स्वरदानकर्त्ता. Accentuā'tion, Accenting *n.* ( v. V. T. I. )-*act.* सस्वरोच्चारण *n*, स्वरयुक्तोच्चारण *n.* -*state.* स्वरप्राप्ति *f*, स्वरितता *f*, स्वरयुक्तता *f. a.* or *s.* स्वरयुक्तोच्चार *m.* २ (v. V. I.)-*act.* स्वर देऊन-स्वरानें-सस्वर-स्वरयुक्त बोलणें *n*-उच्चारणें *n*-&c., स्वरोच्चार *m*, स्वरोच्चारण *n*, स्वरदान *n*, स्वरपालन *n*, प्लुतोच्चारण *n*, सस्वरोक्ति *f*, सस्वरकथन *n*, सस्वरपठण *n*, स्वरयुक्तोच्चारण *n*, स्वरयुक्तोक्ति *f*. Acute accent उदात्त स्वर *m.* Attention to accent गुरुलघुविचार *m.* Circumflex A. स्वरितस्वर *m.* Grave A. अनुदात्तस्वर *m*, प्लुतस्वर *m.* Pleasing A. सुस्वर *m.* Soft, gentle, &c. A. कलध्वनि *m*, कलस्वर *m*, कलरव *m.* Tremulous or broken A. भग्नस्वर *m*, सकम्पस्वर. Accent'ual *a.* स्वरध्वनिविषयीं. Accentual'ity *n.* Accent'ually *adv.* Accent'uate *v. t.* see Accent *v. t.* Accent'uate *v. i. observe the accent* स्वर *m.* देऊन बोलणें-उच्चारणें-वाचणें-&c.,सस्वर बोलणें-उच्चारणें-&c., स्वरयुक्त बोलणें &c., सस्वरोच्चार *m*-सस्वरोच्चारण *n.* करणें, स्वरदान *n.* करणें, प्लुतोच्चारण *n.* करणें. Accentuated, Accented *p.* ( v. V. T. I. ) सस्वर, स्वरित, स्वरानें-उच्चारलेला-म्हटलेला-वाचलेला-&c., सस्वरोच्चारित, सस्वरोक्त, सस्वरोदित, सस्वरपठित, सस्वरकथित, स्वरयुक्त-उच्चारित-उक्त-उदित-कथित-&c., स्वरगत, स्वरप्राप्त, स्वरयुक्त, जातस्वर, स्वरविशिष्ट, स्वरान्वित. २ स्वराची खूण-स्वराच्या खुणा-&c.-दिलेला-केलेला.

Accept (ak-sept') *v. t.* [ L. *ad*, to, & *capere*, to take.] *receive kindly* घेणें, स्वीकारणें, कृपा करून घेणें, ग्रहण *n.* करणें *g. of o.*, मान्य-गोड करून घेणें, मानून घेणें, प्रतिग्रह *m*- स्वीकार *m*- स्वीकरण *n*- ग्रह *m.* करणें *g. of o.* २ ( a bill of exchange ) कबूल करणें, लागू करून घेणें (हुंडी), सचकारणें, सकारणें, आदर *m.* करणें *g. of o.*, पतकरणें; as, To A. a bill of exchange.

Acceptable ( ak-sept'a-bl, ak'sept-a-bl) *a.* (v. V. 1.) घ्याया-चा-सारखा-योग्य-जोगता-जोगा, ग्रहणीय, ग्राह्य, ग्रहणार्ह, ग्रहणोपयुक्त, प्रतिग्राह्य. २ (v. V. 2.) सचकारण्यास योग्य, स्वीकरणीय. I *agreeable* आवडता, मान्य, प्रिय, काम्य, रुचिर, मनोरम. Accept'ableness, Acceptabil'ity *n.* स्वीकारण्याची-घ्यायाची योग्यता *f*-अर्हता *f*, &c., ग्राह्यता *f*, ग्रहणार्हता *f*, ग्रहणोपयुक्तता *f.* I रुचिरपणा *m*, काम्यता *f.* Accept'ably *adv.* ( v. A. I. ) ग्रहण होई असें, पसंत होण्यासारखा, मर्जीस उतरायासारखा, मर्जीमाफक-सारखा-जोगा *a. dec.*, पसंतीनें, यथायोग्य, योग्य. Accept'ance, Accepting *n.* ( v. V. 1. )-*act.* घेणें *n*, मान्य करून घेणें, ग्रहण *n*, स्वीकरण *n*, अंगीकार *m. a.* or *s.* ग्रह *m*, स्वीकार *m*, प्रतिग्रह *m.* २ (v. V. 2.) -*act. law.* सकारणें *n*, सचकारणें *n*, पतकरणें, *a.* or *s.* सकार *m*, आदर *m*, सचकार *m*, सकराई *f.* [CHARGE FOR A. सकराई *f*, हुंडणावळ.] Accept'ancy *n.* घेण्याची-स्वीकारण्याची इच्छा *f.* Accept'ant *n.* Also *a.* स्वीकारणारा, सकारणारा, सचकारणारा, घेणारा. Acceptā'tion *n.* सत्कारपूर्वक स्वीकार. २ शब्दाचा रूढार्थ *m*, मुख्यार्थ, शक्यार्थ, शक्तिग्रह *m*, अर्थबोध *m*, आशय *m.* The common or popular A. रूढि *f*, प्रवृत्ति *f*, बहुमत *n.* Accepted *p.* ( v. V. 1.) घेतलेला, ग्रहण केलेला. स्वीकार-&c.-केलेला, गृहीत, स्वीकृत, प्रतिगृहीत, उपात्त. २ ( v. V. 2. ) सकारलेला-सचकारलेला-आदर केलेला, पतकरलेला, आदृत. [TO BE A. पटणें, सकारणें, सचकारणें.] I *received by grace, favoured* अनुगृहीत. Accept'er, Accept'or *n.* (v. V. 1.) घेणारा, ग्रहण करणारा, ग्राहक, स्वीकार-प्रतिग्रह-&c.-करणारा, ग्रहण-स्वीकार-&c. -कर्त्ता, प्रतिग्राहक, प्रतिग्राही, प्रतिग्रहिता. २ सकारणारा, &c., सकार-सचकार-आदर-&c.-करणारा. Accepting service *law* बजावणीचा स्वीकार करणें, बजावणी कबूल करणें. २ कुळाच्या वतीनें नोटीस किंवा इतर कागदपत्र वकिलानें घेणें. Eccl:—to accept the person:—अनुग्रह करणें. Clean acceptance सचकरणाऱ्याची परंतु फक्त सही असलेली हुंडी ( ह्यांत इतर काहींच शर्ती लिहिलेल्या नसतात ).

Access ( ak'ses, ak-ses') [ L. *ad*, to, & *cedere*, to go.] *n. coming to* जाऊन पोहोंचणें, येणें *n*, पावणें *n*, आगम *m*, आगमन *n*, आगति *f*, आयान *n*, उपागम *m.* २ *way of coming to* द्वार *n*, वाट *f*, मार्ग *m*, जाण्यायेण्याचा मार्ग *m*, आगमन-मार्ग-पथ *m*, आयानपथ *m.* ३ *liberty of coming to* गति *f*, प्रवेश *m*, येण्याची मोकळीक-परवानगी *f*-आज्ञा *f*, &c., मुक्तद्वार *n*, आगमाज्ञा *f.* ४ वृद्धि *f.* ५ (of fever, fit ) रोगाची पुनरावृत्ति *f*-उलट *f*-चढ *m*, भरती *f*, भरतें *n*, भरून येणें *n*, आवेश (?) *m.* (esp. in comp. as ज्वरावेश, क्रोधावेश, &c.), प्राप्ति *f*; or संप्राप्ति *f.* ( esp. in comp. as ज्वरप्राप्ति, ज्वरसंप्राप्ति &c.) Accessibil'ity *n.* v. Accessibleness. Access'ible *a.* (v. V. I.) याया or पावाया-चा-योग्य-जोगा-जोगता, आगम- &c. -व्हायाजोगता, यायास सोपा, आगम्य, गम्य, सुगम, सुगम्य. I *said of persons*, ज्याची भेट अल्पायासें होते असा, सहज भेटणारा, सुलभ, दर्शनसुलभ, अभिगम्य. Access'ibleness *n.* ( v. A. 1.) यायाची or पावायाची योग्यता *f*-शक्यता-अर्हता *f*.-&c., यायाची सोई *f*, आगम्यता *f*, सुगमता *f*, आयानयोग्यता *f*, सौगम्य *n*, सवघडपणा *m.* Access'ibly *adv.*

Accessary ( ak-ses'ar-i or ak'ses-ar-i ) Same as Accessory.

Accession ( ak-sesh'un ) *n.* *Acceding* to मान्य होणें *n*, कबूल होणें *n*, अनुमोदन *n*-अनुमति *n*- संमति *f.* देणें. २ ( to the throne ) गादीवर बसणें, गादीचा अधिकार येणें-प्राप्त होणें *n*, &c. *in con.*, सिंहासनप्राप्ति *f*, राजासनप्राप्ति *f*, राजपदावाप्ति *f*, छत्रचामरोपलब्धि *f*, (राज्य) प्राप्ति, अधिकारप्राप्ति. ३ *increment* वाढ *f*, वृद्धि *f.* ४ नवीन सामील करणें. ५ *med. the invasion, approach or commencement of a disease, a fit or paroxysm* रोगाचा भर *m*, रोगाची सुरवात *f*, लहर *f*, चक्कर *f*, घेरी *f.* ६ जोड (लाभ) *m.* ७ *law* एखाद्या जागेंत वाट केली अगर तिचें मूळरूप न बदलतां तिला

आणखी वस्तु जोडल्या तर त्याबद्दल सदर वाट इत्यादींवर हक्क पोंचणें *n.*

Accessory, Accessary (ak'ses-sor-i) *a.* & *n.* *assistant to a crime* (*law*) सामील, मदत करणारा, मिलाफी, कुसहाय (?). २ *helpful, contributive* सहाय, सहकारी, उपकारक, उपकारी, उपयोगी, उपयुक्त, उपकर्त्ता, साग्या, मिलाफी. ३ मुख्य वस्तूस सहाय्यभूत होणारी (वस्तु) *f,* उपयोगी. ४ अंगभूत असणारी वस्तु *f.* ५ *pl.* जोडवस्तु *f,* बरोबर लागणारें सामान *n.* ६ *bot.* गौण, अपर, अधिक.

Accidence (ak'sid-ens) *n.* the part of grammar treating of the inflections of words because these changes are 'accidentals' of words and not "essentials." वाक्यांगविचार *m,* शब्दविचार *m,* व्याकरण-पूर्वांश *m,* व्याकरणाचा पहिला भाग *m.* (Syntax वाक्यरचना हा व्याकरणाचा दुसरा भाग आहे).

Accident (ak'sid-ent) [L. *ad,* & *cadere,* to fall.] *n.* *non-essential quality or mode; circumstance* आगंतुकधर्म *m,* आहार्यधर्म *m,* असहजधर्म *m,* अमूलधर्म *m,* कृत्रिमधर्म *m,* आगंतुक गुण *m,* अस्वाभाविक गुण *m, log.* उपाधि *f,* अनावश्यक धर्म *m.;* as, कागदाचा पांढरेपणा. २ *chance, casualty* योग *m,* संयोग (??) *m,* मध्येंयोग (??) *m,* दैवयोग *m,* यदृच्छा *f,* अज्ञात-कारणत्व *n.* [By A. दैवानें, दैवयोगेंकरून. By rare A. कर्मधर्मसंयोगानें.] ३ *a casual occurrence* दैवानें घडून आलेली गोष्ट *f,* दैवघटित गोष्ट *f,* दैवसिद्ध गोष्ट *f,* दैवकृत्य *n.* ४ *disaster* अवचट *n,* अनिष्टापात *m,* अरिष्ट *n,* आदान *n,* आदावत (?) *f.* ५ *pl.* जडजोखीम *n.* Fatal A. अपघात *m.* In case of A. जडजोखीम पडल्यास. Accident'al *a.* (v. N. I.) *non-essential* आगंतुक, आहार्य, असहज, असहजसिद्ध, आरोपित(?), अस्वाभाविक. २ *chance, casual, contingent* आगंतुक, असांकेतिक, दैवजात, दैवयोगिक, दैवनिर्मित, दैवहेतुक, दैवोपस्थित, दैवागत, दैवघटित, यदृच्छाजात, यदृच्छाभूत, अकारणोद्भव, निर्हेतुकोत्पन्न, अनिमित्तोत्पन्न, यादृच्छिक, अचिंतित, आपत्तिक, अकल्पित, अनिश्चित, काकतालीयन्यायवत्. ३ अप्रकृत *n,* असहज घडणारी गोष्ट *f.* Accident'alism, Accidental'ity *n.* Accident'ally *adv.* (v. A. I.) आगंतुक धर्मानें, आहार्यधर्मेंकरून, आगंतुकत्वपूर्वक. २ दैवयोगेंकरून, दैवानें, दैववशात्, दैववशें, दैवें, यदृच्छेंकरून, दैवात्, अदृष्टवशात्, अकस्मात्, काकतालीयन्यायानें. Accidentalness *n.* (v. A. I.) आगंतुकत्व *n,* आहार्यता *f,* आरोपितत्व (?) *n,* अस्वाभाविकत्व *n.* २ दैवयोग *m,* यदृच्छा *f,* दैवघटितत्व *n.* Accidental chords *mus.* स्वरमेळांत विसंवाद स्वर उत्पन्न करणाऱ्या तंत्री (तारा). A. colour औपाधिक रंग. A. feature औपाधिकधर्म. A. images *opt.* आगंतुक प्रतिबिंबें. A. light *paint.* औपाधिक प्रकाश. A. points आगंतुक बिंदु. A. vanishing point अनिश्चित अंतर्हित बिंदु.

Acclamation (ak-klam-ā'shun) [L. *ad,* & *clamare,* to shout.] *n.* आनंद-पसंती-संमतिदर्शक जनसमूहानें केलेला गजर *m,* जयजयकार *m,* जयघोष *m,* जयशब्द *m,* एकगजर *m,* प्रशंसोद्गार *m,* धन्यवाद *m.* Acclaim' *v. t.* and *n.* धन्यवाद करणें. Acclam'atory *a.* जयजयकार दर्शित करणारा.

Acclimate (ak-kli'māt) *v. t.* See Acclimatize.

Acclimatize (ak-klīm'at-īz) [Fr. *acclimater,* to acclimate.] *v. t. habituate or inure to a climate not native* परदेशच्या हवेच्या संवयीचा-सात्म्याचा-&c.-करणें. Also Acclim'ate. Acclimated, Acclimatized *p.* and *a.* (v. V.) परदेशच्या हवेच्या संवयींचा केलेला, &c. To be A. परदेशच्या हवेशीं सात्म्य होणें, हवेचा रावता *m.* -राव *m.* पडणें, *all with* स or ला *of s.* हवा *f-* &c.- शरिरास-प्रकृतीस मानून जाणें-परिचयानें-संवईनें मानवणें, हवा *f.* आंगवळणीं पडणें. Acclimatisā'tion *n.* Also Acclimā'tion, Acclimatā'tion *n.* हवा आंगवळणीं पडणें *n.*

Acclivity (ak-kliv'i-ti) [L. *ad,* to, & *clivus,* a slope.] *n.* चढण *f,* चढ *m.* २ *rising ground* चढण *f,* चढाव *m,* घाटी *f,* डाग *m.* (*obs.*). Accli'vous *a.* चढता, चढावाचा, चढणीचा, चढता. also Accliv'itous.

Accomodate (ak-kom'mod-āt) [L. *ad,* to, & *commodus,* fitting.] *v. t. supply with convenience* सोयी(य) करणें, बेगमी or बेजमी *f.* करणें, गरज *f.* चालविणें. २ *adapt* जमा *m* -जवा *m*-जुगल *f*- जुळणी *f*- &c.- बसविणें-पाडणें-घालणें-करणें, जमवणें, जुळेलसें करणें, जुळवून घेणें. ३ *reconcile* जमवणें, जुळणी *f*-जम *m*- मेळ *m*-समेट *m*- मिलाफ *m*-घालणें-करणें-करून देणें. ४ पुरवणें, अडचण *f.* दूर करणें -भागविणें. ५ *com.* हमी *f.* देणें. Accom'modating *a.* सोय करून देणारा, &c. २ भिडस्त. Accommodā'tion *n.* राहण्याची-जाग्याची-बिऱ्हाडाची सोय *f.* २ मिलाफ *m,* मेळ *m.* ३ *com.* पैसे उसने देणें *n.* ४ *law* तोडजोड *f.* Accom'modative *a.* सोय करणारा, जम बसवणारा, मेळ घालणारा, &c. Accom'modativeness *n.* Accom'modator *n.* सोय करणारा, गरज पुरविणारा, &c. Accommodation bill अनें बला दिलेल्या पैशाच्या तारणासाठीं बनें कंवर दिलेली हुंडी, अशा हुंडींत कच्चा अजवळ असलेल्या पतीबद्दल बला फायदा मिळतो. पैशाच्या सोईकरितां तिसऱ्यानें हमी दिलेली हुंडी *f.*

Accompany (ak-kum'pan-i) [L. *ad,* to, & *compagnon,* a companion.] *v. t. go or come with* बरोबर-संगें (R)-संगतीं (R) or-तें-समागमें-सहित-&c.- जाणें-येणें-चालणें &c., सहगति *f*-सहगमन *n*-साहचर्य *n*- सहचरत्व *n.* करणें. २ संगें (R)-संगतीं (R)-समागमें-&c.- बराबर असणें-राहणें, संगतींत असणें with *g. of o.,* संग(?) *m*-समागम *m*-सहवास *m*-सोबत *f.* करणें, संघट्टणें (*poe.*), सहस्थिति *f*-सहवर्त्तमानत्व *n.* करणें, साथ *f.* करणें. Accompanying *p. a,* Accom'panier *n.* (v. V. 1.)—*act.* बरोबर जाणारा-येणारा-चालणारा, सहगति-

सहगमन (S)-&c.-कर्त्ता, सहगामी, सहचर, सहचारी, सहचरित, अनुषंगी, आनुषंगिक. २ बरोबर-&c.-असणारा-राहणारा, संगति-साथ-समागम-सहवास-&c.-करणारा, सहवासी, संगी (esp. in comp. as सत्संगी, साधुसंगी, दुष्टसंगी), सोबती, साथी, सहस्थित, सोबत धरणारा, अनुषंगी, आनुषंगिक, समवेत-समेत. Accompanying, Accom'paniment *n.* (v. V. 1.)–*act.* बरोबर-&c.-जाणें *n*-येणें *n.*, सहगति *f*, सहगमन *n* (*liter*). &c. २–*state.* बरोबर-&c.-असणें-राहणें *n*, संगति *f*, संग *m*, सहस्थिति *f*, अनुषंग *m*, समवस्थान *n.* I संगें असणारी-आनुषंगिक वस्तु *n*-विषय *m*-पदार्थ *m*-कर्म *n*-साधन, उपकरण. II स्वरांचा मेळ *m.* III साथ *f.* Accom'panist *n.* *mus.* साथ करणारा.

Accomplice (ak-kom'plis) [L. *ad*, to, *con*, with & *plicere*, to fold.] (*an associate esp.* in crime) in modern use (with *of* and *with* before a person and *in* or *of* before the crime). *n.* साथी *m*, मदतनीस *m*, साग्या *m*, सोबती *m*, मिळणीचा मनुष्य *m.* २ *law* (गुन्ह्यांतील) साथीदार-मिलाफी *m.* Accomplices (*generally*) सागेलागे *m. pl.* Accomplicity *n.* साथ *f*, मदत *f.*

Accomplish (ak-kom'plish) [L. *ad*, to, & *complere*, to complete.] *v. t. complete, consummate, effect* संपादन करणें, साधणें, साधन करणें, संपादणें, झेपणें, जोडणें, पेलणें, उरकणें, उलगडणें, अटपणें, आटपणें, आटोपणें, निभावणें, निर्वाहणें [R], निर्वाह करणें (R), अनुष्ठणें, साध्य करणें, तडीस-थडीस-लावणें-नेणें-आणणें-घालणें-पोंहोचणें-पोंहोचवणें-&c., संपवणें, पार *adv.* पाडणें, तरीपार करणें, शेवटास नेणें, बजावणें, पूर्ण-संपूर्ण-सिद्ध-&c.-करणें, सिद्धीस नेणें, परिणामास आणणें, सर करणें. २ *complete as time, distance* भरणें, पूर्ण-पुरा-पुरता-समाप्त-&c.-करणें. ३ *fulfill as prophecy* पूर्ण-पुरा-&c. करणें, सत्य करणें. ४ *attain, obtain* संपादणें, संपादन करणें, साधणें-मिळवणें, प्राप्त करणें. ५ *polish* गुणसंपन्न-गुणान्वित-करणें, गुणांनीं मंडित करणें. ६ *equip thoroughly* पुरतेपणीं सज्ज करणें; as, To A. the knights. *Shakes.* Accom'plishable *a.* (v. V. I.) साधाया-चा-जोगता-जोगा-&c., साध्य, (used abundantly in comp. as *easily* A. अल्पसाध्य, अनायाससाध्य. *hardly* A. अतिश्रमसाध्य, अतिकष्टसाध्य, and धनसाध्य, ज्ञानसाध्य, बलसाध्य, शौर्यसाध्य, पराक्रमसाध्य, धैर्यसाध्य, हस्तसाध्य, &c.) संपादनीय. २ (v. V. 2.) भराया-चा-&c., पूर्ण कराया-चा &c. ३ (v. V. 3.) पुरवाया-चा &c., पूर्ण कराया-चा &c. ४ (v. V. 4.) साधाया-चा-&c., संपादनीय, साध्य, प्राप्य, प्राप्तव्य. ५ (v. V. 5.) गुणसंपन्न-गुणान्वित करण्याजोगा. ६ (v. V. 6.) पुरतेपणीं सज्ज करण्याजोगा. Accom'plished *p.* (v. V. I.) साधलेला, झेपलेला, उरकलेला, तडीस नेलेला, &c., समाप्त, साध्य, साधित, सिद्ध, संपादित, संपन्न, समापन्न, निष्पादित, निष्पन्न, संस्थित, प्रतिष्ठित (R). [To BE ACCOMPLISHED तडीस-थडीस लावणें-येणें-जाणें-पोंहचणें, पार *adv.* पडणें, तरीपार *adv.* होणें, शेवटास येणें.] २ (v. V. 2.) पुरा-पुरता-केलेला-झालेला, पूर्ण, संपूर्ण, भरलेला &c. ३ (v. V. 3.) पूर्ण, पूर्ण केलेला-झालेला. ४ (v. V. 4.) संपादित, साध्य, मिळवलेला, प्राप्त, आराधित. ५ गुणी, गुणाढ्य, गुणिजन, चतुरस्र, अष्टपैलू, कुशल, बहुगुणी, गुणसंपन्न, सकलगुणसंपन्न, कलाकुशल, अभ्यासप्रवीण, सर्वसिद्ध, दीक्षित (R), सिद्ध, तरबेत (द). ६ सज्ज केलेला. I स्थापित, पुरा घडलेला (an A. fact). Accom'plisher *n.* (v. V. I.) साधणारा, &c., साध्य करणारा, तडीस लावणारा-नेणारा, &c., तड लावणारा, साधक, संपादक, संपादणारा. २ (v. V. २.) भरणारा, पूर्ण करणारा. ३ (v. V. 3.) पूर्ण-सत्य-पुरा-करणारा. ४ (v. V. 4.) संपादणारा, &c., संपादनकर्त्ता, संपादक. Accom'plishment *n.* (v. V I.)-*act.* साधणें *n*, तडीस नेणें *n*, &c., साधन *n*, साधणूक *f*, संपादन *n*, निष्पादन *n*, समापन *n*, आसादन *n.*-*state.* संपादणूक *f*, समाप्ति *f*, सिद्धि *f*, सिद्धता *f*, निष्पत्ति *f*, इतिश्री *f*, संस्थिति (R) *f*, कृतार्थता *f*, कृतकृत्यता *f.* [A MEANS OF A. साधनसूत्र *n.* A. OF AN UNDERTAKING साध्यसिद्धि *f.*] २ (v. V. २.)-*act.* भरणें *n*, पूर्ण-&c.-करणें *n*, पूरण *n.* -*state.* भरती *f*, भरलेपणा *m*, पूर्णता *f*, पूर्णत्व *n.* ३ (v. V. ५.) शोभा *f*, अलंकार *m*, भूषण *n.* ४ गुण *m*, कसब *n.* I गुणित्व *n*, निपुणता *f*, प्रवीणता *f.* 2 प्राप्ति *f.* Accomplishments-compreh. कळाकुसरी *f. pl.*, नैपुण्य *n.*

Accord (ak-kord') [L. *ad*, to, & *cor*, *cordis*, the heart. To Accord literally means to bring heart to heart.] *v. t. grant* योग्य ह्मणून देणें, बक्षिस देणें; as, To A. to one due praise. २ *reconcile. law.* तडजोड करणें, तोड काढणें, निवाडा करणें. ३ *agree* मेळ बसवणें. *v.i. agree*, जुळण्याजोगें असणें, मिळणें, जमणें, बसणें, बनणें, संभवणें, (with *with*). २ *To be in harmony. mus.* एका सुरांत असणें, एका सुरांत होणें. Accord *n. union of heart* संमति *f*, अनुमति *f*, एकदिल *n*, एकचित्त *n*, एकमत *n*, मिलाफ *m*, एकोपा *m*, ऐक्य *n*, लय *f*, एकतानता *f*, एकसूर *m.* २ एखादी क्रिया करण्यापूर्वी होणारी स्वाभाविक प्रेरणा *f.* [WITH ONE A. एकचित्तानें, एकमतानें, एकाचित्तानें-एकामतानें, एक-एकाबुद्धीनें, एकाजुटीनें, एकादिलानें.] ३ *mus.* सुराची जुळणी *f*, स्वरमेळ *m.* ४ *law.* वादी-प्रतिवादींमध्यें झालेली तडजोड *f* (जी अमलांत आली असतां खटला पुढें चालत नाहीं). ५ *agreement* मेळ *m*, जम *m*, जमाव *m*, बनाव *m.* ६ own A.; *spontaneous agreement with* स्वसंतोष *m*, आपखुशी *f.* of one's own A. आपलेआपण, आपआपसांत, आपोआप, आपआप, आपशांच or आपशेंच (*obs.*), स्वतः (*pop.*) स्वतां, सुखासंतोषानें, सुखासमाधानानें, सुखासुखीं, आत्मसंतोषानें, राजीखुशीनें. Accord'ance, Accord'ancy *n. agreement–state.* मेळ *m*, जम *m or* जमाव *m*, बनाव *m*, एकमत *n*, सम्मति *f*, अन्वय *m*, अनुरोध *m.* In A. with अन्वयें, अन्वयानें, अनुरोधानें, बेतानें, बरहुकुम, प्रमाणें. Accord'ant *a.* Accord'ing *p. a.* (v. V. I. 1.) मिळणारा, &c., मिलाफाचा, बेताचा, अनुकूल, माफक. २ Accord'ant, According, Accord'antly,

Accord'ingly, *conformable, conformably.* N. B. The word *according* by itself is never a preposition in English but the same word, *According*, when coupled with the preposition *to*, becomes a prepositional phrase, and is rendered into Marathi as a preposition प्रमाणें (in comp. as ह्याप्रमाणें, त्याप्रमाणें, मोलाप्रमाणें, &c.), सारखा (?) (in comp. as मालासारखा, केल्यासारखा &c.), बरहुकुम, बमुजीब (*obs.*), माफक, अनुरूप (in comp. as आज्ञानुरूप, कालानुरूप, देशानुरूप, तदनुरूप, &c.), अनुसार (in comp. as श्रमानुसार, सामर्थ्यानुसार, गुणानुसार &c.), यथा (in comp. as यथान्याय, यथाविधि, यथाशक्ति, &c.), परत्वें or परत्वेंकरून (in comp. as ज्ञानपरत्वें or परत्वेंकरून, वयपरत्वें, गुणपरत्वें, &c.), परी (?) in the sense of प्रमाणें or सारखा (in comp. as वडिलांपरी, लेंकरांपरी, &c.), अनुलक्षून (lit. regardingly, observingly, advertently; as योग्यता अनुलक्षून काम सांगणें), वारीं (?) in the sense of प्रमाणें or सारखा (in comp. as तृणावारीं मोजणें, पाण्यावारीं खरचणें, &c.), गत (?) (in comp. as वेड्याचे गत), यथावत्. According to one's power, यथाशक्ति *f.* Accord'ingly *adv.* ह्याप्रमाणें, बरहुकूम, &c. *Accordingly to* is an error.

*N. B.*—In the above renderings of the English word "According" by "सारखा," "परी," "वारीं," "गत," we have put signs of doubt before these words to signify that these renderings are not correct or are at least extremely doubtful according to the present usage of the Marathi language. There is one sense of सारखा meaning प्रमाणें where it is rendered into English by "According to"; as, Goods according to sample नमुन्यासारखा माल. But in all other senses सारखा is rendered into English by, like, as, &c.

Accordion (ak-kor'di-on) *n.* एक प्रकारचें वाद्य *n.* (A small, portable, keyed wind instrument whose tones are generated by play of the wind upon free metallic reeds).

Accost (ak-kost') [L. *ad*, to, & *costa*, a rib, a side.] *v. t. speak to first*, greet. प्रथम-आदीं बोलणें, संबोधणें (poe.), प्रागभाषण *n*-आदिभाषण *n*-करणें, दुसरा आपणास न विचारण्यापूर्वीं आपण विचारणें, हाक *f.* मारणें, हटकणें, नमस्कार-सलाम *m.* करणें. Accost', Accost'ing (*obs.*) *n.* आदिभाषण *n.* Accost'able *a. easy of access* बिनआयासें हाक मारतां येईल असा-संबोधण्याजोगा-&c.

Accoucheur (ak-kōō-shėr') [L. *ad* & Fr. *coucher* to lie or lay down.] *n.* प्रसूतिवैद्य *m*, प्रसूतिकाळीं सुटका करणारा शस्त्रवैद्य *m*, प्रसवकारी वैद्य *m.* Accouchment (ak-kōōsh'mong) *n.* प्रसूति *f*, प्रसवक्रिया *f.* Accoucheuse (ak-kōō-shėz') *fem.*

Account (ak-kownt') [L. *ad.* to, & *computare*, to reckon.] *v. t. reckon, regard* गणणें, लेखणें, मोजणें, मानणें. २ जमा धरणें, खातर करणें. ३ किंमत करणें, मानणें. ४ कथन करणें. A. *v. i.* (with for); *assign causes* कारण *n.* सांगणें, प्रयोजनवर्णन *n*-इतिकृत्योपदेश *m*-इतिक्रियानिरूपण *n*-बीजनिर्देश *m*-&c.-करणें. २ (with for); *answer for* हिशेब *m*-जाब *m*-मोसबा *m*-झाडा *m*-&c.-देणें. ३ योग्य खुलासा करणें. ४ तपशील *m*-वृत्तांत *m*-देणें, स्पष्टीकरण *n.* करणें. ५ जोखीम-जबाबदारी घेणें. Account *n.* (of debts, expenses, costs.) हिशेब or हिशोब m, जमाखर्च *m*, मोसबा *m*, मोजणी *f*, गणती *f*, आयव्यय *m.* [There are certain *Lines* drawn in *Papers of* accounts; and these have particular significancies and particular names. Some are अज, अडांख, एकुणात, दुकारी, बीत, वासलात, हिशेब-हिशोब or हिशेब कितेब. Abstract or general A. आढा(डा)वा. Framing of it सदर घडणी *f.* Budget or bag of accounts रुमाल *m.* Current A. चालता-चालू हिशेब *m*-जमाखर्च *m.* Belonging or relating to accounts जमाखर्ची, जमाखर्चाचा, हिशे(शो)बी, हिशे(शो)बाचा. Payment-side (credit-side) of an A. खर्च *m*-नांवें बाजू. To enter (an item) upon it खर्चांत लिहिणें, नांवें मांडणें. Receipt-side (Debit-side) of an A. जमा *f*-बाजू. To commit or enter upon it जमा धरणें-करणें, जमेस धरणें. Rough A. कच्चा आकार *m*, कच्चा हिशोब *m*, कच्चा खरडा *m.* Rough entry into an A. कच्च्या खरड्यावर नोंद, कच्ची नोंद. Running A. चालू खातें *n*, अलाल हिशेब *m*, अलालनामा *m.* Balance of an A. उधार, बाकी. That has an A. with खातेवाईक, खातेवाला. To balance an A. शिलकझाडा *m*-काढणें-उतरणें, खातेबाकी-बाकी *f.* काढणें, तोंडमिळवणी करणें. To call to A. *fig.*-हिशोब *m*-झाडा *m*-झडती *f*-झाडाझडती *f*-&c.-घेणें, पाहून घेणें, पुसून घेणें (idio.), पुसणें (idio.). To clear A.s झाडा *m*-झडती *f*-&c.-काढणें, फडशा *m.* करणें, फारीख *f*-दफेरफे or रफेदफे *f.* करणें, बाकी *f.* पूज्य करणें. To have an A. with खातें *n.* असणें, *g. of s. recipr.* To make up and settle accounts or an A. वजावाट *f*-फडशा *m.* करणें. To put to the A. of च्या नांवीं-नांवावर-नांवें लिहिणें-मांडणें, च्या खातीं-खात्यावर लिहिणें-मांडणें-धरणें. To turn to A. कारणीं-कार्यास लावणें, फळास-लाभास आणणें, फायदेशीर उपयोग करून घेणें, and *v. i.* कामावर पडणें, कामास येणें, फळास-लाभास येणें.] २ *regard, estimation* हिशेब *m*, लेखा *m*, गणती *f*, किंमत *f*, मजकूर *m*, खिसगणती *f.* (*neg. con.*) केवा *m.* (*neg.* con.) ३ *narrative, statement, relation, story* इतिहास *m*, मजकूर *m*, हालहवाल *f*, गोष्ट *f*, कथा *f*, अहवाल *m*, वाका (*obs.*) *m*, हकीकत *f*, बयाणा(ना) *m*, खबर *f*, वृत्तांत *m*, वृत्तकथन *n*, वृत्तवर्णन *n*, इतिहासाख्यापन *n*, वार्ताकीर्तन *n.* [Accounts बातमी *f*, खबर *f*, वृत्तांत *m*, वृत्त *n.* Accounts of emissaries अखबा(ब)र *f.* Detailed A. तपशील *m*, बाबत *f.* True and exact A. यथार्थ हकीकत, इत्थंभूत कथन *n*, इत्थंभूत निरूपण *n.* Written A. हकिकतनामा *m.*] ४ *explanation, assignment, of causes* निर्वचन *n*, हेतुक-

थन *n*, निदानकथन *n*, बीजनिर्देश *n*, कारणाख्यापन *n*, प्रयोजनवर्णन *n*, इतिकृत्योपदेश *m*, एवंविधा *f*, इतिक्रियानिरूपण *n*. ५ *ground* निमित्त *n*, कारण *n*, सबब *f*. [On A. of मुळें (ex. ह्यामुळें, पावसामुळें &c.), साठीं, करितां, बाबत, बाबें, पायीं, निमित्त (ex. लबाडीनिमित्त मारलें), अर्थीं, अर्थ (in comp. with *Sanskrit* words, as एतदर्थ, तदर्थ, &c.), प्रीत्यर्थ. On that A. त्यामुळें-स्तव-कारणें. On this account ह्यामुळें, ह्यास्तव, अतःकारणात्. On any A. कांहीं झालें तरी, कोणत्याही रीतीनें.] ६ *invoice, inventory, catalogue* याद *f*, मोजदादीची याद *f*, झडती (R) *f*. [To take an A. झडती *f*-टीप *f*. घेणें, मोजदास्त(द) *f*-गणना *f*-याद *f*. करणें.] ७ फायदा *m*. ८ योग्यता *f*, लायकी *f*, किंमत *f*, महत्व *n*. as, men of A. योग्यतेचे गृहस्थ. Account'able *a*. (v. V. I. 1.) वाच्य (S), ज्याची हकीकत-कारण सांगतां येईल असा, निर्वचनीय, निरूप्यकारण, निर्वाच्यबीज, निर्देश्य, आख्यापनीय. २ (v. V. I. 2.) *answerable* हिशेब-जाबमोसबा-&c.-देणारा, जबाबदार, जोखीमदार, मोसबेदार, उत्तर देण्याचा अधिकारी. To be A. for मोसबा *m*. माथ्यावर असणें *g. of s.* Account'ableness, Accountabil'ity *n*. (v. A. २.) मोसबेदारी *f*, जबाबदारी *f*, उत्तर देण्याचा अधिकार *m*. Account'ably *adv*. Account'ancy *n*. हिशेबनिसाचें ऑफिस-काम *n*. Account'ant *n*. हिशे(शो)बी *m*, गणक *m*, फडनवीस *m*, अकाउंटंट *m*, जमाखर्चाची पूर्ण माहिती असणारा. [A village A. तलाठी m. Accurate and exact A. संख्यावित् *m*, कोरड्या टांकानें हिशेब करणारा-देणारा, &c.] २ *Keeper of accounts* मोसबेदार *m*, हिशेबदार *m*, हिशेबनीस *m*, फडनवीस (?) *m*. Account'antship *n*. अकाउंटंटाचा हुद्दा *m*-नोकरी. Account'-book *n*. खातेवही *f*, वही *f*, चोपडी *f*, हिशेबाची वही *f*. Account-sales दुसऱ्यानें आपल्याकडेस विक्रीकरितां ठेविलेल्या मालाच्या विक्रीचें टिपण *n*- याद *f*. For the account खात्यावर (हा खातेवारी हिशेब दर पंधराव्या दिवशीं किंवा महिन्यानें ठरवितात). In Account with (शीं) खातें असणारा. On account of कारणें, मुळें, साठीं, स्तव. On no A. कोणत्याही सबबीवर न (करूं देणें). To check an A. जमाखर्च तपासणें. To clear A.s बाकी शून्य करणें, सर्व फेड करणें. To cook, doctor or garble accounts फसविण्याच्या हेतूनें जमाखर्चांत फेरफार करणें. To make A. of महत्व देणें, गणणें. To make no A. of खिसगणतींत नसणें,-विषयीं बेपरवा असणें. To open an A. (पेढीवर अथवा दुकानावर प्रथम पैसे भरून) खातें सुरू करणें. To pay on A. खात्यावर पैसे भरणें. २ उधार देणें. To take into A. लक्ष्यांत घेणें. To take no account of दुर्लक्ष्य करणें, लक्ष्यांत न घेणें, लक्ष्य न देणें.

Accoutre (ak-kōō'tėr) [L. *ad*, to, *con*, together, & *suere*, to sew.] *v. t. equip with arms* (?), लष्करी पोषाख देऊन हत्यारबंद करणें (?), हत्यारबंद (हतेरबंद)-शिलेपोस्त (पोस)-शिल्याभाल्यानिशीं सिद्ध (सज्ज)-आयुधसज्ज-आयुधसिद्ध-सायुध-सशस्त्र-&c.-करणें (?). २ (*with dress, trappings*) *equip* सजवणें, सजणें, सज्ज करणें *c. of o.*, संजोगणें. Accou'tred *p*. (v. V. २.) सजलेला, &c., सज्ज, सज्जित, सज्जीकृत, सज्य, कडीकोट, कडेकोट. Accoutredness *n*. (v. P. I.) हत्यारबंदी (?) *f*, कडीकोट तयारी *f*. २ (v. P. २.) सिद्धता *f*, सज्जता *f*. सजलेलेपणा *m*, सज्जता *f*, सज्जितत्व *n*. Accou'trements *n. pl. trappings*, gener. साज *m*, सरंजाम *m*, संच *m*, उपकरणें *n*, &c. २ *trappings of war* लढाईचा सरंजाम *m*, युद्धोपकरणें *n. pl*, युद्धोपसाहित्यें *n. pl*. Accoutring *n*. (v. V. I.).—*act*. हत्या(ते)रबंद करणें (?) *n*, &c., सायुधीकरण (?) *n*. २ (v. V. २.)—*act*. सजवणें *n*, &c., सजवणी *f*, सज्जीकरण *n*, सजन *n*, सज्जना *f*, ससामग्रीकरण *n*, सोपकरणीकरण *n*.

*N. B.*—According to Dr. Murray "Accoutre" means simply to "equip" and Accoutrements *milit.* means the equipments of a soldier other than arms and dress.

Accredit (ak-kred'it) [L. *ad*, to, & *credere*, to trust.] *v.t.* (एखाद्या मनुष्यावर) भरंवसा ठेवणें, विश्वास टाकणें. २ (गोष्ट) खरी मानणें. ३ *give authority to* (दुसऱ्यामध्यें) पत उत्पन्न करणें, मुखत्यार-प्रतिनिधी नेमणें, साचपणा *m*-खरेपणा *m*-&c.-आणणें-करणें-देणें-प्राप्त करणें, &c. ४ सहीशिक्क्यानिशीं मनुष्य पाठविणें, शिक्केकट्यारीनिशीं पाठविणें. Accredita'tion *n*. विश्वास-भरंवसा ठेवणें *n*, &c. See Accredit. Accred'ited *pa. p*. मान्य-पसंत केलेला, प्रतिनिधीभूत, &c., &c.

Accrescent (ak-kres'ent) [L. *ad*, in addition & *crescere*, to grow.] *a. bot.* वर्धिष्णु, पुष्पोद्गमानंतर वाढणारा. Accres'cence *n*. उत्तरोत्तर वृद्धि *f*. Accrē'tion *n*. वृद्धि *f*, भर *f*, नवीन भागांची झालेली भरपूर वाढ *f*. २ विस्तार होतांना संयुक्त झालेल्या वस्तु *f*, वृद्धिजनक अभिसंयोग *m*, अन्यसंयोगवर्धन *n*, समुत्थान *n*. ३ *med.* अन्यसंयोगवर्धन *n*. ४ *pol. econ.* अर्थवृद्धि *f*. ५ स्वभावतः निराळया असणाऱ्या भागांचें एकत्र होऊन वाढणें *n*. Accrē'tive *a*. वृद्धिजनक, वाढणारा. Accrete' *a. bot.* संलग्न, संवृद्ध.

Accriminate (ak-krim'in-āt) [Pref. *ad*, & *Criminate*.] *v. t.* दोषारोप करणें, दोष लावणें.

Accrue (ak-krōō') [L. *ad*, to, & *crescere* to grow.] *v.i.* मिळणें, लाभणें, चढणें, उपजणें, लाधणें, लाहणें, पदरीं येणें-पडणें, प्राप्त होणें, राशी-पुंजीस येणें. २ (व्यापारांत) नफा-तोटा होणें. Accruing costs *law* हुकूमनाम्यानंतर झालेला खर्च *m*.

Accumbent (ak-kumb'ent) [L. *ad*, to, & *cumbere*, to lie down.] *a*. (कोचावर) पडलेला-लोटलेला. *bot.* जुळलेला, एकाशीं एक लागलेला, अभितस्थ, आलंबी.

Accumulate (ak-kūm'ūl-āt) [L. *ad*, to, & *cumulus*, a heap.] *v. t. amass* सांचवणें, सांठवणें, गोळा करणें, रास (शि) करणें, ढीग करणें-पाडणें, जोडणें, सांठवण *n*-संचय *m*-संचयन *n*-&c.-करणें *g. of o. v. i. collect, form in a mass* or *quantity* सांचणें, सांठणें, गोळा होणें. २

(-as waters, &c. ) *swell, rise* तुंबणें, चढणें, फुगणें, फूग *f.* धरणें-येणें. ३-business, matters, &c. *increase upon, thicken around* जमणें. Accumulable *a.* (v. V. T.) सांचाया-चा-जोगता-जोगा-&c., संग्राह्य, संग्रहणीय, संचेय. Accumula'ted *p.* (v. V. T.) सांचवलेला, सांठवलेला, गोळा केलेला, &c., संचित, संग्रहीत. २ (v. V. I. 1.) सांचलेला, सांठलेला, सांचीव. Accumulā'tion. *n.* (v. V. T. I.)-*act.* सांचवणें *n*, सांठवणें *n*, &c., सांठवण *n*, संचय *m*, संचयन *n*, संचयीकरण *n*, संग्रहण *n*.-*state.* सांचवलेपणा *m*, संग्रह *m*, संचय *m*, चय *m*, संचितत्व *n*, सांठा *m*, रास *f*, राशि *f*, ढीग *m*, पुंजी *f*, पुंजा *m*, पुंजका *m*. २ (v. V. I. 1.) *a.* or *s.* सांचणें *n*, सांठणें *n*, गोळा *m*. Accum'ulative *a.* ( v. V. I.) *that is accumulated* गोळा झालेला, राशीभूत, राशीकृत, पुंजीभूत. २ (v. V. T.) संग्रहकारी, गोळा करणारा-होणारा. A. judgment *law* एका अपराधाची शिक्षा भोगिल्यानंतर दुसऱ्या अपराधाची शिक्षा चालू व्हावी अशा हुकुमाचा ठराव, शिक्षानुशिक्षाविधायकनिर्णय. Accum'ulative *a.*, Accum'ulator *n.* (v. V. T.) सांठवणारा, सांचवणारा, &c., संचयकर्त्ता-कारी-&c., संग्रह-कर्त्ता-कारी-&c., संग्रही *m*, (आंत) धरणारा. २ *mech.* (विद्युच्छक्ति) संचायक. ३ पुष्कळशा पदव्या जमवून मग एकदम घेणारा.

Accurate ( ak'-kūr-āt ) [ L. *ad*, to, & *cura*, care. ] *a.* *careful in execution, exact, precise, nice* सत्याला धरून असणारा, प्रमाणाला धरून असणारा, सुनिश्चित, सुती, सुतानें काम करणारा, बेतानें काम करणारा, बेतबात्या, बेताबाताचा, खरा, अचूकसंधानी, कडकडीत, सुयंत्र, आटोकाट, सूत्रा (*obs.*), सूत्रक ( *obs.*), सूत्री (*obs.*). २ *carefully executed, exact, correct* तंतोतंत, बरोबर रेखलेला, रेखला ( R ), रेखितसा ( R ), मेजलेला, बराबर, बेताचा, बेताबाताचा, बंदिस्त, बंदिस्तीचा, रजपजचा (*obs.*), सुती, सुतानें केलेला, टापटिपेचा, जंजीरबंद, स्पष्ट, सुयंत्र, ठीक, दुरुस्त, शुद्ध. ३ तंतोतंत, मुद्देसूद, नक्की. ४ कांटेतोल, सूक्ष्म, as, A. balance. ५ चौकस, बारकाईचा, यथार्थ. Ac'curacy *n.*(v.A.I.) सुतीपणा *m*, सूत्रकारित्व *n* (*obs.*), अचूकसंधानत्व *n*, सुयंत्रता *f*, खराई *f*, तवताकपणा ( *obs.* ) *m*, रेखलेपणा *m*, &c. २ ( v. A. ) टापटिप *f*, रेखींवपणा *m*. ३ यथार्थता *f*, सूक्ष्मता *f*, तंतोतंती *f*, मुद्देसूदपणा *m*, बिनचुकपणा *m*, चौकसपणा *m*, बारकाई *f*. Ac'curately *adv.* (v. A. ) सूक्ष्मरीतीनें, टापटिपीनें, सुतानें, दोरीसूत, बराबर, अचूक, बिनचूक. Ac'curateness *n.* See Accuracy.

Accurse ( ak-kurs') [Pref. *ad*, & Curse.] *v. t.* शाप देणें, See Curse. Accurs'ed, Accurst' *a.* शापित, शाप देण्यास योग्य, दुष्ट, शापपात्र, शापास्पद, शापग्रस्त. २ अशुभ, निंदित, निंद्य, गर्हणीय, अमंगळ, ओंगळ, अपशकुनी. A. fate दग्धदैव.

Accusative ( ak-kūz'a-tiv ) *n.* *gram.* द्वितीया विभक्ति *f*, कर्म *n*, कर्मपद *n*, कर्मणिद्वितीया *f*. Accus'atival *a.* द्वितीयाविभक्तीसंबंधीं.

Accuse ( ak-kūz' ) [ L. *ad*, to, & *causa* cause, reason, account. To Accuse is to call to account. ] *v. t.* *charge, impeach, arraign* दोष देणें-लावणें, दूषण *n*-अपराधारोप *m*-अपराधारोपण *n*-दोषारोप *m*-दोषारोपण *n*-दोषाभियोग *m*-दोषाक्षेप *m*-आरोप *m*-अभियोग *m*. करणें, वळवणें ( *obs.* ), दोषणें ( *poe.* ), तोहमत ठेवणें, फिर्याद करणें-मांडणें. २ (falsely) कुभांड रचणें, आळ *f*-बलांट *n*-कुभांड *n*-तुफान *n*-बालंट *n*. घेणें, कैवाड *n*. रचणें-घेणें *with*-वर *of o.*, मिथ्यारोप *m*-मिथ्यापवाद (S) *m*-मिथ्याभिशाप (S) *m*-अपवाद (S) *m*. करणें, डोक्यावर खापर *n*. फोडणें, गळां बांधणें, गळीं पडणें. ३ आळ घालणें (with *of* before the crime or offence). Accus'able *a.* दूषणीय, निंदापात्र, दोष लावावयाजोगा, दूषणार्ह, दोषारोपणीय, दूष्य. Accus'al *n.* See Accusation. Accusā'tion *n.* (v. V. I.)-*act.* दूषणें *n*, &c., अपराधारोप *m*, अपराधारोपण *n*, दोषारोप *m*, दोषारोपण *n*, दूषण *n*, दोषाधान *n*, दोषाभियोग *m*,अभियोग (S)*m*. २ (v.V. २.)-*act.* आळ घेणें *n*, बालंट घेणें *n*, &c., अभिशाप (S) *m*, अपवाद *m*, अपजाळ *f*, मिथ्याभिशाप *m*, अपवाद *m*, कुभांड *n*. ३ आळ *m*, आरोप *m*. ४ गुन्हा *m*. ५ तोहमत *f*. Accusatō'rial *a*, Accus'atory *a.* तोहमतीचा; as, An A. libel. Accuse *n.* *shakes.* See Accusation. Accused' *p.* (v. V. I.) दोष लावलेला, &c., अभियुक्त (S), दोषारोपित, अपराधारोपित, दोषाभियुक्त, &c. &c. २ ( v. V. २. ) आळ घेतलेला, &c., अभिशप्त. ३ गुन्हेगार, आरोपी ( used as a noun). Accuse'ment *n.* आरोप *m*. Accus'er *n*, दोष देणारा *m*, आळ-बालंट घेणारा *m*, आरोप करणारा *m*. २ फिर्यादी *m*, वादी *m*, तोहमतदार *m*.

Accustom ( ak-kus'tum ) [ Fr. *costume*, custom. To accustom is to make a thing customary or habitual or usual or familiar. ] *v. t.* संवय लावणें, संवय-सराव-अभ्यास *m*-राबता *m*-राब *m*-खांद *m*-घसण *m*. पाडणें, -लावणें-घालणें, सरावांत आणणें, चोप *f*. लावणें, अभ्यास *m*. करवणें, वहिवाटीखालीं-घसवटीखालीं-अभ्यासाखालीं-&c. or वहिवाटींत-घसवटींत-अभ्यासांत-&c.-आणणें-पाडणें, परिचित करणें, अभ्यस्त करणें, राबवणें, चाल-वळण लावणें. Accus'tomed *p.* & *a.* ( v. V. ) संवय पडलेला-असलेला, राबता पडलेला, घसवटींत आणलेला, &c., राबलेला, रुळलेला, खांदा मळलेला, सराव लागलेला, अभ्यस्त, सराईत. [To BE OR BECOME A. संवई-संवय *f*. पडणें-लागणें-होणें, सराव *m*. पडणें, खांद *m*. पडणें, चोप *f*. लागणें, राबणें, रुळणें, सुरणें ( ESP. IN AN ILL SENSE), संवकणें, पडकणें, वळसावणें.] २ नित्यांतला, नित्याभ्यासाचा, परिपाठांतला, नित्य प्रचारांतला, रोजचा, हमेशाचा, नित्य पाठांतला; as, In their A. manner.

Ace ( ās ) *n.* [ L. *as*, a unit, a pound, &c. ] (पत्त्यांतील) एक्का *m*. २ (फांशावरील) पव, (पौ) बारा तेरांतील एक. ३ केंसाइतकें अंतर *n.*; as, within an A. of it, त्यापासून केंसाइतक्या अंतरावर. ४ लेश *m*, कण *m*, रती *f*, कवडी *f*.; as, the creditor will not lessen an A.

of his demand सावकार आपल्या रकमेपैकीं एक कवडीही कमी करणार नाहीं.

Acerbity (as-ėr'bi-ti) *n.* (v. Acerb) आंबटाईतुरटाई *f.* आंबटपणातुरटपणा. *m.* २ कडवा स्वभाव *m*, खाष्टपणा *m*, कडवेपणा *m*, कठोरपणा *m*.

Acerb (as-erb') [L. *acer, acris* sharp.] *a.* roughly sour. आंबटतुरट, तुरटांबट. २ fig. (of temper) कडवा, कडू, खाष्टी (*obs.*), कठीण, कठोर, खाष्ट.

Acerous, Acerose (as'ėr-us, as'ėr-ōz) [L. *acus*. a needle.] *a. bot.* सूच्याकार, शलाकाकार, अणकुचीदार, सूच्यग्र; जसें, A. leaves.

Acetabulum (as-ē-tab'ū-lum) [L. a cup-shaped cavity.] *n.* Acetab'ula *pl. anat.* the cavity which receives the head of the thigh bone. मांडीचें हाड ज्यामध्यें बसतें ती वाटी, उलूखलः *e. g.* नितंबोलूखल or उरूखलः substituting र for ल "रलयोरभेदात्" इति सूत्रात्; ऊरुखलक. [खलक means a pitcher.]

Acetic (as-et'ik) *a.* [L. *acetum*, vinegar.] *chem.* आंबट, आम्ल, अम्लगुणविशिष्ट. Acē'tous, Acetosé *n.* See Acetic. A. acid *n.* Carbon, Hydrogen आणि Oxygen या तिहींपासून झालेला आम्ल पदार्थ, शिरक्याचा तेजाब. Ac'e-tate *n. chem.* वरील आम्ल पदार्थापासून इतर क्षारीय भस्मांच्या (bases) संयोगानें झालेला क्षार, शिरक्यांतील कारकक्षार.

Acetify (as-et'i-fī) [L. *acetum* vinegar, & *facere*, to make.] शिरका होणें-बनविणें. Acetificā'tion. *n.*

Acetylene (a-set'i-lēn) कॅलशमकार्बाइडच्या धुराचा उजेड. कॅलशमकार्बाइडवर पाणी घालून जो एक प्रकारचा धूर निघतो तो जळून फार मोठा उजेड होतो.

Ache (āk) [A. S. *ac-an*, to ache.] *v. i.* ठणकणें, कळ लागणें, तिडका येणें, वेदना होणें, एकसारखें दुखणें; as, My head aches, माझ्या डोक्याला सारखा ठोका लागला आहे. [Various Marathi words or phrases containing the central idea in the word "Ache" are: To A. and feel broken, laxated, relaxed &c. as before fever कसकसणें, कसणें, फुटणें, आंग मोडून येणें-मोडणें, कणकणणें, वळणें, घळघळणें, आंगाचा चकनाचूर *m.* होणें. To A. with soreness and shooting, as तिडकणें, शिणकणें, तिडिक *f*-शिणक *f*-कण *f*-करक *f*-कचक *f*-उसण *f*-हूक *f*-शिळक *f*-भरणें-लागणें. To feel sore, tender, stiff, as from bruises, a beating, &c. अंबणें, आंवणें, कुस्त होणें. To A. with a dull, diffused, and continuing pain कसकसणें. To A. with a sense of stiffness and terseness, as from cold तडतडणें, तडाडणें.] २ (the heart) *be distressed* दुःख *n.* वाटणें, in. con., दुखारणें, हृद्रोग *m*-मनोव्यथा *f*-होणें. Ache, Ach'ing *n.* (v. V.) एकसारखें दुखणें, दुःख *n*, शूळ (*pop.*) शूळ *m*, रग *f.* Ach'ing *pr. p.* Ached *pa. p.*

Achieve (a-chēv') [L. *a*, to, *caput*, the head & *venire* to come.] *v. t.* मिळविणें, साधणें, सिद्धीस नेणें, साध्य करणें, सर करणें, संपादणें, साधन *n*-संपादन *n*-संपादणी (obs.) *f*-संपादणूक *f*-&c.-करणें *g. of o.* Achiev'able *a.* संपादण्याजोगा, &c., साध्य, प्राप्य. Achieved *p.* (v. V.) मिळविलेला, संपादित, साधित, साधलेला, &c. Achieve'ment *n.* (v. V.)-*act.* साधणें *n*, संपादणें *n*, सर करणें *n*, साधणूक *f*; संपादणूक *f*; साधन *n*, संपादन *n*, सिद्धि *f.* I मोठें काम *n*, महत्कृत्य *n*, कृतकृत्य *n*, मर्दुमीचें काम *n*, मर्दुमकीचें काम *n*, पराक्रम *m*, साहसकर्म *n*, बशर्तीचें काम *n*.

Achlamydeous (a-kla-mid'ē-us) *a. bot.* अनाच्छादित, पुष्पकोशविरहित, अनावृत्तकोश, नग्न, विकोश.

Achœnium, Achenium (a-kē'ni-um) *n. bot.* क्षुद्रफळ *n*, अकीनियम *n*, अजूंभक.

Achromatic (a-krōm-at'ik) [Gr. *a*, priv, & *chroma*, colour.] *a. biol.* विनरंगाचा, नीरंग. २ द्रवपदार्थाचा रंग न शोषणारा; as, A. tissue. ३ *opt.* पृथक्करण झाल्याशिवाय जीमधून प्रकाशकिरणें जातात अशी (कांच); as, नीरंग; as, A. prism, नीरंग त्रिकोणयव; as, A. lens, नीरंग यव. ४ तथ्यवर्णदर्शक; as, A. telescope, तथ्यवर्णदर्शक दूरदर्शकयंत्र (दुर्बीण). Achrōm'a-tism *n.* नीरंगता, नीरंगत्व; as, A. of lens, यवाचें नीरंगत्व. Achromat'ically *a.* Achrom'atize *v. t.* नीरंगत्व आणणें.

Acicular (as-ik'ū-lar) [L. *acus*, a needle.] *a. bot.* सूच्याकार, लोमाकृति रेषारूपी (पान), शलाकाकार, also acic'ulate, Acic'ulated.

Acid (as'id) [L. *acer*, sharp.] *n. chem.* अम्ल *m*, आसिद *n*, तेजाब *m.* (हा दुसऱ्या भस्मांच्या (bases) संयोगानें क्षार उत्पन्न करतो). *a.* आंबट, आम्ल, जिभेला चटका बसेल असा. Acid'ifiable *a.* आसिद करण्याजोगा, &c. Acidificā'tion *n.* आसिद करणें *n.* Acid'ify *v. t.* तेजाब बनविणें, पदार्थांत तेजाबाचे गुणधर्म उत्पन्न करणें, आंबविणें, आसिद करणें, अम्लता आणणें. Acid'ity, Ac'idness n. (v. A.) आंबटपणा *m*, अम्लता *f*, अम्लभाव *m.* I (of the stomach, &c.) अम्लपित्त *m.* Acidim'eter *n.* अम्लमापक, अम्लपरीक्षक. Acidim'etry अम्लमापनविद्या *f*, अम्लमापनविचार *m*, अम्लमिति *f.* Acid'ulate *v.t. make somewhat acid.* आंबटसा-आंबटसर-ईषदाम्ल-आंबूस-किंचिदाम्ल-&c.-करणें, आंबवणें, पदार्थांत तेजाबाचे गुणधर्म सौम्य प्रमाणांत आणणें. Acidulated *p.* (v. V.) आंबसर-&c.-केलेला. Acidulous *a. somewhat acid* आंबटसर, आंबूस, आंबसर, ईषदाम्ल, किंचिदाम्ल, अम्लमय. Acidulousness *n.* (v. A.) आंबूसपणा *m*, आंबसरपणा *m*, ईषदम्लता *f.* Nitro-hydrochloric A. or Aqua Regia अम्लराज (भूपजल ?). Sulphuric A. गंधकाम्ल, *pop.* known as तेजाब.

Acinaceous (as-in-ā'shus) [L. *acinus*, a grape-stone or kernel.] (acinus = a seedy berry). *a. bot.* बियांचा, बीयुजक्त or अष्टियुक्त.

Acinaciform (as-in-as'i-form) [Gr. *akinakes*, a scimitar.] *a. bot.* असिपत्राकार, कट्यारीच्या आकाराचा; as, an A. leaf.

Acknowledge (ak-nol'ej) [Pref. *a*, on, & Knowledge.] *v. t. own knowledge of* जाणणें, ओळखणें, मानणें; as, To A. the being of God. २ *own, confess, allow, admit* स्वीकारणें, अंगीकारणें, मानणें, मान्य करणें, कबूल करणें, वदणें (*idio.*), घेणें, हो-होय-हुं-हां-&c-ह्मणणें, होयकार *m*-हुंकार *m*-होकार *m*-करणें-देणें, पदरीं घेणें, आंगावर-शिरावर-माथ्यावर-&c.-घेणें, होकारणें, आंगीं लावून घेणें, अंगीकरण *n*-अंगीकार *m*-स्वीकरण *n*-स्वीकार *m*-प्रतिज्ञा *f.* करणें. ३ (a favour, benefit, &c.) *own, admit* जाणणें, आदरणें, घेणें, मानणें, आभार-उपकार *m*-कृपा *f*-सत्कृति *f*-मानणें, जाण *f*-जाणणें, मान्यता करणें *f. g. of o.* ४ (*virtue, merit, &c.*) *recognize, allow* and *honour* जाण *f.* जाणणें, आदरणें (*poe.*), जाणणें, ग्रहण *n.* करणें, घेणें, बूज *f.* करणें-राखणें. ५ (a letter, &c.) पैंचस्ती (R)-पोहोंच *f.* कळवणें, पावती देणें. Acknow'ledgeable *a.* जाणण्याजोगा, मान्य करण्याजोगा, &c. Acknow'ledgeably *adv.* Acknow'ledged *p.* (v. V. 1.) जाणलेला, ओळखलेला, &c. २ (v.V.2) स्वीकारलेला, अंगीकारलेला, &c., स्वीकृत, अंगीकृत, प्रतिज्ञात. ३ (v. V. ३, ४, ५.) जाणलेला, आदरलेला &c. Acknow'ledger *n.* (v. V. 1.) स्वीकारणारा *m*, हो म्हणणारा *m*, &c. Acknow'ledgment *n.* (v. V. 1.)-*act.* जाणणें *n*, ओळखणें *n*, मानणें *n.* २ (v. V. 2.)-*act.* मानणें *n*, स्वीकारणें *n*, &c., स्वीकरण *n*, अंगीकरण *n*, मानणें *n*, *a.* or *s.* स्वीकार *m*, अंगीकार *m*, मान्यता *f*, वदणूक *f*, इकरार *m.* ३-*act.* जाणणें *n*, आदरणें *n*, मानणें *n*, &c., आदरण *n.* I *note of hand* पावतीखत *n*, पावतीरोखा (R) *m.* II पोंच *f.* III *law* कबूली *f*, कबुलात *f.* IV आभार *m*, कृतज्ञता *f.* V प्रत्युपकार *m.* VI (पैसे, पत्र वगैरे) पावल्याची पावती *f*, रसीद *f.*

Acme (ak'mē) [Gr. *akme*, a point.] *n.* कळस *m*, शिखर *n*, सीमा. *f.* २ पराकाष्ठा *f*, शर्थ *f*, शिकस्त *f.* ३ *med.* रोगाचा जोर-भर *m.* ४ भरज्वानी *f*, युवावस्था *f.*

Acne (ak'nē) *n. med.* तोंडावरचा पुरळ-पुरूळ *m*, मुरूम *m.* यौवनकंटक *m*, यौवनपिटका *f.*

Acolyte (ak'o-lit) [Gr. *akolouthos*, a follower.] *n.* चाकर *m*, नोकर *m*, मदतनीस *m.* २ *eccl.* रोमनक्याथालिक देवळांतील चार कनिष्ठ वर्गांतील सेवकांपैकीं पहिल्या वर्गांतील सेवक *m.*

Acondylous, Acondylose (a-kon'di-lus, a-kon'di-lōs) [Gr. neg. pref. *a*, & *kondylos*, a joint.] *a. bot.* संधिरहित, सांधा नसलेला, सळनळीत.

Aconite (ak'o-nīt) [Gr. *akoniton*, a poisonous plant.] *n. bot.* बचनाग *n*, वत्सनाभ *m.* २ प्राणहारक विष *n.* Aconit'ic *a.* Acon'itine *n.* बचनागांतील कारक द्रव्य *n.*

Acopic (a-kop'ik) [Gr. pref. *a*, priv. and *kopos*, toil, weariness.] *a. med.* श्रमपरिहारक, पौष्टिक.

Acorea (a-kō'rē-a) *n. med.* डोळयांतील बाहुली नसणें *n.*

Acoria (a-kō'ri-a) *n. med.* राक्षसी भूक *f.*

Acorn (ā'korn) *n.* ओक झाडाचें फळ *n*-बीं *n.* A'corned *a.*

Acosmist (a-koz'mist) [Gr. Pref. *a*, not, & *kosmos*, the world]. *n.* (one who denies the existence of the universe, or its distinctness from God.) जगन्मिथ्यात्ववादी *m*, अद्वैतवादी *m.* Spinoza did not deny the existence of God; he denied the existence of the world; he was consequently an Acosmist, not an Atheist. Acos'mism *n.* जगन्मिथ्यात्ववाद *m*, अद्वैतवाद *m.* Acosmist'ic *a.*

Acotyledon (a-kot-i-lē'dun) [Gr. *a*, priv, & *kotyledon*, any cup-shaped cavity.] *n. bot.* अदल वनस्पति *f*, डाळिंब्यारहित वनस्पति *f.* Acotyle'donous *a. bot.* अदल, निर्दल, अबीजदल (वनस्पति).

Acoustic, Acoustical (a-kowst'ik) [Gr. *akouein*, to hear.] *a.* श्रवणासंबंधीं, ऐकण्यासंबंधीं, श्रवणविषयक, ध्वनिशास्त्रासंबंधीं. A-coust'ic *n.* श्रवणशक्तिदायक औषध *n.* A-coust'ically *adv.* ध्वनिशास्त्रानुरूप. Ac'ousti'cian *n.* ध्वनिशास्त्रवेत्ता *m.* A-coust'ics *n. phys.* श्रवणविषयकविद्या *f*, ध्वनिशास्त्र *n*, नादविद्या *f.*

Acquaint (ak-kwānt') [L. *ad*, to, & *cognitus*, known.] *v. t. make acquinted with, to inform* कळवणें, जाणवणें, बोधणें (*poe.*), बोधवणें, सप्रयोग माहिती करून देणें, माहितगार-विदित-ज्ञात-&c.-करणें, विज्ञापन करणें, बातमी *f.* देणें, जानपछान-परिचय करून देणें with *g. of o.*, माहित करून देणें with *g. of* the thing. २ (one's self with) ओळख *f*-माहितगारी *f*-माहिती *f*-वाकबगारी *f.* करणें-करून घेणें *g. of o.*, आपणास वाकबवाकबदार-&c.-करणें. Acquaint'ance, Acquaint'anceship *n.* (with matters) *knowledge* ओळख *f*, माहितगारी *f*, माहीत *f*, जाणसाळ *f*, परिचय *m*, वाकबगारी *f*, विज्ञान *n*, परीक्षा *f.* २ (with persons) ओळख *f*, जानपछान *f*, परिचय *m*, जानसाळ *f*, दंडक *m.* (R). [A.—loosely, indef. gener. &c. ओळखपाळख *f*, ओळखदेख or देखओळख *f*, जानपछान *f.* A. by sight तोंडओळख *f.* Bowing A. रामरामी *f*, सलामआलेकी *f*, सलामालकी *f*, सलामी *f.* Mere A., Slight A. तोंडओळख *f*, सोनओळख *f* (R. ?). To drop the A. of हात *m.* सोडणें *g. of* o. (*obs.* ?), ओळख *f.* सांडणें *g. of o.* To have a slight A. with पोंहची *f.* ओळखणें *g. of o.*] ३ *An A. a person known* ओळखीचा मनुष्य-माणूस-गृहस्थ-&c., ओळख *c*, परिचित *c*, जानपछान *m*, यार *m*, (*vulg.*). Acquaintances and connections सुहृत्संबंधी *m. pl.* A mere A. सोनओळखी *c.* Of one's friends or acquaintances ओळखीदेखी, ओळखीदेखीचा मनुष्य, ओळखीपाळखी, ओळख्यादेख्या, ओळख्यापाळख्या. Acquaint'ed *p. a.* (v. V.)

*informed, having knowledge* माहितगार, माहितदार, वाकबदार, वाकबगार, जातज्ञान, प्राप्तज्ञान. [To be A. with (a person) ओळख *f*-परिचय *m*-जानपछान *f*-&c.-असणें *g. of s. recip.*] २ *known to* माहीत, परिचित.

Acquiesce (ak-kwi-es') [L. *ad*, to, & *quies*, rest.] *v.i.* (*with in*) *rest satisfied with* मान्य-कबूल-राजी-अनुमत-सम्मत-&c. होणें-असणें, होय-बरें-&c.-म्हणणें, अनुमोदन *n.* करणें-देणें. २ (*with in*) संतुष्ट असणें. ३ (अडथळा अगर नाखुशी न दाखवितां) स्वस्थ बसणें. Acquies'cence, Acquiescing *n.* (v. V. 1.)-*state.* मान्यता *f*, अनुमत *n*, अनुमति *f*, कबुलात *f*, सम्मति *f*, खुशरजावंती *f.* With ready A. नाखुशी न दाखवतां, अडथळा न करतां, प्रसन्न अंतःकरणेंकरून, खुशीनें. Acquies'cency *n.* नाइलाजामुळें संमति *f*, अनुमति *f.* २ खुषी *f.* Acquies'cent *a.* (v. V.) मान्य, कबूल, राजी, पसंद (त), खुशरजावंत. २ कबूल होणारा, गरीब, सहज वळणारा. Acquies'cently, Acquies'cingly *adv.*

Acquire (ak-kwīr') [L. *ad*, to, & *quærere*, to seek.] *v. t. get* संपादन करणें, कमवणें, कमावणें, संपादणें, प्राप्त करणें, मिळवणें, जोडणें, प्राप्ति *f*-उपार्जन *n*-उपलब्धि *f*-&c.-करणें *g. of o.* Acquirabil'ity *n.* Acquir'able *a.* (v. V.) मिळविण्याजोगा, लभ्य, सुसाध्य, साध्य, संपादाया-चा-जोगता-जोगा-&c., प्राप्य, प्रापणीय, लभ्य, उपलभ्य, उपार्जनीय. Acquired *p.* (v. V.) मिळविलेला, संपादलेला, &c., प्राप्त, उपार्जित, अर्जित, उपलब्ध, लब्ध, संपादित. Acquire'ment, Acquiring, Acquisi'tion *n.* (v. V.)-*act.* मिळवणें *n*, संपादणें *n*, &c., संपादणूक *f*, संपादन *n*, उपार्जन *n*, अर्जन *n*, आसादन *n.*-*state.* लाभ *m*, प्राप्ति *f*, संप्राप्ति *f*, आपत्ति *f*, in the sense of प्राप्ति *f*, अवाप्ति *f.* (in comp. as धनावाप्ति, यशोवाप्ति &c.), आप्ति *f.* (R) (in comp. as धनाप्ति &c.), संपत्ति *f*, जोड *f*, उपलब्धि *f.* II (thing acquired) संपादलेली गोष्ट *f*-वस्तु *f*-&c., लाभ *m*, प्राप्ति *f*, लब्धद्रव्य *n*, उपार्जितद्रव्य *n.* Acquirements (Attainments) साधित गुण *m. pl.* उपार्जित गुण *m. pl.* श्रमसाधित गुण *m.*

Acquisition (ak-kwi-zi'shun) [See Acquire.] हा शब्द ज्ञान अगर गुणांपेक्षां द्रव्य व इतर वस्तु यांचे संपादनार्थी विशेष योजितात. Ac-quis'i-tive *a.* संपादन करण्याची इच्छा बाळगणारा. Ac-quis'i-tive-ly *adv.* Ac-quis'i-tive-ness *n.* संपादन करण्याची इच्छा *f. phren.* धनस्थान *n.*

Acquit (ak-kwit') [L. *ad*, to, & *quietare*, to give rest.] (of criminality) *v. t. absolve* निरपराध(धी)-निर्दोष (षी) ठरविणें, उघडा माथा *m*-उजळता-उजळ माथा *m*-उजळ तोंड *n.* करणें *g. of o.*, दोषमुक्त करणें. २ फेडणें, परत करणें (debt). ३ (from obligation or claim) *free* सोडवणें, मोकळा-मुक्त-&c.-करणें, मोकळीक *f*-सोडवणूक *f*-सोडवणी *f*-सोडवण *f*-करणें-करून देणें *g. of o.* (with *of* before the thing.) ४ (one's self), *act one's part* आपली कामगिरी बजावणें, आपल्याकडून करायाचें तें करणें. Acquitting *pr. p.* आपला बचाव *m.* करणें, आपल्याकडून करणें-झटणें, उद्योग *m.* करणें. Acquitted *pa. p.* Acquit'tal *n.* (v. V. 1.)-*act.* निरपराध-(धी) ठरविणें *n*, &c., अपराधमोचन *n*, दोषमोचन *n*, निर्दोषीकरण *n.*-*state.* दोषमुक्ति *f*, दोषमुक्तता *f*, उघडा माथा *m*, उजळता-उजळ-माथा *m*, उजळतोंड *n*, सुटका *f. law* अपराधाची नाशाबिती *f.* Acquit'-tance *n. discharge from a debt; discharge, release.* ऋणमुक्तता *f*, कर्जमुक्तता *f*, ऋणमोचन *n*, ऋणविमोचन *n*, रद्दकर्ज *n*, ऋणशोधन *n.* २ *deed of A.* कराराच्या किंवा कर्जाच्या किंवा इतर बोज्याच्या अटी पुऱ्या न झाल्या तरी दिलेली सोडचिठी *f*, फारखत *n.* (*law.*) सोडचिठ्ठी *f*, बेदावापत्र *n*, बेदावा *m*, निदावापत्र *n.* or निदावा *m*, ऋणमुक्तिपत्र *n*, फारखती *f.* Acquitted *p.* (v. V. 1.) उजळ माथ्याचा, उजळ तोंडाचा, निरपराध(धी) &c.-ठरवलेला, अपराधमुक्त, दोषमुक्त, निर्दोषीकृत, (कोणतेंही ऋण, दोष अगर उपकारापासून) मुक्त केलेला.

Acrasia (a-krā'siaa) *n. med.* दुबळेपणा *m.* (ज्ञानतंतूचा).

Acre (ā'ker) *n.* इंग्रेजी मापानें ४८४० चौरस यार्ड किंवा ४३५६० चौरसफूट म्हणजे एक एकर. ८५ एकर म्हणजे १०० विघे असें प्रमाण आहे. [God's A., देवळाच्या जवळचें कबरस्थान *n.*] २ *fig.* एखाद्या वस्तूचें मोठें परिमाण *n.* ३ *pl.* जमीन *f.* A'cre-age *n.* क्षेत्राचें एकरामध्यें माप *n*, एकंदर झालेले एकर *m. pl.* A'cred *a.* कांहीं एकर क्षेत्राचा मालक असणारा.

Acrid (ak'rid) [L. *acer*, *acris*, sharp.] *a.* तिखट, खरमरीत, झणझणीत, तीव्र. *chem.* तीक्ष्ण, प्रखर, जहाल, तलख, झळझळीत. २ कडू, कटू. ३ जलाल (स्वभाव). ४ खंवट. ५ *med.* विषारी; as, A. pus. Ac'rid-ness, A-crid'ity *n.* तिखटपणा *m*, जलालपणा *m.* २ *med.* विष *n.*

Acrimony (ak'ri-mun-i) [L. *acer*, *acris*, sharp.] *n.* दुसऱ्या पदार्थांना झिजणी लावण्याचा अगर त्यांचा नाश करण्याचा कित्येक पदार्थांचा गुण *m*, खंवटपणा *m*, जहाली *f.* २ तलखपणा *m* (स्वभावाचा), कडकपणा-कडवेपणा *m*, कटुभाषण *n.* Acri-mō'ni-ous *a.* जलाल, तीक्ष्ण, खंवचट, कडाक्याचा. ३ कटु (भाषण किंवा स्वभाव). Acri-mō'ni-ous-ly *adv.* जलालपणानें. २ खंवचटपणानें. Ac'ri-mo'ni-ousness *n.* खंवचटपणा *m.* २ जलालपणा *m.* ३ कडकपणा *m.*

Acroamatic, Acroamatical, Acroatic (ak-rō-a-mat'ik-al, ak-rō-at'ik) [Gr. *akroaomai*, to hear.] *a.* गूढ, गुप्त.

Acrobat (ak'ro-bat) [Gr. *akros*, high, & *bainein*, to go.] *n.* दोरीवर नाचून खेळ करणारा *m*, कमानी टाकणारा *m*, गोलांटी उड्या मारणारा *m*, नाडेभोरपी *m*, डोंबारी *m*, कोल्हाटी *m.* Acrobat'ic *a.* Acrobat'ism *n.* नाडेभोरप्याचें-डोंबाऱ्याचें कसब *n.*

Acrocarpous (ak-rō-kärp'us) [Gr. *akros*, high, & *karpos*, fruit.] *a. bot.* टोंकांस फळें येतात असें; कांड्याच्या टोंकास फळें येतात अशी (शेवाळ).

Acrogen (ak'ro-jen) [Gr. *akros*, high, & *generare*, to produce.] *n. bot.* अग्रवर्द्धक-धिष्णु (कांड), प्रकांडवर्द्दग, शीर्षवर्धिष्णु वनस्पति *f.* Ac-rog'e-nous *a. biol.* शीर्षवर्धिष्णु, अग्रवर्धिष्णु. २ *bot.* अग्रवर्धक, शीर्षवर्धिष्णु.

Acromion (a-krō'mi-on) [Gr. *akros*, high, *omos*, shoulder.] *n. anat.* फलकास्थीचा बाह्य भाग *m.*

Acronycal (a-kron'ik-al) [Gr. *akros*, extreme, & *nyx*, Sk. नक्तम्, night.] *a. astron.* सूर्यास्ताबरोबर उगवणारा व सूर्योदयाबरोबर मावळणारा (तारा). Acron'yc, Acronyc'tous *a.* See Acronycal. Acron'ycally *adv.*

Acropolis (a-kro'pol-is) [Gr. *akros*, high, & *polis*, a city.] *n.* प्राचीन ग्रीक शहराचा सर्वांत उंच भाग-किल्ला *m*, अथेन्साचा किल्ला *m.*

Acrospire (ak'ro-spīr) [Gr. *akros*, high, & *speira*, a spire.] *n. bot.* कोम *m*, मोड *m.* *v. t.* कोम-मोड येणें. Ac'rospir-ed *pa.* or *a.* कोम आलेली, मोड फुटलेला, मोडाचा, मोड आलेली (बी).

Across (a-kros') [Pref. *a*, & Cross.] *prep.* & *adv. from side to side*;–noting state वरून, पार (opposed to along). २ आड, आडवा. ३ मधून. ४ *from side to side*;–noting passage एका बाजूपासून दुसऱ्या बाजूपर्यंत, ओलांडून. To come across सहज गांठ पडणें, दृष्टीस पडणें, भेटणें.

Acrostic (a-krō'stik) [Gr. *akros*, extreme & *stichos*, order or verse.] *n.* पहिलें, पहिलें आणि शेवटचें, अगर कांहीं विवक्षित अक्षरें वाचलीं असतां एखाद्या गृहस्थाचें नांव, हुद्दा, पदवी वगैरे होतात असा प्रबंध अगर अशी कविता *f*, प्रथमाक्षरबंध *m*, अंत्याक्षरबंध *m*, चित्रकाव्यांतील बंध *m*, विवक्षिताक्षरबंध *m.* *a.* प्रथमाक्षरबंधकवितेसंबंधीं. Acrō'stical *a.* Acrō'stically *adv.* Acro'sticism *n.*

Acrotic (a-krot'ik) [Gr. *akros*, extreme.] *a. med.* बाह्यपृष्ठासंबंधीं.

Acrotism (ak'rō-tizm) [Gr. *a*, priv, & *krotos*, a beating.] *n. med.* नाडीची मंदगति *f*, नाडी सुटणें *n.*

Act (akt) [L. *agere*, & *actum*, to exert power, Sk. अज्, to drive.] *v. t.* क्रिया-कृति करणें, करणें. २ तडीस नेणें. ३ (a part, a character) सोंग *n.* आणणें, सोंगाची संपादणी *f*- बतावणी *f*. करणें, सोंगाचे हावभाव *m. pl.*-आविर्भाव *m*-अभिनय *m.* करणें. ४ (one's part) आपल्याकडून करावयाचें तें करणें, आपल्याकडून करणें *n*, उद्योग *m*-&c.-करणें. ५ *actuate, to move to action* चालवणें, चालता-चालू करणें, वर्तवणें, प्रवर्तवणें. Act *v. i. be in action* चालणें, चालता-चालू असणें-होणें, खेळणें, चलनवलन *n*-चेष्टा (S) *f*-खेळ *m*-&c.-होणें *g. of s.*, प्रवर्त्तणें (*poe.*), प्रवृत्त होणें. २ *perform duties* काम *n.* करणें, चालणें, वागणें, आचरणें, वर्त्तणूक *f*-वागणूक *f*-करणी *f*-कृति *f*-करणें. ३ *perform functions, work* चालणें, वर्त्तणें, खेळणें, चलनवलन *n*-चेष्टा (S) *f*-व्यापार *m*-कृति *f*-खेळ *m.* करणें-*and* होणें with *g. of s.* ४ *discharge the duty of an office temporarily* चार दिवस-&c.-काम *n*-&c.-पाहणें, चालवणें, अमानीबदली असणें. ५ *act upon* कर्तृत्व *n*-कृति *f*-गुण *m*-कार्य *n*-स्वकर्म *n.* करणें, चालता or चालू-लागू होणें with वर. ६ (in the Drama) *perform a part* सोंग *n.* घेणें-संपादणें-(*poe.*)-आणणें, &c., नटणें, नर्त्तन *n*-नृत्य *n*-&c. करणें (dancer). Act *n.* काम *n*, कर्म *n*, कृत्य *n*, क्रिया *f.* [One's own A. स्वकर्म *n*, निजकर्म *n.*] २ *existing state* चालू, प्रस्तुत-स्थिति, विद्यमानता (S) *f*, वर्त्तमानता (S) *f*, वास्तविकता (S) *f*, अस्तित्व *n.* ३ (of a play) नाटकाचा अंक *m.* ४. (of a court &c.) हुकुमनामा *m*, फैसलनामा *m.* ५ सार्वजनिक सभेचा ठराव *m*, सरकारचा ठराव *m*, कायदा *m.* ६ *theol.* पराक्रम *m.* In the A. (वाईट) काम करीत असतां; as, The thief was caught in the act. In A. अगदीं तयारींत; as, In A. to run a race. A. of God *law* ईश्वराची करणी. A. of honour (बची) पत राखण्याकरितां बनें स्वीकारलेली हुंडी अनें स्वीकारणें. Act of legislature सूत्र (*religi.*), शासन, आइन, दस्तुर (*obs.*), कायदा, आक्ट. To act up to प्रमाणें व्यवहारांत चालणें. Acting *n.* (v. V. T. 1.)–*act.* संपादणी *f* बतावणी *f*, सोंगसंपादणी *f.* (v. V. I. 1.)–act. चालणें *n*, खेळणें *n*, &c., खेळ *m*, चलनवलन *n*, चेष्टा (S) *f*, प्रवर्त्तन *n.* २-*act.* चालणें *n*, वर्त्तणें *n*, &c., चाल *f*, वर्त्तणूक *f*, वर्त्तन *n*, गति *f.* ३-*act.* चालणें *n*, &c., हालचाल *f*, कृति *f.* ४-*act. agency, operation, working* करणी *f*, कर्तृत्व *n*, कृति *f*, कर्त्तेपणा *m*, करण *n*, कारकत्व *n*, कारिका (?) *f*, कारिता *f*. The sense of this word is often best rendered by words expressing, *combination, connection, &c.*; as, योग *m*, संयोग *m*, संबंध *m.* ५-*act.* सोंग घेणें *n*, &c., अभिनय *m*, हावभाव *m.* I *gesture, gesticulation* हावभाव *m. pl*, इंगित (?) *n*, आंगिकचेष्टा (S) *f*, अंगविक्षेप *m*, अभिनय *m*, अदा *m*, आदा *m.* [Manual A. हातवारे *m. pl.* Represented by A. आंगिक.] II *an act, a deed, a doing* काम *n*, कर्म *n*, कृत्य *n*, क्रिया *f*, कृति *f*, कार्य *n.* करणें *n*, करणी *f*, कर्त्तव्य *n*, कर्त्तृत्व *n.* Act'ing *pr. p.* (v. V. I. 1. 3. ४.) चालता, चालू, चेष्टमान (S), चार दिवस काम पाहणारा, आमानी, बदली, आक्टिंग borrowed from the English. Act'or *n.* (v. V. I. 1 & v. A. 6.) *performer, player.* १ कर्त्ता. २ *Law* वकील *m*, वादी *m.* ३ सोंग आणणारा, सोंगाची संपादणी-बतावणी-&c.-करणारा, सोंगाडी or सोंगाड्या *m*, सोंगी or सोंग्या *m*, सोंगाळ्या *m*, बहुरूपी (?) *pop.* भोरपी (?) *m*, खेळकरी *m*, नट *m*, नटवा *m*, नटभांड *m*, नाटकी *m*, नर्तक *m.* Act'ress *n.* कर्त्री *f.* २ सोंगाडीण (?) *f*, खेळकरीण *f*, नटी *f*, नर्त्तकी *f*, बहुरूपिणी (?) *pop.* भोरपीण *f.* (?)

Actinism (ak'tin-izm) [Gr. *aktis*, *ak-tinos*, a ray.] *n.* (The chemical action of sunlight as distinct from its power of heat or light.) सूर्यकिरणांचा रसायनकार्योत्पादकधर्म *m.* हा धर्म केवळ रक्तनीळ (*violet*) व

त्या शेजारील पुढील किरणांचा आहे. रासायनिक विकारकता *f.* Ac'tinic *a.* विकारक. as; Actinic rays विकारक किरणें *n. pl.*

Actinology (ak-ti-nol'ō-gi) *n.* किरणविकारकत्वशास्त्र *n,* सूर्यकिरणशास्त्र *n.*

Actinometer (ak-tin-om'e-tėr) *n.* किरणविकारकत्वमापक (यंत्र) *n,* किरणतीव्रतामापक (यंत्र) *n.*

Action (ak'shun) [L. *agere*, to act.] *n.* (v. V. T. 1.) -*act.* संपादणी *f,* बतावणी *f,* सोंगसंपादणी *f.* (v. V. I. 1.) -*act.* चालणें *n,* खेळणें *n.* &c., खेळ *m,* चलनवलन *n,* चेष्टा (S) *f,* प्रवर्त्तन *n.* २ (v. V. 1 2.) -*act.* चालणें *n,* वर्त्तणें *n.* &c. चाल *f,* वर्त्तणूक *f,* वर्त्तन *n,* गति *f.* ३ (v. V. 3.) -*act.* चालणें *n,* वर्त्तणें *n.* &c., हालचाल *f,* कृति *f,* प्रवृत्ति *f.* (as opposed to rest). ४ उद्योगीपणा *m.* ५ क्रिया *f,* व्यापार (S) *m,* आघात *m.* ६-*act. agency, operation, working* करणी *f,* कर्त्तृत्व *n,* कृति *f,* कर्त्तेपणा *m,* करण *n,* कारकत्व *n,* कारिता *f.* (The sense of this word is often best rendered by words expressing, *combination, connection,* &c.) as योग *m,* संयोग *m,* संबंध *m.* ७—*act.* सोंग घेणें *n,* &c. I *gesture, gesticulation.* अभिनय *m,* हावभाव *m. pl,* इंगित (?) *n,* आंगिकचेष्टा *f* (S), अंगविक्षेप *m,* अभिनय *m,* अदा, आदा *m,* सूची (S) *f.* [Manual A. हातवारे *m pl.* Represented by A. आंगिक *n.*] II. *series of events represented* वस्तु *n.* III. *law* व्यवहार *m,* व्यवहारविषय *m,* अर्थ *m* (S), मुकदमा *m,* खटला *m,* दावा *m,* खटला करण्याचा अधिकार *m.* Civil A. दिवाणी फिर्याद *f.* Criminal A. फौजदारी खटला *m.* IV. *gram.* कारक *n.* V. *an act, a deed, a doing* काम *n,* कर्म *n,* कृत्य *n,* क्रिया *f,* कृति *f,* कार्य *n,* करणें *n,* करणी *f,* कर्त्तव्य *n,* कर्त्तृत्व *n.* VI. *battle, engagement* लढाई *f,* युद्ध *n,* संग्राम *m.* VII. पराक्रम *m.* VIII. *mech.* यंत्राचें चलन *n,* (कार्यकारक) गति *f.* IX. *paint* उठाव *m,* मांडणी *f,* मनोभावसूचक शरीरावयवस्थिति *f.* X. *com.* भाग *m.* (एखाद्या कंपनीच्या भांडवलांत). A. and reaction आघात व प्रत्याघात, क्रिया व प्रतिक्रिया, कार्य व प्रतिकार्य. *Med.* Secondary A. अप्रधान-गौण कार्य *n.* Ac'tionable *a. law* ज्यांत खटला करण्यास आधार मिळेल असें (कृत्य), &c.

Active (akt'iv) [L. *activus*, act.] *a. having the power to act, not inert* करण्याची शक्ति असणारा, क्रियाकारक, कार्यक्षम, क्रियाशक्त, जिता. २ *that acts, not passive or patient* क्रियावान्, कर्त्ता, क्रियाकार, क्रियाकारक, कारक, सचेष्ट (S); (as A. opposed to passive). ३ *nimble, agile* चपळ, जलद, चलाख, चपळा, अंगचपल, चपलांग, आंगाचा चपळ, आंगसूट, सुटसुटीत, सुडसुडीत, हलक्या आंगाचा. ४ *not idle or sedentary* उद्योगी, मेहनती, कामसू, कामी, सोद्योगी, उद्योगशील, उद्योगवान्, निरलस, निरालस्य. ५ *med.* जलाल, जाज्वल्य, आशुकारी, शीघ्रगुणावह, लौकर गुण देणारा. ६ जिता, जीवंत (पारा); as, A. mercury. ७ तेजीचा. (An A. demand for gold). ८ चालू असणारा. (A. hostilities.) ९ *gram.* सकर्मक, कर्तरि; as, A. verb, सकर्मक क्रियापद; A. voice. १० व्यावहारिक, प्रयोज्य, कार्योचित. ११ *requiring action* (opposed to speculative) व्यापारमय (S), व्यापाररूप (S), व्यापारात्मक (S), व्यापारप्रचुर (S), कार्यरूप, व्यवहारमय, कर्मात्मक. A. life प्रवृत्तिमार्ग, प्रवृत्ति. A. debt मुदतींतील-वसूल होण्याजोगें कर्ज *n.* A. partner *com.* काम करणारा भागीदार (opposed to sleeping partner or भांडवलाचा भागीदार). A. substances, कारकद्रव्यें, जागृतद्रव्यें, प्रवर्त्तक द्रव्यें. A. reagent प्रवृत्त-प्रतिकारक-परीक्षक द्रव्य. A. action प्रवृत्तिमान-कार्यसाधक व्यापार *m.* A. capital हवे तेव्हां रोकड पैसे करतां येतील असें भांडवल *n.* Active commerce राष्ट्रानें आपल्याच जहाजांनीं चालविलेला व्यापार *m.* A. touch सावधानस्पर्श *m.* A. tension कार्यसाधक-कार्यकारी-प्रतानता. Act'ively *adv.* (v. A. 3.) चपळाईनें, चलाखीनें, जलदीनें, चापल्यपूर्वक. (v. A. 4.) निरालस्यपूर्वक, उद्योगपूर्वक. Act'iveness *n.* (v. A. 3.) चलाखी *f,* चपळाई *f,* चापल्य *n,* उद्योगीपणा *m.* २ (v. V. 1.) क्रियाशक्ति *f,* कर्मशीलता (S) *f,* करणशक्ति (S) *f,* कर्मशक्ति (S) *f.* ३ (v. A. 4.) कामसूपणा *m,* उद्योगीपणा *m,* उद्योगित्व *n,* उद्योगशीलता *f,* निरलसता *f.* Activ'ity *n. phys.* हालचाल *f.* २ *med.* चलनवलनशक्ति *f,* चलाखी *f,* उत्साह *m.* ३ जलदी *f,* आंगचपळाई *f,* आंगसफाई *f,* तडफ *f,* अंगचापल्य *n,* चापल्य *n.* ४ कार्यशक्ति *f,* कार्यशक्तिप्रमाण *n.*; as, A. of an Agent. For more meanings of Activity, see activeness.

Actual (akt'ū-al) *a. not speculative or imaginary, real* वास्तविक, खरा, यथार्थ, सत्य, तथ्य, विद्यमान. २ *in act, not potential* क्रियेचा. *phys.* कार्यरूप, क्रियात्मक, कर्मपरिणामभूत, सिद्ध. ३ *belonging to or comprising action* क्रियेसंबंधीं, क्रियान्वयी, क्रियामय, चेष्टारूप (S), चेष्टात्मक (S), चेष्टामय (S). ४ *phil.* क्रियासिद्ध. Actualist *n.* प्रत्यक्षप्रमाणवादी *m.* (opposed to Idealist). Actualness *n.* (v. A. 3.) क्रियासंबंधिता *f,* क्रियाश्रयिता *f,* क्रियान्वयिता *f.* (v. A. 2.) २ क्रियारूपता *f,* क्रियात्मकता *f.* ३ (v. A. 1.) आहेपणा *m,* वास्तविकपणा *m,* खरोखरी *f,* अस्तित्व *n,* तथ्यत्व (S) *n,* वास्तवत्व (S) *n,* वास्तविकत्व (S) *n,* विद्यमानता (S) *f,* वर्त्तमानता (S) *f.* Act'ualise *v. t.* खरें करणें. Actual'ity *n.* यथार्थता *f,* खरेपणा *m.* For other meanings of Actuality see Actualness. Act'ually *adv.* (v. A. 1.) खरोखर, वस्तुतः, वस्तुगत्या, तत्वतः, खरेपणीं. २ (v. A. 2) क्रियापूर्वक, क्रियेनें. ३ (v. A. 3.) कर्मतः, कार्यतः.

Actuary (akt'ū-ar-i) [L. *acta*, records, acts.] *n. law.* नोंदणारा कारकून *m.* २ विमा उतरणाऱ्या कंपनीचा एक मुख्य अधिकारी *m,* विम्याचे दर ठरविणारा हिशेबनीस *m.* Actuarial *a.*

Actuate (akt'ū-āt) [L. *actus*, action.] *v. t. put into action* चालवणें, चालता-चालू करणें, करवणें,

प्रोत्साहन देणें, वळवणें, प्रवृत्त करणें. २ *influence, move, induce* वळवणें, वर्त्तवणें (R. in this sense), प्रवर्त्तवणें, वागवणें, प्रवर्त्तन *n*-प्रवृत्ति *f*-करणें *g. of o.*, प्रवृत्त करणें. Actuated *p. a.* (v. V. 1.) चालवलेला, &c., चालित, प्रवर्तित. २ प्रवर्तवलेला &c., प्रवर्तित, प्रवृत्त केलेला. Actuā'tion *n.* (v. V. 1.)—*act.* चालवणें *n*, &c., प्रवर्त्तन *n*, चालन *n.*—*state.* चालवलेलेपणा *m*, वर्त्तवलेलेपणा *m*, &c., प्रवृत्ति *f.* २ (v. V. 2.) -*act.* प्रवर्त्तवणें *n*, प्रवृत्त करणें *n*, &c., प्रवर्तन *n.*—*state.* प्रवर्त्तवलेलेपणा *m*, प्रवृत्ति *f.* Actuater,-or *n.* (v. V. 1. 2.) चालवणारा *m*, &c., प्रवर्त्तक, चालक, प्रोत्साहक.

Aculeate, Aculeated (ak-ul-e-āt',-ed) [L. *aculeus*, a spine, a prickle.] *a. bot.* लहान कांटे असलेला, सकंटक, कंटकित. २ बोंचणारा, मर्मभेदक.

Acumen (ak-ū'men) [For root see Acute.] *n.* तीक्ष्णता *f.* २ *quickness of perception* तीक्ष्ण-कुशाग्रबुद्धि *f*, कुशाग्रमति *f*, शीघ्र-बुद्धि *f*-मति *f*, बुद्धिकौशल्य *n*, प्रज्ञा *f*, मेधा *f*, तार्किक्य (R) *n*, सुधी *f.* Acū'minate, Acū'minated *a.* टोंकाचा, अणीदार, तीक्ष्णाग्र. २ *bot.* निमुळतें, लंबाग्र, विस्तृताग्र, शुंडाकार. Acū'minate *v. t.* तीक्ष्ण-अणीदार करणें. Acuminā'tion *n.* अणीदार करणें *n.* तीक्ष्णाग्रता *f.*

Acupressure, Acupression (ak-ū-presh'ūr, ak-ū-pre'-shun) [L. *acus*, needle, & Pressure.] *n. surg.* सुईचा दाब *m*, सूचीपीडन *n.*

Acupuncture (ak-ū-pungkt'ūr) [L. *acus*, a needle, and *punctura*, a pricking.] *n. med. insertion of needles into the living tissues for remedial purposes* सुईच्या योगानें धमनी दाबण्याचा प्रकार *m*, सुईनें टोंचणें *n.*

Acute (ak-ūt') [L. *acutus, pa. p.* of *acuere*, to sharpen, from root *ak*, sharp.] *a. that has a sharp end, pointed* टोंकाचा, अणीदार, अणीचा, टोंकदार, कोंचीचा, तीक्ष्णाग्र, बोचेरा. २ *sharp-witted, sharp* कुशाग्रबुद्धि, कुशाग्रमति, प्रज्ञाता, सुधी, तीक्ष्णबुद्धि, तीव्रबुद्धि, प्रखरबुद्धि, सूक्ष्मबुद्धि. ३ *vigorous, quick*–(A. sense) तिखट, तीक्ष्ण, तीव्र, जलद, सूक्ष्म, सुग्राही, आशुग्राही, शीघ्रग्राही. ४ *med.* लवकर वाढत जाणारा, त्वरित विकोपास जाणारा, आशुकारी (opposed to *chronic* चिरकारी), आशुपरिणामी, शीघ्रपरिणामी, शीघ्रविपाकी, शीघ्रपरिपाकी, जोराचा. ५ (as pain) तिखट, तीक्ष्ण, तीव्र, भेदक, सुईच्या टोंकाप्रमाणें तिखट, &c. ६ (an accent) उदात्त, उच्च. ७ *math.* काटकोनापेक्षां लहान, लघु (कोन). Acute'ly *adv.* (v. A. 1.) बोचेरेपणानें, तीक्ष्णाग्रतापूर्वक, &c. २ कुशाग्रबुद्धीनें, बुद्धितैक्ष्ण्यपूर्वक, तीक्ष्णबुद्धिपूर्वक, &c. ३ तिखटाईनें, तैक्ष्ण्यपूर्वक, तीक्ष्णतापूर्वक. Acute'ness *n.* (v. A. 1.) बोचरेपण *n*, बोचेरेपणा *m*, तीक्ष्णाग्रता *f.* २ कुशाग्रबुद्धि *f*, कुशाग्रमति *f*, बुद्धितीक्ष्णता *f*, बुद्धितैक्ष्ण्य *n.* ३ तिखटपणा *m*, तिखटाई *f*, तीक्ष्णता *f*, तैक्ष्ण्य *n*, जलदी *f*, शीघ्रग्राहित्व *n*, सूक्ष्मता *f.* ४ शीघ्रपरिणामित्व *n*, शीघ्रविपाकित्व *n.* ५ *math.* लघुत्व *n.*

A. D. (a. d.) [Anno Domini] इसवी सन (In the year of the Lord Jesus Christ).

Adage (ad'āj) [L. *ad*, & *agium*, a saying.] *n.* ह्मण *f*, जुनी रूढ *f*, वृद्धवचन *n*, न्याय *m*, आहणा *m.*

Adagio (a-dā'gī-o) [It. *ad, agio*, at ease.] *n. slow time* विलंबित *n.*

Adam (ad'am) *n.* ख्रिस्ती किंवा यहुदी धर्माप्रमाणें पहिल्या मानवप्राण्याचें नांव *n.* २ मनुष्याची स्वाभाविक नश्वरता किंवा दौर्बल्य *n.* A.'s ale *n.* पाणी (*colloq.*) A.'s apple *n.* कंठमणी *m*, गळ्याचे पुढील भागावरील उंचवटा *m*, घांटी *f*, घांटरूं (R) *n*, घंटिका *f*, कंठ *m*, ढाल *f*, मानेचा खाखोटा *m.* २ *bot.* ईडनिंबू *n.* A.'s bridge *n.* रामसेतु *m*, सेतुबंध *m.* (रामसेतूला रामसेतु न ह्मणतां बायबलमतवाले लोक Adam's bridge असें ह्मणतात. परंतु रामाचा त्या सेतूशीं संस्कृत ग्रंथांत जसा ऐतिहासिक संबंध वर्णन केलेला आहे तसा कोठेंहि Adam चा उल्लेख केलेला सांपडत नाहीं.) The second A. येशू-ख्रिस्त. A.'s operation *med.* आंखडलेला मांडीचा खुबा किंवा जघनभागास्थि खुला करण्याकरितां केलेला शस्त्रप्रयोग *m.*

Adamant (ad'a-mant) [Gr. *a*, priv, & *damaein*, Sk. दम्, to tame.] *n.* अतिकठीण वज्रासारखा पदार्थ *m*, हिरा *m*, हीरक *m*, वज्र *m, n.* २ *loadstone* लोहचुंबक *m.* ३ *hard metal, stone*, &c. वज्र *m, n.* Adamantē'an, Adaman'tine *a.* वज्रासारखा कठीण, अतिकठीण, वज्रसदृश, वज्रवत्, वज्रप्राय, वज्रमय, वज्र. A. frame वज्रदेह *m*, वज्रशरीर *n.*

Adapt (ad-apt') [L. *ad*, to, & *aptare*, to fit.] *v. t. make suitable* योग्य-बराबर-माफक-तदुपयोगी-जुळेलसें-&c.-करणें, मिळवणें, लावणें, जमवणें, बसवणें, जम *m*-जवा *m*-जुळणी *f*-जोडी *f*-जुगल *f*-&c.-पाडणें-बसवणें-करणें *g. of o. recip.* २ शोभेलसें करणें, फेरफार करून जुळवणें. ३ प्रमाणांत बसवणें. Adaptabil'ity, Adapt'ableness *n.* जुळेसें करतां येण्याची योग्यता-शक्यता *f.* Adapt'able *a.* जुळेसें करण्याजोगा. Adaptā'tion *n.* (v. V.)-*act.* मिळवणें *n*, लावणें *n*, &c., योग्य करणें *n*, जम *m*-&c. पाडणें *n.* मिळवणी *f.*-*state.* लाग *m*, योग्यता *f*, उपयुक्तता *f*, जम *m*, जवा *m*, जुगल *f*, जुळणी *f*, जुळेशी केलेली कृति *f*-नाटक *n*, चित्र *n*, रूपान्तर *n.* Adapted *p. a.* (v. V.) मिळवलेला, योग्य केलेला, फेरफार करून जुळेसें केलेला, प्रमाणांत बसवलेला, &c. I *fit, suitable* जोगता-जोगा (in comp.), कार्यक्षम, योग्य, उपयुक्त.

Add (ad) [L. *ad*, to, & *dare*, Sk. धा, to put.] *v. t. put to, affix, annex, attach, subjoin* मिळवणें, जोडणें, घालणें (*idio.*), देणें (*idio.*), मारणें (*idio.*), लावणें, साधणें, जडणें, दुसऱ्यास लावणें, संयोग *m*-संयोजन *n*-&c.-करणें *g. of o.* २ (up); *sum* मिळवणें, जोडणें, मिळवणी *f*-बेरीज *f*-संकलन *n*-करणें *g. of o.*, गोळा करणें, भर घालणें. ३ नवीन जोडणें. ४ आणखी पुढें बोलणें. A. *v. i.* वाढवणें (with to). To A. to वाढवणें, अधिक

करणें. २ *math.* बेरीज करणें. Add'able, Add'ible *a.* वाढवितां येईल असा, &c. Adder *n.* बेरीज करणारा, वाढविणारा *m.* २ संख्यांची बेरीज करणारें यंत्र *n.* Addibil'ity, Addit'ament *n.* Addi'tion *n.* (v. V. 1.)—*act.* जोडणें *n,* मिळवणें *n,* &c., जोडणी *f,* संयोग *m,* संयोजन *n.* or .लावालाव *f.* -*state.* संयोग *m,* योग (S) *m.* २—*act.* बेरीज करणें *n,* मिळवणी *f,* मिळवणें *n,* &c., मिश्रण *n,* संकलन *n,* एकीकरण *n,* एकत्रीकरण *n.* [Compound A. विविधबेरीज *f.* Cross proof in A. आड आंखताळा *m.* Successive subtraction-proof in A. सारोळा *m.* (*v.* करणें, उतरणें.)] I. *thing added, v.* Addit'ament जोड *m,* जोडलेला भाग *m,* अंग *n,* &c. ३ नवीन जोडलेली वस्तु *f.* ४ *law* नांवापुढील पदवी *f,* उपनांव *n,* किताब *m.* Ad-di'tional *a.* जोडलेला, अधिक. Addi'tionally *adv.*

Addendum (ad-den'dum) *n.*—*in arithmetic* धन *n.* (as opposed to ऋण *n.* subtrahend.) मिळवणी *f,* क्षेप *m,* मिळविण्याची वस्तु *f.* २ पुरवणी *f.* Adden'da *pl.*

Adder (ad'ėr) [A. S. *nædre.*] *n.* (*zool.*) सर्प *m,* साप *m.* Ad'der's tongue *n.* सर्पाची जीभ *f.* Adder-stone *n.* सर्पाचें विष उतरवण्याची ज्यांत अद्भुत शक्ति असते असा दगड *m.* Ad'der's-wort *n.* सर्पाचें विष उतरवण्याची वनस्पति *f,* also called *Snake-weed.*

Addice (ad'dis) *n.* वांकस *m, n,* तासणी *f.*

Addict (to) (ad-dikt') [L. *ad,* to, & *dicere,* Sk. दिश्, to declare.] *v. t.* (one's self to) *To be or become addicted* छंदास-नादास (नादांत)-नादीं लागणें-भरणें *g. of o.,* भरीं भरणें *g. of o.,* नादावणें, नादांत or नादीं पडणें-होणें *g. of o.,* संवय *f*-चट *f*-चटक *f*-खोड *f*-व्यसन *n*-छंद *m*-लागणें-पडणें *g. of o.,* संवकणें or सोकणें, सोकावणें, पडकणें, लांचावणें. [Generally used with a reflexive pronoun and in a bad sense]. Addict', Addict'ed *p.* (v. V.) नादीं लागलेला, भरीं भरलेला, &c., नादखोर, सोंकील or सोकील, पडकलेला, चटावलेला, लागट, तलबी-फी, लंपट, गरक, शोकी or शौकी, लाहडी (R), लबूद, उपसेवी (in comp. as मद्योपसेवी, द्यूतोपसेवी &c.), परायण or पर (in comp. as विषयपरायण or विषयपर), निरत, अनुषंगी, लांफाळ, आसक्त. Addict'edness, Addic'tion *n.* चट *f,* चटक *f,* लंपटपणा *m,* सवई *f,* व्यसन *n,* खोड *f,* तलब *f;* छंद *m,* नाद *m,* आसक्ति *f,* शोक or शौक *m.*

Addison's disease. See disease.

Addle (ad'dl) *a.* वाढ खुंटून कुजूं लागलेला, सडलेला, सडका, नासलेला, उमळलेला, उगळलेला, उबळलेला. २ (of the brains) पोकळ, कल्पनाशून्य, कल्पनारहित, कल्पनाशक्त्यक्षम. *v. t.* and *v. i.* (अंडीं वगैरे) सडूं देणें, नासवणें. Ad'dle-head'ed, Ad'dle-pat'ed *a.* मूर्ख, मूढ, ठणठणपाळ, गयाळ, गयाळी. Ad'dlement *n.* Addled *a.*

Address (ad-dres') [L. *ad,* to, & *directum,* straight.] *v. t. direct, apply* (esp. as a speech) योजणें, लावणें, योजना *f*-उपयोग *m*-योजणूक *f.* करणें *g. of o.* २ (a charm, a spell, &c.) *set against* योजणें, प्रयोग *m*-योजना *f*-योजणूक *f*-उपयोग *m.* करणें *g. of o.* ३ (one's self for or unto) कमर *f.* बांधणें, तयारी *f.* करणें, जुडणें, प्रवृत्त-उद्युक्त होणें, लागणें. ४ *accost, speak to* हटकणें, बोलणें, संबोधणें (*poe.*), संबोधून बोलणें, भाषणाची योजना *f*-योजणूक *f*-&c. करणें. [To A. a superior विनंती *f*-निवेदन *n*-अर्ज *m*-&c. करणें. To A. respectfully अहो जाहो ह्मणणें-बोलणें.]. ५ (-a letter) नांवाचा-नांवें-नांवानें लिहिणें-पाठवणें, पत्ता *m.* लिहिणें. ६ *consign to the care of*—(ship.) दिम्मतीस पाठवणें. ७ विवाहार्थ प्रार्थना करणें. Addressee *n.* ज्याला उद्देशून लिहितात तो. To address a ball *golf-ball* कोलणें (चेंडू), चेंडूवर सुरवातीचा फटका मारण्याचा अदमास करणें. Address'es *pl.* Address, Addressing *n.* (v. V. 1.)-*act.* योजणें *n,* लावणें *n,* &c., उपयोग *m,* योजना *f,* योजन *n,* योजणूक *f.* २—*act.* योजणें *n.* &c., प्रयोग *m,* उपयोग *m,* योजना *f,* योजन *n,* योजणूक *f,* करणी *f.* ३-*act.* हटकणें *n,* संबोधणें *n,* संबोधन *n,* अभिवादन *n,* अभिमंत्रण *n.* I. *manner of A.* बोलण्याची ढब *f*-धज *f*-चाल *f*-रीत *f*-ऐट *f.* &c. II *skill, management, conduct* ओज *f,* आवर *m,* आवरकशक्ति *f,* आवरण *n,* अटोप *m,* कर्तृत्व *n,* नेतृत्व *n,* नियंतृत्व *n,* व्यवहर्तृत्व *n,* चतुराई *f,* युक्ति *pop.* जुगूत *f,* युगूत *f,* धज *f,* सौकर्य *n.* III (of a letter, &c.) पत्ता *m.* IV *complimentary introduction of letters* अलकाब *m,* मायना. *m* or माना *m,* प्रशस्ती *f,* पूर्वी *f,* इजत *f,* आदाब अलकाब *m,* मंगलाचार *m.* [There are particular forms of address-particular designation and titles or appropriate and allusive terms or phrases. A. to a father is तीर्थरूप, तीर्थरूप बाबासाहेब—to a mother तीर्थरूप मातुश्री *pop.* मातोश्री or मातुश्री, तीर्थरूप, तीर्थरूप आईसाहेब.—to a son, younger brother, young protege, &c. चिरंजीव.—to a daughter, &c. चिरंजीवी—now popularly चिरंजीव.—to an elderly person (male or female) तीर्थसरूप *pop.* तीर्थस्वरूप. -to an unwidowed-woman सौभाग्यवती वज्रचूडेमंडित. -to a widow गंगाभागीरथी, गंगाजलनिर्मल, आयाल, कोम. -to Brahmans esp. as learned, devout, &c., वेदमूर्ति, वेदोनारायण, वेदशास्त्रसंपन्न, विद्याविनयसंपन्न, पंडितशिरोमणि, अपरसूर्य-to a *Shudra* पाटील, गोसावी-to a *Shudra,* &c. from a Brahman पुराणोक्त (??) आशीर्वाद.-to Europeans, Muhammadans, &c. of dignity, अजम, आलीशा, मेहेरबान.-to powerful or affluent Marathas, अखंडित लक्ष्म्यलंकृत *pop.* अखंडितलक्ष्मीअलंकृत.-to a Gosawi or ascetic, तपोधन, तपोनिधि, तपोराशि, तपोमूर्ति, &c.-of honour, gener. राजश्री, राजश्रि *pop.* राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री, सर्वगुणसंपन्न, साहेब—(मुसलमानी रिसायतीपासून अलीकडे प्रचारांत)—(१) कोणीहि ऐपतवान् मनुष्य अगर वजनदार मनुष्य असला तर त्याला साहेब असें ह्मणतात. हा शब्द विशेषेंकरून सरदारांना व बड्या अधिकाऱ्यांना

उद्देशून लावतात; जसें श्री. बाबासाहेब, दादासाहेब, आबासाहेब. (२) राज्यकर्त्यांच्या जातीपैकीं कोणालाहि त्याची वास्तविक योग्यता न पाहतां हा शब्द लावितात; जसें, सोल्जरासंबंधानें वगैरे बोलतांना. (३) हा शब्द व्यवहारभाषेंतून भक्तीच्या भाषेमध्येंहि शिरला आहे. मुसलमानी रिसायतींत साधू झाले त्यांनीं हा शब्द देवाला वारंवार लाविला आहे. कोल्हापुरास पुष्कळ लोक जगदंबा महालक्ष्मीचे दर्शनास जातात तेव्हां अद्याप तिला आई-साहेब असें संबोधतात. (४) अर्थाकडे लक्ष न देतां बरोबरीचे मनुष्यहि एकमेकांस साहेब ह्मणतात. जसें:—कसें काय साहेब? साहेब हा शब्द फारशी असून त्याचा अर्थ स्वामी असा होतो. The forms of address above given are written *before* the names of persons to whom the letters are addressed; but the actual letter begins with (१) शिरसाष्टांग नमस्कार in the case of a father, mother or persons in their position (२) साष्टांगनमस्कार in the case of elders generally (३) आशीर्वाद in the case of a son, daughter or persons in their position (४) नमस्कार in the case of all persons older than the writer.] V. *Address'es* लग्नासाठीं स्त्रीचें आर्जव करणें, तिचा फाजील आदरसत्कार करणें-मन वळवणें. VI. *complimentary &c. letter* मानपत्र *n*, सन्मानपत्र *n*, सत्कारपत्र *n*. Addressed *p. a.* (v. V. 1.) योजलेला, लावलेला, &c., योजित. २ योजलेला, योजित. ३ हटकलेला, संबोधित, अभिवादित, अभिमंत्रित. ४ नांवानें लिहिलेला, &c. ५ दिम्मतीस पाठवलेला. Addressing *p. a.* Addresser *n.* (v. V. 1.) योजणारा, लावणारा, &c., योजक, योजन–&c.-कर्त्ता. २ योजणारा, &c., योजक, प्रयोग-&c.-कर्त्ता. ३ हटकणारा, संबोधन-आभाषण-&c.-कर्त्ता, अभिवादक.

Adduce (ad-dūs') [L. *ad*, to, & *ducere*, to bring.] *v.t.* (an argument, a reason, &c.) *allege, assign, advance* पुढें करणें, उभा करणें, लावणें, दाखवणें, प्रदर्शन *n.* करणें, बोलणें, सांगणें, बोलण्यांत-&c.-आणणें, उपन्यास *m.* करणें *g. of o.* Adduced *p. a.* (v. V.) पुढें केलेला, दाखवलेला, सांगितलेला &c., उपन्यस्त. Addūc'ible *a.* (v. V.) पुढें कराया-चा-जोगता-जोगा-&c., उपन्यसनीय, उपन्यास्य. Adduc'tion *n.* (v. V.)-*act.* पुढें करणें *n*, दाखवणें *n*, सांगणें *n*-&c. उपन्यास *m.* २ *physiol.* शरिराचे अवयव शरिरांतील कल्पित मध्यरेषेकडे नेण्याची क्रिया *f.* (opposed to *abduction*), अंतःक्षेपन *n*, उपक्षेपन *n*.

Adductor (ad-dukt'ur) *n. anat.* शरिराचे अवयव कल्पितमध्यरेषेकडे नेणारा स्नायु *m.* (opposed to–*abductor*), अंतःक्षेपक (स्नायु), उपक्षेपक *m.*

Adelphous (a-del'fus) [Gr. *adelphos*, brother.] *a. bot.* एकत्र झालेला, एककेसर (?). Adel'phia *n. bot.* संगम *m*, भ्रातृगण *m*, सगळे केसर एकत्र झालेले किंवा एक केसरगुच्छ *m*, (पुंकेसरांचा) तंतुसमवाय, किंजल्कसमवाय.

Adenalgy (ad-en-al'ji) [Gr. *aden*, a gland, and *algos*, pain.] *n. med.* लसिकापिंडांतील-मांसग्रंथींतील (?) वेदना *f.* Adenol'ogy *n.* लसिकापिंडज्ञान *n*, मांसग्रंथिज्ञान (?) *n*.

Adenotomy (ad-en-ot'o-mi) [Gr. *aden*, a gland, & *tome*, cutting.] *n. anat.* लसिकापिंडच्छेदन *n*.

Adephagia (ad-ē-fā'ji-a) [Gr. *aden*, abundantly, & *phagere*, Sk. भुज्, to eat.] *n. med.* खाखा सुटणें *n*, अत्यग्नि *m*, तीव्राग्नि *m*.

Adept (ad-ept' or ad'ept) [L. *adeptus*, one who has obtained proficiency.] *n.* प्रवीण *m*, पटाईत *m*, वस्ताद *m*, पक्का-निपुण-&c.-मनुष्य *m. a.* (with *in*) निष्णात, निपुण, प्रवीण, पुरा, पक्का, पूर्ण-पुरा माहितगार, संपन्न, पारंगत, अभिज्ञ, धुरीण, अभ्यासप्रवीण, सराईत, गाढा (*obs.*), तरबेत (द or ज). २ सिद्ध (in alchemy or magic). ३ वस्ताद, पक्का. To be or become adept चौपायीं (*viz.* in चोरी, शिनळकी, चहाडी, &c.) उगवणें or उजवणें (This idiom is now rarely used), पक्का-पटाईत होणें. Adep'tion *n.* मिळवणें *n*, साधन *n*.

Adequate (ad'e-kwāt) [L. *ad*, to, & *æquus*, equal.] *a.* पुरा, पुरता, बराबर, सारखा, भरपूर, योग्य, समान, सम, तुल्य, पुरायाजोगा-सारखा, उपयुक्त, &c., पर्याप्त, क्षम, समर्थ, प्रमाणांतला, अनुरूप. [That is barely A. जेमतेम, पुरेसा, चुटपुटता, चुटपुरता, चुटपूट (*obs.*), चुटपुटित almost obsolete in this sense now, जितक्यास तितका, तात्पुरता, तावन्मात्र.] Ad'equately *adv.* (v. A.) पुरता, पुरा, बराबर, यथायोग्य, कामापुरतें. Ad'equateness, Ad'equacy *n.* (v. A.) बराबरी *f*, पुरतेपणा *m*, पर्याप्ति *f*, योग्यता *f*, सामर्थ्य *n*, क्षमता *f*.

Adfected (ad-fekt'ed) *alg.* See affected.

Adhere (ad-hēr') [L. *ad*, to, & *hærere*, *hæsum*, to stick.] *v. i. stick to* चिकटणें, लगटणें, डकणें, बिलगणें. २ *stick to* (*fig.*) *be attached, faithful,* &c. लगटणें, चिकटणें, बिलगणें, बिलगून-चिकटून-लगटून-जडून-धरून-&c.-राहणें-असणें-&c., अवलंबून राहणें, आसक्त होणें, अनुषंगानें चालणें, आश्रित *m.* होणें *g. of o.*, अनुयायित्व *n.* पतकरणें *g. of o.* ४ (शीं) जुळणें. [To A. to one's promise वचन पाळणें, वचनाप्रमाणें चालणें.] Adher'ence, Adher'ing *n.* (v. V. 1.)—*act.* चिकटणें *n*, लगटणें *n*, चिकटून असणें *n*, &c. २ (v. V. 2.)—*act.* बिलगून राहणें *n*, &c. —*state or quality* सक्ति *f*, आसक्ति *f*, निष्ठा *f*, एकनिष्ठता *f*, अवलंबन *n*. Adher'ent *a.* Adhering *p. a.* (v. V. 1.) चिकटणारा, लगटणारा, आश्रय करणारा, &c., चिकटून-&c.-राहिलेला. २ बिलगून राहणारा-राहिलेला, &c., परायण (in comp. as स्वार्थपरायण). ३ आसक्त, एकनिष्ठ. ४ *bot.* संलग्न, अवलंबित, संसक्त. Adher'er (R), Adher'ent *n.* (with *of*) *follower, partizan* आश्रयी *m*, अनुयायी *m*, अनुगामी *m*, आश्रित *m*, सपक्ष *m*, पक्षी (S) *m*. Adher'ently *adv.*

Adhesion (ad-hē'zhun) [see Adhere.] *n.* अनुषंग *m*, मिलाफ *m*, लगट *f*, चिकटून असणें *n*. २ अवलंबन *n*. ३ आसक्ति *f*, एकनिष्ठता *f*. ४ अनुमति *f*, एकमत *n*, संमति

*f*, पालन *n*, &c. as, A. to a treaty. ५ *phys.* पृष्ठाकर्षण *n*, पदार्थाचे पृष्ठभाग चिकटण्याचा धर्म *m*, संलग्नताकर्षण *n*, अनुषंगाकर्षण *n*, संसक्त्याकर्षण *n*, आसक्ति *f*, स्नेह *m*. ६ *bot.* (कांहीं वनस्पतींतील) संलग्नत्व *n*, सलगी *f*, संसक्ति *f*, संश्लेष *m*. ७ *med.* जवळ असणाऱ्या दोन पृथक् अवयवांस जखमा किंवा दाह होऊन एकमेकांशीं कायमचें एकजीव होणें *n*, संश्लेष *m*. Adhes'ive *a.* चिकट, चिकटणारा, चिकण, चिकटाऊ, लगटणारा. Adhes'ively *adv.* Adhes'iveness *n.* चिकटपणा *m*, चिकटाई *f*, चिकटण *f*, धर *m*. २ *phren.* मैत्रीस्थान *n*, मित्रस्थान *n*.

Adhibit (ad-hib'it) [L. *ad*, to, & *habere*, to hold.] *v. t. use* कामास लावणें, उपयोगांत आणणें, प्रयोग *m*. करणें *g. of o.*, योजणें, योजना *f*-योजणूक *f*-&c.-करणें *g. of o.* २ (in one's own person) सेवणें, सेवन *n*-&c. -करणें *g. of o.* ३ (सही) करणें, घालणें. Adhibited *p.* (v. V. 1.) योजलेला, योजित, प्रयुक्त. २ (v. V. 2.) सेविलेला, सेवित. ३ केलेला. Adhibiter *n.* (v. V. 1.) योजक, योजणारा, &c., प्रयोगकर्त्ता. २ (v. V. 2.) वापरणारा, सेवक. ३ (सही) करणारा. Adhibi'tion *n.* (v. V. 1.)–*act.* प्रयोग *m*, योजना *f*, योजणें *n*, योजणूक *f*. २ (v. V. 2.)—*act.* सेवणें *n*, वापरणें *n*, सेवन *n*, उपसेवन *n*. ३ (v. V. 3.) (सही) करणें-घालणें *n*.

Adiabatic (a-di-ab'at-ik) *a. phys.* उष्णावरोधक; as, A. line or curve उष्णावरोधक रेषा किंवा वक्र. Adiabatically *adv.*

Adiactinic (a'dī-ak-tin'ik) [Gr. *a*, not, *dia*, through and *aktinos*, a ray.] *a. chem.* रक्तनीळ (*violet*) रसायनकार्यकारी प्रकाशकिरणें ज्यांतून जात नाहींत असा, रक्तनीलकिरणाविच्छेद्य.

Adiaphoron (a-di-af'or-on) [Gr. *a*, not *dia*, apart, *pherein*, to carry.] *n. pl. theol.* (any text or usage which is considered as non-essential) अप्रत्यवायकर्म *n*. Adiaph'orism *n.* अप्रत्यवायता *f*. Adiaph'orous *a.* उदासीन, तिन्हाईत. २ मध्यम, सरासरी. ३ *med.* गुणावगुण न करणारें (औषध). ४ *theol.* जें न केलें असतां पाप लागत नाहीं असें (कर्म).

Adiathermic (ā-dī-a-ther'mik) [Gr. *a*, not, *dia*, through, & *thermos*, Sk. घर्म, heat.] *a.* उष्णाभेद्य.

Adieu (a-dū') [L. *ad*, to, *Deus*, Sk. देव, God.] *n. lit.* निरोप देतेवेळीं 'तुझें देव भलें करो' अशा आशीर्वादार्थी इंग्रजींत एक सूचक शब्द *m*. २ जातेवेळचा आशीर्वाद *m*. ३ चरममंगल *n*. (of doubtful meaning). [SOME OF THE COMMON MODES OF EXPRESSION AMONG THE HINDUS ARE कल्याण असो, देव तुमचें बरें करो, स्वस्ति.] ४ रामराम *m*. ५ मित्रांची तुटातूट होतांना परस्परांना सुख होवो अशा अर्थाचें भाषण *n*. Adieu *adv.* ईश्वराजवळ. Adieus or Adieux *n. pl.*

Adipic (a-dip'ik) [L. *adeps*, *adipis*, fat.] *a. chem.* चरवीपासून काढलेला, नैट्रिक ॲसिडच्या मदतीनें चरबीपासून काढलेला (तेजाब).

Adipose (ad'i-pōz) [L. *adeps*, *adipis*, fat.] *a.* चरबीदार, स्निग्ध. २ *zool.* मऊ व बिनहाडाचा, as. A. fin. Adi'posis *n. med.* मूत्राशयांतील स्निग्ध पदार्थ *m*. Adipose tissue शरिरांतील सप्तधातु.

Adipsia, Adipsy, (a-dip'si-a, a-dip'si) [Gr. *a*, not, & *dipsa*, thirst.] *n. med.* तृष्णाभाव *m*. Adip'sous *a.* तहान शमविणारें (फळ वगैरे).

Adit (ad'it) [L. *ad*, to, & *ire*, *itum*, to go.] *n.* खाणींत जाण्याचा अगर तींतून पाणी व अशोधित धातु बाहेर काढण्याचा रस्ता *m*-मार्ग *m*. २ खाणींत जाण्याची परवानगी *f*.

Adjacent (ad-jās'ent) [L. *ad*, to, & *jacere*, to lie.] *a.* जवळचा, आसपासचा, जवळपासचा, लगत्याचा, लगतचा, सन्निध असणारा, शेजारचा, निकटवर्त्ती, समीपस्थ; as, A. Angle. Adjac'ency, Adja'cence *n.* (v. A.) जवळीक *f*, जवळपणा *m*, लगत *f*, लगता *m*, समीपता *f*, निकटवर्त्तित्व *n*, निकटता *f*, सान्निध्य *n*. Adjac'ently *adv.*

Adjective (ad'jek-tiv) [L. *ad*, to, & *jacere*, to throw.] *n. gram.* विशेषण *n*, गुणवाचक *m*, गुणवचन *n*, गुणविशेषण *n*. [RELATION BETWEEN AN A. AND ITS NOUN विशेषणविशेष्यभाव *m*.] *a.* गुणवाचक. २ परावलंबी; as, A. colour इतर पदार्थांच्या मदतीशिवाय जो रंग पक्का बसत नाहीं तो; जसें, पतंगाचे लांकडाचा रंग कपड्यावर पक्का बसविणें झाल्यास त्यांत हिराकस वगैरे पदार्थ घालावे लागतात. ३ *law* वहिवाटीचा, न्यायाचें काम चालविण्याच्या वहिवाटीसंबंधीं, प्रवर्तक (as opposed to substantive निर्णायक law). Adjectīv'al *a.* विशेषणासंबंधीं-सारखा. २ विशेषणाच्या अर्थाचा, भपकेदार, पुष्कळ विशेषणें असलेला, प्रशंसापूरित; as, Description overpoweringly A. Adjectiv'ally, Ad'jectively *adv.*

Adjoin (ad-join') [L. *ad*, to, & *jungere*, to join.] *v.t.* जोडणें, सांधणें, लावणें, मिळविणें. *v.i. be contiguous* लगत *adv.* असणें, शेजारीं असणें, लगत *f*-लगता *m*-असणें. in. con. *g. of s.* Adjoin'ing *p. a.* (v. V. I.) जवळचा, पासचा, लगतचा, लगतीचा, लगत्याचा, शेजारचा, संसर्गी, संसक्त, अव्यवहित, पडोशाचा. Adjoin'ing, Adjunc'tion *n.* (v. V. I.)—*state.* लगत *f*, लगता *m*, उपश्लेष *m*.

Adjourn (ad-jurn') [L. *ad*, to, & *dies*, sk. दिवस, a day.] *v. t. put off* लांबणीवर टाकणें, दुसऱ्या दिवसावर ढकलणें, दुसऱ्या दिवसापर्यंत-दुसऱ्या दिवसास-&c.-ठेवणें, ठेवणें, महकूब or तहकूब करणें or ठेवणें. २ दुसऱ्या बैठकीपर्यंत तहकूब करणें-ठेवणें. *v. i.* कांहीं वेळ (सभेचें) काम बंद पडणें, नियमित काम अपुरें राहिल्यामुळें तें पुरें करण्याकरितां (सभेची) बैठक पुढील दिवशीं होणें. Adjourn'ment *n.* (v. V. I.)—*act.* दुसऱ्या दिवसाला ठेवणें *n*, महकूब ठेवणें *n.* &c. २ (सभेच्या) कामाच्या तहकुबीचा काल *m*. ३ *law* तहकुबी *f*.

Adjudge (ad-juj') [Pref. *ad*, & Judge.] *v. t. doom to* दंड ठरविणें, शिक्षा *f*. सांगणें, शिक्षेची आज्ञा *f*-हुकूम

*m.*-&c.-करणें. २ *award* मनसुबी *f*-तपासणी *f*-चौकशी *f*-( now used in the sense of police investigation ) पंचाईत *f*-&c. करून देववणें, निवाडा-फैसल्ला-&c.-करून देणें-देवविणें. २ मानणें, समजणें, गणणें. Adjudg'ment *n.* फैसल्ला करून देणें-देवविणें *n*, निवाडा *m*, फैसल्ला *m.* २ शिक्षा *f.*

Adjudicate ( ad-jōō'di-kāt ) [ L. *ad*, to, & *judicare*, to judge. ] *v. t. determine judicially* निवाडा *m*-फैसल्ला *m.* करून देणें-देवविणें. २ शिक्षा *f.* सांगणें. *v.i.* निवाडा *m*-फैसल्ला *m.* करणें. २ शिक्षा *f.* सांगणें. Adjudicā'tion *n.* निवाडा-फैसल्ला करून देवविणें *n.* २ चौकशी करून निवाडा सांगणें *n.* ३ निवाडा *m*, फैसल्ला *m.* ४ *law* निर्णय *m*, ठराव *m*, शिक्षा *f*, ठेप *f.* Adjū'dicator *n.* चौकशी करून निवाडा सांगणारा *m*, &c.

Adjunct (ad'junkt) [ L. *ad*, to, & *jungere*, to join.] *n. appendage* अनुषंगानें असणारा-आनुषंगिक-अनुयोगी-अनुबंधी-&c.-पदार्थ *m* -विषय *m* -गुण *m* -&c. अनुबंध *m.* २ *gram.* अनुबंध (?) *m*, कार्य (?) *n*, विस्तृति *f*, विवर्धित शब्दसंयोग *m.* ३ जें कांहीं दुसऱ्या कशास जोडलेलें असतें तें. ४ सहज-अंगभूत-आनुषंगिक गुण *m*-धर्म *m*-वस्तु *f.* ५ *metaph.* मनाचे-शरिराचे गुण-धर्म-लक्षण *n.* ६ साथी *m*, सहायकारी *m.* *a. united with, immediately consequent* अनुषंगी, आनुषंगिक, अनुयोगी, अनुबंधी. Adjunc'tion *n.* अन्वय (s) *m*, जोडणें *n*, संयोग करणें *n.* २ संयुक्त वस्तु *f*, जोडलेली वस्तु *f.* Adjunct'ive *a.* जोडणारा, संयोजक (नाम), उभयान्वयी (अव्यय). Adjunct'ively, Adjunct'ly *adv.*

Adjuration (ad-jōōr-ā'shun) [L. *ad*, to, & *jurare*, to swear.] *n.* ( *v.* Adjure )—*act.* शपथ *f*-&c.-घालणें *n*, शपन *n.* I. *oath put or taken* शपथ *f*, आण *f.* Adjur'atory *a.* शपथेवरचा, शपथेचा. Adjur'ing *p. a.*

Adjure (ad-jōōr') [L. *ad*, to, & *jurare*, to swear.] *v. t. impose an oath on, charge on oath* शपथ *f*-आण *f*-द्वाही *f*-आणभाक-&c. घालणें or घालून बोलणें-बजावणें-ताकीद *f.* करणें-&c. २ कळकळपूर्वक विनंति *f.* करणें. Adjured *p.* ( v. V. ) शपथ घातलेला, आण घातलेला.

Adjust ( ad-just' ) [ L. *ad*, to, & *justus*, just.] *v. t. fix or set rightly, put in order* जागच्या जागीं-जेथल्या तेथें लावणें-ठेवणें-बसविणें, निटावणें, सुधारणें, सजवणें, नीट-बरावर-दुरुस्त-&c.-करणें-ठेवणें, बंदोबस्त *m*-बंदोबस्ती *f*-व्यवस्था *f*-&c.-करणें *g. of o.*, सोईवर आणणें. २ ( a dispute, debt, &c. ) तोडणें, चुकवणें, तोडीवर घेणें, न्याय *m.* तोडणें-निवडणें *g. of o.*, तोडजोड *f.* करणें *g. of o.*, तोड *f.* पाडणें *g. of o.*, हिशेब नक्की करणें, मेळ घालणें (accounts), तोडजोड करणें, मिटविणें. Adjust'able *a.* ( v. V. ) निटावण्याजोगा, तोडजोड करण्याजोगा, &c. Adjusted *p.* ( v. V. 1.) निटावलेला, बंदोबस्त केलेला-झालेला, व्यवस्था केलेला-झालेला, व्यवस्थित, व्यवस्थापित. २ चुकवलेला, तोडलेला, तोडजोड केलेला, चुकता, तोडीवर घेतलेला-आणलेला. Adjust'ment *n.* ( v. V. 1. )—*act.* निटावणें *n*, सुधारणें *n*, &c., व्यवस्थापन *n.*—*state.* बंदोबस्त *m*, बंदोबस्ती *f*, ठाकठिकी *f*, व्यवस्था *f.* २ ( v. V. 2.)—*act.* चुकवणें *n*, तोडीवर घेणें *n*,&c.—*state.* चुकवती *f*, घटवटना *f*, तोड *f*, तोडजोड *f.* ३ (v. V. 3.) *law* तोडजोड *f*, विम्याच्या रकमेची तोडजोड *f.* ४ *astron.* संस्थापन *n.*; as, Adjustment of time कालसंस्थापन *n.* Adjust'ive *a.* तोडजोड करूं किंवा होऊं शकणारा, &c.

Adjutant (ad'joot-ant) [L. *ad*, to, & *juvare*, to assist.] *n.* मदतनीस *m*, साहाय्यकर्त्ता *m*, याचें काम फक्त सेनानायकास आलेल्या बातम्या पोंचविणें व सेनानायकाकडून झालेल्या आज्ञा ज्याच्या त्यास कळविणें हें आहे. २ *mil.* सेनानायकाचा एक हस्तक *m.* Ad'jutancy *n.* वरील लष्करी कामगाराचा हुद्दा *m.* ॲडज्युटंटचा हुद्दा *m.* २ मदत *f.* Ad'jutant–gen'eral *n.* मुख्य सेनापतीबरोबर संबंध असणारा एका तुकडीचा मुख्य कामगार *m*, सेनाधिपतीचा मदतगार *m*, ॲडज्युटंटजनरल.

Adjuvant ( ad'joo-vant ) [ L. *ad*, to, & *juvare*, a help.] *n.* मदतगार *m*, सहाय्यकारी *m.* २ *med.* औषधांतील मुख्य द्रव्याच्या कार्याला मदत करणारा किंवा तें कार्य बदलवणारा *c*, अनुपान *n*, साह्यकारी द्रव्य *n.*

Adlibitum ( ad-lib'i-tum ) [ L. ] *a.* मनसोक्त, मनःपूत, स्वैर, यथासुख, मनास येईल तसें.

Admeasure (ad-mezh'ūr) [ L. *ad*, to, & *mensura*, a measure.] *v. t.* मापणें, क्षेत्र मोजणें, माप घेणें. Admeas'urement *n.* क्षेत्रफळ *n.* २ *law* गांवठण किंवा गुरचरण यांची हिस्सेरशी ठरविणें *n.* Admeas'urer *n.* मापणारा, &c.

Adminicle ( ad-min'i-kl ) [ L. *ad*, to, & *manus*, hand.] *n.* सहाय्यकारी वस्तु *f.* Adminic'ular, *a. law* सहाय्यकारी. A. testimony खुलाशाचा पुरावा *m.* Adminic'ularly *adv.*

Administer ( ad-min'is-tėr ) [ L. *ad*, to, & *ministrare*, to minister.] *v. t. serve, supply, afford* देणें, दान *n.* करणें, अर्पणें, अर्पण *n.* करणें *g. of o.* २ (a government, a business, an estate, &c.) (मुख्य अधिकाऱ्याच्या हुद्यानें काम) चालवणें, व्यवस्था पाहणें, वहिवाटणें, निर्वाहणें (R); वहिवाट *f*-करणें-चालवणें *g. of o.* २ चौकशी करून न्याय देणें, (कायद्याची) बजावणी *f.* करणें, न्याय *m.* पाहणें-तोडणें-करणें, न्यायदर्शन (S) *n.* करणें. ३ ( an oath. ) घालणें, देणें. ४ ( a dose of medicine ) देणें, पाजणें. ५ *phys.* देणें, चारणें, पुरवठा करणें. ६ ( alms &c.) देणें, वांटणें, घालणें, वाढणें. ७ *law* (मयत मनुष्याच्या मालमत्तेची सर्व प्रकारें) व्यवस्था लावणें. A. *v. i. contribute* सहाय-सहकारी–&c. असणें. २ मदत देणें-मिळविणें, (गरज) भागवणें; as, To A. to one's necessities. २ *law* (मयताच्या मिळकतीची कायद्यानुरूप) वहिवाट करणें. Admin'istrable *a.* Administrā'tion *n.* (v. V. 1.)—*act.* देणें *n*, अर्पणें *n*, &c. २–*act.* वहिवाटणें *n*, चालवणें *n*-&c.-वहिवाट

*f*, कार्यनिर्वाह *m*, कारभार *m*. [Administration-deed वहिवाटकरार *m*. Letters of A. to an estate वहिवाट चालविण्याची सनद *f*.] I *executive part of a Government* राज्यकारभारमंडळी *f*. [Change of A. राज्यचालकांची अदलाबदल *f*, कारभाराची बदल *f*, हालीमाली *f*; हाजीमाजी, नवें जुनें *n*.] II *reign, rule* अंमल *m*, कारकीर्द *f*; राज्य *n*, राजवट *m*, राज्यकारभार *m*. [Rigorous or severe A. करडा अंमल *m*.] III *law* (मयत मनुष्याच्या मालमत्तेची) वहिवाट *f*-व्यवस्था *f*. Admin'istrative *a*. कारभाराचा, कारभारीय. Administrā'tor *n*. वहिवाटदार *m*. २ राज्यकारभार चालविणारा *m*. ३ *law* (मृत्युपत्र केल्याशिवाय मेलेल्या मनुष्याच्या) मालमत्तेचा कोर्टानें नेमिलेला वहिवाटदार *m*. ४ शासनकर्त्ता, कार्यनिर्वाहक. Administrā'trix *n*. *fem*. वहिवाट *f*-कारभार पाहणारी स्त्री *f*. Administrā'torship *n*. वहिवाटदाराची कारकीर्द-हुद्दा.

Admiral (ad'mir-al) [Ar. *amir*, a lord, a chief.] *n*. *The chief commander of a navy* आरमारावरचा मुख्य अधिकारी *m*, आरमाराचा अधिपति *m*-अधीश *m*-मुख्य *m*, &c., आडमिरल *m*. २ ज्या लढाऊ गलबतांत हा मुख्य अधिकारी बसतो तें गलबत *n*. ३ आरमारांतील सर्वांत मोठें लढाऊ गलबत *n*. Red A. आणि white A. हीं दोन जातींचीं फुलपाखरें आहेत. Ad'miralship *n*. आडमिरलची जागा-हुद्दा-धंदा *m*. Ad'miralty *n*. आरमारावरच्या मुख्य अधिकाऱ्याचें काम *n*-हुद्दा *m*. २ आरमारावरील मुख्य अधिकार चालविणारी मंडळी *f*. *pl*. ३ ही मंडळी ज्या कोर्टांत न्यायाचें काम करितात तें कोर्ट *n*-ऑफिस *n*-कचेरी *f*; आरमाराचें खातें *n*.

Admire (ad-mīr') [L. *ad*, at, *mirari*, to wonder.] *v. t. regard with wonder and pleasure* चहाणें, चाहणें, वाहवा करणें, कौतुक करणें, सानंदाश्चर्य *n*-&c. -करणें, and *in. con.* वाटणें *g. of o.*, कौतुक *n*-मौज *f*-चमत्कार *m*-&c.-वाटणें *in. con. g. of o.*, आवडणें *in. con.*, आश्चर्य वाटणें. २ (सौंदर्य पाहून मन) प्रसन्न होणें. ३ प्रसन्न मुद्रेनें पाहणें. A. *v. i.* आश्चर्य-कौतुक वाटणें-दर्शविणें (sometimes with *at*). Ad'mirable *a*. (v. V.) आश्चर्य मानण्याजोगा, अद्भुत-सानंदाश्चर्य-कारक-कारी, मौज वाटाया-चा-जोगा-सारखा-&c., उत्तम, खासा, उत्कृष्ट, नामी. २ अनुपम, अत्युत्तम, नामी, रमणीय, मजेदार, मोहक, उमदा, चित्तवेधक. Ad'mirableness *n*. see Admirable. Ad'mirably *adv*. (v. A.) मौज वाटाया-जोगा-सारखा–&c. *a. decl.*, उत्तमरीतीनें, उत्तम, फार चांगलें, खूब, खासा, उत्कृष्ट. Admirā'tion *n*. वाहवा *f*, कौतुक *n*, चहा *f*, आश्चर्य *n*, आचंबा *m*, चमत्कार *m*, मौज *f*, सानंदाश्चर्य *n*. ३ आश्चर्यदर्शक मनाची प्रसन्नता *f*. ४ साश्चर्यभक्ति *f*. Note of A. आश्चर्यदर्शक चिन्ह *n*. Ad'mirative *a*. गुणाशंसी, गुणज्ञानसूचक, &c. Admīr'er *n*. चहाता *m*, गुण गाणारा, चहाणारा *m*, झील किंवा री ओढणारा (*colloq.*), भगत *m*. २ प्रशंसा करणारा *m*. ३ (*of women.*) प्रेम दाखविणारा *m*. Admīr'ingly *adv*.

Admit (ad-mit') [L. *ad*, to, & *mittere*, to send.] *v. t. suffer to enter* येऊं देणें, आंत येऊं देणें, दाखल करणें, प्रवेश करण्याचा अधिकार-हक्क देणें, जागा *f*. देणें, शिरकाव करूं देणें. २ *suffer to pass, allow, grant, concede* घेणें, मानणें, मान्य करणें, बार (?)-देणें-करणें, पतकरणें, कबूल करणें-होणें, झेलणें (?), आदरणें, ग्रहण *n*-प्रतिग्रह *m*-करणें *g. of o.* ३ *acknowledge* अंगीकारणें, स्वीकारणें, अंगीकार करणें, कबूल करणें. ४ खरें मानणें. ५ (ची) योग्यता-लायकी असणें. ६ *take in, receive amongst* घेणें, आंत घेणें, कवळणें, कवटाळणें, अंतर्भाव करणें, समावेश करणें with *g. of o.* A. *v. i.* योग्यता-शक्ति असणें (with *of*); as, These words do not admit of this interpretation. Admit'tance *n*. प्रवेश करण्यास मोकळीक *f*. २ प्रवेश *m*. See Admission. Admis'sible *a*. (v. V. 1.) येऊं द्याया-चा,-जोगता-जोगा-&c., प्रवेशनार्ह. २ घ्याया-चा-जोगा-जोगता-&c., मानाया &c.-चा-जोगा-&c.-उपादेय, प्रतिग्राह्य, ग्राह्य. ३ स्वीकारायाजोगा, &c., पदरीं घ्यायाजोगा, &c., स्वीकारणीय, स्वीकार्य. Admissibil'ity *n*. ग्राह्यता *f*. Admis'sion *n*. (v. V. 1.)—*act*. येऊं देणें *n*, आंत येऊं देणें *n*, प्रवेशदान *n*, प्रवेश *m*. २-*act*. घेणें *n*, मानणें *n*, पतकरणें *n*, &c., आदरण *n*.–*state*. मान्यता *f*, *a. or s.* पतक(का)र *m*, प्रतिग्रह *m*. ३ *a. or s.* स्वीकार *m*, अंगीकार *m*. ४ *law* कबुली *f*. I. मोकळीक *f*, प्रवेश करण्याची परवानगी *f*-हक्क *m*. Admit'table *a*. See Admissible. Admit'ted *p*. (v. V. 1.) येऊं-आंत येऊं-दिलेला. २ घेतलेला, मानलेला &c., मान्य, कबूल, रुजू, अनुमत, उपात्त, स्थापित, प्रतिगृहीत, प्रतिज्ञात. ३ स्वीकारलेला, अंगीकारलेला, &c., स्वीकृत. ४ अंतर्भूत, समाविष्ट. Admit'tedly *adv*. स्थापित-अनुमत-प्रतिज्ञात अशा-रीतीनें, कबूल केल्यावरून, &c.

Admix (ad-miks') [L. *ad*, to, & Mix.] *v. t.* मिळविणें, मिश्रण करणें, मिसळणें. Admix'ture *n*. मिळविणें *n*, मिश्रण *n*, मिसळ *f*. २ मिश्रित केलेला पदार्थ *m*. See Mix.

Admonish (ad-mon'ish) [L. *ad*, to, & *monere*, to warn.] *v. t. warn of, counsel against* ताकीद *f*-सूचना *f*-&c-कानउघाडणी करणें, पूर्वबोध *m*-उद्बोध *m*-उद्बोधन *n*-उपदेश *m*-&c.-करणें *g. of o.*, सुचविणें, जागें करणें, उद्बुद्ध करणें. २ *reprove gently* कान *m. pl.* उघडणें *g. of o.*, कानास खडा *m*. लावणें *g. of o.*, तोंडची शिक्षा *f*-शब्दाचा मार *m*-वाक्‌शिक्षा *f*-वाग्दंड *m*. करणें. ३ उपदेश करणें. ४ शिकविणें, बोध करणें. ५ सूचना *f*. देणें. ६ कर्त्तव्यकर्मास जागें करणें. Admon'isher *n*, Admonishing *p. a.*, Admon'itor *n*. (v. V. 1.) ताकीद करणारा *m*, &c., सूचनाकर्त्ता *m*, उपदेशक *m*, उद्बोधक *m*, पूर्वबोधकर्त्ता *m*. २ तोंडची शिक्षा करणारा *m*, &c. Admon'ishment, Admonishing, Admon'ition *n*. (v. V. 1.)—*act*. ताकीद करणें *n*, सूचना करणें *n*, &c., सूचना *f*, पूर्वबोधन *n*, उद्बोधन *n*. २ (v. V. 2.) कान उघडणें *n*, &c., कानउघाडणी *f*. I. *the warning given* ताकीद *f*, सूचना *f*, उपदेश *m*, बुद्धिवाद *m*, पूर्वबोध *m*, उद्बोध *m*.

II. *the reproof given* तोंडची शिक्षा *f*, वाक्शिक्षा *f*, वाक्ताडन *n*, वाग्दंड *m*, शब्दाचा मार *m*. Admon'itive *a.* कानउघडणीचा, कान उघडणारा. Admon'itively *adv.* Admonito'rial, Admon'itory *a.* सूचनापर, उपदेशपर.

Adnascent (ad-nas'ent) [L. *ad*, to, & *nasci*, *natus*, to grow] *a.* अंवलंबी, वृक्षावलम्बी (लता), बांडगुळासारखा.

Adnate (ad-nāt') [L. *ad*, to, & *natus*, born.] *a. bot.* पृष्ठस्पर्शी, जोडलेले, पृष्ठस्थित-लग्न.

Adnominal (ad-nom'in-al) *a. gram.* विशेषणासंबंधीं, विशेषणासारखा.

Adnoun (ad'noun) *n. gram.* गुणविशेषण *n*, विशेषण *n*.

Ado (a-dōō') [contr. of *at do*, to do; a Northern idiom, whereby *at* was used as the sign of the infinitive Mood, as in the Scandinavian language.] *n. labour, difficulty, pains* खटाटोप *f*, अवडंबर *n. m*, खस्ता *f. pl.* (*v.* खा, काढ), खटपट *f*, खवदव *f*, दगदग *f*, उपद्व्याप *m*. With much A. मारूनकुटून, मारूनधुमकून, मारूनमुटकून, झटून, झोंबून, बलेंबलें (*obs.*), अलेंबळें, लोंबीझोंबीनें. २ *confused hurry, pother, stir* गोंधळ *m*, घोळ *m*, घप्पाघोळ *m*, हुलहूल *f*. To make much A. about nothing अवडंबर माजविणें, अबाबा *m*-अबांव (*obs.*) *n*-तांडव *n*-&c.-करणें, निधाई (*obs.*) *f.* लावणें-पाडणें, हुलहूल *f.* लावणें.

Adobe (a-dō'-bā) *n.* कच्ची-उन्हांत वाळलेली वीट *f*.

Adolescent (ad-o-les'ent) [L. *ad*, to, & *olescere*, to grow.] *a.* वाढता, चढते पराईचा, चढते वयाचा, पौंगडावस्थेचा, ज्याची वाढ सुरू आहे असा (तरुण), तरुण, तरणाबांड. Adolescence, Adoles'cency *n.* वाढती पराई *f*, जवानी *f*, ज्वानी *f*, चढती पराई *f*, वाढती दशा *f*, पौंगड *n*, पौंगडावस्था *f*. २ (लहान मुलाची) वाढ *f*. ३ पोरपण आणि तारुण्य यांमधील वय *n*, यौवन *n*, चढतें रक्त *n*.

Adonis (a-dō'nis) *n.* अतिशय सुंदर पुरुष *m*, मदनासारखा सुंदर पुरुष *m*. Ad'onise *v. i. deck out the person* पोशाख *m*-चट्टीपट्टी *f*-चापचोपी or चापीचोपी *f*-शानशुकी *f*-शोकी *f*-टाकमटिका *m*-टिलेपट्टे *m. pl.*-टिळाटोपी *f*-छानछोकी *f*-&c.-करणें. Ad'onising *n.* (v. V.)-*act.* चट्टीपट्टी *f*, चापचोपी *f*, टिळाटोपी *f*, टेव or टेवरेव *m. pl.*, शानशुकी-शोकी *f*, डामडौल *m*. छानछोकी *f*.

Adopt (ad-opt') [L. *ad*, to, & *optare*, to choose.] *v. t.* (a son) दत्तक-पोसणा-&c.-घेणें, मांडीवर घेणें, ऑटींत-ओट्यांत (*vulg.*) घेणें, आपंगणें, पुत्र *m.* घेणें. २ (a measure, custom, &c.) आदरणें, घेणें, धरणें, पतकरणें, सेवणें, आश्रयणें [R], स्वीकारणें, अंगीकारणें, स्वीकार *m*-अंगीकार *m*-सेवन *n*-ग्रहण *n*-&c.-करणें. Adopted *p.* (v. V. 1.) दत्त-दत्तक-&c.-घेतलेला, पोसका(गा), पोसणा, पोट्या, मांडीवर घेतलेला, ऑटींत घेतलेला, मांडीवरचा, ऑटींतला. २ आदरलेला, सेवित, आदृत, गृहीत. Adoptabil'ity *n.* दत्तक घेण्याची लायकी *f*, आदरणीयता *f*, स्वीकरणीयता *f*, दत्तकयोग्यता *f*. Adopt'able *a.* दत्तक घेण्यास योग्य. Adopt'edly *adv.* दत्तकविधानानें. Adopter *n.* दत्तक घेणारा. २ *chem.* घट *m*, भांडें *n*. Adopting *p. a.* Adopt'ive *a.* (v. V. 1.) दत्त-दत्तक-पोसणा-&c.-घेणारा, मांडीवर घेणारा, ऑटींत घेणारा, दत्तकग्राहक, ग्राही, &c.; as, A. language. २ आदरणारा, &c., सेवी &c., सेवक (esp. in comp.). Adop'tion *n.* (v. V. 1.)-*act.* मांडीवर घेणें *n*, दत्तक-ऑटींत घेणें *n*, दत्तक घेणें *n*, दत्तकग्रहण *n*, दत्तकस्वीकार *m*.—*state.* दत्तकस्थिति *f*. Boy given into A. दत्त *m*, दत्तपुत्र *m*, दत्तक *m*, कृत्रिमपुत्र (R) *m*.-*revilingly* दत्तया or दत्त्या. *familiarly* दत्तोपंत, दत्तोबा. Boy given (after investiture with the thread) in A. in a family not related to him. He is heir both to his natural and to his adoptive parent द्व्यामुष्यायण *m*. Boy self-given into A. स्वयंदत्त *m*. Ceremonies or rites of A. दत्तविधान *n*, दत्तविधि *m*. Deed of A. मांडपत्र (R) *n*, दत्त(क)पत्र *n*. To give into A. मांडीवर-ऑटींत-ओट्यांत देणें-घालणें-ठेवणें. २ (v. V. 2.) —*act.* आदरणें *n*, सेवणें *n*. &c., ग्रहण *n*, धारण *n*, पालन *n*, सेवन *n*, उपसेवन *n*. Adopt'ious *a.* See Adopted.

Adore (ad-ōr') [L. *ad*, to, *orare*, to pray.] *v. t.* पुजणें, भजणें, अर्चणें, आराधणें, उपासणें, वंदणें, पूजन *n*-भजन *n*-&c. करणें *g. of o.* २ अतिशय भक्ति-प्रीति-मान दाखविणें. ३ अत्यंत प्रीति करणें; as, A man A.s a woman. Ador'able *a.* (v. V.) पुजाया-चा-योग्य-&c., पूजनीय, पूज्य, पूजार्ह, भजनार्ह, अर्चनीय, वंद्य, नमस्य, आराध्य, उपास्य, सेव्य, पूजापात्र, पूजाविषय. २ मानपात्र. Ador'ableness *n.* (v. A.) पुजायाची-भजायाची-&c.-योग्यता *f*, वंद्यता *f*-अर्हता *f*-&c. पूजनीयता *f*, पूज्यता *f*, पूजनार्हता *f*, &c., अर्घ्यता *f*, अर्हणा *f*. Ador'ably *adv.* Adorā'tion *n.* (v. V.)-*act.* पुजणें *n*, भजणें *n*, &c., पूजन *n*, भजन *n*, पूजा *f*, अर्चन *n*, अर्चा *f*, वंदन *n*, भक्ति *f*, आराधना *f*, आराधन *n*, उपासना *f*. २ एखाद्या पुरुषाचें स्त्रीवर पूर्ण प्रेम *n*. Adored *p.* (v. V.) पुजलेला, भजलेला, &c., पूजित, अर्चित, आराधित, उपासित, वंदित. Ador'er-or *n*, Ador'ing *p. a.* (v. V.) पुजणारा, &c., पूजक, आराधक, उपासक, वंदक, भक्त, भजक. २ प्रीति करणारा. ३ स्नेहदृष्टीनें पाहणारा, आशक, भक्त. Ador'ingly *adv.* (v. V.) पूज्यबुद्धीनें, भक्तिपूर्वक, &c.

Adorn (ad-orn') [L. *ad*, to, & *ornare*, Sk. वर्ण्, to deck, embellish.] *v. t.* शृंगारणें, शोभवि(व)णें, सुशोभित करणें, अलंकार *m. pl.* घालणें with वर *of o.*, अलंकारणें (*poe.*), शोभा *f*-रंग *m*-&c.-देणें-आणणें, भूषण *n*-भूषा *f*-मंडन *n*-&c.-करणें *g. of o.* २ नटविणें, सजवणें. Adorned *p.* (v. V. I.) अलंकारलेला (*poe.*), &c., अलंकारयुक्त, शोभायुक्त, &c., अलंकृत, सुशोभित, भूषित, मंडित, शृंगारित. Adorn'er *n.* सुशोभित करणारा, शृंगारणारा, अलंकारकर्त्ता. Adorn'ing *pr. p.* शृंगारणारा, प्रसाधिका *f*, प्रसाधक, अलंकारावह, शोभाप्रद, भूषादायक.

सारखा, वर, वाणी (as वेड्यावाणी), परी ( as लेंकरापरी, मूर्खापरी ), गत, चाल, तऱ्हा. ५ *respecting, concerning* विषयीं. ६ शोधार्थ; as, To hunt A. a model. ७ (गुणानें अगर पदवीनें) खालीं, खालोखाल. In the result he comes A. Gama. [One A. another एका पाठीमागून एक, क्रमशः; as, To be A. नादीं लागणें. He is A. money. A. all शेवटीं. २ सर्व गोष्टींचा विचार करितां. ३ निदानीं. ४ एतावता, असें असतांही, तथापि.] A. *adv.* मग, मागें, पश्चात्. २ नंतर, उपरांतिक, पाठलाग करीत. For directions on the rendering of this adverb as it occurs in Composition, see the adjective, and, for examples see the combinations below. After *a. later* (in time), *posterior* (in place). To this word appearing only in combination correspond मागचा, पाठीमागचा, मागला, उत्तर, पश्चात्, पश्चिम, आगामी, नंतरचा. For exemplification see After-life, Afternoon, and other combinations amongst these following in order. After-account *n.* मागचा हिशेब *m*, पश्चात् गणना *f.* After-act *n.* मागचें काम *n*, पश्चात्कर्म *n*, पश्चात्-क्रिया *f*-कृति *f*-करण *n.* After-age *n.* पुढील काल *m.* २ उत्तर वय *n*, ज्ञातारपण *n.* After-ages *n. succeeding ages* पुढील पिढींचे लोक *m. pl*, पश्चात् परंपरा *f.* २ *future ages* पुढचे लोक *m*, पुढें येणारे काळ *pl*, पुढील काळ *m*, उत्तरकाल *m*, आजपासून पुढल्या पिढ्या *f. pl.* After-birth ( aft'er-birth ) *n. med.* वार *f*, गर्भवेष्टन *n*, गर्भाशय ( R. in this sense ), जरायु *m*, *pop.*, जार *m*, खोळ *f*, कूस *f.* After-cast *n.* खेळ संपल्यानंतर डाव *m*-टाकणें. After-comer *n.* मागचा-पाठीमागें-नंतर-मागून येणारा, पृष्ठानुयायी, पश्चादागामी, अनुगामी, &c. After-cost *n.* मागचा खर्च *m*, पश्चाद्व्यय *m.* After-crops *n.* गिमवस *f.* or गिमवसचें पीक *n*, वांजगणें *n.* or वांजगण्याचें पीक *n* ( especially of the pulses ), दुसोटा *m*, दुसोट्याचें पीक *n*, पश्चिमधान्य *n*, पश्चाद्धान्य, एका वर्षांतलें त्याच जमिनीचें दुसरें पीक *n.* After-game *n.* पश्चात्प्रयत्न *m*, काम फसल्यावर तें सुधारण्याचा प्रयत्न *m.* After-grass *n.* एकदां गवत कापलेल्या जागीं त्याच वर्षी पुन्हां उगवलेलें गवत *n*, दुसऱ्या कापणीचें गवत *n.* After-growth *n.* फुटवा *m*, दुसरी वाढ *f*, दुसरें पीक *n*, दुसोट्याचें पीक *n.* After-hours *n.* अतिकाल (होणें), अवेळ *f*, अतिक्रांत समय *m.* २ पुढचा-पुढील-काळ *m.* After-life *n.* उतारवय *n*, उत्तरवय *n*, उत्तरपराई *f*, उतरती पराई *f*, ज्ञातारपण *n*, वार्धक्य *n*, पश्चिमवय *n*, परिणतवय *n.* After-math *n.* एकाच ठिकाणची एकाच हंगामांतील गवताची दुसरी कापणी *f*, गवताची दुसरी फूट *f*, दुसरा फुटवा *m.* After-most *a.* सर्वांचे पाठीमागचा, सर्वांनंतरचा, चरम. After-mentioned *a.* पुढें सांगितलेला. After-noon *n.* दोनप्रहरानंतरची वेळ *f*, तिसरा प्रहर *m*, Afternoon and evening *n.* उतरती वेळ *f*, उतारवेळ *f*, परत वेळ *f*, पराह्ण(ह्न), अपराह्ण(ह्न) *f. m.* After-glow *n.* सूर्यास्तानंतरचा पश्चिमाकाशांतील प्रकाश *m.* After-pains ( aft'er-pānz ) *n. pl.* बाळंत झाल्यानंतरच्या वेदना *f*, जारवेण *f*, जरायुवेदना *f.* After-part *n.* पश्चादंश *m*, पश्चाद्भाग *m*, उत्तरार्ध *n*, उत्तरभाग *m*, उत्तरांश *m.* After-piece *n.* नाटकप्रयोगानंतरचा फार्स *m.* After-sting *n.* परिणामदुःख *n*, परिणतिक्लेश *m.* Aft'er thought *n.* पश्चाद्बुद्धि *f*, पश्चाद्विचार *m*, पश्चिमबुद्धि *f*, पश्चात्कल्पना *f*, पश्चान्मति *f*, पश्चाज्ज्ञान *n*, झालेल्या गोष्टीचें समर्थन करण्यासाठीं योजलेला युक्तिवाद *m.* Aft'er-time *n*, पश्चात्-काल *m*-समय *m*-अवसर *m*-दिवस *m*, &c. After-ward After-wards *adv.* मागाहून, नंतर, मागून, मागें, मग, उपर, उपरांतिक, तदुपरी, परतः, उत्तरतः, तदुत्तर, तदनंतर, तेव्हां, पृष्ठतः. After-wise *a.* मागून शहाणा, गोष्ट घडून गेल्यानंतर ज्याला शहाणपण सुचतें तो, पश्चाज्ज्ञानी, पश्चाद्विचारी. After-wit *n.* पश्चाज्ज्ञान *n*, पश्चिमबुद्धि *f.* After-wrath *n.* पश्चाद्धमर्ष *m*, पश्चाद्रोष *m.* Afterings *n.* चिटणें, चिटलेलें दूध *n*, शेवटीं थेंब थेंब पिळून काढलेलें दूध *n.*

*N. B.*—There are numerous combinations of the preposition, adverb, or adjective *After* with nouns, verbs, participles, all of which cannot be included in this Dictionary owing to the narrowness of space. In such combinations, the hyphen is used to show that the grammatical relation between *After* and the following word is something else than the ordinary one of preposition and object or adverb and verb or adjective and noun. In some cases, this hyphen is dropped through carelessness. In the following combinations, *After* is used in its prepositional sense: After-noon, After-dinner, After-sun-set, After-grave. In the following combinations *After* is used in its adverbial sense: After-date, After-send, After-beer, After-liver, After-mentioned, After-specified. In the following combinations *After* is used in its adjectival sense: After-part, After-truck, After-birth, After-thought, After-account, After-cost, After-effect. The following are some of the special combinations: After-drops (drops of rain which continue to fall after the cloud has passed), After-thinker, (a reflector), &c., &c. The study of these combinations of *After* will be of great interest to those who want to obtain a scholarly knowledge of the English language.

Again ( a-gen' ) *adv. another time* आणखी, अणीक, दुसऱ्यानें, फिरून, परतून, पुनः *pop.* पुन्हा, मागल्यान् or नी or नें, or माकुतीं, दुसारणीं. [A. and A. पुनः पुनः A. and yet A. पुनरपि, पुनश्च, फिरफिरून. As much A. आणखी-इतका-एवढा.] २ *back in restitution*, *v.* Back पुनः, परत, परतून, फिरून, माघारां(रीं-रें). ३ *in return for*, *in recompense of* बदल or ला, ठिकाणीं, पायीं, उलटून, उलट, बदल, खातर. ४ *on the other hand* अन्यतः, अन्यपक्षीं, पुनः, परंतु, प्रत्युत (S).

*N. B.*—Some of the combinations of the adverb 'Again' are: again-bow ( to bend back ), again-hold ( to hold back ), again-behest ( reciprocal or mutual promise ), again-shine ( to reflect ), again-sound ( to resound ), again-ask (to ask back, require), again-set ( to set up again ), again-flower ( to bloom again ), again-weigh ( to reweigh ), again-writing ( copy ).

Against ( a-genst' ) *prep. in opposition to* विरुद्ध, वर, &c. [Note—The genius of the *marathi* language does not permit an exact rendering of this word. Sentences therefore constructed with it should be broken down, and rendered into Marathi with a single eye to the *sense.* For this mode will be wanted prepositions and particles and nouns and adjectives of varying meanings and powers and bearings; and of such words there will be found abundance. Thus—to render *I am or I act against him,* may be employed- विरुद्ध, विपरीत, प्रतिकूल, शत्रु, वैरी, विषम, अमित्र, आडवा, उलटा (*opposed, opposite*); as, मी त्यास विरुद्ध-विपरीत-&c.-आहें:-विरोध, विपर्यास, विपर्यय, प्रातिकूल्य, द्वेष, वैषम्य, विरोधभाव, आडवेपणा, उलटेपणा (*opposition*); as, माझा त्याशीं विरोधभाव-द्वेष-आडवेपणा-&c. आहे or मी त्याशीं विरोध करितों, त्याचा द्वेष करितों:—and such phrases as, विरोध करून, वैर बाळगून, कमर बांधून, वर चढून, तोंडावर मारून, मर्जी मोडून, &c. &c. The Sanskrit prepositions प्रति and वि well express the sense of *against;* but they are *inseparable* prepositions; as, प्रत्युद्गम or प्रत्युद्गमन going against; प्रत्युद्गत gone against; प्रतिकार or प्रतिक्रिया acting against, and विपक्ष, विमत, विमुख, &c. In Sanskrit प्रति as well as some other *inseparable* prepositions appear separately, as, प्रतिसूर्य (?) against the sun, प्रतिवात (?) against the wind.] २ -in place, *opposite* समोर, सम्मुख *pop.* सन्मुख, वर; as to send an army A. the enemy. ३ *in provision for,* or *expectation of* लक्षून, लक्ष्य *n*-धोरण *n*-संधान *n*-&c. धरून-ठेवून *g. of s.*, संधीस-संधीवर with *g. of o.*, वर. ४ *bearing upon* शीं; as, He leans A. a wall. ५ लक्षांत किंवा धोरण ठेऊन; You must provide A. a rainy day वाईट दिवस येतील हें लक्षांत ठेऊन कांहीं संचय केला पाहिजे. ६ वर to strike A. a rock. ७ साठीं, करितां A. an event.

*N. B.*—In the learned note of Mr. Candy, quoted in the above paragraph, on the idiomatic way of rendering "Against" into Marathi, in consonance with the genius of the Marathi language, he gives प्रतिसूर्य and प्रतिवात as instances of the preposition प्रति appearing separately. In our opinion प्रति in the above two combinations is as inseparable as प्रति in प्रत्युद्गम. In राजधानी प्रति, प्रति is a separable preposition. प्रतिसूर्य means a mock sun or a second sun, and प्रतिवात, a contrary wind. प्रतिवातम् and प्रतिसूर्यम् are no doubt prepositional conbinations but in them प्रति is an inseparable preposition. In pure Marathi or even in Marathicised Sanskrit, प्रति (meaning *against*) is perhaps never used as an inseparable preposition.

Agallochum ( a-gal'lok-um ) *n.* अगर *m-n*, अगरू *m.*

Agamist ( ag'am-ist ) [ L. *a*, not, & *gamos*, marriage. ] *n.* ब्रह्मचर्यमतवादी, लग्नासंबंधीं विन्मुख मनुष्य, विवाहविरोधी.

Agamous ( ag'-a-mus ) [ Gr. *a*, & *gamos*, marriage. ] *a. bot.* अपुष्प, क्षीणपुष्प. २ *biol.* अयोनिज, क्लीब, लिंगविहीन. [पसरून.

Agape (a-gāp') *adv.* तोंड वांसून, तोंड विचकून, आ

Agastric ( a-gas'trik ) [ Gr. *a*, without, & *gaster*, Sk. जठर (?) belly.] *a. physiol.* अन्नाशय-पक्वाशयरहित, अजठर.

Agate (ag'āt) *n. mineral.* एक जातीचा दगड *m*, गोमेद *m*, गोमेदक *m.* २ *print.* (*ruby* type) एक प्रकारचा छापाचा खिळा *m*-मुद्रणाक्षर *n.* Agatif'erous *a.* पुष्कळ गोमेद असलेला.

Age ( āj ) *n.* [ L. *ævum*, age. ] *whole duration or term of,* आयुष्य *n*, आयु *n*, आयुर्दा *f*, आयुर्दाय *m.* २ *generation* पिढी *f*, पिढीचा काळ. ३ (of the world) युग *n.* [The four *ages* of the Hindus, corresponding somewhat with the *golden, silver, &c., ages* are कृत, त्रेता, द्वापार, कलि. Ages rolled away युगाचीं युगें-युग युगांतरें-लोटलीं, कैक काळ गेला. Beginning of an age युगादि *m.* End of an age युगांत *m.* Golden age सत्ययुग *n.* Interval between two ages युगसंधि *m.* Lapse of ages कालगति *f.*] ४ *division of life* वयोवस्था *f*, दशा *f*, पराई *f.* [The three ages अवस्थात्रय *n.* these are *childhood* (*i. e.* infancy and adolescence) बाल्यावस्था *f*, *youth* (*i. e.* puberty and manhood) तारुण्यावस्था *f.* and *age* (*i. e.* declining years) वार्धक्यावस्था *f*, वृद्धत्व *n*, वार्धक्य *n.* Another account makes four ages अवस्थाचतुष्टय *n.* बाल्य, तारुण्य, प्रौढता, वार्धक्य. The two ages अवस्थाद्वय *n*; these are *advance to maturity* चढती पराई *f*, पूर्ववय *n*, पूर्वार्द्ध *n*, and *decline into age* उतरती पराई *f*, उत्तर पराई *f*, उत्तर वय *n*, उत्तरार्द्ध *n*, उतारवय *n.*] ५ *time of life* वयोवस्था *f*, दशा *f*, पराई *f*, वय *n*, उमर *f*, शीण *m-f.* [Age of twenty विशी *f.* A. of thirty तिशी. A. of forty चाळिशी. A. of fifty पन्नाशी. A. of sixty साठी. Disparity of A. लहानवीथोरवी, लहानी थोरी.] ६ *old age* ह्यातारपण-(पणा) *m*, म्हातारपणा *m*, वृद्धत्व *n*, वृद्धावस्था *f*, वृद्धापकाल(ळ) *m*, वार्धक्य *n*, जरा *f*, पांढरे केश-केंस *m. pl*, काळ्याचे पांढरे *m. pl.* [IMBECILITY

OF OLD AGE ह्मातारचळ *m.* REVERENCE &c. FOR AGE वयाला मान. BENT UNDER THE INFIRMITIES OF A. ह्मातारपणामुळें वांकलेला.] ७ *Ripe age, maturity* वय *n*, पोक्तवय *n*, प्रौढदशा *f*, मोठेपणा *m*, वयस्कता *f*. [THAT IS OF MATURE AGE वयांत आलेला, भरवयाचा, वयस्क, वयःस्थ, वयस्कर. THAT IS OF AGE (see major) वयांत आलेला, जातव्यवहार. THAT IS UNDER AGE (see minor) वयांत न आलेला, अजातव्यवहार. TO COME OF AGE OR TO BE OF AGE वयांत येणें.] ८ शतक. Augustan age रोमन बादशाहा आगष्टस याचा काळ, पूर्णवैभवशतक. Brazen A. बंडाळीचा काल(ळ). Iron A. कलियुग. Stone A. पाषाणयुग. ह्या काळांत माणसें हत्यारांऐवजीं तीक्ष्ण धारेच्या अगर अणकुचीदार दगडांचा उपयोग करीत अशी कल्पना आहे. Heroic A. वीरयुग. Age *v. t.* ह्मातारा किंवा जुना करणें, मुरवणें; as, To age wine. Aged *a.* ह्मातारा, वृद्ध, वयस्थ, वयोवृद्ध, वयातीत, वयस्क. [A. forty years. middle A. मध्यमवयस्क, वयस्थ.] २ *having a certain age* वयाचा, उमरीचा. Agedly *adv.* Agedness *n.* वृद्धता *f*, &c.

*N. B.*—The words Golden Age, Silver Age, and Iron Age are not the exact English renderings of सत्ययुग, त्रेतायुग, and कलियुग; but they are mere analogous expressions for the same. And as the English have only three Ages, it is not possible to find a corresponding name in English for द्वापारयुग.

Agenda (aj-end'a) [L. *agenda*, things to be done.] *n. pl.* टांचण *n*, टिपणवही *f*, नोंदवही *f*. *com.* कामाचें टिपण *n*. २ (*obs.*) सर्वांनीं मिळून करावयाची प्रार्थना *f*. Agendum *sing.*

Agennesis (a'jen-nē'sis) *n. physiol. male sterility* वंध्यत्व *n*, वांझपणा *m*, अफलता *f*. Also Agenesis.

Agent (āj'ent) [L. *agere*, to do.] *n. doer, actuator gram.* कर्त्ता, कर्तृपद *n*; करणारा, कारक, चालवणारा, प्रवर्त्तवणारा, कर (*in com.*). २ *factor, deputy* प्रतिनिधी *m*, गुमास्ता *m*, कारभारी *m*, मुनीम *m*, वकील *m*, मुतालीक *m*, जाबसाल करणारा *m*. [A. WITH FULL POWERS कुलकारभारी *m*, कुलअखत्यारी *m*, कुलकुल्ला *m.* (*obs.*)] ३ *com.* &c. अडत्या *m*, एजंट *m*. ४ *phys.* शक्ति *f*, कर्त्ता *m*. ५ हेतु *m*, साधन *n*. Ag'ency *n.* करणी *f*, कर्त्तृत्व *n*, कर्त्तेपणा *m*, कारकत्व *n*, करण *n*. २ गुमास्तेगिरी *f*, गुमास्तेपणा *m*, कारभारीपणा *m*, वकिलात *f*, वकिली *f*, एजंटी *f*. ३ अडत *f*, कारभार *m*, कर्तृत्वशक्ति *f*, सत्ता *f*. ४ मारफत *f*, द्वार *n*. ५ एजंटाचें ऑफिस *n*, एजंटाच्या ताब्यांतील प्रदेश *m*.

Ageustia (a-gūs'ti-a) [Gr. *a*, not, & *geuomai*, to taste.] *n.* अरुचि *f*.

Agglomerate (ag-glom'ĕr-āt) [L. *ad*, to, & *glomus*, a ball of yarn.] *v. t. gather into a ball or mass* गोळा *m*-गोलक *m*-पिंड *m*-गोलाकृति *f*-पिंडाकृति *f*-&c. करणें *g. of o.* A. *v. i.* होणें *g. of s.* A. *n. geol.* ज्वालामुखी पर्वतांतून बाहेर पडलेल्या अणीदार वस्तूंचा जमाव *m*. Agglom'erate, Agglom'erated *a.* राशीकृत, पुंजीकृत. Agglomerā'tion *n.* गोळा *m*, संचय *m*. Agglom'erative *a.* संचय-गोळा-करणारा.

Agglutinate (ag-glōōt'in-āt) [L. *ad*, to, & *gluten*, glue.] *v. t.* सरस *m*-&c. लावणें, सरसानें-&c.-चिकटविणें-जोडणें, डकवणें. A. *a.* डकवलेला, जोडलेला. २ *bot.* संयुक्त, संश्लिष्ट, संयुक्त (शब्द); as, arrow-head-maker. Agglut'inant *a. med.* डकवणारें-जोडणारें (औषध). A. *n.* डकवण *n*. Agglut'inate, Agglut'inative *a.* & *n.* जोडणारें, &c., लुकण *n*, जोडणारा (पदार्थ) *m*. Agglutinā'tion *n.* डकवणें *n.* चिकटवणें *n.* २ संयोग *m*, मिलाफ *m*, संबंध *m*, संश्लेषण *n*.

Aggrandise or ze (ag'grand-īz) [L. *ad*, & *grandis*, great.] *v. t.* मोठा करणें, उंच करणें (*colloq.*), मोठाई *f*-मोठेपणा *m*-थोरपणा *m*-&c.-देणें, वाढवणें, महत्त्व *n*-&c.-वाढवणें *g. of o.*, मोठ्या अधिकारास किंवा उच्च पदवीस नेणें, बढती-भरभराट करणें. २ फुगवणें, बडीजाव वाढवणें-माजवणें. Aggrandisā'tion, Aggrandisement *n.* (फाजील) बढती *f*, भरभराट *f*. Aggrandi'zable *a.* बढती करण्यासारखा, &c. Aggrandi'zer *n.* बढती करणारा-वाढवणारा, &c. Self-aggrandisement स्वतःची फाजील बढती करणें, आपलपोटेपणा.

Aggravate (ag'grav-āt) [L. *ad*, to, & *gravis*, heavy.] *v. t. make more grievous* अधिक जड-अधिक भारी-अधिक कठिन *pop.* कठीण-&c. -करणें, बिघडवणें, अधिक करणें, अधिक दुःसह करणें. [TO BE OR BECOME AGGRAVATED बळावणें, विकोपास जाणें.] २ *make more enormous or heinous* अधिक वाईट-अधिक दुष्ट-दुष्टतर-&c.-करणें, दोष *m*.-वाढविणें, दोषाधिक्य करणें. ३ विकोपास नेणें. ३ *provoke* खोड *f*-खोडी *f*-कुरापत *f*. करणें-काढणें *g. of o.*, चिडीस नेणें. ४ मीठमिरची लावून-बतावणी करून सांगणें, अतिशयोक्ति करणें. Ag'gravating *a.* चिडवणारा, कुरापत काढणारा. २ अधिक वाईट करणारा &c. Ag'gravatingly *adv.* Aggravā'tion *n.* (v. V. 1.)—*act.* अधिक जड करणें *n.* &c. २ (v. V. 2.)—*act.* अधिक वाईट करणें *n.* &c. ३ (v. V. 3.)—*act.* खोड काढणें *n.* &c., खवंडाळी *f*. I. *aggravating cause* (रोग) वृद्धिकारण *n*, कुरापतीचें कारण *n*, जड-दुःसह होण्यास कारण *n*. ५ (v. V. 4.) अतिशयोक्ति.

Aggregate (ag'greg-āt) [L. *ad*, to, & *grex*, *gregis*, a flock.] *v. t.* एकवट *adv.*-एकंदर *adv.*-एकत्र *adv.* करणें, एकवटणें, गोळा करणें, मिळवणें, समाहार *m*-&c.-करणें *g. of o.* [In the A. एकंदरीनें पाहतां, एकंदरींत *adv.*] A. *v. i.* एकत्र गोळा करणें. A. *a. collected into a sum or mass* एकंदर केलेला, &c., ढीग *m*-रास *f*-केलेली, गोळवलेला, एकवटलेला, सामवायिक, सामुदायिक, सामासिक (s), सामाजिक (s), समुदित, पिंडित. २ *bot.* समुदित, समाहृत, एकत्र, घोंसदार. ३ *min.* and *geol.* संश्लिष्टावयव (पदार्थ *m.*). A. *n. collected sum or quantity* समुदाय *m*, समवाय *m*, समाज *m*, समूह *m*, अनेक व्यक्तींची

मंडळी *f*, एकूणजमा *f*, एकूण तेरीज *f*, राशि *f*, जमा *f*, समुच्चय *m*, गण *m* (as अहर्गण, मासगण, वर्षगण, भगण &c.), वर्ग *m*, जात *n*. ४ *phys.* सजातीय पदार्थांचा ढीग *m*, रास *f*. Ag'gregately *adv.* (v. A.) एकंदर, एकवट, संघशः, समुदायरूप, समवायरूप. Aggregā'tion *n.* (v. V.)–*act.* एकवट-&c. करणें *n*, गोळा करणें *n*, एकवटणें *n.*, &c., समाहार *m*, पिंडीकरण *n.* (R.), राशीकरण *n.*—*state.* एकवटलेपणा *m*, एकंदरपणा *m*, एकत्रपणा *m*, समुदाय *m*, गोळा *m*, एकपुठा *m*, पिंडितत्व *n*, समाहार *m*, समाहृति *f*. Aggregator *n.* (v. V.) एकवट-एकत्र-&c.-करणारा, एकवटणारा, &c., समाहरण *n*-समाहार *m*-&c.-कर्त्ता, पिंडीकर्त्ता (S). Ag'gregative *a.* एकत्रित.

Aggress (ag-gres') [L. *ad*, to, & *gradi*, to step.] *v. i.* मूळ कुरापत *f*-काढणें-करणें, (कज्जास &c.) मूळ *n*-प्रारंभ *m*. करणें, पहिली चढाई *f*-पहिला चढाव or चढ *m*-पहिली चाल *f*-आगळीक *f*-आगळीत *f*-उपराळा *m*-विरोधोपक्रम *m*-वादोपक्रम *m*-&c.-करणें. Aggress'ive *a.* कुरापत काढणारा, &c. Aggress'iveness *a.* कुरापत काढण्याची खोडी *f*. Aggress'or *n.* (v. V.) आगळीक करणारा, उपराळा करणारा, &c., प्रथम अन्यायी *m*, अग्रवादी *m*. (कज्जास &c.) मूळ करणारा, काढणारा-प्रारंभ करणारा, उचलून येणारा-जाणारा, कज्जा-&c.-उपस्थित करणारा, (मूळ) आगळीक करणारा, (मूळ) कुरापत काढणारा.

Aggression (ag-gresh'un) [L. *ad*, to, & *gradi*, to step.] *n.* (v. V.)—*act.* (obs.) आगळी *f*, (मूळ) आगळीक *f*, आगळीत *f*, विरोधोपक्रम *m*, वादोपक्रम *m*, उपराळा *m*, प्रथमातिक्रम *m*. २ कुरापत *f*, पहिला हल्ला *m*. ३ सार्वजनिक शांततेचा भंग *m*, लोकांच्या हक्कांची पायमल्ली *f*.

Aggrieve (ag-grēv') [L. *ad*, to, & *gravis*, heavy.] *v. t.* *press heavy upon* पिडणें, जड-अवघड-&c.-जाणें-वाटणें *in. con.*, दुःख-&c.,-देणें, संताप देणें. २ *wrong, injure* अन्याय *m*-अपराध *m*-अपकार *m*-&c.-करणें *g. of o.*, जाचणें, गांजणें. [To BE MUCH AGGRIEVED BY फार गांजला जाणें, फार दुःख होणें.]

Aghast (a-gast') *a.* भीतीनें कावराबावरा, तारकाबारका, बावरा, घावरा, छळून गेलेला, मृतप्राय, गतप्राण, काष्ठवत्, चरक. २ भयचकित झालेला, भांबावलेला, गर्भगळित, घावरा. To be struck A. आंगावर कांटा उभा राहणें, भीतीनें एकदम चरक होणें, भीतीनें थबकून जाणें, भीतीनें निचेष्ट होणें, पांचांवर धारण बसणें.

*N. B.*—This word is of Anglo-Saxon origin. A. is intensive prefix and gœstan means to terrify. The primary notion in the root gœs (in *gœstan*) is to fix, to stick; to root to the spot with terror. (Chambers). The most accurate meaning of Aghast will be भीतीनें जागच्या जागीं थबकून गेलेला.

Agile (aj'il) [L. *agilis*, nimble.] *a.* चपळ(ल), चपळा, आंगसूट, सुटसुटीत, आंगाचा चपळ, चपलांग, चलाख. Ag'ileness, Agil'ity *n.* (v. A.) चपळाई *f*, अंगचपळाई *f*, आंगसफाई *f*, चापल्य *n*, चलाखी *f*, सुटसुटीतपणा *m*. Ag'ilely *adv.*

Agio (ā'ji-o) *n. com.* व्याज *n*, व(ब)टाव *m*, वरचा फरक *m*, सूट *f*, बट्टा *m*. Agiotage (aj'i-o-tāj) *n.* बट्ट्याचा धंदा *m*. २ हुंडीचा भाव उतरण्याकरितां व्यापाऱ्यांनीं उठविलेली हूल *f*.

Agist (a-jist') [L. *jacere*, to lie.] *v. t.* चारणीस or चारणीवर घेणें, चारणावळ घेऊन चारणें. Agist'ment *n.* चारणीस घेणें *n*. २ चारणावळ *f*. Agist'or, Agist'er *n.* चारणावळ घेऊन चारणीस घेणारा. २ चारणावळ घेणारा अमलदार *m*.

Agitate (aj'i-tāt) [L. *agere*, to drive.] *v. t.* *shake* हालवणें, हालवाहालव करणें, चळवळ करणें with *g. of o.*, खळवळवणें, गति उत्पन्न करणें, खुदळणें, क्षोभवणें, घोळणें. २ *discuss* वाटाघाट *f*. करणें with *g. of o.*, घोळवणें, घांसणें, घाटणें, घाटाघाट *f*-घालघोळ करणें with *g. of o.* ३ *disturb the mind or passions* क्षुब्ध-क्षोभित करणें, गढुळवणें, खडुळवणें, घावरवणें, तळमळवणें, खळवळवणें, घाबरा-हैराण-व्यग्र-व्याकुल करणें. Ag'itated *p.* (v. V. 1.) चळवळ केलेला, हालवलेला, घोळवलेला, &c., क्षुब्ध, क्षोभित. २ (v. V. 2.) वादविवाद झालेला, &c. ३ (v. V. 3.) गढुळवलेला, विव्हल or ळ, व्यग्र, व्याकुल, कासावीस, हैराण, संतप्त, आतुर, आकुल (in such compounds as क्षुधातुर, कामातुर, क्षुधाकुल), संविग्न. Agitā'tion *n.* (v. V. 1.)-*act.* चळवळ करणें *n*, हालवणें *n*, घोळणें *n*, संतापन *n*, आलोडन *n.*-*state.* खळवळ *f*, क्षुब्धता *f*, क्षोभ *m*, चळवळ *f*, धडपड *f*, घोळणें *n*, घाटणें *n*. २ (v. V. 2.) वाटाघाट *f*, घाटाघाट *f*, आलोडन *n*, चर्चा *f*, आलोडितत्व *n*. ३ (v. V. 3.) क्षुब्ध करणें *n*, गढुळवणें *n*, खडुळवणें *n.*-*state.* तळमळ *f*, तलखली *f*, हळहळ *f*, डामाडूळ (*obs.*), संताप *m*, क्षोभ *m*, उद्वेग *m*, क्षुब्धता *f* व्याकुलता *f*, कासाविसीशी *f*, व्यग्रता *f*, हैराणी *f*, हैराणगत *f*. ४ (v. V. 4.) *a.* or *s.* ताणाताण *f*, ओढाताण *f*, खळवळ *f*, कालवाकालव *f*. Ag'itable *n.* चळवळ करण्याजोगा, खळबळवण्याजोगा, वादविवाद करण्याजोगा, &c. &c. Ag'itative *a.* Ag'itator *n.* चळवळ करणारा, &c. &c.

Aglow (a-glō') [Pref. *a*, & Glow.] *adv.* or *a.* चकाकीत, सतेज, लखलखीत, प्रभावंत.

Aglutition (ag-lū-ti'shun) [L. *a*, not, & *glutire*, to swallow.] *n. med.* गिळतां न येणें *n*.

Agminate (ag'min-āt), Agminated (Ag'min-ā't-ed) *a.* [L. *agmen*, a train or crowd.] एकत्र झालेला; as, Agminated glands of Peyer in the small intestine.

Agnail (ag'nāl) *n.* नखुरडें, नखरूड *n*, नखुरडा *m*.

Agnate (ag'nāt) [L. *ad*, & *nascor*, *natus*, to be born.] *a.* पितृकुलाचा, गोत्रज, सगोत्र, पितृकुलीन. २ एककुलोत्पन्न. A. *n.* सगोत्री. Agnat'ic *a.* पितृवंशासंबंधीं. Agnat'ical *a.* Agnat'ically *adv.* Agnā'tion *n.* पितृगोत्रसंबंध *m*. (Cognation=मातुलसंबंध.)

Agnoiology ( ag'noi-ol'ō-je ) *n. metaph. the doctrine concerning those things of which we are necessarily ignorant* अज्ञातवस्तुमीमांसा *f*, अज्ञातवस्तुशास्त्र *n*.

Agnostic ( ag-nos'tik ) [ Gr. *gnostikos*, good at knowing. ] *n. one who holds that the existence of any thing beyond and behind material phenomena is unknown and ( so far as can be judged ) unknowable, and especially that a first cause and an unseen world are subjects of which we know nothing.* (M.) अज्ञेयवादी *m*, जडवस्तूंपलीकडील ईश्वरादि सर्व अज्ञेय आहे असें मानणारा. A. अज्ञेयवादासंबंधीं. Agnos'ticism *n*. अज्ञेयवाद *m*. "*They themselves vehemently dispute the term (atheism) and usually prefer to describe their state of mind as a sort of know-nothingism or agnosticism or belief in an unknown and unknowable God.*" (M.) Note that Acatalepsy is rendered by संशयवाद.

Ago ( a-gō' ) *a. & adv.* पूर्वीं, मागें, गेलेला, झालेला, झाला, गेला, गत, विगत, अतीत. Five years A. पांच वर्षांपूर्वीं. A while A. नुकताच. Long A. फार दिवसांपूर्वीं, कैक काळाचा, कधींचा.

Agog ( a-gog' ) *adv.* or *a. in a state of excitement* उत्कंठित, सोत्कण्ठ, आतुर, हुरहुरलेला. To be all A. फुरफुरणें, हुरळणें, भरारणें, हुरहुरणें, उमळणें, उबळणें, भुन्यावणें, भुन्यो भुन्यो *adv.* करणें. To set A. हुरशी *f*-हुरूप *f-m*-देणें-आणणें, भर देणें-घालणें, चढीं देणें (?).

Agoing ( a-gō'ing ) चालता, चालू, गतींत. To set a mill A. गिरण चालू करणें.

Agonic (ag'on-ik) [Gr. *a*, neg. *gonia*, Sk. कोण, angle.] *a*. कोन न करणारा, कोणशून्य. A. line *phys*. बांकशून्य रेषा *f*, अकोणिक रेषा *f*, अकोण रेषा *f*. ( ज्या ज्या ठिकाणीं लोहचुंबक-सूची बरोबर उत्तर दिशा दाखविते त्या त्या मधून जाणारी पृथ्वीच्या पाठीवरील कल्पित रेषा; अशी पूर्व व पश्चिम गोलार्धांत एकेक आहे ).

Agony (ag'o-ni) [Gr. *agon*, contest. ] *n*. (शारीरिक) व्यथा *f*, तीव्रवेदना *f*, कळ *f*, ठणका *m*, यातना *f*, अतिव्यथा *f*. २ *pl*. प्राणांत वेदना *f. pl*, प्राणांत व्यथा *f*, प्राणांत यातना *f*, रोमरोम वेदना *f*, रोमागणित वेदना *f*, केंसागणीं वेदना *f*. Ag'onize, Ag'onise *v. i. struggle* झगडणें, आयास-श्रम-प्रयत्न करणें, कुंथणें, नेटणें, झटणें. २ *suffer agony* रोमरोम वेदना होणें ( in. con. ), कळवळणें, वळवळणें, तळमळणें, तळतळणें, अति वेदना होणें, केशागणित-केशागणिक वेदना होणें in. con. A. *v. t.* दीर्घ आयास करणें, अतिदुःख-कष्ट देणें. Agonizer, Agoniser *n*. ( v. V. I. 1.) कुंथणारा, &c., आयासकर्त्ता. २ ( v. V. I. 2. ) कळवळणारा, तळमळणारा, तळतळणारा, &c., कासावीस होणारा. ३ ( v. V. T. ) फार दुःख देणारा, &c. Agonising *p. a.* See Agoniser. Ag'onising *n*. ( v. V. I. 1.) कुंथणें *n*, अटाघाट *m-f*, अटापिटा *f*, अटापेट *f*, उरस्फोड or उरफोड *f*, अट्टाहास *m*. २ ( v. V. I. 2.) कळवळणें *n*, वळवळ *f*, वळापिळा *m*, अळुकेपिळुके *m, pl*.–intens. तळतळाट *f*, वळावळ *f* ( R ). Ag'onisingly *adv*.

Agraphia ( a-graf'i-a ) [ Gr. *a*, not, & *graphein*, to write.] *n. med. a form of Aphasia* लेखनाक्षमत्वरोग *m*, लेखनाघात *m*, लेखनस्तंभ *m*, अलेखन (रोग).

Agrarian ( ag-rā'ri-an ) [ L. *ager*, a field. ] *a. relating to fields and lands* काळीसंबंधीं, जिरायती, जिरायताविषयींचा, शेतगण्याचा, क्षेत्रासंबंधीं, क्षेत्रिक, शेतजमिनीच्या प्रकरणांतला, शेतजमिनीसंबंधीं, क्षेत्रभूमीसंबंधीं. २ *bot*. रानटी. A. laws सार्वजनिक जमिनीची सारखी अगर यथायोग्य वांटणी करण्यासंबंधाचे कायदे, राजा व प्रजा यांचे दरम्यान जमिनीच्या मालकीसंबंधानें नियम करणारे कायदे. Agrarian *n*. शेतजमिनीची सारखी वांटणी असावी असें ह्मणणारा. Agrā'rianism *n*. Agra'rianize *v. t.* जनसमूहामध्यें ( जमिनीची ) सारखी वांटणी करणें.

Agree ( a-grē' ) [ L. *ad*, to, & *gratus*, pleasing.] *v. i. be in concord* मिळणें, मिळून राहणें, जमणें, जुगणें, जुळणें, मिलाफ *m*. असणें-होणें *g. of s. recipr.*, बनणें, पटणें-पडणें *g. of s. recipr.*, जम *m*-जवा *m*-सांधा *m*-&c.-बसणें *g. of s. recipr.* गोत *n*. मिळणें *g. of s. recipr.*, एकोपा *m*-ऐक्य *n*-ऐक्यभाव *m*-सौरस्य *n*. असणें, मिळणींत असणें, तिळागुणी ( R ) *n*-असणें-होणें. २ ( with *to*, *with* *in*, *on*) *accede, assent, consent, comply, acquiesce* अनुमत-सम्मत-&c.-होणें, अनुमत *n*-सम्मत *n*-अनुमोदन *n*-मान्यता *f*-अनुमति *f*-सम्मति *f* देणें, मान्य करणें, रुकार *m*-होयकार *m*. देणें, मान्य-राजी-&c.-होणें, कबूल होणें-करणें. ३ *settle terms, stipulate* खंडून देणें-घेणें, सई करणें, बोली *f*-करार *m*-ठराव *m*.-&c.-करणें, देऊं करणें, मोल *n*. करणें, निश्चय *m*. करणें, टाळी *f*. मारणें. ४ *be consistent, accord, concur, coincide ;* also *unite or suit well with* मिळणें, जमणें, बसणें, बनणें, जुळणें, उतरणें, लागणें, पडणें, घटाव *m*. बनणें, घडी *f*-जवा *m*-जम *m*-जमा *m*-जुगल *f*-सांधा *m*-&c.-बसणें *g. of s. recipr.*, जुगणें. ५ (*with*) *be wholesome to or for* मानणें, मानवणें, जिरणें, सोसणें, भावणें, पचनीं पडणें, मिलाफ *m*. होणें, पाळणें, रुचणें, पथ्य or पथ्यकर होणें, पुरवणें. ६ *answer* मिळणें, उतरणें, जमणें, जुळणें, जुडणें, बसणें, जम *m*-ताळा *m*-जडप *n*. बसणें *g. of s. recipr.* ७ *gram*. लिंग-वचन-विभक्ति यांप्रमाणें असणें. Agree'able *a. pleasant, pleasing, delightful, charming* आवडता, गोड, मान्य, प्रिय, सुप्रिय, मनासारखा, मनमुराद, मधुर, मंजूर, रुचिकर, रुचिर, रिझाऊ, चवदार, दिलपसंद, अभिमत, सुखद, प्रशस्त, चाह्य, अभिराम, रम्य, कमनीय, रमणीय, देखणा, मनोरम, मनोभिराम, मनोज्ञ, हृदयंगम, हृद्य, रंजक, मनोरंजक, चित्तवेधक, मनोहर. २ *congruous* जुळेल असा, मिलाफाचा, बेताचा, मेळाचा, संभावित (R), यथायोग्य, अनुकूल, माफक. Agree'ableness *n*.

(v. A. 2.) मेळ *m*, मिलाफ *m*, लाग *m*, आनुकूल्य *n*, अनुकूलता *f*. २ (v. A. 1.) आवडतेपणा *m*, गोडी *f*, चव *f*, चवदारी *f*, रुचिरपणा *m*, कमनीयता *f*, माधुर्य *n*, प्राशस्त्य *n*, मधुरपणा *m*, सौरस्य *n*. I मनोज्ञता *f*, प्रियता *f*, रम्यता *f*, मनोरंजकता *f*. II अनुरूपता *f*, संगत *f*, जुळणी *f*. Agree'ably *adv.* (v. A. 2.) मिलाफानें, बेतानें, प्रमाणें, यथायोग्य, अनुसार (in comp.), अनुरूप, (in comp.). २ *pleasantly* सुखानें, सुखरूपें, यथासुख, सहज, मनोरंजनपूर्वक. Agreed *p.* (v. V. I.) अनुमत, सम्मत, सई केलेला, पणित, प्रतिज्ञात, संकेतित, निश्चित, सांकेतिक; for other meanings of this word see the first meaning of the verb "To Agree" and also meanings 4, 5, 6, of the adjective 'Agreeing'. Agreeing *p. a.* (v. V. 1.) मिळणारा, &c., मिलाफी, मिलाफाचा, मेळाचा, एकमताचा, एकदिलाचा, एकचित्ताचा, एकचित्त, एकमत, एकमूठ, एकमुठी, एकविचाराचा, एकारथावर आलेला (*colloq.*). २ (v. V. 2.) मान्य, राजी, कबूल, खुशरजावंत, अनुमत, संमत, अभिमत, होयकाररुकार *m.* देणारा-भरणारा, अनुमोदन देणारा. ३ (v. V. 3.) खंडानें देणारा. ४ (v. V. 4.) मिळणारा, &c., अनुकूल. ५ (v. V. 5.) मानणारा, &c., पथ्य, पथ्यकर, पथ्याचा. ६ (v. V. 6.) मिळणारा, &c. I *gram.* समानाधिकरण. Agreement *n.* (v. V. 1.)—*state.* मिळणें *n*, &c., मिलाफ *m*, मेळ *m*, एकोपा *m*, ऐक्य *n*, ऐक्यभाव *m*, ऐक्यमत *n*, एकी *f*, एका *m*, बनाव *m*, जम *m*, जमाव *m*, जुगल *f*, जवा *m*, तह *m*, सौलत *f*, सवलत *f*, चक (?) *m*, तिळागुणी (R) *n*. २–*state.* अनुमत *n*, सम्मत *n*, अनुमति *f*, सम्मति *f*, मान्यता *f*, राजीपणा *m*, कबूलपणा *m*, दिलखुशी *f*, खुशरजावंती *f*. ३–*act.* खंडणूक *f*, सई करणें *n*, &c., बोली *f*, वदणूक *f*, पैज *f* (v. मार, कर, पाड), प्रतिज्ञा *f*, संकेत *m*, निश्चय *m*. ४–*state.* मिळणें *n*, &c., अनुमत *n*, अनुमति *f*, सम्मति *f*, सम्मत *n*, मिलाफ *m*, मेळ *m*, जम *m*, जमाव *m*, बनाव *m*, जवा *m*, जुगल *f*, जुळणी *f*, संगम (meaning जुळणी), उतारा *m*, घटाव *m*, घड *m* (v. बन, जम), लाग *m*, जोडी *f*. ५–*state.* मानणें *n*, &c., पथ्यपणा *m*, मिलाफ *m*. ६–*state.* मिळणें *n*, &c., जम *m*, लाग *m*, जोडी *f*. I. गिरमिट *n* (curruption of the English word Agreement). II *contract, compact, covenant, bargain* खंडणूक *f*, खंड *m*, होड *f*, बोली *f*, भाक *f*, करार *m*, प्रतिज्ञा *f*, संकेत *m*, ठराव *m*, समय *m*, वायदा *m*, नियम *m*. [AGREEMENTS AND ENGAGEMENTS,–COMPREH. करारमदार *m. pl*, कौलकरार *m. pl.* A. FOR A YEAR सालबोली *f*. BREAKING AN A. समयभेद (S) *m*, करार मोडणें *n*. HIRING AGREEMENT कच्ची भाडेचिठी *f*, एखादी जागा पुढें एखादे वेळीं भाड्यानें घेण्याचा ठराव *m*. WRITTEN A. लेखपत्र *n*, लेखी करार *m*. ITS VARIOUS FORMS ARE: करारनामा *m*, इकरारनामा *m*, कौलनामा *m*, कबुलात or कबुलायत *f*, लेख *m* (IN A TECHNICAL SENSE)]. III (of opinion, views, &c.) ऐक्यमत्य *n*, ऐक्य *n*, विचारैक्य *n*. IV *gram.* अन्वय *m*, सामानाधिकरण्य *n*. V (of different books, statements, &c.) एकवाक्यता *f*, ताळा *m*, ताळ *m*, उतारा *m*, जडप (R) *n* (v. बस).

Agriculture (ag'ri-kult-ūr) [L. *ager*, a field, & *cultura*, cultivation.] *n. husbandry* शेती *f*, शेतकी *f*, शेतीक (R) *f*, शेतकाम *n*, कृषि *f*, कृषिकर्म *n*, खेती *f*, कुणबावा *m*, कुणबीक *f*, कुळवाडी *f*, कुळवाडकी *f*. २ gener. or compreh. *field-business,-operation,-work* शेतीभाती *f*, शेतकाम *n*, शेतपोत *n*, शेतभात *n*, शेतखटपट *f*, शेतीक *f*, शेतकी *f*, वाहील or वाहेल *f*, लावणीटुपणी *f*, कृष्यंतर्गत व्यापार *m*, कृषि *f*. Hire of a beast upon A.-employment वाफ *f*, उडी *f*, खांद *m*, खांदवडा *m*. Implements of A.-compreh. अऊतकाठी *f*. The common ones are नांगर, पाभर, कुळव, कोळपें, गुठा or गुठें, रासनी, तिफण, मोघण, डिफळा. Reciprocal service in A. इरजिक or विरजीक *f*, हांदा *m*, पडकय *f*. Man or beast rendering it इरज्या or विरज्या, हांदेकरी or हांदलेकरी, पडकेल (R), पळटेल (R). Agricult'ural *a.* (v. N.) शेतीचा, शेतीविषयींचा, शेतपोत(ता)चा, शेताचा, शेतकामाचा, शेतासंबंधीं, शेताभाताचा, खेतीचा, कुणबाव्याचा, कृषीचा, कृषिसंबंधीं, कृषिकर्मासंबंधीं, कृषिविषयक, कृष्यंतर्गत, कृषिकर्मांतर्गत. A. ant *zool.* चारीचें बीं अन्नासाठीं सांठविणारी मुंग्यांची जात. Agricult'uralist, Agricult'urist *n.* शेतकरी *m*, शेत्या *m*, शेतकाम्या *m*, शेतखप्या *m*, शेतक्या (R) *m*, कृषि करणारा *m*, कृषिकर्मकर्त्ता *m*, कृषिक, कृषीवल, कर्षक, क्षेत्रजीवी, कृषिजीवी, कुणबी, हली *m*, कुल(ळ)वाडी *m*. [हरळी *f*.

Agrostis (a-gros'tis) *n. bent grass* दूर्वा *pop.* दुरवा *f*,

Aground (a-grownd') *adv.* or *a. naut.* (जहाज) जमिनीलगत, जमिनीस-तळास लागून, तळावर, भुईस, कोरड्यावर. To be A. लागणें, लागून असणें.

Agrypnotic (ag-rip-not'ik) [Gr. *agrypnos*, sleepless.] *n.* झोंप उडविणारें पेय *n*; as, चहा, कॉफी वगैरे.

Ague (ā'gū) [L. *acutus*, sharp.] *n. intermittent fever, med.* हिंवताप *m*, अंतऱ्याताप *m*, शीतज्वर *m*. २ *cold fit* हिंव or हींव *n*, थंडी *f*, (v. भर, ये) कुडकुडी *f*, हुडहुडी *f*, हुडहुड *f*, कांटे *m. pl* (v. ये), रेंपा *f. pl*, शिरशिरी *f*. ३ थंडी *f*, सरदी *f*. A'gued *a.* हिंवताप ज्याला आला आहे असा. २ थंडीनें हुडहुडणारा. A'guish *a.* हिंवताप आणणारा, थंडी भरलेला, कुडकुडी भरलेला. A'guishness *n.* (v. A.) कुडकुडी *f*, कुडकुडा *m*, हींव *n*. Ague-cake *n.* कौल्हू *f*, पानथरी *f*. Ague-proof *a.* जितशीतज्वर, शीतज्वरातीत. Ague-spell *n.* हिंवाचा-हिंवतापाचा मंत्र *m*, शीतज्वरनिवारक मंत्र *m*-जप *m*-तप *m*-उपचार *m*-&c. Ague-struck, Agued *a.* शीतज्वरपीडित-आर्त्त-ग्रस्त-बाधित-व्यास.

Agynous (a'jin-us) [Gr. *a*, without, & *gyne*, a female.] *a. bot.* स्त्रीकेंसररहित-हीन.

Ah (ä) *interj.* हा, अहा, हां हां, छी. २ हाय हाय, अरेरे. अयई, अयय, अहाहा, अलल, अबब. ३ अहाहा, हां.

Aha (ä-hä') *interj.* अहाहा, हाहा.

Ahead (a-hed') *adv.* पुढें, समोर. २ आघाडीस; as, To walk ahead of a person. ३ *naut.* गलबताचे पुढील बाजूस (opposed to *astern*). To go A. पुढावणें, पुढारणें. २ पुढें जाणें. To get A. of च्या पुढें जाणें. २ वर वर्चस्व करणें. [एक असा.

Aheap (a-hēp') *adv.* एकत्र सांठविलेला-रचलेला, एकावर

Aid (ād) [L. *ad*, to, & *juvare*, to help.] *v. t.* मदत-सहाय करणें. २ कुमक-हात देणें. A. *n.* मदत-कुमक करणारा, साहाय्य *m*, मदतनीस *m.* ३ *Eng. His.* प्राचीनकाळीं पार्लमेंटाकडून राजाला जी खंडणी मिळत असे ती. ४ *feudal law* कुळानें खोताला द्यावयाची खंडणी *f.* ५ मदत *f*, कुमक *f*, आश्रय *m*, आधार *m.* Aid'ance *n.* See Aid. Aid'ant *a. arch.* आधार *m*, धर *m.* Aider *n.* मदत करणारा. Aid'ful *a.* Aid'less *a.*

Aide-de-camp (ād'-de-kong) [Fr. *lit.* field-assistant.] *n. mil.* लष्करी खात्यांत मुख्याधिकाऱ्याचा निरोप नेणारा-आणणारा मनुष्य *m*, नकीब *m*, निरोप्या *m*, जासूद *m*, परिधिस्थ *m. pl.* Aides'-de-camp.

Ail (āl) [A. S. *eglan*, to pain.] *v. i. feel pain* दुखणें, दुखणें *n*-दुःख *n*-दरद *f*-विकार *m*-बाधा *f*-&c.-होणें; in. con., as, I ail, I am ailing मला or माझ्या जिवाला बरें वाटत नाहीं-स्वास्थ्य नाहीं-समाधान नाहीं-सुख नाहीं-वाईट वाटतें. A. *v. t.* (शरीरास किंवा मनास) दुःख-कष्ट देणें-बाधा करणें. २ होणें, घडणें with *what, something, nothing* used as noun; as, What ails you तुला काय होतें? A. *n.* See Ail'ment. Ailing *a. sick* दुखणेकरी, दुखणाईत, अस्वस्थ, असमाधानी. Ever A. सदा दुखरा-दुखणेकरी. Ail'ment, Ailing *n. bodily disorder* दुखणें *n*, दुःख, दर्द or दरद *f*, *m*, विकार *m*, विकृति *f*, असमाधान *n*, असुख *n*, अस्वास्थ्य *n.* २ *a slight disorder* चालतें-बोलतें दुखणें *n*, खातें पितें दुखणें *n*, हिंडतेंफिरतें दुखणें *n*, हिंडफिरें दुखणें *n*, क्षुद्ररोग *m*, अल्परोग *m.*

Aim (ām) [L. *ad*, to, & *æstimare*, to estimate.] *v. i.*-with a weapon, &c. नेम *m*-शिस्त *f*-धरणें-बांधणें, लक्ष *n*-संधान *n*-&c.-धरणें-लावणें, टिपणें, रोंखणें. २ (*fig.*) *point one's view or attention at* लक्ष्य *n*- लक्ष *n*-संधान *n*-धोरण *n*-&c.-धरणें-लावणें-ठेवणें. A. *v. t. direct, point* नेमणें, रोंखणें, योजणें, लावणें, धरणें. A. *n. direction given* नेम *m*, शिस्त *f*, संधान *n.* २ *view directed* नेम *m*, संधान *n*, अनुसंधान *n*, लक्ष *n*, लक्ष्य *n*, संधि *m* (*v.* ठेव), अवधान *n*, लाग *m*, मजुरा (?) *m* (*v.* धर). [UNERRING A. अचूकसंधान *n.* OF UNERRING A. अचूकसंधानी. ३ *point aimed at* निशाण *n*, लक्ष *n*, टिपण *n.* ४ *object of a design* निमित्त *n*, तात्पर्य *n*, आशय *m*, अभिप्राय *m*, मतलब *m*, इंगित *n*, विषय *m*, कटाक्ष *m.* Of single A. (or purpose) अनन्यवृत्ति. Aimed *p.* (v. V. T.) योजलेला, नेमलेला, योजित. Aimer *n.* (v. V. T.) योजणारा, नेम धरणारा, लावणारा, &c., योजक. Aiming *n.* (v. V. T.)-*act.* नेम धरणें, रोंखणें, नेमणें *n*, योजणें *n*, अनुसंधान *n*, योजना *f.*

Aim'less *a.* ज्यांत विशिष्ट हेतु नाहीं असा. Aim'lessly *adv.* विशिष्ट हेतु नसतां. To cry aim वाहवा करणें, शाबासकी *f*-देणें, उत्तेजन देणें.

Air (ār) [Fr.-L. *aer*-Gr.] *n. wind* हवा *f*, वायु *m*, मारुत (S) *m*, वारा *m*, वात *m*, आत्मा *m*, श्वसन *m.* [IN THE OPEN AIR, *exposed to the air* उघड्या हवेंत, वाऱ्यांत, उघड्यांत, वारबाटीवर, वाऱ्यावावधानांत. IN THE AIR, *in mid-space* अधांतरीं, अंतरिक्षांत, अंतराळीं. TO SNUFF UP THE AIR वारा *m.* घेणें-पिणें. TO TAKE THE AIR हवा *f*-वारा *m.* खाणें, वारापाणी *n.* खाणें, सहल *f.* करणें, बाहेर *adv.* फिरणें, सहल *f.* करणें, तलाव्यास (R) जाणें. TO BEAT THE AIR जलताडन *n.* करणें. २ (with respect to temperature-&c.) हवा *f.* ३-*as a circulating element in the body* वात *m*, वायु *m*, *Hindu med.* ४ *vital air* प्राण *m*, वायु *m.* [Five are enumerated-प्राण, अपान, व्यान, उदान, समान, and five inferior or secondary (उपप्राण)-नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय]. ५ *an A., a gentle wind* झुळूक *f*, मंद वायु *m*, वारें *n.* ६ *mien, look* मुद्रा *f*, चर्या *f*, चेहरा *m*, स्वरूप *n*, ढब *f*, आकार *m*, वारें *n.* ७ *affected or particular manner* झोंक *m*, छटा *f*, ठेव *f*, ठेवण *f*, नोक *f*, ऐट *f*, नोकझोंक *f.* ८ *general aspect* डौल *m*, घटाव *m*, ढब *f*, लकब *f*, ठेव *f*, ठेवण *f*, घाट *m*, रंग *m*, आकार *m.* ९ (airs) *haughty pretensions, notions, manners* अक्कड *f*, अक्कडबाजी *f*, कुर्रा *m*, तोरा *m*, पत्रास(ज) *f*, मिजास *f*, आढ्यता *f* (v. मार, बाळग, मिरव), उड्या *f. pl* (v. मार), प्रतिष्ठा *f* (v. मिरव, बाळग, ओढून आण, कर), फुशारकी *f*, बढाई *f*, बढाइकी *f* (v. कर), शेखी *f* (v. मिरव), तेगार *m* (v. कर), मगरुरी *f*, नखरा *m*, इसीम *f*, ऊतमात *m.* [TO GIVE ONE'S-SELF AIRS आव घालणें, ओढून प्रतिष्ठा *f.* आणणें, ओढून चंद्रबळ *n.* आणणें, ऊतमात *m.* करणें-मांडणें.]. १० *mus.* राग *m*, सूर *m*, ताल *m*, गत *f* (सतार वगैरे वाद्यांवर वाजविण्याची). ११ *publicity* उघड *f*, उघडीक *f*, फूट *f.* Air *v. t. expose to the a. dry in the a.* सुकत-वाळत-सुकूं-वाळूं-&c. घालणें, वाऱ्यांत-वारेवासीं घालणें-ठेवणें, वारा *m.* देणें-दाखविणें, वायुपुट *n*-वाऱ्याचें पुट *n*-देणें. २ *dry by exposure to fire* विस्तवाच्या योगानें वाळविणें-सुकविणें, विस्तवापुढें वाळत घालणें (slippers, sheets). ३ लोकांपुढें मांडणें, प्रसिद्ध करणें. To take air बाहेर फुटणें, पदकर्णी होणें, प्रसिद्ध होणें. Air-bath *n.* वायुस्नान. Air-bladder *n. anat.* वायुकोश *m* (found in fishes), वायूनें भरलेली पिशवी *f*, हवेनें भरलेली पिशवी *f.* Air-bed *n.* हवेनें भरलेली गादी *f.* Air-bone *n.* वायूनें भरलेलें पोकळ हाड *n*, वातास्थि *m* (पक्ष्यांची हाडें पोकळ असतात). Air-brained *a.* निष्काळजी (now generally spelt *hair-brained*). Air-cell *n. anat.* (फुफ्फुसांत हवा पुरवणारा) वायुकोश *m.* Air-chamber *n.* वायुकोष्ठ *m.* Air-compressor *n.* वायुसंपीडनयंत्र *n*, वायुसंकोचनयंत्र *n.* Air-cushion *n.* वायूनें फुगवलेली पिशवी *f.* Air-drawn *a. shakes.*

कल्पित. Air-engine *n.* वायूनें चालणारें यंत्र *n.* Air-filter *n.* हवा-वायु स्वच्छ करण्याचें यंत्र *n.* Air-furnace *n.* फक्त हवेच्या जोरानें चालणारी भट्टी *f.* Air-gun *n.* वातनलिका *f,* हवेच्या दाबानें उडणारी बंदूक *f.* Air-hole *n. opening for air* गवाक्ष *n,* झरोका *m,* धोरें *n,* खिडकी *f,* वातायन *n,* जाळी *f.* A hole of a water-conduit उच्छ्वास (*pop.*) उस्वास *m.* Air'ily *adv.* Air'iness *n.* (v. A. 3.) हवेदारी *f,* हवाशीरपणा *m.* ४ पोकळपणा *m,* रिकामेपणा *m.* ५ हलकेपणा *m,* छिछोरी *f,* छिछोरपणा *m,* अलबेलेपणा *m,* रंगेलपणा *m.* Airing *n. ramble for the air* सहल *f,* सैर *f,* फिरणें *n,* तलावा *m,* फेरफटका *m.* Airless *a.* खेळती हवा नसलेला. Air-jacket *n.* पाण्यांत तरंगतां यावें म्हणून हवेनें भरून तयार केलेलें कुडतें *n.* Air-passage *n. anat.* फुफ्फुसांत हवा नेणारी एक नलिका *f.* Air-pump *n. physics.* वाताकर्षक यंत्र *n,* वातनिष्कासक यंत्र *n,* वाय्वाकर्षक यंत्र *n.* वायुरेचक-&c.-यंत्र *n.* Air-plant *n.* आकाशवेल *m, f,* फक्त हवेवर वाढणारी वनस्पति *f.* Air-sac *n.* फुफ्फुसांत हवा पुरवणारा वायुकोश *m.* Air-shaft *n.* खाणींत हवा जाण्याचा मार्ग *m.* Air-tight *a.* वायु or वातनिरोधक-प्रतिबंधक, वातागम्य, वाताभेद्य, वायुप्रवेशास अगम्य. Air-spaces *n. mech. engin.* हवेकरतां ठेविलेल्या फटी *f.* Air-vessel *n.* हवेची नळी *f.* Air-wards हवेंत वर. Airy *a. composed of air* वायूचा, &c, वायुमय, वातमय, वायुरूप, वातरूप, वातनिर्मित, हवेप्रमाणें गुण-धर्म असणारी (वस्तु), वातकल्प. २ *belonging or relating to air* वायूचा, &c., वायुसंबंधीं, वातविषयक, वातीय, पवनासंबंधीं. ३ *windy, breezy,* (of places) हवाशीर, हवेदार, हवेचा, वारेवासीचा, वारघाटीचा, वाऱ्याचा. ४ *light, hollow* पोकळ, रिकामा, वाव(य)फळ, वायफट, वायकरणी, वायकरणीचा. ५ *frivolous, trifling* हलका, छिछोर, चिचोर, अक्कडवाज, वाव(य)कळ, कमतोल, अलबेला. ६ हवेंत उंच असलेला. ७ आनंदी, रंगेल. ८ *mus.* मधुर, लकेरीचें; A. music.

Aisle (īl) [L. *ala,* a wing.] *n. arch.* देवळांतील सभामंडपाच्या भोवतालचें दालन *n.* Aisled *a.*

Ait (āt) *n.* जुवें *n,* बेट *n.* (A form of *eyot,* an islet.)

Ajar (a-jär') *adv.* अर्धे उघडें (said of a door), किलकिला *a. decl.*

A-jar (a-jär') [Pref. *a,* & Jar] *adv.* बेबनावानें, न बनेल अशा रीतीनें, असंतुष्ट; as, He is A. with the world.

Akimbo (a-kim'bo) *a.* or *adv.* कोपर वर करून व ढुंगणावर (हात) टेंकून, कमानदार (said of the arm).

Akin (a-kin') [Pref. *a,* of, & Kin.] *a. v.* Related आप्त, नातलग, आप्तविषय, आंगलग, नातेवाईक. २ *partaking of the same properties* एके जातीचा, सधर्म, समानधर्मक, समगुण, एकधर्मक, समानजातीय, सजातीय, एकजातीय, हमजात. ३ समानधर्मीचा.

Ala (a'la) [L. *ala,* a wring.] *n. biol.* पक्षधर्मी इंद्रिय *n,* पंखासारखें (वापरतां येणारें) इंद्रिय *n,* पंख *m.* Alæ *pl.* २ *bot.* पंख *m,* पत्र *n,* पतत्र *n.*

Alabaster (al'a-bas-ter) [Gr. *alabastros,* from *Alabastron,* a village in Egypt where it was got.] *n. min.* संगमरवरी दगडासारखा पांढरा दगड *m.*

Alack (a-lak') *interj.* (Archaic or poetic) दुःखप्रदर्शक केवलप्रयोगी अव्यय, हायहाय, अरेरे. A-lack'a-day' *interj.* दुःखप्रदर्शक केवलप्रयोगी अव्यय.

Alacrity (a-lak'ri-ti) [L. *alacris,* cheerful.] *n. cheerful readiness* उत्साह *m,* हर्ष *m,* हौस *f,* औत्सुक्य *n,* उत्सुकता *f,* धमक *f,* प्रोत्साह *m,* हौस *f,* तयारी *f.* २ शीघ्रता *f,* उतावळ *f.*

Alamode (a-la-mōd') [Fr. *a, la mode,* after the fashion.] *adv.* चालीप्रमाणें, परिपाठानुरूप. (Sometimes used as an adjective). [रेशीम *n.*

Alamode (a-la-mōd') *n.* एक प्रकारचें पातळ काळें

Alar (ā'lar) [L. *ala,* a wing.] *a.* पंखासंबंधीं. २ सपक्ष, सपंख. Also A'lary.

Alarm (a-lärm') [L. *ad,* to, & *arma,* arms.] *n. cry or call to await some danger* भयाची-&c.-हाक *f*-ओरड *f*-कुई *f*-सूचना *f,* आसन्नभयसूचना *f,* आसन्नभयघोषणा *f,* सज्ज-तयार होण्याची सूचना *f,* सज्जताकरणसूचना *f.* २ *hubbub* हुलड *f,* हूल *f,* हाकहूल *f,* हूलचाल *f,* गलबल *f,* गलबा *m,* गडबड *f. intens.* गडबडाट *m,* हंगामा *m.* ३ हैबत *f,* दहशत *f,* धास्ती *f,* भेदरा *m,* वित्रास *m.* [To take A. at धास्ती *f* घेणें, हाय *f* खाणें-घेणें, हैबत *f.* घेणें, बाचकणें.]. ४ गजर, नेमलेल्या वेळीं जागें करण्याकरितां घड्याळांत केलेली यंत्राची योजना *f.* A. *v. t.* (v. N.) भयाची खबर *f*-बातमी *f*-&c.-देणें, नगारा *m.* करणें, तयारीची नौबत *f.* वाजवणें, तयारीचा नगारा *m.* वाजविणें, भयाविषयीं सावध-हुशार-&c. करणें. ३ भिवविणें, भेडावणें, भेडसावणें, भेदरावणें, भयभीत-भयाभीत-&c.-करणें. Alarm bell *n.* हुलीचा नगारा *m,* हुलीचें जंगट *n,* घोषघंटा *f,* आसन्नभयज्ञापकघंटा *f,* भयसूचकघंटा *f.* Alarm-clock, Alarm-watch *n.* गजरी घड्याळ *n,* विवक्षित वेळेस वाजून सावध करणारें घड्याळ *n.* Alarmed *p.* (v. V. 1.) भयाविषयीं सावध केलेला, &c. २ (v. V. 2.) भयभीत (*pop.*) भयाभीत, भयदर्शक (A. look.), वित्रस्त. Alarm'ing *p. a.* भयंकर, भयानक, भयजनक, भेसूर, भयप्रद, भयावह. Alarm'ingly *adv.* Alarm'ist *n. one given to raise alarm* भय भाकणारा, भयभाक्या, भयभाषी, भयाशंसी.

Alarum (al-är'um) *n.* See alarm. घड्याळाचा गजर *m.*

Alas (a-las') [L. *lassus,* weary.] *interj.* हाय हाय! अरेरे! Alas the day, Alas the while अरेरे! वाईट वेळ.

Alb, Albe (alb) [L. *albus,* white.] *n.* रोमन क्याथलिक धर्मोपदेशकाचा पांढरा झगा *m.*

Alba Dolens, *n. med.* श्वेतजंघारोग *m.* हा एक स्त्रीरोग आहे, व हा बाळंतपणानंतर होतो. जंघांतील शिरांचें रक्त गोठून त्वचेस पांढरेपणा येणें हें ह्याचें लक्षण आहे.

Albeit (awl-bē'it) [*Al, be,* & *it,* be it so.] *adv.* जरी, यद्यपि, असें आहे तरी. [शेडा *m,*

Albert (al'bert) *n.* घड्याळाची सांखळी *f,* छडा *m.*

Albescent (al-bes'ent) [L. *albus*, white.] *a.* पांढरा-फिकट होणारा, फिकट रंगाचा. Albes'cence *n.*

Albino (al-bī'no) [L. *albus*, white.] *n.* आफ्रिकेंत काळ्या आईबापांपासून झालेलें गोरें मूल *n*, विलक्षण पांढऱ्या कातडीचा व केंसाचा मनुष्यप्राणी *m.* २ *med.* श्वेतत्वप्रोग *m.* Albī'ness *n. fem.* Albī'nos or Albinoes *pl.* Al'binism *n.*

Albion (al'bi-un) *n.* इंग्लंड देशाचें प्राचीन नांव *n.*

Albugineous (al-bū-jin'e-us) [L. *albus*, white.] *a.* अंड्यांतील बलकासारखा पांढरा; as, A. membranes, डोळ्यांतील पांढऱ्या बुबुळा-भागा-सारखा, घारा (डोळा), घाऱ्या डोळ्याचा.

Albugo (al-bū'gō) *n. med.* डोळ्यांतील फूल *n.*

Album (al'bum) [L. *albus*, white.] *n.* संग्रहपुस्तक *n*, यामध्यें प्रसिद्ध थोर पुरुषांचे स्वदस्तुरचे लेख, आवडते गद्यांमधील अगर पद्यांमधील चुटके यांचा संग्रह करण्याची पद्धत आहे. २ फोटोग्राफ (प्रकाशलेख) ठेवण्याचें पुस्तक *n.* ३ भेटीस येणाऱ्या लोकांचीं नांवें नोंदण्याकरितां ठेवलेली चोपडी *f.* Album Græcum (*lit.* Greek white) *n.* कुत्रे, लांडगे वगैरे जनावरांची विष्ठा *f.* ही उन्हांत ठेवून सुकवितात व तिचा उपयोग चामडीं रंगविणारे लोक बहुधा करितात.

Albumen (al-bū'men) [L. *albus*, white.] *n. white of an egg* (अंड्यांतील) पांढरा-बील-बलक *m.* २ *bot.* गर्भपोषक द्रव्य *n*, मगज *m*, बीजसंवर्धक *m*, बीजजीवन *n*, श्वेतकल्क *m*, गर्भपोषक द्रव्य *n*, बील *m*, बीजसार *m*, ओज (?) *m.* ३ *med.* रक्तांतील एक घटक *m*, औजसद्रव्य *n.* Albū'min *n.* one of the classes of albuminoids. Albū'minate *n.* आलब्युमेन क्षार, श्वेतकल्कक्षार. Albuminise' *v. t. photo.* आलब्युमेनयुक्त करणें, आलब्युमेन लावणें. Albū'minous *a.* आलब्युमेनमय, श्वेतकल्कमय.

Albuminoid (al-bū'min-oid) [L. *albus*, white.] *n. chem.* श्वेतकल्ककल्प *m* (हा दुधांत, अंड्यांत, रक्तांत, ओजांत आणि वनस्पतींत सांपडतो), श्वेतकल्कयुक्तपदार्थ *m*, औजसद्रव्य *n*, श्वेतकल्कवर्गीय पदार्थ *m.* A. *a.* श्वेतकल्कयुक्त, श्वेतकल्कासारखा.

Albuminuria (al-bū'mi-nū'ri-a) *n. med.* नाळगुद *n.* २ लघ्वींतून (अल्ब्यूमेन) श्वेतद्रव्य जाणें *n*, मज्जामेह *m*, ओजोमेह *m.*

Alburnum (al-burn'um) [L. *albus*, white.] *n. bot.* श्वेतकाष्ठ *n*, रसाचें लांकूड *n*, काष्ठांतील रसवाहक पांढरा थर *m*, मध्यत्वक्, अंतर्साल *f*, नवकाष्ठ *n*, कोवळें लांकूड *n*, सांद्रकाष्ठ *n.* Alburn'ous *a.*

Alcahest, See Alkahest.

Alchemy, Alchymy (al'ki-mi) *n.* किमया *f*, or *m*, रसायन (*obs.*) *n*, रससिद्धि (*obs.*) *f*, धातुपरिवर्त्तनविद्या *f*, कोणत्याही साधारण वस्तूचें स्वरूप बदलून ती बहुमूल्य करण्याची अद्भुत शक्ति *f*, हिणधातूंचें उच्चधातूंत रूपांतर करणारें शास्त्र *n.* Alchem'ic, Alchem'ical *a.* (v. N.) किमयेचा, किमयाचा, रससिद्धीसंबंधीं-विषयक. Al'chemist, Al'chymist *n.* किमयागार, किमया करणारा, रसज्ञपुरुष (*obs.*) *m*, रससिद्ध (*obs.*), सिद्ध or सिद्धपुरुष (*obs.*) *m.*

Alcohol (al'kō-hol) [L. *alcohol*, applied to pure spirit.] *n.* मद्यार्क *m*, मद्याचा अर्क *m*, मद्यसार *m.* Alcohol'ic *a.* मद्यार्काचा, मद्यार्कधर्मक. Alcoholisā'tion *n.* Al'coholize-se *v. t. concentrate to an essential spirit, rectify* सत्वशुद्धि करणें. २ *saturate with alcohol* मद्यार्कमिश्रित करणें. Al'coholism *n. med.* दारूचे विकार-परिणाम *m*, अतिशय दारू प्याल्यापासून झालेला रोग *m.* Absolute alcohol जलरहित-निर्भेळ-शुद्ध मद्यार्क *m.*

Alcoholometer (al-kō-hol-om'e-tėr) [Alcohol & Meter.] *n.* मद्यार्कमापक *n.* Alcoholom'etry *n.* मद्यार्कमिति *f*, मद्यार्कमापनशास्त्र *n.*

Alcoran (al'kō-ran) *n.* मुसलमान लोकांचें धर्मपुस्तक *n*, कुराण *n.*

Alcove (al'kōv) [Ar. *al*, the, *qobbah*, a vault.] *n. large recess* मोठी कमान *f*, मोठा कोनाडा *m*, भिंतींत पुस्तकें ठेवण्यासाठीं केलेली जागा *f.* २ एकांत स्थळ *n*, एकांत *n.* ३ (in a garden) बागेंत बसण्यासाठीं केलेली जागा *f*, मंडप *m*, पर्णशाला *f*, उद्यानकुंज *f.*

Aldebaran (al-deb'a-ran) [Fr. *al & dabar*, to follow.] *n. astron.* रोहिणीनक्षत्र *n.*

Alderman (awl'dėr-man) [A. S. *ealdor*, (from *eald*, old) senior, chief; *ealdorman*, ruler, king, chief magistrate.] *n.* प्राचीन काळीं साक्सन लोकांतील एका टोळीचा-नायक-अधिपति *m* (राजा नव्हे), सनदी गांवाचा एक अधिकारी *m*, शहरचा कोतवाल *m*, "मेअर" खालचा अधिकारी *m*, नाईक *m*, पुढारी *m.* Al'dermen *pl.* Alderman'ic, Al'dermanlike, Al'dermanly *a.* थाटमाटाचा, डौली, ढबदार, भारदस्त. Al'dermanry *n.* आल्डरमनाचा हुद्दा-अधिकार *m.* २ आल्डरमनाच्या ताब्यांतील प्रदेश *m.*

Ale (āl) [A. S. *alu*, ale.] *n.* एक प्रकारची पिण्याची दारू *f.* २ इंग्लंदांतील खेडेगांवांतील एक सण *m.* Ale'-berry *n.* 'एल' दारूंत मसाला, साखर वगैरे पदार्थ घालून तयार केलेलें पेय *n.* Ale'conner *n.* दारू तपासणारा. Ale-cost *n. bot.* दारूला स्वाद लागावा म्हणून त्यांत घालण्याची वनस्पति *f.* Ale'house *n.* कलालाचें दुकान *n*, पिठा *m.* Ale'wife' *n.* कलालाचें दुकान चालविणारी स्त्री *f.* Ale-yard *n.* लांब कांचेचें पात्र *n* (याचा पूर्वी मापाप्रमाणें उपयोग करीत असत).

Aleatory (ā'-lē-a-tō-ri) [L. *alea*, a die, chance.] *a. law* आकस्मिक गोष्टीचा, आकस्मिक गोष्टींच्या योगानें मिळालेला (पैसा, नफा इत्यादि). A. gain घबाड.

Alee (a-lē') *adv. naut.* वाऱ्याच्या उलट बाजूस (opposed to *a-weather*).

पारदान्यधातुमेलन *n*, पारदयोग *n*. ३-*state*. जमून-मिळून गेलेलेपणा *m*, संमेलन *n*, संयोजन *n*, मिलाफ *m*, मिसळ *f*, मिश्रीभाव *m*, सायुज्य *n*, मेलनैकरूपता *f*. ४ मिश्रण *n*. ५ सोनें आणि रुपें यांचें त्यांच्या अशोधित धातूपासून पाऱ्याच्या साधनानें शोधन करण्याची रीति *f*. अशोधित धातु प्रथम पाऱ्यामध्यें मिश्र करितात. पाऱ्याचा फक्त शुद्ध सोनें व रुपें या धातूंशीं संयोग होतो व इतर पदार्थ बाजूला राहतात. नंतर तें सोन्यारुप्याचें पाऱ्याशीं झालेलें मिश्रण उष्ण करतात. या योगानें पारा उडून जातो व शुद्ध सोनें अथवा रुपें खालीं राहतें. Theory of A. पारदमिश्रणवाद. Amalgamā'tive *a.* Amalgama'tor *n.* पाऱ्याचें इतर धातूंशीं मिश्रण करणारा, मिसळणारा, एक करणारा, &c.

**Amanuensis** (a-man-ū-en'sis) [L. *ab*, from, & *manus*, the hand.] *n.* दुसऱ्यानें सांगितलेला मजकूर लिहिणारा *m*, अन्यकथितलेखक *m*, अन्योक्तलेखक. Error of A. लेखकदोष *m*, लेखकप्रमाद *m*. Written by an A. लेखकी. Amanuen'sēs *pl.*

**Amaranth** (am'ar-anth) [Gr. *a*, not, & *mar*, to waste away.] *n.* yellow आबोल *f*, आबोली *f*. flower आबोल or लें *n*.–globe, the plant or flower गुल मखमल *m*. २ *bot.* कोरांटीचें फूल *n*. ३ (कवितेंत) कधींहि कोमजत नाहीं असें कल्पित पुष्प *n*, अम्लान पुष्प *n*. ४ फिक्का भगवा रंग *m*; [YELLOW A. आबोली *f*. EATABLE A. तांदुळजा. HERMAPHRODITE A. राजगिरा. ROUND-HEADED A. माठ.] Amaranth'ine *a.* कोरांटीचे फुलासारखें. २ कधीं न कोमजणारें. ३ जांभळटसर.

**Amarthritis** (amarthri'tis) *n.* *med.* सर्वसंधिवात *m*, बहुसंधिवात *m*. (a term applied to universal gout affecting several joints at the same time). See Gout.

**Amass** (a-mas') [L. *ad*, to, & *massa*, a mass.] *v. t.* गोळा करणें, गोळवणें (*poe.*), जोडणें, संपादणें, मिळवणें, जथणें, जथाजथ *f*-जथापथ *f*-(चा) संग्रह *m*-संचय *m*-राशि *m*-पुंज-ढीग *m*. करणें *g. of o.*, सांठविणें. Amass'able *a.* (v. V.) गोळा करायाचा-जोगा-&c., संग्राह्य, संचेय, संचितव्य, संग्रहणीय. Amassed' *p.* Amass'ment, Amassing *n.* (v. V.)—*act.* गोळा करणें *n*, जथाजथ *f*, जथापथ *f*, संचय *m*, संग्रह *m*. I संग्रह *m*, संचय *m*.

**Amateur** (am-at-ār') [L. *amare*, to love.] *n.* *one who cultivates a particular study or art for the love of it* शो(शौ)की *c*, हौशी *c*, कलाव्यसनी *c*. (as, तो गाण्याचा शोकी आहे). २ हौशी, गोडी-छंद-नाद-असणारा (कारागीर किंवा जिज्ञासू), धंदेवाला नसून कारागिरीचें काम किंवा अभ्यास हौशीनें करणारा मनुष्य *m*. Amateur *a.* Amateur'ish *a.* हौशी मनुष्यासंबंधीं, विशेष गुण किंवा कौशल्य ज्यास नाहीं असा, धंदेवाल्याचें कौशल्य नसतां एखाद्या कले-धंद्यासंबंधानें विशेष गोडी असणारा. Amateur'ishly *adv.* Amateur'ishness, Amateurism, Amateur'-ship *n.* हौशीपणा *m*. see Amateur.

**Amative** (am'at-iv) [L. *amare*, to love.] *a.* *disposed to loving* हौशी, इष्की, कामी, विषयी, फक्कड, विसनी, विलासी. Am'ativeness *n.* शृंगारप्रवणता *f*, शृंगारपरता *f*, प्रेमाभिलाष *m*. २ *phren.* शृंगारस्थान *n*.

**Amatory** (am'at-or-i) [see Amative.] *a.* of or pertaining to love, love-making, or to sexual love generally प्रेम-प्रीतिजनक, मोहक, वशक्रियाकारक, रतिजनक, रत्युत्पादक. २ प्रेम-प्रीति-संबंधीं-दर्शक (verses, sighs, &c.). ३ शृंगाराचा, शृंगारिक, शृंगारासंबंधीं, शृंगाररसान्वित, शृंगारात्मक, शृंगारविषयक.

**Amaurosis** (am-aw-rō'sis) [Gr. *amauros*, dark.] *n.* *med.* अंधत्व *n*. [डोळ्यांमध्यें दृश्य असा फरक न होतां ज्ञानतंतु विघडल्यामुळें दृष्टि जाणें, तमोमय विकार *m*, क्षीणदृष्टि *f*.] दर्शनतंतुरोग (?) *m*. यांत डोळे शावूत राहून दिसत मात्र नाहीं. Amaurō'tic *a.*

**Amaze** (a-māz') [Pref. *a*, on or in & Maze.] *v. t.* *astonish* चक्क-चकभूल-चकित करणें, चकभूल *f*. उडवणें *g. of o.*, थक्क-गुंग-करणें. २ *frighten* चरकवणें, घाबरवणें, घाबरा करणें, गांगरवणें, धांदरवणें, माटमूट करायास लावणें, पांचांवर धारण *f*. बसवणें *g. of o.*, त्रेधा *f*-तिरपीट *f*-उडवणें-करणें *g. of o.* Amaze *n.* आश्चर्य *n*, विस्मय *m*. २ त्रेधा *f*, गोंधळ *m*. Amaz'ed *p.* (v. V. 1.) घाबरवलेला, &c., चरख, तारकाबारका, हौलहवालदील, घावरा. २ आश्चर्यहत, विस्मित, बावरलेला, चक्क, चकभूल झालेला. To be A. तोंडांत बोट *n*. घालणें, चकणें. Amaz'edly *adv.* आश्चर्यानें, विस्मयानें. Amaze'ment, Amaz'ed-ness *n.* (v. A. 1.) घाबरेपणा *m*, गडबड *f*, घावरगुंडी *f*, आश्चर्य *n*, अचंबा *m*, त्रेधा *f*, तिरपीट *f*. २ विस्मय *m*, चकभूल *f*. Amaz'ing *p. a.* Amazer *n.* (v. V. 1.) चकवणारा, &c., विस्मयकारक-जनक, आश्चर्यकारक-जनक, अद्भुत, अद्भुतरसोत्पादक. २ (v. V. 2.) घाबरवणारा, &c., भयंकर, भयप्रद, त्रेधा करणारा-उडवणारा, अद्भुत, अकटोविकट, अकराळविकराळ, विशाळ. Amaz'ingly *adv.* विस्मय वाटायाजोगा-सारखा-&c. *decl.* विस्मयजनकरूपानें-रीतीनें, अद्भुत, पराकाष्ठेचा, विस्मयानें, अचंब्यानें, घाबरून.

**Amazon** (am'az-on) *n.* प्राचीन ग्रीक ग्रंथकारांनीं वर्णिलेल्या स्त्रीयोद्ध्यांपैकीं एक स्तनविरहित स्त्री *f*, शूर-धीरपटाईत बायको *f*, बहादूर स्त्री *f*, आडदांड स्त्री *f*, पुंसलक्षणा स्त्री *f*, ढालगज बायको *f*, स्त्रीमल्याळची पद्मीण (?), जहांबाजबाई *f*, धिप्पाड स्त्री *f*, वितताकृति स्त्री *f*. २ दक्षिण अमेरिकेंतील ब्रेझिल देशांतील एक नदी *f*. Amazō'nian *a.* शूर-धीट स्त्रीसंबंधीं. २ दक्षिण अमेरिकेंतील अमेझॉन नदीसंबंधीं.

**Ambage** (am'bāj) [L. *ambi*, about, & *agere*, to drive.] *n.* वळसा घेणें, गिरकांडा(डी) *m*, द्राविडी प्राणायाम *m*, चरपटपंजरी *f*. २ वांकण *n*-वळण *n*, वळसा *m*, पळण्याच्या वाटा *f*, चोरवाटा *f*. ३ टाळणें *n*, चुकवणें. ४ मोघम बोलणें *n*, मोघम बोलण्याची रीत *f*, टाळाटाळ *f*, आढेवेढे. Am'bages *pl.* Ambā'gious *a.* Ambā'-

giously *adv.* Ambā'giousness *n.* टाळाटाळी *f*, &c. Ambā'gitory *a.* (R).

Ambassador ( am-bas'a-dur ) [ L. *ambactus*, a vassal, a dependant. ] *n.* राजाचा वकील *m*, दूत *m*, राजदूत *m*, राजप्रेषित पुरुष *m*, एका राजानें दुसऱ्या राजाकडे कामाकरितां पाठविलेला मनुष्य. Credentials of an A. वकीलनामा *m.* Ambass'adorship *n.* वकिली *f*, वकालत *f*, वकीलात, दूतत्व *n.* Ambass'adress *fem.* दूती *f.* Ambassadō'rial *a.* Ambass'age *n.* now Embassage.

Amber ( am'bėr ) [ Ar. *anbar*, ambergris. ] *n.* तृणमणि *m*, तृणग्राही *m*, तैलस्फटिक *m.* २ जमिनींत सांपडणारा पिवळसर रंगाचा सुगंधी पदार्थ *m*, अंबर. Ambered *a.* तृणमणि बसविलेला. Amb'ery *a.*

Ambergris ( am'bėr-grēs ) [ Fr. *ambre gris* ( *gris*, gray ) gray amber. ] *n.* उदी अंबर *m*, उष्ण कटिबंधांतील एका जातीचे माशाचे अंगापासून उत्पन्न होऊन समुद्रांत तरणारा सुगंधी पदार्थ, याचा सुगंधी द्रव्यांत उपयोग करितात.

Ambi ( ambi ) [ L. *ambi*, round. ] *prep.* सभोंवतीं.

Ambidexter ( am-bi-deks'tėr ) [ L. *ambo*, both, & *dexter*, the right hand.] *a. able to use both hands alike* दोन्ही हातांनीं सारखा, समसंधानी, सव्यसाची, हस्तद्वयसमानकुशल, दोन्ही हातांनीं साहजिक सारखें काम करणारा, समानदक्ष. २ *double-dealing* उभयपक्षाला सारखा फसवणारा, उभयसाधारण, पक्षद्वयमान्यपूजक. ३ दोन्ही दगडांवर हात ठेवणारा, दोहों मांडवांचा वऱ्हाडी. A. *n. law* द्विपक्षपाती *m*, दोन्ही पक्षांकडून लांच खाणारा *m.* Amb'idexter'ity *n.* ( v. A. I. ) सव्यसाचित्व *n*, हस्तद्वयसमानकौशल्य *n*, समानदक्षता *f*, फार हुशारी *f.* २ उभयसाधारणत्व *n.* Ambidex'trous *a.* Ambidex'trously *adv.*

Ambient ( am'bi-ent ) [L. *ambi*, about, & *iens*, *pr. p.* of *eo*, *ire*, to go.) *a.* परिवेष्टक, परिवेष्टनकर्त्ता, वलयिता, वेष्टणारा, वेढणारा, घेरणारा; as, A. air or A. cloud.

Ambiguous ( am-big'ū-us ) [ L. *ambi*, about, & *agere*, to drive. ] *a. equivocal* दुटप्पी, दुतर्फी, दुधट, द्व्यर्थी, द्व्यर्थक, मुग्ध(?), मुग्धा(?), दुग्ध्याचा, भ्रांतिकर, संशयी, अव्यक्त, अस्पष्ट, भ्रामक, भ्रमकारी, नरोवाकुंजरोवा, संदिग्ध. A. case of two triangles दोन त्रिकोणांची संशयावस्था —अनिर्णीत स्थिति. Ambigū'ity, Ambig'uousness *n.* (v. A.) दुटप्पीपणा *m*, दुग्धा *f m*, द्वामुष्य or द्व्यामुष्य *n*, द्व्यर्थता *f*, द्व्यर्थकत्व *n*, संदिग्धता *f*, मोघमपणा *m.* Ambig'uously *adv.* ( v. A. ) दुटप्पी, दुटप्पीपणें, दुग्धा (?), मुग्धा (?), द्वामुष्य, अलमटलम, द्व्यर्थरूपानें, अस्पष्ट, अर्धवट.

*N. B.*—दुभजवी is one more word proposed for ambiguous. नरोवाकुंजरोवा is, according to some, not a strict adjectival form, and for it they propose नरोवाकुंजरोवासारखा. However among the persons consulted by us, there is an equal division of opinion on this point. द्विधास्थितित्रिकोण, द्विस्थितित्रिकोण, द्विस्थत्रिकोण are the expressions that now occur to us for the "Ambiguous case of two triangles." We recommend strongly the last as being the briefest.

Ambition (am-bish'un) [L. *ambi*, about, & *ire*, *itum*, to go.] *n. desire of greatness or power* महत्त्वाकांक्षा, मोठेपणा मिळविण्याची हांव-इच्छा *f*-हौस *f*-( हवस ) *f*, दम *m*, धांव *f*, महापदलालसा *f*, महत्त्वतृष्णा *f*, जिगीषा *f*, प्रभुत्वलिप्सा *f*, यशोलिप्सा *f*, यशस्तृष्णा *f*, लोकांत मान *m*-कीर्ति *f*-वाहवा *f*-व्हावी अशाविषयीं दढेच्छा *f*, ऐश्वर्याकांक्षा *f.* Ambi'tionist *n.* महत्त्वाकांक्षी. Ambi'tious *a.* ( with *of* ) महत्त्वाकांक्षी, महत्त्वेच्छु, हवसदार or हौसदार, हौशी, मानाचा-&c.-ह(हां)वरा, प्रभुत्वलिप्सु, प्रभावलिप्सु, यशस्काम, ऊर्ध्वदृष्टि, उत्कृष्टपदाभिलाषी, महापदलालस. २ दिखाऊ. ३ पांडित्यदर्शक, भपकेदार; as, An A. style. Ambi'tiously *adv.* Ambi'tiousness *n.*

Amble ( am'bl ) [ L. *ambulare*, to walk about. ] *v. i.* सात्रक चालीनें चालणें, सात्रक चालणें-जाणें ( applied to the horse or its rider). २ सहज-सावकाश डुलत चालणें. A. *n.* सात्रकचाल *f*, रहिवाळचाल *f*, डुलतचाल *f*, टांकणचाल *f*, चवडचाल *f*, साधी चाल *f.* Am'bler *n.* सात्रकचालीनें चालणारा घोडा *m.* Am'bling *a.* Am'blingly *adv.* डुडुकडुडुक or डुडुकडुडुक, सात्रक चालीनें, तुरतुर(रां).

Amblotic ( am-blŏ'tik ) [ Gr. *amblosis*, abortion. ] *a.* गर्भपात करणारें ( औषध ), गर्भपातकर.

Amblyaphia ( am-bli-ā'fi-a ) *n. med.* ( *obs.* ) स्पर्शज्ञानमांद्य *n*, स्पर्शमंदत्व-मांद्य *n.*

Amblygon ( am'-bli-gon ) [Gr. *amblus*, obtuse, & *gonia*, angle.] *n. geom.* विशालकोनाची आकृति *f.*

Amblyopia ( am-bli-ō'pi-a ) [ Gr. *amblys*, dull, & *ops*, eye.] *n. med.* तिमिर, हीनदृष्टि *f*, दृष्टिदौर्बल्य *n.* Amblyop'sis *n.* डोळ्याच्या खळग्या झाल्यामुळें ज्याला दिसत नाहीं असा मासा.

Ambrosia ( am-brō'zhi-a ) *n.* [ L. *a*, not, & *mors*, death. Sk. मृत, dead—मृ (L. *mori*), to die.] अमृत *n*, सुधा *f*, देवान्न *n*, परमपेय *n.* २ ( ग्रीकदेवांचें ) अमर करणारें खाद्य *n.* ३ सुगंधि-मधुर पदार्थ *m.* Ambrō'sial *a.* अमृताचा, अमृतमय, अमृततुल्य. २ गोड, मधुर, सुवासिक, स्वादिष्ट. Ambrō'sially *adv.*

Ambulance ( am'būl-ans ) [ L. *ambulare*, to walk about. ] *n.* चालतें-फिरतें इस्पितळ *n*, सैन्याबरोबर असणारा दवाखाना *m.* २ ( A. cart. ) रोग्याला त्रास न पडतां शेजारच्या दवाखान्यांत न्यावयाची गाडी *f.* Ambulan'cier *n.* अशा ( Ambulance ) गाडीबरोबरचा मनुष्य *m.* Am'bulant *a.* चालणारा, स्थलांतर करीत जाणारा, चलनशील, अस्थिर, चंचल. Am'bulate *v. t.* and *v. i.* फिरणें. Ambulā'tion *n.* इतस्ततः फिरणें. Am'bulating *p. a.* Am'bulator *n.* इतस्ततः फिरणारा.

२ मार्गावरील अंतर मोजण्याचें यंत्र *n.* Am'bulatory *a.* चालण्यास समर्थ असणारा, चालण्यास योग्य. २ चालण्यासंबंधीं. ३ स्थलांतर करणारा, फिरता, भटकण्याचा; as, A. life of herdsmen. ४ फिरतें (An A. court). *law.*—कायद्यानें निश्चित न झालेला, बदलण्यास शक्य; as, The dispositions of a will are ambulatory until the death of the testator. A. *n.* वाडगें, परूस *n. law* निरनिराळ्या ठिकाणीं जाऊन न्याय देणारें कोर्ट *n.* २ घराजवळील हिंडण्याफिरण्याची जागा *f.*

Ambuscade (am'busk-ād) [Fr. *embushcade*, see Ambush.] *n.* Same meanings as Ambush. Sometimes used as a verb. *pl.* Ambushcā'does.

Ambush (am'boosh) [Fr. *emboscare*, *in* in, & *boscus*, a bush.] *n.* दडण *f*, लिकण *f*, शत्रूवर हल्ला करण्याच्या हेतूनें दबा धरण्याची जागा *f.* २ दबा *m*, दडी *f*, दडा *m* (*v.* धर, मार). ३ दबा धरलेलीं-दडून राहिलेलीं-&c. माणसें *n. pl*, दडा *m.* A. *v. i.* दबा धरून बसणें. A. *v. t.* दबा धरून बसविणें.

Ambustion (am-bus'shun) [L. *amb*, round, & *urere*, to burn.] *n. med.* अग्निदग्धता *f*, विस्तवानें आंग भाजणें *n.*

Ameliorate (a-mēl'yor-āt) [L. *ad*, to, & *melior*, better.] *v. t.* ज्यास्त चांगलें-बरें-नीट-करणें, सुधारणा करणें, सुधारणें, वाईट स्थितींतून चांगल्या स्थितींत आणणें, उन्नति करणें, दुःख कमी करणें. A. *v. i.* बरें-नीट-होणें, सुधारणें. Amel'iorable *a.* नीट होणारें, सुधारण्याजोगें. Ameliorā'tion *n.* नीट किंवा बरें करण्याची क्रिया *f*, सुधारणें *n.* I उन्नति *f*, सुधारणा *f*, सुस्थितींत आणणें *n.* Amel'iorative *a.* नीट करणारें, सुधारणा करण्यास समर्थ. Amel'iorā'tor *n.* सुधारणा करणारा, दुःख कमी करणारा, &c.

Amen (ā'men' or ä'men') [Heb. *amen*, firm, true.] *adv.* तथास्तु, अस्तु, असो. A. *n.* तथास्तुदर्शक शब्द *m*, एखादें धर्मकृत्य संपल्यावर उपाध्यानें दिलेला आशीर्वाद *m*, आशीर्वादमंत्र *m*, सम्मतिदर्शक शब्द *m*, समाप्तिदर्शक शब्द *m*, इतिदर्शक शब्द *m.* २ ख्रिस्ती शास्त्रांत येशु ख्रिस्ताचें नांव *n.*; as, Jesus, who is the truth, is called Amen. A. *v. t.* तथास्तु ह्मणणें, मुकरर-कायम करणें, मान्य-कबूल करणें. A. *a.* यथार्थ, खरोखर.

Amenable (a-mēn'a-bl) [Fr. *a*, to, & *mener*, to lead.] *a. responsible* जाब-हिशोब-मोसबा-&c.-देणारा, मोसबेदार, उत्तर-जाब-&c.-देण्याचा अधिकारी, जोखमदार, जबाबदार. २ वळण्यांतला, वळण्यासारखा, आधीन विनतक्रार होणारा, वळवतां येणारा, (प्रमाणें) वागण्यास तत्पर (A. to law), विनेय, परनेयबुद्धीचा. ३ आधीन, आज्ञांकित. Amenabil'ity, Amen'ableness *n.* (v. A. 1.) मोसबेदारी *f*, जबाबदारी *f*, चांगल्या कार्याच्या आधीन होण्याची तत्परता-प्रवणता, विनेयता *f.* Amen'ably *adv.*

Amend (a-mend') [L. *e*, *ex*, out of, & *menda*, a fault.] *v. t. rectify* दोष काढून टाकणें, सुधारणें, नीट-दुरुस्त-शुद्ध-चांगला-&c. करणें, चूक *f*-काढणें *g. of o.*, सुधारणा सुचविणें, as, To A. a bill. विरुद्ध ठराव मांडणें, प्रतिसूचना आणणें-करणें. २ *reform* सुधारणें, वाटेवर-मार्गावर-ताळ्यावर-सुतावर-रीतीवर-&c.-आणणें. A. *v. i. reform* सुधरणें, सुधारणें, निटावणें, उजरणें, वाटेवर-मार्गावर-ताळ्यावर-&c. येणें, सुधारणा होणें. २ *become better* सावरणें, सावर *m.* घेणें, नीट-होणें-होऊं लागणें, उजरणें, जीव *m* धरणें. Amend'able *a.* सुधारण्याजोगा, (ला) प्रतिसूचना आणण्याजोगा, &c. Amend'atory *a.* प्रतिसूचनेचा, प्रतिसूचनात्मक; as, A. bill. Amend'er *n.* सुधारणा *f*-दुरुस्ती *f*-&c.-करणारा. Amend'ment *n.* (v. V. T. 1.)—*act.* सुधारणें *n*, नीट करणें *n*, &c., शोधन *n*, शोध *m.*—*state.* सुधारलेपणा *m*, &c., दुरुस्ती *f*, शुद्धि *f*, विशुद्धि *f.* २ फिर्यादीची दुरुस्ती *f*, सुधारणा *f.* ३ प्रतिसूचना *f.* ४ सावर *m*, (दुखण्याचा) उतार *m.* Amends' *n. pl.* *recompense* प्रतिफल *n*, दुःख-अनिष्ट-&c.,-परिमार्जक *n*, झालेल्या दुखापतीची अगर नुकसानीची भरपाई *f*, वचपा *m*, मोबदला *m.* To make A. निस्तरणें, निरपणें, निष्कृति *f*-प्रतिक्रिया *f*-प्रतिकार *m*-&c. करणें *g. of o.*, मोबदला देणें, नुकसान भरून देणें.

*N. B.*—निरपणें is objected to by some as not being the proper equivalent for "To make amends."

Amenity (am-en'i-ti) [L. *amœnitas*, *amœnus*, pleasant, from root of *amare*, to love.] *n. agreeableness* रम्यता *f*, रम्यत्व *n*, रंजकत्व *n*, सौरभ्य *n*, रमणीयता *f* (जागेची, देखाव्याची वगैरे). २ स्वभावाचा चांगुलपणा *m*, सुजनता *f*, सुशीलपणा *m*, भलेपणा *m.*

Amenorrhœa, Amenorrhea (a-men-ō-rē'a) [Gr. *a*, not, *men*, month, *roia*, a flowing.] *n.* नष्टार्तव *n*, रोगानें आर्तव बंद होणें *n* (असा प्रकार बहुतकरून क्षयाच्या भावनेमुळें व आणखी कित्येक इतर स्त्रीरोगांमुळें होतो).

Ament, same as Amentum.

Amentia (a-men'shi-a) [L. *a*, from, & *mens*, *mentis*, Sk. मनः, mind.] *n. med.* बुद्धिभ्रंश *m.* २ चळ *m*, खूळ *n.*

Amentum (a-men'tum) [L. *amentum*, thong.] *n. bot.* अनियमित मंजरी *f*, एकाच लवचीक अथवा नाजूक देंठावर असलेला स्त्रीकेसरी व पुंकेसरी पुष्पसमुदाय *m*, (स्त्रीकेसरी व पुंकेसरी) उभयकेसरीपुष्पमंजिरी *f*, मंगुरस्तबक अथवा मंजिरी (?) *f.* Amen'ta *pl.* Amentā'ceous, Amen'tal *a.*

Amerce (in) (a-mers') [Fr. *a*, at, & *merci*, mercy.] *v. t. punish by a fine* द्रव्यदंड करणें. (हा दंड करणें न्यायाधीशाच्या खुषीवर ठेवलेला असतो.) The court amerced the criminal in the sum of 100 Rs. The usual prepositions are *in*, *with* and *of.* Amerce'ment *n.* द्रव्यदंड *m.* Also Amerc'iament. Amerc'er *n.* Amerceable *a.*

American ( a-mer'ik-an ) *a.* अमेरिका खंडा-संबंधीं-चा, उत्तर अमेरिकेंतील संयुक्त संस्थानां-संबंधीं-चा. A. *n.* अमेरिका खंडांतील रहिवासी *m,* ( United States ) उत्तर अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांतील रहिवासी *m.* Ame-r'icanise *v. t.* अमेरिकन करणें. Amer'icanism *n.* अमेरिकन लोकांची रीतभात *f,* अमेरिकन लोकांचा गुण-विशेष *m,* अमेरिकन भाषेंतील शब्दप्रयोगविशेष *m,* अमेरिकेंतील नागरीकत्व *n,* अमेरिकेंतील संस्थेची आवड *f.*

*N. B.*—According to Chambers, America is, so called unfairly from Amerigo Vespucci, a navigator who explored a small part of South America seven years after the first voyage of Columbus.

Amess ( am'es ) *n. eccl.* धर्मोपदेशकाची टोपी *f.*

Amethyst ( a'meth-ist ) [ Gr. *a,* not, *methyein,* to inebriate. Sk. मधु, sweet. ] *n. min.* एक प्रकारचा मौल्यवान् खडा-रत्न *n,* याकूत *m.* Oriental A. नीलमणी.

Amiable ( ām'i-a-bl ) [ L. *amabilis—amare,* to love.] *a. worthy of love, implying the possession of that friendly disposition which causes one to be liked; habitually characterised by that friendliness which awakens friendliness in return* (now restricted to temper and mood ). प्रेमळ, सात्विक, भला, आवडत्या गुणाचा, स्नेहाळ, प्रियगुण, प्रीत्युत्पादकगुणयुक्त, मनमि-ळाऊ, मिळवून घेणारा, मिळत्या स्वभावाचा. Amiabil'ity, Am'iableness *n.* ( v. A. ) भलेपणा *m,* भलाई *f,* भलाइकी *f,* प्रियकरत्व *n,* प्रियगुणत्व *n,* प्रियता *f,* रम्यता *f,* सौजन्य *n,* सुशीलता *f,* मनोरमता *f,* संतुष्ट करण्याची शक्ति *f.* Am'iably *adv.* ( v. A. ) आवडते-पणानें, भलाईनें, भलेपणानें, प्रेमळपणानें.

Amicable ( am'ik-a-bl ) [ L. *amicus,* a friend, *am-are,* to love.] *a. friendly, of mutual arrangements, done in a friendly spirit, with mutual good will, or without quarrelling or employment of force, peaceable, harmonious* मित्रत्वाचा, इष्टत्वाचा, सख्याचा, स्नेहभावाचा, भाईबंदीचा, स्नेहशील. २ दयाळू. ३ शिष्टाचाराचा. ४ सलोख्याचा, गोडीचा. A. settlement समजुतीची तोड-निकाल, मित्रभावानें निर्णय. A. suit (दोघांना मान्य असा निकाल लावून घेण्याकरितां केलेली) सलोख्याची फिर्याद *f,* एकमेकांच्या सम्मतीनें केलेली फिर्याद *f.* Amicabil'ity, Am'icableness *n.* ( v. A.) सलुखा (?) *m,* सलोखा *m,* स्नेहभाव *m,* मित्रत्व *n.* Am'icably *adv.* ( v. A. ) स्नेहभावानें, भाईबंदीनें, भाईचाऱ्यानें, मित्रभावानें, स्नेहभाव-चांगुलपणा राहील अशा प्रकारें.

*N. B.*—भाऊबंदकी हा शब्द शत्रुत्व किंवा वैर ह्या अर्थी वापरतात. कैंडी साहेबांनीं AMICABLE ला 'भाऊबंदकीचा' असा मराठी अर्थ दिला आहे. आमच्या मतें त्यांनीं 'भाईबंदी' बद्दल 'भाऊ-बंदकी' असा शब्द चुकून योजिला असावा.

Amid ( a-mid' ) Amidst ( a-midst' ) [ *a,* on, & *Mid.*] *prep.* मध्यें, मधीं, मध्यभागीं, माजीं, माझारीं. २ घेर-लेला, वेष्टित.

Amide, Amine, ( am'-īd, am'-īn ) *n. chem.* अमोनियां-प्रचुर मिश्रद्रव्य, अमोनिया ज्यांत अधिक आहे असें मिश्रद्रव्य *n.* Meth'*ylamine* ( N C. H5 ) is an example of *amine;* and Acet*amide* ( N C2 H5 O ) is an example of *amide.*

Amiss ( a-mis' ) [ Pref. *a,* on, & Miss. ] *a.* चूक *a,* वांकडें, भलतें, अव्यवस्थित, अन्यथा, अस्थानीं, गैरवाजवी, अयो-ग्य, सदाचारविरुद्ध. A. *adv.* वाईट, अनुचित, अकर्तव्य, वांकडें, गैरवेळीं, गैर, अयथान्याय, अयुक्त. To take A. उलटा अर्थ घेणें. To be not A. साधारण चालेसें असणें. Amiss'ibility *n.* अयथात्व, &c. Amiss'ible, Amiss'ing *a.* चुकलेला, हरवलेला.

Amity ( am'i-ti ) [ L. *amicitia,* friendship, *amicus* a friend.] *n.* मित्रत्व *n,* सख्य *n,* स्नेहभाव *m,* दोस्ती *f,* ( मुख्यत्वेंकरून राष्ट्रांमधील ) सुहृद्भाव *m.*

Ammite ( am'mīt ) *n. geol.* (*obs.*) वालुमिश्रित प्रस्तर-विशेष, एक प्रकारचा रेताड दगड *m.*

Ammonia ( am-mōn'i-a ) [ From *sal-ammoniac,* or smelling salts, first obtained by heating camel's dung in Libya, near the temple of Jupiter Ammon. ] *n. chem.* एक प्रकारचा वायुरूप पदार्थ *m,* मूत्रवायु *m.* ह्या Hydrogen आणि Nytrogen या दोन वायूंपासून होतो. रासायनिक संज्ञा NH3. २ Sal A. नवसागर *m.* Ammon'iac, Ammoni'acal *a.* ( v. N.) मूत्रवायूचा, मूत्रवायूचे गुण असलेला. Ammon'iac, Ammonī'acum *n.* ( *a gum exuded from the flowering and fruiting stem of Dorema Ammoniacum* ) कडू व उग्रवासाचा कफघ्न पदार्थ. Ammon'ium-chloride नवसागर *m.*

Ammonite ( am'mon-īt ) *n. zool.* एक शिंगासारखा ख-निज पदार्थ *m.*

Ammunition ( am-mūn-ish'un ) [ L. *munire,* to fortify.) *n.* दारूगोळा, दारूगोळी *f,* लढाईमध्यें लागणारें बंदुका-तोफा वगैरे सर्व साहित्य *n,* लढाईचा सरंजाम *m,* युद्धसामग्री *f,* युद्धसाहित्य *n,* जिनसी सामान *n.*

Amnesia ( am-nē'si-a ) [ Gr. *a,* not, & *mnesis,* memory. ] *n. med.* स्मृतिभ्रंश *m,* स्मरणक्षीणता *f,* विस्मृति *f.*

Amnesty ( am'nest-i ) [ Gr. *a,* not, & *mna,* to remember. ] *n. general pardon* सरमाफी *f,* सकलदं-ड्यमुक्ति *f,* सकलापराधमोचन *n,* सकलदंडमोचन *n,* पूर्णक्षमा *f.* २ *act or edict of pardon* सरकारमाफीचा जाहीरनामा *m,* माफीनामा *m.* A. *v. t.* सरमाफी देणें.

Amnion ( am'ni-on ) [ Gr. *amnos,* a lamb. ] *n. anat.* गर्भोदकत्वचा *f,* गर्भाच्या सभोंवतालचें उदक असणारी त्वचा *f,* गर्भाशयांतील प्राण्यावरची पहिली अंतस्त्वचा *f,* गर्भवेष्टन *n,* पाणमोटळी *f,* गर्भांडाची-कवची-टी *f.*

Amnios ( am'ni-us ) *n. bot.* गर्भाशयांतील-जलरूपद्रव्य-जलद्रव्य *n.* ह्यांत बीजपिंड प्रथम उत्पन्न होतो.

Amœba ( a-mēb'a ) [ Gr. *amoibe*, change. ] *n.* इंद्रियरहित-एकपेशीमय सूक्ष्म जंतु *m*, अमीबा, बहुतकरून असे जंतु चिखलामध्यें—अशुद्ध पाण्यामध्यें—अथवा उपसा नसलेल्या विहिरीमध्यें असतात.

Among (a-mung'), Amongst ( a-mungst' ) [ A. S. *mengan*, to mingle. ] *prep.* मध्यें, माजीं, मधीं, माझारीं, आंत-ईंत, *used with the noun inflected.* २ पैकीं. From A. मधून, पैकीं. ३ बरोबर ( in the sense of मध्यें ); as, They killed him A. them.

Amorous ( am'or-us ) [ L. *amor*, love. ] *a. disposed to love, loving, habitually fond of the opposite sex* कामी, कामुक, विलासी, कामेच्छु, श्रृंगारी, फक्कड, श्रृंगारिक, इश्की, कामप्रवण, श्रृंगारप्रवण, स्त्रीलंपट, स्त्रैण, विषयी. २ *belonging or relating to love* श्रृंगाराचा, श्रृंगारी, श्रृंगारिक, श्रृंगाररसाचा. [ A. SPORT विलास *m*, क्रीडा *f*. A. DELIGHT विषयानंद *m*. A. AIRS इष्काचा नखरा *m*-चाळा *m*.]. ३ मोहित, आषक ( followed by *of* ); as, Amorous of that lady. Am'orist *n.* कामी पुरुष *m*, स्त्रीप्रेमी पुरुष *m*, जार *m*, यार *m*. Am'orously *adv.* ( v. A. 1. ) विलासपूर्वक-कामुकपणानें, कामभावानें, कामपूर्वक, कामभावपूर्वक, कामेच्छापूर्वक. Am'orousness *n.* ( v. A. 1. ) कामीपणा *m*, कामुकपणा *m*, इष्कबाजी *f*, कामुकता *f*, कामप्रवणता *f*, श्रृंगारप्रवणता *f*.

Amorphism ( a-mor'fizm ) [ Gr. *a*, not, & *morphe*, form. ) *n.* अनाकारता *f*, अष्टस्फटिकाकारभिन्नता *f*, अनियताकार *m*, अनियताकारता *f*, बेडौलपणा *m*, बेढबपणा *m*. Amor'phous *a.* आकारविशेषरहित, आकृतिविरहित, बेडौल, बेढब. २ स्फटिकाचे आठ प्रकार शास्त्रानें ठरविलेले आहेत त्या प्रकारांच्या बाहेरच्या आकाराचा, विलक्षण.

Amortize (a-mort'īz ) [ L. *ad*, to, & *mortis*, death.] *v. t. law* एखाद्या संस्थेचें कर्ज संस्थेची स्थावर जिंदगी विकून वारणें, (पुन्हां न वाढेल अशा रीतीनें) कर्ज फेडणें, कर्जाचें बीज समूळ नाहींसें करणें. Amort'ising *pr. p.* Amort'ised *pa. p.* Amortisā'tion *n.*

Amount ( a-mownt' ) [ L. *a*, to, & *mons*, *mont*, a hill.] *v. i.* रास-एकंदर होणें, भरणें, एकंदरींत हाशील असणें. २ (with *to*) शीं पुष्कळ बाबतींत साम्य असणें; as, The crime A.s to murder. ३ *result in* एकंदरी *f*-हाशील*n*-तात्पर्य*n*-सारांश *m*. असणें. A. *n.* जमा *f*, एकूण जमा-रक्कम *f*, रास *f*, गोळा बेरीज *f*, मान *n*. [ GROSS A. गोळाबेरीज *f*, एकंदर आकार *m*.]. २ हाशील *n*, तात्पर्य *n*, सारांश *m*.

Amour ( am-ōōr' ) [ L. *amor*, love. ] *n.* इष्कबाजी *f*, फंद *m*, जारकर्म *n*, जारकर्माचा विषय *m*, दोस्ती *f*, कामचरित्र *n*. २ *love-making, courtship* विवाहार्थ प्रार्थना-आर्जव ( now only humourously of honourable love-making ); as, To leave the young people together to begin their amours.

Amove ( a-mōōv' ) [ L. *ad*, to, & *movere*, to move. ] *v. t. law* स्थानांतरीं किंवा दूर नेणें.

Ampere ( am-pehr' ) *n. phys.* ऑम्पिअरनें ठरवलेलें विद्युद्वेगाचें प्रमाण *n*, विद्युत्प्रवाहशक्तिप्रमाण *n*, ऑम्पिअरचें माप *n*. Amperemeter *n.* विद्युद्वेगमापक ( यंत्र ) *n*.

Amphi ( am'phi ) [ Gr. *amphi*, around.] *prep.* दोन्ही बाजूंस, सर्व बाजूंस, भोंवतालीं.

Amphiarthrosis ( am'phi-ar-thrōsis ) *n. med.* मिश्रास्थिसंधि *m*. २ मिश्रास्थिसंधिस्थान *n* ( असा संधि मनुष्याच्या तोंडाच्या खालच्या जबड्याचा आहे. हा शब्द पाठीच्या कण्यांतील दोन मणक्यांमधील संधीला व कमरेंतील जंघास्थिसंधीला लावतात ).

Amphibia ( am-fib'i-a ) [ Gr. *amphi*, both, & *bios*, life. ] *n. pl. zool.* उभयवासी-जलस्थलवासी प्राणी *m*, भूजलचरप्राणी *m*, भूजलवासी *m*, उभयचरवर्ग *m*, ज्याला गळचुंडी आणि फुफ्फुस असतात असा प्राणिवर्ग *m*, मासे व त्या वर्गांतले प्राणी *m* ( यांस गळ्याजवळ जलमिश्रित वायूचा श्वासोच्छ्वास करण्याजोगा असलेला अवयव आणि फुप्फुस असतात ). Amphib'ious *a.* जमीन व पाणी ह्या दोन्ही ठिकाणीं रहाणारा, उभयचर, जलस्थलवासी ; जसें, कांसव. २ द्विधागति(क). Amphib'ial, Amphib'ian *a.* जलीं स्थलीं राहण्यास समर्थ. Amphib'iousness *n.*

Amphibole ( am-fib'ol-ē ) [ Gr. *amphibolos*, doubtful, equivocal. ] *n. min.* एक प्रकारचा खाणींतला दगड *m*.

Amphibology ( am-fib-ol'o-ji ) [ Gr. *amphi*, in two ways, *ballein*, to throw and *logos*, discourse. ] *n.* द्व्यर्थी वाक्य अथवा भाषण *n*, श्लेष *m*, संदिग्ध-दुटप्पी अर्थाचें वाक्य *n*. Amphib'olous *a.* द्व्यर्थी, संशययुक्त, दुटप्पी. Amphib'ological *a.*

Amphibrach ( am'fi-brak ) [ Gr. *amphi*, both, & *brachys*, short. ] *n. pros.* मधलें गुरु आणि पहिलें आणि शेवटचें लघु अशा तीन पदांचा गण *m*, जगण *m*.

Amphigean (am-fi-gē'an) [Gr. *amphi*, around, & *ge*, the earth. ] *a.* पृथ्वीच्या सर्व कटिबंधांवर राहणारा, सर्वचर.

Amphisarca ( am-phi'-sārkā ) *n. bot.* काष्ठमय कवचानें आच्छादित असलेलें फळ; जसें, बेलफळ, कवठ, कपित्थ जातिफल.

Amphisbæna (am-fis-bē'na) [Gr. *amphis*, on both sides, & *bainein*, to go. ] *n. zool.* दुतोंडें *n*, मालुंड *n*, सरपटणारें जनावर *n*, महांडूळ *n*, मांडळ *n*, द्विमुखाहि *m*, मांडूळ.

Amphitheatre ( am-fi-thē'a-ter ) [ Gr. *amphi*, round about,& *theatron*, a place for seeing.] *n.* बदामी नाटकगृह *n*, उभयासन नाटकशाला *f*, दीर्घवर्तुलाकार-अर्धचंद्राकार रंगशाला *f*, दीर्घवर्तुल-लंबवर्तुल-रंगशाला *f*, बदामी डौलाचा तालीमखाना *m*. २ ( कुस्त्या वगैरे खेळण्याची ) रंगभूमि *f*. ३ डोंगरांतील अंडाकार दरी *f*. Amphitheat'ric,-al, Amphitheat'ral *a.* दीर्घगोलाकार रंगशाळेसंबंधीं-सारखा. २ अशा रंगभूमीवर प्रदर्शित केलेला. Amphitheat'rically *adv.*

Amphitropal ( am-fi'-trō-pal ) *a. bot.* अर्धन्यस्त, तिर्यक् (गर्भपिंड).

Ample ( am'pl ) [ L. *amplus*, large.] *a.* पुष्कळ, विपुल, भरपूर, रगड. २ *of large dimensions* लांबरुंद, प्रशस्त, विस्तीर्ण, विशाल(ळ). ३ *diffusive, not contracted* or *brief*, &c. प्रशस्त, सविस्तर, विस्ताराचा, पाल्हाळाचा, पाल्हाळीक. ४ *lavish, copious, profuse* उदार, उमाप, पुरून उरायाचा-जोगा-&c., गडगंज, प्रशस्त, चळचळीत, घळघळीत, अघळपघळ. ५ *magnificent, munificent* उदार, प्रशस्त, धौताल. Am'pleness *n.* रगाडी *f*, पर्याप्ति *f*, वैपुल्य *n*, विपुलता *f*. See Amplitude. Amplia'tion *n.* प्रशस्तता *f*, विस्तीर्णता *f*. Amplia'tive *a.* [R] Am'-ply *adv.* प्रशस्तपणानें, विस्तारपूर्वक, सविस्तर, यथेष्ट.

Amplectant (am-plek'tant) [L. *amplector*, to em-brace.] *a. bot.* वेष्टणारें; *as*, A. tendrils लता-प्रतान, लतातंतु.

Amplexicaul (am-pleks'i-kawl) [L. *amplexus*, em-brace, & *caulis*, stem.] *a. bot.* देंठास वेष्टणारें (पान), परिवेष्टक.

Amplify ( am'pli-fī ) [L. *amplus*, ample, & *facere*, to make. ] *v. t. enlarge, expand* विस्तार *m.* करणें *g. of o.*, विस्तारणें, वाढविणें, प्रशस्त-विस्तीर्ण-&c. करणें. २ *enlarge in discussion or representation* फुगवणें, फुगवून-वाढवून-लांबवून-&c. सांगणें, पाल्हाळ *m.* करणें-लावणें, तांडव(?) *n*-टीका *f*-&c. करणें, विस्तार *m.* करणें. A. *v. i.* पाल्हाळ *m.* करणें-लावणें, अकांड-तांडव (?) *n*-&c. करणें, विस्तार *m.* करणें, (चें) अधिक चर्चा करून समर्थन करणें-परिपोष करणें ( with *on* or *upon*). Amplifica'-tion *n.* (v. V. 1.) विस्तारणें *n*, वाढवणें *n*, &c.-*state.* विस्तार *m*, विस्तारितत्व *n.* २-*act.* फुगवणें *n*, फुगवून-वाढवून-लांबवून-&c.-सांगणें *n.*-*state.* तांडव *n*, टीका *f*, पाल्हाळ *m.*

Amplitude ( am'pli-tūd ) [ L. *amplitudo.* ] *n.* पुष्कळपणा *m*, चंगाळी *f* प्रशस्तता *f*, प्रशस्तपणा *m*, विस्तीर्णता *f*, विशालपणा *m.* २ प्राशस्त्य *n*, विस्तार *m*, प्रशस्तपणा *m*, सविस्तरता *f*, असंक्षिप्तता *f.* ३ चळचळीतपणा *m*, अघळपघळपणा *m*, औदार्य *n.* ४ धौताली(?) *f*, उदारत्व *n.* I *astron.* अग्रा *n* ( of the sun ), दिगंश, सूर्य, तारे, किंवा इतर ग्रह हे क्षितिजाच्या ज्या बिंदूंत उगवतात किंवा मावळतात तो बिंदु आणि क्षितिजावरील पूर्व किंवा पश्चिम बिंदु ह्यांच्यामध्यें जो कंस सांपडतो तो. ६ *phys.* परिधि *m*, कंपविस्तार *m.* A. of the mind आकलनशक्ति, आवांका, धारणाशक्ति.

Ampulla ( am-pul'la ) *n. bot.* खुजाच्या आकृतीचें पोकळ पान *n. pl.* Ampul'læ. २ खुजासारखें भांडें *n.* ३ खुजाच्या आकृतीची पोकळी *f*, कुंभिका *f.*

Amputate ( am'-pūt-āt ) [ L. *amb*, about, & *putare*, to cut. ] *v. t.* छाटणें, कापून काढणें, तोडणें, सोडवणें, उतरणें, कलम करणें. २ *surg.* अंगच्छेदन करणें. ३ *bot.* खची करणें (in the sense of तोडणें). Amputa'tion *n.* तोडणें *n*, कापणें *n.* २ *surg.* अंगच्छेद *m*, अंगच्छेदन *n.*

Amuck (a-muk' ) *a.* & *adv.* अविचारानें, माथेफिरूपणानें. To run A. अविचारानें जें पुढें येईल त्यावर हल्ला करणें, उन्मादानें खुनासारख्या कृत्यास प्रवृत्त होणें. २ *fig.* जो विषय आपणांस मुळींच अवगत नाहीं त्याविषयीं बोलणें किंवा लिहिणें.

Amulet ( am'ū-let ) [L. *amuletum*, a talisman hung round the neck. ] *n.* ( चेटुक, भूतबाधा, व इतर रोग यांचें निवारण करणारा ) मंत्रसिद्ध ताईत *m*, तोडगा *m*, तोटका *m*, यंत्र *n.* Amulet'ic *a.* तोडग्यासंबंधीं, &c.

Amuse ( a-mūz' ) [ Fr. *amuser.*] *v. t. divert, entertain* करमणूक *f*-रंजन *n.* करणें, रमवणें, रंजवणें, रिझविणें, खेळवणें, रमणूक *f*-अनुरंजन *n*-मनोरंजन *n*-&c. करणें *g. of o.* २ ( one's self ) रमणें, विहार *m.* करणें, विरगुळणें, रतणें ( *poe.* ), विहरणें ( *poe.* ). ३ *delude, deceive* भुलविणें, भुलथाप *f*-थाप *f*-देणें; as, Amuse and mislead by false light. Amus'able *a.* मनोरंजन होण्याजोगा, &c. Amused *p.* ( v. V. 1. ) रमवलेला, रंजवलेला, &c., अनुरंजित, रंजित. To be A. मौज *f.* वाटणें *in. con.* Amuse'ment *n.* (v. V. 1.)-*act.* रमवणें *n*, रंजवणें *n*, अनुरंजन *n*, रंजन *n*, मनोरंजन *n.* २-*act.* रमणूक *f*, रमण *n*, विरंगुळा *m*, गमत *f*, करमणूक *f*, मजा *f*, मौज *f*, विहार *m*, विहरण *n*, विनोद *m*, इच्छाविलास *m*, विलास *m.* ३ *object* or *cause of A.* गमत *f*, तमाशा *f*, कौतुक *n*, खेळ *m*, क्रीडा *f.* Amuser *n*, रमवणारा, &c. Amus'ing *p. a.* ( v. V. 1.) मौजेचा, कौतुकाचा, तमाशाचा, गमती, मजेदार, अनुरंजक-रंजक, अभिराम, मनोरंजक, मनमोहन, रुचीक, रुचिकर. Amus'ing *n.* see Amusement. Amus'ingly *adv.* मजेनें, गमतीनें, सविलास. Amus'ingness *n.* Amus'ive *a.* [ R]. Amus'iveness *n.*

Amygdalin, Amygdaline ( a-mig'da-lin ) *n.* बदामाचा.

Amygdaloid (a-mig'da-loid) [Gr. *amygdale*, बदाम, *eidos*, form.] *a.* बदामाकार, बदामाकृति. Amygdaloi'dal *a.*

Amyl (am'il) [ Gr. *amylon*, starch, fine meal. ] *n. chem.* इतर रासायनिक द्रव्याबरोबरच असणाऱ्या व स्वतंत्र न राहूं शकणाऱ्या मूलक द्रव्यांपैकीं एक ( *radical* ). amylicalcohol ( C5 H11 HO ) the hydrocarbon radical ( C5 H11 ) is called the amyl. For a clearer explanation see the word Radical.

Amyloid ( am'i-loid ) [Gr. *amylon*, starch.] *n. starch-like substance. bot.* कांजीच्या सत्वासारखा-खळीसारखा चिकट पदार्थ *m.* २ *med.* शरीराच्या घटकावयवांतील पिठूळ पदार्थ *m.*

An ( an ) *indef. art.* एक, एखादा. २ दर, प्रति. ( used before a word beginning with a vowel sound.)

An ( an ) *conj.* हा शब्द जुने आंग्लग्रंथकार 'जर' या अर्थी वापरीत असत. An if आणि जरी, किंवा जरी.

Anabaptist (an-a-bapt'ist) [ Gr. *ana*, again, & *baptistes*, a baptist. ] *n.* ख्रिस्तीशास्त्रांत प्रौढबाप्तिस्मावादी *m*, प्रौढपणींच बाप्तिस्मा द्यावा व ज्याचा बालपणींच बाप्तिस्मा झाला असेल त्याला पुनः बाप्तिस्मा द्यावा असें मत प्रतिपादन करणारा. Anabap'tise *v. t.* Anabap-

tist'ic, An'abaptist'ic-al *a.* Ana-bapt'ism *n.* वरील प्रकारचें मत *n*, प्रौढबाप्तिस्मावाद *m.*

Anacardium (an'a-kär'di-um) [Gr. *ana*, similar to, & *kardia*, the heart.] *n. bot.* काजू, बिबवा अशा प्रकारच्या फळांची जात. Anacardium occidentale काजू. ह्यालाच प्रचारांत Cashew-nut असें ह्मणतात. Semi-carpus Anacardium बिबवा, बि(भि)लावा, काळा (covertly). ह्याला प्रचारांत Marking-nut असें ह्मणतात.

Anacatharsis (an-a-kath-ar'sis) [Gr. *ana*, upward, & *kathairein*, to cleanse.] *n. med.* (*obs.*) वमन *n*, ओकारी *f.* २ ओला खोकला *m*, कफ *m*, कास *m.* Anacathar'tic *n. med.* ओकारीचें औषध *n*, वामक *n*, उद्वमनपर औषध *m.* नुसता वमन शब्द ओकारीचें औषध ह्या अर्थी वापरतात.

Anachronism (an-a'kron-izm) [Gr. *ana*, backwards, & *chronos*, time.] *n. error in chronology* कालविपर्यय *m*, कालक्रमविपर्यय *m*, कालक्रम-विपर्यास-व्यत्यास *m*, कालविसंवाद *m*, (ऐतिहासिक गोष्टींच्या) कालक्रमाची चूक *f*, एखाद्या ऐतिहासिक गोष्टीचा-चालीरीतीचा चुकीनें भलत्याच काळाशीं संबंध जोडणें. श्रीमत् शंकराचार्यांच्या तोंडून रामदासाचें वाक्य कवीनें वदविणें हें कालक्रमविपर्ययाचें उदाहरण आहे, कालक्रमविरोध *m.* Ana'chronise *v. t.* कालक्रमाची चूक करणें. Ana'chronous *a.* Ana'chronist *n.* कालक्रमाची चुकी करणारा, कालक्रमाच्या चुकीचें समर्थन करणारा. Anachronist'ic, *a.* Ana'chronously *adv.*

Anæmia (an-ēm'i-a) [Gr. *an*, not, & *haima*, blood.] *n. med.* रक्त कमी-कमजोर-होणें *n*, रक्तक्षय *m.* Anæm'ic *a.*

Anæsthesia, Anæsthesis (an-es-thē'sia, an-es-thē'sis) [Gr. *an*, not, *aisthanomai*, to feel.] *n. med. paralysis of the sensory nerves* सुप्ति *f*, सर्वांगास किंवा विशेष भागास बधिरता येणें *n*, सुनबहिरी *f*, स्पर्शहानि *f*, स्पर्शशून्यत्व.

Anagogy, Anagoge (an'a-goj-i) [Gr. *anagoge*, elevation.] *n. hidden spiritual sense of words* गूढविद्या *f*, गूढार्थ *m*, अ-लौकिकार्थ *m.* सामान्य शब्दांची व दृष्टांतांची दैविक विषयांकडे योजना *f.*

Anagram (an'a-gram) [Gr. *ana*, again, & *graphein*, to write.] *n.* नामाक्षरविपर्याससिद्धनाम *n*, एका शब्दाचीं अक्षरें फिरवून त्यांचा नवा शब्द करणें *n*; as, *galenus* becomes *angelus.* Anagrammat'ic, Anagrammat'ical *a.* Anagrammat'ically *adv.* Anagram'matise *v. t.* एका शब्दाचीं अक्षरें फिरवून त्यांचा नवा शब्द करणें. Anagram'matism *n.* एका शब्दाचीं अक्षरें फिरवून नवा शब्द करण्याची रीत-पद्धत *f.* Anagram'matist *n.* एका शब्दाचीं अक्षरें फिरवून त्यांचा नवा शब्द करणारा.

Anal (ān'al) [L. *anus*, the fundament.] *a. anat.* गुदद्वारीय, मलद्वारासंबंधीं; as, A. gland.

Analects (an'a-lekts) [Gr. *analektos* -*analegein*, to collect—*ana*, up, *legein*, to gather.] *n. pl.* निरनिराळ्या ग्रंथांतील वेंचे *m. pl*, गावाळग्रंथ *m*, वाड *n.* Also Analec'ta. Analec'tic *a.*

Analeptic (an-a-lep'tik) [Gr. *ana*, up, & *lambano*, *lepsomai*, to take.] *a. med.* पुष्टिकर, पौष्टिक, पुष्टिकारक. A. *n.* पौष्टिक-पुष्टिकारक औषध *n.* Analep'sis *n.* See Analepsy. Analep'sy दुखणें बरें झाल्यावर फिरून पूर्वशक्ति येणें *n.* २ कोठ्यांत बिघाड झाल्यामुळें होणारा एक प्रकारचा अपस्मार *m.*

Analogy (an-al'o-ji) [Gr. *ana*, according to, & *logos*, ratio.] *n. likeness in some respects* उपमान (in Sanskrit logic) *n.* उपमिति (in Sk. *log.*) *f*, सारखेपणा *m*, तुल्यभाव *m*, तुलना *f*, सादृश्य *n*, धोरण *n*, नमुना *m.* २ *geom.* प्रमाणांचा सारखेपणा-समानपणा *m.* Analog'ical, Anal'ogic *a.* (v. N. 1.) तुल्य, सदृश, उपमितीचा, सारखा. Analog'ically *adv.* Ana'logise *v. t.* तुलनेनें-सादृश्यानें विवरण करणें, सादृश्यप्रमाणांचा उपयोग करणें. Analogising *pr. p.* Analogised *pa p.* Anal'ogism *n.* (*obs.*) *phil.* सादृश्यवाद *m.* Anal'ogist *n.* सादृश्यवादी, सादृश्यप्रमाणवादी, सादृश्य पद्धतीनें सिद्ध करणारा. Anal'ogon *n.* See Analogue. Anal'ogous *a.* See Analogical. २ *bot.* सदृशरूप, तुल्य, रचनेनें सारखा; as, A. plants. Anal'ogously *adv.* Anal'ogousness *n.* An'alogue *n.* सदृश-सारखा शब्द *m*-पदार्थ *m*-पुरुष; as, Boileau is the Analogue of Pope in French Literature.

Analysis (an-al'is-is) [Gr. *ana*, up, & *lyein*, to loose.] *n.* मूलतत्वशोधन *n*, घटकसंशोधन *n*, मूलतत्वांचें शोधन करण्यासाठीं प्रत्येक अवयवाचा विचार करणें *n*, मूलतत्वशोधनार्थ पृथक्करण *n*, उपोद्घात *m*, पृथक्कृति *f. logic* पदार्थांच्या मूळ प्रकृतींचें संशोधन *n.* २ *gram.* वाक्यपदच्छेद, वाक्यमीमांसा. ३ मुख्य विभागांचें कोष्टक *n.* ४ शास्त्रसार *n.* ५ *chem.* रासायनिक पृथक्करण *n*, विभजन *n.* ६ *math.* क्लिष्ट गणित विषयांचा समीकरणपद्धतीनें उलगडा *m*, पृथक्करणपद्धति *f.* Analysis and synthesis *math.* पृथक्करण व संयोजन. Proximate A. Qualitative A., Quantitative A., Ultimate A. See under Proximate, &c. Anal'yses *pl.* Analys'able *a.* Analysā'tion *n.* An'alyse *v. t.* पृथक्करण करणें, मूळ शोधणें, मूलतत्व-शोधन-विवेचन करणें, पृथक्कृति *f*-पृथक्करण *n.* करणें *g. of o.* An'alyst, Analyser *n. chem.* पृथक्करण करणारा, मूलतत्वशोधक *m*, पृथक्कृतिकर्त्ता *m.* Analyt'ic-al *a.* पृथक्करण-संबंधीं-विषयक, मूलतत्वशोधन-विवेचन-संबंधीं, मूलतत्वशोधात्मक. A. geometry or conics बीजभूमिति *f*, संगतिकरण *n.* Analyt'ically *adv.* Analy'tics *n.pl. logic.* पृथक्करणविद्या *f*, मूलतत्वशोधनविद्या *f.*

*N. B.*—रसायनपरीक्षक will be a very happy word for Analyser (Chemical Analyser). In this connection see our Note on the word Chemistry.

**Anamorphosis** ( an-a-mor'fo-sis ) [ Gr. *ana*, again, & *morphe*, a form. ] *n. bot.* वनस्पतीच्या कोणत्याहि भागाची नैसर्गिक नव्हे अशी वाढ *f*, अस्वाभाविक वाढ *f*. २ *a distorted projection or drawing of anything, so made that when viewed from a particular point or by reflection from a suitable mirror it appears regular and properly proportioned; a deformation* विकृत छाया *f*, विकृत स्वरूप *n*.

**Ananas** ( an-an'as ) *n. bot.* अननस *m*. Also Anana.

**Anantherous** ( an-an'ther-us ) [ Gr. *an*, not, & Eng. *anther*. ] *a. bot.* अ-परागकोश, परागकोशरहित.

**Ananthous** ( an-an'thus ) [ Gr. *an*, not, & *anthos*, a flower. ] *a. bot.* पुष्परहित, अ-पुष्प.

**Anapest, Anapæst** ( an'-a-pest ) [ Gr. *anapaistos*, reversed. ] *n. pros.* पहिलीं दोन पदें ( syllables ) लघु आणि तिसरें दीर्घ असा गण *m*, सगण *m*. Anapes'tic *a*. Anapes'tically *adv*.

**Anaphrodisiac** ( an-af-rō-diz'i-ak ) [ Gr. pref. *an*, not, & *aphrodisiakos*, venereal.] *n. med.* पुंस्त्वन्नपंढत्वोत्पादक पदार्थ *m*.

**Anaplasty** ( an'a-plas-ti ) [ Gr. *ana*, again, & *plassein*, to form. ] *n. surg.* शरीरांतील दूषित मांसाची जागा शेजारच्या चांगल्या मांसानें भरून टाकण्याकरतां केलेली शस्त्रक्रिया *f*, व्रणरोपकशस्त्रक्रिया *f*.

**Anaplerosis** ( an'a-plē-rō'sis ) [ Gr. *ana*, up, & *pleroo*, I fill. ] *n. med.* जखम वाढून भरून येणें *n*. Anaplerot'ic *a*. and *n. med.* जखम वाढून भरून येण्याचें औषध-मलम *n*.

**Anarchy** ( an'ark-i ) [ Gr. *a, an*, not, *arche*, government. ] *n. want or confusion of government* ( राजा दुर्बळ झाल्यामुळें राज्यांत झालेली ) बेबंदशाई *f*, झोटिंगशाही *f*, अंधाधुंदी *f*, निर्नायकी *f*, अनायकी *f*, झोटिंगपादशाही *f*, अंधेरराज्य *n*, राज्याव्यवस्था *f*, (राज्यांतील) अव्यवस्था *f*, बारभाई घोटाळा *m*, गोंधळ *m*, गैरवंदोबस्त *m*. Anarch'ic, Anarch'ical *a*. ( v. N. ) अंधाधुंद, अंधाधुंदीचा, निर्नायक, अराजक, निर्नायकीचा, शासनरहित, अव्यवस्थराजक, बेबंद, बंडाळीचा. An'archism *n*. बेबंदशाई मत *n*. राजसंस्थेविरुद्ध मत *n*. An'archist, An'arch *n*. बेबंदशाई माजविणारा, बंडाळ्या *m*, बंड्या (?) *m*, बंडी (?) *m*, राज्यसंस्थाविरोधी, राजसत्ताविरोधी.

**Anarthrous** ( an-är'thrus ) [ Gr. *an*, not, *arthron*, a joint, the article.] *a. gram.* अनुपपद, उपपदविरहित. २ *zool.* विसंधि, असंधि, संधिविरहित. Anar'thrously *adv*.

**Anasarca** (an'a-sär'ka) [ Gr. *ana*, through, & *sarx*, flesh. ] *n. med.* जलोदराच्या वर्गांतील एक रोग *m*, शोथ(त) *m*, जलत्वक् *f*, जलनिदानशोथ *m*.

**Anastaltic** ( an-a-stal'tik ) [ Gr. *anastaltikos*, fitted for checking. ] *a. med.* रक्त थांबविणारें (औषध), रक्तस्तंभक (औषध).

**Anastomosis** ( an-as-to-mō'sis ) [ Gr. *ana*, again, & *stoma*, a mouth. ] *n. bot.* तंतुसंयोग *m*, वाहिनीसंमेलन *n*, वाहिनींचा संधि *m*. २ *anat.* वाहिनींचा संधि *m*, वाहिनींची गुंतागुंत *f*, नाडी *f*-शिरासंयोग *m*.

**Anathema** ( an-ath'em-a ) [ Gr. *ana*, up, & *tithenai*, to place. ] *n*. बहिष्काराभिशाप *m*. २ बहिष्कृत केलेली वस्तु *f*-किंवा मनुष्य *m*. A-nath'e-mat'-ic, A-nath'e-mat'ic-al *a*. बहिष्कारासंबंधीं-सारखी. A-nath'e-ma-tize *v. t.* बहिष्कार घालणें, बहिष्काराभिशाप *m*. करणें-देणें. *v. i.* बहिष्काराचा उच्चार करणें, अभिशाप देणें. A-nath'e-ma-ti-zā'tion *n*. बहिष्कार घालण्याची क्रिया *f*.

*N. B.*—Some propose बहिष्कार only or अभिशाप only as the Marathi word for Anathema. We have in Marathi phrases such as बहिष्कार घालणें, अभिशाप देणें. Sanskrit lexicographers do give अभिशाप for Anathema. But we have retained बहिष्काराभिशाप as we found it in Candy.

**Anatomy** ( an-a'tom-i ) [ Gr. *ana*, up, & *temnein*, to cut.] *n. art of dissection* शारीर(शास्त्र) *n*, शरीरव्यवच्छेदनविद्या *f*, (शारीरशास्त्राध्ययनार्थ) शरीरच्छेदन *n*. २ विच्छेदन *n*. ३ अस्थिपंजर *m*; as, He was like an A. तो अतिशय रोडका होता, त्याचा फक्त अस्थिपंजर राहिला होता (सुदामजी). ४ पृथक्करण *n*, विवेचन *n*; as, The A. of a discourse. Anatom'ic, Anatom'-ic-al *a*. शरीरच्छेदनविद्येसंबंधीं, विच्छेदनासंबंधीं. An-at'omist *n*. शारीरवेत्ता, शारीरशास्त्रज्ञ, शरीरव्यवच्छेदक *m*. Anat'o-mise *v. t.* शरीररचना जाणण्याकरितां व्यवच्छेद करणें, चिरणें, फाड करणें, शरीरच्छेदन करणें. २ *fig.* पृथक्करण करणें; as, To A. an argument.

**Anatropal, Anatropous** (a-nat'rop-al, a-nat'rop-ous) [ Gr. *ana*, denoting inversion, & *trepein*, to turn.] *a. bot.* आंसाकडे लागलेलें (बीं), व्यतिक्रान्त, अधोमुख, व्यस्त. A. ovule अधोमुखी अंड, व्यतिक्रान्तस्थान, व्यस्त अंड.

**Ancestor** (an'-ses-tur) [L. *ante*, before, & *cedere, cessum*, to go.] *n. forefather* वडील *c*, पितर *m*, पूर्वज *c*, कुलपुरुष *m*, पूर्वीच्या पिढीचा *m*, आदले पिढीचे मनुष्य *n*, डोई *f*. २ *law* पूर्वज *c*, मूलपुरुष *m*. Ancestors बापदादे *m. pl*, वापजादे *m. pl*, आजेपणजे *m. pl*, वडील *m. pl*, वाडवडील *m. pl*, पूर्वज *m. pl*, पितरें *n. pl*. The three male ancestors पितृत्रयी *f*, त्रिपुरुष *m. pl*. Seat of one's ancestors आद्यपीठ *n*, आद्यस्थान *n*, मूलपीठ *n*. Acquired by one's ancestors वडिलोपार्जित. Through one's ancestors वडिलोवडिलीं. To abuse one's ancestors त्रयी *f*-पित्रें *n. pl*-तीन पिढ्या *f. pl*-सात पिढ्या *f. pl*-बेचाळीस पिढ्या *f. pl*-उद्धरणें-खवर *f* घेणें *g. of o.*, An'cestress *fem*. Ances'tral, Ances-to'rial *a*. पूर्वजांचा, वडिलांचा, वडिलार्जित, वडिलांसंबंधीं, पैत्र, पैतृक, कौलिक, पूर्वजांसंबंधीं, पूर्वजविषयक. २ परंपरागत, पिढीजाद, पूर्वापार, परंपरायात, पित्रायात. An'cestry *n. series of ancestors* वडील or वाडवडील

*m. pl*, वडील परंपरा *f*, कुलपरंपरा *f*, वृद्धपरंपरा *f*. २ कुलीनता *f*, खानदानी *f*.

Anchor (ang'kor) [Gr. *angkos*, a bend.] *n.* (गलबताचा) नांगर *m*, लंगर *m*. २ *fig.* आसरा *m*, आधार *m*, आश्रय *m*. At A. नांगर टाकलेला. To cast A. नांगर टाकणें. To lie at A. नांगर-सोडून-टाकून असणें-नांगरणीवर असणें. To weigh A. गलवत हांकारणें. २ *fig.* लांबणीवर पडलेलें साहसाचें काम करण्यास आरंभ करणें. Flook of an A. or grapnel पावडा *m*. Sheet A. जहाजाचा सर्वांत मोठा नांगर. २ *fig.* सर्वांत मोठा आश्रय; शेवटचा तरणोपाय; as, That was my sheet A. Anchor *v. t.* नांगर टाकून स्थिर करणें, नांगरणें, खुंटवणें. A. *v. i.* नांगर or लंगर *m*. टाकणें, नांगरणें, नांगरणी *f*-नांगरण *f*-करणें or होणें *g. of o.* २ (for some short occasion) ओरवा *m*. करणें, बंदर *n*. करणें. Anch'orage *n. duty levied on anchoring* खुटवा *m*, गलबत नांगरल्याबद्दल जो कर सरकारास द्यावा लागतो तो. २ *place of A.* नांगरवाडा (?) *m*, ओरवा *m*, ठेवण *n*. ३ *fig.* मनाला विसावा देणारी वस्तु *f*. Anchor-hold *n*. नांगराचा दांडा *m*. २ *fig.* हमी *f*, तारण *n*. Anchoring *n.* (v. V. 1.) *-act.* नांगरणें *n*, नांगरणी *f*, नांगरण *f*. २*-act.* ओरवा *m*. Anch'orless *a.* अस्थिर, अधीर. The arms of an anchor नांगराचे दांत *m*. The eye of an anchor नांगराचा डोळा.

Anchoret, Anchorite (ang'kor-et, ang'kor-īt) [Gr. *ana*, back, & *chorein*, to retire.] *n.* वनवासी *m*, योगी *m*, बैरागी *m*, गोसावी *m*, (among Brahmins) वानप्रस्थ *m*. Anch'oritess, Anc'ress, Ank'ress, Anch'oress *n.* बैरागीण, गोसावीण *f*. Anch'oretic, Anch'oret'ic-al, Anch'o-rit'ic-al *a.* गोसाव्यासंबंधीं किंवा त्याचे वर्तनक्रमास अनुरूप.

Anchylosis (ang-kī-lō'sis) [Gr. *angkylos*, crooked.] See Ankylosis.

Ancient (ān'shent) [L. *ante*, before.] *a. belonging to old times* जुना, जुनाट, पूर्वकालिक, प्राचीन, पुराण, पुरातन, पूर्वकालीन, प्राक्कालिक, प्राक्कालीन, कदीम. २ वयोवृद्ध, जुना. A. *n.* वृद्ध-प्राचीन-पुरातन मनुष्य *m*, पूज्य किंवा सन्मान्य मनुष्य *m* (R). ३ *pl.* वाडवडील *m. pl*, पुरातन काळचीं-प्राक्कालचीं-&c. मनुष्यें *n. pl*, वृद्धपरंपरा *f*. ४ ग्रीस व रोमदेशांतील जुने ग्रंथकार, राज्यकर्त्ते (opposed to moderns). Practice of the A.s वृद्धाचार *m*. Track or path of the A.s वडिलांचा परिपाठ *m*. Ancient lights *law* वीस वर्षेपर्यंत विनहरकत व फेरफार केल्यावांचून ज्या खिडक्यांतून उजेड घेण्याची चालू वहिवाट कायम आहे अशा खिडक्या. A. writings तीस वर्षांपेक्षां जुने लेख. An'ciently *adv.* (v. A.) जुन्या काळीं, पूर्वकाळीं, प्राचीनकाळीं, प्राक्कालीं, प्राचीन समयीं, पूर्वी. An'cientness *n.* (v. A.) जुनेपणा *m*, जुनाटपणा *m*, प्राचीनत्व *n*, पुरातनत्व *n*, प्राक्कालिकत्व *n*. &c. An'cientry *n.* See Ancientness. २ *Shakes.* जुने लोक.

Ancient (ān'shent) *n.* (*obs.*) निशाण *n*. २ निशाण धरणारा *m*. (*corrupted from ensign.*)

Ancillary (an'sil-ar-i) [L. *ancilla*, a maid-servant.] *a. subservient* हाताखालील, ताबेदारींतील, दासीप्रमाणें नम्र, गौणभूत, सहाय्यभूत, दुय्यम, हस्तक. (With *to*).

Ancipital (an-sip'i-tal) [L. *an*, for, *amb*, on both sides, & *caput*, the head.] *a. bot.* द्विधारी, दुधारी. २ द्व्यर्थक. ३ द्विकपाल, दोन डोक्यांचा. Also Ancip'itous.

Ancon (an'kon) Ancone (an'kōn) [Gr. *angkon*, the elbow.] *n. anat.* कोंपर *n*. २ *arch.* टेंकू.

And (and) [Gr. *anti*, over against.] *conj.* आणि, आणखी, आण, आणखीन, अणीख, नी, व. A. so forth वगैरे, इत्यादि, इत्यादिक प्रभृति. There are students A. students विद्यार्थी कांहीं चांगले, कांहीं वाईट असतात. A. then नंतर. A. yet तथापि, असें आहे तरी.

Andante (an-dan'te) *n. mus.* सारखा धिमा ताल *m*. *a.* सारख्या धिम्या तालाचें (गीत).

Andrœcium (an-drē'si-um) [Gr. *andros*, a man, & *oikos*, a house.] *n. bot.* पुंकेसराचें स्थान *n*, नरेंद्रियसमुदाय *m*, नरमंडल *n*, पुंकेसरमंडल *n*.

Androgynal, Andragynous (an-droj'in-al, an-droj'in-us) [Gr. *andros*, a man, & *gyne*, woman.] *a. bot.* एकाच देंठावर स्त्री व पुरुषजातींचीं फुलें असणारें, उभयलिंगक, दुलिंगी.

Andromeda (an-drom'e-da) *n. astron.* देवयानी *f*.

Androphore (an'dro-fōr) [Gr. *andros*, a male, & *pherein*, Sk. भृ, bear.] *n. bot.* पुंकेसरधारीनलिका *f*, नरकेसरस्तंभनाल *m*.

Androus (an'drus) [Gr. *andros*, a male.] *a. bot.* पुंकेसरोत्पादक.

Anecdote (an'ek-dōt) [Gr. *a*, *an*, not, *ek*, out, & *didonai*, to give.] *n.* लहानशी गोष्ट *f*, खरी गोष्ट *f*, चटकदार गोष्ट *f*, चुटका *m*. २ आख्यायिका *f*, उपाख्यान *n*, उपकथा *f*, फरडूक *n*, फरडुकें *n*, गतक *n* (*v.* घाल). ३ कुलकथा *f*, कुळकट *f*, खणकत *f*. ४ चरित्रांतील विशेष प्रसंग *m*. ५ अश्रुतपूर्व किंवा अप्रसिद्ध कथा *f*. An'ecdotage *n.* उपकथासंग्रह *m*. २ गोष्ट सांगण्याची म्हातारपणची हौस, वडबड करणारें म्हातारपण. Anecdot'ic, An'ecdotal, Anecdot'ical *a.* An'ecdo'tist, An'ecdot'ri-an *n.* उपकथानिवेदक *m*, चटकदार गोष्टी लिहिणारा *m*.

Anelectric (an-ē-lek'trik) [Gr. *an*, not, & Eng. *electric.*] *a. phys.* घर्षणानें जींत विद्युल्लता उत्पन्न होत नाहीं अशी (वस्तु), विद्युद्ग्राहक, (opposed to *idioelectric* विद्युत्स्थापक).

Anelectrode (an-ē-lek'-trōd) [Pref. *ana*, up, & Electrode.] *n. electri.* विद्युत्घटमालेचा धनध्रुव *m*.

Anemometer (a-ne-mom'et-ėr) [Gr. *anemos*, wind,

& Meter. ] *n. a machine wherewith to measure the strength of the wind* वायूची शक्ति किंवा वेग मोजण्याचें यंत्र *n*, वायुवेगमापक *n*. Anemomet'ric *a.* वायुवेगमापकाचा, वायुवेगमापकानें दाखविलेला. Anemom'etry *n.* वायुवेगमापनमिति *f.*

*N. B.*—इंग्रजींत शास्त्रीय शब्दांत—meter आणि -metry ह्या अंत्य प्रत्ययांचे पुष्कळ शब्द येतात. त्यांना मराठींत मापक आणि मिति हे शब्द योजावे; जसें, Barometer भारमापक, thermo'meter उष्णतामापक. २ Trignometry त्रिकोनमिति, Geometry भूमिति. अशा रीतीचे नेमके शब्द एकदां ठरवून ठेविले ह्मणजे मराठींत शास्त्रीय शब्द बनविण्याचें काम फार सुलभ होईल.

Anent ( a-nent' ) *prep.* and *adv. against* विरुद्ध, उलट. २ *towards* कडे. ३ *concerning, about* विषयीं, संबंधीं, बद्दल.

Anenterous ( an-en'ter-us ) [ Gr. *an*, priv. & *entera*, Sk. अंत्र, bowels. ] *a. zool.* अंत्ररहित, अनंत्र.

Aneroid ( an'e-roid ) [ Gr. *a*, not, *neros*, wet. ] *a.* अनार्द्र, अप्रवाही, पाण्याचा उपयोग न करणारा; as, A. barometer अप्रवाही भारमापक. ह्या भारमापकांत पाण्याचा उपयोग करीत नाहींत. See the word Barometer.

Aneurism ( an'ūr-izm ) [ Gr. *ana*, up, *eurys*, wide. ] *n. med.* धमनीला आलेली सूज *f*, धमनीशोथ *m*, धमनिजग्रंथि *m.* २ *fig.* विषमवाढ. An'eurismal, An'eurismatic *a.*

Anew (a-nū') [Of and New.] *adv. over again* नव्यानें, उलटून, पुन्हः (*pop.*) पुन्हा, फिरून. २ नव्या रूपानें.

Anfractuose ( an-fract-ū'us ) [ L. *fractum*, to break. ] *a. bot.* वक्र, वांकणांनीं युक्त, व्यावृत, परिवृत. Also Anfractuous.

Angel ( ān'jel ) [Gr. *angelos*, a messenger.] *n.* देवदूत *m*, स्वर्गलोकींचा ( मानवश्रेष्ठ ) प्राणी *m.* २ यमदूत *m.* ३ भूत *n*, पिशाच *n*, पतितदेवदूत *m.* ४ इंग्लंदांतील एक प्राचीन सोन्याचें चलनी नाणें *n.* याची किंमत ६ शि. ८ पे. पासून १० शि. पर्यंत असे. ५ ख्रिस्ती देवळांतील धर्मोपदेशक *m.* (या अर्थी प्राचीनकाळीं उपयोग करीत). ६ *fig.* प्रिय मनुष्य *c*, सौंदर्य-कनवाळूपणा-परोपकार इत्यादि सद्गुणांचा पुतळा *m*, सुंदर-मनुष्य *m*-स्त्री *f.* Angel's visit *fig.* ईश्वराचें फूल *n*, चांदसलामी *f*, साठावर्षी सुंठ फुलणें *n.* A. of death यमदूत. Recording A. चित्रगुप्त. An'gelhood *n.* देवदूत-भूत-योनि *f.* Angel'ic, Angel'ical *a.* देवदूताचा, देवदूतासंबंधीं, देवदूतधर्मक, देवदूतवत्. २ उत्तम गुणी, देवादिकांच्या धर्मांनीं-गुणांनीं युक्त; as, A. presence. Angel'ically *adv.* Angelol'atry *n.* देवदूतपूजा *f.* देवदूतांची देवांसारखी पूजा *f.* Angelol'ogy *n.* देवदूतशास्त्र *n*, देवदूतविचार *m.*

Angelica ( an-gel'i-ka ) *n. bot.* हळदी चाफ्याच्या जातीचें मूळ *n.* (root.) Angel-water *n.* सुगंधी पातळ पदार्थ *m.*

Anger ( ang'ger ) [ L. *angor*, vexation. ] *n.* राग *m*, क्रोध *m*, कोप *m*, रोष *m*, जळ or जाळ (?) *m*, घुसा *m*, तवक *m*, क्रोधभाव *m*, अमर्ष *m*, संताप *m*, तैप (?) *m*, त्वेष *m*, क्षोभ *m.* [ ASSUMED A. क्रीडाकोप *m*, प्रणयकोप *m*, कृतककोप *m*, खोटा कोप *m.* TO BE EXCITED INTO A. रागास येणें-भरणें-पेटणें-चढणें, चेत(ता)ळणें. TO CALM, COOL, REMOVE, THE A. राग घालवणें, रागाचें-पाणी *n*-वारापाणी *n.* करणें. TO DRAW DOWN (UPON SELF) THE A. OF कढ *m.* ओढून घेणें, रागें भरून घेणें. TO VENT A. UPON रागें भरणें WITH वर OR ला ]. Anger *v. t. provoke, enrage* क्षोभवणें, तापवणें, संतापवणें, कोपवणें, पेटवणें, राग *m*-कोप *m*-&c. आणणें, रागास आणणें, कातावणें, चितावणें, चेतवणें, चेतळवणें, खिजविणें, (*fig.*) उसळवणें, पित्त *n.* तापवणें-खवळविणें-उसळविणें-&c. *g. of o.*, तापन *n*-संतापन *n*-क्षोभन *n*-क्रोधोद्दीपन *n*-&c. करणें *g. of o.*, संतप्त-क्रुद्ध-कुपित-&c. करणें. २ *inflame* दाह *m.* करणें *g. of o.*, संतप्त करणें. A. *v. i.* राग आणणें. Angered *p.* ( v. V. 1. ) रागास आणलेला, &c., तप्त, संतप्त, रुष्ट, क्रुद्ध, क्षुभित. An'gerly, Ang'rily *adv.* रागानें &c., रागें भरून-येऊन, क्रोधभावानें, क्रोधबुद्ध्या, क्रोधदृष्ट्या, क्रोध-पूर्वक, डोळे चढवून. An'gerless *a.* अक्रोधन, शांत. Ang'riness *n.* रागीटपणा *m*, तापटपणा *m.* Ang'ry *a.* रागें भरलेला, रागास आलेला, क्रोधायमान, कोपायमान, कुपित, क्रुद्ध, क्रोध-कोप-क्षोभ-रोप-संताप with the suffixes of युक्त, आरूढ, अन्वित, आक्रान्त, आविष्ट, तप्त, संतप्त, रुष्ट, क्रोधमूर्च्छित, रागीट, क्रोधी, तापट, जहाल. [ A. feelings क्रोधभाव *m.* A. words रागाचे शब्द, धुसफूस *f*, धुसमूस *f.* To be A. रागें भरणें, राग(गा)वणें. To become A. रागावणें, कोपणें, पेटणें, चेतणें, क्रोधावणें, क्रोधणें, तापणें, संतापणें, क्षोभणें, खिजणें, रागास येणें-चढणें-भरणें, पेटणें, चेतळणें, आंगाची लाही होणें ]. २ क्रोधाचा, रागाचा, कडक.

Angienchyma (an'ji-en'chi-ma) *n. bot.* वाहिनीमय तंतु *m.*

Angina Pectoris ( an-jī'na ) *n. med.* छातींत कळ येणें *n.* Angi'na *n.* कळ *f*, असह्य वेदना *f.*

Angina Tonsillaris (an-ji'na) [L. *anguere*, to choke.] *n. med.* गळ्यांतील दोन गांठींची असह्य वेदना *f.*

Angiography, Angiology ( an'ji-og'ra-fi, an'ji-olo-ji ) [ Gr. *angeion*, a vessel. ] *n. med.* धमनीवर्णन *n*, स्रोतोविवेचन *n.*

Angiosperm ( an'ji-osperm ) [ Gr. *angeion*, a vessel, & *sperma*, seed. ] *n. bot.* सकोशबीज *m*, आवृतबीज *m* (वनस्पति). Angiosperm'ous *a.* परिवेष्टितबीजमय, छन्नबीज, आवृत्तबीज ( वनस्पति ).

Angle ( ang'gl ) [ L. *angulus*, a corner. ] *n.* कोण *m*, कोन *m*, कोपरा *m*, अस्र *n.* Acute A. लघुकोन, न्यूनकोन. Alternate A. व्युत्क्रमकोन. Complementary A. कोटिकोन. Contiguous A. समीप कोन. Corresponding A. अनुरूप कोन. Critical A. अवधिकोन, संधिकोन. External A. बाह्यकोन. Horary A. नतकाल कोन. Internal A. अंतःकोन. Oblique A. विषम कोन. Obtuse A. विशाल कोन, अधिक कोन. Opposite A. अभिमुख कोन. Plane A. समतल कोन *m.* Rectilineal A. सरलरेषाकोन. Right A. काटकोन,

समकोन. Spherical A. चापीयकोन. Solid A. घनकोन. Supplementary A. पूरककोन. Vertical A. शिरस्थ कोन *m*, ऊर्ध्वकोन *m*. Visual A. दृष्टिकोन. A. at the base पायाकडचा कोन, तलस्थकोन. A. at the centre मध्यकोन, केंद्रकोन, नाभिकोन. A. at the circumference परिघकोन, पालिकोन. A. iron *mech. engin.* काटकोनाच्या आकृतीची लोखंडाची कांब *f.* A. iron shears काटकोनाच्या आकृतीची लोखंड कापण्याची कातर *f.* A. of advance वृद्धिकोन. A. of depression अधःकोन. A. of elevation उन्नतांश *m*. A. of friction घर्षणकोन. A. of incidence पतनकोन, मूलकिरणकोन. A. of reflection वलनकोन *m*, परावर्त्तनकोन. A. of screw मळसूत्राचा कोन. Angled *a.* कोणाचा, सकोण, कोन असलेला (used chiefly in compounds); as, right-angled समकोण, many-angled, &c. Ang'ular *a.* *having angles* कोनाचा, सकोन, कोणदार, कोनदार, कोणाकृति, कोपरेदार, कोनीय, अंशात्मक, कोणात्मक, कोणविशिष्ट. A. motion or velocity वर्तुलगति *f*, कोनीयगति *f*, वर्तुलांत फिरणाऱ्या पदार्थाची गति. Angular'ity *n.* सकोणता *f*, कोणविशिष्टता *f.* २ *fig. pl.* खाणाखोचा (of disposition), समविषमपणा *m*. Ang'ulated *a.* कोनांनीं झालेला, कोणप्रचुर.

Angle (ang'gl) [A. S. *angel*, a hook.] *n.* गळ *m*, आंकडा *m*. २ मासे धरण्याची काठी *f*-दोरी *f.* ३ वांकण *n.* A. *v. i.* *fish with a rod and hook* गळ टाकणें, गळानें धरणें, छडीगळानें मासे धरणें. A. *v. t.* एखादी गोष्ट प्राप्त करून घेण्याला आडून प्रयत्न करणें. Ang'ler *n.* गळकरी *m*, गळानें मासे मारणारा. २ एका प्रकारचा मासा *m*. ३ आडून प्रयत्न करणारा. Ang'ling *n.* (sport) मासे धरण्याची क्रीडा *f*-शोक *m*. २ आडून प्रयत्न *m*.

Angles (ang'glz) *n. pl.* इंग्रज लोकांचे मूळपुरुष, इंग्लंदांतील ॲंगल्स नांवाच्या लोकांची जात, इंग्लंडांतील प्राचीन लोक ज्यांवरून इंग्लंडाला इंग्लंड (Angles' land) हें नांव मिळालें. ह्या ॲंगल्स लोकांच्या वसाहती पूर्वी नार्दम्ब्रीया, मर्सिया व ईस्ट ॲंग्लिया ह्या ठिकाणीं होत्या; व हे मूळ जर्मनींतून इकडे आले.

Anglo (ang'glo) *a.* इंग्रेजी, इंग्लंदांतील. Anglo-Saxon ॲङ्ग्ल व सॅक्सन यांचा वंशज *m*, इंग्लिश मनुष्य *m*. Anglo-Indian हिंदुस्थानांत राहणारा इंग्रजी मनुष्य *m*.

Anguish (ang'gwish) [L. *angustia*, a strait or perplexity.] *n.* आधि *f*, मानसी-मानसिक पीडा *f*, यातना *f*, वेदना *f.* २ अतिदुःख *n.* A. of mind मनस्ताप *m*, संताप *m*. A. *v. t.* दुःख देणें. Ang'uishment *n.*

Anharmonic (an-har-mon'ik) *a.* अगायन(निष्पत्ति), अताल (निष्पत्ति). In geometry, a term applied to the section of a line by four points A, B, C, D, when their mutual distances are such that AB divided by CB is unequal to AD divided by CD; the ratio between these two quotients being called the *anharmonic* ratio of AC.

*N. B.*—गायनश्रेढी is the most widely accepted term for Harmonic Progression. In fixing the Marathi equivalent for Anharmonic, we use the word गायन for harmonic and for An we put अ. निष्पत्ति is the old technical word for ratio.

Anhydride (an-hī'drid) [Gr. *a*, *an*, not, & *hydor*, water.] *n. chem.* हाइड्रोजनविहीन (अम्लें), निर्जलज (अम्लें), अनार्द्र. (जलज or उज्ज=hydrogen.)

Anight (a-nīt') *adv.* रात्रीं, रात्रौ, रात्रीस.

Anil (an'il) [Ar. *an-nil*, for *al-nil*, the indigo plant.] *n. bot.* निळीचें झाड *n*. Anil'la *n.* नीळ *f.* An'iline *n. chem.* now a product of coal-tar निळीपासून केलेला पदार्थ *m*; as, A. dies.

*N. B.*—Aniline was obtained originally by distilling indigo with caustic potash; but is now obtained from many other sources especially coal-tar.

Anile (an'īl) [L. *anus*, an old woman.] *a.* वृद्धस्त्रीसारखा, बायक्या, कमकुवत, पावणेआठ (*slang*). २ (imbecile) कमी मेंदूचा, नेभ(ब)ळा, नबळा. Anil'ity *n.* साठीची नाटी बुद्धि *f*, नबळेपणा *m*, बायलेपणा *m*, नेभळटपणा *m*.

Animadvert (an-im-ad-vert') [L. *animus*, the mind, *ad*, & *vertere*, to turn.] *v. i.* लक्ष *n.* पोंचवणें. २ टीका करणें (with *on* or *upon*), बोल लावणें, दोष देऊन-काढून-लावून ठेवून-&c. बोलणें-म्हणणें. ३ *utter criticism* (usually of an adverse kind) विरुद्ध टीका करणें, खंडन करणें, विरुद्ध बोलणें, निंदात्मक टीका करणें. ४ *take legal cognizence of any thing deserving of chastisement or censure* दोषास-शिक्षेस पात्र अशा बाबीकडे कोर्टानें लक्ष्य देणें—अशा बाबीवर कोर्टानें टीका करणें, दोषार्ह मुद्यांचें खंडन करणें. Animadver'sion *n.* बोल *m*, दोषारोप *m*, दोषारोपण *n*, दोषारोपक भाषण *n*, विरुद्ध टीका *f*, निंदात्मकटीका *f*, टवाळकी (?) *f*, कुटाळकी (?) *f*. Animadvert'er *n.* टीका *f.* करणारा *m*, टीकाखोर *m*, निंदक *m*.

Animal (an'im-al) [L. *anima*, air, life. Sk. अन्, to breathe.] *n.* जीव *m*, प्राणी *m*, जंतु *m*, हयवान् or हैवान *m*, *n*, सत्व *n*, *m*, पशु *m*. (The four classes (चार प्राणिवर्ग) into which all Animals are collected, are अंडज, जरायुज, स्वेदज, उद्भिज). [Rational A. सुबुद्धप्राणी.] A. *a.* प्राण्याचा, प्राण्यासंबंधीं, प्राणिविषयक, जीवासंबंधीं, जीवोद्भव, जीवसंभव, पशुसंभव. [A. FOOD मांसाचें अन्न-भक्ष्य *n*. A. FUNCTIONS प्राणिक्रिया. A. KINGDOM प्राणिकोटि *f*, प्राणिजाति *f.* A. SUBSTANCE प्राणिज-प्राण्युत्पन्न पदार्थ *m*-वस्तु *f*.]. २ प्राणिक्रियेचा, प्राणिक्रियासंबंधीं-विषयक. ३ सचेतन, इंद्रियजन्य (as, opposed to intellectual or spiritual; as, A. passions षड्रिपु, काम, क्रोध, इत्यादि). [A. life प्राण्याचें अस्तित्व, प्राणिसृष्टि]. ४ मांसाचा. A. economy प्राण्याचे शरीराची व्यवस्था-शरीरांतील व्यवस्था *f.* A. heat शरिराची-शारीरिक उष्णता *f*, देहज-देहाची-आंगाची

उष्णता *f*. A. magnetism प्राणविनिमय *n*, सत्वविनिमय *n*, मेस्मेरिझम, कृपाशक्ति (?), शक्तिन्यास, शक्तिसंचार, प्राणाकर्षण. A. pleasures विषयसुख *n*. A. spirits उत्साह-शक्ति *f*, उल्हासी स्वभाव *m*. Animalisā'tion *n*. See the verb To Animalise. An'imalize *v. t.* शरीरांत प्राणिद्रव्यरूपानें विकार पावणें. २ ग्राम्य करणें, पशुवृत्तीचा करणें. ३ कामवासना जागृत करणें. An'imalism *n*. शरीरधर्म-व्यापार *m*. २ देहात्मवाद *m*. ३ ग्राम्यधर्मिता *m*, पशुवृत्ति *f*. Animalising *pr. p.* Animalised *pa. p.*

Animalcule (an-im-al'kūl) [L. *animalculum*, diminutive of Animal.] *n*. लहान जीव *m*, क्षुद्रजंतु *m*, अल्प जंतु *m*, अतिसूक्ष्मजंतु *m*, परमाणुतुल्यजंतु *m*, केशवमाधव *m. pl.* २ *zool.* लहान प्राणी *m*. Animal'cula, Animal'cules *pl.* Animal'cular, Animal'culine *a.* क्षुद्रजंतुसंबंधीं, लहान जीवांविषयींचा, अल्पजंतुसंबंधींविषयक.

Animate (an'im-āt) [L. *animare*, to fill with breath.] *v. t. inspirit, inspire, enliven, cheer, exhilarate* धैर्य *n*-उत्साह *m*-दम *m*-धमक *f*-हिम्मत *f*-चेव *m*-&c. आणणें-देणें-घालणें, उठावणी *f*-उचल *f*-&c. करणें, उत्तेजन *n*-प्रोत्साहन *n*-&c. देणें, चेतविणें. २ *quicken, make alive* जीव *m*-जीवनकळा *f*-जीवनशक्ति *f*-जीवित्व *n*-चैतन्य *n*-&c. देणें-घालणें, सजीव-सप्राण-सचेतन-&c. करणें, जीवन *n* घालणें. A. *a.* सजीव, सप्राण, जीवन्त, सचेतन, सचेष्ट, जीवविशिष्ट. A. & inanimate चराचर, सजीवनिर्जीव, चेतनाचेतन. An'imated *a.* (v. V. 1.) उत्तेजित, प्रोत्साहित, प्राप्तोत्साह, जातोत्साह, तरतरीत, प्रफुल्ल (वदन), पाणीदार, तेजस्वी. २ (v. V. 2.) सजीव केलेला, &c., प्राप्तचैतन्य, जातचैतन्य, जीवन्त. ३ दणक्याचा, कडकडीत, कडाक्याचा, धडाक्याचा, सतेज. ४ प्रबल, बलवान्, जोरदार; as, An A. speech. Animat'edly *adv.* An'imating *p. a.* प्रोत्साहक, चेतविणारें, तरतरी आणणारें. Animat'ingly *adv.* Animā'tion *n.* (v. V. 1.)—*act.* उत्तेजन *n*, चेव *m*, उठावणी *f*, उचल *f*, प्रोत्साहन *n*, उद्दीपन *n*, चेतना *f*, उत्साह *m*. २ (v. V. 2.)—*act.* जीव घालणें *n*, सजीव करणें *n*, सचेतन करणें *n*. I जीव *m*, तेज *n*, पाणी *n*, रंग *m*, तरतरी *f*. An'imater-or *n*. तरतरी आणणारा *m*, प्रोत्साहक *m*, सजीव करणारा *m*.

Anime (an'im) *n*. एका झाडामधील राळ *m*.

Animosity (an-im-os'i-ti) [L. *animus*, the mind, courage, pride.] *n*. वैर *n*, द्वेषभाव *m*, अंतर्दाह *m*, अतिशत्रुत्व *n*, बद्धकटाक्ष *m*, वैमनस्य *n*.

Animus (an'im-us) [L. *animus*, spirit, temper.] *n*. उद्देश *m*. २ कल *m*, दुष्टहेतु(?) *m*, द्वेष (?) *m*. ३ आकस *m*. A. furandi *law* चोरी करण्याचा हेतु *m*.

Anise (an'is) [Gr. *anison.*] *n*. *bot.* शेपु *f*, बडीशेप or शोप *f*, अतिच्छत्रा *f*. (S.) २ शेपूचें झाड *n*, बडीशोपेचें झाड *n*. Anise-scented-smelling शेपा or शेप्या, शोपा, शेपट or शोपट. An'iseed *n*. बडीशोपेचें बीं *n*. Anis'ic *a.* बडिशोपेसंबंधीं.

Anisomeric (an-i'so-mer'ik) [Gr. *anisos*, unequal, & *meros*, a part.] *a. chem.* समान घटकांच्या असमान प्रमाणांत झालेला. Anisomerous *a. bot.* विषमभागी.

Anisostemonous (an-i'so-stem-on'us) [Gr. *anisos*, & *stemon*, stamen.] *a. bot.* विषमसंख्याकपुंकेसरांचें (पुष्प), विषमनरकेसरधारी.

Ankle (angk'l) [A. S. *ancleow.*] *n*. मणगट *n* (not used in this sense now), गोफा *m*, गुल्फा *f*, गुल्फ *m*, घुटिका *f*. [REGION OF THE A. इंद्रगोळ *m*.] २ पाऊल आणि त्याचे वरील हाडाचा सांधा *m*. Ankle-bone *n*. घोटा *m*, पायाचा डोळा *m*-खुबा *m*. (not used in this sense now). Ankle-joint *n*. घोट्याची खीळ *f*. Ank'led *a.* Ank'let *n*. पैंजण *n*, तोरड्या *f*, सांखळ्या. Silver A. for a child कांडवाळा *m*, काडोळें *n*.

Ankyloblepharon (ang-ke-lo-blef'ar-on) *n. med.* पक्ष्ममेलन *n*, पापण्या एकमेकांला किंवा डोळ्यांला चिकटणें *n*.

Ankylosis (ang-ki-lo'-sis) [Gr. *angkylos*, crooked.] *n*. संधिस्तंभ *m*. Same as Anchylosis.

Anna (an'a) *n*. आणा *m*, एक रुपयाचा १६ वा भाग *m*.

Annals (an'alz) [L. *annus*, a year.] *n. pl.* क्रमानुसार-सालवार-इतिहास *m*, सालवार बखर *f*, दरवर्षाचा-प्रतिवार्षिक वृत्तांत *m*, शकावली *f*. Ann'alise *v. t.* सालवार इतिहास लिहिणें. Ann'alist *n*. सालवार इतिहास लिहिणारा *m*. An'nalistic *a.*

Annate (an'āt), Annat (an'at) [L. *annus*, a year.] *n*. नवाळी *f*, नवाई *f*, नवीनवाळ *f*, नवान्न *n*, नवधान्य *n*. Annates *pl.* धर्माधिकाऱ्याच्या वृत्तीचें पहिल्या वर्षाचें उत्पन्न *n*. हें पूर्वी पोपचे खजिन्यांत जात असे, परंतु अॅन राणीचे कारकीर्दीपासून कमी उत्पन्नाच्या वृत्ति असतील त्यांत ह्याची भर घालतात.

Anneal (an-ēl') [A. S. *ælan*, to burn.] *v. t.* तापवून नरम करणें, तापवून सावकाश निववणें. २ (रंग चढविण्याकरितां वस्तु) तापविणें. ३ भाजणें, अग्निपुट देणें. Anneal'ing *n.*

Annelida (an-el'i-da) [L. *annulus*, a ring.] *n. zool.* गोगलगायी, कालवें, इत्यादि जातींचीं जनावरें *f. pl.* Ann'elid, Annelidan.

*N. B.*—These animals have long bodies composed of numerous rings.

Annex (an-neks') [L. *ad*, to, & *nectere*, to tie.] *v. t. subjoin* जोडणें, लावणें, दुमाल्यास लावणें–घालणें, योग *m*-संयोग *m*. करणें *g. of o.* २ मोठ्या वस्तूंत लहान वस्तु सामील करणें, (परिणामादाखल) जोडणें (To A. a penalty). ३ खालशांत घेणें–सिळवणें, खालसा करणें; as, To A. a country. Annexā'tion *n.* (v. V. 1.)—*act.* जोडणें *n*, लावणें *n*, &c. २ खालसा करणें *n*. ३ अनुबंध *m*, Annexe *n*. जोड-इमारत-संस्था. Annexed

*p.* (v. V. 1.) जोडलेला, लावलेला, &c. २ खालसा केलेला, &c. Annexā'tionist *n.* खालसा करण्याच्या मताचा अभिमानी-पुरस्कर्ता, परमुलुख स्वतःच्या मुलुखाला जोडण्याविषयींच्या मताचा अभिमानी. Annex'ion *n.* Annex'ment *n.*

Annihilate (an-nī'hil-āt) [L. *ad*, to & *nihil*, nothing.] *v.t.* नाहींसा करणें, विनाश करणें, मागमूस नाहींसा करणें, उच्छेदणें (*poe.*), उच्छेद *m.* करणें with *g. of o.*, निःपात करणें, ठावठिकाणा *m*-नाहींसा करणें *g. of o.*, नायनाट करणें, खणून काढणें, सत्यनाश *m*-विनाश *m*-तळपूस *f.* करणें *g. of o.*, फन्ना-विध्वंस करणें, मागमूस *m.* मोडणें *g. of o.*, होता कीं नव्हता असें करून टाकणें, पाळेंमुळें खणून काढणें. Anni'hilāble *a.* (v. V.) नाहींसा करण्याजोगा, नाहींसा करण्यास योग्य, &c., नाशवंत. Annihilā'ted *p.* (v. V. I.) नाहींसा–केलेला–झालेला, उच्छिन्न, विनाशित, उध्वस्त. Annihilā'tor *n.* (v. V.) नाहींसा करणारा, &c., विनाशक, विनाशी, उच्छेदक, विनाश-&c.-कर्त्ता. Annihilā'tion *n.* (v. V.)—*act.* नाहींसा करणें *n*, &c., उच्छेद *m*, उच्छेदन *n.*—*state.* नाश *m*, विध्वंस *m*, सत्यनाश (*pop.*) सत्यनास or सत्यानास *m*, विनाश *m*, फन्ना *m*, वींमोड *n*, *f*; उच्छेद *m*, क्षय *m*, विलय *m*, लय *m*, प्रलय *m*, निःपात *m*, निधन *n.* Annihilā'tionism दुष्टसंहारसंवाद *m.* Annihilā'tionist *n.* दुष्टसंहारवादी, प्रळयकाळीं दुर्जनांचा संहार होईल असें मत प्रतिपादन करणारा. Annihilā'tive *a.*

Anniversary (an-ni-vers'ar-i) [L. *annus*, a year, & *vertere*, to turn.] *a.* वार्षिक, प्रतिवर्षाचा, प्रतिवार्षिक, प्रतिसांवत्सरिक. A. *n.* स्मारककृत्याचा वार्षिक दिवस *m*, प्रतिवार्षिक दिवस *m*, वार्षिकस्मारक-समारंभ *m*, वार्षिकोत्सव *m.* A. of birth वाढदिवस, वाढदीस *m*, वर्षगांठ *f*, वर्धापनदिवस *m*, जयन्ती (ईश्वरावतारांचे बाबतींत). A. of death मृततिथि *f*, मृतदिवस *m*, निधनतिथि *f.* प्रतिसांवत्सरिक *n*, प्रयाणतिथि, श्राद्धतिथि *f*, पुण्यतिथि *f* (साधु, संन्यासी यांचे बाबतींत).

Annotate (an'not-āt) [L. *ad*, to, & *notare*, to note.] *v. t.* & *v. i.* (when followed by *on* or *upon*) टीका *f*-भाष्य *n*-लिहिणें-करणें, (ग्रंथास) टीपा देणें, टिपणें *n pl*-जोडणें. An'notation *n.* टिप्पणी *f*, टीका *f*, व्याख्या *f* (*obs.*), भाष्य *n.* An'notator *n.* टीकाकार *m*, भाष्यकार *m*, टीपाकार *m*, टीपा देणारा, टिप्पनलेखक *m.* An'notatory *a.* टीपा देणारा, टिप्पणीयुत. Annotated *p.* टिप्पणीयुत.

Annotinous (an-not'in-us) [L. *annus*, a year.] *a.* *bot.* एकवर्षायु.

Announce (an-nowns') [L. *ad*, & *nunti-are*, to tell.] *v. t.* *give notice* कळविणें जाहीर-विदित-प्रसिद्ध-करणें, खबर *f.* देणें, घोषणा *f.* करणें *g. of o.* Announce'ment *n.* (v. V. 1.) जाहीर करणें *n*, प्रसिद्धि *f*, घोषणा *f*, दवंडी *f*, जाहीरनामा *m*, जाहीर खबर *f.* Announcer *n.* जाहीर करणारा, दवंडी पिटणारा.

Annoy (an-noi') *v. t.* *molest* त्रासविणें, छळणें, दुःख *n.* देणें, उपद्रव *m.* करणें, उपद्रव *m*-त्रास *m*-दुःख *n.* देणें, इजा-तसदी देणें, छेडणें, रडीस-रडकुंडीस आणणें. Annoy'ance *n.* उपद्रव *m*, छळ *m*, जाचणूक *f*, त्रास *m*, क्लेश *m*, दुःख *n.* I उपद्रव *m*, नड *f*, नडाव *m.* Annoyed' *p.* (v. V.) क्लेशित, त्रस्त, त्रासित, क्लेशयुक्त. Annoy'er *n.* त्रास देणारा. Annoy'ing *a.* त्रासदायक. Annoy'ingly *adv.*

Annual (an'nū-al) [L. *annus*, a year.] *a.* वर्षाचा, वार्षिक, प्रतिवार्षिक, सालाबाद, सांवत्सरिक, सांवत्सर, प्रतिसांवत्सरिक, एक वर्षापर्यंतच अस्तित्वांत असणारा, वर्षांत पुरा होणारा. A. *n.* *bot.* वर्षायु-वरशिकें झाड *n*-औषधी. २ वार्षिक पुस्तक *n.* An'nually *adv.* दरसाल, दरवर्षास, सालिना, प्रतिवर्षी, सालोसाल.

Annuity (an-nū'-i-ti) [L. *annus*, a year.] *n.* वर्षाशन (*pop.*) वर्षासन *n*, वार्षिक नेमणूक *f*, वार्षिक देणगी *f*, सालवेतन *n*, वार्षिक *n.* Annū'itant *n.* वर्षासन ज्यास आहे असा, वर्षासनदार *m.* Certain annuity कायमचें वर्षासन *n* (कमी जास्त न होणारें). Contingent annuity विशेष कारणांमुळें कमी जास्त होणारें वर्षासन *n.*

Annul (an-nul') [L. *ad*, to, *nullus*, none.] *v. t.* *abolish* रद्द करणें, मोडणें, मोडून टाकणें, नाहींसा-रहित-&c. करणें, लोपवणें, पूज *n.* घालणें *with* वर *of o.* (said of laws, decrees, &c.) Annulled *pa. p.* (v. V.) मोडलेला, &c. लुप्त, रद्द. Annul'ler *n.* रद्द करणारा *m.* Annul'ment *n.* (v. V.)—*act.* मोडणें *n*, &c. लोप *m*, रद्द करणें *n.* Annulling *pr. p.*

Annular (an'nūl-ar) [L. *annulus*, a ring.] *a.* वलयाचे आकाराचा, वलयाकार, मंडलाकार, वृत्ताकार, कंकणाकार, कंकणाकृतीचा. [A. ECLIPSE, *astron.* कंकणाकृति ग्रहण *n.*] २ ज्यांच्या काष्ठांतील पेशींच्या रचना वर्तुलाकार असतात असा. An'nulate, An'nulated *a.* *bot.* मंडलमुद्रित, कंकणवत्. Annulā'tion *n.* कंकण *n*, कंकणाकृति. An'nulet *n.* लहान कंकण *n*, आंगठी *f*, (वाटोळी) कडी *f.* २ *archit.* खांबाभोंवतील वाटोळें कडें. An'nuliform *a.* मंडलाकार, मंडलाकृति, कंकणाकार. An'nulose *a.* आंगठ्या असलेलें, आंगठ्यांचें (केलेलें).

Annulus (an'nūl-us) [L. *annulus*, a ring.] *n.* मंडल *n*, वलय *n*, कंकण *n.* २ *zool.* प्राण्याच्या शरीरांतील वलयाकार अवयव *m*, प्राण्याच्या शरीरावरील वलयांक चिन्हें *n*, भोंवरा *m.*

Annunciation (an-nun-si-ā'shun) *n.* जाहीर-प्रसिद्ध करणें. Annun'ciate *v. t.* खबर देणें, जाहीर करणें. Annun'ciative *a.*

Anode (an'ōd) [Gr. *ana*, up, & *hodos*, way.] The path by which an electric current leaves the positive pole, and enters the electrolyte on its way to the negative pole. उद्गामी मार्ग. (2) The positive pole धनध्रुव *m.*

Anodyne (an'o-dīn) [Gr. *a*, *an*, not, & *odyne*,

pain. ] *n. med.* वेदनाश(शा)मक औषध *n*, शमन *n*, उपशमन *n*, प्रशमन *n*.

Anoint ( an-oint' ) [ L. *in*, upon, & *ungere*, to anoint ] *v. t. rub over with unctuous substance* माखविणें, चोपडणें, न्हाऊं घालणें, अभ्यंग करणें, उटणें लावणें, मर्दणें, चर्चणें. [ To A. with oil तेल लावणें, तैलाभ्यंग करणें. ] २ अभिषेचन करणें, अभिषेक *m.* करणें *g. of o.*, अभिषिक्त करणें. Anointed *p.* ( v. V. I. ) माखलेला, चर्चित, अभ्यक्त, अनुलिप्त. २ अभिषेक केलेला, अभिषिक्त, जाताभिषेक, मूर्धाभिषिक्त; as, 'The anointed ( king ). Anoint'er *n.* माखविणारा *m*, अभ्यंगकर्त्ता, अनुलेपक *m.* Anoint'ment *n.* ( v. V. 1.)—*act.* माखणें *n*, &c., माखण *n*, उटणें *n*, उटी *f*, अनुलेप *m*, अनुलेपन *n*, अभ्यंग *m*, अभ्यंजन *n*, स्नेहन *n.*—*state. See Inunction.* [ A. WITH OIL तैलाभ्यंग *n.*] २—*act.* अभिषेकणें *n*, अभिषेचणें *n*, अभिषेक *m*, अभिषेचन *n*, मूर्धाभिषेक *m* ( of a king ).

Anomaly (an-om'al-i) [L. *an*, not, & *homos*, Sk. सम, the same. ] *n.* नियमविरुद्धता *f*, अनियम *m*, व्यभिचार *m.* २ विधिभंजकगोष्ट *f*-विषय *m*-&c., नियम सोडून असणारी गोष्ट *f*, विसंगति *f.* ३ प्रमाणविरुद्धता *f.* ४ संप्रदायविरुद्धता *f.* ५ विलक्षणपणा *m.* ६ *astron.* गृहांचें नीचान्तर, केंद्र. [ARGUEMENT OF A. मंदकेंद्र *n.*] Anomalist'ic,-al *a.* संप्रदाया-नियमाविरुद्ध Anom'alous *a.* संप्रदाय सोडून असणारा, असंगत, असंबद्ध, विरुद्ध, नियमविरुद्ध, विलक्षण, विधिभंजक, अयथामार्ग, अयथाविधि, अयथासंप्रदाय. [ The A. equation of a planet मंदफल *n.* ] २ *bot.* अनियमित, अविधि, व्यभिचारी. ३ *astron.* केन्द्रस्पर्धी. A. revolution केन्द्रस्पर्धी परिवर्तन. A. year केंद्रस्पर्धी परिवर्तन वर्ष. True A. *astron.* (सूर्यकेन्द्रगतकक्षेतील) केन्द्र. Mean anomaly *astron.* मध्यमकेन्द्र. Excentric anomaly ( कक्षामध्यगत ) उपकेंद्र, अनुकेंद्र, प्रतिकेंद्र, उत्केंद्र, केंद्र, मध्यमकेंद्र, उपकेंद्र हे तीन्ही कोन सूर्याच्या अतिसमीप विंदूपासून उजवीकडून डावीकडे मोजतात. पहिल्या दोन कोनांत सूर्य हा शिरःकोनबिंदु आहे, व उपकेंद्रांत कक्षामध्य हा शिरःकोनबिंदु होय. Anom'alously *adv.* ( v. A. ) नियमाला सोडून, मार्ग-विधि-&c.-सोडून, अविधि, अविधीनें, अयथाविधि, रूढि सोडून. Anom'alousness *n.* (v. A.) व्यभिचार *m*, विधिभंजकत्व *n*, वैलक्षण्य *n.*

*N. B.*—Though केंद्र is commonly used for the focus of any conic section, still in the old Technical Language of Astronomy केंद्र is used for the true Anomaly of a planet. When we once remember that केंद्र is the old recognised term for true Anomaly, we can easily understand that मध्यमकेंद्र is the right term for mean Anomaly. As regards the meaning of Excentric anomaly, the student must refer to a good work on Mathematical Astronomy & he will at once see that उपकेंद्र is the right term for Excentric Anomaly, as the angle measured is between the perihelion of the elliptical orbit and the imaginary position of the planet in question on the auxiliary circle (उपकुर्वाणवर्तुल) of its elliptical orbit. अनुकेंद्र will be another good word for the same, as in the word अनु there is an implication of the *corresponding* position of the planet on the auxiliary circle.

Anomalistic year means:—पृथ्वीला आपल्या कक्षेंत एका नीचस्थानापासून पुन्हां दुसऱ्या नीच स्थानाला येईपर्यंत जो काळ लागतो तो, पृथ्वीचें नीचोत्पन्न वर्ष, केंद्रस्पर्धी वर्ष. Perihelion means:—नीचस्थान (briefly नीच). Sidereal year means:–नाक्षत्र वर्ष. Solar year सौरवर्ष. Tropical year आर्तव-अयन वर्ष, सांपातिक सौर वर्ष. Anomalistic month पृथ्वीचा नीचोत्पन्न वर्षाचा बारावा भाग.

Anon (an-on') *adv.* लागलाच, लवकर, पुनः. Ever and A. नेहमीं, वरचेवर, कधींकधीं, मध्यें मध्यें.

Anonymous ( an-on'im-us ) [ Gr. *a*, *an*, not, & *onoma*, name. ] *a.* निनांवी, विननांवाचा, निनांव्या, अनामक, निर्नामक, गुप्तनामक, नाम-हीन-रहित-&c. An'onym *n.* निनांवी मनुष्य *m.* Anonym'ity *n.* निनांवी होणें *n.* Anon'ymously *adv.* ( v. A. ) नांवावांचून, निनांव, विनानामक. Anon'ymousness *n.* निनांवीपणा *m.*

Anopsia ( an-op'si-a ) [ Gr. neg, pref. *an*, & *ops*, an eye.] *n. med.* दर्शनेंद्रियाचा अभाव *m*, अंधळेपणा *m.*

*N. B.*—Philologically, Anopsia should be rendered by अनक्षिता. Greek *ops*, is said to be allied to Sanskrit अक्षि. According to Keating, Anopsia means "disuse of the eye because of optical defects."

Anorexia, Same as anorexy.

Anorexy ( an'o-rek-si ) [Gr. *an*, not, & *orexis*, desire, appetite. ] *n. med.* अग्निमांद्य *n*, खाण्याची इच्छा असतां भूक न लागणें *n*, क्षुधाभाव *m.*

Anosmia ( an-os'mi-a ) [ Gr. *a*, not, & *osme*, smell.] *n. med.* गंधज्ञानाचा अभाव *m*, अगंधग्राहित्व *n.*

Another ( an-uth'ėr ) [*An*, indefinite article & Other.] *a. one more* दुसरा, आणीक एक, आणखी एक, दुजा, द्वितीय. २ *not the same* दुसरा, अन्य, निराळा, इतर, वेगळा, अपर, अंतर ( in comp. as भाषांतर, देहांतर स्थलांतर, वृक्षांतर, पुष्पांतर, गृहांतर, &c. ), दुजा, अणीक, भिन्न. ३ *any other*, *any one else* दुसरा कोणी, दुसरा, इतर, अन्य, अणीक. ४ *not self* दुसरा, परावा, परका, परकीय. याचा नामाशिवाय उपयोग करितात. फार करून one शब्दाबरोबर याचा उपयोग करितात; as, One went one way, another another. One another एकमेक; one with another सरासरीनें, सर्वांचा एकदम विचार करून.

Answer ( an'sėr ) [ Gr. *anti*, against, & *swerian*, to swear. ] *v. t. reply to* उत्तर *n*-प्रत्युत्तर *n*-जबाब *m*-जाब *m*-&c. देणें-करणें. [ UNABLE TO A. अनुत्तर, निरुत्तर. To A. AGAIN उलटून बोलणें, उलटून गोष्ट *f.* सांगणें, उलटजबाब *m.* देणें, उत्तरास प्रत्युत्तर करणें, बेजबाब बोलणें,. परत

गोष्ट सांगणें, तोंडासी तोंड *n.* देणें, तोंडीं लागणें *g. of o.* To A. LIKE A NORMAN उडवाउडवीचें उत्तर देणें; हो किंवा नाहीं यांपैकीं कांहींएक न ह्मणणें. To A. THE BELL घंटा कशासाठीं वाजली यावद्दल तपास करणें. To A. THE DOOR दार ठोठाविल्यावर तें जाऊन उघडणें. To A. THE PURPOSE हेतु सिद्धीस नेणें. To A. PETULANTLY, SNAPPISHLY, &c. वचकट-वसकन जाब-देणें-बोलणें. To A. PROMPTLY OR SMARTLY, FLATLY, SMART, OUTRIGHT, &c. तोंडावर-तोंडच्या तोंडीं-बोलणें-उत्तर *n.* करणें, तटका *m.* तोडून टाकणें, तुकडा *m.* तोडून देणें, फडका *m.* फाडून देणें, कांडें *n.* मोडून देणें-पाडणें.] २ (a matter stated) *refute, confute* खोडून-काढणें-टाकणें, खंडणें (*poe.*), खंडन *n.* करणें *g. of o.*, उत्तर *n.* देणें. ३ *satisfy, supply* पुरवणें, पूर्ण करणें, पर्याप्ति करणें *g. of o.*, निर्वाह *m.* करणें *g. of o.* ४ *act in return or opposition* उलटून-परतून *with the verb required* प्रतिकर्म *n*-प्रतिक्रिया *f*- प्रतिकार *m*-क्रियोत्तर *n*-करणें, परत (in comp.) देणें-करणें. Answer *v. i. make answer, reply* उत्तर *n*-प्रत्युत्तर *n*-जाब *m*-देणें-करणें. [To A. TO A CALL ओ *f*-साद *m*- हाक *f*-देणें. To A. BACK SAUCILY, &c. उलट गोष्ट or फेर-गोष्ट *f.* सांगणें, उलट जबाब *m.* सांगणें-करणें-देणें, फेर घोडी *f*-फेर पगडी *f*-करणें, जापारणें or जोपरणें]. २ *succeed, serve, do* उतरणें, लागणें, चालणें, बसणें, जमणें, पडणें, जम *m*-जुवा *m*-जुगल *f*- उतारा *m*-पडणें-बसणें, कृतार्थ-कृतकृतार्थ होणें. ३ *give account of* जाब *m*-हिशोब *m*-मोसबा *m*-उत्तर *n*-&c. देणें-करणें. ४ *be correspondent with, suit with* मिळणें, जुळणें, जुगणें, जुडणें, जमणें, गांठ *f*-पडणें *g. of o.* ५ जबाबदार होणें (with *for*). Answer *n.* (v. V. 1.) उत्तर *n*, प्रत्युत्तर *n*, जबाब or जाब *m*, प्रतिवचन *n*, प्रतिवाद *m*, प्रतिवाक्य *n*, प्रतिवाणी *f*, उलथा (*obs.*) *m.* [DECIDED A. नेमोत्तर *n* (R), नेमकें उत्तर *n.* DEFINITE A. साफ जबाब *m.* DEVIOUS OR IRRELEVANT ANSWERS बावांचे *m. pl*, बावट्या *f. pl*, भावांखे (*obs.*) *m. pl.* DISRESPECTFUL A. तोंडपिटी *f*, गैरजवाब *m.* EVASIVE-INAPPLICABLE-&c. A. अनुत्तर *n*, टाळाटाळीचें उत्तर *n.* READY A. हाजीर जवाब *m.* READY OF OR AT A. हाजीरजवाबी OR हाजीरजबाब, जबाबी, जबेतराश OR स. REQUIRING A.-ORDER-&c. जबाबी. SOFT A. सांत्ववाद *m*, मृदु उत्तर *n.*] I *key, solution* उत्तर *n*, किल्ली *f*, उतारा *m*, उलगडा *m.* II दोषखंडन *n.* III *math.* उदाहरणाचें उत्तर. An'swerable *a.* (v. V. I. 3.) *responsible, accountable, amenable,* &c. जाब-हिशोब-मोसबा-&c. देणारा, मोसबेदार, जबाबदार, निसबतदार, उत्तर-जाब-मोसबा-हिशोब-&c.-देण्याचा अधिकारी-धनी-&c. An'swerably *adv.* An'swerableness *n.* उत्तरयोग्यता *f*, अनुरूपत्व *n*, &c., &c. An'swerer *n.* An'swerless *a.*

Ant (ant) *n.* मुंगी *f*, पिपीलिका *f.* [Black or Red A. मुंगळा *m. dim.* मुंगळी *f.* Red A. चांचण or चांचड *n*, उंबला or औंबील *m*, वाळंवा *m.* White A. वाळवी *f*, वाळंबा *m*, उदई or उधई *f.* Certain or other kinds of *Ant* are काडमुंगी *f*, गांडमोडी मुंगी *f*, घाणेरी मुंगी *f*, डोंगळा *m*, ढुंगणमोडें *n*, दांत्या *m*, धांवरी मुंगी *f*, वळचिच or ज *n*, हुरण *n*, हुळहुळी मुंगी *f*, पिसोळी मुंगी *f.* Hillock cast up by white Ants वारूळ *n*, भोम *n*, *enhanc.* भोमाड *n*, वल्मीक *n*, वामलूर *m.* Swarm of ants हुरण *n.* Train or line in progress of ants साईर *f*, वन्हाड *n.* Ant-bear *n.* मुंग्या खाणारा एक चतुष्पाद प्राणी *m.* Ant-hill *n.* भोम *n*, *enhanc.* भोमाड *n*, कृमिशैल *m.* Ant-lion *n.* मुंग्या पकडण्यासाठीं धुळींत वाटोळी खळी करून तिच्या तळाशीं बसणारा प्राणी *m*, एडका *m*, मोर *m.* Ant-cows *n.* See Aphides.

Antagonism (ant-ag'on-izm) [L. *anti*, against, & *agon*, a contest.] *n.* मतांत-कृतींत-विरोध *m. philos.* प्रतिपक्षता *f.* २ विपक्षता *f*, वैरभाव *m*, वैमनस्य *n.* Antagonisa'tion *n.* Antag'onise *v. t.* दुसऱ्याबरोबर भांडण करणें. Antag'onised *p. a.* Antag'onist *n.* प्रतिपक्षी *m*, विरोधी *m*, विपक्ष *m*, विपक्षी *m*, प्रतियोगी *m.* शत्रु *m.* A. *a.* See Opposing. Antagonist'ic,-al *a.* Antagonis'tically *adv.*

Antalgic (an-tal'jik) [Gr. *anti*, against, & *algos*, pain.] *n. med.* दुःखशामक औषध *n.*

Antalkali (ant-al'ka-li) *n.* Same as acid, आल्कलीविरुद्ध पदार्थ *m*, अम्ल *m*, आल्कलीप्रतियोगी.

*N. B.*—Antalkalies are found especially in the human system.

Antaphrodisiac, Antaphroditic (ant-af'ro-diz'i-ak, ant-af'ro-dit'ik) *a. med.* पुंस्त्वघ्न, षांढ्यजनक. २ उपदंशशमक, उपदंशघ्न, उपदंशहारक. A. *n.* उपदंशशमक औषध *n.*

Antapoplectic (antap-o-plek'tik) *n.* and *a.* रक्तजमूर्च्छापरिहारक. २ अंगविभ्रंशघ्न, सन्न्यासघ्न, सन्न्यासनाशक.

*N. B.*—Dr. Garde proposes संन्यास to be the right word for Apoplexy. Dr. Sambhare and others propose रक्तजमूर्च्छा another correct word for the same. अंगविकृति is an old word for Apoplexy according to Monier-Williams. We shall discuss this word further in details under the word Coma.

Antarctic (ant-ärkt'ik) [Gr. *anti*, opposite & Arctic.] *a.* दक्षिणध्रुवासंबंधीं, दक्षिणध्रुवाकडचा-कडील. A. circle दक्षिणध्रुववृत्त *n.* Antarct'ical *a.* Antarct'ically *adv.*

Antarthritic (ant-ar-thrit'ik) [Gr. *anti*, against, & *arthritis*, gout.] *a.* and *n. med.* आमवातरोगहारक (औषध *n.*), क्षुद्रग्रंथिस्थवातरोगघ्न, पादांगुष्ठरोगनाशक.

*N. B.*—Our word for gout is आमवात, while that for Rheumatism is संधिवात. Generally, Gout is an inflammation most commonly of the smaller joints, but, also of other structures, due to the deposits of the salts of uric acid. In Gout, there is the affec-

tion of the kidneys. In Rheumatism, there is the affection of the heart.

Antasthmatic ( ant-ast-mat'ik ) [ Gr. *anti*, against, and *asthma*, asthma.] *a.* and *n.* *med.* श्वासरोगघ्न, श्वासरोगनाशक-शामक, श्वासकुठार *m.*

Antatrophic ( an-ta-trof'ik ) [ Gr. *anti*, against, & *atrophia*, a wasting away.] *a.* and *n.* *med.* शक्ति व मांस इत्यादिकांच्या क्षीणत्वावरचें (औषध).

*N. B.*—Some propose the usual word क्षय for Atrophy. But it is not so according to the strict definition of Atrophy. "The conditions of general Atrophy are—loss of flesh, loss of colour and loss of strength combined with other phenomenon arising from the particular disorder to which the impairment of nutrition is due." ( Keating. ) Consumption or popularly called pulmonary phthises is rendered by क्षय or फुफ्फुसक्षय. In Atrophy, there is no fever. In Consumption, fever is a necessary accompaniment.

Ante ( ant'ē ) [ L. *ante*, before. ] लॅटीन भाषेंत *Antecedere* ( to go before ), *Antecessor* ( a fore-goer ), *Antetemplum* ( the portico of an ancient temple )- *Antemeridianus* &c. &c. असे संयुक्त शब्द तयार करण्यांत *Ante* ह्याचा पुष्कळ उपयोग करितात, आणि त्याच रीतीनें *Ante* ह्याचा इंग्रेजी भाषेंतहि संयुक्त शब्द तयार करण्यांत पुष्कळ उपयोग केलेला आढळतो; जसें, Antecavern, Antecloset, Antegarden, Antechurch, Antenumber, Anteroom. हे वर दिलेले संयुक्त शब्द उच्चारतांना *Ante* ह्या शब्दावर जोर द्यावा लागतो. ह्या वरील शब्दांत *Ante* ह्याचा अर्थ स्थलविषयक असून "पूर्वींचा, अलीकडील, दुसऱ्याकडे नेणारा, दुसऱ्या एखाद्या स्थळाची वाट," इ. इ. असा होतो; as, Antechamber दिवाणखान्याच्या अलीकडील खोली. कालविषयक संयुक्त शब्दांत *Ante* ह्याचा अर्थ "पूर्वींचा, आधींचा" असा होतो; as, Antenoon दुपारच्या पूर्वींचा काळ. कांहीं कांहीं ठिकाणीं *Ante* ह्याचा अर्थ समोरचा असा होतो; as, Antepectoral छातीच्या समोरचा. खालील उदाहरणावरून *Ante* शब्दाचा अर्थ जास्त विद्यार्थ्यांच्या लक्षांत येईल. Anterevolutional, Anterevolutionary, Antereformational, Antehuman, Antehysteric, Antewar, Antesunrise, Antemortem.

Antebrachial ( an-te-bra'ki-al ) [ L. *ante*, before, & *brachium*, the arm.] *a.* *anat.* हाता-चा-संबंधीं.

Antecedent ( an-te-sēd'ent ) [ L. *ante*, before, & *cedere*, to go.] *a.* *preceding in time* मागला, अगोदरचा, अगोदरील, आधींचा, आधील, पूर्व, पूर्वभूत, पूर्वजात, पूर्वगत, प्रागागत, पूर्वसिद्ध, पूर्वसत्ताक, भूतपूर्व, जातपूर्व. A. *n.* पूर्वींची गोष्ट *f*-विषय *m*-&c., पूर्ववृत्तांत *m*, पूर्ववृत्त *n.* २ *gram.* तत्पदवाच्य, पूर्वगामीशब्द *m*, पूर्वशब्द *m*, तत्शब्दवाच्य, तत्शब्दासंबंधीं. ३ *logic.* प्रतिज्ञावाक्य *n*, उदाहरणवाक्य *n.* ४ *math.* प्रमाणांतलें पहिलें पद *n*, अग्रपद *n.* [EVERY MAN IS A HUMAN BEING. THEREFORE EVERY KING IS A HUMAN BEING यांत पहिलें वाक्य ANTECEDENT आणि दुसरें CONSEQUENT आहे.] A.s *pl.* पूर्वचरित, पूर्ववृत्तांत. २ *log.* प्राग्रूप. Antecede *v. t.* पूर्वीं जाणें, अगोदर जाणें. Anteced'ence *n.* *act or state of going before in time* पूर्वीं जाणें *n*, अगोदर जाणें *n*, पूर्वसिद्धि *f*, पूर्वसिद्धता *f*, पूर्वभवन *n*, पूर्वास्तित्व *n*, पूर्वसत्ता *f.* Anteced'ently *adv.* अगोदर, पूर्वीं. Anteces'sor *n.* सर्वांच्या आधीं जाणारा. २ *law* पूर्वज.

Antechamber ( an'te-chām-bėr ) *n.* दिवाणखान्याच्या अलीकडील खोली *f*, पहिली खोली *f.* जींतून दिवाणखान्यांत जाण्याला वाट असते ती खोली *f*, सदरेची खोली *f*, सभोपगृह (?), *n*, सभासीमगृह (?) *n.* also Ante-room.

Antedate ( an'te-dāt ) [ L. *ante*, before, & Date.] *n.* पूर्वमिती *f*, मागली मिती *f*, मागली तारीख *f.* A *v. t.* *date before the true time* पूर्वींची मिती *f*-मागली मिती *f*-मागली तारीख *f*, घालणें. २ पुढें होणार अशा अदमासावर पूर्वींच अमलांत आणणें. ३ See Anticipate.

Antediluvianal ( an-te-di-lū'vi-an-al ) [ L. *ante*, before, & *diluvium*, a flood.] *a.* प्रलयापूर्वींचा, प्रलयप्राक्कालिक, प्रलयपूर्वकालिक. Antedilū'vian *n.* जलप्रलयापूर्वींचा प्राणी *m.* Antedilū'vially *adv.*

Anteflexion (antē-flek'shun) [ L. *ante*, before, & *flectere*, to bend. ] *n.* *med.* *a bending forward of any organ, chiefly the uterus* पुढें पडणें *n*, पुरोवनामन *n*; as, A. of the uterus.

Antelope (an'te-lōp) [Gr. *anthein*, to blossom, shine, & *ops*, eye. ] *n.* हरण *m*, *n*, हरिण *m*, मृग *m*, कुरंग *m*, सारंग *m.* यांचीं शिंगें पोकळ असतात व त्यांस शाखा नसतात. [ Black A. काळवीट *m*, कृष्णमृग *m*, कृष्णसारंग *m.* Spotted A. चित्तळ or चितळ *m*, *n*, चित्रमृग *m.* Dagger of A.-horn माडू *m.* ]

Antemeridian ( an-te-me-ri'di-an ) [ L. *ante*, before, & *meridies*, noon.] *a.* दोनप्रहरच्या पूर्वींचा (काल); हा व्यवहारांत A. M. ह्या अक्षरांनीं दाखवितात.

Antemetic ( ant-ē-met'ik ) [ pref. *anti*, against, & *emeo*, I vomit. ] *a.* *and* *n.* उलटी बसविणारा, वांतिशमक-नाशक-&c., वांतिघ्न, छर्दिघ्न, वांतिशामक.

Antemundane ( an-te-mun'dān ) [ L. *ante*, before & *mundus*, the world. ] *a.* पृथ्वीच्या पूर्वींचा, पृथ्वीच्या अगोदरचा, पृथ्व्युत्पत्तिपूर्वकालिक, प्राक्सृष्टिक.

Antenatal ( an-te-nā'tal ) [ L. *ante*, before, & *natalis*, pertaining to birth. ] *a.* जन्मापूर्वींचा. An'tena'ti *n.* अमुक एक काळापूर्वीं जन्मलेले लोक; as, Scotsmen born before 1603 are called A. with respect to that year.

Antennæ ( an-ten'ē ) [ L. *antenna*, a sailyard. ] *n.* *pl.* *zool.* किड्यांच्या तोंडाजवळील मिशा *f.* २ किड्यांच्या मिशांजवळील तंतु *m.* ( sing. Antenna ). Antenn'al, *of or belonging to A.* Antenn'ary, *of the nature of A.* Antenn'iform, *of the form of A.* Antennif'erous *a.* *Bear or having A.*

Antenuptial ( an-te-nupsh'al ) [ L. *ante*, before, & Nuptial. ] *a.* विवाहापूर्वींचा, लग्नाच्या पूर्वींचा, प्राग्वैवाहिक, लग्नापूर्वीं घडणारीं अगर करावयाचीं ( कृत्यें ).

Antepenult, Antepenultima ( an-te-pen'ult, ante-pē-nul'ti-ma ) [ L. *ante*, before, *pene*, almost, & *ultimus*, last. ] *n. pros.* उपांत्याच्या पूर्वींचा वर्ण *m.* Antepenult'imate *a.* उपांत्याच्या पूर्वींचा, उपांत्यपूर्ववर्त्ती, उपांत्यपूर्वस्थित. A. *n.* उपांत्याच्या आधींचा वर्ण *m.*

Antepileptic ( ant-ep'i-lep'tik ) [ *Anti*, against, & *epileptic.*] *a. med.* फेंफरें-अपस्मार दूर करणारें (औषध), अपस्मार-हारक-शामक, अपस्मारघ्न.

Anterior ( an-tē'ri-or ) [ L. *ante*, before ] *a.* आधींचा, अगला, पूर्वींचा, अगोदरचा, पूर्वकालीन, पूर्वकालिक, भूतपूर्व. २ अग्रवर्त्ती, पूर्ववर्त्ती, प्राग्वर्त्ती. Anterior'ity *n.* Antē'riorness *n.* पूर्वकालीनता *f.* अग्रवर्त्तित्व *n.*

Ante-room ( an'te-rōōm ) [ L. *ante*, before & Room.] See Antechamber.

Anteversion ( an-te-vėr'shun ) [ L. *ante*, before, & *vertere*, to turn. ] *n. med.* पुरोवर्तन *n*, अग्रतःस्थलांतर *n* ( of the uterus ), पुरःसरण *n.*

Anthela ( an'the-la ) *n. bot.* अनियमित विभागांचा पुष्पगुच्छ *m* किंवा स्तबक (?).

Anthelmintic ( an-thel-mint'ik ) [ Gr. *anti*, against, & *helmins*, a worm. ] *a. med.* कृमिघ्न ( औषध ), कृमींचा नाश करणारें ( औषध ). A. *n.* कृमिघ्न-कृमिहर-कृमिनाशक-औषध *n.* Also Anthelminthic.

Anthem ( an'them ) [ Gr. *anti*, against, & *phone*, sound, voice. ] *n.* ईश्वरभजनांतील गीत-स्तोत्र *n*, चर्चेनें-आळीपाळीनें ह्मणण्याचें गीत. A. *v. t.* स्तोत्र ह्मणणें-गाणें. National A. राष्ट्रीय गीत *n.* An'themwise *adv.* स्तोत्रपद्धतीनें.

*N. B.*—According to the latest researches in Philology Greek *Phone* seems to be allied to Sk. भण्.

Anther ( an'thėr ) [ Gr. *anthos*, a flower ] *n. bot.* केसराग्र *n*, परागकोश *m*, केसरग्रंथी *m*, पुंकेसरावरील-पुंकेशरावरील-नरतंतूवरील गोळी *f*, मुदनी *f*, रजोधि *m*, टिकली *f.* An'theral, Antherif'erous *a.* परागकोशाचा, परागकोशासंबंधीं, केसराग्रीय. Anth'eroid *a.* परागकोशासारखा, परागकोशसदृश-कल्प.

Antheridium ( an-ther-id'i-um ) *n. bot.* फर्न जातींच्या वनस्पतींत व शैवालांमध्यें पुंकेसराच्या अग्राऐवजीं असलेला पिंड *m*, फर्नमधील परागकोश-रेणुकोश *m*, पुंकेसरकल्पपिंड *m.*

Antherozooid-zoid ( an-ther-o-zō'oid ) *n. bot.* हालणारा नररेणु, चंचल नररेणु *m.*

Anthesis ( an-thē'sis ) *n. bot.* पुष्पांचा विकासकाल *m.* २ पुष्पविकसन *n.*

Anthocarpous ( an-tho-kär'pus ) [ Gr. *anthos*, a flower, & *karpos*, a fruit.] *a. bot.* अनेकपुष्पजफल, संकीर्णफल.

Anthodium ( an-thō'di-um ) [ Gr. *anthos*, a flower. ] *n. bot.* शिरोद्भूतपुष्पसमुदाय *m*-गेंद, पुष्पकंदुक.

Anthography (an-thog'ra-fi) [ Gr. *anthos*, a flower, & *graphe*, description. ] *n.* फुलांसंबंधीं विवरण करणारी वनस्पतिशास्त्राची शाखा *f*, पुष्पवर्णन *n.*

*N. B.*—Gr. *grapho* is the same as Sk. गृह्.

Anthoid ( an'thoid ) [ Gr. *anthos*, a flower, & *eidos*, a form. ] *a.* फुलाचे आकाराचा, फुलासारखा, पुष्पसदृश, पुष्पाकार, पुष्पकल्प.

Anthology ( an-thol'oj-i ) [ Gr. *anthos*, a flower, & *legein*, to gather. ] *n.* ग्रंथांमधून उत्तम ह्मणून निवडलेल्या चुटक्यांचा संग्रह *m*, निवडक कवितांचा संग्रह *m*, (*lit.*) पुष्पसमुदाय *m*, सुभाषितें *n.*

Anthophore ( an'tho-fōr ) [ Gr. *anthos*, a flower, & *pherein*, Sk. भृ, to bear.] *n. bot.* आंतील पुष्पकोशांचा आधारभूत देंठ *m*, पुष्पकोशाधार *m*, अंतःपुष्पकोशधर *m.*

Anthotaxis (an-tho-taks'-is) [ Gr. *anthos*, a flower, & *taxis*, order. ] *n. bot.* पुष्पोद्भवी सरणी *f*, देंठावरील पुष्परचना *f*-मंजरी *f.*

Anthrax ( an'thraks ) *n. med.* काळपुळी *f*, देटपुळी *f.* २ देटपुळीचा आजार *m.* Anthra'cic, An'thracoid *a.*

Anthropography ( an-thro-pog'ra-fi ) [ Gr. *anthropos*, a man, & *graphia*, description.] *n. the branch of anthropology, which treats of the geographical distribution of the races of mankind, and their local variations* मनुष्यवर्णन *n*, मनुष्यजातींचा इतिहास *m.*

Anthropoid ( an'throp-oid ) [ Gr. *anthropos*, man, *eidos*, form.] *a.* मनुष्यसदृश (प्राणी), मनुष्यकल्प (प्राणी), कांहीं प्रकारचीं माकडें, इ. An'thropoidal *a.*

Anthropolatry ( an-thro-pol'a-tri ) [ Gr. *anthropos*, man, *latreia*, worship.] *n. the giving of divine honours to a human being, a term always employed in reproach:* ( Chambers ). मानवपूजा *f*, दैवतीकरण *n.*

Anthropolite ( an-throp'o-līt ) [ Gr. *anthropos*, man, *lithos*, stone. ] *n.* मनुष्याच्या अस्थींचे झालेले दगड, अश्मीभूतमानवास्थि.

Anthropology ( an-thrōp-ol'oj-i ) [ Gr. *anthropos*, a man, & *logos*, discourse.] *n.* (*the science of the nature of men embracing human physiology and psychology and their mutual bearing, genealogy or issue which they had, arts which they studied, acts which they did.*) मानुष्यक (शास्त्र) *n.* (ह्या शास्त्रांत मनुष्यांच्या देहाची रचना, त्यांचे चलनादि गुणधर्म, त्यांची पूर्वपरंपरा, त्यांनीं उत्पन्न केलेल्या निरनिराळ्या कला, त्यांचे पराक्रम व तदुद्भूत स्वभाव ह्यांचें विवेचन असतें). मानवप्राण्यांच्या शारीरिक-मानसिक स्थितीविषयीं आणि प्राचीन व अर्वाचीन कालांतील त्यांच्या कृतीविषयीं विचार करणारें शास्त्र *n*, मनुष्यजातींच्या आचाररूढींचा इतिहास *m.* मनुष्यासंबंधीं शास्त्र, मानुष्यकशास्त्र. Anthropolog'ic, Anthropolog'ical *a.* Anthropolog'ically *adv.* An-

thropol'ogist *n.* मनुष्यशास्त्रवेत्ता, मानुष्यकवेत्ता. Anthropological religion पितृमूलकधर्म *m.*

Anthropometry ( an-thrō-pom'et-ri ) [ Gr. *anthropos*, man, & *metrein*, to measure. ] *n.* the measurement of the human body with a view to determine its average dimensions and the proportion of its parts at different ages, and in different races or classes मनुष्यदेहमिति *f*, मनुष्यदेहमापनविद्या *f* ( ह्या शास्त्रांत मनुष्याचें डोकें, हात, पाय, नाक, कान, छाती इत्यादि निरनिराळ्या अवयवांच्या लांबीरुंदीची नोंद घेऊन त्यावरून नवीन राष्ट्रशोध करितात). Anthropomet'ric *a.* मनुष्यदेहमितीविषयीं.

Anthropomorphism ( an-throp-o-morf'izm ) [ Gr. *anthropos*, man, *morphe*, form ] *n. attribution of human form or character to the Deity* ईश्वराला मनुष्याचा आकार व त्याचे गुण इत्यादि आहेत असें मत *n*, सगुणवाद *m*, ईश्वरसागुण्यवाद, साकारेश्वरवाद *m.* Anthropomorph'ic *a.* Anthropomorph'ise *v. t.* सगुणरूप देणें. An-thropomorph'ist, Anthropomorph'ite *n.* सगुणवादी. Anthropomorph'itism *n.*

Anthropopathism, Anthropop'athy ( an-thro-pop'a-thizm ) [ Gr. *anthropos*, a man, & *pathos*, passion.] *n. the ascription to the Deity of human passions and affections* सविकारेश्वरवाद, मनुष्याचे विकार देवास लावणें *n.* Anthropopath'ic *a.* Anthropopath'ically *adv.*

Anthropophagy ( an-thro-pof'aj-i ) [ Gr. *anthropos*, man, *phag-ein*, Sk. भुज्, to eat.] *n.* नरभक्षण *n.* Anthropoph'agi *n. pl.* नरभोजी, मनुष्यभक्षक *m. pl.* Anthropophagin'ian *n.* same as Anthropoph'agite *n.* नरभक्षक. Anthropoph'agous *a.* मनुष्यें खाणारा.

Anthropotomy ( an-thrō-pot'om-i ) [ Gr. *anthropos*, a man, & *tome*, a cutting.] *n. anat.* मनुष्यदेहाचें व्यवच्छेदन *n.* २ नरदेहव्यवच्छेदनशास्त्र *n*, शारीर, मनुष्यशारीरशास्त्र *n.*

Anti ( ant'i ) [ Gr. *anti*, against.] *prep.* ह्याचा सर्वसाधारण अर्थ "विरुद्ध" असा आहे व ह्याचा उपयोग उपसर्गाप्रमाणें करितात. हा शब्द ग्रीक भाषेंत क्रियापद व क्रियापदापासून झालेल्या विशेषणांच्या व नामांच्या आधीं जोडतात. कधीं कधीं तो इतर नामांनाही जोडतात; as, Anti-pope, Anti-king, Anti-climax, Anti-Jesuit, Anti-English, Anti-slavery, Anti-friction, Anti-royalist, Anti-Christ, Anti-Christan ह्या शब्दांवरून *Anti* शब्दाचा अर्थ विद्यार्थ्यांच्या सहज लक्ष्यांत येईल. Anti याचे निरनिराळे अर्थः—१ विरुद्ध, प्रतिस्पर्धी; as, Anti-prophet, Anti-critic. २ उलट धर्माचा, शत्रु; as, Antiluminary, Anti-Paul. ३ विरुद्ध काम करणारा, विरुद्ध; as, Anti-association, Anti-league. ४ अगदीं उलट; as, Anti-slavery, Anti-Darvinian, Anti-combination, Anti-vaccination, Anti-reformer, Anti-annexationist. इंग्रजी भाषेंत Anti शब्द लागून झालेले एक हजारांपेक्षां जास्त शब्द आज रूढ होऊन राहिलेले आहेत. परंतु ते सारे स्थलसंकोचास्तव येथें देतां येत नाहींत. परंतु इंग्रजी भाषेचें मर्म कळून घेण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं अशा शब्दांचा स्वतंत्र अभ्यास करावा.

*N. B.* This preposition may be rendered by such words as, शत्रु ( ex. antibilious पित्तशत्रु, कफशत्रु, वातशत्रु, ज्वरशत्रु, विषशत्रु, &c. ), नाशक or नाशन, or नाशी ( ex. कफनाशक, पित्तनाशक ), घ्न ( ex. पितघ्न, ज्वरघ्न), हर, हर्त्ता, हारक, हारी ( ex. विषहर, शूलहर, दुःखहर ), भंजन, मारक, भंजक, अरि ( ex. कफारि, वातारि इ०).

Antiarthritic ( an'ti-ar-thrit'-ik ) *a.* See Antarthritic.

Antiasthmatic ( an'ti-ast-mat'ik ) *a.* See Antasthmatic.

Antibilious ( an'ti-bil'yus ) *a.* पित्तशामक, पित्तशत्रु, पित्तघ्न, पित्तनाशक-हारक-शमक-&c.

Antic ( ant'ik ) [ L. *antiquus*, ancient. ] *n.* मस्कऱ्या *m*, भांड *m*, हंडीबाग *m.* २ *pl.* खेळकुडी *f*, माकडचेष्टा *f*, टिवल्याबाव्हल्या *f*, माकडाचे चाळे. *a.* मस्करीचा, थट्टेचा, माकडचेष्टेचा, थट्टेखोर. An'ticly *adv.* थट्टेनें. An'ticness *n.* An'ticize *v. i.* टिवल्याबाव्हल्या करणें.

Antichrist ( an'ti-krīst ) *n.* ख्रिस्तविपक्षी *m*, ख्रिस्तविरोधी *m*, ख्रिस्तीधर्मविरोधी. Antichristian *a.* ख्रिस्तविरुद्ध, ख्रिस्तीधर्मविरोधी. Antichrist'ianism *n.* Antichrist'ianly *adv.*

Anticipate ( an-tis'ip-āt ) [ L. *ante*, before, & *capere*, to take.] *v. t.* दुसऱ्याच्या पूर्वीं करणें. २ ठरलेल्या काळापूर्वीं करणें, योग्य काळापूर्वीं करणें, योग्य काळ होण्यापूर्वीं करणें, अगाऊ करणें, अगाऊ घेणें. ३ अवली-अघाडी साधणें-मारणें *g. of o.*, अवल साधणें, आगपाई करणें-साधणें. ४ पूर्वीं जाणणें, पूर्वज्ञात असणें. ५ होऱ्यांत-धोरणांत-ध्यानांत-लक्ष्यांत-अटकळींत-&c. येणें-असणें *in. con.*, घांग-अगा येणें-असणें (R). ६ आपल्या ताब्यांत पैसा येण्यापूर्वीं आधींच त्याचा विनियोग ठरविणें, आधींच व्यय रोंखून ठेवणें. ७ प्राप्त काळापूर्वीं स्वीकार करणें. ८ अमुक एक गोष्ट होईल अशी आशा बाळगणें. ९ आपणच अघाडी साधून दुसऱ्याचें पुढें होणारें काम न होऊं देणें, अघाडी साधून खो घालणें. १० दुसरा पुढें बोलणार तें आपण आधींच बोलून जाणें. Antic'ipant *a.* & *n.* See Anticipative. Anticipated *p.* see the ten meanings of the verb To Anticipate. २ अगाऊ केलेला-घेतलेला, पूर्वज्ञात, अटकळींत आलेला, अघाडी साधलेला, &c., &c. Anticipā'tion *n.* for nouns of action see the verb to Anticipate. २ योग्य काळापूर्वीं करणें *n*, &c., अघाडी *f*, आगपाई *f*, अवली *f*, अवल *f*, अगा *f*, होरा *m*, पूर्वज्ञान *n*, पूर्वसूचना *f.* Anti'cipātive *a.* योग्य काळापूर्वीं येणारा, &c. &c. Antic'ipātor *n.* अघाडी साधणारा, &c., &c. Anti'cipātory *a.* अघाडी साधण्यास योग्य-समर्थ. Anticipā'tively, Anticipā'torily *adv.*

Anticlimax ( an-ti-klīm'aks ) *n. rhet.* सारालंकारविपक्ष (?) *m*, सारप्रतिलोभ (?) *m.* प्रतिसारालंकार (?) *m.* ( opposed to climax ). Example:—Next come

Dalhousie, the great God of war, Lieutenant colonel to the Earl of Mar. In Sanskrit, the two namely Climax & Anticlimax go by one name. *i. e.* सार.

Anticous (an-ti'kus) [L. *ante*, before & Axis.] *a. bot.* फुलाच्या आंसाकडे अभिमुखी (facing towards the axis the flower).

Anticyclone (an-ti-sī'klōn) *n. meteorol.* भोंवऱ्याच्या उलट वारा *m*, प्रतिविवर्त *m*, प्रतिचक्रवात *m*, अपमध्यक-वारा *m*, उलट भोंवरा *m*. Anticyclon'ic *a.*

Antidote (an-ti-dōt) [Gr. *anti*, against, & *didomi*, to give.] *n.* विषावरचें औषध *n*, विषघ्न औषध *n*, विषा-पहारक औषध *n*, विषप्रतियोगी. २ *fig.* दुष्परिणामहारक वस्तु *f*, प्रतिकार *m*, निवारक उपाय *m*. ३—*gener.* भंजन *n*, नाशन *n*, गोहो *m*, धगड *m*, वस्ताद *m*. An'tidotal, Antidot'ical *a.* विषहारक, विषनाशक, गरघ्न. २ निवा-रक, भंजक, मारक, नाशक. An'tidotally, Anti-dot'ically *adv.* मारक ह्मणून, &c.

Antidysenteric (an'ti-dis-en-ter'ik) *n. med.* प्रवाहि-कानाशक-रक्तातिसारशामक औषध *n*, रक्तातिसारघ्न औषध *n. a. med.* रक्तातिसारघ्न, रक्तातिसारशामक-नाशक, &c. See Dysentery.

Antiemetic (an'ti-ē-met'ik) [Gr. *anti*, & *emeo*, Sk. वम्, I vomit.] *n. med.* ओकारीवर औषध *n.* A. *a. med.* ओकारी बंद करणारें (औषध), वांतिघ्न.

Antiephialtic (an'ti-ef'-i-al'tik) [Gr. *anti*, against, & *ephialtes*, night-mare.] *n. med.* भयंकर स्वप्नावर औषध *n*, रात्रीं झोपेंत उरावर दडपल्यासारखें वाटतें तें नाहींसें करणारें औषध. A. *a. med.* भयंकर स्वप्न बंद करण्याचें (औषध).

Antifebrile (an-ti-feb'-rīl) [L. *anti*, against, & *febris*, fever.] *n. med.* ज्वरनाशक-हारक-श(शा)मक-&c. औषध *n.* A. *a. med.* ज्वरनाशक-हारक-शमक, ज्वरघ्न.

Antigraph (an'ti-graf) [Gr. *anti*, equal to, & *gra-phein*, to write.] *n. law* करारनाम्याची प्रत *f*, नक्कल *f.*

Antihypnotic (an'ti-hip-not'ik) [Gr. *anti*, against, & *hypnos*, sleep.] *a. med.* निद्रानाशक-झोंप नाहींशी करणारें (औषध), झोंप-आळस नाहींसा करणारें, झांपड-तंद्री उडविणारें (औषध).

Antihypochondriac (an-ti-hip'ō-kon'dri-ak) *a. med.* रोगभ्रमनाशक, शंकारोगनिवारक, कुपितवायु दबवि-णारा, रोग झाला आहे असा भास करणाऱ्या रोगावर औषध. (Hypochondria रोगभ्रम, शंकारोग *m.*).

Antihysteric (an'ti-his-ter'ik) *n. med.* अपतंत्रकनाशक, वायुगोळ्यावर औषध (?) *n.* A. *a. med.* वायुगोळा बस-विणारें (?) (औषध). गर्भाशयाच्या विकारामुळें होणाऱ्या उन्मादावर औषध *n*, वातोन्मादावर औषध *n.*

Antilithic (an-ti-lith'ik) [Gr. *anti*, against, & *lithos*, a stone.] *a.* and *n.* अश्मरीहर, अश्मरीद्रावक, मुत-खडा झिरविणारें (औषध), लघ्वीचा तेजाब (Uric acid) विद्रुत करणारें.

Antimony (an'ti-mun-i) [L. *antimonium* (of un-known origin).] *n. chem.* सुरम्याची धातु *f*, अंज. [A collyrium of A. सुरमा *m*, कापोत *m*, कापोतांजन *n.* Sulphuret of A. सुरमा *m*, मेचक *n*, सौवीर *n.*] Antimōn'ial, Antimon'ic *a.* सुरम्याच्या धातूचा. A. *n. med.* सुरम्याच्या धातूपासून तयार केलेलें औषध *n.*

Antinomy (an'ti-nom-i) [Gr. *anti*, aganist & *nomos*, law.] *n.* एका कायद्याशीं दुसऱ्या कायद्याची विरुद्धता *f.* २ विरुद्ध-कायदा-जबाब, इत्यादि. ३ *philos.* वचनद्वय-विरोध *m.* Antinō'mic,-al *a.*

Antiparalytic (an'ti-pa-ra-lit'ik) *a. med.* गतिभंगनाशक, सर्वांगवायुघ्न, पक्षवातघ्न. *n. med.* सर्वांगवायूवर औषध *n.* गात्रोपघातावर औषध. [See Paralysis=गतिभंग, सर्वांगवायु, गात्रोपघात].

Antipathy (an-tip'ath-i) [Gr. *anti*, against, & *pathos*, feeling.] *n.* सहजविरोध *m*, स्वभाववैरुध्य *m*, सहजद्वेष *m*, सहजवैर *n*, नैसर्गिक शत्रुत्व *n*, नैसर्गिक द्वेष *m*, शाश्वतिक विरोध (with *to* before the object). २ वैगुण्य *n.* Antipathet'ic,-al *a.* स्वभावतः विरुद्ध, सहजविरुद्ध, निसर्गविरुद्ध, नैसर्गिकविरोधी. Anti-path'ic *a.* Antip'athist *n.* सहजवैरी *m.*

Antiphlegmatic (an'ti-phleg-mat'ik) [Gr. *anti*, against, & *phlegma*, Sk. श्लेष्म, phelgm.] *a. med.* कफनाशक, कफघ्न.

Antiphlogistic (an'ti-flo-jis'tik) *a.* & *n. med.* दाहप्रतिबंधक, दाहघ्न, दाहाचा नाश करणारें (औषध).

Antiphon (an'tif-ōn) [Gr. *anti*, in return, & *phone*, voice.] *n.* एकामागून एक आळीपाळीनें गाणें *n.* २ दोन गायकगणांनीं धर्मगीताचे प्रश्नोत्तररूप दोन भाग एकामागून एक गाणें *n.* Also Antiph'ony. Anti-ph'onary *n.* प्रश्नोत्तररूपी धर्मगीतांचें पुस्तक. Anti-ph'oner *n.* same as Antiphonary. Antiph'onal *a.* Antiphon'ical *a.* प्रश्नोत्तररूपी गायनाचा. Antiphon'-ically *adv.*

Antiphrasis (an-tif'ra-sis) [Gr. *anti*, against, & *phrasis*, a form of speech.] *n. rhet.* विपरीतलक्षणा *f*, अगदीं उलट अर्थीं केलेला शब्दांचा उपयोग *m.* Anti-phras'tical *a.* Antiphras'tically *adv.*

Antipodes (an-tip'od-ēz) [Gr. *anti*, opposite, & *pedes*, Sk. पद, foot.] *n. pl.* परस्परसम्मुख पादजन *m*, पर-स्पराभिमुखपादलोक *m*, भूगोलावर ज्या ठिकाणीं आपण असतों त्याच्याबरोबर समोर खालीं दुसऱ्या बाजूवर राह-णारे लोक *m. pl*, प्रतिपदवर्तिजन *m.* २ *fig.* उलटेपणा *m*, विपर्यय *m.* Antip'odal, Antipodē'an *a.* An'ti-pode *n.* परस्परविरोधी *m.* At antipodes अगदीं एक-मेकांविरुद्ध.

Antipyrin (an-ti-pī'rin) [Gr. *anti*, against, & *pyretos*, fever.] *n. med.* ज्वरघ्न औषध. Antipyret'ic *a.* ज्वरघ्न, तापावरील (औषध), घाम आणणारें.

Antiquary ( an'ti-kwar-i ) [ L. *antiquus*, ancient.] *n.* Formerly used in a wide sense of a student of Early History; now tending to be restricted to one who investigates the relics and monuments of the more recent past. ( Murray.) One who studies or collects old things, especially, the monuments and relics of the past but not very ancient things, and rather from curiosity than archæological interest. प्राचीनकालचे वस्तूंचा संग्रह करणारा-जाणता *m*, प्राचीनवस्तुशोधक *m*, प्राचीनविद्यापंडित *m*. Antiquār'ian *n.* प्राक्कालिकद्रव्यसंग्रही, प्राचीनवस्तुशोधक. A. *a.* प्राचीनवस्तुशोधासंबंधीं. Antiquār'ianism *n.* प्राचीवस्तुशोधाची गोडी-शोक-अभिरुचि. २ प्राचीनवस्तुशोधकाचें काम *n*, प्राचीनवस्तुशोधकाचे परिश्रम *m*.

Antique ( an-tēk' ) [ L. *antiquus*, ancient.] *a.* जुना, प्राचीनकालचा, जुनाट, पुराण ( An A. statue ). २ जुन्या पद्धतीचा-चालीचा ( An A. robe ). A. *n.* प्राचीनकालची वस्तु *f*, जुने कलाकौशल्याचे पदार्थांस हा शब्द लावितात. An'tiquate *v. t.* जुना-माजी-&c. करणें, मागें पाडणें, पडीं पाडणें, रद्द-निरुपयोगी करणें. An'tiquated *a.* ( v. V. ) जुना झालेला, रद्द झालेला-केलेला, माजी, गतकालिक, लुप्त, निरुपयुक्त. Antiquatedness *n.* Antiquā'tion *n.* जुनाटपणा. Antique'ly *adv.* Antique'ness *n.* Antiq'uish *a.*

Antiquity ( an-tik'wi-ti ) [ L. *antiquus*, ancient. ] *n.* प्राचीनकाल *m*, पुराणता, प्राचीनत्व *n*. २ पुरातनकालचीं मनुष्यें *n. pl*, वाडवडील *m. pl.* ३ *pl.* प्राचीन-प्राचीन कालच्या वस्तु *f*-संस्था *f*-चाली *f*-रीति *f*-इत्यादि. ४ प्राक्कालीन वस्तुज्ञान *n*. ५ प्राङ्मध्ययुगीनकाल. ६ प्राचीन ग्रंथकार. ( cf. Archæology पुरातनवस्तुज्ञान ).

Antiscorbutic ( an'ti-skor-būt'ik) [ Gr. *anti*, against, & Scorbutic. ] *a.* नाविकरक्तपित्त-नाशक-हारक-शमक. A. *n.* रक्तपित्तनाशक औषध *n*, स्कर्व्हीरोगावर औषध *n*.

Antiscriptural ( an-ti-skrip'tūr-al ) *a.* शास्त्रविरुद्ध, अशास्त्र.

Antiseptic (an-ti-sept'ik) [Gr. *anti*, against, & *sepein*, to rot. ] *a.* and *n.* पूतिनाशक-भंजक-निवारक-स्तंभक, कोथघ्न, कोथप्रतिबंधक किडे पडूं न देणारें (द्रव्य). Antisept'ically *adv.*

Antispasmodic ( an-ti-spaz-mod'ik ) [Gr. *anti*, against, & *spasmos*, a spleen. ] *a. med.* उद्वेष्टननाशक, आंकडे बंद करणारें, स्नायूंच्या आकुंचनावर ( औषध ), अंगग्रहनाशक, पेटके बसविणारें, आचके बंद करणारें. A. *n.* आंकड्यावर औषध *n*. ( spasm=उद्वेष्टन. )

Antisplenetic ( an'ti-sple-net'ik ) *a. med.* प्लीहाघ्न, प्लीहारोगनाशक.

Antithesis ( an-tith'e-sis ) [ Gr. *anti*, against, & *titheme*, to place.] *n.* विरोध *m*, भेद *m*, भावविरोध *m*, अर्थ-शब्द-वाक्य-&c. विरोध *m*. २ *rhet.* ज्यांत शब्दांचा अगर अर्थांचा विरोध एकत्र गोंवला असतो असा अलंकार *m*; as, The prodigal *robs his heir*, the miser *robs himself*. Antith'esēs *pl.* Antithet'ic,-al *a.* Antithet'ically *adv.*

Antitropal (an-tit'-ro-pal ) *a. bot.* गर्भनाडी ( hilum ) पासून फार दूर, गर्भनाडीच्या उलट, व्यतिक्रान्त.

Antitype ( an'ti-tīp ) [ Gr. *anti*, corresponding to, & Type. ] *n.* प्रतिबिंबाचें मूळ *n*, बिंब *n*, मूलवस्तु *f.* बिंबप्रतिबिंब भावामध्यें प्रतिबिंब हा Type आणि बिंब हा Antitype आहे. Antityp'al, बिम्बीय, बिम्बासंबंधीं. Antityp'ical *a.* बिंबरूप, बिंबभूत, बिंबमूलक.

Antivenereal ( an'ti-vē-nē'rē-al ) *a. med.* उपदंशघ्न, उपदंशनाशक.

Antler ( ant'lėr ) [L. *ante*, before, & *oculus*, an eye.] *n.* हरणाच्या शिंगाच्या शाखा *f. pl.*, भारशिंग *n*, शृंगशाखा *f*. Ant'lered *a.*

Anus ( ān'us ) [L. *asnus*, sitting part.] *n.* मलद्वार *n*, गुद *n*, अपानद्वार *n*, अपान *n*, पश्चिमद्वार *n*. Artificial A. कृतीनें केलेलें गुदद्वार. Fall of A. आंग बाहेर पडणें. Fistula in ano. गुदव्रण, भगंदर *m*. Prolapsus ani. गुदभ्रंश *m*. The prolapsed gut आगेंरू *n*, आंग *n*.

Anvil ( an'vil ) *n.* ऐरण *f*, हरण *f*, शिंगाडा *m*, खुरा *m*. संदान *n*, *f*. These words express varieties of Anvil, २ ( of a farrier ) उभारा *m*, उभाळा *m*. [To be on the A. घाटत असणें. A. Chisel ऐरणीच्या भोकांत घालून कापण्याची छिनी.] ३ *anat.* ऐरणीसारखें कानांतील हाड ( incus ).

Anxious ( angk'shus ) [ L. *angere*, to press tightly. ] *a.* काळजीचा, चिंतेचा, चिंतायुक्त, सचिंत, उद्वेगी, दगदगी, intens. चिंतातुर, चिंताक्रांत, चिंताग्रस्त, चिंताकुल, चिंतार्त्त, आतुर, उत्सुक. To be A. काळजी *f*. लागणें, चिंतावणें, हुरहुर लागणें. Anxī'ety *n.* (v. A.) काळजी *f*, चिंता *f*, हळहळ *f*, कळकळ *f*, घोर *m*, चुरचुर *f*, आंच *f*, आंचणी *f*, परवा *f*, भेदरा *m*, खत्ता *f*, धास्त *f*, धास्ती *f*, क्लेश *m*, ताप *m*, उद्वेग *m*, कोजळी(R) *f*, हृद्रोग *m*, दगदग *f*, intens. चुरचुराट *m*, हरणकाळजी *f*. २ *med.* असमाधान *n*, अस्वास्थ्य *n*, अस्वस्थता *f*, अशांति *f*. An'xiously *adv.* काळजीनें, चिंता धरून, चिंतापूर्वक, सचिंत, चिंतापुरःसर. An'xiousness *n.*

Any ( en'ni ) *a.* कोणी ( कोण्ही ), कांहीं, अन्यतम. A. how, A. wise कसेंहि, कसेंपण, कसेंतरी, जसें तसें, कोणत्याहि उपायानें. २ कांहीं, थोडा ( A. men. A. money). A. *adv.* कांहीं अंशीं, कांहींसा (A. better). Any body, Any one कोणी, कोणताहि, कोणी, भलता, अन्यतम. Anything कांहींहि. Anythingā'rian *n.* अमुक एक ठाम मत नसणारा, अमुक एक पक्षाचा अभिमान नसणारा. Anythingā'rianism *n.* An'y-way, An'yways, कसेंही, कोणत्याहि रीतीनें, Any-where कोठेंही, कुत्रापि, निदानीं. At any rate, कांहीं झालें तरी, निदानीं. If anything जर कांहीं अंशीं असेल तर.

Aorist ( ā'or-ist ) [ Gr. *a*, not & *horos*, limit. ] *n.*

*gram.* (ग्रीक किंवा संस्कृत भाषेच्या व्याकरणांत) क्रियापदाचा भूतकाळ, सामान्यभूतकाळ, अनियमित भूतकाळ. A. past अद्यतनभूतकाल *m.* Aorist'ic *a.*

Aorta (ā-or'ta) [Gr. *aeirein*, to raise up.] *n. anat.* मुख्य धमनी *f*, रक्ताशयाची मोठी धमनी *f.* ही धमनी उराखालच्या डाव्या बाजूच्या रक्ताशयांतून निघून वरती जाऊन नंतर खालीं कमानीप्रमाणें वळून जाते. हिला पुष्कळ शाखा फुटलेल्या आहेत. हृन्नळ *m*, महाधमनी *f.* ऐओर्ता *f.* Aor'tal, Aor'tic *a.* (v. N.) महाधमनीचा, रक्ताशयाचे मोठ्या धमनीच्या विषयींचा.

Apace (a-pās') *adv.* त्वरेनें, वेगीं (*vulg.*), वेगून (*vulg.*), जलदपायीं, जलदीच्या पावलानें, शीघ्रगतीनें, जलदीनें, झटपट, तांतडीनें, लगबग.

Apanthropy (ap-an'thrō-pi) [Gr. *apo*, from & *anthropos*, a man.] *n.* मनुष्याच्या सहवासाचा तिटकारा *m.* २ एकांताची आवड *f.*

Apart (a-pärt') [L. *ad*, to, & Part.] *adv.* अलग, अलगत, अलाहिदा, फटकून निसटून, पृथक्. २ एकीकडे, एके बाजूस, कडेकाठास. ३ एकीकडे ठेवून.

Apartment (a-pärt'ment) [L. *ad*, to, & *pars*, *partis* a part.] *n.* कोठडी *f*, खोली *f*, वठाण *n.* Cooking A. ओयरा *m*, ओवरा *m*, सैपाकघर *n.* स्वयंपाकघर. २ खण *m*, गस्त *n*, भद्र *n*, कक्षा *f.* The largest A. चापेखण *m.* Having two A.s दुखणी, दुघई. Having three A.s तिखणी, तिघई. Having four A.s चौखणी, चौघई. Apartment'al *a.*

Apathy (ap'ath-i) [Gr. *a.* not & *pathos*, suffering.] *n.* औदासिन्य *n*, उदासीनता *f.* २ जडपणा *m*, जाड्य *n*, जडत्व *n*, जडिमा *m*, मांद्य *n*, विराग *m*, प्रेमाभाव, रागाभाव *m.* ३ *phil.* तटस्थता *f.*

Ape (āp) [A. S. *apa*, an ape.] *n.* माकड *n*, वानर *n*, मर्कट *m*, कपि *m.* २ पुच्छहीन वानर *m.* ३ *fig.* नकल्या *m*, अनुकारी *m.* [To play the A. माकडासारख्या चेष्टा करणें. To put an A. into one's hood or cap थट्टामस्करी करणें, मूर्ख ठरविणें, वेडाविणें.] A. *v. t.* नकल *f.* करणें-उतरणें *g. of o.*, टाक *f.* टाकणें, ठेव *f*-ठेवण *f*-घाटी *f*-घाटणी *f*-ठी *f*-टीप *f*-&c. उतरणें-साधणें-आणणें *g. of o.* Ape'dom *n.* Ape'hood *n.* Ape'r *n.* नक्कल करणारा *m.* Ape'ry *n.* माकडासारखें अनुकरण *n*, अविचारानें किंवा मूर्खपणानें केलेलें अनुकरण. Ap'ish *a.* माकडचेष्टया, नकल्या, अनुकरणशील. Ap'ishly *adv.* Ap'ishness, Ap'ism *n.* God's ape *n.* जन्मतः मूर्ख *m.*

Apeak (a-pēk') *adv.* टोंकावर.

Apellous (a-pel'lus) [Gr. *a*, without, & L. *pellis*, a skin.] *a.* त्वचाविरहित, अत्वक् *a.*

Apepsy (a-pep'si) [Gr. *a*, not, *peptein*, to digest.] *n. med.* अपचन *n*, अग्निमांद्य *n*, अजीर्ण *n.* also Apepsia (a-pep'si-a).

Aperient (a-pē'-ri-ent) [L. *aperire*, to open.] *a.* and *n. med.* सौम्यरेचक *n*, सुखाचा ढाळ *m*, सुखाचें ढाळक *n*, सारक *n.* Aper'itive *a.* सौम्यरेच करणारें.

Aperispermic (aperispermik) *a. bot.* अपरिगर्भद्रव्य, ज्यांत गर्भद्रव्य अलग नसतें तें (बीं). The Indian वाटाणा or हरभरा is A.

Apert (a-pert') *a.* उघडें, उवड. Apert'ness *n.*

Aperture (a'pert-ūr) [L. *aperire*, to open.] *n.* भेग *f*, छिद्र *n*, भोंक *n*, रंध्र *n*, खिड *f. dim.* खिडकुली *f*, खिडकुलें *n.* or खिडुकली *f*, खिडुकलें. *opt.* दूरदर्शक व्यास.

Apetalous (a-pet'al-us) [Gr. *a*, not & *petalon*, a petal.] *a. bot.* अपटल, पाकळीविरहित, अंतःकोशरहित. The Indian अळू or एरंड has A. flowers.

Apex (ā'peks) *n.* कळस *m*, शिखर *n*, अग्र *n.* २ *geom.* शिरोबिंदु *m*, मस्तक *n*, शेंडा *m*, अणी *f.* Apexes, Apices *pl.* Ap'ical *a.* अग्रस्थ.

Aphasia (a-fā'zi-a) [Gr. *a*, not & *phasis*, speech.] *n. a loss of ability to use words properly or to comprehend them, due to disease of certain cortical centres of the brain* वाक्शक्तिवैकल्य *n*, वागाघात *m*, वाचाभंग *m.* Aphas'ic *a.*

*N. B.*—Greek Phasis may be allied to Sk. भाष्.

Aphelion (a-fē'li-on) [Gr. *apo*, from, & *helios*, the sun.] *n. astron.* ग्रहाच्या कक्षेंतील सूर्यापासून अतिदूर बिंदु, सूर्योच्च, उच्चस्थान *n*, मंदोच्च *n*, *m*, दूरस्थबिंदु. Aphē'lia *pl.*

Aphilanthropy (a-fil-an'thrō-pi) [Pref. *a*, not, & *philanthropy.*] *n.* अनौदार्य *n*, औदार्याभाव *m*, मनुष्यद्वेष *m*, समाजाचा तिटकारा *m.* (the opposite of philanthropy), अपरोपकार, अनुदारता.

Aphis (ā'fis) *n. zool.* भाजीपाल्याचे पानावरील कीड *f.* Aph'ides *pl.* Aphid'ian *a.* and *n.*

Aphony (af-on-i) [Gr. *a*, not, *phone*, voice.] *n. med. disease of the vocal chords* स्वरभंग *m*, गळ्यांतील आवाजाचे पडदे बिघडल्यामुळें बोलतां न येणें *n.* also Aphō'nia. Aphon'ic, Aphon'ous *a.*

Aphorism (af'or-izm) [Gr. *apo*, from, & *horos*, a boundary.] *n.* सूत्र *n*, वाक्य *n*, वचन *n*, थोड्या शब्दांत निर्दिष्ट केलेलें तत्त्व *n.* Aph'orise *v. t.* and *v. i.* सूत्रें करणें. Aph'oriser *n.* Aph'orist *n.* सूत्रें लिहिणारा *m.* Aphoris'tic-al *a.* Aphorist'ically *adv.* सूत्राच्या आकारानें-रूपानें.

Aphrodisiac (af-ro-diz'i-ak) [Gr. *aphrodite*, Venus, goddess of love.] *a.* कामोद्दीपक, कामोत्तेजक, वृष्य, वाजीकर. A. *n.* वाजीकरण *n*, बंदेज *n.* Aphrodis'iacal *a.* Aphrodis'ian *a.*

Aphyllous (a-fil'us) [Gr. *a.* not, & *phyllon*, a leaf.] *a. bot.* अपर्ण, पर्णरहित.

Apiary (āp'i-ar-i) [L. *apis*, a bee.] *n.* मधमाशांस राहण्याकरितां केलेली जागा *f*, मधमाशा राखून ठेवण्याचें स्थळ *n*, मधुमक्षिकालय *n.* Apiar'ian, Ap'ian *a.* मध-

माशांसंबंधीं, मधमाशा पाळणारा. Ap'iarist *n.* मधमाशा पाळणारा मनुष्य *m.*

Apical ( ap'ik-al ) [ L. *apex*, an *apex*, a sharp point or peak.] *a.* टोंकाजवळचा, टोंकासंबंधीं. २ *bot.* अग्रेसर, अग्रस्थवर्ती. Apicill'ary *a.* टोंका-शीं-जवळ असलेला. Apic'ulate *bot.* तीक्ष्णाग्र. Ap'ically *adv.*

Apiculus (a'pi-kū-lus) *n. bot.* एकदम उगवणारें मृदु अग्र *n*; as, The leaves of अगस्ता flowers have an A. at the tip.

Apiece ( a-pēs' ) *adv.* प्रत्येकास, हरएकास, एकेकास, विभागशः, शिरगणती. Apiec'es *adv.* ( *obs.* )

Aplastic ( a-plas'tik ) [ Pref. *a*, not, & *plastic.* ] *a. med.* बेमिलाफ, अमेलनकारी.

Apnœa ( ap-nē'a ) [ Gr. *apnoia.* ] *n. med. breathlessness* श्वासोच्छ्वास बंद झाल्यामुळें श्वासरोध *m*, श्वासघात *m.* ( result of suspended respiration ).

Apo ( āpo ) [ Gr. *apo*, from. ] pref. दूर.

Apocalypse (a-pok'al-ips) [Gr. pref. *apo*, & *kalyptein*, to cover.] *n.* प्रगट करणें *n.* २ प्रगट करण्याचें पुस्तक *n.* (specifically applied to the last book of the New Testament, containing the revelation granted to St. John). Apoc'alypst, Apoc'alypt *n.* भविष्य-कथन करणारा, प्रगट करण्याचें (ख्रिस्ती लोकांचें) पुस्तक उलगडा करून शिकविणारा. Apocalypt'ic,-al *a.* ईश्वरी-वाणीसंबंधीं. Apocalypt'ically *adv.* Apocalypt'ist *n. the writer of the apocalypse.* Apocalyptic number *n.* ६६६ ही गूढ संख्या.

Apocarpous ( ap-o-kär'pus ) [ Gr. *apo* from, *karpos*, fruit. ] *a. bot.* विलग्न, बीजकोशांतील उत्पादक पानें ज्याचीं सुटीं आहेत असें (फळ). The Indian तुळस, गुलाब are A.

Apocopate ( a-pok'o-pāt ) [ Gr. *apo*, off, *koptein*, to cut.] *v. t.* अंत्याक्षर काढून टाकणें. Apocopā'tion *n.* Apocope *n.* अंत्याक्षरलोपालंकार (?) *m*, अंत्याक्षरलोप *m.* २ *med.* शरीराचा कोणताहि भाग कापणें *n*, छेदन *n.*

Apocrustic ( ap-o-krus'tik ) [ Gr. *apo*, away, & *krouo* to drive. ] *n. med.* तुरट आणि घेण्यास तिटकारा येण्या-जोगें औषध *n*, स्तंभक *n*, तुरट आणि अहृद्य औषध *n.*

Apocrypha (a-pok'rif-a) [ Gr. *apo*, away, & *kryptein*, to hide. ] *n.* रोमनक्याथोलिक लोकांनीं धर्मपुस्तकांत घातलेले भाग *m. pl.* हे ईश्वरप्रेरित आहेत असें कित्येक ख्रिस्ती मानितात; इतर मानीत नाहींत. Apoc'ryphal *a.* अनिश्चित आधाराचा. २ खोटा, बनावट. ३ अशास्त्र, संदिग्ध प्रमाणांचा. Apoc'ryphally *adv.* Apoc'ryphalness *n.*

Apogee ( ap'o-jē ) [ Gr. *apo*, from, & *ge*, the earth. ] *n. astron.* कोणत्याही ग्रहांच्या अथवा उपग्रहांच्या कक्षें-तील पृथ्वीपासून अतिदूर बिंदु *m*, विशेषतः चंद्राच्या कक्षेंतील पृथ्वीपासून अतिदूर बिंदु *m*, भूस्युच *m.* Apogæ'ic, Apogē'an *a.* Apogeotrop'ic *a.* पृथ्वीपासून दूर वर गेलेला; as, A. leaves. Apogeotrop'ically *adv.* Apogeōt'ropism *n.*

Apograph ( a'po-graf ) [ Gr. *apo*, from, & *graphein* to write. ] *n.* प्रत *f*, नक्कल *f.*

Apologue ( a'pol-og ) [Gr. *apo*, from, & *logos*, speech.] *n.* नीतिपर कल्पित गोष्ट *f*, नीतिकथा *f*, कहाणी *f*, आ-ख्यान *n*, आख्यायिका *f.*

Apology ( a-pol'oj-i ) [ Gr. *apo*, from, & *logos*, discourse.] *n.* माफी, गुन्हा पदरीं घेऊन माफीची विनंती *f*; दोषनिवारक भाषण *n*, क्षमायाचना *f.* २ सबब *f*, निमित्त *n.* ३ आधार देऊन दोष *m.* उडविणें *n.* Apol'ogise *v. i.* गुन्हा-अपराध-&c. पदरीं घेऊन माफी *f.* मागणें, क्षमा *f.* मागणें, चुकलों ह्मणणें. Apol'ogist, Apol'ogizer *n.* माफी मागणारा. Apologet'ic,-al *a.* ( v. I. ) दोषनि-वारक, अपराध-&c.-न्यूनतादर्शक, क्षमाप्रार्थक.

Apophthegm ( a'po-them ) [ Gr. *apo*, from, & *phthegma*, word. ] *n.* नीतिवचन *n*, वाक्य *n*, वचन *n*, सूक्ति *f*, प्रसिद्धोक्ति *f.* Apophthegmat'ic,-al *a.* नीतिपर, नीतिवचनाचा. Apophthegmat'ically *adv.* Apophtheg'matise *v. i.* सूत्ररूपानें बोलणें-लिहिणें. Apophtheg'matist *n.* नीतिवचनाचीं सूत्रें लिहिणारा.

Apophysis ( a-pof'i-sis ) [ Gr. *apo*, from & *physis*, growth. ] *n. bot.* जननेंद्रियाच्या खालच्या भागाकडील वाढ *f.* ( applied to *cryptogamic* plants ). २ *anat.* अस्थिशाखा *f*, अस्थिप्रवर्धन *n*, अस्थिकूट.

Apoplexy (a'po-pleks-i) [ Gr. *apo*, from, & *plessein*, to strike. ] *n. med.* संन्यास *m*, रक्तजमूर्च्छा *f*, अंग-विभ्रंश *m*, अंगविकृति *f*, शरीरविभ्रंश *m*, मेंदूंतील रक्त-वाहिन्यांत फाजील रक्तसंचय झाल्यामुळें अगर त्या फुट-ल्यामुळें इंद्रियज्ञान एकदम कमी होण्याचा अगर मुळींच नाहींसें होण्याचा रोग *m.* Apoplec'tic,-al *a.* संन्यासाचा, संन्यासासंबंधीं-विषयक, सदरहु रोग झालेला (मनुष्य). Centric A. मस्तुलुंगज संन्यास. Eccentric A. मस्तुलुंगबाह्योद्भवसंन्यास. Apoplexed *a.* (*shake.*). *N. B.*—See note on Antapoplectic.

Apostasy, Apostacy ( a-post'a-si ) [ Gr. *apo*, from, & *stasis*, a standing. ] *n.* स्वधर्मत्याग *m*, स्वधर्म-भ्रंश *m*, स्वमतत्याग *m*, स्वपक्षत्याग *m.* Apost'ate *n.* and *a.* स्वधर्मत्यागी, स्वमतत्यागी, स्वपक्षत्यागी, पतित, धर्मभ्रष्ट, भ्रष्ट. Apostat'ic,-al *a.* Apost'atize or-se *v. i.* स्वधर्मत्याग *m*-&c. करणें, स्वधर्मभ्रष्ट-स्वधर्मच्युत-&c.-होणें.

Aposteme ( ap'os-tēm ) [ Gr. *apo*, from, & *histemi*, to stand. ] *n. med.* पुवानें भरलेला फोड *m*, गळूं *n.* पूययुक्तशोफ *m.* Apos'temate *v. i.* फोड *m.* होणें, पुवानें भरणें. Apostemā'tion *n.* फोड होणें *n.*

A posteriori ( āpos-tē-ri-ōri ) [ L. *posterior*, after. ] *a.* According to Dr. Murray this is a phrase used to characterise reasoning or arguing from effects to causes, from experience ( and not from axioms );

empirical, inductive, inductively. सदोदित प्रचारांत A POSTERIORI MODE OF REASONING (*log.*) A POSTERIORI KNOWLEDGE (*philos.*) A PRIORI MODE OF REASONING (*log.*) A PRIORI KNOWLEDGE (*philos.*) हे शब्द वापरण्यांत येतात. A POSTERIORI AND APRIORI हे दोन्ही लॅटिन शब्द आहेत. व ह्यांचा अर्थ "पासून, पाठीमागचा व पूर्वीचा, पश्चात् व प्राक्" असा आहे. लॅटिन भाषेत POSTERIOR हें POSTERUS ह्या विशेषणाचें तर-भावदर्शक ( COMPARATIVE DEGREE चें) रूप आहे. POSTERIORI हें POSTERIOR शब्दाचें पंचमीचें रूप आहे. A POSTERIORI ह्या शब्दांत *a* ह्या उपसर्गाचा अर्थ 'पासून' असा आहे ( A=AB=FROM ). व ह्या उपसर्गाला पंचमी विभक्ति लागते. POSTERUS ह्या लॅटिन शब्दाचा अर्थ पश्चात्चा, पाठीमागून येणारा, पाठीमागचा असा असल्यामुळें A POSTERIORI ( FOLLOWING FROM ) ह्याचा अर्थ 'पासून उद्भवणारा, पासून जन्य, पासून नंतरचा, पासून पश्चात्चा' असा आहे. A POSTERIORI KNOWLEDGE MEANS, KNOWLEDGE following from observation or experience. **तेव्हां (१) इंद्रियद्वारा किंवा अनुभवापासून मिळालेलें ज्ञान. (२) इंद्रियावगतप्रत्यक्षअनुभवपश्चात्-अनुभवपश्चात् ज्ञान. (३) इंद्रियजन्य ज्ञान किंवा अनुभवजन्य ज्ञान. (४) अनुभवैकद्वारा किंवा निरीक्षणैकद्वारा मिळालेलें ज्ञान. (५) पश्चादनुभवज्ञान. (६) पश्चान्निरीक्षणज्ञान.** हे शब्द A POSTERIORI KNOWLEDGE ला योग्य आहेत; उदाहरणार्थ, सोमल या पदार्थाविषयीं ज्ञान मिळवावयासाठीं सोमलाचे निर्जीव व सजीव वस्तूंवर काय काय परिणाम होतात हें निरीक्षण व प्रयोगद्वारा पाहून सोमलाचे घटक काय आहेत व त्याचे परिणाम काय आहेत इत्यादिकांचा विचार केल्यानंतर सोमलाचे गुण हे आहेत ह्या ज्ञानाला **अनुभवजन्य ज्ञान किंवापश्चादनुभवज्ञान** ( A posteriori knowledge ) असें ह्मणतात. अनेक विशेष गोष्टींच्या निरीक्षणानें त्यांपासून सामान्यनियम स्थापतां येणाऱ्या न्यायपद्धतीला A POSTERIORI SYSTEM OF REASONING असें ह्मणावें. एनसायक्लोपीडिया ब्रिटानिकांत A posteriori न्यायपद्धतीची पुढील व्याख्या दिली आहे. "The mode of reasoning which endeavours to gather into a single formula the various facts of observation is described as A posteriori." मागील सर्व विवेचनावरून आह्मीं पुढें योजलेले A POSTERIORI शब्दाबद्दल मराठींत प्रतिशब्द आमच्या वाचकांस सुगम होतील असें आह्मांला वाटतें. **इंद्रियजन्य अनुभवद्वारा मिळालेलें (ज्ञान), केवलअनुभवावलंबी (न्यायपद्धति), अनुभवपश्चाद्गामी (ज्ञान), अनुभवपद्धतीचें, घडलेल्या कार्यांचें निरीक्षण करून त्यांच्या कारणाविषयीं अनुमान करणारी (न्यायपद्धति), कोणीं कोणीं ह्यालाच कार्यानुमेयकारणानुमानाची (पद्धति), हा शब्द योजितात.** ह्याच ठिकाणीं A PRIORI शब्दाचें विवेचन देणें योग्य आहे असें आह्मांला वाटतें. A PRIORI शब्दांत "A." ह्मणजे "पासून" आणि PRIORI हें 'तरदर्शक' PRIOR ह्या विशेषणाची पंचमी विभक्ति आहे. A PRIORI KNOWLEDGE ह्मणजे अनेक विशेष गोष्टींचें निरीक्षण ( OBSERVATION ) केल्या-झाल्यापूर्वीं ( PRIOR ) कांहीं स्वभावतः सिद्ध किंवा सिद्धवत् धरलेल्या गोष्टींवरून प्रत्यक्ष अनुभवाची वाट न पाहतां मनानेंच रचलेला नवीन सिद्धान्त. तेव्हां A priori knowledge ह्मणजे **प्रागनुभवज्ञान, मनोजन्यज्ञान, केवलमनस्संभूतज्ञान.** A posteriori system of philosophy ह्मणजे **पश्चादनुभवज्ञानवाद, इंद्रियजन्यज्ञानवाद.** A posteriori philosopher ह्मणजे **पश्चादनुभवज्ञानवादी, इंद्रियजन्यज्ञानवादी.** A priori system of philosophy ह्मणजे **प्रागनुभवज्ञानवाद, मनोजन्यज्ञानवाद.** A priori philosopher ह्मणजे **प्रागनुभवज्ञानवादी, मनोजन्यज्ञानवादी. इंद्रियजन्य ज्ञानवाद्यांमध्यें ( A posterori ) आणि मनोजन्यज्ञानवाद्यांमध्यें ( A priori ) मुख्यभेद ज्ञानाच्या आदिकारणासंबंधानें आहे. ज्ञान मूळ इंद्रियजन्य अनुभवापासून होतें व मन हें पुष्कळ संचित अनुभवांचेंच संकलनस्वरूप आहे असें इंद्रियजन्यज्ञानवाद्यांचें मत आहे. सर्व ज्ञानाचें आदिकारण मन हें आहे व इंद्रियजन्य अनुभव नव्हे व मन सिद्ध किंवा सिद्धवत् गृहीत तत्वांपासून नवीन सिद्धांत काढूं शकतें हें मनोजन्यज्ञानवाद्यांचें मत आहे. हीं दोन अत्यंत परस्परविरुद्ध अशीं मतें आहेत. साधारणतः पाहतां व्यवहारांत सभोंतालच्या प्रत्यक्ष घडून येणाऱ्या गोष्टी, आंकडेशास्त्राचीं प्रमाणें इत्यादिकांचा विचार न करितां सिद्ध-सिद्धवत्-गृहीत केलेल्या गोष्टींवरूनच नवीन सिद्धान्त जो काढतो त्याला** A priori thinker **प्रागनुभवज्ञानवादी-मनोजन्यज्ञानवादी असें स्थूलरीतीनें आपण ह्मणतों. आणि जो इंद्रियानें समजलेली सभोंवतालची खरी स्थिति व आंकडे इत्यादि प्रमाणें घेऊन अनुमानें करितो त्याला इंद्रियजन्यज्ञानवादी-पश्चादनुभवज्ञानवादी असें आपण ह्मणतों.**

*N. B.*—ही वरील टीप प्रोफेसर शंकरराव साठे व प्रो. दा. ग. पाध्ये ह्यांजकडून वाचून घेतली आहे व प्रो. दामोदरपंतांनीं स्वतः लिहिलेली ह्याच शब्दावरील टीप पुढीलप्रमाणें आहे:—

"*A priori* and *A posteriori* reasoning primarily meant respectively reasoning from cause to effect and effect to cause, deduction being the only method of reasoning necessary in the former, and the cause being one, taken for granted, either a known fact or an accepted proposition. Later on, the line of distinction between these two methods was more clearly defined and we have the A pirori school of philosophers and that of the A posteriori ones. The difference between them lies in regard to the view they take as regards the origin of human knowledge, its nature and extent. The strict A priori school maintains that the mind *itself* can without any aid know truths *intuitively* and evolve systems of truths, necessarily by deduction, *e. g.* the वेदांत theory or theories of Hales ( all universe from water ) or कर्म and पुनर्जन्म. The strict A posteriori school maintained that no knowledge whatsoever was possible without experience ( = knowledge derived from the senses ) and they ultimately came to maintain ( Mill, Hume, Darwin ) that the mind itself was nothing but the permanent possibility of, or the racially developed product of experience, so

that the one parent of all knowledge with them became *the senses* and the senses only. Their watchwards are *experiment, observation* and *verification.* There are various schools lying between these two, so that we may say, in general, that those who give much higher importance to truths *intuitively derived,* as they call it, by the mind, are called the A priori schools and those who lay great *stress* on experience given by the senses the A posteriori schools."

"In popular language—the A priori thinker is one who starts from certain assumptions and goes on thinking deductively without caring to verify his conclusion. The A posteriori thinker would look at facts only, and rely on statistics, would take care to see that what he assumes is clear established truth and never be weary of verifying his conclusion."

कॅन्टच्या मताप्रमाणें A posteriori न्यायपद्धतींत अमुक एक घडलेली गोष्ट (कार्य) आपण पाहतों आणि नंतर त्याचें कारण ठरवितों. A priori न्यायपद्धतींत अमुक एक सिद्धवत् गृहीत सामान्य नियम किंवा कारणें आपणांस माहीत असतात व त्यांपासून अमुक कार्य होईल असा आपण सिद्धांत करितों. ह्मणजे A priori न्यायपद्धतींत आपण कारणापासून कार्याकडे जातों. (WE PROCEED FROM CAUSE TO EFFECT). A POSTERIORI न्यायपद्धतींत आपण कार्यापासून कारणांकडे परत येतों. (WE GO BACK FROM EFFECTS TO CAUSES). According to Kant—A posteriori knowledge *means*—knowledge following from experience or observation (by the senses). A priori knowledge means—knowledge in anticipation of observation. Observation first and knowledge afterwards. This is true of A posteriori knowledge. When knowledge follows from observation, it is the A posteriori knowledge. But when knowledge anticipates, goes before or precedes observation, it is called the A priori knowledge. A posteriori ला *Analytic* आणि *Inductive* हे इंग्रजी प्रतिशब्द प्रचारांत योजतात. आमच्या मतें A posteriori ला पश्चादनुभव हा प्रतिशब्द योग्य होईल. A posteriori knowledge ह्मणजे पश्चादनुभवज्ञान. ह्या ठिकाणीं 'पश्चात्' शब्दाचा आम्हीं विशेषणासारखा उपयोग केला आहे. परंतु नवीन शब्द तयार करणारांना कांहीं वेळीं, कवीप्रमाणें, अशी थोडीशी मुभा दिलीच पाहिजे. प्रत्येक शब्दाला जर व्याकरणाची सूक्ष्म दुर्बीण लावली तर आज व्यवहारांत असलेले व्याकरणदृष्ट्या अशुद्ध असे बरेच शब्द रद्द करावे लागतील. परंतु त्यानें व्यवहार फार लंगडा पडेल; उदाहरणार्थ 'आगबोट' हा शब्द, ह्यांतील आग हा मराठी शब्द व बोट हा इंग्रजी शब्द. परंतु आगबोट हा समास आम्हीं केला व तो शब्द रोज आम्ही वापरतों.

Apostle (a-pos'l) [Gr. *apo,* away & *stellein,* to send.] *n.* प्रेषित (मनुष्य) *m.* २ गुमास्ता *m.* ३ अमुक एक धर्म किंवा मतप्रसारार्थ पाठविलेला मनुष्य *m,* ख्रिस्तानें स्वमतप्रसारार्थ पाठविलेल्या बारा जणांपैकीं प्रत्येक. ४ कोणत्याहि मताच्या प्रसाराची प्रमुखपणें खटपट करणारा. Apos'tleship, Apost'olate *n.* प्रेषित मनुष्याचा अधिकार *m,* कोणत्याहि एखाद्या कार्यांतील प्रमुखत्व. Apostol'ic,-al *a.* प्रेषिताचा, प्रेषिता-प्रेषितपणा *m*-संबंधीं, प्रेषितोक्त, प्रेषितस्थापित. Apostol'icism *n.* प्रेषितपणा *m.* Apostolic'ity *n.* प्रेषितजनयितृत्व *n,* प्रेषितसंबंधित्व *n,* प्रेषितोक्तत्व *n.*

Apostrophe (a-pos'trof-e) [Gr. *apo,* from, & *strophe,* a turning.] *n. gram.* अक्षरलोपाची खूण *f.* as in *o'er, thro', can't.* नामांचे षष्ठीचे रूपाची खूण *f.* २ परोक्षजनसंबंधोक्ति *f,* अपरोक्षवस्तुसंबोधन *n,* संबोधन *n.* Apostroph'ic *a.* Apos'trophize *v. t.* अक्षरलोपाची खूण करणें. २ अपरोक्ष-परोक्षवस्तूला संबोधून बोलणें; as, Oh Death, where is thy sting? २ हजीर समजून संबोधणें.

*N. B.*—In Sanskrit परोक्ष means 'absent, behind one's back.' In Marathi परोक्ष means—'present, before one's eyes'. The phrase परोक्षजनसंबंधोक्ति will have to be put in current Marathi as अपरोक्षजनसंबंधोक्ति. The same remark also applies to परोक्षवस्तुसंबोधन, अपरोक्षवस्तूला, as they occur in the above word.

Apothecary (a-poth'ek-ar-i) [Gr. *apo,* away, & *theke,* a chest.] *n.* औषधें तयार करणारा-करून विकणारा *m,* औषधें सिद्ध करणारा *m,* औषधविक्रयकर्त्ता *m.*

Apothecium (ap-ō-thē'si-um) *n. bot.* दोन्हीं बाजूंनीं दुरमडलेली ढालेसारखी शेंग *f;* as, The A. of certain ferns.

Apothegm. See Apophthegm.

Apotheosis (a-po-thē'o-sis) [Gr. *apo,* away, & *theos,* a god.] *n.* मनुष्यास देव समजणें *n,* मनुष्याचे ठिकाणची देवभावना *f,* मनुष्यास देवाचे योग्यतेस चढविणें *n.* Apoth'eosise or-ze *v. t.* ईश्वरतुल्य मानणें.

Apozem (a'po-zem) [Gr. *apo,* off & *zeein,* to boil.] *n. med.* काढा *m,* कषाय *m,* क्काथ *m.* Apozem'ical *a.* कषायासंबंधीं. २ कषायासारखा.

Appal, Appall (ap-pawl') [L. *ad,* & *pallidus,* pale.] *v. t. alarm* भय *n*-दहशत *f*-भेदरा *m*-धाक *m*-&c. घालणें-बसविणें, त्रेधा *f.* करणें *g. of o.,* पांचांवर धारण *f.* बसविणें, तोंडावरचें पाणी पळवणें. A. *n.* धास्ती *f,* दहशत *f,* गोंधळ *m,* घाबरपट्टी *f.* Appalled *p.* (v. V.) धाक बसलेला, &c., दरारलेला, पांचांवर धारण बसलेला, हौलदील, हवालदील. Appaller *n.* (v. V.) धाक घालणारा, &c., धाक पडायाचा-जोगता-&c., धाक घालाया-चा-जोगा-&c. Appal'ling *p. a.* भयजनक, भीतिजनक, उग्र, अकटोविकट, अकराळविकराळ, भयंकर, भयप्रद, घोर, दारुण. Appal'lingly *adv.* Appall'ment *n.* भयभीत स्थिति *f.*

Appanage (ap'pan-āj) [L. *ad,* to, & *panis,* bread.] *n.* युवराजाखेरीज इतर राजपुत्रांस दिलेलें वेतन *n,* जहा-

गीर *f.* २ (दुसऱ्या वस्तु) बरोबर विनचूक मिळणारा मान *m*-किंवा लाभ *m.* Ap'panaged *p.* Appanagist *n.* वरील मान *m.* किंवा मालमत्ता *f.* ज्यास मिळते तो.

Apparatus (ap-par-ā'tus) [L. *ad*, & *parare*, to make ready.] *n. s. & pl.* उपकरण, उपकरणीं *n. pl.* यंत्रसामग्री *f.* उपकरणें *n. pl.* सज *m*, साज *m*, सरंजाम *m*, संच *m*, सामान *n*, यंत्र *n*, साहित्य *n*, सामग्री *f*, प्रयोगाचीं साधनें. २ *physiol.* (एकच क्रियाजनक) इंद्रियोपकरण *n.* A. and necessaries-compreh. or gener. साजसरंजाम *m*, साजसामान *n*, साज *m*, आयतें सुयतें (*obs.*) *n*, संभार *m.* Apparatuses *pl.* (R).

Apparel (ap-par'el) [L. *par*, equal.] *n.* (no pl.) पांघरुणें, पोषाख (क), परिधान *n*, वेष *m*, पेहराव *m.* २ *naut.* तारवाचें सामान, शीड दोरखंडें वगैरे. *v. t.* पोषाख *m.* घालणें, सजवणें. २ लढाईकरितां जहाज तयार करणें. Appar'elling or Appar'eling *pr. p.* Appar'elled or Appar'eled *pa. p.* [Article of A. पांघरूण *n*, कांबरूण (vulgar) *n.* Articles of A. presented in honour from off one's own person उतार पोषाख(क) *m*, उतार तसरीफ *f.* Old article of A. जुनेर *n*, जुनेरें *n.* Splendid A. प्रतिष्ठावस्त्र *n*, महार्घवस्त्र *n.*] Appar'elling or Appar'eling *n.* see verb.

Apparency (ap-par'ansi) *n.* (v. A. 1.) प्रादुर्भाव *m*, आविर्भाव *m*, प्रकटीभाव *m*, आविर्भवन *n.* २ ज्येष्ठवारसपणा *m.*

Apparent (ap-pār'ent) [See Appear.] *a. manifest* उघड, उघडा, स्पष्ट, व्यक्त, प्रकट *pop.* प्रगट, आविर्भूत, विशद. २ *seeming* दिसण्यांत येणारा, दृश्य, भासमान, दिसण्यांत मात्र खरा, दिखाऊ, दिसण्याचा, दिसणारा, भासणारा, आभासाचा, दर्शनी, वरकरणी, वरकर्मी, प्रातिभासिक, स्फुट. ३ *not secret* उघडा, दृश्य, दृष्ट, दृग्गोचर. A. expansion स्पष्ट-दृश्य प्रसारण. A. motion स्पष्ट-भासमान-स्फुट-गति. A. horizon स्पष्ट-दृश्य क्षितिज. A. time *astron.* स्पष्ट काल *m*, दृश्यकाल *m.* Heir A. ज्यास खात्रीनें अधिकार अगर मालमत्ता मिळणार असा ज्येष्ठ वारस, ज्येष्ठवारस, युवराज. Appar'ently *adv.* उघड, स्पष्ट, उघडपणें (णीं), स्पष्टपणें (णीं). २ बाहेरून, दिसण्यास-ण्यांत मात्र, दिसण्यांत, दिसायास, पहायास. Appar'entness *n.* भासमानता *f*, उघडेपणा *m.* See Apparent.

Apparition (ap-par-ish'un) [See Appear.] *n.* भूत *n*, समंध *m*, भास *m*, सावली, *fig.* छाया *f* (of a ghost). २ दृग्गोचरता *f*, उदय *m*, प्रकटीभवन *n.* ३ दृश्यवस्तु *f*, भासमानवस्तु *f.* ४ भूत दिसणें *n.* ५ *astron.* उदय *m*, उन्मीलन *n.* (after occultation), मोक्षकालानंतर होणारें ताऱ्याचें दर्शन. Apparī'tional *a.*

Appeal (ap-pēl') [O. Fr. *appellare*, to address, call by name.] *v. i. law. remove a cause to a higher court* (with *to*) (खालच्या न्यायाधिशानें दिलेला ठराव तपासण्याकरितां) वरच्या न्यायाधिशाकडे अर्ज करणें, अपील करणें. २ *refer to another as judge* एखाद्यास पंच-तिऱ्हाईत करणें, पंचाच्या-तिऱ्हाइताच्या निवाड्यावर सोंपविणें. ३ *entreat* मदतीस बोलावणें, मदत मागणें. ४ *refer to another as witness* साक्षी-पडसाक्षी ठेवणें. A. *v. t.* अपील करणें. २ दोषारोप करणें, दोष देणें. A. *n.* (v. V. 1.)—*act.* वरिष्ठ प्रतीच्या न्यायाधिशाकडे फिर्याद नेणें *n*, अपील *n*, विवाद *m*, परावर्त्यव्यवहार (S) *m.* २ विनंति *f*, प्रार्थना *f.* ३ (चा)आश्रय करणें. (A. to arms.) ४ मदतीकरितां अर्ज *m*-विनवणी *f.* Appeal'able *a.* अपील करण्यास योग्य. Appellant, Appellor, Appealer *n.* (v. V. 1.) *law.* अपील करणारा, विवादी *m.* Appellate *a.* अपिलासंबंधीं. Appellee' *n.* अपिलांत बचाव करणारा, प्रतिविवादी *m.* Appeal'ing *a.* अपिलाचा-संबंधीं. Appeal'ingly *adv.* विनंति-प्रार्थनापूर्वक. Appealingness *n.*

*N. B.*—On the analogy of वादी and प्रतिवादी, the new words विवादी and प्रतिविवादी are coined for Appellant and Respondent. They are in daily use in the Baroda State. Another pair of words for the same is अपिलांतील वादी and अपिलांतील प्रतिवादी-सामनेवाला.

Appear (ap-pēr') [L. *ad*, to, *parere*, *paritum*, to come forth.] *v. i. be in sight*, *be visible* दिसणें, दृष्टीं पडणें, दृष्टीस-नजरेस येणें, दृश्य-दृग्विषय-दृग्गोचर-&c. असणें, नजरेसमोर असणें. २ *become visible* दिसणें, दृष्टीस पडणें, दर्शन *n.* देणें, दर्शन *n.* होणें *g. of s.* ३ *be clear from evidence* दिसणें, दिसून येणें, कळणें, उघडा-उघड-स्पष्ट-सिद्ध-&c. होणें. ४ *look*, *seem*, *be in appearance* वाटणें, दिसणें, पाहण्यांत-दिसण्यांत असणें, भासणें. ५ *be revealed*, *become manifest* आविर्भाव होणें, आविर्भवणें, उद्भवणें, प्रकट (*pop.*) प्रगट-स्पष्ट-व्यक्त &c. होणें. ६ *come to light*, *come forth clearly* उमगणें, उमटणें, उमग *m*-उमट *m.* पडणें *g. of s.*, कळणें, प्रसिद्ध-जाहीर होणें. ७ (to, unto) *stand or come into the judgment of* भावणें, दिसणें, वाटणें, गमणें, भासणें (all these verbs are impersonal), नजरेस-दृष्टीस येणें. ८ *be in attendance* हाजीर-रुजू होणें. ९ भासणें, वाटणें, समज असणें. १० लोकांपुढें येणें, प्रसिद्ध होणें. ११ मुखत्यार ह्मणून-तर्फे हजर असणें; as, To appear as a pleader for a *client.* Appear'ance *n.* (v. V. 2.) *act of coming into sight*, *act of becoming visible* दिसणें *n*, दृश्य होणें *n*, दृष्टीं पडणें *n*, दर्शन *n*, सन्निधान *n.* २ प्रगट होणें *n*, &c., आविर्भवन *n*, आविर्भाव *m*, प्रादुर्भाव *m*, आविष्कृति *f*, उद्भव *m*, आगमन *n*, येणें *n.* ३ उमगणें *n*, उमटणें *n*, उमग *m*, उमट *m.* ४ हाजीर होणें *n*, हाजिरी *f.* I *semblance*, *look*, *apparent likeness* रूप *n*, आकार *m*, स्वरूप *n*, थाट *m*, ढब *f*, ठेवण *f*, घाट *m*, डौल *m*, आभास *m*, भास *m*, रंग *m.* II चमत्कार (?) *m*, चर्या *f*, ढब *f.* III *philos.* दृश्यविश्व *n.* IV सोंग *n*, थोतांड *n*, पोकळ डौल *m*, बाह्यभाव *m*, पोम *n.* [In A. दिसण्यांत, दिसायास, बाहेरून, बाह्यात्कारीं. of pleasing A. देखणा *m.* Slight or faint A. आसभास

*m.* ] Appearances *pl.* बाह्यस्वरूप *n*, देखावा *m.* (कोणत्याहि मनुष्याचें किंवा वस्तूचें विशिष्टगुणांचा-धर्मांचा दिखाव करण्याकरितां स्वीकारलेलें) बाह्यस्वरूप. Appear'er *n.* दिसणारा, कोर्टांत हजर होणारा, &c. To all appearance सर्व बाजूनें दिसण्याला, दिसण्यांत. To keep up appearances (खरी स्थिति झांकून टाकण्याकरितां) वरकरणी भपका करणें, ढोंग करणें. To put in an appearance स्वतः हजर असणें.

Appease (ap-pēz') [L. *ad*, to, & *pax*, *pacis*, peace.] *v. t.* शांत करणें, शांतवणें, सांतवणें, संता(था)वणें, सांत्वन *n*-शमन *n*-शांति *f*-&c. करणें *g. of o.*, थंड-थंडा-&c. करणें. २ (भूक) शमविणें. Appeas'able *a.* (v. V.) सांत्वनीय, सांत्वनयोग्य, सांत्वन करण्याजोगें. Appeas'ableness *n.* (v. A.) सांत्वनयोग्यता *f*, सांत्वनीयता *f.* Appease'ment *n.* (v. V.)—*act.* शांतवणें *n*, &c., मनसमजावणी *f*, मनसमजावशी *f*, सांत्वन *n*, शमन *n.*—*state* शांति *f*, शम *m*, शांतता *f.* Appeas'er *n.* शांत करणारा. Appeas'ingly *adv.* शांत होईल अशा रीतीनें. Appeas'ive *a.* शांत करण्यास समर्थ, सांत्वन करणारा.

Appellant (ap-pel'ant) See Appeal.

Appellation (ap-pel-ā'shun) [See Appeal.] *n.* संज्ञा *f*, आख्या *f*, अभिधान *n*, संकेतशब्द *m*, संकेतवाचक *m.* २ किताब *m.* Appellā'tional *a.* Appell'ative *n.* जातिवाचकनाम *n*, सामान्यनाम *n.* A. *a.* *pertaining to a common name* अभिधायक, अभिधायी, जातिवाचक, संज्ञावाचक. Appell'atively *adv.*

Append (ap-pend') [L. *ad*, to, *pendere*, to hang.] *v. t.* *hang or attach to* पुरवणी जोडणें, लावणें, लटकूनटांगून देणें. २ *add* जोडणें, लावणें, दुमाल्यास लावणें. Append'age *n.* *something added to a greater thing* अवयव *m*, प्रत्यंग *n*, उपांग *n*, आनुषंगिक-अनुबंधी-अनुयोगी-&c.-पदार्थ. *astron.* पुच्छ *n*, अंगभूत पदार्थ *m*-विषय *m*-वस्तु *f*, अप्रधान अंग *n*, गौणांग *n*, अनुबंध *m*, उपकरण *n.* Append'ant *n.* See Appendage. २ *law* पोटभाग *m.* Append'ant, Appending *a.* *hanging to* (v. V.) जोडलेला, टांगलेला, लगत्याचा. I *annexed, concomitant* संबंधीं, अंगभूत, आनुषंगिक, अनुबंधी. Append'ed *p.* (v. V. 1.) टांगून दिलेला, टांगलेला, जोडलेला, लावलेला. २ जोडलेला, जडींव, अनुगत. Appendic'ular *a.* परिशिष्टासारखा. Appendic'ulate *a. bot.* अनुबंधित, सोपांग. Append'ix *n.* v. Appendage. २ (to a book, &c.) *supplement* पुरवणी *f*, ग्रंथशेष *m*, परिशिष्ट *n*, शेषसंग्रह *m.* Append'ixes, Append'ices *pl.*

Appertain (ap-pėr-tān') [L. *ad*, to, *pertinere*, to belong.] *v. i.* (with *to*) *belong* (चा) असणें; as, This house appertains to me शीं संबंध असणें. Apper'tainance *n.* see Appurtenance. Appertain'ing *p. a.* योग्य, बरोबर, ठीक. Apper'tinent *a.* च्या संबंधीं-विषयीं.

Appetency (ap'pet-ens-i) [L. *ad*, to, *petere*, to seek.] *carnal desire* विषयवासना *f*, वासना *f*, काम *m*, विषयसुखाभिलाष *m.* २ आतुरता *f*, इच्छा *f*, तलफ *f*, विशेषकल *m*, प्रबलेच्छा *f.* ३ *natural propensity* सहज प्रावण्य *n*, स्वभाव *m*, प्रकृति *f*, सहज-ओढा-कल *m.* Ap'petence, see Ap'petency. Ap'petent *a.*

Appetite (ap'pĕt-īt) [L. *appetitus*, *appetere.*] *n.* *desire* इच्छा *f*, वासना *f*, आशा *f*, तृष्णा *f*, तृषा *f*, कामना *f*, स्पृहा *f.* [Restraint or regulation of A. इंद्रियसंयमन *n.* Carnal A. काम *m*, विषयवासना *f*, भोगेच्छा *f.*] २ *keenness of stomach* भूक *f*, अन्नावर मनशा-मनीषा *f*, अन्नाची इच्छा *f*, अन्नाकांक्षा *f.* [Destruction of A. (through waiting) भूकमोड *f*, भूक मरणें.] ३ *wonted power of eating, stomach* आहार *m*, खाणें *n*, जेवण *n*, भोजन *n*, भोजनप्रमाण *n.* [Delicateness *of* A. नाजूक जेवण *n.* Improving the A. क्षुद्बोध *m*, अग्निवृद्धि *f.* Loss or want of A. अन्नद्वेष *m*, अग्निमांद्य *n*, भूक न लागणें *n.* Of ravenous A. भुकेचा-अळका-अळकुवा. Of tender A. भुकेचा हळवट-हलका. To bridle one's A. तोंड *n.* बंदावर राखणें-ठेवणें-आटोपणें. To indulge one's A. तोंड *n.* सोडणें. To lose one's A. अन्न *n.* राहणें *g. of s.*, भूक *f.* मरणें *g. of s.* Ap'petible, Ap'petitive *a.* Ap'petise *v. t.* भूक उत्पन्न करणें, भूक प्रदीप्त करणें. Appetise'ment *n.* Appetis'er *n.* भूक प्रदीप्त करणारी वस्तु *f*, पाचन *n*, अग्निप्रदीपन *n.* Appetis'ing *p. a.* Appetis'ingly *adv.*

*N. B.*—Some new renderings that occurred to us after completing the above note are: Of ravenous appetite खाखा झालेला-सुटलेला, आग-धाड सुटलेला, राक्षसी खादीचा. To loose one's A. अन्न तुटणें, आहार थकणें. To indulge one's A. तोंड मोकळें सोडणें, खाण्याचा सुमार सोडणें, ओ येईसतों खाणें.

Applaud (ap-plawd') [L. *ad*, to, *plaudere*, *plausum*, to clap.] *v. t.* शाबासकी देणें, टाळी देणें-वाजविणें-पिटणें, वाहवा *f*-करणें, धन्य धन्य-भलेभले-&c. ह्मणणें, साधुवाद *m.* करणें. २ *commend, praise* वाखाणणें, अनुमोदणें, अभिनंदणें, नावाजणें, प्रशंसा *f*-करणें. Applaud'er *n.* (v. V.) शाबासकी-टाळी देणारा, वाहवा करणारा, वाखाणणारा, प्रशंसक. Applauded *p.* (v. V.) वाहवा केलेला-झालेला, &c., नावाजलेला, अभिनंदित. Applaud'ing *p. a.* Applaud'ingly *adv.* Applause' *n.* *praise* शाबासकी *f*, टाळ्यांचा गजर *m*, वाहवा *f*, वाखाण *f*, नावाजस(णी) *f*, वाखाणणी *f.* Applaus'ive *a.* स्तुतिमय. Applaus'ively *adv.*

Apple (ap'l) [A. S. *æppel.*] *n.* *the fruit of the apple tree* एक जातीचें फळ *n*, हें सुमारें डाळिंबाएवढें असून याची रुचि बोरासारखी असते. २ (of the eye) *pupil* पुतळी *f*, बाहुली *f*, तारका *m.* A. of one's eye *fig.* कंठमणी *m*, जिवाचा कलिंदा *m*, गळ्यांतला ताईत, सहावा-बहिश्चर प्राण *m.* To prize as the A. of one's eye साता काळजांचे पलीकडे ठेवणें, तळहाताचे फोडाप्रमाणें वागवणें, गळ्यांतल्या ताईताप्रमाणें वागवणें,

जीव कीं प्राण करणें. A. of discord भांडणाचें किंवा वादाचें मूळ. A. of Sodom बाहेरून दिसण्यांत चांगलें परंतु तोडल्याबरोबर धूर व राख होणारें फळ *n.* Adam's A. See Adam.

Apply (ap-plī′) [L. *ad*, to, & *plicare*, to fold.] *v. t. put or lay to* लावणें, चोपडणें (oil), जोडणें, घालणें, योजणें, जुंपणें, जुळणें, धरणें, आरोपणें. २ (to its end or purpose) *employ* कार्यांस लावणें, कारणीं-कामीं-काजीं-&c. लावणें, प्रयोग *m*-योग *m*-विनियोग *m.* करणें *g. of o.*, सार्थकीं लावणें. ३ (the mind, &c.) मन *n*-लक्ष्य-&c. लावणें-घालणें, लागू *m.* करणें, मनोनिवेश *m.* करणें. ४ *gram.* योग *m*-प्रयोग *m.* करणें. ५ (तारूं) किनाऱ्याला आणणें. A. *v. i. have some connection, agreement, or analogy, suit* लागणें, लागू पडणें, मिळणें, जुळणें, वसणें, येणें *with* वर or कडे, बनणें (followed by *to*). २ *have recourse to as a solicitor* दरखास्त *f*-अर्ज *m*-विनंती *f*-&c. करणें, विनविणें, जाणें *with* कडे *of o.* Apply′ing *pr. p.* Applied′ *pa. p.* Applī′able *a.* मन वळवण्याजोगा, &c. &c. Applī′ableness *n.* Applī′ance *n.* साधन *n*, यंत्र *n*, हत्यार *n* (*pop*). २ *shakes.* वश होण्याचा स्वभाव *m*, रुकार *m.* Applicabil′ity, Ap′plicableness *n.* (v. A.) लावायाची-योजायाची-घालायाची-&c. योग्यता *f*, लायकी *f*, प्रयोक्तव्यता *f.* २ लागूपणा *m*, लाग (?) *m.* Ap′plicable *a. fit or suitable to be applied* (v. V. T. 1. 2). लावायाचा-जोगता-जोगा-&c., योजाया-घालाया-&c.-चा-जोगता-&c., योग्य, लायक, प्रयोक्तव्य, व्यवहार्य. २ *that may have relation to* संबंध जोडायाजोगा, लागाया-चा-जोगता-जोगा. Ap′plicably *adv.* Ap′plicant *n.* अर्जदार *c*, अर्ज करणारा, दरखास्त करणारा, याचक *c*, अर्थी (S)—*in comp.* Ap′plicate उपयोगास लावलेला. Applicā′tion. *n.* (v. V. T. 1.)—*act.* लावणें *n*, योजणें *n*, घालणें *n*, &c., आरोपण *n*, योजना *f*, विधान *n. a. or s.*, आरोप (S) *m*, प्रयोग *m*, विनियोग *m*, नियोग *m*, योग *m*, योजणूक *f.* २–*act.* कार्यांस-कारणीं लावणें *n*-घालणें *n*-&c., प्रयोग *m*, योग *m*, विनियोग *m.* ३-*act.* मन-लक्ष्य-&c. घालणें *n*-लावणें *n*, व्यासंग *m*, अभिनिवेश *m.*—*state.* लाग *m*, आभिमुख्य (S) *n*, अभिमुखता (S) *f.* ४-*act.* योग *m*, प्रयोग *m.* [of particular A. योगरूढ]. ५ (v. V. N. 1.) -*state.* लागूपणा *m*, लाग *m*, प्रसक्ति *f.* व्यपेक्षा *f.* ६–*act.* अर्ज करणें *n*, &c., दरखास्त *m*, अर्ज *m*, विनंती *f.* ७ अवधान *n*, एकाग्रता *f.* ८ संबंध *m.* ९ समर्थककथा *f*, आख्यान *n* (the practical part of a sermon), दृष्टांत *m*, दाखला *m.* १० बोधसार-तात्पर्य *n.* ११ *philos. consecration* उपनय *m.* १२ उपयोग, एका शास्त्राचीं तत्वें दुसऱ्या शास्त्राच्या मदतीस आणणें; as, the A. of higher mathematics in physics. Ap′plicative *a.* उपयोगाचा, व्यवहाराच्या कामाचा. Ap′plicatory *a.* & *n.* Applied *p.* (v. V. T. 1.) लावलेला, &c., योजित, युक्त, प्रयुक्त, आरोपित, व्यपेक्षित, प्रसक्त.

Applier *n.* (v. V. T. 1.) लावणारा, &c., योजक, प्रयोगी, प्रयोक्ता, विधाता, विधायक, विधायी, आरोपक.

*N. B.*—For Applied Mathematics, Applied Chemistry, see under Mathematics, &c.

Appoint (ap-point′) [L. *ad*, to, & *punctum*, a point.] *v. t. prescribe, ordain, fix by a decree-order-command-resolve* नेमणें, स्थापणें, स्थापन-स्थापना करणें, नेमून देणें, निश्चित करणें, नेमणूक करणें, नियोग करणें, ठरवून देणें, रेंखणें. २ *designate, assign, set apart* अधिकारानें नेमणें, नेमणें, योजणें, योजना-योजणूक करणें. ३ *mark out, establish* आंखून ठेवणें, मर्यादा ठरविणें, उपयोग ठरविणें, नेम करणें, संकेत-हेतु ठरविणें. ४ *equip* (*obs.* except in past-participle) सजवणें, संजोगणें, सज्जित-सिद्ध करणें; as, The English, being well *appointed*, did so entertain them. A. *v. i.* नेमणूक-ठराव करणें; as, To A. to do a thing. २ *law. declare in exercise of an authority, conferred for that purpose, the destination of a specific property* इस्टेट नेमून देणें, इस्टेटीचा नियोग ठरविणें, वारसा देणें, वारस ठरविणें, जिनगी वाटणें. Appoint′ed *p.* see the meaning of the verb to Appoint. नेमलेला, ठरविलेला, नेमून दिलेला, नियमित, नियत, स्थापित, सांकेतिक, विहित, चोदित, नियुक्त, नियोजित, सजवलेला, सज्जित. Appointer *n.* नेमणारा, स्थापक, नियामक, विधायक, योजक, विनियोजक, योजना करणारा, सजविणारा (R). Appoint′ment *n.* for nouns denoting action see the meaning of the verb to Appoint नेमणें *n*, स्थापणें *n*, नियमन *n*, स्थापना *f*, नेम *m*, योजना *f*, योजणूक *f*, नेमणूक *f*, नियोग *m*, सजवणें *n*, सज्ज करणें *n.* I *an article of equipment* सरंजामाचा डागिना *m*, वस्तु *f*, सरंजाम *m*, उपकरण *n*, पोशाख(क) (Now usually plural). II *public post or employment* असामी *f*, सरकारी जागा *f*, अंमल *m*, पद *n.* [HEREDITARY A. दर्क *m*, वतन *n.* TO GET AN A. *fig.* वस्त्र *n* मिळणें *inv. con.*] III *engagement, assignation* संकेत *m*, समय *m*, भेटण्याचा वेळ किंवा ठिकाणा ठरविणें, भेटण्याचा पूर्वी केलेला बेत (keep your A.). IV आज्ञा *f*, विधि *m.* V नेमणूक *f* (in the sense of salary or pension or the office given). VI *law. the act of declaring the destination of any specific property, in exercise of an authority conferred for that purpose* अमुक एक इस्टेटीचा नियोग ठरविणें, इस्टेटीचें नियोजन. Appointment-deed नेमणूकपत्र *n.* (यांत मरणकाळीं एका ट्रस्टीनें आपल्या जागीं दुसऱ्या इसमाची नेमणूक केलेली असते).

Apportion (ap-pōr′shun) [L. *ad*, to, & *portio*, portion.] *v. t.* (योग्य) भाग पाडणें, (योग्य) प्रमाणानें वांटून देणें, विभागून देणें, हिस्सेरसीनें वांटून देणें, वांटणी करणें, यथार्थ विभाजन *n.* करणें *g. of o.*, यथाविभागें वांटून देणें. Appor′tioner *n.* योग्य भाग पाडणारा *m.*

Appor'tionment *n.* विभागून देणें. २ *law* हिस्सेरशी *f*, वांटणी *f*, वांटप *n*, यथायोग्य विभाग *m*.

Apposite (to) (ap-poz-it) [L. *ad*, to & *ponere*, to put or place.] *a. suitable* संगत, योग्य, समयोचित, युक्त, समर्पक, यथायोग्य, यथायुक्त, यथोचित, प्रसंगोचित, प्रसंगानुसार, प्रासंगिक, अनुरूप, वाजवी, लायक. २ यथार्थ. ३ *bot.* संगत, पार्श्वगत. Ap'positely *adv.* (v. A.) यथायोग्य, यथोचित, लायक, प्रसंगानुसार, समर्पकपणानें, प्रसंगोपात्त, समयानुसार, यथाप्रसंग, यथावसर. Ap'positeness *n.* (v. A.) समर्पकपणा *m*, योग्यता *f*, लाग *m*, यथायोग्यता *f*, औचित्य *n*.

Apposition (ap-pōz-ish'un) [L. *ad*, *ponere*, to put.] *n. gram.* अभेदसंबंध *m*, एकच पदार्थदर्शक किंवा व्यक्तिदर्शक दोन विशेष्यें एका विभक्तींत असणें *n*, एकान्वय, अभेदान्वय, समानाधिकरण *n*. २ जोडणें *n*. Apposi'tional *a.* अभेदान्वयसंबंध असणारें, एकविभक्तिक, अभेदसंबंधाचा, अभेदी, अभेदान्वयी. Appos'itive *a.* वरील संबंध असलेला, एकविभक्तिसंबंधाचा.

*N. B.*—उद्देश will be the most accurate word for Apposition as in Marathi phrase, उद्देशार्थी प्रथमा. So also Appositional will be best rendered by उद्देशार्थी.

Appraise (ap-prāz') [L. *ad*, to, & *pretium*, price.] *v. t.* मोल *n*-किम्मत *f*-दर *m*-दरदाम *m*-&c. करणें-ठरविणें *g. of o.*, किंमत अजमावणें, अभावणी-अंदाज करणें. Apprais'able *a.* (v. V.) किंमत ठरवितां येण्याजोगा, &c. Apprais'al *n.* अजमावलेली किंमत *f*. Appraise'ment *n.* मोल *n*-दर करणें-ठरविणें *n*, अभावणी *f*, अंदाज *m*. Apprais'er *n.* (v. V.) मोल *n*-दर-&c.-करणारा-ठरविणारा-&c., दरलाव्या *m*, योग्य व खरी किंमत ठरविणारा *m*, पारखी, परीक्षक. This word (Appraise) was for some time used in the sense of "Praise."

Appreciate (ap-prē'shi-āt) [L. *ad*, to, & *pretium*, price.] *v. t.* मोल *n*-दर *m*-करणें-ठरविणें-जाणणें *g. of o.* २ *admit the value of* मोल *n*-महत्व *n*-जाणणें, जाण *f* जाणणें *g. of o.*, बूज *f*. राखणें (?)-करणें *g. of o.*, मर्म *n*. समजणें, स्वारस्य *n*-मर्म *n*-खुबी-समजणें, गुण *m*-योग्यता *f*-&c. जाणणें, आदरणें, ग्रहण *n*. करणें *g. of o.*, पारखणें. A. *v. i.* किंमत अधिक येणें-होणें. २ किंमतीस चढणें; as, Gold has been steadily appreciating in value. Appre'ciable *a.* विशेष किंमतीचा, विशेष परिमाणाचा, परिमाण काढतां येण्याजोगा, परिमेय, मापण्यासारखा, दिसण्यांत येण्याजोगा, समजण्यांत येण्याजोगा, सुस्पष्ट, किंमत करतां येण्याजोगा. Appre'ciably *adv.* समजण्यांत येईल अशा प्रमाणानें. Appreciā'tion *n.* गुणपरीक्षा *f*, पारख *f*, चहा *f*, किंमत वाढणें *n*, खरी किंमत *f*, महत्व. Appre'ciative *a.* योग्यता जाणण्यास समर्थ, रसज्ञ (*poe.*), गुणज्ञ, योग्यतादर्शक, योग्यता दाखविणारा, मर्मज्ञ, मार्मिक. Appre'ciatory *a.* See Appreciative. २ गुणग्राहकाला योग्य असा, गुणग्राहकाचा. Appreciā'tor *n.* (v. V. 2.) जाणजाणता, बूज करणारा, गुणग्राहक.

Apprehend (ap-pre-hend') [L. *ad*, to, & *prehendere*, to seize.] *v. t. seize, lay hold of* (मनुष्यास) धरणें, पकडणें. २ *conceive in the mind, understand* आकळणें, घेणें, धरणें, समजणें, उमजणें, उमज *m*-समज *m f*-बोध *m*. होणें-पडणें in con. and *g. of o.*, अर्थ-जाणणें-वाटणें, मनांत येणें in con., समजणें-उमजणें; used inversely. ३ *dread, fear* धास्ती-भीति-भय वाटणें, आशंकणें *poe.*, अंदेशा *m*-वहमा (?) *m*-शंका *f*-आशंका *f*-संशय *m*-वहीम (?) *m*-(खत्रा) *m*. खत्ता *f*-*m*-&c. धरणें-बाळगणें, अंदेशा *f*-शंका *f*-&c. येणें-in con., वसवसा असणें. ४ *be of opinion, think* वाटणें-भासणें in. con. A. *v. i.* योजणें. २ कल्पना करणें, मानणें. ३ भावी संकटाबद्दल काळजींत असणें. Apprehensibil'ity *n.* धरलें-पकडलें जाण्याची योग्यता *f*, बंधार्हता *f*. २ समजतां येण्याची योग्यता *f*, &c. For more meanings, see the verb 'Apprehend.' Apprehended *p.* (v. T.) धरलेला, पकडलेला. २ घेतलेला, आकळलेला, बोध झालेला, &c., आकलित. ३ आशंकित, शंकित. Apprehen'sion *n.* (v. V. I.)-*act.* धरणें *n*, पकडणें *n*, ग्रहण *n*, ग्रह (S) *m*. २-*act.* लक्षांत घेणें *n*, धरणें *n*, &c. ग्रह *m*, उमज *m*, समज *m*, बोध *m*, आकलन *n*. I *ability to understand* समजण्याची-जाणण्याची-शक्ति, उमज *m*, ग्रह *m*, बोध *m*, प्रबोध *m*, ज्ञान *n*, अधिगम *m*, भावना *f*. II (misgiving) शंका *f*, संशय *m*, अंदेशा *f*, वहमा *m*, वहीम *m*, कल्पना *f*, घोर *m*, धोका *m*, खरका *m*, वसवसा *m*. III *faculty of apprehension* समजून घेण्याची शक्ति *f*, बुद्धि *f*, उमज *m*, समज *m*, *f*, मेधा *f*. Of quick or ready A. सकृद्ग्राही, तैलबुद्धि. Of dull A. मंदबुद्धीचा. Apprehens'ible *a.* (v. V. 2.) मनांत येण्याजोगता-जोगासारखा-&c., समजाया-जोगा-जोगता-&c. Apprehens'ive *a. dreading evil* (v. V. 3.) शंकित, संशययुक्त, साशंक, आशंकित. २ तीव्रबुद्धीचा. Apprehens'iveness *n.* see Apprehensive.

Apprentice (ap-prent'is) [L. See Apprehend.] *n.* करारनाम्याचा विद्यार्थी *m*, शागिर्द *m*, शिष्या *m*, चेला *m*, उमेदवार *m*, छात्र *m*, अंतेवासी *m*, संकेतबद्ध विद्यार्थी *m*, कला *f*-व्यापार *m*-अगर धंदा *m*-शिकण्याकरितां कांहीं अटींवर राहिलेला विद्यार्थी *m*, शिकाऊ मूल *n*, नवशिक्या *m*. A. *v. t.* धंदा *m*-कसब *n*-&c. शिकण्याकरितां करारानें ठेवणें. Apprent'icehood, Apprent'iceship *n.* (v. I.) शागिर्दी *f*, शिष्यपणा *m*, चेलेपणा *m*, उमेदवारी *f*, नवशिकेपणा *m*, छात्रस्थिति *f*, अंतेवासित्व. Apprenticeship-deed नवशिके करार *m*, शिकाऊ करार *m*. २ करारांत नेमलेला काळ *m*. To serve apprenticeship छात्रता *f*. पतकरणें, शिष्यत्व *n*. स्वीकारणें.

Apprise (of) (ap-prīz') [See Apprehend] *v. t. inform* खबर *f*. देणें, कळविणें, जाणविणें, बातमी देणें.

Apprize, Apprise (ap-prīz') see To Appraise. Appriz'er *n.* ज्याकरितां किंमत *f.* ठरविली असते तो मालक.

Approach (ap-prōch') [L. *ad*, to, & *prope*, near.] *v. i. come near* पाशीं-जवळ येणें-जाणें, पावणें, आगम *m*-आगमन *n.* करणें. २ पोंहचणें. ३ (साम्याला) बरोबर उतरणें *v. t.* साम्याला-सारखेपणाला पोहोंचणें. A. *n.* (v. V.)—*act.* येणें *n*, पावणें *n*, आगमन *n*, अभ्युपगम *m*, अभिगमन *n.* उपसर्पण *n.* I वाट *f*, मार्ग *m*, गमनमार्ग *m.* II *pl.* प्रतिपक्षापासून आपला बचाव करण्याकरितां उभारलेलें भिंतीसारखें बांधकाम *n.* Approachabil'ity *n.* Approach'able *a.* (v. V.) जवळ जाया-चा-जोगता, &c., अभिगम्य, अभिगंतव्य, उपसर्पणीय. Approachableness *n.* Approached *p.* (v. V.) जवळ पोहोंचलेला, अभिगत, अभ्युपगत, समीपागत, उपस्थित. Approacher *n.* Approaching *p. a.* (v. V.) जवळ येणारा-पावणारा, &c., अभिगामी, अभ्युपगामी.

Approbation (ap-prob-ā'shun) [See Approve.] *n.* (v. V.)—*act.* मान्य करणें *n*, पसंत करणें *n*, संमति *f*, अनुमोदन *n*, आदरणें *n.* I खुशमर्जी *f*, पसंती *f*, खातरी *f*, मान्यता *f*, अनुसत (?) *n*, अनुमाति (?) *f*, अभिमत *n*, कबुली *f.* To meet the A. of मनास येणें-उतरणें, मर्जीस उतरणें, पसंतीस पडणें, खातरीस येणें-पटणें. Ap'probate *v. t.* (*obs.*) Ap'probatory *a.* संमति-अनुमोदन-अनुमति-&c. ज्ञापक-दर्शक-सूचक-&c., अनुमोदक. Ap'probative *a.* पसंत करणाऱ्या मनुष्यासंबंधीं.

Appropriate (ap-prō'pri-āt) [L. *ad*, to, & *proprius*, one's own.] *v. t. assign to, particularly take to self* आपलें करणें, आत्मसात् करणें, आपलासा करणें, कंवटाळणें, खाजगीकडे-ठेवणें-घेणें. २ नांवाचा-नांवरशीनें-नांवानें-&c. ठेवणें-काढून ठेवणें-लावणें-संकल्पून ठेवणें, योजणें, योजना *f*-विनियोग *m-n*-&c. करणें *g. of o.* ३ *take fraudulently* दाबून बसणें, खाणें, डल्ला *m.* मारणें-देणें *g. of o.*, दपटणें, फामटणें, गट्ट करणें, गिळंकृत करणें, धडांत-धड्यांत टाकणें-सोडणें. A. *a.* विशिष्ट कामाकरितां तोडून दिलेला, निराळा ठेवलेला. २ योग्य, उचित, विशिष्ट. Aprō'priable *a.* (v. V. I.) विनियोग करायाजोगा-&c., विनियोज्य. Appropriated *p.* (v. V. 1.) नांवानें-नांवाचा-&c.-ठेवलेला, विनियोजित, विनियुक्त. २ खाजगीकडे ठेवलेला, आपलासा केलेला, &c., आत्मसात्कृत. ३ खाल्लेला, &c. Apprō'priately *adv.* योग्य रीतीनें. Apprō'priateness *n.* योग्यता *f*, औचित्य *n.* Appropriā'tion *n.* स्वतःसाठीं वस्तूचा विनियोग, उद्दिष्ट हेतूसाठीं वस्तूचा उपयोग करणें, पार्लमेंटानें ठरविलेल्या कार्याकरितांच दिलेल्या पैशाचा राजानें उपयोग करावा असें इंग्लंदच्या राज्यपद्धतींतील तत्व *n*, निर्णीतविनियोगतत्व *n.* २ नांवानें ठेवणें *n*, विनियोजन *n*, विनियोग *m.* ३—*act.* खासगीकडे ठेवणें *n*, आपलासा करणें *n.* ४—*act.* खाणें *n*, अपहार करणें *n.* [I fradulent A. तमाखोरी, अपहार, तनाखोरी *f*, हरामखोरी *f.*]. ५ *law* आदावाद करणें, सावकारानें कोणत्याही रकमेच्या पोटीं रिणकोचे पैसे जमा करणें. ६ काढून ठेवलेली वस्तु *f.* Apprō'priative *a.* Apprō'priativeness *n.* Apprō'priator *n.* स्वतःकरितां घेणारा, विनियोग करणारा *m.*

Approve (a-prōōv') [L. *ad*, to, *probare*, to try, test.] *v. t. be pleased with* संमति *f*-मान्यता *f*- अनुमोदन *n*-&c. करणें *g. of o.*, अनुमति *f.* देणें, मान्य-पसंत-कबूल-मंजूर-&c. करणें, रुजू असणें-होणें and with *in. con.* होणें,-मर्जीस-पसंतीस-खात्रीस-&c. येणें-पडणें-&c. *g. of o.* and *in. con.* अनुमोदणें, कबूल करणें, वाखाणणें, स्तुति करणें. २ (विपर्यी) पसंति दर्शविणें. ३-(चा) संतोष वाटणें, च्या कसोटीस उतरणें *in con.* ४ वाखाणणें, स्तुति करणें. ५ Eng. *law* स्वताच्या सुटकेकरितां आपल्या साथीदारा-विरुद्ध साक्ष देणें. A. *v. i.* आवडणें, पसंत होणें. २ पसंती दर्शविणें. ३ सुप्रसन्न होणें (followed by *of*). Approv'able *a.* (v. V.) पसंत-कबूल-&c.-कराया-चा-जोगता-जोगा, &c., अनुमोदनीय, अनुमोदनार्ह. Approvableness *n.* Approv'al *n.* पसंति *f*, मान्यता *f*, मंजुरी *f.*-*act.* पसंत-मान्य करणें *n.* Approved' *p.* (v. V.) मान्य, पसंत(द), खातरीचा, कबूल, रुजू, अभिमत, सम्मत, अनुमत, अनुमोदित, मंजूर. Approv'er *n*, Approv'ing *p. a.* (v. V.) अनुमंता, अनुमोदक. २ *law* गुन्ह्यांत सामील असलेला साक्षीदार, साथीदार-सामील-साक्षी. गुन्हा कबूल करून दुसऱ्यावर दोषारोप करणारा. Approv'ingly *adv.* पसंतीनें, अनुमोदनानें.

Approximate (ap-proks'im-āt) [L. *ad*, to, & *proximus*, nearest. Superl. of *prope*, near.] *v. t.* जवळ नेणें. २ जवळ आणणें. A. *v. i.* जवळ जवळ येणें. २ जवळ जवळ असणें. A. *a.* जवळचा, समीप असणारा. २ ठोकळ. ३ बहुतेक सारखा. Approx'imately *adv.* जवळ जवळ, बहुतांशीं जवळ. Approximā'tion *n.* जवळ जवळ येणें. २ उपगम *n*, सांनिध्य *f*, जवळजवळपणा *m. math.* सरासरी किंमत *f*, अंदाज उत्तर *n.* Approx'imative *a.* खऱ्या जवळ जवळ असणारा, सारखवट.

Appulse (ap-puls') [L. *ad*, towards, & *pellere*, to drive.] *n.* लागणें *n*, टक्कर *f*, धडक *f*, आपात *m*, अभिस्पर्श *m*, व्याघात *m*, अकस्मात् झालेलें संघट्टन *n.* २ *astron.* सूर्य व इतर ग्रह यांचा योग किंवा सांनिध्य. Appul'sion *n.* अभिस्पर्शता *f*, संघट्टन *n.* Appul'sive *a.* (opposed to repulsive) एकमेकांवर लागणारें, चिकटणारें, अभिस्पर्शांतला (ग्रह).

Appurtenance (ap-pur'ten-ans) [See Appertain.] *n.* उपांग *n*, प्रत्यंग *n*, अंगभूत पदार्थ *m*-विषय *m*-वस्तु *n*-स्थान *n*-&c., दुसऱ्या मुख्य वस्तूच्या अनुषंगानें असणारी वस्तु *f.* २ *law* स्थावरमिळकतीसंबंधाचा हक्क *m.* Appur'tenant *a.* and *n.* अंगभूत, संबंधींचा, आनुषंगिक.

Apricot (ā'pri-kot) [L. *præcox*, early ripe.] *n.* एकाप्रकारचें गोलसर, व चवदार अलुबुखारासारखें विलायती फळ *n.*

April (ā'pril) [L. *aprilis*, usually regarded as from

*aperire*, as the month when the earth opens to bring forth new fruits. ] *n.* इंग्रजी वर्षाचा चवथा महिना *m*, चैत्र वैशाख *m.* A. fool एप्रिल महिन्याचे पहिल्या तारखेस ज्याची मजेनें विलक्षण मस्करी केली आहे असा. हिंदू लोकांत शिमग्याचे सणांत अशीच थट्टा *f.* करितात *n.*

A priori (ā-pri-ō'ri) [ L. *apriori*, from something prior or going before. ] See the word A posteriori. डॉ. मरे साहेबांच्या इंग्रजी कोशांत ह्या शब्दाचे दिलेले अर्थ पहिल्या प्रथम देऊन नंतर आजपर्यंतच्या मराठी लेखकांनीं योजिलेले व कांहीं आमचे स्वताचे शब्द दिले आहेत. (I) a phrase used to characterise reasoning or arguing from causes to effects, from abstract notions to their conditions or consequences, from propositions or assumed axioms (and not from experience); deductive, deductively; सिद्ध किंवा सिद्धवत् गृहीत कारणांपासून मनामध्यें कार्याची अटकळ करण्याची (पद्धत), कारणानुमेयकार्यपद्धतिद्वारा, तर्कद्वारा, विगमनद्वारा, अवनयनद्वारा. २ previous to any special examination presumptively, in accordance with one's previous knowledge or prepossessions अटकळीनें, मनानें घेतलेल्या ग्रहांवरून. ३ previous to experience, innate in the mind अनुभवजन्य नव्हे असें, विचारैक्यद्वारा मिळालेलें, मनस्सम्भव (ज्ञान), प्रागनुभव; as, "the term *a priori*, by the influence of Kant and his school, is now very generally employed to characterise those elements of knowledge which are not obtained *a posteriori—not evolved out of experience* as factitious generalizations; but which, as *native to*, are potentially in, the mind antecedent to the act of experience." A priori laws or conditions स्वतःसिद्ध धर्म किंवा अवश्य अवस्था. Apriō'rism *n.* विचारैकद्वारा तर्कपद्धतीचा उपयोग *m*, प्रागनुभवता *f.* Apriō'rity *n.* प्रागनुभवता *f.* Apriō'rist *n.* Apriori ला प्रागनुभव हा शब्द योग्य व लहान असा आहे. Apriori knowledge प्रागनुभव ज्ञान. Apriori mode of reasoning प्रागनुभवन्यायपद्धति. Apriori reasoner प्रागनुभव तर्क करणारा. An apriori reasoner tries by argument to assign beforehand the place of a fact which may not yet have been discovered by observation. He anticipates experience, of course starting from truths got from experience (Kant).

*N. B.*—विगमन or अवनयन are our words for Deduction. इंद्रियसंभव *a* and मनस्संभव *a* are another pair of good words for A posteriori and A priori. In our notes on A posteriori and A priori the word इंद्रिय means the senses apart from the mind मनः.

Apron (ā'prun) [ L. *mappa*, a napkin. ] *n.* वर बांधण्याचें मलवस्त्र *n*, वस्त्रें विघडूं नयेत अगर फाटूं नयेत ह्मणून पुढील भागावर बांधण्याचा कपडा *m*, चामडें *n*, गाडींत बसलें असतां धुरळा उडूं नये ह्मणून आंगावर घेतलेलें चामडें *n*, मलवस्त्र *n.* २ तोफेच्या कान्यावरील शिशाचें झांकण *n.* ३ गोदीच्या दरवाज्यापुढचा पाणी अडवणारा चौथरा *m.* ४ हंसपक्ष्याच्या अगर बदकाच्या शरीरावरील जाडी कातडी *f.* A. *v. t.* मलवस्त्र *n.* देणें. २ मलवस्त्र *n.* पुढील भागावर बांधणें. A'proned *a.* मलवस्त्र घातलेला, मलवस्त्राच्छादित. A'pron-man *n.* मलवस्त्र धारण करणारा *m.* A'pron-string *n.* मलवस्त्र बांधण्याची दोरी *f.* To be tied to a woman's apron-strings. एखाद्या स्त्रीच्या पाठीमागें पाठीमागें रहाणें. (मूल आईच्या मागें असतें तसें).

*N. B.*—Prof. Shivram Bapujī Paranjpe suggests that Latin *mappa* is allied to Sk. वपुः.

Apropos (a-pro-pō') [ Fr. *a*, to, *propos*, purpose.] *a.* and *adv.* नेमका, प्रसंगोचित, प्रसंगोपात्त, प्रस्तुत कारणास योग्य, प्रास्ताविक (S), प्रस्तावसदृश, वेळेस योग्य. (an A. remark). [To come A. योग्य वेळीं येणें, प्रसंगास येणें]. २ (च्या) संबंधानें (with *to* and *of*).

Apsis (ap'sis) [ Gr. *haptein*, to connect. ] *n. pl.* Apsides (ap'si-dēz) *astron.* ग्रहांच्या अगर उपग्रहांच्या कक्षेंतील सूर्यापासून अति दूर अगर अतिसमीप अशा दोन बिंदूंपैकीं एक, उच्च किंवा नीच बिंदु *m.* *math.* (दीर्घवर्तुलांत) उच्च किंवा नीच बिंदु *m.* The line of the apsides शीघ्रोच्चमंदोच्चसूत्र *n*, उच्चनीचरेषा. Ap'sidal *a.* बृहदक्षासंबंधीं. A. plane बृहदक्षप्रांत *m.* Apse *arch.* (चर्चच्या-पूर्वबाजूला) अर्ध वर्तुलाकार घुमट असलेला इमारतीचा भाग *m.*

Apt (apt) [ L. *aptus*, fitted, fit. ] *a.* प्रवण, तयार, सिद्ध, सादर, स्वभावाचा, झोंकाचा, conjoined with object (as, फुटण्याचे स्वभावाचा A. to break &c.) शील, *in comp.*, स्वभाव, *in comp.* योग्य, उपयोगी, उचित, उपयुक्त. [ *N. B.*—THE MEANING OF THE WORD WILL OFTEN BE MOST IDIOMATICALLY RENDERED BY ADOPTING ANOTHER CONSTRUCTION; AS, THIS CLOTH IS APT TO TEAR हें कापड लवकर फाटतें,-फाटणारें आहे. (*colloq.*) THAT MAN IS APT TO QUARREL तो माणूस लवकर भांडतो,-भांडखोर आहे. (*colloq.*) MY HORSE IS APT TO KICK माझ्या घोड्यास लाथ(त) मारण्याची खोड आहे or माझा घोडा लाथाळ आहे. &c. &c.] ३ कोणताही विषय लवकर उचलणारा, (with *at*) सुजाण, चणचणीत, कडकडीत, ताखडा, (*obs.*) हुशार, निपुण, प्रवीण, चरचीक (*obs.*), पटु, तीक्ष्ण बुद्धीचा, मेधावी. ४ जोगा, पात्र (A. to forget विसरण्यास पात्र). ५ कडे कल असणारा. Apt'ly *adv.* (v. A. 1.) यथायोग्य, यथायुक्त, समर्पक. २ हुशारीनें, चणचणीतपणानें, &c. तीक्ष्णतापूर्वक. Apt'ness *n.* Same as Aptitude.

Apterous (ap'tėr-us) [ Gr. *a.* not, *pteron*, a wing.] *a. bot.* अ-पंख, पंखविरहित. २ *arch.* बाजूचे खांब नसलेला. Also Ap'teral *a.*

Aptha (aptha) *n. med.* तोंड येणें *n*, जिभेवर फोड *m.* येणें *n.* Apthœ *pl.*

Aptitude ( apt'i-tūd ) [ L. *aptus.* ] *n.* योग्यता *f,* उपयोगीपणा *m,* उपयुक्तता *f.* २ कल *m,* प्रावण्य *n,* ओढ *f,* प्रवाह *m,* स्वभाव *m,* झोंक *m,* प्रवृत्ति *f.* ३ सुजाणपणा *m,* ग्रहणशक्ती *f,* चणचणीतपणा *m,* हुशारी *f,* पाटव *n,* पटुत्व *n,* तिखटाई *f,* निपुणता *f,* कौशल्य *n.* ४ सामर्थ्य *n,* शक्ति *f.*

Aqua ( āk'wä ) [ L. *aqua,* water. ] *n.* पाणी *n.* २ व्हिस्की दारू (R).

Aquafortis ( ā'kwa-for'tis ) [ L. *aqua,* water, & *fortis,* strong. ] *n.* ( strong water ) *chem.* आगपाणी *n.* २ अशुद्ध नाइट्रिक अॅसिड अथवा पाणी घालून तीव्रता कमी केलेलें नाइट्रिक अॅसिड *n.* A'qua-rē'gia *n.* अम्लराज. A'qua-vi'tæ *n.* (water of life) ब्रांडी दारूप्रमाणें अंमल उत्पन्न करणारें जलाल पेय *n,* अल्काहोलचें जुनें नांव. ब्रँडी-व्हिस्की वगैरे पेयांना हाच शब्द लावतात. फ्रेंच ब्रँडी *f.*

*N. B.*—Aquafortis is commercial name for Nitric Acid. Aquafortis contains 49 per cent Nitric Acid pure ( sp. gr. 1·26 ). That which contains 67 per cent of Nitric A. is called double Aquafortis ( sp. gr. 1·46 ).

Aquarium ( a-kwā'ri-um ) [ L. *aqua,* water. ] *n.* फक्त पाण्यानें वाढणाऱ्या वनस्पती, मासे इत्यादि जलचरांचे व तसेंच जलवनस्पतींचे सजीव नमुने ठेवण्याकरितां तयार केलेलें तळें अगर भांडें *n,* जलजपात्र. Aquā'riums, Aquā'ria *pl.*

Aquarius ( a-kwā'ri-us ) [ L. *aqua,* water.] *n. astron.* कुंभ (रास), ही कुम्भाकृति तारकपुंजाची फार जुनी कल्पना आहे. या राशीस जानेवारीमध्यें सूर्य येतो व तेव्हां जगाच्या अनेक भागांत पाऊस पडतो ह्मणून त्या पुंजाला कुंभ (जलघटधारी) असें नांव दिलेलें आहे. (एक जुनी कल्पना).

Aquatic ( a-kwat'ik ) [ L. *aqua.* ] *a.* ( of animals and plants. ) जलजन्य, जलज, जलोद्भव, जलजात. २ ( of animals ) जलचर, जलचारी, जलजीवी, जलभव. ३ जलोचित. A. *n.* पाण्यांत वाढणारी वनस्पति *f,* जलजंतु *m.* (of plants) उदकशाक. A.s *pl.* पाण्यांतील खेळ *m.* ( Rowing, swimming ). A. sports जलक्रीडा *f.* A. and terrestrial जलस्थलाचा. Aquat'ics *pl.*

Aquatile ( ak'wa-til ) [ L. *aqua.* ] *a.* (R) जलवासी.

Aqueduct ( ak'we-dukt ) [ L. *aqua,* water, & *ducere,* to lead. ] *n.* नळ *m,* नहर *m,* सारणी *f,* सारण *m,* एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं पाणी जाण्याचा मार्ग *m,* वाट *f.* २ *anat.* मेंदूचें तिसरें वेंत्रिकल चवथ्या वेंत्रिकलशीं जोडणारा नळ *m.* ह्याला Aqueduct of Sylvius ह्मणतात. See the word ventricle. [ Ventricle मेंदूतील एका आशयाचें नांव, मज्जाशय ].

Aqueous ( ā'kwe-us ) [ L. *aqua,* water. ] *a.* जलरूप, जलमय, जलप्राय, जलजन्य, जलभारित, अनूप. *phil.* जलीय, जलसम्भूत. A. vapour सजलबाष्प *n.* A. humour नेत्रोदक, चाक्षुषजल. A'queously *adv.*

Aquila ( ak'wi-la ) *n. astron.* गरुड व शारंगपाणी. *zool.* गरुडपक्ष्याची एक जात.

Aquiline ( ak'wil-in ) [ L. *aquila,* an eagle.] *a.* गरुडासारखें. A. nose गरुडनाक *n,* शुकनासिका *f.* That has an A. nose गरुडनासिक ( *pop.* ) गरुडनाक्या, शुकनासिक.

Aquius ( ak'wi-us ) *n. astron.* अश्वमुख *n,* घोडमुख्या *m.*

Ara ( ā'ra ) *n. astron.* पीठ, पाट, वृश्चिकराशीच्या दक्षिणेकडील तारकपुंज *m.*

Arab ( ar'ab ) *n.* अरब, अरबस्थानांत राहणारा. Street Arabs घरदार नसलेले-गरीब-भिकारी, अनाथ भिकारी मुलें. Arāb'ian *a.* अरबी, अरबस्थानांतील. A. *n.* अरबी *m,* अरब *m.* Ar'abic *n.* अरबी भाषा *f*-बोली-लिपि *f.* A. *a.* अरबी, अरबी भाषेसंबंधीं, अरेबियासंबंधीं. Ar'abism *n.* अरबी भाषेची विशेष राहटी *f*-मोडणी *f.* Ar'abist *n.* अरबी भाषेंत प्रवीण असा मनुष्य *m,* अरबीज्ञ.

Arable (ar'a-bl) [Gr. *aroein,* to plough.] *a.* लागवडीचा, लागवडीच्या उपयोगाचा, लावणीचा, जिराइती, कीर्दसार, कृषियोग्य, कीर्दीलायक. A. land जिराईत *n,* काळी *f.*

Arachnoid ( ā-rak'-noid ) [ Gr. *arachne,* a spider, & *eidos,* form. ] *a. bot.* कोळीष्टिकासारखे गुंतलेले (केंस किंवा लव), सूत्रजालमय, तंतुजालवत्. २ *anat.* कोळ्याच्या जाळ्यासारखा; as, The A. membrane of the brain अन्याकनैद पडदा, हा द्युरामेतर व पायामेतर ह्यांमध्यें कण्याच्या रज्जूच्या टोंकास असतो.

Araneous ( a-rā'nē-us ) [ L. *aranea,* a spider. ] *a.* कोशेट्यासारखा, सुतेऱ्याच्या-कोळ्याच्या जाळ्यासारखा. as, The A. membrane of the eye.

Aration ( a-rā'shun ) [ Fr. *arare,* to plough. ] *n.* (S) नांगरतांना होणारी जमिनीची स्थिति *f,* नांगरणी *f.* Ar'atory *a.* कृषिकर्मास उपयोगी, नांगरण्याचे कामीं उपयोगीं पडणारी, कृषिकर्मोपयोगी, हालिक, हल्य, सैरिक.

Arbiter ( är'bit-ėr ) [ L. *ad,* to, & *bitere,* to go or come.] *n.* पंच *m,* मध्यस्थ c, तिऱ्हाईत c, पंचाईतदार *m,* अमीन *m,* लवाद *m.* Meeting of private A.s शेळसभा *f.* Ar'bitress *fem.* (of Arbiter). Ar'bitrage *n.* मध्यस्थी *f,* तिऱ्हाईतपणा *m.* Arbit'rament, Arbit'rement *n.* पंचांचा निर्णय. Ar'bitrate *v. i.* पंचाईत *f*-तिऱ्हाइती *f*-अमिनी *f*-मध्यस्थी *f*-मनसुबी *f*-मेळा (*obs.*) *m.* करणें, पंचलवाद करणें. A. *v. t.* सर्व बाजूंच्या गोष्टी ऐकून निकाल *m.* सांगणें. Arbitrā'tion *n.* ( v. V. )—*act.* पंचाईत *f,* तिऱ्हाइती *f,* अमिनी *f,* मुनसिफी *f,* लवादी *f,* मनसुबी *f,* मध्यस्थी *f.* २ लवादाचा निकाल *m,* पंचांनीं दिलेला निकाल *m*-निर्णय *m.* [Assembly of A. पंच *m. pl,* मेळा *m.* Paper of agreement given in by the parties before an assembly of A. कबूलकुतबा *m,* कुतबा. Paper of acquiescence in the award of an assembly of A. समजूतपत्र *n.* A. bond *law* लवादपत्र, पंचनामा. To submit to A. लवादींत टाकणें. A. of exchange चलनी नाण्यांच्या बट्ट्याचा पंचमार्फत ठराव.

Ar'bitrātor *n.* see Arbiter. Ar'bitrātrix *fem.* ( of Ar'bitrātor ).

Arbitrary ( är'bi-trar-i ) [ L. *arbitrarius*, arbiter. ] *a.* मनास येईल तसा, अमुक एक नियमानें न बांधलेला, पूर्ण मुभा घेणारा, अनियंत्रित, स्वैरवृत्त, स्वच्छंदी, वर्तन-स्वातंत्र्य असलेला. २ यथाकामी, स्वैर, निरंकुश. ३ जुलमी. ४ उद्दाम. ५ आपल्याच इच्छेप्रमाणें–अकलेप्रमाणें वागणारा. Ar'bitrarily *adv.* मनःपूत, मनास येईल तसें, स्वैरपणानें, जुलमानें, उद्दामपणानें, मनसोक्त. Ar'bitrariness *n.* स्वैरता *f*, हवें तसें वागण्याची मुभा *f*, स्वच्छंदीपणा *m*, उद्दामपणा *m*, जुलमीपणा *m*.

Arbor ( är'bur ) [ L. *arbor*, a tree, a wooden bar.] *n.* वृक्ष *m*. Arborā'ceous *a.* झाडाच्या-जातीचा-गुणाचा. Arbōr'eous *a.* वृक्षासंबंधीं. Arbores'cence, Arborisā'tion वृक्षासारखी वाढ *f*-वृद्धि *f*. Arbores'cent *a.* झाडांच्या आकृतीचा, *archi.* वृक्षासारखा पसरलेला. Ar'boret *n.* (*obs.*). Arborē'tum *n.* शास्त्रीय शोधाकरितां निरनिराळ्या झाडांचें आणि झुडपांचें संग्रहालय *m*. Arborē'ta *pl.* Arboricul'tural *a.* Ar'boriculture *n.* उपयोग-शोभा ह्याकरितां झाडांची केलेली लागवड *f*, उपयोगी झाडें—मुख्यत्वें सागाचीं झाडें करणें *n*. Arboricul'turist *n.* वृक्षवर्धनज्ञ. Ar'borist *n.* झाडाझुडांची विशेष माहिती असलेला मनुष्य *m*, वृक्षज्ञ *m*, वृक्षवेत्ता *m*.

Arbor ( är'bur ) [ L. ] *n. mech.* इतर फिरणाऱ्या चक्रांना गति देणाऱ्या चक्राचा आंस *m*. २ एखाद्या यंत्राचा मुख्य आधार *m*.

Arbour ( är'bur ) *n.* कुंज *n*, निकुंज *m*, *n*, गुंफा *f*, लतागृह *n*, लतामंडप *m*.

Arc ( ärk ) [ L. *arcus*, a bow. ] *n.* धनुष्य *n*, धनु *m*, चाप *m*. २ *geom.* वर्तुळाच्या परिघाचा भाग *m*, कंस *m*. Chord of an A. ज्या *f*, जीवा *f*, चापकर्ण *n*, गुण *m*. Complement of an A. to 90° कोटि *f*. Measurement of an A. धनुःफल *n*, ज्याफल *n*. Versed sine of an A. उत्तरज्या *f*.

*N. B.*—In the terms Diurnal Arc, Nocturnal Arc, Arc of Meridian, the word *arc* is usually rendered by चाप.

Arcade ( ärk-ād' ) [ L. *arcus*, an arch. ] *n. arch.* वरकमानींचा रस्ता, लदावाचा रस्ता *m*-वाट *f*, लादनीचा रस्ता *m*-वाट *f*, एका रांगेंतील कमानींचा मंडप *m*, वरून झांकलेल्या कमानीदार छपराचा रस्ता *m*, महिरपांची रांग *f*. २ छायेचा मार्ग *m*, दुतर्फी दुकानें असलेला रस्ता *m*.

Arcanum (ärk-ān'um) [L. *arca*, a chest.] *n. pl.* Arcan'a रहस्य, गूढार्थ. २ *med.* अद्भुत उपाय *m*. Generally used in the plural; as A. of nature.

Arch ( ärch ) [ L. *arcus*, a bow.] *n.* कमान(ण) *f*, मेहेराब *f*, महिराप *f*. २ तोरण. ३ वर्तुलाच्या परिघाचा कोणताहि भाग *m*, वृत्तक, वृत्तखंड. ४ *physiol.* कंस *m*, कमानीसारखा शरिराचा भाग *m*. A. of heaven नभोमंडळ *m*. Triumphal A. विजयस्मरणार्थ कमानदार तोरण. A. *v. t.* कमानेची-कमानदार-मेहरबदार-&c. करणें, कमान *f*. करणें-लावणें. Arched *a.* कमानी, कमानदार तोरणाकार, मेहेरापदार. Flat and relieving arch *engine.* चपटी व मुकी कमान. Arch'-let *n.* लहान कमान *f*. Arch'-way *n.* कमानीचा रस्ता *m*.

Arch ( ärch ) [ Gr. *arche*, power or rule. ] *a.* धूर्त, गुंडा, गुंड, बाट (*obs.*). २ rather in a mischievous sense विनोदी, मस्कऱ्या, हंडीबाग, थ(ट्ठे)ट्टेखोर, थ(ट्ठे)ट्टेबाज. ३ लुच्चा, अट्टल, बिलंद, बिलंदी, इरसाल used of knaves and rogues, and with the sense of atrocious, monstrous, thoroughbred &c., arrant. Arch'ly *adv.* ( v. A. ) धूर्तपणें, थट्टेनें, विनोदानें, विनोदपूर्वक. २ लुच्चेगिरीनें. Arch'ness *n.* ( v. A. ) धूर्तपणा *m*, कावेबाजी *f*, &c., थट्टेखोरी *f*, थट्टेबाजी *f*.

*N. B.*—Arch meaning धूर्त is now used mostly of women and children.

Arch ( ärch ) [ Gr. *archein*, to begin.] *a.* मुख्य, अग्र, श्रेष्ठ, प्रधान, वर *in comp.*, अग्र्य. २ पहिल्या प्रतीचा; as, A. bishop, A. priest, A. angel, &c. [Arch'-enemy *n.* महाशत्रू, कट्टाशत्रू, सैतान. Arch'-foe *n.* same as A. enemy. (विशेषतः) सैतान. Arch'-fiend *n.* (महा) सैतान, पिशाचाग्रणी. Arch'-flā'men *n.* मुख्य बिशप, मोठा बिशप. Arch'he'resy *n.* कट्टें पाखंडमत. Arch'-he'retic *n.* अट्टल पाखंड्या. Arch'mock' *n.* कुस्करी *f* कमालीची थट्टा. Arch'pī'rate *n.* चांचे लोकांचा नायक. Arch'-pō'et *n.* महाकवि. Arch'-prel'ate *n.* मुख्य बिशप. Arch'-priest' *n.* मुख्य धर्माधिकारी. Arch'-trait'or *n.* अट्टल-पुरा विश्वासघातकी, महाराजद्रोही. हा शब्द ख्रिस्ताचा विश्वासघात केलेल्या जूडास इस्कारिएट ह्याला मुख्यत्वेंकरून लावतात.

Archæology ( ärk-e-ol'oj-i ) [ Gr. *archaios*, ancient, *arche*, beginning, & *logos*, discourse. ] *n. ancient history generally; systematic description or study of antiquities* फार प्राचीन इतिहास *m*, फार प्राचीन वस्तूंचें वर्णन *n*. २ *the scientific study of the remains and monuments of the prehistoric period* पुराणवस्तुशास्त्र *n*, पुरातनवस्तुशास्त्र *n*, पुरातनकालीन लोकांविषयींचें त्या काळच्या सध्यां उपलब्ध असलेल्या वस्तूंवरून ज्ञान मिळविण्याचें शास्त्र *n*; as, The closing epoch of geology is that in which archæology has its beginning. Archæolog'ic,-al *a.* प्राचीनकालिकज्ञानासंबंधीं-विषयक, प्राचीनवस्तुशास्त्रासंबंधीं. Archæolog'ically *adv.* Archæol'ogist *n.* see Archæologian. Archæologian *n.* प्राचीनकालिकज्ञान *n*-विद्या *f*-इत्यादिकवेत्ता, पुराणवस्तुशास्त्रवेत्ता *m*.

*N. B.*—Archæology शब्दाचा सध्यां प्रचारांतील अर्थ पुढील प्रमाणें आहे. Archæology=शिलालेख-जुनीं देवालयें-जुन्या पोथ्या व ग्रंथ वगैरेंचा अभ्यास.

Archaic,-al ( ärk-ā'ik,-al ) [ Gr. *archaios*, ancient.] *a.* जुन्या पद्धतीचा, पुरातन, प्रचारांत नाहीं असा, आर्ष,

ऋषिकाळाचा. Ar'chāise *v. t.* जुन्या पद्धतीची किंवा ह्म-णीची नक्कल करणें. Archā'ism *n.* जुन्या पद्धतीचा शब्द *m*-ह्मण *f*, जुनी चाल *f*.

Archangel ( ärk-ān'jel ) *n.* उच्चवर्गांतील देवदूत *m*, सर्वांत श्रेष्ठ देवदूत *m*. Archangel'ic *a.* प्रधानदूतासंबंधीं.

Archbishop ( ärch-bish'up ) [ *Arch*, chief, & Bishop.] *n.* मुख्य धर्माध्यक्ष *m*, मुख्य बिशप *m*. Archbish'opric *n.* मुख्य धर्माध्यक्षाचा अधिकार *m*-पद *n*, मुख्य बिशपी *f*.

Archdeacon ( ärch-dē'kn ) [ Arch, *chief*, & Deacon. ] *n.* मुख्य धर्माध्यक्षाचा-बिशपचा साहाय्यकारी *m*, मुख्य डीकन. Archdeac'onry *n.* बिशपच्या साहाय्यकाऱ्याचा हुद्दा *m*, त्याचें राहण्याचें ठिकाण *n.* किंवा त्याच्या अधिकारांतील प्रदेश *m*. Archdeac'onship *n.* बिशपच्या साहाय्यकाऱ्याचा हुद्दा *m*, मुख्य डीकनी.

Archduke ( ärch-dūk' ) [ Arch, chief, & Duke.] *n.* आस्त्रिया देशाच्या राजपुत्राची पदवी *f.* २ वरिष्ठ प्रतीचा ड्यूक *m*. Archdū'cal *a.* Archduch'ess *n. fem.* आस्त्रिया देशांतील राजपुत्राची पत्नी *f.* २ आस्त्रियाच्या राजाची कन्या *f.* ३ वरिष्ठ प्रतीच्या ड्यूकाची बायको *f.* Archduch'y, Archduke'dom *n.* आस्त्रिया देशांतील राजपुत्राची पदवी *f.* २ त्याच्या हाताखालचा प्रदेश *m*. ३ वरिष्ठ प्रतीच्या ड्यूकाच्या अमलांतील मुलूख *m*.

Archegonium (är-kē-gō'ni-um) *n.* स्त्रीपिंड *m. bot.* स्त्रीरेणुकोश, अपुष्पवनस्पतिस्त्रीपिंड *m*. Also Archegonia.

Archer ( ärch'er ) [ L. *arcus*, a bow. ] *n.* तिरंदाज *m*, धनुर्विद्येंत निपुण असणारा *m*, तिरकमठ्या *m*, तीरकमान्या *m*, तिरकमठेवाला *m*, धनुर्धर *m*, धनुर्धारी *m*, धनुष्मान् *m*, धन्वी *m*. Arch'eress *fem.* Arch'ery *n.* धनुर्विद्या *f*, तिरंदाजी *f.* [ Skilled in A. तिराईत. ] २ धनुर्विद्येंतील नैपुण्य *n*. ३ शरासन *n*, बाणविसर्जन *n*, शराभ्यास *m*, धनुर्विद्येचा अभ्यास *m*. ४ तिरंदाज लोक ( समुदायवाचक नाम ). Fence for the arm in A. practice गोधा *f.* Glove for the fingers in A. practice अंगुलित्राण *n*.

Archetype ( ärk'e-tīp ) [ Gr. *arche*, beginning, & *typos*, form.] *n.* मूल(ळ) *n*, मूळप्रत *f*, असल used with the noun required, मूळ नमुना *m*. २ आदिरूप *n*. Archetyp'al *a.*

Archimedean ( ärk-i-me-dē'an ) *a.* आर्किमेडिसासंबंधींचा, आर्किमेडीस हा एक मोठा ग्रीक गणिती होता. A. screw *n.* आर्किमेडीसनें शोधून काढलेलें पाणी ओढण्याचें मळसूत्री यंत्र *n.* Principle of Archimedes कोणत्याहि पातळ पदार्थांत बुडविलेली वस्तु वजन केली असतां त्या वस्तूनें बाजूला सारलेल्या पातळ पदार्थाच्या वजनानें कमी भरते हें आर्किमेडिसनें शोधून काढलेलें तत्व *n*.

Archipelago ( ärk-i-pel'a-gō ) [ Gr. *archi*, chief, & *pelagos*, the sea. ] *n.* प्रथम ग्रीस व आशियामैनॉर यांमधील ईजिअन समुद्रास ही संज्ञा होती. यांत लहान लहान अशीं पुष्कळ बेटें आहेत. यावरून ज्या समुद्रांत पुष्कळ बेटें आहेत अशा समुद्रास ती संज्ञा लावतात. द्वीपसंग्रह *m*, द्वीपसमूह *m*. Archipel'agoes *pl.* Archipelagic *a.*

Architect ( ärk'i-tekt ) [ Gr. *archi*, chief, & *tekton*, a workman. ] *n.* घरांचा नकाशा वगैरे काढून तीं बांधित असतां त्यावर देखरेख करणारा, शिल्पशास्त्री (?) *m*, शिल्पकार (?), शिल्पशास्त्रज्ञ (?) *m*, गृहशिल्पी *m*, घरबेत्या (R) *m*, गृहांकनकर्त्ता *m*, गृहनिर्मितीवेत्ता *m*, इमारतशास्त्र जाणणारा. २ योजणारा, घडणारा. ३ कर्त्ता; as, Man is the A. of his own fortune. Architecton'ic *a.* Architect'ural *a.* गृहशिल्पासंबंधीं-अनुरूप, &c., गृहशिल्पीय, गृहादिनिर्माणविद्येसंबंधीं-विषयक. A. drawing शिल्पगतचित्र, शिल्पीनकाशा. Architect'ure *n.* इमारतशास्त्र *n*, इमारतकाम *n*, इमारतकामाचें शास्त्र *n*, गृहशिल्पशास्त्र *n*, घर वगैरे इमारत बांधण्याची विद्या *f*, गृहादिनिर्माणविद्या *f*, वास्तुविद्या *f*.

*N. B.*—See our note on the word Artist.

Architrave ( ärk'i-trāv ) [Gr. *archi*, chief, & L. *trabs*, a beam.] *n.* रोमनडारिक खांबाच्या फ्रेमच्या खालचे पहिलेच दोन थर (या दोन थरांना अपर फेसिया व लोअर फेसिया असें ह्मणतात). Arch'itraved *p. a.*

Archives ( ärk'īvz ) [ Gr. *archeion*, a government building.] *n. pl.* दफ्तरखाना *m*, दफ्तर *n*, राजकार्यलेखरक्षणस्थान *n*. २ ऐतिहासिक पुराव्याचे कागदपत्र *m*, दफ्तर *n*, सरकारी जुने लेख *m. pl.* Arch'ival *a.* Arch'ivist *n.* दफ्तराचा रक्षक *m*. २ दफ्तरदार *m*.

Archivolt ( är'ki-volt ) [ L. *arcus*, an arch, & *volta* a vault. ] *n. archit.* कमानींतील गलथा *m*.

Archon ( ärk'on ) [ Gr. *archein*, to be first. ] *n.* पुरातन ॲथेन्स शहरांतील दिवाणी *f*-फौजदारी *f*-व धर्मसंबंधीं कामावर देखरेख करणाऱ्या नऊ मुख्य अधिकाऱ्यांपैकीं एक; विशेषेंकरून त्या नवांपैकीं पहिला. Arch'onship *n.* वरील अधिकाऱ्याचा हुद्दा *m*. Arch'ontate *n.* वरील अधिकाऱ्याच्या नोकरीची मुदत *f.*

Arctation (ärk-tā'shun) [L. *arctus*, shut in, narrow.] *n. med.* बद्धकोष्ठता *f*, (धमनीच्या पोकळीचें) आकुंचन *n*, (गुदादिद्वाराचा) संकोच *m*, अपत्यपथाचा ( vagina ) संकोच. See the word Vagina.

Arctic ( ärk'tik ) [ Gr. *arktos*, a bear. ] *a.* उत्तरध्रुवाचा, उत्तरध्रुवाकडील, उत्तरध्रुवासंबंधीं, उत्तरकेंद्रीय. A. circle उत्तरध्रुववृत्त.

Arcturus ( ärk-tū'rus ) [ Gr. *arktos*, a bear, & *oura*, a tail.] *n. astron.* स्वातीनक्षत्र *n*.

Arcuate (är'kū-āt), Arcuated (är'kū-āt-ed) [ L. *arcus*, a bow. ] *a. bot.* धनुष्याकृतीचा, कमानदार, धन्वाकार. Arcuā'tion *n.* कमानदार-धन्वाकार करणें.

Ardent ( ärd'ent ) [ L. *ardere*, to burn. ] *a. glowing* जलाल, कडक, चणचणीत. २ *fierce* उष्ण, तलख, तलखल्या, जलाल, जहाल ( झाल ), चंड, प्रचंड, तीव्र,

तीक्ष्ण, खंदा, खमशा. ३ *eager* उत्साहाचा, उत्साही, सोत्साह, हौसदार, उत्सुक, उत्कंठित, उत्साहवान्, धजदार. ४ कळवळ्याचें. ५ सतेज, विस्तवासारखा चकाकणारा. A. spirits व्हिस्की, ब्रँडी, वगैरे. Ard'ently *adv.* कडकडून, कडकावून, जहालीनें, तलखीनें. २ उत्सुकतेनें, उत्साहपूर्वक, उत्कंठेनें, हौशीनें, कळवळ्यानें. Ard'our, Ard'ency, Ard'entness *n.* आंच *f*; दाह *m*, तलखाई *f*; तलखी *f*; संताप *m*, प्रखरता *f*. २ आग *f*; तलखी *f*; जहाली *f*; गरमी *f*; गुरमी *f*; आवेश *m*, हांव *f*; तीव्रता *f*; तीक्ष्णता *f*. ३ उत्साह *m*, उत्साव *m*, हांव *f*; हौस *f*; उत्कंठा *f*; औत्सुक्य *n*, उत्सुकता *f*; प्रोत्साह *m*, हर्ष *m*, उल्हास *m*, कळवळा *m*. Sudden impulse of A. हुरूप *m*, हुरशी *f* ( v. ये, चढ, सुट, धर ).

Arduous ( ärd'ū-us ) [ L. *arduus*, high. ] *a.* दुर्घट, कठीण, दुष्कर, दुःसाध्य, जबर, श्रमसाध्य. ( A. task or employment). Ard'uously *adv.* श्रम घेऊन, कष्ट करून, आयासपूर्वक, प्रयत्नतः. Ard'uousness *n.* (v. N. I. ) दुर्घटता *f*; दुःसाध्यता *f*; दौष्कर्य *n*, श्रमसाध्यता *f*.

*N. B.*—An arduous undertaking calls for an ingenious mind and a patient persevering spirit and especially some loftiness of aim.

Are (är) To be या क्रियापदाचें वर्तमानकाळीं अनेक वचन.

Are ( är ) *n.* फ्रान्सदेशांत औरस चौरस शंभर मीटरचे क्षेत्रास हीं संज्ञा आहे, १०७६·४४ चौरस फूट किंवा १०० चौरस मीटरचें एक फ्रेंच माप *n*.

Area ( ā'rē-a ) [ L. *area*, a thrashing floor.] *n. geom.* क्षेत्रफळ(ळ) *n*, गर्भ *m*, गर्भी *f*; गर्भा *m*, गाभा *m*, मधगर्भ *m*, मधगर्भी *f*; अभ्यंतर *n*. २ अंगण *n*, क्षेत्र *n*, मैदान *n*, मोकळी जागा *f*. ३ *math.* अवकाश *m*, क्षेत्र *n*, क्षेत्रफळ *n*. Superficial A. पृष्ठक्षेत्र.

Areca ( ar'ē-ka ) *n. bot.* ताडाची एक जात *f*; सुपारीचें झाड *n*. A. nut सुपारी.

Arefy ( ār'ē-fi ) [ L. *arere*, to be dry, & *facere*, to make.] *v. t.* सुकविणें, वाळविणें. Arefac'tion *n.* (*obs.*)

Arena ( a-rē'na ) [ L. *arena*, (*lit.* ) sand, a sandy place. ] *n.* रंगभूमि *f*; रंगांगण *n*, रंग *m*, रोमन नाटकगृहांतील मध्यावर रेती टाकलेली व कठडा घातलेली अशी जागा *f*. २ Any place of public contest or exertion, any sphere of action अंगण *n*, विक्रमभू *n*, विक्रमांगण *n*, पटांगण *n*, आखाडा *m*; as, The arena of debate. ३ चौक *m*, हौदा *m*, मल्लभू *f*; तालीमखाना *m*. Arenā'ceous, Arenā'rious, Arē'nōse *a.* रेताड, रेतीचा. २ *bot.* मरुस्थित, मरुद्भव. Arenā'tion *n. med.* वाळूची ऊब देणें *n*, वाळूची पोथंडी *f*.

Areola ( a-rē'o-la ) *n. bot.* काळा वाटोळा डाग *m*. *physiol.* (स्तनाचें) काळें बोंड *n*.

Areometer ( ā-re-om'e-tėr ) [ Gr. *araios*, thin, & Meter. ] *n.* see Hydrometer.

Areopagus (ar-e-op'ag-us) [ Gr. *areios pagos*, hill of Ares.] *n.* ॲथेन्स शहरांतील प्राचीन न्यायसभा *f*. (या नांवाच्या टेंकडीवरून हें शहराचें नांव पडलें आहे). २ कोणतीहि मुख्य न्यायसभा, हायकोर्ट.

Argent ( ärj'ent) [ L. *argentum*, silver. ] *a.* रुप्याचा, रुप्यासारखा चकचकीत. A. *n.* सफेतपणा *m*. २ दिसण्यांत रुप्यासारखी वस्तु *f*-रुपें. Argent'al, Argentif'erous *a.* रजतात्मक, रजतोत्पादक. Ar'gentine *a.* Ar'gentite *n.* *mineral* चांदीची अशोधित धातु *f*. Ar'gentous *a. bot.* रौप्यवर्ण, रुपेरी.

*N. B.*—L. *argentum* शब्दाशीं Sk. रजत शब्दाचा एकोत्पत्तिसंबंध असावा असें वाटतें.

Argil ( är'jil ) [L. *argilla*, white clay.] *n. min.* कुंभार(री)माती *f*; पांढरी माती *f*. Argillā'ceous *a.* Argillous *bot.* पंकज, पंकिल, कुंभारमातीचा. Argillif'erous *a.* पुष्कळ पांढरी माती असणारा.

Argive ( ar'jīv ) *n.* ग्रीसमधील ऑर्गोस्चा रहिवाशी, प्राचीन ग्रीस देशांतील रहिवासी(शी).

Argo ( är'gō ) *n. myth.* एक कल्पित गलबत *n*. Argonavis *astron.* नौका *f*. दक्षिणाकाशस्थित एक मोठा तारकपुंज *m*. [घटक *m*.

Argon ( ar'gon ) *n.* हवेंतील नवीन शोधून काढलेला एक

Argonaut ( är'go-nawt ) [ Gr. *argo*, & *nautes*, a sailor.] *n.* ग्रीक दंतकथेंत जेसनबरोबर आर्गो ह्या गलबतांत सोनेरी लोकरीच्या प्राप्तीसाठीं प्रवास करावयास गेलेला मनुष्य *m*. Argonaut'ic *a.* [बारकस.

Argosy ( är'go-si ) *n.* मोठें व्यापारी गलबत *n*, महागिरी,

Argue (ärg'ū) [L. *argutare*, to prove.] *v. i. dispute, debate* (with, *against*, *for*, *with*, *about*) वादविवाद करणें, भवति न भवति करणें, वाग्युद्ध *n*. करणें, चर्चा *f*-वाद *m*-विवाद *m*-वादविवाद *m*-बोलाचाली *f*-तकरार *f*-&c. करणें. [ To A. DEVIOUSLY, WILDLY आडरानांत शिरणें. To A. idly, FRUITLESSLY, VAINLY काथा *m*-ताग *m*-कथील *n*-कुटणें, काथाकूट *f*-कथिलकूट *f*-तागाकूट ( *obs.*) *f*-कडाकूट करणें ]. A. *v. t. discuss, debate, agitate* घाटणें, घोळणें, मंथणें or मथणें (R), घासणें, कुटणें, खल *m*-करणें *g. of o.*, घोटणें, वाटणें, वाटावाट-वाटाघाट *f*-घोळ *m*-घालघोळ *m*-&c. करणें *g. of o.*, आलोडन *n*-मंथन *n*. करणें *g. of o.* २ *prove, evince, shew* सिद्ध करणें, प्रमाण दाखवणें, दाखवणें, दर्शवणें, सुचवणें, (चा) प्रमाण-प्रमाणभूत असणें, पुरावा *m*. आणणें, लक्षण *n*-चिह्न *n*. असणें *g. of o.* with in. con., भावदर्शक असणें. ३ दाखविणें; as, His conduct argued treachery. ४ अटकळ बांधण्यास पूर्ण जागा देणें, दर्शवणें; as, The gems which argued her a Queen. ५ कारणें पुढें आणणें, कारणें आणून हरकत घेणें. ६ पूर्वपक्षाचा व उत्तरपक्षाचा विचार करणें, साधक बाधक प्रमाणांचा विचार करणें; as, To argue a case before a judge. Arg'ūable *a.* वाटाघाट करण्यास-विचार करण्यास योग्य. Arguing *pr. p.* Argued *pa. p.* Argued *a.* ( v. V.

T. 1.) घाटलेला, घोळलेला, &c., आलोडित, मथित. Arg'ūer *n.* ( v. V. I. ) वाद-विवाद-&c. करणारा, वादी (वादी now restricted to plaintiff ), वाद्या, वादकर्त्ता, विवादकर्त्ता. Arguing *n.* ( v. V. T. 1. )—*act.* घाटणें *n*, घोळणें *n*, &c., घाटाघाट *f*, घालघोळ *m*, घोळ *m*, वाटाघाट *f*, कुटाकूट *f*, कुटाकुटी *f*, घसघस *f*, घर्षण *n*, आलोडन *n*, मंथन *n*, मथित *n*, वाटींव (*poe.*) *f*, खाराखीर *f*, प्रघट्टन *n*. २ ( v. V. I. )—*act. argumentation* वादविवाद *m*, वाद *m*, विवाद *m*, वाग्युद्ध *n*, बोलाचाली *f*, बोलाबोली *f*, कडाकूट (?) *f*, तकरार *f*, विप्रतिपत्ति (?) *f*. [ EMPTY OR IDLE A. काथाकूट *f*, कथीलकूट *f*, तागकूट *f*. INCONCLUSIVE A. अनुपपत्ति *f*. LINE OF A. प्रमाणपरंपरा-सरणी, तर्कपरंपरा. NOISY, &c. A. नादवाद *m*, झंगड *f*, लाताळें. TO GET WARM OR ANIMATED IN A. आवेशास-भरांत येणें ]. Arg'ūment *n.* कारण *n*, हेतु *m*, सबब *f*, कोटी *f*, तकरार *f*, प्रमाण *n*, प्रमाणसरणी *f*, मुद्दा *m*, साधकप्रमाण *n*, साधन *n*, उपोद्घात *m*, कोटि *f*. लेखाचा-संवादाचा विषय-वस्तु *f*, पक्ष *m*. [ TO ADDUCE AN A. कारण-प्रमाण पुढें आणणें-देणें]. २ (of a reasoning ) विषय *m*, पक्ष *m*, प्रमेय *n*, हेतु *m*, वादहेतु *m*, वादास्पद *n*. ३ *contents, heads* अनुक्रमणिका *f*, पूर्वपीठिका *f*, उपोद्घात *m*, ग्रंथविषय-समाहारसूचि. ४ वादविवाद *m*, स्वपक्षसमर्थक भाषण-लेख *m*. [ To make the most of a bad A. कशीतरी संपादणी करणें ]. Argument'able *a.* वादविवाद करण्याजोगा. Argument'al *a.* ( belonging or relating to A. ) वादविवादासंबंधीं, वादविवादाचा, विवादविषयक. Argumentā'tion *n.* वादविवाद *m. philo.* हेतूपन्यास. Argument'ative ( consisting of A. ) *a.* वादात्मक, तर्कशास्त्रास अनुसरून असणारें, वादाचा, विवादरूपविषयक, विवादात्मक, उपपत्तीचा, उपपत्तिसंबंधीं, वादार्थक, उपपत्तिविशिष्ट. २ *fond of A., Disputatious* वितंडवादी, वादरत, वादेली, तकरारी. Argument'atively *adv.* Argument'ativeness *n.* see Argumentative वादात्मकता *f*, &c. To argue a man into different opinions पुष्कळ दाखले देऊन नवीन मतें स्वीकारवणें. To A. out प्रमाणानें किंवा वादविवादानें सिद्ध करणें, शाबित करणें. To argue ( a person ) out of his opinions पुष्कळ दाखले देऊन त्याचीं मतें सोडायला लावणें. To argue away a certain point पुष्कळ प्रमाणें आणून एखादा मुद्दा उडवून देणें.

*N. B.*—वर दिलेले Argue ह्या सकर्मक व अकर्मक क्रियापदाचे बहुतेक अर्थ आजपर्यंतच्या कोशकारांना मान्य असे आहेत. Latin *argutare*=सिद्ध करणें, ह्या धात्वर्थ देऊन नंतर शब्दाचे रूढ अर्थ दिले आहेत. Argue ह्या शब्दाचें मूळ शोधण्याकरितां L. *argutare* ह्या शब्दाच्या पलीकडे आपण थोडेसे गेलों तर *argutus*=स्पष्ट ह्या धातूंत तें सांपडेल व ह्याच धातूच्या अनुसंधानानें जर Argue शब्दाचा आपण अर्थ केला तर साधकबाधक प्रमाणांनीं एखादा मुद्दा "स्पष्ट करणें" असा मूळ अर्थ निघतो. Argue ह्यालाच विवेचन करणें, वादांत उत्तर प्रत्युत्तर करणें, युक्ति लढविणें, हेही रूढ अर्थ आहेत.

सध्याच्या चालू मराठी भाषेंत विप्रतिपत्ति हा Argument against ह्या अर्थीं व उपपत्ति हा Argument for ह्या अर्थीं वापरतात. TO MAKE THE MOST OF A BAD A. आपत्पुरवणी *f* करणें.

Mr. Candy gives लाघाळ as the rendering of "line of argument." In our opinion लाघाळ means prolixity of argument. परंपरा, सरणी, पद्धति, will be very accurate words for line ( of argument ).

We shall give renderings of the following in our Appendix of Latin and French quotations at the [end.

1. Argumentum ad hominem.
2. Argumentum ad ignorantiam.
3. Argumentum ad invidiam.
4. Argumentum ad judicium.
5. Argumentum ad verecundiam.
6. Argumentum baculinum.
7. Argumentum per impossibile or reductio ad [absurdum.

Argufy ( ärg'ū-fī ) [ Illiterate corruption of Argue. ] *v. i.* पुरावा असणें with *g. of o.* २ (च्या संबंधानें) सूचित करणें, दर्शित करणें. ३ वादविवाद करणें. A. *v. t.* चिकाटीनें वादविवाद करणें.

Argus ( ärg'us ) [ Gr. *argos*, bright. ] *n. myth.* ग्रीक पुराणांतील शताक्ष, याला जुपिटरा (ग्रीक लोकांचा देवराजा) ची पत्नी जूनो हिनें ईओच्या पहाऱ्यास ठेविला होता. २ दक्ष मनुष्य *m*. ३ बारीक तपास करणारा. Argus-eyed *a.* दक्ष, सावध, अतिलक्ष ठेवणारा.

Arhizous ( ā-rī'zus ) *a. bot.* निर्मूल, अ-मूल.

Arid ( ar'id ) [ L. *aridus*, dry. ] *a. adust, parched, and dry* ( of a country, &c. ) रखरखीत, रुक्ष, उदास *pop.* रुखा, भुकिस्त, जलशून्य, निर्जल (प्रदेश), जलरहित. २ *dry and meagre* ( of soil ) धापड, उखर, निखरड, निपराळ, भुकाड, निपळवट, जलशून्य, जलरहित, भरड. Arid'ity, Ar'idness *n.* ( v. A. 1. ) रखरखीतपणा *m*, रखरखाट *m*, रुखेपणा *m*, रौक्ष्य *n*, रुक्षता *f*. २ उखरपणा *m*, निखरडपणा *m*-&c., जलराहित्य *n*, निर्जलता *f*. ३ मनोरंजकतेचा अभाव *m*.

Aries ( ā'ri-ēz ) [ L. ] *n. the first of the signs of the zodiac* मेष *m*, मेषरास *f*. The first point of A. मेषसंपात.

Aright ( a-rīt' ) [ L. *a*, pref. & *rectus*, straight.] *adv. rightly* नीट, व्यवस्थेशीर, बरोबर.

Aril, Arillus ( ar'il, a-ril'lus ) [ Low L. *arillus*. ] *n. bot.* कवच *n*, अधिभोग *m*, विशेष बीजाच्छादन *n*, उपबीजस्थंडिल *m*. Also Arillode. The Arillus proceeds from the placenta; the Arillode from the exostome as in Mace. Ar'illary, Ar'illated *a.*

Arise ( a-rīz' ) [ Pref. *a*, up, out, & Rise.] *v. i. rise* (अंथरुणावरून) उठणें, वर येणें, उदय *m*. पावणें, उदय *m*. होणें *g. of s.* २ *proceed, issue, spring, flow* निपजणें, उद्भवणें, उत्पन्न होणें, येणें, सुटणें, निघणें. ३ दिसूं लागणें.

४ उद्युक्त-प्रवृत्त होणें. ५ नीच स्थितींतून वरच्या स्थितींत येणें. Arose *pa. t.* Arisen *pa. p.*

Aristate (a-ris'tāt) [L. *arista*, an awn.] *a. bot.* तृणफलशूक असलेलें, फोल-पळींज असलेला. Arista *n. bot.* तृणफलशूक *n*, धान्यावरचें शूक *n*, शूक *n*.

Aristocracy (ar-is-tok'ras-i) [Gr. *aristos*, best & *kratos*, power.] *n. government by nobles* उमरावांच्या सत्तेचें राज्य *n*, बडे लोकांचें प्रभुत्व *n*, श्रीमंतांचा अंमल *m*, महाकुलीनाधिपत्य *n*. २ *body of nobles* बडे लोक *m. pl*, अमीर उमराव *m. pl*, खानदानीचीं माणसें *m. pl*, महाकुलीनसमूह *m*, पिढीजाद बडे लोक *m. pl*, महाजन *m. pl.* Also Aristarch'y [R]. Aristocrat *n.* महाजननिष्ठ *m*, उमरावांची बाजू धरणारा. २ उमरावी चालीनें चालणारा, सामान्य लोकांस तुच्छ समजणारा, अरेराव. ३ उमरावानुयायी, उमरावभक्त. Aristocrat'ic,-al *a.* (v. N.) बडे लोकांचा, अमीरउमरावांचा, महाकुलीनाधिपत्यासंबंधीं-विषयक, महाजनासंबंधीं. २ उमरावी, दरबारी, डामडौली, उद्धट, गर्विष्ट, उर्मट. Aristocrat'ically *adv.* उद्धटपणानें, डौलानें, अरेरावीनें, खानदानीपणानें. Aristocrat'ism *n.* Aristocratic quarters श्रीमान् मंडळी रहाण्याची जागा. A. airs श्रीमंती डौल. *N. B.*—In modern English, Aristocracy signifies the upper classes, raised above trades and professions, and not only the nobility who hold patents of peerage. Gr. *Kratos*=Sk. क्रतु. (?).

Arithmetic (ar-ith'met-ik) [Gr. *arithmos*, number.] *n.* अंकगणित *n*, अंकविद्या *f*, गणनविद्या *f*, हिशोब *m*, गुणांकभागोत्री (R) *f*, पाटीगणित (*obs.*) *n*. A.—gener. or loosely गुणांकभागोत्री (R) *f*, हिशेबठिशेब *m*, खांजण्याभांजण्या *f. pl.* A. of fractions अपूर्णांक गणित *n*. A. of integers पूर्णांकगणित *n*. A. of known quantities व्यक्तगणित *n*. A. of unknown quantities अव्यक्तगणित *n*. A book of A. अंकगणिताचें पुस्तक *n*. Book of sums and questions मेस्तक *n*. Operation in A. with an assumed number इष्टकर्म *n*. The eight rules of A. परिकर्माष्टक *n*. These are *addition, subtraction, multiplication, division, raising to the square, extracting the square-root, raising to the cube, extracting the cube-root* संकलन *n*, व्यवकलन *n*, गुणन *n*, भाजन *n*, वर्ग *m*, वर्गपद *n*, घन *m*, घनपद *n*. [or *pop.* मिळवणी *f*, वजावाकी *f*, गुणाकार *m*, भागाकार *m*, वर्ग *m*, वर्गमूळ *n*, घन *m*, घनमूळ *n*.]. Arith'metic, Arithmet'ical *a.* गणिताचा, गणिती, हिशेबाचा, हिशोबी, गणितानुगत, गणितानुसार, गणितानुरूप, अंकगणिताविषयीं. Arithmet'ically *adv.* गणिताच्या रीतीनें, हिशेब करून, निर्णयात्मक, निश्चयानें (arithmetically proved). Arithmetic'ian *n.* अंकगणिती *m*, गणित्या *m*, गणक *m*, हिशोबी *m*, अंकविद्यावेत्ता, गणितज्ञ. Arithmetical progression गणितश्रेढि.

Ark (ärk) [L. *arca*, a chest.] *n. small chest* पेटी *f.* २ *naut.* (of Noah) नौका *f*, गलबत *n*.

Arm (ärm) [L. *armus*, the shoulder-joint.] *n.* (from the shoulder-joint to the wrist) बाहु *m*, भुज *m*, हात *m*, बाही *f*.-from the shoulder-joint to the elbow दंड *m*, बाहु *m*, बाहुटा *m*, बाहुदंड *m*, भुजदंड *m*.-from the elbow to the wrist or finger-ends हात *m*. [A. TO A. FIGHTING, &c. हातघाई, दंडादंडी, हाताहाती, बाहुबाहवी *adv.* ARMS AS PINIONED मुसक्या *f. pl.* (*v.* बांध), पिचुं(चों)ड्या *f. pl.* पिचुं(चों)डे *m. pl.* INTERLOCKING OF ARMS AND STRIVING हातझोंबी *f.* LOCKING WITHIN THE ARMS हातकैंची-कचाटी *f.* आंगकवळी *f.* आलिंगन, गाढालिंगन *n* ("locked up in the arms of sleep"). ORNAMENT OF THE A. बाहुभूषण *n*. ROOT OF THE A. बगोटा *m*, बगोटें *n*, बाहुमूल *n*, खुबा *m*, बगडी *vulg. f.* SNATCHING OR SEIZING BY FORCE OF THE A. मूठमर्दाई *f.* STRENGTH OF A. बाहुबल *n*, भुजबल *n*. OF OUTSTRETCHED A. उद्यतबाहु (?), लांब केलेला हस्त. UPPER AND OUTER PART OF THE A. NEAR THE SHOULDER. बाव्हळा or बावळा or बाहुला *m*, बाव्खंड *n*. TO SLAP THE ARMS (IN TOKENS OF READINESS TO FIGHT) बाह्या *f. pl*-भुज *m. pl.* पिटणें-थापटणें, छड्डु ठोकणें, खंब-खांब ठोकणें. TO WHIP UP UNDER THE A. बगलेंत मारणें, काखाटणें.] २ (of a tree) v. Branch खांदा *m*, फांदडा *m*, फांटा *m*, खांदी *f*, फांदी *f*, स्कंध *m*. ३ (of the sea) खाडी *f*, फांटा *m*, (अतिचिंचोळा) फांटा *m*. [ARM OF AN A. OF THE SEA; (*a branch of*) ओहर *m*, खोंची *f*, फांसूं *n*, पोहडी *f*, पोई *f*, पोईड *n*. NAVIGABLE A. तरती खाडी *f.*] ४ (of a garment) बाही *f*, हातपा *m*, हातोपा *m*. ५ (of a mathematical figure) भुज *f.* ६ मुख्य वस्तूपासून फुटणारी शाखा *f.* ७ *fig.* बाजू. ८ *fig.* शक्ति *f*, हात *m*, सामर्थ्य *n*, जोर *m*; as, He is my right arm. At A.'s length अंतरावर. To keep one at A.'s length अतिपरिचय होऊं न देणें. In A.s दोन्हीं बाहूंच्या मध्यें (लहान मुलास घेतात त्याप्रमाणें). Come to my A.s मला तुला कडकडून भेटूं दे, आलिंगन देऊं दे. With open A.s मनापासून, अंतःकरणापासून. In one's A.s पोटाशीं. To know the weight of the A.s of बळपोंची समजणें. Arm-chair *n.* हाताची खुर्ची or खुरशी *f*, भुजांची खुर्ची *f.* Arm'ful *n.* (of grass, sticks) कवल *n*, कवळा *m* dim. कवळी *f*, आडव *f*, वेंग *f.* Arm'-hole *n.* काख *f*, बगल *f*, कक्ष *m*. Tumour in the A. काखमांजरी *f*, मांजरी *f*, काखवळ *m*, वळ *m*. Arm'less *a.* थोटा, बाहुरहित. Arm'-let *n.* लहान दंड, छोटा बाहु *m*. २ बाहूचें संरक्षणार्थ चिलखताचा भाग *m*. ३ बाहुभूषण *n*, कांकण *n*, बांगडी *f*, पोंची *f.* Arm'-pit *n.* See Arm-hole. Arms' reach *n.* हातटप्पा *m*, हाताचा टप्पा *m*. Arm-stall *n.* (of a पट्टा &c.) खोबळा *m*.

Arm (ärm) [L. *arma*, Arms.] *n.* शस्त्र *n*, हत्यार *n*. चिलखत *n*. Arms *n. pl.* लष्करीखातें *n*. २ हत्यारें (हतेरें) *n. pl*, शस्त्रें *n. pl*, शिले-भाले *m. pl*, ढालतलवार

*f.* फौजेचें एक आंग; as, Infantry, cavalry and artillery. [ Lustration of A.s नीराजन *n*, लोहाभिसार *m*. Practice or exercise with A.s शस्त्राभ्यास *m*, शस्त्रव्यवहार *m*, शस्त्रपरिशीलन *n*. Under A.s शस्त्रसज्ज, सशस्त्र, शिल्याभाल्यानिशीं, शिल्याभाल्यासुद्धां. To take up A.s against शस्त्र *n*. धरणें with वर, उठावणें (R), उठावणी *f*-उठावा *m*. करणें]. २ (coat of arms) *escutcheon* &c. कुलमानद्योतकध्वजादि चित्रित चिन्हें *n pl*. Arm *v. i. take arms* सजणें, हत्यारबंदी or हतेरबंदी *f*. करणें, कमरबंदी *f*-कमरबस्ता *m*. करणें, सशस्त्र होणें. A. *v. t. accoutre* हत्यारबंद or हतेरबंद-सशस्त्र-सज्ज-सज्जित-&c. करणें, सज्जन *n*-सज्जना *f*-सज्जीकरण *n*. करणें. २ मजबुती करणें. Ar'mature *n*. चिलखत *n*. Armed *p*. (v. V. T.) हत्यारबंद, हतेरबंद, शस्त्री, शस्त्रपाणि, सायुध, सशस्त्र, सज्ज, सज्जित, सज्जीकृत. Small-arms लढाईंत स्वतः शिपायांस नेतां येण्याजोगीं हत्यारें. A stand of arms एका शिपायाच्या सर्व हत्यारांचा संच *m*. To appeal to arms लढाई करून वादाचा निकाल लावण्याचा निश्चय करणें. To arms लढाईस तयार होणें. To lay down arms शस्त्रें खालीं ठेवणें, शरण जाणें, लढाई बंद करणें. Up in arms उघडपणें बंड करण्याच्या तयारींत. २ रागावलेला. To take up arms युद्ध आरंभिणें.

Armada ( ärm-ā'da ) [ L. *armare*, to arm. ] *n*. लढाऊ गलबतांचा समुदाय *m*, लढाऊ गलबतें *n*, आरमार *n*. इ० स० १५८८ मध्यें एलिझाबेथ राणीबरोबर लढावयास आणलेलें स्पॅनिश आरमार.

Armament ( ärm'a-ment ) [ L. *arma*, arms. ] *n*. फौज *f*, सैन्य *n* (लढाईकरितां तयार असलेलें), लढाईकरितां तयार केलेलें आरमार *n*, फौज *f*, सेनाभार *m*, दलभार *n*. सलतन *f*, सलतनत *f*, फौजबंदी. Light A. सडीफौज.

Armature ( är'ma-tūr ) *n*. चिलखत *n*. २ (लहान झाडांचें रक्षण व्हावें या हेतूनें त्यांभोंवतीं घातलेलें ) कांब्यांचें अथवा तारांचें कुंपण *n*. ३ *magne*. लोहाकर्षणसंरक्षक पट्टी *f*, लोहचुंबकाचीं दोन टोकें (ध्रुव) जोडणारी लोखंडाची पट्टी *f*, लोहखंड *m*.

Armenian (ar-mē'ni-an) *a*. आर्मिनियांतील. A. *n*. आर्मिनिया देशांतील रहिवासी *m*. २ आर्मिनियन लोकांची भाषा *f*. ३ आर्मिनियांतील विशेष खिस्तपंथाचा उपासक *m*. A. bole मुलतानी माती *f*, हुरमूज *f*.

Armilla ( är-mil'la ) [ L. *armus*, the shoulder. ] *n*. कंकण *n*, पोंची *f*, लोखंडाचें कडें *n*. Armillary *a*. *anat*. कंकणाकार. A. sphere कड्यांचें खगोलयंत्र *n*.

Armistice ( ärm'ist-is ) [ L. *arma*, arms, & *sistere*, *stitum*, to stand still. ] *n*. (परस्परसंमतीनें थोडा वेळ केलेली) लढाईची तहकुबी *f*, अल्पकाळापुरता तह *m*, युद्धविश्रांति *f*, तात्पुरता सल्ला *m*.

Armiture ( ärmitūr ) *n*. *bot*. इंद्रियावरील लंव *f*, कांटे *m*, &c.

Armour ( ärm'ur ) [ See Arm 2. ] ( Also spelt Armor. ) *n*. चिलखत *n*, कवच *n*, वर्म *n*, कंचुक *m*, शिला *m*, पेटी *f*, अंगत्राण *n*, संनाह *m*. [ A. OF IRON NETTING OR LITTLE RINGS बकतर *n*, or बक्तर *n*. A. FOR A WAR-HORSE पाखर *f*. A. FOR THE BREAST, &c. *cuirass* उदरत्राण *n*, उरस्त्राण *n*, उरच्छद *m*. A. FOR THE HEAD शिलेटोप *m*, शिरस्त्राण *n*. A. FOR THIGH *cuish* जंघात्राण *n*. PIECE OF A. शिला *m*. CLAD &c. IN A. कवची, सन्नद्ध ]. २ लढाऊ गलबताचा लोखंडी-पोलादी पत्रा *m*. Arm'ourer *n*. चिलखतें करणारा *m*. २ *maker of arms* हत्यारें करणारा, शस्त्रकार, करचकर. ३ *furbisher of arms* शिकलगार *m*, करच (ज) कर, शस्त्रमार्ज, असिधावक. ४ चिलखतें अथवा शस्त्रें दुरुस्त करणारा *m*. ५ चिलखतें आणि शस्त्रें यांवर देखरेख करणारा. Armō'rial *a*. *of or belonging to armour* कवचाचा, कवचासंबंधीं, कावचिक. २ *belonging to the arms of a family* कुलमानद्योतक ध्वजादिचित्रित-चिन्हांचा. Arm'our-bear'er *n*. दुसऱ्याचें चिलखत वाहून नेणारा. Arm'our-plate *n*. लढाऊ गलबताचे अगर किल्ल्याचे वाहेरील बाजूस तोफेच्या गोळयापासून संरक्षण व्हावें म्हणून बसवलेला लोखंडी जाड पत्रा *m*. Ar'mour-plat'ed *a*. बाहेरून जाड लोखंडी पत्रा लावलेलें (लढाऊ गलबत). Arm'oury, Arm'ory *n*. ज्या ठिकाणीं चिलखतें, हत्यारें, व इतर शस्त्रें तयार करतात ती जागा *f*, शस्त्रागार *n*, शिलेखाना *m*. २ शस्त्रें सुरक्षित रहावीं म्हणून तीं ज्या ठिकाणीं ठेवतात ती जागा *f*. ३ जुनीं सर्व हत्यारें व शस्त्रें यांचा संग्रह *m*.

Army ( ärm'i ) [ Fr. *armee*, an armed force. ] *n*. सैन्य *n*, फौज *f*, फौजफांटा *m*, लष्कर *n*. २ सेनाभार *m*, दलभार *m*, कटक *n*, चमू *f*, अनीक *m*, *n*, बल *n*. [ Baggage and followers of an A. बाजारबुणगें *n*, कतवार. Command of an A. सैनापत्य *n*. Commander of an A. सेनापति *m*, सेनाधिपति *m*, सेनाधीश *m*, सेनानायक *m*. Complete A. चतुरंग सैन्य *n*, चतुरंग बल *n*, अक्षौहिणी *f*. Component part of an A. सेनांग *n* ( these are हस्ती, अश्व, रथ, पदाति). Division or corps of an A. सेनाभाग *m*, दस्ता *m*, सेनामुख *n*. Follower of an A. ( suttlers, &c.) सेनाचार, सैनिक. Foreign and invading A. परचक्र *n*. Having a Standing A. फौजबंद ]. २ मोठा समुदाय *m*. A. *a*. लशकराचा, लशकरी, सैनिक, सेनेसंबंधीं. Standing A. स्थायिक सैन्य, खडें सैन्य, पगारी सेना. Arm'y-corps *n*. रणांगणावरील सैन्याचा मोठा भाग *m*. Arm'y-list सैन्याची यादी *f*. या यादींत सर्व शिपायांचीं नांवें, त्यांचे दर्जे व लष्कराचीं ठिकाणें वगैरे सर्व माहिती दिलेली असते.

*N. B.*—For army-corps see Battalion.

Aroma ( a-rō'ma ) [ Gr. *aroma*, spice, sweet herb. ] *n*. सुगंध *m*, परिमल *m*, आमोद *m*, सुवास *m*. २ *fig*. बुद्धीचें कौशल्य *n*, बुद्धीचा प्रभाव *m*, मजा (मझा) *f*, रुचि *f*. Aromat'ic, Aromat'ic-al *a*. सुगंधी, सुवा-

सिक, मसालेदार. Arō'matize *v. t.* सुगंधित करणें, सुवासिक करणें. Arō'mati'zer *n.* सुगंधित-सुवासिक-करणारा.

Around (a-rownd') [*a*, on, & Round.] *adv. in a circle* गरगर(रां), वाटोळें, चक्राकार, गरागर, गरारां, गिरगिर(रां), मंडलवत्, चक्रवत्. २ *on every side* आजूबाजूस, आजूबाजू, चहूंकडे, आसपास, आशींपाशीं, अरसपरस, चौतर्फा, चौगर्द(र्दी), चौफेर, चौरस्तां, भोवतीं(तें), भोवतां, भोवताला, सभोंवता, सभोंवताली, सभोंवतीं, सभोंवर,सभोंवार,दशदिशा, परितः, आसमंतात्, समंततः. A. *prep. about, encircling* आसपास, भोवता, भोवताला, भोवतीं-तें, सभोंवता, सभोंवताला, सभोंवतीं, सभोंव(वा)र.

Arouse (a-rowz') [Pref. *a*, & Rouse.] *v. t.* जागें करणें, (ची) उचल करणें, उठावणी करणें, चेष्टवणें (S), बोध *m*-प्रबोध *m*-&c. करणें *g. of o.*, जागता-जागृत-&c. करणें, चेतवणें. Arous'al *n.* उठावणी *f*; उचल *f*.

Arow (a-rō') *adv.* ओळीनें. २ एकामागून एक.

Arquebuse, Arquebus (är'kwi-bus) *n.* लहान बंदुक *f*.

Arrack (ar'ak) [Ar. *araqa*, to sweat.] *n.* ताडी *f*; माडी *f*; शिंदीची दारू *f*.

Arraign (ar-rān') [L. *ad*, to, & *rationem*, reason.] *v. t.* न्यायसभेसमोर आणणें, दोषारोपाचा जबाब देण्याकरितां कोर्टापुढें उभा करणें. २ दोषारोप करणें, तोहोमत ठेवणें. ३ उघडपणें निंदा करणें. Arraign'er *n.* दोषारोप करणारा *m.* Arraign'ment *n.* दोषारोपाचें कृत्य *n*, दोषारोप *m*.

Arrange (ar-rānj') [L. *ad*, & *rangier*, to range.] *v. t. put in proper order* रांगेनें-ओळीनें-व्यवस्थेनें-बंदोबस्तानें-&c. ठेवणें-मांडणें-&c., योजणें, रचणें, रचना *f*-योजना *f*-&c. करणें *g. of o.*; रेंज पाहणें. २ *adjust, settle* व्यवस्था *f*-बंदोबस्त *m*-तजवीज-&c.-करणें *g. of o.* ३ तोडजोड करणें. A. *v. i.* तोडजोड होणें. Arrange'ment *n.* (v. V. 1.)—*act.* व्यवस्थेनें ठेवणें *n*, &c., रचणें *n*, योजणें *n*, &c., रचना *f*, रचाई *f*, विन्यास *m*, ब(स्त)स्तान *n*, योजणूक *f*, रचणूक *f*, अनुसंधान *n*, प्रतिविधान *n.* २ बंदोवस्त *m*, बंदोबस्ती *f*, व्यवस्था *f.* I *preparatory measure* तजवीज *f*, तरतूद *f*, तोड *f*, युक्ति *f*, अनुसंधान *n.* II तोडजोड *f*, निकाल *m.* III *math.* वर्गीकरण *n*, पाक्षिक विपर्यय *m.* Arrang'er *n.*

Arrant (ar'rant) [L. *errare*, Sk. ऋष्, to wander.] *a.* (used of rogues and villains) अट्ट(ट्ट)ल, (as, अट्टल सोदा, अट्टललबाड, अट्टलचोर, शिनळ-हरामी-&c. or अट्टलसोदा &c.), अलेल (as, अलेल सोदा &c.), बिलंद, एकनिष्ट, झळझळीत, निस्तूक, निपट (महालुचा, महाहरामी, महामात्रागमनी), बिनीचा, बियांचा, (*of the true breed*) अगर्दी, पक्का, पुक्ता, पोक्ता, काढींव or काढाऊ, ऐन (as, ऐनसोदा, ऐन लबाड, ऐन लुचा), गाळींव, सोलींव, एक (as, एकलबाड, एकलुचा, एककाशीकर), इरसाल(र), भटक्या, काफर. Ar'rantly *adv.*

*N. B.*—Arrant हा शब्द Errant (भटक्या) शब्दाचें एक रूपान्तर आहे. आणि "Errant thief" ह्या रूढ शब्दप्रयोगावरून Arrant हाही शब्द "लुचा, सोदा" अशा शब्दांबरोबर वापरण्याचा प्रघात पडला आहे.

Array (ar-rā') [L. *ad*, to, & *rai*, order.] *n. order* रचना *f*, मांडणी *f*, व्यवस्था *f.* २ (of troops) सैन्याची रचना *f*-व्यवस्था *f*, व्यूह *pop.* विहू or विभू *m*, सेनारचना *f.* [A. IN A CIRCLE मंडलव्यूह *m*, चक्रव्यूह *pop.* विहू OR चक्रविभू *m*, सर्वतो भद्र *m. n.*—A. IN SQUARE, सर्वतो भद्र *m*, कोट *m.*—A. IN LINE दंडव्यूह *m*, कोरबंदी *f.* A. IN COLUMN भोगव्यूह *m*, कट *m.* A. IN MIXED ORDER असंहत व्यूह *m.* A. IN DENSE ORDER, GENER. घटाव *m*, कटाव *m*, थट OR थाट *m.* SOME OTHER FORMS OF *Array* ARE बुरूज, शकटव्यूह, मकरव्यूह, पताकाव्यूह, स्कंध] ३ *display* थाट *m*, थाटमाट *m*, घटाव *m*, कटाव *m*, बनाव *m*, आरास *f.* ४ *law* ज्युररलोक *m. pl*, ज्युररांची यादी *f.* Array *v. t. put or set orderly* रांगेनें-क्रमानें-लावणें-बसविणें-रचणें, थाटणें, थटकारणें [R], रचणें, योजणें, प्रसाधणें, प्रतिविधान *n.* करणें. २ *deck* सजणें (*poe.*), सजविणें, (कौशल्यानें) मांडणें. सजना *f*-सज्जीकरण *n.* करणें *g. of o.*, थाटमाट *m.* करणें *g. of o.* ३ (a jury) *call man by man* असामीवार योजणें-बोलावणें. ४ *law* खटल्याच्या चौकशीकरितां ज्युरीस व्यवस्थेनें बसविणें. Arrayer *n.* सज्ज करणारा. २ प्रसाधिक. Array'ment *n.* थाटणें, &c., सज करणें *n*, &c. प्रसाधन *n*, सज्जीकरण *n.* Arrayed *p.* (v. V. 1.) रचलेला, योजलेला, &c., प्रसाधित.

Arrear (ar-rēr') [L. *ad*, to, & *retro*, back, behind.] *n. that which is behind in payment* मुदत टळून राहिलेलें वेतन *n*-काम *n*-भाडें इ०, चढलेला-तुंबलेला-जमलेला-राहिलेला-&c. पगार *m*-वेतन *n*-मुशारा-&c., मागें राहणें *n.* २ *balance unpaid* बाकी *f*, शिल्लक *f*, ठरींव मुदतींत न दिल्यामुळें बाकी राहिलेली रक्कम *f*-काम *n.* (generally in the *pl.*). A. *adv.* मागें, पाठीमागें. In arrears अंगावर बाकी चढलेलें (भाडें *n.*). Arrear'age *n.* see Arrears *n.*

Arrest (ar-rest') [L. *ad*, to, & *restare*, to remain.] *v. t. catch in progress and fix* (धरून) थांबवणें-खोळंबवणें, गतिभंग *m*-गतिस्तंभन *n*-गतिरोध *m*-अटकाव *m.* करणें *g. of o.*, कुंठित करणें, बंद पाडणें. २ (लक्ष्य) आकर्षून घेणें, वेधणें, खेंचून घेणें. ३ *seize by a writ or warrant (law)* सरकारी हुकमानें-वारंटानें-&c. धरणें-पकडणें,आसेध (S) *m*-आसिद्धता(S) करणें *g. of o.*, आसिद्ध करणें. ४ गुंतवणें, निरोध करणें. A. *n.* (v. V.)—*act.* धरून थांबविणें *n*, &c., स्तंभन *n*, निग्रह *m*, गतिस्तंभन *n*, गतिरोध *m*, अटकाव *m.* २-*act.* धरणें *n.*—*stat.* आसिद्धता *f.* ३ *law* वारंटानें धरणें *n*, बंधन *n.* A. of action कार्यप्रतिरोध, कार्यघात *m.* A. of judgment निर्णयनिरोध *m.* Arrest'able *a.* पकडण्यास योग्य. Arrestā'tion *n.* धरणें *n*, धरून थांबविणें *n.* Arrest'ive *a.* थांबवणारा, &c. Arresting *n.* See Arrest. Ar-

rest'ment *n. law* धरलेल्या मनुष्याला तो जामिनावर किंवा इतर रीतीनें सुटा होईपर्यंत केलेला अटकाव. Arrest'or, Arrest'er *n.*

Arrive ( ar-rīv' ) [ L. *ad*, to, & *ripa*, a bank.] *v. i. come to, reach* पावणें, पोहोंचणें, दाखल होणें, लगटणें (?), प्रविष्ट-प्राप्त होणें ( followed by *at* ). [TO BE ARRIVED AND PAUSING येऊन ठेपणें ]. २ यत्नानें संपादणें, साध्य करणें. To arrive at a conclusion कांहीं तरी निर्णय ठरविणें. Arrīv'al *n.* (v. V. 1.)—*act.* येणें *n*, पोहोंचणें *n*, आगम *m*, आगमन *n*. २ प्राप्ति *f.* I *person or thing arrived or to arrive* दाखल झालेलें मनुष्य *n*-वस्तु *f* or दाखल होणारें मनुष्य *n*-वस्तु *f.* Arrīv'ance *n. shakes.* मंडळीचें आगमन *n*. Arriving *n*. See Arrive.

*N. B.*—Things *come* by chance or nature. They *arrive* by previous arrangement; as, The train arrives at a certain place and hour.

Arrogate ( ar'rog-āt ) [ L. *ad*, to, & *rogare*, to ask, or desire.] *v. t. lay claim to, make pretension to* पोकळ अभिमान *m*. धरणें-बाळगणें *g. of o.*, पोस *n*. दाखवणें-मिरवणें-वाढवणें *g. of o.*, स्तोम *n*-करणें *g. of o.*, आढ्यता *f*-बाळगणें-मिरवणें *g. of o.* २ गैरवाजवी हक्क दाखविणें. To A. importance to one's self मोठेपणाचा आव घालणें. Ar'rogance, Ar'rogancy *n.* पोकळ गर्व *m*, अहंकार *m*, वृथा अभिमान *m*, आढ्यता *f*, दर्प *m*, मान *m*, मगरुरी *f*; दिमाख *m*, दिमाखदारी *f*; तोरा *m*, तोरेदारी *f*, उन्माद *m*. Ar'rogant *a.* गर्विष्ठ, गर्वित, अहंकारी, अभिमानी, मगरूर, ओढून चंद्रबळ आणणारा, उर्मट. २ (of things) गर्वाचा, दिमाखाचा, पोकळ-वृथा अभिमानाचा, आढ्यतेचा, &c. Ar'rogantly *adv.* ( v. A.) पोकळ गर्वानें, मगरूरीनें, दिमाखानें, &c., गर्वपूर्वक, अहंकारपूर्वक, वृथाभिमानपूर्वक, &c. Arrogā'tion *n.* (v. V.)—*act.* पोकळ अभिमान धरणें *n*, नसती आढ्यता मिरविणें *n*, आढ्यता बाळगणें *n*, &c., स्तोम *n*, पोम *n*.

Arrow ( ar'rō ) *n.* बाण *m*, तीर *m*, शर *m*, पत्री *m*, सायक *m*, दिशा किंवा प्रवाहगति दाखविण्याचें चिन्ह, शरचिन्ह. [ BLUNT A. बुठणातीर *m*, तुक्का *m*. BOW AND A.s तीरकमठा *m*, तीरकमान(ण) *f.* FEATHER OF AN A. पीस *n*, पक्ष *m*, पुंख *m*, शरपुंखा *f*; पिसारा *m*. FLIGHT OR SHOWER OF A.s शरसंपात *m*, शरजाल *n*, शरवृष्टि *f*, शरवर्ष *m*, बाणजाल *n*. SHOOTING ARROWS बाणविसर्जन *n*, शराभ्यास *m*, शरसंधान *n*. STRUCK BY AN A. शराहत. STRUNG,-AN A. कृतपुंख.] Ar'rowy *a.* बाणासारखी, अणीदार (वस्तु). Arrow-head, Arrow-barb *n.* तिराचें फळ *n*, शरफल *n*, भल्ल *n*, भाल *f.* Arrow-headed *a.* बाणाकार. Arrow-shot *n.* बाणाचा आवांका-टप्पा *m*.

Arrowroot ( ar'rō-rōōt ) *n.* आरारूट *m*, तवकील *n*.

Arsenal ( är'se-nal ) [ Ar. *dar*, house, & *cina*, art or industry. ] *n.* शस्त्रागार *n*, युद्धसामग्री जेथें करतात व सांठवून ठेवतात तें ठिकाण *n*, शिलेखाना *m*.

Arsenic ( ar'sen-ik ) [ Gr. *arsen*, *arsenos*, male-from its powerful qualities.] *n. chem.* रसायनशास्त्रांतील एक मूलद्रव्य (As. परमाणुगुरुत्व ७५), ताल, सोमलांतील धातु *f.* [Yellow sulphuret or sulphide of A. हरताळ. Red sulphuret or sulphide of A. आग्या सोमल, मनसी(शी)ळ. White oxide of A. शंख्या सोमल, फटक्या सोमल]. Arsen'ical *a.* Arsen'icate *v. t.* सोमलाशीं मिश्र होणें. Arsē'nious *a.* तालीय, सोमलाचा, सोमलाची धातु ज्यांत आहे अशी (वस्तु). Arsenious oxide सोमल *m*.

Arson ( ärs'on ) [ L. *arsum*, to burn. ] *n. law malicious burning of a house*, &c. आग लावणें *n*, दुष्टपणानें एखाद्याचें घर-दुकान-इमारत-नौका-वगैरे जाळणें *n*, दुसऱ्याची मिळकत अदावतीनें जाळणें *n*, गृहदाह *m*, अगारदाह *m*, आग घालणें. [आहेस.

Art (ärt) To be ह्या क्रियापदाचें द्वितीयपुरुषाचें एकवचन,

Art ( ärt ) [ L. *ars*, *artis.*] *practical skill guided by rules* कसब *n*, कौशल्य *n*, हुन्नर *f*, कला(ळा) *f. pl.* compreh. or collect. कळाकुसरी *f. pl.* २ *human skill as distinguished from nature* कला *f.* ३ युक्ति *f*, हिकमत *f*, युगत *f.* ४ *cunning, artfulness, trick* धूर्तता *f*, कावा *m*, कावादावा *m*, कावित्र *m. pl.*, छक्केपंजे, डावपेंच, घावडाव, कुलंगडें (?). ५ *secret, contrivance* युक्ति *f*, यलम *m*, घड(डा)मोड (?) *f*; किल्ली *f*; गुरुकिल्ली *f*; कळ *f*, क्लृप्ति *f.* ६ *profession or a skilled trade* कसबी धंदा *m*, पैसा मिळविण्याचें कसब *n*, हुन्नर *f.* ७ *dexterity, expertness, special faculty of some kind acquired by practice* कलाकुशलता *f*, कसब *n*. Arts *pl. ingenious devices* युक्तिप्रयुक्ति *f.* Art'ful *a.* हिकमती, लुच्च्या, कावेबाज, कारस्थानी, कावेखोर, कसबाती (*obs.*). २ *dexterous, clever* कुशल, चतुर. ३ *proceeding from craft* काव्याचा, काव्यादाव्याचा, छक्यापंजाचा. Art'fully *adv.* लुच्चेगिरीनें, डावपेंच करून, खुबीनें, हिकमतीनें, काव्यानें, काव्यादाव्यानें, छक्केपंजे-&c. करून. I *skilfully* युक्तीनें, कसबानें, हिकमतीनें, युक्त्या. Art'fulness *n.* ( v. A. and cunning ) कावेबाजी *f*, धूर्तता *f*, कावेदारी *f.* Art'less *a.* साधा, निष्कपट, भोळा, भावडा, अकपट, निष्कृत्रिम, अकृत्रिम, निष्प्रपंच, अमायी, मनाचा उघळा. Art'lessly *adv.* ( v. A. 1. ) निष्कपटपणानें, निष्कृत्रिमपणानें, भोळेभावानें, भोळेपणानें. Art'lessness *n.* (v. A. 1.) अकृत्रिमता *n*, निष्कपटपणा *m*, निष्कृत्रिमपणा *m*, निष्कापट्य *n*, भोळाभाव *m*, भोळेपणा *m*, भोळाभावार्थ *m*, सरळ भाव *m*. २ साधेपणा *m*, सरळपणा *m*, भावडेपणा *m*, भावडेपणा *m*, &c. Arts'man *n. arch.* कलानिपुण, कलाप्रवीण. Art-un'ions *n. pl.* ललितकलासंवर्धक मंडळया.

*N. B.*—Fine arts ललितकला, विदग्धकला. According to the English idea, the fine arts are five in number—namely, Music (संगीत), Painting (चित्रकला), Sculpture ( खोदकामाची कला, खोदकाम, पाषाणशिल्प, पाषाणकर्म ), Architecture ( इमारतकाम, इमारतशास्त्र, गृहशिल्प ), and

Poetry (काव्य). Mechanical arts हस्तकला, शिल्पविद्या, यंत्रकला. Useful arts उपयुक्तकला, व्यवहारोपयोगी कला. The word "Arts" occurring in B. A., M. A. is according to Chambers "specially used of certain branches of learning to be acquired as necessary for pursuit of higher studies or for the work of life." Therefore in coining a new word for it we may have recourse to the old term वेदांग (the six *vedangas* necessary for the study of the vedas) and on its analogy coin a new word विद्यांग, उपविद्या or उपांगविद्या. उपविद्या is a word rather arbitrarily coined, but it is a small word and will serve the purpose well.

Artery-(är'ter-i) [Gr. *air-ein*, to raise.] *n.* धमनी *f*, नाडी *f*, शीर *f*, शिरा *f*, नाड *f*. २ *med.* शुद्धरक्तवाहिनी *f*, शुद्धवाहिनी *f*. [Hepatic A. यकृतधमनी *f*. Pulmonary A. फुफ्फुसधमनी *f*.]. ३ *fig.* मुख्यमार्ग-रस्ता *m*-साधन *n*. Artēr'ial *a.* धमनीचा, नाडीचा. A. system नाडीचक्र. Artēr'ialise *v. t.* शुद्धवाहिनीचा करणें. Artēriot'omy *n. anat.* धमनीच्छेदन *n*, धमनीमोचन *n*, धमनीच्छेदनविद्या *f*, रक्त काढण्याकरितां शीर तोडणें *n*, धमनीवेध *m*. Arterī'tis *n. med.* धमनीचा दाह *m*.

Artesian (är-tē'zhan) [L. *Artesium.*] *a.* (A. wells) कारंज्याच्या (विहिरी), आर्टीइसी, जमिनींत पाण्याची शीर सांपडेपर्यंत यंत्रानें रंध्र खोदून वर आणलेल्या झऱ्याचे पाण्याच्या (विहिरी); (हें पाणी आंतील जोरानें यंत्रकृत रंध्रांतून वर येतें). ह्या विहिरी फ्रान्सामध्यें आर्टोईस नांवाच्या खेड्यांत प्रथम पाडल्या, व त्यावरून यांस आर्टीसिअन असें नांव पडलें.

Arthritis (ar-thrī'tis) [Gr. *arthron*, a joint.] *n.* Applied generally to any disease involving a joint but more accurately confined to inflammation, acute or chronic, of the structures contributing to the formation of a joint संधिदाह *m*, संधिवात (?) *m*, सांध्यांत दाह उत्पन्न करणारा (रोग) *m*. Arthrit'ic,-al *a.* संधिदाहा(रोगा)संबंधीं. Arthrō'dia *n.* चक्रगतिकसंधि *m*. See ball and socket joint. Arthro'dial, Arthrod'ic *a.*

Arthropyosis (ar-thropi-ō'sis) *n. swelling at the joints* पूयालस *m*.

Article (ärt'i-kl) [L. *artus*, a joint.] *n. thing* जिन्नस *m*, पदार्थ *m*, चीज *f*, वस्तु *f*. [A. OF MERCHANDISE जिन्नस *m*, केणें *n*, वाना(न) *m*. ARTICLE BY A. जिन्नसवार.] २ (as of implements, pieces of apparel, &c. in numbering them.); *item, piece* नग *m*, डाग *m*, डागिणा(ना) *m*, वस्तु *f* (वस्त *f*). ३ *clause, item, point* कलम *n*, रकम *f*, बाब *f*, बाबत *f*, प्रकरण *n*. [ARTICLE BY A. कलमवार]. ४ *condition, term* कलम *n*, संकेत *m*, शर्त *f* (शरत *f*), मुद्दा *m*. TO BE IN THE ARTICLE OF DEATH कंठीं प्राण *m*. येणें-उरणें, तंतीं प्राण *m*. उरणें-लागणें. ARTICLES OF WAR लष्करी कायदे *m. pl*, लष्कराच्या व्यवस्थेकरितां केलेले कायदे. ५ *bot.* कांडें *n*, पेर *n*, ग्रंथि *m*, पर्व *n*. ६ वर्तमानपत्रांतील किंवा मासिक पुस्तकांतील निबंध *m. pl*. ७ *gram.* उपपद; as, *a, an*, and *the* Articles. ८ धर्मश्रद्धेचें कलम. A. *v. t. draw up in articles* कलमबंदी *f*. करणें. २ *bind by articles, law* कसब शिकण्याकरितां करारनाम्यानें बांधून-गुंतवून-&c. ठेवणें. Artic'ular *a. belonging to the joints* पेराचा, पर्वाचा, पर्वासंबंधीं, पर्वनिष्ठ, पार्विक, कांडीय, संधिसंबंधीं, संधिगत, संधिस्थ. २ *bot.* ग्रंथिल, सांध्याचा, सांधलेला. Artic'ularly *adv.* Articles of association गणनियम, मंडळीचे नियम-शर्ती, सामलाती कलमबंदी. A.s of faith विशिष्ट धर्मसांप्रदायाच्या अटी-कलमें, धर्माचीं अनुशासनें, धर्माचे नियम, धर्माचीं आवश्यक बंधनें, धर्माचीं मुख्य लक्षणें. In the article of death मरणसमयीं. Articled-clerk सालिसिटर होण्याकरितां उमेदवार.

Articulate (är-tik'ūl-āt) [L. *articulare*, to furnish with joints.] *a. jointed* सांधलेला, सांधीव, संधियुक्त, संधिविशिष्ट, सांध्याचा. २ *distinct*; (speech) स्पष्ट, साफ, व्यक्त, स्वरित, स्फुट, सुबोध, निर्मल(ळ). ३-of speaker साफ जिभेचा, स्वच्छ वाणीचा, स्पष्टवर्ण, स्पष्टोच्चारक, अस्खलजिव्ह. A. *n.* स्पष्ट बोलतां येणारा प्राणी *m*. A. *v. t. join bones or parts* सांधा *m*-संधि *m*-सांध *f* जोडणें-बसवणें-मिळवणें, सांधणें, सांधपणें. २ *utter words* स्पष्ट बोलणें, उच्चारणें, स्पष्टोच्चार *m*-स्पष्टोच्चारण *n*. करणें. A. *v. i.* स्पष्ट बोलणें. Artic'ulated *p.* see Articulate *a.* Artic'ulately *adv.* (v. A. 3.) स्पष्ट, व्यक्त, स्पष्टोच्चारपूर्वक, स्फुटवचनेंकरून. Artic'ulateness *n.* (v. A. 1.) संधिवैशिष्ट्य *n*, संधिविशिष्टता *f*, सांधलेलेपणा *m*. २ साफी *f*, स्पष्टता *f*, व्यक्तता *f*, स्फुटत्व *n*. Articulā'tion *n. anat. joint* खीळ *f*, सांधा *m*, सांध *f*, संधि *m*, ग्रंथि *m*, चाळा *m*, खुबा *m*. २ *bot. knot* कांडें *n*, पेर *n*, पेरें *n*, पर्व *n*. ३ *distinct pronunciation* स्पष्ट उच्चार *m*. Artic'ulator *n.* स्पष्ट बोलणारा. २ सांधा *m*-संधि *m* जोडणारा.

Artifice (art'i-fis) [L. *ars, artis*, & *facere*, to make.] *n. trick, stratagem* शकल *f*, कसब *n*, पेंच *m*, कुसि *f*, फट *f*, फटवण *f*, डाव *m*, छक्कड (?) *f*, हिल्ला *m*. Artifices *pl. arts, tricks, stratagems, wiles, finesse, chicanery* छक्केपंजे *m. pl*, छकडभेद *m. pl*, पेचपाच or पांचपेच *m. pl*, कातरभेद *m. pl*, शकटभेद *m. pl*, घावडाव *m. pl*, डावपेंच *m. pl*, चकरमकर *f*, चन्नफन्न (*obs.*) *m. pl*, कवाईद *f*, कुडें *n*, कुडेपावडें *n*, गारूड *n*, भानुमती *f* (?), (*obs.*) *pop.* भानामती *f*, गौडबंगाल *n*, चेटक *n*. Artif'icer *n. inventor*, workman हिकमती कारागीर *m*, कल्पक शिल्पकार *m*, कारीगर *m*, कारु *m*, शकल्या शिल्पी *m*, शिल्पोपजीवी.

*N. B.*—See our Note on Artist.

Artificial (ärt-i-fish'yal) *a. made by art, not natural*

कृत्रिम, कृतीचा, करणीचा, कृत्रिमी, केलेला, कृतिजन्य, कृतिसिद्ध, कृतक, यौक्तिक, काल्पनिक. २ *phil.* अप्राकृतिक, अस्वाभाविक. ३ *fictitious* खोटा, कपटाचा, कृत्रिम, अवास्तव, अवास्तविक, चोजलेखोर, कपटी. ४ *not of spontaneous growth* लावणीचा, दिखाऊ, डौली. A. magnet कृत्रिम चुंबक. Artific'ialise *v. t. & v. i.* कृत्रिम (वस्तु) बनविणें. Artificial'ity, Artific'ialness *n.* कृत्रिमपणा *m.* Artific'ially *adv.* (v. A. 1.) करणीनें, कृतीनें, युक्तीनें, मनुष्यकलेनें.

Artillery (är-til'ėr-i) [L. *ars, artis*, art.] *n. ordnance* तोफखाना *m*, तोफा *f pl.* २ *weapons* शस्त्रें *n. pl*, अस्त्रें *n. pl*, फेंकून मारण्याचीं साधनें *n. pl*-हत्यारें *n. pl.* ३ *body of artillery men* तोफखान्याकडील लोक *m. pl*, तोफखाना *m.* ४ गोलंदाजाची विद्या *f.* [No plural]. A. park लढाईच्या तोफा ठेवण्याची जागा *f.* २ घेरा घातला असतां गोलंदाज जेथें जमतात तें स्थान *n.* Artill'erist *n.* गोलंदाजाच्या विद्येंत प्रवीण असा मनुष्य *m.* Artill'eryman *n.* खलासी *m*, गोलंदाज *m.*

Artisan (ärt'i-zan) [L. *artitus*, skilled in the arts.] शिल्पकार, कामगार, हस्तव्यवसायी, शिल्पकर्मकार *m.*

Artist (ärt'ist) [L. *ars, artis*, art.] *n. skilful workman* कसबी *m*, कारागीर *m*, कलाकुशल *m*, कारु *m.* २ *professor of the fine arts* शिल्पी *m*, शिल्पशास्त्री *m*, शिल्पज्ञ *m*, कर्मपंडित (?) *m.* Artist'ical *a.* कारागिरासंबंधीं, कारागिरीचा, शिल्पचातुर्याचा, खुबीदार. Artist'ically *adv.* (v. A.) कारागिरीनें, शिल्पचातुर्यानें, शिल्पचातुर्यपूर्वक. Art'istry *n.*

*N. B.*—A great difficulty is experienced in fixing appropriate and distinct words for architecture, artificer, artisan and artist. Our old word शिल्प applies to all the Mechanical arts and therefore to denote any one particular art we propose that the significant name of that art should be prefixed to the word शिल्प; as गृहशिल्प for Architecture, पाषाणशिल्प for Sculpture &c. &c. After great thought and consultation with some experts we have come to the conclusion that the word कला should be restricted to Fine art and शिल्प to Mechanical art. In the two words artificer and artisan there is the common idea of Mechanical art or शिल्प and therefore शिल्पकार will be an appropriate word for Artisan; हिकमती शिल्पकार, कल्पक शिल्पकार, कल्पक शिल्पी will be quite appropriate words for Artificer. An Artificer is one, who applies the resources of art to constructive manufacture. An artist is one who exercises any fine art well. Therefore कलाभिज्ञ or कलापटु will be an appropriate word for Artist. In popular Marathi, no distinction is made between Artist and Artisan. The word कारागीर is indiscriminately used for both. We would suggest that the word कारागीर should be restricted to Artisan only. An Artisan is one who exercises any mechanical art well. To sum up:—Artist कलाभिज्ञ, कलापटु. Artisan कारागीर, कामगार. Artificer हिकमती कारागीर, कल्पक कारागीर.

As (az) *conj.* and *adv. in the same manner in which* जसा-शी-सें. (correlative with तसा-शी-सें); as, Act as you speak जसें बोलतां तसें वागा, यथा (S) (correl. with तथा), जेवीं (*poe.*) (correl. with तेवीं). २ *while, during* or *at the same time that* जों, जंव (correl. with तों, तंव), जेव्हां (correl. with तेव्हां), ज्या वेळेस (correl. with त्या वेळेस); as, Do not do this as long as you are young जोंपर्यंत तूं लहान आहेस तोंपर्यंत हें करूं नको. The train arrived as I entered the station जों मी स्टेशनांत शिरलों तों गाडी आली. This sense is best rendered by the use of the present participle; as, He trembled as he spoke तो बोलतांना or बोलत असतां कांपला. ३ *since* ज्याअर्थीं (correl. with त्याअर्थीं); as, Do not expose yourself as you are ill ज्याअर्थीं तूं आजारी आहेस त्याअर्थीं वाऱ्यावर जाऊं नको. The same will be idiomatically rendered by तूं आजारी आहेस ह्मणून वाऱ्यावर जाऊं नकोस, where *as* is rendered by ह्मणून. ४ *in the character* or *capacity of* ह्या नात्यानें, ह्या दृष्टीनें; as, As a poet, he is a failure कवी ह्या नात्यानें त्याच्यांत कांहींच राम नाहीं. You must help it as a charitable movement धर्मकृत्य ह्या दृष्टीनें तुह्मीं त्याला हातभार लावलाच पाहिजे. ५ जरी, (तरी); as, Young as I am I cannot be deceived by this जरी मी लहान आहें तरी...... ६ प्रमाणें, सारखा, वत्; as, The story is as follows ती कथा पुढल्याप्रमाणें आहे; He considers pleasure as the object of life सुख हें तो पुरुषार्थवत् समजतो. ७ *for example* उदाहरणार्थ. ८ जसजसा (correl. with तसतसा); You will become wise as you will grow old. जसजसें तुमचें वय होईल तसतसें...... पुष्कळ वेळां "as" च्या पाठीमागें "*such, same, so* किंवा *as*" हें पूर्वगामी शब्द येतात; Give us such things as you please, He is not so brave as you think, As long as you please, Give me the same books as you gave to him. Same पुढें येणाऱ्या as चें व्याकरण संबंधींसर्वनामासारखें करतात व त्याचा अर्थ "that" सारखा होतो. इंग्रजींत same that ह्याच्या ऐवजीं same as असें ह्मणतात. व same that हा प्रयोग चुकीचा आहे. As if, As it were जणूं काय, जणूं, जसें काय, जाणों (*poe.*). As for, As to विषयीं. As yet अझू(जू)न, अजूनपर्यंत, अद्याप, अद्यापि. As well as ही, सुद्धां, देखील, आणखी, त्याचप्रमाणें, तसाच, तशीच, तसेंच. As long as जोंपर्यंत.

*N. B.*—वरतीं "जसें बोलतां तसें वागा" असें भाषांतर as चा अर्थ स्पष्ट दाखविण्याकरितां दिलें आहे. मराठी भाषेच्या शुद्ध मोडणीप्रमाणें "बोलता तसें वागा" असाच प्रयोग आपण करितों. त्याचप्रमाणें पुढील वाक्यांतही समजावें.

As (as) *n. pl.* Asses. रोमन लोकांचें बारा

आसाचें वजनी माप *n.* २ अर्धा औंस वजनाचें तांब्याचें नाणें *n.*

Asafœtida, Asafetida (as-a-fet'i-da) *n.* हिंग *m,* हिंगाचें झाड *n.* Bright A. हिराहिंग. See Assafœtida.

Ascaris (as'ka-ris) *n.* सूक्ष्म कृमिरोग *m* (हे कृमि पोटांत होतात व सुतासारखे बारीक असतात). *pl.* Ascar'ides.

Ascend (as-send') [L. *ad,* & *scandere,* to climb.] *v. i. rise* वर चढणें-जाणें, उद्गम *m*-उद्गमन *n*-आरोह *m*-आरोहण *n.* करणें *and with in con.* होणें. २ (a heavenly body) *rise* उगवणें, उदय *m.* पावणें, उदय *m.* होणें *g. of o.,* उदित-&c. होणें. ३ नांवारूपास चढणें. A. *v. t. climb* चढणें, आरोहण *n*-आरोह *m.* करणें. २ (नदीच्या) उगमाकडे जाणें. Ascend'able, Ascend'ible *a.* (v. V. T.) चढावयाचा-जोगा-जोगता-&c., आरोहणीय, आरोहणयोग्य. Ascending *a. bot.* ऊर्ध्वगामी. A. node राहुचंद्रपात. A. reduction चढतीभांजणी. Ascending *n.* see Ascension.

Ascension (as-sen'shun) [See Ascend.] *n.* (v. V. I. 1.)—*act.* चढणें *n,* चढ *m,* उद्गम *m,* उद्गमन *n,* आरोह *m,* आरोहण *n,* उत्क्रमण *n.* २–*act.* उगवणें *n,* &c. उदय *m.* Ascend'ant,-ent *a. predominant* वर्चस्वी, वरचढ, जबरदस्त, प्रबळ, उत्तम. २ *astrol.* लग्न, उदित, उदयगत, उदयाप्रत आलेला, उच्चीचा. To be in the A. *astrol.* लग्नीं-बलिष्ठ-असणें. Ascend'ant,-ent *n. astrol.* लग्न *n.* २ वर्चस्व *n,* वरचढपणा *m,* उपराळा *m,* उपरदवडा *m,* उपर *m,* वर्चस *n.* ३ (R) पूर्वज *m.* Lord of the A. *astrol.* लग्नस्वामी. Ascend'ency, Ascend'ancy, Ascend'ance, Ascend'ence *predominance* उपर *m,* दसक *m* (v. चढ), मात्रा *f,* चढ *m,* शह *m,* प्राबल्य *n,* प्राधान्य *n,* उच्चत्व *n,* वर्चस्व *n.* Ascen'sional *a.* [A. difference चर *n,* चरखंड *n,* चरदल *n,* चरार्ध *n,* विषुवांशासंबंधीं अंतर *m.* The line of A. difference चरज्या *f.*]. Ascension day ख्रिस्ती धर्मांत मरणानंतर ख्राइस्ट आकाशांत देहासकट वर गेला तो दिवस. Right Ascension of the sun or a star मेषसंपातपुंज आणि तारा यांचीं याम्योत्तरवृत्तें विषुववृत्तामधील ज्या बिंदूंतून जातात त्यांमधील अंतर, विषुवांश. Ascent' *n.* see Ascension. २ *acclivity, rise of ground* चढ *m,* चढण *f.* [A. and descent चढउतार *m,* चढणउतरण *f.*] २ चढण *f,* घाटी *f,* चढाव *m,* चढणी *f,* डाग (?) *f.* Steep A. उभा सूळ *m.* ३ नीच स्थितीपासून उच्चस्थितीप्रत पोंचणें. ४ उड्डाण. Line of Ascent वंशावळ.

Ascertain (as-sėr-tān') [L. *ad,* to, & *certus,* sure.] *v. t. make sure or certain* शाहानिशा करणें, खात्री करणें, दर्यांफ्त *f*-दर्यांफ्ती *f*-करणें *g. of o.,* निश्चय *m*-निर्णय *m*-निर्धार (S) *m*-निर्धारण (S) *n*-अवधारण (S) *n*-निरूहण *n*-निरूपण *n*-खचिती *f.* करणें-करून घेणें, शोध *m.* करणें, अवधारणें, तहकीक-खचीत-निश्चित-&c. करणें, निर्धारणें. २ अजमावून पाहणें. २ (शोध करून) खातरी करून घेणें. Ascertain'able *a.* (v. V.) निर्धार कराया-चा-जोगता-जोगा, निर्धारणीय, निर्धारणयोग्य, अवधारणीय. Ascertained *p.* (v. V.) निर्धार केलेला, निर्णीत, खचीत, निश्चित, निर्धारित, निरूपित. Ascertain'er *n.* निश्चित करणारा, खात्री करून घेणारा. Ascertain'ment *n.* (v. V.)—*act.* निर्धार करणें *n,* दर्यांफ्त *f,* शोध *m,* निर्णय *m,* निर्णयन *n,* निश्चित *m,* निर्धार (S) *m,* निर्धारण (S) *n,* अवधारण (S) *n,* निरूहण *n,* निरूह *m,* निरूपण *n,* ध्रुव *m.* २ अध्यवसाय *m,* निश्चय *m,* खात्री *f,* दर्यांफ्त *f,* तहकीकी *f,* शाहानिशा *m.*

*N. B.*—To Ascertain is to make sure whether a thing is right or wrong. To verify is to make out or show by evidence that a thing is true.

Ascetic (as-set'ik) [Gr. *askein,* to exercise or mortify the body.] *n. one who practises austerity* बैरागी *m,* संन्यासी *m,* योगी *pop.* जोगी *m,* गोसावी *pop.* गोस्वामी *m.* (OF THIS CLASS SOME ORDERS ARE आनंद, उदासी, कानफाटा OR त्या OR टी, गिरी, नाथपंथी, पुरी, बन, भराडी, भारती, हंस), तपी *m,* तपस्वी *m,* तापस *m,* मुनि *m,* तापसी *m,* कर्मसंन्यासी *m,* सर्वसंगपरित्यागी *m,* वानप्रस्त (Note. *Female* A. बैरागीण,गोसावीण,जोगीण, &c.). [A MARRYING A. संजोगी *m,* संयोगी *m.* SELF-IMMOLATION OF AN A. BY DROWNING OR BURNING समाधि *m. f.* SMOKE-FIRE OF AN A. धुणी OR धुनी *f,* धुमी *f.*] Ascet'ic *a.* विरक्त, तपोनिष्ठ, कडकव्रताचा, वैरागी, तपस्यासक्त. Ascet'ical *a.* यमनियमासंबंधीं. २ कडक, निष्ठुर, निर्दय. ३ कडकव्रतासंबंधीं. Ascet'ically *adv.* कडकप्रकारें, उग्रपणें-रूपानें, &c. Ascet'icism *n.* तपश्चर्या *f,* तपस्या *f,* विषयोपरति *f,* वैराग्य *n,* संन्यास *m,* विरक्तावस्था *f,* वानप्रस्थाश्रम *m.*

Ascidium (as-sid'i-um) [Gr. *askidion,* a little bottle.] *n. bot.* कुम्भाच्या आकृतीचें दुमटलेलें पान *n,* पर्णघट *m,* घटपर्ण *n,* पर्णकुम्भ *m.*

Ascites (as-sī'tēz) [Gr. *askos,* a bladder.] *n. med. a local dropsy, dropsy of the abdomen, a collection of serous fluid in the peritoneal cavity* स्थानिक जलोदर *m,* स्थानिक उदररोग *m,* विशेष स्थानाचा जलोदर *m.* Ascit'ic, Ascit'ical *a.* जलोदर झालेला (रोगी), जलोदराचा.

Ascititious (as-si-tish'us) *a.* same as Adscititious.

Ascribe (a-skrīb') [L. *ad,* to, & *scribere,* to write.] *v. t. attribute, assign* (च्या) नांवें लिहिणें-लेखणें, (ला) श्रेय देणें, (शीं) संबंध जोडणें, (कडे) कर्तृत्व-संपादकत्व लावणें. २ आरोप (S) करणें-ठेवणें-लादणें, आरोपणें, आरोप *m*-आरोपण *n*-&c. लावणें *g. of o.,* घालणें,-कारण-संबंध लावणें. *Note.*—The sense of this word (to refer as to a cause) is best rendered thus—I ascribe his poverty to his laziness त्याच्या गरीबीचें कारण त्याचा आळस आहे असें मी मानतों-म्हणतों-&c. Ascrib'able *a.* (v. V.) आरोप्य, आरोपणीय, कडे कारण-संबंध लावण्यासारखा, लावायाचा-जोगता-जोगा-&c. Ascribed *p.* (v. V.) आरोपलेला, आरोपित, ठेवलेला. Ascrip'tion *n.* (v. V.)—*act.* आरोपणें *n,* आरोप *m,* आरोप लादणें *n,*

-कडे संबंध लावणें *n*, तोहोमत *n*. २ (कारण किंवा संबंधदर्शक) पालुपद *n*, ध्रुपद *n*; as, Glory be to God at the end of a sermon.

Ascus ( as'kus ) [ Gr. *askos*, a leather bottle. ] *n. bot.* त्वचेसारखी बीजकोशधरपेशी *f. pl.* As'ci, said of cryptogamous plants.

Aseptic ( a-sep'tik ) [ Gr. *a*, not, & *septos*, to decay. ] *a.* सडून किंवा कुजून न जाईल असा. Asep'ticism *n.* सडून किंवा कुजून न जाईल असा धर्म.

Ash ( ash ) *n.* एक प्रकारचें झाड *n.* याचें इमारतीचें लांकूड उत्तम निघतें. Ash, Ash'en *a.* 'अॅश' झाडाचें बनविलेलें.

Ash (ash) *n.* (फार करून अनेकवचनांत उपयोग होतो). *pl.* Ashes *n.* रक्षा *f*; राख *f*; रखा *f*; राखाडी *f*; राखुंडी *f*; भस्म *n*, भुरी *f*; *chem.* क्षार *m.* २ *fig.* प्रेत *n.* Ash-coloured *a.* भस्मी रंगाचा. [A.s as heaped or strewed राखुंडा *m*, राखाडी *f*, राखवडा *m.* A.s of a body burnt on a pyre चिताभस्म *n.* A.s for smearing the body विभूति *pop.* विभूत *f.* Hot A. मूम(मी)र *n. m*, फुपाटा *m.* Of the colour of A.s भस्मरंग *pop.* भस्मवर्ण *m*, भस्मी. Place bestrewed with A.s राखाडमंडल *n*, राखमंडळ *n.* Reducing to A.s भस्मीकरण *n.* Rubbing A.s by way of Ablution भस्मस्नान *n.* Reduced to A.s भस्मीभूत, भस्मीकृत. To A.s ( reduced, burned ) खाक, भस्मसात् (करून टाकला &c.), ठार ( जळला &c.), फस्त, हुत. Volcanic Ashes ज्वालामुखी पर्वतांतील राखेसारखा पदार्थ *m.* In dust and Ashes, in sackcloth and Ashes पश्चात्तापानें, पश्चात्तापपूर्वक. Ash'-buck'et *n.* राखाडी व घरांतील केरकचरा भरून टाकण्याचें भांडें *n.* Ash'ery *n.* पोटॅशभस्म अथवा मोत्यांचें भस्म करण्याची जागा *f.* Ash'-heap *n.* गोवर *m.* Ash'-pan *mech. engin.* 'बायलरच्या' भट्टीच्या खालची राख साठविण्याची सुपडी(ली). Ash-pit *mech. engine.* आगगाडीच्या 'बायलरां'तील राख साफ करण्याकरितां दोन रुळांमध्यें केलेला खळगा. Ash'y *a. made of ashes* राखेचा, भस्मी, भस्माचा, भास्मन. २ भस्मरंगी, भस्मवर्णी, भस्मवर्णक. ३ राखोंडा, राखोडा. To lay in Ashes जाळून भस्म करणें.

Ashamed ( a-shāmd' ) [ Pref. *a*, intens, for of, & shame. ] *a.* लाजलेला, लज्जित, ओशाळा, लज्जमान, *pop.* लज्जायमान, शरमिंदा(धा), लाजिरवाणा, खजील, अवाङ्मुख, लज्जेनें अधोमुख, अधोवदन, त्रपान्वित, लाजिंद्रा, (*vulg.*) वरमलेला ( with *of* for the cause of shame and *for* for the person) (An A. look). [To be A. of लाजणें, शरमणें, ओशाळणें, लाज *f.* वाटणें *in. con.*]. Ashame' *v. i.* & *v. t.* लाज वाटणें, लाजवणें. Asham'edly *adv.* लाजिरवाणें. Marathi Idiomatic expressions for "Ashamedly" are: तोंडाला पदर लावून, तोंड खालीं करून, मुठींत नाक धरून, खालीं पाहून, मान खालीं घालून, खालचे मानेनें. Ashamed'ness *n.* लज्जितपणा. Asham'ing *p. a.*

Ashlar, Ashler ( ash'lar ) ( ash'lėr ) [ L. *axillaris*, small axle.] *n. building engin.* माठीव संगीन दगड *m* (भिंतीच्या बाहेर कामास वापरण्याकरितां). Ash'lar-work *n.* माठीव संगीन दगडाचें बांधकाम *n*, चौरस घडलेल्या दगडाचें बांधकाम *n.* opposed to rubble-work. Ash'lared *p.* Ash'laring *n.*

Ashore ( a-shōr' ) *adv.* किनाऱ्यावर, किनाऱ्यास, तडीस, तडीवर, कडेस, लगत्यास.

Asian ( āzh'yan ) also Asiatic ( ā-zhi-at'ik ) *a.* एशिया खंडामधील-संबंधीं, एशियाखंडाचा, एशियाखंडांतला. Asiat'ic *n.* एशियाखंडांतील रहिवासी. Asiat'icism *n.* एशियाखंडांतील लोकांची विशेष रीतभात-चाल-पद्धत-भाषाविशेष-धर्म.

Aside ( a-sīd' ) *adv.* एकीकडे, एके बाजूस, कडेकांठास, आडमोरा, आडकुशीस, आड. २ विवक्षित दिशेपासून दूर. ३ (विचारा) पलीकडे (to lay cares A.). ४ *drama.* दुसऱ्या पात्रास ऐकूं न जाईल अशा प्रकारें, स्वगत, आत्मगत. A. *n.* बोलून न ऐकलेलें भाषण, अगर ऐकिलें नाहीं असें भासविलेलें भाषण *n.* २ लांबूनचा किंवा अप्रत्यक्ष प्रयत्न *m.* To set A. *law* नामंजूर करणें, रद्द करणें, बाजूस ठेवणें, विचारांत न घेणें. To move A. खिच(स)णें, सरणें, सारणें. To turn A. पराङ्मुख होणें, विथरणें, पाऊल *n.* वांकडें पडणें.

Asinine ( as'in-īn ) *a.* See Ass.

Ask ( ask ) [ A. S. *ascian, acsian.* ] *v. t. inquire* विचारणें, पुसणें, हटकणें, प्रश्न *m*-पृच्छा *f*-सवाल *m.* करणें. २ *beg.* मागणें, याचणें, अर्थणें (*poe.*), विनंति *f*-याचन *n*-याचना *f*-करणें *g. of o.*, जवळ मागणें. ( with *of* before the person ). ३ ( with *for* ) मागणें, सांगणें, मोल *n*, सांगणें. ४ ( with *about, for* ) पुसणें, विचारणें, वास्तपूस करणें, विचारपूस *f*-करणें, नांव *n*-स्मरण *n*-याद *f*-आठवण *f*-सई *f*-उल्लेख *m*-&c. काढणें-करणें *g. of o.* ५ *invite* आमंत्रण करणें, बोलावणें, बाहणें, अंवतणें. ६ मागणी करणें. ७ चौकशी करणें. (ह्या अर्थीं क्रियापदाला दोन कर्में असतात.) To ask a person his name. A. *v. i.* विनंती *f.* करणें, अर्ज करणें ( with *for* before an object). २ चौकशी करणें, शोध करणें (followed by *after*). Asked *p.* ( v. V. 1.) पुसलेला, &c., पृष्ट. २ मागितलेला, याचित, प्रार्थित. ३ बोलावलेला, आमंत्रित, निमंत्रित. Ask'er *n.* प्रश्न करणारा, पृच्छक, पृष्टा. २ शोध करणारा. ३ अर्ज-विनंती करणारा.

Askance ( a-skans' ) Askant ( a-skant' ) *adv.* तिरकस, आडवें. २ वांकडें, डोळा वांकडा करून, ओझरता, कसरता. To eye, look, or view A. संशयित मनानें पाहणें, संशय धरणें, काण्या डोळ्यानें पाहणें.

Askew ( a-skū' ) See Askance.

Aslant ( a-slant' ) Also Asklent. See Askance.

Asleep ( a-slēp' ) *adv.* and *a.* झोंपेंत, निद्रेंत, झोंपीं, झोंप लागलेला, निद्रित, शयित, सुप्त. Fast A., Sound A.

सुप्त, प्रसुप्त, गाढ झोंप लागलेला. Half A. निजसुरा. To fall A. झोंप *f.* लागणें *in. con.*

Aslope (a-slōp') *a.* and *adv.* उतरता, कलता, ढळता, कातरता, ओघळीचा, ओझरता. २ उतरणीनें.

Asp (asp) *n. zool.* एक लहान जातीचा विषारी सर्प *m*, also Aspic (a-sp'ik.)

Asparagus (as-par'a-gus) *n. bot.* शतावरी *pop.* शतावली *f*, शितागौड *f*, शिताचवरी *f*, दिसमावली *f*, आस्वलीच्या झाडासारख्या वेलीचें मूळ *n*.

Aspect (as'pekt) [L. *ad*, to, & *specere*, to look.] *n*, *astrol.* दृष्टि *f.* २ अवस्था *f*, स्थिति *f*, तोंड *n*, दशा *f.* २ दृष्टीपुढें येणारा सर्व प्रदेश. २ आकार *m*, रूप *n*, डौल *m*, घटाव *m*, घांट *m*, ढब *f*, मांड *f*, मांडणी *f*, स्वरूप *n*, बाजू *f*, असुक एक दिशेकडची बाजू, अंग *n* (a phase). ३ *look*, *air*, *countenance* चेहरा *m*, मुद्रा, सुरत *f*, मुख *n*, चर्या *f.* ४ *view*, *facing position* रोंख *m*, कटाक्ष *m*, लक्ष्य *n*, मुख *n*, तोंड *n*, अभिमुखता *f.* ५ मनापुढें येणारी बाजू-स्वरूप. As'pectable *a.* दृश्य असा, दिसण्यासारखा, दृष्टि टाकतां येईल असा.

Asper (as'pėr) *a. bot.* स्थूललोमी, खरखरीत, खरलोमी.

Asperity (as-per'i-ti) [L. *asper*, rough.] *n.* खरबरीतपणा *m.* २ जला(हा)लपणा *m.* ३ कर्कशपणा *m.* ४ आंबटपणा *m.* ५ *fig.* असभ्यता *f.* ६ *bot.* पानावरचा खरबरीतपणा *m.* खरवतीचीं पानें अशीं असतात.

Aspermatism (as-perm'a-tism) [Gr. *a*, without, & *sperma*, seed.] *n. med.* अशुक्रता *f*, शुक्रक्षय *m*, धातु उत्पन्न न झाल्यामुळें किंवा आंतल्या आंत राहिल्यामुळें बाहेर न येणें *n*.

Aspermous (a-spėr'mus) Aspermatous (a-spėr'matus) [Gr. *a*, without, & *sperma*, seed.] *a. bot.* अबीज, बीजरहित. Said of fungi and mushrooms.

Asperse (as-pėrs') [L. *ad*, to, & spargere, to scatter or sprinkle.] *v. t.* (always transitive) *defame*, *traduce*, *slander* (माती, धूळ इत्यादि &c. वर) शिंपडणें, काजळी-काळीम-काळोखी लावणें, कोरडी किटाळ *f*-घालणें-उठवणें, कुभांड *n*-कुफरांड or कुफराण *n*-बालंट *n.* (or बालांट *n.*) घेणें-घालणें-रचणें, निमित्त *n.* ठेवणें-घेणें, चहाडी *f*-तुफान *n*-तोहमत *f*-घेणें-घालणें, कफरात or कफारत *f.* घेणें-आणणें, लिंपण*n.*लावणें, दोष *m*-कलंक *m.* लावणें, आळ *f. m.* घालणें, कैवाड *n.* रचणें-घेणें with वर *of o.*, कुटाळकी *f*-कुटाळी *f.* करणें, कूट *f.* खाणें *g. of o.*, अदावत *f.* घालणें-घेणें-करणें, अभिशंसन *n*-अभिशाप *m*-अपवाद *m.* करणें *g. of o.* २ कालिमा लावणें. ३ *fig.* पाणी अथवा धूळ टाकणें. Aspersed *p.* (v. V.) आळ आलेला-घातलेला, &c. &c., कलंकित, कलंकी, कलंकमय. Asperser *n.* (v. V.) काजळी लावणारा, आळ घेणारा, आळघाल्या, चुगलखोर or चुगलीखोर, चुगल्या, चहाडखोर, चहाडचुचका, कुभांडी, कुभांडखोर, कुफरांडी or ड्या, कुफराणी, बालंटखोर, गळेपडू, तुफानखोर, तुफानी, थोतांडी, बगलांटी, कुटाळखोर,कुचाळखोर, कुचिंद, कुचिंदा, अभिशंसी, अपवादक. Asper'sion *n.* (v. V.)-*act.* तुफान घेणें *n*, चुगली खाणें *n*, आळ घालणें *n* &c., कुटाळकी *f*, कुटाळी *f*, अपवाद *m*, अभिशंसन *n*, विकत्थन *n*, (literally) धूलिप्रक्षेप *m*, दोष *m.* I *law* तोहोमत *f*, बट्टा *m*, तुफान *n*, बालंट *n*, आळ *f*, निमित्त *n.* २ *fig.* पाणी किंवा धूळ *f.* टाकणें *n*, धूलिसिंचन *n.* Casting A.s on one वाईट वर्तणुकीबद्दल खोटा दोष देणें, आळ *m* घालणें. Aspers'ive, Aspers'ory *a.* अपवादजनक. २ निंदाव्यंजक. ३ कालिमा आणणारा.

*N. B.*—The words चुगलखोर, चुगलीखोर, चुगल्या, चहाडखोर, चहाडचुचका are not quite accurate renderings of "Asperser." In चहाडी or चुगली there is an idea of the communication of a *fact.* In Aspersion, it is not a *fact* that is communicated with a view to injure the interests or reputation of another. Asperser simply means (खोटा) आळ घेणारा, (नालस्ती करण्याच्या हेतूनें) एखाद्यावर नसेल तो आरोप करणारा.

Asphalt (as-falt') [Gr. *asphaltos*, from an Eastern word.] *n.* एक जातीचें डामर *n.* Also As-phalt'um *n.* Asphalt' *v. t.* डामर लावणें. Asphalt'ic *a.*

Asphyxia (as-fik'si-a) [Gr. *a*, not, *sphyxis*, the pulse.] *n. med.* रक्ताभिसरण बंद झाल्यामुळें श्वासावरोध *m*, नाडी सुटणें *n.* (result of suspended circulation due to a deficiency of oxygen in the system).

Aspirate (as'pir-āt) [see Aspire.] *v. t.* महाप्राणानें उच्चारणें, जोरानें उच्चार करणें, महाप्राणाचा उच्चार करणें, महाप्राणोच्चारण *n.* करणें, ह (h) हें अक्षर मिळविणें-जोडणें. २ भांड्यांतून वायु-वाफ बाहेर काढणें. *n.* जोराचा उच्चार *m*, महाप्राणोच्चार *m*, h अक्षर *n.* २ Aspirate *a.* Aspirated *p.* (v. V.) महाप्राण, महाप्राणोच्चारित, महाप्राणोच्चारणीय, महाप्राणाचा. Aspirā'tion *n.* (v. V.)—*act.* महाप्राणाचा उच्चार करणें *n*, महाप्राणोच्चारण *n*, महाप्राणोच्चार *m*, महाप्राण *m.* Aspirā'tor *n. phys.* शोषकोपकरण *n*, शोषणपात्र *n.* २ *med.* शोषणयंत्र *n.* Aspīr'atory *a.* श्वासोच्छ्वाससंबंधीं. २ श्वासावरोबर हवा आंत घेण्यास योग्य.

Aspire (as-pīr') [L. *ad*, to, & *spirare*, to breathe.] *v. i.* मोठी आशा धरणें, आस *f*-उमेद *f*-हांव *f*-लालसा *f*-&c. धरणें, आशावणें. २ थोर दृष्टि *f*-मोठी दृष्टि धरणें, महत्त्वाकांक्षा *f*-महत्वलिप्सा *f*-&c. धरणें-करणें (followed by *to* or *after*). ३ *fig.* चढणें, आकाशांत भरारी मारणें. Aspirā'tion *n.* उत्कट आशा *f.* २ महत्त्वाकांक्षा *f*, तृष्णा *f*, हांव *f*, मनोरथ *m*, आस *f*, लालसा *f.* Aspīr'ing *a.* Aspīr'ingly *adv.* Aspīr'ingness *n.* Aspir'er *n.* (v. V. 1.) मोठी इच्छा धरणारा, आशा धरणारा. २ ऊर्ध्वदृष्टि, महत्त्वाकांक्षी, महत्वलिप्सु, महत्त्वापेक्षी. Aspir'ant *n.* and *a.* महत्वाकांक्षी.

*N. B.*—महत्वाकांक्षा is now almost universally accepted for ambition. And therefore it will be good

if we fix upon a separate word for Aspiration. We propose मनोरथ and तृष्णा as words for the same. आशा is proposed by some as the appropriate word for Aspiration; but आशा is now universally restricted to "hope."

Asport ( as-pōrt' ) [ L. *abs*, away, & *portare*, to carry.] *v. t.* ठेवलेल्या ठिकाणाहून माल लबाडीनें पळविणें. Asportā'tion *n. law* ठेवलेल्या ठिकाणापासून माल लबाडीनें पळविणें *n.*

Asquat ( a-skwät' ) *adv.* उकिडवा ( बसणें ), उकडवा.

Asquint ( a-skwint' ) *adv.* काणें, तिरवें, तिरकें, तिरळें, काण्या डोळ्यानें, वांकड्या डोळ्यानें.

Ass ( as ) *n.* गाढव. [ MALE ASS गाढव, रासभ, गर्दभ *pop.* गधव, खर, लम्बकर्ण. FEMALE ASS गाढव, गाढवी, गाढवीण, गर्दभी, रासभी. in contempt गधडा *m.* Wild A. गोरखर. २ *fool* गधडा,गद्धा,मूर्ख,गाढव,बेवकूव, गाढवाचा लेंक *m,* (colloq.) गाढवाचा खरारा *m.* To make an A. of one's self एखादें मूर्खपणाचें व उपहासास्पद असें कृत्य करणें. To mount the A. दिवाळें निघणें. To wrangle for an ass's shadow क्षुल्लक वाबीकरितां भांडण करणें. Asse's bridge or L. Pons Asinorum, भूमितींतील पहिल्या पुस्तकाचा ५ वा सिद्धांत. As'inine *a.* गाढवासारखा, गाढवाचा.

Assafœtida ( as-a-fet'i-da ) *n.*-plant हिंगाचें झाड *n,* हिंगु *m*-gum or ooze हिंग *m,* हिंगु *m,* हिंगुनिर्यास *m*-*in contempt* हिंगडा *m-in cant, covert, &c. phraseology* वास *m.* A. water हिंगवणी *n.* Bump supervening ( upon a wound or sore ) through the eating of A. हिंगुरडें *n,* हिंगरूड *n.* Fine, bright A. हिराहिंग *m.*

Assail ( as-sāl' ) [ L. *ad*, to, *salire*, to leap. ] *v. t.* (धात्वर्थावरून, एकदम उडी मारणें), घाला घालणें, हल्ला करणें, तुटून पडणें. २ ( वादविवादांत ) कडक टीका करणें, खरडपट्टी काढणें. Assail'able *a.* हल्ला करण्यास योग्य. Assail'ant *n.* and *a.* हल्ला करणारा. Assail'er *n.* हल्ला करणारा *m.* Assail'ment *n.* हल्ला *m,* घाला *m.*

*N. B.*—Assail denotes less powerful but more brisk action than attack. To Assail is to attack in a vehement manner and it involves the idea of repeated attack. Assail means झटपट पण वारंवार हल्ला करणें.

Assassin ( as-as'in ) [ Ar. *hashshashin*, "hashish-eaters," a military and religious order in Syria of the 11 th century, who became notorious for their secret murders in obedience to the will of their chief and fortified themselves for their adventures by *hashish*, an intoxicating drug of drink made from hemp. ] *n.* कपटानें खून करणारा *m,* दग्यानें मारणारा *m,* गुप्त मारेकरी *m,* कपटहिंसक *m,* गुप्तघात्या *m.* Assas'sinate *v. t.* दग्यानें मारणें-जीव *m.* घेणें-प्राण *m.* घेणें, गुप्तमाऱ्यानें-चोरमाऱ्यानें-चोरून-नकळवितां-&c. मारणें-जीव *m.* घेणें &c. Assassinā'tion *n.* गुप्त खून *m.* २-*act.* दग्यानें मारणें *n.* Assas'sinator *n.* गुप्त रीतीनें खून करणारा.

Assault ( as-sawlt' ) [ L. *ad*, upon, & *salire*, to leap. ] *n.* घाला *m,* हल्ला *m,* चढ *m,* चढाई *f,* चाल *f,* उचल *f.* २ *law* आंगावर चाल करून जाणें *n,* पारुष्य *n.* A. and battery दंडपारुष्य. *Battery is aggravated assault; when the evidence fails to prove battery, assault is often proved by the same evidence, therefore they are often used together. But they are distinct wrongs.* A. at arms एक प्रकारची हत्यारांची लष्करी कवाईत *f.* *v. t.* ( मनुष्यावर किंवा बंदोबस्त केलेल्या जागेवर ) घाला घालणें, हल्ला करणें. Assault'er *n.* घाला घालणारा.

Assay ( as-sā' ) [ L. *ex*, out, & *agere*, to bring. ] *v. t.* परीक्षा *f*-परीक्षण *n*-पारख *f*-&c. करणें-घेणें-पाहणें *g. of o.,* परीक्षणें ( *poe.*). २ कसून पाहणें, कस *m.* पाहणें *g. of o.,* कसणें. A. *v. i.* प्रयत्न करणें. A. *n.* ( v. V. T. 1. )-*act.* परीक्षणें *n,* परीक्षा *f,* पारख *f,* परीक्षण *n.* २ कस लावणें *n,* नाणकपरीक्षा ( *obs.* ) *f,* पारख *f.* To take the A. पेयांत अगर अन्नांत विष नाहीं याबद्दल खात्री करण्याकरितां रुचि घेऊन पाहणें; ( hence ) the phrase means परीक्षा करणें, कसास लावणें. To put a thing to A.s कसास लावून खात्री करून घेणें. Assay'er *n.* सप्रयोग परीक्षा करणारा, परीक्षक, पारख, परीक्षा करणारा-पाहणारा. २ कसणारा, परीक्षक, नाणकपरीक्षक ( *obs.* ) ( सोनें, रुपें ) धातू छापणारा. ३ यत्न करून पाहणारा. Assay'ing *n.* Same as Assay *n.* Assay'-mas'ter *n.* नाण्यांत सोनें किंवा रुपें किती आहे हें ठरविणारा टांकसाळेंतील मोठा अधिकारी *m.*

*N. B.*—Names of things used in or connected with assaying are:—Assay-balance, Assay-beam, Assay-furnace, Assay-house, Assay-oven.

Assemble ( as-sem'bl ) [ L. *ad*, to, *similis*, like. ] *v. t.* *gather* जमा करणें, गोळा करणें. २ *convoke, convene* एकत्र बोलावणें, मिळविणें, जमविणें, एकत्र-एकवट करणें, एकवटणें, जमावणें. A. *v. i.* gather मिळणें, जमणें, एकवटणें, जमा होणें, जुटणें(?), जुडणें(?). Assem'blage *n.* *collection* गोळा(?) *m,* जमाव *m,* जमात *f,* मेळावा *m,* थवा *m,* समुच्चय *m,* संचय(?) *m,* समाहार(?) *m,* मेळा *m,* समुदाय *m,* कदंब *n,* गुच्छ(?) *m,* जुटी(?) *f,* समवाय *m,* संघात *m,* मंडल *n.* २ *assembled state* जमलेपणा *m,* एकवटपणा *m,* समुच्चयता *f,* समाहारता *f.* Assembled *p.* ( v. V. T.) जमा केलेला, गोळा केलेला, संहत. २ मिळवलेला, जमावलेला, &c. ( v. V. I.), मिळालेला, जमलेला &c. Assem'bler *n.* एकत्र जमविणारा. Assembling *n.* ( v. V. T. 1. ) See Assembly. Assem'bly *n.* ( v. V. T. I. )-*act.* जमा करणें *n,* गोळा करणें *n,* संग्रह *n,* समाहरण(?) *n,* संचयन(?) *n.* २ मिळविणें *n,* जमविणें *n.* २ ( v. V. I. 1.)-*act.* मिळणें *n,* जमणें *n,* जमा होणें *n* &c. I *body assembled, meeting, company,*

*congregation, congress, convention, Synod, Convocation* सभा *f;* मंडळी *f;* बैठक *f;* जमाव *m,* जमात *f;* मेळा*m,* मजलस(?)*f*(मजालस*f*), अखाडा(?)*m,* अड्डा(?) *m,* संघ *m,* संघात *m,* समाज *m,* समुच्चय *m,* समुदाय *m.* II *mil.* लष्करी नगाऱ्याचा हुलकारा *m,* दुसऱ्या मुक्कामीं निघून जाण्याकरितां तयार व्हावें अशी सूचना करण्याकरितां हा नगाऱ्याचा हुलकारा देतात. A line or row of ( learned Brahmans ) in an A. पट्टी *f.* Dismissal of an A. सभाविसर्जन, सभा बरखास्त करणें *n.* Full A., full meeting, session, &c. भर-सभा-मजालस *f.* Member of an A. or council सभासद *m,* सभ्य *m,* सदस्य *m.* Person present in an A. हाजीर मजालस. Assembly-room सभामंदिर *n,* सभा *f;* अखाडा (?) *m,* सभागृह *n,* सभास्थान *n,* सभामंडप *m.* Unlawful A. बेकायदेशीर मंडळी. National A. ( Fr. His. ) फ्रान्स देशांतील राज्यक्रान्तिपक्षाची पहिली कायदेकानूंची बैठक ( काल १७८९-९१ इ. ).

*N. B.*—Mr. Candy gives अखाडा, अड्डा, मजलस as Marathi equivalents for assembly. In the Marathi of to-day the word अखाडा has a tendency to be restricted in its meaning to a gathering of athletes; अड्डा, to any place of meeting and मजलस to a singing entertainment, thus it is clear that the words have each with us at present a restricted use.

*N. B.*—In the words given above for "Assemblage" गोळा, संचय, समाहार, गुच्छ, जुटी occur. The following observation is needed with regard to them. In any English sentence where the word Assemblage occurs it is never rendered by either of the above words. जूट or जुटी will be a very good word for "Association." गुच्छ is generally restricted to flowers, feathers, &c. समाहार means a collection with a view to consolidation or compactness. गोळा means a collection wherein the individual units lose their individual character and cannot be reduced to their unit-nature after they form a गोळा.

Assent ( as-sent' ) [ L. *ad*, to, *sentire*, to think. ] *v. i.* ( with *to* ) सम्मति देणें, अनुमत देणें. *think or concur with* मान्य करणें, कबूल करणें-होणें, अनुमत-सम्मत-&c. होणें, रुकार *m*-होयकार *m*-सम्मत *n*-&c. देणें. *n.* Assenting ( v. V. )—*act.* मान्य करणें *n,* होयकार *m,* होकार *m,* रुकार *m,* अनुमत *n,* अनुमति *f;* सम्मत *n,* सम्मति *f;* कबुली *m.* २ अंगीकार *m,* स्वीकार *m.* Royal A. ( कामन्स व लॉर्ड्स ह्यांच्या सभांमधून कायद्याचा मसुदा पसंत झाल्यानंतर त्यास मिळालेली ) राजाची सम्मति. Assentā'neous *a.* सम्मति देण्यास तत्पर. Assent'er-or *n.* रुकार देणारा &c. Assent'ive *a.* रुकारपर, संमतिपर, रुकाराचा. Assen'tient *n.* सम्मतिदर्शविणारा, रुकार देणारा. Assent'ingly *adv.* Assent'iveness *n.* रुकारपरता *f,* &c.

*N. B.*—Assentor or assenter *spec.* applied to those who in addition to the proposer & seconder, subscribe the nomination paper of a candidate in parliametary or other election.

Assert ( as-sert' ) [ L. *ad*, to, & *serere*, to join. ] *v. t.* ( मनाची खातरी ह्मणून ) खचीतपणीं-खंबीरपणीं-निश्चितपणीं-निश्चयपूर्वक-प्रतिज्ञापूर्वक बोलणें-ह्मणणें-सांगणें. २ प्रपादणें, पुरवणें, संभाळणें, राखणें, स्थापणें, स्थापना करणें *g. of o.*, निर्वाह (S) *m.* करणें *g. of o.* ३ ( a system of doctrines. ) उपपादन *n*-उपपत्ति *f*-प्रतिपादन *n*-स्थापन *n* करणें, कैवार *m.* घेणें *g. of o.*, पक्ष *m.* धरणें, अस्तिपक्ष मांडणें. ४ ( पुढें होऊन ) हक्क चालवणें-सांगणें. Assert'able *a.* खातरीपूर्वक बोलण्याजोगा. Assert'er,-or *n.* हक्क सांगणारा, प्रतिपादक, पक्षीय, अस्तिपक्ष मांडणारा. To A. one's self स्वताच्या मतांचें जारीनें समर्थन करणें, *fig.* आपलें घोडें पुढें ढकलणें. Asser'tion *n.* प्रतिपादन *n,* वचन *n,* प्रतिज्ञा *f;* प्रतिज्ञावचन *n,* निश्चितवाक्य *n.* *log.* निश्चयात्मकवाक्य *n,* निर्वाह *m.* २ प्रतिज्ञा *f;* पक्ष *m,* मत *n.* ३ हक्क सांगणें-चालवणें, मतांचा आग्रह धरणें. Assert'ive खातरीपूर्वक. Assert'ory *a.* खात्री करणारा. Assert'ively *adv.* Assert'iveness *n.* Self-Assertion स्वतःच्या मतांसंबंधानें हक्कांसंबंधानें आग्रह धरणें.

*N. B.*—One asserts a thing as a truth or as a conviction of his own mind. One affirms it as a proposition with a logical force. The opposite to *Assert* would be to *imply*, that to *Affirm* would be to *destroy*. Assert, Affirm, Asseverate, Aver, Avouch, Protest require to be distinguished.

Assess (as-ses') [L. *ad*, to, *sedere*, to sit.] *v. t. set a tax* पट्टी *f*-कर *m*-सरकारदेणें *n*-ठोका *m*-ठेका *m*-&c. फाळणें बसविणें, ठोक्याची-&c. फाळणी *f*-वर्गणी *f*-वर्गत *f, n.* घालणें ( with *in* or *at* ). २ *set the value in order to tax.* जमाबंदी *f*-&c. करणें-ठरवणें-नेमणें &c. sometimes ( with *upon* ). ३ *fix, settle,* ( damages ) ठरविणें, ठराव *m*-इयत्ता *f*-नियम *m*-&c. करणें *g. of o.* Assess'able *a.* कर बसविण्यास लायक. Assess'ably *adv.* Assess'ment *n.* (v. V. 1. )—*act.* पट्टी बसवणें *n,* कर *m,* कुळाचा सारा *m,* जमाबंदी *f;* पट्टी *f.* २ इस्टेटीचें उत्पन्न *n.* Reduced or lost A. कमदस्त *m,* कमदर *m.* Assess'or *n.* (v. V. 1.) पट्टी ठरविणारा-बसविणारा-घालणारा, असेसर. २ जमाबंदी करणारा-बसवणारा. I सभासद *m,* सभ्य *m,* सहकारी *m,* सदस्य *m,* ( न्यायाधिशाचा ) फौजदारी कोर्टांत आणि विशेषेंकरून सेशनकोर्टांत न्यायाधिशास मदत करण्यासाठीं नेमलेला मनुष्य ( पगारी नव्हे ). Assesee कर देण्यास पात्र ठरविलेला इसम. Assessō'rial *a.* Assess'orship *n.*

*N. B.*—It is good to restrict assessment to सारा and rent to धारा.

Assets ( as'sets ) [ L. *ad*, to, *satis*, enough. ] *n.* ( in plural ) *law* सावकाराचें कर्ज फेडण्यास साधन ह्मणून जी मालमत्ता असते ती, पुंजी *f;* जायदाद *f;* मेलेल्या इ-

समाची मिळकत *f*, मालमिळकत *f*, ठोकमाल *m*, बुटी *f*, केवा (?), ऐवज *m*, विषय *m*. जमा (*colloq.*).

*N. B.*—सावकाराचें कर्ज फेडण्यास पुरेइतकी जिंदगी असा पूर्वी Assets चा अर्थ होता. परंतु आतां तो शब्द अपुऱ्या जिंदगीलाहि लावितात.

Asseverate (as-sev'er-āt) [L. *ad*, to, & *severus*, serious.] *v. t.* निक्षून खरें बोलणें, सत्योत्तर *n.* करणें, सत्य स्मरून बोलणें. २ प्रतिज्ञापूर्वक-शपथेवर सांगणें, शपथ करणें. Asseverat'ingly *adv.* Asseverā'tion *n.* सत्य स्मरून बोलणें *n*, सत्यवचन *n*, शपथेवर बोलणें *n*. Assev'eratory *a.* सत्योत्तराचा, सत्योत्तरपूर्वक.

*N. B.*—To asseverate is to affirm or assert in a peculiarly forcible manner to induce conviction thereby, to speak in earnest.

Assiduity (as-sid-ū'i-ti) [L. *ad*, & *sedere*, to sit.] *n.* पिच्छेस बसून-मेखाटीस बसून काम करणें *n*, व्यासंग *m*, अव्याहत-दीर्घपरिश्रम *m*, सतत उद्योग *m*, उद्यम *m*, उद्योग *m*, अभ्यास *m*, संसक्ति *f*, व्यवसाय *m*, अध्यवसाय *m*, ताण (?) *m*, खणती (?) *f*. Assid'uous *a.* उद्यमी, सतत उद्योगी, खटपट्या, व्यासंगी, व्यवसायी, अध्यवसायी, संसक्त, साक्षेपी. २ दीर्घोद्योगानें-तत्परतेनें (S) केलेलें (काम). Assid'uously *adv.* (v. A.) दीर्घ परिश्रमानें, व्यासंगानें, &c., व्यासंगपूर्वक, व्यवसायपूर्वक, साक्षेपें. Assid'uousness *n.* see Assiduity. [to sit.

*N. B.*—L. *sedere*, seems to be allied to Sk. सद्

Assign (as-sīn') [L. *ad*, to, & *signum*, a mark or sign.] *v. t.* *appoint*, *apportion* (दुसऱ्याचे नांवानें) आंखून-रेखून ठेवणें, नेमून देणें, वांट्यास देणें, विभागास-विभागीं देणें-लावणें, नेमणें, लावून देणें, तोडून देणें. २ *designate*, *appropriate*(ला) योजणें, ची योजना *f*-विनियोग *m*-करणें *g. of o.*, नांवनिशीनें लावणें-ठेवणें, निर्देश(S.) *m.* करणें *g. of o.*, (नादार मनुष्याची मालमत्ता कर्जदारांस वांटून देण्याकरितां एखाद्याच्या) स्वाधीन करणें. ३ *allege*, *show* (कारणें) लावणें-सांगणें-दाखवणें-मांडणें *g. of o.*, उपन्यास *m.* करणें *g. of o.* ४ *make over* हवालीं-स्वाधीन करणें, सोंपवणें, सोपून देणें. ५ ठरविणें, निश्चित करणें. ६ कर्तृत्वसंबंध लावणें. ७ *law* बेचन देणें, नांवावर चढवून देणें. A. *n. law* (Assignee) मुखत्यार *m*, ज्याचे नांवें मालमत्ता करणें असते तो; as, in heirs and assigns. Assign'able *a.* (v. V. 1.) वांट्यास-विभागास द्यायाचा-जोगा-सारखा, नेमून द्याया-चा-जोगा-सारखा-&c., (दुसऱ्याच्या) स्वाधीन करण्याजोगा, बेचन-लावून देण्याजोगा. २ योजाया-चा-जोगा-&c., विनियोज्य, नियोज्य, निर्देश(S), निर्देश्य, निर्देशार्ह. ३ सांगाया-चा-जोगा-सारखा-&c. Assignā'tion *n.* विभागून देणें *n*, निश्चित करणें *n*, ठरविणें *n*. २ नांवावर चढविणें, बेचन देणें. ३ नियमित स्थळीं आणि वेळीं एकत्र भेटण्याचा संकेत *m*, संकेत *m*. [Female making A. अभिसारिका. Place of A. संकेतस्थान *n*.]. ४ ठराव *m*. Assigned *p.* (v. V. 1.) वांट्यास दिलेला, नेमून दिलेला, &c., &c., तैनाती, दिमतीचा, नांवावर चढवून दिलेला, बेचन दिलेला, सोंपवून दिलेला. Assignee *n.* तैनाती *m*, अखत्यारी *m*, मुखत्यार *m*, वकील *m*, दिम्मतदार *m*, मालकाचें काम करण्याचा ज्याला विशेष हक्क असतो तो, वतनदार *m*, नादार जिंदगीची व्यवस्था करणारा. २ *law* बेचन घेणारा *m*, बेचनदार *m*. Assign'ment *n.* (v. V. 1.)—*act.* वांट्यास देणें *n*, नेमून देणें *n*. [AN A. OR STANDING ORDER ON THE REVENUES तनखा *m*. PERSON WHO HAS AN ASSIGNMENT तनखेदार]. २—*act.* योजणें *n*, योजना *f*, विनियोग *m*, निर्देश(S) *m*. ३-*act.* लावणें *n*, सांगणें *n*. ४-*act.* सोंपणें *n*, सोंपून देणें *n*. ५ ठरविणें *n*. ६ *law* बेचन *n*, ज्याचे योगानें हक्क-मालकी बदलली जाते असा लेख *m*, बेचनपत्र *n*. [A. deed बेचनपत्र *n*.] ७ तनखा *m*, वतन *n*. Assign'er-or *n.* विभागून देणारा *m*, ठराव करणारा *m*, नेमणूक करणारा *m*. २ *law* बेचन देणारा *m*, बेचनवाला *m*. Assign'ability *n.* विभागून देण्याची योग्यता *f*, दुसऱ्याचे स्वाधीन करून देण्याची योग्यता *f*-शक्यता *f*, बेचन देण्यासारखी (हक्काची) लायकी *f*.

*N. B.*—In *law* the word *assign* applies to *personal* property *e. g.* leaseholds, railway-shares, furniture, as distinguished from *real* property.

Assimilate (as-sim'il-āt) [L. *ad*, to, & *similis*, Sk. सम, like.] *v. t.* *bring to a likeness* सारखा-सदृश-समधर्मक-अनुगुण करणें *g. of o.*, *recip.* २ *convert into a like substance* आंगीं लावणें, लावून घेणें, सरूप *n.* करणें, विपाक करणें, जिरवणें, जिरेसा करणें, प्रकृतीस मानवणें, एकरूप करणें. A. *v. i.* मिळून जाणें, सारखा सदृश-अनुगुण होणें-होऊन जाणें, एकजीव होणें. २ *be converted into a like substance* आंगीं-आंगास लागणें, जिरणें, जिरणीस पडणें, पचनीं पडणें. Assim'ilability *n.* Assim'ilable *a.* See the verb Assimilate. Assimilated *p.* (v. V. 1.) सारखा-एकरूप-अनुगुण केलेला-झालेला. २ आंगीं लावलेला or लागलेला. Assimilā'tion *n.* (v. V. T. 1.)—*act.* सारखा करणें *n*. २ आंगीं लावणें *n*. (v. V. I. 1.)—*act.* सारखा होणें *n*. २ आंगीं लागणें *n*, परिपाक *m*, एकजीवपणा *m*, एकरसता *f*, पूर्णैक्य *n*, *bot.* रसपरिपाक *m*, एकीकरण *n*. ३ *med.* अन्नाचा परिपाक *m*. Assim'ilātive *a.* एकरूपपचन करण्याची शक्ति असणारा, &c. Assim'ilatory *a.* A. organs अन्नाचा परिपाक करणारीं इंद्रियें. Assimilative substance अन्नाचा परिपाक करविणारा पदार्थ.

Assist (as-sist') [L. *ad*, to, & *sistere*, Sk. स्था, to stand.] *v. t.* साह्य करणें, मदत *f*-कुमक *f*-मदतगारी *f*-पुस्ती *f*-&c. करणें-देणें [हात *m*. देणें=help]. A. *v. i.* कुमक *f*. करणें-देणें, सहाय-सहकारी होणें-असणें. Assist'ance *n.* मदत *f*, कुमक *f*, साहाय्य *n*, साह्य *n*, पुस्ती *f*, सहकार *m*. Assist'ant *a.* मदतगार, मदतनीस, मदत्या, सहाय *m*, सहकारी *m*. २ बगल्या (?) *m*, हस्तक्या *m*, हस्तक *m*. Assist'or *n.* मदत करणारा, मदतनीस, हस्तक. Assist'er *n.*

Assize (as-sīz') [L. *assidere*, to be an assessor.] *v. t.* *fix price* भाव *m*-दर *m*-निरख *m*-धारण *f*-किंमत *f*-ठरविणें, वजन *n*-माप *n*. ठरविणें. A. *n.* दिवाणी अगर

फौजदारी खटल्यांचा न्याय करणारा न्यायाधीश व त्याच्या मदतीस दिलेलें मंत्रिमंडळ (जूरी) यांची कचेरी-कोर्ट, ह्या कोर्टाच्या बैठकी, इंग्लंद व वेल्समधील नियमित कालांतरानें फौजदारी वगैरे खटल्यांची चौकशी करणाऱ्या फिरत्या न्यायाधिशांच्या बैठकी-न्यायसभा (in plural) *f*, न्यायाची कचेरी *f*, अदालत *f*. २ या मंडळीनें केलेले ठराव *m*-कायदे *m*-कानू *m*. ३ पदार्थांचें वजन *n*-माप व किंमत ठरविणारा कायदा *m*. ४ *measure of price* निरख *m*, भाव *m*, दर *m*, धारण *f*. Assiz'er *n*. किंमत *f*-माप *n*-दर *m*-ठरविणारा अधिकारी *m*.

Associate (as-sō'shi-āt) [L. *ad*, to, & *socius*, a companion.] *v. t. unite, join* संगत *f*. करणें, सहवास *m*. करणें, स्नेह *m*-दोस्ती *f*-सख्य *n*-मैत्री *f*-सलगी *f*-संबंध *m*-&c. करणें *g. of o.*, संबंध जोडणें, जोड *f*-जूट *f*-सांगड *f*. घालणें-घालून देणें, सलगी ठेवणें, संविभागी करणें. A *v. i. keep company* संग *m*-संगत *f*-समागम *m*-सोबत *f*-सहवास *m*-साहचर्य *n*-&c. करणें, संघट्टणें, संघट्टन *n*. असणें with *g. of o.* A. *a.* (v. V. T.) See Associated. Assō'ciate *n. companion, mate* साथी *m*, सहकारी *m*, सोबती *m*, संवगडी *m*, संगती *m*, बंधु *m*. [FEMALE A. सोबतीण *f*, संगतीण *f*, &c.] २ *partner* अंशी *m*, भागी *m*, भागीदार *m*, जोडपी *m*. ३ *accomplice* सागया *m*, मिळणीचा मनुष्य *m*. Associated *p.* (v. V. T.) सख्य-सहवास-संगत केलेला *m*-&c., सांगड-&c. घातलेला, सांगडीचा, जोडीचा, संबद्ध, सहित, संगत, संसर्गी, सामलाती. Associater,-or *n.* (v. V. T.) सख्य-मैत्री *f*-संगत-संबंध-&c. करणारा, जोड-जूट-सांगड-जूग-&c.-घालणारा. २ (v. V. I.) स्नेह करणारा, सोबती, साथी, सोबतीचा-साथीचा-मनुष्य *m*, संगी (esp. in comp. as साधुसंगी, स्त्रीसंगी, खलसंगी), सामील. Assō'ciable *a.* see Social. Associabil'ity, Assō'ciableness *n.* Assō'ciateship *n.* Associā'tion *n.* (v. V. T.)–*act.* सख्य *n*-संयोग (?) करणें *n*, &c. संयोग (?) *m*, संयोजन (?) *n*, संबंधन *n*, संबंध *m*. २ *state.* सांगड *f*, जूट *f*, जोड *m*, संबंध *m*. ३ (v. V. I.) *state.* संग *m*, संगम *m*, अनुषंग *m*, समागम *m*, साह्य *n*, साहित्य (R) *n*, संसृष्टत्व (R) *n*, सहवास *m*, *phil.* संगति *f*. I an A. *company, combination* मंडळी *f*, समाज *m*, सभा *f*, मुठाण *n*, गट्ट (*obs.*) *m*, एकवळा *m*, जूट *f*, *m*, जूग *n*, गण *m*. Member of an A. गणाभ्यंतर (R) *m*, सभासद *m*. Association of Ideas *phil.* विचारसंगति *f*, विचारसाहचर्य *n*, प्रसक्तानुप्रसक्ति *f*, एका कल्पनेवरून अगर विचारावरून, कांहीं कारणानें दुसरी कल्पना अगर विचार भासविणारी मानसिक शक्ति *f*. Theory of the Association of Ideas विचारसंगतिन्याय *m*, प्रसक्तानुप्रसक्तिन्याय *m*. Associating *p. a.* (v. V. T.) See Associater. Associationism *n. phil.* विचारसंगतिवाद *m*, &c. Associationist *n. phil.* विचारसंगतिवादी *m*. २ मंडळीचा सभासद.

*N. B.*—Association is the result of a common interest in an object or subject. It springs from a feeling that the efforts of an Association will be more efficient than the individual efforts of its members. We have put queries before the words संयोग, संयोजन as we think that these words should be restricted to "Combination." गणद्रव्य is an old word for the funds of an Association and on its analogy we propose गणनियम as a word for the "Articles of an Association." Latin *socius* seems to be allied to Sk. सखा, a companian, and therefore Associate will best mean सख्यसंबंध जोडणें.

Assonance (as'son-ans) [L. *ad*, to, *sonare*, to sound.] *n*. एकस्वराचा करणें, स्वरयमक करणें, एका आवाजांत स्वर असणें. २ एकस्वरता *f*, स्वरसाम्य *n*. As'sonant *a.* स्वरसाम्ययुक्त; as, *mate* and *shape*, *feel* and *need* are assonant words. As'sonantal *a.* As'sonantic *a.* As'sonate *v. t.* शीं स्वरानें जुळणें.

*N. B.*—L. *sonus* and Sk. स्वन् seem to be allied.

Assort (as-sort') [L. *ad*, to, & *sors*, a lot.] *v. t.* प्रतवार *ad.* लावणें, प्रत *f*-प्रती *f. pl*-&c. लावणें *g. of o.*, उत्तममध्यमकनिष्ठ पर्याय *m. pl.* करणें *g. of o.* २ जेथल्या तेथें निरनिराळ्या वस्तु लावणें. ३ युक्त असें करणें, साजेल-जुळेल असें करणें. A. *v. i.* जुळणें, संगत होणें, मिळणें, जमणें, बनणें, (शीं) विल्हेवारीनें लावणें. Assort'ed *p. a.* (v. V. T.) विल्हेवारीनें लावलेला. Assort'edness *n.* Assort'ment *n.* (v. V. T.) प्रत *f* लावणें *n*, छाटणें *n*, छाट *n*, विल्हेवारी *f*. I एका जातीच्या जिन्नसांचा-वस्तूंचा वर्गवार संचय *m*, जातवार जिन्नसांचा-पदार्थांचा संग्रह *m*-संचय *m*, वर्गीकरण *n*.

Assuage (as-swāj') [L. *ad*, to, *suavis*, mild.] *v. t. allay* (angry or excited feelings) सौम्य करणें, कमी करणें, हलका करणें, समाधान *n*-उपशम *m*-उपशमन *n*-उपशांति *f*. करणें *g. of o.* २ *appease* (the excited person) थंड-थंडा करणें, शमवणें. ३ (physical or mental pain) शांतवणें, सांतवणें, संतावणें or संथावणें, स्वस्थावणें. A. *v. i.* हलकावणें, मंदावणें, कमी होणें, शमणें. Assuage'ment *n.* (v. V. T. 1.)—*act.* हलका करणें *n*, उपशम *m*, उपशमन *n*.—*state.* उतार *m*, समाधान *n*, उपशम *m*, उपशांति *f*. २–*act.* शमवणें *n*, शांतवणें *n*, थंड करणें *n*, &c., शमन *n*, प्रशमन *n*.–*state.* शांति *f*, शम *m*, प्रशम *m*. Assuāg'er *n.* कमी करणारा, शमविणारा. Assuā'sive *a.* हलका-कमी करणारा, उपशमन करणारा, &c.

*N. B.*—L. *suavis* is allied to Sk. स्वादु.

Assume (as-sūm') [L. *ad*, to, & *sumere*, to take.] *v. t. take upon one's-self* (शिरावर) घेणें, आपल्याकडे घेणें, अंगीकार करणें, स्वीकारणें, कबूल करणें, आदरणें, उचलणें, घेणें. २ *adopt* (रूप-मुद्रा) धारण करणें. ३ *take for granted* गृहीत घेणें-करणें (प्रमाणाची अपेक्षा न करितां) गृहीत धरणें, प्रमाण न पाहतां मानणें, कल्पिणें, धरून चालणें, सिद्धवत् मानणें. ४ *pretend to possess* बहाणा करणें, आव आणणें, डौल घालणें, वेष

घेणें with *g. of o.* ५ *adopt into partnership-employment-association* भागीदार ह्मणून नोकरींत-उपयोगांत-मंडळींत घेणें, सामील करून घेणें. A. *v. i.* गर्विष्ट होणें, डौल दाखविणें, ताठ्यांत असणें, ओढून प्रतिष्ठा आणणें, उतमात *m.* करणें-मांडणें. २ गैरवाजवी-हक्क सांगणें. Assum'able, Assump'tive *a.* Assum'ably *adv.* Assumed' *a.* ( v. V. T.) आपल्याकडे घेतलेला, अंगीकार केलेला, अंगीकृत, स्वीकृत. २ गृहीत, प्रमाणावांचून घेतलेला, आहार्य, कल्पित, इष्ट. Assum'edly *adv.* Assum'er *n.* Assum'ing *a.* आढ्यतेचा, कुर्रेबाज, दिमाखाचा, मगरूर, अभिमानी. Assum'ingly *adv.*

Assumpsit ( a-sump'sit ) *n. law* सापेक्ष-सहेतुक-वचन, सापेक्ष कार्यांगीकरण *n.* २ वचनभंगानें अगर अंगीकृत कार्य न केल्यानें झालेलें नुकसान भरून मिळण्याबद्दल आणलेला दावा *m.*

Assumption ( as-sum'shun ) [ See Assume. ] *n.* ( v. V. T. 1. )—*act.* आपल्याकडे घेणें *n*, अंगीकार करणें *n*, &c., स्वीकरण *n*, अंगीकरण *n.*—*a.* or *s.*, अंगीकार *m*, स्वीकार *m.* २—*act.* प्रमाणावांचून घेणें *n*, प्रमाण-विचार-व्यतिरिक्तग्रहण *n*, आधाराशिवाय गृहीत धरणें. I *point assumed* प्रमाणावांचून मानलेली गोष्ट *f*, कल्पना *f*, इष्टपक्ष *m*, इष्टमत *n*, कल्पित-गृहीत सिद्धांत-मत. २ *log.* प्रतिज्ञा *f.* ३ वेषधारण *n.* ४ स्वर्गगमन *n.* ५ स्वर्गगमनाप्रीत्यर्थ उत्सव *m.* Assump'tive *a.* Assump'tively *adv.*

Assure (a-shōōr') [*ad*, to, & L. F. *securus*, safe.] *v. t. make sure* खातरी *f*-खातर *f*-खातरजमा *f.* करणें-करून देणें *g. of o.*, भरंवसा *m*-दिलभरंवसा *m*-दिलासा (R) *m*-दिलदिलासा (R) *m*-धैर्य *n*-धीर *m*-&c. देणें, अभयवचन (?) *n*-अभय (?) *n*-अभयपत्र (?) *n*-होवासा *m.* देणें,अभयदान *n.* करणें; as, To A. a person for a thing. २ *make firm* खचित-निश्चित-करणें. ३ निक्षून सांगणें. ४ *law* तोट्याची हमी भरणें. ५ लग्न जुळविणें,लग्नाची भाप देणें. ६ विमा *m.* उतरणें. Assur'able *a.* Assur'ing *n.* Assur'ance *n.* ( v. V. 1. )-*act.* खातरी-खात्री करणें *n*, भरंवसा देणें *n*, अभयदान (?) *n.* [HAND AS STRETCHED FORTH IN A. अभयहस्त *m.* PROCLAMATION OF A. अभयडंका *m*, अभयडिंडिम *m.* WRIT OF A. अभयपत्र *n*, अभयलेख *m.* ] I *promise* वचन *n*, प्रतिज्ञा *f*, भाक(ष) *f.* II *trust in self* ऊब *f*, उमेद *f*, धीर *m*, दम *m.* III *firm pursuasion* धडा(?) *m*, निधडा(?) *m*, खातरजमा *f*,खातरी *f*, निशा *f*, as in शहानिशा *f*, निश्चय *m.* [ PERFECT A. वालंबाल खातरी *f.* ] IV अभयमुद्रा *f*, तोंड ( *idio.* ) *n.* V. *testimony of credit* निशा *f*, खातरी *f.* Assured' *a.* ( v. V. I. ) खातरी झालेला-केलेला, भरंवसा पटलेला-केलेला, गतशंक, दृढनिश्चित (?), गतसंदेह, जातनिश्चय, निभ्रांत, निःशंक. २ असभ्य, उद्धट. A. *n.* विमा ज्याचा उतरलेला असतो तो, विमेदार. Assur'edly *adv.* खातरीपूर्वक, निश्चयानें, खचित, निश्चयात्मक. Assur'edness *n.* पूर्ण विश्वास *m*, खातरी झालेलेपणा *m.* Assur'er *n.* खात्री करून देणारा. २ विमा उतरणारा, विमेवाला. Assur'ing *a.* खातरीचा. Assur'ingly *adv.*

*N. B.*—For the words अभयहस्त, अभयडंका, अभयलेख —खात्रीचा हात or वचनहस्त, खात्रीचा डंका-द्वाही or वचनडंका, खात्रीचा लेख or वचनलेख will be more correct. धडा, निधडा are really adjectives used as nouns. They mean daring for exploits implying a valiant determination. They are not correct renderings of "Assurance."

Generally Assurance meaning विमा is more used of life contingencies, and Insurance of other contingencies; as, Life Assurance, Fire Insurance.

Assyrian ( as-sir'i-an ) *a.* or *n.* ॲसीरिया प्रांतांतील (रहिवासी-भाषा), असीरियाचा, असीरियादेशासंबंधीं.

Astatic ( a-stat'ik ) [ Gr. *a*, not, & *statos*, to stand. ] *a.* ( magnetism ) एकाच स्थितींत अगर एकाच दिशेंत राहण्याकडे प्रवृत्ति नसणारा, चंचल, चलवृत्ति, अस्थिर, अस्थास्नु. A. galvanometer, See Galvanometer.

Astel ( as'tl ) [L. *astula*, a splint or chip.] *n. mining* खाणीमध्यें काम करणाऱ्यांचे डोक्यावर वरून कांहीं पडूं नये ह्मणून बांधलेली फळ्यांची कमानदार मांडणी *f.*

Aster (as'tėr) [ Gr. *aster*, a star.] *n.* एक प्रकारचें फुलझाड; याचें फूल अस्मानी रंगाचें व ताऱ्यासारखें असतें. As'terism *n. astron.* नक्षत्रसमुदाय *m*, नक्षत्रपुंज *m*, नक्षत्रगण *m.* Table of A.s in the moon's path नक्षत्रमाला *f.*

Asterisk ( as'tėr-isk ) [ Gr. *aster*, a star. ] *n. print.* नक्षत्राचे आकाराची फुली *f* *, चौफुली *f*, फुली.

Astern ( a-stėrn' ) *adv.* गलबताचे मागचे बाजूस, गलबताचे पिछाडीस-पिछाडीकडे.

Asteroid ( as'tėr-oid ) [ Gr. *aster*, a star, *eidos*, form. ] *n. astrol.* मंगळ व बृहस्पती यांच्या कक्षांमधून सूर्याभोंवती फिरणारे अल्पग्रह *m*, लघुग्रह *m.*

Asthenia ( as-thē-nī'a ) [ Gr. *a*, not, & *sthenos*, strength. ] *n. the state of powerlessness produced when an organ loses its capacity for excitability through abuse of excitation, and becomes unable to perform its function unless it has a quantity of stimulus greater than that which originally sufficed.* ( Keating. ) (विशेष इंद्रियाची) शक्तिक्षीणता *f.* Asthen'ic *a.* and *n.* शक्तिक्षीण करणारा (रोग).

Asthenopia ( as-the-nō'pia ) [ Gr. *a*, not, *ops*, eye, & *sthenos*, strength. ] *n. a condition of the ocular muscles or visual powers in which they are easily fatigued, from anæmia, errors of refraction,* &c. ( Keating. ) निर्बलदृष्टि *f*, दृष्टिक्षीणता *f.*

Asthma ( ast'ma ) [ Gr. *asthama*, short-drawn breath.] *n. med.* दमा *m*, श्वास *m*, श्वासकास *m*, धाप *f.* Asthmat'ic,-al *a.* दम्याचा, दम्यासंबंधीं. २ धापाळू, धाप्या, धापकरी, दमेकरी, कासश्वासग्रस्त. Asthmat'ic *n.* दम्याचा रोगी *m.* Asthmat'ically *adv.*

Astigmatism ( a-stig'ma-tizm ) [ Gr. *a*, not, & *stigma*, a mark. ] *n.* निर्बिंदुता *f*, ज्यामुळें डोळ्यावर पडलेलीं किरणें पुन्हां एका बिंदूंतून जात नाहींत असा डोळ्याचा दोष.

Astir ( a-stir' ) *adv.* or *a.* हालत, गतियुक्त, निजून उठलेला, चळवळ करीत असलेला.

Astonish ( as-ton'ish ) [ L. *attonare*, to strike with a thunderbolt. ] *v. t. amaze, surprise* चकित करणें, थक्क करणें, चोजवणें, दंग-चकभूल-सचकित-विस्मित-विस्मयापन्न-साश्चर्य-&c. करणें, चकभूल *f.* उडवणें-करणें *g. of o.*, चौकडी (?) *f.* भुलवणें or गुंग करणें *g. of o.*, आश्चर्यांत निमग्न-गर्क करणें. Aston'ished *p. a.* थक्क, थकित, चकित, चक्क, चकभूल, चरख (?), दंग, सचकित, विस्मित, चमत्कृत, विस्मयापन्न, आश्चर्ययुक्त, साश्चर्य. Aston'ishing *a.* विस्मयकारक, विस्मयजनक, आश्चर्यकारक, चमत्कारिक. A. *n.* ( v. V. )*-act.* चकवणें *n.* Aston'ishingly *adv.* Aston'ishment *n.* ( v. V. )*—state.* विस्मय *m*, चकभूल *f*, अचंबा *m*, आश्चर्य *n*.

*N. B.*—Astonish ह्याचा मूलार्थ कानठाळी बसवणें असा अहे. परंतु त्या मूलार्थाचा लोप होऊन सध्यां अकल्पित भयानें-आश्चर्यानें गुंग करणें-गोंधळून टाकणें असा अर्थ होतो.

Astound ( as-townd' ) [ See Astonish. ] *v. t.* आश्चर्यचकित करणें, विस्मित करणें, आश्चर्यानें स्तब्ध करणें, चक्क करणें. Astounded *p.* ( v. V. ) See Astonished. Astound'ing *a.* अद्भुत, चकित करणारी, विचित्र, चमत्कारिक, विस्मयावह, आश्चर्यकारक. Astound'ment *n.* [R] विस्मय *m*.

Astraddle ( a-strad'dl ) *adv.* दोहों बाजूंस पाय टाकून. To sit A. a horse दोहोंकडे पाय टाकून घोड्यावर बसणें. Also Astride.

Astragal ( as'tra-gal ) *n. archi.* रोमनडॉरिक खांबाच्या टोपीचा शेवटचा थर *m*.

Astragalus ( as-trag'al-us ) [ Same as English *astragal*, & Gr. *astragalos*.] *n.* घोंट्याचें हाड *n*, गुल्फास्थि *m*, गुल्फमुख्य *m*.

Astral ( as'tral ) [ L. *astralis*, a star. ] *a.* ( आकाशांतील ) तारकांसंबंधीं, ताऱ्यांचा, ताऱ्यासारखा. Theosophy:—A. body कामदेह, कामरूपदेह. A. spirit कामलोकदेवता. A. plane कामलोक, प्रेतलोक. ह्या ठिकाणीं मरणानंतर मनुष्याचा कामदेह जातो अशी कल्पना आहे.

Astray ( a-strā' ) [ Pref. *a*, on, & Stray. ] *adv.* वाट चुकून, आडवाटेनें, भलतीकडे, वाट भुलत, गलत (?) रानांत, आडरानांत. To go A. बहकणें, पाऊल *n.* वांकडें पडणें *g. of o.* To lead A. कुमार्गाकडे नेणें, बहकावणें, भलत्याच मार्गाकडे नेणें.

Astriction ( as-trik'shun ) *n.* आवळणें *n*, संकुचित करणें *n.* Astrict' *v. t.* आवळणें, संकुचित करणें.

Astride ( a-strīd' ) *adv.* दोन्हींकडे पाय टाकून.

Astringent ( as-trin'jent ) [ L. *ad*, to, & *stringere*, to bind. ] *a.* (शिरा) संकुचित करणारें, शरिरांतील द्रवद्रव्यें गोठविणारें. २ *med.* स्तंभक (औषध). ३ तुरट, ग्राही, कषाय, कषायान्वित. Astringe' *v. t.* स्तंभन *n.* करणें, ओढून धरणें, संकोच करणें. Astrin'gency *n.* स्तंभकधर्म, स्तंभकत्व *n.* २ तुरटपणा *m*, तुरटाई *f*, राप or रांप *m*, कषाय *m. n.* Astrin'gently *adv.*

Astrolabe ( as'trō-lāb ) [ Gr. *aster*, a star, & *lambano*, I take. ] *n. astron.* वेधयंत्र *n*, तारकोच्चत्वमापक यंत्र; सूर्य व इतर तारे यांची क्षितिजापासून उंची मोजण्याचें यंत्र *n.* हें हल्लीं प्रचारांत नाहीं.

Astrology ( as-trol'o-ji ) [ Gr. *astron*, a star, & *logos*, knowledge. ] *n.* फलज्योतिष *n*, प्रश्नज्योतिष *n*, मुहूर्तज्योतिष *n*, केरली *f*, उपश्रुति (?) *f*, नक्षत्रफलगणनविद्या *f*, ग्रहफलशास्त्र *n.* Astrol'oger, Astrolō'gian *n.* फलज्योतिषी *m*, मुहूर्त सांगणारा जोशी *m*, गणक *m.* २ प्रश्नज्योतिषी *m. pop.* जोशी *m*, दैवज्ञ *m*, नक्षत्रसूचक, नक्षत्रसूची (?). Astrolog'ic,-al *a.* फलज्योतिषासंबंधीं, मुहूर्तज्योतिषाचा, ज्योतिष, ज्योतिषासंबंधीं. Astrolog'ically *adv.* फलज्योतिषावरून, प्रश्नज्योतिषाच्या रीतीनें. Astrol'ogize *v. i.* फलज्योतिष सांगणें-वर्तवणें, भाकित करणें.

Astronomy ( as-tron'om-i ) [ Gr. *astron*, a star, & *nomos*, a law.] *n.* ज्योतिर्विद्या *f*, खगोलविद्या *f*, ज्योतिष *n*, ज्योतिःशास्त्र *n*, नक्षत्रविद्या *f*, ज्योतींचे आकार-नैसर्गिक स्थिति *f*-अंतरें-गति-प्रदक्षिणा-काल यांसंबंधीं ज्या शास्त्रांत विचार केलेला असतो तें शास्त्र *n.* Physical A. ज्योतिर्घटनाशास्त्र, ज्योतिर्घटन (शास्त्र), भौतिकज्योतिष. ह्या ज्योतिषशाखेंत ग्रहांचीं घटकद्रव्यें, व त्यांचे इतर भौतिक गुण व धर्म ह्यांचा विचार होतो. Mathematicial A. ज्योतिर्गणित, ग्रहगणित. Astron'omer *n.* ज्योतिर्विद् *m*, खगोलविद्येचा अभ्यास करणारा, खगोलशास्त्रवेत्ता, ज्योतिषी *pop.* जोशी *m*, खगोलवेत्ता *m.* Astronom'ic,-al *a.* खगोलविद्येसंबंधीं, ज्योतिषाचा, ज्योतिष-संबंधीं-विषयक. [*The astronomical periods* called *Karana* are, बव, बालव, कौलव, तैतिल, गरज, वणिज, भद्रा, शकुनि, चतुरंघ्रि, नाग, किंस्तुघ्न. *The astronomical divisions* called *Yoga* are विष्कंभ, प्रीति, आयुष्मान्, सौभाग्य, शोभन, अतिगंड, सुकर्मा, धृति, शूल, गंड, वृद्धि, ध्रुव, व्याघात, हर्षण, वज्र, सिद्धि, व्यतिपात, वरीयान्, परिघ, शिव, सिद्ध, साध्य, शुभ, शुक्ल, ब्रह्म, ऐंद्र, वैधृति. ] Astronom'ically *adv.* खगोलविद्येच्या अनुरोधानें, ज्योतिःशास्त्राप्रमाणें. Astron'omize *v. i.* [ R ] खगोलविद्येचा अभ्यास करणें.

*N. B.*—As Alchemy is the beginning of Chemistry, so Astrology is the beginning of Astronomy. वेधशास्त्र is another good word for Astronomy.

Astute ( ast-ūt' ) [ L. *astus*, craft, subtlety. ] श(शाह)हाणा, कावेबाज, धूर्त, चतुर, सूक्ष्मदर्शी, अक्कलवान्, अक्कलबाज. Astute'ly *adv.* शहाणपणानें, धूर्ततेनें, सूक्ष्मदृष्टीनें. Astute'ness *n.* धूर्तता *f*, शहाणपण *n*, धूर्ताई *f*, धूर्तावा *m*, हुशारी *f*, कावेबाजपणा *m*.

Asunder ( a-sun'der ) [Pref. *a*, & Sunder.] *adv.* विलग, वेगळा, मोकळें, अलग, पृथक्, निरनिराळा. To fall A. सुटून पडणें, सुटणें.

Asylum ( a-sīl'um ) [ Gr. *a*, not, *syle*, right of seizure.] *n.* धर्मशाळा *f*, धर्मशाळ *f*, अनाथगृह *n.* (मूलार्थ) लुटालूट होण्याची भीति नाहीं अशी जागा *f*, आश्रय *m*.

*pop.* आसरा *m*, थार *m*, थारा *m*, ठाव *m*, मायपोट *n*, माहेर *n*, महालय *n*, शरणस्थान *n*, निर्भयस्थान *n*, आश्रयस्थान *n*. २ अनाथ मंडळीकरितां दवाखाना आणि रहावयाचें ठिकाण *n*.

*N. B.*—हा लॅटिन शब्द आहे. ह्याचें लॅटिन अनेकवचन Asyla व इंग्रजी अनेकवचन Asylums असें आहे.

Asymptote ( a'sim-tōt ) [ Gr. *a*, not, *syn*, with *ptotos*, apt to fall, *piptein*, to fall.] *n. math.* उपगा, स्पर्शकल्परेषा, उपसंजीहाना (वक्ररेषेच्या अधिकाधिक जवळ जाणारी परंतु कितीहि वाढविली तरी तिला न मिळणारी रेषा) *f*; असंपातरेषा; as, The A. s of a hyperbola. Asymptot'ic,-al *a*. Asymptot'ically *adv*.

Asynchronism ( a-sin'kro-nizm ) [ Prefix *a*, not. ] see Synchronism.

At ( at ) *prep.* स or शीं or ला or ई ( *added to the noun*) पाशीं, जवळ, प्रत, लागीं, कडे (वेळ किंवा स्थळ ह्याअर्थीं). २ At first. ह्यांत 'at' ह्याचा कालदर्शक अर्थ होतो. He came at first तो सर्वांत लवकर आला. ३ At home, at church ह्या शब्दरचनेंत 'at' ह्याचा अर्थ स्थलसांनिध्यवाचक आहे. He is at home, I met him at the church तो घरीं आहे, मी त्याला देवळांत भेटलों. ४ At work ह्या शब्दरचनेंत 'at' ह्याचा अर्थ स्थिति किंवा व्यवसायदर्शक आहे. He is at work तो काम करीत आहे. While at school विद्यार्थी असतां. ५ At best ह्यामध्यें 'at' ह्याचा अर्थ प्रमाणदर्शक आहे. At best he has a hundred rupees फार फार झाले तर त्याजजवळ १०० रु. आहेत. ६ At your service ह्यांत 'at' ह्याचा अर्थ परस्परसंबंधदर्शक आहे. I am at your service मी आपण सांगाल तें करण्यास तयार आहें. ७ At a shilling ह्यांत 'at' याचा अर्थ मूल्यदर्शक आहे. He bought each book at a shilling. ८ 'At' ह्याचा अर्थ अमुक एक दिशा दाखवितो. He fired at the bird पक्ष्यावर बंदूक झाडिली. At large मोकळा, मुक्त, स्वतंत्र, निर्बंध. २ सामान्येंकरून. ( Speaking at large सामान्यरीतीनें बोलतांना-बोलावयाचें ह्मणजे.) At least निदान, निदानेंकरून. At length विस्तृत प्रमाणानें, सविस्तर. २ अखेरीस, शेवटीं पुष्कळ काळानें.

*N. B.*—At length बऱ्याच काळानें; ह्या शब्दप्रयोगांत बराच काळ गेल्यावर समाप्ति झाल्याचा ध्वनि आहे. At last शेवटीं एकदाचें; ह्या शब्दप्रयोगांत फक्त बराच काळ गेला असा ध्वनि नाहीं; बरीच निराशा, बऱ्याच अडचणी-मग त्यांचा कालावधि थोडा कां असेना-संपल्यावर शेवटीं एकदाचें असा At last चा अर्थ आहे. At length I reached land बरेच महिने गेल्यावर एकदां मी जमिनीस लागलों. At last the train arrived at 8 p.m. गाडी सहाला यावयाची होती, ती आतां येते, मग येते असें होतां होतां शेवटीं आठांला एकदांची आली.

Atabal ( at'a-bal ) *n.* तबला *m*.

Ataraxia ( at'a-raks'ia ) *n. quietism* अक्षोभ *m*, शम *m*, शांति *f*. ( Stoical indifference), काम, क्रोध, लोभ इत्यादि षड्विकारांपासून मुक्तता.

Atavism ( at'av-izm ) [ L. *atavus*, an ancestor. ] *n. biol.* आनुवंशिकरोग *m*, हा रोग मधूनच एखाद्या पिढींत एकदम उमटतो; कुळींतला-कुलागत-कुळीचा रोग *m*. कुळीचीं लक्षणें. २ जुन्या पिढीच्या वळणाकडे जाणें. At'avistic *a*. पिढीजात or द, जुन्या वळणाकडे जाण्याचा.

Ataxia ( at-ak'si-a ), Ataxy ( a-tax'i ) [ Gr. *a*, not, & *taxis*, order. ] *n. med.* वेपथुरोग *m*, कम्पवायु *m*. हा रोग पृष्ठरज्जु ( spinal chord ) बिघडला असतां होतो.

Ate ( et ) 'eat' या क्रियापदाचें भूतकाळदर्शक रूप.

Atelectasis ( a-te-lek'ta-sis ) *n. med.* अपूर्णाध्मान *n*, अपुरें प्रसरण *n*. ( of the pulmonary alveoli ).

Atheism ( ā'the-izm ) [ Gr. *a*, not, & *theos*, Sk. देव, God. ] *n.* अदेववाद, अनीश्वरवाद *m*, अदेवमत, नास्तिकमत *n*, नास्तिकता *f*, नास्तिक्य *n*, नास्तिकत्व *n*, अनीश्वरमत *n*. A'theist *n*. नास्तिक *m*, अदेववादी *m*, अनीश्वरवादी, नास्तिकमतानुयायी. Atheist'ic, Atheist'ical *a*. नास्तिकमताचा, नास्तिकमतासंबंधीं, नास्तिकमतानुसारी. Atheist'ically *adv*. A'theise *v. i.* and *v. t.* नास्तिकाप्रमाणें बोलणें-लिहिणें. A'theous *a*. नास्तिक.

Atheling ( ath'el-ing ) [ A. S. *ætheling*. ] *n.* युवराज *m*, राजपुरुष *m*, अमीर *m*.

Atheneum, Athenæum ( ath-e-nē'um ) [ Gr. *athene*, the goddess of wisdom. ] *n.* जुन्या अथेन्समधील ॲथीना किंवा मिनर्व्हा देवीचें देऊळ. ह्या ठिकाणीं पूर्वीं विद्येचा घोष होत असे. २ (ज्ञानवर्धक साधनांनीं युक्त अशी) ज्ञानवर्धक संस्था *f*. ३ ज्ञानमंदिर *n*, विद्यामंदिर *n*, ज्ञानमठ *m*.

Athenian ( a-thē'ni-an ) *n.* ग्रीसदेशांतील अथेन्सशहरचा रहिवासी *m*, अथीनियन. A. *a*. अथेन्स शहरासंबंधीं.

Athermanous ( a-ther'man-us ) [ L. *a*, not, & *therma*, Sk. घर्म, heat.] *a*. उष्णाभेद्य, उष्णताविसर्जनप्रतिबंधक. Ather'mancy *n*. उष्णाभेद्यत्व *n*, अघर्मवाहित्व.

Atheroma ( ath'er-ō-ma ) [ Gr. *athere*, pap. ] *n. med.* रोगाच्या संबंधानें होणारा असा धमनींत वसा उत्पन्न करणारा रोग *m*, नाडीव्रण *m*.

Athirst ( a-therst' ) [ with *for*. ] *a.* or *adv.* तृषार्त, तान्हेला. २ आतुर.

Athlete ( ath'lēt ) [ Gr. *athlos*, a contest.] *n.* पहिलवान *m*, मल्ल *m*, जेठी *m*, तालिमबाज *m*, मल्लयोद्धा *m*, मल्लक्रीडक *m*. Business or skill of the Pahilwan पहिलवानकी *f*. Contests or feats of athletes मल्लयुद्ध *n*, मल्लक्रीडा *f*, व्यायाम *m*. Training of athletes तालीम *f*. Athlet'ic *a*. मल्लक्रीडेसंबंधीं-विषयक. २ *robust, lusty* मजबूत, धडधाकट, धट्टाकट्टा, जोमदार, जोधा, जोरकस, कट्टा. Athlet'ics *n. pl.* पहिलवानाचे खेळ, कसरत. Athlet'icism, Ath'letism *n*. पहिलवानाचा धंदा *m*, पहिलवानकी *f*, मल्लविद्या *f*.

At-home ( at-home ) *n.* मित्रमेळा. साहेब लोकांत ह्या वेळीं पुष्कळ तऱ्हेचे खेळ खेळतात; मंडळींनीं फराळ करावाच ह्मणून यजमान किंवा यजमानीणबाई आग्रह करीत नाहीं. हें आमंत्रण पाठविणारा यजमान अमुक

दिवशीं अमुक वाजतां घरीं असेल व आपल्या मित्रांनीं भेट दिली असतां त्याला आनंद होईल इत्यादि मजकूर त्यांत असतो. २ मित्रांचा मेळा *m.* (ह्या भेटीचा काल बहुतकरून दुपारचे जेवणाचे पूर्वीं असतो). *pl.* At-homes. At-home *adv.* पूर्ण, प्रवीण. २ घरच्यासारखा, परकी(के)पणा नसलेला. Not-at-home युरोपियन लोकांत एखादा मनुष्य घरीं असला तरी कामामुळें भेटतां येत नाहीं ह्मणून घरीं नाहीं हें सांगण्याचा प्रघात आहे. ह्या अर्थीं Not at home ह्या शब्दांचा उपयोग करतात, भेटण्यास सवड नसलेला. He is at home in Mathematics तो गणितांत पूर्ण प्रवीण आहे. Make yourself at home here घरच्यासारखे येथें वागा, येथें अगदीं परकेपणा ठेऊं नका.

Athwart (a-thwawrt') [Pref. *a*, on, & thwart.] *prep.*—च्या एका बाजूपासून दुसऱ्या बाजूपर्यंत, आडवा. *adv.* आडवा येऊन, गोंधळ करण्याप्रमाणें, आडवा, *naut.* गलबताच्या मार्गावर आडवा.

Atilt (a-tilt') *adv.* पुढें झोंकता-कलता *a. decl.*

Atkins. See Tommy Atkins.

Atlantes (at-lan'tēz) [Gr. *pl.* of Atlas.] *n. pl.* तुळईला दिलेले मनुष्याकृतीचे खांब.

Atlantic (at-lan'tik) *n.* युरोप व आफ्रिका यांच्या पश्चिमेकडील महासागर *m.* हें नांव आफ्रिकेंतील ॲटलास पर्वतावरून पडलें आहे. २ ॲटलांटिकवेट.

Atlas (at'las) [Gr. *atlas*, one of the Titans.] *n.* आफ्रिकेंतील मॅरिटेनिया देशाचा राजा *m;* यानें आपले दंडावर सर्व जग धरलें होतें अशी आख्यायिका आहे. २ आफ्रिकेमध्यें ॲटलास नांवाचा एक उंच पर्वत आहे. तो स्वर्ग आपले मस्तकावर धरितो अशी कल्पना आहे. व ह्या कल्पनेवरून वरील आख्यायिकेचा उगम झाला असावा असा तर्क आहे. आणि ह्मणूनच प्रत्येक नकाशाचे पुस्तकावर, मानेवर गोल घेतलेल्या एका पुरुषाचें चित्र काढलेलें असतें. ३ निरनिराळ्या देशांच्या नकाशांचें पुस्तक *n*, नकाशांची वही *f.* ४ (कोणत्याहि विषयाचें पूर्ण ज्ञान व्हावें ह्मणून मुद्दाम तयार केलेल्या) आकृतींचें किंवा पटांचें पुस्तक. ५ *anat.* शिरोधरास्थि, मानेंतील मुख्य हाड *n* (ज्यावर डोकें सांवरतें), शीर्षधर मणका *m.*

Atmology (at-mol'o-ji) [Gr. *atmos*, vapour, *logia*, discourse.] *n. that branch of science which treats of the laws and phenomena of aqueous vapour* बाष्पशास्त्र *n.*

Atmometer (at-mom'e-tėr) [Gr. *atmos*, vapour, *and metron*, measure.] *n. an instrument for determining the amount of evaporation from a moist surface in a given time* बाष्पमापक (यंत्र) *n.*

Atmosphere (at'mo-sfēr) [Gr. *atmos*, air, *sphaira*, a sphere.] *n.* वातावरण *n*, पृथ्वीसभोंवतीं ज्या वायूचें आवरण आहे तो वायु *m*, आकाश *n*, वायुचक्र *n*, घनाश्रय *m*, मेघमंडल *n*, वाय्वावरण *n.* २ *fig.* आवरण, परिस्थिति *f;* as, To live in the A. of doubt. ३ *astron.* भूवायु. Atmospher'ic, Atmospher'ic-al *a.* वातावरणासंबंधीं, वातावरणाचा, वायुचक्राचा, आकाशाचा, आकाशीय, आकाशी, वायुचक्रासंबंधीं. A. pressure *n.* वातावरणाचा दाब *m*, हवेचा दाब *m.* A. engine वातावरणाच्या दाबानें चालणारें वाफेचें यंत्र *n.*

Atom (at'om) [Gr. *a*, not, & *tamein*, to cut.] *n.* परमाणु *pop.* अणु *m*, रज *m*, कण *m.* २ *fig.* अतिसूक्ष्म पदार्थ *m*, रज *m*, लवलेश *m* (As—not an A. of sense). Atom'ic,-al *a.* परमाणूसंबंधीं, परमाणूंचा, परमाणुनिर्मित, परमाणुरूप, परमाणुमय. २ अतिसूक्ष्म, सूक्ष्म. Atom'ic philosophy or At'omism *n.* परमाणूंच्या आंगच्या स्वाभाविक धर्मांचे योगानें जगांतील सर्व वस्तु उत्पन्न झाल्या आहेत असें मत *n*, परमाणुवाद *m*, सूक्ष्मवाद *m.* Atomic theory or doctrine of definite proportion नियमित प्रमाणवाद *m*, परमाणूंचा रासायनिक संयोग ठरींव नियमांनीं होतो असा सिद्धांत *m.* Atomic system *Hindu philos.* वैशेषिक मत *n.* Atomic volume परमाणूचें आकारमान *n.* Atomi'cian, At'omist *n.* (See Atomism) परमाणुवादी *m*, सूक्ष्मवादी *m.* Atomis'tic *a.* Atomist'ically *adv.* Atomic'ity *n. philos.* परमाणुता *f.* २ *chem.* परमाणुसंयोगप्रमाण *n.* Atomizā'tion *n. med.* द्रवद्रव्याचें बाष्परूप करणें *n.* At'omize *v. t.* परमाणुरूप देणें, अगदीं लहान-कमी करणें. A. heat परमाणूष्णता. A. weight परमाणुगुरुत्व, अणुभारांक. At'omy *n.* परमाणु *m*, अतिसूक्ष्म-क्षुद्र जंतु *m.* २ *shakes.* अस्थिपंजर *m*, सुदामजी *m.*

Atone (for) (at-ōn') [From *at* & *one.*] *v. i.* (at आणि one या दोन शब्दांपासून या शब्दाची उत्पत्ति आहे) एकी करणें, प्रायश्चित्त घेणें, अपमान अगर गुन्हा यांचें निरसन होईल असें कृत्य करणें, पापनिरसन करणें, निस्तरणें, (भांडलेल्या लोकांची) एकी-मिलाफ करणें. २ प्रायश्चित्तानें (पाप) घालविणें, प्रायश्चित्त &c.-करून-घेऊन घालवणें-निपटणें-निस्तारणें, पापनिष्कृति *f*-निरसन *n*-&c. करणें. ३ भरून-बदल देणें. Aton'a-ble *a.* Atone'ment *n.* प्रायश्चित्त *n*, पापनिष्कृति *f*, अपमाननिष्कृति *f*, अपराधनिष्कृति *f*, पापनिरसन *n*, पुन्हां दोस्ती-मिलाफ होणें. A-ton'er *n.*

Atony (at'on-i) [Gr. *a*, not, & *tonos*, tone.] *n. med. diminution of muscular tone* स्नायूंची क्षीणता *f*, प्रत्येक इंद्रियाची क्षीणता *f*, निःशक्तपणा *m*, धातुक्षीणता *f.* At'onic *a. med.* स्नायूंची क्षीणता झालेला, स्नायु क्षीण झालेला. २ ज्याला आघात (accent) लागत नाहीं असा. A. *n.* स्नायुक्षीणतेवर उपचार *m.*

Atop (a-top') *adv.* वर, वरती, शेंड्यावर.

Atrabilarian (at'ra-bi-lā'ri-an) [L. *atrabilis*, black bile.] *a.* अतिपित्तामुळें उदास झालेला, उदासवृत्तीचा, विषण्ण. Also Atrabil'arious.

Atramental (at'-ra-men'tal) [L. *atramentum*, ink.] *a.* शाईसारखा काळा, कज्जलवर्ण. Atramen'tous, Atramenta'rious *a.* शाई करण्यास उपयोगी.

Atresia (ā-trē'shi-a) [Gr. *a*, not, & *trao* to perforate.] *n. med.* निरंध्रता. A. of the anus निरंध्रगुद, गुद निरंध्र होणें. A. iridis बुजलेली बाहुली.

Atrocious ( a-trō'shus ) [ L. *atrox*, *atrocis*, fierce, cruel. Sk. द्रुह्, to grieve or injure.] *a.* अतिदुष्ट,राक्षसी, अमानुष, अट्टल, घोर, भयंकर, आ(अ)सुरी. २ अकटोविकट, उग्र, महापातकाचा, महापातकी, अतिदुष्ट, महापापरूप, महापापात्मक, तामस, भीमकर्मा, घोरकर्मा. Atrō'ciously *adv.* घोरपणानें, महापापपूर्वक, अतिदुराचरणपूर्वक. Atrō'ciousness *n.* Atroc'ity *n.* घोरपणा *m*, अतिदुष्टता *f*, उग्रता *f*. २ महापातक *n*, घोरकर्म *n*, अत्यंत दुष्टता *f*. असुरीपणा *m*, &c.

Atropal ( at'ro-pal ) [Gr. *a*, not, & *trepein*, to turn.] *a. bot.* यथास्थित (S), सरल, ऊर्ध्वमुख, ऊर्ध्वमुखी; as, A. ovule means ऊर्ध्वमुखी गर्भ *m*. The ovule of Indian वाल *n*. or वाटाणा is such. Also Atropus.

Atrophy ( a'trof-i ) [ Gr. *a*, not, & *trephein*, to nourish. ] *n. med.* अपोषण (रोग), अपोषणक्षय *m*, झुरत जाऊन शक्ति क्षीण होते असा रोग *m*, एखादा अवयव किंवा त्याचा एखादा भाग किंवा त्यांतील शिरा, रक्तवाहिन्या, अस्थि वगैरे झिजत जाणें *n*, एकांगक्षय *m*, किरी *f*, झिजणी *f*, झिरकिणी *f*, सुखवशी *f*, सुका रोग *m*, क्षरण *n*.

Attach (at-tach') [ L. *ad*, to, & *tangere*, to touch. ] *v. t. build, fasten* जोडणें, लावणें, संयोग *m*-संबंध *m*-करणें, बांधणें. २ *seize goods by writ* जप्त करणें, टांच *f*. मारणें-लावणें. ३ *gain over* मन *n*-प्रीति *f*-स्नेह *m*-&c. जडवणें-जोडणें-लावणें-वळवणें, आसक्त-सक्त-अनुरक्त-&c. करणें, मन *n*. आकर्षून घेणें. ४ (*fig.*) *affix, apply* लावणें, आरोपणें, आरोप ( S )–आरोपण ( S ) करणें. A. *v. i.* (to) जोडून असणें, लगत असणें. २ (संबंधानें) उत्पन्न होणें; as, Interest A.s to a subject. Attach'able *a.* जोडतां येण्याजोगा, जप्त करतां येण्याजोगा, &c. Attached' *p.* ( v. V. 1. ) स्नेही, प्रेमबद्ध, निरत, अनुरक्त, अनुरागी, रत, लग्न, परायण, पर, आसक्त. २ ( v. V. 2. ) जप्त केलेला, टांच मारलेला-लावलेला, जप्त. ३ जोडलेला, जडींव, युक्त, संयुत, संबद्ध, अनुषंगी. ४ आरोपलेला, आरोपित ( S ). Attach'ment *n.* स्नेह *m*, निष्ठा *f*, अनुराग *m*, अनुरक्ति *f*, आसक्ति *f*. [ Affected A. भावाभास *m*, वरकरणी प्रेम.] २ जप्ती *f*, टांच *f*. [A. after judgment पक्की टांच *f*. A. before judgment अव्वल-कच्ची टांच *f*. ]. ३ जोडलेला पदार्थ *m*. ४ अनुषंगी गुणधर्म *m*. ५ परायणता *f*.

Attache ( a-ta'shā ) [ Fr. *attacher*, to attach. ] *n.* जोडीस दिलेला मदतगार *m*. २ ( Specifically ) एका राष्ट्राच्या तर्फे इतर राष्ट्रांमध्यें ठेवलेल्या वकिलाचा मदतनीस *m*, दुय्यम *m*.

Attack ( at-tak' ) [ Fr. *attaquer*, to attack. ] *v. t.* हल्ला *m*. करणें, आंगावर तुटून पडणें, घाला *m*. घालणें, चाल *f*-करणें, चढ *f*-चढाई *f*-करणें, चढून-चालून जाणें with वर *of o.*, आंगावर येणें-पडणें-जाणें *g. of o.*, (भाषणांत) घसरणें with वर *of o.*, उडणें with वर, तोंडीं-तोंडास लागणें. [To A. in front पुढून हल्ला करणें, अघाडी *f*. मारणें. To A. insidiously, darkly गुप्त घाला घालणें, मारा-गुसमार-गुपितमार-मुका मारा-&c. करणें. To make an attack upon स्वारी *f*-करणें. To attack suddenly छापा *m*-छप्पा ( R ) घालणें, झपाटा *m*. मारणें.] २ *fig.* ( भाषणांनीं अथवा लेखांनीं ) मन दुखवणें, कडक टीका *f*-करणें. ३ ( व्याधीनें ) धरणें, ग्रस्त करणें, पछाडणें. ४ *fig. vehemently apply oneself to* घेगावणें, मार *m*. मारणें-देणें, घेगा *m*-घेमार or घेघेमार-घेघेहल्ला-एलगार *m*-&c. करणें, पडणें, लागणें, उडणें, घसरणें, घसरा *m*. करणें, झोड *f*-मार *m*. पडणें with वर *of o.* & *g. of s.*, झटणें, लगट *f*-करणें, उठावणें, उठावणी *f*-करणें, झडझडणें. Attack' *n.* हल्ला *m*, घाला *m*, चढ *m*, चढाई *f*, चाल *f*, धाड *f*, घाल *f*, मार *m*, उचल *f*, आक्रम *m*, आक्रमण *n*, कहात *f*. A. of a band of robbers दरवडा *m*. Sudden A. a coup de main छाप (R) *m*, छापा *m*, छप्पा (R). Attacking *p. n.* चाल करणें, घाला घालणें, हल्ला करणें.

Attain ( at-tān' ) [ L. *ad*, to, *tangere*, to touch. ] *v. t. obtain, gain, acquire* मिळविणें, संपादणें, प्राप्त-लब्ध -&c. करणें-करून घेणें, संपादन *n*-&c. करणें *g. of o.* २ *arrive at, come to* पावणें, पोहोंचणें, प्राप्त होणें. ३ *achieve* संपादणें, साधणें. A. *v. i.* पावणें, पोहोंचणें, ( followed by *to* ). Attain'able *a.* ( v. V. 1. ) मिळवया-चा-जोगा-सारखा-&c., प्राप्य, लभ्य. २ *accessible* अधिगम्य, अधिगमनीय. ३ साध्य, संपादनीय, अधिगम्य, अधिगमनीय. ४ आक्रमणीय, पोहोंचण्याजोगा. Attain'ment *n.* ( v. V. 1. )—*act.* संपादणें *n*, &c., संपादन *n*, संपादणूक *f*-*state*. प्राप्ति *f*, आपत्ति (S) *f*, संपत्ति (S) *f*, लब्धि *f*, उपलब्धि *f*. [DIFFICULT OF A. दुर्लभ, दुष्प्राप. EASY OF A. सुलभ, सुप्राप, सुखप्राप.] ३–*act.* संपादणें *n*, साधणें *n*, संपादन *n*, संपादणूक *f*, साधन *n*, अधिगम *m*. I लाभ *m*, लब्धद्रव्य *n*-विषय *m*-&c. II *pl.* संपादिलेला गुण, ज्ञान. Attainabil'ity, Attain'ableness *n.*

Attainder ( at-tān'dėr ) [ L. See Attain. ] *n.* राजद्रोहासारख्या अपराधाबद्दल झालेली शिक्षा *f*, गुन्हेगारास वरील शिक्षा भोगावयास लावण्याची पद्धत *f*. २ सामाजिक हक्क हिसकाऊन घेणें (शिक्षा ह्मणून). ३ (R) अपमान *m*, लांछनस्थिति *f*. ४ राजद्रोहाचा दोषारोप *m*. [Act of A. गुन्हेगार ठरविण्याचा आक्ट *m*-कायदा *m*.] Attaint' *v. t. law* दूषिणें (*poe.*), गुन्हा शाबीत करून गुन्हेगार ठरविणें, दूषित-कलंकित करणें, कलंक लावणें, राजद्रोही ठरवून सर्व हक्क काढून घेणें. Attaint'ment, Attaint'ure *n.* राजद्रोहाचा कलंक *m*. [अत्तर *n*.

Attar ( at'ar ) *n.* अत्तर. Attar or otto of roses गुलाबी

Attemper ( at-tem'pėr ) *v. t. moderate* नरम-हलका-सुमाराचा-माफक-बेताचा-परिमित-सौम्य-&c. करणें, also परिस्थितीला योग्य करणें. Attem'perate *v. t.* साजेसें करणें, सौम्य करणें.

Attempt ( at-temt' ) [ L. *ad*, to, & *tentare*, to try. ] *v. t.* (संपादन करण्याचा) प्रयत्न करणें, खटपट करणें. २ उद्योग करणें. ३ यत्न करणें. ४ हल्ला करणें. To A. a person's life एखादे मनुष्याचा प्राण घेण्याचा यत्न करणें. A. *v. i. try* लाग (?) *m*-यत्न *m*-उद्योग *m*-उपाय *m*-उप-

चार *m*-करणें-चालवणें or करून-चालवून पाहणें. २ अजमावणें. As A. the price of a thing. ३ परीक्षा पाहणें, कसाला लावणें, सत्व पाहणें; as, To A. the virtue of a woman. Attempting *p. n.* प्रयत्न *m.* करणें, कसाला लावणें, &c., लाग चालवणें. Attempt' *n.* ( v. V. )—*act. essay, trial* लाग *m,* यत्न *m,* प्रयत्न *m,* उपचार *m,* उद्योग *m.* २ हल्ला *m.* Attemptabil'ity *n.* प्रयत्न करून साध्य होण्याजोगी स्थिति *f.* Attempt'able *a.* प्रयत्न करून साध्य होणारी (गोष्ट). Attempt'er *n.* प्रयत्नशील, उद्योग करणारा. २ मोह घालणारा (same as Tempter).

Attend ( at-tend' ) [ L. *ad*, to, & *tendere*, to stretch. ] *v. i.* and *v. t. yield attention, hearken, listen, mind, heed* लक्ष्य *n*-चित्त *n*-मन *n*-अवधान *n*-ध्यान *n*-दृष्टि *f*-देणें-घालणें-पुरवणें-ठेवणें-राखणें, जपणें, जागणें ( *idio.* ), ऐकणें, कान *m.* देणें, विचारणें. [ To A. VIGILANTLY, warily, &c. डोळ्यांत तेल घालून जपणें ]. २ ( with *at* ) *be present* जवळ-समीप असणें, हाजीर राहणें. ३ लागून असणें; as, Cold attended with fever. ४ ( with *on* or *upon* ) ; *wait on, serve* सेवा *f*-चाकरी *f*-खिदमत *f*-शुश्रूषा *f*-अनुगमन *n.* ( R )-&c. करणें *g. of o. N. B.*—Such sentences as "He has a cold attended with fever," "A measure attended with ill effects ", &c. are best rendered in some such way as the following त्याला पडसें आलें आणि पडशामुळें तापही आला. ह्या गोष्टीपासून अनेक वाईट परिणाम झाले. Attend'ance *n.* ( v. V. 1. ) हजिरी *f,* हजर असणें *n,* जवळ असणें *n.* २ बरोबर असणें *n.* ३ ( v. V. २. ) लक्ष *n.* देणें *n,* ध्यान *n,* लक्ष *n,* अवधान *n.* ४ नोकरी *f,* सेवा *f,* चाकरी *f,* खिदमत *f,* सेवन (?) *n,* परिचर्या *f,* शुश्रूषा *f,* अनुवर्त्तन *n,* अनुवृत्ति *f.* [ Close A. खडी चाकरी *f.* ] ५ लवाजमा *m,* लवाजिमा *m,* परिवार *m.* Attend'ant *a.* बरोबर असणारा, सहचारी. २ आनुषंगिक. See Accompanying. A. *n. follower, retainer* हुजऱ्या *m,* परिचारक *m,* परिजन (S), अनुगामी, जिलीबदार *m,* अनुचर, अनुचारी, अनुवर्त्ती, अनुग, परिचर *m,* पार्श्वक *m.* [ ARMED A. सशस्त्र शिपायी *m.* BODY OF MOUNTED ATTENDANTS सवारी *f.* ] २ आनुषंगिक पदार्थ *m.* Attend'er *n.* हजर असणारा, बरोबर असणारा. २ सोबती *m,* संवगडी *m.* Attending *n.* See Attendance. लक्ष देणें. २ हजीर असणें. ३ बरोबर असणें. In Attendance upon च्या सेवेंत, शुश्रूषेंत, बरोबर.

Attention ( at-ten'shun ) [ See Attend. ] *n.* ( v. V. 1. )—*act.* लक्ष्य देणें *n,* चित्त देणें *n,* लक्ष घालणें *n,* &c. अवधान *n,* लक्ष *n,* संधान ( S ) *n,* ध्यान *n,* दृष्टि *f,* एकचित्त *n,* भान *n,* लय *m,* मनोयोग *m,* अवेक्षा *f.* I Attentions आदर *m,* आदरसत्कार *m,* आदरउपचार *m. pl.,* समाचार(S) *m,* बरदाश्त *f,* तवाजू ( R ) *f,* उजूतवाजू ( R ) *f,* तारतीम (R) *n.* Attent'ive *a.* (v. V. 1.) लक्ष देणारा, एकचित्त, सावध, सावधान, सुचित्त, जागा, तत्पर, जागृत, सादर (S), एकाग्र, एकाग्रचित्त, एकतान, एकाकार, अवहित. Attent' *a.* See Attentive. Attent'ively *adv.* (v. A.) लक्ष-मन-ध्यान देऊन-लावून, एकाग्र मनानें, कान देऊन, एकटक. Attenti'veness *n.* ( v. A. ) सावधानता *f,* एकचित्तता *f,* लक्ष लावणें *n,* मन एकाग्र करून बसणें *n,* सावधगिरी *f,* अवधानता *f.* To pay attentions to a lady मनधरणी-खुषामत करणें, प्रेमपाशांत गुंतविण्याकरितां एखाद्या स्त्रीची विशेष आराधना-मनधरणी करणें.

Attenuate ( at-ten'ū-āt ) [ L. *ad,* & *tenuis,* Sk. तनु, thin. ] *v. t. to make thin* बारीक करणें, कृश करणें, पातळ करणें. २ कमकस-निकस करणें, सत्वहीन करणें, सौम्य स्वरूप करणें. A. *v. i.* बारीक-कृश-पातळ पोकळ-शुष्क-निर्जीव होणें, कमकस-सत्वहीन होणें. Attenuā'tion *n.* ( v. V. T. )—*act.* पातळ-&c. करणें *n,* कृशीकरण *n,* बारीक करणें *n.* Atten'uant *a.* बारीक-कृश-कमकस-निर्जीव करणारा. २ *med.* कर्शन, कृशकारक. A. *n. med.* सत्वहीन-कमकस करणारें औषध *n.* Atten'uate *a.* Atten'uated *p.* ( v. V. ) बारीक-कृश-पातळ केलेला. २ कमकस, सत्वहीन, निस्तेज.

Attest ( at-test' ) [ L. *ad,* & *testor,* to witness. ] *v. t. affirm by signature* साक्षी *f*-साक्ष *m*-शाहिदी *f*-देणें-घालणें *g. of o.,* साक्षी-शाहिदीदार-&c. होणें *with* विषयीं *of o.* २ (*obs.*) *call to witness* साक्षी ठेवणें, साक्षीस ठेवणें. An attested copy सहीनिशी नकल *f*-प्रत *f.* ३ खातरीपूर्वक सांगणें. ४ अस्सल-खरा-असण्याबद्दल निश्चयानें सांगणें. ५ (आनंद वगैरे) प्रदर्शित करणें. ६ खरेपणाविषयीं सही घालणें or करणें. Attestā'tion *n.* (खरेपणाबद्दल खातरी करण्याकरितां केलेली) सही अगर साक्ष *f,* साक्षी देणें *n,* साक्ष *f,* साक्षी *f.* Attest'er, Attest'or *n.* साक्षी *m,* खरेपणाबद्दल खातरी करून देणारा. Attest'able *a.* साक्ष घालण्याजोगा, खात्री देण्याजोगा. Attest'ative *a.* साक्षपर, साक्षीचा.

*N. B.*—The Latin root *testor* in Attest and Sanskrit दृष्ट *pa. p.* of दृश् to see, seem to be allied. If this suggestion is accepted by modern philologists in Europe then दर्शन will be the best word for the most famous English word Testament, and the translators of the Bible instead of using नवा करार आणि जुना करार for their New Testament and Old Testament should use नवें दर्शन आणि जुनें दर्शन. Compare Sanskrit phrases षड्दर्शन and मंत्रस्य द्रष्टारो वयं.

Attic ( at'ik ) [ Gr. *attikos,* attic. ] *a.* ग्रीसच्या ॲटिका प्रांतांतील अगर त्या प्रांताची राजधानी अथेन्स येथील रहिवाशांसंबंधीं. २ शुद्ध व प्रौढ; as, 'an A. style.' उच्च-प्रगल्भ भाषासरणी. ३ पूर्ण, पक्का, दृढ; as, attic faith ; ( opposed to 'punic faith' वरकरणी किंवा खोटा विश्वास ).

Attic ( at'ik ) *n.* घराचा कातरमाळा *m,* अगदीं वरचा मजला *m.* Also Attic storey. Ill furnished in the 'attic storey' जडबुद्धीचा, तरतरीत नाहीं असा, पोकळडोक्या. In this last phrase 'attic storey' means डोकें or शिर.

Attire (at-tīr') [A. S. *a*, & *tir*, glory.] *n*. (no plural ) वेश *m*, पोषाक(ख) *m*, पेहराव *m*, लिभास *m*. A. *v. t*. वस्त्र *n*-वस्त्रें *n*-नेसणें-वणें, पोषाक घालणें, सजविणें, नटविणें, वेषान्वित-वेषयुक्त करणें, लेणें, लेवविणें. २ सज-सज्जित करणें, सजना *f*. करणें *g. of o*., तयार करणें.

Attitude (at'ti-tūd) [It.–L. *aptus*, fit.] *n*. अंगाची ढब *f*, कल *m*, आसन *n*. २ रोख *m*, धोरण *n*, दिशा *f*; as, The A. of affairs. ३ शरिराची किंवा चित्राची ठेवण *f*, घाट *m*, बनाव *m*, डौल *m*, मांडण *f*, ढब *f*, ठाण *n*, ठाणमाण *n*, मुद्रा *f*. Attitudinā'ri-an *n*. हावभाव व बसण्याचीं आसनें शिकलेला मनुष्य *m*, बसण्याचें हवें तें आसन जाणणारा. Attitud'inise *v. t*. उगाच डौल आणणें. Attitud'inal *a*. अंगस्थिती-कला-&c.-संबंधीं.

Attorney (at-tur'ni) [Low L. *atornare*, to commit business to another.] *n*. *law* वकील *m*, प्रतिनिधि *m*, मुखत्यार *m*, मुनीम *m*, गुमास्ता *m*. Letter of A. or power of A. वकीलातनामा *m*, मुखत्यारपत्र *n*. Attor'ney *v. t*. मुखत्याराकडून करवणें, मुखत्यार ह्मणून ठेवणें. Attor'ney-ship *n*. मुखत्याराचा अधिकार *m*, वकीली *f*. Attor'ney-gen'eral *n*. सरकारतर्फे मुख्य वकील *m*. Attorney at law or public Attorney कोर्टानें कबूल केलेला वकील *m*. Attorney in fact or private Attorney मुखत्यार वकील *m*. Attorneys *pl*.

Attract (at-trakt') [L. *ad*, to, *trahere*, to draw.] *v. t*. *draw towards* (कडे) ओढणें, (मन) आकर्षून घेणें, आकर्षणें, आकर्षण *n*. करणें *g. of o*. २ *allure, invite, engage* मोहून टाकणें, भुलवणें, प्रलोभन *n*-मोहन *n*-&c. करणें *g. of o*., मोह *m*-भुरळ *f*. घालणें, प्रलोभित-&c. करणें. A. *v. i*. आकर्षण करण्याची शक्ति असणें. २ मोहक असणें. Attract'able *a*. लोभनीय, आकर्षणीय. Attrac'tion *n*. (v. V. 1.)—*act*. आकर्षणें *n*, &c., आकर्षण *n*, अनुकर्ष *m*, अनुकर्षण *n*. २–*act*. लोभवणें *n*, &c., मोहन *n*, प्रलोभन *n*. [The attractions and allurements (of the world, &c.) मायापाश, मोहपाश, ओढा *m*, ओढ *f*.] ३ *phys*. आकर्षणशक्ति *f*, आकर्षण *n*. ४ मोहक-आकर्षक-&c. गुण *m*. *pl*. [A. of currents प्रवाहाकर्षण *n*. A. of gravitation गुरुत्वाकर्षण *n*. Capillary A. केशाकर्षण *n*. Magnetic A. लोहाकर्षण *n*, चुंबकाकर्षण *n*. Electric A. विद्युदाकर्षण *n*. A. of cohesion संसक्त्याकर्षण *n*. A. of adhesion संलग्नाकर्षण *n*, पृष्ठाकर्षण *n*. Universal A. सार्वत्रिकाकर्षण *n*.] Attract'or *n*. ओढणारा, आकर्षणारा. Attracted *p*. (v. V. 1.) आकर्षलेला, ओढून घेतलेला, &c., आकर्षित, आकृष्ट. २ लोभवलेला, &c., प्रलोभित, मोहित. Attracter, See Attractor. Attract'ive *a*. (v. V. 1.) मोहक, आकर्षणारा, आकर्षक, आकर्षी (S). २ मोहणारा, मोह घालणारा, &c., प्रलोभक, लोभजनक-&c. Attract'ively, Attract'ingly *adv*. Attract'iveness, Attractabil'ity *n*. मोहकता *f*.

Attribute (at-trib'ūt) [L. *ad*, to, *tribuere*, to give.] *v. t*. *assign* आरोप करणें, (ला) देणें, घालणें, (ला) श्रेय देणें. २ (कडे) संबंध लावणें. ३ मालकीचा संबंध लावणें. A. *n*. निशाणी *f*, विरुद *n*, व्यक्तिविशिष्ट चिह्न *n*, खुणेचें चिह्न *n*, खूण *f*. (Club is the A. of Hercules, the Eagle is the A. of Jupiter). २ गुण *m*, धर्म *m*. The Divine Attributes (*i. e*. the attributes of Shiwa or a सिद्ध) are अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, ईशता, वशिता, प्राकाम्य. They are called अष्टसिद्धि. Attrib'utable *a*. आरोप करण्याजोगा आरोप्य, आरोपणीय, (कडे) संबंध लावण्याजोगा. Attribū'tion *n*. (v. V.)—*act*. लावणें *n*, आरोपणें *n*, &c., आरोपण *n*, आरोप *m*, (कडे) संबंध लावणें. २ गुण *m*, धर्म *m*. Attrib'utive *a*. धर्मवाचक, गुणवाचक (शब्द), विशेषणार्थी. A. *n*. *gram*. विशेषण *n*. Attrib'utive-ly *adv*. विशेषणरूपानें, विशेषण ह्मणून.

Attrite (at-trīt') [L. *ad*, to, & *tritum*, to rub.] *a*. झिजलेला, घासलेला, संघर्षित. २ पश्चात्ताप झालेला. Attri'tion *n*. झिजणें *n*, घासणें *n*, संघर्ष *m*, संघर्षण *n*. [Waste by A. झीज *f*, झिजणावळ *f*, घस *f*.] २ अनुताप *m*, पश्चात्ताप *m*, शिक्षेच्या भीतिमुळें पश्चात्ताप *m*.

Attune (at-tūn') [Pref. *ad*, to, & Tune.] *v. t*. *make musical, tune* एकसुराचा करणें, सूर *m*. लावणें-बांधणें-मिळविणें, स्वरबंधन *n*. करणें. २ *fig. make accordant* एकतान करणें, तादात्म्य करणें, शीं साधर्म्य करणें, मेळ *m*-जम *m*-&c. बसवणें, जमवणें, सुव्यवस्था करणें, जुळवणी *f* करणें, एका स्थितींत आणणें. Attune'ment *n*.

Auburn (aw'burn) [L. *albus*, white.] *a*. *reddish brown* तांबूसभुरका, सोनसळा, पिंगट, पिंगळा, पिंगा. Bright A. गोराभुरका.

A. U. C. (Anno urbis conditæ) in the year from the building of the City of Rome इटली देशांत इसवी सनाच्या पूर्वी ७५३ व्या वर्षी रोम शहर वसलें. त्या वर्षापासून रोमन लोक रोम शहर वसविण्याच्या शकाचा आरंभ समजतात. रोम शहरच्या सुरवातीपासून अमुकवर्षी.

Auction (awk'shun) [L. *augere, auctum*, to increase.] *n*. लिलांव *n*, or लिलाम (*vulg*.) *n*, निलाम (*vulg*.) *n*, पावणी *f*. A. *v. t*. लिलांवानें विकणें. Auc'tionary *a*. लिलांवासंबंधीं. Auctioneer' *n*. परवान्यानें लिलांव करणारा *m*, लिलांववाला *m*. Dutch auction पहिल्या प्रथमच लिलांववाल्यानें भारी किंमत सांगून मग खालीं खालीं उतरवणारी लिलांवाची पद्धत *f*.

Audacious (aw-dā'shus) [L. *audere*, to dare.] *a*. *daring* धाडशी, उलट्या छातीचा-काळजाचा, धीट, धारिष्टवान्, निधड, निधडा. २ *impudent* धीट, उद्धत *pop*. उद्धट, धृष्ट, निर्लज्ज, बेवकूब. ३ *proceeding from effrontery* उद्धटपणाचा, धिटाईचा. Audā'ciously *adv*. Audā'ciousness, Audacity (aw-das'i-ti) *n*. (v. A. 1.) धाडस *f*, धारिष्ट *n*, धाष्ट्य *n*, औद्धत्य *n*, उद्धटपणा *m*.

Audible (awd'i-bl) [L. *audire*, to hear.] *a*. *perceivable by the ear* ऐकूं याया-जाया-चा-जोगता-जोगा-सारखा-&c., श्राव्य (S), कर्णगोचर, श्रवणगोचर. २ *loud enough to be heard* ऐकूं येण्या-जाण्या जोगा-जोगता-सारखा–&c., ऐकूं येईसा, ऐकूं जाईसा. Aud'ibleness, Audibil'ity

*n.* ( v. A. 2. ) ऐकूं येण्या-जाण्याजोगेपणा *m.* &c., ऐकूं येण्याचा धर्म *m*, श्रवणयोग्यता (S) *f.* Aud'ibly *adv.* (v. A. ) ऐकेसा *adv. decl.*, ऐकूं येईसा-जाईसा, कानीं पडेसा *adv. decl.* Aud'ience *n. hearing or attending to* ऐकणें *n*, ऐकून घेणें *n*, श्रवण *n*, आकर्णन *n.* २ *admittance to a hearing* खटल्याची सुनावणी *f*; सुनावणीची भेट *f*; कानावर घालण्यासाठीं भेट *f*-मुलाखत *f.* ३ *assembly of hearers, auditory* श्रोतृसमाज *m*, श्रोतृजन *m. pl*, श्रोते *m. pl*, श्रोतृमंडल *n*, श्रोतेमंडळी *f*, श्रोतृसमूह *m*, श्रोतृगण *m.* A. chamber *n.* सुनावणीची जागा *f*; श्रवणमंदिर *n*, दिवाणखाना *m*, श्रोते बसण्याची जागा *f.* Aud'ient *a.* & *n.* लक्ष्य (क्ष) देणारा, ऐकणारा.

Audiometer ( awd-i-om'et-ėr ) [ L. *audire*, to hear, & Gr. *metron*, measure. ] *n. acous.* श्रवणशक्ति-मापक(यंत्र) *n.*

Audiphone ( awd'i-fōn ) [ L. *audire*, to hear, & Gr. *phone*, voice. ] *n.* बहिऱ्यास ऐकूं येईल असें करणारें यंत्र *n*, हें वरच्या दांतांस लावलें असतां आवाज ऐकूं येतो. बहिऱ्याचें श्रुतियंत्र *n.*

Audit ( awd'it ) [ L. *auditus*, a hearing. ] *n. final account* हिशेबाची शेवटची तपासणी *f*-तपास *m.* २ मालमत्तेच्या किंवा पैशाच्या व्यवहाराची आणि हिशेबाची योग्य अथवा नेमलेल्या गृहस्थांकडून झालेली तपासणी *f.* A. *v. t. examine and pass* तपास or तपासणी करून-रुजू पाहून-&c. मंजूर-बार करणें. Audi'tion *n.* ऐकणें *n*, श्रवणशक्ति *f.* २ (R) श्राव्यविषय *m.* Audited *p.* (v. V.) शेवटची तपासणी होऊन बार झालेला, रुजू, बार, रुकार. Aud'itor *n.* ( v. V. ) शेवटचा तपासनीस, हिशेब तपासून बार करणारा *m*, हिशोबाचा तपासनीस *m*, तजकरनीस *m*, हिशेबतपासनवीस *m*, हिशेब तपासणारा *m.* २ श्रोता *m*, श्रवण करणारा *m*, ऐकणारा *m.* Aud'itress *fem.* Auditōr'ium *n.* प्रेक्षकस्थान *n*, प्रेक्षकांस नाटकगृहामध्यें बसण्याकरितां केलेली जागा *f.* Auditory nerve श्रवणज्ञानतंतु *m.* Aud'itorship *n.* Aud'itory *a. belonging to hearing* ऐकण्यासंबंधींचा, श्रवणाचा, श्रवणसंबंधीं, श्रवणेंद्रियाचा. Outer A. passage कर्णछिद्र. A. *n.* श्रोतृमंडल *n pop.* श्रोतेमंडळी *f*, श्रोतृसमूह *m.* २ *lecture room* पाठ सांगण्याची जागा *f*, व्याख्यानशाला *f.*

Aufait (ō'fā') *a. expert, skilful* वस्ताद, चतुर, सुशिक्षित.

Augean ( aw-jē'an ) *a. myth.* ग्रीस देशांतील एलिस प्रांताचा राजा पौराणिक ऑजीऑस याचेसंबंधीं-विषयक. Auge'an-stable *n.* या राजाचा मोठा तबेला. यामध्यें तीन हजार ढोरें होतीं. हा सुमारें तीस वर्षें मुळींच झाडला नव्हता. नंतर झाडण्याचें काम हरक्यूलीस याकडे सोंपविलें तेव्हां तें त्यानें एका दिवसांत आटपलें, यावरून To cleanse an A. stable खूब जमलेली घाण एकदम काढून टाकणें, थोडक्या काळांत दुर्घट काम करणें, मोठ्या कष्टाचें काम हूंहूं म्हणतां करणें, ज्या वाईट गोष्टींची सुधारणा होणें अति अशक्य असतें त्या गोष्टींची एकदम सुधारणा करणें.

Auger, Augre (aw'gėr) [A. S. *nafugar*,-a nave-piercer being used for boring a hole in the centre of a wheel. ] *n.* सामता *m*, वेधन *n*, बरमा *m*, खोलवत *n.* Au'ger-bit *n.* सामत्याचें पातें *n.* हें एका प्रकारच्या धनुष्याकार पकडींत बसवतात. Screw auger *n.* गिरमिट *n.*

Aught ( awt ) *n.* कांहींतरी, किंचित्तरी, थोडा.

Augment ( awg-ment' ) [ L. *augere*, to increase. ] *n.* वाढ *f.* २ *gram.* आगम *m*, आदेश *m.* A. *v. t.* वाढविणें, वृद्धि करणें, अधिक मोठा करणें, भर घालणें. A. *v. i.* वाढणें, मोठें होणें. Augment'able *a.* वाढण्याजोगा. Augmentā'tion *n.* वाढ *f*, वृद्धि *f.* २ *med.* चढ *f*, भरतें *n.* Augment'ative *a.* वाढविण्याचा अगर वाढण्याचा धर्म असलेला, वाढण्यासारखा, वर्धिष्णु, वृद्धिशील. A. *n.* अर्थवृद्धिदर्शक शब्द-नाम *n.* Augment'atively *adv.* Augment'er *n.* वाढविणारा.

Augur ( aw'gur ) [ L. *avis*, bird, & root, *gar*, in L. *garrire*, to chatter. ] *n.* शकुन्या or शकुन्याजोशी *m*, ( Rom. antiq. ) पक्ष्यांचें उडणें-चतुष्पाद प्राण्यांचें दृष्टीसमोर येणें-विजांचें चमकणें इत्यादि गोष्टींवरून पुढील गोष्टींचें अनुमान करणारा प्राचीन रोमन लोकांतील धर्माधिकारी *m*, शकुनांवरून भविष्य-भाकित सांगणारा, प्रश्न-शकुन पाहणारा-सांगणारा, शकुनवक्ता, शकुनवेत्ता. A. *v.t. presage, betoken* सुचविणें, दर्शविणें, सूचन *n*-&c. करणें *g. of o.*, लक्षण *n*-चिन्ह *n.* असणें *g. of o.* with *in. con.* २ अटकळीनें सांगणें-काढणें, धोरणांत-लक्ष्यां(क्षां)त आणणें. A. *v. i. gather or infer from omens, &c.* शकुनावरून समजणें-तर्क *m.* करणें, अनुमान करणें. Au'gural, Augu'rial *a.* शकुनाचा, प्रश्नाचा, शाकुनिक, शकुनासंबंधीं-विषयक. Au'gurer *n.* Augurā'tion *n.* see Augury. Au'gurship *n.* शकुन सांगणाऱ्याचा धंदा *m.* Au'gury *n.* (v. V. I.) शकुनावरून समजणें *n*, भविष्य *n.* करणें *n*, अनुमान करणें *n*, &c. २ शाकुनिक *n*, शकुनविद्या *f.* ३ चांगला किंवा वाईट शकुन *m.*

August ( aw-gust' ) [L. *augere*, to increase, honour.] *a. grand, majestic* ओजस्वी, प्रभावविशिष्ट-युक्त, पूजनीय, पूजार्ह. २ भव्य, बडा, थोर अनुभावी, महानुभाव, पूज्यबुद्धि उत्पन्न करणारा. ३ वचक उत्पन्न करणारा, धाक उत्पन्न करणारा. August'ly *adv.* August'ness *n.* ( v. A. 1. ) ओजस्विता *f*, प्रतापशालिता *f.* २ भव्यता *f*, थोरवी *f.*

August ( aw'gust ) [ L. *Augustus*, the first Roman emperor Augustus. ] *n.* इंग्रजी सालाचा आठवा महिना *m*, श्रावण-भाद्रपद *m.*

Augustan ( aw-gust'an ) *a.* रोमचा बादशाहा ऑगस्टस यासंबंधीं. A. age कोणत्याहि देशाच्या इतिहासांतील विशेष ज्ञानाभिवृद्धीचा काळ *m.* ( ऑगस्टस बादशाहाचे वेळीं ) रोमन वाङ्मयाचा अभ्युत्कर्ष झाला होता त्यावरून ऑगस्टनकाल याचा अर्थ 'ज्ञानाभिवृद्धिकाल' असा झाला. see Age.

Aunt ( änt ) [ L. *amita*, a father's sister. ] *n. father's sister* आत *f*, फुई *f*, फुइजी *f*, पितृभगिनी *f*, बापाची

वहीण *f.* [Daughter of paternal A. आतेवहीण *f.* Son of husband's paternal A. आतेदीर *m.*] २ *mother's sister* मावसी *f.*; मातृभगिनी *f.* ३ *wife of paternal uncle* चुलती *f.*; काकी *f.*; काकू *f.*; पितृव्यपत्नी *f.* ४ *wife of maternal uncle* मामी *f.*; मावळण *f.*; मातुलानी *f.* [husband of maternal A. मावसा *m.*]

Aura (awr'a) [L. *aura.*] *n. theoso.* तेजोमंडल *n*, प्रत्येक मनुष्यासभोवतीं त्याच्या योग्यतेनुरूप तेजोमंडल असतें व तें दिव्यदृष्टि असणारांस गोचर होतें असें एक मत आहे, छाया *f.* २ *fig.* लक्षण *n*, व्यावर्तक चिन्ह *n*. ३ *med.* वाऱ्याची झुळुक *f*; वाऱ्याचा आभास *m.* A. epileptica *n. med.* हवा आंत शिरल्यासारखा भास *m*; हें एका प्रकारच्या अपस्माराचें लक्षण आहे. Aur'al *a.*

Aural (awr'al) [L. *auris*, the ear.] *a.* कानासंबंधीं; as, A. surgery. Au'riform *a.* कानाच्या आकाराचें. Au'rist *n.* कर्णवैद्य *m.*

Aureate (au'rē-āt) [L. *aurum*, gold.] *a.* सोन्यासारखा, पिंवळ्या झुलाम्याचा, पिंवळा. Aur'ated *a.* सोनेरी.

Aureola, Aureole (awr-ē'o-la, aw'rē-ōl) [L. *aurum*, gold.] *n.* दिव्यतेजोमंडल *n*, प्रभामंडळ *n*, हें देवता, धर्मसंस्थापक आणि साधु यांचे देहांसभोंवतीं चित्रांत काढतात. २ प्रभामंडळ *n.*

Auric (awr'ik) [L. *aurum*, gold.] *a. pertaining to gold* सोन्यासंबंधीं, सुवर्णविषयक.

Auricle (awr'i-kl) [L. *auris*, the ear.] *n. anat. external ear* बाहेरचा कान *m*, बाहेरील कान *m*, कर्णशष्कुली *f.* २ कर्णिका *f.* [Left A. सव्यकर्णिका. Right A. दक्षिण कर्णिका.] कर्णाकृतिहृद्देकदेश *m*, रक्ताशयाचे बाजूचा एक कर्णाकृति भाग *m*, रक्त परत आणणाऱ्या शिरांतून यांत रक्त येतें. हृदयाचा एक आशय *m*, ऊर्ध्वाशय *m.* [Left A. सव्य ऊर्ध्वाशय. Right A. दक्षिण ऊर्ध्वाशय]. Aur'icled *a.* कर्णाकृति-कानासारखीं उपांगें असलेला. Auric'ular *a. relating to the ear* कानाचा-कर्णासंबंधीं; कर्णविषयक, कर्णगोचर, कार्ण, कर्णीय, श्रवणेंद्रियाचा. २ विशेष गुप्तप्रकारें धर्मगुरूजवळ सांगितलेलें; as, A. confession. ३ कानांत सांगितलेला, कर्णोपदिष्ट. ४ कानोकानीं आलेला, कर्णपरंपरागत, कर्णोपकर्णीचा. Auric'ulate,-d *a. bot.* उपपर्ण असलेलें (पान), कानाच्या आकाराचा, कर्णरूप, कर्णरूपी, कर्णिकाधारी, कर्णाकार, कानाकार (?).

Auriferous (awr-if'ér-us) [L. *aurum*, gold, & *ferre*, to bear.] *a. gold-producing* सुवर्णप्रसव (वा *f.*), सोनें ज्यांतून उत्पन्न होईल अशी (वस्तु). Aur'ify *v. t. & v. i.* सोनें करणें-होणें.

Auriform (awr'i-form) See Auriculate.

Auriga (awr-i'ga) *n. astron.* सारथि *m*, उत्तराकाशांतील एक तारकपुंज *m*, याला आर्यज्योतिषांत ब्रह्महृदय असें ह्मणतात.

Auriscope (aw'ri-skōp) [L. *auris*, ear, & Gr. *skopein*, to look in.] *n.* कर्णान्तःपरीक्षायंत्र *n*, कानाचा आंतील भाग तपासण्याचें यंत्र.

Aurist (awr'ist) *n.* कर्णवैद्य *m*, कर्णरोगवैद्य *m.*

Aurora (aw-rō'ra) *n.* प्रातःकाल *m*, प्रभात *f*, उषादेवी *f*, उषःकालदेवता *f*, अहना *f.* हिचें वेदांत पुष्कळ वर्णन आहे. अरुण *m.* [A. Australis दक्षिण गोलार्धांतील अरुणप्रकाश *m*, कुमेरुज्योति *f.*] २ अरुणप्रभा *f.* ३ तेजोमंडल *n.* A. Borealis उत्तर गोलार्धांतील अरुणप्रकाश *m*, सुमेरुज्योति. Aurō'ral *a.* Auroras *pl.*

Auscultation (aws-kult-ā'shun) [L. *auscultare*, to listen.] *n. med.* हृदय-छाती तपासणें *n*, उरोन्तर्ध्वनिपरीक्षा *f.* उराला नळी (stethoscope) लावून आंतील ध्वनीची स्तिमितता पाहतात. ज्या मनुष्याची उरोन्तस्थिति बिघडली असते, त्याचे उरांतील ठोके सारखे पडत नाहींत. Ausculta'tor *n.* उरोन्तर्ध्वनिपरीक्षा करणारा. २ उराला लावण्याची नळी *f.* Aus-cult'ā-to-ry *a.*

Auspice (aw'spis) [L. *avis*, a bird, *specere*, to observe.] *n. augury* शकुन *m*, शुभचिह्न *n.* [of evil A. अभद्र]. २ *pl. patronage* रक्षण *n*, आश्रय *m*, कृपादृष्टि *f*, नेक नजर *f*; हिमाईत *f*, प्रसाद *m*, आश्रयबल *n.* Auspi'cious *a.* मंगल, शुभ, श्रेयस्कर, जयावह, शुभावह, भद्रकर, यशस्वी, सभाग्य, यशस्कर, मंगलदायक, अनुकूल, इष्ट. [A. season or period मंगलकाळ *m.* To be A. (for) लाभणें, लाधणें.] २ *having omens of success* सुशकुनाचा, सुलक्षणाचा, शुभलक्षणाचा, शुभ, मंगल, सुलक्षणसंपन्न. Auspi'ciously *adv.* (v. A.2.) सुशकुनपूर्वक, सुचिह्नपूर्वक, सुलक्षणपूर्वक. Auspi'ciousness *n.* (v. A.) मंगलता *f*, कल्याणप्रदता *f*, शुभता *f*; सद्दी *f*; भाग्यशालित्व *n*, सभाग्यता *f*; सलाबतपणा *m.* २ सुलक्षणविशिष्टता *f*; शुभ स्वरूप *n.* Under the Auspices of च्या आश्रयानें, च्या छत्राखालीं.

Austere (aws-tēr') [Gr. *austeros*, to dry.] *a. harsh* उग्र, करडा, कडक, निष्ठुर, तीव्र, खडतर, कर्कश (S), खरमरा, खरमऱ्या, कडवा (?), कठीण, कदरखोर (?), कठोर, सखत, परुष. २ *rigid, severe, stern* रुक्ष, रुखा, खट्टा, खट्ट्या, परुष. ३ अतिआंबट, चवीला वाईट. Austere'ly *adv.* कडकप्रकारें, खरमरीतपणें. Austere'ness, Auster'ity *n.* उग्रता *f*, रौक्ष्य *n*, रुक्षता *f*, रुखेपणा *m*, पारुष्य *n*, खरमरेपणा *m*, करडेपणा *m.* I (in Religion) तपश्चर्या *f*, तप *n*, तपस्या *f*, तपश्चरण (*pop.*) तपाचरण *n.* Austerities and penances-compreh. उपासतापास *m*, जपतप *n.* Some of the numerous Austerities of the Hindus are उंच्छवृत्ति or शिलोंच्छवृत्ति, ऊर्ध्वबाहु, एकान्न, &c. (एकधान्य, एकभक्त, or एकभुक्त(क्ति), एकव्रत), करतलभिक्षा, कृच्छ्र, चांद्रायण, धूम्रपान, पंचाग्नि, प्राजापत्य, बगाड, लोटांगण, सांतपन, सौम्यकृच्छ्र. Emaciated by A. तपःकृश. Power acquired through A. तपस्सामर्थ्य *n*, तपोबल *n.* Practice of A. तपःसाधन.

Austral (aws'tral) [L. *auster*, the south wind.] *a.* (Austral magnetism is the imaginary magnetic matter which prevails in the Southern regions of the earth.) दक्षिणेकडील, दक्षिणेकडचा. A. Signs *astrol.* बारा राशींतील शेवटील सहा ह्मणजे तुळेपासून

मीनेपर्यंतच्या राशी, दक्षिणगोलार्धांतील राशी. Australasia *n.* आस्ट्रेलेशियादेश (दक्षिणेकडील एशिया). Australasian (aws-tral-ā'zhi-an) *a.* आशियाच्या दक्षिणेकडील बेटांसंबंधीं, किंवा ऑस्ट्रेलेशियासंबंधीं. Austrā'lian *a.* ऑस्ट्रेलियासंबंधीं· A. *n.* ऑस्ट्रेलिया देशांतील रहिवासी, आस्ट्रेलियन.

Authentic-al (aw-thent'ik,-al) [Gr. *authentes*, one who does anything with his own hand.] *a. true, genuine* खरा, सत्य, अस्सल, वित्तम, वित्तीम, तहकीक, सप्रमाण, ठिकाणचा, कलमी, आप्त (S), मुळींचा, मुळचा, स्थलींचा, थेट, थेटचा. Authent'icalness [R] *n.* (v. A.) खरेपणा *m*, सत्यता *f*, असलपणा *m*, वित्तीमपणा *m*, सप्रमाणता *f*, आप्तता *f*. Authent'ically *adv.* Authen'ticate *v. t.* प्रमाण दाखवून खरा ठरविणें. २ खरेपणा आणणें, शाबीत करणें. Authenticā'tion, Authentic'ity *n.* अमुक एकाच्या खरेपणासंबंधानें खात्री देणें. see Authenticalness. [See Genuine].

Author (awth'or) [L. *augere*, *auctum*, to cause things to increase, to produce.] *n. first mover, beginner* कर्त्ता *m*, मूलकर्त्ता *m*, निर्माता *m*, विधाता *m*, जनक *m*, जनिता *m*, उत्पादक *m*, स्रष्टा *m*. २ *composer of a book, &c.* ग्रंथकार *m*, ग्रंथकर्त्ता *m*, कर्त्ता *m*. Auth'oress *n. fem.* ग्रंथकर्त्री *f*, ग्रंथ करणारी *f*. Authō'rial, Auth'orish *a.* Authorīs'able *a.* Authoris-z-ā'tion *n.* (v. A. 1.)—*act.* अधिकार *m*-&c. देणें *n.* २-*act.* विहित-(S)&c. करणें *n*, मुखत्यारी *f*, अधिकार *m*, परवानगी *f*. Auth'oriz-s-e *v. t. give authority or right to* मुखत्यार *m f*-अखत्यार *m*-अधिकार *m*-सत्ता *f*-हुकूम *m*-&c. देणें, अखत्यारी-मुखत्यारी-&c. देणें. २ *establish by authority, make lawful* हुकूम *m*-आज्ञा *f*-मोकळीक *f*-&c. करणें-देणें *g. of o.*, सत्तेचा-साधिकार-ससत्ताक-विहित (S)-विधेय-&c. करणें. Authorised *p.* (v. V. 1.) अखत्यार दिलेला, मुखत्यार, अखत्यारी, प्राप्ताधिकार. Auth'orless *a.* अकर्तृक, कर्तृ-हीन-विरहित. Auth'orling *n.* लहान अधिकारी *m*. Auth'orship, Auth'oring, Auth'orism *n.* ग्रंथकर्तृत्व *n*.

Authority (awth-or'it-i) *n. warranted power* अधिकार *m*, अखत्यार *m*, सत्ता *f*, प्रभुत्व *n*, जोरा *m*, ऐश्वर्य (S) *n.* [FULL A. पूर्ण अधिकार *m*, मुखत्यारी *f*. ONE INVESTED WITH A. अधिकारी, अखत्यारी· TO BE IN A. OVER डोईवर-शिरावर असणें]. २ *grounds for credence &c. warrant, sanction, support* प्रमाण *n*, आधार *m*, आश्रय *m*, मान *n*, प्रामाण्य *n.* [OF LITTLE A. अल्पप्रमाण, अल्पप्रमाणक]. ३ *influence, credit, power* चलती *f*, चाल *f*, चलचल *f*, गौरव *n*, कदर *f*, भारदारी *f*, भारदस्ती *f*, अनुभाव *m*. ४ *authoritative opinion or saying* आप्तवचन *n*, आप्तवाक्य *n*, आप्तोक्ति *f*, अभियुक्तवचन *n.* [HERE आप्त MEANS यथार्थवक्ता· that has A. —A WRITING, A-WRITER-&c. आप्त, अभियुक्त.] ५ *order, &c.* सनद *f*, हुकूमनामा *m*, हुकूम *m*, अधिकारपत्र *n*. ६ *pl. ruling persons or body* सरकार *n*, अधिकारी *m.* Author'itative *a. having due authority* प्रमाणाचा, सप्रमाण, प्रमाणविशिष्ट-युक्त, आप्त (S), साधार. २ *imperative, commanding* दबदब्याचा, दावाचा, दरदऱ्याचा, धनीपणाचे डौलाचा, स्वामीपणाचे डौलाचा, स्वामित्वसूचक. Author'itatively *adv.* (v. A. 1.) प्रमाणेंकरून, सप्रमाण, प्रमाणतः. २ अधिकारानें, धनीपणाच्या डौलानें, दबदब्यानें, खरमरीत, दावाचा *a. decl.* Author'itativeness *n.* (v. A. 1.) सप्रमाणता *f*, आप्तता (S) *f*, आप्तत्व (S) *n*. २ दाव *m*, दबदबा *m*, दवाबा *m*, सलाबत *f*, सलाबतपणा *m*, प्रताप *m*, धनीपणाचा डौल *m*.

Autobiography (aw-to-bī-og'raf-i) [Gr. *autos*, self, *bios*, life, *graphein*, to write.] *n.* आत्मचरित्र *n*, स्वचरित्र *n*, स्वतः लिहिलेलें आपलें चरित्र *n*.

Autocrat (aw'to-krat) [Gr. *autos*, self, *kratos*, power.] *n. an absolute ruler* स्वायत्ताधिपति *m*, मुखत्यार राजा *m*, स्वेच्छाचारी (S) राजा *m*. Autoc'racy *n.* स्वायत्ताधिपत्य *n*, स्वाधिपत्य *n*, पूर्णमुखत्यारी *f*, स्वेच्छाचारी राजाची सत्ता-किंवा त्याचें राज्य *n*, एकसत्ताक राज्य, स्वतंत्रराजानें चालविलेला कारभार *m*, स्वसत्ताकराज्य *n*, अनियंत्रित राज्य *n*. Autocrat'ic-al *a.* एकसत्ताकराज्याचा, &c., स्वायत्ताधिपत्यासंबंधीं, स्वायत्ताधिपत्यविषयक, एकसत्ताक.

Autograph (aw'to-graf) [Gr. *autos*, self, & *graphe*, writing.] *n.* स्वदस्तुरचा लेख *m*-कागद *m*-खत *n*-पत्र *n*, स्वहस्ताची सही *f*. A. *v. t.* स्वदस्तुरचा लेख लिहिणें. Au'tography *n.* हस्तलेख शिलाछापावर घेण्याची क्रिया किंवा पद्धति *f*, स्वदस्तुरचा लेख लिहिणें. Autograph'ic,-al *a.* स्वदस्तुरचा, स्वहस्ताक्षराचा. Autograph'ically *adv.*

Automaton (aw-tom'a-ton) [Gr. *autos*, self, & a stem *mat*-to strive after, to move.] *n. a self-moving machine* स्वयंगतिक यंत्र *n*, यांत्रिकशक्तीमुळें आपोआप चालणारें यंत्र *n*. २ बुद्धिपूर्वकनिर्णयावांचून व्यवहार करणारा प्राणी *m*, परिपाठानुरूप किंवा अंधपरंपरेनें वागणारा मनुष्य *m. pl.* Autom'ata, Autom'atons. Automat'ically *adv.* Autom'atism *n.* स्वयंचलनशक्ति *f*, स्नायूंची आणि ज्ञानतंतूंची स्वयंचलनशक्ति *f*. Automat'ic, Automat'ical *a.* स्वाधीनगतिक, स्वतः चालणारें (यंत्र), स्वशक्तिप्रेरित, स्वयंवह, आत्मचालक, स्वचेष्ट, आत्मचेष्ट. २ *fig.* आंगचे बुद्धीचा, स्वाभाविक, यंत्रवत्. A. apparatus *n.* स्वाधीनगतिक उपकरण *n*, स्वयंवहयंत्र *n*.

Autonomy (aw-ton'om-i) [Gr. *autos*, self, & *nomos*, law.] *n.* आत्मशासन *n*, स्वसत्ता *f*, स्वराज्यसत्ता *f*, स्वतंत्राचार *m*, स्वतः कायदे करण्याचा अधिकार *m*. *Kant's philos.* इच्छा स्वतंत्र आहे असें मत *n*, इच्छास्वातंत्र्य *n*. Autonom'ic, Auton'omous *a.* स्वराज्यसत्तेसंबंधीं. २ स्वसत्ताक, स्वराज्यसत्ताक.

Autonym (aw'ton-im) [Gr. *autos*, self, *onoma*, a name.] *n.* कर्त्याच्या नांवानें प्रसिद्ध केलेला लेख *m*.

Autophagous (aw-tof'ag-us) [Gr. *autos*, self, *pha-*

*gein*, Sk. भुज्, to eat.] *a.* आत्मभोजी. Autoph'agy *n.* उपासमार चालला असतां (शरिरांतील) सप्तधातूंवर धरलेला टिकाव *m.* २ *zool.* अंडीं फुटतांच उडून जाऊन स्वशरीरपोषण ज्यांना करितां येतें असे पक्षी *m. pl.*

Autophoby (aw-tof'ob-i) [Gr. *autos*, Sk. आत्मन्, self & *phobia*, fear.] *n.* आत्मोल्लेखाची भीति *f.*

Autoplasty (aw'to-plas-ti) [Gr. *auto-plastos*, self-formed.] *n.* कोथितांगसंधान *n*, शीर्णांगसंधान *n*, शरिराचा एक भाग नासला असतां दुसऱ्या चांगल्या भागाचें कातडें काढून नासलेल्या भागीं लावतात.

Autopsy (aw'top-si) [Gr. *autos*, self, *opsis*, sight.] *n.* प्रत्यक्ष परीक्षा *f.* २ *med. post-mortem* परीक्षणार्थ मृतदेहाचें व्यवच्छेदन *n.* Also Autop'sia.

Autotype (aw'to-tīp) [Gr. *autos*, self, & *typos*, form.] *n.* मुळावरून काढलेली प्रतिमा किंवा नक्कल *f. photo.* कांचेवरच्या उलट प्रतिमेवरून सुलट प्रतिमा घेणें *n.*

Autumn (aw'tum) [L. *autumnus*, autumn.] *n.* शरत् or द् *f,* शरत्काल *m,* शरदृतु, खरीपाचे दिवस, सराई *f,* सराईचे दिवस. Autum'nal *a.* शरदृतुसंबंधीं, शरत्कालाचा, शरदृतूचा, शारद, शारदी, शारदीय, शरत्कालीन, शरत्कालिक, खरीपाचे वेळचा. २ *fig.* उतारवयासंबंधीं. A. equinox तुलासंपात. A. harvest *n.* खरीप(फ), खरीपाचें पीक. A. signs तूळ, वृश्चिक आणि धन. Autum'nally *adv.*

Auxiliar (awg-zil'yar) Auxiliary (awg-zil'yar-i) [L. *augere*, to increase.] *a.* मदतगार, साहाय्यकारी-कर्त्ता-कारक, उपकारक, कुमकेचा, सहाय. A. *n. gram.* साह्यकारी क्रियापद *n.* २ मदतगार, सहकारी, सहाय करणारा, *pl.* दुसऱ्या राजाकडून कुमकेस आलेली फौज, कुमक. ३ *math.* साह्यकारी संख्या किंवा पद. A. circle विक्षेपवृत्त *n*, विक्षेपवर्तुल *n*, उपवर्तुल (?) *n*, उपकुर्वाण वर्तुल *n.*

Avail (a-vāl') [L. *ad*, to & *valere*, to be strong.] *v. t.* (एखाद्याचा) फायदा करणें, मदत करणें, उपयोगीं पडणें. [To A. ONE'S SELF OF -चा आपल्याला फायदा करून घेणें.] A. *v. i.* कामास-कामीं-उपयोगीं-उपयोगास पडणें-येणें, फळ *n.* येणें *inv. con.*, फळणें, साधणें, फलद्रूप-फलित-&c. होणें. [To A. nothing फुकट जाणें, व्यर्थ जाणें, पोकळीखालीं or पोकळीस जाणें (?).] २ लाभणें, लाधणें, लाहणें, लाभ *m.* होणें. A. *n.* फायदा *m,* उपयोग *m,* फळ *n.* Availing, Avail'able *a.* (v. V. I.) उपयोगीं पडण्याजोगी, कामाचा, उपयोगाचा, उपयोगी, उपयुक्त, अमोघ, फलद्रूप, कार्योपकारक-कर्त्ता-कारी, कार्यसाधक. २ लाभदायक-जनक, फलद, फलप्रद. ३ मिळणारा, मिळण्याजोगा, सुगम, सुलभ. ४ चालू, चालता. Avail'ableness, Availabil'ity *n.* उपयोग *m,* उपयोगीपणा *m,* उपयोगित्व *n,* उपयुक्तता *f,* कार्यसाधकत्व *n.* Avail'ably, Avail'ingly *adv.*

Avalanche (av'al-ansh) [L. *ad*, to, & *vallem*, a valley.] *n.* हिमावसरण *n,* डोंगरावरून अगर कड्यावरून घसरत येणारा वर्फाचा लोट *m*-खडप *m*-धोंड *f,* हिमानी *f.* Avāle', Avāil' *v. i.* खालीं उतरणें-वसरणें. A. *v. t.* खालीं घसरवणें.

Avant (av'ang) Pref. used as *adj.* पुढें पाठविलेला, अघाडीचा; as, Avant-courier *n.* पुढें पाठविलेला जासूद *m,* अग्रदूत *m,* पुरोदूत *m.* Avant guard *n.* अघाडीची फौज *f,* विनी *f.*

Avarice (av'-ar-is) [L. *avere*, to pant after.] *n.* धनतृष्णा *f,* लोभ *m,* धनलोभ *m,* द्रव्यलोभ *m,* धनाशा *f,* लालूच *f,* अर्थकाम *m,* लालसा *f.* Avari'cious *a.* लोभी, धनलोभी, हावरा. Avari'ciously *adv.* धनलोभानें, लोभपूर्वक. Avari'ciousness *n.* धनलोभीपणा *m,* हावरेपणा *m.*

Avast (a-väst') *interj. naut.* पुरे, पुरे करा, हांहां.

Avatar (a-va-tär') [Sk. *ava*, away, down *tar*, to pass over.] *n. incarnation* (देवादिकांचा) अवतार *m.*

Avaunt (a-vawnt') [Fr. *avant*, forward.] *interj.* दूर हो, चल जा, तोंड काळें कर.

Ave (ā'vē) [L. *avere*, to be well or propitious.] *interj.* अभिवादन *n,* अभिवंदन *n,* नमस्ते. This is an address or prayer to Virgin Mary, an abbreviation of Ave Maria or Ave Mary. This Ave Mary is a form of devotion in the Roman Catholic Church.

Avenge (a-venj') [Pref. *a*, & L. *vindicare*, to avenge.] *v. t.* न्यायबुद्धीनें प्रतीकार करणें, न्यायबुद्धीनें उलट नुकसान करणें, प्रतिफल *n.* देणें, सूड (?) *m*-द्वेष (?) *m*-वैर (?) *n*-उसणें(नें) (?) *n.*-&c. उगवणें. Avenge'ful *a.* Avenge'ment *n.* (v. V.)-*act.* उसनें फेडणें *n,* &c., अपराधप्रतीकार *m,* अपराधशासन *n,* सूड (?) *m.* Aveng'er *n.* (v. V.) सूड घेणारा-उगवणारा-&c., कैवारी. A. of his people भक्तकाजकैवारी. Aveng'eress *fem.*

*N. B.*—Avenge means प्रतीकार करणें, वचपा काढणें. Revenge means केवळ मनाच्या शांतीकरितां सूड घेणें. Avengement is an act of justice. Revenge is simply for vindictive desire. I avenge myself upon another or I avenge another or I avenge a wrong. I revenge myself upon another.

Aventurine (a-ven'tū-rin) *n.* कांचेचे मौल्यवान् खडे. Also Avanturine.

Avenue (av'en-ū) [L. *ad*, to, *venire*, to come.] *n.* मार्ग *m.* २ प्रवेशपथ *m,* प्रवेशमार्ग *m,* द्वार *pop.* दार *n,* दरवाजा *m.* ३ दुतर्फा झाडें असलेला रस्ता *m,* दुरस्ता झाडीची वाट *f.* ४ *fig.* सफलतेचीं साधनें.

Aver (a-vėr') [L. *ad*, & *verus*, true.] *v. t.* प्रतिज्ञेनें सांगणें, निश्चयानें बोलणें. Aver'ment *n.* प्रतिज्ञेनें सांगणें, निश्चयपूर्वक बोलणें.

Average (av'ėr-āj) *n.* सरासरी *f,* सरदावरदी *f,* एकंदरी *f.* [In the A., On an A. सरासरी, स्थूलतः, स्थूलमानानें. Average price or rate एकंदर सरासरीचा भाव *m.*] २ साधारण स्थूल प्रमाण *n.* ३ मध्यमप्रमाण *n,* मध्यममान *n.* ४ *com.* (गलबतावरील मालाचें झालेलें नुकसान भरून काढण्यासाठीं) हिस्सेरसीनें दिलेली वर्गणी *f.*

A. *a.* मध्यम. २ साधारण. ३ *com.* सरासरीवरून काढलेला. A. *v. t.* सरासरी काढणें. A. *v. i.* सरासरीनें होणें-भरणें.

Averse (a-vėrs') [L. *aversus*, turned away.] *a.* पराङ्मुख, विमुख, पाठमोरा, अप्रसन्न, प्रतिकूल. २ तिटकारा दाखविणारा (with *to*). ३ माघार घेणाऱ्या मनाचा, विमुख, पराङ्मुख. Averse'ly *adv.* Averse'ness *n.* (v. A. 1.) पाठमोरेपणा *m*, पराङ्मुखता *f*, प्रातिकूल्य *n*, प्रतिकूलता *f*, विमुखता *f*. Aver'sion *n.* नावड *f*, चिळस *f*, तिटकारा *m*, अनावड *f*, चिकार (?) *m*, चिणका *m*, चिणकारा *m*, रीस *f*, विरक्ति *f*, विमति *f*, कंटाळा *m*, द्वेष *m*. I *cause of dislike* त्रास *m*.

Avert (a-vėrt') [See Averse.] *v. t. keep off, divert* निवारणें, टाळणें, वारणें, चुकवणें, टळवणें, (संकट) येऊं न देणें, निवारण *n*-वारण *n*.-&c. करणें *g. of o.* २ फिरवणें, काढणें, परतविणें *g. of o.* Avert'ed *p.* (v. V. 1.) चुकवलेला, निवारित, वारित. २ फिरवलेला, परावृत्त. Avert'edly *adv.* Avert'er *n.* टाळणारा, चुकवणारा, निवारक, निवारणकर्त्ता. Avert'ible *a.* (v. V. 1.) चुकवायाजोगा-सारखा-&c., निवारणीय, निवार्य, परिहार्य.

Avesta (a-ves'ta) *n.* (हिंदूंच्या वेदाप्रमाणें) पारशी लोकांचा मुख्य धर्मग्रंथ *m*. Aves'tan *n.* See Zend Avesta.

Avian (ā'vi-an) [L. *avis*, a bird.] *a.* पक्ष्यांसंबंधीं.

Aviary (ā'vi-ar-i) [L. *avis*, a bird.] *n.* पाखरांचा शिकारखाना *m*, पांखरखाना *m*, पक्षिशाला *f*, कुलायिका *f*, खुरवडा *m*, खुराडा *m*, जेथें पक्ष्यांच्या खाण्यापिण्याची वगैरे सर्व सोई केलेल्या आहेत असें स्थळ *n*.

Avidity (a-vid'i-ti) [L. *avere*, to pant after.] *n.* आधाशीपणा *m*, हांव *f*, सोस *m*, नितांतलेपणा *m*, खवखव *f*. २ बुभुक्षितता *f*, हव्यास *m*, हांवरेपणा *m*, हौस (हवस) *f*. Av'id *a.* लोभी, आधाशी, हांवरा.

Avocation (a-vo-kā'shun) [L. *ab*, from, & *vocare*, to call.] *n.* धंदा *m*, व्यवसाय *m*, व्यासंग *m*, काम *n*, पेशा *m*, हुद्दा *m*. २ *law.* खालच्या कोर्टांतून वरिष्ठ कोर्टांत हुकुमावरून खटला नेणें (advocation). ३ (*rare*) ओढाताण *f*, त्रेधा *f*. ४ *calling, employment pl.* काम *n*, पेशा *m*, व्यवसाय *m*, व्यासंग *m*.

Avoid (a-void') [L. *ex*, out, & Void.] *v. t. shun* चुकविणें, टाळणें, झुकविणें, हुकविणें. २ वर्जणें, वर्ज करणें, वगळणें, टाकणें, निवडून टाकणें, फिरणें *with* पासून *of o.*, अलग राहणें, दूर टाकणें, अस्वीकार *m.* करणें *g. of o.* ३ *law. quash* रद्द करणें. A. *v. i.* रद्द होणें. Avoid'able *a.* टाळतां येण्याजोगा, वर्ज करायाजोगा, टाळायाजोगा. Avoid'ance *n.* टाळणें *n*, वर्जणें *n*, वर्ज करणें *n*, वर्जन *n*, असेवन *n*, अनाचरण *n*, अस्वीकार *m*. २ —*act.* टाळणें *n*, चुकवणें *n*, टाळा देणें, &c.

*N. B.*—Avoid टाळणें आणि Avert निवारणें. Avert शब्दाचा 'पासून पराङ्मुख होणें' असा मूळ अर्थ आहे व 'टाळणें,' हा लांबचा अर्थ आहे. Avoid शब्दाचा 'मध्यें पुष्कळ रिकामी जागा (void) ठेवणें' असा मूळ अर्थ आहे व त्यापासून टाळणें, चुकवणें असा व्यावहारिक अर्थ निघतो. We avoid a thing causing destruction to us or we avoid it as a simple matter of prudence or taste. We always avert an evil or a calamity.

Avoirdupois (av-or-dū-poiz') [L. *habere*, to have, *pensum*, something weighed out.] *n.* एकप्रकारचीं इंग्रजी वजनाचीं परिमाणें (साखर, गूळ वगैरे मोजण्याचीं). यांत एका पौंडाचे १६ औंस असतात. सोनें, रुपें तोलण्याच्या वजनांना ट्राय अशी संज्ञा आहे. त्यांत एका पौंडाचे १२ औंस असतात.

Avouch (a-vowch') [L. *ad*, to, & *vocare*, to call to.] *v. t.* निश्चयपूर्वक-खचीतपणें-प्रतिज्ञेनें-प्रतिज्ञापूर्वक-&c. बोलणें-ह्मणणें, स्थापित करणें, प्रतिपादन करणें. Avouch'able *a.* निश्चयपूर्वक सांगण्याजोगा. Avouch'er *n.* निश्चयपूर्वक सांगणारा. Avouch'ment *n.* निश्चयपूर्वक सांगणें *n*, प्रतिज्ञा *f*.

*N. B.*—To avouch a thing is to place one's-self in the position of a witness for it. Avouchment is always a positive statement, in favour of some person or cause.

Avow (a-vow') [L. *ad*, & *vocare*, to call to.] *v. t. own* उघड कबूल करणें. २ अंगीकारणें, स्वीकारणें, आंगावर घेणें, अंगीकारपूर्वक सांगणें, पदरीं घेणें, कबूल करणें. ३ प्रतिज्ञेनें बोलणें, प्रतिज्ञा करणें. Avow'able *a.* Avow'ably *adv.* Avow'al, Avow'ance *n.* उघडपणें कबूली *f*, अंगीकार *m*, स्वीकार *m*. Avowed' *p.* (v. V.) कबूल केलेला, अंगीकृत, स्वीकृत; as, an avowed enemy, an avowed purpose. Avow'edly *adv.* सांगून सवरून, हटकून. Avow'er *n.* कबूल-अंगीकार-स्वीकार करणारा, अंगीकार-स्वीकार-कर्त्ता.

*N. B.*—To Avow means to declare with boldness and frankness. This implies our own consciousness of right, and of the fact others do not think it so, or at least are not fully pursuaded of it.

Avulse (a-vuls') [L. *avellere*, to pull.] *v. t.* जोरानें विलग करणें, फाडणें. Avul'sion *n.*

Await (a-wāt') *v. t. wait for* वाट *f.* पाहणें *g. of o.*, मार्ग *m.* लक्षिणें *g. of o.*, प्रतीक्षणें, खोळंबणें, तिष्ठणें with साठीं-&c. *of o.*, प्रतीक्षा करणें. २ (करितां) राखून ठेविलेलें असणें. ३ (करितां) तयार असणें; as, A reward awaits him. Awaiting *n.* (v. V.)—*act.* वाट पाहणें *n.* &c., प्रतीक्षणें *n*, प्रतीक्षा *f*, मार्गप्रतीक्षा *f*.

Awake (a-wāk') [See Watch.] *v. t.* जागा-जागृत-&c. करणें, उठवणें, जागविणें, झोंपमोड *f*-नीजमोड *f*. करणें *g. of o.*, निद्राभंग *m*-बोध *m*-प्रबोध *m*-बोधन *n*-&c. करणें, हुशार करणें. A. *v. i.* जागा-जागृत-सावध-&c. होणें, हुशारणें, हुशार होणें, उठणें. A. *a.* जागा, जागृत, सावध, हुशार, अनिद्रित, अनिद्र. [To be A. जागणें. To be A. to जागणें.] Awak'able *a.* Awak'en *v. t.* and *v. i.* जागृत करणें-होणें. Awaked, Awakened *p.* (v. V.) जागा केलेला-

झालेला, प्रबुद्ध, प्रबोधित, उठवलेला. Awak'ening *a.* जागा-प्रबुद्ध-प्रबोधित-&c. करणारा, प्रबोधक. Awak'ening, Awak'ing *n.* (v. V. T.)—*act.* जागा करणें *n*, निद्राभंग *m*, बोधन *n*, बोध *m*, प्रबोधन *n*, प्रबोध *m*. Awak'ement, Awak'enment *n.* जागृति *f*, पुनरुज्जीवन (?) *n*. Awak'ener *n.* डोळे उघडवणारा, जागृत करणारा.

*N. B.*—पुनरुज्जीवन should better be restricted to Revival.

Award (a-wawrd') [Gr. *warten*, to watch in order to protect.] *v. t. give by judicial determination* फैसल्ला करून-निवाडा करून-निर्णय करून-&c. देवविणें, चौकशी-मनसुबी-तपासणी-पंचाईत-&c. करून देवविणें. A. *v.i.* निवाडा करणें. A. *n.* निवाडा *m*, फैसल्ला *m*, फैसल *n*, नीर (*vulg.*) *m*, निर्णय *m*, लवादनामा *m*, पंचांचा ठराव *m*. Written A. निवाडपत्र *n*, निर्णयपत्र *n*, हुकुमनामा *m*, फैसलनामा *m*, महजर *m*. Award'able *a.* Awarded *p.* निवाडा करून देवविलेला, &c. Award'ment *n.* Award'er *n.* निकाल देणारा, &c.

Aware (a-wār') [See Wary.] *a.* (always followed by *of*) सावध, सावचित्त, हुशार. २ माहितगार, वाकबगार, हुशार झालेला, बोधित, प्राप्तबोध, जातबोध, प्रबुद्ध. Aware'dom, Aware'ness *n*.

Awash (a-wosh') [Pref. *a*, & Wash.] *a.* लाटांच्या आधीन, वीचिधूत, समुद्रजलरेषेंत.

Away (a-wā') [A. S. *a*, on, & *weg*, way.] *adv. at a distance* गैरहजिर, दूर अंतरावर, दूर, अन्यस्थानीं, लांब. २ *from, on its way from,* The sense of this word as used with a verb is best expressed in Marathi by the use of another verb; as, To go away निघून जाणें. To give away देऊन टाकणें. To throw away टाकून देणें. To run away पळून जाणें. To make away with वाट लावणें, लांबवणें. Away! Away with you चल! दूरहो! चालताहो! Away with him त्याला येथून घेऊन जा, ठार मारा. Fire Away एकदम बत्ती द्या. I cannot away with it माझ्यानें तें सोसवत नाहीं. Once and Away केव्हांना केव्हांतरी एकदां, निदान एकदां. There away त्या दिशेनें. To fall Away (from) विश्वासघातानें सोडून जाणें, करार मोडून सोडून जाणें. To fight Away लढत रहाणें. To work Away काम करीत रहाणें. In the last two phrases the idea of continuity is involved. To explain Away difficulties in a certain subject (to explain in a plausible and evasive manner) एखाद्या विषयांतील दुर्बोध भाग सुगम झाले असा भास करणें, उडवाउडवीचा खुलासा करणें. To do Away with शेवट करणें.

Awe (aw) [A. S. *ege*, fear, Gr. *achos*, anguish.) *n. reverential fear* दरारा *m*, दबदबा *m*, दरदरा *m*, धास्त or स्ती *f*, दहशत *f*, धाक *m*, वचक *m* (*v.* बाळग), बाज *m*, चक *m*, हैबत *f*, जरब *f* (*v.* बस), दर्प *m*. [To LOSE ONE'S A. OF मीड *f* चेपणें-मरणें *g. of o.*, जरब *f* पिणें. To STAND IN A. OF वचकणें, जरब *f*. खाणें, जुमान *m. n*, खाणें, जुमानणें]. A. *v. t.* (पूज्यभावासह) भीति उत्पन्न करणें, दाब *m*-दबदबा *m*-दरारा *m*-&c. बसवणें, धाक *m*. दाखविणें, जरब *f*-धमकी *f*-देणें-दाखविणें. Awe'less, Aw'less *a.* ज्याचा दरारा बसत नाहीं असा. Awe'lessness *n.* Awe'some, Aw'some *a.* Awe'strike *v. t.* see Awe. Awe'struck *a.* धाक बसलेला, दरारलेला. Aw'ful *a.* धाकाचा, सादरभीतिजनक, दराऱ्याचा, दरदऱ्याचा, जरबेचा, वचकाचा, वचक्याचा, इब्रतीचा, धाक घालायाचा, धाक बसवायाजोगा-सारखा, जरबी, अघोर. २ अघोर, दारुण, भयंकर. ३ अवाढव्य प्रमाणाचा, अजस्र. Aw'fully *adv.* फार मोठ्या प्रमाणानें, भयंकर प्रकारें, &c. Aw'fulness *n.* सादरभीति *f*. २ दबदबा *m*, दाब *m*, इ(ब्र)ब्रत *f*, दरारा *m*, दगदगा (?) *m*, जरब *f*, सलावत *f*.

Aweary (a-wē'ri) *a.* थकलेला, कंटाळलेला. Awea'ried *a.* same as weary.

Aweather (a-weth'er) *a.* or *adv.* गलबताच्या ज्या बाजूवर वारा वाहतो तिकडचा, पवनाभिमुख. The reverse of 'a-lee' applied to the position of a ship's helm where its tiller is moved to the wind-ward side of the ship.

Aweigh (a-wā') *adv.* भुइसांड केलेला, उचलण्याच्या स्थितींत; as, An anchor is A. when the strain on the cable has just raised it from the bottom.

Awhile (a-hwīl') *adv.* कांहीं काळपर्यंत, कांहीं वेळ, अमळ, अमळसा, जरा.

Awkward (awk'ward) [A. S. in a back-handed manner.] *a. clumsy* अडाणी, अनाडी, आडमूठ, आडमुठ्या, आडकसबी (?), नाकसबी, घसक्या, घसड्या, अवसुती, अवसुत्या, गवत्या, काबाडी(ड्या), काबाडकामी, हेंगाडा, दुघड (?), (गव्हार), गंवार, झोडकाम्या, बेहिकमती, बेहुनरी, अकुशल, अपटु. The A. and rude,—compreh. अडाणी कबाडी *m. pl.* गवतेगोमाजी *m. pl.* २ (of things) धोबड, ओबडधोबड or आबडधोबड, बेडौल, बोजड, बेढब, बेडौली, गैरबेताचा, ढोबळ, अवसुती. ३ *unpleasant, disagreeable, untoward,* &c. अवघड, कठीण, अडचणीचा, नडीचा, गैरसोईचा. Awk'wardish *a.* Awk'wardly *adv.* (v. A. 1.) अडाण्या-अनाड्यासारखा, अडाण्यापरी, अडाणीपणानें, अकुशलतेनें. Awk'wardness *n.* (v. A. 1.) अडाणीपणा *m.* or अडाणपणा *m*, अनाडपणा *m*, आडमुठेपणा *m.* &c., अकौशल्य *n*, अकुशलता *f*, अपटुता *f*. २ ओबडधोबडपणा *m*, ढोबळपणा *m*, बेडौलपणा *m*, बेडौली *f*. ३ अवघडपणा *m*, कठिणपणा *m*.

Awl (awl) *n.* आरी *f*, आर *f*, टोपण *n*, टोपणें *n*. To bore with an A. (टोपण) टोपणें, टोपसणें.

Awn (awn) *n.* (गवताचें-धान्यावरचें) कूंस *n*, कुसूं *n*, कुसळ *n*. २ *bot.* तृणवर्गांतील फळावरील फडीच्या आकाराचें आच्छादन *n*-शूक *n*. Awn'y *a.* ज्याला भूस किंवा कुसें फार आहेत असें, फार भुसाचा, भुसाळ.

Awning (awn'ing) *n.* छत *n* (*v.* बांध), चांदणी *f*, आ-

स्मानगिरी (R) *f*, चांदवा *m*, सायवान *n*, शमिना or (समिना) *m*, शामाणा or ना *m*, वितान *n*. To cover with an A. छतावणें.

Awry (a-rī') [Pref. *a*, on, & wry.] *a.* & *adv.* वांकडा-तिकडा, तिरकस, तिरपा, तिरका. To look A. कान्या डोळ्यानें पाहाणें, ओझरतें पहाणें. To walk A. चुकीच्या मार्गानें जाणें.

Ax, Axe (aks) *n.* कुऱ्हाड *f*, कुठार *m*, परशु (*pop.*) परश *m*, तबल *m*. To hang up one's Axe काम सोडून देणें, उद्योग न करणें–टाकून देणें. To put the A. on the helve अडचणींतून पार पडणें किंवा अडचण दूर करण्यास युक्ति शोधून काढणें. He has an Axe to grind त्याच्या मनांत कांहीं स्वार्थ साधून घ्यावयाचा आहे, त्याला आपलें घोडें पुढें ढकलावयाचें आहे. Axe-head *n.* कुऱ्हाडीचें लोखंडी टोपण *n.* Axe-stone *n.* कुऱ्हाड पाजविण्याचा निसणा *m*, लसणा *m*.

Axilla, Axil, (aks'il-la) *n.* कांख *f*, खांक *f*, बगल *f*, कक्ष *f*. २ *bot.* पान आणि देंठ यांमधील कोन *m*. Ax'illar, Ax'illary *a.* बगलेसंबंधीं, कांखेचा, कक्षेसंबंधीं. २ *bot.* पान व देंठ यांमधील कोनासंबंधीं, किंवा कोनापासून येणारा, कक्षस्थ, कक्षागत.

Axile (aks'il) *a.* अक्षासंबंधीं, आंसाकडील. २ *bot.* अक्षस्थ, आक्षिक, मध्यरेपेला चिकटणारा.

Axiom (aks'yum) [Gr. *axio-ein*, to think worth, to take for granted.] *n.* *geom.* प्रत्यक्षप्रमाण *n.* २ स्वतःसिद्ध तत्व *n.* Axiomat'ic, Axiomat'ical *a.* प्रत्यक्षसिद्ध, स्वतःसिद्ध. Axiomat'ically *adv.*

Axis (aks'is) [L. *axis.*] *n.* आंस *m*, आंख *m*, अक्ष *m*, कणा *m*, गुणा *m*. २ *bot.* आंस *m*, अक्षभाग *m*, मध्यभाग *m*. ३ *anat.* कीलकास्थि. ४ *math.* प्रथमरेपा, निर्णयरेपा, मापनरेपा. Axes *pl.* Axis of x कोटिभुजमापनरेपा *f.* A. of y भुजमापनरेपा *f.* Axis of z उच्चत्वमापनरेपा. Axis of ordinates भुजान्तरमापनरेपा *f*, भुजमापनरेपा *f.* Axis of abscissas कोट्यन्तरमापनरेषा *f*, कोटिमापनरेषा *f.* ordinate ला भुज व abscissa ला कोटिभुज किंवा कोटि असेंहि ह्मणतात. Ax'ial *a.* Ax'ially *adv.* Axial inclination अक्षविक्षेप.

*N.B.*—The word अक्ष or आंस is to be substituted for the word *axis* in the following phrases = A. of curve; A. of lens; The axis of co-ordinates in a plane; Axis of revolution; A. of the equator; A. of a balance; A. of a telescope; A. of oscillation; A. of polarization; A. of suspension; Optical or visual axis. Radical A. of two or more circles; Conjugate A.; Major A.; Minor A.; Transverse A.; The exact renderings of these phrases will be found under Curve, lens, &c. &c.

Axle (aks'l) Axle-tree (aks'l-trē) [axis.] *n.* गाडीचीं चाकें ज्याभोंवतीं फिरतात तो लांकडाचा अगर लोखंडाचा दांडा *m*, चाकांचा आंस *m*, आंख *m*, अक्ष *m*, कणा *m*, गुणा *m*. Axle-box of a cart खोब्रळा *m*. Grease for A. ओंगण *n*, वंगण *n*. Transverse beam of A. चाकपाटी *f.* Ax'led *a.*

Axle-nut (aks'l-nut) *n.* चाक खालीं पडूं नये ह्मणून शेवटीं लावलेला स्क्रू अगर खीळ *f*, आंसाची खीळ *f*, आंसाची खिटी *f*, कानखीळ *f.*

Ay or Aye (ī) *adv.* होय, हो, सई, बरें. A. *n.* अमुक एक पक्षाच्या बाजूचें मत *n*, अनुकूलमत *n. pl.* अनुकूल मत देणारे लोक *m*.

Aye (ā) [A. S. *a*, connected with Age, Ever.] *adv.* सतत, निरंतर. For Aye, for ever and Aye अनंतकालापर्यंत, सर्वकाल.

Azimuth (az'im-uth) [Ar. *as-sumut*, *as* = *al* the, *sumut*, *samt*, direction.] *n.* *astron.* समकोण *m*, समांश *m*, दिक्कोट्यंश *m*, खस्थ ज्योतीमधून जाणारें दृङ्मंडल आणि क्षितिजाचा उत्तर किंवा दक्षिण बिंदु यांमधील क्षितिजाचा भाग. Az'imuthal *a.* Altazimuth *n.* उन्नतिदिगंशमापकयंत्र *n.* The co-azimuth *n.* दिगंश *m*, दिग्लव *m*. Azimuth circle, Azimuth-vertical दृङ्मंडल *n*, स्वस्तिक आणि खस्थ पदार्थ ह्यांतून जाणारें व क्षितिजावर लंबरूप असणारें वृत्त *n.* Azimuth compass दिगंशनिर्णययंत्र *n*, दिगंशहोका *m*. Azimuth dial दिगंशमापकशंकुयंत्र *n.* Azimuth magnetic लोहचुंबकासंबंधीं याम्योत्तरवृत्त व पदार्थउन्नतांशवृत्त ह्यांनीं केलेला क्षितिजावरचा चाप *m*.

Azoic (a-zō'ik) [Gr. *a*, not, & *zoe*, life.] *a.* प्राणरहित, निष्प्राणी, प्राणिकोटीच्या पूर्वीचा; as, A. rocks.

Azometer (a-zō'mē-tėr) *n.* नत्रमापक.

Azonic (a-zon'ik) [Gr. *a*, not, & *zone*, a belt-region.] *a.* *not local* विशिष्ट कटिबंधाचा नव्हे असा, कोणत्याहि ठिकाणाचा.

Azoospermia (az-ō-ōs-per'mia) [Gr. *a*, not, *zoe*, life, & *sperma*, seed.] *n.* *med.* शुक्रजंतुदौर्बल्य *n.*

Azote (a-zōt') [Gr. *a*, not, & *za-ein*, to live.] *n.* नायट्रोजनचें पूर्वीचें नांव *n*, (नत्र). Azot'ic *a.* Az'otise *v. t.* अम्लगुण विशिष्ट करणें. Az'otite *n.* नायट्रस असिडचें लवण. Azot'ous *a.* नायट्रस ॲसिडासंबंधीं.

Azure (azh'ūr or ā'zhūr) [L. *azura*, blue colour.] *a.* अ (आ) स्मानी, आकाशासारखा, आकाशाच्या रंगाचा, निरभ्र, स्वच्छ. A. *n.* आकाश *n*, निळा रंग *m*. Azurē'an, Az'urine *a.* अस्मानी, नीलवर्ण, निळा. Az'urite *n.* जांभळा कार्बोनेट.

Azygous (az'i-gus) [Gr. *a*, not, & *zygos*, a yoke.] *a.* दुसऱ्याबरोबर न जोडलेला, एकाकी, जोडीपैकीं एक नाहीं असा; as, an Azygous muscle.

Azymous (az'i-mus) [Gr. *a*, not & *ezym*, leaven.] *a.* बिन आंबवणाचा. Az'ym, Az'yme *n.* बिन आंबवणाची रोटी *f*-भाकर *f.*

# B

B (bē) इंग्रजी वर्णमालिकेंतील दुसरें अक्षर; हें व्यंजन आहे. ह्याचीं अनेकवचनें Bees, B's, Bs. अशीं लिहितात. मराठींत B अक्षर ब् नें दाखविलें जातें; व Bh साठीं भ् लिहितात. २. ३०० ह्या आंकड्याकरितां हें अक्षर योजितात; व ह्याच अक्षरावर आडवी रेघ दिल्यास (B̄) ३००० असा त्याचा अर्थ होतो. ३ *mus.* (the seventh note of the scale of C major) इंग्रजी गायनपद्धतींतील स्वरसप्तकाचा सप्तम स्वर, (अर्थात्) तीव्र धैवत. ४ *alge.* व्यक्तपदचिन्ह; as, In this problem *b* is the number of hours. ५ B चा उपयोग पुष्कळ शब्द संक्षेपानें लिहिण्यांत करितात; as, B (*mus.*) stands for Bass, Basso; B (*chem.*) for Boron; B. A. (or A. B.), for Bachelor of Arts; B. C. L., for Bachelor of Civil Law; B. D., for Bachelor of Divinity; B. L. (or LL. B.), for Bachelor of Laws; B. S. for Bachelor of Surgery; B. Sc., for Bachelor of Science; M. B. for Bachelor of Medicine; B. C., for Before Christ; B. C., for Bad Character; as, He was marked with B. C. before he was dismissed. B. and S. for Brandy and Soda; B. V., for The Blessed Virgin. [The letter B etymologically corresponds to the letters *f*, *v*, *w*, *p*, and *m.*; for example—English *bear* corresponds to Latin *ferre;* English *silver* corresponds to German *silber;* Sk. *dev.* (देव) to *deb* (देब) in Bengali; Latin *ab* to *apa* अप in Sanskrit and Latin *mortalis* to *botos* in Greek.] B flat हा शब्द थट्टेनें ढेंकूण (Bug) ह्या अर्थीं वापरतात. Not to know a B from a bull's foot or Not to know a B from a battle-door or Not to know a B from a bole-foot ह्या तिन्ही विशेष शब्दप्रयोगांचा अर्थ 'मुळींच अक्कल नसणें' 'मूर्ख असणें' 'अगदीं साधेंही तारतम्यज्ञान नसणें' (to be entirely illiterate) असा आहे; as, "There were members who scarcely knew B from a bull's-foot." (M.)

Baa (bä) [From the sound of a sheep's or lamb's bleat.] *n.* मेंढीचा किंवा बकरीचा शब्द *m*, बें बें *n.* B. *v.i.* बें बें *n.* करणें, बेंबावणें, बेंबटणें (?) (used in certain provinces) [मेंढ्याच्या-बकरीच्या ओरडण्यास हा शब्द लावितात]. Baa'ing *n.* (v. V.) बें बें करणें.

Baal (bā'al) [Heb. *baal*, lord. Ar. *baal*, the idol.] *n.* प्राचीन फिनिशियन लोकांचा मुख्य देव *m* (सूर्य). २ *a false god* (कल्पित) देव *m*, देवता *f.* ३ *an idol* देवाची मूर्ति *f.* Bā'alim *pl.* Bā'alism *n.* बेऑलची पूजा *f.* २ मूर्तिपूजा *f.* Ba'alist or Bā'alite *n.* बेऑलची पूजा करणारा *m*, बेऑलचा भक्त *m.* २ मूर्तिपूजक *m.* [Among the ancient Phœnicians, Ashtaroth was the corresponding female deity to Bāal. As a title of honour, the word Baal (Bal, Bel) enters into a large number of Phœnician and Carthaginian proper names; as, Hanni-bal, Bel-shazzar, Hasdru-bal, &c.].

Babbitt-metal (bab'it-met-al) [From the inventor, Isaac Babbitt of Massachusetts.] *n.* एक प्रकारची मऊ मिश्र धातु *f.* यंत्रांत घर्षण कमी करण्याकरितां हिचा उपयोग करितात. ५० भाग कथील, २ भाग अंज (antimony) व १ भाग तांबें हीं एकत्र मिसळून ही धातु तयार करितात.

Babble (bab'bl) [From *ba*, sound uttered by an infant. Fr. *babiller*, to prattle.] *v. i. utter words indistinctly as children* बा बा करणें, बोबडें बोलणें, अस्पष्ट बोलणें. २ *talk incoherently or foolishly, prattle* विसंगतपणें-मूर्खपणानें-बोलणें, बहकणें, भकणें, वकणें, बकबकणें, वटवटणें, बडबडणें. ३ *tell secrets* (गुह्य) फोडणें, तोंडाळणें (?), तोंड *n*- मुखरस *m*- जीभ *f*- पाघळणें *g. of s. idio.*, गुप्त गोष्टी सांगत सुटणें. ४ *make a continuous murmuring sound like a rivulet* खळखळणें, खळखळ आवाज करणें. B. *v. t.* बडबडणें, जल्पना करणें. Bab'blative *a. given to babbling* बडबड्या, वाचाळ, वटवट्या. Bab'bly *a. full of babble* वटवटीचा. Bab'ble, Bab'blement, Bab'bling *n.s.* (v. V. I. 1.) बोबडें बोलणें *n.* २ (v. V. २.) बकणें *n*, &c., बकबक *f*, बडबड *f*, वटवट *f*, बकणी *f*, बकवा *m*, बकवाद *m*, वाचाळता *f*, वाचाळी *f. obs.*, वाचाळपंचविशी *f.* ३ (v. V. ३.) (गुह्य) फोडणें *n.* गुह्यस्फोट, &c. सांगासांगी *f* (?), सांगावांगी *f* (?), लभाडाई *f.* ४ (v. V. 4.) खळखळ *f*, खळखळी *f*, खळाळी *f.* Bab'bler *n. vide* the verb Babble. Babbling *pr. p.* Babbled *pa. p.*

Babe (bāb) Also Baby [Compare Babble. सध्यां Babe शब्दाऐवजीं Baby हाच शब्द जास्त वापरतात. Babe हा शब्द विशेषेंकरून इंग्रजी काव्यांत आढळतो. बायबलमध्यें Babe हाच शब्द वापरतात, व Baby हा शब्द कधींच वापरलेला नाहीं.] *n. an infant* बाळ *n*, कुकुबाळ *n*, लेंकरूं *n*, तान्हें मूल *n*, आंगावरचें मूल *n*, कडेवरचें मूल (?) (*colloq.*), अर्भक *n*, तान्हें *n*, तान्हुलें *n.* २ (*obs.*) बाहुली *f.* ३ दुसऱ्याच्या डोळ्यांच्या बुबुळांतील आपलें प्रतिबिंब *n.* Bā'byish, Bab'ish *a.* पोरकट. २ तान्ह्या मुलासारखें. Bab'ishly *adv.* Bab'ishness, Ba'byishness *n.* पोरकटपणा *m.* Bā'byhood, Babe'hood *n.* पोरपण *n*, बालपण *n*, बाल्यावस्था *f*, तान्हेपणा *m.* Ba'byism *n.* बालदशा *f.* Baby-farm *n.* मुलांकरितां भाडोत्री पालनसंस्था *f.* Baby-farmer *n.* मुलांचा भाडोत्री पालक *m.* मुलें पोसणीस घेणारा. [(युरोपांत) पालनपोषणाबद्दल कांहीं रकम आगाऊ घेऊन बहुतकरून अविवाहित संबंधाचीं तान्हीं मुलें वाढविणारा, आणि खरें प्रेम नसल्यामुळें तीं मोठीं झालीं नाहींत तोंच त्यांस वाईट रीतीनें वागवून हाकलून देण्याची इच्छा करणारा]. Baby-farming *n.* भाडोत्री पालकाकडून मुलें वाढविणें *n.* Bab'ery (*obs.*) *n.* लहान मुलांचें लेणें *n*, बाललेणें *n.* Babes in the wood (*fig.* & *lit.*) रानवट,

अडाणी, साधे भोळे व सहज फसणारे लोक. Bā'by-jump'er *n. a seat suspended from the ceiling of a room by elastic straps, to enable a baby to jump* रबरी दोऱ्यांनीं टांगून ठेविलेली लहान मुलांची उडी मारण्याची खुर्ची.

Babel (bā'bel) [Hebrew word meaning confusion like that of the tower of Babel where, as the Christian Scriptures say, the confusion of languages took place. Refer to the ninth Chapter of Genesis, Bible.] *n.* उंच इमारत *f,* उंच मनोरा *m.* २ अशक्य कल्पना *f;* स्वप्नांतील कल्पना *f.* ३ *a confusion of sounds* भाषासंकर (?) *m,* कलकल *f,* बलबल *f,* बडबड *f.* ४ *a scene of confusion* बलबलपुरी *f,* टमटमराज्य *n.* Bā'beldom, Bā'belism *n. a perfect babel* पूर्ण गोंधळ *m,* सांवळा गोंधळ *m.* A babel of sounds गलबला *m,* गलका *m,* कलकलाट *m,* गलबलाट *m.*

*N. B.*—ख्रिस्ती धर्मपुस्तकांतील जुन्या करारांत लिहिल्याप्रमाणें प्रलयानंतर आकाशाइतका उंच मनोरा मनुष्यें बांधीत होतीं. यांबद्दल देवाला राग आला व त्यानें त्यांना निरनिराळ्या भाषा बोलण्याचा शाप दिला; अर्थात् एकाची भाषा दुसऱ्यास न समजल्यामुळें मोठा गोंधळ झाला; या मनोऱ्यास किंवा गोंधळास Babel हा शब्द योजितात.

भाषासंकर ह्या शब्दाचा अर्थ आधीं पुष्कळ भाषा होत्या, व नंतर त्यांचा संकर (मिश्रण) झाला असा होतो. इंग्रजी Babel शब्दांत आधीं एक भाषा होती व नंतर अनेक भाषा झाल्या अशी कल्पना आहे तर भाषानानात्व, भाषावैचित्र्य हे शब्द Babel शब्दाला योग्य आहेत. भाषासंकर हा चुकीचा अर्थ आहे.

Babiroussa-russa (ba-bi-rōō'sa) [Malay *babi,* a hog and *rusa,* a deer.] *n.* एक जातीचें शिंगें असणारें डुकर *n.*

Baboo (bä'bōō) [Hind. *babu.*] *n.* बाबू *m.* Mr. किंवा Esqr. बद्दल साहेब लोक Baboo हा शब्द इंग्रजी लिहिणाऱ्या देशी कारकुनाला लावतात. कधीं कधीं इंग्रजी र ट फ येणाऱ्या बंगाली गृहस्थाला किंवा कोणत्याहि देशी मनुष्याला हा शब्द तिरस्कारानें लावतात. Ba'boodom, Ba'booism *ns.* बाबूपणा, बाबूची विशेष आचाराची किंवा भाषेची पद्धति *f.* २ (निंदाव्यंजक) अर्धवट शिक्षण मिळालेली स्थिति *f.*

Baboon (ba-bōōn') [Fr. *babouin.*] *n. zool.* एका जातीचें माकड *n.* ह्याला लांब मुसकुट, मजबूत सुळे, लहान शेंपूट, खोल डोळे आणि विशाल भिंवया असतात. Baboon'ery *n.* माकडचेष्टा *f,* माकडासारखे चाळे *m. pl.,* माकडासारखी वर्तणूक *f.* Baboon'ish *a.* माकडचेष्टया. २ माकडासारखा.

Babylonian (bab-i-lōn'i-an) *a.* प्राचीन बॅबिलोनियाच्या राज्यासंबंधीं अगर बॅबिलोन शहरासंबंधीं. २ *fig.* फार मोठा, अवाढव्य, विस्तीर्ण. ३ (*obs.*) केवल शहरांतील भाषेच्या गोंधळासारखा. B. *n.* प्राचीन बॅबिलोनियांतील रहिवाशी *m.* also Babylon'ish, Bab'ylonic, Bab'ylonical *a. s.*

Bacca (bak'ka) [L. *bacca,* a berry, cf. Sk. भक्ष्, to eat.] *n. bot. a many-seeded inferior pulpy fruit* बहुबीजयुक्त मांसल फलजाति *f,* पुष्कळ बिया व गीर असलेल्या वायंग्यासारख्या फळाची जात *f,* बृहतीफलजाति (बृहतीफल = वायंगें). [प्रोफेसर आपटे Berry किंवा Bacca ला गुली किंवा गुटिका असा शब्द देतात. परंतु तो शब्द योग्य नाहीं. गुळी किंवा गुटिका हा शब्द एकच बी (आठोळ) असलेल्या फळाला लावतां येईल. पेरू हें एक Bacca जातीच्या फळाचें उदाहरण आहे.] Bac'cāte *a. bot.* पेरूच्या किंवा वायंग्याच्या जातीचा, पुष्कळ बिया असून मांसल, पुष्कळ बिया व गीर असलेला. Bacciferous (bak-sif'er-us) *a.* वायंग्यासारखें फळ प्रसवणारा, गीरदार व पुष्कळ बिया असलेल्या फळाचा. Bacciv'orous *a.* वायंग्यासारखें फळ भक्षण करणारा. [The grape, gooseberry &c. are true berries; but botanically the name berry also includes the cucumber, gourd, and even the orange and lemon (M.)].

*N. B.*—Achænium, Bacca, Balausta &c. &c. अशा फळांच्या सुमारें तीस जाती आहेत. Bacca जातींत पेरू, वायंगें हीं मोडतात.

Baccalaureate (bak-ka-law're-āt) [L. L. a corrupted form of L. L. *baccalarius,* old Fr. *bachelier,* a lad, a boy, from L. L. *bacca* for *vacca,* a cow;–a man employed on a grazing farm. Fr. *bachelier, bachelette,* a damsel.] *n.* बी. ए. ची पदवी *f. vide* the word *Art.* B. *a.* बी. ए. पदवीधरासंबंधीं, विद्यांगपंडितासंबंधीं. Baccalau'rean *a.*

Bacchanal (bak'a-nal) [L. *Bacchus,* the god of wine.] *n. a priest of Bacchus* बॅकस देवाचा उपासक-पुजारी *m.* २ *one who indulges in revelry, a drunkard* झिंग्या *m,* छाकटा *m,* दारूबाज *m,* पानलंपट *m,* पानासक्त *m,* पानरत *m.* ३ (usually *pl.*) *a festival in honour of Bacchus* बॅकसाप्रीत्यर्थ उत्सव *m,* पानोत्सव *m,* पानसमारंभ *m.* ४ *an occasion of drunken revelry, an orgy* पानोत्सवसमारंभ *m,* रात्रीची गाण्याची, नाचण्याची व दारू पिण्याची मजलस *f.* ५ *a dance or song in honour of Bacchus* बॅकसाच्या प्रीत्यर्थ केलेलें गायन किंवा नृत्य *n.* B. *a.* बॅकसाच्या पूजेसंबंधीं, बॅकसासंबंधीं. २ पानोत्सवाचा. ३ पानासक्त, मद्यरत. also Bacchanā'lian. Bacchanā'lia *pl.* see the third meaning of Bacchanal. Bacchanā'lianism *n.* पानोत्सव *m.* २ पानोत्सव करण्याची रीत *f.* Bacchant (bak'kant) *n.* & *a.* see Bacchanal (meanings 1, 2). Bacchante (bak-kant', bak'kant, bak-kant'i) *n. fem.* of Bacchanal. Bacchant'es *pl.* Bacchic (bak'kik) *a.* बॅकस देवतेचा. २ बॅकसाच्या पूजेचा. ३ चैनी, रंगेल. ४ दारूबाजीचा.

*N. B.*—Bacchanals हें Bacchanal शब्दाचें इंग्रजी अनेकवचन आहे. कधींकधीं Bacchanals च्या ऐवजीं Bacchanalia हाही अनेकवचनी प्रयोग करितात. हा अनेकवचनी प्रयोग लॅटिन भाषेप्रमाणें आहे. Bacchanalia हें *Bacchanalis* ह्या मूळ नपुंसकलिंगी लॅटिन शब्दाचें अनेकवचन आहे. कधींकधीं Bacchanalia हेंच एकवचन धरून Bacchanalias हा अनेकवचनी प्रयोग करितात; परंतु ती चूक आहे.

Bacchus (bak'kus) *n. myth.* ग्रीक लोकांचा सुरादेव. हा शब्द पुल्लिंगी आहे.

Bachelor (bach'el-or) [O. Fr. *bacheler*, L. L. *baccalarius*, a farm-servant, from L. L. *bacca*, for L. *vacca*, a cow.] *n. an unmarried man* लग्न न झालेला मनुष्य *m*, अविवाहित मनुष्य *m*, ब्रह्मचारी *m*, अपत्नीक, निंबा, अवरठा, निस्संग (S). २ *one who has taken the first degree in a College or University and who is not yet a master of the Arts* विद्यांगपंडित *m* (See the word Arts), पाठशाळेंत अमुक एक विषयांत प्रावीण्य संपादन केल्याबद्दलची कनिष्ठ पदवी मिळविलेला मनुष्य *m*. ह्यालाच आजपर्यंतच्या कांहीं मराठी लेखकांनीं कलानिधि, कलासहचर हे शब्द योजिले आहेत; ह्या निरनिराळ्या कनिष्ठ पदव्यांची यादी B अक्षराखालीं दिली आहे. ३ *a knight* नवीन योद्धा *m*, बालयोद्धा *m*. Bach'elorhood, Bach'elorship, Bach'elorism *ns.* अविवाहितत्व *n*, अवरठेपणा *m*, अनूढत्व *n*, अविवाहितावस्था *f*, ब्रह्मचर्य *n*. Bachelor's Buttons *n.* भुतांव. कोंकणांत या झाडाला भुतांव असें ह्मणतात. Button शब्दाचा भुतांव हा गोव्यांकडील लोकांच्या भाषेंत झालेला अपभ्रंश आहे. ह्यालाच लॅटिन भाषेंत *Ranunculus acris*, हें नांव आहे. Bachelor's Button ह्याला कँडीसाहेब गुलटोप हें नांव देतात, परंतु गुलटोप हें नांव *Gomphrœna Globosa* ह्याला योजावें असें आमचें मत आहे.

*N. B.*—The Hindus used to regard celibacy or bachelorship as an absolute necessity in the case of students, saints and ascetics. In the case of others they consider married life (गृहस्थाश्रम) as a necessary form of discipline to train up the soul for life after death. A foreigner can form an idea of the Hindu view of rebuke regarding an unmarried man from the following words:—मसणखुंट, वणव्यांतला मसणखुंट, वणव्यांतला खुंट, खुंटारा, सोट, सडेसोट, सडशिंग, सोटशिंग, सडाफटिंग, सडेहुपट or सडेहुप्या, सडाधस, खुंटावरचा कावळा, थोंटापिंपळ, पारोसापिंपळ, वडपिंपळ, फटिंग or फटिंगभाई, बांडफरीद, उपडसुंभा, पिंपळावरचा मुंजा, जन्मसंन्यासी, जन्ममुंजा, जन्माचा मुंजा, जन्मबट्टू, एकटा टिकोजी, एकटाएकसुरा, फकीर, सोटभैरव, लोटाश्रम—Some other terms and phrases describing an unmarried man especially laying stress upon such features in his life as the following: homelessness, unsettledness, uncomfortableness, disconnectedness and disregardedness are, घरनादार आणि देवळीं बिऱ्हाड, त्याचें बिऱ्हाड बाजलें संगातीच आहे, त्याचा सोटा दुपट्टा बरोबरच आहे, नदीवर न्हाण गांवांत भीक आणि देवळीं निद्रा, आगेलंड पिच्छेगंड (*slang*).

Bacillus (ba-sil'us) [L. *bacillus*, a little rod.] *n. a short rod-shaped bacterium* (न्हस्व) यष्टिजंतु *m*, न्हस्व सूक्ष्मजंतु *m*, न्हस्व जंतु [ह्या शब्दाचा जास्त खुलासा पुढें Bacterium शब्दाखालीं दिला आहे. Bacillus हा Bacterium च्या चार पोटभेदांपैकीं एक पोटभेद आहे. सध्यां प्रचारांत Bacterium ला किंवा Bacillus ला रोगबीज किंवा रोगजंतु असा शब्द रूढ झाला आहे. परंतु शास्त्रीय दृष्ट्या ही चूक आहे. कांहीं सूक्ष्म जंतु (Bacteria) अरोगोत्पादक असतात हें विसरतां कामा नये.] *pl.* Bacilli. Bacil'lar, Bacil'lary *a.* यष्टिजंतुमय, यष्टिजंतूंचा *pop.* रोगजंतूंचा, &c., &c. २ लहान लहान किड्यांचा. Bacil'licide *n.* यष्टिजंतुनाशक (द्रव्य) *pop.* रोगजंतुनाशक (द्रव्य). Bacil'liform *a.* लहान लहान किड्यांसारखा. २ यष्टिजंतूच्या आकारासारखा.

Back (bak) [A. S. *bæc*, again or back.] *n.* (मनुष्याची &c.) पाठ *f*, (झाडाच्या खोडाचा-&c.) पृष्ठभाग *m*, पृष्ठ *n*. [-IN CONTEMPT, पाठाड(ण), पाठण *n*, पाठार *f*. BEHIND ONE'S B. पाठीं, पाठीमागें, असमक्ष, अप्रत्यक्ष, पश्चात्, परोक्ष, वेइजूर, पृष्ठतः. HAVING THE B. TOWARDS (च्या) पाठमोरा OR मोहरा, मागमोरा OR मोहरा, (पासून) पराङ्मुख. ON OR UPON THE BACK (OF) पाठकुळी (स) OR पाठगुळीस, पाठुंगळीस. TO BE ON ONE'S B. जमिनीस OR भुईस पाठ लागणें OR असणें, जमीन धरून असणें, *fig.* आजारी असणें, पडून असणें (*idio.*), निजणें (*idio.*), निजून असणें (*idio.*), उताणा असणें OR पडणें, दांत वासून पडणें (*idio.*). TO BOW THE B. जुलूम सहन करणें, पाठ वांकविणें. TO BREAK THE B. (OF) अतिशय ओझ्यानें लादणें. २ एखाद्या कामाचा अति कठीण भाग संपविणें. TO HAVE ONE'S B. AT THE WALL कचाट्यांत सांपडणें. २ पुष्कळ लोकांशीं सामना देणें. TO CAST BEHIND THE B. विसरून जाणें, क्षमा करणें. २ बेपरवाईनें वागणें, दरकार न ठेवणें. TO MAKE A B. (FOR) पुट्ठा लावणें. TO PLOUGH ON THE B. जुलूम-छळ करणें. TO PUT OR set UP THE BACK निकरानें प्रतिकाराचा आव घालणें, (दुसऱ्यास) चिथावणें, चिथणें, उद्युक्त करणें. TO SEE ONE'S B. एखाद्याला टाळणें-चुकवून जाणें. TO THE B. पूर्णपणें, सर्वभर. TO THROW ONE ON THE B. एखाद्याला चारी मुंडी चीत करणें, पाठीवर पाडणें. TO TURN THE B. ON (ONE) त्याग करणें, ऐन वेळीं सोडणें, (पासून) पाठमोरा होणें, त्याग करून निघून जाणें. TO TURN THE B. TO (ONE) श्रेष्ठता कबूल करणें.] 2 *hinder part*–gener. (of a house or an army) पाठ *f*, पिच्छाडा *m*, पिच्छाडी *f*, पिच्छोडा *m*, पाठोसा *m*, पृष्ठ *m*, पृष्ठभाग *m*, पृष्ठदेश *m*, दुमाला (?) *m*. [AT THE B. OF *fig.* पाठीवर, पाठीमागें, पाठीं, मागें, पश्चाद्भागीं, पृष्ठतः. BLANK OR UNWRITTEN ON THE B. पाठकोरा. FROM THE B. (OF) पाठीमागून, मागून, पाठून, पिच्छवाड्याकडून. TO APPEND OR ADD TO THE B. (OF) दुमाल्यावर लावणें. TO BE AT THE B. (OF) पाठीवर-दुमाल्यावर-पछाड्यावर &c. असणें *g. of o.*] ३ मागील-लांबचा भाग *m*. ४ अदृश्य-भाग *m*; as, The B. of a mountain; दृष्टीसमोर न येणारा भाग *m*, मागील भाग *m*. ५ (चाकू वगैरे हत्यारांची) पाठ *f*; as, the B. of the hand–the knife–the saw, &c. ६ (पाठीमागें) राखलेला भाग *m*, सांठा *m*. ७ *defence or protection* (*fig.*) आयत्या वेळचा आधार *m*. ८ खुर्चीची पाठ *f*. ९ कपड्याची मागील बाजू *f*. १० *foot-ball* या खेळांतील अगदीं पाठीमागचा खेळगडी *m*; as, The duty of the *back* is to defend the goal. [Full back, half

back and quarter back चरणकंदुकक्रीडेंत अगदीं पाठीमागचा-मधोमधचा आणि चतुर्थांश हिश्शावरचा भिडू *m*.]. ११ *pl.* उत्तम रीतीनें कमावलेलीं अतिशय जाड कातडीं. १२ (cf. *bosom*) नदीच्या लाटांचा पृष्ठभाग *m*. Back-band *n*. बैलाला किंवा घोड्याला गाडीला जोडण्याचा पट्टा *m*, पाठबंद *m*. [ For analogy *vide* पायबंध (द) (घोड्याचा)]. Back-bite *v. t. bite one on or behind one's back* पाठीमागें चहाडी *f*-चुगली करणें-खाणें, सांगणें *g. of o.*, परोक्षनिंदा *f*-परोक्षापवाद *m.* करणें *g. of o.*; कूट *f.* खाणें *g. of o.*, कूट कुटणें. Back-bite *v. i.* (पाठीमागें) चहाडी करणें; as, They will B. Back'biter *n.* (v. V.) (पाठीमागें) चहाडी सांगणारा, चहाड, चहाडचुचका, चहाडखोर, चहाडलुतरा, चुगल्या, चुगलखोर-अपरोक्ष निंदा करणारा. Back-biting *n.* (v. V.)-*act.* चहाडी सांगणें *n*, चहाडी *f*, चुगली *f*, कूट *f*, परोक्षनिंदा (?) *f*, परोक्षापवाद (?) *m*, परोक्षपैशून्य *n*, चर्चा *f.* (in the sense of निंदा). Back-bitingly *adv.* Back-bone *n.* कणा *m*, कांटा *m*, दांडा *m*, दांडारा *m*, वांसा *m*, पृष्ठवंश *m*, पृष्ठास्थि *n*. [Fore-end of the B. of beasts मोन्हांटा *m*.] २ आधारस्तंभ *m*, मुख्य भाग *m*, महत्वाचा भाग *m*. ३ मुख्य-मगजाचा भाग *m*, मुख्य मजबुतीचा भाग *m*. ४ *fig.* बाणा *m*, धैर्य *n*, निश्चय *m*, स्वभावाचा करारीपणा *m*-निश्चयीपणा *m*-स्थिरपणा *m*. ५ *the water-shed of a district* भांगणी *f.* To the B.-bone पूर्णपणें, हाडामासीं. Back-boned *a.* पाठीला मणके असलेला, पृष्ठवंशास्थि असलेला. Back-door *n.* मागीलदार *n*, मागलें दार *n*, चोरदार (?) *n*, परसूं (?) *n*. B. *a.* आडून, नजरेआडचा, राजरोस नव्हे असा; as, Back-door intrigues. Backed *a.* पाठ असलेला, पाठीमागें आधार असलेला. Back-end *n.* ऋतूचा शेवटचा भाग *m*, मोसमाचा शेवट *m*. Back-fall *n.* पाठीवर पडणें. Back-friend *n.* पाठराखा स्नेही. Back-hair *n.* (बायकांचे डोक्याचे) पाठीमागचे लांब केंस *m*. Back-hand *n.* (अक्षराचें) डाव्या बाजूचें वळण *n*. Back-hand', Back-hand'ed *a. with the back of the hand* हाताच्या पाठीनें दिलेला (ठोंसा); as, A back-handed blow or a back-handed slap. २ *directed backwards or with the hand or arm crossing the body* (*i. e.* for a right-handed man from left to right) डावीकडून उजवीकडचा; as, A B. sword-cut मागें वळलेला, मागें परतलेला. ३ *indirect, insincere* कपटाचा, वरकरणी; as, back-handed compliments. ४ *sloping backwards* तिरकस, तिरपा; as, Back-handed writing. Back'-hand'edness *n.* Back'-hander *n.* हात मागें करून दिलेला ठोंसा *m*. २ पाळी झाली असली तरी मध्येंच आणखी दिलेला दारूचा पेला *m*. Back'ing out प्रतिगति *f*, माघार घेणें *n*. Back'ness *n.* माघार *m*, नाखुषी *f.* Back'ing down *n.* माघार घेणें. Back-log *n.* (विस्तव सदोदित रहावा म्हणून) पाठीमागें लावून ठेवलेला लांकडाचा ओंडा (ढा) *m*. Back'-most *a.* (the opposite of foremost) फार मागचा. Back-pay *n.* पाठीमागचा पगार *m*. Back'-piece *n.* पाठीचें चिलखत *n*. Back-plate *n.* पाठीवरचें चिलखत *n*. २ एखाद्या वस्तूच्या पाठीवर ठेवलेली तबकडी *f*, पाठीवरचें झांकण *n*. Back-room *n.* मागल्या आंगाची खोली *f*—कोठडी *f.* Back-saw *n.* ज्या करवतीच्या पात्याला तें वांकूं नये म्हणून धातुमय पाठ दिलेली असते अशी करवत *f*, न वांकत्या पाठीची करवत *f.* Back-set *n.* नैसर्गिक प्रवाहाच्या विरुद्ध गति *f*, उलट प्रवाह *m*, परत प्रवाह *m*. २ विघात *m*, अडथळा *m*, हरकत *f.* ३ उलट पाठीमागें जाणें. B. *v. t.* त्याच सालांतील दुसऱ्या पिकाकरितां पुन्हां नांगरणें. Back'-settlement *n.* मागून लागवडीस आणलेली जमीन *f.* Back'-settler *n.* पडित जमिनीची लागवड करून वसाहत करणारा. Back'-side' *n.* मागील बाजू *f*, मागलें आंग *n*, परसूं *n*, पृष्ठभाग *m*, पिच्छाडी *f.* २ *the posteriors* गांड *f*, गुद *n*, बृहती *f.* Back'sight' *n. surveying* पाठीमागच्या वस्तूचें घेतलेलें माप. Back'-slide' *v. i. fall off from* चांगल्या मार्गापासून पाठीमागें निसटून जाणें, धर्म-नीति-पराङ्मुख होणें, पतित-भ्रष्ट होणें, सन्मार्ग *m*- सार्ग *m*. सोडणें, च्यवणें, च्युत होणें, सदाचाराचा मार्ग सोडणें, स्वधर्मत्याग करणें. Backslid'er *n.* (v. V.) धर्मभ्रष्ट, पतित, सन्मार्गत्यागी, भ्रष्ट. Back-slid'ing *n.* धर्मभ्रष्टता *f*, नीतिपराङ्मुखता *f.* B. *a.* धर्मभ्रष्टतेचा, चालते क्रमापासून निसटून जाणारा. Back-slid'ingness *n.* Backslid, Back-slidden *pa. p.* Back'-stair, Back-'stairs *n.* मागला जिना *m*, चोरजिना (?) *m*. आडजिना (?) *m*. २ *fig.* राजरोस नव्हे असें व खाजगी साधन, आडमार्गाचें साधन *n*. B. *a.* पाठीमागच्या जिन्याचा-संबंधीं, छपूनचा. २ अयोग्य, आडमार्गाचा. Backstair-rs influence आडवशीला *m*, खाजगी वशीला, आडमार्गाचा वशीला. Back'-sword *n.* (एकधारी) तरवार *f.* २ (अ) दांडपट्ट्याची रुंद मुठीची काठी *f.* (ब) दांडपट्टा खेळणें *m*. Back'-wash *n.* मागें येणारा प्रवाह *m*. B. *v. t.* लोंकर विंचरल्यानंतर तिचा तेलाचा अंश काढून टाकून ती स्वच्छ करणें. Back'-water *n.* धरून किंवा कोंडून ठेवलेलें पाणी *n*, धरणाचें पाणी *n*, खाडीचें पाणी *n*. २ उलट जलप्रवाह *m*. ३ (आगबोटीच्या पंख्यानें) मागें कांपत जाणारें पाणी *n*. Back'-yard *n.* मागलें आंगण *n*, परूस *n*, परसूं *n*, परडें *n*, मागलें पटांगण *n*.

*N. B.* चहाडी, चुगली and निंदा require to be carefully distinguished. In चहाडी there is an idea of communication of a *fact* to a *superior*. And this communication is made with a view to an injury. In निंदा there is no idea of an evil intention. The निंदा may or may not result in an injury. It is very difficult to trace the shade of distinction between चहाडी and चुगली.

चोरदार means always a hidden door and never a back-door, so also परसूं means always a back-yard.

Back (bak) *adv. in return* (of place) माघारां(रीं-रें), परत, परतून, फिरून, मागें, उलट. २ *behind, in the hinder place* मागें, पाठीमागें, पाठलेकडे, पाठेशीं, पाठ-

वशास, पाठसरीं, पिच्छाडीस, पृष्ठतः, पृष्ठभागीं, पृष्ठदेशीं. ३ *again, in return* परत, पुनः (*pop.*) पुन्हां, उलट, उलटा, फेर (esp. in comp.; as, उलटजाब, फेरचिठ्ठी, &c.), प्रति (in comp.; as, प्रतिदान, प्रतिध्वनि). ४ *with the B. forward* पाठमोरा, पाठसामोरा. To keep B. मागें ठेवणें-राहणें. (v. Keep.) To look B. सिंहावलोकन करणें, मागील काळाकडे-गोष्टीकडे लक्ष्य देणें. To give B. परत देणें. To go B. or draw B. मागें फिरणें-जाणें, माघार घेणें. B. and edge (The reference is to a wedge driven home to split wood) संपूर्ण रीत्या, साग्र, अथपासून इतिपर्यंत. B. and forth पुढें मागें.

Back (bak) *a.* मागचा, पाठीमागचा. २ *being in arrear* आंगावर चढलेला. ३ फिरून-उलटून-चालणारा, उलट. B. charges हिशोब केल्यानंतर पुढील खात्यावर ओढलेली बाकी. To take the B. track मागें फिरणें.

Back (bak) *v.t. mount on the B. of* पाठीवर चढणें, पाठीवर बसणें, सवार होणें. २ (with *up*) *aid, support* पाठ *f.* देणें (?), पाठ राखणें *g. of o.;* पाठीवर असणें *g. of o.;* पाठिंबा असणें, पाठबळ *n.* देणें-करणें, बाहीदारी *f* करणें. *g. of o.*, मदत करणें, उपराळयास (?) येणें, उपराळा (?) *m.* करणें. ३ *put backward, cause to recede* मागें घेणें-सारणें-करणें-काढणें, मागल्या पायीं घेणें-सारणें, हटविणें. ४ (in wrestling) *throw on the B.* (?) चीत-जमीनदोस्त-उलथा-&c. करणें, उताणा पाडणें-घालणें. (?) ५ (to B. the oars) वल्हें फांट *m.* धरणें or करणें. ६ आधार देणें. ७ *to support one's opinion by a bet* (साठीं) (पैजेनें) आपलें मत देणें; as, To B. a horse घोडा शर्यत जिंकील असें पैजेनें सांगणें. ८ पाठीमागें ठेवणें, पाठीमागें परतवणें. ९ *com.* हुंडी स्वीकारणें, पाठीवर लिहिणें; as, To B. a bill. १० (पुस्तकाला) पाठ घालणें. To B. astern उलट दिशेनें वल्हविणें. To B. out of मन फिरविणें, एक पक्ष सोडणें, संकट टाळण्याकरितां माघार घेणें. To B. out कबुलायतीपासून किंवा ठरावापासून परतणें. To B. down *fig.* निश्चयापासून ढळणें, मागें फिरणें. To B. the field शर्यतींत असुक घोडा प्रथम येईल अशी पैज लावणें. To B. the oars or to B. water उलट दिशेनें वल्हविणें. To B. the sails जहाजें चालूं नयेत अशा रीतीनें शिडें उभारणें. To B. up सहाय-मदत करणें, धीर-उत्तेजन देणें. Back *v. i. go backwards* मागें or पाठीमागें हटणें-सरणें-होणें, पाठमोरा चालणें. २ माघार *f.* घेणें, काढतें *n*-निघतें घेणें, माघारा होणें; as, The horse refuses to B. The intransitive verb to Back is generally followed by some one of the prepositions *out of, from.* Back'er *n.* (v. V. T. २.) पाठ देणारा (?), पाठ राखणारा, पाठराख्या, पाठराखणा, पठंगा or (पठिंगा or पठिंबा) पाठिंगा or पाठिंबा, मेढा *m*, बाजू *f*, बाहीदार, कौंशा (*obs.*) २ सहाय-मदत करणारा. ३ टेंका देणारा. Back'ing *n.* (v. V. T. २.)-*act.* पाठ देणें (?) *n*, पाठ राखणें *n*, पाठपुरावा *m*, पाठ *f*, पुस्तपना or पन्हा *m*, पुस्ती *f*, पुस्तगारी *f*, पुस्तवानी(णी) *f*, गुडघा *m*, दुमाला *m*, उपराळा *m.* (v. V. I. 1.)-*act.* मागें हटणें *n*, मागें सरणें *n.* २ माघार घेणें *n*, काढतें घेणें *n*, &c.

*N. B.*—पाठ देणें in the sense of पाठ राखणें (to back up or to support) is not an idiom of the Marathi language. हात देणें and पाठ राखणें are the correct idiomatic uses.

उपराळा now at least means an excess or a surplus. वर दिलेल्या Back सकर्मक क्रियापदाचा चौथा अर्थ (चीत-जमीनदोस्त करणें) फक्त कँडी साहेबांच्याच कोशांत सांपडतो. परंतु तो अर्थ वेब्स्टर, मरे ह्यांच्या जगन्मान्य कोशांत सांपडत नाहीं.

Backgammon (bak-gam'un) [Back and M. E. *gamen*, a play. This name of the play is due to the fact that the pieces are sometimes taken up and obliged to go *back*—that is—re-enter at the table. Always called *Tables* till the 17th century.] *n.* खडे आणि फांसे यांनीं दोघांत खेळण्याचा एक प्रकारचा खेळ *m.*

Background (bak'grownd) *n.* मागील जागा *f.* २ गुप्त स्थल *n*, गुप्तता *f* (स्थितीची). ३ (चित्र खुलण्याकरितां केलेली) पृष्ठभूमिका *f*, परभाग *m.* ४ *fig. state of neglect or loss of notice* मागलट *f*, मागसणी *f.* To keep a fact in the B. लपविणें, सहज न दिसेसें करणें. To throw into the B. मागलटीस-मागसणीस टाकणें. २ फिक्का पाडणें.

Backsheesh, Backshish (bak'shēsh) [Pers. *bakhshish*, to give.] *n. a gift or present of money in the East, a gratuity or tip* बक्षीस *n*, इनाम *n.*

Backward, Backwards (bak'ward) [Back, and affix *ward, wards*, in the direction of.] *adv. towards the back* पाठीमागें, मागें, पृष्ठभागाकडे. २ *with the back forward* पाठमोरा, पाठसामोरा, पाठीनें सरकत, पाठीनें, मागल्या पायीं, मागल्या पावलीं, मागच्या पायांनीं. ३ *from the wrong end* उलट, उलटा, उलट्यानें, व्युत्क्रमानें [R], उरफाटा, उफराटा, उफराट्यानें, उरफाट्यानें, विलोम [R]. ४ मागल्या काळीं, मागील काळाकडे, गतकालीं. ५ चांगल्या स्थितीपासून वाईट स्थितीकडे. [B. and forward *to and fro* उलटासुलटा (?), उलटा पालटा (?), उफराट सुफराट (?), उफराटा सुफराटा (?), अनुलोम विलोम (?), पुढेंमागें. २ *fig.* धरसोडपणाचा. To ring bells backward (आश्चर्याची बातमी कळविण्याकरितां) घंटा लहान सुरांतून मोठ्या सुरांत वाजविणें. B. *a. unwilling* माघार घेणाऱ्या मनाचा, विमुख, विमनस्क. ३ *not proficient* मागसलेला, मागसावलेला, मागें पडलेला, मागस. ४ *late in season, not early* मागस, मागाहून पिकणारें; as, A B.crop. B. *n. the past portion of time* गतकाळ *m.* Back'wardation *n.* *Stock-Exchange*, a percentage paid by a speculative seller of stock for the privilege of keeping back or delaying its delivery till the following account-day or to any other future day agreed upon जास्त मुदत मागून घेण्याकरितां स्टॉक विकत

घेणाऱ्याला दिलेले टक्के-वटाव. (See the word Contango). Back'wardly *adv.* मागच्या बाजूकडे. २ नाखुषीनें. Back'wardness *n.* (v. A.) विमुखता *f.* २ माघार घेणें *n*, माघार *f* (माघारपणा *m.*), सुस्ती *f.*

Bacon (bā'kn) [O. Fr. *bacon.*] *n.* सुकविलेलें व खारें डुकराचें मांस *n.* [पूर्वी ताज्या मांसालाही हाच शब्द लावीत असत; परंतु सध्यां त्याला PORK हा शब्द वापरतात.] To save one's bacon जीव संभाळणें-बचावणें, आपल्या देहाला इजा होऊं न देणें, आंगसुटका करून घेणें, पागोटें संभाळणें, बचावणें. To sell one's bacon आपला देह विकणें.

Baconian (bak-ōn'i-an) *a.* इंग्लंडांतील बेकन नांवाच्या तत्ववेत्त्यासंबंधीं, बेकनाचा, बेकनासंबंधीं. २ बेकनाच्या तत्वशोधनपद्धतीचा-संबंधीं, सूक्ष्म अनुमानाची, निगमनात्मक (Inductive). B. *n.* बेकनाच्या तत्वशोधनपद्धतीचा अनुयायी, बेकनमतानुयायी, बेकनी मताचा. B. system of philosophy बेकनी शोधपद्धति, बेकनाची सूक्ष्म अनुमानपूर्वक तत्वशोधनपद्धति, विस्तृतानुभवजन्यतत्वसंशोधन, बेकनाचें निगमनमत. [लाखों उदाहरणें तपासून व विरुद्ध उदाहरणें येत नाहींत असें पाहून एक सार्वत्रिक सिद्धांत ठरवावा असें बेकनचें मत होतें.] Baconian method, *Inductive method* बेकनचें निगमनमत, बेकनी निगमन *n.*

Bacterium (bak-tē'ri-um) [Gr. *bakterion*, a stick, a staff.] *n. pl.* Bakteria सूक्ष्मजंतु *m. pl.* हे एकपेशीमय असतात, व फार जलद वितात. ह्यांचे चार पोटभेद आहेतः—१ वाटोळे-गोल सूक्ष्मजंतु (Coccaceæ). २ ऱ्हस्व सूक्ष्म जंतु, ऱ्हस्व जंतु, ऱ्हस्व यष्टिजंतु (Bacteriaceæ). ३ सुतासारखे सूक्ष्म जंतु, सूत्रसूक्ष्मजंतु (Leptotricheæ). ४ सर्पाकृति-सर्पिल सूक्ष्मजंतु (Cladothricheæ). ह्या चार पोटभेदांपैकीं प्रत्येकाचे रोगोत्पादक व अरोगोत्पादक असे आणखी दोन पोटभेद आहेत. प्लेग वगैरे रोग रोगोत्पादक जंतूंपासून होतात. अरोगोत्पादक जंतु बहुतकरून आंबलेल्या किंवा कुजणाऱ्या पदार्थांत सांपडतात. Bacteriol'ogy *n.* सूक्ष्मजंतुशास्त्र *n*, जंतुशास्त्र *n.* Bacteriol'ogical *a.* Bacteriol'ogist *n.* जंतुशास्त्रवेत्ता.

N. B.— Bacteria

| Spherical forms | Short rod-forms | Long rod-forms | Spiral forms |
|---|---|---|---|
| गोलजंतू | यष्टिजंतू | सूत्रजंतू | सर्पिलजंतू |

Each of these four groups is sub-divided into pathogenic (disease-producing) and non-pathogenic (not disease-producing). The patho-genic Bacteria are the causes of such diseases as plague, different sorts of fever, &c. &c. The non-pathogenic Bacteria are seen in fermenting, putrifying substances. Bacillus is a form of rod-shaped Bacteria. In Bacillus (straight rods) Endospore formation occurs; and in Bacterium (straight rods) Endospore formation does not occur. The Marathi equivalent for Endospore is given under the letter E.

Baculine (bak'ū-līn) [L. *baculus*, a rod.] *a.* काठीसंबंधीं. २ काठीच्या शिक्षेसंबंधीं.

Bad (bad) [A. S. *bædling*, an effeminate fellow.] comp. *worse*, superl. *worst a.* वाईट, खराब, ओंगळ, नाकारा, नठारा [R], कुत्सित, खटनट, खकान (*vulg.*)-freely or compreh. घाणेरडा, वाईटसाईट, वाईटवांकडा, खटनट, खोटानाटा, नासकाकुजका, ओंगळसोंगळ. [To MAKE B. WORSE कांद्याचा नायटा करणें, हालवून खुंटा बळकट करणें, जास्त घोंटाळा *m.* करणें.] २ *vicious* दुष्ट, पापी, पापिष्ट, दुश्शील, कुशील, असत्, दुर् (in comp.; as, दुराचारी, दुर्जन &c.), कु (in comp.; as, कुजन, कुपुत्र). ३ बाधक, वावडा, अहितकारक, जाचक, दुष्ट; as, B. air, B. climate, B. food. ४ उणा, कमी; as, B. work, B. crop. ५ बेकायदेशीर,गैर; as, The claim is B.६असुखी, दुःखकर; as, B. result; दुःखपरिणामी, दुःखपर्यवसायी; as, B. marriage. ७ अडाणी, अकुशल; as, B. workman. ८ सदोष; as, B. health. ९ आजारी; as, I am B. to day. B. *n.* [R.] वाईट गोष्ट *f.*-स्थिति *f.*-गुण *m.* as, He is gone to the B. तो बुडाला आहे, तो भिकेस लागला आहे, त्याचा सर्वस्वी नाश झाला आहे. २ त्यानें वाईट लोकांची संगत धरिली आहे,त्याचें वर्तन वाईट झालें आहे. B. blood *fig.* अदावत,वैमनस्य. B. chance फार कमी संभव. B. coin खोटें नाणें. B. conductor मंदवाहक. B. debts बुडीत कर्ज. B. faith कपट, लबाडी, अप्रामाणिकपणा, अविश्वासूपणा. B. habit दुष्ट संवय-खोड. B. hand. अडाणी कामगार. B.-hearted *a.* दुष्ट हृदयाचा, दुष्टांतःकरणाचा. B. joke अक्षम्य-ग्राम्य-थट्टा. Bad'ly *adv.* वाईट रीतीनें, नापसंत अशा रीतीनें. २ अडाणीपणानें. Bad'ness *n.* (v. A. 1.) वाईटपणा *m*, खराबपणा *m*, नाकारेपणा *m.* &c., कौत्सित्य *n.* २ दुष्टपणा *m*, दौष्ट्य *n*, पापिष्ठता *f.* ३ दुष्टाई *f*, वावडेपणा *m*, बाधकता *f.* B. repute दुष्कीर्ति, अपकीर्ति. B. smell दुर्गंधी, दुर्गंध. B. spirits खिन्न-उदास मनोवृत्ति. B. shot चुकीचा तर्क. B. taste दुरभिरुचि, अहृदयता. B. turn उलटा फेरा, उलटणें, उलट खाणें, वाईट परिणाम, वाईट स्वरूप. B. woman नीतिभ्रष्ट स्त्री. On B. terms वितुष्टभावानें, वैरभावानें, बेबनावाच्या संबंधानें. To be in a B. humour तब्यत-दील न लागणें, खुशींत नसणें, रंगांत नसणें. To be in a B. temper रागावलेला असणें. To fall into B. company or ways वाईट संगतीला अथवा नादाला लागणें. To go B. नाश पावणें, कुजणें, बिघडणें, वाईट स्थितीस जाणें. To have a B. time of it कठीण दिवस असणें-येणें, वाईट दिवस असणें, दिवस फिरणें, नशीब फिरणें, दुर्दैव ओढवणें. To put a B. construction upon भलताच संबंध लावणें, भलताच अर्थ घेणें-करणें, विपरीतार्थ करणें-घेणें. To view in a B. light दोषदृष्टीनें पाहणें, अर्थाचा अनर्थ करणें.

*N. B.*—Bad, evil, wicked आणि naughty हे चार इंग्रजीत

समानार्थी शब्द आहेत. ह्यांचा इंग्रजींतील भेदभाव लक्ष्यांत आणून त्यांना खालील प्रतिशब्द योजिले आहेत. Bad, वाईट; evil, अनर्थकारक; wicked, दुष्ट; naughty, द्वाड, दुर्वृत्त.

We are on bad terms with each other, त्याचें व आमचें वैमनस्य आहे, त्याचा व आमचा बेबनाव आहे.

इंग्रजी Bad taste ह्या शब्दांत "खुबी, मजा, मर्म अगर लोकरूढि न समजणें" असा अर्थ आहे.

Bad, Bade (bad) Bid धातूचा भूतकाल. हुकूम केला. *Vide* Bid.

Badge (baj) [L. L. *bagia*, sign, *bagea*, connected by Skeat with L.L. *baga*, a ring.] *n.* बिल्ला *m*, खूण *f*, चिन्ह *n*, निशाणी *f*, लक्षण *n*, विरीद or विरुद *n* (of a man), कंकण (*) *n*, चंग (*) *m*. B. *v. t.* खूण करणें. Badgeman निशाणी बाळगणारा. २ अन्नछत्रांत रहाणारा, भिक्षेवर रहाणारा.

*N. B.*—Badge—व्यक्तीची खूण, व्यक्तिसंज्ञान, व्यक्तिकेतन. Cognisance—कुळाची खूण, कुलसंज्ञान, कुलकेतन. कंकण is the badge of fresh marriage among the Hindus.

एखादें काम करण्यापूर्वी किंवा तें काम करीत असतांना कंकण हातांत बांधतात. एखादें काम करण्याकरितां त्यानें पायांत चंग बांधिला आहे ह्मणजे तें काम करण्याकरितां त्यानें विडा उचलला आहे, तसेंच निशाणी हा शब्द दुसऱ्या वस्तूबद्दलची खूण ह्या अर्थी वापरतात; जसें, सही करतां येत नसली ह्मणजे तिच्याबद्दल त्या मनुष्याला कांहीं तरी निशाणी करावयास सांगतात. बिल्ला हाच Badge शब्दाला योग्य प्रतिशब्द आहे.

Badger (baj'ėr) [Fr. *bladier*, a corn-dealer in allusion to some of the habits of the animal, called Badger.] *n.* एके ठिकाणीं धान्य घेऊन दुसरे ठिकाणीं विकणारा.

Badger (baj'ėr) [अनिश्चित व्युत्पत्ति. According to Dr. Murray from *badge* and *ard*, on account of the white mark on its forehead.] *v.t.* *to pester* हाल हाल करणें, छळणें, त्रास देणें, जाच करणें, जीव खाणें *idio.*, पाठीस लागणें, जाचणूक करणें *g. of o.*, पाठलाग करणें, तोंडातोंड करणें *g. of o.* 2 *to banter over a bargain, to beat down in price* स्वस्त करणें, किंमत कमी करणें. B. *n.* जमिनींत बीळ करून राहाणारें कोल्ह्याएवढें एक चतुष्पाद जनावर *n.* २(बॅजर जनावराच्या केंसाचा) कुंचला *m*, लहान बरास *m*. (ह्याचा कारागिरींत उपयोग होतो). Badg'er-baiting *n.* बॅजर नांवाच्या चतुष्पादाला त्याच्या बिळांतून हुसकावण्याकरितां कुत्रे सोडण्याचा खेळ *m*. Badg'er-dog *n.* लहान पायाचा व मोठ्या शरिराचा शिकारी कुत्रा *m*. हा फक्त बॅजर जनावराच्याच शिकारींत उपयोगाचा असतो. Badger-drawing *n.* शिकारी कुत्र्यांकडून बॅजर जनावराला आपल्या बिळांतून बाहेर हुसकावून लावणें. Badg'er-legged *a.* उंच सखल पायांचा. Badg'erer *n.* हल्ला करणारा. २ जाचणारा. Badg'ering *n.* Badg'erly *adv.* To overdraw one's badger (in humourous reference to badger-drawing) पेढीवरून आपल्या जमेपेक्षां जास्त रकम उचलणें.

Badinage (bad'in-äzh) [Fr. *badin*, facetious.] *n.* *light, trifling raillery or humourous banter* विनोदाचें-मस्करीचें-छिचोरपणाचें भाषण *n*, नर्मभाषण *n*. B. *v.t.* गमतीखातर-हौसेनें थट्टामस्करी करणें. To B. away. *to get rid of by badinage* पुष्कळ थट्टा करून (नांवा) निराळा होणें, थट्टेवर नेणें; as, To B. away reforms.

Badminton (bad'min-ton) [From *badminton* in Gloucester, a seat of the Duke of Beaufort.] *n.* पिच्छकंदुक खेळ *m*. इंग्रज लोकांत हा खेळ बहुतकरून बायका खेळतात. लॉनटेनिस्‌सारखाच; परंतु ह्या खेळांत चेंडू फार हलका असतो व त्यास पिसें लावलेलीं असतात, जाळें सहा फूट उंच काठीला टांगलेलें असतें, खेळण्याचें पटांगण लहान असतें व चेंडू हवेंतच खेळता ठेवावा लागतो, बॅड्‌मिन्टन्, पिसांच्या चेंडूचा खेळ. २ साखर, सोडावाटर आणि क्लारेट दारूचें शीत पेय *n*.

Baff (bäf) *v.t.* *golf* फटका मारून चेंडू हवेंत उडविणें. B. *n.* फटका *m*.

Baffle (baf'fl) [ह्या शब्दाची व्युत्पत्ति निश्चयानें ठरलेली नाहीं. Norm. Fr. *befller*, to deceive or mock.] *v.t.* *disgrace (obs.)*, अपमान करणें. २ *to cheat* [*R*] फसविणें, चकविणें. ३ व्यर्थ करणें, निष्फळ करणें. ४ लटपटविणें. ५ मोडणें, चालेनासा करणें. ६ मोड करणें, जेरीस आणणें, पराभव करणें, घोंटाळवणें. B. *v.i.* व्यर्थ धडपड करणें; as, "The ill-fated ship was seen baffling with a gale." (M). Baf'fler *n.* निष्फळ करणारा, चालेनासें करणारा, घोंटाळवणारा, &c. Baffling *a.* Bafflingly *adv.* निष्फळ करून, घोंटाळवून. Bafflingness *n.* Baffle'-ment *n.* निष्फळता *f*, मोडती *f*, निराशा *f*.

Baft (baft) *adv.* & *prep.* नाळीच्या बाजूस, गलबताच्या मागच्या बाजूस. (now more used as Abaft.)

Baft (baft) [Pers. *baft*, woven.] *n.* एक प्रकारचें कापसाचें जाडें भरडें कापड. हें सध्या आफ्रिकेंत पाठविण्याकरितां ग्रेटब्रिटनमध्यें तयार होतें.

Bag (bag) [Gaelic. *balg*, a leather bag.] *n.* थैला *m* (*dim.* थैली *f.*), ठेला (R) *m*, (dim. ठेली *f.*) (R), पोतें. २ पिशवी *f*, कसा *m*, हमिणी *f*, हमीचा *m*. ३ *fig.* खलिता *m*. B. to hold paper and traps गवाळें, जुगदान(*) *n*, जुजदान *n*. B. with pockets or divisions चंची *f*, बटवा *m* (*dim.* बटवी *f.*), वाटवा *m*, पुरवटा *m*. Bag and Baggage (now used depreciatively) बाडबिछात or बिशात *f*, बाडबिछाना, पालपडदल *n*, चंबुगवाळें *n*, गवाळेंचंबाळें (*obs.*), गबाळगुबाळ (*obs.*), असेल नसेल तें. Four-mouthed B. चारतोंडी झोळणा *m*, झोळी *f*. Green bag or Blue bag बारिस्टरची खटल्यांची पिशवी. Two-mouthed B. धोंगटी *f*, (?) हडपी (?) *f*, पडशी *f*. Money-bag of shroffs and goldsmiths कटुळतें *n*, वाटवा *m*, पोतडी *f*. [R], पोतडें *n*, बोरी *f* (*obs.*). ४ *a sac or cyst in the body of animals* कोश or ष *m.*; as, अन्नकोष, वायुकोष. ५ मापाचा थैला; as, "A bag of almonds is about three hundred-weight" (M). ६ शिकारीची पिशवी *f*. (ह्या पिशवींत शिकार ठेवितात).

७ (जनावरांची) ऑंटी *f*, कांस *f*. ८ *fig. The clothes that hang loosely about the wearer* फारच पोकळ कपडा, *vulgarly pl.* पोकळ तुमान. Bag *v. t.* पिशवींत घालणें, पोत्यांत टाकणें. २ राशी-पुंजीस घालणें-आणणें. ३ ताणणें, फुगविणें. ४ बंदुकीनें किंवा दुसरे उपायानें मारून शिकार पिशवींत भरणें. B. *v. i.* झोलणें, झोलका येणें, झोल-फुगारा येणें. २ (clothes) घळघळणें, लोंबत असणें. Bag'ging *n.* बारदान *n.* २ कोथळ्यांत घालणें *n.* ३ ताणणें *n*, फुगणें *n*. ४ पिशव्यांचें कापड *n*. Bag'gy *a.* (पिशवीसारखा) ढिला, *fig.* पोकळ. Bag'man *n.* (somewhat depreciatory) लमाणा लोक, (लमाणासारखा) फिरता व्यापारी. Bag of bones कृश मनुष्य *n*, हाडांचा सांपळा. In the bottom of the bag शेवटचा उपाय ह्मणून शिलकेंतला. To let the cat out of the B. भ्रमाचा भोंपळा फुटणें. The whole bag of tricks सर्व डावपेंच, सर्व शकला. To empty the bag इत्थंभूत हकीगत सांगणें. Get away from here bag and baggage आपलें चंबुगवाळें आटपा, असेल नसेल तें घेऊन निघून जा. To give one the bag नाउमेद करणें. To give one the bag to hold एखाद्याचें मन दुसरीकडे लावून आपण निसटून जाणें.

*N. B.*—Knap-sack पडशी. Satchel जुजदान. To be out of the bag विंग बाहेर पडणें, बेंड फुटणें.

Bagasse (ba-gas') [Fr.] *n.* उंसाचीं चिपाडें *n. pl.*, सोव्या *f. pl.*, चोयट्या *f. pl.*

Bagatelle (bag-a-tel') [Fr.] *n.* क्षुल्लक गोष्ट *f.* २ बॅगाटेल *m*, एक प्रकारचा बिलियर्डसारखा खेळ *m*. या खेळाचीं उपकरणें, सात फूट लांब आणि एकवीस इंच रुंद असें मेज, नऊ गोळ्या आणि एक निमुळती काठी हीं होत. मेजाच्या दूरच्या अर्ध वर्तुलाकार बाजूकडे कांहीं खुणेचीं खोल पिशवीसारखीं घरें असतात, व खेळणाराला (आपल्या शिताफीनें गोळ्या विनखुणेच्या घरांत न जाऊं देतां) खुणेच्याच घरांत घालविण्याकरितां दक्ष रहावें लागतें.

Baggage (bag'āj) [O. Fr. *bagage*, a baggage.] *n. the portable equipment* (of an army) लष्करीबेदा *m*, खेलखाना *m*, बुणगें *n* (*), बहिर्बुणगें *n* (*), बाजारबुणगें *n* (*), कतवार *n*, खाली खटला *m*, (loosely) तंबूचें सामान *n*, लष्करी सामान *n*, सामानसुमान *n*, २ *portable property, luggage* प्रवासांतलें सामान *n*, खटला *m*, खटलें *n*, खाटखाटलें *n*, खाटखडबड *f*, बाडबिछायत(द) *f*, वस्त्रपात्र *n*, पडदल(ळ) *n*, लटंबर *n*, लाहंबर *n*, सारसुर [R.] *f*, मुस्तायकी [R.] *f*. (The English now call this luggage).

*N. B.*—बुणगें, बहिर्बुणगें, बाजारबुणगें in Marathi have a tendency to be restricted to the undisciplined followers of an army recruited from the dregs of the society and in this sense the English word baggage is never used.

Baggage (bag'āj) [Fr. *bagasse*, a baggage, quean.] *n.* *a worthless woman, a strumpet* बटकुली *f*, बटकी or बटिक, बटकरूं *n*, बायरूं *n*, कसबीण *f*, बाजारबसवी *f*. [इंग्रज लोक हल्लीं थट्टेनें बायकोस किंवा लहान मुलीस हा शब्द लावितात; as, Artful cunning-sly-pert-saucy-silly-baggage].

Bagnio (ban'yō) [It. *bagno*—L. *balneum*, a bath.] *n.* हमामखाना *m*, नहाणीघर *n*, ऊन पाण्याचें नहाणघर *n*, स्नानागार *n*. २ कुंटन(ण)खाना *m*, वेश्यालय *n*. ३ तुरुंग *m*.

Bagpipe (bag'pīp) gener. *pl. n.* पिशवीचें पंचनलिकावाद्य *n*. ह्या पांच नळ्या-एक सनई, तीन सूर, व एक वारा आंत फुकण्याची नळी मिळून होतात; (पिशवीचें) पंचवेणुवाद्य. २ *pl. fig.* उगाच शब्दावडंबर माजवून अद्वातद्वा बोलणारा. Bag'pip'er *n.* पिशवीचें पंचनलिकावाद्य वाजविणारा. Bagpipe for charming snakes नागसर or नागसूर *n*.

Bah (bä) *interj.* वीट-किळस-तिटकारा-अविश्वासदर्शक केवलप्रयोगी अव्यय.

Bahadur (ba-had'ōōr) [Hind. *bahadur*, brave.] *n.* बहादुर, ही सन्मानार्थ पदवी हिंदुस्थानांत बड्या लोकांस लावतात.

Bail (bāl) [O. Fr. *bailler*, to deliver.] *n. security given* जामिनी *f*, जामिनकी. २ *fig. guarantee* जिम्मा *m*, हमी *f*. ३ जामीन *m*, प्रतिभू *m*. [Bail for appearance हाजिर जामीन, दर्शनप्रतिभू. B. for good conduct फैलजामीन, खातरजामीन, विश्वासजामीन, सद्वर्तनप्रतिभू, चांगल्या वागणुकीबद्दल जामीन. B. for pecuniary liability मालजामीन.] B. *v. t.* हाजिर जामीन घेऊन सोडणें. २ (करितां) जामीन होणें, आपण जामीन होऊन दुसऱ्याची सुटका करणें. ३ *to deliver (goods) in trust upon a contract expressed or implied that the trust shall be faithfully executed on the part of the bailee* करारानें किंवा कांहीं अटीनें माल स्वाधीन करणें-ताब्यांत देणें. [Bail क्रियापदाच्या ह्या तिसऱ्या अर्थापासून Bailment, Bailer, Bailee ह्या शब्दांचे अर्थ निघतात]. Bail'able *a.* जामीन घेण्याजोगा, जामीन घेऊन सोडण्याजोगा; as, A B. offence. २ करार करून ताब्यांत देण्यास योग्य; as, B. goods. Bail-bond *n. law* हाजीरजामीनखत *n*. २ कबुलायत (पत्र) *n*. Bail'ment *n. law* निक्षेप, अनामत ह्मणून किंवा कांहीं अटीवर माल स्वाधीन करणें *n*, तोहोमतदाराला किंवा आरोपीला जामिनावर सोडवणें *n*. B. of pledge जंगमगहाणवस्तूचा निक्षेप *m*. Bail'or, Bail'er *n. one who delivers goods in trust to another* अनामत माल स्वाधीन करणारा. २ *law.* निक्षेप्ता. Bailee' *n. law. one to whom goods are delivered in trust upon a contract* निक्षेपी *m*, ज्याचे स्वाधीन माल अनामत केलेला असतो तो. Bails'man *n.* दुसऱ्याकरितां जामीन राहणारा मनुष्य *m*. To *accept, admit to, allow,*-bail, are all said of the Magistrate or Judge. The prisoner *offers, surrenders* to, his

bail; The one who provides it, *goes*, *gives*, or *stands*, bail. To give *leg-bail* (*jocular*), *to be beholden to one's legs for escape* पोबारा करणें, पळून बचावाचें श्रेय पायांना देणें. To bail out (आधींच तुरुंगांत असलेल्या मनुष्याला) जामिनावर सोडवणें.

*N. B.*—Bail ह्या क्रियापदाचा 'सोडवणें,' 'मुक्त करणें,' 'मोकळा करणें' अशा अर्थी अलंकारिक उपयोग आहे; as, "The dearest husband cannot bail his wife when death awaits her," "It is hard to bail imprisoned thoughts again."

Bail (bāl) [O. Fr. *baillier*, to enclose. According to some, from L. *bacillus*, a little stick.] *n.* (gener. *pl.*) किल्ल्याची बाहेरील तटबंदी *f*, मेढेकोट *m.* २ तबेल्यांतील दोन घोड्यांमधील फळी *f.*

Bail (bāl) [L. *baculum*, a rod or staff.] *n. cricket* विटी *f*, फिरकी *f.* ही फिरकी किंवा विटी उभ्या काड्यांवर असते. Bail'er *n.* विटी उडवून टाकील अशा धोरणानें फेंकलेला चेंडू *m*, विटी उडवणारा चेंडू.

Bail (bāl) *v. t.* अटकेंत टाकणें. To bail up a cow दुधाचे वेळीं गाईचें डोकें बांधून ठेवणें.

Bail, Bale (bāl) [Fr. *baille*, a bucket.] *v.t. to lade out water* उपसणें, उसपणें, उसपा *m*-उसपणी *f*- करणें, होडींतील पाणी काढून टाकणें; as, To bail a boat. Bailer *n.* पाणी उपसण्याचें भांडें *n*, किंवा उपसणारा मनुष्य *m.*

Bailey (bāl'i) *n.* किल्ल्याची बाहेरची भिंत *f*; किल्ला व ही भिंत ह्यांमधील आंगण *n.* किंवा मोकळी जागा *f.* २ फौजदारी तुरुंग *m.* किंवा न्यायकचेरी *f.*; as, The old Bailey in London लंडनमधील मुख्य फौजदारी कोर्ट *n.* किंवा तुरुंग *m.*

Bailiff (bāl'if) [Fr. *baillif*;—L. *bajulus*, a bearer, gener. with authority.] *n. law* नाझरा (sheriff) च्या खालचा अधिकारी *m*, समन्स लावणारा किंवा बजावणारा, बेलीफ *m*, कैद्यांना पकडणारा, दंड जमा करणारा व ज्युरीला बोलावणारा शेरिफाचा मदतनीस *m*, वतनावर किंवा जहागिरीवर देखरेख करणारा, वर्त्तक, शेरिफाचे हुकूम वर्त्तवणारा. Bail'i-wick *n.* बेलिफाची हद्द *f.*

Bairn (bārn) [A. S. *bearn*, from *bear*, to bring forth.] *n.* मूल *n.* Bairn-like *a.*

Bait (bāt) [Causative of English bite. A. S. *batan*, to bait a hook.] *v. t. to furnish with a bait* आमिष *n*-घास *m*-उंडी *f*- लावणें, आमिषयुक्त करणें. २ आमिष दाखविणें, लालूच *f*- खाऊ *m*- गुळखोबरें *n*- अंबोण *f*- आंबवण *n.* दाखविणें-देणें. ३ मन ओढून घेणें, मोहून टाकणें. ४ कुत्र्यांकडून हल्ला करविणें, हालहाल करणें, *fig.* त्रास देवविणें, जेरीस आणणें, *fig.* एकसारखा छळ करणें. ५ (प्रवासांत टप्प्यांच्या ठिकाणीं) दाणापाणी देणें, चावाचबीना *m.* देणें-करणें, घांस वैरण देऊन असुदा करणें, घांस वैरण देणें. B. *v. i.* थोडासा मुक्काम करणें, वाटेवर घांस वैरण खाणें-फराळ करणें. B. *n.* आमिष *n*, लालुच *f*, प्रलोभन *n.* २ वाटेवर दाणा वैरण खाणें-फराळ करणें-मुक्काम करणें *n.* ३ कुत्र्यांकडून हल्ला करविणें *n.* Baited *pa. p.* See the meaning of the verb 'to bait.' Baiter *n.* लालूच दाखविणारा, &c. २ *fig.* छळणारा, त्रास देणारा. Baiting *n.* See the verb 'to bait.' To hold out some bait मधाचें बोट लावून ठेवणें, साखर पसरणें (*), लालूच दाखविणें.

*N. B.*—साखर पसरणें will not be an accurate equivalent Marathi phrase for "to hold out some bait." Cf. त्याच्या भाषणांत पुष्कळ साखर पसरलेली आहे. साखर पसरणें means "to make unattractive parts attractive" only.

Baize (bāz) [L. *badius*, bay-coloured.] *n.* तेल्याबोर रंगाच्या लोंकरीचा खरबरीत धाग्यांचा कपडा *m*, पट्टू *n.*

Bake (bāk) [A. S. *bacan*, to bake.] *v. t.* (भाकरी-वीट) भाजणें-तापवणें. २ *bake by fire* अग्निपुट *n.* देणें-करणें, (by the sun) सूर्यपुट or सूर्यकिरणपुट *n.* देणें-करणें, (in a pit) गजपुट or ड *n.* देणें-करणें ३ उन्हांत तापवणें, कडक करणें. ४ *fig.* उष्णतेनें पक्का करणें. B. *v. i.* भाजणें. २ उष्णतेनें वाळून कडक-कठीण होणें. B. *n.* एकाच वेळीं भाजलेला घाणा *m.* Baked *p.* (v. V. T. 1.) भाजलेला, भाजीव. Bak'ing *pr. p.* Bake-house *n.* भटारखाना *m.* Bak'en or baked *pa. p.* Bak'er *n.* (v. V. 1.) भाजणारा, भर्जनकर्ता. २ *one who bakes and sells bread* रोटीवाला *m.* Baker's dozen तेरा (thirteen). Baker-legged *a.* आंत फिरलेल्या गुडघ्याचा, संहतजानु, संहतजानुक, संज्ञु. Bak'ery *n.* रोटीवाल्याचें काम *n*-धंदा *m.* २ रोटीचा कारखाना *m*, रोटीखाना *m*, भटारखाना *m.* Bak'ing *n.* (v. V. T. 1.)–*act.* भाजणें *n*, कडक करणें *n.* Baking-heat *n.* भाजण्यापुरती उष्णता *f.* Baking plate or Bake-plate (iron or earthen) तवा *m*, (earthen) रान्हें *n.* Bak'ingly *adv.* Bake-stone *n.* (भट्टींतला) तव्यासारखा दगड *m*, भाकऱ्या भाजण्याचा दगड *m.*

Balance (bal'ans) [L. *bis*, double, & *lanx*, a dish or scale.] *n.* तागडी *f*, तराजू *m*, कांटा *m*, ताजवा *m*, फिरकी *f.* [B. HAVING A TONGUE कांटा. B. for NICE WEIGHING कंपणकांटा *m.* BEAM of A B. दांडी *f.* DISH OF A B. परडें *n.* OR पारडें *n.* FALSE B. दीड दांडी *f.* FRAUDULENT TURN OF A B. IN WEIGHING झोंका *m.* INCLINATION OF AN UNEQUAL B. पासंग *n* (*idio.*). INEQUALITY (UNTRUENESS) OF A B. तट *m.* STRINGS OF A B. तुलासूत्र *n*, तराजूच्या दोऱ्या *f. pl.* TONGUE OF A B. कांटा *m*]. २ (of an account) बाकी *f*, शिलक *f*, शिलकबाकी *f*, बाकीसाकी *f*, वत्तोळा *m* (?), उबार *f.* [B. BROUGHT FORWARD पुढें ओढलेली बाकी *f*, ओढण *f*, ओढणबाकी *f.* B. (FOR OR AGAINST) ON A TRADESMAN'S BOOKS खातेंबाकी *f.* B. AS DRAWN OR SET DOWN शिलकझाडा *m.* CLOSING B. खात्याची मिळवणी करतांना काढलेली नांवेंकडची किंवा जमेकडची बाकी. OPENING B. खात्याच्या सुरवातीची जमेची किंवा नांवेची रक्कम *f.* A DEBTOR B. नांवेंबाकी *f.* A CREDITOR B. जमाबाकी *f.* DEAD BALANCES, *B.s given up as not forthcoming* जळीत बाकी *f*, बुडीत बाकी *f.* OUTSTANDING B. उग्राणी *f*, जेर-

बाकी *f.* To LEAVE A B. राहता-उरता करणें, शिलक-बाकी ठेवणें. To LEAVE NO B. निबाकी *f.* बेबाक *f.* करणें *g. of o.*, बाकी न राहूं देणें, चुकती बाकी करणें. To SETTLE OR DISCHARGE A B. बाकी पूज्य करणें, बाकी चुकविणें, बाकी फडशा करणें. ] ३ (*astrol.*) *the 7th sign* तुळा(ळा) *f*, तूळ *f.* ४ (न्यायान्यायाचा-योग्यायोग्याचा) सारासारविचार *m*-विवेचन *n.* ५ समतोल वस्तु *f.* ६ अनिश्चितस्थिति *f*, द्विधाभाव *m.* ७ समतोलपणा *m.* ८ समतोल *m*, (स्थितीचा-मनाचा-विचाराचा) तोल. ९ प्रमाणयोग्यता *f*, प्रमाणाविरोध *m*, प्रमाण-समता *f*, प्रमाणैक्यता *f.* (esp. in the Arts of Design.) १० समानचित्त-वृत्तित्व. B. *v. t. counterpoise* तोलणें. २ तुलना *f.* करणें. ३ समतोल करणें-राखणें, पासंग बांधणें. ४ पेलणें. ५ जमाखर्च करणें-पाहाणें, अजमास काढणें-पहाणें, शिल्लकझाडा *m.* काढणें-उतरणें, खातेबाकी काढणें. [ To B. an account आढावा काढणें, जमा व नांवें या दोन्ही रकमांमधील फरक काढणें, हिशेब करणें.] ६ तोलणें, तुलना करणें, तारतम्य-तफावत पाहणें. B. *v. i. be on a poise* समतोल असणें, सारखें वजन असणें, एकमेकांशीं बरोबर असणें. २ (विरुद्ध मतें) एकमेकांशीं तोलणें, सारासारविचार करणें. ३ (नर्तनांत) समोरच्या नटाकडे जाऊन तितकेंच परत येणें. Bal'anceable *a.* तोलनीय, वजन करण्यास योग्य, समतोलपणा राखण्यास योग्य. Bal'ancer *n.* वजन करणारा. २ नाडे-भोरपी *m.* Balance-book *n.* शिल्लकचोपडी, शिल्लक दाखविणारी वही, शिल्लकवही, त्रैमासिक-षण्मासिक-वार्षिक अढाव्यांच्या पत्रकांचें पुस्तक *n.* Balance of power शक्तीचा तोल *m*, (निरनिराळ्या राष्ट्रांतील) शक्तीचा समतोलपणा *m*, (राष्ट्रांतील) शक्तिसमता *f*-समतोलपणा *m.* Balance of style शब्दांचा-वाक्यांचा समतोलपणा *m.* Balance of trade (देशाच्या) व्यापाराचा फरक. आयात व निर्गत मालांच्या एकंदर किंमतींमधील फरक *m.* Balance-reef *naut.* स्थिर ठेवणारीं दोरखंडें, गलबत स्थिर ठेवणारीं पुढच्या व मागच्या शिडांतील शेवटचीं दोरखंडें *n. pl.* Balance-sheet तेरीज *n*, आढावापत्रक *n*, धंद्याचें अंदाजपत्रक *n*, शिलकबंद *m*, शिलकेचा तक्ता *m.* Balance-wheel (घड्याळांतील) तुलाचक्र *n.* Dead Balance बुडीत बाकी *f.* He has a good B. at his banker's त्याच्या पेढीवाल्याकडे त्याच्या नांवानें पुष्कळ मोठी रक्कम जमा आहे. To have a balance बाकी *f.* येणें-असणें. To strike a B. जमा व खर्च यांची बाकी-शिल्लक काढणें. His interests tremble in the balance त्याच्या हिताचें तराजू स्थिर नाहीं. To tremble in the B. अनिश्चित स्थितींत असणें.

*N. B.*—Balance and Poise. I balance one thing against another. I poise a thing in a given point. Balance=तोलणें. Poise=झोंक संभाळणें.

*N. B.*—वर कांटा हा शब्द तीन निरनिराळ्या अर्थी वापरलेला आढळेल : कांटा (१) a balance (generally), (२) a balance having a tongue, (३) the tongue of a balance. वर्त्तांला ह्मणजे वटाव; शिल्लकबाकी ह्या अर्थी वर्त्तांला हा शब्द सध्यां तरी निदान वापरीत नाहींत.

Balanitis (balani'tis) [ Gr. *balanos*, the glans penis.] *n. pathol.* (जनन) इंद्रियाचे टोंकाजवळील अंतस्त्वचेचा दाह *m*, शिस्नाग्रदाह *m.*

Balas (bal'as) *n.* नारिंगाच्या रंगासारखें एक प्रकारचें माणिक *n.*

Balausta (ba-laws'ta) [ Gr. *balaustion*, a wild-pomegranate flower.] *n. bot.* डाळिंबाच्या जातीचें फळ *n.* Balaus'tine *n.* डाळिंबाचें झाड *n.* B. flowers डाळिंबाचीं फुलें *n. pl.* हीं औषधांत स्तम्भक ह्मणून वापरतात.

*N. B.*—फळाचे जे सुमारें एकतीस वर्ग आहेत त्या वर्गांपैकीं Balausta हा एक वर्ग आहे, व ह्या वर्गांत डाळिंब हेंच एक फळ येतें.

Balbuties (bal-bū'ti-ēz) [ L. *balbus*, stammering. ] *n.* तोतरेपणा *m.*

Balcony (balk'on-i) [ Gr. *balken*, a beam, Pers. *bala*, upper, and *khaneh*, a chamber or house.] *n. archit.* सज्जा *m*, खिडकीच्या पुढची ग्यालरी. ही उघडी असते व हिला तिन्ही बाजूंनीं गजांचा कठडा असतो. Bal'conet, Bal'conette *n.* लहान सज्जा *f.*

*N. B.*—पुढील शब्द एकदांच ठरवून टाकिले असतां इंग्रजीचें मराठी भाषांतर करितांना बराच घोटाळा वांचवितां येईल:— Balcony=सज्जा. Gallery=गलेरी. Terrace=आगाशी, गच्ची.

Bald (bawld) [ Perhaps connected with *ball*, in the sense of rounded, whence '*smooth*' or *hairless.*] *a.* टकल्या, केशहीन, खल्वाट, तरव्या, गलितकेश. २ असंस्कृत, अप्रौढ, रुक्ष, नीरस, भाकड, रसहीन; as, B. style or language. ३ *bot.* लवविरहित. ४ तोंडावर पांढरा ठिपका असलेला, चांदरें (जनावर). ५ बोडका, बुचा, सुना, ओंका, मुंढा. Baldspot *n.* टक्कल *n.* Bald'-head *n.* डोक्यास टक्कल असलेला मनुष्य *m.* Bald'-headed *a.* Bald'-faced *a.* तोंडावर पांढरी ठिपकी असलेला, चांदरा (प्राणी). Bald'pate *n.* and *a.* टकलीडोई (चा), टक्कलमाथा (थ्याचा). Bald'pated *a.* तरव्या, टक्कलमाथ्याचा. Bald'rib *n.* (डुकराचा) मेदविरहित बरगडींतील भाग *m.* Bald'ly *adv.* उघडेपणानें, नागवेपणानें *colloq.* अप्रौढतेनें, नीच-हलकेपणानें. Bald'ness *n.* टक्कल पडणें *n*, बुचेपणा *m*, शोभाहीनता *f*, रसहीनता *f.* Bald-ea'gle *n.* अमेरिकेंतील पांढरा गरुडपक्षी *m.* ही अमेरिकेची (युनायटेड स्टेट्सची) राष्ट्रीय खूण आहे.

Baldachin (bal'da-kin) [ Fr. *baldaquin*, a canopy.] *n.* (रोमन क्याथोलिक धर्मगुरूचें) छत्र *n*, छत्र *n.* (भिंतीपासून लोंबणारें सिंहासनावरील) छत्र *n.*

Balderdash (bawl'dėr-dash) [ Dan. *buldre*, to make a loud noise or Eng. *balder* to use coarse language. Balderdash शब्दाची व्युत्पत्ति अजून निश्चित झालेली नाहीं. ह्याचे प्राचीन अर्थ दोन आहेत. (१) फेसाळ पाणी किंवा दारू, (२) दारूचें मिश्रण. ह्या दुसऱ्या अर्थापासून

"निरर्थक शब्दांचें जाल,वटवट" असा सध्याचा चालू अर्थ निघतो असा एक तर्क आहे.] *n. a senseless jumble of words* वटवट *f*, बकबक *f*, बडबड *f*, काथ्याकूट *f*. २ *filthy obscene language or writing* अचकटविचकट भाषा *f*, हलकट भाषा *f*, ग्राम्यभाषा *f*. B. *v. t.* भेसळ करणें (as liquors), भेसळणें, हीनकस-हीनगुण करणें.

Baldric, Baldrick ( bawld'rik ) [ L. *balteus*, a belt. ] *n.* खांद्यावरून व समोरच्या बगलेंत घालण्याचा पट्टा *m* (जानव्यासारखा पट्टा), ह्याला तलवार अडकवितात. २ नक्षीदार पट्टा *m*. ३ *fig.* राशिचक्र *n*.

Bale ( bāl ) [O. Fr. *bale*, a round package.] *n.* गठ्ठा *m*, विंडा *m*, दिंड *n*, बस्ता *m*, तक्ता *m*, गांठ *f*. [ STRAP OF A B. दाटणी *f*. WRAPPER OF A B. बारदान *n*, बासन *n*.] B. *v. t.* गठ्ठा बांधणें ; as, To bale out cotton.

*N. B.*—दिंड किंवा बस्ता हा फार लहान असतो व विशेषें करून कापडवाल्याच्या दुकानांतील लहान निरनिराळ्या गाठोड्यांना हा शब्द लावितात. तेव्हां इंग्रजी Bale शब्दाला क्यांडी साहेबांनीं दिलेले दिंड किंवा बस्ता हे प्रतिशब्द योग्य नाहींत.

Bale ( bāl ) See Bail V.

Bale ( bāl ) [ A. S. *bealu*, torment. Bale हा शब्द बहुधा काव्यांत आढळतो.] *n.* अनर्थ *m*, अरिष्ट. २ दुःख *n*. (शारीरिक किंवा मानसिक). ३ आपत्ति, विपत्ति. Bale'ful *a.* दुष्ट, वाईट, अपायकारक, दुःखकारक. २ शोकार्त, दुःखित. Bale'fully *adv.* Bale'fulness *n.* अनर्थकारकत्व *n*, दुष्टपणा *m*. Bliss and bale (सुखदुःख) are often alliteratively opposed ; also Boot and Bale नफातोटा.

Bale ( bāl ) [A. S. *bael*, fire.] *n.* (*obs.*) विस्तव *m*, (*obs.*) अग्नि *m*. २ सरण [R.] *n*, चिता [R.] *f*. Bale-fire *n.* इशारतीची आगटी *f*. २ आनंदाची आगटी-होळी *f*, (a bon-fire) [ Bale-fire ह्याचा एके काळीं चितेवरील अग्नि असा अर्थ होता. पण तो अर्थ आतां लुप्त झाला आहे.]

Balister or Ballister *n.* ( bal'is-ter ) See Baluster.

Balize ( bä-lēz' ) [ L. *palus*, pale. ] *n.* समुद्राच्या मर्यादेची-सीमेची दांडी किंवा इतर खूण *f*.

Balk, Baulk ( bawk ) [ A. S. *balca*, a ridge or beam. ] *n. a ridge generally, a dividing ridge, a bar* खावंडें *n*, वरल *f*, भांगणी *f*. २ *a ridge left in ploughing* दोन शेतांमधील हद्दीचा बांध *m*, बिननांगरलेली जागा *f*, नांगरण्याचा चुकून राहिलेला तुकडा *m*. ३ *a stumbling block, a ridge in one's path* मार्गांतील अडथळा *m*. ४ *a beam of wood* लांकडाचें बहाल *n*. ५ *a cross-beam or bar in a chimney or kiln* धुराड्यांतील किंवा भट्टींतील आडवें बहाल *n*. ६ लांकडाचा मोठा ओंडा *m*. ७ मासे धरण्याच्या जाळ्याच्या टोंकाजवळचा मजबूत दोर *m*. ८ *a tie-beam of a house* त्रिकोणी चौकटीच्या पायाचें बहाल *n*. ९ *disappointment* आशाभंग *m*, निराशा *f*. हेतुभंग *m*. B. *v.t. intentionally omit, shun, overlook* जाणून बुजून गाळणें-टाळणें-चुकवणें, लक्ष न देणें. २ *refuse* (food or drink) नाकारणें, नको ह्मणणें. ३ *avoid* (a responsibility) टाळणें, उपयोग न करणें. ४ (चा) रस्ता बंद करणें. ५ आशाभंग करणें, निराशा करणें, ठकवणें, फसवणें. ६ पडीत ठेवणें, वरल ठेऊन नांगरणें, वापरांत न आणणें. B. *v. i.* सरळ चालतां चालतां वळून जाणें किंवा अडणें (घोड्यासंबंधीं). To make a B. जमिनीचा भाग नांगरल्याशिवाय ठेवणें. २ *fig.* निराशा करणें, लुच्चेगिरीनें कामांत कसूर करणें. To make a B. of good ground चांगली संधि दवडणें. Balk'er *n.* Balk'ingly *adv.* Balk'y *a.* Balk'line *n.* बिलियर्डस् खेळाच्या मेजावर तोंडच्या वाजूपासून २८॥ इंचांवर काढलेली आडवी रेषा *f*, बिलियर्डसमध्यें सुरवातीची आडवी रेषा *f*, आद्यरेषा *f*.

Ball (bawl) [F.-L. *pila*, a ball.] *n.* गोल *m*. (*pop.*) गोळा *m*, गोलक *m*, पिंड *m*, गोटा *m*, उंडा (*colloq.*) *m*. २ चेंडू *m*, कंदुक *m*, गोटी *f* ; as, To play with B. ३ *med.* गोळी *f*, गुटिका *f*, गुटी *f*, गुटका *f*, गुलिका *f*, गोलिका *f*. ४ ( of the eye ) बुबूळ *n*, नेत्रगोल *m*, नेत्रगोलक *m*, अक्षिगोल-क *m*. ५ ( of thread &c. ) गुंडी *f*, गुंजडी *f*, गुंडळी *f*, गुंडाळी-ळें *n*, गुंडा *m*, पिंडा *m*, पिलंडा *m*, मुठ्ठा *m*. ६ वाटोळा पदार्थ *m*. ७ बंदुकीची गोळी *f*. ८ भूगोल *m*, पृथ्वीचा गोल *m*; as, B. of the Earth. B. *v. t.* गोळा करणें. B. *v. i.* गोळा होणें. Ball-cartridge *n.* गोळीचें काडतूस *n* (opposed to blank-cartridge). B.-cock टांकी भरली ह्मणजे आपोआप बंद होणारी तोटी *f*. गोलतोटी. B.-firing गोळीबार *m*. B.-practice गोळीबाराची कवाईत *f*. B. proof गोळयांनीं अभेद्य असा (तट) *m*. B. and socket joint (*anat.*) उलूखलसंधि *m.* ; as, खांद्याचा संधि, मांडीच्या खुब्याचा संधि, (हाडाचें) मुसळासारखें डोकें उखळासारख्या खळींत बसून हा संधि होतो. (उलूखल म्हणजे उखळ). No B. *cricket* गैरचेंडू *m*, नियमाविरुद्ध फेंकलेला चेंडू *m*. To have the B. at one's feet एखादी वस्तु पूर्णपणें स्वाधीन असणें. To keep the B. up or rolling कायम-चालू किंवा जागृत ठेवणें. To take up the B. एखाद्या कामांत आपली पाळी घेणें. Twist B. हुलकावणीचा चेंडू *m*. Wide B. चेंडूफळीच्या पूर्ण मारावाहेरचा किंवा बेसुमार चेंडू *m*.

*N. B.*—इंग्रजींत Ball, Globe, Sphere आणि Orb हे समानार्थी शब्द आहेत, परंतु त्यांतील अर्थभेदाची छाया लक्षांत आणून खालील प्रतिशब्द त्यांना योजिले आहेत. Ball=पिंड. Globe=गोल. Sphere=गोलाकृति. Orb=तेजोगोल. ( तेजोमंडळ-बिंब ).

Ball (bawl) [F.-L. *ballare*, to dance.] *n. entertainment of dancing* साहेब लोकांत जोडप्यांचा नाच *m*, सस्त्रीक नृत्य *n*, साङ्गननृत्य *n*, स्त्रीपुरुषांचा नाच *m*, नाच *m* (?), स्त्रीपुरुषनृत्योत्सव *m*, स्त्रीपुरुषांचा नृत्यसमारंभ *m*, नृत्य (?) *n*. २ साङ्गननृत्याची मजलस *f*, साङ्गननृत्योत्सवार्थ जमलेली मंडळी *f*. Ball-room *n.* नृत्यशाला (?) *f*, नृत्यमंदिर (?) *n*, नाचण्याचा अड्डा *m*, साङ्गननृत्यस्थान *n*. To open the B. नाच सुरू करणें. २ *fig.* कामाचा प्रारंभ करणें.

Ballad (bal'lad) [ Fr. *ballade*, a song. *prov. balada*, a

song for dancing to–L. L. *ballare*, to dance]. (Ballad ह्याचा मूळ अर्थ नाचण्याच्या ठेक्यावर गाण्याचें गीत असा आहे. हा अर्थ मिल्टन, अॅडिसन आणि जॉन्सन ह्यांच्या काळापर्यंत होता. आणि ह्या काळानंतर आमच्या कडील पोवाड्यासारखें काव्य असा एक अर्थ ह्या शब्दाला आला आहे.) *n.* नाचण्याच्या ठेक्यावर गाण्याचें गीत *n*, (शृंगारिक असेल तर) लावणी *f*, ठुंबरी *f*, गर्भा *m*, (ऐतिहासिक असेल तर) पवाडा *m*. Bal'ladist *n.* पवाडे-लावण्या करणारा-गाणारा. Bal'lad-monger *n.* हलक्या प्रतीचे पवाडे-लावण्या करणारा, छोटेखानी कवी *m*. B. singer *n.* पवाडे-लावण्या गाणारा, शाहीर *m*, गोंधळी *m*. B. Opera *n.* संगीत नाटक *n.* (ज्यांत फक्त लावण्याच ह्मणण्यांत येतात). संगीत तमाशा *m*. Bal'lader *n.* पवाडे-लावण्या करणारा. Bal'ladry *n.* लावण्यांचा विषय *m*-पद्धत *f*. Bal'ladize *v. t.* एखाद्या विषयावर लावणी-पवाडा करणें.

Ballast (bal'last) [ ह्याच्या तीन व्युत्पत्ति देतात. (१) O. Dan. *barlast*, *i. e.* bare load, mere weight. (२) O. Low Ger. *ballast*, *i. e.* 'bale last' useless load. (३) Dan. bag-last. *i. e.* back load.] *n.* गलबतांचा अमुक एक बूड पाण्यांत बुडावा ह्मणून अगर तो उलकंडूं नये ह्मणून त्यांत घातलेली रेती-दगड-लोखंड, निलिम *n*, निरीम *n*, भार *m*, वजन *n.* २ विमानांतील रेती *f*, विमानाचें वजन हलकें करावयाचें असल्यास ती रेती खालीं टाकितात. ३ *railway* लोखंडी रस्त्यावरील खडी *f.* ४ *fig.* मनुष्याला स्थिरता आणणारा-स्थिरताकारक धर्म *m*, भारदस्तपणा *m*. ५ *fig.* (स्थिर करणारा वजनी) आधार *m*. B. *v. t.* (जहाजांत किंवा लोखंडी रस्त्यावर) खडी टाकणें-घालणें, निरीम-निलीम भरणें. २ *fig.* स्थिर करणें, स्थिरावणें. B.-heaver *n.* तारवांत रेती किंवा वजन घालण्याच्या कामीं लावलेला मनुष्य *m*. A man of no B. अस्थिर बुद्धीचा-मनाचा-चंचल स्वभावाचा मनुष्य *m*. A vessel in B. (आंत माल नसतांना) फक्त निलिमानें भरलेलें गलबत *n*. Bal'lastage *n.* *law* बंदरांत गलबताची खडी नेण्याबद्दल दिलेली जकात *f*. Bal'lasting *n.* दगडाची खडी *f*. २ स्थिर करणारा पदार्थ *m*.

Ballet (bal'lā) [Fr. *ball*, a dance; Sk. वल्, to turn.] *n.* *pantomime* फक्त हावभाव, नृत्य व देखावे यांनीं युक्त असें नाट्य *n* (ह्या नाटकांत भाषण नसतें), मुग्ध नाट्य *n.* २ *dance* हावभावाचें नृत्य *n*, लास्य *n.* B. *v. t.* मुग्ध नाट्यानें दर्शविणें. Ballet-dancer मुग्ध नाट्यांतील नट *m*.

Ballista, Balista (bal-lis'ta) [L-Gr. *ballein*, to throw.] *n. pl.* Ballistæ, Balistæ. प्राचीन लोकांचें वेढ्यांतल्या स्थलावर दगड वगैरे फेंकण्याचें एक यंत्र *n*, अश्मक्षेपनयंत्र *n.* Ballis'tic *a.* अस्त्रें किंवा दगड फेंकण्यासंबंधीं, क्षेपनविषयक. Ballis'tics *n.* (on the analogy of athletics, accoustics) अश्मक्षेपनशास्त्र *n.* Ballis'tite *n.* सुधारलेली बंदुकीची दारू *f*, सुधारलेलें अग्निचूर्ण *n*, संशोधित अग्निचूर्ण *n.* (अग्निचूर्ण is our old word for gun-powder.)

Balloon (bal-lōōn') [Fr. *ballon*, a football.] *n.* विमान *n*, आकाशयान *n*, आकाशवहन *n*, व्योमयान *n.* २ एक मोठी पोकळ गोल वस्तु *f.* ३ *chem.* वायूचें गोल कांचपात्र *n*, ह्यांत वायू भरून ठेवतात, (वायूचें) विमानपात्र *n.* B. *v. t.* (विमानांत) वर नेणें. B. *v. i.* विमानांतून वर जाणें. २ विमानासारखें फुगणें. Ballooned *a.* विमानासारखा फुगलेला. Balloon'er *n.* विमानांतून वर जाणारा, वैमानिक. Balloon'ing *n.* विमानांत बसून जाणें *n.* २ विमानाची कला *f.* Balloon'ist *n.* विमान चालविणारा, वैमानिक. Balloon'ry *n.* विमान चालविण्याची संवय *f*-विद्या *f*, विमानविद्या *f.*

Ballot (bal'ut) [It. *ballotta*, a little ball used for voting; dim. of It. *balla*, a ball.] *n.* (गुप्त) संमतिगुटिका *f*, गुप्त रीतीनें मत देण्याकरितां वापरलेली गोळी *f*-चिठ्ठी *f.* २ गोळीनें-चिठ्ठीनें गुप्त संमति देणें *n.* ३ मिळालेलीं सर्वमतें *n. pl.* B. *v. i.* गोळीनें-चिठ्ठीनें गुप्त संमति देणें-करणें. (frequently used with *for*). Bal'loting *pr. p.* Bal'loted *pa. p.* Ballot-act *n.* गुटिकाद्वारा-लेखद्वारा मत गुप्तरीतीनें देण्याविषयीं कायदा *m*. Bal'lot-box *n.* गुप्त संमतीची गुटिका *f*-चिठ्ठी *f*-लेख *m*-टाकण्याची पेटी *f*, गोळ्या किंवा चिठ्ठ्या टाकण्याची पेटी *f.* Bal'loter *n.* गोळ्यांनीं गुप्त संमति देणारा.

Balm (bām) [Fr. *baume*. See Balsam.] *n.* झाडाचा सुगंधि रस *m*, सुगंधि वृक्षनिर्यास *m*. २ सुगंधि मलम *n*, दुःख शमविणारा पदार्थ-द्रव्य *n*, उपशामक औषध *n*, उपशमन *n.* ३ *fragrant ointment* सुगंधिक उटणें *n.* B. *v. t.* उटणें लावणें. २ शमवणें, शांतवणें. Balm'ily *adv.* सुखकररीत्या. Balm'iness *n.* सुगंधितपणा *m*. Balm'y *a.* सुगंधि, गोड, सुखकर, उपशामक. २ सुवासिक.

Balneal (bal'nē-al) [L. *balneum*, bath.] *a.* नहाणघराचा, स्नानागारासंबंधीं. Also Balneatory. Bal'neary *n.* नहाणघर *n*, स्नानागार *n.* Bal'neology *n.* *a scientific study of baths and medicinal springs* स्नानशास्त्र *n*, स्नानविधिविचार, स्नानविद्या *f.* ह्या वैद्यकाच्या भागांत कोणत्या खनिज द्रव्याच्या झऱ्याचें स्नान केलें असतां प्रकृतीवर काय परिणाम होतो ह्याचा विचार केलेला असतो.

Balour disc (balōōr disk) [Fr.] *n.* मूर्खपणाचें कृत्य *n.*

Balsam (bawl'sam) [Gr. *balsamon*, a fragrant gum.] *n.* राळेसारखा कडक चीक-वृक्षनिर्यास *m*; [as, धूप *m*, विशेप *m*, रक्तयावोळ *m*.] २ उटणें *n*, अभ्यंजन *n.* ३ *bot.* एका जातीचें सुगंधि तेलसर झाड *n.* ४ उपशामक पदार्थ *m*. B. *v. t.* (जखम) वरी करणें. Balsam'ic, Bal'samous *a.* उटण्याचा गुण असणारा. २ उपशमकारक, स्वास्थ्यजनक-कारक, हुपारी आणणारें. ३ मृदुकारक, मृदु करणारें. B. *n. med.* एक प्रकारचें हुपारी आणणारें औषध *n.* Bal'samation *n.* Balsam'ical *a.* Balsam'ically *adv.* Bal'samine *n.* Bal'samif'erous *a.* सुगंधि वृक्षनिर्यास उत्पन्न करणारें. २ उपशामक औषध उत्पन्न करणारें. Bal'samy *a.* सुवासिक. Canada balsam *n.* एक प्रकारचें टरपेन तेल *n.* एका जातीच्या देवदाराचा द्रवराळ, जसें

रसविशेष. ह्या राळेच्या मिश्रणाचा उपयोग कांचा एकमेकांस चिकटविण्यांत करतात.

Baluster ( bal'ust-er ) [ Lastly from Fr. through It. through L. through Gr. Fr. *balustre*, little, round, and short pillar. So called from a fancied resemblance to the flower of the wild pomegranate डाळिंब. It. *balausto*, *balustra*, the flower of the pomegranate L. *balaustium*, Gr. *balaustion*, the flower of the wild pomegranate. ] *n.* एका बाजूला निमुळती व दुसऱ्या बाजूला रुंद होत जाणारी डाळिंबाच्या फुलासारखी नक्षीदार चपटी गराद *f.* Bal'ustered *a.* नक्षीदार-डाळिंबाच्या फुलासारखी चपट्या गरादा असलेला. Bal'-ustrade *n. archit.* नक्षीदार चपट्या गरादांचा कठडा *m*, loosely कठडा *m*, कठरा *m*, कठंजन *n*.

Bam (bam) *n.* फसवणूक *f*; कंडी *f*. B. *v. t.* फसविणें, कंडी पिकविणें.

Bambino ( bam-bi'no ) *n.* (विशेषतः) रोमनक्याथोलिक देशांतील बाळत्यांतल्या येशूख्रिस्ताचें चित्र *n*, लहान मूल.

Bamboo ( bam-bōō' ) [ Malay *bambu*.] *n. bot.* बांबू *m*, वंश *m*, कीचक *m*, वांसा *m*, वेळू *m*. [SOME OF THE KINDS ARE कळ(ळं)क, कागदीवेळू, कोंडा OR कोंढा (*vulg*.), चिवा, रानचिवा, चिवार, टोंकर, डवगा, भालेकाठी, माणगा OR माणगारा, माणा, मेस. CLUMP OR CLUSTER OF BAMBOOS बेट *n*, कळंक. THE EFFLORESCENCE OF THE B. मेळ *m*. MANNA OF THE B. त्वक्क्षीरा *f* (*pop*.) तव-कीर OR खीर OR कील OR खील *n*, वंशक्षीर *n*, वंशलोचन *n*, वंशलोचना *f*. SEEDING OF A B. काटे *m. pl*, मळ *m*.]. २ *a stick, single cane* बांबू *m*, वेळू *m*, कळंक *m*, वंश *m*, वास *m*, बास *m*, वेणु *m*, कीचक *m*. [ B. CROOK डांग *f*, डांगकाठी *f*. B. FLUTE OR PIPE वेणु *m*. FRAMEWORK OF LIGHT SLIPS OF B. भाळी *f*. OUTER STRIP FROM A B. पाठकांब *f*; पाठबीळ *n*. PIECE OR BIT OF A B. कळकूट *n*, वेळकट OR कूट. PIN OF B. चुई *f*, चोई *f*, शिलक *f*, शिगर *n*. STRIP OR SLIP OF A B. कांब *f*, कांबीट *n*, सरी *f*, सारण [R.] *f*, चिंब *n*, चिंबट *n*.] Bamboo' *a.* बांबूचा, वेळूचा, वेळवाचा, वेळवी, वंश्य, वंशी, वांस, वैणव, वेणूचा. B. *v. t.* कळकीच्या काठीनें फटका मारणें.

Bamboozle ( bam-bōō'zl ) [ Dut. *bum*, to hum & *bœsen*, to rave or talk idly. ] *v. t. to deceive by trickery* ठकविणें, तोंडाला पान पुसणें, धत्तुरा दाखविणें (*slang*), फसवणें, धाब्यावर बसविणें, धूर *m.* देणें. To B. into ( doing something ) *to persuade to a belief or course of action by bamboozling* एखादी गोष्ट फसवून करविणें. To B. one out of something *to take away something trickily from him* फसवून किंवा युक्तीनें एखादी गोष्ट काढून घेणें. Bamboo'zlement *n.* ठकवणूक *f*, फसवणूक *f*. Bambooz'ler *n.* ठकविणारा, फसविणारा. Bambooz'led *p. t.*

Ban (ban) [A. S. *ban*, an edict ] *n.* बहिष्कारपत्र *n*, निषेधपत्र *n*, वाळीतपत्र *n*, बहिष्कारघोष *m*, निषेधघोष *m*. २ शाप *m*. ३ निषेध *m*, मनाई *f*. ४ जाहीरनामा *m*, डांगोरा *m*. ५ दंड *m. pl.* Banns. B.s ( of marriage ) always *pl.* लग्नाची जाहीरपत्रिका *f*, लग्नाची द्वाही *f*. Ban *v. t.* शापणें. २ बहिष्कृत करणें. ३ निषेध-मनाई करणें. To forbid the banns लग्नाला हरकत आणणें-घेणें. To publish or put up the banns लग्नाची प्रसिद्धिपत्रिका काढणें, अमुक दिवशीं लग्न होणार असें तीन आठवडे आधीं जाहीर करणें. [ जर ठरलेल्या लग्नाला कोणाला हरकत घ्यावयाची असेल तर ती त्याला घेतां यावी ह्मणून तीन आठवडे आधीं अशी जाहिरात देवळांत लावतात. ] To put-place under the ban बहिष्कार घालणें, वाळींत टाकणें.

Ban ( ban ) *n.* हंगारी देशांतील सेनापति किंवा लष्करी कामदार *m*.

Ban ( ban ) *n.* ईस्टइंडीज बेटांतून आणलेली एक प्रकारची मलमल *f*.

Banal ( ban'al ) [ Fr. ] *a. hackneyed, commonplace* सर्वांचे तोंडचा, सार्वत्रिक, साधारण लोकांचा. Banal'ity *n.* साधारण-क्षुल्लक गोष्ट *f*.

Banana ( ba-nä'na ) *n. bot.* ( *musa sapientum* ) केळीच्या जातीचें झाड *n*. २ ( the fruit ) केळें *n*. [ सोनकेळें, वनकेळें, राजेळें, रसवाळें, मुठेळें, वेलची, लालकेळें (वसईचें) असे ह्या फळाचे निरनिराळे प्रकार आहेत.

*N. B.*—सोनकेळें, is one variety of the banana fruit. सुवर्णकदली is one variety of the banana tree. Some old writers name banana as Adam's apple from a notion that it was the forbidden fruit of Eden.

Banco ( bang'ko ) [ It. equal to Bank. ] *n.* पेढीवरचे हिशेब ज्या नाण्यांत ठेविलेले असतात तें नाणें *n*, हिशेबाचें नाणें *n*. हें नाणें त्या देशांतील चलनी नाण्याहून भिन्न असूं शकतें. (Thus at Hamburg, while the current mark was worth 1 *s.* $1\frac{1}{10}$ *d*.; the mark *banco* was valued at 1 *s.* $5\frac{1}{2}$ *d.* sterling). Sittings in banco, *sittings of a superior Court of Common Law as distinguished from those of the Judges on circuit* "फुलबेंचची बैठक" *f*, साऱ्या न्यायाधिशांची बैठक *f*.

Band ( band ) [A. S. *band*, from *bindan*, Sk. बंध्, to bind.] *n.* बंधन *n*, बांध *m*, आळा *m*, बांधाटी *f*, बंद *m*, बंध *m*. २ कडें *n*, आळा *m*. ३ *fig.* (भिडेचें) बंधन *n*, (अवश्य कर्तव्याचा) पाश *m*, संबंध *m*, सांखळी *f* (*idio*.). ४ (दरवाजाची लांब लोखंडी) पट्टी *f*. ५ *pl.* बिड्या (*B*.).

Band ( band ) [Sk. बंध्, *bandh*, to bind.] *n.* कपड्याची पट्टी *f*.; as, A bat-band, a waist-band. पट्टा *m*. २ *pl.* (धर्मोपदेशकाची किंवा बारिस्टराची) गळपट्टी *f*. Band'-age *n.* पट्टी *f*. (जखमा बांधण्याची). २ बंद *m*, बंधन *n*. ३ बांधणें *n*. B. *v. t.* पट्टी बांधणें. Band'-box *n.* (टोप्या) ठेवण्याची जाड कागदाची पेटी *f*. Band'ed *a.* पट्ट्यानें बांधलेलें. Band-saw *n.* पट्ट्याची करवत *f*. Band'-fish *n.* एक जातीचा मासा *m*. Band'-ster *n.* (धान्य कापल्यावर) पेंढ्या बांधणारा.

Band ( band ) [ A. S. *bindan*, Sk. बंध्, to bind.] *n.*

*company, troops, body* मंडळी *f.* टोळी *f.* जमात (?) *f.* थवा (?) *m.* जथा (?) *m.* तांडा *m.* थाट [R] *m.* थाटी [R] *f.* जुग [R] *f.* चंगी [R] *f.* तुंग [R] *m.* मुठाण *n.* जूग (?) *f.* झुंड (?) *f.* गण *m.* मेळा *m.* मंडल (?) *n.* गट or गट्ट *m.* गट्टा *m.* पेंडें *n.* भिंड *n.* पोहा [R] *m.* घोळका (?) *m.* चळक [R] *f.* पंक्ति (?) *f.* स्तोम (*obs.*) *n.* २ (of insurgents or robbers) बंड *n.* खूळ *n.* गट *m.* गट्टा *m.* धडा [R] *m.* हत्यारबंद लोकांची टोळी *f.* ३ (of dancing girls, &c.) ताफा *m.* फड *m.* चक्री *f.* मेळ *m.* [Man belonging to a B. फडकरी *m.*] ४ *mus.* नगारखाना (*) *m.* वाद्यभांड (*) *n.* चौघडा (*) *m.* बाजा *m.* बाजेकरी मंडळी *f.* [Flourish or closing beat upon a B. आखेर नौबत *f.*] ५ (of knaves, libertines, idlers, &c.) The word here has the power of *pack, crew, gang, knot, &c.* and is answered by चांडाळचौकडी *f.* चौकट *f.* चौक *m.* चांडाळ *m.* नवग्रह *m.* अठराबाबू *m. pl.* प्रकरण (*colloq.*) *n.* भुतावळ *f.* सोदेमंडळ *n.* शकुनिचतुष्टय *n.* मुठाण *n.* B. *v. t.* पट्टीनें बांधणें. २ जमाव एकत्र करणें. B. *v. i.* कट-जूट करणें, जुटणें, एकमुसणें, एकमूस *f.* करणें. Band'master *n.* बॅन्ड वाजविणाऱ्या मंडळीचा मुख्य, बाजेवाला, बॅन्डमास्तर. Band'room *n.* नगारखाना *m.* वादनशाळा *f.* वाद्यशाळा *f.* Bands'man *n.* बाजेवाला, बॅन्ड वाजविणाऱ्या ताफ्याच्या इसमांपैकीं एक मनुष्य *m.* Band'stand *n.* बॅन्डवाद्य वाजविण्याची चावडी *f.* सार्वजनिक वाद्यस्थान. Band of hope (तरुण मंडळीची) मद्यपाननिषेधी संस्था *f.* Band of knaves चांडाळचौकडी *f.*

*N. B.*—वर थवा, जथा इत्यादि ज्या शब्दांपुढें संशयचिन्हें घातलीं आहेत ते शब्द Band ह्या इंग्रजी शब्दाला योग्य प्रतिशब्द नाहींत. ते सर्व शब्द समुदायवाचक आहेत खरे, परंतु Band ह्या इंग्रजी शब्दांत जो मुख्य अर्थ आहे तो मंडळी किंवा टोळी ह्याच शब्दांनीं पूर्णपणें व्यक्त होतो. पंक्ति ह्या मराठी शब्दांत इंग्रजी Series ह्या शब्दाचा अर्थ आहे. तर पंक्ति हा शब्द Band ह्याला योजण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

मोत्यांच्या किंवा इतर जवाहिरांच्या माळेला पेंडें हा शब्द लावतात; आणि म्हणून Band ला पेंडें हा शब्द योग्य होणार नाहीं.

Band शब्दाचा चौथा अर्थ पहा. Band ला बाजा हाच शब्द कायमचा ठरवावा. Band ला बॅंडवाजा हाही शब्द रूढ होत चालला आहे. नगारखाना, चौघडा ह्या वाद्यांच्या जाती आहेत खऱ्या, परंतु इंग्रजींत Band चीं जीं उपकरणें असतात तीं चौघड्यांत किंवा नगारखान्यांत नाहींत. चौघडा हा शब्द इंग्रजींत साहेब लोकांनीं घेतलाच पाहिजे.

Band (band) an obsolete *pa. t.* of Bind.

Bandala (ban-dä'la) *n.* ज्यापासून चांगलें दोरखंड करितां येईल अशा मॅनिला (Manilla) झाडाचा काथ्या, *cf. coir of cocoanut plant.*

Bandalore (ban-da'lōōr) (*obs.*) *n.* चक्र *n.* चक्कर *f.* चकीर *n.* चक्री *f.* चाकदोरीचा खेळ *m.* हें एकदा खालीं सोडलें कीं दोरीच्या स्थितिस्थापकत्वामुळें पुन्हां आपोआप वर येतें. (ज्यानें मुलें खेळतात तें).

Bandana, Bandanna (ban-dan'a) [Hind. *bandhnu,* the mode of dyeing handkerchiefs.] *n.* रेशमाचा एक प्रकारचा हातरुमाल *m.*

Bandeau (ban'dō) [Fr. dim. from *bande,* a band, Sk. बंधू, to bind.] *n. pl.* Ban'deaux. केंस बांधण्याची पट्टी *f.* हिनें बायका केंस बांधतात. २ (टोपीच्या कडेबरोबर लावण्याची लोंकरीची अगर रेशमाची) पट्टी *f.*

Bandelier (ban-de-lēr') *n.* a form of Bandoleer.

Banderol, Banderole (ban'de-rōl) [Fr.] *n.* डोलकाठीला बांधलेलें छोटेखानी लष्करी निशाण *n.* पताका *pop.* पताक *f.*

Bandicoot (ban'di-kōōt) [Telugu. *pandikokku,* pig-rat.] *n.* called also *Malabar rat* and *pig-rat* (मुंगुसाएवढी मोठी) घूस *f.*

Bandit (ban'dit) [Low L. *bandire,* to proclaim.] *n. pl.* Banditt'i, Ban'dits हद्दपार केलेला मनुष्य *m.* देशबहिष्कृत मनुष्य *m.* २ लुटारू *m.* वाटमाऱ्या *m.* वाटपाड्या *m.* ३ *pl. body of bandits* बंड *n* (?), लुटाऱ्यांचा गट्ट *m.* खूळ [R] *n.* दरवडा or दरोडा *m.* [One of the body दरवडेकरी or दरोडेकरी *m.* Depredations and ravages of B. बंडावा *m* (?), धुंडाई *f.* चोरक्रांत *colloq. f.* चोरक्रांति *colloq. f.* जाळपोळ *f.*

*N. B.*—चोरक्रांत आणि चोरक्रान्ति हे शब्द संक्रांत आणि संक्रान्ति ह्या शब्दांच्या धर्तीवर तयार केले असावे.

In the English word Bandit, the prominent idea is that of theft. In the Marathi word बंड or बंडवाले लोक, the two prominent ideas are those of disobedience and resistance. Therefore बंड or बंडवाले लोक will never be a correct word for Bandits.

Bandlet, Bandelet (band'let, band'e-let) [Fr. *bandelette.*] *n.* लहान पट्टी *f.* पट्टीसारखी वस्तु *f.*

Bandog (ban'dog) [*Band,* fastening, and Dog.] *n. a mastiff* सदोदित बांधलेला उग्र पहाऱ्याचा कुत्रा *m.* क्रूर व पहारा करणारा मोठा कुत्रा *m.*

Bandoleer, Bandolier (ban-do-lēr') [It. *banda,* a band.] *n.* एक रुंद असा कातड्याचा पट्टा *m.* (जुन्या काळीं गोलंदाज ह्यांत दारूगोळ्याचें तोस्तान अडकवीत.)

Bandoline (ban'do-lin) *n.* केंसांस स्निग्धता व जोम आणून ते एके ठिकाणीं चिकटवणारा पदार्थ *m.* केशबंधनतेल *n.*

Bandore (ban-dōr') [Fr. *mandore.*] *n. mus.* सतारीसारखें तीन किंवा ज्यास्त तारांचें एक वाद्य *n.*

Band'rol, See Banderole.

Bandy (ban'di) [Fr. *bander* perhaps, from *bande,* a side.] *n.* (टोंकाशीं वांकविलेला) आकडीसारखा कडीदार दांडू *m.* खेळण्याची आंकडी *f.* २ वांकड्या दांडूचा खेळ *m.* (*bandy-ball=hockey*). B. *v. t. beat to and fro* (चेंडू) उलट सुलट मारणें, इकडून तिकडे तिकडून इकडे मारणें, फेंकणें, (loosely) घोळणें, टोलवाटोलव *f.* कोलवाकोलव *f.* परतवापरतव *f.* करणें *g. of o.* २ वादविवादाची खडाजंगी करणें, वाग्युद्ध करणें. ३ अदलाबदल करणें, देणेंघेणें; as, B. words and com-

pliments. To B. blows हाता (तो) फळीस-हातघाईस &c. येणें. To B. sharp speeches-words धुसफुसणें (*), धुसफूस (*) f-धुसमूस (*) f-फटकाफटकी f-झटापटी f-करणें, वर्दळीवर येणें, वाग्युद्ध करणें. Ban'dy *a.* फेंगडा (मनुष्य). Ban'dying *n.* Bandy-leg *n.* फेंगडा पाय *m.* B.-legged *a.* फेंगड्या-पायाचा (मनुष्य), फेंगड्या, वक्रजानु.

*N. B.*—In modern Marathi धुसफुसणें means to express anger or displeasure in a suppressed manner.

Bane ( bān ) [A. S. *bana*, a murderer. ] *n.* हानिकारण, हानीचें मूळ *n*, हानि *f*, नास *n*, नुकसान *n.* [ I will be his B. मी त्याचा सर्वस्वी नास करीन, मी त्याला धुळीस मिळवीन (?), मी त्याला ठार मारीन (?) ]. २ *fig.* जालीम विष *n*, विख *n*, विषाचा प्याला *m.* ३ ( *obs.* ) मृत्यु *m*, मरण *n*, काळ *m.* ४ मेंढरांस होणारा एक प्रकारचा रोग *m.* Bane'ful *a.* अपायकारक, घातक, हानिकारक, मारक, अहितकारक. २ विषारी, विखारी, विषयुक्त. Bane'fully *adv.* घातुक रीतीनें. Bane'fulness *n.* घातुकपणा *m.* Bane'wort, Bane'berry *n. bot.* कांटेरिंगणी *f.*

*N. B.*—Bane=हानि; Ruin=नाश; Pest=वाड ( जसें टोळधाड ).

संस्कृत नाश शब्दाचा अर्थ ruin असा आहे, परंतु त्यापासून झालेलें नास हें मराठी रूप 'हानि किंवा नुकसान' एवढेंच दाखवितें. (नास = हानि = नुकसान. नास ह्मणजे नाश नव्हे). ह्याचा महाराष्ट्रभाषापंडितांनीं विचार करावा.

Bang ( bang ) *n.* (युरोपियन लोकांत) बायकांचे भिंवयांपासून चौकोनी कापलेले केंस *m.* Banged *a.* चौकोनी कापलेले केंस असणारी. Bang'tail *n.* (टोंकास कापलेलें घोड्याचें) चौकोनी शेंपूट *n.*

Bang ( bang ) also spelt Bangue, See Bhang.

Bang ( bang ) *v. t. beat violently* दणकावणें, सडकणें, बदडणें, दणगारणें, रपाटणें, धमकणें, कडकावणें. २ *strike against forcibly* आपटणें, आदळणें, आफटणें, धडकणें, धडकणें, (दरवाजा) धडकावून लावणें, धडका मारणें. B. *v. i.* धडकणें, आदळणें. B. *n. blow* दणका *m*, दणकारा *m*, खणका *m*, थडका *m.* B. *adv.* थाडकन-कर-&c., धडकन-कर &c. Bang'ing *a.*

Bangle ( bang'gl ) [ Sk. वलय or कंकण, Hind. *bangri.*] *n.* बांगडी *f*, चुडा *m*, कांकण *n.*

Banian ( ban'yan ) [ Sk. वणिक्, Hind. *banya*, a merchant. ] *n.* वाणी *m*, वैश्य *m*, वणिक *m.* २ ( used derisively ) वाणगंड *m*, *n*, वाणकूट *m*, वाणगट *m.* ३ एक प्रकारचा झगा *m.* ४ *bot.* वड *m*, वटवृक्ष *m.* B. days, *days of poor fare* ( Seamen's phrase ) खलाशांस खाण्यास मांस न मिळण्याचे दिवस *m.* [ इकडील वाणी लोक मांसभक्षक नाहींत त्यावरून युरोपियन लोकांत ही ह्मण पडली आहे]. २ उपासमारीचे दिवस *m. pl.*

Banish ( ban'ish ) [ O. Fr. *banis*, stem of *pr. p.* of *banir. bannir*, to proscribe. ] *v. t. expatriate, exile* हद्दपार-देश-मुलुख पार करणें, देशनिकाला-देशपारखा-देशहद्द करणें, देशपार-राज्यपार-तरपार करणें, देशांतरास-द्वीपांतरास-&c. घालवून देणें. २ *fig. drive away* घालवून देणें, दूर करणें, दवडणें, घालविणें; as, To B. cares, anxieties, ideas and thoughts from one's mind. Banished *p.* (v. V. 1.) हद्दपार केलेला, देशपार केलेला, देशनिकाला [R], देशपारखा, मुलुखपारखा, देशबहिष्कृत, हाकून दिलेला. Ban'ishment *n.* (v. V. 1.)—*act.* देशपार करणें *n*, देशबहिष्कार *m*, निर्वासन *n.*—*state.* हद्दपारी *f*, देशनिकाली *f*, देशबहिष्कृति *f.*

Banister ( ban'ister ) *n.* Same as Baluster.

Banjo ( ban'jo ) *n.* सतारीसारखें पांच तारांचें एकवाद्य *n.*

Bank ( bangk ) [A. S. *bank*, a bench.] *n.* तट *m*, कड *f*, तीर *m*, किनारा *m*, त(थ)ड *f*, तटाक *m.* २ बांधारा *m*, बांध *m*, बंधारा *m.* [ Farther or other B. पैलथड *f*, पैलथडी *f*, पैलतीर *n*, परतीर *n*, पैलथड, परपार *m*, पैलपार *m*, पैलतड *f.* Hither or near B. ऐलथड *f*, ऐलथडी *f*, ऐलतीर *n.* Hither and further banks पारावार (?) *m.* On both banks दुथडी.] २ *high or steep bank* डगर *f*, दरड *f*, धस *m*, धसरड *f.* [ FULL OF BANKS OR RIDGES दरडवट. ] ३ *dike, mound, mole* बांध *m*, बांधोळी *f*, बंधारा *m*, पेंडवळ [R.] *m*, पेंडवळा [R.] *m.* [ LITTLE B. TO STOP WATER ताल *f*, पाळ *f.* ] ४ *shelf, shallow, flat* भाट *n*, भाटी *f*, लाग *m.* ६ खाणींत काम करणारे लोक जेथें खपतात ती सपाटी *f.* B. *v. t. confine with banks* बांधणें, बांधारणें, बांध *m.* घालणें. २ ढीग किंवा रास करणें. Banks'man *n.* खाणीच्या तोंडाशीं देखरेख करणारा. From bank to bank कोळशाच्या खाणींत उतरणारा मनुष्य वरून खालीं जाऊन वर येईपर्यंतचा काल *m.* Banker एक जातीचा पडाव *m.* २ नाला खणणारा. ३ गवंडी लोक ज्या दगडी बांकावर दगड घडतात तें बांक. Bank-side नदीची उतरती कड *f.* Bank-sided *a.* आंत उतरत्या बाजूचें (जहाज; opposed to wall-sided). To B. a fire, to B. up a fire (विस्तव पुष्कळ वेळ राखण्याकरितां चुलींतील) राख निखाऱ्यावर घालणें.

*N. B.*—Bank तट. इंग्रजी Bank शब्दांत उंचपणाची कल्पना प्रधान आहे; तीच मराठी तट शब्दांत आहे. Coast हा विशेषतः भुगोलांतील पारिभाषिक शब्द आहे. 'जमिनीचा शेवट' हा ह्याचा प्रधान अर्थ आहे; तर Coast शब्दाला किनारा हा शब्द योग्य होईल. Shore समुद्रकिनारा. A shore is a strip of land washed by the sea.

Bank ( bangk ) *n.* वल्हीं मारण्याकरितां बसावयाची उंच जागा *f*, उंच बैठक *f*, बांक *n.* २ *a rank of oars one above another* एकावर एक बांधलेली वल्ह्यांची उभी ओळ *f.* ३ *law* न्यायाधिशाची बैठक *f*, कायद्याची तक्रार ऐकण्याकरितां भरलेलें कोर्ट *n*-कचेरी *f.* ४ *print.* छापलेले किंवा छापण्याचे कागद वगैरे ठेवण्याचें उतरतें मेज *n.* ५ *mus.* तंतुवाद्याच्या चाव्या *f. pl.*

Bank ( bangk ) [ Fr. *banque*, a bench or table.] *n.*

पाश्चात्य पद्धतीची पेढी *f,* सराफी पेढी (*), ठेव पेढी(*), ब्यांक *f,* कोठी *f* (*), सावकारी पेढी *f.* २ पेढीची जागा *f.* ३ जुगाऱ्यांचें भांडवल *n,* गोठा *slang.* B. *v. t. to deposit in a bank* (as money) पेढीवर पैसे ठेवणें. २ पैशाचें रूप देणें, (चा) पैसा करणें; as, To B. an estate. B. *v. i.* पेढी घालणें, सराफाबरोबर देवघेव करणें. Bank-agent *n.* (पेढीच्या) शाखेचा अडत्या *m,* एजंट *m*-मुनीम *m.* Bank-annuities *n.* व्याजाबद्दल सरकारानें हमी घेतलेलें पेढीचें भांडवल *n.* २ सरकारानें हमी घेतलेल्या पेढीचे भागावर दरसाल दर शेंकडा तीन टक्केप्रमाणें नियमित मिळणारें व्याज *n.* Bank-bill *n.* एका पेढीनें दुसऱ्या पेढीवर दिलेली (दर्शनी किंवा मुदतीची) हुंडी *f.* Bank-book *n.* पेढीवर पैसे ठेवणाराची-पैसे भरणाराजवळ असलेली खातेवही *f,* टिपडें *n.* Bank-cheque *n.* चेक, चिठ्ठी अगर जाब *f,* दर्शनी हुंडी *f*-वरात-चिठ्ठी *f.* Bank-credit *n.* पेढीशीं असलेली पत *f,* पेढीशीं साख *f,* जितक्या रकमेपर्यंत जामिनगिरी दिली असते तितकी रक्कम पेढीवरून घेण्याची भलामण *f.* Bank-holiday *n.* (सरकारी हुकमानें) पेढीनें सुट्टी घेण्याचा दिवस *m.* त्या दिवशीं जी दर्शनी हुंडी वटवावयाची असेल ती कित्येक वेळां आदले दिवशीं व कित्येक वेळां दुसरे दिवशीं वटावणें कायदेशीर ठरविलें आहे. Banknote *n.* रोख पैशाऐवजीं चालणारी हुंडी किंवा ब्यांकेचा जाब *f.* हिचा रोख पैशाप्रमाणें उपयोग होतो. Bank of deposit ठेवीची पेढी *f.* रकमा ठेऊन घेणारी किंवा ठेवी घेणारी पेढी *f.* Bank of issue (केव्हांही रोख पैशाऐवजीं) हुंडी काढण्याचा अधिकार असलेली पेढी *f.* Bank-paper (व्यापाराच्या घडामोडींत चालणाऱ्या) ब्यांकेनें काढलेल्या नोटा *f. pl.* Bank-stock *n.* पेढीचें भांडवल. Agricultural Bank शेतकीची पेढी *f,* कृषिसहाय्यक पेढी *f.* Branch-bank मुख्य पेढीची शाखा *f.* Joint-stock-Bank *n.* समाईक भांडवलाची पेढी *f.* Private Bank *n.* दाहांपेक्षां कमी भागीदारांची पेढी *f,* सावकारी पेढी *f,* (सरकारी नव्हे किंवा सरकारांत नोंदलेली नव्हे). Savings-bank *n.* गरीब लोकांस शिल्लक लहान रकमांनीं राखावयाची सोय करणारी पेढी *f,* संचयोत्तेजक पेढी *f.* Bank'er *n.* बँकवाला *m,* सावकार *m.* पेढीवाला *m,* सराफ *m* (*), हुंडीवाला *m.* [ Bankers and Banking,-compreh. सावसावकारा *m.* Fraternity or body (in a town, &c.) of bankers सावकारा *m.* Sitting carpet of a B. सावकाराची गादी *f.* ] Bank'cress *n. fem.* Banking *n. banker's business* सावकारी *f,* सावकारकी *f,* सावकारा *m,* पेढीचा व्यापार *m,* धनव्यवहार *m,* सराफी *f,* सराफीचा धंदा *m.* B. *a.* सावकारी, सावकाऱ्यांचा. २ बँकेसंबंधीं. Banking company सराफी मंडळी *f.* कंपनीची पेढी *f.* [ BANKING UPON A POOR OR PETTY SCALE सांदोंतली सावकारी *f,* तुटपुंजी सावकारी *f,* बायाबापड्यांची सावकारी *f.* ] Bank'able *a.* पेढीवर ठेवण्यास लायक; as, B. securities.

*N. B.*—Strictly speaking, सराफी पेढी is a Bank of Exchange, ठेवपेढी is a Bank of Deposit, कोठी is a Treasury-House, सावकारी पेढी is a Bank that lends money. पाश्चात्य पद्धतीच्या पेढींत ह्या सर्व शाखा एकवटलेल्या असतात. खालीं दिलेल्या दोन वाक्यांत "सावकारी" शब्दाचे दोन निराळे अर्थ आहेत: १ ही पेढी सावकारी आहे, सरकारी नव्हे. २ त्या गांवांत मी सावकारी करतों.

Strictly speaking, सावकार is a money-lender, सराफ is a money-exchanger.

Bankrupt (bangk'rupt) [ Fr. *banque-route;* It. *banca rotta,* bench broken.] *a. insolvent* दिवाळें निघालेला, नादार, दारफळणीचा, धंद्यांत बुडालेला. २ *fig.* रहित (with *of*). B. *v. t.* [ R ] भिकेस लावणें, दिवाळें काढणें, लाहा घेणें. B. *n.* दिवाळ्या, दिवाळनिघा, सूर्यभक्त. [ Division of the money of a B. दामाशाई *f.* To become B. or a B. दिवाळें वाजणें-निघणें]. Bank'ruptcy *n.* नादारी *f,* दिवाळें *n,* दारफळणी *f,* भांगोरें *n.* To declare B. दिवाळें काढणें, शेणाचा दिवा लावणें (*idio.*), काखा *f. pl.* वर करणें (*idio.*).

Bank-swallow (bank-swal'ō) *n.* नदीच्या कांठीं घरटें करून राहणारी पाकोळी *f.* ही युरोप आणि अमेरिकेंत सांपडते.

Banlieue (ban'lū) [ Fr. *ban,* jurisdiction, and *lieue,* a league, a district of indeterminate extent.] *n. the legal limits* (of a city) कायदेशीर सीमा *f*- हद्द *f.*

Banner (ban'ėr) [ O. Fr. *banere,* cog. with *bindan,* to bind. ] *n. flag* निशाण *n,* झेंडा *m,* पताका *f,* बावटा *m,* केतु *m.* Ban'nered *a.* निशाण असलेला. Ban'nerol *n.* थडग्यावरचें लहान निशाण *n.*

Banneret (ban'ėr-et) [ Lit. *bannered.* ] *n.* स्वतःचे निशाणाखालीं स्वतःचे लढवय्ये नेणारा बॅरनपेक्षां कमी दर्जाचा सरदार *m.* (*). २ (अ) (लढाईतल्या पराक्रमाबद्दल दिलेली) बॅरन व नाईट यांच्या मधली पदवी *f.* (ब) अशी पदवी ज्यास आहे तो.

*N. B.*—असें स्वतंत्र सैन्य नेण्याचा अधिकार फक्त बॅरन पदवीच्या सरदारांना असे; परंतु पुढें हा अधिकार त्यांच्या खालच्या प्रतीच्या बॅनेरेट ह्या सरदारांना दिला होता.

Bannock (ban'nok) *n.* ओट धान्याची अगर जवाचे धान्याची पोळी-भाकर *f* (बिन आंववणाची).

Banns (banz) *n. pl.* vide Ban.

Banquet (bangk'wet) [ Fr. *banque,* a bench. The word banquet has reference to the table on which the feast is spread.] *n.* मेजवानी *f,* मिष्टान्नभोजन *n,* मिष्टान्नपानसमारंभ *m.* २ *fig.* रुचकर-मजेदार पदार्थ *m.* A Banquet of brine अश्रूंचा पूर-लोट. B. *v. t.* मेजवानी करणें-देणें. B. *v. i.* खाऊनपिऊन मजा मारणें. Banq'ueter, Banq'ueteer *n.* मेजवानी-मिष्टान्नपान देणारा-सेवन करणारा. Banqueting-house मिष्टान्नपानगृह *n.*

*N. B.*—Banquet, Feast, Carousal, Entertainment, आणि Treat ह्यांना योग्य मराठी प्रतिशब्द आम्ही Treat शब्दाखालीं देणार आहों.

Banquette ( bang-ket′ ) [ Fr. *banque*, a bench.] *n.* तटाच्या आंतील दरड *f.* ( दरडीवर उभें राहून तटावरून गोळीबार सोडण्याकरितां ). २ *archit.* पुलाच्या दोन्हीं बाजूंचा उंच पायरस्ता *m.* ३ खिडकीच्या आंतील कठडा *m.* ४ *the long low bench behind the driver in a French diligence or omnibus* गाडी हाकणाराच्या मागचें सखल बांक *n.*

Bantam ( ban′tam ) *n. a small variety of the domestic fowl* जावा बेटांतील बॅन्टम पक्ष्यासारखा लहान पक्षी *m.* B. *a.* बॅन्टम पक्ष्याएवढा लहान. २ नेटानें झोंबी खेळणारा. B. work एक प्रकारचें चितारी किंवा नकशी काम.

Banter (bant′ėr) *v. t.* थट्टा-मस्करी-उपहास करणें. B. *n.* (*no pl.*) उपहास *m*, विनोद *m*, थट्टा *f*, चेष्टा *f*, मस्करी *f*, उपहासपूर्वक थट्टा *f* ( now विनोदाची थट्टा ). Bant′erer *n.* थट्टा किंवा मस्करी करणारा. Bant′ering *n.* थट्टा किंवा मस्करी करणें. Bant′ery *a.* थट्टामस्करीचा. Bant′eringly *adv.*

Banting (bant′ing) *n.* मेदोघ्न आहार (सेवन करणें), फाजील मेदनाशक आहार; हा आहार श्वेतकल्कयुक्त ( albuminous ) पदार्थांचा असतो, व ह्याच्या पचनक्रियेसाठीं लागणारा कर्ब ( carbon ) शरीरांतील फाजील सांठलेल्या मेदापासून मिळतो व त्यामुळें शरीरांतील मेद कमी होतो. हें मत सध्यां चुकीचें ठरलें आहे. Bant′ingism *n.* बॅन्टिंगची मेदोघ्नाहारपद्धति. ही १८६३ सालीं विल्यम बॅन्टिंग् यानें लंडन येथील लोकांस कळविली.

Bantling ( bant′ling ) [ So called from the bands and swaddling clothes in which the child is wrapped; another derivation connects this word with German *bankling*, 'bastard' from *bank*, 'bench' *i. e.* a child begotten on a bench and not in the marriage-bed.] *n.* अर्भक *n*, लहान मूल *n*, (केव्हां केव्हां तुच्छतादर्शक ) पोरटें *n*, कारटें *n.* [ हा शब्द एकदा bastard या शब्दाशीं समानार्थक होता.]

Banyan, See Banian.

Baptise-ze ( bapt-īz′ ) [Gr. *baptein*, to dip in water.] *v. t.* जलसंस्कार करणें, जलसंस्कार करून खिस्ती धर्माची दीक्षा देणें, बाप्तिस्मा देणें, जलसंस्कारानें खिस्ती धर्मांत घेणें,खिस्ती धर्मदीक्षा देण्याकरितां यथाविधि स्नान घालणें. २ *fig.* ( यथाविधि ) शुद्ध करून घेणें, प्रथम दीक्षा देणें. Bapt′ism *n.* बाप्तिस्मा *m*, ( खिस्ती धर्मांतील ) प्रथम संस्कार *m*, ( खिस्ती धर्मदीक्षेचा ) जलसंस्कार *m.* २ शुद्धिविधिस्नान *n*, शुद्धिस्नानविधि *m.* Baptis′mal *a.* ( v. N.) बाप्तिस्म्याचा, बाप्तिस्म्याविषयींचा, धर्मनिवेशनार्थक -संबंधीं-विषयक. B. service ( खिस्ती धर्माची दीक्षा *f*, देतांना ) जलसंस्कारासंबंधीं उपासना *f*, जलसंस्कारोपासना *f.* २ जलमार्जनानें किंवा पाण्यांत बुडवून शुद्ध करण्याचा प्रकार *m*, जलसिंचनविधि *m*, जलशुद्धिविधि *m.* Baptis′mally *adv.* Bapt′ist *n.* बाप्तिस्मा देणारा-करणारा, खिस्तापूर्वीं झालेला जो जॉन त्यास हा शब्द लावितात. २ प्रौढबाप्तिस्मावादी *m*, लहान मुलांस 'बाप्तिस्मा देऊं नये' असें प्रतिपादणारा; ( *contr. of Anabaptist* )

Bap′tistery *n.* जलसंस्कारशाला *f*, बाप्तिस्मा करण्याची जागा *f*, जलसंस्कारस्थान *n.* हें स्थान देवळांतील एका भागांत असतें, किंवा त्याकरितां एखादें निराळें गृह बांधिलेलें असतें. Baptismal regeneration जलसंस्कारजन्य अंतःशुद्धि *f*, जलसंस्कारानें झालेली अंतःशुद्धि *f.* Baptism by desire मानसजलसंस्कार ( cf. मानसस्नान), खरा जलसंस्कार होण्यापूर्वीं जरी कोणी एखादा खिस्ती मेला तरी त्याच्या मनांत जलसंस्कार व्हावा अशी दृढ इच्छा असल्यामुळें खऱ्या जलसंस्काराचें त्याला फळ मिळतें (ही भावना). Baptism of blood खिस्ती धर्माकरितां प्राणत्याग *m.* Baptism of fire खिस्ती धर्माकरितां अग्नींत उडी टाकणें. २ *fig.* नवीन शिपायाला तोफेच्या माऱ्याचा पहिला अनुभव *m.* Name of baptism बाप्तिस्म्याचे वेळीं दिलेलें नांव *n*, बाप्तिस्म्यांतलें नांव ( cf. मुंजींतलें नांव ). Clinical baptism आजाऱ्यांचा-आतुरजलसंस्कार (आतुरसंन्यास ह्या शब्दाच्या धर्तीवर तयार केला आहे) *m.* Conditional or hypothetical baptism पूर्वीच्या बाप्तिस्म्याच्या संशयावरून पुन्हां दिलेला बाप्तिस्मा. Private baptism खासगी-घरगुती बाप्तिस्मा, ( देवळांत दिलेला नव्हे ). Baptis′tic *a.* See Baptismal. Baptiz′er *n.* बाप्तिस्मा देणारा. २ शुद्ध करून घेणारा. Baptiz′able *a.* बाप्तिस्मा देण्याजोगा.

*N. B.*—Baptism शब्दांत (१) जलसंस्कार करणें व (२) नवीन नांव देणें (नामकरण) ह्या दोन कल्पनांचा समावेश होतो. Greek *baptein* and Sk. गाहू, seem to be allied. Sk. ग् often interchanges with ब् of Greek.

Bar ( bär ) [ allied to Sk. द्वार, *dwar*, a door; Celtic *bar*, the top, a branch; Italian *barra*, a bolt.] *n. a piece of wood laid across* गज *m*, गजी *f*, अडवट *m*, अडवण *n*, गातडी *f*, अड्ड *m*, अट *f*, लाट (*) *f*, गवा(व्हा)ण or णी *f.* [PINNING WITH A B. ONE'S ARMS AND LEGS कोलदांडा *m.*]. २ (of a door) अडसर *m*, अर्गला *f.* (*pop.*) अर्ग (ग) ळ *f*, आडगळ *f*, आडखिळी *f*, अडणा *m*, अडणी *f*, अडणें *n*, खीळ *f*, अड्ड *m*, आडिंबा *m.* ३ *obstacle* अट *f*, अडती *f*, आड *f*, अटक *f*, आडकाठी *f*, अडथळा *m.* ४ ( of a harbour ) दांडा *m*, अळदांडा *m*, नक्त *n*, दांडी *f*, बांध *m*, ( नदीच्या मुखाशीं जमलेला ) चिखलाचा बांध *m*, सैकतक, मृत्तिकाबंध. ५ *exception* प्रतिबंध *m*, अड *f*, बांध *m.* ६ ( of a metal ) लगड *f*, कांब *f.* [ B. iron set round with rings गोरखचाळा *m*, गोरख सांखळी *f.* ] ७ ( of a window, railing, &c.) कठडा *m*, गज *m*, गराडा, गराद *f*, गराज *f.* ८ शेवटचा टप्पा *m*, मर्यादा *f*; as, To cross the bar. ९ *law* (कैद्यास उभा करण्याचा) पिंजरा *m*, कठड्याचा पिंजरा, न्यायासनासमोरची जागा *f.* १० (*a*) वकीलमंडळ *n*, सनदी वकिलांची मंडळी *f.* (*b*) वकिलांचा धंदा *m.* ११ अदालत *f*, कोर्ट *n*, न्यायसभा *f.*; as, The bar of public opinion. १२ गुत्त्यांत किंवा फराळाचे दुकानांत गिऱ्हाइकाकरितां केलेली कठड्याची जागा *f.* १३ (परवान्यानें चालविलेलें) खानपानालय *n*, ह्यांत दारू व मांस मिळतें. १४ *mus.* (*a*) गायनतालाचें आवर्तन *n*, आवर्त *n.* (*b*) गायन

लिपींत आवर्त्तन दाखविणारें चिन्ह *n*-कला *f.* १५ घोड्याच्या खुरावरच्या आवाळूभोंवतालचा भाग *m*.१६ अरुंद पण फार लांब अशी पट्टी. Bar *v. t. close and secure with a bar* अडसर *m*-अर्गळ [R] *f*- अगळ [R] *f. m*-आडिंबा *m*-&c. घालणें-लावणें-सारणें or घालून बंद करणें. २ *oppose, obstruct* अटकावणें, अडविणें, अवरोधणें, अटकाव *m*-हरकत *f*- करणें, अट *f*- आड *f*- घालणें, आड येणें. ३ गज लावणें. ४ प्रतिबंध *m*. करणें, वर्जणें, अपवादानें वर्ज करणें. Barred *pa. p.* Bar'ring *pr. p.* Bar of iron लोखंडी गज *m* (to punch rocks), पहार *f*, पारई(य) *f.* Bar'-ī'ron लोखंडाच्या कांबी *f. pl.* Bar'-maid *n.* (इंग्रजी लोकांच्या) खाणावळींतील नोकरीण-दासी *f*, पानपात्रवाहिनी (cf. तांबूलकरंकवाहिनी). Bar-room *n.* पानभोजनालय, खानपानालय. येथें दारू व भोजन मिळतें. Bar-shot *n.* 'डंम्बेलचे' आकारासारखा तोफेचा मोठा गोळा *m*. याचा आरमारावरील डोलकाठ्या वगैरेंचा नाश करण्याकडे उपयोग करतात. Bar of capstan अढें (?) *n*, मूठ *f.* To pass the B., To appear at the B. खालील कोडताकडून वरील कोडताकडे चौकशीस शिस्तवार पाठविणें. To be called to the Bar बारिस्टरची सनद मिळणें. To be called within the B. सरकारी वकील (King's Counsel) नेमला जाणें. Case at B. *law.* कोर्टांत चालू असलेला मुकदमा *m*. In B. of-च्या विरुद्ध हरकत किंवा मनाई करणारा. Plea in B. *law.* ज्या तकरारीनें वादी निखालस हरला जातो (वा) ती तकरार *f*; ही तकरार प्रतिवादी आणतो. Trial at B. वरिष्ठ कोर्टांत चार न्यायाधिशांपुढें होणारी चौकशी *f* (महत्वाच्या खटल्याची). The prisoner at the B. पिंजऱ्यांत उभा केलेला कैदी-गुन्हेगार *m*.

*N. B.*—सध्यां लाट हा शब्द Cylindrical bar ह्या अर्थी वापरतात; जसें, घाण्याची लाट.

Barb (bärb) [L. *barba*, a beard.] *n. beard* दाढी *f*, तिच्या सारखा दिसणारा पदार्थ *m*. २ (of an arrow) बाणाचें अगर गळाचें टोंक *n*, कांटा *m*, उलट(टा)कांटा *m*, आंकडा *m*. ३ कांहीं माशांच्या तोंडाजवळ लोंबणारें दाढीसारखें मांस *n*. ४ (of grain, grasses, &c.) कुसूं *n*, कूंस *n*, कांटा *m*, भुसी *f*, भूस *f.* ५ बाणाच्या शेवटाचा झुबका *m*. B. *v. t.* आंकडा *m*- उलट कांटा *m*- लावणें-घालणें. Barb'ate *a. bot.* नरम केंसाच्या आच्छादनाचें (पान); as, तुळशीचें पान *n*. Barb'ated, Barbed *a.* आंकडेदार, आंकड्याचा. २ कर्णाचा, सकर्ण, गळाचा. Barbed wire कांटेरी तार, कांटेरी विणीची तार. Barb'ellate *a. bot.* रांठ केंस असलेले.

Barb (bärb) *n.* चपळ, पाणीदार व कंटक असा बार्बरी देशांतील घोडा *m*.

Barb (bärb) *n.* (*obs.*) घोड्याची पाखर *f.* B. *v. t.* पाखर घालणें. Barbed *a.* पाखर घातलेला, पाखरेचा.

Barbacan (bär'ba-kan) [Fr. *barbacane*, a gateway.] *n. fort.* नगर किंवा किल्ला यांचे रक्षणार्थ बांधलेला पहारे बसण्याचा बुरूज *m*, नगर-किल्ला-रक्षक बुरूज *m*. २ (*obs.*) (किल्ल्यांतून शत्रूवर गोळीबार सोडण्याकरितां) तटांतील खिंड *f.*

*N. B.*—Barbacan शब्दांत मुख्यत: बचावा(defence)ची कल्पना आहे.

Barbadoes Tar (bär-bā'dōz tär) *n.* बार्बाडोझचें डामर *n*.

Barbarous (bär'bar-us) [Gr. *barbaros*, foreign. ह्याचा मूळ संबंध L. *balbus*, तोतरा ह्या शब्दाशीं असावा. ह्या शब्दाचा मूळ अर्थ कसा बदलत गेला हें जाणणें अतिशय महत्वाचें आहे. ग्रीक भाषेंत १ परकी, २ हेलसच्या बाहेरचा, ३ परकी देशचा, ४ रानटी, ५ क्रूर असे Barbarous शब्दाचे निरनिराळे अर्थ होत गेले. प्राचीन रोमन भाषेंत १ ग्रीक नाहीं किंवा लॅटीन नाहीं असा,२ रोमन राष्ट्राच्या बाहेरचा, ३ विद्याचारहीन-अशिक्षित असे अर्थ होत गेले. Barbarous ह्याचा 'ख्रिस्ती नाहीं' असा एके काळीं अर्थ होता. सध्यां रानटी, अडाणी, निर्दय, अ-मानुष असे इंग्रजी भाषेंत चालू अर्थ आहेत.] *a.* (of language) *unpolished, without literary culture, pertaining to an illiterate people* हेंगाडी or हेंगडी, धनगरी (भाषा), रानटी, जंगली, असंस्कृत, अपशब्दांची, अपप्रयोगांची, तारवटी, कानडी, गव्हार, अडाणी, अडाणी लोकांची. २ (of people) *uncivilised, savage* रानटी, रानवट, जंगली, अशिक्षित, विद्याचारशून्य, विद्याचाररहित, विद्याचारहीन. ३ म्लेंच्छासंबंधीं, हेंगाडा, हेंगडा, कानडा. ४ क्रूर, निर्दय, दयाहीन, मांगहृदयी. ५ रानटी लोकांच्या भाषेसारखा, गोंगाटाचा. Bar'baresque *a.* बार्बरी देशाचा. २ रानटीपणाचा, अडाणी, अशिक्षित. Barbār'ian *n. a savage* रानटी-रानवट-जंगली-&c.-माणूस *c*, रानमनुष्य *c*, म्लेंच्छ *c*, बरबर *c*, पुलिंद *c*, यवन *m*, अडाण जात *f*, अरवूज जात *f.* २ *fig. cruel person* मांग हृदयाचा माणूस *m*, राक्षस *m*, यम *m*, महार *m*, मांग *m*, *fig.* खाटीक *m*, कसाई *m*, *fig.* पाषाणहृदयी, दुरात्मा *m*, प्रकृतिदुष्ट. [प्राचीन ग्रीक लोक आपल्याशिवाय इतर लोकांना Barbarians ह्मणत असत]. Barbar'ic *a.* ओबडधोबड. २ परकीय. ३ रानटी, असभ्य, गैररिवाजाचा. Barbarisā'tion *n.* Bar'barise *v. t.* रानटी करणें. २ खोटा पाडणें, नीच-हीन करणें (as a language). B. *v. i.* रानटी होणें-असणें. Bar'barism *n.* भाषेचा किंवा व्याकरणाचा अशुद्ध प्रयोग *m*, असंस्कृत प्रयोग *m*, अपप्रयोग *m*, कानडें *n*, (of language) प्रयोगाची अशुद्धता *f*, प्रयोगाशुद्धता *f.* २ आडदांडपणा *m*, रानवटपणा *m*, रानटीपणा *m*, अशिक्षित स्थिति *f*, आचारशून्यता *f*, अनाचारता (?) *f*, निरक्षरता *f*, विद्याचारहीनता *f*, विद्याचाररहित *n*. Barbar'ity *n.* क्रूरता *f*, क्रौर्य *n*, निर्दयता *f*, निर्दयपणा *m*, स्वभावदुष्टता *f.* २ हेंगाडेपणा *m*, रानटीपणा *m*. Bar'barously *adv.* (v. A. 4.) क्रूरतेनें, निर्दयतेनें. २ (v. A. 1.) हेंगाडे रीतीनें, हेंगाडे बोलीनें, अपप्रयोगपूर्वक, रानटीपणानें. Bar'barousness *n.* See Barbarous.

*N. B.*—ज्याप्रमाणें प्राचीन काळीं ग्रीकलोक आपण जिंकलेल्या लोकांना किंवा इतर राष्ट्रांतील लोकांना Barbarians (रानटी) म्हणत असत त्याचप्रमाणें पूर्वी आर्यलोक म्लेंच्छ, बर्बर, पुलिंद

आणि यवन ह्या लोकांना Barbarians (अनार्य) म्हणत असावेत. म्हणून Barbarian शब्दाला म्लेंच्छ, वर्बर, पुलिंद हे शब्द योजिले आहेत. रानटीपणाची कल्पना ह्या शब्दाच्या मुळांत नाहीं.

Barbary (bär'bar-i) *n.* बार्बरी देशांतील घोडा *m.*

Barbe (bärb') *n.* घोड्याची छाती व बाजू रक्षण करणारें चिलखत *n.* Barbed *a.*

Barbel (bärb'el) [L. *barba*, a beard.] *n.* दाढी असलेला गोड्या पाण्यांतील मासा *m.* ह्याला तोंडाजवळ दाढीसारखे चार मांसाचे लांब झुबके असतात. २ मांसाची मिशी *f.* (केंसाची नव्हे). Bar'bellate *a.*

Barber (bärb'ėr) [L. *barba*, a beard.] *n.* न्हावी or नाहवी *m*, नापित (?) *m*, नापिक *m*, हजाम *m*, कारागीर *m*, वारीक (R) *m*, दिवाकीर्त्ति (R) *pop.* दीवाकीर्त्त (R) *m.* [(In contempt) डोईचा *m*, नाहवगंड *n*, *m*, न्हावगंड *m*, तृणशत्रु *m.* Business of a B. हजामत *f.* Bag or Razor case of a B. धोकटी or धोंकटी *f.* Shop of a B. वारीकवाडा *m*, नापितशाला *f*, न्हाव्याचें श्मश्रुगृह *n.* Strap of a B. चटपटणें, चामड्याचें लटपटणें-थापटणें *n.* Terms of courtesy prefixed to the name of a B. महाला or महाल्या or महाली or माली. Vessel of a B. (holding shaving-water) तांबोटी *f.*] २ *fig. curtailer* छाटून टाकणारा; as, An excellent barber of prayers. Barber *v. t.* श्मश्रू करणें, हजामत करणें. Barber's block *n.* (केंसांचे) टोप करण्याचा वाटोळा ठोकळा *m*, न्हाव्याचा ठोकळा *m.* Barber-monger *n.* (न्हाव्यानें) केंस कापून सजलेला मनुष्य *m*, छानछोकी *m*, सदोदित हजामत करून घेणारा. Barber's pole *n.* न्हाव्याचें निशाण *n* (तांबड्या काळ्या पट्ट्यांचें), ह्यावरून न्हावी येथें राहतो असें कळतें. Barber-surgeon *n.* हजामत करणारा व तुंबडीनें रक्त काढणारा किंवा दांत काढणारा न्हावी *m*, न्हावी वैदू *m.*

Barberry (bär'ber-i) [Barberry is borrowed from Ar. *barbaris.*] *n. bot.* एक प्रकारचें कांटेरी झाड *n.* हें आमच्याकडील दारूहळदीसारखें दिसतें, या झाडाला पिवळीं फुलें व तांबडीं फळें येतात. Indian B. दारूहळद *f.*

Barbet (bär'bet) [Fr.-L. *barba*, a beard.] *n.* एक जातीचा लांब कुरळ केंसांचा लहान कुत्रा *m*, कुलंगी कुत्रा *m.* २ एक कोकिळेसारखा पक्षी *m.* (हा उष्णकटिबंधांत सांपडतो).

Barbican (bär'bi-kan) *n.* See Barbacan.

Barbule (bärb'ūl) [L. *barbula*, a small beard.] *n.* लहानशा दाढीसारखें आलेलें मांस *n.* २ लहानसें कूंस *n.*

Bard (Bärd) *n. a poet* and *singer* भाट *m*, बंदी *m*, वंदिजन *m*, मागध *m*, पोवाडे गाणारा (?), वैतालिक, स्तुतिपाठक *m*, चारण *m.* २ कवि *m.* Barded *a.* Bard'ic *a.* भाटासंबंधीं, भाटाच्या पोवाड्यासंबंधीं. Bard'ling, Bard'let *n.* अल्पबुद्धीचा कवि *m*-भाट *m.* Bard'craft *n.* भाटाचें कौशल्य *n.* Bard'ism *n.* भाटाची विद्या-च्या ह्याणी *f.* Bard'ship *n.* भाटपणा *m.* Bard'ish *a.*

*N. B.*—A bard is a superior person to a ballad-maker or a ballad-singer पोवाडे करणारा किंवा पोवाडे गाणारा.

Bare (bār) [A. S. *bær.*] *a. nude, uncovered* उघडा, नागवा, खुला, बोडका, नग्न, दिगंबर, अवस्त्र, वस्त्रहीन, आच्छादन-रहित-हीन-शून्य-&c. २ (a tree or plant) निपानी, सडसडीत, खडखडीत, खडलेला, निष्पर्ण, निष्पत्र, खरांटलेला, खरांट. ३ *nude, plain, unadorned, bold* भुंडा, बोडका, ओंका, साधा, शून्य *pop.* सुना, सुनका, लकलकीत, लक्क, लकीलक्क, रंडका or रांडका, अभूषित, भूषणरहित-हीन-&c. ४ *mere* निखालस, नुस्ता, निस्ता, केवळ; as, B. supposition शुद्ध कल्पना. ५ रिकामा, रिता, विरहित (B. of money). ६ जीर्ण झालेला. ७ निःशस्त्र, शस्त्र-हीन-विरहित. B. *v. t. to make bare or naked* बोडका-उघडा-नागवा-बुचा-सुना-&c. करणें, बोडकावणें. २ *fig. to disclose, to reveal* उघड करणें. Bare'backed *a.* उघड्या पाठीचा, बिगरखोगीर, उपलाणीं. To ride (upon horse) B. जिनाशिवाय घोड्यावर बसणें, मोकळ्या पाठीवर बसणें, उपलाणीं बसणें. Bare'bone *n.* जरत्कारू *c*, सुदामदेव *m*, शुकस्वामी *m*, पाप्यांचा पितर *m*, अस्थिपंजर *m*, सांपळा *m.* [To become or be a mere B. सांपळा *m.* वळणें-राहणें *g. of s.*] Bare'boned *a.* हाडक्या, हाडगळ, हाडळ, हाडकुळा. Bare'faced *a.* उघड्या तोंडाचा, बिनमुखवट्याचा, अनावृतमुख, अनाच्छादितमुख. २ निर्लज्ज, निलाजरा, निश्शंक, उघड्या माथ्याचा, उजागीर, निर्धास्त, धिटाईचा; as, A B. robbery. Bare'facedly *adv.* (v. A. 1.) उघड्या तोंडानें, निलाजरेपणानें, उघडपणानें, उघड्या माथ्यानें, उजागरीनें. Bare'facedness *n.* Bare'foot,-ed *a.* अन(ण)वाणी, अणव्या पायांचा, पादत्राणरहित-शून्य. Bare'-foot *adv.* अनवाणी, अणव्या पायानें, उघड्या पायानें, मोकळ्या पायानें. Bare'headed *a.* बोडका, उघड्या डोईचा, शिरोवेष्टनरहित-हीन. २ (प्रणामपूर्वक) टोपी काढलेला. Bare'legged *a.* उघड्या मांडीचा. Bare'ly *adv.* (v. A. 1.) उघडेपणानें, नागवेपणानें. २ फक्त, मात्र, केवळ, निवळ, निखालस. Bare'ness *n.* (v. A. 1.) नागवेपणा *m*, खुलेपणा *m*, बोडकेपणा *m*, &c., आच्छादनराहित्य *n.* २ निष्पर्णत्व *n*, निष्पत्रता *f.* ३ बुचेपणा *m*, बोडकेपणा *m*, ओकेपणा *m*, साधेपणा *m*, &c. भूषणराहित्य *n.* ४ कंगाली *f*, गरीबी *f.*

Bargain (bär'gin) [O. Fr. *bargaigner*, to chaffer.] *n. contract* सौदा *m*, बोली (?) *f*, करार (?) *m*, साटें *n*, पैज (?) *f*, होड (?) *f*, व्यापार *m*, कबुलायत *f.* २ सौदा, सौद्याची वस्तु *f*-चीज *f.* ३ सवंगसौदा, किफायतीचा सट्टा *m*, घोबें *n.* B. *v. t.* विकणें, मोबदला घेऊन देणें (followed by *away*). B. *v. i. make contract for* खंडून घेणें, खंडणूक *f.* खंड *m.* करणें-ठरवणें, बोली *f.* करणें-ठरवणें, पैज (?) *f.* मारणें, सौदा-सट्टा करणें. २ *chaffer in settling a price (obs.)* घासाघास *f*-घासाघीस *f*-घासघीस *f*-घिसघीस *f*-खाराखीर *f*-&c. करणें. ३ मोबदला घेऊन विकणें (with *for*). ४ सट्टे करून गमविणें (with *away*). Bar'gainee *n.* सौदा पतकरणारा *m.* Bar'-gainer, Bar'gainor *n.* सौदा ठरवणारा-करणारा. To make the best of a bad B. वाईट परिस्थितीचा होतां

होईल तितका फायदा करून घेणें, संकटाचा किंवा अडचणीचा फायदेशीर उपयोग करणें, cf. कोंड्याचा मांडा करणें. To sell any one a B. (*shakes.*) एखाद्याला मूर्ख बनविणें-करणें, फजित करणें, भोंदणें, झकवणें.

N. B.—Bargain, सौदा. Agreement, (*law*) कबुलायत, संकेत. Contract, (*law*) (दोघांमधील) करार, मक्ता; as, in contractor. Covenant, एका विशिष्ट कृत्यासंबंधानें केलेला करार. Compact, पुष्कळांतील करार, समवायी करार, जुटीमधील करार.

Bargain ह्या शब्दांत (१) ठराव किंवा करार, (२) अदलाबदल आणि (३) स्वस्तपणा ह्या तीन कल्पनांचा समावेश होतो. Into the bargain वर, शिवाय, आणखी. To strike a bargain सौदा ठरविणें.

Barge (bärj) [L. *baris*, a flat Egyptian row-boat.] *n.* क्रीडानौका *f*, बरकीण *f.* २ पडाव *m.* ३ बाज्या *m.* Bar'gee *n.* same as Bargeman. Barge'man *n.* क्रीडानौका चालविणाऱ्या खलाशांपैकीं एक, क्रीडानौकेवरील खलाशांचा मुख्य *m.* Barge'-mas'ter *n.* क्रीडानौकेचा मालक *m.*

Bargeboard ( barj'-bōrd ) [ This barge may be connected with low L. *bargus*, a gallows or a corruption of verge-board. ] *n.* पाऊस आंत येऊं नये ह्मणून व वांसे झांकून टाकण्याकरितां चांदईच्या कड्यानें लावलेला फलाट किंवा फळी *f*, चांदईची दर्शनपट्टी *f*, पानपट्टी *f.*

Bargecourse ( barj'-kōrs ) *n.* वाशांच्या पुढें आलेली कौलांची पाळी *f.*

Barium ( bā'ri-um ) [Gr. *baros*, heavy. Sk. भार *bhar*, weight. ] *n. chem.* बेरिअम, ह्याला "भार" हें नांव योजिलें आहे. ही धातु आहे व ही रुप्यासारखी पांढरी असते. हिची संक्षिप्त संज्ञा Ba. हिचा अणुभारांक किंवा विशिष्टगुरुत्व १३७.

Bark (bärk) *n.* साल *f dim.* सालपट *n*, चामडें *n*, चर्म *n*, त्वचा *f.* [INNER B. अंतःसाल *f*, वल्कल *n*, अंतस्त्वचा *f.* OUTER B. उपरसाल *f.* ] २ झाडाची औषधी साल *f.* ३ (कोणत्याहि वस्तूचें) बाहेरील वेष्टन *n*, बाह्यवेष्टन *n.* Bark used as a material in dyeing रंगाची साल. B. *v. t.* त्वचा *f-* साल *f-*काढणें-सोलणें, साळणें (R.), ओंसणें, छिलणें. २ (कातडी) घासणें. ३ (चामडें) सालीनें रंगवणें. Bark'bed *n.* सालीचा कडक बिछाना *m.* Bark'en *v. t.* सुकवून सालीसारखा करणें. B. *v. i.* सालीसारखा होणें. Bark'er *n.* झाडाच्या साली काढणारा. Bark'ery *n.* साली ठेवण्याची जागा *f.* २ कातडें कमविण्याचा कारखाना *m*, (चामड्यावर विशिष्ट झाडांच्या सालींच्या रसाचा संस्कार केल्यानें तें कमावलें जातें). Bark'less *a.* बिनसालीचा, सालीविरहित. Bark'y *a.* सालीसहित, सालीचा. Cinchona, Peruvian bark चिंकोनाची साल *f*, ह्यापासून कोयनेल (quinine) काढतात.

Bark (bärk) [A. S. *beorcan*, prob. a variety of *brecan*, to crack, snap. ] *n. cry of the dog, wolf,* &c. भोंक *f*, भोंकणी *f*, श्वनाद *m.* B. *v. i. yelp like a dog* भुंकणें, भोंकणें, भुंकण्यासारखा स्वर काढणें, श्वनाद *m.* करणें. Barking dogs seldom bite. Cf. Marathi idiom गर्जेल (ढग) तो पडेल काय; cf. बोलेल (मनुष्य) तो करील काय? His bark is worse than his bite तो कृतीपेक्षां बडबडीनें जास्त नुकसान करतो. To B. at the Moon मोठ्या लोकांवर व्यर्थ तोंड सोडणें. Bark'er *n.* भुंकणारें (जनावर). २ बडबड्या, वटवट करणारा. ३ दुकानापुढें ओरडत राहणारा (जिन्नस विकत घेण्यासाठीं लोकांचें मन वळविण्याकरितां). Bark'ing *n.* (v. V. I.)—*act.* भोंकणें *n*, भुंकणें *n*, भोंकणी *f.*

Bark ( bärk ) See Barque.

Barker's mill ( bärk'ėrz mil ) *n.* एक प्रकारचें पाण्यानें फिरणारें यंत्र *n*, बार्करानें शोधून काढलेली गिरण *f.*

Barley ( bär'li ) [A. S. *bere*, barley, *leac*, a plant.] *n.* जव *m*, *n*, यव *m*, सातू *m*, सक्तु *m.* Barley-bread *n.* जवांची भाकर *f*; ही फार पौष्टिक असते. Barley-bree,-broth *n.* यवाची फार अमली दारू *f.* Barley-brake or Barley-break *n.* बार्ली धान्यानें खेळण्याचा जुन्या तऱ्हेचा खेळ *m.* Barley-corn *n.* जवाचा-सातूचा एक दाणा *m.* [GOLDEN B. (AS USED IN BRACELETS, &c.) जवा *m.* NOW जव *m.* BARLEY PRODUCING MALT LIQUOR IS PERSONIFIED AS SIR JOHN BARLEY-CORN]. २ इंचाचा तिसरा हिस्सा *m.* [MEASURE OF EIGHT BARLEY-CORNS LAID SIDE BY SIDE अंगुळ *pop.* अंगूळ *n.* EXCEEDING BY A BARLEY-CORN जवा आगळा]. Barley-sugar *n.* जवाच्या काढ्यांत तयार केलेली खडीसाखर *f.* Barley-water *n. med.* यवाचा काढा *m*, यवक्काथ *m*, यवाचें-सातूंचें काट *n.* Pearl-barley मोत्यांसारखे वाटोळे यवाचे दाणे *m. pl.* Pot-barley *n.* वरचीं सालें काढून टाकलेले-बिनसालाचे सातू-यव *m. pl.* यांची दारू करितात.

*N. B.*—Barley is an English product and is the nearest approach to our यव or सातू. Indian barley is the correct expression for our जव or सातू.

Barm ( bärm ) [ A. S. *beorma*, cf. L. *fermentum*, yeast. ] *n.* फेनयुक्त सुरामंड *m*, सातूच्या दारूवरील फेंसाळ साय *f* (हिचा पावांत मोहनासारखा उपयोग करतात), कारोत्तम (S.) *m*, कारोत्तर (S.) *m*, यवमंड *m.* Barm'y *a.* सुरामंडाचा-सारखा. २ (बीरप्रमाणें) फेंसाळ. Barm'y-brained *a.* चंचलबुद्धीचा, उडाणटप्पू, उनाड.

Barmecide ( bär'me-sīd ) [ बार्मेसाइड नांवाच्या राजपुत्रानें एका भिकाऱ्याला रिकाम्या ताटांत दिलेली नकली-खोटी मेजवानी. ] *n.* नकली मेजवानी देणारा *m*, खोटे फायदे दाखविणारा *m.* Bar'mecide feast नकली-खोटी-मायावी-मेजवानी *f.* Bar'mecide or Barmeci'dal *a.* नकली, काल्पनिक, अशाश्वत, अवास्तविक (S).

Barn ( bärn ) [ A. S. *bern*, contracted from *bere-ern*, *bere*, barley, *ern*, a house. ] *n. a house for storing grain*, कोठार *m*, मागर *n.* २ used *contemptuously* घोडवळ *f*, दांडसाळ *f*, दांडळ *f*, मागरघर *n.* B. *v. t.* कोठारांत सांठविणें. Barn'door *n.* (*cricket*) *a player*

*that blocks every ball* सर्व चेंडू आडविणारा (खेळगडी), फार वाकबगार बॅटवाला. Barn'-yard *n.* कोठाराभोंवतालचा कूड.

Barnacle ( bär'na-kl ) *n. a species of wild goose found in the Arctic seas* एक प्रकारचा पाण्यांतील हंसासारखा प्राणी *m.* २ *a conical shell-fish found in the sea* खुबा *dim.* खुबी *f*, खुबडी *f.*

Barnacle ( bär'na-kl ) *n.* काजगी *f*, काजा *m*, घोड्याला नाल वगैरे मारतांना त्यानें हालूं नये ह्मणून नाकावर घालतात तें, कांटेरी मुंगा. २ *pl.* ( *colloq.* ) चष्मा *m* (probably from their pinching the nose ).

Barograph ( bar'o-graf ) [Gr. *baros*, weight, & *graphein*, to write.] *n. a self-registering barometer* भारलेखक *n*, स्वयंलेखक भारमापक *n*.

Barometer (bar-om'et-ér) [ Gr. *baros*, weight, & *metron*, measure.] *n. phys.* भारमापक यंत्र *n.* २ (हवेचा) भार (pressure) मोजण्याचें यंत्र *n.* यानें हवेचा भार किंवा दाब कोणत्या वेळीं किती आहे तो कळतो, वायुगुरुत्वज्ञापक यंत्र (*obs.*) *n.* Barometrical observation भारमापकी माप *n*, भारमापकानें घेतलेलें माप *n.* Barometrical pressure भारमापकानें दाखविलेला हवेचा दाब *m*, भारमापकी-भारमापकीय दाब *m.* Aneroid B. अप्रवाही भारमापक, अनार्द्रभारमापक, द्रवहीन भारमापक. [लोकांनीं अप्रवाही भारमापक हाच शब्द प्रचारांत आणावा.] Cistern B. कुंडभारमापक, हौदभारमापक. Marine B. सामुद्रीय भारमापक. Mountain B. पर्वतीभारमापक *n* (उंची मोजण्याचें). हें प्रवासांत बाळगण्यासारखें असून त्याला आधारास्तव तिवई असते व याची मापनसूची (scale) बरीच लांब असते. Siphon B. भारमापक वांकडी नळी *f.* ही नळी आंकड्यासारखी असून तिचें लंबाग्र (लंब) बंद असतें. लंबभागांत पारा असतो, व त्याची उंची वातावरणाचा भार (दाब) दाखविते. Weight B. गुरुत्वभारमापक. Wheel B. चक्राधारचक्रीभारमापक. Baromet'ric, Baromet'rical *a.* भारमापकानें दाखविलेला, भारमापकी, भारमापकीय, भारमापकाचा. Baromet'rically *adv.* Barometrograph *n.* same as Barograph. Barom'etry *n.* भारमिति *f*, भारमापनशास्त्र *n*.

Baron ( bar'on ) [व्युत्पत्ति अनिश्चित. परंतु हा शब्द L. *baro* पासून Fr. *baron* च्या द्वारें इंग्रजींत नॉर्मन फ्रेंच लोकांचे वेळीं आला असावा. L. *baro*, ह्याचा अर्थ पुरुषमनुष्य असा आहे. त्यावरून *baron* ह्याचे (१) the king's man राजपुरुष, (२) राजापासून लष्करी कामाबद्दल जहागिरी मिळालेला मनुष्य *m*, (३) गुलाम नव्हे असा मनुष्य असे अर्थ झाले असावे असें एक मत आहे.] *n.* राजापासून किंवा इतर वरिष्ठ अधिकाऱ्यापासून लष्करी नोकरीबद्दल जमीन ज्यानें मिळविली आहे असा, जहागिरदार सरदार *m.* 'बॅरन,' कनिष्ठ प्रतीचा उमराव *m*, न्हायकाउन्टाच्या खालच्या मानाचा उमराव *m.* [Barons by tenure राजापासून मिळविलेली जमीन असणारे सरदार, जहागिरदार सरदार. Barons by writ सनदेनें सरदारीचे हक्क मिळालेले सरदार *m*, सनदी सरदार *m*-उमराव *m.*] २ ब्रिटनमध्यें कोणताहि सनदी हक्क नसलेला परदेशी उमराव; as, Baron Rothschild. ३ एक्सचेकरच्या कोडतांमधील न्यायाधीश *m.* ४ *heraldry* नवरा *m.* Bar'onage *n.* बॅरनमंडळी, कनिष्ठ सरदारांचा वर्ग *m.* Bar'oness *n.* सरदाराची बायको *f*, सरदाराचे हक्क असलेली स्त्री *f.* Bar'ony *n.* सरदाराची-उमरावाची पदवी *f*-अधिकार *m*-जहागीर *f*-प्रांत *m.*

*N. B.*—जसे इंग्रजींत रावसाहेब, राववहादूर, खानसाहेब, खानबहादूर, श्रीमंत, इनामदार, जहागिरदार इत्यादि पदवींदर्शक शब्द कायम ठेविले आहेत तसेच आपण मराठींत बॅरन, बॅरोनेट, ड्यूक, अर्ल, नाईट हे शब्द कायम ठेवावे.

Baronet (bar'on-et) *n.* बॅरनच्या खालच्या प्रतीचा उमराव *m*, (Knight) नाइटपेक्षां (Baronet) बॅरोनेट हा श्रेष्ठ आहे व बॅरोनेटपेक्षां बॅरन हा श्रेष्ठ आहे. बॅरोनेट ही पदवी वंशपरंपरागत असते, व ही पहिल्या जेम्स राजानें इ. स. १६११ त निर्माण केली. Bar'onetage *n.* बॅरोनेट मंडळी, बॅरोनेटाचा दर्जा *m*, बॅरोनेटाची पदवी *f*, बॅरोनेटाचें पद *n.* Bar'onetcy *n.* बॅरोनेटाचा अधिकार *m*-पदवी *f*, बॅरोनेटाची सनद *f.* Baronet'ical *a.*

*N. B.*—इंग्लंडांतील निरनिराळ्या उमरावांच्या अधिकाराची व योग्यतेची विस्तृत माहिती आह्मी Lord शब्दाखालीं देणार आहों.

Baroscope ( bar'ō-skōp ) [ Gr. *baros*, Sk. भार, weight, & *skopein*, to see.] *n. phys.* (हवेचें) भारदर्शक *n.* Baroscop'ic,-al *a.* भारदर्शकासंबंधीं, भारदर्शकानें दाखविलेला.

Barouche ( ba-rōōsh' ) [ Ger. *barutsche*; L. *bis*, Sk. द्विः, double, and *rota*, a wheel. ] *n.* पडत्या झांकणाची चौचाकी गाडी *f.* ह्या गाडीचें झांकण पाडतां येतें, हिच्यांत चार मनुष्यें बसतात व हांकणारा बसण्याची जागा निराळी असते, बारुश.

*N. B.*—लॅटिन rota, आणि संस्कृत 'रथ' ह्यांचा व्युत्पत्त्युगम एकच असावा असें वाटतें.

Barque, Bark ( bärk ) [ Bark is the English spelling of Fr. *Barque*, a little ship. Late L. *barca*, a sort of ship or large boat. ] *n.* लहान जहाज *n*, गलबत *n*, बारकस *n.* सध्यां हा शब्द जहाज ह्या सामान्य अर्थीं वापरतात. Bar'quentine, Bar'kantine *n.* तीन डोलकाठ्यांचें एक प्रकारचें गलबत *n*.

Barrack ( bar'ak ) [ Fr. *baraque*, It. *baracca*, Sp. *barraca*, a soldier's tent. ] (gener. used in the *pl.* rarely in the *singular.*) *n. mil.* लष्करी शिपायांची चाळ *f*, 'बॅरॅक,' अलंग *f.* २ *a temporary hut or cabin* थोडे दिवस राहण्याकरितां बांधलेलें घर *n.* ३ एकाच वर्गाच्या मजूरदार लोकांची चाळ *f.*; as, The barracks of mill-hands. B. *v. i.* चाळींत राहणें. B. *v. t.* लष्करी शिपाई राहण्याकरितां चाळ बांधणें. २ बराकींत ठेवणें. B.-master *n.* बराकीवर देखरेख करणारा कामगार *m*, बराकमास्तर *m.*

Barracoon ( bar'a-kōōn ) *n. a depôt for slaves* गुलामांचें संग्रह-क्रयविक्रय-स्थान *n*.

Barrator ( bar-āt'or ) [ O. Fr. *barat*, deceit, fraud. ] *n. law.* कायद्याच्या कोडतांत वारंवार फिर्यादी आणणारा, लोकांस एकमेकांविरुद्ध भांडावयास लावणारा, खोटे तंटे उपस्थित करणारा. २ लांच खाणारा न्यायाधीश. ३ गलबतावरच्या मालांत वारंवार अफरातफर करणारा. Bar'ratrous *a.* Bar'ratrously *adv.* Bar'ratry *n. law.* दावा आणण्यास व कज्जा करण्यास उत्तेजन देणें *n.* २ गलबताच्या मालांत अफरातफर करणें *n.* ३ *scot's law* न्यायाधिशानें लांच घेऊन खोटा निकाल देणें.

Barrel (bar'el) [perhaps from Late L. *bara*, bar, pale; from the staves of it.] *n.* पीप *n*, पिंप *n.* २ पिंपभर माप *n*, पिंप *n.* ३ पिंपासारखी लांब पोकळी-नलिका *f.* as, The B. of a gun, B. of a watch, B. of a boiler, B. of the ear. B. *v. t.* पिंपांत घालणें-भरणें-ठेवणें. B.-bulk *n.* पांच घनफुटांचें माप *n.* Bar'reled *a.* Bar'relled *a.* नळीची, नळी असलेली; as, A double B. gun दोन नळयांची-जोडनळीची बंदुक *f.* Bar'rel-bellied-stomached *a.* पिपासारख्या पोटाचा. Bar'rel-fever *n.* अतिशय दारू पिण्यामुळें होणारा रोग *m.*

Barren ( bar'en ) [ O. Fr. *brehaigne* or *baraigne*, unfruitful. ] *a.* वंध्य *pop.* वांझ. [A B. woman वंध्या *f*, ( in contempt ) वांझटोळी *f*, वांझोटी *f*, वांझोळी *f*, वांझोडी *f*, ओंडा *m*, खुंटाळी *f.* The following special uses should be noted:- वंध्या she who has no offspring, काकवंध्या she who bears only one child, मृतवंध्या she whose offsprings die.] २ ( of a cow or female animal) वांझ, वंडा, ओंडा *a. ind.* ३ (of a tress) वांझा [Rather or somewhat B. वांझट ]. ४ ( of a soil or country) *unproductive*, *bad* नापीक, नापिकी, मुकड, भुकिस्त, निखरड, ओसाड, बरड or भरड, रखरखीत, रुक्ष, नाकीर्दसार, खरांट, रानट, खंगार, खचरट, अफल, अफलवान. ५ *scanty*(*), *not copious*(*) वांझा, भाकड, सुना, सुनका. ६ *dull*, *uninventive* कल्पनाशक्तिशून्य,अकल्पक (?), मठ्ठडोक्याचा, बोथा, बोथट, शून्य-मंद बुद्धीचा. अमनोरंजक. ८ *fig.* बिनफायद्याचें, व्यर्थ, निष्फल; as, A B. speculation. Bar'ren *n.* उजाड जमीन *f*, वृक्षरहित जमीन *f. pl.* ज्यावर फारच लहान झाडें उगवतात अशी उंच सपाटी *f.* Bar'renly *adv.* Bar'renness *n.* ( v. A. 1.) वांझपणा *m*, वंध्यत्व *n*, वंध्यात्व *n*, अफलत्व *n*, अफलता *f*, निष्फलता *f*, शुष्कता *f.* २ नापीकपणा *m*, मुकडपणा *m.*

*N. B.*—Meaning No. 5 of Barren (scanty, not copious) as given by Mr. Candy is not given in any Standard English Dictionary. Again वांझा, भाकड, सुना, सुनका never mean 'scanty' or 'not copious. The idea of 'unfruitfulness which is ever present in the English word Barren, is never present in भाकड, सुना, सुनका.

Barricade (bar'ik-ād) [Fr. *barre*, a bar.] *n. a barrier or a fence mil.* मेढेबंदी *f*, मेढेकोट *m*, मेढा (?) *m*, अडकूट *n*, मार्गावरोधकरचना *f*, मार्गप्रतिबंधकरचना *f.* (शत्रूला येण्यास अडचण व्हावी किंवा त्याचा गोळीबार चुकावा ह्मणून हा झाड माती व दगड वगैरे जें सांपडेल तें घेऊन करितात. हा मेढेकोट प्रायः शहरांत दंगेधोपे अगर बंडें होतात तेव्हां किंवा शहरावर एकाएकीं परचक्र येतें अशा वेळीं करितात). २ *obstacle* प्रतिबंध *m*, अडथळा *m.* Bar'ricade *v. t.* मेढेबंदीनें कोंडणें, मेढेबंदी *f* करणें. २ प्रतिबंध-अटकाव करणें. Barricader *n.* Barricā'do See Barricade.

Barrier ( bar'i-ėr ) [ Fr. *barre*, a bar.] *n.* कुंपण *n*, कुडण *n.* २ आडकाठी *f*, अटक *f*, अट *f*, अडकूट *n*, अवरोध *m*, प्रतिबंध *m*, अटकाव *m* ३ हद्द, सरहद्द. ४ सरहद्दीवरचा किल्ला *m*, हद्दबंदीचा-हद्दीचा-कडमहालचा गांव *m*, किल्ला *m*-&c. To fight at B. s लष्करी कसरतींत विनिश्चित हद्द अगर अटक मध्यें राखून लढणें (Tournament). B. *v. t.* कुंपण घालणें, कुंपण घालून बंद करणें; ( gener. with *off*, *in* ). Barriered *p. a.*

Barring (bäring) [*pr. p.* of the verb "to bar," used as *prep.*] *save*, *except* वगळतां, वगळून, व्यतिरिक्त. B. *n. resistance* मनाई *f.* २ गज किंवा कांबी लावणें. Barring-out *n.* शाळेचे अगर वर्गाच्या खोलीचे दरवाजे व खिडक्या बंद करून शिक्षकास बाहेर ठेवणें. हा शाळेंत मुलें बंडखोरपणा करितात त्यांचा एक मासला आहे. Barring-engine मोठ्या वैठ्या एन्जिनास काम पडेल तेव्हां हळू हळू फिरविणारें लहान एंजिन *n.*

Barrister ( bar'is-tėr ) [ Fr. *barre*, a bar referring to the Bar of the Courts of Justice; Note the phrase 'to be called to the Bar.' ] *n.* ( also Barrister-at-Law.) पहिल्या वर्गाचा सनदी वकील *m*, ब्यारिस्टर *m*, *pop.* बालिस्टर. ह्यालाच फक्त वरिष्ठ कोर्टांत न्यायाधिशापुढें मूळ खटले मांडण्याचा अधिकार असतो, व अशा सर्व खटल्यांचे कागद तयार करण्याचें काम सालिसिटर करतो. Barristēr'ial *a.* बारिस्टरासंबंधीं. Bar'ristership *n.* बारिस्टरी *f. pop.* बालिष्टरी *f*, बारिस्टरगिरी *f*, बारिस्टरचा हुद्दा *m.* Revising Barrister पार्लमेंटच्या सभासदांना मत देणाऱ्या मंडळींच्या यादी तपासण्याकरितां नेमलेला बारिस्टर. Briefless B. See Brief.

*N. B*—बॅरिस्टरची परीक्षा इंग्लंडांतच होते. बॅरिस्टरानें हिंदुस्थानांतील हायकोर्टाची सनद घेतली ह्मणजे तो त्या हायकोर्टाचा अॅडव्होकेट होतो. बॅरिस्टराला किंवा अॅडव्होकेटाला हायकोर्टांतील अव्वलाचे किंवा अपिलाचे दावे चालविण्याचा अधिकार असतो. तेव्हां बॅरिस्टर किंवा अॅडव्होकेट ह्मणजे पक्षकारांच्या वतीनें सरकारदरबारांत काम करणारांपैकीं वरिष्ठप्रतीचा मुखत्यार. सॉलिसिटर ह्मणजे पक्षकारांची सर्व हकीगत समजावून घेऊन आरंभापासून त्याचें कच्चें टांचण करून बॅरिस्टरामार्फत आपल्या पक्षकाराचें काम चालवितो. सॉलिसिटराला हायकोर्टांत कांहीं विविक्षित कामें खेरीज करून कज्जा चालविण्याचा अधिकार नाहीं, व त्या कामांत सुद्धां तो जज्जाच्या खोलींतच बोलूं शकतो. अॅटर्नी ह्मणजे मुखत्यार.

Barrow ( bar'rō ) [ Cf. Sk. वराह hog. ] *n.* डुकर *n*, खची केलेलें डुकर *n.*

Barrow ( bar'rō ) [ A. S. *beran*, to carry. ] हातांनीं

चालवावयाची गाडी *f*; हातगाडी *f*; लहान एकचाकी हलकी गाडी *f*. Hand B. मंज्या.

Barrow ( bar'rō ) [ A. S. *beorgan*, to protect. ] *n*. लहान मुलांचें विनबाह्यांचें गरम कापडाचें कुडतें *n*, हातकापें *n*.

Barrow ( bar'rō ) [ A. S. *beorg*, or *beorh*, a hill or funeral mound.] *n*. (प्रेतें पुरलीं आहेत अशा जागेवरील) मातीचा अगर दगडांचा ढीग *m*-ढिगार *m*, स्मशानांतील गडगा *m*. Barrowish *a*.

Bar-shoe ( bär-shö ) *n*. a kind of horse-shoe designed to protect a tender frog or tender horn that grows in the middle of the sole of a horse's foot. घोड्याच्या तळव्यावरचा नाजूक शिंगासारखा उंचवटा (पुतळी) रक्षण करण्याकरितां मारलेला नाल. Frog= पुतळी.

Barter ( bär'tėr ) [ Fr. *barate*, deceit.] *v. t. to traffic by exchange* एका वस्तूबद्दल दुसरी वस्तु मोबदल्यादाखल घेणें-देणें, मोबदला देणें, बदलाबदल *f*. करणें, अदलाबदल *f*. करणें *g. of o.*, केजें *n*. करणें *g. of o.*, केज्यानें देणें-घेणें. B. *v. i.* मालास माल *m*-ऐवजास-ऐवज *m*-नगास नग *m*- &c. देणें-घेणें, जिन्नसानें जिन्नस *m*. घेणें, ऐवजमोबदला करणें, फेरमोबदल्याचा व्यवहार *m*.करणें, भांडप्रतिभांडक व्यापार *m*. करणें, विनिमय *m*. करणें. Bar'ter *n*. अदलाबदल *f*. २ साटेंलोटें *n*, साटलोट *f*, फेरमोबदला *m*, मोबदला *m*, फेरमोबदल्याचा व्यवहार *m*, विनिमय *m*, परिदान *n*. ३ मोबदल्यादाखल दिलेली वस्तु *f*. Bar'terer *n*. साटेलोटें करणारा.

Barth ( bärth ) *n*. गुरें किंवा ढोरें बांधण्याचा वाडा *m*, [गोठा *m*.

Basalt ( bas-awlt' ) [ Gr. & L. *basaltes*; Æthiopic *basal* iron.] *n*. *geol.* लोखंडासारखा काळा दगड; हा एक प्रकारचा मऊ दगड आहे. याचा रंग लोखंडासारखा काळसर असतो. हा भूगर्भांतून व ज्वालामुखीपर्वतांतून बाहेर पडणाऱ्या उष्णप्रवाही पदार्थांपासून उत्पन्न होतो. ह्याचे वाटोळ्या आकाराचे समकोनी अष्टपैलू किंवा समकोनी षट्पैलू असे सुळके सांपडतात. अशा दगडांच्या डोंगरांत शिवाजीनें आपले सर्व किल्ले बांधिले होते. २ बॅसॉल्ट पाषाणाच्या रंगाच्या मातीचीं भांडीं *n. pl.* Basalt'ic *a*. Basalt'iform *a*.

*N. B.*—Basaltes हा मूळचा आफ्रिकी भाषेंतला शब्द जशाचा तसा लॅटिन भाषेंत गेला; व तींतून इंग्रेजी भाषेंत आला.

Bascinet ( bas'i-net ) *n*. एक हलकें शिरस्त्राण *n*.

Base ( bās ) [ Fr. *basse*, *fem. of bas*, through L. L. *bassus*, *low*. पूर्वीं base हा शब्द 'लहान उंचीचा,' 'सखल,' 'खुजा,' 'सखल प्रदेशाचा,' 'हीनकुलाचा' ह्या अर्थीं वापरीत असत. परंतु सध्यां मनाचा किंवा वर्त्तनाचा हलकटपणा, अधमपणा, पाजीपणा, व्यसनीपणा ह्या अर्थीं वापरतात. सध्यां Base हें विशेषण मनुष्य किंवा त्याची कृति किंवा आचारविचार ह्याला लावितात. तरी Base metal, Base coin, Base voice, Base language (असंस्कृत and not अपभ्रष्ट) हेही शब्दप्रयोग आढळतात. अगदीं हलक्या किंवा कमी प्रतीचा असाहि कांहीं अगदीं थोड्या ठिकाणीं Base चा अर्थ होतो.] *a. servile, mean, cowardly, dishonourable* (applied to actions, habits and thoughts.) हलका, हलकट, नीच, नामर्दपणाचा, निर्लज्जपणाचा, अधम. २ (applied to persons) हलका, हलकट, अधम, कनिष्ठ, हीन योग्यतेचा, नीच मनोवृत्तीचा, कुमार्गगामी, पाजी. ३ नीच मनुष्याला किंवा नीचपणाला शोभणारा; as, A B. occupation. ४ (applied to metals) *of comparitively little value, those not classed as noble or precious* हिणाचा, हिणकस, हिणकट, हिणवट, खोटें (*cf.* inferior gold). ५ अगदीं हलक्या किंवा कमी प्रतीचा; as, B. imitation. ६ *mus.* नीचा, खरजांतला, गंभीर. ७ असंस्कृत, प्राकृत, हलकी, मागसलेल्या लोकांची (भाषा). ८ *law* लष्करी नोकरीनें न मिळवितां केवळ सेवेबद्दल मिळालेला (हक्क). Base'-born *a*. बटकीचा, रांडेचा, हरामजादा, बांदीचा, अकरमाशी, हीन अवलादीचा, दासीपुत्र *m*. २ कमजात,हीनजात, अकुलीन, हीनकुल, कमअसल, विजात. Base'ly *adv.* पाजीपणानें, हलकेपणानें, दौर्जन्यानें, दुर्जनतेनें, पामरवृत्तीनें. Base'-minded *a*. हलक्या मनाचा,पाजी,हलकट, मनाचा हलका, नीच. Base'-mindedly *adv.* पाजीपणानें, हलक्या मनानें, पामरवृत्तीनें, नीचपणानें. Base'-mindedness *n*. पाजीपणा *m*, पामरवृत्ति *f*, हलकटपणा *m*. Baseness *n*. नीचपणा *m*, हलकेपणा *m*. २ पाजीपणा *m*, हीनपणा *m*, पामरत्व (*) *n*, पामरवृत्ति (*) *f*. ३ मनाचा हलकेपणा *m*, मनाचा नीचपणा *m*, अधमत्व *n*.

*N. B.*—उणा, एर, खेर, गैरी, निरस, उणा, निपटारा हे शब्द कॅन्डी साहेबांनीं Base ह्याला प्रतिशब्द योजिले आहेत. परंतु आम्हीं सुरवातीला दिलेले Base शब्दाचे चालू असलेले व लुप्त झालेले अर्थ लक्ष्यांत घेतले म्हणजे वरील शब्द Base शब्दाचे अगदीं तंतोतंत अर्थ नाहींत.

सध्यांच्या मराठी भाषेंत पामरत्व हा शब्द इंग्रजी absolute inferiority चा अर्थ दाखवितो. आणि जेव्हां Baseness ह्यानें absolute inferiority ची कल्पना दाखवावयाची असेल तेव्हांच Baseness चा पामरत्व हा अर्थ होईल. पामरत्व ह्या शब्दांत नीचपणा, पाजीपणा, हलकटपणा इ० वाईट कल्पना मुळींच नाहींत.

Base ( bās ) [ L. *basis*, Gr. *basis*, a step, a pedestal, base. Gr. *basis*, from *ba*, to go. cf. Sk. गतिः, a going from गम्, to go. ] *n. pl.* bases. पाया *m*, आधार *m*, तल or ळ *m*, बूड *m*, बैठक *f*, पडगी or घी *f* (R), पेंदी or धी *f* ( R ). [ B. LINE पायाची रेषा *f*, आधाररेषा *f*. ] २ *fig.* मुख्य आधार *m*, आदितत्व *n*. ३ *archit.* उथळा *m*, खुर्ची (नक्षीदार असेल तर), (ब) तळसरी (नुसती दगडाची असेल तर), जमिनीवरच्या बांधकामाचा अगदीं खालचा थर *m*. ४ *bot. and zool.* तळ *m*, बूड *m*, पानाच्या देंठाजवळची जागा *f*, शरिराच्या मुख्य धडाशीं चिकटलेलें एखाद्या इंद्रियाचें बूड *n*. ५ *chem. the metallic oxide, (sulphide, selenide) hydrate or alkaloid which enters into combination with an acid to form a salt* भस्म *n*, लवणोत्पादक धातू *f*, आल्कली, अम्लाशीं संयुक्त होऊन लवण उत्पन्न करणारा पदार्थ. ६ शर्यतीच्या सुर-

वातीचें ठिकाण *n.* ७ *geom.* आधाररेषा *f,* पायाची रेषा *f.* ८ *math.* आधारसंख्या *f,* मूळसंख्या *f.* ९ *mil.* लढाई सुरू करण्यास सोइस्कर असा तळ *m.* १० *gram.* (प्रत्यय लावण्यापूर्वीं शब्दाचें झालेलें) सामान्यरूप *n.* ११ *dyeing* कापडावर रंग पक्का बसविण्याकरितां वापरलेला पदार्थ *m.* १२ (एखाद्या वस्तूचा) मुख्य घटक *m.* १३ *surveying* आधाररेषा. १४ *mus.* (तारेचा किंवा आवाजाचा) नीचस्वर *m,* घोर *m,* खरज *m.* १५ *the base-end or bass-end of a tabor* धूम *m,* धुमाचा पुरा, धुमाडा, बाया(ह्या), मृदंगाची डावी बाजू. B. *v. t.* पाया घालणें-रचणें, (वर) रचणें-स्थापणें, स्थापित करणें. Base'less *a.* निराधार, आधारशून्य, कांहीं आधार नसलेला. २ मुळांत कांहीं नसलेला. Bas'al or Bas'ilar *a.* तळाचा, बुडाचा, बैठकीचा. Bas'ic *a. chem.* भस्मिक, अम्लापेक्षां जास्त भस्म असलेलें (लवण). Basic'ity *n.* भस्माबरोबर संयुक्त होण्याची शक्ति *f,* भस्मसंयोगशक्ति *f.* Bas'ilary *a.* तळाचा.

Base-ball ( bās'-bawl ) *n.* चेंडू मारून चार सीमां (base)-वर चार काठ्या रोंवून केलेल्या मंडळावर पळण्याचा लहान मुलांचा एक खेळ *m,* सीमाचेंडूचा खेळ *m,* सीमाचेंडू *m.* २ या खेळांतील चेंडू *m.*

Basecourt ( bās'kōrt ) [ Fr. *basse-court.* ] *n.* घराच्या मागील आंगण *n.* २ नोकर रहाण्याचें (किल्ल्याच्या बाहेरील) सखल आंगण *n.*

Basement ( bās'ment ) *n.* एखाद्या इमारतीचा तळचा भाग *m,* तळमजला *m,* पहिला मजला *m,* खालचा मजला *m.* २ *fig.* आधारकाम *n,* आधार *m,* आधारतल *m,* पायावरचें दगडकाम *n.* ३ कांहीं भाग जमिनीच्या सपाटीच्या खालीं असणारा तळमजला *m* ( not a cellar ).

Base-viol ( bās'-vī'ol ) *n.* खरजसुराचें एक तंतुवाद्य *n.*

Bashful ( bash'fōōl ) [See Abash.] *a. modest to excess, sheepish* लाजाळू, लाजरा, लाजखोर (?), लाजवट, लाजट, लज्जाशील, भिडस्त (*), भिडसारू-ळू (*), भिडसर (*), भिडसूळ (*), भेजूड (*), संकोची (*), संकोचशील (*), सभाभीत (?), जनभीत (?). A bashful person is लाजकोंबडा. [ Some other terms for a bashful person given by Mr Candy are:—गायतोंड्या, गोमुख्या, मुंगसतोंड्या, मेलतोंड्या, मेमलतोंड्या, मेमुलगाडा, मेषपात्र, मेषा, मेंगा-ग्या, मेंगें, तोंडझांक्या, मुखदुर्बल (ळ). But we differ from him in this respect.] Bash'fully *adv.* लज्जेनें, लाजाळुपणानें, लाजरेपणानें, लाजून, लाज धरून, लाजवटपणें. Bash'fulness *n.* लाजाळुपणा *m,* लाजरेपणा *m,* लाज *f,* लज्जा *f.*

*N. B.*—आमच्या मतें भिडस्त हा Bashful शब्दाला योग्य प्रतिशब्द नाहीं. भिडस्त मनुष्य ह्मणजे मुख्यत्वें दुसऱ्याची भीड किंवा मुरवत जो मोडीत नाहीं तो. हा अर्थ Bashful शब्दाचा नव्हे. Bashful शब्दांत विनयातिरेकाची कल्पना प्रधान आहे; तसेंच सभाभीत हा इंग्रजी Nervous शब्दाला योग्य प्रतिशब्द होईल. Bashful मनुष्य सभाधीट असूं शकेल. Bashful ला संकोचशील हाहि प्रतिशब्द योग्य नाहीं. संकोचशील शब्दांतील संकोच शब्दाची कल्पना इंग्रजींतील Constraint शब्दानें व्यक्त होते. आणि उगाच एका इंग्रजी शब्दाला अयथार्थ असे पुष्कळ प्रतिशब्द देण्यांत कांहीं हांशील नाहीं. Bashful शब्दांत मुख्यतः विनयातिरेका ( excess of modesty,) ची कल्पना आहे, ती भीड किंवा संकोच किंवा सभाभीति ह्या तिन्ही शब्दांत नाहीं.

आपला मराठी शब्द लज्जा (लाज) हा इंग्रजी modesty किंवा shame ह्या शब्दांनीं व्यक्त होतो हेंहि ध्यानांत ठेवणें महत्वाचें आहे.

ज्याप्रमाणें खोर ह्या अंत्य प्रत्ययाचे हरामखोर, दिवाळखोर असे शब्द सध्यां मराठींत आहेत, त्याप्रमाणें लज्जाखोर हा शब्द आज भाषेंत चालू नाहीं व तसा नवीन तयार करण्याची जरूरही दिसत नाहीं.

Basidium ( ba-sid'i-um ) [ Gr. *basis,* a base, & *eidos,* likeness. ] *n. bot. the cells of the fructification in some fungi, which form the 'gills' and bear the spores.* अळंब्यांतील रेणुजनक पिंड *n. pl.* Basidia.

Basil ( baz'il ) [ Fr. *basilic,* It. *basilico,* the basil—from Gr. *basilicos,* royal—perhaps because the herb was used in some royal unguent, bath or medicine.] *n.* तुळशीच्या जातीची वनस्पति *f.* [ Holy Basil or Black Basil ( *Ocymum Sanctum* ) काळी तुळस, वैजयंती, कृष्णतुळस or तुळसी. White Basil ( *Ocymum gratessimum* ) पांढरी तुळस, रामदूती or रानतुळस. This रानतुळस is also called माळीतुळस. But माली is a synonym for पाच in कोंकण particularly in the सांवतवाडी district. पाच is really speaking *Pogostenion Patch* only. What is known as Wild Basil (*Calamintha Clinopodium*) in English Botany is not found in India.]

Basilian ( ba-zil'i-an ) *a.* सेन्ट बेसिल साधूच्या पंथाचा, (हा पंथ एशियामायनरामधील कॅपेडोशियामध्यें ख्रिस्ती शकाच्या चवथ्या शतकांत स्थापण्यांत आला). B. *n.* सेन्ट बेसिल पंथाचा साधू *m.*

Basilicon ( baz-il'ik-on ) [Gr. *basilikon,* royal.] *n.* लेपराज, एक जातीचें मलम *n*-लेप *m.* हा पिंवळें मेण, राळ, व डुकराची चरबी ह्यांपासून करितात. also Basilicum.

Basilisk ( baz'il-isk ) [ Gr. *basileus,* a king. ] *n.* एक जातीचा विषारी सर्प *m,* सर्पराज *m.* इतर जातींचे सर्पहि यापासून दूर पळतात व ह्याची ज्याच्यावर नजर पडते तो मरतो अशी समजूत आहे.

Basin ( bās'n ) [Supposed to be from L. L. a water-vessel, dim. of *bac,* a wide open vessel.] *n.* तसराळें *n,* फार रुंद तस्त *n,* काथोटली *f,* फार रुंद वाडगा *m,* रुंदीच्या मानानें अतिशय थोड्या उंचीचें भांडें *n.* २ हौद *m,* कुंड *n.* ३ अळें *n.* ४ *a hollow between two hills* पाळें *n,* आंडण *f. or n,* ओंडवण *n,* घोळ *f.* ५ तसराळेंभर, तस्तभर. ६ थडी; as, in गंगाथडी. ७ नदीचा पाणवठा, ज्या प्रदेशांतून एखादी नदी किंवा तिला मिळणाऱ्या नद्या वाहतात तो प्रदेश *m.* ८ *dock* नदीच्या किंवा समुद्राच्या कांठची गोदी *f.* Coal basin कोळशाचे थराचा प्रदेश.

Basinet ( bas'i-net ) Same as bascinet.

Basis ( bās'is ) [ L. and Gr. *basis,* the foundation.] *n.* पाया *m,* तळ *m,* बैठक *f,* बूड *n,* आधार *m,* अधिकरण *n,* मूळ *n* (*), मूलतत्व *n* (*), मूळचा-सुरवातीचा पाया

*m.* २ *fig.* मुख्य घटक *m*-आधार *m*, आधाराचा सिद्धांत *m*-मत *n.* *pl.* Bases ( ba'sēz ).

N. B.—'मूल' is the 'origin' out of which a thing grows. 'मूलतत्व' is always rendered by 'elementary principle.'

Bask ( bask ) [ Dut. *bakern*, to bask ; *Bask=bada sik*, (Icelandic) to bathe one's self.] *v. i.* उन्हा(नां)त बसणें, ऊन *n*-निबर *n*- ओप *f*- ओपाळी *f*- तिरीप or तिरीम *f*- खाणें-घेणें-घेत बसणें, तिरपेस बसणें, उनास पाठ *f*- देणें, ऊब घेणें. २ *fig.* (प्रेमाची-भरभराटीची) ऊब उपभोगणें. B. *v. t.* ऊन देणें, उनांत ठेवणें.

N. B.—ज्या ठिकाणीं इंग्रजी लोक To bask in the sunshine of the favour of हा शब्दप्रयोग वापरतात त्या ठिकाणीं आह्मी To enjoy the moonshine of the favour of हा शब्दप्रयोग वापरूं. इंग्लंदाच्या अति थंड हवेंत सूर्याचें ऊन सुखकर आहे. आपल्या उष्णदेशांत चांदणें (कौमुदी) हें सुखकर आहे.

Basket ( bas'ket ) [ W. *basged*-from *basg*, a netting, a plaiting, as of twigs or splinters. ] *n.* टोपली *f.* [निरनिराळ्या आकाराच्या टोपल्यांचीं नांवें:—करंडा *m*, करंडी *f*, कुरकुला *m*, करंड *m*, करंडूल *n*, कुरकू *f*, कुरकुल *m*, केरी *f*, छवडी *f*, झाल *f*, टोपला *m*, टोपली *f*, *dim.* टोपलें *n*, डाली *f*, डाळें *n*, दुरडी *f*, परडी *f*, पांटी *f*, पांटें *n*, पेटारा *m*, *dim.* पेटारी *f*, रुमालीपाटी *f*, रोवळा *m*, *dim.* रोवळी *f*, शिपतर *n*, शिवुटलें *n*, संबळी *f*, सांगशी OR सांकशी *f*, हिणगें *n*, हरा OR हारा *m*. LITTLE COVERED B. टोकर *m*, टोकरा *m*, *dim.* टोकरी *f.* SLUNG B. डाली *f.* WICKER-WORK B. कुरकुला *m*, कुरकूल *m*, *dim.* कुरकुली *f.* BASKET-HILT खोबळा *m*. BASKET-MAKER *n.* बुरूड *m*. BASKET-WOMAN पांटींत माल घेऊन विकणारी *f.* BASKET-WORK बुरुडकाम *n*.] २ टोपलीभर; as, A basket of mangoes, करंडाभर. ३ (स्टेजकोचगाडीच्या) पाठीमागच्या समोरासमोरच्या बैठका *f*, *pl.* B. *v. t.* टोपलींत टाकणें, भरणें. २ केराच्या टोपलींत टाकणें. Bas'ketful *n.* टोपलीभर. Bas'ketry *n.* (*cf.* pottery) बुरुडकाम *m*. To be left in the basket पसंत न केल्यामुळें टोपलींत शिल्लक रहाणें, लक्ष्य न दिलें जाणें. To give a B. to one एखाद्याशीं लग्न करण्याचें नाकारणें.

Basque ( bask ) *n.* स्पेन व फ्रान्सच्या जवळ बिस्के उपसागराजवळचा रहिवासी *m*, बास्क. २ बिस्के येथील मूळचे रहिवाशी जे बास्क लोक त्यांची भाषा *f*, बास्कभाषा *f.* ३ ( मडमेचें एक प्रकारचें ) लहान बाह्यांचें कमरेच्या खालीं पोंचणारें जाकीट *n*. असें जाकीट बास्क लोक वापरीत असावे असा समज आहे. B. *a.* बास्क लोकांच्या भाषेसंबंधीं.

Bas-relief (bä-re-lēf'), Bass-relief ( bas'-re-lēf' ) [ From It. *basso rilievo*, Sk. भृष्टि, *bhrishti*, pointed. ] *n.* थोडेंसें वर आलेलें (बाह्यगोल) नकसकाम-शिल्पकाम, बाह्यगोल उठावाचें नकसकाम. ज्या शिल्पकामांत योग्य प्रमाणाच्या निम्मेपेक्षां कमी भाग वर आलेला असतो त्यास Bass-relief हा शब्द लावतात.

Bass ( bās ) [ It. *bassus*, deep, low.] *n. mus.* खरज सूर *m.* २ खरज वाद्य किंवा खरज सुरांत गाणारा. B. *a.* नीच, खरज, घोगरा. B. *v. t.* खरज सुरांत गाणें. Bass-clef *n.* खरजदर्शक चिन्ह *n.* Bass-drum *n.* मोठा ढोल. Bass-staff *n.* खरजस्वरदर्शक चिन्ह लिहिण्याचें स्थान. Bass-viol *n.* खरज सुरांतील गाण्यावरोबर वाजविण्याचें तंतुवाद्य. Bass-voice *n.* खरजसुरांत गाण्यास योग्य असा आवाज.

Basset ( bas'et ) [ Fr. *bassette.* ] *n.* एक प्रकारचा प- [त्यांचा खेळ. Now obsolete.

Basset ( bas'et ) [ Fr. *bas*, low. ] *n. geol. the outcrop or emergence of mineral strata at the surface* (जमिनीच्या पृष्ठा) वर आलेला भूस्तर. B. *a.* वरून वळलेला; as, 'The basset edge of strata.' Basset *v. i.* बाहेर निघून येणें, बाहेर दिसणें.

Bassoon ( bas-ōōn' ) *n. mus.* एक प्रकारचें मुखवाद्य *n*, भोंवारा *n.* Bassoon'ist *n.* भोंवारा वाजविणारा.

Bast ( bast ) *n. bot.* दीर्घतंतुमयान्तस्त्वक्, वल्कलत्वचा, लांब तंतूंची अंतरसाल such as that of आंबा or जांब. Bast-tissue अन्तस्त्वग्घटकतंतु, लवचिक तंतु, वल्कलतंतु, अन्तःसालींत पेशींच्या योगानें बनणारा तंतु.

Bastard (bas'tard) [O. Fr. *bastard*–from *bast*, a packsaddle.] *n. a child born out of wedlock* अवैवाहिकसंबंधापासून झालेलें मूल *n*, दासीपुत्र *m*, रांडलेक *m*, कौलटेय *m*, अकरमाशा *m*, अठरा धान्यांचें कडबोळें *n. colloq.* जारजसंतान *n*, लेंकवळा *m*, राखेची संतति *f.* २ *anything spurious* हीन-कमअसल जातीची-अशुद्ध वस्तु *f.* ३ मऊ पिंगट रंगाची मळीची साखर *f*, साखर साफ करण्याची एक मोठी कुंडी किंवा कढई *f.* ४ एक प्रकारचा लिहिण्याचा कागद. हा २० इंच लांब व १६ इंच रुंद असतो. ह्याला copy paper असेंही ह्मणतात. B. *a. born out of wedlock* अवैवाहिक संबंधापासून झालेला, रांडेचा, दासीचा, बटकीचा, लवंडीचा, बांदीचा, पोटकरणीचा, जारज, दासीज, व्यभिचारज, अनौरस, कडवा, कडू, अदंपतिजात, अधर्मजात, अविधिजात, अकरमाशा, दोन बापांचा. २ *spurious* खोटा, खोटसाळ, मिथ्या, कृत्रिम. ३ मिश्रित, अशुद्ध. Bas'tardise *v. t.* अनौरस करणें-ठरविणें, कमी प्रतीचा ठरवणें, जारज कोटींत आणणें-आहे असें ठरविणें. B. *v. t.* हीनत्व आणणें. Bas'tardly (*obs.*) *adv.* Bas'tardy *n.*, Bas'tardism *n.* अनौरस स्थिति *f* (औरस किंवा दत्तक नव्हे), व्यभिचारोत्पत्ति *f*, दासीपुत्रत्व *n*, जारजता *f*, जारजावस्था *f*, कौलटेयत्व *n*, जारोत्पत्ति *f.* २ हीनगुणता *f.* Bastard-ashler *n.* खांडकीचें माठींव संगीन काम *n.* B. cut *n.* एक प्रकारच्या कानशीच्या फुलाची जात.

*N. B.*—पूर्वीं एके काळीं धर्मशास्त्रकारांस संमत असलेल्या तेरा पुत्रांची यादी आह्मी Son शब्दाखालीं देणार आहों, व तेथेंच कन्यापुत्र, अनूढासुत, इत्यादि शब्दांची व्याख्या सांपडेल.

Baste (bāst) *v. t.* शिक्षा करण्याकरितां दांडकणें-दांडाळणें-सोटाळणें-टोणपणें-कुंदी काढणें *g. of o.*

Baste ( bāst ) *v. t.* मांस भाजतांना त्यावर लोणी किंवा चरबी सोडणें-घालणें.

Baste (bāst) [Fr. *bastir*, to sew.] *v. t.* धावदोरा घालणें. (पक्की शिलई करण्यापूर्वी असा दोरा घालतात.) धागे मारणें, टांचे मारणें, टांचणें. Basting *n.* धावदोऱ्याची शिवण *f.*

Bastile, Bastille (bast-ēl') *n.* पारीसमधला एक जुना किल्ला *m* [याचा सरकारी तुरुंग ह्मणून उपयोग करीत असत. हा इ० स० १७८९ त फ्रान्सांतील बंडवाल्या लोकांनीं पाडून टाकिला], तुरुंग *m.* २ *a tower or bastion of a castle* तटबंदी बुरुज *m.* ३ *a small fortress* किल्ला *m.*

Bastinado (bast-in-ād'o) [Fr. *bastonnade*, *baston*, a stick or staff.] *n.* मारझोड *f*, वांसेमार *m*, टोणपेमार *m*, दांडकेमार *m*, दंडप्रहार *m*, यथास्थित सोंटेमार. २ काठीनें पायाच्या तळव्यावर मारणें (तुर्क, चिनी वगैरे लोकांची एक शिक्षेची पद्धत). B. *v. t.* सोंट्यानें मारणें, दांडकणें, सोटाळणें, मारझोड *f.* करणें *g. of o.*, चेचरणें, चेंचणें. २ (शिक्षेदाखल) पायाच्या तळव्यावर मार देणें. Bastinade' *n.*

Bastion (bast'yun) [Fr. *batir*, for *bastir*, to build.] *n. fort* बुरूज *m*, हुडा *m.* [FORTRESS OF FOUR BASTIONS चौबुरजी]. Bast'ionary *a.* बुरुजांचा. Bast'ioned *a.* बुरूज असलेला.

Bat (bat) [A. S. *batt*, cf. *bat*, a staff.] *n.* (मुठीची) दांडफळी *f*, बॅट *f*, क्रिकेट खेळण्याची फळी *f*, दांडू *m.* २ दांडकें (*) *n*, सोंटा (*) *m*, दांडू *m*, दांडूक *n.* ३ (short for *batter* or *batsman*) बॅटनें खेळणारा; as, He is a good B. ४ विटेचा निमुळता तुकडा *m.* ५ रजईंत किंवा इतर कपड्यांत भरण्याकरितां केलेली कापसाची लेपडी *f.* ६ *mining* अतिशय पातळ थराच्या रूपांत असणारी एक प्रकारची कुंभारमाती *f.* Parliament of Bats सोटेवालें पार्लमेन्ट. B. *v. t.* (बॅटीनें) मारणें-हाणणें. B. *v. i. cricket* चेंडूफळी घेऊन खेळणें. To carry out the B. चेंडूफळीचा खेळ संपेपर्यंत बाद न होणें, शेवटपर्यंत टिकणें-राहणें. Off his own B. त्याच्या एकट्याच्या श्रमानें, त्यानें स्वतः. Bat-horses स्वारीमध्यें लष्करी अधिकाऱ्यांचें सामान वाहणारे घोडे. Bats'man, Bat'ter *n.* बॅटनें खेळणारा, क्रिकेटमध्यें दांडफळीनें खेळणारा, बॅटवाला. Bat'ting *n. cricket* दांडफळीनें खेळणें *n.* २ दांडू (बॅट) वापरण्याची ढब-पद्धत-शैली *f.*

*N. B.*—दांडकें, सोंटा, दांडू आणि दांडूक ह्या चारी शब्दांत वाटोळेपणाची कल्पना आहे; व इंग्रजी Bat शब्दांत सर्वभर किंवा कांहीं भागांत तरी चपटा असणें अशी कल्पना आहे. तेव्हां वरील चारी शब्द Bat ला बिनचूक प्रतिशब्द होत नाहींत.

Bat (bat) *n.* वाघूळ *n.* [WILD B. वडवाघूळ *n.*] Bat'ty *a.* वडवाघुळाचा. २ वडवाघुळासारखा. Bat-fowling *n.* रात्रीं विसावा घेत असणाऱ्या पक्ष्यांची पारध *f.*

Batavian (ba-tā'vi-an) *a.* प्राचीन बटेव्ही जातीसंबंधीं. (या जातीनें हॉलंड देश वसविला. बटेव्हिया हें हॉलंडचें पूर्वी नांव असे.) २ जावामधील बटेव्हिया राजधानीसंबंधीं. B. *n.* डच मनुष्य किंवा बटेव्हियांतला मनुष्य *m.*

Batch (bach) [From A. S. *bacan*, to bake, connected with Sk. पच्.] *n.* एकाच वेळीं भाजलेल्या भाकऱ्यांची रास *f.* २ रास *f*, समूह *m*, जमाव *m* (एका जातीच्या माणसांचा अगर वस्तूंचा). ३ भट्टी *f* (एकाच वेळीं भाजलेल्या भाकरींची). Of one B. एका राशीचा, एका भट्टीचा, एके घाणीचा.

Bate (bāt) *v. t.* उतरणें, कमी-मंद करणें; as, "With bated breath" (*Shakes*). २ सूट देणें, सोडणें. ३ गाळणें. B. *v. i.* कमी होणें (with *of*). Bate'ment *n.* सूट *f*, उतार *m*, मंदी *f*, कमी होणें-करणें *n.*

Bath (bāth) [A. S. *bæth.*] *n. pl.* baths. *ablution* आंघोळ *f*, स्नान *n.* [COLD B. शीत स्नान *n*, थंड पाण्याची किंवा थंड पाण्यानें आंघोळ *f*-स्नान *n.* (33°-60° फॅरन हाइट.) अशा पाण्याचें उष्णमान (TEMPERATURE) फॅरन हाइटच्या उष्णमापकाप्रमाणें 30° अंशांपासून 66° अंशांपर्यंत असतें. DRY B. पोतंडीचा शेक *m.* HOT B. अत्युष्णस्नान *n*, ऊन पाण्याची किंवा ऊन पाण्यानें आंघोळ *f*-स्नान *n*, कढत पाण्याचें स्नान (98°-112° फॅ.). TEMPERATE B. समशीतोष्णस्नान *n.* (75°-85° फॅ.). TEPID B. कोष्णस्नान *n*, कोंबट पाण्याची किंवा कोंबट पाण्यानें आंघोळ *f*- स्नान (*pop.*) सोमळपाण्याचें स्नान *n.* (85°-92°फॅ). WARM B. उष्णस्नान (92°-98° फॅ). VAPOUR B. वाफारा *m*, बाष्पस्नान *n.* (100°-130°फॅ.)] २ स्नानाचें पाणी किंवा पाण्यासारखा इतर पदार्थ *m.* ३ स्नानकुंड *n*, नहाणी पात्र *n.* ४ हमामखाना *m.* ५ *photo.* (अ) मज्जन *n.* (ब) मज्जनपात्र *n.* (क) साधा किंवा मुद्रित कांचपट *m*- (plate) ज्यांत बुडवितात तें, द्रावण *n.* ६ *chem.* उष्णता लावण्याचें साधन *n.*; Such as, heated sand, ashes, hot air. ७ *med.* औषधिस्नान *n*, जलस्नान *n.* Bath-room, Bathing-house *n.* नहाणघर *n*, स्नानागार *m*, हमामखाना *m.* Knight of the B. इंग्लंडांतील सरदारांची एक मोठी पदवी *f.* Air B. स्वच्छ हवा घेणें *n.* Plunge B. बुडी मारून स्नान करणें. Douche B. डोक्यावर कारंज्यासारखी धार धरून स्नान करणें. Shower B. कारंज्याच्या तोटीनें केलेलें स्नान *n.* Blood B. कत्तल *f.* Order of the Bath—G. C. B., K. C. B., आणि C. B. ह्या तिहींपैकीं कोणतीही एक पदवी असणारें सरदारमंडळ *n.* [K. B. stands for Knight of the Bath; G. C. B. or K. G. C. B. (first class) stands for Knight of the Grand Cross of the Bath; K. C. B. (second class) for Knight Commander of the Bath; C. B. (third class) for Companion of the Bath.] Russian bath *n.* रशियन-रुशिस्नानविधि *m*, पुष्कळ वेळ वाफारा घेऊन मग आंग साफ घासवून व चम्पी करवून घेण्याची स्नानपद्धति *f.* Turkish bath चम्पी करवून व आंग साफ घासवून वाफेंत घाम येई तोंपर्यंत बसून स्नान करण्याची पद्धति *f*-स्नानाची जागा *f*, तुर्की स्नानविधि *m*, तुर्की न्हाणें.

Bathe *v. t. wash* नाहवणें, नाहणणें, नाहणें, आंघूळ *f* आंघोळ *f*-स्नान *n*-घालणें; as, To B. one with inunction एखाद्याला नाहूं घालणें-नहाण घालणें; To B. one in the water एखाद्याला स्नान घालणें. २ *to wash or moisten* धुणें, ओला करणें. ३ सर्व बाजूंनीं वेष्टणें, लपेटणें; as, The sun bathes the earth with his rays. ४ बुड-

वणें, बुचकळणें, बुडवून-बुचकळून काढणें. B. *v. i.* नाहणें, आंघोळ-आंघूळ *f*-करणें, स्नान *n*. करणें, आंग *n*. धुणें. To B. with or in holy water गंगा नाहणें, पवित्र जलानें स्नान करणें. To B. in a river नदीस्नान *n*. करणें. To B. in the sea समुद्रस्नान *n*. करणें. Bathed *p*. (v. V. I.) नाहलेला, आंघोळ केलेला-झालेला, स्नानाप्लुत. To be B. in blood or sweat रक्तानें-घामानें नाहणें. Bather *n*. (v. V. I.) आंघोळ करणारा, स्नानकर्त्ता, स्नाता (स्नातृ); स्नायी (स्नायिन्) (esp. in comp.; as, जलस्नाता, गंगास्नाता, तिलस्नाता, भस्मस्नाता and जलस्नायी, &c.). Bathing *n*. (v. V. I.) आंघोळ-आंघूळ *f*, स्नान *n*, आंग धुणें *n*. Mortared spot for B. नाहणी *f*, मोरी *f*, मोहरी *f*. Bathing-box *n*. स्नान करण्याच्या पूर्वी कपडे काढून ठेवण्याची व नंतर ते घालण्याची खोली *f*-पेटी *f*. Bathing-machine *n*. पाण्यांत नेतां येण्याजोगी झांकलेली गाडी *f*. हींत आंघोळ करण्यापूर्वी लोक कपडे काढतात व नंतर ते घालतात. Room or house for B. नाहणघर *n*, पाणघर *n*. Fire-place in it पाणचूल *f*.

N. B.—वर Warm = उष्ण, व Hot = अत्युष्ण असे शब्द ठरविले आहेत. त्यांशिवाय Warm bath and Hot bath ह्यांना प्रतिशब्द देतां येत नाहीं.

Bath (bäth) *n*. इंग्लंडच्या पश्चिमेकडील एक शहर *n*. हें शहर उष्ण पाण्याच्या झऱ्यासंबंधानें प्रसिद्ध आहे. Bath-chair *n*. एक माणूस बसविण्याची लहानशी गाडी *f* (जाया झालेल्या किंवा हैराण मनुष्याकरितां). Bath-brick *n*. सुऱ्या, कातऱ्या वगैरे साफ करण्याची वीट *f*. Bath-metal *n*. जस्त व तांबें यांचें समान मिश्रण *n*. Bath-note *n*. १४ इंच लांबी आणि ८॥ इंच रुंदीचा पत्र लिहिण्याचा कागद *m*.

Bathometer (bath-om'et-ėr) [Gr. *bathos*, depth & *metron*, Sk. मात्रा, a measure.] *n*. जलवेधमापन-यंत्र *n*, जलवेधयंत्र *n*, गाढत्वमापक, गळाशिवाय तळ मोजण्याचें कमानीच्या तराजूसारखें यंत्र *n*. Bathy-met'ric, Bathymet'rical *a*. Bathym'etry *n*. (समुद्राची) गाढत्वमापन (विद्या *f*.), जलवेधविद्या *f*.

Bathos (bā'thos) [Gr. *bathos*, depth, from *bathys*, deep.] *n*. *rhet*. *a ludicrous descent from the elevated to the mean in speaking or writing* सारप्रतिलोमालंकार *m* (anticlimax), बोलतांना किंवा लिहितांना क्रमाक्रमानें मोठ्या महत्वाच्या गोष्टीवरून कमी महत्वाच्या गोष्टीवर येणें; as, "And thou, Dalhousie, the great god of war, Lieutenant-general to the Earl of Mar." Bathet'ic *a*.

*N. B.*—पद्याचे श्रेष्ठ गुण वर्णन केल्यावर त्याचेच क्षुल्लक गुण वर्णन करणें हा अलंकारदोष आहे.

Bating (bāt'ing) *prep*. *abating* सोडून, वजा करून.

Batlet (bat'let) [dim. of Bat.] *n*. कुंदी करावयाची मोगरी *f*, कपडे धुतांना ते चोपण्याचें आंखूड दांडकें *n*.

Baton, Batoon (bat'on, ba-toon') [Fr. *baton*, akin to *baste*, to beat.] *n*. पोलीस शिपायाच्या हातांतील दंडुकें *n*, सोटा *m*. २ दंड *pop*. दांडा *m*, काठी *f*. ३ अधिकार-यष्टि *f*, (निरनिराळ्या अधिकाऱ्यांचा हुद्दा दाखविणारा) अधिकारदंड *m*. ३ ताल धरण्याची काठी *f*.

Batta (bat'ta) [Hind. *bhatta*, भत्ता, an extra allowance.] *n*. भत्ता *m*.

Battalia (bat-tāl'ya) *n*. रणरचना *f*, रणव्यूह *m*, सैन्यरचना *f*, सेनारचना *f*. २ व्यूहित-सेना-सैन्य *n*.

Battalion (bat-al'yun) [Fr. *bataillon*, a battle or body of soldiers.] *mil*. (लढाईस तयार अगर कवायतीसाठीं उभी अशी पायदळाची तुकडी *f*. (३०० शें पासून १००० पर्यंत) पलटणीचा एक भाग *m*, पलटण(न) *f*. *n*. बटालण *f*. Battalion is a unit of infantry and generally consists of one thousand men officered by one man. A battalion is divided into from 4 to 10 companies. Companies from 4 to 10, in all one thousand strong constitute a battalion; two or more battalions, a regiment: two or more regiments, a brigade; two or more brigades, a division; two or more divisions, a corps of an army; and two or more corps, an army. Battal'ioned *a*.

*N. B.*—Battalion ला पलटण हा शब्द ठरला आहे; व Company, Regiment, Brigade, Division आणि Corps ह्यांना आमच्याकडील जुन्या लष्करी शब्दांच्या धर्तीवर आम्हीं योजिलेले शब्द Corps शब्दाखालीं देणार आहोंत.

Batten (bat'n) *n*. पट्टी *f*, चिरकांब *f*, चीप *f*, कडी *f*. २ *civil engin*. रीफ *f*, दांडली *f*, पट्टी *f*. ३ मागावरची वीण घट्ट बसवण्याची फिरती काठी *f*; ठासणी *f*. ४ ढोलकाठ्यांना सभोवतीं मजबुतीसाठीं दिलेली चीप *f*. B. *v. t.* चिपेनें-पट्टीनें सांधणें-जोडणें; as, To B. down the hatches.

Batten (Bat'n) *v. t.* (*obs.*) *to fatten* पुष्ट करणें, माजवणें. B. *v. i.* पुष्ट होणें, माजणें, पोसणें. २ *to live in luxury* चैनींत राहणें. ३ *to feed greedily* आधाशासारखें चरणें; as, "The pampered monarch lay battening in ease." Garth.

Batter (bat'ėr) [L. *battuere*, to beat.] *v. t.* *to beat with successive blows, to throw down* ठोकणें, ठोकाठोकी *f*. करणें, मार *m*-मारा *m*-मारगिरी *f*-करणें-लावणें, भडीमार करणें. २ पोंचा-खोचा-पाडणें-आणणें, घनमार*m*-घनाघात*m*-करणें. ३ *to attack with artillery* तोफांचा भडीमार *m*. करणें. ४ *to wear with service* कावल करणें, भुसडा *m*-भुसा *m*. पाडणें, खोंचे-खोमे पाडणें, खोमलणें. B. *v. i.* मारा करणें. B. *n*. अंडीं, पीठ, दारू वगैरेंचें मिश्रण *n*. २ तिंबणें *n*. ३ मातीचा चिखल-गारा करणें *n*. ४ टाईपावर किंवा टाईपाच्या तोंडावर आलेला खोमा *m*. ५ *building-engine* (भिंतीच्या बांधकामांतील मजबुतीकरितां दिलेला) उतार *m*, उतरण *f*, ढाळ *m*. Battered *p*. (v. V. 1.) खोमललेला, &c. २ चेचका, खोचे पाडलेला or पडलेला &c. Bat'tering, Bat'tery *n*. (v. V. 1.)—*act*. खोमलणें *n*, मारा लावणें *n*. &c., मारा *m*, मार *m*, मारगिरी *f*. Battering-ram *n*. आघातांनीं भिंत पाडण्याचें

यंत्र *n*, किल्ला फोडण्याचें यंत्र *n*, लोलगदायंत्र *n*. (हें चालवायाला शंभर माणसें लागतात.)

Battery ( bat'ėr-i ) [ Fr. *battre*, to beat.] *n*. *a line of cannon* मोर्चा *m*, ४-६ किंवा ८ तोफांची तुकडी *f*. इंग्लंडांत अशा तुकडींत सहाच तोफा असतात; परंतु जर्मनींत आठ असतात. २ मोर्चाचें सामान *n*, व माणसें *n*. *pl*. ३ संरक्षक तट *m*. गोलंदाज ह्याच्या आड उभे राहून ह्या तटाच्या छिद्रांतून (जंग्यांतून) तोफा सोडतात. ४ धमधमा *m*, धमामा *m*, दमदमा *m*, (मोर्चा लावण्याची) उंच जागा *f*. ५ तोफखान्यानें हल्ला करणें *n*. ६ सडकून ठोक देणें *n*. ७ *law* दंडपारुष्य *n*, कायद्याविरुद्ध दुसऱ्यास मारणें *n*, दुर्बुद्धीनें परक्याला केलेला स्पर्श *m*. ८ अनेक सारख्या वस्तूंची माला *f*, किंवा मालिका *f*, सजातीय वस्तुमाला *f*; as, A B. of boilers, a B. of retorts. Electric B. विद्युद्घटमाला *f*, विद्युन्माला *f*, विद्युच्चक्रमाला *f*. Erecting of batteries मोरचेबंदी *f*. करणें. Magnetic B. चुंबकमाला *f*, लोहाकर्षणमाला *f*. Thermo-electric B. *chem*. उष्णताजन्यविद्युन्माला *f*. A masked B. (वापरण्याचा वेळ खेरीज करून सदां झांकतां येणारा) गुप्त मोर्चा *m*. Gas B. वायुविद्युन्माला *f*. Storage battery विद्युत्संचायक(घट)माला *f*. Disposition or range of batteries मोरचेबंदी *f*. To change one's B. हल्ला करण्याची दिशा बदलणें, मोर्चा बदलणें-फिरविणें. Floating B. तोफेचीं लढाऊ जहाजें *n*. *pl*., तरता मोर्चा, तराफांचा तोफखाना. Battery gun दारू भरण्यास थांबल्याशिवाय एकदम किंवा एका पाठीमागून एक असे जिच्यामधून गोळे उडवितां येतात अशी तोफ *f*. Gun B. तटाच्या जंगींत बसविलेली तयार बंदुक *f*. Gun out of battery भरण्याकरितां तटापासून दूर नेलेली बंदुक *f*. Battery is the tactical unit of artillery. Several big guns (4, 6 or 8) constitute a battery and several batteries constitute an artillery. Batteries are of four kinds: १ Horse battery (घोड्यावरील तोफखाना *m*.); २ Field battery (मैदानी तोफखाना); ३ Mountain battery (डोंगरी तोफखाना); and ४ Position battery (स्थानिक किंवा कायमचा तोफखाना).

Battle ( bat'l ) [ Fr. *battre*, to beat.] *n*. *fight* लढाई *f*, युद्ध *n*, रण *m*. *n*, संग्राम *m*, विग्रह (S.) *m*, रणसंग्राम *m*. [ BRAVE IN B. रणशूर, रणधीर, रणगंभीर, रणसिंह, झुंजार. CLOSE AND FURIOUS B. तुमुल-दारुण-घनघोर संग्राम *m*, हातघाईची लढाई *f*-सफेजंगी *f*. COWARDICE IN B. रणभीरुत्व. COWARDLY IN B. रणभीत, रणभीरु. MIXED OR TUMULTUARY B. रणसंकुल *n*, तुमुल *m*, *n*. MORTAL OR FURIOUS B. रणतुंबळ *n*, रणकंदन *n*, घनचक्र *n*, रणधुमाळी *f*. PILLAR ERECTED ON THE FIELD OF B. रणस्तंभ *m*, रणखांब *m*. TO GIVE B. लढाई *f*. करणें-देणें.] २ कलह *m*, मारामारी *f*. B. *v. t*. लढणें, युद्ध करणें. B. *v. i*. खडाजंगी होणें, कडाक्याचा वाद-वाग्युद्ध करणें; as, To battle over theories. Battle-array *n*. रणरचना *f*, रणव्यूह *m*, फरेबंदी *f*, युद्ध सुरू करण्याकरितां केलेली सैन्याची रचना. Battle-axe *n*. परशु (*pop*.) फरश or स *m*, फरशी *f*. Battle-piece *n*. लढाईचें वर्णन किंवा चित्र *n*. Battle-scarred *a*. लढाईंत वार लागलेला. A drawn B. दोन्ही पक्षांची बरोबरी झालेली लढाई *f*, बरोबरीची लढाई *f*. A pitched B. ठाणावरची-खडी लढाई *f*, व्यूहबद्ध सेनेची लढाई *f*. The B. of life जीवनकलह *m*, प्रपंचयुद्ध *m*. A good beginning is half the B. सुविचारानें प्रारंभ करणें ह्मणजेच अर्धी लढाई (जय) मारणें होय. Line of battle-ships *n*. पाण्यांतील लढाईच्या उपयोगीं पडणारें जंगी जहाज *n*, आरमार *n*. B. royal *n*. हातझोंबीची लढाई *f*. २ लढाऊ कोंबड्यांचें झुज *n*. Line of B. बद्धसैन्य *n*. To do or join B. लढाई करणें. To raise the battle-cry रणशब्द उच्चारणें [ उ. हरहर महादेव (हिंदु), दीन दीन (मुसलमान), सेन्ट जार्ज (इंग्रज)], लढाईची खूण *f*. सिंहनाद करणें.

*N. B.*—Battle लढाई. War मोहीम, युद्ध. Combat द्वंद्व (द्वंद्वयुद्ध). Engagement गांठ, (तोंड) मिळणी. Encounter सामना. Action चकमक.

Battledoor, Battledore ( bat'l-dōr ) *n*. पिच्छकंदुक (Shuttle-cock), खेळांतील बॅट.

Battlement ( bat'l-ment ) *n*. जंग्यांची भिंत *f*. २ जंगी *f*. *archit*. तटाच्या दोन जंग्यांतील (छिद्रांतील) भरींव भाग *m*. Bat'tlemented *a*. जंग्यांची भिंत आहे असा; also Bat'tled *pa. p*. (*poe*.)

Battology ( bat-ol'oji ) [ Gr. *battos*, a stammerer & *logos*, discourse.] *n*. रिकामी बडबड *f*, (भाषणांत किंवा लेखनांत शब्दांची) निरर्थक-पाल्हाळिक पुनरुक्ति *f*. Battolog'ical *a*. Battol'ogize *v. t*. शब्दांची व्यर्थ पुनरुक्ति करणें.

Battue ( bat-tōō' ) [ Fr. *battre*, to beat. ] *m*. *pursuit* पाठलाग *m*. २ *attack* हल्ला *m*.

Bauble, Bawble ( baw'bl ) [ From Old Fr. *baubel*, *babel*, a child's plaything. Perhaps connected with Modern Italian *babbola*, a toy; and with L. *babulus*, a fool.] *n*. मुलामी वस्तु *f*, नकली खेळणें *n*, पुराणाचा डागिना *m* (*cf*. पुरण-पाटली *f*.), खोटा दागिना *m*, भुसके लड्डू *m*. *pl*. (*idio*.), बेगडेचा जोडा *m* (*idio*.). २ पोरकट-क्षुल्लक गोष्ट *f*. ३ विदूषकाची लंबकर्णी मुखवट्याची काठी *f*. (हा मुखवटा टोंकास लाविलेला असतो; हा पुरातन काळीं थोर घराण्यांत खुपमस्करे वापरीत असत).

Bauk, Baulk, Same as Balk.

Bauxite bricks ( bō'zīt ) *n*. भट्टीच्या विटा *f*. *pl*.

Bavin (bav'in) *n*. कोंडका *m* (*obs*.), कोंडकें *n* (*obs*.), फाटें or फाटें *n*, भुरभुर जळणारें जळवण *n*, काटक्या *n*, अगदीं हलकें व भरकन पेटणारें लांकूड *n*. B. wits तेरड्याच्या रंगाप्रमाणें तीन दिवस महत्व असणारी बोलण्यांतील खुबी *f*.

Bawble, Same as Bauble.

Bawd ( bawd ) *n*. कुंटीण *f*, भाडखाऊ *c*, कुट्टनी (*pop*.) कुंटण *f*, दूती *f*, दूतिका *f*, शंभली *f*. (usually applied to

women.) २ भडवा *m*. B. *v. i.* व्यभिचाराकडे स्त्रियांचें मन वळविणें. २ व्यभिचाराकरितां बायका मिळविणें. Bawd'ry *n.* कुंटणपणा *m*, कुंटणगिरी *f*, दूतीकर्म *n*, कुंटणकी *f*. २ बीभत्स भाषण *n*, अचकट विचकट or विचकट बोलणें *n*. ३ व्यभिचार *m*. Bawd'y *a.* बीभत्स, अचकट विचकट, विचकट, अवाच्य. Bawd'iness *n.* Bawd'y-house *n.* *a brothel, a bagnio, a stew* कुंटणखाना *m*, छिनालखाना *m*, रांडवाडा *m*, वेश्यागृह *n*. Bawd'ily *adv.*

Bawd-rick (bawd'rik) *n.* पट्टा *m*.

Bawl (bawl) [L. *baulare*, to bark like a dog.] *v. i.* (from pain) *to bellow, roar* ओरडणें, अ(आ)रडणें, बोंबलणें, आकांतणें (*poe.*), आक्रंदणें, ओक्साबोक्सी रडणें, घसा *m*-टाहो *m*-फोडणें-फोडून ओरडणें, आकांत *m*-आक्रोश *m*-आक्रंदन *n*-अ(आ)रड or ओरड *f*-अरडाओरड *f*-&c. करणें. २ *to cry out, vociferate* गागणें, आरडणें or ओरडणें, पुकारणें, गरजणें, ओरड *f*- ओरडा *m*- अरडाओरड *f*- पुकारा *m*- ललकारी *f*- or ललकारणी *f*- कल्लोल *m*- कोल्हाळ *m*- गोंगाट *m*-&c. करणें, अ(आ)रोळी *f*. मारणें. ३ *to speak loudly* घाटी *f*. खाऊन-गळा *m*. फोडून-तंगाडून-गळा काढून-शिरा *f. pl.* ताणून &c. बोलणें, कडकून बोलणें, जीव टाकून ओढून-खाऊन-देऊन तोडून-खरडून-&c. बोलणें, मोठ्या गळ्यानें बोलणें, गळेफोड *f*. करणें. ४ *to bellow at, roar at* दणकावणें, खणकावणें, दणगारणें, डुरकणें, कडकडणें, ताव *m*. देणें, खाकरवसा *m*. घालणें. B. *v. t.* पुकारणें, आरोळी मारणें. २ ओरडून जाहीर करणें. B. *n.* आरोळी *f*, ललकारी *f*, आक्रोश *m*. Bawl'er *n.* ओरडणारा, बोंबलणारा, &c., बोंबठोक्या, अरड्या or ओरड्या, बोंबल्या, बोंबमाऱ्या. Bawling *p. a.* (v. V.) Bawling *n.* (See Bawler.) ओरडणें *n*, बोंबलणें *n.* &c., आकांत *m*, आक्रोश *m.* &c. २ गागणें (?) *n*, ओरडणें *n*, पुकारणें *n.* &c., ओरडा *f*, पुकारा *m*, ललकारी *f*. &c.

*N. B.*—गागणें या शब्दांत रागा( anger )ची झांक आहे; ती इंग्रजी Bawl शब्दांत नाहीं. ललकारी हा शब्द विशेष प्रकारच्या ओरडण्याला लावतात; जसें, भालदाराची-चोपदाराची ललकारी.

Bay (bā) [L. *baia*, a harbour.] *n.* उपसागर *m*, कोळ *n*, वांकण *n*. [B. (large) आखात *n*, मोठा उपसागर *m*.] २ (उपसागरासारखा) घराचा पुढें आलेला भाग *m*, उपगृह *n*. ३ एखाद्या इमारतीचा खणासारखा भाग *m*, खांबांनीं किंवा इतर कोणत्याहि कारणांनीं झालेला भिंतीचा किंवा छपराचा खण *m*. ४ (वाळलेलें गवत किंवा धान्य ठेवण्याकरितां) कोठारांतला खण *m*. ५ बे नांवाचें लांकूड *n*. Bay-salt *n.* समुद्राचें मीठ *n*.

Bay (bā) [L. *bacca*, a berry.] *n.* विद्युत्प्रतिबंधक झाड *n*. वीज आंगावर पडूं नये म्हणून या झाडाच्या पानांची माळ गळ्यांत घालीत असत. २ *fig. pl.* विद्वत्तेची कीर्ति *f*. ३ जयचिन्ह *n*; as, Crowned with bays जयचिन्हांकित, विजयमाळा ज्याच्या आंगावर आहे असा; जयचिन्ह म्हणून या झाडाच्या पालवीचे तुरे लावण्याची युरोपांत पूर्वीं चाल होती. ३ तज, दालचिनी. The bark of B. दालचिनीत्वक् *f*, दालचिनीची पत्री *f*. Bay-leaf *n.* विद्युत्प्रतिकारक झाडाचें पान *n*.

Bay (bā) [O. Fr. *abai*, barking.] *n.* कुत्र्याचें खोल आवाजाचें व दीर्घ स्वराचें भोंकणें *n*. २ (when in pursuit) सावजावर तुटून पडलेल्या पुष्कळ कुत्र्यांचें भोंकणें *n*. ३ सावजाचा शेवटचा तरणोपायाचा सामना *m*. At B. (शत्रु इतका जवळ येऊन भिडला आहे कीं आतां पळतां येणें शक्य नाहीं अशा वेळीं) नाइलाजास्तव शत्रूशीं सामना करण्याच्या स्थितींत. B. *v. i.* भोंकणें. B. *v. t.* (कडे) भोंकणें, (च्या) मागें भोंकत जाणें, (शत्रूवर) तुटून पडणें. [At bay ह्या शब्दप्रयोगांत (१) स्वतःचा बचाव (२) अडचणीची परिस्थिति आणि (३) जीवाला धोका ह्या तीन कल्पनांचा समावेश होतो.] To B. the moon *lit.* चंद्रावर भोंकणें. २ *fig.* (आपल्यापेक्षां कितीतरी बलाढ्य शत्रूवर) व्यर्थ तुटून पडणें-सामना करणें, (आपल्यापेक्षां फार श्रेष्ठ मनुष्याची) व्यर्थ निंदा करणें. To bring to B. पाठीस लागून नाइलाज करणें-सामना देण्यास लावणें. To hold, keep at B. सावजाचा पूर्ण पाठलाग करून त्यास सामना देण्यास लावणें. To stand, or be at B. नाइलाज झाल्यामुळें सामना देण्यास जागा धरून तयार असणें. To turn to B. शत्रूकडे तोंड करून आंगावर येऊं न देणें, नाइलाजामुळें सामना देण्यास वळणें.

*N. B.*—The hounds keep or hold the hunted animal at bay or they bring or drive it to bay. The hunted animal turns to bay; it stands or is at bay.

Bay (bā) [L. *badius*, chestnut-coloured.] *a.* सारंगा, तांबूस, काळसर (generally applied to the colour of a horse). २ कुमेत, कुमाईत. Chestnut B. तेल्याबोर. Dark B. सारंगा. Bayard (bā'ard) *n.* तांबूस रंगाचा घोडा *m*.

Bayonet (bā'on-et) [Fr. *baionnette*, perh. from *Bayonne*, a town in France, where bayonets are supposed to have been first made. O. Fr. *bayon*, arrow.] *n.* संगीन, बागनेट (हें एक भोंसकण्याचें हत्यार व हें बंदुकीला लावलेलें असतें). २ लष्करी सैन्य *n*. ३ *pl.* संगीनबंद शिपाई *m. pl.* B. *v. t.* संगिनीनें भोंसकणें. २ युद्धाची भीति घालून अमुक एक करावयास भाग पाडणें. They took the position at the point of B. संगिनीच्या जोरावर त्यांनीं तें ठिकाण घेतलें.

*N. B.*—At the point of the bayonet ह्या शब्दप्रयोगांत (१) युद्ध करणें, (२) बळजोरी आणि (३) निष्ठुरपणा ह्या तीन कल्पनांचा समावेश होतो.

Bay-window (bā-win'dō) *n.* भिंतीच्या बाहेर असलेली खिडकी *f*. Bay-windowed *a.*

Bazaar, Bazar (ba-zär') [Pers. *bazar*, a market.] *n.* बाजार *m*, हट्ट (*pop.*) हट (R.) *m*. Fancy bazar (एखाद्या संस्थेच्या मदतीकरितां भरलेला) मजेचा बाजार *m*.

Bdellium (del'i-um) [Gr. *bdellion.*] *n.* गुग्गुल (*pop.*); गुगूळ *m*, देवधूप *m*.

Be (bē) [L. *fui*, I was; Sk. भू, *bhu*, to be or exist.] *v. i.* (भौतिक अस्तित्व) असणें, (इंद्रियज्ञानगोचर) असणें,

(जीवन्त) राहणें-असणें, (देहरूपी) असणें; as, "To *be* only must not be your ambition"; "To *be* or not to *be* is the question." (Shakes.) २ घडणें; as, "So much that *was* not is going to *be*." ३ असणें (with *there*); as, There *are* twenty men present ह्या वाक्यांत *there* चा अर्थ होत नाहीं. ४ (अस्तित्वांत) येणें, (न घडलेली गोष्ट) घडणें-होणें; as, "The flower-show *was* last week." ५ (प्रत्यक्ष-वस्तुस्थिति) असणें; as, (*a*) *Be it that*, means if it be the case that जर अशी वस्तुस्थिति असेल तर; (*b*) *being or being that* means it being the case that अशी वस्तुस्थिति असल्यामुळें. ६ (आहे त्या स्थितींत चालू) राहणें-ठेवणें-असणें; as, *let be* means let alone—let continue आहे त्या स्थितींत असूं द्या. Go, but do not *be* (continue) long जा, पण पुष्कळ वेळ तिकडेच राहूं नको. ७ (एखाद्या स्थलीं) असणें; as, Your book *is* (lies) under the table. ८ with *off* (दूर) असणें; as, Be off चालता हो. ९ (एखाद्या विशेष स्थितींत) असणें; as, To *be* in debt, to *be* at one's ease; How *is* your Highness now? १० (चा) असणें, (ला) मिळणें, घडणें; *as*, Success *be* to (*befall*) you! Woe *be* to (*befall*) him! ११ (दुर्दैव ह्मणून) असणें, ओढवणें, गुदरणें, कष्ट देणें; as, (आजार, क्लेश) असणें-होणें; as, What *is* with you? १२ (विशेष गुण-स्थितिविशिष्ट) असणें; as, "I *am* aweary, aweary, I would that I were dead." १३ (सरूप) असणें, (दोन वस्तु एकाच नांवानें) असणें; as, The earth and the atmosphere *are* the two sources. १४ (एकच भावार्थ किंवा मथितार्थ) असणें, (एकच अर्थ) असणें-होणें, (एकच) दर्शविणें; as, "To fall *was* to die." "The earth *is* the world." १५ (चें महत्व) असणें, (चा हिताहितसंबंध) असणें; as, What *is* that to you? १६ (च्या बरोबर) असणें; as, One rupee *is* sixteen annas. १७ (चा खर्च) सोसणें; as, If I have three pence in my pocket, I never refuse to *be* my three half pence. [ फक्त सकर्मक क्रियापदांच्याच कर्मणिप्रयोगांत To BE ह्या धातूचीं निरनिराळीं रूपें वापरतात. इंग्रजी भाषेत अकर्मक क्रियापदांचे कर्मणिप्रयोग होत नाहींत, व त्यांच्या पूर्ण काळांच्या प्रयोगांत To HAVE ह्या धातूचीं रूपें वापरतात. परंतु COME, GO, RISE, SET, FALL, ARRIVE, DEPART आणि GROW ह्या अकर्मक क्रियापदांच्या पूर्णकाळ प्रयोगांत To BE ह्या क्रियापदाचींच रूपें वापरतात; as, HE IS GONE; THE SUN IS SET; THE CHILDREN ARE GROWN UP; HE IS COME.] It may be न जाणों. It never has been and it never will be न भूतो न भविष्यति. Let it be, Be it so असो, अस्तु, असूं द्या. Not to be (जीवंत) नसणें. Be that as it may तें कसेंही असो, जसें असेल तसें. To be at one with एकमत असणें-होणें. To be in with मेहेर नजरेंत असणें. To be for अनुकूल मत असणें. To be no more नाश पावणें, मरणें. To be null and void रद्द होणें. To be numbered with the dead मरणें. Being *n.* असणें *n*, अस्तित्व (मानसिक किंवा भौतिक). २ जीव *m.* प्राणि *m.* The be-all and end-all, *the whole—most important aim* सर्वमुख्यहेतु *m*, सर्वस्व, इतिकर्तव्यता *f*, पुरुषार्थ *m*.

*N. B.*—Be (इंद्रियगोचर किंवा इंद्रियअगोचर-वास्तविक किंवा अवास्तविक स्थितींत) असणें. Exist (इंद्रियगोचर-वास्तविक स्थितींत) असणें. Subsist (दुसऱ्यावर उपजीविका) असणें. Live जीवंत असणें. The philosopher's stone is a chimera means it has no existence. Blood exists in the human body. Tigers subsist on flesh.

Be (bē) [of Anglo-Saxon origin.] *prefix*, *be* हा इंग्रजी भाषेंतील एक उपसर्ग आहे. ह्याचा मूलार्थ *about* असा आहे. परंतु रूढीनें ह्याचा अर्थ *with*, *at* or *near* असा होतो; as, Before means *at*, *near* or *towards the front*. *Cf.* behind, below, beneath. २ *be* चा *about* हा अर्थ कांहीं शब्दांत कायम रहातो; as, To become (*come about*) होणें, घडणें. ३ कांहीं शब्दांत *be* चा अर्थ all about, all around, over, throughout असा होतो; as, Bespatter सर्वभर शिंपडणें *cf.* Bedaub, Bestir. ४ *be* उपसर्गानें कांहीं अकर्मक क्रियापदें सकर्मक होतात; To fall is intransitive, but to befall is transitive; as, The misfortune that befell us. To speak is sometimes intransitive but to bespeak is always transitive. ५ कांहीं ठिकाणीं *be* हा उपसर्ग नामाला जोडला म्हणजे नामाचें क्रियापद होतें; as, Friend is a noun, befriend (मदत करणें) is a verb. Night is a noun, benight is a verb. Kiss is a noun, bekiss is a verb. Mouth is a noun, bemouth is a verb. ६ *be* हा उपसर्ग विशेषणाला जोडला म्हणजे विशेषणाचें क्रियापद होतें. Late is an adjective, belate is a verb. ७ *be* हा उपसर्ग क्रियापदाला लावला म्हणजे क्रियापदाचे मूळ अर्थांत जास्ती जोर येतो; as, Bepiece पुष्कळ ठिगळे-तुकडे एके ठिकाणीं लावणें, जिकडे तिकडे ठिगळ लावणें. ८ कांहीं क्रियापदांत *be* उपसर्गानें विलगपणाचा अर्थ येतो, as, Be-shear चारी बाजूंनीं कापणें. ९ कांहीं नामांना *be* उपसर्ग लाविला म्हणजे त्यापासून होणाऱ्या क्रियापदांत एक गर्भित शब्दयोगीसंबंध उत्पन्न होतो; as, Bemoan means *to moan about*. १० तृतीयाविभक्तींत असणाऱ्या नामाला *be* हा उपसर्ग लाविला म्हणजे त्या नामाचें क्रियापद होतें; as, Beback means *to furnish* (a book) *with a back*. Bebed means *to furnish* (one) *with bed*. ११ कांहीं कांहीं शब्दांत *be* या उपसर्गाचा *by* असा अर्थ होतो; as, Bequest means *something left by will*. Because means *by the cause that*. Beside means *by the side of*. १२ कधीं कधीं *be* हा उपसर्ग एखाद्या क्रियेचा स्थलनिर्देश करितो; as, Behead means *to deprive one of his head*. १३ *be* हा उपसर्ग कांहीं नामांना जोडला म्हणजे त्याचा अर्थ-(ची) पदवी देणें,-चें नांव देणें असा होतो; as, To beblockhead ठोंबा आहे असें म्हणणें, ठोंब्याचें नांव देणें. To bevillain

शठ आहे असें म्हणणें, शठपणाचा टिळा लावणें. अशा रीतीनें झालेल्या क्रियापदांत गौणता, निंदा व तिरस्कार इत्यादि गुण गर्भित असतात.

Beach (bēch) [A. S. *becc*, a brook.] *n.* समुद्रकांठ *m*, किनारा *m*, समुद्रतीर *m* [हा बहुतकरून वाळूचा किंवा लहान शंखांचा असतो], पुळण, रेताड *f*, जमीन *f* [अशा प्रदेशाचा लढाईत किंवा नावाड्याला फार उपयोग होतो], वेला *pop.* वेळा *f*, ढकशी [R.] *f.* २ किनाऱ्यावरची रेती *f.* [SANDY BEACH वाळवंट, पुलिन *n*, *pop.* पुळण *f. n.*] B. *v. t.* समुद्रकिनाऱ्यावर (एखादें जहाज) आदळणें, समुद्रकिनाऱ्याच्या रेतींत जहाज घालणें; as, To B. a ship. Beached *a.* किनाऱ्याचा, किनाऱ्यावर आदळलेला-लागलेला. Beach'y *a.* वाळूंत-रेतींत बारीक शंख असलेला. Beach-comber *n.* किनाऱ्यांवर आदळणारी अशी महासागरांतून येणारी लाट. २ पॅसिफिक बेटांतील मोत्यें काढून उपजीविका करणारा.

B. C. (Before Christ) ख्रिस्तजन्मापूर्वी, इसवी सनापूर्वी.

Beacon (bē'kn) [A. S. *beacn*, a beacon, a sign.] *n.* खूण *f*, निशाण *n*, मार्गदर्शक खूण *f.* २ दीपस्तंभ *m.* ३ नावाड्यास वाट दाखविण्याची खूण *f*, आगतशत्रुज्ञापक दीप *m*, भयसूचक दीप *m*, भयाची सूचना *f*, इशारा *m.* B. *v. t.* भयाची सूचना देणें, इशारा करणें. Bea'conage *n.* (वरील प्रकारच्या) दीपस्तंभाचा खर्च *m.* Bea'coned *a.* Bea'confire इशाऱ्याची आगटी *f.* Floating bea'con (मार्गसूचक) दीपनौका *f.* २ (भयसूचक) दीपनौका *f.*

Bead (bēd) [A. S. *bed*, a prayer.] *n.* (लांकडाचा किंवा कांचेचा) मणि-(णी) *m*, मणका (*) *m.* [GLASS B. कांचमणी *m.* GOLD B. कांचनमणी *m*, (OF RICE FORM) सोन्याचे तांदूळ. GOLD B. (ROUND) करमरामणी (*) *m.* STRING OF SUCH BEADS जवांची माळ *f.* RED GLASS B. गोविंद OR गोविंदमणी *m.* STRING OF BEADS माला *pop.* माळ *f.* TO BE AT ONE'S BEADS जप करीत असणें.] २ *archi.* गोलची *f.* ३ *the sight of a gun* माशी *f.* [To draw a bead upon निशाण धरणें.] ४ *bubble on spirit* मद्यावरचा बुडबुडा *m.* ५ जपमाळेचा मणी *m.* [To say, tell or count one's beads जप करणें, *speci.* ईश्वराचें नामस्मरण करणें, माळा ओढणें. A rosary of B.s जपमाळ *f.*] ६ बिंदू *m*, थेंब *m.* Beading-tool *n.* 'बायलराच्या' आंतल्या नळ्या ठोकण्याचें हत्यार *n.* Bead *v. i.* (मण्यासारखे) बुडबुडे येणें. २ मण्याच्या आकाराचा होणें. B. *v. t.* मण्यांनीं सुशोभित करणें. २ गोलची करणें, मण्यासारखा कंगोरा करणें. Bead'ed *a.* मण्यांनीं सुशोभित केलेला, मणिमंडित, मणिमय, &c. Bead'ing *n. archi.* मण्यासारखा कंगोरा *m.* Bead'y *a.* मण्यांचा, मण्यांनीं भरलेला. २ Beadlike मण्यासारखा. Bead'-house *n.* साधु लोकांकरितां अन्नछत्र *n.* Bead'-proof *a.* हालविली असतां जिला कांहीं वेळपर्यंत बुडबुडे येत रहातात अशी (दारू). Bead'-roll *n.* ज्या मेलेल्या लोकांकरितां जप करावयाचा त्यांच्या नांवाची यादी *f*, पितरांची याद *f.* २ रोमन क्याथोलिक लोकांचें मृतांसाठीं करावयाच्या प्रार्थनांचें पुस्तक *n*, प्रार्थनापुस्तक *n.* ३ जपमाला *f.* Beads'man, Bedes'man *n.* पैसे घेऊन प्रार्थना करणारा. एखाद्या इसमास न फावल्यास तो आपल्याकरितां पैसे देऊन प्रार्थना करावयास जो मनुष्य लावतो तो, जपकरी *m*, जप्या *m*, अनुष्ठानी, जपाचा ब्राह्मण *m.* Bead-plane *n.* गोलरंधा *m.* Beads'woman *n.* दुसऱ्याकरितां जप करणारी बायको *f*, अनुष्ठानी बायको *f.* *N. B.*—मणका हा शब्द मणि ह्या अर्थीं फारच क्वचित् वापरतात. करमरामणि करमरें ह्या फळासारखा असतो.

Beadle (bēd'l) [A. S. *beodan*, to proclaim.] *n.* छडीदार *m*, पाईक or पायक *m* (His office पायकी *f.*), भालदार *m*, अदालतींतील चोपदार *m*, पक्षकार व साक्षी यांचीं नांवें पुकारणारा शिपाई *m*, नाझराचा शिपाई *m.* २ ख्रिस्ती देवळांतील शिपायासारखा अधिकारी *m.* ३ विद्याधिकारी व विद्यार्थी यांचे मिरवणुकींत आधीं चालणारा, विश्वविद्यालयाचा चोपदार *m.* Bead'ledom, Bead'lehood *n.* Bead'leship *n.* Bea'dlery *n.* चोपदारी *m*, पायकी *m.*

Beagle (bē'gl) [Origin unknown. Dr. Murray suggests Fr. *begaeule.*] *n.* एकजातीचा लहान शिकारी कुत्रा *m.* २ *fig.* गुप्तपोलीस *m.* ३ बेलीफ *m.*

Beak (bēk) [Fr. *bec.*] *n. bill* चोंच *f*, टोंच *f*, चोंचेसारखें टोंक *n*, बोंच *f*, चंचु *f*, चंचुपुट *n*, जमिनीची चोंच *f.* २ *naut.* जहाजाचा नाळेकडील अणीदार भाग *m*, चोंचेसारखी नाळ *f.* ३ चोंचेसारखी वस्तू *f.* ४ (कांहीं प्राण्यांचें व सरपटणाऱ्या प्राण्यांचें) चोंचेसारखें तोंड *n*, चंचुमुख *n.* ५ चोंचेसारखें नाक *n.* Beaked *a.* चोंचीसारखा, चंच्वाकार, चोंच असलेला. Beak-like projection *pathol.* चोंचीसारखा उंचवटा *m*-पुढें आलेला भाग *m.*

Beaker (bèk'ĕr) [Gr. *bikos*, a wine-jar.] *n.* (रांजणासारखा) पिण्याचा मोठा पेला *m*, पडघीचा पेला *m.* २ पेलाभर पदार्थ *m.* ३ आंखलेला-आंखी पेला *m.* ह्यावर मापाच्या खुणा असतात.

Beam (bēm) [A. S. *beam*, a beam, a post, a tree, a ray of light. Gr. *phyma*, a growth.] *n. a piece of timber* तुळई *f*, तुळवट *n*, वहाल *n*, दांडी *f*, सर *m*, सरी *f*, वार *n.* [B. OVER TWO POSTS. piece B. खांडतुळई *f*, खांड *n.* LONGITUDINAL DIVISION OF A B. चिरखांब (ड) *m.* SMALL AND SQUARED B. कडी *f*, बडोद *m.*]. २ (of a balance) दांडी *f.* ३ (of a car, &c.) दांडी *f*, गाडीच्या दोन घोड्यांच्या मधला दांडा *m*, धुराणी *f*, धुरांडी (*vulg.*). ४ (of the weaver) तुरी *f.* ५ (of the sun) किरण *m*, रश्मि *m*, कर *m.* [SHORN OF HIS BEAMS क्षततेजा, क्षततेजस्क]. ७ (of a draw-well)–transverse, with stone ओकती *f*, लाट *f* (पाणी ओढण्याचा मोटेची). ७ (of a stag) सांबराचीं शिंगें ज्या मुख्य सुळक्यापासून फुटतात तो शिंगाचा सुळका *m.* ८ जहाजाची रुंदी *f.*; as, "One vessel is said to have more beam than another." ९ससाणा पक्ष्यांच्या पंखांतील मोठें पीस *n.* On the B. नावेच्या कण्याशीं समांतर. The weather B. जहाजाची वाताभिमुख बाजू, जहाजाची जी बाजू वाऱ्या-

च्या तोंडाशीं असेल ती, वाऱ्याच्या माऱ्याकडची जहाजाची बाजू. Beam *v. i.* प्रकाशणें, किरण *n.* पाडणें, तपणें (*poe.*). २ The countenance, &c. *glow with health, delight* टवटवणें, टकटकणें, लुसलुसणें, लिंबू *n.* फुटणें (तोंडावर &c.). Beam-compass *n.* मोठा कंपास *m*, बहालकंपास *m*, साध्या कंपासाला धातूचा किंवा लांकडी जोड दिला म्हणजे जो मोठा कंपास होतो तो, जोड देऊन मोठा झालेला कंपास. B. *v. t.* पुढें पसरणें (with *forth*). Beamer *n*, Beaming *p. a.* (v. V. 1.) तपणारा (*poe.*), किरणमय, प्रकाशमान. २ टवटवणारा, *&c.*, टवटवीत, टकटकीत or टुकटुकीत, सुप्रसन्न. Beamful *a.* तेजःपुंज, चकचकित. Beam'less तेजरहित. Beamy *a.* चकचकीत. २ निरोगी. ३ प्रकाश पाडणारा. Beam'ily *adv.* Beam'iness *n.* प्रकाशितपणा *m*, चकचकीतपणा *m.* Beaming *a.* Beamingly *adv.* Beam-let *n.* लहान किरण *n.* Beam'-en'gine लांबलचक बारानें (सुळक्यानें) गति उत्पन्न करणारें वाफेचें यंत्र *n*, (तराजुसारख्या लांब) दांड्याचें एंजिन.

Bean (bēn) [Ger. *bohne*; L. *faba*, a bean.] *n. a smooth, kidney-shaped, laterally flattened seed, borne in long pods by a leguminous plant called* Faba vulgaris (common bean). (शेंगांत असलेलें कडदणाच्या जातीचें) द्विदल धान्य *n*, कडदण *n.* [Some kinds of beans are—French bean (Phaseolus vulgaris, or Harricot) फरसबी. Kidney beans उडीद, मूग, इत्यादि जातीचें कडदण (जातिवाचक शब्द). Phaseolus mungo मूग. Phaseolus radiatus उडीद. Phaseolus aconitifolius मठ or मटकी. Phaseolus lunatus (lima bean or double bean) डबलबी, लोब्या or लोबिआ. Underground kidney-bean (ground-nut), भुईमूग. Phaseolus rostratus हळौंदा, हळसुंदा, अळसुंदा. The scarlet runner (Phaseolus multiflorus) फजांव (हें कडदण गोंव्याकडे खातात). Dolichos lablab घेवडा, वालपापडी. Some kinds of this are पावटे, श्रावणघेवडा, फटाराघेवडा, सुगाघेवडा, काळा घेवडा, पांढरा घेवडा, मेहेंदळ, वरणे, &c. Dolichos biflorus कुळीथ, हुलगा. This seed is called horse grain or Madras gram. Dolichos sinensis चवळी. Psophocarpus tetragonolobus (chevaux de frise bean) चौधारी, चौधरी. Cicer arietinum (chickpea or gram) चणा, हरभरा. Pisum sativum (pea) वाटाणा. Cyamopsis psoralioides गोवारी. Cajanus indicus तूर. Ervum Lens मसूर. Egyptian or Pythagorean bean कमलकाकडी. Molucca bean सागरगोटा. Cæsalpinia Bonducella गजगा. Bean of St. Ignatius (strychnos Ignatii) पपिता. Negro bean (mucuna monosperma) मोठी कुइली. Bean caper (a common name for zygophyllum) गोखरूं किंवा धमाशाच्या कुळांतील एक झाड. Bean'-fly कडदणावर असणारी माशी *f.* Bean'-feast *n.* यजमानानें आपल्या हाताखालच्या कामकरी लोकांस दिलेलें भोजन *n.* (या दिवशीं कडदणाचा उपयोग करीत असावेत यामुळें हें नांव पडलें आहे.) Every bean has its black प्रत्येकामध्यें कांहींतरी दुर्गुण-व्यंग असतें. He has found the bean in the cake त्याला पैशाचा लाभ अवचित झाला. He knows how many beans go to make five तो कधीं फसावयाचा नाहीं. Full of beans पाणीदार (घोडा).

Bear (bār) [A. S. *beran*, L. *ferre*, Gr. *pherein*, S. भृ, to bear or support.] ह्या शब्दाचे चार मुख्य अर्थ आहेत: (१) to carry (भार किंवा ओझें) वाहणें-नेणें; (२) to sustain (भार किंवा ओझें) सोसणें; (३) to thrust, to press ढकलणें, खुपसणें, (वर) भार-वजन-ओझें टाकणें; (४) to bring forth (संततीचा-फळाचा भार) वाहणें, जन्म देणें. ह्या दिलेल्या चारी अर्थांमध्यें भाराची कल्पना सर्व साधारण आहे). *v. t.* I (*a.*) वाहणें, नेणें, घेऊन जाणें, वहन *n.* करणें *g. of o.* [To B. IN MIND मनांत-ध्यानांत ठेवणें-धरणें. To B. WITNESS OR TESTIMONY साक्ष देणें. To B. AWAY (बक्षीस) जिंकून नेणें. To BE BORNE AWAY (मत बदलून) नेला जाणें-वाहून जाणें. To BEAR OFF (जिंकून) नेणें, हरणें-हरण करणें *g. of o.* To B. OUT (*to corroborate*) मजबुती करणें, समर्थन-पुष्टि करणें. To B. ANY ONE COMPANY (चें) सोबत करणें, (चा) सोबती राहणें. To B. ONE'S SELF नीट रीतीनें-अदबीनें वागणें (*cf.* TO BEHAVE ONE'S SELF). I. (*b.*) (अंग म्हणून) धारण करणें; as, "Eustace, thou bearest a brain." Scott. I. (*c.*) (वस्त्र वगैरे अंगावर)-धारण करणें, बाळगणें. I. (*d*) (नांव-पदवी-तारीख) धारण करणें. I. (*e.*) (किंमत-भाडें) धारण करणें, असणें with *in. con.* I. (*f.*) (स्तुति-निंदेचें पात्र-स्थान) असणें with *in. con.* I. (*g.*) (प्रेम-आदर-वैमनस्य &c.) बाळगणें-धरणें-ठेवणें-राखणें-वागवणें-पाळणें. I. (*h.*) (सत्ता) चालविणें. II. (*a.*) *to sustain, to support* सोसणें, साहणें, सहन *n.* करणें with *g. of o.* II. (*b.*) (जबाबदारी अंगावर) घेणें, वाहणें. II. (*c.*) (अमुक एक अर्थ-परिणाम) असणें. with *in. con.* II (*d.*) (खर्च) सोसणें. II. (*e.*) *to endure, to put up with* सोसणें, पोटांत घालणें-ठेवणें (*idio.*); मुलाखा-सबुरी करणें, मूग खाणें-गिळणें (*idio.*). III. (*a.*) *to push, to thrust, to press* (हीन किंवा नीच स्थळीं-स्थितींत) भारानें ढकलून नेणें. III. (*b.*) खालीं दडपणें; as, A calamity bears down a man; (खालीं) चेपणें. III. (*c.*) (पुढें) ढकलणें, (पुढें) लोटणें. III. (*d.*) with *down* जोरानें चित करणें, जिंकणें. [To BRING TO B. UPON वर अम्मल-परिणाम करवणें, उपयोगीं लावणें. To B. ON (जणूं काय मार पडल्यामुळें) शीं संबंध असणें-लागू पडणें; AS, THIS DOES NOT B. ON THAT POINT. To B. DOWN UPON वाऱ्याच्या बाजूनें झडप घालणें; AS, THE FLEET BORE DOWN UPON THE ENEMY. To B. IN WITH कडे जाणें; AS, THE SHIP B.S IN WITH THE LAND. To B. UPON कडे रोखून ठेवणें. To B. OFF. लागूं न देणें, वारणें, निवारण करणें; AS, To B. OFF A BLOW. २ कशाशीं आदळूं-घासूं न देणें. AS, To B. OFF A BOAT.]. IV. *to bring forth* जन्म देणें, प्रसवणें, जनणें, प्रसव करणें, विणें (cattle), पोटीं पिकें घालणें, फळ देणें. B. *v. i.* फळ *n.* देणें, फळणें, बार *m.* धरणें, लागणें, ऋतु *m.* होणें *in. con.*, बाजणें. [To

BEGIN TO B. लागास येणें, लागणें, वारास येणें. THAT B.s ABUNDANTLY बाजवट. THAT B.s ONCE ANNUALLY एकवारी. THAT B.s TWICE ANNUALLY दुबारी.] २ with *against, towards, upon* &c. कलणें, (एखाद्या दिशेनें किंवा मार्गानें) लागणें; as, The land B.s N. by E., मोड *f-* मोडणी *f-* झोंक *m-* कल *m-* रोंख *m-* गम *m-* कटाक्ष *n-* धोरण *n-* संधान *n-* &c. असणें. ३ with *on, to refer to* लागणें, अन्वय *m-* संबंध *m-* ठेवणें-धरून असणें. ४ with *upon, to press, to pinch* दडपणें, लागणें, घासणें, रुपणें, रुतणें. ५ with *with, to put up with, to make allowance for, to be patient with* (विनतकरार) सोसणें, ऐकून घेणें (*idio.*), (हाल-कष्ट) सोसणें, मूग गिळणें *idio.*, शांतपणानें सहन करणें, सहनशील-सोशिक असणें. ६ निकट-लकडा लावणें; as, He bore hard upon me in the matter of his debt; आग्रह धरणें. ७ ताण-ओढ संभाळणें; as, "Timber is said to bear at its whole length when neither a big wall nor posts stand between the ends of it." ८ with *against* वर भार टाकणें; as, A picture bears against a wall. Bear'able *a.* Bear'ableness *n.* Bear'ably *adv.* Bear'er *n.* नेणारा, निरोप्या. २ खांद्यावर स्मशानांत प्रेत नेणारा, खांदेकरी. ३ वाहणारा, वाहक, वाही (esp. in comp.), बरदार (in comp.; as, हटेबरदार, बेलेबरदार, शिक्केबरदार). Bearer (in a cheque or order) नेऊन दाखविणारा. ४ सोसणारा, सोसिक, सहन करणारा ५ भोई *m*, कहार *m*, हमाल *m.* ६ प्रसवणारा, &c.; सू and प्रसू (in comp., as, वरिसू, विश्वसू, नरसू). ७ माता *f*, आई *f.* ८ *wearer, holder* बाळगणारा, धर (in comp.), धारक, धारी (in comp.). Bear'ing *n. direction* रोंख *m*, मोड *f*, मोडणी *f.* २ *inclination* कल *m*, झोंक *m.* ३ *relation* संबंध *m*, नातें *n.* ४ *meaning* भावार्थ *m*, मथितार्थ *m.* ५ (अ) दोन खोबणांमधला सुटा रहाणारा भाग *m.*; The beam has twenty feet of B. between the walls. *mech* दुसऱ्यावर आश्रित असलेला आंसाचा किंवा यंत्राच्या दांड्याचा भाग*m*, (ब) खोबण, (क) फिरणाऱ्या दांड्या-(लाटे) खालीं असणारा धातूचा (अर्धवर्तुल) निमगोल भाग *m.* ६ प्रसवण्याची किंवा फळें लागण्याची क्रिया *f-* काळ *m-* शक्ति *f*; as, She died from travail of B; The tree is past B; The tree is in full bearing. ७ वर्त्तणूक *f*, चालचलणूक *f*, वागणूक *f*, परापेक्षस्थिति *f.* To lose one's bearings आपला सर्व आधार नाहींसा होणें- सुटणें, मन गोंधळून जाणें. To bring one to his bearings एखाद्याला आपल्या खऱ्या स्थितीची माहिती करून देणें, एखाद्यास शुद्धीवर-ताळ्यावर आणणें.

Bear (bār) [A. S. *beara*, a bear; L. *fera* and Sk. भल्ल are allied.] *n.* अस्वल *m. f. n*, ऋक्ष (*pop.*) रीस *m*, भल्लूक (*pop.*) भालू or भालूक *m*, नडघ *m* (R), नडघा *m-* (घी *f*, घें *n.*) (R). २ (*a*)*astron. the Great Bear or Ursa major* सप्तर्षि (*pop.*) सप्तऋषि *m. pl.*, खाटलें बाजलें *n* (a vulgar term for Ursa major). २. (*b*) *Lesser Bear or Ursa minor* ध्रुवपुच्छ *n.* ३. *fig.* अडाणी-उद्धट मनुष्य. ४ *a rough mat for wiping boots on* बुटाची माती घासून झाडण्याकरितां खरखरीत तरट, अस्वली पायपुसणें. ५ जाड केंसांचा चौकोनी वरास. ६ भोंक पाडण्याचें हत्यार, अस्वली 'पंच'. ७ *stock exchange* बाजारांतील भावाची पुढें मंदी झाल्यावर पुन्हां तेच भाग (shares) परत फायद्यानें देतां येतील ह्या आशेनें आपले भाग विकणारा सट्टेवाला. हे भाग फक्त त्याच्या नांवें असतात व त्यानें पैसे देऊन विकत घेतलेले नसतात (opposed to a "bull"). The bears and bulls of the stock exchange पुढें भाव कमी होईल ह्मणून आपले भाग विकणारे (bears) किंवा चढेल ह्मणून नवीन भाग विकत घेणारे (bulls) लोक. To bear the bear-skin before one has caught the bear *fig.* पुढील फायद्याची खात्री करून घेण्यापूर्वीच हातांतलें घालविणें. Bear-baiting *n.* कुत्र्याकरवीं अस्वलास त्रासविण्याचा एक तमाशा *m.* Bear'-gar'den *n.* अस्वलबाग, लढण्याकरतां-करमणुकीकरतां ज्या ठिकाणीं अस्वलें ठेवितात ती जागा, अस्वलांचा बाग. २ *fig.* ज्या ठिकाणीं बदफैलीपणाचा व्यवहार चालतो अशी जागा *f*, बाजारवाडा *m.* ३ भांडखोर मंडळीचा अड्डा. To become a bear-garden or babel वेड्यांचा बाजार पिकणें. Bear's grease *n.* अस्वलाची चरबी *f.* Bear'ish *a.* अस्वलासारखा. २ उद्धट, अडाणी, द्वाड, रानवट, गैरचाल or ळ, गैरचालीचा. Bear'ishness *n.* उद्धटपणा *m*, दांडगेपणा *m.* Bear'-lead'er *n.* अस्वलाच्या खेळावर पोट भरणारा, दरवेशी. २ तरुण मनुष्यांवर प्रवासांत देखरेख करणारा मनुष्य *m*, प्रवासरक्षक. Bear's'-breech *n. a popular name of Acanthus.* Bear's'-ear *n. anat.* ऊर्ध्वाशय (auricle). Bear'-ward *n.* अस्वलें पाळणारा.

Bear (bār) *v. t. stock exchange* बाजारांतील भाव मंदी करण्याचा प्रयत्न करणें; as, to B. a rail-road stock, to B. the market.

Bear, Bere (bēr) *n.* जव *m.* [used in Scotland.]

Beard (bērd) [A. S. *beard*, a beard.] *n.* दाढी *f.*-[IN CONTEMPT, B. खाड *n.* B. WHISKERS AND MOUSTACHES श्मश्रु(*); THAT HAS BUSHY B. W. AND M. श्मश्रुल. TONSURE OF THE B. AND HEAD दाढीडोई *f.* (*v.*) कर. WOMAN HAVING A B. मिशाळी *f*, पोटा *f*, पुंसलक्षणा *f.* TO SHAVE THE B. दाढी *f-* खाड *n.* करणें] २ *fig.* अनुभवाची-वयस्कतेची खूण *f.* ३ *bot.* (of corn) कुसळ *n*, कुसूं or कूस *n*, शूक *n*, सस्यशूक *n.* ४ बाणाचा आंकडा *m.* ५ घोड्याच्या खालच्या जबड्याची बाजू *f.* (जेथें लगामाची कैची बसते ती.) ६ माशाचा कल्ला *m.* B *v.t.* (छाती करून, उद्दामपणानें व आपण एखाद्यास तुच्छवत् मानतों हें दाखविण्याकरितां त्याची) दाढी *f*-मिशा *f.pl.* उपटणें *g. of o.*; नाकावर पाय देणें (?), नाक *n.*ठेचणें, पायावर पाय देणें(?), नाकास चुना *n.* लावणें (?), तोंडास तोंड देणें (?). २ तोंडावर अप्रतिष्ठा करणें, अपमान करणें. ३ जाड केंसांच्या बरासानें घांसणें. Beard'ed *a.* दाढीवाला, दाढी असलेला, दाढीकरी, दाढीवाईक. [LARGE B. दाढ्या, दाढेल. LOSS OF B. दाढी जाणें.] २—(as corn) कुसळा, कुसळाचा, शूकवान्. To one's beard *adv. phrase*-च्या

तोंडावर, उघड रीतीनें, अप्रतिष्ठा करून. Beard'less *a.* दाढीशिवाय, निखाडा-ड्या, निदाढ्या, खाडू, तूवर. Beard'less youth दाढी नसलेला तरणाबांड, बारवर्षा (*idio.*), सोळवर्षा (*idio.*).

*N. B.*—सध्यां श्मश्रू शब्दांत डोकीवरील हजामतीच्या केंसांचाही अंतर्भाव होतो.

Bearing (bering) *a.* हांशील न दिलेला, हांशील देण्याचा; as. B. letters.

Beast (bēst) [L. *bestia*, a beast.] *n.* जनावर *n*, पशु *m* (R), हैवान *m. f. n*, चतुष्पाद *m f. n.* [B. OF BURDEN पाठीचा (बैल, घोडा &c.), ओझेल OR ओझेली (बैल, घोडा &c.), पाठाळ OR पाठवळ *n*, पृष्ठवाह्य *m*, पृष्ठवाह. B. OF DRAUGHT वाहीम *m*. B. BROKEN IN TO CARRY A RIDER पाठवळ *n*, पाठाळ *n*. B. OF PASTURE गुरूं *n*, ढोर *n*. B. OF PREY, WILD B. जंगली जनावर *n*, श्वापद *n.m.*नखी *m*, सावज *n*, हिंस्रपशु *m*. HORNED B. शिंगोटी *f.*] २ पशुवृत्ति; as, The beast in us. ३ पशुतुल्य मनुष्य *m*, फक्त आहारनिद्राभयमैथुन इत्यादि पशूंचे धर्म असणारा मनुष्य, नरपशु. ४ *fig.* रीस, ऐदी, ह्मशा. Beast'-fā'bles *n. p.* बोलक्या जनावरांच्या कल्पित गोष्टी *f. pl.* Beast'-hood पशुपणा *m*, रानटी स्थिति *f.* Beastish *a. obs*, now beastly. Beastliness *n.* जनावरपणा *m*, पशुवृत्ति *f*, पशुस्वभाव *m*, पशुधर्म *m.* २ निर्दयपणा *m*, निष्ठुरपणा *m.* ३ ओंगळपणा *m*, मलिनता *f.* Beastly जनावराचा, पशुसंबंधीं, पाशव, पशुतुल्य, पशूसारखा, पशूचा, पशूचा-पशुवृत्तीचा, पशुस्वभावाचा. २ मळीण. ३ फारच वाईट ह्मणून त्याज्य, फार अहितकारक; as, B. weather. (colloq.).

*N. B.*—Beast जनावर, जंगलांत किंवा रानांत राहाणारा प्राणि; Brute पशु, अबुद्धप्राणि; Animal प्राणि.

Beastings (Bēs'tings) *n.* Same as Biestings.

Beat (bēt) [A. S. *beatan*, to beat.] *v. t. to strike with repeated blows* बडवणें, (एका पाठीमागून एक असे ठोसे) मारणें, पिटणें, ठोकणं, मार देणें, ताडन *n*-प्रहार *n*-करणें. [To B. THE BREAST ऊर-छाती बडवणें. To B. TO POWDER पूड होई तों कुटणें, पूड करणें. To B. BLACK AND BLUE काळानिळा होई तोंपर्यंत मारणें. To B. THE AIR, To B. THE WIND वाऱ्याशीं भांडणें (*idio.*). To B. THE BRAINS उगाच काथ्याकूट-माथाकूट-माथेफोड करणें. To B. THE STREETS इकडून तिकडे, तिकडून इकडे फिरणें. To B. A PATH OR TRACK *lit.* & *fig.* वर्दळीनें नवीन रस्ता किंवा मार्ग पाडणें.] २ mutually or generally मारामार-मारामारी-हाणमार-हाणामार-हाणामारी करणें. Some idiomatic expressions to express the same idea with force are बुकलणें, बडवणें, झोडणें, पिटणें, ठोकणें, कुटणें, कुचलणें, कुबलणें, कुदकणें, कुदवणें, कुमकणें, कुमलणें, झोडपणें, दांडकणें, दांडगणें, दांडाळणें, दुबकणें or बुदकणें, सोटाळणें, टोणपणें, खुंदलणें, खुबलणें, धोपटणें, चेचणें, चेचरणें or ठेंचणें, धमकणें or धुमकणें, वखलणें, सडकणें, घोळसणें, घोळसावणें, चोपटणें, चोपणें, सोतरणें or सोतारणें or सोताडणें, अंबविणें, कांडात काढणें *g. of o.*; पिकवणें, लाथाबुक्यांनीं तुडवणें, बळकट *adv.* मारणें, हात *m.* टाकणें, आंगाचे धुडके *m. pl.* उडवणें *g. of o.*, कुंदी *f.* काढणें-गाजवणें *g. of o*, गुण *m. pl.* काढणें *g. of o.*(*obs.*), टांके *m. pl.* ढिले करणें *g. of o.*, कात्यायन *n.* करणें *g. of o.*, बरडेल *n.* काढणें, कुव्या *m.* काढणें *obs.*, पूजा *f.* करणें-घालणें *g. of o.*, तेल *n*-काढणें or तेलवण *n.* काढणें-घालणें *g. of o.*, मारून भूस *n.* भरणें, बुक्या *f. pl.* -लाथा *f. pl.* सडकणें or भरपूर- यथास्थित- सडकून-कचकून-कचकावून-रगडून-रपाटून देणें, त्राटणाचें *n.* घालणें, मारून मोत *m.* करणें or मारतां मोत भरणें, डोळे *m.pl.* पांढरे करणें *g. of o.*,चामडी *f.* लोंबवणें *g. of o.*, कुटण or कुट्टण *n*- कुट्टा *m*- कुट्येल *n*- काढणें *g. of o.*, मारकूट *f*- मारझोड *f*- मारपीट *f*-माराकुटी *f*- करणें, फरमाशीमार *m*- पलाखतीचा मार *m*- तंबीमार *m*- देणें, मारून उरता न ठेवणें, मारून भूस *n.* पाडणें, मारून पीठ *n*- पिठार *n*-करणें, हाडें मोकळीं करणें *g. of o.*,कणीक *f.* मऊ करणें-तिंबणें *g. of o.*, कणकीसारखा तिंबणें. A sound or good beating फरमाशीमार *m*, खरपूस मारहग्यामार *m.* देणें (*slang.*). ३ *to inflict blows on, to thrash* दणकावणें, दणगारणें, थडाथड-फडाफड मारणें, कडकावणें, तडकावणें. ४ जिंकणें, जेर करणें, जेरीस आणणें, हटवणें, मागें टाकणें; as, He beat hollow all other competitors; च्या आटोक्याबाहेर असणें; as, "This beats me altogether." ५ *to flap the wings with force so that they beat the air or the sides* फडफडावणें. ६ एकसारखें ठोकून पुढें ढकलणें, घुसवणें. [TO BEAT A THING INTO ONE'S HEAD OR MIND शिकवणें.] ७ *to break, crush, smash, overthrow, batter* (एकसारखें ठोकून) चुराडा पाडणें. [To B. DOWN A WALL भिंत जमीनदोस्त करणें.] ८ (किंमत) पाडवणें, (हुजत घालून किंवा दोन गोष्टी सांगून) किंमत कमी करण्यास लावणें. ९ हातोड्यानें एकसारखं ठोकून हव्या त्या आकारास आणणें; as, To beat gold into leaf. १० कुटून पूड-चूर्ण करणें. ११ चुना इत्यादि बुदक्यानें कुटणें, कुटून एकजीव करणें, कमावणें, कमाई-मशागत करणें. १२ झाडून टाकण्याकरितां झोडपणें; as, To beat a carpet धूळ काढून टाकण्याकरितां सत्रंजी झोडपणें; To beat a tree फळें पाडण्यास झाड झोडपणें. १३ पारधीकरितां धडधड आवाज करून रान उगवणें-जागवणें. [To B. ABOUT THE BUSH *lit.* रान उगवणें. *fig.* सुरवातीची तयारी करणें, द्राविडी प्राणायाम करणें, विषयासंबंधां सरळ न बोलणें, पाल्हाळ लावणें. To B. UP FOR RECRUITS लष्करांत भरती करण्याकरितां (नवीन उमेदवारांचा) शोध करित फिरणें, शोधणें. To B. UP THE QUARTERS जागें करणें, त्रास देणें, *colloq.* अवचित एखाद्याला भेटण्यास जाणें] १४ *mus.* (time) ताल धरणें. १५ पिटणें, वाजवणें; as, To beat a drum. [To B. A RETREAT परत जाण्याचा इशारा देणें. To B. THE TATTOO शिपायांना संध्याकाळीं बराकींत परत बोलावण्याकरितां नगारा वाजवणें. To B. ALARM भयाची सूचना देण्याकरितां पडघम ढोल वाजवणें. SOME ADVERBIAL COMBINATIONS OF THIS VERB ARE: TO BEAT ABOUT (GIVEN ABOVE).

To B. AWAY एकसारखा ठोकित सुटणें. To B. DOWN खालीं पाडणें, किंमत कमी करणें. २ नाश करणें. To B. IN ठोकून आंत घुसवणें. To B. OFF परत फिरवणें, मागें हटवणें. To B. OUT चालून नवीनच मार्ग पाडणें. २ ठोकून नवीन आकार देणें. ३ ठोकून बाहेर पाडणें. ४ लढून बाहेर हाकलणें. ५ ठोकून वाढवणें. ६ धान्य झोडपणें. ७ खूब मेहनत करून एखाद्या विषयाच्या मुळाशीं जाणें. ८ जेरीस आणणें. ९ ठोक्यांनीं मोजणें. To B. UP एकाएकीं हल्ला करणें.] १६ थकविणें, त्रास-शीण देणें; as, "Why should you beat your head about Mathematics?" B. *v. i. to pulsate* (नाडी) उडणें, रक्ताशयाचा ठोका चालणें, (with pain) ठणकणें, टचटचणें, टचटच *adv.* वाजणें, टणटण दुणदुण *adv.* उडणें, टणटणणें. २ with *on, at* एकसारखें ठोसे देणें, धाडधाड वाजवणें. ३ *to dash against* आपटणें, थडकणें, धडक *f.* धडका *m.* थडक *f.* थडका *m.* लागणें-बसणें. ४ (इशाऱ्याकरितां) पडघम वाजविणें; as, The soldiers beat to call their friends home. ५ *naut.* नागमोडीच्या मार्गानें जहाज नेऊन वाऱ्याच्या विरुद्ध मार्गक्रमण करणें, माचण घेणें. B. *n.* फटकारा *m,* तडाका *m,* आघात *m.* २ ठोका *m.* (रक्ताशयचलनदर्शक), घड्याळयाचा-हृदयाचा ठोका *m*; as, B. of the heart. ३ पायाचा आवाज *m.* ४ पहारा *m.* (पोलीस शिपायांचा.) ५ *mus.* ताल *m.* ६ अड्डा *m.* Beat'en *a.* ठोकून-चालून गुळगुळित केलेला, मळलेला, मारलेला, ठोकलेला, ताडित, प्रहारित, आहत. [To BE BEATEN मार *m.* खाणें, *spec.* तोंडांत खाणें.] २ (a beaten path or road) राबत्याचा, वहिवाटीचा मळलेला, दळवळ्याचा. To be beaten राबणें, मळगावणें, मळणें, चोळ *f.* पडणें *inv. con.* ३ शिणलेला. ४ जिंकलेला, जेरीस आणलेला. Beaten with his own staff *fig.* त्याचेच दांत त्याच्या घशांत घातलेला. Beat'er *n.* मारणारा, ठोकणारा, (ढोल) वाजवणारा. २ मुसळ *n,* बडवणी *f,* ज्या बाजूला लोखंडी बूड बसविलें असतें ती बडवणीची बाजू *f.* ३ रानकाळ्या, पारध्याकरितां सावज कचाट्यांत आणणारा. Beating *n.* बडवणें *n,* ठोक देणें *n.* The meanings of "beating" are formed from the other meanings of the verb to Beat.

*N. B.*—Beat एकसारखे ठोके मारणें. Strike टोला देणें, तडाका देणें. Hit (लागेलच अशी खात्री नसतां) फटका मारणें.

Beatify (bē-at'i-fī) [L. *beatus*, blessed & *facere*, to make.] *v. t. to pronounce or declare supremely blessed* सुखी-परम सुखी आहे असें मानणें किंवा जाहीर करणें, सुखदायक आहे असें मानणें-जाहीर करणें; as, "Public opinion beatifies wealth." २ *to make supremely happy or blessed* सुखी करणें, स्वर्गसुख-परमानंद देणें; as, "Beatified spirits." ३ *to pronounce (a person) to be in the enjoyment of heavenly bliss* मृत मनुष्य मुक्त झाला किंवा स्वर्गांत गेला असें चारचौघांत जाहीररीतीनें सांगणें, मुक्ति जाहीर करणें. Beatif'ical *a.* सुखकर, सुखप्रद. २ स्वर्गसुखदायक. ३ मुक्तिदायक. Beatif'ically *adv.* Beatificā'tion *n.* मुक्त करणें. २ सुखाची अवस्था *f.* ३ मुक्तिवार्ताकथन *n,* रोमन क्याथलिक धर्मपंथांत धर्मगुरू पोप एखादा मनुष्य मुक्त झाला असें ह्मणतो तें. गयावळाचें "तेरे पितर सरग भये" असें आश्वासन *n.* Beatific vision (देहमुक्त झालेल्या आत्म्याला किंवा अतिपवित्र साधूला परमात्म्याचें) मुक्तिदायक दर्शन *n.*

*N. B.*—For appropriate Marathi words for Beatification and Canonisation, see the word Canonisation.

Beatitude (bē-at'i-tūd) [L. *beatus*, blessed.] *n. supreme blessedness or happiness* स्वर्गसुख *n,* परमसुख *n.* २ *pl.* धन्यतावचनें *n.* धन्य कोण होईल अशाबद्दलचीं धन्यवादपर ख्रिस्तवचनें *n. cf.* "Blessed are the meek for they shall inherit the earth." New Test. Matthew V. ३ संसिद्धि *f,* मोक्ष (*) *m,* मुक्ति (*) *f,* निर्वाण (*) *n,* अपवर्ग *m,* निःश्रेय *n,* निःश्रेयस *m.* [THE HINDUS DISTINGUISH THE FINAL BEATITUDE INTO FOUR KINDS *viz.* सायुज्य ABSORPTION INTO THE ESSENCE OF THE DEITY, सलोकता RESIDENCE WITH HIM, समीपता NEARNESS TO HIM OR BEING IN HIS PRESENCE AND सरूपता CONFORMEDNESS TO HIS IMAGE.]

*N. B.*—Final beatitude निश्श्रेयस *m,* मुक्ति, मोक्ष, निर्वाण (बुद्ध लोकांचा). Bliss आनंद (समाधानानें होणारा आनंद).

ख्रिस्ताच्या डोंगरावरील उपदेशांतील नऊ वचनांना धन्यतावचनें (Beatitudes. *Beatus*, blessed–धन्य) म्हणतात. कारण प्रत्येक वचनाच्या इंग्रजी वाक्यांत Blessed धन्य (L. *beatus*) हा शब्द सुरवातीस आहे.

Beau (bō) [Fr. *beau*, from L. *bellus*, fine, gay.] *n. a man of dress a fop, a dandy* कपड्यांच्या नवीन नवीन तऱ्हेचा शोकी *m,* छानछुक *m,* अक्कडबाज, नटनवरा, रंगेला, छबेला, नटवा. २ *a man who attends a lady, an admirer, a lover* स्त्रियांना विशेष आदर दाखविणारा, प्रेम करणारा, स्त्रीमोही, स्त्रीवर्गाचें सप्रेम कौतुक करणारा, स्त्रीस्तोता, अंधप्रेमी. *fem.* Belle (bel). *pl.* Beaus, Beaux (bōz). Beau-esprit (bō-esprē) *a witty man* थट्टेखोर-विनोदी मनुष्य (used in a good sense). Beau'-idē'al *n.* [Fr. *beau ideal*, good ideal.] सर्वोत्तम-उत्तमोत्तम कल्पना, सर्वोत्तम-उत्तमोत्तम-परमोत्तम मूर्ति,कोणतेंहि व्यंग किंवा दोष नसणारी कल्पना, निर्दोष कल्पना-मूर्ति, उत्कृष्टपणाची-सौंदर्याची किंवा इतर गुणांची परमावधि, कल्पनैकग्राह्यमूर्ति. [A BEAU-IDEAL OF BEAUTY सौंदर्याचा पुतळा, मदनाचा पुतळा (*idio.*), सौंदर्याचो पुतळी (स्त्री), रतीसारखी स्त्री (*idio.*), (जशी काय दुसरी) रती. A BEAU-IDEAL OF CHASTITY पातिव्रत्याची पुतळी, सीतेसारखी पतिव्रता (*idio.*). A BEAU-IDEAL OF LEARNING विद्वत्तेचा पुतळा, पंडितशिरोमाण (*idio.*), A BEAU-IDEAL OF VALOUR वीरशिरोमाण (*idio.*), शौर्याचा पुतळा.] Beau'ish *a.* अक्कडबाज, डौली, छानीचा, शोकीन, नोकदार, छानछुकीचा, चट्टीपट्टीचा, नोकीझोकीचा. Beau'ishness *n.* छानछोकी or छुकी *f,* चट्टीपट्टी *f,* छानदारी *f,* नोकझोक *f,* अकड *f,* अकडबाजी *f.* Beau'-monde [Fr. *beau monde*, the good world.] *n. the fashionable people* छानछोकी लोक *m. pl;* ख्यालीखुशाली लोक *m pl,* खाऊन पिऊन

सुखी (असे पांढरपेशे) लोक *m. pl.* खाऊन पिऊन सुखी लोक, समाजांतील श्रेष्ठ प्रतीचे लोक.

Beauty (bū'ti) [Fr. *beaute*, from L. *bellus*, beautiful.] *n.* सौंदर्य *n*, सुंदरता *f*, सुंदरपणा *m*, लावण्य *n*, शोभा *f*, कांति *f*, छब *f*, छबी *f*, छवी *f*, रूपसंपत्ति *f*, रूपलावण्य *n*. [ARTIFICIAL B. कृत्रिम सौंदर्य.] २ *a particular grace or feature* खुबी *f*, खोंच *f*, नोक *f*, रस *m. fig.* तेज *n*, टूम *f*. ३ *a beautiful woman* (often used ironically) सुंदर स्त्री *f*, रूपवती, रमणी, सुंदरी, सुंदरा, स्वरूपवती. [Some idiomatic expressions for the same are: चटकचांदणी, महताव, छबकडी, परी, अप्सरा, कुरंगनयना, मृगनयना, मृगलोचना, नागकन्या, गजगामिनी, गजगती, मंदोदरी, ठिकडें (*obs.*) *n*, चित्ररेखा *f*, खांरत *n*, छबडी *f*, पद्मिनी *pop.* पद्मीण, नागीण, बिजली, चित्रांचा लेख *m.*] ४ *pl.* (उत्तम कवींचे) वेंचे.

Beauty *v.t.* (*Shakes.*) शोभविणें, शोभा देणें. For more meanings see Beau'tify. Beau'teous, Beau'tiful *a.* सुंदर, रूपवंत, रूपवान्, स्वरूपवान्, सुरूप, खुबसूरत, सुदर्शन, दर्शनीय, सुभगदर्शन, सुशोभित, शोभिवंत, सुरेख, सुभावणा *obs.*, देखणा, साजरा, गोजरा, गोजिरवाणा, कांत, कांतिमान्, कामरूपी, कमनीय, मंजु, मंजुल, (as B. voice), चारु, मनोज्ञ, मनोहर, मनोरम, खुबीदार. Beau'teously *adv.* सुंदर, सुशोभित, मनोहर, मनोरम, मंजुल. Beau'teousness, Beau'tifulness *n.* (v. A.) सौंदर्य *n*, सुंदरपणा *m*, खुबसुरती *f*, सुरूपता *f*, सौरूप्य *n*. (R.) Beau'tifica'tion *n.* सुंदर करणें *n*. २ शोभा आणणें *n*, सजवणें *n*, अलंकृत करणें *n*. Beau'tify *v. t.* शोभविणें, सुशोभित-सुरेख-रंगदार-शोभाविशिष्ट-रमणीय- &c.-करणें, शोभा *f*-आणणें-देणें, शोभन *n*. करणें *g. of o.* B. *v.i.* सुंदर किंवा शोभिवंत होणें. Beauty of form आकृतीचें सौंदर्य *n*, रमणीयता *f*. Beau'ty-sleep *n.* आवश्यकीची झोंप *f*, मध्यरात्रीपूर्वीची झोंप. Beauty-spot तीट *f*, गालबोट *n*, सौंदर्य खुलविण्याकरितां केलेला तिलक *m*, सौंदर्यतिलक.

Beauxite (bō'zīt) See Bauxite.

Beaver (bē-v'ēr) [A. S. *befer*; Dut. *bever.*] *n.* 'बीव्हर,' एक जलचर व स्थलचर किंवा भूजलचर जनावर *n*. २ बीव्हर जनावराची लोकर *f*. ३ ह्या जनावराच्या लोकरीची केलेली टोपी *f*- किंवा हातमोजा *m*. (उत्तम पोषाखावर वापरण्याचें) मलवस्त्र, बीव्हरच्या लोकरीचें उपवस्त्र *n*. Beav'erish *a* बीव्हर जनावरासारखा. २ उपजतबुद्धीचा. Beav'ery *n.* बीव्हर जनावराचा गोठा *n*.

Beaver ( bēv'ēr ) [ L. *bave*, slaver, *baviere*, according to Cotgrave, is the bib put before a slavering child ] मुखत्राण (हें खालीं वर करितां येतें व हें कपाळाच्या खालचा तोंडाचा भाग झाकतें). Beav'ered *a.*

Beblubbered (bē-blub'ērd) *a.* [Pref. *be* & Blubber.] रडून रडून दुर्मुखलेला-सुजून गेलेला; as, Her eyes or cheeks were beblubb-red.

Becall (bē-kawl') *v. t* नांवें ठेवणें, भलत्याच नांवानें हाका [मारणें.

Becalm (bē-käm') *v. t.* (जहाज) वारा नसल्यामुळें थांबवून ठेवणें. २ स्थिर किंवा शांत करणें. ३ शांतवन करणें. ४ हालचाल नाहींशी करणें. Becalmed *p. a.*

Became (bē-kām') *p. t.* of Become.

Because (bē-kawz') [*be* for *by* & Cause. Distinguish *because*, *for*, *since*, *as*, & in as much as.] *conj.* कारण, सबब, ह्मणून, कां कीं, कांतर, ज्याअर्थीं. Because of करितां, साठीं.

Bechance (bē-chans') [A. S. *be*, by & Chance, from L. *cadere*, to fall.] *v.t.* अकस्मात् घडणें, (पुखाद्या संबंधानें) घडणें, (वर) प्रसंग येणें, येऊन बेतणें. B. *adv.* अकस्मात्, दैववशात्, एकाएकीं.

Becharm (bē-chärm') *v. t.* मोहणें, भारणें, मंतरणें.

Bechicks (bē-chiks') *n.* कासघ्न-कासहारक औषध *n*.

Bechoba (bē-chobā) *n.* बिचवा *m*.

Beck (bek) [Ger. *bach.*] *n.* नाला *m*, ओढा *m*; as, "Each gorge and valley has its beck."

Beck (bek) *n.* ( हुकूम किंवा संमतिदर्शक ) खूण *f*, संकेत *m*, संज्ञा *f*, इंगित (S) *n*, शिरःसंकेत *m*, शिरःसूचना *f*, इशारा *m*, इशारत *f*. [BECK (TRANSFERRED SENSE) पूण कह्या किंवा तावा, IN THE PHRASE 'TO BE AT ONE'S BECK.' TO BE AT THE B. OF कह्यांत असणें, तिळीं असणें, अर्ध्या वचनांत-अर्ध्या शकुनांत असणें, अंकित असणें.] B. *v. t.* खुणेनें बोलावणें. B. *v. i.* मान हालवणें, (डोक्यानें, बोटानें) खूण करणें. At one's beck अर्ध्या वचनांत, कह्यांत, पूर्ण हुकुमांत. (shortened form of Beckon).

Beck (bek) same as Beak.

Beckon (bek'n) [A.S. *beacn*, a sign.] *v t. to make a sign* खूण *f*- करणें, संकेत (S) *m*- इशारा *m*- इशारत *f*- सूचना *f*. करणें-देणें, खुणावणें, पालवणें, पालवण *f*. करणें. २ (with the hand) हातखूण *f*- हातपालवी *f*- हस्तसंकेत *m*- करपल्लव *m*-हस्तपाचारण *m*-करणें. ३ (with the eye or head) डोळा *m*. करणें-घालणें, डोईखूण *f*- करणें, नेत्रसंकेत *m*- कटाक्षसंकेत *m*- भ्रूसंकेत *m*- करणें, डोईनें खुणावणें. ४ खूण करून बोलावणें. ५ खुणेनें हेतु कळविणें. B. *n.* संकेत (S) *m*, संज्ञा *f*, इशारत *f*, इशारा *m*, खूण *f*, सूचना *f*.

Becloud (bē-klowd') *v. t. to hide with clouds* ढगानें आच्छादणें, निस्तेज करणें. २ *to darken* मलीन करणें.

Become (bē-kum') [A. S. *becuman*, to come to.] *v. i.* होणें, बनणें, पडणें, येणें; as, The boy becomes a man. To become of शेवट होणें, परिणामास पावणें, वाट *f*- गति *f*-शेवट *m*. होणें *g. of s.*; as, What became of him? B. *v. t. to beseem* शोभणें, साजणें, घटणें, बसणें, मिळणें, बाणणें; as, Anger B s him not. २ शोभणें, सरणें, चांगला-उचित -लायक-योग्य-&c. असणें होणें, ठीकनीट पडणें, बेताचा होणें; as, A black garment becomes him. Become *p.* ( v. V. T.) झालेला, भूत, संप्राप्त. Becom'ing *p. a.* (v. V. T.) शोभणारा, सुभावणा (*obs.*), शोभाप्रद, शोभादायक, योग्य, उचित, शिस्तवार, लाजीम. Becom'ingly *adv.* (V. A.) शिस्तरीतीनें, शिस्तवार, शोभेसा *a decl.*, साजेसा *a. decl.* Becom'ingness *n.* (v. A. I.) शोभादायकत्व *n*, योग्यता *f*. २ लायकी *f*, शिस्तपणा *m*, औचित्य *n*.

*N. B.*—For appropriate Marathi words for Becoming, Proper, Decent and Seemly, see the word Seemly.

Bed (bed) [ A. S. *bed*, a bed. ] *n.* बिछाना *m*, शय्या *f*, शेज *f*, शयन *n*, तल्प *n*, अंथरूण *n*. २ अढी *f*, आडी *f*. as, A bed of straw for ripening fruits ३ ताटवा *m*, तक्ता *m*, क्यारी *f*, पाटगा *m*, वाफा *m*, चिरा *m*.; as, A B. of roses in a garden. [Banked up B. कोंडकें (R) *n*, कुणगा (R) *m*, चोंढा *m*, खोंचा (R) *m*.] ४ भांडें *n*, पोट *n*, नदीचें पात्राचा तास *m*, नदीचें पात्र *n*, नरांडी *f*. *obs.* ५ थर *m*. ६ बैठक; as, The B. of an engine. ७ लग्न as, He is the first child of her second B. ८ बिछान्यासारखी पसरलेली रास *f*; as, A B. of ashes. ९ रेल्वेवरचा खडीचा बिछाना *m*. १० *print.* मुद्रणयंत्राची पाठ (यावर 'फॉर्म' ठोकतात). B. *v. t.* बिछान्यावर ठेवणें. २ *to plant in, as in a garden bed* पेरणें, रुजत घालणें. ३ बैठक तयार करणें, थर घालणें-ठेवणें, गच्च व न ढांसळेल अशा रीतीनें बसविणें; as, To B. a stone. ४ घडून तयार करणें, as, To B. the surface of a stone. ५ एकशय्या करवणें. B. *v. i.* निजणें, एकशय्या करणें, नवराबायको या नात्यानें एक बिछान्यावर निजणें; as, "If he be married and B. with his wife." Bed'ding *pr. p.* Bed'ded *pa. p.* Bed-chair *n.* शयनखुर्ची *f*, मंचकाप्रमाणें उपयोगी खुर्ची *f*. Bed'-chamber *n.* निजावयाची खोली *f*, रंगमहाल *m*, शयनगृह *n*. Bed-charge *casting* and *foundery* पहिला थर *m*. Bed-cloth *n. pl.* चादर पांघरूण वगैरे. Bedding *n.* बिछाना *m*, शय्यासामुग्री *f*. Bed-fast *a.* आजारीपणामुळें बिछान्यास खिळलेला. Bed-fellow शयनबंधु *m*, एकाच बिछान्यावर निजणारा, शयनसखा *m*, अंथरुणांतला सोबती *m*,-सोबतीण *f*. Bed-hangings *n.* मच्छरदाणी *f*. Bed-key *n.* पलंगाची चावी *f*. Bed-linen *n.* पलंगपोस *m*, सरपोस, उशांचे अभ्रे वगैरे. Bed-maker *n.* केम्ब्रिज युनिव्हर्सिटींत विद्यार्थ्यांचे बिछाने करणारा व खोल्यांची साफसूफ करणारा. Bed of honour लढाईत मेलेल्या शिपायांचें थडगें *n*. Bed of lathe कातकामाच्या सांगाड्याची -चरकाची बैठक *f*. Bed of roses, Bed of down सुखाची जागा *f*, सुखकारक परिस्थिति *f*. Bed of thorns संकटस्थिति *f*, चिंता आणि भीति यांनीं युक्त-परिपूर्ण स्थिति *f*. Bed-pan *n.* बिछान्याला ऊब देण्याचें पात्र *n*, शेगडी *f*. २ आजारी मनुष्याचें मलपात्र *n*- तस्त *n*. Bed-plate *n.* यंत्राची किंवा इतर सांगाड्याची तळची बैठक *f*. Bed-post *n.* पलंगाचा खूर *m*, मच्छरदाणीच्या चौकटीचा पाय *m*. In the twinkling of a bed-post अतिशय शक्य तेवढ्या त्वरेनें. Bed-rid, Bed-ridden *a.* वार्धक्यानें किंवा अशक्तपणामुळें) बिछान्याला खिळलेला, सदा खाटलेकरी, खाटखिलया,खाटधन्या,सदाखाटलें कुजवणारा,उठवणेकरी. To be B उठवण *f*. घेणें, उताणा पडणें *idio.*, सदा बिछान्यांत असणें. Bed-right *n.* दाम्पत्तिक हक्क *m*. Bed-room *n.* निजावयाची खोली *f*. Bed-side बिछान्याची बाजू *f*. Bed-sores शयनव्रण *n*. (हा सदोदित माकडहाडाच्या जवळ होतो.) Bed-staff *n.* रात्रीं बिछान्याजवळ ठेवलेली काठी *f*. Bed-stead *n.* खाट *f*, खाटलें *n*, मंचक *m*, पलंग *m*, बाज *f*, माचा *m*. Bed-stead with a canopy or top छप्परपलंग *m*. Piece of the frame of a bed गात *f*. Bed-straw गादींत घालावयाचें गवत *n*. Bed-swerver *n.* पलंगाचें पाप करणारा, व्यभिचारी. Bed-tick *n.* पलंगाची खोळ *f*. (यामध्यें छप्परदाणीचे खूर बसवितात.) Bed-time *n.* निजावयाची वेळ *f*. Bed-ward *adv.* बिछान्याचे दिशेस. २ निजावयाचे वेळीं. Bed-work *n.* हं हं म्हणतां केलेलें काम *n*, विनआयासें केलेलें काम *n*. Bed and board जेवणखाण आणि निजण्याची सोय *f*. Divorce from bed and board, same as Judicial separation, see Judicial separation. To be brought to bed बाळंत होणें, प्रसूत होणें, कोनीं निघणें (R); as, She was brought to bed of a daughter. Foot of a bed पायतें, पायगत, पायतर, पायथर, पायथा *m*, पायवंश *n*, पायांस *n*. To get up from bed निजून उठणें. To go to bed निजणें, पाठ टाकणें *idio.* To be in bed निजलेला असणें. Head of a bed उसें *n*, उसेगत. उशागत. To keep one's bed आजारी पडणें, अंथरूण धरणें; *idio.* खाटेस-बिछान्यास खिळणें. To leave one's bed उठूं बसूं लागणें, (वरें होऊन) बिछाना सोडणें. To lie in the bed one has made, cf. जसें करावें तसें भरावें लागणें, आपलें आपल्याला निस्तरावें लागणें. Lords of the Bed-chamber राजाच्या शयनमंदिराची व्यवस्था करणारे मानकरी सरदार. Ladies of the Bed-chamber (राज्य करणाऱ्या राणीच्या) शयनमंदिराची व्यवस्था करणाऱ्या मानकरणी स्त्रिया. ह्यांचाही बडीजाव सरदारांप्रमाणें असतो. Bed and baggage खाटखटलें. To make the bed बिछाना घालणें, गादी घालणें. As you make your bed, so you sleep on it प्रत्येकानें आपापल्या कर्माचें फळ भोगिलें पाहिजे. Death upon the bed *n.* खट्वामरण.

Bedaggle (bē-dagg'l) *v. t.* ओल्या जमिनीवर ओढून मळवणें. [टाकणें.

Bedarken (bē-dark'n) *v.t.* अंधारानें झांकून किंवा अंधारांत

Bedash (bē-dash') *v. t.* पाण्याचा सडासारवण करणें.

Bedaub (bē-dawb') *v. t.* चोपडणें, घाणीनें यथेच्छ सारविणें, लेथडणें, लिडबिडवणें-भरणें.

Bedazzle, (bē-daz'l) *v. t.* दिपविणें. Bedaz'zled, Bedāze'd *a.* दिपून गेलेला, स्तब्ध केलेला. २ थक्क केलेला. Bedaz'zlement *n.*

Bedder, Bedding, Bedetter (bedd'r) *n.* (जात्याचें) खालचें पेड-तळी *f*. [टाकणें.

Bedeafen (bē-def'n) *v. t.* बहिरा करणें, कानठाळें बसवून

Bedeck (bē-dek') *v.t.* शृंगारणें, सुशोभित करणें, भूषविणें, सजविणें, साजरा करणें. To be bedecked.

Bedesman, Beadsman *vide* Bead.

Bedevil (bē-dev'il) *v. t.* घोंटाळा करून टाकणें, छळणें,

अतिशय क्रूर किंवा निर्दयपणानें वागवणें, (शीं) सैतानासारखें वागणें.

Bedew (bē-dū') *v. t.* ओलावणें, दंवानें ओलें करणें, दंवसारणें, तुषारणें. To be bedewed दंवारणें, दहिंवरणें, दंवसरणें, तुषारणें.

Bedim (bē-dim') *v. t.* अंधुक करणें, अंधार करणें, काळें करणें. Bedimmed' *a.* Bedim'ming *a.* अंधुकता आणणारा. To be bedimmed with tears अश्रूंनीं डोळ्यापुढें काळोखी येणें.

Bedlam (bed'lam) [corrupted from *Bethlehem,* the name of a religious house in London, afterwards converted into a hospital for lunatics.] *n.* वेड्यांचें इस्पितळ *n,* दिवाण्या लोकांचें इस्पितळ *n.* २ दंग्याचें माहेरघर *n.* Bed'lamism *n.* वेडेपणासारखा आचार *m.* Bed'lamite *n.* वेडा, दिवाणा मनुष्य.

Bedouin (bed'-ōō-in) [Ar. *badawin,* dwellers in the desert.] *n.* पाठीवर बिऱ्हाड घेऊन फिरणारे अरब लोक.

Bedraggle (bē-drag'l) *v. t.* ओल्यावर ओढून मळवणें.

Bedrop (bē-drop') *v. t.* खूब शिंपडणें. Bedropt' *a.* शिंपडलेले.

Bedung (bē-dung') *v. t.* शेणानें सारवणें, खतमूत घालणें. Bedung'ed *a.* खतमूत घातलेला, शेणानें सारवलेला, घाण लागलेला, मळ लागलेला, हगेरा, हगिरडा, हगुरडा.

Bedwarf (bē-dwawrf') *v. t.* खुजा करणें, वाढ खुंटवणें.

Bee (bē) [A. S. *bēo.*] *n.* मधमाशी *f,* मधुमक्षिका *pop.* मोहोळमाशी *f;* मधुकर *m,* मधुप *m,* मधुकारी *m,* मधुलिह *m,* मधुलिट् *m,* मुरकुटी माशी *f.* २ भोवरा *m.* ३ भृंग *pop.* भुंगा *m,* भोंवर *m,* भोंवूल *m,* भ्रमर *m,* अलि *m.* ३ सहश्रमकारी संस्था, उपयुक्त गोष्टींची चर्चा करणारी संस्था; as, spelling-bee; शेजारधर्मानें एखाद्याकरितां काम करावयास जमलेली मंडळी; as, The roof of my house was repaired by a bee in two days. ४ *pl.* शिडांच्या दोऱ्या अडकवण्याकरितां नाळीच्या बाजूला मारलेल्या मजबूत लांकडी पट्ट्या. Bee'-bread हळद्या *n.* मधमाशांनीं पुष्पांचे रजःकणांचा केलेला पदार्थ *m.* हा पदार्थ माशांचीं पोरें खातात. Bee'-eat'er मधमाशांवर उपजीविका करणारा पक्षी *m.* Bee'-glue *n.* मेणासारखा पदार्थ *m.* Bee-hive मधमाशांचें मोहोळ, पोळें (लें). *n.* २ *fig.* कुटुम्बवालें घर, नंदाचें गोकुळ *idio. n.* Bee-line अगदीं जवळचा मार्ग *m,* आपल्या मोहोळाकडे ज्या जवळच्या मार्गानें मधमाशी जाते तो मार्ग *m,* दिलेल्या दोन बिंदुंस्थळांमधील अतिशय कमी अंतर *n.* Bee-master मधमाशा राखणारा मनुष्य *m.* Bee-moth मधमाशीभक्षक किडा *m.* Bee-nest *n,* मोहोळ *n,* मोहळ *n,* पोळें *n.* Bees'wax *n.* मेण *f.* Bee-wax *v.t.* मेणानें पालीस करणें. Bees'wing पोर्ट किंवा द्राक्षासवावरील बुरशी किंवा चिती. Burrowing bee भोंवरा. Humble-bee भृंगराज *m,* भृंग *m* A bee in one's bonnet एखाद्या मुद्यावर छांदिष्ट आणि हेकेखोर मत *n.* Spelling-bee शब्दांची वर्णरचना ठरविण्यासाठीं भरलेली सभा *f,* वर्णरचनासभा *f.*

Beech (bēch) [A. S. *boece;* Gr. *phagein,* to eat; according to some भुज, to eat.] *n.* 'बीच' वृक्ष *m.* हें झाड फक्त अमेरिकेंत व युरोपांत सांपडतें. एक प्रकारचा वृक्ष, याची साल तुळतुळीत असते. याला पालवी दाट असते. याचीं फळें डुकरें खातात. Beechen *a.*

Beef (bēf) [L. *bos, bovis,* Sk. गो, an ox.] *n.* गोमांस *n.* In this sense the word has no plural. २ धष्टपुष्ट गुरूं किंवा ढोर (खाण्याच्या मांसाकरितां). *pl.* Beeves गाय बैल *m,* गुरेंढोरें *n. pl.* Beef *a.* गोमांसाचा. Beef'-eat'er गोमांस खाणारा, लठ्ठ मनुष्य. २ राजरक्षक, राजाच्या रक्षकांपैकीं एक. Beef'iness *n.* Beef'-steak शिजवलेल्या गोमांसाचा जाड लांबोळा तुकडा *m.* Beef'-tea गोमांसाचा रसा *m.* Beef'-brained, Beef-headed, Beef-witted बैल fig. ढुंभ, ढ, ठोंब्या. Beef'y *a.* गोमांसासारखा, मांसल.

Beelzebub (bē-el'zē-bub) [Heb. *ba'al z'bub,* fly-lord.] *n.* 'बीएलझीबब' फिलेस्टाइन लोकांचे बेअॅल देवतेचें नांव *n.* २ New Test. पिशाचांचा राजा *m.*

Been (bēn) *pa. p.* of to Be झालेला.

Beenah (bē'na) *n.* 'बीना.' सीलोनमधील लग्नाची एक चाल *f.* ह्या चालीप्रमाणें नवरा बायकोच्या घरीं रहातो व मुलांवर बायकोची व तिच्या कुटुंबाची मालकी असते.

Beer (bēr) [A. S. *beor,* connected with Barley.] *n.* सातूची केलेली एक प्रकारची पिण्याची दारू *f,* बीर *n,* बोजा *m* (बीरदारूचा एक प्रकार). Beer'-en'gine, Beer'-pump बीर दारू उपसावयाचें यंत्र किंवा संचा *m,* बीरबम्ब. Beer-house बीरचें दुकान *n,* बीरचा पिठा. *m.* Beeriness *n.* बीरसारखा गुण किंवा धर्म *m.* Beer-money (लष्करी शिपायांना) बीरच्या ऐवजीं दिलेला पैसा *m.* Beer'y *a.* बीरसारखा. २ बीरनें आलेल्या अंमलाचा. Small beer फिक्की बीरदारू *f.* २ *fig.* क्षुल्लक गोष्ट *f;* as, To think no small beer of one's self."

Beestings (bēst'ingz) [A. S. *bysting.*] *n. pl.* व्यालेल्या गाईचें पहिलें दूध *n,* पहिला चीक *m.*

Beet (bēt) [L. *beta,* beet.] *n.* एक प्रकारची मुळ्यासारखी भाजी *f.* *Beeta vulgaris* (sometimes called Beet-root) चुकंदर, (also called) पालक. But there is another plant called *Spinacia Oleracea* which means पालक or simply भाजी.

Beetle (bē'tl) [A. S. *beatan,* to beat, of the same origin as the English word Beat.] *n.* मोगर *m,* मोगरा *m.* (दगड किंवा खडी ठोकण्याकरितां). २ गिरणींत विणलेलें कापड ठोकण्याचें यंत्र *n,* वीण घट्ट बसण्याकरितां व सुरकुत्या पडूं नयेत ह्मणून हें कापड दाबून ठोकतात. ह्या यंत्रास Beetling machine असेंही ह्मणतात. B. *v. t.* मोगरीनें ठोकणें *n,* ठोकण्याच्या यंत्रांत घालून सफाई करणें (कापड, कापसाचा गड्डा इ०); as, To beetle cotton goods. Beetle-head मूर्ख, अक्कलशून्य. Bee'tle-head'ed *a.* ठोंब्या, मंदबुद्धीचा, मठ्ठ. Bee'tle-stock *n.* मोगऱ्याचा दांडा *m.* Beetling *n.* मुद्गराघात. २ कापड सफाई करण्याकरितां ठोकणें.

Beetle (bē'tl) [A. S. *bitan*, to bite.] *n.* एक प्रकारचा चार शिंगट पंखांचा किडा *m.*

Beetle (bē'tl) [A. S. *bitle*, sharp, hence, prominent; from *bitan*, to bite.] *v. i.* पुढें येणें (as a cliff, a battlement). Beetle-browed (bē'tl-browd) फुगीर भिंवया असलेला; उन्नतभ्रुकुटी असलेला, उन्नतभ्रू. Beetle-brow *n.* उन्नत भ्रुकुटी *f.* Beetling *n*, beetled *p. a.*

Beeves (bēvz) [see Beef.] *n.* गुरें *n. pl.*, ढोरें *n. pl.* (विशेषें खाण्याच्या मांसाकरितां.)

Befall (bē-fawl') [A. S. pref. *be* & *feallan*, to fall.] *v. t.* येणें, पडणें, गुदरणें. B. *v. i.* (Spens.) घडणें, होणें, मार्गांत आड येणें, (वर) बितणें, भिडणें (?). *pr. p.* befalling, *pa. t.* befell, *pa. p.* befallen. The intransitive use is rare.

Befit (bē-fit') [pref. *be* & Fit.] *v. t.* साजणें, घटणें (*poe.*), शोभणें, ठीक होणें. Befit'ted *pa. p.* Befit'ting *a.* साजेल असा, शोभेल असा, योग्य. Befit'tingly *adv.*

Beflatter (bē-flat'ėr) [pref. *be* & Flatter.] *v. t.* पुष्कळ किंवा फारच स्तुति करणें.

Beflower (bē-flow'ėr) *v. t.* (वर) पुष्पांचा वर्षाव करणें, वर्षाव करणें. २ (वर) भरपूर पसरणें, शृंगारणें.

Befoam (bē-fōm') *v. t.* फेंसानें झांकणें.

Befog (bē-fog') *v. t.* धुक्यांत सांपडवणें, धुक्यानें गुरफटवणें. Mostly used as a participle or as a participial adjectve. २ *fig.* गोंधळवणें. Befog'ged *a.* गोंधळलेला, गोंधळवलेला.

Befool (bē-fōōl) *v. t.* छकवणें, भोळसावणें, भोंदणें, फसविणें, मोह घालणें, मूर्ख बनवणें, झकवण *f.* झकवणी *f.* झकवणूक *f.* करणें.

Before (bē-fōr') [A. S. *be* & *foran*, *fore*; see Fore.] *prep.* पुढें, समोर, मोहरें (*vulg.*), सामोरा, पुढती, (*vulg*) पुढां (*poe.*), पुढारां (*poe.*). The man before me. २ अगोदर, पूर्वी; जसें; as, There were many prophets before Christ. ३ पुढें, अग्रभागीं; as, A bright future is before us. The fire-engine stands before all other carriages. ४ पेक्षां, हून मानानें-इभ्रतीनें-हक्कानें-आधीं; as, The eldest son gets the estate before all other children. ५ समक्ष, समक्षासमक्ष, देखत, सन्मुख, देखतां, साक्षात्, अपरोक्ष, उरूबरू, विद्यमान, तोंडासमोर; as, This was done before me. I am a worst sinner and, therefore, cannot stand before God. ६ च्या हद्दींत किंवा अधिकारांत; as, A criminal case cannot come before a Civil Court. ७ च्या पूर्ण ताब्यांत, च्या पूर्ण कब्जांतला, अत्यन्त सुलभ किंवा सुगम अशा स्थितींत; as, The whole world is before you to make your mark. Before the wind (*naut.*) वाऱ्याच्या दिशेनें, वाऱ्यानें प्रचोदित.

Before (bē-fōr') [A. S. pref. *be* & *foran*, *fore*; see Fore] *adv.* समोर, समोरच्या दिशेस, पुढल्याकडे, पुढल्या अंगीं, अग्रभागीं, पुढतीं; as, The enemy is before and behind. २ आधीं; as, You must have told that to me before. ३ पूर्वी, पूर्वकाळीं, अगोदर, पहिल्यानें, आधीं, प्रथम, आदौ, प्राक्, मागें; as, I knew this before. ४ तोंपर्यंत; as, I shall be happy then only and not before. Before and behind आगेंमागें, पुढेंपाठीं, आघाडी पिछाडी, मागेंपुढें. From before समोरून, पुढून. To be beforehand with आघाडी साधणें. A little before or after आदिपश्चात्. As before पूर्ववत्, पूर्वीप्रमाणें, यथापूर्व. Beforehand *adv.* आधींच, आदींच, पहिल्यानेंच, आगाऊ, generally followed by *with*; as, I had been beforehand with this subject. हा विषय मीं आधींच हातीं घेतला होता. २ (पूर्व सामग्री किंवा तयारी ह्या नात्यानें) आधीं, दुसरी गोष्ट करण्यापूर्वी; as, Every soap-manufacturer must learn beforehand something of Practical Chemistry. Immediately B. थोड्या वेळापूर्वीं; क्षणभर आधीं.

Befoul (bē-fowl') *v. t.* घाणेरा करणें, मलीन करणें, हेंदराऑंगळ करणें. २ दुसऱ्या पदार्थाच्या गतिविरुद्ध जाऊन आदळणें, दुसऱ्याची गति बंद होईल अशा रीतीनें गुंतविणें, आडवणें.

Befriend (bē-frend') *v. t.* हात देणें, बाजू-थापे राखणें, मदत करणें; (चा).वाली होणें, उपकार *m.* कृपा *f.* मेहेरबानी *f.* करणें. [किनार लावणें.

Befringe (bē-frinj') *v. t.* फितेनें शृंगारणें, फीत लावणें,

Beg (beg) [O. Fr. *begart*, *begard* & *begar*, or its synonym *begaine* and derivative verb *beguigner*, *beguiner*, to act the Beguine. The Beghards or Beguines were a lay mendicant-order, and in the 13th century mendicants calling themselves by these names swarmed over Western Europe. According to Dr. Murray, this word came into the English language in the 13th century.] *v. i.* भीक *f.* भिक्षा *f.* &c. मागणें, भिक्षाटन *n.* याचना *f.* याचनवृत्ति *f.* करणें, झोळीवर पोट *n.* भरणें *idio.*, उलट्या अंबारींत बसणें *fig.*, उलट्या अंबारीनें राज्य *n.* करणें *fig.* [As USED OF BRAHMANS भिक्षुकी *f.* करणें.—As USED OF BRAHMANS BEGGING ONLY OF BRAHMANS शुक्लवृत्ति *f.* करणें. To B. ABOUT IN GREAT WRETCHEDNESS अन्नान्न करीत फिरणें, दयांदयां-भयांभयां करीत फिरणें-जाणें, दोमदोम करीत फिरणें-जाणें, अन्नान्नगत *f.* होणें. *g. of s.*, कण्याकण्या करणें.] *v. t.* *to ask earnestly, beseech, entreat, implore, supplicate* विनवणें, प्रार्थणें, याचणें (*poe.*), अर्थणें (*poe.*), विनवणी *f.* विनंती *f.* प्रार्थना *f.* याचना *f.* अर्ज *m.* मिनत *f.* मिनती *f.* मिनतवारी *f.* मिनतमाना *m.* &c. करणें. *g. of o.* [For this second sense of to Beg, some forcible idiomatic expressions are:—पायां पडणें, हातांपायां पडणें, पाय *m.* धरणें, दाढी *f.* धरणें, पायधरणी *f.* करणें, दाढीस-हनुवटीस हात *m.* लावणें, हात *m. pl.* जोडणें, बहुमानार्थी पदर पसरणें, पायां पडून-हातापायां पडून प्रार्थणें, अर्ज *m.* करणें, नाक *n.* घासणें, नाकदुरई *f.* काढणें.] २ *to ask alms* मागणें, याचणें, भिक्षणें (*poe.*), अर्थणें (*poe.*), भीक *f.*

भिक्षा *f.* मागणें *g. of o.*; मागणी *f.* याचना *f.*-प्रार्थना *f.* विनंती *f.* करणें. *g. of o.* ३ *to assume without proof* प्रमाणावांचून-प्रमाण न पाहतां धरणें-मानणें, गृहीत धरणें. I beg to = I beg leave to या शब्दांचा मानार्थी वाक्याच्या आरंभीं उपयोग करितात. Beg'gar *n.* विनंती किंवा प्रार्थना करणारा, भिकारी, भिक्षेकरी, भीकमाग्या, भिक्षुक (&c.), भिक्षार्थी, याचक, मागतेकरी (?), मागणेकरी (?), अर्थी, भणंग *m.*-in contempt, anger. [A POOR B., A WRETCH OF A B., A DOG OF A B. भिकारडा *m*, भणंगभिकारी *n*, भिकारगंड *n.* (*slang.*).] B. by profession झोळीबंद, चौपद्रीचा जहागिरदार (*colloq.*). B. (of victuals) from door to door माधुकरी *m*, मधोकरी (*colloq.*) The victuals given माधुकरी *f.* B.'s bowl or dish भिक्षापात्र *n*, तुंबा *m*, जोगणी *f*, तुंबडी *f*, पत्तर *n.* Beggars must not be choosers दरिद्र्यांस खोड असूं नये. *cf.* अन्नसत्रीं जेवणें आणि मिरपूड मागणें (हें असूं नये). Crowd or multitude of beggars भिकार *n*, (समुदायवाचकनाम), भणं(डं)ग भिकार*n* Obstinate and troublesome B. खळभट, तेलंगभट *m*, खळ्या, गळग्रह, गळफाशा, जीवघेणा-घेण्या, प्राणघेण्या, डोईफोड्या, कपाळफोड्या, कपाळसुळ्या, डोकेंउठव्या, धरणेकरी (*trans.*). खणपट्या, खांताड्या (*obs.*), मेंडजोगी (*obs.*). B.-like trick भिकारचाळा *m.* B.-like habit भिकारखोड *f*, भिकारलक्षण *n*, भिकारचट *f*, भिकारछंद *m.* B.-like longing भिकेचा डोहळा. To turn a beggar भीक *f.* लागणें *inv. con.*, चौपदरी *f.* घेणें, झोळी-कोंपरगांवचा सुभा घेणें *idio.*, हातीं नारळाची आई *f.* येणें *g. of s. idio.*, हातीं भोपळा *m.* घेणें *idio.*, हातीं तपेली-नरोटी *f.* तिडोळी *f.* डवली *f.* कामधेनु *f.* घेणें *idio.*, उलट्या अंबारींत बसणें *idio.*, उलट्या अंबारीनें राज्य करणें. ३ दरिद्री मनुष्य, मागरा, माग्या. ४ हलकट-नीच मनुष्य. Beggar *v. t. to reduce to beggary* भिकेस लावणें, भिकारी-कंगाल करणें, देशोधडीस लावणें, धूळ फुंकावयास लावणें, धुळीचे दिवे खावयास लावणें, देसधूळ *f.* करणें. २ *to cause to seem inadequate or very poor* फिक्का पाडणें, अपुरा करणें; as, This scene beggars all description हा देखावा वर्णनातीत आहे. ह्या देखाव्याचें कितीहि उत्तम वर्णन फिक्कें व अपुरें दिसतें. Beggar-my-neighbour भिडूचीं सर्व पानें हरी तोंपर्यंत परयांचा खेळ *m.* Beggar'ed *p.* (*v.*V.) भिकेस लावलेला, विगतश्री, नष्टश्री. Beggar'liness *n.* (*v.*A.) भिकारपणा *m*, भिकारीपणा *m.* Beggar'ly *adv.* (*v.* A.) भिकारपणानें, भिकाऱ्याप्रमाणें, भिकाऱ्यावाणी (*vulg.*), दैनवाणें. Beggar'ly *a.* भिकार, भिकारी, कंगाल, भिकारवाणा-णी, भिकारपणाचा, दैन्याचा, दरिद्री. २ भिकारलक्षणाचा, भिकारचाळ्याचा. ३ हलकट, तिरस्कारार्ह. ४ दारिद्र्यामुळें घडलेला. [BEGGARLY SINS दारिद्र्यामुळें घडणारीं पापें. *Lying, flattery, stealing, dissimulation* are termed beggarly sins]. Beggary *n* याचनावृत्ति *f*, भिक्षुकवृत्ति (?) *f.* कंगाली *f*, याचकवृत्ति *f.* *To be reduced to B.* भिकेस लागणें, भीक *f.* लागणें *inv. con.*, भिकेची पाळी येणें, भीक मागण्याची पाळी येणें, भीक मागण्यास भाग पडणें. Beg'ged *p.* (*v.* V. T. 1.) प्रार्थलेला, याचित. २ मागितलेला, याचित. ३ जें सिद्ध करावयाचें त्याचीच सिद्धता गृहीत धरलेला. Beg'ging *n.* (*v.* V. T. 1.) *act* विनवणें *n*, प्रार्थणें *n*, &c., याचन *n*, याचना *f*, अभ्यर्थना *f*, याञ्चा *f.* (*v.* V. I.)-*act* भीक मागणें *n.* &c., भिक्षाटन *n*, याचकी *f*, भिक्षार्थन *n*, भिक्षुकी (?), याञ्चा *f.* [B. IS BETTER TRADE THAN WORKING. *cf.* घुसळतीपेक्षां डंड्या उकळतीचे घरीं फार. TO GO A-BEGGING (अ) भीक मागत जाणें, (योग्य मनुष्य न मिळाल्यामुळें) अयोग्य-भलत्याच मनुष्याच्या हातीं जाणें; AS, FOR WANT OF A COMPETENT MAN, THE POST WENT A-BEGGING. (ब) मागणी नसल्यामुळें स्वस्त दरानें विकला जाणें; as, MANGOES WERE SO PLENTIFUL THIS YEAR AT NASIK THAT THEY WENT A-BEGGING.] To beg the question वादग्रस्त विषयाचा सिद्धांत सिद्ध करण्याकरितां त्याची (त्याच सिद्धांताची) सत्यता गृहीत धरणें; as, Parallel lines will never meet, because they are parallel. ह्या उदाहरणांत जें सिद्ध करावयाचें आहे तेंच आपण गृहीत धरतों. ह्या पद्धतीला ॲरिस्टाटलनें *Petitio principii* हें लॅटिन नांव दिलें आहे.

*N. B.*—Beggar भिकारी, विनंति-प्रार्थना करणारा. Mendicant भिक्षु (बौद्धधर्मी). The Marathi word भिक्षुक will be best rendered by the English word 'priest.' With the word भिक्षुक are associated ideas of social dignity and learning.

Bega see Bigha.

Began (bē-gan') *pa. t.* of Begin.

Begem (bē-jem') *v. t.* (रत्नांनीं किंवा इतर रीतीनें) भूषित करणें; as, "Grass begemmed with dew-drops."

Beget (bē-get') [A. S. *begitan*, to acquire.] *v. t.* (कार्यरूपानें) उत्पन्न करणें, पैदा करणें, जन्म देणें (Usually said of fathers but sometimes of both parents.), उपजविणें, (परिणामरूपानें) उत्पन्न करणें; as, "Love is begot by fancy." *pa. t.* Begat, Begot. *pa. p.* Begot, Begot'ten. Begetter *n.* उत्पन्न करणारा, बाप, जनक.

Begift (bē-gift') *v. t.* देणगी देणें.

Begild (bē-gild') *v. t.* मुलामा देणें. *pa. t.* Begilded. *pa. p.* Begilded or Begilt.

Begin (bē-gin') [A. S. *be* & *ginnan*, to begin.] *v. i.* लागणें (in the sense of सुरू होणें), (ला) सुरुवात होणें, आरंभणें, प्रारंभणें (*poe*), उपक्रमणें (*poe.*), प्रवृत्त होणें, प्रवर्तणें, आरंभ-प्रारंभ-उपक्रम-मुहूर्त होणें, (चा) गणनमणें, पाऊल पुढें पडणें, पाय घालणें-शिरविणें (in the sense of commencing a new act), शिलान्यास करणें (in the sense of laying the foundation of a new work). [TO BEGIN IN GOOD EARNEST मनापासून-कळकळीनें सुरू करणें—मांडवमेड रोंवणें *idio.*—मुहूर्तमेढ घालणें *idio.*] २ आरंभणें, प्रारंभणें, आरंभ-प्रारंभ-उपक्रम होणें, प्रवृत्त होणें, चालू-सुरू होणें, टांका चालता होणें. *g. of o.* चालू-सुरू होणें, *mili.* तोंड लागणें, चालीस लागणें. This second set of meanings from आरंभणें to चालीस

he verb 'to begin.'. *v. i.* express the gen- of taking existence, form or being. B. *v.* णें, प्रारंभिणें, आरंभ-प्रारंभ करणें, लावणें, उपक्रम का-चालता-सुरू करणें, सुरवात करणें. Began *pa.* un *pa. p.* Begin'ner *n.* सुरवात-प्रारंभ करणारा, ग्राशिक्या, नवशिक्या, आरंभ करणारा, आरंभक, यासी, नवीन (R) in this sense. Beginning *n.* *m*, प्रारंभ *m*, सुरवात *f*; उपक्रम *m.* [मुहूर्त *m*, वरण *n*, ओंनमः *fig.*, गणपतिपूजन *n*, श्रीकार *m*, श्री *f*; उवाच *n.* हे शब्द आरंभ ह्या अर्थी विशेष प्रसंगीं वापरतात.] २ आगम *n*, उपक्रम *m*, मूळ *n.* [GRADUAL AND GENTLE BEGINNING अल्पारंभ. AT THE VERY B. प्रथमारंभीं, मुळारंभीं, मुळींमुहूर्ती, मुळामुहूर्तानें, मुळीं (R). B. AND END आदिअंत, पूर्वापार, शेंडाबुडखा, शेंडाबुंधा, आगापिछा, उपक्रम आणि उपसंहार, अथइति. FROM THE B. पहिल्यापासून, पूर्वीपासून, मुळापासून, मुळींपासून, प्रथमपासून. IN THE B. पूर्वी, पहिल्यानें, आदीं, आदौ, प्रारंभीं. THE VERY B. प्रथमारंभ, प्रथमचरण. २ (IN RESPECT OF TIME) प्रथमांश, पहिलें तोंड, तोंड, आदि, अवल, मुखचरण, प्रथमचरण, पूर्वावधि (S). FROM THE B. TO THE END आद्यंत, साद्यंत, अथपासून इतिपर्यंत, अथेति, अव्वल अखेर, आमूलचूड, आमूलाग्र. WITHOUT B. MIDDLE OR END आदिमध्यांतरहित.] ३ मूलपीठिका. Beginningless *a.* अनादि.

*N.B.*—For appropriate Marathi words for 'to begin' and 'to commence,' see the word 'to commence.'

Begird ( bē-gird' ) [ A. S. *begyrdan.* ] *v. t.* वेष्टन बांधणें, वेष्टणें, सभोंवतीं बांधणें ( with *with* ). *pa. t.* Begirt, Begirded. *pa. p.* Begirt. [गुंडाळणें.

Begirdle (bē-gird'l) *v. t.* पट्ट्यानें बांधणें, वेष्टणें, सभोंवतीं

Beglerbeg (bēg'-lēr-bēg) [Turk. *lit.* 'bey of beys'.] *n.* तुर्कस्थानांतील मुख्य वजीराच्या खालचा सुभेदार *m.*

Begloom ( bē-glōōm' ) *v. t.* उदास करणें, मलीन करणें, म्लान करणें, अंधारमय करणें.

Begnaw ( bē-naw' ) *v. t.* कुरतडून नाश करणें, कुरतडून फन्ना करणें, (आंतडीं) तोडून टाकणें, कुरतडणें.

Begone ( bē-gon' ) [impera. of 'be' & *pa. p.* of 'go.'] *interj.* नीघ, काळें कर, तोंड घेऊन जा, चालता हो, काळें करून जा, आपला देश घे. In the phrase 'Woe-begone' the word 'begone' is not the *pa. p.* of the English Begin, but it is the *pa. p.* of A. S. *began*, to go round, to beset. Thus the phrase woe-begone means 'beset with woe' दुःखानें पूर्ण ग्रासलेला.

Begore ( bē-gōr' ) *v. t.* रक्तानें माखवणें. Begored *pa. p.* रक्तानें माखलेला-माखवलेला.

Begot, Begotten ( bē-got', bē-got'n ) *pa. p.* of Beget उत्पन्न केलेला, जन्मास आणलेला &c., जनित, पैदा केलेला, उद्भवलेला (R).

Begrime ( bē-grīm' ) *v. t.* कटविणें or किटविणें, विटविणें, मळानें रापणें. To be begrimed किटणें, कटणें, काटणें, कट *m*-कीट *m*-बसणें, मळानें रापणें. Begriming *pr. p.*

Begrudge ( bē-gruj' ) *v. t. to envy any one the possession of* (चा) हेवा करणें; as, To begrudge a person something.

Beguile ( bē-gīl' ) [ A. S. *be*, & O. Fr. *guile*, deceit.] *v. t. to trick* मोह *m*- भुरळ *f*- भुरळें *n*- भोळें *n*- भुलवण *f.* घालणें, गोफाटणें, भूल भरणें, मोहून टाकणें, मोहिनी घालणें, झुलवणें. २ (time) घालवणें, करमवणें, करमणूक *f.* करणें, कालवंचन *n*- कालवंचना *f.* करणें. ३ (काळजीचें किंवा वेळेचें) भान नाहींसें करणें, मनरंजन करून थकवा किंवा कंटाळा नाहींसा करणें, मनरंजन करून चकविणें- भुरळ पाडणें. ४ (भुरळ पाडून) आडमार्गांत नेणें. Beguile'ment *n.* भुरळ *f.* २ मनरंजन *n.* ३ भान नाहींसें करणें *n.* ४ आडमार्गांत नेणें. Beguil'er *n.* भुरळ पाडणारा. २ मनरंजन करणारा. ३ भान नाहींसें करणारा. ४ भुरळ घालून आडमार्गांत नेणारा. Beguil'ingly *adv.*

Begum ( bē'-gum ) [ Urdu *begum.*] *n.* बेगम. हा शब्द उच्च प्रतीच्या मुसलमान स्त्रीला लावितात. २ मुलेंबाळें जीस आहेत अशी राजपत्नी *f.* ३ राजकन्या *f.* ४ थोर घराण्यांतील स्त्री *f.*

Begun ( bē-gun' ) *p.* ( v. V. T.) आरंभलेला, चालू केलेला-झालेला, आरब्ध, प्रारब्ध, उपक्रांत, सुरु, प्रवृत्त.

Behalf ( bē-hāf' ) [ A. S. *be healfe*, by the side.] *n.* पक्ष *n*, तरफ *f*; बाजू *f*; वत *f.* २ हित *n*, लाभ *m.* In behalf of च्या फायद्याकरितां, ची बाजू राखण्याकरितां. On behalf of च्या वतीनें, च्या तर्फेनें, साठीं, करितां, पक्ष धरून, वतीं. [बितणें-बेतणें.

Behappen ( bē-hap'n ) *v. t.* (वर) प्रसंग येणें, (वर) येऊन

Behave ( bē-hāv' ) [ DR. MURRAY SAYS THAT THIS WORD MUST HAVE BEEN FORMED IN THE 15TH CENTURY FROM *be* AND *have* APPARENTLY UNCONNECTED WITH A. S. *behabban*, TO BEHAVE ONESELF. TO BEHAVE ONESELF-TO HAVE BY (BE) ONESELF-TO CONTROL ONESELF AND HENCE THE MODERN MEANING OF *behave.*] *v. t.* (v. V. I.) (आपल्या पायरीला शोभेल अशा रीतीनें) वागणें, चालणें (used reflexively). B. *v. i.* चालणें, वागणें, वर्त्तणें, आचरणें, आचरण *n*-आचार-*m*-करणें, वहिवाटणें. To B. carefully जपून वागणें, मागें पुढें पाहून आपल्या पायरीला शोभेल असें वागणें. In conversation this verb is used without the adverb of manner; as, If you do not behave, you will be dismissed from the class. Behaviour *n.* (v. V.) वागणूक *f*; चाल *f*; चालचर्या *f*; चालणूक *f*; आचरण (?) *n*, आचरित (?) *n*, आचार (?) *m*, वर्त्तन *n*, वर्त्तणूक *f*; as, To be upon one's good behaviour or to be put upon one's good behaviour वर्त्तणुकीची कसोटी लागणें, वर्त्तन प्रसंगानुरूप असण्यावर पुष्कळ भिस्त आहे अशा स्थितींत असणें, कसाला लावणें. *Cf.* Marathi idiom सत्व घेणें. During good behaviour चांगली वागणूक आहे तोंपर्यंत.

Behead ( bē-hed' ) [Pref. *be*, & Head.] *v. t. to decapitate, execute, kill* डोकें *n*- डोस्कें (vulg) *n*- डोई

*f*-&c. मारणें-उडवणें *g. of o.*, गर्दन *f.* मारणें *g. of o.*, गळा *m.* सोडवणें *g. of o.*, शिरच्छेद *m*- करणें *g. of o.*—in covert or cant phraseology मुंडी मोचन *n.* करणें (R) *g. of o.*, शिरकमल *n.* उडविणें. Behead'al *n.* शिरच्छेद *m.* Behead'ed *p.* (v. V.) छिन्नमस्तक, छिन्नशिरस्क. Behead'ing *n.* (v. V.) डोस्कें उडवणें *n*, शिरच्छेद *m.*

Beheld (bē-held') *p. t.* & *p. p.* of Behold पाहिलेला, प्रेक्षित, अवलोकित, विलोकित, आलोकित, वीक्षित, दृष्ट.

Behemoth (bē'he-moth) [Either the pl. of Hebr. *behemah*, a beast, or a Hebraistic form of the Egyptian *p-ehe-mout*, 'water-ox.'] *n.* ख्रिस्ती धर्मशास्त्रांत या शब्दाचा उपयोग हिपॉपोव्यामस किंवा पाणघोडा *m.* याऐवजीं केला आहे.

Behest (bē-hest') [A. S. *behæs*, a promise.] आज्ञा *f*, आदेश *m*, हुकूम *m*, सांगी *f.*; as, To do his behest.

Behight (bē-hīt') [A. S. *behatan*, *be* & *hatan*, to call.] *v.t.* वचन देणें. २ च्या दिमतीस देणें, विश्वासानें हवालीं करणें. ३ अधिकारपूर्वक देणें. ४ मनांत असणें, कल्पना करणें. ५ आहे असें दाखल करणें-मानणें. ६ बोलावणें, असुक नांवानें हाक मारणें. ७ हुकूम करणें. This word is obsolete in all its senses. *pr. p.* Behighting. Behote *pa. t.* Behight *pa. p.*

Behind (bē-hīnd') [A. S. *be* & *hindan*, see Hind.] *prep.* पुढच्या बाजूच्या उलट, पाठीमागच्या बाजूस, पाठीमागें, मागें, पाठीं, पाठीशीं, पाठशीं, पश्चात्, पलीकडे (पैलीकडे); as, B. my house. [CLOSE B. पाठोपाठ, मागोमाग, लगोलग. To LOOK B. पाठमोरा पाहणें, सिंहावलोकन *n.* करणें.] २ *under the cover or shelter of* आड, आडऊड. [FROM B. पाठीमागून, पाठून, मागून, पाठीकडून, पाठलेकडून, मागलेकडून, पलीकडून or पैलीकडून, आडून.] ३ (गेल्यावर किंवा मरणानंतर) राहिलेला, पाठीमागें; as, He left two children B. him; He went to Poona leaving his books B. him. ४ पाठीमागें, अंतरावर; as, I am not behind the class in my studies.

Behind (bē-hīnd') *adv.* पाठीमागें, पिछाडीस, मागें, पाठीं, पृष्ठभागीं, पश्चात्, पश्चात्भागीं, पश्चिमभागीं, पृष्ठतः; as, To remain B. २ पाठीकडे. ३ वळून (To look B.). ४ पुढें न आणलेला, नजरेआडचा, नकळत, परोक्ष; as, There is no evidence B. ५ शिल्लक; as, There are some passengers B. ४ मागील, पूर्वकालचा; as, "Forgetting those things which are behind." Phil. III, 13. ६ (कोणी एक गेल्यानंतर) पाठीमागें; as, To stay B. Behindhand *adv.* & *a. in a state of backwardness* मागलटीस or मागलटीवर; as, In this matter he is very much B. [To FALL B. मागें-पाठीमागें-मागलटीस-मागलटीवर पडणें, मागें पडणें, मागलटणें, मागसावणें, मागसणें, माघारणें (?). To THROW B. मागें-पाठीमागें-मागलटीस or मागलटीवर टाकणें, मागसांडणें, माघारणें.] २ आदायाच्या जास्त खर्च अशा स्थितींत; as, The Budget is very much B. ३ धिमा, सुस्त, पाठीमागचा,

Behold (bē-hōld') [A. S. *be* & *healdan*, स भाग पडणें. *to observe, to view* पाहणें, अवलोकणें, विंत्रत. २ मा. (*poe.*), अवलोकन *n*- प्रेक्षण *n*-&c. करणें, चीच सि. निरखणें, निरीक्षण करणें. B. *v. i.* पाहणें, T. 1.) *act* *pa. t.* and *pa. p.* Beheld. Behold *interj.* अभ्यर्थना Beholden *a.* आभारी, उपकारी, उपकारब &c., सि. लागेला; as, I am very much beholde याञ्चा *f.* (old *p. p.* of 'behold,' used in the primi पळतीपेक्षां of the simple verb 'hold'). Behold'er *n* अ) भीक पाहणारा, बघणारा, प्रेक्षक, वीक्षक, निरीक्षक, लक्ष याच अवलोकन-&c.-कर्त्ता. Behold'ing *n.* (v. V. NT पाहणें *n*, अवलोकणें *n*, अवलोकन *n*, विलोकन *n*, *n*, वीक्षण *n*, संदर्शन *n.*

Behoof (bē-hōōf') [A. S. *behof*, advantage.] *n.* *m*, उपयोग *m*, फायदा *m*, सोय *f* (with *to, for, on*), "No mean recompense it brings to your behoof." [Milton.

Behot, Behote *pa. t.* of Behight.

Behove, behoove (bē-hōv', bē-hōōv') [A. S. *behofian*, to be fit, to stand in need of.] *v. t.* योग्य होणें, शोभणें, used impersonally; as, It behoves us. २ अगत्य पडणें, "It behooved Christ to suffer." Luke. Behove *v. i.* योग्य असणें, अगत्य असणें. Behove'ful *a.* उपयोगी, फायदेशीर, जरूरीचा. Behove'fully *adv.*

Being (bē'ing) *n.* असणें *n*, आहेपण *n*, जीवनदशा *f*, अस्तित्व *n*, भाव (S.) *m*, भव *m*, भवन *n*, स्थिति *f*, सत्ता (S.) *f*, वर्त्तन *n*, सद्भाव *m*, सत्त्व *n*; as, "In Him we live, move, and have our B." [To BRING INTO or TO CALL INTO B. जन्मास घालणें-आणणें, जन्म *m. n.* देणें, उत्पन्न करणें.] २ *metaph.* मूर्त किंवा अमूर्त पदार्थ *m.* ३ सत्व *n*, भूत *n*, वस्तु *f.* ४ व्यक्ति *f.* [THE SUPREME B. परमेश्वर.] ५ प्राणी *m.* B. *pr. p.* of the verb 'to Be.' B. *a.* चालू असलेला, विद्यमान; as, For the time B. चालू असलेल्या काळापुरता. This being so असें असल्यामुळें, अशा स्थितींत, असें आहे म्हणून. Being'less *a.* Being'ness *n.* To have one's being असणें.

*N. B.*—वर दिलेल्या Being शब्दाच्या अर्थांतील सत्ता, सद्भाव, सत्व हे शब्द सत् (असणें) ह्या नामाचीं भाववाचक रूपें आहेत. भाव, भव, भवन, स्थिति आणि वर्त्तन हे शब्द संस्कृत भाषेमध्येंच Being (असणें) शब्दाचे प्रतिशब्द आहेत. ह्या अर्थीं त्यांचा संस्कृतपणा जाऊन त्यांना शुद्ध मराठीपणा आला नाहीं.

Beinked (bē-inkt') *p. a.* शाईनें माखलेला, शाईनें फांसलेला.

Bejesuit (bē-jez'ū-it) *v. t.* 'जीझसच्या सोसायटीची' किंवा 'जेसुइट' पंथाची दीक्षा देणें, मन वळवून 'जेसुइट' नामक ख्रिस्त पंथांत ओढणें.

Bejewel (bē-jōō'el) *v. t.* रत्नांनीं मंडित करणें, अलंकारभूषित करणें; as, A bejeweled neck.

Bekiss (bē-kis') *v. t.* प्रेमानें किंवा लडिवाळपणानें तोंडभर [मुका घेणें.

Beknave (bē-nāv') *v. t.* (*obs.*) एखाद्यास ठक ह्मणणें. २ ठक आहे असें समजून त्याच्याशीं वर्तन करणें, ठकासारखा वागवणें.

...wn ( bē-nōn′ ) *a.* माहितीचा, ओळखीचा, महशूर.

...our (bē-lā′bur) [A. S. *be* & L. *labor*, toil.] *v. t.* ...णें, कुटणें, ठोकणें. “Ajax belabours there a ...s ox.” *Dryden.* २ अतिशय मेहनतीनें काम ...णें, (वर) काळजीपूर्वक मेहनत घेणें. “If the earth bela boured with culture, it yieldeth corn.”

...e (bē-lās′) *v. t.* फितीनें किंवा दोरीनें बांधणें. २ फीत ...चून शृंगारणें, फीत लावणें.

...ate ( bē-lāt′ ) [ Pref. *be* & Late.] *v. t.* उशीर करणें, ...रात्र करणें. Belated *a.* उशीरानें आलेला, काळोखानंतर आलेला. Belatedness *n.*

...laud ( bē-lawd′ ) *v. t.* प्रशंसा करणें, स्तुति करणें.

...lay ( bē-lā′ ) [A. S. *belecgan.* See Lay.] *v. t.* *naut.* खुंट्याभोंवतीं लांब दोरखंड गुंडाळणें. Belaying-pin *n.* बोटींतील दोरखंड गुंडाळण्याचा खुंटा *m.* Belay there आटोपा.

Belch (belch,-sh) [A. S. *bealcian*, to bellow.] *v. t.* ढेंकर देणें. २ बाहेर टाकणें-फेंकणें, ओकणें; as, A volcano belches flames or ashes. B. *v. i.* ढेंकर येणें. २ कमजास्त जोरानें बाहेर पडणें. B. *n.* ढेंकर *m*, ढेंकूर *m. f.* २ उद्गार *m* (बाहेर टाकणें). Low or soft B. गुटकुळी *f*, डचकळी *f.* Sour B. करपट ढेंकर *m*, *f*, सारढेंकर *m*, *f.*

Beldam, Beldame (bel′dam,-ām) [Formed from *dam*, mother & *bel*, expressing relationship. *cf. belsire.*] *n.* (*obs.*) (मूळार्थी) आजी *f*, ह्यातारी *f*, ह्यातारडी *f*, वृद्ध स्त्री *f*, थेरडी *f.* २ जखीण (*) *f*, डंखीण (*) *f*, विशेषतः कुरूप स्त्री *f.*

*N. B.*—वर दिलेले जखीण, डंखीण हे शब्द हल्लीं witch शब्दासाठीं बहुधा वापरतात.

Beleaguer (bē-lēg′ėr) [Dut. *be* & *leger*, camp.] *v. t.* सैन्याचा वेढा घालणें, कोंडमारा करणें, वेढणें. Beleaguer-er *n.* सैन्याचा वेढा घालणारा. Beleag′uerment *n.*

Belecture (bē-lek′tur) *v. t.* कंटाळा येईपर्यंत व्याख्यानें देणें, पुष्कळ व्याख्यानें देणें.

Bel-Esprit (bel′es-prē) [Fr.] *n.* अतिशय बुद्धिमान् मनुष्य *m.* *pl.* Beaux-Esprits (bōz es-prē).

Belfry (bel′fri) [M. E. *berfraey*, a watch-tower.] *n.* ख्रिस्ती लोकांच्या देवळांतील घांट असलेला घुमट *m*, घांटघुमट *m*, घंटालय *n.* २ (बचावासाठीं किंवा हल्ल्यासाठीं उपयोगीं पडणारा) चालता-हालता लांकडाचा बुरूज *m.*

Belgian (bel′ji-an) *n.* बेल्जिअम देशांतील रहिवासी. B. *a.* बेल्जम देशाचा, बेल्जियन.

Belgravian (bel-grā′vi-an) *a.* लंडनच्या बेल्ग्रेव्हिया भागांतला. २ छानछोकीची फाजील हांव असणारा. ३ गर्भश्रीमंतीचा खोटा आव घालणारा.

Belial (bēl′yal) [Heb. *bli*, not, & *ya′al*, use or profit.] *n.* बलियाल *m*, भ्रष्ट मनुष्य *m*, पापमूर्ति *f.* A son of B. पुंड व वंडखोर मनुष्य *m*, अधम-दुष्ट माणूस *m.*

Belie (bē-lī′) [A. S. *be*, & Lic.] *v. t.* खोटा करणें, खोटा पाडणें, खोटेपणा आणणें, लटका-मिथ्या-लबाड &c. करणें, लबाडी *f*- लटीकवाद *m*- असत्यता *f*- &c. आणणें, (ची) लबाडी पदरांत घालणें; as, “His terror belies his words.” २ उलट भासविणें, (वर) तुफान घेणें, खोटें सांगणें, खोटें वर्णन देणें, आळ घालणें, कंडी उठवणें with वर *of o.* ३ निराश करणें; as, To B. one's hopes. ४ निंदा करणें, उपहास करणें. “Thou dost belie him, Percy, thou dost belie him.” ५ खोव्यानें भरणें; as, “The breath of slander doth belie all the corners of the world.” *Shakes.* ६ *to counterfeit* नकल करणें, उतरणें *g. of o.*

Believe ( bē-lēv′ ) [ M. E. (*bi*)-*be*+*leafa* shortened from *gel-eafa*, belief. बाराव्या शतकापासून ह्या शब्दाचीं जीं निरनिराळीं रूपें झालीं आहेत त्यांवरून हा शब्द beleive असा लिहावयाला पाहिजे होता; परंतु सतराव्या शतकापासून हा शब्द relieve ह्या शब्दाच्या धर्तीवर believe असा लिहितात.] *v. t. to credit, to trust* विश्वास ठेवणें, खरा मानणें, विश्वासणें, मान्यता *f.* करणें *g. of o.*, भरंवसा *m*-भाव *m*- इतबार *m*- &c. ठेवणें-धरणें, खरा-सत्य वाटणें *in. con.* A make-believe हुलकावणी *f* (*v.* दाखव), हूल *f* (*v.* दाखव). To make-believe एखाद्या नसलेल्या गोष्टीचा आहे असा भास करवणें, ढोंग करणें, हुलकावणी-हूल दाखवणें. Believe *v. i.* विश्वास-भरंवसा असणें, मानणें. To B. in (एखादी गोष्ट घडून आली किंवा येईल असें) खरें मानणें; as, (अ) To B. in the resurrection of a saint means to believe that the saint has really risen or will rise from the dead साधूचें पुनरुत्थान झालें-होईल असें मानणें. To believe in ghosts means to believe that ghosts exist भूतपिशाच खरें आहे असें मानणें. (ब) एखाद्या मनुष्याची वर्त्तणूक-वचनें व हेतू पूर्ण विश्वसनीय आहेत असें मानणें; as, I believe in God means I believe that the promises &c. of God are trustworthy ईश्वराचीं वचनें विश्वास ठेवण्यालायक आहेत असें मानणें. (क) एखाद्या वस्तूचे गुणधर्म किंवा परिणाम सुखावह आहेत असें मानणें; as, To believe in sea-bathing means to believe that sea-bathing is beneficial समुद्रस्नान सुखावह आहे असें मानणें. To believe on श्रद्धापात्र आहे असें बिनदिक्कत मानणें, श्रद्धा बिनदिक्कत ठेवणें; as, To believe on व्यास, means to believe that व्यास is an object of religious trust or obedience व्यासावर बिनदिक्कत विश्वास ठेवणें.

Belief ( bē-lēf′ ) *n. trust* भरंवसा *m*, विश्वास *m*, समजूत *f*, मान्यता *f*, इतबार *m*, श्रद्धा (*) *f*, भाव *m* (*). २ *intuition* सहजावबोधानें आलेला विश्वास, सहजावबोध *m*, प्रत्यय *m.* ३ *mental acceptance* (of a proposition) मान्यता *f.* ४ *a creed, religion* मत *n*, धर्म *m*, मार्ग *m*, पंथ *m.* ५ *the object of belief* श्रद्धाविषय (*) *m*, (*) विश्वासस्थान *n.* ६ *trust in God* आस्तिक्यबुद्धि *f*, आस्तिकता *f*, आस्तिक्य *n*, अस्तिभाव *m.* [ Ultimate B. प्रमाणाक्षममत *n*, स्वसंवेदनीय तत्व *n*, अंतिमतत्व *n*. जें

प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध करितां येत नाहीं तें.] Belief'less *a.* Believ'able *a.* विश्वास ठेवण्याजोगा, खरें मानण्याजोगा, श्रद्धेय, विश्वसनीय, भरंवशालायक, माननीय. Believ'er *n.* (v. V.) भरंवसा-विश्वास ठेवणारा, विश्वासणारा, मानणारा, विश्वासी, भाविक. I (in theology) आस्तिक. II. of a divine revelation शास्त्रमानी, शास्त्रमंता. III spec. *a Christian disciple* ख्रिस्ती, ख्रिस्तीधर्मानुयायी. Believing *p. a.* विश्वास ठेवणारा, &c. B. *n.* विश्वास ठेवणें *n*, &c. Believ'ingly *adv.* विश्वास ठेवून, &c., भावपूर्वक.

*N. B.*—Belief, Credit, Trust आणि Faith ह्या चार समानार्थी शब्दांना खालील प्रतिशब्द यथार्थ होतील. Belief विश्वास; Credit पत; Trust भरंवसा; Faith श्रद्धा. Belief प्रत्यक्ष इंद्रियगोचर अनुमवाशिवाय एखादी गोष्ट खरी आहे असा विश्वास.

Belike (bē-līk') [A. S. pref. *be*, by & Like *n.* or *a.* by what is likely, by what seems.] *adv. in all likelihood, probably* बहुतकरून, बहुधा. २ *perhaps* कदाचित्, न जाणों, न कळे. "B. boy, then you are in love."

Belinuncia (belinun'ciä) *n.* जिच्या रसानें गॉलचे (फ्रान्सचे) रहिवासी आपले बाण विषारी करीत असत ती वनस्पति *f.* 'बेलिनन्शिआ' *f.*

Belittle (be-lit'l) [Pref. *be* & Little.] *v. t.* (महत्व) कमी करणें, लहान असें दर्शविणें, हिणवणें, उणेपणा आणणें, अप्रतिष्ठा-अवमान करणें. Belit'tlement *n.* हिणवणें *n*, कमी करणें *n*, उणेपणा *m.* Belittling *a.*

Bell (bel) [A. S. *belle*, a bell.] *n.* घंटा *f*, घांट *f*, घांटी *f*, घन [R.] *m.* [CLANKING OR TINKLING B. झुंगुर *m*, घणघणघंटा (?) *f*, घागरी *f.* NECK B. गळघांटी *f.* STRING OF LITTLE BELLS घांटसर *m*, झुंगुरमाळ *f*, घागरमाळ *f.*] २ *bot. a bell-shaped corolla* घंटाकृति पुष्पान्तरवटिका *f*, फुलांचें घांटेसारखें आंतलें आवरण, पुष्पघंटा. ३ घड्याळाचें काम करणारी घंटा *f.* ४ *naut.* घंटेनें वाजवलेले घड्याळाचे तास*m, pl.* ५ जहाजावरील दर अर्ध्या तासाची घंटा *f.* मोठ्या जहाजावर ही घंटा पहारेकऱ्यास वेळ कळविण्याकरितां तासांत दोनदां याप्रमाणें चार तासांच्या पहाऱ्यांत आठ वेळां वाजवितात. ६ घांटेसारखें-घंटाकृति भांडें *n*, किंवा वस्तू *f*, घंटापात्र *n.* B. *v. t.* घांट बांधणें; [TO BELL THE CAT मांजराच्या गळ्यांत घांट बांधणें. २ *fig.* एखाद्या धोक्याच्या कामांत पुढाकार घेणें, (अगदीं भयंकर शत्रूशीं) झगडणें -सामना देणें.] ३ घांटेचा आकार देणें, घांटेच्या आकाराचें करणें; as, To bell a tube. B. *v.i.* फुलणें; as, Hops B. कळीचें अंतराच्छादन येणें. Bell-jar *n.* घाटेच्या आकृतीची बाटली *f*, घांटेच्या आकृतीचें भांडें, घंटाकार कुपी *f.* B.-cote *n. archi.* घांटेचे घुमट *m*, घांट बांधण्याचा घुमट *m*, घांटघुमट *m.* B. crank *n.* काटकोनी तरफ *f*-उत्तोलनी *f.* B. clapper *n.* or B. tongue *n.* घंटेचा लोळा *m*, लोळी when small, घंटावादक. Bell-founder *n.* घंटा बनवणारा, घांटा ओतणारा. Bell-glass *n*, घंटाकृति कांचपात्र *n*, घंटाकुपी *f.* Bell-hanger *n.* घंटा बांधणारा व दुरुस्त करणारा. Bell-man *n.* घंटेनें थाळी पिटणारा. २ (हल्लींचें पोलीसखातें निघण्यापूर्वी) रात्रीचे रस्त्यांतून जे गस्तवाले फिरत असत त्यांपैकी एक, दवंडीवाला. Bell-metal *n. an alloy of copper and tin* कांसें *n.* Bell-punch *n.* घंटापंच, गजर करून तिकिटाला भोंक पाडणारें यंत्र *n*, गजराचा-गजर असलेला वेधक. Bell-ringer *n.* (विशेष प्रसंगीं) घंटा वाजविणारा. २ हा-तांतल्या घंटा सुरावर वाजविणारा. Bell-rope *n.* घंटे (वाजविण्याची) दोरी *f*, घांटेच्या लोळ्याची दोरी *f*, घांटेची दोरी *f.* Bell-shaped *a.* घंटाकार, घांटेच्या आकाराचा. Bell-wether *n.*(अ)(कळपांतील) गळ्यांत घांट असलेला म्होरकें मेंढरूं *n.* (ब) दंगेखोर मंडळीचा म्होरक्या. To curse by bell, book and candle. रोमनक्याथलिक धर्मपद्धतीप्रमाणें बहिष्कार घालणें. अशा प्रसंगीं देवळांतील घंटा वाजवितात, प्रार्थनापुस्तक मिटतात, मेणबत्ती विझवितात. To bear or carry away the bell सर्वांत उत्तम ठरणें, (शर्यतींत) पहिला येणें, पुढारी असणें, पहिली जागा पटकावणें. To hang all one's bells on one horse आपली सर्व मालमत्ता एकाच मुलास देणें. To lose the bell तंट्यांत पाडाव होणें, शर्यतींत हरणें. The passing bell देहावसानाचे वेळीं वाजविण्याची घंटा *f.* [The different kinds of bells are—church-bell, hand-bell, alarm-bell, marriage-bell &c.]

Bell (bel) [L. *bulla*, a bubble in water.] *n.* प्रवाही पदार्थांत येणारा बुडबुडा *m.* [ना करणें.

Bell (bel) [A. S. *bellan*, to roar.] *v. i.* डुरकणें, गर्जना करणें.

Belladonna (bel'la-don-na) [It. *bella donna*, fair lady, one property of belladonna is to enlarge the pupil, and so add brilliance to the eyes.] *n.* एक प्रकारची विषारी वनस्पति *f*, 'बेलाडोना.' Tincture Belladonna *n.* (बिब्याच्या अर्कासारखा) बेलाडोनाचा अर्क *m.* (आपल्याकडे बिब्याच्या तेलानें जो गुण येतो तोच या औषधानें येतो.)

Belle (bel) [L. *bella*, *bellus*, fine.] *n.* अति सुंदर स्त्री *f. fig.* सुंदरी *f*, स्त्रीरत्न *n*, खुपसुरत स्त्री *f*, रूपवती *f*, चांदणी, चटकचांदणी *f*, परी, रंभा, अप्सरा.

Belles-lettres (bel-let'r) [Fr. lit. 'fine letters.'] *n. pl.* भाषा *f*- अलंकार *m*- काव्य इत्यादि शास्त्रें *n. pl.*; प्रौढसारस्वत, उच्च सारस्वत. Bellet'rist, Bellet'trist *n.* सारस्वतप्रवीण. Belletris'tic *a.*

Bellibone (bel'i-bōn) *n. Spens.* सुस्वरूप व गुणवान् स्त्री *f.*

Bellicose (bel'ik-ōs) [L. *bellicosus*, very warlike, from *bellum*, war.] *a.* भांडखोर, कज्जेदलाल. २ शूर, युद्धप्रिय, लढाईचे विचार नेहमीं मनांत घोळवणारा. Bel'licosely *adv.* Bellicos'ity *n.*

Bellied (bel'lid) *p. a.* ढेरपोटाचा *p. t.* & *p. p.* of the verb 'to Belly.'

*N. B.* Even though no decisive line can be drawn between adjectives and participles in *ed*, in such formations as: gifted, ill-conditioned, landed, bodied, leisured, moated, monied, talented, eagle-eyed, barefooted, cone-shaped, unfriended &c., *ed* having evidently an adjectival force should be treated as an ad-

jectival suffix meaning *having or being in possession of*; as, *landed* means having lands, *four-footed*, having four feet and *talented*, possessing talents.

Belligerent ( bel-ij'-ér-ènt ) [ L. *belligerāre*, to wage war. ] *a.* युद्ध चालवणारा, लढाईचा, युद्धांत गुंतलेला. B. *n.* युद्धांत गुंतलेलें राष्ट्र *n*, लढणारें-लढाऊ राष्ट्र. २ युद्ध चालवणारा. Bellig'erancy *n.*

Bellona ( bel'lōna) [ L. *bellum*, war.] *n.* 'बेलोना' *f*, रोमन लोकांची रणदेवता *f.* २ *fig.* रणशूर स्त्री *f.*

Bellow ( bel'lō ) [ A. S. *bellan*, to roar.] *v. i.* डुरकणें, डुरकाळी फोडणें, डरकण *n*- डरकणी *f*-डरकी मारणें. २ *call* गागणें, आरडणें, ओरडून बोलावणें-पुकारणें- बोलणें, जीव खरडून बोलणें. ३ ( from pain ) आकांतणें ( *poe.* ), आकांत *m*-आक्रोश *m*-&c. करणें, अकांडतांडव करणें, ओरडणें. [To B. suddenly भोंक *n.* फोडणें. To B. and beat the mouth बोंबलणें, बोंबा *f. pl.* मारणें- शंखध्वनि *m*- पांचजन्य *m.* करणें.] ४ ( the sea, wind ) गर्जणें, गाजणें, घोषणें, सोसावणें, घोगावणें, गर्जना *f*- गोंगाट *m*- करणें. B. *v. t.* ( मोठ्या आवाजानें ) ओरडणें,-बाहेर टाकणें; as, " Would bellow out a laugh." Bellow, Bellowing *n.* (v. V. I.) डरकणें *n*, ढेंवणें (*obs.*) *n*, &c., डरकन *n.* For more meanings see the verb. २ गागणें *n*, ओरड *f*, ओरडा *m.* ३ ओरडणें *n*, आकांतणें, आकांत *m*, आक्रोश *m.* ४ गरजणें *n*, गर्जना *f*, गर्जन *n*, खळाळ *m*, कल्होळ *m*, दरसा *m.* Bellower *n.* ( v. V. ) ओरडणारा, डुरकणारा, बोंबल्या, बोंबमाऱ्या, बोंबठोक्या, ओरड्या.

Bellows ( bel'lōz ) [ A. S. *bælg*, *bælig*, bag. ] *n. pl.* (भट्टीचा) भाता *m*, *dim.* भातडी *f*, भातोटा *m*, भस्त्रा *m*, भस्त्री *f.* २ बाजाच्या पेटीचा भाता *m*, धम (न) ण *f.* ३ *fig.* द्वेष किंवा चुरस वाढविणारें कारण *n.* To blow with the B., To work the B. भाता *m.* फुंकणें-धमकणें. Hydrostatic B. जलभाता *m*, पाण्यानें चालणारा भाता *m.* Bellows camera भात्यासारखी प्रकाशलेख घेण्याची पेटी *f.*

Belly ( bel'li ) [ A. S. *bælg*, *belg*, bag.] *n. pl.* Bellies पोट *n*, उदर *n*, कुक्षि *m*, जठर *m*, *n*, जनावराचा पाठीच्या समोरचा भाग *m.* [B. ALLUSIVELY दरा *m*, गार *f*, खळी *f*, खांच *f*, कोठा *m.* B.-in contempt, endearment, &c. पोटकूळ *m*, पोटकली or कुली *f*, पोटनळी *f.* B.-expense(*) पोटखर्च *m.* Distended B. तडस लागलेलें-फुगलेलें पोट.] २ (*obs.*) गर्भाशय *m*, स्त्रियांचें गर्भस्थान *n.* ३ वस्तूचा आंतील भाग *m*, *fig.* पोट *n*; as, The belly of a ship. ४ पोकळी *f*, कोठा *m*, पोट *n*, अंतर्गोलाची पोकळी *f*, पोटासारखा फुगलेला भाग *m.* as, The belly of a bottle. ५ अंतर्गोलपृष्ठ *n*, झोल *f*, पोकळी *f*; as, The belly of a sail. Empty B. (*) अनोशें or अनशवें पोट *n*, रिक्तकोष्ठ *n*, रिक्तोदर *n.* With or upon an empty B. (*) उपाशीं, उपाशी पोटीं, निराळे पोटीं, अनशवें पोटीं or अनशे पोटीं or अनशिळें पोटीं, उपवासीं. With or upon a full B. (*) भरल्या पोटीं, जेवल्या पोटीं. Shooting in the B. गर्भार स्त्रियांच्या वेदना, तिडीक-कळा येणें. Stinting or pinching of the B. (*) पोटमारा *m*, पोटमार *f*, पोटास टांच देणें, पोटास चिमटा घेणें, पोट बांधणें, पोटकोंडा *m*, पोटतंगचाई *f.* [Swelling or swollenness (*) of the B. पोटफुगी *f*, आध्मान *m*, आझान *n.* Certain combinations of words expressing this sense are पोट डांबारलें or डांभारलें or डांबरलें, पोटानें or पोटांत डंबा (भा) रा धरला, पोटामध्यें गुबारा धरला, पोटांत तडस भरले or तडस लागले, पोटांत दब्ब झालें, पोट तट्ट फुगलें, टमटमीत or टुमटुमीत भरलें, or झालें-दबदबीत-दुमदुमीत-डेंबरें-डुबरें-&c. झालें.] Shrunkenness and flattenedness of the B. is expressed with equal force by पोटाची पत्रावळ झाली, पोट पाताळास गेलें, पोटास बखळ पडली, पोट रसातळास गेलें, पोटाचीं भकाटें *n. pl.* बसलीं-पडलीं or खपाटें *n. pl.* बसलीं, पोट भकाटीस or भकाळीस गेलें, पोट पाठ एक झाली, पोट भकाट-(ळ) लें, भकाळ्या *f- pl.* पाखली or वाखली *f- pl.* बसल्या or पडल्या, पोट पाठीस मिळालें. The three folds across the B. ( from obesity or age ) त्रिवली *f.* To be engrossed in providing for the B. पोटाचे पाठीस लागणें, पाठीस पोट *n.* लागणें *in. con.* To go to the B. (*) पोटीं पडणें, भक्षस्थानीं पडणें. To have a B. to fill (*) पोट *n.* पाठीस लागणें. To pinch one's B. पोटबांधणें, पोटास विबे *m, pl.* घालणें, पोटास पाटा *m.* बांधणें, पोटकोंडा *m.* करणें, (R.), पोटतंगचाई करणें (R.), पोटाला चिमटा घेणें *idio.* To pinch the B., to clothe the back (*) कण्या खाऊन मिशांस तूप लावणें. Whip my back, don't cut my B. (*) पाठीवर मार पोटावर मारूं नको. Belly *v. i. to swell out* फुगीर होणें, (ला) पोपडा येणें. झोल *m*-झोलका *m*-येणें. B. *v. t. to cause to swell out* (R.) फुगावणें, झोल पाडणें. Belly-ache (*) पोटशूल *m*, पोट दुखणें *n*, पोटदुखी *f*, उदरशूल *m.* [Constitutional or constant B. पोटदुखा ( *obs.* ) *m*, पोटदुखी *f.*] Belly-band पेटी *f.* २ gener. पोट बांधणें *n*, तंग ( of a horse). ३ पोटावर बांधण्याचा गरम कपडा *m.* ४ *naut.* शीड आंवळण्याचा पट्टा *m*, शीडदोर *m.* Belly-bound *a.* बद्धकोष्ठ *pop.* बद्धकोष्ठ्या. Belly-fretting *n.* ( applied to a horse) कुरकुरी. Belly-ful *n.* पोटभर *f*, पोटभरती *f*, पोटभर अन्न *n*- जेवण *n.* [With half a B. अर्धपोटीं, निमे पोटीं. To eat a B. पोटभर जेवणें-खाणें, रगडून -कचकावून जेवणें.] Belly-god *n.* खादाड, पोटभरू *m*, पोटभऱ्या *m*, पोटबाबू *m*, पुकानंद *c*, खादू *c*, खादुनंदन *m*, खाबू *c*, उदरंभर. Belly-timber *n.* (used ludicrously) पोटगी, शिधासामुग्री *f*, बेगमी *f*, तरतूज *f.* Belly-worm *n.* पोटकिडा *m.* The belly has no ears भुकेला मनुष्य सबबी किंवा उपदेश यांकडे लक्ष्य देत नाहीं. *cf.* Marathi idiom आधीं पोटोबा मग विठोबा. Lower belly ( Hypogastrium ) ओटीपोट *n*, बेंबीच्या

खालचा पोटाचा भाग *m*, नाभ्यधःप्रदेश *m*. Middle-belly *n*. (Umbilical region) नाभीच्या सभोंवतालचा प्रदेश *m*, नाभिप्रदेश *m*, नाभिःस्थप्रदेश *m*. Upper-belly *n*. (Epigastrium) नेसण्याच्या वरच्या भागापासून छातीच्या पिंजऱ्यापर्यंतचा पोटाचा भाग *m*, नाभ्यूर्ध्वप्रदेश *m*. Belly *a*. पोटाचा उदराचा, फुगीर.

*N. B.*—Belly पोट, Stomach जठर हे प्रतिशब्द एकदा कायमचे ठरवून टाकावे व होतां होईल तितकें stomach च्या बद्दल पोट व Belly च्या बद्दल जठर असें शब्द वापरूं नयेत.

All the phrases and sentences marked with an asterisk as given by Mr. Candy are not English idioms, but they are merely literal translations of the Marathi idioms and phrases into which the word 'पोट' enters. In all the above cases, the word 'belly' is not used in elegant English. It is un-English to say 'belly-expense' and 'upon or with an empty belly,' but idiomatic expressions for the same are 'boarding expenses' and 'on or with an empty stomach.' An educated Englishman will say that he suffers from 'stomach-ache,' but not from 'belly-ache.' It is equally un-English to use 'pinching of the belly' for 'pinching of the stomach.' We should say 'to starve the stomach (or one's self) to dress (one's self) well' but not 'to pinch the belly, to clothe the back.' It is again un-English to say a disease (as measles) 'goes to the belly' but we should say a disease (as measles) 'is suppressed in the body.' 'Whip my back, don't cut my belly,' should be 'Whip me on the back, but don't deprive me of my food.'

So also is 'Swelling or Swollenness of the belly' the literal translation of पोटफुगी and other Marathi expressions given by Mr. Candy to follow it. Our own renderings are: पोट फुगलें आहे The belly (Abdomen) is puffed up. पोट दवदवीत झालें आहे. The belly (Abdomen) is bloated. पोट तट्ट फुगलें आहे. The belly (Abdomen) has become tympanitic or is puffed up. पोटास तडस लागली आहे. There is a feeling of tension in the belly. पोटांत दवा धरला आहे. There is an accumulation in the bowels. पोट डांबरलें आहे. The bowels have become inactive.

**Belong** (be-long') [A. S. *be* & *langian*, to desire.] *v. i.* (with *to*) *to be the property of* असणें with चा-कडे &c.; as, हें घर त्याचें आहे This house belongs to him, लागणें, माल *m*- &c. असणें *in. con.* २ *to be the province or business of* असणें with चा-कडे-&c.; (as, हें काम त्याचें आहे. This work belongs to him), लागणें, इलाख्यांत &c. असणें *g. of o.*, काम *n*-प्रकरण *n*. असणें *in. con.* ३ *to have relation to* लागणें, संबंध *m*. असणें, संबंधी-निसबतीचा असणें; as, No blame belongs to you. ४ (चा) अंश, भाग किंवा तुकडा असणें; as, These fo[rts] belong to the king's army. ५ (च्या) लायक अ[सणें]; as, "Strong meat belongeth to them that ar[e of full] age." ७ नोकरींत असणें; as, This servant belong[s to] me. Belonging *n*. मालकीची वस्तु *f*. २ *pl*. जि[नगा] ३ अंगभूतवस्तु *f*- साहित्य *n*. ४ (*coll.*) आसइष्ट, गोत; as, "Few persons of her ladyship's bel[ong]ings stopped, before they did her bidding, to [ask] her reasons." *Thackeray*. Belonging *p*. (*a*. 1.) सत्तेचा. २ अंगीभूत, अंगभूत, अंगसंबंधी, संबंधी, संबंधीक, आंगिक, अनुगत, निसबतीचा, पोटचा, यींचा, लागी, पर and परायण (*in comp.*).

**Beloved** (bē-luvd') *a*. आवडता; (as, 'My beloved son.' Bible). २ प्रिय, जिवलग, प्यारा, वाली, वल्लभ, प्रेमपात्र, दयित, प्राणसा (R), जीवसा (R), प्रीत, प्रेमास्पद, अभीष्ट, अभीप्सित (followed by '*of*' when *p. p.*). Beloved by all सर्वप्रिय. Best beloved इष्टतम. Beloved *n*. प्रिया, प्रियतमा, कांता, दयिता, प्रीतिपात्र, रमणी, जिवलगा, मनोरमा, कामिनी, रामा, वल्लभा, प्यारी, सजणी, साजणी (All these words apply to females), प्राणनाथ, प्राणपति, प्राणसखा, प्राणेश्वर, प्राणेश, प्राणप्रिय, प्राणविसांवा, कांत, दयित, वल्लभ, प्रियकर, प्रियतम, प्रियरमण, जिवलग. (All these words are of masculine gender and apply to a lover or husband.)

**Below** (bē-lō') [Pref. *be* & Low.] *prep*. (च्या) खालीं, (पेक्षां) उंचसर नव्हे; as, Earth B. the Sun; B. the knees. [From below खालून]. २ (पदवीनें, मानानें, किमतीनें, गुणानें) कमी किंवा उणा; as, "One degree B. kings." *Addison*. ३ अयोग्य, असदृश, अननुरूप, न शोभणारा; as, "Who thinks no fact B. his regard." **Below** (bē-lō') *adv*. खालीं, खालच्या जागीं किंवा खोलींत, खालतीं, हेट (*vulg.*), तळवटीं (R), अधः, अधरतः, अधरात्, अधस्तात्; as, I shall wait B. २ इहलोकीं, भूमीवर; as, "We are all sinners B." ३ अधोलोकीं, नरकांत, अधोभुवनीं, पातालांत; as, "The depraved are thrown into regions B." ४ कनिष्ठ-खालच्या कोडतांत; as, At the trial B. ५ पानाच्या पुढील भागांत; as, On some page B. From B. खालून.

**Belt** (belt) [L. *balteus*, border.] *n*. पट्टा *m*, कमरपट्टा *m*, मेखला *f*, रशना *f*; as, A lady's B., A sword-B. २ अडकवण *n*.; as, To confine within B. of a rule. ३ (पट्ट्यासारखी लागलेली पदार्थांची) वाटोळी ओळ *f*- रांग *f*.; as, A B. of trees. ४ (गोलावरचा किंवा पृथ्वीवरचा) कटिबंध *m*. ५ *geog*. सामुद्रधुनी *f*.; as, The Greater B. and the Lesser B. belong to the Baltic Sea. ६ नाइटपदवीच्या खुणेचा पट्टा *m*. ७ *mech. engi.* (दोन यंत्रांवरचा) पट्टा *m*. एका यंत्रानें दुसऱ्या यंत्रास गति देण्याला याचा उपयोग करितात. ८ (जनावराच्या अंगावरील) उपजतचा रंगीत पट्टा *m*. B. *v. t.* पट्ट्यानें बांधणें, सभोंवताली बांधणें, भोंवतीं गुंडाळणें. Belt'ed *a*.

कार होईल or strap-fork पट्टयाचा वाटाड्या m. Belt'ing कारित्व (तसा वांकवितां येईल असा) मऊ चामड्यांचा तु-जहागीर (याचे यंत्राचे पट्टे करितात.) २ वादीनें मारणें प्रसाराच m. Belt-pulley पट्टयाची कप्पी f (पुली). Belt-भोगी, n. पट्टयांस दाबून भोंकें पाडण्याचें यंत्र n, 'पंच.' च्या rivets चामड्याचे पट्टे सांधण्याचे खिळे-रिवेट m. pl. किंवा strifter n. पट्टयाच्या वाटाड्याचा दांडा m. To hold असते belt (मल्लयुद्धांत व तशाच प्रकारच्या कुस्त्यांत) अग्रेसर-oppoणें. A leathern B. n. दाल f. Life-belt n. आut. संकटसमयीं बोटींतील उतारूंकरितां केलेला बु-च्यांचा कमरपट्टा m-सांगाडा f. Sword-belt n. दाली f; पट्टा m. Plate of a B. चपरास f. Waist-belt n. कमर-पट्टा m, कमरबंद m, कमरबस्त f.

Beltane (bel'-tān) n. जुन्या सक्सन लोकांचा एक सणाचा दिवस m. 'बेल्टेन.' हा मेच्या पहिल्या दिवशीं असे. या दिवशीं आनंदाच्या होळ्या पेटविण्यांत येत असत.

Belvedere (bel'vedēr) [It. *bel*, beautiful & *vedere*, a view.] n. मनोरा m, प्रासादशृंग, गोपुर. २ देखाव्याक-रितां राजवाड्यांत उंच मनोऱ्यावर टांगलेला कंदील m. ३ संध्याकाळचा गार वारा नीट लागेल अशा प्रकारची के-लेली गची f. ४ उच्चस्थळीं बांधलेलें हवाशीर गृह n.

Belwether (*obs.*) see Bellweather.

Bema (bē'ma) [Gr. *bema*, a step.] n. आथेन्स शहरा-मधील वक्ते ज्यावर उभे राहून भाषणें करीत तें पीठा-सन n.

Bemad (bē-mad') v. t. वेड लावणें, बुद्धिभ्रंश करणें.

Bemaul (bē-mawl') v. t. मारणें, कुटणें. २ धिरडें पाडणें *fig.*

Bemazed (bē-māzd') p. a. घोटाळून गेलेला. २ गुंग केलेला, गोंधळून टाकलेला.

Bemean (bē-mēn') v. t. हलकेपणा आणणें, (ची) अप्रति-ष्ठा करणें, मानभंग करणें. [Bemired p. a.

Bemire (bē-mīr') v. t. चिखलानें मळविणें, मलीन करणें.

Bemoan (bē-mōn') v. t. शोक करणें, दुःख करणें, विलाप करणें, आक्रोश करणें, कींव किंवा काकळूत दाखविणें. B. v. i. कष्टी होणें, दुःखी होणें. Bemoan'er n. Be-moaning n.

Bemock (bē-mok') v. t. उपहास-विटंबना करणें.

Bemoil (bē-moil') v. t. घाण-चिखल उडविणें, घाण करणें.

Bemonster (bē-mon'ster) v. t. अचाट रूप देणें, आहे त्यापेक्षां मोठें आहे अशी कल्पना करणें. २ एखाद्याला राक्षस असें समजून वागविणें.

Bemouth (bē-mowth') v. t. वाजवीपेक्षां ज्यास्त स्तुति करणें, खोटा-सुका डौल घालून बोलणें. [सारवण करणें.

Bemud (bē-mud') v. t. चिखलाचे शिंतोडे उडविणें, सडा-

Bemuddle (bē-mud'l) v. t. गदळ-रेंदा करणें. २ *fig.* अगदीं भांबावून टाकणें, गोंधळविणें.

Bemuffle (bē-muf'l) v. t. मुस्कट घालणें, बुरखा घालणें. २ *fig.* तोंडबंदी करणें, अडकावून टाकणें, तोंडाला बोळा घालणें.

Bemuse (bē-mūz') v. t. दारू वगैरे अमली पदार्थानें मूढ करणें, घोटाळवणें, स्तब्ध करून टाकणें, गोंधळून टाकणें. "A person much bemused in beer."

Ben (ben) [A. S. *binnan*, within.] *prep.* & *adv.* घरांतील आंतल्या भागास. B. n. (घरांतील) अंतर्गृह n. opposed to the 'But' (स्वैपाकघर). To be far B. with one एखाद्याशीं घरोबा असणें. To live But and B. एखाद्याच्या शेजारीं असणें, शेजारच्या खोलींत रहाणें.

Ben (ben) n. पर्वताचें शिखर n. (used with the names of Scottish mountains; as, Ben Nevis, Ben Lomond).

Bench (bensh) [A. S. *benc*, bench.] n. बांक n, बांकासारखी बैठक, बांकासारखा उंचवटा m. २ *the seat of a judge* न्यायाधिशाची खुर्ची-गादी f, न्यायासन n, धर्मासन n. ३ न्यायाधीशमंडळ n, कोर्ट n.; as, The opinion of the full B. ४ (आगबोटींतील) बांकासा-रखी बैठक f; बांक n. B. v. t. बांकें लावणें, (आंत) बांकें (बसविणें) as, "Stately theatres benched crescent-wise." २ (*Shakes.*) मानाच्या जागेवर बसवणें. B. v. i. न्यायासनावर बसणें [R.]. २ बांकावर बसणें. Bench'er n. एखाद्या कोर्टांतील जुना वकील m. Bench'er-ship n. *the position or dignity of a bencher* जुन्या वकीलाची जागा f- मान m. Bench'-mark n. कायमची टिकणारी खूण f- जागा f- इमारतीचा भाग m- बांधका-माचा दगड m. ह्यावर समान्तरपातळी दुर्बीण (a levelling instrument) ठेवतात. Bench-vice n. *mech. engi.* टेबलाला बसवलेला शेगडा m. Bench'-war'rant n. (opposed to a justice's or magistrate's warrant) मुलकी न्यायाधिशानें दिलेला पकडण्याचा हुकुमनामा m, मुलकी 'वारंट' n. Bench and Bar न्यायाधीश आणि वकील, n. न्यायमंडळ. Bench'-drilling machine टेब-लाला बसविलेलें भोंक पाडण्याचें यंत्र n. Bench'-lathe टेबलावरील लहान चरक-लेट m. Bench'-plane n. मे-जावर चालवावयाचा रंधा m. To be raised to the Bench न्यायाधीश होणें, न्यायाधिशाच्या पदवीला चढ-विला जाणें-पोंचणें. To be raised to the Episcopal B. बिशपाची जागा मिळणें, बिशप होणें. The King's (Queen's) Bench इंग्लंडांतील राजाचें किंवा राणीचें कोडत. [हें इंग्लंडांत सर्व कोर्टांतील वरिष्ठ कोर्ट आहे, व पूर्वी राजा किंवा राणी ह्या कोर्टांत अध्यक्षस्थानीं बसत असे.] Bench of Bishops (लॉर्डांच्या सभेंत बसणारें सर्व) धर्माधिकारी-मंडळ n, बिशपमंडळ n.

Bend (bend) [A. S. *bendan*, to bend.] v. t. (धनुष्य) वां(बां)कविणें, (कैचींत किंवा पकडींत धरून) वांक-बांक &c. देणें-आणणें, वळण n-मोड f- &c. देणें-आणणें, वांकडा-वक्र-&c. करणें. २ *fig.* (असुक एक कामाकरितां) लव-विणें, वांकविणें; as, "And they bend their tongue like their bow for lies." ३ *naut.* (घट्ट बांधण्याक-रितां) वळविणें, वळवून घट्ट बांधणें; as, To bend one rope to another, To bend a sail to its yard or stay. ४ with *down* (a bough, &c.) लववणें, ओंलबवणें. ५

वळवणें, वक्र करणें, नवीन वळण देणें, नवीन मोडणी-मोड देणें. ६ नमवणें, नम्र करणें, जिंकणें. ७ *to direct to a certain point* (as one's mind, eyes, ears, weapon, &c.) लावणें, रोखणें, रोख लावणें, (कळकळीनें) वळवणें. B. *v. i.* वांकणें, बांकणें, लवणें, नमणें, ओणवा होणें, वांक *m*- बांक *m*- मोड *f*- वळण *n*- घेणें and with *in. con.* येणें. २ (the branch of a tree) ओळंबणें, ओथंबणें. ३ झोंकणें, झुकता-झोलता असणें; as, The bending (*overhanging*) cliff of a mountain. ४ (कडे) वांकणें, रोख असणें; as, "Our wishes bend to him." ५ *to submit* वांकणें, लवणें, (पुढें) लीन होणें, (with *to, before, towards*); as, "While each to his Great Father bends." Bend'ed or Bent *pa. p. & pa. t.* B. *n. flexure, curvature* वळण *n*, वांकण *n*, बां-(वां)क *m*, मोड *f*. २ (of a stick, &c., of a road, river, &c.) वांक *m. f. n*, वांकण *n*, वांकाड *n*, वळण *n*, वळसा *m*. ३ एक दोर दुसऱ्याला बांधतांना वळवून दिलेली गांठ *f*.; as, Cable bend, Carrick bend, Fisherman's bend. ४ शक्ति *f*, सामर्थ्य *n*; as, It is beyond my bend तें माझ्या शक्तीच्या बाहेर आहे. ५ (सांध्यावर बसविण्याची) वांकविलेली पट्टी *f*. Bend'ed, Bent *p.* वांकवलेला, &c., वांकडा, वक्र. २ तिडा, तेढा, तिडका. [B. ABOUT वांकडातिकडा, वांकडकोंका, वांकडमुसका]. ३ नत, विनत, नम्र. ४ ओणवा. २ (with *on*) प्रवण (S.), as, in तत्कार्यप्रवण, अभिनिविष्ट, अभिनिवेशी. Bending machine (चपटे पत्रे अगर लोखंडी गज वगैरे) वांकविण्याचें यंत्र *n*. Bent gauge *n*. वांकडें अथवा वांक दिलेलें लांबीचें अथवा जाडीचें माप *n*, वांक दिलेला गज *m*. To bend the brow कपाळास आंठी-आठ्या घालणें. To bend the knee *lit.* गुडघा वांकविणें. २ *fig.* लीनतेनें-आदरानें खालीं वांकणें. ३ हांजी हांजी करण्याकरितां खालीं वांकणें. [कातडें *n*.

Bend (bend) *n*. (बुटाच्या तळव्याकरितां) कमावलेलें मऊ

Beneath (bē-nēth') [A. S. *beneoth, beneothan*, pref. *be & neothan*, perhaps allied to Sk. नीच, below. cf. tetra चत्वार.] *prep.* खालीं, एखाद्या वस्तूच्या उजू खालीं; as, He lies B. this stone. २ (वजना) खालीं, (छळा) खालीं, (जुलुमा) खालीं; as, "Our country sinks B. the yoke." ३ (मानानें-योग्यतेनें) कमी-उणा; as, Brutes are B. man. ४ अयोग्य, न शोभेल असा as, B. one's station in life; B. notice; B. regard; B. consideration. B. *adv.* खालीं, खालतीं; as, On earth B. From B. खालून.

Benedict, (ben'e-dikt) Benedick [From *Benedick*, a character in 'Much Ado About Nothing.' *Shakes.*] *n*. पुष्कळ काळ ब्रह्मचारी राहून मग लग्न केलेला मनुष्य *m*.

Benedictines (bene-dik'tins) *n. pl.* The followers of St. Benedict. बेनेडिक्टसाधूचे अनुयायी, बेनेडिक्ट संप्रदायी.

Benediction (ben-edik'-shun) [L. *bene*, well & *dicere*, *dictum*, to say. L. *dicere*, & Sk. दिश्, to ... to be allied.] *n*. भलें होवो असा दुवा m, आशीर्वाद *m*, आशीर्वचन *n*, दुवा *m*, स्वस्तिवाचन, कल्याणवचन *n*. २ (प्रार्थनेच्या शेवटचा) आशी... [APOSTOLIC B. प्रेषितानें ठरविलेला आशीर्वाद...] ३ महंताला (abbot) दीक्षा देण्याचा संस्कार... (*drama*) नांदी. ५ (जेवणानंतर किंवा जेवण...) केलेला परमेश्वराचा) स्तव *m*. (cf. नैवेद्यअर्पण). Benedic'tive *a.* आशीर्वादयुक्त. Benedic'tory *a. expressive of a blessing* आशीर्वादाचा, दुव्याचा, आशीर्वादार्थक.

*N. B.*—It is customary among Christians to pronounce the following Benediction (of Apostle Paul) at the close of the service in Church and family prayers. "The grace of our Lord Jesus Christ, and the love of God and the communion of the Holy Ghost be with you (us) all! Amen. II Cor. XIII. 14.

Benediction दुवा, आशीर्वाद. Blessing वर.

Benefaction (ben-e-fak'shun) [L. *bene*, well & *facere, factum*, to make or do.] *n*. (केलेली) उपकृति *f*, (केलेलें) कल्याण *n*. २ दान *n*, (धर्मादायाची) देणगी *f*, एहसान *n*. Benefac'tor *n*. उपकार करणारा, उपकारकर्त्ता, कल्याणकर्त्ता, दानकर्त्ता. Benefac'tress *n. fem.* उपकार करणारी *f*, उपकारकर्त्री *f*, &c. Benefac'tory *a.* उपकार करणाराचा, फायदेशीर.

Benefice (ben'e-fis) [L. *beneficium*, a favour, from *bene*, well & *facere*, to make or do.] *n*. (उपाध्यायाच्या उपजीविकेकरितां लावून दिलेलें) धर्मादाय उत्पन्न *n*, देवाला लावून दिलेलें उत्पन्न *n*, उपाध्याची वृत्ति *f*. २ (मूलार्थ) जहागीर *f*, मोकासा *m*. Ben'eficed *a.* (उपाध्याची) वृत्ति ज्याला मिळते आहे असा. [पूर्वी दिशपला लावून दिलेल्या उत्पन्नाला DIGNITY हा शब्द व इतर खालच्या दर्ज्यांच्या उपाध्यायांच्या उत्पन्नाला BENEFICE हा शब्द लावीत असत. आतां सामान्यतः BISHOP, DEAN, ARCHDEACON आणि PREBENDARY ह्यांच्या उत्पन्नाला DIGNITY हा शब्द लावितात व PARSON आणि VICAR ह्यांच्या उत्पन्नाला BENEFICE हा शब्द लावितात.]

Beneficence (be-nef'i-sens) [L. *beneficentia.*] *n. active kindness* उपकारकारित्व *n*, परोपकारता *f*. २ लोकोपकार *m*, परोपकारी स्वभाव, अन्योपकार *m*. Benefic'ency *n*. (*obs.*) Benef'icent *a.* उपकार-फायदा करणारा, परोपकारक, परोपकारी, लोकोपकारक, परोपकारशूर. Beneficen'tial *a.* परोपकारतेचा. Benef'icently *adv.* परोपकारबुद्धीनें, परोपकारपूर्वक, उपकारबुद्धीनें.

Beneficial (ben-e-fish'al) [L. *beneficium*,] *a. useful, profitable* फायद्याचा, उपकारी, हितकारक, उपयोगाकारक, श्रेयस्कर, हितकर, उपयोगी. Benef'ic *a. astrol.* शुभफलाचा, शुभकारक, शुभ; as, B. planets. Benefici'ally *adv.* उपयोग-हित होईल अशा रीतीनें, उप-

कार होईसा. Benefic'ialness *n.* उपयोगीपणा *m*, उपकारित्व *n.* Benefic'iary *n.* (मूलार्थी) मांडलिक राजा *m*, जहागीरदार *m.* २ देणगीचा उपभोग घेणारा, (शिक्षण-प्रसारार्थ दिलेल्या) देणगीचा फायदा घेणारा, उपकार-भोगी, उपकारजीवी, धर्मोध्यापनवृत्तिभोगी, उपाध्येपणाच्या वृत्तीवर रहाणारा. ४ *law* जिम्मालेखावरून किंवा मृत्युपत्रावरून ज्याला कांहीं इस्टेट मिळावयाची असते असा मनुष्य *m*-संस्था *f.* *cf.* लेखवारस *m* (as opposed to legal heirs), पश्चादुपयोग मिळेल अशी आशा असलेला मनुष्य *m*, पश्चादुपभोगाशंसी. B. *a.* दुसऱ्याचे हाताखालचा, पराधीन, परतंत्र. २ बक्षिसासारखा दिलेला; as, B. gifts.

Benefit (ben'e-fit) [L. *benefactum*, benefit.] *n. kindness* उपकार *m*, उपकृति *f*, एहसान [as, A PUBLIC B. लोकोपकार *m*, सर्वोपकार *m*]. २ *profit, use* हित *n*, लाभ *m*, फायदा *m*, उपयोग *m*, गुण *m.* ३ *theat.* धर्माचा खेळ, धर्मार्थ खेळ, बक्षिसार्थ दिलेला खेळ *m.* B. *v. t.* हित करणें-कल्याण करणें-बरें करणें-चांगलें करणें with *g. of o.* २ गुणास पडणें. B. *v. i.* कल्याण-हित-फायदा होणें with *g. of s.*; as, He will B. by the change. Ben'efited *p.* (v. V. T.) उपकृत, &c. Ben'efit-of-cler'gy धर्माधिकाऱ्यास कायद्यासंबंधीं दिलेल्या विशेष सवलती. (जसें, त्यांची चौकशी दिवाणी किंवा फौजदारी कोर्टांतल्या न्यायाधिशाकडून होत नाहीं.) Ben'efit-of-in'ventory नोंदीचा फायदा, इस्टेटीची नोंद केल्यावर इस्टेटीपेक्षां जास्त कर्जाचा बोजा वारसावर पडूं नये म्हणून त्याला दिलेली सवलत. Benefit-societies (मजूर लोकांच्या) परस्पर साहाय्यकारी मंडळ्या. To reap the benefit of चा फायदा उपभोगणें. Benefits-forgot कृतघ्नता.

*N. B.*—The following examples will make clear to the reader the uses of Benefaction, Beneficence, Beneficent and Beneficial.

"She was liberal in her benefactions to convents and colleges." "What does intellectual power, stripped of beneficence, most resemble?" "Confucius is still revered as a beneficent genius." "The Sabbath was a singularly beneficent institution." "No measures could have been made beneficial to the kingdom at large."

Benet (be-net') [A. S. *be* & Net.] *v. t.* जाळ्यांत पकडणें. (used more in a figurative sense.)

Benevolence (ben-ev'ol-ens) [L. *bene*, well & *volere*, *volens*, to wish.] *n. the disposition to do good to mankind at large* (सर्व भूतांचे ठायीं प्रेमभाव असल्यामुळें उत्पन्न झालेली) परोपकारेच्छा *f*, परोपकारबुद्धि *f*, परहितबुद्धि *f*, धर्मबुद्धि *f*, जनहितेच्छा *f*, loosely भलाई, भलाइकी. [UNIVERSAL B. भूतदया *f*, सर्वसमहितबुद्धि.] २ (इंग्लंड देशांतील राजांनीं बड्या लोकांकडून देणगी ह्या नांवानें) अन्यायानें घेतलेला कर *m*; as, Henry VII. exacted benevolences from his subjects. Benev'olent *a.* परोपकारबुद्धि, परोपकारशील, जनहितेच्छु, धर्मबुद्धि, सात्विक, भला, भूतदयेचा. Benev'olently *adv.* (v. A.) परोपकारेच्छेनें, परोपकारबुद्धीनें.

Benework (beenwerk) [of A. S. origin] *n.* चौदाव्या शतकांत इंग्लंडांतील जमीनदारांच्या कुळांत जमीनदारासाठीं करावें लागणारें वेठीचें काम. (या कामाच्या मोबदला कधीं कधीं पैसा देत असत.)

Bengali, Bengalee (ben-gaw'lē) *n.* बंगाल्यांतील रहिवाशी *m*, बंगवासी *m*, बंगाली. २ बंगाली भाषा *f.* B. *a.* बंगाल्यांतील, बंगाल्यासंबंधीं. Benga'lis,-ees, Benga'lese *pl.* बंगाली, बंगदेशीय. Bengal'-light इशारत देण्याकरितां वापरलेलें दारूकाम *n*, इशारतीचें बंगाली दारूकाम *n.* Bengal-heat अतिशय कडक उन्हाळा, बंगाली उन्हाळा *m.*

Benight (bē-nīt') [Pref. *be* & Night; Sk. नक्तम्] *v. t.* रात्रीनें पछाडणें-घेरणें, (ला) रात्र होणें, रात्रीनें गांठणें used passively in this sense; as, "The Tourists were benighted in a forest." २ (used actively or reflexively) रात्रीच्या अंधकारांत झांकून टाकणें. ३ झांकून टाकणें, आच्छादणें, दुःखाच्या किंवा निराशेच्या काळोखीनें झांकणें, अज्ञानाच्या किंवा पापाच्या अंधकारांत झांकणें-बुडवणें. ४ डोळ्यापुढें काळोखी आणणें, डोळे दिपवणें; as, "Pale, sudden fear benights his eyes." Benight'ed *a. overtaken by night* रात्रीनें घेरलेला, निशाक्रांत, रात्रीनें गांठलेला. २ *involved in ignorance &c.* अज्ञानानें-&c. गांठलेला, अज्ञानांत बुडालेला, अज्ञानग्रस्त, अज्ञाननिमग्न, नीतिभ्रष्ट, पापांत बुडालेला; as, The B. heathen. ३ शिक्षणांत फारच मागसलेला. Benight'er *n.* निराश करणारा, अंधकारांत टाकणारा. Benight'ing, Benight'ment *n.* निराश करणें *n.* २ रात्रीनें घेरणें *n.* ३ *lit. & fig.* अंधकारांत ठेवणें *n*, अंधकारमज्जन *n.*

Benign (ben-īn') [O. Fr. *benigne*,—L. *benignus*, kind, from L. *bene*, well & *genus*, born.] *a. gracious, kind* दयाळू, कृपाळू; as, Our B. Sovereign. २ *bland, mild, salutary* सात्विक, सौम्य, हितकारक, हितावह; as, B. influences. ३ *astrol.* शुभ, मंगल, शुभप्रद, मंगलकारक, सु *in comp.*, सत् *in comp.* Benig'nancy *n.* सात्विक गुण-धर्म *m*, दयाळूपणा *m.* २ शुभप्रदता *f*, हितावहता *f.* Benig'nant (be-nig'nant) *a.* हित-दया करणारा, शुभ करणारा. Benignantly *adv.* Benignity (be-nig'-ni-ti). Benig'nness *n.* (v. A. 1.) कृपा *f*, दया *f*, कृपाशीलता *f*, कृपालुता *f.* २ सात्विकता *f*, हितकरता *f.* ३ शुभत्व *n*, मंगलत्व *n*, मांगल्य *n.* Benign'ly *adv.* (v. N.) दयाळूपणानें, दयाबुद्धीनें, कृपादृष्टीनें, कृपापूर्वक. २ सौम्य रीतीनें.

Benison (ben'-izn) [Fr. *beneison*.—L. *bene*, well & *dicere*, *dictum*, to say. Sk. दिश्, to point out.] *n.* दुवा *m*, आशीर्वाद *m* (परमेश्वराचा).

Benjamin (ben'jä-min) *n.* लाडका, सर्वांत लहान; as, Queensland is the B. of England's colonial possessions.

Benjamin ( ben'jä-min ) *n.* सगळ्या कपड्यांचे वर घालावयाचा एक प्रकारचा झगा *m*, 'बेन्जामिन' झगा. [ THERE WAS A TAILOR OF THIS NAME WHO FIRST PREPARED THIS COAT. ]

Benjamin ( ben'jä-min ) [ Corr. of Benzoin. ] *n.* ऊद *m*, देवधूप *m*, कवड्याऊद *m*.

Bent ( bent ) [ See Bend ] *n. flexure, curvity* बांक *m*, वांक *m*, वक्रता *f*, वांकडेपणा *m*, वक्रभाव *m*. २ वांकणाचा-वक्रतेचा कोन *m*. ३ *disposition towards* मोड *f*, मोडणी *f*, कल *m*, झोंक *m*, रोंख *m*, तोल *m*. ४ *tendency* कल *m*, झोंक *m*, तोल *m*. ५ स्वाभाविक कल *m*, बुद्धीचा -मनाचा कल *m*, इच्छा *f*, प्रवृत्ति *f*. Out of my bent माझ्या बुद्धीच्या पलीकडे. To the top of one's bent ( always used in a bad sense ) एकाद्याच्या पूर्ण कलाबरहुकूम; as, "They fooled me to the top of my bent." *Shakes.* त्यांनीं मला फसवितां येईल तितकें फसविलें.

Bent, Bentgrass ( bent, bent'gras ) *n.* फार बारीक काडीचें गवत *n.* हें गवत वाळवून जनावरांकरितां ठेवितात. Ben'net *n.* बाजरीचा कडबा. Ben'ty *a.* वरील गवतासारखें.

Benthamism ( ben'tham-izm ) *n.* बेन्थेममत *n*, जेरेमी बेन्थेमचीं सामाजिक आणि राजकीय मतें; उपयुक्ततामत *n*, अतिशय लोकांचें अतिशय कल्याण व्हावें असें मत-वाद *m*, (समाज) हितबाहुल्यवाद *m*.

Benumb ( bē-num' ) [ Pref. *be* & Numb.] *v. t.* सुंभ-बहिरा-बधिर करणें, सुना करणें, गुंग करणें, भूल आणणें, स्पर्श-ज्ञान नाहींसें करणें, इंद्रियस्तंभ *m*- इंद्रियस्तंभन *n*-करणें. Benumbed' *p. a.* ( v. V. 1. ) बहिरा-सुना &c- केलेला. Benumbed'ness *n.* बधिरता *f*. To be benumbed by cold थंडीनें गारठणें-कांकडणें. Benumb'er *n.* बधिर करणारा, गुंग करणारा. Benumb'ment *n.* बधिरता *f*.

Benzene ( ben'zēn ) *n.* उज्ज ( hydrogen ) आणि कर्ब ( carbon ) ह्यांचा मिश्र पदार्थ. Also called benzia, benzine, benzinum, benzol, benzole, hydrophenyl.

Benzoin, Benzoine (ben'zō-in or zoin) *n.* (of superior quality ) लोभानी-लोहबंद ऊद *m*, देवधूप *m*, जनार्दनी ऊद *m* ; ( of inferior quality) ऊद *m*, कवड्या ऊद *m*, कपिश *m*.

Bepaint ( bē-pānt' ) *v. t.* सर्व बाजूंनीं रंग लावणें.

Bepat ( bē-pat' ) *v. t.* पुष्कळ वेळपर्यंत चापट्या मारणें, चापट्यांवर चापट्या मारणें.

Bepatched ( bē-patcht' ) *p. a.* तोंडावर सौंदर्याकरितां लहान लहान पट्ट्या मारलेला. २ ठिगळा मारून सुधारलेला. ३ ठिगळांचे कपडे वापरणारा.

Bepearl ( bē-pérl' ) *v. t.* मोत्यांनीं मढविणें.

Bepelt ( bē-pelt' ) *v. t.* खूब जोरानें दगड मारणें.

Bepepper ( bē-pep'ėr ) *v. t.* पुष्कळ गोळ्यांचा किंवा ठोशांचा भडिमार करणें.

Bepester ( bē-pest'ėr ) *v. t.* फार त्रास देणें, चिडविणें.

Bepity ( bē-pit'i ) *v. t.* फार कळकळ येणें-वाटणें, फार कळकळ दाखविणें, फार कींव येणें.

Beplumed ( bē-ploōmd' ) *p. a.* पिसांनीं शृंगारलेला, गच्च पिसें लावलेला.

Bepommel ( bē-pom'el ) *v. t.* पूर्ण कुट्टा काढणें, कुदवणें.

Bepowder ( bē-pow'dėr ) *v. t.* चहूंकडे पूड पसरणें.

Bepraise ( bē-prāz' ) *v. t.* खूब वाखाणणी करणें, खूब स्तुति करणें, हरभऱ्याच्या झाडावर चढवणें (*idio.*). Beprais'ed *pa. p.* Bepraise'ment *n.* Bepraise'r *n.*

Beprose ( bē-prōz' ) *v. t.* गद्यस्वरूप देणें. २ शब्दपाल्हाळ करणें, शब्दपाल्हाळानें कंटाळवाणा करणें.

Bepuff (bē-puf' ) *v. t.* फाजील स्तुति करणें, फाजील पोमस्तोम वाढविणें, फाजील चढविणें.

Bequeath ( bē-kwēth' ) [ A. S. *be* & *cwethan*, to say.] *v. t. to leave by will* मृत्युपत्रानें आपली मिळकत दुसऱ्याला देणें, मृत (त्यु) पत्रांत-मृत (त्यु) लेखांत लिहून देणें-ठेवणें, मृतलेखदत्त-मृतलेखांकित-मृतपत्रदत्त-&c. करणें. २ परंपरा-वारसा चालू ठेवणें, पुढील पिढीच्या उपयोगाकरितां ठेवणें, पुढील पिढीचे स्वाधीन करणें, (कायदेशीर रीतीनें) स्वाधीन करणें-देणें. Bequeath'able *a.* Bequeath'al, Bequeath'ment *n.* मृत्युलेखदानाची क्रिया *f*, मृत्युलेखदान *n*, वारसाच्या स्वाधीन करणें *n.*

Bequest ( bē-kwest' ) [ M. E. *bi-queste*,-A. S. *becwisbe*, & *cwethan*, to say.] *n. a legacy* मृत्युपत्रांत लिहून दिलेली मालमिळकत *f*, मृतपत्रांकितदान *n*, मृतपत्रार्पितदान *n*.

Berate ( bē-rāt' ) *v. t.* खडसून बोलणें; खरडपट्टी काढणें.

Berberry ( bėr'bėri) See Barberry.

Bereave ( bē-rēv' ) [ A. S. *be* & *reafian*, to rob.] *v. t.* ( प्रिय मनुष्याचा ) वियोग करणें, ( with *of* ) नागव(व) विणें, रहित-विरहित-हीन करणें, ( widow ) उघडी-रांडकी करणें-पाडणें. Bereaved *pa. t.* ( always used in a passive construction; as, He was B. of his only son ). In the case of abstract ideas such as hope, strength, &c., we do not use the form 'bereaved' but use 'bereft' instead. Bereaved *a.* ( मृत्यूमुळें ) तुटातूट झालेला, वियोग झालेला. २ उघडा-नागवा केलेला ( used figuratively ). Bereave'ment *n.* वियोग *m*, नागवण *f*, नागवणूक *f*, तुटातूट *f*, मृत्यूमुळें झालेली माणसांची तुटातूट *f*, नागवलेपणा *m.* &c.; Bereav'er *n.* Bereaving *pr. p.*

Berg ( berg ) *n.* बर्फाचा पर्वत ( used only when ice is mentioned or understood in the context). Bergfall [ बर्फाच्या ] पर्वताचा कडा कोसळून पडणें *n.* See Iceberg.

Berhyme (bē-rīm' ) *v. t.* यमकयुक्त करणें, -(ची) कविता

Berlin ( bėr'-lin ) *n.* बर्लिनगाडी *f*, एक जातीची चार चाकांची गाडी *f*. [ही पूर्वीं जर्मनींत बर्लिन येथें केली होती म्हणून हिला हें नांव पडलें.]

Bermudas (bėr-mu'das) *n.* आडजागा *f* ; as, To live in the B. जागेच्या स्वस्ताईकरितां कोठेंतरी आडगांवीं राहणें, गल्लीकुचींत राहणें.

Berry (ber'i) [A. S. *berie, berige,* lit. an edible fruit.] *n. pl.* Berries. *bot.* see Bacca. २ *the coffee-bean* काफीचें दळ-दाणा *m.* ३ *one of the eggs of a fish* माशाचें अंडें *n.* In berry, *containing ova* अंडें असलेला-घातलेला. B. *v. i. to bear berries* मांसल फळें, बोरें येणें. Berried *pa. t. & p. p.* Berried *a. consisting of berries, baccate* बोरांचा, मांसल फळांचा, मांसल फळें असलेला; as, A B. shrub. Berrying *n. a seeking or gathering of berries, esp. of such as grow wild* मांसल फळें-बोरें गोळा करणें.

*N. B.*—कोणत्याहि लहान फळाला किंवा क्षुद्र फळाला Berry हा शब्द लावतात; उदाहरणार्थ करवंद, बोर. परंतु वनस्पतिशास्त्रदृष्ट्या तें चूक आहे. तसेंच गुंज गुंजा ह्यालाहि Berry हा शब्द लावतात. परंतु तेंहि वनस्पतिशास्त्रदृष्ट्या चूक आहे.

Berry (ber'i) [A. S. *beorh.*] *n. a mound or hillock* उंचवटा *m,* टेंकाड *n.*

Berth (bėrth) [Perhaps connected with *birth,* which, besides its ordinary sense, means also *station, position,* or *natural place.*] *n. a station or range of a ship at anchor* गलबत नांगरण्याची जागा *f,* गलबत उभें राहण्याची जागा *f.* २ *a fit distance for ships under sail to keep clear, so as not to fall foul of one another* चालू गलबताची फिरण्याची जागा *f.* ३ *a post or an employment* मोठ्या पगाराची जागा *f,* जागा *f,* असामी *f;* as, He has a good B. ४ सुदैव *n,* सुस्थिति *f;* as, He has tumbled into a nice B. Berth *v. t.* (गलबताचा) नांगर टाकणें; as, The ship berthed in a new port. २ निजावयाच्या जागेची सोय करून देणें; as, To B. passengers in a railway car. Berth'age *n.* नांगरणावळ *f,* (बंदरांत ज़हाज) नांगरल्याबदलची जकात *f.* To give a wide B. to, To keep a wide B. of *lit. & fig.* दूर-लांब राहणें, टाळणें.

Beryl (ber'il) [L. *beryllus,* a beryl, cf. Sk. वैदूर्य. Originally *beryl* was brought from विदूर in Southern India.] *m.* एक प्रकारचा पाषाण *m,* गोमेद *m,* विरोजा *m.* ह्यांत भविष्य दिसण्याचा अद्भुत गुण आहे अशी एक आख्यायिका आहे. Ber'ylline *a.* गोमेदासारखा, निळ्या हिरव्या रंगाचा.

Beryllium (be-ril'i-um) *n. chem.* called also Glucinum. It is a rare, white, malleable metal of specific gravity 2·1 and atomic weight 9·1. 'विरल' बेरिलियम.

Besaint (bē-sānt') *v. t.* साधूंच्या मालिकेंत गणणें. Besainted *pa. p.* साधूंच्या मालिकेंत गणलेला, साधूंच्या मालिकेंतला. २ साधुसंतांनीं आश्रय केलेला; as, "Besainted country."

Bescatter (bē-skat'ėr) *v. t.* सर्वभर पसरणें.

Bescrawl (bē-skrawl') *v. t.* सपाटून खरडणें, ओरखडणें.

Bescreen (bē-skrēn') *v. t.* सर्व बाजूंनीं झांकून टाकणें, गुरफटवणें.

Bescribble (bē-scrib'l) *v. t.* खरडणें, घासणें, खरवटून [लिहिणें.

Beseech (bē-sēch') [A. S. *be* & M. E. *sechen,* to seek. Beseech refers at first to Feeling.] *v. t.* मनधरणी करणें, विनंती करणें, विनंती करून मागणें, प्रार्थना करणें, प्रार्थना करून मागणें, पदर पसरणें(*idio.*), मिन(त्र)त *f.* मिन(त्र)ती *f.* मिन(त्र)तमाना *m.* मिन(त्र)तवारी *f.* &c.-करणें *g. of o.* [SOME MARATHI IDIOMS EXPRESSING THE ABOVE IDEAS ARE:—पाय धरणें, हात जोडणें, दाढी धरणें, दाढीस हात लावणें, नाक घासणें, पायधरणी *f.* करणें, हनुवटीस हात लावणें, हात *m. pl.* जोडणें, उराशी धरणें, पदर पसरणें.] २ मागणें, याचणें, प्रार्थणें (*poe.*). Besought' *pa. p.* Beseech'er *n.* Beseech'ing *n.* मनधरणी *f.* करणें *n.* Beseech'ingly *adv. n.* Beseech'ingness *n.* Beseech'ment *n.* मनधरणी *f.* प्रार्थना *f.* करणें *n,* विनंती *f,* विनवणी *f.*

*N. B.*—Ask, Request, Beg, Beseech, Supplicate, Entreat, Implore and Solicit require to be carefully distinguished. See the word Solicit.

Beseem (bē-sēm') [Pref. *be* & Seem., in the old sense of Become.] *v. t.* शोभणें, साजणें. २ योग्य दिसणें. Beseem'ing *a.* शोभणारा, साजणारा. Beseem'ingly *adv.*

Beset (bē-set') [A. S. *be* & *settan,* to set.] *v. t.* जडवणें, मौल्यवान् किंवा चकचकित पदार्थांनीं शृंगारणें; in this sense now used only in *pa. p.* as, "A robe azure, beset with drops of gold." निरनिराळ्या वस्तूंनीं भरणें-आच्छादणें; as, "The garden is so B. with all manner of sweet shrubs that it perfumes the air." २ घेरणें, वेढणें, वेष्टणें; as, Beset with enemies; घेरून हल्ला करणें, घेरून घोटाळ्यांत पाडणें, घेरून त्रास देणें. ३ *fig.* (विनंतीचा) गराडा घालणें, (विनंतींवर विनंति करून) नाइलाज करणें; as, To B. one with applications for a post. Beset'ment *n.* घेरणें *n,* वेढणें *n,* शृंगारणें, &c. Beset'ter *n.* घेरणारा, वेढणारा, शृंगारणारा, ओढाताण करणारा, &c. Beset'ting *a.* भोंवतालचा, पाठ पुरवणारा, राशीस लागलेला, बोकांडीस बसलेला, सदोदित पाठीस लागलेला; as, Our besetting sins. Beset'ting *pr. p.* Beset *pa. t.* or *pa. p.* घेरलेला, वेढलेला, घेरा घातलेला, &c. [टाकणें.

Beshadow (bē-shad'ō) *v. t.* छाया पाडणें, छायेनें झांकून

Beshame (bē-shām') *v. t.* लज्जित करणें, पाणउतारा करणें.

Beshine (bē-shīn') *v. t.* उजेड करणें, प्रकाशित करणें. Beshone' *a.*

Beshrew (bē-shrōō') *v. t.* शाप देणें, अभिशाप देणें. Beshrew me! Beshrew the fellow!

Beshroud (bē-shroud') *v. t.* पडदा घालणें, नजरेआड करणें, वस्त्रांत गुंडाळणें. २ प्रेत वस्त्रांत गुंडाळणें.

Beside (bē-sīd') [A. S. *be* & *sidan,* the side.] *prep. & adv.* बाजूस, पाशीं, बाजूकडेस, कुशीस, पार्श्वतः, पार्श्वभागीं; as, Beside him lay this book. २ *away from, wide of* (a mark), *not embraced within* (a plan, purpose, question) आड, एकीकडे, नित्य क्रमाच्या वहिवाटीच्या बाहेर, आडबाजूस, आडवळणीस, आडकुशीस, गैरलगामीं, गैरसुती. ३ वांचून, वेगळा, बाजत(द),

शिवाय, उपर, निराळा, खेरीज, व्यतिरिक्त, बगर, पलीकडे; as, Beside the present subject, Beside the mark, असंबद्ध, विषयाला सोडून. To be beside one's self *fig.* ठिकाणावर नसणें, भानावर नसणें, बेशुद्ध असणें, वेडावून जाणें.

Besides (bē-sīdz') [Beside with the *s* of the adv.] *prep.* & *adv.* आणखी, आणि; as, Besides this money, I shall give you more. २ अणीक, दुसरा. ३ पेक्षां, ज्यास्त, शिवाय, खेरीज.

Besiege (bē-sēj') [A. S. *be* & Siege.] *v. t.* घेरणें, वेढणें, वेष्टणें, घेरा-वेढा घालणें, गराडा घालणें. २ गोंधळविणें. ३ गर्दी करणें. ४ *fig.* अर्जांवर अर्ज किंवा विनंतींवर विनंति करून त्रास देणें; as "The ministers were besieged with innumerable applications for every post." Besieg'er *n.* Besieg'ingly *adv.*

Besigh (bē-sī') [A. S. *be* & Sigh.] *v. t.* (करितां) सुसकारा टाकणें, दुःख प्रदर्शित करणें.

Besing (bē sing') [A. S. *be* & Sing.] *v. t.* काव्यरूपानें जाहिर करणें, काव्यरूपानें (कीर्ति) गाणें. Besung' *a.*

Beslave (bē-slāv') [A. S. *be* & Slave.] *v. t.* चा गुलाम करणें, दासानुदास करणें. २ गुलाम ह्मणणें.

Beslaver (bē-slāv'ēr) [A. S. *be* & Slaver.] *v. t.* लाळीनें-मुखरसानें मळवणें, लाळ *f.* टाकणें-गाळणें. २ अतोनात फाजील स्तुति करणें.

Beslobber (bē-slob'ēr) [A. S. *be* & Slobber.] *v. t.* लाळीनें लेपटणें, बरबटविणें, शेंबुडानें लेपटणें-न्हाणें, भरणें, लेथडणें, बरबटविणें, लाळ गाळणें. २ खूब स्तुति करणें.

Beslubber (bē-slub'ēr) [A. S. *be* & Slubber.] *v. t.* लाळ गाळणें, (लाळेनें) भरणें.

Besmear (bē-smēr') [A. S. *be* & Smear.] *v. t.* भरणें, लेपटणें, मळवणें, माखविणें, चोपडणें, लेथडणें, लिडबिडवणें, माखविणें, चोपडणें. २ दूषित करणें, सारवणें.

Besmirch (bē-smirch') [A. S. *be* & Smirch.] *v. t.* धुरकट करणें, मळकटवणें. Besmutch' *v. t.* धुरानें मळविणें.

Besmut (bē-smut') [A. S. *be* & Smut.] *v. t.* घ(धे)रोशानें काळा करणें. Besmutted *pa. p.*

Besom (bē'-zum) [A. S. *besema, besma,* broom.] *n.* केरसुणी *f,* खराटा (झाडणी *f,*) *m,* झाडू *m,* बुथारी *f.* B. *v. t.* केरसुणीनें झाडणें. Bē'som-head *n.* मद्द, टोणपा.

Besort (bē-sort') (*obs.*) Same as Become.

Besot (bē-sot') [A. S. *be* & Sot.] *v. t.* दारूनें मस्त करणें, गुंग करणें, धुंद-सुस्त-&c. करणें, गुंगी *f* धुंदी *f* आणणें, गुंगवणें. २ मोहांत पाडणें, मूढ करणें. (with *with*). Besotted *a.* गुंग, धुंद, मस्त, झिंगलेला. Besot'tedness *n.* Besot'tedly *adv.* Besot'ment *n.* धुंदी *f,* माज *m.*

Besought (bē-sawt') *pa. t.* & *pa. p.* of Beseech.

Besouled (bē-sōld') [A. S. *be* & Soul.] *a.* आत्मा असलेला.

Bespangle (bē-spang'gl) [A. S. *be* & Spangle.] *v. t.* टिकल्यांनीं भूषित करणें, चकचकीत करणें, सुशोभित करणें. [विलेला.

Bespate (bē-spāt') [A. S. *be* & Spate.] *a.* थुंकीनें सार-

Bespatter (bē-spat'ēr) [A. S. *be* & Spatter.] *v. t.* शितोडे-छाटे उडविणें, शिंतोड्यांनीं भरणें, सिंचणें, शिंपणें, शिडकावणें, शिडकाव देणें. २ सडासारवण करणें. ३ हुरमत घेणें, बदनामी करणें.

Bespawl (bē-spaw'l) [A. S. *be* & Spawl.] *v. t.* लेपटणें, लेथडणें, सांगून-बोलून ठेवणें, लिंपणें, माखविणें.

Bespeak (bē-spēk') [A. S. *be,* prefix, causative & Speak.] *v. t. to speak for, to engage beforehand* आधीं सांगून किंवा बोलून ठेवणें, आधीं गुंतवून ठेवणें; as, To bespeak a seat in the public coach. २ *to order* (goods) फरमास करणें ३ *to ask for a favour or the like* (करितां) विनंति-प्रार्थना करणें; as, "I must humbly bespeak your pardon." ४ *to address* संबोधून बोलणें, हटकणें, संबोधणें. ५ *to speak of, to be the outward expression of, to give evidence of* आधीं सुचविणें, (चें) बाह्यस्वरूप असणें, जाणवणें, दर्शविणें; as, "An action that bespoke a kind heart." ६ *to betoken beforehand, to prognosticate, to argue* भविष्य करणें-सांगणें; as, "They bespoke dangers to scare the allies." Bespoke *pa. t.* Bespoken *pa. p.* Bespeak *n. a benefit night* नटाला दिलेलें खेळाचें उत्पन्न *n;* as, "The night of her bespeak." *Dickens.*

Bespeckle (bē-spek'l) [A. S. *be* & Speckle.] *v. t.* ठिपक्यांनीं किंवा डागांनीं चिन्हित करणें, शिडकावणें.

Bespectacled (bē-spek'ta-kld) [A. S. *be* & Spectacle.] *pa. p.* चष्मा घातलेला, चष्मा असलेला, आरशी-चाळिशी लाविलेला.

Bespeed (bē-spēd') [A. S. *be* & Speed.] *v. t.* (मदत देऊन) जारीनें चालविणें, (आधार देऊन) जारीनें चालविणें. Besped' *p. a.*

Bespice (bē-spīs') [A. S. *be* & Spice.] *v. t.* मसाल्यानें भरणें, (नासूं नये ह्मणून) मसाला घालणें, मसाला घालून रुचि आणणें, मसाला घालून टिकाऊ करणें.

Bespot (bē-spot') [A. S. *be* & Spot.] *v. t.* टिपकेटिपके देणें-पाडणें. Bespot'ted *pa. a.* टिपकेटिपके दिलेला-असलेला, चित्रित. Bespot'tedness *n.*

Bespout (bē-spowt') [A. S. *be* & Spout.] *v. t.* मोठ्या थाटानें व्यर्थ बडबडणें, वाक्पांडित्य करणें. २ तोटीनें भिजविणें.

Bespread (bē-spred') [A. S. *be* & Spread.] *v. t.* विखरणें, सर्वत्र पसरणें, सर्वभर झांकून टाकणें, सर्वभर आच्छादणें. Bespread *pa. t.* & *pa. p.* प्रावृत, समाच्छादित, सर्वभर आच्छादिलेला.

Besprent (bē-sprent') [A. S. *besprengan.* vide Sprinkle.] *pa. p.* वर पसरलेला, शिंतोडलेला.

Besprinkle (bē-spring'kl) [A. S. *be* & Sprinkle.] *v. t.* सर्वभर शिंपडणें, सर्वभर पसरणें, चहूंकडे पसरणें.

Bessemer (bes'em-ēr) [From the name of the inven-

tor Sir H. *Bessemer.*] *n.* सर एच्. बिसेमरच्या पद्धतीनें तयार केलेलें पोलाद. याचा उपयोग आगगाडीचे रूळ, चाकांच्या धांवा वगैरे करण्यांत करितात.

Best ( best ) *a.* ( *superl.* of Good ) सर्वांहून चांगला, उत्तम, श्रेष्ठ, अव्वल, ज्येष्ठ, सत्तम, उत्कृष्ट, पर, वरिष्ठ, वर्य, वर ( in comp., as, नरवर, पशुवर). २ प्रगल्भ स्थितीचा, दूरसाल, उच्च प्रतीचा; as, The B. scholar. ३ बिनचूक किंवा पूर्ण; as, The B. description of a place. ४ बहुतेक (सर्व), अतिशय मोठा; as, The B. part of a week. ५ (*poe.*) सिंह (पुरुषसिंह), व्याघ्र (पुरुषव्याघ्र), पुंगव (नरपुंगव), इंद्र (नृपेंद्र). B. *n.* पराकाष्ठा *f*; कमाल *f*; परिपूर्णता *f.* B. *adv.* ( when *superl.* of Well ) सर्वोत्तम, कमालीनें, पराकाष्ठेनें, इतरांपेक्षां फार उत्तम रीतीनें; as, This cap B. suits you. २ फार फायदेशीर रीतीनें, अतिशय यशस्कर किंवा सुखकर रीतीनें; as, You may pass B. in the examination; You had B. not go that way; You had B. avoid an unpleasant situation. ३ पूर्णपणें, अगदीं बिनचूक रीतीनें; as, For reasons B. known to me. B. *v. t.* ( *collog.* ) (च्या) वर ताण-(च्या) पेक्षां सरशी करणें. Bestmaid *n.* करवली *f.* Bestman *n.* करवला *m.* At the best or At best होईल तितक्या उत्तम तऱ्हेनें, होईल तितक्या उत्तम स्थितींत, फार फार झालें तर, पराकाष्ठा झाली तरी, कमाल झाली तर. For the best चांगल्या हेतूनें, सद्धेतूनें, चांगल्याकरितां. I were best मला त्यापासून फार फायदा झाला असता. To have the best of it or To have the best of the bargain एखाद्या कामांत शक्य तेवढा पुष्कळ फायदा होणें. To make the best of one's way होतां होईल तितक्या मार्गांतील अडचणी टाळून चांगल्या मार्गानें जाणें. To make the best of-चा शक्य असेल तितका उत्तम उपयोग करणें, फार फ़ायदा होईल अशा रीतीनें विल्हेवाट लावणें; as, I shall send the goods to the market where I can make the best of them; (*b*) अगदीं कमी त्रास किंवा नुकसान होईल असें करणें; as, To make the B. of a dire misfortune, To make the best of a bad bargain. To make the best of hardships *cf.* गोड करून खावें व मऊ करून निजावें. To the best of one's belief खऱ्या खऱ्या-उत्तम समजुतीप्रमाणें. Do your best होईल तितकी पराकाष्ठा-शिकस्त-करा. [ भर मळवून टाकणें.

Bestain ( bē-stān' ) *v. t.* (सर्व ठिकाणीं ) डाग पाडणें, सर्व-

Bestead ( bē-sted' ) *v. t.* मदत करणें, कुमक-सुटका करणें. B. *v. i.* फायदेशीर असणें-होणें.

Bestead, Bested ( bē-sted' ) *pa. a.* घेरलेला; as, Bested by enemies, Bested with dangers.

Bestial ( best'i-al ) [ L. *bestia*, a beast. ] *a.* पशुसंबंधीं, पाशव. २ पशुतुल्य, आचरट, निंद्य, दुष्ट. Best'ialise *v. t.* पशूसारखें करणें-वागविणें. Best'ialism *n.* अजाणपणा *m*, बुद्धिहीनता *f*; पशुपणा *m.* Bestial'ity *n.* पशूसारखें वर्तन *n*, पशुपणा *m*, आंगावर शहारे आणणारें निंद्य वर्तन *n.*

Bestiary (best'i-ar-i ) [ L. *bestiarium*, a menagerie. ] *n.* कल्पित किंवा खऱ्या प्राण्यांचा इतिहास *m.* [पाडणें.

Bestick ( be-stik' ) *v. t. lit.* & *fig.* सर्वभर भोकें भोकें

Bestill ( bē-stil' ) *v. t.* शांत करणें. २ दाबादाब-चेपाचेप करणें, आंतल्याआंत दाबणें.

Bestir ( bē-stėr' ) *v. t.* सावध-हुषार करणें. २ ( used reflexively ) प्रयत्न करणें, प्रयत्न करण्यास लागणें. ३ जागृत करणें, उत्तेजन देणें ( used reflexively ). ४ काम करण्यास लावणें. ५ हालवणें, गति देणें. Bestir'ring *a.* Rarely used intransitively.

Bestorm ( bē-storm' ) *v. t.* दंग्याधोप्यांत अडकवणें, वावटळांत अडकवणें.

Bestow ( bē-stō' ) [A. S. *be* & *stow*, a place.] *v. t.* देणें, दान करणें, अर्पण करणें, समर्पणें, अर्पित-&c. करणें, समर्पण करणें. २ ठेवणें, सांठवण-संग्रह-सांठा करणें; as, "He bestowed it in a pouch." ३ with *on* or *upon* कामीं लावणें. ४ (लग्न लावून) देणें; as, He bestowed his daughter upon a gentleman. ५ (राहण्यास किंवा उतरण्यास जागा) देणें; as, I bestowed my house for some time upon him. Bestow'able *a.* देण्याजोगा, देय, अर्पणीय. Bestow'al, Bestow'ment *n.* दान *n*, दान करणें *n*, समर्पण *n.* Bestow'er *n.* देणारा.

Bestraddle ( bē-strad'dl ) [ A. S. *be* & Straddle.] *v. t.* पाय फांकून-फेंगडा चालणें-उभा राहणें.

Bestreak ( bē-strēk' ) [ A. S. *be* & Streak.] *v. t.* रेघो-(घ) ट्या काढणें, (रंगाच्या किंवा बिनरंगाच्या) पट्ट्यांनीं भूषित करणें.

Bestrew ( bē-strōō' ) [ A. S. *be* & Strew. ] *v. t.* पेरणें, चहूंकडे पातळ पसरणें, विखरणें ( with *with* ). Bestrewed, Bestrown, Bestrewn *pa. p.*

Bestride ( bē-strīd' ) [ A. S. *be* & Stride.] *v. t.* ( घोड्यावर-&c. ) दोन्हींकडे पाय टाकून बसणें, पाय फांकून उभा रहाणें, ढेंगांत धरून-पायाच्या बेचक्यांत धरून-ढेंग टाकून ओलांडून जाणें. २ सावरणें, रक्षण करणें, संभाळणें, ( from the sense of standing over a fallen man to defend him.) Bestred, Bestrode *pa. t.* Bestrid, Bestridden *pa. p.* Bestrider, Bestriding *n.*

Bet ( bet ) [O. Fr. *beter*, to bait (as a bear).] *n.* पैज *f*; पण *n*, होड *f*; प्रतिज्ञा *f.* B. *v. t.* & *v. i.* पैज मारणें, पण-प्रतिज्ञा करणें. Bet or Betted *pa. t.* & *pa. p.* Better, Bettor *n.* पैज लावणारा, जुगारी. Betting *n.* पैज लावणें *n.* An even bet सारखा डाव *m*, बरोबरी *f.*

Betake ( bē-tāk' ) [ A. S. *be* & Take.] *v. t. to repair to* आश्रयाकरितां जाणें; as, 'He betook himself to a forest.' २ *fig. to have recourse to* (अमुक एक मार्गाचा किंवा कृत्याचा) अवलंबन-आश्रय करणें, अंगीकार करणें used reflexively. Betook *pa. t.* Betaken *pa. p.*

Betel (bē'tl) [Fr. *betel*, Port. *betel*, *betle*.—Malayalam *vettilā*, *i. e. veru elā*, mere leaf.] *n. the Piper-Betel* plant नागवेल *f*, पानवेल *f*, वेल *f*, नागवल्ली *f*. [SOME KINDS OR VARIETIES ARE : कापूरवेल *f*, काळी पानवेल *f*, जनी *f*, देंटी *f*, मागधी पान, *pop.* मघई पान *n*. B. LEAF OF THE MIDDLING QUALITY बादखासापान *n*. BUNDLE OF B. LEAVES (CONTAINING 550) कवळी *f*. (AGGREGATE OF 36 कवळीs IS कुडतन *n*.). CASE (OF BAMBOO, PALM-LEAVES, &C.) TO HOLD B. LEAF पानपूड *n*. CASE TO HOLD B. LEAF WITH ITS ACCOMPANIMENTS पानदान *n*, पानसडें *n*, पानसुपारीचा डबा. LEAF OF B. पान *n*. LEAF OF B. OF AN ELONGATED OR BUD FORM कळीचें पान OR कळीदार पान *n*, कळी *f*. CHUNAM OR LIME PLACED TO BE EATEN WITH B. LEAF चुनपट्टी *f*. PILE OF B. LEAVES खाप *f*, कवळी *f*, काट *n*. PLANTATION OF B. पानमळा *m*. ROLL OF B. LEAF, AND ARECA-NUT विडा *m*, वीटिका *f*, तांबूल *m*, पान *n*, पानपट्टी *f*. SOME KINDS OR FORMS ARE कातरविडा *m*, कापूरविडा *m*, कुलपीविडा *m*, गोंदविडा *m*, गोविंदविडा *m*, मोडविडा *m*, मोदकविडा *m*. ROLL OF B. LEAF, ARECA-NUT &C.—COMPREH. पानसुपारी *f*. SOME SIGNIFICANT TERMS FOR THIS ROLL ARE मुखभूषण *n*, मुखवास *m*, मुखशुद्धि *f*.] Vender or Vendor of B. leaf and B. nut तांबोळी *m*.

Betel-nut (bē'tlnut) *n. areca catechu or betelnut* tree सुपारीचें झाड *n*, पोफळ *f*, पोफळी *f*, पूग *m*. [THE FRUIT OR NUT सुपारी *f*, पोफळ *n*, पूग *n*, पूगफल *n*, पूगीफल *n*. B. NUT, WHICH HAS RIPENED AND HARDENED ON THE TREE घोंट *n*, दगडी सुपारी. B. NUT GATHERED AFTER IT HAS FULLY RIPENED बेडा *m*, रोंठा *m*, रोंठी सुपारी *f*. B. NUT DECAYING WITHOUT RIPENING कुंमारी सुपारी *f*. B. NUT—AS ON THE TREE OR BEFORE SHELLING पोफळ *n*. BRANCH OF B. NUT-TREE झांवळी *f*. BASE PORTION OF A BRANCH OF A B. NUT TREE पोवा *m*, पोवळी *f*, विरी *f*. B. NUT-BOX पूगपात्र *n*, सुपारीची डबी *f*. CORE OR HEART OF A B. NUT खोबरें *n*. गर *m*. DUNGING AROUND THE ROOTS OF A B.-NUT TREE शेण साऊळ *f*. FINE CUTTINGS OF A B. NUT सुपारीचें फूल *n*. FRUIT-STALK OF A B.NUT शिंपट *n*, शिंपटें *n*, शिंपूट *n*, शिरटी *f*, शिपटी *f*. IMPLEMENT FOR STRIPPING OFF INTEGUMENTS OF A B. NUT रांपा *m*, रांपी *f*. NUT-CRACKERS (FOR CUTTING A B. NUT) सरोता *m*, अडकिता *m*. SPATHE OF A B. NUT गिरमी *f*, पागोटा *m*, गर्मी *f*. YOUNG B. NUT PLANT कावती *f*. YOUNG B. NUT PLANTATION सरगड *n*. YOUNG AND TENDER B. NUT पोंकटी *f*, पोंका(को)टी *f*. FOR BETEL-NUT PREPARED IN PARTICULAR WAYS, SOME OF THE TERMS ARE कापकडी सुपारी *f*. OR खापकडी *f*, चिकणी सुपारी *f*, चवारी *f*, बरडा *m*. OR बरडी सुपारी *f*, फूल बरडा *m*. OR फूलबरडी सुपारी *f*, लवंगचुरी सुपारी *f*. OR लवंगचूर *f*, कापी सुपारी, वरखी सुपारी *f*.]

*N. B.*—Betel-nut, the nut or fruit of the *areca catechu*, so misnamed (by Europeans) because it is chewed with the betel-leaf; hence, betel-nut-tree, betel-tree (*Murray*).

Betelgeuse (bet'el-gēz) [Fr. *Betelgeuse*, of Arabic origin.] *n. astron.* आर्द्रानक्षत्र *n*.

Bethel (beth'el) [Heb. *beth-el*, house of God. cf. Bethlehem, Bedlam.] *n.* पवित्र ठिकाण *n*. २ मेथाडिस्ट लोकांची प्रार्थनेची जागा *f*. (देऊळ *n*.) ३ (समुद्रांत कायम केलेलें खलाशांचें) प्रार्थनेचें तारूं *n*.

Bethink (bē-think') [A. S. *bithencan*.] *v. t. to call to mind* आठवण *f*-आठवणूक *f*-करणें, लक्ष्यांत आणणें (used reflexively and followed by *of*); as, To B. one's self of a thing. B. *v. i.* आठवण *f*-स्मरण *n*-होणें-असणें, ध्यानांत असणें, आठवणींत असणें-आणणें; as, B. ere thou dismiss us. Bethought *pa. t.* & *pa. p.*

Bethrall (bē-thrawl') [A. S. *be* & Thrall.] *v. t. to reduce to slavery* गुलाम करणें, गुलामगिरीच्या स्थितीस पोंहचवणें.

Bethumb (bē-thum') [A. S. *be* & Thumb.] *v. t. to handle, to soil by handling* (as books) हाताळणें, (आंगठ्यांनीं) बिघडवणें.

Bethump (bē-thump') [A. S. *be* & Thump.] *v. t. to beat soundly* बेदम-खूब-सडकावून मारणें. Bethumped or Bethumpt' *pa. t.* & Bethumping *pr. p.*

Betide (bē-tīd') [A. S. *be* & *tiden*, from A. S. *tidan*, to happen, from *tid*, time.] *v. t. to happen to, to befall* (ला) घडणें, (वर) बितणें; as, "What will betide the few?" B. *v. i. to come to pass, to occur* घडणें, बितणें, गुदरणें, पडणें, प्राप्त होणें. Shakespeare has used it with *of*; as, "What would betide of me?" Betided *pa. t.* & *p. p.* Betiding *pr. p.*

Betime, Betimes (bē-tīm,'-z') [A. S. *be* + *time i. e.* by the proper time; the *s* is an adverbial suffix.] *adv. seasonably, early* लवकर, वेळेवर, वेळेवारी, उशीर न होतां, योग्य वेळीं; as "To rise betimes is often harder than to do all the day's work." २ *speedily, forth with* एकदम, लवकर; as, "He tires betimes that spurs too fast betimes." *Shakes.*

Betitle (bē-tī'tl) [A. S. *be* & Title.] *v. t. to entitle* नांव देणें.

Betoil (bē toil') [A S. *be* & Toil.] *v. t. to weary with toil* खूब मेहनतीनें थकवणें.

Betoken (bē-tō'kn) [A. S. *be* & Token.] *v. t. to indicate* दर्शविणें, सुचविणें, जाणवणें, भासवणें. Betokener, Betokening *n.* दर्शविणारा, सुचविणारा. २ सूचकसूची (R), (as, in comp. हर्षसूचक, शुभसूचक).

Betook (bē-took') *pa. t.* of Betake.

Betossed (bē-tost') *pa. p.* खवळलेला, क्षुब्ध झालेला, प्रक्षुब्ध.

Betray (bē-trā') [A. S. *be* & Old Fr. *trahir.*—L. *tradere*, to deliver up.] *v. t.* विश्वासघात करणें. २ (दग्यानें-विश्वासघातानें) स्वाधीन करणें-सोंपणें-देणें; as, To B. one to his enemies, विश्वासघात करणें. विश्वासानें गळा *m.* कापणें. ३ गळा कापणें *fig.* ४ *to disclose* (a secret) (दग्यानें) मंत्रभेद-गुसभेद करणें, बाहेर फोडणें; as, To B. a secret. ५ प्रगट करणें, बिनसावधगिरीनें उघड करणें; as, To B. ignorance. ६ आडमार्गास नेणें, पापाच्या मार्गास नेणें; as, To B. a virgin. ७ स्पष्ट करणें, स्पष्ट रीतीनें दाखवणें, *colloq.* ठणठण बोंब मारून सांगत सुटणें; as, "All the names in the city B. great antiquity." *Bryant.* ८ भलत्याच मार्गास नेणें, नुकसानींत उतरणें; as, "This conduct of his betrayed him into great troubles." Betray'al *n.* विश्वासघात करणें *n*, फसविणें *n*, दग्यानें बाहेर फोडणें *n*. Betray'er *n.* विश्वासघात करणारा, दगेखोर मनुष्य. २ बेसावधपणामुळें गुप्त स्फोट करणारा. ३ (भोळसर मुलीला) घरांतून फूस लावून बाहेर काढणारा-पळविणारा, आडमार्गास नेणारा.

Betrim (bē-trim') *v. t.* व्यवस्थित करणें, टापटिपींत ठेवणें, सुशोभित करणें, (दिव्याची वात वगैरे) कापून बरोबर करणें. Betrimmed *pa. t.* & *p. p.* Betrimming *pr. p.*

Betrodden (bē-trod'n) *pa. t.* & *pa. p.* of Betread.

Betroth (bē-troth') [Pref. *be* & Troth or Truth. Betroth शब्दाचा मूळ अर्थ वचन देणें (to give one's word, to pledge one's self to any cause) असा आहे.] *v. t. to engage or promise with a view to marriage* (वधू अमुक वराला दिली असें) वाणीनें ठरविणें, वाग्दान *n*- वाङ्निश्चय, (*pop.*) वाग्निश्चय *m*- वाङ्नियम करणें with *g. of o.*, वाचादत्त-वाग्विवाहित करणें. २ *to promise to take as a future spouse* (R.) वाणीनें वरणें, वाक्प्रतिग्रह-वाक्स्वीकार करणें with *g. of o.* ३ वाचेनें बिशपाची अमुक एक देवळावर नेमणूक करणें. Betroth'al, Betroth'ment *n.* (v. V. T.)-*act.* वाग्दान करणें *n*, वाग्दान *n*, वाचादान *n.*—*act.* वाणीनें वरणें.(R.) *n*, वाक्स्वीकार (R.) *m.* Betrothed' *a.* (v. V. T.) वाग्दत्त, वाचादत्त, मागणीची (used of a female), प्रतिज्ञाविवाहित, वाग्विवाहित. २ वाणीनें वरलेला, वाक्स्वीकृत. The word Betroth is used more usually with reference to females. We say a female is betrothed and very rarely a male.

Better (bet'ėr) [A. S. *bettera;* Dut. *beter*, better, more.] *adv.* (comp. of Well) अधिक बऱ्या किंवा चांगल्या रीतीनें, जास्त अकलेनें-शहाणपणानें, जास्त फायदेशीर रीतीनें-कुशलतेनें-यश येईल अशा रीतीनें. २ जास्त बिनचूक किंवा पूर्ण रीतीनें; as, You must do your home-work better. ३ जास्त प्रमाणानें, जास्त अंशांनीं, (किंमत, वेळ, अंतर ह्या बाबतींत) जास्त प्रमाणानें. B. *a.* (comp. of Good) अधिक उंच-सरस-बरा. Betters *n.* वडील, वरिष्ठ, श्रेष्ठ. B. *v. t.* सुधारणें, चांगले गुण वाढविणें. २ (नैतिक, भौतिक, सांपत्तिक, धार्मिक किंवा सामाजिक) स्थिति सुधारणें. B. *v. i.* सुधारणें. B. *n.* सुधारणा *f*; as, To alter a thing for the B. २ फायदा *m*, वर्चस्व *n*, विजय *m*; as, To have, gain or get the B. of वर्चस्व मिळविणें. Bet'tered *p. a.* सुधारलेला. Bet'tering, Bet'terment *n.* सुधारणा *f*, सुधारणा करणें. Bet'tering *a.* Bet'terness *n.* Bet'termost *a.* (R.) Better half अर्धांगी, वरांगी, बायको. I had better do this मी हें करतों तर बरें झालें असतें. To be better off चलती चालणें-असणें, चंगळींत असणें. To be better than one's word कबूल केल्यापेक्षां-बोलल्यापेक्षां ज्यास्ती करणें. To think better of the matter त्या गोष्टीचा चांगला विचार करणें, तिच्याविषयीं पूर्ण विचारानें आपलें मत बदलणें, गुणदृष्टीनें पाहणें. To think better of a man एखाद्या मनुष्यासंबंधानें ज्यास्त अनुकूल मत करणें. To change for the better चांगल्यासाठीं फरक होणें, (रोग्याला) बरें वाटणें, गुण पडणें. For better, for worse बरें होवो वा वाईट होवो तरी, सुखांत वा दुखांत वा, कोणत्याहि परिस्थितींत.

Betty (bet'ti) [*Betty*, dim. of *Bet*, *Beth*, abbr. of Elizabeth.] *n.* बेटी. हें नांव पूर्वी इंग्लंडांतील बायकांत फार चालू होतें; as, In Lady Betty; परंतु आतां तें ग्राम्य असें समजलें जातें. २ बायकांचीं घरांतील कामें करणारा, बायक्या, बायल्या (used in contempt). ३ पहार, कटवणी; as, "Ruffians, who with crows and betties, break houses."

Betumble (bē-tumbl') [A. S. *be* & Tumble.] *v. t.* ढांसळणें, अस्ताव्यस्त करणें. Betumbl'ed *a.* ढांसळलेला; as, "From her B. couch she starteth."

Betutor (bē-tū'tor) [A. S. *be* & Tutor.] *v. t.* शिकविणें, शिक्षण देणें.

Between (bē-twēn') [A. S. *be*, by & *twa*, two.] *prep.* मध्यें, आड, मधीं, दर्म्यान (दोन वस्तु किंवा स्थळां) मधल्या जागेंत; as, Thana is between Bombay and Poona. ३ मध्यें, आंत, -च्या मध्यें, एकापासून दुसऱ्याकडे; as, "Letters passing between them"; "If things should go so between them." ४ दोहोंमध्यें, (समाईक); as, "A piece of land shared B. them." You can use only one book B. two. ५ दोघांमध्यें; as, The blame lies B. you. ६ (काल, संख्या, किंवा प्रमाण ह्यांसंबंधीं) मध्यें; as, B. 4 and 5 o'clock; His salary is B. three and four hundred &c. &c. (अन्योन्य कार्य किंवा संबंधद्योतक) दोन वस्तूंमधील; as, "Opposition between Religion and Science." Between decks *n.* गलबताच्या दोन तक्तपोशींमधील जागा *f.* Between'ity *n.* [R.]. Between whiles मधून मधून, कांहीं वेळानें, कधींबधीं. Between ourselves, Between you and me बाहेर न फोडतां, तुमच्या आमच्यांत, तुझ्या माझ्यांत, फक्त तुला व मला ठाऊक. Betwixt and between मध्यम स्थितींत (धड उत्तम नाहीं

व धड वाईट नाहीं ). Between Scylla and Charybdis इकडे आड व तिकडे विहिर. Between two fires दोन संकटांमध्यें. Between two stools you come to the ground दोन दगडांवर हात ठेवला तर तुह्मी जमिनीवर पडाल. cf. Marathi idiom दोन दगडांवर हात ठेवूं नये. To go between मध्यस्थी करणें. A go-between मध्यस्थ, भडवा ( slang ). Between is rarely used as a noun and then it means मधला काळ किंवा स्थळ.

*N. B.*—The idioms 'Far between,' 'Few and far between' and 'Short and far between' will be found under Far.

Betwixt ( bē-twikst' ) [ A. S. *be*, by & *twa*, two. ] *prep.* दोन वस्तूंमधल्या जागेंत; as, "From betwixt two aged oaks." २ एकापासून दुसऱ्याकडे.

Bevel ( bev'el ) [Fr. *biveau*, an instrument for measuring angles. Origin uncertain.] *n.* विषमकोन *n*, काटकोनापेक्षां लहान किंवा मोठा कोन *m*. २ दोन पातळींमधील कोन *m*. ३ ( एखाद्या पृष्ठभागाच्या कडेची ) उतरण *f.* To give a bevel to the edge of a table टेबलाला उतरती कडा काढणें. ४ *carpentry* चळता काटकोन ( न्या ) *m*, चळता गुण्या *m*. ह्मालाच bevel square असेंही ह्मणतात. सुतारकाम करीत असतांना फळी कोनदार कापावयाची असली तर ह्मा चळत्या काटकोन्यानें कोन आंखून घेतात व मग त्याप्रमाणें ती फळी कापतात. ५ *casting and foundery* कोडी. B. *a.* कोनेदार, कोनदार, तिरकस, चळत्या काटकोन्यासारखा. २ (*poe.*) नीतिभ्रष्ट. B. *v. i.* काटकोनांत नसणें, झुकता असणें; as, Their houses are very ill built, the walls bevel. B. *v. t.* ( चळत्या काटकोन्यानें आंखून ) तिरकस कापणें. २ कडेचा उतार ( स्लोप ) काढणें, उतरती धार पाडणें. Beveled or Bevelled *pa. t.* & Beveling or Bevelling *pr. p.* Bevel-gear *n.* दोन तिरकस-तिर्यक् दांत्यांच्या चक्रांची रचना *f.* ह्मा रचनेनें एका आंसाची गति दुसऱ्या आंसाला देतां येते. Bevel wheels तिरकस-तिर्यक् दांत्यांचीं चक्रें *m*, तिरकस कॉगव्ह्यांचीं चाकें *n*. Bevelled edge उताराची-तिरकस-उतरती धार *f.* Bevel pinion *mech. eng.* मोठ्या चाकाच्या दांत्यांत फिरणारें लहान उतरत्या दांत्यांचें चक्र *n*. Bevelling machine *n.* ( पुस्तकांचे पुठ्ठे ) तिरकस कापण्याचें यंत्र.

Bever ( bĕv'ĕr ) [ It. *bevere*, to drink.—L. *bibere*, Sk. पिब्, to drink. It seems that this repast originally consisted of a drink.] *n.* (*obs.*) मधल्या वेळचा फराळ *m*. B. *v. i.* (*obs.*) मधल्या वेळीं फराळ करणें.

Beverage ( bev'er-āj ) [ O. Fr. *bevrage*, *beivre*.—L. *bibere*, Sk. पिब्, to drink.] *n.* मादक पेय *n*, मादक *n*; as, An intoxicating B. पुष्कळ वापरांत असलेल्या दारूला पूर्वी हा शब्द लावीत असत. २ पेय *n*; as, Tea, that elegant and popular B. ३ *fig.* आपल्या वर्तणुकीचा कडू परिणाम *m*. ४ ( *slang* ) पेय किंवा पेयाकरितां पैसे. एखाद्यानें पहिल्यानेंच नवीन कपडे घातले ह्मणजे असलें पेय किंवा पैसे मागतात; as, To pay B. on the occasion of putting on a new suit of clothes.

Bevy ( bev'i ) [ It. *bevere*, L. *bibere*, to drink. The word *bevy* at first meant a throng or company and it was first applied to a throng of roebucks, quails or pheasants. These timid gregarious animals, in self-defence, go down to a tank or river to drink in bevies or small companies, and hence this word has been secondarily applied to a collection of beautiful young ladies, who are, from their timidity to go alone, placed under the same category.] *n.* घोळका *m*, जमाव *m*, साईर *f*, झुंड *f*, पल्ला *m*, यूथ (S.) *n*; as, A B. of larks or quails. २ कदम्ब *m*, झुंड *f*, झुंडी *f*; as, A B. of young ladies or girls.

Bewail ( bē-wāl ) [ A. S. *be* & Wail. ] *v. t.* *to deplore* विलाप *m*- रुदन *n*. करणें *g. of o.*, हायहाय *f.* करणें *g. of o.*, रडणें, शोचणें (*poe.*), शोक *m*-पराकाष्टेचा खेद *m*-फार दुःख *n*. करणें-मानणें *g. of o.* B. *v. i.* दुःखानें आक्रोश करणें; as, He bewailed exceedingly. Bewail'able *a.* Bewail'er *n.* ( v. V. ) शोक-विलाप करणारा, रडणारा, हायहाय करणारा, शोचक, शोचित, शोचनकर्ता (S.). Bewail'ing *n.* खेद *m*, विलाप *m*, शोक *m*. B. *a.* खेदात्मक, शोकात्मक, विलापाचा. Bewail'ment *n.*

Bewake ( bē-wāk ) *v. t.* पहारा ठेवणें, संरक्षण करणें. २ *spec.* ( प्रेताचा ) पहारा करणें. ३ जागून घालविणें; as, The night was well bewaked. B. *v. i.* जागा राहणें.

Beware ( bē-wār' ) [ From the words *be* & *ware* run together. A. S. *be* & *waer*, cautious; see Wary.] *v. i.* *to be on one's guard* संभाळणें. २ *to be suspicious of danger* (भयाविषयीं) सावध-सावधान (S.)-हुशार असणें-राहणें. ३ *to take care* जपणें ( with *of*; with clause-*lest*, *that*, *not*, *how* ). "Beware of all, but most beware of man!" "Beware, lest the enemy may pain you." Beware संभाळ. The transitive use of *beware* is now obsolete. "Priest, beware your beard." "Beware the awful pine trees."

Beweep ( bē-wēp' ) [ A. S. *be* & Weep.] *v. t.* *to lament, to bemoan* पुष्कळ रडणें, शोक करणें. Bewep't *pa. t.* & *p. p.* Beweeping *pr. p.* Bewept *p. a* *disfigured by weeping* रडून खराब झालेला; as, A B. face.

Beweltered ( bē-wel'-terd ) [ A. S. *be* & Welter. ] *a.* *besmeared by weltering in blood* रक्तांत बुचकळून खराब झालेला-तांबडा झालेला.

Bewet ( bē-wet' ) *v. t.* ओला करणें. ( *Shakes.* )

Bewig ( bē-wig' ) *v. t.* टोप घालणें. Bewigged *p. a.*

Bewilder (bē-wil'dĕr) [Pref. *be* & prov. Eng. *wildern*, a wilderness.] *v. t.* (*lit.*) *to lose in pathless places, to confound for want of a plain road* बिनमार्गाच्या ठिकाणीं-आडरानांत गुरफटवणें, घोंटाळवणें. २ (*fig.*) *to perplex* गांगरविणें, भांबावणें, गुंगविणें, भ्रमविणें. ३

*to astonish* चकभूल-भूल घालणें-पाडणें. ४ *to lead astray* बहाकावणें, भकवणें. Bewil'dered *a.* गुरफटलेला, गळफटलेला. २ गोंधळलेला, भांबावलेला, घावरलेला, घाबरा झालेला, मार्गावर नसलेला. ३ चकभूल, चक्र, चकित, चरक, बावरा, कावराबावरा, भ्रमिष्ट. ४ बहकलेला, भकलेला. To be bewildered गांगरणें, भांबवणें, भांबावणें, घोंटाळणें, गोंधळणें, बावरणें, चकणें, बावचळणें. Bewil'dering *a.* Bewil'deringly *adv.* Bewil'derment *n.* (See the meanings of the verb.) (अ) गांगरणें, (ब)बहकणें,(क) घोंटाळणें. २ घोंटाळा *m*, चकभूल *f*, भूल *f*, गडबड *f*, गोंधळ *m*, घोळ *m*, बावरणी *f*, मोह *m*, चित्तवैकल्य *n*.

Bewitch (bē-wich') [A.S. *be & wicce*, a witch.] *v. t. to affect* (generally injuriously) *by witchcraft* चेटुकचेटक-करणी करणें, जादुटोणा करणें, मानता करणें. २ *to fascinate, to enchant* भारणें, भारणी *f.* घालणें, चक्रचकभूल करणें. ३ सुरळ *f*-भुलवण घालणें. ४ *to excite love by pleasing influences* मोहणें, मोहविणें, मोह घालणें, मोहित करणें. [TO BE BEWITCHED सुरळणें, सुरळें पडणें, मोहून जाणें.] Bewitch'er *n.* Bewitch'ing *p. n.* Bewitch'ment *n.* चेटुक करणें. २ भारणें *n*, भारणी *f*, मोहणें, मोहन *n*, मोहनी *f*, मोहिनी *f.* ३ सुरळ *n*, सुरळें *n*, भुलवण *f*, भूल *f*, मोह *m*, चित्तभ्रम *m.* Bewitch'ing *a.* मोहक, मारू, चित्तहारी, उमदा, नामी, चित्तवेधक, भूल-मोह पाडणारा, भारण्यासारखा. Bewitch'ingly *adv.*

Bewray (bē-rā') [A. S. *be* + *wregan*, to accuse, to betray.] *v. t.* (*B.*) *to betray or disclose unintentionally* दर्शविणें, सांगणें; as, "Thy speech bewrayeth thee." Bewray'ed *pa. t. & p. p.* Bewraying *pr. p. & n.* Bewray'er *n.* विश्वासघात करणारा. २ (in bad sense) समजवणारा, दर्शविणारा, सांगणारा. Bewray'ment *n.* (R.) same as Betrayal.

Bey (bā) *n.* सुभेदार. (हा तुर्की शब्द आहे.)

Beyond (be-yond') [A. S. *begeondan*, from pref. *be & geond*, across, yonder, from *geon*, yon.] *prep. farther onward than* पुढें, मोहरें (*vulg.*), पुढां [R], पुढारां [R], पुढतीं, वर, वरतां, वरतींतें. २ *on the farther side of* पलीकडे-पैलीकडे, पल्याड (*vulg.*), बाहेर, पर, परतां, त्याच दिशेनें पण दूर अंतरावर, पुढें, वर, अधिक. [From B. पलीकडून. That is B. अतीत.] ३ (च्या) मर्यादेबाहेर; as, B. expectation. ४ (in excellence, degree, &c.) *above* वर, वरता, वरती-तें, अधिक, अगळा, उपर. ५ पुढच्या स्थलीं किंवा कालीं; as, "A thing B. us even before our death." ६ पेक्षां अधिक, पेक्षां दूर, आटोक्याच्या किंवा मर्यादेच्या बाहेर; as, The patient was B. medical aid; B. one's strength. ७ फारच मोठ्या प्रमाणानें, योग्यता, वैभव व उत्कृष्टपणा ह्या बावतींत फार श्रेष्ठ. Beyond measure प्रमाणाबाहेर, अतिशय प्रमाणानें. Beyond seas परदेशांत. The back of beyond अतिशय लांबचें स्थल-जागा. To be beyond one एखाद्याच्या आटोक्याबाहेर असणें. To go beyond (करामत, शोध इत्यादिकांत) ताण करणें, वरचढ करणें, मागें टाकणें, मागसांडणें, कान *m. pl.* कापणें. २ (व्यवहाराचे ठरींव नियम) उल्लंघणें; as, "That no man go B. and defraud his brother in any matter." B. *adv. yonder* पलीकडे.



Bezant (bezant') *n.* तुर्कस्थानांमधील एक सोन्याचें नाणें *n.* याची किंमत दहा शिलिंग किंवा वीस शिलिंग असते. हें नाणें रुप्याचेंही आहे, 'बेझान्ट.'

Bezel, Bezil (bez'el) *n.* कोंदण *n*, घर *n.* २ तासणीच्या पानाच्या धारेजवळचा निमुळता भाग *m*, तासणीच्या पानाची निमुळती धार *f.* ३ (as of a watch) (कांच बसविण्याची) खांचदार कडी *f*, कांचकडी *f.*

Bezique (be-zēk') [Fr. *besigue*, a game at cards.] *n.* एक प्रकारचा पत्त्यांचा खेळ *m*, बिझिक *n.* ह्यांत दोन, चार किंवा सहा असे इसम खेळतात व दोन किंवा चार पत्त्यांचे जोड घेतात.

Bezoar (bē'zōr) [O. Fr. *bezoar*-from Pers. *padzahr pad*, dispelling & *zahr*, poison.] *n.* बकरें, काळवीट इत्यादिकांच्या कोठ्यांतील दगडासारखा पदार्थ *m.* हा विषघ्न आहे. २ कोणत्याहि रोगावर औषध *n*, विषघ्न औषध *n*, विषाचा मोहरा *m.* Bovine B. गोरोचना *f*, गोरोचन *n*, गोवर्धन *n.*

Bezonian (bē-zōn'ian) [It. *besogni*, from *besogno*, need.] *n.* (*Shakes.*) हलकट मनुष्य *m*, भिकारडा मनुष्य *m.*

Bhang (bang) [Sk. भंगा; bhang.] *n.* भांग *f*, गांजा *m.*

Bhystie, Bheestie (bhistē) [Per. *bhyst*, heaven.] *n.* भिस्ती *m.* (पखालींतून पाणी नेणारा).

Bi (bī) *pref.* दोन. २ दोनदां. ३ दुप्पट.

Biacid (bī-as'id) *n.* द्व्यम्ल.

Biangular, Biangulate (bī-ang'gū-lėr,-lāt) *a.* द्विकोण, दोन कोंपऱ्यांचा, दुकोनी.

Biantheriferous (bī-an'-therif'erus) *a.* दोन केसरग्रंथी असलेला, दुकेसरग्रंथी.

Biarticulate (bī-är-tik'u-lāt) *a.* [see Articulate.] *zool.* द्विसंधिक, दोन सांधे असलेला, दुसांधी.

Bias (bī'as) [Fr. *biais*, a slope,—L. *bi*, double & *facies*, the face.] *n.* (पेल्यांच्या खेळांत पेल्याच्या) एका बाजूला ठेवलेलें वजन *n.* ह्या वजनानें पेल्यांची गति सरळ रेषेपासून कलती होते; as, "Being ignorant that there is a concealed bias within the spheroid, which will swerve away." *Sir W. Scott.* २ वांक *m*, कल *m*, ओढा *m*, वळण *n.* ३ पक्षपात *m.* ४ त्रिकोणाकार कापडाचा तुकडा *m*, कपड्याची कळी *f.* B. *v. t.* वळविणें, वांक देणें, वळण देणें, झुकविणें, तोलविणें, झोंक *m*-तोल *m*- कल *m*- वळण *n*- देणें. २ एकाच बाजूला मनाची प्रवृत्ति करणें. Biased or Biassed *p. p.* Biasing *n.* एका बाजूला वळणें *n*, पक्षपात करणें *n.*

Biauriculate (bī-awrik'u-lāt) *a.* (हृदयाला) दोन ऊर्ध्वाशय असलेला, द्व्यूर्ध्वाशय *a.* (see Auricle.)

Biaxial (bī-aks'i-al) *a.* दोन आंसांचा. Also Biaxal.

Bib (bib) [L. *bibere*, to drink.] *n.* लहान मुलांचें उरावरील पडवस्त्र *n*, मळवस्त्र *n*, लाळेरें *n* (लाळ ज्यावर पडेल असें). B. *v. t. obs.* & *v. i.* पिणें, चाखणें, घुटका घेणें. Biba'cious *a.* पानप्रिय,पानव्यसनी. Biba'city *n.* पानव्यसन *n*, पानासक्ति *f.* Biba'tion *n.* Bib'ber *n.* मद्य पिणारा. Bibu'lous *a.* शोषक, स्पंजासारखा. २ मद्य पिणारा. ३ पिण्यासंबंधीं ; as, B. propensities. Bib-cock *n.* एक प्रकारची पाण्याचे नळाची तोटी *f.*

Bib (bib) same as Bibcock.

Bibasic (bī-bās'ik) *a. chem.* लवणोत्पादक दोन भस्में (bases) असलेला, द्विभस्मीय, द्विभस्मिक, दुभस्मि.

Bibble-babble (bib'l-bab'bl) *n.* व्यर्थ बडबड *f.*

Bible (bī'bl) [Gr. *biblos*, a book.] *n.* ख्रिस्तीधर्मपुस्तक *n*, बायबल *n.* Bib'lical *a.* बायबलासंबंधीं. Bib'lically *adv.* Bib'licism *n.* बायबलांतील मत *n*, बायबलांतील धर्म *n*, बायबलांतील धर्मविचार *m.* Bib'licist, Bib'list *n.* बायबलवेत्ता, बायबलाचा कट्टा भक्त *m.*

Bibliography (bib'-li-og'raf-i) [Gr. *biblos*, a book & *graphia*, description.] *n.* ग्रंथवर्णन *n*, ग्रंथकोश *m.* [या कोशांत ग्रंथांचे कर्त्यांचीं व ग्रंथांचीं नांवें वगैरे माहिती कालानुक्रमानें दिलेली असते], पुस्तकांचा इतिहास *m.* Bibliog'rapher *n.* ग्रंथवर्णन-कोशवेत्ता, ग्रंथकोशकार. Bibliograph'ic *a.*

Bibliolatry (bib-li-ol'at-ri) [Gr. *biblos*, a book & *latreia*, worship.] *n.* बायबलपूजा, बायबलवरील अंधभक्ति *f*, पोपपेक्षां किंवा पोपसांप्रदायी इतर धर्मग्रंथांपेक्षां बायबल श्रेष्ठ आहे असें क्याथलिक पंथी लोकांचें मत *n.* २ बायबलच्या भावार्थापेक्षां शब्दार्थ ज्यास्त महत्वाचा आहे असें मत *n.* Bib'liol'ater, Bib'liol'atrist *n.* बायबलांतील भावार्थापेक्षां शब्दार्थ ज्यास्त महत्वाचा मानणारा *m*, बायबलपूजक.

Bibliology (bib'-li-ol'ō-ji) [Gr. *biblos*, a book & *logos*, discourse.] *n.* पुस्तकांचा कोश *m.* २ बायबलांतील परमार्थज्ञान किंवा ईश्वरविद्या *f*, ख्रिस्ती लोकांची अध्यात्मविद्या *f.*

Bibliomancy (bib'-li-ō-man-si) [Gr. *biblos*, a book & *manteia*, divination.] *n.* बायबलाच्या योगानें भविष्य सांगणें *n*, बायबलची शकुनवंती *f.*

Bibliomania (bib'-li-ō-mā-n'i-a) [Gr. *biblos*, a book & *mania*, madness.] *n.* दुर्मिळ आणि अपूर्व पुस्तकांचा शोक *m*, दुर्मिळ ग्रंथसंग्रहाचें व्यसन किंवा वेड *n.* Bib'lioman'iac *n.* दुर्मिळ व अपूर्व पुस्तकांच्या संग्रहाचें वेड असणारा. Bib'lioman-i'acal *a.* Bib'liomanist *n.* पुस्तकें संग्रह करण्याचें वेड असणारा.

Bibliopegy (bib-li-op'e-ji) *n.* पुस्तकें बांधण्याची कला *f*, Bibliop'egic *a.*

Bibliophile (bib'li-ō-fīl) [Gr. *biblos*, a book & *philos*, friend.] *n.* पुस्तकें संग्रह करण्याचा छंद असणारा. Bib'liophilist *n.* पुस्तकांचा छंद असणारा.

Bibliopole (bib'li-ō-pōl) [Gr. *biblos*, a book & *polein*, to sell.] *n.* पुस्तकें विकणारा *n.* also Bib'liop'olist. Bib'liopol'ic, Bib'liopical, Bib'liopolar *a.*

Bibliotheca (bib'-li-ō-thē'-ka) [Gr. *biblos*, a book & *theka*, a box.] *n. a library* पुस्तकालय *n*, 'लायब्ररी.' [Bib'liothecal *a.*

Bibulous, see Bib.

Bicameral (bī-kam'er-al) [A. S. *be* & L. *camera*, a vault, a chamber.] *a. consisting of, or including, two legislative branches (chambers)* कायदे करणाऱ्या दोन सभांचा, दोन सभा असलेला, सभाद्वयात्मक. Bicamerist *n. an advocate of two legislative chambers* साधारण लोकांची (Commons) व उमरावांची (Lords) अशा दोन कायदे करणाऱ्या सभा असाव्या असें मत प्रतिपादन करणारा, सभाद्वयवादी.

Bicapsular (bī-cap'-su-lar) *a.* द्विबीजकोशयुक्त, द्विबीजकोशी; as, A bicapsular pericarp.

Bicarbonate (bī-kär'-bon-āt) *n.* यामध्यें घालवितां येण्यासारखा सर्व उज्ज (H हायड्रोजन) घालविलेला नसतो; *e. g.* $NaHCO_3$. Sodium bicarbonate; $(NH_4)CO_3$. Ammonium bicarbonate. [Carbonate, भस्म (base) व carbonic acid यांचा रासायनिक संयोग *m.*] Normal carbonate यामध्यें धातूनें घालवितां येण्यासारखा उज्ज (H हायड्रोजन घालविलेला) असतो; *e. g.* $Na_2CO_3$. [निळा रंग *m.*

Bice, Bise (bīs) [Fr. *bis.*] *n. paint.* हिरवा रंग, फिकट

Bicentenary (bī-sen'-te-na-ri) [L. *bis*, twice & *centum*, a hundred.] *n.* दोनशें वर्षांची पुण्यतिथि *f.*

Bicentennial (bī-sen-ten'i-al) *a.* द्विशतवार्षिक. B. *n.* द्विशतवार्षिक-दोनशें वर्षांची-पुण्यतिथि *f.*

Bicephalous (bī-sef'-al-us) [L. *bis*, Sk. द्वि, twice & Gr. *kephale*, Sk. कपाल, the head.] *a.* द्विकपाल, दोन डोक्यांचा, द्विमस्तक, दुडोक्या, दुकपाली.

Biceps (bī-seps) [L. *bis*, twice & *caput*, the head.] *n. med.* द्विशिरस्नायु (applied particularly to a flexor in the arm, and another in the thigh).

Bichromate (bī-krō'māt) *a.* भस्मांचीं प्राणिलें आणि chromium trioxide ($CrO_3$) यांचा रासायनिक संयोग $K_2Cr_2O_7$ Bichromate of potash. Bichromate ह्याचा Dichromate च्या ऐवजीं चुकीनें उपयोग करितात. खरा शास्त्रीय शब्द Dichromate हा आहे.

Bichrome (bī-krom') *n.* मंजिष्ठ.

Bicipital, (bī-sip'it-al) Bicipitous (bī-sip'itus) [L. *bis*, twice & *caput*, the head.] *a.* द्विमस्तकी, दोन डोक्यांचा, द्विमूर्द्धा, दोन बुडख्यांचा; as, A B. muscle.

Bicker (bik'er) [Origin uncertain. O. F. *bequer*, to strike with the beak (see Beak) or A. S. *becca*, a pick-axe.] *v. i.* भांडणें, तंटा करणें. २ झुळझुळ-संथ हालणें; as, A bickering flame. ३ खळखळ वाहणें. B. *n.* भांडण *n*, तंटा *m.* Bicker'ment *n.* Bickerings *n.*

Bicker (bik'er) [Scand. *bikarr* (Scot. *bicker*), probably from Low L. *bicarium*, a drinking-bowl.] *n.* दारूचें-लांकडी भांडें *n.*

Bickern (bik'ėrn) *n.* (चोंचेसारखीं) दोन शिंगाटीं असलेली ऐरण *f.*; (दोन) शिंगाट्यांची ऐरण *f.* २ ऐरणीचें शिंगाटें *n.*

Biconcave (bī-kon'kāv) [L. *bi*, twice & Concave.] *a.* उभयांतर्गोल.

Biconvex (bī-kon'veks) [L. *bi*, twice & Convex.] *a.* उभयबाह्यगोल.

Bicorn, Bicornus (bīkorn',-us) [L. *bi*, double, & *cornu*, Sk. शृंग, a horn.] *a.* दुशिंगी, दुशिंग्या, द्विशृंग.

Bicorporate (bī-kor'por-āt) [L. *bis*, twice & Corporate.] *a.* द्विदेही, दुदेही. २ *hera.* दोन धडांचा; as, "A lion having one head and two bodies."

Bicuspid (bī-kus'pid) [L. *bi*, twice & *cusp*, *cuspis*, the point of a spear.] *a. having two cusps or points* द्व्यग्र, द्विस्कंध. B. *n. a premolar tooth in man* उपदाढ *f.* Bicuspids उपदंष्ट्रा *f.*, उपदाढा *f. pl.*

Bicycle (bī'si-kl) [L. pref. *bi*, twice & Gr. *kyclos*, a circle or wheel.] *n.* दुचाकी *f.*, वेगाची लोखंडी पायगाडी *f.*, द्विचक्रपादवाहन *n.*, 'बायसिकल' *f.*

Bid (bid) [सध्यांच्या इंग्रजी भाषेंतील to Bid ह्या शब्दाचे दोन मुख्य अर्थ आहेत; (१) *to offer* (a price) सांगणें-देणें; (२) *to order*, *to command* आज्ञा करणें, हुकूम करणें. हा शब्द मूळ Old Teutonic *beudan* (O. E. *beodan*) व Old Teutonic *bidjan* (O. E. *biddan*) ह्या दोन धातूंचें संकीर्ण रूप आहे. *Beudan* या धातूची *to stretch out, to reach out, to offer, to present; hence, to communicate, to inform, to announce, to proclaim, to command* अशी अर्थपरंपरा आहे. त्याचप्रमाणें *bidjan*, ह्या धातूची *to ask pressingly, to beg, to pray, to require, to demand, to command* अशी अर्थपरंपरा आहे. आतां जेव्हां ह्या दोन निरनिराळ्या धातूंचा *to command* असा अर्थ झाला तेव्हां ते वापरण्यांत घोंटाळा उपस्थित झाला, व एक धातु दुसऱ्याकरितां वापरूं लागले, व *beodan* धातूपासून होणारे अर्थ सध्याच्या Bid शब्दांत कायम राहिले. परंतु *biddan* ह्या धातूपासून झालेलीं भूतकाळ व भूतभूतकाळाचीं रूपें मात्र *beodan* पासून होणाऱ्या Bid शब्दानें घेतलीं. आतां *biddan* ह्या दुसऱ्या धातूचा to pray हा अर्थ सध्याच्या to Bid prayers (to *pray* or *say* prayers) ह्या शब्दप्रयोगांत आढळतो]. *v. t. to offer* (a certain price for) देणें, सांगणें, मागणी करणें. २ *to ask any one to come, to invite* बोलावणें, पाचारणें, आमंत्रण करणें; as, "As many as ye shall find, B. to marriage." ३ हुकूम करणें, आज्ञा करणें; as, B. him come. ४ *to say, to utter* or *to express* सांगणें, बोलणें; as, To B. welcome-adieu-farewell-goodbye-good morning-&c. ह्या सर्व शब्दप्रयोगांतील Bid चा 'प्रार्थना करणें,' 'मनापासून इच्छिणें' असा प्राचीन अर्थ होता. B. *v. i.* 'बीट' करणें, किंमत देणें-सांगणें; as, To Bid at an auction. To bid up at an auction. लिलांवांत किंमत चढवणें. *cf.* Marathi idioms घोड्यावर घोडा घालणें, उडीवर उडी घालणें. To Bid fair संभवनीय दिसणें, -चा संभव दाखवणें, -ची आशा उत्पन्न करणें, -चें आश्वासन देणें; as, It bids fair to be a fine day; He bids fair to be successful. To Bid defiance to धमकी देणें, धमकीची गोष्ट सांगणें, सामन्यास-युद्धास बोलावणें. To Bid for votes लोकांचीं मतें मिळविण्यासाठीं पार्लमेंटामध्यें अमुक एक कायद्यांना पाठबळ देण्याचें वचन देणें. To Bid against one (लिलांवामध्यें) दुसऱ्यापेक्षां जास्त किंमत चढविणें. To Bid high किंमत हाकणें-चढविणें. To Bid adieu-goodbye-farewell निरोप घेणें, निघून जाणें. Bidding *pr. p.* Bid, Bad or Bade *pa. t.* Bid, Bidden *pa. p.* B. *n.* मोल *n.* Bid'der *n.* लिलांवांत किंमत बोलणारा, मोलकिंमत सांगणारा &c., गिऱ्हाईक. २ हुकूम करणारा. ३ आमंत्रण करणारा. Bidding *n.* किंमत बोलणें *n.*, आमंत्रण *n.*, बोलावणें *n.*, निमंत्रण *n.*, पाचारण *n.* ३ मागणी *f.* Bidding prayer *n.* विशेष मागण्याची प्रार्थना *f.* ह्या प्रार्थनेंत ईश्वरापाशीं विशेष मागण्या करितात.

Bide (bīd) *v. t.* & *v. i. to tolerate, to put up with* (क्षुब्ध न होतां) सहन करणें. २ वसति करणें, राहणें (R). ३ वाट पाहणें; as, to B. one's time (*to await one's opportunity*). Bid'ing *n.* वाट पाहणें *n.* २ वसतिस्थान *n.* Bid'ing *a.* सतत राहणारा, टिकाऊ (now usually abiding).

Bidentate (bī-dent'āt) [L. *bi*, twice & *dens*, *dentis*, Sk. दन्त, a tooth.] *a.* दोन दांतांचा, द्विदंती, दुदांती. Also Bident'al.

Bidet (bi-det' or bē-dā) [Fr.] *n.* लहान घोडा *m.* (असला लहान घोडा पूर्वीं घोडेस्वाराला आपलें सामान वाहून नेण्यास देत असत.) २ दोन्हींकडे पाय टाकून बसून स्नान करण्याचें पिंप *n.*

Bifoliate (bī-fō'li-āt) [L. *bi*, twice & *folium*, leaf + suffix *-ate.*] Bifoliolate (bī-fōli'ōlāt) [L. *bi*, twice & *foliolum*, dim. of *folium*, leaf + suffix *-ate.* Bentley uses the word *bifoliate* and Drs. Lindley and Oliver use the word *bifoliolate*, both meaning *having, or composed of, two leaflets.*] *a. bot.* दोनच दलें (लहान पानें) असलेलें, दोन दळांचें झालेलें (मिश्रपर्ण), द्विदल, एक जोडीचें.

*N. B.*—Leaf = पर्ण, Leaflet = पर्णदल, gener. abbr. into दल. Cotyledon बीजदल gener. abbr. into दल; as, In Acotyledonous plants अदलवनस्पति there is a danger of दल meaning leaflet being confounded with दल meaning cotyledon.

Bifronted (bī'frunt-ed) [L. *bi*, twice & Front.] *a. of two fronts* दुतोंडा *lit.* द्विमुख, उभयतोमुख. Also Bifront *a.*

Biform (bī'form) [L. *bi*, twice & Form.] *a. of two forms* द्विविध, द्विरूप; as, "Of a B. figure, human above, half brute below." Biform'ed *a.* द्विरूप. Biform'ity *n.* द्विरूपता *f.* दोन निराळी रूपें-आकार एकत्र असणें.

Bifurcate, Bifurcated (bī-fur'kāt,-ed) [L. *bi-bis*, twice & *furca*, a fork.] *a. shooting into two branches* दुखांचांचा, दुफाब्यांचा, दुखांदी, बेळक्याचा. [A B. STICK डेळकी *f*, बेळकी *f*, डेळकें *f*, डेळी *f*.] Bifurcate *v. t.* दोन शाखा करणें. B. *v. i.* दोन शाखा होणें. Bifurcā'tion *n.* दोन फांद्या-शाखा फुटणें *n*, दुखांदा *m*, दुफाटा *m*, दुबा(बे)ळकें *n*, दुभाळकें *n*, बेळकें *n*, बेंचक *f*, *n*, बेचकें *n*, बेचांगळें *n*, डेळकी *f*, डेळकें *n*.

Big (big) *a. large* मोठा, महान्, स्थूल, अवजड, बृहत् (mostly in comp.). २ (with *with*) *pregnant* गरोदर, गर्भार, गर्भिणी, गर्भवती, दोन जिवांची, पोटाशी, गाभीण or गाभण (cattle and certain reptiles), सबर or सभर (mare and ass). [TO BECOME OR BE GROWING BIG पिकणें, गाभणें, गाभ धरणें, गाभास जाणें (APPLIED TO CATTLE AND CERTAIN REPTILES), पोटळणें OR पोटाळणें (R), कांहीं दिवस-महिने जाणें (WOMEN), डोहाळे लागणें, पोट वर येणें (USED IN A BAD SENSE)]. ३ *full of pride, haughty; puffed up* चढेल, दिमाखदार, दिमाखाचा, दिमाख्या, माजलेला, फुगलेला, शेफारलेला, मगरूर. [TO GROW BIG शिष्टावणें, चढून जाणें.] ४ उदात्त, उदार, प्रशस्त; as, A B. heart उदात्तान्तःकरण. ५ भरपूर, गंभीर, मोठा; as, A B. voice. ६ *distended* ताणलेला, फुगलेला; as, "The bellows of a furnace grow big when blown into. Big-bellied *a.* मोठ्या पोटाचा, ढेन्या, ढेरपोट्या, ढमढेरा, स्थूलोदर. Big'ger *a.* अधिक मोठा, &c. Big'gish *a.* जरा मोठा. Big'ness *n.* मोठेपणा *m*, मोठाई *f*, महत्त्व, (*pop.*) महत्व *n.* For more meanings of Bigness see the adjective Big. Big-wig *n.* बडा मनुष्य *m.* To look big डौल घालणें, दिमाख करणें, दुसऱ्याला तुच्छवत् मानणें. To talk big बढाई *f*-फुशारकी *f*-मारणें, बढाइकी मारून दहशत घालणें.

Bigamy (big'am-i) [L. *bi*, *bis*, twice & Gr. *gamos*, marriage; allied to Sk. यम् to restrain or govern.] *n. having two wives or two husbands at once* दोन लग्नें करणें *n*, एक बायको असतां दुसरी करणें *n*, एक नवरा असतां दुसरा करणें *n*, द्विभार्याकरण *n*, द्विभर्तृकरण *n.* २ द्विभार्याकरणाचें-द्विभर्तृकरणाचें पाप. Big'amist *n.* दोन बायकांचा नवरा *m*, दोन नवऱ्यांची बायको *f*, दुवायल्या *m*, द्विपतिका *f*, द्विभार्यक, द्विपत्नीक. Big'amous *a.* द्विभार्याकरणाचा, द्विभर्तृकरणाचा.

Bigg (big) [Icel. *bygg*; Dan. *byg*.] *n.* एक प्रकारचा जव *m.* ह्याच्या दाण्याला चार धारी असतात.

Biggen, Biggin (big'in) [Fr. *beguin*, from the cap worn by the *Beguines*, a religious society of women in France.] *n.* टोपडें *n*, टोपरें *n.* २ *infancy* बालपण *n*, बालदशा; as, "How many dangers meet Poor man between biggin and the winding sheet!"

Biggin (big'in) *n.* आंगचें गाळणें असलेलें काफी तयार करावयाचें भांडें *n*, आंगच्या गाळण्याची किटली *f*, काफी तयार करतांना ज्यामध्यें काफीची पूड ठेऊन काफी तयार करतात तें सच्छिद्र भांडें *n.*

Bight (bīt) [A. S. *byht*.] *n.* अढी *f*, वेटाळें *n.* २ *mech. eng.* गाळा *m.* ३ उपसागर *m.*

Bignonia (big-nō'ni-a) [Named after the Abbe *Bignon*, the librarian of Louis XIV.] *n. bot.* पाडळ *f*, पाडळी *f*, अमोघा *f.* ह्याला संयुक्तपर्ण व नळीच्या आकाराचीं फुलें येतात.

Bigot (big'ot) [Fr. *bigot*, a bigot or hypocrite, a name once given to the Normans in France. At first the word *bigotry* was confined to religious opinions but afterwards it was extended to opinions of any sort.] *n.* आपलींच धर्मसंबंधीं किंवा इतर मतें बिनचूक खरीं व आपल्याहून भिन्नमतें अगदीं खोटीं असें मानणारा, धर्मवेडा, हट्टी, कट्टा उपासक, हेकेखोर, स्वमताभिमानी(?) *m.* Big'oted *p. a.* दुराग्रहानें आपल्या मतांस चिकटून रहाणारा, धर्मवेड असलेला, मताभिमानी, एककल्ली, स्वमतवादी, स्वमताग्रही, हटवादी, एकमार्गी (?), एकमोडी (?), एकचाली (?). [BIGOTED CHRISTIAN वीरखैस्त, *cf.* वीरवैष्णव, वीरशैव.] Big'otedly *adv.* Big'otry *n.* स्वमताचा फाजील अभिमान *m*, धर्मवेड *n*, फाजील मताभिमान *m*, हटवाद *m*, दुराग्रह *m*, स्वमताग्रह *m*, श्रद्धाजाड्य *n.*

*N. B.*—एकमोडी, एकचाली, एकमार्गी are not the correct meanings of Bigoted; nor are स्वमताभिमान, स्वमतासक्ति the correct meanings of Bigotry.

Bijou (be-zhōō') *n.* नकशीदार वस्तु *f.* २ नकशीदार लहान पेटी *f.* ३ फार लहान पण सुबक असा, विशेष कारागिरीचा दागिना *m. pl.* Bijoux. Bijou'try (Fr. *Bijouterie*) *n.* नकशीचें जवाहीर-दागिने.

Bijugate (bī-jū'g-ate) [L. *bi*, twice & *jugare*, *jugatus*, to yoke.] *a. bot. two-paired*, 'as a pinnate leaf of two pairs of leaflets.' दलांच्या दोन जोड्यांचें बनलेलें (संयुक्तपर्ण), संयुक्तपर्णाच्या मधील दांड्याच्या प्रत्येक बाजूला दोनदोन दलें असलेलें (पर्ण), दलांच्या दोन जोड्यांचें, द्विदलयुग्म (संयुक्तपर्ण).

Bijugous (bījū'-gus) *a. bot.* द्विदलयुगल (संयुक्तपर्ण). See Bijugate.

Bike (bīk) [Etymology unknown.] *n.* गांधिलमाशांचें घरटें *n.* २ (used contemptuously.) मनुष्यांचा घोळका *m.* ३ *fig.* जमिनीखालची लपावयाची जागा *f.*

Bike (bīk) [Abbreviation of Bicycle which see.]

Bilabiate (bī-lā'bi-āt) [L. *bi* & Labiate.] *a.* द्वयोष्ठक, उघडलेल्या तोंडाचे आकृतीचा, द्वयोष्ठ; as, Bilabiate corollas.

Bilaminar (bī-lam'i-nėr) [L. *bi*, twice & *lamina*, a lamina.] *a.* दोन पातळ पत्रे असलेला, दोन पातळ पऱ्यांचा.

Bilander (bī'-lan-dėr) [Of Danish origin.] *n.* कालव्यांत चालणारें दोन डोलकाठ्या असलेलें व्यापारी जहाज *n.*

Bilateral (bī-lat'ėr-al) [L. *bi*, twice & *latus*, *lateris*, side.] *a.* द्विपार्श्व (as, Bilateral operation (अंतर्गळरोगांत) द्विपार्श्व अंडच्छेदनक्रिया), दुबाजूंचा, दोन बाजू असलेला. Bilat'erally *adv.*

Bilberry (bil'ber-i) [Dan. *böllebaer*; Ger. *blaubeere.*] *n. pl.* Bilberries काळ्या बोरांचें झाड *n.* २ काळें बोर *n.* Called also Whortle-berry.

Bilbo (bil'bō) [From *Bilbao*, in Spain, famous for iron and steel.] *n.* बहुधा खुपसण्याकरितां वापरलेली तरवार *f.* विचवा *m.* Bil'boes (Bil'bōz) कैद्याच्या पायांत किंवा हातांत घालण्याच्या खोड्यासारख्या बिड्या *f. pl.*

Bile (bīl) [L. *bilis*, bile, also anger.] *n.* पित्त *n.* २ *fig.* खप्पामर्जी *f.* राग *m.* Bil'iary *a.* पित्ताचा, पित्तवाहक; as, B. ducts. ३ पित्त, पित्तासंबंधीं; as, B. acids. Bil'ious *a.* पित्ताळू, पित्तळ, पित्तकर, पित्तप्रकोपी, पित्तप्रधान, पित्तग्रस्त, पित्तक्षोभी, पित्तक्षुब्ध. २ पैत्तिक, पित्तासंबंधीं. ३ तामसी, उग्र प्रकृतीचा, गरम तब्येतीचा. To feel B. पित्तानें जळजळणें-उचमळणें. *impers.* पित्ताची ज्योत *f.* मारणें-भरणें (उरांत, घशांत). Bile'-duct *n.* पित्तवाहिनी *f.* Bil'iously *adv.* Bil'iousness *n.* पित्तप्रकोप *m.* Bilious fever *n.* पित्तज्वर *m.* Bilestone *n.* पित्तातिशयानें झालेला मूतखडा *m.* पित्ताश्मरी *f.* To rouse one's bile एखाद्याचें पित्त खवळणें.

Bilge (bilj) [Most probably connected with Bulge.] *n.* पिपाचें पोट *n.* २ गलबताचें पोट *n.* घमताड *f.* गमतड (डी). ३ घमत *n.* ४ फुगा *m.*-फुगारा *m.* B. *v. t.* गावडें पडणें, गमत *n.* करणें. Bilge-pump *n.* आगबोटींतील घमत काढावयाचा बंब *m.* Bilge-water *n.* घमत *n.* Bilg'y *a.*

Bilingual (bī-ling'wal) [L. *bis*, twice & *lingua*, tongue.] *a.* दोन भाषांचा; as "*Cock-boat* is probably a bilingual compound," द्विभाषिक. Bilin'guar *a.* द्विभाषिक. Biling'uous *a.* दुभाषी, दोन भाषांचा.

Biliteral (bī-lit'ėr-al) [L. *bi*, twice & *litera*, a letter.] *a.* दोन अक्षरांचा, दोन वर्णांचा, द्विवर्णात्मक.

Bilk (bilk) [Probably a form of Balk.] *v. t.* फसविणें, घेतलेल्या मालाचे पैसे न देतां फसवून निघून जाणें. २ *fig.* हातावर तुरी देणें; as To bilk a creditor. Bilk'er *n.* गाडीवानाला कमी भाडें देऊन आणि त्याबद्दल त्यानें तक्रार केल्यास खोटें नांव सांगून खोटा पत्ता देणारा मनुष्य *m.* गाडीवानाला भाडें न देतां फसवून निघून जाणारा. २ मालकाला गाडीबद्दल भाडें न देणारा गाडीवान *m.* Bilk *n.* गंजिफाच्या खेळांत आपल्या समोरच्या भिडूला एकदम डाव करूं न देणें. २ धूर्तता *f.* ३ व्यर्थ बडबड *f.* सटरफटर *n.* ४ स्वतःचे धनकोला फसविणारा मनुष्य *m.*

Bill (bil) *n.* कोयता *m.* कुरंदी *f.* कोयती *f.* पायळा or पाळा *m.* पाईळ *m.* बोडसा *m.* बोडसें *n.* खराळ *m.* लवित्र *n.* २ आकुत. [Catch or lodge of a B. अंकडी *f.* अंकडा *m.* आऊत (?) *m.*] ३ लढाईंत वापरण्यासारखा परशु *m.* B. *v. t.* कोयतीनें-कुरंदीनें खणणें-तोडणें. २ परशूनें तोडणें. Bill'-hook *n.* आंकडी असलेला मोठा कोयता *m.*

Bill (bil) [A. S. *bile.*] *n.* चोंच *f.* चंचु *f.* चंचुपुट *m.*, *n.* B. *v. i.* चोंचीला चोंच लावणें (as doves), चंचुचुंबन करणें. Billed *a.* चोंच असलेला. To bill and coo लडिवाळपणानें गोंजरणें (said of doves or demonstrative lovers).

Bill (bil) [L. *bulla*, a boss, a seal &c.] *n.* पत्रक *n.* याद *f.* तपसील *n.* 'बील.' २ विकलेल्या जिनसांची याद *f.* ३ *law* अपराधलेख *m.* वादीचा अर्ज *m.* ४ हुंडी *f.* ५ कायद्याचा खर्डा-मसुदा *m.* कायदा *m.* ६ परवाना. ७ ढळढळीत अक्षरांची मोठी जाहिरात *f.* Bill'-book *n.* स्वीकारलेल्या व दुसऱ्यावर काढलेल्या हुंड्यांचें नोंदबुक *n.*-वही *f.* Bill-broker *n.* स्वतःकरितां किंवा दुसऱ्याकरितां हुंड्यांचा धंदा करणारा दलाल, हुंडीदलाल, हुंड्या पटवून देणारा दलाल. Bill-discounter *n.* कटमुदतीच्या हुंड्यांचा दलाल; ह्या हुंड्या तो विकतो आणि विकत घेतो. Bill-chamber *n.* स्काटलंडामध्यें खटल्याचा निकाल तत्काल लावणारें सेशनकोर्टापैकीं एक खातें *n.* Bill-sticker *n.* जाहिराती लावणारा-चिकटविणारा. Bill of adventure. See Adventure. Bill of complaints *n.* (इंग्रजी न्यायपद्धतीअन्वयें) वादी घडलेली हकीकत कोर्टांत कळवून आपणास काय पाहिजे हें देण्याची कोर्टास विनंति करितो ती. Bill of costs (वकिलाच्या किंवा दाव्याच्या) खर्चाचें पत्रक *n.* Bill of credit (सरकारानें आपल्या) पतीवर काढलेली नोट. २ पतचिठी, ही चिठी ज्याला दिली त्याला उधार माल चिठी देणाऱ्याच्या पतीवर द्यावा असें हींत लिहिलेलें असतें. Bill of divorce सोडचिठी. Bill of entry जकातकचेरींत बाहेर गांवीं पाठविण्याच्या व आंत येणाऱ्या मालाची ठेवलेली याद *f.* Bill of exceptions सेशनकोर्टांत ज्यूरीच्या मदतीनें खटला चालून खटल्याचा निकाल सांगितल्यावर निकालाविरुद्ध ज्या तक्रारी विनंतीअर्जानें कोर्टापुढें मांडण्यांत येतात त्या ज्यूरी आणि जज्ज यांच्या निकालाविरुद्ध केलेल्या तक्रारींची याद. Bill of exchange अदलाबदल करतां येणारी हुंडी (ज्यांत बहुतकरून मुदत ठरविलेली असते). Bill of fare जेवणाचे पदार्थांची यादी, ताटाची यादी. Bill of health गलबत निघण्याचे वेळीं तें ज्या ठिकाणाहून निघालें त्या ठिकाणीं कोणत्याही प्रकारचा सांसर्गिक रोग नव्हता अशाबद्दलचा योग्य अधिकाऱ्याकडून मिळालेला दाखला. Bill of indictment कोर्टींतील पंचांला सादर केलेली लेखी तोहमत. Bill of lading गलबतावरील भरता (बारदाना) ची याद, भरितपत्र. Bill of pains and penalties राजद्रोहासारखा गुन्हा जरी कायदेशीर रीतीनें शाबीत झाला नाहीं तरी अशा गुन्हेगारांस देहांतशिक्षेव्यतिरिक्त शिक्षा देण्याचा कायदा. Bill of mortality मृत्युसंख्येची याद, मुडदेसुमारी. Within the bills of mortality गांवाच्या हद्दींत. Bill of parcels विकत घेतलेल्या वस्तूंचा प्रतवार तक्ता, हा तक्ता विकणारा इसमच करितो. Bill of particulars वादीच्या मागणीचा किंवा प्रतिवादीच्या वजावटी (set off) चा तपशील. Bill payable ज्यामध्यें हुंडीचा पैसा देण्याबद्दल लिहिलें असतें ती हुंडी.

Bill receivable ज्यावरून पैसा वसूल करावयाचा असतो ती हुंडी. Bill of rights (लोकांच्या) राजकीय हक्कांचा कायदा. Bill of sale *law* विक्रीचा करार, एखाद्या मनुष्यानें दुसऱ्या इसमापासून कर्ज काढिलें असतां त्याला तो आपली जिनगी लिहून देतो, आणि मुदतींत कर्ज परत न केल्यास सावकारास या (Bill of sale) करारपत्रानें गहाणवट जिनगी विकण्याचा हक्क प्राप्त होतो. Bill of, or, at sight रोकडी हुंडी. Bill of store व्यापारी लोकांनीं (कस्टम) जकात दिल्याशिवाय ह्यांना आवश्यक लागणारे पदार्थ प्रवासाकरितां आगबोटींतून नेण्याची देण्यांत येणारी परवानगी. Bill of sufferance जकात दिल्याशिवाय हव्या त्या इंग्रजी बंदराशीं व्यापार करण्याचा व्यापाऱ्याला दिलेला परवाना *m*. To accept a bill हुंडी सचकारणें. To dishonour a bill हुंडी नाकारणें, हुंडी फिरविणें. To present a bill for acceptance हुंडी रुजू करण्याकरितां दाखविणें. To present a bill for payment पिकलेली हुंडी पटवण्याकरितां दाखविणें. Bill payable to bearer जो दाखवील त्याला पटवून मिळणारी हुंडी. Bill payable to order ज्याच्या नांवें हुंडी लिहिली असेल त्यालाच किंवा त्यानें ज्याला बेचन केली असेल त्याला मिळणारी हुंडी. To endorse a bill (शेरा मारून) हुंडी बेचन करणें.

Billet (bil'et) [Fr. dim. of Bill.] *n. a note* चिट्ठी *f*, चकती *f*, सुक्का (R) *m*. २ *a ticket* चकती *f*, लष्करी शिपायास नेमून दिलेल्या जागेबद्दलचा परवाना *m*; as, A B. of residence. B. *v. t.* चिठ्ठया *f-pl.* चकत्या *f-pl.* देऊन रहायास नेमणें-योजणें, लष्करी शिपायास रहावयास जागा देणें. B. *v. i. to be lodged* बिऱ्हाडाची सोय लावून दिलेली असणें; as, He billets in my lodgings.

Billet (bil'et) [Fr. *billette-bille*, the young stock of a tree.] *n. a log of wood* ओंडा *m*, dim. ओंडी *f*, ओडकी *f*, ओंडकूर *n*, ओंडकें *n*, उसळपा *m*, फांटें *n*, टोणका *m*, dim. टोणी *f*, टोणकें *n*, भिंतळा *m*. २ बकलांत अडकवण्याचा चामड्याचा तुकडा *m*.

Billet-doux (bille-dōō') [Fr. *billet*, a letter & *doux*, sweet.] *n. a short love-letter* प्रणयलेख *m*, कामलेख *m*, मदनलेख *m*, प्रीतिसंदेश *m*, प्रीतिपत्र *n. pl.* Billets-doux.

Billiards (bil'yardz) [Fr. *billard*, a billard or the stick wherewith the players touch the ball at billiards.] *n.* बिलिअर्ड, चौरंगावरच्या गोळ्यांचा खेळ *m*, टेबलावर खेळण्याचा गोळ्यांचा खेळ. Billiard *a.* बिलियर्डासंबंधीं. Billiard-marker *n.* बिलियर्ड खेळांतील डाव नोंदणारा.

Billicock (bil'i-kok) *n. colloq.* एक प्रकारची उंच नव्हे [अशी मुकुटी टोपी *f*.

Billingsgate (bil'ingz-gāt) [*Billingsgate*, the great fish market of London.] *n.* लंडनमधील बिलिंग्सगेट मार्केटांत पूर्वीं चालू असलेल्या हलकट भाषेसारखी भाषा *f*, हलकट व हमरीतुमरीची भाषा *f*, बीभत्स भाषा *f*, बिलिंग्जगेटची हलकट भाषा *f*.

Billion (bil'yun) [L. *bi*, twice, & Million.] *n.* महापद्म *n. m.* (१,०००,०००,०००,०००) Ten B.s शंकु *m*. Hundred B.s जलधि *m*, शंख *m*. Thousand B.s अंत्य *n*. Ten thousand B.s मध्य *m*. Hundred thousand B.s परार्ध *n*.

Billon (bil'on) [Fr. *billon*, a debased metal.] *n.* हीण धातु *f*. (ही रुपें व तांबें किंवा रुपें व जस्त ह्यांची केलेली असते व कधीं कधीं सोनें किंवा रुपें व इतर हीण धातू ह्यांचीहि असते.)

Billow (bil'ō) [Scand.,—Icel. *bylgja*; Dan. *bolge*, a wave.] *n.* वाऱ्यानें फुगलेली मोठी लाट *f*, कल्लोळ *m*, दांडी *f*, गह्वा *m*. Swelling and dashing of Billows खळबळी *f*, *intense.* खळबळाट *m*. B. *v. i.* मोठी लाट येणें-आदळणें. Bill'owed, Bill'owy *a*.

Billy (bil'i) *n.* पोलीस शिपायाचा दंडुका *m*, काठी *f*.

Billy, Billie (bil'i) *n.* बरोबरचा योद्धा *m*-वीर *m*.

Billygoat *n.* बकरा *m*. [Bill'ies *pl.*

Bilobate (bī'lōbāt) [L. *bi* & Lobate.] *n. bot.* द्विखंडयुक्त, दोन खंडांचा (भागांचा) झालेला.

Bilocular (bī-lok'ū-lar) [L. *bi*, twice & *locus*, place.] *a. bot.* दुकोशी, दुकोटरी, द्विकोशी, द्विकोटरी; as, जायफळ.

Bimaculate (bī-mak'ū-lāt) [L. *bi*, twice & *macula*, a spot.] *a.* दोन डाग असलेला.

Bimana (bīm'an-a) [L. *bi*, twice & *manus*, hand.] *n.* दोन हात असणारा प्राणी *m*. Bi'manous *a.* दोन हातांचा, दोन हात असणारा.

Bimensal (bī-men'sal) [L. *bi*, twice & *mensis*, a month.] *a.* दोनदोन महिन्यांनीं होणारा-घडणारा, द्वैमासिक.

Bimetallism (bī-met'al-izm) *n.* द्विचलनवाद *m*, सोनें आणि रुपें ह्या दोहोंचीं चलतीं नाणीं असावीं असें मत *n*, द्विधातुवाद *m*. Bimetal'lic *a.* दोन धातूंचा, सोनें व रुपें ह्या दोहों जातींचीं नाणीं चालू असलेला (देश). Bimet'allist *n.* द्विचलनवादी *m*.

Bimonthly (bī-munth'li) same as Bimensal.

Bin (bin) [A. S. *binn*, a manger.] *n.* कणगा *m*, कोथळा *m*, कणंग or कणिंग *f*, *dim.* कणगुली *f*, कणगूल *n*, कोथळी *f*, पालटें *n*, पालें *n*.

Binacle, same as Binnacle.

Binary (bī'nar-i) [L. *binarius*, two by two, from *bis*, twice.] *a.* दोहोंचा, दुहेरी, द्विगुण. २ *chem.* द्विभौतिक, दोन एकाकी पदार्थांपासून झालेला, द्विमूल, द्वितन्विक. Bī'nate *a.* एकाच देठावर दोन दलें (लहान पानें) असणारें. Binary arithmetic द्व्यांशगणित *n*, द्व्यांशपद्धतीप्रमाणें लिहिलेलें अंकगणित *n*. Binary scale दोहरा, दुवांरी ताल. २ *math.* द्विक्रम, शून्य आणि एक यांनीं बांधलेली अंकपद्धति *f*. Binary star *astron.* दुहेरी तारा *m*, बेवडातारा *m*. Binary system *astron.* मिथुनमाला *f*. Binary theory द्वैभौतिक वाद *m*. *chem.* दोन भिन्न व विरोधिगुणांच्या

एकाकी पदार्थांपासून सर्व रासायनिक मिश्रणें झालीं आहेत असा वाद किंवा असें मत *n.*

*N. B.*—Binary star = a double star, one of two stars associated together so as to form a system, the one revolving round the other, or both round their common centre of gravity.

Bind (bīnd) [A. S. *bindan*, Sk. बन्ध्, to bind. (बंदानें-बिव्व्यांनीं-वेष्टनानें-प्रेम इत्यादि मनोविकाराच्या पाशानें) गच्च बांधणें, घट्ट करणें, असा to Bind ह्या क्रियापदाचा मूळ अर्थ आहे.] I (अ) *to tie fast* बांधणें, बांधून टाकणें-ठेवणें, बंधन *n*-निबंधन *n*.-&c. करणें *g. of o.* I (ब) (कशानें) कसणें, करकचणें, करकचून बांधणें-आवळणें-ओढणें, कर्कटून आवळणें. II (अ) (वेष्टनानें) बांधणें, वेष्टणें, लपेटणें, वेढणें, गुंडाळणें. II (ब) *to make costive* पोट *n.* बंद करणें *g. of o.*, बद्ध-बद्धकोष्ठ करणें, मलावष्टंभ करणें *g. of o.* II (क) *to bandage the body with something* पट्टीनें बांधणें, लपेटून बांधणें, गुंडाळणें, II (ड) *to secure with a border or edging of some strengthening material* सभोंवतीं फीत लावणें, गोट घालणें, गोटी *f*- गोटा *m*- मगजी *f*- लावणें. III (अ) *to tie together or to form into a single mass* एकजीव करणें, दृढ करणें. III (ब) टणक-कडक-घट्ट करणें. III (क) (a book) बांधणें, बांधणी करणें. III (ड) (sheaves) वेटणें, वेटाळणें, वेटाळणी करणें. III (इ) आळा-कुडण घालणें; as, To B. a tree with an enclosure. IV (धर्मासंबंधानें-विवाहासंबंधानें-उपकारानें-प्रेमपाशानें-कायद्यानें-जादूटोण्यानें-आजारीपणानें) बांधणें, बांधून घेणें, गुंतवणें, गोवून घेणें, गोवणें, विकत घेणें *fig.*, मिंधा-ओशाळा करून ठेवणें, उपकारबद्ध करणें, गुलाम करून सोडणें, पाय बांधून टाकणें, जखडणें, जखडून बांधणें (with *to*, *unto*, *at*). [BIND OVER TO APPEAR हाजीर होण्याविषयीं मुचलका *m.* घेणें. TO B. ONE (over) TO HIS GOOD BEHAVIOUR नीट वागेन अशा वचनानें एखाद्याला बांधून घेणें. I DARE, OR WILL, BE BOUND FOR THIS STATEMENT ह्या म्हणण्याची सर्व जबाबदारी मी आपल्या वर घेईन. TO BE BOUND बांधलेला असणें, कर्तव्यबद्ध असणें.] B. *v. i.* बद्धकोष्ट होणें, मलावष्टंभ होणें. २ कडक-कठीण होणें; as, Clay binds by heat. ३ गति-प्रवाह थांबणें. ४ बांधलेला-बद्ध होणें. Bound *pa. t. & pa. p.* Bind *n.* पट्टी *f.* २ दुसऱ्या झाडावर चढणारा वेल *m.* ३ दगडी कोळशांच्या थरांतील कठीण माती *f.* Bind'er *n.* पट्टी *f.* २ बांधणारा, पुस्तकें बांधणारा. ३ गठ्ठे बांधणारा. ४ कापतांक्षणींच भारे बांधण्याचें यंत्र *n.* Bind'ery *n.* पुस्तकें बांधण्याचा कारखाना *m.* Bind'ing *a.* एखादें काम करावयास लावणारा, मुरवत पाडणारा, बांधणारा, अवश्यमाननीय. B. *n.* बांधणें *n*, निबंधन *n*, कसणें *n.* २ बद्धकोष्ठ करणें *n.* ३ फीत लावणें *n.* ४ कडक करणें *n.* ५ पट्टी *f*, बंद *m*, बंधन *n*, आळा *m*, मगजी *f*, गोट *m.* For more meanings of the verbal noun 'Binding,' see the meanings of the transitive verb to Bind given above. Bind-weed *n.* *Convolvulus turpethum* तडडी *f*, तेड *n.* Bine *n.* (a dialectic form of Bind) वर जाणाऱ्या वेलीचा नाजुक दांडा *m.* To bind hand and foot *lit. & fig.* हातपाय जखडून टाकणें.

Bing (bing) [Dan. *bingh*, Icel. *binger*, a heap.] *n.* रास *f*, ढीग *m.* (धान्य, कोळसे वगैरे वस्तूंचा.)

Binn, same as Bin.

Binnacle (bin'a-kl) [Formerly *bittacle*, Port. *bitacola.*—L. *habitaculum*, a dwelling-place.—L. *habitare*, to dwell.] *n. naut.* होकायंत्रपेटिका *f*, ह्या पेटींत होकायंत्र दिसण्याकरितां दिवाही असतो.

Binocle (bin'o-kl) [L. *bini*, two by two & *oculus*, Sk. अक्ष, an eye.] *n.* दोन डोळ्यांची-नळ्यांची दुर्बीण *f*, जोडदुर्बीण. Binoc'ular *a.* दुडोळी, द्विनयन, नेत्रद्वयोपयोगी, दोन डोळ्यांच्या कामाचा. Binoc'ularly *adv.* दोन डोळे वापरून. Binocular glass (also Binnocular) *n. chem.* नाटकी भिंगें *n*, नाटकांतील रंगभूमीवरचीं पात्रें पाहण्यास ह्यांचा उपयोग करितात. Binocular vision *n.* एकदम दोनी डोळे वापरून मिळालेला देखावा *m.*

Binode (bīnōd) द्विपात (in *math.*).

Binomial (bī-nom'i-al) [L. *bis*, Sk. द्वि, twice & *nomen*, Sk. नाम, a name.] *n. alg.* द्विपद, ऋण किंवा धन चिन्हांनीं जोडलेलीं दोन पदें; as, A + B किंवा A—B. B. *a* द्विपद, दोन पदें असलेला. Binomial theorem *n. math.* द्विपदसिद्धांत *m.* ह्या सिद्धांताच्या योगानें हव्या त्या द्विपद संख्येचा हवा तो घात एकदम लिहितां येतो. B. expression द्विपदसमूह, द्वियुक्तपदसमूह.

Binormal (bī-nor'mal) *a. math.* द्विमुख्यलंब. See the word Normal.

Binominal (bī-nom'i-nal) *a.* दोन नांवांचा.

Bio (bī'ō) [Gr. *bios*, Sk. जीव, life.] *a prefix.* Biobibliograph'ical *a.* एखाद्याच्या जीवनवृत्तांता-लेखासंबंधीं. Bi'oblast *n.* जीवकण *m*, जीवबिंदु *m.* Biodynam'ics *n.* प्राणमीमांसा. ह्या शास्त्रांत प्राण्यांच्या प्राणशक्तीचाच (vitality) फक्त विचार केला असतो. Biogen'esis *n.* जीवाजीववाद *m.* Biogenet'ic *a.* Biog'enist *n.* Biog'eny *n.* जंतूंचें उत्क्रान्तिवर्णन. Biomag'netism *n.* See Animal magnetism. Biom'etry *n.* आयुर्दायशास्त्र *n.* ह्या शास्त्रांत निरनिराळ्या जातींचे लोक किती किती वर्षें वांचतात याचा विचार केला असतो.

Biocellate (bī-os'el-lāt) [L. *bi*, twice & *ocellus*, an eyelet.] *a.* डोळ्यांसारखे दोन खळगे असलेला.

Biograph (bī'o-graf) [Gr. *bios*, life & *graphein*, to write.] *n.* चित्रें सजीव दाखविणारी पेटी *f*- दृग्यंत्र *n.* ह्या यंत्राचा दांडा फिरविला असतां आंतील-मनुष्यें-गाड्या इत्यादिकांचीं चित्रें फिरून जणूं काय सजीव मनुष्यें, गाड्या इत्यादि चालत आहेत असा भास होतो.

Biography (bī-og'raf-i) [Gr. *bios*, Sk. जीव, life, & *graphein*, to write, describe.] *n.* *the history of a particular person* चरित्रलेख *m*, चरित्र *n*, चरित्रवर्णन *n.* २ चरित्राचें पुस्तक *n.* Biog'rapher *n.* चरित्रकार, चरित्र-

लेखक. Biograph'ic-al (v. N.) चरित्राचा, चरित्रवर्णनाचा, चरित्रवर्णनासंबंधीं. Biograph'ically *adv.* Biographise *v. t.* (चें) चरित्र लिहिणें.

Biology (bī-ol'oj-i) [Gr. *bios*, Sk. जीव life, and *logos*, a discourse.] *n.* प्राणिशास्त्र (?) *n*, जीवनशास्त्र *n*. Biolog'ic, Biolog'ical *a.* जीवनशास्त्रासंबंधीं. Biolog'ically *adv.* Bio'logist *n.* जीवनशास्त्रवेत्ता *m.*

Bioplasm (bī'ō-plazm) [Gr. *bio*, & Plasm.] *n.* (सर्व प्राण्यांचा) आद्यघटक *m*, आद्यधातु *m*. See Protoplasm.

*N. B.*—With a view to avoiding confusion while coining words for Bioplasm & Bioblast, we kept before us our coinages for Protoplasm, Protoplast, Spermatozoa, Spermatozoids, Ovum, Ovule, Embryo, Ovary, Pistil, Stamen & Pollen.

Biotaxy (bi'ō-tax'i) [Gr. *bios*, life & *taxis*, arrangement.] *n. the arrangement of living animals according to their structural character, taxonomy* प्राण्यांचें व वनस्पतींचें त्यांच्या रचनेप्रमाणें वर्गीकरण, जीवरचनाशास्त्र *n*.

Biparous (bip'ar-ous) [L. *bi*, Sk. द्विः twice & *parere*, to bear.] *a.* द्विप्रसू, यमलप्रसू, जुळें प्रसवणारा; जसें, शेराचें झाड.

Bipartite (bī'part-īt) [L. *bis*, Sk. द्विः twice, & *partire*, to divide.] *a.* दुभाग, द्विभाग, दुखंड. २ *law* दोन पक्षांचा; as, Bipartite contract दु-अंगी करार *m*, ह्या कराराला मक्ता देणारा व घेणारा अशीं दोन अंगें आहेत. ३ *bot.* देंठापर्यंत दुभागलेलें. Biparti'tion *n.* देंठापर्यंत दुभाग होणें (पानाचें).

Biped (bī'ped) [L. *bi*, Sk. द्विः twice & *pes*, *pedis*, Sk. पद, foot.] *n.* द्विपाद, दोन पायांचा प्राणि-जीव *m*. Bi'ped, Bi'pedal *a.* दोन पायांचा, दुपायी, दुपायांचा, द्विपाद.

Bipetalous (bī-pet'al-us) [L. *bi*, twice & *petalon*, a leaf.] *a.* द्विपत्री, दोन पाकळ्यांचें.

*N. B.*—Petal in Botany is rendered by पत्र; See the word Petal.

Bipennate (bī-pen'āt) [L. *bi*, & *penna*, a wing.] *a.* दोन पंखांचा, द्विपक्ष.

Bipinnate (bī-pin'nāt) [L. *bis*, twice, & *pinnatus*, winged.] *a. bot.* ज्या संयुक्तपक्षपर्णाचीं दलें स्वतःच पक्षदलें किंवा पंखासारखीं असतात असें, द्विपक्षदलयुक्त (पक्षपर्ण), द्विधापक्षदल. Bi'pinnatipar'tite जवळजवळ मध्यशिरेपर्यंत विभागलेल्या पक्षपर्णाचीं दलें पुन्हां त्याचप्रमाणें विभागलेलीं असतात तेव्हां त्या संयुक्तपक्षपर्णाला Bi'pinnatipar'tite असें ह्मणतात. द्विधाभिन्नपक्षदल (पक्षपर्ण). [FOR-PARTITE WE USE THE WORD भिन्न AND FOR-FID WE USE THE WORD छिन्न, SEE BIPINNATIFID. AND FOR-SECTED AS IN BISECTED WE USE THE WORD खंडित. IN COINING SUCH WORDS SOME SUCH ARBITRARINESS MUST BE EMPLOYED.]

Bipinnatifid (bī'pin-nat'i-fid) *a.* द्विधाछिन्नपक्षदल (पक्षपर्ण).

*N. B.*—For a clear distinction between Bipinnatifid, Bipinnatipartite and Bisected refer to some good work on Botany, such as, Hooker's Elementary Lessons in Botany.

Biplicate (bī'pli-kāt) [L. *bi*, twice, & *plicare*, to fold.] *a.* दुहेरी घडीचा, दुहेरी. Biplic'ity *n.* दुहेरीपणा *m*.

Bipolar (bī-pō'ler) *math.* द्विध्रुव.

Biporous (bī-pō'rus) [L. *bis*, twice, & *porus*, a passage.] *a. bot.* दोन वाटोळ्या तोंडांचा.

Biquadratic (bī'-kwod-rat'ik) [L. *bis*, twice, & *quadratus*, Sk. चतुः squared.] *n.* चतुर्घात *m*, वर्गाचा वर्ग *m*. Biquadrat'ic *a.* द्विवर्गीय-या-यं. Biquadratic equation द्विवर्गसमीकरण, चतुर्घातसमीकरण. Biquadratic root द्विवर्गमूळ.

Biquintile (bī-kwin'til) [L. *bi*, twice, & *quintus*, Sk. पञ्चम, fifth.] *n. astron.* द्विवर्तुलपंचमदृष्टि किंवा १४४ अंशांची दृष्टि *f*, दोन ग्रहांमधील १४४ अंशांचें अंतर *n*.

Birch (bėrch) [A. S. *berce*, Sk. भूर्ज, a kind of birch] *n.* एक जातीचें झाड *n*. भोजपत्राचें झाड *n*, भोजवृक्ष *m*. २ मोठी काठी *f*. Birch'en *a.* भोजपत्राचा.

Bird (bėrd) [A. S. *brid*, the young bird.] *n.* पाखरूं *n*, पक्षी *m*, खग *m*, खेचर (S) *m*, पतंग (S) *m*, शकुन्त *m*, शकुनि *m*, शकुन्त.—[IN CONTEMPT, &C. पांखुरडें *n*. CERTAIN OF THE COMMON BIRDS ARE कवडा, होला, सोनार, गोपिपी, करकोची OR भारडी OR खरपुडी, कडुवा, कुक्कडकोंभा OR कुंभारकुक्कडा, कुंजर, कुंभा, कुवाकर, कोंका, कोंकाटी, कोंकेरी, कोळसा, परटीण, गवळण, गाय, चंडोल, जकात्या, डोळाफोडी, धनचिडी, सुतार, टांकारी, चारगा, दयर, सोनचिडी, टिटवी, लावा, हुम्या, गण्या, न्हावी, कोकीळ, पातर, कुरळी, पाथरवट, अडय, भिल्हालांडोर.] २ *fig.* कुमारिका *f*, कुमारिकेला लडिवाळपणानें 'बर्ड' असें साहेब लोकांत ह्मणतात; as, "And by my word, The bonny bird in danger shall not tarry." मराठींत चिमणी, वगैरे शब्द कुमारिकेला लावतात. B. *v. i.* पक्षी धरणें, पारध करणें. Bird'-cage *n.* पक्ष्याचा पिंजरा *m*. Bird'-call *n.* पक्षिवंचनवाद्य *n*, पक्ष्यास मोहविण्याचें वाद्य *n*. [पारधी लोक पक्ष्यास मोहविण्यासाठीं त्यासारखे हुबेहुब सूर काढण्याकरितां हें वाजवितात.] Bird'-catcher *n.* वाघरी *m*, पारधी *m*, पाखरपारधी *m*, फांसेपारधी *m*, शाकुनिक *c*. Bird'-catching *n.* पक्षी धरण्याची कृति *f*-कला *f*. Bird'-cherry *n.* एक जंगली झुडुप *n*. याला काळें फळ येतें व फळांत आठी असते. Bird'-eyed *a.* विहंगमदृष्टीचा, एकदम पुष्कळ गोष्टींचें अवलोकन करणाऱ्या नजरेचा. Bird'-fan'cier *n.* पक्षी पाळण्याचा शोकी *m*. २ पक्षी विकण्याकरितां पाळणारा. Bird'ing *n.* (शिकविलेल्या ससाण्याकडून करण्याची) पक्ष्यांची पारध *f*. Bird'ing piece *n.* (पक्ष्याच्या) शिकारीची बंदूक *f*. Bird-lime *n.* पक्षी धरण्याचा चिकोटा

किंवा एक चिकट पदार्थ *m*, चिकटा *m*. [A STICK COVERED WITH B. चिकाटी *f. fig.* मोहनाळ.] Bird of Juno *n*. मोर *m*. Bird of paradise *n*. स्वर्गपक्षी *m*, सुंदरपक्षी *m*. या पक्ष्याचा पिसारा चांगला असतो व त्यामुळें याला हें नांव पडलें आहे. Bird of passage एके ठिकाणीं फार वेळ न राहणारा मनुष्य *m*, तूर्तातूर्त रहाणारा मनुष्य, सतरा पिंपळांवरचा मुंजा (*) *m*, खुंटावरचा कावळा (*) *m*. Bird's-eye *n*. अमेरिकेंतील 'बर्डस्‌आय' नांवाची तंबाखू *f*. B. *a*. वरून पाहण्याचा, एकंदरीनें पहाण्याचा, साधारण दृष्टीनें पहाण्याचा. Bird's-nest कोटें *n*, पाखरांचें घरटें *n*. घरकुंडा (R) *m*. Bird-spider पक्ष्योपजीवी कोळी *m*, एक प्रकारचा कोळी *m*. हा लहान पक्षी खाऊन उपजीविका करितो. Bird's eye-view *n*. विहंगमदृष्टीनें अवलोकन *n*, (विषयाचें) स्थूल अवलोकन *n*, वरवर अवलोकन *n*. २ (आकाशांतून पाहिलें असतां जसें असेल तसें) स्थूल चित्र *n*- नकाशा *m*. Bird-witted *a*. चंचल, अस्थिरबुद्धीचा. Bird's-foot trefoil पक्षिपादसमत्रिदल रोप *m*. याला गोलाकार शेंगा येतात आणि याचा आकार पक्ष्याच्या पायाप्रमाणें असतो. A bird in the hand is worth two in the bush *cf*. हातचें सोडून पळत्याचे पाठीमागें लागणें, घरची अर्धी दारच्या सगळीबरोबर आहे. A little bird told me अशा रीतीनें बोलणें ऐकलें कीं कसें तें बाहेर सांगतां येत नाहीं. A bird of ill omen *fig*. वाईट बातमी आणणारा मनुष्य *m*. Birds of a feather एका स्वभावाचे किंवा शिलाचे मनुष्य. *cf*. the idioms एका माळेचे मणी, एका दांडीचीं पारडीं, एके पासोडीचीं पाटगीं. One beats the bush and another takes the bird नोकर काम करितो आणि धनी पैसे वांचवितो. *cf*. आयत्या बिळावर नागोबा also *cf*. ज्याचें त्याला आणि गाढव ओझ्याला. To kill two birds with one stone (C) एका धोंड्यानें दोन पक्षी पाडणें, एकाच मेहनतीनें दोन कामें साधणें.

*N. B.*— 'Bird of passage' is used in English to denote temporary residence. The English phrase does not imply any reproach while the Marathi phrases सतरा पिंपळांवरचा मुंजा, खुंटावरचा कावळा are terms of reproach, denoting inconstancy or irresoluteness of the mind.

Biretta, Beretta (bir-et'a, be-ret'ta) written also Birretta) [It. *biretta*, a cap.] *n*. [धर्मोपदेशकाची] चौकोनी टोपी *f*, बिरेता *f*.

Birminghamise (bir'ming-ham-īz) [see *Brummagem*.] *v. t.* कृत्रिम रीतीनें तयार करणें, खोटा तयार करणें. Bermingham wire-gauge बरमिंघामचे तारांची जाडी मोजण्याची भोकांभोकांची पट्टी *f*.

Birostrate (bī-ros'trāt) [L. *bi*, twice & *rostrum*, a beak.] *a*. दोन चोंची असलेला, दुचोंची.

Birr (bir) [Icel. *byrr*, a favouring wind.] *n*. गुणगुण. B. *v. i.* गुणगुणणें.

Birth (bėrth) [Same as Berth.] *n*. गलबत नांगरण्याचें [ठिकाण *n*.

Birth (bėrth) [A. S. *byrth*, from *beran*, to bear.] *n*. *the act or fact of being born* (अ) (मनुष्याचा) जन्म *m. n*, जनन *n*; (ब) वस्तूची पैदास्त *f*, उपज *m*, उत्पत्ति *f*, निपज *f*. [A PRECEDING BIRTH पूर्वजन्म, मागला जन्म, प्रागूजन्म. A PREVIOUS BIRTH सध्याच्या पूर्वीचा जन्म. A GENIUS FROM BIRTH बालसरस्वती, जातप्रज्ञ *m*. ANOTHER (PRECEDING OR FUTURE) BIRTH अन्यजन्म *n*, जन्मांतर, पश्चाज्जन्म, दुसरा जन्म. BIRTH, LIFE AND DEATH उत्पत्ति, स्थिति आणि नाश; सर्ग, स्थिति आणि लय. BIRTH, BEING (LIFE), DECLINE AND DESTRUCTION, THE FOUR STAGES IN THE LIFE OF EVERY CREATURE जनन, भवन, अपक्षयण आणि नशन. BIRTH AFTER DEATH पुनर्जन्म, पुढला जन्म. REPEATED BIRTHS असकृत्गर्भवास; IN THE PRESENT BIRTH ह्या जन्मीं, इह जन्मनि. IN, THROUGH, DURING, &C. ALL ONE'S BIRTHS जन्मजन्मांतरीं, जन्मजन्मीं OR जन्मोजन्मीं. NEW BIRTH नवजन्म, पुनर्जन्म. UNTIMELY BIRTH अकालजन्म. ACQUIRED IN SOME PRECEDING BIRTH पूर्वजन्मार्जित. TO BLAME THE AUTHOR OF ONE'S BIRTH जन्मास घालणाऱ्याच्या नांवानें रडणें. PERHAPS THERE IS NO SUCH PHRASE IN THE ENGLISH LANGUAGE AS, TO BLAME THE AUTHOR OF ONE'S BIRTH, BUT THERE IS A PHRASE AKIN TO THIS WHICH IS TO RUE OR CURSE THE DAY ON WHICH ONE WAS BORN. TO GIVE BIRTH (TO) जन्म देणें, प्रसवणें, जनणें.] २ भव, as in the phrase भवभयहरण. ३ *the act of coming into life* जनन *n*, जनि *f*, प्रसव *m*, जन्मणें. ४ *descent, family* कुल, कुळी *f*, खाण *f. fig.*, जाति *f*, घराणें *n*, *vulg*. अवलाद *f*, (कांहीं ठिकाणीं विशेषतः) उच्चकुल, उंचकुळी, मोठें घराणें. [NOBLE OR HIGH BIRTH खानदानी, वर्णश्रेष्ठता, कुलीनता, उच्चकुलांत जन्म. OF PURE BIRTH शुद्धबीजाचा, कुलीन, सद्वंश, अस्सल (AS OPPOSED TO कमअस्सल), पावनजन्म, वंशविशुद्ध, शुद्धबीज.] ५ *beginning* सुरवात *f*, आरंभ *m*, (सुरवात या अर्थीं) जन्म. [FROM B RTH जन्मापासून, जन्मतः, आजन्म, जन्मप्रभृति, जन्मादारभ्य. BLIND FROM BIRTH उपजत आंधळा, जन्मांध. POET FROM BIRTH उपजतकवि. NOTE SUCH OTHER PHRASES AS, उपजत बहिरा, उपजत मुका, उपजत लंगडा, उपजत मूर्ख, उपजत शहाणा. SICKLY FROM BIRTH जन्मरोगी, पिंडरोगी, जातरुग्ण, जरत्कारू. NOTE SUCH PHRASES AS, जन्मकरंटा, जन्मभिकारी.] ६ *origin* उद्गम *m*, मूळ *n*, प्रभव, उद्भव. ७ *the condition in which one is born* जन्मकाळची परिस्थिति *f*, जन्मपरिस्थिति *f*, जन्मस्थिति, (जन्मपरिस्थिति या अर्थीं) जन्म; as, He is an Indian by birth. Birth-day *n*. जन्मदिवस *m*, वाढदिवस *m*, जन्मदिन *m*. B.-day-ceremonies *n*. वाढवीस *m*, वर्धापन *n*, वर्षगांठ *f*. He was in his birth-day suit तो नग्न होता. Birth-day-book *n*. जन्मतिथिनोंद *f*. ह्यांत एखाद्याच्या स्नेह्यांच्या जन्मतिथि त्यांच्याच हातानें लिहिलेल्या असतात. Birthdom *n*. निसर्ग-जन्मसिद्ध-जन्मार्जित-नैसर्गिक हक्क

*m.* Birth-mark *n.* जन्मखूण *f,* जन्मतः एखाद्याच्या अंगावर असणारें चिन्ह *n.* तीळ &c. *m.* Birth-night *n.* एखाद्याचा जन्म ज्या रात्रीं झाला ती रात्र *f,* जन्मरात्र *f.* Birth-place *n.* जन्मभूमि *f,* जनुस्थान (R.), जन्मस्थान *n,* जन्मभूमिका *f.* Birth-right *n. a right or privilege to which any one is entitled by birth n.* जन्मसिद्ध हक्क *m,* नैसर्गिक-स्वाभाविक हक्क *m,* जन्ममूलकाधिकार *m,* उपजतहक्क *m,* जन्माधिकार *m.* Birth-root *n.* उत्तर-अमेरिकेंतील शक्तिवर्धक गुणाची वनस्पति *f.* Birth-star *n.* जन्मनक्षत्र *n.* Birth-strangled *a.* जन्मतांच गळा दाबून मारलेला. Birth-wort *n.* शीघ्र प्रसूतिकारी वनस्पति *f.* हिचा उपयोग इंग्रजलोक प्रसूति लवकर व्हावी ह्मणून करितात. Indian Birth-wort *n.* सापसंध (नागदवणी वेल).

Bis Bi (bis), (bi) [L. *bis,* twice.] *adv.* दोनदां. (*e. g.* द्विरुक्तिचिन्ह, दोनदां ह्मणण्याविषयीं खूण). Biseg'ment *n.* एका रेषेच्या किंवा आकृतीच्या दोन सारख्या भागांपैकीं एक भाग *m.* Biser'rate *a. bot. notched like a saw, with the notches themselves similarly minutely notched* करवतीसारखा दांताळ. Bisex'ual *a. bot.* लिंगद्वययुक्त, केसरपुष्पगर्भयुक्त (पुष्प), दुलिंगी.

Biscuit (bis'kit) [L. *bis,* twice & *coctus,* Sk. पक्व, cooked.] *n.* बिस्कुट *n,* कणीक, अंडीं वगैरेंचा केलेला खाण्याचा पदार्थ *m.* २ झिलई देण्यापूर्वी एकदा भाजलेलें मातीचें भांडें *n;* as, "The kneaded clay refines, The biscuit hardens and the enamel shines."

Bisect (bīsekt') [L. *bis,* twice & *sectus,* cut.] *v. t. to cut into two parts* दोन समविभाग करणें, दुभागणें, दुखंड करणें, दुभेदणें, दुफोड *f*-द्विधा *n*-द्वैधीकरण *n.* करणें *g. of o.* Bisec'ting *a.* Bisec'ted *a.* द्विखंडित, सारखे दोन भाग केलेला, दुभाग, दुखंड. Bisec'tion *n.* (v. V.)-*act.* सारखें दुभागणें *n,* द्विधाछेदन *n,* सारखे दोन भाग करणें *n.* Biseg'ment *n.* see Bis. Bisecting point *n.* मध्य-समच्छेद-बिंदु *m.* Bisecting line *n.* द्विभागणारी रेषा *f,* समद्विभागरेषा.

Bishop (bish'op) [From L. *episcopus.*–Gr. *episcopos,* an overseer, from *epi,* upon & *skopein,* to look.] *n.* धर्माध्यक्ष *m,* 'बिशप' *m.* २ साखर, नारिंगें आणि द्राक्षासव ह्यांचें केलेलें सरबत-पेय *n.* ३ बुद्धिबळांच्या खेळांतला उंट *m.* B. *v. t.* कृपा *f*-मेहेरबानी *f.* करणें. २ दांताची वाढ कापून (घोडा) लहान दिसेल असा करणें; as, To B. an old horse ह्मातार्‍या घोड्याचे दांत कापून जवानसा करून दाखविणें. Bish'opess *n. fem.* धर्माधिकारीण *f,* बिशपीण *f.* २ धर्माधिकार्‍याची पत्नी *f.* Bish'opric, Bish'opdom *n.* बिशपाच्या अधिकारांतला प्रांत *m,* बिशपाची जागा *f.*

Bisk (bisk) [Fr. *bisque,* rich soup.] *n.* निरनिराळ्या जातींचीं मांसें शिजवून केलेला रसा.

Bismillah (bis-mil'a) [Ar. in the name of God.] *interj.* हे परमेश्वरा.

Bismuth (biz'muth) [Ger. *wiss,* white & *muth,* lively.] *n.* 'बिस्मथ,' बिस्म, एक रासायनिक मूलद्रव्य *n.* ही एक प्रकारची ठिसूळ धातु आहे; व ही शिशापेक्षां कठीण असते. ५०७ फारनाहिट उष्णतेनें ही वितळते. हिचें विशिष्टगुरुत्व ९-८ व अणुभारांक २०७.५ आहेत. Bis'muthal, Bis'muthic *a.*

Bison (bī'son or bis'on) [L. *bison.*—Ger. *wisunt,* a bison; A. S. *wesend,* a wild ox.] *n.* गवा *m,* गवय *m.*

Bisque (bisk) *n. obs.* तकाकी चढविण्यापूर्वीं पुन्हां एकदा भाजलेलीं भांडीं *n. pl.* See Biscuit.

Bisque (bisk) [Fr.] *n.* एक प्रकारचा मांसाचा रसा *m.*

Bissextile (bis-sext'il) [L. *bis,* Sk. द्वि, twice & *sextus,* Sk. षट् *sixth,* so called by the ancient Romans because the intercalated day (formerly 24 Feb.) called the *sixth* day before the calends of March; there being thus two days with the same name.] *n.* अधिक दिवस *m.* २ *leap year* ज्या वर्षीं फेब्रुवारीचे २९ दिवस येतात तें वर्ष *n.* B. *a.* अधिकदिनवर्षासंबंधीं. Bissext *n.* प्रत्येक चौथ्या वर्षी फेब्रुवारी महिन्याच्या २८ दिवसांऐवजीं २९ दिवस धरतात, त्या वाढलेल्या एका दिवसास हा शब्द लावतात. खरा वाढविलेला दिवस २४ फेब्रुवारी (मार्चाच्या पूर्वींचा सहावा दिवस) हा आहे.

Bistoury (bis'tōōr-i) [Fr. *bistouri,* an incision knife, from *Pistoria,* now Pistoja, in Tuscany.] *n.* टोंचून शस्त्रप्रयोग करण्याचें हत्यार *n.* हें निरनिराळ्या आकृतींचें असतें, 'बिस्तुरी.'

Bistre, Bister (bis'tėr) [Fr. *bistre.*] *n.* बीच किंवा दुसर्‍या जातीच्या झाडांच्या घरोशापासून तयार केलेलें एक प्रकारचें अंजन *n,* 'बिस्तर.' Bis'tred *a.*

Bisulcous (bī-sul'kus) [L. *bis,* twice & *sulcus,* furrow.] *a. zool. cloven-footed* द्विशफ, दुखुरी. Also Bisulcate.

Bisulphate (bī-sul'fāt) *n.* धातूनें घालवितां येण्याजोगा हायड्रोजन न घालविलेला गंधकाम्लाचा धातूंशीं रासायनिक संयोग *m.* Potassium bisulphate पोटासिअम् बायसल्फेट्. K H S O 4. Sodium bisulphate सोडिअम् बायूसल्फेट Na H S O.

Bit (bit) [O. E. *bitt, bite,* A. S. *bite,* bite from *bitan,* to bite.] *n. the part of a bridle, usually of iron, inserted in the mouth of a horse* लगाम *f. m,* मुखयंत्रण *n.* [BIT SHAPED LIKE AN AXE कुर्‍हाड्या लगाम *m.* B. B. WITH FOUR RINGS कडोळी OR कडोळ्या लगाम *m.* B. WITH SPIKES AND POINTS कांटेलगाम *m.* UNDER CHAIN OR STRAP OF A BIT जेरकडी *f.*] २ *fig. a curb or restraint* आळा *m,* यंत्रण *n,* निरोध *m,* दाब *m.* B. *v. t. to put a bridle upon, to put the bit in the mouth of* तोंडांत लगाम *m.* घालणें. २ थांबविणें, लगाम खेंचणें. Bit'ted *pa. t.* & *p. p.* Bit'ting *pr. p.* & *vl. n.*

Bit (bit) [O. E. *bite,* A. S. *bita,* from *bitan,* to bite.] *n. a morsel, a bite* घांस *m,* ग्रास (S) *m,*

कवळ *f.* २ *a small piece of anything, a little, a mite* तुकडा *m*, कुटका *m*, खंड *m*, खांड *n*, खांडोळें *n*, खाप *f*, कोरका *m*, शकल *n*, छकल *n*. [ BIT MEANING THE SMALLEST PARTICLE OR THE LEAST QUANTITY IS IDIOMATICALLY RENDERED BY कांहींच, कांहींएक, तिळभर, तिलतुल्य, तिलप्राय, तिळप्राय, लवमात्र, लेशमात्र, लवलेश, नखभर, काडीभर, काडीमात्र, अणुमात्र, सुताचा तोडा, यत्किंचित, रजभर, गंध *m*, वास *m*. NOT A BIT लवलेश नाहीं, कांहींएक नाहीं, मुळींच नाहीं, तिळमात्र नाहीं. BIT BY BIT खंडशः, लहान लहान मार्गांनीं; ( सविस्तर पण ) लहान लहान भागांनीं, थोडथोड्या प्रमाणानें. ] ३ *somewhat, something but not very great* कांहींतरी, अगदीं थोडा भाग-अंश; as, "My young companion was a bit of a poet." माझ्या तरुण स्नेहाला थोडेंसें कवीचें अंग होतें,-लहानसा कवी होता. ४ *bitstock* डोलमीट *n*, भोंक पाडण्याचें एक लहान हत्यार *n*. ५ किल्लीच्या तोंडाकडील पुढें आलेला भाग *m*. ६ *the cutting iron of a plane* सामत्याचें पुढचें पातें *n*. ७ *a small silver coin* (U. S.) लहान रुप्याचें नाणें *n*. To give a person a bit of one's mind कानउघाडणी करणें, आपल्या मनांत काय आहे हें खरमरीत रीतीनें सांगणें.

Bitangent (bī-tan'jent) *n.* द्विस्पर्शज्या *f*, द्विस्पर्शरेषा *f*. B. *a.* दोन स्पर्शबिंदूंतून जाणारी (एक रेषा).

Bitartrate (bī-tar'trāt) *n.* भस्मानें (base) घालवितां येण्याजोगा (हायड्रोजन) उज्ज न घालविलेल्या टार्टरिक (आसिडचें) अम्लाचें लवण.

Bitch (bich) [A. S. *bicce*, a little dog, a female dog.] *n.* कुतरी *f*, शुनी *f*. २ (स्त्रियांना हा शब्द निंदार्थी लावितात), छिनाल बायको *f*.

Bite (bīt) [A. S. *bitan*, Sk. भिद्, to split.] *v. t.* चावणें, डसणें, चावा *m*-डांस *m*-डांसा (R) *m*. घेणें, दंश *m*-करणें. [ TO B. THE LIPS दांत-ओंठ *m*. खाणें-चावणें.] २ (as cold) खाणें, झोंबणें, (*pop.*) खूब लागणें *in. con.* ३ (as pungent substances) खवखवणें, खाजणें, मिरमिरणें, झोंबणें; as, "Pepper bites the tongue." ४ (as speech, &c.) *to sting, to cut* झोंबणें, खाणें, टोचणें, वेधणें, डांचणें, तोडणें, *loosely* लागणें *in. con.* ५ (snake) चावणें, डंखणें (R), डसणें, झोंबणें. ६ (ants, bugs, &c.) झोंबणें, खाणें, चावणें,-fiercely or eagerly तोडणें, तडतड or डां *adv.* तोडणें, चणचण or णां-चटचट or टां-चणाचण or चणाणां-चटाचट or चटाटां-तडातड or तडाडां-&c. तोडणें. ७ (esp. of a horse) डसणें, चावणें, तोंड *n*. टाकणें (?). ८ घट्ट धरणें; as, "An anchor or a file bites the ground." ९ (*colloq.*) *to deceive, to overreach* फसविणें, (वर) ताण करणें (now only in the passive). B. *v. i.* चावा घेणें. २ घट्ट धरणें. ३ चुरचुरणें (मन). ४ दुखणें, झोंबणें. B. *v. t.* & *v. i.* *to corrode or eat into as a strong acid or any other chemical agent* (तांबेनें-अम्लानें) खावविणें, (with *in*) (in *engraving*) *to eat out the lines of an etching on metal with an acid* पत्र्यावर खोदकाम करवणें, (पत्र्यावरचा रेखाटलेला भाग अम्लानें खाववून) खोदणें. Bite *n.* चावणें *n*, डांस घेणें *n*, (वारा) झोंबणें *n*, तांब चढणें *n*, (with *in*) तांबेनें-अम्लानें खाणें-खाववणें *n*, (घोड्यानें) एकदम डोकें खालीं करणें *n*, दांते पाडणाऱ्या (यंत्रानें) पट्टयाला धरणें *n*. २ भाकरीचा टोंका *m*-टवरा *m* (घेणें). ३ चावा *m*, डांस *m*, दंश *m*, लवका *m*, लचका *m*. ४ पटदिनीं पकडणें-धरणें *n*. ५ फसव्या *m*, उचल्या *m*, गळेकापू *m*. Bit *pa. t.* Bit or Bitten *pa. p.* Bit'er *n.* (For all the meanings of this word see the verb.) चावणारा, &c. २ फसव्या. Bit'ing *a.* (For all the meanings see the verb.) चावणारा, डसणारा, झोंबणारा, &c. २ प्रखर, कडक (थंडी), (असभ्यतेचा-निंदेचा म्हणून) झोंबणारा (शब्द), तीक्ष्ण, तीव्र, मर्मभेदक, भेदक, झोंबणारा; as, B. pepper. Biting *n.* चावणें *n*, डसणें *n*, &c., चावा *m*. (v. घे), दंश *m*. (*pop.*) डांस *m*. २ खाणें *n*. झोंबणें *n*. ३ फसवणें *n*. &c., फसवणूक *f*, फसवणी *f*. ४ झोंबणें *n*, टोचणें *n*, डाचणें *n*, &c. To bite the dust जमीनदोस्त होणें, धुळीस मिळणें; as, "Their enemies will bite the dust." To bite the thumb at खाजवून खरूज काढणें, भांडण उकरून काढणें, नाक खाजवणें *idio.*; as, "Do you bite your thumb at us?" *Shakes.* To bite upon the bridle लगाम चावणें. The biter bit *cf.* शेराला सवाशेर.

*N. B.*—Scientifically more accurate words for (1) मिरमिरणें, (2) खवखवणें, (3) खाजणें, (4) खंवट are (1) Tingling, (2) Tickling, (3) Itching, (4) Rancid.

Bitloben, Bitnoben (bit-lōben, bit-nōben) *n.* गंधबीड *n*, पादेलोण *n*, बीडलवण *n*, बीड *n*, काललवण.

Biternate (bī-ter'-nāt) [L. *bi* & *ternatus*, from *terni*, three each, Sk. त्रि, three.] *n. bot.* मुख्य संयुक्त पानाच्या शेवटीं तीन बाजूंना तीन दलें असून त्यांपैकीं प्रत्येक दल जेव्हां त्रिदल असतें तेव्हां त्यास Biternate हा शब्द योजतात. द्विधात्रिदलपर्ण *n*.

Bitter (bit'er) [A. S. *bitan*, to bite.] *a.* कडू, कटु. २ खंवट. ३ कठीण, बिकट, प्रखर, जालीम, कडक; as, A B. cold day. ४ कडु, जालीम, विपारी, कठोर (द्वेषामुळें-रागामुळें) निष्ठुर; as, B. reproach. ५ दुःखदायक, घातुक, मनाला संताप देणारा. ६ खेदयुक्त, दुःखी, शोकभरित. "The Egyptians made their lives B. (जीवांस दुःख दिलें) with hard bondage." ७ *malevolent* दुष्टबुद्धीचा. B. *n.* कडू पदार्थ *m*. Bitt'erish *a.* कडवट, कडसर. Bitt'erly *adv.* फारच निकरानें. २ मोठ्या दुःखानें. ३ कठोरपणानें. ४ पुष्कळ. Bitt'erness *n.* कडूपणा *m*, कटुत्व *n*, कटुता *f*, तिक्त(?)*m*, तिक्तता(?) *f*, कडुस्वाद *m*. २ *rancour, malice* चुरस *f*, वितुष्ट *n*. ३ *keenness of sorrow* क्लेश *m*, श्रमीपणा *m*, दुःख *n*, कष्टीपणा *m*. Bitt'ers *n. pl.* Bitter-gourd *n.* कडु भोंपळा *m*, कौंडळ, कडू इंद्रायण, हें जुलाबाकरितां रेचक म्हणून वापरतात. Bitter-pills *fig.* कडू गोष्टी-प्रसंग. Bitter principles वनस्पतींतील कडूकारक द्रव्यें *n, pl.* Bitter-sweet *fig.* दुःखमिश्रितसुख,

इष्टानिष्ट. २ *bot.* एका कुंपणावरील वेलीस तांबडीं विषारी फळें येतात तीं. हीं प्रथम चावतांना कडू व मग गोड लागतात. Sweets & bitters of life संसारांतील सुखदुःखें. Bitter medicines कडू औषधें (such as quassia, cinchona, calumbia, gentian).

*N. B.* तिक्त=तिखट, व त्याला Pungent हाच शब्द नियमित करावा. बहुतेक कोशकारांनीं तिक्त व कडू ह्यांना Bitter हाच शब्द दिला आहे. परंतु कडू आणि तिखट हे निरनिराळे धर्म आहेत, व ह्यांना निरनिराळे इंग्रजी शब्द एकदाचे ठरवून ठेविले पाहिजेत.

Bittern (bit'ẽrn) [It. *bittore.*] *n. a bird of the heron tribe* क्रौंचाच्या-बगळ्याच्या जातीचा विलायती पक्षी *m.*

Bittern (bit'ẽrn) *n.* एप्सम मीठ तयार करण्याकरितां वापरलेला ओशट क्षार पदार्थ *m.*

Bitts (bits) [Icel. *biti*, a cross-beam in a house or a ship.] *n. pl.* (गलबत नांगरतेवेळीं) दोरखंडें बांधून ठेवण्याची नाळेकडची चौकट *f.*

Bitumen (bi-tū'-men or bit'yū-men) [L. *bitumen*, mineral pitch.] *n. any inflammable or combustible mineral substance of a resinous type, such as naphtha, petroleum, asphaltum* ज्वालाग्राही खनिज पदार्थ किंवा द्रव्य. शिलाजतु as given by Mr. Candy and Sir M. Monier-Williams is not an accurate equivalent for Bitumen. शिलाजतु might be one of the examples of Bitumen. We may, however, arbitrarily fix upon "Indian Bitumen" as the equivalent for शिलाजित or शिलाजतु. Bitu'minate, Bitū'minise *v. t.* ज्वालाग्राही खनिज पदार्थाशीं-शिलाजिताशीं मिसळणें, ज्वालाग्राही खनिज पदार्थमय-शिलाजितमय करणें. Bitu'minif'erous *a. producing bitumen* शिलाजितोत्पादक. Bitū'minous, Bitūmed' (R.) *a.* ज्वालाग्राही खनिज पदार्थांचा अंश असणारा, शिलाजिताचा अंश असणारा.

Bivalence, Bivalency (bī'va-len-sy) [L. *bis*, twice & *valens.* vide Valence.] *n. chem.* द्वैधाशक्ति *f.* (उजाच्या-&c.) दोन परिमाणूंशीं संयुक्त होण्याची किंवा त्यांचें स्थलांतर करण्याची शक्ति. Biv'alent *a.* द्वैधाशक्ति.

Bivalve (bī'valv) [L. *bis*, twice & *valva*, a valve.] *n.* दुझडपी झांकण *n.* २ ज्याला दोन शिंपल्यांचीं झांकणें आहेत असा कालवासारखा प्राणी *m.* ३ द्विपुट *n.* Bivalv'ular, Bi'valved, Bival'ous *a.* दुझडपी झांकण असलेला.

Bivouac (biv'ōō-ak) [Ger. *bei*, by & *wachen*, to watch.] *n. the encampment of the army for the night in the open air* (उघड्या हवेंत रात्रीस पहाऱ्याकरितां) सैन्याचा तळ *m.* २ प्रवाशांनीं विश्रांतीकरतां दिलेला तळ. B. *v. i.* उघड्यावर तळ देणें. Biv'ouacking *pr. p.* Biv'ouacked *pa. p.*

Biweekly (bī'wēk'li) [L. *bi*, twice & Week.] *a.* आठवड्यांतून दोनदां निघणारें, द्विसाप्ताहिक, (*pop.*) द्विसाप्ताहिक. [ह्याचा 'पाक्षिक' किंवा 'पंधरवड्यास निघणारा' असा अर्थ पूर्वीं होता; परंतु तो आतां लुप्त झाला.]

Bizarre (bi zär') [Fr.] *a. odd, fantastical* तऱ्हेवाईक, विजोड, विलक्षण, लहरीचा, विक्षिप्त, दोन विजोड वाजूंनीं झालेला.

Blab (blab) [A. S. *blaberen*, to stammer.] *v. i.* वाचाळता करणें, बडबडणें, वटवट करणें. [SOME COLLOQUIAL EXPRESSIONS FOR THE SAME ARE-तोंड *n.*-सुखरस *m*-जीभ *f.*-&c. पाघळणें *g. of s.*, जिभली *f.* हालणें *g. of s.*, जीभ *f.* चाळवणें-चळवळणें *g. of s.*] २ वदणें (Rare in this sense), तोंडाळणें, वाचाळता करणें. B. *v. t.* (out, forth) (जीभ स्वाधीन नसल्यामुळें) गुप्त गोष्ट फोडणें, ओकणें *idio.*, ओकून टाकणें *idio.* [SOME COLLOQUIAL EXPRESSIONS FOR THE SAME ARE पुडी *f.* पूड *f.* फोडणें *g. of s.*, बेंड *n*, फोडणें OR बाहेर पाडणें *g. of o.*, बोंमाट OR बोंमाटा *m*-बाजार *m*-&c. करणें *g. of o.*, पट्कर्णी करणें. To BE BLABBED पुडी *f.* पूड *f.* बेंड *n.* &c. फुटणें *g. of s.*, दुभरा *m.* &c. होणें *g. of s.*, पट्कर्णी होणें.] Blab'bing *pr. p.* Blab'bed *pa. p.* Blab *n.* भकवा करणारा, (जीभ स्वाधीन नसल्यामुळें) गुप्त फोडणारा. Blab'ber *n.* (v. V. T.) (जीभ स्वाधीन नसल्यामुळें) गुप्त फोडणारा, तोंडाळणारा, &c., जिभेचा हलका, जिभेचा अधीर-ढिला-जीभचोंढाळ, लुतरा, लभेचाटू, लांबर, वाचाळ, ज्याच्या तोंडीं तीळ भिजत नाहीं असा, अस्वाधीनजिव्ह. Blab'bing *a.* see Blabber. Blab'bing *n.* तोंडाळणें *n*, बभरा करणें *n*, गुप्त फोडणें *n*, गवगवा *m*, बभरा *m*.

Black (blak) [A. S. *blac*, black.] *a.* काळा, कृष्ण, कृष्णवर्ण. [B. AS COAL, SOOT, &c. INTENSELY B. काळा कुळकुळीत, काळाकिट्ट (ट), काळाकूट,-कोट, काळामसकूट, काळुंदरा, काळाढुस्स, काळाभोर, काळाढोण, काळाठिक्कर, काळाघुस, काळामोदक, काळामिचकूट, काळाकभिन्न, काळाजहर, काळाकरजत, काळाकरंद, शेळोंद्रा. SOME TERMS FOR AN EXTREMELY BLACK PERSON ARE कोळशांतील माणीक, कोळशांतली अंतःसाल, काळामांग, काळाकोळसा, काळामील, शाळिग्राम.] २ निस्तेज, प्रकाशहीन. ३ उदास. ४ अंधारमय, काळा, कृष्ण; as, A B. night. ५ दुर्मुखलेला, घुणा, ओंठरलेला; as, A B. look. ६ घोर, संकटाचा; as, B. fate. घोरप्रसंग. ७ दुष्ट, घोर, अकटोविकट, अतिदुष्ट, भीतिदर्शक, अशुभसूचक, अस्वास्थ्यसूचक. ८ रजोगुणप्रधान, पापाचा, पापमूलक. B. *n.* काळा रंग *m*, कृष्णवर्ण *m.* २ हबशी *m*, शिद्दी *m.* ३ *soot* मशी *f.* मस *f.* ४ एखाद्या वस्तूचा काळा भाग *m.* ५ *pl.* काळा किंवा सुतकी पेहराव *m.* B. *v. t.* काळा करणें, काळा रंग लावणें (shoes), मलीन करणें. २ *fig.* काळिमा लावणें, बेअब्रू करणें, डाग लावणें. Black'amoor *n.* हबशी *m*, शिद्दी *m*, काळाभिल्ल. Black and tan *a.* पाठीवर काळे केंस असून अंगाच्या सर्व भागीं हलक्या तपकिरी रंगाचे केंस असणारा (कुत्रा), काळातपकिरी (कुत्रा). Black'-a-vised *a.* कृष्णवर्णाचा. Black-ball *n.* काळी गोटी *f.* B. *v. t.* काळ्या गोटीनें नापसंती दर्शविणें, रद्द करणें, काढून टाकणें. Black-balling *n.*

काळ्या गोटीनें उमेदवाराच्या विरुद्ध मत देणें. Black-band *n.* लोखंडाचें भस्म करण्याइतका ज्यांत कोळशाचा भाग आहे असें अशोधित लोखंड *n.* Black-beetle *n.* झुरळ *n*, वागुरडा *m.* Black-berry *n.* गौरीफळ *n.* Black-bird *n.* काळ्या रंगांचा एक गाणारा पक्षी *m.* २ मोलमजुरीसारखें हलकें काम करण्याकरितां पोलिनेशिआ प्रांतांतील लोक किंवा शिद्दी लोक, यांना दुसरे ठिकाणीं नेण्यांत येतें व या जबरदस्तीनें नेलेल्या लोकांस हा शब्द लावतात, वेठीस नेलेला शिद्दी *m.* Black-birding *n.* जबरदस्तीनें नेणें *n*, वेठीस धरणें. Black-board *n.* (शाळेंतील खडूनें लिहिण्याचा) काळा फळा *m.* Black-boding *a.* दुश्चिन्हाचा, अपशकुनाचा. Black-book *n.* सरकारी काळ्या पुठ्ठ्याचें बुक *n.* शिक्षेस पात्र अशा लोकांचीं नांवें ज्यांत लिहिलेलीं असतात तें पुस्तक *n*, याचा पुठ्ठा बहुधा काळा असतो. Black-browed *a.* रडका, दुर्मुखलेला. Black-cap *n.* गाणाऱ्या पक्ष्याची एक जात *f.* २ *cookery* कठीण कवचेचें करपेपर्यंत भाजलेलें फळ *n.* ३ (अपराध्यास फांशीची शिक्षा सांगणाऱ्या) न्यायाधीशाची काळी टोपी *f.* Black cattle *n.* बैल *m*, गुरेंढोरें *n. pl.* (कापण्याकरितां in opposition to Dairy cattle). Black chalk *n.* चिकणी निळ्या काळ्या रंगाची दगडी माती *f.* चित्रें काढण्याच्या कामीं हिचा उपयोग करितात. Black-coat *n.* पाद्री. [RED-coat हा शब्द लष्करी शिपायाला लावितात.] Black-cock *n.* इंग्लंड व स्काटलंडमधील पकोरडी पक्ष्याची एक जात *f.* Black-death *n.* काळी मरकी *f*, काळा मृत्यु *m*, विलायतेंत चवदाव्या शतकांत तापाची सांथ आली होती तेव्हां तापकरी इसमांच्या अंगावर काळे डाग पडत असत. ह्मणून त्या सांथीच्या तापास काळा मृत्यु हें नांव दिलें असावें. Black-draught *n.* काळा घोट *m*, सोनामुखी आणि एपसम (Epsom) मीठ यांच्या मिश्रणाचा रेच किंवा जुलाब होणारें औषध *n.* Black-drop *n.* कृष्णबिंदू *m*, अफू, शिरका व साखर या तिहींचा केलेला पाक *m.* Blacken *v. t.* काळा करणें, काळा रंग देणें. २ कालिमा लावणें. B. *v. i.* काळवंडणें, काळा होणें. Blackening *n.* काळा रंग देणें *n*, कालिमा लावणें *n.* Black-earth *n.* काळी *f*, काळी माती *f*, काळवट जमीन *n*, नीलमृत्तिका *f.* Black-eye *n.* काळ्या बुबुळाचा डोळा *m.* (हें सौंदर्याचें लक्षण समजतात.) २ (डोळ्यास धक्का किंवा फटका लागून त्या सभोंवतीं येणारा) काळा डाग *m.* Black-eyed *a.* काळ्या डोळ्यांचा, कृष्णनयन. Black-faced *a.* ओंगळ, मळीण, अंधक, दुर्मुखलेल्या तोंडाचा, मलका, दुर्मुखलेला. Black-flag *n.* (चांचे लोकांचें) काळें निशाण *n.* २ (एखाद्या अपराध्यास फांशी देतांना उभारलेलें) काळें निशाण *n.* Black-flux *n.* लांकडी कोळसा आणि पोटॅश कारबोनेट यांचें मिश्रण (कच्ची धातु वितळविण्यासाठीं). Black-friar *n.* डोमिनिक पंथाचा मनुष्य *m.* याचा झगा काळा असतो. २ *pl.* या पंथाचा मठ शहराच्या ज्या भागांत असतो ती जागा अगर तो भाग *m.* Black-ground *n.* काळी जमीन *f.* Black-guard *n.* सोदा, लुचा, पाजी, हरामखोर. प्रथम हा शब्द मुदपाकांत अगदीं हलकें (भांडीं घासणें इत्यादि) काम करणारांस लावीत असत. Black-guard *v. t.* & *v. i.* हरामखोराप्रमाणें वागणें-वागवणें. Black-guardism *n.* पाजीपणा *m*, सोदेपणा *m.* Black-guardly *a.* & *adv.* पाजीपणाचा-नें. Black-heartedness *n.* दुष्टपणा *m*, अधमता *f.* Black-hole *n.* अंधारकोठडीची शिक्षा *f*, अंधारखोली *f*, अंधारकोंडी *f.* The Blackhole कलकत्त्यांतील फोर्ट विल्यममध्यें असलेली अंधारकोठडी *f.* त्यांत १७५६ मध्यें सुराजउद्दवल्यानें १४६ इंग्रज लोकांस कोंडून ठेविलें होतें, असें इंग्रजी इतिहासकारांचें ह्मणणें आहे. Black'ing *n.* बुटाचें काळें पालीस *n.* Black'ish *a.* काळसर. Black-jack *n.* पेय ठेवण्याची पिशवी *f.* २ चांच्याच्या जहाजावरील निशाण *n.* ३ *mining* अशुद्धजस्त *n.* Black-lead *n.* शिसपेन्सलीची धातू *f*, प्लम्बगो, मुरदाड शिसें, मृतसीसक. Black-leg *n.* सोदा *m*, मजुरीच्या कमताईसंबंधानें संप करून काम सोडणाऱ्या लोकांच्या बद्दल जो काम करतो तो, हलकट जुगारू लोक, खोटेंनाटें करून जुगार जिंकणारा. Black-letter *n.* जुने इंग्रजी भाषेंतील अक्षर *n.* याला गोथिक अक्षर ह्मणतात. Black-list *n.* दिवाळखोर लोकांची याद *f.* २ (सरकारच्या) इतराजींतल्या मंडळीची गुप्त याद *f.* Black-looks *n.* असंतोषसूचक मुद्रा *f.* Blackmagic *n.* वाममार्ग *m*, जादूटोणा *m*, कुविद्या *f.* as opposed to Whitemagic. Black-Maria *n.* कैद्यास कचेरींतून तुरुंगाकडे ज्या गाडींतून नेतात ती काळ्या रंगाची गाडी *f*,काळी गाडी *f.* Black-Monday *n.* ख्रिस्त मरून पुन्हा उठल्याच्या आठवणीकरितां पाळण्यांत येणारा सोमवार, हा बहुतेक मार्च किंवा एप्रिल महिन्यांत येतो. २ इंग्लंडचा राजा तिसरा एडवर्ड याच्या सैन्यांतील इ० स० १३६० च्या एप्रिलच्या १४ तारखेस हवेच्या कडकीनें पुष्कळ मनुष्यें आणि घोडे मेले ह्मणून याला "कृष्ण सोमवार" असें ह्मणतात. ३ मोठी सुटी संपल्यावर ज्या सोमवारीं शाळेंतील अभ्यास सुरू होतात त्या सोमवारास विद्यार्थी हा शब्द लावतात.) Black-monk *n.* सेंट बेनिडिक्ट पंथानुयायी *m.* (यांचा पोषाख काळा असतो ह्मणून त्यांना असें नांव पडलें आहे.) Blackness *n.* काळेपणा *m*, का(लि)लिमा *m*, काळा रंग *m*, कृष्णवर्ण *m.* २ *darkness* काळोख *m*, काळोखी *f*, काळोखें *n.* Black-pudding *n.* मांसांतील रक्त व इतर द्रव्यें यांचें केलेलें एक मिष्टान्न *n.* Black-note *n.* व्यापारी मंडळाचा सभासद न होणारा मनुष्य *m.* Black-rod *n.* (इंग्लंडांतील बड्या लोकांच्या सभेचा) काळ्या काठीचा भालदार *m.* याची काठी काळी असून तिच्या मुठीवर सोनेरी सिंह काढलेला असतो. The Black-Sea *n.* काळा समुद्र *m.* Black-sheep *n.* कुळास कलंक लावणारा, वाईट चालीचा मनुष्य *m.* चांगल्या मंडळींतील एकच वाईट मनुष्य *m.* Blacksmith *n.* लोहार *m*, घिसाडी *m.* Business of a B. लोहारकी *f*, लोहारकाम *n*, लोखंडकाम *n.* Black-thorn एक प्रकारचें काळ्या कांट्यांचें झाड *n.* २ ह्या झाडाची केलेली काठी *f.* Black-tressed *a.* काळ्या केसांचा झुबका असलेला. Black-visaged *a.* काळ्या चेहऱ्याचा. Black-wash *n.* कृष्णजल *n*, *med.* रसकापूर

आणि चुना यांच्या मिश्रणाचें पाणी *n.* २ कृष्णीकरणद्रव *m*, काळें करणारा रंग *m.* ३ *fig.* निंदा *f*, बदनामी *f*, दुर्लौकिक *m.* Black-wood *n.* शिसवी लांकूड *n.* अबनूस *m*, शिसव *m.* Oil obtained from the B. सिसवेल. Dead black निस्तेज काळा. In black and white पांढऱ्यावर काळें केलेला, लेखी. Black as a crow काळाकुळकुळित, काळाढुस्स. Black-letter day अनिष्ट दिवस. To be black in the face रागावलेला असणें. To put down in black and white पांढऱ्यावर काळें करणें. To say or swear black is white *cf.* तिळांत तेल नाहीं असें ह्मणणें, उघडउघड खोट्या गोष्टीला चिकटून राहणें. To be in one's black books एखाद्याची खप्पा मर्जी होणें, इतराजींत येणें. The black ox has trod on his foot संकटांनीं त्याला घेरलें आहे, तो कचाटींत सांपडला आहे. Washing the black white निरर्थक काम, *cf.* गाढवाचा घोडा करणें. To black out काळ्यानें खोडणें-पुसून टाकणें. To look black (रागानें किंवा असंतोषानें) काळवंडणें, काळा दिसणें. [Black.

Black-art (black'ärt) *n.* See Black-magic under

Black-mail (black'māl) [Black & A. S. *mal*, tribute, toll.] *n.* कोंबडीपट्टी *f*, लुटूं नये ह्मणून दरोडेखोरांना दिलेली लांचपट्टी *f*, धमकी देऊन पैसा काढणें *n*, (शारीरिक नुकसान न करितां) धमकी देऊन पैसा काढणें *n*, धमकी देऊन काढलेला पैसा *m.* To levy black-mail धमकीनें पैसा काढणें.

Bladder (blad'ėr) *n. anat.* पिशवी *f*, आशय *m.* (as, पित्ताशय, मूत्राशय), मूत्राचा कोठा *m*, वस्ति *m*, *f.* [OBSTRUCTION OF THE B. मूतखडा *m*, मूत्रग्रंथि *m.*] २ फोड *m.* [LARGE WATER B. आंत्रफोड *m.*] ३ फुगारा *m*, फुगा *m.* ४ *bot.* स्फीत बीजकवच. Bladder disease मूत्राशयांतील विकृति *f.* Bladdered, Bladd'ery *a.* फोडाप्रमाणें सुजलेला-फुगलेला. २ पुष्कळ पिशव्या असलेला, पिशवीसारखा. ३ मूत्राशयासारखा. Bladd'erwort *n.* पाण्यांत होणारी वेल *f.* हिचीं पानें तरंगत असतात.

Blade (blād) [A. S. *blæd*, a blade.] *n.* काडी *f.* [B. OF GRASS, तणसरी *f.*]. २ पान *n*, पातें *n*; as, The B. of a knife. 3 *fig.* तरवार *f.* ४ बांका *m*, फांकडा *m*, बांकडा *m*; as, A knowing B. लुच्चा व तरतरीत असा मनुष्य. A regular B. पुरा नखरेबाज मनुष्य. ५ फंदी (?) *m*, ढेंगोजी (?) *m.* ६ *anat.* अंसफलक, स्कंधफलक *m.* ७ *eng. pl.* छपराचे मुख्य वांसे *m. pl.* B. *v. t.* पातें बसवणें. B. *v. i.* पानें फुटणें. Blade'bone *n.* खवाट्याचें हाड *n*, भुजवट्याचें हाड *n.* Bladed *a.* Two-bladed *a.* दुपानी, दुतलफी, दुपाती.

*N. B.*—The Marathi word फंदी means नाच, तमाशा, दारू, भांग, इत्यादि व्यसनें प्रसिद्धपणें वाळगणारा. The Marathi word ढेंगोजी means a swaggerer. The English word Blade contains only two ideas: (1) sharpness. (2) foppishness. Therefore the words ढेंगोजी आणि फंदी as given by Mr. Candy are not correct equivalents for the English word Blade.

Blain (blān) [A. S. *blegen*, a blister, probably from *blawan*, to blow.] *n.* (वाटोळा-बाह्यगोल) पाण्यानें भरलेला फोड *m.* २ (श्वासनलिका बंद करणारा) घोड्याच्या जिभेच्या मुळावर आलेला फोड *m.*

Blame (blām) [Fr.-L.-Gr. *blaspheme-in*, to speak ill of.] *v. t.* दोष *m.* देणें-ठेवणें-लावणें-काढणें, निंदणें, दोषणें (*poe.*), खोड *f*-ठेवणें, बट्टा *m*-ठपका *m.* लावणें, नांवें ठेवणें, शब्द *m*-बोल-इलजाम *m*- लावणें-ठेवणें. ['TO BLAME' IS IDIOMATIC FOR 'TO BE BLAMED.' HE IS TO BLAME MEANS HE IS TO BE BLAMED, OR HE DESERVES BLAME.] B. *n.* (v. V.)-*act.* दोष देणें *n*, निंदणें *n*, &c. दूषण *n*, दोष *m*, दोषारोप *m*, निंदा *f*, निंदन (R) *n*, बोल *m*, शब्द *m*, ठपका *m*, अपवाद (R) *m*, इलजाम *m.* [A BEAR-BLAME अपयशाचा धनी *m.* TO BEAR THE B. TO TAKE THE B. दोष पदरीं घेणें-डोईवर घेणें.] I *fault* दोष *m*, अपराध *m.* Blam'able *a.* (v. V.) दूषणीय, दूष्य, दोषास पात्र, निंद्य, निंदनीय, दूषणार्ह, दोषास्पद, निंदास्पद, निंदेस पात्र, गर्हणीय, गर्ह्य. Blam'ableness *n.* (v. A.) दूषणीयता *f*, वचनीयता *f*, दूषणार्हता *f.* Blam'ably *adv.* दोष द्यायाजोगा *a. decl.*, दोष येईल असा *a. decl.* Blam'ed *p. a.* (v. V.) दूषलेला, दोष दिलेला-ठेवलेला, दूषित, निंदित, अपवादित (R). Blame'ful *a.* सदोष, दोषवान्. Blame'fully *adv.* सदोषतेनें. Blame'fulness *n.* सदोषता *f.* Blame'less *a. not meriting censure, without fault* निर्दोष, निर्दोषी, निरपराध, निरपराधी, निर्बाध, निरपवाद, निष्कलंक, अकलंक, बिनअपराध, बिनठपका, बिनठपक्याचा. Blame'lessly *adv.* (v. A.) निर्दोषपणानें, &c., बिनअपराध, बिनठपका. Blame'lessness *n.* अदोषता *f*, निर्दोषपणा *m*, दूषणराहित्य *n.* Blam'er *n.* (v. V.) दूषणारा, दोष देणारा-ठेवणारा-&c., निंदक, निंदाखोर. Blame'worthiness *n.* see Blamableness. Blame'worthy *a.* see Blamable. Blam'ingly *adv.* दोषदृष्ट्या, दोषबुद्ध्या, दोष देण्याच्या दृष्टीनें-बुद्धीनें.

Blanc-bec (blan-bek') [Fr. *blanc*, white.] *n. a novice, a greenhorn* नवशिक्या *m.*

Blanch (blansh) [Fr. *blanchir*, to whiten, from *blanc*, white. vide Blank.] *v. t.* पांढरा करणें, सफेत करणें, निस्तेज करणें; as, "Fear blanches the cheeks." २ (साल काढून) पांढरा भाग बाहेर काढणें, सोलणें; as, To B. almonds. ३ उजळा देणें; as, To B. gold (before stamping it). ४ (लोखंडाच्या पत्र्यांना) पांढरे जस्ताची कल्हई करणें. ५ *fig.* पांढरा करणें, सौम्य स्वरूप देणें, (एखाद्या वस्तूला) चांगलें स्वरूप देणें. B. *v. i.* पांढरा होणें, पिकुटणें, फिका पडणें; as, "His face blanched with fear." Blancher *n.* सफेत करणारा, उजळा देणारा.

*N. B.*—Blanch, Bleach आणि Whiten हे शब्द समानार्थी आहेत. Whiten ह्मणजे शुभ्र करणें; Bleach (वस्तूचा मूळ

रंग 'नाहींसा' करून ) शुभ्र करणें; व Blanch ( वस्तूचें मूळरूप 'बदलून' ह्मणजे कल्हई-झिलई करून ) शुभ्र करणें.

Blanch-mange, Blanch-manger (bla-mawngzh', bla-mawngzh') [Fr. *blanc*, white & *manger*, food.] *n.* *a white jelly prepared with milk* एक प्रकारचा दुधाचा चिकचिकित पदार्थ *m.*

Bland (bland) [L. *blandus*, mild.] *a.* मृदु, कोमल. २ मंद; as, B. zephyrs. ३ सात्विक, शांत, सौम्य; as, "His manner is very B." ४ शामक गुणाचा, मृदु, जालीम नव्हें असा, उत्तेजक नव्हे असा, सौम्य; as, A B. diet सौम्य आहार. A. B. medicine मृदु औषध. Bland'ness *n.* ( v. A.) कोमळपणा *m*, सौम्यता *f*; मृदुत्व *n*, शांति *f*. Bland'ly *adv.* ( v. A.) कोमळपणानें, लाडीगोडीनें.

Blandiloquence (blan-dil'o-kwens) [L. *blandus*, mild & *loquor*, to speak.] *n.* *fair, mild, and flattering speech* लाडीगोडीचें भपकेदार भाषण *n*, आर्जवाचें भाषण *n.* Blandi'loquous, Blandilo'quious *a.*

Blandish (bland'ish) [O. Fr. *blandir*, *blandis*, to flatter.–L. *blandiri*, to caress.–L. *blandus*, mild.] *v. t.* *to flatter and coax* लाडीगोडीचें भाषण करणें, गोडी गुलाबीनें बोलणें. Blandishing *a.* *soft, wheedling* लाडीगोडीचा, गोडीगुलाबीचा, सांत्ववादाचा, प्रियवादी, प्रियंवद. Blandishing *n.* (see verb). Bland'ishment *n.* *soft airs, winning words, attraction,* &c. हाव *m*, *pl.*; नखरा *m*, अदा *m*, लालित्य *n*, विलास *m.* २ लाडीगोडी *f*, सांत्ववाद *m*, गोडीगुलाबी *f*, सुवाळीमवाळी *f*, गुळपापडी *f*, गुळगुळथापडी *f*, गोडगोड गोष्टी *f*; गुलगुल गोष्टी *f. pl.*, मधुर भाषण *n*, वसंताचें बोलणें ( R ) *n.*

Blank (blangk) [ Fr. *blanc*, from root of Ger. *blinken*, to glitter –O. H. Ger. *blichen*; Gr. *phlegein*, Sk. भ्लस्स्, to shine.] *a.* शुभ्र, पांढरा, पिठासारखा; as, A B. moonlight. २ *not written upon, not filled up* कोरा; as, A B. paper; सही, नांव, किंवा इतर कांहीं मजकूर लिहिण्याकरितां कोरी जागा असलेला; as, A B. cheque कोरा 'चेक.' ३ भीतीनें घाबरलेला, शून्यमनस्क (असा), उदास, तोंड उतरून गेलेला; as, He stood B. ४ रिकामा, साफ, रिता, शून्य (S), *vulg.* खाली, सुना, फाका, न भरलेला; as, A B. box. ५ कांहीं विशेष गोष्ट झाली नाहीं असा, सुना, रिकामा; as, A B. day. ६ वैराण, वैचित्र्यरहित. [ A B. DESERT झाडें झुडपें नाहींत असें अरण्य; A B. WALL खिडक्या दारें नाहींत अशी भिंत *f.* ] ७ (प्रेम, आशा किंवा इतर) पाशरहित; as, A B. existence. ८ बिनपाणीदार, बिनतरतरीचा, बिनचतुराईचा; as, A B. face, A B. look. ९ पूर्ण, केवळ, शुद्ध, एकजात; as, B. terror, Blank unconsciousness. १० यमकरहित, प्रासरहित; as, A B. verse. ११ बिनगोळीचा, वायबाराचा. B *n.* रिकामी जागा *f*; कोरा कागद *m.* २ बिनमहत्वाचा काळ *m*, सुनाकाळ; as, A long B. in the history of a people. ३ बिनबक्षिसाची चिट्ठी *f*, सोडतींत ज्या तिकिटाला बक्षिस नसतें तें तिकिट, कोरें तिकिट *n.* ४ नांव व तारीख नसलेला दस्तऐवज *m.* ५ लक्ष्य *n*, निशाणावरील पांढरा ठिपका *m*; as, "Let me still remain the true B. of thine eye." ६ (इंगलंडांत पांचव्या हेनरीनें पाडलेलें) हलक्या रुप्याचें नाणें *n*, ह्याची किंमत ८ पेन्स होती. ७ *mech.* स्क्रू किंवा इतर वस्तूकरितां तयार केलेली धातूची कांब किंवा तुकडा *m.* ८ खाडा *m*, खांडवा (R.) *m*, खांवडें (R.) *n*, खिंड (?) *f.* B. *v. t.* फिका करणें. २ गोंधळून सोडणें, नाउमेद करणें. ३ फिसकटून टाकणें, मोडून टाकणें (as plans, &c.). Blank-bar *n.* *law* प्रतिवादीनें अमुकच ठिकाणीं मर्यादोल्लंघन केलें असें वादीनें दाखवावें अशी प्रतिवादीची तकरार *f.* Blank-cartridge *n.* *lit.* बिनगोळीचें काडतुस *n*, सुका-रिता तोटा *m.* *fig.* *empty threats* सुखाकोरडा दम. Blank door or blank window *n.* भिंतींतील दरवाज्यासारखी किंवा खिडकीसारखी खांच *f*, भिंतींतील खोटा दरवाजा किंवा खिडकी *f.* Blank indorsement *n.* (हुंडी) कोरी बेचन करणें, हुंडी ज्यानें बेचन घेतली आहे त्याचें नांव घातलेलें नसतें अशी हुंडी *f.* Blank line *n.* ओळीची कोरी जागा *f.* Blank practice *n.* शुष्केष्टी, बिनगोळींच्या काडतुसांनीं बंदुकीचा अभ्यास. Blank tire *n.* बिनवळवलेल्या कांठाची धाव *f.* Blank'y *adv.* Blank'ness *n.* (v. A.) रितेपणा *m*, कोरेपणा *m.* In blank मुख्य भाग भरण्याचा ठेवलेला; as, To make out a check in B. Point-blank *n.* See Point. Point-blank *a.* *direct, unqualified* स्पष्ट, उघडउघड, सरळ, मोघम नाहीं असा; as, A Point-blank assertion. Point-blank *adv.* *in a plain manner* स्पष्ट-उघड-रीतीनें; as, He refused point-blank to go there.

Blanket (blangk'et) [O. Fr. *blanket*, (Fr. *blanchet*), dim. of *blanc*, white, from its usual white colour.] *n.* *lit.* पांढरें गरम पांघरूण *n*, घोंगडी *f.* [THE WORD BLANKET IS NOW MOST GENERALLY USED FOR घोंगडी. TWO BLANKETS OR घोंगडीS SEWN TOGETHER BREADTHWISE IS कांबळा *m*, OR (*dim.*) कांबळें *n.* A WORN OUT AND TORN BLANKET फटकुरी *f*, फटकूर *n*, पटकूर *n*, रगटें *n.*] B. *v. t.* कांबळयांत गुंडाळणें. २ (शिक्षेदाखल) घोंगडींत आसडणें. ३ (वाऱ्याच्या प्रवाहांत असणाऱ्या गलबतापुढें जाऊन त्यास) वारा न मिळेसा करणें, वाऱ्याच्या आड येणें. Blank'eting *n.* घोंगडीचें कापड *n.* २ कांबळयांत आसडण्याची शिक्षा *f.* ३ वाऱ्याच्या आड येणें *n.* Wet blanket *fig.* धीर किंवा हिम्मत खचविणारें कारण *n*, विरजण *fig. n.*

Blare (blār) [M. E. *blaren*; Dut. *blaren*; Low Ger. *blarren*, to bleat.] *v. i.* मोठा आणि कर्कश आवाज करणें; as, "The trumpet blared." २ मोठ्यानें आरडणें, मोठ्या स्वरानें रडणें (लहान मुलें खोड्या केल्यावर रडतात त्याप्रमाणें). ३ मोठ्यानें वाजणें. B. *v. t.* मोठा आवाज करण्यास लावणें. २ जाहीर करणें; as, "To blare its own interpretation." B. *n.* तुतारीच्या

सारखा कर्कश आवाज *m.* २ आवाज *m,* गर्जना *f;* as, Thunder's blare.

Blarney (blär'ni) [After the castle of *Blarney* near Cork in Ireland, held by Cormack Macarthy in 1602. He concluded an armistice with Carew, the Lord President, on condition of surrendering the fort to the English garrison. Day after day his lordship looked for the fulfilment of the terms, but received nothing except protocols and soft speeches, till he became the laughing-stock of Elizabeth's ministers, and the dupe of the Lord of Blarney.] *n. soft wheedling speeches to gain some private end* गोडगोड शब्द *m,* वरपांगी गोडपणाचें भाषण *n,* कावेबाजपणाचें पण गोड भाषण *n.* B. *v. t.* गोडगोड शब्दांनीं फसविणें, फुसलावणें; as, She blarneyed the landlord. None of your blarney *idio.* वरपांगी गोडपणाचें भाषण पुरे करा.

Blase (blä-zā) [Fr. *blaser*, to exhaust with pleasure.] *a. satiated with pleasure* सुखाचा वीट आलेला, सुखांत मुरलेला; as, A man blasé.

Blaspheme (blas-fēm') [L. *blasphemare*, to speak ill of—Gr. *blaptein*, to hurt, & *phemein*, to speak.] *v. t.* & *v. i.* ईश्वराची निंदा *f*-निर्भत्सना *f*-&c. करणें *g. of o.* &c. २ श्रेष्ठ मनुष्याची निंदा करणें. ३ धर्मशून्यतेमुळें निंदा करणें. ४ निंदात्मक भाषण करणें. Blasphem'er *n.* ईश्वराची निंदा करणारा किंवा श्रेष्ठ मनुष्याची निंदा करणारा. Blas'phemous *a.* ईश्वरनिंदात्मक-निंदक, निंदात्मक, कुचेष्टेचा, ईश्वरनिंदेचा. Blas'phemously *adv.* ईश्वरनिंदेनें, ईश्वरनिंदा करून, &c. Blas'phemy *n.* ईश्वराची निंदा *f,* श्रेष्ठ मनुष्याची निंदा *f,* ईश्वराक्षेप *m.*

Blast (blast) [A. S. *blæst*, a puff of wind.] *n. a blowing or strong gust of wind* झपाटा *m,* सनाटा *m,* जोराचा झोत *m.* [Hot B. झळ *f,* झळई *f,* हळ *f,* भवका *m, dim.* भवकी *f,* भवकारा *m,* अहा (R) *f,* अहळी *f.*] २ (of a planet) *f,* संक्रान्त *fig. f,* अनिष्टफल *n.* ३ (of an evil eye) दृष्टिपात *m,* दृष्टि *f,* दृष्ट *f,* (दृष्टि) बाधा *f.* ४ (of devil) झपाटा *m,* झटका *m,* झडपण *f,* झडप *f,* (भूत) बाधा *f,* (पिशाच्च) बाधा *f.* [To BLAST OR TO BE BLASTED (SUCH AS TREES, FRUITS &c., BY DEVILS &c.) लांवसटणें OR लांवसरणें, OR लांवारणें, सठवणें, सठळणें, लागोरणें, विवंशी *f* लागणें; *in. con.* दृष्ट *f* पडणें-लागणें-होणें *in. con.,* दृष्टावणें, दृष्ट (टा) ळणें, संक्रांतीचें वसणें, *in. con;* पांचवीचें OR सठवीचें *n.* होणें-लागणें.] ५ (of lightning) विद्युत्पात *m.* ६ (with the mouth on a wind instrument) फुंक *f,* फुंकर *m,* फुंका *m,* फुंकारा *m,* फुंकारी *f,* फुंकून वाजवणें *n.* ७ सणईसारख्या वाद्याचा आवाज *m,* धमननाद *m.* ८ सुरुंगाचा आवाज *m.* ९ *fig.* विनाशकारण *n.* १० (नाश करणारा) रोग *m,* रोगट हवेनें झाडांना किंवा जनावरांना होणारा रोग *m,* चिकटा *m,* मेकडा *m.* B. *v. t.* (an evil eye) दृष्ट *f.* बाधणें-पडणें-लागणें-होणें *in. con.;* दृष्टिपात *m*- दृष्टिबाधा *f.* होणें *in. con.* २ (a devil) (v. N. 4) झडपणें, बाधणें, बाधा *f.* होणें-लागणें, लागणें, पडणें. ३ (wind, weather, heat, cold) करपविणें, कोमजविणें, जाळणें, जाळून टाकणें. [To BE BLASTED करपणें, करपून दर्भ होणें, जळणें.] ४ *to foil, to ruin* मारणें, नासणें, हिसकणें, लटपटविणें, भंग *m*- नाश *m*- मातेरा *m*- मात्रा (R) *f*- विघात *m,* करणें *g. of o.,* नष्ट-&c. करणें. ५ (rocks, &c. by the explosion of gunpowder) सुरुंगानें फोडणें-उडवणें-&c. ६ उध्वस्त करणें, नाश करणें, नासाडी करणें, मोठा दणका करून घाबरवून टाकणें; as, "Trumpeters, With brazen din blast you the city's ear." ७ आशाभंग करणें. ८ कलंक लावणें; as, To B. character. B. *v. i.* नाश होणें. २ करपणें. ३ झपटणें, बाधा होणें. Blast'ed *a.* करपलेला. २ निराशा झालेला. ३ नष्ट झालेला. Blast'er *n.* नाश करणारा. २ सुरुंग्या. Blast-furnace *f.* (धातूंचा रस करण्याची) वाऱ्याच्या झोतानें चालणारी भट्टी *f.* [BLAST FURNACE IS IN B. धातूंचा रस करण्याची भट्टी चालू आहे. BLAST FURNACE IS OUT OF B. भट्टी बंद आहे.] Blast'-hole *n.* पाणी उपसण्याच्या यंत्रांतील) पाणी आंत नेणारें तळचें छिद्र *n.* Blast'ing *n.* सुरुंग लावणें *n.* Blasting gel'atine *n.* सुरुंगी कापूस *m,* (प्राणिजखळ देऊन तयार केलेला) सुरुंगासारखा उपयोगीं पडणारा कापूस *m.* Blast'ment *n.* सुरुंगानें फोडलेल्या दगडाची सुरकुती किंवा रेपा *f.* Blast-pipe *n.* (इंजिनांतील फाजील) वाफ धुरांड्याद्वारे बाहेर नेणारी नळी *f.* In full blast पूर्ण भरांत.

*N. B.*—See the note on the word Blight.

Blastema (blas-tē'ma) [Gr. *blastamein*, to germinate.] *n. protoplasm* (एखाद्या इंद्रियाचा-&c.) आद्यधातू *f. pl.* Blastemata.

Blastoderm (blas'to-dėrm) [Gr. *blastos*, a bud & *derma*, skin.] *n.* गर्भपिंडावरची पहिली त्वचा *f.*

Blat (blat) *v. i.* बेंबें करणें. २ (अक्कलशून्याप्रमाणें) कांहींतरी बोलणें, वाटेल तें बहकणें. Blat'ant *a.* बेंबें करणारा, उगाच गोंगाट करणारा. २ बेंबटण्यासारखा आवाज. Blat'antly *adv.*

Blatter (blat'ėr) [Dut. *blaet*, a boaster.—L. *blaterare*, to prate.] *v. i.* (अक्कलशून्यासारखी) व्यर्थ बडबड करणें, जल्पना करणें.

Blaze (blāz) [A. S. *blæse*, a flame, a torch; *cf.* M. H. Ger. *blas*, a torch; Ger. *blasse.*] *n. a flame* आगीचा डोंब *m,* धग *m,* भ (ड) डाका *m,* भडाड *m,* गल्लूल (*obs.*) *m,* लोळ *m,* होळा (*obs.*) *m.* २ उजेडाचा धोत *m,* भणभणीत उजेड *m,* प्रखरतेज *n.* ३ झपाट्याचा प्रादुर्भाव *m,* झपाट्यानें प्रकट होणें *n,* (रागामुळें तोंडावर एकदम आलेला) तांबडेपणा *m,* (मनोविकाराचा) भडका *m;* as, The B. of wrath रागाचा भडका *m,* प्रखर तेज *n,* ज्योत *f;* as, The B. of ambition महत्वाकांक्षेची प्रखर ज्योत. B. *v. i.* धगधगणें, धगधगून पेटणें, धडकणें; as, The fire blazed. २ भडकणें, भडभडणें. *intens.* भडाडणें, भडकणें, भडका होणें. ३ भडकून प्रकाशणें. To set in a blaze भडका करणें, भडभडावणें. Blazing *a.* भणभणीत, धगधगीत; as, B. noon भणभणीत दुपार.

**Blaze** (blāz) [M. E. *blasen*, –Icel. *blāsa*, to blow, to blow a trumpet.] *v. t.* (with *abroad*, *forth*, *about*) *to noise abroad*, *to proclaim* (as with a trumpet) इतरदिनीं चोहोंकडे प्रसार करणें, गाजवणें (?), गांवभर करणें, गाजावाजा *m*-बभरा *m*-बोभाटा *m*-लौकिक (S) *m*-बाजार *m*- पेट *f.* करणें *g. of o.*, प्रगट करणें, (*spec.*) डांगोरा *m*-दवंडी *f*-&c. पिटणें *g. of o.*, (*spec.*) वेशीस बांधणें. Blaz'er *n.* गांवभर करणारा.

**Blaze** (blāz) [Dut. *blesse*, a white streak on the forehead, Ger. *blasse*, Icel. *blesi.*] *n.* घोड्याच्या कपाळावरील पांढरा ठिपका *m.* २ (साल कापून केलेली) झाडावरची पांढरी खूण *f* (रस्ता किंवा हद्द दाखविण्याकरितां); as, 'We had come to the sixth mile blaze, a boundary-mark on a pine.' B. *v. t.* (साल कापून) झाडांवर पांढरी खूण करणें. २ खूण केलेल्या झाडांनीं दाखविणें, आखणें; To B. a line or path.

**Blazon** (blā'zn) [A. S. *blæse*, a flame; Fr. *blason*, a coat of arms.] *v. t. to publish* (शिंग वाजवून) मोठ्या भपक्यानें जाहीर करणें. २ सुशोभित करणें, शृंगारणें. ३ (ललकारी करण्यास चिलखतासारख्या वस्तूसंबंधीं) ललकारणीदाराच्या भाषेंत वर्णन करणें, स्वर्णाक्षरांनीं अधिकारचिन्हें किंवा पदवीचिन्हें दाखविणें *n*, कुलमानद्योतक चित्रित चिन्हें काढणें, पूर्ण माहिती देणें, स्पष्ट माहिती देणें; as, "The coat of arms, which I am not herald enough to B. into English." *Addison.* B. *v. i.* (R) प्रसिद्ध होणें. २ चकाकणें. B. *n.* भाटाची किंवा ललकारणीदाराची ढाल *f.* २ चिलखतावरून घालण्याचीं उपवस्त्रें *n. pl.* ३ भाटाची ललकारणी *f.* प्रसिद्धि *f.* ४ अधिकारचिन्हें किंवा पदवीचिन्हें गौरवानें वर्णन करण्याची कला *f.* Blaz'oner *n.* प्रसिद्ध करणारा. Blaz'onry *n.* अधिकारचिन्हें गौरवानें वर्णन करण्याची कला *f.* २ चिलखतावरून घालण्याचा लहानसा आंगरखा *m*, ह्या आंगरख्यावर काढलेलीं पदवीचिन्हें *n.* ३ कौशल्ययुक्त मांडणी किंवा देखावा *m.*

**Blea** (blē) *n. the alburnum or sapwood* अंतःसाल *f.*

**Bleach** (blēch) [A. S. *blaecan*,–*blac*, shining, bright, pale. See Bleak.] *v. t.* ओपवणें, ओप देणें, काळे डाग काढून टाकणें, पांढरा करणें. B. *v. i.* पांढरा होणें. Bleached *a.* निखारलेला, पांढरा फटफटीत केलेला, पांढरा फटफटीत झालेला; as, Bleached bones. Bleach'er *n.* ओप देणारा. Bleach'ery *n.* ओपखाना, ओपविण्याचा कारखाना *m.* Bleach'field *n.* (कापड किंवा सूत) ओपविण्याची जागा *f.* Bleach'ing *n.* कोरें वस्त्र ओपविण्याची कृति *f*, कापडाचा रंग उतरण्याची कृति *f.* Bleaching agent ओपवणारें-निक्षालक-शुभ्रक द्रव्य. Bleach'ing compound शुभ्रक-निक्षालक मिश्रण. Bleach'ing green *n.* ओप दिलेले कपडे सुकवावयाचें मैदान *n.* Bleach'ing mixture शुभ्रकमिश्रण. Bleach'ing powder *n.* (धोबी वापरतात ती) कपडे साफ करण्याची पूड *f*, शुभ्रकक्षार *m*, also called *chloride of lime*; रंग काढण्याची पूड *f*, ओपपूड *f.*

**Bleak** (blēk) [A. S. *blac*, white.] *a.* (*obs.*) रंगरहित, फिकट, निस्तेज; as, She looked as bleak as dead. २ सर्दीचा, सर्द; as, Bleak winds. ३ बिनआसऱ्याचा, उघड ओसाऱ्याचा, वाताप्रतिबंधक, वारधाटीचा (*obs.*). ४ ओसाड, भयाण, उदासीन. Bleak'ish *a.* थोड्या ओसाऱ्याचा. २ थंडीचा, सर्द. ३ फिकट. Bleak'ly *adv.* Bleak'ness *n.* बिनआसरेपणा *m.* २ सर्दपणा *m.* ३ (*obs.*) फिकटपणा *m*, निस्तेजपणा *m.*

**Bleak** (blēk) *n.* यूरोपांतील नद्यांत सांपडणारा एक प्रकारचा मासा *m*, हा पांच किंवा सहा इंच लांब असतो.

**Blear** (blēr) [Dan. *blaere*, a blister; Low Ger. *blarren*, to cry or weep, hence *blarr-oged*, having a red, watery eye.] *a.* चिपडा, बरबरीत, पिचका (?) (said of eyes); as, "His B. eyes ran in gutters to his chin." २ (पू वाहत असल्यामुळें) अंधुक झालेला, अंधुक; as, Blear illusion. B. *v. t.* बरबरीत करणें. २ *fig.* डोळ्याला पडदा बांधणें, अंधारी घालणें. [To B. THE EYES OF (*obs.*) फसविणें, मोह पाडणें, मतिभ्रंश करणें. २ मंद किंवा अंधुक करणें]. Blear-eye *n. med.* डोळ्यांच्या पापणींत सदोदित पू आणणारा रोग *m.* Blear-eyed *a.* चिपड्या डोळ्यांचा. २ *fig.* अदूरदृष्टीचा. Blear-eyedness *n.* डोळे पुवानें बरबरलेले-चिपडे असणें. Blearedness *n.* चिपडेपणा *m*, बरबरीतपणा *m.* २ अंधुकता *f*, नेत्रमांद्य *n.*

*N. B.*—सध्यां पिचका हा शब्द बरबरीत किंवा चिपडा ह्या अर्थी फारच कमी वापरतात. डोळ्याच्या कांचेला चीर पडल्यासारखें जर कांहीं झालें असेल तर त्याला पिचका डोळा असें ह्मणतात.

**Bleat** (blēt) [A. S. *blætan*, to bleat as a sheep; Dut. *blaten.*] *v. i.* बेंबावणें, बें बें करणें. Bleat, Bleat'ing *n.* बें बें करणें *n.* Bleater *n.* बें बें करणारा, मेंढरूं *n.*

**Bleb, Blob** (bleb, blob.) [M. E. *blober*, *blubber*, a bubble, of imitative origin.] *n.* (अंगावरचा) पाण्याचा टवटवीत फोड *m.* २ (पाण्यांतील) बुडबुडा *m*; as, "Arsenic abounds with air blebs."

**Bled** (bled) *p. t. & pa. p.* of Bleed.

**Bleed** (blēd) [A. S. *bleden*. See Blood.] *v. i.* रक्त वाहणें, रक्तप्रवाह होणें, रक्त पाझरणें-ओघळणें, रक्ताचा ओघळ *m.* सुटणें, रक्तावणें (?), रक्ताळणें (?). २ चीक वाहणें; as, A tree bleeds when tapped. ३ रक्त बाहेर काढणें; as, She bleeds in fevers. ४ रक्तस्राव होऊन तडाक्यानें मरणें, रक्तस्राव होणें; as, "The lamb thy riot dooms to bleed to-day." *Pope.* ५ (the heart) *to feel extreme pain from pity* दया येऊन हृदय *n.* फुटणें, ऊर *m.* उलणें. ६ (*colloq.*) पैशाकरितां लुबाडला जाणें, अतोनात पैसा घालवणें; as, He bled freely for a cause. B. *v. t.* रक्त काढणें, नस *m.* तोडणें-घेणें, रक्तमोक्ष (S) *m*-रक्तसांड *f*- रक्तमोचन *n*-&c. करणें, शीर काढणें. २ (*colloq.*) जुलमानें पैका काढणें; as, To freely B. a miser for some fund. Bled *p. t. & pa. p.* Bleed'ing

*n.* रक्त वाहणें. २ चीक वाहणें. ३ जुलमानें पैसा काढणें *n.* B. *a.* रक्त बाहेर काढणारा, रक्त वाहणारा, रक्तस्रावी. २ चीक वाहणारा-बाहेर टाकणारा (वृक्ष). ३ लढाईंत रक्तस्राव होऊन अशक्त झालेला. ४ घोर, रक्तानें माखलेला. ५ अतिशय खिन्नतेचा-वेदनेचा. Bleeder *n.* रक्त काढणारा, (थोड्या जखमेनें) खूब रक्त वाहण्याची खोड असणारा. To bleed at every pore रक्त उपळणें-उमळणें-उवळणें. To bleed at the nose घोणा *m*-घुणघुणा *m.* फुटणें-वाहणें, नाकांतून रक्त वाहणें. To make a man bleed *fig.* एखाद्यास वळी घालणें. It makes my heart bleed त्या योगानें माझें मन अति खिन्न झालें-द्रवलें आहे. My heart bleeds for him माझें मन त्याच्या करितां तिळतिळ तुटतें.

Blemish (blem'ish) [O. Fr. *blesmir*, *blemir*, to stain, to make pale.–O. Fr. *blesme*, *bleme*, pale, wan.] *v. t.* *to deform, to impair* व्यंग-विकल-&c. करणें, ऐब *m.* करणें-लावणें, ऐबदार-&c. करणें, खोड करणें. २ बट्टा लावणें, कलंक लावणें (reputation). ३ कुरूप करणें (beauty). ४ लांच्छन *n*-काळें *n*-कालिमा *f*-&c.-लावणें-आणणें. B. *n.* वैगुण्य *n*, दोष *m*, खोड *f*, कलंक *m*, बट्टा *m*, बाट *m.* (v. ठेव, पड), गोम *f*, छिद्र *n.* Blem'ished *p. a.* (v. V. 1.) ऐब लावलेला, व्यंग केलेला. २ कुरूप केलेला. ३ दोषी, सदोष, ऐबदार, बट्टा लावलेला. Blem'ishment *n.* कलंक *m.*

Blench (blensh) [From root of Blink.] *v. i.* *to shrink or start back* (with *at*, *from*) माघार घेणें, मागें हटणें, कच खाणें; as, "B. not at thy chosen lot." ह्या क्रियापदाचें सकर्मक रूप सध्यां प्रचारांत नाहीं.

Blench (blensh) *v. i.* & *v. t.* फिका होणें, फिका करणें.

Blench (blensh) [also Blanch; see Blank.] *a.* & *adv.* *based on the payment of a nominal yearly duty* नांवाला कांहीं तरी भाडें किंवा कर देऊन मिळणारा.

Blend (blend) [A. S. *blandan*, to mix.] *v. t.* *to mingle* मिसळणें, एकजीव करणें, एकत्र करणें, एकवटणें, संकर (?) *m*-एकाकार *m*-सायुज्य *n*(*)-एकरूपता (*) करणें *g. of o. recipr.* २ (जणूं काय एकांतून दुसरा निघाला आहे अशा रीतीनें) दोन किंवा अनेक रंग एके ठिकाणीं लावणें. ३ (*obs.*) *to confound* गोंधळविणें. B. *v. i.* मिळून जाणें, समावणें (as colours). Blended and Blent *pa. p.* Blend *n.* मिश्रण *n.* Blend'er *n.* मिसळणारा. २ रंग मिळविण्याचा लहान बरास *m.* ज्यानें निरनिराळे रंग एक-एकजीव करून टाकतां येतात. Blending *n. paint.* (निरनिराळे रंग मिळून एक नवीनच रंग होईल अशा रीतीनें ते) एकाशीं एक लावणें *n*, मिसळणें *n*, एकत्र करणें *n.*

*N. B.*—संकर is an undesirable combination. Note the phrase वर्णसंकर. सायुज्य (as in सायुज्यता) has now become chiefly a technical term of Hindu theology. एकरूपता will denote only one aspect of blending. In Blend, there is the idea of a complete mixing in every respect.

Blendwater (blend-wa'ter) *n.* जनावरांचा यकृताचा रोग *m.*

Blenheim (blen'im) [After *Blenheim* Palace, the seat of the Dukes of Marlborough.] *n.* 'ब्लेनहीम'; एक जातीचा कुत्रा *m.*

Blennorrhoea (blen-no-rē'a) [Gr. *blenna*, mucus & *rhein*, to flow.] *n. med. a flow of mucus, gonorrhoea* जननेंद्रियांतून पुष्कळ दिवसांपासून असणारा किंवा आशुकारी रक्ताचा किंवा पुवाचा स्राव *m*, बायकांची धुपणी *f.*

Blepharitis (blef-a- ri'-tis) [Gr. *blepharon*, eyelid & suffix–*itis.*] *n. an inflammation of the eyelids* पक्ष्मदाह *m*, पक्ष्माभिताप *m.*

Blepharospasmus (blef'a-rō-spas-mus) *n. med.* पापण्यांचा कंपवायु *m.*

Bless (bles) [A. S. *bletsian*, to bless, from *blithe*, merry, joyful. Bless शब्दाचा संबंध भाषाशास्त्राच्या नियमांनीं blood शब्दाशीं दाखवतां येतो. Bless शब्दाचा मूळार्थ कदाचित् यज्ञपशूचें रक्त शिंपडून सोवळें करणें किंवा शुचिर्भूत करणें असा असूं शकेल.] *v. t. to make prosperous or happy* कल्याण *n*- कुशल *n*- क्षेम *n*- ऊर्जित (S.) *n*-बरें *n*-चांगलें *n*-मंगल *n*-अभीष्ट *n*-इष्टसिद्धि *f*-&c. करणें *g. of o.*; as, "Mercy is twice blessed, It blesseth him that gives and him that takes." बरकत *f.* देणें, सुखी-संपन्न-&c. करणें, सुदशेस-ऊर्जितदशेस- &c. आणणें, सुखस्थानीं बसवणें, सुखसंपन्न करणें. [To BLESS GREATLY कोटकल्याण करणें *g. of o.*] २ *to pronounce a blessing upon, to invoke or confer a blessing upon*—applied to persons and to things as food, &c. आशीर्वाद *m*-आशीर्वचन *n*-श्रेयोवाद *m*-कल्याणवचन *n*-आशी *f*-&c. देणें, स्वस्तिवाचन *n.* करणें, मस्तकीं-डोईवर-&c. हात *m.* ठेवणें, दुवा *m.* देणें-मागणें, बरें *n.* मागणें *g. of o.*, अभीष्टचिंतन *n.* करणें; as, "Bless them that curse you." "Then he took the five loaves and the fishes, and looking up to heaven, he blessed them." (विषयीं आशीर्वाद मागितला.) ३ *to glorify for benefits received* (उपकार आठवून) स्तवणें, स्तुति *f*-स्तवन *n*-&c. करणें *g. of o.*, गोडवे गाणें, गौरव *m*-स्तुति *f*-उत्कृष्टपणाची वाहवा करणें, स्तव करणें (*B.*); as, "Bless (स्तवा) the Lord, O my soul: and all that is within me, bless His holy name." ४ *to consecrate* पवित्र कामाकरितां वेगळा ठेवणें; as, "And God blessed the seventh day and sanctified it." ५ *to consider happy* सुखी-आशीर्वादित मानणें; as, "The nations shall bless themselves in Him." Blessed or Blest *pa. p.* Blessed *a.* (v. V. I.) सुखी केलेला, कल्याण केलेला, वरदी, प्राप्तवर, अनुगृहीत. २ (v. V. २.) आशीर्वाद दिलेला, प्राप्ताशीर्वाद, आशीर्वाद मागितलेला, दुवा दिलेला, दुवा मागितलेला, चिंतिताभीष्ट. ३ (v. V. ३.) (उपकार आठवून) स्तवलेला, वंदलेला, वंदित, सुवंदित. ४ *happy, prosperous* सुखी, धन्य, सुखसंपन्न, कुशल, कल्याण-क्षेम-&c. संपन्न, कृतकृत्य, कृतार्थ, सुखपदीं-सुखासनीं

बसलेला. ५ परमार्थसुखभोगी. ६ पवित्र, पूज्य, देवाला वाहिलेला. ७ आनंदी, सुखकारक. Bless'edly *adv.* सुखानें, आनंदानें, सुदैवानें. Bless'edness *n.* (v. A.) धन्यता *f,* सिद्धि *f,* कृतार्थता *f,* कृतकृत्यता *f,* वरदीपणा *m.* २ सुख *n,* स्वर्गीयसुख *n,* ईश्वरकृपा *f.* Blesser *n.* आशीर्वाद देणारा, सुखी करणारा, &c. Bless'ing *n.* (v. V. 1.)—*act.* कल्याण करणें *n,* &c., सुखी करणें *n.* २ आशीर्वाद देणें *n,* आशीर्वाद *m,* आशीर्वचन *n,* वरदान *n,* स्वस्त्ययन *n.* ३ स्तवणें *n,* स्तुति करणें *n,* &c., वंदन *n,* वंदना (R.) *f.* ४ दुवा *m,* दुवा देणें *n,* दुवा मागणें *n.* I. *divine favour* ईश्वर-ईश्वरी कृपा *f,* भगवत्कृपा *f,* अनुग्रह *m.* II. *benefit, good* सुख *n,* श्रेय *n,* प्रसाद *m,* गनिमात (R.) *f,* अनुग्रहफल *n,* प्रसाद-फल *n.* III. a B.—as in the gift of a saint,-god, &c. वर *m.* (v. दे). [Granting of a B. वरदान *n.* Granter of a B. वरद.] Bless'ing *a.* (v. V. 1.) कल्याण करणारा, कल्याणकर्त्ता-कारक-कारी, मंगलकर्त्ता, श्रेयस्कर. २ आशीर्वाद देणारा, आशीर्वाददाता. (For more meanings see the verb). Bless me! Bless my soul! मला वांचव. In such phrases 'bless' is used in the sense of 'save,' 'protect' or 'keep from evil.' God bless you ईश्वर तुमचें भलें करो. कधीं कधीं 'bless' ह्या शब्दांत व्याजस्तुति किंवा निंदा ह्यांचा ध्वनि असतो. To bless from पासून सुरक्षित ठेवणें; as, "O God, bless me from such fools." To ask a blessing वर मागणें. Single-blessedness (*Shakes.*) ब्रह्मचर्याचें सुख. २ अविवाहित अवस्था *f.*

*N. B.*—There is no word or phrase in the English language more difficult for translation than the word 'blessed' and the phrase 'to bless one's self with' as used in the following instances. (1) The blessed system of printing debates. (2) Every blessed evening in the theatre. (3) Blessed farthing, Blessed rupee. (4) I have not got a pie to bless myself with. (5) I'll be blessed if I do it. In the first three instances, the word 'blessed' is used either ironically or euphemistically for 'cursed.' In the first example the word 'blessed' should be translated by मिकार, कष्टदायक, अतित्रासाचा, जळला, मेला (used by women), फारच सुखाचा-(in this last rendering, the irony and euphemism of the English original are kept up). In the second example, 'blessed evening' is rendered. by दररोज संध्याकाळीं सुमुहूर्तीं here the word सुमुहूर्तें, means the opposite of its usual meaning. In the third example 'blessed rupee' is rendered by जळला एक रुपया, मेला एक रुपया (used by women), फुटका एक रुपया (cf. फुटकी कवडी). If the irony and euphemism of the English original are to be induced into the Marathi translation, we should translate the same by अगाध लक्ष्मीच्या खुणेचा रुपया. 'I have not got a single pie to bless myself with' कपाळाला लावायला माझ्या जवळ एक कपर्दीक सुद्धां नाहीं. cf. कपाळावर मारावयाला-दांतावर मारावयाला माझे जवळ एक पै सुद्धां नाहीं, विष खावयाला मजजवळ एक पैसा सुद्धां नाहीं, लक्ष्मीच्या मोठ्या वहिणीची (आक्काबाईची) आमच्यावर खूप मेहेरबानी आहे. In the English phrase "to bless one's self with," there is probably an allusion to the cross on the silver penny, or to the practice of crossing the palm of the recipient with a piece of silver.

'I'll be blessed if I do it.' तें जर मीं केलें तर माझें कोटकल्याणच होईल. Here the word कोटकल्याण is used either ironically or euphemistically for कोट-अकल्याण. Some translate the same English sentence by तें जर मीं केलें तर माझें वाटोळें होईल.

Blest (blest) *pa. p.* of Bless.

Blet (blet) *n.* ज्यास्त पिकून रुचि गेलेलें-अविकलेलें फळ [सडणें *n.*

Blether (ble-*th*'er) [M. E. *blather*, Icel. *blathra*, to talk foolishly.] *v. i.* फटकळपणानें कांहीं तरी भकणें. B. *n.* अद्वातद्वा फटकळ भाषण *n.* also Blather. Bleth'ering *p. a.* फाजील, वडबड्या. Blath'erskate, Blath'erskite (*Amer.*) *n.* बडबड्या *m.*

Bletonism (blē'-ton-izm) [after one *Bleton*, of France.] *n.* जमिनींत पाणी कोठें सांपडेल हें शोधून काढण्याची विद्या *f,* ब्लीटनची पाणी सांगण्याची विद्या *f.*

Blew (blōō) *pa. t.* of Blow.

Blight (blīt) [Possibly from *be* & *light*, the original meaning being perhaps to scorch or blast as by lightning; M. H. Ger. *blieze*, Ger. *blitz*, lightning.] *n.* पीक बिघडविणारा रोग *m,* फळांचा-धान्याचा रोग *m,* वीट *m,* चिकटा *m,* मेकाडा *m,* लाखा *m,* टाका *m,* मोवा or मवा *m.* [B. AS ATTACKING FIELDS OF WHEAT, &C. तांबरा OR तांबारा *m,* तांब *f,* गेरवा *m.* B. ATTACKING THE GRAIN *zondhala* अंगारा *m,* काजळी *f,* कोळशी *f,* खैरा *m,* मकळी *f.* B. ATTACKING RICE CROPS पीस *f.* B. ATTACKING THE MANGO, &C. भिरड OR भेरूड *n. m.* TO BE AFFECTED BY IT भिरडणें OR भेरुडणें. B. AS INDICATED BY THE CURLING UP मुरटी *f.* TO BE AFFECTED BY IT मुरटणें.] २ नाश करणारा. ३ आशाभंग करणारा. ४ बेत फिसकटवणारा. ५ नाश करणारी वस्तु *f.* Blight *v. t.* चिकटा पाडणें, रोग पाडणें, टाका *m*-ताका *m*-मोवा *m.* पाडणें. [To BE BLIGHTED ताकाळणें, ताका *m*-रोग *m*-&c. पडणें *in con.*] २ आशाभंग करणें; as, To B. hopes. B. *v. i.* नाश होणें. Blighting *a.* मेकाडा रोग उत्पन्न करणारें. २ नाश करणारें. ३ आशाभंग करणारें.

*N. B.*—Generally Blast is applied to Vegetables and Blight to Corn and Fruits.

Blind (blīnd) [A. S. *blind*, turbid or cloudy, allied to Blend, which see.] *a.* अंध, *pop.* अंधळा, नेत्रहीन-रहित, हीनचक्षु, प्रज्ञाचक्षु (from birth), दृष्टीवेगळा, डोळे-फुटका.-in covert phraseology धृतराष्ट्र. [B. BY NIGHT रातांधळ्या, रातांधळा, रात्र्यंध, निशांध. B. BY DAY दिवसांधळा,

दिनांध, दिवांध. BLINDISH दीडडोळ्या, दीडडोळ्याचा, अर्धेडोळ्या, अंधकल्प. STONE BLIND निपट अंधळा. TO BECOME B. आंधळा होणें, डोळे *m, pl.* जाणें-फुटणें *g. of s.*; डोळेगांवचीं कवाडें *n. pl.* लागणें, डोळ्यांची मित *f*-होणें, डोळ्यांचीं खोगरें *n. pl.* होणें, (THROUGH RICHES, HONOUR, &c.) डोळ्यांवर धूर *m* येणें]. २ (of one eye) एकडोळ्या, काणा (?), एकाक्ष, एकनेत्र. [in covert phraseo. शुक्राचार्य.] ३—boils, tumours, &c. मुका. ४ *undiscerning* (of persons) मुळींच विचार न करणारा, विवेकशून्य (S), विवेकहीन (S), असमंजस, समजूत घेण्यास नाखूष, न्याय करण्यास किंवा सारासार विचार करण्यास नाखुश-ष. ५ *inconsiderate*- (of actions, &c.) अविचाराचा, अविविवेकाचा, असमंजसपणाचा; as, B. wrath. ६ झांकलेला, किर्र अंधकाराचा, बंद; as, B. paths, B. mazes. ७ गुप्त, अदृश्य. ८ वांझ, पुष्पें किंवा फळें न धरणारा; as, B. buds, B. flowers. ९ समजण्यास किंवा उकलतां येण्यास अशक्य, दुर्बोध; as, A B. writing. Blind *n.* (खिडकीचा) पडदा *m*, आडपडदा *m*, अंतःपट (*), *pop.* अंतरपट (*) *m*. २ (for a bullock) झांकणी *f*, झांपणी *f*, झापडी *f*, ढांकणी *f*, ढांपणी *f*. (or डोळे ढांपणें *n*, डोळे झांकणें *n*. &c.), झोपणें *n*. ३ *pl.* घोड्याच्या डोळ्यावरचीं झांपणें *n. pl*, अंधेऱ्या *f. pl.* ४ *anything intended to conceal one's real design* हुलकावणी *f*, भुलकावणी *f*, फटवण *f*, फसवणी *f*. ५ *a pretence, a pretext* निमित्त *n*, ढोंग *n*. [As a B. निमित्तास.] B. *v. t. to deprive of sight* आंधळा करणें, डोळे *m. pl.* फोडणें-काढणें *g. of o., colloq.* सळई *f*, फिरवणें. २ *fig. to darken the understanding* डोळे *m. pl.* बांधणें, दृष्टि *f.* बंद करणें, डोळ्याला पाटा *m*. बांधणें, डोळ्यांवर पडळ *n*- झांपण *f*. घालणें, डोळ्यांत माती घालणें, छकावणें. ३ बुद्धिभ्रंश करणें; as, Blinded by passion. Blind'age *n.* लांकडाचा तट *m*, लांकडी झांपण *n*. तोफेचे गोळे आपणांवर पडूं नयेत ह्मणून हें उभारतात. Blind-alley *n.* एका बाजूनें बंद गल्ली *f.* Blind-axle *n.* मुका आंस *m*, फिरता पण गति न देणारा आंस *m*. Blind-coal *n.* ज्वालेशिवाय जळणारा कोळसा *m*, रसरसीत कोळसा *m*. Blind-door or -wall हवा किंवा उजेड आंत येण्यास मार्ग नसलेला दरवाजा *m*- किंवा भिंत *f.* Blinded *a.* अंधळा केलेला, डोळा फोडलेला, अंधीकृत. Blind'er *n.*. Blinders *n. pl.* For meaning see Blind *n.* (3). Blind-fold *a.* डोळे बांधलेला, बांधडोळ्याचा, आवृतनेत्र. २ *fig.* बुद्धिभ्रंश झालेला. B.-fold *v. t. to cover the eyes of* डोळे *m. pl.* बांधणें *g. of o.*, पडदा *m*- अंधेरी *f*-झांकणी *f*- &c. बांधणें-घालणें-देणें, *fig.* गणेशटोपी *f.* घालणें. २ (चा) मार्ग चुकविणें. Blind'ing *a.* Blind'ly *adv.* डोळे झांकून, मार्ग पुढें न पाहतां, डोळे मिटून, डोळे न उघडतां. २ विचार न करतां. Blind'ness *n.* अंधळेपणा *m*, अंधत्व *n*, अंधावस्था *f*, नेत्राभाव *m*. [NIGHT B. श्लेष्मविदग्धदृष्टि, रातांधळेपणा *n.*] २ *fig.* अंधळेपणा *m*, अंधत्व *n*, विचाराराहित्य *n*, बुद्धिभ्रंश *m*, अविवेक *m*. ३ असमंजसपणा *m*. Blind-shell *n.* बिनबाराचा किंवा न फुटणारा कुलपी गोळा *m*. Blind-side *n.* मर्मस्थान *n*, *fig.* गुह्यस्थान *n*, लंगडें *n*, उघडें नागवें *n*. सहज हल्ला करून जिंकतां येईल अशी बाजू *f*, बरोबर संरक्षण न केलेली बाजू *f*, आपलें व्यंग आपल्याला बरोबर दिसत नाहीं अशी बाजू *f.*

*N. B.*—अंतःपट or अंतरपट, as given by Mr. Candy, is not a blind but is now a technical word meaning a wedding-curtain held between the bride and the bridegroom at the time of the wedding.

Blindman's buff (-buf) [Blindman's and buff, from O. Fr. *bufe*, Fr. *buffe*, a blow. Vide Buffet.] *n.* आंधळी कोशिंबीर. (हा एक प्रकारचा खेळ आहे.) Blindman's holiday (humourous) *n.* सकाळपासून संध्याकाळपर्यंतचा वेळ *m*, उजेडाचा काळ *m*, आंधळ्याचा सुटीचा काळ. Blindman's lantern *n.* आंधळ्याची काठी *f.*

Blink (blingk) [M. E. *blenken*, to shine, to glance.- A. S. *blanc*, white, from *blican*, to shine.] *v. i.* (दिपून-दिपेनें) डोळे लुकलुकणें, डोळे पिटपिटणें, डोळे पिटपिट हालणें. B. *v. t.* डोळे लुकलुकविणें, *fig.* कानाडोळा करणें, डोळेझांक-पाहिलें न पाहिलें-टाळाटाळ करणें, टाळणें. B. *n.* अर्धवट पाहणें *n*, अर्धवट दर्शन *n*. २ उजेडाची झांक *f.* Blink'ard *n.* लुकलुकडोळ्या, लुकलुक्या डोळ्यांचा माणूस *m*. Blinked *p. a.* Blink'er *n.* डोळे लुकलुकविणारा. Blinkers *n. pl.* घोड्याच्या अंधेऱ्या. २ एक प्रकारचा चष्मा (उपनेत्र). Blinking *a.* (v. V.)-*act.* डोळे लुकलुकणें-लुकलुकविणें *n*, &c., उघडमीट *f*, उघडझांक *f*, मिचमिच *f*, निमेषोन्मेष *m*.

Blirt (blirt) *n.* रडण्याचा हुंदका *m*, एकदम रडणें *n*. B. *v. i.* एकदम हुंदका येणें.

Bliss (blis) [A. S. *bliss*, joy. Bliss is of the same origin as Blithe, the meaning of *bliss* and that of *bless* have mutually influenced each other since an early period and now there is a gradual tendency to withdraw from earthly blitheness to the beatitude of the blessed in heaven or that which is likened to it.] *n. the highest degree of happiness* आनंद as in सच्चिदानंद (सत्+चित्+आनंद), परमानंद *m*, परमसुख *n*, सुखावस्था *f*, सौख्य *n*. २ परमसौख्यकारण *n*; as, "A withered violet is her bliss." २ कृतकृत्यता *f*, कृतार्थता *f*, धन्यता *f*. ३ परमपद *n*, सुखपद *n*, स्वर्गसुख *n*. ४ *fig.* स्वर्ग *m*. Blisses *pl.* Bliss'ful *a.* सुखदायक, सुखाचा, परमानंदाचा, परमसुखाचा, सुखमय, आनंदमय; as, Blissful solitude. Bliss'fully *adv.* Bliss'fulness *n.* Bliss'less *a.*

Blissom (blis'sum) [Cf. Icel. *blœsma*, of a goat in heat.] *a.* विषयातुर, कामातुर.

Blister (blis'tėr) [O. Fr. *blestre*, tumour.-Icel. *blaster*, a blast, a swelling; A. S. *blaesan*, to blow.]

*n. med.* (पलिस्तर मारून येणारा) फोड *m*, फुगा *m*, फुगारा *m*, पोपडा *m*, स्फोट *m*. २ फोड आणणारें औषध. *n*, प्लास्तर *n*, स्फोटकर औषध *n*, प्रस्फोटक *m*. ३ *photo.* फुगारा *m*. B. *v. t.* फोड आणणें. B. *v. i.* फुगा येणें, फोड उठणें, फोपेणें (*obs.*), फोपसणें, उफणणें or उफाणणें, फोड आल्याप्रमाणें फुगणें. Blister-plaster *n*. स्फोटकर पलिस्तर *n*. Blister-steel, Blistered-steel *n*. पोलादाचा पृष्ठभाग कांहीं रीतीनें कठीण करण्याच्या कृतीमध्यें कांहीं रसायनद्रव्यांच्या योगानें ज्याच्यावर पोपडे उठतात तें. ज्यावर पोपडे येतात असें अपूर्णशुद्ध पोलाद, पोपड्यांचें पोलाद. Blis'tery *a*. फोडांनीं भरलेला.

Blithe (blīth) [A. S. *blithe*, joyful.] *a*. सुस्वभावाचा व आनंदी, उल्हासी, सदाहसतमुख, गुलहौशी, हास्यमुख, रंगेल. Blithe'ful, Blithe'some *a*. आनंदी, आनंददायक. Blithe'ly आनंदीपणानें, आनंदवृत्तीनें, उल्हासीवृत्तीनें. Blithe'ness, Blithe'someness *n*. आनंदीपणा *m*, उल्हासीपणा *m*, आनंदवृत्ति *f*. Blithe'somely *adv.*

Blizzard (bliz'ard) [vide Blaze, a flame.] *n*. आकाशांतील बर्फाचे ढग इकडून तिकडे नेणारा झंझावात *m*, (आकाशांतून पडलेल्या) बर्फाचें वावटळ *n*. Blizz'ardly *adv.* Blizz'ardous *a*.

Bloat (blōt) [Dan. *blod*; Sw. *blot*, soft.] *v. t.* (रक्तांतील पाणी त्वचेच्या खालीं जमून) फोड आणणें, फुगविणें (applied to fish). २ (R.) *fig.* गर्वानें फुगवणें, माजवणें, उन्मत्त करणें. B. *v. i.* (रक्तांतील पाणी *serum*, त्वचेच्या खालीं) जमून फोड येणें, फोपसणें, घोदरा चढणें, फुगणें, कापुसणें *idio.*, वातपुष्ट होणें. Bloated *a*. फोपशा, कापश्या, सुटलेला, फुगलेला, गुरगुरीत (?), वातपुष्ट, पेजट (?), घोदल्या, गदेल्या. २ गर्वानें फुगलेला. ३ फाजील मोठा; as, B. armaments. Bloatedness *n*. फोफशी *f*, फूग *f*, शोफा *f*, शोफ *f*, फुगवटी *f*, फुगवशी *f*. Bloater *n*. एक प्रकारचा फोपशा मासा *m*.

*N. B.*—इंग्लिश Bloated शब्दाचा अर्थ वेडौल व वाह्यगोल फुगलेला असा आहे. तो अर्थ गुरगुरीत व पेजट शब्दांत मुळींच नाहीं. गुरगुरीत व पेजट शब्दांत बाह्यगोलतेची व वेडौलपणाची कल्पना मुळींच नाहीं. गुरगुरीत ह्मणजे एकसारखा वाटोळा फुगलेला व पेजट ह्मणजे फुगलेला पण निस्सत्व.

Blob (blob) [This word belongs to the root of *blub*, *blubber* perhaps *blow*, to puff. See Bleb.] *n*. चिकचिकीत पदार्थाचा थेंब *m*. २ मऊ व वाटोळा पदार्थ *m*. ३ फोड *m*. ४ (R.) फुगा *m*, बुडबुडा *m*. Blobber *n*. (*obs.*) बुडबुडा *m*. Blobber lip *n*. बावरओंठ *m*, जाड ओंठ. Blobber-lipped *a*. जाड ओंठांचा.

Block (blok) [Fr. *bloc*, a log or mass.] *n*. *a mass of wood, a chump, a clump* ओंडा *m*, ठोकळा *m*, ढोणका *m*, टोणका *m*, टोणपा *m*, ढोणपा *m*, खोड *n*, ओंडकूर *n*, ढोणकूर (*obs.*) *n*, करंडा (R) or करांडा *m*, कांडका (*obs.*) *m*, कोंडका (*obs.*) *m*, ढोण (*obs.*) *n*. २ (of stone, &c.) गुंडा *m*, ठेकी *f*, चिरा *m*. ३ *pulley-block* कप्पा *m*, *dim.* कप्पी *f*-or कपी *f*. [Rope confining it चावी *f*.] ४ *chopping block* (of carpenters, &c.) घोडी *f*, वाघी *f*, सकोटन (ण) *n*, सांकटन (णं) *n*, नेहा (*obs.*) *m*. ५ (of buildings) वाडा (not in the sense of palace) *m*, वाडगें *n*, समुदाय *m*; as, A B. of houses. ६ लास *m*, पायाचा ठोकळा *m* (now used by shoe-makers). ७ (शिरच्छेदाचा) ठोकळा *m*. [CHIPS OF THE SAME B. एके माळेचे मणी *m. pl*, एके आईचीं लेंकरें *n. pl*, एके झाडाचीं फळें *n. pl.*] सांकटा *m*, &c., (उभें राहून घोड्यावर चढण्याचा) ठोकळा *m*. ८ चारी बाजूंना रस्ते असलेला भाग *m*-वाडी *f*. ९ *a frame on which to make any thing* (टोप्या वगैरे करावयाचा) लांकडी सांचा-ठोकळा *m*. १० (घर्षणाच्या धातूखालील) ठोकळा *m*. ११ ('ब्लॉक'पद्धति) अवरोधनपद्धति चालू असलेला आगगाडीचा भाग *m*. १२ *print.* कायम ठशांचा ठोकळा. १३ (*obs.*) मूर्ख *m*, टोणपा *m*. १४ अडथळा *m*, विघ्न *n*. Block *v. t. to stop up* अडवणें, रोधणें, रोध *m*-अवरोध *m*-&c. करणें *g. of o.*, कोंडणें, बुजवणें, बुजणें, मुंदणें (*obs.*) or मुंधणें (*obs.*). २ (टोपी किंवा पागोटें) ठोकळ्यावर तयार करणें; as, To B. a hat. Block-head *n*. मूर्ख, घोंडा *m. fig.* टोणपा *m*, ठोंबा or ठोंब्या, गावदी (ढी). Block-headed *a*. ठोंब्या. Blockade' *n*. कोंडमारा *m*, कोंडमार *m*, कोंडी *f*, कोंडणी *f*, वाटकोंडी *f*, वाटबंदी *f*, नाकेबंदी *f*. २ *fig.* लष्करी चौकी. [TO RAISE A B. वेढा उठविणें.] B. *v. t.* कोंडमारा *m*-कोंडी *f*-वाटकोंडी *f*-नाकेबंदी *f*-&c. करणें *g. of o.* २ अडथळा करणें. Blocked *p*. कोंडलेला, बुजलेला, बंद, रुद्ध, अवरुद्ध. [To be B. बुजणें, कोंदणें, कोंदाटणें, मुंदणें (*obs.*), मुंधणें (*obs.*), रोधणें (R), रुधणें (*obs.*).] Blockad'er *n*. कोंडणारा, अवरोधक. २ गराडा घालणारा. ३ कोंडमारा करणारें गलबत *n*. Block'age *n*. कोंडून ठेवलेली स्थिति *f*. Block-book *n*. (कोरलेल्या लांकडी) ठोकळ्यावरून छापलेलें पुस्तक *n*. Block-house *n*. लांकडी किल्ला; असा किल्ला लढाईंत संरक्षणाकरितां करितात, व ह्यांतून तोफा सोडतां याव्या ह्मणून भिंतींत भोंकें ठेवलेलीं असतात. Blocking *n*. (v. V.) *-act* कोंडणें *n*, कोंडी *f*, कोंडणी *f*, अवरोध *m*, अवरोधन *n*. Block'ish *a*. मंदबुद्धीचा, टोणपा. Block-printing *n*. कोरलेल्या लांकडी ठोकळ्यावरून छापणें *n*. Block-ship *n*. शत्रूला अडविण्यास उपयोगीं पडणारें लढाऊ जहाज *n*. Block-system *n*. रेल्वेच्या एका भागांत एक गाडी असतां दुसरी गाडी त्याच भागांत त्याच दिशेनें न येऊं देण्याची पद्धत *f*. Block-tin *n*. जस्ताच्या लगडी *f, pl.* -किंवा विटा *f, pl.* To block out आकारास आणणें, नियमित स्वरूप देणें, स्थूल मानानें रेखणें, स्थूल प्रमाण ठरविणें; as, To B. out a plan.

Blood (blud) [A. S. *blod.*] *n*. रक्त *n*, रुधिर *n*, शोणित *n*, *colloq.* लाल पाणी *n*. [B. VOMITED ON THE BITE OF CERTAIN SERPANTS झेंडू *m*. IN COLD B. कोणी चिथावलें नसतां, थंड्या पोटानें (*idio.*), थंडाईखालीं, पूर्ण विचारांतीं, मागला पुढला विचार करून, संथपणानें. IN HOT B. (रागाच्या किंवा इतर) मनोविकाराच्या अमलांत, चिथव-

णीनें, चाळवल्यावरून. VITIATION OR DISORDER OF B. रक्तविकार *m*, रक्तदोष *m*. TO RUN WITH B. (A SORE) &c. रक्तावर्ण-रक्ताळणें.] २ *high birth* कुलीनता *f*, आभिजात्य *n*, अभिजातता *f*, कुलश्रेष्ठता *f*, सद्वंशता *f*; as, A man of B. ३ एका रक्तमांसाचा संबंध *m*, *spec.* सहोदरसंबंध *m*, एके घराण्याचा संबंध *m*; as, Allied by B. [ Brother of whole blood सहोदर *m*, सखा भाऊ. Brother of half blood सावत्र भाऊ, दुधभाऊ]. ४ *a fast or foppish man* फांकडा *m*, फंदी *m*, रंगेल *m*, रंग्या *m*. ५ *disposition, mood* मनाची तब्यत *f*, स्वभाव *m*; as, B. inclined to mirth. ६ क्रोध *m*; as, His B. was up. ७ रक्तस्राव *m*, रक्तपात *m*, रक्ताचा सडा *m*; as, "Blood only can atone for blood." ८ खून *m*, हत्या *f*. ९ हिंसकता *f*, रक्तप्रियता *f*; as, "Nor gives it satisfaction to our blood." १० *a hot spark, a man of fire* तलख मनुष्य *m*. ११ रक्तवर्ण-तांबडा द्रवपदार्थ *m*; as, "He dipped his hand in the B. of grapes." B. *v. t.* रक्त काढणें. २ रक्तानें भरणें. ३ संवकवणें, रक्ताची संवय लावणें; as, "It was most important that his troops should be blooded." B. *a.* उच्च जातीचा. Blood-baptism *n.* See Baptism. Blood-bespotted *a.* रक्ताचे डाग पडलेला, रक्तसिंचित, रक्ताक्त. Blood-boltered *a.* रक्ताच्या सड्यानें भिजलेला. Blood-bought *a.* जीव बळी देऊन घेतलेला, लढाईत जिंकलेला. Blood-brother *n.* एका रक्ताचा-सख्खा बंधु *m*. Blood-coloured *a.* *red* रक्तासारखा लाल, रक्ताच्या रंगाचा, रक्तवर्ण. Blood-diseases *n.* रक्तविकार *m. pl.* रक्त नासल्यामुळें- रक्ताधिक्यामुळें-रक्त बरोबर न खेळल्यामुळें होणारे सर्व विकार *m*, *pl.* Blooded *a.* रक्ताचा. Cold B. शीत रक्ताचा, गूढवर्चा, एकदम राग न येणारा, थंड्या रक्ताचा, थंडा (पाणीदार-तरतरीत नव्हे असा), धिम्या स्वभावाचा. Hot B. उष्ण रक्ताचा, तापट, तलख, तरतरीत. Blood-frozen *a.* गारठलेल्या रक्ताचा. Blood-guiltiness *n.* खुनाचा अपराध *m*. Blood heat *n.* मानवी उष्णता *f*, (मनुष्याच्या) रक्ताइतकी उष्णता *f* (98½° *Fahr.*). Blood-horse *n.* अस्सल अवलादीचा घोडा *m*, उंची-अव्वल-खंदा घोडा *m*. Blood-hound *n.* रक्तप्रिय शिकारी कुत्रा *m*, वासावरून माग लावणारा शिकारी कुत्रा *m*. (*fig.*) २ खुनी मनुष्य *m*. Blood'ily *adv.* Blood'iness *n.* (v. N. 1.) रक्ताचा डागीलपणा *m*, रक्तांकितत्व *n*. &c. २ रक्तानें भरलेलेपणा *m*, रक्तबोंबाळपणा *m*, &c., रक्ताक्तता *f*. ३ खुनीपणा *m*, घातुकपणा *m*, हिंस्रता *f*. Blood'less *a.* रक्तशून्य-रहित-हीन-&c., नीरक्त, पिकुटलेला. Blood-letting *n.* नस तोडून रक्त काढणें *n*, रक्त काढणें *n*, रक्तमोक्ष *m*. Blood-money *n.* रक्ताचा पैसा *m*, खुनी खटल्यांत अथवा खून करून मिळविलेला पैसा *m*. २ (खुनाच्या खटल्यांत) खोटी साक्ष देऊन मिळविलेला पैसा *m*. ३ खुनाच्या नुकसानीचा मोबदला. Blood-poisoning *n.* विषजन्य रक्तविकार *m*, रक्तगतविषदोष *m*, विषार होणें *n*. Blood-rain *n.* रुधिरवर्षाव *m*- वृष्टि *f*. Blood-relation *n.* एका रक्ताचा-एकरक्तीसंबंधी, सहोदरत्व *n*, सापिंड्य *n*. Blood-sacrifice *n.* प्राणत्याग. Blood-shed, Blood-shedding *n.* रक्तपात *m*, रक्तस्राव *m*, रक्ताचा सडा *m*. Blood-shot *a.* Blood-shotten *a.* *shot or suffused with blood* राता, रातड, आरक्त, तांबडट, तांबूस. [To become B. (eye) खरावणें, खडुळणें, तळावणें (R)]. Blood-shottenness *n.* रात *m*, नेत्रराग *m*. Blood-sized *a.* रक्तासारखा लाल केलेला-रंगवलेला. Blood-spavin, see Spavin. Blood-stained *a.* रक्तानें भिजलेला-डागळलेला. २ *fig.* खुनाचा अपराधी. Blood-stone *n.* एकप्रकारचा रक्त थांबवणारा दगडी ताईत *m*. Blood-sucker *n.* रक्त शोषणारा प्राणी *m*. २ *esp. the leech* जळू *f*. ३ *fig.* जुलुमाचा कर घेणारा *m*. Blood-tax देशांतून कांहीं कामाकरितां कांहीं लोक कर म्हणून घेणें. Blood-thirstiness *n.* रक्तप्रियता *f*, खुनी स्वभाव *m*, घातुकपणा *m*, अघोरपणा *m*, हिंस्रता *f*, जिघांसा *f*. Blood-thirsty *a.* हिंसक, हिंसालु, हिंस्र, जिघांसु, रक्तप्रिय. Bloody *a.* *stained with blood* रक्ताचे डागाचा, रक्तानें डागळलेला, रक्त लागलेला, रक्तांकित. २ *Covered with blood* रक्तानें भरलेला-माखलेला-न्हालेला, रक्तबोंबाळ, रक्तानें बोंबाळ, रक्तावलेला, रक्तमय. ३ *bloody-minded* खुनी, रक्तप्रिय, हिंसक, घातुक, जिघांसु, हत्यारा, क्रूर. ४ *attended with blood-shed* रक्तपाताचा, रक्तस्रावाचा, कत्तलीचा, रक्ताचा पूर वाहलेला. [BLOODY-FLUX *n.* रक्ताची हगवण *f*, रक्तातिसार.] B. *a.* & *adv.* अतिशय, फार; as, Bloody drunk, Bloody hot, Bloody fool, &c. B. *v. t.* *to make bloody* रक्तानें तांबडा करणें. Bloody-bones *n.* बागुलबोवा *m*. Bloody-minded *a.* क्रूर, घातकी. Bloody'mindedness *n.* Bloody-sweat *n.* रक्तमिश्रित घाम *m*. Avenger of blood (खून झालेल्या मनुष्याच्या वतीनें त्याच्या) खुनाचा सूड घेणारा (जवळचा नातलग) *m*. Blood and iron policy *war policy* युद्धप्रवर्तक असें राज्यनीतीचें धोरण, दंडुकेशाई *f*, ऊठ कीं मार हा कायदा *m*, दंडुक्याचा कायदा *m*, दंडणनीति *f*. Blood is thicker than water आप्तसंबंध इतर संबंधांपेक्षां अधिक जिवाक्याचा असतो. Flesh and blood *lit.* रक्तमांस *n*. २ *fig.* मनुष्यस्वभाव *m*, मनुष्य *m*. ३ पोरेंबाळें *n*, *pl*, नातेवाईक *m*, गोतवळा, आप्तजन. It makes one's blood boil त्याच्या योगानें रक्त कढतें-अंगाचा तिळपापड होतो-राग येतो. It runs in the blood पिंडांतच तें आहे, तें आनुवंशिक आहे. It stirs up bad blood त्याच्या योगानें मत्सर *m*- द्वेष *m*. जागृत होतो. Prince of the blood राजवंशी *m*, राजपुत्र *m*. In blood पूर्ण आवेशांत, पूर्ण उमेदींत, पूर्ण भरांत. The blood राजवंश *m*. Young blood तरणे लोक *m*, *pl*, तरुण बांड *m*, तरुणपिढी *f*. २ ताज्या दमाचा सभासद *m*. ३ नवीन भागीदार *m*; as, "To bring young blood into the concern."

Bloom (blōōm) [Dut. *bloem*; Ger. *blume*, a flower; see Blow.] *v. i.* (plant) *to blow* फुलणें, विकसणें. २ *to look fresh* टवटवणें, टकटकणें, लुसलुसणें- टवटवीत

&c. दिसणें. ३ *fig.* अंगांत वाढत्या रक्ताचा जोर असणें. B. *v. t.* (*obs.*) मोहोर आणणें. २ *to cloud a varnished surface* रवा किंवा कांटा आणणें. B. *n. opening and ripening state* विकास *m*, विकसनावस्था *f*, विकसनदशा *f.* २ (of youth) नवतीचा बहर *f. m*, यौवनभर *m*, तारुण्यभर, तारुण्यावस्था *f*, प्रौढावस्था; as, The B. of youth. ३ *freshness or loveliness of look* टवटवी *f*, टकटकी *f*, विकासतेज *n*, तजेला *m*, तजेली *f*, उजळा *m*. ४ (फुलावर किंवा फळावर आलेला) रवेदार कांटा *m*; as, "A new, fresh, brilliant world with all the B. upon it." ५ *fig.* मोहकता आणणारा गुण *m*-पदार्थ *m*. ६ (चित्रावरच्या वारनिसाला आलेली) धुरशी *f.* ७ (कमावलेल्या कातड्यावर आलेला) पिवळा रवा *m*. ८ एक प्रकारचा मौल्यवान् खनिजपदार्थ *m*. ९ टवटवी *f*, टकटकी *f*, पूर्णविकासाची मोहकता *f*; as, "The plan of the dictionary would have come out with more B. if it had not been seen before by anybody". Blooming *p. a.* (v. V. I.) फुलता, विकसता, नवतीचा. २ टवटवीत, टकटकीत, तजेल्याचा, टवटवींचा, &c. In the bloom of life तारुण्याच्या भरांत, यौवनभरांत. *N. B.*—Bloom, Blossom and Flower. Flower म्हणजे पुष्प. हा शब्द अतिव्यापक आहे. Blossom म्हणजे फलोत्पादक पुष्प, मोहोर. Bloom म्हणजे पूर्ण विकासलेलें पुष्प. Bloom ह्या शब्दांत पूर्णविकासाची कल्पना प्रधान आहे; Blossom ह्या शब्दांत फलोत्पादकत्वाची कल्पना प्रधान आहे. Flower ह्या शब्दांत शेलकेपणाची किंवा वेंचकेपणाची कल्पना प्रधान आहे. The Bloom of youth पूर्णयौवन, यौवनभर, नवतीचा बहार. The Blossom of youth यौवनारंभ, पौंगडावस्था, तारुण्याचा मोहोर, नवतीचा आरंभ. The Flower of youth तारुण्यांतील शेलका भाग.

Bloom (blōōm) [A. S. *bloma*, a mass, a lump.] *n. the rough mass of iron from the puddling furnace.* अशुद्ध खनिज लोखंड शुद्ध करण्याच्या पहिल्या कृतीचे अंतीं तयार झालेला लोखंडाचा गट. Bloomery वरप्रमाणें तयार झालेलें लोखंड ठोकून कांहीं प्राथमिक आकार देण्याचें यंत्र.

Bloomer (blōōm'er) [From Mrs. *Bloomer*, an American lady who sought to introduce this style of dress.] *n.* ब्लूमरपोषाख, बायकांचा एक प्रकारचा पोषाख *m*, हा हुबेहुब पुरुषांच्या पोषाखासारखा असतो. ह्या पोषाखांत रुंद पट्ट्याची टोपी *f*, घोट्याभोंवतीं जमणारी पोकळ तुमान आणि छोटेखानी कमरेचा कबजा *m*. हीं असतात.

Blossom (blos'om) [A. S. *blosma*, *blostma*, a flower, akin to Dut. *bloesem*; L. *flos.*] *n. bot.* (फलोत्पादक) पुष्प *n*, मोहोर *m*, फूल *n*, पुष्प *n*. [OF THE MANGO AND SOME OTHER TREES मोहोर *m*, मोहर *m*, केसर *m*, *n*, मंजरी *f*. BARREN B., BLIND B. वायफूल *n*, वांझफूल *n*.] २ Collectively (एकाच झाडाचा) पुष्पसमुदाय *m*; as, "The plant is in blossom." ३ भावी उत्कर्षसूचक काल *m*-कारण *n*-वस्तु *f*, भरभराटीचा पूर्वकाळ *m*, टवटवीतपणा *m*; as, In the blossom of youth. ४ तेल्याभोर आणि पांढऱ्या केसाच्या घोड्याचा रंग *m*. Blossom *v. i.* फुलणें, फुलास येणें, फुलें *n. pl.* येणें *in. con.* [THE MANGO AND SOME OTHER TREES मोहरणें, केसरणें, मोहोर येणें.] २ *fig. to flourish and prosper* उत्कर्ष होणें, भरभराट होणें, फुलणें; as, "Israel shall B. and bud and fill the face of the world with fruits". Bloss'oming *pr. p.* Bloss'omy *a.* नवतीचा, नवनवतीचा. In blossom पूर्ण मोहोरलेला. २ पूर्ण उदयांत, मुग्धावस्थेंत.

Blot (blot) [Icel. *bletter*, a spot, a stain.] *n.* (as of ink) डाग *m*, बोळा *m*, ठिपका *m*. २ *a slur, a stigma, a stain* डाग, ठपका *m*, काळें *n*, कलंक *m*, खोड *f*, काळि (ळि) मा *m. f.* B. *v. t.* (as with ink) भरणें, भरविणें, ठिपकाळणें, बोळा *m*. पाडणें-घालणें, डाग *m*. लावणें, डागील करणें. २ (कांहीं लिहिलेलें किंवा छापलेलें) टिपणें; as, To B. a written paper. ३ *to sully, to soil, to blur, to stain* डागाळणें, डाग *m*. लावणें, डाग *m*. पाडणें, कलंक *m*. लावणें, डागील करणें. ४ (with *out*) *to obliterate, to efface* पुसणें-पुसून टाकणें; as, "One victory like this blots out ten thousand former defeats." बोळा *m*. पोतेरें *n*. &c. घालणें-फिरवणें, काळा करणें, काळें *n*-शाई *f*. घालणें. ५ अंधारांत किंवा छायेंत झांकून ठेवणें; as, "He sung how earth blots the moon's gilded wane". *Cowley*. B. *v. i.* शाई ओढून-शोषून घेणें; as, This paper blots easily. Blotter, Blotting-paper *n.* शाई टिपण्याचा कागद *m*, टिपकागद *m*. २ *a rough note-book* कच्चें नोंदबुक. Blot'ty *a.* ठिपक्यांचा. To be blotted out of mind मनांतून काढून टाकणें.

Blot (blot) [Dan. *blot*, naked, bare; Swed. *blott*, naked.] *n.* दोष *m*, व्यंग *m*; as, "Here the critic undoubtedly hit a B."

Blotch (bloch) [A variant of Blot.] *n.* शाईचा काळा डाग *m*. २ काळी पुटकुळी *f*, चकदा *m*, खवला *m*, फोडाचा काळा डाग *m*, चकदळ *n*, चकदा *m*, चकदें *n*, काळीमाव *f.* २ *fig.* अब्रूचा डाग *m*, कलंक *m*. B. *v. t.* पुष्कळ फोड येणें. Blotched, Blotch'y *a.* खवल्यांचा, काळ्या डागाचा.

Blouse (blowz) [Fr. *blouse.*] *n.* सैल व गुडघ्यापर्यंतचा झगा *m*, 'ब्लाउझ.'

Blow (blō) [M. Dut. *blouwen*, (*pa. t.* of *blou*) to strike, to dress flax by beating; Ger. *bläuen*, to beat. The noun appears in the 15th century without evidence of parentage.] *n.* (with a stick, sword, &c.) *a stroke* टोला *m*, आघात *m*, घात (S.) *m*, प्रहार *m*, चटकणी (R.) *f*, झटका *m*, झटकारा *m*, फटका *m*, फटकारा *m*, घसका *m*. २ (with the fist &c.) *a thump* बुक्की *f*, ठोसा *m*, ठोंबरा *m*, ठोमणा *m*, ढुस्सा *m*, भतका *m*, भदका *m*, मुटका *m*, गुद्दा *m*, घुसा (घुस्सा) ढोसरा-ढोसा *m*, मुष्टिप्रहार *m*, मुष्टिमोदक *m*. [SOME MORE FORCIBLE WORDS ARE-रपाटा *m*, धपा(मा)टा *m*,

रवेद-त्त *m*, रवेता (दा), रबका *m*, धब्ब *f*, *n*, रामटोला *m*, रामरट्टा *m*, रट्टा *m.* OR रट्टया *m*, तडाखा *m*, कडाखा *m.*] ३ gener. *a box, buffet, cuff, hit, knock* टोला *m*, बतका or भदका *m*, थाप *f*, आघात *m*, ठोका *m*, घात (S) *m*, ठोक *m*, धमाटा [R] *m.* [B. WITH THE BOTTOM OF THE FIST बुकी *f*, बतका OR बदका OR बुतका *m*, दुबका *m*, &c., धुमका *m*, बुकांदा OR बुकाडा *obs. m*, *dim.* बुकांदी *f.*] [DEAD OR FLAT B. धुस्मा *m.* Heavy B. निर्घात *m*, सज्जर ठोसा. To come to blows हातघाईस-हातघाईवर-हातपिटीस-हातफळीस येणें]. ४ *fig.* (of calamity, misfortune) vide Stroke, धक्का *m*, गचका *m*, गहजब *m*, चट्टा *m*, घसरा *m*, घाला *m.* ५ घाला *m*, एकदम केलेला हल्ला *m*; as, "A vigorous blow might win." [At a blow एका तडाख्यास, विशेष आयास न पडतां; as, "They won the fort at a B." Without striking a B. लढाई *f*, न मारतां, *fig.* विशेष श्रम न घेतां]. ६ (in trade, &c.) *loss* झोका *m*, (v. बस), गोता *m*, (v. खा, बस), *colloq.* चट्टा *m*, घाला *m*, घसरा *m.* ७ *the oviposition of flesh-flies or other insects* असडी or आसडी *f*, आसडा *m*, सडी *f.*

Blow (blō) [A. S. *blawan*, to blow as wind; akin to Ger. *blahen*, to swell.] *v. i.* वाहणें, चालणें, (in gentle puffs) sometimes with the subject it, झुळझुळ *adv.* वाहणें, थंड-मंद वाहणें; as, The wind blows. २ (भात्यानें किंवा तोंडानें) फुंकर-फुंकारा घालणें-मारणें. ३ *to breathe hard, to pant* धापा टाकणें, धापणें, धापळणें; *as*, "Here is Mistress Page at the door sweating and blowing." ४ *to sound on being blown into as a trumpet* वाजणें, नाद देणें-घेणें; as, The trumpet blows. ५ *to pass away without effect* (with *over*) वाहवणें, जिरणें, उडणें, वाऱ्यावारीं-फुकटावारीं जाणें, वायबार होणें *g. of s.*; as, "The storm and the clouds have blown over." ६ (with *up*) भडकणें, उडून जाणें; as, A steam boiler blows up. ७ (with *out*) वाऱ्यानें जाणें-विझणें; as, The fire B.s out. ८ *to talk loudly, to boast, to storm* मोठ्यानें गडबड करणें, वढाई मारणें; as, "You blow behind my back, but dare not say anything to my face." B. *v. t.* वाहवणें, चालवणें, उडवणें, उडवून नेणें; as, The winds B. odours from North to South; the Tempest blew the ship ashore. २ (a wind-instrument) फुंकणें, फुंकून वाजविणें, (आंत फुंक-फुंकारा) मारणें. ३ (a nose, an egg, a gas-pipe, a water-pipe) नाक शिंकरणें, फुंकून झाडणें-साफ करणें. ४ (the fire) धमकणें, फुंकर घालणें; as, To B. the fire. ५ *to destroy by an explosion* (दारूनें-सुरुंगानें) उडवून देणें-फुंकून देणें. ६ (with *out*) फुंकून विझवणें. ७ *to spread by report, to publish* पसरणें, प्रकट करणें, प्रसिद्ध करणें; as, "His language does his knowledge B." ८ (चा) फुगा करणें, फुगवणें; as, To B. bubbles. ९ *to put out of breath* धापा टाकील असा करणें, धापा टाकावयास लावणें, बेदम-बिनदम करणें; as, To B. a horse. १० *to inflate as with pride* गर्वानें फुगवणें: as, "Look how imagination blows him!" Blow-pipe *n.* फुंकणी *f*, धमनी *f.* Blower *n.* (भिंतींतली शेगडीवरची हवा खेळण्याकरितां-धान्य साफ करण्याकरितां-खोलींतील हवा वाढवण्याकरितां ठेवलेली) पट्टी *f.* २ वाहणारा, वाहवणारा &c. ३ *mech. eng.* पंखा. For more meanings, see the verb. 'To Blow' (*v. t.* & *v. i.*). Blowing *n.* (v. V. I. 1.) वाहणें, वाहवणें *n.* &c. &c. For more meanings, see the verb. Blown *p. p.* उडवलेला, उडवून नेलेला. For more meanings, see the verb. Blow'y *a.* To blow away उडवून देणें, वाताहत करणें. To blow down जमिनीबरोबर पाडणें. To blow hot and cold with the same breath असंबद्ध किंवा विसंगत असणें-बोलणें, निश्चयाचा डळमळीत असणें, परस्परविरुद्ध वर्त्तन करणें, क्षणांत रोंख-बेत फिरविणें-बदलणें. To blow off the steam फाजील झालेली वाफ सोडून देणें. To blow one's own trumpet स्वतःचे गुण अतिशयोक्तीनें सांगणें, शेखी मिरविणें, बडेजाव सांगणें. To blow over आपोआप नाहींसा होणें. To blow up a person for some offence खरडपट्टी काढणें. I will blow him sky high मी त्याची चांगली कानउघाडणी करीन. To blow up a scheme एखाद्या बेताची वाताहत करणें. To blow upon कलंक लावणें, अपकीर्ति करणें, निष्फल करणें. २ एखाद्या वस्तूची किंमत *f*-टवटवी *f*-महत्व *n*-कमी करणें. ३ विरुद्ध माहिती देणें; as, "A lady's maid whose character has been blown upon." *Macaulay.*

Blow (blō) [A. S. *blowan*, to blossom; akin to Dut. *bloeijen*; Ger. *bluhen.*] *v. i. to blossom* फुलणें, विकसणें, विकासणें, पुष्पणें (*poe.*), उफलणें, उमलणें. B. *v. t. to cause to blossom* फुलवणें (फुलें), (-चा) विकास करणें; as, "The odorous banks that blow, Flowers of more mingled hue." B. *n.* मंजरी, (पुष्प) विकास.

Blowze (blowz) [A. S. *blysa*, a torch; Dut. *blose*, the redness of the cheeks.] *n.* लाल व मोठ्या गालांची स्त्री *f*, मुसमुसलेली वेश्या *f.* Blowz'y *a.* लाजेनें किंवा श्रमानें तोंड लाल झालें आहे अशी. (Probably from the same root as Blush.)

Blubber (blub'er) [M. E. *blober*, a bubble; *bloberen*, to bubble up, cf. Blob; the 'blubber' of the whale consists of bladder–like cells filled with oil.] *n.* बुडबुडा *m.*; as, "At his mouth a B. stood of foam." २ *the fat of the whale* देवमासा इत्यादि समुद्रांतील विशाल प्राण्यांची चरबी *f*; as, In a large whale the B. will weigh thirty pounds. ३ मोठा देवमासा *m.* ४ *a fat-like substance cast up by the sea* जार *m. f*, गलगल *m.* B. *v. i.* ओकसाबोकसा रडणें, गाल फुगवून-भरून रडणें, तोंड आणि डोळे सुजेपर्यंत रडणें; as, "She wept, she blubbered, she tore her hair." B.

*v. i.* रडून रडून तोंड विद्रूप करणें, अश्रूंनीं तोंड मलीन करणें; as, "Dear Cloe, how blubbered is that pretty face!" २ (with *forth* or *out*) अश्रू ढाळणें, अर्धवट बोलत बोलत रडणें. Blubber cheeks *n.* फुगलेले गाल. Blubber lip *n.* जाड ओंठ *m.* Blubbered *a.* फुगलेल्या गालाचा, सुजलेल्या गालाचा. Blubberer *n.* *one who blubbers* अंसुढाळ्या, अंसुढाळ. Blubbery *n.*

Blucher (blōōch'ẽr) *n.* कमावलेल्या कातड्याचा घोंट्या-इतका अर्धा बूट *m,* 'ब्लूचर.' [इ० स० १८१५ सालीं वाटर्लू येथील लढाईंत प्रशियाचा सरदार मार्शल ब्लूचर याच्या पायांत हा होता. यावरून हें नांव पडलें आहे]. Blucher boot *n.*

Bludgeon (blud'jun) [Goth. *blyggwan*, to strike.] *n.* (प्रहारानें दुखापत करलि अशा) जड मुठीची आंखूड काठी *f,* लोहांगी काठी *f,* काष्ठलौही *m,* परिघ *m,* गदा *f.*

Blue (blōō) [O. Fr. *bleu*.–O. H. G. *blao*, livid.] *n.* *the blue colour* निळा रंग *m,* आकाशासारखा रंग *m.* २ *the sky* आकाश. ३ *the sea* समुद्र; as, "Far out on the blue were many sails." ४ (short for blue stocking) *a learned or pedantic woman* विद्वत्तेची आढ्यता असणारी स्त्री *f,* आढ्यताखोर विदुषी *f.* (contemptuously applied to women.) ५ *pl.* (short for blue devils) पिशाचें *n. pl,* भुतें *n. pl.* ६ *depression of the spirits, despondency* उदासीनता *f,* उद्वेग *m,* विषाद *m.* B. *a.* निळा, श्यामवर्ण. [Dark B. नील (*pop.*) निळा, नीलवर्ण, श्याम, श्यामल. LIGHT B., SKY B. अस्मानी रंगाचा, मेघवर्ण. TRUE B. नीलराग. To LOOK B. *to be confused or terrified* काळवंडणें, उदास-काळा दिसणें.] २ उदास, दिलगिरी उत्पन्न करणारा; as, He looked B. ३ व्यवहारांत फार कडक; as, Blue and sour religionists. व्यवहारांत आणण्यास कठीण अशीं नीतितत्त्वें प्रतिपादन करणारा, कडक नीतीचा, करडा; as, B. laws. ४ *learned* विद्वत्तेची आढ्यता असणारी, विदुषी, ज्ञानाचा तोरा मिरविणारी (applied to women); as, "The ladies were very B. and well informed." *Thackeray.* Blue-beard *n.* [फ्रेंच लोकांत अशी एक दंतकथा आहे कीं ब्ल्यूबिअर्ड नांवाचा एक उमराव होता, त्यानें घर सोडून कांहीं कामासाठीं बाहेर जातांना आपल्या तरुण पत्नीला आपल्या वाड्यांतील अमुक खोली उघडूं नको अशी आज्ञा केली होती परंतु ती मोडून तिनें खोली उघडली तेव्हां तिला आपल्या नवऱ्यानें पूर्वीं मारलेल्या बायकांचीं प्रेतें आढळलीं.] (सदर दंतकथेंतील) ब्ल्युबीअर्डप्रमाणें· राक्षसहृदयी व बहुत स्त्रिया केलेला मनुष्य *m.* Blue-bell *n.* घांटेसारख्या निळ्या फुलांचें झाड *n.* Blue-black *a.* निळाकाळा, *cf.* हिरवापिंवळा. Blue-blood *n.* खानदानीचें रक्त *n,* सरदारी घराणें *n.* Blue-books *n.* निळीं बुकें, पार्लमेंटाचीं रिपोर्ट वगैरेचीं पुस्तकें *n. pl.* हीं पुस्तकें निळ्या पुठ्ठ्यांचीं असतात. Blue-bottle *n.* धान्यांत उगवणारा एक प्रकारचा रोपा *m.* २ मोठ्या व निळ्या पोटाची माशी *f.* ३ पोलिसचा शिपाई. Blue-cap *n.* (*Shakes.*) स्कॉच मनुष्य *m.* Blue-coat *n.* (निळे कपडे घातलेला) खलाशी किंवा शिपाई, लष्करी शिपाई *m.* Blue-devils *n. pl.* दुष्ट पिशाचें, एखाद्या मनुष्याला वायु झाला असतां दिसणारीं भुतें. Blue-eyed *a.* नीलनयन, नीलाक्ष. २ खिन्न, उदास. Blue-funk *n.* मोठें भय *n.* Blue-jacket *n.* (आरमारावरील) निळ्या पोशाखाचा खलाशी *f.* Blue'ness *n.* (v. A.) निळेपणा *m,* नीलिमा *m,* नीलत्व *n.* Blue-peter *n.* मध्यें पांढरा चौकोनी भाग असलेलें निळें निशाण; हें तारूं चालवावयाची खूण आहे. Blue pill *n.* पारदगुटिका *f* (रेचक). ह्या रेचकाचा उपयोग यकृताच्या विकारांत करितात. Blue ribbon *n.* (गार्टराच्या पदवीचे लोकांनीं धारण केलेली सन्मानसूचक) निळी फीत *f.* २ गार्टराच्या पदवीचा सरदार *m.* ३ एखादें मोठें बक्षिस. Blues cobalt *n.* See Cobalt. Blues' copper *n.* ताम्राचा भुरा *m.* Blue-stocking *n.* आपल्या विद्वत्तेचा तोरा मिरवणारी विदुषी स्त्री *f.* Blue-stone, Blue-vitriol *n.* मोरचूत. Blue talk *n.* बीभत्स भाषण *n.* Blue-throat *n.* एक निळ्या गळ्याचा गाणारा पक्षी *m.* Blue-breast *n.* एक निळ्या छातीचा पक्षी *m.* Blue water *n.* महासागर *m.* Blu'ish *a.* निळसर, कांहींसा निळा· Light blue and dark blue फिका निळा आणि काळा निळा. True blue *a.* अस्सल, कडक, लिचापिचा नव्हे असा. To be a blue (एखाद्या कॉलेजच्या किंवा शाळेच्या वतीनें क्रिकेटांत किंवा नौकाक्रीडेंत) सामन्याच्या भिडूंत निवडला जाणें. To drink till all's blue सर्व भोंवतालचें निळें·काळें-हिरवेंपिंवळें-दिसे तोंपर्यंत पिणें. True blue नीलराग. २ कॉन्सरव्हेटिव्ह पक्षाचा कट्टा अभिमानी. True blue will never stain मोठ्या मनाचा मनुष्य आपणास कलंक लागेल अशी गोष्ट करणार नाहीं·

Bluff (bluf) [Dut. *blaf*, plain, level, not sloping but rising straight up.] *a.* दांडगट पण मोकळ्या स्वभावाचा. २ दर्शनी रुंद आणि सपाट असा; as, The B. bows of a ship. ३ उंच होत जाणारा परंतु पसरट मथाळ्याचा; as, A B. shore. ४ धोपटमार्गाचा, सरळ-ठोक, भीडभाड न करतां दिलेला; as, A B. answer. ५ व्यवहारशून्य, शिष्टताशून्य; A B. sea-captain. ६ दांडगट चालीरीतीचा; as, B. king Harry. B. *n.* उंच किनारा *m.* २ *slang. an excuse, a blind* सबब *f,* हुलकावणी. Bluff-boned *a.* रुंद आणि सपाट नाळेची बाजू असलेला. Bluff-headed *a.* रुंद आणि उंच कपाळाचा. Bluff'ly *adv.* Bluff'ness *n.* Bluff'y *a. precipitous* उंच, उभा.

Blunder (blun'dẽr) [M. E. *blondre*, to confuse, to move blindly, formed from Icel. *blunda*, to doze, slumber; Swed. *blunda*, to shut the eyes.] *v. i.* (मूर्खपणामुळें-असंबद्धपणामुळें-अडाणीपणामुळें-डोकें गोंधळून गेल्यामुळें) चुकणें, बहकणें or भकणें, ढोबळ चूक करणें, भ्रमणें, घसरणें, भुलणें, स्खलन *n.* पावणें, प्रमाद *m.* करणें; as, To B. in writing. २ *to flounder and stumble* (जणूं काय डोळे मिटल्यामुळें किंवा गोंधळून) ठोकर लागणें; as, To move in an awkward and blundering manner. B. *n.* घोड्याएवढी चूक *f,*

चुकी f, भूल f, घोडचूक f, ढोबळचूक f, प्रमाद m. २ (in writing or speaking) अवाक्षर n, अशुद्ध n, असंबद्ध n. Blunderer n. Blunder-head, Blunder-headed a. चुकणारा, भकणारा, धांदल्या, गोंधळ्या. Blunder'ing p. a. (v. V.) *one given to blundering* चुकणारा, भकणारा, चुकरा, गफलती or त्या, अशुद्धाळ, भांब्या, भांबळ or ळ्या, झांबऱ्या, धांदल्या, गोंधळ्या. २ ढोबळ चुका करणारा, अडखळणारा. To blunder away एखादी संधी जाऊं देणें, घरीं चालत आलेल्या लक्ष्मीला लाथ मारणें. To blunder on चुका करीत असणें. २ (एखाद्या वेडगळ मार्गानें किंवा चुकतचुकत) आकस्मिक जाऊन पोहोंचणें; as, To B. on a discovery. Blunder'ingly *adv.* चुकत चुकत, चुकतमाकत, चुकतवाकत, चुकत मुकत, घसरत घसरत, प्रमादानें.

Blunderbuss (blun'dėr-bus) [Dut. *donderbus*; Ger. *donner buechse*, a thunder-gun.] *n.* 'बंदरबस,' दमामा m, बकमाल f. २ मोठ्या तोंडाची लहान बंदूक f (पुष्कळ गोळ्यांची.) ३ मूर्ख, टोणपा.

Blunt (blunt) [Sw. *blott*, naked; M. E. *blunt*, *blont*, dull.] *a. not sharp* बोंथा, बोंथट, बुठणा, बोटका, बुंठा or बोंठा, नरम, मऊ, मुंढा, अतीक्ष्ण, अतीव्र, जड, बोध, ठोसर, मोठा, लोणकाप्या, धार बसलेला, बोंथलेला, &c. [To BECOME B. बोंथणें, बोंथटणें, माठणें, बुटणें OR बाठणें, बोळणें, बसणें, बोधणें.] २ *dull* मंद, जड, बोंथट, अतीक्ष्ण, अतीव्र. ३ *roughly plain, open and free-spoken* निखालस, घोपटमार्ग्या, घोपटमार्गी, कडकडीत, खडखडीत, खडखडीत स्वभावाचा, खरमरीत, खसखसीत, खणखणीत, ठसठसीत, सणसणीत, झणझणीत, धडकफडक or धडकभडक, खरपूस, निर्भीड. B. *v. t.* बोथवणें, बोळवणें, बसवणें, धार f. मोडणें-बुझविणें g. *of o.*; धार f. पाणी n-उतरणें g. *of. o.*, निपाणी करणें. २ *fig.* (the feelings or faculties) तीक्ष्णता f-तीव्रता f-प्रखरता f. -&c. घालविणें-कमी करणें. Blunt'ish *a.* मंदसर. Bluntishness *n.* Blunt'ly *adv.* (v. A. 1.) बोथेपणानें. २ मंदाईनें, जडपणानें. ३ *plainly, roundly, downright, outright, plump, smack, flat, slap* धडधडीत, निक्षून, निखालस, हडसूनखडसून, रोखठोक, रोख. ४ चरचरीत, खसखसीत, धडकफडक, धडकभडक, धादांत, साफ, खरपूस. Blunt'ness *n.* (v. A. 1.) बोथेपणा m, &c., मंदाई f, मंदत्व n, मऊपणा m, नरमाई f, अतीक्ष्णता f, अतीव्रता f. Blunt-file *n.* दांते बसलेली कानस. Blunt-witted *a.* मंदबुद्धीचा, मठ्ठ डोक्याचा, स्थूलपिंडबुद्धि.

Blur (blur) [Swed. *blura*, to blink; *lit.* 'to dim.'] *n.* (पुसटलेल्याचा) डाग m. २ कलंक m, दोष m, व्यंग n. B. *v. t.* अस्पष्ट-पुसकट करणें, (दृष्टि) अंधुक करणें, दिपवणें, डोळ्यांवर झांपड आणणें; as, "Her eyes are blurred with the lightning's glare." २ कलंक लावणें, व्यंग काढणें, दोष लावणें (with *out* and *over*). ३ *lit. & fig.* डाग पाडणें, बिघडवणें, घाणेरडा करणें. Blurring *pr. p.* Blurred *p. p.* Blurry *a.*

Blurt (blurt) [Low. Scot. *blirt*, to make a noise in weeping; of imitative origin. This word is expressive of a discharge of breath or fluid from the mouth after an effort to retain it.] *v. t.* (with *out*) *to utter suddenly and inadvertently* (तोंडांतून बाहेर पडूं नये असा प्रयत्न केला असतांहि) भकदिनीं बोलून जाणें, घसकावून बोलणें, भडभडावणें, बोलण्याच्या भरांत गुप्त फोडणें, गुप्तस्फोट करणें, बेसावधगिरीनें बोलणें. B. *v. i.* भकदिनीं बाहेर पडणें. B. *n.* एकदम बोलून गेलेलें भाषण *n.* Blurt'ing *a.* भकदिनीं-घसकावून बोलणारा, आवेशाच्या भरांत न बोलण्यासारखी गोष्ट बोलणारा. Blurter *n.* See the meanings of Blurting. B. *a.* फट(ड)सूळ, फठसाळ, फट्ट्या or फव्या, भडभड्या, फव्यावाबरा (R.).

Blush (blush) [M. E. *bluschen*, *blusshen*, to glow; A. S. *blyscan*, to glow.] *n. colour on the cheeks from shame, confusion*, &c. (v. V.) विनयाची-लाजेची काळोखी f-काळी f-कालिमा f-काळवंडी f, मुखवैवर्ण्य (S.) *n.* २ लाली f, लालरंग m, लालीची झांक f (गालावरील) गुलाबी झांक f-छटा f. (युरोपियन लोक लाजेनें लाल होतात.) [At the first B, At first B. *at the first appearence* सकृद्दर्शनीं, प्रथमदर्शनीं]. B. *v. i. to betray shame or confusion by the face* शरमणें, लाज-शरम-वाटणें, लाजेनें-&c. काळवटणें-काळवंडणें, काळोखी f-काळी f-कालिमा f- येणें, मुखचर्या f-मुखश्री f-नूर m-&c. फिरणें-बदलणें, मुखवैवर्ण्य (S.) *n.* होणें *g. of o.* २ *to grow red, to have a red or rosy colour* (कांहीं काळपर्यंत) लाल रंगाचा आणि टवटवीत होणें; as, "Full many a flower is born to B. unseen." Blush'ful *a.* नम्र, सलज्ज, (लाजेच्या) लालीचा. Blush'ing *n.* लाज f, शरम f, (लाजेची) लाली f, तोंडावरची शरम f. B. *a. showing blushes* लज्जायुक्त, &c. २ *modest* नम्र, सलज्ज. ३ प्रफुल्ल, विकसित; as, B. honours. Blush'ingly *adv.* To put to the blush लाजविणें. Blush'less *a.*

Bluster (blus'tėr) *v. i.* (-the wind) घोंघावणें, सोसावणें, सो सों-घो घों-झों झों-धो धों-&c. वाहणें-येणें. २ (with *out*) *to puff, to swagger* मोठमोठ्यानें बोलणें, गर्जून बोलणें, दणदणणें, दणकावणें, अकांडतांडव करणें, दणगारणें, नाकपुड्या f. *pl.* पिंजारणें-फुगवणें-फुरफुरवणें, मोठाल्या गोष्टी f. *pl*-तीन तेरा गोष्टी f. *pl.* सांगणें, बाराबत्तिशा f. *pl.* लावणें, तम m. गाणें, ताल m. तोडणें, तमतमणें (R.), तमणें (R.). ३ *to bully* ताल m. झाडणें, शिरा f. *pl.* ताणणें, गुरकावणी f. देणें. Bluster *n*, Blustering *n* (v. V. 1.). घोंघावणें *n*, &c., घोंघाट m, झोंझाट m, सोसाट m, सोसाटा m, सनाटा m. २ अरेरावी f, अरेरावकी f, फुशारकी f, शेखी f, चढाईच्या गोष्टी f. *pl*, वल्गना f, गुरकावणी f, गुरकी f, तमतमाशा (*obs.*) m, तोवारा (*obs.*) m. Blusterer *n.* घोंघावणारा, तीन तेरा गोष्टी सांगणारा, पोकळ धमकी देणारा. Blus'tering *a.* सोसाट्याचा, चढाईच्या गोष्टी सांगणारा, &c. &c. Blustering *p. a.* Blus'terous *a.*, Blus'trous *a.*

faneness deserves to be branded as folly." Bordered *a.* (v. N. 4.) घेरदार, कांठाचा, पदराचा, पदरी. [B. with working of gold or silver, &c. जरीकांठी, लफ्फेदार, जरीपदरी, संजाफी, संजाफदार, पल्लेदार, मगजीदार. B. with trees and flowers झाडपदरी. Double B. दुपदरी, दुधारी, (*colloq.*) दुमजला or ली. Narrow B. दामणकांठी. Silk B. रेशिमकांठी. Single B. एकपदरी, एक मजला or ली. Three B. तिपदरी, तिधारी तिमजला or ली.] Bord'erer *n.* (v. V. I.) भिडणारा, लगतीचा, लगतचा, लगत्याचा, कडचा, शिवेचा, शिवधड्या, सामंत. I *a close neighbour* शिवशेजारी, शिवधडी (R), शिवसोयरा, सामंतवासी. II *a person dwelling on the border* कडमहालांतला राहाणारा, कडमहालचा मनुष्य *m.* Bordering *p. a.* Borderland *n.* सीमेवरची जमीन *f*, शीव *f.* Bord'erless *a.*

Bore (bōr) [A. S. *borian*, to bore. डॉ. मरे ह्यांच्या मताप्रमाणें हा शब्द (नाम आणि क्रियापद) १७५० सालापुढें इंग्रजी भाषेंत प्रचारांत आला.] *v. t. to perforate* (कोरणीनें किंवा गिरमिटानें) रंध्र पाडणें, विंधणें, छेदणें, वेधणें, भोंक *n.* पाडणें; as, To B. a hole; To B. a plank. २ फार खटपटीनें रस्ता करणें; as, To B. one's way through a crowd. ३ त्रास देणें, छळणें; as, He bores me with some trick. B. *v. i.* पुढें घुसणें; as, "They take their flight boring to the west." *Dryden.* २ विंधलें जाणें; as, This block of wood does not B. well. ३ सामत्यासारख्या हत्यारानें भोंक मोठें करणें-पाडणें; as, To sink a well by boring for water; To B. with an auger; Insects B. into a tree. ४ नाक सरळ खालीं-वर करणें (a horse). B. *n.* भोंक *n*, छिद्र *n*, वेध *m*, विंध *n*, रंध्र *n*, भोंकू *m*, बुराख *n*, घरका (*obs.*) *m.* २ (बंदुकीची किंवा इतर नळीची) लांब पोकळी *f.* ३ कटकट करणारा, व्यर्थ बोलून कंटाळा आणणारा. ४ पीडा *f*, त्रासदायक वस्तु *f*, व्याद *f*, उपाध *f*, व्याध *f*, झट *n*, कांटा *m.* ५ (*obs.*) छेद मोठें करण्याचें वेधन *n.* ६ (of the ear) कान *m.* Bored *a.* भोंक पाडलेला, विद्ध. Borer *n.* भोंक मोठें करण्याचें यंत्र *n.* २ *zool.* एक प्रकारचा किडा *m.* ३ वेधणारा, भोंक पाडणारा, छेदक, वेधक. ४ कोरणी *f*, वेधन *n.* Boredom *n.* रिकामपणाची आलेली सुस्ती *f*-कंटाळा *m.* २ (used collectively as Christendom) कंटाळा किंवा त्रास देणारे लोक *m. pl.* Boring *n.* (पाडलेलें) छेद मोठें करणें (क्रिया), कोरणें *n.* २ *pl.* भोंक मोठें होतांना पडलेला भुका *m.* Boring-bar *n. mech. eng.* वेधनपातीं बसविण्याचा दांडा *m.* Boring-lathe *n. mech. eng.* कोरणीनें भोंक पाडण्याचा चरक *m.* Boring-machine *n.* कोरणीनें भोंक पाडण्याचें यंत्र *n.* Boring-tool *n. mech. eng.* कोरणी *f.*

*N. B.*—Bore आणि Drill ह्यांमध्यें एक महत्वाचा भेद आहे. Drill ह्मणजे सामत्यानें नवीन भोंक पाडणें. Bore ह्मणजे लहान भोंकाचें सामत्यासारख्या हत्यारानें मोठें भोंक करणें. Boring tool ला कोरणी हाच शब्द ठरवावा. व्यावहारिक यंत्रशास्त्राचे मराठी शब्द ठरविणें फार कठीण आहे. ह्या विषयाकडे शिकलेल्या लोकांनीं अजून लक्ष दिलेलें नाहीं, व ज्या अशिक्षित लोकांनीं लक्ष दिलें आहे ते जसेच्या तसेच इंग्रजी शब्द वापरतात.

Bore (bōr) [Icel. *bara*, a wave or swell.] *n. geog.* भरती *f*, उचंबळलेली लाट *f.* Bore of the tidal wave भरतीची लाट *f.*

Bore *pa. t.* of Bear.

Boreal (bō're-al) [L. *boreas*, the north wind.] *a.* उत्तरेकडचा, उत्तरीय; as, A B. bird. २ उत्तरेकडील वायुसंबंधीं; as, B. winds. Boreal fluid *n.* उत्तरध्रुवचुंबक द्रव, धनचुंबक द्रव. Boreal signs उत्तरीय राशी *f*, मेषेपासून कन्येपर्यंत साहा राशी *f.* Boreas *n.* उत्तराण *f.*

Borele (bo'rele) *n.* दक्षिण आफ्रिकेंतील गेंडा *m.*

Boric (bō'ric) See under Borax.

Born (bawrn) *pa. p.* of Bear उत्पन्न-पैदा झालेला, जनित, जन्य, जात, प्रसूत, सूत, संभूत, उद्भूत, भव (in comp. as, देहभव, मनोभव, समुद्रभव), भू (in comp. as, देवीभू). [First B. ज्येष्ठ, प्रथमज, अग्रज, वडील (अपत्य). Next B. पाठचा, पाठीमागचा or पाठीमागील, पाठीस पाठ लावून आलेला. Middle B. मधला, मधिवला (R), मधवला (R). Last B. कनिष्ठ, शेवटचा, चरमज, *spec.* कूसधुवणा, *spec.* शेंडेफळ. Ill-B., Low B. हीनजात, कमजात, बदजात, अकुलीन. That is to be B. जनिष्यमाण. That is being B. जायमान. Untimely B. अकालज, अकालजन्म. Well B., High B. कुलीन, कुलवंत, पिढीजात, पिढीजादा, जातिवंत, जातीचा, अभिजात. To be B. with face downwards पालथा येणें. To be B. जन्मणें, उपजणें, निपजणें, उद्भवणें, जन्म *m.* होणें *g. of s.*, जन्मास येणें, जन्म *m.* घेणें. To be B. again नवा जन्म *m.* होणें *g. of s.*] २ जन्मतः; as, A B. liar. Born again पुन्हां जन्म घेतलेला. A B. fool उपजत मूर्ख. Born of पासून झालेला; as, Born of humble parents. Born with a silver spoon in one's mouth गर्भश्रीमंत. In all my born days आजन्मांत. Born under an evil star वाईट नक्षत्रावर जन्मलेला.

Borne (bōrn) *pa. p.* of 'Bear' नेलेला, नीत, वाहिलेला, वाहित.

Boron (bō'ron) *n.* एक रसायनशास्त्रांतील मूलतत्व *n*, 'टंक.' हें सोहागीच्या तेजाबांत असतें. याचा अणुभारांक ११ आहे.

Borough (bur'o) [A. S. *burg*, *burh*, a city.] *n.* 'बरो,' पार्लमेंटांत प्रतिनिधि पाठवणारें शहर *n.* २ स्थानिक स्वराज्य (म्युनिसिपालिटी) असलेलें शहर. ३ *fig.* बरोमधील लोक. Borough-monger *n. one who trades in parliamentary seats for boroughs.* पार्लमेंटांत जागा मिळवून देण्याचा धंदा करणारा *m.* County-borough *n.* ५०,००० पेक्षां ज्यास्त वस्तीचें गांव. Rotten borough *n.* मोडकळीला आलेला बरो, लोकसंख्येच्या

मानानें हक्क नसतांही प्रतिनिधि निवडून देणारें शहर *n.* अशीं शहरें १८३२ नंतर इंग्लंडांत रद्द केलीं आहेत.

Borrow ( bor'ō ) [ A. S. *borgian, borg, borh*, a pledge, a security. ] *v. t.* उसना घेणें, मागून घेणें ( opposite of 'Lend' ), जायां (*obs.*)-जायजणा (*obs.*) आणणें-घेणें-मागणें, मागून आणणें-घेणें. २ *arith.* वजावाकींत हातचा घेणें. ३ नक्कल किंवा तर्जुमा करणें; as, To B. the style of another. अनुकरण करणें; as, To B. the practices of the ancients. ४ बनावट किंवा कृत्रिम घेणें-करणें; as, "The borrowed Majesty of England." ५ (पासून) घेणें, as, He borrowed this defect from his father. ६ ( money at interest ) कर्ज *n*-ऋण *n.* काढणें-घेणें-करणें-आणणें, कर्जी काढणें, व्याजीं-व्याजावर काढणें-घेणें. Borrowed *pa. a.* उसना घेतलेला, उसना, उसनवारीचा, मागींव, मागून आणलेला. [ B. FOR AN OCCASION, जायाचा (*obs.*), जायजण, जायजणा. ] २ कर्जी काढलेला, कर्जाऊ, कर्जाचा, व्याजीं, व्याजाऊ, व्याजू. Borr'ower *n.* ऋण काढणारा, रिणको. २ नकल्या. Borrowing *n.* (v. V. I.) उसना घेणें *n*, मागून आणणें *n.* २ कर्ज काढणें *n*, व्याजावर घेणें *n*, ऋणग्रहण *n.* [ B. from every quarter काढाओढ *f*, सर्वत्र उचापत, ओढाओढ *f*, उचका (R) *m.* B. and lending उसनें देणें आणि घेणें, घेणें देणें *n*, घेवाण देवाण (?) *n*, घेवादेवा *m.*] Borrowed plumes *lit.* उसनीं घेतलेलीं पिसें *n. pl.*, *fig.* उसना मोठेपणा *n.*

Boscage, Boskage ( bosk'āj ) [ Fr. *boscage*, a bush.— L.L. *boscus*, a thicket.] *n.* जंगल *n*, झाडी *f.*

Bosh ( bosh ) [ Turk. *bosh*, silly talk. ] *n. colloq.* व्यर्थ बडबड *f*, लटरफटर, ठकवाजी.

Bosh ( bosh ) *n.* लोखंड किंवा बीड वगैरे गाळण्याच्या भट्टीची खालची निमुळती जागा *f.* २ मुशीच्या खालचा निमुळता भाग. ३ ज्या भांड्यांत लाल केलेलें लोखंड बुडवून थंड करतात तें. *pl.* Boshes.

Bosom ( bōōz'um ) [A. S. *bosm.*] *n.* ऊर *m*, छाती *f*, वक्ष *n*, वक्षोदेश *m*, वक्षःस्थल *n.* [ To PRESS TO THE B. पोटाशीं-उराशीं धरणें, आवळणें, कवटाळणें.] २ हृदय *n*, अंतःकरण *n.* ३ गाभारा *m*, मध्य *m*, गर्भ *m*, अभ्यन्तर *n*; as, The B. of the earth भूगर्भ. ४ आंगरख्याची छाती *f*; as, The B. of a coat. ५ *fig.* हृद्गतस्थान *n*, अंतर्याम *n*; as, I am in their bosoms and I know what they do. ६ *fig. the inner circle* आंतला गोट *m*, आंतला कम्पू *m*; as, "The B. of the church." ७ *fig. the privacy* ( of the domestic circle ) अंतस्थ *n*, अंतस्थ व्यवहार *m*; as, In the bosom of one's family. ८ जात्याच्या पेडाचा मधला खोलगट भाग (ज्यांतून आंत दाणे घालतात). B. *a.* छातीचा, उरासंबंधीं. २ प्रिय, जिवलग. [B. FRIEND जिवाचा मित्र, जिवींचा मित्र, सुखदुःखाचा मित्र-सोबती, जिवलग मित्र, जिवींचा जिव्हाळा *m*, प्राणसखा, प्राणमित्र, जीवश्च कंठश्च *m.* B. SECRET पोटांतली गोष्ट *f*, गुपितगोष्ट, कुपींतली गोष्ट *f*, *vulg.* गुपित गोष्ट.] ३ विश्वास ठेवण्याजोगा. ४ (R.) मनांतला; as, B. expressions. B. *v. t.* अंतःकरणांत ठेवणें, मनांत ठेवणें; as, "B. up my counsel." २ काळजींत बाळगणें. ३ लपविणें. Abraham's bosom *lit.* आब्राहामाचा ऊर *m.* २ *fig. the abode of the blessed dead* (ख्रिस्ती लोकांच्या मतें) दिव्य झालेल्या मृतांचें वसतिस्थान *n.* To take to one's bosom लग्न करणें. (Said by a man with respect to a woman.)

Boss ( bos ) [Fr. *bosse*, a swelling.] *n.* गोंडा *m*, बोंड *n*, पुढें आलेला भाग *m*, गेंद *m.* २ (कपड्यावर) काढलेलें फुगट फूल *n*-कशिदा *m.* ३ (जीन वगैरे वर लावलेलें सोन्याचें, हस्तिदंताचें, किंवा दुसऱ्या कोणत्याही वस्तूचें) जडींव नकसकाम *n.* ४ तुंबा *m*, नारडी *f.* ( of a wheel or pulley ). ५ 'शाफ्टिंगचा' जाड केलेला भाग *m.* जेथें चाक बसवितात. 'शाफ्टिंग'चें जाड केलेलें टोंक *n.* ६ (*pl.* लांकडी छतांवर मारलेलीं फार रुंद) लांकडी फुलें. ७ घमेलें *n*, कमावलेला चुना ठेवण्याचें भांडें *n.* B. *v. t.* गोंडा लावणें, पुष्कळ उठावाचीं फुलें काढणें. Bossed *pa. p.* Boss-tool तुंबा घडण्याचें हत्यार *n.* Boss'y *a.* गोंड्याचा, &c.

Boss ( bos ) [ Dut. *baas*, the head of a household.] *n. slang* (more used in America) देखरेख करणारा, व्यवस्थापक, नाईक, म्होरक्या, पुढारी, राजकीय कढाचा सूत्रधार, कारस्थानी, एखाद्या जोखमाच्या कामांतील कळसूत्र्या किंवा मुख्य नाईक. B. *v. t.* देखरेख करणें, व्यवस्था ठेवणें. B. *v. i.* धनी होणें, देखरेख करणें. To boss the show एखाद्या नवीन कामाचें पुढारीपण-चालकत्व पत्करणें.

Boswellian ( bos-wel'li-an ) *n.* बॉस्वेलची (लेखनपद्धति). बॉस्वेलला आपल्या चरित्रनायकांच्या गुणांचा विशेष अभिमान असे व तो त्यांच्या अंगचीं क्षुल्लक गोष्टींना देखील विशेष महत्व देत असे. अशा चरित्रलेखनपद्धतीला Boswellian असें इंग्रजींत ह्मणतात.

Botany ( bot'an-i ) [Gr.*botane*, herbage, from *boskein*, to feed.] *n.* वनस्पतिशास्त्र *n*, उद्भिज्जविद्या *f.* Fossil B. अश्मीभूतवनस्पतिशास्त्र *n*, प्रस्तरीभूतवनस्पतिविद्या *f.* Botan'ic, Botan'ical *a.* Botan'ical garden *n.* वनस्पतिबाग, वनस्पतिशास्त्र शिकण्याकरितां केलेली बाग *f.* Botan'ically *adv.* वनस्पतिशास्त्राप्रमाणें. Bot'anist *n.* वनस्पतिशास्त्रवेत्ता, वनस्पतिशास्त्री. Bot'anize *v. i.* *n.* वनस्पतिशास्त्राचें अध्ययन करणें. Geographical Botany *n.* वनस्पतिभूगोल *m.* Morphological Botany *n.* वनस्पतींचा आकारविचार. २ वनस्पतिशारीर. Physiological Botany *n.* वनस्पतिइंद्रियविज्ञानशास्त्र *n.* Structural B. वनस्पतिघटनाशास्त्र *n.* Systematic Botany वनस्पतींचें वर्गीकरण.

Botch ( boch ) [ Same as Boss, a stud. ] *n.* खांडुक *n*, व्रण *m*, खवंद *n*; as, "Botches and blains must all his flesh emboss." २ बेडौलाचें ठिगळ *n.* ३ ओबडधोबड काम *n*; as, "To leave no rubs nor botches in the work." B. *v. t.* ओबडधोबड काम करणें. २ ओबडधोबड ठिगळ मारणें, (भलतेंच काम-वर्णन करून)

बिघडून टाकणें; as, "For treason botched in rhyme will be thy bane." Botcher *n.* ओबडधोबड काम करणारा, धोबडकाम्या शिंपी, जुने कपडे शिवून तयार करणारा. Botch'y *a.* Botch-work, Botchery *n.* ओबडधोबड केलेलें शिवणकाम *n.* कोणतेंही ओबडधोबड काम *n.*

Both (bōth) [A. S. *ba*, both.] *a.* दोन्हीं, दोघे, (घी or घ्या *f*; घें or घीं) उभय, उभयतां. Both is often expressed by ही (also); as, I both saw and touched him मीं त्याला पाहिलें आणि त्याला स्पर्शही केला. Both the (दोघेही) dogs barked at the same time. B. hands हस्तद्वय *n.* In both ways उभयथा, दोन्ही मार्गांनीं-प्रकारें. Both *conj.* हें आणि तें सुद्धां; as, "To judge both the quick and the dead."

Bother (both'-ėr) [Ir. *buaidhirt*, trouble.] *v. t.* *to perplex, to bewilder* घोटाळ्यांत घालणें-पाडणें, घोळणें (*obs.*), त्रेधा *f* घोळ *m.* करणें *g. of o.* २ पीडा देणें, क्लेश देणें. ३ (one's self) खस्ता खाणें. B. *v. i.* त्रास देणें, घोटाळा करणें; as, Without bothering about it. B. *n.* *vexation, worry, petty trouble* खटपट *f*, खवदव *f*, दगदग *f*, खस्ता *f. pl*, झट्टेपट्टे *m. pl*, उपद्व्याप *m.* २ bothered (*disturbed*) state तारांबळ *f*, घोळ *m*, घोळंकार *m*, घोंटाळा *m*, आटापीट *f*, घोळाणा *m*, घप्पाघोळ *m*, तारातीर *f*, गोंधळ *m*, धांदल *f.* Botherā'tion *n.* Same as Bother *n.* Botherer *n.* त्रास देणारा, &c. Both'ersome *a.* त्रासदायक.

Bothrenchyma (both-ren'ki-ma) [Gr. *bothros*, a pit and *engchyma*, a tissue.] *n. bot.* (सालीच्या) अन्तर्घटकनलिका किंवा वाहिन्या.

Bots Botts, (botz) *n. pl.* घोड्याचा कोठा, घसा व आंतडीं यांस त्रास देणाऱ्या गोचिड्या, गोमाश्या, also Bot-fly *n.*

Bottle (bot'l) [Fr. *bouteille*, dim. of *botte*–from L. L. *butis*, a vessel.] *n.* शिशी *f*, कुपी *f*, बाटली *f.* २ बाटली *fig.*, शिशीभर, बाटलीभर; as, To drink a B. of wine. ३ दारू *f*, बाटली *fig.*; as, He has wasted all his money on the bottle; To drown one's reason in the bottle. ४ (for oil, ghee, &c., made of skin) बुधला *m*, बुधलें *n. dim.* बुधली *f*, दवडा *m*, *dim.* (द्)-डवडें *n.* B. *v. t.* शिशींत ओतणें. २ कोंडणें, दाबांत-कह्यांत ठेवणें; as, To B. up one's wrath. Bottled *a.* बाटलींत घातलेला-कोंडलेला. २ बाटलीच्या आकाराचा, फुगरट. Bottle-glass *n.* बाटल्या करण्याची कांच *f.* Bottle-gourd *n.* दुधभोपळी *f*, the fruit दूधभोपळा *m.* Bottle-holder *n.* ठोसाठोसीच्या खेळांतील गड्याचा पाठिराख्या. Bottle-screw *n.* बूच काढण्याचा स्क्रू, बूच काढण्याचें मळसूत्र *n.* Feeding bottle, Nursing bottle, लहान मुलांना दूध पाजण्याची शिशी *f.* Generating bottle *chem.* उत्पादक कुपी *f.* Bottler *n.* To bottle off पिपांतून काढून बाटल्यांत भरणें. To bottle up one's wrath राग दाबून ठेवणें. To bring up on the bottle वरच्या दुधावर पोसणें. 'Looking for a needle in a bottle of hay' *fig.* पुष्कळ वस्तूंच्या राशींत क्षुल्लक वस्तु शोधणें. To pass the bottle round मंडळींत दारूची बाटली (पिण्याकरितां) फिरविणें. A three bottle-man एका दमाला तीन बाटल्या झोंकणारा. Bottling *n.* बाटलींत भरणें.

Bottom (bot'um) [A. S. *botm*, depth.] *n.* *the lowest part of any thing* बूड *n*, तल *n*, *pop.* तळ *m*, बुंध *n*, बुंधा *m*, बुंधारा *m*, बुडखा *m*, बुडुख *n*, अधोभाग *m.* २ *the foundation, the groundwork* आधार *m*, पाया *m.* ३ *the posteriors* गांड *f*, गुद *n.* ४ *low-lying land, an alluvial hollow* खोलचा *m*, दवका *m*, दरी *f*, खोरें. ५ *the lowest end* खालचा शेवट *n*, (तळाकडचा) शेवट *n*, पाय *m*, पायगत *n*, पायतें *n.* ६ *the foundation, the beginning* मूळ *n*, आधार, बीज *n*, (तळाचा) ठिकाण *n*- ठिकाणा *m.* [To GET TO THE B. OF मुळास जाऊन पोंचणें.] ७ *the utmost profundity or depth* (तळाचा-मुळाचा) ठाव *m*, ठिकाणा *m*, ठिकाण *n*, थांग *m*, पार *m.* ८ *natural strength, power of endurance* जीव *m*, दम *m*, ईर *f*, वीर्य *n*, त्राण *n*, जोर *m.* [THAT HAS B. AND PLUCK (WAR-HORSES, &C.) जिवट, जिवस, मगरमस्त, जीवदार, जोरदार.] ९ (खुर्चीची) बैठक *f*, बसक *f.* १० जहाजाचा तळभाग *m*, *fig.* जहाज *n*; as, "My ventures are not in one bottom trusted." *Shakes.* ११ कचरा *m*, अवशेष *m.* B. *a.* बुडाचा, खालचा, शेवटचा, तळचा, बुडील (R), शेवटील. B. *v. t.* च्या आधारावर बांधणें-रचणें (with *on*, *upon*). [To BE BOTTOMED ON च्या आधारावर असणें; AS, "ACTION IS SUPPOSED TO BE BOTTOMED ON PRINCIPLE."] २ बूड लावणें, बैठक घालणें; as, To B. a chair. ३ (च्या) मुळाशीं जाणें. B. *v. i.* आधार धरून असणें; as, "Find on what foundation any proposition bottoms." Bottomed *a.* Bottom-fuller *n.* ऐरणीवरचें लोखंड वाढविण्याचें हत्यार *n.* Bottoming *a.* टेंकू दिलेला. Bot'tom-less *a.* बिनबैठकीचा, बिनतळाचा, बिनबुडाचा, ज्याला तळ-बूड-बैठक नाहीं असा, अथांग, बेठाव, अतलस्पर्श, तलहीन. Bot'tomry *n. law* जहाज गहाण ठेवून पैसे उसने देणें *n.* Bottom-tool *n.* ऐरणीच्या भोंकांत बसणारें हत्यार *n.* At the bottom, At bottom तळाशीं, मुळाशीं, बुडाशीं. २ मनानें, खरोखर; as, He was good at bottom. From the bottom of one's heart मनापासून, बेंबीच्या देंठापासून *idio.* To go to the bottom खोल जाणें, अंत काढणें, बुडणें, जहाज फुटून बुडाशीं जाणें; as, The ship went to the bottom. He was at the bottom of it (used in a bad sense) त्याच्या मुळाशीं तो होता. To stand on one's own bottom आपल्या पायांवर उभें राहणें, दुसऱ्यावर अवलंबून न राहणें. To touch bottom तळाशीं जाणें, तळ शोधून काढणें. Bottoming *pr. p.* Bottomed *pa. p.*

Boudoir (bōōd'-war) [Fr. *boudoir*, a private room for a lady; *lit.* a place to sulk in.–Fr. *bouder*, to pout, to be sulky.] *n.* एकांतांत स्वस्थ बसण्याची

खोली *f*, स्त्रियांची आपल्या इष्टमित्रांना भेटण्याची खोली *f*, खाजगी दिवाणखाना *m*.

Bough (bow) [A. S. *bog*, from *bugan*, to bend.] *n.* फांदी *f*, खांदी *f*, डहाळी *f*, टहाळी *f*, फांदोरी *f*. *dim. intens.* फांदाडा *m*.

Bought *pa. t. & p. p.* of Buy.

Bougie (bōō'zhi) [Fr. a 'waxcandle' because the instrument was originally made of waxed linen from *Bougie*, in Algeria.] *n. surg.* सळई *f*, बत्ती *f*. ही पूर्वी मेणाची करीत असत. हिचा उपयोग स्त्रियांच्या गुह्येंद्रियांत औषध घालण्याकरितां करितात.

Boulder (bōld'er) [Swed. *bullra*, Dan. *buldre*, to roar like thunder, as large pebbles do.] *n.* पाण्यानें घासून वाटोळा झालेला दगड *m*, गुंडा *m*, गोटा *m*.

Bounce (bowns) [Dut. *bonzen*, to knock or strike,-*bons*, a blow, from the sound.] *v. i. to spring or start suddenly* (आपटून-सटकन-झटकन-पटकन-तडकन) उडणें, उसळणें, उसळी *f*. खाणें. २ (as a fish from the water) उझाळणें (R), उल्हाळणें (R), उसळी खाणें-मारणें,उझाळा (R)-उल्हाळा (R) घेणें-मारणें-खाणें-देणें, उसळणें. ३ झटकणें, सटकणें, (फेंकलेल्या चेंडूप्रमाणें) सटदिनीं जाणें; as, He bounced into the room. ४ *to thump* दणकण-दणकर-दणदण-&c. ठोकणें-मारणें; as, "Another bounces as hard as he can knock." (*colloq.*) वल्गना करणें, दणदणणें. B. *v. t.* दणकन-जोरानें ठोकणें-आपटणें. २ दणकन उडविणें. ३ दणक्यानें जाहिर करणें. ४ (*colloq.*) दणदणून बोलणें. B. *n.* धडधडीत ठळठळीत-धादांत-&c-लबाडी *f*. २ दणकण उडणें *n.* ३ रपाटा *m*, धवका *m*, दणकन आवाज *m*. ४ वल्गना *f*, आत्मप्रौढी *f*, आत्मप्रौढीकरितां असत्य भाषण *n*. ५ आत्मश्लाघी, दणदणून बोलणारा. B. *adv. & interj.* तटकन, दणकन; as, "To come B. into a room." Bounc'er *n.* धाडकन उडी मारणारा. २ (*colloq.*) वल्गना करणारा. ३ (आत्मप्रौढीकरितां) खोटें बोलणारा. Bounc'ing *a.* भक्कम, लट्ठ, मोठा, धिप्पाड, जोरदार, बळकट, मजबूत आणि चलाख; as, "Many tall and bouncing young ladies." A B. lie धडधडीत-अचानक खोटी गोष्ट *f*. Bouncingly *adv.*

Bound (bownd) [O. E. *bounde*.–O. Fr. *bonde*.–L. L. *bodina*, *bodena*, *bonna*, boundary, limit.] *n. limit, boundary* मर्यादा *f*, सीमा (*pop.*), (सींव) शींव *f*, हद्द *f*, अवधि *m*, पार *m*, पर्यंत (S) *m*, काष्ठा (S) *f*. [To KEEP BOUNDS मर्यादेंत असणें, मर्यादेच्या बाहेर न जाणें *fig.* नेमस्तपणानें वागणें, विवेकानें वागणें. BOUND AND BORDER शींवमर्यादा *f*; दांडपेंडोळा (*obs.*) *m*, दांडपेंडोळें (*obs.*) *n*, दांडमेंड (*obs.*) *m*. OVERSTEPPING OF BOUNDS मर्यादोल्लंघन *n*, सीमातिक्रमण *n*. THE BOUNDS चतुःसीमा *f*. To OBSERVE NO BOUNDS मर्यादा न ठेवणें, मर्यादा अतिक्रमणें, इयत्ता *f*. न ठेवणें.] B. *v. t. to limit, to circumscribe, to confine, to define* सीमा *f*- मर्यादा *f*. घालणें, अवधि (S) *m*-हद्द *f*, अवच्छेद (S) *m*. करणें *g. of o.*, ससीम-समर्याद-मर्यादाबद्ध-सीमाबद्ध- &c-करणें, आरेखणें. २ हद्दीचा नामनिर्देश करणें; *as*, "To B. France." Bound'ary *n.* बांध *m*, बांधारा *m*, बंधारा *m*, बांधोळी *f*, सीमा *f*, मर्यादा *f*, हद्द *f*. [WAY OR PASSAGE ALONG A RAISED B. बांधवाट *f*, बांधाटी *f*.] Artificial boundary मनुष्यनिर्मित-कल्पित सीमा *f*. Natural boundary प्राकृतिक सीमा *f*, सृष्ट मर्यादा *f*. Boundary post *n. surv.* हद्दीचा खांब *m*- मटोलें *n*, मूळठोंबा *m*. Bound'ed *p.* (v. V. T.) सावधि, सावधिक, समर्याद, मर्यादित, नियत. २ संकोचित, मर्यादित; as, A man of bounded views. Bound'er *n.* Bound'-less *a.* अमर्याद, अपार, अनंत, अपरंपार, अनंतपार, बेहद्द, निस्सीम. Bound'lessly *adv.* Bound'lessness *n.* (v. A.) बेहद्दपणा *m*, अमर्यादता *f*.

Bound (bownd) [Fr. *bondir*, to bound; but orig. to resound.-L. *bombitare*, to resound-L. *bombus*, a humming sound.] *v. i. to rebound, to hop* उडणें, टप्पा *m*. खाणें, उसीं येणें, उसीं खाणें, टणटण उडणें; as, The ball bounded from the ground. २ *to spring, to skip, to leap* उडणें, झेंप *f*-झाप *f*. टाकणें-मारणें, झडप *f*-घालणें, ठिकणें (R), उडी *f*-घालणें-मारणें; as, "The tiger bounded from his den." ३ (a horse) फटकडी (*obs.*) मारणें. B. *n. spring, leap* उडी *f*, टिपण *n* (*v.* टाक, मार), किलाण (R) *n*, किराण (R) *n* (*v.* मार, साध, टाक), फलंग (R) *f* (*v.* मार), झेंप *f*, झाप *f*. ३ (of a ball, &c.) *rebound* टप्पा *m*, उसी *f*. ४ *dancing* नाचांतील उडी *f*. Bound'ing *a.* उड्या मारीत, झपाट्याचा. By leaps and bounds उड्या टाकीत, चौखूर, फारच झपाट्याच्या वाढत्या प्रमाणानें. Bound क्रियापदाचा सकर्मक प्रयोग फक्त भाषणांत वापरतात. तेव्हां त्याचा अर्थ उडवणें, उडूं देणें असा होतो; as, To B. the ball on the floor. *colloq.*

Bound (bownd) *pa. t. & pa. p.* of Bind. (v. V. I.) (कायद्यानें-उपकारानें किंवा इतर रीतीनें बांधलेला-&c., बद्ध, संबद्ध, पाशित. [FIRMLY OR FAST B. निबद्ध, सन्निबद्ध, निगडित, जखडलेला.] २ आकळलेला, आकलित, नियंत्रित, निग्रहित. ३ वेष्टलेला. ४ बांधलेला, गोंवलेला, गुंफलेला, &c. ५ बांधलेला, बंदा or बांदा, बांधील, विकलेला, आभारी, उपकारी, लागेला, उपकारबद्ध, उपकृत, मिंधा, ओशाळा, लिप्ताळा. [To BE BOUND लिप्ताळा असणें, लागेला जाणें.] ६ बंद केलेला, बद्ध. ७ (with *to*) खचीतपणा-खात्री-निश्चय असलेला; as, He is B. to succeed, B. to fail. ८ (अपचनाच्या विकृतीनें) बद्ध कोष्ठाचा.

Bound (bownd) [*pa. p.* of O. E. *bounen*, to prepare, from *boun*, ready, prepared, from Icel. *buinn*, *pa. p.* of *bua*, to dwell, to prepare.] *a.* (with *to* or *for* or with *an adv.* of motion) *going or intending to go* जाणारा, जाणार, जायाचा, गंतुकाम (S), गामी (S.); as, A ship is bound to or for Cadiz, "The mariner bound homeward."

Bounden (bownd'n) [See Bind.] *a.* आभारी केलेला,

उपकारबद्ध झालेला, ओशाळा केलेला. २ अवश्यक, अवश्य कर्तव्य ह्मणून सांगितलेला; as, Our bounden duty to our Emperor.

Bounty (bown'ti) [Fr. *bonte*, goodness.—L. *bonitas*, from *bonus*, good.] *n. liberality* उदारपणा *m*, औदार्य *n*; as, "My B. is as boundless as the sea." २ महादान *n*, बहुदान *n*, उदार-सुबलक दिलेली देणगी *f*; as, "Thy morning bounties." ३ कोणताहि धंदा लोकांनीं नवीन सुरू करावा किंवा जुना असेल तर वाढवावा ह्मणून देऊं केलेलें इनाम *n*-बक्षीस *n*-देणगी *f*. ४ लोकांनीं अमुक एक खात्यांत नोकरी पतकरावी ह्मणून त्यांना दिलेल्या विशेष सवलती *f*, उत्तेजनाकारितां उदार सवलती *f*. Boun'teous, Boun'tiful *a*. पुष्कळ, विपुल. २ उदार, सढळ, दाता, दानशूर, दानशील, वदान्य. Boun'teously, Boun'tifully *adv*. औदार्यानें, मोकळ्या हातानें, सढळ हातानें, औदार्यपूर्वक, उदार हस्तानें. Boun'teousness, Boun'tifulness *n*. उदारपणा *m*, सढळपणा *m*, औदार्य *n*, दानशीलता *f*, दातृत्व *n*, दानशौर्य *n*, वदान्यता *f*. Boun'tyhood *n*. (*obs*.) उदारपणा, औदार्य *n*. Bounties *pl*.

Bouquet (bōōk'ā) [Fr. *bouquet*, O. Fr. *bousquet*, 'a little wood.'–L. L. *boscus*, a wood.] *n*. फुलांचा झुबका *m*, तुरा *m*. २ सुवास *m* (दारूचा); as, The B. of wine. ३ *colloq*. मजेचा वास *m*.

Bourgeoisie (bōōrzh'waw-zē) [Fr. *burgeois*, our burgess.] *n. sing. & pl. lit*. मध्यम स्थितीचा नगरवासी, *esp*. व्यापारी-उदमी. Bourgeois *a*. मध्यम स्थितीच्या व्यापाऱ्यासारखा.

Bourgeois, Burgeois (bur-jois') [From a French type-founder named *Bourgeois* or from a word *bourgeois*, of the middle class; *the bourgeois* being an intermediate size of type between brevier and long primer.] *n. print*. बरजॉइस नांवाचा छापखिळा *m*.

Bourgeon (bur'jun) [Fr. *bourgeon*, a bud.] *v. i*. अंकुर फुटणें, कोंब येणें. २ (फांद्या) फुटणें. ३ वाढणें.

Bourn, Bourne (bōrn or bōōrn) [A.S. *burna*, a stream. The root of this word is probably that of *burn* as the source of a stream seems to issue forth bubbling and boiling from the earth.] *n*. लहान नदी *f*, झरा *m*, ओढा *m*, नाला *m*.

Bourn, Bourne (bōrn, bōōrn) [Fr. *borne*, a limit; corruption of *bonne*, a boundary.] *n*. सीमा *f*, मर्यादा *f*, किनारा *m*; as, "The undiscovered country, from whose bourn no traveller returns." *Shakes*.

Bourse (bōōrs) [L. *bursa*, a hide or leather purse, *burse* of which the purse is usually made.] *n*. उदमी लोकांचा अड्डा *m*, चौक *m*, सराफकट्टा *m*.

Bouse, Booze (bōōz) [Dut. *buysen*, to drink largely, from-*buyse*, a large two-handed flagon.] See Boose.

Bout (bowt) [Dan. *bugt*, a bend, a turn.] *n*. खेप *f*, पाळी *f*, अवसान *n*, दम *m*. २ झटापट, (कोण हरेल व कोण जिंकेल हें पाहण्याचा) डाव, चढाओढ *f*; as, A drinking B., A fencing B.

Bovine (bō'vīn) [L. *bos*, *bovis*, an ox; Sk. गो, *go*, a cow.] *a*. बैलाचा-गाईचा, गाई-बैलासंबंधीं, गुराविषयींचा, गव्य, गोविषयक; as, B. genus. २ जड, मठ्ठ, थंड, मंद; as, A B. temperament.

Bow (bow) [A. S. *bugan*, to bend.] *v. i. to bend* लवणें, (नमस्कारपूर्वक) वांकणें; as, To B. down before God. २ *to make obeisance* (डोकें लववून) नमणें-वंदणें, नमन *n*-नमस्कार *m*-शिरोवंदन *n*-शिरोनमन *n*-करणें. [To B. AND SCRAPE अतिशय लवून नमस्कार करणें, लवणभंजन (R) *n*-नमोनमो *adv*. करणें.] ३ *to obey, &c. reverentially* (पूज्य बुद्धीनें-शिरसा) मानणें-घेणें-स्वीकारणें, शिरीं वाहणें. ४ (through age and infirmity) कमरेची कमान होणें, गुडघ्यांत मान येणें, (शरिराची) धनुकली होणें, गुडघे *m*, *pl*. मेटीं येणें, कमर *f*. वांकणें *g. of s.*, पोंक *n*-पोंग *n*. येणें, कुबड *n*- निघणें. B. *v. t*. नमस्कार *m*-प्रणाम करणें. २ लववणें, वांकवणें; as, "Adversities do more B. men's minds to religion." ३ जिंकणें, दवचिणें; as, To B. the will. ४ नमविणें; as, To B. a person out. ५ लवून (आभार) प्रदर्शित करणें; as, To B. one's thanks. Bow *n*. नमन *n*, (वंदून) नमस्कार *m*, शिरोनमन *n*. Bow-backed *a*. कुबडा, वांकलेल्या पाठीचा. Bow'er *n*. नमस्कार करणारा *m*. A bowing acquaintance तात्पुरती ओळख, नमस्कारापुरती ओळख (See Acquaintance). To make one's bow लवून थाटानें-ऐटीनें रंगभूमीवरून परत जाणें. Bowed *a*. नमित, नमवलेला, वांकवलेला. (v. V. I. 1.) वांकलेला, नमलेला, &c. नत. २ नम्रमूर्ति, नम्रांग, अवनत. ३ गुडघे टेंकलेला, कमर वांकलेला, कुबड निघालेला, कमरेची घडी झालेला, &c., हातापायांचा चौरंग झालेला, गोळंकारी.

Bow (bō) [A. S. *boga*, from *bugan*, to bend.] *n*. धनुष्य *n*, धनु *n*, चाप *n*, *m*, शरासन *n*, कमाण (न) *f*, कमटा (ठा) *m*. [ARMED WITH A B. धनुष्पाणि. B. AND ARROW तिरकमठा *m*, तीरकमाण (*n*) *f*. B. & ARROW MAKER कमाणग(गा)र *m*. END OF A B. गोशा *m*, कोटि *f*. TWANG OF A B. ज्याघोष *m*, टणत्कार *m*.] २ *anything of bow-form* (*gener.*) कमाण (न) *f*, धनुष्य *n*, वक्रवस्तु *f*. ३ (of a slipknot, &c.) अढी *f*, फांस *m*, दुमड (?) *f*. ४ (of a saddle) खोड *n*. ५ (for cleaning cotton) कमान *f*, (धनुष्यासारखी) पिंजरणी *f*. ६ (सारंगी किंवा ताऊस वाजविण्याचा) कमानदार गज *m*. ७ इंग्रजी U अक्षरासारखी चौकट *f*, इंग्रजी U अक्षराच्या आकाराची जनावराला जोखडाला बांधण्याची चौकट *f*. ८ (विंधणें किंवा सामता गरगर फिरविण्याचा) गज *m*. ९ (क्षितिजापासून सूर्याची उंची मोजण्याकरितां) वर्तुलपाद यंत्र *n*. १० कमानीसारखी सुरगांठ (दोरीची) *f*. B. *v. t*. गजानें सारंगी वाजविणें.

B. *v. i.* गज चालवणें. Bow-bell *n.* लंडननजीक रहाणारा रहिवासी *m.* Bow-bellied *a.* दोंदील, डेऱ्यासारख्या पोटाचा, ढेरपोट्या. Bow-bent *a.* धनुष्यासारखा वांकलेला. Bow-compasses *n. pl.* शाईनें कंस काढण्याचा कंपास. Bow-hand *n.* डावा हात *m*, धनुष्य ज्या हातांत धरितात तो हात. Bow-knot *n.* सुरगांठ *f.* Bow-leg *n.* फेंगडा पाय *m.* Bow-legged *a.* फेंगडा, फेंगड्या पायाचा. Bow-line *n.* (चौकोनी शिडाच्या मध्यापासून) नाळेकडे जाणारा दोर. Bowman *n.* तिरंदाज *m*, धनुर्धर *m*, धनुर्धारी *m*, धन्वी *m.* Bow-shot *n.* तिराचा-बाणाचा टप्पा *m-* मारा *m-* मारका *m-* शरपात *m-* शरपातस्थान *n.* Bow-string *n.* धनुष्याची दोरी *f*, शीत *n*, ज्या *f*, प्रत्यंचा *f*, मौर्वी *f*, गुण *m.* Bow-window *n.* अर्धवर्तुलाकार-निमगोल-खिडकी *f.* Bowyer *n.* (*obs.*) धनुर्धारी *m.* २ धनुष्यें तयार करणारा *m*-विकणारा. To be too much of the bow-hand नवखा कारागीर असणें. Draw not your B. till your arrow is fixed सर्व तयारी झाल्याशिवाय कामास आरंभ करूं नका. To draw the long bow खोटें बोलणें. २ अतिशयोक्ति करणें *colloq.* He has two strings to his bow तो दुप्पट तयारीनें आला आहे; त्याला पैसे मिळविण्यापुरते दोन धंदे येतात. Bowed *pa. t.* & *p. p.* Bowing *pr. p.*

Bow (bow) [Icel. *bogr*, bow of a ship.] *n.* often *pl.* (गलबताची) नाळ *f.* २ नाळेची बाजू *f.* ३ नाळेकडे वल्हवणारा. Bow-oar *n.* नाळेकडचें वल्हें *n.* B. sprit *n.* (गलबताचा) नाळदांडा *m.* A bold or bluff bow रुंदनाळ *f.* A lean bow अरुंदनाळ *f.* On the bow नाळेच्या अगदीं समोरच्या बिंदूपासून पंचेचाळीस अंशांचे आंत. Bower, Bower-anchor *n.* नाळेजवळचा नांगर *m*, नाळनांगर *m.*

Bowels (bow'elz) [O. Fr. *boel.*-L. *botellus*, a small sausage or intestine.] *n. intestines, entrails*, आंतडीं or अंतडीं *n. pl*, आंतें *n. pl*, अंत्रें *n. pl.*, मलाशय *m.* [IN POETIC CANT, &c. PHRASEOLOGY अंतरमाला *f. pl.* BLOCKED UP STATE OF THE BOWELS आंतड्यांतील अवरोध, मलबद्धता. DISCHARGE OF THE B. मलोत्सर्ग *m*, मलविसर्जन *n*, झाडा *m*, मलशुद्धि *f*, शौच *m.* DISORDER OF THE BOWELS THROUGH CRUDITIES आमविकार *m*, आम *m.* IRREGULAR STATE OF THE B. अनियमित मलशुद्धि, मलशुद्धीचें वैषम्य. MUCUS OF THE B. VOIDED आंव *f*, आम *m*, शेंब OR शेम *f.* PART OF THE B. HANGING OUT THROUGH A GASH पोटळा OR पोटाळा *m.* SHARP PAIN IN THE B. कळ *f*, शूल *m*, तिडीक. WIND IN THE B. नळाश्रित वायु *m*, उंड *m*, मुठा *m*, गुबार OR गुबारा *m.* B. OF MERCY OR COMPASSION दया *f*, करुणा *f*, अंतःकरण *n*, माया *f*; AS, HIS B. YEARN OVER HIS SON तो आपल्या मुलावर मनापासून प्रेम करितो.] २ पोट *n*, गर्भ *m*, अभ्यंतर *n*; as, The B. of the earth. ३ (*obs.*) पुत्रपौत्र. ४ अंतःकरण *n.* Bowel *v. t.* (*Shakes.*) आंतडीं काढणें *g. of o.* Boweled, Bowelled *pa. p.* Boweling, Bowelling *pr. p.* Bowelless *a.* दयारहित.

Bower (bow'ėr) [A. S. *bur*, a chamber.] *n.* (लता) मंडप *m*, लतागृह *n*, गुंफा *f*, कुंज *f*, निकुंज *f.* [A NATURAL AND CLOSE B. जाळी *f.*] २ (*obs.*) स्त्रियांची घरांतील खाजगी खोली *f.* B. *n.* एक आस्ट्रेलियांतील पक्षी. B. *v. t.* (मंडपलतागृह करून) झांकणें, बंद करणें. Bowered *a.* Bow'ery *a.* मंडप असलेला, छायेचा.

Bowie-knife (bō'i-nīf) [After its inventor Colonel *Bowie.*] *n.* बोईचा चाकू *m*, खंजीर *m*, त्याचें पातें पंधरा इंच लांब असतें.

Bowl (bōl) [A. S. *bolla*, a bowl.] *n. a cup* पेला *m*, वाटगा *m*, *dim.* वाटी *f*, कटोरा *m*, कटोरी *f*, बोगणी *f*, शराव (R) *m*, प्याला *m.* २ (as, of a ladle, spoon) माथळा (R) *m*, परडें *n*, बोंड *n.* ३ (as, of an Indian lute, &c.) डेरा *m*, भोपळा *m.* ४ (of wood) पाळें *n*, पडगा (घा) *m*, पडगें (घें) *n.* [BOWLS AND BASINS COMPREH. पडगेंपाळें *n*, पाळेंपडगें *n.*] ५ (of earth) खापर *n.* ६ (of a gourd) तुंबा *m*, तुंबी *f.* Bowl-sleepers *n.* आगगाडीच्या रुळाखालीं घालण्याचीं घमेलीं.

Bowl (bōl) [Fr. *boule*—L. *bulla*, a bubble, hence a ball.] *n. a ball to bowl* चेंडू *m*, गोळ *m*, गोटा *m*, काष्ठगोलक *n.* २ *pl.* काष्ठगोलकाचा खेळ *m.* B. *v. t. to cause to roll as a bowl* (गरगरत जाईल असा चेंडू) फेंकणें, (लोळत जाईल असा सुईसरपट) लोटणें, लोटणें, लोटून देणें, घुळवणें, घुळत जाईसा करणें, घरळवणें. B. *v. i. to move smoothly* घुळणें, घुळत जाणें. २ (चेंडूप्रमाणें) जलद गरगरत जाणें. Bowler *n.* चेंडू देणारा *m*, फेंकणारा *m.* २ गोळ्यांचा खेळ खेळणारा *m.* Bowling *n.* चेंडू फेंकणें *n.* Bowling-alley *n.* काष्ठगोलकाचा खेळ खेळण्याकरितां कुडणगल्ली. Bowling crease *n. cricket.* नेमरेघ *f.* Bowling-green *n.* चेंडू चांगला फेंकतां यावा म्हणून तयार केलेली गवती जागा *f.* To bowl out बाद करणें, तीन उभ्या काठ्यांना चेंडू लागून त्यांवरचे लांकडाचे तुकडे खालीं पाडून खेळणारास बाद करणें.

Bowlder, Boulder (bōld'ėr) *n.* पाण्याच्या घर्षणानें झालेला गोटा *m.* Bowlder-stone *n.* गडगडा धोंडा *m.*

Box (boks) [A. S. *box*; Ger. *buchse*, a box;-L. *buxus*, a box-wood.] *n.* पेटी *f*, संदुक *f*, (large) हडपा *m*, 'बाकस' *f.* २ पेटी (भर). ३ पैसे ठेवण्याची पेटी *f*, तिजोरी *f.* ४ गाडी हांकणाराची बैठक *f.* ५ (short for Christmas-box) ख्रिस्तमसभेटीची पेटी *f.* ६ रंगभूमीसमोर प्रेक्षक बसण्याची एक विशेष जागा, 'बॉक्स.' ७ (पहारेकऱ्याची किंवा संन्याची) पेटीसारखी झोंपडी *f.* ८ (भांडें ठेवण्याची चौकोनी गाळ्याची) पेटीसारखी घोडी *f.* ९ *phys.* घर *n.* B. *v. t.* पेटींत ठेवणें. Box'-bed *n.* मोडून पेटी करतां येण्यासारखा पलंग *m*, पेटीपलंग *m.* Box'bolt *mech. eng.* ज्या बोलटाचें माथें गोल गाळ्याच्या आंत बसतें तो. Box'coat *n.* सर्वांवरील मोठा जाडा डगला *m.* Box'day *n.* महत्वाचे कागदपत्र पेटींत ठेवण्याचा एक नेमलेला दिवस *m.*

२ नजराण्याची ख्रिस्तमसपेटी देण्याचा दिवस *m.* Box'-hardening *mech. eng.* लोखंडाचे दागिने पेटींत घालून त्यांचा पृष्ठभाग कठीण करण्याची रीत *f.* Box-iron *n.* (कपडे साफ करण्याची) लोखंडी इस्तरी *f.* Box'-keeper *n. theatr.* बॉक्सच्या दरवाजावर उभा राहणारा. Box'-key *n.* बाकसपान *n*, गोलगाळ्यांत बसणारी चाकी फिरविण्याचें पान *n.* also Box'spanner. Box'-nut *n. mech. eng.* एक बाजू बंद असलेली चाकी *f.* Box'-wood *n.* कोरींव कामाचें टणक लांकूड *n.* Box'ing-day or Box'-ing-night *n.* नाताळच्या सणानंतर मित्रांना भेटी वांटण्याचा दिवस *m.* In the wrong box योग्य परिस्थितीच्या बाहेर, भलत्याच परिस्थितींत. Milter-box *n.* कार्निसचे सांधे कापावयाचा ठोकळा *m.* To box a tree झाडांतील दूध-रस काढण्याकरितां छिद्र पाडणें. To be in a box कैचींत सांपडणें, अडचणींत असणें. To box off *carpen.* खातें पाडणें. To box up (सांठविण्याच्या हेतूनें) पेटींत ठेवणें. २ बंद करणें, प्रतिबंध करणें. ३ पेटी मारणें; as, To Box the beam. To box the compass दिशांचे ३२ बिंदु दाखविण्याकरितां कंपासाचा कांटा उलटासुलटा फिरविणें. २ आपलें मत सपशेल बदलणें-फिरविणें.

Box (boks) [Dan. *bosk*, a sounding-blow–*baske*, to slap. A box is a blow on the ear or side of the head with the hand.] *n. a cuff* बुकी *f*, बुकांदा *m*, बुकांदी *f*, ठोसा *m*, बुक्का *m*, (with the open hand) चापट *f*, चापटी *f*, चपराक *f.* B. *v. t.* बुकी देणें, ठोंसा मारणें, बुकलणें, बुकणें, धबकणें, मुष्टिमोदक *m*- ठोसा *m*- गुद्दा *m*- मुष्टिप्रहार *m.* देणें-करणें. [To B. THE EARS कानशिलांत मारणें.] B. *v. i.* मुष्टियुद्ध करणें, ठोंसाठोंसी करणें, बुक्काबुकी *f*- मुष्टियुद्ध *n*- मुष्टिप्रहार *m.* करणें. Box'er *n.* मुष्टियोद्धा *m.* २ इ० स० १९०१ सालांतील चीन देशांतील बंडवाला *m.* Box'ing *n.* मुष्टियुद्ध *n*, ठोंसाठोंसीचा खेळ *m*, मुष्टिप्रहारक्रीडा *f*, ठोसाठोसी *f*, बुकाबुकी *f*, धप्पाधपी (?) *f*, धबाधबी (?) *f*, मुष्टामुष्टि *f.* Box'ing-gloves *n.* मुष्टिप्रहारक्रीडेंतील हातमोजे. Box'ing-match *n.* ठोंसाठोंसीचा सामना *m.*

Boy (boy) [M. E. *boi*, boy; Fris. *boi*; Dut. *boef*; Ger. *bube.*] *n.* मुलगा *m*, बाळ *m*, पोर *n*, छोकरा *m*, पोरगा *m*, मूल *n*, (*prov.*) चेडा *m*, (*prov.*) झिलगा *m*, (*prov.*) झील *m*, (*prov.*) बोढ्या *m*, पोंगडा (R) *m*, कुमार, (*pop.*) कुंवर *m*, शिशु (S.) *m.* [BIG, OVER-GROWN B. (WHOSE मुंज HAS NOT TAKEN PLACE) घोडगा *m*, घोडमुंज्या *m.* LITTLE, LIVELY AND INTELLIGENT B. चिटलिंग *m*, चिट्टू *m*, चिंगा(गो)टी *f.*] २ कधींकधीं *son* ह्या शब्दाऐवजीं boy शब्दाचा उपयोग करितात; as, "My only B. fell by the side of great Dundee." ३ बरोबरीचा मित्र *m.* बरोबरीच्या मित्रांना *boy* अशी हाक मारितात. ४ पोक्त नव्हे असा मनुष्य *m.* ५ नोकर मनुष्य *m*; as, A post boy. B. *v. t.* मुलाचें सोंग घेणें. Boy'hood *n.* पोरपण *n*, बाल्यावस्था *f*, शिशुत्व *n*, पोरवय *n.* Boy'ish *a.* पोराचा, पोरासारखा, पोरवट, पोरगळ or पोरकट. Boy'ishly *adv.* पोरासारखा *a. decl.* पोरपणानें. Boy'ishness *n.* पोरकटपणा *m*, पोरखेळ, पोरस्वभाव *m.* Boys' play मुलांचा खेळ *m*, *fig.* क्षुल्लक गोष्ट *f*; अगदीं सोपी गोष्ट *f*; as, This problem is a boys' play to me. Boy-actress *n.* स्त्रीवेषधारी मुलगा *m.*

Boycott (boy'kot) [From Captain *Boycott*, a land-agent in Mayo, Ireland, with whom his neighbours refused to have any dealings in Dec. 1880.] *v. t.* *to withhold social and business relations from* (a person) शीं सर्व प्रकारचा व्यवहार बंद ठेवणें. २ *colloq.* गुडगुडी बंद करणें, *spec.* वाळींत टाकणें (पुष्कळ जणांनीं एक होऊन) अडवून धरणें.

Brabble (brab'bl) [Dut. *brabbelen*, to confound, to stammer.] *v. i.* (क्षुल्लक बाबतींत) भांडण करणें. B. *n.* कज्जा *m*, भांडण *n.* Brab'blement *n.* भांडण *n.* Brab'bler *n.* भांडखोर मनुष्य *m.*

Brace (brās) [O. Fr. *brace* (Fr. *bras*) from L. *brachia*, the arms, *pl.* of *brachium*, an arm.] *n.* *a straining strap or cord* कसणी *f*, ओढणी *f*, तबल्याची वादी *f*, ओढण *f*, दाटणी. २ अशा वादीची ताण; as, The B. or tension of the tympanum. ३ भोंक पाडण्याचा एक प्रकारचा सामता *m*, डोलमीट. ४ पकड *f*, आधार *m*, कैची *f.* ५ *print.* कंस *m*, कुंडली *f.* ६ जोडी *f*, जुळी *f*, जुळें *n* (मनुष्याचीं नव्हेत); as, A B. of ducks. ७ *pl.* विजार घट्ट बांधण्याचा पट्टा, विजारीचे खांदेबंद *m.* B. *v. t.* *to strain up, to make tense* ताणणें, ओढणें, ओढून घेणें, ओढ *f*- ताण *m.* देणें, चढवणें. २ दृढ करणें, पुष्टि देणें, पुष्ट करणें, मजबूत करणें. ३ आंवळणें, आंवळून घेणें, बळकटी आणणें. ४ तबला चढवणें. ५ मुंढा मारणें, पकड लावून-आधार देऊन मजबूत करणें; as, To B. a beam in a building. ६ कितीहि दाबवजन पडलें तरी टिकाव धरतां येईल अशा स्थितींत ठेवणें; (पाटलोन कोट गच्च बांधून) सज्ज तयारी करणें; as, He braced himself against the crowd. ७ घट्ट धरणें; as, "A sturdy lance in his right hand he braced." Brac'ed (v. V. I.) ताणलेला, ओढ दिलेला, ताण दिलेला, &c. Brac'er *n.* पट्टा *m*, कसणी *f.* २ (*obs.*) पौष्टिक औषध *n.* Brac'ing *p. a.* जोरदार, निरोगी, तकवा-हुशारी आणणारा; as, A bracing climate. २ पुष्टि करणारा, बळकटी आणणारा. To brace one's self आपल्याला तयार करणें.

Bracelet (brās'let) [Fr. *bracelet*, a bracelet, from Fr. *bras*, the arm.-L. *brachium*, the arm.] *n.* वलय *n*, कंकण *n*, करभूषण *n*, चुडा *m*, कडें *n.* [SOME KINDS OF BRACELETS ARE वाळा, गोट, कंकण, कांकणं, कंगणी, कडगुलें, पाटली, खिसमती, गजरा, तोडीची पाटली, चढईची वांक, छंद, जवा, जुळी OR जुळें, ठोसला, लगदा, पडुंची, दोरा, हातसर, तोडा, मेढसर. B. SET WITH GEMS FOR CHILDREN मणगटी *f.*] २ (of glass) बिलवर बांगडी *f*, कडगुलें *n.* [Bracelets bound with (gold or silver) wire लपेटा *m.* B. given to boot (in purchases)

वाढती बांगडी *f.* Seller of bracelets काजारी *m*, कांसार *m*.] Bracelet-maker *n*. कांसार *m*, बांगडेकरी *m*, लकिरी, मणेर, or मणेरी or मण्यार *m*.

Brach (brak) [O. Fr. *brachet*, Fr. *braque*,-from O. H. Ger. *bracke*, a kind of hunting-dog.] *n*. शिकारी कुत्रा *m*, शिकारीच्या वासावरून शोध लावणारा कुत्रा *m*. किंवा कुत्री *f*; 'ब्राक.'

Brachial (brak'i-al) [L. *brachium*, the arm.] *a*. बाहूचा, बाहुसंबंधीं, बाहूसारखा, प्रकोष्ठाचा. Brachial artery प्रकोष्ठगत धमनी. Brachiate *a*.

Brachycephalic, Brachycephalous (brak-i-sef-al'ik, brak-i-sef'al-us) [Gr. *brachys*, short & *kephale*, a head.] *a*. *anat*. लहान डोक्याचें.

Brachygraphy (bra-ki'gra-fi) [Gr. *brachys*, Sk. ऱ्हस्व, short & *graphe*, a writing. This word is obsolete except as a designation of certain old systems of Short-hand especially, that of Gurney.] *n*. लघुलेखनकला *f*. Brachygrapher *n*. लघुलेखक *m*.

Brachystochrone (bra-kis'to-krōn) *n*. *the curve of quickest descent* गुरुत्वाकर्षणाच्या योगानें एखादा पदार्थ अतिअल्पकाळांत एका विवक्षित स्थळीं ज्या मार्गानें येतो तो मार्ग-वक्र, लघुत्तमावरोहणवक्र *n*, ऱ्हस्वकालवक्र, ब्रॅकिस्टोक्रोन.

Bracket (brak'et) [F. *braguette*.–L. *braca*, *bracae*, breeches.] *n*. *arch*. तीर *m*. २ *naut*. बेळकें *n*, जहाजांतील एक वक्र लांकडाचा भाग *m*, लांकडी धनुकली *f*. ३ *print*. कंस *m*; as, [ ], कुंडली *f*. ४ *math*. कंस *m*. ५ *mech*. *eng*. अर्धी मेहेराप *f*. ६ (घर्षणाच्या धातूच्या बाहेरील) ओतींव अथवा घडींव लोखंडी कंस *m*. B. *v*. *t*. *print*. कंस घालणें. Bracket-lamp कंसांत अडकवावयाचा दिवा *m*. Bracket-foot *n*. *mech*. *eng*. मेहेरापीचा पाया *m*. Centre-bracket *n*. केंद्रकंस *m*. Knee-bracket *n*. वांकडा कंस *m*. Removal of brackets *math*. कंस उडविणें.

Brackish (brak'ish) [O. Fr. *brac*, mud; Dut. *brak*, refuse.] *a*. खारट, मचूळ (हा शब्द पाण्याला लावतात), सऊळ. Brack'ishness *n*. (v. A.) मचुळाई (R.) *f*, मचुळपणा *m*, सऊळपणा *m*.

Bract (brakt) [L. *bractea*, a thin plate of metal.] gener. *pl*. Bracts *n*. *bot*. ज्या पानाचे कोनांतून पुष्प अगर पुष्पगुच्छ येतें तें पान, फुलाच्या देंठाशीं असलेलें पान, पुष्पोपांगपर्ण *n*, उपपर्ण *n*. केळीच्या बोंडाच्या बाहेरच्या तांबड्या पानांना Coloured bract ह्मणतात, व त्याला spathe हाही शब्द लावतात. Brac'teal *a*. पुष्पोपांगपर्णयुक्त. Brac'teate, Bract'ed, पुष्पोपांगपर्णासंबंधीं. Bractlet, Bracteole *n*. *bot*. उपपुष्पोपांगपर्ण *n*, अल्पोपपर्ण. Bractless *a*.

*N. B.*—We must arbitrarily fix upon पुष्पोपांगपर्ण or उपपर्ण as the shortest word for Bract. In Bract the idea of "a leaf of the flower" is prominent.

Brad (brad) [M. E. *brod*.–Icel. *broddr*, a spike.] *n*. टेकस, एक लहान जातीचा खिळा *m*. २ सुरसा *m*, तुरई *f*, गुलमेख *f*, मकुड्याचा खिळा *m*. B. awl *lathe work* भोंक पाडण्याचें हत्यार *n*, बराडोल.

Bradypod (brad-i-pod') [Gr. *bradys*, slow & *pous*, *podos*, a foot.] *n*. मंदगतीचा मनुष्य *m*, सुस्त, आळसबोंडा. [मळई (?) *f*, टेंकाड *n*.

Brae (brā) [Scand. *bra*.] *n*. टेंकडीची बाजू *f*. २ उतरण *f*.

Brag (brag) [Fr. *braguer*, to flaunt; Dan. *brag*, a crack.] *v*. *i*. बढाई-गर्व करणें, शेखी मिरविणें. B. *n*. घमेंडी मिरविणें-मारणें, बढाई *f*, आत्मप्रशंसा *f*, आत्मप्रौढी *f*. २ पत्त्यांचा एक प्रकारचा खेळ *m*. Brag'ger *n*, Brag'gart *n*. & *a*. शेंदाडशिपाई, बढाईखोर, शेखी मिरविणारा, आत्मप्रौढी करणारा. Bragg'artism *n*. Bragging *a*. शेखी मिरविणारा, बढाई मारणारा. B. *v*. *n*. शेखी मिरवणें. Braggingly, Bragly *adv*. See the word Boast.

Braggadocio (brag-a-dō'shi-o) [From *braggadochio*, a boastful character in Spenser's 'Faerie Queene,' from the verb to Brag.] *n*. बढाईखोर, फुशारखोर *c*, तिसमारखान *m*. 'Brag is a good dog, but Holdfast is better.' बोलणें चांगलें, पण (बोलण्यापेक्षां) करणें फार उत्तम.

Brahma (brä'ma) [From *Brahma*, the Supreme post-Vedic Hindu deity.] *n*. *the Supreme Universal Infinite Spirit* ब्रह्म *n*. २ *the Creator* (according to Hindu theology) ब्रह्मा *m*. (ब्रह्मा, विष्णु, महेश या तिहींपैकीं पहिला.)

Brahman, Brahmin (brä'man, brä'min) [The word etymologically means "one who knows the ब्रह्म" (ब्रह्म जानातीति ब्राह्मणः).] *n*. ब्राह्मण *m*, भट्ट *m*, विप्र *m*, वर्णगुरु *m*. [SOME OTHER TERMS FOR A BRAHMIN ARE भूदेव, द्विज, द्विजन्मा, जानव्याचा धनी, यज्ञोपवीताचा धनी, यज्ञोपवीतधारी, अठरा वर्णांचा गुरु, वर्णोत्तम, उत्तमजाति, प्रथमवर्ण.] The four different stages or periods of a Brahmin's life are:—(१) ब्रह्मचर्य (the stage of studentship). (२) गार्हस्थ्य or गृहस्थाश्रम (the stage of married or family life). (३) वानप्रस्थाश्रम (the stage of retirement from the business of the world into a forest). (४) संन्यासाश्रम (the stage of a संन्यासी). A Brahmin in the first stage of his life is ब्रह्मचारी (unmarried); in the second stage of his life is गृहस्थ (married); in the third stage of his life is a वानप्रस्थआश्रमी (with or without a wife); in the fourth a संन्यासी, संन्यासाश्रमी, चतुर्थाश्रमी, संन्यस्त (without a wife). A B. priest भिक्षुक or भट. A lay B. गृहस्थ. A B. boy from thread investiture to maturity बटु *m*, बटुक *m*, बटुवामन *m*. B. devoted all through his life to celibacy, study and religion नैष्ठिक ब्रह्मचारी, बालगोसावी, बालब्रह्मचारी. B. upon his begging rounds

देशावरकरी *m.* Begging rounds of a B. देशावर *m, n.* Alms, &c. thus obtained देशावर *m, n.* B. who begs cooked food from door to door मधुकरी *m.* Cooked food thus begged माधुकरी *f.* B. clothes or apparel ब्राह्मणथर *m.* B. mulcts ब्रह्मदंड *m.* B. offspring ब्राह्मणबीज *n.* B. property ब्रह्मस्व *n.* B. town ब्रह्मपुरी *f.* B. caste ब्राह्मणजाति *f.* A company or assembly of Brahmans ब्रह्मवृंद *m.*—(in contempt) भटोरखाना *m.* Curse by a B. *n,* ब्रह्मशाप. Endowments (of villages or lands) to a B. अग्रहार *m.* Feasting of B.s ब्राह्मणभोजन *n,* ब्राह्मणसंतर्पण *n,* समाराधना *f.* Feasting of 1000 B.s सहस्रभोजन *n.* Feasting of 100000 B.s लक्षभोजन *n.* A B. woman ब्राह्मणी *f.* The spiritual power of a B. ब्रह्मतेज *n,* ब्रह्मवर्चस *n.* Hatred of B.s ब्रह्मद्वेष *m.* Hater of B.s ब्रह्मद्वेषी-द्वेष्टा. Learned B. पंडित *m.* Money given to B. s दक्षिणा *f;* देकार *m (idio.),* पांतु *(colloq.),* or पांतूचें *(colloq.) n.* Out-caste B. बहिष्कृतब्राह्मण *m.* Religious duties of a B. ब्रह्मकर्म *n.* The six acts or duties of a B. षट्कर्में *n. pl.* A disorderly or carelessly dressed B. नेभळभट *m,* भोंगळभट *m,* पोकळभट *m,* गयावळ *m.* Give him (B.) an inch and he will take an ell भटास दिली ओसरी भट पाय पसरी. Brahman'ic,—al *a.* ब्राह्मणजातीचा, ब्राह्मणजातीय, ब्राह्म, ब्राह्मणी, ब्राह्मणयोग्य. Brah'manicide *n.*—*act.* ब्रह्महत्या *f;* ब्रह्मवध *m,* ब्रह्मघात *m,*—agent ब्रह्मघ्न, ब्रह्मघातक. Brah'manism *n.* ब्राह्मणपणा *m;* ब्राह्मण्य *n.* Insignia of B. शिखासूत्र *n.* Brah'manist *n.* Brahmo ब्रह्मसमाजाचा अनुयायी *m.* Brahmo'ism ब्रह्मसमाजपंथ *m.* Brah'mo'samaj.

Braid (brād) [A. S. *bregdan, bredan,* to weave.] *v. t.* गुंफणें, विणणें, वळणें, वेणी घालणें. B. *n.* गोफ *m,* वेणी *f.* २ वेणीसारखी-वेणीची फीत *f.* Triple B. त्रिवेणी *f.* Braid'ed *a.* विणलेला, वेणी घातलेला, विणींव, गुंफींव. Braid'ing *n.* वेणी घालणें *n,* फीत विणणें *n.* २ विणी *f,* (समुच्चयार्थीं) वेणीचें विणकाम *n,* वीण *f.*

Braid (brād) [M. E. *braid,* trick, deceit–A. S. *brægd,* deceit; from A. S. *brægd, bregdan,* to draw out, to weave.] *v. t. (obs.) Shakes.* निंदा करणें, दोष लावणें. B. *a. (ob.)* फसवणुकीचा, छपवाछपवीचा, मनांत एक व बाहेर एक अशा प्रकारचा.

Brain (brān) [A. S. *bragen, brægen,* the brain.] *n.* मगज *m,* मस्तुलुंग *m,* मस्तिष्क *n,* मस्तकस्नेह *m,* शिरोब्रह्म *n,* मेंदू *m,* मजा *m,* गोर्द (R) *n.* [CREATION OF ONE'S B. कल्पित कादंबरी *f.* TO RACK OR WEARY ONE'S B. कपाळकूट *f-* कपाळफोड *f-* कपाळकष्टी *f-* कडाकूट *f-* डोईफोड *f-* &c. करणें.] २ *brains* बुद्धि *f,* मति *f;* as, 'He is of dull brains', 'He has no brains about him.' (often in *pl.*) ३ बुद्धिस्थान *n.* B. *v. t.* कपाळमोक्ष *m.* करणें *g. of o.,* डोकें *n-*&c. फोडणें *g. of o.,* डोकें फोडून मेंदू काढणें, ठार करणें. 'There thou mayest B. him.' २ मेंदू पुरवणें. Brain-centres मेंदूंतील मुख्य पीठें, मस्तिष्कपीठें (Centre=पीठ). Brained *a.* बुद्धीचा. Brain-fever *n.* मास्तिष्कगामी-मनोदूषक-ज्वर *m.* Brainish *a.* तापट स्वभावाचा. Brain'less *a.* निर्बुद्ध, बुद्धिहीन-रहित-शून्य-&c., मतिहीन. २ मूर्ख, मठ्ठ, बेवकूफ. Brain-pan *n.* कवटी *f,* गोर्दभाजन *n.* Brain'-sick *a.* मतिहीन, मूढ, मूढमति, भ्रांतिष्ट. Brain'-sickly *adv.* Brain'-sickness *n.* (v. A.) मूढता *f,* मतिभ्रंश *m.* Brain'y *a.* चंचल बुद्धीचा. Softening of the brain मेंदूचें काठिण्य नाहींसें होणें, विकारानें मेंदूला मृदुत्व येणें, मस्तिष्कमेदोभवन. Brain-inflammation मेंदूचा दाह *m-*अभिताप *m.*

Braird (brārd) [A. S. *brord,* the first blade of grass or corn.] *n.* अंकुर *m.*

Brait (brāt) [Fr. *braed,* grind.] *n. a rough diamond* खाणींतला-पालीस न केलेला हिरा *m.*

Brake (brāk) *(obs.) p. t.* of Break.

Brake (brāk) [Dut. *braak,* a marsh; Ger. *brach,* a wood in a marshy place, connected with *Break.*] *n. a thicket, a copse* कांटेरान *n,* कांटलील *(obs.) n,* कांटवन *n,* कांटेझाडी *f,* कांटेराई *f.*

Brake (brāk) [M. E. *brake.*-Low Ger. *brake,* a flax-brake.] *n.* ताग ठेंचून त्याचा काथ्या निराळा काढण्याचा दांडा *m.* २ *the handle of a pump* बंबाचा दांडा *m-*मूठ *f.* ३ (for wheels) वेगमोड *f,* वेग कमी करण्याची कळ *f,* गतिरोधक *m,* गतिस्तंभक *m,* ढकली *f,* घोरपड *f.* ४ *a carriage for training horses* खडखडा *m,* तक्ता *m.* ५ पीठ मळावयाचें यंत्र *n-*काथवट *f.* ६ *(obs.)* घोड्याचा आणीदार लगाम *m.* ७ नाल ठोकतांना घोड्यास जखडून बांधण्याचा सांगाडा *m,* पायबंद *m.* ८ *agric.* दांताळें *n-* फेंसाटी *f.* हें फणीसारखें असून जमीन नांगरल्यावर मातीचीं डिखळें फोडण्यास ह्याचा उपयोग करितात. ९ *engin.* (एंजिनाचें) घर्षणमापकयंत्र *n.* Brake'less *a.* Brak'eman, Brak'esman *n.* आगगाडीचा वेग कमी करणारा *m,* कळवाला *m,* वेगमोड्या. Brake'-van *n.* (आगगाडीचा) ब्रेकडबा *m, n.* Brake'-wheel *n.* वेगमोडीचें किंवा गतिस्तंभकाचें चाक *n.*

Bramah-press (brä'ma-pres) [After Joseph *Bramah* of London, the inventor (1748-1814).] *n.* ब्रामाचें दाबक यंत्र *n,* दाबजलयंत्र *n,* ब्रामाचा दाबण्याचा प्रेस *m.*

Bramble (bram'bl) [A. S. *bremel.*] *n. Rubus indicus* कांटेझाट *n,* गौरी *f.* Bram'ble-berr'y, Bramble-bush *n.* कांटेरी झाड *n,* गौरीफळ *n.* Brambled *a.* Bram'bly *a.*

Brame (brām) [It. *brama.*] *n.* उत्कट इच्छा *f;* as, Heart burning B.

Bran (bran) [O. Fr. *bran,* bran.] *n.* (गव्हांचा-&c.) कोंडा *m,* भुसा *m,* (भाताचा-&c.) तूस *m,* करल *n,* (of wheat sprinkled with water) तरडा or तराडा *m,* तडरक (R.) *n,* तरडें *n.* २ (-as remaining in fine flour) तांब *f.* Bran'fulness *n.* कोंडा-तांब असलेली

स्थिति *f*, कोंडसरपणा *m.* Bran'ny *a.* कोंड्या-करला-सारखा, कोंडा-करलें असलेला.

Branch ( bransh ) [ Fr. *branche.*—Low L. *branca*, a beast's paw. ] *n.* ( of a tree ) खांदी *f*, फांदी *f.* [ B. *intens.* खांदाड *n*, फांद ( R ) *n*, फांदा ( R ). DIM. फांदी *f*, & फांदोरी *f.* & *intens.* फांद(दा)डा *m*, फांटा *m*, *f*, फणगाडा *m*, शाखा *f*, स्कंध *m.* SMALL LEAFY B. टाहळा *m*, डाहळा *m*, *dim.* टहाळी *f*, टाहळी *f*, डाहळी *f*, डहाळी *f*, डघळा ( R ) *m.* ] २ ( of a river ) उपनदी *f*, फांटा *m.* ३ ( of a subject or discourse ) शाखा *f*, अंग *n*, प्रकरण, कथाभाग *m.* [ MINOR B. उपांग. ] ४ ( of a family ) शाखा *f*, वंशज *m*, कुलसंतान *n*, अपत्य *n.* ५ ( of a curve ) शाखा *f.* Branch *a.* मुख्य पदार्थापासून-विषयापासून फुटलेला-पसरलेला; as, A branch vein उपशीर. A branch road मुख्य रस्त्याची शाखा *f*, शाखापथ *m.* A branch topic विषयाचें उपांग *n*, विषयांग. A branch store वखारीची शाखा *f*, संग्रहशाखा *f.* Branch *v. i. to shoot in branches* फुटणें, फांटे *m*, *pl.* फुटणें. २ ( with out) *to ramify*, *to spread diversely* फुटणें, फांकणें, फांकटणें, फणगडे *m. pl.* फुटणें *g. of s.*, फैलावणें. ३ *to amplify*, *to speak or write diffusely* पाल्हाळ *m*- विस्तार *m.* करणें. B. *v. t. to make subordinate divisions* विभाग *m. pl*- पोटविभाग *m. pl.* करणें *g. of o.* २ *to adorn with gold or needle-work representing flowers or foliage* बुटी *f*- बुटे *m. pl.* काढणें, फुलांफांद्यांचा कशीदा काढणें, ( फुलांफांद्यांची ) वेलबुटी *f.* करणें. ३ फांद्या लावणें-पुरवणें. Branch-candle-stick *n.* दिव्याचें झाड *n*, दीपवृक्ष *m.* Branched *a.* Branch'er *n.* फांद्या टाकणारा-असणारा. २ आपलें घरटें सोडून फांद्यावर बसावयास जाऊं लागलेला पक्षी *m.* Branch'ery *n.* फांद्यांचा झुबका *m*, शाखांचा समुदाय *m.* Branch'-ing *a.* फांदटणारा &c. Branch'y *a. having many branches* पुष्कळ फांद्यांचा, पुष्कळ शाखा असलेला, फांदललेला, बहुशाख, शाखाबहुल, शाखासंभृत- [ B. AND BUSHY झांपाळ, झांपाळलेला, झांकराचा.] २ *striking or spreading out* ( horns, &c.) फांकट, फटांगा (R). Branch'iness *n.* ( v. V. 1.) फांदललेलेपणा, शाखाबाहुल्य *n.* २ फांकटपणा *m*, फांकटी *f.* Branch'-less *a.* शाखाहीन. Branch'let *n.* लहान फांदी *f*, शिपटी *f.* Branch'work *n.* नकशीदार वेलबुट्टीचा कशीदा *m.* Olive-branch *n. fig. an infant* लहान बाळ *n.* २ *fig. peace-making* समेट *m*; as, To hold out the olive-branch समेटाचें बोलणें लावणें. Root and branch *adv.* मुळांफांद्यांसकट, पूर्णपणें; as, To destroy a thing root and branch. Root and branch *a.* निर्मूलन करणारा; as, A root & branch policy. To branch off (पासून) फांदटणें, निरनिराळे फांटे फुटणें. To branch out (एखाद्या विषयाच्या उपांगांसंबंधीं ) पाल्हाळ लावणें.

Branchiæ ( brangk'i-ē ) [ L. ] *n. pl. gills* (माशांचे किंवा इतर जलचर प्राण्यांचे) कल्ले *m. pl.* Branch'ial, Branch'iate *a.*

Brand ( brand ) [ Icel. *brandir*; Ger. *brand*, a fire-brand; A. S. *brand*, a burning, a sword; from *brann*, *brennan*, to burn. ] *n.* कोलीत *f*, कोलती *f*; as, "Snatching a live B. from wigwam." २ *fig.* तलवार *f*; as, "Paradise, so late their happy seat, Waved over by that flaming B." ३ डाग *m*, चरका *m*, लास *m*, चोंचा *m.* [ B. BURNED (UPON THE HAND OR ARM) WITH COW-DUNG धामा *m*, धमाटा *m.* CIRCULAR B. गूल *m.*] ४ *a mark of infamy* डाग *m*, कलंक *m*, कालिमा *f*, लांछन *n.* ५ *fig.* जात *f*; as, "Wine of good B." ६ डागणी *f.* ७ *bot.* भाजीपाल्यावरची कीड *f*, पिकाचा रोग *m.* ८ पक्की खूण *f*, अपराध्याला डागणीनें केलेली खूण *f*; as, The B. of private vice. ९ *a trade-mark* व्यापाराची खूण *f.* B. *v. t. to burn with a hot iron* डागणें, डावणें, लासणें, डाग *m*- लास *m*- चोचा *m*- डाव *m*- गूल *m*, &c. देणें. २ *fig.* डागणें, डाग *m*- कलंक *m*- लांछन *n*- &c- लावणें. ३ खूण ह्मणून डागणें. ४ *to impress indelibly* ( कधींही न पुसेल अशी ) खूण करणें; as, "As if it were branded on my mind." Branded *a.* (v. V. 1.) डागलेला, डाग दिलेला, &c., लाशा, डागील. २ डागलेला, डागील, कलंकित, कलंकयुक्त. Brand'er *n.* डाग देणारा *m.* 2 (*obs.*) लोखंडी पळ्यांची शेगडी *f.* B. *v. t.* शेगडीवर शिजवणें. Brand'ered, Brand'ering *p. a.* Branding-iron, Brand'-iron *n.* डागणी *f*, डाहणी *f*, दागणी *f.* २ लोखंडाची तिवई *f.* Brand-new, Bran-new *a. quite new* कोरा करकरीत (आतांच भट्टींत तयार करून आणलेला). Brand'reth *n.* (पिपालालची लोखंडाची ) तिवईसारखी ठेवण *f.* २ विहिरीसभोंवतील लोखंडी कठडा *m.* A brand from the burning *fig.* आलेल्या घोरपडींतून शिताफीनें बचावलेला मनुष्य *m.*

Brandish ( brand'ish ) [ Fr. *brandir*, to make a thing shake by the force it is cast with; A. Fr. *brand*, a sword. ] *v. t. to flourish* (दहशत घालण्याकरितां) किंवा तयारी दाखविण्याकरितां ) परजणें. २ झोंकून देणें; as, To B. syllogisms. Brand'isher *n.*

Brandy ( brand'i ) [ Formerly brandy-wine: Ger. *branntwein*, burnt-wine: Dut. *brandewijn.* ] *n.* ब्रांडी *f*, एक प्रकारची दारू *f.* Brandied *a.* दारूनें धुंद झालेला. Brand'y-pawnee' *n.* दारू आणि पाणी *n.*

Brank ( brangk ) [ Prob. a variant of Prank. ] *v. t.* बागडणें, (घोडा लगाम तोंडांतून टाकण्याचा प्रयत्न करतो तेव्हां) डोकें नाचवणें. २ *fig.* बढाई मारणें. Branky *a.* दिखाऊ, भपकेदार.

Brannew ( bran'-nū ) [ Corr. of Brand-new. ] *a.* अगदीं नवीन, घणकोरा, कोरा करकरीत, घणाखालचा.

Brash (brash) [Fr. *breche*, a breach, broken stuff.] *n.*

(झाडाची कापलेली) निकामी डाहाळी *f.* २ बर्फाचे तुकडे *m, pl.* Brashy *a.* Water-brash *n. med.* अपचनानें पोटांतून तोंडांत पाणी येणें-गुळण्या येणें, द्रवोद्गार, पित्तोद्गार. Weaning brash *n. med.* अंगावरून सोडवल्यावर मुलांना कधीं कधीं होणारी हगवण *f.*

Brash (brash) [Scot., prob. onomatopœic.] *n.* एकदम थोडीशी तब्यत बिघडणें *n.* २ पावसाची एकदम आलेली सर *f.* B. *v. t.* त्रास देणें.

Brasier (brā'zhēr) [Fr. *braise,* live coals. Vide Brass.] *n.* शेगडी *f.*

Brasier, Brazier (brā'zhēr) *n.* कांसार *m,* कांस्यकार *m.*

Brass (bräs) [A. S. *braes,* allied to Icel. *brasa,* to harden by fire; Dan. *brase,* to fry; Swed. *brasa,* fire.] *n.* पित्तळ *n,* (pop.) पितळ *f.* [CALX OF B. पुष्पक *n,* पुष्पकेतु *m,* रीति *f,* रीतिपुष्प *n,* रीतिका *f.* Sounding B. वाजणारी पितळ *fig.* व्यर्थ बडबड करणारा.] २ *fig. impudence* उद्धटपणा *m,* तिखें meaning impudence. ३ दागिने *m. pl;* पितळेचीं भांडीं *n. pl;* as, "The very scullion who cleans the brasses." ४ घर्षण सोसणारी पितळेची पट्टी *f. fig.* ५ *pl.* सनई *f.* ६ (पितळेचें) रोख नाणें *n.* ७ मृताच्या स्मरणार्थ त्याचा चेहरा ज्यावर काढला असतो अशी पट्टी *f,* पितळेची स्मरणपट्टी *f.* Brassarts *n. pl.* चिलखतांतील खांदा आणि बाहु जोडणाऱ्या पितळेच्या पट्ट्या. Brass *v. t.* (R.) पितळेनें मढविणें. Brass-band *n.* पितळेचीं वाद्यें (शिंगा, तुतारी &c.) वाजविणारी मंडळी *f.* Brass-foil *n.* पितळेचा वर्ख *m,* पितळपान *n.* Brasset, see Brassarts. Brass-finisher *n.* पितळेच्या वस्तु साफ करणारा *m.* Brass-fittings *mech. eng.* पितळेचें सामान *n.* Brass-leaf पितळपान *n.* Brass-founder *n.* पितळ ओतणारा *m.* Brass'iness *n.* पितळपणा *m,* पित्तलत्व *n.* Brass-paved टिकाऊ. Brass-visaged *a.* उद्धट. Brass-wire *n.* पेंचक *f, n,* (?) पितळेची तार *f.* Brass-works *pl.* पितळेचा कारखाना *m.* Brass, Brassy *a.* पितळेचा, पितळी, पितळेच्या रंगाचा, पित्तलेसंबंधीं, पित्तलमय. २ उद्धट, धीट. *n.* पितळेच्या बुडाची गॉल्फ खेळण्याची काठी *f.*

Brat (brat) [A. S. *bratt,* a cloak.] *n* (तिरस्कारार्थी) कारटा *m,* (टी *f,* टें *n.*), पोरटा *m.* (टी *f,* टें *n.*) २ मळवस्त्र *n.* Brat'chet, Brat'ling *n,* लहान पोर *n.*

Bravado (brav-ā'do) [Sp. *bravada,* vide Brave & Brag.] *n.* फुशारकी *f,* फुशारी *f.* २ स्वतःची फुशारकी दाखविण्याकरितां दिलेली धमकी *f.* ३ तिसमारखानपणा *m. pl.* Brav-adoes. Bravado *v. i.* फुशारकी मारणें, उद्धटपणानें-अरेरावीनें-तिसमारखानासारखें बोलणें. Bravadoing *n.*

Brave (brāv) [Fr. *brave,* gay.–Fr. *braver,* to swagger; Sp. *bravo,* bullying.] *a. courageous, spirited, valiant, gallant* शूर, छातीदार, छातीचा, बहाद (दू) र, जवानमर्द, मर्दा, मर्दाना, हिम्मती, हिम्मतीचा, हिम्मतदार, शौर्यसंपन्न, शौर्यशाली. २ *magnificent, noble, grand* खासा, नामी, छानदार, उमदा, उत्कृष्ट, सुंदर; as, "It being a B. day, I walked to White-hall." ३ शूराच्या ढबीचा, दिसण्यांत चांगला; as, 'Wear my dagger with B. grace.' Brave *v. t. to defy, to challenge* न डगमगतां झगडणें, हमतम *m.* दाखविणें, हमतमानें बोलावणें, नाकावर निंबू *n.* घासणें (?). २ तुच्छ मानणें. ३ *to encounter with courage* धैर्यानें संकटाला पाठ देणें, शौर्यानें लढणें, धैर्यानें झगडणें, छाती ठोकून सामना देणें-करणें, सामना देत राहणें, छाती करून उभा राहणें. B. *n. a man of daring courage* शूर मनुष्य *m.* २ उत्तर अमेरिकेंतील शूर इंडियन. ३ उरफाट्या काळजाचा मनुष्य *m.* ४ (*obs.*) युद्धास-सामन्यास आमंत्रण *n.* ५ (*obs.*) धमकी *f;* as, 'And so in this, to bear me down with braves.' Brave'ly *adv.* (v. A.) मर्दानें, हिंमतीनें, शहामतीनें, &c. शौर्यपूर्वक. २ उमदेपणानें, छाती करून, भपक्यानें, दिखाऊपणानें. Brave'ness *n.* Brave'ry *n.* (v. A.) शौर्य *n,* शूरत्व *n,* जवानमर्दी *f,* छाती *f,* मर्दी *f,* मर्दुमकी *f,* हिम्मत *f,* हिय्या *m,* क्षात्रधर्म, *m,* शहामत *f.* २ उमदेपणा *m,* छानदारी *f,* छानी *f,* दिखाऊपणा *m,* भपका *m;* as, 'With scarfs and fans and double change of bravery.'

Bravo (bräv'o) [See Brave.] *n.* मारेकरी *m,* उरफाट्या काळजाचा मनुष्य *m.* Brävoes *pl.*

Bravo (bräv'o) [Sp. & It.] *interj.* भले शाबास, वाहवा, धन्य, जयजय, लगें, ऐशी, खाशी. Acclamations of bravo! bravo! शाबासकी *f. Colloq.* खाशी. [पुरुषाला BRAVO, बायकोला BRAVA, आणि पुष्कळ मंडळीस BRAVI ह्मणतात.]

Bravura (bräv-ōōr'a) [Italian word meaning bravery or spirit.] *n. mus.* अतिशय अलंकारयुक्त गीत-राग.

Brawl (brawl) [Fr. *brailler,* to cry often; Dan. *bralle,* to talk much and high.] *n. a clamorous contention* भांडण *n,* हमरीतुमरीचें भांडण *n,* कटकट *f,* हर्पामर्ष (?) *m,* कलागत *f,* खणकादणका *m,* खडाजंगी *f,* धडकाधडकी *f,* खडकाधडका *m.* B. *v. i.* खटपटणें, खडका *m*-खटका-खडकाधडका *m*-तडकाफडकी *f* उडणें-झडणें-होणें-चालणें, कचक *f* उडणें-झडणें. २ *to speak loudly and indecently* गोंगाट *m*- गलबल *f*- गलबला *m*-कलकल *f.* करणें-करून बोलणें, खडखडून बोलणें. ३ –(as a brook or a stream) खळखळणें; as, "A brook brawls along." Brawler *n.* Brawling *p. a.* (v. V. 1.) भांडरा, कटकट करणारा, कलागती, कलागत्या, कटकट्या. २ गोंगाट्या, गलबल्या, ओरड्या, खडखडून बोलणारा. ३ खळखळ वाहणारा. Brawling *n.* (v. V. 1.)-*act.* खटपटणें *n,* &c. कटकट-कलागत-&c. करणें *n.* 2-*act.* गोंगाट-&c. करणें *n.*

Brawl (brawl) [Fr. *braule.*] *n. Shakes.* नाच *m.*

Brawn (brawn) [A. S. *braedan,* to roast.] *n.* (हाताचा किंवा पोटरीचा) मांसल व पिळदार स्नायु *m,* मांसल प्रदेश *m.* [SOME SPECIAL WORDS FOR THE

SAME ARE बेडकी *f*, गांठ *f*, गांठी *f*, *pl*., मेंडकी *f*, पेंडकी *f*.] २ (*obs.*) *esp.* the arm, the calf of the leg, the buttock दंड *m*, पोटरी *f*, ढुंगण *n*. ३ डुकराचें मांस *n*, रानडुकराचें भाजलेलें मांस. ४ स्नायूंचें बल, शरीरबल. Brawned *a.* Brawner *n.* जेवणाकरितां मारलेलें रानडुकर *n.* Brawn'iness *n.* मांसाळपणा *m*, बळकटपणा *m*, गांठाळपणा *m*, मांसलत्व *n*. Brawn'y *a.* मांसल, मांसाळ, गांठळ, गांठाळ, गोंडस, गोलदार, बळकट.

Bray (brā) [Fr. *broyer*, to break.] *v. t.* कुटणें, खलणें; as "Though thou shouldest bray a fool in a mortar, yet will not his foolishness depart from him." Bray'er *n.* कुटण्याचें यंत्र *n*. २ शाई टाइपावर पसरण्याचें यंत्र *n*.

Bray (brā) [Fr. *braire*, to cry like an ass.] *n.* गाढवाचें ओरडणें *n*, गर्दभध्वनि *m*, मोठी आरोळी *f*, खरशब्द *m*, रासभध्वनि *m*. B. *v. i.* ओरडणें. [THERE IS NO SPECIAL WORD IN MARATHI FOR THE BRAYING OF AN ASS.] २ कर्कश शब्द करणें (तुतारीचा). B. *v. t.* कर्कश शब्दानें बोलणें, ओरडणें. Bray'er *n.* गाढवासारखें ओरडणारा. Bray'ing *n.* गाढवासारखें ओरडणें *n*. B. *a.* गाढवासारखें ओरडणारा.

Bray (brā) *n.* टेंकडी *f*, चढाव *m*.

Braze (brāz) [Fr. *braser*, to solder, A. S. *braes* brass-from its being used in solder.] *v. t.* पितळेनें मढविणें. २ (पितळेचा) पक्का डांक(ख) देणें-लावणें; as, To B. the seams of a copper pipe. ३ कठीण करणें. *fig.* संवय करणें, आंगवळणीं पाडणें; as, Now I am brazed to it. Brazen *a.* पितळेचा, पितळीचा, पित्तलमय, पित्तलनिर्मित; as, A brazen sound. २ अविचाराचा, निलाजरा; as, A B. face or countenance. B. *v. t.* कोडगेपणानें वागणें; as, "Sabina brazed it out before Mrs. Wygram, but inwardly she was resolved to be a good deal more circumspect." Brazen-face *n.* निलाजरा *m*, कोडगा *m*. Brazen-faced *a.* निलाजरा, कोडगा. Bra'zenly *adv.* Bra'zenness *n.* Bra'zenry *n.* निलाजरेपणाचें बोलणें *n*. Brazing *n.* एके ठिकाणीं सांधणें *n*. Braz'ing metal *n. mech. eng.* डांख करण्याची धातू *f*.

Brazier vide Brasier.

Brazil, Brazil-wood (bra-zil') [Port. *brasa*, glowing embers; O. Fr. *brasil*, of a brightred.] *n.* ब्राझिल लांकूड *n*, तांबड्या रंगाचें एक जातीचें लांकूड *n*. Brazil'ian *n.* दक्षिण अमेरिकेंतील ब्रेझिल देशांतील रहिवासी. B. *a.* ब्रेझिल देशासंबंधीं.

Breach (brēch) [M. E. *breche*, a fracture.—O. Fr. *breche* (Fr. *breche*), a fracture.] *n. a break, gap, rupture* भगद (दां) ड *n*, भगदळ *n*, भगाड *n*, भगास *n*. भोंकसा *m*, भोंसका *m*, भोसकू *m*, भोंसकट (R) *n*, भोसकटें (R) *n*, भंगसाळ *f*, खिंड *f*, खिंडार *n*, खिंडारें *n*, सांध *f*; as, A B. in a wall. २ *violation, infringement* मोडणें *n*, तोडणें *n*, भंग *m*, (much used in comp.) भेद *m*, (in comp.) उल्लंघन *n*. ३ *rupture among friends* फूट *f*, तूट *f*, भेद *m*, विघाड *m*, अंतर *n*. as, The B. of two brothers. [To heal a B. डांगपट्टी *f*, घालणें, भांडण मिटविणें.] ४ भंग *m*; as, B. of promise, Breach of law. ५ *surg.* जखम *f*. ६ तुटून पडणें *n*, हल्ला *m*, झपाटा (given in the Marathi Bible); as, "The Lord has made a B. upon Uzza." ७ *med.* उतरणें *n*, स्रंसन, भ्रंश, सरकणें, (आंतडें वगैरे भागाचें अंतर्गळ) (not अंग बाहेर येणें). ८ (जहाजावर समुद्राची) लाट आदळणें *n*- फुटणें *n*, लाटेचें पाणी *n*, मोठी लाट *f*. A clear breach जहाजावरून लाटा सपशेल निघून जाणें. A clean breach जहाजावरच्या सर्वांस लाटांनीं उडवून नेणें. Breach *v. t.* *to make a breach* खिंड *f*, पाडणें; as, To B. the walls of a city. २ *fig.* भंग करणें. To commit a breach of the peace सार्वजनिक शांततेचा भंग करणें. B. *v. i.* दुभागणें. Breach'y *a.* मोडण्याजोगा, फोडण्याजोगा.

*N. B.*—To heal a breach as given by Mr. Candy is a faulty or incongruous metaphor. We heal a wound but not a breach.

Bread (bred) [A. S. *breod*, BREAD.] [साहेब लोक भाकरीच्या पिठांत आंबवण घालतात, व ते ती भट्टींत भाजतात. हिंदु लोक भाकरीच्या पिठांत आंबवण घालीत नाहींत व ते ती तव्यावर भाजतात. BREAD=भाकर. व CAKE पोळी असे अर्थ एकदांचे ठरवून टाकावे. CAKE शब्दाची माहिती पुढें दिली आहे. रोट, रोटगा, पानगा, भाजणीची भाकर, चपाती इत्यादि भाकरींच्या प्रकारांसंबंधानें पूर्ण माहिती कोशांत देणें अशक्य आहे.] *n.* (जोंधळ्याची-तांदुळांची-बाजरीची-&c.) भाकर *f*, गव्हांची चपाती *f*. [B. IN COVERT OR JOCOSE PHRASEOLOGY भकारी *f*, भास्करी *f*, सूर्यकन्या *f*.] २ (compreh.) अन्न *n*, अन्नपाणी *n*, दाणापाणी *n*. ३ *means of subsistence* (as in the phrase 'daily bread') अन्नवस्त्र *n*, निर्वाहास लागणाऱ्या अवश्य वस्तु *f. pl*, चरितार्थ *m*-उपजीविका *f*, निर्वाहाचें साधन *n*; as, "The B. of a family depends on that man's paralytic hand." Bread and water अन्नपाणी *n*, अन्नोदक *n*. that has eaten the bread (salt) of (*) अन्नाचा, To beg for one's bread (*) (to beg one's bread) अन्नाकरितां भीक मागणें, अन्नान्न करीत फिरणें. To begin to get (earn) one's bread आपलें अन्नवस्त्र मिळवूं लागणें, आपल्या श्रमानें पोट भरूं लागणें. To be reduced to bread and water केवळ अन्नोदकावर राहण्याची स्थिति येणें, चणवणी-मिठवणी पिऊन असणें. To destroy or injure one's bread (*) (to deprive one of his bread, to stand in the way of one's bread) पोटावर पाय देणें, पोटावर उठणें-येणें, पोटाआड-अन्नाआड येणें, पोटावर मारणें, अन्नांत माती *f*. घालणें-कालवणें, *idio.* To lose one's bread अन्न जाणें *g. of o.* To put in the way of earning one's B. अन्नास लावणें. To quarrel with one's B. and butter पुढें वाढलेल्या पानास लाथ *f*. मारणें, आपल्या अन्नांत माती *f*. पाडून घेणें. To take the B. out of one's

mouth तोंडाचा घास *m*, काढणें-हिरावून घेणें, &c. Him laud whose B. you eat ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी. Bread *v. t. cookery.* शिजविण्यापूर्वीं भाकरीचे बारीक तुकडे पेरणें; as, Breaded cutlets. Bread-basket *n.* भाकऱ्यांची टोपली *f.* २ *slang* पोट *n.* Bread-corn *n.* भाकरीचें धान्य *n.* Bread-room *n.* गलबतांतील भाकरी ठेवण्याची खोली *f.* Bread-study *n.* पोट भरण्याची विद्या *f.*, पोट भरण्याकरितां मिळविलेली विद्या *f.* Bread-stuff *n.* भाकरीचें पीठ *f.* Bread-tree *n.* भाकरीचें झाड *n.* हें झाड दक्षिण पासिफिक महासागराच्या बेटांत होतें व ह्यापासून भाकरी होते. Bread-winner *n.* (सर्व कुटुंबाकरितां) भाकरी मिळविणारा. Bread and butter लोणीभाकर cf. Marathi भाजीभाकर, मीठभाकर. To break bread (तोंडांत घांस घेण्याकरितां) भाकरी मोडणें. २ जेवणें. ३ (दुसऱ्यास वांटण्याकरितां) भाकरी मोडणें, भाकरी मोडून दुसऱ्यास वांटणें. ४ प्रभुभोजनांतील भाकरीचा प्रसाद घेणें-सेवन करणें. ५ प्रभुभोजनाच्या प्रसादास हजर असणें. He took bread and salt त्यानें शपथ घेतली. To know on which side one's bread is buttered आपलें हित कोणत्या रीतीनें साधेल याविषयीं निदिध्यास करणें, स्वहिताकडे लक्ष देणें. Bread buttered on both sides *fig.* चमचमीची स्थिति *f.*, चमचम *f.* To butter one's bread on both sides *fig.* उधळपट्टी करणें. Bread and cheese, *the barest necessities of life* निर्वाहाच्या आवश्यक वस्तु cf. Marathi भाजीभात, मीठभाकर. Bread of idleness बैठी भाकर, आळसाचें अन्न, मेहनत केल्याशिवाय मिळालेलें अन्न; as, "She eateth not the B. of idleness." Prov. XXXI. 27. Bread of affliction दुःखाची भाकर, पुष्कळ जाच होऊन खावयास मिळालेली भाकर; as, "Thou shalt eat the bread of affliction." Deut. XVI. 3. To cast one's bread upon the waters *lit.* आपलें अन्न जलांवर टाक cf. Marathi बरें करून ठेवावें तें कधीं फुकट जात नाहीं. धर्म करून ठेवावा, तो कधीं वायां जाणार नाहीं; as, "Cast thy bread upon the waters; for thou shalt find it after many days." Eccles. XI. Bread of life जीवनाचा आधार *m*, जीवनाची भाकर (?) *f.* [CHRIST CALLED HIMSELF THE BREAD OF LIFE. जसें मनुष्य भाकर खाऊन जगतो, तसें ख्रिस्तपदीं भाव ठेविल्यानें मनुष्याचा आत्मा जगेल-तरेल अशी ख्रिस्ती लोकांची भावना आहे.]

*N. B.*—Mr. Candy renders "To work for one's bread" by हातावर संसार करणें, हातावर पोट भरणें. This is, in our opinion, wrong. "To live from hand to mouth" is the correct rendering of हातावर पोट भरणें, हातावर संसार करणें. An educated Englishman will never say 'To beg for one's bread,' the correct mode of expression is 'to beg one's bread.' So also will he never say 'to eat the bread of;' the correct idiom is 'to eat the salt of. "To destroy or injure one's bread' is utterly un-English. "To deprive one of his bread" or "To stand in the way of one's bread" is the correct English mode of expression. Where Mr. Candy has used 'to get one's bread,' the idiomatic English expression is 'to earn one's bread.'

Breadth (bredth) [A. S. *brædu*, broad.] *n.* (v. A.) रुंदी *f.*, विस्तार *m*, रुंदपणा *m*, व्यास *m*, रुंदावा *m.* [TO INCREASE IN B. रुंदावणें.] २ (of cloth) पन्हा *m*; as, The B. of the cloth. [A SINGLE B. पाट *m*, पट्टें *m*, पाट (ड) गें *n*, अटपळें (*obs.*) *n.* OF A SINGLE B. एकवरी.] ३ *fig.* मनाचें औदार्य *n*, विशालबुद्धि *f.* ४ *fine arts* विशालता *f.*, एके ठिकाणीं आणलेला पुष्कळपणा *m.* Breadthways *adv.* पन्ह्यानें, रुंदीच्या बाजूनें (see Broad).

Break (brāk) [A. S. *brecan*, to break; Ger. *brechen.*] *v. t. to part by violence, to sever into distinct parts* मोडणें, तोडणें, फोडणें, खंडणें, खांडणें, भंगणें (*poe.*), भेदणें, बिघडविणें, (चा) भंग-(चा) विघात करणें *g. of o.* २ फाडणें, तुकडे तुकडे करणें; as, "Like hounds breaking up a fox." ३ मोडून विजोड करणें; as, To B. a set of things. ४ (गळूं-शीर-धमनी) फोडणें. ५ फोडून मोकळा करणें; as, To B. ground. ६ (मोडून-फोडून-तोडून) कमकुवत करणें, नाश करणें, विस्कळित करणें, ढिला करणें, चुरा करणें, चुराडा करणें. ७ *to make bankrupt* मोडणें, दिवाळें काढणें *g. of o.*, बसविणें, निजविणें, नादार करणें, नापत करणें. ८ *to crush the strength of, to wear out, to exhaust* निर्बल करणें, (प्रकृति) बिघडवणें, क्षीण करणें; as, "An old man, broken with the storms of state." ९ हिम्मत खचवणें, नाउमेद करणें; as, "A person easily broken by affliction." १० (with *in*) *to reduce to obedience or discipline, to train* वठणीस-वळणीस-चालीवर आणणें, राबणें, कमावणें, शिकवणें. [TO BE BROKEN IN वठणीस येणें, पेटणें (?).] ११ (वचनाचा-शांततेचा-पवित्रतेचा) भंग करणें, (कायदा-नियम-तह-करार-जूट-शपथ-लग्न-इत्यादि) मोडणें. १२ (फोडून-मोडून-तोडून-पाडून) रस्ता करणें-पाडणें, (तुरुंग फोडून) बाहेर निघणें. १३ (फोडून-बाजूला सारून) आंत शिरणें. १४ (जूट-एकसारखेपणा-सातत्य) मोडणें, तोडणें, अव्यवस्था करणें; as, To B. the enemy's line. १५ *to stop for the time, to suspend, to interrupt* मोडती-मोडा घालणें, खंड-खळ पाडणें. १६ एकदम दिशा बदलणें; as, "A fast bowler can B. both ways." १७ उखळणें, विखळणें, निखळणें, उकलणें, विखळ-उखळाउखळ करणें, उलगडणें, उलकटणें, विस्कळित करणें. १८ (wind) *to crepitate* पादणें, पाद *m.* करणें-मोकळणें. १९ *to disclose* फोडणें, काढणें, उघ्‍डकाढणें-करणें *g. of o.*, मन मोकळें करणें; as, "Katharine, B. thy mind to me." *Shakes.* २० (मध्यें) थांबणें, मुक्काम करणें; as, To B. one's journey. २१ हुद्दा कमी करणें, कामावरून दूर करणें, बरतरफ करणें; as, I see a great officer broken. [TO BREAK AWAY (मोडून-

फोडून-तोडून) काढून टाकणें-दूर करणें. To B. THE BACK पाठीच्या हाडाचा सांधा उखळणें, पाठीचा कणा निखळणें. २ *fig.* निश्शक्त-निरुपयोगी करणें. ३ कामाचा कठीण भाग संपवणें, कामाच्या कठीण भागांतून पार पडणें; AS, To B. THE BACK OF A DIFFICULT UNDERTAKING. To BREAK DOWN मोडून नाश करणें-खालीं पाडणें, मोडून जमीन-दोस्त करणें. २ मोडून तुकडेतुकडे करणें-विस्कळित करणें-चुराडा करणें. ३ शक्ति, धैर्य नाहींसें करणें, अवसान नाहींसें करणें. ४ हीन करणें, कमजोर करणें, कमजात करणें. To BREAK IN मोडून आंत घुसवणें. २ मध्यें अडथळा किंवा हरकत करणें. ३ भाषणामध्येंच बोलणें, ALSO SEE THE 10TH MEANING OF THE VERB. To BREAK OFF संबंध तोडणें, (पाडून-मोडून) वेगळा करणें, एकाएकीं बंद करणें. To B. OPEN तोडणें, फोडणें; AS, "OPEN THE DOOR, OR I WILL BREAK IT OPEN." To B. OUT एकदम उद्गारणें, एकदम उद्गार काढणें. २ मोडून बाहेर काढणें; AS, To B. OUT A PANE OF GLASS. To B. OVER अवज्ञा करणें, भंग करणें; AS, "To B. OVER A RULE." To B. THROUGH आंत घुसून मार्ग करणें. २ *fig.* (मोडून) मुळींच पर्वा न करणें; AS, To B. THROUGH ALL CEREMONIES. To B. UP तुकडे तुकडे करणें. २ कांहीं वेळ बंद ठेवणें; To B. (ONE) ALL UP घाबरवून टाकणें, गडबडवणें, तिरपीट उडवणें, हवेलंडी उडवणें, धांदल करून सोडणें. To B. BULK तारवांतील माल काढून घेणें. To B. COVER लपून बसलेल्या ठिकाणांतून बाहेर पडणें. To B. GROUND नांगरण्यास-खणण्यास प्रारंभ करणें, *fig.* कामास आरंभ करणें. To B. THE HEART दुःखानें कष्टी करणें. To B. THE ICE सुरवातीचीं संकटें निवारून एखाद्या कामास सुरवात करणें, पहिली अडचण दूर करणें, (कार्यारंभीं नेटानें अडचणी दूर करून) मार्ग खुला करणें. २ (संभाषणास) सुरवात करणें. To B. A JEST थट्टामस्करी करणें. To B. A LANCE WITH हल्ला करणें. २-शीं सामना करणें. To B. THE NEWS (ऐकणाराला एकदम धक्का बसूं नये म्हणून) पोक्तपणानें एखादी दुःखकारक-भयंकर बातमी सांगणें. To B. A PATH रस्ता पाडणें. To B. THE PEACE (दांडगाईनें-भांडण तंटा करून) शांतता मोडणें. To B. UPON A WHEEL एखाद्या गुन्हेगारास चाकावर बांधून लोखंडी पहारीनें त्याच्या गात्राचा चुराडा करणें.] Break *v. i. to part, to come asunder* मोडणें, तुटणें, फुटणें; as, Else, the bottles B. and the wine runneth out." २ *to burst* फुटणें. ३ *to become bankrupt* मोडणें, मोडावणें, तुटणें, बसणें, थकणें, निजणें, दिवाळें *n.* निघणें *g. of s.*; as, He broke in this and became poor. ४ (in health, strength, spirits, &c.) तुटणें, थकणें, दमणें, मोडकळणें, मोडकळीस-मोडीस येणें, मोडावणें, भागणें, घसरणें, पडणीस येणें. ५ (the voice), *to become hoarse or cracked* गळा *m.* फुटणें-पडणें-पिंजणें-बसणें, घांटी *f.* फुटणें-बसणें; as, A singer's voice breaks. ६ *to fall out, to quarrel* फुटणें, तुटणें, बिघडणें, बिघाड *m*-फूट *f*-तूट *f*-होणें *g. of s.*, निश्शक्त होणें, प्रकृति बिघडणें, शक्तिहीन होत जाणें; as, "How the dean begins to B." ७ *to yield, to fail, &c.* मोडणें, मोडावणें, मोडकळणें, भागणें. ८ *to break loose* सुटणें, मोकळा होणें (with *out, forth*). ९ *to appear in eruptions* उतणें, उगवणें, उफणणें, फुटणें, सुटणें, आंगफुटणी *f.* होणें, दरदरणें, दरदर or रां फोड *m. pl.* येणें. १० (with *out*) *to become dissolute &c., to run wild* सुटणें, निसवणें, निसत होणें, बंधनांतून जाणें, आरबण्यांतून जाणें. ११ (with *up*) *to dissolve*, as firms, associations, companies भंगणें, तुटणें, सुटणें, फुटणें, फाटणें, फांकणें, *n*-तुटातुटी or तुटातूट *f*, भंग *m*- बिघड *m*-नितुटक *n*-&c. होणें *g. of s.*, with implications of *completeness and ruinousness* भयाभंगास जाणें; as, The clouds are breaking. १२ (with *up*) *to come to pieces* उखळणें, निखळणें, चिखळ *f*-उखळा उखळ *f*- होणें, सुटणें, फाटफूट *f.* होणें. १३ (with *with*); *to fall out with, to quarrel with* बिघडणें, फुटणें, तुटणें, बेबनाव होणें, भांडणें. १४ एकदम जोरानें येऊन-पडून फुटणें; as, 'A second deluge over our heads may B.' १५ दुःखानें फुटणें-व्याकुळ होणें; as, His heart broke in grief. १६ (जणूं काय फुटून-मोडून) एकदम बदल होणें; as, "To B. into a run or gallop." [To BREAK AWAY (मोडून-फुटून) दूर बाजूला होणें. २ एकदम निसटून-बंधमुक्त होऊन पळून जाणें. To B. DOWN मोडून खालीं पडणें, उलथून पडणें, उलटणें, हातीं घेतलेल्या कामांत यश न येणें, गोंधळून जाणें, घाबरून जाणें, अवसान सुटणें. To B. FORTH (FLAME, LIGHT, PASSION, WAR, DISEASE) एकदम प्रादुर्भाव होणें, फुटणें, भपकन् वर दिसणें, एकदम दृष्टोत्पत्तीस येणें. २ आश्चर्यानें एकदम बोलत सुटणें. To B. FROM पासून निसटणें. To BREAK INTO आंत घुसणें. To B. IN UPON (भलत्या वेळीं) जोर करून आंत घुसणें, एकदम घुसून अडथळा करणें; AS, "LET US NOT BREAK IN UPON HIM." To B. LOOSE मोकळा होणें-सुटणें; AS, "WHO WOULD NOT, FINDING A WAY, BREAK LOOSE FROM HELL?" To B. OFF संबंध तुटणें, (पडून-मोडून) वेगळा होणें, एकाएकीं बंद पडणें. To B. OUT (AN EPIDEMIC, DISCORD, LIGHT, FIRE, DISEASE, RIOT, WAR, REBELLION) एकदम उमटणें, एकदम भडकणें, एकदम प्रादुर्भाव होणें. To B. OVER हद्द सोडून जाणें. To B. UP कांहीं वेळ बंद होणें-बंद ठेवणें; AS, "TODAY THE SCHOOL WILL BREAK UP FOR HOLIDAYS FOR ONE WEEK." To B. UPON-च्यावर आंत एकदम प्रादुर्भाव किंवा उदय होणें. To B. WITH कज्जा किंवा भांडण, होणें. To B. WITH THE PAST मागचा संबंध तोडणें.] Break *n. an opening, a gap* खिंड *f.* *dim.* खिंडकुली *f*, or लें *n*, खिंडार *n*, or रें *n*, खांडार *n.* २ *an opening, an interruption, a stoppage* खंड *m*, तूट *f*, फूट *f*, फट *f*, मोडा *m*, अंतर *n*, खळ *m.* as, Five years without a B. ३ (in the weather) उघाड *f*, or उघाडी *f* (*v.* पड, हो). ४ *an intermission of time* खाडा *m*, जागा *f*, अंतर *n.* ५ विराम *m.* ६ सातत्यभंग *m.* ७ पहिल्यानें दिसणें, प्रभातकाळ *m*; as, The B. of day. Breakable *a.* Breakage *n.* see Breaking. २ *an allowance for things broken* फुटीतुटीबद्दल सूट *f*- मोबदला. Break down *n.* मोडकळीला येणें, लय *m.* ३ अपघातानें मोडणें *n*, मोडून खालीं पडणें *n.* Breaker *n.* (v. V. T. 1.) तोडणारा, मोडणारा, &c., छेदक, विघातक, विघाती, भंगकर्ता, भंजक. २ किनाऱ्यावर-खडका-

वर आदळून फुटणारी लाट *f*, मौजा; as, Surrounded by breakers. ३ एक प्रकारचें पाण्याचें लहान भांडें, जांब, जाम. Breakers ahead संभाळा (पुढें लाटा फुटून उसळताहेत). Breaking *n.* (v. V. T. 1.)–*act.* तोडणें *n*, मोडणें *n*, &c., भंग *m*, खंडण *n*, स्फोट *m*, स्फोटन *n*. Break-neck *a. lit.* & *fig.* मानमोडा-डी-डें, मान मोडणारा, जीव धोक्यांत घालणारा, घातकी. २ *head-long* मुसंडी, खूब जोराचा; as, B. speed. ३ *precipitous* सुळ्यासारखा, तुटलेल्या कड्याचा; B. road,-rock. Break-water *n.* पाणी थोपविण्याकरितां-अडविण्याकरितां केलेला बांध *m*-भिंत *f*-बंधारा-&c., ढकशी *f*, थोप *f*.

Break, Same as Brake.

Breakfast (brek'fast) *n.* प्रातरन्न *n*, प्रातर्भोजन *n*, न्याहारी *f*. २ उपास सोडणें *n*. B. *v. i.* न्याहारी-&c. करणें. B. *v. t. to furnish with breakfast* न्याहारी पुरविणें; as, We breakfast him to-day. Breakfasting *n.* न्याहारी करणें. २ उपास सोडणें, उपासानंतर जेवणें. Breakfast-set न्याहारीचीं भांडीं *n. pl.*

Breast (brest) [A. S. *breost*, swelling.] *n.* उर *n*, (*pop.*) ऊर *m*, छाती *f*, उरःस्थल *n*, वक्ष *n*, वक्षःस्थल *n*, *loosely* हृदय *n*. [IN CONTEMPT, ANGER, &C. उराड *n*, छाताड *n*. HOLLOW OF THE B. उराची शिंप *f*. PIGEON B., PROJECTING B. उराड *n*. TO CLASP TO THE B. उराशीं-पोटाशीं-&c. धरणें, पोटाळणें.] २ (of a woman-&c.) स्तन *n*, थान *n*, कुच *m*, छाती *f*, जोबन *n*, मामू *m*, मिमी *f*, उरोज *m*, पयोधर *m*; as, "My brother that sucked the B. of my mother." [IN COVERT, वरशीं OR वरलाशीं *n. pl.* A HARD B. दगडी छाती *f*. MOTHER's B. अमा-आमा *m*, माम *n*, अमू *m*. TO SUCK THE B. स्तनपान *n.* करणें.] ३ *heart, conscience, mind* हृदय *n*, हृदयमंदिर (*idio.*) *n*, हृदयकमल (*idio.*) *n*, अंतःकरण *n* (a loyal B.), *colloq.* पोट *n*, मन *n*. [WEIGHT UPON ONE's B. उरावरचा गोहो-दगड-दडपण-धोंड *f*. TO MAKE A CLEAN B. (OF A THING) चोरून न ठेवतां सांगणें, मन मोकळें करून सांगणें.] ४ कोणत्याहि वस्तूचा दर्शनी भाग, छाती *f*; as, The B. of a hill. ५ भट्टीचा दर्शनी भाग *m*, छाती *f*. B. *v. t.* छाती ठोकून पुढें उभें राहणें, सामना देणें; as, To B. the storm. Breast-bone *n.* उराचें हाड *n*, उरोस्थि *n*. Breast-deep, Breast-high *a.* छातीइतका उंच, छातीभर. Breasted *a.* छाती असलेला. Breast-knot *n.* छातीवर लावण्याची फितेची धनुकली *f*. Breast-pin *n.* छातीवर लावण्याचा टांचणीसारखा दागिना *m*. Breast-plate *n.* छातीचें कवच *n*, चपरास *f*, उरस्त्राण *n*. Breast-plough *n.* छातीइतकाच उंच नांगर *m*. Breast-rail *n.* छातीइतकी उंच रेल, (संरक्षणाकरितां) छातीइतक्या उंच बांधलेल्या भिंतीवरची रेल *f*. Breast-summer, Bressummer *n.* आधारकाठी *f*, आधारवहाल, ह्यावर छपराचा सर्व भार असतो. [खिडकीवर दरवाजावर बसविलेली जाडी फळी (छावणी) ज्याप्रमाणें वरचा सर्व भाग तोलते त्याप्रमाणें हें आधारवहाल छपराचा सर्व भाग तोलतें.] Breast-wall *n.* छातीइतकी भिंत *f*. Breast-wheel *n.* (पाणचक्कीमधील) मुख्य चक्की (चक्र); ही चक्की-चक्र-फक्त पाण्याचे जोरावर चालते व ती अर्धी पाण्यांत असते. Breast-work *n. fort.* संरक्षणाकरितां घाईनें बांधलेला छातीइतका उंच तट *m*, वरंडी *f*, वरंड *f*. An infant at the breast तान्हें मूल *n*, स्तनपान करणारें मूल *n*, पितें मूल *n*, स्तनंधय *n*.

Breath (breth) [A. S. *braeth*, a breath.] *n.* श्वास *m*, उच्छ्वास, (*pop.*) उसासा *m*, दम *m*; as, To be out of breath from violent exercise. [IN A BREATH एकदम, एका क्षणांत, अत्यल्पकाळांत. SWEETENING THE B. (AS AFTER A MEAL) मुखशुद्धि *f*. ANYTHING (BETEL-LEAF, &C.) TO SWEETEN THE B. मुखवास *m*, मुखवासन *n*. THAT CAN RETAIN HIS B. A LONG TIME पुष्कळ वेळ श्वास कोंडूं शकणारा मनुष्य, जितप्राण. THAT IS OUT OF B. बेदम. TO DRAW B. श्वास *m.* ओढणें. TO HOLD ONE's B. दम *m.* छाटणें-धरणें. TO LABOUR FOR B. धापा टाकणें, धापलण, धापणें. TO STOP ONE's B. दम *m.* कोंडणें. TO SUSPEND OR RESTRAIN THE B. प्राणायाम *m.* करणें TO SUFFER TO TAKE B. दम *m.* घेऊं देणें. To take B. दम *m.* खाणें-घेणें. TO WASTE (OR LOSE) ONE's B. तोंडाची वाफ *f*. गमावणें.] २ झुळूक *f*, वाऱ्याची लहर *f*; as, A breath of wind. ३ श्वासोच्छ्वास करण्याची शक्ति *f*, प्राण *m*. ४ वास *m*, सुवास *m*; as, The B. of flowers. ५ नुसता शब्द *m*; as, "A breath can make them as a breath has made." अगदीं स्वल्प-अत्यल्प प्रयत्न *m*. ६ जीवनशक्ति *f*, जीवनकारण *n*, जीव *m*; as, 'He is the breath of this movement.' ७ एक क्षण दम घेण्यास जितका वेळ लागेल तितका वेळ *m*, अगदीं थोडा काळ *m*; as, "He changes in a breath." ८ (दम घेतल्यानें) मिळणारा विसावा *m*; as, 'Give me some breath, some little pause.' ९ उद्गार *m*. Breath'ful *a.* Breath'ableness *n.* To catch one's breath श्वासोच्छ्वास थोडा वेळ बंद करणें. The news took away his breath (अतर्कित व भीतिदायक असल्यामुळें) त्या बातमीनें त्याला आश्चर्यचकित केलें-घाबरविलें. With bated breath (पूज्यभावानें अगर भीतीनें) कमी झालेल्या श्वासानें. Below or under one's breath लहान स्वरानें. Breath'less *a.* श्वासोच्छ्वासाशिवायचा. २ पूर्ण, पुरा; as, Breathless attention, expectation, &c. ३ *dead* श्वासोच्छ्वास नाहींसा झालेला, मेलेला; as, Breath'less body. Breath'lessness *n.*

Breathe (brēth) *v. i. to respire* श्वासोच्छ्वास (*pop.*) श्वासोश्वास *m*- करणें-टाकणें, श्वास *m.* सोडणें-टाकणें, श्वास *m.* वाहणें-चालणें *g. of s.*, श्वास *m.* असणें *in. con.* २ *to take breath, to have an interval of rest* दम *m.* खाणें-घेणें-टाकणें, उमास or उमासा *m.* टाकणें, उमस or उमास *n.* खाणें or *inv. con.* पडणें; as, "Breathe a while and work again." ३–(the air) *to blow softly* झुळझुळ *adv.* वाहणें, झुळझुळणें, झुळकणें, संथ-थंड-मंद वाहणें; as, The air breathes upon us most sweetly.

४ (with *hard*) laboriously दम *m*- श्वास *m*. लागणें *in. con.*, दम *m*. चढणें, सुस्कारा *m*- सुसकारा *m*. टाकणें, उश्रम or मा (R) *m*. घेणें-टाकणें, धापणें. ५ (with *out*) *to expire forcibly* सुस्कारणें, हुसकारणें, सुसकार *m*- सुसकारा *m*-हुसकारा *m*. टाकणें. ६ जगांत-जीवंत असणें; as, "Breathes there a man with soul so dead?" *Scott.* Breathe *v. t. to inhale* श्वासाबरोबर घेणें-खाणें *idio.*, पिणें *idio.* २ *to utter softly* हळू उच्चारणें; as, To B. a vow. ३ to *disclose, to tell* वदणें, उद्गु *m*. करणें *g. of o*. [NOT TO B. A SYLLABLE OF चकारशब्द श्र- &c. न सांगणें.] ४ (with *into*) *to inject by breathing* श्वासाबरोबर फुंकणें. ५ (with *out*) *to eject by breathing* श्वासाबरोबर सोडणें; as, The flowers breathe out a sweet smell. ६ *to express, to show, to manifest* (जणूं काय श्वासानें) दाखविणें; as, This article breathes a revengeful spirit. ७ दमविणें, थकविणें; as, A little breathed by the journey up. ८ फुंकून वाजविणें; as, They breathe a flute. ९ (*obs.*) दम वाढविणें. Breathed *p. a.* Breather *n*. Breathing *pr. a.* (v. V. I. 1.) श्वासी, श्वासोच्छ्वासी *pop*. श्वासोश्वासी, श्वासोश्वास करणारा, प्राणधारी. Breathing *n*. (v. V. I. 1.)-*act*. श्वासोच्छ्वास *pop*. श्वासोश्वास *m*, श्वास *m*, उच्छ्वास *m*, श्वसन *n*, उच्छ्वसन *n*. २ सुसकारणें *n*, &c., सुसकार or सुसकारा or हुसकारा *m* (*v*. टाकणें, सोडणें). ३ *med.* श्वसनक्रिया *f*. ४ झुळझुळ वारा *m*. ५ प्रेरणा *f*; as, 'The breathings of the Holy Spirit.' ६ संचार *m*. ७ उद्गार *m*, उच्चार *m*; as, To give breathings to one's thoughts. ८ उसासा *m*. ९ महाप्राणोच्चार *m*. १० मनोगत प्रार्थना *f*, हांव *f*; as, Breathings after that blessed state. ११ विश्रांति *f*, विराम *m*, विसावा *m*. [BREATHINGS THROUGH THE NOSTRILS, AS PRACTISED BY THE FOLLOWERS OF THE YOGA PHILOSOPHY पूरक *m*, कुंभक *m*, रेचक *m*, प्राणायाम *m*. (THESE WORDS EXPRESS DIFFERENCES IN THE MANNER)]. Breathing hole उच्छ्वास *pop*. उश्वास *m*, झरोका *m*. Breathing pores, see Stomata वायुरंध्रें, श्वासोच्छ्वासकूप, श्वासरंध्रें. Breathing-time विश्रामकाल *m*. Breathing-while श्वास घेण्याइतकी वेळ *f*. To breathe hard दम-श्वास *m*. लागणें. To breathe again क्लेशापासून मुक्त होणें. To breathe freely मनाची शांतता-स्वास्थ्य असणें, जीव भांड्यांत-सुखांत पडणें, कोणत्याही तऱ्हेची काळजी नसणें. To breathe one's last प्राणोत्क्रमण होणें, प्राण सोडणें, मरणें, राम म्हणणें. To breathe upon मलीन करणें. To B. a vein रक्त काढणें.

Bred (bred) [See Breed.] *a*. जनित, संवर्धित, पाळलेला, पोसलेला. Well-B. चांगल्या रीतीभातीचा, चांगल्या वागणुकीचा, सुविनीत, सदाचार. Ill-B. वाईट रीतीभातीचा, वाईट चालीचा, दुराचार.

Breech (brēch) [A. S. *brec*, the breech.] *n. bum, bottom* ढुंगण *n*, ढुंग *n*, नितंबदेश *m*. २ *hinder part, back-part* पाठीमागला भाग *m*, पृष्ठभाग *m*, पश्चाद्भाग *m*. ३ (*obs.*) (breeches) चोळणा *m*. [B. JUST COVERING THE POSTERIORS गांडचोळणा *m*. B. just covering the thighs मांडचोळणा *m*, मांडीचोळणा *m*.] Breech *v. t.* इझार *f*-विजार &c-घालणें, चोळणा नेसवणें, झांकणें. २ (*obs.*) ढुंगणावर &c-मारणें. ३ (बंदुकीचा प्रत्याघात होऊं न देणारी) दोरी बांधणें; as, To breech a gun. Breeched *a*. Breeches *n*. चोळणा *m*, मांडचोळणा *m*. Knee-breeches गुडघ्यापर्यंतचा चोळणा *m*, गुडघी *f*. Breeching *n*. (*obs*). लेंडी (घोड्याच्या खोगिराची). २ ढुंगणावर मारणें *n*. ३ तोफ उडविल्यावर ती प्रत्याघातानें मागें सरूं नये ह्मणून तिला बांधलेली दोरी *f*. B. *a*. फटके मारण्याजोगा. Breech-loader *n*. एक प्रकारची तोड्याची बंदूक *f*. Breech-loading *n*. तोड्याची बंदूक भरणें. Breeches-Bible प्रॉटेस्टंट लोकांचें जिनीवा बायबल *n*. Breeches-part *theat.* नाटकांत मुलीनें पुरुषाचा वेष घेणें. To wear the breeches *colloq.* नवऱ्याचा अधिकार हिरावून घेणें.

Breed (brēd) [A. S. *bredan*, to nourish.] *v. t. to generate, to engender* उत्पन्न करणें, उत्पादन *n*-उद्भावन *n*-उत्पत्ति *f*. करणें *g. of o.*; as, Every mother breeds not sons alike. २ *to occasion, to produce, to cause* उत्पन्न करणें, उत्पादणें, उद्भावणें, उपस्थित करणें; as, To B. a storm or To B. a disease. ३ जन्म देणें; as, A pond breeds fish. ४ *to bring up, to rear* पाळणें, पोसणें, पालन *n*-पोपण *n*-&c- करणें *g. of o.*, लहानाचा मोठा करणें. ५ शिकवून तयार करणें. ६ (cattle) *to raise, to rear* उपजवणें, निपजवणें, संतति *f*-&c- वाढवणें *g. of o.* ७ *to be the native place of* ची जन्मभूमि असणें; as, A Northern country breeds stout men. Breed *v. i.* उपजणें. २ विणें. ३ उत्पन्न होणें; as, Dissensions breed among them. ४ गर्भार होणें; as, 'The mother had never bred before.' ५ अधिक होणें, वाढणें; as, 'I make it (my gold and silver) breed as fast.' *Shakes.* ६ अवलाद उत्पन्न करणें-उत्पन्न होणें, जन्म होणें. Breed *n. progeny, race, family, offspring* बिजवट *n*, वाढा *m*. २ (of cattle) *stock* ताणा *m*, बिजवट *n*, थळ *n*, थळी *f*, खाण *f*, जात *f*, अवलाद *f*. [OF A GOOD B. थळीचा, थळाचा.] ३ संतती *f*. ४ वीत *f*, वीण *f*. Breed'-bate *n*. कळलाव्या, आगलाव्या, कळीचा नारद *m*, नारदमुनि *m* (*obs.*), भांडणें उपस्थित करणारा *m*. Breeder *n*. Breeding *p. a.* (of female animals) *not barren* वितीगाभती, वितीफळती, भादी. Breeder *n*. पोसणारा *m*. Breeding *n*. पोषण *n*, पालन *n*, संवर्द्धन *n*, पैदास्ती *f*. २ *education, manners* माणुसकी *f*, सुजनता *f*, सुजनत्व *n*, शिक्षण *n*. ३ उत्पन्न करणें *n*. ४ विनय *m*, रीत *f*, आचरण *n*. ५ फळणें *n*, गर्भधारण *n*. Cross-breeding भिन्नकुलोत्पत्ति *f*. Breeding in and in एकजातीय उत्पत्ति *f*. Good breeding सुशीलता *f*, शिष्टता *f*, चांगलें वळण *n*. Breeding *pr. p.* Bred *pa. p.*

*N. B.*—Breed हा शब्द पाळींव जनावरांच्याच जातीला

लावतात, रानटी जनावरांच्या जातीला Species आणि मनुष्यांच्या जातीला Race हे शब्द वापरतात.

Breeze (brēz) [M. E. *brese*; A. S. *briosa.*] *n.* (*Shakes.*) *the gadfly* गोमाशी. Also written Breese, Brize.

Breeze (brēz) [Fr. *brise*, a cold wind.] *n.* *a fresh soft flowing wind* मंद वारा *m*, मंदवायु *m*, मंदपवन *m*, झुळुक *f*, वारें *n*, वाऱ्याची लहर *f*, मृदुवात *m*, मंदानिल *m*. [BALMY B. मंदसुगंध वायु *m*. COOL AND BALMY B. शीतसुगंध वायु *m*. Land B. (BLOWING FROM E. OR N. E.) मतलई *f*, रात्रीं जमिनीवरून समुद्राकडे वाहणारा वारा, भूमित्यागी-सौम पवन, स्थलपवन. SEA B. समुद्राकडचा वारा *m*, दिवसा समुद्राकडून जमिनीकडे वाहणारा वारा, समुद्रत्यागी पवन, समुद्रपवन, खारावारा.] २ *fig.*, *colloq.* *a disturbance, a quarrel, a row* क्षोभ *m*, चित्ताची अस्वस्थता *f*, वाद *m*, कलह *m*, चकमक *f*; as, To keep up a B. means to continue a disturbance; The discovery produced a B. Breeze'less *a.* निर्वात, शांत. Breez'y *a.* हवाशीर, हवेचा. To breeze up जास्त जास्त जोरानें वाहणें.

Breeze (brēz) [O. Fr. *brese*, Fr. *braise*, cinders, live coals. See Brasier.] *n.* (विटा भाजतांना वापरलेला) केर *m*, कचरा *m*, राख *f*.

Brethren (breth'ren) *n.* *members of the same society or profession* बंधुजन *m*, *pl.*, वर्गबंधु *m. pl*, व्यवसायबांधव, समाजबांधव, जातभाई. २ gener. *B. and near relatives* भाऊबंद *m. pl.*

Bretwalda (bret-wal'da) [A. S. *bret*, *bryten*, wide, powerful & *walda*, a ruler.] *n.* सर्व ब्रिटनलोकांचा अधिराज *m*. 'ब्रेटवॉल्डा,' ही एक इंग्लंडच्या राजांची जुनी पदवी आहे. ही पहिल्यानें इंग्लंडचा राजा जो एग्बर्ट त्यास दिली होती, त्यानंतर बरेच इंग्रजी राजे ही पदवी धारण करीत असत. ही पदवी हल्लीं प्रचारांत नाहीं.

Breve (brēv) [L. L. *breve*, from L. *brevis*, short.] *n. print.* ऱ्हस्व स्वराची खूण *f* [ ˘ ]. २ *mus.* लघुचिन्ह *n*, चार मात्रांचा काल दाखविणारें चिन्ह.आर्य संगीत शास्त्रांत तें असें (।) लिहिलें आहे.

Brevet (brev'et) [Fr. *brevet*, a commission.-L. *brevis*, short.] *n.* राजाकडून-देणगी-मान-हक्क-अगर पदवी मिळाल्याबद्दलचा लेख, सन्मानाची-बहुमानाची-&c. सनद *f*. २ *mil.* पलटणींतील अधिकाऱ्यास त्याच्या चांगल्या कामगिरीबद्दल सन्मानार्थक मिळालेला वरिष्ठ अधिकार. कमी पगारदारानें मोठ्या पगारदाराची जागा चालविण्याची सनद *f*. ही सनद फक्त मानाचीच असते, व तीमुळें ज्यास्त पगाराचा हक्क येत नाहीं. Brevet'cy *n.*

Breviary (brēv'i-ar-i) [Fr. *breviaire*.-L. *breviarium*, from *brevis*, short.] *n.* गोषवारा *m*, सार *n*, संक्षिप्तवर्णन *n*. २ (of Roman Catholic and Greek churches) स्तोत्रसंग्रह.

Brevier (brev-ēr') [L. *brevis*, short. A small type between bourgeois and minion, originally used in printing breviaries.] *n. print.* ब्रेव्हिअर नांवाचा ठसा *m*.

Brevity (brev'it-i) [L. *brevitas*,-*brevis*, short.] *n.* (v. A. 2.) अल्पता *f*, विस्ताराभाव *m*, अविस्तरा *m*, विस्तारराहित्य *n*, संक्षेप *m*, संक्षिप्तकथन *n*, अटपसरपणा *m*. २ *briefness of time* अल्पकालता *f*.

Brew (brōō) [A. S. *breowan*, to brew. The original meaning seems to have been to make (ale, beer, and the like) by infusion, boiling and fermentation.] *v. t.* निरनिराळीं द्रव्यें मिळवून तयार करणें. (beer, ale, &c.) काढणें, गाळणें; as, She brews (गाळते) good ale. २ *to devise* (scheme) बांधणें *fig.* बनावणें, रचणें; as, To brew a plot. B. *v. i.* *fig.* *to hatch mischief or evil* पिकणें, धुमसणें, शिजणें. २ बीर दारू करण्याचा धंदा करणें. ३ (मिश्रणानें) तयार होणें; as, A storm brews. Bre'wage *n.* कढवून तयार केलेलें मादक पेय *n*. २ दारू गाळण्याची क्रिया *f*, दारूची भट्टी लावणें *n*. ३ (मीठ वगैरे) उकळून तयार करणें. Brewer *n.* कलाल, काळण. Brewery, Brew-house *n.* बीरदारूचा दारू गाळण्याचा कारखाना *m*, दारूची भट्टी. Brewing *n.* दारू तयार करणें *n*. २ एकाच वेळीं तयार केलेली दारू *f*. Brewster *n.* कलाल.

Bribe (brīb) [Fr. *bribe*, broken victuals given to beggars.] *n.* लांच *f*, (*colloq.*) अंतस्थ *n*, पानसुपारी *f*, *idio.* पान्हवण *n*, *idio.* तोंड दावणें *n*, रुशवत *f*, खुलवर *f*. *n.* [To stop the mouth with a B. तोंड *n*. दावणें, *idio.* To take B. or bribes लांच *f*. खाणें, अवदान *n*-हात *m*-गपका *m*. मारणें, चावणें *idio*, चरणें *idio.*] २ लुचपत. ३ नीतिभ्रष्ट करणारें कारण *n*. Bribe-eater (?), Bribe-taker *n.* लांच खाणारा *m*, लांचखोर *c*, लांचखाऊ *c*, लिदवळ (*obs.*), पेंडीचें गुरूं (*obs.*) *n*. Bribe *v. t.* लांच *f*. देणें, लांचावणें, अवदान *n*. देणें, हात *m*-मूठ *f*. दावणें-चेपणें-शेकणें, तोंड *n*-दाबणें, पैसा *m*. चारणें, आडव्या हातानें देणें, हातीं घालणें. [To B. extensively रान *n*. भारणें.] २ लांच देऊन आपल्या बाजूचा करणें. B. *v. i.* एखाद्यास लांच देणें; as, "The bard may supplicate, but cannot bribe." *Goldsmith.* Brib'able *a.* लांच देण्याजोगा. Bribed *p.* (v. V.) लांच दिलेला, लांच खाल्लेला, अंतस्थ घेतलेला. To be bribed, *to be won over by bribery* लांचाविणें. Brib'er *n.* (v. V.) लांच देणारा, लांचाविणारा, मूठचेप्या-दाव्या, तोंडदाब्या, चाटू. Brib'ery *n.* लांच देणें *n*-घेणें *n*. लांचखोरी *f*, लांचेचा व्यापार *m*. B.—compreh. B. and corruption लांचलुचपत *f*, लांचलूप *f*, चापसाचापसी *f*. Bribery-oath *n.* एखाद्यानें मत देतांना लांच घेतली नाहीं अशाबद्दल त्यापासून घेतलेली शपथ *f*.

Bric-a-brac (brik-a-brak) [Fr. *brique*, a fragment, a bit, from O. Dut. *brick*, a piece, from *breken*, to break. '*brac*' in bric-a-brac is the ricochet of *bric.*] *n.* *odds and ends of curiosities* मौजेचे हौसेचे सटरफटर पदार्थ-वस्तु *f*.

Brick (brik) [Fr. *brique*, a brick, a piece.] *n.* वीट *f,* इट्का, इष्टिका (?) *f.* [KILN-BURNED B. BAKED B. पक्की वीट *f,* पक्वेष्टका *f.* ROW OF BRICKS (IN A BUILDING) LAID UPRIGHT OR ON EDGE खंडजा *m.* SUN-DRIED B. कच्ची वीट *f,* मोप *n,* मोपें *n,* मेंडा *m* (THIS IS A LARGE AND SQUARED MASS OF KNEADED EARTH). VITRIFIED B. खंगर *m,* दग्धेष्टका *f.* VITRIFIED EXCRESCENCE UPON A B. किटण *n.*] २ विटा (समुच्चयार्थी); as, A load of brick. ३ विटेसारखा चौकोनी पदार्थ *m;* as, A penny brick of bread. ४ *slang.* आनंदी पुरुष *m;* as, He is a regular brick. B. *a.* विटेचा, विटेसारखा. Brick *v. t.* वीटबंदी *f.* करणें, वीटबंदीचा करणें, विटांनीं बांधणें. Brick-arch *n.* विटांची कमान *f*-जूड *f.* Brick bat *n.* विटकर or विटकूर *f, n,* ढोला *m,* रोडा *m,* बडा *m.* Brick-built *a.* विटांचा, विटांनीं बांधलेला. Brick-dust *n.* विटांचा चुरा *m.* Brick-earth *n.* विटा करण्याची माती *f.* Brick-field *n.* विटा तयार करण्याची जागा *f.* Brick-kiln *n.* विटांची भट्टी *f.* Brick-layer *n.* गवंडी or गवंड्या or गौंडी *m.* Brick-laying *n.* विटा घालणें *n.* Brick-maker *n.* वि-इटा करणारा, कुंभार *m,* विटवाला, इष्ट(ष्टि?)काकार. [Frame of a B. for carrying earth मंची *f.*] Brick-mould *n.* वि-इटाळें *n,* मोपाळें *n.* Brick-red *a.* विटेप्रमाणें तांबडा. Brick-tea *n.* विटेसारखा करून ठेविलेला चहा *m,* चहाच्या वड्या *f, pl.* Brick-coloured. Brick-work *n.* विटकाम *n,* इ-वीटबंदी *f.* Brick-works *n.* विटांचा कारखाना *m.* Paving bricks फरशीच्या विटा. Fire-brick, see Fire. Like a brick चांगल्या इच्छेनें. Table-brick ठोकळी वीट. To make bricks without straw (जुलमामुळें) आवश्यक सामुग्री नसतांना एखादी गोष्ट करावयास लागणें. cf. नवरा-नवरीवांचून वऱ्हाड (लग्न) करणें.

Bride (brīd) [A. S. *bryd*, a married person.] *n.* *a woman about to be married or newly married* नवरी *f,* वधू *f,* नववधू *f,* नुकतेंच लग्न झालेली बायको *f,* नवोढा *f.* [AN ADULT BRIDE जाणती नवरी *f,* जाणती वधू *f.* BRIDE AND BRIDEGROOM वधूवर, ओहर (R) *n,* वधूवरें *f.* THE CLOTH PUT UP (AT WEDDINGS) BETWEEN THE BRIDE AND THE BRIDEGROOM अंतरपट, अंतःपट *n.* FIGURES OR LINES DRAWN ON IT नंद *m,* नंदी *f.* A GROWN-UP OR BIG GIRL STANDING AS A BRIDE घोडेनवरी (R), घोडनवरी *f,* घोडकुदळ नवरी *f.* MOTHER OF THE BRIDE वधूमाय OR वहूमाय *f,* ओहमाय *f.* PARTY OR COMPANY OF THE B. वधूपक्ष *m.* MEMBER OF IT वधूपक्षीय. TO DANCE HOLDING THE B. AND THE BRIDE-GROOM UPON THE SIDES (OF A MAN) झेंडा नाचवणें. TO FIX UPON A B. (FOR ONE'S SON) वधू नेमस्त करणें. SOME IMPORTANT TECHNICAL TERMS OCCURRING IN THE DESCRIPTION OF A HINDOO MARRIAGE ARE: कन्याशुल्क, जाणवसा, जानोसा, आगती, जाणवसघर, देज, द्विरागमन, परतवण, पाटपासोडा, पाठराखणा OR पाठराख्या, पावण, पावता, मांगसळई OR मांगसळ, मंगळसूत्र, माघारपण, माघारी, माघारीण, मुहूर्तमणी, मुळारी OR मुन्हाळी, मुन्हाळीपान, मूळ, लग्नचुडा, लाह्यांचा मान, वधूप्रवेश, वधूवस्त्र, वीध, सुनमुख, हातपाणी, शुल्क. FOR MEANING OF THESE, SEE MOLESWORTH'S MARATHI-ENGLISH DICTIONARY.] २ एखादी फारच आवडती वस्तु *f;* as, "Venice, the bride of the sea." Bridal [A. S. *Bride-ale*, the wedding feast.] *n.* *the nuptial feast* लग्नोत्सव *m,* विवाहोत्सव *m,* लग्नप्रयोजन *n.* B. *a.* लग्नाचा, विवाहाचा, वैवाहिक, विवाहासंबंधीं, विवाहविषयक. Bride-bed *n.* गर्भाधानशय्या *f.* Bride-cake *n.* लग्नांत वाढलेली पोळी *f.* Bride's maid, Bridemaid *n.* करवली *f.* Bride's man, Brideman *n.* करवला *m,* वरसखा *m.*

Bridegroom (-groom) [A. S. *bryd*, & *guma*, a man.] *n.* *a man about to be married or newly married* नवरा *m,* वर *m,* नवरदेव *m.* [AN ADULT B. जाणता नवरा *m,* जाणता वर *m.* ALIGHTING OF THE B. AT THE VILLAGE OF HIS INTENDED BRIDE जाणवसा *m,* जानोसा *m.* (*v.* दे, कर.) House appointed for it जानोशाचें घर *n,* जाणवसघर *n.* जाणवसा *m.* B. inferior (in age or size) to his bride हिणवर. Departure of the B. for the marriage वरप्रस्थान *n.* Father of the B. वरबाप *m,* वरपिता *m.* Flowers, &c. bound around the brow of the B. मंडोळी or मंडवळ *f,* मुंडावळ or मुंडावळी *f.* Full-grown or big boy standing as a B. घोडजांवई *m,* घोडकुदळ नवरा *m.* Man sent to bring the B. वरधावा *m.* Mother of the B. वरमाय *f,* वरमाता *f.* Offerings and honours paid to a B. मधुपर्क *m,* सीमांतपूजन *n.* The party or company of the B. वरपक्ष *m.* A member of it वरपक्षीय. Presents given to the B. वरदक्षिणा *f,* लाडाचा तांब्या (?) *m.* Presents given to the mother of the B. भेटबकरा *m,* मांडचेपणें *n.* &c. Procession of the B. वरघोडा *m.* Pole carried before the B. in procession पालछत्र *n.* Procession of the B. and the bride towards home वरात *f,* गृहप्रवेश *m.* To fix upon a B. (for one's daughter) वर नेमस्त करणें, वर निश्चित करणें.

Bridewell (brīd'wel) [From a palace near St. *Bride's well* in London.] *n.* *a gaol* तुरुंग *m.*

Bridge (brij) [A. S. *brycg*, a bridge.] *n.* पूल *m,* सेतु *m,* *colloq.* दादर *m.* [B. OR FLOAT HASTILY CONSTRUCTED OF RUDE MATERIALS साकूं *m.* A DISPOSITION OF BRIDGES पूलबंदी *f.* A WOODEN B. लकडपूल OR लक्कडापूल OR लकडीपूल *m.*] २ (of the nose) नाकाचा दांडा or वांसा *m,* नाकाड (*) *m,* नासावंश *m.* ३ (of a musical instrument) घोडी *f,* चौकी *f,* तारदानी *f,* अट *f,* अडती *f,* अटक *f.* ४ (द्वारा-पुलासारखा) मार्ग *m.* ५ (called *pons varolii*) मस्तिष्क-सेतु *m,* मेंदूंतील सेतुबंध *m.* Bridge *v. t.* पूल *m.*

बांधणें with वर *of o.* २ वलांडून जाणें, पार पडणें, (कांहीं तरी तोडजोड काढून किंवा समेट करून) टाळ-ण्याचा मार्ग शोधून काढणें; as, To B. over a difficulty. Bridge-laying *n.* पूलबंदी *f.* Bridge-head *n.* पुलावरच्या शेवटची तटबंदी *f.* Brid'geless *a.* Bridge of boats गलबतें खुटवून त्यांवर बांधिलेला पूल *m.* Drawbridge काढताघालता पूल *m.* Hanging-bridge झुलता पूल. Over bridge (रेल्वेच्या-सडकेच्या) वरचा पूल, वलांडपूल.

Bridle (brī'dl) [A. S. *bridel*, a bridle.] *n. lit. & fig.* लगाम *m, f,* अनीन (R) *f.* [GROOMING B. काजगी *f,* काजा *m.* TO PUT ONE'S B. IN THE JAWS OF नाकीं वेसण *f.* घालणें *g. of o.*] २ दडपण *n,* आड-काठी *f.* ३ लगाम, बंदुकीच्या कुलपांतील लगामीसारखी रचना *f.* Bridle *v. t. to put a bridle on* लगाम *m. f.* देणें-घालणें-चढविणें; as, To B. a horse. २ *to restrain or guide by a bridle, lit. & fig. to restrain* लगामीं धरणें, आकळणें, आवरणें, लगामीं लावणें, वठणीस आणणें; as, To B. the passions. B. *v. i. to hold up the head and draw in the chin* मान आंखडणें, मानेचा आंकडा *m.* वळणें. [To B. up गर्वाचा ताठा येणें, फुगणें.] २ वर डोकें धरणें-करणें. Bridled *p.* (v. V. 1.) लगाम दिलेला-घातलेला-चढविलेला, लगामबंद. २ लगामांत धरलेला, &c., आंवरलेला, आटो-पलेला. Bridler *n.* लगाम ओढणारा *m.* Bridle-hand *n.* लगामाचा हात *m.* Bridle-board *n.* घोडेवाट *f.* Bridle-rein *n.* लगामाची वादी *f.* To bridle up (at something) दिमाखानें डोकें वर करून ऐटींत उभें राहणें. Bridle structure लगामासारखी वस्तूची रचना *f.* To bite on the bridle दांतओंठ खाऊन कष्ट-दुःख सोसणें, जळफळत दुःख सोसणें.

Brief (brēf) [Fr. *bref*.-L. *brevis*, short.] *n. an epitome* संक्षेप *m.* २ *short written instructions to counsel* वकिलाचें टांचण *n*-टिपण *n,* सालिसिटर बॅरिस्टराला करून देतो तें मुकदम्याचें टांचण *n.* B. *a. short* लहान, थोडा. २ *concise*-(writings, speeches, &c.) संक्षे-पाचा, संक्षिप्त, अल्पविस्ताराचा, अल्पशब्दक, परिमित-शब्दक. ३ speaker, &c. मितभाषी. ४ *short in duration* अल्पकाल, क्षणिक. Brief *v. t.* मुकदम्याचें टांचण करून बॅरिस्टरास देणें; as, To B. pleadings. Briefless *a.* ज्याला मुकदमे (मुकदम्याचीं टांचणें) मिळत नाहींत असा, बिनकुळांचा; as, A B. barrister. Brief'ly *adv.* (v. A. 2.) थोडक्यांत, संक्षेपानें, संक्षेपें-करून, संक्षेपतः. Brief'ness *n.* (v. A. 2.) संक्षेप *m,* संक्षिप्तता *f,* अल्पता *f,* विस्ताराभाव *m.* Brief of title मालकीच्या पुराव्याच्या कागदांचा गोषवारा *m.* The brief and the long (*Shakes.*) इत्यर्थ, सारांश, तात्पर्य, मथितार्थ, इंगितार्थ, ग्राह्यांश. To hold a brief *to be retained as counsel in a case* कुळाच्या वतीनें गुंतून रहाणें. To take or accept a brief एखादी गोष्ट हातीं घेणें, (चा) कैवार घेणें, (चें) वकील-पत्र घेणें. In brief सारांश, तात्पर्य, एकून, एवंच, एकंदरींत, थोडक्यांत. To be brief थोडक्यांत सांगा-याचें तर.

Brier, Briar (brī'er) [A. S. *brer.*] *n. the wild rose* रानगुलाब *m,* सदागुलाब *m,* खोटा गुलाब *m.* २ *gener.* कांटेझाड *n.* ३ *fig.* मनाला क्लेशदायक कारण *n*-वस्तु *f;* as, "The thorns and briers of reproof." *Cowper.* Brī'ery, Brī'ered *a.* कांटेरी, कांट्यांनीं भरलेलें. Brī'ery *n.* कांटेरी झाडाची जागा *f.*

Brig (brig) [Short for *brigantine.*] *n.* एक प्रकारचें दोन शिडांचें गलबत *n.*

Brigade (brig-ād') [Fr. *brigade*-from It. *brigata*, a troop.] *n. mil.* चारपासून पांच हजार मनुष्यांची लष्करी टोळी *f,* पंचहजारी *f;* (सैन्याची टोळी-तुकडी) 'ब्रिगेड.' २ (एका कामदाराच्या हाताखालची) एकच काम करणारी टोळी *f;* as, A fire-brigade. B. *v. t.* सैन्याच्या निरनिराळ्या टोळ्या-तुकड्या करणें. Brigade-major *n.* ब्रिगेडीयरच्या मदतीस दिलेला लष्करी अम-लदार *m,* 'ब्रिगेड मेजर,' दुय्यम पंचहजारी (अधिकारी). Brigadier', Brigadier'-gen'eral *n.* ब्रिगेडवरील अमल-दार *m,* पंचहजारी सेनापति, ब्रिगेडीअर *m,* कर्नल आणि मेजर-जनरल ह्यांमधला अधिकारी *m.* Brigadier हा शब्द Brigadier-general चें संक्षिप्तरूप आहे.

Brigand (brig'and) [O. Fr. *brigand*, skirmishes, from It. *briga*, strife; Mid. L. *brigant*, a light-armed foot-soldier.] *n.* वाटमाऱ्या, वाटपाड्या, पेंढारी, पुंड, लुटारू. Brig'andage, Brig'andism *n.* लुटारूचा धंदा *m.* लुटीचा धंदा, लूट, लूटफाट. Brig'andine (brig'-andīn), also Brig'antine *n.* एक प्रकारचें चिलखत *n.* Brig'andish *a.* लुटारूसारखा, लुटारूपणाचा.

Brigantine (brig'-an-tīn) [Fr. *brigantin*, a kind of ship.-It. *brigantino*, a pirate-ship.-It. *brigante*, a robber.] *n. a piratical vessel (obs.)* चांचे लोकांचें गलबत. २ एक प्रकारचें दोन शिडांचें गलबत *n.* See Brig. ३ एक प्रकारचें चिलखत *n.* See Brigandine.

Bright (brīt) [A. S. *beorht*, *berht*, *briht*, shining; M. H. Ger. *berht*; Goth. *bairhts*, shining.] *a. shining, lustrous, radiant* चक्क, उजळ, सोजवळ or ळ, चकचकीत, तेजस्वी, तेजवान्, तेजवंत, तेजस्कर, तैजस, तेजोमय, सतेज, तेजाचा, तेजाळ, तेजःपुंज, तेजःशाली, ज्योतिवंत, ज्योतदार, प्रकाशमान, भास्वर, प्रभावान्, उज्वल, दीप्तिमान्, कांतिमान्, लक्क, लख्ख, भास्कर (*s*), उल्लसित; as, B. wings, intens. *flaming, blazing, &c.* जरकबरक (R.), देदीप्यमान, जाज्वल्य, सुप्रभ. See also Brilliant. २ *not dull, sharp* चणचणीत, तीक्ष्ण, प्रखर, सतेज, चुणचुणीत, चलाख, पाणीदार, चाणाक्ष, तैलबुद्धीचा, as, A B. boy. ३ (a colour) *clear and full* गहिरा (गैहरा). ४ (the moon-beams) चांद-ण्यासारखा पिठूर, पिठासारखा, टिपरासारखा, फटफटीत. ५-(the eyes) पाणीदार, चकचकीत, सतेज. ६ (prospects, &c.) उत्कर्षाचा, उत्कर्षसूचक, बरें होण्याच्या

रंगाचा, शुभसूचक. ७ सतेज; as, B. beauty (सतेज सौंदर्य). ८ उघड, स्पष्ट, ठळक, ढळढळीत, ठळठळीत; as, B. evidence. ९ *illustrious*, *glorious* यशस्वी, प्रख्यात, वैभवशाली; as, In the brightest reign of Queen Victoria. १० आनंदी, उल्हासी; as, "Be bright and cheerful among your guests." *Shakes.* ११ *fig.* निर्मळ, शुचि. Brighten *v. t. to make bright* उजळ-सोज्वळ-तेजस्वी-तेजवंत-&c. करणें, प्रकाशविणें, उजळणें, उजळा *m* तजेला *m*-जिलई *f.* देणें, रंगास आणणें, प्रसन्नता देणें, खुलवणें. २ (*up*) *to make clever, to sharpen* उजरणें, चणचणीत-तीक्ष्ण-तीव्र-प्रखर-&c.-करणें. B. *v. i. to become bright* उजळणें, रंगास चढणें, खुलणें, चढणें, निवळणें. २ (with *up*) *to become clever* उजरणें, तीक्ष्ण-तीव्र-&c-होणें. Brightening *n.* (v. V. T. 1.) *act.* उजळ करणें *n,* उजळणें *n,* उज्वलन *n.* Bright-eyed *a.* तेजस्वी-पाणीदार डोळ्याचा. Bright-line *n.* प्रकाशरेषा *f.* Brightly *adv.* (v. A. 1.) तेजानें, तेजेंकरून, तकतक, झकझक, चकचक, झ्याक, प्रकाशपूर्वक, तेजःपूर्वक. २ ठळकपणानें, स्पष्ट. Bright'ness *n.* (v. A. 1.) उजळपणा *m,* तेज *n,* तेजी *f,* जिलाई *f,* झील *f,* सफाई *f,* आभा *f,* कांति (*pop.*) कांत *f,* प्रभा *f,* दीप्ति *f,* छवि *f,* उज्वलत्व *n,* औज्वल्य *n,* द्युति *f,* उजळा *m,* तजेला *m,* तजेली *f.* २ तीक्ष्णता *f,* बुद्धितीक्ष्णता *f*; as, The B. of his parts. Bright'some *a.* चकचकीत. To look at the bright side (of a thing) गुणैकदृष्टीनें पाहणें, चांगलें तेवढेंच घेणें.

Bright's-disease (brīts'-diz-ēz') [From Dr. Richard *Bright* who first investigated the disease.] *n. pathol. a degeneration of the tissues of the kidneys into fat* मूत्रपिंडाचा रोग *m.*

Brilliant (bril'yant) [Fr. *briller*, to shine. L. *beryllus*, a bright, shining, precious stone.] *a. sparkling, glittering* लकलकीत, तकतकीत, चकचकीत, झगझगीत, झगमगीत, तळपणारा, झकझकीत, झळझळीत, झळकफळक, जरकबरक, उजळपाजळ. See also Bright. २ *lustrous* पाण्याचा, पाणीदार, ढाळदार, तेजःशाली; as, A B. achievement, A B. warrior. ३ *splendid* छानदार, छानदारीचा. ४-(an exploit) शर्तीचा, शर्तमर्दीचा, भावाचा. ५ *astron.* तेजस्वी, तेजोमय. B. *n. diamond cut with facets* तरतरा *m.* ६ *print.* एक प्रकारचा सर्वांत लहान असा छापण्याचा खिळा *m.* Brilliance, Brilliancy *n.* (v. A. 1.) लकलकी *f,* तकतकी *f,* चकचकी *f,* पाणी *n,* तेज *n,* प्रभा *f,* द्युति *f,* झगझगी (झिगझिगी) *f,* झकझकी *f,* झगमग or गी *f,* झळझळ *f,* झळक *f,* झळकी *f,* चाकचक्य *n,* intens. लकलकाट *m,* लकाकी *f,* चकाकी *f,* तकाकी *f,* चकचकाट *m,* झकझकाट *m,* झकाकी *f,* झळाळ *f, m,* झळझळाट *m,* झळाळी *f.* २ *lustre fig.* दिखाऊपणा *m,* भपका *m.* Brill'iantly *adv.* (v. A. 1.) लकलकीनें, तकतकीनें, &c. तकतक, झकझक, चकचक, लकलक. Brill'iantness *n.* चकाकी *f.*

Brim (brim) [O. E. *brim*, *brimme*, A. S. *brymme*, edge, border, akin to Icel. *barmr*, edge; Ger. *brame*; Swed. *bräm*, edge, border. Possibly the same word as A. S. *brim*, surge, sea and properly speaking line of surf at the border of the sea, same as M. E. *brymme*, *bremman*, to roar and akin to L. *fremere* to roar.] *n.* कांठ *m,* किनारा *m,* कड *f. colloq.* तोंड *n.* Up to the B. तंतोतंत, तुडुंब, कांठोकांठ, तोंडोतोंड. B. *v. t.* कांठोकांठ-ओतप्रोत-&c. भरणें. B. *v. i.* कांठापर्यंत भरणें, तंतोतंत-उरपूर-तुडुंब होणें. Brimful *a.* तुडुंब, कांठसर (R), तोंडसर (R), भरपूर, वरसर, वरशेर, कांठोकांठ, टंकोटंक, तंतोतंत, तारोतार, तोंडोतोंड, तोंडावर, धारबोळ, धारोधार, वरसांड, डुबूक, तुडुंब (तुडुम), तुरुंब, तुंद, तुडुंबव (?), सवट (?), पूर्ण. To be B. डबडवणें, डब्ब असणें-भरणें. Brimfulness *n.* कांठोकांठ भरलेला असणें *n.* Brim'less *a.* Brimmed *a.* कांठोकांठ भरलेला. Brimmer *n. a glass,* &c. *full to the brim* डबडबीत-डुबडुबीत-भरपूर भरलेला पेला *m.* Brimming *a.* डबडबीत, वरसांड, कांठोकांठ भरलेला; as, A B. pail. To brim over *lit. & fig.* उतूं जाणें, कांठोकांठ भरून खालीं सांडणें.

Brimstone (brim'stōn) [Lit. burning stone. A. S. *bryne*, a burning-*byrnan*, to burn and Stone. cf. Icel. *brennisteinn*. Ger. *bernstem*. Vide Burn.] *n. sulphur* गंधक *m.* B. *a.* गंधकाचा; as, B. matches. Brimstony *a.* (v. N.) गंधकीय, गंधकाचा, गंधकासारखा, गंधकधर्मक. Fire and brimstone. See Fire.

Brinded, Brindled (brin'ded, brin'dld) [See Brand & Burn.] *a. of a gray or tawny colour with streaks of darker hue* बहाळा-बाहळा, बांडा, कसरा; as, The B. cat. Brindle *n.* बांडा असणें *n.* २ बांडा रंग.

Brine (brīn) [A. S. *bryne*, a burning, salt liquor, from *byrnan*, to burn.] *n.* पाणखार *m,* खार *m,* मिठवणी *n.* [PREPARED WITH B. उदलावणिक.] २ अश्रू *m,* असूं (singular), आसवें *n.* (*pl*). ३ *fig.* समुद्र *m.* B. *v. t. to steep in brine* मिठवण्यांत घालणें. २ *to sprinkle with salt* मीठ *n.* घालणें, खारवणें, मीठ मिसळणें. Brine pan (saltpan) मिठकोंडी *f.* Brine-pit *n.* ज्यांत मीठ तयार करतात अशा खाऱ्या पाण्याचा खड्डा *m*-विहीर *f.* ह्यांतलें पाणी उकळवून त्याचें मीठ करतात. Brine-shrimp, Brine-worm. *n. zool.* कवची असलेला प्राणी *m.* Brin'ish *a.* खारट. Brin'y *a.* खारट. The briny *n. slang.* समुद्र *m.*

Bring (bring) [A. S. *bringan*, to carry.] *v. t.* आणणें, घेऊन येणें; as, Bring me a morsel of bread. २ *to produce unto* देणें, पाठविणें, प्राप्ति *f*-मिळकत *f* &c.-असणें-होणें *in. con. & g. of o.*, कारण *n.* होणें *in. con. & g. of o.*; as, Nothing will bring you more honour than justice. ३ (to a certain condition)

अवस्थेस-दशेस-&c. आणणें. ४ *to sell for* किंमत आणणें; as, What does coal bring per ton? ५ (with *about*) *to effect* घडवून-बनवून-जमवून-&c. आणणें, घडविणें. ६ (with *down*) *lit. & fig.* खालीं आणणें, *fig.* अवनतीस नेणें. (*b*) पाणउतारा करणें; as, To B. down high looks. (*c*) टेंकीस-जेरीस आणणें, वांकवून टाकणें; as, "To B. down my gray hairs with sorrow to the grave." ७ (with *forth*) *to bear* जन्म देणें, उपजविणें, प्रसविणें, विणें. ८ (with *forth*) *to light, to publish* उघडकीस-उघडिकेस-उजेडास-उघड दशेस-चवाठ्यावर-उमाठ्यास-&c. आणणें (of bad things), प्रसिद्ध करणें, प्रसिद्धीस आणणें (of good things). ९ (with *forward*) *to adduce* पुढें आणणें-करणें, उभा करणें, उपन्यास करणें *g. of o.*; as, To B. forward arguments. १० (with *in*) (*a*) *to produce as income* (पासून) उत्पन्न-प्राप्ति-आय (R.)-&c. होणें, वसूल येणें, वसूल करून देणें. (*b*) प्रचारांत आणणें, रूढ करणें. ११ (with *off*) (*a*) दूर नेणें. (*b*) सुटका मिळविणें, दंडमुक्त करणें. १२ (*a*) (with *on*) (पासून) उद्भूत होणें-निघणें, उत्पन्न करणें. (*b*) उपस्थित करणें, आरंभ करावयास लावणें; as, To B. on a battle, &c. १३ (with *on one's self*) *to trouble* आपल्या पायावर (धोंडा) ओढून घेणें-पाडून घेणें-मारून घेणें, खोकला विकत घेणें (*idio*). १४ (with *on one's way*) मार्गावर-ताळ्यावर आणणें. १५ (with *out*) दर्शविणें, ठळक रीतीनें पुढें आणणें, लोकांत प्रसिद्ध करणें. १६ (*a*) (with *over*) मन वळवणें, वळवून घेणें, समजावणें, समजाविशी *f*-समजावीस *f*-समजूत *f*-समजी *f*- &c. करून आपल्या बाजूस-पक्षास आणणें-ओढणें. (*b*) पैलतीरीं नेणें, पलीकडे नेणें, (संकटांतून) पार पाडणें. १७ (with *round*) शुद्धीवर-कौलास आणणें, बरा करणें; as, To B. a person round. १८ (with *to*) *to restore to consciousness* शुद्धीवर-देहभानावर-&c. आणणें. १९ (with *under*) *to subdue*-च्या हाताखालीं-हुकुमांत-ताब्यांत-लगामींत-&c. आणणें, वश करणें, जिंकणें; as, To B. to do a certain thing. २० (*a*) (with *up*) *to pull in, to curb* आटोपून-ओढून-&c. धरणें, आकळणें, लगामीं धरणें. (*b*) बाळगणें, आपंगणें, पाळणें, पोसणें, पालन-पोषण करणें, लहानाचा मोठा करणें. (*c*) शिकविणें. (*d*) पुढें आणणें; as, To B. up a subject. (*e*) कोर्टापुढें आणणें. (*f*) गति बंद करणें; To B. up a horse. (*g*) ओढून घेणें. To bring home *lit.* घरीं आणणें. २ *fig.* पूर्णपणें सिद्ध करणें, ठसविणें, (ची) खात्री करणें, अंगीं लावणें, पदरीं घालणें. ३ (*naut.*) (नांगर उचलून) त्याच्या जागयावर ठेवणें. To bring into play चालू करणें, गति देणें. To bring a ship to जहाजाची गति बंद करणें. To bring to light प्रसिद्धीस आणणें. To bring to mind आठवण करणें, स्मरण देणें. To bring to pass घडवून आणणें, घडविणें. To bring to bear घडविणें. To bring to book चुकींत पकडणें. To bring to the hammer लिलांव करणें. Bringer *n.* आणणारा, &c. To bring down the house इमारत खालीं पडेल इतक्या जोराचा टाळयांचा गजर मिळविणें.

**Brinjal** (brinjal') *n. bot. the eggplant*—the plant वांगी *f*, वृंताकी *f*, वृंताक *m.*—the fruit वांगें *n*, वृंताक *n.* Summer B.—the plant उन्हाळवांगी *f*- the fruit उन्हाळवांगें *n.*

**Brinjarrie** (brin'ja-rē) *n. carrier of grain*, &c. वणजारा or वणजारी. Camp or company of Brinjarries वणजार *n.*

**Brink** (bringk) [Dan. & Ger. *brink*, declivity.] *n.* कड *f*, तड or थड *f*, किनारा *m.* २ कांठ *m*, तट *m.* ३ धोक्याचा प्रांत-भाग *m.* ४ *fig.* (एखाद्या) गोष्टीचा शेवटचा काळ *m*, शेवटची मर्यादा *f.*; as, To be on the B. of death.

**Briny, Brinish** (brīn'i,-sh) *a. salt* खारा, खारट, क्षारयुक्त.

**Brisk** (brisk) [Fr. *brusque*, lively, quick.] *a. active, quick, smart* चपळ, हुशार, जलद, झपाट्या, चलाख; as, A B. boy. २ *sprightly, gay, lively* आनंदी, उल्हासी, आनंदवृत्ति, खुशमौजा. ३ *busy* वेगाचा, जोराचा. ४ *bustling* चटपट्या, गडबड्या, झटपट्या, झटपटी. ५ (of town, &c.) *lively, swarming* गजगजीत, गजबजीत. ६ (of trade, sale, &c.) तेजीचा, जिवट, तेजगीचा, चडचडीचा, भरभराटीचा; as, B. business. ७ (of fire) धगधगीत, धगधगीचा. ८ *effervescing* उतणारा,उतणीय (?), फेंसाळणारा, फेंस येणारा, ऊत येण्याजोगा-सारखा; as, B. liquors. Brisk *v. t.* आनंदी करणें. B. *v. i.* (with *up*) आनंदी-उल्हासी-चपल होणें. Brisk'ish, Brisk'y *a.* आनंदी. Brisk'ly *adv.* (v. A. 2.) उल्हासानें, आनंदवृत्तीनें, हौशीनें, जोरानें, वेगानें. २ चलाखीनें, चटपटीनें, &c., चपचप or पां, तडक or का, कडक or का, झपकन-कर-&c., झपझप, धडक or का, झरझर, झराझर, हातोहात, भरभर, भरभरां, intens. चपाचप, चपापां, झरारां, झपाझप, झपापां. ३ तेजीनें, भरभरीनें, झरझर, झपाझप, &c. Brisk'ness *n.* (v. V. 2.) उल्हासीपणा *m*, &c., आनंदवृत्ति *f*, उल्हासवृत्ति *f*. २ चपळपणा *m*, हुशारी *f*, चटपट *f*, चकपक *f*, झटपट *f*, वेग *m*, त्वरा *f*, जलदी *f*, चलाखी *f*, चपलता *f*, चापल्य *n.* ३ तेजगी *f*, तेजी *f*, जीव *m*, भरभर *f*, जिवटपणा *m.* B. and dulness (of trade-sale-&c.) तेजीमंदी *f.*

**Brisket** (brisk'et) [O. Fr. *brischet*, also *bruschet*; Fr. *bricket*, the breast-piece.] *n.* (पशवादिकांचा) ऊर *m*, छाती *f.*

**Bristle** (bris'l) [A. S. *byrst*; Scot. *birse*, a thick hair.] *n.* (डुकराचा) कांट्यासारखा केंस *m*, सुळाकेंस *m*, राठ केंस *m*, शूकरलोम *m. pl.*, शूक *m*, *bot.* कंटक *m*, दढलोम *m*, सड *m*, कांटा *m*, (दाढीचे किंवा मिशीचे) खुंट, कंटक केश. B. *v. t.* (रागानें-वैरबुद्धीनें) केंस उभारणें. पिसारणें-पिंजारणें, थरारविणें, थुरथुरविणें (*obs.*), थरथरविणें (*obs.*), उभारणें. B. *v. i.* (the hair) उभारणें, उभा राहणें, थरारणें, थुरथुरणें. २ (with *up*) (वैरबुद्धीनें-रागानें) थरथरणें. To set up one's bristles, *to show one's*

*temper, resistance, or pride* आपला स्वभाव-पराक्रम-पाणी प्रदर्शित करणें. Bristled *p. a.* सुळ्या केंसांचा, कंटकित. Bristling *pr. p.* Brist'liness *n.* Brist'ly *adv.* शूकयुक्त, शूकविशिष्ट, खरखरीत.

Bristol (bris'tul) *n.* इंग्लंडच्या पश्चिमेकडील बंदर. Bristol-board *n.* एकजातीचा गुळगुळीत पुठ्ठयाचा कागद.

Britain (bri'tān) [By far the most probable derivation is that suggested by Bochart from the Phœnician *Baratanic* (country of tin) contracted into B'ratan.'] *n.* ब्रिटनदेश *m.* The Great Britain (इंग्लंड, वेल्स आणि स्कॉट्लंड मिळून) मोठें ब्रिटन *n.* The Greater Britain, *the whole British Empire* सर्व ब्रिटिश राज्य *n.* Britan'nia, Britannia metal (brit-an'ia-met'l) *n. a metallic alloy of block-tin, antimony, bismuth and copper* कथील, अंज (antimony), विस्म आणि तांबें यांचें पांढरें मिश्रण *n,* ब्रिटानिया धातु *f.*

Britannic (brit-an'ik) *a.* ब्रिटन देशाचा. British *a.* ब्रिटिश, ब्रिटन देशाचा. British lion *an Englishman who has courage all round* ब्रिटिशसिंह. हें विशेषण इंग्रजी मनुष्याला त्याच्या शौर्याबद्दल लावतात. Britisher *n.* ब्रिटिशच्या मुलुखांतला मनुष्य *m.* Briton *n.* ब्रिटन *m,* ब्रिटन देशाचा मनुष्य *m.*

Brittle (brit'l) *a.* ठिसूळ, ढिसळ, ढिसूल, ठुसकर. २ *that breaks easily* कडक, भंजनशील. ३ *fig.* अल्पकाल टिकणारा, क्षणभंगुर. Britt'leness *n.* (v. A.) ठिसूळपणा *m,* ढिसळपणा *m.* २ *fig.* अल्पकालिकता. Brittle-star *n. star-fish* तारामत्स्य, माशासारखा तारा.

Broach (brōch) [Fr. *broche*, a spit, a point.] *n.* (*obs.*) *a spit* सुळा *m,* शूल *m.* २ *awl, bodkin* दाभण *m,* सळई *f.* ३ *mech.* भोंक पाडण्याचें हत्यार *n,* बारीक सामता *m,* गिरमीट *m.* ४ दांडा *m,* शंकु *m.* ५ (*masonry*) टांकी *f,* चिरणी *f,* आड *m.* ६ मनोऱ्याचा कळस *m.* ७ फांसा *m,* अडकवण *n.* ८ *the stick from which candle wicks are suspended for dipping* (मेणांत बुडविण्याकरितां) वाती ठेवण्याचा दांडा *m.* ९ (किल्ली घालण्याचा) कुलपाचा कांटा *m.* B. *v. t. to spit* (*obs.*) सुळ्यानें-सुळावर-सळईनें टोंचणें. २ *to pierce in order to draw* भोंक *n*-तोंड *n*-पाडणें. ३ (a store) सोडणें, फोडणें, उघडणें. ४ *to give out, to disclose* फोडणें, काढणें, प्रसिद्ध-प्रगट-&c. करणें, चौघांत आणणें; as, To B. a new subject नवीन विषयाची हालचाल करणें-उपक्रम करणें, नवीन विषय काढणें. ५ *to shape roughly by chiselling with a coarse tool* छिनीनें आकार आणणें, डगळणें, डगळून ठेवणें. Broach'er *n.* उपक्रम करणारा. २ सूळ. To broach the admiral रेल्वेतून नेतांना किंवा सांठ्यांतून कांहीं दारू चोरून घेणें. To broach to *naut.* एखादें जहाज वाऱ्याच्या बाजूस फिरविणें.

Broad (brawd) [A. S. *brad*, broad.] *a. wide* रुंद, रुंदट. रुंदेला (R), रुंदीचा, विस्ताराचा, विस्तीर्ण, विस्तृत. [(OF CLOTH) मोठ्या पन्ह्याचा. B. AS LONG *fig.* पकूनपकच, पकून क्षेत्रफळ सारखेंच, पकूण तेंच, पकूण हिशेब एकच. BROADISH रुंद, रुंदट.] २ *gross, coarse, rudely plain, blunt* घसक्याचा, बेमुरवतीचा, बेमुलाज्याचा, धडकभडक, धडकफडक, निर्भीड, विचकट, बीभत्स, अश्लील; as, A B. compliment. A B. joke, B. humour, B. ballads. ३ (day-light) भणभणीत, फटफटीत; It is B. daylight भणभणीत उजाडलें. ४ (-views, sentiments) comprehensive प्रशस्तपणाचा, प्रशस्त, व्यापक, बहुग्रह. ५ असंदिग्ध, खुलाखुला, व्यापक आणि स्पष्ट; as, "The words of the constitution are broad enough to include the case." ६ उदार, उदारबुद्धीचा; as, "This is a broad statesmanlike manner of viewing at things." ७ उघड, खुला, स्पष्ट; as, A broad hint. ८ मोकळा, बंधनरहित, इतस्ततः संचार करणारा; as, "As broad and general as the casing air." *Shakes.* ९ (*fine arts*) ठळक ठळक असा-प्रमाणाचा. Broad *n.* एखाद्या वस्तूचा रुंद भाग *m;* as, The B. of an oar. २ सिलिंडराचें कांठ वांकविण्याचें हत्यार. Broad, Broad'ly *adv.* Broad-arrow *n.* रुंद बाण *m,* बाणासारखी खूण *f* (↑). ही खूण सरकारच्या मालावर असते. Broad awake *a.* पुरा जागा, डोळ्यांत तेल घालून टपत बसलेला, तत्पर. Broad-breasted, Broad-chested *a.* भरछातीचा, छातीपूर, कपाटवक्षा, विशालवक्षा, उरस्वान्(न), अश्वोरस(स). Broad-brim *n.* रुंद कांठाची टोपी *f.* २ क्केकरपंथी. See the word Quaker. Broad-brimmed *a.* Broad-cast *n.* मुठीची पेरणी *f.* Broad-cast *a.* मुठीचे पेऱ्याचा, मुठीनें पेरलेला-टाकलेला. Broad-cast *adv.* विस्तृत रीतीनें पेरलेल्या स्थितींत. Broad-cast *v. t.* मुठीनें पेरणें. २ *fig.* सर्वत्र प्रसार करणें. Broad-church *n.* इंग्लंडांतील चर्चमधील एक उदार विचारांची-सहिष्णुमंडळी *f.* Broad-cloth *n.* दुप्पट (डबल) पन्ह्याचें कापड *n.* Broad'en *v. t.* रुंद करणें, रुंदावणें. B. *v. i. to grow broad* रुंदावणें, पसरट होणें. Broad-eyed *a.* मोठ्या डोळ्यांचा-नजरेचा, मोठ्या पाहणीचा. २ उघड्या डोळ्याचा, जागा. Broad-guage रुंद अंतर, रुंद माप, साडेचप्पन्न इंचांपेक्षां ज्यास्त रुंदीचें आगगाडीच्या दोन रुळांमधील अंतर. Broad'ly *adv.* (v. A. 1.) रुंद. २ बेमुरवत, बेमुरवतपणानें, बेमुलाज्यानें. Broad'ness *n.*(v. A. 1.) रुंदी *f,* रुंदपणा *m.* २ बेमुरवतपणा *m,* घसकेपणा *m,* निर्भीडपणा *m,* अश्लीलपणा *m,* बीभत्सता *f.* Broad-seal *n.* (राष्ट्राचा) रुंद शिक्का *m*-मोतब, इंग्लंदाचा शिक्का *m.* Broad-sheet *n.* पाठकोरा ताव *m.* Broad-shouldered *a.* विशालस्कंध, अंसल. Broad-side *n. the side of the ship above the waterline from the bow to the quarter* गलबताची जलरेषेवरील रुंदट बाजू. २ गलबताच्या रुंदट बाजूवरील एकदम सोडतां येणाऱ्या सर्व तोफा. ३ *a volley of abuse, or denunciation* शिव्यांचा भडि-

मार. ४ एका बाजूनें छापलेला रुंद कागद. To open a broadside on the enemy गलबताच्या रुंद बाजूकडील सर्व तोफा शत्रूवर झाडणें. Broad-sword *n.* रुंद पानाची तलवार *f.* रुंदी तलवार *f.* २ *pl.* रुंद पानाच्या तलवारीनें सज्ज असे मनुष्य. Broad-wise *adv.* आडवा, कडेकडून.

Brobdingnagian (brob'ding-nā'ji-an) [From *Brobdingnag*, a country of giants in "Gulliver's Travels."] *n. a giant* राक्षस *m.* B. *a. colossal* राक्षसासारखा मोठा, राक्षसी; as, Limbs of B. proportions.

Brocade (brok-ād') [Fr. *brocher*, to prick, to emboss, to embroider.] *n.* जरीचा किनखाब *m*, जर *m*, जरबाब or जरबाफ्त *f.* जरीकापड *n*, तमामी *f.* False B. or lace लोखंडीजर *m, f.* खोटा जर. Old B. fringe, &c. जरीजरतार *f.* जरीबुटी *f.* Old B. lace-&c. merchant *m.* जोहरी *m*, जरीपुराणा विकणारा *m.* Brocad'ed *a. woven with gold or silver thread* जरकाम केलेला, जरतारी, जरीचा. २ लफ्फेदार, गोलदार, गोलाचा, पल्लेदार, जरीपदर, भरजरीचा. ३ जरतारी पोशाख केलेला.

Brocage, Brokage (brōk'āj) *n.* दलाली *f.* २ दलालीचा धंदा.

Brocard (brōk'ärd) [After *Brocard* or *Burkhard*, Bishop of Worms.] *n.* मूलतत्त्व *n*, कायद्याचें-तत्त्वज्ञानाचें अगर अध्यात्मशास्त्राचें सूत्र *n.*

Brochure (bro-shōōr') [Fr. *brochure*, a few leaves stitched together.—Fr. *brocher*, to stitch.] *n. a pamphlet* छापलेला लहान ग्रंथ *m*, लहान छापील पुस्तक *n*, छापील चोपडें *n.*

Brogue (brōg) [Ir. & Gael. *brog*, shoe.] *n. a stout, coarse shoe* ओबडधोबड जोडा *m.* २ *a dialectic pronunciation, esp. the Irish manner of pronouncing English* आयरिश लोकांचे इंग्रजी उच्चार.

Broider (broid'ėr) [O. Fr. *brouder*, to broider.] *v. t.* कशिदा-वेलबुट्टी काढणें. [BROIDER IS THE SAME AS EMBROIDER.]

Broil (broil) [Fr. *brouiller*, to trouble.] *n.* भांडण *n*, कलागत *f*, कलह *m*, खडाजंगी *f*, कडाकडी *f.* Broil'er *n.* कलह करणारा *m.*

Broil (broil) [Contr. of Fr. *bruiler*, to roast on glowing coals.] *v. t.* भाजणें or (भुजणें), भाजण *n*-भाजप *n.* करणें. B. *v. i.* भाजणें. २ *fig. to suffer from the sun*, &c. तळतळणें, पोळणें, तळपणें, तळतळ *f.* होणें *g. of s.* Broiled *p.* भाजलेला, भाजींव. Broiler *n.*

Broke (brōk) *pa. t.* of Break. Broken *p. p. & a.* (v. V. T. 1.) मोडलेला, तुटका, मोडका, फुटका, खंडित, भग्न, छिन्न, चुरलेला, विच्छिन्न, भिन्न, विघटित. [B. AND BATTERED खुळाखुळा, खुडाखुडा, तुटून फुटून फन्ना झालेला.] २ अशक्त झालेला, रोगानें-वयानें-संकटांनीं शक्तिहीन झालेला. I *discontinuous, interrupted* तुटक, तुटका, फुटक, फुटका, सांतर. II (a discourse, an utterance, &c.) तुटक, तुटका, अस्पष्ट, अर्धवट, मोडकेंतोडकें; as, B. English. III *not entire, incomplete, odd* फुटक, फुटकर. Broken backed *a.* पाठ मोडलेला. २ पाठीमागची बाजू खिळखिळी होऊन लवकर मोडण्यासारखें झालेलें (तारूं). Broken-down *a.* नाश पावलेला. २ शक्तिहीन झालेला, अन्नहीन झालेला. Broken-fortuned *a.* कंगाल झालेला. Broken-hearted *a.* भग्नहृदय, भग्नाश, हताश, निराश झालेला, दुःखानें छाती फुटलेला, काळजानें ठाव सोडलेला *idio.* To die of a broken heart दुःखानें उरीं फुटून मरणें. Broken-horse *n.* वठणीस आणलेला-माणसाळलेला घोडा *m.* Broken-kneel *a.* तुटलेल्या गुडघ्यांचा. Broken-meat *n. colloq.* उरलेलें अन्न *n*, तुकडेमाकडे *m. pl*, तुकडेताकडे *m. pl*, उरलें-सुरलें *n*, शिळेंपाकें *n*, शेषान्न *n*, खरकटें *n.* Broken-reed *n. lit.* मोडकाबोरू, *fig.* लिचापिचा-लेचापेचा-मनुष्य. Broken-tradesman *n.* दिवाळें निघालेला मनुष्य *m.* Broken'ly *adv.* Brokenness *n. a feeling of laxation, exhaustion* मोडलेलेपणा, चुरा *m*, चूर *m*, मोडकळी *f*, खुरदा *m*, खुरदमा *m*, खुंदला *m* (*obs.*), घुमा (R) *m*, अंगाचा चकनाचूर *m*, अवयववैकल्य *n.* [TO HAVE THE FEELING OF B. घळघळणें, आंग मोडून गेलेंसें वाटणें.] २ (as of a floor or pavement) उखळण *f.* Broken-wind *n.* फुटलेला दम *m*, भग्नश्वास *m.* हा एक प्रकारचा घोड्याचा रोग आहे. Broken-winded *a.* फुटलेल्या दमाचा, दम फुटलेला, दम गेलेला.

Broker (brōk'ėr) [A. S. *brucan*, to use, to profit.] *n. one who buys or sells for another* दलाल *m*, 'ब्रोकर' *m.* २ *a seller of old apparel*, &c. जुनेरेंविक्या, जुन्याचा बाजारी, मोडतोडविक्या, बोहरी, जुनेपुराणेवाला. ३ *slang.* भडवा. Broke *v. i.* (R) दलालाचें काम करणें, दलाली करणें, मध्यस्ती करणें. २ *slang.* भडवेगिरी करणें. Brok'erage *n.* (v. N. 1.) *the business of a broker* दलाली *f*, दलालाचें काम *n.* I *hire or pay of a broker* दलाली *f.* Brok'ery *n.* दलालाचा धंदा *m.* Broking *a.* दलालीचा धंदा करणारा. Bill-broker *n.* हुंड्या विकणारा व विकत घेणारा दलाल *m*, हुंडीदलाल. Curbstone broker or Street broker दलालांच्या ठरींव अड्ड्यांत न जातां ठेवीचे (स्टॉकचे) भागांची दलाली करणारा. Exchange broker *n.* कोणत्याही देशचें नाणें चालू नाण्याच्या मोबदला विकत घेणें-विकत देणें ह्या दोहोंचा धंदा करणारा दलाल *m*, सराफ. Insurance broker विमा दलाल, जहाजांचा (marine) व आगीचा (fire) विमा उतरविणारा दलाल *m.* Pawnbroker *n.* गहाणदलाल, गहाणावर पैसे मिळवून देणारा दलाल *m.* Real estate broker इस्टेटींची दलाली करणारा. Ship-broker जहाजें विकण्याची व त्यांना माल मिळवून देण्याची दलाली करणारा. Stock-broker (स्टॉकची) ठेवीची दलाली करणारा, शेरविक्या, शेरदलाल.

Brome (brōm) [Fr.-Gr., vide Bromine.] *n.* ब्रोम किंवा ब्रोमिन नांवाचें मूलतत्त्व *n.*

Bromine (brōm'in) [Gr. *bromos*, bad smell.] *n.* 'ब्रम' *f*, एक रासायनिक मूलतत्त्व *n* (ही एक उपधातु

आहे). ह्याचें विशिष्टगुरुत्व ३.१ आणि अणुभारांक ७९.८ हा आहे. Brom'ic *a.* ब्रोमीनचा, ब्रमिक. Brom'ic acid ब्रम आणि प्राणवायु यांचें अम्ल. Brom'ate *n.* ब्रमिकाम्ल आणि इतर भस्म (base) यांचें संमेलन, 'ब्रोमेट'. Brom'ide *n.* धातूच्या भस्माचें व ब्रमाचें संमेलन, ब्रमिल, 'ब्रोमाइड'.

*N. B.*—See the word Chemistry for the vernacular suffixes corresponding to 'ic,' 'ate,' 'ite,' 'ide,' 'ous,' &c. संमेलन = chemical compound and मिश्रण = mechanical mixture. These coinages are better than रासायनिक मिश्रण (Chemical compound) and यांत्रिक मिश्रण (Mechanical mixture).

Bronchi Vide Bronchus.

Bronchia (brongk'i-a) [L.-Gr. *bronchia,* (neuter *pl.*) the bronchial tubes. Formerly sometimes treated as a *sing.* with a new *pl.* Bronchiæ. cf. Bronchus.] *n. pl.* लघुश्वासनलिकेच्या शाखा.

Bronchophony (bron'kō-fō-ni) *n.* अपस्तम्भनाद *m.* लघुश्वासनलिकानाद *m.*

Bronchus (bron'kus) [Gr. *bronchos,* the wind-pipe.] *n.* (अधःश्वासनलिके (trachea)-पासून दुभागून डाव्या किंवा उजव्या फुफ्फुसाकडे अतिलघुश्वासनलिकां (bronchioles)-च्या द्वारें जाणारी डावी किंवा उजवी) लघुश्वासनलिका *f.* धाकटी श्वासनळी *f.* अपस्तम्भशाखा *f.* Bronchi *pl.* Bronch'ic *a.* Bronch'ial *a. pertaining to the bronchi or bronchia* धाकट्या श्वासनळीसंबंधीं, अपस्तम्भशाखेसंबंधीं. B. polypi धाकट्या श्वासाच्या नळींत होणारा अर्श-मासरुड, श्वासनलिकार्श. B. respiration लघुश्वासनलिकाध्वनि *m,* अपस्तम्भध्वनि *m.* Bron'chiole *n. a minute bronchial tube* अतिलघु-सूक्ष्मश्वासनलिका. Bronchī'tis *n.* लघुश्वासनलिका-मिताप-दाह *m.* Bron'chocele *n.* गलगंड *m.* Bron'chotome *n.* मृतपरीक्षेंत लघुश्वासनलिका उघडण्याकरितां वापरलेली कातर-चाकू *m,* लघुश्वासनलिकाछेदक (छुरिका). Bronchŏ'tomy *n.* लघुश्वासनलिकाछेदन *n.*

*N. B.*—Trachea or wind pipe अधःश्वासनलिका or simply श्वासनलिका, खालची कंठनाडी. Larynx (the upper part of the Trachea) ऊर्ध्वश्वासनलिका, शब्दनलिका, नरडें, वरची कंठनाडी. Bronchus (डावी किंवा उजवी) लघुश्वासनलिका, अपस्तम्भशाखा. Bronchiole अतिलघु-सूक्ष्मश्वासनलिका.

Bronze (bron'z) [Fr. *bronze.*—It. *bronzo; bronzino,* made of bronze.—L. *Brundusium,* the modern Brindisi (in Italy) where bronze mirrors were made.] *n.* ब्रांझ *m,* तांब्याची आणि कथिलाची मिश्रधातु *f;* ओतकामास योग्य असें कांसें, एकप्रकारचें कांसें *n.* २ ब्रान्झ धातूचा पुतळा. ३ *fig.* उमेटपणा *m,* उद्धटपणा *m.* ४ ब्रॉंझचा रंग, ब्रॉन्झधातूचा मुलामा देण्याची पावडर-पूड. B. *a.* ब्रांझचा केलेला. B. *v. t.* ब्रान्झधातूचा मुलामा देणें. २ *fig.* निष्ठुर किंवा कठीण करणें. Bronzed *a.* ब्रान्झचा मुलामा दिलेला. Bronzed steel *n.* घट्ट केलेलें ब्रांझ *n.* Bronzify *v. t.* ब्रान्झस्वरूप देणें, ब्रान्झ तयार करणें. Bronz'ing *n.* ब्रान्झसारखें करून देणें *n.* Bronz'y *a.* बिरंजी, ब्रान्झचा. Bronze age or period ब्रांझयुग, लोहयुग आणि पाषाणयुग यांमधील काल. दगडाच्या हत्यारांनंतर आणि लोखंडी हत्यारें प्रचारांत येण्यापूर्वी ब्रांझधातूचीं हत्यारें लोक वापरीत असत.

Brooch (brōch) [Fr. *broche,* a spit. See Broach.] *n.* वस्त्रांचें छातीवरील अडकवण *n* (now worn at the breast by women), कपडा ठीक बसण्यासाठीं वापरलेला कांटा (दागिना).

Brood (brōōd) [A. S. *brod,* a brood.] *n. a hatch, the whole hatch* वीण *f;* वीत *f;* वेत *n.* २ *breed, progeny, hatch, &c.* वाढा *m,* विजवट *n.* ३ संतान *n,* संतति *f.* Brood *a.* ऊब देण्याकरितां ठेवलेली. २ फळवण्याकरितां ठेवलेली. B. *v. t.* (wrath or the like) पोसणें, पालन करणें. २ पंखांनीं झांकणें, ऊब देण्याकरितां किंवा विण्याचे वेळीं झांकणें. ३ पाखर *f.* घालणें; सुरकूत *f.*-करणें, अंडीं *n. pl.* उबविणें, रोवण घेणें, कुलायनिलाय *m.* करणें. ४ *to think anxiously upon* सचिंत विचार करणें. B. *v. i.* (with *over* or *on*) *to ponder over* ध्यास *m.* धरून बसणें, चिंतन-चिंता करीत बसणें, सचिंत बसणें; as, To B. over misfortunes. २ उबवणें, ऊब देणें, पाखर घालणें. Brooding *a.* सचिंत; as, B. disposition. Broodingly *adv.* Brood'y *a.* ऊब देण्याची किंवा उबविण्याची इच्छा असलेला; as, A B. hen.

Brook (brōōk) [A. S. *broc,* a stream, a brook.] *n.* ओढा *m,* नाला *m,* ओहळ *m,* पऱ्हा *m.* A clattering B. खळाळी *f.* Dry bed of a B. ओढवण *n.* Brook'let *n.* लहान ओढा *m.* Brooky *a.* पुष्कळ ओढे असलेला.

Brook (brōōk) [A. S. *brucan,* to use, to enjoy.] *v. t. to bear, to put up with* सोसणें, साहणें; as, They cannot B. restraint.

Broom (brōōm) [A. S. *brom,* the plant broom; hence, a besom made from the twigs of it; Dut. *brem;* Low L. *braam;* cf. Bramble.] *n. besom* केरसुणी or केरसोणी *f;* झाडू *m,* झाडण *f,* झाडणी *f,* बुतारा *m. dim.* बुतारी *f,* वाढवण *f,* वाढणी *f,* मार्जनी *f,* सम्मार्जनी *f,* कुंचली *f,* सळाथी *f.* [B. OF STRONG AND STIFF STALKS खरांटा *m.* B. OF TWIGS OR CUTTINGS शिरांटा *m,* सराटा, खराटा. B. WITH HANDLE दांडकेरसुणी *f.* B. WORN TO THE STUMP खुंटारा *m,* OR खरांटा *m.* STOCK OR HINDER PART OF A B. बुंध *m,* बुंधा *m,* बुंधारा *m,* मुडगा OR मुगडा *m.* TO BEAT WITH A B. बुंधारणें, केरसुणीनें मारणें.] २ केरसुणीचें झाड. Broom-corn *n.* ज्याचे झाडू करितात तें झाड *n.* Broom-staff, Broomstick *n.* केरसुणीचा दांडा *m.* Broom'y *a.* To marry over the broomstick or to jump the besom कधीं प्रचारांत नाहीं अशा रीतीनें लग्न करणें, ह्यांत दोघेजण केरसुणीच्या दांड्यावरून उड्या मारतात. A new broom (एखाद्या हुद्यावर) नेमलेला नवीन

मनुष्य. New brooms sweep clean, cf. तेरड्याचे रंग तीन दिवस, नव्याचा रंग नऊ दिवस.

Broth (broth) [A. S. *broth*, from root of Brew.] *n.* *a decoction of meat* मांसाचें कढण *n*, कढवण *n*, रसा *m*, शृतमांसपेय *n*. B. of some pulse कढण *n*, कढवण *n*. Chicken broth कोंबड्याचे मांसाचा रसा, कुक्कुटमांसरस, सुरवा *m*, शेरवा *m*.

Brothel (broth'el) [M. E. *brothel*, a lewd person, a base wretch.—A. S. *breothan*, to perish, to become vile, whence also *abrothen*, degenerate, vile; hence was made *brothel-house*, a house for vile people (Much Ado I. 1. 256), afterwards contracted to *brothel*.] *n.* *a house of ill fame* कुंटणखाना *m*, वेश्याशाला *f*, छिनालवाडा *m*, बटीकवाडा *m*, छिनालखाना *m*, शिंदळवाडा *m*, वेश्यागृह *n*.

Brother (bru*th*'ėr) [A. S. *brodor*; Dut. *broeder*; Icel. *brodir*; Swed. & Dan. *broder*; Ger. *bruder*; L. *frater*; Gr. *bratur*; Sk. भ्रातृ, a brother.] *n.* भाऊ *m*, बंधु *m*, भ्राता *m*, बंधुजन *m*, बांधव *m*. [BROTHERS, BRETHREN बंधुजन *m*, *pl*, बंधुवर्ग *m*, *pl*. BROTHERS AND SISTERS COLLECTIVELY भावंडें *n*, *pl*, वहीणभावंडें *n*, *pl*, भाऊबहिणी *f*, *pl*. B. OF WHOLE BLOOD सहोदर, सखा भाऊ *m*, सोदर, एकोदर, सगर्भ. B.'S WIFE भावजई-य, भ्रातृजाया *f*. ELDER B. वडील भाऊ, पुढला भाऊ, अग्रज, ज्येष्ठबंधु. HALF-B. B. ON THE FATHER'S SIDE सापत्नभाऊ, सावत्रभाऊ, सापत्नबंधु. HUSBAND'S B.'S WIFE जाऊ *f*. HUSBAND'S B.'S DAUGHTER पुतणी *f*. TWIN B. जुळाभाऊ, जावळाभाऊ. UTERINE B. समानमातृक-एकमातृक बंधु *m*, दूधभाऊ,&c.,सनाभि. YOUNGER B. धाकटा भाऊ, मागला भाऊ, पाठचा भाऊ, अनुज.] २ *one closely allied by some tie* भाऊ *m*, बंधु *m*. ३ सहकारी. ४ गुरुबंधु. B. *v. t.* भावाप्रमाणें वागविणें. २ बंधुत्व मानणें. Brother-german (—jer'man) [L. *germanus*, of the same stock; *germen*, a bud or sprout.] *n.* *a real brother, a brother by both the father's and mother's side* सखा (एक आईबापांचा) भाऊ *m*. Brother-in-law *n.* *one's wife's brother* श्यालक *m*, श्याल *m*, मेहुणा *colloq. m.* २ *one's sister's husband* मेहुणा *m*, भगिनीपति *m*, भावोजी *m*. (used only of an elder sister's husband). ३ *one's husband's brother* देवर *m*, *pop.* दीर *m*, भावोजी *m*. Broth'erhood *n.* भाऊपणा or भाईपणा *m*, भाईबंदी *f*, बंधुत्व *n*, भ्रातृत्व *n*. २ *fraternity, association* अखाडा *m*, समाज *m*, एकाच धंद्याचे लोक *m*, *pl*. Brother-like, Brotherly *a.* भाऊपणाचा, भाऊबंदीचा, बंधुत्वाचा, भाईचाऱ्याचा, बंधुभावांचा, भाऊसा (?), भ्रात्रीय, बंधुवत्; as, B. love. Brotherliness *n.* (v. A.) भाऊबंदी *f*, भाऊपणा *m*, or भाईपणा *m*, भाईदारी *f*, भाईचारा (R) *m*, बंधुभाव *m*, बंधुत्व *n*. Brotherly *adv.* भाऊपणानें, भाईचारानें, भाईबंदीनें, बंधुभावानें, बंधुवृत्तीनें; as, I speak but B. of him.

Brougham (brōō'am) [named after Lord *Brougham*.] *n.* "ब्रूम," एका घोड्याची झांकणाची गाडी *f*, हिला दोन किंवा चार चाकें असतात व तीं एकदम गरदिनीं फिरूं शकतात.

Brought (brawt) *pa. t.* & *p. p.* of Bring (v. V. 1.) आणलेला, &c., आनीत, आहृत.

Brow (brow) [A. S. *bru*; Sk. भ्रू, the eyebrow.] *n.* *the arch over the eye* भिवई *f*, भ्रुकुटी *f*, भ्रू *f*. [TO KNIT THE B.s भिंवयांस गांठी *f*. *pl*-अढी *f*, घालणें, भिंवया *f*, *pl*. चढविणें.] २ (usually *pl.*) *the eyebrow* भिंवईचे कंस *m*. *pl.*, भोंवई or भवई or भिवई *f*. ३ *fig. the forehead* कपाळ *n*, निढळ or निढाळ *n*, भाळ *n.*; as, "Beads of sweat have stood upon thy B." [BY THE SWEAT OF THY B. निढळा(ळ)च्या घामानें.] ४ *fig.* (of a hill, &c.) माथ्याची कड *f*, गळा *m*, गळवटा *m*. ५ *the general air of the countenance* मुद्रा *f*, मुखचर्या *f*; as, "He told them with a masterly B." ६ कोळशाच्या खाणींतील गल्लेरी *f*. ७ *fig.* माथ्याचा देखावा *m*, दर्शनी भाग *m*, दृश्यबाजू *f*. Brow-ague *n.* कपाळ दुखणें *n*, कपाळशूळ *m*. हा रोग डोक्यावरच्या बाजूस होतो. Browbeat *v. t.* (गुरकावणी दाखविण्याकरितां) भिंवया चढविणें, चढवून बोलणें, भिंवया चढवून बोलणें, डोळे *m. pl.* चढवणें-उगारणें-गुरकावणें-वटारणें-फाडणें-(अपमान करण्याकरितां) पिंजारणें, डोळे *m. pl.* उगारून-गुरकावून-वटारून-फाडून-पिंजारून-&c. बोलणें-दाबणें-दपटणें-&c., गुरकी-गुरकावणी दाखवणें; as, To browbeat a witness. Browbeat *pa. t.* & Borwbeaten *p. p.* Brow-beater *n.* भोंवया चढवून बोलणारा. २ धमकी देणारा. Brow-beating *n.* (v. V.) *act.* डोळे चढवून बोलणें *n*, &c., घसरा *m*, गुरकी *f*, गुरकावणी *f*. Brow-bound *a.* किरीट घातलेला, मुकुट घातलेला. Browless *a.* निर्लज्ज.

Brown (brown) [A. S. *brun*, brown; Sk. बभ्रु, tawny.] *a.* उदी, उदी रंगाचा, बदामी, तपकिरी, सुगदुमी. N. B. These words express different shades of brown. [DARK B. घनसावळा, कपिश. LIGHT OR REDDISH B. भुरा OR भोरा, मळ्या.] २ (*obs.*) चकचकीत; as, My brownie brown sword. B. *n.* घनसांवळा रंग *m*, उदी रंग *m*, तपकिरी रंग *m*. B. *v. t.* उदी रंग *m.* देणें, उदी रंगाचा करणें, गहिरा-तांबुस रंग देणें; as, To B. meat or flour. B. *v. i.* तांबुस रंगाचा होणें. Brown-bess *n.* 'ब्राउनबेस.' जुनी इंग्रजी कठीण चापाची बंदूक *f*. Brown-bread *n.* (बिनचाळलेल्या कणकेची केलेली जाडी-भरडी) तांबूस भाकर *f*. Brown-George *n.* कठीण बिस्कूट *n*, 'ब्राऊनजॉर्ज'. Brown-paper *n.* (आच्छादनार्थ) तपकिरी जाड व मजबूत कागद *m*, 'ब्राउन' कागद *m*, पुठ्याचा कागद *m*. Brown-stout *n.* 'उदी स्टॉउट,' एक जातीची मादक दारू *f*. हिचा रंग तपकिरी असून हिचा उपयोग प्रथम लंडन येथलि पोर्टरांनीं म्हणजे हमालांनीं केल्यावरून हिला पोर्टर हें नांव पडलें.

**Brown-study** *n.* पोकळ ध्यान *n*, निरर्थक ध्यान *n*, शून्यमनस्कता *f*, मन व्यग्र झाल्यामुळें देहभान नसणें. **Browning** *a.* Brownish *a.* उदीसर. [BROWNISH YELLOW तांबूस-बदामी पिंवळा. RICH BROWNISH YELLOW खूब बदामी पिंवळा, अति तांबूस पिंवळा.] **Brown'ness** *n.* **Brown'y** *a.* To be done brown *lit.* पूर्णपणें भाजलेलें असणें. २ *slang.* पूर्णपणें फसविलें जाणें.

**Brownie** (brown'i) *n.* स्कॉटलंडांतील एक कल्पित धान्य-देवता *f* किंवा वास्तुदेवता *f*, 'ब्रावनी.'

**Brownist** (brown'ist) *n.* ब्राउनिस्ट, रॉबर्ट ब्राउनचा धर्मानुयायी. ह्या मतापासून इंग्लंडमधील "Independents" धर्मानुयायांचा पंथ निघाला.

**Browse** (browz) [Fr. *brouter*, to browse.] *v. i. to feed on branches, leaves, &c.* झाडपाला *m.* खाणें, पल्लवभक्षण *n*-पर्णभक्षण *n.* करणें. २ *to graze* चरणें. B. *v. t.* (झाडपाल्यावर) उपजीविका करणें; as, A deer browses the barks of a tree; (झाडपाला) तोडून खाणें (हा शब्द बहुधा गुरांना लावितात). B., Browsing *n.* झाडपाला *m*, झाडांचा कोंवळा पाला *m*, ओला पाला *m*, पानपागोरा *m*, पाला *m*, पालें (R) *n.*

**Brucine** (bru'sin) *n.* काजऱ्याचा सत्वांश. Called also Brucia, Brucina.

**Bruin** (broo'in) *n.* अस्वल, गोष्टीच्या पुस्तकांत अस्वलाला हा शब्द लावतात. (कोल्ह्याला Reynard असें म्हणतात.)

**Bruise** (brōōz) [A. S. *brysan*, to crush.] *v. t.* ठेंचणें, ठेंचळणें, चेंगरणें, चेंचरणें, चेंदरणें, कुचलणें, जखम करणें, काळानिळा करणें, चेंचणें, मर्दणें; as, To B. one's fingers with a hammer. २ (peppers, fruits, seeds, &c.) *to pound lightly, to break coarsely* खरडणें, खरगटणें, दुख(खा)वणें, चुरणें, घावटणें *dim.* घावटळणें. B. *v. i.* मुष्टियुद्ध करणें; as, "Bruising was considered a fine, manly, old English custom." B. *n.* आघातानें झालेली दुखापत *f*, चेंचलेला हात *m*- &c., जखम *f*, खोक *f*. Bruised *p.* (v. V. 1.) चेंचलेला, चेंचरलेला-&c., चेंचका, जखमी, मर्दित, क्षुण्ण. २ खरंगटलेला, खरडलेला, &c. Bruis'er *n.* मुष्टियुद्ध करणारा. २ चेंचणारा. Bruising *a.*

**Bruit** (brōōt) [Fr. *bruit*, noise, uproar, from *bruire*, to make noise.] *n.* (R.) (नेहमींचा नव्हे असा) हृदयांतील विलक्षण ध्वनि *m.* २ (*obs.*) *a report, a rumour* वदंता *f*, वार्ता *f*, अवई *f*, अफवा *f*; as, "The B. thereof will bring you many friends." B. *v. t.* (often with *abroad, about*) *to noise abroad* प्रसिद्ध-&c. करणें, वार्ता *f*-वदंता *f* पसरणें, जाहीर करणें.

**Brume** (brōōm) [Fr. *brume*, winter-season, mist.—L. *bruma*, winter.] *n. mist, fog* धुकें *n*; as, "The drifting B." Brum'al *a. pertaining to winter* हिंवाळ्यासंबंधीं, हिंवाळ्याचा, हैम, हैमन; as, The B. solstice. Brum'ous *a. foggy* धुक्याचा, धुकट.

**Brummagem** (brum'ma-jem) [From *Birmingham*, (formerly Bromwycham) "The great mart and manufactory of gilt toys, cheap jewelry, &c."] *a. counterfeit* बनावट. २ *gaudy but worthless* (*slang.*) दिखाऊ, कुचकामाचा. B. *n.* बर्मिंघाम येथें तयार केलेली नकली वस्तु. २ खोटें नाणें. ३ *a spur* घोड्याला मारण्याची टांच-आर *f*-आणी *f*.

**Brunette** (brōōn-et') [Fr. *brunette*, *fem.* of *brunet*, brownish.—M. H. Ger. *brun*, brown; See Brown.] *n. a girl or woman of a dark complexion* काळी-सांवळी मुलगी *f*-बायको *f*. (opposite of Blonde). B. *a. having a dark tint* काळा रंग असलेली, कृष्ण-वर्णाची, श्यामा.

**Brunt** (brunt) [Probably imitative. O. E. *brunt*, *bront*, from Icel. *bruna*, to rush.] *n. the chief violence of* (पहिल्या जोराचा) मारा *m*- तडाका or तडाखा *m*-धडाका *m*-कडाखा *m*, धडक *f*; as, The B. of the battle. २ *the chief stress* (as of a blow) (पहिलाच) धक्का *m*, धडका *m*, थप्पड. ३ (पहिलाच) मारा *m*-भडिमार *m*; as, The heavy B. of a cannon-ball. ४ (पहिलाच) मुख्य भार *m*; as, The B. of affairs. ५ मुख्य जोर; as, The B. of his arguments कोटिक्रमाचा मुख्य भार-मुख्य जोर. B. *v. t.* धक्का *m*- मारा *m*- भार *m.* सोसणें. २ *fig.* भार आपल्या शिरावर घ्यावयास तयार असणें. To bear the brunt of *fig.* (बचावाकरितां) धक्का-मारा सहन करणें. (ह्या शब्दाचा *burnt* शब्दाशीं संबंध असावा असें डॉ. मरे साहेबांचें मत आहे.)

**Brush** (brush) [O. Fr. *brosse*, brushwood.] *n.* कुंचला *m*, कुंचली *f*, ब्रश *m*, बरास *m.* २ (of painter) कलम *n*, कुंची *f*, ईषिका *f*, तूलिका *f*, तूली *f*. ३ (of weavers) कुंचणी *f*, कुंची *f*. ४ (of peacock's feathers, palm leaves, &c.) कुंचा *m*, मोरचेल or मोरचल, चौरी (of white hair). ५ *rub.* घसरा *m*, घसका *m*, घष्टा *m*, चाट, थोडा स्पर्श *m*; as, "We got a B. from the wheel as we passed." ६ *a skirmish, a slight encounter* चकमक *f* (*v.* झड), झटापट *f*; as, "A B. with the enemy." ७ (ब्रशसारखें) कोल्ह्याचें गोंडाळ शेंपूट *n.* ८ *elect.* कुंचल्यासारखा बारीक लवचिक तारांचा झुपका *m.* ९ कुचलणें *n*, कुंचल्यानें साफ करणें *n.* १० झाडझूड *n.* ११ झाडांच्या फांद्या. B. *v. t.* कुंचल्यानें झाडणें-साफ करणें, झाडणें, कुंचलणें. २ (with *off*) *to whisk, to flap* झाडणें, झटकणें, झटकावणें, (कुंचल्याचा) झटका *m*-झटकारा *m*, मारणें-देणें. ३ (with *up*) *to retouch, to polish* ओजवणें, घासणें, घासपूस *f*, करणें, उजळा देणें. ४ (with *up*) (study, &c.) उजळणें, उजळणी *f*. करणें *g. of o.*, *colloq.* घर्षण *n.* करणें, जागृत-तयार-&c.-करणें. B. *v. i.* (with *by, along, against*) ओझरता जाणें-पडणें-लागणें, खेटणें, घसटून जाणें, झगटणें, खरकणें or खुरकणें, घसरा-घसका-घष्टा-देऊन जाणें. Brush'ing *n.* घांसणें. B. *a.* घासणारा, साफ करणारा. Brush-wheel *n.* 'बरास चाक,' घर्षणाच्या योगानें चालणारें चाक *n*, खरखरीत केंसांचें घर्षणचक्र *n.* २ जाड कांब्यासारख्या केंसांच्या परिघाचें

चाक *n*, याच्या घर्षणाच्या योगानें दुसरें चाक फिरतें. Brush-wood *n.* खुरटी झाडी *f*, दाट जाळ्यांचें जंगल *n.* Brusher *n.* See the verb. Brush'iness *n.* कुंचल्या-सारखी स्थिति *f*, केंसाळपणा *m.* Brush'y *a.* खरखरीत. He brushed by me तो मजजवळून ओझरता गेला. Give it another brush त्याला दुसरा हात दे.

**Brusque, Brusk** (brōōsk) [Fr. *brusque.*—Ital. *brusco*, sharp, tart, sour, applied to fruits and wine; hence, rough (in manner). Vide Brisk.] *a. blunt, bluff* बेपरवा, निर्भीड. २ रानटी, अशिक्षित, बेमुरवती; as, A B. man; A B. style. Brusque'ly *adv.* Brusque'-ness, Brusk'ness *n.* Brusque'rie *n.* (*obs.*) निर्भीड भाषण *n.* ३ (*obs.*) रानटीपणा *m*, अशिक्षितपणा *m.*

**Brute** (brōōt) [Fr. *brut.*—L. *brutus*, dull, stupid.] *a. wanting in reason or understanding* अबुद्ध, निर्बुद्ध, जड, मनुष्याच्या खालचा, मनुष्येतर; as, The B. creation (मनुष्येतर सृष्टि). २ *without intelligence or volition, irrational, merely material* अचेतन, इच्छाशक्तिशून्य, जड, केवळ नैसर्गिक नियमानें चालणारा; as, "The B. powers of nature." ३ अज्ञानी, ज्ञानहीन-शून्य-रहित. ४ *pertaining to or characteristic of a brute beast* पशुसंबंधीं, पाशवी; hence, *cruel, fierce, ferocious, savage, pitiless* क्रूर, पशुतुल्य, निर्दय, असमानुष, पशूसारखा; as, B. violence, B. labour. ५ *coarse, unpolished* संस्कारहीन, असंस्कृत, असभ्य, पशूसारखा, दांडगा, आडदांड. [B. FORCE आंगबळ *n*, आंगजोर *m*, मनगटाचा जोर *m*, मस्ती *f*, पशुबल *n*, निवळ संख्येचा जोर *m* (अकलेचा नव्हे).] B. *n.* चतुष्पाद *n*, पशु *m*, जनावर *n*, हैवान *m.* २ *a cruel person, a ruffian* क्रूर मनुष्य *m*, क्रूरकर्मा, अघोरकर्मा, खवीस *m*, सोरठ, इमामदांडगा, कर्मचंडाळ, मांग, कंटक. ३ *a stupid person* हैवान *m*, धोंडा *m*, टोणपा (टोणपी *f.*). ४ *fig.* पशुवृत्ति *f.*; as, The B. in us. Brut'al *a. belonging to a brute* पशूचा, जनावराचा, पाशव, पशुसंबंधीं; as, B. nature. २ *savage, inhuman* क्रूर, निर्दय, मांगहृदय, निष्ठुर; as, A B. murder. Brut'alize *v. t.* पशूसारखा-पशुवत्-&c.-करणें. B. *v. i.* (R.) पशुसमान-पशुवृत्तीनें रहाणें. Brutal'ity *n.* (v. A. 1.) पशुपणा *m*, पशुत्व *n*, पशुता *f*, पशुधर्म *m.* २ क्रूरता *f*, क्रौर्य *n*, क्रूरत्व *n*, निर्दयता *f*, निष्ठुरता *f.* Brut'ally *adv.* Brut'eness *n.* पशुतुल्य स्थिति *f.* Brut'ify *v. t.* एखाद्या मनुष्यास मूर्ख ठरविणें, पशु करणें, निष्ठुर करणें. Brut'ish *a. resembling a beast* पशूचा, पशूसारखा, पशुवत्, पशुतुल्य, पशुसदृश. २ *rude, uncivilized* पशूसारखा, पशुवत्, पशुसमान, अशिक्षित, असभ्य. ३ रानटी, निर्दय. Brut'ishly *adv.* (v. A.) पशूसारखा *a. decl.*, पशुवत्, जनावरापरी. Brut'-ishness *n.* (v. A. 1.) *the qualities of a brute* पशुता *f*, पशुत्व *n*, पशुस्वभाव *m*, पशुधर्म *m*, पशुवृत्ति *f.* २ असभ्यता *f*, अशिक्षितत्व *n*, शिक्षाराहित्य (S) *n.* असंस्कृतत्व *n.* Bru'tism *n.* See the word Beast.

**Brutus** (brōō'tus) *n.* एक प्रकारचा टोप *m.* २ कपाळापासून पाठीमागें नेलेल्या केंसांचा टोप *m.* [रोमच्या इतिहासांतील प्रख्यात पुरुष ब्रूटस ह्याच्याशीं या शब्दाचा संबंध आहे.]

**Bryology** (brī-ol'o-ji) [Gr. *bryon*, moss, and *logos*, discourse.] *n. bot.* शेवाळीविषयीं ज्ञान *n*, शैवालवर्णनविद्या *f*, शैवालवर्णन *n.* Bryolog'ical *a.* शैवालवर्णनाविषयीं. Bryol'ogist *n.* शेवाळीविषयींचें ज्ञान असणारा.

**Bub** (bub) *n. a young brother* लहान भाऊ-बंधू *m.* २ *a little boy* लहान मुलगा *m.*-a familiar term of address to a small boy. Bubby *n.* लहान मुलगा *m*, बबी.

**Bubble** (bub'l) [Of imitative origin. Sw. *bubbla*; Dan. *boble*, a bubble; also Dut. *bobbelen*, to bubble.] *n.* (of water) बुडबुडा *m*, फुगारा *m*, फुगा *m*, बोंबडा (*obs.*) *m*, बुद्बुद *m.* २ *cheat, false show* माया *f*, मोह *m*, मायाजाल *n*, ठकसौदा *m*, ठकबाजीचा व्यापार *m*; as, The South Sea B. ३ असार वस्तु *f.* ४ पातळ कांचेचें लहान तरंगतें भांडें. ५ (*obs.*) *a person gulled* फसलेलें माणूस *n*, फशा, पागोटें गमाव्या. B. *v.i. to rise in bubbles* बुडबुडे *m. pl.* येणें, बुडबुडणें. २ (with *up* & *over*)—*to be under ebullition* बुडबुड आवाज करणें, खतखत (द) णें, खुतखुतणें, गदगदणें, गुदगुदणें, सळसळणें (intens. सळाळणें), उफाळणें, उफळणें, उसळणें, रटमटणें (applied to things); as, The stream bubbles. ३ (with *up* or *over*) (-कढत्या भांड्याप्रमाणें) रागानें अगर थट्टेनें उसळणें (applied to persons); as, 'He had his views, but he never bubbled up to discuss and defend them.' 'He bubbled and brimmed over with fun.' B. *v. t.* (*obs.*) *to gull, to deceive, to befool* फसवणें, झोका *m*-धोका *m*-ढोला *m.* देणें, छकविणें, झुकविणें; as, "She has B.ed him out of his youth." Bubbler *n.* (*obs.*) फसव्या, बुडव्या. २ ओहिओ नदींत सांपडणारा मासा. Bubbling *pr. p.* Bubbled *pa. t.* & *pa. p.* Bubbling (v. V. I.)—*act.* बुडबुडे येणें *n.* २-*act.* खतखतणें *n*, &c.; खतखत or खुतखुत *m*, खदखद *m*, उबाळा *m.* Bubblingly *adv.* खतखत or तां, गदगद or दां, बुडबुडा, सळसळ-ळां. Bubb'ly *a.* Bubble and squeak एकत्र तळलेली भाजी व मांस. The South Sea Bubble *n.* दक्षिण समुद्राकडील बुडव्या मंडळीचा व्यापार *m.* ह्या मंडळीची स्थापना इंग्लंडमध्यें पहिल्या जॉर्जच्या कारकीर्दींत झाली, व मंडळीच्या मुख्य भागीदारांनीं इतरांस बुडवून त्यांचे पुष्कळ पैसे खाल्ले; ह्मणून, भागीदारांस बुडवून त्यांचे पैसे खाणाऱ्या मंडळीस हें नांव देतात. Bubbling stream खळखळ वाहणारा प्रवाह *m.* Bubble tube or spirit glass साधन *n*, पाणसळींतील कांचेची नळी *f.*

**Bubby** (bub'bi) *n. a woman's breast* (स्त्रीची) छाती-स्तन.

Bubo (bū'bo) [L. L. *bubo*, groin, a swelling in the groin.-Gr. *boubon*.] *n. an inflammatory swelling of the glands in the groin or armpit.* (जांघेंतील किंवा खांकेंतील) बद *m*, ग्रंथि *m*, वळ *m*, वाघणा *m*, अवधणा *m*, गांठ *f.* Buboes *pl.* Bubon'ic *a.* ग्रंथिमय, बदाचा, बद्या. Bubonic fever ग्रंथिक सन्निपात, बद्या ताप *vul.*, गोळीचा ताप *colloq.* गोळीचा रोग.

Buccal (buk'al) [L. *bucca*, the cheek.] *a.* गाला-चा-संबंधी.

Buccaneer, Buccanier (buk-an-ēr') [Fr. *boucanier*, from *boucaner*, to smoke or broil meat and fish, to hunt wild beasts for their skins: a word of American origin. Primarily, one who dries and smokes flesh or fish after the manner of the Red Indians. The name was first given to the French settlers in Hayti or Hispaniola, whose business was to hunt wild beasts and swine.] *n. a pirate* चांचा *m*, समुद्रांतील चोर *m.* B. *v. i.* चांचेपणाचें काम करणें. Buccaneer'ing *n.* चांचेपणाचें काम करणें. Buccaneer'ish *a.*

Bucephalus (bū-sef'a-lus) [Gr. *bous*, Sk. गो, ox, & *kephale*, Sk. कपाल, the head.] *n.* अलेक्झांडर धी ग्रेटचा प्रख्यात लढाऊ घोडा *m.* २ बसावयाचा घोडा *m.*

Buck (buk) [A. S. *bucca*, *buc*, a he-goat; akin to Dan. *bok*, Ger. *bock*, Ir. *boc*, Welsh, *bucch*, Sk. *bukka*; cf. Butcher. In modern English the word Buck signifies the male of *the deer*, *the goat*, *the hare*, and *the rabbit*, though it is often used specially for the male fallow deer.] *n. the male of the deer* काळविट *m*, हरिण *m.* २ *the male of the goat* बोकड *m*, बकरा *m*, छाग *m.* ३ *the male of the sheep* मेंढा *m*, एडका *m.* ४ *the male of the hare* ससा *m.* ५ *a beau, a blade, a blood, a spark, a swell* छानछूक, छानछोक, शानशूक or शोक, फांकडा, अक्कडबाज, टेवखोर, नटवा, नटबाज, नखरेदार, नखरेबाज. B. *v. i.* (of a vicious horse or mule, a buck-jumper) डोकें खालीं करून, पाठ वांकवून व पाय ताठ करून उभी उडी टाकणें. Buckeen *n.* एक गरीब सरदारी घराण्यांतला आयरिश मनुष्य *m.* Buck-eye *n. the American horse-chestnut* अमेरिकेंतील बक्-आय् नांवाचें फळ *n.* Buckhorn *n.* मृगाच्या शिंगाची वस्तु *f.* Buck-hound *n.* हरणाची पारध करणारी एक शिकारी कुत्र्याची जात *f.* Buck-shot *n.* बंदुकीनें मृग मारण्याची मोठी गोळी *f.* Buck-skin *n.* मेंढी अगर हरिण यांचें कमावलेलें कातडें *n.* B. *a.* मेंढी अगर हारिण यांच्या कातड्याचें केलेलें. Buck-skins *n. pl.* (मेंढीच्या अगर हरिणाच्या मृदु कातड्याचा) मांडचोळणा *m.* Buck-thorn *n.* एकप्रकारची वनस्पति *f.* (हिच्या फुलांचा हिरवा रंग रंगारी वापरतात.) Buck-tooth *n.* पुढें आलेला दांत, पुरोवर्तिदंत. Buckish *a.* छानदार, शानदार, छानीचा, छालछबीला, शोकदार, छानछुकीचा, अलबेला. Buckishly *adv.* (v. V.) छानछुकीनें, नटूनथटून, टाकमटिका करून. Buckishness *n.* छानछुकी *f*, छानशुकी, शोकी *f*, टाकमटिका *m*, टाकमटिकला *m*, टाकमटिला *m*, चट्टीपट्टी *f*, डौल *m*, डामडौल *m.*

Buck (buk) (*obs.*) *v. t.* खाराच्या पाण्यांत शिजविणें-भिजत घालणें. B. *n.* खारें पाणी *n*, क्षारजल *n.* (वस्त्रें धुण्याकरितां.) B. basket क्षारजलांत वस्त्रें धुण्याकरितां नेण्याची टोपली *f.*

Bucket (buk'ket) [A. S. *buc*, a pitcher.] *n.* डोल *m.* *dim.* डोलची *f*, काढणें *n.* [SOME PARTICULAR KINDS ARE पोहरा *m.* (OF METAL OR WOOD), डोल *m*, *dim.* डोलची *f*, बालदी *f* (OF LEATHER OR WOOD AND USED ESP. ON BOARD THE SHIP), मोट *f.* (OF A DRAW-WELL), ओकती *f.* (B. OF THE TRANSVERSE BEAM AND STONE.)] Bucketful *a.* बालदीभर. Bucketshop *n.* हुंडीच्या किंमतीच्या चढ-उतरावर पैज मारणाऱ्या दलालाचें दुकान *n.* Bucketwheel *n.* राहाट *m.* To kick the bucket मरणें.

Buckle (buk'l) [L. *buccula*, a little cheek or mouth.] *n.* एक प्रकारचें अडकवण *n*, कचक *f*, कांब्याची कडी *f*, 'बकल *m.*' B. *v. t.* कचकीनें अडकविणें, बकल घालणें, बकलानें अडकविणें, कचणींत अडकविणें, अडचींत धरणें. २ (used reflexively) *to make ready* सिद्ध-सज्ज करणें, तयार करणें, (काम करावयास) कंबर बांधणें *idio.*, कांस *f.* मारणें *idio.* ३ (R) विवाहासंबंधानें जोडणें. B. *v. i.* नेमणें. २ (with *to*) काम करण्यास तयार होणें. ३ *to apply with vigour* झटणें, लगट *f.* करणें. Buckler *n.* एक प्रकारची ढाल *f.* B. *v. t.* ढालीप्रमाणें काम-उपयोग करणें. २ (*obs.*) संरक्षण करणें (*Shakes.*). I can't buckle to (कामांत) माझें लक्ष्य लागत नाहीं. To cut the buckle नाचणें, बागडणें. To put into buckle शेंकडा ४० टक्के व्याजानें गहाण ठेवणें. To talk buckle (R) विवाहासंबंधीं भाषण करणें; as, I took a girl to dinner who talked B. to me.

Buckram (buk'ram) [M. H. Ger. *buckeram*, from *boc*, a goat; perhaps stuff originally made of goat's hair.] *n.* विरविरीत जाड धाग्याचा खळीचा कपडा *m.* हा कागदावर पुट्टा डकविण्याकरितां किंवा मडमांच्या पोषाकांत ताठपणा आणण्याकरितां वापरतात. सरसानें कडकडीत केलेलें कापड *n.* B. *a.* विरविरीत व जाड धाग्याच्या कपड्याचा. २ ताठ, कडकडीत. B. *v. t.* विरविरीत जाड धाग्याच्या खळीच्या कपड्यानें मजबूत-कडकडीत-ताठ करणें.

Buckwheat (buk'hwēt) *n.* एक प्रकारची वनस्पति *f.*

Bucolic, al (bū-kol'ik, al) [L. *bucolicus*.-Gr. *boukolikos*, pastoral.-Gr. *bous*, an ox, & *kellein*, to drive.] *a.* गांवढळ, ग्राम्य (कविता, लावणी). Bucolic *n.* धनगरी गाणें *n*, लावणी *f.*

Bud (bud) [O. E. *budde*.] *n.* (of a flower) कली *pop.* कळी *f*, कलिका *f*, उत्कलिका *f.* २ (of a leaf) पानांचा तुरमा *m*, अंकुर *m*, पल्लवांकुर *m*, मुकुल *m*, *n*, कोश *m*, कोंब *m.* [LARGE B. कळा *m.* NIPPER IN THE B. *fig.*

मानमोडें *n.* ] २ होतकरू तरुण मनुष्य *m*, कळीसारख्या जोमाचा तरुण मनुष्य *m.* B. *v. i.* (v. N.) फुटणें, कळ्या *f. pl.* फुटणें-येणें, कोम येणें *in con.* B. *v. t.* *to inoculate* पिवंदी *f.* करणें, झाडाचें कलम करणें. Budded (v. V. I.) फुटलेला, कळ्या आलेला, अंकुरित, मुकुलित. Bud'ding *n.* Bud'dy *a.* Bud'less *a.* Bud'let *n.* To nip in the bud जन्मतांच नाश करणें, विकासापूर्वी नाश करणें, कोवळेपणीं नाश करणें.

Buddha (bōōd'da) [Sk. बुध्, to know.] *n.* बुद्ध *m*, बौद्ध *m*, बौद्धधर्मस्थापक *m* (गौतमबुद्ध). Bud'dhism *n.* बौद्धधर्म *m.* Bud'dhist *n.* बौद्ध *m*, बौद्धधर्मानुसारी, बौद्धधर्मानुयायी. Buddhist'ic, Bud'dhist *a.* बौद्धधर्माचा. Esoteric Buddhism बौद्धधर्माचा तद्विषयपटूंसच समजण्यासारखा अर्थ *m*, बौद्धधर्मरहस्य.

Budge (buj) [Fr. *bouger*, to stir.—L. *bullire*, to boil.] *v. i.* and *v. t.* *to move*, *to stir* सरकणें, सरणें, सरवणें, हलणें, हटणें, हिचमिचणें *neg. con.*, ढिम *f.* करणें-खाणें *neg. con.*; as, I will not B. an inch. २ *fig.* (*for*) जुमास (R) *m.* खाणें, जुमान *m.* खाणें-पावणें, जुमानणें all with *neg. con.* and स or ला *of o.*

Budge (buj) [L. *bulga*, a leathern bag.] *n.* एक प्रकारची लोंकर *f.* ही कोंकराचे कातड्यापासून घेऊन दुसऱ्या लोंकरींत मिसळून करितात. (ह्याचा उपयोग पूर्वी विद्यार्थ्यांच्या कपड्यांना झालर लावण्याकडे होत असे.) B. *a.* बज लोंकरीची फित लावलेला; as, B. gowns. २ विद्येचा डौल मिरवणारा, गंभीरवृत्तीचा, निष्ठुर मुद्रेचा, कडक, कडकडीत; as, "Those B. doctors of the Stoic fur."

Budget (buj'et) [Fr. *bougette*, dim. of *bouge*, a bag.–L. *bulga*, a leathern bag.] *n.* (महसूल व खर्च याचें-आय आणि व्यय याचें) अंदाजपत्रक. २ (of business papers, of accounts, &c.) (*obs.*) पिशवी *f*, थैली *f*, (कागदपत्रांचा) रुमाल *m.* ३ *fig. store* पुंजी *f*, गठडी *f*, गांठोडें *n*, पोतें *n*, संग्रह *m*, भरणा *m*; *as*, कथाभरणा B. of stories or tales; गतभरणा B. of tunes; गीतभरणा B. of songs, &c.

Buff (buf) [Fr. *buffle*, a buffalo.—L. *bufalus*, vide Buffalo.] *n.* (बैलाचें-रेड्याचें, &c.) कमावलेलें कातडें *n*, *spec.* महिषचर्म *n*, झसडें *n.* २ *colloq.* नग्नस्थिति *f.* [IN BUFF उघडा, नग्न. TO GO IN BUFF नागवें असणें, नागमोडींचा पितांवर नेसणें, नागवा पाटाव नेसणें. TO STRIP TO THE BUFF कपडे काढून घेऊन उघडा नागवा करणें.] ३ पिक्का पिंवळट रंग *m*, 'बफ.' ४ *mil.* फिक्कया पिंवळया रंगाचा डगला *m.* [BUFFS *n. pl.* 'बफ' रंगाच्या पोशाखाची पलटण.] B. *v. i.* *to polish with a buff* मखमालीसारखा मऊ पालिस करणें. २ गहिरापिंवळट रंग-बफरंग देणें. B. *a.* झशीच्या-&c-कातड्याचा केलेला. २ पिंवळट रंगाचा. Buffer *n.* (बफकातड्यानें) पालिस करणारा. २ पालिस करण्याचें हत्यार. Buff-coat मजबूत लष्करी कोट. २ लष्करी शिपाई, बफकोट घालणारा. Buff-wheel, Buff-stick *n.* पालिस करावयाचें चामड्याचें चाक किंवा काठी. ह्या चाकाला किंवा काठीला हिमरी नांवाच्या दगडाची पूड लाविलेली असते.

*N. B.*—Buff originally meant the buffalo or other large species of wild ox; hence its proper meaning is 'leather made of buffalo-hide,' but now it is usually applied to a very stout kind of leather made of ox-hide, dressed with oil, and having a characteristic fuzzy surface and a dull whitish-yellow colour.

Buffalo (buf'a-lo') [It. *buffalo*.–L. *bufalus*, also *bubalus*.–Gr. *boubaos*, a buffalo.] *n.* (*male*) रेडा, रेडका, टोणगा, हैसा, हेलगा, हेला, हल्या, महिष. २ (*female*) ह्मैस. [IN ENDEARMENT OR DISPARAGEMENT OR CONTEMPT हैसरूं OR ह्मसरूं *n*, ह्मसरूड *n*, रेडूक *n.*] B. carrying eleven months अकरमाशी ह्मैस. Young female B. पारडी *f*, रेडी *f*, वांट *f.* Buffalo-calf *n.* ताव्या, रेडूक.

*N. B.*—Buffalo is the name given to several species of oxen, esp. *Bos bubalus* inhabiting most of Asia, Southern Europe, and Northern Africa and *Bos caffer* inhabiting the South Africa. It is also, in popular unscientific use, applied to the American *bison* (गवा).

Buffer (buf'ėr) [Lit. 'a striker;' from M. E. *buffen*, to strike, orig. to buffet on the cheek. See Buffet.] *n.* (आघात कमी करण्याकरितां) डब्याच्या बाहेर लाविलेली प्रतिबंधक तवकडी, संघर्षणप्रतिबंधक, दोन वस्तूंमध्यें होणारा आघात नाहींसा करण्याचें साधन *n.* (*colloq.*) मूर्ख (हा शब्द बहुधा वयानें-चडिलांसंबंधानें वापरतात). Buffer-state *n.* दोन विरोधी देशांमधील एक देश *m*; as, Afganistan is a B. state between India and Russia.

Buffet (buf'et) [O. Fr. *buffet*, primarily the tap of a tavern, then a side-board.] *n.* *a cupboard for holding china, crystal*, &c. भिंतीस टेंकून ठेवण्याचें कपाट *n.* (ह्यावर चिनी मातीचीं व रुप्याचीं वगैरे भांडीं लावून ठेवतात.) २ सर्व प्रकारचें खाद्य व पेय मिळणारें परवान्याचें आरामगृह, खानपानगृह.

Buffet (buf'et) [O. Fr. *bufet*, a blow, dim. of *bufe* a blow, esp. on the cheek.] *n.* *blow* ठोंसा *m*, बुक्की, गुद्दा *m*, मुष्टिमोदक *m*, मुष्टिप्रहार *m.* २ *fig.* टोला *m*, आघात *m*; as, Fortune's buffets. B. *v. t.* बुक्क्या देणें, बुकलणें, धवकणें. २ *to contend against* झोंबणें, झगडणें. B. *v. i.* बुक्या देणें. २ बुक्या देऊन आपला मार्ग काढणें. Buff'eting *n.*

Buffo (bōōf'fō) see Buffoon.

Buffoon (buf-ōōn') [Fr. *bouffon*, a jester, one who makes grimaces, from Fr. *bouffer*, to puff, because the buffoons puffed out their cheeks for the amusement of the spectators.] *n.* विदूषक *m*, नर्मसचिव *m*, नटवा *m*, नट *m*, भांड *m* (?), मसकऱ्या *m*, नकल्या

m, माधवी m, थट्टेबाज c. B. v. t. थट्टामस्करीनें वागविणें. B. v. i. (R.) थट्टा करणें, विदूषकासारखें वागणें. B. a. विदूषकी लक्षणाचें; as, 'B. stories. Buffo n. विदूषक m, नट m. Buffoon'ery, Buffoon'ism n. माधवीपणा m, मस्करेपणा m, मस्करी f, थट्टामस्करी f. Buffoonish a. विदूषकी.

*N. B.*—The distinction between Buffoon and Clown will be discussed under Clown. A buffoon is a more dignified person than a Clown. A Clown is more rustic. Our Sanskrit word नर्मसचिव will be the best word for Buffoon.

Buffy (bufi') *a. med.* पांढरा, धूसर, थिजलेल्या रक्ताच्या रंगाचा. Buffy-coat *n.* (थिजलेल्या रक्ताचें) पांढरें अस्तर.

Bug (bug) [O. E. *bugge*, from Welsh. *bwg, bwgan*, a hobgoblin, a scarecrow, a spectre. cf. Bogey, Boggle.] *n.* ढेंकूण m, भिकूण m, मत्कुण m, रक्तबीज m, रक्तप m. [In covert or cant phraseology भीष्म m. Large and fat bug टेणा or टोण्या m, टोणा m.] २ (*obs.*) ज्याच्यापासून पुष्कळ भीति वाटते असा मनुष्य किंवा अशी वस्तु f; as, "The B. which you should fright me with I seek." *Shakes.* Bug'gy *a.* ढेंकणांनीं भरलेला. Bug'giness *n.* Big-bug *n.* (*slang*) वडी स्वारी, बडा मनुष्य m. Bug-aboo, Bug-bear *n. something frightful as a spectre, anything imaginary that causes needless fright* बौ or बाऊ m, बागूल or बागूलबावा m, घोंगडबाऊ m, भोंबा m, घोंगा m. [To make a B. of वाऊ or भोंबा करणें or करून सांगणें-दाखविणें.] Bug-bear *a. causing needless fright* भयोत्पादक, भिवविणारा.

Bugger (bug'ger) [Fr. *bougre*, from L. L. *Bulgarus*, a Bulgarian, a name given to a sect of heretics who originally came from Bulgaria, and afterwards, to other heretics to whom abominable practices such as sodomy, masturbation, &c. were imputed.] *n.* गुदमैथुन करणारा, गुदमैथुनाचा दोषी. Buggery *n. unnatural sexual intercourse, sodomy* सृष्टिक्रमाविरुद्ध मैथुन n, पुंमैथुन n.

Buggy (bugg'i) [Hind. *baghi.*] *n.* बगी f, एक किंवा दोन माणसें बसण्याची एक घोड्याची दुचाकी किंवा चौचाकी गाडी f. Buggies *pl.* कांहीं व्युत्पत्तिशास्त्रवेत्ते ह्या शब्दाचा *Bogie* शब्दाशीं संबंध दाखवितात. खरी व्युत्पत्ति माहित नाहीं.

Bugle (bū'gl) [O. Fr. *bugle*, a wild ox.—L. *buculus*, a young ox. Bugle is short for Bugle-horn.] *n. a hunting horn* तुतारी f, मोरशिंग n, रणशिंग n, वांका m, *dim.* बांकी f, बिगूल m. B. *v. i.* तुतारीचा आवाज होणें. Bū'gler *n.* शिंगाड्या m, बिगूल वाजविणारा m. Buglet *n.* बायसिकलवाल्याचें वाजवण्याचें शिंग n, लहान बिगूल.

Bugle (bū'gl) [Prob. from L. L. *bugoli, pl.* or from Dut. *beugel*, a ring.] *n. a bead of black glass* कांचेचा काळा मणि m, काळी पोत f, कृष्णमणि m, वजरवट्टु m. B. *a.* मण्याप्रमाणें काळा, काळा कुळकुळीत. Bugled *a.* काळे मणी लावलेला.

Bukshi, Bukshee (buk'shē) [Hind. *bukshi—buksh*, pay.] *n.* हिंदी संस्थानांतील पगार वांटणारा, बक्षी.

Bukshish, Buksheesh. See Backsheesh.

Build (bild) [A. S. *byldan*, to build.] *v. t. to construct* बांधणें, रचणें, उभारणें, उभा करणें, बांधणी f-इमारत f-बंदिस्ती f. करणें g. of o.; as, To B. a house, a new theory. उभारणें; as, To B. an institution. [To B. castles in the air अधांतरीं घर वांधणें, मनःसृष्टि करणें, मनोराज्य n. करणें, कोरडे मनोरथ करणें, मनीं मांडे खाणें आणि स्वर्गी पुऱ्या खाणें, आशेच्या माड्या रचणें, वाळूचीं घरें बांधणें.] २ स्थापणें; as, To B. fame, hopes, &c. B. *v. i.* (with *upon*) *to depend on, to rest on* भरंवसा m-विश्वास m-&c. ठेवणें, जाणें with वर; as, To build on the opinions and advice of others. २ बांधण्याचें काम n-धंदा m. करणें. ३ वर पाया m. घालणें, रचणें (with *on* or *upon*). B. *n. make, physique* बांधा m, बांधणी f, आंगकाठी f; as, A man of strong build. Build'er *n.* घरें बांधणारा. २ गृहशिल्पी, गवंडी. [Master B. मेस्तरी.] Build'ing *n.* (v. V.)—*act* बांधणें n, रचणें n, &c., बांधणी f, बंदिस्त f, बंदिस्ती f. [Cost of B. बांधणावळ f.] 2. A B. *an edifice, a structure, a fabric* इमारत f, इमला m. [A long B. सोपा m. A long narrow B. दांडळ f, दांडेसाळ f. B. composed of four slips चौसोपी f. B. having a roof of two slopes दुपाखी f, दुमोळी f.-of four slopes चौपाखी f, चौमोळी f. B. of two rooms lengthwise दुघई f, दुवडी f-of three rooms तिघई f, तिवडी f-of four rooms चौघई f, चौवडी f. Buildings of some other forms or constructions are designated by the epithets सावंत्राई, शृंगारी, हजारी, &c. Division of a B. खण m, गस्त m, भद्र (R) n. Public or large B.—gener. वाडा m. The woodwork of a B. काजाणू n, लांकडी काम n.] २ इमारत बांधण्याची कला f. Building society इमारती बांधणारी मंडळी. Built *n.* (*obs.*) *build, make, structure, form, construction* बांधण n, बांधणी f, बांधा m, बांधणावळ f, बांधावळ f, बंदिस्ती f, बनावट f. Built *p. a.* (v. V. T.) बांधलेला, रचलेला &c. बंदिस्त. [B. up बंदिस्त.] To build in इमारतीनें कुडणें. To build up (दरवाजा) बांधून बंद करणें, (इमारत) उभारणें. २ आध्यात्मिक मजबुती करणें, मजबूत करणें.

Bulb (bulb) [F.-L.-Gr. *bolbos*, an onion.] *n. a round root* कांदा m, गड्डा m, कंद m. [हा भूमिगत खोडाचा एक प्रकार आहे.] २ कांचेचा गोल m, गोल भाग m, चंबू m, फुगा m; as, The B. of the thermometer. ३ *anat.* गड्ड्यासारखा भाग m; as, The B. of the aorta. B. *v. i.*

(with *out*) पुढें येणें, फुगणें. Bulbed *a.* Bulbil, Bulblet *n. bot.* लहान कंद-गांठ *f,* लघुकंद *m.* Bulbar *a.* कांद्याचा, कंदाचा. Bul'bous, Bul'by *a.* (v. N.) कंदमय, कंदरूप, कंदयुक्त. Bul'bule *n.* लहान कांदा *m,* मोठ्या कांद्यापासून झालेली सुळी *f.* Bul'bus *n.* कांदा *m.* Bulb of the eye नेत्रगोलक. Bulb of the hair केंसाचा बुडखा *m.* Bulb of the spinal cord (*the medulla oblongata*) पृष्ठवंशमज्जेचा गड्डा *m,* पृष्ठमज्जाकंद *m.* Bulbous-based *a.* तळाशीं गांठ आहे असा (अवयव).

Bulbul (bool'bool) [Pers. *bulbul,* a bird with melodious voice resembling the nightingale; of imitative origin.] *n. the Indian nightingale* बुलबुल or बुलबुलवोचा *m.*

Bulge (bu'lj) [L. *bulga,* a leather knapsack.] *n. a protuberant part* फुगा *m,* फुगारा *m.* २ पोंक *n.* B. *v. i. to jut out, to swell out* कोस (R) *m*-पोंक *m*-कोंक *n*-फुगा -*m*फुगारा *m*- येणें *in con.,* उराड *n.* वाढणें *g. of o.,* बेंडाळणें. २ See to Bilge. Bul'ger *n.* कच्छपमुखाकृतीचा खेळण्याचा एक लांकडाचा सोटगा *m.* Bul'giness *n.* फुगटपणा *m.*

Bulimy (bū'l'i-mi) [Gr. *bous,* ox & *limos,* hunger.] *n.* भस्मक रोग *m,* अनावर बुभुक्षा *f,* खाखा *f.*

Bulk (bulk) [A. S. *bolca,* gangway of a ship.] *n. size, magnitude* आकारमान *n,* आकृतिमान *n,* महत्त्वमान *n,* प्रमाण *n,* परिमाण *n.* २ *main mass or body* मोठासा भाग *m,* मुख्य अंश *m.* ३ *main fabric, the body* मोठासा भाग *m,* प्रधानभाग *m;* as, The B. of the nation. ४ स्थूलता *f,* बृहत्त्व *n.* ५ *naut.* गलबताचें भरताड. B. *v. i. lit. & fig.* अधिक वाढणें, ढीग होणें, मोठा-ढीगभर दिसणें-असणें. B. *v. t.* मोकळा धरणें-ठेवणें. Bulkhead *n.* पाणी अडवण्याकरितां केलेलें लांकडाचें किंवा दगडाचें बांधकाम *n.* Bulk'iness *n.* (v. A. 1.) स्थूलता *f,* स्थूलत्व *n,* स्थौल्य *n,* बृहत्त्व *n,* आकारमहत्त्व *n.* Bulk'y *a.* स्थूल, बोजड, अवजड, झांवड, आकारमहत्त्वाचा, बृहत् (in comp.). २ as used esp., of a man or an animal मोधळा, अगडबंब, ढमाल, ढमाल्या, रट, रटेल, धडेल, धडेलमौला, मस्त. In bulk सुटा, मोकळा, विसकलित. To load in bulk जहाजांत माल विसकलित भरणें. To sell in bulk जहाजांत असलेला माल एकदम विकून टाकणें. २ *to sell in large quantities* माल घाऊक विकणें. Sale by bulk माल उधडा विकणें, उधडी विक्री, मालाचें वजनमाप न करितां उधडा विकणें.

Bull (bool) [A. S. *bellan,* to bellow.] *n.* बैल *m,* वृषभ *m,* आंडील बैल *m,* बलीवर्द *m,* वृष *m.* [Bulls and B.-calves-compreh. बैलपाडा *m.* Castrated B. वडवलेला बैल *m.* Setting a bull at large in the name of a dead person, *setting a bull at liberty on the occasion of* श्राद्ध *or of the funeral rite in honour of a deceased ancestor* वृषोत्सर्ग *pop.* वसुसर्ग *m.* B. so set at large पोळ *m,* वसु *m,* *pop.* सांड *m,* लगिन्या बैल (R) *m,* घुळी (R.) *m.* Gross, overfed B. गलेलठ्ठ बैल *m.* Brahminee B. नंदीबैल *m,* नांद्या or नांद्याबैल *m,* पांगुळबैल, पांगळ्या बैल *m.* The class of mendicants who go about with it are called पांगुळ *m.*] २ *the male of certain other large animals, as, the elephant, alligator, whale, &c.* (नर) हत्ती *m,* (नर) सुसर *m,* (नर) देवमासा *m.* ३ *astron.* वृषभ राशि. ४ *slang* "बुल," पांच शिलिंग किंमतीचें एक नाणें. ५ ठेवीचा भाव वाढविणारा *m.;* as, The bulls and bears of the Stock Exchange. See the verb To Bull. B. *a.* बैलाचा, बैलासारखा, भयंकर, मोठा, घोड, वृषभलक्षणाचा. B. *v. t.* (केवळ सट्ट्याकरितां कृत्रिमपणानें) ठेवीची किंमत वाढविणें; as, To bull railroad bonds, To bull the market. B. *v. i. colloq.* मैथुनेच्छा होणें (said of cows). Bull-baiting *n.* बैलाची कुतरओढ *f.* Bull-beggar, see Bugbear. Bullbat *n.* रात्रीं ससाणा पक्षी धरणारा. Bull-beef *n.* बैलाचें मांस *n.* Bull-calf *n. young bull* खोंड *m,* गोऱ्हा *m,* पाडा. २ *fig.* वेडापीर *m.* Bull-dance *n.* फक्त पुरुषांचा नाच *m,* नरनृत्य *n.* Bull-dog *n.* एका जातीचा मोठ्या डोक्याचा क्रूर कुत्रा *m,* 'बुलडाग.' Bull-dog *a.* विलक्षण धैर्य दाखविणारा. Bull-dose *v. t.* धाक दाखविणें, दहशत घालणें. Bull-faced *a.* मोठ्या तोंडाचा. Bull-fight *n.* बैलाची व सशस्त्र मनुष्याची झुंजाझुंज *f.* Bull-fighter *n.* हातांत भाले घेऊन बैलाशीं झुंज खेळणारा. Bull-head *n. a blockhead* (*colloq.*) बैल *m,* टोणपा *m,* मंद डोकें *n.* Bull-headed *a. fig.* हेकड, हट्टी, दुराग्रही, खुनशी. २ उतावळा, कडक, तापट. ३ बैलासारखें डोकें असलेला. ४ रुंदट डोकें असलेला, रुंदट मथाळ्याचा; as, B. pivots. Bull-headedness *n.* हट्टीपणा, दुराग्रहीपणा *m.* Bull'ish *a.* Bull'ock *n. a castrated bull* बैल *m,* चेंच्या-चेंचलेला-वडवलेलाकुंव्या काढलेला बैल *m.*-in contempt बैलट *n.* २ पूर्ण वाढीस आलेला हरिण-गवा *m.* [Bell-band (piece of sackcloth-&c.) of a B.'s neck घांटपान *n.* Hump of a B. वशींड *n,* ओसंड or डें *n,* कोहळें *n.* Nose-rein of a B. वेसण *f,* नास्य *n,* नाथ (R) *f.* Rein or guiding string of a B. कासरा *m,* पाग *f.* Single side or half of a B. load अटकें *n,* अखें *n.* Esp. of the leaves of the Piperbetel कुडतन or तान *n.* String of bells around the neck of a B. घुंगुरमाळ *f,* घांटसर *m,* घागरमाळ *f.* To tie the four legs of a B. (or buffalo, &c.) डुबक *f*-अडची घालणें. The horn-rope of a B. सर *m.*] ३ *a young bull* खोंड *m,* गोऱ्हा *m.* Bullock-driver, Bullock-grazier *n.* बैलका (क्या) *m.* Bull's-eye *n.* झरोका, गवाक्ष. २ (पोलिस शिपायाचा) कंदील *m.* ३ निशाणाचा मध्य *m.* ४ वादळाचा सूचक असा ढग *m.* ५ *aldebaran*

रोहिणी नक्षत्रांतील पांचवा तारा, गर्ग. Bull's-eyed *a.* Bullock's heart, true custard-apple *Anona reticulata* (the tree) रामफळ *f*, अनवल or अनोल *f* (the fruit) रामफळ *n*, अनवलें or अनोलें (R) *f*. Bullock-pass *n.* बैलघांट *m.* Bullock-road *n.* बैलवाट *f*, बैलरस्ता *m*, बैलमार्ग *m.* Bull-terrier *n.* 'बुल-टेरिअर,' टेरिअर व बुलडॉग यांपासून झालेली अवलाद. Bull-whack *n.* चाबकाचा तडाका *m.* Bull-whack *v. t.* चाबकानें मारणें. Bull-wort *n.* 'बुलवर्ट' वनस्पति. A bull in a china shop नाजूक वस्तूंची नासाडी करणारा. To take the bull by the horns संकटाला निश्चयानें-धैर्यानें तोंड देणें. John Bull इंग्रज, इंग्लिश मनुष्य, 'जॉनबुल.' To make a bull's eye मोठा थोरला फायदा मिळविणें.

Bull (bool) *n.* दारूचें भांडें विसळून घेतलेलें पाणी *n.* हें एक प्रकारचें पेय म्हणून वापरतात.

Bull (bool) [L. *bulla*, a bubble, boss, knob, a leaden seal on an edict.] *n.* पोपचें आज्ञापत्र *n.* Bullan'tic *a.* Bull'ary *n.* आज्ञापत्रसमुच्चय *m.*

Bull (bool) [O Fr. *boul*, cheat.] *n.* वाणीदोष *m*, हंसें पिकण्यासारखी बोलण्यांतील ढोबळ चूक *f.*

Bulla (bool'la) [L.] *n.* प्राचीन रोममधील मुलांचा वाटोळा दागिना *m.* २ शिक्का *m*, मोर्तब *m.* ३ कोणतीही वर्तुलाकार वस्तु *f.*

Bullet (bool'et) [Fr. *boule*, a ball.—L. *bulla*, a boss, a knob. See Bull, an edict.] *n.* गोळी *f*, बंदुकीची गोळी *f.* [B. POUCH OR CASE गोळ्या ठेवण्याची पिशवी *f*-वा *m*, गोलदानी *f.*] Bullet-head *n.* गोळीप्रमाणें वाटोळें डोकें *n.* २ हट्टी मनुष्य *m.* Bullet-headed *a.* Bullet-mould *n.* गोळ्यांचा सांचा *m.* Bullet-proof *a.* गोळ्यांनीं अभेद्य. Bullety *a.* गोळीसारखा (वाटोळा).

Bulletin (bōōl'e-tin) [Fr. *bulletin*, a ticket.—It. *bulletino*, a safe-conduct, a pass, dim. of *bulleta*, a passport.—L. *bulla*, a boss.] *n.* प्रकृतिमानपत्र *n*, आतुरपत्रिका *f*, गदवृत्त *n*, (राजाच्या प्रकृतीसंबंधानें अगर दुसऱ्या महत्वाच्या कामासंबंधानें) जाहीर खबर *f.* २ लष्करी-सरकारी जाहीरपत्र *n.* B. *v. t.* प्रकृतिमानपत्रानें-जाहीरखबरीनें प्रसिद्ध करणें.

Bullfinch, Bulfinch (bool'finch) [From Bull and Finch; named so prob. on account of the thickness of the bird's neck.] *n.* *a song bird* बुलफिंच *m*, एक गाणारा पक्षी *m.*

Bullion (bōōl'yun) [Fr. *bullion*, a mint.—L. L. *bulliona*, *bullio*, a mass of metal apparently from its being melted from L. *bullire*, to bubble up, to boil.] *n.* लगडीचें सोनें किंवा रुपें *n*, खोटीचें सोनें-रुपें *n*, सोन्यारुप्याच्या लगडी *f, pl.* [SILVER B. चांदी *f.*] २ परदेशी नाणें, आपल्या देशांत चालू नसलेलें (सोन्याचें किंवा रुप्याचें) नाणें. [ज्याची आपल्या देशांत फक्त भारंभार रुप्याइतकी किंवा सोन्याइतकी किंमत होते.] Bull'ioner *n.* (*obs.*) लगडीच्या सोन्यारुप्याचा व्यापारी *m.* Bullionist *n.* *one who advocates a metallic currency* धातुनाणकवादी *m.*

Bully (bōōl'i) [M. Dut. *boel*, a lover (of either sex) borrowed from M. H. Ger. *buole*, a lover.] *n.* *a noisy rough fellow* गरिबांचा काळ *m*, इसामदांडगा *m*, वीरपीर *m*, रगडमल्ल *m*, खलेल. २ (*obs.*) बडबड्या पण भ्याड. B. *a.* धटिंगण, गरिबांच्या काळासारखा. B. *v. t.* डरकावणें, डरावणें, चापणें, दणकावणें, दणगारणें, गुरकावणें, धमकावणें, दरडावणें, दटावणें, धाकदडप *f*-दांडगाई *f.* करणें. B. *v. i.* गुरगुरणें, बढाई करणें. Bullying *n.* (v. V.)—*act.* डरकावणें *n*, &c., दरडावणी *f*, डरकावणी *f*, डरावणी *f*, दटावणी *f*, दांडगाई *f*, तापतोवारा *m*, रगडमल्ली *f.* [B. OF BODILY MIGHT आंगरेंटाई *f*, आंगधटाई *f*, आंगमर्दाई (र्दी) *f*, लठ्ठाई *f.*] Bull'yism *n*, गरिबांच्या काळासारखें वर्तन *n.* Bullyrag *v. t.* *colloq.* शिवी हासडणें, धाक घालणें. Bull'yragging *n.*

Bulrush (bool'rush) *n.* मोठ्या जातीचा लव्हाळा *m.* often applied to the cat's-tail (*Typha*). Bul'rushy *a.*

Bulwark (bool'wark) [Dan. *bulværk*, Swed. *bolverk*; compounded of Dan. *bul*, Swed. *bol*, trunk of a tree, log & Dan. *vaerk*, Swed. *verk*, a work. lit. 'log-work.'] *n.* बुरूज *m*, तटबंदी *f*, कोटबंदी *f.* २ *fig.* रक्षणसाधन *n*, रक्षण *n.* B. *v. t.* बुरूज बांधून बंदोबस्त करणें. २ रक्षण करणें.

Bum (bum) *n.* *breech* कुल्ले *m. pl.*, पुट्ठा (*slang*) *m*, ढुंग *n*, ढुंगण *n*, नितंब *m.* Bum-bailiff *n.* दुताडा (*obs.*) *m*, एक कनिष्ठ प्रतीचा बेलिफ *m.* Bum-boat [DUT. *boom*, a beam.] *n.* बांबोट, किनाऱ्यापासून दूर अंतरावर असणाऱ्या जहाजावर अन्नसामग्री नेणारी लहान व रुंद होडी *f.*

Bum (bum) [Onomatopœic.] *v. i.* गुणगुणणें, गुणगुण आवाज करणें. Bumming *pr. p.* Bummed *pa. p.* Bum *n.* गुणगुण आवाज *m.*

Bumbaze (bum'bāz) See Bamboozle.

Bumble-bee (bum'bl-bē) [M. E. *bumble*, frequentative of Bum, & Bee.] *n.* गुणगुण करणारी मोठी मधमाशी *f.* Bumclock *n.* *drone-beetle* नरभुंगा.

Bump (bump) [Of imitative origin. Cf. M. Dan. *bumpe*, to strike with the fist.] *v. i.* *to thump against* थाडकन-कर-&c.- फाडकन-कर-&c.- धबकन-कर-&c.-लागणें, धडक *f*-धडका *m*-थडक *f*-थडका *m*-लागणें-बसणें *in. con.*, धडकणें. B. *v. t.* थडक *f*-थडका *m*-धडक *m.* मारणें. B. *n.* (on the body, &c.) *a swelling, a blind tumor* स्वाभाविक आलेलें टेंगूळ *n*, गांठ *f*, ढुंग *n*, ढुंगर *n*, ढुंगल *n*, ढुंगळ *n*, ढुंबर *n*, उटिंबरा *m.* (*obs.*) [To HAVE A. B. टेंगुळणें, टेंगुळ *n.* येणें-उठणें.] २ थडक *f*, थडका *m*, धडक *f*, धडका *m*, ठोंसा, बुक्का. ३ *phren.* (डोक्यावरील ठिकठिकाणचा) उंचवटा *m*, उन्नत भाग *m.* Bumper *n.* *brimmer* पुरा भरलेला पेला *m.* २ गच्च भरलेलें नाटकगृह *n*, चिकार थेटर. B. *a.* गच्च भरलेलें;

as, A B. house. Bumping *n. act.* थडक *f*, थडका *m*, धडक *f*, धडका *m*, (B. whilst sucking) ढुमणी *f*, ढुकसी *f*, ढुश्शी *f*, हुंडका *m*, हुंदडा *m*, हुंदडी *f*, हुंडकी *f*, ढुसणी *f*, हेमटी *f* (*v.* मार). Bumpology *n.* (humorous) कपालसामुद्रिक, मस्तुलुंगेंद्रियशास्त्र *n*, मस्तिष्कविद्या *f.* Bumpy *a.* To bump out *print.* पुष्कळ काम झालेंसें दाखविण्याकरितां टाईप हवे तसे तुरळक-मोकळे-अलग-पसरट जुळणें.

Bumpkin (bump'kin) [Dut. *boomken*, a little tree, E. *bumkin*, a thick piece of wood; hence, a thick-headed fellow, a blockhead.] *n.* *a clown* खेडवळ माणूस *c*, खेडेगांवचा माणूस *m*, खेड्या *m*, गांवढ्या *m*, गांवढळ. Bump'kinish *a.* Bump'kinly *adv.*

Bumptious (bump'shus) [A corr. of *presumptious*, first into *sumptious*, then into *bumptious*. L. *sumere*, to take.] *a.* सदोदित आपलेंच घोडें पुढें ढकलणारा, भांडखोर, आपल्याच हक्कासाठीं भांडणारा. Bump'tiously *adv.* Bump'tiousness *n.*

Bun (bun) [Fr. *bugne*, a swelling; Ir. *bunna*, a cake.] *n.* पोळी *f*, पुरणाची पोळी *f.* also Bunn.

Bunch (bunsh) [Sw. *bunke*, a heap.] *n.* *hunch, a protuberance* टेंग(गू)ळ *n*, टुंग *n*, टुंगर *n.* [B. OF A CAMEL'S BACK मदार *f.*] २ *cluster* तुरा *m*, घड *m*, झुबका *m*, झुमका *m*, गुच्छ *m*, घूड (*obs.*) *m*, घोंस *m*, स्तबक *m*, पुंज *m*, पुंजका *m.* ३ *number tied together* पेंढी *f*, जुडगा *m*, जुडगें *n*, जुडका *m*, जुडकें *n*, जुडा *m*, *dim.* जुडी *f*, गड्डी *f.* ४ *tuft, knot, clump* झुबका *m*, झुमका *m*, चुबका *m*, गुंठी *f*, गोंडा *m*, गुच्छ *m*, बुचडा *m.* ५ (esp. of flowers) झेला *m.* ६ कपड्याचें ठाण *n.* (१८०००० वारांचें). B. *v. i.* टेंगळणें or टेंगुळणें, गांठळणें, टेंगाळ *n*-&c. येणें, गड्डा होणें. २ घड येणें. B. *v. t.* घोस *m*- झुबका *m.* &c. बांधणें *g. of o.* Bunch-backed *a.* कुबडा. Bunched *a.* Bunch-grass *n.* पश्चिम अमेरिकेंतील बेटांमधील झुबक्यासारखें गवत. Bunchiness *n.* (v. A.) झुबकेदारी *f*, गोंडाळपणा *m*, &c. Bunch'y *a.* गोंडाळ, झुबकेदार, गोंड्याचा, गोंडेदार. Bunch of fives पांच बोटांनीं आंवळलेली मूठ *f*, पक्की मूठ *f.*

Bundle (bun'dl) [A. S. *byndel*, *bund*, *bindan*, to bind; Dut. *bondel*; Gr. *bündel*; Ger. *bündel*.] *n.* (as, of clothes, &c.) गांठोडें *dim.* गांठोडी *f*, गठडें *n*, गांठोळें *n*, गठडी *f*, गड्डा *m*, बासन *n.* [DISORDERLY OR LOOSE B. गासडी *f*, बोचका *m*, बोचकें *n*, मोटळा *m*, *dim.* मोटळी *f*, मोटकुळें (R) *n.*] २ *things bundled together*-gener. मोट *f*, *enhanc.* मोटळा & *dim.* मोटळी *f*, मोटकुळें *n*, गुंडाळा (*) *m*, *dim.* गुंडाळी (*) *or* गुंडळी (*) *f*, गुंडाळें (*) or गुंडळें (*) *n*, विंडा *m.* ३ (of hay, thatch, grass, &c.) *a load* गड्डा *m*, बिंडा *m*, *dim.* विंडकें (*obs.*) *n*, बिंदडी (*obs.*) *f*, बिंदली (*obs.*) *f*, भारा *m*, वरंड *f*, ओझें *n.* ४ (of *kúdbá* grass) पेंढी *f*, *dim.* पेंढकी *f*, *and* पेंडकें *n*, *f*, पेंढूक *n*, पुला *m*, *dim.* पुली *f*, चुंगी *f.* ५ (esp. of paddy straw) गुंडी *f.* [AN AGGREGATE OF FIVE BUNDLES पाचुंदा *m.*] ६ (a long or spheroidal) *straw case* मुडा *m*, वांठी (*obs.*) or वांठ्यें (*obs.*) *n.* ७ (as of matches, greens, sticks, &c.) जुळी *f*, जुडा *m. dim.* जुडी *f*, जुडगा *m*, जुडगें or जुडका *m*, जुडकें *n*, गडी or गड्डी *f*, पुंजका *m*, जुबाडें or जुंबाड *n*, जुंबाडा *m*, चुंगडा *m*, चुंगडें *n.* ८ (as, of paper) *a packet* पुडका *m*, or पुडकें *n*, पुडा *m. dim.* पुडी *f*, तबलक (R) *f.* [A tape or tie of a B. दाटणी *f*, तवलक *f*, दफ्तरणी *f.*] B. *v. t. to tie or bind in a B.* गांठोडें *n*- गठडें *n*-गाठोळें *n*- मोट *f*-&c. बांधणें-करणें, एके ठिकाणीं बांधणें. B. *v. i.* (with *away*, *off*, and *out*) गाशा गुंडाळणें, चालता होणें. Bun'dling *n.* To bundle off धिसपिटाविणें. २ (एखाद्याला) घालवून देणें. To bundle out (जणुं काय मोटळी बांधून) एकदम बाहेर काढणें, धिसपिटावणें.

*N. B.*—गुंडाळा, गुंडाळी, गुंडळी, गुंडाळें, गुंडळें ह्या शब्दांत गुंडाळलेपणाची कल्पना प्रधान आहे. इंग्रजी Bundle ह्या शब्दांत बांधलेपणाची कल्पना प्रधान आहे. आतां बांधणें आणि गुंडाळणें ह्या धातूंनीं दर्शविलेले व्यापार अगदीं भिन्न असल्यामुळें वर दिलेले शब्द Bundle शब्दाचे अगदीं योग्य प्रतिशब्द नव्हेत.

Bundobust (bundō'bust) [Pers.] *n.* बंदोबस्त *m.*

Bung (bung) [M. Dut. *bonge*, a bung.–L. *puncta*, an orifice, from *pungere*, to prick.] *n.* दट्टा *m*, गट्टा *m*, बूच(ज) *m*, गुडदी *f.* २ (esp. of *dubbers*, &c.) हुंडी *f.* ३ पिपाचें तोंड. B. *v. t.* दट्टा *m*-&c. बसविणें, दट्ट्यानें तोंड बंद करणें. Bung-hole *n.* दट्टा बसविण्याचें भोंक *n.* २ पिंपाचें तोंड *n.* Bung-vent *n.* पिंपाच्या दट्ट्यांतून वारा जाण्याचें भोंक *n.* To bung up बंद करणें, गुडदी ठोकणें. Bung of bone *pathol.* बुचासारखें हाड *n.*

Bungalow (bung'ga-lō) [Hind. *bangalah*, of or belonging to Bengal, a bungalow.] *n.* बंगला *m.* Dák B. प्रवाशाकरितां बांधलेलें घर *n*, डाकबंगला *m*, पांथालय, मुशाफरी बंगला.

Bungle (bung'l) [Of imitative origin.] *n.* *anything ill-done, an affair ill-managed, a gross blunder* ओबडधोबड काम *n*, अव्यवस्थित काम *n*, ढोबळचुकी *f.* B. *v. i. to perform in a clumsy, awkward manner* अडाणकाम *n*- ओबडधोबड काम *n*- धावडीकाम (*obs.*) *n*- अडबंगकाम *n*- अडमुठेंकाम *n*- &c.— करणें, अडाण्यासारखें करणें. B. *v. t. to cobble, to botch* ओबडधोबड रीतीनें करणें, ओबडधोबड तांगडणें-शिवणें-&c. Bung'led *a.* ओबडधोबड रीतीनें केलेलें. Bung'ler *n.* (v. V. I.) *an awkward workman* नाकसबी, गवत-काप्या *idio.*, गवत्या *idio.*, दगडघाशा *idio.*, कबाडी, कबाड्या, अनाडी, आडमुठ्या. Bunglers and cobblers compreh. अडाणी कबाडी *m, pl.* Bung'ling *a.* *clumsily or awkwardly done* नाकसब्याचा, नाकसबाचा, झोडींव, ओबडधोबड, धावडी, भोंपळसुती. २ *con*

fused, *blundering* गडबडगुंड्याचा, गोंधळाचा. Bung'lingly *adv.* अडाणीपणानें, अडाणी रीतीनें, ओबडधोबड रीतीनें.

Bunk (bungk) [Sw. *bunke*, a heap.] *n.* निजण्याबसण्याची लांकडी पेटी *f.* हिचा उपयोग दिवसा बसण्याला व रात्रीं निजण्याला होतो. B. *v. i.* वरील पेटींत निजणें. Bunk'er *n.* पेटारा *m*, कोळसे वगैरे ठेवावयाची पेटी *f.*

Bunkum (bung'kum) [From *Buncombe*, the name of a county in North Carolina. A representative at the Congress at Washington being asked why he made such a flowery and angry speech, so wholly uncalled for, made answer, "I was not speaking to the House, but to Buncombe," which he represented.] *n.* *an empty claptrap oratory* आवेशाचें पण निरर्थक वक्तृत्व *n*-भाषण *n.*

Bunsen (bōōn'sen) [After the great chemist, R. W. *Bunsen* of Heidelberg.] *a.* आर्. डब्ल्यू. बुनूसेन नांवाच्या मोठ्या रसायनशास्त्रवेत्त्याच्या नवीन शोधासंबंधीं. Bunsen-burner *n.* धुराशिवाय वात जळण्याची खोळ *f* (बर्नर), बनसनचें वातघर *n.*

Bunt (bunt) *n.* (वाऱ्यानें फुगणारा) शिडाचा मधला ढिला भाग *m.* २ मासे धरण्याच्या जाळ्याचा पिशवीसारखा भाग *m.* B. *v. t. naut.* फुगविणें, फुलविणें. B. *v. i.* फुगारा *m*-झोल *m.* येणें.

Bunt (bunt) (R) *v. i.* शिंगें मारणें, डोकें-धडक-मारणें, मुसंडी देणें; as, The ram bunted him. B. *n.* शिंगें मारणें *n*, मुसंडी देणें *n*, धक्का, घसरा *m.* Bunt'ing *n.* एक प्रकारचा मुलांचा खेळ *m.* २ मजबूत टेंकू *m.*

Bunter (bunt'er) *n.* भिकारी बायको *f*, रस्त्यावरील चिंध्या गोळा करणारी भिकारीण *f.*

Bunting (bunt'ing) *n.* (तारवांचा किंवा इतर निशाणें करण्याचा) पातळ व निरनिराळ्या रंगाचा विरविरीत कपडा *m.*

Buoy (boi) [L. L. *boia*, a collar of leather.] *n.* तरतें *n*, बोयरा *m*, (समुद्रामध्यें खडक दाखविण्याकरितां) पाण्यावर तरंगणारे शंकु. B. *v. t. to keep afloat* तरता-तरंगत-&c.-ठेवणें-राखणें, तरंगविणें, तरविणें. २ *to mark out by buoys* बोयरे *m. pl*-लावणें. ३ *to keep from despondency* धैर्य *n*-धीर *m*-अवसान *n*-&c. देणें, हिंमत देणें, आशा लावणें. Buoy'age *n.* बोयऱ्यांची रांग *f.* Buoy'ance, Buoy'ancy *n.* तरतेपणा *m*, तरणशीलता *f*, तरणशक्ति *f*, तरणधर्म *m.* २ प्लवनशक्ति *f*, तरण्याची शक्ति *f.* ३ उल्हासवृत्ति *f*, रंगेलपणा *f.* B. of spirits सदानंदवृत्ति *f.* Buoy'ant *a. that will not sink* तरायासारखा, तरणशील. २ आनंदी, रंगेल. Of buoyant spirits सदानंदी, सदानंदवृत्तीचा, उल्हासवृत्तीचा. Buoy'antly *adv.* Buoy'antness *n.*

Burden (bur'dn) [A. S. *beran*, to bear.] *n. load* ओझें *n*, भार *m*, हेल *m, f*, बारदान *n.* [SHIP OF B. बारकस *n*, जिन्नसी तारूं *n*-गलबत *n*-जहाज *n*-&c., नोरी तारूं-गलबत-&c.] २ *fig. a grief, an anxiety, a trouble* ओझें *n*, भार *m*, उरावर or गळ्यावर धोंड *f*, धोंड *f*, दडपण *n*, वेध *m*, लकडा *m*, घोरपड *f.* ३ (of a favour received) आभार *m*, ओझें *n*, (*in contempt*) टापरण *n*, टेपरण *n*, टेपर *n.* ४ (of a business, as imposed or as reposed or rested) ओझें *n*, भार *m*, आधण *n*, गडदू (R) *m.* Burden *v. t.* लादणें, ओझें *n.* घालणें-टाकणें-लादणें-देणें. २ *fig. to oppress, to encumber*, &c. ओझें *n*-भार *m*-&c. घालणें-लादणें, भारग्रस्त-भाराक्रांत-&c-करणें, भाराखालीं त्राही त्राही करून सोडणें. Burdened *p.* (v. V. I.) लादलेला, ओझें घातलेला-&c. २ भारग्रस्त, भाराक्रांत, भारपीडित. Bur'densome *a. grievous to be borne* जड, भारी, दु:सह, कष्टकर, श्रमकर. २ दुर्धर, दुर्वह, दुर्वाह्य, अवघड, अवजड, वजनदार. ३ जाचणारा. Burdensomely *adv.* Bur'densomeness *n.* Burden of proof *n. law* पुराव्याचा बोजा *m*, दाव्यांतील वादग्रस्त मुद्दे-गोष्टी-शाबीत करण्याचा बोजा *m.*

Burden (bur'dn) [Fr. *bourdon*, a drone-bee, from Late L. *burdonem*, acc. of *burdo*, a drone.] *n.* (of a song) अंकण कडवें or अकड कडवें *n*, पेडाबंद (R) *m*, पालवपद or पालुपद *n*, ध्रुपद *n*, ध्रुवपद. २ *that which is often repeated* गाणें *n*, जप *m.* ३ ओझ्याचें किंवा वजनाचें प्रमाण *n.* ४ एखाद्या भाषणाचा किंवा लेखाचा-झोंक-रोंख-मुख्य विचार-मुद्दा *m.*

Bureau (būr'ō) [Fr. *bureau*, a desk, a writing-table; so called because covered with brown baize.] खणांची पेटी *f*, दोन बाजूंला एकावर एक खणांच्या रांगा असलेलें लिहिण्याचें टेबल *n*, खणांचें कपाट *n*, बुरो *m.* २ *department* खातें *n.* ३ कचेरी *f.* ४ फड *m.* Bureaux (būr'ō), Bureaus (būr'ōz) *pl.*

Bureaucracy (būr-ō'kras-i) [Bureau & Gr. *kratein*, to govern. The word *kratein* is perhaps connected with Sk. क्रतु, power.] *n.* राजपुरुषैकसत्ता *f*, अधिकारिनिविष्टशासनपद्धति *f*, खात्याखात्याच्या अधिकाऱ्यांना पूर्ण अधिकार असलेली शासनपद्धति *f*, मुख्य अधिकाऱ्यांच्या हातीं सर्व राज्यसूत्रें असलेली शासनपद्धति *f.* Bureau'crat, Bureau'cratist *n.* राज्यसूत्रें खात्याखात्याच्या अधिकाऱ्यांच्याच हातीं असावीं असें प्रतिपादन करणारा, राजपुरुषैकसत्तावादी. Bureaucrat'ic *a.* Bureaucrat'ical *a.* Bureaucrat'ically *adv.*

Burette (bū-ret') [Fr. *burette*, a small vase, dim. of *buire*, a vase for liquors.] *n. chem.* द्रवमापकनलिका *f*, थोडथोडे पातळ पदार्थ मोजण्याची खुणा केलेली नळी *f.*

Burg (burg) [A. S. *burg*, Sk. पुर, a city; Dut. *burg*; L. L. *burgus*, a fort. An earlier form of the word Borough.] See Borough.

Burgess (bur'jes) [See Burg and Borough.] *n.* खेड्यांतील रहिवाशी *m*, याची पार्लमेंटांत निवडणूक करितां येते. प्रतिनिधिसभेंतील (पार्लमेंट) ग्रामप्रतिनिधि.

Burgeous, See Bourgeois.

Burgh (burg or bur'ō) [See Borough.] *n.* शहर *n.* (मुख्यत्वेंकरून स्कॉटलंडांतील.) B. on the sand

पुळणीवरील शहर *n.* Burg'age *n.* राजाची किंवा राज-पुरुषाची खाजगी जमीन कुळानें वर्षाचा खंड-भाडें देऊन नियमित काळ लावण्याकरितां घेण्याची पद्धति *f.* Bur'gher *n.* नगरवासी, नगरप्रतिनिधी *m.* (America.) Bur'ghal *a.* शहरचा. Burgo-master *n.* जर्मनींतील शहराचा कोतवाल *m,* (इंग्लंदांतील मेअरसारखा) अधिकारी *m.* Parliamentary burgh 'पार्लमेन्टरी बरो,' म्युनिसिपालिटिचा हक्क असलेलें शहर *n.* Police burgh 'पोलिसबरो,' पोलिस कमिशनरच्या अधिकारांतलें शहर *n.* Royal burgh सनदी शहर, राजाच्या सनदीवरून हक्क मिळालेलें शहर *n.*

Burglar (burg'lar) [Fr. *bourglair.*—L. *burgu lator*, the robber of a dwelling.] *n.* रात्रीचा घरफोड्या *c,* भिंतफोड्या, अट्टलचोर. B. *v. t.* and *v. i.* घर फोडणें (चोरीकरितां). Burglār'ious *a.* Burglār'iously *adv.* Burg'larise *v. t.* (चोरानें) रात्रीं घर फोडणें. Burg'lary *n. house-breaking* घरफोडी *f,* (चोरी करण्याकरितां) भिंत फोडणें *n,* घरफोडीचा अपराध *m.*

Burgrave (bur'grāv) *n.* शहरचा सुभेदार *m,* किल्ल्याचा सुभेदार.

Burgundy (bur'gun-di) *n.* एक प्रकारचा बर्गंडींतील तांबडा उत्तेजक द्राक्षरस *m.* २ फ्रान्समधील एक प्रांत *m.*

Burial (ber'i-al) [A. S. *byrgels,* a tomb, from *byrgan,* to bury.] See under Bury.

Burin (būr'in) [Fr. *burin.*—M. H. Ger. *boren* (Ger. *bohren*), to bore.] *n.* तक्षणहत्यार *n,* तक्षणी *f,* तांब्यावर नकशी काढण्याचें पोलादी हत्यार *n.* Bur'inist *n.* खोदणारा.

Burke (burk) [From *Burke,* the name of an Irishman, hanged 1829. He committed the crime in order to sell the bodies of his victims for dissection.] *v. t. to murder by throttling, to smother* शरीरावर जखम न दिसेल अशा रीतीनें खून करणें, श्वास कोंडून मारणें, गळा दावून मारणें. २ *fig. to put an end to quietly, to suppress* आंतल्या आंत दावून टाकणें; as, "To B. a parliamentary question." ३ आंतल्या आंत नाहींसा करणें, आंतल्या आंत गुदमरून टाकणें. Burker *n.* Burking *n.* Burkism *n.*

Burl (burl) *n.* (सुतांतील किंवा कापडांतील आंगचीच) गांठ *f.* २ लांकडाची गांठ *f.* B. *v. t.* गांठ सोडवणें, (गांठ) साफ करणें. २ इस्त्री करणें. Burling-iron *n.* गांठ मोडणारी इस्त्री *f.* Burling-machine *n.* गांठ मोडणारें-सोडणारें-काढणारें यंत्र *n,* इस्त्री करण्याचें यंत्र. Burly *a.* गांठाळ, गांठ असलेलें.

Burlesque (bur-lesk') [Fr. *burlesque,*—It. *burlesco,* ludicrous.–It. *burla,* waggery, a trick.–L.L. *burrae,* trifles, nonsense.] *a. tending to raise laughter* हास्यरसाचा, हास्योत्पादक, हास्यरसप्रधान. B. *n.* प्रहसन *n,* हसें उत्पन्न करण्याकरितां किंवा थट्टा करण्याकरितां किंवा उपहास करण्याकरितां केलेली नक्कल *f,* हास्यजनक नाटक *n,* थट्टात्मक भाषण *n.* B. *v. t. to ridicule* हासूं येण्यासारखी नक्कल *f.* करणें, नक्कल *f.*-वर्तावणी *f*-करणें, हास्यजनकविडंबन *n.* करणें. B. *v. i.* नकलेचा उपयोग करणें. Burlesqued' *a.* चित्रांनीं किंवा वर्णनानें विटंबना केलेला, हास्योत्पादक चित्रें काढलेला, Burlesque'ly *adv.* Burlesquer *n.* हसें पिकविण्याजोगी नक्कल करणारा.

Burletta (bur-let'a) [It. *burletta,* dim. of *burla,* a jest.] *n.* (R) *a comic opera* हास्यरसोत्पादक संगीत नाटक *n,* संगीत फार्स *m.*

Burly (bur'li) [Ir. to grow big; Gael. to swell.] *a. big, bulky* गबदूल, गलेलठ्ठ, लडदू (लडधू), धडेल (R.), धटिंगण, लठ्ठ or लठ्ठ्या, बोंगा, बोंगाडा, डाचर, घस्सर. Burliness *n.* (v. A.) गबदूलपणा *m,* गलेलठ्ठपणा *m,* &c., देहस्थूलता *f,* धटिंगणपणा *m.* Hurly-burly गोंगाट *m,* गोंधळ *m.*

Burmese (bur'mēz) [Burma lies to the south-east of India.] *n. sing.* & *pl.* ब्रह्मदेशांतील रहिवासी *m. pl,* ब्रह्मी मनुष्य *m.* २ *sing.* ब्रह्मी (लोकांची) भाषा *f.*

Burn (burn) [A. S. *bærnan,* to burn.] *v. t. to affect by heat* जाळणें, भाजणें, पोळणें, दहन *n.* करणें *g. of o.,* दग्ध करणें, पेटविणें, होम *m*-हवन *n.* करणें (in sacrifice), (ची) होळी करणें or (ला) आग लावणें (with cruelty or through foolishness). [To BE BURNED *fig. to sustain loss* पोळणें, आंच *f.* बसणें *in. con.,* चट्टा *m,* बसणें *in con.,* शेकणें.] २ (bricks, &c.) भाजणें. ३ (the throat)—rancid &c. substances खवखवणें (*v. t.* ?), डाचणें, जाळणें; as, The pepper B.s the throat. ४ (food in cookery) करपवणें, जाळणें. ५ *to corrode, to gnaw* खाणें, डाचणें, जाळणें. ६ (*up*) *to consume by fire* जाळून टाकणें, जाळून राख *f.* &c. करणें, जाळून फस्त करणें, जाळून भस्म करणें. ७ (the ground before sowing seed) भाजणी *f*-भाजावळ *f*- भाजवट *n*- &c. करणें, दाढ *f*- राब *m*- भाजणें. ८ डागणीनें डाग देणें. B. *v. i. to be on fire* जळणें, दहन *n.* होणें *g. of o.*—fiercely, &c. धगधगणें, फणफणणें. [To B. WITH A CRACKLING NOISE (AS DRY GRASS, &c.) भरभरणें, धुरधुर जळणें. B. IT! CURSE IT! (आग लागो) जळो.] २ (a lamp or light) जळणें, तेवणें. ३ (with rage or lust) जळणें, तापणें, संतापणें, जळफळणें, धडकणें, फणफणणें, *intens.* फणाणणें, संतप्त होणें, दाह *m*- होणें *g. of s.,* (आंगाची) लाही होणें, करपून जाणें. ४ (with emulation, eagerness, desire, &c.) खवखवणें, खुरखुरणें, सळसळणें, सुरसुरणें, हुटहुटणें. ५ (in being cooked)—food करपणें, जळणें, आंच *f.* लागणें *in. con.* डागणें, डागळणें, वाळगणें (?). ६ (corn-fields, country, &c.) *to be burnt up or parched* करपणें, जळणें, जळगणें, भाजणें, करपून दर्भ होणें, हरपळणें or होरपळणें. ७ (*the mouth,* &c.) under acrid tastes, पोळणें, तिखटावणें, तिखावणें, झणझणणें, फणफणणें, धगधगणें, खवखवणें, भगभगणें, मिरमिरणें. ८ (in

the throat, stomach, &c.) जळजळणें *v. impers.* (as पोटांत-उरांत-घशांत-&c. जळजळतें), डाचणें, डचडचणें (as, घशांत-&c-डाचतें or डचडचतें, खवखवतें). ९ (the body in fever, &c.) तापणें, रसरसणें, आंगाची (होळी) लाही-आंगाचा दाह *m.* होणें, धगधगणें, फणफणणें, जळफळणें, धडकणें, रणरण *adv.* करणें. १० *to tingle with heat* चुरचुरणें, चुणचुणणें, फणफणणें. ११ (with *out*) जळून राख होणें, जळून खाक होणें, जळून राहणें. १२ *colloq.* लपविलेल्या वस्तूकडे बिनचूक जाणें (in certain games). Burning *pr. p.* Burned or Burnt *pa. p.* Burn *n.* चरका *m*, चटका *m*, चट्टा *m*, लास *m*, दाहक्षत *n.* [SCAR OR MARK OF A B. चटका *m.* SKIN PEELING OFF FROM A B. पळका *m*, फळका *m*, भाता *m*, काळपा *m*, भोत *m.* SMART OF A B. चटका *m*, चरका *m.*] २ भाजीपाल्याचा रोग *m.* Burnable *a.* जाळायाचा-जोगा, &c., जळाऊ, जाळींव, दहनीय, दाह्य. Burned, Burnt *p.* जाळलेला,&c., जाळींव, भाजींव, दग्ध, ज्वलित, जळका *dim.* जळकट. Rather B. कसलेला, जाळलेला &c., करपट. To be B. पोळणें, भाजणें, आंच *f.* बसणें-लागणें *in. con.* Victuals B. in the dressing करप *f*, करपी *f*, करपलेलें अन्न *n.* Burning *p. a.* (v. V. T. 1.) जाळणारा, &c., दाहक, दहनकर्ता. (v. V. I. 1.) जळणारा, जळता, जळत, ज्वलित, दह्यमान. ३ तापलेला, &c., फणफणीत, संतप्त. ४ हुरहुरलेला, उत्साही, &c. ५ झणझणीत, फणफणित, रणरणीत, धगधगीत. ६ (as poisons, medicines, &c.) जलाल, जहाल, झोंबरें, जळजळीत. Burner *n.* See the meanings of Burning. २ खोळ, वातीचें घर. Burning *n.* (v. V. T. 1.) जाळणें *n*, &c., दाह *m*, दहन *n.* (v. V. I. 1.)-*state.* जळणें *n*, दहन *n*, ज्वलन *n*, भुज *f*, as said of राब on land. २ जळणें *n*, तेवणें *n.* ३ जळणें *n*, दाह *m*, संताप *m.* ४ खवखवणें *n*, &c., खवखव *f*, खुरखुर *f*, खाज, धग *f.* ५ हवस or हौस *f*, सळका *m* (*v.* सुट), चुळचूळ *f.* ६ धगधग *f. intens.* धगधगाट *m*, खवखव *f*, जळजळ *f. intens.* जळजळाट *m*, दाह *m*, झणक्या *f. pl*, झणझण्या *f, pl*, झणझणी *f*, *intens.* झणझणाट *m*, मिरमिर *f*, *intens.* मिरमिराट *m*, भगभग *f*, *intens.* भगभगाट *m.* ७ दाह *m*, डोंब or आगीचा डोंब *m*, धगधग *f*, *intens.* धगधगाट *m*, फणका *m. intens.* फणफणाट *m*, फणाण *m.* [INTERNAL B. अंतर्दाह *m*, जळजळ *f*, *intens.* जळजळाट *m.*] ८ चुणचूण *f*, चुणफूण *f*, फुणफूण *f*, दाह *m*, फणका *m*, धणकारा *m*, *intens.* फणफणाट *m.* Burning-glass *n.* मणि *m*, सूर्यमणि *m*, दाहमणि *m*, सूर्यकांत *m*, सूर्यकांताचें भिंग *n*, ज्वलनकारक कांच *f.* Burning-house *n.* भट्टी. Burning-mirror *n.* ज्वलनकारक आरसा *m*, दाहक आरसा *m.* Burning-point *n.* (उडून जाणाऱ्या तेलाचा) ज्वलनबिंदु *m.* Burning question *n.* पुष्कळांचें चित्त खवळवून टाकणारा विषय *m.* Burnt-ear *n.* चिकटा, गहूं वगैरे पिकाचा रोग *m.* Burnt-offering *n.* आहुति *f*, हवि *n*, हव्य *n*, हवनद्रव्य *n.* २ होम *m*, हवन *n.* Burns and scalds भाजणें व पोळणें, दग्ध व प्लुष्ट. To burn a hole in one's pocket खिशाला भोंक पाडणें; as, "His money burns a hole in his pocket." To burn day-light काळोखापूर्वींच दिवा लावणें. २ *fig.* वेळ व्यर्थ घालविणें, निरर्थक गोष्टी करणें; as, We burn day-light. To burn up, To burn down साफ जाळून टाकणें. *v. i.* साफ जळून जाणें. To burn in मनावर कायमचा ठसा उमटविणें-उमटणें. To burn out जाळून खाक करणें-होणें. To be burned out आगीमुळें झालेलें नुकसान सोसणें. Burning bush *n.* किरमिजी रंगाचीं फळें येणारें एक झुडुप. २ 'जळतें झुडूप,' स्कॉटलंडमधील प्रेस्बिटेरिअन मंडळीच्या खुणेचें चिन्ह *n.* To burn one's boats परत जाण्याचीं साधनें नाहींशीं करणें. To burn one's fingers *lit. & fig.* बोटें भाजणें, नुकसान सोसणें, (जुगारांत) चट्टा बसणें. To burn the candle at both ends (figuratively used) दोन्हीं बाजूंनीं मेणबत्ती जाळणें, उधळपट्टी करणें.

Burn (burn) [A. S. *burna*, a fountain, a brook, a spring.] *n.* ओहोळ *m*, ओढा *m*, नाला *m.*

Burnish (burn'ish) [M. E. *burnishen.*—O Fr. *burnir*, *brunir*, to embrown, to polish.] *v. t. to polish* उजळ करणें, (शि)सिकल करणें, उजळणें, निसळणें, उजळा *m*-ओप *f*-जिल्हे *f*-जिल्हई *f*-झिलई *f*-झील *f*, झिगी *f*-&c. देणें-आणणें. B. *v. i.* उजळ होणें. २ *lit. & fig.* चकाकणें. B. *n.* सफाई *f*, जिल्हई *f.* Burn'isher *n.* (v. V.) उजळेकरी, ओप देणारा, शिकलगर or शिकलगार. २ *dog's tooth, stone, &c. used in burnishing* घासून जिल्हई देण्याचें हत्यार *n*, मोहरा *m*, ओपणी *f*, ओपसळई *f*, घोटा *m.* Burn'ishing *n.* Burn'ishment *n.*

Burnoose, Burnous, Burnouse (burnōōs' or bur'nōōs) [Fr. *burnous.*—Arab. *burnus.*] *n. pl. a mantle or cloak with a hood, an upper garment extensively worn by the Arabs and the Moors* (men and women) बुरणुसासारखा पायघोळ आंगरखा *m*, पायघोळ बुरखा *m.* Burnoosed, Burnoused *a.* वरील आंगरखा घातलेला.

Burnoullis' number *n. math.* बरनोलीची संख्या *f.* Burnoullis' series *n.* बरनोलीची श्रेढी. ह्या संख्यांचा व श्रेढीचा शून्यलब्धिनामक गणितप्रकरणांत विचार केला आहे. The correct spelling Bernoulli.

Burnt (burnt) *pa. p.* of Burn.

Burrow (bur'ō) [A. S. *beorgan*, to protect.] *n.* बिल *pop.* बीळ *n*, ढोल *f*, गव्हर *n*, कंदर *n*, विवर *n*, पोखर *n*, पोखारा *m*, धावरें (*obs.*) *n*, धाव (*obs.*) *f.* B. *v. i.* बीळ *n*-पोखर *n*-पोखारा *m*-विवर *n.* करणें-करून राहणें, (बिळांत) लपणें.

Burrow (bur'ō) *n.* (*mining*) गाळ-कचरा यांचा ढीग *m.*

Bursar (burs'ar) [L. *bursa*, a purse.] *n.* विद्यालयाचा खजिनदार, धनाधिकारी, कोशाधिप, खजिनदार; as, B. of a college or of a monastery. २ स्काच युनिव्हर्सिटींत शिष्यवृत्ति मिळवणारा विद्यार्थी, धर्मार्थ ठेवलेला स्काच विद्यार्थी *m.* Bursarial *a.* Bursar-

ship *n.* खजिनदाराचा हुद्दा *m.* Burs'ary *n.* विद्यालयाचा खजिना *m.*-तिजोरी *f.* २ स्कॉटलंड देशांत विश्वविद्यालयांतील शिष्यवृत्ति (स्कॉलरशिप) *f.;* विद्यार्थ्यांस दिलेली मदत *f.* Bursic'ulate *a.* लहान पिशवीच्या आकृतीचा. Burse, Bourse *n.* मौल्यवान् वस्तु ठेवण्याची पिशवी *f.* २ इंग्लंडांतील मुख्य प्रधानाची निशाणी *f.* ३ व्यापाऱ्यांचा अड्डा *m,* गरजू विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ति देण्याकरितां काढलेला फंड (निधि) *m.* Burs'iform *a.* पिशवीच्या आकाराचा.

Burst (burst) [A. S. *berstan,* to break; Ger. *bersten;* Dut. *bersten.*] *v. t.* (फटदिनीं आवाज करून कडक वस्तु) फोडणें, स्फोट (S) *m*-स्फोटन *n.* करणें *g. of o.,* उघडणें, तोडून टाकणें; as, To B. one's bonds. B. *v. i.* फुटणें, फाटणें, उतटणें, उताटणें; as, The boiler had burst, The buds will burst in spring. [To B. IN PIECES कोसळणें, ढांसळणें. To B. INTO TEARS रडें *n.* कोसळणें *in. con.* To B. OUT WITH LAUGHTER हांसतां हांसतां आंतडीं *n. pl.* गळ्यास येणें, हांसतां हांसतां पोट दुखणें, हांसतां हांसतां पोट फुगून गळ्यास लागणें.] २ फुटून बाहेर येणें-पडणें (with *forth, out, away*), उधळणें, उसळणें, सुटणें, सुटून मोकळा होणें *colloq.,* उसळ *f.*-उसळी or उसाळी *f.* खाणें. ३ (with *through*) फोडून जाणें, फळी फोडून जाणें, दपटून शिरणें, धसकणें, धसणें. ४ दुःखानें फुटणें-फाटणें; as, His heart burst in grief. ५ *fig.* दिवाळें निघणें (अकर्मक burst च्या पुढें बहुधा *forth, out, away, into, upon, through* हीं अव्ययें येतात.) Burst *n.* फुटणें *n,* स्फोटन *n. a sudden explosion* (of anger) झटका *m,* झटकारा *m,* (of grief) सर *f,* उकळी *f,* गहींवर, (of thunder) कडाका, धडाका, बार. Burst *p.* (v. V. I. 1.) फुटलेला, &c., फुटका, फुटकर, फुटक, स्फुट, स्फुटित, विघटित, विदीर्ण. Bursting *n.* (v. V. I. 1.)-*act.* फुटणें *n,* फाटणें *n,* स्फोटन *n.* (v. V. T.)-*act.* फोडणें *n,* &c., स्फोट *m,* स्फोटन *n.* Bursting charge, see Charge. To burst in जोरानें आंत घुसून मार्ग करणें. To burst into blossom मोहोर येण्यास आरंभ होणें. To burst out जोरानें घुसून बाहेरचा मार्ग काढणें. To burst up *colloq.* चुराडा होणें.

Bury (ber'i) [A. S. *byrgan,* to hide in the ground, to bury, from *beorgan,* to hide; see Borough.] *v. t.* पुरणें, गाडणें, गडदणें, माती-मूठमाती देणें, माती-सुईआड करणें, भूमिगत करणें. २ (one's self) as in a book *fig.* पुरून घेणें, गाडून घेणें. ३ (seed, &c.) मातींत-&c. घालणें. ४ *to overwhelm* गडप होणें. ५ (in oblivion) माती घालणें-लोटणें *with* वर *of o.;* विस्मृति-&c. पाडणें with *g. of o.,* पोटांत घालणें, विसरणें. ६ लपविणें, झांकणें; as, To B. one's face in the hands. ७ विसरणें; as, To B. injuries. Burying *pr. p.* Buried *pa. p.* Burial, Burying *n.-act.* पुरणें *n,* गाडणें *n,* माती देणें *n,* &c., मूठमाती *f,* भूमीकरण *n.* Burial-aisle *n.* ख्रिस्ती देवळाच्या दोन्ही बाजूंस प्रेतें पुरण्याकरितां राखून ठेविलेली जागा *f.* Burial-Burying-ground, Burial-Burying-place *n.* प्रेतें गाडण्याची-पुरण्याची जागा *f.;*मसणवटी *f.;*मसण *f.;*स्मशान *n,* प्रेतभूमि *f,* कबरस्थान *n,* पितृवन *n.* Burial-service *n.* प्रेतसंस्कारविधि *m,* अंत्यविधि *m,* अंत्यविधीचे वेळची उपासना *f,* और्ध्वदेहिक कर्में *n. pl.* Burial society प्रेतसंस्काराच्या खर्चाचा विमा उतरून तो पुरविणारी मंडळी *f.* Buried *a.* पुरलेला, गाडलेला. २ *fig.* विसरलेला. Burier *n.* मसण्या, मुरदेफरास, प्रेतें पुरणारा. To bury the hatchet भांडण बंद करणें.

Bus, Buss (bus) *n.* बस *f,* एक प्रकारची गाडी *f.*

Bush (boosh) [M. E. *busch, busk.*—Dan. *busk;* Swed. *buske,* a bush; Dut. *bosch;* O. H. Ger. *busc.* All from L. L. *boscus,* a bush.] *n. a thicket* झुडूप *n,* झुडप *n,* loosely. [CLOSE AND DENSE B. जाळी *f,* झुडपी *f,* झांकर *n,* झुंबाड (R.) *n,* झुंगाड (R.) *n,* जाळ, *dim.* जाळकट. PLACE OVERRUN WITH BUSHES बुरंट OR बुरांट OR बुरुंट *n.*] २ *a leafy branch broken off* (to be set, &c.) झांकर *n,* झांप *m.* ३ (अ) झाडाची फांदी *f.* ही फांदी बहुधा इंग्लंडांतील खाणावळीबाहेर निशाणीदाखल लाविलेली असते. (ब) (R) खाणावळ *f.* ४ झाडीचा प्रदेश *m.* ५ *bot.* क्षुप, गुल्म. B. *v. i.* झाडी वाढणें. B. *v. t.* झाडी लावणें. २ झुडपाचा आश्रय देणें. Bushed *a.* झुडपांत झांकलेला. Bush-fighting गनिमी काव्यानें लढणें. Bush-harrow *n.* दाताळें, कुळव, गुठा (?). Bush'iness *n.* झुडपाळपणा *m.* २ झाडी *f,* झाडोरा *m.* Bush-man *n.* अरण्यांत राहणारा, वनवासी. Bush-ranger *n.* अरण्यांत चोरून राहिलेला गुन्हेगार *m.* Bush-whack *v. i.* गनिमी काव्यानें लढणें, झाडझुडपांत इकडे तिकडे फिरणें. Bush-whacker *n.* गनिमी काव्यानें लढणारा. २ झुडपें तोडण्याची कुऱ्हाड *f.* Bush-whacking *n.* Bushy *a. thick like a bush* झांपाळ, झांकराचा, किर्र, झांकरमय, झुडपाळ, निबिड. [To GROW BUSHY झांपाळणें, झांकरणें, झुडपाळ होणें.] २ *full of bushes* झुडपांचा, झुडपाळ, झाड्या. ३ (tail) झुपक्यांचा, झुपकेदार, गोंडाळ, *dim.* गोंडेदार. Good wine needs no bush *lit.* चांगल्या दारूला पुष्कळ जाहिरात लागत नाहीं. cf. सूर्याला दाखविण्याकरितां मशालीची जरूर नाहीं.

Bush (boosh) [M. E. *busse,* Dut. *bus,* a box, a barrel (of a gun).—L. L. *buxis,* a box.—Gr. *buxos,* box wood, box-tree.] *n. mech. engin.* लाट (shafting) ज्यांत फिरते ती घर्षणधातूची नळी *f.* २ आंववण *n,* आमण *n.*

Bushel (boosh'el) [M. E. *bushel.*—O. Fr. *boissel,* a *dim.* of O. Fr. *boiste,* a box.—L. L. *bustellus,* a small box.—L. L. *buxida, buxis,* a box.] *n.* एक कैली माप *n* (आठ ग्यालनांचें). २ मापाचें पात्र *n.* ३ (of the nave of a wheel) वसूं *n,* विडी *f.* Under a B. (*lit.*) बुशेल मापा (भांड्या) खालीं, गुप्तपणें, चोरून, झांकून. To hide one's candle under a B. See

Candle. To measure other people's corn by one's own bushel *cf.* आपल्यावरून जग ओळखणें-ताडणें.

Business (biz'nes) [A. S. *bysgian*, *bysig*, busy.] *n. employment, occupation* काम *m*, धंदा *m*, व्यवसाय *m*, उद्योग *m*, कसब (?) *n*, व्यापार *m*, उद्यम *m*, व्यवहार *m*. २ *work to be done* काम *n*, कामगत (R) *f*, कामगिरी *f*, कारभार *m*, कामकाज *n*, कामकारभार *m*, कामधंदा *m*. [Mind your own B. आधीं आपल्याच कामांत पुरें लक्ष घाला, तुला काय पंचाईत, तुझें काय जातें, तूं आपलें घर संभाळ, नसती उठाठेव तुला कशाला पाहिजे, अव्यापारेषु व्यापार कशाला हवा]. ३ *a job, a matter to be done* काम *n*, कार्य *n*, काज *n*, कर्तव्य *n*, प्रयोज्य *n*. [LIGHT OR EASY B. क्षुल्लक काम *n*, *idio.* अगदीं सोपें काम *n*, हातचा मळ *m*. LOSING B. बुडता धंदा, बुडीत व्यापार, बुडस्थळ. TROUBLESOME B. बखेडा *m*, लचांड *n*, लटांबर *n*, भानगड *f*, उपद्व्याप *m*.] ४ *a matter gener. an affair* गोष्ट *f*, मुकद्दमा *m*, खटला *m*. or खटलें *n*, गाणें *n*. ५ *province, office* काम *n*, स्वकर्म *n. idio.*, स्वधर्म *idio.*, प्रकरण *n*, हक्क *m*, टप्पा *m*, मान *m*, अरुता (?) *f*, अरू (?) *f*. ६ *traffic* उदीम *m*, घेणेंदेणें *n*, घडमोड or घडामोड *f*, देवघेव *f*, व्यापार *m*. [EXTENSIVE OR VAST B. मोठा कारखाना *m*, अलायी-लंगर-ब्रह्मांड-&c. कारखाना *m*, फापटपसारा *m*, फाकडपसारा *m*, कामाचा परगणा *m*, मोठा व्यापार *m*, मोठी देवघेव *f*, मोठी उलाढाल *f*. DEPARTMENTS OF AN EXTENSIVE B. अठरा कारखाने *m. pl.* MAN OF B. व्यवहारी, *pop.* वेव्हारी *m*, उद्योगी, उद्योगाचा पुतळा, उलाढाल करणारा, देवघेव चालविणारा, व्यापारी. SKILLED IN B. व्यवहारदक्ष, कुशल, व्यवहारपटु. TO THRIVE IN B. दुकान *n*. वाढणें *g. of s.*, धंदा भरभराटीस येणें, व्यापारास चढती कळा येणें-चलती असणें.] ७ *bustle and stir of buyers and sellers* गिऱ्हाइकी *f*. ८ *profession, art, vocation, occupation* रोजगार *m*, कसब *n*, व्यवसाय *m*, वृत्ति *f*, व्यवहार *m*, उद्योग *m*, धंदा *m*. Business *a.* कामधंद्यासंबंधीं. Business-like *a.* (कामदार मनुष्याच्या). टापटिपीचा, व्यवहाराचा, व्यवहाराला अनुसरून, शुद्ध व्यवहाराचा. To do the business for सोक्षमोक्ष करणें, निकाल लावणें. २ नाश करणें. To make it one's business स्वकर्तव्यबुद्धीनें करणें, आपलेंच काम ह्मणून एखादी गोष्ट काळजीपूर्वक करणें. To mean business खरी खरी व्यवहारबुद्धि असणें, खरी खरी कार्यबुद्धि असणें, उगाच वेळ काढण्याचा हेतु नसणें. To mind one's own business आपल्या स्वतःच्या कामाकडे लक्ष्य देणें, दुसऱ्याच्या भानगडींत न पडणें. To send one about one's business हाकलून देणें, (एखाद्याला) त्याच्या स्वतःच्या कामावर जावयास लावणें.

Buskin (busk'in) *n.* प्राचीनकाळांतील नटांचा जोडा *m*, उंच टांचेचा गुडघ्यापर्यंतचा जोडा *m*. २ पूर्वकालीन इंग्लंडांतील शोकपर्यवसायी नाटकांतील पात्रांचा मोठा जोडा. ३ (R.) शोकपर्यवसायी नाटक *n*. Buskined *a.* बस्किन जोडा घातलेला, बस्किन जोड्यानें तुडवलेला. २ शोकपर्यवसायी.



Buss (bus) [Fr. *baiser*, to kiss.—L. *basium*, a kiss.] *n. a kiss* मुका *m*, चुंबन *n*. B. *v. t.* मुका घेणें, चुंबन घेणें.

Buss (bus) [O. Fr. *busse*,—L. L. *bussa*, buss.] *n.* एक प्रकारचें दोन डोलकाठ्यांचें लहान मजबूत गलबत *n*. ह्याचा हेरिंग मासे मारण्याच्या कामीं उपयोग करितात.

Bust (bust) [Fr. *buste*.—It. *busto*, the bust, the trunk of the human body.—L. L. *bustum*, the trunk of the body.] *n.* डोकें, बाहू व छाती असलेला पुतळा *m*, छातीपर्यंतचा मुखवटा or मुखोटा *m*, ऊर्ध्वांगप्रतिमा *f*. Busted *a.*

Bustard (bus'tard) [O. Fr. *bistarde*, Fr. *outarde*, from L. *auis tarda*, lit. a slow bird.] *n.* माळढोंक *m*, एक जातीचा पक्षी *m*.

Bustle (bus'l) [A variant of *buskle*, to prepare, also to hurry on; frequentative of *busk*, from Icel. *bua*, to prepare and *sik*, one's self. vide Busk. Bustle ह्या शब्दांत तरतरीच्या फाजील प्रदर्शनाची प्रधान कल्पना आहे.] *v. i.* गडबड करणें. २ गडबडीनें धांवाधांव करणें. ३ विनाकारण धडपड करणें. ४ धांवाधांव करणें. ५ उपद्व्याप करणें. ६ नाचानाच करणें, नाचनाचणें. B. *n. stir, hurry, lively motion* घाई *f*, धांवाधांव *f*, धांवाधांवी *f*, गडबड *f*, गडबडी *f*, धामधूम *f*. [TO BE IN A B. धामधुमींत असणें-घाईंत असणें, गडबडींत असणें, गडबडणें.] २ (as of business, &c.) *brisk & noisy stir* खटपट *f*, खवदव *f*, तडाका-खा *m*, वावर *m*. ३ *confused hurry, din, pother, pudder, row, clutter, coil, ado* गोंधळ *m*, घोळ *m*, घप्पाघोळ *m*, घालमेल *f*, आडंबर *n*, गडबड *f*, गडबडी *f*, हुलहूल *f*. Bustler, Bustling *a. busy, stirring, active* उलाढाल्या, चटपटी-द्या, झटपटी-द्या, कचाट्या, गडबड्या, धांदल्या, चळवळ्या, चगडग्या, खटलेखोर. Bustling *a.* घालमेल्या, गडबड्या. २ उद्योगी, चंचल.

Busy (biz'i) [A. S. *bysig*, busy, see Business.] *a. engaged in business* कामांत असणारा, उद्योगास लागलेला, कामांत गुंतलेला, उद्योगी, *colloq.* गाड्याला जुंपलेला, *intensely* कामांत गढलेला, *intensely* कामांत चूर, उद्यमी, उद्योगनिमग्न, कार्यव्यापृत. [THE SENSE OF THE WORD IS OFTEN BEST RENDERED BY कामांत, उद्योगांत, &c.; AS, तो कामांत आहे. HE IS BUSY.] २ *stirring, lively* गडबड्या, चळवळ्या. ३ *full of stir and life*–(*a town, a house*, &c.) गजबजीत, गजगजीत, उपद्व्यापी, उलाढालीचा. ४ (day, &c.) कामाचा, कामाच्या गर्दीचा-तडाक्याचा, कामांत घालविलेला; as, A B. day. ५ *meddling* (in contempt) लुडबुड्या, लुबरा. ६ *active* चपळ, चंचल. B. *v. t.* कामांत चूर करणें, कामांत लावणें-गुंगवणें (*reflex.*). Bus'ily *adv.* Busy-body *n.* उपद्व्यापी, लुडबुड्या, लटपट्या. Busy-bodyism *n.* उपद्व्यापीपणा *m*. Bus'yless *a.* (*Shakes.*) आळशी.

But (but) [A. S. *be-utan*, *butan*, *buta*, lit. 'without'-*be*, by & *utan*, 'without' from *ut*, out.] *prep. leav-*

*ing out, barring, except, save* शिवाय, खेरीज, विना, वांचून, सोडून; as, "He is last *but* one in the class;" Who could have done it *but* him? B. *conj. however, on the contrary, on the other hand, yet, moreover, nevertheless* पण, पर, परंतु, (इतकेंच नाहीं) तर, तथापि; as, "Thou hast not lied unto men, *but* (thou hast lied) unto God"; "They not only tell lies *but* bad lies." B. *adv.* मात्र, केवळ, केवल, फक्त; as, "There is *but* one God." B. *a.* बाहेरचा; as, "But end." B. *n.* बाहेरील खोली *f*; as, The but and ben of a house. २ परंतु (used as a noun in Marathi); as, 'I heartily wish I could but'—'Nay, but me no buts—I have set my heart upon it.' B. *v. t. to say or use but* 'परंतु' म्हणणें, बयादी सांगणें; as, "But me no buts." B. *negative relative pronoun, who not, which not, that not,* जो नाहीं, जें नाहीं; as, "There is no work whatsoever but he can criticise." "Not a man but felt the terror in his face."

Butcher (booch'ėr) [Fr. *boucher*, one who kills buck-goats.] *n.* खाटीक *m*, कसाई *m*, कसाब *m*, खाटक (R) *m*, खाटकी (R) *m*. २ मांस विकणारा दुकानदार *m*. ३ *fig.* खाटीक, कसायासारखा मनुष्य. B. *v. t.* (भक्ष्यार्थ) जीव *m*-प्राण *m*. घेणें *g. of o.*, खून *m*-कत्तल *f*-सूना *f*-&c. करणें *g. of o.*, हिंसणें, गळा *m*. कापणें. Butcher-bird *n.* टीव. Butchering *n.* (मांसाकरितां) ठार मारणें. Butcherly *adv.* क्रूरपणानें, खुनीपणानें. Butcher-meat, Butcher's meat *n.* खाटकानें कापलेल्या जनावरांचें खाण्याचें मांस *n.* Butcher's broom *n.* एक प्रकारची वनस्पति *f.* ह्या वनस्पतीच्या केरसुणीसारख्या झुबक्यानें इंग्लंडांत खाटीक आपलीं दुकानें साफ करितात. Butch'ery *n.* कसावकाम *n*, कसावकरणी *f*, खाटीकपणा *m*. २ (*obs.*) *slaughter-house* कसाईखाना *m*, वधशाला *f*, सूना *f*. ३ *fig. great or cruel slaughter, massacre* कत्तल *f* (*v.* उड, उडिव), सूना *f*, कापाकापी *f*, कंदन *n*.

Butler (but'lėr) [Fr. *bouteillier*, a bottle-bearer, a cup-bearer, from Fr. *bouteille*—L. L. *buticula*, double dim. of *butis, buttis*, a cask; See Bottle and Butt.] *n.* वाकनीस *m*, कोठवळा *m*, 'बुटलेर' *m*. B. *v. i.* बुटलेरचा धंदा करणें. Butlership, Butlerage *n.* बुटलेरचा पेशा-धंदा *m*. Butlery *n.* बुटलेराची कोठी *f*.

Butment (but'ment) [Fr. *but*, a mark, a shooting target.] *n.* टेंका *m*, पुस्ती *f*, धिरा *m*. Same as Abutment.

Butt (but) [Fr. *but*, butt, aim.] *n.* निशाण *n*, लक्ष्य *n*, लक्ष (?) *n*, वेध्य *n*, संधानबिंदु *m*, संधानहेतु *m*, हिंदण (R.) *n*. [A. B. FOR ARCHERS तोदा *m*.] २ *a person at whom ridicule, jest or contempt is directed, a laughing-stock* उपहासास्पद *n*., परिहासपात्र *n*, खेळवणा *m*. (used objectively), खेळणें *n* (used subjectively), थट्टेचें-करमणुकीचें साधन *n*-पात्र *n*, पाठवळ (*obs.*) *n*, पाठाळ (*obs.*) *n*; as, The B. of the company.

Butt (but) [O. Fr. *boter*, to push, Fr. *bouter*; vide Butt, an end or extremity.] *v. t. to strike with the head* ढुसकणें, ढोसणें or ढुंडणें, ढुंदाडणें, ढुंढारणें, टक्कर *f*-ढुस्सी *f*-&c. देणें; as, "Two harmless lambs are butting one the other." [THAT IS GIVEN TO BUTTING मारका, *dim.* मारकट.] B. *v. i. to join at the butt, end or outward extremity* शिवेशीं-सीमेशीं असणें. B. *n.* (of a horned animal) टक्कर *f*, ढुस्सी *f*, ढुमणी *f*, or ढेमणी *f*, टापशी (*obs.*) *f*, ढुसकी *f*, ढुसणी *f*, ढुंडका *m*, ढुंदाडा *m*, धडक *f*. २ बांध *m*.

Butt, but (but) [M. E. *but*, Icel. *butt*, short. See Buttock.] *n. a limit or boundary* मर्यादा *f*, सीमा *f*, हद्द *f*. २ *the end; esp. the larger or thicker end* बूड *n*, बुडखा *m*.

Butt (but) [O. Fr. *boute* (Fr. *botte*).—Late L. *butta, buttis*, a cask; vide Bottle.] *n.* (for wine or beer) मोठें पिंप *n*. Wine-butt एकशें सव्वीस ग्यालनांचें असतें; व Beer butt, sherry butt एकशें आठ ग्यालनांचें असतें.

Butte (būt, but) [Fr. See Butt, an end or bound.] *n.* टेंकडी *f*, टेंकाड *n*.

Butter (but'ėr) [O. E. *botere, butter*, A. S. *butere*, from L. *butyrum*, Gr. *bou-tyros*, butter, either from *bous*, ox, cow–*turos*, cheese; or perhaps of Scythian origin.] *n.* लोणी *n*, मस्का *n*, नवनीत *n*, घुसळा (R) *m*. [B. IMPERFECTLY SEPARATED ताकट लोणी *n*. CLARIFIED B. तूप *n*, घी *n*, आज्य *n*, घृत *n*, सर्पि *n*. IN CANT OR COVERT PHRAS. घट्टें *n*. CLARIFIED B. FRESH AND HOT लोणकढें तूप *n*. CLARIFIED B. WASHED (A HUNDRED TIMES) शतघृत *n* (USED AS MEDICINE). २ (A THOUSAND TIMES) सहस्रघृत *n* (USED AS MEDICINE). DREGS OF CLARIFIED B. बेरी *f*. DREGGY OR BADLY CLARIFIED B. बेरकट OR बेरकूट *n*, बेरट *n*, बेरकट तूप *n*. THAT SMELLS OR TASTES OF CLARIFIED B. तुपट]. २ *blarney* गुळपापडी *f* (used *fig.*), घामटगुळवणी (used *fig.*). Butter *v. t.* लोणी *n*. लावणें-घासणें. २ दुधातुपानें or दुधातुपांत माखणें. ३ *fig.* लोणीमस्का लावणें, लोणी चोळणें-घासणें, loosely हांजी हांजी करणें. Butter-boat *n.* द्रोण *m*, डोणा *m*. *dim.* डोणी *f*, खोरा *m*, खोला *m*. Butter-cup *n.* एक प्रकारचें फूल *n*. Butter-fingers *n. cricket* जो आपल्या हातांतून चेंडू झेलावयाचा असून जाऊं देतो तो. Butter-fingered *a.* बुळबुळीत हाताचा, लोणकट हाताचा. Butterfly [A. S. *butter-fleoge*, *lit.* BUTTERFLY ह्याची शीट लोण्यासारखी असते म्हणून हें नांव पडलें आहे.] *n.* पाकोळी *f*, फुलपाखरूं *n*, पिंगाणें *n*, बेबा *m*, पतंग *m*, काशीचा कापड्या *m*. २ *fig.* गालिच्याचा बूट (R.), फुलबिसनी (R.), तिवाशीचा बूट (R.), छेला, छेलछबीला. ३ *fig.* खुशालचेंडू *m*. Butter-fly-shaped *a. bot.* चित्रपतंगाकृति, पतंगाकार (corolla). Butterine *n. a substance*

*prepared from animal fat with some other ingredients intermixed* कृतीचें लोणी *n.* Butter-knife *n.* लोणीकाप्या चाकू *m.* Butter-man *n.* लोणीविक्या. *m.* Butter-milk *n.* ताक *n,* तक्र *n.* Some terms for Buttermilk considered as weak and wishy-washy are ताकवणी *n,* शंखवणी *n,* पांढरें पाणी *n,* फळकवणा *n,* धोंडवणी *n,* कावळयाचा डोळा *m.* B. compreh. or loosely *i. e. curdled milk, whey, &c.* ताकपाणी *n.* B. mixed with rice-gruel & chilly पेजबुडें *n.* B. warmed with spices, &c. ताकतई or ताकतव *f.* तिक्रय or व *f.* That sells B. ताक्या. To scald B. ताक *n.* फोडणें. Butter-scotch *n.* पुष्कळ लोणी घालून केलेली मिठाई *f.* Butter-tooth *n.* चौकीचा दांत *m.* Butter-wife, Butter-woman. *n.* लोणी करणारी किंवा विकणारी बाई *f.* Buttery *a.* लोण्याचा, लोणकट. He looks as if butter would not melt in his mouth तोंडांत घातलेले लोण्यालाही धक्का न लावणारा असा तो दिसतो Cf. त्याच्या तोंडावरची माशी देखील उडत नाहीं. To butter one's bread on both sides दोन्हीं बाजूंला पोळीला तूप लावणें म्हणजे उधळपट्टी करणें, छानछोकीनें-उधळपट्टीनें वागणें. To know on which side one's bread is buttered आपला फायदा जास्त कशांत आहे हें समजणें.

Butteris (but'ėr-is) [The same word as *buttress,* noun, in a different application, Fr. *bouter,* to push.] *n. an instrument used in paring the hoofs of horses* सुंबतरास *m.* हें एक प्रकारचें घोड्याचें वाढलेलें सुंब (hoofs) कापण्याचें हत्यार (चाकू) आहे.

Buttery (but'ėr-i) [A corr. of M. E. *boteleric,* a butlery, properly a place for a butler; from M. E. *boteler,* a butler. See Butler, Bottle. Not to be confused with the word Butter.] *n. pl.* Butteries. *an apartment in a house where butter, milk and other provisions are kept* लोणी, दूध वगैरे वस्तु ठेवण्याची खोली *f, spec.* सोंवळयाची खोली *f,* दुभत्याची खोली *f,* खाद्यसंभारगृह *n.* २ इंग्रजी विद्यालयांतील फळें व दारू विकण्याचें दुकान *n;* as, "And the major of Oxford kept the buttery bar." ३ दारूचीं पिंपें ठेवण्याचें तळघर *n.*

Buttock (but'ok) [M. E. *buttok.* Formed with dim. suffix—*ok* (A. S. *uc*) from *butt,* a thick end, a stump.] *n.* ढुंगण *n,* ढुंग *n,* ढुंगाड *n,* ढुंगाण or ढोंग *n,* ढोंगण, &c., कुला or कुल्ला *m,* टीर *f,* तिडें *n,* गांड *f,* पुट्ठा *m* (used of beasts), नितंब *m,* श्रोणी *f.* २ गलवताची बाह्यगोलता. Ulcer on the B. गांडबोला *m.* To clap the buttocks in exultation टिरी *pl.* बडविणें-पिटणें. To move along upon the buttocks खुरडणें, खरडणें, खुरगटणें, फरपटणें, फरकटणें, फरकडणें, फरकंदणें, रखडणें, फरपट्या *adv.* जाणें-चालणें.

*N. B.*—'To clap the buttocks in exultation,' 'To move along upon the buttocks' as given by Mr. Candy are mere English translations of Marathi phrases given. A cultured Englishman will use "To clap the hands in exultation." He will use "To creep along" in place of 'To move along upon the buttocks.'

Button (but'n) [O. Fr. *boton* (Fr. *bouton*), a bud, a button; properly a round knob pushed out, from *bouter,* to push.] *n.* गुंडी *f,* ब्रुतांव *n,* बिरडें *n,* बटन *n.* [Holding by the B. मगरमिठी *f.*] २ (of wood to fasten doors, &c.) चिमणी *f.* ३-gener. अडकण *n,* अडकवण *n.* ४ *a knob or boss fitting a loop* गुळखी *f,* गुळखें *n,* विरडें(ढें) *n.* These words also mean the knob & loop together. ५ *pl.* चाकर *m,* नोकर *m.* असा अर्थ नोकराच्या पोशाखावर विशेष प्रकारचीं बटणें असतात ह्मणून पडला. ६ अगदीं क्षुल्लक वस्तु *f.* ७ (*Shakes.*) वनस्पतीची कळी *f.* B. *v. t.* गुंडीनें अडकविणें, गुंड्या *f, pl.*-घालणें-अडकविणें, गुंड्या लावून गच्च बांधणें. B. *v. i.* गुंड्या लावण्यास योग्य असणें, (च्या) गुंड्या लागणें; as, His coat will not button. Button-hole, Button-loop *n.* गुंडीचें घर *n,* विरडें *n,* तुकमा *m,* मुदन *f,* मुदनी *f,* काज *n,* फांसा *m.* Button-hole *v. t.* (कोटाच्या) गुंडीनें धरणें, (कोटाच्या गुंडीला धरून एखाद्या मनुष्यास) कंटाळा येईपर्यंत संभाषणांत गुंतविणें; as, He button-holed me for a quarter of an hour. Button-hook *n.* जोड्याच्या अगर बटणाच्या भोंकांतून बटणें वर काढून घेण्याचा हूक *m.* But'tony *a.* पुष्कळ बटनांनीं विभूषित, बटन घातलेले. A boy in buttons पूर्ण पेहराव केलेला चाकर (आपल्या धन्याच्या इभ्रतीप्रमाणें). To hold or take one by the button एखाद्या मनुष्यास कंटाळा येईपर्यंत त्याला बोलण्यांत गुंतविणें.

Buttress (but'res) [Orig. a plural form as if for *butterets,*–O. Fr. *bouterez, pl.* of *bouteret,* a prop.—Fr. *bouter,* to thrust, to prop. See Butt, a thrust.] *n.* टेंका *m, lit. & fig.* टेंकू *m,* टेंकवा *m.* २ *archi.* पुस्ती *f,* धिरा *m,* मच्छ *m,* धिरासा *m,* पुस्तवान *n. m.* B. *v. t.* टेंका *m.* देणें. Buttress-thread screw *n.* एक बाजू चौरस व एक बाजू तिरपी असलेल्या आट्याचा स्क्रू (मळसूत्र).

Butyric (bütir'ik) [L. *butyrum,* butter.] *a.* लोण्याचा. Butyl *n.* ब्युटिल अल्कोहोलचें प्रधानद्रव्य *n.* Butyrā'ceous, Butyrous *a.* लोण्याचा, लोणट, नवनीतात्मक, चिकण, तुपट, तुपाळ, ओशट. Butyric acid घाणेऱ्या लोण्यांत सांपडणारें अम्ल.

Buxom (buks'um) [M. E. *boxom, buhsum, lit.* 'bowsome.'—A. S. *bugan,* to bow, to bend, to obey, & *-sum,* suffix as in *win-some.*] *a. gay* (चांगली शरीरसंपत्ति, व चांगला स्वभाव असल्यामुळें) उल्हासी, हौशी, रंगी, रंगेला, रंगेली, आनंदी, खुशमौजा. २ सौंदर्यलतिकेसारखी, तरतरीत व गुटगुटीट, चपळ व गोंडस (हा शब्द

बहुधा स्त्रियांना लावितात ). Buxomly *adv.* (v. A.) उल्हासवृत्तीनें, आनंदीपणानें, मौजा मारून. Buxomness *n.* (v. A.) आनंदीपणा *m*, उल्हासवृत्ति *f*, सदानंदवृत्ति *f*.

Buy (bī) [A. S. *bycgan*, to buy.] *v. t.* विकत घेणें, खरीद करणें, खरीदी *f*· खरेदी *f*· क्रय *m.* करणें *g. of o.*, मोल देऊन घेणें; as, To B. favour with flattery. २ लांच देणें (now to Buy off). Buyable *a.* विकतघेण्याजोगा. Buyer *n.* (v. V.) विकत घेणारा, खरेदी-खरीद करणारा, &c., खरीददार *m*, ग्राहक *m*, गिऱ्हाईक *m*, क्रयी *m*, क्रेता *m*. Buying *n.* (v. V.)-*act.* विकत घेणें *n.*, &c., खरीदी *f*, खरेदी *f*. To buy and sell खरेदी व विक्री करणें. To buy in घाऊक माल खरेदी करणें, (पुरी किंमत येत नसली म्हणजे) लिलांवांत वस्तूंच्या जुन्या मालकाकरितां वस्तु विकत घेणें. To buy off a person पैसा देऊन लष्करी नोकरींतून मुक्त करणें. २ लांच देणें, पैसा देऊन वाद मिटविणें, तोडजोड करणें. To buy out दुसऱ्याचा पुरा भाग विकत घेणें. To buy over लांच देऊन आपलासा करणें. To buy up एकदम सारा माल खरेदी करणें. To buy the refusal (of a thing) इसारा-बयाणा देणें, ठरींव किमतीस विकत घेण्याच्या हक्काबद्दल कांहीं देणें. Buying *pr. p.* Bought *pa. t. & pa. p.*

Buzz (buz) *v. i.*—as flies, &c. गुंगणें, गोंगणें (R.), गोंगावणें or घोंगावणें, भणभणणें, भणाणणें. २ *fig.* फुसफुसणें, कुचकुचणें, गुणगुणणें, गुणगुण *f.* करणें. B. *v. t.* कुजबूज करणें, फुसफुस करून बाहेर फोडणें; as, 'I will buzz abroad such prophecies.' B., Buzzing *n.* (v. V. 1.) गुणगुण or गिणगिण *f*, *intens.* गणगणाट or गिणगिणाट or घुणघुणाट *m*, घोंघों *n.* *intens.* घोंगाट *m*, घोंगाण *n*, भणभण or भिणभीण *f*; *intens.* भणभणाट *m*, भणाण *m*, गजवज *f*, रुंजी *f*, गुंजारव *m*, अलिविराव *m* (of bees). २ गुणगुण *f*, फुसफुस *f*, कुचकुच *f*, कुजबुज *f*, बातमी *f*, खबर *f*. Buzz'er *n.* कुजबुज करणारा. Buzz'ingly *adv.* Buzz'y *a.*

By (bī) [A. S. *bi*, *big*, near to, by, of, from, after, according to; akin to Dut. *bij*; O. H. Ger. *bi*; Ger. *bei.*] *prep.*-noting agent कडून, हातून, जवळून, पासून, हस्तें, करवीं. २ *with*,-noting instrument करून, कडून, नें, वारीं. ३ *at, as soon as*,-noting time करणें (R) (ex. आज प्रारंभ केला तर उद्यां दोन प्रहरां करणें संपेल), पावेतों, पर्यंत, तों, वेरीं, कडे. [BY THIS TIME, BY NOW एव्हांच, एव्हांवेरीं.] ४ *through*,-noting cause or means करून, करवीं or करवें, द्वारा, योगें, करून, परत्वें or परत्वेंकरून; as, Profit made by commerce. ५-noting passage along वरून, जवळून, पासून, सरसून; as, I went by his house. ६ जवळ, पाशीं; as, Sit by me; To sit by a river. ७ वर, वरतीं, ओलांडून; as, A journey by land or by sea. ८ नें, नीं, लांबी, रुंदी किंवा उंची दाखवितांना हा शब्द वापरतात; as, A room twenty by ten. ९ ज्याची शपथ घेतात तें दाखविण्याकरितां; as, To swear by heaven, earth or by one's children. १० अमुक एक हुकमानें-अधिकारानें; as, To live by strict rules of discipline. ११ वरून, अमुकाच्या अनुरोधानें; as, Ten o'clock by my watch. १२ अमुक नमुन्या-प्रमाणावरून; as, A model to build by. १३ अमुक एक दरानें; as, To price by a small coin. अमुक एक मेजानें-परिमाणानें; as, To sell cloth by the yard. १४ अमुक एक संख्येनें; as, To sell eggs by the dozen. १५ कमीपणा, उणेपणा किंवा जास्तपणा दाखविण्याकरितां; as, Larger by a half; Older by five years. १६ भर, चालूपणा किंवा सातत्य दाखविण्याकरितां; as, By day दिवसभर. १७ पावेतों, पर्यंत; as, He will be here by three o'clock. By *adv. near, at hand, present* नजीक, जवळ, समीप, निकट, गोटीं. २ *passing near, past beyond* पुढें निघून; as, The procession has gone by. ३ *aside* बाजूला, एकीकडे; as, To lay by, To put by संग्रह करणें. By *a. out of the common path* आड, उप &c. [USED IN COMPOSITION DENOTING SOMETHING ASIDE, SECONDARY OR INCIDENTAL, A COLLATERAL MATTER, A THING PRIVATE OR AVOIDING NOTICE. IT WAS FORMERLY MORE FREELY USED IN COMPOSITION THAN IT IS NOW, AS, BY-BUSINESS, BY-DESIGN, BY INTEREST, &C. &C.] By and by *in a short time* कांहींशा वेळानें, कांहीं वेळानें, मग, क्षणभरानें, अमळशानें. २ क्रमाक्रमानें, लौकरच, विशेष उशीर न लागतां. By all means निःशंकपणें, खचित, खात्रीनें. By the bye, By the by सहज आठवण झाल्यावरून, ओघाओघानें, ओघालाच आलें ह्मणून. By-affair, By-business, By-job, By-work *n.* आडकाम *n*, शिवायकाम *n*, खेरीज काम *n*, किरकोळ काम *n*, अडपझडपकाम *n*, अरतेंपरतें काम *n*, कामांत काम *n*. By-blow *n.* ओझरता फटका *m*. २ *slang* अनौरस मूल *n*. By-corner *n.* कोनाडा *m*. २ आडरस्त्याची जागा *f*; as, Britain being a by-corner, out of the sea-coast round Europe. By-day *n.* आडदिवस *m*. By-design, by-end, by-object *n.* गौणकल्पना *f*, उपहेतु *m*, आनुषंगिक कार्य *n*. By-election *n.* मधलीच निवडणूक *f*, पार्लमेंटची नवीन निवडणूक होण्यापूर्वी मध्येंच सभासदांची निवड *f*; as, Two months after the general election, there was a by-election to fill up a vacancy caused by the death of, &c. &c. By-expenses *n.* वरखर्च *m*, आडखर्च *m*, गैरवाजवी खर्च *m*, शिवाय खर्च *m*, &c. By-form किंचित् फरक असलेला दुसरा शब्द *m*. By-going जवळून जाणें; as, In the by-going. By-gone *a.* गत. *n.* गतगोष्ट. By-lane, by-street *n.* आडगल्ली *f*, चोरगल्ली *f*, आडरस्ता *m*. By-law [FORMERLY BIRLAW.—ICEL. *bœr*, *byr*, A VILLAGE. DAN. *by-lov*, A TOWN LAW.] *n.* आडकायदा *m*, पोटकायदा *m*, अवांतर कायदा *m*. By-matter *n.* आड गोष्ट *f*, खेरीज गोष्ट *f*, शिवायकलम *n*, गौण विषय *m*, गौणकार्य *n*. By-motive *n.* उघडपणें कबूल न केलेला हेतु-कारण *n*, आडहेतु *m*, अंतस्थहेतु *m*. By-name

*n.* पडलेलें नांव *n*, जडलेलें नांव *n*. By one's self एकट्यानेंच, जोडीला दुसरा कोणी न घेतां, दुसरें कोणी जवळ नसतां. By-passage *n*. बाजूची वाट *f*. By-past *a*. गत, गेलेला. By-path, By-way, By-road *n*. आडवाट *f*, आडमार्ग *m*, आडरस्ता *m*, चोरवाट *f*, गूढमार्ग *m*, गल्लीकुची *f*. By-place *n*. एकांताची जागा *f*. By-play गर्भनाटक, उपवृत्त, उपनाटक *n*, अवान्तर वृत्त, नाटकांतील मुख्य वृत्त अथवा कृत्य चाललें असतां रंगभूमीवरच अन्य स्थलीं घडणारें व मुख्य वृत्तान्ताला अनुकूल असें अन्य वृत्त किंवा कृत्य. By-product *n*. उपफल *n*, मुख्य पदार्थाचे अंगभूत होणारा पदार्थ *m*, आडउत्पन्न *n*; as, In manufacturing soap you should use its by-products to make candles. By-speech अप्रस्तुतभाषण *n*, चालू विषयाशीं अप्रत्यक्षसंबंधाचें भाषण *n*, विषयांतरात्मक भाषण *n*. By-stander *n*. जवळचा उभा राहिलेला माणूस *m*, तमासगीर *idio.*, मौज पहाणारा. Idle by-standers आलेभाऊ कोल्हेभाऊ *m. pl.* By the run एकदम, झटदिनीं. By-stock, by-store *n*. आडसांठा *m*. By-story *n*. उपाख्यान *n*. By-tale *n*. आडकथा *f*. By-thing *n*. कमी महत्वाची गोष्ट *f*. By-time, By-season आडवेळ *f*, भलती वेळ *f*, गैर वेळ *f*, गैर मोसम. By-view *n*. स्वहितदृष्टि *f*, स्वार्थदृष्टि *f*. By-village, By-town *n*. काणीपेठ *f*. By-word *n*. ह्मण *f*, न्याय *m*, दृष्टांतास्पद *n*. Day by day दिवसेंदिवस. Let bygones be bygones झालेल्या गोष्टी विसरून जा. One by one एकेक, एका पाठीमागून एक.

By, Bye (bī) *n*. विषयाचें उपांग *n*, वादाचें उपांग *n*, (हेतू बरोबर साधण्यासारखा) उपहेतु *m*. २ *cricket* खोट्या चेंडूचा डाव घेणें, टोला न लागतां लांब गेलेल्या चेंडूचा फायदा घेऊन केलेली धांव *f*, खोटी धांव *f*. Bye-play *n*. गर्भनाटक. By the bye, see under By.

Byre (bīr) [A. S. *byre*, a shed, a hut.—A. S. *bur*, a bower.] *n*. *a cow-house* गाईचा गोठा *m*.

Byronic (bī-ron'ik) [From the name of Lord *Byron*. Cf. Miltonic.] *a*. बायरनी, बायरनच्या कवितेसंबंधीं, बायरनसंबंधीं. B.s *n. pl.* (cf. Phillipics) *declamatory utterances or invectives in the style of Byron* बायरनसारखे ओढलेले कोरडे, बायरनी फटके. Byro'nically *adv.* Byro'nism *n*. *characteristics of Byron or his poetry, imitation of Byron* बायरनी-बायरनची लेखनपद्धति, बायरनी शैली.

Byzantine (bī-zan'tīn) [From *Byzantium*.] *a*. बायझनूशिअम किंवा कॉन्स्टन्टिनोपलसंबंधीं. B. *n*. कान्स्टन्टिनोपलचा रहिवासी *m*. Byzan'tinism *n*. ह्या रहिवाशांच्या विशेष रीतिभाती *f*, *pl.* Byzantine architecture *n*. बायझनूशिअसमधील इमारतपद्धति. Byzantine-church *n*. पूर्वेकडील किंवा ग्रीकचर्च *n*. Byzantine empire पूर्वेकडील ग्रीकसाम्राज्य *n*. (इ. स. ३९५ पासून १४५३ पर्यंत). Byzantine historians इ. स. १४५३ पर्यंतचे बायझनूशिअमूमधील ग्रीक साम्राज्याचे इतिहासकार.

# C

C (sē) इंग्रजी वर्णमालिकेंतील तिसरें अक्षर व दुसरें व्यंजन *n*. [ग्रीक गामा (ग्) किंवा सेमेटिक गिमेल ह्या अक्षरापासून C अक्षराची उत्पत्ति; ग्रीक कापा (क्) हें अक्षर जुन्या लॅटिन भाषेच्या प्रचारांतून बहुतेक गळल्यामुळें C कडूनच ग् आणि क् असे उच्चार दाखविण्याची जुन्या लॅटिन भाषेची रीत; ख्रिस्ती शकापूर्वीं सुमारें तिसऱ्या शतकांत ग् उच्चार दाखविण्याकरितां निराळ्या G अक्षराची निर्मिति; नंतरचा रोमन C अक्षरानें क् उच्चाराचा ग्रीक शब्द लिहिण्याचा जारीचा प्रघात; क् उच्चाराचीच C असलेल्या रोमनवर्ण लिपीचा सेल्टिक लोकांनीं केलेला अंगीकार; प्राचीन अँग्लोसॅक्संन लोकांत सेल्टिक वर्णलिपीची सुरवात; *e* आणि *i* ह्या स्वरांपूर्वीं इटॅलिअन व फ्रेंच भाषांत C ला 'च' व 'TS' (स्) असे मिळालेले उच्चार; उत्तर-फ्रेंच भाषेंतील क् उच्चार K आणि C ह्यांनीं व्यक्त करण्याची चाल व C अक्षराला असलेले *K* आणि *ts* (स्) असे दोन उच्चार; अशा फ्रेंच भाषेच्या वळणावर इंग्लंडांतील नॉर्मनविजयानंतर जुन्या इंग्रजी शब्दांच्या वर्णरचनेची (स्पेलिंगाची) चाळवाचाळव; जुन्या इंग्रजी शब्दांतील *Cw* बद्दल फ्रेंच वळणावर वापरलेले *qw*, *qu*; कांहीं ठिकाणीं फ्रेंच भाषेंत रूढ झालेल्या लॅटिनशब्दांतील C बद्दल Ch लिहिण्याचा प्रघात; कांहीं जुन्या इंग्रजी शब्दांत फ्रेंचच्या सहवासानें C बद्दल *K*, *Qu*, *Ch* असें लिहिण्याची रूढी; कांहीं फ्रेंच शब्दांत C चा TS (स्) असा होणारा उच्चार व कांहीं जुन्या इंग्रजी शब्दांत C (स्) बद्दल प्रत्यक्ष TS ह्या अक्षरांचा उपयोग इ. इ. प्रश्न भाषाशास्त्रजिज्ञासूंस अत्यंत महत्वाचे आहेत. युरोपांतील निरनिराळ्या भाषा जेव्हां एका रोमन वर्णलिपींत आणिल्या, तेव्हां त्या भाषांतील निरानिराळ्या शब्दांचे ध्वनि व्यक्त करण्यास कोणकोणतीं रोमन अक्षरें वापरलीं व अशा रोमन लिपींत व्यक्त केलेले एका भाषेचे शब्द दुसऱ्या भाषेंत गेले तेव्हां ते त्या दुसऱ्या भाषेशीं सरूप होतां होतां त्यांच्या वर्णरचनेंत (SPELLING) काय फरक झाला असे दोन प्रश्न भाषाशास्त्रजिज्ञासूंस अत्यंत अगत्याचे आहेत. एकाच मुळापासून उत्पन्न होऊन, ग्रीक, लॅटिन, इंग्रजी, फ्रेंच, संस्कृत इत्यादि एककुलोत्पन्न भाषांत निरनिराळ्या रूपांनीं कायम झालेल्या शब्दांत एकांतील C च्या ऐवजीं दुसऱ्यांत G, H, K, Q, S, SH ह्यांपैकीं कोणतें तरी अक्षर सांपडेल असें भाषाशास्त्रवेत्त्यांचें मत आहे; जसें, L. ACUTUS, E. ACUTE, AGUE; L. CENTUM, SK. शतम् (SHATAM); L. CORNU, E. HORN; E. SEARCH, L. CIRCARE; GR. CONDYLAS, SK. कान्ड (KANDA); L. KANO, SK. क्कण् (QUANA). *a*, *o* आणि *u* ह्यांपैकीं कोणत्याही स्वरापूर्वीं, किंवा *h* खेरीज करून कोणत्याही व्यंजनापूर्वीं, किंवा कोणत्याही शब्दाचे शेवटीं जर *C* हें अक्षर आलें तर त्याचा उच्चार क् असा होतो; जसें, CAP, COT, CUP, CLASP, EPIC. *e*, *i* आणि *y* ह्या स्वरांपूर्वीं *C* चा उच्चार स् असा होतो; जसें, CENTURY, CIS-

TERN, CYMBAL. जुन्या फ्रेंच भाषेंतून किंवा जुन्या इंग्रजी भाषेंतून जे क् उच्चाराचे *C*–अंत्यशब्द सध्यांच्या इंग्रजी भाषेंत आले आहेत, त्यांत मूळ *C* च्या ऐवजीं *K* किंवा *ck* हीं अक्षरें घालतात, जसें, BOOC (BOOK), PAC (PACK), MEEC (MEEK). कारण हा फेरफार केल्यावर अशा शब्दांपासून दुसरे शब्द साधणें सोपें पडतें; जसें, MEEC = MEEK ह्यापासून MEEKER हा प्रयोग होतो; नाहींतर MEECER (मीसर) हा प्रयोग झाला असता. ग्रीक किंवा लॅटिन भाषेंतून जे C (क्)-नें अंत्यशब्द इंग्रजी भाषेंत आले आहेत त्यांची शेवटची *C* तशीच कायम ठेविलेली असते. परंतु कांहीं थोड्या ठिकाणीं जेव्हां *e* किंवा *i* हा स्वर *C* ला जोडावयाचा असतो तेव्हां *C* बद्दल *Ck* लिहावें लागतें; जसें, TRAFFIC, TRAFFICKER. जेव्हां स् ध्वनीचें *C* अक्षर अंत्य असतें तेव्हां *C* बद्दल *Ce* लिहितात; जसें, TRACE, THRICE. आणि अशा शब्दांपुढें *a*, *o*, *u* हे स्वर आले तरी *Ce* जशीच्या तशीच रहाते; जसें, TRACEABLE. *Ci* (क्वचित् प्रसंगीं *ce*) ह्यापुढें जर एखादा स्वर आला तर त्याचा श् असा उच्चार होतो; जसें, PRECIOUS, COERCION]. २ शंभर, C हें रोमन आंकड्यांत शंभर ह्या संख्येऐवजीं वापरतात; जसें, CCC = ३००. ३ *math.* *a constant* कायमची संख्या *f*-पद *n.* ४ अव्यक्त गणितांत-तर्कशास्त्रांत-कायद्यांच्या पुस्तकांत C हें अक्षर कोणीएक त्रयस्थ पुरुष किंवा वस्तु दाखविण्याकरितां वापरतात. ५ Charles, Caius, Carbon, Current (of electricity), Centigrade ह्या शब्दांचें मोठें C अक्षर संक्षेपरूप म्हणून वापरतात. व धाकटें c हें अक्षर Chapter, Century, Caught (in Cricket), Canine (teeth) ह्यांचें संक्षेपरूप ह्मणून वापरतात. तसेंच C. A. = Chartered Accountant. C. B. = Companion of the Bath. C. E. = Civil Engineer. C. M. = Master of Surgery, or Common Metre. C. S. = Civil Service. ६ *mus.* स्वरसप्तकांतील प्रथम स्वराची संज्ञा. षड्जस्वर, षड्जग्रामालाहि हीच संज्ञा दिली आहे. ७ कालमानाच्या दृष्टीनें C हें चिन्ह मध्यलयांत चार मात्रांचें द्योतक आहे. म्हणजे एका कलेंत ४ मात्रा (क्रोचेट्स) ठरविल्या आहेत आणि ₵ हें चिन्ह द्रुतकालांत २ किंवा ४ अनुद्रुतांचें दर्शक मानिलें आहे. C = Counter tenor उच्चस्वर. C. F. = Canto Fermo गमक-खट्का वगैरे नसलेला साधा स्वर.

*N. B.*—इंग्रजी भाषेच्या कोशांत *S* खेरीज करून बाकीच्या कोणत्याही अक्षरांपेक्षां *C* ची शब्दसंख्या फार मोठी आहे. A आणि B ह्यांपैकीं प्रत्येकाची शब्दसंख्या तर मोठी आहे खरीच; परंतु एकट्या C ची शब्दसंख्या A च्या व B च्या मिळून होणाऱ्या शब्दसंख्येइतकी आहे. C च्या शब्दसंख्येचें दुसरें मान पुढें दिलें आहे. X, Y, Z, Q, K, J, N, U आणि V ह्या सर्वांची शब्दसंख्या *O* च्या तीन चतुर्थांश शब्दसंख्येंत जर मिळविली तर ती बेरीज *C* च्या शब्दसंख्येबरोबर होईल. कोणत्याहि अक्षरांतील शब्दसंख्येचें मान साधारण व विशेष अशा दोन कारणांवर अवलंबून असतें. पहिल्या प्रथम *c* अक्षरासंबंधानें आपण साधारण कारणांचा विचार करूं. J, N, V, X, Z, Y ह्या अक्षरांपुढें फक्त *a*, *e*, *i*, *o*, *u*, *y* हे स्वरच येऊं शकतात व कोणतेंही व्यंजन येऊं शकत नाहीं. ह्यामुळें वरील अक्षरांतील शब्दसंख्या फारच थोडी आहे. परंतु *c*, *p*, *s*, *b* ह्या अक्षरांचा प्रकार तसा नाहीं. ह्यांच्यापुढें स्वर तर येतातच; परंतु कांहीं व्यंजनेंही येतात; जसें, *cl*, *cr*, *pl*, *pr*, *bl*, *br*, *sp*, *sl*, *sn*. कांहीं अक्षरांपुढें तर दोन दोन व्यंजनें येतात; जसें, *spr* (spring), *spl* (split). ह्यामुळें *c*, *s* इत्यादि अक्षरांतील शब्दसंख्या फार वाढते. B अक्षरांतील शब्दसंख्येचा चौथा हिस्सा *bl* आणि *br* ह्या व्यंजनद्वयानें सुरू होणाऱ्या शब्दांचा आहे. तसेंच *C* अक्षरांतील एक पंचमांश शब्द *cl*, *cr*, *chl*, *chr* ह्या व्यंजनसंयोगांनीं सुरू होतात. ह्या वरील स्पष्टीकरणावरून *C* अक्षरांतील शब्दसंख्या वाढण्याचें एक ठळक कारण वाचकांच्या लक्षांत येईल. *C* अक्षरांतील शब्दसंख्या वाढण्याचीं तीन विशेष कारणें आहेत. पहिलें विशेष कारण, स्थूलमानानें विचार करितां *C* अक्षरांतील जवळजवळ एक पंचमांश शब्द *ch* ह्या व्यंजनसंयोगानें सुरू होतात आणि अशा शब्दांच्या मूळ उत्पत्तीचा व उच्चाराचा जर विचार केला तर हे शब्द स्पॅनिश्, वेल्श् व बोहिमिअन् ह्या भाषांच्या कोशाप्रमाणें *Ch* ह्याच संयुक्त व्यंजनाखालीं निराळे देतां येतील. परंतु इंग्रजी भाषेच्या अर्वाचीन लेखनपद्धतीप्रमाणें त्यांचा C अक्षरांतच अंतर्भाव केल्यामुळें C ची शब्दसंख्या फार वाढली आहे. C ची शब्दसंख्या वाढण्याचें दुसरें कारण असें कीं *Ce*, *Ci*, *Cy* ह्या अक्षरांनीं प्रारंभ होणारे स् ह्या उच्चाराचे शब्द C मध्येंच घेतले आहेत. त्यामुळें C ची शब्दसंख्या फार वाढली आहे. जे शब्द पूर्वीं C ह्या अक्षरानें सुरू होत असत ते सध्यां *K* ह्यानें सुरू होतात. ह्यामुळें C मधले कांहीं जुने शब्द कमी झाले आहेत खरे; परंतु अशा गळलेल्या शब्दांची संख्या फार थोडी आहे. C ची शब्दसंख्या वाढण्याचें तिसरें विशेष कारण con, contra किंवा ह्यांचीं रूपांतरें Co, Col, Com, Cor आणि Counter ह्या लॅटिन उपसर्गांचे शब्द C मध्यें पुष्कळ आहेत हें होय. Ch अक्षरांनीं सुरू झालेले शब्द बाजूला ठेवून बाकी राहिलेल्या C च्या शब्दसमूहांत जवळ जवळ निम्मे शब्द Co ह्या अक्षरांनीं सुरू होतात; व जवळ जवळ एक तृतीयांश शब्द वरील इतर उपसर्गांनीं सुरू होतात. C ह्या अक्षरांतील शब्दांच्या घटनेचा अभ्यास करणाऱ्यास तत्वतः इंग्रजी भाषेंतील शब्दघटनेचा अभ्यास केल्याचें श्रेय मिळेल. कारण C ह्या अक्षरांत इंग्रजी भाषेच्या निरनिराळ्या उगमांतून आलेले शब्द आहेत. ट्युटॉनिक् आणि स्कॅन्डिनेव्हिअन् भाषांतून, नॉर्मन-फ्रेंच भाषेंतून, सरळ लॅटिन भाषेंतून, फ्रेंचच्या किंवा इतर एक किंवा अनेक युरोपियन भाषांच्या द्वारें लॅटिन भाषेंतून, सरळ ग्रीक भाषेंतून, लॅटिनच्या किंवा इतर एक किंवा अनेक भाषांच्या द्वारें ग्रीक भाषेंतून, सेल्टिक भाषेंतून, स्पॅनिश्, पोर्तुगीज, इटॅलियन व फ्रेंच भाषांतून, इतर युरोपस्थ भाषांतून, हिब्रू, अरॅबिक, पारसी, तुर्की व इतर पौरस्त्य भाषांतून, असे सर्व प्रकारचे शब्द C च्या शब्दसमूहांत आहेत व पुढें दिलेल्या Come, Cast, Call, Cattle, Council, Country, Court, Conduct, Cross, Cathedral, Cholera, Clergy, Church, Cairn, Crag, Castle, Cork, Crusade, Cupola, Coach, Czar, Cherub, Caravan, Coffee, Check, Chess, Chouse, Calico, Camphor, Cash, Cacao, Canoe शब्दांच्या व्युत्पत्तीचा अभ्यास केल्यावर वर केलेलें विधान वाचकांस स्पष्ट होईल.

**Caaba** (kä'a-ba) [Ar. *ka'bah*, a square building.] *n.* काएबा, मुसलमान लोकांची मक्केंतील अति पवित्र मशीद *f*, हें त्यांचें महायात्रेचें सर्वांत श्रेष्ठ स्थळ आहे. २ ह्या मशीदींतील आग्नेयी बाजूचा काळा दगड *m*, हा दगड स्वर्गी-

तून आणिला आहे अशी भाविक मुसलमान लोकांची समजूत आहे.

Caaing-whale (kä'ing-hwāl) [Scot. *ca*, to drive.] *n.* एका प्रकारचा बोजड देवमासा *m.* याची लांबी १६ पासून २४ फूटपर्यंत असते व कमरेचा घेर सुमारें १० फूट असतो. हा बहुतकरून किनाऱ्याजवळ आढळतो.

Cab (kab) [Abbrev. of *cabriolet.*] *n.* क्याब, इंग्लंडांतील एकप्रकारची झांकणाची भाडोत्री गाडी *f.* Cabby, Cabman *n.* भाडोत्री गाडी हां(हा)कणारा. Cab-stand *n.* भाडोत्री गाड्यांचा अड्डा *m.* Cab-tout *n.* भाडोत्री गाड्यांचा दलाल *m.* Cabmen's shelter *n.* गाडीवाल्यांची निवाऱ्याची जागा *f.* येथें गाडीवाले भाडेकऱ्यांची वाट पहात बसतात.

Cabal (ka-bal') [Fr. *cabale*, 'the Jewes Caball, a hidden science'.;-Heb. *qābal*, to receive; *qibbēl*, to adopt (a doctrine). By a strange coincidence one of the Ministries of Charles II (1670) consisted of five members, the initial letters of whose names made up the word *cabal*: Clifford, Ashley, Buckingham, Arlington, and Lauderdale.] *n.* कट *m*, कूट *n.* २ गुप्तकारस्थानी मंडळी *f.* ३ (R.) कंत्राण-ट *n*, खलबत *m*, मसलत *f.* ४ इंग्लंडचा राजा दुसरा चार्लस याचें प्रधानमंडळ *n.* C. *v. i.* गुप्त मसलत करणें. Caballer *n.* गुप्त मसलत करणारा, पाताळयंत्री, कंत्राट्या.

*N. B.*—Cabal, Conspiracy, Combination, Plot, Faction, Machination ह्यांतील मुळचा अर्थभेद लक्ष्यांत आणून ह्यांना योग्य असे प्रतिशब्द Conspiracy शब्दाखालीं दिले आहेत.

Caballine (kab'a-lin) [L. *caballus*, a horse.] *a.* घोड्याचा, अश्वासंबंधीं, अश्वीय, अश्वोपयोगी, घोड्यास लागणारा. C. *n.* *a coarse variety of aloes used as medicine for horses* काळा बोळ.

Cabaret (kab'a-ret) [Fr. *cabane*, a hut.] *n.* *a tavern* लहान पथिकाश्रम *m*, धर्मशाळा *f*, इंग्लंडांत पूर्वीं अशा ठिकाणीं असली पेयें विकत मिळत असत.

Cabas, Caba (kab'a) [Fr.] *n.* कशिदा काढण्याचें सामान ठेवण्याची परडी *f.*

Cabbage (kab'āj) [Fr. *caboche*, lit. 'great head.'—L. *caput*, head.] *n.* *Brassica oleracea* कोबी *f*, or कोई *f*, कोबीचा कांदा *m*-गड्डा *m.* करम *n*, करमाची भाजी *f.* C. *v. i.* गड्डा होणें-येणें, कोबीसारखा शेंडा होणें-असणें; as, To make lettuce C. २ (a wick) कोजळी येणें, कोजळणें. Cabbage-butterfly *n.* कोबीचीं पानें खराब करणारा एक मोठा पांढरा पतंग *m.* Cabbage-worm *n.* कोबीचीं पानें खाऊन राहाणारा कीटक-किडा *m.* Cabbage-palm, Cabbage-tree *n.* *Areca oleracea.* एका जातीचा ताडवृक्ष *m* (याच्या फळांचा उपयोग कोबीच्या भाजीप्रमाणें करितात.), गायदड. Cabbage-rose *n.* कोबीच्या आकाराचा गुलाब *m.*

Cabbage (kab'āj) [Fr. *cabasser*, to put into a basket, from Fr. *cabas*, a basket.] *v. t.* & *v. i.* *to steal, to purloin, to pilfer, to pick* खाणें, चापसणें, चापणें, ताव *m*, देणें with वर *of o.* २ (शिंप्यानें) बेतून राहिलेलें कापड चोरणें. ३ *fig.* खाणें, वर ताव देणें. C. *n.* बेतून राहिलेलें चोरलेलें कापड *n.*

Cabbala, Cabala (kab'a-la) [Fr. *cabale*, see Cabal.] *n.* 'कब्बाला,' इस्राएली लोकांच्या धर्मशास्त्राचें परंपरागत भाष्य *n*, इस्राएली ब्रह्मविद्या *f.* जुन्या कराराची परंपरेनें आलेली गूढार्थद्योतिनी टीका *f.* ह्या विवरणांत ईश्वराच्या व मनुष्याच्या गूढ स्वरूपाचा विचार केलेला असतो; व शास्त्राच्या मुळांतील प्रत्येक अक्षराला गूढार्थ आहे अशी भाविक इस्राएल लोकांची समजूत आहे. २ गूढविद्या *f*, गुप्तविद्या *f*, रहस्यविद्या *f.* Cabb'alism *n.* कब्बालासंप्रदाय *m*-मत *n*, कब्बालापंथ *m.* २ गूढार्थत्व *n.* Cabb'alist *n.* कब्बालावेत्ता *m*, इस्राएली ब्रह्मविद्यावेत्ता *m.* Cabbalist'-ic,-al *a.* कब्बालासंबंधीं, गुप्त, गुह्य, गूढार्थक. [C. LETTER गूढार्थक अक्षर *n.*] Cabbalistically *adv.* कब्बालाला धरून, कब्बालासंप्रदायाप्रमाणें, गूढार्थाला धरून, इस्राएली ब्रह्मविद्येच्या अनुरोधानें.

Cabin (kab'in) [Fr. *cabane*, a cabin.] *n.* 'केबिण,' खोली *f*, खण *m*, पयाल (ळ) *n*, (अमलदाराची किंवा जास्त भाडें देणाऱ्या उतारूंची गलबतांतील) खोली *f.* २ *cottage* खोपट *n*, *dim.* खोपटी *f*, झोंपडी *f.* ३ (*obs.*) तंबू *m*, राहुटी *f.* C. *v. i.* गलबतांतील खोलींत राहणें.—C. *v. t.* गलबतांतील खोलींत घालणें. Cabin-passenger *n.* (गलबतांतील) केबिणींतला उतारू *m.* Cabin-boy *n.* खोलीचा तैनाती नोकर *m*, केबिणनोकर *m.*

Cabinet (kab'in-et) [Fr. *cabinet*, a closet.] *n.* (*obs.*) लहान खोली *f.* २ *a private council-room* खलबतखाना *m*; खासदिवाणखाना *m*, मंत्रिगृह *n*, मंत्रगृह *n.* ३ *a select body of ministers* मुत्सद्दीमंडळ *n*, खलबत करणारी मंडळी *f*, मुख्य मंत्री *m*, *pl*, मुख्य प्रधान *m*, *pl*, मुख्य मंत्रिमंडळ *n*, मुख्य प्रधानमंडळ *n.* ४ *a box of drawers, cells, &c.* नकशीदार खणांची पेटी *f*, खानेंदारपेटी *f.* ५ (*Shakes.*) जनावरांची राहण्याची जागा, पक्ष्यांचें घरटें *n.* The Cabinet (राज्यसूत्रें हांकणारें) मंत्रिमंडळ *n.* Cabinet-council *n.* (earlier name for the cabinet) राजाच्या मुख्य मंत्र्यांची सभा *f.* २ निवडक मंत्रिजन *n*, मंत्रिमंडळ *n.* Cabinet-edition *n.* खासगी खोलींत ठेवण्यासारखी (पुस्तकालयांतील प्रतीपेक्षां आकारानें व किंमतीनें) लहान प्रत *f.* Cabinet-maker *n.* नकशीदार पेट्या व इतर लांकडी काम करणारा सुतार *m.* Cabinet-photograph *n.* कार्डापेक्षां मोठ्या आकाराचा-मध्यम आकाराचा प्रकाशलेख *m*, खोलींत ठेवण्याचा प्रकाशलेख *m.* Cabinet-work *n.* गृहोपयोगी लांकडी सामानावर नकसकाम करण्याची कला *f*, गृहोपयोगी लांकडी सामान *n*, उपस्कर (S) *n.*

Cable (kā'bl) [M. E. *cable*.—O. Fr. *cable*.–L. L. *capulum*, *caplum*, a strong (holding) rope.—L. *capere*, to take.] *n.* लंगरदोर *m*, दोरखंड *m*, राजू *m.* (हा सुमारें ६०७ फूट लांब असतो व हा लोखंडाच्या कड्यांचा

किंवा तागाचा केलेला असतो). २ (रक्षक पदार्थानें) मढविलेली पोलादाची किंवा तांब्याची तार *f*; as, A telegraphic C. ३ सामुद्रीय तार *f.* ४ दोरखंडासारखी वेलबुट्टी. C. *v. t.* दोरखंडानें बांधणें. २ पाण्यांतील तार पाठविणें, तार देणें. ३ खांबावर दोरखंडासारखी वेलबुट्टी काढणें. Cablegram [CABLE & GR. *gramma*, LETTER.] *n.* पाण्यांतील तारेनें पाठविलेली बातमी *f.* पाण्यांतील तार *f. Colloq.* Cable-moulding *n. arch.* जाड दोरासारखा काढलेला-पीळदार कंगोरा *m.*-तोडा *m.* Cabling *n. arch.* मोठ्या खांबाच्या खांचणींत काढलेला पीळदार कंगोरा *m.*-तोडा *m.* To slip the cable लंगरदोर खालीं सोडणें. A cable's length *n.* ७२० किंवा ६०७ फूट लांबीचें जमिनीवरून समुद्राची खोली मोजण्याचें माप *n.* Submarine telegraphic cable समुद्रांतून नेलेली तारायंत्राची तार *f.* To pay out or veer out the cable दोरखंड ढिलें सोडून त्यास सरकूं देणें. To serve the cable घर्षणानें झिजून जाऊं नये ह्मणून दोरखंडाभोंवतीं दोऱ्या वगैरे गुंडाळणें.

Cabob (ka-bob') [Hind. *kabab*, a small piece of meat roasted on a skewer.] *n.* कबाब, मांस व शाख ह्यांचें पक्वान्न *n*, शिजविलेलें मांस *n.* C. *v. t.* कबाब पक्वान्नासारखें भाजणें-शिजविणें.

Caboose (ka-bōōs') [Etymology obscure.] *n.* गलबताचा ओवरा *m.*-ओयरा *m*, गलबतावरील स्वयंपाकघर *n.* २ अन्न शिजवण्याची भट्टी.

Cabotage (kab'ō-tāj) [Fr. *cabotage*, from *caboter*, to sail along the coast.] *n. naut.* किनाऱ्यालगत नौकानयन *n.* २ किनाऱ्याकिनाऱ्याजवळ गलबतांतून व्यापार करणें *n.*

Cabriole (kab'riōle') [Fr. *cabriole*, a leap, caper, from *capriola*.—L. *caper*, he-goat.] *n. a caper* (of a horse) घोड्याची टाप *f*; बकरकुदाई *f*; बकरउडी *f.*

Cabriolet (kab'-ri-ō-lā') [See Cabriole above.] *n.* 'काब्रिओले,' एका घोड्याची अर्ध्या झांकणाची गाडी *f.* [१८३० मध्यें याचें *cab* हें संक्षिप्त रूप झालें.]

Cacao (ka-kā'o) [Sp.—Mex. *kakahuatl.*] *n.* कॅकाओ झाड, हें दक्षिण अमेरिकेंत व वेस्ट इंडिजमध्यें होतें. २ कॅकाओफळ *n.* याच्या बियांपासून कोको व चाकोलेट करितात.

Cacæmia, Cachæmia (ka-kē'mi-a) [Gr. *kakos*, bad and, *haima*, blood.] *n.* दूषित रक्त *n.* Cac'æmiac *a.*

Cachalot (kash'a-lot) [Fr. *cachalot.*] *n.* कॅशॅलाट *m*, एक जातीचा देवमासा *m.* याच्या डोक्यांत एक प्रकारचा मेणकट पदार्थ असतो, व हा पदार्थ तेलांत मिसळतो.

Cache (kash) [Fr. *cacher*, to hide.] *n.* (द्रव्य, धान्य-सामुग्री, दारूगोळा, इ० लपवून)-सांठवून ठेवण्याची जागा *f*, तळघर *n.* २ लपवून ठेविलेलें द्रव्य किंवा सामुग्री *f.* Cache *v. t.* (द्रव्य-धान्य-दारूगोळा वगैरे) जमिनीखालीं लपवून ठेवणें. Cache-pot *n.* फुलझाडाची कुंडी ठेवण्याचें नक्षीदार भांडें *n.*

Cachet (kas'hā) [Fr. *cachet*, a seal, from *chacher*, to hide.] *n. a mark or seal* पत्रावरील शिक्का किंवा मोर्तब *m.* Lettre-de-chachet (letter of chachet) (Fr. Hist.) फ्रेंच राजाच्या शिक्क्याचें पत्र. असलें पत्र बहुतकरून देशबहिष्कार किंवा कैद ह्या संबंधाचें असतें.

Cachexy (ka-kek'si) [Gr. *kakos*, bad, & *hexis*, condition.] *n. a depraved condition of the body in which nutrition is everywhere defective* प्रकृतीची दुःस्थिति *f.* शरीरांतील सत्त्व धातूंना चांगलें पोषण न मिळाल्यामुळें, किंवा रक्तांतील घटक बिघडल्यामुळें, किंवा विषारी हवा शरिरांत गेल्यामुळें हा रोगटपणा व फिकटपणा येतो. Cachec'tic, Cachec'tical *a.* (v. N.) दुःस्थितभावनेचा.

Cachinnation (kak'in-ā'shun) [L. *cachinnare*, to laugh aloud.] *n. a guffa or peal of laughter* अट्टहास *m*, खदखदून हसणें *n.* Cachinnate *v. i.* खदखदा हसणें.. Cachinator *n.* Cachin'natory *a.* *of laughter* मोठ्या हशाचा.

Cachou, Cashoo (ka-shū') [Fr. *cachou*.–Cochin-China. *cay cau*, from the tree called *mimosa*, or *areca catechu*; cf. Catechu.] *n. a pill made of cashew-nut, extract of liquorice, &c. used by tobacco smokers to sweeten the breath* (श्वासोच्छ्वासाचा दुर्गंध दूर करणारी) मंजिष्ठ व काजू ह्यांची केलेली गुटिका *f.*-गोळी *f.*

Cack (kak) *n.* (*obs.*) शौचास जाणें. C. *v. i.* & *v. t.* शौचाच्या वाटेनें बाहेर लावणें. Cacking *pr. p.* Cacked *p. p.*

Cackle (kak'l) [An onomatopoetic word, lit. to keep on saying kak; cf. Gabble, Gaggle.] *v. i.* (a goose) कलकल *m.*- हंसनाद *m.*- हंसध्वनि *m*, करणें. २ (a hen, especially after laying eggs) कुक्कुटनाद करणें, नाद करणें, खुटखुट आवाज करणें. ३ हिहिहि *f.* करणें. ४ बडबडणें, जल्पणें. C. *n.* कलकल *m*, हंसनाद *m*, हंसशब्द *m.* २ खुटखुट आवाज *m*, कुक्कुटनाद *m.* ३–*act.* हिहिहि *f*, हिहि *f.* ४–*act.* &c. बडबड *f*, जल्पना *f.* Cackler *n.* हंसनाद करणारें, २ इकडच्या गोष्टी तिकडे सांगणारा, बडबड्या, बदक *n.* वडबड करणारा. Cackling *n.*

Cacochymy (ka'-kokimi) [Gr. *kakos*, bad, & *chymos*, juice.] *n. med. vitiated state of the humors or fluids of the body* रक्तदोष *m*, धातुदोष *m*, रक्तदुर्विकार *m.* Cacochym'ical, Cacochym'ic *a.* रक्तदोषासंबंधीं.

Cacoethes (kak-o-ē'thez) [L.–from Gr. *kakos*, bad & *ethos*, habit.] *n. a bad habit, an insatiable desire, a diseased passion* हाडीं खिळलेली वाईट चाल *f.* संचय *f*, कुकर्मबुद्धि *f*, कुकर्मकंडु, दुर्बुद्धि, दुर्वासना, हव्यास *m*, जबरदस्त इच्छा *f.* [CACOETHES LOQUENDI,

Calum'nious *a.* तुफानाचा, बालंटाचा, कुभांडाचा, चुगलीचा, तुफानी, बालंटी, कुभांडी, अपवादक, मिथ्याभिशंसी. Calum'niously *adv.* तुफान घेऊन, चहाडी करून, आळ घेऊन. Calum'niousness *n.*

Calvary (kal'va-ri) [L. *calvaria*, a skull, from *calva*, a bare scalp.] *n.* ख्रिस्ताला जरूशलेमनजीक ज्या एका लहान टेंकडीवर क्रूसावर चढविलें ती टेंकडी *f*, जरुशलेममधील 'कवटी,' (क्यालव्हरी) नांवाची टेंकडी *f*, क्यालव्हरी. २ (उघड्यावर उभी केलेली) क्रूसावर चढविलेल्या ख्रिस्ताची मूर्ति *f*, क्यालव्हरी. ३ (सामान्यार्थे) क्यालव्हरीचा देखावा *m*, रोमनक्याथेलिकांचें रोमनक्याथेलिक देवळांत किंवा प्रार्थनामंदिरांत (दाखविलेला) क्यालव्हरी टेंकडीवरील ख्रिस्ताला फांशीं दिलेल्याचा देखावा *m*, ख्रिस्तवधाचा देखावा *m*.

*N. B.*— क्यालव्हरी हा शब्द जशाचा तसा मराठींत घेतला आहे. वर दिलेला पहिला अर्थ विशेषनामासारखा आहे, व दुसरे दोन अर्थ त्या शब्दाला लक्षणेनें प्राप्त झाले आहेत.

Calve (käv) [A. S. *cealfian*, see Calf.] *v. i.* वांसरू-वत्स-जावपें-जोपें-जापें देणें-घालणें. २ विणें, पसवणें, प्रसवणें, जन्मणें. [That calves yearly वर्षवीण, समस्की, सामासी (शी), सामासकी. That has twice calved दुजाईत, दुवेती, दोहों वितांची.] Cal'vish *a.* वांसरासारखा. २ मूर्ख.

Calvinism (kal'vin-izm) *n.* कालव्हिनचा पंथ *m.* जान कालव्हिन हा १६ व्या शतकांतील फ्रेंच सुधारक व विद्वान् शास्त्री होता. Cal'vinist *n.* कालव्हिनपंथी. Calvinist'ic-al *a.* कालव्हिनपंथाचा. Cal'vinize *v. t.* कालव्हिनपंथी करणें.

*N. B.*—The particular doctrines of theological Calvinism are (1) Particular Election, (2) Particular Redemption, (3) Moral Inability in a fallen state, (4) Irresistible Grace, (5) Final Perseverance. For the meanings of these words in Christian Theology, see the word Theology.

Calvity (kal-viti) [L. *calvus*, bald.] *n.* बुच्चेपणा *m*, सुनेपणा *m*, टकलेपणा *m. pl.* calvities.

Calx (kalks) [L. *calx*, lime.] *n.* भस्म *n*, *spec.* राख *f*, खाख *f.* [Some of the calces are ताम्रभस्म, पारदभस्म or रसभस्म, प्रवालभस्म, मौक्तिकभस्म, लोहभस्म, वंगभस्म, सुवर्णभस्म, माक्षिकभस्म, अभ्रकभस्म, गंधकभस्म, हीरकभस्म, रत्नभस्म.] २ *lime* (R) कळीचा चुना *m.* ३ *broken and refuse glass, returned to the pots* मोडक्यातोडक्या कांचा. *pl.* Calxes, Calces.

Calyptra (ka-lip'tra) [Gr. *kalyptra*, a veil.] *n. bot.* पुट *m*, आवरणकोश *m*, पटल *n*, पिधानकफणा *m.* Calyp'trate *a.* आवरणकोश असलेला. Calyp'triform, Calyp'trimor'phous *a.* पिधानक फण्यांच्या आकाराचा.

Calyx, Calix (kāl'iks) [Gr. *kalyx*, *kalyptein*, to cover.] *n. bot. the outer covering of a flower* पुष्पबाह्यकोश *m*, फुलांचें बाह्याच्छादन *n*, पडघी (?) *f*, फुलपडघी (?), पुष्पबाह्यवटिका *f*, पुष्पाच्छादन *n*, पुष्पावरण *n*, पुट (?) *n*, दलकोश *m*, बेंबी *f*, पुष्पकलश, पेला *m*, कचोळें *n*, कर्णिका *f*, कंचुकी (R) *f*, गोंडण (R) *n*, तुरमणें (R) *n.* २ कर्णिका *f*, विवर *n.* मूत्रपिंडस्रोतस *m*, मूत्रपिंडविवर *n.* E. calyxes, L. calyces. *pl.* Calycate *a.* बाह्यावरणाचा. Calycīfe'rous *a.* पुष्पबाह्यकोश-&c. असलेला. Caly'ciflorae *n.* पुटस्थ पटलवर्ग *m*, फुलांच्या बाह्यकोशांत पुंकेसर जडलेला असतो असा फुलांचा वर्ग *m.* Calyciflō'ral, Calyciflō'rate, Calyciflō'rous *a.* पुष्पबाह्यकोशावर दळें आणि तंतु असलेली. Calyc'iform *a.* पुष्पबाह्यावरणाच्या आकृतीचा. Cal'ycine, Calyc'inal *a.* पुष्पबाह्यकोशाचा. Cal'ycle, Caly'cule *n.* क्षुद्रदलकोश, उपबाह्यकोश. Cal'ycled *a.* क्षुद्र मुकुलाचा. Cal'ycoid, Calcoi'deous *a.* पुष्पाच्या बाह्यकोशासारखा.

Cam (kam) [Dut. *cam.*] *n. mech.* स्वतः वर्तुल फिरून आपल्यावर अवलंबून असणाऱ्या जिनसाला मागेंपुढें किंवा इतर दिशेनें फिरवणारें यंत्र *n.*

Camaieu (kamā'-ū) *n.* ज्यावर नकशीचें उठाव काम आहे असें रत्न किंवा शिंप *f.* Also Cam'ayeu.

Camaraderie (kam-a-rade-rē') [Fr.] *n.* सलोखा *m*, मैत्री *f*, दोस्ती *f.*

Camarilla (kam-ar-il'a) [L. *camera*, *camara*, a chamber.] *n. a cabal* गुसकट, गुसकट करणारी टोळी, राजाला गुप्त सल्लामसलत देणारी मंत्रिमंडळी *f.* २ राजाचा खासगी दिवाणखाना *m*, लहान खोली *f.*

Camber (kam'bėr) [L. *camera*, a vault.] *n.* बाह्यगोलकमान *f*, बाह्यगोल मेहराब *f.* C. *v. t.* मेहराबदार करणें, कमानदार करणें, बांकदार करणें.

Cambist (kam'bist) [L. *cambire*, to exchange.] *n.* चलनी नाण्यांचा व्यापारी *m.* चलनी नाण्यांच्या धंद्यांत वाकबगार *m.* Cam'-bism, Cam'bistry *n.* चलनी नाणीं एकमेकांच्या मोबदला कशीं घ्यावीं अशाविषयीं माहिती किंवा ज्ञान, चलनविनिमयविद्या *f*, *n.* Cambial *a.* (R.).

Cambium (kam'bi-um) [L. *cambire*, to exchange.] *n. the mucilaginous fluid which lies between the young wood and the bark of a tree* वर्धनस्तर, युकांडवर्धनस्तर, काष्ठत्वग्जनकपेशींचा थर, कांडजीवक.

Cambrel (kam'brel) [L. *camera*, a vault.] *n.* खाटीक लोकांचा मांस टांगून ठेवण्याचा आंकडा *m*-हूक.

Cambric (kām'brik) [Said to be named from *Cambray*, in Flanders where it was first manufactured.] *n.* एक तलमसुती कापड आहे, तागाचें सफाईदार कापड *n*, केम्ब्रिक.

Came (kām) *pa. t.* of Come.

Camel (kam'el) [Fr. *camel.*—L. *camelus*—Gr. *kamelos.*—Heb. *yamal.*] *n.* male उंट, उष्ट्र. [FEMALE उंटीण, सांड, सांडीण; (-IN CONTEMPT सांडरूं

*n.* ) उष्ट्री OR उष्ट्रिका—*in jocose speech* आकाशमुनि *m.* BRIDLE OR NOSESTRING OF A C. मुकता' *m*, नथणी *f.* PIN OF IT FIXED IN THE NOSE नकील *n.* BUNCH OR HUMP OF A C. मदार *f*, डुबर *n.* C.-GROUND, C.-YARD पीलखाना, शुतरखाना *m.* GUN CARRIED UPON A C. शुतुरनाळ, सुतरनाळ *f.* LINE OR STRING OF CAMELS कतार *f*, कतारा *m.* RIDER UPON A C. सुतरस्वार. RIDER UPON A FEMALE C. सांडणीस्वार. RUBBING C. *camel that rubs* बगली उंट. SORENESS ARISING FROM RUBBING बगली *f.* SACKING FOR THE BURDEN OF A C. शलिता OR सलिता *m.* SADDLE FOR A C. पलाण *n. f.* YOUNG C. करभ *m.* BELONGING OR RELATING TO A C. उंटाचा, औष्ट्र. ] २ उंट, उंटासारखें यंत्र, समुद्रांतील रेतीमध्यें सांपडलेलें जहाज वर उचलण्याचें यंत्र *n.* Camel-backed *n. hump-backed* कुबडा, कुब्ज. Camel-bird *n. the ostrich* शहामृग. Cam'eleer, Cam'el-driver *n* सारवान. Cam'elish *a.* उंटासारखा. Cam'elry *n.* सांडणीस्वार, उंटाचें सैन्य *n*, उष्ट्रसेना *f.* Camel's thorn *n.* उंटांना आवडणारें एक प्रकारचें कांटेरी झुडूप *n.*

Cameleon, see Chameleon.

Camelopard (kam'el-o-pärd or kam-el'-opärd) [L. *camelus.*—Gr. *kamelos*, the camel & *pardalis*, the female panther.] *n. the giraffe* जिराफ *n*, उंटासारख्या उंच मानेचें पण हरिणाच्या कोटींतलें एक आफ्रिकेंतील जनावर.

Cameleopardalis ( ka-mel'o-pärd-a-lis ) *n. astron.* उंटाची मान *f*, करभ *f.* Also Camalus.

Cameo (kam'ē-ō) *n.* ज्यावर नकशीचें उठाव काम आहे असें रत्न किंवा शिंप *f.*

Camera (kam'era) [ L. *camera*, a vault. ] *n. photo.* प्रकाशलेखनाची पेटी *f.* Camera obscura काळोखपेटी, खरें प्रतिबिंब पाडण्याची पेटी *f*, अंधाराची पेटी-खोली, ह्या खोलीला एक छिद्र ठेविलेलें असतें. त्या छिद्रांतून बाहेरील पदार्थांपासून परावर्तन पावलेले किरण आंत येतात व ते छिद्रासमोरच्या पडद्यावर त्या पदार्थांची प्रतिमा उठवितात. Camera lucida (भ्रामक प्रतिबिंब पाडण्याची ) सप्रकाश पेटी *f.*

Camera (kam'ĕr-a) *n.* न्यायाधिशाची खाजगी बसण्याची खोली *f.* २ घुमटाकार-घुमट असलेली खोली *f.* Cam'erated *a.* A case heard in camera रीतीप्रमाणें उघड रीतीनें चौकशी न झालेला मुकदमा. Cam'erate *v. t.* घुमटाकार बांधणें. २ खोल्या पाडणें, घुमटासारखे खण-भाग पाडणें.

Camlet (kam'let) [ L. *camelus.*] *n.* बकऱ्याच्या किंवा उंटाच्या केसांचें केलेलें कापड *n*, बुरणुस, क्याम्लेट, कांबळें. Sometimes written as Camelot or Camblet.

Camp (kamp) [ L. *campus*, a field.] *n. ground* तळ *m*, छावणी *f*, गोट *m*, सेनानिवेश *m*, निवेश *m.* [ APPOINTED SPOT FOR A TENT IN A C. मिसल. FOLLOWING A C. ( FOR SUBSISTENCE &C. ) लष्करगिरी *f.* QUARTER OR DIVISION OF A C. गोट *m*, शिबिर *n.* ] २ लष्कर *n*, क्यांप *m*, काप *m*, लष्करी शिपायांचें कायमचें ठाणें *n.* ३ मोहिमेवर गुंतलेलें सैन्य *n.* ४ उतरण्याची जागा *f*, प्रवाशाची थोडासा वेळ राहण्याची जागा *f.* ५ तटबंदीची छावणी *f*; as, British or Roman camp. ६ एक प्रकारचें वलननृत्य *n.* ७ बटाटे आणि इतर पदार्थ नासूं नयेत म्हणून ज्यांत पुरून ठेवितात तो मातीचा ढीग *m.* Health camp (रोगाच्या सांथीपासून आपलें निवारण करण्याकरितां बांधलेल्या) झोंपड्यांची छावणी *f*- गोट *m.* C. *v. i.* तळ देऊन राहणें, डेरा-तळ देणें, ठाणें करणें, तंबू ठोकणें. २ (R) नाचणें. C. *v. t.* राहूं देणें, विश्रांतीस जागा देणें, मुक्काम करवणें. Camp-follower *n.* लष्करी मनुष्य *m*, लष्कराबरोबरचा मनुष्य *m* ( हा लष्कराबरोबर असतो परंतु लढाईत लढत नाहीं ). २ बाजारबुणगा *m.* Camp-meeting *n.* उघड जागेंतील उपदेशसभा *f.* Camp-shedding-sheeting-shot *n.* नदीच्या कांठीं मजबुतीकरितां उभारलेला तट *m.* Camp-stool or bedstead *n.* मोडून इकडे तिकडे नेतां येण्याजोगा पलंग किंवा चवरंग-घडवंची *f*, मोडपलंग *m*, प्रवाशी पलंग *m.* To pitch a camp तंबू मारणें-ठोकणें. To strike a camp तंबू उतरणें, तंबू काढून टाकणें, तंबू मोडणें.

Campaign ( kampān' ) [ L. *campus*, a field ] *n. a level tract* मैदान *n*, पटांगण *n*, सपाटी *f*, समस्थळ *n*, समथळ *n.* २ *mil.* स्वारी *f*, मुलुखगिरी *f.* ३ समरांगणामध्यें लढाईत गेलेला काळ *m*, मोहिमेचा काळ *m.* ४ (एखाद्या सामाजिक किंवा धार्मिक विषयासंबंधानें) तरफदारीची कार्यसरणी *f*, मोहीम *f*, सारखी खटपट *f.* ५ वाऱ्याची भट्टी एकसारखी चालण्याची वेळ *f.* C. *v. i.* मोहिमींत जाणें किंवा लढणें. Campagn'a *n.* नेपल्स शहरालगतचें क्याम्पेनाचें मैदान-प्रदेश. Campaign'er *n.* पुष्कळ मोहिमींतून जाऊन आलेला शिपाई *m*, फार दिवसांचा-जुना-कसलेला शिपाई *m.* To enter upon the campaign, To open the campaign मोहिम सुरू करणें.

Campanile (kampanē'le or kampanil ) [ It. *campanile*, a bell-tower, a steeple, from It. & L. L. *campana*, a bell.] *n.* (देवळालगतचा) घांटेकरितां बांधलेला घुमट *m*, देवळालगतचा घांट-घुमट *m. pl.* Campan'ili.

Campanology ( kampan-ol'o-ji ) [ L. L. *campana*, a bell & Gr. *logos*, discourse. ] *n.* घंटाशास्त्र *n.* [ घंटाशास्त्रांत घंटा कशा करतात व वाजवितात ह्यासंबंधीं माहिती असते. ] २ घंटाशास्त्रावरील पुस्तक *n.* Camp'anist, Campanol'ogist *n.* घंटावादनपटु, घंटाशास्त्रवेत्ता. Campanolog'ical *a.*

Campanula ( kam-pan'-ū-la ) [ L. L. *campana*, a bell.] *n.* पांढरें किंवा निळें घंटाकृति सुंदर पुष्प *n.* घंटापुष्प *n.* Also called Bell-flower. Campan'iform, Campan'ulate, Campa'nular *a.* घांटेच्या आकाराचा, घंटाकार, घांटेसारखा.

Campestral, Campestrian (kam-pes'tral,-trian) [ L. *campester*, from *campus*, a field.] *a. relating to, or*

*growing in an open field* मोकळ्या प्रदेशासंबंधीं, मोकळ्या जागेंत उगवणारा.

Camphine (kam'fīn) *n.* शुद्ध केलेलें टरपेण तेल *n.*

Camphire, an old spelling of Camphor.

Camphor (kam'for) [Fr. *camphre.*-from Ar. *kafur*, prob. from Sk. कर्पुर *karpura.* Cf. Malay. *kapur*, lit. chalk.] *n.* कापूर *m*, कर्पूर *m.* २ कापुरासारखा सुगंधी डीक. [Some kinds or varieties are:—चंद्रसेनी कापूर, भीमसेनी कापूर, रंभाकर्पूर.] Camphorā'ceous *a.* कापुराचा. Cam'phorate *n. a salt of camphoric acid* कर्पूराम्लाचें लवण *n.* Cam'phorate *v. t.* कर्पूरमिश्रित करणें, कापूर मिसळणें. Camphor'ic, *a*, कापुराचा. Cam'phorāte, Cam'phorated *a.* कर्पूराक्त, कर्पूरयुक्त, कर्पूरमिश्रित, कर्पूरान्वित. Camphor-liniment *n.* मद्यार्कमिश्रित कापूरतेल *n*, मद्यार्कानें तयार केलेलें कर्पूरमिश्रित तेल *n.* Camphor-oil *n.* कापरेल, कर्पूरतैल. Camphor-tree *n.* कापराचें झाड *n.* Camphor water *n.* कापरवणी *n.*

Campo santo (kam'po sant'o) [It.] *n. a burial-ground, a cemetery* खिस्ती लोकांची स्मशानभूमी *f.*

Campstone (kam'stone) *n.* एक प्रकारची पांढरी माती *f.*

Campus (kam'pus) [L. *campus*, a field.] *n.* कालेज किंवा शाळा यांचें अंगण *n*; as, The college C.

Camwood (kam'wood) *n.* कॅम नांवाच्या झाडाचें लांकूड *n*, तांबड्या रंगाचें झाड *n.* (हें झाड रंगाकरितां वापरतात.) Called also Barwood.

Can (kan) [A. S. *cunnan*, to know. See Cunning & Uncouth.] *v. i.* शकणें, समर्थ असणें (ह्याचा उपयोग साह्यकारी क्रियापदाप्रमाणें करितात.) Can but पेक्षां कांहींही ज्यास्त करूं न शकणें, फक्त (तेवढेंच) करूं शकणें; as, We can but fight. Cannot but केल्याशिवाय गत्यंतर नाहीं; as, I cannot but remember, I cannot but acknowledge. [पुष्कळ वेळां *can but* आणि *cannot but* हीं एकमेकांच्या ऐवजीं चुकीनें वापरतात.] I cannot but do this हें मला केल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. Could *pa. t.*

Can (kan) [A. S. *canne*, a can.] *n.* आंकड्याचें पंचपात्र *n*, (formerly) पेला *m.* २ धुराड्याच्या वरचें झांकण *n.* ३ डबा *m*, फळें, दूध, मांस इत्यादि ठेवण्याचा (टिनचा) डबा *m.* C. *v. t.* हवा आंत न जाईल असें ठेवणें. Canned goods *n. pl.* हवा आंत न शिरेल अशा रीतीनें (टिनच्या) डब्यांत बंद ठेवलेलें सामान *n.* Can'nery *n.* डबे भरण्याचा कारखाना *m*, मांस, फळें इत्यादि डब्यांमध्यें भरण्याचा कारखाना *m.*

Canadian (ka-nā'dian) [From *Canada*, a British province in North America.] *a.* क्यानडा देशांतलासंबंधीं. C. *n.* क्यानडाचा रहिवासी-क्यानडीयन मनुष्य *m.* Canada *n.* उत्तर अमेरिकेंतील ब्रिटिश मुलुख *m.* C. balsam, see Balsam.

Canaille (ka-nāl' or kana'ya) [Fr. *canaille.*-It. *canaglia*, a pack of dogs, from L. *canis*, a dog.] *n.* (*colloq.*) महारपोर *n*, हलक्या जातीचे लोक.

Canakin (kan'a-kin) also Cannikin.

Canal (kan-al') [L. *canalis*, a water-pipe.] *n.* कालवा *m*, पाट *m*, नाला *m*, सारणी *f.* २ *anat. a duct or passage in the body* नळ *m*, प्रणाली *f*, नळी *f.* Canalic'ular *a.* कालव्याच्या आकृतीचा. २ नळासारखा. Canalic'ulate (नळासारखी) लांब खांच असलेला. Canalic'ulus *n. anat.* हाडांतील सूक्ष्म रुधिरमार्ग *m*, क्षुद्रप्रणालिका *f*, लहानशी खांच *f.* Canalisā'tion *n.* कालवे बांधण्याचें काम *n.* [R.]. Canalise *v. t.* कालवा बांधणें, कालव्यासारखा करणें. Spinal canal कण्यांतील नळी *f.*

Canard (ka-när' or ka-närd') [Fr. properly a duck.] *n. an extravagant and absurd report, a concocted sensational report especially in a newspaper to hoax the public* कांहींतरी पिकविलेली कंडी *f*, खोटी बातमी *f*, पोकळ गप्प.

Canarese (kan a-rēz') *a.* दक्षिण हिंदुस्थानांतील कानडी देशासंबंधीं. C. *n.* कानडी मनुष्य *m.* २ कानडी भाषा. Also kanarese.

Canary (ka-nā'ri) [Fr. *canarie.*-L. *canaria insula*, one of the Canary Islands, said to be so called from its large dogs, from L. *canis*, a dog.] *n. pl.* Canaries. क्यानरी पक्षी, एक जातीचा गाणारा पक्षी *m.* २ (क्यानरी बेटांत तयार होणारी) क्यानरी नांवाची दारू *f*; as, A cup of C. ३ एक प्रकारचें चपल नृत्य. ४ (कानरी पक्ष्यासारखा) फिक्कट पिंवळा रंग *m.* C. *a.* क्यानरी बेटाचा; as, C. wine, C. birds; पिंवळट रंगाचा. Canary-bird *n.* एक जातीचा क्यानरी नांवाचा गाणारा पक्षी *m.* हा घरांत बाळगतात. Canary-grass *n.* क्यानरी पक्षी ज्याचें बीं खातात तें गवत *n*, क्यानरी गवत *n.* Canary-wood *n.* (ब्राझीलमधील) एक जातीचें काळें लांकूड *n*, क्यानरी लांकूड *n.*

Canaster, see Canister.

Cancel (kan'sel) [Fr. *canceller.*-Low L. *cancellare*, to cancel a deed by drawing lines across it.-L. *cancellus*, a grating, *pl. cancelli*, lattice-work, crossed lines. Cf. Chancel, Chancellor.] *v. t. to cross out, to obliterate, to annul* आडव्या रेघा मारून खोडणें, छ(छे)कणें, फांटा-छेका मारणें, रेघ मारणें, रद्द करणें, हरताळ देणें-लावणें, निरुपयोगी समजून टाकून देणें. [LINE DRAWN IN CANCELLING छेका *m.*] २ (समीकरणांत दोन्ही बाजूंचीं सारखीं पदें) उडविणें. ३ *print.* जुळलेलीं अक्षरें काढून टाकणें. ४ *law.* रद्द करणें. Cancelling *pr. p.* Cancelled *pa. p.* छकलेला, खोडलेला, शेरा मारलेला, रद्द केलेला. Cancel *n.* छेका *m.* २ *print.* खिळ्यांत जुळलेलीं अक्षरें काढून टाकणें *n.* ३ असा काढून टाकलेला भाग *m.* Cancellā'tion, Cancelling *n.* (v. V.) छकणें *n*, खोडणें *n*, छेका मारणें *n*, शेरा मारणें *n.*

Cancelli (kan-sel'lī) [L. a lattice, vide Cancel.] *n. pl.* जाळीदार कामाच्या आडव्या व उभ्या पट्या. २ *anat.* लहान जाळ्यासारखीं छिद्रें-रंध्रें *n. pl.*, जालसदृश विवरें *n. pl.* Can'cellated, *a. bot.* जालसदृश, जाळ्यासारखा. Cancellā'tion *n.* Can'cellous *a.* जालसदृश. Cancellous tissue जालसदृश कला *f.*, जालसदृश त्वचा *f.*

Cancer (kan'sėr) [L. *cancer*, a crab, an ulcer.] *n. astron.* कर्करास *f.* २ *med.* मांसार्बुद, कर्कटरोग *m*, दुष्टव्रण, चाळपुळी *f*, चरणारा व्रण *m*, विद्रधि *m*. ३ *crab fish* खेकडा *m*. Can'cerate *v. i.* नासूर पडणें, विद्रधि होणें. Cancerā'tion *n.* Can'cerite *n.* अश्मीभूत खेकडा *m.* Can'cerous *a.* विद्रधीचा, विद्रधीसारखा. Can'cerously *adv.* Can'cerousness *n.* विद्रधि झालेली स्थिति *f.* Can'criform, Can'croid *a.* खेकड्यासारखा. Can'cerite-crab *n.* दगडासारखा बनलेला खेंकडा *m.* Cancer of the breast थानखांडूक *n*, स्तनविद्रधि *m.* Cancerous cachexy कार्कटिक क्षय, कर्कट रोगापासून झालेला क्षय. Tropic of Cancer *geog.* कर्कवृत्त. Calms of Cancer कर्कवृत्तामधील निर्वात किंवा शांत प्रदेश.

Canchorie root-plant (kankō'ri-) (Gloriosa superba) *n.* कळलावी *f*, खड्यानाग *m.*

*N. B.*—Canchorie root-plant हा शब्द क्यांडी साहेबांच्या कोशाशिवाय कोठें सांपडत नाहीं. Gloriosa superba ह्याचा अर्थ कळलाव्या किंवा खड्यानाग ह्या बरोबर आहे.

Candent (kan'dent) [L. *candere*, to be white.] *a.* फार तापविलेला, झकाकणारा, तापवून पांढरा झालेला, चकाकणारा, तापतांना चकाकी आलेला; as, A C. vessel. Candescence (kan-des'ens) *n.* (अतिशय तापवल्यामुळें आलेली) श्वेतता *f*, तकाकी *f*, चकाकी *f*, झकाकी *f.* Candes'cent *a.*

Candid (kan'did) [L. *candidus*, white.] *a. fair, open, ingenuous, sincere* मनाचा मोकळा, आपले दोष कबूल करण्यास मागें पुढें न पाहणारा, लबाडीनें-लुचेगिरीनें आपले दोष न झांकणारा, निष्कपट, अकपट, अकृत्रिम, प्रांजल, (*pop.*) प्रांजळ, शुद्धमति, साळढाळ, स्पष्ट, सरळ, उघडा, खुलाखुला; as, A C. friend. २ *fair* &c. applied to things निष्कपट, प्रांजळ, प्रांजळपणाचा, सरळ बुद्धीचा, सरळ भावाचा; as, C. opinion. ३ न्यायप्रिय, निष्पक्षपाती; as, C. Judge. ४ (*obs.*) सफेत. Can'didly *adv.* (v. V.) उघडउघड रीतीनें, स्पष्ट रीतीनें, निष्कपट, कपट सोडून, मोकळ्या मनानें, मन मोकळें करून, निवळ, साळसाईनें, सरळबुद्धीनें, सरळभावानें. Candidness *n.* स्पष्टता *f*, प्रांजलपणा *m.*

Candidate (kan'di-dāt) [L. *candidus*, white. प्राचीन रोममध्यें उमेदवारांचा पोशाख पांढरा असे.] *n.* उमेदवार *c*, पदाभिलाषी. २ उमेद किंवा आशा धरणारा. Can'didature, Can'didateship, Candidacy *n.* उमेदवारी *f*, उमेदवारपणा *m.*

Candle (kan'dle) [L. *candela*, from *candere*, to glow.] *n.* मेणवत्ती *f*, मेणवात *f.* [C. OF WHITEST WAX कापुरी मेणवत्ती.] २ उजेड देणारा पदार्थ *m.* ३ *fig.* आयुष्याची-प्राणाची ज्योत *f.* Candle-berry *n.* क्यान्डलबेरी झाड *n.* २ क्यान्डलबेरी फळ *n.* यालाच इंग्रजींत Wax-myrtle ह्मणतात. Candle-bomb *n.* मेणवत्तीवर धरल्याबरोबर फुटून जाणारा पाण्यानें भरलेला कांचेचा गोळा *m.* Candle-coal *n.* (same as Cannel-coal). Candle-dipping *n.* साच्यांतून मेणबत्त्या करण्याऐवजीं त्या पाण्यांत बुडवून करण्याची रीत *f*, सांच्याशिवाय वातीवर मेण चढवून मेणबत्ती तयार करणें. Candle-end *n.* मेणबत्तीचा जळून राहिलेला शेषभाग *m.* Candle-holder *n.* (दुसरा काम करीत असतां त्याला उजेड दिसावा ह्मणून) मेणबत्ती धरणारा, मशालजी. २ दुसऱ्यास अल्पस्वल्प मदत करणारा. Candle-light *n.* मेणबत्तीचा उजेड *m.* २ मेणबत्ती लावण्याची वेळ *f.* Candle-lighter *n.* मेणबत्त्या लावणारा, मशालजी. २ मेणबत्ती लावावयाचा कांकडा *m.* Candle-power *n.* (प्रमाणभूत) मेणबत्तीची प्रकाशकशक्ति *f*, तेजस्सामर्थ्य, एका मेणबत्तीचा प्रकाश *m.* Candle-stick *n.* (नळीसारखें) मेणबत्तीचें घर *n.* Candle-waster *n.* रात्रीं फार वेळपर्यंत अभ्यास करणारा. Candle-wood *n.* क्यान्डल वुड नांवाचें झाड *n.* अमेरिका व मेक्सिको येथें राळेसारखीं पेटणारीं झाडें. To burn the candle at both ends, see Burn. Not fit to hold a candle to another एखाद्याशीं तुलना करण्यास अयोग्य; as; "Edith is pretty, very pretty; but she can't hold a candle to Nellie." २ चा दुय्यम होण्यास अयोग्य; as, "Others aver that he to Handel is scarcely fit to hold a candle." To hold the candle to the devil असत्याला-दुष्कृत्याला उत्तेजन देणें. To smell of the lamp or candle रात्रीचा दिवस करून पुष्कळ श्रमानें (लेखन) तयार केल्याचा वास येणें-ची झांक मारणें, स्वाभाविकपणा जाऊन कृत्रिमता भासणें. The game is not worth the candle ह्या खटपटींत श्रमाचें चीज होणार नाहीं, ह्या कामांत मेहनतीसारखें फळ नाहीं. To sell by the candle किंमत येईल तेथपर्यंत चढविणें, मेणबत्ती संपेपर्यंत लिलावांत येईल त्या किंमतीस माल विकणें. Candle-auction एक इंच लांबीचा मेणवातीचा तुकडा जळेपर्यंत लिलावांत जो ज्यास्त किंमत करील त्याला माल विकण्याची रीत *f.* ईस्टइंडिया कंपनीचा माल सतराव्या शतकांत लंडन बंदरांत या पद्धतीनें विकीत असत.

Candlemas (kan'dl-mas) [A. S. *candel*, candle + *mæsse*, mass.] *n.* 'कॅन्डलमास,' नांवाचा सण *m*, पवित्र कुमारी मरीया (Mary) इचें शुद्धीकरण नामें सणाचा दीपोत्सव *m*, (हा दुसऱ्या फेब्रुवारीस होतो. ह्या उत्सवाचे वेळीं पुष्कळ मेणबत्त्या लावतात.)

Candour (kan'dur) [See Candid.] *n. candidness* निष्कपटपणा *m*, मनाचा मोकळेपणा *m*, सरळभाव *m*, सरळ बुद्धि *f*, साळसाई *f*, दिलपाकी *f.* २ स्वतःचे अपराध झांकण्याची बुद्धी नसल्यामुळें दिसून येणारा न्यायीपणा *m*, स्वभावाचा उघडेपणा-खुलेपणा *m.* Also Candor.

*N. B.*—व्युत्पत्तीप्रमाणें Candour शब्दाचा मूळ अर्थ पांढरेपणा, श्वेतता असा आहे. ह्या मूळार्थापासून मनाची पवित्रता, निष्कलंकता, निष्कपटपणा, मोकळेपणा हे अर्थ निघाले आहेत. आपलीं व्यंगें झांकून न ठेवण्याचा-पक्षपात न करण्याचा-आंत एक बाहेर एक असें दुटप्पी वर्त्तन न ठेवण्याचा सभ्यतेला शोभणारा असा स्वभाव ज्याचा असतो, त्याला इंग्रजींत Candid मनुष्य असें म्हणतात.

Candy (kan′di) [Fr. *sucre candi.*] *n.* खडीसाखर *f.* मिसरी *f.* २ साखरेंत पाकविलेला पदार्थ *m.* मिठाई *f.* C. *v. t.* साखरेंत पाकविणें; as, To C. ginger. २ साखरेचे खडे किंवा कांडी करणें; as, To C. sugar. ३ (जसें काय साखरेच्या खड्यांनीं) झांकणें; as, "These frosts that winter brings which C. every green." C. *v. i.* साखर होणें. Candied *p.* (v. V.) पांकलेला, पांकविलेला. २ खडे झालेला-बनलेला. ३ खड्यांनीं झांकलेला. ४ *fig.* मधुभाषी, मिठास; as, C. tongue, प्रिय, मनाला संतोषकारक, कानाला गोड लागेल असें; as, C. speech.

Candy (kan′di) [Tamil.] *n.* दक्षिण हिंदुस्थानांतील धान्य मापण्याचें वजन *n.* हें सुमारें २० मणांचें असतें, खंडी. Also Candie and Kandy.

Cane (kān) [Fr. *canne.*–L. *canna*–Gr. *kanna*, a reed.] *n. bot. calamus rotang* वेत *m*, वेत्र *n.* २ *switch* वेताची छडी *f*, वेताटी *f*, वेताची काठी *f*, वेतकाठी *f*, कमची *f*, चमकी *f*, फिरण्याची काठी *f.* ३ *bot.* झाडाचा दांडारा *m*; as, A C. of a raspberry. ४ वाटोळी कांडी *f.* ५ (R.) वेताचा भाला *m*, तीर *m.* ६ मापाची काठी. C. *v. t.* वेताखालीं-छडीखालीं-&c. मारणें, वेतानें-छडीनें पाठ *f.* फोडणें, छडी चमकावणें. [To C. SMARTLY थडाथडी *f.* करणें *g. of o.*; चमकाविणें.] २ वेतानें विणणें. C. *a.* वेताचा. Cane-brake *n.* वेताचें बेट *n.* Cane-chair *n.* वेताची खुर्ची *f.* Cane-mill *n.* उसाचा घाणा *m*, चरक *m*, उंसाचें गुऱ्हाळ *n.* Cane-sugar *n.* उंसाची केलेली साखर *f.* Cane-trash *n.* चिपाड. Caning *n.* वेतानें सडकणें. Cany *a.* वेताचा. Malacca-cane *n.* (चालतांना हातांत घेण्याची एक प्रकारची) मलाका वेत-काठी *f.* Sugar-cane उंस.

Canine, Caninal (ka-nīn′,-al) [L. *caninus*, *canis*, Sk. श्वा, a dog.] *a.* कुत्र्याचा, कुत्र्याविषयीं, श्वसंबंधीं, श्वविषयक, शौन. २ *anat.* (कुत्रा अगर लांडगा ह्यांच्या सारख्या) सुळ्या दांतांचा-संबंधीं. Canines *n.* सुळेदांत. Canine appetite अतिशय भूक *f*, राक्षसी भूक *f.* Canine-letter (R) हें अक्षर. Canine-race श्वजाति. Canine-teeth (कुत्रा व लांडगा ह्यांच्या सारखे) सुळ्याचे दांत, same as Canines.

Canis (kā′nis) [L. Sk. श्वा, a dog.] *n. zool.* कुत्रे व लांडगे या जातींपैकीं प्राणी. Canis major *astron.* बृहल्लुब्धक, मोठा कुत्रा. Canisminor *astron.* लघुलुब्धक, लहान कुत्रा. Canis venatici *astron.* शामशबल.

Canister (kan′is-tėr) [L. *canistrum*, a light basket, from Gr. *kannē*, a reed.] *n.* डब्बा *m*, *dim.* डबी *f.* २ वेताची लहान टोपली *f.* ३ (नळकंडीसारखा) कुलपी गोळा *m*, शत्रूनें तोफखान्यावर हल्ला केला असतां ह्या गोळ्याचा उपयोग करितात, called also Canister-shot.

Canker (kang′kėr) [Fr.–L. *cancre*, (*chancre*).–*cancrum*, *acc. of cancer*, a crab.] *n.* दुष्टव्रण, चरणारा व्रण, मांसकोथ *m*, मांसार्बुद. २ हृद्रोग *m*; as, The C. of envy and faction. ३ कीड *f*, किडा *m*, वाळवी *f*, कसर *f.* ४ घोड्याच्या पायांत होणारा एक जातीचा रोग *m*, मसा *m.* ५ एक जातीचा रानटी गुलाब *m.* ६ कीट, गंज *m*, विष *n.* C. *v. t.* कीड लागणें, खराब करणें. C. *v. i.* खराब होणें. Cank′ered *a.* कसर-कीड लागलेला. २ विषारी. Cank′eredly *adv.* Cank′eredness *n.* Cank′erous *a.* कसरीप्रमाणें खात जाणारा. Cank′er-worm *n.* कीटक *m*, कसर *f*, वाळवी *f.* Cank′ery *a.* कसर लागलेला. २ निष्ठुर. Canker-bit *a.* वाळवीनें-कसरीनें-कसरीप्रमाणें खाल्लेला, खराब केलेला. Canker-bloom *n.* (*obs.*) एक जातीच्या रानटी गुलाबाची कळी. Canker-blossom वाळवी लागलेला मोहोर. Canker-fly *n.* फळें खाणारी माशी.

Cannabic (kan′a-bik) *a.* भांगेचा. Can′abene *n.* उडून जाणारा व उग्रवासाचा भांगेचा अर्क *m.* Cann′abin *n.* भांगेच्या झाडापासून काढलेली विषारी राळ. Cann′abis *n.* (Cannabis Indica) गांजा *m*, भांगेचें झाड *n.*

Cannel (kan′el) [Probably connected with *candle* because of the similarity in burning.] *n. chem.* शिलाजिताचा (बिट्युमेनचा) अंश असणारा कोळसा *m.* (ह्याची ज्योत तेजस्वी असते व ह्याचें तेल काढतात किंवा ग्यास तयार करितात.) Also called Cannel-coal, Candle-coal बिट्युमिनी कोळसा *m.* See Bitumen.

Cannibal (kan′i-bal) [Sp. *canibal*, a corr. of *Caribal*, a Carib, native of the Caribbean Islands.] *n.* नरभक्षक, नरमांस खाणारा, नरभोजी. २ स्वजातिभक्षक प्राणि. C. *a.* नरभक्षणसंबंधीं. Can′nibalism *n.* पुरुषाशन *n*, नरमांसभक्षण *n*, मनुष्यभक्षणवृत्ति *f.* ३ हिंसकपणा *m*, निष्ठुरपणा *m.* Cannibali′stic *a.* Can′nibally *adv.*

Cannikin (kan′i-kin) [Dim. of can.] *n.* लहान पेला *m*, पेय पिण्याचें पात्र *n.*

Cannon (kan′un) [L. *canna*, a reed. See Cane.] *n.* शतघ्नी *f*, तोफ *f*, नाळ *f*, उल्हाटयंत्र *n*, भांडें *n*, जंबुरा *m. pl.* Cannon—very rarely Cannons. [BLANK-DISCHARGES OF C. वायबार.] २ मधल्या गोटीवर आपटलेली गोटी प्रतिपक्ष्याच्या गोटीवर मारणें. C. *v. i.* तोफेचा मारा करणें. Cannonade′ *v. t.* तोफा सोडणें, (वर) तोफेचा मार-मारा करणें. Cannonade′ *n.* तोफांचा मार *m*- मारा *m*- भडिमार *m.* Cannonad′ing *n.* Cann′on-ball, Cannon-shot, Cannon-bullet *n.* तोफेचा गोळा *m.* Range of a C. गोळ्याचा टप्पा *m*, गोळ्याची मारणी *f.* Cannon-bit or Cannon *n.* एक गुळगुळीत वाटोळा गोळा *m.* Cannon-bone *n.*

घोड्याचें गुडघ्यापासून खुरापर्यंतचें मोठें हाड *n.* गुडघ्यापासून खुरापर्यंत हाडाची नळी. Cannoneer', Cannonier' *n.* गोलंदाज *m*, तोफेचें काम करणारा. Cannon-game *n.* एक प्रकारचा बिलियर्डचा खेळ *m.* Cannon-metal *n.* नव्वद भाग तांबें आणि दहा भाग जस्त यांच्या मिश्रणानें झालेली ) तोफा करण्याची धातु *f.* Cannon-proof *a.* तोफेच्या गोळ्यांनीं अभेद्य, तोफारोधक, शतघ्नीरोधक. Cann'onry *n.* तोफखाना *m*, तोफेचा मारा *m.*

Cannot (kan'ot) [*can*, to be able and Not.] *v. i.* असमर्थ असणें. I cannot away with this, *I detest it*, *I abominate it* मी त्याचा तिटकारा करितों.

Cannula (kan'ūla) [L. *cannula*, a small reed, dim. of *canna*, a reed.] *n.* (*surg.*) जलनिष्कासिका *f*, धातूची-लांकडी-रबराची-नळी. हिचा पाणी काढून घेण्याकडे प्रायः उपयोग होतो. Written also Canula *n.* Cannular *a.* वरील नळीच्या आकाराची. Cannulated *a.* पोकळ, नळीसारखा.

Canny, Cannie (kan'i) [See Can.] *a.* (R) *artful*, *cunning*, *shrewd* कावेबाज, धूर्त. २ *worldly wise* मुख्य फायद्याकडे नजर देणारा, व्यवहारचतुर. ३ *cautious*, *prudent* दूरदर्शी, सावध, विचारी. ४ *having pleasing or useful qualities*, *gentle* शांत स्वभावाचा, शांत. ५ (*obs.*) *reputed to have magical powers* जादू जाणतो अशा ख्यातीचा, अद्भुतशक्ति असणारा. Cannily *adv.* Canniness *n.* To Ca'canny सावधगिरीनें वागणें-जाणें. Not canny सुरक्षित नाहीं असा. २ कमनशीबाचा.

Canoe (ka-nōō') [Sp. *canoa*, from Caribbean *canaoa*, a boat.] *n.* डोंगा *m*, पगार *m*, (बिनसुकाणूची) होडी *f*, *dim.* होडकी *f*, होडकें (गें) *n*, प्लव *m*, द्रोणी *f*, गोजी *f.* [OUTRIGGER OF A C. उलंडी *f.* ARM OF IT बावखंड *n.*] *pl.* Canoes. C. *v. t.* होडी वल्हवणें. Canoe'ist *n.* होडी चालवणारा. Canoe'man *n.* होडींत प्रवास करणारा.

Canon (kan'-un) [A. S. *canon*, a rule.—L. *canon*, a rule.—Gr. *kanon*, a rod, a rule.—Gr. *kanne*, a (straight) cane.] *n.* *a statute*, *an institute* कायदा *m*, कानू *m*, धर्मसभेचा ठराव *m*, सूत्र *n*, नियम *m*, विधान *n*, विधि *m*, शेरा *m.* [THE SACRED C, *the books of the Holy Scriptures* शास्त्राचीं अस्सल पुस्तकें *n. pl.*] २ *a dignitary of the church under a dean* क्यानन *m*, बिशपच्या देवळांत राहून रोजची उपासना चालविणारा व सेवाधारी गायकांस शिकविणारा. ३ प्रमाण *n*, इयत्ता *f.* ४ *the catalogue of saints* संतमाला *f.* ५ *mus.* एक जातीची गीतरचना *f*, प्रबंधविशेष *m.* ६ *print.* 'क्यानन,' एक प्रकारचा सर्वांत मोठा छापण्याचा खिळा *m.* ७ *surg.* जखम शिवण्याचें शस्त्र *n.* ८ कानोना, मठवासी लोकांचा आचारनियम *m.* ९ *billiards*, see Cannon. Can'oness *n.* क्याननीण, जोगीण *f.* Canon'ical *a.* कायदेशीर, विधियुक्त, विधिप्रोक्त, धर्मशास्त्रसम्मत, सौत्र (?), स्मार्त (?); as, C. books (यथाशास्त्र मानलेलीं) अस्सल धर्मपुस्तकें, ईश्वरप्रेरित ख्रिस्ती धर्मग्रंथ. Canonical hours पर्वकाळ, शुभवेळा, धर्मकाल, प्रतिदिवशीं ख्रिस्ती लोकांतील भक्तीसाठीं नेमलेले सात समय किंवा तास. Canon'ically *adv.* यथाविधि, यथाशास्त्र, विध्यनुसार. Canon'icals *n.* ख्रिस्ती आचार्यांचा पोशा(पा)ख-क *m*; एक्लेसिएच्या कानूंत सांगितलेला ख्रिस्ती आचार्यांचा पोशाख, वकील-ब्यारिष्टर लोकांचा धंद्याचा पोषाख *m.* Canon'icate *n.* क्याननचा अधिकार-प्रांत *m.* Canonic'ity *n.* कानोनपणा *m*, धर्मानुसारें चालण्याचा गुण-स्थिति *f*, धर्मानुसारें चालणें *n.* Canonisation *n.* संतमालिकेंत गेला असें जाहीर करणें Can'onize *v. t.* साधूंच्या मालिकेंत गणणें. २ महिमा-कीर्ति वाढविणें. Can'onizer *n.* Can'onist *n.* ख्रिस्ती धर्मशास्त्रांत प्रवीण, ख्रिस्ती धर्मशास्त्री, धर्मशास्त्रज्ञ, एक्लेसिएचे कायदेकानू जाणणारा. Canonist'ic *a.* कानोन्यासंबंधीं. Canon-law *n.* (ह्यांत विवाह व इतर गृह्यसंस्कार सांगितलेले असतात.) ख्रिस्ती लोकांचें संस्कारप्रकरण, कल्पसूत्र. ह्याला आपल्यामध्यें कल्प म्हणतात. विवाहादिसंस्कारप्रकरण *n.* Canon of the mass ख्रिस्ती लोकांच्या मासनामें विधीचा मुख्य भाग.

Canopus (ka-nō'pus) *n. astron.* दक्षिण गोलार्धांतील एक नक्षत्र, अगस्ति, अगस्त्य.

Canopy (kan'o-pi) [Fr. *canope.*—It. *canope.*—L. *conopeum.*—Gr. *konopeion*, an Egyptian bed with mosquito curtains (hence, any sort of hangings).—Gr. *konops*, a mosquito, a knat, lit. 'cone-faced,' *konos*, cone and *op*, face.] *n.* छत *n*, चांदवा *m* (v. भर), छप्पर *n*, घटाटोप *m*, मच्छरदाणी *f*; as, "Golden canopies and beds of state." २ पिंजरी *f*, घटाटोप *m*, चंवरडोल *m.* [C. OF LIGHT FRAMEWORK OVER AN IDOL मंडपी *f*, चंवरडोली *f.*] ३ छत्र *n*, राजछत्र *n.* ४ थडग्यावरची छत्री *f.* ५ देवळांतील धर्माध्यक्षाच्या जागेवरील छत *n.* C. of clouds मेघमंडप *m.* C. of heaven नभोमंडळ, नभोवितान. C. *v. t.* छत लावणें-बांधणें, चांदवा बांधणें. as, "A bank with ivy canopied." Canopying *pr. p.* Canopied *pa. p.*

Canorous (kan-ō'rus) [L. *canorus*, from *canor*, melody, from *canere*, Sk. क्कण् (?) to sing.] *a. melodious*, *musical* सुस्वर-मधुर गायनाचा, मधुर गायनासंबंधीं; as, "Birds that are most canorous." Canō'rously *adv.* Canō'rousness *n.* स्वरमाधुर्य *n*, मधुरता *f.*

Cant (kant) [Prob. from O. Fr. *cant*, Fr. *chant* singing, in allusion to the singing or whining tone of voice used by beggars, from L. *canere*, *cantus.*] *n.* *the idioms and peculiarities of speech of any sect, class or occupation* (विनंति-अर्ज-प्रार्थना-स्तुति करण्याची) स्वभावानें ठरलेली भाषा *f*, श्रेणीभाषा *f*, विशेष भाषा *f*, दीनवाणी *f*, मानभावी बोलणीं, दांभिक भाषण *n.* C. *a.* दीनवाणीचा, दांभिक भाषणाचा, ढोंगी. C. *v. i.* *to speak in a whining voice* दीनवाणीनें बोलणें. २ *to talk with an affectation of religion*, *philanthropy &c.*, *to practise*

*hypocrisy* धर्मनिष्ठपणाचें सिप करणें, गोड बोलून फसवणें, (चोरांची किंवा इतर धंदेवाल्यांची) सांकेतिक भाषा वापरणें, रड गाणें. Cant'er *n.* See Canter 2. Canting *a.* दांभिक भाषणाचा.

Cant (kant) [O. Fr. an edge, an angle, from L. *canthus*, the iron ring round a carriage wheel.] *n.* बाह्य कोन, बाहेरचा कोन, सरळ रेषेपासून वांकविणें. २ धक्का *m*, हिसका *m*, झटका *m*. ३ कलंडलेली स्थिति *f*. उतार. ४ (पिंपाचे बाजूला बसविण्याचा एक) निमुळता लांकडी तुकडा *m*. ५ *naut.* नावेच्या कण्याशीं कोन करणारें लांकूड *n*. C. *v. t.* कलंडणें, कानवडा करणें. २ आंचका मारणें, फेंकून देणें. ३ लांकडाचा एक कोंपरा कापणें. Canting *n.* कलंडणें. Cant-rail *n.* आगगाडीच्या डब्यांतील छताची दांडली (दांडा), दाशा. २ सज्याचा धीर. ज्यावर सज्या-कठडा असतो तें लांकूड-तो धीर, दाशा, धीर (for small dimensions).

Cant (kant) *n.* लिलांव. C. *v. t.* लिलांवानें विकणें.

Cant (kant) *a.* चपळ, सुटसुटीत.

Can't (känt) a colloquial contraction of *Cannot*.

Cantab (kan'tab) [Abbreviated from Cantabridgian] *n. a cantabridgian* (*colloq.*) केंब्रिजचा रहिवाशी. २ (*esp.*) *a student or graduate of the University of Cambridge, England* केंब्रिज विद्यालयांतील विद्यार्थी किंवा पदवीधर; as, B. A. (Cantab.)

Cantalever (kan'ta-lēvėr) [O. Fr. *cant*, an angle & *lever*, to raise.] *n.* (कंसाकृति) खांबासारखी पल्लेदार कमान. [Written also Cantaliver, Cantilever.]

Cantankerous (kan-tang'kėr-us) [M. E. *contak*, quarrelling.] *a. ill-natured, cross, perverse, contentious* दुस्स्वभावाचा, भांडखोर, चिडखोर, हेंकट, हेकेखोर; as, "The C. old maiden aunt."

Cantata (kan-tä'ta) [It.—from *cantare*, to sing, L. *cantare*, intens. of *canere*, to sing.] *n. mus.* गाण्याचें पद्धतीवर बसवलेली कविता. Can'tatrice *n.* गाणारीण.

Canteen (kan-tēn') [Fr. *cantine.*—It. *cantina*, a cellar, cool cave (hence the sense of vessel for liquids). Perhaps from L. L. *cantus*, a corner.] *n.* क्यान्टीन *n*, लष्करी शिपायांना दारू व इतर सामान विकण्याचें दुकान *n*. २ क्यान्टीन *n*- दारू-पाणी वगैरे ठेवण्याचें तीन किंवा चार पाइन्टांचें भांडें.

Canter (kan'tėr) [An abbr. of *Canterbury gallop*. See *Canterbury gallop* under Canterbury.] *n. a moderate and easy gallop adapted to pleasure-riding* चौकचाल *f*, सात्रक चाल *f*, प्लुतगति *f*, तुर्की दुडकी चाल *f*. २ *a rapid or easy passing over* घाई-घाईनें पाहून जाणें-पाहणें; as, "A rapid canter in the *Times* over all the topics." C. *v. i. to move in a canter* चौकणें, चौकचालीनें चालणें. C. *v. t. to ride* (a horse) *at a canter* चौकचालीवर चालविणें.

Canter (kan'tėr) [Vide Cant. I.] *n. one who cants or whines, a beggar* कन्हेरी गाणें-रडगाणें गाणारा, भिकारी. २ *a hypocrite, one who uses canting language* ढोंगी, वाग्वेदांती, वाग्ब्रह्मज्ञानी, तोंडचा ब्रह्मज्ञानी.

Canterbury (kan'tėr-ber-ri) [From *Canterbury* (in England); it is the seat of the Archbishop of Canterbury (the primate of all England) and contains the shrine of Thomas a' Becket, to which pilgrimages were formerly made.] *n.* इंग्लंडांतील क्यान्टरबरी नांवाचें शहर *n*. C. gallop, *a gentle gallop such as was made by pilgrims riding to Canterbury* चौकचाल, सात्रक चाल. C. tale(s), *any tale told by travellers to beguile the time* (मूळार्थ) क्यान्टरबरी येथील टामसबेकेटच्या देवळाच्या यात्रेस जाणाऱ्या प्रवाशांना रस्त्यानें करमणुकीकरितां सांगितलेल्या गोष्टी. प्रसिद्ध इंग्रजी कवि चासर यानें Canterbury Tales या नांवाची एक अपुरी कादम्बरी लिहिली आहे. कल्पित कादंबरी *f*, क्यान्टरबरी गोष्टी *f. pl.* (करमणुकीकरितां) प्रवासांत वेळ जाण्याची गोष्ट *f*, भंडपुराण *n*.

Cantharidal (kan-thar'i-dal) [Vide Cantharis, Cantharides.] *a. pertaining to cantharides, containing or made of cantharides* स्प्यानिशफ्लाय नांवाच्या माश्यांचे. as, C. plaster. Canthar'idin *n.* स्प्यानिशफ्लाय नांवाच्या माश्यांतील पलिस्तरच्या उपयोगाचें मूलद्रव्य *n*. Cantharides *n.* See Cantharis.

Cantharis (kan'tha-ris) [L., a kind of beetle.—Gr. *kantharis.*] *n. pl.* Cantharides. स्प्यानिशफ्लाय नांवाची एक माशी *f*. इच्यापासून पलिस्तराचें औषध तयार करितात.

Canthus (kan'thus) [Gr. *kanthos*, corner of the eye.] *n.* डोळ्याचा कोंपरा *m*, नेत्रकोन *m*. Can'thi *pl.* Inner C. डोळ्याचा आंतला कोंपरा *n*. Outer C. नेत्रप्रांत *m*. नयनोपांत *m*, अपांग *m*.

Canticle (kan'ti-kl) [L. *canticulum*, a little song, *dim.* of *canticum*, a song, from *canere*, *cantus*, to sing.] *n.* (*obs.*) (लहान) गीत *n*, (लहान) स्तोत्र *n*. २ *pl.* सालोमन राजाचें गीतनामें पुस्तक *n*. ३ (*obs.*) सर्ग *m*, पर्व *m*. Can'ticum *n.* लहान गीत *n*.

Cantilever, same as Cantaliver.

Cantillate (kan'ti-lāt) *v. t.* & *v. i.* गाणें. Cantillā'tion *n.* Can'tillatory *n.*

Cantle (kan'tl) [O. Fr. *cant*, an edge or a corner.] *n.* कोंपरा *m*, भाग *m*. २ खोगिराचा उंचवट्याचा भाग *m*. C. *v. t.* (पासून) तुकडा कापून घेणें. Cantlet *n.* तुकडा *m*.

Canto (kan'tō) [L. *canere*, *cantus*, to sing.] *n. pl.* Cantos. सर्ग *m*, पर्व *m*, काव्याचा भाग *m*, अध्याय *m*. २ ढिंपेचा सूर, किनरी चिजेचा उच्च स्वरांतला भाग *m*. Cantus *n.* स्वरमाधुर्य *n*.

Canton (kan'ton) [L. L. *cantonum*, a region.] *n.* परगणा *m*, जिल्हा *m*, पेटा *m*, महाल *m*. २ निशाणीचा

अथवा चित्राचा एक भाग *m.* ३ ढालेच्या उजव्या बाजूस केलेली खूण *f.* C. *v. t.* वर्ग करणें, भाग-जिल्हे करणें. २ छावणीची जागा वांटून देणें. Can'tonal *a.* परगण्याचा. Can'tonment *n.* छावणी *f,* लष्कर *n.*

Cantor (kan'tur) [L. a singer, from *canere,* to sing.] *n. obs. a singer* गाणारा, गवई *m,* esp. *the leader of a church choir* ख्रिस्ती देवळांतील सेवाधारी गवयांचा नायक, क्यान्टर. Can'toral *a.* क्यान्टरासंबंधीं, ख्रिस्ती देवळांतील मुख्य गायकासंबंधीं. Cantoral staff मुख्यसेवाधारी गवयाची यष्टि *f.* (ताल दाखविण्याकरितां). Canto'ris *a.* गवयासंबंधीं, मुख्य गवयासंबंधीं.

Canty (kan'ti) *a.* आनंदी, उल्हासी. Can'tiness *n.*

Canvas (kan'vas) [L. *cannabis,* hemp.] *n.* क्यानव्हास, किंतान *n,* त्रिवटा *m,* ताट *m.* २ *fig.* (*a*) जहाजाचीं शिडें. (*b.*) चित्र *n.* C. *a.* चिवट्याचा, ताटाचा, किंतानाचा, चिवटी. C. *v. t.* क्यानव्हास घालणें-बसवणें. Canvas-climber *n.* खलाशी. Canvas-back *n.* क्यानव्हास रंगी पिसांचें बदक *n.* Canvas-stretcher *n.* चित्रें काढण्याकरितां क्यानव्हास ताणण्याचा फळा *m,* क्यानव्हासफळा *m.* Under the canvas शिडें सोडलेलीं आहेत अशा स्थितींत. २ वर निशाण फडकत असलेल्या तंबूंत, तंबूंत; as, "A life under canvas in the finer seasons of the year."

*N. B.* क्यानव्हास पुष्कळ प्रकारचा असतो, तो विरविरीत असतो व दट्टही असतो. लोंकरीच्या विणकामांत तेलकट-रंगाचीं चित्रें काढण्यांत व इतर वस्तु करण्यांत त्याचा उपयोग करितात.

Canvass (kan'vas) [From Canvas.] *v. t.* बारकाईनें शोध करणें, छानणें, छान करणें, छडा *m-* झाडा *m-* शोध *m-* लावणें-काढणें-करणें. २ वाटाघाट करणें, वादविवाद करणें, (गिऱ्हाईक, कामधंदा, वर्गणी इत्यादि) आर्जव-प्रार्थना-विनंति करून मिळविणें. C. *v. i. to solicit votes.* एखाद्याकरितां मतें गोळा करणें, खटपटीनें मत मिळविणें (with *for*). C. *n.* शोध *m.* २ वाटाघाट *f,* वादविवाद *m.* ३ आर्जव *f,* प्रार्थना *f,* मत मिळविण्याची आर्जवपूर्वक खटपट *f-* प्रयत्न *m.* Can'vasser *n.*

Cany (kān'i) *a. made of canes* वेताचा, वेतसमय, वेतसप्रचुर. Vide Cane.

Caoutchouc (kow'chuk) [Fr. *caoutchouc,* from Caribbean *Cahuchu.*] *n. India-rubber* रबर *m.*

Cap (kap) [A. S. *cæppe,* cap, cape, hood, from L. L. *cappa,* a cap.] *n.* बसकी टोपी. [OPPOSED TO HAT. साहेब लोकांत वृद्ध पुरुष, स्त्रिया व मुलें बहुधा बसकी टोपी (CAP) वापरतात. C. WORN BY WOMEN AND CHILDREN (AMONG THE HINDUS) टोपडें (रें) *n,* कुंचडें *n,* टकोचें. C. THAT COVERS THE EARS कानटोपी]. २ बसक्या टोपीसारखें शिराच्छादन. ३ खूण म्हणून घातलेली अधिकाराची किंवा हुद्याची टोपी. ४ टोपी काढून केलेला नमस्कार-रामराम *m;* as, "He that will give a cap and make a leg in thanks." ५ *a cap-like covering of any kind* शेंब, शेंबी *f,* टोपण *n,* (टोपीसारखें) झांकण. ६ (*a*) *archi.* मथाळा *m,* स्तंभशीर्ष. (*b*) *naut.* and *photo.* टोपी *f.* ७ शिरोमणि; as, Thou art the cap of fools तूं मूर्खांचा शिरोमणि आहेस. ८ (टोपीसारखी) डांबरी कापडाची मूठ *f.* ९ *a large size of writing paper* मोठ्या आकाराचा जाड कागद; as, फुलिस्केप कागद (foolscap). C. *v. t.* टोपी *f-* टोप *m.* घालणें, शेंबी *f-* सांब लावणें-बसवणें. २ पुरें करणें, शिखराला पोंहचवणें. ३ भंडी *f.* लावणें-म्हणणें; as, To C. a story, quotation, verses, &c. (For more meanings of the verb see the meanings of the noun). C. *v. i.* (*Shakes.*) (साहेब लोकांत) सन्मानार्थ टोपी काढणें. Capped (kapt) *pa. p.* Capping *pr. p.* Cap-case *n.* टोपी ठेवण्याचा डबा *m.* Cap'ful *n. naut.* अल्पप्रमाण. Cap and bells *lit.* टोपी आणि घंटा, खुषमस्कऱ्याच्या खुणा-विशेष सरंजाम; as, To mount cap and bells. Cap in hand *adv. phrase.* नम्रपूर्वक असा; as, "Any chance fellow who was cap in hand for a situation." A feather in one's cap *fig.* भूषण-अभिमान वाटण्यासारखी गोष्ट-कारण *n,* विजयाची खूण *f,* कीर्तींत नवीन भर *f.* Black cap, See Black. Percussion cap, *gun-cap* (बंदुकीच्या काप्यावर घालण्याचें) केप *n.* I must put on my considering cap निखालस उत्तर देण्यापूर्वी मला त्या गोष्टीचा विचार केला पाहिजे. If the cap fits, wear it जर हे शब्द तुम्हांला लागू पडतील तर ते आपल्याला लावून घ्या. Your cap is all on one side तूं कामानें अतिशय फार त्रासला आहेस. To pull caps (बायकांसारखें) चिरडीस जाऊन भांडणें. To cap the climax *to say or do something extraordinary* कांहींतरी विलक्षण करणें-म्हणणें. [THE EXERCISES AMONGST SCHOLARS CORRESPONDING TO "CAPPING OF VERSES" ARE आद्याक्षरी *f,* अंत्याक्षरी *f,* प्रतिमाला *f.*] To set one's cap at (एखाद्या स्त्रीनें लग्न करण्याच्या उद्देशानें) पुरुषाचें मन ओढून घेण्याकरितां एकसारखा प्रयत्न करणें. To throw up or fling up one's cap (आनंदातिशयामुळें) टोपी हवेंत उडवणें. To win at capping verses (एखाद्यावर) भंडी *f.* लावणें-चढविणें.

Capable (kāp'a-bl) [Fr. *capable.*–L. L. *capabilis,* comprehensible, afterwards able to hold.—L. *capere,* to hold.] *a* (*obs.*) *sufficiently capacious* मावून घ्यायाजोगा-जोगता-&c., सांठव्याचा. २ (चा) समावेश करण्यास योग्य, धारणयोग्य, लायक, ग्रहणयोग्य; as, "A room C. of holding a large number". ३ *of adequate ability* समर्थ, योग्य, लायक, कार्यक्षम, क्षम, शक्त. ४ *talented* काबील (used at present in a bad sense) बुद्धिमान्, मोठ्या बुद्धीचा. ५ मोठ्या कर्तृत्वाचा, कार्यक्षम, कर्ता. Capabil'ity, Cap'ableness *n.* (v. A. 1.) मावून घेण्याची योग्यता *f,* धारणासामर्थ्य *n.* २ शक्ति *f,* योग्यता *f,* कर्तृत्व *n,* कार्यकुशलता *f,* कार्यक्षमता *f,* कार्यसौकर्य (facility). ३ सामर्थ्य *n,* बल *n;* as "A C. to take a thousand views of a subject."

**Capacity** (kap-as'i-ti) [L. *capacitas*, from *capax*, *capacis*.—from *capere*, to take.] *n.* (v. A. 1.) *the power of containing* समावेशशक्ति *f*, सांच *m*, सांठ *m*, सांठपा *m*, घर *m*, पोट *n*, ग्रहणशक्ति *f*, समाई *f*, समावा *m*, कोठी *f*. [OF C. A MEASURE कैली, मापी, (EX. कैली खंडी-मण-शेर, &c. मापी खंडी-मण, &c.] २ *reach of the mind* आक्रमणशक्ति *f*, कव *f*, कवळ *n*, (आ)अवांका *m*, आटोका or आटंका *m*, आव *m*, बुद्धीची धांव *f*, पोहोंच *m. f.* [SUITABLE OR SUITABLY WITH ONE'S C. यथाबुद्धि, यथामति. TO BE WITHIN ONE'S C. आहारीं-अवसानांत असणें *g. of o.*] ३ *power of the mind* ग्रहण-धारणाशक्ति *f*, (आंगची-जातीची-मुळांतली) आकलनशक्ति *f.* ४ शक्ति *f*, सामर्थ्य *n.* ५ नातें *n*, अधिकार *m*, पदवी *f*, हुद्दा *m*, पेशा *m*; as, "He liked to work in the C. of a carpenter." ६ लायकी *f*, योग्यता *f*, सत्ता *f*; as, He had the C. of making a will." ७ *geom.* घनफळ *n.* ८ *phys.* ग्राहकता *f*, ग्रहणशक्ति *f.* Capā'cious *a.* *wide, spacious* ऐसपैस, प्रशस्त, सावकाश, पोटारा, विशाल, विस्तृत; as, A C. vessel. २ विशालबुद्धीचा, आटोपाचा, मोठ्या सांठप्याचा, मोठ्या आवांक्याचा. ३ मोठी ग्रहणशक्ति असलेला, मोठ्या ग्राहकतेचा. Capaciously *adv.* Capaci'ousness *n.* (v. A. 1.) पैसपणा *m*, ऐसपैसपणा *m*, प्रशस्तपणा *m*, प्राशस्त्य *n.* Capacitate *v. t.* योग्य करणें, लायक-समर्थ-कार्यक्षम करणें. Legal capacity (व्यक्तिनिष्ट) व्यवहारयोग्यता *f*, (विशिष्ट हक्क भोगण्याची) कायदेशीर योग्यता *f.*

**Cap-a-pie** (kap-a-pē') [O. Fr. (*de*) *cap-a-pie*, from head to foot.—L. *caput*, the head and *pes*, foot.] *adv.* नखशिखांत, सर्वांगभर, आपादमस्तक, डोक्यापासून पायांपर्यंत; as, "He was armed C."

**Caparison** (ka-par'is-un) [Fr. *caparacon*, from Sp. *caparazon*, a cover for a saddle, coach, &c., from *capa*, cloak, cover & suffix *azon*.—L.L. *capa*, cape.] *n.* गाशा *m*, चारजमा *m*, चारजामा. २ पाखर *f*, झूल *f.* (of an elephant or a horse). ३ चांगला-उंची पोशाख *m*; as, "My heart groans beneath the gay C." C. *v. t.* गाशा-चारजमा *m.* टाकणें-घालणें-करणें, सज्ज करणें; as, "The steeds, caparisoned with purple, stand." २ नटविणें, सजविणें, (संग्रामवारू-&c.) अलंकृत करणें; as, "I am caparisoned like a man." Capar'isoned *a.* गाशा घातलेला, शृंगारलेला, &c.

**Cape** (kāp) [L. *caput*, the head.] *n.* भूमीचें टोंक *n*, भूशिर *n*, भूशलाका *f.* २ (केप आफ गुड होप येथें तयार केलेली) केप नांवाची दारू *f.* C. *v. i.* *naut.* नेमणें(?), रोंखणें, लावणें, लागणें; as, "The ship C.s westward." गलबत पाश्चिमाभिमुख चालत आहे. The Cape केप आफ गुड होप (आफ्रिकेचें अगदीं दक्षिण टोंक). Cape-cloud *n.* *astron.* केपक्लाउड नांवाचा तारा *m.* Cape-horn current शृंगांतरीय प्रवाह, केपहार्नप्रवाह.

**Cape** (kāp) *n.* *the neck-piece of a cloak* साहेब लोकांचें केप नांवाचें उपवस्त्र *n*, हें गळ्याभोंवतीं बांधितात व निम्या पाठी व छातीपुरतें असतें.

**Capelin, Caplin** (kap'e-lin) *n.* केपेलिन नांवाचा समुद्रांतील एक लहान मासा. हा ग्रीनलंड, आइसलंड, न्यूफाउंडलंड व अलास्का यांच्या किनाऱ्यावर फार आढळतो. याचा काडमासा धरण्यासाठीं आमिषासारखा उपयोग करितात.

**Capella** (kä-pel'lä) *n.* *astron.* ब्रह्महृदयतारा *m.* (हा ओरीगान नक्षत्रांतील एक मोठा चमकणारा तारा आहे.) सार (थि) थ.

**Caper** (kā'pėr) [L. *capparis*, the caper.] *n.* केपर नांवाचें झुडुप *n*, तिळवण वर्गांतील एक वनस्पति *f.* Caper tea एक प्रकारचा केपर नांवाचा काळा चहा *m.* याचीं पानें थोडीं कुरळ असतात.

**Caper** (kā'pėr) *n.* डच लोकांचें लुटारू जहाज *n*, केपर.

**Caper** (kā'pėr) [L. *caper*, a he-goat.] *v. i.* उड्या मारणें, नाचणें, खिदळणें. [TO BOUND OR C. AS A HORSE चौक चालणें. TO JUMP AND C. ABOUT AS A CHILD टिणटिण-टणटण उड्या मारणें.] C. *n.* उडी *f*, नाच *m.* Caperer *n.* बागडणारा. Capers, Capering *n.* (v. V.)—*act.* खिदळणें *n*, नाच *m*, उड्या *f. pl.* [Wild capering बोकंदळ.] To cut a caper आनंदानें उडी मारणें, बागडणें.

**Capias** (kā'pi-as) [L. *capere*, to take.] *n.* *law.* कैदी पकडण्याचा हुकुमनामा *m.* (जामीन घेऊन किंवा गुन्ह्याची नाशाविती होऊन सोडीपर्यंत ह्या हुकुमनाम्याचा अम्मल असतो.)

**Capillament** (ka-pil'a-ment) [L. *capillus*, hair.] *n.* *obs.* (के) कंसर *n*, तंतु *m.* २ *anat.* (R) केशवाहिनी *f.*

**Capillary** (kap'il-a-ri) [L. *capillus*, hair.] *a.* *small like hair* कंसासारखा बारीक, केशतुल्य, केशसदृश, अतिसूक्ष्म. C. attraction केशाकर्षण *n.* Cap'illary *n.* *anat.* केशवाहिनी *f*, सूक्ष्म नाडी *f*, सूक्ष्मवाहिनी० *f.* कंसाच्या आकृतीची वाहिनी, केशवाहिनी (शुद्ध आणि अशुद्ध रक्त वाहणाऱ्या नाड्यांना जोडणारी), कंसासारखी वाहिनी. Capilla'ceous *a.* अतिसूक्ष्म, कंसासारखा. Capilla'rity *n.* केशाकर्षण. Cap'illose *a.* कंसाळ (R.) Capillary orifice कैशिक मुख, कैशिक छिद्र. Capillary tube कंसासारखी सूक्ष्म नळी, केशतुल्य नलिका *f.* Capillary vessel केशतुल्य वाहिनी. Capilliform *a.* केशाकृति.

**Capital** (kap'it-al) [L. *caput*, the head.) *a.* (*obs.*) *relating to the head or top* मस्तकासंबंधीं, शीर्षण्य, मूर्धन्य, वरला, वरचा, वरील. २ *principal* मुख्य, श्रेष्ठ, अग्रणी, अग्रगण्य; as, A C. city. ३ प्राणांतिक, प्राणांत, देहांत, मरणांत; as, A C. punishment. ४ *noble, excellent* खासा, नामी, उमदा, शेलका, उत्कृष्ट; as, A C. speech. ५ देहांत शिक्षेचा, मृत्युदंडार्ह; as, A C. crime. ६ मोठा, as, A C. letter. C. *n.* *archi.*

खांबाचा मथाळा *m*, स्तंभशीर्ष *m*. २ *the chief city* राजधानी *f*, राजनगर *n*, मुख्य नगर *n*, तख़्ताची जागा *f*. ३ *the trade's stock* मुद्दल *n*, पुंजी *f*, भांडवल *n*, मूलधन *n*. ४ *a large letter* मोठा वर्ण *m*, मोठें अक्षर *n*. ५ सत्ता *f*. अधिकार *m*. वाढविण्याचा उपाय *m*, फायदेशीर साधन *n*. उपयोग *m*; as, He has made a C. out of his enemy's position. ६ (*obs.*) प्रकरण *n*, बाब *f*. Capitaliz-sation *n*. मुद्दल आकारणें *n*, मुद्दलाचें किंवा मूळ भांडवलाचें रूप देणें. २ मोठ्या अक्षरांनीं छापणें *n*. Capitalize-se *v. t.* मुद्दलाचें स्वरूप देणें, मुद्दल आकारणें. २ मोठ्या अक्षरांनीं छापणें. Cap'italist *n*. पुंजीवाला, भांडवलवाला, मुद्दलवाला, भरणेकरी (?). Cap'itally *adv.* प्राणांत शिक्षेनें, देहांत शिक्षेनें. २ उत्तम रीतीनें, उत्कृष्ट रीतीनें (*colloq.*). Cap'itate *a. bot.* टांचणीच्या शिरोभागासारखा, टांचणीसारखा शिरोभाग ज्या स्त्रीकेंसरास आहे असा, अणकुचीदार, कीलमुंडाकार. Capitā'tion *n*. शिरोगणना *f*, शिरोगणती *f*. २ डोईपट्टी *f*, माणुसपट्टी *f*, दरव्यक्तीवरचा कर *m*. Circulating or floating Capital फिरतें भांडवल (कामगारांची मजुरी व कामांत वापरलेला कच्चा माल ह्यांना हें नांव देतात), अस्थाई भांडवल. A fixed Capital स्थिर-कायमचें भांडवल (कारखान्याचा इमला व तेथील यंत्रें, हत्यारें यांना कायमचें भांडवल असें नांव दिलें आहे). To hold lands in Capital खुद्द राजापासून जमीन मिळविणें. To make Capital out of (चा) फायदेशीर उपयोग करून घेणें, (क्षुल्लक गोष्टीचा बराच वडीजाव करून) फायदा करून घेणें. Capital stock व्यापारांत घातलेलें भांडवल *n*. To live on one's Capital (मूळ भांडवलांत भर टाकल्याशिवाय किंवा ज्यास्त पैसा मिळविल्याशिवाय) भांडवलच खर्च करणें, पदरमोड करून उदरनिर्वाह करणें. To speak in Capitals कांहीं शब्दांवर जोर देऊन बोलणें, कांहीं शब्द ठांसून उच्चारणें. Capitation-tax डोईपट्टी.

Capitol (kap'it-ol) [L. *capitolium*, from L. *caput*, the head. CAPITOLIUM हें प्राचीन रोमन लोकांच्या 'ज्युपिटर' देवाच्या देवळाचें नांव आहे. कारण ह्या देवळाचा पाया खणीत असतांना (CAPUT) मनुष्याचें डोकें सांपडलें होतें. ज्या टेंकडीवर हें देऊळ बांधलें होतें त्या टेंकडीलाही CAPITOLIUM असें नांव पडलें होतें, व ह्या टेंकडीवरच प्राचीन रोम शहरांतील राज्यव्यवस्था ठरविण्याकरितां सभासद जमत असत.] *n*. प्राचीन रोम शहरांतील ज्युपिटरचें देवालय. २ रोमी सभासदगृह. ३ अमेरिकेंतल्या युनायटेड् स्टेट्समधील राष्ट्रीय सभा भरण्याची वाशिंगटन् येथील जागा, 'क्यापिटाल.' Capitō'lian, Capit'oline *a*. ज्युपिटरच्या देवालयासंबंधीं-देवालयाचा.

*N. B.* Senate सभासदमंडळ, सभासदगृह, मंत्रिसभा. Syndicate तंत्रीसभा, कारभारीमंडळ, कार्यकारी मंडळ.

Capitulate (kap-it'ūl-āt) [L. *capitulare*, to arrange under heads, from *caput*, the head.] *v. i.* (*obs.*) *to draw up in articles* कलमबंदी *f*. करणें, कलमवार लिहिणें-करणें. २ *to surrender upon terms* कौलानें-कौल मागून-कौल घेऊन सोडणें, वश होणें, शरण जाणें, &c., कौलास येणें. [TO WAVE A FLAG OR CLOTH IN INDICATION OF CAPITULATING रुमाल *m*. फिरवणें-उडवणें.] C. *v. t.* (R.) (तहाच्या अटी ठरवून) स्वाधीन करणें. Capitulā'-tion *m*. तह *n*. २ (शत्रूच्या) स्वाधीन होणें *n*. ३ तहाचा करारनामा *n*. Capitulator *n*. तह करणारा *m*, तह करून शरण जाणारा *m*. Capit'ulatory *a*.

Capitulum, Capitellum (ka-pit'ūl-um) [L. dim. of *caput*, the head.] *n*. गुच्छ, मंजरी(?), पुष्पगुच्छ. [ज्याप्रमाणें डोक्यावर केसांची मांडण असते त्याप्रमाणें देंठाच्या टोंकावर फुलांची मांडण असलेला पुष्पगुच्छ. उदाहरणार्थ—सूर्यकमळ, झेंडू, शेवती, गेंद इ.] २ *anat.* अस्थिगुच्छ *m*, हाडाचा शिरोभाग (मुख्यत्वेंकरून फांसळीच्या शिरोभागाला हा शब्द लावितात). Capit'ular *a*.

*N. B.* सूर्यकमळ वगैरेंचें जें एकच फूल बहुशः समजलें जातें तें लक्ष्यपूर्वक पाहिल्यानें एकच नसून तो पुष्पसमुदाय आहे असें लक्षांत येईल. प्रत्येक फुलास वेगळा देंठ नसावा आणि फुलें बहुतेक एकाच पातळीवर असावींत असें याचें लक्षण आहे. Capitulum = गुच्छ, and spike मंजरी.

Capon (kā'pn) [L.-Gr. *koptein*, to cut.] *n*. खच्ची केलेला गुबगुबीत कोंबडा *m*. Caponise-ze *v. t.* गुबगुबीत करण्याकरितां खच्ची करणें; as, To C. a cock.

Capon (kā'pun) [Fr.] *n*. मासा *m*. २ लेख *m*, प्रीतिपत्र *n*.

Caprice (ka-prēs') [Fr.-L. *capra*, a she-goat.] *n*. तव्यत *f*, लहर *f*, छंद *m*, हुक्की *f*, तरंग *m*, चंचलता *f*. Capri'cious *a*. लहरी, चंचलबुद्धीचा, ऐच्छिक, छंदखोर, क्षणिकबुद्धि. २ (temper) चंचलपणाचा, चंचलबुद्धीचा, क्षणिकबुद्धीचा. Capri'ciously *adv.* लहरीनें, छंदिष्टपणानें, लहर येऊन. Capri'ciousness *n*. (v. A. 1.) लहरीपणा *m*, छंदीपणा *m*, चांचल्य *n*, चंचलता *f*, चंचलबुद्धि *f*, उचलचावडेपणा *m*.

Capricorn (kap'ri-korn) [L. *capricornus*, *caper*, a he-goat, and *cornu*, a horn.] *n*. *astron. the tenth of the twelve signs of the zodiac* मकर *m*. entrance of the Sun into C. मकरसंक्रांति *f*, मकरसंक्रमण *n*. [THIS IS THE FIRST DAY OF उत्तरायण OR THE SUN'S APPARENT COURSE IN THE NORTHERN DIRECTION. THE DAY IS CONSIDERED SACRED BY WAY OF HAILING THE ADVENT OF A WARMER AND MORE SUNNY PERIOD OF THE YEAR. SOME OF THE NUMBERLESS RITES OR ACTS COMMON AMONG HINDU WOMEN UPON THE OCCASION ARE अवा लुटविणें, खेळणें, रांगणें, सुगडें वसणें AND SOME OF THE OFFERINGS MADE TO PRIESTS OR GIFTS INTERCHANGED AMONGST THEMSELVES ARE अचळवीवाण, घासग्रास, चिरचोळी, तिळगूळ, तिळवण, पाटपोट, रसरंग, हिरेदिवे.] The Tropic of Capricorn मकरवृत्त.

Caprification (kaprifikā'shun) [L. *caprificus*, the wild fig-tree,—*caper*, a he-goat & *ficus*, a fig, from goats feeding on it.] *n*. *the fertilization of the fig*

*by insects, branches of the wild fig being placed among the cultivated kind; the subsequent fertilization is attributed to the punctures of an hymenopterous insect* कीटकांच्या सहाय्यानें अंजीर पिकविण्याचा प्रकार; जंगली अंजिरांच्या डहाळ्या उत्तम जातीच्या अंजिरांच्या डहाळ्यांजवळ ठेवतात आणि त्यामुळें जे कीटक उत्तम अंजीर पिकवितात तेच त्या डाहाळ्यांतील कच्च्या अंजिरांत शिरून त्यांत आपलें घरटें करितात व असें झालें ह्मणजे जंगली अंजिरांचेच चांगले स्वादिष्ट अंजीर तयार होतात. २ *fecundation by artificial means* कृत्रिम रीतीनें अंजीर तयार करण्याचा प्रकार. Cap'rificate *v. t.* कीटकांच्या साहाय्यानें कृत्रिम रीतीनें जंगली अंजीर पिकविणें.

Capriform (kap'riform) [L. *caper*, a he-goat & *forma*, form.] *a.* बकऱ्याच्या आकाराचा, बकऱ्यासारखा, अजाकृति.

Caprine (kap'rin) [Vide Capriform.] *a.* बकऱ्याप्रमाणें.

Capriole (kap'ri-ōl) [L. *caper*, a he-goat.] *n.* बकरकुदा(द)ई *f*, बकरकुदी *f.* २ नाचांतील एक प्रकारची उडी *f*, पाऊल पुढें टाकल्याशिवाय तेथल्या तेथेंच मारलेली उंच उडी *f.* C. *v. i.* (पाऊल पुढें टाकल्याशिवाय तेथल्या तेथेंच) उडी मारणें, बागडणें.

Capsicum (kap'si-kum) [L. *capsa*, a case, its berries being contained in pods or capsules, from *capere*, to take hold.] *n. bot.* मिरची *f.* Capsicum annum (chillies) लाल मिरची. Cap'sicine *n. chem.* मिरचींतील कारक द्रव्य *n.*

Capsize (kap-sīz') [L. *caput*, the head; Sk. कपाल, the forehead.] *v. t.* उलथा-उपडा करणें, उलथणें. C. *v. i.* उलटणें.

Capstan (kap'stan) [L. *capistrum*, a halter.] *n.* (दोरखंडानें) नांगर उठविण्याचें यंत्र *n*, कापसिन, मोठाली ओझीं उचलण्याचें यंत्र.

*N. B.*—पाण्याच्या रहाटास दोरी गुंडाळली जाऊन घागर जशी वर येते त्याप्रमाणेंच नांगर अगर इतर ओझें ह्या कापसीन यंत्रानें वर आणतां येतें. भेद इतकाच कीं रहाट आडवा असतो व हें यंत्र उभें असून फिरतें असतें व दोरी चक्रावरून खालीं सोडलेली असते, व यामुळें हें पांच चार माणसांना फिरविण्यास सोईवार पडतें.

Capsule (kap'sūl) [L. *capsa*, a case, & *capere*, *capsus*, to hold.] *n. bot.* बोंड *n*, (फुटीर-स्फुटनशील) पुटफल; as, भेंडा. २ *photo.* संपूट, एक जातीची चिनई मातीची उभट बशी *f.* ३ (शिसारी येणारें औषध घेण्यास सुलभ पडावें ह्मणून) जिलाटिनचें तकतकीत पुट *n*-वेष्टन *n.* ४ (शिशीच्या बुचावर बसविण्याचें) धातूचें टोपण *n.* ५ काडतुसाचें वेष्टन *n.* ६ *anat.* कोश, पुट, पिशवी. Cap'sular, Cap'sulary *a.* बोंडाप्रमाणें पोकळ, बोंडाचा, टोपण-वेष्टन-पिशवी असलेला. Cap'sulated *a.* जिलाटिन (gelatin) च्या पिशवींत घातलेला-वेष्टण असलेला.

*N. B.*—बीजकोश हा Capsule ला योग्य प्रतिशब्द नाहीं. Achœnium, Berry, Capsule, Drupe, Follicle, Legume, Silique, इत्यादि फळांच्या जातींना आमचे पारिभाषिक शब्द आम्ही Fruit शब्दाखालीं देणार आहोंत.

Captain (kap'tān) [O. E. *capitain*, *captain*.—Fr. *capitaine*.—L. L. *capitanus*, from L. *caput*, the head.] *n. a chief officer* नाईक *m*, प्रमुख, नेता, सेनाधिकारी *m*, सरदार *m*, (चेंडू वगैरे खेळणाऱ्या मंडळीचा) नाईक *m*, कप्तान *m.* २ (of a ship) कप्तान *m*, नाखवा *m*, तांडेल *m*, नौकाध्यक्ष *m*, नौकाधिपति *m.* ३ (of a band, gang, &c.) नायक *pop.* नाईक *m*, नायकडा *m*, नायकवडा, म्होरक्या *m.* ४ (of a body)—as, of spearmen, couriers, peons, labourers, &c. नाईक, हवालदार, जमादार, मिरधा, मुकादम. ५ *the commander of a company in a regiment* कप्तान. ६ *one skilled in war* युद्धकुशल, योद्धा *m.* ७ वर्गाचा कप्तान, शाळेंतील वर्गाची व्यवस्था ठेवणारा मुलगा *m.* C. *a.* (R.) श्रेष्ठप्रतीचा-धैर्याचा. C. *v. t.* पुढाकार-पुढार घेणें. Cap'taincy, Captainship *n.* नाइकी, नायकवडी, पुढारकी, कप्तानी *f*, सरदारी *f*, सरदारकी *f*, आधिपत्य *n*, स्वामित्व *n.* २ कप्तानाची जागा *f*- पदवी *f*, नौकाधिपतीची पदवी *f*, कप्तानी *f.* ३ युद्धकौशल्य *n.* Captain general *n.* सैन्याचा मुख्य *m*, सरनाईक *m.*

Caption (kap'shun) [L. *captio*, a taking, a sophistical argument, from *capere*, to take.] *n.* (*obs.*) धरणें *n.* २ (R.) युक्तीनें पकडणें *n.* ३ (भांडण उकरून काढण्याच्या हेतूनें) तकरार करणें *n.* Cap'tious *a. censorious, cavilling, carping, given to cavil* दोषैकदृष्टीचा, निंदक, दूषक, तकरारी, आडफांट्या. २ *fitted to harass or perplex, invidious, troublesome* पकडीचा, धरपकडीचा, पेंचबांधाचा. ३ *proceeding from a cavilling disposition* दोषदृष्टीपासून उत्पन्न होणारा, दोषैकदृष्टीचा, दिक्कतखोरीचा, हुजतखोरीचा, आडफांट्याचा. Cap'tiously *adv.* (v. A.) दिक्कतखोरीनें, तकरारीनें, आडफांटे फोडून, &c. Cap'tiousness *n.* (v. A. 1.) दोषदृष्टिस्वभाव *m*, दिक्कतखोरी *f*, हुजतखोरी *f*, तकरारखोरी *f*, निंदकता *f*, पेंच *m.* (used as an abstract noun).

Captivate (kap'tiv-āt) [L. *captivatus p. p.* of *captivare*, to capture, from *captivus*, captive.] *v. t. to take prisoner* (*obs.*) युद्धांत पकडणें-धरणें-पाडाव करणें. २ *to fascinate, to enchant* मोहून वश करणें, मोहणें, भारणें, मोह *m*- मोहनी *f*- घालणें, मोहित करणें; as, Cleopatra captivated Antony. Cap'tivāting *a. charming, engaging, pleasing* मोहक, वश करणारा, मोहित करणारा, मनो(न)मोहक, मनोवेधक; as, C. smiles, manners, &c. Cap'tivation *n.* (R.) मोहन *n*, मोहित करणें *n*; as, The C. of our understanding.

Captive (kap'tiv) [L. *captivus*, from *capere*, to take.] *n.* लढाईंतला कैदी *m*, युद्धदास *m.* २ प्रेमपाशबद्ध. ३ सौंदर्यानें लोभित झालेला. C. *a.* युद्धांत धरलेला, पाडाव केलेला, युद्धधृत, युद्धगृहीत. २ मोहित झालेला. ३ बंधनकारक, कैदखान्यासंबंधीं; as, C. chains, बंदिवासाचा; as, C. hours. C. *v. t. to take prisoner, to*

capture कैदी-बंदीवान करणें; as, "Their inhabitants slaughtered and captived." Cap'tivaunce *n.* बंधन *n*, दास्य *n*, कैद *f.* Captiv'ity *n.* युद्धदास्यत्व *n*, बंदी *f*, कैद *f.* २ वशीभूतता *f*, प्रेमपाशबद्धता *f.* Cap'tor, Cap'turer *n.* (v. V.) युद्धांत धरणारा, पाडाव करणारा, धरणारा. Cap'ture *n.* (v. V.) *act.* धरणें *n*, पाडाव *m*, निग्रह (S) *m.* २ *the thing taken by force* पाडावजिन्नस *m*, जितद्रव्य *n*, लढाईंत हस्तगत केलेली वस्तु *f.* C. *v. t.* युद्धांत धरणें, पाडाव करणें, धरणें. २ बळजवरीनें हस्तगत करून घेणें. Captured *p.* (v. V.) युद्धांत धरलेला-पाडाव केलेला.

Caput (käp'ut) [L. *caput*, the head.] *n. pl.* Capita डोकें *n*, वस्तूचें वरचें टोंक *n*, अग्र *n.* २ *anat.* See Capitulum. Caput mortuum [L. the dead head.] *n. the worthless remains* चोंथा *m*, गाळ *m.*

Car (kär) [O. Fr. *car*, *char.*—L. *carrus*, a wagon.] *n.* गाडी *f.* २ *a chariot of war or splendour* रथ *m*, स्यंदन *m.* ३ रेल्वेची-ट्राम्वेची गाडी *f*- डबा *m.* ४ विमानांत बसण्याची टोपली *f.* [CELESTIAL C. विमान *n.* FESTIVAL OF CARS रथोत्सव *m.*] ५ *astron.* सप्तऋषि नांवाचे सात तारे. हे उत्तरगोलार्धांत असतात. Also called Charles's Wain, the Great Bear or the Dipper. Car'man *n.* गाडी हांकणारा.

Carabine (kar'a-bīn) Carbin [Fr.] *n.* करावीन, करवली, कडाबीन, बंदूक, दामा, घोडेस्वारानें वापरण्याची बंदुक *f.* Car'abineer', Car'bineer' *n.* करवली बंदूक वापरणारा, करवल.

Caracole (kar'a-kōl) [Fr. *caracol*, *caracole*, a snail, whence *faire de caracole*, applied to a manœuvre by soldiers, and to turns made by a horse:—Sp. *caracol*, a snail, a winding staircase, a turning about.] *n.* घोडेस्वारांनीं घेतलेली अर्धी चक्कर *f.* २ चाटोला जिना *m.* C. *v. i.* घोडेस्वाराप्रमाणें अर्धी चक्कर घेणें; as, "Prince John caracoled within the lists." इकडे तिकडे नाचणें. C. *v. t.* घोड्याकडून अर्धी चक्कर घेववणें.

Carafe (ka-räf') [Fr.] *n.* पाणी ठेवण्याचें कांचेचें भांडें *n*, कुपी.

Caramel (kar'a-mel) [Fr. *caramel*,—L. L. *cannamellis*, *cannamella*, sugar-cane, from *canna*, reed & *mel*, *mellis*, honey.] *n.* (साखरेला चारशें अंशांची उष्णता देऊन बनविलेला काळया किंवा तपकिरी रंगाचा चिकचिकीत पण ठिसूळ) पक्का पांक *m.* गुलाबछडी करण्याकरितां अशा प्रकारचा पांक तयार करतात.

Carapace (kar'a-pās) [Fr.—Sp. *carapacho.*] *n. zool. the shell of the crab or tortoise* कांसव-खेकडा इत्यादि प्राण्यांची पाठ *f*, पाठीची कठीण कवची *f.*

Carat (kar'at) [Fr. *carat.*—It. *carato*:-Gr. *keration*, seed of pulse: Ar. *kirat* (*qirat*), a small weight; *kuara*, name of a plant whose beans in Africa are used as weights for gold.] *n.* क्यारट *m*, हिरे इत्यादि जवाहीर तोलण्याचें वजन *n.* [एक क्यारट हा एक रती व एक आणा यांवरोबर आहे. क्यारट हा पूर्वीं तीन पूर्णांक एक तृतीयांश ग्रेनवरोवर असे पण आतां तो तीन पूर्णांक एक पंचमांश ग्रेनवरोवर धरतात.] २ सोन्याच्या शुद्धतेच्या प्रमाणाचें क्यारट नांवाचें माप *n.* [आपल्याकडील शंभर नंवरी सोनें चोविस क्यारटवरोवर समजलें जातें. एखाद्या सोन्यांत जर बावीस भाग शुद्ध सोनें व दोन भाग इतर हीण धातु असेल तर तें सोनें बावीस क्यारटचें आहे असें म्हणतात.]

Caravan (kar'a-van) [Pers. *karwan.*—Ar. *quirawan.*] *n.* काफला *m*, पथिकसमुदाय *m*, सार्थ *m*, पथिकसमूह *m.* [C. OF HORSE-DEALERS कारवान *m.*] २ लमाणांचा तांडा *m.* ३ हिंस्रपशु ठेवण्याची गाडी *f*- पिंजरा *m.* ४ हिंस्रपशूंचें फिरतें प्रदर्शन *n.* ५ प्रदर्शनांतील गांवोगांवीं नेण्याची मोठी गाडी *f.* ६ माल व उतारू नेण्याची मोठी गाडी *f.* कधीं कधीं *caravan* बद्दल नुसतें *car* म्हणतात. Caravaneer *n.* सार्थनायक. Caravan'sary, Caravan'sera *n.* सराई *f*, धर्मशाळा *f*, पथिकशाला *f.*

Caravel, Carvel (kar'a-vel, kar'vel) [F.—It. *caravelia*, a kind of ship.] *n. a small fishing-vessel* लहान मच्छमारी नौका, मासे मारण्याची होडी *f.* २ *a Turkish man of war* तुर्की लढाऊ गलबत.

Caraway (kar'a-wā) or Carum [Gr. *karon.*] *n.* ओंवा, जिरें ह्यांच्या जातीचें धान्य *n.* [CARUM COPTICUM ओंवा, अजवान, अजमोदा. CARUM CARUI जिरें. CARUM NIGRUM शहाजिरें.]

Carbazotic (kar-ba-zot'ik) [*carbon* and Azote.]

Carbine (kär'-bīn) *n.* 'कारबीन,' घोडेस्वाराकरितां लहान बंदुक *f.* See Carabine.

Carbolic-acid (kar-bol'ik-as'id) *n. chem.* कोलटार (coal-tar) पासून काढलेलें पूतिनाशक तेल *n*, कार्बालिक तेल *n.* See Coal-tar.

Carbon (kär'bon) [L. *carbo*, *carbonis*, coal.] *n. chem.* शुद्ध कोळसा *m*, अंगार(?)*m*, कार्बान, कर्ब. हें एक रासायनिक मूलतत्व आहे. याचा अणुभारांक ११.९७. Carbide *n. chem. a binary compound of carbon with some other element or radical, in which the carbon plays the part of a negative* कर्ब व एखादी धातू ह्यांचा संयुक्त पदार्थ *m*, कर्बाइत. Formerly called Carburet. Carbonā'ceous, Carbon'ic *a.* कारवानसंबंधीं, कारबान वायु असलेला, कर्बवायूसंबंधीं. Carbonate *n.* कारवानमय लवण, कार्बानिक अम्ल आणि एखादें भस्म (base) यांपासून झालेलें लवण. Carbonated *a.* Carbonif'erous *a.* शुद्ध कोळसा उत्पन्न करणारें. Carbonisā'tion *n.* कार्बान-शुद्ध कोळसा बनविणें. Car'bonise *v. t.* कारबानाच्या-शुद्ध कोळशाच्या रूपांत आणणें. Carbonic acid प्राणवायु (oxygen) आणि कर्ब (carbon) यांपासून झालेला एक वायुरूप पदार्थ *m*, कर्बिकाम्ल. Carbonate of lime खडू, भाजलेला चुनखडा, चुन्याची कळी. Sodium carbonate पापडखार. Carbon-process *photo.* See Photography.

Carboy ( kar'boi ) [Pers. *qarabah.*] *n.* 'काराबा,' रक्षक सांगाडा असलेली निळी किंवा हिरवी बाटली (हिचा उपयोग गंधकाम्ल ( Sulphuric acid ) वगैरे भरण्याकडे करितात), सांगाड्याची बाटली.

Carbuncle (kär'bung-kl) [L. *carbunculus,* dim. of *carbo,* coal.] *n.* लाल *m,* माणिक्य (*pop.*) माणीक *m. dim.* माणकी *f.* २ *red pimple* अतिशय उष्णतेनें झालेला मोठा फोड *m,* पुष्कळ तोंडें असलेलें गळूं *n-* पुळी *f.* ३ ( on the back ) काळपुळी *f,* काळफोड *m,* देटपुळी *f.* ४ अग्निरोहिणी. Carbuncled *a.* काळपुळी झालेला. २ माणकें लावलेला. Carbun'cular, Carbunculate *a.* लाल माणकाचा. २ काळपुळीचा. Car'buncula'tion *n. bot. the blasting of the young buds of trees or plants by extreme heat or cold* अतिशय थंडीनें किंवा उष्णतेनें वनस्पतींच्या किंवा झाडांच्या कळया मरणें-खुरटणें.

Carburet, same as Carbide (in the word Carbon). Carbureted *a.* कारबाननें बनलेला.

Carcanet ( kär'ka-net ) *n.* (*Shakes.*) रत्नमाला *f,* जडावाचा हार *m.* Also Carkanet, Carcant.

Carcass, Carcase ( kär'kas ) *n. a dead body* मढें-डें *n,* मुडदा *m,* मुरदा *m,* शव *n,* प्रेत *n,* लोथ (घ) *f,* ( of a beast) पडें *n.* २ (जिवंत मनुष्यास तिरस्कारानें) कुडी *f,* कूड *f,* कलेवर *n,* लोधा *m,* लोथ *f.* ३ सांगाडा *m,* खटारा *m,* सांगटा *m,* सांटा *m.* ४ बोटीचा वगैरे कुजलेला सांगाडा; as, A rotten C. of a boat. ५ कोणत्याही अपुऱ्या वस्तूचा सांगाडा *m.* ६ *a hollow cage or shell filled with combustibles* (घरांना किंवा जहाजांना आग लावण्याकरितां फेंकण्याचा ) पेट घेणाऱ्या वस्तूंनीं भरलेला गोळा *m,* एकदम आग लावतां येईल अशा पदार्थांनीं भरलेलें भांडें *n.* हें फेंकल्यावरोबर फुटून आग लागते; as, A discharge of C.es and bombshells.

Card ( kärd ) [ Corruption of Fr. *carte,* a card.—It. *carta.*—L. *charta.*—Gr. *kartes,* a leaf of papyrus.] *n.* जाड्या कागदाचा एक लहानसा तुकडा *m,* चकती *f,* कार्ड *n.* २ *a playing card* गंजिफांतलें पान *n,* गंजिफ *f,* पान *n,* पत्ता *m,* क्याट *m.* [ BACK OF A C. पुस्त *f.* FACE OF A C. रू *n.* PACK OF CARDS गंजिफा, पत्त्यांचा-गंजिफांचा जोड *m,* पत्ते, क्याटांचा जोड. THERE ARE THREE PACKS OF CARDS चंगकांचन गंजिफा, दशावतारी गंजिफा, AND बाराराशी गंजिफा. THE FIRST HAS 8 SUITS, THE SECOND HAS 10 SUITS, AND THE THIRD HAS 12 SUITS. SUIT AT CARDS रंग *m,* रुपें *n,* बाजू OR बाजी *f.* THE SUITS OF THE FIRST PACK ARE चंग, कांचन, वरात, खुमाश (स), ताज, गुलाम, रूप, समशेर. THE SUITS OF THE SECOND CORRESPOND TO THE TEN INCARNATIONS OF VISHNU; AND THE SUITS OF THE THIRD, TO THE TWELVE SIGNS OF THE ZODIAC. गंजिफा किंवा पत्ते खेळतांना पुढील शब्द वापरण्यांत येतात. काट, काटणी, काटणीवाटणी, काडी, केतेंपान, घेणी, चंगचिल्ली or चंगचिल्लत, चंगाराणी, देणी, चढतीबाजू, चौवा, चाळणी, चोर, छक्का, छक्कापंजा, जवर, तावनदस्त, तिक्कल, तिक्का, तिगस्त, नहल (ल्या), नादर, पानबाजी, बुळी, बूज, रंगडाव or रंगबाजी, रंगलूट, जेरजबरडाव, रंगपानी, सत्या, केल्याचा डाव, दावदुबीचा डाव, गुलाम डाव, नोटडाव, बिझीक, लाडीस, कोट, बावनपानी कोट, हुकूम, काटहुकूम, हुकूम सांगणें, पिसणें, पिसणी, गलत करणें, दुक्कल, दहल्या, अठ्ठ्या, सुरक्या, राजतलफ, सर, हरड. TO HAVE A RUN OF ILL LUCK AT CARDS पड *f.* लागणें. ] ३ आभार-विनंतिदर्शक छापलेली चिठ्ठी *f,* पत्यासह दिलेली लहानशी जाहिरात *f;* as, To put a C. in the newspaper. ४ *a note, a ticket* चकती *f,* तिकीट *n.* ५ होकायंत्रांतील दिशा लिहिलेली चकती *f.* C. *v. i.* गंजिफा-पत्ते खेळणें. Card-board *n.* जाड पुठ्ठ्याचा कागद *n.* Card-case *n.* आपलें नांव लिहिलेलीं कार्डें ठेवण्याची पेटी. Card-sharper *n.* पत्ते खेळतांना जादुगिरी करतो तो, पत्त्यांचा जादुगार. Card-table *n.* गंजिफा खेळण्याचें मेज *n.* A sure card *fig.* हटकून यश मिळवील अशी ज्यासंबंधीं खात्री आहे असा मनुष्य *m.* २ *lit.* खात्रीचें पान *n,* डाव करील असें पान *n.* ३ ज्यांत खात्रीनें यश येईल असें काम. Visiting card नांवाची चिठ्ठी *f* (भेटावयास आलों आहें असें कळविण्याची). To have a card in one's hand कोणतीही गोष्ट करण्याची मुखत्यारी असणें. House of cards एखादी असार गोष्ट, शुष्कबाब(?). Cf. वाळूची भिंत. He is the card of our house कुटुंबांतील मनुष्य. He played his cards well त्यानें आपल्यावर सोंपविलेलें काम चातुर्यानें आणि शहाणपणानें पार पाडलें. On the cards घडून येण्याजोगा. To show one's cards एखाद्याचे गुप्त हेतु किंवा बेत फोडणें. To speak by the card (विसंगतता होऊं नये म्हणून) ठरींव विचारसरणीस-सुद्दा धरून बोलणें. The cards are in my hands सर्व गोष्टी माझ्या हातांत आहेत. The fact is on the cards ती गोष्ट घडून येण्याचा विशेष संभव आहे. To count on one's cards *lit.* हातांत चांगलीं पानें असल्यामुळें डाव खात्रीनें होईल असा अंदाज करणें, अनुकूल परिस्थितीवरून कार्यसिद्धि होईलच असें अनुमान करणें. To expose one's cards *fig.* आपले विचार-गुप्तहेतु-प्रदर्शित करणें. To play one's best card *fig.* स्वतःचे मतानें जें कार्य खात्रीनें फलदायक दिसतें तें करणें. To throw up the cards *fig.* आपला पक्ष कमी आहे हें कबूल करणें, हार घेणें.

Card ( kärd ) [ Fr. *carde*—L. *cardus, carduus,* a thistle.] *n.* फणी *f.* C. *v. t.* पिंजणें, विंचरणें, धनुकणें, पिंजारणें, तोडणें. २ (*obs.*) स्वच्छ करणें; as, This book must be carded and purged. ३ (*obs.*) मिश्रण करणें; as, "C. your beer if you see your guests begin to be drunk, half small, half strong." Carder *n.* ( v. V. ) पिंजणारा; पिंजारणारा, पिंजारी. Bow of C. धनुकली *f,* धनु *f.* Carding *n.* पिंजणें. Carded cotton *n.* पिंजलेला कापूस *m,* गाळा, रुई, रू. Carded seed सरकी. Carded thread पिंजलेलें सूत.

Cardamom ( kar'da-mum ) [ L. *cardamomum.*—Gr.

*kardamomon.* ] *n. bot.* वेलची *f*, वेलदोडा *m.* २ वेलचीचें झाड *n.*

Cardiac ( kär'di-ak ) [ L. *cardiacus.*—Gr. *kardia*, the heart.] *a.* काळजासंबंधीं, हृदयासंबंधीं, काळजाजवळचा. २ *med. a stimulant for the heart* हृदयांत विशेष चलनवलन उत्पन्न करणारें (औषध), दीपक, हृदुत्तेजक. C. *n. a cardial* हृच्चलनोत्तेजक औषध *n.* Car'dialgy, Cardial'gia *n. a heart-burn* छातींत-उरांत जळजळणें-वेदना *f.* Car'diograph, Car'diogram [Gr. *graphein*, to write.] *n.* हृच्चलनलेखक. हृदयाच्या चलनवलनाचा वक्र ज्यानें घेतां येतो असें यंत्र *n.* Car'dioid *n. a geometrical curve, so called from its heart-like form* हृदयवक्र, हृदयच्छेद, हृद्वक्र. Cardit'is *n.* हृदयांतील दाह *m*, छातींतील-उरांतील दाह *m*, उरोदाह.

Cardinal ( kär'din-al ) [ L. *cardinis, cardinalis*, from *cardo*, hinge of a door, that on which a thing turns or depends.] *a.* मुख्य, श्रेष्ठ, मूल, प्रधान. C. *n.* कार्डिनल *m*, रोमन क्याथोलिक पंथाचा मुख्य धर्मगुरु (पोप) निवडण्याचा ज्या सत्तर इसमांना अधिकार आहे त्यांपैकीं एक, पोपच्या खालोखालच्या दर्जाचा धर्माधिकारी. २ (वायकांनीं घालावयाचा) कार्डिनल नांवाचा लहान झगा *m.* ३ (मसाला घालून कढविलेली) कार्डिनल नांवाची लाल दारू *f.* Car'dinalate, Car'dinalship *n.* कार्डिनलपणा *m.* २ कार्डिनलचा अधिकार *m*- पदवी *f.* ३ कार्डिनलचा प्रांत-प्रदेश-इलाखा *m.* Cardinal-bird *n.* कार्डिनल पक्षी *m.* अमेरिकेंतील एका गाणाऱ्या पक्ष्याचें नांव *n.* (त्याचा पिसारा तांबडा असतो.) Car'dinally *adv. Shakes.* मुळास धरून. Cardinal flower एक प्रकारचें कार्डिनल नांवाचें सुबक फूल *n.* (याचें मूळ औषधाच्या उपयोगीं पडतें.) Cardinal numbers मूलांक; as, एक, दोन, तीन, [पहिला, दुसरा व तिसरा इत्यादि अंकांना Ordinal numbers क्रमांक म्हणतात.] Cardinal points *geog.* (पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर अशा) मुख्य दिशा. Cardinal signs *astron.* मेष, कर्क, तुळा आणि मकर अशा चार मुख्य राशी. Cardinal virtues ( prudence, justice, temperance, and fortitude) दूरदर्शित्व, न्यायप्रियता, नेमस्तपणा आणि सहनशीलता हे चार प्रधान-मुख्य गुण, सद्गुण; हे जुन्या ग्रीक लोकांत मुख्य सद्गुण समजले जात असत. Cardinal winds मुख्य चार दिशांकडून वाहणारे वारे.

*N. B.*—We shall give under the word 'Leading' the distinctions between Chief, Main, Principal, Leading, Cardinal, and Capital.

Care ( kär ) [ A. S. *caru, ceara*, akin to O. S. *kara*, sorrow.-Goth. *kara*, perh. from Gr. *karos*, voice.] *n.* काळजी *f*, चिंता *f*, आधि *f*, मानसिक व्यथा *f*, घोर *m*, आंच *f*, कळकळ *f.* २ जपणूक *f*, निगा *f*, जतन *n*, देखरेख *f*; as, Left to his care. ३ सावधगिरी *f*, खबरदारी *f.* ४ विशेष काळजी बाळगण्याची वस्तु *f*- विषय *m.* C. *v. i. to have solicitude, anxiety or concern* चिंता *f.* वाहणें *g. of o.*, काळजी *f.* वाहणें-करणें-धरणें *g. of o.*, फिकीर *f.* करणें *g. of o.*, चिंता *f*- घोर *m.*-&c. लागणें *g. of o. in-con.* २ *to be inclined, disposed or desirous* चाहणें, चहा *f*- आवड *f*- चाड *f.* लागणें-असणें *in con.*, गरज *f.* बाळगणें *g. of o.* ३ *to mind, to heed* जुमानणें, गुमानणें, जुमास *m*- जुमान *m*- गुमान *m.* बाळगणें-खाणें ( generally with *for* or *about* before the object ). Care-crazed *a.* काळज्यांनीं वेडावलेला, चिंतामग्न, चिंताविक्षिप्त, चिंतामूढ. Care'ful *a.* काळजीचा, चिंतायुक्त, जागृत, उद्वेगी(?), आस्थेकरी, आस्थेवाईक, आस्थिक. २ *heedful, cautious* सावध, हुशार, सावधान. Care'fully *adv.* काळजीनें, चिंतापूर्वक. २ सावधगिरीनें, सावधपणानें. ३ जपून, संभाळून. Care'fulness *n.* (v. A.) सावधानता *f*, काळजी *f*, चिंता *f*, सचिंतता (R) *f.* २ सावधगिरी *f*, सावधपणा *m*, सावधानता *f*, खबरदारी *f.* Care'less *a. unsolicitous, unanxious, unconcerned* निःश्चित *pop.* निचिंत, निकाळजी, निष्काळजी, बेपरवा, बेफिकीर, निर्धास्त, अनास्थ, आस्थाहीन-रहित, अजुरदा, निरपेक्ष, अनुत्सुक, अनिचाड, निघोरी, निसूर. २ *neglectful, unmindful, inattentive*, &c. असावध, असावधान, अनवधान, गैरसावध, गफलती or त्या, गाफल or गाफील, गाफली, बेफाम, गबाळी or ळ्या, गलथा, निष्काळजी, गैदी, गैबी, गैबती or त्या, विसराळू, गैरात, गयाळ, बेपरवा. ३ *arising from want of care* निष्काळजीपणाचा, दुर्लक्षाचा, आळसानें झालेला, अविचाराचा, अविचारी, बेफामीचा, प्रमादाचा. Care'lessly *adv.* ( v. A. 2. ) गफलतीनें, गाफीलपणानें, हयगय करून, अनवधानपूर्वक, प्रमादपूर्वक. Care'lessness *n.* ( v. A. 1. ) निकाळजी *f.* अलक्ष्य *n*, दुर्लक्ष्य *n*, हयगय *f*, निचिंतपणा *m*, बेदरदीपणा(?)*m*, बेफिकिरी *f*, बेपरवाई *f*, अनास्था *f*, आस्थाराहित्य *n*, हयगय *f*, निघोरपणा *m*, निसूरपणा *m*, चिंताराहित्य *n*, निरपेक्षता ( Rare in this sense ), अनुत्साहता *m*, निश्चिंतता *f.* २ गाफीलपणा *m*, हयगई or हयगय *f*, गफलत *f*, आनाकानी *f*, प्रमाद *m*, अनवधान *n*, असावधता *f*, गैरसावधगिरी *f*, विसराळूपणा *m*, गैदीपणा *m*, गबाळेपणा *m.* Care-taker रखवालदार *m*, ज्याच्या ताब्यांत कांहीं वस्तु दिली आहे असा मनुष्य *m.* २ आयर्लंडमध्यें ज्या जमिनीचा ताबा, सरकार मालकाकडून एखाद्याच्या ताब्यांत देतें तो इसम, ताबा घेणारा. Care-worn चिंताग्रस्त, चिंतातुर. Take care! खबरदारी घे, जप, सांभाळ. To take care of जतन करणें, सांभाळणें, संगोपन करणें, (ची) काळजी घेणें, (च्या) वर लक्ष ठेवणें. To commit to the C. of (च्या) हवालीं देणें-करणें.

Careen ( ka-rēn' ) [ L. *carina*, a keel.] *v. t. naut.* (तळाच्या दुरुस्तीसाठीं) जहाज कलतें करणें, कानवडा करणें, कुशीस करणें-पाडणें. C. *v. i.* जहाज कलतें होणें. C. *n.* जहाजाचा एका बाजूस होण्याचा कल *m.* Careen'age *n.* (जहाजांचा) दुरुस्तीखाना *m.* ज्या ठिकाणीं जहाजें दुरुस्ती करण्याकरितां कलतीं (एका बाजूवर) ठेवतात तें स्थान *n.* नौकापरिवर्तनस्थान *n.* २ जहाजाच्या तळाच्या दुरुस्तीचा खर्च *m.*

Career (ka-rēr') [L. *carrus*, wagon.] *n.* (*obs.*) *course of action* ओळ *f*, ओळा *m*. २ वर्त्तनक्रम *m*, आयुर्यात्रा *f*, जीवनमार्ग *m*, कारकीर्द *f*, आयुष्यक्रम *m*, विशेषेंकरून सार्वजनिक आयुष्यक्रम. २ *obs.* दौड *f*, धांव *f*, ओघ *m*, प्रवाह *m*. ३ *obs. height of speed* धोंवण्याचा सपाटा *m*- झपाटा *m*- तडाखा *m.* &c., क्रम *m*. ४ ससाणा पक्ष्यांचें उडणें *n*, (असुकेक धंद्यांत किंवा कलेंत नांवलौकिक मिळविण्याकरितां-भरभराट करून घेण्याकरितां) खुला मार्ग *m*, उघडें मैदान *n*; as, He is quite young and still he has a career before him. C. *v. i. to move rapidly and smoothly* सुरळीत-सुसाट चालणें. २ धांवत जाणें.

Caress (ka-res') [Fr. *caresse.*—L. *carus*, dear.] *v. t.* लाड करणें, प्रीति करणें, लडिवाळ *m*- लळा *m*.- लालन *n*. करणें *g. of o.* २ प्रेमानें आलिंगणें-कुरवाळणें-गोंजारणें. C., Caress'ing *n.* (v.V.) *act.* लाड करणें *n*, लाड *f*, *m*, लडिवाळ *m*, लाडकी(?) *f*, लाडिकपणा *m*, लाडीगोडी *f*, कोडकौतुक *n*, लालन *n*. See also Embrace. Caress'ingly *adv.* (v. V.) लाड करून, लाडीगोडीनें, लाडुकपणानें.

Caret (kā'ret or kar'et) [L. *caret*, there is wanting, (in writing or printing)—from, *carere*, to want.] *n. a mark of omission* काकपद (∧) *n*, हंसपद *n*, चुकीची खूण *f*.

Cargo (kär'go) [Sp. *cargo*, *carga*, burden, load, from *cargar*, to load, charge, vide Charge.] *n.* बारदान *n*, म(भा)रताड *f*, (गलबताचें) भरगत *n*, भरीत *n*, भरत *f*, नौकापूरण *n*, गलबतावरून जाणारा माल *m*. Cargoes (-gōz) *pl.*

*N. B.*—See the word 'Freight' for the distinctions between Cargo, Freight, Lading, Burden.

Carib (kar'ib) *n. a native of the Caribbee Islands or the coasts of the Caribbean Sea.* मध्य-अमेरिकेलगतच्या कारिबीअन समुद्रांतील बेटांत किंवा त्या समुद्राच्या लगत प्रदेशांत राहणाऱ्या मूळच्या रहिवाशांपैकीं एक मनुष्य, कारिब *m*. also Car'i-bee. Caribbē'an *a.*

Caricature (kar'i-ka-tūr) [It. *caricatura*, a satirical picture; so called because exaggerated or 'overloaded.'—It. *caricare*, to load, to burden.—L. L. *carricare*, to load a car. Vide Charge.] *n. an exaggeration or distortion by exaggeration, of parts or characteristics, as in a picture, a burlesque, a parody,* मनुष्याचें अतिशयोक्तीचें हास्यरसोत्पादक वर्णन-चित्र *n*, सोंग *n*, नक्कल *f*, हास्यजनक चित्र *n*- प्रतिमा *f*- प्रतिकृति *f*- वर्णन *n.* &c. C. *v. t.* हास्यजनक चित्र *n*. काढणें *g. of o.*, सोंग *n*. करणें *g. of o.*, नक्कल करून दाखविणें, हास्यरस उत्पन्न करणें. Formerly spelt Caricatura. Caricatur'ist *n.* हास्यजनक नकला करून खूब हसवून टाकणारा नट *m*.

Caries (kā'ri-ēz) [L. *caries*, decay.] *n. med.* हाडांतील कुजलेपणा *m*, कुजकेपणा *m*, कुजटपणा *m*, अस्थिगलित भाव *m*. २ अस्थिव्रणविकार, उपदंशज अस्थिव्रण, कृमिदन्तक (according to माधवनिदान). Carios'ity *n.* कुजकेपणाची स्थिति *f*, अस्थिक्षय *m*. Ca'rious *a.* कुजका, सडका, गलितभावविशिष्ट. Caries in bones हाड्यांव्रण, also वर्ण.

Carillon (kar'il-yong) [Fr. *carillon*, a chime of bells, originally consisting of four bells as if from L. *quadrilio*, from *quatuor*, four.] *n.* स्वरसंयोगयुक्त अनेक घंटांचा नाद *m*, घंटास्वरसमेळ *m*, घंटास्वरमेळ *m*.

Carina (kar'i-na) *n. bot.* नावेच्या कण्यासारखा कणा *m*, अगस्त्याच्या (हतग्याच्या) फुलांतील अगदीं आंतल्या पाकळ्यांनीं होडीच्या आकाराची झालेली पोकळी *f*.

Carinate Carinated (kar'i-nāt-ed) [L. *carina*, the keel.] *a. bot.* नावेच्या कण्यासारखा.

Cariole, Carriole (kar'i-ōl) [Fr. *carriole*, dim. from L. *carrus*, see Car.] *n.* 'क्यारिओल,' लहान हलकी व उघडी एका घोड्याची गाडी *f*. २ झांकण असलेला छकडा *m*.

Cariopsis (kar'i-op'sis) *n.* See Caryopsis.

Cariosity (kā'rios'ity) *n. med.* See Caries.

Cark (kärk) [O. E. *cark*, from Fr. *charge.*] *n. solicitude, anxiety* चिंता *f*, काळजी *f*. C. *v. t. to harass* त्रास देणें (R). C. *v. i.* काळजी *f*- चिंता *f*- लागणें-पडणें (R.) Cark'ing *a.* काळजी उत्पन्न करणारें.

Carl (kärl) [Icel. *karl*, a male, a man, akin to A. S. *ceorl*, see Churl.] *n. a rude fellow, a churl* गांवढळ-खेडदळ मनुष्य, टोणगट-आडदांड माणूस. २ *large stalks of hemps which bear the seed* ज्याला बीं येतें असा तागाचा उभा देंट *m* (called also *carl-hemp*). ३ *pl.* (साहेब लोकांतील) (चरबींत किंवा लोण्यांत) तळलेली वाटाण्याची उसळ *f*.

Carline (kär'līn, kar'lin) *n.* म्हातारडी *f*, थेरडी *f*, झातारी बायको *f*. २ *a witch* जखीण *f*, डंखीण *f*.

Carlovingian (kär-lo-vin'ji-an) [From *Charlemagne.*] *a.* फ्रंकिश राजाच्या घराण्यासंबंधीं, शार्लमेनच्या वंशजासंबंधीं; as, The C. race of kings.

Carlylese (kar-līl'ēz) *n. the vigorous, irregular, hypermetaphorical literary style and phraseology peculiar to Thomas Carlyle* (जोरदार, व्याकरणाचे बारीक नियम न पाळणारी व पुष्कळ अलंकारयुक्त अशी) थामसकारलाइलची विशेष लेखनशैली *f*.

Carminative (kär'-min-ā'-tiv) [L. *carmen*, a card for wool.] *a. that expels wind* वातहर, वातघ्न, वातनाशक, वातनिस्सारक, वायु नाश करून पचनशक्ति वाढविणारें (औषध); as, Peppermint and ginger are C. medicines. २ वातहारक. Car'mina'tive *n. med.* वातनाशक औषध *n*, (वातनाश करणारें) उद्दीपक औषध *n*.

Carmine (kär'mīn) [Sp. *carmin.*—Ar. *qirmizi*, crimson.—Sk. *krimi*, a worm.] *n.* किरमिजी रंग *m*.

Carmina'ted *a.* किरमिजी रंग मिसळलेला. Carmin'ic *a.* किरमिजी रंगाचा.

Carnage (kär'nāj) [L. *caro, carnis,* flesh.] *n. slaughter* कत्तल (*v.* उड), काटाकाट *f,* काटाकाटी *f,* कापाकाप *f,* कापाकापी *f,* रक्ताचा पूर *m-* चिखल *m-*नदी *f,* कंदन *n.* There was a great C. कबंधें नाचलीं, खूब कत्तल उडाली.

Carnal (kär'nal) [L. *caro, carnis,* flesh.] *a.* विषयाचा, विषयी, विषयासक्त, विषयतल्लीन, विषयाभिमुख, विषयग्रस्त, विषयपरायण, सकाम, इंद्रियवश, रजोगुणी, राजस, बहिर्मुख, आशाबद्ध. २ इंद्रियजन्य, शारीरिक. ३ (*obs.*) खुनी, मांसभक्षक. [C. KNOWLEDGE, *sexual intercourse* संभोग *m,* अंगसंग *m,* रतिसुख *n.* C. DESIRE संभोगेच्छा *f.*] Carnal *v. t. & v. i.* मांसमय बनविणें-बनणें. Car'nalise *v. t.* विषयासक्त-सत्वगुणविहीन करणें. Car'nalist *n.* विषयासक्त (मनुष्य), कामी मनुष्य. Carnal'ity *n.* विषयासक्ति *f.* Car'nalism *n.* विषयासक्ति, रजोधर्मित्व *n,* रजोगुणित्व *n.* Car'nally *adv.* Carnal-minded *a.* विषयी, विषयसुखाकडे प्रवृत्ति असलेला. Carnal-mindedness *n.* सकामता *f,* विषयबुद्धि *f,* विषयवासना *f,* विषयासक्ति *f,* विषयतल्लीनता *f.* Car'neous, Carnose' *a.* मांसल, मांसासारखा. *bot.* मांसासारखा ठिसूळ. Car'nifex *n.* फांशीं देणारा, शिरच्छेद करणारा. Carnific'ial *a.* Carnos'ity *n. med.* (शरिराच्या कोणत्याही भागावर होणारा) वाळुकासारखा मांसपिंड *m,* मांसलता *f.* २ *fleshy covering* मांसल पुट.

Carnation (kär-nā'shun) [Fr. *carnation,* the flesh tints in a painting, from L. *carnatio,* fleshiness, from *caro,* flesh.] *n.* मांसासारखा रंग *m,* मांसवर्ण *m,* श्वेतरक्तवर्ण *m.* २ *bot.* पिंक, गुलाबी-प्याजी रंग *m.* Carnā'tioned *a.* मांसाच्या रंगाचा.

Carnelian (kärnē'li-an) [Fr. *corneline.*–L. *carneus,* fleshy, of flesh, because of its flesh-red colour.] *n.* (min.) अकीक *m,* गोमेद दगड, मांसासारखा तांबडा दगड *m.* also Carnelian.

Carnify (kär'ni-fī) [L. *caro, carnis,* flesh & *facere,* to make.] *v. i.* मांस बनणें, मांसासारखें होणें. Car'nifica'tion *n. med.* मांसीभवन *n,* मांसासारखें होणें.

Carnival (kär'ni-val) [Fr. *carnaval,* Shrove-tide.-It. *carnevale, carnovale,* the last three days before Lent.—Med. L. *carnelevamen,* removal of flesh, Shrove-tide.-L. *caro, carnis,* flesh and *levare,* to remove, to take away.] *n.* 'कार्निव्हल' सण (होळीसारखा), रोमन क्याथोलिक लोकांचा लेंट नामक चाळीस दिवसांचे उपवासाचे अगोदर येणारा सण *m,* चैनबाजीचा उत्सव *m.* २ बेसुमार चैनीची मेजवानी *f.* ३ राजस-सुखात्मक करमणूक *f,* विषयोपभोग *m,* यथेष्ट मधुमांससेवन-खानपान *n.*

Carnivora (kär-niv'ō-ra) [L. *caro, carnis,* flesh & *vorare,* to devour.] *n. pl. zool.* मांसाहारी प्राणी. Carnivore *n.* मांसभक्षक प्राणी *m.* Carniv'orous *a.* मांस खाणारा, मांसभक्षक, मांसाहारी, क्रव्याद. Carniv'orously *adv.* Carnivor'ousness *n.* मांसभक्षकपणा *m.*

Carol (kar'ol) [Fr. *carole,* a (singing) dance.] *n.* आनंदाचें गीत *n,* हर्षानंदगीत *n,* आल्हादसूचक गीत *n.* २ भक्तिगीत *n,* भजन *n,* कीर्तन *n.* C. *v. t.* काव्यरूपानें स्तुति करणें, आनंदानें गीत गाणें. C. *v. i.* आनंदानें गाणें, कंपस्वरानें गाणें. Carolling *n.* आनंदानें गीत गाणें *n,* भक्तिपुरःसर गाणें *n.*

Carol, Carrol (kar'ul) [O. Fr. *carole,* a sort of circular space, or carol.] *n.* अभ्यास करण्याची किंवा बसण्याची खिडकीलगतची खोली *f.* २ खिडकी *f,* बारी *f.*

Carotid, (ka-rot'id) *a. med.* ग्रैवेयक, मानेच्या दोन मोठ्या धमनींविषयीं; as, C. artery.

Carouse (kar-owz') *n.* पानसमारंभ *m,* पानोत्सव *m.* C. *v. i.* दारू झोंकणें, खूब दारू पिणें. २ पानोत्सव करणें. Carous'al *n.* पानसमारंभ *m.* Carou'ser *n.* पानोत्सव करणारा. Carou'singly *adv.*

Carp (kärp) [L. *carpere,* to seize, to pluck, to deride.] *v. i.* दोष काढणें, आढेवेढे घेणें, आडफांटा-आडफांटे-फांटे फोडणें-काढणें, कांक्षा घेणें-काढणें, छिद्रें काढणें, तकरार करणें, कारणावांचून दोष देणें, नांवें ठेवणें (with *at*). C. *v. t.* (*obs.*) सांगणें. २ दोष देणें. निंदा करणें. Carper *n.* (*Shakes.*) तकरारी *m,* दोष काढणारा, निंदक. Carping *n.* आडफांटा *m,* आढेवेढे *pl.* २ हेंगल *f,* पंचाईत *f.* Carpingly *adv.*

Carp (kärp) *n.* नदी, तळें वगैरेंच्या गोडे पाण्यांत सांपडणारा वनस्पत्याहारी मासा *m,* रोहीमासा *m.* (हा फक्त पूर्वी आशियांत होता. परंतु आतां युरोप व अमेरिका यांमध्यें नेऊन त्याची वाढ झालेली आहे.)

Carpal (kär'pal) *a.* मणगटाचा, मणगटाविषयींचा, मणिबंधीय; as, C. bone. C. *n. one of the bones or cartilages of the carpus* मणिबंधास्थि.

Carpel (kär'pel) [Gr. *karpos,* fruit.] *n. bot.* फलदपर्ण *n,* बीजकोशांतील फलोत्पादक पान *n.* २ बीजगर्भसंवेशकपल्लव. Car'pellary *a.*

Carpenter (kär'pen-tėr) [L. *carpentum,* a wagon.] *n.* सुतार *m,* बढई, तक्षा, तक्षक, सूत्रधार (R.), सूत्रधारी (R.), सूत्रधर [R.], (in contempt) तासकास्या, खरडघाशा, खरड्या, रथकार *m.* [BUSINESS OF A C. सुतारकाम *n,* सुतारकी *f.* WORK EXECUTED BY A C. सुतारकाम *n.*] Carpenter *v. i.* सुतारकाम करणें. Carpenter-bee *n.* लांकूड कुरतडून त्यांत आपलें घरटें करणारी मधमाशी *f.* Carpentry *n.* सुतारकी *f,* सुतारकाम *n,* सुताराचें कौशल्य *n.*

Carpet (kär'pet) [L. *carpere,* to pluck.] *n.* सतरंजी *f,* बिछायत *f,* बैठक *f,* आस्तरण *n.* [SOME OF THE INDIAN CARPETS ARE:—गालिचा *m,* गाशा (?) *m,* गेटम *n,* जमखाना *m,* जाजम *n,* बाजू *f,* रुजामा *m,* सतरंजी *f.* हीं निरनिराळ्या प्रकारच्या बैठकींचीं नांवें आहेत.] २ बैठकीसारखें आस्तरण *n.* Carpet *v. t.* बिछायत *f-* आस्तरण *n.* घालणें-पसरणें. Carpeting *pr. p.*

Carpeted *pa. p.* Carpet-bag *n.* प्रवासांत उपयोगी पडणारी पिशवी *f*, प्रवाशी थैली *f*, प्रवाशाचे सामानाचा कोथळा *m*, पडशी *f.* Carpet-bagger *n.* कार्पेटब्यागर नांवाचे लोक. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांपैकीं उत्तरेचे व दक्षिणेचे लोक. यांच्यामध्यें १८६५ मध्यें आपआपसांत लढाई झाल्यावर उत्तरेकडील इसम दक्षिणेकडे येऊन राजकीय हक्क स्वार्थपरायणतेनें मिळविण्याची खटपट करूं लागले. त्यांपैकीं प्रत्येकास तिरस्कारानें हा शब्द लावतात. २ *U. S.* स्वार्थबुद्धीनें साहस करणारा. Carpet-beating *n.* सतरंजी झोडपणें (धुरळा नाहींसा करण्याकरितां). Carpet-bedding *n.* (चित्रविचित्र पण नियमित आकृतीचे) सतरंजीसारखे ताटवे. Carpeting *n.* सतरंजीनें आच्छादणें-झांकणें *n.* २ सतरंजीचा कपडा *m.* ३ सतरंजी *f*, सतरंज्या *f. pl.* Carpet-monger *n.* सतरंज्यांचा व्यापारी *m.* २ (*Shakes.*) विषयी, बायकांत लुडबुडणारा, बायकांशीं जास्त लगट ठेवणारा. Carpet-rod *n.* बैठकपट्टी, (सरकूं नये म्हणून) सतरंजीवर बसविण्याची काठी *f*- पट्टी *f.* To be on the carpet विषयाची चर्चा होत असणें, प्रस्तुत-चालू असणें. Carpet-knight *n.* originally *a knight of the carpet*, "a contemptuous term for a knight whose achievments belong to the 'carpet' (*i. e.* the ladies' boudoir or carpeted chamber, drawing-room or court) instead of, to the field of the battle." गेहेशूर (opposed to रणशूर), शेंदाड शिपाई, रणांत लढून 'नाइट' पदवी न मिळवितां राजाच्या दरबारांतच राहून 'नाईट' पदवी जो मिळवितो तो.

*N. B.*—Carpet-bag (पडशी) ही सतरंजीसारख्या जाड कपड्याची केलेली असते. Carpet ह्याला "सुताडें" हाही प्रतिशब्द व्यवहारांत वापरतात.

Carpolite (kär'po-līt) [Gr. *karpos*, a fruit and *lithos*, a stone.] *n. a fossil or petrified fruit* अश्मीभूत फळ *m.* [पृथ्वीच्या पोटांत कोणत्याही कारणानें वनलेला फळाचा दगड *m.* अशा तऱ्हेनें वनलेल्या दगडांत मूळ फळाचा आकार व केव्हां केव्हां तर रंग देखील कायम राहतो.] Also Carpolithe.

Carpology (kärpo'-lo-ji) [Gr. *karpos*, a fruit & *logos*, a discourse.] *n. bot.* फलप्रकरण *n*, फलवर्गीकरण *n*, फलविचार *m*, फळ आणि त्याच्या बियां यांचा विचार करणारा वनस्पतिशास्त्राचा भाग *m.* Carpolo'gical *a.* Carpolo'gically *adv.* Carpo'logist *n.*

Carpophore (kär'-pō-fōr) [Gr. *karpos*, a fruit & *pherein*, Sk. भृ, to bear.] *n.* बीजवाही देंठ *m*, फलवाही देंठ *m*, तुम्बगर्भकोशनाल, तुम्बफलवृंत.

Carpus (kär'-pus) [Gr. *karpos*, the wrist.] *n. anat.* मणिबंध *m*, मणिबंधास्थिसंघ. [हा संघ चार चार हाडांच्या दोन रांगा मिळून झालेला असतो.] *pl.* Carpi.

Carriage (kar'ij) [O. Fr. *cariage*, luggage, carriage, cart, baggage, from O. Fr. *carier*, *charier*, to carry.] *n.* (*obs.*) भार *m*, ओझें *n.* २ (v. V. 1.)—*act.* वाहणें *n*, वाहन *n.* ३ *the price of carrying* वाहणावळ *f*, हेल *f*, हमाली *f*, नेणावळ *f*, आणणावळ *f*, भाडें *n.* ४ (*a*) *vehicle* गाडी *f*, यान *n*, वाहन *n.* [CERTAIN SORTS OF CARRIGES ARE कराती (?), करवत *f*, छकडा *m*, छकडी *f*, रथ *m*, रेकला *m*, शकट *m*, कर्णीरथ (?) *m.* PLEASURE C. क्रीडारथ *m*, पुष्परथ (?) *m.* WHEEL C. चक्रयान *n.*] (*b*) (as gun carriage) गाडा *m*, छकडा *m.* ५ *deportment* चाल *f*, चालण्याची ढब *f*; as, "His gallant C. all the rest did grace." ६ वर्तनक्रम *m*, गोठवण, वागणूक *f*, वर्त्तणूक *f.* ७ *management* व्यवस्था *f.* Carr'iageable *a.* वाहण्याजोगा. Carriage-drive *n.* (सार्वजनिक बागांतला किंवा खासगी हद्दींतला) गाड्या हांकण्याचा रस्ता *m.* Carriage free वाहणावळ माफ करून. Carriage-horse *n.* गाडीचा घोडा *m.* Carriage and pair गाडी आणि दोन घोडे यांचा संच *m.* Carriage and four गाडी आणि चार घोडे यांचा संच. Carriage-maker *n.* गाडी करणारा, रथकार. Carriage-people श्रीमंत लोक, गाडीघोडा ठेवण्याची ज्यांची ऐपत आहे असे लोक. Carriage porch *n.* घरांत जातांना गाड्या उभ्या करण्याची देवडी-द्वारमंडप *m.* Carriage-varnish *n.* गाडीचें रोगण *n*-वारनीस *n.*

Carrion (kar'i-un) [O. Fr. *caroigne* (Fr. *charogne*)- L. *caro*, flesh.] *n.* प्राण्यांचें कुजकें प्रेत किंवा कुजकें मांस *n*, मुरदाड मांस *n*, लोथ *f*, अखाद्य मांस *n.* २ (*obs.*) नीच इसम *m.* C. *a.* मुरदाड मांस खाणारा, मुरदाड मांसासंबंधीं. Carr'ion crow *n.* (मुरदाड मांस खाणारा) कावळा *m*, डोंबकावळा.

Carrot (kar'ut) [Fr. *carotte*.-L. *carota*.-Gr. *karotos*, a carrot.] *n.* गाजर *n.* Carroty *a.* गाजराच्या रंगाचा.

Carry (kar'i) [O. Fr. *carier*, to carry, from L. *carrus*, a car.] *v. t. to convey, to transport* एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेणें, (चें) स्थलांतर करणें, (चें) स्थानांतर करणें. २ वाहणें, नेणें, घेऊन जाणें, (अंगावर-शिरावर बोजा म्हणून) नेणें, वाहणें. ३ घेऊन जाणें, जोरानें-बळजोरीनें नेणें, ओढून-खेंचून नेणें. ४ हातचा घेणें. ५ वाढवणें, पुढें नेणें, लांब नेणें; as, To C. a road, ten miles farther. ६ सिद्धीस नेणें, शेवटास नेणें, सिद्ध करून घेणें-नेणें, संपादणें, साधणें. ७ *to get possession of by force* सर करणें, काबीज करणें, हस्तगत करणें, जिंकून घेणें; as, "The town would have been carried in the end." ८ पोटीं असणें, (चा) गर्भितार्थ असणें, (चें) स्वरूप असणें. ९ (with *one's self*) चालणें, वागणें, वर्त्तन करणें, वर्तणें. १० (चा वर बोजा) वाहणें, असणें; as, "A farm carries a mortgage." ११ (खूब भांडून बहुमतानें कायद्याचा मसुदा) पास करून घेणें. १२ (बंदुकीची गोळी म्याच्या) टप्प्याच्या जागीं नेणें. Carry arms *mil.* उजव्या हातांत उभी खांद्यावर टेंकलेली अशी बंदुक धरणें. हा एक लष्करी कवाइतीचा भाग आहे. To C. all before one *to raise universal enthusiasm and overcome all opposition* मार्गांतील सर्व अडचणी दूर करणें, अप्रतिहत जय मिळविणें. To C. arms शस्त्रें धारण करणें. २ लष्करी नोकरी करणें. To C. away

हिरावणें, हरणें, नेणें, हरण करणें *g. of o.* २ पटकावणें; as, He carried away all prizes. To C. by storm दणकाऊन जय मिळविणें. To C. coals to Newcastle, see Coal. To C. fire in one hand and water in the other बोलावयाचें एक व करावयाचें भलतेंच, स्तुति करून फसविणें, जास्त नुकसान करण्याकरितां संशय दूर करणें, *lit.* एका हातांत आग व दुसऱ्या हातांत पाणी नेणें, विझवण्याची हूल दाखवून आग लावणें. To C. off दूर नेणें. २ हरण करणें. ३ जगांतून नेणें; as, The plague carried off thousands. ४ पटकावणें; as, To C. off prizes or honours. ५ *to bear it out, to brave it out* सोसणें, (शीं) माथें-टक्कर *f.* मारणें, (संकट इत्यादि) साहणें. To C. it off *to cause to pass, to take away the averse effect of* (चा) अनिष्ट परिणाम नाहींसा करणें, झांकणें, झांकण्याचा प्रयत्न करणें; as, "A rapid intellect and ready eloquence may carry off a little impudence." To C. on पुढें चालवणें, चालू ठेवणें, वहिवाटणें(?), निर्वाहणें (?). To C. one's point उद्दिष्ट गोष्ट-हेतु-मुद्दा तडीस नेणें, अभीष्ट मिळविणें. To C. out बजावणें, अमलांत आणणें. २ सिद्धीस-शेवटास नेणें. To C. out one's bat चेंडू-फळीच्या खेळांत गडी बाद न होऊन त्यानें (विकेट) उभ्या काव्या सोडून जाणें. To C. over पुढें नेणें. To C. through तरीपार करणें, पुरें करणें, निस्तरणें, निस्तारणें, निर्वाह करणें. To C. the day or C. it जय मिळविणें, पैज जिंकणें. To C. too far योग्य मर्यादेचा अतिक्रम करणें. To C. up बांधकाम अमुक एक उंचीपर्यंत नेणें, वर चढवणें. To C. weight (चें) वजन असणें. २ (R) लटंबर-वजन नेणें; as, "He carries weight, he rides a race." C. *v. i.* वाहणें, नेणें, वाहकाचें काम करणें. २ पुढें ढकलणें, पुढें नेण्याची शक्ति असणें, पुढें फेंकण्याची शक्ति असणें. ३ (कमानदार मान करून) डोकें उंच उभारणें. Carry-all *n.* चौचाकी हलकी एका घोड्याची गाडी *f.* Carried (v. V. 1.) वाहलेला, नेलेला, &c. [To BE C. AWAY (चें) डोकें भडकून जाणें, मनाचा तोल जाणें.] Carrier *n.* नेणारा, वाहक, वाहणारा, ओझें नेणारा, ओझील *m*, हमाल *m*, भारवाहक, भारवाही, भारवाह. २ निरोप नेणारा. ३ भाडें घेऊन माल गाडींत नेणारा. ४ चरकी लावण्याच्या दागिन्याला पकडून फिरविण्याचें साधन *n*, चरकीवरील दागिन्याचा वाहक. ५ बंदुकींतील काडतूस उडविण्याकरितां नळींत योग्य ठिकाणीं तें आणून लावणारा कुत्रा *m.* Common Carrier सार्वजनिक वाहक *m*, ठरींव भाडें देणाराचें ओझें वाहून नेण्याची कायदेशीर जबाबदारी पतकरणारा भाडेकरी. रेल्वे-ट्राम्वे-टांगे यांचे मालक सार्वजनिक वाहक आहेत. Carrying *a.* Carrying trade or traffic जलमार्गानें होणारा व्यापार.

*N. B.*—To carry ह्या क्रियापदाचा मूळ अर्थ उचलून गाडींत घालून एके ठिकाणाहून दुसरे ठिकाणीं नेणें, असा आहे. म्हणजे आधार आणि स्थानांतर ह्याच दोन मूळ कल्पना To carry ह्याच्या अर्थांत आहेत. तेव्हां वर दिलेल्या To carry शब्दाच्या निराळ्या अर्थांत कांहीं ठिकाणीं 'स्थानांतर' ही कल्पना उत्कट आहे व कांहीं ठिकाणीं 'आधार' ही कल्पना उत्कट आहे. To carry ह्याच्या कोणत्याही अर्थांत एक कल्पना उत्कट असली म्हणजे दुसरी कल्पना तेथें नसतेच असें नाहीं; परंतु तेथें ती तितकी उत्कट नाहीं असा अर्थ समजावयाचा. आमचें म्हणणें पुढील उदाहरणावरून स्पष्ट होईल; as, "Do not leave the carpet-bag here; carry (take) it upstairs. Do not drag it along the floor, carry it."

Cart (kärt) L. [*carrus*, a car.] *n.* गाडा *m*, खटारा *m*, गाडी, *dim.* गाडली (*obs.*) & गाडलें (in contempt), छकडा *m*, शकट *m*, रेंकला *m*, रेडू (?) *m*, रेडका (?) *m.* [BOTTOM OF A C. साटी OR साठी *f.* CHILD'S GO-C. पांगुळगाडा *m*, पांगुळगाडी *f.*] २ किरकोळ वस्तु विकण्याची लहान गाडी *f.* ३ दोन चाकांची सहल करण्याची व बिनझांकणाची गाडी *f.* C. *v. t.* गाड्यांत-गाडींत नेणें-वाहून नेणें. २ शिक्षेदाखल गाडींतून धिंड काढणें; as, "She chuckled when a bawd was carted." C. *v. i.* गाडी वापरणें, गाडीवाल्याचा धंदा करणें. Cartage *n.* मालनेणावळ *f.* २ माल नेणें *n.* Carter *n.* गाडी हांकणारा, गाडीवान. Cart-grease *n.* ओंगण, वंगण. Cart-horse गाडीचा घोडा *m.* Cart-house *n.* गाडी ठेवण्याकरितां केलेली सावली-छपरी *f.* Cart-load गाडीचें भर ओझें. Cart's tail *n.* गाडीचा मागचा भाग. Cart-rope *n.* नाडा *m*, मणदोर. Cart-rut च-(चा)कारी. Cart-way-road गाडीरस्ता. Cart-wright गाड्या करणारा सुतार, गाड्या बांधणारा सुतार. T.—Cart चौघांस बसतां येईल अशा प्रकारची चौचाकी गाडी, हिचा आकार T. अक्षरासारखा असतो. Dog-cart 'डागकार्ट', एक दुचाकी गाडी *f*, हौशी लोक प्रथम आपले खेळाडू कुत्रे यांतून नेत असत. Mail-cart टपालाची गाडी. २ लहान मुलांची गाडी. To put the C. before the horse वस्तुस्थितीचा विपर्यास करणें, वस्तुस्थितिविरुद्ध एखादी गोष्ट करणें. Village cart गांवढ्यांतली गाडी, एकच मनुष्य नेणारी अशी उघडी सखल एका घोड्याची दुचाकी गाडी. White chapel cart or Chapel cart खाटीक लोकांची गिऱ्हाइकांना मांस पोंचविण्याची दुचाकी हलकी कमानीची गाडी *f.* Carting *pr. p.* Carted *pa. t.*

Carte (kärt) [Fr.-L. *charta*, a paper.] *n.* *a bill of fare at a hotel* खाणावळवाल्याचें बील *n*- आकारपत्रक *n*, खाणावळीचा आकार *m.* २ Short for *carte-de-visite* कार्डाच्या आकाराचा प्रकाशलेख *m.* (ह्याची लांबी साडेतीन इंच व रुंदी सव्वादोन इंच असते.) Carte-blanche *n.* *blank paper* कोरा कागद. २ '*a blank paper given to any one on which to write his own conditions*' पूर्ण अखत्यारसूचक कोरा कागद *m.* (ह्या कोऱ्या कागदावर अखत्यार देणाराची सही केलेली असते.) ३ *fig. full discretionary powers granted* कुलअखत्यार *m*, पुरा-पूर्ण अखत्यार *m.* Carte-de-visite' *n. pl.* Cartes-de-visite. Cartel *n. mil.* लढाईंत पाडाव केलेल्या शिपायांची अदलाबदल करण्याचा करारनामा *m.* २ सलोखापत्र *n.* ३ *a written challenge, a letter*

*of defiance* युद्धाला बोलावणें, युद्धाव्हान *n.* ४ छापलेली किंवा लिहिलेली चकती. To give carte-blanche कुल-अखत्यार देणें.

Carte, Quarte (kärt) [Fr. *quart.*-L. *quartus*, fourth.] *n.* शत्रूच्या उजव्या छातीवर फेंकण्याचा एक प्रकारचा तरवारीचा हात *m.*

Cartel, see Carte I.

Cartesian (kar-te'-zhi-an) [From Renalus *Cartesius*, Latinized form of Rene Descartes.] *a.* रेने डेकार्ट नांवाच्या फ्रेंच तत्ववेत्त्यासंबंधीं.

Carthaginian (kar'thā-jin'-i-an) *n.* प्राचीन कार्थेजमधील रहिवाशी *m*, कार्थेजिनिअन मनुष्य *m.*

Cartilage (kär'ti-lāj) [Fr. *cartilage*, gristle.-L. *cartilago.*] *n.* लवचिक अस्थिकूर्चा *m*, कूर्चा *m*, मृदु अस्थींचें वेष्टन *n.* हें शरिरांत प्रत्येक सांध्यांत असतें. Cartilagi'nous *a.* तरुणास्थिमय, तरुणास्थिरूप, कूर्चामय, कूर्चारूप.

Cartography (kar-tog'ra-fi) [L. *charta*, *chart*, a map & Gr. *graphia*, *graphein*, to write.] *n.* नकाशे तयार करण्याची कला *f*, नकाशेकला *f.* Cartog'rapher *n.* Cartogra'phial *a.*

Cartoon (kär-tōōn') [Fr. *carton.*—It. *cartone*, *lit.* a large paper, from *carta*, a card.] *n. print.* जाड कागदावर काढलेलें चित्र किंवा नकशीकाम *n*, रंगीत तसबीर काढण्याच्या अगोदर त्याचा जाड कागदावरचा समान आकाराचा नमुना *m.* २ चालू विषयाचें त्यांतील ठळक ठळक व्यक्तींसुद्धां वेडेंवांकडें चित्र *n.* ३ प्रचलित विषयाचें हास्योत्पादक चित्र *n*, प्रचलित विषयांतील प्रधान पात्रांचें सोपहास व सचित्र प्रदर्शन, विडंबन-प्रहसन-प्रहासकचित्र. Cartoon'ist *n.* हास्योत्पादक चित्रें काढणारा *m.*

Cartouche, Cartouch (kär-tōōsh') [Fr. *cartouche*, a roll of paper.—It. *cartoccio*, a roll of paper.-It *carta*, paper.—L. *charta.*] *n. mil.* काडतूस *n.* २ तोसदान *n*, साज(?) *m*, बोलश्री *f.* ३ (तोफेचे) गोळे ठेवण्याची लांकडाची पेटी *f.* ४ लष्करांतील शिपायांचा रजेचा परवाना *m.*

Cartridge (kär'trij) [A corr. of Cartouche.] *n.* तोटा *m*, काडतूस. C. bag काडतुसें ठेवण्याची पिशवी *f.* C. box *n.* तोसदान *n.* C. belt *n.* काडतुसें ठेवण्याचा पट्टा *m.* Cartridge-paper जाड काडतूस-कार्ट्रिज कागद, फिकट रंगाचा जाड कागद, काडतुसें बनविण्याचा जाडा भक्कम कागद.

Carucate (kar'u-kāt) [L. L. *carruca*, a plough.] *n.* आठ बैलांच्या मालकाच्या वांटणीची जमीन *f*, १२० एकर, १ चाहूर *m.* (पूर्वी इंग्लंडांत आठ बैलांचा एक पूर्ण नांगर समजत.) एक वर्ष आणि एक दिवसांत आठ बैलांच्या जोतानें नांगरली जाणारी जमीन *f.* Car'ucage *n.* औतावरील कर *m.* हा प्रथम पहिल्या रिचर्ड राजानें इ० स० ११९८ त बसविला.

Caruncle (kar-unk'l) [L. *caruncula.*] *n. protuberance of flesh* (फाजील) मांसवृद्धि *f*, मांसचंचु *f*, चंचुक *f.* (पक्ष्यांच्या गळ्याजवळ किंवा हनवटीजवळ होणारी). २ *bot.* बीजचंचू *f*, चंचूक *f*, बीजवृद्धि *f.* Also Carun'cula. Carun'cular, Carun'culate, Carun'culous *a.* पुष्कळ ठिकाणीं मांसवृद्धि असलेला, मांसवृद्धीचा.

Carus (kā'rus) [Gr. *karos*, heavy sleep.] *n. profound sleep or insensibility* especially *the fourth and extremest degree of insensibility*, the others being sopor, coma, and lethargy अंतिम मूर्च्छना *f*, मूर्च्छा *f.*

Carve (kärv) [A. S. *ceorfan*, to cut.] *v. t. to cut wood, stone, etc. or form by carving* कोरणें, खोदणें, नकसणें or नकासणें, किरवणें, कोरून-खोदून काढणें. २ कोरून घडणें-आकार आणणें. ३ कापणें, फांका-फोडी *f. pl.* करणें (as meat at table), तुकडे-खंड करणें, भाग पाडणें. ४ *Shakes.* (*obs.*) सौजन्यानें बोलणें. ५ योजणें, आधींपासून बेत करणें; as, "Lie ten nights awake carving the fashion of a new doublet." ६ (R) स्वतः करितां घेणें, स्वतःला पुरवणें. C. *v. i.* कातरण्याचा-कोरण्याचा धंदा करणें. २ चित्रें खोदणें. ३ (मांस) कापणें, (मांसाच्या) फांका करणें-कापणें. Carv'en, Carv'ed *p.* (v. V. 1.) कोरलेला, खोदलेला, &c., कोरींव, खोदींव, नकशीदार, नकशी (*a.*), नकसींव. Carv'er *n.* (v. V. 1.) कोरणारा, खोदणारा, नकसकामी (म्या), नकसगीर, खोदकामी (म्या). २ जेवणाचे वेळीं मांसाच्या फांकी पाडणारा. ३ मांस कापण्याचा सुरा. Carv'ing *n.* (v. V. 1.)—*act.* कोरणें *n*, खोदणें *n*, &c., कोरणी *f*, खोदणी *f.* [Price or cost of C. खोदणावळ *f*, खोदाई *f.*] २ *carved work* खोदकाम *n*, नकसकाम *n*, नकशी *f*, नकसगिरी *f.* ३ कोरलेली मूर्ति *f.* Carving-tool कोरणी *f*, कोरणें *n.* To carve out *to hew out* तोडणें, कापणें. २ स्वतःच्या श्रमानें तयार करणें-मिळविणें. Cut and carve सफाई करणें.

Caryophyllaceous (kar-i-ō-fi-lā'sh-us) [Gr. *karyophyllon*, the clove-pink.] *a. bot.* लवंगाकार, लवंगेच्या फुलाच्या अंतराच्छादनाच्या रचनेसारख्या रचनेचा; as, Caryophyllaceous corolla लवंगाकार अंतर्वेटिका, लवंगाकार फुलवरा.

Caryopsis, Cariopsis (kar-i-op'sis) [Gr. *karyon*, a nut, and *opsis*, sight.] *n.* तृणधान्यवर्गाचें फळ *n*, धान्य.

Cascade (kas-kād') [Fr. *cascade*, a water-fall, from It. *cascare*, to fall.] *n.* धबधबा *m*, धबधबी *f*, धोत *m*, धोदा or धोधा *m*, चादर (?) *f.* २ (वस्त्रास लावलेली) नागमोडीची दाल. C. *v. i.* पाणी धोधो-धबधब्यासारखें पडणें. २ *slang.* उलटी होणें-येणें.

Case (kās) [L. *capsa*, from *capere*, to take.] *n. a covering, a sheath* आवरण *n*, वेष्टन (ण) *n*, टोपण *n*, घर *n*, म्यान *n*, मेण *n*, कोश *m*, खोळ *f.* २ *a frame* चौकट. [Needle C. चंची *f.* Pen C. कलमदान *n*, कलमदानी *f*, पट्टिका(?), पेटी, संदुक. Razor-C. धोंकटी or धोकटी *f.*] ३ (as, of a pillow, couch, &c.)

cover अभ्रा m, गलेफ m, गवसणी f, ठैला m, पिशवी f. ४ (as, of a mattress, quilt, &c.) *case to be stuffed* खोळ f. m. ५ पेटी f, बारदान n. ६ प्राण्याचें कातडें n. ७ *print.* टाइपाळें n (टाईप ठेवण्याचें) मोठें पाळें, खणाळें n. ८ संच m, साज m, जोड m; as, The C. of surgical instruments. Case v. t. (वर) आच्छादन-झांकण करणें-घालणें. Case-bottle n. पेटींत दुसऱ्या बाटलीबरोबर ठेवतां येणारी बाटली f. Case-harden v. t. पाणी देण्याकरितां लोखंड पेटींत घालून कडक करणें. Case-hardening n. Case-hardened a. बाहेरच्या बाजूनें कडक केलेला. २ *fig.* निर्लज्ज. Casing n. झांकणें n, आच्छादणें, झांकणांत ठेवणें. २ अस्तर n, आच्छादन n, झांकण n, वेष्टन n. ३ खिडकी किंवा दार ह्यांना लावलेली जाळी f. Case-knife n. झांकणांत ठेवण्याचा मोठा चाकू m. Case-maker n. म्यान-पेटी करणारा. Case-man n. जुळारी, जोडारी, टाईप जोडणारा m. Case'ment n. सांचा, खोका, खिडकी (?) f, झरोका (?). Casemented a. खिडकीचा. Case-shot n. जवळच्या माऱ्याचा तोफेचा गोळा m. Case-worm n. न्हावी m (एक जातीचा किडा), कोशकिडा m.

Case (kās) [Fr. *cas*, from L. *casus*, from *cadere*, to fall, to happen; cf. Chance.] n. *state, condition, circumstances* दशा f, अवस्था f, स्थिति f, गति *pop.* गत f, गोष्ट f, हवाल f. m; as, "Our C. is miserable." [IN THAT C. तशांत, तसें असतांना, मग.] २ *case adduced or occurring instance* अढळ (?) m, प्रतीक (?) n, उदाहरण n, स्थल n. ३ *med. the state of the body* देहस्थिति f, प्रकृति f, देहभावना f. ४ *the history of a disease* रोग्याचें भावनापत्रक, रोग्याचें टिपण, दुखण्याचा मजकूर m. ५ रोगी, दुखणाईत; as, Ten C. s. of fever. ६ *law. the state of facts, the question* मजकूर m, हकिकत f, कैफियत f, वाका m, तकरीर m, भूत (S) n, प्रकरण n. [WRITTEN STATEMENT OF A C. तकरीरनामा m.] ७ *a suit at law* मुकदमा m, प्रकरण n, खटला m, खटलें n, दावा m. ८ *gram. the variation of nouns* विभक्ति f, कारकव्यक्ति f. [The six कारकें are:—कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, अधिकरण or प्रथमा, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी.] ९ (of instruments) गंज m. Case of conscience, see Conscience. In any case कांहीं झालें तरी. In case (असें) असेल तर. To make out one's case. See To make out. The case खरी वस्तुस्थिति.

Casein, Caseine (kā'sē-in) [Fr. *caseigne*, from L. *caseus*, cheese. पोटांत रेनेटच्या कार्यानें दुधांतील केसीनोजन-Caseinogen-चें पृथक्करण झालें म्हणजे त्यापासून (Casein) उत्पन्न होतें.] n. दुग्धज n, दुधांतील वीर्य n, दुग्धवीर्य n, दुधांतील मुख्य सेंद्रिय नत्रप्रचुर घटक. Ca'sēic a. दुग्धवीर्यासंबंधीं. Ca'seous a. दुग्धजमय, दुग्धवीर्यमय.

Casemate (kās'māt) [Fr. *casemate*,-It. *casamatta*, from *casa*, house & *matto, matta*, mad, weak.] n. जंगीच्या पाठीमागचें तोफघर n, जंगीच्या पाठीमागची तोफा ठेवण्याची किंवा माणसें उभीं राहण्याची सुरक्षित जागा f.

Casern (ka-sėrn') [Fr.-L. *casa*, a hut.] n. *a lodging for soldiers in garrison towns, usually near the rampart* तटालगत आंत शिपायांची आसऱ्याकरितां राहण्याची जागा f.

Cash (kash) [Fr. *casse*, case, box, cash-box, cash.] n. रोकड f, नगद f, n, नगदी f, दाम m, सोनेंनाणें n, *colloq.* रोख or रोकड, रोकड पैसा m. २ (*obs.*) तिजोरी f. C. v. t. (note, bill, &c.) रोकड दाम करणें, वटावणें, मोडणें, टक्के करणें. Cash-account n. रोकडीचा हिशेब m, रोकडीचा व्यवहार m. Cash-credit n. (पेढीवरून) रोख पैसे उचलण्याची पत f. Cash-book n. रोजकीर्द, रोजमेळ, रोकडवही. Cashier' n. रोख पैसे वांटणारा m, सराफ. Cash-keeper n. खजीनाकारकून m, खजिनदार m, जामदार (*) m, पोतनीस (*) m, किल्लीदार (*) m, रोख पैशाचा हिशेब ज्याकडे असतो तो मुनीम m. [PRIVATE C. खासगीवाला.] Cash-payment n. रोख पैसा देणें n. Hard Cash रोख नाणें. Out of Cash रोकड पैशाशिवाय. In cash रोकडीच्या रूपांत-नें. Ready cash रोकड. Cash-boy दलालानें गिऱ्हाइकांकडून गोळा केलेले पैसे खजीनदाराकडे नेणारा नोकर. Cashing *pr. p.* Cashed *pa. p.*

*N. B.*—Treasurer खजीनदार; Cashier सराफ, जामदार, पोतनीस, आणि किल्लीदार हे मराठेशाहींत निरनिराळे दर्जाचे अधिकारी होते. तेव्हां हे शब्द Cashier, किंवा Cash-keeper ह्या शब्दांना योग्य प्रतिशब्द होणार नाहींत.

Cash (kash) n. चिनी लोकांचें एक तांब्याचें नाणें n.

Cashew (ka-shōō') [A corruption of Fr. from Malay *kayu* tree.] n. *a tree* काजू f, काजूचें झाड n. २ *an apple or nut,* (C. apple) *pulpous portion* बोंड n, (काजूचें) बोंड n, काजूगोळा m. Cashew-nut n. काजू, काजूगोळा.

*N. B.*—काजूला कोठें कोठें जांब असेंही म्हणतात.

Cashier (kash-ēr') [Fr. *casser*, to break, to annul, from L. *cassare*, to annul.] v. t. *to dismiss from an office for bad conduct* बडतरफ-बरतर्फ करणें, स्थानभ्रष्ट-स्थानच्युत-पदच्युत-पदभ्रष्ट-&c. करणें, नोकरीवरून काढून टाकणें. २ लक्षांत न घेणें, सोडून देणें, वेगळा करणें; as, "They absolutely C. the literal express sense of the words." ३ रद्द करणें. Cashierer n. (R.) बडतरफ करणारा. Cashiering n. Cashierment n. बडतरफी f, रजा f.

Cashmere (kash'mēr) [From *Cashmere* in India.] n. *a rich and costly shawl* काश्मीर देशांतील लोंकरीची उंची शाल f, काश्मीरी शाल f. Also Cashmere shawl.

Casings (kā'singz) n. *pl.* गोवऱ्या, शेण्या.

Casino (kas-ē'nō) [It. *casino*, a small house.—L. *casa*, a cottage.] n. *pl.* Casinos. *a small country-house* खेड्यांतली बंगली. २ *a building or saloon*

*used for social meetings or public amusements, for dancing or gaming* आराममंदिर *n*, नृत्यगृह *n*, द्यूतगृह *n*. ३ (also Cassino) पत्त्यांचा क्यासिनो नांवाचा एक डाव *m*.

Cask (kask) [Sp. *casco*, a pot-sherd, a skull, a helmet, from *cascar*, to break.—L. *quassare*, to break.] *n*. पीप *n*, पिंप *n*, काष्ठतुंग(?) *n*. २ पीप, पीपभर माप *n*. ३ (*obs.*) शिरस्त्राण *n*. ४ (*obs.*) जवाहीर ठेवण्याची लहान पेटी *f*. C. *v. t.* पिपांत घालणें. Also Casque.

Casket (kask'et) [Dim. of cask. Fr. *casque*, a helmet, from Sp. *casco*.] *n*. (रत्नें वगैरे मोल्यवान् पदार्थ ठेवण्याचा) डबा *m*, डबी *f*, टोपली *f*, करंड *f*, करंडा *m*, पेटी. २ कोणताही प्रिय किंवा किंमतवान् जिन्नस ज्यांत असतो असा डबा-करंडा *m*. C. *v. t.* (*Shakes.*) करंड्यांत घालणें, डब्यांत ठेवणें.

Casque (kask) [Sp. *casco*, a helmet, a case.] *n*. शिरस्त्राण *n*, टोप *m*, डोकें आणि तोंड यांपुरतें चिलखत *n*. चिलखतवजा तोंडावरील बुरखा अथवा पडदा.

Cassia (kash'ya) *n*. बाहवा-टाकळा-इत्यादि वर्गांच्या जातीची वनस्पति *f*. C. fistula बाहवा *m*. C. tora टाकळा *m*. Woody-cassia तज, त्वक्पत्र, त्वक्सार. Cassia-oil दालचिनीचा अर्क *m*.

Cassimere (kas-i-mēr') [Corruption of *Cashmere* in India.] *n*. काश्मीर, उत्तम लोंकरीचें सळईदार विणलेलें एक प्रकारचें कापड *n*. also Kerseymere.

Cassino (kas-sē'no) [It *casino*, a small house, a gaming-house.] *n*. एकवीस टिपक्यांचा क्यासिनो नांवाचा खेळ *m*. Great C. चवकटचा दाहिल्या, दश्शा. Little C. इस्पीकचा दुव्वा.

Cassiopeia (kās-i-ō-pē'ya) *n*. *astron.* उत्तरध्रुवाजवळचा एक सहा ताऱ्यांचा पुंज *m*, शर्मिष्ठा *f*.

Cassock (kas'ok) [Fr. *casaque*.-It. *casacca*.-L. *casa*, a cottage.] *n*. अंगांत घालण्याचा पोकळ झगा *m*, क्यासाक. २ खिस्ती आचार्य अंगांत घालतात तो झगा *m*, क्यासाक. Cass'ocked *a*.

Cassolette (kas'ō-let) [Fr.] *n*. अत्तरपेटी *f*, सुगंधिक द्रव्यें ठेवावयाची पेटी *f*. (सुवास बाहेर यावा म्हणून हिजवर छिद्रें पाडलेलीं असतात), (जाळीदार) अत्तराची डबी.

Cassonade (ka'-son-ād') [Fr. *casson*, *caisson*, a large chest. From sugar exported from Brazil in large chests.] *n*. *raw sugar* ब्राझिल देशांतून येणारी कच्ची साखर, क्यासानेड नांवाची साखर.

Cassowary (kas'ō-war-i) [Malay *kasuari*.] *n*. *pl*. Cassowaries. वगळ्यापेक्षां आकारानें लहान पण बळकट असा पासिफिक महासागराच्या बेटांतील एक पक्षी, त्याच्या डोक्यावर टोपीसारखा टणक पदार्थ असतो. हा पक्षी बुजरा आहे व फार जलद धांवतो, क्यासोवारी नांवाचा. पक्षी *m*.

Cast (kast) [Icel. *kasta*, to throw.] *v. t. to hurl, to fling, to throw* टाकणें, फेंकणें, झोंकणें, झुगारणें, भिरकावणें, उडवणें, होपटणें, (*obs.*) होडंगणें. २ *to direct or turn* (as the eyes) दृष्टि *f*. नजर *f*. फेंकणें. टाकणें. ३ ठेवणें, टाकणें; as, To C. a ballot सम्मतिगुटिका टाकणें. ४ *to throw down as in wrestling* चीत करणें, पाडणें, जमीनदोस्त करणें. ५ तट-भिंत इत्यादि घालणें. रचणें. ६ बाहेर टाकणें; as, "Neither shall your vine C. her fruit." ७ दुहेतणें, गाभटणें, अकालीं प्रसवणें; as, "Thy she-goats have not cast their young." ८ (प्रकाश इत्यादि) पाडणें-टाकणें-पसरणें. ९ (भार इत्यादि) टाकणें-ठेवणें, सत्ता-अधिकार सोंपविणें-हवालीं करणें; as, "The government I C. on my brother". १० (*obs.*) काढून टाकणें, बडतरफ करणें; as, The State can with safety C. him. ११ (पत्रिका) वर्त्तवणें-मांडणें, हिशेब करणें, गणित करणें. १२ (*obs.*) योजणें, कल्पना करणें. १३ *to defeat in a law-suit, to convict, to condemn* हतपक्ष-नष्टपक्ष करणें, विरुद्ध निकाल देणें, गुन्हेगार ठरविणें, गुन्हा शाबीत करणें. १४ एकाच बाजूला फिरवणें-वळवणें, मत एकाच बाजूला देऊन त्या बाजूची सरशी करणें, एकच बाजू जास्त वजनदार करणें; as, A casting vote,—voice. १५ ओतणें, घाट पाडणें, आकार देणें. १६ कायमचा ठसा (टाईप) पाडणें. १७ नाटकांत पात्रें योजणें, भूमिका ठरविणें, सोंगें वांटून देणें; as "Our parts in the other world will be new cast." [To C. anchor नांगर टाकणें. To C. a horoscope कुंडली मांडणें. To C. a shoe (said of a horse or ox) नाल हरवणें. To C. aside (निरर्थक किंवा कुचकामाचें म्हणून) बाजूला ठेवणें. To C. away उधळून टाकणें, व्यर्थ खर्च करणें, व्यर्थ घालवणें. गमावणें, हरवणें. २ टाकून देणें, रद्द करणें, मरूं देणें, नाहींसा होऊं देणें. ३ फुटूं-मोडूं देणें. C. away *n*. हतभागी मनुष्य *m*, टाकाऊ मनुष्य *m*. जिन्नस. C. away *a*. देवाधर्मानें टाकलेला, बहिष्कृत, निरुपयोगी. To C. by काढून टाकणें, रद्द करणें, फेंकून देणें. To C. down खिन्न करणें, मनांत उतरवणें. To C. for (शिकारीचा पत्ता लावण्यासाठीं) चोंहीकडे धांवणें; as, The dogs, when they lose scent of the chase C. for it. To C. forth बाहेर टाकणें. To C. in one's lot with एखाद्याच्या सुखदुःखाचा वांटेकरी होणें, दुसऱ्याच्या नशिबाशीं आपल्या नशिबाची सांगड घालणें. To C. away care मनाला कधींही काळजी शिवूं न देणें, सदोदित आनंदांत-मजेंत राहणें. To C. behind one विसरणें, सोडून देणें, नाकारणें, टाकणें. Cast-down *a*. उतरलेला, मनांत खिन्न झालेला; as, With cast-down looks. To C. in one's teeth बोलण्यांत एखाद्याचे (त्याच्याच शब्दांनीं-विचारसरणीनें) दांत पाडणें-पच्ची करणें. To C. lots चिठ्या टाकणें. To C. off दूर फेंकून देणें, टाकून देणें, टाकणें, त्याग करणें. Cast-off *a*. निरुपयोगी म्हणून टाकून दिलेला. Cast-off *n*. टाकून दिलेली वस्तु. To C. off copy हातच्या प्रतीची किती छापील पानें होतील असा अंदाज करणें. To C. one's self on or upon दुसऱ्याच्या पूर्णपणें स्वाधीन करून घेणें. To C. the lead *naut.* शिशाचा गोळा तळापर्यंत टाकून पाण्याचा ठाव-खोली मोजणें. To cast out बाहेर काढणें.

घालविणें. २ बोलणें, उच्चारणें. ३ *to quarrel, to fall out* भांडणें. To cast a slur upon (चा बदलौकिक करणें, दोष लावणें. To cast up हिशेब करणें, किंमत आकारणें. २ ओकणें. ३ बोलण्यांत दांत पाडणें, टोमणा मारणें (R.) ४ अकस्मात्-एकदम दिसणें; as, "Another countryman, and Jesuit priest now casts up." Cast *v. i.* टाकणें. २ तारवाची दिशा बदलणें. ३ *to devise or plan* मनांत विचार करूं लागणें, मनांत युक्ति योजणें-काढणें; as, To C. about for reasons (हें कां तें अशा प्रयोगात्मक बुद्धीनें) कारणें लावीत बसणें-शोधणें. ४ मनांत घोळणें. ५ (साचा) आकार येणें. ६ ओकणें. ७ वेडौल होणें, वेड्यावांकड्या आकृतीचा होणें. Cast *n.* (*a*) फेंकणें *n*, टाकणें *n*, क्षेपन *n.* (*b*) क्षेप, प्रक्षेप *n.* २ फेंकलेली वस्तु *f.* ३ (फेंकलेल्या वस्तूचा) टप्पा *m*- अंतर *n.* ४ फांशानें टाकलेला डाव *m*, नशीव *n*, दैव *n*, सट्टा *m*, दैवयोग *m*, धाडस *n.* ५ (*a*) सापानें टाकलेली कात *f.* (*b*) पक्ष्याच्या पोटांतील मळ *m*, मैला *m*, किड्याची शीट *f.* ६ साच्यांत ओतणें *n.* ७ घडण *f*, घडणी *f*, घडवण *f*, घाट, घडाव *m*, डौल. ८ सांचा *m*, नमुना *m*, पाटण or पाटन (corruption of *pattern*), आकार *m*, चर्या *f*, झांक *f*, स्वाद *m*, छटा *m*, धुनुक *f*, लकेरी *f*, लकेर *f*, वास *m.* ९ नाटकांतील निरनिराळ्या पात्रांस सोंगें वांटून देणें. १० आकार *m*, चर्या, ढब, आकृति *f*; as, A peculiar C. of countenance. ११ एकाच वेळीं हातांतून उडालेली ससाणा पक्ष्याची जोडी *f.* १२ रंगाची छांट *f*-आभास *m*, छत(?), छाया *f*, छटा *m.* १३ नजरेची-दृष्टीची ढब *f.* १४ ओतणी *f*, सांचा *m.* १५ ओतणींत धातूचा रस पोहोंचविणारी नळी *f.* १६ चारांची एकपाती, चौकडी *f.* (जसें आपलेकडे आंबे मोजतांना पंचकडी, पांचांची पाती वापरतात, तसें इंग्लंडांत कांहीं जिन्नस मोजतांना चारांची पाती वापरतात.) (?) Cast, Casted *a.* निरुपयोगी म्हणून टाकून दिलेला. Caster *n.* (v. V. 1.) झोकणारा, टाकणारा, क्षेपक. २ ओतणारा, ओतारी. ३ (चटणी, मसाला वगैरे ठेवण्याचें) लहान भांडें-पाळें *n.* ४ वरील पाळीं ठेवण्याची घडवंची *f.* ५ *pl.* (तोफ किंवा खुर्ची हवी तशी फिरवितां यावी म्हणून खालीं लावलेलीं) लहान चाकें *n. pl.* Casting *n.* (v. V. 1.) *act.* झोंकणें *n*, टाकणें *n*, क्षेप *m*, प्रक्षेप *m*, विक्षेप *m*, प्रक्षेपण *n.* २ सांच्यांत ओतण्याची कृति *f.* ३ सांचा *m.* ४ *mech. eng.* ओतकाम *n.* ५ (सापाची) कात वगैरे टाकणें *n.* Casting-net *n.* मासे धरण्याचें (एक प्रकारचें) जाळें *n.* Casting-vote,-voice अध्यक्षाचा दोन मतांचा अधिकार (दोन पक्षांचीं मतें समसमान झालीं म्हणजे अध्यक्षाला दोन मतें असतात), दुजोरी-निर्णायक-संमति. Casting weight (समतोल तराजूचें एक पारडें) खालीं नेणारें वजन *n.* Cast-iron बीड. Cast-shadow पडछाया. Cast-steel ज्या पोलादाच्या रसाच्या लांब कांबी करतात तें पोलाद, वितळून शुद्ध केलेलें पोलाद *n.* Last Cast शेवटचा धाडसी प्रयत्न. To C. beyond the moon मनोराज्य करणें. To C. pearls before swine. See Pearls. To set upon a C. दैवाधीन करणें. To C. behind one विसरणें, सोडून देणें, नाकारणें (?), टाकणें.

Castanets (kas'ta-nets) [L. *castanea*, a chestnut.] *n.* चिपळ्या *f*, *pl*, करताळ *f*, झांजरी *f*, मंजरी *f.*

Caste (käst) [L. *castus*, pure.] *n. a division of the Hindu Society* जात *f*, ज्ञात *f*, जाति *f.* [THE FOUR ORIGINAL CASTES ARE: ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र. C. AND LINEAGE-COMPREH. जातकुळी *f*, जातकूळ *n*, जातपात *f*, कुळगोत *n.* THE C. COLLECTIVELY. (AS ASSEMBLED IN AN INVESTIGATION OF AN OFFENCE, &C.) जातजमात *f*, काशीगोत *n* (R.), गंगागोत *n* (R.), गोत *n*, गोतगंगा *f*, जातगंगा *f*, दैव *n.* A MIXED C. OR RACE भेसळजात *f*, संकीर्ण जात, संकरजाति *f*, *colloq.* कोडबुळें *n.* A LOW C. MAN हलक्या जातीचा मनुष्य *m*, (*colloq.*) बाहेरचा-ला, गांवाबाहेरचा, दिवाकीर्ति (?) *pop.* दिवाकीर्त *m.* (?). BROTHER OR FELLOW BY C. जातभाऊ *m*, जातभाई *m.* A CIRCULAR NOTIFYING AN EJECTION FROM C. वाळीतपत्र *n*, बहिष्कारपत्र *n*, CONFUSION OF CASTES वर्णसंकर *m.* DISTINCTION OF C. जातिभेद *m.* EJECTED FROM C. जातीबाहेर टाकलेला, वाळीत, बहिष्कृत. EJECTION FROM THE C. वाळ *f.* (*v.* घाल, पड). EXTINCTION OF C. जातिलोप *m*, वर्णलोप *m.* FALLING AWAY FROM C. जातिभ्रंश *m.* FALLEN AWAY FROM C. जातिभ्रष्ट, बाटगा. FEUD IN A C. तट *m.* OF MIXED C. OR BLOOD संकीर्ण, मिश्र. PRIDE OF C. जात्यभिमान *m.* THE PECULIAR DUTY, VIRTUES, &C. OF A C. जातिधर्म *m.* TO LOSE CASTE बाटणें, जात गमावणें.]

*N. B.*—The word वर्ण is used with respect to the primeval four-fold division of the ancient Hindu Society. The only four varṇas are–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र.

Castellan, Castellated, see Castle.

Caster (käs'tėr), see the word Caster under Cast.

Castigate (kas'tig-āt) [L. *castigare*, *castigatus*, to correct, to punish, from *castus*, pure, chaste & *agere*, to move, to drive.] *v. t. to chastise, to correct* शिक्षा करणें, शिक्षा म्हणून कोरडे मारणें-ओढणें, दंड करणें. २ (आपली नापसंती दर्शविण्यासाठीं-शिक्षा करण्यासाठीं) खरमरीत टीका करणें. Castiga'tion *n. punishment* शिक्षा *f*, दंड *m.* २ खरमरीत टीका *f.* Cas'tigātor *n.* शिक्षा-दंड करणारा. २ खरमरीत टीका करणारा. Cas'tigātory *a.* C. *n.* शिक्षा करण्याचें हत्यार.याचा पूर्वीं उपयोग करीत असत, called also Ducking stool.

Castle (kas'l) [A. S. *castel*, from L. *castellum*, dim. of *castrum*, a fortified place.] *n. a house or mansion of a prince or nobleman* वाडा *m*, हवेली *f*, महाल *m*, सरदाराचें घर *n.* २ *a fortified place, a fortress* कोट *m*, किल्ला *m.* ३ (at chess) हत्ती *m.* ४ लढाऊ जहाजावरील किल्ला *m.* ५ हत्तीवर स्वरक्षणार्थ नेलेला किल्ला *m.* C. *v. t.* कोट बांधून तटबंदी करणें. २ किल्ला-गड बांधणें. C. *v. i.* (at chess) राजाच्या घराजवळ हत्ती नेणें, राजाला हत्तीनें झांकणें, हत्तीनें शह निवारणें.

Cas'tellan *n.* किल्लेदार *m*, गडकरी. Cas'tellated *a.* किल्ल्याप्रमाणें मनोरे किंवा तटबंदी असलेला. Castle-builder *n. fig. day-dreamer* मनोराज्य करणारा. Castle-building *n. fig.* मनोराज्य करणें *n.* Castled *a.* Castle-guard,-ward *n.* किल्ल्याचा रक्षक, किल्ल्यावरचा पाहारेकरी. २ (Old English Law) किल्ल्याच्या नियमित अंतरामधील घरावरील कर-घरपट्टी *f.* हा कर घराच्या रक्षणार्थ द्यावा लागतो. Castlery *n.* किल्ल्यावरील सत्ता *f.* Castlet *n.* लहान किल्ला *m.* Castles in Spain, Castles in the air मानससृष्टि *f.* मनोराज्य.

*N. B.* Castle = किल्ला, Fort = गड, Fortification = तट, Fortress = लहान गड.

Castellated, see Castle.

Castling (käst'ling) *n.* गर्भपात *m*, गर्भस्राव *m.*

Castor (kas'tor) [L. *castor*, the beaver; obtained from the special glands of the beaver. Of Eastern origin-Sk. *kasturi*, musk.] *n.* एक जातीचा जलस्थलचर (क्यास्टर नांवाचा) चतुष्पाद प्राणी *m.* २ बीव्हर जनावराच्या लोकरीची टोपी *f.* हिला क्यास्टर म्हणतात. ३ कोट करावयाची एक फार किंमतीची बनात *f.* क्यास्टर नांवाची बनात *f.*

Castor (kast'or) [L.] *n. astron.* मिथुन राशीमधील पुनर्वसुनक्षत्राची पहिली तारा *m*, अश्विनीकुमारपुंजांतील एक तारा *m.* Castor and Pollux अश्विनीकुमार. [CASTOR AND POLLUX WERE THE TWIN SONS OF JUPITER AND LEDA.]

Castor-oil (kas'tor-oil) [A corruption of *castus oil*, formerly called *agnus castus.*] *n.* (the oil) एरंडेल *n.* C.-plant. *Ricinus communis or Palma Christi* एरंड *m.*-seed एरंडी *f.* एरंडबीज *n.* (the root) एरंडमूळ *n.* [SOME VARIETIES OR SPECIES ARE:—एरंडी, सुरती एरंड *m*, गोडा एरंड *m*, चंद्रज्योत *f.* कडवा एरंड *m*, श्वेतएरंड *m.*] Castor-bean *n.* एरंडी *f.* Castors same as Casters under Cast.

Castral (kas'tral) [L. *castra*, camp.] *a.* लष्कराच्या तळासंबंधीं.

Castrametation (kastra-me-tā'shun) [L. *castra*, camp, & *metior*, Sk. मा, to measure off.] *n. mil.* तळ देण्याची कला *f.* तळ देणें *n*, छावणी देणें *n.*

Castrate (kas'trāt) ]L. *castrare, castratus*, to geld; akin to Sk. शस्त्र, knife.] *v. t. to emasculate* खच्ची करणें, खोजा करणें, अंड *m. pl.* काढणें *g. of o.*, अंडच्छेद *m*- अंडच्छेदन *n.* करणें *g. of o.*, नामर्द करणें. २ (by pounding the testicles) बडविणें, चेंचणें. ३ *to expurgate* ग्रंथ-लेख वगैरेंतून बीभत्स किंवा जालिम भाग काढून टाकणें. Cas'trated *p.* (v. V.) खच्ची केलेला, बडविलेला, भादा (द्या), खोजा, &c. Castrā'tion *n.* (v. V. 1.)-*act.* अंड काढणें *n*, खच्ची *f.* अंडच्छेद *m*, अंडच्छेदन *n.* २ अंड बडविणें *n*, चेंचणें *n*, बडविणें *n.* Castrato *n.* उंच आवाज रहावा म्हणून लहानपणापासूनच खच्ची केलेला गवई. *pl.* Cas'trati. Cas'trating *pr. p.* Cas'trated *pa. p.*

Casual (kash'ū-al) [Fr. *casuel.*-L. *casualis*, from *casus*, fall,accident, from *cadere*, to fall.] *a. fortuitous* दैवानें घडलेला, अचिंतित, दैविक, यदृच्छाजात, असंकेतिक, आगंतुक, दैवघटित, अतर्कित. २ *incidental* नैमित्तिक, प्रासंगिक, प्रसंगोपस्थित, प्रसंगोपात्त. C. *n.* कधीं कधीं येणारा पाहुणा *m*, उडाणटप्पू-भिकारीमजूर *m.* २ प्रसंगोपात्त भिक्षुकी *f.* "The tithes and the casuals of the clergy." Cas'ualism *n.* दैववाद *m*, जगांतील सर्व व्यवहार दैवाधीन आहेत असें मत *n.* Cas'ually *adv.* दैवयोगानें, दैवानें, यदृच्छेंकरून. Cas'ualness *n.* (v. A. 1.) दैवयोग *m*, यदृच्छा *f.* दैवघटितत्व *n*, आगंतुकत्वपण *n.* Cas'ualty *n.* दैवघटित गोष्ट *f.* दैवकृत *n.* २ *a chance producing death* अपघात *m*, अपमृत्यु *m.* ३ *pl.* (*mil. & nav.*) (लढाईंत मृत्यूमुळें, जखमा झाल्यामुळें, शिपाई पळून गेल्यामुळें व इतर आकस्मिक कारणामुळें झालेलें) नुकसान *n.* Casualty-ward *n.* अपघातखण *m*, इस्पितळांतील अपघातांचे रोग्यांचा खण *m.* Casual ward *n.* दोन दिवस विपत्ति आलेल्यांचें अनाथगृह *n.* Casual labourer कायमची नोकरी नाहीं असा मनुष्य *m.*

Casuist (kaz'ū-ist) [L. *casus* a case.] *n. one skilled in casuistry, in studying and resolving cases of conscience or nice points regarding conduct* दोषादोषविवेचक, दोषादोषवेत्ता, धर्माधर्मविवेचक, सदसत्संशयनिवर्त्तक. Casuist'ical *a.* (v. N.) दोषादोषविवेचनासंबंधीं-विषयक, &c. Cas'uistry *n. the science of determining the lawfulness or unlawfulness of acts* दोषादोषविवेचन (विद्या) *f.* धर्माधर्मविचार *m*, धर्माधर्मविद्या *f.* कार्याकार्यविवेक *m.*

Cat (kat) [A. S. *cat.*] *n.* मां(मा)जर *m. f.* मार्जार *m*, बिडाल *m.* [MALE,-HE C. बोका, मांजर. FEMALE,-SHE C. मांजर, मांजरी, माटी, बिल्ली *f.* IN ENDEARMENT, CORRESPONDING TO *puss, pussy*, मंगी *f.* माऊ, मनी, मांजरू *n.* IN ENDEARMENT, DISPARAGEMENT, OR CONTEMPT मांजरूं. IN CANT PHRASEOL. वाघाची मावशी. TOM C. वाल्या बोका. WILD C. रानमांजर *m. f. n.*] २ खुनशीचहाड बायको *f.* ३ वेढा घालणाऱ्या मंडळीचा बचावाचा इकडून तिकडे नेतां येण्याजोगा बुरुज *m.* ४ सहा पायांची एक तिवई *f.* हिचे तीनच पाय जमिनीवर टेंकतात. ५ (*a*) *naut.* एक मोठें कोळशाचें गलबत *n*, महागिरी. (*b*) नांगर ओढण्याचा दोर *m.* ६ एक प्रकारचा चेंडूचा खेळ व तो खेळ खेळण्याचें साधन *n.* C. *v. i.* नांगर पूर्ण वर उचलणें. Cat'amount *n.* चित्ता *m*, वाघ *m.* Cat and dog मांजर व कुत्र्याप्रमाणें भांडखोर, कजेदलाल. Cat-call *n.* नाटकगृहांत केलेला कर्कश शिटीचा आवाज *m*, नाटकाची वेळ टळली म्हणजे किंवा नाटक वाईट झालें म्हणजे असा आवाज करतात. २ कर्कश शिटी *f.* ओरड *f.* Cat-call *v. i.* कर्कश ओरडणें. *v. t.* कर्कश आवाज करणें. Cat-eyed *a.* मांजरडोळ्या, घारडोळ्या, घारा, घाऱ्या. [RATHER

C. घारेला OR घारोळा. ] Cat'-gut *n.* सांव *f*, आंतड्याची तार-तांत *f*- तांथ *f*, रोदा *m.* Cat'-hammed *a.* टाळघाशा, टाळकुव्या. Cat'-head *n.* मांजरडोकी नळी *f*; मांजराच्या डोक्यासारखा नळीचा भाग *m.* ह्यांतून नांगराच्या दोऱ्या घातलेल्या असतात. Cat'-hole *n.* नांगराच्या दोऱ्यांचें घर (भोंक) *n.* Cat'-hood *n.* मांजरासारखे चाळे करणें *n*, मांजरासारखा स्वभाव *m.* Cat'kin *n.* क्याटकिन फूल. Cat'-lap *n.* गरीबीचें पेय *n*, साधें पेय *n.* Cat'-like *a.* गुपचुपीचा, चोरव्या रीतीचा. Cat'ling *n.* मांजराचें पिलूं *n.* २ *surg.* संधिबंधनें सोडविण्याचा दोन्हींकडे धार असलेला-दुधारी चाकू *m.* Cat-nap *n.* डुलकी *f*, मार्जारनिद्रा *f.* Catamoun'tain or Cato'mountain *n.* रानमांजर. २ *leopard* चित्ता. Cat-o'-nine-tails फटके मारण्याचा नऊ गांठाळ दोऱ्यांचा चाबूक *m.* Cat's-cradle *n.* एक प्रकारचा सुलांचा दोरीचा खेळ *m.* Cat's eye *n.* मांजरडोळा मणि *m.* (या मण्याचा रंग मांजराच्या डोळ्याप्रमाणें असतो.) एक जातीचें मार्जारनत्री रत्न. Cat-silver *n.* एक प्रकारचें रुपेरी अभ्रक. Cat's meat *n.* मांजराला खाण्यासाठीं घोड्याचें मांस *n.* Cat's paw *n. naut.* वाऱ्याची मंद झुळूक *f*, हलका वारा *m.* २ (used in a bad sense) हस्तक, क्रीडामृग, हातखोरण, स्वहेतुसाधन *n*; as, To make a cat's paw of. Cattish *a.* मांजरासारखें. Cat-witted *a.* हलक्या बुद्धीचा, मगरूर व द्वेषखोर (मनुष्य), क्षुद्रबुद्धि, मांजरबुद्धीचा. Catted and fished (said of an anchor) अगदीं वर उचलून तारवाच्या बाजूस गच्च बांधून ठेवलेला (नांगर). To rain cats and dogs पावसाच्या मुसळधारा पडणें. To see which way the cat jumps आपण अमुक एक बाजू घेण्यापूर्वी वस्तुस्थिति एकदम कशी बदलेल ह्याकडे लक्ष्य ठेवणें. To let the cat out of the bag खोटी गोष्ट उघडकीस आणणें, बिंग बाहेर फोडणें, गाफलपणानें गुप्त हेतु प्रगट करणें, ढोलकें फोडणें. To lead or live a cat and dog life नेहमीं भांडण करणें. To bell the cat मांजराच्या गळ्यांत घांट बांधणें. २ एखादें धोक्याचें काम करणें. To grin like a Cheshire cat मोठ्यानें खिदखिदां दांत काढून हसणें. To fight like Kilkeny cats एकमेकांचा नाश करण्याच्या बुद्धीनें लढणें. To turn a cat in pan (गो)घोलांटी घेणें, घोलांट उडी मारणें. २ *fig.* (विश्वासघातानें एक बाजू सोडून) दुसऱ्या बाजूस मिळणें, उलट बाजूस मिळणें.

Catacaustic (kat'-a-kaws'tik) [Gr. *kata*, against & Caustic.] *a. geom.* प्रतिदाहक (वक्र).

Catachresis (kat'a-krē'sis) [Gr. *kata*, against & *chraomein*, to use.] *n. application of a term to a thing which it does not properly denote, abuse or perversion of a trope* अनुचित दृष्टांत *m*; as, "Her voice was but the shadow of a sound"; "To take arms against a sea of troubles." Catachres'tic *a.* अनुचित दृष्टांताचा, अनुचितसादृश्याचा. Catachres'tically *adv.*

Cataclysm (kat'a-klizm) [Gr. *kata*, downward & *klyzein*, to wash.] *n.* जलप्रलय *m.* २ *fig.* प्रलय, भयंकर उलथापालथ *f.* Cataclys'mic *a.*

Catacomb (kat'a-kōm) [It. *catacomba*.–L. *catacumba*.-Gr. *kata*, downward & *kumbe*, a hollow.] *n.* शववापिका *f*; प्रेतें पुरण्याची गुंफेसारखी जागा *f.* २ पुस्तकें, दारू वगैरे सुरक्षित ठेवण्याकरितां भुयारें असलेली जागा *f.* Cat'acumbal *a.*

Catacoustics (kat'a-kows'tiks) [Gr. *kata*, against & Acoustics] *n.* प्रतिध्वनिशास्त्र *n.* Catacous'tic *a.* प्रतिध्वनिविषयक, प्रतिध्वनिसंबंधीं.

Catadrome (kat'a-drōm) *n. mech.* जड वजनें वर उचलण्याचें व खालीं नेण्याचें यंत्र *n.*

Catafalque (kat'-a-falk') [Fr.–It. *catafalco*.] *n.* प्रेताची पेटी देवळांत कांहीं वेळ ठेवण्याचा प्लॅटफॉर्म *m.* २ उघडी प्रेतें नेण्याची गाडी *f.*

Catalectic (kat'-a-lek'tik) [Gr. *katalēgein*, to stop.] *a.* अपूर्ण (कवितेच्या शेवटल्या चरणांत अपूर्ण). २ *photo. & chem.* अपूर्ण.

Catalepsy (kat'a-lep-si) [Gr. *kata*, downward & *lepsis*, seizing.] *n.* (ज्ञानेंद्रियें एकदम विघडल्यामुळें) मूर्च्छा-संन्यास. Also Cat'alepsis. Catalep'tic *a.*

Catalogue (kat'a-log) [Gr. *kata*, down & *logos*, a speech.] *n.* अनुक्रमवार याद *f*, फेरिस्त *n*, यादी *f*, अनुक्रमणी *f*, अनुक्रमणिका *f*, क्याटलाग *m.* C. *v. t.* अनुक्रमानें यादी करणें, अनुक्रमणिका करणें. Cataloguing *pr. p.* Catalogued *pa. p.* Cat'aloguise *v. t.* Catalogue of names नामावली. Catalogue of stars तारास्थितिपत्रक, ताऱ्यांची सारणी, नक्षत्रसारणी.

Catalysis (ka-tal'i-sis) [Gr. *kata*, down, & *lyein*, to loosen.] *n. chem. a term used to designate certain phenomena, in which changes in the composition of substances are effected by the action of one body on another by contact* योगवाही क्रिया *f.* Catalyt'ic *a.* योगवाही.

Catamaran (kat'a-mar-an') [Tamil *kattumaram*, tied logs.] *n.* तराफ *m*, ताफा *m.*

Catamenia (kat'a-mē'ni-a) [Gr. *kata*, against & *men*, *menos*, a month.] *n. med.* ऋतु *m*, रज *n*, विटाळ *m*, पुष्प *n.* Catamen'ial *a.* रजोविषयक, (स्त्रियांच्या) विटाळासंबंधीं, आर्तव.

Catamount, See Catamountain under Cat.

Cataphonics (kat'-a-fon'iks) [Gr. *kata*, against & *phone*, sound.] *n.* प्रतिध्वनिविचार *m.* प्रतिध्वनिशास्त्र *n.* Cataphon'ic *n.*

Cataplasm (kat'-a-plazm) *n. med.* पोटीस *n*, पिंड- [स्वेद, प्रलेप *m.*

Cataract (kat'-a-rakt) [Gr. *kata*, down & *rhegnymein*, to break.] *n.* धबधबा *m*, धोत *m*, धोदा (धा) *m*, धोधाणी *f.* २ *med.* मोतीं *n*, मोतीबिंब *n*, मोतिबिंदु *m*, कांच *m*, नेत्रपटल *n.* Cat'arac'tous *a.*

Catarrh (kat-är') [L. *catarrhus*.—Gr. *kata*, down & *rhein*, to flow.] *n.* (श्लेष्मलत्वचेला सूज येऊन

झालेलें) पडसें *n*, अभिष्यंद, शैत्य *n* [असें शैत्य झालें असतां थोडासा ज्वर, घसा सुजल्यामुळें घोगरा आवाज, खोकला व नाकांतून पाणी हीं लक्षणें होतात.], प्रतिश्याय (according to माधवनिदान an old medical work). [C. of a horse शेंबा.] Catarrh'al, Catarrh'ous *a.* पडशाचा, पडशाविषयींचा, पडशानें झालेला, शैत्यज. Catarrhal fever शैत्यज्वर. Catarrh of the bladder मूत्राशयाची पिच्छात्वचा सुजून होणारा अभिष्यंद-श्लेष्मस्राव. Catarrh of the bronchial tubes लघुश्वासनलिकेच्या पिच्छात्वचेचा अभिष्यंद.

Catastrophe (kat-as'trō-fē) [Gr. *kata*, down and *strephein*, to turn.] *n.* नाटकाचा उपसंहार *m*, आकस्मिक परिणाम *m*, निर्वहण *n*, निर्वाह *m*. २ (*a*) *a ruinous issue or event* दुरंत *m*, दुष्परिणाम *m*, दुःखपरिणाम *m*, अरिष्ट *n*. (*b*) *a sudden calamity* आकस्मिक संकट *n*. आपत्ति *f*. आपदा *f*. ३ (जमीन एकदम खालीं जाऊन किंवा एकदम वर येऊन होणारा) आकस्मिक फेरफार *m*. हालचाल *f*. Catastroph'ic *a.* Catas'trophism *n.* (भूगर्भशास्त्रांतील) जमिनींत भूगर्भांत एकदम भौतिक स्थित्यंतरें झाल्यामुळें भूगर्भिक फेरफार झाले आहेत असें मत *n*, आकस्मिक स्थित्यंतरवाद. Catas'trophist *n.* आकस्मिक स्थित्यंतरवादी.

Cat-call, see Cat.

Catch (kach) [O. Fr. *cachier*, to hunt, to chase, hence to catch.-L. *captiare*, for *captare*, to catch.—*capere*, *captus*, to seize.] *v. t. to lay hold of or on, to apprehend* धरणें, हातांत धरणें, पकडणें. २ *to receive in its passage* झेलणें, झेलून घेणें, झिकणें (R.); as, To C. a ball. ३ *to get hold of, to get into one's power* धरणें, डावाखालीं-डावांत-&c. आणणें, आवाक्यांत येणें *in. con.*, घावाडावांत सांपडणें *in. con.*, पटकावणें; as, "Torment myself to catch the English throne." ४ (a contagion or disease) घेणें, जडणें *in. con.*, लागणें *in. con.*, येणें *in. con.*; as, To C. the plague. ५ (a song or tune) *to take up and follow* उचलणें. ६ (as in speech or conduct) *to lay hold of* पकडणें, गोवणें, कबजीं धरणें or पाडणें, पछाडणें, कडसणींत धरणें; as, To C. him in his words. ७ (with *up*) गाठणें, मिळवून घेणें; as, To C. up a traveller in advance. ८ हिसकावणें, हिसकावून घेणें. ९ अचूक-एकदम पकडणें; as, To C. a thief in the act of stealing. १० (मध्यें) पसरणें-(ला) लागणें; as, The fire caught the adjoining house. ११ मनरंजन करणें, मनहरण करणें, रिझवणें; as, "The soothing arts that catch the fair." १२ (सहानुभूतीमुळें अनुकरणाकरितां) पतकरणें, स्वीकारणें, घेणें, उचलणें. १३ (वेळेवर जाऊन) पकडणें; as, To C. a train. [To C. fire (ला) आग लागणें. २ *fig.* मनोविकार-महत्वाकांक्षा-प्रेम ह्यांना स्फूर्ति येणें, जोर-आवेश येणें, (चा) भडका होणें, पेट घेणें. To C. it *colloq.* खरडपट्टी निघणें *in. con.*; as, "He catches it up if he does not bring home a fair proportion to his wife." २ शिक्षा भोगणें *colloq.* To C. a person's eye एखाद्याच्या नजरेस येणें, (एकमेकांची) नजरानजर होणें. To C. one up बोलण्यांत पकडणें. To C. out (*cricket*) चेंडू झेलून बॅटवाल्याला बाद करणें. To C. up जबरीनें हिसकाऊन घेणें, पटकावणें, हात मारणें. २ एकदम वर अलग उचलणें. ३ See V. T. 9. To C. a Tartar आपल्यापेक्षां जास्त बलाढ्य शत्रू पकडणें, शेरास सवाशेर भेटणें. To C. as catch can हातास येईल तसें पकडणें. To take or C. a likeness नक्कल उतरणें-करणें, अनुकरण करणें. C. *v. i. to be contagious* लागणें. २ *to fasten on* लागणें, गुंतणें, अडकणें; as, A kite C.es in a tree. ३ *to take fire, to ignite* चेतणें, पेटणें, लागणें, शिलगणें. ४ *to sustain some morbid affection* धरणें. ५ *to endeavour to seize (at)* झोंबाडा *m*. झेप *f*. &c. घालणें, धरण्याचा प्रयत्न करणें, उत्सुकतेनें-आशेनें धरणें; as, "The drowning man catches at a straw." ६ पकडणें, गच्च बसणें; as, The bolt does not C. ७ (संसर्गानें) पसरणें; as, The plague is catching from man to man. [To C. on (ला) जाऊन बिलगणें. To be on the C. धरितां येईल अशा बेतानें किंवा पवित्र्यानें बसणें. To C. up with पकडणें, च्या अगोदर जाऊन पोंहचणें. C. *n. seizure* धरणें *n*, पकडणें *n*. [To LIE UPON THE C. धरावयास टपून बसणें.] २ *clasp, hook, hold, chape* अडकण *n*, अडकवण *n*, आंकडा *m*, कडी *f*, अर्गला *f*, अडसर *m*, अडणा *m*, कचक (?) *f*; as, The C. of a gate. ३ धरणें *n*, झेलणें *n*. ४ पकडतांना-झडप घालतांना बसण्याचें आसन *n*, झडप घालण्याकरितां केलेली तयारी *f*. तत्परता *f*. ५ (एकदम झालेला) लाभ *m*, फायदा *m*, घोबें *n*. ६ एकाच वेळीं पकडलेल्या सर्व वस्तु; as, A good C. of fish. ७ *mus.* गाण्यांतील एक प्रकारची चीज किंवा पद. ८ थोडेंसें स्मरण *n*, आभास *m*; as, "We retain a C. of those pretty stories." ९ *pl.* लग्गा *m*, मिळालेला लाग *m*. किंवा अल्पसंधि. १० *colloq.* मोठा लाभ, मिळावयास हवी अशी वस्तु *f*, मिळेल तर बरी अशी वस्तु *f*, अलभ्य लाभ *esp.* a husband or wife in matrimony. ११ पकड *f*. १२ *fig.* शिकार *f*. Catch'able *a.* पकडण्याजोगा. Catcher *n.* पकडणारा. Catch-fly *n.* एक प्रकारच्या कॅचफ्लाय नांवाच्या वनस्पतीचें नांव *n*. Catching *n.* (v. V. 1.)-*act.* धरणें *n*, पकडणें *n*, &c. Catching *p. a.* सांसर्गिक, स्पर्शानुगामी. २ मनोहर, मनमोहक. Catch'ment-bās'in *n.* नदीच्या पात्रांत जे वढ्या प्रदेशांतील पाणी येतें तो सर्व प्रदेश *m*, नदीच्या पाणलोटाचा प्रदेश *m*, थडी *f*, as, गंगथडी *f*; पाण्याचा पुरवठा करणारा प्रदेश, नदीचा पाणवठा *m*, नदीचा पूरक प्रांत *m*. Catchment area पाण्याचा पुरवठा करणारा प्रांत *m*. Catch'-penny पुष्कळ खप व्हावा म्हणून तयार केलेली लोकांस आवडणारी अल्प किंमतीची वस्तु (मुख्यत्वेंकरून पुस्तकें वगैरे), पैसा मिळविण्याची नवीन टूम. C. *a.* पैसा मिळविण्याकरितांच केलेली. Catch-water

सांठवलेल्या पाण्याचा खड्डा *m.* Catch-weight *adv.* जास्त वजनाशिवाय; as, To ride catch-weight. Catch-word *n.* पुढील पानाच्या आरंभीं लिहावयाचा शब्द *m.* (हा मागील पानाच्या कोंपऱ्यावर लिहितात). २ इशाऱ्याचा शब्द *m*, खुणेचा-संकेताचा शब्द *m.* Catch'y *a.* मनोवेधक, मोहक.

Catechise (kat'e-kīz) [Gr. *kata*, down & *echein*, to sound.] *v. t.* (प्रश्नोत्तरद्वारें) तोंडीं शिकविणें, प्रश्नोत्तररूपानें शिकविणें. २ प्रश्न करणें, प्रश्नरूपानें विचारणें, प्रश्नोत्तररूपानें तपासणी करणें. Catechet'ic,-al *a.* प्रश्नोत्तराचा, प्रश्नोत्तररूप, प्रश्नोत्तरमय-विशिष्ट. Catechet'ically *adv.* प्रश्नोत्तररूपानें, सवाल करून, जवाब घेऊन. Cat'echet'ics *n.* ख्रिस्ती धर्मशास्त्राचें प्रश्नोत्तर शिक्षाप्रकरण-शिक्षणपद्धति *f.* Cat'echē'sis *n.* (प्रश्नोत्तररूपाचें) प्राथमिक तोंडीं शिक्षण *n.* Cat'echiser *n.* प्रश्नोत्तररूपानें शिकविणारा. Cat'echising *n.* प्रश्नरूपानें शिकवणें *n.* Cat'echism *n.* प्रश्नोत्तरावली *f*, प्रश्नोत्तरमाला *f.* Cat'echist *n.* प्रश्नोत्तररूपानें शिकविणारा, तोंडीं शिकविणारा. Catechis'tic-al, Cat'echis'mal *a.*

Catechu (kat'e-shoo) [Tamil.] *n.* *terra japonica* खैरसार-सत्व *m*, कात *m.* [(the tree is called खैर *m*, खदिर *m.*), in cant or covert phraseol. चतुर्थ *m*, कडू *m.*] Cat'echu'ic *a.* कातासंबंधीचा.

Catechumen (kat'-e-kū'men) [Gr. *katēcheein*, to teach.] *n.* बाप्तिस्मा घेण्यापूर्वीं ख्रिस्ती धर्माचीं तत्वें शिकणारा, ख्रिस्ती धर्माचीं मूलतत्वें शिकणारा, बाप्तिस्म्याचा उमेदवार. हा शब्द पूर्वीं ख्रिस्ती लोकांच्या कळपांत जाऊं इच्छिणाऱ्या यहुदी लोकांस किंवा मूर्तिपूजकांस लावीत असत. ख्रिस्ती धर्माचा नवशिक्या, नवा छात्र. Cat'echumen'ical *a.* Cat'echumen'ically *adv.*. Cat'echū'menship, Cat'echū'menism, Cat'echū'menate *n.*

Category (kat'e-gor-i) [Gr. *kata*, down, against, and *agora*, assembly.] *n. log. & metaph. a predicament or a class* (इंद्रियजन्य ज्ञानावरून माहित झालेल्या) द्रव्यांच्या निरनिराळ्या विधेय वर्गांपैकीं एक, विधेयवर्ग *m*, समानाधिकरण *n*, (विधेय) पदार्थ *m.* (in the sense of *Sk. log.* अभिधेयत्वं is पदार्थत्वं or more strictly according to Aristotle विधेयत्वं is पदार्थत्वं.) [ACCORDING TO ARISTOTLE THE TEN PREDICAMENTS OR CATEGORIES ARE:—SUBSTANCE OR BEING, 2 QUANTITY, 3 QUALITY, 4 RELATION, 5 PLACE, 6 TIME, 7 POSTURE, 8 HAVING OR POSSESSION, 9 ACTION, 10 PASSION. THE SEVEN पदार्थाज् OF THE नैयायिकाज् OR CATEGORIES (THOUGH RATHER INACCURATELY SO TRANSLATED) ARE:— १ द्रव्य, २ गुण, ३ कर्म, ४ सामान्य, ५ विशेष, ६ समवाय, ७ अभाव. पदार्थ IS NOT AN ACCURATE RENDERING OF CATEGORY OR PREDICAMENT. CATEGORIES OR PREDICAMENTS ARE PREDICABLES (विधेयें) ONLY OR IMPLY SOMETHING WHICH CAN BE PREDICATED OF ANOTHER, WHILE पदार्थ IMPLIES NOT ONLY A THING WHICH IS PREDICABLE OF ANOTHER BUT ALSO A THING WHICH IS CAPABLE OF HAVING ANYTHING PREDICATED OF IT.] २ (according to Kant) the pure *a priori* conceptions of the understanding, which the mind applies (as forms or frames) to the matter of knowledge received from *sense*, in order to raise it into an *intelligible* notion or object of knowledge. इंद्रियजन्य ज्ञानाचें मनांत वर्गीकरण करून ठरविलेले ज्ञानविषयक कल्पितपदार्थवर्ग *m. pl.* परमभावना *f*, नानाविध ज्ञानाचा मूलवर्ग *m*, मुख्य विभाग *m.* [THE CATEGORIES OF KANT ARE:—1 OF QUANTITY—(*a*) UNITY, (*b*) PLURALITY, (*c*) TOTALITY. 2 OF QUALITY (*a*) REALITY, (*b*) NEGATION, (*c*) LIMITATION. 3 OF RELATION (*a*) OF INHERENCE AND SUBSISTANCE, (*b*) OF CAUSALITY AND DEPENDENCE, (*c*) OF COMMUNITY. 4 OF MODALITY (*a*) POSSIBILITY, (*b*) IMPOSSIBILITY (*c*) EXISTENCE, (*d*) NONEXISTANCE, (*e*) NECESSITY, (*f*) CONTINGENCE.] ३ वर्ग *m*, विल्हा *m*, विल्हे *f.* ४ स्थिति *f*, दशा *f*, अवस्था *f.* Categorematic *a. philos.* स्वतंत्रपदयोग्य, विधेयपदयोग्य. Categorical *a.* जातिवर्गासंबंधीं. २ *absolute*, *express* साफ, स्पष्ट, निश्चयाचा, निश्चयात्मक. Categorically *adv.* व्यक्त रीतीनें, साफ, निक्षून, स्पष्ट. Categoricalness *n.* Categories *v. t.* वर्ग करणें, मूळकल्पनेच्या-पदार्थांच्या जातीमध्यें घालणें, विल्हेवारी लावणें. Categorist *n.* वर्ग करणारा, निरनिराळया वर्गां-जातीमध्यें घालणारा, प्रतवारी करणारा.

Catelectrode (kat'-ē-lek'trōd) [Gr. *kata*, down & Electrode.] *n.* अवरोह *m*, ऋणध्रुव *n.*

Catenary (kat'-ē'nar-i) [L. *catena*, a chain.] *n.* रज्जुवक्र *n*, कातन्वली *f*, शृंखलावक्र *n*, दोरीचीं दोन टोंकें हातांत धरलीं म्हणजे दोरीची झालेली वक्र आकृति *f.* C. *a.* कातन्वली नांवाचा; as, C. curve. (२) निरनिराळ्या विषयांच्या सांखळीसंबंधीं. Cat'enate *v. t.* जोडणें, सांधणें, सांखळी करणें. Catenā'tion *n.* परस्परान्वय, अन्वय, (सांखळीसारखा) संबंध. २ परंपरा *f*, शृंखला, जोड, संधि.

Cater (kā'tėr) [L. *ad*, to & *capere*, to take.] *v. i. to provide food* अन्नसामग्री पुरविणें, खाण्याची-भोजनाची सामुग्रीची योजना करणें, आहारयोजना *f.* करणें, वाकनिशी करणें, अन्न विकत देऊन पुरवठा करणें. २ (with *for* or *to*) पाहिजे असेल तें देणें-पुरवणें (as theatrical or musical entertainments). Caterer *n.* मोदी, अन्नसामुग्री पुरविणारा. Catering *n.* Catery *n.* भां (भं)डार, कोठार, मोदीखाना.

Cater-cousin (kā'tėr-kuz'n) *n.* लांबचा नातेवाईक (परंतु अतिशय सलोख्याचा). See Quarter-cousin.

Caterpillar (kat'ėr-pil-ar) [O. Fr. *chatepeleuse*, is lit. 'hairy she-cat.'—L. *catus*, cat; *pilosus*, hairy, from *pilus*, a hair.] *n.* कुसरूड *m*, कुसरीण *m*, घुलें *n*, शूककीड *m*, शूककीटक *m*, सुरवंट, सुरट. २ *bot.* एका

जातीचा (सुरवंटासारखा) कॅटरपिलर नांवाचा रोपा *m.* ३ लोकांना लुबाडणारा समाजशत्रु; as, We have become the caterpillars of the island instead of its pillars.

Caterwaul (kat'ėr-wawl) *n.* गुरम्यांव करणें (फळायला झालेल्या भाटीचें). C. *v. i.* गुरम्यांव करणें, मांजरासारखें ओरडणें, मदनमस्त झाल्यासारखें वागणें. Caterwauling *n.* (*Shakes.*) गुरम्यांव, बोकेझुंज.

Cates (kātz) *n. pl.* (*Shakes.*) पक्वान्नें, मिष्टान्न. Catgut, see under Cat.

Catharist (kath'ar-ist) [Gr. *katharizein*, to purify.] *n. a pretender to great purity* अति सोंवळा, लांकडें धुऊन घेणारा, मीठ धुऊन घेणारा, फाजील शुद्धतेचा आव घालणारा. Cath'arism *n.*

Cathartic-al (kath-ärt'ik,-al) [Gr. *katharizein*, to clean.] *a. purgative* ढाळक, रेचक. Cathart'ic *n.* ढाळ *m*, रेच *m*, जुलाब *m*, उदरशोधन *n.* Cath'arise *v. t.* (उदर) साफ-स्वच्छ करणें. Catharsis *n.* मलविसर्जन. Cathar'tin *n.* सोनामुखींतील मलशुद्धीचें तत्व *n.*

Cathedral (kathē-d'ral) [L. *cathedra*, chair, esp. seat of a bishop; teacher's or professor's chair.] *n.* क्याथीड्रल, एपिस्कोपाचें-बिशपचें देवालय *n*, एखाद्या प्रदेशां (diocese) तील मुख्य देवालय *n.* २ *a type of the episcopal system* एपिस्कोपानुष्ठित ख्रिस्ती धर्म *m*; as, They had ruined the monarchy and pulled down the old C. without establishing any church at all. ३ विद्येचें व अधिकाराचें मुख्य पीठ *n*; as, Let England then keep that honour to be the C. to other nations. C. *a.* क्याथीड्रलासंबंधीं. For other meanings, see the noun.

Catheter (kath'e-tėr) [L.—Gr. *katheter*, a thing let down or put in, from *kata*, down and *hienai*, to send.] *n. surg.* मूतसळई *f*, मूत्रोत्सर्जक नलिका *f*, मूत्रस्राावियंत्र *n*, मूत्रशलाका *f.* [ही पोकळ असते. मूत्रावरोध झाला म्हणजे ही नळी इंद्रियांत घालून मूत्र काढितात.] Cath'eterism *n.* मूत्रशलाकाप्रयोग *m*, नलिका शिरविण्याचा प्रयोग. Male Catheter पुरुषाची मूत्रशलाका. Female C. स्त्रियांची मूत्रशलाका. Eustachian C. युस्टेचीयन मूत्रशलाका. Prostatic C. बस्तिपिंडशलाका.

Cathetometer (kath'ē-tom'ē-tėr) [From Gr. *kathetos*, vertical height + meter.] *n.* नळ्यांतील पातळ पदार्थांची सूक्ष्म ऊंची मोजण्याचें यंत्र *n*, द्रवोच्चत्वमापक (यंत्र).

Cathetus (kath'ē-tus) [L. from Gr. *kathetos*, let down, from *kathienai*. See Catheter.] *n.* दुसऱ्या सरळ रेषेवर-पृष्ठतलावर पडणारी एक लांब रेषा *f.*

Cathode (kath-ōd') [Gr. *kata*, down & *hodos*, a way.] *n. the negative pole* ऋणाग्र, ऋणपथ, ऋणाध्व, *m*, अवरोह (?), अवपात (?), ऋणध्रुव. २ *the surface in contact with the negative pole* ऋणध्रुवप्रदेश *m*, ऋणध्रुवाभोंवतालचा भाग *m.* ३ *the object to be coated in electrōplating* विजेच्या योगानें मुलामा देण्याची वस्तु *f.* Cath'odal *a.*

Catholic (kath'ol-ik) [L. *catholicus*,—Gr. *katholicos*, universal.–*kata*, down, wholly & (*h*) *olos*, the whole. CATHOLIC शब्दाचा मूळ अर्थ 'सर्वांचा, जगाचा, सर्वसाधारण' असा आहे. परंतु मूळ ख्रिस्ती धर्मांचे जेव्हां प्राटेस्टन्ट आणि रोमनक्याथलिक असे दोन तट झाले तेव्हां CATHOLIC शब्दाचा पोपसंप्रदायाचेच ख्रिस्ती लोक असा नियमित अर्थ रोमन काथालिक लोक करूं लागले. परंतु इंग्लंडांतील एक्लेसिया (CHURCH) व इतरत्र एक्लेसिया हीं आपल्यांना काथोलिक ही पदवी अझून लावून घेतात.] *a. universal or general* सर्वसाधारण, सर्वांचा, सर्वांसंबंधीं, सर्वव्यापक, सामान्य, काथोलिक; as, The C. faith. २ *not narrow-minded, partial or bigoted; liberal* प्रशस्तमनाचा, उदारमनाचा, प्रशस्त, उदार, विश्वकुटुम्बीय, असंकोचवृत्तीचा. ३ (R. C. use) *pertaining to the Roman Catholics* रोमनकाथोलिक लोकांसंबंधीं, as, The C. Emancipation Act. C. *n.* 'काथोलिक.' २ रोमनकाथोलिक धर्माचा मनुष्य *m*, रोमनकाथोलिक पंथानुयायी, पोपसंप्रदायी *m*, रोम येथील पोपचा अधिकार मानणारा ख्रिस्ती मनुष्य *m.* Cathol'ical *a.* (*obs.*) सामान्य. Cathol'ically *adv.* सामान्य रीतीनें. Cathol'icise *v. t.* or *v. i.* काथोलिक एक्लेसियेची दीक्षा देणें, रोमनकाथोलिक पंथ स्वीकारणें. Cathol'icity *n. universality* सार्वत्रिकपणा *m*, सार्वलौकिकता *f*, सार्वत्रिकता *f*, सर्वसाधारणता *f.* २ *liberality of sentiment* मनाचा उदारपणा *m*, निःपक्षपात(अपक्षपात)पणा *m.* ३ *orthodoxy* सत्यधर्मानुरोधिता, काथोलिकता. ४ काथोलिक धर्मपंथ *m.* ५ काथोलिकत्व *n*, काथोलिक पंथानुकूल स्वभाव. Catho'licism *n.* काथोलिक धर्मपंथ *m.* २ *adherence to the doctrines of the church of Rome* रोमन काथोलिक धर्माचें पालन *n.* ३ काथोलिकपणा *m*, काथोलिकत्व *n.* ४ *a trait, note, or act of a good catholic* काथोलिक सज्जनाचें कृत्य *n*- गुण *m*, काथोलिकत्वाला शोभेल असा गुण-कृत्य *n.* ५ (R) सार्वत्रिकपणा *m.* Catho'licon *n. a universal medicine, a panacea* सर्वरोगहारी औषध, cf. त्रैलोक्यचिंतामणी *m.* Catholic Emancipation *Eng. hist.* काथोलिक मुक्ततेचा कायदा, काथोलिक स्वातंत्र्यतेचा कायदा *m*, रोमन काथोलिक लोकांस राजकीय हक्क देणारा कायदा. Catholic or General Epistles *a name originally given to the general epistles of James, Peter, Jude and John as not being addressed to particular churches or persons.* (याकोब, पेत्रस, योहान्न आणि यहूद यांनीं लिहिलेलीं) सर्व भाविकांस पत्रें. [THE EPISTLES OF PAUL WERE WRITTEN EITHER TO PARTICULAR CHURCHES OR PERSONS, SUCH AS THE EPISTLE TO THE ROMANS, THE EPISTLES TO THE CORINTHIANS, THE EPISTLES TO TIMOTHY, &c.] Catholic king 'काथोलिक राजा'. ही पदवी स्पेन देशच्या राजाला पोपनें दिली होती. Catholic rent *n.* काथोलिक सभेचा खर्च भागविण्या-

साठीं प्रत्येक रोमन काथोलिक चर्चच्या सभासदावर महिन्यास एक पेनी बसविण्यांत आलेली वर्गणी *f.* Catholic roll *n.* काथोलिक सभासदाचा करारनामा *m,* रोमन काथोलिक पंथाचा मनुष्य पार्लमेंट सभेचा सभासद झाला असतां त्यास करून द्यावा लागणारा शपथेचा करारनामा *m.* Old catholics रोमन काथोलिक धर्मगुरूंचीं वचनें प्रमादशील आहेत अशा मताचे रोमन काथोलिक, जुने काथोलिक लोक. Catholic Church or Church Catholic काथोलिक एक्क्लेसिया. See the word Church.

*N. B.*—वर Catholic साठीं काथोलिक व Church as a society साठीं एक्क्लेसिया हे शब्द वापरले आहेत.

Catoptric (kat-op'trik) [Gr. *kata,* against & *optomaein,* to see.] *a.* परावृत्तकिरणांनीं झालेला, परावृत्तकिरणविचारासंबंधीं. Catop'trics *n. pl. the science of reflected light* परावृत्तकिरणविचार, तेजःपरावर्त्तनविचार, आरशावरून परावृत्त झालेल्या किरणांच्या गुणधर्मांविषयीं विचार. हा एक दर्शनानुशासनशास्त्र (optics) चा भाग आहे. Catoptric telescope परावर्तनदुर्बीण *f.*

Cattle (kat'l) [L. L. *captale,* goods, property, especially in animals.] *n.* (horned) गुरें *n. pl.,* ढोरें *n. pl.* Great and small C. गुरेंढोरें *n. pl.,* गुरेंवासरें *n.* [SOME OF THE DISEASES OF cattle ARE कांसेफोड *m. pl.,* कुकडें *n,* कुंद *m,* कोणें *n,* घांटरोग *m,* झेंडू *m,* सडी *f,* पायलाग *m.* पांसी OR फांसी *f,* पेय *n,* फोडाळणें *n,* वरग *m,* लाळ *f,* नरड *m,* तोंडलाग *m,* खुरखू(ख)त *n.* A CATTLE PASTURE गुरचरण, गोपचार, गोचार, गायरान. THE COST OF THE USE OF IT गुरचराई *f.* C. LOUSE गोचडी *f.* C. TICKS खिरड *f,* दूड *f.* C. TRACK गुरवाट, गुरदंड (?) *m.* HIRE FOR THE USE OF DRAUGHT C. शेक. PICKETING LINE OF C. दावण *f.* ROPE BY WHICH C. ARE TIED TO IT दावें *n. dim.* दावली *f.* LOOP OF THIS ROPE (IT CONSISTS OF TWO) कानी *f.* पडकें *n.* पेंडें *n.* SPOT ON WHICH THE C. ARE ASSEMBLED DAILY, TO BE DRIVEN OUT TO PASTURE गोठण *f.* गोंड *m* (R.) TENDING OR KEEPING OF C. राखील *f.* राखणावळ *f.* राखूळ *f.* (*v.* घाल,) पशुरक्षण *n,* पशुपालन *n.* HIRE OF TENDING C. राखणावळ *f.* राखील *f.* राखूळ (R.) *f.* WEALTH OR PROPERTY IN C. गोधन *n.*] Catt'leman *n.* गुराखी, गोवारी, गोपाळ. Catt'le-plague *n.* गुरांचा रोग *m,* गुरांच्या रोगांची साथ *f.* Catt'le show *n.* गुरांचें प्रदर्शन *n.*

Catty (kat'i) *n.* ($1\frac{1}{3}$lbs.) ५३ तोळे किंवा $१\frac{१}{३}$ पौंड (lbs.) चें चिनी लोकांचें क्याटि नांवाचें वजन *n.*

Caucasian (kaw-kā'shi-an) [L. *caucasiaus.*] *a.* एशियांतील काकेशस पर्वतासंबंधीं. C. *n.* काकेशस पर्वताजवळ राहणारा, काकेशियन मनुष्य *m.*

Caudal (kaw'dal) [L. *cauda,* a tail.] *a. pertaining to a tail* पुच्छसंबंधीं-विषयक, पुच्छीय. Cau'dāte, Caud'ated *a.* पुच्छ असलेला, पुच्छवंत, शेपाळ.

Caudex (kaw'deks) [L.] *n. bot.* समूलस्कंध, एकदलवनस्पतिस्कंध-प्रकांड (मुख्यत्वेंकरून ताडाचा). *pl.* Caudices, Caudexes. Caudicle *n.*

Caudle (kaw'dl) [L. *caldus, calidus,* warm,] *n. a warm drink consisting of thin gruel, mixed with wine or ale, sweetened and spiced, given chiefly to sick people, esp., to women in child-bed and also to their visitors* साहेब लोकांत बाळंत बायकांना किंवा आजारी माणसांना दारू व इतर साहेबी मसाला घालून दिलेली ऊन पेज *f.* The caudles administered to Hindu women in child-birth are called बाळंतकाढा, शिरें, सोनवणी. C. *v. t.* (बाळंतिणीकरितां, &c.) मसाला घालून पेज तयार करणें.

Caudron (kaw'dron), same as Cauldron.

Caught (kawt) *pa. t.* & *pa. p.* of Catch.

Caul (kawl) [A. S. *caul,* a basket.] *n.* शिरोवेष्टन *n,* बायकांनीं मस्तकावर धारण करण्याचें जाळीदार कापड; also जाळें *n.* २ *anat.* तोंड आणि डोकें (ह्यांवरील) गर्भवेष्टन, अंत्रवेष्टन *n,* पातळ वेष्टन.

Cauldron (kawl'dron) *n.* See Caldron.

Caulescent (kaw-les'ent) [L. *caulis,* a stalk.] *a. bot.* देंठाच्या (वनस्पति), सकांड, दृश्यकांडधर, also Cauliferous. Cau'licle *n.* आंखूड देंठ, विशेषतः बिजाच्या गर्भांत दिसणारा वनस्पतीचा मूलदेंठ *m.* Caulic'ulus *n.* same as Caulicle. Caulic'olus *a.* देंठावर येणारा. Caul'iform *a.* देंठासारखा. Caulig'enous *a.* देंठावर असलेला. Caul'inary *a.* Cau'line *a.* Cau'lis *n.* वनस्पतीचा देंठ.

Cauliflower (kaw'li-flow'er) [L. *caulis,* a stem, & Flower.] *n. bot.* फुलकोबी *f.* Cauliflower excrescence *med.* फुलकोबी रोग, हा विकार झाला असतां कोबीच्या फुलाच्या आकाराचा ग्रंथि योनीच्या (यूटरसच्या) अग्रभागीं असतो व त्यापासून रक्तमिश्रित पुवाचा फार स्राव होतो, कोबीगांठ. Cauliflower-growth कोबीच्या फुलाच्या आकाराची ग्रंथि.

Caulk, Calk (kawk) [L. *calx,* heel.] *v. t.* गलबतांत पाणी येऊं नये म्हणून भेगा बुजवणें (सूत वगैरे कोंबून). Caulk'er, Calk'er भेग बुजवणारी. Caulking-iron भेगा बुजवण्याचें हत्यार *n.*

Cause (kawz) [L. *causa,* a cause.] *n.* कारण *m,* कर्त्ता *m,* कारक *m,* प्रयोजक *m,* उपाधि (?) *m,* आदि *m,* प्रभव *m,* उत्पादक *m,* प्रवर्त्तक *m,* हेतु *m,* बीज *n,* मूल *n.* [COEXISTING CAUSES सहकारी-सहवर्ती कारणें. COUNTERACTING CAUSES प्रतिकारक कारणें. DECISIVE CAUSE (A LEGAL PHRASE) अंतिम-निर्णायक कारण. EFFICIENT OR INSTRUMENTAL CAUSE निमित्तकारण. FINAL CAUSE उद्देशकारण, हेतुभूत कारण. FIRST CAUSE आदिकारण. FORMAL CAUSE युक्तिकारण. GENERATIVE OR ORIGINATING C. प्रभव *m.* MATERIAL CAUSE उपादानकारण. PREDISPOSING CAUSES योग्यताजनक कारणें. PREVENTING CAUSES प्रतिबंधक कारणें. PRIMARY,-REMOTE CAUSE पारंपरिक-विप्रकृष्टकारण. PROXIMATE,-IMMEDIATE CAUSE निकट-सन्निकृष्टकारण. SECONDARY CAUSES आदिकारणापासून

निघालेलीं कारणें.] २ *reason, ground, motive* कारण *n*, हेतु *m*, प्रयोजन *n*, सबब *f*, निमित्त *n*. [WITHOUT CAUSE विनाकारण, निष्कारण, अकारण, उगाच, सहज.] ३ *law. a suit or action in court* खटला *m*, मुकदमा *m*, वाद *m*, प्रकरण *n*, फिर्याद *f*, दावा *m*, व्यवहारविषय *m*. ४ *side, party* पक्ष *m*, कड *f*, बाजू *f*, तरफ *f*. [TO ESPOUSE A C. कैवार घेणें-धरणें. ESPOUSER OF A C. कैवारी.] ५ स्थान(?) *n*, अवसर (?) *m*. ६ *any subject of discussion, matter, affair in general* भांडण्याचा विषय *m*, बाब *f*. C. *v. t. to produce, to occasion, to effect* (कारण होऊन) उत्पन्न करणें, उत्पत्ति *f*- उद्भव *m*. करणें *g. of o.*, कारणभूत-निमित्तभूत-हेतुभूत-&c. होणें-असणें *in. con.* C. *conj.* Because चें संक्षिप्त रूप. Causable *a.* उत्पादनीय, कारणोत्पाद्य, निमित्तोत्पाद्य. Caus'al *a.* कारणासंबंधीं, कारणदर्शक, उत्पादक, कारणिक. Causal *n. gram.* प्रयोज्यधातु; as, 'To fell' means to 'cause to fall. Causal'ity *n.* कारणत्व *n*, हेतुता, साधकत्व. २ *phren.* कार्यावरून कारण शोधून काढण्याचें स्थान, कारणशोधकता *f*. Caus'ally *adv.* Causā'tion *n.* उत्पादन, उद्भावन, कार्यकारणभावासंबंधीं मत, कारणता, हेतुत्व. Law of universal causation. Causā'tionism *n.* कार्यकारणन्याय *m*, कार्यकारणसिद्धान्त. Causā'tionist *n.* कार्यकारणभाववादी *m.* Caus'ative *a.* कारणविषयक, उत्पादक, कारणिक, हैतुक, साधक. Caus'ative *n.* कारणदर्शक शब्द *m.* Caus'atively *adv.* Caused *p.* (v. V.) केलेला, उत्पादित, जनित, जन्य. Cause'less *a. uncreated, self-originating* अनुत्पन्न, नित्य, स्वयंभू, अकारण, अकारणी, निष्कारण, अहेतुक, अकर्तृक, कर्तृहीन. २ अकारण, अकारणी, निष्कारण, विनाकारण, अहेतुक, निर्हेतुक, निर्निमित्त, निष्प्रयोजन.] Cause'lessly *adv.* (v. A.) कारणावांचून, विनाकारण, निष्कारण, उगीच. Cause'lessness *n.* (v. A.) अकारणत्व *n*, अहेतुकत्व *n*, अकर्तृकत्व *n*, &c. Caus'er *n.* (v. V.) करणारा, कर्ता, जनक, जनिता, प्रयोजक, प्रवर्तक, कारणभूत. Cause and effect कार्यकारण. Cause celebre (French phrase) कोणत्याही न्यायमंदिरांतील चाललेला एखादा महत्वाचा खटला *m.* Relation of cause and effect कार्यकारणभाव *m*, जन्यजनकभाव *m*, हेतुहेतुमद्भाव *m*, प्रयोज्यप्रयोजकभाव *m*, साध्यसाधकभाव *m.* To have or show cause कारण-हेतु दाखविणें. To lose one's cause (आपली बाजू-पक्ष) हरणें. To make common cause with (पुष्कळांनीं) एकाच हेतूनें कामास लागणें, संगनमत करणें.

Causeway, Causey (kawz'wā, kawz'e) [Causeway is formed from Causey and Way. Causey is in M. E. *causee*.–L. *calx*, heel.] *n.* बांध *m*, बांधाचा रस्ता *m*, सेतु *m*, धरण (?) *n.* C. *v. t.* बांधाचा रस्ता तयार करणें, रस्त्यावर खडे पसरणें. Cause-wayed, Causeyed *p. a.*

Caustic (kaws'tik) [Gr. *kaustikos, kaiein, kausein*, to burn.] *a.* मांस जाळणारा, मांसदाहक, मांसनाशक. २ *fig. sharp, cutting* तिखट, खंवट, कडु, मर्मभेदक; as, C. remark. C. *n.* मांस जाळणारें औषध *n*, मांसदाहक or नाशक पदार्थ *m*, अरुष्कर *m* (?); as, Caustic potash or soda दाहक पोट्याश किंवा सोडा. [Stick or lunar C. काडी (खाड्या) खार *m.*] Caus'tically *adv.* Caustic'ity *n.* मांसदाहकत्व *n*, मांसदाहनशक्ति *f*. Caustic alkali *chem.* क्षारांचें तीव्र मूलतत्व. Caustic curve वक्रांशु संगम, परावृत्त प्रभावक्र. Caustic lime फुलवलेला कळीचा चुना. Common caustic दाहक पोट्याश (पालाश).

Cauterize (kaw'tėr-īz) [Fr. *cauteriser*.—L. *cauterizare*, to sear.–Gr. *kauter*, a branding-iron, from *kaiein*, to burn.] *v. t.* डागणें, लासणें, डावणें, डाग *m*- डाव *m*- गूल *m*- चोंचा *m.* देणें. २ *fig.* चरका देणें, भाजणें. Cau'ter *n.* डागणी *f*, डाहणी *f*. Cau'tery *n.* डाग *m*, दाह *m.* २ डागणी *f*. Actual Cautery *n.* लोखंड तापवून दिलेला डाग *m*, निखारा ठेऊन दिलेला डाग *m*- डागणी *f*. २ डाग देण्याचा निखारा. Circular Cautery *n.* गूल *m*, गोदा *m.* २ गूल देण्याची डागणी *f*. Potential or Virtual Cautery *n.* दाहक द्रव्यांनीं दिलेला डाग *m.* २ भाजणारें औषध *n*, रासायनिक क्रियेनें डाग देण्याची वस्तु *f*. Galvanic Cautery *n.* विजेच्या तारेनें दिलेला डाग *m.* २ डागण्याची विजेची तार *f*. Cautering, Cauterisa'tion *n.* (v. V.)–*act* डागणें *n*, डाग देणें *n*, डाग *m.* Cau'terism *n.* (*obs.*) डाग देणें.

Caution (kaw'shun) [Fr. *caution*, a security.–L. *cautio*, from *cavere*, to be on one's guard, to take care.] *n. prudence, care, wariness* सावधगिरी *f*, सावधपणा *m*, हुशारी *f*, खबरदारी *f*, दक्षता *f*, पगदस्तपणा *m*, सावधानता *f*, पुढच्या परिणामाचा विचार *m.* २ *monition, warning* ताकीद *f*, सांगी *f*, जतावणें *n*, प्राक्सूचना, पूर्वीची सूचना *f*, इशारा *m*; as, By way of C. I must tell you this. ३ *provision against* करून ठेवलेला उपाय *m*-बंदोबस्त *m*, पूर्वोपाय *m.* ४ (R.) *bail, guarantee, security* तारण *n*, हमी *f*, जामिनगिरी *f*; as, "The Parliament would yet give his Majesty sufficient C. that the war should be prosecuted." Caution *v. t. to admonish* (one) *to take heed, to warn* (followed by *against*) ताकीद *f*. करणें-देणें, जतावणें, सांगी *f*. करणें, सावध करणें. Cau'tionary *a. conveying warning to avoid danger* ताकिदीचा, जतावणीचा; as, C. signals. २ *given in pledge or security* तारण म्हणून दिलेला, तारणाचा, बंधकीभूत. Cau'tioner *n.* सावध करणारा. Cau'tionry *n.* (Scotch law) दुसऱ्याकरितां जामीन होणें *n.* Cau'tious *a. prudent, circumspect, wary* सावध, हुशार, पगदस्त, पगदस्ती, सावधान, पूर्वापरविचारी, खबरदार, पूर्वदर्शी, मागें पुढें-चोहोंकडे-पदोपदीं-&c. पाहाणारा, आगापिछा पाहणारा, दक्ष, जागरूक. Cau'tiously *adv.* (v. A.) सावधपणानें, मागेंपुढें पाहून, पूर्वापरविचार करून, &c. Cau'tiousness *n.* (v. V.) सावधपणा *m*,

सावधगिरी *f*, हुशारी *f*, पगदस्ती *f*, दक्षता *f*. Caution money *n*. जामिनगिरींत-अनामत दिलेला पैसा *m*.

Cavalcade (kav-al-kād') [Fr. *cavalcade*.–It. *cavalcata*, from *cavalcare*, to go on horse-back.–L. *caballus*, a horse. See Cavalier, Cavalry.] *n*. (घोडेस्वारांची) स्वारी *f*, अश्ववारयात्रा *f*, अश्वारोहश्रेणी *f*. C. *v. i.* स्वारींत जाणें.

Cavalier (kav-alēr') [Fr. *cavalier*.–It. *cavaliere*. See Cavalcade.] *n*. घोडेस्वार *m*, शिलेदार *m*, तुरंगी *m*, अश्ववार *m*, अश्वसादी. २ *a gallant* मर्द, प्रतापशाली. ३ 'क्याव्हालिअर', पहिल्या चार्लसच्या कारकीर्दीत राजाचा पक्षकार *m*. ४ *fort.* आजूबाजूचा दूरचा देखावा जेथून दिसतो अशी किल्ल्यावरील अतिशय उंच इमारत *f*. C. *a. gay, easy, frank* बांका, फक्कड, रंगेल. २ *high-spirited* (*obs.*) उत्साही, शूर, लढवय्या; as, "The people are naturally not valiant and not much C." ३ *haughty, disdainful* अविवेकी, पत्राजी (सी), शिलेदारी, मगरूर, अभिमानी, शिलेदारी डौलाचा, राऊत चालीचा, तिरस्कार्य वर्तणुकीचा, तोऱ्याचा, रावकीचे चालीचा. ४ *of the party of Charles I.* पहिल्या चार्लसच्या मंडळीपैकीं. C. *v. i.* घोडेस्वारी करणें. Cavalier'ish *a*. Cavalier'ism *n*. Cavalier'ly *adv*. (v. A.) शिलेदारी डौलानें, पत्राजीनें, मगरुरीनें, गर्विष्ठपणानें, तोऱ्यानें.

Cavalry (kav'al-ri) [O. Fr. *cavallerie*.—It. *cavalleria*. See Cavalcade.] *n*. घोडेस्वार *m*, अश्वभार *m*, अश्वसेना *f*, घोडेस्वारांची फौज *f*, तुरंगवल *n*, घोडबळ *n*. Heavy Cavalry अवजड-बोजड-धिमें घोडदळ. Light Cavalry सुटसुटीत-सडें-चपळ-घोडदळ.

Cave (kāv) [Fr. *cave*.—L. *cavus*, hollow.] *n. a hollow place in a hill or rock* गुहा *f*, गुंफा *f*, गव्हर *n*. *dim.* गव्हरी *f*, ढोल *f*, दरी *f*, भुयार *n*, खबदड *n. f*, खबदडी *f*, विवर *n*, कंदरा *f*, कपाट *n*, कंदर *m, n*, कुहर *m*; as, In C.s and hollows and dens and chasms, &c. कडेकपारीं, दरीकंदरीं. C. *v. t.* (*obs.*) उकरणें, विवर खोदणें; as, "The mouldered earth had Caved the banks." C. *v. i.* गुहेंत राहणें. २ कबूल होणें, मान्य होणें. Cave-dwellers *n*. गुहेंत राहणारे रानटी लोक. Cave-hyena *n. zool.* गुहेंत राहणारा तरस *m*. Cave-lion *n. zool.* गुहेंत राहणारा सिंह *m*. To cave in (said of land) ढांसळणें, पडणें, दडपून जाणें. २ *fig.* माघार घेणें.

Caveat (kā've-at) [L. *caveat*, *lit.* let him beware, from *cavere*, to beware.] *n. law* 'केव्हिअट', विरुद्ध पक्षानें पुरावा दिल्याखेरीज फैसला करूं नये अशा आशयाची दरखास्त *f*. २ पूर्वसूचना, तांकीद *f* (पुढें अमुक एक शोधाचें आपण (पेटंट) विशिष्टाधिकार मागणार आहों अशा आशयाची) विशिष्टाधिकारदानाध्यक्षाकडे दिलेली पूर्वसूचना *f*. Caveat emptor *law* खरेदीदारानें सावध रहावें.

Cavendish (kav'endish) *n. the leaf-tobacco softened, sweetened and pressed into plugs or cakes* चौकोनी खापीचा तंबाखू *m*.

Cavern (kav'ėrn) [L. *caverna*, from *cavus*, hollow.] *n. a hollow in a hill, &c.* गुहा *f*, कपार *n. f*. २ *a deep mountain recess or hollow* दरा *m*. *dim.* दरी *f*, घोल *n*. C. *v. t.* दरींत ठेवणें. २ दरीप्रमाणें खोदून काढणें. Cav'erned *a*. Cav'ernous *a. abounding with caverns* गुहाप्रचुर, गुहामय, पोकळ. २ *med.* खांकेंत उत्पन्न झालेला, गर्तोत्पन्न, गार्तिक; C. tumour. Caver'nously *adv*. Caver'nūlous *a*. लहान लहान छिद्रें असलेला, छिद्राळ, रंध्राळ; as, C. metal.

Cavesson (kav'es-sun) Cavezon (kav'e-zun) [Fr. *cavecon*.–L. L. *capitium*, a head-covering, a hood, from L. *caput*, the head.] *n*. घोड्याची झोरकी *f*. (ही तोंडाला बांधतात.)

Cavil (kav'il) [L. *cavillari*, to practise jesting, from *cavilla*, jesting.] *v. i.* (with *at*) क्षुल्लक किंवा खोटे दोष काढणें; as, To C. in the course of the contract. C. *v. t.* (*obs.*) मिथ्या निंदा करणें, (ची) खोटी चूक काढणें, छिद्रें शोधून काढणें. C. *n*. खोटी चूक *f*, मिथ्याविवाद *m*. Cavilling *pr. p.* Cavilled *pa. p.* Cavillā'tion *n*. (*obs.*) Cav'illing *n*. Cav'iller *n*. विनाकारण वाद करणारा, छिद्रान्वेषी.

Cavity (kav'it-i) [L. *cavus*, hollow.] *n. pl.* Cavities. खळगा *m*. *dim.* खळगी *f*, खळी *f*, खांच *f*, खोलवा (गा) *m*, रंध्र *n*, छिद्र *n*, बीळ *n*, पुट *n*. C. of hands ओंजळ. Cav'itied *a*.

Caw (kaw) [An imitation of the cry of the crow or daw.] *v. i.* कावकाव करणें, काकशब्द करणें. C. *n*. कावकाव *n*, करकराट *m*. Also Kaw. Cawing *n*. (v. V.) *act.* करकरणें *n*, कवकाव *f*, करकर *f*. *intens.* करकराट *m*.

Cayenne, Cayenne-pepper (kā-in', kā-en'-pep'ėr) [From *Cayenne*, a town & island in French Guiana, South America.] *n*. फारच तिखट मिरें. ह्याला Red-pepper असेंही म्हणतात. [सुसर *f*.

Cayman, Caiman (kā'man) *n*. दक्षिण अमेरिकेंतील मगर-

Cazique (ka-zēk') [Sp. *cacique*, from the language of Hayti.] *n*. काझिक, अमेरिकेंतील इंडियन टोळींचा राजा *m*-नायक *m*- सरदार *m*- अग्रेसर. (A title given by the Spaniards.) A form of Cacique.

Cease (sēs) [Fr. *cesser*.—L. *cessare*, *cessum*, to give over, to yield.] *v. i. to stop, to desist* रहाणें, पुरे *adv*. बस *adv*. करणें, स्थिरावणें, स्थिर होणें, खळणें, थांबणें, स्तब्ध होणें, निवृत्त होणें, विसावणें, विरमणें, विराम *m*. पावणें, फिरणें, निवर्त्तणें, सोडणें (ex. बोलायाचें जेवायाचें-भांडायाचें, &c. सोडणें), माघार घेणें, हात *m*. काढणें, हात *m*. आवरणें, हात *m*. काढून घेणें-आटोपणें. २ *to become extinct, to pass away* उडणें, सरणें, जाणें, गळणें, संपणें, उलगणें, उरकणें, नाहींसा होणें, खूट पडणें; as, "The poor shall never C. out of the

land." ३ *to come to an end, to stop.* राहणें, संपणें, समाप्त होणें, उलगडणें. C. *v. t. to put a stop to, to bring to an end* थांबविणें, समाप्त करणें. C. *n.* (*obs.*) शेवट *m*, अटकाव *m*, समाप्ति *f*. Cease'less *a. incessant* अखंड, निरंतर, सतत, अविश्रांत. Cease'lessly *adv.* निरंतर, सतत, एकसारखा. Ceas'ing *n.* Without ceasing खंड न पडतां, एकसारखें.

Cecity (sē'si-ti) [L. *cœcus*, blind.] *n.* [R.] अंधता *f*, अंधत्व *n*. Cecut'iency *n.* [R.]

Cedar (sē'dar) [A. S. *ceder.*–L. *cedrus.*] *n.* देवदारूची जात *f*, एक जातीचें देवदारूचें झाड *n*. The cedar (devadara) is called गंधतरु on the Himalayas. C. *a.* गंधतरूचें, गंधतरूविषयीं. Cē'dared *a.* गंधतरूनें झांकलेला. Cē'darn *a.* (R.) गंधतरूचें. Cē'dry *a.* (obsolete form of Cē'dary) गंधतरूच्या रंगाचा.

Cede (sēd) [L. *cedere*, to yield, to give up.] *v. t. to surrender, to yield* सोडणें, सोडून देणें, स्वाधीन करणें. C. *v. i.* दबणें, नमणें, हार जाणें. Ceded *a.* सोडलेला.

Cedilla (se-dil'la) [Fr. *cedille.*—Sp. *cedilla*, dim. of *zeta*, the Gr. name of the letter *z*, because this letter was formerly written after the *c*, to give it the sound of *s*.] *n.* *C.* चा उच्चार *S* सारखा करण्याकरितां *C.* खालीं केलेली (*C̦*,) अशी खूण.

Cedule (sed'ūl) [Fr. *cédule.*–L. *schedula*, a small leaf of paper.] *n.* (*obs.*) तक्ता *m*, कोष्टक *n*, परिशिष्ट *m*, लेख *m*. Same as our present Schedule.

Ceduous (sed'u-us) [L. *cœdere*, to cut down.] *a.* (*obs.*) कापण्यालायक.

Ceil, Ciel (sēl) [Fr. *ceil*, heaven, canopy, from L. *cœlum*, heaven, vault, arch.] *v. t.* छत *n.* भरणें-लावणें-देणें-बांधणें, छतावणें. २ (पाख्याला) गिलावा करणें. Celling *n. arch.* छत *n*, वितान *n. m*, चांदवा *m*, तक्तपोशी *f*. [To lay a C. छत *n.* भरणें.] ३ (of cloth) चांदवा *m*, अस्मानगिरी *f*. ४ *naut.* जहाजाचे आंतल्या बाजूस मारलेली फळी *f*.

Celature (sel'a-tur) [L. *cœlare*, to engrave in relief.] *n.* उठाव आकृति कोरणें *n*, खोदणें *n*, काढणें *n*. २ कोरण्याची विद्या किंवा कला *f*. ३ (*obs.*) कोरलेली वस्तु *f*.

Celebrate (sel'e-brāt) [L. *celebrare*, from *celeber*, famous.] *v. t. to laud, to extol, to praise* कीर्ति गाणें, स्तवणें, कीर्तणें, स्तुति *f*- स्तवन *n*- कीर्तन *n.* करणें *g. of o.* २ *to perform solemnly, to solemnize* समारंभानें करणें-आचरणें-पाळणें, समारंभ *m*- उत्सव *m*- *&c.* करणें *g. of o.*, विधीप्रमाणें करणें-आचरणें-पाळणें; as, To C. a birth-day. [To C. HUMBLY उदकापाण्यानें करून टाकणें, फुलपाकळीनें करून टाकणें. To C. WITH POMP AND STYLE गाजवणें.] ३ थाटानें समारंभ करणें; as, To C. a marriage. Cel'ebrant (R.) *n.* थाटानें समारंभ करणारा. Cel'ebrated *p. & a.* (v. V. 1.) स्तुति केलेला, स्तवलेला, कीर्तित. २ समारंभानें केलेला. ३ कीर्तिमान, विख्यात, प्रख्यात, सुप्रसिद्ध, प्रतिष्ठित, नामांकित. Celebrā'tion *n.* (v. V. 1.)—*act.* स्तवणें *n*, कीर्तणें *n*, कीर्तन *n*, संकीर्त्तन *n*. २ समारंभानें करणें *n*, समारंभ *m*, प्रसिद्धि *f*, प्रख्याति *f*. Celebrāt'or *n.* कीर्ति गाणारा, स्तुति करणारा. Celeb'rity *n.* नाम *pop.* नांव *n*, नांवलौकिक *m*, कीर्ति *f*, प्रतिष्ठा *f*, ख्याति *f*, विख्याति *f*. २ (*obs.*) उत्सव *m*; as, The C. of marriage. ३ धेंड *n*, प्रसिद्ध मनुष्य *m*, प्रस्थ *n*; as, He is one of the celebrities of the place.

Celerity (sel-er'it-i) [L. *celeritas*, from *celer*, quick, swift.] *n. swiftness* त्वरा *f*, वेग *m*, शीघ्रगति *f*, वेगगति *f*. या शब्दाचा सजीव प्राण्याकडे उपयोग करितात. आणि velocity ह्या शब्दाचा उपयोग निर्जीव पदार्थांकडे करितात.

Celery (sel'er-i) [Fr. *celeri*, from Gr. *selinon*, parsley.] *n.* एक प्रकारची वनस्पति आहे; हिच्या पानांच्या देठांचें लोणचें करितात.

Celestial (sel-est'yal) [O. Fr. *celestial.*–L. *cœlestis*, from *cœlum*, heaven.] *a.* देवलोकाचा, स्वर्गीय, स्वर्ग्य, स्वर्गवासी, दिव्य, अमर्त्य, देवलोकासंबंधीं. २ *belonging to the visible heavens or sky* आकाशाचा, आकाशमंडलासंबंधीं. C. *n. an inhabitant of heaven* देवलोकवासी, देवलोकस्थ, स्वर्गवासी, दिव्य(S.), वैकुंठवास(?) करणारा. २ चीनचा रहिवासी *m*. चिनी लोक आपल्याला देववंशी अथवा देवकोटीचे मानितात. Celest'ially *adv.* Celestial body *n.* खस्थ पदार्थ *m*. Celestial city वैकुंठ, स्वर्ग. Celestial-damsel अप्सरा, परी. Celestial empire चीनचें राज्य; so called from the Chinese words *tien chan*, Heavenly Dynasty, as being the kingdom ruled over by the dynasty appointed by Heaven. Celestial equator खस्थ नाडीवृत्त *n*, नाडीमंडल *n*, खगोलीय नाडीमंडल *n*. Celestial latitude खगोलीय शर. In such terms as C. longitude, C. meridian, the Marathi word for *celestial* is खगोलीय. C. sphere खगोल, भचक्र. C. vault अंडकटाह. The twelve C. signs आकाशांतील बारा राशिचिन्हें. C. orb खस्थपिंड. C. globe खगोल. C. light खप्रकाश. C. distance आकाशीय अंतर.

Celiac (sēl'i-ak) *a.* पोटासंबंधीं. Also Cœliac.

Celibacy (se-lib'a-si) [L. *cœlebs*, unmarried, single.] *n.* ब्रह्मचर्य *n*; as, The C. of the clergy, ब्रह्मचारिता *f*, अविवाहितावस्था *f*, अपरिणयन *n*, अनुद्वाह *m*, अनूढावस्था *f*, निंबेपणा (*vulg.*) *m*, अवरठेपणा (*vulg.*) [LIFE OF CELIBACY, STUDY AND DEVOTION नैष्ठिक ब्रह्मचर्य *n*. ONE WHO LEADS SUCH A LIFE नैष्ठिक ब्रह्मचारी *m*, नैष्ठिक ब्रह्मचारिणी *f*. LIFE-LONG CELIBACY शाश्वत ब्रह्मचर्य *n*.] Celibatā'rian *a.* ब्रह्मचर्याचा, ब्रह्मचर्याला अनुकूल, ब्रह्मचर्य आवडणारा. C. *n.* ब्रह्मचारी *m*, ब्रह्मचर्याचा कैवारी *m*. Cel'ibate *a.* अविवाहित. C.

*n.* २ अविवाहित पुरुष *m*, ब्रह्मचारी *m*. Celib'atist *n.* [R.] अविवाहित पुरुष *m*.

Celidography (sel-i-dog'ra-fi) [Gr. *kylis*, spot & *graphein*, to write.] *n. a description of apparent spots on the disk of the sun, or on planets* कलंकवर्णन *n.* [ही एक खगोलविद्येची शाखा आहे. ह्यांत सूर्यावरच्या किंवा इतर ग्रहांवरच्या कलंकांचें-डागांचें वर्णन केलें असतें.] २ कलंकवर्णनाचें पुस्तक *n.*

Cell (sel) [O. Fr. *celle*, from L. *cella*, a store-room, connected with *celare*, to hide.] *n. a small apartment* खण *m*, खाना *m*, पूड. [A C. WITH BARS (FOR BIRDS AND ANIMALS) पिंजरा *m*.] २ *a small cavity* खळी *f*, खळगी *f*, घर *n*, सूक्ष्म गर्त्ता *f*, लहान गुंफा. ३ (as, in tables of calculation) कोष्टक *n*, घर *n.* ४ *a little bag or bladder* (of animals) कोश *m*, पिशवी *f.* ५ (साधूची) मठी *f*, मठ *m*, आश्रम *m*. ६ *elect.* (विजेच्या घटमालेंत वापरण्याचें एक) भांडें *n*, घट *m.* ७ (घुमटाचा-&c.) अंतरगोल खण-खाना-पूड *m.* ८ *bot.* पेशी *f*, सूक्ष्मपिंड *m*, गोलक *m*. ९ *a minute portion of protoplasm* गोलक *m*, वृद्धि व पुनरुत्पादन हे धर्म असणारा सूक्ष्मपिंड *m*, बारीक घ वाटोळा घटकावयव *m*, सूक्ष्म घटक *m*. [Blood-cells रक्तगोलक, Air-cells, see Air.] १० (as, in a bone, &c.) विवर *n*, छिद्र *n*, रंध्र *n*, कोश *m*, भोंक *n*, घर *n.* ११ (used in poetry) थडगें *n*; as, "Their last rest, Their little cells within the burial place." C. *v. t.* (R.) भुयारांत-मठांत ठेवणें. C. *v. i.* (R) मठांत राहणें. Celled *a.* खळगे-रंध्र-पेशी-गोलक असलेला, रंध्राळ, पेशील. Cellif'erous *a.* खळगे-गोलक-पेशी-&c. असलेला, अनेकपेशीमय, अनेकगोलकोत्पादक. Cell'ular, Cell'ulated *a. consisting of cells* खळ्यांचा, खळग्यांचा, बारीक घरांचा, सूक्ष्मगर्त्ताप्रचुर, सूक्ष्मगर्त्तामय, सूक्ष्मपिंडमय, सूक्ष्मरंध्रमय. २ *physio.* जालसदृश, जालमय, जाळ्यासारखा. [C. tissue जालमयत्वचा.] Cell'ule *n.* (cellपेक्षां) लहानछिद्र *n*, विवर *n*, रन्ध्र *n*. Cell'uliferous *a.* लहान लहान छिद्रें असलेला. Cell'uloid *n.* (हस्तिदंतासारखा-कांसवाच्या पाठीसारखा) लांकडाचा रांधा *m*, रांध्याचा हस्तिदंत *m*, रांध्याची कांसवाची पाठ *f.* Cell'ulose *a.* पेशीमय, गोलकमय, &c., पुष्कळ सूक्ष्म खळग्यांनीं झालेला, अनेकसूक्ष्मकोशमय, अनेकगोलकमय. C. *n.* काष्टक *n*, वनस्पतीच्या मूळपेशी ज्यापासून उत्पन्न होतात तें द्रव्य *n*, पेशीद्रव्य *n*. [THE CELL-SAP गोलकरस, पिंडरस, पिंडशोणित. THE CELL-WALL गोलकत्वचा, पिंडत्वचा, पिंडकवच. THE LIBER-CELLS काष्टपेशी.]

*N. B.*—See the words Protoplasm and Tissue.

Cella (sel'a) *n. the body of the temple as distinct from the portico and other external structures* देवळाचा मुख्य भाग *n*, गाभारा *m*.

Cellar (sel'ar) [L. *cella*, a store-room.] *n.* तळघर *n*, वळद (?) *n*, भुयार *n*, जिन्नसखाना *m*. [C. FOR GRAIN पेंव *n*.] C. *v. t.* तळघरांत सांठविणें. Cell'arage *n. cellars collectively* भुयारें *n, pl.* २ भुयारांची जागा *f*, भुयार *n.* ३ भुयाराचें भाडें *n*. Cell'arer, Cell'arist *n.* तळघराचा अधिकारी-मालक *m*. २ मठांतील कोठाराचा अधिकारी *m*, मठांतील कोठारी *m*. Cell'aret *n.* बाटल्या ठेवण्याचें फडताळ *n*- पेटी *f.* Cell'arman *n.* तळघरांची देखरेख ठेवणारा *m*. Cell'arous *a.* तळघरासंबंधीं, तळघराचें.

Celt (selt) [From L. *pl. celtæ*, the Celts; the word probably meant warriors.] *n.* also Kelt. सेल्ट जातीचा मनुष्य *m*, सेल्ट *m*. [ही जात आयर्लंडांत, स्काटलंडाच्या कांहीं भागांत, वेल्स प्रांतांत व फ्रान्सच्या उत्तर भागांत सांपडते.] Celt'ic *a.* सेल्टी, सेल्टलोकांसंबंधीं. २ सेल्टिक भाषेसंबंधीं. Celt'ic *n.* सेल्टलोकांची भाषा *f.* सेल्टिक भाषा *f.* Celt'icism *n.* सेल्टी रीतरिवाज *f*, २ सेल्टिक भाषेचा सां(सं)प्रदाय *m*. Celtomā'nia *n.* सेल्टिक रीतरिवाजाची विशेष आवड *f*, सेल्टिक रीतरिवाजाचें वेड *n.*

Celt (selt) [L. *celtis*, a chisel.] *n. archæol. an implement, with chisel-shaped edge of bronze or stone but sometimes of iron* (सेल्टिक लोकांचें दगडाचें किंवा ब्रांझ धातूचें) सेल्ट नांवाचें छिनी (chisel) सारखें हत्यार *n.*

Cement (se-ment') [Fr. *ciment*, from L. *cæmentum*, a rough, unhewn stone, chips of marble from which marble was made.] *n.* शिमिट *n*, गिलाव्यांत वापरलेली पूड *f.* २ (शिरसाचें-खळीचें किंवा इतर कोणतेंही) डकवण *n*, चिकटवण *n*, लुकण *n*, संधानक *n*, संधानद्रव्य *n*. [C. OF MORTAR गारा *m*, गिलावा *m*. C. OF TIN कस्तर (कस्तुर *n*.)] ३ *fig. bond of union* लगा *m*, लगावांधा *m*, दृढीकरण *n*, बंधन *n.* ४ *anat.* दंतसंधान *n*, दंतसंधानास्थि, दांताचें मूळ धरणारा अस्थिपुट *n*. (हिरडी नव्हे.) C. *v. t.* शिमिट लावणें. २ सांधणें, जोडणें, सांधण-&c.-करणें with *g. of o.*, संयुक्त करणें. ३ चिकटविणें, डकविणें, लेप-पुट देणें. C. *v. i. to unite and cohere* सांधणें, जोडणें. २ चिकटणें, मिळणें, जडणें. Cementā'tion *n.* जोडणें *n*, सांधणें *n*, संयोग *m*, बंधन *n*, दृढीकरण *n*, एकीकरण, &c. &c. Cement'atory *a.* चिकटविणारें. Cementi'tious *a.* (R.) शिमिटासारखा.

Cemetery (sem'e-tėr-i) [L. *cæmeterium*,—Gr. *koimeterion*, a sleeping chamber, burial place, from *koimai*, to sleep.] *n. a repository for the dead* स्मशान (*pop.*) मसण *n*, मसणवटी *f*, मसणखाई *f*, स्मशानभूमि *f*, प्रेतस्थान *n*, प्रेतभूमि *f*, प्रेतवन *n*, पितृवन *n*, मृतस्थान *n*, रुद्रभूमि *f*, शवालय *n*, शिवालय (R.) *n*, कबरस्थान. *pl.* Cemeteries.

Cenobite (sēn'ō-bīt) [L. *cœnobitā*, from Gr. *koinos*, common & *bios*, life. Cf. Sk. जीव, life.] *n.* मठवासी *m*, जोगी *m*, गोसावी *m*. also Cœnobite. Cenobit'ical *a.* Cen'obitism *n. the belief or practice of a cenobite* जोगीपणा *m*, मठवासीधर्म.

*N. B.*—A *cenobite* lives in a convent or monastery with others, and not alone like an *anchoret* or *hermit*.

Cenotaph (sen'ō-taf) [Gr. *kenos*, empty & *taphos*, a tomb.] *n. an empty monument* (अन्यस्थलीं पुरलेल्या मनुष्याची त्याच्या सन्मानार्थ उभारलेली) छत्री *f*, शवरहित समाधि *f*-कबर *f*, सन्मानार्थ रिकामी समाधि *f*, स्मारक-समाधि *f*.

Cense (sens) [See Census.] *n.* (*obs.*) वस्तिपत्रक *n*, मनुष्यगणति *f*, खानेसुमारी *f*. २ (*obs.*) कर *m*, जकात *f*. ३ (*obs.*) स्थिति *f*, पदवी *f*.

Cense (sens) *v. t.* (*obs.*) धुपाचा वास देणें. Cen'ser *n.* धुपारती *f*, धुपाटणें *n*, धूपपात्र *n*.

Censor (sen'-sor) [L. *censere*, to value, to estimate.] *n. an officer in ancient Rome who imposed taxes and punished immorality* आचारनियंता *m*, कर्माध्यक्ष *m*. [Cf. THE INDIAN धर्माध्यक्ष, धर्माधिकारी.] २ लेखननियंता *m*, मुद्रणाधिकारी, ग्रंथनियामक कामदार *m*, वर्तमानपत्रांचा नियामक *m*, मुद्रणनियामक *m*, मुद्रणशास्ता *m*, लेख-पुस्तकें इत्यादि छापण्यास योग्य आहेत कीं नाहीं हें ठरविणारा अधिकारी *m*. ३ *an adverse critic, one given to fault-finding*, दोषदर्शी टीकाकार, दुष्ट बुद्धीनें टीका करणारा, दोष तेवढेच पाहणारा, (निंदात्मक) टीका करणारा, दोषैकदृक्. ४ इंग्लंडांतील युनिव्हर्सिटींत-कालेजांत तेथें न राहणाऱ्या विद्यार्थ्यांवर देखरेख ठेवणारा, वर्त्तननियंता *m*. ५ रायल कालेज ऑफ फिजिशन्समध्यें परवाना देणारा अधिकारी. Censo-r'ial *a.* आचारशास्त्यासंबंधीं, लेखननियंत्यासंबंधीं, &c. Censo-r'ious *a. addicted to finding fault with others* दोषदर्शी, दोषग्राही, छिद्रदर्शी, छिद्रान्वेषी, रंध्रान्वेषी, अवगुणदर्शी. २ निंदक, निंदाखोर. ३ *implying or expressing censure* दोषदृष्टीचा, दोषबुद्धीचा, निंदात्मक. Censor'iously *adv.* दोषदृष्टीनें, छिद्रदृष्टीनें, दोषबुद्धीनें. Censor'iusness *n.* (v. A.) दोषदृष्टि *f*, दोषबुद्धि *f*, छिद्रदृष्टि *f*, छिद्रान्वेषणबुद्धि *f*. Censorship *n.* आचारनियंतृत्व *n*, आचाराध्यक्षाचा अधिकार *m*, धर्माध्यक्षता *f*, धर्माधिकार *m*, मुद्रणनियंतृत्व *n*. Censorship of the press मुद्रणाधिकाऱ्याच्या पसंतीशिवाय कोणताही लेख किंवा पुस्तक प्रसिद्ध करावयाचें नाहीं असा कायदा-नियम *m*.

Censual (sen'sual), vide Census.

Censure (sen'shūr) [Fr. *censure*.–L. *censura*, originally an opinion–L. *censere*, to give an opinion.] *n.* (*Shakes.*) ठराव *m*, मत *n*, निर्णय *m*; as "Take each man's censure, but reserve thy judgment." २ *reprehension, blame* दूषण *n*, निंदा *f*, निर्भर्त्सना *f*, ठपका *m*, अपवाद *m*, आक्षेप *m*; as, "Both the censure and the praise were merited." ३ न्यायाधिशानें किंवा धर्माध्यक्षानें केलेली शिक्षा *f*—दंड *m*. C. *v. t.* (*obs.*) गुणदोषविवेचन करणें. २ निंदा करणें, निर्भर्त्सना करणें, नापसंती दर्शविणें, दोष लावणें. ३ कायद्याप्रमाणें शिक्षा *f*-दंड *m*. करणें. Cen'surable *a.* निंदापात्र, निंद्य, दोषपात्र, गर्हणीय, वाच्य. Cen'surableness *n.* Censurably *adv.* Censurer *n.* निंदक, आक्षेपक.

Census (sen'sus) [L. *census*, a registering, from *censere*.] *n.* लोकगणती *f*, खानेसुमारी *f*, प्रजागणन *n*. वस्तीपत्रक *n*. (usually made once in ten years.) Cen'sual *a.* खानेसुमारीचा.

Cent (sent) [L. *centum*, a hundred.] *n.* शेंकडा *m*, शंभर *n*. [PER C. शेंकडा, दरशेंकडा.] २ युनायटेड स्टेट्समधील डालरच्या एक शंभरांश किंमतीचें नाणें *n*. ३ पत्त्यांचा एक तऱ्हेचा खेळ *m*. (या खेळांत शंभर ठिपके ज्याचे होतील तो जिंकतो.) Cent'age *n.* शेंकड्याचा भाव *m*, टक्का *m*. Cen'tal *n.* (अव्हॉइडुपाईस) १०० पौंडांचें वजन *n*. C. *a.* शेंकड्या-शतकासंबंधीं.

Centaur (sen'tawr) L. *centaurus* which some have compared with Sk. गंधर्व, a demi-god.] *n. myth.* तुंबरु *m*, नराश्व *m*, हयग्रीव *m*, हयांग *m*. २ नरतुरंग, हा एक राशि आहे व हा दक्षिण गोलार्धांत आहे. Centaurian *a.* नराश्वासारखा. Centaurus *n. astron.* नरतुरंग. हा एक राशि आहे.

Centenary (sen'tin-ar-i) [L. *centum*, Sk. शतम्, a hundred.] *n. a century* शंभर वर्षें *n. pl.* २ शतक *n*; as, Every C. of years. ३ *a commemoration of events which occurred a hundred years ago* शतवार्षिकोत्सव *m*. C. *a.* शंभरांचा-संबंधीं. २ शताब्दगत. Centenā'rian *n. a person a hundred years old* शतायु, शतवयस्क, पूर्णायू, शंभर वर्षांचा म्हातारा मनुष्य *m*. Centenā'rianism *n.* शतायुपणा *m*, शतवयस्कता *f*.

Centennial (sen-ten'i-al) [L. *centum*, Sk. शतम्, a hundred & *annus* (cf. Sk. हायन), a year]. *a. consisting of a hundred years* शंभर वर्षांचा, शताब्दगत. २ शंभर वर्षांनीं घडून येणारा, शतसांवत्सरिक, शताब्दिक. ३ शंभर वर्षें टिकणारा, शतवर्षायु. C. *n.* See Centenary (2).

Center, see Centre.

Centering (sen'tering) *n.* See Centre. कमान बांधते वेळीं दिलेला धिरा, कमानीचा धिरा-टेंका *m*.

Centesimal (sen-tes'i-mal) [L. *centesimus*, the hundredth, from *centum*, a hundred.] *a.* शंभर भागांचा. C. *n.* शतांश, शतभाग. Centes'imally *adv.*

Centesimation (sen-tesi-ma'-shun) *mil.* शिपायांनीं दंगा केल्यास दर शंभरांपैकीं एकाला द्यावयाची देहांत शिक्षा *f*. Centesimate *v. t.* शिक्षेकरितां शंभरांपैकीं एक निवडणें.

Centesipitous (sen-ti-sip'i-tus) [L. *centiceps*, *centicipitus*, from *centum*, a hundred & *caput*, the head.] *a.* शतशीर्षी, शंभर डोक्यांचा, शतशिरस्क.

Centifolious (sen-ti-fō'li-us) [L. *centum*, a hundred & *folium*, a leaf.] *a.* शतपत्री, शतपत्र, शतपत्रक.

**Centigrade** (sen'ti-grād) [L. *centum*, a hundred & *gradus*, a step; a degree.] *a.* शंभर भाग आहेत असा. Centigrade thermometer शतभागोष्णमानमापक यंत्र, शतांशोष्णमापक. [हा सेल्सीअस नामक गृहस्थानें शोधून काढिला. ह्यांत थिजण्याचा बिंदु व कढण्याचा बिंदु यांमधील नळीच्या जागेचे शंभर भाग पाडिलेले आहेत.] Centigrade temperature शतभागोष्णमान.

**Centinody** (sen-tin'o-di) [L. *centum*, a hundred & *nodus*, a knot.] *n.* शतपर्वा, शंभर पेरें ज्याला आहेत अशी वनस्पति.

**Centiped, Centipede** (sen'ti-pēd) [L. *centum*, a hundred & *pes*, *pedis*, Sk. पद्, a foot.] *n.* गोम *f*, घोण *f*, शतपदी *f*.

**Cento** (sen'to) [L. *cento*, a patch-work, a poem made up of various verses selected from different authors disposed in a new order.] *n. pl.* Centos. वेगवेगळाल्या ग्रंथांमधून निवडक निवडक वेंचे घेऊन नवीन रीतीनें तयार केलेलें पुस्तक *n*, खंडकाव्य *n*. Cen'toist *n.* Cen'tonism *n.* Cen'toism *n.*

**Centre, Center** (sen'tėr) [Fr. *centre*, from L. *centrum*.-Gr. *kentron*, any sharp point,-*kentein*, to prick. Gr.-*kentron* seems to be allied to Sk. केंद्र.] *n.* मध्य *m*, गर्भी *f*, मध्यभाग *m*, गर्भ *m*, गाभा *m*. २ (of a circle &c. or a conic) मध्य *m*, केंद्र *n*, नाभी *f*. ३ (*obs.*) पृथ्वी *f*. ४ (फ्रान्सच्या) कायदेकानू करणाऱ्या सभेचे सरकारतर्फेचे सभासद *m, pl.* ५ *arch.* गर्भाधार *m*, मंदिरगर्भाधार *m*, घुमट बांधतांना त्यास टेंका देण्याकरितां केलेलें बांधकाम *n*. ६ *mech. engin.* चरकाच्या यंत्रा (lathe) वर दागिना धरण्याच्या अणीदार मेखांपैकीं एक, दागिना धरण्याची गर्भी *f*. ७ *med.* (शरिराचा, अवयवाचा किंवा सुजेचा) केंद्र-बिंदु, व्यापारककेंद्र *m*; as, C. Accelerans, C. Auditory. ८ उत्तेजनस्थान *n*, केंद्रस्थान *n*. C. *v. t.* मध्यावर ठेवणें-आणणें. २ *to collect to a point* एके ठिकाणीं-एके केंद्रांत आणणें, एकीभूत करणें, केंद्रस्थानीं-केंद्रांत आणणें, स्थिर करणें, एकवट करणें. ३ *mech. engin.* मध्यबिंदु स्थिर करण्याकरितां खळगा पाडणें. C. *v. i. to be collected to a point* एक केंद्रस्थित होणें-असणें, एकाच आधारावर येणें-असणें. Centering or Centring *pr. p.* Centred, Centered *pa. p.* एकवटलेला. Central *a.* मध्यगत, मधील, केंद्रीय, मध्य. २ केंद्रस्थ, मध्यवर्ती, मध्यस्थ, मुख्य; as, C. figure. Centralisā'tion, *n.* समाकर्षण *n*. [C. of power सत्तेचें समाकर्षण-केंद्रीकरण.] २ सर्वांत श्रेष्ठ अधिकाऱ्याच्या हातीं आणणें-ठेवणें *n*. Cen'tralise *v. t.* मध्यबिंदूकडे आणणें, (निरनिराळ्या ठिकाणांतून काढून) एके ठिकाणीं ठेवणें-आणणें, समाकर्षणें. २ एका सत्तेखालीं-व्यवस्थेखालीं ठेवणें. Central'ity *n.* (v. A.) मध्यत्व *n*, केंद्राकडे जाण्याची प्रवृत्ति *f*, मध्यस्थता *f*, मध्यस्थितता *f*. Cen'trally, Cen'trically *adv.* मध्यें, मध्यभागीं. Centre-bit *n.* वाटोळें भोंक पाडण्याचें सुताराचें हत्यार, सामता *m*. Centre-bracket *n.* केंद्रकंस *m*. Centre-piece *n.* छताच्या मधोमधची-टेबलावर मधोमध ठेवण्याची एक शोभिवंत नकशीची वस्तु *f*. Cen'trical, Cen'tric *a.* मधचा, मधील, मध्य, केंद्रगत, मध्यवर्ती, मध्यस्थ. Cen'tricalness, Centric'ity *n.* Centrum *anat.* मणक्याचा देंठ *m*.-केंद्र. Centre of attraction गुरुत्वाकर्षणमध्य, आकर्षणकेंद्र-मध्य. Centre of buoyancy or displacement प्लावनमध्य. Centre of inertia or mass *mech.* एक किंवा अधिक जड पदार्थांचा गुरुत्वमध्यबिंदु, अयनकेंद्र, जडत्वकेंद्र. Centre of motion गतिमध्य. Centre of oscillation आंदोलनकेंद्र, दोलनकेंद्र. Centre of pressure भारकेंद्र. Centre-punch टोंचा मारण्याचें हत्यार *n*, चमकी *f*. Centring-drill परिघापासून सुरू होऊन मध्याकडे येणारें वाटोळें भोंक पाडण्याचा सामता *m*. टोपण *n*.

*N. B.*—In translating the following phrases, मध्य or मध्यबिंदु will be the best rendering of the word Centre:—Centre of an army, C. of gravity, C. of gyration, C. of motion, Centre of percussion.

In Conic sections it is better to restrict नाभि to focus, and मध्य or केंद्र to the Centre of a conic.

**Centrifugal** (sen-trif'ū-gal) [L. *centrum*, centre & *fugere*, to flee.] *a. tending to go off from the centre* मध्योत्सारी, मध्यत्यागी, केंद्रत्यागी. २ *bot.* ध्रुवोत्सारक, केंद्रपरावर्ती. C. *n.* see Centrifugal machine. Centrifugal machine *n.* सूत, कपडा, साखर इत्यादि ओलसर पदार्थांतून पाणी किंवा इतर प्रवाही पदार्थ काढून टाकण्याचें यंत्र *n*, मध्यशोषकयंत्र, मध्यशोषणयंत्र *n*. Centrifugal pump (पाणी उपसण्याचा) मध्यशोषक बंब.

*N. B.*—आपल्यांतील ताक करण्याची योजना ही एक Centrifugal Machine ची जात आहे.

**Centripetal** (sen-trip'et-al) [L. *centrum*, centre & *petere*, to seek.] Sk. केंद्र, *a. tending to approach the centre* मध्याभिगामी, मध्याभिसारी, केंद्राभिगामी, केंद्रपाती, केंद्रसाधक, केंद्रसंवर्ती, केंद्रशोधी. २ बाहेरील भागाचें रूपांतर होतहोत मध्यबिंदूकडे जाणारें. Centripetal force *mech.* मध्याभिगामी शक्ति *f*, केंद्रगामी प्रेरणा *f*.

**Centrobaric** (sen-tro-bar'ik) [L. *centrum*, centre & Gr. *baros*, Sk. भार weight.] *a.* गुरुत्वाकर्षणमध्यसंबंधी. २ गुरुत्वमध्य काढण्याच्या पद्धतीसंबंधीं. [भारकेंद्र.

**Centroid** (sen'-troid) *n. math.* त्रिकोणकेंद्र. २ *physic.*

**Centrolineal** (sen-tro-lin'e-al) [L. *centrum*, centre & *linea*, a line.] *a.* केंद्राकडे वळणारा, केंद्रोन्मुख.

**Centry** (sen'tri) *n.* (*obs.*) पाहरेकरी, चौकीवाला, संत्री.

**Centumvir** (sen-tum'vir) [L. *centum*, Sk. शतम्, a hundred, & L. *vir*, a man; for L. *vir*, cf. Sk. वीर्य.] *n.* दिवाणी कामाचा निकाल करावयास ३५ रोमन जातींतून प्रत्येकीं तीनप्रमाणें नेमिलेल्या १०५ न्यायाधीशांपैकीं एक, शतवीरन्यायाधीश *m. pl.* Centum'-

*N. B.*—A *cenobite* lives in a convent or monastery with others, and not alone like an *anchoret* or *hermit*.

Cenotaph (sen'ō-taf) [Gr. *kenos*, empty & *taphos*, a tomb.] *n. an empty monument* (अन्यस्थलीं पुरलेल्या मनुष्याची त्याच्या सन्मानार्थ उभारलेली) छत्री *f*, शव-रहित समाधि *f* कबर *f*, सन्मानार्थ रिकामी समाधि *f*, स्मारक-समाधि *f*.

Cense (sens) [See Census.] *n.* (*obs.*) वस्तिपत्रक *n*, मनुष्यगणति *f*, खानेसुमारी *f*. २ (*obs.*) कर *m*, जकात *f*. ३ (*obs.*) स्थिति *f*, पदवी *f*.

Cense (sens) *v. t.* (*obs.*) धुपाचा वास देणें. Cen'ser *n.* धुपारती *f*, धुपाटणें *n*, धूपपात्र *n*.

Censor (sen'-sor) [L. *censere*, to value, to estimate.] *n. an officer in ancient Rome who imposed taxes and punished immorality* आचारनियंता *m*, कर्माध्यक्ष *m*. [Cf. THE INDIAN धर्माध्यक्ष, धर्माधिकारी.] २ लेखननियंता *m*, मुद्रणाधिकारी, ग्रंथनियामक कामदार *m*, वर्तमानपत्रांचा नियामक *m*, मुद्रणनियामक *m*, मुद्रणशास्ता *m*, लेख-पुस्तकें इत्यादि छापण्यास योग्य आहेत कीं नाहीं हें ठरविणारा अधिकारी *m*. ३ *an adverse critic, one given to fault-finding*, दोषदर्शी टीकाकार, दुष्ट बुद्धीनें टीका करणारा, दोष तेवढेच पाहणारा, (निंदात्मक) टीका करणारा, दोषैकदृक्. ४ इंग्लंडांतील युनिव्हर्सिटींत-कालेजांत तेथें न राहणाऱ्या विद्यार्थ्यांवर देखरेख ठेवणारा, वर्त्तननियंता *m*. ५ रायल कालेज ऑफ फिजिशन्समध्यें परवाना देणारा अधिकारी. Censo-r'ial *a.* आचारशास्त्यासंबंधीं, लेखन-नियंत्यासंबंधीं, &c. Censo-r'ious *a. addicted to finding fault with others* दोषदर्शी, दोषग्राही, छिद्रदर्शी, छिद्रान्वेषी, रंध्रान्वेषी, अवगुणदर्शी. २ निंदक, निंदाखोर. ३ *implying or expressing censure* दोषदृष्टीचा, दोषबुद्धीचा, निंदात्मक. Censor'iously *adv.* दोषदृष्टीनें, छिद्रदृष्टीनें, दोषबुद्धीनें. Censor'iusness *n.* (v. A.) दोषदृष्टि *f*, दोषबुद्धि *f*, छिद्रदृष्टि *f*, छिद्रान्वेषणबुद्धि *f*. Censorship *n.* आचारनियंतृत्व *n*, आचाराध्यक्षाचा अधिकार *m*, धर्माध्यक्षता *f*, धर्माधिकार *m*, मुद्रणनियंतृत्व *n*. Censorship of the press मुद्रणाधिकाऱ्याच्या पसंतीशिवाय कोणताही लेख किंवा पुस्तक प्रसिद्ध करावयाचें नाहीं असा कायदा-नियम *m*.

Censual (sen'sual), vide Census.

Censure (sen'shūr) [Fr. *censure*.–L. *censura*, originally an opinion–L. *censere*, to give an opinion.] *n.* (*Shakes.*) ठराव *m*, मत *n*, निर्णय *m*; as "Take each man's censure, but reserve thy judgment." २ *reprehension, blame* दूषण *n*, निंदा *f*, निर्भर्त्सना *f*, ठपका *m*, अपवाद *m*, आक्षेप *m*; as, "Both the censure and the praise were merited." ३ न्यायाधिशानें किंवा धर्माध्यक्षानें केलेली शिक्षा *f*—दंड *m*. C. *v. t.* (*obs.*) गुणदोषविवेचन करणें. २ निंदा करणें, निर्भर्त्सना करणें, नापसंती दर्शविणें, दोष लावणें. ३ कायद्याप्रमाणें शिक्षा *f*-दंड *m*. करणें. Cen'surable *a.* निंदापात्र, निंद्य, दोषपात्र, गर्हणीय, वाच्य. Cen'surableness *n.* Censurably *adv.* Censurer *n.* निंदक, आक्षेपक.

Census (sen'sus) [L. *census*, a registering, from *censere*.] *n.* लोकगणती *f*, खानेसुमारी *f*, प्रजागणन *n*, वस्तीपत्रक *n*. (usually made once in ten years.) Cen'sual *a.* खानेसुमारीचा.

Cent (sent) [L. *centum*, a hundred.] *n.* शेंकडा *m*, शंभर *n*. [PER C. शेंकडा, दरशेंकडा.] २ युनायटेड स्टेट्समधील डालरच्या एक शंभरांश किंमतीचें नाणें *n*. ३ पत्त्यांचा एक तऱ्हेचा खेळ *m*. (या खेळांत शंभर ठिपके ज्याचे होतील तो जिंकतो.) Cent'age *n.* शेंकड्याचा भाव *m*, टक्का *m*. Cen'tal *n.* (अन्हीडुपाईस) १०० पौंडांचें वजन *n*. C. *a.* शेंकड्या-शतकासंबंधीं.

Centaur (sen'tawr) L. *centaurus* which some have compared with Sk. गंधर्व, a demi-god.] *n. myth.* तुंबरु *m*, नराश्व *m*, हयग्रीव *m*, हयांग *m*. २ नरतुरंग, हा एक राशि आहे व हा दक्षिण गोलार्धांत आहे. Centaurian *a.* नराश्वासारखा. Centaurus *n. astron.* नरतुरंग. हा एक राशि आहे.

Centenary (sen'tin-ar-i) [L. *centum*, Sk. शतम्, a hundred.] *n. a century* शंभर वर्षें *n. pl.* २ शतक *n*; as, Every C. of years. ३ *a commemoration of events which occurred a hundred years ago* शतवार्षिकोत्सव *m*. C. *a.* शंभरांचा-संबंधीं. २ शताब्दगत. Centenā'rian *n. a person a hundred years old* शतायु, शतवयस्क, पूर्णायू, शंभर वर्षांचा म्हातारा मनुष्य *m*. Centenā'rianism *n.* शतायुपणा *m*, शतवयस्कता *f*.

Centennial (sen-ten'i-al) [L. *centum*, Sk. शतम्, a hundred & *annus* (cf. Sk. हायन), a year]. *a. consisting of a hundred years* शंभर वर्षांचा, शताब्दगत. २ शंभर वर्षांनीं घडून येणारा, शतसांवत्सरिक, शताब्दिक. ३ शंभर वर्षें टिकणारा, शतवर्षायु. C. *n.* See Centenary (३).

Center, see Centre.

Centering (sen'tering) *n.* See Centre. कमान बांधते वेळीं दिलेला धिरा, कमानीचा धिरा-टेंका *m*.

Centesimal (sen-tes'i-mal) [L. *centesimus*, the hundredth, from *centum*, a hundred.] *a.* शंभर भागांचा. C. *n.* शतांश, शतभाग. Centes'imally *adv.*

Centesimation (sen-tesi-ma'-shun) *mil.* शिपायांनीं दंगा केल्यास दर शंभरांपैकीं एकाला द्यावयाची देहांत शिक्षा *f*. Centesimate *v. t.* शिक्षेकरितां शंभरांपैकीं एक निवडणें.

Centesipitous (sen-ti-sip'i-tus) [L. *centiceps*, *centicipitus*, from *centum*, a hundred & *caput*, the head.] *a.* शतशीर्षी, शंभर डोक्यांचा, शतशिरस्क.

Centifolious (sen-ti-fō'li-us) [L. *centum*, a hundred & *folium*, a leaf.] *a.* शतपत्री, शतपत्र, शतपत्रक.

**Centigrade** (sen'ti-grād) [L. *centum*, a hundred & *gradus*, a step, a degree.] *a.* शंभर भाग आहेत असा. Centigrade thermometer शतभागोष्णमानमापक यंत्र, शतांशोष्णमापक. [हा सेल्सीअस नामक गृहस्थानें शोधून काढिला. ह्यांत थिजण्याचा बिंदु व कढण्याचा बिंदु यांमधील नळीच्या जागेचे शंभर भाग पाडिलेले आहेत.] Centigrade temperature शतभागोष्णमान.

**Centinody** (sen-tin'o-di) [L. *centum*, a hundred & *nodus*, a knot.] *n.* शतपर्वा, शंभर पेरें ज्याला आहेत अशी वनस्पति.

**Centiped, Centipede** (sen'ti-pēd) [L. *centum*, a hundred & *pes*, *pedis*, Sk. पद्, a foot.] *n.* गोम *f*, घोण *f*, शतपदी *f.*

**Cento** (sen'to) [L. *cento*, a patch-work, a poem made up of various verses selected from different authors disposed in a new order.] *n. pl.* Centos. वेगवेगळाल्या ग्रंथांमधून निवडक निवडक वेंचे घेऊन नवीन रीतीनें तयार केलेलें पुस्तक *n*, खंडकाव्य *n.* Cen'toist *n.* Cen'tonism *n.* Cen'toism *n.*

**Centre, Center** (sen'tėr) [Fr. *centre*, from L. *centrum.*-Gr. *kentron*, any sharp point,-*kentein*, to prick. Gr.-*kentron* seems to be allied to Sk. केंद्र.] *n.* मध्य *m*, गर्भी *f*, मध्यभाग *m*, गर्भ *m*, गाभा *m.* २ (of a circle &c. or a conic) मध्य *m*, केंद्र *n*, नाभी *f.* ३ (*obs.*) पृथ्वी *f.* ४ (फ्रान्सच्या) कायदेकानू करणाऱ्या सभेचे सरकारतर्फेचे सभासद *m, pl.* ५ *arch.* गर्भाधार *m*, मंदिरगर्भाधार *m*, घुमट बांधतांना त्यास टेंका देण्याकरितां केलेलें बांधकाम *n.* ६ *mech. engin.* चरकाच्या यंत्रा (lathe) वर दागिना धरण्याच्या अणीदार मेखांपैकीं एक, दागिना धरण्याची गर्भी *f.* ७ *med.* (शरिराचा, अवयवाचा किंवा सुजेचा) केंद्र-बिंदु, व्यापारककेंद्र *m*; as, C. Accelerans, C. Auditory. ८ उत्तेजनस्थान *n*, केंद्रस्थान *n.* C. *v. t.* मध्यावर ठेवणें-आणणें. २ *to collect to a point* एके ठिकाणीं-एके केंद्रांत आणणें, एकीभूत करणें, केंद्रस्थानीं-केंद्रांत आणणें, स्थिर करणें, एकवट करणें. ३ *mech. engin.* मध्यबिंदु स्थिर करण्याकरितां खळगा पाडणें. C. *v. i. to be collected to a point* एक केंद्रस्थित होणें-असणें, एकाच आधारावर येणें-असणें. Centering or Centring *pr. p.* Centred, Centered *pa. p.* एकवटलेला. Central *a.* मध्यगत, मधील, केंद्रीय, मध्य. २ केंद्रस्थ, मध्यवर्ती, मध्यस्थ, मुख्य; as, C. figure. Centralisā'tion, *n.* समाकर्षण *n.* [C. of power सत्तेचें समाकर्षण-केंद्रीकरण.] २ सर्वांत श्रेष्ठ अधिकाऱ्याच्या हातीं आणणें-ठेवणें *n.* Cen'tralise *v. t.* मध्यबिंदूकडे आणणें, (निरनिराळ्या ठिकाणांतून काढून) एके ठिकाणीं ठेवणें-आणणें, समाकर्षणें. २ एका सत्तेखालीं-व्यवस्थेखालीं ठेवणें. Central'ity *n.* (v. A.) मध्यत्व *n*, केंद्राकडे जाण्याची प्रवृत्ति *f*, मध्यस्थता *f*, मध्यस्थितता *f.* Cen'trally, Cen'trically *adv.* मध्यें, मध्यभागीं. Centre-bit *n.* वाटोळें भोंक पाडण्याचें सुताराचें हत्यार, सामता *m.* Centre-bracket *n.* केंद्रकंस *m.* Centre-piece *n.* छताच्या मधोमधची-टेबलावर मधोमध ठेवण्याची एक शोभिवंत नकशीची वस्तु *f.* Cen'trical, Cen'tric *a.* मधचा, मधील, मध्य, केंद्रगत, मध्यवर्ती, मध्यस्थ. Cen'tricalness, Centric'ity *n.* Centrum *anat.* मणक्याचा देंठ *m.*-केंद्र. Centre of attraction गुरुत्वाकर्षणमध्य, आकर्षणकेंद्र-मध्य. Centre of buoyancy or displacement प्लावनमध्य. Centre of inertia or mass *mech.* एक किंवा अधिक जड पदार्थांचा गुरुत्वमध्यबिंदु, अयनकेंद्र, जडत्वकेंद्र. Centre of motion गतिमध्य. Centre of oscillation आंदोलनकेंद्र, दोलनकेंद्र. Centre of pressure भारकेंद्र. Centre-punch टोंचा मारण्याचें हत्यार *n*, चमकी *f.* Centring-drill परिघापासून सुरू होऊन मध्याकडे येणारें वाटोळें भोंक पाडण्याचा सामता *m.* टोपण *n.*

*N. B.*—In translating the following phrases, मध्य or मध्यबिंदु will be the best rendering of the word Centre:—Centre of an army, C. of gravity, C. of gyration, C. of motion, Centre of percussion.

In Conic sections it is better to restrict नाभि to focus, and मध्य or केंद्र to the Centre of a conic.

**Centrifugal** (sen-trif'ū-gal) [L. *centrum*, centre & *fugere*, to flee.] *a. tending to go off from the centre* मध्योत्सारी, मध्यत्यागी, केंद्रत्यागी. २ *bot.* ध्रुवोत्सारक, केंद्रपरावर्ती. C. *n.* see Centrifugal machine. Centrifugal machine *n.* सूत, कपडा, साखर इत्यादि ओलसर पदार्थांतून पाणी किंवा इतर प्रवाही पदार्थ काढून टाकण्याचें यंत्र *n*, मध्यशोषकयंत्र, मध्यशोषणयंत्र *n.* Centrifugal pump (पाणी उपसण्याचा) मध्यशोषक बंब.

*N. B.*—आपल्यांतील ताक करण्याची योजना ही एक Centrifugal Machine ची जात आहे.

**Centripetal** (sen-trip'et-al) [L. *centrum*, centre & *petere*, to seek.] Sk. केंद्र, *a. tending to approach the centre* मध्याभिगामी, मध्याभिसारी, केंद्राभिगामी, केंद्रपाती, केंद्रसाधक, केंद्रसंवर्ती, केंद्रशोधी. २ बाहेरील भागाचें रूपांतर होतहोत मध्यबिंदूकडे जाणारें. Centripetal force *mech.* मध्याभिगामी शक्ति *f*, केंद्रगामी प्रेरणा *f.*

**Centrobaric** (sen-tro-bar'ik) [L. *centrum*, centre & Gr. *baros*, Sk. भार weight.] *a.* गुरुत्वाकर्षणमध्यसंबंधी. २ गुरुत्वमध्य काढण्याच्या पद्धतीसंबंधीं. [भारकेंद्र.

**Centroid** (sen'-troid) *n. math.* त्रिकोणकेंद्र. २ *physic.*

**Centrolineal** (sen-tro-lin'e-al) [L. *centrum*, centre & *linea*, a line.] *a.* केंद्राकडे वळणारा, केंद्रोन्मुख.

**Centry** (sen'tri) *n.* (*obs.*) पाहरेकरी, चौकीवाला, संत्री.

**Centumvir** (sen-tum'vir) [L. *centum*, Sk. शतम्, a hundred, & L. *vir*, a man; for L. *vir*, cf. Sk. वीर्य.] *n.* दिवाणी कामाचा निकाल करावयास ३५ रोमन जातींतून प्रत्येकीं तीनप्रमाणें नेमिलेल्या १०५ न्यायाधीशांपैकीं एक, शतवीरन्यायाधीश *m. pl.* Centum'-

viri. Centum'virate *n.* प्राचीन रोममधील दिवाणी न्यायाधीशाचा हुद्दा *m.* अधिकार *m.*

Centuple (sen'tū-pl) [L. *centum*, a hundred & *plicare*, to fold.] *a.* शंभरपट, शतगुण. C. *v. t.* शंभरपट करणें. Centuplicate *v. t.* शंभरपट करणें. Centuplica'tion *n.*

Century (sen'tū-ri) [L. *centum*, Sk. शतम्, a hundred.] *n.* *a hundred* शेंकडा *m*, शतम् *n*, शंभरांची संख्या *f.* २ *a hundred years* शतक *n*, अब्दशत *n*, वर्षशत *n.* ३ फारच पुष्कळ काळ *m.* ४ मुलकी अधिकारी निवडण्याचा हक्क असलेल्या प्राचीन रोमन लोकांच्या तीस विभागांपैकीं एक. ५ रोमन सैन्याच्या पलटणीच्या तीस तुकड्यांपैकीं एक (हिच्यावरील अधिकाऱ्यास सेंचुरिअन ह्मणतात). Centur'ial *a.* (R.) शतकाचा. Centū'rion *n.* शतपति *m*, शताधीश *m*, एकशतकी *m*, रोमन लोकांत लष्करी खात्यांत ज्याच्या हाताखालीं शंभर लोक असत असा इसम *m.* Century-plant *n.* शतवार्षिकी लता, एक प्रकारची लता *f.* हिला फुलावयास शंभर वर्षें लागतात अशी पूर्वीं समजूत होती.

Ceoral (Churl) [A. S.] *n.* [नॉर्मन लोकांनीं इंग्लंडावर स्वारी केली त्याच्या अगोदर हा शब्द गांवढळ व हलक्या कुळांतल्या पण स्वतंत्र इसमास लावीत असत.] गांवढळ पण स्वतंत्र मनुष्य *m*, चर्ल *m.*

Cephalic (se-fal'ik) [Gr. *kephale*, Sk. कपाल, the head.] *n. a medicine for headache* नस *m*, नस्य *n*, मूर्धविरेचन. C. *a. belonging to the head* मस्तकाचा, मस्तकासंबंधी, मूर्धन्य, शिरस्य; also Cephalis'tic. Cephalag'ra *n. gout in the head* मस्तकामवात *m.* Cephalal'gia, Ceph'alalgy *n.* डोकें दुखणें *n*, मस्तकशूळ. Cephalal'gic *a. med.* मस्तकशूलासंबंधी. C. *n.* डोकें दुखणें बंद करणारें औषध *n*, मस्तकशूलहारी औषध *n*, नस्य *n*, नस *n.* Ceph'alate *a.* डोकें आहे असा, सशीर्षक. Cephalī'tis (See Phrenitis.) *n.* मेंदूचा व मेंदूच्या आच्छादनाचा दाह *m.* हा दाह झाला असतां मेंदूला सूज, शूल, विवर्णता, निर्व्यापारता हीं लक्षणें होतात. Ceph'aloid *a.* डोक्याच्या आकाराचें, शीर्षाकार, वर्तुलाकार. Cephalot'omy *n. surg.* डोकें कापणें *n*, शीर्षच्छेदनक्रिया *f*, शीर्षास्थिच्छेद, कपालच्छेद *m.* Cephalotribe *n.* अडलेल्या गर्भस्थ बालकाचें डोकें कापण्याकरितां वापरलेला जाडपातीचा चाकू, कपालच्छेदक छुरिका *f.* Ceph'alous *a.* डोकें आहे असा, कपाली.

Ceraceous (serā'shus) [L. *cera*, wax.] *n.* रंगानें व मेणासारखा घटनेनें, सिक्थसदृश.

Ceramic (se-ram'ik) [Gr. *keramos*, potter's earth.] *a.* कुंभारकामासंबंधीं; as, C. ornaments for ceiling. Ceramics *pl.* २ मातीचें बनवलेलें काम *n*, कुंभारकाम; as, vases, urns, &. ३ कुलालकला *f.*

Cerate (sē'rāt) [L. *cera*, wax.] *n.*, मेण व डुकराची चर्बी वगैरे पदार्थांनीं बनविलेलें मलम *n.* Ce'rated *a.* Ce'roman'cy *n.* पाण्यांत पातळ मेण टाकिलें असतां जी आकृति होते त्यावरून शकुन पाहण्याची विद्या *f*, मेणशकुनविद्या.

Ceratine (ser'a-tin, — tīn) [Gr. *keratinos*, the fallacy called "the horns." from *keros*, a horn.] *a. sophistical* वाक्छलाचा, शुष्क कोटीचा, लबाडीचा; as, "If you have not cast a thing away, you have it, but you have not cast horns; therefore, you have horns." This is a C. argument.

Ceraunics (se-raw'niks) [Gr. *keraunos*, thunder and lightning.] *n.* (R.) उष्णता व विद्युत् यांविषयीं ज्ञान देणारा सृष्टिशास्त्राचा भाग *m*, विद्युदुष्णविचार *m.* Ceraunoscope *n.* (गूढविद्येंत) प्राचीन काळीं मेघगर्जना व वीज यांची हुबेहूब नक्कल करणारें उपकरण *n.*

Cerberus (ser'ber-us) [L. *cerberus*, Gr. *kerberos*, a monster in the shape of a three-headed dog, guarding the entrance into the infernal regions.] *n. myth.* नरकाचा द्वारपाळ *m*, तीन डोक्यांच्या कुत्र्याचें रूप धारण केलेला सेरबरस नांवाचा राक्षस *m.* २ चलाख व करडा पाहरेकरी. ३ *zool.* एक जातीचा सर्प *m.* C. *a.* फार कडक; as, "C. watch over the golden rules of female chastity." Cerbe'rian *a.*

Cerberus (sėr'-be-rus) *n. astron.* सारमेय ही राशी उत्तर गोलार्धांत नंदीचे उत्तरेस आहे.

Cere (sēr) [L. *cera*, wax.] *v. t.* to *wax*, *to cover or close with wax* मेणानें आच्छादणें-बंद करणें, मेण सारवणें. C. *n.* (पक्ष्याच्या चोंचीच्या तळाजवळ नाकपुड्यांशीं) मेणासारखें मऊ त्वगिंद्रिय *n.* Cera'ceous *a.* मेणा-चा-प्रमाणें. Cerago *n.* मधमाशांची मेणासारखी खाद्यवस्तु *f.* (हळद्या, ह्यालाच मधमाशांची भाकर असें म्हणतात.) Cere-cloth *n.* मेणकापड *n.* Cerement *n.* मेणांतून बुचकळून काढलेला कपडा *m.* हा यूरोपांत बहुतेक प्रेतावर गुंडाळतात, प्रेतवस्त्र *n.* Cē'reous, Cē'ric *a.* मेणाचा. Cē'rin, Cē'rine *n.* तापवलेल्या मद्यमय पदार्थांपासून निघणार मेणासारखा अर्क, कार्क नांवाचें लांकूड दारूंत शिजविलें असतां त्यापासून मेणासारखा जो एक पदार्थ निघतो तो. Cē'-rograph *n.* मेणावर लिहिणें-कोरणें. २ मेणाच्या चित्रांची कला. Cerograph'ic-al *a.* Cerog'raphist *n.* मेणचित्रकलाविज्ञ *m.* Cerog'raphy *n.* मेणावर कोरून चित्रें काढण्याची कला *f*, मेणचित्रकला *f.* Ceroplas'tic *a.* मेणाच्या हुबेहूब चित्राचा; as, A ceroplastic panorama of the men of the time. Ceroplastic *n.* मेण ओतून हुबेहूब चित्रें करण्याची विद्या *f.* Cer'osin *n.* कांहीं उसाच्या सालीपासून मेणासारखा पदार्थ मिळतो तो, उसाचें मेण *n.* (मेण=Sk. सिक्थ.)

Cereal (sē'rē-al) [L. *cerealis*, pertaining to Ceres, the goddess of agriculture.] *a.* खाद्यधान्यासंबंधीं-विषयक. C. *n.* खाद्यधान्य *n.* (always *pl.*) Cereals or Cerealia.

Cerebel, Cerebellum (ser'e-bel, sere-bel'lum) [L. dim. of *cerebrum*, the brain.] *n.* मस्तिष्कांग, मगजाचा खालचा व मागचा भाग *m*, लघुमस्तिष्क, शतदल (मस्तिष्क).

Cerebrum (ser'e-brum) [L. *cerebrum*, the brain.] *n.* मस्तकांतील मगजाचा वरचा आणि मोठा भाग *m*, सहस्रदलमस्तिष्क, महामस्तिष्क. Cerebell'ar, Cere-

bell'ous *a.* Cer'ebral *a.* मस्तकांतील मगजाचा मस्तकांतील मेंदूचा. C. *n.* मूर्धन्यवर्ण *n.* Cer'ebralism *n. the theory that mental operations arise from the action of the brain* सर्व मानसिक व्यापारांचें मस्तिष्क हें कारण आहे असा वाद *m*, मेंदूंतून सर्व मानसिक व्यापारांचा उद्भव होतो अशा प्रकारची कल्पना *f*, मस्तिष्ककारणवाद *m.* Cer'ebralist *n.* Cer'ebrate *v. i.* वरिष्ठ मेंदूचा व्यापार दाखविणें. Cerebrā'tion *n.* महामस्तिष्काचा व्यापार (शुद्धींतला किंवा बेशुद्धींतला, कनिष्ठ मेंदूचा *i. e.* Cerebellum चा नव्हे). Cer'ebric *a.* महामस्तिष्कासंबंधीं. Cereb'riform *a.* महामस्तिष्काच्या आकाराचा. Cer'ebrin *n.* महामस्तिष्काचा मुख्य घटक *m*, मेंदूंत सांपडणारा नत्र (nitrogen) असलेला व स्फुर (phosphorus) असलेला पदार्थ *m.* Cerebri'tis *n.* मस्तिष्काभिताप, मस्तिष्कदाह *m.* हा दाह झाला असतां सूज येते. Cer'ebro-spīn'al *a.* मेंदू आणि पृष्ठरज्जू यांसंबंधीं; as, Cerebrospinal meningitis. मेंदूची एक प्रकारची भयंकर व्याधि. Cerebral hemispheres वरिष्ठ मेंदूचीं-महामस्तिष्काचीं दोन शकलें, मनोव्यापारस्थानाचे दोन मोठे भाग *m. pl.*

*N. B.*—Cerebrum मस्तिष्क व Cerebellum साठीं मस्तिष्कांग हे शब्द कायम करून टाकावे. असें केल्यानें मस्तिष्कीय (Cerebral), मस्तिष्कीक (Cerebric), मस्तिष्कीन (Cerebrin), मस्तिष्काकार (Cerebriform), असे शब्द करण्याला फार सुलभ होईल.

Cerebropathy (ser-ē-brop'ă-thi) *n.* मेंदूवर फार दाब पडल्यामुळें होणारी मेंदूची क्षीणता *f*; व त्यामुळें येणारा भ्रमिष्टपणा *m*, मस्तिष्कक्षीणता.

Cerebroscopy (ser-ē-bros'kō-pi) *n.* मगजांतील रोगाची तपासणी *f*, मस्तिष्कपरीक्षा *f.* ही डोळ्यांच्या आंतील भागाची तपासणी केली असतां समजते, मगजतपासणी *f.*

Ceremony (ser'e-moni) [Fr. *ceremonie.*—L. *cærimonia,* a rite.] *n. an outward rite or observance religious or held sacred* कर्म *n*, क्रिया *f*, विधि(*) *m.* [A religious ceremony lasting for a certain period अनुष्ठान *n.* A closing ceremony उद्यापन *n.*]. २ *an empty form* (used disparagingly) विधीचें सोंगढोंग *n*, विधीची कवाईत *f*, तांत्रिक विधि *m*, विधीचें तंत्र *n*, केवलतंत्र *n*; as, The custom had probably been long a mere C. ३ *a stately formality* समारंभ *m*; as, "Thank God, the ceremony of dinner is over." ४ *a formal act or observance expressive of deference or respect to superiors in rank, or established by custom in social intercourse* शिष्टाचार *m*, लोकरीति *f*; as, "I seldom use the C. of waiting for answers." ५ *formal observances or usages collectively* संस्कार *m. pl.* ६ *set forms of deference or respect* आदरोपचार *m*, विधि (समुच्चयार्थी), सन्मान दाखविण्याची ठराविक पद्धत *f*, ठराविक रीत *f*. शिरस्ता *m.* Ceremo'nial *a.* (See the meanings of Ceremony). *relating to or characterised by ceremonies* विधिसंबंधीं, संस्कारासंबंधीं, वैधिक, विधीचा, कर्मात्मक. २ विशेषविधिदर्शक; as, The C. costume. ३ विधिरूप, क्रियारूप, कर्मरूप. ४ आदरोपचारासंबंधीं, शिष्टाचारासंबंधीं; as, "Laying on one side all C. manners." Ceremō'nial *n. a prescribed system of ceremonies* विधिपद्धति, विधिक्रम *m*; as, The C. prescribed in the Anglican service. २ (R.) विधि *m*; as, The use of water is not a mere empty C. ३ शिष्टाचार *m*, शिष्टांशीं किंवा वडिलांशीं वागण्याचा वर्त्तनक्रम *m.* ४ (of Roman Catholic church) विधिपुस्तक *n*; as, "The Roman Ceremonial was first published by the bishop of Corcyra in 1506." Ceremō'nialism *n.* बाह्याचारसंसक्ति *f*, शुष्कविधिप्रीति *f*, विधींवर विशेष भर *m*, दांभिकपणा *m.* Ceremonialist *n.* बाह्यविधींना पुष्कळ महत्व देणारा, विधिवादी, तांत्रिक. Ceremo'nially *adv.* Ceremo'nious *a.* पुष्कळ विधींचा, विधियुक्त, ज्यासाठीं पुष्कळ विधी करावे लागतात असा. २ दांभिक, बाह्यविधींचा. ३ (ठराविक) शिष्टाचारानुरूप; as, C. politeness. ४ (of persons) विधि *m*- संस्कार *m*- कर्म *n*. हीं अतिशय पाळणारा, मंत्रापेक्षां तंत्राकडे जास्त लक्ष देणारा, तांत्रिक. ५ आदरोपचारी, आदरशील. Ceremo'niously *adv.* विधीनें, आदरोपचारानें, यथाविधि, यथोपचार. Ceremoniousness *n.* विधीचा कवाइतीपणा *m*, आदरोपचारनिष्ठा *f*, आदरोपचाराची भक्ति *f.* To stand on ceremony संकोचानें वागणें, उपचारांच्या कवाइतीकरितां अडून बसणें, तांत्रिक उपचारांची वाट न पाहणें. Not to stand on ceremony घरोब्यानें वागणें. Without ceremony *off hand, unceremoniously* विशेष उपचारांच्या कवाइतीची वाट न पाहतां. Master of ceremony, The person who superintends the ceremonies observed in a place of state or on some public occasion राजसभानियमाभिज्ञ, राजसभानियमपटु *m.* [बडोदें संस्थानांत Master of ceremonies झाला गोठगस्ते असें म्हणतात. राजसभेंत झाला खालीं दिलेलीं कामें करावीं लागतात; (१) ज्या वेळीं दरबार होतो त्या त्या वेळीं मंडळीस आमंत्रणें करणें. (२) दरबारांत नेमलेल्या ठिकाणीं बसवणें. (३) पानसुपारी देणें.]

*N. B.*—Ceremony शब्दाचे (१) कर्म, (२) शिष्टाचार, (३) समारंभ हे मूळ अर्थ आहेत. इंग्लंडांतील एक्लेसिपच्या रीत्यनुसार साधारण प्रार्थनेच्या पुस्तकांत, विधि=rite, आणि कर्म=ceremony असे अर्थ खिस्ती विशपांच्या सभेनें ठरविले आहेत.

Ceres (sē'rēz) [L. *Ceres,* the daughter of Saturn & Ops or Rhea, the goddess of corn & tillage.] *n.* सीरीझ नांवाची कार्षदेवता, ग्रीक लोकांची धान्य व कृपिकर्म ह्यांवरची अधिष्ठात्री देवता *f*, रोमन लोक हिला डेमेटर म्हणतात. २ *astron.* मंगळ व बृहस्पति यांच्या कक्षेंतील एक लहान तारा *m.*

Cereus (sē'ri-us) [L. *cera,* wax.] *n.* सिरीअस नांवाचें अमेरिकेंत वाढणारें एक जातीचें झाड *n*, याला पानांऐवजीं कांटेच येतात, कंटकपर्णवृक्ष *m.*

Cernuous (ser'nū-us) [L. *cernuus*, with the face turned towards the earth.] *a. bot.* लोंबणारा. Cernuous flower अवनतपुष्प *n.*

Cerograph (sē'ro-graf) [L. *cera*, wax & Gr. *graphein*, to write.], see Cere.

Ceromancy, see Cerate.

Certain (ser'tān) [Fr. *certain*.—L. *certanus*, from *certus*, determined, fixed, certain.] *a. sure, confident, undoubting* निःसंशय, निःसंदेह, निभ्रांत, दृढकृत-बद्धनिश्चय, निश्चितमनस्क, निर्धारयुक्त, संशयरहित. [I am certain माझी खातरी आहे.] २ *indubitable, undeniable* निश्चयाचा, खचीत, निखालस, निश्चित, निर्विवाद, बिनतकरारीचा, असंदिग्ध; as, "The dream is C. and the interpretation thereof sure." ३ *of sure occurrence or action* खचित, निश्चयात्मक, निस्संदेह, अचूक, आवश्यक, खचीत घडणारा, ठरीव, ठरलेलें; as, Death is C. to all. ४ *unfailing, infallible* रामबाण, खातरीचा; as, C. remedy. ५ *settled, stated, fixed* नियमित, निर्धारित, खचित, ठाम; as, "The people shall go out and gather a certain rate every day." ६ *some* कोणीएक; as, A C. person अमुक, अमका, फलाणा. [SOME TIMES USED INDEPENDENTLY AS A NOUN, MEANING CERTAIN PERSONS.] ७ अव्यभिचारी (S.), ज्याच्यापासून निश्चय होतो तो. Certain (*obs.*) *n.* खातरी *f*, निश्चय *m.* C. (*obs.*) *adv.* खास, नक्की, निश्चयपूर्वक. Cer'tainly *adv.* निभ्रांत, निखालस. Cer'titude, Cer'tainty, Cer'tainness *n.* खातरी *f*, निभ्रांतपणा *m*, निधडा *m*, संशया-संदेहाभाव *m*, असंशय *m*, असंदिग्धता *f*, निर्धार *m*, निश्चय *m*, निःसंशयत्व *n*, निःसंदेहत्व *n.* २ निखालसपणा *m*, खचितपणा *m*, निःसंदिग्धता *f.* ३ *law* निर्दोष *m*, स्पष्टता *f.* ४ *a real & fixed thing* खचित-निश्चित गोष्ट *f*-विषय *m*, निश्चितार्थ *m.* A certain person (तिरस्कारयुक्त) कोणीएक मनुष्य *m.* A lady of a certain age आरूढा, निदान तरुण नाहीं हें खास अशी स्त्री *f*, चाळिसीच्या पुढची स्त्री *f.* For certain खचित. Moral certainty, see Moral.

Certificate (sėr-tif'kāt) [L. *certus*, sure & *facere*, to make.] *n. a testimonial of character* दाखला *m*, प्रमाणलेख *m*, सौजन्यपत्र *n*, प्रशंसापत्र *n*, खातरीपत्र *n*, सर्टिफिकीट *n*, चिठ्ठी *f*, लेख *m*; as, A C. of good behaviour. [In comp. with the indicating noun; as, C. of purification शुद्धिपत्र *n*; C. of pre-eminence अजितपत्र *n*, अजिंक्यपत्र *n*; C. of good character अनूपत्र *n.*] C. *v. t.* दाखला देणें. २ (प्रमाणपत्रानें) खातरी करून देणें. Certifica'tion *n.* सर्टिफिकिट-दाखला देणें *n.* Cer'tifier *n.* खातरी करणारा, सर्टिफिकिट-दाखला देणारा.

Certify (sėr'ti-fī) *v. t. to testify to a thing in writing, to make a declaration concerning a thing in writing under hand, or hand and seal* दाखला *m*-दस्तऐवज *m*-प्रमाणलेख *m*-खातरीचा लेख *m.* लिहून देणें, निश्चयपूर्वक लिहून देणें; as, To C. some-thing to a person. २ माहितगार-ज्ञात-ज्ञापित करणें, खात्रीलायक माहिती देणें. ३ खातरी करणें, खातरीनें सांगणें. Certifying *pr. p.* Certified *pa. p.*

Certitude (ser'-titūd) [L. *certus*, sure.] *n.* See Certainty.

Cerulean (sē-rū'le-an) [L. *cæruleus*, dark-blue.] *a. sky-coloured* अस्मानी, निळा, आकाशवर्णाचा, श्याम, नील. Cerū'leous *a.*

Cerumen (sē-rū'men) [L. *cera*, wax.] *n. wax of the ear secreted by the wax-glands* कानांतला मळ *m*, कर्णमल *m.* Ceru'minous *a.*

Ceruse (sē'rōōs) [Fr. *ceruse*.—L. *cerussa*.] *n. white lead* सफेता(दा) *m.*

Cervical (sėr'vi-kal) [L. *cervix*, *cervicis*, the neck.] *a.* मानेचा, ग्रीवेसंबंधीं, ग्रैविक, ग्रैवेयक. C. vertebræ ग्रैवेयकमणि *m. pl.*

Cervix (ser'viks) [L.] *n. physio.* मान *f*, ग्रीवा *f*, गळ्याचा मागचा भाग *m.* २ *fig.* मानेसारखा भाग *m*, मान *f*; as, The neck of the womb (*cervix uteri*), the neck of the bladder (*cervix vesicæ*), the cervix of the thigh-bone (cervix femoris).

Cess (ses) [Sess for 'assess' which see.] *n. an assessment, tax or levy* कर *m*, सारा *m*, राजभाग *m*, राजदेणें *n*, सरकारदेणें *n.* २ (special uses in India) विशेष कामाकरितां बसविलेला कर *m*-पट्टी *f*; as, The road C., the irrigation C., the education C. &c. Cess as a verb was once used in the sense of 'assess' but that use is now obsolete.

*N. B.*—जमिनीची मालकी राजाची किंवा प्रजेची ह्या महत्वाच्या प्रश्नावर Cess or Assessment ह्या शब्दांचा अर्थ अवलंबून आहे. ह्यांचा पूर्ण विचार आम्ही Rent शब्दाखालीं करणार आहोंत.

Cessation (ses-ā'shun) [L. *cedere*, to yield.] *n. ceasing, discontinuance* (पासून दूर) राहणें *n*, उपरम थांबणें *n*, बंद ठेवणें *n*, निवर्त्तन *n.* २ *intermission* मं-हकुबी *f.* [CESSATION OF ARMS कांहीं वेळ हत्यारें खालीं ठेवणें *n*, थोड्या वेळेपुरता केलेला तह *m.*]

Cession (sesh'un) [L. *cedere*, to go.] *n. act.* सोडणें *n*, सोडून जाणें *n*, त्यागपूर्वक दान *n.* २ दुसऱ्याचे स्वाधीन करणें-होणें *n.* ३ धर्माधिकाऱ्याची वृत्ति सोडणें *n.* ४ धनकोला आपखुषीनें आपली मालमत्ता देणें *n.*

Cess-pool (ses'-pōōl) [Most prob. equivalent to (se) *ceso-pool*, cf. It. *cesso*, a privy which is a shortened form of *secesse*, a retreat.—L. *secessus*, the draught.] *n.* कचऱ्याचें-खातेऱ्याचें किंवा घाण सांडपाण्याचें डबकें *n*, मलवापी *f.*

Ceylon (se-lon') *n.* लंका *f*, सिंहलद्वीप *n*, सीलोन *n.* Celonese *a.* सीलोनच्या रहिवाशासंबंधीं. C. *n.* सीलोनचा रहिवाशी *m.* २ सीलोनी भाषा *f.*

Chack (chak) *v. i.* कचदिनी चिरडणें. २ *obs.* (घोडा जसा लगाम तोडून टाकण्याकरितां मान खालींवर करतो त्याप्रमाणें) वारंवार मान खालींवर करणें.

Chafe (chāf) [O. E. *chaufen*, to warm.—O. Fr. *chaufer*.—L. *calere*, to be warm and *facere*, to make.] *v. t. to excite heat in by rubbing* चोळून चेतना *f.* जीव *m-* उबारा *m-* चेव *m-* &c.-आणणें; as, To rub her temples and C. her skin. २ *to wear by rubbing* चोळणें, चोळवटणें; as, To C. a cable. ३ *to fret, to irritate, to excite passion in* चेतवणें, चिडवणें, खिजवणें; as, Her intercession chafed him. C. *v. i. to rub, to come together so as to wear by rubbing* चोळणें, घांसणें; as, 'Made its great boughs C. together.' २ *to be worn by rubbing* चोळून-घांसून कमी होणें, झिजणें. ३ *to be vexed, to fret* चडफडणें, चिडणें, तडफडणें, उगवणें (?), संतापणें, खलखलणें (?), तडफडणें, *intens.* तडफडाट *f. m-* चडफड *f- intens.* चडफडाट *m-* करणें; as, He will chafe at the doctor's marrying my daughter. C. *n. heat excited by friction* घर्षणताप *m*, घर्षणजनित उष्णता *f*, घर्षणानें उत्पन्न झालेली उष्णता *f*. २ *vexation, irritation of mind, rage* क्षोभ *m*, राग *m*, संताप *m*, मनस्ताप *m*. Chafing-dish *n.* प्रवाशी शेगडी-टी *f*, प्रवाशी अग्निपात्र *n.* Chafer *n.* पाणी तापवावयाचें भांडें *n*, 'सास' (sauce) शिजविण्याचें भांडें *n*.

Chafer (chā'fėr) [A. S. *cefer*.] *n. a kind of beetle* एक प्रकारचा पंखांचा किडा *m*, पिंगकपिशविशेष.

Chaff (chaf) [A. S. *ceaf*.] *n.* भुसा *m*, भूस *n*, भुसकट *n*, भुशी *f*, फोल *n*, तूस *n.* or *m.* Chaff'y *a. having much chaff* भुसाळ. २ *light* भुसा-भुसकटासारखा हलका, तृणवत्, फल्गु.

Chaff (chaf) *v. t.* & *v. i. to use light idle language by way of fun or ridicule* (मजेनें उपहास करण्याच्या उद्देशानें) हलकट शब्द वापरणें, (एखाद्याला चिरड येई तोंपर्यंत त्याची) थट्टा करणें; as, "Morgan saw that his master was chaffing him." "Not pausing to chaff or parley." Chaffer *n.* विनोदानें थट्टामस्करी करणारा *m*, &c.

Chaffer (chaf'ėr) [O. E. *chaffaren*, from *chaffare*, *chapfare*, *cheapfare*, a bargaining.—A. S. *ceap*, a bargain & *faru*, a journey; hence orig. 'a going to market.'] *v. i. to dispute about a purchase, to haggle* or *higgle* घासाघीस करून भाव ठरविणें-सौदा करणें. २ *to talk much and idly, to chatter* फाजील-निरर्थक बोलणें. C. *v. t. to buy or sell, to trade in* खरेदी-विक्री-क्रयविक्रय करणें, व्यापार करणें.

Chaffinch (chaf'insh) *n.* 'चाफिंच' नांवाचा पक्षी *m*.

Chagrin (sha-grēn') [Fr. *chagrin*, melancholy caused by care and grief.] *n. vexation, mortification* (काळजी व दुःख यांनीं होणारा) खट्टूपणा *m*, मनाला वाईट वाटणें *n*, खजीलपणा *m*, हिरमोड *m*. C. *v. t. to vex, to mortify* खट्टू करणें, खजील करणें, हिरमोड करणें. C. *v. i.* खट्टू होणें. Chagrin', Chagrined' *a.* खट्टू केलेला.

Chain (chān) [Fr. *chaine*, from L. *catena*.] *n.* सांखळ *m. dim.* सांखळी *f*, शृंखला *f*. [FINE CHAIN (AS OF A WATCH) जंजिरी *f*, जंजीर *f*. LARGE IRON CHAIN लंगर *m*. LARGE & THICK C. सांखळदंड *m*. LITTLE C., C. OF TWO OR THREE LINKS कडी *f*.] २ *lit.* & *fig. fetters, bond, shackles* बंद *m*, बंधन *n*, बंध *m*, बिडी *f*, शृंखलाबंधन *n*; as, The chains of habit. [TO RIVET ONE'S CHAINS *lit.* & *fig.* आपली बिडी जास्त घट्ट करून घेणें.] ३ *a series, a concatenation* सांखळी *f*, शृंखला *f*, माला *f*, ओळ *f*, रांग *f*, सिलसिला *m*, श्रेणी *f*, अन्वय *m*, आनुपूर्वी *f*, परंपरा *f*; as, A chain of mountains, A chain of events. C. *v. t. to fasten or bind securely as with a chain* सांखळीनें जोडणें, सांखळीनें बंद करणें, शृंखलाबद्ध करणें, सांखळीनें बांधणें; as, To C. a bulldog. २ *to enslave* गुलाम करणें. ३ *to unite closely & strongly* घट्ट आणि मजबूत रीतीनें जोडून टाकणें; as, "And in this vow do chain my soul to thine." C. armour कड्यांचें चिलखत *n*, कड्या गुंतवून केलेलें चिलखत. Chained *a.* सांखळीनें बांधलेला-बद्ध केलेला. Chain-gang *n.* सांखळीनें बांधलेल्या कैद्यांची टोळी *f*. Chain'less *a.* मोकळा, सुटा, अबद्ध; as, C. mind. Chain-bridge *n.* सांखळदंडाचा-सांखळपूल, सांखळदंडी पूल. C.-let *n.* लहान सांखळी *f*. C.-pier सांखळदंडानें केलेला त्रिकोणी धक्का *m*. C.-rule *n.* (*arith.*) सांखळरीत *f*. C.-shot *n.* जंजिरीगोळी *f*, जोडगोळी *f*. C.-work जाळीचें-नकशीचें काम *n*. Chain'ing *n.* सांखळीनें बांधणें *n*, शृंखलाबंध *m*, शृंखलाबंधन *n*, बिडी *f*. घालणें.

Chair (chār) [Fr. *chaire*, a pulpit.—L. *cathedra*.—Gr. *kathedra*, a seat, from *kata*, down & *edra*, a seat.] *n.* खुर्ची, खुरची *f*. [Easy-C. or seat सुखासन *n*, आरामखुर्ची *f*.] २ *the seat of authority* गादी *f*, अग्रासन *n*, मुख्यासन *n*, अध्यक्षाचें आसन *n*, अध्यक्षासन *n*. ३ (as of a professor) गुरुपीठ *n*, गुरूची जागा *f*, अध्यापकपीठ *n*. ४ (*sedan C.*) नालकी *f*, एखाद्याला इकडून तिकडे नेण्याची खुर्ची. C. days बसण्याचे दिवस *m. pl*, वृद्धापकाळ *m*. C.-bed बिछान्यासारख्या उपयोगाची खुर्ची, हिच्यावर निजतां व बसतां येतें, बिछानाखुर्ची. Chair'man *n. the president of an assembly* सभानायक (R.) *m*, सभापति (R.) *m*, सभाध्यक्ष *m*. Chairman-ship अध्यक्षाचा हुद्दा-मान *m*, अध्यक्षगिरी *f*, अध्यक्षपणा *m*, अध्यक्षत्व *n*. To put into the chair अध्यक्ष नेमणें. To take the chair सभेचा अध्यक्ष होणें, अध्यक्षस्थान स्वीकारणें. To address the chair अध्यक्षाला उद्देशून बोलणें.

Chaise (shāz) [Fr. *chaise*, a seat or chair, a carriage.] *n.* दोन माणसें बसण्यापुरती एक लहानशी उघडी दुचाकी एका घोड्याची गाडी, शेज *f*.

Chalcedony (kal-sed'ō-ni) [L. *chalcedonius*, from Gr. *Kalcedon*, *Chalcedon*, a town in Asia Minor, opposite to Byzantium.] *n. a variety of quartz with some opal disseminated through it* एक प्रकारचा पांढरा चकचकीत वाळूचा मौल्यवान् दगड *m*, शिवधातु (?). *pl.* Chalcedonies.

Chalcography (kal-kog'ra-fi) [Gr. *kalkos*, brass & *graphein*, to write.] *n.* तांबें अथवा पितल यांवर खोदण्याची कला *f*, तांब्या-पितळेवरचें नकसकाम *n*, ताम्रत्वक्षण *n*. Calcography.

Chaldron (chawl'drun) [O. Fr. *chaldron*, Fr. *chaudron*, a kettle.], see Caldron.

Chalet (sha-lā') [Fr.] *n. a hut, a shed, a herdsman's hut in the mountains of Switzerland* स्वित्सरलंडच्या पर्वतांतील धनगराची झोंपडी *f*, खोंपट *n*.

Chalice (chal'is) [O. Fr. *chalice*.—L. *calix*, a cup.] *n.* पेला *m*. Chaliced *a.* पेलेदार; as, C. flowers.

Chalk (chawk) [A. S. *cealc*, from L. *calx*, limestone.] *n.* खडू *m*, चाक *m*, कठिनी *f*, सितधातु *m*. Red C. तांबडा खडू, रक्तधातु (?) *m*, सुरंगधातु (?) *m*. C. *v. t.* खडूनें रेखाटणें-अंकणें-आंखणें. २ (with *out*) *to sketch as with chalk, to outline, to plan* रेखाटणें, काढणें, बेतणें, (आंखून) ठरविणें-निश्चित करणें.

Challenge (chal'enj) [O. Fr. *chalenge*, a claim, an accusation, a contest.–L. *calumnia*, false accusation, see Calumny.] *n. a defiance, an invitation to engage in a contest or controversy of any kind* लढाई *f*. मागणें *n*, युद्धनिमंत्रण *n*, युद्धाव्हान *n*, सामन्यास-वादविवादास आव्हान-आमंत्रण-बोलावणें *n*. [To ACCEPT A CHALLENGE युद्धाव्हानस्वीकार करणें, युद्धनिमंत्रण-सामना पत्करणें. WRITTEN C. युद्धनिमंत्रणपत्र *n*, युद्धाव्हानपत्र *n*.] २ संशय घेणें, अमुक पंच नको असें ह्मणणें *n*, मध्यस्थवर्जनप्रार्थना *f*. C. *v. t. to call to a contest of any kind, to defy* लढाई *f*- मागणें with जवळ *of o.*, युद्ध-निमंत्रण *n*- युद्धाव्हान करणें [CHALLENGE ह्या अर्थी युद्धाव्हान हा शब्द महाभारतांत वापरलेला आहे], सामन्यास बोलावणें. २ हक्क सांगणें. ३ (as a sentry) हटकणें, ललकारणें. ४ (in a trial) आपल्या खटल्याची चौकशी करण्यांत अमुक पंच नसावा-वर्ज करावा असें म्हणणें. C. *v. i.* सामन्यास बोलावणें. Chall'engeable *a.* युद्धनिमंत्रण करण्यास-सामन्यास बोलावण्यास योग्य. Chall'enger *n.* युद्धाव्हान करणारा, सामन्यास बोलवणारा, योद्धा *m*. २ प्रतिवादी *m*.

Chalybeate (ka-lib'iāt) [Gr. *chalybs*, *chalyb*, steel.] *a. impregnated with iron* लोखंडाप्रमाणें चव आहे असा, लोहगुणमिश्रित, लोहगुणान्वित, लोहगुणात्मक.

Cham, Kham (kam) *n.* तार्तरीचा बादशाहा; now usually written Khan.

Chamade (sham'ad) [Fr. *chamade*.– Port. *chamada*, from *chamar*, to call.—L. *clamare*.] *n. mil.* शत्रूशीं संभाषण करावें अशी सैन्याला आज्ञा देणारा नगाऱ्याचा आवाज *m*.

Chamber (chām'bėr) [Fr. *chambre*.–L. *camera*, a vault, an arched roof, from Gr. *kamara*, any thing with an arched roof or covering.] *n. an apartment* कोठडी *f*, खोली *f*. २ (in a gun) खजीना *m*, कोठा *m*, कोठी *f*. ३ सभा *f*. Cham'ber council बैठा सल्ला, बैठी वकीली. C.–counsel,-counseller *n.* बैठा वकील *m*. (हा कधीं कोडतांत खटला चालवण्यास जात नाहीं.) Cham'bered *a.* Cham'ber-fellow *n.* एकाच खोलींत राहणारा सोबती *m*, सहवासक *m*. Cham'ber-hangings *n. pl.* खोलीची झालर *f*, खोलीचे बुट्टीदार पडदे. Cham'bering *n.* (*obs.*) बदख्याल वर्त्तणूक *f*. Chamber-lye *n.* (*Shakes.*) मूत्र *n*, मूत *n*, वि(इ)राकत *f*. Cham'ber-maid *n.* दासी *f*, सैरंध्री *f*. Cham'ber-pot *n.* विराकत-लघ्वी करण्याचें भांडें, मूत्रपात्र *n*, तस्त *n*. Cham'ber-practice *n. law.* (खोलींतल्या खोलींत बसून) कायद्याचा खाजगी सल्ला *f*- मसलत *f*. देण्याचा धंदा *m*. (कोर्टांत काम चालविण्याचा नव्हे), बैठी वकीली. Chamber of a judge न्यायाधिशाची कमी महत्वाचें काम चालविण्याची खोली *f*. Star-chamber 'स्टार चेम्बर' नांवाची मंत्रिसभा *f*, दिवाणखान्यांत भरणारा तारकांकित दरबार *m* (at the time of Charles I. of England). Chamber of Commerce व्यापाऱ्यांच्या हक्कांच्या रक्षणार्थ स्थापिलेलें मंडळ *n*, वणिक्सभा *f*. Chambers of the eye नेत्रगत विवरें.

Chamberlain (chām'bėr-lān) [Fr. *chamberlian*.–L. *camera*, see above. चेम्बरलेन शब्दाचा अगदीं मूळचा अर्थ राजाचें शयनमंदिर राखणारा मानकरी किंवा एखाद्या स्त्रीची शयनमंदिरांतील दासी असा होता; परंतु तो अर्थ सध्यां चालू नाहीं.] *n.* इंग्लंडांतील राजाचा चेम्बरलेन पदवी धारण करणारा खाजगी कारभारी *m*. २ एखाद्या संस्थेच्या धारावसूलखात्याचा मुख्य अधिकारी *m*. ३ एखाद्या श्रीमंत सरदाराचा मुख्य कारभारी *m*. Cham'berlainship *n.* चेम्बरलेनचा हुद्दा *m*.

*N. B.*—"Lord Great Chamberlain of England: a heriditary office, the main duties of which now consist in attending upon and attiring the sovereign at his coronation, the care of the ancient Palace of Westminster, the furnishing of Westminster Hall and the Houses of Parliament on state occasions, and attending upon peers and bishops at their creation or doing of homage. Lord Chamberlain of the Household: a chief officer who shares with the Lord Steward, the Master of the Horse, and the Mistress of the Robes, the oversight of all officers of the Royal Household. He appoints the royal professional men and tradesmen, has control of the actors at the royal theatres, and is the licenser of plays." (M.) Chamberlain corresponds to कंचुकी or अंतःपुराधिकारी of the old Hindu kings.

Chameleon (ka-mēl'yun) [L. *chamæleon*, from Gr. *chamailcon–chamai*, the ground & *leon*, the lion, *lit.* the ground-lion.] *n. zool.* सरडा *m*, सरट *m*, वायुभक्षक *m*. Chamel'conic, Chamel'eon-like *a.*

Chamfer (cham'fėr) [Fr. *chanfrein.*] *n. carp.* पाटा *m*, कोना *m*. C. *v. t.* पाटा पाडणें, कोना मारणें. Cham'fered *a.* कोना मारलेला. Cham'fret *n.* लहान पाटा *m*.

Chamois (shamoi') [Fr. *chamois*, prob. from O. Ger. *gamz*, Ger. *gemse.*] *n.* एका जातीचा काळविटासारखा शामाई नांवाचा प्राणी, वातमृगविशेष. २ शामाई मृगाचें चामडें *n*. Chamois leather शामाई कातडें, एक प्रकारचें चिवट चामडें (वद्याळें वगैरे साफ करण्यास हें वापरतात).

Chamomile, same as Camomile *n. bot.* बाबुना.

Champ (champ) [Of imitative origin.] *v. t. to bite noisily, to crunch* चावणें, चघळणें. C. *v. i.* चावतांना-चघळतांना मान-जवडा हालवणें; as, To C. at the bit. Champ'ing *n.* चावणें *n*.

Champ, Champe (champ) *n.* ज्या पृष्ठभूमिकेवर कोरींव चित्रकाम केलें आहे ती, पृष्ठभूमिका *f.* [चंपकवृक्ष *m*.

Champak (cham'pak) [Sk. चंपक, the champak.] *n.*

Champagne (sham-pān') [From *Champagne*, a province in France, which means 'a plain'.] *n.* एक प्रकारची पिण्याची दारू, शाम्पेन दारू *f.* ही प्रथम फ्रान्समधील शाम्पेन प्रांतीं तयार होत असे.

Champaign (sham-pān') [Fr. *champaigne.*–L. *campus*, a field.] *n. a flat, open country* पटांगण *n*, मैदान *n*. C. *a.* सपाट, चौरस. The champagne (without *pl.*) सपाट जमीन *f.* अंगण.

Champerty (sham'pėr-ti) [Fr. *champert*, field-rent.–L. *campi pars*, field-share.] *n. law.* वाद विकत घेणें. A Champer-bargain वादग्रस्त हक्क किंवा दावा विकत घेऊन दाव्याचा निकाल जर अनुकूल झाला तर होणारा फायदा वांटून घेणें.

Champion (cham'pi-un) [O. Fr. *champion.*–L. *campio, campionem*, a combatant–*campus*, a field for military exercise.] *n. one who combats in the place, or for the cause, of another, an advocate* दुसऱ्याकरितां लढणारा *m*, कैवारी *m*, तरफदार; as, A C. of the poor. २ *a warrior* वीर *m*, योद्धा *m*; as, A stouter C. never handled a sword. ३ एकांगवीर *m*, लढणारा, दुसऱ्याकरितां द्वंद्वयुद्ध करणारा. ४ वस्ताद. ५ पटाईत; as, A C. player. Cham'pioness *fem.* Cham'pion *a.* योद्ध्याप्रमाणें वागणारा. २ कैवारी, कैवार घेणारा. ३ पटाईत. C. *v. t.* (दुसऱ्याकरितां त्याचा) कैवार घेऊन लढणें, कैवार घेणें, तरफदारी करणें. २ (कैवार घेऊन) बचाव *m*- रक्षण *n*- करणें, आश्रय देणें, मदत करणें. Cham'pionship *n.* कैवार *m*, &c.

Chance (chans) [Fr. *chance.*–L. L. *cadentia*, a falling (in allusion to the falling of the dice)-*cadere*, to fall.] *n.* (as the cause of events) दैव *n*, दैवगति *f.* [By C. दैवानें, दैवयोगानें, दैववशें, दैववशात्, प्रारब्धगत्या, यदृच्छेंकरून.] २ *fortune, fate, turnup, luck* दैवदशा *f*, दैवरेषा *f*, कपाळरेखा *f*, दैवयोग *m*, दैवघटित *n*, प्राक्तनयोग *m*, अदृष्टयोग *m*, दैव *n*, नशीब *n*, प्रारब्ध *n*. ३ आकस्मिक-दैवानें घडलेली गोष्ट *f*, दैवकृत्य *n*, दैवघटित *n*, यदृच्छा *f*. ४ *a possibility of occurrence* संभव *m*, होण्याचा-घडण्याचा-*&c.*-संभव *m*, घटनायोग *m*, घटनशक्यता *f*, भवितव्यता *f*, लाग *m*, अवसर *m*; as, A C. to escape; The chances are all against him. ५ संधि *f*; as, To lose a C. C. *v. t.* (with *it*) धाडस करणें. २ नशिबावर हवालणें-सोंपविणें-हवाला ठेवणें. C. *v. i.* दैवगत्या-आकस्मिकरीतीनें-आगंतुकरीतीनें होणें-घडणें-घडून येणें. C. *a. casual* दैवागत, दैवघटित, आगंतुक, विधिप्राप्त, आकस्मिक. C. *adv.* दैवयोगानें. Chance-comer *n.* अवचित येणारा. Chanc'eful *a.* अनिश्चितपणाचा, नशिबाचा. Chanc'iness *n.* (R.) अनिश्चितपणा *m*. Chanc'y *a.* (*obs.*) भाग्याचा, नशीबवान्. २ *colloq.* अनिश्चित; as, "The crop is a chancy one." Theory of Chance *math.* संभवप्रकरण *n*. The main chance खरा लाग, मुख्य हेतु, सुखाची किंवा स्वार्थाची मुख्य संधि *f.* To stand a chance of (ला) चा संभव असणें. To take one's chance अमुकेक गोष्टीसंबंधानें फांसा टाकून पाहणें, प्रयत्न करून पाहणें. To mind one's chance संधीकरितां टपून बसणें, संधीची वाट पाहत बसणें.

Chancel (chan'sel) [O. Fr. *chancel.*–L. *cancelli*, lattices.] *n. that part in a church where the altar is placed* चान्सल, चर्चमधील कठडा व वेदी यांमधील जागा *f.* C. aisle *arch.* चर्चमधील यज्ञवेदीच्या (प्रार्थनापीठाच्या) आसपासचा सभामंडप *m*.

Chancellor (chan'sel-or) [O. E. *chanceler, channceler.*–Fr. *chancelier.*–L. L. *cancellarius*, a director of chancery, from L. *cancelli*, lattices which surrounded the seat of judgment. In the Roman empire the 'Cancellarius' was a petty officer stationed at the bar of a law-court as an usher; next he had risen to be a Secretary or Notary. In latter times he was invested with judicial functions under the Norman kings in England. The Chancellor was the official secretary having superintendence of all charters, letters, and official writings of the sovereign, the custody of the royal seals, and important legal functions.] *n.* (*obs.*) राजाचा किंवा मोठ्या सरदाराचा किंवा परकी राजाच्या वकिलाचा चिटनीस *m*. २ इंग्लंडांतील राजाचा चान्सेलर पदवी धारण करणारा एक मुख्य मंत्री *m* (प्राइम मिनिस्टर नव्हे), पंडितराव *m*, अतिशय भानगडीच्या खटल्यांत ह्यानें दिलेला न्याय सर्व लोकांना मान्य होतो. ह्यालाच Lord Chancellor आणि Lord High Chancellor असें म्हणतात. [Chancellor of the Exchequer

the highest finance minister of the British Government ब्रिटिश राज्यांतील मुख्य कोशाध्यक्ष *m.* खरें म्हटलें असतां हा उपकोशाध्यक्ष आहे. ब्रिटिश राज्यांत राजकोशाचा सर्व अधिकार Lords Commissioners of the Treasury ह्या नांवाच्या उमरावांच्या हातांत आहे. Chancellor of a bishop *a vicar-general of the bishop* बिशपच्या वतीनें धर्मासंबंधीं खटल्यांचे निवाडे करणारा (चान्सेलर). Chancellor of a chapter or of a cathedral बिशपच्या देवालयांतील चार मुख्य आचार्यांपैकीं एक. The Chancellor of a University विश्वविद्यालयाच्या कार्यकारी मंडळाचा अध्यक्ष *m,* विश्वविद्यालयाचा अधिपति.] ३ (in Europe) मुख्य राजतंत्राधिकारी. Chan'cellorship *n.* Chan'cellory *n.*

*N. B.*—"He (the Chancellor) is the highest judicial functionary in the kingdom and ranks above all peers spiritual and temporal, except only princes of the blood, and the Archbishop of Canterbury; he is Keeper of the Great Seal, is styled 'Keeper of His Majesty's Conscience', and is president and prolocutor of the House of Lords; he presides in what was the Court of Chancery, but is now the Chancery Division of the Supreme Court; he appoints all Justices of the Peace; is the general guardian of infants, lunatics, and idiots; is visitor of hospitals and colleges of royal foundation, and patron of all church livings under twenty marks in value." (M.)

Chance-medley (chans'-med-li) [O. Fr. *chance-medlee,* mingled chance. 'From the fact that *medley* is also a noun, and *chance-medley,* a possible combination in the sense of "fortuitous medley," the meaning has often been mistaken'. (Dr. Murray).] *n.* आत्मरक्षणार्थ मलत्याची हत्या *f,* आपणावर हल्ला केला असतां बचावासाठीं केलेली हत्या. २ केवळ नशीब *n,* केवळ दैव *n-* यदृच्छा *f;* as, Left to the guidance of unreason and chance-medley.

Chancery (chan'sėr-i) [Fr. *chancellerie,* see Chancellor.] *n. the court of the Lord Chancellor of England, the highest court of judicature next to the House of Lords; but since the Judicature Act of 1873, a division of the High Court of Justice.* इंग्लंडांतील 'च्यान्सरी' नांवाचें कोडत *n,* लार्डसभेच्या खालोखालचें न्यायासन *n.* २ *a court of equity* सामान्य कायद्याच्या निष्कारण जाचक अडचणी दूर करून केवळ रूढिप्रधानन्यायतत्वानें जेथें न्याय दिला जातो असें कोडत *n,* अदालत *n,* रूढिप्रधान न्यायाचें कोर्ट *n.* ३ *an office of public records, archives* दफ्तरखातें. In chancery वादांत-खटल्यांत गुंतलेला-अडकलेला; as, An estate in chancery. Chancery suit or suit in chancery पुष्कळ दिवस चालणारी फिर्याद *f.* See the word Equity.

*N. B.*—Chancery formerly consisted of two distinct tribunals, one ordinary, being a court of common law, the other extraordinary, being a court of equity. To the former belonged the issuing of writs for a new Parliament, and of all original writs. The latter proceeded upon rules of equity and conscience, moderating the rigour of the common law, and giving relief in cases where there was no remedy in the common law courts. Its functions in this respect are now transferred to the Court of Appeal.

In Ireland the Court of Chancery was distinct from, but analogous in character to, the English court; but it has been since early changed into a division of the Irish High Court of Justice.

Chancre (shang'kėr) [Fr.] *n.* उपदंशाचा चट्टा *m.* Chan'croid *n.* लहानसा चट्टा *m.* Chan'crous *a.*

Chandelier (shan-de-lēr') [O. Fr. *chandelier,* a candle-holder.–L. L. *candelarius,* from *candela,* a candle.] *n.* झुंबर *n,* (दिव्याचें) झाड *n,* झुगर (*obs.*) *n,* दीपवृक्ष *n,* दीपमाळ *f.* Chand'ler *n.* किरकोळ व्यापारी *m,* मेणबत्त्या करणारा व विकणारा *m,* मेणबत्तीविक्या *m.* Chand'lering *n.* Chand'lerly *adv.* Chand'lery *n.* किरकोळ व्यापाऱ्यांनीं विकलेला माल *m.* Ship-chandler *n.* गलबतास लागणारा माल पुरवणारा.

Change (chānj) [Fr. *changer.*–L. *cambire,* to barter.] *v. t. to alter, to vary* बदलणें, पालटणें, फिरविणें, परतणें, नवाजुना करणें, फरक *m-* बदल *m-* फेर *m-* फेरफार *m-* पालट *m-* भेद *m-* रूपांतर *n-* रूपभेद *m-* &c. करणें *g. of o.* २ *to put or quit for, to shift* बदलणें, पालटणें, बदली *f.* करणें. ३ *to interchange* अदलाबदल *f-* बदलाबदल *f-* करणें *g. of o.* ४ (money) मोडणें, वटावणें. [To C. A RUPEE खुर्दा *m-*मोड करणें.] C. *v. i. to suffer, to change* बदलणें, फिरणें, परतणें, पालटणें, फेर *m-* भेद *m-* पालट *m-* अंतर *n-* फरक *m-* &c. पडणें *in. con.* or होणें *g. of o.,* अवस्थांतर *n-* स्थित्यंतर *n-* &c. पावणें. [To C. FOR THE WORSE ESP. OF PERSONS बदल *m.* खाणें, चलविचल *f.* होणें, बिचलणें, बिथरणें, बिघडणें, पगडी *f.* फिरणें, or फेरपगडी करणें.] *n.* Changing (v. V. T. 1.)—*act.* पालटणें *n,* बदलणें *n.* Change *n.* अदलाबदल *f,* बदलाबदल *f,* विनिमय *m.* २ फिरवणें *n,* पालटणें *n, &c.,* भेद *m,* पालट *m,* पालटणी *f,* पालटवाणी *f.* ३ मोडणें *n.* ४ (v. V. I.)—*state* फेर *m,* भेद *m,* पालट *m,* बदल *m,* फरक *m,* विकार *m,* विकृति *f,* विवर्त *m,* अवस्थांतर *n,* स्थित्यंतर *n,* रूपांतर *n,* विपर्यय *m,* विपर्यास *m,* रूपभेद *m,* अन्यथाभाव *m,* परिणाम *m.* ५ *small money* खुर्दा *m,* टक्के *m,* नाणें *n,* (copper change) मोड *f.* [Keeper of C. for traffic खुर्देकरी.] ६ बट्टाबाजार, व्यापाऱ्याचा अड्डा, सराफकट्टा *m.* Changeabil'ity *n.* Change'ableness *n.* बदलण्याचा धर्म *m.* २ चापल्य *n,* भंगुरता *f,* अस्थिरता *f,* चपलता *f,* चांचल्य *n,* चंचलवृत्ति *f,* चंचलबुद्धि *f,*

पाऊलबुद्धि *f*, अनित्यता *f*, चलता *f*, अस्थायिता *f*. Change'able *a.* (v. V. T. 1.) *possible to be changed* परिवर्तनयोग्य, फिरावया-परताया-चा-जोगा-जोगता-&c., फेरफार करायाजोगा-&c., विकार्य, अनित्य, अस्थिर, परिवर्तनीय. २ *changeful, mutable, variable, inconstant, fickle* बदलणारा, चंचल, चंचलचित्त, चंचलवृत्ति, तरल or प्रकृतितरल, लहरी, लहरीदार, लहरीबहरी, अस्थिरमनाचा, अस्थिर, अस्थिरबुद्धि, क्षणिकबुद्धि, क्षणिकचित्त, क्षणिकवृत्ति, तिरतिरा or ऱ्या, क्षणोक्षणीं बदलणारा. Change'ably *adv.* Changed *p.* (v. V. I.) बदललेला, फिरलेला, फेर पडलेला-झालेला, &c. Change'ful *a.* see Changeable. Change'fully *adv.* Change'fulness *n.* Change'-house *n.* (R) लहान खाणावळ *f*, एलदारू विकण्याचें दुकान *n.* Change'less *a.* नित्य, स्थायी, शाश्वत, स्थिर, अचल. Change'ling *n. a changed child* बदललेलें मूल *n.* २ कुरूप-मठ्ठमूल *n*, मूर्ख. ३ (R) चंचल मनाचा मनुष्य *m.* C. *a.* बदली दिलेलें-घेतलेलें. Changer *n.* फेरफार करणारा *m*- बदलणारा. २ सराफ. Changing-piece (R.) चंचल मनुष्य *m.* To change colour लाजेनें काळवंडणें, (चें) तोंड-नूर उतरणें. To change hands धनी-मालक बदलणें. To change one's mind आपला विचार किंवा मन बदलणें. To change one's self कपडे बदलणें. To change one's tune बोलण्याची पद्धत बदलणें, सूर बदलणें, (*colloq.*) हसायचें टाकून रडूं लागणें. Change-wheel बदलतां येणारें चाक. To put the change on गोता देणें, फसविणें. To ring the changes on तीच गोष्ट पुन्हां पुन्हां निरनिराळ्या तऱ्हेनें सांगणें. Change of direction दिशांतर. Change of life स्त्रीचा रजस्वला किंवा गर्भधारणा होण्याचा काळ जाणें (हा काळ ४५ पासून ५० वर्षेपर्यंतचा आहे). Change of pitch सुराचा बदल, स्वरभेद. Change of property गुणधर्मविपर्यय. Change of state स्थित्यंतर.

Channel (chan'el) [O. Fr. *chanel.*–L. *canalis*, a water-pipe.] *n.* (of a river, &c.) पात्र *n*, तास *n.* २ (for water, for irrigation, &c.) पाट *m*, सारणी *f*, कुल्या *f. pop.* कालवा *m*, पन्हळ *m*, पन्हळी *f*; थर *m*, नाला *m.* [Ever running C. ओला दंड *m.* Raised C. or course दांड(डा) *m.*] ३ *arch.* (to carry off water) *a gutter* मोरी *f*, नहर *m*, प्रणालिका *f*, प्रणाली *f*, सारणी *f*, सारण *n.* ४ (as, of a pillar, &c.) खांचणी *f*, बलकी *f.* ५ *a strait* सामुद्रधुनी *f*, खाडी *f.* ६ *a medium of passing, conveying or transmitting* द्वार *pop.* दार *n*, मार्ग *m*, वाट *f*; as The news was conveyed to us by different channels. C. *v. t.* कालवा काढणें, खांचणी-पन्हळ पाडणें. Chann'elled *p. a.* The Channel इंग्लिश खाडी *f.* Channel-bill *zool.* ऑस्ट्रेलियांतील कुकु नांवाचा पक्षी *m.*

Chant (chant) [Fr. *chanter.*—L. *cantare, canere*, Sk. कण्, to sing.] *v. t.* गाणें, गाण्याच्या ढबीवर म्हणणें; as, "When she chants her evening hymn," आलापणें, तालाशिवाय गाणें. [To CHANT THE PRAISES OF प्रशंसा करणें-गाणें. To CHANT THE HORSES *slang* घोड्याचे फाजील गुण गाणें. २ *fig.* (मालाचे फाजील गुण गाऊन विकतांना) फसविणें.] C. *v. i.* गाणें, गाण्यासारखें ओरडणें—भोंकणें. C. *n.* राग *m*, सूर *m.* २ *a psalm, canticle or dirge so chanted* गाण्याच्या सुरावर म्हटलेलें स्तोत्र *n.* ३ सुस्वरगीत *n*, गायन *n*, तालाचे नियम नसतांना स्वरांत बसवलेली चीज *f*- शब्दरचना *f.* Chanter, Chantor *n.* गाणारा *m*, गवई *m.* २ क्याथिड्रलमधील सेवाधारी गायक *m.* ३ मुख्य सेवाधारी गायक. ४ 'मास' नामक विधीचा स्तोत्रें म्हणणारा प्रेसबुतर-आचार्य (priest). Chant'ry *n.* ख्रिस्तीप्रार्थनागृह *n.* Chant'y *n.* खलाशाचें गाणें (नांगर उचलतांना म्हणतात तें).

Chanticleer (chant'iklēr) [Fr. *chanteclair*, the name of the cock in the Roman due Renart (Reynard the fox); *chanter*, to sing & *cler*, clear.—L. *chanticularius*, a clear (shrill) singer.] *n. the cock* एक जातीचा कर्कश आरवणारा कोंबडा *m.*

Chaos (kā'os) [L. *chaos.*–Gr. *kaos*, a yawning gulf. ह्या शब्दाचा मूळचा अर्थ अतिशय मोठें आखात किंवा खिंड किंवा चरक-शून्यावकाश असा होता. cf. Bible Luke XVI. 26.] *n. the great deep or abyss out of which the cosmos or order of the universe was evolved* सृष्टीला व्यवस्थित रूप येण्यापूर्वीची स्थिति *f*, सृष्टीची प्रथमावस्था *f*, अव्यक्तावस्था *f.* २ *fig.* अव्यवस्थारूपी देव *m*; as, "If C. himself sat umpire, what better could he do." ३ अस्ताव्यस्तता *f*, घोंटाळा *m*, घालमेल *f*, गप्पाघोळ *m*, गोंधळ *m.* Chaot'ic *a.* (सृष्टीच्या) पहिल्या अस्ताव्यस्ततेचा, अस्ताव्यस्त प्रथम स्थितीचा. २ गोंधळाचा, अस्ताव्यस्त.

Chap (chap) [M. E. *chappen*, to cut; hence, to gape open like a wound made by a cut.] *v. t. to cleave, to split* चीर पाडणें, भेगा पाडणें. २ मारणें, ठोकणें. C. *v. i.* फुटणें, उलणें, तडकणें, भेगलणें. [Ready to C. फुटरा.] २ दारावर ठोठावणें. ३ टाळी देणें-मारणें. C. *n.* भेग *f*, तीड *f*, चीर *f*, तडा *m.* २ ठोसा *m.* ३ भाग *m*, फूट *f*, तूट *f.* Chap'less *a.* Chap'ped *p. a.* चीर पडलेला, भेगाळलेला. Chap'py *a.* To chap hands सौदा ठरला म्हणून हातावर हात मारणें. Chapping away तासणें.

Chap (chap) *n.* (*colloq.*) गडी *m*, बच्चाराम *m*, मनुष्य *m.* २ गिऱ्हाईक *n.* C. *v. i.* (*obs.*) विकत घेणें, सौदा करणें. Chapman (*obs.*) *n.* व्यापारी *m*, खरेदी करणारा, विकणारा. *pl.* Chapmen. Chap-book फेरीवाल्यांनीं विकलेलीं पुस्तकें.

Chap (chap) *n.* हनु *f*, ज(जा)बडा, चावडा *m*, जांभाड *n*, टाळी *n. pl.*, मुसकुटी *f*, मुसकें *n.* [To lick the chaps जिभल्या *f. pl.* चाटणें, लाळ *f.* घोटणें, दांत *m. pl.* पाजवणें.] २ नदीचें तोंड *n.* Chap-fallen *a.* तोंड उतरलेला, हिरमुसतोंड्या, हिंपुटी, हिंपूट or हिमट. [To be C. तोंड *n.* फुटणें-उतरणें-खरकणें *g. of s. fig.* दांत *m. pl.* पडणें *g. of s.*]

Chape (chāp) [Fr. *chape*, a churchman's cape.—

Low L. *capa*, a cap.] *n. a hold, a hook* अडकवण *n*, अडकण *n*. २ (of a scabbard, &c.) तैनाल or तहनाल *m*, *n*. ३ तरवारीची मूठ *f.* Chape'less *a*.

Chapel (chap'el) [Low L. *cappella*, dim. of *cappa*, a cloak or cap. The following history of this word is very interesting. From the *cappella* or cloak of St. Martin, preserved by the Frankish kings as a sacred relic, which was borne before them in battle, and used to give sanctity to oaths, the name was applied to the sanctuary in which this was preserved under the care of its *cappellani* or chaplains, and thence, generally to a sanctuary containing holy relics, attached to a palace, and so to any private sanctuary or holy place, and finally to any apartment or building for orisons or worship, not being a church, the earlier name for which was *Oratorium*, an oratory.] *n. a sanctuary or place of Christian worship, not the church of a parish or the cathedral church of a diocese* ख्रिस्ती लोकांचें खाजगी भजनमंदिर *n*, खासगी प्रार्थनामंदिर *n*, (शाळा, कालेज, राजवाडा, तुरुंग, किल्ला, मठ, इत्यादींपैकीं कोणालाही जोडलेलें) भजनगृह *n*, प्रार्थनेकरितां खोली *f*, मृतांच्या शांतीकरितां 'मास' म्हणण्याची जागा *f.* २ ख्रिस्ती देवळाची शाखा *f*, 'च्यापेल'. [Chapel of ease चर्चपासून फार लांब राहणाऱ्या लोकांकरितां शेजारीं बांधलेलें प्रार्थनामंदिर *n*. Chapel Royal राजवाड्यांतील प्रार्थनामंदिर *n*. Lady Chapel कुमारी मरीये (St. Mary) चें देऊळ *n*. Proprietary chapel खासगी मनुष्याचें देऊळ *n*.] ३ (*a*) छापखाना *m*. (*b*) छापखान्यांतील कामगारांची सभा *f.* [इंग्लंडांत छपाईचें काम प्रथम chapel मध्यें सुरू झालें म्हणून Chapel हा तिसरा अर्थ आला आहे.] ४ ख्रिस्ती देवळांतील-राजाच्या दरबारांतील गायकगण-समूह *m*. C. *v. t. naut.* परत मागें वळवणें, रस्त्यावर आणणें. Chap'elry *n*. च्यापलची हद्द *f.*

Chaperon (shap'e-rōn) [Fr. *chape*, a hooded cloak.] *n. obs.* 'च्यापेरान' नांवाची बसकी टोपी *f.* २ *an elderly female attendant on a young lady in public* (साहेब लोकांत अविवाहित) कुमारीबरोबरची पाठराखीण, (वांकडें पाऊल पडूं नये म्हणून) अविवाहित स्त्रीबरोबर पाठविलेली प्रौढ बायको *f*- सखी, नियंत्रिका *f*, (सामान्य नामार्थीं) गौतमी *f*; [गौतमी MAY BE SAID TO BE THE CHAPERON OF SHAKUNTALA.] C. *v. t. to act as a chaperon to a young lady, to escort* (गौतमीसारखें) अविवाहित कुमारीबरोबर जाणें. Chap'eronage *n*.

Chapiter (chap'i-tėr) [O. Fr. *chapitre*, Fr. *chapitre*, from L. *capitulum*, dim. of *caput*, the head.] *n*. (*obs.*) *the upper part of a pillar* स्तम्भशीर्ष *m*, कळस *m*.

Chaplain (chap'lān or chap'lin) [Fr. *chapelain*, from O. Fr. *chapel*.–L. L. *capella*, orig. a shrine in which was preserved the *capa* or *cope* of St. Martin.—L. L. *capa*, *cappa*, a hooded cloak.] *n. the priest, clergyman or minister of a chapel* चाप्लेन *m*, चापेलची उपासना चालविणारा उपाध्याय. २ *a clergyman who conducts religious service in the private chapel of a sovereign, lord or high official, of a castle, garrison, embassay, college, school, workhouse, prison, cemetery, or other institution, or in the household of a person of rank or quality, in a legislative chamber, regiment, ship,* &c. चाप्लेन *m*, शाळा, कालेज, आरमार इत्यादि खासगी संस्थेचा उपासना चालविणारा भट *m*, उपाध्याय *m*. ३ ख्रिस्ती जोगिणींच्या देवालयांतील उपासना चालविणारी जोगीण, चाप्लेन *f.* [CHAPLAINS OF THE POPE पोपचा न्यायाधिशी अधिकार चालविणारे च्याप्लेन.] Chap'laincy, Chap'lainry, Chap'lainship *n*. चाप्लेनवृत्ति *f*, चाप्लेनचा अधिकार *m*- हुद्दा *m*.

Chaplet (chap'let) [O. Fr. *chapelet*, dim. of O. Fr. *chape*, a hat, a garland.—L. L. *cappa*. See Cap.] *n*. (फुलांची-पानांची-जवाहिरांची-इत्यादिकांची) माला *f*, माळा *f*, शेखर *m*. [C. USED AT MARRIAGES (AMONG THE HINDOOS) मुंडावळ *f*, मंडावळी *f*, शिघळ *f*, शेघळ *f*, वाशिंग (?) *n*; RETICULATED C. जाळी.] २ *a string of beads* जपमाला *f*, स्मरणी *f*, अक्षमाला *f*, तसबी (for non-Hindus), माळ *f.* ३ जपमाला घेऊन म्हणण्याची प्रार्थना; as, "To recite the chaplet in alternate choirs." ४ *a metal support* धातूचा धिरा *m*. ५ मोराच्या डोक्यावरील पिसांचा तुरा *m*. C. *v. t.* माळेनें सुशोभित करणें. Chapleted *a*. माळा घातलेला.

Chapman, see Chap II.

Chapter (chap'tėr) [O. Fr. *chapitre*.—L. *capitulum*, dim. of *caput*, Sk. कपाल, the head.] *n. a division of a book* अध्याय *m*, कांड *n*. *m*, स्कंध (*) *m*, सर्ग *m*, पर्व (*) *n*, वर्ग *m*, प्रकरण *n*, परिच्छेद *m*, उल्लास *m*, (*) स्तबक (*) *m*, अंक (*) *m*, खंड *m*. *n*. २ कालेजीयेट चर्चांतील किंवा बिशपच्या देवालयांतील क्याननची सभा *f*, क्याननसभा *f*, ख्रिस्ती मठवासी लोकांची सभा *f*, च्यापटर. ३ क्याननसभागृह *n*, क्याननांच्या सभेचें स्थान *n*. ४ डीनच्या आश्रयाखालीं असणारी क्याननसभा *f.* C. *v. t.* भाग-अध्याय पाडणें. २ (*obs.*) (दोष किंवा चुकी दाखवून) सुधारणें, ठपका देणें. Chapter-house *n*. क्याननसभागृह *n*, क्याननांच्या सभेचें स्थान. To quote chapter and verse अध्याय आणि ओंवी सांगणें, प्रमाणनिर्देश करणें, आप्तवचननिर्देश करणें, सप्रमाण पुरावा देणें. The chapter of accidents *the unforeseen course of events* आकस्मिक वृत्तपरंपरा, दैवघटित गोष्टींची परंपरा. To the end of the chapter अवलपासून अखेरपर्यंत, शेवटच्या भागापर्यंत, अथपासून इतिपर्यंत, आमूलान्तम्.

*N. B.*—सर्व ग्रंथाला वृक्षाची उपमा दिली तर प्रत्येक भागाला स्कंध हें नांव शोभेल. सर्व ग्रंथाला इक्षुदंडाची-उंसाची उपमा दिली तर

प्रत्येक भागाला पर्व-पेर हें नांव शोभेल. उल्लास म्हणजे आनंद. काव्यप्रकाश नांवाच्या एका अलंकारशास्त्राच्या ग्रंथाच्या प्रत्येक भागाला उल्लास हें नांव दिलें आहे. तेव्हां अलंकारशास्त्रासारख्या आनंद देणाऱ्या ग्रंथाच्याच प्रत्येक भागाला उल्लास हें नांव शोभेल. स्तवक म्हणजे पुष्पगुच्छ. तेव्हां ह्या शब्दाचाही विशेष प्रसंगीं उपयोग केला पाहिजे. अंक हा शब्द नाटकाच्या प्रत्येक भागालाच लावतात.

Char (chär) *n.* **एक प्रकारचा मासा. हा सरोवरांत व नद्यांत सांपडतो.**

Char (chär) [Probably borrowed from Char-coal.] *v. t.* **कोळसा करणें, आंच देणें.** Charring *pr. p.* Charred *pa. p.* Char'ry *a.* **कोळशासंबंधी.**

Char (chär) [A. S. *cierr*, *cyrr*, turn, occasion, from *cyrran*, to turn.] *v. t.* (*obs.*) **रोजकाम करणें.** C. *v. i.* **आडकाम-रोजकाम करणें.** C. *n.* *odd or day work* **रोजकाम** *n*, **मोलकाम** *n*, **आडकाम** *n*, **दळाकांडा** *m*, **केरकोंडा** *m*, **दळणभरडण** *n*, **उधडें काम** *n*. Also Char-work. Charwoman *n.* **आडकामी** *f*, **कामकरीण** *f*, **रोजकरीण** *f*, **मोलकरीण** *f*, **मोलकामी** *f*, **मोलारीण** *f*, **नैमित्तिकी दासी** *f*.

Character (kar'ak-tėr) [L. *character*.—Gr. *charakter*, an engraved or stamped mark, from *charassein*, to furrow, to cut, to engrave.] *n.* *a distinctive mark* **चिन्ह** *n*, **निशाणी** *f*, **खूण** *f*, **अंक** *m*, **आंख** *m*. **मुद्रा** *f*, **लिंग** *n*, **हरफ** *f*. २ (*fig.*) **ठसा** *m*, **मुद्रा** *f*, **खूण** *f*, **चिन्ह** *n*; as, "Stamped with the character of sublimity." ३ *a letter of the alphabet* **अक्षर** *n*, **वर्ण** *m*. ४ *the series of alphabetic signs peculiar to any language* **अक्षरमाला** *f*, **वर्णमाला** *f*. ५ *handwriting* **लिपि** *pop.* **लीप** *f*, **वळण** *n*. ६ *a kind of type or printed letter* **टाइपाची अगर छापील अक्षरांची जात** *f*; as, "Imitation of printed Roman character." ७ *a magical sign or emblem* **गूढचिन्ह** *n*, **गूढखूण** *f*. ८ *astron.* **ग्रहाची खूण** *f*- **चिन्ह** *n*. ९ (of a person) *the distinguishing qualities* **शील** *n*, **स्वभाव** *m*, **धर्म** *m*, **विशेष गुण** *m. pl.*, **विशेष धर्म** *m*, **लक्षण** *n*, **स्वरूप** *n*, **जातीचें** *n* (used in the singular only). १० (of a thing or place) **प्रकृति** *f*, **स्वधर्म** *m*, **गुणावगुण** *m. pl.* ११ **मनोरचना** *f*, **स्वभावरचना** *f*. १२ **प्रकृति** *f*, **वर्तन** *n*, **वर्तनक्रम** *m*, **जीवनक्रम** *m*, **जीवनवृत्ति** *f*. १३ **मनोबल** *n*, **करारीपणा** *m*, **निश्चयीपणा** *m*, **सत्व** *n*. १४ **व्यक्ति** *f*, **विशिष्टजन** *m*, **विलक्षण मनुष्य** *m*, **नामांकित मनुष्य** *m*. १५ (in a play) *a part* **पात्र** *n*, **सोंग** *n*, **वेष** *m*, **भूमिका** *f*. [To ACT IN CHARACTER वेशाला अनुसरून वागणें, सोंगाप्रमाणें बतावणी करणें.] १५ *a description, delineation or detailed report of a person's qualities* **गुणवर्णन.** १६ *credit, reputation* **अब्रू** *f*, **पत** *f*, **आब** *m*, **नांव** *n*, **ख्याति** *f*. C. *v. t.* (R.) **कोरणें, खोदणें**; as, "His holy ring charactered over with the ineffable spell." २ (R.) **गुण वर्णन करणें.** Characterisa'tion *n.* **गुण वर्णन करणें, गुणवर्णन** *n*. Characterise,-(ze) *v. t.* *to define in form or outline* **लक्षण सांगणें, लक्षणकथन-वर्णन करणें** *g. of o.* २ (चें-ला) **विशेषण देणें**; as, Characterised by benevolence. ३ **गुणभेद करणें.** ४ (*obs.*) **वर छाप मारणें, निशाणी-चिन्ह करणें.** Char'acterised *p.* **लक्षित, लक्षणलक्षित, लक्षणयुक्त, विशेषित, विशिष्ट, चिन्हित.** Characterism *n.* (*obs.*) **स्वभाव** *m*, **लक्षण** *n* Characteris'tic *n.* **लक्षण** *n*, **विशेष** *m*, **खुबी** *f*, **खूण** *f*. २ **वैलक्षण्य, लाक्षण्य** *n*. ३ *math.* **पूर्णभाग, पूर्णांक** *m*, (**घातगणितांत) पूर्णांक.** Characteris'tic,-al *a.* (with *of*) **लाक्षणिक, असाधारण, विशेषक, योग्य, उचित, विशेषगुणबोधक, गुणदर्शक.** Characteris'tically *adv.* Char'acterless *a.* Char'acterlessness *n.* Char'actery *n.* **लिपि** *f*, **मुद्रा** *f*, **ठसे** *m. pl.*, **चिन्हें** *n. pl.* &c. २ **चिन्हांनीं विचार व्यक्त करणें.** Out of Character (**एखाद्याची) कृति-लिहिणें-धंदा-वय-सामाजिक स्थिति यांना अनुसरून नसणारें, परिस्थितिविरुध्द.**

Charade (shar-äd') [Fr. *charade*, a long talk, from Provencal *charra*, to chatter.] *n.* **शब्दसमस्या** *f*, **उखाणा** *m*, **कोडें** *n*.

Charcoal (chär'kōl) [**ह्या जोडशब्दांची व्युत्पत्ति अनिश्चित आहे. इंग्रजी** *char* = **जाळणें, आणि** Coal **ह्या दोन शब्दांपासून** Char-coal **हा शब्द झाला असावा असें कांहीं शब्दशास्त्रवेत्त्यांचें मत आहे. कोणी इंग्रजी** Chare **बदलणें ह्या शब्दाशीं याचा संबंध जोडितात.** Charcoal, *turncoal* = wood *turned* or *converted* into coal.] *n.* **ज्वाला न होऊं देतां अर्धवट जाळलेल्या लांकडाचा कोळसा** *m*, **लांकडी कोळसा (दगडी कोळसा नव्हे).** Charcoal-burner **लोणारी** *m*, **कोळसेकरी** *m*. Red-hot-charcoal **जिता कोळसा.** Animal-charcoal **प्राणिज कोळसा.** Mineral-charcoal **खनिज कोळसा.**

*N. B.*—The name *coal* itself originally meant *charcoal* and *collier*, *charcoal-burner*. Perhaps, the word 'charcoal' was introduced into the English language to distinguish Coal from Sea-coal & Pitcoal. See the word Coal.

Chare (char), see Char (III).

Charet (chär'et), same as Chariot.

Charge (chärj) [Fr. *charger*, to load.—L. L. *carricare*, to load a car, from L. *carrus*, a car. Charge **शब्दाचे मूळ अर्थ (1) भरणें. (२) (वर) खर्च-जबाबदारी-दोष-त्रास-इत्यादिकांचा बोजा घालणें. (३) एकदम हल्ला-चाल करणें, असे आहेत. व खालीं दिलेले निरनिराळे अर्थ ह्या तिहींपैकीं कोणत्या तरी एका अर्थाला धरून आहेत.**] *v. t.* (*a*) **भरणें, ओझें घालणें, लादणें**; as, To C. the memory with facts. (*b*) **बंदुकींत बार भरणें**; as, To C. the gun. (*c*) **पुरें-तोंडोतोंड भरणें**; as, To C. the vessel with liquor. (*d*) **एखाद्या पदार्थांत दुसरा पदार्थ मिसळणें-घोळवणें-एकजीव-विद्रावित करणें**; as, To C. the air with vapour; To C. the water with mineral substances. (*e*) **वीज इत्यादिकांनीं संचारित-**

संयुक्त करणें-भरणें; as, To C. a wire with electricity. २ (*a*) (with a duty, task, responsibility) माथीं मारणें, गळ्यांत घालणें, ओझें *n*- भार *m*- माळ *f*- गळ्यांत घालणें-स्वाधीन करणें. (*b*) *to commission, to entrust* दिम्मतीस-तैनातीस-तसलमातीस-पागेस-दुमाल्यास-विल्हेस लावणें-घालणें-देणें. [ In the last two senses, *the business charged* is the Object of the verb and the *person charged with it* is in the Genitive case.] (*c*) (with a fault or crime) (वर) आरोप करणें, माथीं मारणें, (वर) आणणें, चार्ज ठेवणें. (*d*) *to enjoin, to exhort, to lay a command or injunction upon* निक्षून सांगणें, बजावणें, हडसणें, बजावून-हडसून-खडसून सांगणें. (*e*) (a sum or price) मोल *n*- किंमत *f*- हेल *f*- भाडें *n*- &c.—मागणें-सांगणें. (*f*) *to deliver official or formal instructions or an exhortation to* कायद्याची दिशा-मार्ग दाखविणें, कायद्याचा सारांश समजून सांगणें; as, To C. a jury. (*g*) मालमत्तेवर कर-भाडें बसवणें. (*h*) च्या नांवानें-नांवावर लिहिणें-मांडणें-आकारणें. ३ *to attack impetuously* हल्ला *m*- चाल *f*- चढ *m*- करणें, चालून जाणें (with वर *of o.*), तुटून आंगावर जाणें-पडणें. C. *v. i.* वर हल्ला करणें. २ किंमत-मोल मागणें-सांगणें. ३ *to debit* (*to an account*) नांवावर मांडणें; as, To C. for purchases. C. *n.* भार *m*, बोजा *m*. २ (बंदुकीचा) बार *m*, भर *m*, पेट *m*. [C. OF NAILS, STONES, BALLS, &c. छरा *m*.] ३ सुरुंगाचा बार *m*. ४ *the materials, introduced at one time, or at one round into the furnace* घाणा *m*. ५ विद्युत्संचय *m*, विद्युत्संचार *m*. ६ घोड्याच्या आंगावर मारण्याचें पलिस्तर *n*. ७ किंमत *f*, खर्च *m*. ८ हवाला *m*, जिम्मा *m*, जोखीम *n*, निसबत *f*, रखवाली *f*, राखण *f*. [RELEASED FROM A CHARGE जिम्मापारख. THAT HOLDS A C. OR TRUST जिम्मेदार; THAT IS UNDER THE C. OF दिम्मतवार, दिमती; UNDER THE C. OR CARE OF स्वाधीन, हवालीं.] ९ *command or conduct* दिम्मत *f*, तैनात *f*, तसलमात *f*. १० *an object committed to the charge* अमानत *f*, अनामत *f*, ठेव *f*, दिम्मत *f*. ११ *a business charged, a trust imposed, a commission entrusted* काम *n*, सोंपवलेलें काम *n*, अधिकार *m*. १२ *law.* आरोप *m*, तोहोमत *f*, अभियोग (S.) *m*, चार्ज *m*, बोजा *m*. १३ पंचांस खटल्याचा सारांश समजावून सांगणें. १४ सूचना *f*, ताकीद *f*, सांगणी *f*, आज्ञा *f*, हुकूम *m*, बजावणी *f*. १५ चाल *f*, चढ *f*, लढाई *f*. १६ हल्ला करण्याची इशारत *f*. Charging *v. n.* See the meanings of the verb. Charge'able *a.* आरोपणीय, आकारणीय. Chargeableness *n.* Chargeably *adv.* Charge'ful *a.* (*Shakes.*) खर्चीचें. Charge-house *n.* (*Shakes.*) विद्यार्थ्यांचें भोजनवसतिगृह *n*. Chargeless *a.* फुकट. Charger *n.* आरोप घेणारा, &c. २ (*obs.*) थाळा *m*, तबक *n*. ३ *a war-horse* लढाऊ घोडा *m*, रणघोडा *m*, रणाश्व *m*. To charge oneself with-ची जबाबदारी आपल्या अंगावर घेणें. To give in charge पोलीस शिपायाच्या स्वाधीन-ताब्यांत करणें. To give in charge over वरचा अंमलदार नेमणें. To have in charge (ची) जबाबदारी-ताब्यांत असणें. To take in charge ताब्यांत घेणें, (ची) जबाबदारी घेणें. To return to the charge हल्ला पुन्हां सुरू करणें. To sound the charge हल्ला करण्याकरितां इशारत देणें.

Charge'-d'aff'aires (shar'-zhā-da-fār') [Fr.] *n. pl.* Charges-d'affaires वहिवाटदार *m*, परदेशच्या दरबारांत काम करणारा दुय्यम वकील (हा मुख्य वकिलाच्या गैरहजेरींत काम करतो.)

Charily, see Chary.

Chariot (char'i-ot) [Fr. *chariot*, from *char*, a car.] *n.* रथ *m*, चार चाकांची गाडी *f*. २ *antiq.* युद्धरथ *m*, लढाईचा रथ *m*. C. *v. t. to convey in a chariot* रथांत नेणें. Char'iotee *n.* क्रीडारथ *m*. Charioteer' *n.* सारथि or सारथी *m*, सूत *m*, रथ हांकणारा *m*. C. *v. t.* & *v. i.* सारथ्य करणें. Charioteering *n.* सारथ्य *n*, अश्वसारथ्य *n*. Sun's charioteer *Hindu mytho.* अरुण, सूर्याचा सारथी.

Charism (char'izm) [Gr. *karisma*, a gift.] *n.* अलौकिक-अद्भुत ईश्वरी देणगी, as, रोग बरे करणें, शिकल्याशिवाय परकी भाषा बोलणें-लिहिणें-इत्यादि.

Charity (char'i-ti) [Fr. *charite.*—L. *caritas*, love, from *carus*, dear.] *n. pl.* Charities. *christian love* (ख्रिस्ती धर्मशास्त्रांत सांगितलेली देवाची मनुष्यांवरची-मनुष्यांची देवासंबंधीं व परस्परांसंबंधीं) प्रीति *f*; as, "The charity of God that is in Jesus Christ, our Lord." Rom. *VIII.* 39. २ (*a*) ख्रिस्तानें विहित केलेली भूतदया *f*, प्रीति *f*; as, 'Faith, Hope and Charity.' 1 Cor. *XIII.* (*b*) भूतदयेची मूर्ति *f*, भूतदयादेवी *f*; as, "Let Charity benign breathe on us her balm." ३ दया *f*, कृपा *f*, अनुकंपा *f*, परोपकारबुद्धि *f*, परहितबुद्धि *f*. ४ दीनदयाळूपणा *m*, दीनदया *f*, दीनदातृत्व *n*. ५ *pl.* compreh. *charitable acts and deeds* दानधर्म *m*, धर्मादाय *m*, धर्मकृत्यें *n. pl.* [A CHARITABLE IMPULSE धर्मवासना *f*. C. BEGINS AT HOME घरांत दिवा तर देवळांत दिवा, अगदीं जवळच्या लोकांचें कल्याण केल्यानंतर मग लोककल्याणाकडे वळावें हें बरें. C. IS ALWAYS ON THE MORROW धर्म वर सोमवार. OBJECT OF C. दानपात्र *n*. WORK OR ACT OF PUBLIC C. लोकोपकार, इष्टापूर्त (R). To DEVOTE TO C. (TO CHARITABLE PURPOSES) धर्मादाय *adv.* टाकणें-सोडणें.] ६ *alms* भिक्षा *pop.* भीक *f*. [C. PAPER धर्मादाय (दाव) पट्टी *f*. BY OR ON C. धर्माधर्मी, धर्मांधर्मीं. IN C., FOR C. &c. धर्मार्थ, धर्मादाय, धर्मपरायण. DINE UPON C. AND CALL OUT FOR SAUCE अन्नसत्रीं जेवणें आणि मिरपूड मागणें.] ७ निवळ मेहेरबानी. ८ धर्मार्थ खातें *n*, परोपकारी मंडळी *f*. Char'itable *a. kind in judging* दयाळू, कृपादृष्टि, गुणदृष्टि, अदोषदृष्टि-दर्शी. २ *alms-giving* दानधर्मी, दानधर्म करणारा, धर्मबुद्धि, धार्मिक, धर्मिष्ठ, दीनदयाळ, दाता, दीनवत्सल, धर्माचें

पारीं बसलेला, धर्मपरायण. ३ *pertaining to charity* धर्माचा, दानधर्माचा, धर्मकृत्याचा, लोकोपकाराचा, परोपकारी. Char'itableness *n.* (v. A. 1.) दयाळूपणा *m,* कृपादृष्टि *f,* दयाळुता *f,* दातेपणा *m,* धार्मिकपणा *m,* धर्मबुद्धि *f.* Char'itably *adv.* (v. A. 1.) दयाळूपणानें, कृपादृष्टीनें, &c. २ धार्मिकपणानें, धर्मबुद्धीनें. Cold as charity कृत्रिम प्रीतिसारखा, उष्णताविरहित, मनापासून न केलेल्या कवाइती दानधर्मासारखा, प्रीत्युष्णताविरहित, कृत्रिम-दिखाऊ-भाडोत्री-औपचारिक-तांत्रिक-कवाइती प्रीतीप्रमाणें अनादराचा-थंडेपणाचा-उष्णताशून्य; as, "The charity of many shall wax cold." *Matthew XXIV. 12.* पुष्कळांची प्रीति उष्णताशून्य होईल. Sisters of Charity नैष्ठिकभगिनी *f. pl.,* दीक्षितभगिनी.

Chark (chärk) *v. t.* खाक करणें. C. *n.* (*obs.*) कोळसा *m.*

Charlatan (shär'la-tan) [Fr. *charlatan.*—It. *ciarlatano,* a mountebank, a great talker.—It. *ciarlare,* to prattle.] *n. a quack, a montebank* नाडी-वैद्य *m.* (नाडीवैद्य ह्मणून ओरडणारा किंवा त्या प्रकारचा वैद्य. cf. The Indian नाकाडोळ्याचा वैद्य-वैदु.) २ आपल्यांत जे गुण नाहींत ते आहेत असें भासविणारा ढोंगी *m,* लुच्चा *m.* Charlata'n'ic *a.* ढोंग्यासारखा, &c. Char'latanism, Charlatan'ry *n.* बढाई *m,* ठकविद्या *f,* शेखी *f.*

Charle's Wain (chärlz'ez wān') [*Charles & wain;* A. S. *carles waegn;* Sw. *karlvagnen;* Dan. *karlsvogn.* See Churl & Wain.] *n. astron. a familiar name given to the seven bright stars in Ursa Major or Great Bear* (उत्तरध्रुवाकडील) ताऱ्यांचें खाटलेंबाजलें *n,* उत्तरध्रुवाकडील सप्तर्षितारे.

Charm (chärm) [Fr. *charme.*—L. *carmen,* a song, a verse, an incantation.] *n. magic words, a spell* मंत्र *m,* तंत्र (?) *n,* कुवेडें *n,* तोडगा *m,* भारणी *f,* चेटुक *n.* CHARMS AND SPELLS जंतरमंतर *n,* टाणाटोणा OR टोणाटाणा *m,* आसुरी माया *f,* जादूटोणा *m,* ताडातोडा *m.* CHARMS AND INCANTATIONS TO PRODUCE DEATH OR EVIL जारण *n,* जारणमारण *n.* THERE ARE AMONGST THE HINDUS CHARMS AND CHARMED THINGS ADDRESSED AGAINST ALL THE AFFLICTIONS AND AFFLICTIVE APPREHENSIONS OF LIFE. SOME OF THEM ARE ओलांडा, केसारी, गंडा, गालवोट, चिरीपान, तापाचा दोरा, धरण, धारबंद, तीट, दृष्टमाणि, पाचुंद्याचें माणि, निंबलोण, पंचाक्षरी,-मंत्र, भालदोरी, मंत्राक्षत OR मंत्राक्षता, मिठकणी, मुष्टि *pop.* मूठ, मृतसंजीविनी, यंत्र, रक्षा, राखांडुळी, राखी, रामरक्षा, वज्रावळ OR वज्राळें, सल्कडें, ताइती. COMMAND OF CHARMS AND SPELLS मंत्रसिद्धि *f.* IDIOCY PRODUCED THROUGH THE MISAPPLICATION OF A C. (मंत्र) मंत्रचळ *m.* AND THE PERSON SO AFFECTED मंत्रचळ्या. TO ACQUIRE COMMAND OVER CHARMS, &c. मंत्रसाधन *n.* करणें. TO APPLY, SET, OR CAST A C. मंत्रप्रयोग *m.* करणें, मंत्र *m.* मारणें-घालणें-टाकणें, भारणी *f-* घालणें-टाकणें, करणी *f-* चेटुक *n.* करणें.] २ मोहक पदार्थ *m. pl,* मोहक गुण *m. pl.* ३. (with *pl.*) अप्रतिम आकृति *f-* सौंदर्य *n.* ४ (in singular) मोहकता *f.* C. *v. t. to subdue or affect by charms, to bewitch* भारणें, मंत्रणें or मंतरणें, भारणी *f.* घालणें-टाकणें, मोह *m-* मोहनी *f-* मोहिनी-भुरळ *f-* भूल *f-* भुलवण *f-* &c. घालणें-करणें, चेटक *n-* कुवेडें *n-* &c. करणें, मंत्रित करणें. २ *fig. to enchant, to captivate, to fascinate* मोहणें, मोह *m-* मोहनी *f-* मोहिनी-भूल-घालणें, भारणें, वश करणें, भुलवणें, रंजविणें, रंजन *n.* करणें *g. of o.,* मोहित-रंजित करणें. (३ with *off* as scorpion-sting, &c.) मंत्रानें-मंत्र टाकून-मंत्र घालून-&c.-उतरणें. ४ शमविणें, शांत करणें; as, "Music, the fiercest grief can C." ५ (*a*) (वाद्य इत्यादि) सुस्वर वाजविणें; as, "Here we our slender pipes may safely charm." (*b*) सुस्वर गाणें; as, "O what song shall I charm out!" C. *v. i. to use magic arts or occult power* तोडग्याचें कार्य करणें, मंत्रविद्या चालविणें. २ *to act as a charm, to please greatly* आनंददायी-रंजक-मोहक असणें. ३ सुस्वर वाद्य वाजविणें. Charmed *p.* (v. V. 1.) भारलेला, मंतरलेला, मंत्रित, अभिमंत्रित, मोहित. २ मोहलेला, भुललेला, रंजित, वश. Charmer *n.* (v. V. 1.) *a magician* भारणारा, मंतरणारा, मोहक, मंत्री (in the sense of मांत्रिक), पंचाक्षरी, भुताळ्या, चेटक्या. २ मंत्र घालून-टाकून-फुंकून उतरणारा, उतारी. ३ मोहित करणारा (in this sense usually applied to a woman). Charm'ful *a. abounding with charms* जादुटोण्याची, जादु टोणे असलेली. २ मोहक, मारू. Charm'ing *p. a.* मोहक, मनोरम, मनोहारी, मनोरंजक, रंजक, हृदयग्राही, हारी, हारक (in con.), हृदयंगम *colloq.* उमदा. C. *n.* (v. V. 1.) भारणें *n,* मोहणें *n,* मोहन *n,* मोह *m,* वशीकरण *n,* मंत्र *n,* वशक्रिया *f.* २ मोहित करणें *n,* मनोहरण *n,* चित्तहरण *n,* मनोरंजन *n,* रंजन *n.* Charm'ingly *adv.* (v. A. 2.) मनोरंजनपूर्वक. Charm'ingness *n.* (v. A. 2.) मोहकत्व *n,* रंजकत्व *n.* Charm'less *a.* कुरूप, ऐंदी, बोजड.

Charmel (kär'-mel) [Heb.] *n. a fruitful field* फलपुष्पादिकांनीं युक्त अशी भूमि *f,* समृद्धा-सुफलाभूमि; as, "Libanus shall be turned into C. and Charmel shall be esteemed as forest."

Charnel (chär'nel) [O. Fr. *charnel,* carnal, lit. containing carcases.] *a.* स्मशानवत्, स्मशानासारखा. C. *n.* स्मशान *n,* स्मशानभूमि *f.* Char'nel-house *n.* शवास्थि टाकण्याची विहीर *f-* स्थान *n,* देवळाजवळचें स्मशान *n,* शवास्थिगृह *n.*

Charon (kā'ron) [Gr.] *n. myth. the son of Erebus and Nox whose office it was to ferry the souls of the deceased* ग्रीक पुराणांतरीचा केरुन नांवाचा यमदूत *m.*

Charr (chär), same as Char.

Chart (chärt) [O. Fr. *charte.*—L. *charta,* a paper.—Gr. *kartu,* a paper.] *n. a marine map* समुद्राचा नकाशा *m* [ह्या नकाशांत खडक, रेतीचे उंचवटे, खाड्या, बंदरें दाखविलेलीं असतात.], समुद्रपट *m.* २ ता-

राशिस्थितिपट *m.* ३ *a sheet of paper, paste-board or the like on which information is exhibited,* पट *m,* नकाशा *m.* ४ (*obs.*) सनद *f,* दस्तऐवज *m,* शासनपत्र *n.* [HELIOGRAPHIC C. सूर्य व त्याचे डाग यांचा नकाशा *m,* सूर्यपट. SELENOGRAPHIC C. चंद्राची सपाटी दाखविणारा नकाशा *m,* चंद्रपट. TOPOGRAPHIC C. एखाद्या विवक्षित स्थळाचा बारकाईनें काढलेला नकाशा *m,* स्थलविशेषपट.] C. *v. t. to map out* नकाशा काढणें; as, To C. a coast. Chartā'ceous *a.* कागदासारखा-नकाशासारखा दिसणारा. Chart'less *a.*

Charter (chärt'ẽr) [O. Fr. *chartre.*—L. *chartula,* dim. of *charta,* a paper.] *n. a deed of grant* राजसंमतिपत्र *n,* राजसंमति *f,* सनद *f,* फरमान *f,* शासन *n,* *n,* शासनपत्र *n.* २ *a deed of conveyance* खतपत्र (?), दस्तऐवज *m,* लेख *m.* ३ *a special privilege or immunity or exemption* खासहक्काची सनद *f,* विशेषाधिकारपत्रिका *f,* माफीची सनद *f.* ४ *naut.* जहाज भाड्यानें देण्या-घेण्याचा करार *m.* ५ परवाना *m.* ६ *license, liberty* राजरोशी *f,* मुभा *f.* [MAGNA CHARTA (MAG'NA KAR'TA) मॅग्नाचार्टा. इ. स १२१५त इंग्लंडचा राजा जॉन यानें प्रजेला लिहून दिलेला करार *m.*] C. *v. t. to establish by charter* सनद देऊन कायम करणें. २ *to let or hire by charter* (as a ship) करारनामा करून भाड्यानें देणें-घेणें, गलबत भाड्यानें देण्याघेण्याचा मक्ता करणें. Chart'ered *p.* राजसंमत सनदीनें स्थापिलेला, सनदीनें हक्क असणारा, सनद मिळालेला.

Charter-party (chärt'ẽr-pär'ti) [Fr. *chartre partie,* a divided charter.] *n. a mercantile lease of a vessel* गलबताच्या भाड्याविषयींचा करारनामा *m,* गलबताचें भाडेंपत्र *n.*

Charwoman, see Chare III.

Chary (chār'i) [A. S. *cearig,* careful.] *a. careful, cautious* सावध, काळजी घेणारा. २ *fastidious, shy, particular* तोलेबंद जपणारा-वागणारा (दुसऱ्याचा उपमर्द-अपमान होऊं नये म्हणून) अतिविनयशील. ३ (with *in & of*) अमुक एक काम करण्याला नाखुष, होतां होईल तितकें टाळणारा; as, Tradesmen chary of allowing vessels to leave port prior to payment. ४ *frugal, sparing* हात राखून खर्च करणारा, मितव्ययी, काटकसरी. Char'ily *adv.* काटकसरीनें, मितव्ययानें. Char'iness *n.* काटकसरीपणा *m.*

Charybdis (ka-rib'dis) [Gr. *karybdis,* a dangerous whirlpool on the coast of Sicily opposite Scylla (a dangerous rock) on the Italian coast, see Scylla.] *n.* सिला वेटानजीक गलबतांचा विध्वंसक असा पाण्याचा भयंकर भोंवरा. २ *fig.* मोठें धोक्याचें कारण *n.*

Chase (chās) [O. Fr. *chacier, chasser,* to pursue.–L. *captare,* freq. of *capere,* to take. See Catch.] *v. t. to pursue for the purpose of taking* शिकार करणें. २ *to hunt* पाठीस लागणें, पाठलाग करणें. ३ *to drive away* (with *from, out of, to, & into*) (पाठीस लागून) हाकलून देणें. ४ *to put to flight* पळावयास लावणें. ५ शोध लावणें. C. *v. i. to give chase*-ची पाठ पुरविणें; as, To C. around after a doctor. C. *n.* शिकारीस जाणें *n.* २ *that which is pursued* शिकार *f,* मृगया *f,* सावज *n.* ३ *the ground abounding in game* मृगयाभूमि *f,* शिकारीचें मैदान *n.* Chase-port *n.* गलबताच्या मागल्या बाजूनें बंदूक सोडण्याचा भोंसका *m.* Beasts of chase शिकारीचीं जनावरें, (ससा, हरिण, कोल्हा, बगळा इत्यादि) शिकारीचीं सावजें. Wild-goose chase *fig.* व्यर्थ खटाटोप, सुवर्णमृगाचा शोध *m.* २ *lit.* हंसाची शिकार. Chas'able *a.* शिकार करण्यास योग्य. Chaser *n.* पाठलाग करणारा. २ जहाजाच्या मागल्या बाजूस ठेवलेली तोफ *f.*

Chase (chās) [Short for Enchase which see.] *v. t.* दागिन्यांवर उठावाचें नकशी काम करणें. २ जडणें, जडावाचें काम करणें. Chas'er *n. enchaser* दागिन्यावर उठाव नकशी काढणारा. २ *a hard tool of steel* नकशी काम करण्याची कोरणी *f.* Chasing *n.* उठावाचें नकसकाम करणें-करण्याची रीत *f.*

Chase (chās) [Fr. *chasse,* a shrine.—L. *capsa,* a chest.] *n.* खांचणी *f,* खोबण *f,* खांचा *m,* बंदुकीची पोकळ नळी *f.*

Chase (chās) *n.* जडाव कामाकरितां केलेलें कोंदण *n.* २ *a rectangular iron frame to confine types* छापखान्यांत जुळलेले खिळे (टाईप) बांधण्याची लोखंडी चौकट *f,* चेस *f.*

Chasm (kazm) [L. *chasma,* a yawning gulf.—Gr. *chainein,* to gape, to yawn, vide Chaos.] *n.* चीर *f,* भेग *f,* चील *f,* चिळण *f,* भगाड *n,* भगदाड *n,* भगदळ *n,* तडा *m.* २ फट *f.* Chasmed (R.) *a.* Chasm'y *a.* भेग पडलेला, चिरांचा, भेगाळ.

Chasseur (sha-sar') [Fr. a huntsman.] *n.* पारधी *m.* २ *mil.* चपळ गतीची पायदळाची अथवा घोडेस्वारांची तुकडी. ३ डोक्यावर तुरा खोंचलेला व हातीं तरवार घेतलेला असा उमरावाचा हुजऱ्या. ४ (चपळ रीतीनें इकडे तिकडे जातां यावें म्हणून) सुटसुटीत पोशाखाचा शिपाई *m.*

Chaste (chāst) [Fr. *chaste.*–L. *castus,* pure.] *a.* (of females) सती, पतिव्रता, साध्वी, अव्यभिचारिणी, पवित्र, अश्राफ, इमानी, *colloq.* कासोट्याची बळकट-खबरदार. These words apply chiefly to married women; for words applicable to the unmarried ones, see *Continent,* and *Virgin* & for words for 'chaste' of men, see also *Continent.* २ *not obscene, decent, pure,* अबिभत्स, सात्विक, पवित्र, निर्मल, निष्कलंक, मर्यादशील, पाक, साधा, साफ; as, C. mind [C. EYES पाकनजर *f.*] ३ *language or style* निर्दोष, शुद्ध, संस्कृत, दोषरहित; as, C. style in composition. ४ (*obs.*) अविवाहित (कुमारी). Chastely *adv.* Chaste'ness, Chas'tity *n.* साध्वीपणा *m,* पातिव्रत्य *n,* सतीत्व *n,* साध्वीत्व *n,* अव्यभिचार *m.* २ बीभत्साभाव *m,*

पवित्रता *f*, दोषराहित्य *n*, निर्दोषता *f*, निष्कलंकता *f*. ३ शुद्धि *f*, शुद्धता *f*. ४ (*obs.*) अविवाहित स्थिति *f*. Chaste tree निरगुडी *f*, बनई *f*, निगई *f*.

Chasten (chās'n) [O. E. *chastien*, O. Fr. *chastier*.- L. *castigare*, to punish, from *castus*, pure & *agere*, to lead.] *v. t.* (usually of Divine chastisement) *to correct by punishment, to discipline* शिक्षा *f*. करणें, दंड करणें, शिक्षा करून शिस्त लावणें; as, "Whom the Lord loveth, him he chasteneth." Heb. XII. 6. २ *to purify from errors or faults* शुद्ध करणें, सुधारणा करणें, दोष काढून टाकणें, दोष-व्यंग नाहींसे करणें. Chas'tened *p. a.* Chas'tenment *n.* (R.) शिक्षा *f*, शासन *n*. २ दोषशुद्धि *f*. ३ अतिरेक होऊं न देणें *n*, अतिरेकाचें नियमन *n*. (See *N. B.* to Chastise.)

Chastise (chas-tīz') *v. t.* *to inflict punishment* (especially corporal) (शासनासाठीं किंवा सुधारणुकेसाठीं फटके मारून किंवा दुसऱ्या कोणत्याही रीतीनें) शिक्षा करणें, शिक्षा-दंड करणें, फटके मारणें, शिस्तीस लावणें, वाटेवर आणणें, वठणीस आणणें.२ दोष काढून टाकणें, दोषरहित करणें; as, "To C. his very method and phrase." Chastis'able *a*. Chas'tisement *n*. शिक्षा *f*, शासन *n*.

*N. B.*—Chastisement is generally by a man in authority or power. Chastenment is generally by God.

Chasuble (chaz'ū-bl) *n*. ख्रिस्ती लोकांत 'मास' नामक विधीच्या वेळीं किंवा प्रभुभोजनाच्या साक्रमेंतसमयीं ख्रिस्ती आचार्यांनीं घालण्याचा झगा *m*, च्याझुबल *m*.

Chat (chat) [Short for *chatter*.] *v. i.* *to talk familiarly or easily* गोष्टी *f. pl.* सांगणें-करणें, गोष्टी-वाता *f. pl.*-गप्पाष्टक *n*.-&c. करणें, गप्पा *f. pl.* छाटणें, वाता *f. pl.* खबालणें-मारणें-ठोकणें-छाटणें, चकाट्या *f. pl.* पिटणें-मारणें. २ *to talk idly* बहकणें, वाता *f. pl.* कुटणें, काथा *m*. कुटणें. C. *v.t.* (*obs.*)-ची गोष्ट सांगणें. Chat, Chatting *n*. (v. V. I.) गोष्टी *f. pl.*, बात *f*, गप्पाष्टक *n*, गप or गप्प *f*, चकाट्या *f. pl.*, गजलगोष्टी *f. pl.*, गजाल *f*. २ वका *f. pl.*, बकबक *f*, बकवा *m*, बकवाद *m*, गाथा *f*, कोरड्या गाथा *f. pl.*, अकडंतकडं *n*, काथा(थे)कूट *f*, अगडतगड *n*. Chatting *pr.p.* Chatted *pa. p.* Chat'tiness *n*. Chat'ty *a*. (v. V. 1.) गोष्टिप्रिय, गोष्टिवेल्हाळ, बोलका, गप्पावेल्हाळ, वाताड्या.

Chat (chat) *n*. लहान काठी *f*, डहाळी *f*. Chatwood *n*. *little sticks* लांकूडफांटी *n. pl.*, फाटी *n. pl.*, कावळकाड्या *f. pl.*, काटक्याकुटक्या *f. pl.*

Chat (chat) *n*. अशुद्ध धातूंत मिसळलेले लहान दगड.

Chateau (sha-tō') [Fr. *chateau*, a castle, vide Castle.] *n*. किल्ला *m*, गड *m*, दुर्ग *m*. २ *a mansion* बंगला *m*, वाडा *m*, महाल *m. pl.* Chat'eaux. Chat'elain *n*. (*obs.*) किल्लेदार, दुर्गाधिकारी *m*. Chat'elaine *n*. किल्लेदारीण, दुर्गाधिकारिणी. Chateaux en Espagne मनोराज्य.

Chatelet (shat'ē-lā) *n*. *a small castle* लहान किल्ला *m*. २ महाल *m*.

Chattel (chat'l) [O. Fr. *chatel*, another form of *catel*, see Cattle.] *n*. *a movable possession* घरजिंदगी *f*, जंगमद्रव्य *n*, जंगमामिळकत *f*. माल *m. pl.* Chattels जिंदगी *f*, चीजवस्त *f*, मालमत्ता *f*, इळाखिळा *m*, इस्ताद. Goods and Chattels सर्व चीजवस्त, मालमत्ता, *idio.* इळाखिळा.

*N. B.*—Chattels are personal or real; *personal* are such as are movable; as, goods, plate, money; *real* are such rights in land as are less than a freehold, as leases, mortgages, &c.

Chatter (chat'er) [Of imitative origin.] *v. i.* (as a pie) किलकिलणें, किलबिलणें, चिवचिवणें, कचकचणें. २ (as a monkey) किचकिचणें, कचकच करणें, खेसणें. ३ (the teeth) करकरां *adv.*- खुडखुड *adv.* वाजणें, कडकडणें, कुरकुर वाजणें. ४ *to talk idly* बडबडणें, बकणें, बहकणें, बाता *f. pl.* कुटणें-खबालणें-छाटणें-मारणें-हाणणें-तासणें. Chatt'er, Chatt'ering *n*. (v. V. I.) चिवचीव *f*, कलकल *f*, किलकिल *f. m*, किलबील *f*, *m*, किजबीज *f*, टकटक *f*, कचकच *f*, *intens.* कलकलाट or किलकिलाट *m*, किलबिलाट *m*, कचाच *m*, किल्लाण *n*, चिलचिलाट *m*, चिलबिलाट *m*, चिवाचिवाट *m*. २ किचकिचणें *n*, खेसणें *n*. ३ वाजणें *n*, कडकडणें *n*. ४ बकवक *f*, बकवा *m*, बकवाद *m*, बकणी *f*, गप्प *f*, जल्पन *n*, गप्पाष्टक *n*, चरबट *f*, वटवट *f*. Chatt'er-box *n*. बडबड्या, गप्पाष्टक्या, बकवादी or द्या, बडबड्या, बोलघेवडा, बोलगाडा, बोलगाभणा. Chatt'erer *n*. Chatt'ering *p. a.* (v. V. ४.) बकबक करणारा, वाता कुटणारा, जल्पक, गप्पाष्टक्या, बकबक्या.

Chatterer (chat'ėrer) *n*. चाटरर नांवाचा पक्षी *m*.

Chatty (chat'i) *n*. मातीचें मडकें *n*, मृत्पात्र *n*.

Chaw (chaw) [For root, see Jaw.] *n*. usually *pl.* जबडा *m*, चव्हाळें *n*. C. *v. t.* चघळणें, चर्वण करणें *fig.* २ *fig.* विचार करणें,-चें चिंतन करणें. Chaw-bacon *n*. *a ludicrous contemptuous name for a bumpkin* गांवढळ, ग्राम्य. Chawed up नाश केलेला, नष्ट, नाशित.

Cheap (chēp) [A. S. *ceap*, bargain, sale, price.] *a.* स्वस्त (स्ता), सवंग, हलक्या-थोडक्या मोलाचा-किंमतीचा-&c., अल्पमोली. २ मंदीचा. ३ *common, mean, not respected* आदररहित, महत्वरहित; as, "You grow cheap in every subject's eye." C. *n*. (*obs.*) साधारण-हलका खरेदी केलेला माल *m*- सौदा *m*. २ (*obs.*) स्वस्त वस्तु मिळण्याची जागा *f*. C. *adv.* स्वस्तभावानें. Cheap'en *v. t.* स्वस्ता करणें, स्वस्तावणें, किंमत *f*- मोल *n*- भाव *m*- दर *m*- पाडणें-कमी करणें, पाडून देणें-घेणें-&c. २ *fig.* *to lessen the value of, to depreciate* भाव कमी करणें, किंमत कमी करणें; as, "My proferred love has cheapened me. C. *v. i.* स्वस्ता होणें, सस्तावणें, सवंग होणें, स्वस्तावणें, मोल *n*- किंमत *f*- भाव *m*-धारण

*f.* &c. पडणें-उतरणें-कमी होणें-हलकावणें-मंदावणें, &c. Cheap'ly *adv.* (v. A.) स्वस्ताईनें, सवंगाईनें, थोडक्या मोलानें. Cheap'ener *n.* (*obs.*) Cheap'ness *n.* (v. A.) स्व(स) स्ताई *f.* सवंगाई *f.* मंदी *f.* अल्पमूल्यता *f.* Cheap Jack or John आडगिऱ्हाइकी माल स्वस्त विकणारा. २(फार स्वस्त माल देण्याचा आव घालणारा) फेरीवाला. Cheap labour *n.* स्वस्त मोलाची मजुरी, हलकी मजुरी (opposed to भारी मजुरी). Cheap trip *n.* (आगगाडीनें किंवा आगबोटीनें) नेहेमीपेक्षां थोड्या भाड्यांत केलेली-स्वस्त सफर *f.* Cheap tripper *n.* (ठरींव दरापेक्षां) कमी भाड्यांत सफर करून येणारा. Dog cheap or Dirt C. *colloq.* अतिशय स्वस्त, पैशा-पायली, पैसापासरी, पैशा शेराचा, मातीच्या मोलाचा, *idio.* टक्काशेर. To become C. स्वस्तावणें, सवंगणें, सवंग होणें. To be dirt C. *idio.* अति स्वस्त असणें, वाटेवर पडणें, मातीचे मोलानें विकणें-देणें-जाणें. To be cheap of any thing (Scot.) एखाद्यास (शिक्षा, बक्षीस वगैरे) जितकी मिळावयास पाहिजे होती त्यापेक्षां कमी मिळणें. To hold cheap, *to hold of small account, to think little of, to despise* अल्प महत्वाचा समजणें, कमी किंमतीचा समजणें, विशेष पर्वा न करणें.

Cheat (chēt) [short for *Escheat*, lands or tenements that fall to a lord or to the state by forfeiture, or by the death of the tenant without heirs; the *escheaters* often resorted to fraud to procure escheats; hence the verb 'to cheat' which means 'to defraud', see Escheat.] *v. t. to defraud, to trick, to swindle* चकविणें, फसविणें, तुरी देणें, प्रतारणें, टोपी घालणें, मुंडवण *f.* घालणें, धत्तुरा *m.* दाखविणें *slang*; as, To C. a person of or out of something. २ सुलथाप-झोंका देणें, मोह-भुरळ घालणें; as, To C. winter of its dreariness. [To C. and give the slip हूल मारणें, बाल्या देणें-मारणें-हाकणें.] C. *v. i.* ठकबाजी करणें, लबाडी करणें; as, To C. at cards. C. *n. a fraud, a trick, imposture* कपट *n*, फसवण *f*, ठकवण *f*, फटवण *f*, वंचना *f*. २ *a cheater, an impostor* ठक, दगेबाज, प्रतारक, वंचक, फसव्या, ठकव्या, ठकबाज. ३ *bot.* शेतांत धान्यामध्यें उगवणारें गवत *n*. Cheated *p.* ठकविलेला, फसवलेला, &c., वंचित, प्रतारित. Cheat'er *n.* फसवणारा, फसव्या, ठक(ग), ठकबाज, वंचक, प्रतारक. Cheat'ery *n. colloq.* कपट *n*, वंचना *f*, फसवणें *n*; as, "Much room for exaction, cheatery and litigation." २ *law* ठकबाजी *f.* Cheating *n.* (v. V.)—*act* ठकवणें *n*, फसवणें *n*, ठकवणी *f*, ठकवणूक *f*, *slang* धत्तुरा *m*, ठकवाजी *f*, वंचन *n*, वंचना *f*, प्रतारण *n*, प्रतारणा *f*. To put a cheat upon फसविणें. Tame cheater *Shakes.* पाश, जाळें, प्रलोभन. २ फसवून जाळ्यांत नेणारा प्राणी *m.*

Check (chek) [O. E. *chek*, O. Fr. *eschec*, Fr. *echec*, a stop, hindrance, orig. check in the game of chess, *pl. echecs*, chess, through Ar. from Per. *shah*, Sk. शाह, king; from its use in chess, the word has been widely transferred in English.] *n. chess* शाह *m.* (v. दे.). २ *stop, arrest, delay* आवरणें *n*, दाब *m*, अडथळा *m*, आवर, आकलन *n*, निग्रह *m*, प्रतिबंध *m*, निरोध *m*, अटकाव *m*, अडचण *f*, अवरोध *m*, अटक *f*, हरकत *f*; as, "No C. no stay this streamlet fears." [To be under the C. of अडकेंत-दावांत-आडकित्यांत-कातरींत-काचींत-कैचींत असणें. *idio.*] ३ *that arrests progress or limits action* दडपण *n*, दाबता *m*, दडपता *m*; as, "Useful C. on the administration of Government." ४ दडपशाही *f.* ५ निशाणी *f*, खूण *f.* ६ विघ्न *n*, हरकत *f.* ७ हार *f*, पराजय *m.* ८ रेल्वेनें प्रवास करितांना सामानाच्या मालकास दिलेली लहान चकती *f*, प्रतिपत्रिका *f*, लहानशी नक्कल *f.* ९ (of banks) चक *m*, चेक, चेकनोट, सावकारावर चिट्ठी *f*, दर्शनी हुंडी. See Cheque. १० (*obs.*) लहान चीर. C. *v. t. to put in check* (chess) बुद्धिबळांतील राजास शह देणें, मात करणें, पराजय करणें. २ *to repress, to curb, to hinder* दडपणें, दाबणें, आवरणें, आकळणें, (चें) आकलन *n*- निग्रह *m*-करणें *g. of o.*, थोपून धरणें, प्रतिबंध करणें, अटकावणें, आडविणें. ३ (an account, paper, &c.) *to verify, to guard, to make secure by means of a mark, token, or other check* ताडून-मिळवून—&c. पाहणें, ताळा मिळवून पाहणें, चक करणें; as, To C. an account. ४ *to chide, to rebuke* दम देणें, धमकावणें; as, 'Good king, his master will C. him for it'. ५ *naut. to slack or ease off* नरम पाडणें, ढिला करणें, सैल करणें. ६ (*obs.*) *to cause to crack* चिर *f*-भेग *f* पाडणें; as, The sun C.s timber. C. *v. i. to pause* (with *at*) थांबणें, थबकणें, विराम घेणें; as, "The mind once jaded by an attempt above its power C.s at any vigorous undertaking ever after." २ *to act as a curb or restraint* (चा) दाब बसणें; as, His presence C.s too strong upon me. ३ (*obs.*) चीर-भेग पडणें. Check-clerk *n.* ताडून पाहणारा कारकून *m*, तपासणीदार. Check-mate *n.* मात *f.* २ पराजय *m.* Check-mate *v. t.* (*chess*) मात करणें, पराजय करणें. [CHECK-MATE हा शब्द 'शाहमत' (राजा मेला आहे) या अरबी शब्दापासून झाला आहे.] To check-mate with a pawn प्यादी *f*, प्यादेमात *f.* Check-key *n. latch-key* फेरतपासणीची चावी-दाब. Check rein *n. the coupling rein* कायजा (दा) *m*, आंखूड रासपट्टी *f.* २ घोड्यास खालीं वरमान करितां येऊं नये म्हणून लाविलेली वादी *f.* C. string *n.* ज्या दोरीनें गाडींत बसणारा गाडीवानाला गाडी थांबविण्याची खूण करितो ती दोरी *f*, चेकदोरी *f*, इशाऱ्याची दोरी *f.* C. taker आगगाडींत किंवा नाटकगृहांत जाणाऱ्या लोकांचीं तिकिटें गोळा करणारा *m*, प्रवेशतिकिटें घेणारा. C. weigher *n.* खाणींतून वर ओढलेल्या कोळशाचें वजन तपासून पाहणारा, 'चक' करणारा. Checked *a.* विरोध केलेला, अडवलेला, प्रतिहत, बंद पडलेला, तपासलेला, 'चक' केलेला. Checker *n.*

निरोधक *m*, अटकाव करणारा *m*. Check-board *n*. (चौकोनी आडव्या उभ्या रेघा मारलेला) बुदबळांचा पट *m*.

*N. B.*—निरोध will be the best rendering of the word *check* in the following phrases. Check on population लोकसंख्येचा निरोध; Positive or Providential check on population प्रजावृद्धीचा नैसर्गिक निरोध *m*. Preventive or prudential check on population प्रजावृद्धीचा कृत्रिम अथवा विवेकजन्य निरोध.

Check (chek) [Check ह्मणजे आडव्या उभ्या रेघा मारणें, या शब्दापासून check शब्दाची उत्पत्ति आहे.] *n*. चौकोनी आडव्या उभ्या रेघांचें कापड *n*, चेकचें कापड *n*. Check *a*. चौकोनी आडव्या उभ्या रेघांचें.

Cheek (chēk) [A. S. *ceac*, the cheek, the jaw.] *n*. गाल *m*, कपोल *m*, गंडप्रदेश *m*, कानसल (?) *n*, कानशील (?) *n*, गालफड *n*, गल्ल *m*, (in abusive or angry style) थोबाड *n*, थोबाडी *f*, थोत(द)री *f*. [THE CHEEKS (REVILINGLY) गालठें *n*, *pl*. DIMPLE ON THE CHEEK गालावरची खळगी *f*. FLUSHED CHEEKS *idio*. पिकलेले रातंबे, लाल झालेले गाल. TO GET ONE'S CHEEKS FLUSHED गाल लाल भडक होणें, रातंबे *m*. *pl*. पिकणें *idio*. TO PINCH AND PULL THE CHEEKS OF गालगुच्चा घेणें *g*. *of o*. TO SMACK OR SLAP THE CHEEKS थोबाडणें, (गालावर) चकचकावणें]. २ *insolence in speaking to any one* उद्धटपणा *m*, उद्दामपणा *m*. [TO GIVE CHEEK TO उद्धटपणानें वागणें; AS, "IF HE GIVES ME ANY OF HIS CHEEK, I WILL KNOCK HIM DOWN." TO HAVE THE CHEEK बेशरमपणा *m*- उद्धटपणा *m*- तोंड *n*. असणें; AS, HE CANNOT HAVE THE CHEEK TO ASK FOR MORE. TO ONE'S OWN CHEEK स्वतःच्या खासगी कामाकरितां-उपयोगाकरितां; AS, "IF I SPENT MY EARNINGS, LET HIM KEEP HIS TO HIS OWN CHEEK."] ३ *the cheek-strap* गालपट्टा *m*. (see Strap), सरदवाली (head-piece) व नासबंद (nose band) ह्यांना जोडणारा गालपट्टा *m*. ४ लगामीची कडी *f*. ५ दाराच्या किंवा खिडकीच्या चौकटीची बाही *f*. C. *v. t. to form a cheek or side to* (गालासारखी) बाजू लावणें; as, "The altars round about the church are cheeked with exquisite colours." २ उद्धटपणानें-बेशरमपणानें तोंड करून बोलणें, संबोधणें. Cheek-bone *n*. गालाचें हाड *n*, गल्लास्थि *m*. Cheek-pouch *n*. माकडाच्या गालांतील भक्ष्य ठेवण्याची पिशवी. Cheek-tooth *n*. दंष्ट्रा *f*, चर्वणदंत. Cheek'y *a*. उद्धट, उद्दाम, अमर्यादशील, धीट. Cheek by jowl अगदीं जवळ; as, "Mercy and Justice marching cheek by jowl." Cheeks of a mast डोलकाठीचे गाल, डोलकाठीचा प्रत्येक बाहेर आलेला भाग.

Cheep (chēp) *v. i*. चकूचकू करणें, चिंवचिंव करणें. C. *v. t*. चकूचकू करून दर्शविणें; as, "Cheep and twitter twenty million loves." C. *n*. चिंवचिंव *f*, चकूचकू *f*.

Cheer (chēr) [O. E. *chere*, face, welcome, cheer.—Fr. *chere*, from L. L. *cara*, the face.] *n*. *a disposition, frame of mind, mood*, (*usually qualified by good, glad, joyful, sorrowful, heavy*) स्वभाव *m*, तव्यत *f*, चित्तवृत्ति *f*, प्रकृति *f*. २ *comfort, encouragement, spirit* समाधान *n*, उत्तेजन *n*, धैर्य *n*. [BE OF GOOD CHEER धैर्य धरा, धीर धरा.] ३ *cheerfulness, animation* आनंद *m*, हर्ष *m*, उल्हास *m*; as, "I have not that C. of mind that I was wont to have." ४ (*obs.*) मुखचर्या *f*, चेहरा *m*; as, 'Sweat of thy C.' ५ गंमत *f*, मौज *f*, मजा *f*. ६ *provisions prepared for a feast* मेजवानीचे पदार्थ, स्वयंपाक *pop*. खैंपाक *m*; as, A table loaded with good cheer. ७ *a shout, hurrah or acclamation expressing joy, applause, &c.* गजर *m* (टाळ्यांचा), आनंदघोष *m*, जयघोष *m*, जयशब्द *m*; as, To receive a speaker with C. s. C. *v. t. to gladden* (with *up*) आनंदित *m*. करणें *g. of. o.*, संतोषविणें, संतुष्ट-हर्षित-खुश-&c. करणें. २ *to inspirit, to comfort, to solace* हुशारी-उमेद देणें, शांतवन करणें, सांतवणें, आश्वासणें; as, "The penitent he cheered." ३ *to urge on by cheers* धैर्य *n*- धीर *m*. देणें, उत्साह *m*- आणणें-देणें, (ला) आश्वासन *n*- प्रोत्साहन *n*- उत्तेजन *n*- &c. देणें; as, 'To cheer hounds in a chase.' ४ *to salute with cheers* जयजयकार *m*- वाहवा *f*- करणें *g. of. o*. C. *v. i*. (with *up*) *to become cheerful* धैर्य *n*- धीर *m*- दम *m*- धरणें. २ खुशी-आनंदी होणें; as, "At sight of thee my gloomy soul cheers up." ३ *to utter shouts of applause* आनंदघोष करणें. Cheered *p*. (v. V. 1.) संतोषवलेला, संतुष्ट. २ शांतवन केलेला. आनंदित केलेला. ३ उत्तेजित. Cheerer *n*. Cheering *p. a*. (v. V. 1.) संतोषवणारा, संतोषकर-कारी, आनंदकारक-दायक. २ उत्साह देणारा-आणणारा, &c., प्रोत्साहक, उत्तेजक, प्रोत्साहनकर्त्ता-कारी. ३ संतुष्ट करणारा, जयजयकार करणारा. Cheer'ful *a. gay, lively* उल्हासी, आनंदी, हास्यमुख, हसतमुख, प्रसन्नमुख, हृष्टचित्त. २ (of disposition) *habitually cheerful* आनंदी, उल्हासी, संतोषी, सदानंद(दी), आनंदवृत्ति, संतोषवृत्ति, खुशमौजी(ज्या). Cheer'fully *adv*. (v. A. 1 & 2.) *with gaiety, willingness* प्रसन्न अंतःकरणानें, आनंदानें, खुशीनें, हौसेनें, सुखासंतोषानें, सुखासमाधानानें. Cheer'fulness, Cheer'iness, Cheer'ishness (R.) *n*. आनंद *m*, उल्लास *m*, उल्लासवृत्ति *f*, उल्लासित्व *n*. २ आनंदी स्वभाव *m*, आनंदवृत्ति *f*, सदानंदित्व *n*. Cheer'less *a*. सुखहीन, उल्लासरहित-&c. &c. Cheer'lessness *n*. Cheer'ly *adv*. आनंदित रीतीनें. C. *a*. हास्यवदनाचा. Cheer'y *a*. आनंदी, आनंदवर्धक.

Cheese (chēz) [O. E. *chese*, A. S. *cese*, from L. *caseus*, L. L. *casius*, cf. Casein.] *n*. पनीर *f*, चीझ *f*; [दूध विरजून त्यांतील पाणी काढून टाकून व त्यामध्यें मीठ वगैरे घालून तयार केलेला अतिशय घट्ट पदार्थ. हा साहेब लोकांत पावाशीं खाण्यास तुपाप्रमाणें वापरतात.] २ *a mass of pomace or ground apples pressed together in the form of a cheese* ठेंचलेल्या आपलसचा चीझ-पनीरासारखा पदार्थ. ३ *the mucilaginous fruit of the*

dwarf-Mallow म्यालो नांवाच्या झाडाचें चीझसारखें फळ n. ४ a low courtesy फार लवून केलेला नमस्कार m- सलामी f. Cheese-bacillus n. चीझमध्यें उत्पन्न होणारी अळी f., पनीरजन्यकृमि m. Cheese-cake n. चीझचा गोळा, चीझची वाटोळी वडी f. Cheese-mate n. चीझमध्यें सांपडणारा किडा m. Cheese-monger n. चीझविक्या m, चीझवाला m, चीझचा व्यापारी. Cheese-parer n. तासून चीझाचे काप काढणारा m. Cheese-paring n. चीझाची तासणी. Cheese-paring a. चिक्कू, फाजील काटकसऱ्या m, चिक्कूपणाचा, फाजील काटकसरीचा; as, Cheeseparing economy. Cheese-press n. चीझ बनविण्याचें दाबकयंत्र-सांचा m. Cheese-rennet n. दूध विरजून दहीं होण्याकरितां ज्या वनस्पतीचा रस घालतात ती, नारिंगासारखी रेनेट नांवाची वनस्पती Chees'iness n. चीझसारखा रंग m, चीझसारखा गुण किंवा-धर्म m. Chees'y a. चीझचा-सारखा, चीझयुक्त. Green-cheese कडक न झालेलें चीझ. To get the cheese *to receive a check or disappointment* निराशा होणें. Bread and cheese *food generally* (but of a frugal nature). साधें अन्न n. To make cheese (a school-girl's amusement) गरगर फिरून झगा फुगल्यावर एकदम खालीं बसणें. [m, चित्ता.

Cheetah, chetah (chē'ta) [Hind. *chita.*] n. पट्या वाघ,

Chef (shef) [Fr.] n. *the head cook of a large establishment as a club, a family, &c.* एका कुटुंबाचा किंवा क्लबासारख्या संस्थेचा मुख्य स्वयंपाकी—आचारी m, बल्लव.

Chef'-d'-œuvre (shádevr) [Fr. a chief work.] n. pl. Chefs-d'œuvre, *a master-piece, a capital work in art, literature, &c.* उत्तम चित्रकाम m, उत्तम ग्रंथ m.

Cheiropter (ki-rop'tėr) [Gr. *cheir*, the hand & *pteron*, the wing.] n. एक प्रकारचा वाघळासारखा प्राणी m. Cheiroptera. pl. Cheirop'terous a. वाघळाच्या जातीचा.

Cheirosophy (kī-ros'o-fi) [Gr. *cheir*, the hand & *sophia*, knowledge.] n. *the art of reading character as it is delineated in the hand* हात पाहून स्वभाव सांगण्याची विद्या f, हस्तपरिज्ञान (on the analogy of मस्तुलुङ्गपरिज्ञान phrenology).

Chelonian (kelō'ni-an) [Gr. *chelone*, a tortoise.] a. कांसवाच्या वर्गांतील प्राण्यासंबंधीं, कूर्मवर्गीय. Chelo'nia n. (सरपटत जाणाऱ्या) कांसवासारख्या प्राण्यांची जात f.

Chemise (she-mēz') [Fr. *chemise* shirt.—L. L. *camisa, camisia*, dress, thin dress.] n. बायकांचें खमीस n, चोळी f. २ बंधाऱ्याच्या अग्रभागाची भिंत f.

Chemistry (kem'is-tri) [Short for *Alchemy*.–O. Fr. *alkemie, arquemie*, Fr. *alchimie*, Ar. *alquimia, al*, the & *quimia*, chemistry, from Gr. *chemeia*, a mingling, an infusion, chemistry, from Gr. *cheein*, to pour, to drop; for *chemistry* was orig. the art of extracting the juices from plants for medicinal purposes.] Formerly Chymistry. n. पदार्थमूलतत्वशास्त्र n, रसायनशास्त्र n, २ किमया (*obs.*) ३ रसायनशास्त्राचें पुस्तक n. Chem'ical a. (v. N.) रसायनशास्त्रासंबंधीं-विषयक, रसायनशास्त्रानें केलेला, रासायनिक. Chem'ically *adv.* Chem'icals n. pl. रसायनप्रयोगांत उपयोगीं पडणारीं द्रव्यें n. pl., रसायनद्रव्यें n. pl. Chem'ism n. रासायनिक क्रिया f. Chem'ist n. मूलद्रव्यशास्त्रवेत्ता m, रसायनशास्त्रवेत्ता m, रसायनज्ञ-विद्, रसायनशास्त्रज्ञ, रसायनी m. २ रासायनिक औषधें तयार करणारा व विकणारा. Chemical action n. रासायनिक क्रिया-कर्म n. C. affinity रसायनप्रीति f. C. analysis रासायनिक पृथक्करण. C. attraction रसायनाकर्षण. C. change रासायनिक विकृति-विकार-रूपांतर. C. combination रासायनिक-रसायनसंयोग. C. composition रासायनिक-रसायन-घटना. C. constituents of plants रसायनशास्त्रदृष्ट्या वनस्पतींचे घटकावयव. C. equation रासायनिक समीकरण. C. equivalents संयोगप्रमाणें, सममूल्यप्रमाणें. C. formula रासायनिक सूत्र n, नियम m, सारणी f. C. laboratory, see Laboratory. C. mixture रासायनिक मिश्रण n. C. names रासायनिक संज्ञा f. C. nomenclature रासायनिक संज्ञापद्धति f. C. notation रासायनिक घटनालेखनपद्धति f. C. physics रासायनभौतिकशास्त्र n. C. substitution. रासायनिक घटकांतर. C. symbols रसायनशास्त्रांतील मूलद्रव्यांचीं पारिभाषिक चिन्हें-संज्ञा. C. technology रासायनिकलाविज्ञान n, रसायनकलाविज्ञान n. C. theory रासायनिकवाद m- उपपत्ति f. C. works रसायनें-रासायनिक पदार्थ तयार करण्याचा कारखाना m. Inorganic Chemistry जड-अचेतन रसायनशास्त्र n, निरिंद्रियरसायनशास्त्र n. Organic Chemistry चेतनरसायनशास्त्र-सेंद्रियरसायनशास्त्र n. Physiological chemistry इंद्रियविज्ञानरसायनशास्त्र n. Practical Chemistry कर्तव्यरसायनशास्त्र, रसायनक्रियाशास्त्र. Applied C. व्यावहारिक रसायनशास्त्र, उपयुक्त रसायनशास्त्र, व्यवहारोपयोगी रसायनशास्त्र n. Pure chemistry तात्विक रसायनशास्त्र, रसायनसिद्धांत.

रसायनशास्त्रावर पुस्तकें लिहितांना पारिभाषिक शब्दांसंबंधानें ज्या अडचणी येतात त्या सर्व अडचणींचा समग्र विचार करून खालील परिभाषा डाक्तर मोरेश्वर गोपाळ ऊर्फ नानासाहेब देशमुख बी. ए., बी. एस. सी., एम्. डी., व प्रोफेसर त्रिभुवनदास कल्याणदास गज्जर एम्. ए., बी. एस. सी., ह्यांनीं ठरविली आहे. ही ठरवितांना प्रोफेसर बाळाजी प्रभाकर मोडक, यांचीं रसायनशास्त्रावरील पुस्तकें, प्रोफेसर राय यांचा हिंदुरसायनशास्त्राचा इतिहास, रा. मोरो भिकाजी आगाशे, बी. ए., एल. एल. बी. यांचा या विषयावरील ग्रंथमालेंतील निबंध व कलकत्त्यांतील साहित्य समेचा या विषयावरील प्रयत्न इत्यादि उपलब्ध साधनांचा पूर्ण विचार केला आहे; व अशा पूर्ण विचारानें ठरलेली परिभाषा बनारस येथील नागरीप्रचारिणी सभेनें मान्य केल्यामुळें सभेच्या व आमच्या परिभाषेंत अगदींच थोड्या ठिकाणीं आतां फरक राहिला आहे.

*See Next Note.*

*N. B.*—ELEMENTS मूलतत्वें.

## मूलतत्वें.

खालीं पहिल्या रांगेंत मूलतत्वांचीं इंग्रजी नांवें, दुसऱ्या रांगेंत मराठी नांवें, तिसऱ्या रांगेंत साधारण संज्ञा व चवथ्या रांगेंत परमाणुभारांकाला धरून बसविलेल्या संज्ञा दिल्या आहेत.

| | | | |
|---|---|---|---|
| Aluminium (also, Aluminum) | स्फट | (स्फ) | (ड) |
| Antimony, Stibium | अंज | (ज) | (बु) |
| Argon | आर्गन | (आ) | (*) |
| Arsenic | ताल | (ल) | (वि) |
| Barium | भार | (भा) | (चे) |
| Beryllium, Glucinum | विदुर | (वि) | (च) |
| Bismuth | विस्मत | (वि) | (वो) |
| Boron | टंक | (ट) | (ट) |
| Bromine | स्तंभ | (स्त) | (सि) |
| Cadmium | काद्म | (का) | (जु) |
| Cæsium | श्याम | (श्य) | (के) |
| Calcium | खट | (ख) | (चि) |
| Carbon | कर्ब | (क) | (त) |
| Cerium | श्रीक | (श्री) | (ते) |
| Chlorine | हर | (ह) | (स) |
| Chromium | क्रुम | (क्र) | (रि) |
| Cobalt | कोबल्ट | (को) | (श्रि) |
| Columbium | कोलंब | (कोल) | (*) |
| Copper, Cuprum | ताम्र | (ता) | (गि) |
| Erbium | अर्ब | (र्ब) | (*) |
| Fluorine | प्लव | (प्ल) | (श) |
| Gadolinium | गादोलिन | (गादो) | (*) |
| Gallium | गाल्ल | (गा) | (ढि) |
| Germanium | शार्मण्य | (शा) | (दि) |
| Gold, Aurum | स्वर्ण | (स्व) | (गो) |
| Helium | सौर | (सौ) | (*) |
| Hydrogen | उज्ज, उदज | (उ) | (*) |
| Indium | इंद | (इ) | (डू) |
| Iodine | अद | (द) | (सू) |
| Iridium | ऐन्द्र | (ऐ) | (श्रो) |
| Iron, Ferrum | लोह | (लो) | (श्री) |
| Krypton | क्रिस | (क्री) | (*) |
| Lanthanum | लंथन | (लंथ) | (टे) |
| Lead, Plumbum | सीस | (स) | (दो) |
| Lithium | ग्राव | (ग्रा) | (क) |
| Magnesium | मग्न | (म) | (ज) |
| Manganese | मंगल | (मं) | (शी) |
| Mercury, Hydrargyrum | पारद | (पार) | (जो) |
| Molybdenum | मोलद | (मो) | (रू) |
| Neodymium | न्योदिम | (न्यो) | (*) |
| Neon | न्युन | (न्यु) | (*) |
| Nickel | निकिल | (नि) | (श्लि) |
| Nitrogen | नत्र | (न) | (प) |
| Osmium | ओस्म | (ओ) | (श्वो) |
| Oxygen | प्राण, अम्लजन | (प्र) | (र) |
| Palladium | पलाद | (प) | (श्लू) |
| Phosphorus | स्फुर | (स्फु) | (व) |
| Platinum | प्लातिन | (प्ला) | (श्ले) |
| Potassium, Kalium | पालाश | (पा) | (की) |
| Praseodymium | प्रास्युदिन | (प्रास्यु) | (*) |
| Radium | रद | (रद) | (*) |
| Rhodium | न्हद | (न्ह) | (श्रू) |
| Rubidium | रूपद | (रू) | (क्रू) |
| Ruthenium | रुथेन | (थे) | (श्रू) |
| Samarium | सामर | (साम) | (*) |
| Scandium | स्कन्द | (स्क) | (टी) |
| Selenium | सोम | (सो) | (*) |
| Silicon | सिक | (सि) | (द) |
| Silver, Argentum | रजत | (र) | (गू) |
| Sodium, Natrium | सिंधु, सिंध | (धु) | (ग) |
| Strontium | स्रांत | (स्र) | (चू) |
| Sulphur | गंध (गंधक) | (ग) | (ल) |
| Tantalum | तंतल | (त) | (पो) |
| Tellurium | भौम | (भौ) | (लू) |
| Thallium | थाल्ल | (था) | (डो) |
| Thorium | थुर | (थु) | (ता) |
| Thulium | थुल | (थुल) | (*) |
| Tin | वंग | (व) | (द्व) |
| Titanium | तितन | (ति) | (*) |
| Tungsten, Woe franium | तुंगस्थ | (तु) | (रो) |
| Uranium | वरुण | (ण) | (रा) |
| Vanadium | वनाट, बनाट | (व) | (वि) |
| Xenon | झेन | (झे) | (*) |
| Ytterbium | यितर्ब | (यित) | (टो) |
| Yttrium | यित्र | (यि) | (द्रू) |
| Zinc | जशद (यशद) | (जश) | (*) |
| Zirconium | जिर्कन | (जि) | (तू) |

रसायनशास्त्रांत खालीं दिलेल्या उपसर्गांची व तद्धित प्रत्ययांची सदोदित जरूरी लागते.

An- अन् (An-hydride अनार्द्र, निरुद)
-Ate इत (Nitrate नत्रित. Hydrate आर्द्र, सोद उज्जित).
-Ide इल, इद (Oxide प्राणिल. Hydride उज्जिल-द).
-Ite आयित (Nitrite नत्रायित).
Per- परि (Perchloride परिहरिल).
Hypo- अधि (Hypophosphate अधिस्फुरित).
Meta- मित (Metaphosphite मितस्फुरायित).
Pyro- मध्य (Pyrophosphate मध्यस्फुरित).
Artho- ऋजु (Arthophosphate ऋजुस्फुरित).
-Ous (Ferrous oxide लोहप्राणिल).
-ic क (Ferric oxide लोहकप्राणिल).
-ation ता.
-oid ओद, कल्प, अनु (Alkaloid क्षारकल्प, अनुक्षार).
-ine ईय (Alkaline क्षारीय, सक्षार).
Penta- पंच (penta-oxide पंचप्राणिल).
Hepta- सप्त (Hepta-oxide सप्तप्राणिल).
Sub- उप (Sub-oxide उपप्राणिल).
Be- प्र, वि.
-mylइल.
Hexa- षट्‌ (Hexa-oxide षट्‌प्राणिल).
Mono- एक (Mono-oxide एकप्राणिल).
Di- द्वि (Di-oxide द्विप्राणिल).
Tri- त्रि (Tri-oxide त्रिप्राणिल).
Tetra- चतुर (Tetra-oxide चतुर्प्राणिल).
Proto- प्रति (Protoxide प्रतिप्राणिल).
Super- अति, उपरि (Super-oxide अतिप्राणिल).

### इतर सदोदित येणारे शब्द.

acid अम्ल.
Base भस्म.
Salt लवण.
Alkali क्षार.
Radical मूलक.
Atom परमाणु.
Molecule अणु.
Element मूलतत्व.

### स्पष्टीकरण.

मूलतत्वांच्या नांवांवरून साधलेले पारिभाषिक शब्द वापरण्यास सुलभ पडावेत म्हणून मूलतत्वांचीं नांवें होतील तितकीं लहान करण्याचा प्रयत्न केला आहे, व हीं नांवें ज्या पद्धतीवर बसविलीं आहेत त्या पद्धतीचे नियम पुढें दिले आहेत:—

नियम पहिला.—नामसंख्या नऊ. स्वर्ण (सुवर्ण), रजत, ताम्र, सीस, लोह, वंग, जशद (जस्त), गंध (गंधक), पारद हे जुने सर्वांना माहीत असलेले शब्द जसेच्या तसेच ठेविले आहेत.

नियम दुसरा.—नामसंख्या चार. जीं इंग्रजी नांवें स्थलांवरून पडलीं आहेत. तीं संस्कृत व्याकरणाच्या नियमांशीं जुळविण्यास थोडींशीं बदलून तशींच ठेविलीं आहेत. जसें, Strontium = स्त्रान्त (स्त्रंते भवः, स्त्रंतदेशांत सांपडलेला). त्याचप्रमाणें गाल्ल, शार्मण्य, नार्व.

नियम तिसरा—नामसंख्या दहा. कांहीं ठिकाणीं इंग्रजी शब्दांचें संस्कृत भाषांतर केलें आहे; जसें, Lithium (Gr. *lithos*, stone.) ला 'ग्राव' हें नांव योजिलें आहे. ह्याच रीतीनें सोम, ऐंद्र, वनाट, श्रीक, वरुण, भार, सौर, (उदज) उज्ज, भौम, हीं नांवें योजिलीं आहेत. पुढें कोशांत ज्या ज्या ठिकाणीं तीं द्यावीं लागतील तेथें तेथें त्यांचें स्पष्टीकरण आह्मी करणार आहों.

नियम चवथा—नामसंख्या अकरा. कांहीं मूलतत्वांचीं नांवें त्यांपासून होणाऱ्या अतिशय प्रसिद्ध अशा संयुक्त पदार्थांच्या नांवांतील (क, १) क्रियावाचकधातूवरून किंवा (क, २) मूल नामावरून, किंवा (ग) त्या पदार्थांचा प्रधानधर्म दाखविणाऱ्या शब्दांतील क्रियावाचकधातूवरून ठरविलीं आहेत :—

क. (१) अंजनाचा मुख्य घटक Antimony ही धातु आहे, म्हणून Antimony ला अंज हें नांव योजिलें आहे. Antimony ही धातु अविकृत असल्यामुळें अंज् ही क्रियापदधातु अविकृत ठेविली आहे. व्यवहाराच्या सोईकरितां अंज् हा व्यंजनांत शब्द अंज असा स्वरान्त लिहिला आहे. ह्याच नियमानें स्फट, टंक, खट, सिक, हे शब्द योजिले आहेत. स्फट (Aluminium) ही स्फटिकी (Alum) चा मुख्य घटक आहे. टंक (Boron) ही टांकणखारा (Borax) चा मुख्य घटक आहे. Silicon (सिक) हा सिकतेचा मुख्य घटक आहे. स्फट्, टंक् आणि सिक् हे स्फटिकी, टंकण, आणि सिकता ह्यांतील क्रियापदधातु असल्यामुळें स्फट, टंक आणि सिक हीं नांवें आह्मीं योजिलीं आहेत. व ह्याच धोरणाला अनुसरून खट शब्दाची योजना केली आहे. खट (Calcium) हा खटिके (chalk) चा मुख्य घटक आहे.

क. (२) सैंधव हा शब्द सिंधु शब्दापासून झाला आहे, व वैदूर्य हा शब्द विदुर शब्दापासून झाला आहे. सिंधु किंवा सिंध )Sodium) हें मूलतत्व सैंधवाचा मुख्य घटक आहे; म्हणून सिंधु किंवा सिंध हें नांव Sodium ला योजिलें आहे; त्याचप्रमाणें Beryllium (विदुर) हें मूलतत्व (Beryl) वैदूर्यांचा मुख्य घटक आहे, म्हणून Beryllium ला विदुर हें नांव योजिलें आहे.

(ग) Bromine पासून झालेल्या Bromide चा धर्म ज्ञानतंतूंच्या क्रियेचें "स्तंभन" करण्याचा आहे. म्हणून Bromine ला स्तंभ हें नांव योजिलें आहे. ह्याच नियमानें अद, प्लव, हे शब्द ठरविले आहेत. मग्न हा शब्द ह्याच नियमाखालीं घालतां येईल.

नियम पांचवा-नामसंख्या चार. प्राण, नत्र (न त्रायते इति), हर, आणि स्फुर. हे शब्द Oxygen, Nitrogen, Chlorine आणि Phosphorus ह्यांना त्यांच्या स्वतःच्या प्रधान धर्मांवरून आम्हीं योजिले आहेत.

नियम साहावा-नामसंख्या एक. ('पलाशस्य इदं' इति.) पालाश हा शब्द Potassium ला योजिला आहे. कारण Potassium हें पलाशाच्या किंवा पानांच्या राखेपासून निघतें.

नियम सातवा—नामसंख्या तीन—कांहीं पण अगदींच थोड्या ठिकाणीं इंग्रजी नांवांच्या लॅटिन किंवा ग्रीक धातूंना संस्कृत वर्णोच्चाराचें रूप देऊन तेच धातुशब्द कायम केले आहेत; जसें, Chromium (Gr *chrome*, colour) चें क्रुम हें नांव ठेविलें आहे. त्याचप्रमाणें कर्ब आणि काद्म हे शब्द योजिले आहेत.

नियम आठवा—नामसंख्या चवतीस. इंग्रजी शब्दांना फक्त संस्कृताचें वर्णोच्चाररूप दिलें आहे; जसें, आर्गन, बिस्मत, श्याम, कोबल्ट, कोलंब, अर्ब, गादोलिन, इंद, क्रिप्त, लंथन, मंगल, मोलद, न्योदिम, निकिल, ओस्म, पलाद प्लातिन, प्रास्युदिन, रद, र्‍हद, रूपद, रुथेन, सामर, स्कंद, तंतल, थाल्ल, थुर, थुल, तितन, तुंगस्थ, झेन, यितर्ब, यित्र, आणि जिर्कन.

नियम नववा—नामसंख्या एक. ताल. हरतालासाठीं संस्कृतांत ताल हा शब्द वापरतात. हरतालाचा मुख्य घटक जें Arsenic नांवाचें मूल तत्व त्यालाही आम्हीं 'ताल' हाच शब्द योजिला आहे. कारण त्यापेक्षां ज्यास्त लहान शब्द करणें शक्य नाहीं.

मूलतत्वांच्या रासायनिक संज्ञा.—बहुतेक ठिकाणीं त्या त्या शब्दाचें पहिलें अक्षर योजिलें आहे. कांहीं ठिकाणीं दुसरें किंवा तिसरें अक्षर योजिलें आहे. कांहीं ठिकाणीं पहिलीं दोन्हीं अक्षरें ठेविलीं आहेत.

* भारसंज्ञापद्धति.-ही संज्ञापद्धति निरनिराळ्या तत्वांच्या परमाणुभारांकास धरून बसविली आहे. ज्या ठिकाणीं ह्या पद्धतीप्रमाणें वर अमुक एक द्रव्यापुढें संज्ञा लिहिलेली नाहीं तीपुढें Periodic शब्दाखालीं ह्या पद्धतीवरून ठरविलेल्या संज्ञाकोष्टकांत आम्ही देणार आहों. वर दिलेली क (Lithium), ग (Sodium), कि (Potassium), गि (Copper), कु (Rubidium), गु (Silver), के (Cæsium), गो (Gold) हीं एकाच समानगुणधर्मांच्या वर्गाचीं आहेत, व त्यांच्या संज्ञा क वर्गातील अक्षरांनीं ठरविल्या आहेत. ज्यास्त माहितीकरितां Periodic शब्द पाहा.

Chemolysis (ke-mol'i-sis) [Chemical & Gr. *lysis*, a loosening.] *n. decomposition of organic substances into more simple bodies by the use of chemical agents alone* रसक्रियामात्रपृथक्करण *n*, रासायनिक कार्यकारीद्रव्यांच्याच योगानें केलेलें सेंद्रिय पदार्थांचें पृथक्करण *n*.

Chemosmosis (kem'-oz-mō-sis) [Chemical & Gr. *osmosis*, which see.] *n. a. chemical action taking place through an intervening membrane* मध्यस्थित अंतर्त्वचेच्या द्वारें होणारी रासायनिक क्रिया. Chemosmot'ic *a.* मध्यस्थित अन्तर्त्वचेच्या द्वारें होणाऱ्या रसायन क्रियेसंबंधीं.

Chenille (she-nēl') [Fr. a caterpillar.) *n.* स्त्रियांच्या पोशाखाकरितां-कशीद्याकरितां अथवा झालरीकरितां रेशीम वगैरेचा झुबकेदार दोरा.

Chenomorphæ (kē'no-mor-fi) [Gr. *chyn*, the wild goose, and *morphe*, form.] *n. zool.* राजहंस-हंस-सारस-बदकें इत्यादि पक्ष्यांची जाति *f*, हंसजाति *f*.

Cheque, Check (chek) [vide Check.] *n. an order for money* (दाखविल्यावरोबर पैसे देण्यासाठीं) सावकारावर-पेढीवर चिट्ठी *f*, चेक *m*, चक *m*, हुंडी *f*, दर्शनी हुंडी *f*. Cheque-book *n.* हुंडीच्या तक्त्यांचें पुस्तक *n*, चकबुक *n*. Cheq'uer, Check'er *n.* चौपट *m*, पट *m*, रंगीबेरंगी पट *m*. २ *pl.* पटावर खेळणारी मंडळी *f*. ३ पैशांचा पटावरील खेळ *m*. ४ चित्रविचित्र काम *n*. C. *v. t. to variegate, to diversify* रंगीबेरंगी करणें, जाळीदार-खिडकीदार करणें, नानाप्रसंगयुक्त करणें, निरनिराळ्या प्रसंगांनीं चित्रविचित्र करणें. Chequered, Checkered *a.* चित्रविचित्र रंगविलेलें, रंगीबेरंगी, चित्रित, जाळीदार, कर्बुरित, खिडकीदार. २ नानाप्रसंगयुक्त. Chequer-work *n.* (निरनिराळ्या रंगांचें) चित्रविचित्र काम *n*. Blank cheque *n.* (पैशाचा आंकडा न घालतां) सही केलेली कोरी हुंडी *f*. Cross,- Crossed cheque *n.* आडव्या किंवा उभ्या रेघा मारलेली हुंडी *f*, चेक *m*. (ज्या हुंडीवर ती एखाद्या दुसऱ्या पेढीवाल्याच्या मध्यस्थीनें वटवावी हें दर्शविण्याकरितां) दोन आडव्या किंवा उभ्या रेघा मारलेल्या असतात अशी हुंडी *f*. Cheque to bearer ज्याच्या हातीं असेल त्याला पैसे घेऊं देणारा चेक *m*. Cheque to order नोंदलेल्या मनुष्यास व त्याच्याच वतीच्या दुसऱ्या मनुष्याला पैसा घेण्याचा हक्क देणारा चेक *m*.

*N. B.*—Cheque हा इंग्रजी पद्धतीनें चालणाऱ्या पेढीवर किंवा ब्यांकेवर देतात. चेक दाखविल्याबरोबर पैसे मिळतात. हुंडी चेकाहून भिन्न आहे. ज्याच्यावर हुंडी केलेली आहे त्याला ती हुंडी दाखविली असतां तो ज्याला पैसे भरावयाचे आहेत त्याचेकडे नेऊन भरतो. हुंडीचे पैसे चेकासारखे रुजू केल्याबरोबर ताबडतोब मिळत नाहींत.

Cherif (sher'if) *n.* मक्का येथील शेरीफ *m*. २ काजी *m*.

Cherish (cher'ish) [M. E. *cheriss,–isch*, from Fr. *cheris*, from Fr. *cherir*, to cherish or to hold dear from *cher*, dear. ह्या शब्दाचा मूळ अर्थ लडिवाळणें, ममतेनें वाढविणें असा आहे.] *v. t. to treat with fostering care, to nurse* (as children, young creatures) प्रेमानें-काळजीनें वाढविणें-संवर्धन करणें. २ (as hair) वाढविणें. ३ *fig.* वाढविणें, पोसणें; as, "That I should C. that which bears but bitter fruit." ४ (आशा-कल्पना-हौस-द्वेष) मनांत पोसणें-ठेवणें-बाळगणें. The last is the most frequent current sense. Cher'isher *n.* वाढवणारा, संवर्धन करणारा, पालक, पालनकर्ता. २ मनांत बाळगणारा. Cherishing *n.* पाळणें *n*, पालन *n. pop.* पाळण *n*, प्रतिपाल *m*, प्रतिपालन *n*, Cher'ishment *n.* संवर्धन *n*, &c.

Cheroot (she-rōōt') [Tamil. *suruttu*, a roll of tobacco, from verb *suruttu*, to roll.] *n.* निवळ तंबाकूचीच विडी *f*, चुट्टा *m*, चिरूट *m*.

Cherry (cher'i) [M. E. *cheri*.–O. Fr. *cerise*—L. *cerasus*, a cherry-tree.—Gr. *kerasos*, a cherry-tree.] इंग्लंडांतील चेरी नांवाचें फळ *n*. २ चेरी नांवाचें झाड *n*. ३ चेरी नांवाच्या झाडाचें लांकूड *n*. ४ चेरीफळाच्या रसाचें व मद्यार्काचें मिश्रपेय *n*. C. *a.* तांबूस; as, C. cheeks or lips. Cherry-pepper *n.* एक प्रकारची मोंगली मिरची *f*. Cherry-stone चेरीफळाची कठीण बी-आठी *f*.

Chersonese (ker'so-nēz) [Gr. *chersos*, land & *nesos*, an island.] *n.* द्वीपकल्प *n*.

Cherub (cher'ub) [Heb. *kerub* (*pl.* k'ruvim), a mystic figure.] *n. pl.* Cherubs, Cherubim, Cherubims स्वर्गदूत, देवदूत, दिव्यदूत, केरुबीन. २ रूपवान् मूल *n*, खुबसुरत मुलगा *m*.

Chess (ches) [O. E. *ches*, Fr. *echecs*, *pl.* of *echec*, pers. सत्‌रंज्, from O. Pers. चत्‌रंग्, Sk. चतुरंग, *lit.* 'the four अंगज् or members of an army (elephants, horses, chariots, foot-soldiers).'] *n.* बुदबळांचा खेळ *m*, बुदबळें *n. obs.* सतरंग(ज) *m*. To play at C. बुदबळानें खेळणें, बुद्धिबळें खेळणें. [SOME OF THE TERMS USED AT THE GAME OF CHESS AMONG THE HINDUS ARE उपरप्यादी, काडशह, घोडगांठ, घोडमात, घोडशह, जोरी, तिजोरी(र), दुजोर-रा, प्यादी, प्यादेमात, फरजी, बळाचा, बळी, बुरजी, भरडाव, शैली, शैलीबाजी, सबळी, हस्त, हस्तपगदस्ती, हुचमछी.] २ *bot.* चेस नांवाचें गवत *n*. Chess-board *n.* पट *m*, चौपट *m*. Chessman *n.* मोहरी *f*, प्यादें *n*, बुदबळें *n*. Each player has a king राजा, a queen वजीर or फर्जी, two bishops उंट, two knights घोडे, two castles हत्ती, and eight pawns प्यादीं. *pl.* Chessmen.

Chest (chest) [O. E. *chest*, A. S. *cyst*.—L. *cista*.—Gr. *kiste*, a box.] *n.* संदूक *f*, पेटी *f*, हडपा *m*, पेटारा *m*. [C. OF DRAWERS खणांची पेटी *f*.] २ (of the body) छाती *f*, वक्षःस्थळ *n*, उरःस्थल *n*, कडणी(?) *f. pl.* कडसण्या(?) *f. pl.* [PAIN IN THE C. उरोग्रह *m*, उरोवेदना *f*, छातींत दुखणें *n*. BROAD-CHESTED व्यूढोरस्क, वृषस्कंध, रुंद छातीचा.] ३ (*obs.*) कफन *n*. ४ शव-प्रेत नेण्याची पेटी *f*. ५ पेटीभर माल *m*. ६ *com.* बारदान *n*. C. *v. t. to*

*deposit in a chest* (पेटींत) संचय करणें, सांठवणें. Chested *a.* छाती असलेला. Chest-foundered *a.* उरीं भरलेला,-गेलेला-फुटलेला. [To be C. उरीं भरणें.] Chest-note *n.* खोल आवाज *m-* स्वर *m.*

Chest-nut, Ches-nut (ches'nut) [For *chesten-nut*, O. E. *chestein*, *chesteigne*.—O. Fr. *chestaigne*.—L. *castanea*, the chest-nut tree, from Gr. *kastanon*, from *Castana*, in Pontus, where this tree abounded.] *n.* (fruit) चेस्नट नांवाचें काळसर लाल फळ *n.* २ (tree) चेस्नट नांवाचें झाड *n.* ३ चेस्नट झाडाचें लांकूड *n.* ४ (घोड्याच्या पायांच्या आंतल्या बाजूस वर आलेलें) चेस्नट फळासारखें हाड *n.* ५ चेस्नट फळाच्या रंगाचा, काळसर-तांबूस रंगाचा घोडा *m.* ६ तांबूस पिंगट रंग *m*, अळीत्याचा रंग *m.* ७ *slang* मस्करीची गोष्ट *f.* C. *a.* कस्तानी, काळसर तांबूस रंगाचा, तेल्याकुमाईत.

Cheval-de-frise (sheval'-de-frēz) [Fr. *lit.* 'horse of Friesland'; because first employed by the Frisians in their struggles for freedom during the latter half of the 17th century to supply their want of cavalry]. *n.* भाल्यांचें आडण *n*, घोडे *m*, लोखंडी किंवा लांकडी तुळयांमधून आरपार व तिरकस भाल्यांच्या टोंकांच्या कांबी किंवा काठ्या लावून अरुंद रस्त्यानें येणाऱ्या शत्रूचा अटकाव करण्याकरितां किंवा मोरचेबंदींतील फटी बुजवण्याकरितां केलेली योजना *f.* २ भिंतींतून वर आलेले भाल्यासारखे लोखंडी गज, शतघ्नी ? कारलें ? *pl.* Chevaux-de-frise.

Cheval'-glass (sheval'-glāss) [Fr. *cheval*, a horse & Glass]. *n.* चौकटींत बसविलेला मोठा झुकता आरसा *m.*

Chevalier (shev-a-lēr') [Fr. *cheval*, Sk. अश्व, a horse. See Cavalier.] *n.* शिलेदार *m*, घोडेस्वार *m*, सरदार *m*, शूर शिपाई *m.* २ स्त्रीप्रेमी (तरुण मनुष्य). Chevalier d'industrie *n.* ठक, लुचा, खिसेकातरू. The Chevalier St. George एडवर्डस्टुअर्टचें एक उपनांव. The Young Chevalier एडवर्डस्टुअर्टचा मुलगा चार्लस एडवर्डस्टुअर्ट *m.*

Cheverel (chev'ĕr-el) [Fr. *chevre*, a goat.] *n.* करडूं *n.* २ करडाचें मऊ कातडें *n.*. ३ *fig.* अतिकोमलता *f.* C. *a.* बकऱ्याच्या चामड्याचें बनवलेलें, चिवट. २ अतिकोमल, सौम्य; as, Cheverel conscience. Webster spells 'Cheverel' as 'Cheveril'.

Chew (chōō) [G. *kauen*, to chew.] *v. t. to masticate* चावणें, चर्वण करणें *g. of o.* २ *to roll in the mouth*, *to champ* चावणें, चघळणें. [To C. the cud रवंथ *n-* वागूळ *n.* करणें.] ३ *fig. to ruminate mentally, to meditate on* घोळणें, जपमाळ *f-*स्मरणी *f* घेणें *g. of o.*, *fig.* मनन करणें, एकाच गोष्टीविषयीं पुनःपुनः विचार करणें. ] C. *v. i. to ruminate upon* ध्यान *n.* करणें-लावणें. २ *to chew tobacco*, (तंबाखूची) गोळी चढविणें, चघळणें. C. *n.* चर्वण केलेला पदार्थ *m.* २ *spec.* तंबाखूचा वार *m.* Chewing *n.* (v. V. T. 1.) *n.* चघळणें *n*, चर्वण *n.*

Chicane (shi-kān') [Fr. *chicane*, *chicanerie*, orig. a kind of game and the manoeuvres in playing it, from Per. *chaugan*, a club or bat, the game of golf played on horse-back, polo.] *n. the use of artful subterfuge, designed to draw away attention from the merits of a case or question specifically applied to a legal proceeding, trickery, sophistry* छक्केपंजे *m. pl.*, डावपेंच *m. pl*, पेंचपांच *m. pl.* २ गारूड*n*, गौडबंगाल करणें *n.* Chicā'ner *n.* छक्केपंजे करणारा. Chica'nery *n.* same as Chicane. Chicaning *n.* डावपेंच *m.*

Chiccory, vide Chicory.

Chick (chick) [Fr. *chiche*, *pois cheche*, the dwarf-pea, from L. *cicer*, the chick-pea.] *n.* लहान वाटाणा *m*, *pl.* Chicks. C. *v. i. to germinate* अंकुर-मोड येणें, रुजणें.

Chick (chik) [O. E. *chykkyn*, cf. E. *chicken.*] *v. i.* अंकुर येणें, रुजणें.

Chick (chik) [A. S. *cicen*, *cycen*, dim. of *coc*, the cock.] *n.* कोंबडीचें पिलूं *n*, (R) कोणत्याही पक्ष्याचें पिलूं *n.* २ मूल *n*, अर्भक *n.* Chicka'-biddy, Chick'a-did'dle *n.* हीं प्रेमाचीं नांवें लहान मुलांना उद्देशून वापरतात. Chick'en *n.* कोंबडीचें पिलूं *n.* २ मूल *n*, अर्भक. [या शब्दाचा उपयोग मुलीकडे करितात; as, She is no chicken.] ३ कोंबडीच्या पिलाचें मांस *n.* ४ भित्रा-भेकड-मनुष्य *m.* Chicken-broth *n.* कुक्कुटमांसरस *m*, कोंबड्याच्या मांसाचा रसा *m.* Chicken-heart *n.* भित्रा मनुष्य, भित्रेपणा *m.* Chicken-hearted *a.* भितरा, भ्याड. Chicken-pox *n. pl. med.* कांजण्या *f. pl.* [A pox of it कांजणी *f.* ] Chickling *n.* कोंबडीचें पोर *n-* पिलूं *n.* Chick-weed *n.* पक्ष्यास घालण्याचें एक प्रकारच्या गवताचें वीं व पानें. No chicken बाल्यावस्थेंत नाहीं असा. To count chickens before they are hatched cf. बाजारांत तुरी आणि भट भटणीला मारी.

Chick-pea (chick'-pē) [L. *cicer*, & Pea.] *n.* लहान वाटाणा *m*, चणा *m.*

Chicory (chik'ō-ri) [Fr. *chicoree*.–L. *cichorium*, from Gr. *kichorion*, chicory.] *n. the popular name of a composite plant, common in England with a fleshy tapering* काफीच्या ऐवजीं वापरतां येणारें चिकोरी नांवाचें फळ *n.* २ चिकोरी फळाचें झाड *n.*

Chide (chīd) [A. S. *cidan*, to chide.] *v. t. to scold*, *to reprove*, *to rebuke* रागें भरणें, बोडंती करणें, पूजा करणें, बोलणें, खरडपट्टी काढणें. २ तोंडची शिक्षा देणें. ३ *fig. to be noisy about* भोंवतालीं गोंगाट करणें; as, "The sea that chides the banks of England." C. *v. i. to contend angrily, to find fault* दोष काढणें; as, "Wherefore the people did chide with Moses!" २ भांडणें, कज्जा करणें. ३ *to make a clamorous noise* गोंगाट करणें; as, A chiding flood. C. *n.* (R) खडखडाट,

खणखणाट. Chiding *pr. p.* Chid, Chode (*obs.*) *pa. t.* Chid, Chidden *pa. p.* Chid'er *n.* भांडखोर, भांडणारा, कज्जेदलाल, &c.

Chief (chēf) [O. E. *chief, chef.*—O. Fr. *chief* (Fr. *chef*).—L. *caput*, the head.] *a. head, principal* मुख्य, प्रथम, पहिला, आदि, आदिम, मुखर, अग्रगण्य, अग्रणी, अग्र्य, अग्रगामी, अग्रेसर, श्रेष्ठ, उत्तम, परम, प्रधान, प्रमुख, प्रवर, विनीचा, खासा, वर, and वर्य (in comp.; as, द्विजवर्य, गुरुवर्य, नरवर्य), सिंह (in comp.; as, पुरुषसिंह, नरसिंह, वीरसिंह). २ (*obs.*) अगदीं जवळचा, सलगीचा, जिवलग; as, "A whisperer separateth C. friends." Chief *n.* सरदार *m*, नायक *m*, अधिपति *m*. २ ग्रामणी *m*. ३ *the most valuable portion* मोठ्या किमतीचा भाग *m*- अंश *m*. Chief, Chiefly *adv.* (v. A.) मुख्यत्वेंकरून, प्राधान्येंकरून, विशेषेंकरून, बहुतकरून, मुख्यशः, प्राधान्यतः, विशेषतः, फार करून, बऱ्याचशा-पुष्कळशा प्रमाणानें. Chief-baron *n.* एक्सचेकर कोर्टाचा मुख्य न्यायाधीश *m*. Chief'dom *n.* Chief'ship *n.* Chief'tainry *n.* सरदारी *f*, सरदारकी *f*, नायकी *f*, नाईकपणा *m*. Chief'tain *n.* सरदार *m*, नायक *m*, अधिपति *m*. Chief'ess *n. fem.* मुख्याधिकारीण *f*. २ मुख्याधिकारिणी *f*. (मुख्याधिकाऱ्याची बायको नव्हे). The Chief Justice *n.* सरन्यायाधीश *m*. Chief'less *a.* पुढाऱ्याशिवाय, नायक नसलेला. Chief'ry *n.* स्वामित्व *n*, राजभाग *m*, प्रजेकडून राजाला मिळणारी वृत्ति *f*, (मालकाला किंवा प्रभूला दिलेला) स्वामित्वाचा पैसा. Chief'tainess *n. fem. a female chieftain*; सरदारीण *f*. Chief'taincy *n.* सरदारी *f*, आधिपत्य *n*. In chief पहिल्या प्रतीचा,-वर्गाचा; as, Tenants-in-Chief मुख्य कुळें. Commander-in-chief मुख्य सेनापति *m*.

Chilblain (chil'blān) [Chill & Blain.] *n. an inflamed sore on the hands or feet, produced by cold* थंडीची भेग *f*- चीर *f*, (तळपायाची) विपादिका *f*; [TO BE AFFECTED WITH C. (A LIMB) थंडीनें फुटणें.] २ थंडीकातरा *m*, थंडीनें होणारा त्वग्विकार *m*. C. *v. t.* कातरा पडणें.

*N. B.*—Chilblain is not जाळवात.

Child (chīld) [A. S. *cild*, a child, *pl. cildren*, afterwards *cildre, childre*, to which *n.* another plural termination was added.] *n.* लेंकरूं *n*, मूल *n*, पोर *m, f, n*, पोरगा *m*- (गी *f*. गें *n*.), संतान *n*, बाल *n*, बालक *m. n*, अपत्य *n*, शिशु *m*, अर्भक *m, n*. (अर्भकी *f*.), बचडा *m*- (डी *f*- डें *n*.) (past child-hood but not sufficiently grown up), पोरसौदा. [C. (carelessly, generally, &c.) लेंकपूत *m*, लेंकबाळ *n. m*, मूलबाळ *n*, पोरसोर *n*, पोरबाळ *n*, पोरजिन्नस *m. f.*—in endearment बाबा, बा *m*, बाबा (ठ्या), छावडें *n*, छावडा (डी *f*, डें *n*.), छकडें *n*, बचडा *m* or डें *n*, बाबला or ल्या *n*, चिमुकला, तानुला, वत्स *m, n*, सोनकुला *m*, सोनक्या *m*, सोनटका *m*, सोना or न्या *m*, बेटा *m*, to a female C. बया *f*, बाबी, बचडी *f*; in anger or contempt, as *brat, imp.*, &c. पोरटा *m*. (टी *f*- टें *n*.), कारटा *m*. The last child of one's old age शेंडफळ *n*, शेंडेफळ *n*, सरत्या पालवाचें मुलगें *n*. C.'s. play बालक्रीडा *f*, बाललीला *f*, बालचरित्र *n*, बालचरित *n*. C.'s speech बालभाषा *f*. Dotingly fond of children पोरपिसा. Extravagant fondness for children पोरपिसें *n*. Spoiled child ढुघखुळा, लाडानें बिघडलेला मुलगा *m*, लाडोबा. Better no child than a bad child कुसंतानापेक्षां निसंतान बरें. To be with C. पोटासी-गर्भार-&c. होणें-राहणें. Children मुलेंबाळें *n. pl.* पोरेंबाळें *n. pl*, मुलें लेंकरें *n. pl*, लेंकरूंबाळ *n*, चिलीं पिलीं *n. pl*; कच्चेबच्चे *m. pl*, चेंडळ मेंडळ *n*, पोरें सोरें *n. pl*, बालापत्य.] २ मूल, बाळ. ३ बेटा. ४ प्रजा *f*, संतति *f*; as, The children of Manu. ५ *pl.* पुढील पिढी, पुत्रपौत्र. ६ अस्सल घराण्यांतील ज्वान सरदार (in ballads). Sometimes Childe and Chylde; as, Childe Harold. ७ (*Shakes.*) मुलगी *f*; as, 'A boy or a child, I wonder.' ८ तत्संभूत. Child *v. i.* (*obs.*) जन्मणें. C. *v. t.* जन्म देणें. Child-bearing, Child-birth, Child-bed *n.* *the state of being in labour, also the act of bringing forth* बाळंतपण *n*, बाळंतदशा *f*, प्रसूतिदशा *f*, प्रसवावस्था *f*, प्रसव *m*, प्रसूति *f*. [Easy C. सुखप्रसव *m*. Pains of C. गर्भवेदना *f*, प्रसववेदना *f*, प्रसूतिवेदना *f*. Woman after C. (just delivered) बाळंत *f*, बाळंतीण *f*, प्रसूतिका *f*, सूतिका *f*. Woman in C. कोनीं निघालेली स्त्री *f*. Chamber for or of a woman in C. बाळंतखोली *f*, बाळंतघर *n*. Disease incidental to a woman in C. बाळंतरोग *m*, स्त्रीरोग *m*. Foul clothes of a woman in C. बाळंतें *n*, बाळवतें *n*. Belonging to a C. बाळंतप्रकरणाचा, प्रासूतिक.] Child-crowing *n.* *med.* शब्दनलिके (the larynx) च्या स्नायूंच्या अचक्यामुळें लहान मुलाचा कोंबड्यासारखा आवाज *m*. Childed *a.* Childhood *n.* बाळपण *n*, लेंकुरपणा *m*, पोरपण *n*, लहानपण *n*, बाल्य *n*, बाल्यावस्था *f*, कौमार्य *n*, शैशव *n*, शिशुत्व *n*. २ आरंभ *m*; as, The C. of our joy (*Shakes.*) [Second C. म्हातारपणांतलें पोरपण -तील पोरचेष्टा, म्हातारचाळे cf. साठी बुद्धि नाठी *n*. Practised or versed in something from C. बालाभ्यासी. Childing *a.* (*Shakes.*) प्रसवणारी. Child'ish *a.* पोरकट, पोरवट, लेंकुरवट, बालबुद्धि, पोरबुद्धि, लेंकुरबुद्धि, पोरस्वभावाचा. २ (of things) पोरबुद्धीचा, पोरसमजुतीचा, पोरस्वभावाचा, पोरपणाचा. Child'ishly *adv.* Child'ishness *n.* (used in a bad sense) पोरकटपणा *m*. Child'likeness *n.* (almost always in a good sense) लेंकुरपणा *m*, लेंकुरस्वभाव *m*, लेंकुरछंद *m*, लेंकुरसमजूत *f*, लेंकुरबुद्धि *f*, पोरपणा *m*, पोरसमजूत *f*, पोरखेळ *m*, पोरबुद्धि *f*, पोरस्वभाव *m*, बालबुद्धि *f*. Child'ness *n.* पोरपणा *m*, लेंकुरपणा *m*. Child'less *a.* असंतान, असंतति, अनपत्य, अपत्यहीन, संतानशून्य, &c. A childless woman अप्रसूत, वांझ, वांझोडी, वंध्या. Child'lessness *n.* अनपत्यता, निसंतानता *f*. Child-like *a.* मुलासारखा, बालसदृश,

बाळासारखा, पोरसौदा. २ साधा, सरळ, लेंकुरबुद्धीचा. A child-wife पोरवयांत लग्न झालेली बायको.

Childermas-day (chil'dėr-mas-dā) [ A. S. *cild*, a child, *mæsse*, mass & *dæg*, day.] *n.* 'निर्दोषांचा' दिवस *m.* हेरॉड यानें ता० २८ डिसेंबर रोजीं ठार मारलेल्या मुलांची स्मारक तिथि *f.* Also called the Holy Innocents' Day.

Chiliad ( kil'i-ad ) [ Gr. *chilioi*, a thousand.] *n. a period of a thousand years* सहस्र वर्षें. २ सहस्रपट, कोणत्याही वस्तूची हजारपट, सहस्रक *m,* सहस्र *m,* हजार. Chiliagon *n.* सहस्रकोनाकृति. Chil'iahēdron *n.* सहस्रभुजाकृति. Chilian, Chil'iarch *n.* सहस्रसेनानायक. Chil'iarchy *n.* सहस्रसेनानायकाचा हुद्दा *m,* सहस्रसेनानायकत्व *n.* Chil'iasm *n. the millennium* ख्रिस्त एक हजार वर्षें पृथ्वीवर राज्य करील असें मत. Chil'iast *n.* ज्याचें असें मत आहे तो.

Chill ( chil ) [ A. S. *cele*, chill. ] *n.* ( v. A. 1. ) सरदी *f,* शिळट (R) *f,* शिळटी (R) *f,* थंडी *f,* गारठा *m.* [ OF WHICH THE C. IS TAKEN OFF शिळबुडा, शिळमोडा, TO TAKE OFF THE C. OR TO LOSE ITS C. (-water) पाण्याचा कांटा *m.* मोडणें. ] २ *a chilly feeling* हिंव *n,* हिम *n,* हुडहुडी *f,* कुडकुडी *f,* रेपा *f. pl,* शैत्य *n.* [ CHILLS AND FLUSHINGS सरदगरमी. ] ३ *fig.* हर्षभंग-नाउमेद करणारी गोष्ट *f.* ४ थंड करून कठीण करणारा ओतकामाचा सांचा *m.* C. *a.* ( of the air or things ) सरद, शीतल, गार, हिम, थंड. २ ( of the feeling ) थंडावलेला, कुडकुडलेला, हिंव or हिंवकुडकुडी भरलेला. ३ *without warmth or cordiality, formal, distant* थंडाईचा, अनादराचा, बिनकळकळीचा; as, A C. reception. ४ हुडहुडी भरविणारा. ५ हिरमुसलेला, धैर्य खचलेला. C. *v. i. to be affected with cold* थंडी भरणें, हिंव येणें, हिंवणें, हिंवडणें. २ *to be chill-struck* (plants) शिळटणें. C. *v. t. to make chilly* सरदी-थंडी &c. करणें. २ *to dispirit* मोडणें, पाणी *n.* घालणें-ओतणें, हिरमोड *f,*—हिरसांड *f* करणें, नाउमेद करणें. ३ उष्णता एकदम कमी करणें ( of a piece of red-hot iron). Chilled *a.* थंड केलेला. २ थंड करून लोखंडाप्रमाणें कठीण केलेला-झालेला. ३ भग्नोत्साह *a.* Chilliness *n.* गारवा *m,* थंडी *f,* सरदी *f.* Chilling *a.* थंड, सरद *mech. eng.* ( थंड करून ) कडक करणें. Chill'iness *n.* Chilly *a.* थंड झालेला, हिंव भरलेला. Chill-casting. *mech. eng.* कडक करणें.

Chilli ( chil'li ) [ Sp. *chile*, the pods of Cayenne or Guiana pepper, vide Capsicum.] *n.* मिरची *f,* मिरशंग-शेंग *f. pl.* Chillies pounded into a mass तिखट *n,* ( *colloq. & fig.*) चाबूक *m.* Red Chillies pounded भगवती *f,* भसकापुरी *f.* Some other spellings of Chilli are Chili, Chilie & Chilly.

Chillum (chil'um) [ Hind. *chilam.* ] *n.* चिलीम *f.*

Chime ( chīm ) [ O. Fr. *cymbe*, *cymble.*—L. *cymbalum*, a cymbal.] *n.* (घंटांचा अथवा गायनवाद्यांचा) स्वरमेळ, ताळ( ल )मेळ *m,* समस्वर (*pop.*) समसूर *m.* [ C. BEATEN AT THE END OF A WATCH गजर *m,* (*v.* वाजणें, होणें.) CLOSING C. OR PEAL (AS, OF A चौघडा &c.) उतार *m,* उतारबाजी. ] २ देवळाच्या घुमटांत टांगलेल्या पुष्कळ घंटा *f. pl.* C. *v. i.* ताल मिळणें, जमणें. २ जम-मेळ बसणें, ( शीं ) संगत (S.) असणें ( followed by *in* or *in with* ). C. *v. t.* घंटांचा समनाद करणें. २ राग-ताल गाणें. ३ मंत्र म्हणण्याची वेठ मारणें.

Chime, Chimb ( chīm ) [ Ger. *kimme*, edge. ] *n.* लांकडाच्या पिपाची कोर *f*- कांठ *m.*

Chimera, Chimæra ( ki-mē'ra ) [ L. *chimæra*, from Gr. *chimaira*, a she-goat, a fabulous animal that vomited fire. ] *n. a fabulous or unreal thing* असंभवकल्पना *f,*—पदार्थ *m.* [ AS, वाळूचें तेल, सशाचें शृंग, आकाशपुष्प, कर्पूरभस्म, वंध्यापुत्र *m.*] २ *a monster represented as vomiting flames and as having the head of a lion, the body of a goat and the tail of a dragon* ज्याचें तोंड सिंहासारखें, धड बोकडासारखें व शेंपूट सापासारखें आहे असा ग्रीक लोकांच्या पुराणांतीं वर्णन केलेला तोंडांतून ज्वाला बाहेर टाकणारा प्राणी *m,* किमिरा नांवाचा राक्षस. Chimeric'-al *a.*(v. A.) *merely imaginary* असंभवकल्पनेचा, असत्कल्पनेचा, असत्कल्पनासिद्ध-जात-&c., मानसिक, काल्पनिक, कांदवरीय, असंभाव्य. Chimer'ically *adv.*

Chimney ( chim'ni ) [ Fr. *cheminee.*—L. *caminus*, a furnace, a fireplace.] *n. a vent for smoke* धुराडें *n,* धुराळें *n,* धूमनलिका *f,* धारें *n.* २ *a glass for the flame of a lamp* (दिव्याच्या वातीवर ठेवण्याची) कांचेची नळी *f,* चिमणी *f. pl.* Chimneys. Chimney-board *n.* चूल झांकण्याची फळी *f,* चुलीची झांकणफळी *f.* Chimney-can, C. -pot *n.* चिमणींत जास्त हवा खेळण्याकरितां तिला लाविलेला मोठा नळ *m.* Chimney-hook *n.* चिमटा *m.* Chimney-money *n.* चुलीवरील कर-पट्टी *f.* Chimney-piece *n.* घरांतील चुलीच्या धुराड्यावर बसविलेला नक्शीचा दगड-बांधकाम *n.* Chimney-shaft *n.* (छपरापेक्षां) उंच स्वतंत्र धुराडें *m.* Chimney-sweeper *n.* धुराडें झाडणारा *m.* Chimney-top *n.* धुराड्याचा घुमट *m.* Chimney-pot hat चिमणीसारखी उंच टोपी *f.*

Chimpanzee, Chimpansee ( chim-pan'-zē ) *n.* एक चिंपान्झी जातीचें वानर *n.*

Chin ( chin ) [ A. S. *cin*, akin to Dut. *kin*; Ger. *kinn*; Icel. *kinn*, cheek; L. *gena*; Gr. *genus*; Sk. हनु, the jaw. ] *n.* हनु ( न ) वटी *f,* हनु *f. colloq.* दाढी *f.* Chin-ache हनुग्रहवात *m,* हनुवात *m,* हनुदुःख *n.* The hollow above the chin बचाळी, बेचाळी *f,* बेंचाळें *n.*

China ( chīn'a ) *n. chinaware* चिनी काम *n,* चिनी भांडें *n.* China-clay *n.* (भांडीं करण्याची पांढरी ) चिनी माती *f.* China-fire *n.* एक प्रकारची उडवावयाची चिनी दारू *f.* China-grass *n.* चिनी गवत *n,* एक प्रकारचें चीन देशांतील गवत *n.* China-ink *n.* चिनी शाईच्या वड्या *f. pl,* काजळापासून केलेल्या शाईच्या वड्या, ह्या मुख्यत्वें

चीन देशांत तयार करतात. China-man *n.* चीनचा रहिवासी *m.* China-root *n. smilax china* चोव(प)चिनी *f.* China-rose *n.* शेवंती (?) *f.* China-shop *n.* चिनी भांडीं विकण्याचें दुकान *n.* China-ware *n.* चिनी मातीचें भांडें *n.* Chinee *n.* चिनी मनुष्य *m.* Chinese *a.* चीन देशासंबंधीं-चा. Chinese *n. sing. & pl.* चीन देशाचा मनुष्य. २ चिनी भाषा *f.*

*N. B.* Some propose शेवंती for China-rose and others जपाकुसुम for the same. We shall take up this point again under the word 'Rose.'

Chinchona, vide Cinchona.

Chincough ( chin'kof ) [For *chink cough*; *a chink, kink* is a catch in the breath. ] *n. whooping-cough* डांग्या खोकला.

Chine ( chīn ) [O. Fr. *eschine*, Fr. *echine*, from O. H. Ger. *skina*, a needle, a prickle. ] *n.* पाठीचा कणा *m*, कणा *m*, कण्याचा भाग *m.* २ जेवणाकरितां शिजविलेली जनवराची पाठ *f*, व तिच्या जवळील भाग *m.* C. *v. t.* कणा कापणें.

Chine ( chīn ) *n.* पिंपाची पाठ-धार *f.* C. *v. t.* कोर किंवा धार काढणें.

Chine ( chīn ), *vide* Chink 1.

Chink ( chingk ) [ A. S. *cinc*, fissure, chink, from *chinan*, to gape.] *n. f*, फट *f*, सापट *f*, चिरण *f*, चिलण *f*, संधि *m.* (*pop.*) सांदी *f*, सांधा *m*, चीर *f*, चील *f.* C. *v. i.* चीर पाडणें, भेगलणें. C. *v. i.* चिरणें, भेग पडणें. Chink'y *a.* चीर पडलेलें.

Chink ( chingk ) [ From the sound. ] *n.* खणखण आवाज *m* ( as, of coins. ). २ पैसा *m*, रोकड नाणें *n*, पुंजी *f*; as, To leave his C. to better hands. C. *adv.* छण-कर-कण, छम-कन-कर-&c., छणछण-णां (*intens.* छणाछण, छणाणां ). C. *v. t.* छणछणावणें, छणछण वाजविणें, खळखळविणें. C. *v. i. to make a sharp sound* छणकर-&c.—छण वाजणें, छणछणणें, intens. छणाणणें.

Chinse ( chinz ) *v. t.* जहाजाच्या भेगा तात्पुरत्या बुजवणें. Chinsing is used as a temporary expedient when calking cannot be conveniently or safely performed.

Chintz ( chints ) [ For *chints pl.* of *chint*, Hind. *chhint*, spotted cotton cloth, named from the variegated patterns on it; *chhit*, chintz, also a spot.—Sk. *chitra*, spotted.] *n.* रंगीत कापड *n*, चीट *n*, छीट *n. pl.* Chintzes.

Chip (chip) [Closely connected with *chop* and *chap*; O. Dut. *kippen*, to knock to pieces ; Ger. *kippen*, to clip or cut money.] *v. t.* तासणें, ढलपे *m. pl.*-&c. काढणें, तुकडे *m. pl.* करणें. C. *v. i. to break off in small pieces* कवची *f.* निघणें, तुकडे होणें. C.*n.* (of wood) ढपला *m*, ढलपा *m*, ढलपी *f*, ढलपट *n*, कपळा भेतळा *m. dim.* भेत *f. n*, भेतूक *n.* २ (of stone chipped or sliced off ) कपचा *m. dim.* कपची *f*, कवची *f*, कपरा *m. dim.* कपरी *f*, टोंचा or टौंका *m. dim.* टौंची or टौंकी *f*, ढलपा *m. dim.* ढलपट *n*, किपली *f*, करप *n*, ठिकरी. Chips, Chippings काटकूट *f*, काटक्या-कुटक्या *f. pl*, सालपा *m.* ] Chip-hat *n.* ब्रेझिलच्या गवताची केलेली साहेब लोकांची उभी टोपी *f.* Chipped (v. V. T. ) *a.* तासींव, तासलेला. Chipping *n.* (V. V. T.)—*act.* तासणें *n*, तास *m*, तासणी *f*, तासकाम *n*, तक्षण *n.* Chipping machine तासणीयंत्र *n*, छोल. Chippy *a.* कोरडा, सुका. २ पुष्कळ ढपले-कळपे असलेला. To chip in वर्गणी देणें. २-चा खर्च करणें, खर्चाचा किंवा जबाबदारीचा हिस्सा सोसणें. A chip of the old block जुन्या खोडाची ढलपी *f*, cf. सिंहाचा बच्चा.

Chiragra ( ki-rāg'ra ) [ Gr. *cheir*, the hand & *agra*, seizure. ] *n. med. gout in the hand* हाताचे सांधे दुखणें, हातदुखीचा रोग.

Chiretta ( ki-reta' ) [ Hind. *chiraita.*] *n.* काडेकि(चि)राईत. [ one up.

Chirk ( chėrk ) *v. t.* खुश करणें, राजी करणें; as, To C.

Chirm ( chėrm ) [ A. S. *cirman*, to cry out. ] *v. i.* (*obs.*) ओरडणें, किंकाळी फोडणें. C. *n.* गोंगाट *m*, घडाखा *m.*

Chirognomy ( kī-rog'nomi ) [ Gr. *cheir*, the hand & *gnome*, understanding. ] *n.* हातांच्या रेपेवरून स्वभाव सांगण्याची विद्या *f.*

Chirograph ( kī-rog-raf' ) [ Gr. *cheir*, the hand & *graphein*, to write.] *n.* हातानें कोरून लिहिलेला दस्तऐवज *m.* Chirog'rapher *n.* कोरून सुबक अक्षरांनीं दस्तऐवज लिहिणारा. Chirograph'ic *a.* Chirographist *n.* Same as Chirog'rapher. Chirog'raphy *n.* लिहिण्याचें कसब *n*, कलमसफाई *f.*

Chirology ( kī-rol'o-ji ) [ Gr. *cheir*, the hand & *logos*, a science. ] *n. the art of talking with the fingers* करपल्लवी भाषा *f*, करपल्लवी *f.* Chirol'ogist *n.* करपल्लव्या.

Chiromancy (kī'rō-man'-si) [Gr. *cheir*, the hand & *mantein*, to foretell. ] *n. palmistry, divination by the hand* सामुद्रिक *n*, हस्तसामुद्रिक *n.* Chir'oman'cer, Chirograph'ist, Chir'oman'ist *n.* हस्तरेषापरीक्षक *m*, हात पाहणारा *m.*

Chiroplast ( kī-ro-plast ) [ Gr. *keir*, the hand & *plassein*, to shape. ] *n.* पियानो वाजविण्यास शिकणारांना मदत करणारें साधन *n.*

Chiropodist ( kī-rop'o-dist ) [ Gr. *cheir*, Sk. कर, the hand & *pous*, *podos*, Sk. पद, the foot.] *n.* हात व पाय यांचा वैद्य *m*, हस्तपादभिषक् *m*, करपादभिषक्, मुख्यत्वें करून पायांच्या घोट्यांना औषध देणारा *m.*

Chirp ( chėrp ) [ Of imitative origin. ] *n.* चिंवचिंव *f.* चूंचूं *f*, चिची *f*, (noisily ) कुलकुलाट *m*, किलाण *m.* २ चिणचीण or चिनीचिनी *n*, किण्ण *n*, किर्र *n.* C. *v. i.* (of birds) चिंवचिंव *f.* चूंचूं *n.* करणें, चिणचिणणें, noisily-&c. किलकिलणें. २ ( of insects ) किर्र-किण्ण *adv.* करणें, चिणचीण or चिनीचिनी करणें. Chirp'er *n.*

लहान पक्षी *m*. २ चिंवचिंव करणारा *m*. Chirping *a*. उल्हासी, आनंदी. C. *n*. चिणचिण *f*, चिंवचिंव *f*, चिची *f*. Chirping-cup *n*. उल्हास वाढविणारें पेय (पेलाभर). Chirp'y *a*. आनंदी.

Chirrup (chir'up) *v. i*. चिंवचिंव करणें. Chirrup *v. t*. तोंडानें चकचक आवाज करून घोडा हाकलणें. २ *fig*. हुशारी-उत्तेजन देणें, उत्साह वाढविणें.

Chirurgeon Chirurgery, Chirurgical, old forms of Surgeon, Surgery, Surgical शस्त्रवैद्य, शस्त्रविद्या, शस्त्रवैद्यका-संबंधी. Chirur'geonly *adv*. (*obs*.)

Chisel (chiz'el) [O. Fr. *cisel*.—L. L. *cisellus*, probably for *caesellus*, from L. *cæsus*, *pa. p*. of *cædere*, to cut.] *n*. (of a carpenter) किंकरें *n*, विंधणें, पातळी *f*, [SMITH's C. छिनी *f*. STONE CUTTER's C. टांकी *f*, टंक *m*, पाषाणदारक *m*. INCISION MADE WITH IT टांकी *f*. ONE WHO WORKS WITH IT टांकेकरी *m*.] २ छिनी (लोखंड) दगड फोडावयाची. C. *v. t*. किंकऱ्यानें-विंधण्यानें-&c. कापणें-तोडणें, छिनीनें कापणें. २ (stone) *to roughen with incisions* टांक्या पाडणें-मारणें, टांकी *f*. लावणें. ३ फसविणें (*slang*). Chis'elling *pr. p*. Chis'elled *pa. p*. Chis'elled *a*. विंधण्यानें कापलेलें, तासींव, टांकी लावलेलें. Chis'elling *n*. Chis'elshaped *a*. Chis'eltooth *n*. खार, उंदीर इत्यादि प्राण्यांचा वेधकदंत (incisor). Cold chisel थंड धातु कापण्याची छिनी *f*.

Chit (chit) [Hind. *chitti*.] *n*. *a note or small epistle* चिट्टी (ठ्ठी) *f*, also Chitty चिटी *f*. Chitee, Chitti.

Chit (chit) [A. S. *cian*, to germinate.] *n*. (generally used in contempt of young persons; now mostly of a girl or young woman.) मूल *n*, पोर *n*, चिटलिंग *n*, चिट्टू *m*. २ कोंब *m*, अंकुर *m*, मोड *m*. ३ (*obs*.) चामखीळ *m* (शरिराच्या कांहीं भागावर आलेला). C. *v. i*. अंकुर फुटणें. Chit'ty *a*. पुष्कळ अंकुराचा, अंकुरमय.

Chit-chat (chit'-chat) *n*. गप्पा, वार्ता, बाष्कळ भाषा *f*, बोली-बोलणें.

Chitin (kī'tin) [Gr. *chiton*, a coat of mail.] *n*. लहान लहान किड्यांच्या बहिस्त्वचेंतील एक पांढरा कठीण भाग *m*, बहिस्त्वचेंतील कठीण श्वेतद्रव्य.

Chitterling (chit'ėr-ling) *n*. डुकराच्या पोटांतील लहान आंतडें. २ डुकराच्या आंतड्याचें भाजून किंवा शिजवून केलेलें पक्वान्न *n*.

Chivalry (shiv'al-ri) [O. Fr. *chevalerie*, Fr. *cheval*.-L. *caballus*, a horse. इंग्लंडांत पंधराव्या शतकांत पीडितांचें रक्षण हेंच ज्यांचें ब्रीद अशा नाइट (knight) लोकांच्या अमदानींत Chivalry ह्याचा अर्थ "युद्धास सज्ज अशी अश्वसेना" असा होता. इंग्रजी ग्रंथांत Chivalry चीं जीं निरनिराळीं वर्णनें दिलीं आहेत त्यांवरून इंग्लंडांतील मध्ययुगीन कालांतील नाइट लोकांत व हिंदुस्थानांतील प्राचीन क्षत्रियांत फारच साम्य आहे. गीतेंतील क्षत्रिय धर्माचें लक्षण पुढें दिलें आहे. "शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्। दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्." 'आर्तत्राणाय (for the defence of the oppressed or afflicted) वः शस्त्रम्' हें क्षत्रियत्वाचें लक्षण कालिदासानें दिलें आहे. "The unbought grace of life, the cheap defence of nations, the nurse of manly sentiment and heroic enterprise is gone." हे बर्कचे Chivalry संबंधीं उद्गार आहेत, तेव्हां क्षात्रधर्मांतील व Chivalry तील साम्यावरून Chivalry ला आर्तत्राणधर्म, क्षात्रधर्म हे प्रतिशब्द योग्य आहेत असें आमचें मत आहे. मध्ययुगीन इंग्लंडांतील नाइट लोकांना गरिबांचें—दुबळ्यांचें-स्त्रियांच्या पातिव्रत्याचें रक्षण हेंच आपलें पवित्र कर्तव्य असें वाटत असे व त्याकरितां ते प्राणाचीही बिलकुल पर्वा करीत नसत.] *n*. (in the Middle Ages) (a) युद्धास तयार अशी अश्वसेना *f*, आर्तत्राणव्रताची अश्वसेना *f*; (b) स्त्रीशुद्धीकारितां प्राण देणारे शूर लोक, स्त्रियांचा आदर असणारे शूर लोक; as, "And Belgium's capital had gathered then her beauty and her chivalry, and bright the lamps shone over her fair women and brave men." २ पीडितरक्षणधर्म *m*, आर्तत्राणधर्म *m*, आर्तत्राणव्रत *n*, क्षात्रधर्म *m*, मर्दुमकी *f*, पौरुष *n*, वीरता *f*, शौर्यशालिता *f*, पराक्रम *m*, सरदारबहादरी *f*. ३ *the knightly system of the feudal times* पीडितांचें रक्षण करणारी सामंतसंस्था *f*, राजापासून नोकरीबद्दल जमीन घेऊन सदोदित शिपाईबाण्यानें राहणारी मंडळी *f*. ४ हृदयाचा किंवा मनाचा थोरपणा *m*. Chiv'alric, Chiv'alrous *a*. *pertaining to chivalry*. See the meanings of the noun and form adjectives therefrom. Chiv'alrously *adv*. आर्तत्राणधर्मानें, सरदारी बाण्यानें, क्षत्रियबाण्यानें, &c. Chiv'alrousness *n*.

Chive (chīv) [Fr. *cive*, from L. *cepa*, *cæpa*, an onion.] *n. pl*. (R.) *bot*. केसर *n*. २ (also Cive) *agric*. एक प्रकारचा कांदा *m*.

Chivy, Chevy (chiv'vi, chev'vi) *n*. शिकारीची आरडाओरड *f*. २ शिकार *f*, पारध *f*. C. *v. t*. शिकार-पारध करणें. C. *v. i*. पळ काढणें, पोबारा करणें.

Chlamys (kla'mis or klam'is) [Gr. *chlamys*, *chlamydos*, a garment.] *n*. क्लामिस *m*, प्राचीन ग्रीक लोकांचा पोकळ व आंखूड झगा *m*. Chlam'ydate *a*. झगा असलेला. २ (गोगलगाईसारखें) पाठीवर कवच असलेला.

Chloral (klō'ral) [From *chlor*, the first part of Chlorine & *al*, the first part of Alcohol, व्यवहारांत याला क्लोरल हायड्रेट असें म्हणतात.] *n*. 'क्लोरल' किंवा 'क्लोरल हायड्रेट' नांवाचें झोंप-गुंगी आणणारें औषध *n*. हें 'हर' (chlorine) नांवाच्या मूलद्रव्याचें व मद्यार्काचें मिश्रण करून तयार करितात. हें पोटांत गेल्यावर रक्तांत मिसळतें व शरिरांत क्लोरोफार्म तयार करितें. ($CCl_3CH_2OH$) ही याची रासायनिक घटना आहे.

Chlorine (klō'rīn) [Gr. *chloros*, greenish yellow, from its colour.] *n*. रसायनशास्त्रांतील 'हर' नांवाचें मूलतत्व, हें हिरवट पिंवळ्या वर्णाचें असतें व कपड्याचा रंग, दुर्गंधि, इत्यादि हरण करितें; हें वायुरूप आहे व हवेपेक्षां अडीचपट जड असतें; ह्याचा ओपकामांत बराच उपयोग करितात. Chlo'rate *n*. *a salt of chloric acid* हरित,

हरिकाम्लापासून झालेलें लवण *n.* Chlo'ric *a.* हर वायूपासून झालेला, हरिक. Chlo'ride *n.* हरिल *n*, हर वायु व दुसरी एखादी धातु किंवा सेंद्रियमूलक (radical) यांपासून झालेलें लवण *n.* Chlo'ridise (incorrectly Chlorodize) *v. t.* हरिलाचें-क्लोराइडचें रूप देणें, हरिल करणें. Chlorite *n. a salt of chlorous acid* हराचित, हराम्लाचें लवण. Chlo'ritic *a.* हराचित (chlorite) संबंधीं. Chlo'rous *a.* हर वायूपासून झालेला.

Chlorodyne (klō'rō-dīn, or klō'rō-din) [From *chlor*, the first part of Chloroform & *odyne*, pain.] *n. a drug popular as a narcotic and anodyne, composed of chloroform, morphia, tincture of Indian hemp, prussic acid and other substances* क्लोरोडाईन नांवाचें पोटदुखीवर व जुलाबावर इंग्रजी वैद्यकांतील औषध. हें बाजारांत आयतें तयार मिळतें. ह्यांत क्लोरोफार्म, अफूचें सत्व, प्रसिकाम्ल व इतर द्रव्यें असतात.

Chloroform (klō'rōform') [From *chlor*, part of Chloride or Chlorine and *form*, from *Formic* acid, from chemical connection.] *n.* शस्त्रप्रयोग करतांना बेशुद्धि आणण्याकरितां हुंगण्यास दिलेलें औषध, क्लोरोफार्म, बेशुद्धि आणणारें औषध.

Chlorometer (klō-rom'ĕt-ĕr) [From *chlor*—part of Chlorine & Gr. *metron*, a measure.] *n.* हरमापक; हरवायुमिश्रित चुना, सोडा किंवा पोव्याश यांमधील हर (chlorine) मोजण्याचें उपकरण. Chlorom'etry *n.* हरमिति *f*, हरमापन *n.*

Chlorophyll (klō'ro-fil) [Gr. *chloros*, light green & *phyllon*, a leaf.] *n.* पानांतील हरिद्वर्णद्रव्य *n*, रंजकद्रव्य *n.*

Chlorosis (klōrō'sis) [Gr. *chloros*, light green.] *n. med.* हलीमक, पंडुरोगाचा भेद, पित्तपंडु, नीरक्तता *f*, हरितरोग *m*, ज्यांत रक्त कमी झाल्यानें हिरवा रंग येतो तो रोग *m*, रक्तन्यूनत्वामुळें स्त्रियांस येणारी पांडुरता *f.* Chlorot'ic *a.*

Chock (chok) [O. Fr. *cuche*, a block of wood.] *v. t.* (पाचरीनें-पाचर ठोकून) मजबूत-गच्च करणें. C. *v. i.* (पाचरीप्रमाणें) गच्च बसणें. C. *n.* पाचरवजा ठोकळा *m*, पाचर *f*, अडकवण *n.* २ डोला *m*, बेचकें *n*, खोबण *f.* [BOAT-CHOCKS आगबोटीवर रक्षक होडी-देवी ठेवण्याचा बेचकासारखा ठोकळा *m.*] C. *adv.* संपूर्ण, पुरा. Chock'ful, Choke'full *a.* पूर्ण भरलेला; as, "Speeches C. of puerile insolence." Chock'-tight *a.* घट्ट, मजबूत.

Chocolate (chok'ō-lāt) [Sp. *chocolate.*—Mex. *chocolatl*—*choco*, cocoa and *latl*, water.] *n.* एक काफीसारखें चाकोलेट नांवाचें पेय *n*, कांहीं कृतीनें क्याकाओफळ जाळून त्यापासून तपकिरी रंगाची चहाकाफीसारखी पिण्याकरितां केलेली पूड *f.* C. *a.* काळसर-तांबूस-पिंगट रंगाचा, धुपेली रंगाचा.

Choice (chois) [O. E. *chois.*—O. Fr. *chois.*—Fr. *choisir*, to choose.] *n.* निवड *f.* [TO MAKE C. OF निवड करणें, पसंत करणें.] २ *the power of choosing, option* निवडण्याची मुखत्यारी *f-* अधिकार *m.* ३ पसंती *f*, खुशी *f.* ४ निवडक-निवडलेली वस्तु *f.* ५ *the best part* निवड *f*, उत्तमांश *m*, उत्तमभाग *m.* ६ निवड करण्याकरितां एक किंवा अनेक वस्तु *f. pl.* C. *a. select, excellent, precious* निवडक, निवडीक, शेलका, अस्सल, पसंत, खातरीचा, नगजानगजीचा, संग्रहाई, उत्कृष्ट, उत्तम, उंचा, सरस, उमदा, वेंचक, नामी, अमूल्य. २ *selected with care and due attention to preference* निवडलेला. ३ (with *of*) *using with care* जपून खर्च करणारा, जोखून खर्च करणारा; as, To be C. of time or money. Choice-drawn *a.* (*Shakes.*) काळजीनें निवडलेला. Choice'ful *a.* पुष्कळ निवडी करणारा, चोखाळ. Choice'ly *adv.* काळजीपूर्वक. Choice'ness *n.* उत्कृष्टता *f*, चोखपणा *m.* Hobson's choice (named from Tobias *Hobson*, the Cambridge carrier who let out horses and is said to have compelled customers to take the horse which happened to be next the stable door, or go without) हॉब्सनी निवड *f*, जुलमानें करावयास लावलेली निवड *f*, पाहिजे असल्यास देतों तें घ्या नाहींतर वाट धरा अशा धमकीनें करावयास लावलेली निवड *f.* To take one's choice आपल्या आवडीप्रमाणें घेणें.

Choir (kwīr) [O. Fr. *cuer*, Fr. *chœur*. L. *chorus*.-Gr. *choros*, an advance in a ring.] *n. a band of singers* ख्रिस्ती देवालयांतील सेवाधारी गायकमंडळी *f*, उपासनागीत प्रमुखपणानें म्हणणारी गायकमंडळी *f.* [A CATHEDRAL CHOIR CONSISTS OF THE VICAR'S CHORAL OR MINOR CANONS, LAY-CLERKS, CHORISTERS. THIS BODY IS DIVIDED INTO TWO SETS OF VOICES SITTING IN THE SOUTH AND NORTH SIDES OF THE CHANCEL CALLED RESPECTIVELY DECANI AND CANTORIS WHO SING ANTIPHONALLY. BUT IN SOME CASES THE POSITIONS ARE REVERSED.] २ ख्रिस्ती देवालयांतील गाणाऱ्या मंडळीची जागा *f*, देवळांतील गायनस्थल *n.* ३ *arch.* चान्सेल, कठड्यामुळें किंवा पडद्यामुळें देवळाच्या मध्यभागापासून भिन्न झालेला देवालयाचा भाग *m.* C. *v. t.* & *v. i.* एकत्र गाणें. Choir-organ *n.* ख्रिस्ती देवालयांतील प्रार्थनागीताबरोबर वाजविण्याचें वाद्य *n.* Chō'ral *a. belonging to a choir* गाणाऱ्या मंडळीचा, गायकगणासंबंधीं—विषयक. Choir-screen *n.* गायक मंडळीच्या स्थानापुढचा जाळीदार पडदा, कटिंजन *m.* Chō'ral, Chor'ale *n.* भजनगीत *n*, कीर्तन *n.* Chō'rally *adv.*

Choke (chōk) [A. S. *aceocian*, to suffocate; Icel. *koka*, to gulp.] *v. t. to stifle, to suffocate, to strangle* गुदमरून-घुसमटून टाकणें-मारणें, नाकतोंड दाबूनकोंडून-&c.-मारणें, नरडें *n*-नरडी *f*-गळा *m-* &c.-दाबणें or दावून मारणें, दम *m-* श्वास *m.* कोंडून मारणें. २ *to hinder or check* (as growth, progress, &c.) वाढ खुंटविणें, खुजट करणें. ३ *to block up* कोंडणें, बुजविणें, रोधणें. C. *v. i.* गुदम (मु) रणें, घुटमळणें, श्वास कोंडणें.

२ (esp. through violent emotion) ऊर *m.* दाटणें *g. of s.*, गळा *m.* दाटणें or भरून येणें *g. of s.*, गहिंवरणें, गहिंवर *m.* येणें *in con.*, घुसमटणें, सद्गदित होणें. Choked *a.* गुदमरलेला, श्वास कोंडलेला. Choke-damp कोळशाच्या खाणींत सांपडणारा विषारी वायु *m*, खाणींतील विषारी हवा *f.* ही प्राणवायु आणि कर्ब (carbon) ह्यांच्या मिश्रणानें होते. Chokeful *a.* आकंठ भरलेला, तुडुंब, कांठोकांठ, गळ्यापर्यंत, ओतप्रोत. Cho'ker *n.* दम-श्वास कोंडणारा. Cho'king *n.* श्वास-दम कोंडणें *n.* Chok'y *a.* दम कोंडणारें. To choke off अंत करणें, नाश करणें. २ मध्यें अडथळा आणणें. To choke up पूर्णपणें प्रतिबंध करणें. २ दम कोंडणें, दाबून टाकणें, गुदमरून टाकणें. White choker खिस्ती आचार्यांच्या गळ्याभोंवतीं असलेला पांढरा गळपट्टा *m.* [चौकी *f.*

Chokey (chō'ki) [Hind. चौकी.] *n.* बंदीखाना *m.* २

Cholagogue (kol'a-gog) [Gr. *chole*, bile & *agogos*, leading, from *agein*, to lead.] *n.* *a medicine to evacuate bile* पित्तघ्न-पित्तनाशक-पित्तशामक औषध *n*, पित्तरेचक *n.* Cholagog'ic *a.*

Choler (kol'ėr) [Gr. *chole*, bile & *rhein*, to flow.] *n.* पित्त *n.* २ *irascibility* तमोगुण *m*, पित्तप्रकृति *f*, पित्तस्वभाव *m.* ३ राग *m*, कोप *m*, क्रोध *m.* Chol'eric *a.* पित्तानें भरलेला. २ पित्तप्रकृतीचा. ३ तापट, तमोगुणी, तामसी. ४ रागीट, क्रोधाचा, क्रोधी.

Cholera (kol'ėr-a) [Gr. & L. *cholera*, from *chole*, bile. कोलेरा हा पित्तातिशयामुळें होतो अशी जुनी समजूत होती, त्यामुळें हें नांव पडलें आहे.] *n.* कालेरा *m*, हगओक *f*, कुळीक *f*, विसू-सू-षू-चिका *f.* (according to माधवनिदान), पटकी *f*, वाखा. [Inveterate or long-standing C. पुष्कळ दिवस राहिलेली पटकी *f.* Epidemic C. जरीमरी, महामारी, वाख्याची सांथ, पटकी. Spasmodic C. पायांत पेटके-वळ आणणारी पटकी. To be affected with C. पटकीनें-वाख्यानें लागणें, पटकी-वाखा होणें. British C. विलायतेंत होणारी पटकी *f.* Asiatic C. एशियांत होणारी पटकी *f.* C. bascillus विषूचिकाजंतु. Endemic C. सदोदितचा कोलरा. Cholera infantum or Cholera morbus मुलांना होणारा कालरा. Sporadic Cholera तुरळक पटकी. (पटकीची सांथ नव्हे.)

Choltry (chōl'tri) *n.* प्रवाशांसाठीं मुशाफरखाना, ओरी, धर्मशाळा *f*, सराई *f.* २ सभामंडप *m.* also Choul'try.

Chondroid (kon'droid) [Gr. *chondros*, cartilage gristle, a grain & *oid.*] *a.* कूर्चास्थिमय, कोमलास्थिमय. Chon'drin *n.* कूर्चास्थीचा मुख्य घटक पदार्थ *m.* Chondritis *n.* कूर्चास्थीचा दाह-अभिताप *m.* Chondrogen'esis *n.* कूर्चास्थीची उत्पत्ति *f.* Chondrog'enetic *a.* Chondrog'raphy *n.* कूर्चास्थीचें वर्णन *n.* Chondrol'ogy *n.* कूर्चास्थीचें ज्ञान *n*, कूर्चास्थिशास्त्र *n.*

Choose (chōōz) [A. S. *ceosan*, to taste.] *v. t.* *to make a choice of* निवडणें, निवडून घेणें-काढणें, वरणें, पसंत करणें. २ (with the infinitive object) अमुकेक गोष्ट करण्याचा निश्चय करणें; as, He chose to visit the best of actual nations. ३ (esp. with the infinitive) *to think fit*, *to be pleased* (to do so and so) इच्छिणें, मर्जीस-मनास-पसंतीस येणें *in. con.* C. *v. i.* *to make a selection*, *to decide* निवडणें. Chose *pa. t.* Chosen *pa. p.* वरलेला, निवडक. २ वेंचक, वेंचलेला. ३ निवडक, आवडलेला. Choos'er *n.* पसंत करणारा, निवडणारा. Choos'ing *n.* निवडणें *n*, वरणें *n*, निवड *f.* [the C. of a husband by a woman स्वयंवर, the woman that chooses a husband स्वयंवरा, पतिंवरा.] To choose sides बाजू पसंत करणें, खेळांत भिडू वांटून घेणें. Not much to choose between निवडण्यास मुळींच जागा नसणें, सर्व सारखेंच वाईट असणें. To pick and choose काळजीनें निवडणें.

Chop (chop) [Scot. *chap*, to strike; *choppe* a blow.] *v. t.* *to cut with a quick and heavy blow* तोडणें, खांडणें, कलम *n.* करणें, तोड or तोडा करणें. २ *to make by this action* सांकटून करणें; as, To Chop wide gaps. ३ (with *about*, *away*, *down*, *off*, *through*, *from* anything) *in two*, *into pieces* छाटणें, कलम करणें. ४ सागोती-मांस इत्यादि सांकटणें. ५ खुपसणें, घुसवणें; as, "You chop in the word *offer*;" "You chop so much uplandish in your tale." ६ *fig.* बोलण्यांत घोटाळणें, एकदम विसंगत आणि तुटक तुटक बोलणें; as, She was somewhat nervous and chopped her word. ७ चीर-भेग पाडणें, तडकवणें; as, "That rough thread of soil chopped by the blades of a hundred streams." C. *v. i.* (with *at*) (वर) घाव घालणें; as, Chopping at one of the trees. २ झडप घालणें; as, To C. at the shadow and lose the substance. ३ (with *in* or *into*) मध्यें विघ्न आणणें. ३ चीर पडणें, फाटणें, तडकणें. C. *n.* सांकटणें *n*, तोडणें *n*, कलम करणें *n*, &c. २ खंड *m*, खांड *n*, खांडोळें *n*, तोडा *m*, तुकडा *m*; as, A mutton C. ३ तोड *f*, तोडा *m*, फोड *f*; as, C. of timber. ४ तडाखा *m*, फटका *m*, चीर *f*, फट *f.* Chop'house *n.* शौनगृह *n*, खाटकाचें दुकान *n*, सर्व प्रकारची मांस पुरविणारी खाणावळ *f.* Chop'ped *p. a.* तोडलेला, सांकटलेला, कलम केलेला. Chop'per *n.* मांसाचे तुकडे करणारा खाटीक *m.* कसाई *m.* Chop'ping *n.* तोडणें *n.* कलम करणें *n*, सांकटणें *n.* २ बोलण्यांत घोटाळणें *n.* Chopping-block *n.* खाटकाचा ठोकळा *m*, घोडा *m*, घोडी *f*, नेट *n.* Chopping-knife *n.* मांस सांकटण्याचा सुरा *m.* Chop'py *a.* भेग-चीर असलेला, भेगाळ. २ खवळलेला, क्षुब्ध, अस्थिर; as, A C. sea.

Chop (chop) [Seems to be a variant of Chap which means to barter.] *v. t.* अदलाबदल करणें, साटेलोटें करणें. २ एकदम बदलणें; as, In the phrase 'to C. and change,' *lit.* & *fig.* वाऱ्यासारखें एकदम बदलणें. ३

युद्ध or तांडव or भांडण करणें, निकरानें भांडणें, वाक्तांडव करणें, कज्जेदलालीवर येणें; as, The counsel chops with the judge. [ To C. LOGIC हमरातुमरीचा वादविवाद करणें. ] C. *v. i.* ( with *with* ) अदलावदल करणें. २ एकदम बदलणें. [ To C. ABOUT (AS WIND) घोटाळणें, कोंडाळणें, घोटाळत जाणें. To C. AND CHANGE WITH *v. i.* शीं सांटेलोटें करणें, व्यापार करणें, क्रयविक्रय करणें. ] C. *n.* अदलाबदल *f;* सांटेलोटें *n.* २ दिशेची-गतीची-स्थितीची-बदल *f;* as, "Like fortune, full of chops and changes."

Chop(chop)[from Hindi. छाप, impression, print, stamp, brand, from the root स्था, to make a stand.] *n.* छाप *m.* २ *a licence or passport made valid by means of a seal* छापी किंवा मोहोरबंद परवाना *m.* ३ प्रत *f;* जात *f;* नंबर *m;* as, We are the first C. of the world. Chop-house *n.* जकात घेण्याचें नाकें *n,* जकातकट्टा *m.*

Chop ( chop ) [ A variant of Chap. Chop is usually *pl.* and gener. used in contemptuous or humorous application to men. ] *n.* जाभाड *n,* दाभाड *n.* २ तोफेचें-दरीचें तोंड *n.* ३ फुगीर गालाचा मनुष्य *m.* ४ नदीच्या-खाडीच्या मुखाच्या दोहों बाजूंची जमीन *f;* as, The chops of the channel. Chop-fallen *a.* निराश-नाउमेद झालेले.

Chopsticks (chop'stiks) *n. pl.* सुरी व कांटे यांच्या ऐवजीं वापरण्याच्या चिनी लोकांतील दोन लांकडाच्या किंवा हस्तिदंताच्या कांड्या *f. pl,* हस्तिदंती कांटे.

Choral, Chorale, see Choir.

Chord (kord) [ L. *chorda.–Gr. chorde,* a gut, a string made of a gut.] *n. the string of a musical instrument* तंतु *m, pop.* तार *f.* २ *geom.* ज्या *f,* पूर्णज्या *f,* गुण, चापकर्ण *n,* जीवा *f,* ३ स्वरमेळ *m.* ४ ( of skin) तांत *f.* C. *v. t. to string, to tune* तारा लावणें. C. *v. i. mus. to accord, to harmonize together* स्वरमेळ होणें, ताल-सूर जमणें. २ मिळणें, जमणें. Chord of an arch. कमानीची रुंदी *f.* [ The focal Chord नाभिज्या. Chord of contact संपर्कज्या. Chord of quickest descent लघुत्तमावरोहणज्या *f.*

Chordee (kordē') [Fr. *corde, cordee, pa. p.* of *corder,* to cord. ] *n. a painful inflammatory downward curving of the penis* पूयप्रमेह झाला असतां शिश्नाचें त्रासदायक वक्रोत्थान *n.*

Chorea ( kō-rē'a ) [ Gr. *choreia,* dance. ] *n. med. St. Vitus's dance, a disease attended with constant twitchings of the voluntary muscles* एक प्रकारचा विशेषेंकरून मुलींना होणारा वातरोग *m,* ह्यांत स्नायूंचे अचके आले म्हणजे शरीर अनियमित प्रमाणांत हालतें व ह्यांत ज्ञानतंतु व गतिदायक तंतू विकृत होतात, नृत्यवात, कम्पवात.

Choreographythe, See Chorus.

Chorion ( kō'ri-on ) [ Gr. *chorion,* the skin. ] *n.* गर्भपोषक कोश *m,* दुसरा गर्भकोश *m,* दुसरें गर्भवेष्टन *n.* ह्यापासून वार उत्पन्न होते. २ ( the true skin or cutis ) चर्म *n.* ३ *bot.* वृक्षांच्या बियांची बाहेरील साल *f-* बाह्यत्वचा *f.* Chō'ria *pl.* Chō'roid *a.*

Chorister, vide Choir.

Chorography ( kō-rog'ra-fi ) [ Gr. *choros,* a place & *graphein,* to describe.] *n.* भूगोलाचें विस्तृत वर्णन *n* -नकाशा *m.* Chorog'rapher *n.* परगण्याचा नकाशा काढणारा. २ प्राचीन स्थळांचा शोध लावणारा. Chorograph'ic,-al *a.*

*N. B.*—Geography deals with the earth in general; Topography, with particular places; but Chorography, though now little used, at one time covered the sphere of both.

Chorology ( korol'o-ji ) *n.* वनस्पति व प्राणी यांच्या मूलप्रदेशांचा विचार *m.* Chorolog'ical *a* Chorol'ogist *n.*

Chorus ( kō'rus ) [ L. *chorus,* a dance in a ring, a dance accompanied with song, a band of singers.] *n. pl.* Choruses (प्राचीन ग्रीक देशांतील नाटकांत व धर्मसंबंधीं उत्सवांत) नाचणारांचा ताफा *m,* गायकनर्तकमंडळ *n.* २ नाटकाची प्रस्तावना म्हणणारा नट *m.* ३ *fig.* सूर्याभोंवतीं फिरणारी ग्रहमाला *f.* ४ सहगायकमंडळ *n,* सर्वांनीं मिळून गाणारी गायकमंडळी *f.* ५ सर्वांनीं मिळून एकदम म्हणण्याचें गीत *n.* ६ स्वरमेळ *m.* ७ पुष्कळ आवाज मिळून झालेला एक आवाज *m;* as, A C. of laughter. ८ ध्रुवपद *n,* आंकणकडवें *n,* अस्ताई *f.* Choreograph'ic *a.* Choreo'graphy *n.* नृत्याचें अंकन *n.* Chō'ric *a.* Chō'rist, Chor'ister *n. one of a choir* फडांतला गवय्या, गायकगणांतला एक गाणारा, सहगायक. Celestial C. किन्नर *m.*

Chose, Chosen, See Choose.

Chose ( chōz ) *n. law.* वस्तु *f;* खासगी मालमत्ता *f.*

Chough ( chuf ) *n.* यूरोपांत आढळणारा एक प्रकारचा कावळ्यासारखा पक्षी *m.* याचा रंग काळा असून चोंच लांब, बारीक व बांकडी असते आणि पाय तांबडे असतात.

Chouse ( chows ) [ Prob. from Turk *chaush* in the sense of a "Turk" with the implied sense of a cheat. ] *v. t. to gull (colloq.)* धुतारणें, मुंडणें, भोंदणें फसवणें, ठकवणें, दगलबाजी करणें; as, To C. one out of his money. C. *n.* (*obs.*) भोंदु *m,* ठक *m,* फसव्या *m.*

Chow-chow ( chow'-chow' ) [of Chinese origin. ] *n.* चिनी गोडें किंवा खारें लोणचें *n.* Chow-chow *a.* मिश्रित, पंचमेळ; as, C. sweetmeats.

Chowkeedar ( chow'kē-där' ) [Hindi. चौकी probably from Sk. चतुष्क, a quadrangular court-yard & दार Pers.] *n. a. watch-man* चौकीदार, पहारेकरी *m.*

Chowry, Chowrie (chow'ri ) [Hindi. चौरी, from Sk. चामर, fly-flap]. *n. the tail of the Bos Grunniens* ( चमर ) *used to whisk off flies,* &c. चौरी *f,* चवरी *f,* चामर *n.* Holder of it चौरीबारदार, चौरी वारणारा.

Chowse (chous), same as Chouse.

Chrematistics (krēma-tis'tiks) [Gr. *chremata*, wealth.] *n. the science of wealth* अर्थशास्त्र *n.*

Chreotechnics (krē'o-tek'niks) [Gr. *chreios*, useful & *techna*, art.] *n. the useful arts esp. agriculture, manufactures, commerce* उपयुक्त कला *f*, कृषि-शिल्प-वाणिज्य इ. उपयुक्त कला *f. pl.*

Chrestomathy (kres-tom'athi) [Gr. *chrestos*, useful & *mathein*, to learn.] *n.* लेखरत्नमंजूषा *f*, सुभाषितसंग्रह, अवतरणें, वेंचे, उतारे (भाषेचें मार्मिक ज्ञान होण्याकरितां असा संग्रह केलेला असतो). Chrestomath'ic *a.*

Chrism (krizm) [A. S. *crisma*.-L. L. *chrisma*.—Gr. *chrisma*, an unguent, from *chriein*, to anoint.] *n.* ख्रिस्ती लोकांत विशेष वेळीं लावावयाचें संस्कारी तेल *n*, प्रार्थनेनें पवित्र केलेलें तेल *n.* Chris'mal *a.* संस्कारी तेलासंबंधीं. C. *n.* तेलाचा माठ *m*- बुधला *m.* Chris'matory *n.* संस्कारी तेल ठेवण्याचें भांडें *n.* Chris'om *n.* (*obs.*) बाप्तिस्मा देतेवेळीं अभ्यंगस्नान झाल्यानंतर वापरण्याचा कपडा *m*, तुणीचा लहान मुलाचा पांढरा कपडा *m.* २ देवाला अर्पण केलेल्या तेलानें प्रथम माखलेलें मूल *n.* Chrisom-child *n.* (*obs.*) प्राथमिक तेलाभ्यंगाच्या कपड्याचें मूल *n*- अर्भक *n.*

Christ (krIst) [L. *Christus*.-Gr. *Christos*, the Anointed, from *chriein*, to anoint. Christ means the Anointed, the appellation given to Jesus the Saviour, synonymous with the Hebrew *Messiah*, which see.] *n.* ख्रिस्त *n*, अभिषिक्त. २ ख्रिस्तासारखा पुरुष *m*; as, "Each man must be his own C. or he is no Christian." Christ-cross-row (kris'-kros-rō) *n.* (*obs.*) मूळाक्षरमालिका, मूळाक्षरें. Christ's-thorn *n.* एका प्रकारचें ख्राइस्टथार्न नांवाचें कांटेरी झाड *n*, या झाडाचा ख्रिस्ताला मुकुट केला होता असें म्हणतात.

Christen (kris'n) [A. S. *cristnian*, to make a Christian.] *v. t.* बाप्तिस्मा देणें, जलसंस्कारद्वारा ख्रिस्ती करणें-ख्रिस्ती धर्मांत आणणें. २ *to give a name, to denominate* नाम-नांव *n*-ठेवणें-देणें, बारसें *n.* करणें; as, "C. the thing what you will." ३ (*obs.*) बाप्तिस्मा देणें, ख्रिस्ती धर्मांत आणणें, (चा) मुहूर्त करणें, प्रथमच वापरणें. Christendom *n.* ख्रिस्ती स्थान *n.* यावत् ख्रिस्ती देश *m.* २ ख्रिस्ती धर्म*m*-मत *n*-पंथ *m*, ख्रिस्ती धर्माचा स्वीकार *m*; as, "A wide and still widening C." (opposed to Heathendom.) ३ (*obs.*) नांव *n*- संज्ञा *f* (जलसंस्काराचे वेळची). ४ ख्रिस्तीमात्र लोक, यावत् ख्रिस्ती लोक *m. pl.* Chris'tening *n.* (v. V. 1.) *act.* (जलसंस्कारद्वारा) ख्रिस्ती करणें, बाप्तिस्म्याचा समारंभ *m.* २ नांव ठेवणें *n*, नामकरण *n*, बारसें (among the Hindus); as, I was present at your C.; (among Christians) मी तुझ्या बाप्तिस्म्याचे वेळेस हजर होतों, (among the Hindus) तुझ्या बारशास मी जेवलों होतों, तुझ्या बारशाच्या मीं घुगऱ्या खाल्या आहेत. Christ-hood *n.* ख्रिस्तपणा *m*, पतितांना पावन करण्याची शक्ति *f*, जगांतील पाप वाहून नेण्याची शक्ति *f.* Christian *n.* (v. V.) ख्रिस्ती *m*, किरिस्तांव *m*, ख्रिस्तभक्त *m*, ख्रिस्ताचा अनुयायी *m.* २ *colloq.* मानवप्राणी, ख्रिस्ती देशांतील जन्मलेला मनुष्य *m.* C. *a.* ख्रिस्ताचा संबंधीं; as, A. C. doctrine. २ ख्रिस्ती धर्मानुसारी; as, "The English are a C. people." ३ ख्रिस्ती धर्मासंबंधीं; as, "A C. court." ४ *kind, beneficent* मायाळू, सौम्य; as, "The graceful tact; the C. act." Christianise *v. t.* ख्रिस्ती करणें, ख्रिस्ती धर्मांत आणणें-घेणें. Christ'ianism *n.* (*obs.*) ख्रिस्ती धर्म *m.* Christian'ity *n.* ख्रिस्ती धर्ममत *n*, ख्रिस्ती धर्माचें ओज *n*—तेज *n*, ख्रिस्ती धर्माचें उन्नत वर्तन *n*, (*obs.*) ख्रिस्तीमंडळ *n*, ख्रिस्ती धर्माला शोभेल असें वर्तन *n.* Christian-like ख्रिस्त्यासारखा. Christianly *a.* Christianness *n.* (*obs.*) ख्रिस्ती धर्ममताशीं ऐक्य *n.* Christ'liness *n.* ख्रिस्तमय झालेली अवस्था *f*, ख्रिस्तीं रंगलेल्या मनाची स्थिति *f*, ख्रिस्तपदीं आसक्ति *f.* Christless *a.* ख्रिस्तविरहित, ख्रिस्ताच्या ठिकाणीं पूज्यबुद्धि नसणारा. Christ'ly *a.* ख्रिस्तासारखा. Christian era ख्रिस्ती शक *m*, इसवी सन *m.* Christian name (as distinguished from surname) बाप्तिस्मा देतांना ठेवलेलें नांव *n*; as, Robert Scott, Robert हें ख्रिस्ती नांव आणि Scott हें आडनांव.

Christmas (kris'mas) [L. *Christus*, the Anointed & *mass* A. S. *maesse*, (1) the mass, (2) a church-festival. L. *messa*, *missa*, a dismissal, the mass. Usually said to be derived from the phrase *ite, missa est*, go, you are dismissed, used at the end of the service; in any case the derivation is from L. *missus*, *pa. p.* of *mittere*, to send away.] *n.* नाताळ *m*, ख्रिस्तजयंती *f.* हा सण २५ दिजेंबर रोजीं असतो. Christ'mas box *n.* नाताळचें बक्षीस *n*, नाताळचे बक्षिसाची पेटी *f.* २ नाताळांत चाकर लोकांना दिलेलें पोस्त—इनाम *n*-बिदागी *f.* Christmas-cake *n.* नाताळाकरितां केलेली साहेबी पोळी-केक. (See Cake.) Christmas-card *n.* नाताळांत मित्रांनीं मित्रांना पाठविण्याचें कार्ड *n*-पत्र *n.* Christmas-day *n.* नाताळ *m.* Christmas Eve *n.* नाताळच्या महोत्सवाच्या अगोदरची (२४ दिजेंबरची) रात्र *f.* नाताळची पूर्वसंध्या *f.* Chrismtas-sheaf *n.* नाताळांतील गवताची पेंढी *f*, Christmas-tide, time *n.* नाताळचा समय-नाताळचे शेवटचे बारा दिवस. Christmas-tree *n.* खोलींत उभी केलेली लहान झाडाची (विशेषतः देवदाराची) फांदी *f*, या फांदीला नाताळांतील देणग्या टांगतात.

Chromatic (krō-mat'ik) [Gr. *chroma*, colour.] *a. relating to colour* रंगासंबंधीं, वर्णविषयक. २ वर्णानें, रंगानें उत्पन्न केलेला. ३ *mus.* द्विश्रुतिकस्वरासंबंधीं, दोन श्रुतींचे अंतराचे स्वर ज्यामध्यें आहेत (असा जो ग्राम) त्यासंबंधीं. [C. ABERRATION रंगापायन, रंगापेरण. CHROMATIC PRINTING रंगी बेरंगी छापील काम, निरनिराळ्या रंगांच्या शाईच्या ठशांनीं किंवा ठोकळ्यांनीं छापलेलें काम

*n.* C. SCALE द्विश्रुतिक स्वरांचा ग्राम. C. SERIES (SOUND) ग्रामिक किंवा द्वादशस्वरी श्रेढी.] Chrōm'ate *n.* क्रुमेत, क्रुमिक अम्लाचें लवण *n.* Chrōma'tics *n. pl.* वर्णप्रकरण. हा एक दर्शनानुशासनशास्त्राचा भाग आहे. Chrō'matis'e *v. t.* (दुसऱ्या वस्तूंत) क्रुमिक अम्लाचें लवण मिसळणें. Chrō'matog'raphy *n.* वर्णविद्या *f.* निरनिराळे रंग तयार करण्याची व देण्याची विद्या *f.* Chrōmatol'ogy *n.* रंजकद्रव्याचें पृथक्करण *n.* रंजकद्रव्यशास्त्र *n.* Chrōmatomet'er *n.* वर्णप्रमाणक *m.* वर्णप्रमाणपट *m.* निरनिराळ्या रंगाची मंदता किंवा तीव्रता मोजण्याचा कित्ता *m.* Chrōmat'ophore [Gr. *chroma* & *pherein*, to bear.] *n.* सरड्याच्या जातीच्या प्राण्यांच्या शरीरांतील वर्णपेशी, निरनिराळ्या रंगांच्या पेशी. Chrōmatop'sia *n.* दर्शनविकार, दृग्ज्ञानतंतूंच्या सुजेमुळें पदार्थ पिवळा दिसणें. Chrōmatoptome'try *n.* वर्णाकलनपरीक्षा *f.* दृष्टीला कोणत्या कोणत्या वर्णाचें कितीकिती ज्ञान (आकलन) होतें ह्यासंबंधीं विचार *m.* Chro'mogen *n.* रंगोत्पादक (द्रव्य) *n.* ह्यांत कोणतेंही लवण मिसळलें असतां त्याचा रंग होतो. Chrō'matype, Chrōmotype *n.* क्रुमप्रकाशलेखन *n.* क्रुमिक लवणानें प्रकाशलेख घेण्याची पद्धत *f.* Chrōmo *n.* (short for Chromolithograph) शिळेवरचा रंगीबेरंगी-क्रुमछाप *m.* Chrō'mophore *n.* वर्णधारीद्रव्य. ह्या वर्णधारी द्रव्यांत कोणतेंही लवण मिसळलें असतां त्याचा रंग होतो. Chromophor'ous *a.* रंगधारक, वर्णधारक. Chrō'mosphere, Chromatos'phere *n. astron.* वर्णगोल, वर्णमुकुट, ऋकचावरण, सूर्यबिंबाच्या भोंवतालचें रक्तावरण किंवा रक्तिमा.

Chromatography see Chromatic.

Chromatology see Chromatic.

Chronatopsia see Chromatic.

Chromogen see Chromatic.

Chromotype see Chromatic.

Chromopathy (krōmōpathi) *n.* वर्णचिकित्सा *f.* वर्णजलचिकित्सा *f.* (वर्णैः जलेन च चिकित्स्यते इति), निरनिराळ्या रंगांच्या बाटल्यांत ठेवलेल्या पाण्यावर सूर्यकिरणांचें कार्य झाल्यावर तें पाणी औषधासारखें वापरण्याची पद्धत.

Chromophore see Chromatic.

Chromosphere, Chromatasphere see Chromatic.

Chronic,-al (kron'ik,-al) [L. *chronicus.*–Gr. *chronos*, time.] *a.* बहुकाळासंबंधीं-चा. २ *med. of a long standing* जीर्ण, दीर्घकालिक, बद्धमूल, विलंबी, आस्ते आस्ते बळावत जाणारा व फार दिवस चालणारा (opposed to *acute*). Chro'nic *n.* जुनाटरोगी.

Chronicle (kron'i-kl) [Fr. *chronique.*—L. *chronica.*—Gr. *chronos*, time.] *n.* तीथवार टिपण, तवारीख *f.* रोजनामा *m.* तारीखवार वृत्तांत *m.* दिनवृत्त *n.* ३ *pl.* (old Test.) ख्रिस्ती लोकांच्या जुन्या करारांतील 'कालवृत्तान्त' नांवाचीं दोन पुस्तकें. C. *v. t.* तारीखवार इतिहास लिहिणें. Chron'icler *n.* तारीखवार इतिहास कर्ता-लिहिणारा, बखरनवीस, अखबरनवीस.

Chronogram (kron'ogram) [Gr. *chronos*, time and *gramma*, a letter or writing.] *n.* कालश्लेष *m.* एखादाकाल किंवा शक अक्षरांच्या रूपानें लिहिण्याचा अलंकार *m.* अशा अलंकारांत जीं अक्षरें संख्या दाखविण्यासाठीं वापरतात तीं ठळक अशीं किंवा कांहींतरी विवक्षित रीतीनें लिहितात; as, 'LorD haVe MerCIe Vpon Vs' the total sum of the figures represented by the numeral letters (printed in capitals) gives the date 1666.

*N. B.*—In the above, the capitals L. is 50, M. 1000, D. 500, V. 5, C. 100, I. 1, V. 5 and V. 5, which numbers when added are 1666.

Chronograph (kron'o-graf) [Gr. *chronos*, time & *graphein*, to write.] *n.* सूक्ष्मकाललेखक *m.* हें यंत्र सूक्ष्म काल आपणच नोंदूं शकतें. Chronog'rapher *n.* शकावलीलेखक *m.* Chronog'raphy *n.* रोजनिशी-शकावली लिहिणें.

Chronology (kron-ol'o-ji) [Gr. *chronos*, time & *logia*, a discourse.] *n.* कालगणनविद्या *f.* कालक्रमनिर्णयविद्या *f.* कालानुपूर्व्यदर्शनविद्या *f.* Chronol'oger, Chronol'ogist *n.* कालक्रमवेत्ता, कालक्रमनिर्णायक. Chronolog'ic,-al *a.* (v. N.) कालगणनविद्येचा, कालक्रमानुसार, कालक्रमविद्येविषयीं. Chronolog'ically *adv.* कालानुक्रमानें, कालानुक्रमाप्रमाणें.

Chronometer (kron-om'e-ter.) [Gr. *chronos*, time & *metron*, a measure.] *n. an instrument that measures time, as a clock, watch or dial* काल समजण्याचें साधन *n.* सूक्ष्मकालमापक यंत्र *n.* Chronomet'ric,-al *a.* Chronom'etry *n.* यंत्रद्वारा सूक्ष्मकालमापनकला *f.*

*N. B.*—Chronometer = सूक्ष्मकालमापन यंत्र. Chronograph = सूक्ष्मकाललेखक. Note the distinction.

Chrysalis, Chrysalid (kris'a-lis, kris'-alid) [Gr. *chrysallis*, the gold-coloured sheath of butterflies.] *n.* सौवर्णकोशस्थता *f.* रूपांतरपूर्वावस्था *f.* सुरवंटाचीं फुलपाखरें होण्याच्या अगोदर त्यांच्या कवचाची अवस्था असते ती. Chrys'alid *a.*

Chrysolite (kris'ō-līt) [Gr. *chrysos*, gold & *lithos*, stone.] *n.* रत्नविशेष, पुष्पराग, लसणा or लसण्या.

Chrystal (kris'tl) *n.* स्फटिक (कांचेसारखा), कांच (?), बिलोर (?). C. *a.* स्फटिकांचा. २ *fig.* निर्मळ. ३ स्फटिकवत्, स्फटिकासारखा चकचकित.

Chrystal or Crystal as spelt at present is not बिलोर or कांच but is स्फटिक only. We shall give the important history of this word under Crystal.

Chub (chub) [so called probably from its *chubbiness* or plumpness.] *n.* नदींतला एक लठ्ठ मासा *m.* Chubbed, Chubby *a. short and thick* गबदुल, गबदू. २ वाटोळा, गुरगुरीत. Chub'faced *a.* गालफुगऱ्या, Chub'biness *n.* गबदुलपणा. Chubby-faced,-cheeked *a. having a fat face* फुगऱ्या गालांचा, गुरोळी गालांचा,

फुगीरगाल्या, गालफुग्या. To get C. and plump (*colloq.*) गालावर गाल *m.* चढणें *g. of s.*

Chubb, Chubb-lock (chub,-lok) [From the name of its inventor, a London locksmith.] *n.* एक प्रकारचें चोरकुलूप *n*, चबचें कुलूप *n*.

Chuck (chuk) [Of imitative origin.] *n.* चकचक *n.* करणें, (कोंबडी आपल्या पिलांना बोलावतांना जो आवाज करते तो.) २ कोंबडीचें पिलूं *n.* ३ *fig.* लाडकें मूल *n*, बच्चा *m*; as, Pray C. come hither. C. *v. i. to call as a hen* चकचक करून बोलावणें, चकचक करणें. २ मस्करीनें हासणें, मस्करी करणें. C. *v. t.* (कोंबडीच्या पिलांना) चकचक करून बोलावणें.

Chuck (chuck) [Fr. *choquer*, to strike, cf. Shock.] *n.* हनवटीला मारलेली टिचकी *f.* धक्का *m.* २ *mech. eng.* पकडणारा चांद-चंद्रक, कातकामाच्या सांच्यावरील थाळी *f.* ३ *colloq.* प्रक्षेप. C. *v. t. to throw, to pitch* फेंकणें, टाकणें, फकदिनीं—फकशिरी *adv.* टाकणें. २ (grain or powder or dry food, into the mouth) फक्की मारणें, फांकणें. [MATTER (PARCHED CORN-MEAL, &c.) CHUCKED INTO THE MOUTH फक्की *f.* (*v.* मार,) फाका *m.* (*v.* मार), फक्का *m*, बकणी *f*, बकणा *m.* (*v.* मार). ३ (under the chin) खालून आघात करून हनवटी उचलणें *g. of o.* C. *interj.* फककन-कर-&c.

Chuckle (chuk'l) [From the 1st Chuck.] *n.* (गालांतल्या गालांत) स्मितहास्य, तोंडांतल्या तोंडांत हांसणें *n.* २ कोंबडीचा चकचक शब्द *m.* C. *v. i. to laugh in a suppressed or broken manner* गालांतल्या गालांत हसणें, अंतर्यामीं आनंद पावणें. C. *v. t.* कोंबडीचें आपल्या पिलांना चकचक करून बोलावणें. Chuckling *n.*

Chuckle (chuck'l) [Applied contemptuously to the head and occasionally to other parts.] *a.* मोठा व ओबडधोबड. C. *n.* अडाणी मनुष्य *m.* Chuckle-head, *a.* मूर्ख, अक्कलशून्य.

Chuff (chuf) [Perhaps a modification of *chub.*] *n. a coarse or stupid fellow* मूर्ख मनुष्य *m*, गांवढळ. C. *a.* गांवढळ, मूर्ख. Chuf'finess *n.* गांवढळपणा *m*, गव्हारकी *f.* Chuf'fy *a.* गांवढळ, असभ्य.

Chum (chum) [Perhaps an abbreviation of *comrade* or *chamber-fellow*. Dr. Johnson calls it a term used in the universities.] *n. a room-mate esp. in a college or university; an old and intimate friend* सहवासिक, बिन्हाडसोबती. मुख्यत्वेंकरून एके ठिकाणीं राहाणाऱ्या विद्यार्थ्यांना हा शब्द लावतात. २ जिवलग मित्र *m.* C. *v. i.* & *v. t.* एका बिन्हाडांत रहाणें; as, To C. together at a college. C. *v. t.* एकाच खोलींत दुसऱ्याबरोबर ठेवणें; as, To C. one person on another. Chum'mage *n.* सहवासित्व *n*, एकाच खोलींत दोन अगर जास्त इसम राहणें *n.* Chum'my *a.* एकत्र राहण्यास योग्य असा, सहवसतियोग्य. C. *n.* धुरांडी झाडणारा पोर *m.* २ बिन्हाडसोबती *m.*

Chump (chump) *n.* [An imitative word expressive of the thick end of anything.] *n.* ठोकळा *m*, ठिकी *f*, ओंडा *m.* २ *the but-end of anything*, called also *chump-end* जड बुडखा *m*; as, The chump of a loin of mutton. ३ (jocosely applied to the head) डोकें. [OFF HIS CHUMP *adv. phrase, off his head* देहभानावर नसतांना.] ४ मठ्ठ *m*, टोणपा *m.* Chump-chop *n.* बुडाच्या जवळचा तुकडा *m.*

Chunam (chuna'm) [Hindi. चुना, from Sk. चूर्ण, lime.] चुना *m*, सुधा (S). Terrace or floor of C. or C. work चुनेगची *f.* Making of a C. floor गचिगिरी *f.* Of C. work चुनेगचीचा.

Church (church) [O. E. *chirche, cherche.*—A. S. *circe, cyrice*, (the *c's* all hard), from Gr. *kyriakon*, the Lord's house, from *kyrios*—the Lord] *n. a building set apart for christian worship* सार्वजनिक खिस्ती देवालय *n.* (चापल किंवा आरेटरी नव्हे. चापल किंवा आरेटरी हीं खासगी उपासनामंदिरें आहेत.), चर्च *n.* 2 *a body of believers, church as the community or whole body of Christ's faithful people collectively* एक्क्लेसिया, खिस्ती समाज *m.* [Church militant—*the church on earth considered as warring against the powers of evil* पापप्रतिकारी एक्क्लेसिया, पापविरोधक एक्क्लेसिया, पापाशीं झगडणारा-युद्ध करणारा खिस्ती समाज *m.* Church triumphant, *the portion of the church which has overcome the world and entered into glory* (स्वर्गांतील) विजयी एक्क्लेसिया, जितपाप एक्क्लेसिया, नष्टपाप एक्क्लेसिया, पापजित् एक्क्लेसिया, पापावर जय मिळविलेला खिस्तसमाज *m*, पापाचा नाश करून शाश्वत सुखाचा आस्वाद घेणारा खिस्ती समाज *m.* Visible Church *the church as visibly consisting of its professed members upon earth* पृथ्वीवरील दृश्य एक्क्लेसिया. Invisible or mystical Church अदृश्य एक्क्लेसिया. Church universal or catholic काथोलिक-सार्वत्रिक एक्क्लेसिया.] ३ खिस्ती धर्मशाखा *f*; as, The primitive Church, the Latin Church, the Greek Church, the Orthodox Church, the Gallican Church, the Nestorian Church, &c. &c. [The High Church प्राचीन काळचीं धर्ममतें व रीतभात यांजकडे लक्ष देणारे इंग्लंडांतील एक्क्लेसियेचे लोक. The Low Church सोळाव्या शतकांतील प्राटेस्टंट धर्मसुधारकांच्या मतांकडे अधिक लक्ष देणारे इंग्लंडांतील एक्क्लेसियेचे लोक. The Broad Church प्राचीन खिस्ती धर्माच्या रीतीभातींकडे विशेष लक्ष्य न देणारे इंग्लंडांतील एक्क्लेसियेचे लोक. The Established Church (राज) संमत एक्क्लेसिया, सरकारमंजूर एक्क्लेसिया. ४ *a congregation of local Christians* खिस्ती मंडळी *f.* [Church court खिस्ती धर्मासंबंधीं खटल्याचा निवाडा लावणारें कोर्ट *n.*] Church *v. t.* (उपकारस्तुति करण्यास) प्रसूतिसंकटांतून पार पडल्यानंतर देवळांत जाणें, लग्नानंतर-बाळंतपणानंतर देवळांत जाणें. Church-

ale *n.* ख्रिस्ती सणाच्या उत्सवासाठीं केलेली पिण्याची एल दारू *f.* २ एल दारूचा पानोत्सव *m.* Church-bench *n.* ख्रिस्ती देवळाच्या देवडींतील बांक *n.* Church-going *n.* नित्यनियमानें देवळांत जाणें *n.* Church-ing *n.* प्रार्थनेकरितां प्रथम देवळांत जाणें *n.* Church-ism *n.* धर्मसंप्रदायित्व *n*, कोणत्याही धर्माचा संप्रदायी असणें *n.* Churchless *a.* ख्रिस्ती धर्मसंप्रदाय किंवा कोणताही धर्मसंप्रदाय न मानणारा. Churchman *n.* पवित्र काथोलिक एक्क्लेसियेचा सभासद *n*, अँग्लिकन चर्चचा अनुयायी-पंथी. २ ख्रिस्ती धर्माधिकारी *m.* Church-owl *n.* पांढरें घुबड *n.* Church-rate *n.* ख्रिस्ती देवळाच्या खर्चाकरितां दिलेला कर *m.* Church service *n.* देवळांतील सार्वजनिक प्रार्थना *f.* उपासना. २ प्रार्थनेचें पुस्तक *n.* Church-text *n.* लांबट आणि ठळक अक्षरांची छपाई *f.* Church warden *n. a lay honorary officer of a parish or district church elected to assist the incumbent in the discharge of his administrative duties* देवालयरक्षक *m*, देवालयव्यवस्थापक *m*. हा त्या देवालयांतील मुख्य आचार्याला त्याच्या कामांच्या व्यवस्थेंत मदत करितो. ह्याला पगार नसतो. Church-way *n.* देवळास जाण्याचा मार्ग *m.* Church-woman *n.* (इंग्लंडांतील) धर्मसंस्थेची सभासदीण *f.* Churchy *a.* एक्क्लेसियेचा किंवा धर्ममताचा फाजील अभिमानी, धर्मकार्यतत्पर, धर्माचा निदिध्यास असणारा. Church-yard *n.* ख्रिस्ती देवळाच्या अंगणांतील स्मशान *n*, प्रेतभूमि *f*, मसण *n*, कबरस्थान *n.* Church-history *n*, एक्क्लेसियेचा इतिहास, धर्माचा व धर्मसंस्थेचा इतिहास *m*, धर्माचा व धर्मक्रांतीचा इतिहास *m*, धर्मासंबंधीं इतिहास *m.*

**Churl** (churl) [A. S. *ceorl*, a freeman of the lowest rank, a man, a husband.] *n. a surly, rude, ill-bred fellow* दुसऱ्याच्या जमिनीवर खपणारा स्वतंत्र मनुष्य *m.* (*Eng. Hist.*) अतिशय हलक्या दर्जाचा स्वतंत्र मनुष्य *m*, (गुलाम नव्हे), अकुलीन. २ शेतकरी *m*, तुसडा-मत्सरी, कुरठा मनुष्य *m*, अडाणी मनुष्य *m*, असभ्य, दुर्जन, गांवढळ, धुससुसळ्या. ३ *a selfish miser, a niggard* कंजुष, कृपण, चिक्कू, कद्रू. C. *a.* गांवढळ, आपस्वार्थी, कद्रू, आपलपोटी. Churl'ish *a. rude, surly, sour* तुसडा, तुसड, द्वाष्ट, दुष्ट, दुःशील, दुःस्वभाव, खाष्ट. ३ आपमतलबी, लोभी. ३ कठीण, कठोर; as, A C. nature of minerals खनिज पदार्थांचा कठीणपणा *m.* Churl'ishly *adv.* (v. A.) कुरठेपणानें, तुसडेपणानें, द्वाष्ट होऊन. Churl'ishness *n.* (v. A.) कुरठेपणा *m*, तुसडेपणा *m*, दुष्टपणा *m*, दुःशीलता, कंजूषपणा *m*, *f*, असभ्यता *f*, कठोरपणा *m*, दुःस्वभाव *m.*

**Churn** (churn) [A. S. *ceren, cyrin*, a churn.] *n.* रवी *f*, मंथा *m*, घुसळणी *f*, *m*. [LOOP OF THE FIXED PART OF A C. मांजरी *f*.] C. *v. t.* घुसळणें, मंथणें, घुसळण *n*- मंथन *n*. करणें *g. of o.* २ जोरानें हालविणें. [MATTER (CURDS) TO BE CHURNED घुसळण *n.* MATTER OBTAINED BY CHURNING घुसळा *m.*] C. *v. i.* घुसळणें, मथणें. C. घुसळण *n*, मंथन *n*, मथन *n.* २ ताकाचें एक वेळचें लोणी *n.* Churn-rope *n.* रविदोर *m*, मंथरी *f*, आंसणी *f*, कसणी *f*, मांजरी *f.* Churn-staff *n.* रवी *f.* Knob or head of a C. माथा-माथ्या *m*, माठलें *n*. Hand-churn *n.* हातरवी *f.* Post, pillar, stake, &c. with which the C. is connected घुसळखांब *m*, ताकमेढ *f.* Churned *p.* (v. V.) घुसळलेला, &c., घुसळींव, मंथित.

**Chutnee, Chutney** (chut'nē) [Hind. चटणी.] *n.* चटणी *f.*

**Chyle** (kīl) [Gr. *chylos*, juice, from *cheein*, to pour, whence also Chyme.] *n. anat. the milky fluid prepared from chyme* पोटांत पचलेल्या अन्नाचें-आमाचें रूपांतर *n*, अन्नरस *m*, रस *m*, धातुप *m*, आहारसार *m.* Chylā'ceous, Chylif'ic, Chyl'ous *a. belonging to chyle* अन्नरससंबंधीं, अन्नरसाचा, धातुपाचा, २ धातुपमय, आहारसारमय. Chylifac'tive, Chyli-'fic-atory, Chyl'opoit'ic *a.* अन्नरसकारक, अन्नरसोत्पादक, Chylificā'tion *n.* धातुपीभवन(क्रिया). Chyli'-fy *v. t.* & *v. i.* आमरसाचा धातुप करणें-होणें. Chylū'ria *n.* पांढरी लघ्वी होणें *n*, लघ्वींतून पांढरा धातुप जाणें.

*N. B.*—अन्न पोटांत गेल्यावरोबर प्रथम त्याचा आमरस (chyme) बनतो. नंतर ह्या आमरसापासून धातुप (chyle) व मल हीं उत्पन्न होतात. धातुप धातुपवाहिनींत जातो; व मल मलाशयांत जातो.

**Chyme** (kīm) [Gr. *chymos*, from *cheein*, to pour, see Chyle.] *n. the modification which food assumes in the stomach* आमरस *m*, अर्धपक्व अन्न *n.* Chyme हा Chyle चा एक पूर्व भाग आहे. Chymificā'tion *n.* अन्नाचा परिणाम-आम होण्याची क्रिया *f.* Chym'ify *v. t.* पचलेल्या अन्नाचा परिणाम-आम करणें. Chym'ous *a.* आमरसाचा, आमरससारखा.

**Chymist**, see Chemist.

**Cibarious** (si-bā'ri-us) [Fr. *cibus*.—L. *cibarius*, food.] *a. pertaining to food, edible* अन्नाचा, अन्नमय, खाद्य. Cibation [L. *cibatio*, fr. *cibare*, to feed.] *n.* अन्न खाणें *n.*

**Cicatrix** (sik'-ātriks) [L. *cicatrix*, a scar.] *n.* also Cicatrice. *pl.* Cicatrices. वण *m*, चट्टा *m*, क्षतचिन्ह *n*, माव *f.* २ झाडाच्या सालीवरची माव *f.* ३ छाप *m*, ठसा *m.* Cicatric'ula *n.* (लहान) वण *m.* (झाडाचें पान पडल्यावर जो रहातो तो.) Cicatrizā'tion *n.* खपली-खवंद धरणें *n*, सिध्मीभवन *n.* Cic'atrize *v. t. to make to heal* जखम भरेसा-खपली धरेसा करणें (a wound). C. *v. i. to heal* माठणें, माठळणें, भरणें-भरून येणें, खपली धरणें.

**Cicerone** (sis-e-rō'ne) [It. *cicerone*, a guide, orig. *a Cicero*.—L. *Cicero* acc. *Ciceronem*, the great orator of Rome, 'the speaker of speakers' at Rome; and certainly, in a party of sight-seers, the guide is

the chief speaker. It is no compliment to the great orator to call the glib-patterer of a show-place a Cicero. It. *pl.* Ciceroni. Eng. *pl.* Cicerones. परकीय लोकांस स्वदेशांतील प्राक्कालीन व अपूर्व पदार्थ दाखविणारा, अपूर्व पदार्थ दाखविणारा, अपूर्ववस्तु-दर्शक. C. *v. i.* बाहेर गांवच्या लोकांस स्वदेशांतील पदार्थ दाखविणें. Ciceró'nian, Ciceron'ic *a.* सिसरोच्या भाषासरणीसारखा. Ciceró'nianism *n.* सिसरोची भाषा-सरणी *f.* सिसरोच्या लेखनपद्धतीचें अनुकरण *n.* Ciceron'ism, Ciceron'age, Cicerone'ship *n.* अपूर्वपदार्थ-मार्ग दाखविण्याचें काम *n.* सीसरोई *f.* Ciceronian *n.* सिसरोच्या भाषेचा अभिमानी, सिसरोसारखी भाषापद्धति उचलणारा-उतरणारा.

Cider (sīdėr) [L. *sicera*, a strong drink.] *n.* ॲपल नांवाच्या फळाचा खतखतवलेला रस *m.* २ (R) दारू *f.* Ci-'derand *n. colloq.* ॲपल नांवाच्या फळांचा रस व दारू यांचें मिश्रण *n.* Ci-'der-cup *n.* दुसरें पदार्थ घातलेलें ॲपलांचें गोड पेय *n.* Ci-'derkin सायडरची हलक्या प्रतीची दारू.

Cidevant (sē'-de-vong') [Fr. from *ci*=*ici* (from L. *hicce*, here and *devant*, representing L. *de ab ante*, lit. 'of from before.'] *a. former, late* माजी, मागला, मागचा, पूर्वकाळचा, गतकालीन; as, A C. [Governor.

Ciel, see Ceil.

Cierge (sėrj) [Fr.—L. *cera*, wax.] *n.* धर्मविधीच्या वेळीं ख्रिस्ती देवालयांत लावावयाची मेणबत्ती *f.* See Cerge.

Cigar (si-gär') [Fr. *cigare*, Sp. *cigarro*, orig. the name of a kind of tobacco in the island of Cuba.] *n.* विडी *f.* चुट्टा *m,* सिगार. Cigarette' *n.* कागदाची विलायती तंबाखूची विडी *f,* लहान विडी *f.* सिगार.

Cilia (sil'i-a) [L. *cilium* (*pl.* cilia). hair of the eyelid, eyelash.] *n.* पापणीचे केंस *m. pl.* २ फळावरचा कांटा *m,* लव *f.* ३ केशतुल्यइंद्रिय *n,* केशेंद्रिय *n.* Cil'iary *a.* पापणीच्या केंसासंबंधीं, पक्ष्मासंबंधीं. Cil'iate, Cil'iated *a.* केंस-लव असलेला. Cilif'erous *a.* केंस-लव धारण करणारा. Cil'iform, Cil'iiform *a.* पापणीच्या केंसाप्रमाणें बारीक-नाजूक.

Cilice (sil'is) [Gr. *kilikion*, a cloth made of the hair of the goat of Cilicia in Asia Minor.] *n.* सिलिस नांवाच्या लोंकरीचा कपडा *m.* Cilic'ious *a. made of hair* सिलिस नांवाच्या लोंकरीचा, सिलिशियांतील बोकडाच्या केशांचा, केशनिर्मित. [(Scimiter).

Cimeter (sim'ėtėr) *n.* खंजीर*m,* कव्यार *f,* बरची *f.* also

Cimmerian (sim-ē'ri-an) [L. *Cimmeris*, a mythical people.] *a.* अतिशय अंधाराच्या जागेंत राहणाऱ्या लोकांसंबंधीं. २ अतिशय-गाढ (अंधार), घोर (अंधार), तमोमय.

Cinchona (sin-kō'na) [So called after the Countess of Chinchon, the wife of the Viceroy of Peru, who was cured of a fever by it in 1638 and who assisted in spreading the remedy.] *n.* (*bot.*) the *Peruvian bark*, vide Quinine. सिंकोनाचें झाड *n,* सिंकोना. या झाडापासून कोयनेल तयार करितात. २ *med.* सिंकोनाची साल *f.* Cin'choná'ceous, Cinchon'ic *a.* सिंकोनासारखें-असणारें, सिंकोनासंबंधीं. Cin'chonine *n.* सिंकोनाच्या सालींतील आल्कलीसारखें कारकद्रव्य, सिंकोनिन. Cinchonin'ic *a.* Cinchonisā'tion *n.* Cin'chonise *v. t.* सिंकोन्याचे गुण-रूप उत्पन्न करणें. Cin'chonism *n.* प्रमाणापेक्षां जास्त कोयनेल किंवा सिंकोना घेण्याचा परिणाम (म्हणजे ऐकूं कमी येणें, कानटाळ्या बसणें, घेरी येणें वगैरे).

Cincture (singk'tūr) [L. *cintura*, a girdle from *cingere*, *cinctum*, to gird.] *n.* पट्टा *m,* कमरबंद *m,* मेखला *f.* २ हद्द *f,* सीमा *f,* मर्यादा *f.* C. *v. t.* पट्टा घालणें. Cinct *a.* पट्टा घातलेला, मेखलायित, घेरलेला, वेष्टलेला, मर्यादित. Cinc'tured *a.*

Cinder (sin'dėr) [A. S. *sinder*, dross.] *n.* कोळपलेला—कोळंजलेला कोळसा *m.* २ भुसा *m,* भुगा *m.* राख *f, n.* ३ *slang.* हुशारी आणण्याकरितां चहा, सोडावाटर, इत्यादिकांत घालावयाची ब्रांडी *f,* व्हिस्की *f.* Cinderel'la *n.* स्वैपाकघरांत काम करणारी बाई *f.* Cin'dery *a.* Hot cinders फोपेटा *m,* फुपाटा *m,* मुर्मु (मू) र *n. m.*

Cinerary (sin'e-ra-ri) [L. *cinerarius* from *cinis*, ashes.] *a.* भस्माचा, भस्म-राख ठेवण्याचा. Cinerā'tion *n.* भस्मीकरण *n.* Cinerāt'or *n.* प्रेतें जाळण्याची भट्टी *f.* Cinē'real, Cinē'reous, Cineri'tious *a.* भस्मवत्, भस्मतुल्य, भस्मवर्ण, राखेसारखा, भस्मरंगी, करडा, भस्मी. Cineres'cent *a.* भस्मवर्ण असलेला, भस्मरंगी, करडा.

Cinnabar (sin'abar) [L. *cinnabaris*, Gr. *kinnabari*, a dye, vermilion.] *n.* (*min.*) *vermilion* इंगिळ, रक्तपारद *m.* Fictitious C. हिंगुळ *m.* Cin'nabar *a.* हिंगुळासारखा. Cinnabar'ic, Cinn'abarine *a.* रक्तपारदयुक्त, लालपाऱ्यासंबंधीं.

*N. B.*—Cinnabar is the red or crystalline form of mercuric chloride.

Cinnamon (sin'-a-mon) [L. *cinnamomum*.—Gr. *kinnamomon*.—Heb. *qinnamon*, said to be of Malay origin, (Malay.) *kayu manis* from *kayu*, wood & *manis*, sweet.] *n.* दालचिनी *f,* कलमी दालचिनी *f.* C. *a.* दालचिनाची, दालचिनीच्या वर्णाचा. Cinnam'ic *a.* Cin'namon'ic *a.* दालचिनीपासून मिळालेला, दालचिनीचा. Cinn'amon-stone *n.* एक जातीचा दगड *m.* हा सिलोनांत सांपडतो. ह्याचा रंग दालचिनीसारखा म्हणजे तांबूस पिंगट असतो व त्याचीं रवें करितात.

Cinque' (singk) [Fr.—L. *quinque*, five.] *n.* पांच. २ *mus.* पंचकडी. ३ पंजा; as, इस्पिकचा पंजा (used in games such as at dice or cards), (*colloq.*) पंचमी. C. foil *n. arch.* पांच कमानींचें फूल *n.* हें चिलखतावर काढलेलें असतें. २ *bot.* पांचपातीचें गवत. C. Ports *n. pl.* इंग्लंडच्या दक्षिणेकडील पांच जुनाट बंदरें:—सँडउइच्, डोव्हर,

हाइथ, रोम्नी, हेस्टिंग्स. C. spotted *a.* (*Shakes.*) पांच ठिपके असलेला. [also Scion.

Cion (sī'un) *n. a graft* कलम *n.* २ कोम *m*, अंकुर *m.*

Cipher (sī'fer) [Ar. *sifr*, empty, a translation from Sk. शून्य, empty; cipher.] *n. an arithmetical character* आंकडा *m*, आंख *m*, खूण *f.* २ *a mark for nothing* पूज्य *n*, शून्य *n.* ३ *an occult writing* गूढलिपी *f*, गुप्तलिपी *f*, सांकेतिकलिपी *f.* [SOME PARTICULAR CIPHERS ARE अंकलिपी OR अंकभाषा *f*, चिकारी *f.* OR चिकारीबोली OR भाषा *f*, फुलकारी OR फुलारी *f.* OR फुलकारी बोली OR भाषा, फुलारी, &c. छत्रबंध *m*, मिताक्षरी *f.*] ४ कवडी मोलाचा मनुष्य- जिन्नस *m.* ५ (*obs.*) भाषा *f.* ६ *a mere or nominal person* टिकोजी, टिकोबा, टिक्याचा धनी *m*, दिपाचा कवडा *m.* ७ अनेक अक्षरांचें एक अक्षर करणें *n.* Cipher *v. i.* हिशोब *m.* करणें, आंकडे मांडणें; as, It was certain he could write and cipher too. २ (with *out*) (जी लिपी प्रचारांत नाहीं तिचा) अर्थ लावणें. C. *v. t.* गूढलिपी लिहिणें. २ (*obs.*) दर्शविणें, अक्षरानें दाखविणें. Ci'phering *n.* गूढलिपी उलगडणें *n.* Cipher-key *n.* (*Shakes.*) गुप्तलिपी उलगडण्याची किल्ली *f.*

Circe (sŏrsi) [L. or G.] ग्रीक किंवा ल्याटीन पुराणांतरींची सर्सी नांवाची मोहिनी. हिनें दिलेलें पेय जो पिई तो डुकर होत असे अशी हिच्याविषयीं दंतकथा आहे.

Circean (sėr-sē'an) [L. *circæus.*] *a.* सर्सीसंबंधीं- सारखा. Also Circæan. See Circe.

Circinate (sėr'si-nāt) *a. bot.* कुंडलाकार; as, C. leaves.

Circinus (sėr'si-nus) *n. astron. a name of a southern constellation* कर्कटराशी *f.*

Circle (sėr'kl) [L. *circulus*, dim. of *circus*, a ring, circle.] *n.* वर्तुळ *n*, वर्तुल *n*, मंडल *n*, वृत्त *n*, कुंडली *f.* [The Area of a C. वर्तुलक्षेत्र *n*- फल *n.* The fourth part or quadrant of a C. वर्तुलपाद *n*, पाद *n.* The Great C. महद्वृत्त *n*, बृहद्वृत्त *n.* The Small C. लघुवृत्त *n.* A Segment of a C. वर्तुलखंड *n*, वृत्तखंड *n.* The eccentric C. प्रतिवृत्त *n*, प्रतिवर्तुल *n.*] २ *compass, circuit, district, region* मंडल *n*, चक्र *n*, मंडलभूमि *f*, वृत्तभूमि *f*; as, On the C. of a forest. ३ *a band, a body, a ring* मंडली *f*, (C. of men) चाकोळें or चाखोळें *n*, कोंडाळें *n*, परिषद् *f.* ४ कडें *n*, घेर. [Reasoning in a Circle *logic.* चक्रोक्ति, अन्योन्याश्रयदोष *m*, आत्माश्रयदोष *m*, चक्रानवस्था *f.*] ५ फेरा *m.* ६ *astron.* चक्रयंत्र *n*; as, A Mural C., A Reflecting C. ७ चक्राकार घटमाला. दीर्घसूत्री भाषण *n.* ९ वेढा *m*, परगणा *m*; as, The several C. s. of the empire. C. *v. t. to enclose* वेढा-फेरा घालणें, वेष्टणें; as, He lies C.d with evil. २ प्रदक्षिणा करणें; as, Other planets C. other suns. ३ *to revolve round* फेरा *m*- फेरी *f*- गरका *m*- &c. मारणें- घेणें-&c. *with* भोंवतालीं *of o.* C. *v. i. to move circularly* फेरा *m*- फेरी *f*- गरका *m*- गिरकी-&c- खाणें- घेणें-मारणें, गिरटी or घिरटी *f.* घालणें, गिरगिर-गरगर (रीं) and intens. गरागर (गरारां) फिरणें-जाणें. Circle described about a figure क्षेत्रपरिगतवृत्त *n.* C. inscribed in a figure क्षेत्रांतर्गतवृत्त *n.* C. of altitude उन्नतांशवृत्त *n.* C. of azimuth दिगंशकोटिवृत्त *n.* C. of curvature वलमानवर्तुल *n.* C. of declination ध्रुवप्रोतवृत्त *n*, खगोलविषुववृत्ताशीं समांतर वर्तुळ *n.* C. of illumination प्रकाशवृत्त *n.* C. of latitude कदंबप्रोतवृत्त *n*, शरवृत्त, अक्षांशवृत्त. C. of perpetual apparition ध्रुवापासून कोणत्याही स्थळाच्या अक्षांशापेक्षां कमी अंतरावर राहणाऱ्या ताऱ्यांचें कक्षावृत्त, ह्या वृत्तांत फिरणारे तारे सदोदित त्याच स्थळाच्या क्षितिजाचे वर फिरतात, नित्यदृश्यकक्षावृत्त, सार्वदिकतारोदयवृत्त. C. of occultation अदृश्यध्रुवापासून अक्षांशापेक्षां कमी अंतरावर फिरणाऱ्या ताऱ्यांचें कक्षावृत्त, नित्यादृश्य कक्षावृत्त. C. of the celestial sphere गोलाचें वर्तुल, खगोलीयवृत्त *n.* Cir'cled *a.* वर्तुलाकार. Cir'cler *n.* गुंडाळणारा *m.* Cir'clet *n.* लहान वर्तुळ *n*, कडें *n.* २ माला. Cir'cling *n.* चक्राकारगति *f*, भवंड *m.* Any point within a C. वर्तुलांतर्बिंदु *m.* The Arc of a C. कंस *m.* Concentric C. एककेंद्रवर्तुल *n*, समकेंद्रवर्तुल *n.* Cutting C.s (अन्योन्य) छेदकवर्तुळें. Diurnal C. अहोरात्रवृत्त *n.* Dress-circle *n.* रात्रीच्या पोशाखानें येणाऱ्या लोकांकरितां राखून ठेवलेली नाटकगृहांतील पहिली ग्यालरी *f.* Equal C.s समानवर्तुळें. Equatorial C. विषुववृत्त. External contact C. बाहेरून छेद करणारें वर्तुल, बाह्यस्पर्शवर्तुल. A Figure described about a C. वृत्तोपरिगतक्षेत्र. The Great C.s through the poles याम्योत्तरवृत्त, रेखावृत्त. Polar Cs. उत्तर आणि दक्षिण ध्रुवापासून २३½ अंशांवरची दक्षिण व उत्तर ध्रुवांकडील वर्तुळें, ध्रुववृत्तें. Circles touching circles स्पर्शक वर्तुलें.

Circuit (sėr'kit) [Fr. *circuit*, *circumire*, *circurie*, from L. *circuitus*, from *circum*, around & *ire*, to go.] *n. the act of moving or passing round* चाटोळया वाटोळया मार्गानें जाणें *n*, फेरा *m*, गिरकांडा *m*, *dim.* गिरकांडी *f*, (*v.* देणें, मारणें, घेणें), घिरटी *f.* (*v.* घालणें), गरका *m.* (*v.* घेणें-मारणें), वळसा *m*, भोवांडा *m.* [To FETCH (R). OR MAKE OR TAKE A. C. फेराफेरी खाणें-घेणें, गरका मारणें-घेणें, घिरटी घालणें.] २ परिभ्रमण, परिवर्त्तन *n*; as, The periodical C. of the earth round the sun. ३ *the line real or imaginary described in going round any area* परिघ *m*, मंडल *n*, मंडलभूमि *f*, मंडलपथ *m*; as, The C. of electricity. ४ *fig.* हालचालीचा-खटपटीचा प्रांत *m*- प्रदेश *m*- परिघ *m.* ५ *a circular journey, a round* फिरती *f*, फेरी *f.* ६ फिरतीचा-फेरीचा प्रांत *m*, न्यायाधिशाच्या-एखाद्या अधिकाऱ्याच्या फिरतीचा-स्वारीचा प्रांत *m*; as, A C. of a judge. ७ घेर *m*, फेर *m*; as, The C. of Ireland is 1800 miles. ८ चक्रवेष्टन *n*, कुंडलाकृति वस्तु *f*, कुंडल *n*; as, "The golden C. on my head". ९ (*obs.*) दीर्घसूत्रिक भाषण *n.* C. *v. t.* (ला) भोंवंडा-गिरकी देणें,

चक्राकार फिरवणें, भोंवतीं जाणें. C. *v. i.* चक्राकार-भोंवतीं फिरणें. Circuiteer' *n. spec.* फिरता न्यायाधीश. २ फेरी करणारा, भोंवतालीं जाणारा. Circū'itous *a. round-about, indirect* फेऱ्याचा, घेऱ्याचा, गिरक्याचा, गिरकांड्याचा, भोंवांड्याचा; as, A. C. road. २ द्राविडी प्राणायामाचा; as, A C. manner of accomplishing an end. Circū'itously *adv.* फेऱ्यानें, फेरा घेऊन. Circu'-ity *n.* चक्राकारगति *f.* दीर्घसूत्रिक गति *f.* Circuit judge फिरता न्यायाधीश *m.* Divided circuit विभक्त मंडळ *n.* To make a circuit फिरतीवर जाणें.

Circular (sėr'-kū-lar) [L. *circularis*, from *circulus*, circle.] *a.* चक्राकार, मंडलाकार, चक्रवत्, वृत्ताकार, वाटोळा. [C. TOUR पुन्हा आरंभस्थानांतच शेवट होणारा प्रवास, प्रवासप्रदक्षिणा *f.*] २ चक्ररूपी, अन्योन्यपर्यवसायी, एकमेकांत पर्यवसान होणारें; as, "The life of man is a perpetual war, in misery and sorrow circular." ३ *circuitous, round about, indirect* आडेवेढ्याचा, आडेवेढे घेणारा; as, Do not be so C. ४ पुष्कळांना उद्देशून लिहिलेला; as, A C. letter. ५ *of the nature of arguing or reasoning in a circle* अन्योन्याश्रयदोषाचा, चक्रानवस्थेचा. C. *n.* (short for Circular letter or note) जाहिरात *f.* प्रसिद्धिपत्र *n*, सराचिट्ठी *f.* वटचिट्ठी *f.* आज्ञापत्रिका *f.* [C. ORDER वटहुकूम-सामान्यादेश.] Circular'ity *n.* गोलाकारत्व *n*, गोलाकृति *f.* गोलपणा *m*, चक्रता *f.* चक्राकार *m*, वृत्ताकार *m.* Cir'cularly *adv.* (v. A.) *in a circular form* चक्रासारखा, मंडलवत्, वृत्तवत्. २ *with a circular motion* वाटोळ्या गतीनें, चक्रगतीनें, वर्तुलगतीनें, चक्रन्यायानें. Circular arc परिघाचा कोणताही चाप-कंस. Circular measure *math.* चापमान, चापीयमान *n.* Circular motion वाटोळी गति, वृत्ताकारगति *f.* वर्तुळगति *f.* चक्राकार गति *f.* Circular note पुष्कळ मनुष्यांना एकाच अर्थाचें लिहिलेलें पत्र *n*, जाहीरचिट्ठी *f.* Circular numbers *arith.* आवर्तघातांक, घातपरिवर्त्यांक *m*, स्वतःचे व आपल्या घाताचे अंत्यांक एकच असणाऱ्या संख्या; as, ५ आणि ६.

Circulate (sėr'kū-lāt) [L. *circulare, circulatus*, to surround, to make a round from *circulari*, to gather into a circle.] *v. t.* फिरवणें, चालवणें, हातोहात-हातोहातीं-हातोपात फिरवणें-चालवणें, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं फिरवणें, चालू करणें. २ सर्वत्र कळविणें, प्रसिद्ध करणें, प्रसार करणें; as, To C. a report. C. *v. i. to move round and return to the same point* फिरणें, हिंडणें, भ्रमणें, चालणें, एका जागेहून दुसऱ्या जागीं जाणें, अभिसरण होणें; as, The blood C.s in the body. 2 *to pass from place to place, from person to person, or from hand to hand* परिभ्रमण करणें; as, Money C, s. A story C. s. Cir'culable *a.* पसरण्यास-चालवण्यास-प्रसार करण्यास योग्य. Cir'culant *n.* पसरणारा. Circulā'ting *a.* पसरणारा, &c. 2 *arith.* आवर्त्त, पुनरावर्त्तक; as, C. decimals. Circula'tion *n.* (v. V. T.)-*act.* फिरवणें *n*, चालवणें *n*, कळविणें *n*, &c., भ्रमण *n*, (v. V. I.) फिरणें *n*, भ्रमणें *n.* २ *med.* अभिसरण *n*, वाहणें *n.* ३ (of coins) *currency* चाल *f.* चलन *n*, प्रसार *m*; as, C. of money, news, &c. ४ *physiol.* अभिसरण *n.* ५ प्रसार *m*, फैलाव *m*; as, A newspaper with a large circulation. Cir'culative, Cir'culatory *a.* प्रसार करणारें. C. *n.* एक प्रकारचें रसायनक्रियेला वापरण्याचें भांडें *n.* Cir'culator *n.* प्रसारक, प्रसार करणारा. Cir'culating decimals आवर्तदशांश. Circulating library फिरतें वाचनालय, ठराविक दरानें पुस्तकें भाड्यानें घरीं नेण्यास देणारें वाचनालय, घरोघरीं पुस्तकें पाठविणारें वाचनालय.

Circumambages (sėr-kum-am'-baj-ez) [L. *circum*, about & *ambage*, obs. sing. of *ambages*.] *n.* (*obs.*) दीर्घसूत्री भाषण *n.* Cir'cumambā'gious *a.* आडेवेढ्यांचा, दीर्घसूत्री. Circumam'bience, Circumam'biency *n.* सभोंवार जाणें. २ आडेवेढेपणा. Circumam'bient *a.* वेष्टक, आवरक, परिवेष्टक, वेढणारा.

Circumambulate (sėr-kumam'bū-lāt) [L. *circum*, around & *ambulare, ambulatus*, to walk.] *v. i. to walk round about* सभोंवतीं फिरणें, गरका *m*-वळसा-*m*-फेरा-&c. घालणें-मारणें. To C. an object (keeping it on the right). प्रदक्षिणा *f* घालणें- करणें, परिभ्रमण *n* करणें. Circumambulā'tion *n.* सभोंवतीं फिरणें *n.*

Circumcentre (sėr'-kum-sen'tr) परिकेन्द्र *m.* (त्रिकोणाभोंवतीं काढलेल्या वर्तुळाचा मध्यबिंदु, त्रिकोणपरिगत वर्तुलमध्य).

Circumcise (sėr'kum-sīz) [L. *circumcidere*, *circum*, around, & *cædere*, to cut.] *v. t* सुंता *f.* सुनत करणें. २ *fig.* पवित्र करणें. Cir'cumcised *a.* सुंता केलेला. २ पवित्र केलेला. Cir'cumciser *n.* सुंता करणारा. Circumci'sion *n.* (A. V.) सुंता *f.* सुनत *f.* शेफाग्रचर्मच्छेद *m*, परिकर्त्तन *n.*

Circumference (sėr-kum'fėr-ens) [L. *circum*, about & *ferre*, to carry.] *n.* परिघ *m*, घेर *m*, फेरा *m*, फेर *m*, वेढा *f.* परिधि *m*, गरका *m*, लपेट *m*, घेरमेज *m*, पालि *f.* २ मंडळ *n*, गोल *m.* ३ (*obs.*) गोळाची बाहेरची सपाटी *f.*; as, The bubble seemed red at its apparent C. ४ कोणत्याही क्षेत्राची किंवा पदार्थाची आंतील जागा *f.* गर्भ *m.* C. *v. t.* गोलाकृतींत घालणें, परिवेष्टन करणें. Circumferen'tial *a.* घेराचा. Circumferent'or *n. survey* मोजणी करण्याचें यंत्र *n.* जुनें सपाटीवरील मोजणीचें अगर कोन मापण्याचें यंत्र *n.* सदर यंत्रांत एक पेटी असून त्यांत उत्तर ध्रुव दाखविण्याचा कांटा असतो व एक वर्तुळाकार पट्टी असून त्यावर अंश मांडलेले असतात व आणखी एक पितळेची पट्टी असून त्या पट्टीचे दोहों बाजूंस पहाण्याकरितां दोन भोकें असतात. त्यांतून पाहिलें असतां वर्तुळपटीवरील अंश दिसतात.

Circumflex (sėr'kum-fleks) [L. *circum*, around & *flectere*, to bend.] *a.* स्वरितचिन्हाचा. २ वांकलेला, वांकण असलेला, फेऱ्याचा, घेऱ्याचा. ३ स्वरितचिन्हा-

सारखा, वलित; as, C. arteries. C. *n. an accent* स्वरित *m*, स्वरितस्वर *m.* २ वांकण *n*, वळण *n.* २ स्वरितचिन्ह *n.* Cir'cumflect, Cir'cumflex *v.t.* स्वरित चिन्हांची खूण *f.* करणें. २ भोंवतीं वांकविणें. ३ वाटोळया रेघेनें जोडणें. Cir'cumflex'ion *n.* वांकडें करणें *n*, वळण *n.*

N. B.—संस्कृत पुस्तकांत स्वरितचिन्हाची खूण अशी (T) आहे व इंग्रजींत अशी (Λ) आहे.

Circumfluence (sėr-kum'flōō-ens) [L. *cirum*, round, and *fluere*, to flow.] *n.* चोहोंकडे वाहणें *n*, परिप्रवाह. *m*, परिवाह. Circum'fluent *a.* चारी बाजूंस पसरणारा.

Circumfuse (sėr-kum-fūz') [L. *circum*, around & *fundere, fusun*, to pour.] *v. t.* चहूंकडे पसरणें, भोंवतीं ओतणें. Circumfused' *p. a.* Circumfus'ile *a.* चोहोंकडे पसरूं शकणारें, सभोंवार लावतां येणारें, सभोंवार ओतलेलें. Circūmfu'sion *n.* सभोंवार ओतणें *n*-पसरणें *n.*

Circumgyrate (sėr-kum-jī'rāt) [L. *circum*, around & *gyrare*, to turn.] *v. t.* भोंवतीं फिरवणें, वाटोळें फिरवणें. C. *v. i.* सभोंवतीं फिरणें, प्रदक्षिणा करणें. Circumgyrā'-tion *n.* परिभ्रमण *n.* Circumgy'ratory *a.* सभोंवतीं फिरणारा.

Circumincession (sėr-kum-in-se'shnn) *n.* [L. *circum*, round & *incedere*, to move, to proceed. Circumincession was a theological term used by the Schoolmen.] *n. the existence of three divine beings* in one *another, in the mystery of the Trinity.* खिस्ती धर्मशास्त्रांत पिता (the Father), पुत्र (the Son) आणि पवित्रात्मा (the Holy Ghost) ह्यांचें एकमेकांत राहणें-असणें *n*, पिता, पुत्र आणि पवित्रात्मा ह्या त्रिव्यक्तींची एकात्मता *f*- ऐक्य *n.*

*N. B.*—परस्पराश्रय किंवा अन्योन्याश्रय हे शब्द Circumincession ला बरोबर नाहींत. कारण, पिता, पुत्र आणि पवित्रात्मा ह्यांमध्यें कार्यकारणभाव नाहीं. जेथें कार्यकारणाचा भाव असतो तेथेंच अन्योन्य किंवा परस्पर हे शब्द बरोबर होतील.

Circumjacent (sėr-kum-jā'sent) [L. *circum*, around and *jacere*, to lie.] *a. bordering* जवळपासचा, आसपासचा, नजीकचा, सभोंवतालच्या प्रदेशाचा, शेजारचा, समीपस्थ, निकटस्थ. Circumjā'cency *n.* समीपस्थता *f*, २ *pl.* सीमान्तप्रदेश *m.*

Circumlittoral (sėr-kum-lit'ō-ral) [L. *circum*, around & *litus, litoris*, the shore.] *a.* किनाऱ्याजवळचा.

Circumlocution (sėr-kum-lō-kū'shun) [L. *circum*, around & *loqui, locutus*, to speak. See Loquacious.] *n. a circuit of words* गिरकांड्याचें-फेऱ्याचें-वळश्याचें-द्राविडी प्राणायामाचें बोलणें *n*, चरपट *f*, चरपटपंजरी *f*, गिरकांडा *m*, चर्पटिका *f*, वाक्यविस्तार *m.* Cir'cumlocute *v. i.* वळसा घेऊन बोलणें. Circumlocū'tionist *n.* सरळ न बोलणारा. Cirumlcoc'utory *a.* फेऱ्याचा, गिरकांड्याचा, भोंवाड्याचा. Circumlocution office *n.* पुष्कळ कामगारांच्या हातून जावें लागत असल्यामुळें कामाला दिवसगत लावणारें दप्तर *n*, गायकवाडी खातें (*obs.*) *n.* [वृत्त.

Circummeridian *a.* मध्यान्हवृत्ताजवळचा, परिमध्यान्ह-

Circummure (sėr-kum-mūr') [L. *circum*, around & *murus*, a wall.] *v. t.* सभोंवतीं भिंत घालणें, भिंतीनें वेष्टणें, चहों बाजूंनीं कुसूं घालणें.

Circumnavigate (sėr-kum-nav'igāt) [L. *circum*, around & *navigare*, to sail, from *navis*, Sk. नौ, a ship.] *v. t.* गलबतांत बसून पृथ्वीप्रदक्षिणा करणें, परिनावणें (?). Circumnav'igable *a.* गलबतांत बसून सभोंवार हिंडतां येण्याजोगा-सारखा-प्रदक्षिणा करण्याजोगा सारखा. Circumnavigā'tion *n.* गलबतांत बसून केलेली पृथ्वीप्रदक्षिणा *f*, परिनावन *n.* Circumnav'igator *n.* गलबतांत बसून पृथ्वीप्रदक्षिणा करणारा, परिनावक *m.*

Circumpolar (sėr-kum-pō'lar) [L. *circum*, around & *polus*, pole.] *a* अभिध्रुव, परिध्रुव, पृथ्वीच्या ध्रुवांसंबंधीं, ध्रुवासभोंवतीं हिंडणारा, परंतु अस्तास न जाणारा. Circumpolar stars सदोदित दिसणारे तारे; हे तारे सदोदित ध्रुवप्रदेशांत दिसतात, ध्रुवाच्या जवळचे तारे.

Circumpose (sėr'kum-pōz) [L. *circum*, around & *ponere, positum*, to place.] *v. t.* सभोंवतीं ठेवणें-स्थापणें. Circumposi'tion *n.* सभोंवार स्थापना *f*- ठेवणें.

Circumrotary, Circumrotatory (circum rō'taritātori) [L. *circum*, around & *rotare*, to turn round, from L. *rota*, Sk. रथ, a wheel. Chariot (?)] *a.* चक्रगतिक, चक्राकार-वाटोळा फिरणारा.

Circumscribe (sėr-kum-skrīb') [L. *circum*, around & *scribere*, to write.] *v. t. to limit* सभोंवतीं रेखणें-काढणें, हद्द *f* करणें-बांधणें, समर्याद-सावधिक करणें, आरेखणें, आरेखा *m* करणें, मर्यादा करणें, आळा घालणें. २ *to inclose within a certain limit, to confine, to restrain* मर्यादित करणें. ३ (R) लिहिणें, भोंवतालीं कोरणें. Circumscrib'able *a.* मर्यादित करण्याजोगा, परिच्छेदनीय. Circumscrib'ed *a.* (v. V.) समर्याद-सावधिक केलेला, नियमित, संकुचित, स्थिर, सीमायुक्त, परिच्छिन्न. २ *confined* अप्रशस्त, मर्यादित. ३ *math.* वृत्तांतर्गत. Circumscrib'er *n.* मर्यादित करणारा. Circumscribing *a.* परिच्छेदक. Circumscrip'tion *n.* हद्द रेखणें, स्थलमर्यादा ठरविणें, हद्द *f*, मर्यादा *f*, नियमन *n.* २ हद्दीची रेषा *f.* ३ मर्यादित स्थळ *n.* Circumscrip'tive *a.* Circumscribed figure *n.* भोंवतालीं रेखलेली आकृति, परिलिखित आकृति *f.* Circumscribed within a circle *geom.* वृत्तांतर्लिखित. Circumscribing cylinder *n.* परिगामी घनस्तंभ *m.*

Circumspect (sėr'-kum-spekt) [L. *circum*, around & *specere, spectum*, to look.] *a. cautious, prudent, wary* चोहोंकडे-मागेंपुढें-पदोपदीं &c. पाहणारा, पगदस्ती, सर्व बाजूंचा विचार करणारा, चौकस, सावध, दक्ष, हुशार, दूरदर्शी. Cir'cumspec'tion, Cir'cumspectness *n.* (v.

A.) दक्षता *f*, सावधानता *f*, दूरदर्शित्व, चौकसपणा *m*, पगदस्ती *f*, हुशारी *f*, खबरदारी *f*. Circumspec'tive *a. cautious* परिणामाकडे लक्ष देणारा, चहूंकडे पाहणारा, खबरदार. Cir'cumspectly, Cir'cumspectively *adv.* (v. A.) मागेंपुढें पाहून, सावधपणानें, &c.

Circumstance (sėr'kum-stans) [L. *circum*, around & *stare*, to stand.] *n. that which affects a fact or case in some way* परिस्थिति *f*, भोंवतालची-आनुषंगिक स्थिति *f*- अवस्था *f*-दशा-वर्त्तमान *n*- हवाल. [EASINESS OF C. S. OR EASY C.s. अनुकूल परिस्थिति *f*. STRAITENED C. s ओढगस्त, ओढ, चणचण, चडचड, प्रतिकूल परिस्थिति, अडचणीची किंवा प्रतिकूल परिस्थिति, धूळ फुंकण्याची दशा. of easy C.s खाऊन पिऊन खुशाल-सुखी, घरचा सुखी.] २ गोष्ट *f*, प्रकरण *n*, बाबद *f*, प्रकार *m*, हकीगत *f*. [BY THE FORCE OF C.s प्रसंगवशात्, प्रसंगानें. UNDER SUCH C.s अशी परिस्थिति असल्यामुळें, अशा परिस्थितींत.] ३ आनुषंगिक-आनुबंधी-लगतचा पदार्थ *m*- विषय *m*. Circumstanced *pa.* दशेंतला, अवस्थेंतला, (अमुक एक) दशेचा, स्थितीचा. Circumstan'tial *a. appendant, adventitious* पारिस्थितिक, आनुषंगिक, दूरस्थ. २ *particular, detailed* तपसिलाचा, बयादीचा, सविस्तर, विस्तृत. ३ (evidence) परिस्थितीवरून ताडलेला, संभवात्मक, अनुमानसिद्ध, आनुमानिक, वस्तुकृत, प्रासंगिक, पर्यायाचा, अप्रत्यक्ष. [C. EVIDENCE पर्यायाचा पुरावा *m*.] C. *n.* (gener. in the *pl.*) आनुषंगिक माहिती *f*, भोंवतालची हकीगत *f*. Circumstan'tiality *n.* आनुषंगिकत्व *n*, आनुषंगिक माहिती *f*. २ विस्तार *m*, विस्तृतता *f*. Circumstan'tially *adv.* (v. A. 1.) तपशीलवार, सविस्तर, बयादवार. Circumstan'tiate *v.t.* हकीगत सांगून सिद्ध-स्थापित करणें. २ सविस्तर हकीगत सांगणें.

Circumvallate (sėr-kum'val-āt) [L. *circum*, around & *vallare*, *vallatus*, to wall, from *vallum*, a rampart.] *v. t.* चहोंकडे कोटबंदी *f*-तटबंदी *f*. करणें. C. *a. inclosed with a rampart* चोहोंकडून तटबंदी असलेला. २ *anat. surrounded by a ridge or elevation* भोंवतालीं कडा अथवा उंचवटा असलेला, उन्नतभागयुक्त; as, The C. papillæ near the base of the tongue. Cir'cumvallā'tion *n.*

Circumvent (sėr-kum-vent') [L. *circum*, around & *venire*, to come.] *v. t.* फसवून घेरा घालणें. २ पेंचांत धरून फसवणें-ठकवणें. ३ पाडाव करणें, पराजय करणें. Circumven'tion *n. fraud, imposture* दगलबाजी *f*, कपट *n*, पेंच *m*. Circumvent'ive *a.* फसविणारा, फसव्या, दगलबाज.

Circumvolve (sėr-kum-volv') [L. *circum*, around & *volvere*, to roll.] *v. t. to cause to revolve* भोंवतालीं फिरविणें-गुंडाळणें, फेरा घालविणें, प्रदक्षिणा करविणें, वाटोळ्या-चक्राकार-वर्तुळ-गतींत ठेवणें. C. *v. i.* to *revolve* फेरा घालणें, प्रदक्षिणा करणें. Circumvolu'tion *n.* फेरा *m*, प्रदक्षिणा *f*, गरका *m*, परियाण *n*. २ दुसऱ्या पदार्थाभोंवतीं गुंडाळलेली वस्तु *f*. ३ दीर्घसूत्री भाषण *n*.

Circus (sėr'kus) [L. *circus*, circle, ring.] *n. an enclosure for shows and games* (प्राचीन रोम शहरांतील) सार्वजनिक क्रीडागृह *n*. ह्या गृहांत घोड्यांच्या-रथांच्या शर्यती व इतर मर्दुमकीचे खेळ होत असत. २ आखाडा *m*. ३ घोड्याची कसरत करण्याची वाटोळी जागा *f*, घोड्याचें (रं) रिंगण *n*. ४ घोड्यावर कसरत करणारी मंडळी *f*. ५ सरकस *f*, जनावरांचा खेळ *m*. ६ जागा *f*, विस्तार *m*, घेर (R) *m*. ७ घरांची वाटोळी रांग *f*.

Cirque (sėrk) [Fr.—L. *circus*, circle.] *n.* सरकस *f*. २ उंच उंच कड्यांनीं परिवेष्टित असा नदीच्या मुखाजवळील-प्रदेश *m*.

Cis (sis) [L. *cis*, on this side of.] *pref.* च्या बाजूकडचा. Cis हें लॅटिन भाषेंतील शब्दयोगी अव्यय आहे. परंतु ह्याचा कधीं कधीं उपसर्गासारखा उपयोग करतात; as, Cis.-Alpine आल्पस् पर्वताच्या अलीकडचा. Cis-Tiberis टायबर नदीच्या-इकडील. Cis च्या उलट trans किंवा Ultra (पलीकडचा) हे शब्द आहेत.

Cisalpine (sis-alp'in) [L. *cis*, on this side (with respect to Rome.) *and* L. *Alpinus*, Alpine.] *a.* आल्पस् पर्वताच्या अलीकडचा (opposed to Trans-Alpine आल्पस् पर्वताच्या पलीकडचा).

Cissoid (sis'soid) *n. geom.* शिंजिनी, एक प्रकारचा वक्र.

Cistern (sis'tėrn) [O. E. *cisterne*. O. Fr. *cisterne*.—L. *cisterna*, from *cista*, a box or chest.] *n.* हौद *m*, टाकी *f*, कुंड *m*, टाकें *n*, घमाधमा *m*, खजिना *m*.

Cit (sit) [Contraction from citizen.] *n.* (*obs.*) नगरवासी, नागरिक. Cit'ess *fem.* (या शब्दाचा टोंचून बोलतांना किंवा हेटाळणी करितांना उपयोग करितात.)

Citadel (sit'a-del) [Fr. *citadelle*.—It. *cittadella*, dim. of *citta*, a city, from L. *civitas*, see City.] *n.* आंतला किल्ला *m*, आंतला कोट *m*, बालेकिल्ला *m*, अंतर्दुर्ग *m*.

Cite (sīt) [Fr. *citer*, from L. *citare*, intensive of *cire*, *ciere*, to put in motion, to excite.] *v. t. to summon* अधिकारानें-हुकुमानें बोलावणें. २ ग्रंथावरून घेणें, उतारा करणें-घेणें. ३ ताकीद देणें, फर्मावणें. ४ *to quote* प्रमाण म्हणून दाखविणें; as, To C. an authority. ५ पुरावा म्हणून दाखविणें-दर्शविणें, सुचविणें, आपल्या पक्षाच्या बळकटीसाठीं आधार *m*-प्रमाण *n*. दाखविणें. ६ *law* कोर्टांत मुकदमा करणें. Cit'able *a.* प्रमाण ह्मणून दाखवण्यास योग्य. Cit'al *n.* (*obs.*) हजर होण्याविषयींचें कोर्टाचें आज्ञापत्र *n*, समन्स *n*. २(*obs.*) दोषारोप *m*, तुफान *n*, शब्दमार *m*. Citā'tion *n. law.* कोर्टाचें आदेशपत्र-आज्ञापत्र, कोर्टांत हजर राहण्याविषयीं हुकूम *m*, बोलावणें *n*, समन्स *n*. २ उतारा *m*, अवतरण *n*, निर्देश *m*. ३ गणना *f*, गणति *f*. ४ फैसला झालेल्या खटल्याचा किंवा राजमान्य ग्रंथाचा पुरावा देणें *n*. Citā'tor *n.* (R.) उतारा घेणारा. Cit'ātory *a.* कोर्टाचे बोलवण्याच्या अधिकाराचा.

**Cithara** (sith'a-ra) [ Gr. *kithara*, a doublet of Guitar. ] *n.* प्राचीन काळचें एक प्रकारचें सिथारा नांवाचें तंतुवाद्य *n.*

**Citizen** (sit'i-zen) [ O. E. *citesein*, from O. Fr. *citisain*, in which *s* was an insertion. ] *n. a resident of a city* पौरजन, नगरवासी, शहरवाला, नगरवाला, नगरस्थ, पौर, शहरवासी, नागरिक, नागर. २ (प्रतिनिधि किंवा अम्मलदार निवडण्याचा हक्क असणारा) नगरस्थ *m.* Cit'izeness(R)नगरवासी स्त्री *f.* Cit'izen *a.* नगरवाशासारखा, नागरिकासारखा- गुणी-सुशील- नम्र. २ (*obs.*) विलासी, सुखाभिलाषी, चैनी. Cit'izenise *v. t.* (*obs*)रहिवासी करणें. Cit'izenry *n.* सर्व नागरिक लोक, पौर-गण-वृंद. Citi'zenship *n.* पौरवृत्ति *f,* पौराधिकार *m,* नागरिक लोकांचें हक्क *m,* पौरजनत्व *n.* Fellow C. सहनागरिक, पुरसखा.

**Citron** (sit'run) [ Gr. *kitron*, a citron. ] *n.*- (the tree) महाळुंग *f,* मातुलिंग *n,* ईड *f,* तोरंजन *n,* महाफल *n,* महाळुंगाचा वृक्ष *m.*—(the fruit) मातुलुंग *n* (*pop.*) मातुलिंग *n,* महाळुंग *n,* ईड *n,* ईडनिंबू *n,* तोरंजन *n,* महाफल *n.* Cit'rate *n,* लिंबाच्या रसाचे गुणधर्म असणारा क्षार, सिट्रिक अम्लाचें लवण. Cit'reous *a.* महाळुंगी, महाळुंगी रंगाचा, पिंवळा. Cit'ric *a. chem.* महाळुंगाचा, महाळुंगापासून काढलेला. Cit'rine *a.* महाळुंगी रंगाचा. C. *n.* महाळुंगी रंग *m.* Cit'ron-wood, Cit'rus-wood *n.* प्राचीन रोमन लोकांचें मोल्यवान् वस्तु करण्याचें लांकूड *n.* Citric acid *n.* लिंबाचें अम्ल.

**City** (sit'i) [ L. *civitas*, a city. ] *n.* शहर *n,* नगर *n.* *dim.* नगरी *f,* पत्तन *n,* पुर (*pop.*) पूर *n,* (so written only as an affix, as in पंढरपूर), पट्टण *n,* पुरी *f. spec.* सनदी शहर *n.* [ Holy C. धर्मपुरी. Walls of a C. or town. शहरपन्हा *m.* ] C. *a. urban* शहरी, शहरचा, नगरचा, नागरिक, पौर. Cit'y-commissioners *n. pl.* म्युनिसिपालिटीचे सभासद. City-fathers *civic rulers* महाजन, ग्रामश्रेष्ठ (म्युनिसिपालिटीच्या सभासदांना हा शब्द लावतात). City'-mis'sion *n.* मोठाल्या शहरांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार करणारी मंडळी. Civ'ic *a. of or belonging to a city* शहरचा, नगराचा, शहरी, नगरासंबंधीं-विषयक, नागरिक. City of God, Heavenly city *n.* देवाची नगरी *f.* (Psalms XLVI 4.). City of refuge आश्रयाचें नगर *n,* प्राचीन काळीं ज्या नगरांत मनुष्यवध चुकून करणाऱ्या मनुष्यास रहावयास लावीत असत तें नगर *n.* (refer to Joshua XXI. 13.) Eternal city *n.* प्राचीन रोम शहर. Holy-city जरुशलेम. The city, *the city of London* लंडन शहरांतील मोठ्या व्यापाराचा भाग.

**Civet** (siv'et) [ Fr. *civette*, civet. ] *n.* जवादी मांजराची कस्तुरी *f,* मार्जारकस्तूरिका *f,* ओतुर्मद *m,* २ *zool.* जवादीमांजर *n.* often called more fully Civet-cat. C. *v. t.* कस्तूरीचा वास लावणें.

**Civic,** See City.

**Civil** (siv'il) [ L. *civis*, a citizen. ] *a. relating to the community, or to civil affairs* लोकव्यवहाराचा, जनव्यवहाराचा, जनव्यवहारविषयक, जनव्यवहारासंबंधीं, लोकव्यवहारविषयक-संबंधीं. २ *relating to a man as a member of a body politic* जानपदीय, सामाजिक, (S) सांसारिक. (S) ३ *not ecclesiastical or military* मुलकी, मुलकी कामाचा, मुलकी प्रकरणाचा, गांवखात्याचा. ४ *complaisant, polite, courteous, &c.,* बोलून चालून चांगला-गोड, &c., माणुसकीचा, मिळाऊ, गोडबोल्या, विनयसंपन्न, माणुसपणाचा, गृहस्थपणाचा, गृहस्थी स्वभावाचा, सुशील, आदरशील, सालस, विनयी, सत्कारी, शिष्टसंप्रदायी, सभ्य, आदरनिष्ठ. ५ दिवाणी. ६ व्यवस्थित, सुधारलेला, सुशिक्षित, सरकारच्या कायद्याप्रमाणें वागणारा. Civ'ian *n. one employed on civil duties* मुलकी काम करणारा-पाहणारा, &c., गांवखात्याचें काम पाहणारा. &c., रोमन लोकांचे कायदे जाणणारा. २ कायद्यांत प्रवीण. ३ रोमन लोकांचे कायदे जाणणारा शिक्षक. Civ'ilist *n.* (*obs.*) मुलकी कायद्यांत प्रवीण. Civil'ity *n.* (v. A. 4.) *complaisance, politeness, courteousness* शिष्टता *f,* माणुसकी *f,* मनुष्यपणा *m,* माणुसपणा *m,* गृहस्थगिरी *f,* गृहस्थपणा *m,* तवाजू *f,* भलमाणसाई *f,* भलाई *f,* सभ्यता *f,* सुजनता *f,* सुजनत्व *n,* सौजन्य *n.* [ Civilities and courtesies आदरसत्कार *m,* आदरमान *n,* आदरउपचार *m. pl.,* मानसन्मान *m,* ताजीमतवाजू *f,* आगतस्वागत *n,* मुजारत *f,* उपचार *m, pl.,* ऊठबैस *f,* उठाबसा *f.* (*v.* कर, ठेव). Empty C. पैठणी आदर शुष्कोपचार *m. pl.* 'For the civil civility, for the saucy sauce' अहो तर कांहो, अरे तर कांरे. Civ'illy *adv.* माणुसकीनें, गृहस्थपणानें, गृहस्थरीतीनें, सालसाईनें, भलेपणानें, सभ्यतेनें. Civ'ism *n. the principles of good citizenship* नागरत्व *n,* सरकाराविषयीं पूज्य बुद्धि *f.* Civil-case *n.* दिवाणी खटला *m.* Civil-court दिवाणी अदालत *f.* Civil-death निवृत्ति *f,* संसारत्याग *m.* Civil-engineer वास्तुविद्याविशारद; पूल, तळीं, वाडे वगैरेंच्या बांधकामावर देखरेख ठेवणारा (opposed to mechanical engineer). Civil-engineering (opposed to mechanical engineering) *n.* पूल, कालवे, वगैरे बांधण्याचें काम *n,* इमारतविद्या *f,* वास्तुविद्या *f.* Civil-law मुलकी कायदा *m,* दिवाणी कायदा *m.* Civil list *n.* (राजाच्या खासगी खर्चाकरितां तोडून दिलेली) खानगीकडची नेमणूक *f-* रक्कम *f,* राजाच्या खाजगत खर्चास लागणारा पैसा *m.* २ सरकारी तिजोरींतून पगार घेणारे अमलदार, मुलकी आफिसरांची यादी. Civil list pensions राजाची कृपा म्हणून दिलेलें पेन्शन *n.* Civil service *n.* मुलकी खात्याची नोकरी. Civil state *n.* सुजनसमाज *m.* Civil-suit *n.* खाजगी हक्कासंबंधीं अथवा इजा झाली असतां केलेला दावा *m,* दिवाणी मुकदमा *m.* Civil war *n.* स्वचक्र (परचक्राच्या उलट), एकाच देशाच्या लोकांची आपआपसांत लढाई *f,* यादवी. Civil surgeon (opposed to military surgeon) गांवखात्याकडील वैद्य *m,* मुलकी वैद्य. Civil year (कायद्याप्रमाणें) व्यावहारिक वर्ष *n,* सरकारी वर्ष (तीनशें साठ दिवसांचें).

**Civilise,-ze** (siv'-il-iz) [ L. *civilis*, civil. ] *v. t.* माणुस-

कींत-मनुष्यांत आणणें, माणुसकी *f.* मनुष्यसा करणें, सुधारणें, शिक्षित करणें, संस्कृत-विद्याचारसंपन्न करणें. Civ'ilisable *a.* रीतीभातींत व कलाकौशल्यांत सुधारणा करतां येण्याजोगा, संस्करणीय. Civilisā'tion *n.* (v. V.) —*act.* मनुष्यांत आणणें *n.* &c.–*state* माणुसकी *f.* माणुसपणा. २ संस्कृति *f.* सुशिक्षितावस्था *f.* Civ'ilised *p. a.* सुधारलेला, मनुष्यांत आणलेला, माणुसकींत आणलेला. २ विद्याचारसंपन्न, संस्कृत, सुशिक्षित. ३ सुधारलेल्या लोकांसंबंधीं, विद्याचारसंपन्न लोकांसंबंधीं. Civilised government सुधारलेली राज्यपद्धति *f.* Civ'ilizer *n.* सुधारणा करणारा.

Clack (klak) [Fr. *claquer*, to clap.] *v. i. to make a sharp noise* खणखण होणें, ठकठक वाजणें, खटखटणें. २ *to prate* लवलव बोलणें, वटवटणें, बकबकणें. C. *v. t.* टकटक करणें, खणखण करणें. २ बडबडणें, बकबकणें, डोकें उठवणें. C. *n. an unceasing and wearying speech* वटवट *f.* टकटक *f.* ठकठक *f.* खटखट *f.* २ टकटक करणारी वस्तु. ३ वटवट *f.* बकबक *f.* बकवा *f.* ४ *a vociferous woman* वटवटीबाई *f.* वटवट करणारी, गजघंटा *f.* कर्कशा *f.* नारो शंकरची घांट (?) *f.* ५ *colloq.* जिव्हा *f.* जीभ *f.* ६ छूंक पडदा *m. n.* Clack'-dish *n.* खटखट वाजणारी भिकाऱ्यांची थाळी. भिकारी या थाळीचें झांकण लोकांचें लक्ष जावें म्हणून वाजवीत असतात. Clack'er *n. a clacking instrument* (to frighten birds, &c.) खटखटें *n.* ठकठकें *n.* फटफटें *n.* खुटखुटें. Clack'valve खटदिशीं वाजणारें उघडें झांकण *n.*

Clad (klad) or Clothed. *pa. p.* of Clothe (वस्त्रानें) झांकलेला, (कोणत्याही वस्तूनें) झांकलेला, परिधानयुक्त, वस्त्राच्छादित, पोशाख केलेला. २ *fig.* अलंकृत, भूषित, सनाथ, युक्त; as, "In wealth and bliss was Clad."

Clados (klad'os) [Gr. *klados*, a sprout.] *n. bot.* खांदी *f.* फांदी *f.* हा शब्द दुसऱ्या शब्दाला जोडला असतां Clado असें ह्याचें रूप होतें; as, Clado-carpus.

Clag (klag) [cf. Clog.] *v. i.* (मातीनें-मळानें) खराब होणें, चिकटणें, डकणें. C. *v. t.* (मातीनें-मळानें) कपडेकेंस इत्यादि खराब करणें, विघडवणें. C. *n.* चिकटण *n.* डकण *n.* चिकटा *m.* Clag'giness *n.* चिकटाऊपणा *m.* Clag'gy *a.* चिकटाऊ, चिकट.

Claim (clām) [O. Fr. *claimer*—L. *clamare*, to cry out, to call, to proclaim, to declare aloud, to call upon, the verb to Claim has two principal senses:—(1) *to demand as one's own on the ground of right.* (2) *to assert and demand recognition of* (*an alleged right, title, possession, attribute, acquirement or the like*). Sense 1 claims the delivery of the thing; Sense 2 the admission of an allegation.] *v. t.* हक्कानें-वारशानें मागणें. २ दावा करणें–सांगणें, सत्ता सांगणें. ३ (ची) योग्यता दाखविणें, (चा) हक्क स्थापणें, (हक्कानें येणारी) पात्रता असणें, with *g. of s.*; as, He claims our attention. C. *v. i.* हक्कदार होणें, हक्क सांगणें, हक्कानें मागणें; as, "We must know how the first ruler, from whom any one claims, came by his authority." C. *n. a demand of a right or supposed right* मागणें *n.* हक्काची मागणी *f.* सत्तापूर्वक मागणी *f.* २ *a title, a right* वारसा *m.* दावा *m.* अधिकार *m.* सत्ता *f.* हक्क *m.* इलाखा *m.* ३ दाव्याचा विषय *m.* हक्काची वस्तु *f.* ४ (*obs.*) मोठी हांक *f.* Claim'able *a.* दावा *m.* सांगण्याजोगा. Claim'ant *n.* Claim'er *n.* (v. V.) हक्कानें मागणारा, &c. दावेदार, दावेकरी, वारसा-दावा-हक्क सांगणारा. Claim'ed *p. a.* हक्कानें मागितलेला, &c. २ हक्क-वारसा सांगितलेला. Claim'ing *n. act.* हक्कानें मागणें *n.* दाव्यानें मागणें. २ हक्क सांगणें. To lay claim to (संबंधीं) हक्कानें मागणी करणें-हक्क सांगणें.

Clairvoyance (klār-voi'ans) [Fr. *clair*, clear & *voyant*, seeing, *pr. p.* of *voir* (L. *videre*).] *n. keenness of mental perception, clearness of insight into things beyond the range of ordinary perception* सूक्ष्मदर्शन, *n.* हरवलेल्या वस्तु-दृष्टीच्या आडच्या वस्तु &c. पाहण्याची शक्ति *f.* ही शक्ति हची त्याला कमावितां येते अशी थिआसफिस्ट लोकांची समजूत आहे. २ सूक्ष्मदृष्टि *f.* Clairvoy'ant, Clairvoy'ante *n.* सूक्ष्मदर्शी, पाहण्या, पाहणारा. [पाहणारा is the recognised technical word among us for a clairvoyant. He makes a spot of black collyrium on the palm of his hand and is supposed to see the things at a distance in that spot. According to the English idea, a clairvoyant sees things hidden from him simply through the exercise of his special power and does not require the medium of a black spot, &c. A clairvoyant is not अन्तर्ज्ञानी or अतींद्रियज्ञानी. The latter is a far superior being.]

Clam (klam) [Origin. *clam-shell*. The name refers either to the action of the two valves of the shell in shutting like a pair of clams or pincers, or to the tenacity with which these animals cling to the rocks.] *n.* एकजातीचा शिंपींतील मासा *m.*

Clam (klam) [Ger. *clam*, fetter.] *n.* मजबूत चिमटा *m.* पकड *f.*

Clam (klam) [A. S. *clæman*, to smear.] *v. t. to clog as with glutinous or viscous matter* चिकचिकीत करणें, चिकट पदार्थ लावणें. C. *v. i. to adhere* चिकट होणें, चिकटणें. C. *n.* चिकटपणा *m.* ओलावा *m.* चिकटाई *f.* Clam'ming *pr. p.* Clam'med *pa. p.* Clam'mily *adv.* चिकटाईनें. Clam'miness *n.* चिकटाई *f.* चिकटी *f.* चिकचिकाट *m.* Clam'ming *a. sticky* चिकट, चिकचिकीत, चिडचिडीत. २ (मरणाच्या पूर्वीं आलेल्या घामानें झालेला) चिकचिकीत; as, "The cold sweat stands upon his clammy limbs."

Clam (klam) [Abbreviation of Clamour, which see.] *n.* घंटांचा खणखण नाद *m.* C. *v. t.* & *v. i.* घंटानाद करणें-होणें.

Clamant (klam'ant) [L. *clamans*, *clamantis*, *pr. p.* of

*clamare*, to cry out. ] *a.* मोठ्यानें गलबला करणारा; as, C. children. Clam'ancy *n* निकड *f*, जरूरी *f*, तांतड *f.*

Clamber (klam'bėr) [ From root of Clamp. ] *v. i. to climb with difficulty* धरून धरून-वेंघत-वेंघत-हाता-पायांनीं-हातपाय टेंकून चढणें, प्रयासानें चढणें. C. *v. t.* प्रयासानें चढून वर जाणें. C. *n.* प्रयासानें चढणें *n.*

Clamour (klam'or) [ O. Fr. *clamour*, *clamur*.—L. *clamor*, from *clamare*, to cry out ; see Claim. ] *n. a great outcry or vociferation, a popular outcry arising from disaffection or discontent* गलबला *m*, गलका *m*, गलबला *m*, गवगवा *m*, कलकल *f*, कलकलाट *m*, आरोळी *f*, ओरड *f*, गोंगाट *m*, कोलाहल *m*, *intens.* गलबलाट *m.* C. *v. i.* पुकारा *m*-गोंगाट *m*-गलका *m*-गलबला—&c. करणें-भांडणें, ओरड *f.* करणें, आग्रह-पूर्वक-अविवेकी मागणी करणें; as, "The obscure bird Clamoured the live-long night." २ ( with *against* ) नांवें बोंब *f*- हाका मारणें *g. of o.*, नांवें शंख *m*- बोंब *f*- हाकाटा *m*- हाकाटी *f.* करणें *g. of o.* C. *v. t.* गोंगाट *m.* करणें, ओरड *f.* करणें, पुकारा *m.* करणें. Clam'orous *a.* गलबल्या, गोंगाट्या, बोंभाट्या, गलबलाचा, गलबल्या, गलबला करणारा. Clam'orously *adv.* (v. N) गलबला-करून. Clam'orousness *n.* गोंगाट *m.* Clam'ourer *n*- गोंगाट करणारा. To clamour bells जलदीनें मोठा आवाज व्हावा म्हणून जोरानें घंटा ठोकणें. To clamour for विनंतिपूर्वक मागणी करणें.

*N. B.*—Clamour is not the ordinary गलबला or गोंगाट but it is the गलबला or गोंगाट that proceeds from complaint, disapprobation or from a feeling of hostility.

Clamp (klamp) [ A. S. *clam*, fetter. ] *n.* सांधपट्टी *f*, जोर(ड)पट्टी *f*, आधारपट्टी *f.* २ *fig.* बंधन *n.* ३ *mech. eng.* माकडी *f.* ४ पकड *f.* C. *v. t.* सांधपट्टी देणें-मारणें. Clamp-nail सांध पट्टी बसविण्याचा मोठ्या डोक्याचा खिळा *m.* Clamping plates चाटोळ्या सांधपट्ट्या *f. pl.*

Clamp (klamp) [ Usually Clamp-shell. This Clamp is a specific application of the last word Clamp.] शिंपींत राहणारा एक प्रकारचा मासा *m*, शिंपल्या (मासा) *m.*

Clamp (klamp) [ Dutch. *klamp*, heap or from the first Clamp. ] *n.* भाजण्याकरितां केलेला विटांचा ढीग. २ ढीग *m.* ३ (हिवाळ्यांत बटाटे नासूं नयेत म्हणून) गवतमातीनें लिपलेली बटाट्यांची रास *f.*

Clamp (klamp) [ Of imitative origin. ] *n.* जोरानें टाकलेलें पाऊल *n.* C. *v. i.* दणदण चालणें, पाय हापटीत चालणें.

Clan (klan) [ Gael. *clann*, offspring, descendants. Irish. *cland*, *clann*, descendants, a tribe; cf. Sk. *kula* (*n.*), a herd, family. ] *n. a tribe or collection of families, regarded as having the same common ancestor or bearing the same surname* कूळ *n*, वंश *m*, घराणें *n*, गोत्र *n*, एकाच कुळपुरुषाचा विस्तार *m.* २ स्कॉटलंडांतील हायलंडर लोकांच्या निरनिराळ्या कुळां-पैकीं एक कूळ *f*; as, The C. of Macdonald. ३ एकाच मूळपुरुषापासून उत्पन्न झालेल्या व एकाच नाइकाचे आज्ञेंत राहणाऱ्या लोकांची जात *f*- वंश *m*- पक्ष *m.* ४ एका कटाची मंडळी *f.* Clan'nish *a.* टोळीचा. २ संकुचित स्वभावाचा. ३ असुक एक टोळीच्या-वळणाचा-विशेष गुण-दोषांनीं युक्त. ४ आपल्याच टोळीचा फाजील अभिमान असणारा. Clan'nishly *adv.* Clan'nishness *n.* Clan'-ship *n.* टोळ्याटोळ्यांच्या विभागानें असणें *n.* २ आप-आपल्या टोळीसंबंधानें किंवा कटांतील मंडळीसंबंधानें असलेला अभिमान *m*- प्रेम *n*, संकुचित स्वभाव *m.* Clan'sman *n.* कुळापैकीं गोत्रापैकीं-एक गृहस्थ *m*, सगोत्रज, सकुल्य.

Clancular (klan'ku-lar) [L. *clancularius*, from *clanculum*, dim. of *clam*, secretly.] *a. secret, sly* गुपचुपीचा, खाजगी, गुप्त,

Clandestine ( klan-des'tīn ) [ L. *clandestinus*, secret, close. ] *a. conducted with secrecy usually for an evil purpose* चोरीचा, गुपचुपीचा छपावणीचा, गुप्त; as, A C. marriage. C. doings. Clandes'tinely *adv.* ( v. A. ) चोरून, लपतछपत, लपून, चोरून, चोर-गस्तीनें. [ To GIVE C. आडव्या हातानें देणें.] Clandes'-tineness *n.* चोरटेपणा *m*, गुपचुपपणा *m.* Clandestin'-ity (R) *n.*

Clang (klang) [ L. *clangere*, formed from the sound.] *v. i.* खणखणणें, घणघणणें, झणझणणें, *intens.* झणाणणें, घणाणणें, ठणाणणें, खणाणणें. C. *v. t.* खणखण वाजविणें. C. *n. a sharp, shrill sound* खणखण *f*, घणघण *f*, झण-कारा *m*, दणका *m*, खणखणाट *m*, टणत्कार *m*, खणका *m*, झणझणाट *m*, घणघणाट *m*, दणाणा *m*, घणाणा *m.* २ *fig.* पक्ष्यांचा चिवचिवाट *n.* ३ *mus.* रागाची लचक *f.* Clan'ging *n.* खणखण आवाज *m*, खणखणणारा. Clan'g-or *n.* खणखणीत आवाज *m*, खणखण-झणझण वाज-णारा. Clang'orous *a.* खणखण आवाज करणारा. Clang'ingly, Clang'orously *adv.* खणाणा, खणाखण, झणाझण, झणाणा, घणघण, खणखण, झणझण. Clang'-our *n.* दणका *m.* २खणखणाट *m.* C. *v. i.* खणखणणें.

Clank ( klangk ) [ Prob. formed under the influence of Clink and Clang. ] *n. a sharp, shrill sound* रुणत्कार, झणत्कार, ( दागिन्यांचा ), शिंजित, क्वणित, नूपुर अथवा पैंजण यांचा मधुर आवाज. C. *v. t.* रुणत्कार-झणत्कार करणें. C. *v. i.* रुणत्कार-झणत्कार होणें. Clank'ing *n.* रुणत्कार, झणत्कार. Clank'less *a.* बद्, आवाजरहित.

Clap ( klap ) [ A. S. *clappen*, akin to Icel. & Swed. *klappa* ; Ger. *klaffen*, *v. i.* to yelp ; Dut. *klopken*, *v. t.* to knock.] *n. a loud noise* दणका *m*, कडाका, धडाका *m* ; as, "What fifty of my followers are at C.?" २ (of the hands) टाळी *f.* ३ ( of thunder ) कडाड *m*, गडगडाट *m*, गर्जना *f.* ४ हर्षगर्जना *f.* ५ (*falconry*) *the lower mandible of a hawk* ससाणा पक्ष्याच्या चोंची-

च्या खालचा भाग *m.* C. *v. t.* (दरवाजा-बारी) दणक्यानें-तडाक्यानें बंद करणें. २ टाळी वाजविणें-मारणें-पिटणें. ३ तडकून-झटकन लावणें-मारणें-ठोकणें. ४ थापट मारणें. ५ (हाता सारख्या) सपाट वस्तूनें ठोकणें. ६ दणकन खालीं ठेवणें. C. *v. i.* (थापटी मारल्यासारखा) दणकन आवाज होणें, दणदणाणणें. २ झटकन बंद होणें-लागणें; as, "The doors around me clapped." ३ टाळ्या वाजविणें. Clap'ping *pr. p.* Clap'ped *pa. p.* Clap'-board *n.* लांकडाचीं घरें झांकण्याकरितां केलेला पातळसा तक्ता *m.* Clap-net *n.* दोरी ओढल्याबरोबर बंद होणारें जाळें *n.* Clap'per *n.* टाळी-फटका मारणारा. २ वाजणारी वस्तु *f.* ३ (of a bell) लोळा *m*, लोळी *f.* Clap'-per-claw *v. t.* ओरखडणें. २ धमकी *f.* देणें, खरडपट्टी *f.* काढणें. Clap'ping *n.* टाळी *f.* वाजविणें. ६ Clap'sill *n.* उंबरठा *m*, उंबरा *m.* also Lock'sill. Clap'-trap *n.* *humbug* शाबासकी मिळविण्याकरितां केलेलें भाषण—कृति *f.* शब्दगौरव *m.* C. *a. deceptive, unreal* शाबासकी मिळविण्याकरितां केलेला, खोटा, फसवणुकीचा. २ बेगडी. Claptrap'pery *n.* शब्दगौरवता *f*, बेगडीपणा *m.* Claptrap'pish *a.* To clap eyes on, *colloq.* दिसणें दृष्टीस पडणें, पाहणें. To clap hands (संमति *f.* आनंद-दर्शक) टाळ्या वाजविणें. २ वचन देणें, बोली *f.* करार *m*, करणें. ३ (used formerly in this sense) तिरस्कार *m.* दर्शविणें. To clap the hand to the mouth तोंडावर हात *m.* मारणें. To clap spurs to a horse घोड्याला टांच *f*, मारणें. To clap up एकदम तर्कानें जाणणें, एकदम ताडणें. २ एकदम उचलून कैदेंत टाकणें. To clap wings पंख *m*, फडफडावणें. Clapping-screw *mech. eng.* पकडण्याचा स्क्रू *m*, see Screw. To clap a dish at the wrong door ज्या-ठिकाणीं दाद लागणार नाहीं तेथें अर्ज *m* करणें.

Clap (klap) *n. gonorrhœa* परमा *m*, पूयप्रमेह *m.*

Claque (klak) [Fr. *claquer*, to clap the hands.] *n.* नाटक चांगलें आहे असें दर्शविण्याकरितां टाळ्या पिटणारी पगारी प्रेक्षक मंडळी *f.* २ भाडोत्री उत्तेजकसंस्था *f.*

Clarence (klar'ens) [Named after William IV. when the Duke of *Clarence.*] *n.* एक प्रकारची गाडी *f*, चौचाकी बुरख्याची चार माणसें बसण्याची गाडी *f.*

Clarendon (klar'en-don) *n. print. a style of type having a narrow and heavy face (it is made in all sizes)* अरुंद पण भरींव ठसा ज्याचा आहे असा एक प्रकारचा टाईप *m.* अक्षरमुद्रिका *f.* वाटोळ्या वळणाचा आंखूड टाईप *m*, क्लेरेंडन टाईप *m.*

Claret (klar'et) [O. Fr. *claret, clairet*, from *clair.*—L. *clarus*, clear.] *n.* एक प्रकारचा तांबूस पिंगट रंगाचा द्राक्षासव *m*, क्लारेटदारू *f.* २ *slang. the blood* रक्त *n.* C. *a.* दारूप्रमाणें तांबूसपिंगट रंगाचा. C. *v. i.* दारू पिणें. Claret-cup *n.* क्लारेट.दारूचा पेला *m*, ब्रँडि, साखर व लेमोनेड ह्या तिहींचें केलेलें पेय *n.* Clar'et-jug *n.* क्लारेट दारूचा चंबू *m.*

Clarify (klar'i-fī) [L. *clarus*, clear & *facere*, to make.] *v. t. to defecate, to fine, to clear* (said of liquids as wine, syrup, &c.) मळ *m.* मळी *f.* काढणें, (उष्णता लावून) शोधन *n.* करणें, निवळवणें. २ *to brighten or illuminate* स्वच्छ-निर्मळ करणें; as, "To C. his reason and to rectify his will." ३ *to glorify* (*obs.*) अमर करणें, मोठेपणा *m.* मान *m.* देणें. C. *v. i.* *to become clear from feculence* निवळणें, शुद्ध होणें, २ *spec.* मळ *m.* मळी *f.* निघणें, गाळ बसणें *g. of s.* Clar'ified *p. a.* शोधलेला, (कढवून) स्वच्छ केलेला, मळ छाटलेला, शोधित, शोधींव. Clarifica'tion *n.* (v. V. T.)—*act.* शोधनक्रिया *f*, मळ काढणें *n*, शुद्धि *f*, शोध *n*, शोधन *n.* Clar'ifier *n.* साफ करणारा, &c., शोधक (S). To clarify butter लोणी कढवणें, तूप करणें.

Clarion (klar'i-on) [O. Fr. *clarion.*—L. *clario, clarionis*, so called from its clear tone, from *clarus*, clear.] *n. the trumpet* तुतारी *f*, कर्णा, मोरशिंग *n*, रणशिंग *n.* Clar'inet, Clar'ionet *n.* एक प्रकारचें वाद्य *n*, वरील प्रकारचें लहान वाद्य *n*, लहान कर्णा *m.*

Clarity (klar'i-ti) [L. *claritas*, clearness.] *n.* (*obs.*) स्वच्छता *f.*

Clash (klash) [Of imitative origin.] *n. collision* आपटणें, धक्का *m*; as, "A roll of cannon and clash of arms." २ *opposition* दणका *m*, तडाखा *m*, कचकचाट *m*, कचाकच *f*, कचाकची *f*, चकमक *f*, संघर्ष *m*, संघर्षण *n*, घासणी *f*, घासाघास *f*; घासाघीस; as, "Clashes between popes and kings." I *a clashing sound* तडाका *m*, धडाका *m*, कडाका *m*, धडाड *m*, धडधडाट *m.* II (as, of musical instruments) गजर *m*, झंगड *f*, कटका *m*, कडाखा *m.* III (as, of swords) (तरवारींचा) खणखणाट *m*, झपाटा *m*, झमाझमी *f*, चकमक *f*, चकाचकी *f.* IV विरुद्धता *f*, प्रतिकूलता *f.* C. *v. i. to strike or drive against with force* एकमेकाशीं लागणें, धडक *f.* धक्का *m.* बसणें, परस्परांचा झपाटा *m.* सपाटा *m.* तडाका *m.* &c. बसणें, आपटणें, एकमेकांशीं आदळून वाजणें-लागणें-दणाणणें. २ *fig. to meet opposingly, interfere, or collide* घांसणें, घांसणी *f.* होणें *g. of s*, लढणें, एकमेकांस आडवा-वांकडा-येणें, एकमेकांस नडणें, चकमक-कचक *f.* झडणें-उडणें *g. of s.*, परस्परविरोध *m*, पडणें-होणें *g. of s.* C. *v. t.* एकमेकांवर आपटणें. Clashed *pa. t.* & *pa. p.* Clash'ing *pr. p.* Clash'ing *n.* आपटणें *n*, संघर्ष *m*, संघर्षण *n*, घासाघीस *f*, विरुद्धता *f*, परस्परविरोधी. C. *a* आपटणारा, धडाक्याचा, आवाज करणारा, विरुद्ध, प्रतिकूळ.

Clasp (klasp) [O. E. *claspen*, *clapsen*, probably akin to E. *Clap.*] *n. a hook, a hold* फांसा *m*, अडकण *n*, अडकवण *n.* २ *a close embrace* परिरंभ *m*, आलिंगन *n*, कवटाळणें *n*, कवळणें *n*, आंगकवळी *f.* मिठी *f.* C. *v. t.* फांसा *m*, लावणें. २ *to hug* आलिंगन *n.* देणें, आलिंगणें, कंवटाळणें, वेंगाटणें, कवळून धरणें, कव *f.*

गव *f.* घालणें or कवेंत-वेंगेंत धरणें. [To C. to one's bosom पोटाळणें, पोटाशीं धरणें, उराशीं धरणें.] ३ *to catch and hold, to grasp* आवळणें, आवळून धरणें, मुठींत-चौड्यांत धरणें. Clasp'ed *p.* (v. V.) कंवटाळलेला, आलिंगित, आंवळलेला, आंवळून धरलेला. Clasp'er *n.* ताणा *m,* पागोरा *m.* २ फांसा *m.* Clasp'ing *n. act.* कवळणें *n,* कवंटाळणें *n,* कवळून धरणें *n,* आलिंगन *n,* आंगकवळी *f,* आवळणें *n.* Clasp-knife *n.* मोडसुरा *m, dim.* मोडसुरी *f,* मुठींत पात बसणारा-मिटणारा चाकू *m.* Clasp-lock *n.* कमानीच्या साधनानें लागणारें कुलूप *n.* Clasp-nut *n. mech.* पकडचाकी *f.*

Class (klass) [Fr. *classe*, a rank.—L. *classis*, a class, a collection.] *n. a group of individuals ranked together as possessing common characteristics* जाति *f,* जात *f,* गण *m,* वर्ग *m,* पक्ष *m,* विल्हे *f,* विल्हा *m,* प्रत *f,* खातें *n,* प्रकरण *n,* प्रकार *m,* मंडळी *f. pl;* as, The different classes of society; The educated classes. २ (of scholars) वर्ग *m.* ३ (of people or men) जाति *f,* जात *f,* मंडळी *f,* लोक (in comp. as, ब्राह्मणलोक, शूद्रलोक, &c.) [The higher classes, compreh. उच्च-श्रेष्ठवर्गाचे लोक, केवळ काबाडकष्ट न करणारे लोक. The lower classes, compreh. काबाडकष्ट करणारे लोक, खालच्या-कनिष्ट वर्गाचे लोक.] C. *v. t. to classify* जात *f.* लावणें, प्रतवार-जातवार-विल्हेवार लावणें, वर्ग *m.* करणें-बांधणें, प्रकार-प्रत करणें. C. *v. i.* वर्गांत असणें, सवर्गी होणें. Class'able, Class'ible *a.* वर्ग करण्याजोगा. Class'ed, Class'ified *p.* (v. V.) जातवार लावलेला, *spec.* गणीभूत, वर्गीभूत-कृत. Class-fellow,-mate *n.* सहाध्यायी *m,* शाळेंतील सोबती *m.* Class'ic *n.* उत्तम ग्रंथ *m,* साहेबनामा *m,* प्राचीन ग्रीक किंवा लॅटीन भाषेंतील ग्रंथराज, ग्रंथोत्तम, कोणत्याही कलेचें श्रेष्ठकाम, आपआपल्या जातींतील श्रेष्ठ वस्तु, कलोत्तम. २ उत्तमग्रंथलेखक *m.* कविराज *m,* वरकवि *m,* श्रेष्ठकवि *m,* उत्तम ग्रंथकार *m,* सर्वमान्य अशा श्रेष्ठ नियमांप्रमाणें ग्रंथ लिहिणारा किंवा एखादें कलेचें काम करणारा. ३ रोमन व ग्रीक लोकांच्या उत्तम ग्रंथांत प्रवीण मनुष्य *m.* ४ (in this sense used in the *pl.*) प्राचीन ग्रीक किंवा लॅटिन भाषेंतील ग्रंथराजसमूह, कोणत्याही भाषेंतील ग्रंथराजसमूह. Class'ic, Class'ical *a.* श्रेष्ठ पहिल्या प्रतीचा-वर्गाचा, प्रथमवर्गीय, सरस, उत्तम. २ *of or relating to the first rank in literature or any other art* ग्रंथराजीय, सर्वमान्यग्रंथासंबंधीं, कोणत्याही ललितकलेच्या उत्तम कृतीसंबंधीं, कलाकृतिराजीय. ३ *spec.* प्राचीन ग्रीक किंवा लॅटिन प्रथमवर्गीय ग्रंथकारासंबंधीं, कोणत्याही प्राचीन पहिल्या प्रतीच्या ग्रंथकारासंबंधीं. ४ *approved, standard* सर्वमान्य, सर्वोत्कृष्ट. Class'icalness, Class'icality *n.* प्रथमवर्गीयता *f,* ग्रंथराजीयता *f,* कृतिराजीयता *f,* सर्वमान्यता *f,* सर्वोत्कृष्टता *f.* Class'icality *n.* पहिल्या प्रतीची विद्वत्ता *f,* प्रथमवर्गीय विद्वत्ता *f.* २ प्रथमवर्गीयकृति. Class'ically *adv.* सर्वोत्कृष्टतेच्या यत्तेप्रमाणें, &c. Class'icism सर्वोत्कृष्टत्वाचीं तत्त्वें *n. pl,* सर्वोत्कृष्टतेचें मान *n.* २ सर्वोत्कृष्ट ग्रंथांत वापरलेली भाषासरणी *f.* ३ सर्वमान्य विद्वत्ता *f.* Class'icist *n.* प्राचीन ग्रंथराजांचा अभिमानी *m.*-कैवारी *m.* ललितकलांतील सर्व श्रेष्ठकृतींचा अभिमानी *m.* Classificā'tion, Clas'sing *n.* (v. V.)—*act* जातवार लावणें *n,* प्रतवार लावणें *n,* &c., विल्हेवारी *f,* प्रतवारी *f,* वर्गीकरण *n.* [C. of soils प्रतबंदी *f.* Roll of the classes of soils प्रतवारी *f.*] Class'ificā'tory *a.*

*N. B.*—Classical शब्दाचा मूळ अर्थ वर्गाचा असा आहे. परंतु तो अर्थ सध्या लुप्त होऊन पहिल्या किंवा श्रेष्ठ वर्गाचा असा त्याचा चालू रूढार्थ झाला.

Clastic (klas'tik) [Gr. *klastos*, broken, from *klein*, to break.] *a.* निरनिराळया तुकड्यांचा केलेला.

Clatter (klat'er) [A. S. *clatrung*, a rattle.] *v. i. to rattle* खटखटणें, खटखट वाजणें, घडघडणें, कडकडणें, खळखळणें(?) खळखळ वाजणें (?) *intens.* घडाडणें, कडाडणें, खळाळणें. २ *to chatter, to talk fast and noisily* बडबडणें, वकवकणें, वटवटणें. Clat'ter, Clat'tering *n.* (v. V. 1)—*act.* खटखटणें *n,* घडघडणें *n,* तडाका *m,* धडाका *m,* कडाकडी *f,* धडाधडी *f. intens.* खडखडाट *m,* खडाड *m,* घडघडाट *m,* २ *commotion, disturbance* बडबडणें *n,* टकळी *f,* जल्पन *n,* वडबड *f,* बकबक *f,* टकटक *f,* कटकट *f.* २ *hubbub* कडाकडी *f,* धडाधडी *f,* गोंगाट *m,* गुल *f,* गलबला *m.* Clatter'ingly *adv. rattlingly* घडघड, *intens.* खडाखड, फडाफड.

Clause (klawz) [Fr. *clause*.—L. L. *clausa*, equivalent to L. *clausula*, a clause, properly of a closed rhetorical period, from *claudere*, to shut, to end.] *n.* (of a sentence) वाक्यांतर्गतवाक्य *n,* पोटवाक्य *n.* Principal C. प्रधानवाक्य. Subordinate C. गौण वाक्य. Noun C. नामार्थक वाक्य, नामवाक्य. Adjectival C. विशेषणार्थक वाक्य. Adverbial C. क्रियाविशेषणार्थक वाक्य, क्रियाविशेषणवाक्य. Co-ordinate C. समानाधिकरण वाक्य, समानवाक्य. Dependent C. परतंत्र वाक्य. Independent C. स्वतंत्रवाक्य. Clause पोटवाक्य. Phrase वाक्यांश.] २ *a stipulation article or proviso, in a legal document* कलम *n,* पोटकलम *n,* प्रकरण *n.*

*N. B.*—The distinction between 'a Word,' 'a Phrase', 'a Clause' & 'a Sentence' should be noted 'Wisdom' is a word; 'of wisdom' is a phrase; 'He is a man of wisdom' is a sentence. 'Every one who possesses wisdom will think well before he does anything'. The whole is a sentence and 'who possesses wisdom,' 'every one will think well' & 'before he does anything' are clauses.

Clavicle (klav'i-kal) [Fr. *clavicule*.—L. *clavicula*, dim. of *clavis*, a key.] *n. the collar-bone* गळयाचें हाड, सरी *f,* अक्षक *n.* Clav'icular *a.* सरीचा, अक्षकासंबंधीं, अक्षकविषयक.

मोनियर वुइल्यमप्रभृति कोशकारांनीं दिलेला 'जत्रु' शब्दाचा Clavicle or collar bone असा अर्थ

डा॰ गर्दे यांच्या मताप्रमाणें चुकीचा आहे. Clavicle ला डा॰ गर्दे अक्षक हा शब्द योजितात. डा॰ गर्दे यांच्या वाग्भटाच्या भाषांतरांतील जत्रु शब्दावरील टीप पहा.

Claw (klaw) [A. S. *clawu*, *clea*, claw.] *n.* नखी *f.* पंजा *m.* नख *n.* २ (of a lobster, crawfish) नांगा *m.* नांगी *f.* नांगडा or नांगाडा or नांगोडा *m.* आंकडा *m.* ३ *the nail*—(in contempt) नखरुड *n.* C. *v. t.* ओरबाडणें, नखानें तोडणें-धरणें, विचकुरणें, बुचकुरणें, बोचकडणें or बोचकरणें, विचकुरा *m-* बोचकरा *m.* घेणें *g. of o.*, बोचकरणें or बोचकडणें. Clawe'd *p. a.* (v. V.) नखानें तोडलेला, पंजानें ओरबाडलेला. २ *having claws* नखी, नखाचा. Claw'ing *n.-act.* विचकुरणें *n.* विचकुरा *m.* बुचकुरा *m.* बोचकडा or बोचकरा *m.* ओरबाडा *m-* ओरखडा *m.*

Clay (klā) [A. S. *clæg*, akin to A. S. *clam*, clay.] *n.* चिकणमाती *f.* शेडमाती *f.* शेडी *f.* शाडू (शेडू) *f.* माण *f.* शेड *f.* २ माती *f.* [Potter's C. कुंभारमाती *f.* White C. गोपीचंदन *n.* मुलतानी माती, शाडू, गोपीचंदन हे सर्व *clay* चे प्रकार आहेत.] C. *v. t.* मातीनें स्वच्छ करणें, शुद्ध करणें; as, To C. sugar. Clay-brained (*obs.*) जडबुद्धीचा. Clay-cold *a.* मातीसारखा थंड, अचेतन, निर्जीव, मड्ढ. Clay-eater *n.* मृद्भोजी. (in Brazil and elsewhere). Claye'd *a.* मातीनें शुद्ध-केलेला. २ मातीनें सारवलेला. ३ मातीसारखा केलेला, मातीसारखा. Clay'ey *a.* मातीचा, शाडूचा, शेडीचा. Clay-ground *n.* शाडवट जमीन *f.* शाडूची जमीन *f.* माण-जमीन *f.* Clay'ish *a.* चिकणमातीच्या मिसळीचा, चिखलाचा, मृत्तिकामय, कर्दमरूप. Clay-loam *n.* चिकणलापण जमीन *f.* Clay-marl *n.* शाडू *f.* खडी *f.* पांढरी-दुधाळ माती *f.* Clay-mill *n.* माती तयार करण्याची चक्की *f.* Clay-pit *n.* शाडूची-मातीची खाण *f.* Clay-slate *n.* ज्याचे पापुद्रे लवकर निघतात असा खडक *m.* ठिसूळ खडक *m.* दगडासारखा घट्ट बनलेला मातीचा गोळा. Clay-stone *n.* मातींतील धोंडा *m.* Brick-clay *n.* लोखंड मिश्रित माती *f.* Porcelain C. चिनीमाती *f.* चिनाई भांडीं बनविण्याची माती *f.* To wet one's clay दारू पिणें.

Claymore (klā'mor) [Gael. *claidheamh*, a sword & *mor*, great, large.] *n.* स्कॉटलंडचे डोंगरी लोक पूर्वी वापरीत असलेली एक प्रकारची दोन धारांची रुंद तलवार *f.* खांडा *m.* तेलंगणी तलवार *f.*

Clean (klēn) [A. S. *clæne*, clean.] *a.* साफ, निर्मल, विशद, स्वच्छ, शुद्ध, पवित्र, विमल, चोख, शुचि, स्पष्ट, शुचिर्भूत, चोखट, also चखोट, मलहीन. २ *naked*, *void* लकलकीत, चक्क, लख्ख, लखीलख्ख. ३ चांगल्या घाटाचा, प्रमाणशील बांध्याचा, सप्रमाण; as, C. limbs. ४ सोंवळा, शुचि, निर्दोष, पवित्र, शुद्ध, पापविरहित. ५ *uncontaminated* निरपराध, निर्मल, निष्पापी, अलिप्त. ६ कुशल, चतुर, कसबी; as, 'The legerdemain must be C.' ७ अचानक, सफाईदार; as, A C leap. ८ पूर्ण, संपूर्ण, निःशेष. ९ शुद्ध, सरळ; as, A C. style. १० (shirt, &c.) *washed and ready for use* धुवट, धुवटघडीचा, घडीचा. C. *adv.* *quite*, *entirely* साफ, शुद्ध. २ बिलकूल, सफाई, निखालस, झाडून, पार, अजि, अजिबात. ३ पूर्णपणें. ४ *in a clever, dexterous manner* अचानक, अलग, अलगत, अल्लाद-(अलाद-त). C. *v. t.* साफ करणें, मळी *f.* काढणें, गाळ *m.* काढणें, स्वच्छ करणें, परिमार्जन *n.* करणें *g. of o.*, शुद्ध-निर्मल करणें, धुवून काढणें. २ (with perfumes or unguents) उटणें, उद्वर्तन *n.*- मार्जना *f.* करणें *g. of o.* ३ (*without*) (a well, pond, ditch, &c.) गाळणें, गाळ *m.* काढणें *g. of o.*, उपसणें, उपसा करणें *g. of o.* Cleaned *p. a.* (v. V.) साफ केलेला, शुद्ध, शोधित, शोधलेला, शुचिर्भूत, परिमार्जित, धूत, परिशुद्ध. Clean'er *n.* शोधक, परिमार्जक, मलापकर्षक, साफ करणारा, शोधणारा. २ *mech.* सामान साफ करणारा. Clean'ing *n.* साफ करणें *n.* शोधन (S) *n.* सम्मार्जन *n.* शुद्धि *f.* मार्जन *n.* २ उटणें *n.* धुणें, धुण *f.* Clean'limbed *a.* प्रमाणशील बांध्याचा, बांधेसूद. २ चपल, चलाख. Clean'liness *n.* (klen'liness) सोंगळपण *m.* शुचिर्भूतता *f.* स्वच्छता, चकपकी *f.* चापचोपी *f.* साफसुफी *f.* Clean'ly *a.* *careful to be clean* साफ, शुद्ध, निर्दोष, निष्पापी, चकपक, मलद्वेषी. Clean'ness *n.* स्वच्छता *f.* निर्मळपणा *m.* सफाई *f.* पवित्रता *f.* नैर्मल्य *n.* स्वच्छपणा *m.* शुद्धि *f.* शौच *n.* मलाभाव *m.* मलहीनता *f.* A clean bill of health, see under Bill. To have clean hands निर्दोषी असणें. To clean out धुवून काढणें. २ *slang* निष्कांचन करणें. ३ *colloq.* उपसा करणें, उपसणें. Clean-tongue सरळ-गोड वाणी *f.* To have a clean heart मन निर्मळ-पापभीरु असणें. To keep the hands clean दुष्कर्मांत न पडणें, हात न मळवणें. To make a clean breast of पूर्णपणें-मोकळया मनानें कबूल करणें. To show a clean pair of heels पळ *m.* काढणें, निघून जाणें. The clean thing सरळ गोष्ट *f.* Cleanse (klenz) *v. t.* स्वच्छ करणें, साफ-निर्मळ करणें. २ दोषमुक्त करणें, शुद्ध करणें, पापविरहित करणें, दोष *m-* मळ *m-* रहित करणें. Cleanse'd, see Cleaned. Cleansed'ness *n.* शुद्धि *f.* शौच *n.* Cleans'er, see Cleaner. Cleans'able *a.* स्वच्छ करण्याजोगा. Cleans'ing *n.* शुद्धिकरण *n.*

Clear (klēr) [O. Fr. *cler*, Fr. *clair*.—L. *clarus*, clear, bright, loud, distinct, renowned; cf. Chanticleer, Clairvoyant, Claret, Clarify.] *a.* *bright*, *luminous* साफ, निवळ, स्वच्छ, शुद्ध, नितळ, काचेभिंगासारखा, प्रसन्न (s.); as, "Fair as the moon, Clear as the sun." २ *free from clouds* निरभ्र, निवळ, स्वच्छ, प्रसन्न. ३ *manifest*, *evident*, *apparent* स्पष्ट, व्यक्त, उघड, साफ, प्रकट, प्रत्यक्ष, अभिव्यक्त, झळझळीत. ४ *perspicuous*, *free from ambiguity or obscurity* उघड, सुबोध, उत्तान, बाळबोध, व्यक्त, अगुढ, विपद; as, "One truth is clear: whatever is, is right". ५ *guiltless*, *blameless* निरपराध, निर्दोष, निर्बाध, अलिप्त (applied to persons), शुद्ध; as, "In action faith-

ful and in honour clear." ६ *unobstructed* (of places) मोकळा, खुला, खुलाशाचा, प्रशस्त; as, A clear view. ७ *not entangled, free of* सुटा, मोकळा, मुक्त. [C. OF DEBT अनृण, अनृणी.] ८ (of sounds, voice, &c.) स्पष्ट, व्यक्त, ठास. ९ (of stamps, letters) *clear-looking, conspicuous, distinct, bright* झळझळीत, स्पष्ट, ठळठळीत, ढळढळीत, ठळक. १० (profits) *net* निवळ, नक्की, चोख, ठोक; as, C. profit or gain. ११ (sight) निवळ, तीक्ष्ण, तीव्र. C. *adv.* उघड रीतीनें, स्पष्ट, साफ, अगदीं. २ अचानक, अलगत, अलात. ३ पूर्णपणें, बिलकूल; as, To cut a piece C. off. C. *v. t. to render bright* स्वच्छ करणें, मळ काढणें, मळ छाटणें *g. of o.*; as, "He sweeps the skies and clears the cloudy north." २ *to free from obstruction* मोकळा-साफ-रिकामा करणें, अडगळ *f.* काढणें. ३ *to free from bushes, grass, rubbish, &c.* केरकचरा *m.* काढणें, साफ करणें, झाडें झुडपें काढून साफ करणें. ४ with *off* (debt) *to liquidate, to discharge* झाडणें, फेडणें, वारणें, फिटंफाट *f.* करणें, बाकी *f.* पूज्य करणें, बेवारा *m.* निकाल *m*, करणें *g. of o.*, फडशा *m*, करणें-करून टाकणें *g. of o.* ५ (with *away*) *to remove* काढणें, काढून घेणें, घेऊन जाणें, वारासार *f.* करणें. ६ (with *up*) *to free from ambiguity* उलगडणें, उलगडा *m*, करणें *of o.*, खुलासा करणें, उघडा-स्पष्ट करणें. ७ *to free from the imputation of guilt* (often with *from* before the thing imputed), निर्दोष-निरपराध-निष्कलंक-दोषमुक्त करणें *g. of o.*, उजळ माथ्याचा करणें; as, I am sure he will clear me from partiality. ८ *to gain without deduction* नफ्यांत पाडणें; as, "The profit which she cleared on the cargo." ९ (the bowels) *to purge* साफ करणें, मलशुद्धि *f.* कोष्टशुद्धि *f* करणें. १० (a hedge, a ditch) *to leap or pass by or over without touching or failure.* अलगत-अचानक जाणें-पार जाणें, अलगरीतीनें उडी *f.* मारणें; as, "The horse has cleared the wall." ११ एकसारखें परिक्षेंत पास होणें; as, He has cleared three examinations in three years. १२ *naut. to clear goods to pay the custom-house dues and duties* जकात देणें, परवाना मिळवणें. C. *v. i. to become free from clouds or fog, to become fair* (often followed by *up*, *off* or *away*) as the sky or weather उघडणें, निवळणें, खुलणें, उघाड होणें, नितळणें, उमणें, उघाड *f.* उघाडी *f* पडणें-होणें *g. of o.* २ हिशेबाचा उलगडा होणें. ३ *to obtain a clearance* बंदर सोडणें; as, The ship cleared for Liverpool to-day. ४ मुक्त होणें, सुटणें, परवाना-रजा-चिठ्ठी *f* मिळणें. Cleared *pa. t. & p. p.* Clearing *pr. p.* Clear'age (R) *n.* साफ केलेली जमीन *f.* Clear'ance *n.* साफ करणें *n*, विशोधन *n*, वाईट माल काढून-विकून टाकणें *n.* २ जहाज हाकारण्याची परवानगी *f, law.* गलबत तपासल्याचा दाखला *m*, गलबताची दाखले चिठ्ठी *f.* ३ दोन पदार्थांतील अंतर *n.* ४ निवळ नफा *m.* Clear-day *n.* स्वच्छ-निरभ्र दिवस *m.* २ सगळा-संबंध-पुरा दिवस *m*; as, The bonds must be left three clear days for examination. Cleared' *a.* मळ छाटलेला, शोधित. २ मोकळा केलेला. ३ चोखलेला. ४ फेडलेला, वारलेला, बेबाकी, फिटंफाट. To be cleared फिटणें. Clear'er *n.* साफ करणारा. Clear-cut *a. having a sharp, distinct outline* स्पष्ट मर्यादा असलेला, सुमर्यादित. Clear-eyed *a.* मर्मज्ञ, भेद पाहण्याची शक्ति असणारा. Clear-headed *a.* विमलमति, विशदबुद्धीचा, साफ डोक्याचा. Clear-head *n.* साफ डोकें *n*, सर्व गोष्टी स्पष्टपणें कळण्याची बुद्धि *f*, विशदबुद्धि *f.* मति *f.* Clearing *n.* साफ करणें *n*, निकाल-लावणें *n.* २ हुंडीवाल्या लोकांनीं एकमेकांच्या हुंड्या एकमेकांस देऊन हिशोब चुकता करण्याची रीत *f*, हिशोब चुकता-पूज्यकरणें *n.* ३ *a tract of land cleared of wood for cultivation* शेतकीकरितां झाडें तोडून साफ केलेली जमीन. Clear'ing-house *n.* ज्याठिकाणीं हुंडीवाल्यांच्या हुंड्या एकमेकांनां देऊन हिशोब चुकता करण्याचें वगैरे काम चालतें ती जागा *f* Clearing-nut *n.* ईस्ट इंडीजमध्यें गढूळ पाणी निवळवण्याचें स्टिक्नॉस् पोटॅटोरमचें बीं, निवळीची बीं *f.* Clear'ing-solution *n.* द्रावण. Clear'ly *adv. plainly* उघड, प्रत्यक्ष, साफ, स्पष्ट, निवळ, साक्षात्, धड, धडधडीत. Clear'ness *n.* स्वच्छता *f*, निवळपणा *m*, सफाई *f*, निर्मलता *f*, निर्मलपणा *m.* २ निरभ्रता *f*, स्वच्छता *f*, प्रसाद (S) *m.* ३ उघडेपणा *m*, स्पष्टता *f*, विशदता *f.* ४ उघडेपणा *m*, मोकळेपणा *m*, प्रशस्तता *f*, खुलासा. ५ व्यक्तता *f.* Clear-seeing *a.* तीक्ष्ण डोळ्याचा. २ तीक्ष्ण बुद्धीचा. Clear-sighted *a.* विशदबुद्धीचा, मर्मज्ञ, दूरदर्शी, प्रज्ञावान्. Clear-sightedness *n. acute discernment* दूरदर्शित्व *n.* Clear-starch'er *n.* खळ देऊन कपडे कडकडीत करणारा धोबी. Clear'-starching *n.* खळ लावून कडकडीत इस्त्री करणें *n.* Clear story *n.* (variant of Clerestory) ख्रिस्ती देवळाच्या मध्य भागांतील मजला *m.* Clear-style (of writing) लिहिण्याची सुबोध पद्धत *f*, प्रसन्नता *f.* Clear-voice *n.* स्वच्छ (घोगरा नव्हे असा) आवाज *m.* स्वर *m.* To C. off चल नीघ. To C. out जाणें, निघून जाणें, वाट *f* धरणें. To C. an examination paper घातलेले अगर विचारलेले सर्व प्रश्न सोडविणें. To be cleared out जवळ एक पै देखील नसणें; as, I am quite cleared out माझ्या जवळ एक पै देखील नाहीं. Clear articulation स्पष्टोच्चार. Clear conscience निर्दोष अंतःकरण. To clear the ground *fig.* अडचणी दूर करणें. To clear the course मार्ग खुला करणें. Clear sky निरभ्र आकाश. To clear the throat घसा साफ करणें. २ *fig.* विचार बोलून टाकणें. To clear up भीति, शंका किंवा चिंता योग्य स्पष्टीकरणानें दूर करणें. Coast clear (आगबोटींना दिलेला इशारा) किनारा निर्भय (आहे.) Line clear रस्ता खुला-मोकळा, आगगाडीला रस्ता निर्भय आहे अशी खुणेनें माहिती देतात त्यास ह्मणतात. To keep clear of च्या भानगडींत न पडणें, पासून अलिप्त राहणें. To get clear of संकटांतून पार पडणें.

Cleat (klēt) [M. E. *clete*, a wedge; Dut. *kloot*, a ball.; Ger. *kloss*, *klotz*, a lump, clot, wedge; O. H. Ger. *chloz*, a ball, a round mass.] *n.* पाचरवजा पट्टी *f.* पाचरपट्टी *f.* २ *naut.* (जहाजाच्या बाजूंवर मारलेलें दोरी बांधण्याचें) लांकडी किंवा लोखंडी दुबेळकें. C. *v. t. to strengthen with a cleat* मजबुती-जोराकरितां लांकडाची पट्टी मारणें.

Cleave (klēv) [A. S. *cleofan*, *pa. t.* of *cleaf*, to split *pp. clofen* (English *cloven*).] *v. t. to split* फोडणें, तो-डणें, खांडणें; as, "O Hamlet, thou hast cleft my heart in twain." २ चीर-भेग पाडणें. C. *v. i. to adhere closely, to hold fast, to cling* चिकटणें, चिकटून राहणें; as, My bones C. to my skin. २ *to adhere with strong attachment* प्रेमानें जखडून राहणें; as, "There-fore shall a man leave his father and his mother and shall cleave unto his wife." ३ *to open, to part, to split* तडकणें, तडतडणें, उफलणें. Cleav'ing *pr. p.* Clove or Cleft *pa. t.* Cloven or Cleft *pa. p.* Cleav'-able *a.* फोडाया-तोडायाजोगा, उच्छेद्य. Cleav'age *n.* तडकण्यासारखा दगडांत आलेला ठिसूळपणा *m.* Cleav'er *n. a chopper* चीर *f.* फट *f.* पाडणारा. २ चीर पाडण्याचें हत्यार *n.* ३ (खाटीकाची) सुरी *f.* मांसच्छेदिनी *f.* Cleav'ing *a.* विदारक, भेदक. C. *n.* चिकटणें.

Cleft, (*obs.*) Cliff, clift *n. a crack, a fissure, an open-ing* भेग *f.* चीर *f.* सांधा *f*; as, The C. of a rock. २ कांतडीचा भेतळा *m.* ३ खाप *f.* फांक *f*; as, A C. of orange. A C. between two hills खिंड *f.* खिंडारें *n.*

Cleftgraft (kleft'-graft) *v. t. to ingraft by cleaving the stock and inserting a scion* कलम करणें, झाडावर कलम करणें. Cleftgrafted *pa. p.* Cleftgrafting *pr. p.*

Cleg (kleg) [Northern English Scot. *cleg.*] *n. zool.* घोडमाशी *f.* डांस *m.*

Cleistogamic, Clieistogamous (klistō-ga'mik,-mus) [Gr. *kleistos*, closed and *gamos*, marriage, the Gr. verbal root in *gamos*, perhaps may be allied to Sk. यम्, to restrain.] *a. bot.* उमलल्याशिवाय ज्यांत फळें येतात अशीं (फुलें), नित्यमुकुलित (पुष्पें).

Clement (klem'ent) [L. *clementia*, from *clemens*, mild, meerciful.] *a.* कृपाळू, दयाळू. २ सौम्य, कोमल. Clem'ence (*obs.*), Clem'ency *n.* दया *f.* कृपा *f.* २ सौम्यता *f. pl.* Clemencies. Clem'ently *adv.*

*N. B.*—Clemency is a gentleness of temper as shown in the exercise of authority or power.

Clench (klensh) [M. E. *clenchen*, *klenken*, to strike, to strike smartly, to make to clink; causal of *Klin-ken*, to klink.] *n.* घट्ट धरणें *n.* आंवळणें *n.* दृढग्रह *m.* २ खिळा घट्ट बसविण्याकरितां त्याचा वांकविलेला भाग *m.* खिळ्याचा वांकविलेला भाग. See also Clinch. C. *v. t.* आंवळणें, घट्ट धरणें, (खिळ्यांनीं-बोल्टांनीं) घट्ट बसविणें-आवळणें. ३ सिद्ध करून दाखविणें, कायम-नक्की करणें; as, To C. a bargain, To C. a business. Clenched *pa. p.* Clencher *n.* घट्ट बसविणारा. २ पुरी खातरी करणारें-सिद्ध करणारें विधान. More commonly Clincher.

Clepsydra (klep'si-dra) [Gr. *kleptein*, to steal & *hudor*, water.] *n. a water-clock* घटकापात्र, घटिका *f.* वेलामापकजलयंत्र *n.* जलघटी *f.* घटीयंत्र *n.*

Cleptomania (klep'to-mān-ia) Kleptomania चोरी करण्याची अनिवार्य इच्छा *f.* हा एक विशिष्ट रोग आहे.

Clergy (kler'ji) [O. Fr. *clergie.*—L. *clericus*, a priest.–Gr. *klerikos*, clerical, from *kleros*, a lot, an allotment, the Clergy.] *n. the clerical order* (concre-te)ख्रिस्ती लोकांची धर्मकृत्यें चालविण्याकरितां दीक्षा दि-लेली पगारी मंडळी *f.*-संस्था *f.* २ (collective *pl.*) ख्रिस्ती आचार्यमंडळ *n.* ख्रिस्ती धर्माधिकारी मंडळी *f. pl.*; धर्माधि-कृत मंडळ *n.* ३ (collective, *sing.*) ख्रिस्ती आचार्य *m.* ४ (rarely as numerical *pl.*) पुष्कळ आचार्य *m. pl.*; as, Some hundred C. ५ धर्मपुरुष (on the analogy of राजपुरुष a servant of the king on the secular side. ६ (*obs.*) *a benefit of the clergy* आचार्यस्वातंत्र्य *n.* ख्रिस्ती आचार्यस्वातंत्र्य *n.* cf. ब्रम्हस्वातंत्र्य, राजस्वातंत्र्य, वैश्यस्वातंत्र्य. ख्रिस्ती (आचार्यांचा) धर्माधिकाऱ्यांचा विशेष हक्क *m.* ख्रिस्ती धर्माधिकाऱ्यांच्या हातून मनुष्यवधासारखें महापातक झालें असतां त्याची चौक-शी सामान्य न्यायमंदिरांत न होतां धार्मिक न्यायासना-समोर व्हावी असा हक्क *m.* C. *a.* धर्माधिकाऱ्यासंबंधीं, आचार्यासंबंधीं. Cler'gyable *a. admitting benefit of a clergy, in regard to which benefit of a clergy may be pleaded* ख्रिस्ती धर्माधिकाऱ्याच्या हक्कांतला; as, "A C. felony." Clergyman *n.* ख्रिस्ती धर्माधिकारी *m.* ख्रि-स्ती आचार्य *m.* ख्रिस्तीधर्मपदस्थ *m.* Clergywoman *n.* ख्रिस्ती धर्माध्यक्षाची बायको *f.* २ ख्रिस्ती धर्माध्यक्षबाई (ही धर्माध्यक्षाची बायको नव्हे). Cler'ic *a.* ख्रिस्ती आचार्य मंडळीसंबंधीं. Cler'ical *a.* See Cleric. २ कारकुनाचा, कारकुनी. Cler'icalism *n.* ख्रिस्ती धर्माध्यक्षांनीं प्रतिपादन केलेलीं तत्वें *n.* २ ख्रिस्ती धर्माध्यक्षांचा प्रांत *m.* ३ ख्रिस्ती आचार्यांचा आपापल्या शाखेचा अभिमान *m.* Cleric'ity *n.* ख्रिस्ती आचार्यपदवी *f.* Cler'isy *n.* विद्वद्वृंद *m.* पंडित-मंडळ *n.* २ ख्रिस्तीधर्ममतनिग्रह. Benefit of the clergy, see the 6th meaning of Clergy.

Clerk (klärk) [L. *clericus*, a priest, scholar. See Clergy. The original sense is "man in a religious order, cleric, clergyman," as the scholarship of the Middle Ages was practically limited to the clergy and these performed all the writing, nota-rial and secretarial work of the time, the name Clerk came to be applied to scholar, and specially applicable to a notary, secretary, recorder, accoun-tant or penman. This last meaning is now current.] *n.* (R.) ख्रिस्ती आचार्यत्वाची दीक्षा दिलेला मनुष्य *m.* ख्रिस्ती आचार्य *m.* २ (one of lectors, cantors, acolythists, exorcists, and door-keepers.

con.] *prefix* सम्, सम, समान, सह, स, एक, एकत्र. [COALITION संधि; CO-EXPANSION समविस्तार; CO-RELIGIONIST समानधर्मी; CO-OPERATIVE सहकारी; COWIFE सपत्नी; CO-CENTRIC एककेन्द्रिक; CO-EXIST एकत्र असणें.] २ Company शब्दाचें संक्षिप्तरूप; जसें, The Western India Publishing Co. ३ *math.* Complement शब्दाचें संक्षिप्तरूप; जसें, Co-sine कोटिज्या, किंवा कोज्या; co-tangent कोटिस्पर्शज्या, किंवा कोस्पर्शज्या.

Coacervate (kō'aser'vāt) [L. *co* & *acervare*, *acervatus*, to heap up.] *v. t.* ढीग *m*- रास *f.* करणें (R.). C. *a.* राशीकृत, जमलेला. Coacervātion *n.* रास, ढीग(R.).

Coach (kōch) [Fr. *coche*, coach; Said as early as A. D. 1553 to be a Hungarian word; from *kocsi*, a coach, so called because it was first made at a Hung-village called *Kocsi*, or *Kocs*, near Raab, in Hungary.] *n. a carriage* गाडी *f*, रथ *m.* २ परिक्षेंत पास होण्यापुरतें उत्तम रीतीनें शिकविणारा खाजगी शिक्षक *m.* ३ बोटशर्यतीसाठीं तयार करणारा शिक्षक *m*, कसरत शिकविणारा, तालमींतील वस्ताद *m.* ४ *naut.* (*obs.*) लढाऊ गलबताच्या कप्तानच्या केबीनपुढची मागील बाजूवरील खोली *f.* C. *v. t.* रथांत नेणें, गाडींत नेणें. ५ खाजगी शिक्षण देऊन तयार करणें, खाजगी शिक्षकाजवळ शिकणें. C. *v. i.* (sometimes used with *it*) *colloq.* रथांतून जाणें; as, "Coaching it to all quarters." Coach-box *n.* गाडी हाकणाऱ्याची बसावयाची जागा *f*, कोचपेटी *f.* Coach'-dog *n.* गाडीबरोबर धांवणारा एक जातीचा कुत्रा *m.* Coachee', or Coach'y *n.* गाडीवान *m*, गाडी हाकणारा *m.* Coach'-fellow *n.* जोडीदार घोडा *m.* २ *fig.* जोडीदार, सोबती *m*, सवंगडी *m.* Coach'-hire *n.* गाडीभाडें *n.* Coach'-horse *n.* गाडीचा घोडा *m.* Coach'-house *n.* रथशाला *f*, गाडीखाना *m*, (loosely) तबेला *m.* Coach'ing *n.* घोड्याच्या गाडीनें-चा प्रवास *m.* २ गाड्यानें जाणें-येणें *n.* ३ परीक्षेकरितां तात्पुरतें घेतलेलें शिक्षण *n.* Coaching-clerk *n.* प्रवासाचीं टिकिटें विकणारा. Coach'man *n.* गाडीवान *m*, सूत *m*, सारथि-थी *m.* Coach'manship *n.* गाडीवानाचें काम *n*, अश्वनियंतृत्व *n.* Coach'-master *n.* गाड्या भाड्यानें देणारा, गाडीभाड्याचा धंदा करणारा. Coach'office *n.* (बंग्या) पार्सलें करण्याचें व प्रवासाचीं टिकिटें घेण्याचें हपीस *n.* Coach'-stand *n.* गाड्यांचा अड्डा *m.* Coach'-wheel *n.* गाडीचें चाक *n.* Coach'whip *n.* चाबूक *m.* Coach'y *a.* गाडीसंबंधींचा. २ गाडीच्या घोड्यासारखा. Hackney coach *n.* भाडोत्री गाडी *f.* Mail coach डांकगाडी *f*, टपालगाडी. Stage coach टप्पेगाडी *f*, टप्याटप्यावर थांबून उतारू नेणारी गाडी *f.*

Coact (kō-akt') [L. *coactare*, intensive from *cogere*, *coactum*, to force.] *v. i.* (*obs.*) *to act together*, (*Shakes.*) जुटीनें काम करणें. Coact'ive *a.* (*Shakes.*) जुटीचा, जुटीनें-बरोबर काम करणारा. Coactiv'ity *n.* कार्यसहकारित्व *n.*

Coact (kō-akt') [L. *cogere*, *coactum*, to compel.] *v. t.* (*obs.*) *to compel* (*Shakes.*) भाग पाडणें, सक्तीनें-बलात्कारानें करवणें; as, "The faith and service of Christ ought to be voluntary and not coacted." Coac'tion *n.* भाग पाडणें *n*, करावयास लावणें *n*, बलात्कार *m*, जुलूम *m*, सक्ति *f.* Coact'ive *a.* भाग पाडणारा, करावयास लावणारा, जबरीचा, सक्तीचा, बलात्काराचा, जबरदस्तीचा.

Coadjust (kō-ad'-ju's) [Co + Adjust.] *v. t.* परस्परांशीं मिळता-मिळेसा करणें. Co-adjusted *p. p.* Co-adjustment *n.*

Coadjument (kō-ad-jōō'ment) *n.* (*obs.*) परस्परांची मदत *f*- साहाय्य.

Coadjutant (kō-ad-jōō'tant) [L. *co*, with, *ad*, to, *juvare*, *jutum*, to help.] *a. helping another or others* सहाय करणारा. C. *n.* सहकारी *n*, मदतनीस *m.* Coadju'tor *n.* बिशपाचा मदतनीस *m.* २ सहकारी *m*, सहाय,मदतगार. २ *canon law* प्रतिनिधि. Coadju'tress, Coadju'trix *fem.* साहाय्य करणारी स्त्री. Coadju'torship *n.* मदतगिरी *f*, मदतगारी *f.*

Coadunate (kō-ad'ū-nāt) [L. *co*, with *ad*, to & *unus*, one.] *v. t. bot.* एकत्र करणें, जोडणें, सांधणें. Coad'unate *pa. p.* (जननेंद्रियस्थानाशीं) जोडलेला, संयुक्त.

Coagulate (kō-ag'ū-lāt) [L. *con*, together & *agere*, to drive.] *v. t.* विरजणें, जमविणें, गोठविणें, घट्ट करणें. C. *v. i.* गोठणें, घट्ट होणें, थिजणें (?), विरजणें, दाटणें, सांखळणें. C. *a.* जमलेलें, घट्ट झालेलें. Coagulabil'ity *n.* दाटण्याचा-विरजण्याचा धर्म *m.* Coag'ulable *a.* सांखळण्यासारखा. Coagū'lant, Coag'ulator *n.* विरजण *n.* Coagulā'tion *n.* (v. V. I.)-*act.* विरजणें *n*, जमणें *m*, गोठणें *n.*, *state* जम (used as an abstract noun), विरजण (used as an abstract noun), जमलेलेपणा *m*, विरजलेपणा *m*, सांखळ *m*, घनीभाव *m*, संकलन *n.* Coag'ulātive *a.* जमण्या-गोठण्यासारखा. Coag'ulātory *a.* गोठवणारा, विरजविणारा (पदार्थ). Coag'ulum *n.* विरजलेला-गोठलेला-घट्ट बनलेला पदार्थ *m.*

Coal (kōl) [A. S. *col.* Ger. *kohle*, fire. cf. Sk. ज्वल्, to glow.] *n.* दगडी कोळसा, खाणींतील कोळसा *m*, विलायती कोळसा *m.* [LIVE C. जळजळीत-जिताजीवंत निखारा *m*, इंगळ (ळा) *m*, अंगार *m*, धगधगीत कोळसा *m.* MASS OF HOT AND GLOWING COALS रसाणें *n.* TO CALL OVER THE COALS फुफाट्यावरून ओढणें, फुफाट्यांत घालणें, धसावरून ओढणें, भाजणें.] Coal *v. i.* (आगबोटींत वगैरे) कोळसे घेणें. C. *v. t.* जाळून कोळसा करणें [R]. २ कोळशानें चित्र काढणें. ३ (आगबोटींत वगैरे जाळण्याकरितां) कोळसे भरणें. Coal'bed *n.* दगडी कोळशाचा थर *m.* Coal'black *a.* काळाकुट्ट, काळाडुस्स, कोळशासारखा काळा, अतिशय काळा, काळा शालिग्राम. Coal'-box *n.* कोळसे ठेवावयाची पेटी *f*, कोळसेपेटी *f*, कोळ-

शाची पेटी *f.* Coal′-brass *n.* कोळशांच्या थरांत सांपडणारें पिवळें अशोधित लोखंड *n.* Coal′-field, Coalery *n.* कोळशाच्या खाणीचा प्रदेश *m.* Coal′factor *n.* खाणवाल्यापासून कोळसे घेऊन गलबतवाल्यास विकणारा. Coal′-fish *n.* पाठ काळी असलेला काडसारखा मासा *m.* Coal′-gas *n.* दगडी कोळशाचा धूर *m.* (धुराच्या दिव्यांत वापरतात तो.) Coal′-heav′er *n.* कोळसे वाहणारा मनुष्य *m.* Coal′-house *n.* कोळसे ठेवण्याची जागा *f.*, कोळशांची वखार *f.* Coal′-man *n.* कोळशांत काम करणारा. Coal′-master *n.* कोळशाचे खाणीचा मालक *m.* २ कोळशाची खाण चालवावयास घेतलेला मनुष्य *m.* Coal′-measure *n.* कोळसे मोजण्याचें माप *n. pl.* कोळशांचा विशेष उंचीचा थर *m.* Coal′mine, Coal′pit *n.* कोळशांची खाण *f.* Coal′-meter *n.* कोळसे मापणारा. Coal′-mouse *n.* कोलमाउस नांवाचा पक्षी *m.* Coal′oil *n.* खनिज तेल, दगडी कोळशांचें तेल *n.* Coal′-own′er *n.* कोळशांच्या खाणीच्या कारखान्याचा मालक *m.* Coal′-passer *n.*भट्टीजवळ कोळसे नेणारा. Coal′-scutt′le *n.* कोळसे ठेवण्याचें पात्र *n.* Coal′-tar *n.* ओलें डांबर *f.*, हें विद्युमिनस कोळशापासून करतात, कोलटार *n.* Coal′-trim′mer *n.* आगबोटीवर &c. कोळसे पुरविणारा-भरणारा. Coal′-whip′per *n.* दगडी कोळसे बोटींतून काढून जहाजांत भरून धक्क्यावर नेऊन पोंचविणारा. Coal′y *a.* कोळशाप्रमाणें -चा. Coaling station *n.* ज्या बंदरांत गलबतें कोळसे (स्वतःच्या उपयोगाकरितां) घेतात असें बंदर *n*, गलबतांत जाळण्याकरितां कोळसे घेण्याचें बंदर *n.* Blind or Anthracite coal पेटविला असतां ज्वाळा निघत नाहींत असा कोळसा *m*, आंधळा कोळसा. Bituminous coal पेटविला असतां ज्वाळा निघतात असा कोळसा *m*, जाळ घेणारा कोळसा *m.* Brown coal मूळ लांकडाचे धागे ज्यांत दिसत आहेत असा दगडी कोळसा. Caking coal जळून भाकरीसारखा होतो असा कोळसा *m.* Cannel or Parrot Coal मेणबत्तीसारखा जळणारा कोळसा. Cherry or Soft coal ठिसूळ व तेजदार कोळसा *m.* Black-coal *n.* रेघा ओढण्याचा स्कॉटलंडांतला एक प्रकारचा कोळसा *m.* To blow the coals भांडण चेतवणें, आगींत तेल ओतणें. To carry coals to Newcastle, cf. समुद्रांत पाणी ओतणें, तृप्तास भोजन देणें, अनावश्यक गोष्ट करणें, देशांतील मीठ कोकणांत नेणें, कोकणचे कांदे देशास नेणें. To hand or take over the coals धाक दशपटशा दाखविणें, वाग्दंड-निर्भत्सना करणें. To heap coals of fire on the head of a foe *to melt down his animosity by deeds of kindness* उपकार करून शत्रूला लाजविणें, आपलें अहित केलें तरी त्याचें हित करून शत्रूला शमविणें, त्याचा वैरभाव नाहींसा करणें. Cf. Prov. XXV 21, 22.

*N. B.*—For more accurate meaning of the various kinds of coal, refer to a good text-book on geology.

Coalesce (kō-al-es′) [L. *con*, together, & *alescere*, to grow up, from *alere*, to nourish.] *v. i. to join, to combine* मिळणें, जमणें, एकसूत- एकगोत होणें, जुडणें, मेथकूट *n.* मिळणें. २ जमणें, एक होणें, एकतंत्र *n.* होणें, संधि होणें. Coalesced *pa. t. & p. p.* Coalesc′ing *pr. p.* Coales′cent *a.* एकत्र होणारें. २ *bot.* संधिशील, एकीभाव झालेला. Coales′cence *n.* संगम *m*, ऐक्य *n*, एकीभाव *m*, मिळणें *n*, जमणें *n*, समागम *m*, संयोग *m*, संधि *m.*

Coalition (kō-al-ish′un) *n.* संयोग *m*, समागम *m*, जूग *m*, मिलाफ *m.* २ निरनिराळ्या लोकांचा-पक्षांचा किंवा राजांचा एक मिलाफ *m*, जूट *f*, संप *m.* Cō′alise *v. i.* मैत्री *f.* जोडणें, एकत्र होणें, जमणें. Coali′tionist *n.* जूट जमवून आणणारा, जुटींतील एक. Coali′tioner *n.* जुटींत सामील होणारा. Coalition of letters *gram.* संधि *m.*

Coaptation (kō-ap-tā′shun) *n. the adaptation of parts to each other as of a broken bone or dislocated joint* निरनिराळे तुकडे-भाग एके ठिकाणीं जोडणें-जुळवणें *n*, जम *m*, जुगल *f*, समन्वय *m*, लाग *m*, जुळवणी *f.* [L. *aptare*, to fit.]

Coarse (kawrs) [Fr.-L. formerly *course*, an adjective which arose from the phrase *in course* to denote anything of an ordinary character, hence it came to mean 'rough.'] *a.* (of cloth, paper) जाडसुती, जाड, जाडा, जाडगा, धनगट, दणगट, घन, भरभरीत, भरड, भसाडा, खसखसीत, धोंगड, धोगड, दडस, दडदडीत. (–indef. or carelessly) धडधाकड, जाडा, धोंगडा, जाडाभरडा. २ (of things) *clumsy* धोबड, बोजड, ढोबळ, भोपळसुती. ३ *not delicate* or *fine, gross* मोठा, मोठाधोटा, भोंपळसुती, भरडा, स्थूल. ४ (as a workman) *awkward* झोडकामी, दगडघाशा, भसाडा, घसक्या, घसव्या, झोडकाम्या. ५ (as a work done) *rough* भसाडा, भरड, भोंपळसुती, भसाळ, वेठीचा, धोंगड. ६ (as the hair) *dry, stiff* चरचरीत, भरभरीत, रांठ. ७ *unpolished, inelegant* असभ्य, अशिष्ट, रानवट, गव्हार, अशिक्षित, गैरशिस्त, अचकट, अडबंग, विचकट. ८ (of diet) अरबट, अरबटचरबट, ताककण्याचा; as, C. fare कुभोजन *n*, कदन्न *n.* Coarse-grained *a.* भरड, खसखशीत. २ *fig.* असभ्य, ग्राम्य. Coarse′ly *adv. not finely* जाड, भरड. २ असभ्य रीतीनें, जंगलीपणानें. Coars′en *v. t.* (R.) भरड करणें, असभ्य-ग्राम्यतेचा करणें. Coarse′ness *n.* जाडपणा *m*, जाडेपणा *m*, धोंगटपणा *m*, भरडपणा *m*, जाडी *f.* २ धोबडपणा *m*, ढोबळेपणा *m*, ओबडधोबडपणा *m.* ३ मोठेपणा *m*, भरडेपणा *m.* ४ स्थूलता *f*, स्थूलत्व *n.* ५ भसाडेपणा *m.* ६ ग्राम्यता *f*, अश्लीलता *f.* Coars′ish *a.* कांहींसें जाडेंभरडें.

Coast (kōst) [O. Fr. *coste*, rib, hill, shore, coast, —L. *costa*, a rib, side.] *n. shore* कांठ *m*, तीर *m*, समुद्रकांठ *m*, वेला *f*, बंदरकांठ *m*, समुद्रकिनारा *m*, बंदरकिनारा *m.* २ मर्यादा *f*, सीमा *f.* ३ एखाद्या देशाची बाहेरील सीमा *f.* हद्द *f.* C. *v. i.* कांठ-किनारा

धरून जाणें, किनाऱ्यानें हाकारणें. २ एका बंदरापासून दुसऱ्या बंदरीं जाणें. ३ उतरणीवरून घसरत जाणें. C. *v. t.* किनाऱ्याजवळून गलबत हांकारणें. Coast'er *n.* किनाऱ्याजवळून जाणारें गलबत *n*, किंवा माणूस *n*. Coast-guard *n.* सीमारक्षक. २ वेलारक्षक, समुद्ररक्षक *m*- सैन्य *n*. Coast'ing *a.* एकाच राज्यांतील निरनिराळ्या बंदरीं व्यापार करणारें, किनाऱ्याजवळ राहणारें. C. *n.* किनाऱ्याचे बाजूस हांकारणें-व्यापार *m.* करणें. २ वर पाय सोडून बायसिकल उतरणीवर चालवणें *n.* ३ उतरणीवरून खालीं घसरत जाणें *n.* Coasting-trade *n.* एकाच देशाच्या निरनिराळ्या बंदरांमधील व्यापार *m.* Coast-line *n.* किनाऱ्याची हद्द *f*, किनारा *m.* Coast-waiter *n.* (जहाजांत माल चढला अगर उतरला ह्यावर देखरेख ठेवणारा) जकातखात्यांतील बंदरकारकून *m.* Coast-ward,-s *adv.* किनाऱ्याकडे. Coast'wise *adv.* किनाऱ्यावरून. C. *a.* किनाऱ्याजवळून हाकारलेलें. The coast is clear *fig.* भय नाहींसें झालें, रस्ता मोकळा आहे, शत्रू पळाला.

Coat (kōt) [O. F. *cote*, Ger. *kotte*, a coat.] *n.* आंगरखा *m*, डगलें *m*, डगला *m*, कोट *m.* २ अमुक एक धंद्याचा पोशाख *m*, वस्त्रें, धंदा *m*; as, Men of his C. ३ *an integument, a covering* कवच *n*, आच्छादन *n*, आवरण, सोडण *n*, चोड *n*, चंवड *vul.*, (नारळाचें) कंचुक. ४ (of the eye) पडदा *m*, पटल *n.* ५ *layer, fold, crust* थर *m*, पापुदरा *m*, पदर *m*, पडदा *m.* ६ (of paint, mud, cowdungwash) लेप *m*, लेवा *m*, लिंपण *n*, लपेटा *m*, सारवण *n*, हात *m*; as, A C. of varnish. ७ चतुष्पादांचे केंस. ८ (*obs.*) राजा, राणी किंवा गुलामाचें चित्र असलेला पत्ता *m.* Coat of mail *armour* बक्तर *n*, चिलखत *n.* Great C. or cloak मोठा पायघोळ आंगरखा *m.* Cut your coat according to your cloth आंथरूण पाहून पाय पसरणें, (आदा) पाहून खर्च करणें. C. *v. t.* आंगरखा *m*- डगला घालणें. २ मढवणें, थर *m*-पूट *m.* देणें; as, To C. a jar with tin कल्हई *f.* करणें. Coat-armour, Coat of arms *n.* कुलमानद्योतक रंगानें दाखविलेलीं ध्वजादि चिन्हें *n. pl.* Coat-card *n.* बादशहा, राणी किंवा गुलामाचा पत्ता (खेळण्याचा). Coatee' *n.* पाठीमागें शेपटें लोंबणारा आंगरखा *m*, लांब शेपटांचा आंगरखा *m.* Coat'ing *n.* हात *m.* (in painting), कवच *n*, आवरण *n*, पुट *m*, लेप *n*, लिंपण *n*, आच्छादन *n.* २ आंगरख्याचें-कोटाचें कापड *n.* A Coat of white wash सफेत्याचा हात. To turn one's coat स्वतःचीं मतें बदलणें, एक बाजू *f*- पक्ष *m*- सोडून उलट बाजू-पक्षाकडे जाणें. Turn-coat *n.* जो आपली मतें अथवा पक्ष एकदम सोडतो तो *m.*

Coax (kōks) [From O. E. *cokes*, a fool; *to coax one* being thus to make a *cokes* or fool of him.] *v. t. to persuade by soothing words, to wheedle* फुसलावणें, थापटणें, (कार्यसाधू किंवा हलक्या दर्जाच्या माणसांनीं) आळवणें, आर्जवणें, (ची) लुलुपुतु-आर्जव करणें *n*, लाडीगोडी *f.* लावणें, (मुलांस किंवा दुःखाक्रांत माणसांस) उरीं-पोटीं धरणें or गोंजारणें, चाटूक्तीनें or गोड शब्दानें शांतवन *n.* करणें. To C. a female आईबाई करणें. To C. a male दादाबाबा करणें, बाबापुता करणें. Coax, Coax'er *n.* आळवणारा, आर्जवी, आर्जवू. Coaxed *a.* आळवलेला, प्रार्थित, लाडका. Coax'ing *n.-act.* आळवणें *n*, लाडीगोडी *f*, लाडकेपणा *m*, लुलुपुतु, आर्जव *n*, गुळगुळथापडी *f*, लालन *n.* Coax'ing *n.* (See verb.) Coax'ingly *adv.* लाडीगोडीनें, लाडीकपणानें, दादा बाबा-आईबाई करून, लाडेंकोडें.

Co-axial (kō-ak'sial) [L. *co.* & Axis.] *a.* एकाच अक्षाचा, एकाच आंसाचा, एकाक्षक.

Cob (kob) [A. S. *cop*, *copp*, head, from Welsh *cob*, a top, a tuft.] पुढारी *m*, म्होरक्या *m*, वडा मनुष्य *m.* २ Cobswan, which see. ३ *a short-legged stout pony* आंखूड पायाचा मजबूत तट्टू *m.* ४ फळांतील वाटोळी बी *f*- आठीळ *f*- गर *m.* ५ अंड *m.* ६ गवताची वाटोळी गंजी *f*- उडवें *n.* ७ वाटोळा पाव *m.* ८ दगडी कोळशाचा वाटोळा गड्डा *m.* ९ शाळूच्या-मक्याच्या कणसाचें वाटोळें बाडें *n.* १० बियांतील वाटोळा कोंब *m.* ११ केंसांचा वाटोळा झुबका *m.* १२ गवत घालून कमावलेली चिकण माती *f*, गिलाव्याची माती *f.* १३ ढुंगणावर फटके मारण्याची शिक्षा *f.* Cob wall *n.* कूड *m.* २ गवत घालून कमावलेल्या मातीनें उभारलेली भिंत *f.* C. *v. t. prov.* मारणें. २ *mining* हातोड्यानें फोडणें-लहान तुकडे करणें. ३ *naut.* वादीनें ढुंगणावर फटके मारून शिक्षा करणें.

Cobalt (kō'bawlt) *n.* [Ger. *kobold*, the goblin or demon of Germen mines.] *chem.* रसायनशास्त्रांतील कोबल्ट नांवाचें मूळ तत्व *n*, ह्याचा रंग तांबूसकरडा असतो. Cobalt'ic *a.* कोबल्टाचा-संबंधीं. Co'baltine (tīne) *n.* तालाबरोबर (arsenic) मिसळलेलें खाणींतील अशुद्ध कोबल्ट.

Cobble (kob'l) *n.* गोटा *m*, गुळगुळीत घडलेला गोटा *m.* Cobble-stone *n.* फरसबंदीचा वाटोळा घडलेला धोंडा *m.* C. *v. t.* वाटोळ्या धोंड्यांनीं फरसबंदी करणें.

Cobble (kob'l) *v. t. to mend* (Shoes) (जुने जोडे) तांगडणें, ठिगळ मारणें, जशाचा तसा सांधणें. २ *to make or do clumsily, to bungle* ओबडधोबड करणें, अनाडीपणानें करणें-झोडणें; as, To C. rhymes. Cobb'ler *n.* (v. V. t.) जुने जोडे तांगडणारा, ठिगळ *f.* मारणारा, चांभार *m.* २ अनाडीपणानें काम *n.* करणारा, दगडघाशा, झोडणारा, झोडकामी. ३ दारू *f*, लिंबू *n*, साखर व बर्फ यांचें केलेलें सरबत *n.* Cobb'lery *n.* चांभारकी *f*, चांभारकाम *n.* Cobbler's punch दारू लिंबू, साखर वगैरेचें केलेलें एकपेय *n*- पंच.

Cobelligerent (kōbel-ij'-e-rent) [L. *co*, with, *bellum*, war & *gerere*, to wage.] *a.* or *n.* एकाद्या राष्ट्राशीं दुसऱ्याच्या मदतीनें लढाई करणारें राष्ट्र *n.*

Cobra, Cobra de capello (kō'bra, kō'bra-deka-pe'lo) [Port. *cobra*, also cobra de capello, *i. e.* a serpent

of the hood.—L. *colubra*, a snake or serpent, *de*, of and *capellus*, hood.] *n. zool.* विषारी सर्प *m*, नाग *m*, भुजंग *m.* in covert &c., phraseol. नागोबा *m.* Expanded hood of C. फडा *m*, फडी *f*, फणी *f*, फणा *m.* Figure of ten as seen in the form of the hood of a C. दशांकचिन्हपद्म *n*, दहांचा आंकडा *m.* Gem found in the hood of a C. मोहरा *m*, नागमणि *m.* To expand its hood—the C. फडी *f.* फं-फिंदारणें, फणा करणें-काढणें.

Cobswan (kob-swon) *n.* *a male swan* राजहंस पक्षी (नर).

Cobweb (kob'web) [M. E. *copweb*, *coppeweb*, from *coppe*, a spider & *web*.—A. S. *coppa*, as in *attorcoppa*, a spider; lit. a *poison-bunch from* A. S. *attor*, poison & *cop*, a head.] *n.* कोळ्याचें जाळें *n.* जाल *n*, कोलिष्टि(ष्ट)क *n.* २ सुतेरा *m.* ३ फसविण्याकरितां केलेली युक्ति *f*, पसरलेलें जाळें *n.* ४ (व्यावहारिक दृष्ट्या) निरुपयोगी-निस्सार, कुचकामाची वस्तु *f.* [Filaments of a C. सुतें *n. pl.* झिलमिळ्या. Stretched line of a C. तणावा, ताणवा *m.*] Cobweb'bery *n.* जाळें करण्याची विद्या *f*- कला *f.* २ निःसारता *f*, निरुपयोगिता *f.* Cob'webby *a.* कोलिष्टकानें झांकलेला, कोलिष्टिकासारखा, कोलिष्टिकांनीं व्याप्त. Cobweb of speech, logic, metaphysics &c. वाग्जाळ *n.* Cobweb of learning विशालबुद्धिजनित परंतु व्यवहारांत निरुपयोगी विद्या *f.* Sooty cobweb जळमट *n.*

Cocagne, Cocaigne (kō-kān') [Fr. a land of milk and honey.] (आळशीपणानें) स्वस्थ बसून ऐषआराम उपभोगण्याची काल्पनिक नगरी *m*, अलकापुरी *f*, यक्षनगरी *f*, गंधर्वपुर *m.*

Cocciferous (kok-sif'-ėrus) [L. *coccum*.—Gr. *kokkos*, a berry & *pherein*, to bear.] *a.* बेरीसारखें फळ येणारें.

Coccus (kok'us) [L.- Gr. *kokkos*, grain, seed, *a berry*.] *n. bot.* फलपुटक *n. pl.* Cocci.

Coccyx (kok'siks) *n. anat.* गुदास्थि *n. pl.* Coc'cyges. Coccyg'eal, coc-cyg'ian *a.* गुदास्थीचा.

Cochin-leg (kōchinleg) *n.* हत्तीरोग *m*, पादवल्मीक *n.*

Cochineal (koch'-i-nēl) [L. *coccinus*, of a scarlet colour.] *n.* किरमिजी रंग ज्याचा करितात असा कृमि *m.* २ किरमिजी रंग *m.* (सुकी पूड). [Ball or lump of C. किरमिजी दाणा *m.*]. C. *a.* किरमिजी.

Cochlea (kok'le-a) [L. *cochlias*, a snail.] *n.* सर्पिल शंखाकृति *f*, मलसूत्राकार शंख *m*, गोगलगाईच्या पाठीवरचें घर *n.* २ *anat.* कानाचें शंखाकार विवर *n*, कानाचा शंख *m.* Cochlear'-iform *a.* Coch'-leary, Coch'leate *a.* सर्पिल शंखाकार, मलसूत्राकार, शंबुककवचाकृति, गोगलगाईच्या पाठीवरच्या घरासारखा. Coch'lea'ted *a.* सर्पिल शंखाकार.

Cock (kok) [A. S. *coc*, perhaps in imitation of the cry of the cock. *cf.* sk. कुक्कुट.] *n.* कोंबडा *m*, चरणायुध *m.* २ वायुकुक्कुट *m*, वायुगतिदर्शक-वायुगतियंत्र *n.* (कोंबड्याच्या आकृतीचें). ३ वायुध्वज *m*, वायुज्ञापक *n.* ४ *humorous* नायक *m*, पुढारी *m*, म्होरक्या *m*; as, He is the C. of our party. [C. OF THE WALK धारवार *m*, बुटनाईक *m*, टिकोजी *m*, टिकोबा *m*, वडेमिया *m*, म्होरक्या *m.* C. *of one's own walk* आपल्या घरचा थोर राजा. WILD C. रानकोंबडा *m*, वनकुक्कुट *n.*] ५ *male of birds* नर *m*; as, Cocksparrow. ६ (of a gun) घोडा *m.* ७ (of hay) गंजी, गंज *m. f*, ढिगार *m.* ८ (of a balance) कांटा *m.* ९ (of a hat, turban) झोंक *m*, कोचकी *f*, चोंच *f*, कोकी *f*, राघू *m*, कोंब *m.* १० *spout* कुलपी तोटी *f*, मळसूत्री तोटी *f.* [Cock and bull story *cf.* कुत्र्या मांजराची गोष्ट *f.*] ११ (*obs.*) प्रभातकाल *m*, (*obs.*) कोंबडेआरवणी *f*, अरुणोदय *n.*; as, He begins at curfew and walks till the first C. १२ आढ्याखालचा पोटमाळा *m.* १३ होडकें *n.* Cock *v. t.* (the ears) (पाहतांना) कान *m.* टवकारणें-उभारणें, -चढविणें. २ (the nose) नाक *n.* वर करणें-फुगवणें. ३ (a gun) घोडा *m.* चढवणें-खेंचणें. ४ (डोळा) मिचकावणें-घालणें मारणें. ५ निमुळती गंजी करणें, उटी घालणें. ६ टोपी वगैरे कलावर-कलती-वांकडी घालणें. C. *v. i.* ऐट *f*- गर्व *m.* आणणें, ऐटींत चालणें, नखऱ्यानें डुमकत चालणें. Cockāde' *n.* (कांहींएक खुणेकरितां) टोपीवर लावण्याचा फितीचा झुबका *m.* Cockalō'rum *n.* लब्धप्रतिष्ठित हलका मनुष्य *m.* २ मुलांचा एक प्रकारचा खेळ *m.* Cock'-broth *n.* कोंबड्याचा रसा *m.* Cock'chafer *n.* एक सपक्ष किडा *m.* Cock'-crowing *n.* आरवणी *f.* कोंबड्याची आरवणी *f*, कोंबड-साद *f.* २ *dawn* कोंबड-पहांट *f.* At C. कोंबडेआरवणीस, कोंबडसादीस. Cocked *a.* उभारलेला, कलावर-झोंकावर घातलेला, झोंकदार, टवकारलेला. Cock'er *n.* रानकोंबड्यांच्या झुंडीमागें जाणारा स्पॅनिअल जातीचा कुत्रा *m.* Cock'brained *a.* अविचारी, हट्टी, आग्रही. Cock-boat होडी *f*, होडकें *n.* Cock'atoo *n.* एक जातीचा तुरा असलेला राघूसारखा पक्षी *m*, काकातू *m*, काकाकुवा *m.* Cock'e-rel, *Cock'le n.* लहान कोंबडा *m.* २ तरुण मनुष्य, तरणा बांड. Cock'le-brained *a.* मूर्ख. Cock'-eye *n.* तिरवा डोळा *m.* Cock-eyed *a.* तिरवाऱ्का. Cockfight,-ing *n.* कोंबड्याची झुंज *f.* Cock-head *n. mech. eng.* निमुळतें डोकें *n.* Cock'-horse *n.* लहान मुलाचा खेळावयाचा लांकडी घोडा *m.* २ (R.) उंच घोडा *m.* C. *a.* घोड्यावर बसलेला. २ *exultant, triumphant* अभिमानी, कारवा वाजविणारा, आनंदोन्मत्त. Cock-loft *n.* शेवटच्या मजल्यावरची छपराच्या खालची खोली *f*, पोटमाळा *m.* Cock-match *n.* कोंबड्याची झुंज. Cock-pit *n.* कोंबडे झुंजवण्याचा आखाडा *m.* २ वेस्टमिनिस्टर येथील प्रिव्ही काउन्सिलची बसण्याची जागा *f.* ३ लढाऊ जहाजांत

जखमी लोक ठेवण्याची जागा *f.* Cock'roach *n.* झुरळ *n*, बागुरडा *m*. Cocks-comb *n.* कोंबड्याची शेंडी *f*, तुरा *m*, कुक्कुटचूडा *f*, *m*. २ *bot.* गुलकेश *m*, मोराची शेंडी *f* तुरा *m*, मयूरशिखा *f*, मयूर *m*. ३ *a fop* अक्कडबाज, नखरेबाज, कुर्रेदार. Cock-shut *n.* आवशी *f*, तिनीसांज *f*. २ (R.) रानकोंबडा धरण्याचें जाळें *n*. Cock-shut time or Cock-shut light *n.* संध्याकाळ *m*. ( probably referring to the evening time when poultry are shut up ). Cock'-shy *n.* ( game ) नेम मारण्याकरितां एखादी वस्तु *f*. फेंकणें *n*. Cock'-sure *a.* खात्रीलायक, खात्रीचा. To be C. पण भोगणें (?), मनांत पक्की खात्री असणें, ठसून राहणें, पूर्ण खात्री *f*. असणें. Cock-swain *n.* गलबतावरचा एक खालचा (वल्हें हांकणारा) मनुष्य *m*, नौकापति *m*. Cock'sy, Cox'y *a.* बढाईखोर उद्धट माणूस. Cock'-tail *n.* दारू वगैरे मिश्रण करून तयार केलेलें पेय *n*. २ सभ्यपणाचा आव घालणारा गांवढळ मनुष्य *m*. Cock'-tailed *a.* शेंपटी उभी केलेला. Cock'y *a.* फाजील अभिमानी, उद्धट. Cock'y-leek'y *n.* लीकफळांबरोबर कोंबडा शिजवून केलेला रसा *m*. Cock-a-doodle-doo कोंबड्याचें अरवणें *n*, कुकूकु. At full cock घोडा ओढून तयार; as, The gun is at full C. Every cock crows on its own dunghill प्रसंग पडला नाहीं तों आपल्या घरीं बसून आपला मोठेपणा सांगणें. Cf. जोंवरी देखिलें नाहीं पंचानना तोंवरी जंबूक करी गर्जना. To cry cock कोरडी आढ्यता *f*. मिरविणें. Stop-cock *n.* ( नळाची ) चावी *f*. To put on with a cock झोंकावर घालणें-लटकाविणें.

Cockatrice ( kok'a-trīs ) *n.* *zool.* नाग *m*, अजगर *m*.

Cock-master *n.* झुंझणारे-लढाऊ कोंवडे तयार करणारा.

Cocket ( kok'et ) *n.* *law.* जकातीच्या अधिकाऱ्याचा शिक्का *m*. २ जकातदारानें दिलेली पावती *f*. ३ जकातीचें नाकें *n*. ४ जकात *f*.

Cockle ( kok'l ) [ Fr. *coquille*, a cockle-shell. ] *n.* गोगलगायी-कालवें इत्यादिकांच्या वर्गांतील शिंपींतील मासा *m*. २ *a testaceous shell* शुक्ति *f*, शिंप-पी, दीर्घकोशी *f*. Cock'led कवचींत असलेले, कवच-गत-लीन. २ शिंपीसारख्या कवचाचें. Cockle-hat *n.* (यूरोपमध्यें) शिंपी बसवलेली यात्रेकरूची टोपी *f*. Cockle-shell *n.* शिंप. २ लहान होडी *f*. The Cockles of the heart हृदयाचे आशय. २ अंतरात्मा ( the wine is said to warm the cockles of one's heart ). Cocklestairs *n. a winding staircase* मळसूत्राकार जिना *m*. Cockle *v. t.* सुरकुती *f*. पाडणें. C. *v. i.* सुरकुती पडणें.

Cockle (kok'l) *n.* एक जातीची शेंगडी *f*. २ तापलेल्या भट्टीचा घुमट *m*.

Cockle (kok'l) [probably L. *coculus* dim. of *coccus*.] *n.* निंदण नांवाची कांटेरी वनस्पति. *cf.* Matt. XIII. 25. २ *fig.* विनाशकारण *n*.

Cockney ( kok'ni ) [ M. E. Coken plur. of cock and A. S. *age*, an egg, so originally an effeminate person.] *n.* शहरांत राहून नाजूक झालेला मनुष्य *m*, पोशा *m*, नाजुक मनुष्य *m*, मेषपात्र *m*, मुरदाड *m*.

Cocoa ( kō'kō ) [Port. & Sp. *coco*, a bugbear, an ugly mask to frighten children; hence applied to the cocoa-nut on account of the monkey-like face at the base of the nut. cf. Sp. *cocar*, to make grimaces.] *n. obs. the tree* माड *m*, नारळ *f*, नारळी *f*, नारिकेल *m*. [ LEAF OR FROND OF A C. NUT TREE झावळी *f*. सांवळी *f*, A HALF OF IT कडण *n*. C. NUT TREE KEPT FOR FRUIT नारळमाड. AS OPPOSED TO मंडारमाड ONE KEPT FOR TODDY FRUIT STALK OF THE C. NUT-TREE शिंपा *m*, शिंपटी *f*. MATTED BRANCH OF C. NUT TREE FOR ROOFING झांप *f*, झावळी *f*. SPATHE OF C.-NUT TREE पोगी *f*, पोई *f*. YOUNG C.- NUT TREE *plantlet* कोंभा *m*, पात *f*. ] २ *the nut* नारळ *m*, नारिकेल *n*, श्रीफल *n*, महाफल *n*. contemptuously बोंडफळ *n*, बेलटें *n*. [A COUPLE OF C. NUTS जोडी *f*. C. NUT OF WHICH THE KERNEL IS THIN & SCANTY खापऱ्या नारळ *m*. CLUSTER OR BUNCH OF YOUNG C.-NUTS पेंद(ड). DRY AND RATTLING C.- NUT गोटा *m*. गुडगुडा नारळ *m*. EMPTY C.- NUT फोल नारळ *m*. वाहोल OR वाहेल *n*. END PIECE OF A C.- NUT टेंबी *f*. FIBROUS INTEGUMENTS OF THE SHELL OF A C.- NUT काथ्या *m*, चोड *n*, चवड *n*. A SINGLE FIBRE OF THEM काथकडी *f*, खरडी *f*, तांतू; FUNGOUS MASS IN THE MIDDLE OF THE C.- NUT मारंदा *m*, मरांदा *m*, कोंब *m*, मोड *m*. GREENISH C.- NUT A NUT WHICH IS ALMOST FULL OF MILK आडसर *m*, कांकडें *n*, शहाळें *n*, शाळें *n*, हातखुरपें *n*, आंधळा नारळ *m*. HALF OF A C.- NUT कवड *f*, वळें *n*, वाटी *f*. HALF OF A C. NUT SHELL USED AS A VESSEL नारळी *f*, नारळीपात्र *n*, वेली *f*, वाटी *f*. HOLLOWED C. NUT, USED TO DISH OUT WATER, FOR KEEPING THINGS IN ओळग OR ओळक *m*, ओळकी *f*, शेंद *f*, डव *m*, डाव *f*, बेला, वेलें, कवंडल. INTEGUMENTS OF THE SHELL OF A C.- NUT DRAWN INTO STRINGS काथाळ, पेढू. THE SAME TWISTED INTO CORDS सुंभ, सुंब *n*. A PIECE OR BIT OF IT सुंभखंड *n*, सुंभखंडी *f*. KERNEL OF A C.- NUT खोबरें *n*. OIL FROM THE KERNEL OF THE C. NUT खोबरेल *n*. OIL OBTAINED FROM C.- NUT SHELLS BY BURNING THEM नरटेल *n*, करंटेल *n*. OIL OBTAINED FROM HEATED SCRAPINGS OF YOUNG C.- NUTS आवेल *n*. OIL OBTAINED FROM THE KERNEL OF THE C.- NUT BY SQUEEZING WITH THE HAND मुठेल *n*. PIECE OF THE KERNEL OF A C. NUT CUT OUT FROM THE SHELL खुरडी *f*. RIPE & DRY C. NUT सुखड OR सुकड *f*. RIPE C.- NUT FALLEN FROM THE TREE गळींब, गळ्या ( नारळ ). SCRAPINGS OF C. NUT चव *m*, चोव *m*. चहू *m*. SHELLS OF A C.-NUT नरोटी *f*, नरटी *f*, करोटी *f*, करवंटी *f*, नारळाची आई *f*, वेली *f*. YOUNG C. NUT खांखोटा *m*, शहाळें *n*, मुकानारळ *m*. ] ३ Cocoa-nut *n. slang* मनुष्याचें डोकें *n*, नारळ, कवटी.

**Cocoa** ( kōkō ) [ a corruption of Cacao.] *n.* (*obs.*) उष्ण कटिबंधांत होणारें काकाओ नांवाचें झाड *n.* २ वरील झाडाच्या बियांचें चूर्ण *n.* ३ ह्या चूर्णापासून केलेलें पेय *n.*

**Cocoon** (ko-kōōn') [ Fr. *cocon*, from L. *concha*, a shell. ] *n. the envelope or case of silky threads, spun by the larvæ of many insects as a covering to enclose them in the chrysalid state* कोश *m*, कोसला *m.* २ (used with respect to similar structure of other animals) रेशमी किड्यांचा कोशेटा *m.* ३ *fig.* कोश *m*, कोसला; as, "The mind can weave itself warmly in the cocoon of its own thoughts." C. used attributively कोशाचा, कोसल्याचा. Cocoo-n'ery *n.* कोशघर *n*, कोशखाना *m*, जेव्हां रेशमी किडे कोशे तयार करितात त्या वेळीं त्यांस ठेवण्याची जागा *f.* Coctible: see Coctile.

**Coctile** (kok'til) [ L. *coctilis*, baked, burnt as bricks, from L. *coquere*, to cook.] *a.* (विटेप्रमाणें) भाजलेला-भाजून तयार केलेला-झालेला. २ भाजलेल्या विटांचा. Coctible *a.* भाजण्यासारखें, भाजण्यास योग्य.

**Coction** (kok'shun) [ L. *coctionem*, cooking *n.* of action, from *coquere*, to cook. ] (R.) *n.* उकळणें, काढा करणें, उकळ. २ (*obs.*) *The ripening of morbid matter which fits it for elimination from the living body* (शरिरांतील) दुष्ट द्रव्यांची परिपक्वता *f.* ३ (*obs.*) *med.* पचनक्रिया *f*, पाचन *n.*

**Cod, Codfish** ( kod, kod'fish ) [ व्युत्पत्ति अनिश्चित. Cod =bagfish अशी एक व्युत्पत्ति लावितात. Flemish *kodde*=*kudse*=club, cudgel अशी दुसरी व्युत्पत्ति आहे. हा काडमासा आमचे कोचीन प्रांतांत आहे. हिकडून ह्याचें कच्चें तेल काढून विलायतेंत जातें.] *n.* काड नांवाचा मासा *m.* Cod'fisher *n.* काडमासे धरणारा मनुष्य *m*, किंवा गलबत *n.* Cod'fish'ery *n.* काडमासे धरण्याचा धंदा. Cod'fish'ing *n.* काडमासे धरणें. Cod'ling *n.* लहान काडमासा *m.* Codoil Codliver oil *n.* काडमाशाच्या यकृतांतून काढलेलें तेल *n.*

**Cod** ( kōd ) [ of old Teutonic origin. ] *n. bot.* शेंग *f*, बीजकोश *m.* २ *med. scrotum* अंडकोश *m*, वृषण *m.* ३ (*obs.*) कोथळी *f*, थैली *f.*

**Cod** ( kod ) [ A. S. *codd* a bag. ] *n.* उशी *f.*

**Coddle** ( kod'l ) [ व्युत्पत्ति अनिश्चित. Some connect it with Fr. *chandeler*, & *candel*, *chande*. Late L. *cal (i) dellum*, to warm or heat gently. ] *v. t. to boil gently, to parboil*, अर्धकच्चा शिजवणें, अर्धकच्चा भाजणें. Coddled *p. t.*

**Coddle** ( kod'le ) [ व्युत्पत्ति अनिश्चित. Fr. *cadder* (?), to cocker, pamper. ] लाड करणें (अशक्त म्हणून), लाडकावणें, लाडानें वागवणें.

**Code** ( kōd ) [ Fr. Code–L. *codicem*, accu. of *codex*, a tablet, book. Codex also means a trunk of a tree. ] *n.* संहिता *f*, कोड *n*, नियमांचा-कायद्यांचा क्रमवार संग्रह *m*; as, Penal Code. २ सांकेतिक शब्द-समूह-कोश *m*; as, Telegraphic code. C. *v. t.* (R.) to enter in a code नियमसंग्रहांत समाविष्ट-नमूद करणें. Codex *n.* पुराव्या ग्रंथाची फार जुनी हस्तलिखित प्रत *f.* Codical *a.* कोडा-संग्रहासंबंधीं. Cod'ify *v. t.* क्रमवार संग्रह करणें. Codifier *n.* Codification *n. act.* क्रमवार संग्रह करणें *n.* २ *state* क्रमवार संग्रह *m.* Codist *n.* कायदेपंडित *m.*

**Codger** ( koj'ėr ) [ Prob. a variant of Cadger, which see. Codger हा शब्द बहुधा तिरस्कारार्थीं वापरतात. ] *n. a mean, stingy, or miserly (old) fellow* कवडी कवडी जमविणारा कंजूष म्हातारा *m*, कंजूष मनुष्य *m.* २ चिरडखोर म्हातारडा. ३ भिकारडा.

**Codical** ( kod'i-kl ) [ L. *codex*, a code. ] *a.* see Code.

**Codicil** ( kod'i-sil ) [ L. *codicillus*, dim. of *Codex*, a code. ] *n.* (मूळांतील अटी स्पष्ट करण्याकरितां किंवा बदलण्याकरितां किंवा रद्द करण्याकरितां जोडलेली) मृत्यु-पत्राची पुरवणी *f*, मृत्युलेखाचें परिशिष्ट *n.* २ पुरवणी *f*, परिशिष्ट *n.* Codicill'ary *a.* मृत्युपत्राच्या पुरवणीचा-सारखा.

**Codify** ( kōdi'fī ) *v. t.* see Code.

**Co-education** ( kō-edū-ka'-shun ) [ L. *co*, and Education. ] *n. education of the two sexes together in school or college* सहशिक्षण *n*, मुलांमुलींचें एकेच ठिकाणीं शिक्षण *n.* Coeducational *a.* सहशिक्षणीय, सहशिक्षणासंबंधीं.

**Coefficacy** ( kō-e-fikasi ) [ L. *co* & Efficacy. ] (R.) सहगुणकारिता *f*, सहपरिणामकारित्व *n.*

**Coefficiency** ( kō-e-fishensi ) [ L. *co* and Efficiency. ] (*R.*) *n.* सहकारिता *f*, सहकार्यकारिता *f.* २ *math.* गुणकता *f*, वेळाप्रकाशकता *f*, वारसंख्याकता. See the word Coefficient.

**Coefficient** ( kō-e-fish'ent ) [ L. *co* & Efficient. ] *a. co-operating* साहाय्यकारी, सहकारी. C. *n.* सहकारी वस्तु *f.* २ *math.* अक्षराच्या किंवा अंकाच्या पूर्वीं त्या त्या अक्षराची किंवा अंकाची पट दाखविण्याकरितां घात-लेला अंक किंवा अक्षर *n*, गुणक, वेळाप्रकाशक, वार-संख्याक. In the following terms such as, C. of absolute expansion, C. of apparent expansion, C. of cubical expansion, C. of linear expansion, C. of superficial expansion. Differential C., the word coefficient means गुणक. Indeterminate C. अनि-श्चितवेळाप्रकाशक. Numerical C. अंकरूप गणक-वेळाप्रकाशक. Coeffi'ciency *n.* Coeffi'ciently *adv.*

**Coemption** ( ko-emp'shun ) [ L. *co* & Emption.] *n.* (R.) सर्व मालाचा एकदम सट्टा करणें *n.* २ *Roman Law* औपचारिक परस्पर विक्रयविवाहपद्धति *f*, नवरा-बायकोनीं एकमेकांना औपचारिक रीतीनें विकत घेण्याची चाल *f.*

Cœlenterata, also Cœlentera (sē-len'ter-ātā, sē-len'terā) [L.-Gr. *coilos*, hollow and *enter*, intestine.] *n.* नलिकोदर प्राणी *m*, प्रणालोदर प्राणी *m*.

Cœlia (sē'lia) [Gr. *kolia*, belly.] *n.* उदर *n.* Cœliac *a.*

Cœlosperm (sēl'osperm) [Gr. *coilos*, hollow & *Sperm.*] *n. bot.* अंतर्गोल पुटक *n.* Cœl'osperm'ous *a.*

Cœnæsthesis (Sen'es-thō-sis) [Gr. *koinos*, common & *aisthesis*, perception.] *n.* अहंभावना *f*, चैतन्यज्ञान *n*.

Coequal (ko-ēkwal) [L. *co* & Equal.] *a. equal* समसमान, समतोल, तोलाचा, एकाच पदवीचा. C. *n.* समसमान, समधर्मी, समानपदाचा मनुष्य *m*. Coequal'ity *n.* समसमानता *f*, समतोलता, समानतोलता *f*, पदवीची समता *f*, बरोबरी *f*, समान अवस्था *f*, तुल्यपदत्व *n*. Coē'qually *adv.* (दोघांनीं-अनेकांनीं) बरोबरीनें.

Coerce (kō-ėrs') [L. *co*, to-gether & *arcere*, to shut up.] *v. t. to compel or enforce* सक्ती *f*- जबरदस्ती करणें-चालविणें, जबरी करणें-चालविणें. २ *to restrain by force, esp. by law or authority* (कायद्याचा किंवा सत्तेचा) धाक दाखवून काम करून घेणें, शक्तीनें-भाग पाडणें-करावयास लावणें. ३ *to constrain to any action* जोरा *m*. करणें. Coer'cible *a.* ज्यावर जोरा चालवितां येईल असा-येण्याजोगा. Coer'cibly *adv.* Coer'cion (koershun) *n. compulsion, restraining* सक्ती *f*, जुलूम *m*, निग्रह *m*, धाक *m*, दपटशा (शहा) *m*, जबरी *f*, जबरदस्ती *f*, सक्ती *f*, जुलमाचा अधिकार *m*. Coer'cionist *n.* सक्तिपक्षाचा अभिमानी. २ सक्तीनें राज्यकारभार चालविणारा. Coer'cive, Coer'citive *a.* कदरखोर, सक्तीचा, जबरदस्तीचा, जुलमी. २ दाबण्याची शक्ति असणारा. ३ कबूल करावयास लावणारें (विधान). Coer'cively *adv.* Coer'civeness *n.*

Coessential (kō-es-sen'shal) [L. *co* & Essential.] *a. partaking of the same essence* एकाच मूलसत्वाचा, समभाव *a.*, समसत्व *a.*, एकाच मूलप्रकृतीचा, एकाच मूलपदार्थाचा. Coessential'ity *n.* सममूलप्रकृतित्व *n*, समभावता *f*, सत्व-भाव-समानता *f*, सत्व-भाव-साम्य.

Coetaneus, Coetaneous (kō'-ē-taoni-us) [L. *co* & *œtus*, *œtalis*, age.] *a. coeval* (R.) *of the same age* समवयस्क, समवयी, समानवयी, एकवयी. २ एका कालीं उत्पन्न झालेला, सारखाच जुना.

Coeternal (kō'-etėr'nal) [L. *co*, & Eternal.] *a.* समनित्यजीवी, समनित्यस्थायी. Coetern'-nally *adv.* Coeter'nity *n.* समनित्यस्थिति *f*.

Coeval (kō-ē'val) [L. *co*, together & *œvum*, age.] *a. of the same age, contemporaneous* एककालिक, समकालिक. C. *n.* एककालीन-समकालीन-पुरुष *m* समवयस्क वस्तु *f*, पुरुष *m*.

Coexist (kō-egz-ist') [L. *co*, together, *existere*, from *ex*, *esse*, to be.] *v. i.* एकाच स्थळीं-कालीं-असणें, संवसणें, एकत्र असणें. Coexist'ence *n.* सहजीवित्व *n*, एकत्रस्थिति *f*, संवास *m*, सहवर्तन (S) *n*, एककालावस्थान *n*, एककालिकत्व *n*. Coexist'ent *a.* एका कालाचा, संवासी, एका समयाचा, एककालिक, सहजीवी.

Coexecutor (kō'eks-ekūter) [L. *co* & Executor.] *n.* मृत्युपत्र चालविणारा जोडीदार, मृत्युपत्राचा सहव्यवस्थापक. Co-executrix *fem.*

Co-expand (kō-eks-pand) *v. i. to expand together equally* बरोबरीनें पसरणें, (शीं) समविस्तार होणें.

Coextend (kō-eks-tend') [L. *co* & Extend.] *v. i.* समव्यापणें, समविस्तार होणें. २ दुसऱ्याइतका वाढणें. Coexten'sion *n.* समविस्तार *m*, समव्यापकता *f*, समव्याप्ति *f*. Coexten'sive *a.* समविस्तारी, समव्यापक, समावधिक, समाक्रमक; as, Consciousness and knowledge are coextensive.

Coffee (kof'ē) [Turk. *qahveh*. Arab.-*qahuah*, coffee.] *n.* the berry बुंद *m*. २ the infusion कवा *m*, काफी *f*. C. bean *n.* बुंद *m*. C. cup काफी पिण्याचा पेला *m*. C. house *n.* कवाखाना *m*. २ उपहारगृह *n*, फराळाचें दुकान. ३ C. mill बुंद दळण्याची चक्की *f*. Coffee-pot *n.* काफीचें भांडें, कवादानी *f*. C. room *n.* काफी व इतर फराळाचे जिन्नस खाण्याची खोली *f*.

Coffer (kof'er) [Fr. *coffre*.-O. Fr. *cofre*, a coffer.-L. *cophinus*.-Gr. *kophinos*, a basket.] *n. a box* संदूक *f*, मांदूस *f*, पेटारा *m*, खजिन्याची पेटी *f*. २ *pl.* treasury भांडार *n*, खजीना *m*, कोश *m*. C. *v. t. to hoard up* पेटींत घालणें, संचय-संग्रह करणें. Cof'fered *a.* Cofferdam *n.* (*engin.*) पाण्यांत काम करितेवेळीं पाणी आंत येऊं नये म्हणून कामाभोंवतीं बसविलेली उभ्या फळ्यांची मुंढे मारून केलेली पेटी *f*, पाणपेटी *f*. Cofferdamwork *n.* दर्शनी दगडामागें विटांच्या तुकड्यांची भर घालून बांधलेलें काम *n*, पुरणी *f*.

Coffin (kof'in) [O. Fr. *cofin*.-L. *cophinus*, a basket.] *n.* प्रेताची संदुक *f*- पेटी *f*- शवपेटिका *f*. २ *obs.* (मोदकाची) पारी. ३ घोड्याच्या खुराची पोकळी *m*. ४ (*obs.*) *grocer's paper-case* निमुलता पुडा *m*, *dim.* पुडी *f*, खोलपा *m*, *dim.* खोलपी *f*. C. *v. t.* शवाच्या पेटींत घालणें. २ पक्कें बंद करणें. Cof'fined *pa. t.* & *p. p.* Cof'ning *pr. p.* Coffin-ship *n.* मोडकळीस आल्यामुळें बहुधा बुडणारें जहाज *n.* To add a nail to one's coffin, to drive a nail in one's coffin आपला मरणकाल जवळ आणण्यासारखें कृत्य करणें, ज्यानें आपला विनाशकाल त्वरित येईल असें करणें.

Cog (kog) [of Scand. origin. Probably to catch as with a *cog*; to *cog* a die, to check it so as to make it fall as desired. cf. Swed. *kugg*, Norw. *kogga*, to dupe.] *v. t.* ठकविणें, युक्तीनें फसविणें. २ C. *to wheedle* फुसलावणें, मठारणें. ३ कपटानें दाखल करणें.

C. *v. i.* खोटें बोलणें, फसवणें. C. *n.* फसविणें, फसवणुक *f.* ठकबाजी *f.* कपट *n.* प्रतारणा *f.* To C. a die (पाहिजे तें दान पडण्यासाठीं) चेंपून फांसे टाकणें. २ फांसे खेळण्यांत ठकविणें-लबाड्या करणें.

Cog (cog) [M. E. *cogge*; Swed. *kugg, kugge*, a cog.] *n. mech.* चक्राचा दांता *m-* दांत *m.* २ *interstice between cogs* दोन दांतांमधली फट *f.* दंतांतर *n.* खांचा *m.* अंधारी *f.* २ खाणींत आधाराकरितां राखलेला दगड *m.* धीऱ्याचा दगड *m.* C. *v. t.* दांते लावणें, दांते तयार करून दांतावणें, दांतळणें. Cog'ging *pr. p.* Cog'ged *p. p.* Cog-wheel *n.* दांत्यांचें-दांते पाडलेलें चक्र *n.* (हे दांते दुसऱ्या चाकाचे दांत्यांत अडकविलेले असतात, व त्या योगानें तें चाक फिरतें.)

Cog (cog) [O. E. *kogge*, a small boat.] *n.* मासे पकडण्याची लहान होडी *f.* २ जहाजांतील होडी. ३ प्राचीन लढाऊ किंवा मालाचें जहाज *n.*

Cogent (kō'-jent) [L. *co*, together, *agere, agentum*, to drive.] *having the power to compel conviction or move the will, forcible* (as arguments, proofs, reasoning) जोरदार, बळवान्, समर्थ, सबळ, जोराचा, दृढ, बळकट, प्रबळ. २ मनावर ठसण्यासारखे, खात्री करून देणारा, सयुक्तिक, सुयुक्त. Cō'gence, Cō'gency *n.* बळकटी *f.* दृढता *f.* प्रबलता *f.* प्राबल्य *n.* जोर *m.* जोरावा *m.* प्रभाव *m.* २ खात्री करण्याचें सामर्थ्य *n.* ३ सयुक्तिकपणा *m.* Cō'gently *adv.*

Cogitate (kŏj'i-tāt) [L. *co*, together, *agitare, agitatus*, to shake.] *v. i. to think, to meditate* मनन *n-* विचार *m.* होणें, मनांत घोळणें. C. *v. t. to think over, to plan* विचार करणें, योजना *f-* युक्ति *f.* योजणें. Cog'itable *a. conceivable* विचार करण्याजोगा. Cogitā'tion *n.* ध्यान *n.* विचार *m.* मनन *n.* २ मनन करण्याची शक्ति *f.* ३ (R.) बेत *m.* हेतु *m.* Cog'itātive *a.* विचारशक्ति असलेला, विचारशक्तिसंबंधीं; as, Cogitative faculties. २ ध्यानमग्न, विचारमग्न.

Cogman (kog'mun) *n.* (*obs.*) जाड लोकरीचें कापड विकत घेणारा व्यापारी *m.*

Cognac (kō'nyak) [so called because large quantities of this brandy are manufactured in the town of Cognac in France.] *n.* कागनाक नांवाची उंची ब्रांडी *f-* दारू.

Cognate (kog'nāt) [L. *cognatus* allied by birth, from L. *co*, together and *gnatus*, old form of *natus*, born. For. L. *natus cf.* sk. जात. The word *cognate* means generally related by blood whether through males or females, as distinguished from *agnate* which was limited in Roman Law to legal relationship through father only though including relationship by adoption. In the technical language of the Hindu Law, an agnate is a सगोत्र and a cognate is a भिन्नगोत्रसपिंड *m.* बंधु *m.*] *a.* एकाच



मूळ पुरुषापासून झालेला, एकाच मातृ किंवा पितृवंशांत झालेला, एका रक्ताचा, सहजात, सवंश, एकवंशीय, एकजात, सजातीय, एकाच उगमापासून झालेला. *Hindu Law* भिन्नगोत्रसपिंड, अफलादी. C. *n.* सवंशी मनुष्य *m.* अफलाद. २ सजातीय वस्तु *f-* पदार्थ *m.* Cognā'tion *philology* सपिंडता *f.* २ एकवंशता *f.* सहजातसंबंध *m.* बंधुता *f.* सजातिभाव *m.* एकवंशोत्पत्ति *f.* Cognate Languages सपिंडभाषा, एकाच मूळ भाषेपासून झालेल्या भाषा; as, Latin, Greek and Sanskrit are cognate languages descended from a common ancestor. Cognate words सपिंड शब्द; as, sk. पितृ, L. *patter* and Gr. *patris* are congate words. Cognate accusative सजातीय कर्म; as, To die a death.

*N. B.*—Cognation एकवंशता. Agnation सगोत्रता.

Cognition (kog-nish'un) [From *acc.* of L. *cognitio*- L. *cognitus p. p.* of *cognoscere*, L. *co*, together & *noscere, gnoscere* (sk. ज्ञा), to know.] *n. the action or faculty of knowing including sensation, perception, conception; certain knowledge* यथार्थस्पष्टज्ञान *n.* (इंद्रियजन्य) अनुभवसिद्धज्ञान *n.* ज्ञान *n.* २ ज्ञानशक्ति *f.* ३ *metaphy.* अभिज्ञा *f.* Cog'nizable, cog'nisable *a. that may be known* जाणण्याजोगा, ज्ञेय, गोचर. [COGNISABLE BY THE SENSES इंद्रियगोचर.] २ *that falls under judicial notice* चौकशी करण्याजोगा-सारखा. [COGNISABLE OFFENCES, SPEC. वारंटाशिवाय चौकशी करितां येण्याजोगे फौजदारी गुन्हे.] Cog'nizably, Cog'nisably *adv.* Cog'nizance, Cog'nisance *n.* वास्तपुशी *f.* वास्तपूस *f.* चौकशी *f.* २ *jurisdiction* चौकशी करण्याचा अधिकार *m-* अम्मल *m.* ३ *Eng. law* कबुली *f.* स्वीकार *m.* ४ *badge* नोकराच्या पोशाखाची निशाणी *f-* खूण *f.* ५ यथार्थस्पष्टज्ञान *n.* Cog'nisant, Cog'nizant *a. having a knowledge of* माहितगार, वाकबगार. Cog'nize, Cog'nise *v. t.* चें ज्ञान *n.* असणें. Cog'nitive *a.* ज्ञानाचा, ज्ञानानें-अकलेनें जाणण्यासंबंधाचा. Have a cognizance of चें ज्ञान असणें. To take cognizance of (ची) चौकशी करणें, (कडे) लक्ष्य पुरवणें.

Cognomen, (kog-nō'men) [L. *co*, together & *gnomen*, Sk. नाम, a name.] *n.* (In Latin use) आडनांव *n.* उपनांव *n.*; as, Marcus Tullius *Cicero*, Here *Cicero* is the cognomen. २ टोपणनांव *n.* लाडकें नांव *n.*; as, "The cognomen by which Phillip is recognised as the "Prudent."' ३ (loosely) नांव. Cog'nominal *a. having the same name* एकाच नांवाचा. २ *of or pertaining to a cognomen or surname* आडनांवाचा, &c. २ एकाच आडनांवाचा. Cog'nominate *v. t.* आडनांव देणें. Cog'nomination *n.* आडनांव देणें, &c. २ आडनांव.

Cognoscente (kog'no-sen'tē) [O. It. *cognoscentet p. p.* of *cognoscere*.-L. *co* & *gnoscere*.] *n. pl.*

Cognoscenti. कोणत्याही विषयांत व मुख्यत्वेंकरून ललितकलांत पटाईत-हुशार-मनुष्य, कलाभिज्ञ.

Cohabit ( kō-hab'it ) [ L. *co*, together, & *habitare*, to dwell. ] *v. i. to dwell with* सहवास *m*- एकस्थान *n*-वास *m*- एकत्रवास *m.* &c. करणें, एके ठिकाणीं रहाणें. २ *to live together as husband and wife* ( usually applied to a man and a woman not legally married ) लग्नाशिवाय नवराबायकोच्या नात्यानें राहणें, दंपतीभावानें-दंपतीभाव धरून राहणें-असणें-वागणें, स्त्रीपुरुषधर्मसंसर्ग *m.* करणें, एकशय्या *f.* करणें. Cohabitant *n.* दुसऱ्यांच्या बरोबर राहणारा, एकत्रवासी *m.* Cohabitā'-tion *n.* (v. V. 1. )–*act or state* सहवास *m*, एकस्थान-वास *m*, एकत्रावस्थिति *f.* २ संभोग *m*, दांपत्यसहवास *m*, एकशय्या *f*, स्त्रीपुरुषधर्मानुसार वर्तन *n*, दंपतीधर्म *m.*

Coheir ( kō-ār' ) [ L. *co* & Heir. ] *n.* वतनभाऊ *m*, वतनबंधु *m*, विभागी *m*, भागहर *m*, घरभाऊ *m*, भागी *m*, दायाद *m*, दाईज *m*, दायबंधु *m.* Coheiress *n. fem.* वतनबहीण, वतनविभागिनी, वतनविभागीण.

Cohere (kō-hēr') [ L. *co*, together, & *hærere*, to stick. ] *v. i. to stick together* पदार्थ एकमेकांशीं लगटून-चिकटून असणें. २ *to be well connected* जुळणें, जमणें, संदर्भाचा-जुळणीचा-संगतवार-संदर्भशुद्ध &c. असणें. ३ (*obs.*) अनुकूल होणें, मिळणें. Coher'ence, Coher'ency *n.* (पदार्थांतील परमाणूंप्रमाणें एकमेकांस) चिकटून असणें, संलग्नता (?) *f*, संसक्ति *f.* २ चिकटून राहणारी वस्तु *f.* ३ संदर्भ *m*, संगति *f*, संबंध *m*, पूर्वापराविरोध *m*, संदर्भशुद्धि *f*, संबद्धता *f.* Coher'ent *a.* संसक्त, संलग्न. २ *logically consistent* संदर्भाचा, सुसंगत, संगतवार; *as*, A C. thinker. ३ (*obs.*) योग्य, लायक. Coher'-ently *adv.* संगतवार, संदर्भपूर्वक. Cohē'sible *a.* संसक्तिक्षम. Cohē'sion *n.* चिकटण्याचा धर्म *m*, संसक्ति *f.* २ पदार्थांच्या कणांमधील एकमेकांस चिकटून बसण्याची शक्ति *f*, संसक्त्याकर्षण. २ *log.* पूर्वापरसंगति *f.* Cohē'sive *a. sticky* चिकटवूं शकणारा. Cohē'sively *adv.* एकमेकांस चिकटेल-धरील अशा रीतीनें. Cohe'sibil'ity, Cohē'siveness *n.* संसक्त होण्याची शक्ति *f.*

*N. B.*—Chemical Affinity स्नेहाकर्षण. Cohesion संसक्ति.

Cohort ( kō'hort ) [ Fr. *cohorte.*—L. *cohors*, *cohortis*, an enclosure, a court, also a band of soldiers. The living descendent of the *L.* Cohortis is the English word court. ] *n.* प्राचीन रोमन लोकांतील पायदळाची तीनशेंपासून सहाशें माणसांची तुकडी *f*, सहाशंभरी *f*, षट्शती *f.* २ लढाऊ शिपायांची सहाशंभरी *f.* ३ घोडदळाची सहाशंभरी. ४ कुमकेच्या शिपायांची टोळी *f.* ५ *fig.* एकाच कामाकरितां जुळलेल्या लोकांची टोळी *f.*

*N. B.*—पांचहजारी, चारहजारी ह्या जुन्या बखरींत सांपडणाऱ्या शब्दांच्या धर्तीवर सहाशंभरी हा शब्द बसविला आहे.

Coif ( koif) [O. Fr. *coife*, Fr. *coiffe*,–L. L. *cofia*, Fr. *cuphia*, cap, perhaps from *cupa*, a tub. ] *n.* एक प्रकारची काइफ नांवाची कानटोपी *f.* C. *v. t.* टोपी घालणें. २ वेणी फणी करणें, केस विंचरणें.

Coign (koin) पायाचा दगड *m*, इमारत बांधतेवेळीं बसविलेला मुख्य धोंडा *m*, कोपऱ्याचा दगड *m*, कोणशिला *f.* मुहूर्ताचा दगड *m*, मत्स्य *m.* Also coigne.

Coil ( koil ) [ O. Fr. *coillir*, Fr. *cueillir*, to gather together—L. *colligere*, from *col* (*con*), together and *legare*, to gather. ] *v. t. to gather into a ring* वेष्टणें, वेंटाळणें, वेंटोळें करणें, सभोंवार गुंडाळणें. C. *v. i.* ( often with, *about* or *around* ) वेंटाळें होणें. C. *n.* (as a rope ) वेटाळें *m*, वेंटाळी *f*, वळी *f*, कुंडलें *n.* २ *coiled mass* गुंडी *f*, पेंडोळें *n*, गुंडाळी *f.* [ Mortal coil मर्त्यदेह *m*, नश्वरदेह, मानवदेहाचें-मर्त्यदेहाचें वेटाळें *n.* २ प्रपंचाचा गोंधळ *m.* ]

Coil ( koil ) [ Gael. *goill*, fume, rage. ] *n.* (*obs.*) *a noise, tumult, bustle or confusion* गडवड *f*, गोंधळ *m*, घोळ *m.* २ खडखड *f*, खटखट *f*, फडफड *f.*

Coin ( koin ) [ Fr. *coin*, formerly also *coing*, wedge, stamp, corner.—L. *cuneus*, wedge *cf.* Coigne, quoin, Cuneiform. शेक्सपियरच्या ग्रंथांत coin शब्दाचा अर्थ कोंपऱ्याचा चिरा-दगड असा आहे. Coin शब्दाचा पाचर किंवा कमानीचा पाचरवजा दगड असाही अर्थ पूर्वी होता. Coin शब्दाचा नाणें पाडण्याचा छाप-शिक्का असाही आणखी एक अर्थ असल्यामुळें Coin शब्दाला नाणें हा अर्थ आला आहे. व कोंपऱ्याचा चिरा किंवा दगड, किंवा पाचर ह्या अर्थी Coin शब्दाचें quoin किंवा coign हें स्पेलिंग लिहितात. ] *n.* नाणें *n*, शिक्का *m*, मुद्रा *f*, मुद्रिका *f.* [ BORED COIN सुलाखी नाणें(?). CONSISTING OF OR IN VARIOUS COINS नाणेंवारी. CRACKED C. फुटकरफुटकें-कची नाणें. STAMPED COIN छापी नाणें. CRACKED OR RUBBED COIN कची ढेली.] २ नाण्याऐवजीं देण्याजोगी वस्तु *f*- नाणें *n.* ३ (without *pl.*) रोकड नाणें-पैसा; as, I have not the coin to do it. C. *v. t.* नाणें पाडणें, शिक्का मारणें-पाडणें, अंकन-मुद्रांकन करणें. २ *to fabricate*, नवीन रचणें, नवीन तयार करणें, योजणें, बनवणें; as, To coin a word. ३ *fig. to acquire rapidly as money* उत्पन्न करणें, एकदम मिळविणें, तयार करणें; as, "Tenants cannot C. rent just at quarter day." C. *v. i.* (चें)नाणें पडणें. २ *to manufacture counterfeit money* खोटें नाणें पाडणें; as, "They cannot touch me for coining." Coin'age *n.* नाणें *n.* पाडणें, शिक्का *m.* मारणें, छापणें. २ मुद्रांकन *n*, शिक्का *m*, ( पाडलेलें ) नाणें *n.* ३ नाणें पाडण्याचा खर्च *m*- हक्क *m.* ४ *formation, fabrication, invention* योजना *f*, रचना *f*, कल्पना *f*, निर्मिति *f*; as, "This is the very C. of your brain." Coin'er *n.* मुद्राकार *m*, नाणें पाडणारा, टांकसाळवाला. २ खोटीं नाणीं करणारा. ३ रचणारा, नवीन करणारा, कल्पक. Coin'ing *n.* शिक्का मारणें. २ रचणें *n*, रचना *f.* To coin money *colloq.* भरभर पैसा मिळवणें.

pay a man in his own coin *cf.* जशास तसें देणें, अरे तर कारे अहो तर कांहो म्हणणें.

**Coincide** ( kō-in-sīd′ ) [ L. *co*, together, *in*, into and *cadere*, to fall. ] *v. i. to fall together, to meet in the same point* एकच जागा व्यापणें, एकाच बिंदूंत-रेषेंत पडणें, संपात *m.* होणें *g. of s.* २ एकाच काळीं होणें, तुल्य-समान होणें. ३ *agree* जुळतें-जमतें असणें, एक होणें, जुळणें, मेळ *m*- जम *m.* बसणें, मिळणें, जुगणें. ४ संयोग *m.* होणें. ५ अनुरूप होणें. To coincide *with* a person *in* an opinion दुसऱ्याच्या मताप्रमाणें मत असणें, मतभेद नसणें. Coin′cidence *n.* समस्थलव्याप्ति *f,* संपात *m,* संगम *m,* संयोग *m.* २ *concurrence, agreement* मेळ *m,* जम *m,* जवा *m,* मिलाफ *m.* ३ संधि *m,* अवचितयोग *m*- घटना *f.* ४ कालैक्यता *f,* कालसंगम *m,* अवचित एके काळीं होणें. ५ अनुरूपता *f.* ६ एकचित्तता *f,* एकमत *n.* By an unlucky C. दुर्दैवाच्या, अवचितघटनेनें. Coin′cidency *n.* (R) Coin′cident, Coincident′al *a.* ( followed by *with* ) मिळणारा, जुळणारा. २ समकालीन-स्थलीन, अनुरूप, अविरुद्ध, संवादी. Coin′cidentally *adv.*

**Coinhabitant** ( kō′-in-hab′it-ant ) [ L. *co* and Inhabitant. ] *n. one who dwells with another* ( एकाच ठिकाणीं ) दुसऱ्याच्या बरोबर राहणारा *m,* एकाच घरांत एके ठिकाणीं राहणारा.

**Coinhere** ( kō′-in-hēr′ ) [ L. *co* and Inhere. ] *v. t. to exist together as in one substance* अनेक गुण एकाच अधिष्ठानांत समवायसंबंधानें असणें, अंतर्निविष्ट असणें.

**Coinheritance** ( kō′-inher′itans ) [ L. *co* and Inheritance. ] *n. joint inheritance* सारखा वारसा असणें *n,* सहरिक्थाधिकार *m.*

**Coinheritor** ( kō-inher′itor ) [ L. *co* & Inheritor. ] *n. a coheir* जिंनगीचा भागीदार *m,* वतनभाऊ *m,* सहदायाद *m,* बरोबरीचा दाईज *m.*

**Coir** ( koir ) [ Tamil. *kayiree*, a rope.] काथा *m,* काथ्या *m,* काथ्याची दोरी *f.* Coir-mattress काथ्याच्या (हं) हातरी *f.*

**Coition, Coitus** ( kō-ish′un, kō-it-us ) [ L. *co*, together *ire, itum*, to go. ] *n. sexual intercourse, copulation* संग *m,* संयोग *m,* सुरत *n,* मैथुन *n,* संभोग *m,* रतिसुख *n.*

**Coinitial** ( kōin-ishal ) [ L. *co* & Initial. ] *a. having a common beginning* एकाच ठिकाणीं सुरू होणारा, एकोगम, सामान्यादि.

**Coinstantaneous** ( kō-in′stan-ta′nius ) [ L. *co* & Instantaneous. ] *a. happening at the same moment* एकसमयावच्छेदेंकरून घडणारा, एकाच क्षणीं-कालीं घडणारा.

**Cojuror** ( kō-jū′rer ) [ L. *co* & Juror. ] *n. one who swears to another's credibility* दुसऱ्याच्या विश्वासूपणाबद्दल जो शपथपूर्वक खात्री देतो तो, पडसाक्षी *m,* प्रतिसाक्षी *m.* २ दुसऱ्यानें घेतलेली शपथ खरी आहे असें शपथेवर सांगणारा.

**Coke, Coak** ( kōk ) [ Possibly from the word *colk* which means a core, coke being viewed as the hard core of the coal left after other parts have been consumed. जसें लांकूड अर्धवट जाळून व त्यांतील उडणारे पदार्थ घालवून charcoal तयार करितात, तसेंच खाणींतील कोळसा ( pit-coal ) अर्धवट जाळून त्यांतील उडणारे पदार्थ घालवून coke तयार करितात. ] *n. the solid substance left after mineral coal has been deprived by dry distillation of its volatile constituents* दगडी कोळसा जाळल्यानंतर त्याचा अवशिष्ट राहणारा अदाह्यभाग *m,* कोक *m.* C. *v. t.* ( दगडी कोळसा जाळून) कोक करणें. Coked *pa. t.* & *p. p.* & Coking *pr. p.*

**Colander, Cullender** ( kul′andėr ) [ L. *colare*, to strain. ] *n. a vessel, usually of metal, closely perforated at the bottom with small holes and used as a sieve or strainer in cookery* धातूची गाळणी *f,* चाळण *f.*

**Colatitude** ( kō-lat′itūd ) [ Abbr. of complement and latitude. ] *n. astron. the complement of the latitude* कोट्यक्षांश *m.* See *latitude*; नतांश ( खस्वस्तिकापासून खस्थज्योतीपर्यंत दृग्मंडलावरील जें अंशात्मक अंतर त्यास नतांश म्हणतात. )

**Cold** ( kōld ) [ A. S. *ceald, cald* cool, akin to Dut. *koud*, Ger, *kalt*, Dan. *kold.* ] *n. the opposite or the absence of heat* हिम *n,* हिंव or हींव *n,* थंडी *f,* शैत्य *n.* २ *the cold state of the atmosphere, chilliness, chillness* शैत्य *n,* थंडी *f,* थंडाई *f,* हिंव or हींव *n,* हिंवडी or हिंवाडी *f.* [ Cramp from cold काकड *n,* काकडी *f.* (*v.* भर) Stiff from C. कांकडकुडा, काकडलेला. To be stiff and cramped from C. काकडणें, गारठणें. ] ३ *an inflammatory condition of the mucous membrane accompanied by catarrh* पडसें *n,* सरदी *f.* ४ *an indisposition of the body caused by exposure to cold* सरदी *f,* थंडी *f.* [ C. in the eyes वावशी *f.* *v.* धर. ] Cold *a.* थंड, शीतळ or ल, शीत, गार, शीतस्पर्श, उष्णताशून्य, नेहमींच्या पेक्षां कमी उष्णतेचा. [ Very C. काल्यासारखा-फार थंड. To be or become C. गारसणें, गारठणें, थंडावणें. ] २ (applied to weather) थंड, शीत, सरद, गार. [ Bitter, biting, piercing cold थंडगार, गारीगार, करवतासारखें गार, करवतीच्या धारेसारखें गार, गारगार थंड, गारगार ठणक. ] ३ (applied to metals) न तापविलेला. ४ (applied to food) थंड, गार, शिजवून थंड केलेला; as, C. meat, C. roast, C. porridge. ५ (applied to persons) *having the sensation of cold* ( usually in predicate ) थंडी वाजलेला, हिंव भरलेला, थंडावलेला, कुडकुडलेला, शीतपीडित, शीतग्रस्त. To feel to be C. थंडी *f*- हींव *n.*

वाजणें, हिंव n. वाजणें, हिंवडणें.] ६ *having cold or cooling properties* थंड, शीतल, सरद, शीतगुण, शीतवीर्य. ७ (*obs.*) (opposed to pungent, acrid, or stimulating) तिखट नसलेला; as, C. plants. ८ *void of ardour, warmth or intensity of feeling, lacking enthusiasm, heartiness or zeal, indifferent, apathetic* निरुत्साहाचा, रसहीन (S.), नीरस (S.), उदासीन, उत्साहशून्य, मठ्ठ, जड, मंद, थंडप्रकृतीचा. ९ *feelingless, bloodless* धिम्मा, विकारशून्य. १० *showing no warmth or friendly feeling* अनादराचा, आदररहित, थंडा, स्नेहशून्यतेचा. ११ (*obs.*) *void of sensual passion or heat* थंड, थंडा, कामवासनारहित, थंडप्रकृतीचा. १२ *gloomy, despairing, deadening* निरुत्साह करणारा, नाउमेदकर, खेदकारक, उदास, खिन्न. १३ *not strong, faint, weak* सौम्य; as, C. scent. १४ (applied to colours and tints) blue or gray अस्मानी, नीलवर्णी, अपाण्डु (opposed to warm tints which are red and yellow). Cold-blood-ed *a.* (चिथावणीशिवाय केलेला म्हणून) निर्दय, करुणारहित, थंड रक्ताचा, थंडपणाचा, चिथावणीशिवायचा, (सभोंवतालच्या हवेपेक्षां किंवा पाण्यापेक्षां) थंड रक्ताचा, तरतरीत नव्हे असा. Also see the word Blood. Cold'ly *adv.* उदासपणानें, थंडाईनें, कळकळीवांचून, स्नेहावांचून, प्रेमावांचून, उत्साहावांचून. Cold chill हुडहुडीची थंडी *f.* Cold chisel थंड लोखंड कापण्याची छिनी *f.* ही फार मजबूत असते. Cold-cream (डोकीला थंडाव्याकरितां लावावयाची) थंडी कृत्रिम मलई. ही मलई बदाम, पांढरें मेण, गुलाबपाणी व पांढऱ्या मगरमाशाच्या डोकींतील चरबी यांची केलेली असते. Cold'ish *a.* Cold'ness *n.* (See the meanings of the adjective) थंडी *f,* थंडपणा *m,* शीतळाई *f,* शीत *n,* शैत्य *n,* थंडाई *f.* २ थंडी *f,* हींव *n,* शीत *n,* शैत्य *n,* सरदी *f.* [Rigours of C. extreme, intense, bitter, biting &c. C. थंडीचा ताठा-गारठा-गारोठा-कहर *m,* कडाका.] ३ हिंव, थंडी, शैत्य, शीत, हिंवाडी *f,* कुडकुडी *f.* ४ थंडपणा *m,* शीतळपणा *m,* सरदी *f.* ५ थंडपणा, उदासी *f,* मांद्य *n,* जाड्य *n,* जडत्व *n,* विराग *m,* रागाभाव *m,* अरति *f,* उदासीनत्व *n,* शीतप्रकृति *f.* ६ थंडपणा *m,* थंडाई *f,* अस्नेह *m,* निर्ममत्व *n,* स्नेहाभाव *m.* ७ थंडपणा *m,* कामवासनाराहित्य *n,* शीतप्रकृति *f.* Coldness of extremities *med.* शीतगात्रता *f,* हातपाय थंड पडणें. Cold water *n.* नैसर्गिक शीतोदक *n,* साधें थंड पाणी *n.* Cold as Charity. See Charity. To catch a cold, to take (a) cold, to get (a) cold पडसें होणें. To give one the cold shoulder परकेपणा दाखविणें. To leave one out in the cold एखाद्याविषयीं निष्काळजीपणा दाखविणें, हयगय करणें, दुर्लक्ष करणें. In cold blood. See Blood. To throw cold water on one धैर्य-हिम्मत खचविणें, नाउमेद करणें, उत्साहभंग करणें.

*N. B.*—Cold denotes a greater degree of the quality than *cool.* Cool is associated with the praiseworthy as cold with the contrary. We say cool determination or courage and not cold determination or courage; cold indifference, cold calculation and not cool indifference, cool calculation.

Col-egatee (kō-leg'atē) [L. *co* & Legatee.] *n.* See Collegatary.

Coleoptera (kol-e-op'tėr-a) [Gr. *koleos,* a sheath & *pteron,* a wing.] *n.* पक्ष्मचर्मवर्ग *m,* पक्ष्मचर्म प्राण्यांचा वर्ग *m,* पक्षकवच प्राण्यांचा वर्ग *m,* अशा प्राण्यांचे मागचे पंख पुढच्या पंखांचें कवचासारखें आच्छादन करितात. Coleop'terist *n.* पक्षकवच प्राण्यांची माहिती असलेला मनुष्य. Coleopter *n.* पक्षकवच प्राणी *m.*

Coleorhiza (kol-e-ō-rī'za) [Gr. *keleos,* sheath, *rhiza,* a root.] *n. bot.* मूलकोश, मुळांवरचा कोश, एकदल-वनस्पतींच्या लहान मुळांना आच्छादन करणारा एक कोश. त्याच्या योगानें कोंवळ्या मुळांचें संरक्षण होतें.

Colic (kol'ik) [Fr. *colique.*-L. *colicus*-Gr. *kolikos,* the colon.] *n. med.* पोटशूल—पोटशूळ *m,* पोटसूळ *m,* परिणामशूळ (?) *m,* आमशूळ (?) *m.* [Hepatic Colic, Renal Colic, See Hepatic &c.] Col'icky *a.* पोटशूळाचा, शूलोत्पादक.

*N. B*—परिणामशूल, आमशूल, वातशूल are only different kinds of colic. They are not any colic. For their exact meaning refer to a good work on Hindu medicine.

Collaborateur, Collaborator (kol-ab'ō-rā-tor) [Fr. *collaborateur.*-L. *col* for *con,* together & *laborare, laboratum,* to work.] *n.* सहलेखक *m,* विद्याविषयक कामांतील सहकारी-जोडीदार *m,* लेखनश्रमसहकारी. Collaborā'tion *n.* एकच काम जोडीनें करणें.

Collapse (kol-aps') [L. *col* for *con,* together, & *labi, lapsus,* to slide or fall.] *n.* बसणें, चेपून जाणें *n.* २ *an utter failure of any kind, a breakdown* ढांसळणें *n,* मोडणें, मोडकळीस येणें, निष्फलता *f,* संहार *m,* क्षय *m,* लय *m.* ३ धैर्यपात *m,* उत्साहपात *m,* घाबरून जाणें *n.* ४ *med.* (मज्जातंतूंच्या अतिशय क्षीणतेमुळें आलेली) निर्बलता *f,* शक्तिपात *m,* एकदम शक्ति गळून जाणें *n,* एकदम थकून जाणें *n.* [Syncope शब्द पहा. Collapse and syncope ह्या दोन्हीं स्थितींत शक्तिपात व बेशुद्धि हीं एकच लक्षणें होतात; परंतु Collapse हा मज्जाक्षीणताजन्य शक्तिपात आहे व syncope हा हृच्चलनमांद्यजनित शक्तिपात आहे.] C. *v. i. to fall together* एकदम पडून-दबून-बसून जाणें. २ एकदम निष्फळ होणें, बसणें, बसून जाणें, कोसळणें. ३ *med.* शक्तिपात होणें, अतिक्षीण होणें. Collapsed *p. t.* & *p. p.* Collap'sing *pr. p.* Collap'sion *n.* (R.) Collap'sionable *a.* collap'sed *a.* बसून गेलेला.

Collar (kol'er) [Fr. *collier.*-L. *collum,* the neck.] *n.*

(of the neck) गळपट्टी *f*, गळबंद *m*, गळयाभोंवतीं शर्टाला अडकविण्याची मळपट्टी *f*. [C. OF SILVER WORN BY THE WORSHIPPERS OF KHANDOBA गांठा OR गांट्या *m*. ORNAMENTAL C. OF GOLD OR SILVER हसळी *f*, हांसोळी *f*, सरी *f*. ] २ (as of dogs) पट्टा *m*, तोक or तोख. ३ (of horses &c.) गळपेंडें, *n*, हांसोळी *f*, सरी *f*, हसळी *f*. [To slip the C. आंग *n*. काढून घेणं.] ४ कंठी *f*, कंठभूषण *n*. ५ *arch*. सरी *f*, हांसोळी. ६ *bot*. गलपाश *m*. ७ इंग्लंडांतील नाइट नामक सरदारांची मानाची हांसोळी *f*- गळेमाळ *f*, नाइट ही पदवी धारण करणाऱ्या लोकांच्या गळयांत असलेला दागिना *m*. ८ *mech*. मायनी *f*, शेंबी *f*, हांसोळी-सारखा वाटोळा भाग *m*. Collar *v. t. to seize by the collar* गळचिपी *f*- गळगोटी *f*- नरडी *f*- &c. धरणें *g. of. o.* २ *to put a collar on* गळपट्टा गुंडाळणें. ३ हांसोळी घालणें-धरणें-पकडणें. C. beam *n*. काळबीम, दोन समोरासमोरील वांसे हालूं न देणारा आडवा वांसा *m*, आडिंगा *m*. C. bone *n*. *anat*. अक्षक *m*. सरी (?) *f*, जत्रु (?) *n*. Coll'ared *a*. Collarette *n*. लहान गळे-बंद *m*. Coll'ar-work *n*. *lit*. ओझ्याच्या ताणाच्या विरुद्ध दिशेंत केलेलें काम *fig*. काबाडकष्ट *m*, दगदग.

Collate (kol-āt') [ L. *col* for *con*, together & *fero*, *latum*, to bring, to carry. ] *v. t. to compare critically as books and manuscripts in order to note the points of agreement or disagreement* (जुने हस्तलिखित ग्रंथ-लेख) पडताळून पहाणें, मिळवून पहाणें, पडताळणें, (शीं) ताळा पाहाणें, ताडणें, ताडून पहाणें, रुजुवात *f*- रुजु-मुकाबला *m*. घेणें-करणें. २ *to gather and place in order* जुपणी *f*. करणें, जुळणें, लावणें; as, To C. the sheets of a book for binding. ३ *Eccl*. (with *to*) (धर्माध्यापकाला) वृत्ति *f*. देणें; as, To C. somebody to a church. C. *v. t.* & *v. i.* पौरोहित्य *n*- औपाध्विक *n*- उपाध्यायकी *f*- पुरोहिताची जागा *f*. देणें, पुरोहित नेमणें. Colla'table *a*. रुजुवात घेण्याजोगा, पडताळून पाहण्यासारखा, &c. Colla'ted *a*. पडताळून पाहिलेला. Collā'tion *n*. पडताळणें *n*, ताळा *m*. पाहणें, पडताळा *m*, रुजवात *f*, रुजूमुकाबला *m*, पडोसा *m*. २ (धर्माध्यापकाची) वृत्ति *f*, दान *n*. ३ जुपणी *f*, पुस्तकें बांधण्याकरितां कागद बरोबर रीतीनें एकमेकांवर लावणें *n*. ४ *repast* दोन जेवणांमधील फराळ *m*, उपहार *m*: (derived from the habit of reading the collations or lives of the fathers during meals in monasteries). Collā'tor *n*. पडताळून पाहणारा.

*N. B.* In the present Marathi संशोधन is Research and not Collation. And it is good to restrict the meanings of words in this way.

Collateral (kol-at'ĕr-al) [ L. *col* & *lateralis*, lateral. See Lateral. ] *a. coming from, being on, directed toward the side* अन्योन्यपार्श्वस्थित, जवळजवळ असलेला, पडोशाचा. २ एका कोंपऱ्याच्या दोहों बाजूंला असलेला, शेजारच्या बाजूंवरचा; as, C. pressure. ३ एका मुख्य रेषेला-रस्त्याला लागून समांतर असा असलेला; as, "Rural lanes C. to the main roads." ४ *acting in an indirect way* परोक्ष, अप्रत्यक्ष; as, If by direct or by C. hand. ५ *subordinate, not principal* गौण. ६ आनुषंगिक, प्रासंगिक. ७ *law* फाजील, मुख्यापेक्षां जास्त. ८ *descending from the same stock or ancestor but not in the same line, opposed to lineal* सगोत्रसपिंड, गोत्रज, एकाच कुळांतील पण भिन्न शाखेचा, भिन्नशाख, उपलोम, समानोदक. ९ समान्वयी, शाखांसंबंधींचा, बाजूच्या नात्याचा. १० *not direct* पेंठचा (?), पडोशाचा. Collat'eral *n*. लांबचा नातेवाईक *m*, आनुषंगिक गोष्ट *f*. Collat'erally *adv*.

*N. B.* Collateral circulation शाखांतील रक्ताभिसरण. C. evidence साहाय्यकारी-अप्रत्यक्ष पुरावा, उपप्रमाण. C. security फाजील-अप्रत्यक्ष तारण, (मुख्य तारणापेक्षां) ज्यास्त—दुय्यम तारण. See Evidence for distinction between secondary Evidence and collateral Evidence.

Colleague (kol'-ēg) [ Fr. *collegue*.—L. *collega*, a partner in office, from *col*, for *con*, with & *legere*, to choose or *ligare*, to bind. ] *v. i.* दुसऱ्याबरोबर काम करणें. २ सामील होणें. C. *n*. कामाचा सोबती *m*, कार्यबंधु *m*, सहाधिकारी *m*, साथीदार *m* (हा शब्द धंद्यांतील किंवा कारखान्यांतील भागीदारांला लावीत नाहींत). Col'leagueship *n*. साथीदारी *f*, सहाधिकारित्व *n*.

Collect (kol-ekt') [ Fr. *collecter*–L. L. *col* for *con*, with & *legere*, to gather. ] *v. t. to gather* गोळा करणें, मिळवणें, जमा करणें, जमवणें. २ संग्रह *m*- संचय *m*- एकवट करणें. ३ (monies) वसूल करणें, उगवणी *f*- उग्राणी *f*-उगावा *m*- करणें. ३ (R.) (now the correct word being gather) अनुमान *n*- तर्क *m*- अटकळ *f*. करणें. ४ (one's self) शुद्धीवर-भानावर आणणें, चित्त *n*. स्थिर करणें, थाऱ्यावर आणणें. C. *v. i. to accumulate* जमणें, सांचणें, सांठणें, गोळा होणें. २ *assemble* संमेलन *n*. होणें, एकत्र होणें, एकवटणें. Col'lect *n. a short comprehensive prayer* सारप्रार्थना *f*. Col'lectā'nea *n. pl. an anthology* अनेकविषयसंग्रह, वेंचे, अवतरणसंग्रह. Collect'ed *a*. एके ठिकाणीं केलेला. २ *self-possessed, composed* स्थिरचित्त, स्वस्थचित्त, समाहितमनस्क, अक्षुब्धचित्त. Collect'edly *adv*. Collect'edness *n*. एकाग्रीभूतता *f*. २ मनाची स्थिरता *f*, आत्मसंयमन *n*, धैर्य *n*. Collec'tion *n*. मिळविणें *n*, जमा करणें *n*, समुदाय *m*, संग्रह *m*, संचय *m*, जमाव *m*. २ *act*. वसूल करणें *n*, उगवणें *n*, उगावा *m*, उगवणी *f*, उग्राणी *f*, वसूल *m*. [C. OF THE REVENUE OF A DISTRICT कमाविशी *f*, कमावीस *f*, तहशील OR सील *f*. ] ३ (v. V. I.) -*act*. जमणें *n*. सांचणें *n*, सांठणें *n*. २ मिळणें *n*, एकवटणें *n*, जमणें *n*, वाढणें *n*. २ *collected body* सांठा *m*, संग्रह *m*, संचय *m*, राशि *m*, रास *f*, मेळावा *m*, संघात *m*, संघ *m*, समुदाय *m*, संग्रह *m*. Collections

(as of sums, monies, &c.) उगवण f, उगवणी f, उग्राणी f, उगावा m, वसूल m. [CONTINGENT COLLECTIONS (OR LEVIES) सादिलवार जमा f. EXTRA COLLECTIONS शिवाय जमा f, खेरीज जमा f. MISCELLANEOUS C. सर्वसंग्रह m.] Collect'ive a. *aggreegate* समग्र, सामाजिक (S), सामुदायिक, सामवायिक, एकीकृत, एकंदर. २ *gram.* समुदायवाचक; as, समुदायवाचक नाम. ३ आनुमानिक, अटकळ करण्याचा. ४ *having plurality of origin or authority* ज्याला एक नाहीं पण अनेक कर्ते असतात असा, अनेककर्तृक. A C. note, signed by the representatives of several governments. निरनिराळ्या राष्ट्रांच्या प्रतिनिधींनीं सह्या करून पाठविण्याचा खलिता m. [C. FRUIT *bot.* गुल्मजन्य (फळ), पुष्पसंघा-गुच्छापासून तयार झालेलें फळ.] Collect'ively *adv.* एकवट, संघशः (S), समुदायरूप, समवायरूप, समस्त, एकंदर. Collecti'vism n. समाजस्वामित्ववाद m. (समाजः एव स्वामी समाजस्वामी, तस्य भावः समाजस्वामित्वम्). Collect'ivist n. समाजस्वामित्ववादी. Collect'or n. जमविणारा, मिळवणारा, संग्रही, संग्राहक, संग्रहकर्ता. २ उगवणारा, उकळणारा. I (of revenue) मामलेदार, मामलतदार (his office मामलतदारी f.), कमावीसदार (his office कमावीसदारी f.), वसूलदार, तहशीलदार (his office तहशीलदारी f.). The European Collector is called कलेक्टर. Collect'orate, Collec'torship n. कलेक्टरच्या अमलांतील जिल्हा m, &c. २ कलेक्टराचा हुद्दा m.

*N. B.*—Individualism व्यक्तिस्वामित्ववाद. सध्यां Collector म्हणजे जिल्ह्याचा मुख्य अधिकारी. (त्याच्या हाताखालीं पुष्कळ मामलेदार असतात.)

Collegatary (kol-leg'a-tā-ry) [*con*, together & *legare*, to appoint.] *law.* मृत्युपत्रावरून दोन किंवा अधिक मनुष्यांस संयुक्त देणगी मिळाली असतां अशा देणगीचा प्रत्येक मालक.

College (kol'ej) [Fr. *college*,-L. *collegium*, from *collega*, a colleague, See Colleague.] n. कांहीं विशेष हक्क असणारी एकाच कामाकरितां स्थापन झालेली मंडळी-संस्था f, कालेज n. २ *an edifice or a number of edifices used by a college* पाठशाला f, विद्यालय n, मठ m, छात्रनिलय m; as, 'The gate of Trinity College.' ४ *associated body* मंडळी f, सभा f, शाला f, समाज m. *Coll'eger n.* कालेजांत राहणारा. Colle'gial a. पाठशाळेचा, पाठशाळे-विद्यालया-संबंधीं. Colle'gian, Colle'giate n. विद्यार्थी m, छात्र m, विद्यालयनिवासी m. Colle'gianer (*obs.*) n. विद्यार्थी m. Collē'giate a. पाठशाळेसंबंधीं-सारखा, पाठशालीय, पाठशाला असलेला; as, A C. town.

Collenchyma (kol-len'ki-ma) [Gr. *kolla*, glue & *enchyma*, an infusion.] n. *bot, the cellular matter in which pollen is generated* श्लेष्मलधातु.

Collet (kol'et) [Fr. *collet*, a collar or necklace.] n. *collar* लहान गळेबंद m, गळपट्टा m. २ *mech.* धातूची लहान आंगठी f. ३ (*jewellry*) *that part of a ring in which the stone is set* घर n, कोंदण n.

Colletic (ko-let'ik) [Gr. *kolletikos kolla*, glue.] a. *agglutinant* चिकट. C. n. दोन पदार्थांना चिकटविणारा कोणताहि सरसासारखा पदार्थ m. Colleterium n. (फुटलेल्या) गर्भाशयांतून बाहेर आलेल्या अंड्यास जोडण्यास उपयोगीं पडणारें लुकण ज्यांत आहे असें कीटकांचें (प्राण्यांचें) इंद्रिय n, अण्डसंधानक n. Colleterial a.

Collide (kol-īd') [L. *col* for *con* & *lædere*, to strike. See Lesion.] v. i. (more often applied to ships and railway trains) *to strike against each other* एकमेकांचा धक्का m- धडक f- लागणें-बसणें, एकमेकांवर आपटणें, थडकणें, एकमेकांशीं लागणें, घसटणें. २ *fig. to interfere with, to clash with* घासणें, लढणें, चकमक f. झडणें. Colli'ded, colli'ding. Colli'sion n. (v. V. I.)-*act.* झगडणें n. एकमेकांचा धक्का m- धडका m- &c. परस्पर आघात m, टक्कर f. २-*act.* घासणें n, घासणी f, चकमक f. ३ विरोध m, विरुद्धता f, प्रतिस्पर्धीपणा m. Collision-mat n. (जहाजांची) टक्कर होऊन पडलेलें भोंक बंद करण्याकरितां केलेली चटई f, आघातचटई f.

Collier (kol'yer) [M. E. *colier*, from *col* coal. पूर्वी Collier हा शब्द लांकडी कोळशासंबंधानें वापरीत असत; परंतु सध्यां तो लांकडी, दगडी किंवा कोणत्याही इतर कोळशासंबंधानें वापरतात.] n. कोळशाचे खाणींत काम करणारा. २ कोळशांचा व्यापारी m. ३ कोळशाचें बारकस-जहाज n. ४ कोळशाच्या जहाजावरील खलाशी m. Coll'iery n. खाणींतून दगडी कोळसे काढण्याचा किंवा कोळसे तयार करण्याचा कारखाना n. २ कोळशांची खाण f. ३ (*obs.*) दगडी कोळशांचा व्यापार m.

Colligate (kol'igāt) [L. *col* (*con*), together & *ligare*, *ligatum*, to bind.] v. t. (निरनिराळ्या गोष्टींचा संबंध) प्रमेयरूपानें बांधणें, प्रमेयस्वरूप देणें, संबंध जोडणें, सिद्धांत बांधणें. Colligā'tion n. प्रमेयरूपबंधन n, सिद्धांतस्वरूप n, सिद्धांत बांधणें n.

Collimate (kol'limāt) [From a fancied L. verb *collimare*, really a false reading for *collineare*, from *col*, for *con*, together & *linea*, sk. रेषा, a line.] v. t. *phys. & astron. to send parallel to a certain line or direction* (as the axes of telescopes or the rays of light) मुख्याक्षाच्या दिशेंत नेणें-आणणें, मुख्याक्षाशीं समांतर करणें, मुख्याक्षरेषेंत आणणें, मुख्याक्षीकरण करणें, अक्षीकरण करणें, एका नेमांत-संधानांत आणणें, संरेखीकरण करणें, संरेखणें, एकाच याम्योत्तरांत नेणें. Collimā'tion n. मुख्याक्षीकरण n, अक्षीकरण n, नेम n, संधान m, संरेखीकरण m, एकाच याम्योत्तरांत असणें, एकयाम्योत्तरस्थिति f, एकयाम्योत्तरता f. २ दर्शनरेषा f. [Error of C. अक्षीय अंतर. Line of C. अक्षीय रेखा.] Col'limā'tor n. *astron.* अक्षीकरणयंत्र n, नेमरेषांतील अंतर काढणारी दुर्बीण f.

**Collinear** ( kol-lin'e-ar ) [ L. *col*, for *con*, together & *linea*, a line. ] *a.* एकारेषेवर-रेषेंत असणारा, समरेखिक, एकरेषास्थित. Collin'eate *v. t.* & *v. i.* *to aim or direct in a line corresponding with another* एका रेषेंत नेणें-असणें. Collineā'tion *n.* एकरेखीभवन *n*, एकरेखीकरण *n*, एका रेषेंत नेणें-असणें *n*.

**Collingual** ( ko-ling'wal ) [ L. *col*, for *con*, together & *lingua*, tongue. ] *a.* *pertaining to or speaking the same language* एकाच भाषेचा, एकच भाषा बोलणारा, एकच भाषा असणारा, एकभाषिक.

**Colliquate** ( kol'ikwāt ) [ L. *col*, for *con*, together & *liquare*, *liquatum*, to melt. ] *v. t.* वितळवणें. C. *v. i.* *med.* (घट्ट भाग पिठूळ होऊन) झिजून जाणें. Colliq'uable *a.* ( *obs.* ) *liable to melt, grow soft or become fluid* वितळण्यास योग्य. २ *med.* क्षरणशील, द्रवणशील. Col'liquā'tion *n.* वितळणें. २ वितळण्याची क्रिया *f*, विद्रवण *n*. ३ क्षीणत्वकारिता *f*. ४ घट्ट भाग पिठूळ होऊन झिजून जाणें, क्षरण *n*. Colliq'uative *a.* *med.* *causing rapid waste or exhaustion, melting* अशक्तपणा आणणारा, शक्तिक्षय करणारा, क्षीण करणारा. २ प्रलेपक, वितळवणारा, शरीर पिळून काढणारा, शरीर धुणारा ( रोग ); as, Colliquative sweats. Colli'quefac'tion *n.* वितळणें *n*.

**Collocate** ( kol'ō-kāt ) [ L. *col* for *con*, together & *locare*, *locatus*, to place. ] *v. t.* *to place* एकाच रांगेनें जवळ जवळ मांडणें, व्यवस्थेनें रचणें. Collocā'tion *n.* *disposition in place, arrangement* व्यवस्थान *n*, मांडणी *f*, रचना *f*, स्थापन *n*; as, "The choice and collocation of words."

**Collocution** ( kol'lō-kū'shun ) [ L. *col*, for *con* & *loqui*, *locutum*, to speak. ] *n.* (R.) संभाषण *n*, संवाद *m*. Col'locu'tor *n.* संभाषण करणारा. Col'locu'tory *a.* संभाषणासंबंधीं.

**Collodion** ( kol-lō'di-on ) [ Gr. *kolla*, glue & *eidos*, resemblance.] *n.* *a solution of gun-cotton in ether and alcohol* कृत्रिमचर्म *n*, कृत्रिमत्वचा *f*, इंधकांत भिजविलेला आगकापूस, कालोडियन, याचा उपयोग शस्त्रप्रयोगांत कांतडीं मिळवून आणण्याकरितां करितात. हा त्वचेवर लावला म्हणजे लागलाच वाळतो व त्याचा एक पापुद्रा होऊन तो त्वचेला चिकटतो.

**Collogue** ( ko-log' ) [ L. *colloqui*, to speak together. ] *v. t.* (शीं) गुप्त मसलत चालविणें, संगनमत करणें, कट करणें. C. *v. t.* ( *obs.* ) आळवणें, गोंजारणें, फाजील स्तुति करणें.

**Colloid** ( kol'oid ) [ Gr. *kolla*, glue & *eidos*, resemblance. ] *a.* (सरससारखा) चिकचिकित. २ ( opposed to chrystalloid ) *physio.* & *chem.* जेलाटिनसारखा प्रतिस्फटिक, प्रतिस्फटिक व पिच्छल. [ Chrystalloid = अनुस्फटिक. Colloid प्रतिस्फटिक. See the word Chrystalloid. ] C. *n.* प्राण्यांच्या वनस्पतींच्या अंतस्त्वचेंत हळुहळु पसरणारा एक सरससारखा पदार्थ *m*, प्रतिस्फटिक व चिकट पदार्थ *m*.

**Collop** ( kol'op ) [ Dut. *klop*; It. *colpo*, a blow. ] *n.* *a small slice of meat* सागुतीचा तुकडा *m*, मांसखंड *n*. २ ( *Shakes.* ) *a child* मूल *n*, अर्भक *n*, संतान *n*; as, "God knows thou art a collop of true flesh." ३ *a portion* तुकडा *m*. [ Minced collops बारीक बारीक तुकडे केलेलें मांस *n*. ] ४ स्थूलत्वदर्शक वळी *f*.

**Colloquy** ( kolō'-kwi ) [ L. *col*, for *con*, together & *loqui*, to speak.] *n.* दोन किंवा अधिक माणसांचें ( विवक्षित विषयावरील ) संभाषण *n*, तोंडी चर्चा *f*. Colloc' ūtor *n.* तोंडी चर्चा-संभाषण करणारा. Colloc'ūtory *a.* तोंडी चर्चेसंबंधीं. Collō'quial *a.* भाषणांतच वापरलेला, बोलण्यांतच वापरलेला ( लेखांत नव्हे ), तोंडी चर्चेसंबंधीं, संवादांतला. २ भाषणरूढ, भाषणप्रचलित, भाषणैकयोग्य. Collō'quialism *n.* *colloquial quality or style of language* बोलण्यांतल्या भाषेची रूढि *f*, बोलण्यांतील भाषासंप्रदाय *m*, बोलण्यांतील भाषाप्रयोग *m*, संवादांतील भाषासरणी *f*, बोलण्यांतच वापरण्याचा शब्दप्रयोग *m*. Collō'quialist *n.* बोलण्यांतील शब्दप्रयोग वापरण्यांत पटाईत *m*. २ बोलण्यांत रूढ झालेली भाषा वापरणारा. Collō'quially *adv.* भाषणरूढप्रयोगानें, &c. Collō'quise,-ze *v. i.* संवादांतसंभाषणांत गुंतणें, तोंडी चर्चा करणें. Collō'quist *n.* एकमेकांशीं तोंडी चर्चा करणारांपैकीं एक, संवादांत-चर्चेंत गुंतलेला मनुष्य *m*.

**Collotype** ( kol'otīp ) [ Gr. *kolla*, glue & Type. ] *n.* *photo.* सरसावर प्रकाशलेखाची उलटी ( negative ) आकृति घेऊन ती शाईनें दुसऱ्या कागदावर छापण्याची पद्धत *f*.

**Colluctation** ( kol-uk-tā'shun ) [ L. *col*, for *con*, together & *luctari*, to struggle. ] *n.* ( *obs.* ) लढाई *f*, झगडा *m*, हरकत *f*, झटापट *f*.

**Collude** ( kol-ūd' ) [L. *col*, for *con*, together & *ludere*, to play. ] *v. i.* *to conspire in a fraud* फसवणीचा कट *m*- कूट *m*- गट्टी *f*- करणें, कपटमंत्र *m*. करणें, संगनमत *n*- प्रतारणसंकेत *m*. करणें, वंचणें, वाईट कामाकरितां-फसविण्याकरितां कट *m*. करणें. Collud'er *n.* संगनमत करणारा, कपटमंत्र करणारा, संगनमती. Collū'sion *n.* फसवणीचा कट *m*, कूट *n*, कपट *n*, वंचना *f*, संगनमत *n*, प्रतारणसंकेत *m*, कपटमंत्र *m*, फसविण्याचा गुप्त बेत *m*. Collū'sive, Collū'sory *a.* संगनमताचा, फसवणुकीचा, प्रतारणेचा. Collū'sively *adv.* संगनमतानें, प्रतारणसंकेतानें. Collusive agreement *n.* *law* दुसऱ्यास फसविण्याकरितां केलेला पोकळ दस्तऐवज *m*.

**Collum** ( kol'um ) [ L. neck. ] *n.* *pl.* Colla *anat.* *the front part of the neck* मानेचा पुढचा भाग *m*, गळा *m*, कंठ *m*, ग्रीवा *f*. [ CERVIX ( BACK PART OF THE NECK ) मन्या, मानेचा मागचा भाग *m*, मान *f*. ] *bot.* कोंब आणि मूळ यांमधील जागा *f*, मोडाची ग्रीवा *m*.

Collutory (kol'ūtori) [L. colluere, collutum, to wash.] n. med. a medicated wash for the mouth गुळण्या करण्याचें-चूळ-भरून टाकण्याचें औषध n.

Colly (kol'li) [See coal.] n. (कोळशाची भांड्याला लागलेली) मस f. C. v t. मशीनें काळा करणें, काजळ फासणें. २ fig. कालिमा लावणें, कलंक लावणें, काजळ फासणें. Col'lied p. a. काळा केलेला. २ कालिमा लावलेला.

Collyrium (kolir'i-um) [Gr. kollyrion, an eye-salve.] n. pl. Collyriums, Collyria med. an application to the eye, usually an eyewater डोळ्यांत घालण्याचें औषध n, नेत्रौषध n, अंजन n, नेत्रांजन n, काजळ n.

N. B.—The properties and ingredients of the अंजन of the Ayurvedic pharmacopœa are different from those of the English Collyrium.

Colocynth (kol'ō-sinth) [Gr. kolokynthis, a kind of round gourd or pumpkin.] n. the plant इंद्रवारुणी pop. इंद्रावण f, कडू वृंदावन n, कंवडळ f, विशाली f. २ the fruit इंद्रवारुणी pop. इंद्रावणी n, कंवडळ n.

Cologne (ko-lōn') [Orig. made in Cologne, the French name of Köln, a city in Germany.] n. मद्यसारमिश्रित सुगंधी पाणी, कोलन नांवाचें सुगंधी पाणी n. Called also Cologne water.

Colon (kō'lon) [Gr. kolon, the largest of the intestines.] n. स्थूलांत्र n. [Ascending C. ऊर्ध्व-स्थूलांत्र Transverse C. तिर्यक् स्थूलांत्र, Descending C. अधःस्थूलांत्र.], महदंत्र (as opposed to लघ्वंत्र), पोटांतील मोठें आंतडें n, बृहदंत्र n.

Colon (kō'lon) [Gr. kulon, a limb, a clause.] n. विरामचिन्ह (:), द्विबिंदुचिन्ह n.

Colonel (kūr'nel) [Fr. colonel, formerly coronel, from L. corona, a crown.] n. mil. लष्करांतील एका रेजिमेंटावरचा अधिकारी. [एका रेजिमेंटमध्यें निदान दोन हजार तरी शिपाई असतात.] दोन हजारीवरील अधिकारी m, कर्नल m. Col'onelcy, Col'onelship n. कर्नलचा हुद्दा-अधिकार m- पदवी f. Col'onelling n. शिपाई जमविण्याकरितां हिंडणें.

Colonnade (kolon-ād') [Fr.-L. columna, a column.] n. खांबावली f, स्तंभपंक्ति f, खांबांची रांग f.

Colony (kol'o-ni) [L. colonia, from colonus, a farmer, from colere, to till, to dwell.] n. pl. Colonies. आपल्या देशाचा किंवा राज्याचा फांटा वसविणारी मंडळी f- वसविणारे लोक m- pl, देशशाखाधिष्ठित जन m- pl. देशशाखास्थ जन m- pl, वसाहतींतले लोक m- pl. २ देशशाखा f, राज्यशाखा f, वसाहत f. ३ संघ m, समूह m. Colō'nial a. देशशाखेचा, राज्यशाखेचा, वसाहतीचा, देशशाखेसंबंधीं. C. n. वसाहतींतला मनुष्य m, देशशाखानिवासी. Colōn'ialism n. वसाहतींतील रीत-संप्रदाय-भाषाविशेष m. Colonisā'tion n. वसाहत वसविणें, वसाहत करणें n. Col'onise v. t. to establish a colony in नवी वसाहत करणें, देशाचा-राज्याचा फांटा वसविणें. २ to migrate to and settle in नवी वस्ती करणें, वसविणें, दिवेलावणी करणें. C. v. i. दूर देशांत जाऊन राहणें. Colonist n. वसाहतींत राहणारा, वसाहतवाला, देशशाखानिवासी, वसाहत करणारा. Colonised' pa. t. & p. p. Col'oni'sing pr. p. & v. n.

Colophon (kol'o-fon) [Gr. kolophon, a summit, top, finishing stroke. In early times the colophon gave the information now given on the title page.] ग्रंथाच्या शेवटीं ग्रंथाचें नांव, काल इत्यादि दिलेली माहिती f, नामकालपूर्वक परिसमाप्ति f, समाप्तिलेख m, हीच माहिती सध्यां नामपृष्ठावर दिलेली असते.

Colophony (kol'-ofō-ni) [First brought from Colophon in Ionia.] n. a dark coloured resin obtained from turpentine काळ्या अथवा पिंवळ्या रंगाची राळ f. Collophonic a. काळ्या रंगाच्या राळेसंबंधीं-चा.

Coloquintida (kol-o-kwin'ti-da) n. see Colocynth.

Colossus (kol-os'us) [L. colossus, Gr. kolossos, a huge statue at Rhodes at the entrance of the port.] n. a gigantic statue दोहों कांठांवर पाय ठेऊन उभा असलेला आपोलो देवाचा ऱ्होड्स बंदरांत शिरतांना दिसणारा भव्य पुतळा m. भीमविग्रही-राक्षसी पुतळा m, विशाळ आकृतीचा पुतळा m. Coloss'-al a. भव्य, विशाळ, प्रचंड, जगद्व्याळ. Colossal-wise adv. (Shakes.) दोन्हींकडे पाय टेंकून. Colosseum, Coliseum n. व्हेस्पॅसिअन्‌चें रोममधील उभयासन व वाटोळें असें प्रचंड नाटकगृह n.

Colostrum (ko-los'trum) [L.] n. beestings, green milk सस्तन प्राण्यांचें कोवळें दूध n, चीक m. Colostrā'tion n. कोंवळ्या दुधापासून लहान मुलांस होणारा रोग m. Colostric' a.

Colour (kul'er) [O. Fr. colour, colour.-L. acc. colorem, from color, a tint.] n. रंग m, वर्ण m, राग (S) m. [PRIMARY OR SIMPLE OR FUNDAMENTAL COLOURS मूल रंग, एकाकी किंवा साधे रंग; जसें जांभळा, पारवा, निळा, हिरवा, पिंवळा, नारंगी आणि तांबडा; हे सर्व रंग पृथग्भूतसूर्यकिरणामध्यें दिसतात. SECONDARY Cs हे दोन किंवा अधिक मूल रंगांपासून होतात, मिश्ररंग. COMPLIMENTARY Cs पूरकरंग. ज्या दोन रंगांच्या एकीकरणानें पांढरा रंग उत्पन्न होतो त्यांस एकमेकांचे पूरकरंग असें म्हणतात. ACCIDENTAL C. s आगंतुक किंवा औपाधिक किंवा उत्तर रंग. कागदाच्या पांढऱ्या पानावर रंगीत चक्ती ठेवून तिजकडे न्याहाळून कांहीं वेळ पाहिलें तर असा उत्तर किंवा आगंतुक रंग दिसतो. २ spec. मनुष्याचा काळा रंग m. [A PERSON OF COLOUR (AMERICAN) शिद्दी मनुष्य m. ३ complexion, hue मुखकांति f, तोंडाचें तेज n. [TO CHANGE COLOUR नूर बदलणें,

मुख विवर्ण होणें *g. of s.* ] ४ *the ruddy hue of the cheeks, freshness of hue* तोंडावरील लाली *f*, गुलाबी छटा *m*, (लाजेमुळें—शरमेमुळें (?) आलेली) लाली *f*. ५ रंगाची झांक *f*, रंगाची छाया *f*. ६ *phren. faculty or organ of colour* रंगज्ञानशक्ति *f*. ७ रंगीत बिल्ला *m*, रंगीत निशाणी *f*. [ TO COME OUT IN ONE'S TRUE COLOURS आपल्या खऱ्या स्थितींत-स्वरूपानें लोकांपुढें येणें. TO SHOW ONE'S COLOURS आपलें खरें स्वरूप लोकांना दाखविणें. TO FIGHT UNDER FALSE COLOURS *lit.* खोटा वेष घेऊन भांडणें, *fig.* आपल्या कृतीची खोटी संपादणी करणें, खोटी सबब सांगणें. ] ८ ( generally plural ) *a standard, an ensign* निशाण *n*, बावटा *m*, ध्वज *m*. [ TO DESERT ONE'S COLOURS आपला पक्ष सोडणें, उलट पक्षाला जाऊन मिळणें. २ कर्तव्यत्याग करणें. TO JOIN THE COLOURS OF अमुक एक पक्षाला जाऊन मिळणें. TO COME OFF WITH FLYING COLOURS मोठा जय मिळविणें, दिग्विजय करणें-लावणें, एखादें मोठें काम करून ध्वज-झेंडा उभारणें-लावणें-फडकवीत येणें. TO STICK TO ONE'S COLOURS आपल्याच पक्षाला चिकटून राहणें. TO NAIL ONE'S COLOURS TO THE MAST अमुकएक पक्ष उघड रीतीनें स्वीकारून त्याला चिकटून राहणें. TO HANG OUT FALSE COLOURS आपण कोणत्यातरी भलत्याच पक्षाचे आहों असें दाखविणें, हूल *f*- हुलकावणी *f*. दाखवणें. ] ९ *a colouring matter, a pigment, a paint* रंग *m*, रंगद्रव्य *n*. १० *a pretence* बहाणा *m*, निमित्त *n*, मिष *n*, खोटी सबब *f*. ११ *sort* जात *f*, प्रकार *m*. १२ *law* उघड हक्क *m*. C. *v. t.* रंगविणें, रंग देणें, रंगलेला-रंगीत करणें. २ *to varnish, to gloss* (दोष झांकण्यासाठीं) बनावून सांगणें, तिखटमीठ *n*- मीठमिरची *f*. लावून सांगणें, अतिशयोक्ति करणें. ३ *to palliate* (दोष) हलका कमी-करणें. ४ ( *obs.* ) झांकणें, छपविणें. ५ स्वरूप देणें; as, "It is the motive that colours the act." C. *v. i. to blush* लाल होणें, रंग येणें, रंग चढणें, लाजेनें लाल होणें, लाजणें. Colourif'ic *a*. रंगदायक, दुसऱ्या पदार्थांना रंग देण्याजोगा, वर्णद. Col'ourable *a*. *specious, plausible* खरासा, सत्यसदृश, सत्यसन्निभ, सत्यभासात्मक, वरून खरा दिसणारा. Col'ourably *adv*. Colourā'tion *n*. रंग देणें *n*. Col'our-blind *a*. रंग ओळखण्यास असमर्थ, रंग न ओळखणारा. Col'our-blind'ness *n*. रंग पारखण्याची पूर्ण अशक्तता *f*, दृष्टीच्या दुर्बळपणामुळें रंग न ओळखणें *n*, रंग ओळखण्याची दृष्टीची अशक्तता *f*. Col'oured *a*. See the Verb. २ spec. काळ्या रंगाचा. ३ *bot.* हिरव्याशिवाय इतर रंगाचा. Col'ouring *n.*–*act.* रंग देणें *n*, रंगणें *n*, वर्णन (S) *n*, रंजन *n*. २ *cost or price of colour* रंगणावळ *f*, रंगाई *f*. ३ *specious appearance* सत्याभास *m*, सत्यसादृश्य *n*. ४ रंगाचें चित्र *n*. Col'ourist *n*. रंगवणारा, रंग देणारा. Col'ourless *a*. नीरक्त, विवर्ण, रंगहीन-रहित-विरहित-विहीन-शून्य, वर्णहीन-रहित. Col'ourman *n*. रंग तयार करणारा-विकणारा. Col'ourimeter *n*. रंगाची रंजकता मोजण्याचें यंत्र *n*, रंजकतामापक *n*. Colour sergeant *a*. निशाण धरणारा-वागवणारा सार्जंट *m*. Col'oury *a*. रंगीत. To colour a pipe तंबाखू ओढून ओढून चिलमी किटविणें. High colour चेहऱ्याची स्पष्ट लाली. To paint in bright colours सुरेख रीतीनें रंग देणें, वस्तुस्थितीपेक्षां अधिक भासविणें, लाक्षणिक रीतीनें सांगणें, वडेजाव करून सांगणें. Under colour of-च्या मिषानें. Without colour उघड उघड रीतीनें. २ विवर्ण, फिक्का, निस्तेज.

Colporteur ( kōl'pauɹt'-ār or ėr' ) [ Fr. *colporteur*, one who carries on his neck, from *colporter*, to carry on one's neck.—L. *collum*, the neck & *portare*, to carry. ] *n*. फेरीवाला *m*. २ *spec.* धर्माचीं व इतर लहान लहान पुस्तकें विकणारा फेरीवाला *m*. Col'portāge *n*. फेरीवाल्याचा धंदा *m*. २ फेरीवाल्याच्या मार्फत धर्माचीं पुस्तकें विकण्याची पद्धत *f*.

Colstaff ( kōl'stäf ) [ Fr. *col*,—L. *collum*, the neck and Eng. staff. ] *n*. दोन मनुष्यांनीं ओझें वाहाण्याकरितां खांद्यावर घ्यावयाचा आडवा वांसा *m*.

Colt ( kōlt ) [ A.S. *colt*, a young horse, ass, or camel. ] *n*. शिंगा *m*, किशोर ( S. ), शिंगरूं *n*, अश्वशाव *m*. [ C. IN CONTEMPT, ENDEARMENT, &C. शिंगरट *n*.]. २ *a young foolish fellow* आडमुठा मनुष्य *m*, शिंगरट (*colloq.*) *n*. ३ चपल (S)-चंचलबुद्धीचा-अनुभवशून्य तरुण मनुष्य *m*. ४ उंटाचें शिंगरूं *n*, गाढवाचें पोर *n*. ५ *naut.* ( शिक्षा करण्याकरितां जहाजांत ठेवलेली ) गांठीगांठीची दोरी *f*. C. *v. i.* ( *Spens.* ) शिंगरासारखें वागडणें. C. *v. t.* ( *Shakes.* ) फसविणें, मूर्ख बनविणें. २ घोडीवर घोडा चढविणें, घोडी भरविणें. Colt'ish *a*. शिंगरासारखा. २ नाचरा. ३ छंदी, विलासी. Colt's tooth शिंगराचा अपुरा किंवा फाजील दांत *m*. २ (*Shakes.*) ज्वानीच्या सुखाची लालसा *f*, ज्वानीचा भर *m*. To cast one's colt's tooth ज्वानी कमी करणें. To have a colt's tooth ज्वानीच्या तोऱ्यांत-भरांत असणें.

Colter, Coulter ( kōl'-tėr ) [ A. S. *culter* from L. *culter*, a plough-share, a knife.] *n*. (of a plough) विलायती नांगराचें फाळ्यापुढचें गवत कापणारें पातें.

Coluber (kol'ub-ėr) [ L. *coluber*, *colubris*, a serpent.] *n*. एक जातीचा सर्प *m*. Col'ubrine *n*. which see below.

Colubrine (kol'ū-brīn) [ L. *coluber*, *colubris*, a serpent. ] *a*. *relating to a serpent* एक तऱ्हेच्या सर्पासंबंधीं. २ *cunning, crafty* सर्पासारखा, कपटी, लुच्चा.

Columba Noachi ( kōlum'bä nōäki ) *n*. *astron.* पारावत. ( English. Noah's Dove. ही राशी दक्षिणगोलार्धांत मूर्तिकाशस्त्र व नौकापुंज यांचे मध्यें आहे. )

Columba See Calumba.

Columbae ( kōl'um-bē ) [ L. *columba*, a pigeon, cf. Sk. कदम्ब, a kind of goose.] *n. pl.* ( *Zool.* ) पारवे व त्यांच्या वर्गांतील सर्व पक्षी *m. pl.*, पारावतवर्ग *m*.

Columbine ( kol'um-bīn ) *a*. *dove-coloured* पारव्याच्या रंगाचा, पारवा ( in comp. ). २ पारव्यासारखा-

संबंधीं; as, "C. innocence." C. *n.* 'पेंटोमाइम' खेळांतील नायिका. Columbā'rium *n.* खबुतरखाना *m,* खुराडें *n.* २ थडग्यांतील मृतमनुष्याची रक्षा ठेवण्याचा कोनाडा *m. pl.* Columbaria. Col'umbar'y *n. a dove-cot, a pigeon-house* खुराडें *n,* खबुतरखाना *m.* Columbaries.

Columel, Columella. See Column.

Column (kol'um) [L. *columna*, a round pillar.-Gr. *kolonos*, a hill.] *n.* (*arch.*) *pillar* खांब *m,* गोलस्तंभ *m,* वाटोळा खांब *m,* स्तंभ *m.* २ (धुळीचा) लोट *m.* ३ स्तंभाकार वस्तु *f.* राशि *f.* रचना *f.* ४ *mil.* (of troops) फौजेची तुकडी *f.* [CLOSE C. कट *m.*] ५ *naut.* एका पाठीमागून एक चालणारी गलबतांची उभी रांग *f.* ६ (of a page) रकाना *m,* कालम *m.* ७ अंकस्तंभ *m.* ८ *bot.* यूपक *m,* स्थाणू, यूप. Col'ūmel *n.* लहानस्तंभ *m*-खांब *m.* Col'umel'la *n. bot.* मध्यस्तम्भ, स्तंभक *m,* स्तंभासारखा अक्ष *m,* स्तम्भाक्ष *m.* Colum'nal, Colum'nar *a.* खांबाच्या आकाराचा, स्तंभाकार *m.* Column'arity *n.* स्तंभाकार असणें *n,* स्तम्भाकारता *f.* Col'umned, Colum'niāted, Colum'nated *a.* स्तंभाचा, स्तंभमय, खांब असलेला. Colum'niā'tion *n.* एखाद्या इमारतींत स्तंभ बसविणें *n.*

Colure (kō-lūr') [L. *colurus*.—Gr. *kolourus*, dock-tailed, from *kolos*, docked and *oura*, the tail.] *n.* *astron.* छिन्नपुच्छवृत्त *n,* छिन्नपुच्छयाम्योत्तर *n. pl.* Colures. Equinoctial C. *astron.* भरांतलें छिन्नपुच्छयाम्योत्तर. Solstitial C. संपाताकडचें छिन्नपुच्छयाम्योत्तर.

Com (kom) A prefix from the Latin *prep. cum*, signifying *with, together, in conjunction, very,* etc. It is used in the form *com-* before *b, m, p,* and sometimes before *f*; and by assimilation becomes *col-* before *l, cor-* before *r*, and *con-* before any consonant except *b, h, l, m, p, r*, and *w*. Before a vowel *com-* becomes *co-*; also before *h*, *w*, and sometimes before other consonants.

Coma (kō'ma) [L. *coma*, hair.—Gr. *kome*, hair of the head.] *n. bot.* कुंतलगुच्छ *m,* शिखागुच्छ *m,* झुबका *m.* २ *astron.* शिखा (of a comet). ३ *astron.* अरुंधतिकेश नांवाच्या तारकापुंजांतील एक तारा. Co'mate *a.* *hairy, of a bushy appearance* शिखायुक्त, झुबक्यासारखा, गुच्छाच्या आकाराचा, गुच्छानें वेष्टित, लवेचा. [COMA BERENICES अरुंधतिकेश. ही राशी उत्तरगोलार्धांत सिंह आणि भूतप ह्यांचे मध्यें आहे.]

Coma (kō'ma) [Gr. *koma*, a deep sleep.] *n. med.* झांप *f,* झांपड *f,* बेशुद्ध स्थिति *f,* मूर्च्छा *f.* (ही झांपड दोन प्रकारची असते. एकीला Lethargic coma व दुसरीला Carus coma असें म्हणतात. पहिल्यांत हाक मारली असतां रोगी हाक देतो. परंतु दुसऱ्यांत पुरा बेशुद्ध असतो.) निद्रालुता *f,* झोंपाळूपणा *m.* Com'atose (kō'matōs) Com'atous *a. lethargic* झांपड पडलेला, निद्रालु, झोंपाळु.

Comart (kō'mart) *n.* (*obs.*) (*Shakes.*) करार *m,* बोली *f,* शर्त *f.*

Comate (kō'māt) *n.* साथीदार *m,* सोबती *m.*

Comb (kōm) [A. S. *camb*, a comb cf. Sk. जम्भस, a tooth.] *n.* फणी *f,* कंगवा *m,* विंचरणी *f.* [C. *in contempt* फणकुट *n.* TO DRAW THE C. FORCIBLY THROUGH THE HAIR ओरपणें, ओरप *f.* घालणें-करणें.] २ (for a horse) खरारा *m.* ३ (of a cock) कोंबड्याची शेंडी *f.* शिखा *f,* चूडा *f.* ४ *honey-comb* मधाची पोळी *f,* पोळें *n.* ५ (पाण्याच्या) लाटेचा अथवा टेंकडीचा शेंडा *m.* C. *v. t.* विंचरणें, जटा *f.* मोडणें. २ (wool, &c.) विंचरणें, पिंजणें. ३ (*Shakes.*) मारणें. ४ तुरा लावणें. C. *v. i.* पांढरा फेंस येऊन लाट *f.* मोजा *f.* फुटणें. Comb-bag फणेरें *n.* Combed *a.* विंचरलेला. २ पिंजलेला, पिंजारलेला. Comb'er *n.* लोंकर विंचर-पिंजर-णारा. Comb'ing *n.* *-act.* विंचरणें *n,* विंचरणी *f.* २ पिंजणें *n,* पिंजणी *f,* पिंजारणी *f.* Comb'ings *pl.* (of hair, of शेंडी *f,* &c.) गुंतागुंत काढतांना पडलेले केंस, गुतवळ *m. pl.* Comb off (गुंतागुंत) मोडणें-काढणें. Comb'y *a.*

*N. B.*—Card (wool, &c.)=पिंजरणें. Comb (wool, &c.) =विंचरणें. The process of combing is used in straightening wool of long staple; short wool is carded.

Comb, Combe (kōm or kōōm) [Probably of Celtic origin. A. S. *comb*. Welsh. *cwm*, a dale, a valley.] *n. an upland valley gen. narrow and without a stream of water; a hollow between hills* खोरें *n,* दरी *f.*

Combat (kom'bat or kum'bat) [Fr. *combattre*, from *com* & *battre*, to beat ;-L. *battuere*, to strike.] *v. i. to struggle or contend as with an enemy, to fight* लढणें. २ वाद *m.* करणें. C. *v. t.* लढाई *f.* करणें, युद्ध करणें, विरोध *m.* करणें, कलह *m.* करणें, झगडणें. ३ वाद *m.* करणें. C. *n.* लढाई *f,* युद्ध *n,* संग्राम *m,* समर *n.* Com'batable *a.* Com'batant *a.* लढाऊ, लढाईचा. C. *n.* युद्ध करणारा, योद्धा, वीर, भट, लढवय्या. २ वाग्योद्धा, वाग्वीर, वाक्कलह करणारा. Com'bative *a.* भांडखोर, युद्धशील, युद्धप्रवण-तत्पर. Com'bativeness *n.* युद्धप्रवणता *f,* युद्धतत्परता *f.* Single Combat द्वंद्वयुद्ध *n.*

Combine (kom-bīn') [L. *com*, with & *binus*, *pl.* *bini*, two by two, double. See Binary.] *v. t. to unite or join* जोडणें, संयोग *m.* करणें, जथविणें, एक करणें, मिळविणें. C. *v. i. to coalesce, to mingle* मिळणें, एक होणें, जमणें; as, "So sweet did harp and voice combine." २ *to confederate, to conspire, to league together* मिळणें, जुटणें, जुडणें, मेथकूट *n.* जमणें-मिळणें *y. of s.*, कट *m.* करणें, संगनमत-एकोपा-जूट-करणें, एकवटणें; as, "You with your foes combine, And seem your own destruction to design." ३ *chem.* नवें मिश्रण *n.* बनणें. Com'binate *a.* एकत्र झालेला. २ (*obs.*) कबूल केलेला, वाग्निश्चय झालेला. Combi-

nā'tion *n.- act.* मिळवणें, जोडणें, जडण, एकीकरण *n*, समाहार *m*, समाहरण *n*, संयोजन *n*, संधान (S) *n*, संमेलन *n*, संयोग *m*, संधि *m*, संयुक्तता *f*, संगम *m*, समागम *m*. २ *combined body, band, confederacy* कट *m*, बारभाई *f*, जूग *f*, जुटी *f*, जूट *f*, गट *f*, गोट *m*. ३ *chem.* संयोग *m*. ४ *math.* एकीकरण *n*. Combinā'tional *a*. Com'binātive *a*. Combi'natory *a*. Combined' *a*. जोडलेला, &c., जूट असलेला, संयुक्त. Combin'ing *a*. Combination of levers उत्तोलनींचें संधान *n*. Combi'ner *n*. Combi'ning (v. V. T.) मिळवणारा, संयोग-संयोजनकर्ता. (v. V. I.) मिळणारा, जमणारा. २ मिळणारा, जुटणारा, संगनमती. Combining proportion संयोजनप्रमाण *n*. Combining weight *chem.* संयोजनभारांक *m*. Chemical combination. See Chemistry. Combination by volume घनमानसंयोग *m*. C. by weight भारमानसंयोग *m*. C. in definite proportion (निश्चित) प्रमाणसंयोग *m*.

Combust (kom-bust') [Fr.-L. *com* & *urere*, *ustum*, to burn.] *a*. (*obs.*) सूर्यतेजानें जळलेला. २ (*obs.*) *astron.* सूर्याशीं युति झालेला (ग्रह). C. *n*. (*obs.*) ज्वलत् पदार्थ *m*. C. *v. t.* (R.) जाळणें. Combusti'ble *a. capable of taking fire and burning, inflammable* जळाऊ, जळायासारखा-जोगा, ज्वलनीय, ज्वलनशील, ज्वालाग्राही; as, "Sin is to the soul like fire to C. matter." २ *that easily takes fire* लौकर पेट घेणारा, जळघेऊ, शीघ्रज्वलनीय, शीघ्रज्वालाग्राही (दारूसारखा). ३ *irascible, irritable* एकदम चिरडीस जाणारा, चिडका. C. *n*. ज्वालाग्राही द्रव्य *n*- पदार्थ *m*. Combust'ibleness, Combus'tibil'ity *n*. ज्वालाग्राहीपणा *m*, ज्वालाग्राहित्व *n*. Combus'tion [Fr. *combustion.*] *n*. ज्वलन *n*, ज्वलनक्रिया *f*. २ (*obs.*) गोंगाट *m*, कलकलाट *m*, गलबला *m*, गोंधळ *m*. Combust'ious *a*. (*Shakes.*) जळावयाचा-सारखा. २ घोंटाळ्याचा. Combust'ive *a*. ज्वालाग्राही. Area of complete combustion पूर्णज्वलनस्थान *n*. Area of incomplete combustion अपूर्णज्वलनस्थान *n*. Area of no combustion अज्वलनस्थान *n*. Rapid Combustion शीघ्रज्वलन *n*. Slow Combustion मंदज्वलन *n*. Spontaneous combustion अंतरुष्णताजनितज्वलन *n*, अंतःप्रवृत्तज्वलन *n*.

Come (kum) [A. S. *cuman*, to come. cf. Dut. *komen*; Dan. *komme*; Ger. *kommen*; L. *venire*; Gr. *bainein*; Sk. गम्, to go.] *v. i. to move hitherward, to draw near* येणें, जवळ-समीप येणें, आगमन करणें. [COME! COME ALONG चल, चल ये, चल निघून ये लवकर.] २ *to arrive, to approach, to reach* प्राप्त होणें, येणें, पावणें, पोहोंचणें. ३ *to approach or arrive as the result of a cause* or *of the act of another* होणें, उपजणें, लागणें, उत्पन्न होणें, मिळणें, उपस्थित होणें. ४ *to arrive in sight, to be manifest, to appear* वर येणें, वर दिसणें; as, "Then butter does refuse to come." [TO COME *yet to arrive, future* यायाचा, व्हायाचा, येणारा, भविष्य काळाचा; AS, "IN TIMES TO COME." TO C. ABOUT घडून-बनून-होऊन येणें, घडणें, होणें. २ फिरणें, वळणें, फिरून येणें. TO C. ABROAD (*a*) परदेशांत जाणें-येणें. (*b*) (*obs.*) जाहीर होणें, बाहेर पडणें. TO C. ACROSS अनायासें-एकाएकीं-दैवयोगानें मिळणें-नजरेस पडणें *in. con. & g. of o.* TO C. AFTER मागून जाणें, अनुसरणें. २ मिळणें, लाभणें. TO C. AGAIN परत माघारीं-येणें, ठिकाणीं येणें. TO C. AND GO येणें-जाणें, जायें-येजा होत असणें, बदलणें. TO C. AT पोहोंचणें, मिळविणें; AS, "TO C. AT A TRUE KNOWLEDGE OF OURSELVES." २ आंगावर चढून-चालून जाणें. TO C. AWAY सुटून येणें, निघणें, वेगळा होणें. TO C. BETWEEN मध्यें येणें, वेगळा-भिन्न करणें. TO C. BY मिळवणें, प्राप्त-संपादन करणें. २ जवळ जाणें. TO C. DOWN चांगल्या स्थितींतून वाईट स्थितींत जाणें. २ खालीं उतरणें, पडणें, मोडकळीस येणें. ३ स्वस्त होणें, किंमत उतरणें. TO C. DOWN UPON (*colloq.*) तोंडची शिक्षा करणें, (शिक्षा देण्याकरितां) तोंडानें झाडणें. TO C. HIGH OR LOW किंमत ज्यास्त किंवा कमी पडणें. TO C. HOME मर्मीं लागणें, मनांत बिंबणें-ठसणें. २ आपल्या घरीं येणें. ३ *naut.* नांगर वर उचलणें. TO C. IN प्रवेश करणें. २ येऊन पोंचणें. ३ अधिकाराचीं सूत्रें हातीं घेणें. ४ मान्य-वश होणें. ५ प्रचारांत आणणें. ६ माग वगैरे जोडले जाणें. ७ उत्पन्न होणें. ८ पिकून तयार होणें. ९ (WITH *to* OR *into*) संभोग-मैथुन करणें. १० पोर होणें-विणें. TO C. IN FOR हिस्सा मागणें-घेणें. TO C. INTO मिळणें. २ मान्य होणें. TO C. IT OVER (*colloq.*) फसविणें, (चा) फायदा घेणें. TO C. NEAR OR NIGH (शीं) समान किंवा बरोबर होणें. TO C. OF (च्या) वंशांत-कुळांत जन्म होणें. २ पासून होणें-उद्भवणें, (चा) परिणाम असणें. TO C. OFF सोडून-निघून जाणें. २ सुटणें, निसटणें. ३ वटावणें, निभणें, निभावणें, पार पडणें. ४ भांडणांतून वगैरे बचावणें, आपली मोकळीक करून घेणें. ५ होणें, घडणें. ६ कांहीं अवकाशानें होणें-बनणें. ७ सुटणें (AS A GARMENT). ८ CLEARLY OR PROMINENTLY (AN IMPRESSION) वठणें, उटाळणें, निघणें, उठणें, उमटणें. ९ जलदीनें-गर्दीतून निघून जाणें. TO C. OFF FROM सोडणें, सोडून देणें. TO C. ON पुढें येणें, चढती कळा होणें, उन्नति होणें. २ जवळ येणें. ३ सर्वांवर येणें. TO C. OUT निघून जाणें, बाहेर पडणें. २ उमटणें, उमगणें, प्रगट होणें, उघाडीस-उजाडीस-उघडकीस-प्रसिद्धीस येणें, बाहेर फुटणें. ३ शेवट-परिणाम होणें, निकाल-अंत होणें. ४ मंडळींत प्रथमच येऊं जाऊं लागणें; AS, "SHE CAME OUT TWO SEASONS AGO." ५ दिसणें, उगवणें. ६ पक्ष-बाजू-तरफ घेणें. TO C. OUT WITH प्रकट-जाहीर-प्रसिद्ध करणें. TO C. OVER एका बाजूपासून दुसऱ्या बाजूस जाणें, पक्ष बदलणें. २ (अर्क वगैरे) वर येणें. TO C. OVER TO येऊन मिळणें. TO C. ROUND नियमित काळानें येणें-बनणें, वळचणीच्या रस्त्यानें येणें. २ (*colloq.*) शुद्धीवर येणें, पूर्वस्थितीवर येणें. ३ वारा फिरणें-बदलणें. ४ दया करणें, दयार्द्र होणें, वळणें. ५ *colloq.* गोड बोलून फसविणें. TO C. SHORT OF पुरे न होणें, कमी होणें, उणें पडणें, कमती पडणें. TO C. TO मान्य-कबूल होणें. २ *naut.* नांगर टाकणें. ३ शुद्धीवर-ध्यानावर-देहभानावर येणें, सावध होणें, स्मृतीवर येणें. ४ पोहोंचणें. ५ एकंदर मिळून होणें, जमा होणें, भरणें. ६ (*Shakes.*) वंशपरंपरेनें येणें, मिळणें (चा) वारसा मिळणें. TO C. TO GRIEF दुःखांत प-

डणें, संकट गुदरणें. To C. TO A HEAD पिकणें, पुवळणें. २ (कट) पूर्णतेस पोहोंचणें, बरोबर तयार होणें. To C. TO ONE'S SELF देहभानावर-ठिकाणावर-शुद्धीवर येणें. To C. TO PASS घडणें, घडून येणें. To C. TO THE POINT मुख्य मुद्याजवळ येणें-मुद्यावर येणें. To C. TO THE SCRATCH *colloq.* वैऱ्याला किंवा संकटाला हिंमतीनें तोंड देणें. To C. TO TIME वेळेवर येणें, समयानुसार-संकेतानुसार येणें. (*colloq.*) संकेत किंवा वेळ न टाळणें. To C. TOGETHER जमणें, मिळणें. २ नवराबायकोप्रमाणें एकत्र राहणें. To C. TRUE खरें होणें-उतरणें, सांगितल्याप्रमाणें होणें-उतरणें. To C. UNDER (च्या) सदराखालीं येणें, मोडणें, ओढणें, पोटांत असणें. To C. UP चढणें, वर जाणें. २ निघणें. ३ उगवणें, उद्भवणें, मोड येणें. ४ उपयोगांत-प्रचारांत येणें. ५ उपटणें, उपडणें. To C. UP TO चढणें, वाढणें, समान-बरोबरी होणें. To C. UP WITH पाठलाग करून पकडणें, पछाडणें, गांठणें. To C. UPON, TO CHANCE UPON अवचित घडणें. २ सहजगत्या मिळणें, अवचित आढळणें-मिळणें. ३ वेतणें, गुदरणें, येऊन ठेवणें, कोसळणें, ओढवणें, हल्ला-चाल करणें. ४ (च्या) वर हक्क असणें.] Come *p.* (v. V. I.) आलेला, आयात, समागत, दाखल, उपस्थित, प्रविष्ट (used esp. of letters). Com'er *n.* येणारा, आगमनकर्ता. Com'ing *a.* येणारा, थोड्या वेळानें येणारा. C. *n.* येणें *n*, आगमन *n.* [Coming in प्रवेश *m*, प्रवेशमार्ग *m*- रीति *f.* २ उत्पन्न *n*, महसूल *m.*] Come *v. t.* जय पावणें (*slang*). To come it (*slang*) कोणत्यातरी हातचलाखीनें जय पावणें.

Comedy (kom'e-di) [O. Fr. *comedie* a play.—L. *comedia.*—Gr. *comedia*, a comedy.—Gr. *comedos*, a comic actor, from *comos*, a banquet, revel, a festal procession & *aoidos*, a singer.] *n.* आनंदपर्यवसायी नाटक *n.* Come'dian *n.* आनंदपर्यवसायी नाटकांतील नट *m.* २ असें नाटक लिहिणारा *m.* See Farce.

Comely (kum'-li) [O. E, *comeliche*,-A. S. *cymlic*, *cyme*, suitable (*cuman* to come, to become)+*lic*; like.] *a. pleasing to the sight, handsome* सुंदर, सुरेख, देखणा, बांधेसूद, गोजरा, साजरा, गोजिरवाणा, सुबक, छबदार, सुरूप. २ *suitable* योग्य, यथायोग्य, सोइस्कर, उचित, शोभणारा. C. or Come'lily *adv.* साजेशा प्रकारानें. Come'liness *n.* (v. A.) सौंदर्य *n*, सुबकपणा *m*, सुरेखपणा *m.* &c., औचित्य *n*, यथायोग्यता *f*, &c. Come'lier *compar.* Comliest *super.*

Comet (kom'et) [M. E. *comete*–O. Fr. *comete*–L. *cometa*, *cometes*–Gr. *komutus*, long-haired.] *n.* धूमकेतु *m*, शेंडेनक्षत्र *n*, केतु *m*, पुच्छलतारा *m.* [ENVELOPE OF A C. केतु-आवरण *n*, केतूचें आवरण *n.* COMET-FINDER केतुशोधिनी, केतुप्रदर्शक (यंत्र *n.*), धूमकेतु शोधून काढण्याकरितां योजावयाची दुर्बीण *f.* TAIL OF A C. शेंडी *f*, पुच्छ *n.*] Com'etary, Comet'ic *a.* धूमकेतूसंबंधीं-विषयक. Cometog'raphy *n.* धूमकेतूंची माहिती देणारें पुस्तक *n*, धूमकेतुवर्णन *n.* Cometol'ogy *n.* धूमकेतुशास्त्र *n*, हें एक ज्योतिषशास्त्राचें अंग आहे. Cometa'rium *n.* केतुगतिदर्शक यंत्र *n.*

Comfit (kum'fit) [Fr. *confit*, from L. *confectum*, prepared or put together.] *n.* (बारीक पेपरमिंटासारख्या) साखरेंत पाकवलेल्या वड्या *f. pl.*

Comfort (kum'furt) [O. E. *comfort*,—O. Fr. *conforter*, to comfort.—L. L. *comfortare*, to strengthen, from *con* and *fortis*, strong, brave. This verb first meant (1) to strengthen, (morally or spiritually), (2) to encourage; its present current sense is to soothe in grief or trouble, to relieve of mental distress.] *v. t.* (*obs.*) दृढ-मजबूत करणें, आधार *m*-पुष्टि *f.* देणें. २ हिम्मत *f.* देणें, धीर *m*-धैर्य *n.* देणें, आश्वासन *n*- प्रोत्साहन *n.* देणें, आश्वासणें. ३ *to console* दुःखाचें परिमार्जन करून सुखाचे विचार मनांत भरविणें, शांतवन *n*- समाधान *n.* करणें with *g. of o.* C. *n. relief or rest from pain, distress &c.* सुख *n*, समाधान *n*, स्वस्थपणा *m*, आराम *m.* २ *solace under affliction* सांत्वन *n*, संतोषण *n*, आश्वासन *n.* ३ *a state of quiet enjoyment* सुख *n*, सुखावा *m*, खुशाली *f*, सुखरूपता *f*, सुखीपणा *m*, स्वस्थता *f*, स्वास्थ्य *n*; as, "He had the means of living in C." ४ *ground or cause of C.* सुखहेतु *m*, सुखास-समाधानास कारण *n*, सुखसाधन *n*, सुखस्थान *n.* ५ *law* (*obs.*) *unlawful support, countenance or encouragement* कायद्याविरुद्ध आश्रय *m*- मदत *f*, बेकायदेशीर मदत *f*- प्रोत्साहन *n*; as, "To give aid and comfort to the enemy." Com'fortable *a. easy* स्वस्थ, समाधानी, आराम-सुख पावलेला. २ *convenient* सोईचा, सोईवार, सुखाचा. ३ सुखद-सुखप्रद, सुखावह. ४ *affording consolation* शांतिदायक-कारक, दुःखहारक, शोकहारक, क्लेशापह, शोकापह. ५ *having comforts* कुशल, सुखी, खुशाल, सुखरूप, सुखापन्न, सुस्थित. ६ गतदुःख, गतपीड, आराम पडलेला, बरा. [To FEEL COMFORTABLE सुखास पडणें-येणें-वाटणें, सुखी असणें-येणें.] ७ (*obs.*) दृढ, हिम्मतवान्, मजबूत. ८ *consoled* शांत, समाधानी, समाधान पावलेला. Com'fortably *adv.* सुखानें, सुखासमाधानानें, सुखरूप, खुशाल. Com'forted *a.* उत्तेजन-आश्वासन दिलेला, प्राप्तसमाधान, आश्वासित. Com'forter *n.* सांतवणारा, समाधान करणारा, आश्वासक, सांत्वनकर्ता, शोकहारक. २ (U. S.) लोंकरीचा लांब व अरुंद गळपट्टा *m.* ३ *script. the title of the Holy Spirit, whose office is to comfort and support the Christian, Advocate* संबोधक (*obs.*) *m*, कैवारी *m*, प्रोत्साहक *m.* Com'fortress *n. fem.* शांतवन करणारी. Com'fortless *a.* असुखी, असमाधानी, अस्वस्थ, शांतिहीन, दुःखाचा, सुखहीन. २ गैरसोईचा, गैरलागींचा. Com'fortableness *n.* स्वस्थपणा *m*, आराम *m*, स्वस्थता *f*, स्वास्थ्य *n.* २ सुखीपणा *m*, सुखरूपता *f.* ३ (*obs.*) सोईवारपणा *m.* Com'forting *n.-act.* सांतवणें *n*, दुःखापहरण *n*, शोकहरण *n*, क्लेशापहरण *n.* Com'forting *a.* सुखकारक. Com'fortlessness *n.* असुखता *n*, शांतिहीनता *f*, असमाधानता *n*, अस्वस्थता *f*,

दुःख *n.* Job's Comforter समाधान करण्याच्या मिषानें तुम्हींच आपल्यावर हें संकट ओढून घेतलें असें म्हणून अधिक मात्र दुःख देतो तो. २ गळूं *n,* कॅंसतोड *n.*

*N. B.*—Cheer खेद किंवा निराशा नाहींशी करून उत्साह आणणें. Console दुःखपरिहार करणें. Comfort, See above.

Comic ( kom'ik ) [ L. *comicus,* relating to comedy. See Comedy. ] *a. relating to comedy as distinct from tragedy* आनंदपर्यवसायी नाटकासंबंधीं. २ *raising mirth* हसें उत्पन्न करणारा-पिकवणारा, हास्योत्पादक, हास्यजनक. ३ बेडौल-विजोड किंवा विक्षिप्त असल्यामुळें हसें उत्पन्न करणारा; as, C. proportions. C. *n.* (*colloq.*) (*obs.*) ( मनरंजनासाठीं ) हसें उत्पन्न करणारा मनुष्य *m,* हसव्या *m.* २ *colloq.* ( short for comic paper ) वेडौल चित्रांचें विनोदी वर्तमानपत्र *n.* Com'ical *a.* आनंदपर्यवसायी नाटकासंबंधीं, हास्योत्पादक नाटकासंबंधीं. २ हास्यकारक, विनोदी. Comical'ity *n.* Com'icalness *n.* तऱ्हेवाइकपणा *m,* हास्योत्पादकता *f.* Com'ical'ity हास्योत्पादक वस्तु-प्रसंग. Com'ically *adv.* Comique *n.* (आपल्या नाट्यानें किंवा गायनानें ) हसें उत्पन्न करणारा मनुष्य, हसव्या.

*N. B.*—Comical ( विलक्षणपणामुळें-बेढप आकारामुळें-अपरूपतेमुळें ) हसें उत्पन्न करणारा. Ridiculous उपहासास्पद. Ludicrous हास्योत्पादक, हास्यकारक.

Comitia ( komish'i-a ) [ L. ] *n.* 'कामिशिया,' प्राचीन रोमन लोकांतील कायदेकानू करणारी व राज्याचा कारभार चालविण्याकरितां अधिकारी नेमणारी सभा *f.*

*N. B.* For more information about the three kinds cf *comitia,* refer to any text-book on Roman History.

Comity (kom'i-ti) [L. *comitas,* from *comis,* courteous. cf. शग्म ( S ), kind.] *n.* सुजनता *f,* सौजन्य *n,* सभ्यता *f,* अनुनय *m.* [C. OF NATIONS राष्ट्रीय शिष्टाचार, राष्ट्रांतील परस्परशिष्टाचार *m,* राष्ट्रांतील सलोखा *m.*]

Comma ( kom'a) [L. *comma.*-Gr. *komma,* a section of a sentence, from *koptein,* to cut off. ] *n.* स्वल्पविराम चिन्ह (,)*n.* २ ( *Shakes.*) ( *obs.*) वाक्याचा अल्पभाग *m.* ३ *fig.* अल्पविराम *m.* Inverted commas अवतरणचिन्हें ( " ... " ).

Command ( kom-mand' ) [ O. E. *commanden.*-O. Fr. *commander.*-L. *com* and *mandare,* to commit, to command. ] *v. t. to order with authority, to direct, to bid, to charge* आज्ञा *f*- हुकूम *m.* करणें-देणें, ताकीद करणें-फर्माविणें-देणें. २ *to exercise direct authority over* सत्ता *f*- हुकूम *m*-अधिकार *m.* चालवणें, आधिपत्य *n*-स्वामित्व *n*-चालवणें, सरदारी *f*- सरदारकी *f.* चालवणें, आधिपत्य *n.* असणें with वर *of o.* ३ ( उंच असल्यामुळें ) आटोक्यांत-माऱ्यांत-टप्प्यांत -नजरेखालीं-नजरेंत-ठेवणें-रोंखणें, लक्ष्यणें. ४ (*Shakes.*) हक्कानें मागणें; as, This speech commands admiration. ५ ( *B.* ) देणें; as, I will C. my blessings upon you. C. *v. i.* अधिकार *m*-अम्मल *m.* असणें. २ टप्यांत-माऱ्यांत-रोखांत असणें. C. *n. order, precept* आज्ञा *f,* हुकूम *m,* हुकमत *f,* आदेश *m,* निदेश *m,* नियोग *m,* कहा *m,* विधि *m,* विधान *n,* अनुज्ञा *f,* चोदना *f.* २ सत्ता *f,* अधिकार *m,* प्रभुत्व *n.* ३ स्वामित्व *n,* आधिपत्य *n,* सरदारी *f,* हुकमत *f,* शासन (S.) *n,* नायकी *f.* ४ दृष्टिमर्यादा *f*-, टप्पा *m.* ५ सत्ता *f,* अम्मल *m,* ताबा *m.* ६ हवाला *m,* चार्ज *m,* तैनात *f,* तसलमात *f.* ७ एका लष्करी अधिकाऱ्याच्या ताब्यांतील सैन्य *n*- प्रदेश *m.* Command'able *a.* हुकूम करण्यास योग्य, सत्ता चालविण्यास योग्य. Commandant' *n.* आज्ञा *f.* हुकूम *m.* करणारा-देणारा, आज्ञापक. २ हुकुमत-शासनस्वामित्व करणारा, अधिपति, नायक, सरदार, जमादार, सेनापति. Commandant'-ship *n.* सेनापत्य *n.* Command'ed *a.* आज्ञापलेला, आज्ञप्त. Commandeer' *v. t.* सैन्यांत नोकरी करावयास लावणें, लष्करी उपयोगास घेणें. Command'er *n.* कह्यांत-ताब्यांत ठेवणारा, सरदार *m,* नायक *m,* (वर) सत्ता-गाजविणारा *m,* सेनापति *m.* २ *navy.* कप्तानाच्या खालच्या दर्जाचा अधिकारी *m,* रोखांत ठेवणारा. ३ धुमस *f,* मोगर *m,* मोगरी *f,* लांकडाची जड हातोडी *f,* ठोकणी *f.* Commandress *n. fem.* आधिपत्य चालविणारी. Commander-in-chief *n.* मुख्य सेनापति *m,* सेनानायक *m,* सेनाध्यक्ष *m.* Command'ership *n.* सेनाधिपत्य *n.* Command'ing *a.* हुकूम करणारा, सत्ता चालविणारा. २ छाप पडेल असा, छाप ठेवणारा, भव्य, थोर. ३ टप्यांत येईल असा, उंच. Command'ingly *adv.* Command'-ment *n.* आज्ञा *f,* हुकूम *m,* निदेश *m,* आदेश *m.* २ *script.* मोझेसनें दिलेल्या दहा आज्ञांपैकीं एक. ३ सत्ता *f,* अधिकार *m.* ४ *law* दुसऱ्यास कायदा मोडावयास लावण्याचा अपराध *m.* Commander of the faithful-ही खलिपाची पदवी आहे. At one's command पाहिजे तेव्हां-जरूर लागेल तेव्हां मिळण्यासारखा. On one's command अधिकारानें, हुकमानें. The Ten Commandments *the Decalogue* (ख्रिस्ती मताप्रमाणें) ईश्वरानें मोझेसला दिलेल्या दहा आज्ञा.

Commatic (kom-mat'ik) [L. *commaticus,* See Comma.] *a. brief, concise* संक्षिप्त, अल्प विस्ताराचा, लहान लहान वाक्यांचा. Com'matism *n. conciseness in writing* लिहिण्यांतला संक्षिप्तपणा *m,* थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ आणणें *n,* अल्पशब्दकता असणें *n.*

Commeasure ( kom-mezh'ūr ) [ L. *com* and measure which see. ] *v. t. to coincide with, to equal* (शीं) मापानें बरोबरी करणें, समपरिमाण असणें. Commeas'ur-able *a.* समपरिच्छिन्नमान.

Commemorate ( kom-em'o-rāt ) [ L. *commemoratus, p. p.* of *commemorare,* to call to memory, from *com & memorare,* to mention-L. *memor,* mindful.] *v.t. to call to remembrance, to celebrate with solemnity* ( प्रिय किंवा महत्वाच्या विद्यमान गोष्टीचें किंवा विषयांचें ) स्मरण *n*- आठवण *f.* राखणें, स्मरणतिथि किंवा नियम पाळून ( ची ) आठवण राखणें, स्मरणोत्सव करणें,

उत्सव करणें, (उत्सवानें) आठवण ठेवणें. Commem'orable *a.* स्मरण ठेवण्यायोग्य, स्मरणोत्सवयोग्य, &c. Commemorā'tion (v. V.) *n.* स्मरण *n*, आठवण *f*, स्मरणोत्सव *m*, उत्सव *m*. Commem'ora'tive, Commem'orator'y *a.* आठवणुकीचा, स्मरणाधायक, स्मरणोत्सव-हेतूचा, स्मरणोत्सवहेतुक. Commem'orator *n.* स्मरणार्थ उत्सव करणारा, स्मरण-आठवण राखणारा.

*N. B.*—Celebrate उत्सव करणें. Commemorate (उत्सव करून-प्रार्थना करून किंवा कोणत्याही अन्यतऱ्हेनें स्मरण-आठवण राखणें. We celebrate what is marked, striking, illustrious. We commemorate what is dear and interesting to us.

Commence (kom-ens') [Fr. *commencer*-Low L. *cominitiare*.-L. *com* & *initiare*, to begin.] *v. i.* प्रारंभ *m*- आरंभ *m*- सुरुवात *f*- होणें. २ (*spec.* in England) विश्वविद्यालयाची पदवी घेणें; as, "I question whether the formality of commencing was used in that age." C. *v. t.* सुरुवात *f*- आरंभ *m*- प्रारंभ *m.* करणें. २ पदवी घेणें; as, "To commence M. A." [IT IS THE PRACTICE OF GOOD WRITERS TO USE THE VERBAL NOUN (INSTEAD OF THE INFINITIVE WITH *to*) AFTER C.; AS, HE COMMENCED STUDYING AND NOT HE COMMENCED TO STUDY]. Commence'ment *n.* सुरुवात *f*, प्रारंभ *m*. २ विश्वविद्यालयांतील पदवी-दानसमारंभाचा दिवस *m*.

Commend (kom-end') [M. E. *commenden*, *comenden*.-L. *commendare*, to commit to.] *v. t. to intrust, to commit* एखाद्याचे ताब्यांत देणें, (वर) सोंपविणें, (कडे) निरविणें. २ *to recommend* शिफारस *f.* करणें, *with g.. of o.* ३ *to praise* स्तुति करणें *with g. of o.* ४ *arch. to mention by way of courtesy* विचारलें-पुसलें आहे म्हणून सांगणें; *as*, C. me to my brother." Commend'able *a.* स्तुत्य, शिफारस करण्याजोगा, प्रशंसनीय, &c. Commend'ableness *n.* स्तवनीयता *f*, स्तवनार्हता *f.* Commend'ably *adv.* Com'menda'tion *n.* प्रशंसा *f.* २ तारीफ *f*, शिफारस *f.* ३ नमस्कार *m*, रामराम *m*, सलाम *m*. Commend'ator *n.* शिफारस करणारा. Commen'dator'y *a.* शिफारस-प्रशंसा-स्तुति करणारा, स्तुति-प्रशंसाकर, प्रशंसक. C. *n.* स्तुति *f*, शिफारस *f.* Commend'er *n.* स्तुति-शिफारस करणारा.

Commensal (ko-men'sal) [L. *com* & *mensa*, table.] *n.* एकाच मेजावर जेवणारा, एकाच पंक्तींत जेवणारा. २ (*zool.*) एक जातीचा प्राणी *m*, सहभोजी प्राणी *m*. C. *a.* समपंक्तीचा, पंक्तिव्यवहाराचा. २ सहभोजी प्राण्यासारखा. Commensal'ity (*obs.*) Commensā'tion (*obs.*) *n.* एकाच पंक्तीस जेवणें, एकाच मेजावर जेवणें, पंक्तिभोजन *n*.

Commensurate (kom-en'-sū-rāt) [L. *commensuratus p. p.* of *commensurare*-L. *com* & *mensurare*, to measure.] *v. t.* सारख्या परिमाणाचा-समपरिमाण-समप्रमाणक करणें. C. *a.* सारख्या परिमाणाचा, समपरिमाण, सममान, समप्रमाणक. Commen'surable *a.* समपरिमाण. Commen'surableness, Commen'surabili'ty *n.* समपरिमाणता *f*, सममानता *f.* Commen'surably, Commen'surate'ly *adv.* Commen'surateness *n.* Commensurā'tion *n.* एकप्रमाणीकरण *n*, समप्रमाणीभाव *m*.

Comment (kom'ent) [from O. Fr. *comment*, commentary, from L. *commentum*, invention, contrivance, a comment or interpretation, from *commentus p. p.* of *commin-is-c-i-* root *com-men*, to devise by careful thought from *men*, *mens*, mind cf. (Sk.) मनू, to think.] *n.* प्रवाद *m*, निरूपण *n.* (तोंडी किंवा लेखी) टीका *f*, विवरण *n*, व्याख्या *f*, प्रवाद *m*, निरूपण *n*. २ (निंदात्मक) टीका-व्याख्या *f.* ३ चर्चा *f.* C. *v. i.* (often followed by *on* or *upon*) टीका *f.* विवरण *n.* व्याख्या *f.* करणें. २ (*Shakes.*) मनन करणें, विचार करणें. ३ (निंदात्मक) टीका-व्याख्या करणें. C. *v. t. arch.* टीका *f.* करणें, अर्थ समजावणें. Comm'entary *n. a book of comments or annotations* विषमपदविमर्शिनी टीकेचें पुस्तक *n*, कठीण भागांचा अर्थ सांगणाऱ्या टीकेचें पुस्तक *n*, भाष्य *n* (S), विवरण *n*, विवेचन *n*. २ *historical narrative* ऐतिहासिक टीकाग्रंथ *m*, बखर *f.* Commentā'tion *n.* टीका *f*, भाष्य *n.* २ टीका करणें. Comm'entātor *n.* भाष्यकार, भाष्यकर्ता. Comm'enter, Commentor *n.* टीकाकार, टीका लिहिणारा, भाष्य लिहिणारा. Commentatō'rial *a.* टीका करण्या-संबंधीं. Commentaries (*pl.*) विशेष प्रसंगाचीं घाई-घाईनें लिहिलेलीं टिपणें.

*N. B.*—Note टीप. Annotation—सोदाहरण—खुलाशाची टीप. Commentary—भाष्य (S). Comment—टीका किंवा व्याख्या.

Commerce (kom'-mĕɹs) [Fr. *commerce*.—L. *commercium*, trade, from *com*, with & *merx*, *mercis*, goods, wares.] *n.* व्यापार *m*, उदीम *m*, घाऊक व्यापार *m*, क्रयविक्रय *n*, वाणिज्य *n.* २ *social intercourse*.दळणवळण *n*, व्यवहार *m*, संघट्टण *n*, परिचय *m*, वहिवाट *f.* ३ (C. of the sexes) संगम *m*, संभोग *m*, मैथुन *n.* ४ *a game of cards in which exchange or barter is the chief feature* देवघेवीचा पत्त्यांचा डाव *m*. C. *v. i.* (*obs.*) व्यापार करणें, देवघेव करणें, व्यापार ठेवणें. २ दळण-वळण राखणें, संघट्टण असणें. Commer'cial *a.* व्यापारा-संबंधीं, उदीमाचा, उदीमासंबंधीं. २ व्यवहाराचा, व्यावहारिक, व्यवहारिक. Commer'cialism *n. the principles and practice of commerce* व्यापारी तत्वें *n. pl.* व्यापारीपणा *m*. २ *the commercial spirit* व्यापारी धोरण *n*, (निंदार्थी) वाणगटी धोरण *n*. ३ *a commercial custom, practice or expression* व्यापारी चाल-पद्धत-वळण-म्हण-वचन. Commer'cialist *n.* व्यापारी तत्वांचा अभिमानी. Commer'ciality *n.* Commercially *adv.* व्यापारदृष्ट्या-रीतीनें. Commercial room, *a room*

*in an inn or hotel for the accomodation of commercial travellers and their customers* खाणावळींत व्यापाऱ्यांच्या दलालांना व त्यांच्या गिऱ्हाइकांना उतरण्याकरितां मुद्दाम ठेवलेली खोली *f*, व्यापारी खोली *f*. Commercial traveller *n. an agent for a manufacturer or wholesale trader who travels over a district showing samples and soliciting orders* व्यापाऱ्यांचा गिऱ्हाईक मिळविणारा फिरता दलाल, फिरता दलाल.

Comminate ( kom'in-āt ) [ L. *com*, intensive prefix, and *minari*, to threaten. ] *v. t. to threaten* धमकावणें, ( ईश्वरी कोपाची ) भीति घालणें, धमकी *f*. घालणें. Comminā'tion *n.* दहशत *f*, धास्ती *f*, धमकी *f*. २ शाप *m*; as, Commination against sinners. Comm'inative, Commin'atory *a.* धमकीची-धास्तीची ( शिक्षा *f*. ).

Commingle ( kom-ing'gl ) [ L. *con*, together & Mingle. ] *v. t. to mix* मिसळणें, एकमेळ करणें, भेळणें, संमीलन *n.* करणें, भेळ करणें, भेसळ करणें. C. *v. i* मिसळणें, एकमेळ होणें. Commin'gled *a.* मिसळलेला.

Comminute ( kom'i-nūt ) [ L. *com* & *minuere*, to make small, from *minus*, less. ] *v. t. to grind, to pulverize* चूर्ण *n*- पूड *f*. करणें, पीठ करणें, दळणें; as, To C. food with the teeth. Comminū'tion *n.* चूर्ण *n*, पूड *f*. २ (*surg.*) हाडाचे बारीक बारीक तुकडे. ३ झिजणें *n*, थोडथोडें कमी होणें *n.* Comminuted fracture *med.* चूर्णित अस्थिभंग, पुष्कळ तुकडे ज्यांत होतात असा अस्थिभंग *m.*

Commiserate ( kom-miz'-ėr-āt ) [ L. *com* & *miserari*, to pity.] *v. t.* चा-कळवळा येणें, दुःख-वाईट वाटणें. Commis'erā'tion *n.* कळवळा *m.* Commis'era'tive *a.* Commis'era'tively *adv.*

Commissariat ( kom'-mis-sā'-riat ) See Commissary.

Commissary ( kom'is-ar-i ) [ L. *con*, together & *mittere*, *missus*, to send. ] *n. a deputy, a delegate* मुखत्यार *m*, प्रतिनिधि *m.* २ बिशपाचा हस्तक *m*- प्रतिनिधि *m.* ३ *mil.* कोठीवाला *m.* सबनीस *m.* मोदी *m.* ४ शेरीफ *m.* See the word Sheriff. ५ लष्करावरचा तपासनीस *m.* Com'missārial *a.* प्रतिनिधीचा, कोठीवाल्याचा, &c. Com'missāriat *n.* मोदीखान्यांतील अधिकारिमंडळ *n.* २ मोदीखाना *m.* Commissary general (लष्कराच्या) मोदीखान्यावरचा मुख्य अधिकारी *m.* Comm'issar'yship *n.* प्रतिनिधित्व *n.* २ बिशपाचें प्रातिनिधित्व *n.* ३ मोदीचें काम *n*- हुद्दा *m*- पदवी *f*.

Commission ( kom-ish'un ) [ Fr. *commission*.-L. *commissionem*, acc. of *commissio*, the commencement of a play or contest. ] *n. authority committed or entrusted to any one* हवाला *m*, नियोग *m* (S.), अखत्यार *m.* २ *authoritative charge or direction to act in a prescribed manner* विशेष अधिकार *m*, हुकूम *m*, आज्ञा *f*, अखत्यार *m.* ३ *a paper conveying authority* सनद *f*, अखत्यारनामा *m*, पत्रक *n*, नियोगपत्र *n*, अधिकारपत्र *n.* ४ दिलेला हुद्दा *m*- अधिकार *m*- असामी *f*. ५ नियोजन *n* पंच-कमिशन मंडळी *f*, पंच *m. pl.*; as, The Police Commission. ६ *com. allowance made to a factor* कमिशन *n*, अडत *f*, दलाली *f*. ७ *order* काम *n*, फरमाश (स). ८ ( वाईट काम ) करणें *n*, बनवणें *n*, दुराचरण *n*, वाईट कर्म *n*, दुष्कर्म *n.* C. *v. t. to authorize, to empower* अखत्यार *m*- अधिकार *m.* देणें. २ *mil.* सनद *f*. देणें. ३ नियोजन करणें, नियुक्त-अधिकृत करणें, अधिकार देऊन पाठविणें. ४ *to order* अधिकार देऊन बाहेरगांवीं पाठविणें, फरमाश( स ) देणें-करणें. Commission agent दलाल *m*, अडत्या. Commission merchant अडत्या, अडत किंवा दलाली घेऊन माल विकणारा, व्यापारी दलाल. Commissionaire' *n.* (सार्वजनिक ठिकाणीं किंवा भोजनवसतिगृहांत ) निरोप पोंचविणारा किंवा अल्प किंमतीच्या जिनसा प्रवाशांना अडत घेऊन आणून देणारा मनुष्य *m.* Commissi'oned *a.* अधिकृत, नियुक्त, अखत्यार दिलेला-पावलेला. २ सनद दिलेला. Commissi'oner *n. person commissioned* मुखत्यार *m*, विशेष काम करण्याकरितां नेमलेला मनुष्य *m*- नियुक्त ( used as a noun ) अधिकृत ( as a noun). २ विशिष्ट खात्यांचा एक सरकारी मुख्य अधिकारी *m*, प्रतिनिधि *m*, कमिशनर (पोलिस कमिशनर) *m.* Commis'sionership *n.* कमिशनरचा हुद्दा *m.* Commissioned officer आरमारावर लेफटेनंटपासून वरचे शासनपत्रानुरोधानें नेमलेले अधिकारी. Commission of the peace जस्टिस ऑफ् दि पीस नेमण्याकरितां शिक्कामोर्तबाचें राजशासनपत्र. To put a ship ( or vessel ) in or into commission सरकारी जहाजावर दारूगोळा वगैरे भरून कुमकेकरितां तें लढाईवर पाठविणें, कामगिरीवर पाठविणें. To put a ship ( or vessel ) out of commission खलाशी व कामगार दुसरीकडे बदलून एखादें जहाज लढाऊ जहाजांतून कमी करणें.

Commissionaire, See Commission.

Commissure ( kom'mis-shūr ) [ L. *commissura*, a joining together from the root of Commit. ] *n.* कोंपरा *m*, सांधा *m.* २ *bot.* संधिस्थान *n.* सांध्याची रेषा *f*, सांधा *m. anat.* (मस्तिष्कीय गोलार्धाचे) संधायक तंतु *m. pl.*, जोडणारे तंतु *m. pl.* Commis'sural *a.* संधिस्थाना-सांध्यासंबंधीं.

Commit (kom-it') [L. *com*, with & *mittere*, to send. ] *v. t. to consign, to entrust, to deliver to* ( with *to* or *unto* ) सोंपवणें, समर्पणें (S), हवालणें, निरवणें, ओपणें, हवालीं देणें-ठेवणें, स्वाधीन करणें, *spec.* वरिष्ठ कोर्टाकडे पाठविणें. २ ( work or business) पदरीं घालणें, माथीं मारणें, सांगणें ( loosely ). ३ *to imprison* प्रतिबंधांत-अटकेंत-ठेवणें, हवालीं करणें, तुरुंगाच्या मुख्य अधिकाऱ्याच्या स्वाधीन करणें, कैदेंत घालणें; as, "These two were Committed." ४ *to perpetrate* (as a crime, sin or fault) (दुष्कृत्य) करणें, आचरणें; as, "Thou shalt

not C. adultery." ५ (often used reflexively) *to pledge, to compromise, expose or endanger by some decisive act* (अ) आपल्याला बांधून-गुंतवून घेणें; (ब) धोक्यांत घालणें; as, "To C. oneself to a certain course." ६ *Milton* (*obs.*) घाबरविणें, वाताहात *f.* धांदल *f.* करणें. C. *v. i.* (*Shakes.*) जारकर्म-व्यभिचार करणें. Commit'ted *pa. p.* Commit'ting *pr. p.* Commit'ment *n. law.* वरिष्ठ कोर्टाकडे इनसाफाकरितां पाठविणें. २ स्वाधीन करणें, कैदेंत टाकणें *n*, कैद *f*, बंधन *n.* ३ अधिक विचारासाठीं एखादें काम कमिटीकडे सोंपविणें. ४ कैदेचें वारंट *n.* Commit'tal *n.* स्वाधीन करणें, सोंपविणें *n.* २ वचन *n*, बंधन *n*, स्वाधीन केलेली वस्तू *f.* ३ आचरणें (S) *n*, करणें *n.* Commit'tee *n.* कार्यकारी सभा *f*, पंचाईत, पंचसभा, नियुक्तसभा *f.* २ *law.* पालक *m*, वाली *m*, संभाळणारा. Commit'teeship *n.* To commit to memory तोंडपाठ करणें, मुखपाठ करणें.

Commix (kom-iks') [L. *com*, together & mix.] *v. t. to mix or mingle together, to blend* मिश्रण करणें. C. *v. i.* एकमेळ होणें, मिसळणें. Commix'tion, commix'-ture *n.* एकजीव करणें *n*, मिश्रण *n*, भेसळ *f.*

Commodious (komō'di-us) [O. Fr. *commodieux*, M. L. *commodiosus*, from L. *commodus*, fit, suitable, *com* (*cum*) and *modus*, measure.] *a. spacious, convenient, comfortable* (आकारानें) सोईचा, सुखाचा, सोईवार, यथासुख (S), उपयुक्त, उपयोगी, सोईस्कर, ऐसपैस, प्रशस्त, यथापेक्ष (S); as, A C. house. "The heaven was not C. to winter in." २ (*Shakes.*) उपयोगीं पडण्यासारखा, सुखकर. Commode' *n.* पूर्वी उपयोगांत असलेलें एक स्त्रियांचें शिरोवस्त्र *n*,-वसन, बुरखा, फडकी. २ एक जातीचें कपाट *n.* ३ मलविसर्जनाच्या सोईची पेटी *f*, मलपात्र *n.* Commō'diously *adv.* सोईवार-स्करपणानें. Commō'diousness *n.* सोईवारपणा *m*, उपयुक्तता *f*, उपयोग *m.* Commod'ity *n. item of wares or goods* (*obs.*) सुखाची-सोईची वस्तू *f.* २ (*Shakes.*) जिन्नस *m*, वाण, सौदा *m*, केणें *n*, माल *m.* ३ (*Shakes.*) (*obs.*) लाभ *m*, स्वार्थ *m*, फायदा *m*, लाग *m.* ४ Commodities *pl.* जिन्नसपान्नस, हरजिन्नस, सौदा *m*, माल *m.*

Commodore (kom'o-dawr) [Dut. from, Fr. *commandeur*, from Late L. *commandare.*] *n.* कमोडोर *m*, रिअर ॲडमिरलच्या खालचा व कप्तानाच्या वरचा अधिकारी *m.* २ आरमारांतील म्होरकें-बिनीचें-निशाणाचें जहाज *n.* ३ *naut.* क्लबचा अध्यक्ष *m.*

Common (kom'un) [O. Fr. *comun*—L. *communis*, from *com* + *munis*, ready of service.] *a. belonging or relating equally or similarly to more than one* सामान्य, साधारण, समाईक, सार्वजनिक, सार्वलौकिक, अनेकस्वामिक, उभयविध. २ *possessed or shared alike by both or all* सामान्यसत्ताक, साधारणसत्ताक, सामायिक, उभयसामान्य, अनेकसत्ताक, सामान्यस्वामिक. As, C. power, authority, government. ३ *belonging to the public* सार्वजनिक, सर्वांचा, सर्वांच्या संबंधाचा, सर्वसाधारण, सर्वोपयोग्य, समाजसत्ताक (S), सर्वांच्या सत्तेंतला, सर्वोपयोगी. ४ *ordinary, customary, frequent* परिपाठाचा, परिपाठांतला, व्यवहारांतला, रोजचा, नित्यांतला, वहिवाटीचा, वहिवाटींतला, राबत्याचा, नित्याचा, साधारण, व्यावहारिक. ५ *undistinguished by rank or position* मध्यम, सामान्य, मध्यम कुळाचा, मध्यम वर्गाचा, सामान्य कुळाचा-वर्गाचा. ६ सर्वांच्या उपयोगी, सर्वांनीं उपभोगण्यासारखा, सर्वोपभोग्य; as, "A dame who herself was common." ७ *abundant* बहुत, पुष्कळ, विपुल, प्रचुर, महामूर, मुबलक, रानोमाळ पडलेला, वाटेवर पडलेला. ८ *belonging to all, universal, general* सर्वांचा, सर्वांच्या संबंधाचा, सार्वजनिक, सार्वत्रिक, सरीसर्वत्राचा. ९ *public, popular, general* लोकांचा, लोकांतला, लौकिक, व्यवहारांतला, लोकरूढींतला, लोकरूढीचा, लोकप्रसिद्ध, प्रसिद्ध. १० (of things) *ordinary, not excellent* हलका, वापरण्याचा, खैराती, चालीचा, नित्यवहिवाटीचा, नित्याचा, बाजारी. [ABOVE COMMON असाधारण, असामान्य, लोकोत्तर.] ११ (*obs.*) *profane* अपवित्र. Common carrier *n.* भाडें घेऊन माल वाहणारा. Common-crier *n.* दौंडी-थाळी पिटणारा. C. denominator समच्छेद *m*, समहर *m.* C. difference *n. alge.* उत्तर *n.* चय *m.* C. divisor or C. measure सामान्य-निश्शेष भाजक. C. noun सामान्यनाम. C. gender *n. gram.* सामान्यलिंग *n.* Common Law *n. the unwritten law* (of England), *administered by the king's courts, which purports, to be derived from ancient and universal usage, and is embodied in the older commentaries and the reports of adjudged cases.* (opposed to statute law, or equity or ecclesiastic law or admiralty law) देशाचारावरून किंवा जुन्या निर्णीत व्यवहारांवरून ठरलेला कायदा *m*, अलिखित व्यवहार (शास्त्र). Common-place. [COMMON PLACE IS A RENDERING OF L. LOCUS COMMUNIS, WHICH CORRESPONDS TO THE ARISTOTELIAN 'COMMON TOPICS.' IT LITERALLY MEANS A GENERAL THEME OR ARGUMENT APPLICABLE TO MANY PARTICULAR CASES. *Its present current sense is an opinion or statement generally accepted or taken for granted, an every-day saying* (*slightingly*) *a platitude or truism n.* अतिशय-प्रसिद्ध सिद्धान्त-वचन-विधान *n*, सर्वांना महशूर-माहीत असलेलें वचन *n*, शिळेंउष्टें विधान *n*, शिळा-सामान्य सिद्धान्त *m.* २ (*obs.*) स्मरणवही. C. Common place. *v. t.* स्मरणवहींत लिहून ठेवणें. C. *a.* सामान्य, जुनें, शिळें *fig.* उच्छिष्ट *fig.* उष्टा *fig.* Commonplace-book *n.* प्रसिद्ध वचनें टिपून ठेवण्याची स्मरणवही *f*, बाड *n.* Common-pleas *n.* प्रजांनीं एकमेकांविरुद्ध आणलेले खटले (राजानें प्रजेविरुद्ध आणलेले नव्हे). Common Prayer *n.* (The Book) साधारण प्रार्थना *f.* C. ratio *n. alge.* गुण *m*, गुणोत्तर *n.* Common report *n.* जनप्रवाद *m*, लोकवार्ता *f.* Com-

mon room *n.* (शाळा, कालेज किंवा दुसऱ्या असल्या शिक्षणसंस्थेंतील अध्यापकांस बसण्याची) समाईक खोली *f.* Common section *n.* मिथश्छिन्न, परस्परच्छेद. Common sense [ ACCORDING TO ARISTOTLE, 'COMMON SENSE' DENOTED THE FACULTY IN WHICH THE VARIOUS REPORTS OF THE SEVERAL SENSES ARE REDUCED TO THE UNITY OF A COMMON APPERCEPTION. IT AT FIRST MEANT AN INTERNAL SENSE WHICH WAS REGARDED AS THE COMMON BOND OR CENTRE OF THE FIVE SENSES, IN WHICH THE VARIOUS IMPRESSIONS RECEIVED WERE REDUCED TO THE UNITY OF A COMMON CONSCIOUSNESS. THE CURRENT MEANING OF COMMON SENSE IS ORDINARY, NORMAL, AVERAGE UNDERSTANDING. ] *n. good sound practical sense* व्यवहारज्ञान, व्यावहारिक ज्ञान *n*, अक्कल *f.* Common sign *n. astrol.* उभयमुखराशी. Common verb *n.* उभयविधक्रियापद *n.* Common *n.* (*Shakes.*) *pl.* सामान्यलोक, जनता. २ समाईक जमीन *f*, गायरान *n*, समाईक शेत *n*, गोप्रचार *m*, गोचार *m*, गुरचरण *n.* ३ समाईक हक्क *m.* [ COMMON OF ESTOVERS लोकांच्या जमिनींतील लांकडें घेण्याचा हक्क *m.* COMMON OF PISCARY दुसऱ्याच्या नदींत किंवा तलावांत मासे धरण्याचा हक्क *m.* COMMON OF PASTURE दुसऱ्याच्या जागेंत ढोरें चारण्याचा समाईक हक्क *m.* COMMON OF TURBARY दुसऱ्याच्या जमिनींतून माती खोदण्याचा हक्क *m.*] C. *v. i.* (*obs.*) सहभाषण करणें. २ समाईक हक्क असणें. ३ सहभोजन करणें, एके ठिकाणीं जेवणें. Common'able *a.* सर्वांनीं सारखा मानलेला. २ सार्वजनिक हक्काचा. ३ गुरचरणीवर चरण्याचा फुकट हक्क असलेला. Comm'onage *n.* समाईक जमिनींत गुरें चारण्याचा हक्क *m*, समाईक जमीन वापरण्याचा हक्क *m.* २ सार्वजनिक जमीन *f*- जागा *f.* ३ मध्यम स्थितींतले लोक. ४ समाईक मालमत्ता *f.* Comm'onalty *n.* (Common people as opposed to the upper classes) मध्यम वर्गांतील लोक, मध्यम स्थितीचे लोक. Comm'oner *n.* साधारण मनुष्य *m*, सामान्य मनुष्य *m*, सामान्य पदवीचा गृहस्थ *m*, छोटेखानी माणूस *m*, *colloq.* इंग्लंडांत लार्डच्या खालच्या पदवीचा-पायरीचा मनुष्य *m.* [ THE GREAT COMMONER वडील विल्यम पिटचें नांव *n.* ] २ (सार्वजनिक जागेंत) समाईक हक्क असणारा मनुष्य *m*, केंब्रीज येथील पाठशाळेंतील एक सामान्य विद्यार्थी *m.* (शिष्यवृत्तिधारी नव्हे.) ४ (हाऊस ऑफ् कॉमन्स मधील) लोकप्रतिनिधिसभेंतील एक सभासद *m.* ५ (*obs.*) वेश्या, गणिका *f*, विश्वयोषिता *f*, बाजारबसवी. Comm'only *adv.* सामान्यतः, बहुतकरून, बहुशः, प्रायः, फार करून. Comm'onness *n.* सामान्यता *f*, साधारणत्व *n.* २ अनेकसत्ताकत्व *n*, साधारणस्वामित्व *n.* ३ प्रसिद्धपणा *m.* ४ रासवटपणा *m*, बाजारीपणा *m*, हलकेपणा *m.* ५ पुष्कळपणा *m*, मात *f*, बाहुल्य *n*, वैपुल्य *n*, अविरलता *f.* ६ सर्वसंबंधिता *f.* ७ (*B.*) अपवित्रता *f*, ओंवळेपणा *m.* Commons *pl. House of Commons* (इंग्लंडांतील) लोकप्रतिनिधिसभा, साधारण लोकांच्या प्रतिनिधींची सभा, कामन्सची सभा *f.* २ साधारण लोक, जनता. ३ (*obs.*) *spec.* आक्सफर्ड कॉलेजांतील मिश्रींतलें अन्न, गणान्न. In Common with (शीं) समाईक. To make Common cause with (शीं) एकाच कार्याचा साथीदार होणें, (शीं) एकाच हिताहिताचा भागीदार होणें, (शीं) एककार्य होणें. Short Commons अपुरें अन्न, तोडलेलें अन्न; as, "To put one on short Commons." The Common नेहमींचें. The Common good सार्वजनिक हित.

*N. B.*—Common हें जेव्हां विधेयार्थी विशेषण असतें, तेव्हां बहुतकरून त्याच्या पुढें to किंवा between हें अव्यय येतें; जसें, "The force of Gravity is Common *to* all kinds of matter." There is nothing Common *between* them.

Commonweal (kom'un-wēl) [ Common + weal. ] *n. the public good* सार्वजनिक हित *n.* २ See Commonwealth लोकहित.

Commonwealth (kom'unwelth) [*Common* + *wealth* well-being. ] *n.* एखाद्या विशेष वर्गाचेंच नव्हे तर सर्व लोकांचें हित सारखेंच पाहणारी राज्यपद्धति *f*, केवळ लोकांच्या हिताकरितां चालविलेलें राज्य *n*, सुराज्य *n*, रामराज्य *n*, धर्मराज्य *n.* २ *the whole body of the people in a country* राष्ट्रांतील सर्व लोक *m. pl*, प्रजाजन *pl.* ३ *the form of government in England established under Oliver Cromwel* इंग्लंडांतील आलिव्हर क्रामवेलच्या वेळची प्रजाहितदक्ष राज्यपद्धति, इंग्लंडांतील क्रामवेलच्या वेळचें सुराज्य *n*, क्रामवेलची रियासद *f.* ४ *a body of persons united together by a common interest* (एकहेतुक) मंडळ *n*, मंडळी *f*; as, "C. of letters."

Commorant (kom'mōrant) [ L. *commorari, commorans*, to abide.—*morari*, to delay. ] *a.* राहणारा, बिऱ्हाडकरू, वस्तीस रहाणारा. Com'morancy *n.* वस्ती *f*, वास *m.*

Commotion (kom-mō'shun) [ Fr. *commotion commotion.*—L. *commotionem acc.* of *commotio*, commotion. ] See Commove.

Commove (kom-mōōv') [L. *com* & *movere*, to move.] *v. t.* (R.) *to agitate* गति *f.* देणें, हालवणें, खळबळविणें, क्षुब्ध करणें. Commō'tion *n. perturbation* क्षोभ *m*, क्षुब्धता *f.* २ गडबड *f*, गोंधळ *m*, कल्लोळ *m.* ३ *tumult* बंडाळी *f*, बंड *n*, दंगा *m.*

Commune (kom'ūn) [ O. Fr. *communer*.-L. *communicare*, to communicate from L. *communis*, common. सध्यां commune शब्दाचा उपयोग वाङ्मयात्मक-भक्तिरसात्मक-काव्यात्मक विषयांत करितात. ] *v. i.* (*Bib.*) *to hold intimate converse with* (विश्वासानें व सहानुभूतीनें) बोलणें, संभाषण *n*- संलाप *m.* करणें, परस्पर गोष्टी सांगणें-करणें, हितगुज-रहस्य करणें. २ *to communicate* ईश्वराशीं (मनानें) व्यवहार ठेवणें *n*, दळणवळण *n*- संघट्टन *n*- संसर्ग *m.* ठेवणें-करणें-राखणें. with *in. con.* ३ *to partake of the Lord's Supper*

or *Holy Eucharist* प्रभुभोजन *n-* 'पवित्रयुखरिस्त' *n-* सहभागिता(?) *f.* घेणें. ४ *to administer The Holy communion to* प्रभुभोजन *n-* पवित्रयुखरिस्त *n-* सहभागिता (?) *f.* देणें. C. *n.* (R.) बोलाचाली *f,* संभाषण *n,* व्यवहार *m,* हितगुज *n,* सुखदुःखाच्या गोष्टी *f.* To Commune with oneself or one's own heart ध्यान करणें, चिंतन करणें.

Commune (kom-ūn') [Fr. *commun,* common.] *n.* फ्रान्स देशांतील मेयरच्या व म्युनिसिपालिटीच्या अमलांतील प्रदेश *m,* काम्यून *m.* २ काम्यूनांत राहणारे लोक. ३ म्युनिसिपालिटीचा-काम्यूनचा कारभार *m,* स्थानिक स्वराज्याचा स्वतंत्र अधिकार. Com'munal *a.* काम्यूनासंबंधीं.

Communicate (kom-ū'ni-kāt) [L. *communis,* common.] *v. t.* (*obs.*) *to give so as to have in common* सहोपभोग घेण्याच्या इराद्यानें दुसऱ्यास देणें, सहविभाग *m.* सहभाग करणें. २ *to impart* देणें, सहविभागी करणें *g. of o.;* as, "To C. heat, light, motion, a quality." ३ *to convey* नेणें, संसर्गानें पोंचविणें-नेणें; as, "To C. diseases." ४ *to make known* कळविणें, जाणविणें, बोधविणें, निवेदिणें, निवेदन *n.* करणें with *g. of o.,* जाहीर-माहित-विदित करणें; as, "To C. information to any one." ४ (B) *to administer the communion to* प्रभुभोजन *n-*पवित्रयुखरिस्त *n-*सहभागिता *f.* देणें. C. *v. i. to have sympathy* (*with*) सुखदुःखांत भागीदार असणें-वांटेकरी होणें, (च्या) बरोबर भाग असणें-उपभोग घेणें; as, "Ye did C. with my affliction." २ (*Bib.*) *to give alms, aid or sympathy* भिक्षा *f.* घालणें, मदत *f.* करणें; as, "To do good and to C. forget not." ३ *to have intercourse with* बरोबर व्यवहार *m.* होणें-असणें, संबंध *m-* दळणवळण असणें, दळणवळणाला कारणीभूत होणें; as, To C. with another. ४ *to partake of the Lord's supper* (ख्रिस्ती लोकांमध्यें) प्रभुभोजन-पवित्र युखरिस्त घेणें; as, "The primitive Christians C.ed every day." ५ *to have passage from one to the other* दळणवळणाचा रस्ता *m-* मार्ग *m-* संबंध *m-* असणें-*in. con.* Communicabil'ity, Commū'nicableness *n.* देयता *f,* देतां येण्याची योग्यता *f.* २ सांगण्याची योग्यता *f,* निवेदनीयता *f.* &c. Commū'nicable *a.* देण्याजोगा, देय. २ कळविण्याजोगा, निवेद्य, निवेदनीय &c. Commū'nicably *adv.* Commū'nicant *n.* ख्रिस्ती लोकांमध्यें प्रभुभोजन घेणारा, "सहभागिता-" सहभोजन-घेणारा, प्रभुभोजन घेण्याचा हक्क असणारा. Communicā'tion *n.* (T. V. 1.) *-act.* देणें *n,* सहविभाग *m,* प्रदान *n,* निवेदन *n,* कथन *n,* विज्ञापन *n.* २ *-act.* कळविणें *n,* सांगणें *n,* निवेदन *n.* ३ *communion* दळणवळण *n,* संसर्ग *m,* जाणेंयेणें *n,* वळण *n.* ४ *conference, colloquy* (in free masonry) बोलीभाषण *n,* संभाषण *n.* ५ *line or means of C.* सामान्य मार्ग *m, mili.* पायबंद *m,* जाण्यायेण्याचा संबंध *m-* रस्ता *m-* मार्ग *m.* ६ *matter communicated* निरोप *m,* संदेश *m.* ७ संबंध *m,* व्यवहार *m,* संलाप *m,* संवाद *m.* ८ पत्रव्यवहार *m.* ९ संगत *f,* सोबत *f.* १० (ख्रिस्ती लोकांमध्यें) प्रभुभोजन घेणें *n.* Commū'nicative *a. not reserved* भडभड्या, बोलका, बोलघेवडा, मोकळ्या मनाचा, कथनोत्सुक. २ निरोपाचा. ३ दानशील, देणारा. ४ *lit.* आपल्याबरोबरच दुसऱ्याला हिस्सा देणारा. Commū'nicatively *adv.* Commū'nicativeness *n.* बोलकेपणा *m,* &c.

*N. B.*—Communicate and Impart. Impart म्हणजे आपलें स्वतःचें जें आहे त्यापैकीं दुसऱ्यास देणें; as, We impart what we regarded peculiarly as our own. Communicate, See the first meaning.

Communion (kom-ūn'-yun) [L. *communio,* Mutual participation.] *n. the act of sharing* (दुसऱ्याबरोबर) वांटून घेणें *n,* सहविभाग *m-*सहभाग *m.* करणें. २ *common possession, community* सामान्य मालकी *f,* व्यवहार *m.* ३ *common participation* सहविभाग *m,* संविभाग *m,* सहभाग (?) *m.* ४ *intercourse between two or more persons* (प्रत्यक्ष किंवा मानसिक) व्यवहार *m,* दळणवळण *n,* वळण *n,* संसर्ग *m.* ५ *Fellowship* सख्य *n* (one of the nine forms of भक्ति. See दासबोध of रामदास, समास ४ दशक ८, सहवास *m,* संगति *f,* संग *m,* समागम *m.* ६ *a body of Christians having one common faith and discipline* एकाच पंथाच्या ख्रिस्ती लोकांचा समाज *m.* ७ (a) *The sacrament of the Eucharist* ख्रिस्ती लोकांमध्यें पवित्र युखरिस्ताचा विधि *m,* प्रभुभोजनविधि *m,* सहभोजनविधि *m,* सहभागिता (?) *f.* (b) *the act of partaking of the sacrament* ख्रिस्ती लोकांत सहभोजन-प्रभुभोजन करणें, सहभागिता घेणें (?). ८ (of saints) '*the fellowship* (*or oneness*) *in which the saints, namely God's people of all ages and in all places, are knit together*' सहभागिता *f* (?), ख्रिस्तावलम्बिता *f,* परस्परैक्यभाव *m,* परस्परसंबंध *m,* ऐक्य *n.* [IN CHRISTIAN THEOLOGY, THE WORD COMMUNION IS USED IN THREE SENSES; (1) SPIRITUAL COMMUNION WITH GOD (A MENTAL ACT) FOR WHICH WE GIVE THE WORD मानसिक व्यवहार, (2) FOR THE SECOND SENSE OF COMMUNION, SEE MEANING NO. 7 GIVEN ABOVE, (3) FOR THE THIRD SENSE, NAMELY, FELLOWSHIP OR ONENESS OF ALL GOOD CHRISTIANS THROUGH CHRIST, WE GIVE THE WORD ख्रिस्तद्वारा ऐक्य OR अंन्योन्यसंबंध. FOR IT IS THE ONENESS THAT IS EMPHASIZED IN THIS THIRD SENSE. IN THE MARATHI TRANSLATION OF THE COMMON PRAYER BOOK OF THE CHURCH OF ENGLAND, सहभागिता IS THE WORD USED FOR COMMUNION IN ALL THESE THREE SENSES. PERHAPS THE TRANSLATERS HAD THE IDEA OF MUTUAL PARTICIPATION (L. *communio*) IN THEIR MIND PROMINENTLY WHEN THEY TRANSLATED THIS WORD.] Communionist *n.* *communicant* ख्रिस्ती लोकांत प्रभुभोजन घेणारा.

Communism (kom-'ū-nizm) [Fr. *communisme commun*, common.] *n.* धनसमता *f*, समाईक संपत्तीची पद्धति *f*, सार्वजनिक संपत्तीचा वाद *m*, समाजामधील लोकांमध्यें जी अनेक बाबतींत असमता दृष्टीस पडते ती नाहींशी होऊन सर्वत्र समता उत्पन्न झाली पाहिजे हें मत *n*, विशेषेंकरून संपत्तीचे दृष्टीनें समाजांतील व्यक्ती-व्यक्तींमध्यें जो फरक दिसतो तो नाहींसा व्हावा म्हणून संपत्तीची सारखी वांटणी व्हावी किंवा समाजांतील संपत्तीवर एकाच व्यक्तीचा हक्क नसावा व सर्व संपत्ति समाजाची समाईक समजली जाऊन प्रत्येकास तिचा सारखाच उपयोग व्हावा असें मत *n*.

Community (kom-ūn'i-ti) [O. Fr.-L. *communitas-communis*, common.] *n. common possession or enjoyment* समाईक मालकी *f*, समाईक उपभोग *m*, समाईक धनीपणा *m*, साधारण प्रभुत्व *n*, साधारण स्वामित्व *n*. २ *people having common rights, &c.* जात *f*, जाति *f*, ज्ञात *f*, ज्ञाति *f*, जमात *f*, मंडळी *f*, पंथ *m*, फड *m*. ३ लोकसंस्था *f*, राज्यसंस्था *f*, समाजसंस्था *f*, संस्था *f*, पांढर *f*. ४ (with the article *the*) *the public in general* समस्त लोक, लोकसमाज *m*, प्रजाजन *m. pl.* ५ (R.) *common character or likeness* साम्य *n*, सारखेपणा *m*, सामान्यगुण-धर्म *m*. ६ *commonness, frequency* (*obs.*) साधारणता *f*, वारंवार होण्याचा धर्म *m*-गुण *m*.

Commute (kom-ūt') [L. *com*, & *mutare*, to change.] *v. t. to exchange* अदलाबदल *f*. करणें, बदल *m*. करणें, फेर-मोबदला *m*. करणें. २ *to lessen or diminish* (as a sentence or punishment) कमी करणें, मोठी शिक्षा रद्द करून हलकी शिक्षा देणें; as, To C. sentence of death to one of imprisonment for life. C. *v. i.* बदलणें, भागाभागानें-हप्त्याहप्त्यानें रक्कम न देतां ती एकदम देणें. Commutabil'ity *n.* Commut'able *a.* फेरबदल-अदलाबदल व्हावयाजोगा. Commuta'tion *n.* फेर *m*, फेरबदल *m*, स्थित्यंतर *n*, फेरफार *m*. २ (*obs.*) अदलाबदली *f*, परिवर्तन *n*, विनिमय *m*, बदलऐवज *m*, (तोडजोडीनें ठरलेला) मोबदला *m*. ३ *law* शिक्षा कमी कडक करणें. ४ (commutation-ticket) (सफरीवर निघतांना गाडीभाड्याची एकदम) उक्ती रक्कम देऊन घेतलेला प्रवासाचा हक्क *m*. C. *a.* अशा प्रवासाचा हक्क देणारा (परवाना किंवा तिकीट). Commu'tative *a.* Commū'tatively *adv.* Commū'tator *n.* (*Elect.*) विद्युत्प्रवाह उलट दिशेला लावण्याकरितां विद्युद्यंत्राला लावलेलें उपकरण *n*, परिवर्तक *m*, (परिवर्तयति इति परिवर्तकः). Commut'ual *a.* (R.) एकमेकांचा, अन्योन्य, परस्पर. Angle of Commutation *astron.* कोणताहि ग्रह आणि स्पष्ट सूर्य ह्यांच्या क्रांतिवृत्तांमधील अंतर *n*, स्थानीयान्तरकोन *m*.

Comose (kō'mōs) [L. *coma*, hair.] *a. bot.* केंसाळ (बी), सकेश, सशिख, शिखावत् (उ. मांदार, हरणदोडी, कावळी, वगैरे).

Compact (kom-pakt') [O. Fr. *compactate*, compacted.-L. *compactus p. p. of compingere*, to join or unite, from *com* & *pangere*, *pactum*, to fasten, to unite. "That is *compact* of which the particles are densely close, or the component parts so arranged as to occupy little comparative space. It is opposed to diffuse, disjointed and flabby."] *a. firm* दृढ, घट्ट (loosely), जंजीरबंद (loosely), दाट (loosely), सांद्र. २ *Milton.* (with *of*) (चा) केलेला, बनविलेला; as, "A wandering fire C. of unctuous vapor." ३ *close-set, thick-set* ठाठर (loosely), आटोपसर, सुटसुटीत, खुटखुटीत, जंजीरबंद (loosely), कणखर, संहत. ४ *not diffuse* आटोपशीर, सुसंबद्ध, सुप्रयुक्त, साररूप. C. *v. t.* आटोपशीर-घट्ट-दृढ-दाट-घन करणें. २ घट्ट-आटोपशीर बांधणें, संबद्ध करणें. Compact'ed *a.* आटोपसर-घट्ट-केलेलें-बांधलेलें. Compact'edly *adv.* Compact'edness *n.* Compact'ly *adv.* Compact'ness *n.* आटोपशीरपणा *m*, घटसूटपणा *m*, घट्टपणा *m.* (loosely), घनता *f* (loosely), निबिडता *f*. २ सुसंहति *f*, दृढसंधिता *f*. २ गोटीदारपणा *m*, सुसंबद्धता *f*. Compac'tion *n.* आटोपशीर बांधणें *n*. २ घनीकरण *n*, दृढीकरण *n*. Compac'ture *n. spens.* दृढबंधन *n*. Compāge', Compā'ges *n.* निरनिराळे भाग एकत्र जोडून केलेली रचना *f*. Compact tissue *anat.* See Tissue.

*N. B.*—Solid घट्ट, घन. Firm स्थिर, न हालणारा, Substantial पुष्टिदायक. Compact आटोपशीर, अविस्खलित.

Compact (kom'pakt) [L. *compactum*, an agreement, from *com* & *pacisci*, to make a bargain.] *n. agreement* बोली *f*, समय (S) *m*, तह *m*, करार *m*, नियम *m*, ठराव *m*.

*N. B.*—Agreement तोंडीं किंवा लेखी केलेला ठराव. Contract or Covenant करार. Compact जमातीचा-गांवकीचा ठराव; या ठरावाची अम्मलबजावणी कायद्यानें होऊं शकत नाहीं. Bargain सौदा.

Companion (kom-pan'yun) [L. *con*, together & *panis*, bread. See Pantry. Companion ह्याचा रूढार्थ सुखदुःखाचा साथीदार असा आहे.] *n. one who accompanies another* बरोबरचा, सहयायी, संगती, सोबती, सहचर, सहगामी, अनुचर. २ साथी, सोबती, साथीदार, संगाती, सांगाती, गडी, सवंगडी. ३ *friend* सखा, खेळीमेळीचा, सहवासी, मित्र, स्नेही, दोस्त. ४ (अगदीं खालच्या प्रतीचा) कनिष्ठ उमराव *m*. ५ ज्याला मित्रभावानें वागवितात असा वरच्या दरजाचा चाकर *m*, स्नेह्यासारखा चाकर *m*, सखा *m*. [FEMALE C. परिचारिका. २ सखी.] C. *v. t.* (R) सोबत करणें, बरोबर जाणें. C. *a.* संगतीचा, बरोबरीचा, स्नेहाचा. Compan'iable *a.* (*obs.*) सहवासनीय. Compan'ionable *a.* सहवासयोग्य-पात्र. Compan'ionableness *n.* Compan'ionably *adv.* Compan'ioned *a.* संगतीं असलेला. Compan'ionhood, Compan'ionary *n.* Compan'ionless *a.* Compan'ionship *n.* सोबत *f*, संगत *f*, संग *m*, साहचर्य

*n*, समागम *m*, दोस्ती *f*, स्नेह *m*, मैत्री *f*. २ संगती *f*, साथीपणा *m*, गडी *m*. ३ सख्य *n*, सखित्व *n*, साहाय्य *n*, &c. [ CLOSENESS OF C. जवळीक *f*. IN CONSTANT OR CLOSE C. गट्टींत, नित्यसहवासांत, संगेंमगें ( *colloq.* ). ]

*N. B.*—Associate सखा, *m*, गडी *m*. Companion—सोबती, *m*, संगाती *m*. Comrade—खेळगडी *m*. Mate—सहचर*m*-री. *f*, Partner—भागीदार *m*, वांटेकरी *m*.

Companion ( kom-pan'yun ) *n. naut.* जहाजाचे खालचे मजल्यांत उजेड पाडण्याकरितां केलेलें झांकणाचें सहाणें. २ केबिनीच्या जिन्यावरील लांकडी छपर *n*. Companion ladder *n. naut.* जहाजावरील मजल्यांतून कामदारांच्या हपिसांत जाण्याची शिडी *f*. Companion-way *n. naut.* गलबताच्या मजल्यावरून खालीं केबिनींत जावयाचा जिना *m*. Companion-hatch *n*. केबिनीकडे जाणाऱ्या जिन्यावरील लांकडी छपर *n*.

Company ( kum'pa-ni ) [ M. E. *companye*-O. Fr. *companie*—L. *com*, together and *panis*, bread.] *n*. मंडळी *f*, मंडल *n*, टोळी *f*, जथा *m*, झुंड *f*. २ *a party of persons assembled for social intercourse* सभा *f*, बैठक *f*, चार मंडळी *f*. ३ *fellowship, companionship* संगति *f*, संगत *f*, संग *m*, समागम *m*, सोबत *f*, साहचर्य *n*, साथ *f*. ४ *guests or visitors in distinction from the members of the family* पाव्हणे मंडळी *f*, पाहुणे मंडळी; *f*; as, "To invite company to dinner." ५ स्नेही-मंडळ *n*; as, "To thee and thy company I bid a hearty welcome." ६ *a firm, a corporation* कंपनी *f*, फड *m*, मंडळी *f*; as, "the East India Company, an Insurance Company, a Joint-stock Company." ७ पेढीचे-दुकानचे-कंपनीचे भागीदार *m. pl.* ८ नाटक-मंडळी *f*, नाटककंपनी *f*. ९ *the crew of a ship including its officers* जहाजांतील अंमलदार व खलाशी; as, A whole ship's company. १० *mil.* कंपनी *f*, रेजिमेंटची तुकडी ( निदान १०० माणसांची ). C. *v. t.* (*obs.*) (ची) सोबती करणें. C. *v. i.* (शीं) सोबत-संगत धरणें; as, "Men which have companied with us all the time." [ ADDRESS IN C. सभा-चातुर्य *n*, सभापांडित्य *n*, वाक्पाटव *n*. BOLD OR CONFIDENT IN C. सभाधीट, सभाशूर. BOLDNESS OR CONFIDENCE IN C. समाधैर्य *n*. THE GRACE OR ORNAMENT OF A C. सभारत्न *n*, सभादीप *m*. SUITABLE TO A GOOD C. सभ्य, समोचित. TIMID OR DIFFIDENT IN C. सभाभीरु *m*. TIMIDITY OR DIFFIDENCY IN C. सभाभीरुत्व *n*. BAD C. दुष्ट-दुर्जन-असत्-खल-दुःसंग *m*, कुसंगति *f*. GOOD C. साधु-सु-सत्-संगति-समागम *m*. IN THE C. OF संगतीं, संगें *with g. of. o.* VIRTUE OF C. संगतगुण *m*. BAD C. LEADS TO RUIN असंगाशीं संग प्राणाशीं गांठ. TO BEAR OR KEEP C. WITH संगत-सोबत करणें-धरणें. ]

Compare ( kom-pār' ) [ L. *com*, together, & *parare*, to make equal, from *com*+*par* ( equal ). ] *v. t.* ( भेदाभेदपरीक्षणार्थ ) तुलना *f*. करणें *with g. of o.*, तुलना *f*. मुकाबला *m*. रुजुवात *f*. करणें-पाहणें *with g. of o.*, जोडणें, जोडून पाहणें, तुळणें, ताळा *m*. पाहणें with *g. of. o.*, मिळवून-लावून-ताडून पाहणें, रुजू घेणें. २ (R.) उपमा *f*. देणें, तुलना *f*. बरोबरी *f*. करणें तुळणें, तोलणें. ३ *gram. to form the comparative or superlative degree of* ( श्रेष्ठता-कनिष्ठता दाखविण्या-करितां ) विशेषणाचा व क्रियाविशेषणाचा तारतम्यभाव दाखविणें. C. *v. i.* ( शीं ) सारखें असणें. २ ( शीं ) साम्य *n*. बरोबरी *f*. करणें. C. ( *obs.* ) बरोबरी *f*, तुलना *f*. Com'parable *a.* तुलना करण्याजोगा, मिळवून पाहायाजोगा-जोगता, तुळायाजोगा, तुलनार्ह, तुलनापात्र. २ उपमा देण्याच्या योग्यतेचा, तुळण्याजोगा, तुलायाजोगा, उपमेय. Com'parableness *n*. तुलनार्हता *f*. Com'parably *adv.* Compar'ative *a.* तुलने-उपमे-संबंधीं. २ अवधिसाकांक्ष, अवधिसापेक्ष, अन्यापेक्ष, सापेक्ष. ३ *gram.* तर-भावदर्शक, अधिकता किंवा न्यूनतादर्शक. ४ तुलनादर्शक, तुलनात्मक; as, C. Anatomy तुलनात्मक शारीरशास्त्र. Compar'atively *adv.* तारतम्य पाहिलें असतां, बरोबरी केली असतां, मिळवून पाहिलें असतां, तारतम्यानें, सापेक्षतेनें. Com'pared *a.* तुलना केलेला, जोडून-ताडून पाहिलेला. २ तुळलेला, उपमित, तुलित. Com'parate *n*. ( *in logic* ) उपमानोपमेयांपैकीं एक, उपमान किंवा उपमेय ह्यांपैकीं एक. Com'paring *n*. तुलना करणें, &c. Compa'rison *n*. तुलना करणें, मुकाबला *m*, रुजुवात *f*, तुलना *f*, उपमा *f*. [ STANDARD OR MEASURE OF C. उपमान *n*, अवधि *m*. TO STAND A C. WITH तुलनेस *n*. उतरणें. ] २ तुलना *f*, उपमा *f*. ३ तर-भावदर्शक किंवा तम-भावदर्शक विशेषणाचें रूप देणें. ४ *illustration* उदाहरण *n*, उपमा *f*, दाखला *m*, दृष्टांत *m*. [ SUBJECT OF C. उपमेय *n*. ] ५ *capacity or possibility of being compared* बरोबरी *f*, तुलना *f*, तुल्यभाव *m*; as, Is there any C. between them or in the phrases *without comparison, out of all comparison, beyond comparison* &c.

Compartment ( kom-pärt'ment ) [ Fr. *compartiment*-L. *pars, partis*, a division. ] *n*. घर *n*, पूड *n*, खण *m*, दालन *n*, भाग *m*, खंड *m*, विभाग *m*, अंश *m*. २ आगगाडीच्या डब्याचा खण *m*. ३ शाला *f*; as, "Singing C." संगीतशाला *f*. ४ कोष्टक *n*. ५ कक्षा *f*.

Compass ( kum'pas ) [ Fr. *compas*.-L. L. *compassus*, a circle, prop., a stepping together, from *com* and *passus*, a pace or step. ] *n*. *circumference*, घेरा *m*, घेर *m*, परिधि *m*, वेढ *m*, परिघ *m*. २ *circuitous route* चक्कर *f*, फेरा *m*, गिरकांडा *m*, गिरकांडी *f*, गरका *m*, वळसा *m*. [ TO FETCH A C. फेरा करणें-घालणें, गिरकांडा *m*-फेरा *m*-वळसा *m*-गरका घेणें-मारणें, घिरटी *f*. घालणें. ] ३ *capacity* पोट *n*, अवकाश *m*, कव *f*, कवळ *n*, खातें *n*. ४ *range, sphere* आटोका *m*, आवांका *m*, पोहोंच *f*, धांव *f*, पंथ, विषय ( S ) *m*, टप्पा *m*, मारा *m*. ५ ( of the voice or instrument) फेर *m*, घर *n*. ६ (of mariners) होका

*m*, होकायंत्र *n*, मच्छयंत्र *n*. [ POINTS OF THE C. होकायंत्रांतील दिशादर्शक बिंदू-दिशा *f*- दिग्विभाग *m*. THE EIGHT POINTS ARE अष्टदिशा *f. pl.* AND WITH INCLUSION OF THE *Zenith* AND *Nadir* दशदिशा *f.* THE MINOR OR REMAINING POINTS ARE:—उपदिशा *f*, विदिशा *f. pl.* THE POINTS COLLECTIVELY ARE:—दिग्चक्र *n*. DETERMINING THE POINTS OF THE C. दिक्साधन. BUILDING OPEN TO ALL THE POINTS OF A C. सर्वतोभद्र. TO BOX THE C. दिक्कथन करणें. ] ७ *compasses* कैवार *m*, कर्कटक *m*, कंपास *m*. ( वर्तुळ वगैरे काढण्याचा ). ८ मर्यादा *f*, हद्द *f*, मंडळ *n*, घेर *m*. ९ विस्तार *m*, परिमाण *n*. C. *v. t. to go about or entirely round* प्रदक्षिणा घालणें, (च्या) सभोंवतीं फिरणें, वळसा-गिरका घालणें. २ (with *about*, *round*) *to encircle* घेरणें, वेढणें, वेष्टणें, घेरा *m*- वेढा *m*. घालणें. ३ *to accomplish*, *to attain* साधणें, सर करणें, प्राप्त करून घेणें, सिद्ध करणें, संपादन करणें. ४ (*law.*) *to purpose*, *to intend*, *to devise* मनांत योजणें, युक्ति योजना-बेत करणें *g. of o.* Com'passable *a.* संपादन करण्यास योग्य, साध्य. Com'pass-card *n.* होकायंत्राची तबकडी *f.* Com'passing *a.* वांकलेला, वक्र, वांकदार. Com'pass-plane *n.* (लांकडें साफ करण्याचा) वांकाचा वैठा रंधा *m*, (खालचे बाजूस) कूर्मपृष्ठाकार व वांकदार रंधा *m*. Com'pass-saw *n.* लांकूड वाटोळें कापण्याची निरुंद करवत *f.* Com'pass-tim'ber *n.* जहाजें बांधण्याच्या उपयोगाचें बांकदार लांकूड *n*. Com'pass-win'dow *n.* बांकदार-अर्धवर्तुळाकार खिडकी *f*, वांकाची खिडकी *f.*

Compassion ( kom-pash'un ) [ L. *com*, with & *pati*, *passus*, to bear, to suffer; lit. suffering with another. Thus compassion means fellow-feeling. ] *n.* अनुकंपा *f*, करुणा *f*, दया *f*, कळवळा *m*, माया *f*, कृपा *f*, कारुण्य *n*. C. *v. t.* ( *obs.* ) अनुकंपा *f.* करणें. Compas'sionable *a.* अनुकंपा-दया-कृपा-पात्र. Compas'sionate *a. sympathetic, merciful* अनुकंपेचा, अनुकंपायुक्त, दयार्द्र, दयाळू, दयाशील, दयावान्, करुणार्द्र, मायाळु, कृपाळु, कृपावंत. Compas'sionate *v. t. to have compassion for, to sympathise with* अनुकंपा-दया-करुणा करणें. Compas'sionately *adv.* अनुकंपेनें, दया करून, दयापूर्वक, कळवळ्यानें. Compas'sionateness *n.* अनुकंपा *f*, कारुण्य *n*, सदयता *f.* Compas'sionating *a.* Compas'sionless *a.* निष्ठुर, निर्दय.

*N. B.*—Mercy दया, कृपा, Compassion अनुकंपा, Commiseration कळवळा, Pity करुणा, कींव, Sympathy सहानुभूति, Condolence समदुःखता, अनुशोचन.

Compatible ( kom-pat'-i-bl ) [ L. *com*, with & *pati*, to suffer. ] *a.* ( usually followed by *with* ) *consistent* जुळायाचा-जोगा-जोगता, जमायाचा-जोगा, अविरुद्ध, अनुरूप, सुसंगत. Compatibil'ity, Compat'ibleness *n.* सुसंगतता *f*, विरोधाभाव *m*, अनुरूपता *f*, योग्यता *f*, मिलाफ *m*. Compat'ibly *adv.* जुळेशा रीतीनें, अनुरोधानें, विरोधाभावपूर्वक.

*N. B.*—Compatible सुसंगत, Consistent सुसंबद्ध. Consistent denotes internal harmony of a thing with its several parts or its harmony with another or harmony with itself at different times. Compatible denotes an extraneous relation of one thing to another or of two to each.

Compatriot ( kom-pā'tri-ot ) [ Fr. *compatriote*.- L. L. *com*, with & *patriota*, a native; See Patriot and *cf.* Copatriot. ] *a.* एकदेशीय, एकराष्ट्रीय. C. *n.* एकदेशीय, एकदेशी, एकदेशनिवासी, एकदेशस्थ. Compatriot'ic *a.* Compā'triotism *n.* एकदेशस्थता *f.* एकराष्ट्रीयता *f.*

Compeer ( kom-pēr' ) [L. *com*, with & *par*, equal.] *n. an equal* समवयस्क, बरोबरीचा-मनुष्य, समानपदस्थ; as, "His C. in arms." २ *a comrade, a mate* सोबती *m*, संगाती *m*, मित्र *m*. C. *v. t.* ( *obs.* ) ( *Shakes.* ) *to match* बरोबरी करणें.

Compel ( kom-pel' ) [ L. *compellere*, *compulsum*, to drive together; hence *compulsion*, *compulsory* &c.] *v. t. to necessitate either by physical or moral force, to force or constrain* भाग पाडणें, (वर) बळजोरी *f*- बलात्कार *m*-जोर *m*-जोरा-जोरी करणें-चालविणें, बळें-बळजोरीनें करवणें-करवून घेणें, सक्तीनें लावणें-योजणें-प्रवर्तविणें, नाकीं वेसण घालून or टोंचून करविणें, सक्ती *f.* करणें, बलात्कारानें करविणें, जरूर पाडणें, जोर चालविणें, सक्तीनें करविणें. २ (R.) जबरीनें-बलात्कारानें घेणें; as, "Commissions which compel from each the sixth part of his substance." (*Shakes.*) ३ *to force to yield, to overpower* वांकण्यास लावणें, वश करणें, (च्या) आधीन करून घेणें; as, "Easy sleep their weary limbs compelled." ४ *to unite in a crowd or company* ( Latinism ) एकत्र करणें; as, "In one troop compel." C. *v. i.* ( बळजोरीनें ) वश-स्वाधीन करणें; as, "If she cannot entreat, I can compel." Compell'ing *pr. p.* Compelled' *pa. p.* Compel'lable *a.*

Compellation (kōm-pel-ā'shun) [L. *compellare*, to address, to accost.] *n. styles of address or salutation, an appellation* औपचारिक नांव *n*, टोपण नांव *n*, अभिधान *n*, पोषाकी प्रतिष्ठित-नांव *n*, बाहतें-बोलावतें नांव *n*; as, "He useth this endearing C., my dear children." Compel'lative *a.* & *n.* Same as compellation.

Compend ( kom'pend ) [ L. *com*, together & *pendere*, L. Fr. *compendiam*, to weigh.] *n. an epitome, a summary* सारग्रंथ *m*, सारसंग्रह *m*, संक्षिप्तग्रंथ *m*, सारांश *m*. Compen'dious *a. abridged, condensed* थोडक्यांत आणलेला, संक्षेपाचा, सारभूत, संक्षिप्त, संक्षेपरूप. Compen'diously *adv.* संक्षेपानें, थोडक्यांत, संक्षेपेंकरून, समासतः, समासेंकरून. Compen'dious-

ness *n.* संक्षेप *m*, संक्षिप्तता *f.* Compendium *n.* सारग्रंथ *m.* &c.

*N. B.*—Compendium संकलन, विषयसंक्षेप, विषयसार. Abridgement संक्षेप, ग्रंथसंक्षेप.

Compensate (kompen'-sāt or kom-pen'-sāt) [L. *com con*, together & *pensare*, *pensatum*, to weigh.] *v. t. to remunerate, to recompense* (नुकसान *n*-) भरणें-भरून देणें, भरपाई *f.* करणें, मोबदला-मजुरा देणें, हानिपूरण *n.* करणें; as, "To C. a labourer for his work." २ *to make up for, to make amends for* बरोबर-समतोल होणें, बरोबरी *f.* करणें, योग्य मोबदला देणें. C. *v. i.* (with *for*) *to supply an equivalent, to make amends* भरून काढणें; as, "Nothing can C. for the loss of reputation." Compensā'tion *n. equivalent given for loss* नुकसानीची भरपाई *f*, नुकसानीबद्दल दिलेला पैसा) *m*- ऐवज *m.* देणें, हानिमूल्य *n*, तूट भरून काढण्याकरितां दिलेला पैसा *m*; as, Exchange compensation given to European officers हुंडणावळ *f*, खुट *f*, खोट *f* (in the sense of खूट भरून काढण्याकरितां दिलेला पैसा). Compen'sative, Compen'satory *a.* हानिपूरक, &c. Compensater-or *n.* तोटा भरून देणारा, क्षतिपूरक, हानिपूरक.

Compete (kom-pēt') [L. *con* & *petere*, to seek.] *v. i. to vie with* चढाओढ करणें, स्पर्धा करणें, चढीवर चढ करणें. Competi'tion *n. emulous contest or rivalry* चढाओढ *f*, स्पर्धा *f*, अहमहमिका *f*, हेवा *m*, प्रतिस्पर्धा *f*, चढाचढी *f.* Compet'itive *a.* चढाओढीचा, स्पर्धेचा. Compet'itor *n. rival* प्रतिस्पर्धी *m*, प्रतियोगी *m*, प्रतिपक्षी *m*, स्पर्धी *m.* Competi'tory *a.* चढाओढ करणारा.

Competent (kom'pe-tent) [L. *com*, with & *petere*, to seek.] *a. qualified for* पुरता, पुरेसा, समर्थ, लायक, योग्य, उपयुक्त, कार्यक्षम, अखत्यार-अधिकार असलेला. २ (R.) except in legal usage वास्तविक सत्तेचा-अधिकाराचा. Com'petence, Com'petency *n.* पुरतेपणा *m*, पूर्तता *f*, सामर्थ्य *n*, लायकी *f*, योग्यता *f*, उपयुक्तता *f*, कार्यक्षमता *f*, क्षमता *f.* २ *sufficiency without excess* निर्वाहापुरतें धन *n*, द्रव्यानुकूल्य *n*, त्यागाभोगापुरता पैसा, ताजी रोटी (*fig*). ३ *law* सत्ता *f*, अधिकार *m*, योग्यता *f.* Com'petently *adv.* पुरता, कार्यापुरता, कार्यांकारण. One that enjoys competence खाऊन पिऊन सुखी, सुखवस्तु, घरचा सुखी, निर्दंदा (ता) त, खातापिता.

Compile (kom-pīl') [Fr. *compiler*.-L. *compilare*, to plunder, to pillage, from *com* & *pilare*, to plunder.] *v. t. to collect together and re-arrange* संग्रह *m*- संग्रहण *n.* करणें *g. of o.*, एकवटणें, संकलन करणें. २ संग्रहग्रंथ *m.* करणें, निरनिराळ्या ग्रंथांतून एक नवीन रूपाचा ग्रंथ तयार करणें. ३ (*obs.*) *to write, to compose* लिहिणें, रचणें, बनवणें. Compilā'tion, Compile'ment *n.* संग्रह करणें *n*, संग्रह *m*, संग्रहण *n.* २ निरनिराळ्या ग्रंथांतून एक नवीन रूपाचा ग्रंथ तयार करणें. ३ *thing compiled* संग्रह *m*, संग्रहग्रंथ *m.* Compil'er Com'pilator *n.* निरनिराळ्या ग्रंथांतून एक नवीन ग्रंथ तयार करणारा, संकलनकर्ता, संग्रहकर्ता, संग्राहक.

Complacent (kom-plā'sent) [L. *complacens*, very pleasing, from *com*, and *placere*, to please.] *a.* समाधानाचा, समाधानयुक्त, संतोषाचा, संतोषयुक्त, खुशदिल, प्रसन्नचित्त, प्रीतात्मा. २ सभ्य, भला, सुशील. Complā'cence,-cy *n. pleasure, or satisfaction in one's own condition or doings* समाधान *n*, संतोष *m*, खुशाली (loosely) *f*; as, "The inward C. we find in acting reasonably and virtuously." २ *pleasantness of temper or mien* स्वभावाचा गोडपणा *m*, भलाई *f*, सौजन्य *n*, भीडस्तपणा *m.* ३ the cause of pleasure. सुखास कारण *n.* Complacently *adv.* संतोषानें, समाधानानें, संतोषपूर्वक, सुखानें.

Complain (kom-plān') [Fr. *complaindre*.-L. L. *con* & *plangere*, to beat one's breast or head in sign of grief, to lament aloud.] *v. i.* (with *of*) *to murmur* कुरकुरणें. २ *to lament* रडणें, विव्हळणें, खेद करणें, (असंतोष) कळविणें, विलाप-दुःखोद्गार काढणें, दुःख करणें, हायहाय करणें, रडगाणें गाणें. [To C. PEEVISHLY किरकिर-पिरपिर करणें, किरकिरणें.] ३ (with *of*) *to make a formal accusation* तकरार *f.* करणें, फिर्याद करणें-ठोकणें, नालस्ती करणें-सांगणें, दाद लावणें, अभियोग करणें, तोहमत घेणें, गिल्ला करणें, आरोप करणें. ४ (of pain) दुखणें-रोग आहे असें सांगणें, कण्हणें, कुंथणें, कुथणें. Complain'ant *n. law.* वादी, फिर्याद करणारा, फिर्यादी. २ पूर्ववादी, भाषावादी (?), अग्रवादी, पूर्वपक्षी. Complain'er *n.* दुःख करणारा, रडणारा, किरकिरा, पिरपिरा. [SOME TERMS FOR A PERSON EVER COMPLAINING ARE:—रडका, रडवा, रड्या, रडतोंड्या, रडतराऊत AND FOR A FEMALE रडतलक्ष्मी, रडतपार्वती, रडतगौरी, रडवी.] Complain'ing *a.* किरकिरा or -ऱ्या, पिरपिरा or -ऱ्या C. *v. n.* रडणें *n.* विव्हळणें *n.* Complain'ingly *adv.* Complaint' *n.* रडणें *n*, विव्हळणें *n*, विव्हळ *m*, खेद *m*, विलाप *m.* २ *cause of complaining* दुःखास कारण *n*, दुःखहेतु *m*, दुःख *n*, रड *f*, गाऱ्हाणें *n.* ३ *malady* रोग *m*, दुखणें *n*, दरद *f*, व्याधि *f*, पीडा *f.* ४ (*a*) *law. charge* वाद *m*, पूर्वपक्ष *m*, आक्षेप *m.* फिर्याद *f.* (*b*) दाद *f.* ५ कागाळी *f*, कुरकुर *f*, गाऱ्हाणें *n*, गिल्ला *m.* [PEEVISH COMPLAINT किरकिर, पिरपिर, कुरकुर. PITEOUS COMPLAINT रडगाणें. A STRING OF PITEOUS COMPLAINTS रडकथा *f*, कपालकहाणी *f.*] ६ कागाळी *f*, दाद *f.* To go or come to lodge a C. फिर्याद जाणें-येणें.

Complaisant (kom'plā-zant) [Fr. *complaisant* p. p. of *complaire*, to acquiesce in order to please:—L. *complacere*, to be very pleasing to.] *a. disposed to please, obliging, politely agreeable* गोड स्वभावाचा, आपल्यापेक्षां खालील दर्जाच्या मनुष्यांशीं—दुसऱ्याशीं मिळून वागणारा, बोलून चालून गोड, उपयोगी, मिळस,

परोपकारी, सत्कारी, गोडबोल्या, सुशील. Com'plaisance *n. compliance with or deference to the wishes of others, obligingness, courtesy, politeness* गोडबोल्या स्वभाव *m*, दुसऱ्याशीं गोडीनें वागण्याचा स्वभाव *m*, परोपकारीपणा *m*, सौजन्य *n*, आदरशीलता *f*, गृहस्थपणा *m*, गृहस्थगिरी *f*. Com'plaisantly *adv.* गोडबोल्या स्वभावानें, भिडस्तपणानें, आदरशीलतेनें. Com'plaisantness *n*.

*N. B.*—Complaisance means a desire to comply with the wishes of others and is generally used of those who have authority or power on their side.

Complement (kom'ple-ment) [L. *com*, & *plere*, to fill. See Complete.] *n. a quantity completing* पुरवणी *f*, पूरण *n*, भर *f*, भरती *f*, भरण *f*. २ *that which fills up or completes as to make a symmetrical whole* भरती *f*, भरगत *f*, भरतें *n*, भरणा *m*, भर *f*, भरताड *f*, भरतळ *n*, पुरवणी *f*, पूरण. ३ पूरक-कोटि अंक *m*- वस्तु *f*. [C. OF AN ARC TO 90° कोटि *f*. C. OF A SEGMENT पीठ *f*.] C. *v. t.* (R.) उणेपणा भरून काढणें, अपूर्ण पूर्ण करणें. Complement'al *a.* भरीचा, भरतीचा, पुरवणीचा, पूरक. Complement'ary *a.* पुरवणी करणारा. C. ANGLE SEE ANGLE. Complement'ary Colours, see Colour. The Complements of a parallelogram. पूरक समांतरभुजचौकोन.

Complete (kom-plēt') [L. *com*, *con*, together & *plere*, *pletus*, to fill cf. Sk. पृ, to fill.] *v. t. to fulfil, to perfect, to finish* संपूर्ण करणें, भरती *f*- पूर्णता *f*. करणें, पुरें करणें, पूर्तता *f*. करणें, पुरा-पुरता करणें. २ *to execute fully* तडीस नेणें, सिद्धीस-शेवटास नेणें, संपविणें, भरणें, पूर्ण-पुरा करणें. C. *a. entire, perfect, finished* पूर्ण केलेला, पुरा, पुरता, पूर्ण, परिपूर्ण, संपूर्ण, समग्र, अखिल, निःशेष, अन्यून. २ *executed fully, accomplished* पूर्ण केलेला, पुरा, पुरता, समाप्त, संपूर्ण, खलास, निर्वृत्त. (S) ३ (a period or term) भरलेला, पूर्ण-पुरा केलेला. Complēt'able *a.* पुरें करण्याजोगा. Completed *a.* see Complete. Complete'ly *adv.* पूर्णपणें, अगदीं, सर्वथा, संपूर्ण रीतीनें. Complete'ness *n.* पुरेपणा *m*, पूर्णता *f*, परिपूर्णता *f*, संपूर्णता *f*, परिपूर्ति *f*. २ पुरेपणा *m*, समाप्ति *f*. Complē'tion *n.* पूर्ण करणें *n*, पुरवणूक *f*, भरती *f*, पूरण *n*, परिपूरण *n*, पुरेपणा *m*, परिपूर्णता *f*, पर्याप्ति *f*, परिपूर्त्ति *f*, परिपाक (?) *m*, निःशेषता *f*. २ सिद्धता *f*, समाप्ति *f*, निर्वृत्ति (S) *f*, संसिद्धि (?) *f*, संपूर्णता *f*, पुरेपणा *m*. Complēt'ive, Complēt'ory *a.* भरीचा, भरतीचा, पूरक. To be completed भरणें; as, "The month is C." महिना भरला आहे. To draw to completion पुरा झाल्यामुळें आकारास येणें.

*N. B.*—Completion परिपूर्णता, संपूर्णता. Consummation संसिद्धि, पर्यवसान, परिपाक.

Complex (kom'pleks) [L. *complexus*, *p. p. of complecti*, to entwine around, from *com* & *plectere*, to twist; akin to *plicare*, to fold. Complex is opposed to simple, and in complex the want or absence of order is the principal idea.] *a.* मिश्र, अनेकवस्तुघटित, संकीर्ण, संमिश्र. २ *complicated* गुंतागुंतीचा, घोंटाळ्याचा, गहन. ३ क्लिष्ट, संकीर्ण. C. *n.* मिश्रण *n*, गुंतागुत *f*. C. *v. t.* गुंतवणें, गुरफटवणें, गुंतागुंत करणें. Complex'edness, Com'plexness, Complex'ity *n.* संकर *m*, अनेकवस्तुघटितत्व *n*. २ गुंतागुंत *f*, घोंटाळा *m*, मिश्रता *f*. Com'plexly *adv.* Complex'us *n.* मिश्रपद्धत *f*. २ पाठ आणि डोकें यांच्यामधील मानेचा रुंद स्नायु *m*, अधिग्रीव स्नायु-पेशी. Complex fraction *math.* भिन्नभागजाति अपूर्णांक, मिश्र अपूर्णांक. Complex number *math.* संकीर्णसंख्या; as, "$a+b\sqrt{-1}$ is a complex number." Complex sentence मिश्र वाक्य.

Complexion (kom-plek'shun) [Fr. *complexion*, appearance.-L. *complexionem*, a comprehending *compass*, habit of body, complexion, from *com. &c. plectere*, *plexus*, to plait. The sense-history of this word is: Originally in the physiology and natural philosophy of the middle ages, it meant the combination of supposed qualities (cold or hot, and moist or dry) in a certain proportion, determining the nature of a body; next it meant the combination of the four humours of the body in a certain proportion, or the bodily habit attributed to such combination; next it meant temperament; now it means the natural colour showing the temperament or bodily constitution.] *n. the colour of the skin esp. of the face* अंगकांति *f*, मुखवर्ण *m*, अंगवर्ण *m*, रंग *m*, वर्ण *m*, वाण;*m*, as, "Tall was her stature, her complexion dark." २ *fig. the general appearance or aspect* देखावा *m*, डौल *m*, स्वरूप *n*, रूप, *n*, स्वभाव *m*, आकार *m*, as, "The C. of the sky, The C. of the news." ३ (*Shakes.*) *bodily constitution* प्रकृति *f*; Complex'ional *a.* प्रकृतीचा, स्वभावाचा, अंगवर्ण-कांतिसंबंधाचा. Complex'ioned *a.* अमुक एक तऱ्हेचा वर्ण किंवा स्वभाव असलेला. Complex'ionless *a.* रंग-वर्णहीन, फिकट.

Compliance (kom-plī'-ans) [Formed with Fr. suffixes *ance*, *ant*, from the verb to *comply* which, however, is not of Fr. origin. See Comply.] *n.* मान्य करणें *n*, कबूल करणें *n*, स्वीकार *m*, रुकार *m*, मान्यता *f*, अनुवर्तन *n*, संमति *f*; as, "Ready C. with the wishes of the people." २ *civility, complaisance* अनुवृत्ति *f*, अनुरोध *m*, वश होण्याचा स्वभाव *m*; as, "A man of few words and of great Compliance." Complī'able *a.* विनेय, मान्य-कबूल होण्याजोगा, वळण्यासारखा, वश्य. Complī'ancy *n.* same as Compliance. Complī'ant *a.* वश होण्याचा स्वभाव असलेला.

[To MAKE C. बधविणें.] २ अनुरोधी, अनुवर्ती, सानुनय. Compli'antly *adv.* To yield compliance to बधणें.

Complicate (kom'pli-kāt) [L. *con*, together & *plicare*, to fold.] *v. t.* or *v. i.* घोंटाळवणें, गुंतवणें, गुरफटवणें, गुंतागुंत करणें, गुंतागुंता *f.* करणें, संकर करणें. C. *a.* गुंतवलेला, गुंतागुंतीचा, घोंटाळ्याचा, संश्लिष्ट, संमिश्र, जटिल, गुंफागुंफीचा, गुतवळीचा. २ *bot.* दुमटलेला, पुटित, गुणीकृत. Com'plicacy *n.* गुंतागुंत *f.* गूढता *f.* मिश्रता *f.* गडबड *f.* घोंटाळा *m.* Com'plicated *a.* Complicā'tion *n.* गुंतवणें *n.* गुरफटणें *n.* गुरफटा *m.* गुतवळ *f.* गुतागुत *f.* गुंताड *f.* गोंधळ *m.* घोंटाळा *m.* जाळें *n.* गुंताडा *m.* २ *med.* संकर (of disease), अनेकरोगसंकर *m.* संकरण *n.* [उपद्रव IS A TECHNICAL WORD IN SANSKRIT MEDICAL WORKS FOR COMPLICATION.] Complicative *a.* गुंतणारें, गुंतविणारें. Com'plicately *adv.* Com'plicateness *n.*

Complice (kom'plis) [Fr. *complice*, a confederate.] *n.* (*Shakes.*) बदकर्मांतील मिलाफी, साथीदार. Compliči'ty *n.* सामिलपणा *m.* मिलाफीपणा *m.*

Compliment (kom'pli-ment) [Fr. *compliment.*- It. *complimento*, civility.-It. *complire*, to finish. L. *complere*, to fill up. This word literally means that which goes to complete the gentleman.] *n.* *an expression by word or act of approbation, regard, confidence, civility or attention* स्तुतिवाद *m.* स्तुतिवचन *n.* स्तुतिवाक्य *n.* आदरवचन *n.* प्रशंसा *f.* स्तुति *f.* श्लाघा *f.* २ *a ceremonious greeting* शिष्टाचारदर्शक वचन *n.*-शब्द *m.*; as, रामराम *m* (among Hindus other than Brahmins), सलाम *m* (among the Muhamadans), जयगोपाळ *m.* जयगुरु *m.* नमस्कार (among the Brahmins). C. *v. t. to praise* वाखाणणें, स्तुति करणें, शाबासकी देणें. २ रामराम-नमस्कार-सलाम करणें. C. *v. i.* वाखाणणी करणें, शाबासकी देणें, नमस्कार करणें. as, "I make the interlocutors, upon occasion, to compliment with one another." Com'plimental, Com'pliment'ary *a.* स्तुतीचा, स्तुतिवाचक, स्तुतिबोधक. २ आदराचा, आदरदर्शक-सूचक, औपचारिक, उपचाराचा. Compliment'er *n.* स्तुति करणारा. २ नमस्कार करणारा. Compliments of the season कालोचित अभीष्ट शुभवचनें, प्रासंगिक अभीष्ट शुभवाक्यें. Hollow, poor, empty compliments कोरडा आदर, वायफळ स्तुति. Interchange of Compliments नमस्कार-चमत्कार होणें. Left-handed compliments बाहेरून दिसण्यांत स्तुतिदर्शक परंतु अर्थाला उलट असें भाषण, शालजोडींतले (जोडे), व्याजस्तुति. To make one a compliment (ची) उत्तम रीतीनें वाखाणणी करणें. To make one's compliments to उपचाराचा रामराम-नमस्कार करणें. To pay or present one's compliment नमस्कार करणें-सांगणें.

Compline, Complin (kom'plin) [O. Fr. *complie.*- from L. L. *completa*, (prop. *fem.* of L. *completus*) the religious exercise which completes and closes the service of the day.] *n.* संध्याकाळची प्रार्थना *f.*

Complot (kom'plot) [Fr. *complot*, a plot.-L. *complicitum*. See Complicate.] *n. plot, a conspiracy* कट *m.* कूट *m.* C. *v. t.* & *v. i.* कट *m.*-कूट *m.* करणें, मसलत *f.* करणें.

Comply (kom-plī') [It. *complire*, to fill up, to suit, also to use compliments, ceremonies or kind offices and offers. L. *complire*, to fill up. The L. *complire*, meant to fill up, to make up what is wanting, satisfy, satisfy the requirements or forms of courtesy. In the sense-developement of comply in English, there has been a tendency to association with ply, Fr. *plier*,-L. *plicare*, to bend, so as to make bending to the will of another.] *v. i.* (followed by *with*) मानणें, कबूल करणें, रुकार देणें, स्वीकारणें, अनुवर्तन करणें. Comply'ing *pr. p.* Complied' *pa. t.* & *pa. p.* Compl'ier *n.* मान्य-कबूल करणारा, स्वीकारणारा. २ वश होणारा. Comply'ing *a.* अनुवर्ती.

Component (kom-pō'nent) [L. *con*, together & *ponere*, to place.] *a.* अंशभूत, अवयवभूत, अंगभूत, घटक. C. *n. a constituent part* अवयवभूत-अंशभूत-अंगभूत पदार्थ *m.* अंश *m.* अंग *n.* अवयव *m.* घटक *m.* २ Compō'nency *n.* (R.) रचना *f.* घटना *f.* Componen'tal *a.*

Comport (kom-pōrt') [Fr. *comporter*, to admit of, to allow, to endure.-L. *com*, together & *portare*, to carry.] *v. i.* (sometimes followed by *with*) *to agree, to accord* (शीं) सुसंगत असणें, शीं-मिळणें; as, "How ill this dulness doth C. with greatness." C. *v. t.* (with a reflexive pronoun) *to conduct* वर्तणें, वागणें; as, "Observe how Lord Somers comported himself." २ (*obs.*) सहन करणें. C. *n.* वर्तणूक *f.* वागणूक *f.* चाल *f.* आचार *m.* Comport'able *a.* यथायोग्य, व्यवहारयोग्य, अनुकूल, सुसंगत, उचित (*obs.*). Comport'ance *n.* वर्तणूक *f.* आचरण *n.* Comportment *n.* वर्तणूक *f.*

Compose (kom-pōz') [Fr. *composer*, from *com* & *poser*, to place. L. *com* & *ponere*, to place.] *v. t. to put together, to make up* एकत्र करणें, (चें) बनवणें; as, "Zeal ought to be composed of the highest degrees of all pious affections." २ *to constitute* अंगभूत होणें, बन (ना) वणें; as, "A few useful things composed their intellectual possessions." ३ *to construct by mental labour* रचणें, तयार करणें, जुळणें, कवन *n.* करणें, लिहिणें, ग्रथन करणें; as, To C. a sentence, a sermon. ४ *to adjust, to regulate* (तंटा) तोडणें, समेटणें, समेट-तोड करणें, समजूत करणें, गडबड-गलबा बंद करणें-मोडणें; as, "In a To C. a quarrel. ५ व्यवस्थेनें ठेवणें; as, "In a

peaceful grave my corpse C." ६ *to tranquilize* शांतवणें, शमविणें, निवविणें, शांत-स्वस्थ-स्थिर करणें, शम-शमन-शांति-उपशमन करणें, संतापहरण करणें; as, "C. thy mind, nor frauds are here contrived nor force designed." ७ *print.* ठसे-खिळे-वर्णमुद्रा जुळणें. ८ *to place in a proper state* व्यवस्थेशीर ठेवणें, शिस्तवार लावणें. ९ *mus.* राग व संवादि पद्धती (harmony) च्या नियमाप्रमाणें चीज बसविणें, चिजेची (नवीन) स्वररचना करणें. Composed' *a.* केलेला, बनवलेला. २ रचलेला, रचित, घटित, ग्रथित, निर्मित, निबद्ध, प्रणीत. ३ शांतवन केलेला, शमित, समाश्वसित, समाहित. ४ *sedate* निरुद्विग्न, स्थिर, गंभीर, धिमा, शांत, अव्याकुल. Compo'sedly *adv.* स्वस्थपणानें, शांत मनानें. Compo'sedness *n.* *steadiness* शांतता *f*, गांभीर्य *n*, स्थिरता *f*, गंभीरपणा *m*, स्वस्थता *f.* Compos'er *n.* रचणारा, प्रणेता, कर्ता, करणारा, ग्रंथकार. २ सांतवणारा, शांत-स्वस्थ करणारा, संतापहर-हर्ता-हारक-हारी. Compo'sing *n.* Com'posite *a.* *made up of parts* अनेकावयवघटित, संयुक्त, संमिश्र, मिश्रित. C. *n.* (R.) समास *m*, मिश्रण *n*, संघात *m.* Com'positely *adv.* Com'positeness *n.* Composing-stick हस्तिका *n.* *print.* टाईप जुळण्याची पकड *f*- पट्टी *f*, जुळपट्टी *f.* Compos'ition *n.* *the act or art of forming the whole* रचना *f*, निर्मिति *f*, बनावणें *n*, बनावणी *f*; as, "The C. of a poem or a piece of music." २ (*a*) (fine arts) कुशल रचना-मांडणी *f*, कसबी रचना *f.* (*b*) निबंधरचना *f*, निबंध *m.* (*c*) *print.* छापण्यासाठीं ठसे जुळणें *n.* ३ *combination, adjustment* घटना *f*; as, "An elementary C. of bodies." ४ *a literary, musical or artistic production* निबंध *m*, ग्रंथ *m*, प्रबंध *m*, कवन *n*, काव्य *n*, चीज रागांत बसविण्याची कला *f*, चीज *f*, रागदारी चीज *f*, गीत *n.* ५ (*Shakes.*) *congruity* सुसंबद्धता *f.* ६ *agreement* परस्परांतील तंटा *m*- भांडण मिटविण्याची-मिटविण्याबद्दल कबुलायत *f*; as, "Thus we are agreed I crave C. may be written." ७ *law.* निकाल *m*, तोड *f*, तडजोड *f*, तोडजोड *f.* ८ *synthesis as opposed to analysis* समास *m*, समाहार *m*, संयोगीकरण; as, "The investigation of difficult things by the method of analysis ought ever to precede the method of composition." Compos'itive *a.* (R.) मिश्रित. २ संयोगधर्मी, संयोग होण्याचा धर्म असणारा. Compos'itor *n.* अनुक्रमानें जुळणारा. ३ जुळारी, ठसे-खिळे जुळणारा. Com'post (R.), Compost'ure *n.* (*obs.*) मिश्रण *n.* २ *agric.* जमिनीचें खत *n.* Compost *v. t.* खत घालणें. Compo'sure *n.* (*obs.*) रचणें *n*, बनवणें *n*, मिश्रण *n*, संयोग *m.* २ (*obs.*) *adjustment* व्यवस्था *f*, तोड *f*, तोडजोड *f.* ३ (*obs.*) घटना *f*, बनाव, रचना *f.* ४ *calmness* स्वस्थता *f*, शांति *f*, शांतावस्था *f*, शांत-स्वस्थचित्तता *f*, स्वास्थ्य *n.* Composite Carriage *n.* दोन भिन्न वर्गांच्या खणांचा (आगगाडीचा) एक डबा *m*, दुवर्गी डबा *m.* Composite numbers अनेकावयवी संख्या, यौगिक-मिश्रसंख्या. Composite portrait अनेक तसबिरी एकत्र करून केलेली तसबीर *f.* Composite ratio योगनिष्पत्ति. Composition metal मिश्रधातु, ही तांबें, जस्त व दुसऱ्या धातू यांची बनविलेली असून तिचा उपयोग जहाजांस पत्रे मारण्याकडे करतात. Composition of a felony कांहीं अंतःस्थ लाभासाठीं गुन्हेगाराची चौकशी न करितां गुन्हेगारास सोडून देतात तो गुन्हा (अशा गुन्ह्याबद्दल दंडाची व कैदेची शिक्षा सांगितली आहे). Composition of forces प्रेरणैकीकरण *n.* Composing rule ओळपट्टी *f*, पितळपट्टी *f*, ओळी निराळ्या पाडण्याची पट्टी *f.*



Compotation (kom-po-tā'shun) [L. *com*, together & *potare*, to drink.] *n.* (R.) *drinking together* सहपान *n*, संपीति *f.* Compotā'tionship *n.* Com'potator *n.* (R.) सहपान करणारा-कर्ता, सहपानी. Compot'atory *a.* (R.)

Compound (kom'-pownd') [O. E. *componre*, M. E. *compounen*,-*L. componere*, from *com* & *ponere*, to place, put or act, excrescent.] *v. t.* *to mingle* मिश्रण करणें, मिळवणें, मिसळणें, एकवट करणें, भेळणें, संमेलन करणें. २ *to adjust* तोडणें, तोडजोड काढणें, तोड पाडणें, तोड काढणें, तोड करणें. ३ *gram.* समास-समाहार करणें. C. *v. i.* *to come to terms of agreement* तोडजोड करणें, तोडीवर येणें, कावडतावड-खांजणी-भांजणी करणें. C. *a.* *not simple* मिश्र, संयुक्त, मिश्रित, मिसळीचा, भेळीचा. [COMPOUND BODY संयुक्त पदार्थ *m.* C. FRACTION *n.* प्रभागजाति अपूर्णांक *m*, भागापवाह-स्वांशापवाह-स्वांशानुबंध-अपूर्णांक *m.* C. FRACTURE सव्रण अस्थिभंग, हाड आणि त्यावरील मांस व त्वचा यांना झालेली खोंक *f*- जखम *f.* (या खोंकेंत हवा शिरते), मिश्र अस्थिभंग *m.* C. INTEREST चक्रवाढ व्याज *n*, चक्रव्याज *n*, चक्रवृद्धि *f.* C. MULTIPLICATION *n.* विविध गुणाकार *m.* C. NUMBER विविधसंख्या. C. PROPORTION *n.* समस्तराशी. C. QUANTITY अनेकपदसंख्या. C. RADICAL विविधमूलक *m.* C. RATIO संयुक्तगुणोत्तर, योगनिष्पत्ति. CHEMICAL C. रासायनिक सम्मेलन *n*, रसायन *n.*] २ *gram.* समासाचा, समस्त, सामासिक. C. *n.* *mixture* मिश्रण *n*, मिसळ *f*, मिसळा *m*, संयुक्त पदार्थ *m*; as, "Rare C. of oddity, frolic, and fun." २ *chem.* रासायनिक संमेलन *n.* ३ *gram.* समास *m.* [DISSOLUTION OF A C. विग्रह *m.*] Compound'able *a.* पक्षकारांनीं फिर्याद केल्यानंतर आपसांत तोडण्यासारखा (गुन्हा), तोडीयोग्य, &c. Compound'ed *a.* मिश्र, मिश्रित, संयुक्त. २ तोडजोड केलेला. ३ समासाचा, सामासिक. Compound'er *n.* *med.* संम्मेलक, औषधमेलनकर्ता, रोग्याकरितां दवाखान्यांत औषध तयार करणारा. २ तोडजोड करणारा, समजूत पाडणारा-घालणारा, तोडीवर आणणारा. Compound'ing *n.* मिसळणें *n*, मिळवणें *n*, मिश्रण *n*, संमिश्रण *n*, संमेलन *n.* २ तोडणें *n*, तोडजोड करणें *n*, तोडमोड करणें *n.* ३ समास करणें *n.* Compound sentence संयुक्तवाक्य *n.*

*N. B.*—In the phrases Compound subject, Com-

pound object, Compound adjective, Compound adverb, Compound verb, the word Compound is to be translated by संयुक्त (See Agarkar's वाक्यमीमांसा).

Compound (kom'pound) [Malays. *kompung*, a village.] *n. In the East Indies, an enclosure containing a house, out-building, &c.* आवार *n*, पटांगण *n*, परडें *n*, कंपाउंड *n*.

Comprehend (kom'-prē-hend') [L. *com*, together & *prehendere*, (to seize by the hand); to comprehend first meant to lay hold of, to seize, to grasp by the hand; now its current sense is *to lay hold of with the mind or sense.*] *v. t. to take in, to comprise, to include, to embrace* आकळणें, कंवटाळणें, धरणें, आंत घेणें, आकलन *n*-समावेश *m.* करणें *g. of o.*; as, "The states comprehended in the Austrian Empire," "Who hath C.ed the dust of the earth in a measure." २ *to understand fully* (बाह्येंद्रियांनीं नव्हे तर बुद्धीनें) आकळणें, घेणें, धरणें, समजणें, उमजणें, पूर्णबोध *m*-होणें, समज *f.* पडणें; as, "Great things doeth he, which we cannot C." ३ (मध्यें) सारांशरूपानें असणें. Com'prehensibil'ity, Com'prehen'sibleness *n.* समजला जाण्याची शक्ति *f*, अधिगम्यता *f*, अवधारणीयता *f*. Com'prehen'sible *a.* आकळाया-चा-जोगा-&c., आकलनीय, आकलनयोग्य, व्याप्य. २ समजायाचा-जोगा-जोगता-सारखा, &c., बुद्धिगम्य, बोधगम्य, ज्ञानगम्य, ग्राह्य, बुद्धिग्राह्य, ज्ञानग्राह्य. Com'prehen'sibly *adv.* Comprehen'sion *n.* आकळणें *n*, आकलन *n*, आंत घेणें *n*, समावेश *m*, अंतर्भाव *m*; as, "In the old Testament there is a close comprehension of the New one." २ (*obs.*) सारसंग्रह *m*, सारग्रंथ *m*, संक्षेप *m*, सार *n*. ३ *capacity of knowing* समजूत *f*, ग्रहणशक्ति *f*, आकलनशक्ति *f*, समज *m*, बोध *m*, अवगम *m*, ज्ञान *n*; as, "Power of C." ४ जमा *f*, गणती *f*, गणना *f*. ५ *log. the sum of the attributes comprehended in a notion or concept* जातिनिर्देश *m*. ६ *embrace* कव (*obs.*) *f*, कवळ (*obs.*). Com'prehen'sive *a.* बहुग्राही, बहुव्यापक, व्यापी, व्यापक. २ बहुविषयग्राही. Com'prehen'sively *adv.* Com'prehen'siveness *n.* विस्तृतत्व *n*, व्यापकता *f*, बहुसमावेशिकत्व *n*, बहुग्राहित्व *n*. २ आकलनसामर्थ्य *n*.

*N. B.*—To apprehend अंशज्ञान होणें. To comprehend पूर्णज्ञान होणें. Apprehend denotes the *laying hold* of a thing mentally, so as to understand it clearly, at least in part, whereas Comprehend denotes *the embracing* or *understanding* it in all its compass and extent. We may *apprehend* many truths which we do not *comprehend.*

Compress (kom'-pres') [L. *compremere, compressus*, to press together.] *v. t. to force together* कोंबणें, दाबणें, चेपणें, चेपटणें, दडपणें, संपीडन करणें. २ *to condense, to compact* थोडक्यांत आणणें, संकलित सांगणें-लिहिणें-करणें, समाहार *m*- संकलन *n.* करणें. ३ (*obs.*) आवळणें, (*obs.*) आलिंगन देणें. C. *n. med.* उपाधान *n*. घडी (दाबण्याकरितां) *f*, दाबण्याची वरघडी *f*. पट्टी *f*. Compressed' *a.* थोडक्यांत आणलेला, संकलित. २ चेपलेला, चेपट, चिंबा, चिवळ. Compressibil'ity, Compres'sibleness *n.* संपीड्यता *f*. Compres'sible *a.* थोडक्यांत आणण्याजोगा, संकलनीय. २ दाबायाजोगा-चापायाजोगा. Compres'sion, Compres'sure *n.* संपीडन *n*. २ संकलन *n*, आकलन *n*. ३ दाबणें *n*, चेपणें *n*. Compres'sional, Compres'sive *a.* Compres'sor *n.* दाबणारा. २ दाबणारा स्नायु *m*, संपीडकपेशी-मांसरज्जु *m*.

Comprise (kom-prīz') [Fr. *compris, comprise, p. p.* of *comprehendere.*—L. com & *prehendere*, to seize.] *v. t.* (especially in a treatise) आंत घेणें, व्यापणें, आकलन-समावेश करणें. Compris'able *a.* Compris'al *n.* -*act.* समावेश *m*- अंतर्भाव *m*-आकलन करणें *n*. २ सार, संक्षेप *m*. Comprised' *p. p.* Compris'ing *pr. p.*

Compromise (kom'prō-mīz) [Fr. *compromis*, from L. *compromissum*, a mutual promise or agreement made by the contending parties, to abide by the decision of arbiter.] *v. t.* (*Shakes.*) *to agree* कबूल-मान्य करणें; as, "Laban and himself were C. ed that all the eanlings should fall as Jacob's hire." २ *to compound* तोडजोड करणें, तोडीवर येणें, तोडणें, तोड काढणें-पाडणें, लवाद करणें; as, "The controversy may easily be C. ed." ३ *to expose to suspicion, risk or danger* अब्रूस धक्का लावणें-चट्टा लावणें-नुकसान करणें; as, "To pardon all who had been C.ed in the late disturbances." C. *v. i.* तोडजोडीवर-समजुतीवर-तोडीवर येणें. C. *n. a reciprocal abatement of extreme demands or rights, resulting in an agreement* (थोडीशी हार खाऊन) तोडजोडीवर येणें *n*, तोडजोड *f*, लवाद *f*, तडजोड *f*. २ *a prejudicial concession, a surrender* स्वाधीन होणें *n*, शरण जाणें *n*, हक्क गमावणें *n*; as, "A C. of character or right."

Comptroller (kon-trōl'ėr) [Another spelling of controller. *Control* is short for *contre-rol*, a duplicate register, used to verify the official or first made roll. O. F. *contre*, over, against, & *rol* (*l*) *e*, a roll. L. *contra*, against & Roll.] *n.* हिशेब तपासणारा सरकारचा श्रेष्ठ अधिकारी *m*, श्रेष्ठ तपासनीस *m*.

Compulse (kom-puls') [L. *compellere*, to compel, L. *com* (*cum*), together, *pellere*, to drive.] *v. t.* (*obs.*) जबरी करणें, जबरीनें घेणें, आग्रह करणें. Compul'satory (R.), Compul'sative *a.* (*Shakes.*) (R.) बळाचा, बळजोरीचा, जबरीचा, बलात्काराचा, जुलुमाचा. Compulsed' *p. a.* Compul'sion *n.* जुलूम *m*, जबरदस्ती *f*, जुलूमदस्ती *f*, सक्ति *f*, बलात्कार *m*, जबरी *f*. Compul'sive *a.* सक्तीचा, जबरीचा, बलप्रधान, बलाचा. Compul'sively *adv.* Compul'sorily *adv.* दाटून, दाटबळें, जुलमानें, जबरदस्तीनें, बलात्कारानें, जबरीनें, जुलमाजुलमीनें.

Compul'sory *a.* जुलुमाचा, जबरीचा. २ आवश्यक, जरूरीचा; as, C. subject in an examination.

Compunction ( kom-punk'shun ) [ O. Fr. *compunction.*–L. *com & pungere, punctum,* to prick. ] *n. contrition, remorse* खेद *m,* दुःख *n,* खिन्नता *f,* खरखर *f,* अनुताप *m,* चुरचुर *f,* हुरहुर *f,* रुखरुख *f.* Compunc'tionless *a.* खिन्नताशून्य-विरहित, अननुतापी. Compunc'tious *a. repentant* अनुतापकर, हुरहुर लावणारा, खिन्नताजनक-कारक, चुरचुरीचा. Compunc'tiously *adv.* Com'punctive *a. causing remorse* खिन्न करणारा.

*N. B.*—Compunction, Contrition, Remorse, Penitence, Repentance.

Compurgation ( kom'-pur-gā'shun ) [ L. *con & purgare, purgatus,* to make pure.] *n. a witness to character who swore along with the person accused in order to the acquittal of the latter* पडसाक्ष *f.* २ पडसाक्षीनें दोषमुक्त होण्याची युरोपांतील प्राचीन पद्धत *f.* Com'purgator *n.* पडसाक्षी *m.* Compurgatō'rial, Com'purgat'ory *a.*

*N. B.*—A compurgator was a term in old English times used for the oath-helpers, whom a person on trial was allowed to call in to swear that, to their belief as neighbours of the accused and acquainted with his character, he was speaking truth in making oath of his innocence.

Compute ( kom-pūt' ) [ *com,* together & *putare,* to reckon. ] *v. t. to calculate* मोजणें, गणणें, अजमास करणें, संख्या काढणें. Comput'able *a.* गणना करण्याजोगा. Com'putant, Comput'er, Com'putist *n.* गणना करणारा. Computā'tion *n.* गणना *f,* सुमार *m,* अजमास *m.* Comput'ātive *a.* Com'putātor *n.*

*N. B.*—Compute, Calculate, Reckon, Count, Estimate, Enumerate.

Comrade ( kom'rād ) [ Sp. *camarada,* from L. *camara, camera,* a chamber, hence chamber-fellowship and then a chamber-fellow. The word comrade is more used with respect to soldiers. ] *n.* खेळगडी *m,* सोबती *m,* साथी *m,* संवगडी *m.* Com'radery *n.* (R.) Com'radeship *n.* सोबत *f.*

Con ( kon ) [ Short for L. *contra,* against in, *pro & con.* ] *adv.* विरुद्ध, उलटा. Pro and con ( of a subject ) भवतिनभवति, न्याय व दोष, अनुकूल व प्रतिकूल विधान *n,* साधकबाधक प्रमाण *n.*

Con (kon) ( क्रियापदाच्या धातूला पूर्वीं लागणारा उपसर्ग; ह्याचा अर्थ सम, सह, असा होतो). See *Com.*

Con ( kon ) [ A. S. *cunnian,* to know. See Cunning.] *v. t. (obs.)* जाणणें, समजणें. २ *to commit to memory* पाठ करणें, संथा घेणें, घोकणें, मनन *n-* चिंतन करणें; as, "I did not come into Parliament to con my lesson." Conning *pr. p.* Conned *pa. p.* Conning *n.* लक्षपूर्वक पाठ करणें *n.* [विणें-वळविणें.

Con, Conn ( kon ) *v. t. naut.* गलबताचें सुकाणूं चालविणें-वळविणें.

Conarium (konā'ri-um) [Gr.] *n. anat. the pineal gland of the brain* (मेंदूचे तळभागास असलेली एक) सूक्ष्म शंकाकृति गांठ *f,* निमुळती गांठ *f.* Conā'rial *a.*

Conatus ( ko-nā'tus ) [ L. *conari, conatus,* to attempt. ] *n.* वाढण्याची शक्ति *f.* २ प्रयत्न *m,* प्रयास *m;* as, "What C. could give prickles to the porcupine or hedgehog or to the sheep its fleece." Conā'tion *n. metap.* शरीराचे व्यापार चालविणारी प्रेरक शक्ति *f.* Conā'tive *a.* इंद्रियांच्या व्यापारकशक्तीसंबंधीं, शारीरिक प्रवृत्तिसंबंधीं.

Concamerate ( kon-kam'er-āt ) [ L. *concameratus, concamerare,* to arch over. ] *v. t.* (वर) कमानमेहेराव करणें. २ कमानदार खोल्या करणें. Concamerā'tion *n.* कमान-मेहरप करणें *n,* कमान *f,* मेहराप (व) *f.*

Concatenate ( kon-kat'e-nāt ) [ L. *con & catena,* a chain. ] *v. t. to link* जोडणें, सांधणें, संबंध करणें, सांखळी करणें-बांधणें. Concatenā'tion *n.* सांखळी *f,* श्रेणी *f,* परंपरा *f,* संबंध *m.* २ सांखळी *f,* शृंखला *f.*

Concave ( kon'kāv ) [ L. *con & cavus,* a hollow. ] *a. hollow & arched* अंतर्गोल, नतोदर, निम्नोदर, गगनाकार, घुमटदार, गगनाकृति, कटाहाकृति, आंतून कमानदार, अंतर्वृत्त, मध्यनिम्न. २ ( R. ) पोकळ. C. *n.* पोकळी *f.* २ घुमट *m,* अंडकटाह *m.* C. *v. t.* अंतर्गोल किंवा पोकळ करणें. Con'cavely *adv.* Concav'ity *n.* अंतर्गोलता *f,* नतोदरत्व *n,* अंतर्वृत्तता *f,* गोल पोकळी *f,* कटाहाकृति *f,* कटाहावकाश *m.* Concā'vo-Con'cave *a.* or Double Con'cave *a.* दोन्ही बाजूंस अंतर्गोल, उभयांतर्गोल, ऊर्ध्वाधः कटाहाकृति, उभयतः कटाहाकृति. Concā'vo-convex *a.* अंतर्बाह्य कटाहाकृति, अंतर्बाह्यगोल.

Conceal ( kon-sēl' ) [ O. Fr. *conceler.*– L. *concelare,* from *con & celare,* to hide. ] *v. t. to hide* लपविणें, झांकणें, आड करणें, दडविणें, गुप्त ठेवणें, चोरणें, छपवणीगोपन करणें. Conceal'able *a.* लपविण्या-झांकायाजोगा-जोगता, गोपनीय, गोप्य, गुह्य, आच्छादनीय, आच्छाद्य. Concealed' *a.* लपविलेला, झांकलेला, गुप्त, गोपित, प्रच्छन्न, आच्छादित. Conceal'ment *n.* लपविणें *n,* झांकणें *n,* चोरून ठेवणें *n. fig.* २ गोपन *n,* निगूहन *n.* ३ *hiding place* लपण्याची जागा *f,* लिकण *f,* दडण *f.* ४ ( *Shakes.* ) गूढगोष्ट *f.* ५ *law.* दाबादाबी *f,* छपवाछपवी *f.* Conceal'er *n.* छपविणारा.

*N. B.*—Conceal लपविणें, Secret छपविणें, Screen पडदा-पांघरूण घालणें, Disguise ( Sentiments ), Dissemble ( Feelings ) खोटा बहाणा करून छपविणें, Hide एकदम झांकणें.

Concede ( kon-sēd' ) [ L. *con,* wholly & *cedere,* to yield. ] *v. t. to yield or suffer to pass, to grant* ( तकरार केल्याशिवाय ) कबूल-मान्य करणें, सवलत-सूट देणें-देऊन टाकणें. २ *to admit to be true, to acknow-*

*ledge* स्वीकारणें, खरें आहे असें कबूल करणें. ३ *to grant as a right or privilege* हक्क म्हणून देणें. C. *v. i. to yield or make concession* कबुली देणें. २ सवलत देणें. Conced'er *n.* कबूल-मान्य करणारा, &c.

Conceit (kon-sēt') [O. Fr. *concept*, from L. *conceptus*, a conception, from *concipere*, to conceive, from *con* + *capere*, to take. cf. Deceit, Receipt.] *n. conception, idea, thought* कल्पना *f*, बुद्धि *f*, बुद्धिविषय *m*, विचार *m*; as, "A man wise in his own C." २ (*obs.*) *mental faculty* मति *f*, बुद्धि *f*. ३ *quickness of apprehension, lively fancy, active imagination* कल्पनाशक्ति *f*, तर्कशक्ति *f*, बुद्धीची तीव्रता *f*, शीघ्रग्राहकता *f*; as, "There is no more C. in him than in his mallet." ४ *an odd or extravagant notion, a fancy, a whim (used disparagingly)* लहर *f*, स्वच्छंद *m*. ५ *an overweening idea of one'self* घमेंड *f*, अहंकार *m*, दम *m*, दिमाख *m*, पत्राज *f*, तोरा *m*, बदमस्ती *f*, आढ्यता *f*, मान *m*. ६ *design, pattern* कल्पनेनें काढलेला नकाशा *m*- नमुना *m*. C. *v. t. arch.* योजणें, कल्पणें. C. *v. i.* (मनांत) विचार करणें. Conceit'ed *a.* घमेंडखोर, अहंकारी, अभिमानी, अहंमानी, दिमाखखोर, दिमाखी, गुमानी, पतराजखोर, फुंद, बदमस्त, तोरेबाज. Conceit'edness *n.* शेखी *f*, पत्राज *f*, मानीपणा *m*. Conceit'edly *adv.* अभिमानानें, दिमाखानें, अभिमानपूर्वक. Conceited (of or respecting) घमेंडीचा. Conceit'less *a.* (*Shakes.*) तर्कशून्य, मूर्ख. In conceit with इच्छानुसार, प्रमाणें, अनुकूल. To be out of conceit with (वरून) मन उठणें, नाखुष असणें, प्रतिकूल ग्रह होणें. To lose one's conceit अभिमान गळणें, घमेंड जिरणें. To take the conceit out of, to put one out of conceit with घमेंड जिरविणें, कढ-दब जिरविणें-झाडणें.

*N. B.*—Egotistical मी मी करणारा, अहंकारी, Conceited किलेक गोष्टींत गर्व वाहणारा-आढ्यता मिरवणारा, घमेंडखोर.

Conceive (kon-sēv') [O. F. *concever*, *concevoir*, from L. *concipere*, to conceive. See Conceit.] *v. t. to begin the formation of the embryo of* गर्भ धारण करणें, पोटांत धरणें; as, "She has also C.ed a son in her old age." २ *to form in the mind* (मनांत) (बेत) योजणें-कल्पिणें, (इच्छा) धरणें, (तर्क) बांधणें-रचणें; as, "To C. a purpose, plan, hope, &c." ३ *to understand, to know* समजणें, जाणणें, आकळणें, ग्रहण करणें, धरणें; as, "I conceived you." C. *v. i. to become pregnant* गर्भार राहणें, गर्भ धारण करणें, गर्भार-गर्भवती होणें, (जनावर) गाभणी होणें, (जनावर) गाभास जाणें, (घोडी) सबर होणें; as, "A virgin shall conceive, and bear a son." २ (with *of*) *to have an idea, to think* मनांत-ध्यानांत चित्तांत-दिलांत येणें; as, "Conceive of things clearly and distinctly in thine own nature." Conceivabil'ity, Conceiv'ableness *n.* बुद्धि-गम्यता *f*-गोचरता *f*. २ कल्पनीयता *f*, कल्पायाजोगेपणा *m*. Conceiv'able *a.* कल्पितां येण्याजोगा, तर्कें कळितां येण्याजोगा, बुद्धि-बोधगम्य, समजायाजोगा, सुबोध, कल्पनीय. Conceiv'ably *adv.* Conceived' *a.* पोटांत धरलेला. २ मनांत धरलेला-रचलेला, कल्पित, चिंतित, उद्दिष्ट. ३ आकलित, बुद्ध्यारूढ. Conceiv'er *n.*

Concent (kon-sent') [L. *con*, together & *canere*, to sing. cf. (*Sk.*) क्वण्, to sound.] *n. concord* स्वरांचा मेळ, *m.* स्वरैक्य *n.* C. *v. i.* (*Spens.*) स्वरैक्य होणें.

Concentrate (kon'-sen-trāt) [L. *con.* (*cum*), together, and *centrum*, Sk. केंद्र, a centre.] *v. t.* केंद्रांत आणणें, एककेंद्र-एकस्थ-एकायन-एकाग्र-एकतान करणें, एके ठिकाणावर-एके लक्षावर आणणें-बसविणें. २ आटवून-गाळून किंवा ऊर्ध्वपातनानें तीव्रता-जलाली चाढविणें; as, "To concentrate vinegar." C. *v. i.* एकाग्रस्थित होणें, एककेंद्र होणें. Concen'trated *a.* Concentrā'tion *n.* एक केंद्रांत लावणें *n*, एकीकरण *n*, समाहरण *n*, एकाग्रता *f*, केंद्रण *n*. २ (द्रववस्तूंतील बाष्परूपानें पाणी काढून टाकून त्यांची) तीव्रता-जलाली वाढविणें *n*. Concen'trative *a.* Concen'trativeness *n.* एककेंद्र करण्याचा गुण *m*. २ तीव्रता वाढविण्याचा धर्म *m*, तीव्रत्ववर्धकता *f*.

Concentre (kon-sen'-tēr) [L. *con* (*cum*,) together, and *centrum*, a centre.] *v. i.* एककेंद्रस्थित होणें. C. *v. t.* एककेंद्र करणें. See Concentrate. Concentering, Concent'ring *pr. p.* Concen'tred, Concent'ered *pa. p.* Concen'tric,-cal *a.* समकेंद्रक, एककेंद्रक; as, "Concentric circles" समकेंद्र वर्तुलें. Concen'trically *adv.* Concentric'ity *n.* एककेंद्रता *f*, समकेंद्रता *f*.

Concept (kon'sept) [L. *concipere*, *conceptus*, to conceive. See conceit.] *n. an abstract general notion* कल्पना *f*, विचार *m*, तर्क (S) *m*. Concep'tacle *n.* (*obs.*) पात्र *n*, बारदान *n*, आशय *n*. २ *bot.* एके बाजूनें उघडें असून त्यांत मोकळ्या बिया असणारें फळ *n*. Concep'tion *n.-act.* गर्भ धारण करणें *n*, गर्भधारण (S) *n*, गर्भाधान *n*, गर्भसंभव *m*, गर्भग्रहण *n*. २ (Shakes.) प्रारंभ *m*, सुरुवात *f*. ३ समजणें *n*, समज *m*, उमज *m*, अनुगम *m*, आकलन *n*. ४ मूळ कल्पना *f*, बुद्धिविषय *m*. ५ हेतु *m*, इरादा *m*, आशय *m*, विचार *m*, ग्रह *m*. Concep'tionist *n.* केवळ कल्पनांमध्यें लुडबुडणारा-गर्क असणारा. Concep'tious *a.* (*Shakes.*) फलदायी, गर्भार, गर्भवती. Concep'tive *a.* कल्पक, &c. Concep'tual *a.* कल्पनाविषयक. Concep'tualism *n.* सादृश्यवाद *n*. एकाच वस्तूविषयीं वेगळाल्या लोकांच्या मनांतील कल्पना सारख्याच असतात असें मत *n*. Concep'tualist *n.* सादृश्यवादी *m*. Concep'tualistic *a.*

Concern (kon-sern') [Fr. *concerner*.-L. L. *concernere*, to regard, from L. *con* & *cernere*, to separate or sift, to distinguish by the senses and especially by the eyes, to perceive or see.] *v. t. to relate or belong to* (चा) संबंध *m*. असणें; as, "Preaching the kingdom of God, and teaching those things which

concern the Lord Jesus Christ"; संबंधी-विषयीं असणें, लागणें, असणें *g. of o.*, वेधणें, कडचा-लगेचा-संबंधाचा-संसर्गाचा-&c. असणें *in. con.* २ (one's self) *to feel an interest in* काळजी *f-* चिंता *f-* कळकळ *f-* &c. असणें *in con. with* विषयीं *of o.*, काळजी *f-* चिंता *f.* &c.- धरणें-वागवणें-बाळगणें *g. of. o.*; as, "A good prince concerns himself *with* the happiness of his subjects." ३ (one's self) *to intermeddle, to be busy* हात *m.* घालणें, मध्यें पडणें. C. *v. i.* (*obs.*) (चा) उपयोग *m.* होणें, महत्वाचें असणें; as, "Which to deny concerns more than avails." (*Shakes.*) Concern *n. that which relates to one, affair* काम *n*, कडचें काम *n.* (as, आमच्या कडचें काम) खटला *m*, खटलें *n*, प्रकरण *n*, विषय *m*; as, "The private concerns of families." [To PROVE A LOSING C. दांतावर येणें (?), आंगावर येणें, आंतबट्ट्याचा-तुडीत व्यापार *m.* होणें.] २ *interest* अंग *n*, संबंध *m*, लगा *m.* ३ *importance, moment* वजनदारी *f*, भारीपणा *m*, अगत्य *n*, महत्व *n.* ४ *care for* काळजी *f*, चिंता *f*, उद्वेग *m*, तिडीक *f*, फिकीर *f*, होष *m.* [TO CEASE TO TAKE ANY CARE OR C. ABOUT काळजी सोडणें, कथा *f-* कथावार्ता *f-* वास्तपुस्त *f-* नांव *n.* &c. सोडणें *g. of. o.*] ५ *interest in, care for* हितसंबंध *m*, आस्था *f*, *f*, पोटाग *f*, कळकळ *f*, जिव्हाळा *m.* ६ *persons engaged in a business, a firm and its business* कारखान्यांतील माणसें, कारखानाखातें *n*; as, "A banking concern." ७ बाब *f*, बाबत *f.* Concerned' *a.* (V. N. 4.) *solicitous, anxious* काळजी-चिंता असलेला-बाळगणारा, काळजीचा, फिकिरीचा, चिंतातुर, चिंतायुक्त; as, "To be much C. for the safety of a friend." २ *having an interest in or connection with* संबंधीं, संबंधाचा, संबंधविशिष्ट, सुखदुःखाचा भागीदार-विभागी-अंशी-वांटेदार. Concern'edly *adv.* (v. N. 2.) काळजीनें, उद्मेखून (*colloq.*), पोटागीनें, आस्थापूर्वक, &c. Concern'ment *n.* काळजी *f*, जरूर *f*, काम *n*, &c. Concern'ing *a.* (R.) *important* महत्वाचा, कामाचा, अगत्याचा; as, "So great and so C. a truth." (Southey). २ Concern'ing *prep.* (or *vulg. prep.*) *pertaining to, respecting, as regards* विषयीं, संबंधीं, विषयक *in. com.* संबंधीं in. *comp.* as, "The Lord hath spoken good concerning Israel."

Concert (konsert) [Fr. *concertere*, 'to agree together'.-It. *concertare*, 'to agree or tune together, to sing in concert'.-L. *concertare*, to contend or struggle together.] *v. t. to contrive together, to plan, devise or arrange* एकोप्यानें-एकवट्यानें-मिळून-सम्मतीनें-&c.—युक्ति-ठराव-मनसुबा करणें-योजणें-रचणें-बांधणें, संगनमत करणें, विचार-बेत करणें-ठरविणें; as, "It was concerted to begin the siege in March." C. *v. i. to act in harmony or conjunction* एकमतानें रहाणें-चालणें-वागणें; as, "The ministers of Denmark were appointed to C. with Talbot." Concert'ed *p. a.* एकमतानें ठरविलेलें-योजलेलें, नक्की ठरलेलें; as, "C. schemes, signals." Concert *n.* (v. V.) *-act.* (एकमतानें झालेला) मेळ *m*, जथा *m-*एकोपा *m.* २ C. of music &c. फडाचा बाजा *m*, वादनसमारंभ *m*, वादनोत्सव *m*, गाण्यावाजविण्याची बैठक *f-* मजलस *f*, जलसा *m.* [C. OF SINGING, PLAYING AND DANCING संगीत *n*, तौर्य *n*, तौर्यत्रिक *n.* C. ROOM गाण्याचा अड्डा *m-* फड *m*, संगीत शाळा *f.*] ३ *agreement* एकोपा *m*, समा *m*, जुगल *f*, ऐकमत्य *n*, एकविचार *m.* Concertina (kon-ser-tē'na) *n. mus.* (दोन्ही हातांनीं ओढून वाजवितात तो) वेंड-वाजा *m.* Concer'to *n.* एखाद्या विशिष्टवाद्यांत वाजविण्याकरितां बांधलेली चीज किंवा गत *f.* Concert-pitch *n. mus.* तारस्वर *m*, चढास्वर *m*, रंग येण्याकरितां नेहमींपेक्षां चढविलेला स्वर *m.*

Concession (kon-sesh'-un) [L. *concessus. p. p.* of *concedere*, to concede. See Concede.] *n.* (v. V.) *the act of conceding or yielding* कबूल करणें *n*, सूट सवलत देणें *n*; as, "By mutual C. s the business was adjusted." २ मान्यता *f*, कबुली *f.* ३ सोडलेली गोष्ट *f-* विषय *m*, सूट *f*, मोबदल्यादाखल देणें *n.* ४ (सवलत किंवा सूट म्हणून) दिलेलें बक्षीस *n*, इनाम *n.* ५ अमुक एक काम करण्याचा सरकारानें दिलेला विशेष हक्क *m*, विशेष सवलत *f.* Conces'sible *a.* Concessionaire' *n.* सरकाराकडून एखादा हक्क *m-* विशेष सवलत *f-* मिळालेला मनुष्य *m.* Conces'sionary *a.* Conces'sionist *n.* सूट किंवा हक्क द्यावा असें प्रतिपादन करणारा. Conces'sive *a.* Conces'sory *a.* सवलत देणारा.

Concetto (kon-chet'to) [It.-L. *conceptus.* See conceit.] *n. pl.* Concet'ti. (konsettē) *affected wit*, or *conceit* ओढून ताणून केलेला विनोद *m.*

Conch (konk) [L. *Concha*, Sk. *çankha*, शंख, a shell.] *n.* शंख *m*, कंबु *m*, सिंधुपुष्प *n.* २ शंखवाद्य *n.* (शिंगासारखा किंवा तुतारीसारखा शंखाचा उपयोग करतात तो). ३ बहामा बेटांतील रहिवाशी *m.* ४ *arch.* (चर्चच्या पूर्वबाजूला) अर्ध-वर्तुलाकार घुमट असलेला) शंखाकृति इमारतीचा भाग *m*, शंख *m*, इमारतीचा शंख *m.* ५ *anat.* बाहेरचा कान *m*, कानाचा शंख *m.* Conchif'erous *a.* शंख असलेला-युक्त, शंखोत्पादक. Conch'iform *a.* शंखाकृति, शंखाकार. Conch'-oid *n.* कोणत्याही सरळ कोनाचे तीन सारखे भाग करणारा वर्तुळ खंड *n*, अनुशंखवृत्तखंड *n.* Conchoid'al *a.* शंखासारखे उच्चनीच भाग असलेला. Concholog'ical *a.* शंखशास्त्राचा. Conchol'ogist *n.* शंखशास्त्र-पारंगत-वेत्ता. Conchol'ogy *n.* शंखशास्त्र (या शास्त्रांत शंखांच्या जातीचे आकार, धर्म, वर्ग, व त्यांतील प्राणी यांचें वर्णन केलेलें असतें). Conch'menstrum शंखद्राव *m.* Conchom'eter *n.* सर्पिलताकोनमापक, शंखकोनमापक.

Concha (kong'ka) [L. *concha.* See conch above.] *anat. the external ear* बाह्यकर्ण *m*, बाहेरील कान *m.* २ *arch. the plain semidome of an apse* शंख

*m*, वर्तुलाकार घुमट असलेला इमारतीचा भाग *m*, (इमारतीचा) शंखाकृति भाग *m*. Conchal *a*.

Concierge (kon'si-èrj') [Fr.] *n. one who keeps the entrance of an edifice public or private, a door-keeper, male or female.* द्वारपाल *m*. द्वारपालिका *f*.

Conciliar, Conciliary (kon-sil'-i-ar,-i) *a. pertaining to a council* सभेचा, सभेसंबंधीं, सभ्य, सामवायिक.

Conciliate (kon-sil'i-āt) [L. *concilior, conciliatus*, to bring together, from *concilium*, a council.] *v. t. to win or gain over, to make friendly, to appease* मर्जी प्रसन्न करून घेणें, मनधरणी करणें with *g. of. o.*, मिळवून घेणें, वळवणें, आपलासा-अनुकूल करून घेणें, मैत्री *f* सलोखा *m*. करणें, शत्रुत्व नाहींसें करणें, गोडी करणें. Concil'iable *a.* (*obs.*) Concil'ia'ted *p. a.* मर्जी प्रसन्न करून घेतलेला, &c. Conciliā'tion *n.* (v. V.) -*act*. वळवणें *n*, मनधरणी *f*, मनवळणी *f*, गोडी *f*. Concil'iative *a.* Concil'ia'tor *n.* Concil'ia'ting *pr. a.* Concil'iatory *a.* (v. V.) सामोपचाराचा, सामाचा, मनधरणीचा, मनमिळाऊ, मिळाऊ, मिळताऊ, द्वेषहारक. [C. MEASURE सामोपचार *m*.]

*N. B.*—Conciliate मर्जी प्रसन्न करून-संपादन करून घेणें, Reconcile सलोखा करणें. Propitiate (राग घालवून) प्रसन्न करून घेणें, आराधना करणें, आळवणें.

Concinnity (kon-sin'i-ti) [L. *concinnus*, well-adjusted.] *n.* (R.) *mutual adaptation of parts* एखाद्या वस्तूच्या निरनिराळ्या अवयवांचा एकमेकांशीं मिळतेपणा *m*, अंतर्गतमेळ *m*, (अवयवांची) परस्पराविरुद्धता *f*. २ *elegance used chiefly of style or of discourse* रीतिसौंदर्य *n*, भाषाललित्य *n*. Concinn'ous *a.* (R.) *neat and elegant* अंतर्गत मेळाचा, सुंदर.

Concionator (kon'sho-na'tor) [L. *concionari, concionatus*, to address.] *n. an haranguer of the people, a preacher* वडबड्या *m*, उपदेशक *m*.

Concise (kon-sīs') [L. *concidere, concisus*, to cut to pieces.] *a.* संक्षेपाचा, अल्पविस्तराचा, अल्पशब्दक, संक्षिप्त, सामासिक. (S.) Concise'ly *adv.* थोडक्यांत, अल्पविस्तरानें. Concise'ness *n.* संक्षेप *m*, संक्षिप्तता *f*, विस्ताराभाव *m*, अल्पविस्तर (S.) *m*.

Concision (kon-sizh'un) *n.* भाग *m*, विभाग *m*, कर्तन *n*, छेदन *n*.

Conclave (kon'klāv) [Fr. *conclave*, a small room (to meet in.)-L. *conclave*, a room, later an assembly of cardinals, an assembly. Orig. a locked-up place. L. *con*, together & *clavis*, a key.] *n.* पोपाची निवडणूक करतेवेळीं 'कार्डिनल्स' ज्या ठिकाणीं बसतात ती खासगी खोली *f*- जागा *f*. २ पोपाच्या निवडणुकीकरितां रोमनक्याथलिक धर्माध्यक्षांची सभा *f*. ३ गुप्तसभा *f*, गुप्तमंडळी *f*. Con'clavist *n.* 'कार्डिनल' बरोबर सभागृहांत येण्याची ज्या दोन ख्रिस्ती भटांना परवानगी असते त्यांपैकीं प्रत्येक. To be in conclave, *to engage in a secret meeting* गुप्तसभेंत गुंतला जाणें.

Conclude (kon-klōōd') [L. *con*, together & *claudere*, to shut.] *v. t. to infer as from premises* (पूर्वपक्ष-प्रतिज्ञा वगैरे वरून) निर्णय-सिद्धांत ठरविणें. २ *to judge, to decide* ठरवणें, निर्णय-निश्चय करणें, नक्की करणें; as, "Is it concluded he shall be protector?" ३ *to bring to an end* समाप्त-बंद-पुरा करणें, संपवणें, आटोपणें. ४ *to bring about as a result* घडवून आणणें, ठरविणें, तडीस नेणें-लावणें; as, "To C. a bargain, to C. a peace." ५ *to estop, to bar* (generally in the passive) अडणें,अटकाव-अवरोध होणें-करणें, (ला) बाध येणें; as, "The defendant is C.ed by his own plea." C. *v. i. to come to a termination* समाप्ति-शेवट होणें; as, "And to C., the victory fell upon us." २ *to come to a decision* (संबंधीं) निकाल-निर्णय करणें, तोड करणें, शेवटचा ठराव करणें; as, "Can we C. upon Luther's instability?" Conclu'ded *p. a.* (v. V. T. I.) समाप्त, समाप्त केलेला, निश्चित केलेला, उपसंहृत. Conclu'ding *pr. p. a.* शेवटचा, समाप्तीचा, अखेरीचा, सरता.

Conclusion (kon-klōō'-zhun) *n. termination, end* अंत *m*, शेवट *m*, अखेर *f*, समाप्ति *f*, उपसंहार *m*, परिणाम *m*, अवसान (S.) *n*. २ *final decision* निर्णय *m*, अवधारणा (S.) *f*; as, "The C. is, she shall be thine." (*Shakes.*) ३ *any inferrence or result of reasoning* अनुमान *n*, अनुमिति *f*, परिणाम *m*, घटितार्थ *m*. ४ *logic. the inferred proposition of a syllogism* सिद्धांत *m*, निगमन *n*, इत्यर्थ *m*, घटितार्थ *m*, मथितार्थ *m*, निर्णीतार्थ *m*. ५ *law. an act by which a man debars himself from doing anything inconsistent with it* (कायद्यांत) प्रतिबंधककृत्य *n*. "Conclu'sive *a.* Conclu'sory *a.* निर्णायक, निश्चायक; as, "C. evidence, C. proof or reasoning, C. presumption." Foregone conclusion आगाऊ धारलेला निर्णय. Hasty conclusion उतावळीचा-उतावळीनें केलेला-दिलेला निर्णय *m*. Conclus'ively *adv.* Conclus'iveness *n.* निर्णायकत्व *n*. In conclusion सारांशरूपानें, सारांश, थोडक्यांत. २ सरते शेवटीं. To try conclusions प्रचीति-अनुभव घेणें; as, "Like the famous ape, to try conclusions, in the basket creep." २ कलहांत-वादांत गुंतणें.

Concoct (kon-kokt') [L. *con*, together, & *coquere, coctus*, to cook.] *v. t.* पचविणें, पाक कराविणें, जिरविणें. २ (*obs.*) पक्का करणें, पिकविणें. ३ *to prepare in the mind* योजणें, रचणें, बनवणें, बनावट करणें, कल्पना करणें-काढणें, नवीन करणें. ४ निरनिराळे पदार्थ मिळवून पक्वान्न तयार करणें. Concoct'er,-or. *n.* Concoc'tion *n.* (*obs.*) पचविणें *n*, पाचन *n*. २ (*obs.*) परिपक्व करणें *n*. ३ बनावट करणें *n*, रचना *f*, कल्पना *f*, घाट *m*, कादंबरी *f*, खोटी हकीकत *f*. ४ *med.* (*obs.*) पाक *m*, परिपाक *m*. Concoc'tive *a.* (*obs.*) पाचक, परिपाकाचा, पाकाचा.

Concomitant (kon-kom'i-tant) [L. *con*, & *comitari*,

to accompany-L. *comit* stem of *comes*, a companion.] *a. accompanying* सहचारी, सहगामी, सहभावी, जोडीदार, साथी. C. *n. a. companion* जो बरोबर असतो तो पुरुष *m*, सहचर *m*, जोडीदार *m*, भावंड *n*. *fig*. २ *an accompaniment* अनुषंगी वस्तु *f*; as, "The other C. of ingratitude is hard-heartedness." Concom'itance, Concom'itancy *n*. सहगामित्व *n*, सोबत *f*, साथ *f*, संग *m*, संगति *f*. Concom'itantly *adv*.

Concord (kon'-kawɹd) [L. *con*, together, *cor*, *cordis*, the heart.] *n. harmony, union* मिलाफ *m*, मेळ *m*, एकोपा *m*, एकी *f*, एकराग *m*, एकमत *n*, ऐक्य *n*, एकविचार *m*. २ (*obs.*) प्रतिज्ञा *f*, करारनामा *m*, तहनामा *m*. ३ *gram*. अन्वय *m*, विशेष्यनिघ्नता *f*, सामानाधिकरण्य *n*, अनुषंग *m*. ४ (*mus.*) सुरांचा जमभेळ *m*, स्वरांचा जम-मेळ *m*, सम *m*, जुळणी *f*, स्वरसाम्य *n*, स्वरैक्य *n*, समस्वरता *f*. C. *v. i*. (*obs.*) मिळणें, एकमत होणें. Concord'ance *n*. ऐक्य *n*, सादृश्य *n*, मेळ *m*. २ *gram*. (*obs.*) कारकसंबंध *m*, अन्वय *m*. ३ क्रमिक-विल्हेवार याद *f*, (विषयांची पृथक्करणरूप) अनुक्रमणिका *f*. Concor'dant *a*. मिलाफी, मिलाफाचा, जमाचा, मेळाचा. Concor'dantly *adv*. Concor'dial *a*. समताल, मिलाफाचा, सुरळीत.

Concorporate (kon-kor'por-āt) [L. *con*, together & corporate.] *v. t*. (दोन किंवा अनेक वस्तू) एकदेही करणें, समाविष्ट करणें. C. *a*. समाविष्ट केलेला.

Concourse (kong'kawɹs) [Fr. *concours*-L. *concursus* from *con*, together & *currere*, to run.] *n. confluence* संगम *m*, संयोग *m*, जमाव *m*, मिळणें *n*, एकत्र होणें *n*. २ *an assembly* जमाव *m*, मेळा *m*, मंडळी *f*, समुदाय *m*. ३ (*obs.*) पुष्कळ रस्ते एके ठिकाणीं मिळतात ती जागा *f*, चौक *m*, एके ठिकाणीं जमण्याची जागा *f*- अड्डा *m*- चव्हाटा *m*.

Concreate (kon'krē-āt) [from L. *concreatus*. participal of *concreare*; *con* together & *creare*, to create.] (*obs.*) or (R.) *v. t*. (दोन किंवा अनेक वस्तु) एकाच वेळीं पैदा-उत्पन्न करणें; as, "When water, the first matter of all things was created with that water was concreated all manner of farms." Con'creat'ed *p. t*. and *p. p*.

Concremation (kon'-krē-mā'shun) [from L. *concretionem* *n*. of action from *concremare*, to burn up, consume. This word has two senses given afterwards. In sense I, the prefix *con* means together & in sense II it means altogether or completely.] *n*. (दोन किंवा अनेक वस्तु) एकत्र जाळणें *n*, सहदहन *n*. *spec*. मेलेल्या नवऱ्याबरोबर त्याच्या स्त्रीला जाळणें. २ रक्षा करणें *n*, साफ जाळून टाकणें *n*.

Concrescence (kon-kres'ens) [L. *con*, together & *crescere*, to grow.] *n. the growing together of cells, organs*, &c. परमाणु, पेशी इत्यादि जमून वाढणें -मोठें होणें *n*, संवर्धन *n*.

Concrete (kon'-krēt) [from L. *concretus* p. p. of *concrescere*, to grow together.] *a*. (opposed to *fluid*) *formed by union or cohesion of particles into a mass, congealed, coagulated, solidified, solid* घट्ट, घन, घण, दाट; as, "The seeds too yield a concrete oil." २ *log*. (opposed to *abstract*) *combined with or embodied in matter, actul practice or particular example; existing in a material form or as an actual reality, or pertaining to that which so exists* अधिष्ठानविषयक, अधिकरणासंबंधीं, धर्मिवाचक, गुणधर्मविशिष्ट; as, "*White* (paper, hat, horse) is the concrete quality or quality in the concrete; *whiteness* the abstract quality or quality in the abstract." ३ *philo*. समवेत, अकेवल, अन्वित, विशिष्ट, संकलित. ४ *gram*. सिद्ध. C. *n*. गुणधर्मविशिष्टपद *n*, गुणधर्मयुक्त पदार्थ *m*, मूर्त पदार्थ *m*. २ गोठणें *n*, अटणें *n*, डिखळ *f*, ढेप *f*, गड्डा *m*. ३ रेती, चुना, गोटे वगैरेचें मिश्रण *n*, कांक्रीट *n* (ह्याचा उपयोग घरांचा पाया भरणें, रस्ते करणें वगैरेकडे करतात). C *v. t*. जमवणें, घट्ट-घण-दाट करणें, गोठवणें. २ कांक्रीटनें फरसबंदी करणें. C. *v. i*. गोठणें, जमणें, जमा होणें. Concrete'ly *adv*. Concrete'ness *n*. Con-crē'tion *n*. गोठणें *n*, आटणें *n*, जमणें *n*. २ गोळा *m*, गुठळी *f*, डिखळ *f*, ढेप *f*. ३ *med*. खडा *m*, संकर *m*. Concrē'tionary *a*. Concrēt'ive *a*. Concrete knowledge व्यक्तिज्ञान *n*, मूर्तिज्ञान *n*, विशिष्टज्ञान *n*, विषयज्ञान *n*. Concrete number संयुक्त-विशिष्ट संख्या. Concrete object मूर्तपदार्थ *m*, साकारपदार्थ *m*.

Concubine (kong'kū-bīn) [Fr. *concubina*, from *con*, together & *cubare*, to lie down.] *n. a woman who cohabits with a man without being his wife, a kept mistress* ठेवलेली (बायको) *f*, रखेली *f*, राख *f*, उपवस्त्र *n*, अंगवस्त्र *n*, उपपत्नी *f*, उपस्त्री *f*. २ (In reference to polygamous peoples as the ancient Hebrews and the Mahomedans) भोगिनी *f*, भोगपत्नी *f* (धर्मपत्नीच्या उलट). Concū'binage *n*. (अशास्त्र अविहित-धर्मविरुद्ध) संभोगसंबंध *m*. २ *law*. अधर्मपत्नीसंबंध *m*, (युरोपांतील लोकांत) स्त्रीनें अन्नवस्त्र व स्त्रीधन मिळविण्याविषयीं नवऱ्यावर दावा केला असतां सशास्त्र किंवा कायदेशीर लग्न झालेलें नाहीं अशी नवऱ्याची तक्रार *f*, अधर्मपत्नीसंबंधाची तक्रार *f*. Concu'binary *a*. राखेपासून झालेला, राखेच्या संबंधाचा. C. *n*. अधर्मपत्नीसंबंध ठेवणारा *m*, अधर्मपतिसंबंध ठेवणारी *f*.

Concupiscence (kon-kū'pis-ens) [From L. *concupiscentia*, from L. *con*, very much & *cupere*, to long for.] *n. eager or vehement desire, the coveting of carnal things, desire for things of the world* भोगेच्छा *f*, संसारविषयेच्छा *f*, संसारांतील सुखाची अत्यंत लालसा *f*. २ *sexual appetite, lust* विषयवासना

*f.* सुरतेच्छा *f*, कटिशूळाची व्यथा *f*, कामाभिलाष *m*, कटिशूल(ळ) *m*. Concū'piscent *a.* संसारसुखाची अतितृष्णा असलेला. २ उत्कट कामवासना असलेला, कामुक. Concū'piscible *a.* कामी, कामुक, कामबुद्धि, कामलोलुप, कामलंपट, पुरुषलंपट, स्त्रीलंपट.

Concur (kon-kur') [L. *con*, together & *currere*, to run. The *verb* To Concur at first meant to rush together in hostility, to come into collision; as, "It is not now utterly incredible that our two Vessels placed there, Antipodes to each other, should ever happen to concur." Then it meant to run or come together peacefully. And now it means simply to run or come together (as streams, lines, times, events, circumstances, things, causes, conditions, &c.)] *v. i.* एका बिंदूंत-रेषेंत-स्थळीं मिळणें-पडणें-जमणें-जाणें-असणें. २ मान्य-कबूल-सम्मत होणें, (ला) सम्मत *n*- सम्मति *f*- अनुमत *n*- अनुमति *f*- अनुमोदन *n*. देणें. ३ *to combine or join* मिळणें, जमणें, जुळणी होणें with *g. of s.*; as, "When outward causes concur." ४ *to unite or agree* (in action or opinion) followed by *in* before the word opinion &c., and *with* before the person जुळणें, जमणें, जुळणी होणें *g. of s.*; as, "Mr. Burke concurred with Lord Chatham in opinion." Concurred' *pa. p.* Concur'rence *n.* एका बिंदूंत-&c. मिळणें *n*, एके ठिकाणीं जमणें *n*, संयोग *m*, सहभावन *n*. २ सम्मत *n*. अनुमति *f*. ३ *agreement in opinion implying joint approbation* मन मिळणें, एक होणें, एकचित्तता *f*, एकमत *n*, मतैक्य *n*, जम *m*, मेळ *m*. ४ *co-operation* मदत *f*, साहाय्य *n*; as, "We collect the greatness of the work and the necessity of divine concurrence to it." ५ *coincidence of equal powers* सामान्य हक्क *m*, समानाधिकार *m*, सारखा अंमल *m*, सारखेपणा *m*; as, "A concurrence of jurisdiction in two different courts." Concur'rency *n.* Concur'rent *a.* एके ठिकाणीं मिळणारा. २ मिळता, जुळता, अनुमत, जुळणारा, एकाच अर्थाचा. ३ सहकारी, जोडीस असलेला, साथीदार, अनुषंगी, एककालिक. ४ समानाधिकृत, समाईक, समवर्ति, समव्यापी. ५ *geom.* एकाच बिंदूंत मिळणारी (रेषा), सहगामी. C. *n.* प्रतिस्पर्धी *m*, आपलाच धंदा करणारा दुसरा मनुष्य *m*. २ सहाय करणारें-सहकारी कारण *n*. ३ *chron.* वर्षांत बावन आठवड्यांपेक्षां जास्त आलेल्या दिवसांपैकीं प्रत्येक दिवस *m*. Concur'rently *adv.* Concur'ring *a.* जुळणारा, मिळणारा.

Concuss (kon-kus') [from L. *concuss pa. p.* stem of *concutere*, to dash together, to shake violently. The stem *concuss* may be philologically rendered by Sk. संघस् or संघर्ष.] *v. t.* खूब जोरानें हालवणें, क्षुब्ध करणें, खळबळवणें. २ *law. to force* (a person) *to do something or to give up something by intimidation, to coerce* धाक बसविणें, धाक घालणें, धाक घालून काम करून घेणें, जबरदस्तीनें काम करून घेणें, दहशत घालणें; as, "Every party ought to tolerate a dissentient minority & not concuss it into acquiescence." Concus'sion *n.* हालवणें *n*. २ धक्का *m*, गचका *m*, हबका *m*. ३ दपटशा *m*. ४ *med.* एकदम (धक्का बसल्यामुळें किंवा उंचावरून एकदम पडल्यामुळें) इंद्रियव्यापार मंद होणें *n*, इंद्रियव्यापाराची मंदता *f*, बधिर होणें *n*, लटका पडणें *n*; as, "A C. of the brain." २ बधिरता. Concus'sive *a.*

Condemn (kon-dem') [L. *con*, very much & *damnare*, to condemn.] *v. t. to pronounce an adverse judgement upon* विरुद्ध टीका करणें, विरुद्ध निर्णय देणें, (संबंधीं) नापसंती दर्शविणें. २ (opposed to *acquit, absolve*) *to convict of guilt* दोष ठेवणें-लावणें; सदोष-दूषित करणें-ठरविणें. ३ *to sentence to punishment, suffering or loss* (with *to* before the penalty) अन्याय आंगीं लावून शिक्षा सांगणें, शिक्षा देणें-ठोठावणें, अपराधी-सदोष ठरवून दंड करणें, अपराधी म्हणून शिक्षा सांगणें,(अपराधकथनपूर्वक-अपराधक्षालनार्थ) दंडाभिधान करणें, दंड ठोठावणें. ४ *to amerce or fine* (with *in* before the penalty) दंड करणें, दंडाची शिक्षा देणें; as, "The King of Egypt condemned the land in a hundred talents of silver." ५ *to adjudge or pronounce to be unfit for use or service* निकामी-निरुपयोगी-अनुपयोगी ठरविणें, रद्द करणें; as, "The ship and her cargo were condemned." Condem'nable *a.* नालायक ठरविण्याजोगा, रद्द करण्याजोगा. २ शिक्षार्ह, गुन्हेगार ठरविण्याजोगा. ३ निंदनीय, दूषणीय, निंद्य. Condemnā'tion *n.-act.* अन्याय आंगीं लावून शिक्षा सांगणें *n*, दंड करणें *n*, दंडनियोजन *n*, दंडन *n*.- *state* दंड केलेली स्थिति *f*, नियोजितदंडत्व *n*. २ *ground or reason of* C. दंडहेतु *m*, दंडकारण *n*, दोषकारण *n*, दोषी-अपराधी-शिक्षापात्र ठरविण्यास कारण; as, "Speak or thy silence on the instant is, thy condemnation and thy death." ३ *a sentence of forfeiture* जप्त करण्याची शिक्षा; as, "A condemnation on the express ground that the ship is enemies' property." ४ निंदा *f*, दूषण *n*, दोष *m*. ५ गुन्हेगार ठरविणें *n*. ६ शिक्षा *f*, सजा *f*, दंड *m*. Condem'natory *a.* दंड-शिक्षा सांगणारा, दंडाचा, शिक्षेचा. २ निंदात्मक, &c. Condemned' *a.* खोटें-सदोष-निरुपयोगी-दोषी ठरविलेला. २ कैद्याच्या उपयोगाचें-करितां; as, "Condemned cell or house." ३ शिक्षा ठोठावलेला. ४ वाळींत टाकलेला. ५ रद्द केलेला; as, "Condemned house or bridge." ६ (निरुपयोगी-दोषी-अपराधी म्हणून) शिक्का मारलेला.

Condense (kon-dens') [From. Fr. *condenser*.-L. *condensare, condensus*, condense.] *v. t. to make dense, to increase the density of, to reduce in volume, to thicken, to concentrate* घण-घन-घट्ट-दाट-दृढ-घनावयव, &c.-करणें. २ *optics. to bring* (rays of light) *to a focus or into a smaller space, so that*

*the brightness is increased* (तेजःकिरणें एकवटवून) तेज प्रखर करणें, तेजोद्दंहण करणें. ३ *elect. to increase the amount or intensity* (*charge of electricity*) विद्युत्संचय-विद्युत्संचार तीव्र करणें, विद्युत्संचाराचें दृंहण करणें. ४ वायुरूप पदार्थाला द्रवाचें रूप देणें, (अदृश्य वायु) दाट किंवा दृढ करून दृश्य करणें. ५ *to contain in a condensed state* दृढ-दाट स्थितींत धरणें-ठेवणें; as, "The powerful gem condensed primeval dews." ६ *fig. to bring together closely or in small compass* जवळ जवळ नेणें, दाट करणें. ७ *to compress thought or meaning into few words* संक्षेप करणें, संकलन करणें, सार काढणें. ८ *to concentrate, to intensify* दृढता वाढवणें, एका केंद्रांत आणणें, (एका केंद्रांत आणून) जोर वाढविणें. C. *v. i.* दाट होणें. २ थोड्या स्थलांत-अवकाशांत येणें. ३ केंद्रीभूत होणें, एकवटणें. Conden'sable *a.* (see the several meanings of the verb), दृढभवनीय, दाट-दृढघन करतां येण्याजोगा-सारखा, &c. Condensabil'ity *n. the quality of being condensable* दृंहणीयता *f*, दृढभवनीयता *f*, दृढ-दाट होण्याजोगी स्थिति *f*- शक्ति *f*, सारभवनीयता *f*, केंद्रीभवनीयता *f*. Conden'sing *p. n.* दाट करणें *n.* २ दाट होणें *n.* Con'densā'tion *n.* दाट होणें *n*, दाट करणें *n*, दृढीकरण *n*, दृढीभवन *n.* २ *reduction of volume* आकार-परिमाण॰ लहान होणें *n*, आकार-दृंहण *n.* ३ *optics.* (तेजाचें) दृढीभवन *n*, दृंहण *n.* ४ (वायुरूप पदार्थांचें) द्रवीभवन, दृंहण *n.* ५ *condensed condition* दृढीभूत स्थिति *f*, दार्ढ्य *n.* Condens'er *n.* दृंहक. २ (In Distillation, Steam-engine, gas-works, metallurgy, pneumatics, wool-manufacture, sugar-manufacture) दृंहक or शीतक. Conden'sible *a.* Conden'sity *n.*

*N. B.*—It will be better if the following distinctions are made: Solidify–घन-घण करणें, Condense दाट-दृढ करणें, Accumulate संचय करणें, Add संकलन करणें. Accumulator संचायक, Condenser दृंहक (from दृंह् in दृढ).

Condescend (kon'-dē-send') [from Fr. *condescendre*, from L. *condescendere*, *con*, together & *descendere*, to descend. To condescend originally meant *to come down voluntarily*. But this sense is now obsolete. Its current senses are:] *v. i. to come or bend down so far as a particular action is concerned from one's position of dignity or pride* (आपल्या हाताखालच्या-कमी दर्जाच्या लोकांशीं) निरभिमानतेनें वागणें, अभिमान सोडून वागणें, मोठेपणा एकीकडे ठेवणें, अभिमानत्यागपूर्वक आचरण करणें, (loosely) मेहेरबानी-दया करणें, अनुग्रह करणें. २ (often used ironically, implying an assumption of superiority) मोठेपणा एकीकडे ठेवल्याचें ढोंग करणें; as, "Those who thought they were honouring me by condescending to address a few words to me." ३ (*obs.*) कबूल करणें, संमति देणें. ४ (विनयातिशयानें) तोडजोडीस कबूल होणें, आपण कमीपणा घेणें. Con'descen'dence *n.* (मोठेपणा एकीकडे ठेऊन पतकरलेलें) निरभिमानतेचें वर्तन *n*, प्रसाद (S.) *m*, मेहरबानी (loosely) *f.* Con'descend'ing *p. a.* See the verb. C. *n.* निरभिमानतेनें वागणें *n.* Con'descend'ingly *adv.* मोठेपणा एकीकडे ठेवून, मेहरबानीनें, अभिमानत्यागपूर्वक. Condescen'sion *n.* (v. V.) *affability to one's inferiors with courteous disregard of difference of rank or position* प्रसाद (S) *m*, अनुग्रह *m*, निरभिमान *m*, अत्यंत नम्रतापूर्वक किंवा आपल्या खालच्या मनुष्याशीं आपणच होऊन निरभिमानतेनें वागणें *n*, त्यक्ताभिमानाचरण *n*, त्यक्ताभिमानाचार *m*, मेहेरबानी; as, "It forbids pride and commands humility, modesty and condescension to others." Con'decen'dence *n.*

Condign (kon-dīn') [O. Fr. *condigne*.-L. *con*, & *dignus*, worthy.] *a. deserved or suitable* (to the fault or crime) योग्य, यथायोग्य, यथायुक्त, वाजवी, रास्त, उचित, अनुरूप; as, "A C. punishment, C. censure." Condign'ly *adv.* Condig'nity (kon-dig'-nity), Condign'ness *n.*

Condiment (kon'di-ment) [L. *condimentum*, *condire*, to preserve, to pickle.] *n.* मसाला *m*, तोंडीलावणें *n*, व्यंजन *n.* C. *v. t.* मसाला घालणें-करणें.

Condisciple (kon'dis-sī'pl) [L. *con.* & Disciple.] *n.* (R.) *a schoolfellow* गुरुबंधु *m*, गुरुभाऊ *m*, सहाध्यायी *m*, सतीर्थ्य *m.*

Condition (kon-dish'un) [F. *condition*, agreement, compact.-L. *con*, together & *dicere*, to say.] *n. state of being or situation* अवस्था *f*, दशा *f*, स्थिति *pop.* स्थीत *f*, गति *f*, गत *f*, अहवाल or हवाल *m. f*, वर्तमान *n.* [CAUSAL C. कारणावस्था *f.* TO GET INTO A GOOD C. चांगल्या स्थितीस येणें, रूपास-नांवारूपास येणें.] २ *state of body* भावना *f*, प्रकृति *f*, देहभावना *f*, शरीरस्थिति *f*, शरीरावस्था *f.* [THAT IS IN GOOD C. *spec.* ताजा, ताजातवाना, टवटवीत, ढुमढुमीत, धुंद. TO GET INTO C. आंग *n.* धरणें-येणें, आपलेपणांत येणें, रंगास येणें. TO GET OUT OF C. आंग *n.* टाकणें-सोडणें.] ३ स्थिति *f*, पदवी *f.* ४ *law. a term or stipulation* प्रतिज्ञा *f*, अट *f*, मुद्दा *m*, अड *f*, शरत *f*, शर्त *f.* ५ गुण *m*, उपाधि *f*, विशेषण *n*, धर्म *m.* Conditions परिस्थिति *f.* C. *v. i. to make terms, to stipulate* शरत-बोली-करार करणें; as, "I will C. with you." २ (*metaphysics*) (ज्ञानग्राह्य) एखादी वस्तु गुणधर्मान्वित-उपाधियुक्त करणें; as, "To think of a thing is to C." C. *v. t. to impose or be imposed as the condition of* नियमानें-संकेतानें बांधणें; as, "Seas that daily gain upon the shore, Have ebb and flow conditioning their march." २ *to contract, to stipulate* ठराव-करार करणें. ३ *to test or assay* (as silk, *to ascertain the proportion of moisture it contains*)

परीक्षा करणें, पारख करणें. Condi'tional *a. implying terms, depending upon conditions* अटीचा, सप्रतिबंधक, 'तरी'चा(?), अन्यावलंबी, यद्यर्थगर्भित. २ *gram.* संकेतार्थक. C. *n.* संकेतार्थकशब्द. Conditional'ity *n.* संकेतार्थकता *f.* अट असलेली स्थिति *f.* अन्यावलंबिता *f.* सोपाधिकता *f.* सापेक्षत्व *n.* Conditi'onally *adv.* अट घालून-सांगून-करून, अटीवर, शर्तीवर, सप्रतिज्ञ. Condi'tionate *v. t.* (*obs.*) अट घालणें-ठरविणें. Condi'tioned *a.* परिस्थितींतला, परिस्थितिविशेषाचा, अमुक एक स्थिति-गुण-धर्म असलेला; as, "A well C. man." २ *philo.* सोपाधिक, सगुण. Conditioning house *n.* विणकामाच्या जिनसांची जात *f.*-वजन *n.*-माप वगैरे नक्की ठरविण्याचें घर *n.* पारखघर *n.* (हें इंग्लंडमध्यें ब्रॅडफर्ड येथें १८९१ त स्थापन झालें). Given conditions *math.* प्रतिज्ञा *f.* Conditional legacy अवलंबी-सोपाधिकमृत्युलेखदान *n.* मृत्युपत्रांतील कांहीं अटीवरची देणगी *f.*

Condole (kon-dōl') [L. *con*, with & *dolere*, to grieve.] *v. i.* (followed by *with*) *to grieve with another* (मृताच्या आप्तांस त्यांचे दुःखांत) सहानुभूति दाखविणें, समदुःखी होणें, परदुःखदुःखित होणें, अनुशोचन करणें. C. *v. t.* (R.) (च्या) करितां शोक करणें. Condo'latory *a.* समदुःखी, दुःख प्रदर्शित करणारा, दुःखप्रदर्शक, दुसऱ्याच्या दुःखानें दुःखित होणारा. Condole'ment *n.* Condo'lence *n.* (*v.* V.) अनुशोचन *n.* समदुःखी होणें *n.* परदुःखेनदुःख *n.* (मृताच्या आप्तास) दाखविलेली सहानुभूति *f.* समदुःखिता *f.* Condol'ent *a.* समदुःखी. Condo'ler *n.* अनुशोचक *m.* दुःखप्रदर्शक *m.* Condo'ling *p. a.* (v. V.) दुःख प्रदर्शन करणारा, समदुःखी, दुःखित होणारा. C. *vb. n. See the verb.*

Condone (kon-dōn') [L. *condonare*, *condonatum*, to give up, from *con* & *donare*, to give.] *v. t.* क्षमा करणें, दया करणें, माफ करणें. २ *law.* विवाहाचे वेळीं घेतलेली शपथ मोडल्याबद्दल पतीनें किंवा पत्नीनें एकमेकांस माफी करणें. Con'donā'tion *n.* अपराधदुर्लक्षरूप क्षमा *f.* माफी करणें *n.* माफी *f.* क्षमा *f.* २ *law.* नवरा वायकोंनीं एकमेकांशीं केलेल्या बेइमानपणाची माफी *f.*

Conduce (kon-dūs') [L. *con*, together & *ducere*, to lead.] *v. i.* (with *to*) *to contribute, to help* उपयोगी सहाय-साधक होणें, उपयोगास येणें-पडणें, मदत करणें. C. *v. t.* (*obs.*) वाट दाखवून नेणें, पुढाकार घेणें. Conduce'ment *n.* (*obs*). Condu'cible, Condu'cive *a.* साधक, उपयोगी, उपयुक्त, उपकारक, कारणीभूत, आवह. [C. TO HEALTH आरोग्यावह. C. TO SATISFACTION तृप्तिजनक.] Condu'cibleness *n.* आवहता *f.* Condu'civeness *n.* (v. A.) आवहकता *f.* साधकता *f.* उपयोगीपणा *m.* उपयोगिता *f.* उपकारित्व *n.* उपयुक्तता *f.* Condu'cibly, Condu'civelly *adv.*

Conduct (kon-dukt') [L. *con* & *ducere*, *ductum*, to lead.] *v. t. to lead, to guide, to escort* वाट दाखवून नेणें, वाटेनें नेणें. २ वाट दाखवून पोहोंचविणें, पोहोंचविणें. ३ पुढाकार *m.* पुरस्कार *m.* पुढार घेणें *g. of o.* ४ (one's self) चालणें, आचरणें, वागणें, वर्त्तणें. ५ *to carry on, to transact, to manage* निर्वाहणें, चालवणें, वागवणें, वहवणें, हाकणें, निर्वाह *m.* वहिवाट *f.* करणें *g. of o.* ६ *physics* वाहकतेनें (उष्णता, वीज, प्रकाश) पोहोंचविणें. ७ वादकमंडळीचा अग्रेसर होणें. C. *v. i.* पोंहचविणें, नेणें. C.(kon'dukt) *n.* (v. V. 1.) *-act. guidance* वाट दाखवून नेणें *n.* वाटेनें नेणें *n.* &c. २ *- act.* निर्वाहणें *n.* वहिवाटणें *n.* निर्वाह *m.* वहिवाट *f.* वलावणी *f.* आचरण *n.* निभावणी *f.* निभावणूक *f.* वागणूक *f.* ३ *skilful guidance or management* हुशारीनें नेणें *n.* नेतृत्व *n.* नियंतृत्व *n.* सेनापतित्व *n.*; as, "C. of armies is a prince's art." ४ *personal deportment* वर्तणूक *f.* वर्तन *n.* आचरण *n.* वागणूक *f.* चाल *f.* चर्या (as दिनचर्या) *f.* चालचर्या *f.* चालचलणूक *f.* वहिवाट *f.* व्यवहार *m.* स्थीतरीत *f.* पाऊल (used colloq.), पदन्यास (S.) *m.* [BAD C. दुराचरण *n.* दुराचार *m.* GOOD C. सदाचरण *n.* सदाचार *m.* सद्वर्तन *n.* GENERAL C. आचारपद्धति *f.*] ५ पुढाकार *m.* पुरस्कार *m.* पुढार *m.* ६ *management, skill* आवरकशक्ति *f.* आवर *m.* कर्तृत्व *n.* नियंतृत्व *n.* व्यवहर्तृत्व *n.* ७ *safe conduct* अभयपत्र *n.* ८ (*Shakes.*) वाटाड्या *m.* वलाव्या *m.* मार्गदर्शक *m.* ९ वाहक *m.* नळ *m.* नळी *f.* १० *plot, construction* कथा *f.* रचना *f.* वस्तु (S.) *n.*; as, "The book of Job, in C. and diction." Conduc'tibil'ity *n.* वाह्यत्व *n.* Conduct'ible *a.* वाहून नेण्यासारखा, वाहून जाण्याजोगा, वाह्य. Conduc'tion *n.* वाहून नेणें *n.* पार नेणें *n.* वहन *n.* २ *physics* वहन *n.* Conduc'tive *a.* वाहक, वाहून नेण्यास समर्थ. Conductiv'ity *n.* (विद्युत्-उष्णता) वाहकता *f.* Conduc'tor *n.* नेणारा, वाहक *m.* [LIGHTNING C. वीज नेणारी-विद्युद्वाहक तार *f.*] २ वाट दाखवून नेणारा. ३ *person presiding and managing* पुढाकारी, पुरस्कर्ता, पुरस्कारी. [C. OF CEREMONIES पुरोहित ESP. RELIGIOUS (among the Hindus), याज्ञिक.] ४ *mus.* गाण्याचा नायक *m.* पुढारी *m.* Conduct'ress *n. fem.* गाण्यांतील नायिका *f.* पुढारीण *f.*

*N. B.*—As 'a person presiding and managing' is the sense of the terms and phrases Manager, Foreman, Headman, Leader, Leadingman, Captain, Coryphœus, charge d' Affaires (F), that holds the reins, that sits at the helm, that mounts the box, that plays the first fiddle, &c. &c. and as many of the Marathi terms which are employed to convey this sense, bear also a latent sense agreeing well with the latent sense borne by *one or other* of these terms, we have here collected the terms of both the languages. वहिवाटणारा, वलवणारा, निर्वाहक, कारभारी, व्यवहर्त्ता, वहिवाटदार, पुढाईत, पुढारी, मोहोरकाव्या, मोहरक्या, मोहरपी, चालक, नायक, घटक, नेता, वाहक, सरनाम्या, सुकाण्या, सुकाणदार, पुढच्या जोताचा, सूत्रधार, सूत्रधारी, बिनीचा, अध्वर्यु, प्रमुख. (*Candy.*)

**Conduit** ( kun'dit or kon'dit ) [ Fr. *conduit*.-L. *con* & *ducere*, *ductum*, to lead.] *n. a surface drain* पाणी नेण्याचा नळ *m*, नहर *m*, सारणी *f*, नळी *f*, पन्हळ *f*, नस *m*. २ खाजगी वापरण्याचा बोळ *m*.

**Conduplicate** ( kon-dū'pli-kāt ) [ L. *con*. & Duplicate. ] *a. bot.* घडी पडलेला, संपुटित, दुमडलेला, मिटलेला. Condu'plicā'tion *n*.

**Condyle** ( kon'dīl ) [ L. *condylus*-Gr. *condulos*, a knuckle, a joint. ] *n. anat.* पर्वांग *n*, हाडाचें गांठाळलेलें वाटोळें टोंक *n*. Condylo'id *a*. Condylo-'ma *n*. आर्द्रचर्मकील, चर्मांकुर, एक प्रकारच्या उपदंशाच्या विकारानें होणारा त्वचान्तर्गत रोग *m*.

**Cone** ( kōn ) [ Gr. *konos*, a peak, a peg. ] *n. math.* शंकु *m*, सूचि *f*, गोपुच्छ *n*, गोपुच्छाकृति *f*. [ A RIGHT CIRCULAR C. वर्तुलशंकु *m*. AN OBLIQUE C. तिरकसतिर्यक्शंकु *m*. CONE OF THE EARTH'S SHADOW पृथ्वीचा छायाशंकु *m*- सूचि *f*. CONE OF FRICTION घर्षणशंकु *m*. CONE OF RAYS किरणशंकु *m*. SURFACE OF THE C. शंकुक्षेत्र *n*. ] २ (शंकूसारखा) सुळका *m*, *dim*. सुळकी *f*. ३ *bot.* (देवदारू वगैरे झाडाचें) शंकाकार फळ *n*. ४ शंकाकार शंख *m*, शंकुशंख *m*. ५ शंकाकार पदार्थ *m*,- भाग *m*, शंकु *m*. C. *v. t.* शंकाकार-शंकूसारखा बनविणें-करणें. Cone-wheat *n*. शंकाकार कणीस येणारी एक गव्हाची जात *f*. Con'ic, al *a*. शंकूसारखा, निमुळता, निमोळता, गोपुच्छाकार, शंकाकार, सूच्यग्रसदृश. Con'ically *adv*. Con'icalness, conic'ity *n*. शंकुत्व *n*, शंकाकारता *f*. Con'ics *n. math.* शंकुच्छेद *m*. Con'icoid *a*. शंकुसदृश, शंकूसारखा. Co'niform *a*. शंकाकार, शंकूच्या आकृतीचा. Central conic केंद्रलशंकुच्छेद. Conic section शंकुच्छेद.

**Confabulate** ( kon-fab'ū-lāt ) [ L. *con*, together & *fabulare*, to converse, from *fabula*, a discourse. See fable. The word is sometimes shortened colloquially to confab. ] *v. i. to talk familiarly together* गप्पा मारणें, संभाषण *n*- गोष्टी-वार्ता करणें. Confabulā'tion *n*. बोलणें *n*, संभाषण *n*, गप्पा *f*, गप्पागोष्टी *f*.

**Confect** ( kon-fekt' ) [ L. *confectio*, a preparing, a composing, from *con* & *factum*, to make. ] *v. t.* (साखर व इतर द्रव्यांची) मिठाई *f*- हलवा *m*. तयार करणें. C. (kon'fekt) *n*. मिठाई *f*, हलवा *m*. Confec'ting *pr. p.* Confec'ted *pa. p.* Confectioner *n*. मिठाईवाला *m*, मिठाई करणारा *m*, हलवाई *m*. Confec'tionery *n*. (नाना प्रकारची) मिठाई *f*. २ मिठाईचें दुकान *n*- कारखाना *m*.

*N. B.*—Some articles of English confectionery are:—Chocolates, Imitation fruits, Imitation flowers &c. &c.

**Confederate** ( kon-fed'ėr-āt ) [ L. *con*, together & *fœdus*, a league. ] *a. united in a league*, *alliance or confederacy*, *leagued*, *allied* जुटींत सामील झालेला, जुटींतला. २ *fig.* जुटींत असणारा. ३ संयुक्त; as, "Confederate states of America." ४ मिलाफी, मिळणीचा, संगनमती or त्या. C. *n. an ally*, *an associate* जुटीचा सभासद, जुव्या, साथी, सोबती, संगनमती, संगनमत्या, दोस्त. २ स्नेही *m*. ३ *law. an accomplice* सामील *m*, मिलाफी *m*, दुष्कर्मांतील सोबती *m*. C. *v. t. to unite in a league* जुटणें, ( ची ) जूट करणें, संप करणें. C. *v. i.* जुटणें, (शीं) जुटणें, सामील होणें. Confed'eracy *n. a federal compact or league* बारभाई (?) *f*, कूट *n*, जूट *f*, मिळण *f*, जूग *f*. २ संगनमत. ३ *a confederate body* कूट *n*, जूट *f*, जूग *m*, जथा *m*, मिलाफ (loosely) *m*. Confederā'tion *n*. एकी *f*, संप, एकमेकांनीं एकमेकांस मदत करण्याचा केलेला संप-निश्चय-कूट *n*. २ कुटांत-संपांत मिळालेले पक्ष *m*- लोक-संस्थानें *n. pl.* Confed'erative *a*. जुटीसंबंधी, जुटीचा. Confed'erator *n*. See Confederate.

*N. B.*—कट=Conspiracy. जूट or कूट=Confederacy.

**Confer** ( kon'-fėr' ) [ from L. *conferre*, to bring together, collect, gather, contribute, connect, join, consult together, bring together for joint examination, compare, also to confer or bestow. ] *v. t.* (प्रसन्न-मेहेरबान होऊन ) देणें, दान (S.) *n*. करणें, बहाल करणें, बक्षीस देणें. २ (*obs.*) ताडून-मिळवून पाहणें, मुकाबला करणें. ३ (*obs.*) मदत देणें, साहाय्यकारी-मदतगार होणें. C. *v. i. to advise with*, *to speak with* ( now always on some important subject or stated question ) सहविचार करणें, महत्वाच्या विषयावर बोलणें भाषण *n*- संभाषण *n*- संवाद *m*- &c. करणें, खलबत-मसलत करणें (when secret), मनसुबा करणें with शीं. Conferred' *pa. p.* Con'feree' संभाषणांत-सहविचारांत-सभेंत गुंतलेला मनुष्य *m*, सहविचारी *m*. २ ज्याला कांहीं दिलें आहे तो. Con'ference *n*. (v. V.I.) संभाषण *n*, मसलत *f*, खलबत *n*, खल *m*, मनसुबा *m*. २ (*obs.*) मुकाबला *m*, रुजुवात *f*. ३ महत्वाच्या गोष्टींचा विचार करण्याकरितां जमलेली मंडळी *f*- परिषद् *f*- सभा *f*. Con'feren'tial *a*. (R.) *of or pertaining to a conference* परिषदेचा, &c. Confer'rable *a*. द्यायाजोगा, देय, दानार्ह, &c. Confer'rer *n*. ( See verb) (प्रसन्न होऊन) देणारा, बहाल करणारा. २ संभाषण करणारा, बोलणारा.

**Confess** ( kon-fes' ) [ O. Fr. *confesser*.-Late L. *confessare*.-L. *confessus pa. p.* of *confiteri*, to confess; *con*, fully & *fateri*, to acknowledge. ] *v. t.* (नुकसान होईल म्हणून गुप्त ठेविलेली गोष्ट) निवेदन करणें, उघड रीतीनें कळविणें. २ (दोष-व्यंग-अपराध-गुन्हा) पदरीं घेणें, कबूल करणें. ३ (संशयनिवृत्तीनंतर) कबूल करणें. ४ *Eccl.* (C. sins to a priest) ख्रीस्त नामें पाद्याजवळ पाप निवेदन करणें. ५ पापोच्चार-पापोद्घाटन ऐकणें, पापख्यापन ऐकणें. ६ (often introducing a statement made in the form of a disclosure of private feeling or opinion.) (कांहीं झालें तरी) आपणांला काय वाटतें तें उघडपणें सांगणें; as, "I confess that I have my doubts about it,=I must say that I have

my &c." ७ *to profess faith in* (वर) आपली श्रद्धा-विश्वास कबूल करणें. C. *v. i.* पापें कबूल करणें. २ संशयनिवृत्ती-नंतर कबूल-मान्य करणें. Confes'sion *n.* (v. V. T. I.) *act.* See the verb. [FULL C. पोटउकल *f*, पोटफोड *f*.] २ गुन्हा कबूल करणें, कबुलीजबाब *m.* ३ *declaration of belief in or adhesion to* आपली श्रद्धा-विश्वास कबूल करणें. ४ *eccl.* पापोच्चार *m*, पापनिवेदन *n*, पापोद्घाटन *n*, पापांगीकार (?) *m.* ५ *a formulary in which a church or body of christians sets forth the religious doctrines which it considers essential* ख्रिस्ती धर्मांतील विशेष पंथांचीं तत्वें *m. pl.* हीं तो पंथ प्रमाणभूत मानून चालतो. धर्मांची पंथोक्त पद्धति *f.* Confes'sion of Faith एखाद्या ख्रिस्ती धर्मपंथाचीं तत्वें. Confes'sional *n.* पापें ऐकतांना पाद्र्याचें बसावयाचें आसन *n.* C. *a.* कबुली-जबाबासंबंधीं, &c. Confes'sionalist *n.* (R.) पापांगीकार (?), पापोच्चार ऐकणारा 'ख्रीस्त.' २ पाप स्वीकार करण्याच्या ठराविक जागेंत बसणारा. Confes'sionary *n. the crypt or shrine under the high altar, or the part of the altar in which the relics are placed* (ख्रिस्ती लोकांत) ख्रिस्ती देवळांत मुख्य वेदीखालील अस्थिगृह *n*- भुयार *n*. ह्यांत साधू, धर्मवीर (martyr) इत्यादिकांच्या अस्थि ठेवितात. C. *a.* पापख्यापनासंबंधीं. Confess'or *n.* (v. V. T. I.) (दोष-गुन्हा-पाप &c.) कबूल करणारा &c. २ *one who hears confessions* पापें ऐकणारा व त्यांची क्षमा करणारा ख्रीस्त *m.* ३ *one who suffers for his faith* ख्रिस्ती धर्मार्थ छळ सोसणारा-दुःख भोगणारा-भोक्ता. Confess'oress *n.* *fem.* Confess'orship *n.* Confessed', Confest' *a.* Confess'edly, Confest'ly *adv. avowedly, undeniably* निभ्रांत, निखालस, निस्संशय, उघड, प्रत्यक्ष, खचित, धडधडीत, सांगूनसवरून, कबूली करून. २ बुद्ध्या, दादून, हटकून. Confession of faith (treatise) ख्रिस्ती धर्माचा मतसंग्रह *m.* Confess to (जवळ) कबूल करणें. Stand confessed उघडकीस आलेलें असणें.

*N. B.*—Own, Acknowledge, Confess, Avow, Own-आपणच केलें असें कबूल करणें, Acknowledge-आंगीं लाविलेला लहान दोष-चूक कबूल करणें, Confess-मोठा दोष-गुन्हा आपणच होऊन कबूल करणें, Avow-प्रतिज्ञेनें सांगणें.

Confide (kon-fīd') [from L. *confidere*, to have full trust or reliance; *con*, very much & *fidere*, to trust.] *v. i.* (with *in*) *to trust or have faith, to put or place trust in* भरंवसा असणें, विश्वासणें, विश्वास *m*- भरंवसा *m*- इतबार *m*-&c. ठेवणें, with वर of *o.*; विश्वासावर-भरंवशावर असणें *in. con.* with *g. of o.* and विश्वास धरणें with *g. of o.* २ (*used absolutely*) to have faith or trust विश्वास ठेवणें; as, "O prudent princess! bid thy soul confide." C. *v. t. to impart as a secret, to communicate in confidence* (to a person) आपलें गुप्त दुसऱ्याला विश्वासणें, दुसऱ्याला विश्वासानें सांगणें-कळविणें; as, "An opportunity of confiding all her perplexities to her friend." २ *to entrust* (an object of care, a task) *to a person with reliance on his fidelity or confidence* एखाद्यावर काम विश्वासानें सोंपविणें, निरवणें, भरंवशानें सोंपविणें; as, "The execution of the plan was confided to Aranda." Confi'ded *pa. t. & pa. p.* Confi'dee *n.* ज्यावर विश्वास ठेवितात तो, विश्वासभूमि, विश्वासभाजन, विश्वस्त (S). Con'fidence *n.* विश्वास *m*, भरोसा or भरंवसा *m*, भाव *m*, निष्ठा *f*, इतबार *m.* [Confidence or assurance given होवासा *m.* IN CONFIDENCE (फोडणार नाहीं-फुटणार नाहीं) अशा विश्वासानें, विश्वासानें. VIOLATION OR ABUSE OF C. विश्वासभंग, विश्वस्तवंचन *n.* VIOLATER OR ABUSER OF C. विश्वस्तवंचक, विश्वासाचा दुरुपयोग करणारा. INSPIRED WITH CONFIDENCE जातविश्वास, विश्वासप्रेरित.] २ *firm conviction or belief* पक्की खातरी *f*, दृढ विश्वास *m*, पूर्ण भरंवसा or भरोसा *m.* ३ *trust in self, assurance* धमक *f*, ऊब *f*, आव *m*, उमेद *f*, दम *m*, अवसान *n*, हिय्या *m*, हिम्मत *f.* ४ *cause or ground of confidence* खातरीला आधार *m*- आश्रय *m*- कारण *n.* ५ *object of confidence* भावविषय *m.* ६ *confidential intimacy, the confiding of private or secret matters to another* विश्वासानें आपलें हृद्गत सांगणें. ७ *a confidential communication* गुप्त ठेवण्यासारखी हकीकत. ८ (In a bad sense) *assurance based on insufficient or improper grounds, excess of assurance, overboldness* फाजील धाडस *n*, हिय्या *m.* Confid'ing *p. n.* See verb. Confid'ing *a.* विश्वासणारा, विश्वास ठेवणारा, &c., विश्वासी, श्रद्धावान्. Con'fidant', Con'fidante' *n.* जीवजानदोस्त, जीवश्चकंठश्च जिवलग मित्र-मैत्रीण. Con'fident *a.* विश्वास-खात्री असलेला, विश्वास-खात्री-भरंवसा-उमेद असणारा. [IMPORTANT CONSTRUCTIONS: THOROUGHLY CONFIDENT THAT SHE WOULD CONSENT; REASONS THEY HAD TO BE CONFIDENT OF VICTORY; BUT THE FRENCH COMMANDER WAS NOT SO C. IN HIS TROOPS.] २ *full of assurance, self-reliant, bold, sure of one's own cause* निभ्रांत, निश्शंक, विश्वासयुक्त, विश्वासपूर्ण. [TO BE OR FEEL CONFIDENT (बद्दल OR ची) खातरी असणें.] ३ अवसानाचा, दमदार, दमाचा, निधडा, निधड्याचा, छातीदार, हिम्मतदार, हिय्येदार. ४ *confidential, to whom one confides secrets* जिवलग, जीवश्चकंठश्च, रहस्यमित्र, विश्वासांतला-भरंवशांतला माणूस, सखा, एकांतमित्र; as, "Her confident nurse." Con'fidency *n. confidential intimacy* (विश्वासजनित) रहस्य *n.* Con'fiden'tial *a. enjoying the confidence of another person entrusted with secrets* विश्वासी, विश्वासू, विश्वासूक, भरंवशाचा, विश्वासाचा, खातरीचा, विश्वास ठेवण्याजोगा-&c., विश्वासनीय, विश्वास्य, विश्वासपात्र. २ *that is to be kept in confidence* न फोडायाचा, गुप्त ठेवावयाचा, गुप्त, अप्रकाश्य, गुह्य. Con'fiden'tially *adv.* (v. A.) फोडणार नाहीं-फुटणार नाहीं अशा विश्वासानें, &c. Con'fidently *adv.* (v. A.) विश्वासानें, विश्वास-भरंवसा-&c. ठेऊन.

धरून, विश्वासपूर्वक. २ खातरीनें, निश्शंक, निश्शंकपणानें, निर्भ्रांत or निभ्रांत. ३ उमेदीनें, दमानें, अवसानानें, धमक धरून, &c. Confid'er *n.* See Confiding *a.* given above. Confid'ingly *adv.* Confid'ingness *n.* Confidence trick-game *n. a method of professional swindling, in which the victim is induced to hand over money or other valuables as a token of confidence in the sharper* जिच्या योगानें फसणारास, भामट्यावर आपला पूर्ण विश्वास आहे असें दाखविण्यासाठीं आपल्या जवळचा पैसाआडका देण्याची युरळ पडते अशी खुबी *f.* ज्यास्त फसविण्याकरितां भामट्यानें आपल्यावर विश्वास बसवून घेण्यासाठीं केलेलें कृत्य. Confidence man *one who practices this trick* आपल्यावर जास्त विश्वास उत्पन्न करून लोकांना फसविणारा, भामटा, लुच्चा, ठक. To take one into confidence आपल्या रहस्यांत-विश्वासांत घेणें, अमुक एक मनुष्य आपला विश्वासपात्र आहे असें समजणें.

Configuration ( kon-fig'-ū-rā'shun ) [ L. *con*, together & *figurare*, to form. ] (R.) आंतररचना *f.* २ ( एखाद्या वस्तूच्या आंतररचनेमुळें आलेला) बहिराकार *m*, बाह्याकार, बाहेरचा आकार *m*, बाह्याकृति *f*, बाह्यरूप *n.* ३ *astron.* ग्रहांची सापेक्ष स्थिति, ग्रहांची स्थिति *f.* Config'urate *v. i. to take form* विशेष आकार घेणें, साकार होणें. Config'ure *v. t.* (आकार) करणें, घडवणें, डौल-आकार देणें.

Confine ( kon-fīn' ) [ Fr. *confiner*, to border upon.- L. *con*, together & *finis*, the end. ] *n.* ( usually in *pl.* ) (*a*) मर्यादा *f*, सीमा *f*, शीव *f*, हद्द *f*, हद्दीचा देश *m.* (*b*) शिवेलगतचा देश *m*- प्रांत *m*; as, "Events that came to pass within the C.s of Judea." २ (*obs.*) *a prison* कैदखाना *m*, बंदीखाना *m*, तुरुंग *m*, कारागृह *n*, कारागार *m.* C. *v. t. to limit, to bound, to restrict* आळाबांधा *m*- आळा *m*- मर्यादा *f*- सीमा *f*- नेम *m*- बंधारण *n*- घालणें-करणें-करून देणें, ठेवणें-बसवणें (*idio.*) *&c. with* वर (ex. मीं आपलें जेवण दोन भाकरींवर ठेविलें आहे). २ (*obs.*) *to imprison, to restrain* कोंडणें, कैद करणें, कोंडी *f*- कोंडणी *f.* करणें *g. of o.*, कैदेंत-बंदींत घालणें-टाकणें, अटकेंत घालणें. ३ *to restrain* प्रतिबंध *m*- निग्रह (S.) *m*- निग्रहण (S.) *n*- निरोध (S.) *m*- निरोधन (S.) *n.* करणें *g. of o.* C. *v. i.* (*obs.*) ( followed by *on* or *with* ) ( देश ) लागून-लगटून-भिडून-&c. असणें, (शीं) एकशीव असणें. Confined' *p. p. & a.* (*v.* V. T. I.) आळाबांधा घातलेला. २ (v. V. 2.) कोंडलेला, बंदींत-कैदेंत घातलेला, कैदी. ३ ( v. V. 3.) निबद्ध, निरुद्ध, निगृहीत. ४ *not roomy* अवघड, सांकड, कुंचड (R), अडचणीचा, दाटीवाटीचा, संकोचाचा, अप्रशस्त. ५ *delivered* (*spec.*) बाळंत झालेली, प्रसूत झालेली. [ To BE CONFINED बाळंत-प्रसूत होणें.] ६ ( The bowels ) बद्ध, अवरुद्ध See Costive. Confinedness *n.* (v. A. I.) *want of room* अडचण *f*, संकोच *m.* [ To SUFFER OR FEEL C. बांधलेलें-चांधलेसें वाटणें, अवघडणें.] Confine'ment *n.* (v. V. T. I.)-*act.* बांधणें, कोंडणें *n.*- state. आळाबांधा *m*, आळा *m*, बंधारण *n*, बंध *m*, बंद *m*, धरबंद *m*, बंधन *n.* २- *state.* बंद *m*, बंदी *f*, कैद *f*, अटक *f*, कोंडी *f*, कोंडणी *f.* निग्रह (S) *m*, निरोध (S) *m*, निर्बंध (S) *m.* [ PLACE OF C. बंदीखाना *m*, तुरुंग *m*, कारागार *m*, बंदीशाळा *f*, अंधारकोठडी *f*, *spec.* अंधारकोंडी *f*, *spec.* अंधारखण *m* or णी *f.* RELEASE FROM C. बंधमोचन *n*, बंदखुलास *m.* SOLITARY C. एकांत कैद *f*, अंधारकोठडी *f.* ] ३ *lying in delivery* प्रसवावस्था *f*, प्रसूतीमुळें झालेला प्रतिबंध *m*, बाळंतपण *n.* Confin'er *n.* Confin'ing *a.*

*N. B.*—Border हद्द, Boundary मर्यादा, Bounds चतुःसीमा, Frontier सरहद्द, Confines सीमा, शींव, Precincts आवार.

Confirm ( kon-fẽrm' ) [ O. F. *confermer*-L. *con*, inten. & *firmare*, to make firm, from *firmus*, firm. ] *v. t. to corroborate* स्थिर-दृढ-कायम करणें, खरा-सत्य-शाबूत-पक्का-नक्की-खचीत-निश्चित-&c. करणें, संशय काढून टाकणें, खरेपणाविषयीं खात्री-शाबिती देणें; as, "To C. a statement." २ *to make firm or firmer, to add strength to, to establish* बळकट-दृढ-सुदृढ करणें, सबळ करणें, स्थापणें, ठरविणें; as, "C.ed the same unto Jacob for a law." [ TO BE CONFIRMED ( A DISEASE) बळावणें, जडावणें, जडकावणें(?), जुनावणें, जुनाटणें.] ३ *to strengthen in judgment or purpose* ( मन किंवा उद्देश ) घट्ट-बळकट-बद्धमूल-&c. करणें, सुस्थिर करणें; as, "Confirmed, then, I resolve Adam shall share with me in bliss or woe." ४ *to ratify* बहाल-काई-(य)म-मुकरर-मंजूर करणें, सई *f.* करणें; as, "To C. the appointment of an official." ५ (*Eccl.*) *to administer the rite of confirmation* दृढीकरणाचा संस्कार करणें. Confirm'able *a.* कायम करण्यालायक, &c. Confirmā'tion *n.* (v. V. I.) *the act of confirming or strengthening* बळकट करणें *n*, खरावणें *n*, सत्यीकरण *n*, दृढीकरण *n*, निश्चितीकरण *n*, स्थापन *n.*-*state* खरावलेलेपणा *m*, बळकटी *f*, मजबुती *f*, मुकररी *f*, दार्ढ्य *n.* २ *the act of ratifying or sanctioning* बहाल करणें *n*, सई *f*, बहाली *f*, मंजुरी *f.* ३ *corroborative or convincing evidence* पडसाक्ष *f*, प्रतिप्रमाण *n*, खात्री करणारा पुरावा *m*, शाबिती *f.* ४ *Eccl.* दृढीकरणसंस्कार *m.* Confirm'ative, Confirm'atory *a.* बळकट-मजबूत-स्थिर करणारा, स्थिरकारी, अनुवादक. २ (ख्रिस्ती धर्मांत बाप्तिस्म्यानंतरचा ) दृढीकरणसंस्कारासंबंधीं. Con'firma'tor, Confirm'er *n.* (v. V. I.) खरें करणारा, खरावणारा, बळकटी-मजबुती आणणारा, बळकट करणारा, सत्याख्यापनकर्त्ता, स्थापक, स्थापनकर्त्ता. Confirmed' *p.* ( v. V. I. ) खरा-बळकट केलेला, संवयीचा, दृढ झालेला; as, "A C. habit." २ बहाल केलेला, मुकरर केलेला, मंजूर. Confirmee' *n. law.* ज्याची मालकी मंजूर किंवा स्थापित केली असेल तो, कोर्टानें ठरविलेला मालक *m*- वारस *m.* २ कायम केलेला मनुष्य *m.* Confirm'ing *n.*

*N. B.*—Confirm स्थिर-दृढ-कायम करणें, Corroborate मजबूत-पुष्ट करणें, (ला) पुष्टी देणें.

Confiscate (kon′fis′kāt) [L. *confiscare, confiscatus,* to confiscate, properly to lay up in a chest, from *con* & *fiscus,* a basket, a purse, a treasury. See Fiscal.] *v. t. to seize as forfeited to the public treasury* दंडार्थ हरण करणें, (सरकारानें) दंडासाठीं घेणें-जप्त करणें, (दंडासाठीं) खालसा करणें-सरकारांत घेणें, (दंडमूलक) हरण करणें. C. *a.* (दंडासाठीं) खालसा केलेला, सरकारांत घेतलेला, दंडादाखल घेतलेला. Confis′cable, Confis′cator′y *a.* जप्त करण्याजोगा, जप्त करणारा. Con′fiscā′tion *n.* (v. V. I.) सरकारांत घेणें *n,* खालसा करणें *n,* दंडार्थ हरण *n,* दंडमूलक हरण *n.* Con′fisca′tor *n.* (दंडार्थ) खालसा करणारा, दंडार्थ हरण करणारा.

*N. B.*—Confiscate (राजानें) हरण करणें. ह्या हरणामुळें मूळ मालकाचे सर्व हक्क नष्ट होऊन हरण केलेल्या मालावर राजाची कायमची मालकी होते. Confiscate याचा अर्थ जप्त करणें असाही पुष्कळ ठिकाणीं आढळतो, परंतु Attach शब्दाचा अर्थ जप्त करणें असा ठरवून टाकला तर बरें होईल. कर्जाचे पैसे आल्यामुळें ऋणकोचे मालावर जी जप्ती नेतात तिला Attachment म्हणतात. बंडखोर किंवा इतर राजद्रोही अपराध्यांची मिळकत सरकारांत जप्त होते त्या जप्त होण्याला किंवा करण्याला Confiscation असें म्हणतात.

Conflagrate (kon′fla-grāt) [Fr. *conflagration.*—L. *con,* inten. & *flagrare,* to blaze.] *v. t.* (R.) जाळणें. C. *v. i.* जळणें. Conflag′rant *a.* (R.) जळणारा. Conflagrā′tion *n. a general burning* आगीचा डोंब *m*-लोळ *m,* डोंबाळा(ळी). [C. OF A FOREST वणवा *m,* दावाग्नि *m,* दावानल *m.*]

Conflate (kon-flāt) [L. *con* & *flare,* to blow.] *v. t.* (R.) *to blow together* एकत्र फुंकणें-वाहविणें, उत्पन्न करणें. २ ग्रंथाचे दोन निरनिराळे पाठ एक करणें, पाठभेदांचें मिश्रण करणें. Conflā′tion *n.*

Conflict (kon′flikt) [L. *con,* together & *fligere, flictus,* to strike. Distinguish carefully conflict and contest. A contest is a strife for a common object or reward or prize; while a conflict is a violent meeting of two forces or individuals. "In the wars of the Roses two contending Houses had many conflicts between them." Contest looks to the end, conflict emphasises antagonism.] *n.* एकमेकांवर जोरानें आदळणें *n,* एकमेकांचा धक्का *m,* टक्कर *f.* २ *espec. a prolonged struggle, contest* युद्ध *n,* झुंज *f,* झोंबी *f,* झगडा *m,* संप्रहार *m,* संग्राम *m,* सामना *m,* लढाई *f.* ३ *a mental or spiritual struggle within man* मानसिक चलबिचल *f.* खळबळ *f,* व्यग्रता *f.* C. *v. i.* लढणें, झुंजणें, झुंज *n*-&c. करणें or *in. con.* with *g.* of *o.*-लागणें, झोंबी घेणें. २ एकमेकांशीं टक्कर होणें. ३ विरोधी होणें. Conflic′ting *a. contrary, opposite* एकमेकांवर जोरानें आदळणारा, प्रतिकूल, विरुद्ध, विरोधाचा, विरोधी, परस्परविरोधी; as, "C. passions, C. evidence, &c." Conflic′tion *n.* Conflict′ive *a.* विरुद्ध, विरोधी, उलट.

Confluence (kon′floo-ens) [L. *con,* together & *fluere, fluxum,* (Sk.) द्रु, to flow.] *n.* (of streams, &c.) संगम *m,* संघ *m,* संप्लव *m.* २ जमाव *m,* संघीभवन *n.* ३ *people crowded* जमाव *m,* मेळा *m.* Con′fluent *a.* एकाच ठिकाणीं-कडे वाहणारा, संगम होणारा, मिळणारा. २ *bot.* संप्लवक, अनेकपुष्पज, संमीलित. Con′fluent *n.* मोठ्या नदीस मिळणारी लहान नदी *f,* उपनदी *f,* शाखा *f.* २ संगम (स्थान) *m.* (R.). Con′fluently *adv.* Con′flux, same as Confluence.

Confocal (kon-fokal) [L. con & *focus,* a hearth, a fireplace.] *a.* एकनाभिक.

Conform (kon-faw-ɹm′) [Fr. *conformer*-L. con, with & *formare,* to form, from *forma,* form. Conform denotes an external or at least formal agreement. We conform only to externals or the opinions which affect them or the rules which regulate them. We conform to habits, customs and practices; not to thoughts but the modes in which they find expression; not to principles, but the action which is the result of them.] *v. t. to make like* (बाह्यतः) सारखा-बेताचा-सदृश-अनुरूप करणें. C. *v.i.* (with *to or with*) *to comply with, to act according to* सारखें-प्रमाणें-पाहून वागणें-वर्तणें-आचरणें-चालणें, &c., अनुसरणें, अनुवर्तणें, अनुसरण *n.* करणें. २ *Eccl.* (इंग्लंडांतील कायद्यानें) प्रस्थापित धर्माप्रमाणें चालणें. Conformabil′ity *n.* अनुवर्तन *n,* सदृशता *f,* बाह्यरूपसादृश्य *n,* सादृश्य *n,* अनुरूपता *f.* Conform′able *a.* (with *to*) *resembling* सारखा, अनुगुण, सदृश, अनुरूप, समरूप. २ *agreeable, congruous* मिळाफाचा, बेताचा, माफक, अनुकूल, अनुसार (in comp.), अनुसारी (in comp.). ३ *compliant* अनुरोधी, अनुलक्षी, अनुविधायी, मिळाऊ, मिळता. ४ *parallel or nearly so (said of strata in contact)* समांतर, जवळ जवळ समांतर. Conform′ably *adv.* (v. A. I.) सारखा. २ सरसा, अन्वयें, अनुरूप, अनुसार (*in comp.*), यथा (*in comp.*), बरहुकूम, यथावत्. ३ अनुरोधानें अनुलक्षून. Conformā′tion *n.* (आकाराचा) सारखेपणा *m,* मेळ *m,* मिळतेपणा *m,* बाह्यसादृश्य *n.* २ अनुवृत्ति *f,* अनुवर्तन *n.* ३ रचना *f,* आकृति *f,* घाट *m.* Conform′ableness, Conform′ity *n.* (v. A. I.) (followed by *to, with* or *between*) सारखेपणा *m,* सदृशता *f,* सादृश्य *n,* समरूपता *f,* सरूपता *f,* सारूप्य *n.* २ मिलाफ *m,* जम *m,* लाग *m,* आनुरूप्य *n,* अनुरूपता *f.* ३ अनुरोध *m,* अनुवर्तन *n,* अनुवृत्ति *f.* ४ *Eccl. H.* कायद्यानें स्थापिलेल्या (प्रवृत्त) धर्मास अनुसरून वागणें. [IN C. WITH अन्वयें, बरहुकूम.] Conform′er *n.* (v. V. I.) अनुसरणारा, अनुवर्तणारा, अनुसरणकर्ता-कारी, अनुसारी (*in comp.*). २ प्रवृत्त-प्रस्थापित आचार व विचार

पाळणारा, अनुसरणारा. Conform'ist *n.* कायद्यानें स्थापलेल्या धर्मास अनुसरून वागणारा *m*, प्रवृत्तधर्मानुसारी *m.*

Confound (kon-fownd') [O. E. *confoundre*—L. *confundere p. p. confusus*, to pour together, to mingle, to perplex, to overwhelm.] *v. t. to mingle confusedly, to disorder* घोंटाळा *m-* गोंधळ *m.* करणें, अव्यवस्था *f-* उलटापालट *f-* उलथापालथ *f-* संकर *m-* भानगड *f-* करणें with *g. of o.*, (*loosely*) गडबड *f-* धांदल *f.* करणें *g. of o.* २ *to mistake for another, to identify falsely* अन्यथा-भलतेंच समजणें. ३ *to throw into confusion or disorder, to perplex, to strike with amazement, to dismay* घोळांत-गोंधळांत-गळफट्यांत-गोफाट्यांत-भ्रमांत-पाडणें घालणें-टाकणें, भ्रम पाडणें-घालणें, गोंधळवून टाकणें, बावरवणें, (आश्चर्यचकित करून) गोंधळाविणें-विस्मित करणें, गडबडवणें, (भयातिशयानें) मूढ करणें, घाबरविणें, बहकाविणें, (अतिशय भयानें कर्तव्यशून्य होण्याइतकें) घाबरवणें-गांगरवणें. ४ *to overthrow, defeat or bring to nought* (a scheme, plan, hope, &c.) (बेत) फिसकटावणें, (आशा) निष्फल करणें, कट मोडणें-उडवून देणें. ५ *to destroy, to ruin, to waste* नाश करणें, वायां-व्यर्थ दवडणें, अपव्यय करणें; as, "One man's lust these many lives confounds." *Shakes.* ६ *to abash, to put to shame* (गोंधळून जाईल इतका) शरमिंदा-ओशाळा करणें, खालीं पहावयास लावणें. ७ In curses or imprecations used in the imperative third person sing. as an equivalent or substitute for 'bring to perdition'; now it is regarded as a mild form of imprecation & vaguely associated with other senses. जळो, मरो, आग लागो, सत्यानाश होवो इ० अर्थी Confound क्रियापदाचा तृतीय पुरुषीं एकवचनीं आज्ञार्थी प्रयोग होतो. Confound'ed *p. p.* (See the verb). २ *colloq.* पक्का पुरा, पूर्ण; as, "He was a most C. Tory". ३ बिलंदर, अट्टल, इरसाल. ४ निंद्य, असंगळ, ओंगळ; as, "This is his C. impudence." [To BECOME C. (भयातिरेकानें) मूढ होणें, बावरणें, घाबरणें, घोंटाळणें, गडबडणें, गोंधळणें, चकित होणें, गांगरणें, गांगावणें.] Confound'edly (*collog.*) तिरस्कारानें. २ शरमेनें, लज्जेनें. ३ पूर्णतेनें. ४ निंद्यपणें, असंगळपणें. Confoun-d'er *n.* गोंधळवणारा, &c. Confound'ing *p. a.* गोंधळवणारा, घाबरवणारा, &c. C. *n.* (v. V.T.)-*act.* गोंधळवणें *n*, संकरीकरण *n.-state* अव्यवस्था *f*, घालमेल *f*, गोंधळ *m*, घोळ *m*, घप्पाघोळ *m*, घोळंकार *m*, घोळणा *m*, गफलत *f*, गडबड *f*, गलबल *f*, गलफटा *m*, घोंटाळा *m*, गुरफटा or फाटा *m*, संकर *m*, ब्रह्मघोळ *m*, गलत *f*, गलद *f*, भिसमिल्ला *m*, झंगड *f*, भानगड *f*, बचबच *f*, चवचव *f*, चवढव *f*, ढवढव *f*, धांदल *f*, धांदलपट्टी *f*, धांदलाधांदल *f*, गडबडगुंडा *m.* [Everything there is in C. and disorder तेथें पुरी बजबज माजली आहे, खूब घोंटाळा माजून राहिला आहे.] २-*act.* बावरविणें *n-*घाबरविणें *n.-state* गडबड *f*, हडबड-डी *f*, धांदल *f*, गोंधळ *m*, घोंटाळा *m*, घोळ *m*, घोळंकार *m*, गळफटा *m*, भ्रम *m.* (S). Confound'ingly *adv.* आश्चर्यानें, थक्क होऊन.

*N. B.*—Abash, Confuse & Confound या प्रत्येकांत गोंधळून जाणें ही कल्पना सामान्य आहे. *Abash*–(लाजेनें–शरमेनें) गोंधळणें; as, "Peter was *abashed* in the presence of his Master ; so a modest youth is *abashed* in the presence of those who are greatly his superiors.' *Confuse* (कांहीं अवचित कारणानें प्रसंगावधान व मनाची विशदता, शांतता नाहींशी होऊन) गोंधळून जाणें. Thus, a witness is often *confused* by a severe cross-examination; a timid person is apt to be *confused* in entering a room full of strangers. *Confound* (अतिशय भयानें कर्तव्यशून्य होण्याइतकें) घाबरणें-बावरून जाणें. Thus a criminal is usually *confounded* at the discovery of his guilt. (Webster.)

Another distinction between confuse & confound as drawn by Smith is given in his own words as follows:—"A person confuses an account when he gives inverted, vague, or contradictory relations, so making it obscure. He confounds one account or circumstance with another when he mixes into one details belonging to both. When we confuse we throw into indistinctness; when we confound we falsely identify. In the former we wrongly put one or more things *among* others; in the latterwe substitute them wrongly *for* others."

Confraternity (kon'-fra-tėr'ni-ti) [L. *con*, together, & *frater*, Sk. भ्रातृ, a brother.] *n. pl.* Confraternities. *a brother-hood* एकाच धंद्यासाठीं किंवा हेतूसाठीं स्थापित झालेली मंडळी *f*, भ्रातृसमाज *m*, मंडळी *f.* (often expressed with a compound ending in बंधु; as, व्यवसायबंधु, धर्मबंधु, समाजबंधु &c.,) बांधव *m*, भाऊ-मंडळी *f*, भाउबळ *n*, बंधुमंडळ *n.*

Confrere (kon'frār) [F.] *n. fellow-member of a fraternity, an intimate associate* बंधु *m*, समाजबंधु *m*, समाजस्थ *m*, सामाजिक (S), सामाजीय (S), (used as a noun), संघसभासद *m*, जीवश्चकंठश्च गडी *m.*

Confrication (kon'fri-kā'shun) [L. *con*, together & *fricare*, to rub.] *n.* (*obs.*) च्या बरोबर घासणें *n*, संघर्षण *n*, संमर्दन *n.*

Confrier (kon'frīr) [See Friar.] Same as Confrere.

Confront (kon-frunt') [Fr. *confronter*.—L. *con*, & *frons*, the forehead or front. See Front.] *v. t. to stand in front of* (च्या) सन्मुख-समोरासमोर उभा राहणें *g. of. o.* २ *to bring face to face* मुकाबला *m-* रूजूमुकाबला *m-* रुजुवात *f-* उरबुरू *f.* करणें-घेणें *g. of o.* ३ (शीं) ताडणें, तुलना *f.* करणें. ४ *to oppose, to resist* अडथळा *m.* आणणें, प्रतिबंध *m.* करणें, प्रतिरोध *m.* करणें. Confrontā'tion *n.* (v. V. 1.)-*act.* or *state*

तोंडावर चालून जाणें *n.* २ रुजूमुकाबला *m*, मुकाबला *m*, रुजुवात *f*, तुलना *f*, अडथळा *m*, विरोध *m*, प्रतिबंध *m*. *N. B.*—Confront तोंडासमोर चालून जाणें, Face तोंड देणें.

Confuse (kon-fūz′) [L. *confusus*, disordered. The following history of the word *Confuse* is taken from Dr. Murray's Dictionary. A passive participle 'confused' is found from 14th Century, but the present stem and active voice are only of modern use having been formerly expressed by Confound, cf. Fr. *confoundre*, *confus*.—L. *confundere*, *confusus*. The verb is entered by Bailey (folio) 1730–6 and thence by Johnson, but there are no examples except of the *p. p.* of it in J., Todd or Richardson. The participle was an English adaptation of Fr. *confus*, L. *confusus* with the native participle ending-ed and the present stem a much later inference from it. ] *v. t.* गोंधळवणें, उलटसुलट-मोघम किंवा परस्परविरोधी-संबंध सांगून अस्पष्ट किंवा न कळेसें करणें. See the verb to Confound. Confu′sing See Confounding. Confused See Confounded. Confusedly *adv.* Con-fusedness *n.* Confusion, See Confounding.

Confute (kon-fūt′) [L. *confutare*, to check (a boiling liquid), to repress, to confute, from *con* & root *fut* as seen in *futis*, a water-vessel, prob. akin to *fundere*, to pour out. ] *v. t. to prove to be false or defective* निर्मूलता *f.* निराधारता *f.* सिद्ध करणें, काईल-कुंठित-निरुत्तर, करणें, खंडणें, खुंटवणें, मोड *m.* खंडन *n.* करणें *g. of o.*, मोडून काढणें, खोटा करून दाखविणें. २ चूक ठरविणें, मत खोडून काढणें. Confu′table *a.* (v. V.) खंडाया-चा-जोगता-जोगा &c., मोडायाजोगा, खंडनीय, खंडनार्ह, खंडनयोग्य, खंडनक्षम. Confutant *n.* Confutā′tion *n* (v. V.) खंडणें *n*, मोडणें *n*, &c., खंडन *n*, मोड *m*, निर्मूलतासिद्धि *f.* Confūt′ative *a.* खंडक, निर्मूल करणारा, खंडनसमर्थ. Confu′ted *p.* (v. V.) खंडलेला, &c., खंडित, प्रतिहत, कुंठित. Confute′ment *n.* (*obs.*)

*N. B.*—Confute निर्मूलता सिद्ध करणें, Refute (विवक्षित व्यक्तीला) लागू नाहीं असें दाखविणें-उडविणें.

Conge (kong′zhā) See Congee.

Congeal (kon-jēl′) [L. *con*, together & *gelare*, to freeze, from *gelu*, frost.] *v. t. to change to a solid state* गोठवणें, सांखवणें, थिजवणें, घन-घट्ट-&c. करणें. C. *v. i.* थिजणें, गोठणें, साखणें, घन-घट्ट होणें. Congeal′-able *a.* Congeal′ableness *n.* Congealed′ *p.* (v. V. T.) गोठविलेला, घनीकृत. २ (v. V. I.) गोठलेला, घनीभूत. Congeal′ment, Congelā′tion *n.* (v. V. T.) *-act.* थिजविणें *n*, थिजवणी *f*, गोठवणी *f.-state*-घनीकृतता *f.* (v. V. I.)*-act.* थिजणें *n*, &c., गोठणी *f*, घट्ट होणें *n.-state* थिजलेपणा *m*, घनीभाव *m*, घनीभवन *n*.

Congee, Conge (kon′-jē, kong′jā) [L. *con*, together & *meare*, to go.] *n.* नमस्कार *m*, नमन *n*, रामराम *m*. २ रजा *f.* निरोप *m.* चेणें *n.* C. *v. i.* (followed by *with*) सलाम *m.* रामराम *m.* नमस्कार *m.* करणें.

Conjee (kun′-jē) *n.* [Tamil *kanshi*, boilings.] कांजी *f*, कणे (ण्हे) री *f.* [C. WATER. *n.* तरवणी *f*, पेजेवरची निवळी *f*, पेजेवरचें पाणी *n.*] २ कैदखाना *m*, कारागृह *n*, तुरुंग *m*, बंदीखाना *m*.

Congener (kon-jē′-nėr or kon-jė-ner) [L. *con*, with & *genus*, *generis*, kind. ] *n.* सजातीय-सममूलक-एकजातीय वस्तु *f.* Con′gener′ic,-al, Congenerous *a. of the same kind or nature, allied in origin* &c. समजात, सजातीय, एकजातीय, समानजातीय, एककारणक, सममूलक. Congenet′ic *a.* एकजातीय, एकमूलक. Congen′eracy, Congen′erousness *n.* (V. A.) एकजातपणा *m*, एकजातीयता *f*, &c.

Congenial (kon-jē′ni-al) [L. *con*, with & *genialis*, jovial. ] *a. agreeable to the nature or disposition of* अनुगुण, अनुकूल, सुखावह, हितकर, प्रकृत्यनुगुण, (प्रकृतीला) अनुकूल-मानेसा; as, C. to health. २ *partaking of the same genus, kind, or nature* समस्वभाव, समभाव, समानभाव, एकभाव, समधर्मक, समानप्रकृतिक, समप्रकृतिक. Congenial′ity *n.* (v. A. 2.) आनुगुण्य *n*, आनुकूल्य *n*, अनुकूलता *f*, अनुगुणता *f*, समानप्रकृति *f*, समभाव *m*, साधर्म्य *n*, समधर्मता *f*, स्वभावसाम्य *n*, प्रकृतिसाम्य *n*. Cong-′enially *adv.* Conge′nialize *v. t.* अनुकूल-मानेसा करणें. Conge′nialness *n.* Same as Congeniality.

Congenital (kon-jen′i-tal) [L. *con*, together & *gignere*, *genitum*, to beget.] *a.* जन्माचा, जन्मतः, उपजत, जन्मापासून, स्वाभाविक, नैसर्गिक, आंगाचा; as, C. deformity जन्मखोड. Congenital hernia जन्मापासून अंतर्गळ *m*, उपजत अंतर्गळ *m*. Congen′itally *adv.*

Conger (kong′gėr) [Gr. *gongros.* ] *n.* समुद्रांतील वाम जातीचा मासा *m.* ह्याची लांबी ३ पासून ६ फूटपर्यंत असते.

Congeries (kon-jē′ri-ēz′) [L. *con*, together & *gerere*, to bear. ] *n. a collection, a mass* पुंज *m*, राशि *m*, ढिगला *m*, रास *f*, समुदाय *m*.

Congest (kon-jest′) [L. *con*, together & *gerere*, *gestum*, to bear. ] *v. t.* (फाजील-जास्त-अधिक) गोळा करणें, ढीग *m.* करणें, संचय *m.* पुंज *f.* जमाव *m.* करणें. २ *med.* रक्तसंचय *m.* or स्तंभन *n.* करणें. Congest′ed *a.* (अति मोठा) जमाव जमलेला. २ रक्तस्तंभन झालेला. Congest′ible *a.* Congest′ion *n.* (of humours into a tumur) गांठ *f*, ग्रंथि *m*. २ (of blood) रक्तसांकळ *f*, रक्तावरोध *m*, रक्तस्तंभन *n*, रक्तसंचय *m*, रक्तावष्टंभ *m*. [ACTIVE C. तीव्ररक्तसंचय *m.* PASSIVE C. मंद रक्तसंचय *m.* CONGESTIONS OF ALL KINDS रक्तपित्त वगैरेचें आधिक्य जाहल्यापासून होणारे सर्व प्रकारचे विकार *m. pl.*] Congest′ive *a.* (रक्त) आधिक्यदर्शक-सूचक, रक्ताधिक्यासंबंधीं.

Conglomerate ( kon-glom'er-āt ) [L. *con* & *glomerare, glomeratus*, to wind into a ball, from *glomus, glomeris*, a ball. ] *a. concentrated* ( यकृतपिंडांतील शिरांच्या जाळ्यासारखा ) एकगोळा झालेला-केलेला, पिंडित, समुदायीकृत, जाळ्यासारखा पिंड झालेला; as, "C. rays of light." २ *bot. densely clustered* गुच्छाकार, झुबक्याचा ; as, "C. flowers." ३ *geol.* गोटे, गारगोट्या, आणि रेती यांनीं बनलेला. C. *v. t. to collect into a mass* ( जाळ्यासारखें ) गुंडाळें करणें, गुंडाळ्याच्या आकाराचा करणें, गुंडा-गोळा करणें, एके ठिकाणीं रास करणें. C. *n. collection* ( जाळ्यासारखा ) गोळा *m*, पिंड *m*, समुदाय *m*, समूह *m*, संचय *m*, जमाव *m*, पुंज *m*, राशि *f.* २ *geol.* गोटे, गारगोट्या आणि रेती यांनीं बनलेला गड्डा *m* ( opposed to agglomerate ). Conglom'era'ted *pa. t. & p. p.* Conglom'era'ting *pr. p.* Conglomerā'tion *n.-act.* एकगोळा करणें *n.-state* जालसदृश पिंडता *f.*

Conglutinate ( kon-glū'tin-āt ) [ L. *con*, together & *glutenare, glutinatus*, to glue.] *v. t. to glue together* (सरसानें-खळीनें) जोडणें, (हाडें वगैरे) सांधणें. C. *v. i. to unite or grow together lit. & fig.* एकजीव होऊन वाढणें, मिलाफ होणें, जमणें. Conglu'tinant, Conglu'tina'tive *a.* जोडणारा, डकविणारा, सांधणारा, भरविणारा. Conglutinā'tion *n.* जोडणें *n*, &c. २ संधि *m*, संधान *n*, जोड *m*, सांधा *m*. Conglu'tina'tor *n.* संधायक *m*, जोडणारा, सांधणारा.

Congou ( kong'gōō ) [ Chinese *kung-foo*, labour, referring to the labour expended in producing the tea. ] *n. a kind of black tea* एक जातीचा कांगु नांवाचा काळा चहा *m.* also Congo.

Congratulate ( kon-grat'ū-lāt ) [ L. *con* (*cum*), fully & *gratulari, gratulatus*, to wish joy, from *gratus*, pleasing. ] *v. t. & v. i.* ( followed by *upon* or *on* ) मनःपूर्वक अभिनंदन करणें, शुभ गोष्टीचा-विजयाचा आनंद प्रदर्शित करणें. Congrat'ulant *a.* अभिनंदनोक्तीचा. C. *n.* अभिनंदन करणारा. Congratu'la'ted *p.* (v.V.) अभिनंदित. Congratulā'tion *n.* अभिनंदन *n.* Congrat'ula'tor *n.* अभिनंदन करणारा *m.* Congrat'ulatory *a.* अभिनंदनाचा, अभिनंदनपर. To congratulate oneself आनंद-समाधान मानणें.

*N. B.*—Congratulate ( मनःपूर्वक ) अभिनंदन करणें. Felicitate आनंद प्रदर्शित करणें. Congratulate implies a sharing of the joy of him whom we congratulate. Felicitate is simply to wish a person a joy. It is a word of formal politeness. Good manners felicitate, good heart or true friendship congratulates. As felicitations are manifestations of politeness they may be offered where congratulations might seem to presume an equality of condition.

Congregate ( kong'gre-gāt ) [ L. *con*, together & *gregare*, to collect into a flock, from *grex, gregis*, a flock.] *v. t.* जमा करणें, गोळा करणें, जमविणें, जमावणें, संमेलन करणें. C. *v. i.* जमणें, मिळणें, गोळा होणें, संमेलन होणें. Con'grega'ted *a.* जमलेला, गोळा झालेला, जमा केलेला, घट्ट, घन. Congregā'tion *n.-act.* एकीकरण *n*, जमवणें *n*, एकत्र करणें *n.* २ निरनिराळ्या पदार्थांचा समूह *m*, समुदाय *m*, गण *m*, समाहार *m.* ३ धर्मसमाज *m*, परिषद् *f*, सभा *f*, मंडळी *f*, जमाव *m*, समाज *m.* ४ धर्माधिकाऱ्यांचें मंडळ *n.* ५ स्काटलंड देशांत मेरी राणीचे वेळीं एका प्राटेस्टंट पंथाच्या लोकांनीं घेतलेलें नांव *n.* Con'grega'tional *a.* सामाजिक, समाजसंबंधाचा, स्वतंत्रधर्मपद्धतीसंबंधी. Con'grega'tionalism *n.* स्वतंत्रधर्मपद्धति *f.* प्रत्येक सभेची व्यवस्था तींतील सभासद आपल्या विचाराप्रमाणेंच करतात. त्याबद्दल ते कोणावर अवलंबून नसतात, किंवा त्यांच्यावर कोणाचा ताबा नसतो, अशी ज्यांत व्यवस्था आहे, असा एक ख्रिस्तधर्मीयांचा पंथ *m*, स्वविचारानुवर्ति-स्वावलंबी धर्मसमाजपद्धति *f.* Con'grega'tionist *n.* स्वतंत्रधर्मपद्धतीचा अनुयायी *m.*

Congress ( kong'gres ) [ L. *congressus*, to go or come together, from *gradus*, a step. ] *n. a gathering or assembly, a conference* सभा *f*, मंडळी *f.* २ स्त्रीपुरुषसंगम *m*- समागम *m.* [ SEXUAL C. स्त्रीपुरुषसंग *m*, मैथुन *n.* TO BE JOINED IN SEXUAL C. जुगणें, लागणें.] ३ महापरिषद् *f.* ४ प्रतिनिधिसभा *f.* ५ *the lower house of the Spanish Cortes* स्पेन देशांतील साधारण-प्रतिनिधिसभा *f.* C. *v. i.* सभेमध्यें जमणें-मिळणें, सभा भरणें. Congres'sional *n.* Con'gressman *n.* ( सभेस पाठविलेला ) प्रतिनिधि *m*, सभासद *m.* The Congress (in India) हिंदुस्थानची राष्ट्रीय सभा, हिची स्थापना इ. स. १८८५ सालीं डिसेंबर महिन्यांत मुंबई शहरीं झाली.

Congrue ( kong-grōō' ) [ L. *congruere, congruus*, to come together, to coincide. ] *v. i.* ( *Shakes.* ) मेळ असणें, जमणें, अनुकूल होणें. Con'gruence, Con'gruency *n.* ( v. A. ) मेळ *m*, मिलाफ *m*, जम *m*, अनुसंधान *n*, आनुगुण्य *n*, आनुकूल्य *n*, अनुकूलता *f*, समन्वय *m.* Con'gruent *a.* जमावाचा, मिलाफाचा, मिलाफी, बेताचा, एका जमाचा, योग्य, यथायोग्य, सयुक्त, उपयुक्त. [ C. TRIANGLES समभुज व समकोन त्रिकोण *m.*] Con'gru'ity *n.* See Congruence. Con'gruous *a.* See Congruent. Con'gruously *adv.* योग्य (S.), यथायोग्य. Con'gruousness *n.* See Congruence.

Conic,-al, Conics, See under Cone. Conic section, Conicoid, See Cone.

Coniferæ ( kon-if'ėr-ē ) [ L. *conus*, cone & *ferre*, to bear. ] *n. pl.* देवदारूसारख्या झाडांचा वर्ग *m.* Conifer *n.* आडवें वाढणारें-बुंध्याला वाढणारें झाड *n*, देवदारवर्गांतील झाड *n.* Conif'erous *a.* कोन असलेलें, शंकूचें, सकोन.

Conjecture ( kon-jek'tūr ) [ L. *con*, together & *jacere*, to throw.] *n. guess, conjecture* अनुमान *n*, अंदाज *m*,

अटकळ *f*, तर्क *m*, अजमास *m*. २ *conjectural statement* अटकळपंचविसीचें-तगदमपट्टीचें-तगदम्याचें, &c. बोलणें *n*- भाषण *n*- &c., अनुमानोक्ति *f*. C. *v. t.* & *v. i.* अटकळणें *in. con.*, अटकळून-अटकळ करून &c. सांगणें, बोलणें &c., अजमासणें, अनुमान *n*-&c. करणें *g. of. o.* Conjec'turable *a.* (v. V.). अटकळ-अजमास करितां येण्याजोगा-सारखा, अनुमेय, अनुमानगम्य, अनुमानसाध्य. Conjec'tural *a. done or said by guess* अनुमानाचा, अनुमानमूलक, अनुमानप्रमाणक, आनुमानिक. Conjec'turally *adv.* (v. A.) अनुमानानें, तर्कानें, अनुमानें-करून, अनुमानतः. Conjec'tured *pa. t.* Conjec'turing *pr. p.*

*N. B.*—Conjecture, Guess. Conjecture a statement upon what is known· तर्कानें-अनुमानानें जाणणें. Guess a statement upon what is unknown केवळ कल्पनेनें जाणणें.

Conjee, Congee (kon'jē) *n.* कांजी *f*, कण्हेरी *f*.

Conjoin (kon-join') [L. *con*, together & *jungere, junctum*, sk. युज् to join.] *v.t. to unite* जोडणें, संयोग *m.* करणें *g. of. o.*, सोबत घालून देणें, सांधणें, संयुक्त करणें; as, "If either of you know any inward impediment why you should not be C. ed." C. *v. i.* (*Shakes.*) जुळणें, एक होणें, मिळणें, संयोग होणें. Conjoined', Conjoint' *a.* जोडलेलें, सांधलेलें, संयुक्त, संबद्ध, संयुत. Conjoint'ly *adv.* मिळून, एकत्र जमून, संयोगतः, संयोगानें, संगतीनें, सोबतीनें.

Conjubilant (kon-jū'bi-lant) [L. *con* & Jubilant.] *a.* (R.) *rejoicing together* सहानंदी, बरोबर खिदळणारा.

Conjugal (kon'-ju-gal) [L. *conjux*, one united to another, a husband or wife, from *con* & *jungere*, to join, allied to *jugare*, to yoke, from *jugum*, a yoke.] *a. matrimonial, connubial* वैवाहिक, विवाहाचा, विवाहविषयक, विवाहसंबंधीं; as, C. affection. २ दांपत्याचा, दंपतीभावाचा, दंपतीधर्माचा, नवराबायकोसंबंधाचा. Con'jugal'ity *n.* (R.) दंपतीभाव *m*, मैथुन *n.* Con'jugally *adv.*

Conjugate (kon'-jū-gāt) [L. *con*, together & *jugare*, to yoke, from *juguma*, a yoke.] *v. t. gram.* धातूंचीं रूपें चालविणें-साधणें-साधून दाखविणें, रूपाख्यापन-वाच्यता करणें. C. *a.* जोड्याजोड्या केलेला. २ *math.* सहचरित, संबद्ध, प्रतिबद्ध. [C. DIAMETERS सहचरित व्यास.] ३ *bot.* युग्म (युग्मपर्ण). C. *n.* दुसऱ्या शब्दाच्या व्युत्पत्तीशीं संबंध असणारा शब्द *m.* Con'juga'ted, Con'juga'tional, Con'jug'ative *a.* जोडलेला. Con'jugateness *n.* Con'juga'ting *n.* Con'jugā'tion *n.* जोडणें *n.* २ मिलाफ *m*, संयोग *m.* ३ *gram.* क्रियापदांचीं रूपें चालविणें *n.* ४ *Sk. gram.* गण *m.* ५ *biol. a kind of sexual union* applied to a blending of the contents of two or more cells or individuals in some plants and lower animals by which new spores or germs are developed युग्मसंयोग. Conjugate axes *n.* सहचरित-संबद्ध अक्ष. Conjugate foci *n.* युग्मनाभि, संबद्धनाभि. Conjugate mirrors परस्परकेंद्रस्थ आरसे, सहचरित आरसे. C. friction संबद्धघर्षण. In the phrases C. hyperbola, C. lines, C. points and C. triangles the word प्रतिबद्ध is to be used for Conjugate. Some writers use सहचरित for Conjugate in all these phrases.

Conjunct (kon-junkt') [L. *con* & *jungere, junctum*, to join.] *a.* जोडलेला, सांधलेला, संयुक्त, संयुत. Conjunc'tion *n.* जोडणें *n.* २ संयोग *m*, संयोजन *n*, संधि *m*, समायोग *m.* ३ *gram.* उभयान्वयी अव्यय *n.* ४ *astron.* युति, योग, संयोग, संगम. ६ *astrol.* संगमदृष्टि. Conjunc'tional *a.* Conjunc'tionally *adv.* Conjunc'tive *a.* जोडणारा, संयोग करणारा. Conjunc'tively *adv.* Conjunc'tiveness *n.* Conjunct'ly *adv.* Conjunc'ture *n.* संयोग *m*, संधि *m.* २ प्रसंग *m*, आणीबाणीची वेळ *f*, गडसंद *f*. [AUSPICIOUS CONJUNCTION *astron.* युति सुयोग *m*, सुमुहूर्त *m.* INAUSPICIOUS C. दुर्योग *m*, कुयोग *m.* C. OF SUN AND MOON सूर्येंदुसंगम *m.* DAY OF C. OF SUN AND MOON अमावास्या *f*, आंवस *f*, अमा *f*, दर्श *m.* SUPERIOR C. बहिर्योग *m*, चलोच्च, शीघ्रोच्च, पश्चाद्युति. INFERIOR C. अंतर्योग, बुधाची युति, मंदोच्च. GRAND C. ग्रही; जसें, पंचग्रही, सप्तग्रही.

Conjunctiva (kon'jun-kt'īva) [L. *conjuntivus*, connective.] *n. the fine sensitive membranes of the eyeball and eyelids* नेत्रशुक्र *n.*

Conjunctivitis (kon-junk'-ti'vi'tis, ve'tis) [See Conjunctiva.] *n. med.* अक्षिगोलाच्या बाहेरच्या पडद्याचा दाह *m*, आंतल्या पापणीची सूज *f*, खुपरी *f*.

Conjure (kun'jer) [Fr. *con*, together & *jurare*, to swear.] *v. t.* शपथ *f*- सत्य *n*- आण *f* घालून सांगणें-बोलणें-पुसणें, ताकीद *f*. करणें, शपथ *f*- आण *f*. घालणें. २ *to implore earnestly, to adjure* आतुरतेनें-शपथपूर्वक विनंति करणें; as, "I C. you, let him know, whatever was done against him Cato did it." C. *v. t. to combine together by an oath* आपसांत शपथ घेऊन कट *m.* करणें. Conjure'ment *n.* शपथ घालणें *n.* २ (*obs.*) शपथ *f*, आण *f*, ताकीद *f*. Conjurā'tion *n*, शपथ घालून पुसणें. Con'jurer *n.* शपथ घालणारा *m.* Conjurā'tor *n.* संगनमतांतला, कटांतला, कटवाला *m.*

*N. B.*—Conjure प्रतिबंधक शपथ *f*- आण *f*. घालणें, Adjure शपथ *f*- आण *f*. घालून करावयास सांगणें.

Conjure (kun'jur) *v. t. to affect or effect by machination* जादू *m.* करणें, भारणें, मंतरणें, भारणी *f.* करणें, (वर) इलम चालवणें, मंत्रप्रयोग *m.* करणें; as, "The habitation which your prophet C. ed the devil into." C. *v. i. to practise magical arts* मंत्रसाध्य करणें, जादू करणें, फांफूं-छांछूं-गौडबंगाल-गारुड-नजरबंदी दृष्टिबंधन-इलम-तंतरमंतर करणें. Con'jured *p. p.* Conju'ring *pr. p.* भारणें *n*, भारणी *f*. २ फांफूं *f*, छांछूं *f*, तंतरमंतर *m*, गौडबंगाल *n*, गारुड *n*, इलम, जादूटोणा *m*, बाजीगिरी *f*- गरी *f*- गारी *f*, सिद्धसाधन *n.*

Con'jurer *n.* जादूगार *m*, मंत्र घालणारा-मारणारा *m*, मंत्री *m*, गौडबंगाली-बंगाल्या *m*, भानामत्या *m*, गारुडी *m*, गारोडी *m*, पंचाक्षरी *m*, इलमी *m*, इलमवाज *m*, इलमवाला *m*, बाजीगर-गार *m*, नजरबंद्या *m*, मायाजीवी, *m*, नजरबंद *m*, मायावी *m*, मदारी *m*, ऐंद्रजालिक *m*. Conju'ring *n*, See Con'jura'tion. Conjury *n.* जादू *f*, चेटक *n*, पिशाचविद्या *f*. To conjure up ( मंत्र घालून ) डोळ्यापुढें उभें करणें-दृष्टिगोचर करणें-प्रत्यक्ष उभें करणें. २ (*fig.*) नवीन बनविणें, कल्पणें ; as, "To conjure up a story."

Conjuror ( kon-jū'-rur ) *n. law.* एखाद्या गोष्टीविषयीं कांहींएक लोकांनीं शपथ घेतली असतां, त्यांचे बरोबर त्या बाबतींत शपथ घेणारा, शपथ घेणारा-शपथबद्ध-साथीदार, एकशपथी ( on the analogy of एकगोत्री ).

Connascent ( kon-as'ent ) [ L. *con*, with, & *nasci*, to be born. ] *a.* सहजन्म, सहजात, एकाच कालीं उत्पन्न झालेला-केलेला, एककालिक. Connas'cence,-cy *n.* सहोत्पत्ति *f.*

Connate ( kon'-āt or kon-āt' ) [ L. *con*, with, & *natus*, born. ] *a.* जन्माचा, स्वाभाविक, निसर्गज, सहज, नैसर्गिक. २ सहजसिद्ध, सहोत्पन्न. ३ जातीचा, जन्माचा, आंगचा, बुद्धीचा. ४ *bot.* संयुक्तमूल, संबद्धमूल, बुडाशीं एकत्र झालेला; as, "C. leaves." Connat'ural *a.* एकजातीय, सजातीय, समधर्मक. २ आंगचा, प्रकृतिसिद्ध, स्वाभाविक. Connat'ural'ity *n.* एकगुणता *f*; समधर्मता *f.* Connat'uralness *n.* Connat'ure *n.* Same as Connat'ural'ity.

Connect (kon-nekt' ) [ L. *con*, together & *nectere*, sk. नह्, to bind.] *v. t.* जोडणें, संबंध *m*- योग *m*-संयोग *m.* करणें, संनद्ध-संयुक्त-संलग्न करणें. २ मागील पुढील संबंध ठेवणें, अनुसंधान *n*- संदर्भ *m*- पूर्वापार संबंध *m.* ठेवणें-राखणें-बांधणें. C. *v. i.* संबंध असणें. Connec'ted *a.* जोडलेला, संयुक्त, समन्वित, संबद्ध, संयुक्त, संलग्न. २ संबंधी, आप्त, आप्तविषयक, नात्याचा. ३ संगतवार, सुसंबद्ध, सुसंगत, संदर्भशुद्ध. Connec'tedly *adv.* संगतवार, संदर्भपूर्वक, मागलें पुढलें धोरण ठेवून. Connec'teror *n.* जोडणारा, संयोजक, संबंधकर्ता-कारी. Connect'ible *a.* संयोज्य. Connec'tion, Connex'ion *n.* जोडणें *n*. २ संयोग *m*, संबंध *m*, लगत *f*, संधि(s.) *m*, संन्नाह *m*, संलग्नता *f.* ३ अनुसंधान *n*, संदर्भ *m*, धोरण *n*. ४ संगति *f*, संगत *f*, अन्वय *m*, संबंध *m*, लाग *m*, संदर्भ *m*. ५ सोयरा *m*, संबंधी *m*, नातेदार *m*, नातेवाईक *m*, आप्त *m*, सगा *m*, शरीरसंबंधी *m*, सोयराधायरा *m*. ६ संबंध *m*, लागाबांधा *m*, लगा *m*, लग *f*, नातें *n*, सूतगोत *n*, धागादोरा *m*, दोरा *m*, सूत *n*, तंतु *m*. ७ संग *m*, संयोग *m*, समागम *m*, मैथुन *n*, संभोग *m*, झोंबट (of animals) *n*. Connec'tive *n.* see Connector. Connex'ive *a.* & *n.* (*obs*) संयोजक. Connec'tively *adv.* Connective tissue (*med.*) संग्राहक-जोडणारा तंतु *m*. In this connection चालू गोष्टीसंबंधीं, ह्या संबंधानें-संबंधीं. Indissoluble connection जन्मगांठ.

*N. B.*—Connection. This word was formerly written with *X* instead of *t* in the termination. But general usage, at present, is to spell as *connection*. The same is the case with *inflexion*, *reflexion*, &c. According to Skeat *connection* is a misspelt word.

Connive ( kon-nīv' ) [ Fr.-L. *connivere*, to close the eyes at, *con*, together & *niclare*, to wink. ] *v. i.* कानाडोळा-डोळेझांक करणें, डोळ्यांवर कातडें ओढणें, आनाकानी करणें, ऐकिलें न ऐकिलें करणें, पाहिलें न पाहिलें करणें. २. लक्ष न देणें. ३. ( एखाद्या गोष्टीची ) उपेक्षा करणें, उपेक्षणें. Conni'vance, Conni'vancy, Conni'vence, Conni'vency (*obs.*) *n.* कानाडोळा *m*, डोळेझांक *f*, आनाकानी *f.* Connivent *a.* (*bot.*) अंतर्वलित. Conni'ver *n.*

Connoisseur (kon'-nis-ėr'-sur') [O. Fr. *connoistre*.—L. *cognoscere*, to know.] *n.* प्रवीण *m*, जाणता *m*, पारखी *m*, परीक्षावंत *m*, परीक्षक *m*, अभिज्ञ *m*, मार्मिक, निपुण, रसज्ञ, गुणग्राहक, मर्मज्ञ, गुणज्ञ, गुणग्राही, वाकबगार, दर्दी, मुरब्बी. Con'noisseur'ship *n.* मार्मिकता *f*, पारख *f.* २ रसज्ञाचा प्रांत *m*-विषय *m*.

Connote ( kon-nōt' ) [ L. *con*, with, & *nota*, a mark.] *v. t. log.* अप्राधान्यपणानें-गौणरीतीनें जातिनिर्देश करणें, गुण दाखविणें, सांसिद्धिकगुण दाखविणें. २ ध्वनित करणें, सुचविणें. Con'notā'te *v. t.* See Connote. Connotā'tion *n.* जातिनिर्देश *m*. Conno'tative, Conno'tive *a.* उपाधि-गुणवाचक, जातिनिर्देशक. C. term जातिनिर्देशक पद. See the word Denotation.

Connubial ( konn-ū'-bi-al ) [ L. *con* & *nubere*, to marry. ] *a.* वैवाहिक, विवाहमूलक, विवाहाचा, लग्नाविवाहासंबंधीं-विषयक. २ दंपतीभावाचा, स्त्रीपुरुषभावाचा, दांपतिक. Connu'bial'ity *n.* Connu'bially *adv.*

Conoid (kō'noid) [Gr. *konos*, a cone & *eidos*, form.] *n.* शंकूच्या आकृतीचा पदार्थ *m*, करुआकार-शंक्वाकृति-पदार्थ शंकूसारखा पदार्थ *m*. २ *a solid formed by the revolution of a conic section about its axis* शंक्वाभास *m*.

Conquer ( kong'kėr ) [ O. F. *conquerre*.—L. con, & *quaerere*, *quisitus*, to seek. ] *v. t. to gain or acquire by force, to vanquish* जिंकणें, पराजय-पराभव करणें, (वर) जय मिळविणें, पराजित-विजित-पादाक्रांत करणें-जिंकून-जय करून-युद्ध करून (मुलूख) घेणें-मिळविणें. as, "If thou C. Rome." २ *to overcome by mental or moral force, to surmount* निग्रह-संयम करणें, वशआधीन करणें, (तून) पार पडणें; as, "To C. difficulties, temptations, passions, &c." ३ *to win, to obtain, overcoming difficulties in the way* झगडून मिळविणें; as, "To C. freedom." C. *v. i. to overcome, to prevail* जिंकणें, जय पावणें-मिळविणें; as, "He went

forth conquering and to C." Con'quered *pa. t.* & *p. p.* Con'quering *pr.p.* Con'querable *a.* जिंकण्याजोगा, जेतव्य, जेय, जय्य, पराभवनीय, अभिभवनीय. Con'querableness *n.* Con'quering *a.* Con'queringly *adv.* Con'queror *n.* जिंकून आपल्या हस्तगत करून घेणारा *m*, जिंकणारा *m*, जेता *m*, पराजय-पराभव करणारा *m*. २ (मुलूख) जिंकून घेणारा *m*. ३ (v. V.I.) जयी *m*, विजयी *m*, जयमान *m*, Con'queress *n. fem.* जिंकणारी *f*, जयिनी *f*, जेत्री *f*. Con'quest *n. the act, victory* जय *m*, विजय *m* अभिभूति *f*, पराभूति *f*, पादाक्रांति *f*. २ *subjugation* हस्तगत करून घेणें *n*, स्वायत्तीकरण *n*; as "Three years sufficed for the C. of the country." २ *possessions gained by physical or moral force* जिंकलेली वस्तु *f*, जितवस्तु *f* द्रव्य *n*, जयलब्ध वस्तु *f*. ३ *acquisition* झगडून मिळवणें *n*; as, "The C. of liberty or peace." To make a conquest of जिंकणें. The Conqueror इंग्लंडचा राजा पहिला वुइल्यम, विजयी. The Conquest इ. स. १०६६ त पहिल्या वुइल्यमनें इंग्लंडच्या गादीचा मिळविलेला जय *m*. विजय *m*.

*N. B.*—Conquer जिंकणें. Vanquish पराजय करणें. Subdue वठणीस आणणें, Subjugate मान वांकवणें, Surmount (तून) पार पडणें, Overcome दमविणें.

Consanguine (kon-sang' gwin) [L. *con*, with & *sanguis, sanguinis*, blood.] *a.* गोत्रज, एका रक्ताचा, एकरक्त, एका हाडामासाचा, एकपिंड, सपिंड, एका रक्तामासाचा. also Consanguin'eous. Con'sanguin'eal *a.* Con'sanguined *a.* (R.) Con'sanguin'ity (as distinguished from affinity) *n.* एकरक्तसंबंध *m*, समरक्तसंबंध *m*, सगोत्रता *f*, सपिंडता *f*, एकवंशिता *f*.

*N. B.*—Consanguinity सगोत्रता *f*, एकरक्तता *f*, Affinity वैवाहिक संबंधाचें नातें *n*.

Conscience (kon'shĕns) [Fr. *conscience*, from L. *con*, together (with God) *scire, sciens*, to know.] *n. the moral faculty or sense passing judgment* सदसद्विवेकशक्ति *f*, बरेंवाईट समजण्याची शक्ति *f*, मन *n* (loosely), मनोदेवता, बुद्धि *f* (loosely). Cf. त्याची बुद्धि फिरली; अंतःकरण *n* (loosely), अंतर्याम *n* (loosely). [CLEARNESS OF C. अंतःकरणशुद्धि *f*. NO WITNESS IS SO STRONG AS ONE'S C. मनाएवढा ग्वाही त्रिभुवनांत नाहीं. TO RESIST OR FIGHT AGAINST C. बुद्धीशीं वैर करणें-मांडणें-झगडणें. TO MAKE A C. OF मनोदेवता सांगेल तसें वागणें.] २ *justice* मनाचा निवाडा *m*, इमान *n*, न्याय *m*, सत्प्रतीति *f*. ३ (*obs.*) दया *f*. Conscience-proof *a.* मनाला हुरहुर न लागणारा, अंतःकरणांत पस्तावा न होणारा. Conscience-smitten *a.* अंतःकरणांत पस्तावा झालेला, ज्याचें मन खाऊं लागलें आहे असा, मनांत खंती उत्पन्न झालेला. Con'scien'tious *a.* सदसद्विवेकबुद्धिनुरूप वागणारा, न्यायनिष्ठ, न्यायपरायण, नेकीचा, इमानी, सत्यनिष्ठ. Con'scien'tiously *adv.* इमानानें, इमान राखून, सत्यबुद्धीनें. Con'scien'tiousness *n.* (v. A.) सदसद्विवेकबुद्धिनुरूप-मनोदेवतेनुरूप वर्तन *n*, वागणूक *f*, इमानीपणा *m*, न्यायनिष्ठा *f*, सत्यनिष्ठा *f*. Con'scionable *a.* Con'scionableness *n.* Con'scionably *adv.* यथान्याय, न्यायानें, धर्मानें. Conscience clause धर्मसंबंधीं बाबतींत सवलत देणारें कायद्याचें कलम *n*. Conscience money पूर्वी अपहार करून मागाहून पश्चात्ताप झाल्यामुळें गुप्तपणें सरकारांत भरलेलें द्रव्य *n*. Case of conscience धर्माधर्मतेचा प्रश्न, योग्यायोग्यतेचा प्रश्न, दोषादोषविवेचक प्रश्न. Good or bad conscience सुष्ट किंवा दुष्ट अंतःकरण. In conscience, In all conscience अंतर्यामापासून, सच्चेपणानें, योग्यायोग्यतेचा विचार करून. To make a conscience of or to make a matter of conscience इमानानें चालणें-वागणें, मनोदेवता सांगेल तसें वागणें. Speak one's conscience (*Shakes.*) आपलें स्वतःचें मत सांगणें-कळविणें-देणें.

*N. B.*—Conscientious मनाला योग्य दिसेल तसें करणारा, Scrupulous बारीक सारीक विचार करणारा.

Conscious (kon'shus) [L. *con* & *scire, sciens*, to know.] *a. possessing the power of knowing one's own mental operations* संज्ञावान्, देहाभिमानी, सचेतन, विचार करणारा, विचारक्षम. २ *cognizant, sensible* जाणून-समजून-ओळखून असलेला, ज्ञान असलेला, प्राप्तज्ञान, जातबोध, प्राप्तबोध; as, "The man who breathes most healthily is least C. of his own breathing." ३ *known to one's self* स्वतः पुरतेपणीं माहीत असलेला. ४ *having recovered consciousness* शुद्धीवर-सावध-हुशार असलेला. Con'sciously *adv.* देहभानानें, देहभानावर असून, सदेहभान, सचेतन, समजून उमजून. Con'sciousness *n.* (v. A. I.) शुद्धि *f*, देहशुद्धि *f*, भान *n*, देहभान *n*, सावधगिरी *f*, सावधपणा *m*, जाणीव *f*, होष *m*, फाम (always used with बे) *f*, प्रबोध *m*, संज्ञा *f*. [BEREFT OF C. बेशुद्ध, बेहोश, निचेष्ट, निश्चेतन, बेसावध. TO RETURN TO C. देहावर-देहभानावर शुद्धीवर-स्थितीवर-ध्यानावर-स्मृतीवर येणें, संज्ञा *f*. येणें *g. of. s.*] २ बोध *m*, प्रतिबोध *m*. ३ समज *m*, माहिती *f*, उमज *m*. (v. पड), संवेदन *n*. ४ *conscious feeling, sense of self* अहंकार *m*, अहंमति *f*, अहंभाव *m*. ५ *med.* वेदनाशक्ति *f*. ६ *metaph.* चेतनाशक्ति *f*, ज्ञानशक्ति *f*, ज्ञानवत्ता *f*, संवेदना *f*.

Conscribe (kon-skrīb') [L. *con*, together & *scribere, scriptus*, to write.] *v. t.* (*obs.*) (लष्करी पटांत) नांव लिहिणें-नोंदणें-दाखल करणें. Con'script *a. enrolled* (लष्करी) पटावर लिहिलेला-मांडलेला-नोंदलेला. C. *n.* पटावर लिहिलेल्यांपैकीं ज्याच्यावर लष्करांत नौकरी करण्याची पाळी आली तो. C. *v. t.* सक्तीनें लष्करी नोकरी करावयास लावण्यासाठीं पटांत नांव घालणें. Conscription *n.* (लष्करांत किंवा आरमारांत पाठविण्याच्या उद्देशानें अमुक वयाच्या मनुष्यांचीं) नांवें पटावर मांडणें *n*.

मांडण्याची चाल *f.* Conscrip'tional *a.* Conscript fathers प्राचीन रोम देशांतील सेनेटचे सभासद.

Consecrate (kon'sē-krāt) [L. *con*, wholly & *sacrare*, *sacratum*, to set apart as sacred, from *sacer*, sacred.] *v. t. to set apart, to dedicate or devote to the service or worship of God* उत्सर्ग *m.* करणें *g. of o.*, प्रतिष्ठणें, प्रतिष्ठा *f.* करणें *g. of o.*, देणें-लावणें-वाहणें, अर्पण *n.* करणें *with* कडे; as, "To C. a temple or church." २ *to set apart to a sacred office* अभिषेकणें, अभिषेक *m-* अभिषेचन *n.* करणें *g. of. o.*, दीक्षा *f.* देणें, धर्मासनावर बसविणें, पवित्र कार्याकरितां बाजूस राखून ठेवणें; as, "To C. a bishop." ३ *to canonize* देवासमान मानणें, (ला) साधू बनवणें, संतमालिकेंत दाखल करणें. ४ *to dignify* पूज्य-मान्य-प्रतिष्ठित करणें; as, "Rules or principles C.ed by time." *Burke.* C. *a.* उत्सृष्ट, प्रतिष्ठित, अभिमंत्रित, प्रतिष्ठापित, अभिषिक्त, संस्कृत, (देवाकडे) लावलेला-वाहिलेला, &c. Con'secra'tedness *n.* Con'secrā'tion *n.* (v. V. T.) *-act.* उत्सर्ग *m*, प्रतिष्ठणें *n*, अभिमंत्रणें *n. a.* or *s.*, प्रतिष्ठा *f.* अर्पण *n*, संस्कार *m.* २-*act.* अभिषेकणें *n*, अभिषेक *m*, अभिषेचन *n.* Con'secra'torer *n.* अभिषेक करणारा *m*, अभिषेचक. २ प्रतिष्ठा करणारा, प्रस्थापक. ३ देवार्पण करणारा. Con'secra'tory *a.*

*N. B.*—Consecrate उत्सर्ग करणें, Dedicate अर्पण करणें, Devote वाहणें, Hallow पवित्र समजणें-मानणें, Vow व्रत करणें.

Consectaneous (kon'-sek-tā'nē-us) [L. *consectaneue.*] *a. following as a natural consequence* सहजानुसारी-अनुगामी.

Consectary (kon-sek'ta-ri) [L. *con* & *sectari* to follow eagerly, from *sequi*, to follow.] *n.* एका गोष्टीवरून सिद्ध झालेली दुसरी गोष्ट *f.* C. *a.* आनुपंगिक, अनुसारी.

Consecution (kon'-se-kū'-shun) [L. *con* & *sequi*, to follow.] *n.* (*obs.*) *succession* अविच्छिन्न-एकसारखी परंपरा *f.* अनुक्रम *m*, अन्वय *m*, आनुपूर्व्य *n*, अनुवृत्ति *f.* अनुबंध *m*, परिपाटी *f.* [In close C. बरावर, हारोहार, लागोपाठ, पाठोपाठ, मागोमाग.] २ (*logic*) *train of consequences* सिद्धांतमाला *f.* सिद्धांतानुक्रम *m*, अनुमानपरंपरा *f.* Consec'utive *a.* अनुक्रमाचा, लागोपाठचा, पाठोपाठचा, मागोमागचा &c., पारंपरिक, आनुक्रमिक, आन्वयिक, अविच्छिन्न, क्रमिक; as, "Fifty C. years." २ *actually or logically dependent* अवलंबी-अनुवर्ती; as, "The actions of a man C. to volition." ३ *mus.* अनुक्रमाप्रमाणें चालणारा; as, "C. octaves." Consec'utively *adv.* एका पाठीमागें एक, अनुक्रमानें, अविच्छिन्नतेनें, अनुक्रमशः, बरोबर. Consec'utiveness *n.* अनुक्रम *m*, अविच्छिन्न परंपरा *f.*

Consension (kon-sen'shun) [L.] *n. agreement or accord* ऐकमत्य *n*, संमति *f.*

Consensual (konsen'shual) *a. law.* संमतानें केलेला, संमतिजनित, संमतियुक्त, अनुमोदित, अनुमोदनप्रेरित. [C. contract परस्परांच्या संमतीनें ठरलेला-झालेला करार.] २ (*physiol.*) अनिच्छिक, शरीरधर्मजनित. Consen'sus *n.* संमति *f.* अनुमति *f.* ऐक्य *n.*

Consent (kon-sent') [O.Fr.L. *con*, together & *sentire*, *sensus*, to feel, to agree.] *v. i. to assent, to concur, to agree in opinion or sentiment* रुकार *m-* होकार *m-* अनुज्ञा *f.* देणें-भरणें, कबूल-अनुमत-सम्मत, &c. होणें, अनुमत *n.* देणें. २ *to give assent or approval* पसंती दर्शविणें; as, "My poverty, but not my will, consents." *Shakes.* C. *v. t. Milt.* मोकळीक देणें. C. *n. accord* रुकार *m*, or होयकार or होकार *m*, अनुमत *n*, अनुमति *f.* सम्मत *n*, सम्मति *f.* खुशारजावंती *f.* [Tacit or implied C. मानस *n.* With free C. (or choice) सुखासंतोषानें, सुखासमाधानानें, राजीखुशीनें. To express C. (or concurrence) रुकारणें, रुकार *m-* हां *f.* देणें, होय *m.* ह्मणणें.] २ *harmony, coherence* एकराग *m*, मिलाफ *m*; as, "The melodious C. of the birds." [With one C. एकचित्तानें, एकमतानें.] ३ *compliance, approval* संमति *f.* अनुमति *f.* अनुमोदन *n*, अनुज्ञा *f.* ४ मंजुरी *f.* परवानगी *f*; as, "Thou wert possessed of David's throne, by free C. of all." *Milton.* ५ *law.* स्वतंत्र अनुमति *f-* संमति *f.* Consentā'neous *a. consistent, agreeable* लायक, योग्य, अनुकूल, माफक, अनुरूप, उचित. as, "A good law and C. to reason." Consentā'neously *adv.* Consentā'neousness, Con'sentanē'ity *n.* (R.)Consent'er *n.* रुकार देणारा. Consen'tience *n.* एकमतता *f.* Consen'tient *a.* संमत, कबूल, राजी, एकचित्त, एकमत्त. Consent'ingly *asv.* संमतीनें-पूर्वक. Age of consent संमतिवय. To be of consent *Shakes.* साथीदार असणें. With one consent एकमतानें, सर्वानुमतें, एकचित्तानें.

*N. B.*—Assent, Acquiescence, Concurrence, Agreement, Approval, Permission.

Consequence (kon'sē-kwens) [*L. consequens,-entis*, from *con* & *sequi*, to follow.] *n. a result* परिणाम *m*, फळ *n*, फलश्रुति *f.* फलोत्पत्ति *f.* फलोदय *m*, अर्थ *m*, कार्य *n*, परिपाक *m*, फळादेश *m*; as, "Shun to taste, And shun the bitter C." २ (*logic.*) *inference* अनुमान *n*, सिद्धांत *m*, निश्चितार्थ *m*, अनुमिति *f.* ३ *chain of causes and effects* कार्यकारणसंबंध *m*, कार्यकारणान्वय *m*, हेतुहेतुमदन्वय *m*, कार्यहेतुसंबंध *m*; as, "Link follows link by necessary C." ४ *importance, dignity, moment* महत्त्व *n*, वजन *n*, वजनदारी *f.* भारीपणा *m*, मोठेपणा *m*, गौरव *m*, भारदस्ती *f*; as, "A sense of your own worth and C." ५ (*math.*) उपाग्रसर, फलभाग *m.* Con'sequent *a.* आनुपंगिक, अनुयायी, अनुवृत्त, अनुसारी, आन्वयिक, कार्यकारणसंबंधीं. २ *logic.* आनुमेय, अनुमितिजन्य. C. *n.* अनुपंग *m*, परिणाम *m*, फळ *n*, कार्य *n.* २ (*logic.*)

सिद्धांत *m*, अनुमान *n*. ३ (*math.*) *the second term of a ratio* (as *a*:*b*, here *b* is *consequent* & *a* is *antecedent*) उत्तरफल *n*, अग्रेसरपद *n*. Con'sequen'tial *a*. परिणामक, आनुषंगिक, अनुवर्ती. २ *big, lofty* दिमाखदार, दिमाखाचा, पत्रांसी or जी, तोरेदार, तोऱ्याचा, मिजासी, मानी, लब्धप्रतिष्ठित. Con'sequen'tially, Con'sequently *adv.* त्यामुळें, तस्मात्, ह्मणून, अर्थात्, कार्यकारणभावानें, अतएव, फलतः, अतःकारणात्, दिमाखानें, तोऱ्यानें. ३ *in a regular series, consecutively* नियमाप्रमाणें, अनुक्रमाप्रमाणें, क्रमवार-पूर्वक, &c. Con'sequen'tialness *n*. (v. A.) दिमाख *m*, तोरा *m*, पत्रास *f*, मिजाज (स). २ *f* शेखी *f*, बढाई *f*, बढाइकी *f*. Consequential damage (*law*) *damage so remote as not to be actionable* पुष्कळ दिवस झाल्यामुळें ज्याबद्दल दावा लावतां येत नाहीं असें नुकसान *n*. २ *damage which although remote, is actionable* पुष्कळ दिवस होऊन गेले तरी ज्याबद्दल दावा चालूं शकतो असें नुकसान *n*. ३ *actionable damage but not following as an immediate result of an act* कोणत्याही कृत्याचा प्रत्यक्ष परिणाम नव्हे असें असतांही ज्याबद्दल दावा लावतां येतो असें नुकसान *n*.

Conserve (kon'-sėrv) [Fr. *conserver*, from L. *con* & *servare*, to keep, to guard.] *v. t. to preserve, to protect* रक्षण-संरक्षण करणें. २ *to prepare with sugar &c. for the purpose of preservation as fruits, &c.* मुरविणें, मुरवून-टिकाऊ-टिकेसा-करणें, पाकवणें, मुरंबा करणें- घालणें. C. *n*. साखरेंत मुरविलेला पदार्थ *m*. Conser'vancy *n*. सांभाळ *m*, रक्षण *n*, संरक्षण *n*. [COURT OF C. तेम्स नदींत मासे मारण्याविषयीं प्रतिबंध करण्याचा अधिकार असलेलें कोर्ट *n*.] Conser'vant *a*. Conservā'tion *n*. बचाव *m*, संरक्षण *n*, पालन *n*, सांभाळ *m*. Conservā'tional *a*. Conser'vatism *n*. *opposition to change* पूर्वापार चालत आलेल्या रूढींत-रीतींत फेरबदल न करण्याविषयींचें मत *n*- विचार *m*, रूढींत फेरबदल न होऊं देण्याची इच्छा *f*, रूढिप्रियता *f*. Conser'vative *a*. सलामत राखणारा, रक्षक, संरक्षक, पालक. २ स्थितिपालक. C. *n*. नुकसानापासून बचाव करणारा. २ पुरातन रीतीप्रमाणें वागणारा मनुष्य *m*. ३ (*politics.*) राजपक्षीय लोक, रूढमार्गवादी, मंदसुधारणावादी, कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाचा मनुष्य *m*, राज्यपद्धतींत एकदम फेरफार नको असें म्हणणाऱ्या पक्षाचा मनुष्य *m*. Conser'vativeness *n*. Con'ser'vatoire (kon-ser-va-twär') or Con'servatō'rium *n*. संगीत, कला इत्यादि विशेष विषय शिकविण्याची सार्वजनिक जागा *f*. Con'servā'tor *n*. संरक्षक *m*, रक्षक *m*, पालक *m*. २ (*law.*) लोकांत शांतता राखणारा अधिकारी *m*, न्यायाधीश वगैरे; एखाद्या शहरचे-समाजाचे-मंडळीचे किंवा एखाद्या मालमत्तेचे-सर्व हक्क राखण्याचा-कायम ठेवण्याचा ज्याला अधिकार असतो असा राजपुरुष, संरक्षकराजपुरुष *m*. Conser'vatrix *n. fem.* Con'serva'torship *n*. रक्षकाधिकार *m*. Conser'vatory *n*. रक्षणवर्धनशाला, विशेष अभ्यासानें गायनादिकलांचें रक्षण करून त्यांचें वर्धन किंवा वृद्धि करण्याकरितां स्थापिलेली शाळा *f*. २ वनस्पति वगैरे सुरक्षित ठेवण्याचें स्थळ *n*, रक्षणस्थान *n*. C. *a*. रक्षक, संरक्षक. Conser'ver *n*. Conservation of energy शक्तिसंस्थिति, शक्तीचें प्रकृतिनित्यत्व *n*. Conservation of matter जडपदार्थांचें नित्यत्व *n*. Conservative energy प्राकृतिक शक्ति.

*N. B.*—Conservative किंवा रूढिप्रिय लोक मुळींच फेरफार करूं इच्छीत नाहींत असें नाहीं; तर रूढीला धरून व अवश्य तितका फेरफार करावा असें ह्यांचें मत असतें.

Consider (kon-sid'-ėr) [Fr. *considerer*, to view attentively, from L. *con* & *sidus*, *sideris*, star; orig. to look at the stars.] *v. t. to ponder, to study, to meditate on* विचार *m*. करणें *g. of o.*, चिंतणें; as, "I will C. thy testimonies." २ *to examine, to observe* तपास *m*- चिकित्सा *f*. करणें, न्याहाळून पाहणें; as, "She considereth a field and buyeth it." ३ *to have regard to, to respect* पाहणें, लक्षिणें, विचारांत घेणें, मनांत-ध्यानांत-लक्षांत आणणें, लक्ष *n*. देणें with कडे *of o.*, जमेस धरणें; as, "C., Sir, the chance of war; the day was yours by accident." ४ *to estimate, to view* पाहणें, मानणें, भावणें, सोजणें, गणणें, लेखणें, धरणें; as, "Considered as plays, his works are absurd." ५ *to regard with sympathy and pity* चिंता करणें, लक्ष्य देणें, चिंता-काळजी वाहणें, परामर्श घेणें; as, "Blessed is he that Considereth the poor." C. *v. i. to think seriously, to reflect or meditate on* चिंतणें, पूर्ण विचार करणें, चौकशी करणें, विचारांत असणें; as, "She wished she had taken a moment to C., before rushing downstairs." Consid'erable *a*. विचार करायाजोगा, विचारणीय, विचार्य, मननीय, मंतव्य. २ संभावनीय, संभावित, मान्य, योग्य, मान्यतेचा, प्रतिष्ठित. ३ बराचसा, बराच, सांगायाजोगा, जमेस धरायाजोगा, अनुपेक्षणीय, अनुपेक्ष्य; as, "A C. sum of money." Consid'erableness *n*. Consid'erably *adv.* (v.A. 3.) बराच, &c. *all decl.* Consid'erance *n*. (*obs.*) (*Shakes.*) विचार *m*. Consid'erāte, Consid'erative *a*. (*obs.*) विचारवंत, विचारशील, विचारी. Consid'erate'ly *adv.* विचारानें, विचारपूर्वक, विचारपुरस्सर, सावधानपणानें, सावधपणानें-रीतीनें, विचारेंकरून, बुद्ध्या, समजूनउमजून, जाणूनबुजून. Consid'erate'ness *n*. विचारीपणा *m*, विचारशीलता *f*, विचारदृष्टि *f*, विचारी स्वभाव *m*, विचारिता *f*, विमृश्यकारिता *f*. Consid'erā'tion *n.–act.* घोळणें *n*, विचार *m*, विचारणा *f*, विभावना *f*, ऊहापोह *m*, मनन *n*, छान *f*, विमर्श *m*, चर्चा *f*. [C. OF PROS AND CONS कार्याकार्यविचार *m*, फलाफलविचार *m*, सदसद्विचार *m*, कर्तव्याकर्तव्यविचार *m*. MATURE C. पूर्णपोक्त विचार *m*. MINUTE C. सूक्ष्म-बारीक विचार *m*. UPON C. IF WE CONSIDER, &c. पाहिलें असतां, पाहिल्यास, पाहतां, विचा-

रान्तीं, विचार केला असतां.] २ *examination, deliberation* मनन *n*, चिंतन *n*, विवेचन *n*, चर्चा *f*, चिकित्सा *f*, तपास *m*; as, "C. like an angel came." ३ *appreciative regard* आदर *m*, मान *m*; as, "C. with which he was treated." ४ *sympathetic regard or notice* चिंता *f*, दरकार *f*, परवा *f*, आंच *f*, गुमान *m*, काळजी *f*. ५ *some degree of importance or consequence* गौरव *m*, प्रतिष्ठा *f*, वजन *n*, महत्त्व *n*, भारदस्ती *f*, योग्यता *f*; as, "Lucan is the only author of C. among the Latin poets who was not explained for the Dauphin." ६ *matured opinion* पोक्तपूर्ण विचार *m*; as, "C. on the choice of a profession." ७ *motive, reason* हेतु *m*, कारण *n*, निमित्त *n*, सबब *f*; as, "He was obliged, antecedent to all other considerations, to search an asylum." ८ (*law.*) *the price of stipulation, compensation* मोबदला *m*, प्रतिफळ *n*. ९ *deference* भीड *f*, मुलाजा *m*, मुरवत *f*, चाड *f*, परवा *f*. Consid'ered *p.* ( v. V. T. I. ) विचार केलेला, घोळलेला, &c., विचारित, चिंतित, &c. Consid'ering *pr. p.* Consid'eringly *adv.*

*N. B.*—Meditate ध्यान करणें, Muse गमतीनें गतगोष्टीच्या विचारांत गुंगत राहणें, Reflect चिंतन करणें, Consider विचार करून ठरविणें, Regard मानणें, Ponder गाढ विचार करणें.

Consign (kon-sīn') [Fr. *consigner.*—L. *consignare*, from *signum*, mark. ] *v. t. to intrust* सोंपवणें, हवालणें, निरवणें, निरवणी *f*- निरवणूक *f*- अर्पण *n*- समर्पण *n*. करणें *g. of o.*, हवालीं-स्वाधीन करणें, जिम्मा *m*- तावा *m*. देणें; as, "To C. a dead body to the flames." २ *to give into the hands of an agent for superintendence, sale,* &c. ( अडत्याकडे ) पाठविणें; as, "To C. goods to a factory for sale." ३ *to assign* ( कडे ) लावणें. ४ (*obs.*) *to stamp or impress* मोहोर करणें, नांव घालणें. C. (*obs.*) *v. i. to submit* शरण येणें. २ *to agree* अनुमति *f*. देणें. Consign'able *a.* ( v. V. ) सोंपायाचा, अर्पणीय, अर्प्य, समर्प्य, &c. Consignā'tion *n.* Consig'natory *n.* (खतावर-समर्पणपत्रावर) दुसऱ्याबरोबर सही करणारा. Consigned' *a.* ( v. V. ) सोंपविलेला, हवालीं केलेला, न्यस्त, अर्पित, समर्पित. २ अडत्याकडे पाठविलेला. Consig'nature *n.* दुसऱ्याबरोबर केलेली सही *f*, जोडसही *f*. Consig'nee' *n.* अडत्या *m*, ज्याच्याकडे विक्रीकरितां माल पाठवितात तो. Consign'er-or *n.* माल विक्रीकरितां पाठविणारा मनुष्य *m*. Consign'ment *n.* ( v. V. )-*act.* सोंपणें *n*, हवाला देणें *n*, हवालीं करणें *n*, निरवणें *n*, निरवणूक *f*, निरवणी *f*, न्यास *m*, निक्षेप *m*, निक्षेपण *n*, अर्पण *n*, समर्पण *n*. २ *com. goods consigned* अडत्याकडे पाठविलेला माल *m*. ३ हवाल्याची चिट्ठी *f*, अर्पणपत्र *n*.

Consilience ( kon-sil'i-ens ) [L. *con* & *salire*, to leap.] *n. coincidence* एकमत *n*, संमति *f*, समभवन *n*.

Consist ( kon-sist' ) [ L. *consistere*, to stand still or firm, from *con* & *sistere*, to cause to stand, from *stare*, to stand. ] *v. i. to exist, to subsist* असणें, होणें, वर्तणें; as, "He is before all things, and by him all things C." २ ( with *of* ) *to be made up* असणें *with g. of o.*, घटित-मय-रूप-आत्मक-&c. असणें, (in comp.); as, "The land would C. of plains and valleys." ३ ( with *in* ) *to have as its substance or character* ( आंत ) असणें, राहणें; as, "Body's ornament C.s in true knowledge." ४ ( with *with* ) *to be harmonious, to be in accordance* संभवणें, जुगणें, जमणें, सुसंबद्ध असणें, जम *m*. बसणें *g. of o. recip.*; as, "Health C.s with temperance alone." Consis'tence, Consis'tency *n. existence, firmness, solidity* मजबुती *f*, स्थिरता *f*, दृढता *f*; as, "We are as water, weak and of no C." २ *a degree of firmness or denseness* घट्टपणा *m*, घणपणा *m*, दाटपणा *m*, घनता *f*, सांद्रता *f*; as, "The C. of a syrup." ३ *a combination* संयोग *m*, एकीकरण *n*, मिश्रण *n*; as, "The church of God, as meaning the whole C. of orders and members." ४ *durability, persistency* टिकाऊपणा *m*, दृढता *f*, स्थिति (s) *f*, स्थिरता *f*; as, "His friendship is of a lasting C." ५ *correspondence, congruity* पूर्वापरसंगति *f*, परस्परसंगति *f*, ताळ *m*, अविरोध *m*, संगतता *f*, पूर्वापराविरोध *m*, संदर्भ *m*, संदर्भशुद्धि *f*, गांठ *f*, थार *m*, मागचें पुढचें धोरण *n*, सुमार *m*, अनुसंधान *n*, ठिकाणा *m*, धरबंद *m*, ताळतंत *m*, घर *m*, नेम *m*; as, "C. of opinions; C. of character." ६ *that which stands together as a united whole* ऐक्य *n*, एकसंप *m*, एकपणा *m*. Consist'ent *a. firm, hard, solid* घट्ट, घन, जाड, दाट, सांद्र. २ *congruous, compatible* मिलाफाचा, मिलाफी, जुळणीचा, बेताचा, जमाचा, जमावाचा, मेळाचा, यथायोग्य, अनुकूल, सुयुक्त, माफक, जुळता, अनुसार ( in comp. ), अनुसारी (in comp. ), अनुरूप (in comp. ); as, "His conduct is C. with his words." ३ *agreeing with itself, coherent* संगतीचा, संगतवार, सुसंगत, संदर्भाचा, जुळणीचा, संदर्भशुद्ध, सुसंबद्ध, संगत. Consis'tently *adv.* बेतानें, अन्वयानें, अन्वय धरून, अनुरोधानें, संधानानें, सुमारानें, अनुसंधानानें, अनुरूप (in comp.), अनुसार (in comp.). २ संगतवार, मागलें पुढलें धोरण धरून-राखून, पूर्वापराविरोधानें, यथायोग्य. Con'sistō'rial, Con'sistō'rian *a.* Consis'tory *n. any solemn assembly or council* धर्मासंबंधीं जमलेली मंडळी, धर्मसभा *f*. २ ( *Eng. church*) The Spiritual court of a diocesan Bishop held by deputy viz. the chancellor of the diocese or a commissionary acting for him in his cathedral church, or elsewhere न्यायसभा *f*. ३ ( *R. C. church* ) *the Pope's Council of Cardinals* कार्डिनल नांवाची पोपची मंत्रिसभा *f*. C. *a.* व्यवस्थापकापंचासंबंधीं. Consist in तेंच असणें, एकरूप असणें. Consist of (चें) केलेलें-बनवलेलें असणें.

Consociate (kon-sō'shi-āt) [ L. *con* & *sociare*, to join,

to unite. ] *v. t.* & (*R.*) *v. i.* एकत्र करणें-होणें, एकसंप करणें, (ख्रिस्ती) धर्मसंबंधीं सभांत सामील होणें. Conso'ciated *a.* Consociā'tion *n.* एकसंप *m*, दोस्ती *f.* २ परमार्थसंबंधींचीं सर्व तऱ्हेचीं धार्मिक कार्यें एकवटून करण्याकरितां व अशा कार्यांत परस्परांना सल्लामसलत देण्याकरितां आसपासच्या सर्व ख्रिस्तपंथीयांची कायमची सभा *f.*

Console (kon-sōl') [L. *con* & *solari*, to comfort. ] *v. t. to solace, to comfort* शांतवणें, समाधान *n*-चित्त-*n*- समाधान *n*- सांत्वन *n*- आश्वासन *n*- दुःखापहरण *n*- संतापहरण *n.* करणें *g. of. o.*, जीव *m*– चित्त *n*– थंड करणें *g. of. o.*, स्वस्थावणें, आश्वासणें, दुःखाची शांति *f.* करणें, दुःख *n.* घालवणें *g. of o.* Conso'lable *a.* (v. V.) सांतवायाजोगा, शमनीय, सांत्वनीय, सांत्वनार्ह, सांत्वनक्षम. Con'solate *v. t.* (*obs.*) (*Shakes.*) सांतवणें. Con'solā'tion *n.* दुःखशांति *f*, संतापहरण *n*, आश्वासन *n*, सांत्वन *n*, मनाचें समाधान *n*, मनसमजावणी *f*, मनसमजावशी *f*, दुःखापहरण *n*, क्लेशापहरण *n*, दुःखपरिमार्जन *n*, दुःखपरिहार *m.-state* समाधान *n*, चित्तसमाधान *n*, चित्तस्वास्थ्य *n*, चित्तस्वस्थता *f*, दुःखशांति *f.* २ समाधानवस्तु *f*, समाधानसाधन *n*, समाधानकारण *n*, समाधानहेतु *m.* Consola'tory *a.* दुःखहर, शोकहारक, सुखावह, सांत्वनशील. Con'sola'tor *n.* सांत्वन करणारा. Consol'atrix *n. fem.* सांत्वन करणारी.

*N. B.*—See the word Comfort.

Consolidate (kon-sol'i-dāt) [L. *con*, together & *solidare*, to make solid, from *solidus*, solid.] *to make solid, to condense* दृढ-कठिण-घट्ट करणें. २ *to join* एकत्र करणें. ३ *surg.* सांधणें, जोडणें. C. *v. i.* दृढावणें, दृढ होणें, घट्ट होणें. C. *a.* घनीकृत, दृढीकृत. Consol'ida'ted *a.* दृढ-घट्ट केलेला, घनीकृत, दृढीकृत, सांद्रीकृत, व्यवस्थित, एकत्रित (v. V. I.), घनीभूत, दृढीभूत, सांद्रीभूत. Consol'idā'tion *n.* (v. V. T. I.)-*act.* दृढ करणें *n*, घट्ट करणें *n*, घनीकरण *n*, दृढीकरण *n*, सांद्रीकरण *n* (v. V. I.), दृढावणें *n*, घट्ट होणें *n*, &c. Consol'idative *a.* घनीकरणाची शक्ति-गुण असणारा. २ जखम भरून काढणारा. Consol'idator *n.* सांधणारा, जोडणारा. Consolidation Acts लहान लहान कानू एकत्र करून बनविलेले कायदे.

Consols (kon-solz') *n. pl.* (short for Consolidated Annuities) इंग्लंडच्या राज्यानें हमी घेतलेलें कर्ज.

*N. B.*—A considerable part of the public debt of great Britain which had been contracted in the form of annuities yielding various rates of interest was in 1757 consolidated into one fund at 3 percent interest the account of which is kept in the bank of England.

Consonant (kon' sō-nant) [L. *con*, with or together & *sonare*, स्वन्, to sound. ] *a. agreeing in sound* समस्वर, एकस्वर, समनाद, एकस्वन. २ *congruous* मिलाफाचा, मिलाफी, जमाचा, बेताचा. ३ पुष्कळ व्यंजनें असलेला. ४ बहुव्यंजन-क-संबंधीं. C. *n.* व्यंजन *n*, हलवर्ण *m*, व्यंजनाक्षर *n.* [ CONJUNCT C. संयोग *m*, जोडाक्षर *n.* ] Con'sonance,-cy *n.* स्वरैक्य *n*, स्वरसाम्य *n*, समस्वरता *f*, स्वरमेळ *m.* २ मिलाफ *m*, जम *m*, जवा *m*, जमाव *m*, मेळ *m*, अनुसार *m*, अनुरूपता *f*, एकताल *m*, संगतता *f.* Con'sonan'tal *a.* व्यंजनासंबंधी-विषयीं. Con'sonantly *adv.* Con'sonous *a.* मिलाफाचा, बेताचा, जमाचा. २ एक आवाजाचा-स्वराचा-स्वनाचा.

Consort (kon'-sort) [L. *con* & *sors*, *sortis*, lot, fate, share. ] *n. a companion or partner, esp. wife or husband* जन्माचा गडी *m*- सोबती *m*- साथी *m*- संगती *m*- जोडपी *m*; *fem.* जन्माची सोबतीण *f*, दादला *m*, बायको *f.* २ *naut.* एका जहाजाच्या संगतीनें चालणारें जहाज *n.* ३ अनुमति *f*, संमति *f*, जूट *f*; as, "By Heaven's C." ४ (*obs.*) मंडळी *f*, समुदाय *m*, समूह *m*, मंडळ *n*, टोळी *f.* ५ *harmony of sounds* एकरागताल *m*, स्वरैक्य *n*, स्वरमेळ *m.* [ PRINCE C. राज्य करणान्या राणीचा नवरा *m.* QUEEN C. राज्य करणान्या राजाची बायको *f.* ] C. *v. t.* (*Shakes.*) संग-संगति-समागम करणें. C. *v. i. to associate with* संग *m*- संगति *f*- समागम *m*- सहवास *m*- साहचर्य करणें *n. g. of o.* Consort'ed *a.* Con'sort-ship *n.* In consort संगतीनें, सहवासानें. २ एकाच रागानें तालानें.

Conspectus (kon-spek'tus) [L.] *n. a synopsis, epitome* टांचण *n*, मसुदा *m*, सारांश *n*, सार *n.* Conspectū'ity *n*, (Shakes.) पाहणें *n*, दर्शन *n.* २ नेत्र *n*, दृष्टि *f.*

Conspicuous (kon-spik'ū-us) [L. *con* & *spicere*, *specere*, to look. ] *a. open to the view, plainly visible, easy to be seen* ठळक, पाहण्यांत सहज यायाजोगा, &c., सहजगोचर, सुदृश्य, सुदर्शनीय, सहजदृश्य, सुव्यक्त, उघड; as, "C. by her veil and hood, signifing the Cross, the abbess stood." २ *obvious to the mental eye, prominent, eminent* प्रसिद्ध, प्रसिद्धीचा, महशूर; as, "A C. excellence or fault." "A man who holds a C. place in the political, ecclesiastical, and literary history of England." Conspicū'ity, Conspic'uousness *n.* सुदृश्यता *f*, सहजदृश्यता *f*, सुव्यक्तता *f.* २ कीर्ति *f*, प्रख्याति *f*, प्रसिद्धी *f*, प्रसिद्धीपणा *m.* Conspic'uously *adv.* पाहण्यांत सहज यायाजोगेपणानें, उघडपणें, सुव्यक्त, ढळकपणानें.

Conspire (kon-spīr') [Fr. *conspirer*.- L. *con* together & *spirare*, to breathe. ] *v. i. to plot or scheme together* (दुष्ट कृत्य करण्याकरितां) मसलत *f*- कट *m.* करणें; as, "They C.d against Joseph to slain him." २ *to concur to one end* कट-जूट करणें, एकोपा- संगनमत करणें; as, "The press, the pulpit and the stage C. to censure and expose our age." C. *v. t.* जमणें, व्यूह रचणें; as, "Angry clouds C. your overthrow." Conspir'acy *n.* गुप्त मसलत *f*, संगनमत *n*, कट *m*, एक

कट *m*, कूट *n*. २ संप *m*, एकोपा *m*. Conspir'ant *a.* Conspirā'tion *n.* (R.) संगनमत *n.* Conspir'ator *n.* कटांत-कूटांत असणारा, कटवाला. Conspir'atress *n. fem.* Conspiratō'rial *a.* Conspi'er *n.* (*Shakes.*) संगनमत्या *m*, कटांत सामील होणारा *m*, साथीदार *m.* Conspir'ingly *adv.*

Conspissate (kon-spis'āt) [L. *conspissare*, to make thick.] *v. t.* (R.) *inspissate* दाट-घट्ट करणें, अळवणें, दाटविणें, आटविणें. Conspiss'ateness *n.* (R.) आटणी *f*, आटवणें *n.*

Constable (kun'sta-bl) [L. *comes stabuli*, *lit.* count of the stable; the title of a dignitary of the Roman Empire and afterwards in use among the Franks.] *n.* युरोपमधील पूर्वीच्या राज्यकारभारांतील एक मोठा अधिकारी *m*, सैन्याधिकारी *m*. २ पोलीसखात्यांतील एक अधिकारी *m*- शिपाई *m*-कानिस्टेबल *m.* Con'stableship *n.* कान्स्टेबलचा हुद्दा *m*-काम *n.* Con'stablewick *n.* कान्स्टेबलची हद्द *f.* Con'stablery *n.* Constab'ulary *n.* सर्व शिपाई लोक *m. pl.* *C.a.* कान्स्टेबलसंबंधीं. To overrun or outrun the constable (*colloq.*) कर्जबाजारी बनणें. २ उत्पन्नापेक्षां जास्त खर्च-उधळपट्टी करणें.

Constant (kon'stant) [L. *con* & *stare*. sk. स्था, to stand.] *a. persistent*, *fixed*, *steady* अचल, स्थायी, स्थिरात्मा, स्थिरचित्त, निश्चल, अचंचल, अव्यभिचारी, अविकारी. २ *unchangeable* नित्य, निरंतर, सतत, दृढ, शाश्वत. ३ *math.* न बदलणारें, स्थिर. C. *n.* नित्यवस्तु *f.* २ *math.* स्थिरपद *n*, अविकारिपद *n.* Con'stancy *n.* स्थिरता *f*, दृढता *f*, स्थैर्य *n*, अचलपणा *m*, सततपणा *m*, नित्यता *f*, सातत्य *n*, नैरंतर्य *n*, सततभाव *m*. २ स्थिरता *f*, धर *m*, स्थैर्य *n*, स्थिति *f. pop.* स्थित *f.* ३ दृढप्राप्ति *f*, अचंचलता *f*, अनिश्चलता *f*, अविकारिता *f.* Con'stantly *adv.* (v. A. I.) नित्य, नेहमीं, नेमानें, नित्यशः, नित्य उठून (loosely), रोज उठून, सतत, सदोदित, येऊन जाऊन, येरेयेरां, रात्रंदिवस, अहोरात्र, निशिदिनीं. २ स्थिरतेनें, स्थिरचित्तानें.

Constellate (kon'stel-lāt or kon-stel'lāt) [L.con, (*cum*) together; *stellat-us* *p. p.* of *stellare*, to set with stars, from *stella*, a star.] *v. t.* (R.) तेजाचें एकीकरण करणें. २ ताऱ्यांनीं सुशोभित करणें. C. *v. i.* (R.) तेजाचें एकीकरण होणें. Constellā'tion *n. cluster of stars* नक्षत्रसमूह *m*, नक्षत्रांचा पुंज *m*, नक्षत्रगण *m*.२ ग्रह *m*, नशीब *n*, प्रारब्ध *n*. ३ कोणत्या तरी एका विषयांत कर्लेत प्रसिद्ध अशा पुरुषांचा मेळ *m*-संघ *m.* Constel'latory *a.*

Consternate (kon'-ster-nāt) [L. *con*, wholly & *sternere*, to spread out, to throw down.] *v. t.* पांचांवर धारण बसवणें. Consternā'tion *n.* त्रेधा *f*, तिरपीट *f*, गात्रभंग *m*, चळकांप *m*, पांचांवर धारण *f* (*v.* बस), लटपट *f*, थरकांप *f*, गाळण *f*, व्याकुलता *f*, घाबरणें *n*, संत्रास *m*. २ सभयाश्चर्य *n*, सभीति *f*, विस्मय *m.*

Constipate (kon'stip-āt) [L. *con*, together & *stipare*, to crowd together.] *v. t. med. to make costive* कोठा *m.* बंद करणें *g. of o.*, बद्धकोष्ठ करणें, मलावरोध *m*, &c. करणें, खडा धरणें. २ बंद करणें, कोंडणें. ३ (*obs.*) घनघट्ट करणें, चेपटणें, दाबून लहान करणें. Constipated *p.* (v. V.) बद्धकोष्ठ, &c. Constipā'tion *n. med.* सांखळा *m*, बद्धकोष्ठ *n*, मलावरोध *m*, मलावष्टंभ *m*, शौचास साफ न होणें *n*. २ घन-घट्ट करणें-होणें *n.*

Constitute (kon'sti-tūt) [L. *con*, together & *statuere*, to make to stand, to set up, denom. vb. from *status*, a position.] *v. t. to establish*, *to enact* स्थापणें, ठरविणें, रचणें, (नियम) करणें-बांधणें; as, "Laws Constituted by lawful authority." २ *to compose* रचणें, (चें) अंगभूत-अवयवभूत-अंशभूत असणें, बनवणें, बनावणें; as, "Truth and reason C. that intellectual gold that defies destruction." ३ *to nominate*, *to elect* नेमणें, योजणें, नेमणूक *f*- योजना *f*- योजणूक *f*- &c. करणें *g. of o.*, नियुक्त करणें, निवडणें. C. *n.* (*obs.*) स्थापित नियम *m*, ठरविलेला कायदा *m.* Constit'uency *n. a body of constituents* नियोजकसमूह *m*, नेमणारे *m. pl.*, योजणारे लोक *m. pl.* Constit'uent *a. elemental*, *essential* कारणभूत, बीजभूत, हेतुभूत, मूलरूप, मूलात्मक, अवयवभूत, अंशभूत, अंगभूत; as, "Body, soul and reason are the three parts necessarily C. of a man". २ नियोजक. C. *n.* (v.A.) *essential part* कारणभूत पदार्थ *m*- विषय *m*, &c., अवयवभूत- अंशभूत-अंगभूत पदार्थ *m*- विषय *m.* २ घटकावयव *m*. ३ मुखत्यार निवडण्याच्या किंवा नेमण्याच्या कामांतील सहकारी *m*, प्रतिनिधि नेमणारा. ४ *law* मुखत्यार निवडणारा *m.* Constitu-'tion *n.* स्थापणें *n*, ठरवणें *n*, निवडणें *n*. २ स्थापना *f.* रचना *f*, घटना *f.* ३ *structure*, *conformation*, *natural condition* अवस्था *f*, बांधा *m*, ठेवण *f*, काठी *f*; "A robust C." ४ *temperament* स्वभाव *m*, तबियत *f.* ५ *form of government* राज्यव्यवस्थास्वरूप *n*, राज्यनीतिस्वरूप *n*, राज्यव्यवस्था *f*, राज्यरीति *f*, राज्यपद्धति *f*, राज्यप्रवृत्तिनियम *m. pl.* ६ *authoritative ordinance* अधिकारानें केलेला कायदा *m*- नियम *m*- ठराव *m.* Con'stitū'tional *a.* जातीचा, स्वाभाविक *pop.* स्वभाविक, स्वभावसिद्ध, नैसर्गिक, निसर्गज, स्वभावज, प्रकृत्यनुरूप. २ राज्यव्यवस्थेसंबंधीं. ३ *legal* कायदेशीर, राज्यव्यवस्थानुरूप, राज्यव्यवस्थानुसार, राज्यनियमानुसार, नियमबद्ध. ४ प्रकृतीचा, तब्येतीचा, अंगस्वभावाचा. C. *n.* शरीरप्रकृतीकरितां घेतलेला व्यायाम *m.* Constitū'tionalise *v. t.* राज्यनियमानुसार करणें-बनवणें. Constitū'tionalism *n.* राज्यनियमानुसारित्व *n*, राज्यनियमतत्व *n*,–मत *n*,–अधिकार *m*, राज्यनियमपद्धति *f*, राज्यनियमानुसारित्व *n*, शासनाधिकृतत्व *n.* Con'stitu'tionalist, Constitu'tionist *n.* Constitu'tional'ity *n.* प्रकृतिस्वभाव *m.* Con'stitu'tionally (*adv.*) (v. A. I.) प्रकृतीनें, स्वभावानें,

जातीनें, स्वभावतः, निसर्गतः, प्रकृतितः, प्रकृत्या, जात्या. २ राज्यनियमानुसार, राज्यव्यवस्थानुरूप, &c. Con'stitu'tive *a.* नियोजक, कारणभूत. २ स्थापणारें, उत्पन्न करणारें. Mental constitution मनोरचना *f.*

Constrain (kon-strān') [L. *con*, together & *stringere*, to draw tight. ] *v. t. to confine, to bind* जखडणें, आवळणें, आवरणें, निग्रह *m.* करणें *g. of o.*, बंद-बद्ध करणें. २ *to compress* दाबून टाकणें, दाबणें, संकोचणें. ३ जोरानें अटकावणें. ४ *to force, to oblige* बळ *n-* बलात्कार *m.* करणें-चालवणें with वर *of o.*, गळ *m.* घालणें, सक्ति करणें; as, "I was C.d to appeal unto Caesar." ५ *to produce so as to give an unnatural effect* अवदंष्ट स्वर काढणें; as, "A C.d voice." Constrain'able *a.* Constrained' *a.* Constrained'ly *adv.* बळानें, बलात्कारानें, जबरदस्तीनें, जबरीस्तव. Constraint' *n.* (v. V. I. )-*state.* जातबलात्कारता *f,* निग्रह *m,* निर्बंध *m,* निरोध *m,* दाब *m,* आळा *m,* आळाबांधा *m.* ३ जोर *m,* बळजोरी *f,* जबरी *f,* बलात्कार *m.* [By C. जबरीनें, जबरीस्तव, जबरीमुळें, बलात्कारामुळें, जबरदस्तीनें. ] Constrained motion अवरुद्धगति.

Constrict (kon-strikt') [L. *constringere, constrictum.* ] *v. t. to draw together* संकोचणें, संकोचन करणें, आंग चोरणें-मारणें, दबणें. Constric'ted *a.* संकुचित, आंग चोरलेला-मारलेला, दबलेला. Constric'tion *n.* संकोचन करणें-होणें *n,* आकुंचन *n,* संकोच *m.* Constrict'ive *a.* Constric'tor *n.* एके ठिकाणीं आंवळणारा, संकोच करणारा, आंग मारणारा-चोरणारा. २ *anat.* संकोचनस्नायु *m,* संकोचक. ३ *zool.* अजगर *m.*

Constringe ( kon-strinj' ) [ L. *con*, together & *stringere*, to draw tight. ] *v. t.* See Constrict. Constrin'gent *a.*

Construct (kon-strukt') [ L. *con*, together & *struo*, to set in order. ] *v. t. to build, to form* रचणें, बांधणें, उभारणें, उठवणें; as, "To C. an edifice" इमारत बांधणें. २ *to devise, to invent* (युक्ति) योजणें, रचणें, व्यवस्थित करणें; as, "To C. a theory." C. *a.* रचलेला, बांधलेला. Construct'able, Construct'ible *a.* रचायास-बांधायास-व्यवस्था करायास योग्य-सारखें. Construc'ter-or *n.* Construc'tion *n.* उभारणें *n,* रचणें *n.* २ बांधणी *f,* रचना *f,* योजना *f.* ३ *gram.* वाक्यरचना *f,* पदयोजना *f,* अन्वय *m,* पदान्वय *m,* प्रयोग *m,* वाक्यपद्धति *f.* ४ अर्थ *m,* मायना *m,* अभिप्राय *m,* आशय *m*; as, "Do not put a bad C. upon his words." Construc'tional *a.* Construc'tive *a.* रचनासमर्थ, निर्माणकुशल; as, "C. genius." २ रचण्याजोगा. ३ अनुमानसिद्ध, अर्थसिद्ध, आर्थिक, घटनात्मक, विधायक (S), आनुमानिक, संदर्भागत, आशयसिद्ध. Construct'ively *adv.* Construct'iveness *n.* रचनासामर्थ्य *n,* रचनाशक्ति *f.* Construct'ure *n.* ( *obs.* ) इमारत *f,* मकाण *n,* रचना *f.* २-*state.* रचणें *n,* बांधणें *n.* Constructive crimes *law.* अप्रत्यक्ष रीतीनें ठरणारा गुन्हा *m.* Constructive criticism घटनात्मक-विधायक टीका *f.* (as opposed to destructive criticism विध्वंसक टीका *f.* ) Constructive notice अप्रत्यक्ष पारंपरिक सूचना *f-* नोटीस *f.* [ अच्या अडत्याला बनें जर नोटिस दिली तर ती अडत्याला ( actual notice ) होते व अला (constructive notice ) होते. ]

Construe (kon'strōō) [ L. *construere*, to pile together. L. *con* (*cum*,) together & *struere*, to pile. ] *v. t. gram.* अन्वय-अर्थ करणें-लावणें-जुळणें *g. of o.*, लावणें, अन्वययोजना करणें. २ आशय *m-* अभिप्राय *m-*सांगणें. ३ अनुमान *n-* तर्क *m.* करणें, ताडणें. C. *v. i.* व्याकरणमीमांसा होऊं शकणें, (चा) अन्वय लागणें.

Constuprate ( kon'stū-prāt ) [ L. *con* & *stuprare*, to ravish, *stuprum*, rape. ] *v. t.* ( *obs.*) *to violate the person of, to ravish* धर्षण *n-* बलात्कार *m-* जुलूम *m.* करणें. Constuprā'tion *n.*

Consubstantial ( kon'-sub-stan'-shal ) [ L. *con* & Substantial.] *a. of the same substance* एकाच तत्वाचा, समानतत्व, एकतत्व, समानद्रव्यक, एकद्रव्यक, एकाच तत्वाचा-द्रव्याचा; as, "Jesus Christ........ coeternal and C. with the Father and Holy Ghost." Foxe. Consubstan'tialism *n. the doctrine of Consubstantiation i. e. the doctrine of Luther that in the Sacrament of the Supper, the Body and Blood of Christ coexist in union with the substance of the bread and wine.* This is opposed to transubstantiation एकतत्वतामत *n,* समानतत्वतामत *n,* ख्रिस्ती धर्मशास्त्रांत पुत्र आणि पिता हे एकाच तत्वाचे आहेत असें काथोलिक एक्क्लेसियेचें मत *n.* Con'substan'tialist *n.* तत्वतावादी. Consubstan'tial'ity *n.* ( v. A. ) एकतत्वता *f,* समानतत्वता *f.* Consubstan'tially *adv.* Consubstan'tiate *v. t.* एकतत्व-एकद्रव्य-एकरूप करणें, सजातीय करणें. C. *v. i.* एकतत्व-रूप होणें, &c. २ एकतत्वता मताचा अनुयायी असणें. C. *a.* समद्रव्यक, एकतत्व झालेला. Consubstantia'tion *n.* तत्वैक्य *n,* तत्वाभेद *m.* २ *theol. the actual substantial presence of the body of Christ with the bread and wine of the Sacrament of the Lord's supper* एकतत्वता *f.*

Consuetude ( kon'swē-tūd ) [ L. *consuetudo.* See Custom. ] *n.* (R.) *custom, habit, usage* चाल *f,* रीति *f,* लोकव्यवहार *m,* रिवाज *m,* रूढि *f,* लोकाचार *m.* २ परिचय *m,* घसटणी *f.* Consuetu'dinal, Con'suetudinary *a.* चालीरीतीचा. C. *n.* पूर्वापार चालत आलेली चाल *f-* रूढी *f-* कायदा *m.* २ *pl.* नित्याचा भजनसंग्रह.

Consul ( kon'sul ) [ Fr.- L. *consulere*, to deliberate.] *n. one of the two chief magistrates of the Roman Republic* रोमन प्रजासत्ताक राज्यांतील दोघां मुख्य माजिस्ट्रेटपैकीं एक, कान्सल. २ व्यापाराच्या संबंधाचे

कोणत्याही राज्यांतून परराष्ट्रांत राहण्यास पाठविलेला वकील *m*, व्यापारी वकील *m*; as, "With kings and C.s of the earth." Job III. 14. ३ फ्रान्समध्यें १७९९ पासून १८०४ पर्यंत मुख्य तीन माजिस्ट्रेट-कान्सलपैकीं एक. Con'sulage *n.* व्यापारी लोक आपल्या मालाचे संरक्षणार्थ कान्सलला जी जकात किंवा जो कर देतात तो, कान्सलपट्टी *f.* Con'sular *a.* प्रतिनिधीसंबंधीं, कान्सला-संबंधीं. C. *n.* कान्सलच्या दर्जाचा मनुष्य *m.* Con'sulate *n.* प्रतिनिधीचा हुद्दा *m*- पदवी *f*- अधिकार *m.* २ प्रतिनिधीचें राहण्याचें ठिकाण *n.* ३ कान्सलच्या प्रतिनिधित्वाचें क्षेत्र *n.* Con'sulship *n.* कान्सलची कारकीर्द *f.* २ प्रतिनिधित्व *n.*

Consult (kon-sult') [L. *consulere*, to consider well, to deliberate.] *v. t. to ask advice of, to refer to* सल्ला *m*- मसलत *f.* पुसणें-विचारणें, विचार-सल्ला-मसलत-अभिप्राय-मत घेणें. *g. of o.*, as, "To C. a physician, To C. a dictionary." २ *to have regard to, to consider* पाहणें, विचार करणें *g. of o.*; लक्ष *n*- दृष्टि *f*- नजर *f*- &c. देणें-ठेवणें with कडे or वर *of o*; as, "We are to C. the necessities of life rather than matters of delight." ३ (*obs.*) *to deliberate upon* मसलत *f.* करणें. ४ (*obs.*) (कोणा एखाद्याचा नफा व्हावा म्हणून) उपाय-तजवीज करणें. C. *v.i. to take counsel, to confer* मसलत-विचार करणें; as, "Let us C. upon tomorrow's business." C. *n.* (*obs.*) विचारणें *n*, पुसणें *n*, अभिप्राय घेणें *n.* २ (*obs.*) मसलत *f*, विचार *m.* ३ (*obs.*) ठराव *m*, निश्चय *m*, निर्णय *m.* ४ (*obs.*) विचार करणारी सभा-मंडळी *f*- डाक्तर लोकांची सभा *f.* Consultā'tion *n.* सल्ला *f*, मसलत *f*, विचार *m*, अभिप्राय *m.* २ डाक्तरांची किंवा वकिलांची सभा *f.* Consult'ative *a.* सल्ला-मसलती संबंधीं. २ सल्ला घेण्याजोगा, सल्ला-विचार देण्याचा हक्क-अधिकार असलेला. Consultee' *n.* मसलत देणारा. Consult'er *n.* मत घेणारा-विचारणारा. Consult'ing *a.* सल्ला-मसलत देणारे (वकील किंवा इंजिनियर). Consult'ive *a.* सल्लामसलती-संबंधीं.

Consume (kom-sūm') [L. *con*, wholly & *sumere*, to take; *sub* & *emere*, to buy.] *v. t. to destroy, as by decomposition, dissipation, waste or fire* निःशेष-क्षय करणें, फस्त करणें, खाक करणें, जाळून टाकणें, स्वाहा *adv.* करणें, गिळणें, ग्रासणें, (चा) खग्रास करणें *g. of o*; as, "Fire has consumed the whole edifice." २ *to expend, to use wholly* खर्चणें, सारणें, फन्ना *m*-फडशा *m.* करणें-उडवणें *g. of o.* ३ *to annihilate, to ruin* लय *m*-नाश *m*-सत्यानाश *m*-क्षय *m.* &c. करणें *g. of o.*, खाक करणें. ४ *to eat up* खाऊन फस्त करणें; as, "All the provisions were consumed," "Lay up for yourselves treasures in heaven where neither moth nor rust doth consume." C. *v. i. to waste away slowly* सावकाश नाश-ऱ्हास पावणें, क्षय पावणें. Consu'mable *a.*

Consumed' *a.* (v. V. T. I.) खाऊन टाकलेला, खाक केलेला. २ खर्च केलेला, खलास-समाप्त-फडशा केलेला-झालेला, निश्शेष केलेला. ३ नाश केलेला. Consu'mer *n.* (as opposed to producer) नाशक *m*, विध्वंसक *m.* २ गिऱ्हाईक *m*, ग्राहक *m. pol. eco.* (माल) वापरणारा. Consu'ming *n.* नाश *m*, क्षय *m.* Productive consumer *n.* उत्पादक खप-व्यय करणारा (गिऱ्हाईक *m*). Unproductive consumer अनुत्पादक खप-व्यय करणारा.

Consummate (kon'sum-āt or kon-sum'-māt) [L. *con summare, consummatus*, to sum up, to accomplish, from *con* & *summa*, sum.] *a. complete, perfect* पुरा, पूर्ण, परिपूर्ण, पक्का, अट्टल (in an ill sense); as, "A C. rogue." २ सर्वोत्कृष्ट; as, "A man of perfect and C. virtue." "The little hand held the post with C. tenacity." C. *v. t. to complete, to finish, to perfect* पूर्ण-पुरता-पुरा-पक्का &c. करणें, पूर्णता *f*- संसिद्धि *f*- &c. करणें *g. of o.*, as, "To C. this business happily." २ अत्युच्च दशेला नेऊन पोंचविणें. ३ (संभोग करून) कायदेशीरपणानें लग्न पुरें-विवाहपूर्ति करणें. Con'summa'ted *a.* (v. V.) पूर्ण केलेला, &c. Consum'mately *adv.* परिपूर्णतेनें, पुरतेपणानें. Consummā'tion *n.* (v. V.)- *act.* पूर्ण करणें *n*, पूरण *n.*- *state.* पूर्णता *f*, पूर्ति *f*, संसिद्धि *f*, संपूर्णता *f*; as, "C. of marriage." विवाहपूर्ति *f.* ३ लय *m*, अंत *m*, शेवट *m.* ४ रतिक्रिया *f*; (कीं जीमुळें विवाहसंबंध कायदेशीरपणानें लोकमान्य होतो.)

Consumption (kon-sump'-shun) [L. *con*, wholly & *sumere, sumptus*, to take.] *n. decay, destruction* नाश *m*, क्षय *m*, ऱ्हास *m*, झीज, *m*, फन्ना *m.* २ *pol. eco. diminution, waste, loss* खप *m*, तोटा *m*, खर्च *m*, व्यय *m*, क्षय *m.* [Productive C. उत्पादक खप *m.* Unproductive C. अनुत्पादक व्यय-खप *m.*- *state.* व्यय *m*, फडशा *m*, फन्ना *m.*] ३ *med.* क्षयरोग *m*, कफक्षय (?) *m*, यक्ष्मा (?) *m*, यक्ष्मरोग (?) *m*, रोगराज (?) *m.* ४ झड, झडी, सडी, क्षरण, किरी, झिजणी, झिरकणी, झुरणी, झुरवशी, सुकवशी. Consump'tive *a.* नाश-क्षय करणारा, झड्या, क्षयी, क्षयरोगी, क्षयरोगार्त. २ क्षयभावनेचा, आसन्नक्षयी, क्षयोन्मुख. C. *n.* क्षयी मनुष्य. *m.* Consump'tively *adv.* Consump'tiveness *n.* Consumptiv'ity *n.*

*N.B.*—कफक्षय, राजयक्ष्मा, यक्ष्मा, यक्ष्मरोग, रोगराजः These terms have now a tendency to be restricted to phthisis or Tuberculosis of the Lungs.

Contabescent (kon-tab-es'ent) [L. *contabescere, contabescens*, to waste away.] *a.* हळूहळू क्षीण होत जाणारें, झिजणीस-झुरणीस लागलेला. Contabes'cence *n.* झुरणी *f*, किरी *f.*

Contabulate (kon-tab'ū-lat) [L. *con*, with & *tabula*, a board.] *v. t.* तक्तपोशी करणें, पाटणी करणें, पाटणें. Contabulā'tion *n.* पाटणी *f*, तक्तपोशी *f*, पटई *f.*

Contact (kon'takt) [L. *con*, wholly & *tangere, tactum*, to touch.] *n. touch, close union* संग *m*, स्पर्श *m*,

संस्पर्श *m*, संयोग *m*, संघट्टन *n*, संघट्टना *f*, सक्ति (S.) *f*, संसक्ति (S.) *f*. [ASCERTAINMENT BY CONTACT स्पर्शप्रत्यक्ष *m*. IN C. लगत. MEDIATE C. OR CONNECTON अंतरास्पर्श *m*, परंपरास्पर्श *m*, स्पर्श *m*, सांतर परंपरासंबंध *m*. TO COME IN C. संघट्टणें, संघटन *n*. होणें *in. con.* OR *g. of s. recip.* ] २ *math.* स्पर्श. ३ *mining* स्पर्शक्षेत्र *n*. Contact'ual *a*. स्पर्शा-संयोगा-संबंधीं. [To be in contact ( with ) लगत-लागून-चिकटून असणें. POINT OF C. स्पर्शबिंदु *m*. LINE OF C. स्पर्शरेषा *f*. ]

*N. B.*—Contact संग, Touch स्पर्श.

Contagion ( kon-tā'jun) [L. *con*, on all sides, wholly & *tangere*, to touch.] *n. med. an infection, communication by contact* स्पर्शसंचार *m*, स्पर्श *m* ( loosely ). स्पर्शवाहकता *f*, स्पर्शानुप्राप्ति *f*. २ मनास-अंतःकरणास पछाडणारी गोष्ट *f*. ३ *fig.* दुष्टसंगति *f*. ४ रोगसंचारक विष *n*; as, "The C. of enthusiasm or of example." ५ स्पर्शसंचारी बाधा *f*. ६ (*obs.*) विष *n*. Contagionist *n*. स्पर्शजन्यतावादी, रोग स्पर्शजन्य आहेत असें मानणारा *m*. Conta'gious *a*. स्पर्शानें-संसर्गानें लागणारा-लागाया-जोगा, स्पर्शसंचारी, स्पर्शसंक्रमी, सांसर्गिक, सांक्रामिक, स्पर्शजन्य. Conta'giously *adv.* Conta'giousness *n*. (v. A.) स्पर्शजन्यता *f*, स्पर्शसंचारित्व *n*, स्पर्शसंक्रमिता *f*, स्पर्शवाहकता *f*. Contā'gium *n*. रोगसंचारकवस्तु *f*.

*N. B.*—Contagious स्पर्शसंचारी, स्पर्शचर; Infectious गुप्तसंचारी, गुप्तचर. Contagion रोगी शरिराशीं प्रत्यक्ष स्पर्श घडल्यामुळें दुसऱ्यास रोग होणें, स्पर्शजन्यता, स्पर्शसंचारिता, स्पर्शवाहकता. Infection रोगी शरिरांतील मल, मूत्र, घाम, उच्छ्वास वगैरे उत्सर्गांचे योगानें दुसऱ्याला रोग होणें. See the word Infection.

Contain ( kon-tān' ) [Fr. *contenir*, from L. *continere*, *contenere*, to hold. ] *v. t. to hold, to comprise, to include* धरणें, ठेवणें, सांठवणें, सांठवून-मावून घेणें, आंत समावेश *m*- &c. होणें-असणें *g. of o.*, as, "When that this body did C. a spirit," "What thy stores C. bring forth." २ *to be able to hold* समावेश करूं शकणें; as, "This vessel contains four seers; the relation of the contained and the containing." ३ *to restrain, to confine* दावांत-मर्यादेंत ठेवणें- राखणें ( used refl. ); as, "Fear not, my lord: we can C. ourselves." C. *v. i. to live in continence, to restrain desire* इंद्रियनिग्रह *m*- कामजय *m*. &c. करणें, मन ताब्यांत ठेवणें; as, "If they cannot C. let them marry." Contain'able *a*. मावाया-रहाया-समवाया जोगा-जोगता. Contained' *p*. ( v. V. T. I. ) धरलेला, समावेश झालेला, समाविष्ट, अंतर्भूत, गर्भित, धृत, अंतःपाती ( in comp. ). [ TO BE C. मावणें, समावणें, माणें, सांठणें, राहणें, जाणें.] Contain'ant, Contain'er *n*. भरणारा, मावून घेणारा, धारक, धारी. Contain'ing *n*. See Contain'ant.

Contaminate ( kon-tam'i-nāt ) [ L. *contaminare*, *contaminatus*, to bring into contact; from *con* & *tangere*, to touch. ] *v. t. to tarnish, to taint, to defile* मळवणें, मळकट-मळीण करणें, दोष लावणें, कलंकित करणें, दूषित करणें, बिघडवणें, अपवित्र-भ्रष्ट करणें, बाटवणें, ओंवळा करणें; as, "I shall not C. my fingers with bribes." C. *a*. दूषित, अपवित्र, भ्रष्ट, मलिन, कलंकित. Contam'inable *a*. Contaminā'tion *n*. मलिन &c. करणें *n*, कलंक *m*, भ्रष्टता *f*, लांछन *n*, डाग *m*, दूषण *n*. Contam'inative *a*. दूष्य.

Contemn (kon-tem') [ L. *con* & *temnere*, to despise.] *v. t. to reject with disdain, to despise, disesteem, slight* तिरस्कारणें, हेळणें, तिटकारणें, हेळसांडणें, अवगणणें, अपमानणें, अवमानणें, अनादरणें, तुच्छ-हलका-कःपदार्थ &c. मानणें-समजणें, तिटकारा *m*- तिरस्कार-हेटाळणी *f*-हेळसांड *f*- हेळसांडणी *f*- हेळा *f*-&c- करणें *g. of o.*; as "Thy pompous delicacies I C." In this general sense *To hold lightly* or *To reject scornfully*, but as better agreeing with the more expressive and emphatic words *To scout, To Flout, To Fleer*, &c. कसपटाप्रमाणें मोजणें-मानणें-लेखणें-गणणें, शेंटलणें or शेंटाळणें ( *vul.* ), झिडकावणें, झिडकारणें, हिडसणें or हिडसावणें, वारापाणी *n*- केरवारा *m* करून टाकणें *g. of o.*, उडवणें, हडबडावणें, हडहडावणें, हिडहिड *adv.* करणें, धिस *interj.* पिटावणें, हेडसावणें, लाथडणें or लाथाडणें, धुडकावणें, केंडणें, छिथु *f*- थुथु *f*- गाळण *f*- पायमल्ली *f*. &c. करणें *g. of o.* Contemned' *a*. ( v. V.) अवगणलेला, हेळसांडलेला, तुच्छ मानलेला, अवगणित, अनादृत, तुच्छीकृत, तिरस्कृत, अवज्ञात, अधिक्षिप्त, धिकृत, लघूकृत, निराकृत. Contem'ner *n*. ( v. V. ) तिरस्कारणारा, हेळणारा, अनादरकर्ता-कारी, तिरस्कर्ता, तिरस्कारी.

Contemper ( kon-tem'pėr ) [ L. *con* & *temperare*, to temper. ] *v. t.* ( *obs.* ) *to temper, to allay* मिसळून-मिसळ करून-भेसळून-भेसळ करून-नेमाचा-सुमाराचा-बेताचा -माफक -नेमस्त -नरम -नरमगरम -समधात -समगुण-यथास्थित-यथायोग्य करणें, सौम्य करणें, मिळवणें, एकांतएक मिसळणें. Contemperā'tion *n*. ( *obs.* ). Contem'perature *n*.

Contemplate ( kon'tem-plāt or kon-tem'-plāt ) [ L. *con* & *templum*, a space for observation marked out by the augur. ] *v. t. to meditate, to study* सावधान चिंतन करणें, ध्यान *n*- मनन *m*- चिंतन *n*- चिंतना *f*, &c.करणें *g. of o.*, ध्याणें; as, "To live at least to C. & admire, what I see excellent." २ *to regard or consider fixedly* लक्षिणें, ध्यान लावून-लक्ष लावून-टक लावून, &c. पाहणें. ३ *to have in view as contingent or probable, to purpose* ध्यानांत-लक्षांत-मनांत-धोरणांत-होऱ्यांत &c. असणें-धरणें, *in. con.*; as, "There remain some particulars to complete the information comtemplated by those resolutions."

C.v.i. *to muse, to meditate* ध्यान *n*- चिंतन *n*- मनन *n*. चिंतनिका करणें, ध्यानांत-चिंतनांत-&c. असणें. Contem'plative *a*. (v. V. I.) ध्यान लावून पहायाजोगा &c., विलोकनीय. २ ध्यान करायाजोगा, &c., ध्यातव्य, ध्येय, चिंत्य, चिंतनीय, मननीय, मंतव्य. Contemp'latist *n*. See Contemplator. Contem'plated *p*. (v.V.T. I.) ध्यान लावून पाहिलेला, &c., लक्षित. २ ध्यान केलेला, ध्यात, चिंतित. Contemplā'tion *n*. (v. V. T. I.)–*act*. ध्यान लावून पाहणें *n*, &c. २ ध्यान करणें *n*, ध्यान *n*, ध्यास *m*, निदिध्यास, *pop*. निजध्यास *m*, निदिध्यासन *n*, अनुध्यास *m*. अध्यास *m*. [esp. of the deity, or one's own soul ध्यान *n*, समाधान *n*, समाधि *m*. Absorbed in C. of the Deity or Atman, (v. N. 2.) ध्यानांत मग्न झालेला, ध्यानस्थ, समाहित, समाधिमग्न. Air or look of C. ध्यानमुद्रा *f*.] ३ मनन *n*, चिंतन *n*, मानसपूजा *f*. ४ *expectation* धोरण *n*. Contem'plate *a*. Contem'plator *n*. (v. V. T.) ध्यान लावणारा, ध्यानशील, मननशील, ध्यानी, चिंतनशील, ध्याता, ध्यानस्थ, अध्यासी. Contem'platively *adv*. Contem'plativeness *n*.

Contemporaneous (kon-tem'-pō-rā'ne-us) [L. *con*, together & *tempus*, time.] *a*. *living or being at the same time* एका काळचा, एके वेळचा, समकालीन, समकालिक, एककालिक, बरोबरचा. Contemporanē'ity *n*. समकालीनता *f*, समकालीनस्थिति *f*. Contem'pora'neously *adv*. दुसरी गोष्ट होत असतांना त्याच वेळीं. Contem'porā'neousness *n*. Contem'pora'riness *n*. एके कालीं असणें *n*, एककालिक अस्तित्व *n*-स्थिति *f*. Contem'porary *a*. समकालीन, समकालभव, तत्कालवर्ती. २ एकाच वयाचा. C. *n*. समकालभव पुरुष *m*, एके कालीं असणारा-राहणारा; as, "C. poet."

Contempt (kon-tempt') [See Contemn.] *n*. *scorn, disdain* (v. V.) तुच्छ करणें *n*, तिरस्कारणें *n*, नीच-अधम समजणें *n*, हेळणें *n*, अवमानणें *n*, अवगणणें *n*, हेटाळणी *f*, हेळसांड *f*, हेळसांडणी *f*, तिटकारा *m*, तिरस्कार *m*, अवहेलन *n*, अवज्ञा *f*, उपमर्द *m*, अपमान *m*, अवमानन *m*, अवगणन *n*, अवगणना *f*, तिरस्कृति *f*, तिरस्करण *n*, धिक्कार *m*, अधिक्षेप *m*. as, "better agreeing with *scouting, flouting* &c," पायमल्ली *f*. -*state*. अपमान *m*, अवमान *m*, अवगणना *f*, हेळसांड *f*, हेलना *f*, अवहेलना (*pop*. णा) *f*, हेटाळणी *f*, नाचक्की *f*, परिभव *m*, अपमानितत्व *n*, अवमानितत्व *n*, (the sentiment or passion) तिरस्कार *m*, तिटकारा, अवमति *f*, अनादरबुद्धि *f*, तुच्छभाव *m*, तिरस्कारभाव *m*. २ *the state of being despised* (R.), *disgrace, shame* अप्रतिष्ठा *f*, अपमान *m*, अपयश *n*, मानभंग *m*, बदनामी *f*. ३ *law*. कायदा न मानणें *n*, कायद्याची अवज्ञा करणें *n*. Contemp'tibil'ity, Contemp'tibleness *n*. (v. A.) तुच्छपणा *m*, हलकेपणा *m*, तिरस्कार्यता *f*, अवमाननीयता *f*, &c., अवमानार्हता *f*, अवगणनार्हता *f*, &c. Contemp'tible *a*. (v. V.) हेळसांड करायाजोगा, हेळण्याजोगा, तुच्छ, तिरस्कार्य, अवगणनीय, अवगणनार्ह, अवमान्य, अवमाननीय, अवज्ञेय, निर्भर्त्स्य, धिक्कार्य, गर्हणीय, गर्ह्य, अवमानार्ह. २ (*obs*.) तिरस्कार-मत्सर-अपमान भरलेला, उद्धट. ३ हलका, अधम, तुच्छ, निकृष्ट, नीच, क्षुद्र, तिरस्कारपात्र. Contemp'tuous *a*. तुच्छतादर्शक, अनादरकारी, तिरस्कारदर्शक, गुर्मी-मिजाज-ऐट–दिमाख दाखविणारा, ताठ्याचा, अवमानी, अवमंता, तिरस्कारकर्ता-अवमानदर्शक. २ अपमानाचा, तिरस्काराचा, धिक्काराचा, दिमाखाचा, अनादरयुक्त, तिरस्कारयुक्त, अवहेलनात्मक, निंदात्मक, तिरस्कारबोधक-सूचक. Contemp'tuosly (*adv*.) (v. A.) तुच्छ करून-मानून, अनादरानें, अपमानानें, तिरस्कारानें, &c., अनादर-अपमान-तिरस्कार-पूर्वक-पुरस्सर, नाक वर करून, नाक मुरडून, अव्हेरून, कवडीचा माल करून, हेळसांड करून, &c. Contemp'tuousness *n*.

*N. B.*—Contempt is one of the strong expressions which the English language affords. Contemptible तुच्छतापात्र, Contemptuous तुच्छतादर्शक.

Contend (kon-tend') [O. Fr. *contendre, con* & *tendere*, Sk. तन्, to stretch.] *v.i. to contest, to dispute, to fight* (with *against, for, with, about*) लढणें, झगडणें, झुंजणें, भांडणें, तंडणें, लढाई-वाद-कज्जा-भांडण करणें; as, "For never two such kingdoms C. without much fall of blood." २ *to struggle or exert one's self to obtain or retain possession of*, *or to defend* प्राप्तीसाठीं किंवा संरक्षणार्थ झटणें, मनापासून प्रयत्न करणें; as, "You sit above, and see vain men below C. for what you only can bestow." ३ *to strive in debate, to argue* समर्थन करणें, वादविवाद करणें, वाग्युद्ध करणें, कोटी करणें; as, "The question which our author would C. for." C. *v. t.* (R.) *to contest* एखाद्या वस्तूसाठीं ईर्षेनें झगडणें-धडपडणें; as, "Carthage shall C. the world with Rome." Contend'ent, Contend'er *n*. प्रतिस्पर्धी, प्रतिरोधी, प्रतिपक्षी; (loosely), कटकट्या, कज्जेखोर, भांडखोर, खळवादी, तकरारी, तकरारखोर, विवादी. Contend'ing *p. a*. विरुद्ध असणारा, विरोधी, कलहशील. C. *n*. See Contention.

*N.B.*—The transitive use of the word *contend* is not strictly legitimate. The phrase is elliptical, *for* being understood after contend, but it is admissible in poetry.

Contention *n*. (v.V.)- *act*. वाग्युद्ध-वादविवाद करणें, प्रयत्न, *m*, धडपड *f*, भांडण *n*, झटापटी or झटापट *f*, झोंबी *f*, झुंज *f*, तकरार *f*, संघर्षण *n*, संघर्ष *m*, घर्षण *n*, द्वंद्व *pop. n*, कलि *m*. *pop*. कळ *f*, कलह *m*, खडबड *f*, वादविवाद *m*, वाका. २ ईर्ष्या *f*, स्पर्धा *f*; as, "An end worthy of our utmost contention to obtain." Conten'tious *a*. भांडखोर *m*. लढाईखोर, तकरारी. २ लढाई-तकरारी-कलहासंबंधीं. ३ (*law*.) विवादी, तकरारीचा, तकरारी. Conten'tiously *adv*. Conten'tiousness *n*. Point of contention वादाचा मुद्दा.

Contenement (kon-ten'ē-ment) [L. *con* & Tenement.] *n. law.* अंगभूत-लगतचा-सोबतचा आनुषंगिक पदार्थ *m.*

Content (kon'tent or kon-tent') [Fr. *content*, from L. *continere*, *contentus*, to hold together.] *n.* usually in the *pl.* Contents आंत असलेली गोष्ट *f*, समाविष्ट वस्तु *f*; as, "The contents of a cask, a book, a room" भरलेला जिन्नस *m*, आंतला जिन्नस *m*, भरगत *f. n*, भरीत *n*, भरवण *n*, समाविष्ट-अंतर्गत-अंतस्थवस्तु *f*, &c. [CONTENTS RECEIVED भरपाई.] २ (वस्तु) धारणशक्ति *f.* ३ *geom.* क्षेत्रफळ *n*; as, "Solid Contents." Superficial Contents पृष्ठफल *n*. Table of contents विषयानुक्रमणिका *f*, सूचीपत्र *n*.

Content (kon-tent') *a. satisfied, at rest* समाधानी, खुष, संतुष्ट, संतोषी, तृप्त, प्रीतात्मा, खुषवक्त, प्राप्तसमाधान, जातसमाधान; as, "Having food and raiment, let us be therewith C." [EASILY C. अल्पसंतोषी, अल्पसंतुष्ट.] C. *v. t. to quiet, to appease, to gratify* समाधान *n*- संतोष *m*- तृप्ति *f*- इच्छातृप्ति *f.* करणें *g. of o.*, संतुष्ट-तृप्त-संतुष्ट &c. करणें; as, "Pilate willing to C. the people, released Barabbas unto them." २ *to pay, to stop complaint or opposition* दुःख किंवा अडथळा दूर करणें, (ची) आशा पुरी करणें; as, "Come the next Sabbath, and I will C. you." C. *n. contentment, satisfaction* समाधान *n*, संतोष *m*,शांति *f*, सुख *n*, तृप्ति *f*, स्वस्थता *f*; as "Such is the fulness of my heart's content." २ (*obs.*) *acquiescence without examination* तपास न करितां दिलेली संमति-अनुमति *f*; as, "The style is excellent; The sense they humbly take upon content." ३ *that which satisfies or contents* संतोषाचें कारण *n*; as, "So will I in England work your grace's full content". Shakes. ४ (Eng. House of Lords) *a technicality of the House of Lords i. e. an expression of assent to a will or motion* मान्यता *f*, संमति *f.* २ अनुकूल मत देणारा. Contentā'tion *n.* (*obs.*) Content'ed *a.* तृप्त, संतुष्ट, संतोषी, शांत, सुखी. Content'edly *adv.* समाधानानें, चित्तसमाधानानें,समाधानपूर्वक. Content'edness, Content'ment *n.* संतोष *m*, तृप्ति *f*, चित्तसमाधान *n*. २ संतोष देणें *n*. Content'less *a.*

Conterminous (kon-tėr'mi-nus) [L. *con*. together & *terminus*, a boundary.] *a.* लगत्याचा, शिंवधड्याचा, एकशिवेचा, एकसीम, समीपवर्ती, निकटवर्ती, शिवेलगतचा, शिवेवरचा. Also Conter'minable *a.* Conter'minal *a.* Conter'minant *a.* Conter'minate *a.*

Contest (kon-test') [Fr. *contester*.–L. *contestari*, to call to witness, from *testis*, a witness.] *v, t. to controvert, to oppose, to dispute* (वर-संबंधीं) तकरार करणें, तंटा *m*-वादविवाद *m.* करणें; as, "People Contested not what was done." २ *to struggle to defend* (च्या) संरक्षणार्थ धडपडणें, झुंजणें, टक्कर घेणें; as, "The troop contested every inch of ground." ३ *law. to defend as a suit, to resist as a claim, by course of law* कायद्यानें लढणें-भांडणें. C. *v. i.* (followed by *with*) *to emulate* चढाओढ *f*- बरोबरी *f*- स्पर्धा *f.* करणें. C. *n.* झगडा *m*, तकरार *f*, विवाद *m*, वाग्युद्ध *n*, भांडण *n.* [SUBJECT OF C. वादविषय *m.*] २ स्पर्धा *f*, ताणाताण *f.* Contes'table *a.* वादास योग्य, वाद करायाजोगा, वादाचा, तकरारीचा, विवादार्ह, विवादयोग्य, वादास्पद. Contest'ant *n.* Contestā'tion *n.* Contest'ed *a.* Contest'ingly. To contest an election निवडून यावें ह्मणून चढाओढ करणें. २ निवडणुकीचा निकाल गैरकायदेशीर आहे अशी तकरार करणें.

Context (kon-'tekst) [L. *con*, together & *texere*, *textus*, to weave.] *n.* वाक्यसंबंध *m*, वाक्यानुसंधान *n*, कथासंदर्भ *m*, संदर्भ *m*, अर्थान्वय *m*, पूर्वापरसंबंध *m*, पूर्वापरसंदर्भ *m.* [RULE OR LAW OF C. प्रत्यासत्तिन्याय *m.*] C. *a.* (*obs.*) मजवूत, संयुक्त. C. (*not used*) *v.t. to unite closely* मजबूत करणें. Context'ual *a.* Context'ually *adv.* Contex'ture *n.* विणणें *n*, कुमास *f.* २ विणप. C. *v. t.* विणणें.

Contignation (kon'tig-nā'shun) [L. *con*, together & *tignum*, a beam.] *n. the process of framing together or uniting as beams* मांडणावळ करणें *n.* २ *a frame work of beams* मांडणावळ *f.*

Contiguous (kon'-tig'ū-us) [L. *con*, wholly & *tenger*, *contiguus*, to touch.] *a.* संलग्न, लगतीचा, लगत्याचा, अनंतर, संसक्त, एकसीम, समसीम, प्रत्यासन्न, अव्यवहित, समीपस्थ, निकटवर्ती. Contigū'ity, Contiguousness (v. A.) *n.* संलग्नता *f*, लगता *m*, प्रत्यासत्ति *f*, सीमैक्य *n*. Contig'uously *adv.*

*N. B.*—Contiguous संलग्न, Adjoining संस्पृष्ट, Adjacent समीपस्थ.

Continent (kon'ti-nent) [L. *continere*, *continens*, to hold together.] *n. one of the great divisions of the land surface of the globe* महाद्वीप *n*, खंड *n.* २ (with *The*) *the main land of Europe.* ग्रेटब्रिटन खेरीजकरून युरोपखंडाचा भाग. Continent'al *a.* महाद्वीपासंबंधीं, महाद्वीपविषयक.

Continent (kon'ti-nent) *a.* संयमी, नियमी, नियतवर्ती, नियतेंद्रिय. २ *moderate or pure in the indulgence of sexual passion* (*of men*) एकपत्नी, एकपत्नीव्रती, अव्यभिचारी, नियतकाम, मितकाम, नियतव्यवाय, in covert phraseol. कासोट्याचा बळकट-खबरदार-धड, काष्टयाचा बळकट. ३ *refraining from woman* बंदिस्त, बंदेज, ऊर्ध्वरेता, स्त्रीपराङ्मुख, स्त्रीविमुख,-विरक्त-निस्पृह, अज्ञातव्यवाय, त्यक्तकाम, त्यक्तव्यवाय. [A C. MAN ब्रह्मचारी, ब्रह्मचर्याश्रमी, सनत्कुमार, नाडबंद.] ४ *refraining from man* पुरुषपराङ्मुखी-विमुखी-निस्पृहा, अज्ञातव्यवाया, अज्ञातकामा, त्यक्तकामा, त्यक्तव्यवाया. [A C. FEMALE ब्रह्मचारिणी.] Con'-

tinence, Con'tinency *n.* (v. A. I.) संयमन *n*, नियतवर्तन *n*, नियतवृत्ति *f*, संयतवर्तन *n*, संयतवृत्ति *f*. २ स्त्रीसंगनियम *m*, कामनिग्रह *m*, व्यवायनियम *m*, एकपत्नीव्रत *n*, पातिव्रत्य *n*. ३ नाडबंदपणा *m*, नाडबंदी *f*, ब्रह्मचर्य *n*, स्त्रीविरक्ति *f*, स्त्रीनिस्पृहता *f*. ४ ब्रह्मचर्य *n*, पुरुषनिस्पृहता *f*. Continent'alism *n*. Con'tinently *adv.* इंद्रियनिग्रहपूर्वक.

Contingent (kon-tin'jent) [L. *contingere*, to touch on all sides, *from con* & *tangere*, to touch.] *a.* आकस्मिक, अवचित, दैवयोगी, दैवायत्त, दैववश. २ *dependent on that which is unknown* दैवयोगाचा, आगंतुक, दैवघटित, दैवयोजित, यदृच्छाजात; as, "Uncertain and C. causes." ३ *law.* नैमित्तिक. C. *n.* अनिश्चित-दैवयोगी-दैवानुसार गोष्ट *f*. २ (*a*) भाग *m*, हिस्सा *m*, वांटा *m*, अंश *m*. (*b*) सैन्य *n*, दळ *n*, लष्कर *n*. ३ *logic.* आगंतुक गुण *m*- धर्म *m*. Contin'gency *n.* (*obs.*) संबंध *m*, स्पर्श *m*, संगम *m*. २ संभव *m*, दैवायत्त गोष्ट *f*. ३ आकस्मिक गोष्ट *f*. ४ आगंतुकता (S.) *f*. Contin'gently *adv.* अकस्मात्.

Continue (kon-tin'ū) [Fr. *continuer*.–L. *continuare*, *continuatum*, to connect, to continue, from L. *continuus*, lit. holding together, from *continere*, to hold together. Vide Contain.] *v. i. to abide, to stay* बराच वेळ (कित्येक दिवस) राहणें, नांदणें, असणें, स्थिरावणें, थावरणें; as, "Here to C. and build up here A growing empire." "They C. with me for three days and have nothing to eat." २ *to endure, to last* टिकणें, राहणें, थारणें, थारावणें, थिरावणें, ठरणें; as, "But now thy kingdom shall not C." ३ *to be steadfast or constant in any course, to persevere* (सतत) राहणें-चालणें; as, "If ye C. in my word, then are ye my disciples indeed." John. Contin'ue *v. t. to persevere or persist in, to cease not* सुरू-चालू राखणें, ठेवणें, चालवणें or पुढें चालवणें, -चालता राखणें-ठेवणें-चालवीत-करीत &c. जाणें; as, "O C. thy loving kindness unto them that know thee." २ *to prolong or produce, to add to or draw out in length* वाढवणें, लांबवणें; as, "A bridge of wonderous length from hell continued, reaching the utmost orb of this frail world." ३ *to retain to suffer or cause to remain* राहूं देणें; as, "The trustees were continued." ४ *to suffer to live* जिवंत ठेवणें, जिवंत जाऊं देणें; as, "How shall we C. Claudio." Contin'uable *a.* (R). Contin'ual *a.* (बहुतेक) निरंतर, वारंवार. Contin'ually *adv.* (बहुतेक) सारखा, सतत. २ (बहुतेक) निरंतर, नित्य, नेहमीं, वारंवार. Contin'uance *n.* (v. V. T. 1.)-*act.* चालवणें *n*. चालवणूक *f*, चालवणी *f*. २-*act* वाढवणें *n*. (v. V. I. 1.) -*state.* टिकणें *n*, टिकाव or टिकावा *m*. २ राहणें *n*, वसति *f*. ३ (*obs.*) चालू राहणें *n*. ४ *propagation* विस्तार *m*, संतति *f*, वृद्धि *f*. ५ (*a*) *law.* तहकुबी *f*. (*b*) *the entry of such adjournment on the record* तहकुबीची दफ्तरी नोंदणी *f*. Contin'uant *a*. Contin'uate *a*. Contin'uation *n.* विस्तार *m*, संतति *f*, वृद्धि *f*. २ उत्तरभाग *m*, खंड *m*, परिशिष्ट. Continuā'tion day, same as Contango-day. Contin'uative *a*. Contin'ua'tor *n.* चालू असणारा-ठेवणारा. Contin'ued *a.* चालू असलेला. [C. bass C. fever. C. fraction. C. proportion.] Contin'uedly *adv.* Contin'uedness *n.* Contin'uer *n.* चालू ठेवणारा. Continu'ity *n.* निरंतरता *f*, सातत्य *n*, सांतत्य *n*, अविरतता *f*, *n*. [Law of C. *math.* अखंडता *f*. & *physics.* अनुबंधनियम, सातत्य नियम *m*; "as, solution of C."] २ नैरंतर्य *n*, अखंडता *f*, अव्यवधान *n*, अव्यवधानता *f*, अविच्छेद *m*, अविच्छिन्नता *f*. Contin'uous *a.* (in time) निरंतर, सतत, अनवरत, अविरत. २ (of space) निरंतर, अखंड, अखंडित, अव्यवहित, *med.* अविच्छिन्न, लगत in comp. as, लगत मजकूर. Contin'uously *adv.* निरंतर, अखंड. Contin'uousness *n.* See Continuity. Contin'ūum *n.* अखंडित गोष्ट *f*. *pl.* Continua.

Contort (kon-tort') [L. *con*, together & *torquere*, *tortus*, to twist.] *v. t. to twist, to distort, to wrest* पिळवटणें, मुरग-(गा)ळणें, मोडणें, आळेपिळे देणें. Contort'ed *a.* पिळाचा, पिळवटलेला, वक्रीकृत. Contor'sion Contor'tion *n.* पिळवटणें *n*, मुरगळा *m*. २ *pl.* आळेपिळे *m. pl.*, वळेपिळे *m. pl.*, अळोकेपिळोके *m. pl.*, अळयापिळया *f. pl.* (*v.* दे, घे,) अळंगेविळंगे. Contor'tionist *n.* अळेपिळे देणारा. Contort'ive *a.* वैरूप्यदर्शक.

Contour (kon'tōōr, kontōōr') [F. *contour*, from *contourner*, to mark the out-lines.] *n. the outlines of a figure or body or the line or lines representing such an outline* आंगलट *f*, आंगवठा *m*, रूपरेषा *f*, रूपरेखा *f*, परिघाकृति *f*, घाट *m*, आकार *m*, आकाररेषा *f*, आकृति *f*, परिधि *f*. Contour feathers बाहेरचा पिसारा. C. line परिधिरेषा *f*.

Contra (kon'-tra) [A Latin.] *adv.* & *prep.* signifying *against, contrary, in opposition* उलट, प्रतिविरुद्ध. (entering as a prefix into the formation of many English words such as contradiction, contradance, contravene, &c. See Counter *adv.* & *prep.*)

Contraband (kon'-tra-band) [It. *contrabando*, from *contra* & *bando*, *ban*, proclamation. See Ban an edict.] *a. prohibited by law or treaty* निषेधाचा, मनाईचा, वर्जित, निषिद्ध, बेकायदेशीर; as, "C. goods or trade." C. *n. illegal or prohibited traffic* निषिद्धव्यापार *m*; as, "To prevent C." २ *merchandise, the importation or exportation of which is forbidden* मना केलेला माल *m*. C. *v. t.* (*obs.*) मना केलेला माल देशांत आणणें. २ (*obs.*) बंदी-मना-निषेध करणें. Con'traban'dism *n.* मना केलेल्या-निषिद्ध मालाचा व्यापार *m*. Con'traban'dist *n.* मना केलेला माल देशांत आणणारा, गैरकायदेशीर व्यापार करणारा. Con'-

traband of war युद्धाचे वेळीं निषिद्ध किंवा मना केलेला माल *m*.

Contract (kon-trakt') [ L. *contrahere, contractus,* from *con,* together & *trahere,* to draw. ] *v. t. to draw together or nearer, to shorten, to lessen* संकोच करणें, आखडणें, *or* अखुडणें, आकर्षणें, आवटरणें, आक्रसणें, संकोच *m.* करणें *g. of o.*, आंखूड or संकुचित &c. करणें; as, "In all things desuetude doth C. and narrow our faculties." (b) *to knit* आवरणें, चढवणें; as, "To C. one's brow." [ To C. THE BROW कपाळास आंठी *f.* अठ्या *f. pl.* घालणें. ] २ *to incur, to acquire* लागणें *in. con.*, जोडणें, मिळवणें, संपादणें, प्राप्त करणें. as, "To C. a debt; To C. a habit;" "To C. a disease." ३ *to enter into with mutual obligations* करार-ठराव करणें; as, "We have contracted inviolable amity, peace & league with the aforesaid queen." "To C. a marriage." ४ (*obs.*) *to betroth, to affiance* विवाह करणें, लग्नसंबंध करणें; as, "The truth is, she and I long since contracted, are now sure that nothing can dissolve us." *Shakes.* ५ *gram. to abridge* संक्षेपणें, संक्षेप *m*- संकोच *m*- संकलन *n.* &c. करणें *g. of o.*; as, "To Contract a word or a sentence." C. *v.i. to shrink,to be reduced in compass or duration* आखडणें or अखुडणें, आठरणें, आवटरणें, ओढणें, आक्रसणें (आक्रुसणें), आवळणें, आटणें, दाटणें, घटणें, संकोचणें, संकोच *m.* &c. होणें *g. of o.*; "as, Iron contracts in cooling; "Years contracting to a moment." २ *to make an agreement, to covenant* ठराव-करार करणें, कंट्रॅक्ट करणें, खंडणें, खंड *m*- मक्ता *m.* करणें; as, "To C. for carrying the mail." C. *n.* मक्ता *m*, खंड *m*, करार *m*, खंडणूक *f.* [ By C. उक्ता, उधड-डा, करारानें, मक्त्यानें, कंत्राटानें. C. OR AGREEMENT ON BINDING CONDITIONS अटीचा करार *m*, अटीची बोली *f*-बोलणें *n.* CONTRACTS AND MONOPOLIES. *-compreh.* खंडमक्ता *m.* WORK TO BE DONE BY C. खंडकाम *n*, खंडितकाम *n*, उक्तें काम *n.* To GIVE BY C. खंडून देणें, तोडून देणें. To TAKE BY C. खंडून घेणें, तोडून घेणें. ] २ करारनामा *m*, करारपत्र *n.* ३ *the act of formally betrothing a man and a woman* वाग्निश्चय *m*; as, "This is the night of the contract." Contrac'ted *a* (v. V. T.) आंखुडलेला, आवरलेला, आकर्षित, संकोचित; as, "A C. brow." २ *narrow, illiberal, selfish* नीच, आपस्वार्थी, अनुदार, क्षुद्र; as, "A. C. mind;" "C. views." ३ *betrothed* वाग्निश्चित, वाचाकृत; as, "A C. peace;" "A C. bachelor." ४ संक्षेप केलेला, संक्षिप्त. Contrac'tedly *adv.* Contrac'tedness *n.* Contrac'tibil'ity, Contrac'tibleness *n.* Contrac'tible *a.* संकोचनशील. Contrac'tile *a.* संकोची, संकोचनक्षम. Con'tractil'ity *n.* Contrac'tion *n.* आखडणें *n*, आवटरणें *n*, आकर्षण *n*, आकुंचन *n*, संकोचन *n. -act.* or *-state* अखडणी *f*, अखडणूक *f*, आवटरणी *f*, आवटरणूक *f*, संकोच *m.* २ लागणें *n*, घेणें *n.* ३ संक्षेपणें *n*, संक्षेपण *n*, (v.V. I. I.) आखडणें *n*, संकोच *m*, आवटरणी *f*, आवटरणूक *f*, अखडणी *f*, अखडणूक *f.* ४ खंडणें *n*, खंड करणें *n*, खंडणूक *f.* ५ *math.* संक्षेप *m.* ६ वाग्निश्चय *m*. Contract'ive *a.* Contract'or *n.* आकुंचन करणारा. २ मक्तेकरी, मक्तेदार, मक्तेवाला, खंडवाला. Contract'ual *a.* To contract one's self out of विशेष करार करून जबाबदारींतून पार पडणें. Contract-work *n.* कंत्राटी काम *n.*

Contradance (kontra-dans) *n.* एक प्रकारचा नाच, यांत जोड्या समोरासमोर उभ्या राहतात.

Contradict (kon'-tra-dikt') [ L. *contra* & *dicere, dictum,* to speak.] *v. t. to oppose in words* विरुद्ध-उलट बोलणें, प्रतिषेध *m*- प्रतिवाद *m*- विसंवाद *m.* &c. करणें. २ विरोध करणें. C. *v. i. to oppose in words, to gainsay* आक्षेप घेणें, उलट जाणें; as, "They spoke against those things which were spoken by Paul, Contradicting and blaspheming." Con'tradic'table *a.* Con'tradict'ed *p.* See the verb. Con'tradic'tion *n.* (v. V. I.)*-act.* उलट बोलणें *n*, प्रतिषेध *m*, प्रत्याख्यान *n*, प्रतीपवचन *n*, प्रतिवाद *m*, विसंवाद *m*, प्रतिकूलता *f*, विरोधोक्ति *f.* २ *contrariety, an inconsistency* फेर *m*, विपर्यय *m*, विपर्यास *m*, विप्रतिपत्ति *f*, असंगति *f*, विरुद्धता *f*, विसंवाद *m*, विरोध *m*; as, "To make a deathless death is a C." [ To MAKE A STATEMENT WITH CONTRADICTIONS OR INCONSISTENCIES असंबद्ध-अद्वातद्वा भाषण करणें.] Con'tradic'tious *a.* Con'tradic'tiously *adv.* Con'tradic'torily *adv.* Con'tradict'ive, Con'tradic'tory *a.* आडवा, उलटा, विरोधी, विरुद्ध, विसंवादी, विप्रतिपन्न. २ *inconsistent with itself* असंबद्ध, विसंगत, संदर्भविरुद्ध, पूर्वापरविरुद्ध. Con'tradict'oriness *n.*

*N. B.* Contrary विपरीत, Contradictory विरुद्ध.

Contradistinction (kon'-tra-distingk'-shun) [Pref. *contra* & Distinction which see. ] *n.* विरुद्धगुणजन्य-भेद *m*, व्यतिरेक *m*, विरुद्धता *f.* Contradistinct' *a.* विरुद्ध गुणाचा, उलट गुणाचा.

Contradistinguish (kon'-tra-dis-ting'-gwish) *v. t.* विरुद्ध गुणांनीं-विरुद्ध गुणांवरून भेद *m.* पाहणें-करणें.

Contraposition (kon'-tra-pozish'un) [ Pref. Contra & Position which see. ] *n. logic.* द्विनञ्प्रकृतार्थानुमान.

Contrary (kon'-tra-ri) [ Fr. *contraire.*-L. *contrarius,* from *contra,* against. ] *a. opposite, adverse, reverse, opposed to* विपरीत, विरुद्ध, उलटा, आडवा, विपर्यस्त, विपर्यासाचा, व्यत्यासाचा, विपर्ययाचा, प्रतिकूल; as, "C. winds; A C. way, direction, &c." २ *cross, repugnant, hostile* आडवा, विरुद्ध, विपरीत, विपक्षीय. ३ *contrary willed, cross* करनकर, अकरनकर, करनकऱ्या or करनकरा, अकरताळा, विपरीतकारी, विपरीतकर्ता;

as, "A C. child, A C. disposition." ४ ( wind, tide ) उलटा, तोंडचा, समोरचा, तोंडावरचा. C. *n.* विरुद्ध गुणाची वस्तु-चीज. २ विपक्ष *m*, प्रतिपक्ष *m*, प्रतिपक्षी *m*, प्रतियोगी *m*. ३ *logic.* (always in *pl.*) विपरीत वाक्यें. [ ON THE CONTRARY, TO THE CONTRARY उलटपक्षीं, प्रत्युत. ] Contrā'riant *a.* (R.) Con'traries *n. pl.* Con'trari'ety *n.* ( v. V. I. ) उलटेपणा *m*, व्यत्यय *m*, व्यत्यास, विपर्यय *m*, विपर्यास *m*, वैपरीत्य *n*, विपरीतता *f*, विपरीतभाव *m*, विरुद्धता *f.* २ आडवेपणा *m*, हरकत *m*, विपक्षता *f*, प्रातिकूल्य *n*, प्रतिकूलता *f*, प्रतिकूलभाव *m*. ३ करनकरेपणा *m*, अकरताळेपणा *m*, करनकर *f*, विपरीतकारिता *f.* Con'trarily *adv.* ( v. V. I. ) उलटून, उलट, उलटा, उफराट, उफराटा, उलट्यानें, विपरीत भावानें. २ आडवेपणानें, विरुद्धभावानें, विरुद्ध, प्रतिकूलभावानें, विपक्षतः, प्रतिकूलतः. Con'trariness, See Con'trari'ety. Contrā'rious *a.* See Contrary. Contrā'riously *adv.* Con'trariwise See Contrarily.

Contrast ( kon-trast' ) [ Fr. *contraster.*–L. L. *contrastare*, to resist, to withstand, from *con*, against & *stare*, to stand. ] *v. i. to exhibit difference, unlikeness or opposition of qualities* वैषम्य *n*- भेद *m*. दाखविणें, वस्तूंतील गुणविरोध दाखविणें. C. *v. t. to compare by contrariety of qualities* परस्परांतील भेद-अंतर दाखवून तुलना करणें, परस्परांतील भेद *m*- अंतर दाखविणें, परस्परांचें वैलक्षण्य *n*- विरोध *m*. &c., दाखविणें, परस्पर गुणागुणप्रदर्शन *n*- परस्पर गुणागुणप्रकाशन *n*. करणें, तुलना करून भेद दाखविणें; as, "To C. the present with the past." C. *n. comparision by difference of qualities* परस्परांच्या गुणांतील भेद *m*- अंतर *n*, गुणविरोधानें-वैषम्यानें तुलना *f.* करणें, विरोध *m*, वैलक्षण्य *n*. २ *dissimilitude of things or qualities* विरोध *m*, प्रतिपक्षता *f*; as "The contrasts and resemblances of the seasons." ३ ( Fine arts ) *the opposition of varied forms* निरनिराळ्या तऱ्हेचा-आकारांचा किंवा रंगांचा विरोध *m*. Contrast'ive *a.*

Contrastimulant ( kon'tra-stim'u-lant ) [ Pref. *contra* & Stimulant which See. ] *a. med.* मदहारी. C. *n.* मदहारी औषध *n*- उपाय *m*.

Contrate ( kon'trāt ) [ See Contra. ] *a.* आडव्या दात्यांचा; as, "Contrate wheels."

Contravallation ( kon'-tra-val-lā'-shun ) [Pref. *contra* & Vallation which see. ] *n.* दळा-सैन्याभोवतीं वेढा घालणाऱ्यांनीं केलेली तटबंदी *f*, प्रतिकूप *m*. (S.)

Contravariants ( kon'-tra-variants ) विपरीत-चलस्पर्धी. See Variant.

Contravene (kon'-tra-vēn' ) [ L. *contra*, against & *venire*, to come. ] *v. t. to oppose* आडवा येणें-होणें. २ *to break, to nullify* तोडणें, उल्लंघन करणें; as, "To C. a law." Con'traven'tion *n.* भंग *m*, विरुद्धता *f*, अटकाव *m*, अडथळा, हरकत *f*, अडचण *f*, निषेध *m*, प्रतिरोध *m*, प्रतिबंध *m*, उल्लंघन *n*.

Contretemps ( kon'tr'-tan' ) [ L. *contre* ( L. *contra* ), against & *temps* ( L. *tempus* ), time. ] *n. an unexpected and untoward accident* आफत, दुर्दैव *n*.

Contribute ( kon-trib'-ūt ) [ L. *contribuere*, *contributus*, to bring together, from *con*, together & *tribuere*, to impart. ] *v. t. to give or grant in common with others, to furnish or supply in part* वर्गणी *f*- देणें, अंश *m*- वांटा *m*- &c. देणें, वर्गणीचा-पट्टीचा-टिपेचा &c. अंश-भाग देणें, भर *f.* घालणें; as, "England contributes much more than any of the allies." C. *v. i. to have a share in any act or effect, to give a part to a common stock* भाग *m*- हिस्सा *m*. देणें. २ *to assist* साहाय्य-सहकारी होणें, मदत *f.* करणें-देणें; as, "These men also contributed to obstruct the progress of wisdom." ३ *to furnish an article to a newspaper*, &c. वर्तमानपत्राला लेख पाठविणें. Contrib'utary *a.* मिळणारी ( नदी ). २ साहाय्यकारी. Contribū'tion *n. the act of contributing* वांटा देणें *n*, मदत करणें *n*. २ *a thing contributed* वर्गणी *f*, वर्गत *f*, भर *f.* [ MILITARY C. खंड *m*, खंडणी *f.*] ३ *mil.* दांडगाईनें घेतलेला कर *m*. ४ *law.* वर्गणीनें केलेली नुकसानीची भरपाई *f.* ५ वर्तमानपत्राला पाठविलेला लेख *m*. Contrib'utive, Contrib'utory *a.* ( v. V. T. ) वर्गणी देणारा, भर घालणारा, अंश देणारा, भरीचा, सहाय (S.), ( v. V. I. ) सहकारी, साहाय्यकर्ता,-कारी. Contrib'utor *n.* वर्गणी देणारा, भर घालणारा, साहाय्यकर्ता-कारी.

Contrite ( kon'-trīt ) [L. *contritus*, bruised from *con* & *terere*, *tritus*, to rule, to grind.] *a.* (*obs.*) फुटलेला, चिंध्या उडालेला. २ *humbly and thoroughly penitent* पश्चात्तप्त, पश्चात्तापयुक्त; as, "A C. heart O God, thou will not despise." C. *n.* पश्चात्तप्त मनुष्य *m*. Con'tritely *adv.* पश्चात्तापानें, पश्चात्तापबुद्धीनें, पश्चात्तापपूर्वक. Con'trite'ness *n.* पश्चात्तप्तता *f.* Contri'tion *n.* पश्चात्ताप *m*, अनुताप *m*, अनुशय *m*. २ घर्षण *n*, चुटपुट *f*; as, "My future days shall be one whole contrition."

*N.B.*—Repentence, Contrition, Attrition, Compunction, Remorse, Penitence. See Repentence.

Contrive ( kon-trīv' ) [M. Fr. *controuver*, from *con* & *trouver*, to find.] *v.t. to devise, to invent, to design* युक्ति *f.* योजणें-बांधणें-रचणें-कल्पिणें-चिंतणें-काढणें-करणें, योजना *f*-योजणूक *f.* करणें. *g. of o.* C. *v. i. to plan, to scheme, to plot* बेत-मसलत करणें; as, "The fates with traitors do C." Contriv'able *a.* योजाया-चा-जोगता-सारखा, कल्पनीय कल्प्य, योजनीय, योज्य, रचनीय. Contri'ving *vb. n.* & *pr. p.* Contri'vance *n.* (v. V T. I. )-*act.* युक्ति योजणें *n*- रचणें *n*, &c., योजना *f*, योजणूक *f*, रचना *f*, रचणी *f*, रचणूक *f*, चिंतन *n*. २ युक्ति *f*, हिकमत *f*, हुन्नर *m*, तोड *f*, इलम *m*, बेत *m*, कल्पना *f*, तजवीज *f*, इलाज *m*, शक्कल *f*, अनुसं-

धान *n*, कृप्ति *f.* ४ *engine, piece of mechanism* यंत्र *n*, कुलंगडें *n*, करामत *f.* Contrive'ment *n.* (*obs.*) See Contri'vance. Contri'ver *n.* युक्ति योजणारा *m*- काढणारा, कल्पक, योजक.

Control ( kon-trōl' ) [ Fr. *controle*, a counter register contracted, from *contre* (L. *contra*) & *role*, roll.] *n.* (*obs.*) *a counter register* (पडताळा पाहण्यासाठीं ठेवलेलें) प्रतिनोंदणीपुस्तक *n.* २ *that which serves to check, restraint* निबंधन *n*, नियमन *n*, निग्रह *m*, अंकुश *m*, दाब *m*, ताबा *m*; as, "Speak without C." [SELF. C. आत्मसंयमन, इंद्रियजय. MENTAL C. मनोजय.] ३ *power or authority to control* जोरा *m*, हुकूम *m*, सत्ता *f*, अधिकार *m*, कैद *f*, नियंतृत्व *n*, देखरेख *f*; as, "Children should be under parental C." C. *v. t.* (*obs.*) *to check by a counter register or Duplicate account* प्रतिनोंदणीपुस्तकावरून पडताळा पाहणें. २ *to restrain, to govern, to overpower* आवरणें, अटोपणें, आकळणें, आवरण *n*- आवर *m*- आकलन *n*- आटोप *m*, &c. करणें *g. of o.*, लगामीं धरणें, ताब्यांत-कह्यांत-हुकुमांत &c. ठेवणें, आळा *m*- आळाबांधा *m.* घालणें-बांधणें. Control'ling *pr. p.* Control'led *pa. p.* Control'labil'ity *n.* Control'lable *a.* आवराया-चा-जोगता-सारखा &c., लगामीं धरायाजोगा, नियम्य, आकलनीय, शासनीय. Control'lable-ness *n.* Control'ler *n.* आवरणारा, आटोपणारा, आवर करणारा, नियंता, शास्ता, नियामक; as, "The great C. of our fate designed to be man and lived in low estate." २ ( more commonly written comptroller ) *an officer appointed to keep a counter register of accounts or to verify accounts* नियंतृक. ३ *naut. an iron block usually bolted to a ship's deck, for controlling the running out of a chain cable* अडकवणी *f.* Control'lership *n.* Control'ment *n. restraint, regulation, superintendence* निबंधन *n*, नियमन *n*, आवरण *m*, आवर *m*, निग्रह *m*, दाब *m*; as, "You may do it without C." २ (*obs.*) *resistance, hostility* शत्रुत्व *n.*

Controvert (kon'tro-vert) [L. *contra* (*contra*), against & *vertere, versus*, to turn.] *v. t. to dispute or oppose by reasoning, to debate* वाद *m*- विवाद *m*- विप्रतिपत्ति *f*- विप्रतिपादन *n*- प्रत्याख्यान *n*- विरुद्धप्रमाण देणें, खंडण करणें. Con'trovert'ed *p.* ( v. V. ) विप्रतिपादित, वादग्रस्त, प्रत्याख्यात, विवादास्पदीभूत. Con'trover'sial *a.* विवादाचा, विवादसंबंधीं-विषयक; as, "C. divinity; C. books." २ वादग्रस्त. Con'trover'sialist *n.* विवादी (S), वादकर्ता, वादी (S). Con'trover'sially *adv.* Controver'sion *n.* Con'troversy *n. dispute, contention, agitation of contrary opinions* विवाद *m*, वादानुवाद *m*, वादविवाद *m*, वाद *m, f*, वाग्युद्ध *n*, शंकासमाधानें *n. pl.*, आक्षेप *m*; as, "This left no room for C. about the title." २ *quarrel, cause of variance* तकरार *f*, लढाई *f*, मतभेद *m*; as, "The Lord hath a C. with the nation." ३ (*obs.*) *a suit in law or equity* दावा *m*, तकरार *f*; as, "When any that had a C. came to the king for judgment." Con'trover'ter *n.* Con'trovert'ible *a.* वादास योग्य, वाद करायाजोगा, विप्रतिपाद्य, प्रत्याख्येय, प्रत्याख्यानार्ह, प्रत्याख्यानक्षम. Con'trover'tibly *adv.* Con'trover'tist *n.* तकरार करणारा, वादी.

Contubernal ( kontū'ber-nal ) [ L. *contu bernalis*, a tent companion. ] *a. living or messing together, familiar* परिचित, रावत्याचा, सहवासी.

Contumacious (kon'-tū-mā'-shus) [L. *contumax, contumacis*, insolent; prob. akin to *contemnere*, to despise.] *a. contemning authority, obstinate, perverse* शिरजोर, हट्टखोर, आग्रही, दुराग्रही. २ *law. wilfully disobedient to the orders of a court* कोर्टाची अवज्ञा करणारा, हुकूम न मानणारा, कोर्टाशीं बेपर्वाईनें वागणारा. Con'tumā'ciously *adv.* दुराग्रहानें, दुराग्रहपूर्वक. Con'tumā'ciousness *n.* Contumac'ity *n.* Con'tumacy *n.* जिद्द *f*, जिद्दखोरी *f*, जळ *m*, दुराग्रह *m*, दुर्मद *m.* २ *law.* कोर्टाची अवज्ञा *f.*

Contumely ( kon'tū-me-li ) [ L. *contumelia*, prob. akin to *contemnere*, to despise. ] *n.* तिरस्कार *m*, अवज्ञा *f*, अपमान, निर्भर्त्सना *f*, अवहेलना *f*, विटंबना *f*, ताठा *m*; as, "The oppressor's wrong, the proud man's C." Con'tume'lious *a.* उर्मट, निर्भर्त्सक. २ (language) निर्भर्त्सनेचा, उर्मट-उद्धटपणाचा. Con'tume'liously *adv.* निर्भर्त्सनापूर्वक. Con'tume'liousness *n.* अवहेलना *f*, निर्भर्त्सना *f*, विटंबना *f*, हेळणा *f.*

Contund (kon-tund') [ L. *contundere, contusum, con* & *tundere*, to bruise cf. Sk. तुद्.] *v. t.* कुटणें, चेंचणें, वाटणें, ठेंचणें.

Contuse ( kon-tūs' ) [ See Contund. ] *v. t. to beat, to pound or bray together* कुटणें, ठेंचणें, चेंचणें, भुकी करणें; as, "Roots, barks and seeds contused together." Contū'sion *n. med. the act of beating, bruising or pounding* ठेंचणें. २ *the state of being bruised* कुटलेलेपणा *m.* ३ *surg.* बोंथट हत्यारानें झालेली दुखापत *f.* Contū'sive *a.*

Conundrum ( ko-nun'-drum ) [ Origin uncertain. ] *n. a puzzling question of which the answer is or involves a pun* प्रहेलिका *f*, प्रवह्लिका *f.* २ *a question to which only a conjectural answer can be made* उखाणा *m*, कूट *n*, कोडें *n*; as, "Do you think life is enough to let me speculate on C.s like that?"

Conure ( ko-nūr' ) [ Gr. *konos*, cone & *oura*, tail. ] *n. zool.* अमेरिकन खबूतर.

Conus ( kō'nus ) [ L. a cone. ] *n. a cone* शंकु *m.* २ *zool.* कालवाच्या जातीचा प्राणी *m.*

Convalesce ( kon'-va-les' ) [ L. *con* & *valescere*, to grow strong, See Valiant. ] *v. i. to recover health and strength gradually after sickness* दुखण्यांतून उठल्यावर शक्ति *f.* येणें. Con'vales'cence,-cy *n.* आरोग्य-

स्थापन *n*, प्रकृतिस्थापन *n*, पालवी *f.* २ रोग बरा झाल्यापासून शक्ति येईपर्यंत जो काल जातो तो. Con'vales'cent *a.* दुखण्यांतून उठलेला, हिंडताफिरता, दांडेस्वार, *colloq.* C. *n.* (दुखण्यांतून उठून) हिंडू फिरूं लागलेला मनुष्य *m.* Con'vales'cently *adv.*

Convection (kon-vek'-shun) [L. *con*, together & *vehere*, to carry.] *n. the act of transmitting* प्रापण *n*, प्रापणधर्म *m.* (as distinguished from conduction which is वहनधर्म.) Convec'tive *a.* प्रापणधर्मसिद्धजनित, प्रापणधर्मयुक्त. Convec'tively *adv.*

Convene (kon-vēn') [F. *convenir*-L. *con* & *venire*, to come.] *v. i.* (R.) *to meet, to unite* जमणें, मिळणें. २ *to assemble* सभेंत जमणें, एकत्र होणें; as, "The Parliament of Scotland now convened." C. *v. t. to convoke, to call together* जमवणें; as, "To C. a meeting." २ *to summon judicially to meet or appear* न्यायाधिशाचे नात्यानें बोलावणें. Conven'er *n.* सभा भरविणारा.

Convenient (kon-vē'-ni-ėnt) [L. *convenire*, to come together, to be suitable.] *a. fit or adapted, suitable, proper* लायक, योग्य, उचित, अनुकूल. २ *affording accommodation or advantage, handy* उपयोगी, सुखावह, सोईचा, सोईवार, उपयुक्त; as, "C. house, C. tools." ३ *seasonable, opportune* योग्य (loosely); as, "A C. occasion or season." ४ *colloq. near at hand, easy of access* जवळचा, जवळ, सुगम्य, सुलभ. Conven'able *a.* (*obs.*). Conve'nience,-cy *n.* अनुकूलता *f*, योग्यपणा *f.* २ उपयोग *m*, सोई *f*, सोईवारपणा *m*, लाग *m*, उपयुक्तता *f*, सोय *f.* [At one's C. यथावकाश.] ३ फुरसत *f*, अवकाश *m*, अवसर *m*, सवड *f*; as, "When it suits your C." "To do something at one's C." ४ उपयोगाची-उपयोगीं पडणारी चीज *f*- वस्तु *f.* Conve'niently *adv.* सोईनें, सोईवार.

Convent (kon'-vėnt) [L. *con*, together & *venire*, *ventus*, to come.] *n.* (*obs.*) *a meeting* मंडळी *f*, समाज *m.* २ *a body of monks or nuns* बैराग्यांचा-बैरागिणींचा मेळा *m.* ३ *a monastery or nunnery* (of men) मठ *m*, आश्रम *m*, (for women) जोगिणींचा मठ *m.* C. *v. i.* (*obs.*) एकत्र जमणें. C. *v. t.* (*Shakes.*) *to call before a judge or judicature* समान लावून बोलावणें, हजीर रहाण्यास फर्माविणें. Convent'ual *a.* मठासंबंधीं-विषयक. C. *n.* बैरागी-*m*- ण *f*, जोगी *m*-ण *f.*

Conventicle (kon-vēn-'ti-kl) [L. *conventiculum*, dim. of *conventus*, a coming together.] *n.* समाज *m*, सभा *f*, गुप्तसभा *f.* २ डिसेंटरपंथी लोकांची गुप्तसभा *f.* Conven'ticler *n.* सदर पंथाचा अनुयायी-कैवारी *m.*

Convention (kon-ven'-shun) [Fr. *convention*-L. *convento*, from *con* & *venire*, *ventum*, to come.] *n.* मिळणें *n*, एकत्र होणें *n*, एकत्रता *f*; as, "The conventions or associations of several particles of matter into bodies of any certain denomination." २ चाल *f*, रिवाज *m*, रूढी *f*, आचार *m*; as, "There are thousands now, Such women but C. beats them down." ३ प्रतिनिधींची सभा *f.* ४ (Eng.Hist.) राजाच्या निमंत्रणावांचून जमलेली पार्लमेंट सभा *f.* ५ ठराव *m*, बोली *f*, संकेत *m*, नियम *m*, समय *m.* ६ तात्पुरता तह *m.* Conven'tional *a.* सामायिक, सांकेतिक, संकेतगर्भित, संकेतसिद्ध, समयसिद्ध. २ लोकांच्या समजुतीचा, लोकव्यवहारास अनुसरणारा, जनरूढीचा, शिष्टाचाराचा; as, "C. decorum." ३ (*Fine arts*) संकेतसिद्ध; as, "C. flower; C. shell." Conven'tionalise *v. t. to establish from usage* रूढीनें ठरविणें. २ (*Fine arts*) संकेतसिद्ध नियमानें बद्ध करणें. C. *v. i.* (*Fine arts*) (See २ V. T. above.) Conven'tionalism *n.* रूढि *f*, संप्रदाय *m.* Conven'tionalist *n.* संप्रदायवादी, ठरींव संप्रदायाप्रमाणें चालणारा. Conven'tional'ity *n.* संकेतसिद्धता *f*, सांकेतिकता *f.* Conven'tionally *adv.* Conven'tionary *a.* ठरावानें वागणारा. Conven'tioner *n.* सभासद. Conven'tionist *n.* तह *m*- ठराव *m.* करणारा.

Conventual (kon'ven'tual) See Convent.

Converge (kon-vėrj') [L. *con*, together & *vergere*, to turn, to incline.] *v. t. to tend to one point* एका केंद्राकडे वळणें, एककेंद्रप्रवण-एककेंद्राभिसारी-एककेंद्राभिमुख &c. होणें; as, "Lines C." C. *v. t.* एककेंद्राभिमुख करणें; as, "I C. its rays to a focus of dazzling brilliancy." Conver'gence,cy *n.* एककेंद्राभिमुखता *f*, एककेंद्रप्रणवता *n. math.* परिछिन्नमान *n.* Conver'gent, conver'ging *a.* केंद्राभिमुख, एककेंद्राभिमुख, एककेंद्रप्रवण, एककेंद्राभिसारी, सन्निपाती (S.), परिछिन्न. [Converging rays संपातिकिरण. Converging series परिछिन्नश्रेणी, आसन्नफलश्रेढी.]

Conversazione (kon-vėr'-sat-si-ō'-ne) *n.* वाङ्मयात्मक व शास्त्रीय विषयांवर संभाषण करण्याचा सभा *f*- बैठक *f*, विद्वत्संभाषणसभा *f*, संभाषणसभा *f.*

Converse (kon-vėrs') [Fr. *converser.*-L. *con*, together & *versari*, to live, to remain, from *vertere*, to turn.] *v. i.* (followed by *with*) *to hold intimate intercourse, commune* वहिवाट *f*- सहवास *m*- वाग *f*- वळवटा *m*- वळण *n*- सोबत *f*- संगत *f*- करणें-राखणें -ठेवणें *with* शीं *of o.* or असणें *g. of s.*; as, "Conversing with the world, we use the world's fashions." "But to C. with Heaven this is not easy." २ (followed by *with* before a person & by *on*, *about*, *concerning* &c. before a thing) *to confer or talk with* गप्पागोष्टी *f*- संभाषण *n*- संलाप *m.* करणें, गोष्टी *f. pl.* सांगणें, कथा करणें; as, "We had conversed so often on that subject." ३ *to have knowledge of* (*from intercourse or study*) परिचय होणें, ज्ञान होणें. C. *n.* सहवास *m*, बैठक *f*, परिचय *m.* २ संभाषण *n*, Convers'able *a.* Convers'ably *adv.* Con'versance,-cy *n.* (R.) अभ्यास *m*, वहिवाट *f*, घसवट *f*, घसण *f*, घटण *f*,

वाकबगारी *f*, वाकबदारी *f*, माहितगारी *f*, परिचय *m*, परिज्ञान *n*, प्रावीण्य *n*, नैपुण्य *n*, गम्य *n*, गति *f*. २ वहिवाट *f*, वळण *n*, वळवटा *m*, घसण *f*, वागणूक *f*, संघट्टन *n*, परिचय *m*, सहवास *m*. Con'versant *n*. (R.) Con'versant *a*. *versed, well acquainted* ( followed by *with* or *in* ) माहितगार, जाणता, वाकबगार, वाकब, वहिवाटलेला, घसवटलेला, रहाटलेला, वापरलेला, प्रवीण, निपुण, अभ्यस्त, शिक्षित, निष्णात, कोविद, अभिज्ञ; as, "He is well C. with Sanskrit or in Platonic philosophy." [ To BE C. WITH वहिवाटणें, वापरणें, रहाटणें, रहाळणें, घसवटणें.] २ *having intercourse* ( with ) परिचयाचा, वागलेला, रुळलेला, परिचित, वागीचा, वागणुकीचा, वहिवाटीचा, घसणीचा, घसवटीचा. ३ *having relation to* संबंधाचा, विषयींचा, संबंधी-विषयक *in comp*; as, "Education is C. about children." Conversā'tion *n*. वळण *n*, वळवटा *m*, वळवट *f*, वागणूक *f*, सहवास *m*, रुळणी *f*, सोबत *f*; as, "C. with the best company." २ (*archaic.*) आचरण *n*, चाल *f*, आचार *m*, वर्तन *n*, वृत्ति *f*, वर्तणूक *f*; as, "Let your C. be as it becometh the gospel." ३ संभाषण *n*, गोष्टीवार्ता or वार्ता *f*. *pl*., संवाद *m*, गप्पाष्टक *n*, संलाप *m*. ४ संग *m*, समागम *m*, एकशय्या *f*, एकतल्प *n*; as, "Criminal C." ५ ( *obs.* ) *commerce, traffic* व्यापार *m*. Con'versa'tional *a*. संभाषणसंबंधींविषयक. Conversā'tionalist, Conversā'tionist *n*. बहुभाषी. २ वाक्पटु *m*, संभाषणकोविद-चतुर *m*. Convers'ationism *n*. संभाषणांतच वापरण्याचे शब्द *m*. *pl*. Conver'sative *a*. *talkative, ready to talk* ( as opposed to contemplative ) बोलण्याचालण्याचा, बोलकेचालकेपणाचा, बोलघेवडेपणाचा. २ ( *obs.* ) *fitted for social intercourse* लोकांत मिळून मिसळून वागण्यायोग्य.

Convert ( kon-vert' ) [ L. *con* & *vertere, versum*, to turn.] *v. t. to alter in form, substance or quality* रूप पालटणें *g. of o.*, रूपांतर *n*- रूपभेद *m*- स्थित्यंतर *n*- स्थितिभेद *m*. &c. करणें *g. of o.*, (चें) भिन्नरूप करणें, (चें) निराळें रूप बनविणें; as, "To C. water into ice." २ *to change from one belief to another* दुसऱ्या धर्मांत-पक्षांत आणणें, धर्म *m*-मत *n*-&c. पालटणें-फिरवणें *g. of o.*, धर्मांतर-मतांतर *n*. &c. करविणें *g. of o.*, धर्मभेद *m*- मतभेद *m*- मतांतर *n*-&c. करविणें *g. of o.*, *spec.* बाटविणें; as, "No attempt was made to C. Moslems." ३ *to turn from a bad life to a good one* मन *n*. पालटवणें-फिरवणें, सन्मार्गाकडे मन *n*. फिरवणें, मनःपरिवर्तन *n*- चित्त परिवर्तन *n*. करणें *g. of o.*, as "He which Converteth the sinner from the error of his way shall save a soul from death." ४ नेमलेल्या कार्यांपासून भलत्याच कार्याकडे लावणें. ५ ( *obs.* ) भाषांतर-तरजुमा करणें. ६ मोबदला करणें; as, "To C. goods into money." ७ ( उद्देश्यविधेय ) परिवर्तन *n*. करणें. C. *v. i.* रूपांतर-मतांतर होणें, *spec.* बाटणें. Con'vert *n*. दुसऱ्या धर्मांत-पक्षांत आलेला मनुष्य *m*, धर्मांतरकारी मनुष्य *m*, अन्यधर्मावलंबी *m*, बाट्या *m*. Con'verse *a*. *reciprocal* परिवृत्त; *log.* व्युत्क्रम-उलटें पद *e. g*; as, "No virtue is vice" & "no vice is virtue," are two C. s. ४ *math.* उलट, प्रतिलोम, विलोम *n*. C. *a*. उलटा, व्यस्त, व्युत्क्रमाचा, Con'versely *adv*. उलट रीतीनें-उलटरीत्या, परिवर्तनरीत्या. Conver'sion *n*. (v. V. I. )-*act*. रूपांतर करणें *n*. रूपभेद करणें *n*.- *state*. रूपांतर *n*, रूपभेद *m*, परिवर्तन *n*, बदल *m*, पालट *m*, स्थित्यंतर *n*, स्थितिभेद *m*, अवस्थांतर *n*; as, "The C. of the aliment into fat." २ *change of views or cause or religion* दुसऱ्या धर्मांत आणणें *n*, *spec.* बाटवणें *n*, पक्षांतर *n*, मतांतर *n*; as, "C. to Christianity." ३ *law. the appropriation of the property of another as it were one's own without right* अपहार *m*; as, "Trover and conversion." ४ *logic.* परिवर्तन *n*. ५ *math.* आकार बदलणें *n*, रूपांतर *n*. Con'vertend *n*. *logic.* परिवर्तनीय वाक्य *n*. Con'vertendly *adv*. Conver'ter *n*. धर्मांतर-मतांतर -पक्षांतर करावयास लावणारा. २ *spec.* बाटविणारा. Convertibil'ity, Convert'ibleness *n*. परिवर्तनीयता *f*, रूपांतर करण्याची-होण्याची योग्यता *f*. Conver'tible *a*. रूपांतर करायाजोगा, रूपांतरकरणीय, परिवर्तनीय. Conver'sive *a*. (*obs.*) परिवर्तनक्षम. Conver'tibly *adv*. Con'vertite *n*. (*obs.*) बाट्या. Convertendo *math.* विलोमनिष्पत्ति.

*N. B.*—Change बदलणें, Alter फेरफार करणें, Vary अनेक वेळां बदलणें, Convert (चें) रूपांतर-परिवर्तन करणें.

Convex ( kon'-veks ) [ L. *convexus*, vaulted, arched, from *convehere*, to bring together. ] *a*.( opposite of concave) बाह्यगोल, बहिर्गोल, उन्नतोदर, कूर्मपृष्ठाकार. C. *n*. कूर्मपृष्ठाकृति *f*. Convexed' *a*. कूर्मपृष्ठाकार. Convex'edly, Convexly *adv*. कूर्मपृष्ठाप्रमाणें. Convex'ity, Con'vexness *n*. बाह्यगोलाकृति *f*. २ *math.* उन्नतोदरत्व *n*. Convex'o-Con'cave *a*. बाह्यांतरगोल, चंद्रकोरीसारखा. Convex'o-Con'vex *a*. उभयबाह्यगोल. Convexo-plane *a*. बाह्यगोलसमतल.

Convey ( kon-vā' ) [ O. Fr. *conveier*, to escort, to convey, from L. L. *con* & *via*, way. ] *v. t. to bear or transport* घेऊन जाणें, नेणें, वाहून नेणें; as, "I will C. them by sea in floats." २ *to transmit* प्रापण *n*. करणें, पावता ( ला ) &c. करणें, प्रापणधर्मानें पोंचविणें; as, "Air Conveys sound." ३ *to make over* सोंपवणें, हवालीं-हस्तगत करणें. ४ *to imply* संकेतानें देणें; as, "These words do not C. this sense". ५ *to impart or communicate* नेणें, कळविणें, सांगणें; as, "To C. an information." ६ (*obs.*) *to manage with privacy* गुप्तरीतीनें काम करणें, व्यवस्था करणें; as, "I will C. the business as I shall find means." *Shakes.* ७ (*obs.*) *to steal* चोरी करणें. ८ (*obs.*) *to accompany* बरोबर जाणें. C. *v.i.* (*obs*) चोरी-चौरकर्म करणें. Convey'able *a*. वहनीय, उह्य. Convey'al *n*.

Convey'ance *n. -act.* नेणें *n*, घेऊन जाणें *n*, यान *n.* [HUMAN C. नरयान *n*, नरवाहन *n*, पालखी *f*, डोली *f*, मेणा *m.*](*a*)*law.* मिळकत दुसऱ्याचे नांवावर करून देण्याकरितां केलेला दस्तऐवज *m*, फरोक्तखत *n.* (B) *the act by which the title to property is transferred* मालकी हक्काची निरवणी *f.* (C) *transfer of ownership* मालकी हक्क दुसऱ्याचे नांवावर चढविणें *n.*४(*obs.*)लबाडी *f.* Convey'ing *n.* नेणें *n*, घेऊन जाणें *n*, &c. Convey'ancer *n. law.* दस्तऐवज-खतें लिहिणारा. Convey'ancing *n.* Convey'er *n. physic.* प्रापक. २ नेणारा, पोंचविणारा. Convey'or *n. mach.* वाहनसाधन *n.* Convection प्रापणधर्म *m.* (as distinguished from conduction.)

Convicinity (kon'-vi-sin'i-ti) *n. neighbourhood* सन्निकटता *f.*

Convict (kon-vikt') [See Convince.] *v. t. to prove guilty* अपराध लागू करणें-शाबीत करणें *with* वर *of o.*, अन्यायी-अपराधी ठरवणें, (अपराध) पदरीं घालणें, (अपराधाचें) माप *n.* पदरीं घालणें, अपराधस्थापन *n.* करणें *g. of o.* २ (*obs.*) *to prove or show to be false* खोटें आहे असें दाखविणें-सिद्ध करणें, खंडन *n.* करणें. ३ *to demonstrate by proof or evidence* पुराव्यानें सिद्ध करणें. C. *a.* अपराधी-गुन्हेगार ठरलेला. C.*n.* अपराधी ठरविलेला मनुष्य *m*, स्थापितापराध *m.* Convictible *a.* Convic'tion *n.* अपराधी ठरविणें *n*, सापराधीकरण *n*, दोषीकरण *n*, अपराधस्थापन-ना *f.* २ (*obs.*) खोटें पाडणें *n*, खंडन *n.* ३ *convincedness* खातरजमा *f*, खातर *f*, खातरी *f*, भरोसा or भरंवसा *m*, प्रबोध *m*, विश्वास *m*, प्रत्यय *m*; as, "To call good evil and evil good, against the C. of their own consciences." Con'victism *n.* (R.) Convic'tive *a.* खात्रीलायक, सबळ, निश्चयकारक, संशयच्छेदक. Convic'tively *adv.* Convic'tiveness *n.* To carry conviction खातरी पटविणें. Under conviction (अशा) दृढ-पक्क्या समजुतीनें-खात्रीनें.

Convince (kon-vins') [L. *convincere,-victum*, to refute, to prove, from *con* & *vincere*, to conquer.] *v. t.* (*shakes.*) *to overpower, to subdue* जिंकणें. २ (*a*) *to overcome by argument* कुंठित करणें, खातर *f*- खातरी *f*- खातरजमा *f.* करणें *g. of o.*, प्रचितीस-अनुभवास-हिशेवास-प्रत्ययास-ताळयास आणून देणें *g. of o.*,(*b*)*satisfy by proof* शंकानिवृत्ति *f.* करणें *g. of o.* ३ (*Bacon*) *to prove the fallacy of* खोटेपणा पटविणें. ४ (*Bib.*) *to prove guilty* दोष लागू करणें, अपराधी ठरविणें; as, "Which of you Convinceth me of sin?" Convince'ment *n.* खातरी करणें *n*, खातरी *f.* Convin'cer *n.* पुराव्यानें खातरी करणारा. Convin'cible *a.* खात्री करण्यालायक. Convin'cing *a.* खातरी करणारा, निश्चायक, निश्चयकारक, संशयनिवर्तक, संशयच्छेदी. Convin'cingly *adv.* खातरी होईल अशा रीतीनें, शंकानिवृत्तिपूर्वक. Convin'cingness *n.* खातरी करण्याची शक्ति *f*- धर्म *m*, निश्चायकता *f.*

Convivial (kon-viv'i-al) [L. *convivium*, a feast, from *con* & *vivere*, to live.] *a. festive, jovial, gay* मेजवानीचा, भोजनसमारंभाचा, आहारविहारासंबंधीं, आहारविहारविषयक, आनंदी, औत्सविक. २ मेजवानीचा भोक्ता, भोजनप्रिय, आहारविहारपर. Convive' *v. i.* (*Shakes.*) एकत्र जेवणें. Conviv'ialistn. Conviv'ial'ity *n.* ख्यालतमाशा *m*, आहारविहार *m.* २ आहारविहारप्रीति *f.* ३ चैनीपणा *m.* Conviv'ially *adv.*

Convoke (kon-vōk') [L. *con*, together & *vocare*, to call.] *v. t. to summon to meet, to assemble by summons* बोलावणें, जमवणें, निमंत्रणपूर्वक एकत्र करणें. also Con'vocate. Con'vocā'tion *n.* आमंत्रण *n*, निमंत्रण *n* (S), बोलावणें *n.* २ सभा *f*, मंडळी *f*, समाज *m*; as, "In the first there shall be a holy C." ३ (*Church of England*) धर्मोपदेशकाचें मंडळ *n.* ४ (*Oxf. University*) विद्वत्सभा *f*, कान्वोकेशन *n*, विश्वविद्यालयाची व्यवस्था करणारी व कार्यकारी मंत्रिमंडळ निवडणारी सभा *f.* (हिंदुस्थानांत पदवीधरांना पदव्या देण्याच्या समारंभास हा शब्द लावतात.) पदवीदानसमारंभ *m.* Con'vocā'tional *a.*

Convolve (kon-volv') [L. *con*, together & *volvere*, to roll.] *v. t. to roll or twist one part on another* केळीच्या पानासारखें वळवणें, वेटाळणें. Con'voluted' *a. bot.* (केळीच्या पानाच्या) गुंडाळीसारखा. Convolū'tion *n* वळी *f*, सुरळी *f*, वळकटी *f*, पीळ *m.* २ *anat.* कोणत्याही अवयवाच्या भागाची अनियमितपणें झालेली वळकटी *f*, वेटाळें *n*, आवर्त; as, "The C.s of the intestines, the cerebral C. s."

Convolvulus (kon-vol'vū-lus) *n.* bot. *turpethum* तडतड *f*, तेड *n.* नांवाची वनस्पति.

Convoy (kon-voy') [Fr. *convoyer*, O. F. *conveier*, See Convey.] *v. t. to escort* वाटेनें राखण करून पोहोंचविणें, बरोवर जाऊन सुखरूप पोंचता करणें, मार्गरक्षण करून नेणें. C. *n.* पावणी *f*, तैनात *f*, राखण *n.* २ *a vessel, fleet* युद्धसामग्री पोंचविणारीं जहाजें *n. pl.* वगैरे. ३ *a protecting force accompanying ships* रखवालीचें सैन्य *n.* ४ (*obs.*) *conveyance* वाहन *n.* ५ गाडीचा वेग बंद करण्याकरितां केलेला चाप *m*- पकड *f*, अटक *f.*

Convulse (kon-vuls') [L. *convellere, convulsus*, to tear up, to shake, from *con* & *vellere*, to pluck, to pull.] *v. t. to contract violently and irregularly, as the muscular parts of an animal body* आंचके देणें. २ *to shake with irregular spasms*, as *in excessive laughter or agony from grief or pain* खुबळणें; as, "With emotions which checked his voice and C. ed his powerful frame." ३ *to agitate* थरारणें, कांपणें, क्षोभ *m*- व्याक्षोभ *m*- &c. करणें *g. of o*; as, "The world is C.ed by the agonies of great nations." Convulsed' *p.p.* आंचके दिलेला, &c. [TO BE C. d ओढी *f. pl.* येणें, आंचका येणें, वळणें, घुटवळणें.] २ क्षुब्ध, क्षुभित. Convul'sible *a.* Convul'sion *n. med.* आंकडी *f*, कंप *m*, झटका *m*, आंचका *m.* [INFANTILE

C. बाल्यग्रह *m.* ] २-*act.* वळणें *n.–state* झटका *m.* ३ क्षोभ *m*, क्ष्याक्षोभ *m*; as, "Times of violence and C." [ POLITICAL C. राज्यांतील अंतःक्षोभ *m*- धामधूम *f.* ] Convul'sional, Convul'sionary *a.* Convul'sive *a.* आंकडीचें, आकर्षक, आंचक्याचा; as, "An irregular convulsive movement may be necessary to throw off an irregular, convulsive disease." Convul'sively *ad.* Convul'siveness *n.*

Cony, Coney ( kō'ni or kun'i ) [ O. E. *coning, conig, coni.*—O. Fr. *connin, conin, connil*, from L.*cuniculus*, a rabbit. cf. Sk. खन्, to dig. ] *n.* ( *Zool.* ) ससा, सशासारखें एक जनावर *n.* Cony-burrow *n.* ससे वाढविण्याची जागा *f.* Cony-catch ( *Shakes.* ) *v. t.* ठकविणें, फसविणें. Conycatcher *n.* ठक. Cony-wool *n.* सशाची लोकर *f*- लव *f.*

Coo ( kōō ) [Onomatopoetic, in imitation of the sound made by doves. ] *v. i.* घुमणें, घुंघूं करणें. २ *to act in a loving way* प्रेमानें गोंजारणें, प्रेम दाखविणें. Coo'ing *pr. p.* Cooed *pa. p.* Coo'ing *n.* घुमणें *n.* घुंघूं *n*, घुंबरडा *m.* Coo'ingly *adv.*

Cook ( kōōk ) [ Onomatopoetic. ] *v. i.* (R.) कोकिळेप्रमाणें ( कुंऊ ) आवाज करणें.

Cook ( kuk ) [ Ety. unknown. ] *v. t. to throw* फेंकणें; as, "Cook me that ball."

Cook (kuk) [*A.S.coc.*–L. *cocus, coquus*, from *coquere*, to cook.] *n.* स्वयंपाकी *pop.* स्वैंपाकी *m.* (and स्वयंपाकीण *pop.* स्वैंपाकीण female. C. ); रांधवणा *m.* आचारी *m*, रांधपी *m* ( रांधपीण *f.* ), सैपाकी *m*, पाचक *m.* ( पाचकी *f.* ), मुतपाखी *m*, पाककर्ता *m*, सोंवळेकरी *m*, बल्लव *m*, सूद *m*, (in contempt) भाकरबडव्या; C.s mate खटपट्या. २ ( *Zool.* ) एक प्रकारचा मासा. C. *v. t. prepare as food by boiling, roasting, baking* &c. स्वयंपाक *pop.* स्वैंपाक *m*-पाक *m*-पाक-सिद्धि *f*- सिद्ध तयार-करणें. २ (*by boiling*) शिजवणें, उकडणें, रांधणें. २ ( *by roasting, boiling* ) भाजणें. [ SWEPT AND SMEARED SQUARE TO C. IN चौका *m.* ] ४ *fig. to tamper with or alter*, often with *up* बनावट तयार करणें; as, "To cook up a story; To Cook up an account." ३ C. *v.i.* जेवण तयार करणें. Cooked *a.* स्वैंपाक केलेला, पक्व *pop.* पक्का, पाचित in comp.; as, तैलपाचित, घृतपाचित or ब्राह्मणपाचित ( स्त्रीपाचित ). Under-cooked हिरवा, हिरवस-ट. Cook'ery, Cook'ing *n.* स्वयंपाक *pop.* स्वैंपाक *m*, पाक *m*, पाकसिद्धि *f*, पाकनिष्पत्ति *f*, पाकक्रिया *f.* २ पाककौशल्य *n*, पाकचातुर्य *n.* Cookery-book *n.* सूपशास्त्राचें पुस्तक *n.* Cooking apples *n. pl.* शिजवून किंवा भाजून खाण्याचीं फळें *n. pl.* Cooking-range *n.* पुष्कळ चुली असलेलें शिजविण्याचें यंत्र *n.* Cook-maid *n.* आचाऱ्याच्या हाताखालीं राहणारी खटपटीण *f.* Cook-room *n.* स्वयंपाकघर *n*, ओंवरा *m*, पाकशाला *f*, पाकस्थान *n*, रांधतें घर *n*, पाकगृह *n*, सुदपाकखाना *m*, महानस(S) *n.* Cook-shop *n.* भोजनगृह *n*, खाणावळ *f.*

Cool ( kōōl ) [ A. S. *col, calan*, to be cold. ] *a. slightly cold* अमळ थंड, शीतल, थोडें थंड, मंदशीत, शीतस्पर्श; as, "Fanned with C. wind." २ *not ardent* धिमा, उदासीन, अनुत्साही, अनुत्सुक, अनास्थ, अनुत्कंठित, अनासक्त; as, " A. C. debater, lover, patriot &c. &c. ३ *not retaining heat* ( dress ) थंड, ऊब न देणारा, ऊबदार नव्हे असा, गारव्याचा; as, "C. dress." ४ *apathetic* आदरशून्य, स्नेहभावशून्य; as, "A C. manner." ५ *presuming and selfish, audacious* बेपरवा, उद्धट, धृष्ट, शिष्टाचाराच्या बारीकसारीक गोष्टीकडे लक्ष न देणारा; as, "C. behaviour." ६ ( applied facetiously, in a vague sense, to a sum of money) ( विनोदानें-थट्टेनें ) रोकडा, चांगला; as, "Leaving a C. thousand to Mr. Matthew Pocket." C. *n.* थंडावा *m*, थंडोसा *m*, थंडी *f.* [ C. ( OF THE DAY) HOURS OF MORNING AND EVENING थंडा वेळ *m*, OR *f.* शिळोपा *m.* शिराळ *m, f.* ] C. *v. t. to make coldish* थंड करणें, उष्णता मोडणें-घालवणें *g. of o.*, निववणें; as, "Ice cools water." २ *to allay, to moderate* थंड-शीतल करणें, निववणें, शांत करणें; as, "To C. raging emotions, excited passions &c." ३ *fig.* ( one's ardour, affection, &c. ) थंड-मंद करणें, विरजण *n*-विरझण *n.* घालणें, माया पातळ करणें. C. *v. i.* (*lit.*) थंडावणें, निवणें, थंड होणें, उष्णता *f.* जाणें-मोडणें *g. of s.* २ *fig.* (zeal, ardour, affection ) थंडावणें, निवणें, थंड होणें, आळसणें, विरजण *n*- विरझण *n.* पडणें *in, con.* ३ ( anger ) निवणें, थंडावणें, शांत-थंड होणें. Cooled *a.* ( v. V. T. I.) थंड केलेला, मोडलेल्या उष्णतेचा, हततापं, हतोष्ण, शीतलीकृत. ( v. V. I. ). थंडावलेला, निवालेला. २ गतप्रीत. ३ शांत झालेला. Cool'er *n.* थंड-शांत करणारें. २ ज्या भांड्यांत प्रवाही पदार्थ अथवा दुसऱ्या वस्तु थंड होतात तें भांडें *n*, शीतक *n.* Cool-headed *a.* शांतचित्त *n*, Cool-headedness *n.* शांतचित्तता *f.* Cool'ing *a.* ( an article of diet, a medicine) थंड, थंडा, शीतल *pop.* शीतळ, सरद, शीतवीर्य, उष्णता-दाहशामक. Cool'ish *a.* Cool'ly *a.* (*obs.*) थंड. *adv.* थंडपणानें, शांतपणानें, सावकाशीनें, दमाखालीं, धिराईखालीं, धीरेधीरे, आस्तेआस्ते. Cool'ness *n.* थंडपणा *m*, थंडाई *f*, शीतळाई, *f*, मंदशैत्य *n*, थंडावा *m*, थंडोसा *m.* २ अनुत्साह *m*, अनुत्सुकता *f*, सावकाशी *f.* ३ स्नेहाची मंदी *f*, पातळाई *f*, अनुरागशैथिल्य *n.* ४ ( after heat ) थंडावा *m*, थंडोसा *m.* Cool tankard *n.* शीत पेय *n.* Coolth (dial) थंडाई *f*, शीतलता *f*, मंदशैत्य *n.* To cool the heels (*colloq.*) *to dance attendance* थुंकी झेलणें, दारीं तिष्ठत राहणें. To cool down थंड होणें, थंड पडणें, थंडगार होणें. To take a thing coolly दमानें-थंडाईनें-सावकाशीनें ऐकून घेणें-सोसणें.

Coolie, Cooly ( kōōl'i ) [ Hind. *kūli*, a porter, a labourer. ] *n.* बिगारी *m*, हेलकरी *m*, पांटीवाला *m*, (*fem.* पांटीवाली *f.*) मजूर *m*, हमाल *m*, ओझें वाहणारा माणूस *m.* [ BUSINESS OF A C. हेलपाटी *f.* ]

Coom (kōōm) [A. S. cf. Icel. *kām*, film of dirt.] *n.* कीट *m*, मळ *m*, मळी *f*, काजळ *n.*

Coomb (kōōm) [A. S. *cumb*, a liquid measure.] *n.* Written also Combe. धान्य मोजण्याचें चार बुशेलांचें माप *n.*

Coop (kōōp) [A. S. *cypa*, from L. *cupa*, a vat, tub.] *n.* (दारू बिघडूं नये म्हणून ती ठेवण्याचें) पीप *n.* २ (लहान प्राण्यांचा) कोंडवाडा *m*, खुराडें *n*, खुराड *n.* ३ (*Scotch*) छकडा *m*, लहान गाडी *f.* C. *v. t.* कोंडणें, कोंडून ठेवणें, कोंडींत घालणें, कोंडी *f.* करणें. *y. of o.* Coop'er *n.* पिंपें करणारा. C. *v. t.* पिंपें तयार करणें. Coop'erage *n.* पिंपाचा कारखाना *m.* २ पिंपाची मजुरी *f.* ३ पिंपें करण्याचा धंदा *m.* Coop'ering *n.* Coop'ery *n.* पिंपें करण्याचें काम *n.*

Co-operate (kō-op'ėr-āt) [L. *co*, & *opus*, work.] *v. i.* *to act jointly with* मिळून-सोबतीनें काम *n*-उद्योग *m.* करणें, संभूयकार्य *n.* करणें, सहोद्योग *m.* करणें, सहकार *m*- सहकरण *n*- सहकारिता *f*-साहाय्य *n.* करणें, सहाय-सहकारी-समानक्रियाकारी &c. होणें. Co-operā'tion *n.* (v. v.) *-act.* सहकार *m*, सहकरण *n*, सहक्रिया *f*, सहकारिता *f*, सहकारित्व *n*, परस्परसाहाय्य *n*, एकमेकांस मदत *f*, सहोद्योग *m.* [CO-OPERATION OF LABOUR मजुरदारांचा सहोद्योग *m.* PARTIAL C. अंशिक सहोद्योग *m.*] Co-op'erātive, Co-op'erant, Co-op'era'ting *a.* मिळून काम करणारा, सहकारी, एककार्योन्मुख, एककार्योद्यत, सहोद्योगी; as, "C. society, C. store." [CO-OPERATIVE BANKS समाईक भांडवली पेढ्या *f. pl.*, C. CREDIT SOCIETY सहकारी पतीची पेढी *f.* C. PRINCIPLES सहोद्योगतत्वें *n. pl.* C. PRODUCTION सहोद्योगफल *n.* C. SOCIETY सहकारी मंडळी *f.*] Co-op'era'tor *n.* मदत करणारा, साहाय्यकारी, सहोद्योगी.

Co-ordain (kōordān') [See co-ordinate.] *v. i.* (विशेष कामाकरितां) दुसऱ्याचा साथीदार म्हणून नेमणें.

Co-ordinate (kō-or'di-nāt) [L. *co* & *ordinare*, *ordinatus*, to regulate.] *a.* *equal in rank or order* एकाच पदवीचा, बरोबरीचा, समान पदवीचा, समपर्याय, समपदस्थ, समतोल. २ *math. pl.* भुजयुग्म. C. *v. t.* बरोबरीचा करणें, समानपद करणें. C. *n. astron.* स्थाननिर्णायकवृत्त or रेषा *f.* २ *geom.* निर्णायकभुज *m*- अंतर *n*, भुजयुग्मापैकीं एक, *pl.* भुजयुग्म, भुज आणि कोटिभुज. [BIPOLAR C.s द्विध्रुवीय भुजयुग्म. C.s CARTESIAN कारटीसचें भुजयुग्म. C.s GENERALISED साधारण भुजयुग्म. C.s POLAR अक्षीय भुजयुग्म. C.s QUADRUPLANER चतुःफलक भुजसमुदाय. C.s TRILINEAR त्रिफलक भुजसमुदाय. C. s TANGENTIAL स्पर्शीय भुजसमुदाय. C.s VECTORIAL नाभिकर्णीय भुजसमुदाय.] Co-ordinance *n.* एकक़ायदा *m*, सहनियम *m.* Co-or'dinately *adv.* Co-or'dinateness *n.* Co-or'dinā'tion *n.* *the act of putting in the same order, class, rank, dignity, &c.* सहवर्गीकरण *n*; as, "The C. of the executive, legislative and the judicial authority in forming a government." २ *harmonious adjustment* (निरनिराळ्या अवयवांचा) परस्परानुकूल व्यापार किंवा कार्य; as, "A. C. of functions." ३ *the state of being co-ordinate or of equal rank, dignity, power, &c.* समानपदता *f*; as, "In this high court of parliament, there is a rare C. of power." Co-or'dinative *a.* Co-ordinate plane निर्णायक भुजफलक. Geographical co-ordinates एखाद्या स्थलाचा अक्षांश आणि रेखांश.

Coot (kōōt) [M. E *cote*, *coote*, a water-fowl.] *n.* *zool.* पाणकोंबडी *f*, जलचर प्राणी *m.* २ पाणबुड्या *m.* ३ *colloq. stupid fellow* बेअकली-मूर्ख मनुष्य *m*,

Coot (kōōt) *n.* घोटा *m*, गुल्फ *m.*

Cooter (kōōt'er) *n.* *zool.* फ्लारिडा देशांतील गोड्या पाण्यांत राहणारें कासव *n.*

Cop (kop) [A. S. *cop*; Ger. *kopf*, head.] *v. t.* फेंकणें; as, "C. it here." २ टोलावणें, मारणें; as, "C. a ball with a bat."

Cop (kop) *n.* वस्तूचा शेंडा *m*, डोकें *n*, तुरा *m.* २ *a conical mass of coiled thread, yarn or roving, wound round a spindle, &c.* कुकडें (?). ३ *a tube or quill upon which silk is wound* रेशीम गुंडाळण्याची नळी. ४ See the word Merlon. ५ *policeman (slang)* शिपाई. Copper *n.* शिपाई *m.* To get copped पोलीस शिपायाकडून पकडला जाणें.

Copaiba, copaiva (kō-pā'-ba, kō-pā'-vā) [Sp. & Port. from Brazil *cupauba.*] *n. med.* एक प्रकारची औषधी वनस्पती. Balsam Copaiba कोपायबा नांवाच्या वनस्पतीचा डिंकासारखा पदार्थ. हा विशेषेंकरून परम्याच्या विकारांत पोटांत देतात, व यानें लघ्वी साफ होते व तिची जळजळ कमी होते.

Copal (kō'-pal) [Sp. from Mexican *copalli*, a generic name of resins.] *n.* (in making varnishes) चंद्रुस *m*, राळ *f.*

Coparcener, See Copartner.

Copartner (kō-p-ärt'-nėr) [L. *co* + Partner which See.] *n.* (दुसऱ्या बरोबरचा) सरकतदार-पातीदार-सहभागी, समांशी, अंशभागी, सहभागीदार, हिस्सेदार. Copart'nership *n.* सरकत *f*, भागी *f*, भागीदारी *f*, पाती *f.* Copart'nery *n.* हिस्सेदारी *f.* Copar'cener *n.* हिशाचा वांटेकरी, वारस, सहांशभाक्, सहांशहर, घरभाऊ *m*, विभागी, सहभाग, सहभागी, सहांशी, तक्षीमदार. Copar'cenary *n.* [L. *co* & Parcenary.] *n. law. joint heirship* सारखा वारसा *m*, सहभागित्व *n*, सहभागिभाव *m*, सहांशित्व *n*, भागसाम्य *n*, अंशसाम्य *n. pl.* Coparcenaries. Copar'ceny *n.* वारसाचा सारखा वांटा *m*, रिक्थसमभाग *m.*

Copatriot (kōpä'triot) [L. *co* & Patriot.] *n. a.* *joint patriot* समस्वदेशाभिमानी, देशबंधु *m.*

Cope (kōp) [O. Fr. *Cape*–L. L. *capa*, a cape.] *a.* शिरस्त्राण *n*, टोपी *f.* २ छत (used vaguely), *n.* छत्री *f.* (used vaguely). ३ पाद्र्याचा एक प्रकारचा पायघोळ

झगा *m* (हा धर्मविषयावर व्याख्यान देतांना घालतात). ४ (*founding*) सांचाच्या टोंकाचा भाग *m*. C. *v. i.* (*obs.*) घुमटाकार बनणें-होणें, वांकणें, छतासारखें होणें. Cope-stone, Coping stone *n*. भिंतीच्या शिखरा-मथळ्या-वरचा दगड *m*. Co'ping (*arch.*) मुंढरी *f*, मुंढेरी *f*, मुंडेरी *f*, वरवंडी *f*, वरंडी *f*. (of a wall).

Cope (kōp) *v. t.* (*falconry*) *to pare the beak or talons of* (a hawk) ससाण्याची चोंच-किंवा पंजे कापणें.

Cope (kōp) [O. E. *copen*, *coupen*, to buy, from Dut. *koopen*, to buy.] *v. i.* (*obs.*) *to exchange or barter* अदलाबदल-मोबदला करणें, विनिमय करणें. २ *to encounter, to have to do with* मिळणें, भेटणें, मुलाखत होणें; as, "Horatio, thou art e'en as just a man, As e'er my conversation coped withal." ३ (followed by *with*) *to match, to equal* बरोबरी करणें, लढणें, झुंजणें, पोटरीस पोटरी *f*, घासणें (loosely), पायास पाय *m*. देणें (loosely), मुजेस भूज *f*. देणें or देऊन असणें, टक्कर *f*. मारणें-देणें, खांद *m*. बांधणें-करणें *with* शीं *of o.*, स्पर्धणें, स्पर्धा करणें. Cope *v. t.* (*Shakes.*) *to requite* उपकार इत्यादिकांची फेड करणें, फेडणें. २ *to meet, to encounter* सामना देणें. *Shakes.* Copes'mate *n.* (*obs.*) सोबती, गडी, भागीदार.

Cope-chisel (kōp-chiz'el) *n*. खांचा पाडण्याचें-पोखरण्याचें हत्यार *n*.

Copeck, kopeck (kō'pek) [Russ. *kopeica.*] *n. a Russian copper coin* रशियन लोकांचें तांब्याचें नाणें *n*.

Copernican (kō-pėr'ni-kan) [After Nicholas Copernicus, the Prussian astronomer (1473-1543)]. *a. pertaining to the doctrine of the mobility of the earth and the immobility of the Sun* कोपर्निकसच्या मताचा; as, "The C. system of astronomy as opposed to the Ptolemaic system." Copernicanism *n*. कोपर्निकसचें मत *n*. (सूर्य स्थिर आहे व त्याभोंवतीं पृथ्वी फिरते असें कोपर्निकसचें मत होतें.)

Copier } Copyist } नक्कल करणारा; See Copy.

Copious (kō-'pi-us) [Fr.L. *copia*, abundance.] *a. plentiful, abundant* बहुत, पुष्कळ, विपुल, मनस्वी, खूप, रगड, मुबलक, उमोप. Copiously *adv.* बहुत, पुष्कळ, पुष्कळपणीं. Cō'piousness *n*. पुष्कळपणा *m*, विपुलता *f*, बाहुल्य *n*, प्राचुर्य *n*, वैपुल्य *n*.

Coplanar (kō-plān'er) *n. math.* स्पर्धी धरातल.

Copolar (kō-pōlar) *a. math.* ध्रुवस्पर्धी.

Copper (kop'-pėr) [M. E. *coper*. L. L. *cuper*, from *cuprum*, for earlier *cuprium*, *cyprium æs* Cyprian brass from Gr. *kyprios* of Cyprus, Gr. *kypros* anciently noted for its copper mines.] *n. the metal* तांबें *n*, ताम्र *n*. [BRICK. (SOLID AND FLAT MASS) OF C. तांबोटी *f*. CALX OF C. ताम्रभस्म *n*, ताम्र *n*. COPPER-CHANGE खुर्दा *m*. COPPER PIECE ताम्रमुद्रा *f*. IN CANT PHRASEOL. धाकटा नारायण *m*. COPPERY DECOCTION (AS A VOMIT) तांब्याचा उकाळा *m*. SULPHATE OF C. मोरचूत-द *n*, ताम्रगर्भ *m*.] २ तांब्याचें नाणें *n*. ३ तांब्याचें भांडें *n*. ४ *pl. naut.* जहाजाच्या जेवणाच्या खोलींतील सैंपाकपात्र *n*. as, "A ship's C.s." (हें वाष्पपात्रा boiler सारखें असतें.) C. *a*. तांब्याचा, ताम्रमय, ताम्रमिश्रित; as, "A C. tube." २ तांब्याच्या रंगाचें, तांबडें. C. *v.t. to coat with copper* (च्या) वर तांब्याचा पत्रा चढवणें, तांब्यानें मढवणें. Copper-bottomed *a*. बुडाशीं तांब्याचा पत्रा मारलेला आहे असें (as a ship). Copper-captain *n*. खोटेंच आपल्याला कॅप्टन म्हणवून घेणारा. Copper-coloured *a*. तांब्याच्या रंगाचा. Copper-faced *a*. वरचा पुढा तांब्याचा असलेला. Copper-fastened *a*. तांब्याच्या खिळीनें बसविलेलें. Copper-head *n*. अमेरिकेंतील एक प्रकारचा विषारी सर्प *m*. Copp'ering *n*. तांब्याचें आच्छादन *n*. तांब्याचा मुलामा *m*. Cop'perish, Cop'pery, Cū'preous *a*. ताम्रवर्ण, तांब्यासारखा. Copper-nose *n*. अतिमद्यपानाच्या योगानें लाल झालेलें नाक *n*. Copper-plate *n*. तांब्याची पट्टी *f*, ताम्रपट *m*, ताम्रफलक *m*. Copp'er-pyrī'tes *n*. गंधकमिश्रित अशुद्ध तांबें (ore) *n*. Coppersmith *n*. तांबट *m*, ताम्रकार *m*, ताम्रिक *m*. Copperworks *n*. तांब्याचा कारखाना *m*. Copper-worm *n*. *rīngworm* गजकरण *n*, गजकर्ण *n*. Hot Coppers दारू अतिशय पिऊन भाजलेला घसा व जीभ.

Copperas (kop'-pėr-as) *n*. हिराकस *m*.

Coppice (kop'-pis), Copse (kops) [O. Fr. *copeiz*, from *coper couper*, to cut,–Fr. *cop*, *coup*, a blow. L. G.] सर्पणाकरितां तोडावयाचें रान *n*. Copse *n*. लहान झाडी C. *v. t.* कापणें, छाटणें. २ रोपे लावणें व ते नीट राखणें. Copse-wood *n*. एका प्रकारची लहान झाडी *f*. *n*. Copsy *a*. पुष्कळ झाडी असलेला.

Coppin (kop'pin) [See Cop.] *n. a cop of thread* कुकडें *n*, चाती (spindle) भोंवतीं गुंडाळलेली निमुळती दोऱ्याची गुंडाळी *f*.

Copple (kop'l) [A. dim. of *cop.*] *n. a hill rising to a point* निमुळती टेंकडी *f*. Copp'le-crown *n*. तुरा असलेलें डोकें *n*. Copp'le-crowned *a*. सचूड.

Copra (kōp'ra) [Malyalam *koppora*, Hind. *khopra*, the dried kernel of the cocoanut, from which cocoanut-oil is extracted.] *n*. खोबरें *n*. also Copra, Copperah, Coppra.

Coprolite (kop'-rō-līt) [Gr. *kopros*, dung & *lite.*] *n. a fossil excrement* भूगर्भांत दडपून गेल्यामुळें अश्मीभूत किंवा दगडासारखी झालेली जनावरांची विष्ठा *f*. अश्मीभूत विष्ठा *f*. Cop'rolit'ic *a*.

Coprophagan (kop-rof'-āgan) [Gr *kopros*, dung & *phagein*, Sk. भुज्, to eat.] *n. a dung-beetle* उकिरड्यावरील घाण खाऊन राहणारी पाकोळी *f*. Coproph'agist *n*. विष्ठा खाणारा. Coproph'agous *a*.

Copse (kops) see Coppice.

**Copt** (kopt) *n.* [ Abbrev. from L. *Aegyptius*, an Egyptian-Arab. *kibti. pl. kibt.* ] *n.* प्राचीन मिसर देशचा रहिवासी *m.* Copt'ic *a.* प्राचीन मिसर देशच्या रहिवाशांसंबंधीं. C. *n.* प्राचीन मिसरदेशाची भाषा *f.*

**Copula** ( kop'-ū-la ) [ L. *copula*, bond, band, See Couple. ] *n. logic. & gram. the word which unites the subject and predicate* उद्देश्य व विधेय यांस जोडणारा शब्द *m*, संयोजक. २ *music.* पकड *f.* (हारमोनियम किंवा आर्गनवाद्याच्या किल्ह्यांचे फळीला लावितात ती ). ३ *anat.* अस्थिबंधन *n.* Cop'ular *a.* Cop'ulate *v. t. & v. i. to unite in the sexual intercourse* जुगणें, लागणें, रतणें, अंगसंग *m*- संग *m*- मैथुन *n*- करणें ( applied to animals in general ). Copulā'tion *n.* जुगणें *n*, लागणें *n*, मैथुन *n*, अंगसंग *m*, रति *f*, रतिक्रिया *f*, संग *m*, संयोग *m*, समागम *m*, सुरत *n*, संभोग *m*, संयोजन *n.* २ *gram.* समाहार *m*, समुच्चय *m*, संयोग *m.* Cop'ulātive *a. gram.* उभयान्वयी, संयोजनक्षम. २ दोहोंस जोडणारा, संसर्गकारी. Cop'ula'tory *a.* संयोगकारी.

**Copus** ( kōpus ) *n.* सातूची दारू *f*, द्राक्षासव व मसाला यांचें मिश्रण करून केलेलें पेय *n.*

**Copy** ( kop'-i ) [ Fr. *copie*.–L. *copia*, abundance, number, also a transcript, from L. *coopes*, riches. ] *n.* Copies *pl.* ( *obs.* ) *plenty of anything* विपुलता *f.* २ *an imitation, transcript or reproduction of an original work* नक(क्क)ल *f*, उतारा *m*, प्रतिलेख *m*, प्रत *f*; as, "A C. of a letter, an engraving, a painting or a statue." ३ *an individual book* प्रत *f*, पुस्तक *n*; as, "A C. of the works of Milton." ४ *a pattern, model or example* नमुना *m*, कित्ता *m*, निदर्शन ( S ) *n*; as, "His virtues are an excellent C. for imitation." ५ *printing* छापण्याकरितां तयार केलेला लेख *m.* ६ *a writing paper of a particular size*, See Bastard. C. *v. t. to write, print, engrave or paint after an original* उतरणें, नकल-उतारा करणें, उतरून घेणें, ( ची ) नकल-प्रत करणें, नमुन्याप्रमाणें उतरणें. २ *to imitate* कित्ता-वळण घेणें, ( च्या प्रमाणें ) अनुकरण-अनुसरण करणें, नकल करणें. C. *v. i. to make a copy, to imitate* नकल करणें-उतरणें. २ *to yield a duplicate or transcript* ( ची ) नकल-उतारा होणें; as, "The letter did not C. well." Cop'ied *pa. t. & pa. p.* Cop'ier, Cop'yer, Cop'yist *n.* लेखक, अनुकरण करणारा, लिपिकार, नकलनवीस. २ चोरून नकल करणारा. Copy-book *n.* वळणखरड्यांची चोपडी *f*, खरडेवही *f.* Copy-hold *n. Eng. law.* देशाचारप्रमाणें दिलेला पट्टा *m*- सनद *f.* [ COPYHOLD TENURE पट्टेदारी *f.* २ सनदी जमीन *f.* ] Copy-holder *n. Eng. law.* पट्टेदारी जमिनीचा मालक. Cop'ying *n.* उतरणें *n*, नकल करणें *n.* २ अनुसरण *n*, अनुकरण *n.* C. *pr. p.* नकल करण्यासंबंधी, &c. Copying camera *n. photo.* एका प्रकाशलेखावरून दुसरे लहान किंवा मोठे प्रकाशलेख घेण्याची पेटी *f*- यंत्र *n.* Copying-press *n.* दाबून एका लेखाची नकल काढण्याचा हातछाप *m.* Copy-right *n.* ग्रंथावरचा मालकी हक्क *m*, मुद्रणाधिकार *m.* C. *a.* मालकी हक्क ठेवलेला-राखलेला. ( ग्रंथवगैरेंना हा शब्द लावतात ). C. *v. t.* ग्रंथकर्त्याचा हक्क संपादन करणें-मिळविणें. Copy-wheel *n. mech. eng.* अनुकरणचक्र *n.* A copy of verses कवितालेखन. Cop'yism *n.* खतेंपत्रें-कागदपत्र लिहिण्याचा धंदा *m.* Cop'yist *n.* खतेंपत्रें-कागदपत्रें लिहिणारा, लेखक. २ शब्दचोर, कवनचोर. Foulcopy खरडा *m*, मसुदा *m.*

**Coqueli-cot** ( kōk'li-kō ) [Fr.] *n. the wild poppy* खसखशीच्या वर्गांतील झाड *n.*

**Coquet** ( ko-ket' ) [ Fr. *coquet*, *coquette*, coquettish; *orig.* strutting like a cock, from *coq*, a cock.–L.–Greek. ] *v. t.* to *attempt to attract the notice, admiration or love of* (चें) मन-प्रीति आपल्याकडे आकर्षण्याचा प्रयत्न करणें. २ *to treat with a show of regard or love with a view to deceive and disappoint* भुलविणें, वरकांती प्रीति दाखविणें, नखरा करणें, नादीं लावणें; as, "You are Coquetting a maid of honour." C. *v. i.* ( followed by *with* ) *to trifle in love* वळेंच नखरा-हावभाव-खोटी प्रीति दाखविणें. २ *to simulate affection or interest* प्रेम आकर्षण करण्याचा प्रयत्न करणें. ३ *to deal playfully instead of seriously* लटकें-वरोपचारी प्रेम दाखविणें, खेळ मांडणें, थट्टा चालविणें; as, "We have C.ed with political crime." Coquet'ted *pa. t. & pa. p.* Coquet'ting *pr. p.* Co'quet'ry *n.* Coquetries *pl. trifling in love* नखरा, खोटा हावभाव, अदा, टेव, टेवरेव, नखरेबाजी, गमजा, विभ्रम. Coquette' *n. a vain flirt* ( formerly sometimes also applied to men ) नखरेदार-बाज स्त्री, चाळक, चाळकभवानी *f*, चटकचांदणी *f.* २ *zool. a tropical humming bird* उष्णकटिबंधांतील एक पक्षी *m.* (ह्याच्या गळ्यासभोंवतीं सुंदर पिसारा असतो). Coquet'tish *a.* हावभाव दाखविणारी, लटकाळी. २ नखरेबाज स्त्रीला योग्य-साजणारा. Coquet'tishly *adv.* Coquet'tishness *n.*

**Cor** ( kor ) *a prefix signifying* 'with' 'together' &c. See Con.

**Cor, Core** ( kor ) [ Heb. ] *n. a Hebrew measure of capacity, a homer* यहुदी लोकांचें एक माप. यांत आठ बुशील धान्य किंवा ७५ ग्यालन आणि ५ पिंट द्रव पदार्थ मावतो.

**Coracle** ( kor'-a-kl ) [ Welsh, *corwgl*, *cwrwgl*, from *corwg*, a round vessel. ] *n. a boat made of skins or oilcloth over a frame* टोंकरा, ठोकर, चामड्यानें किंवा तेलकापडानें मढविलेली डोणी *f.*

**Coracoid** ( kor'-a-koid ) [ Gr. *korax*, crow & *eidos*, form.] *a. shaped like a crow's beak* (काक)चंचवाकृति. C. *n.* काकचंचवाकृति अस्थि, अगर त्या अस्थीची रचना *f.*

**Coral** ( kor'-al ) [ O. Fr. *coral*, Fr. *corail*, from L. *coralium*, Gr. *corallion*, coral.] *n.* प्रवाळ *n*, पोंवळें. २

*the ovaries of a cooked lobster* शिजविलेल्या खेकड्याचा अंडाशय. ३ *a piece of coral used by children as a play-thing* लहान मुलांचें पोंवळ्यांचें केलेलें खेळणें, चुंपणी, चोंपण-णी, चोपणें n, चोखणें. Cora'led *a.* पोंवळ्यांनीं युक्त. Coral-fish *n.* प्रवालमत्स्य *m.* Coral-island *n. geogr.* प्रवाळाचें बेट *n.* Cor'alla'ceous *a.* पोंवळ्यासारखा. Corallif'erous *a.* प्रवालधर, प्रवालजनक. Coral'liform *a.* प्रवाळाकृति असलेलें. Cora'lligenous, Cora'lligenerous *a.* प्रवाळ उत्पन्न करणारें. Coralline *a.* प्रवालसदृशवस्तुमय. Cor'alloi'dal *a.* प्रवाळाकृति, प्रवाळासारखा. Coral-rag *n.* Coral-reef *n.* प्रवाळखडक *m.* Coral-sea *n.* आस्ट्रेलिया आणि न्यू हेब्रिडिज यांमधील पासिफिक महासागराचा भाग *m.* Coral-snake *n.* प्रवालसर्प *m.* Coral-tree *n.* पारिजात, पारिजातक. Coral-wood *n.* प्रवालकाष्ठ *n.*

Coranach ( kor'a-nak ) [ Gael. a crying.] *n. a lamentation for the dead, a dirge* मृतगीत *n*, शोकगीत *n*, विलापगीत *n.*

Corb ( korb ) [ L. *corbis*, a basket. ] *n.* कोळशाची लोखंडी टोपली *f*, घमेल-लें *n.* २ *arch.* इमारतींतील लांकडी किंवा दगडी घोड्याच्या आकृतीचें नकस काम *n.*

Corban ( kor'-ban ) [Heb. *gorban.* ] *n. an offering in fulfilment of a vow* देवास वाहिलेली नवसाची वस्तु *f.*

Corbeaux ( kor'bo ) *n.* मुर्देफरास, मेलेल्या मनुष्यास स्मशानांत वाहून नेणारे लोक, खांदेकरी, वाहक.

Corbel ( kor'-bel ) [ Fr. *corbeau*, for older *corbel*, dim. of L. *corbis*, basket. ] *n. arch.* भिंतींत बसविलेले दगडी लांकडी घोडे. C. *v. t. to support by a corbel or corbels* भिंतींत लांकडी-दगडी घोडे बसविणें, अशा घोड्यांचा टेंका देणें. Cor'belled *a.* Cor'belling *n.*

Corbie, Corby ( kor'bi ) [ Fr. *corbeau* dim. of L. *corvus*, a raven.] *n. pl.* Corbies. *zool.* डोमकावळा *m.*

Corcle, Corcule ( kor'-kl, kor'-kūl ) [ L. *corculum*, a little heart, dim. of *cor*, the heart. ] *n. bot.* ( *obs.* ) *the embryo or germ* वनस्पतीच्या बियांतील मोड *m.*

Cord ( kord ) [ Fr. *corde.*–L. *chorda*, catgut, chord, Gr. *korda*, the string of a musical instrument.] *n. a string or small rope composed of several strands twisted together* दोर *m*, दोरी *f*, चऱ्हाट *n*, रस्सी *f*, नाडा *m*, सडा *m*, सोल *m*, गुण *m*, दोरक *m.* २. १२८ घनफुटांचें परिमाण *n.* ३ *fig. an enticement, an allurement* पाश *m*, जाळें *n*, आमिष *n*, बंधन *n*; as, "The C.s of sin," "the C.s of vanity." ४ *anat. a tendon or nerve* रज्जु *m.* [ SPINAL C. ज्ञानरज्जु. ] C. *v. t.* दोरी बांधणें. २ *to ornament with ends as a garment* किनार लावणें. ३ *to arrange* ( wood, &c. ) *in pile for measurement by the cord* दोरीनें माप घेण्याकरितां ( लांकडें वगैरेची ) रास *f.* करणें. Cor'dage *n.* दोरखंडें, दोरडी. Cor'ded *a.* दोरीनें बांधलेला-गुंडाळलेला. Cord-grass दोरखंडी गवत *n*, दोरखंडें तयार करण्याचें एक प्रकारचें गवत *n.* Cord'ing *n.* बांधणें *n*, बांधण्याची क्रिया *f.* २ दोरखंडें, चऱ्हाटें. Cord'ite *n.* विनधुराची बंदुकीची दारू *f.* Umbilical cord ( *physio.* ) नाळ *f.*

Cordate ( kor'-dāt ) [ L. *cor*, *cordis*, the heart. ] *a. bot.* हृदयाकृति *f*, हृदयाकार. Cor'dately *adv.*

Cordial ( kor'jal, formerly kord'i-al ) [ L. *cordialis*, from *cor*, the heart. ] *a.* ( *obs.* ) *proceeding from the heart* मनापासून निघणारें; as, "A rib with C. spirits warm." *Milton* २ *sincere, warm, affectionate* अंतःकरणपूर्वकचा, मनापासूनचा, बेंबीच्या देंठापासूनचा, पोटांतीचा, मनोभावाचा, मनःपुरस्सर, जिव्हाळ्याचा; as, "C. thanks, reception, love &c." ३ *giving strength or spirit* पौष्टिक, पुष्टिकारक, तेजोवर्धक, दीपक, हृद्य (औषध); as, "Behold this C. julep here, that flames and dances in his crystal bounds." C. *n. anything that comforts, gladdens or exhilarates* आनंददायक-सुखदायक वस्तु *f*; as, "Charms to my sight and C.s to my mind." २ *med. any stimulating and invigorating preparation* तेजोवर्धक-पुष्टिकारक-हृच्चलनोत्तेजक औषध *n*; as, "A peppermint C." ३ *aromatized and sweetened spirit used as a beverage* सुवासित व गोड असा दारूचा अर्क *m.* Cordial- hearted *a.* Cor'dialise *v. i.* (R.) बंधुप्रीतीनें एकत्र राहणें, सहवास करणें, समागम करणें. C. *v. t. to make into a cordial* (चें) हृच्चलनोत्तेजक औषध करणें. २ *to render cordial or friendly* आनंददायक-स्नेहभावाचा-सुखाचा. Cor'dial'ity, Cor'dialness *n.* मनःपूर्वकता *f*, खरेपणा *m*, सौमनस्य *n*, सौहार्द *n.* Cor'dially *adv.* मनापासून, मनःपूर्वक, बेंबीच्या देंठापासून, अंतःकरणपूर्वक. Cor'diform *a.* हृदयाकृति *f.*

Cordillera ( kor-diler-a ) [Sp. from old Sp. *cordilla*, *cordiella*, dim. of *cuerda*, a rope or string. ] *n. geog. a mountain ridge or chain* पर्वतांची रांग *f.* ओळ *f.*

Cordon (kor'-dong) [ Fr. from *corde*, See Cord. ] *n. a cord or ribbon bestowed or borne as a badge of honour* मान *m*-महत्त्व *n*-दर्शक मिळालेली फीत *f* किनारी *f.* २ *mil.* लष्करी ठाण्यांची-चौक्यांची रांग *f*, नाकेबंदी *f.* ३ *a rich and ornamental lace or string used to secure a mantle in some costumes of state* उंची वंद *m.*

Cordonbleu ( kor'don-blā ) *n.* उत्तम अचारी *m*, उत्तम रसई बनवणारा, पाककुशल. Cordon sanitaire रोगाचा प्रसार बाहेर ठिकाणीं होऊं नये ह्मणून दूषित जागे भोंवतीं केलेली (लष्करी ) ठाणेबंदी *f*, नाकेबंदी *f.*

Cordonnet ( kor'don'nā ) [Fr. dim. of Cordon which see. ] *n.* गोंड्याला लावण्याच्या कच्या रेशमाच्या दोऱ्या.

Cordovan, Cordwain ( kor'-dō-van ) ( kord'wān ) [Sp. *cordoban*, from *cordova* or *cordoba*, in Spain.] *n.*

एक जातीच्या बकऱ्याचें किंवा घोड्याचें कमावलेलें कार्डोवा नांवाचें चामडें *n.* हें प्रथम स्पेनमध्यें कार्डोवा येथें तयार करीत. Cord'wainer *n.* चर्मकार *m,* चांभार *m.* Cord'wainery *n.*

Corduroy ( kor'dū-roi ) [ Probably Fr. *corde du-roi,* king's cord. ] *n.* सुती मखमल *f.* २ *pl.* सुती मखमलीचा मांडचोळणा *m.*

Core ( kōr ) [ O. Fr. *cor, coer, cuer,* from L. *cor,* the heart. ] *n. the heart or inner part of a thing, as of a column, wall, rope of a boil, &c.* आंतील भाग *m,* गर्भ *m,* गाभा *m.* २ *the central part of a fruit including the kernels or seeds* गीर *m,* गाभा *m.* ३ *the essence* तत्त्व *n,* हृद्गत *n,* अंतर्याम *n,* इंगित *n,* बीज *n,* रहस्य *n* ; as, "The C. of a subject." ४ *mech. eng.* गर्भ *m,* गाभा *m.* ५ *anat.* गळूं वगैरेंतील वी *f*-गड्डा *m,* मोख *n,* आंठी *f.* C. *v. t. to take out the inward parts of* ( फळांतील ) गीर *m*- गर्भ *m.* बाहेर काढणें ; as, "To C. an apple." २ *to form by means of a core as a hole in a casting* ओतकामांत खिटीनें-खुंटीनें पोकळी राखणें. Cored *a.* गीर असलेलें. Core'less *a.* गर्भरहित, निगर्भ, निस्सत्व, पोकळ. Corer *n.* गाभा-मधला भाग काढून टाकण्याचें हत्यार *n,* खंवणें *n.* True to the core अंतर्यामशुद्ध. Rotten to the core काळजापर्यंत-पुरा सडलेला. To the very core थेट अंतर्यामाशीं.

Core ( kōr ) [Fr. *corps.* See Corps.] *n.* ( *obs.* ) टोळी *f,* जमाव *m*; as, "He was in a C. of people." *Bacon.* Core term ( सजातीय वस्तूंचें ) परस्परसापेक्ष-अन्योन्यसापेक्ष पद *n.*

Coreclisis ( koreklisis ) *n. med.* डोळ्याच्या बाहुलीवर पडदा येणें, दृष्टिसंरोध *m.*

Corectopia ( ko-rektōpia ) *n. med.* डोळ्याची बाहुली मोठी होणें *n,* दृष्टिविकास *m.*

Co-regent ( kō-rē'-jent ) [ L. *co* & Regent. ] *n. a joint regent or ruler* राज्यव्यवस्थेच्या कामांतील सहकारी *m,* सहराज्यव्यवस्थापक.

Co-relation(kō-re-lā'shun) [ L. *co* & Relation. ] *n.* परस्परसापेक्षत्व *n,* अन्योन्यसापेक्षत्व *n,* ( सजातीय वस्तूंचें ) परस्परसापेक्ष-अन्योन्यसापेक्षपद *n.*

Co-relative ( kō-re-lativ ) *a.* See Correlate. C. term सापेक्ष पद *n.*

Co-religionist (kō-re-lij'un-ist) [L. *co* & Religionist.] *n.* धर्मबंधु *m,* एकाच धर्माचा मनुष्य *m.*

Coreoplasty ( kore-oplasti ) *n. med* नेत्रांतील कृत्रिम बाहुली तयार करणें, शस्त्रक्रियेनें नवीन बाहुली तयार करणें *n.*

Co-respondent (kō'-re-spond'ent) [ L. *co* & Respondent. ] *n. law.* सहप्रतिवादी *m.*

Corf (korf) [L. *corbis,* basket.] *n.* Corves *pl.* टोपली *f.*

Coriaceous ( kōr-i-ā'shus ) [ L. *corium,* leather. ] *a.* चर्मरूपी, चामड्यासारखें. २ *bot.* चिंवट.

Coriander ( kōri-an'-der ) [Gr. *koris,* bug, on account of the bug-like smell of the leaves. The leaves of coriander have no bug-like smell as is supposed in the above etymology. The seeds of Coriander have a bug-like appearance and hence this name for this plant. ] *n. bot.* कोथिंबीर *f,* धणा *m,* धना *m,* धान्यक *n.*

Corinthian (ko-rin'th'i-an) [From *corinthus,* Corinth a city of Greece famed for its luxury and extravagance. ] *a.* कॉरिंथचा. २ ग्रीक लोकांच्या वास्तुशिल्पशास्त्राच्या पद्धतीसंबंधीं. ३ *debauched in character or practice* दुराचरणी. ४ *pertaining to an amateur sailor or yachtsman* चैनी-शोकाकरितां खलाशीपणा करणाऱ्या लोकांसंबंधीं. C. *n.* कारिंथशहरनिवासी *m.* २. ( *Shakes.* ) *a gay licentious person* रंगेल-विषयी मनुष्य *m.*

Corium ( kō'ri-um ) *med.* अधस्त्वचा *f.* २ कवच *n.*

Co-rival ( kō-rī'val) [ L. *co* & Rival. ] *n. a rival, a corrival* सहप्रतिस्पर्धी *m.* Cor'ivalry *n.*

Cork ( kork ) [ Sp. *corcho*-L. *cortex, cortices,* bark, rind. ] *n. the outer layer of the bark of the cork-tree (Quercus Suber),* कार्क नांवाच्या झाडाची बहिस्त्वचा *f.* २ *a stopper for a bottle or cask cut out of cork* बूच (ज) *n,* दट्ट्या *m,* गुडदी *f.* ३ *bot.* पिधानकत्वचा *f.* C. *a* बुचाचें केलेलें. C. *v. t.* बूच-दट्टा मारणें-बसविणें, दट्ट्या मारून बंद करणें. Cork'age *n.* बाटल्यांचें बूच काढण्याची किंवा बसविण्याची मजूरी *f.* Cork-cutter *n.* बूच करणारा *m.* २ बूच करण्याचें हत्यार *n.* Corked *a.* बूच मारून बंद केलेलें. २ बुचामुळें नासलेली ( दारू वगैरे ). Cork-jacket *n.* ( पोहावयास शिकतांना पाण्यावर तरंगून रहातां यावें ह्मणून अंगांत घालण्याचें पडमांत बुचें भरून केलेलें ) बूचजाकीट. Cork-screw *n.* बूचइस्क्रूर *m,* बाटलीचा बूच काढण्याचा स्क्रू *m*- मळसूत्र. C. *a.* स्क्रूप्रमाणें, स्क्रूच्याआकाराचा, मळसूत्राकृति. C. *v. i.* वाटोळें फिरणें. C. *v. t.* मोठ्या कष्टानें गर्दीतून वाट *f.* काढणें. २. धाकदपटशानें-लुचेगिरीनें बातमी काढणें. Cork-tree *n.* बुचाचें झाड, किंवा ज्या झाडाच्या लांकडाचीं बुचें होतात तें झाड *n.* Cork'y *a.* बुचा-चें-सारखें. २ ( *Shakes.* ) *dry, shrivelled up* कोमेजलेला, वाळलेला. To be corked बुचाची घाण लागणें-येणें.

Corm ( korm ) [ See Cormus. ] *n. bot.* गड्डा *m,* घनकंद *m,* करमगड्डा *m.*

Cormogenæ ( kor'mo-genē ) *n. bot.* प्रकांडवनस्पति *f.*

Cormorant ( kor'mō-rant ) [ L. *corvus, marinus,* a sea-raven. ] *n. a voracious eater, a glutton* खादाड किंवा अधाशी मनुष्य *m.* Cor'morant *a. ravenous, voracious* खादाड, अधाशी.

Cormus (kor'mus) [Gr. *kormos,* trunk of a tree with branches cut off. ] *n. bot.* Same as Corm.

Corn (kawɹn) [A.S. *corn*.. cf. L. *granum*, Sk. जीर्ण.] *n.* दाणा *m.* २ धान्य *n*, दाणागल्ला *m*, सस्य *n.* (कणसांत-बोंडांत उत्पन्न होणारीं) धान्यें; जसें, गहूं, बाजरी, वगैरे. ३ सर्व प्रकारचें धान्य *n.* ४ कण *m.* C. *v. t.* दाणेदार-रवेदार-रवाळ करणें; as, "To C. gunpowder." २ (च्या) वर मीठ घालणें, खारवणें, मिठांत-मिठानें मळणें; as, "To C. beef." ३ दाणा घालणें-लावणें-देणें-चारणें. ४ *colloq.* मस्त-छाकटा बनवणें-करणें; as, "Ale C.s him." Corn-brandy *n.* धान्यापासून काढलेली ब्रान्डी-दारू *f.* Corn-beetle *n.* शेतावर-पिकावर पडणारा रोग *m.* Corn-bin *n.* कोथळा *m*- ळी *f*, कोठार *n*, पेटी *f*, पेंव *n*, ठिकी *f.* Corn-cake *n.* भाकरी *f*, पोळी *f*, वगैरे. Corn-chandler *n.* भुसारी *m*, गल्लेकरी *m*, दाणेवाला *m*, वाणी *m.* Corn-cob *n.* कणसाचें बुरखुंड *n.* Corn-cockle *n.* शेतांत उगवणारें जांभळ्या फुलांचें सुंदर व उंच रानटी गवत *n.* Corn-crake *n.* एक प्रकारचा शेतांत सांपडणारा पक्षी *m.* Corned *a.* दाणेदार-रवेदार. २ खारवलेले. Corn-country *n.* धान्यमुलूख *m.* Corn-exchange *n.* दाणेबाजार. Corn-factor *n.* धान्याचा घाऊक व्यापारी *m.* Corn-field *n.* शेत *n*, उभें शेत *n*, भरलेलें शेत *n.* Corn-floor *n.* खळें *n.* Corn-flower *n.* शेतांत उगवणारें एक प्रकारचें गवत *n.* किंवा असल्या गवताचें निळें फूल. Corn-fly, Corn-moth *n.* धान्याचा नाश करणारे किडे. Corning-house *n.* रवेदार दारू तयार करण्याची जागा *f.* Corn-land *n.* जिराईत शेत जमीन *f.* Corn-laws *n.* आयात धान्यावर कर बसविण्याकरितां इंग्लंडनें (सन १८१५ मध्यें) केलेले कायदे *m. pl.* हे कायदे सन १८४६ मध्यें रद्द झाले. Corn-loft *n.* कोठी *f*, कोठार *n.* Corn-market *n.* भुसार पेठ *f.* Corn-meter *n.* धान्याचें माप घेणारा सरकारी अधिकारी *m.* Corn-mill *n.* भात-धान्य भरडण्याचें यंत्र *n*, धान्यपेषणी *f*, गिरण *f.* Corn-rent *n.* खंडादाखल ऐन जिन्नस-धान्य देणें. Corn-stone *n.* तांबडा चुन्याचा दगड *m.* Corn-van *n.* धान्य पाखडण्याचें-वारवण्याचें यंत्र *n.* Corn-weev'il *n.* धान्यास लागणारी कीड *f.* Corn'y *a.* धान्यासारखें, धान्यापासून झालेलें. २ *slang.* झिंगलेला, मस्त. There is corn in Egypt *there is abundance* विपुलतादर्शक-सूचक म्हण. Bare or blank in corn दळा *m*, दल्हें *n*, ओंसा *m.* Bundles of unthrashed corn गूड *n*, उडवें *n.* Corn just sprung up वाप *n.* (S.), रूज(झ)वण. Corn soaked and puffed by parching लाह्या, भुरुंगुल्या. Erection over a heap of corn अढी. Grown corn, Sprouted corn रोह, रोप. Head or full ear of corn तटोरी-टटोरी *f*, पोठरा *m*, गाभोळी *f.* New corn नवधान्य, नवान्न. To tread out corn मळणें. Whilst you've corn to give out, you will have friends round about असतील शितें तर मिळतील भुतें.

Corn (kawɹn) [L. *cornu*, a horn.] *n.* (पायाला-पायाच्या बोटांना) बुटाच्या योगानें पडलेला घट्टा *m*, जोड्याचा घट्टा *m*- किणा *m.* Corn'eous *a. bot* शृंगसदृश, शृंगासारखा. Corn'y *a.* शृंगमय, शिंगाचें. Tread on one's corn दुसऱ्याच्या मनास लागेल असें करणें, दुसऱ्याचें मन दुखविणें.

Cornea (kawɹ'ne-a) [L. *corneus*, horny, from *cornu*, horn.] *n.* बाहुलीचें ढापण *n*- पडदा *m*, तारकापिधान *n.* २ डोळ्यांत फूल पडणें *n.* ३ *anat.* काळें बुबुळ *n.* Cornea opaca डोळ्यांत फूल पडणें.

Cornelian (kawɹ-nē'-li-un) [L. *cornu*, horn so called from its horny appearance when broken.] *n. min.* अकीक *m*, एक प्रकारचा पाषाण. ह्याचा उपयोग छतासाठीं करितात. Also Carnelian.

Corneous (kawɹ'nē-us) [L. *corneus*, *cornu*, a horn.] *a.* शिंगाचा, शृंगरूप. २ *bot.* कठीण.

Corner (kawɹ'-nėr) [O. F. *corniere*, *cornier*,—L. L. *cornerium*, from *cornu*, horn, end.] *n.* कोन *m*, कोण *m*, कोपरा *m*, कोना *m*, कोनपडा *m*, कोनपा *m*, संधि *m*, सांद *f*, अस्र (S.) *n.* [CHANGING THE C. (AS OF A CAT WITH KITTEN) कोनपालट *m.* HOLES AND CORNERS, NOOKS AND RECESSES कोनेकोपरे *m. pl.*, सांदीकोंदी *f. pl.* IN EVERY HOLE AND C. कोणेकोणीं, सांदीकोंदी. TO DRIVE UP INTO A C. *to stop one's mouth, to pose* कोंडणें, कोंडमारा *m.* निरुत्तर *m.* करणें *g of o.*] २ *secret or remote place* गुप्त-आडजागा *f*, कोनपडा *m*, एकवसा or एकोसा *m.* [IN A C. एकोशास, एकोशीं. THING DONE IN A C. सांदींतली गोष्ट *f.* TO DO GREAT THINGS (MIGHTY FEATS, &C.) IN A C. सुन्या घरीं वाग देणें, चुलीजवळ शौर्य दाखविणें, गेहेनर्दत्व.] ३ सांदीकोंदींतला देश *m*- प्रदेश *m*; as, "They explored all corners of the country." ४ दिशा *f*, बाजू *f.* ५ गिऱ्हाईकांकडून हवी ती किंमत काढतां येण्याच्या इच्छेनें, विवक्षित सह व्यापाऱ्यांनीं सर्व किंवा जितका मिळेल तितक्या मालाची एकसट्ट्यानें खरेदी करण्यानें येणारी स्थिति *f.* C. *v. t.* कोनांत ठेवणें-ढकलणें. २ संकटांत घालणें. ३ *to get command of* (a stock, commodity) so as to put one's own price upon it (पुढें हव्या त्या किंमतीला विकतां यावा ह्मणून) सट्टा करणें. Cor'nered *a.* कोनांत ठेवलेला, &c. २ संकटांत टाकलेला. ३ कोन असलेला, कोनाचा, कोनी (in comp.; as चौकोनी, &c.). Corner-stone *n.* कोपऱ्याचा-कोनाचा दगड *m*, कोन्याचा दगड *m*, प्रधानप्रस्तर *m*, कोना *m*, कोणशिला *f.* २ *fig.* मूलाधार *m*, प्रधानवस्तु *f.* Corner-tooth *n.* घोडा चार वर्षांचा असतांना त्याला चार दांत येतात त्यांपैकीं प्रत्येक. Corner-teeth *pl.* Cor'nerwise *adv.* तिरकस, तिर्यक्. Cut off a corner *take a short cut* मधली किंवा मधून वाट काढणें, जवळच्या रस्त्यानें जाणें. Nook and corner कोनाकोपरा *m*, सांदीकोंपरा *m.* Keep a corner थोडीशी जागा राखून ठेवणें. The corner (*slang.*) *Tattersall's betting rooms in London* till (1867) at Hyde Park corner लंडन शहरांतील टाटरसालचा सट्ट्याचा बाजार. हा सन १८६७ पर्यंत चालू होता. To make a corner, *to combine in order to*

*control the price of a given article and thus secure enormous profits* (पुढें हवा तितका नफा मिळवितां यावा ह्मणून) जुटीनें एकदम बाजारांतील सारा माल खरेदी करणें, तो माल दुसरीकडे मिळेनासा करणें. To turn the corner कोंपऱ्यावर वळणें. २ *fig.* संकटांतून पार पडणें. Within the four corners of (च्या) चतुस्सीमेंत.

Cornet (kawɹ'-net) [Fr. *cornet*, from L. *cornu*, horn.] *n. mus.* तोंडानें वाजविण्याचें शृंग *pop.* शिंग *n.* २ (टोंकाकडे दुरमडलेला) निमुळता पुडा *m.* ३ *mil.* (A) घोडेस्वारांचें लष्कर *n.* (B) त्या लष्कराचें निशाण *n.* (C) घोडेस्वारांचा एक अंमलदार *m.* ४ प्राचीन काळची डाक्तर व बायका यांनीं घालण्याची चौकोनी टोपी *f.* Cornet a piston बिगुलासारखें पितळेचें वाद्य *n.* Cor'netcy *n.* स्वारांच्या अंमलदाराची पदवी *f.* Cor'neter *n.* बिगुलासारखें पितळेचें वाद्य वाजविणारा *m,* शिंगाड्या *m,* शिंग वाजविणारा *m.* Cor'netist, Cor'nist *n.* Same as Cor'neter.

Cornice (kawɹ'-nis) [Fr. *corniche.*–It. *cornice.*–L. *coronis*, a curved line.] *n. arch.* कंगोरा *m,* कंगणी *f,* गलथा *m,* कारनिस. [C. UNDER A CEILING गोट *m,* गोठ *m,* छतपट्टी *f.*] C. *v. t.* कंगोरा घालणें. Cor'niced *p. a.* Cornice- hook-pole,-rail *n.* चित्रें, पडदे वगैरे टांगण्यासाठीं कारनिसांतील आंकडी,-दांडी-कठडा. Cornice -ring *n.* तोफेच्या मोहऱ्याखालील कडी *f.*

Corniculate (kawɹ-nik'ū-lāt) [L. *corniculum*, little horn.] *a.* शृंगवत्, शृंगी, शिंगाच्या आकाराचा, शिंगासारखा वांकडा. Cor'nicle *n.* (*obs.*) लहान शिंग *n.* Cornif'ic *a.* शृंगोत्पादक. Cornificā'tion *n.* Cor'niform *a.* शृंगाकृति. Corni'gerous *a.* शृंगधारी, शृंगी.

Cornucopia (kawɹ-nū-kō'-pi-a) [*cornu copiae*, horn of plenty.] *n.* Cornucopia'o or Cornucopiæ *pl. an emblem of abundance* ज्यांतून फुलें व फळें निघालेलीं दाखविलेलीं असतात असें कृत्रिम शिंग (चित्र) *n.* ज्या बकरीनें ज्युपिटरास दूध पाजिलें तिचें शिंग; याची तारकागणांमध्यें स्थापना केली आहे व तें विपुलतादर्शक मानतात.

Cornute, Cornuted (kawɹ'-nūt, kor-nū'ted) [L. *cornutus*, horned, from *cornu*, horn.] *a.* शृंगाच्या आकाराचा, शृंगें असलेला, शिंगाळ, शृंगी.

Corolla (kō-rol'la) [L. *corolla*, a little crown or garland, from *corona* See Crown.] *n. bot.* पुष्पप्रभावळ *f,* फुलवरा *m,* अंतर्वेटिका *f,* अंतराच्छादन *n,* पुष्पांतर्वेटिका *f,* अंतःपुष्पकोश *m.* Cor'olla'ceous *a.* Cor'ollat'ed *a.* Corollif'erous *a.* Coroll'iform *a.* Coroll'ine *a.* अंतर्वेटिकेचा, अंतर्वेटिकीय.

Corollary (kor'-ol-lĕr'-i) [L. *corollarium*, gift, corollary, from *corolla.*] *n. an additional inference or deduction from a demonstrated proposition, a consequence* उपप्रमेय *n,* आनुषंगिक सिद्धांत *m,* आनुषंगिक सिद्ध गोष्ट *f,* (सिद्ध केलेल्या मुख्य सिद्धांतापासून आपोआप सिद्ध होणारा) उपसिद्धांत *m.* (*Shakes.*) २ (*obs.*) *something added or superfluous* अधिकदान *n,* उपराळा, फालतु भाग, फालतुक. Corollaries *pl.*

Coromandel (kor'ō-man'del) *n. geog.* कारोमांडल किनारा *m.*

Corona (ko-rō'-na) [L. *corona*, crown.] *n. arch.* (मेणबत्या लावण्याकरितां देवळाच्या छतापासून लोंबत असणारी दिवे लावण्याकरितां वर्तुळाकार केलेली) खोवणी *f.* २ *bot.* पुष्पमुकुट *m.* ३ *astron.* (खग्रास सूर्यग्रहणांत) सूर्या भोंवतालचें प्रभामंडल *n,* प्रभामुकुट *m.* [CORONA AUSTRALIS दक्षिण मुकुट *m,* ही राशी दक्षिण गोलार्धांत धनुराशीच्या दक्षिणेस व वृश्चिक राशीच्या उत्तरेस आहे. CORONA BOREALIS उत्तर मुकुट *m,* ही राशी उत्तर गोलार्धांत भूतप आणि शौरी यांचे मध्यें भुजंग राशीचे उत्तरेस आहे.] ४ *anat.* अगर्दीवरचा वाटोळा भाग *m,* शिखा *f,* मंडल *n;* as, "The C. of a tooth." [CORONA DENTIS दंतमंडल. CORONA GLANDIS मणिमंडल. CORONA VENERIS उपदंशमंडल.] ५ मेणबत्त्यांचें वाटोळें झुंबर *n. pl.* Corō'næ, Coronas. Cor'onal *n.* मुकुट *m.* २ माळा *f.* ३ कपाळाचें हाड *n.* Cor'onal, Cor'onary *a.* मुकुटासंबंधीं. २ कपाळाच्या हाडासंबंधीं, टाळूचा, टाळूच्या संबंधींचा. Cor'onate,-d *a.* Cor'onā'tion *n.* राज्याभिषेक *m.* राज्याभिषेकाच्या वेळचा थाटमाट *m,* राज्याभिषेकोत्सव *m.* २ राज्याभिषेकाच्या समयीं जमलेली मंडळी. Corō'nis *n.* संक्षेप चिन्ह *n*[']. Cor'onule *n. bot.* (लहान मुकुटाप्रमाणें) बीजाचा शिरोभाग *m,* मुकुटक *m.* Coronal atmosphere किरीटाकृति अगर प्रभारूप वातावरण *n.* The Sun's corona *astron.* सूर्याचे ग्रहणाचे वेळीं त्याचे सभोंवतीं जो प्रकाशगोल दिसतो तो, सूर्याचें प्रभामंडल *n.*

Coroner (kor'o-nėr) [Fr. *coruner*, coroner.–L. *coronarius*, a crown officer, from L. *corona*, a crown. In Saxon times it was the *coroner's* duty to collect the crown revenues; next, to take charge of crown pleas; but at present to uphold the paternal solicitude of the sovereign by investigating with the help of a jury all cases of violent, sudden or suspicious death.] *n.* अपघातमृताचा तपासनीस-चौकसनीस *m,* (संशयोत्पादक कारणानें आलेल्या) अपघाती मरणाची चौकशी करणारा *m.* C.'s inquest मयतकयास *m,* मयतचौकशी *f.*

Coronet (kor'o-net) [Dim. of O. Fr. *corone*, crown.] *n.* राजपुत्रांचा किंवा बडे लोकांचा मुकुट *m-* टोप *m-* मुकुटक *m.* २ शिरोभूषण *n,* मुकुटक *m.* ३ घोड्यांच्या खुरांचा (वरचा) मुकुटाकृति भाग *m,* मुकुट. ४ भाल्याचें लोखंडी टोंक *n.* also Cornet. Cor'oneted *a.*

Coronoid (kor'o-noid) [Gr. *korone*, a crow & *eidos*, form.] *a. anat.* काकचंचुसदृश, कावळ्याच्या चोंचीसारखा; as, "The C. process of the lower jaw."

Coronule (kor'ō-nūl) [See Corona.] *n.* (*bot.*) बियांवरील लव *f-* केंसाळी *f.*

Corporal (kawɹ'-pō-ral) [L. *corporalis*, from *corpus*, body.] *a. relating to the body* शरीरासंबंधीं, शारीरिक, कायिक, दैहिक. २ *material, not spiritual* भौतिक, पंचभूतात्मक, प्राकृतिक, आधिभौतिक, स्थूल, जड (in this sense written as Corporeal). Cor'poral, or Cor'pora'le *n.* सहभागितावस्त्र *n*, रोमन काथोलिक देवळांत प्रभुभोजनाचे-युखरिस्ताचे पदार्थ झांकण्याचें वस्त्र *n.* Cor'poral'ity *n.* सदेहता *f*, देह असलेली स्थिति *f*, देहवत्त्व *n*, शरीरवत्ता *f.* Cor'porally *adv.* देहानें, सदेह, मूर्तिमंत.

Corporate (kawɹ'-pō-rāt) [L. *corporatus*, from *corpus*, a body.] *a. united in a body or community, as a number of individuals who are empowered to transact business as an individual* कायद्यानें एकव्यक्तीभूत-एकव्यक्तित्वारोपित-(संस्था -समाज) संघीभूत, गणीभूत, श्रेणीभूत. [CORPORATE SOCIETY OR ASSEMBLY गण *m*, संघ *m*, श्रेणी *m.*] २ सनद दिलेला, सनदी, सनदी शहरासंबंधीं. ३ एकव्यक्तीभूत संस्थेसंबंधीं; as, "Corporate towns, C. property." ४ *united, general, collectively one* समुदित, एकत्रित, एकवटलेला. C. *v. t.* (*obs.*) गण *m*- संघ *m*- श्रेणी *m*. करणें, कायद्यानें एकव्यक्तीभूत करणें. C. *v. i.* (*obs.*) एकत्र होणें. Cor'porately *adv.* Cor'porateness *n.* संघस्थिति *f*, गणस्थिति *f.* Cor'porā'tion *n.* कायद्यानें एकच व्यक्ति ह्मणून मानलेला अनेकांचा समाज *m*-संस्था *f*– जमात *f*, गण *m*, संघ *m*, श्रेणी *m.* [जमात, गण, संघ, आणि श्रेणी ह्या शब्दांत CORPORATION शब्दांत असलेली एकव्यक्तित्वाची कल्पना आहे. FUNDS OF A CORPORATION गणद्रव्य. ARTICLES OR RULES OF A CORPORATION गणनियम. VILLAGE CORPORATION ग्रामश्रेणी. Cor'porā'tor *n.* जमातीचा-गणाचा-&c. सभासद *m.*

Corporeal (kawɹ'-pō'-ɹe-al) [L. *corpus*, body.] *a. consisting of a material body* देही, अंगी, शरीरी, भौतिक, स्थूल, जड; as, "C. frame, C. substance." Corpō'realise *v. t.* & *v. i.* सदेह-जड करणें-होणें. Corpō'realism *n.* जडवाद *m*, देहात्मवाद *m.* Corpor'ealist *n.* जडवादी *m.* Corpōreal'ity *n.* देहित्व *n*, जडता *f.* Corpō'really *adv.* Corporē'ity *n*, देह असलेली स्थिति *f*, देहित्व *n*, अंगित्व *n*, सदेहता *f.*

Corposant (kawɹ'-po-zant) [L. *corpus sanctum*, holy body.] *n.* जहाजावर दिसणारा विद्युत्प्रकाश *m.* याला St. Elmo's fire असें ह्मणतात.

Corps (kawɹ) [L. *corpus*, body] *n.* सैन्यदल *n*, चक्र *n*, सेनाभाग *m.*

Corpse (kawɹps) [L. *corpus*, body.] *n.* प्रेत *n*, मढें *n*, मुरदा or मुडदा *m*, शव *n*, कुणप *m.* [COLLECTING THE BONES AFTER BURNING A C. अस्थिसंचय *m*, अस्थिसंचयन *n.* GROUND FOR BURNING OR BURYING A C. स्मशान *pop.* मसण *n*, मसणवटी *f.*] Corpse-bearer *n.* खांदेकरी, खांद्या, शववाहक, प्रेतवाहक, वाहक. Corpse-candle *n.* प्रेत पुरण्याचे आदले दिवशीं त्याजवळ लाविलेली मेणबत्ती *f*, स्मशानांत दिसणारा मेणबत्तीसारखा उजेड *m.* Corpse-gate *n.* स्मशानद्वार *n.*

Corpulence (kawɹ'-pū-lens) See Corpus below.

Corpus (kawɹ'-pus) [L. *corpus*, the body.] *n. a body* शरीर *n*, (निर्जीव अथवा सजीव) देह *m*, काया *f.* २ जडवस्तु *f.* ३ एखाद्या विषयावरील सर्व वाङ्मय *n.* Cor'pulence, Cor'pulency *n.* ढमालेपणा *m*, दुलदुलीतपणा *m*, मेद *m*, मेदोवृद्धि *f*, मेदोवात *m*, भोपळ्या रोग *m* (*colloq.*), स्थौल्य *n*, स्थूलता *f*, मेदोबाहुल्य *n.* Cor'pulent *a. fleshy, bulky* ढमाल or ढमाल्या, कापशा, धोनशा, मेदोवृद्धीचा, स्थूल, स्थूलकाय, फोपशा. Cor'pulently *adv.* Cor'puscle *n.* रज *m*, कण *m*, अणु *m.* २ *anat.* रक्तगोलक *m.* also Corpuscule (*obs.*). Corpus'cular, Corpuscul'ā'rian *a.* Corpus'culā'rian *n. an adherent of the corpuscular or atomic philosophy* परमाणु हे सर्व वस्तूचे अत्यंत सूक्ष्म घटक आहेत असें मानणारा-सूक्ष्मपरमाणुवादी, सूक्ष्मवादी. २ *an adherent of the corpuscular theory of light* तेजःपरमाणुवादी. Corpuscular'ity *n.* Corpus delicti गुन्हा शाबीत करण्यास लागणारा अवश्य पुरावा. Corpuscular theory of light or Emission theory तेजःपरमाणुवाद. Corpus Christi N. त्रिने(नि)टी रविवारच्या नंतर येणाऱ्या गुरुवारीं युखरिस्ताच्या प्रीत्यर्थ उत्सव किंवा सण.

Corradiate (kor-rād'i-āt) *v. i.* एकाच विन्दूंत (विद्युत् किंवा प्रकाश) किरणांचें संमेलन होणें, प्रकाशकिरणांचें केंद्रीभवन होणें. Corradiā'tion *n.* केन्द्रीभवन.

Corral (kor-ral') [Sp. *corral*, a yard for cattle.] *n.* गोठा *m*, मेंढवाडा *m.* C. *v. t.* मेंढवाड्यांत घालणें.

Correct (kor-rekt') [L. *corrigere*, *correctum* cor, intens. & *regere*, to rule. Correct literally means to bring to a conformity with a settled standard or rule.] *v. t. to make right, to rectify* (ठराविक प्रमाणानियमाबरोबर आणण्याकरितां) सुधारणें, (र्शी) तंतोतंत करणें, निटावणें, नीट-शुद्ध करणें; as, "To C. manners." २ *to chastise, to chasten, to punish* शिक्षा *f*- करणें-देणें-लावणें, वाटेवर आणणें. ३ (*med*) *to obviate or remove, to counteract or change* समधात-दोषनिरास *m*-दोषापहरण *n.* करणें, निर्बाधता *f.* आणणें, दोष *m*- विकार *m.* मोडून टाकणें; as, "To C. the acidity of the stomach." ४ (a literary work) चुकी *f.* काढणें, शोधणें, शोध (S.) *m*, शोधन (S.) *n.* करणें *g. of o.*, शुद्ध करणें; as, "To C. the proofs." C. *a. just, proper* बराबर, तंतोतंत, नीट, ठीक, दुरुस्त, यथायोग्य, शिस्तवार. २ *esp.* (of conduct or of language) नीट, ठीक, शुद्ध, विशुद्ध, निर्दोष, दोषहीन-शून्य. Correct'able, Correct'ible *a.* सुधारतां येईल असा, शुद्ध करितां येईल असा, शुद्धिपात्र-क्षम. Correc'ted *a.* सुधारलेला, निटावलेला, नीट केलेला. २ शुद्धीकृत. ३ शिक्षा केलेला, शासन केलेला, दंडित. Correct'ly *adv.* बरोबर, ठीक, नीट, यथायोग्य, यथायुक्त,

चुकीवांचून, विनचूक. Correc'tion *n.-act.* बरोबर करणें *n*, निटावणें *n*, नीट करणें *n*, सुधारणी *f*, सुधारणूक *f*- दुरुस्ती *f.-act.* शोधणें *n*, शोध *m*, शोधन *n*, शुद्धि *f*, विशुद्धि *f*. २ शिक्षा करणें *n*, शिक्षा *f*. देणें *n*, शिक्षा *f*, शासन *n*, पारिपत्य *n*, तंबी *f*. [ House of C. तुरुंग *m*, कोंडा *f*, कैदखाना *m*. ] ३ *an error corrected* शोध *m*. ४ *med. abatement of noxious qualities* दोषशोधन *n*, निर्वीर्यीकरण *n*, विकार मोडणें *n*. ५ *an allowance made for the inaccuracy of an instrument* संस्कार *m*, बीजसंस्कार *m*. Correc'tioner *n*. (*Shakes.*) उनाड लोकांच्या शाळेंतला. Correct'or *n*. सुधारणारा, शिक्षा करणारा, तंतोतंत करणारा. Correct'ive *a*. सुधारणा-शिक्षा-शुद्धि &c. करण्याची शक्ति असलेला, (*med.*) समधात करणारा, भंजक (R.), दोषशोधक. Correct'ress *n. fem.* Correct'ness *n*. तंतोतंतपणा *m*, ठीकपणा *m*, दुरुस्तपणा *m*, यथायोग्यता *f*. २ शुद्धपणा *m*, शुद्धि *f*, विशुद्धि *f*, शुद्धता *f*, निर्दोषता *f*, दोषराहित्य *n*, दोषहीनता *f*. Correct'ory *a*. शुद्धिकारक.

*N. B.* -Correct ( ठराविक प्रती-प्रमाणा )शीं तंतोतंत-बरोबर करणें. Rectify सुव्यवस्थित करणें. Amend दोष काढून टाकणें. Reform दोष काढून टाकून चिरकाल-निरंतर टिकेल अशी, सुधारणा करणें.

[ मुख्य मॅजिस्ट्रेट *m*.

Corregidor (ko-rej'i-dōr) *n*. स्पेनदेशांतील शहरचा

Correlate (kor'-re-lāt) [L. *con*, with & Relate.] *v. i. to be mutually related* ( as father and son) परस्पर-संबंध होणें-असणें. C. *v. t. to put in relation with each other* एकमेकांशीं संबंध *m*-नातें *n*. जोडणें. C. *n*. Correlā'tion *n* परस्परसंबंध *m*, अन्योन्यापेक्षक संबंध *m*, परस्परान्वय *m*, अन्योन्यान्वय *m*. Correl'ative *a. having a reciprocal relation* परस्परसंबंधाचा, अन्योन्यसंबंधाचा, अन्योन्याश्रित, परस्पराश्रित. C. *n*. परस्परसंबंधी, इतरेतरसंबंधी, जो दुसऱ्याशीं निकट संबंध ठेवतो तो. २ *gram.* सर्वनामाचें तत्पद *n*, पूर्वगामी पद *n*. Correl'atively *adv*. Correl'ativeness, Correlati'vity *n*. परस्परसंबंध *m*, अन्योन्यसंबंध *m*, अन्योन्यान्वय *m*. Correlative term प्रतियोगीपद, सापेक्षपद.

Correption (kawr-ep'-shun) [L. *correptio*, from *corripere*, to seize.] *n*. (*obs.*) *chiding, reproof* वाग्दंड *m*, शब्दाचा मार *m*, खरडपट्टी *f*.

Correspond (kor-rē-spond') [L.prex. *con* & Respond.] *v. i.* (followed by *with* or *to*) *to be like something else in the dimensions and arrangement of its parts* (रचनेनें किंवा आकारानें) सारखवट असणें. २ (followed by *to*) *to be adapted, to suit, to agree, to answer* मिळणें, जमणें, जुळणें, जम *m*-जवा *m*. &c. बसणें *g. of o.*, जोडी *f*. बनणें *g. of o. recip.* ३ (followed by *with*) *to have intercourse or communion* (esp. through letters) पत्रव्यवहार करणें, कागदपत्राची वहिवाट *f*. ठेवणें, पत्रें *n. pl.* येणें जाणें *g. of s. recip.*, पत्रव्यवहार ठेवणें, पत्रोपत्रीं दळण वळण ठेवणें.

Cor'respond'ence,-cy *n*. कागदपत्राची वहिवाट *f*- भेट *f*-संबंध *m*, पत्रव्यवहार *m*, दळणवळण *n*. २ कागदपत्रें *n. pl*, जावसाली पत्रें *n. pl.* ३ मेळ *m*, ताळा *m* (घे-पाह-पडणें), तालामाला *m*, जम *m*, जवा *m*, उतारा *m*, जुळणी *f*, जुगल *f*, लाग *m*. ४ *congruity* परस्परयोग्यता *f*, अनुरूपता *f*, सादृश्य *n*, संबंध *m*, बरोबरी *f*. Cor'respond'ent *a*. अनुरूप, सदृश, तुल्य, लायक, सहगामी. २ (*obs.*) आज्ञाधीन, ताबेदार. C. *n*. कागदपत्राची वहिवाट ठेवणारा. २ वर्तमानपत्राला खबर देणारा, बातमीदार. ३ तारेनें किंवा पत्रानें व्यापार किंवा व्यवहार करणारा मनुष्य *m*. Cor'respond'ently *adv*. Corresponder, See Correspondent. Cor'respond'ing *a*. मिळणारा, जुळणारा, जुगता, वेताचा, समन्वित, अनुरूप, मिळता, अनुगुण. २ पत्रव्यवहारी. ३ *math.* अनुरूप, संगत. Cor'respond'ingly *adv*. Cor'respon'sive *a*. See Corresponding. Cor'respon'sively *adv*. Doctrine of correspondences सर्व सृष्ट पदार्थांत आध्यात्मिक प्रतिरूपें आहेत व तीं शोधून काढण्याची गुरुकिल्ली बायबलांत आहे असें मत *n*.

Corridor (kawr'-ri-dōr) [Fr. It. *corridore* or Sp. *corredor*, a runner, from L. *currere*, to run. ] *arch. a gallery or passage in a house* बंगल्यांतील-घरांतील सार्वजनिक तिव्हाटा-सज्जा *m*. २ *fort.* (R.) कोणत्याहि ठिकाणच्या किल्ल्याच्या आसपासचा झांकलेला रस्ता *m*, तटाभोंवतालची चोरवाट *f*, गूढपथ *m*, छन्नमार्ग *m*.

Corrigendum (kor'-ri-jen'dum) [L. *corrigens*, *pr. p.* of *corrigere*, to correct. ] *n*, शुद्धि *f*, शुद्धिपत्र *n. pl.* Cor'rigen'da.

Corrigent (kor'i-jent) [See above.] *n. med.* एखादें औषध नरम-सौम्य करण्याकरितां किंवा त्यांतील तीव्रता कमी करण्याकरितां त्यांत जी वस्तु घालतात ती, अपायनाशक *n*, हितसंस्कारक *n*. (औषध)

Corrigible (kor'i-ji-bl) [See above.] *a*. सुधारण्याजोगा-जोगता ; as, "A C. fault." २ (*obs.*) दंडार्ह, शिक्षार्ह, दंडनीय, दंड्य. ३ सुधारणारें. ४ (*obs.*) सुधारेल असा. Corrigibil'ity *n*. शिक्षार्हता *f*, &c.

Corrival (kor-rī'val) (R.) See Corival.

Corroborate (kor-ob'-o-rāt) [L. *con roborare*, *roboratum*, to strengthen. ] *v. t.* (*obs.*) *to make strong* मजबूत करणें, बळकटी *f*- बळ *n*- जोर *m* देणें-आणणें, पुष्टि *f*- पुष्टिकरण *n*- करणें, समर्थन *n*. करणें. २ *to make more certain* बळकटी *f*- बळ *n*. देणें-करणें, खरा करणें, सबळ करणें, पुष्टिकरण *n*. करणें *g. of o.* Corrob'orant, Corrob'ora'tive *a*. धातुपुष्ट, पौष्टिक, पुष्टिकरकारक, बलवर्धक. २ बळकटी देणारा-आणणारा. C. *n*. बलवर्धक-पौष्टिक औषध *n*. Corroborā'tion *n*. पुष्टिकरण *n*, बळकटी *f*- देणें *n*, सबलीकरण *n*, दृढीकरण *n*, बळकटी *f*, बळ *n*, मजबुती *f*, प्रत्यंतर *n*, आधार *m*. २ पुष्टि-बळकटी देणारी वस्तु *f*. Corrob'orā'tor *n*. Corrob'ora'tory *a*.

*N. B.* See the word Confirm.

Corrode ( kor-ōd' ) [ L. *con & rodere, rosum,* to gnaw. ] *v. t.* हळुहळु चावणें, कुरतडणें, खातां खातां खाणें, खाणें, खणणें (loosely), खांडणें ( loosely ), झिझविणें, झरविणें. २ तांब आणणें, तांबवणें, जंग-गंज चढवणें. C. *v. i.* खाणें. Corrod'ent *a* (R.) नाशक, क्षयकर. C. *n.* खाऊन टाकणारा पदार्थ *m.* Corrō'dibil'ity ( R. ), Corros'ibil'ity *n.* Corrō'sibleness *n.* Corrod'ible, corros'ible *a.* झरण्याजोगा. Corro'sion *n.* खाणें *n*, खणणें *n*, खणती *f.* Corro'sive *a.* खादक, खाणारा. २ दुःख देणारें, तीव्र, मर्मच्छेदक. C. *n.* नाशक वस्तु *f*; झिजवून-झरवून टाकणारी वस्तु *f.* Corro'sively *adv.* Corro'siveness *n.* खादकत्व *n*, अरुष्करता *f.*

Corrody, Corody ( kor'o-di ) *n.* धर्मगृहांतून राजास मिळणारा तनखा *m.* हा नोकरांचा शिधा ह्मणून मिळत असतो.

Corrugate ( kor'ru-gāt ) [ L. *con & rugare, rugatus,* to wrinkle. ] *v. t.* सुरकुती *f*-पन्हळ *m.* पाडणें. C *a.* सुरकुती-पन्हळ पडलेला. Cor'rugant *a.* पन्हळ पाडण्याजोगा. Cor'ruga'ted *a.* पन्हळ पाडलेला, खांचा पाडलेला; as, [ C. SHEETS वांकवून खांच-पन्हळ पाडलेले पत्रे. २ *mech. eng.* पन्हळी पत्रे *m. pl.* ] Corrugated (paper) चुरून लवचिक केलेला जाड (कागद) हा बाटल्या वगैरेनां गुंडाळलेला असतो. Cor'rugā'tion *n.* सुरकुती *f*; पन्हळ *f.* २ *mech. eng.* खांच *f*- पन्हळ *m.* पाडणें *n.* Cor'ruga'tor *n. anat.* ज्या दोन स्नायूंनीं कपाळाला-ललाटाला-सुरकुती पडते त्यांपैकीं प्रत्येक. भ्रूसंवलिनी *f.* To corrugate the forehead कपाळ चढवणें, कपाळाला सुरकुत्या-आठ्या पाडणें.

Corrupt ( kor-upt' ) [ L. *con. & rumpere, ruptum* to break. ] *v. t. to make putrid* कुजवणें, सडवणें, बिघडवणें or बिनसणें, नासवणें, खराब करणें. २ *fig. to deprave, to vitiate, to spoil* बिघडवणें, नासवणें, भ्रष्ट करणें, आचार-गुणभ्रष्ट करणें, कर्तव्यभ्रष्ट करणें. ३ अशुद्ध करणें, दूषित करणें; as, "To C. language." ४ लांच देणें, लांच देऊन वश करणें. ५ खराब करणें, निरुपयोगी करणें, बिघडविणें. C. *v. i.* कुजणें, सडणें, नासणें. २ खराब होणें, आचार-नीति भ्रष्ट होणें, बाचकुटणें (fruit, article of food) C. *a.* कुजका, नासका, कुजलेला, नासलेला. २ भ्रष्ट, दुष्ट (S.), दूषित, आचारभ्रष्ट, लांचखाऊ. ३ अशुद्ध, दोषाचा; as, "The text of the manuscript is C." Corrup'ter *n.* Corrup'tibil'ity, Corrup'tibleness *n.* दूष्यता *f.* Corrup'tible *a.* कुजण्या- नासण्या जोगा-लायक. २ भ्रष्ट होण्याजोगें. C *n.* जें सडून मरून जातें तें, मनुष्यशरीर *n*- देह *m.* Corrup'tibly *adv.* Corrup'tion *n. putrefaction, deterioration* बिघडविणें *n*, खराब करणें *n*, बिघडणें *n*, खराब होणें *n*, बिघाड *m*, खराबी *f.* २ *putrid matter* पू *m*, कूज *f.* ३ *depravity, impurity* नीति-आचार-धर्म भ्रष्टता-भ्रंश *m.* ४ *bribery* लांच *m.* ५ *departure from what is fine, simple or correct* अशुद्धता *f*, अपभ्रंश *m.* Corrup'tionist *n.* कोणत्याही भ्रष्टतेचें मंडन करणारा. २ भ्रष्ट करणारा, लांच लुचपत देणारा, &c. Corrup'tive *a.* धर्म-गुण-आचार भ्रष्ट करणारें, दूषक, भ्रंशक. Corrupt'ly *adv.* भ्रष्टतेनें. Corrupt'ness *n.* भ्रष्टता *f.*

Corsage ( kor'sāj ) [ Fr. See Corset. ] *n. a bodice, the body of a lady's dress* चोळी *f*, कंचुकी *f.*

Corsair ( kawr'-sār ) [ Fr. *corsaire,* Prov. *corsari,* L. *corsarius,* from *cursus,* a running course. ] *n. a pirate* चांचा *m*, समुद्रांत लुटणारा. २ *a pirate vessel* चांच्यांचें गलबत *n.*

Corse ( kawrs ) [O. Fr. *cors,* Fr. *corps.* See Corpse. ] कवितेंत Corpse च्या ऐवजीं हा शब्द योजतात.

Corselet (kawrs'-let) [Dim. of O. Fr. *cors.* Fr. *corps,* body. ] *n.* उरस्त्राण *n*, उरश्छद *n.* २ *zool. the thorax of an insect* प्राण्याचें वक्षःस्थळ *n*- छाती *f.*

Corsepresent ( kawrs'prez'ent ) *n.* अंत्येष्टींतलें भूमिदान *n*, ख्रीस्त्याचें प्रेत पुरतानां देवळाला दिलेलें दान *n.*

Corset ( kawr'set ) [See Corselet.] *n.* चोळी *f*, काचोळी *f.* २ उरस्त्राण *n.* Corset *v. t.* चोळी घालणें.

Cortege (kawr'tāzh') [Fr. *cortege.* It. *corteggio,* train, from *corte,* court—L. *cors, cohors,* an enclosure.] *n. a train of attendants* परिवारगण *m*, लवाजमा *m.* २ *a procession* स्वारी *f.* ३ *a funeral procession* प्रेताबरोबर जाणारी मंडळी *f*, स्मशानयात्रा *f.*

Cortes ( kawr'-tēs ) [ Sp. Port. *pl.* of *corte,* a court. ] *n. pl. the two chambers or houses constituting the legislative assembly of Spain and Portugal* स्पेन व पोर्तुगाल देशची कायदेकानु करणारी ('पार्लमेन्ट') प्रतिनिधिसभा *f.*

Cortex (kawr'teks ) [L. *cortex, cortices,* bark. ] *n. the bark or skin of a plant* झाडाची बाहेरील साल *f*, वृक्षवल्कल *n*, बाह्यत्वचा *f*, पिधानकत्वचा *f.* २ *a covering* बाहेरील झांकण *n.* ३ (*spec.*) *cinchona bark* ज्या सालीपासून क्विनाइन होतें ती साल *f.* ४ *anat. the outer gray matter of the brain, or any organ, or the cortical substance of the kidney* मेंदूची-मूत्रपिंडाची-कोणत्याही इंद्रियाची बाहेरील त्वचा *f*, बहिरंग *n.* Cor'tical *a.* बाहेरील सालीचा, वल्कलासंबंधीं, पिधानक त्वचेसंबंधीं, बाह्यत्वचेसंबंधीं. Cor'ticate,-ed *a.* बाह्यत्वचा असलेला. Cor'ticif'erous *a.* बाह्यत्वगुत्पादक, बाहेरील साल उत्पन्न करणारा. Cor'tici'form *a.* बाहेरील सालीसारखा, वल्कलसदृश. Cor'ticose' *a.* बाहेरील सालीचा, वल्कलमय. २ बाह्यत्वचासदृश.

Corundum ( kawr'un'dum ) [ Hind. *kurand,* corundum stone. ] *n.* कुरुंदाचा दगड *m*, कुरुंद *m*, एक प्रकारचा मौल्यवान् दगड *m.* Corun'dums *pl.*

*N. B.*—See the word Sapphire.

Coruscate (kawɹ'-us-kāt or ko-rus'-kāt) [L. *coruscare*, to flash, to vibrate. ] *v. i. to glitter in flashes, to flash* चमकणें, झळकणें, झगझगणें. Corus'cant *a.* चमकणारें. Cor'uscā'tion *n.* ( विजेसारखी ) चमक *f*, झळक *f.* २ बुद्धीचें तेज *n*-चमक *f.*

Corvette ( kawɹ'-vet' ) [ Fr. *corvette*, Port. *corvea*, a slow sailing ship of burden, from L. *corbis*, a basket.] *n. naut.* एक प्रकारचें लढाऊ जहाज *n*, कार्वेट *n.*

Corvine ( kawɹ'-vīn ) [L. *corvus*, *corvinus*, a crow.] *a.* कावळ्यासारखा-संबंधीं.

Corvus (kawɹ'-vus) *n. astron.* (E.) the cross ध्वांक्ष, ही राशी दक्षिणगोलार्धांत आहे.

Corybant ( kawɹ'i-bant) [Gr. *korubas.*] *n.* फ्रिजी लोकांतील सिबिलीदेवतेचा पुजारी *m.* Cor'yban'tic *a. frenzied, frantic* धांगडधिंग्याचा; as, C. dance.

Corymb ( kawr'im,-imb ) [L. *corymbus.*–Gr. *korumbos*, a cluster. ] *n. bot.* पुष्पस्तंभविशेष, गुच्छासारखा स्तंभविशेप, गुच्छस्तम्भ, खालच्या फुलांचे देंठ लांब व वरच्याचे आंखूड असल्यामुळें सर्व फुलें बहुतकरून एकाच पातळींत असतात असा गुच्छ. Cor'ymbiate, Cor'ymbiated *a.*

Corypheus ( kawr'-i-fē'-us ) [ L. *corypheus*, from Gr. *koruphe*, head.] *n. the conductor, chief or leader of the dramatic chorus* सूत्रधार *m*, पुढारी *m*, मुख्य *m*, नायक *m.pl.* Cor'yphe'uses or Cory'phei.

Coryza ( kōrī'za ) [ Gr. *koruya*, catarrh. ] *n. med. nasal catarrh* सरदीपासून होणारें पडसें *n*, श्लेष्म *m.*

Cos (kōs ) *m.* See Coss.

Cosecant ( ko-sē'-kant ) [ For *co*, *secans.* abbrev. of L. *complemente secans.* ] *n. trig.* कोछेदनरेषा *f*, कोटिछेदनरेषा *f*, व्युत्क्रमज्या *f.*

Cosen ( kuz'n ) See Cozen.

Cosenage ( kuz'nāj ) See Cozenage.

Cosentient ( kōsen'sheut ) [L. *co* & Sentients.] *a.* एकदम-एकेकाळीं जाणणारें.

Cosey-zy ( kō'-zi ) *a* ( of persons ) *comfortable from being warm & sheltered, snug* सुखी, सुखकारक, सुखरूप. २ ( of a place ) *sheltered and thus warm* सुखाचा, उबदार, निवाऱ्याचा ३ बोलका, बडबड्या, मनमिळाऊ, मंडळींतला. C. *n.* (चहादाणींतील चहा थंड होऊं नये ह्मणून त्यावर घालण्याची ) लेपडीची टोपी *f.* Co'sily *adv.*

Cosignificative ( kō'signif'ikā-tive ) [ L. *co* & Significative.] *a.* समानार्थक.

Cosignitary ( kō-sig'nitari ) [ L. *co* & Signitary. ] *n.* एखाद्या दस्तऐवजावर सही करणाऱ्यांपैकीं प्रत्येक. *pl.* Cosig'nitaries.

Cosine ( kō'sīn ) *n. math.* कोटिज्या *f*, कोभुजज्या *f.*

Cosmetic (koz-met'-ik ) [ Gr. *kosmos*, order. ornament.] *a.* शरीराची कांति वाढविणारा, कांतिवर्धक, केंसांची व अंगवर्णांची शोभा वाढविणारा. C. *n.* कांतिवर्धक. ( used as a noun ), अंगराग *m.* Cosmet'ical *a.* Cosmet'ically *adv.* Cosmet'icise *v. t.* (चें) उटणें बनविणें, (चा) अंगराग करणें. Cosme'ticism *n.* कान्तिवर्धकता *f*, अंगरागाचा गुणधर्म *m.*

Cosmi'cal, See Cosmos.

Cosmogony ( kos'-mog'-o-ni ) [ Gr. *kosmos*, world & root of *gignesthai*, to be born. ] *n. pl.* Cosmog'onies. जगदुत्पत्ति *f*, विश्वोत्पत्ति *f.* २ जगदुत्पत्तिविचार also Cosmog'eny. Cos'mogon'etic, Cosmo'gonal, Cos'mogonic,-al *a.* जगदुत्पत्तिसंबंधीं. Cosmog'onist *n.* जगदुत्पत्तीचा विचार करणारा, जगदुत्पत्तिशास्त्रज्ञ.

Cosmography (kos-mog'ra-fi) [Gr. *kosmos*, world & *graphein*, to write. For graphein cf. गृभ्.] *n. the science which describes and maps the general feature of the universe ( both the heavens and the earth ), without encroaching upon the special provinces of astronomy or geography* विश्ववर्णन *n*, जगद्वर्णन. Cos. mog'rapher *n.* विश्ववर्णनज्ञ *n.* Cos'mographic,-al *a*-विश्ववर्णनासंबंधीं. Cos'mographically *adv.*

Cosmolabe ( koz'-mō-lāb ) [ Gr. *cosmos*, the world & *lambanein*, *lombanien*, to take. ] *n. an ancient instrument resembling astrolabe* नक्षत्रांची स्थिति दाखविणारें यंत्र *n*, नक्षत्रस्थितिदर्शक यंत्र *n.* also called Pantacosm.

Cosmolatry ( koz-mol'at-ri ) [ Gr. *cosmos*, the world & *latrein*, to worship. ] *n.* विश्वपूजा *f*, ( on the analogy of मूर्तिपूजा *f.* )

Cosmoline (koz'mōlin) [ From prob. *cosmetic*+ L. *oleum*, oil.] *n. chem.* खनिज तेल शुद्ध केल्यानंतर अवशिष्ट राहिलेला पदार्थ *m*, खनिज तेलाचा-गाळ-सांका.

Cosmology (koz'-mol'-o-ji) [Gr. *kosmos*, the world & *logos*, discourse.] *n.* विश्व-व्यवस्था-रचनाशास्त्र *n*, विश्वघटनाशास्त्र *n.* Cos'molog'ical *a. log.* विश्वरचनाशास्त्रासंबंधीं. Cos'mol'ogist *n.* विश्वरचनाशास्त्रज्ञ, विश्वघटनाशास्त्रपटु.

*N. B.*—Cosmogony विश्वोत्पत्तिशास्त्र; विश्वाची यांत उत्पत्ति कशी झाली असावी याचा विचार केलेला असतो. Geology भूस्तरशास्त्र, यांत केवळ पृथ्वीच्या रचनेचा विचार केलेला असतो. Cosmography विश्ववर्णनशास्त्र, यांत ( जग उत्पन्न झालें ही गोष्ट गृहित धरून ) तें कसें आहे हें वर्णिलेलें असतें. Cosmology विश्वरचनाशास्त्र, यांत विश्वाची रचना कशी आहे, त्याच्या वेगळाल्या अवयवांचा परस्परसंबंध कसा आहे व ते कोणत्या नियमांनीं बद्ध आहेत, हा विचार केलेला असतो.

Cosmopolitan, Cosmopolite ( koz'-mō-pol'-i-tan, koz'-mo-p'o-līt ) [ Gr. *kosmos*, & *polites*, a citizen, *polis*, a city. ] *n.* वसुधैवकुटुंबी *m*, जगन्मित्र *m*, सर्वमित्र *m*, समदर्शी. C. *a.* सार्वत्रिक, जगाच्या सर्व भागांत सांपडणारा, उदार ( S ), वसुधैवकुटुम्बवृत्तीचा, सर्वजातींचा-सर्व वर्गांतील लोकांचा समावेश करणारा. Cos'mopol'itanism, Cos'mopol'itism, Cos'mopolicy *n.* वसुधैवकुटुंबवृत्ति *f.* Cos'mopolitical *a.*

Cosmos (koz'mos) [ Gr. *kosmos*, the world. ] *n. the universe of created things* व्यवस्थित विश्व *n*, जग *n*, दुनिया *f*. २ *the theory of the universe as a system displaying order and harmony* विश्वव्यवस्थोपपत्ति *f*, विश्वघटनोपपत्ति *f*, व्यवस्थित रचना *f*. Cos'mi-c,-al *a*. जगत्संबंधीं, सृष्टिब्रह्मांडासंबंधीं-विषयक. २ व्यवस्थित, यथाक्रम. ३ *astron*. ग्रहमालेसंबंधीं. ४ *astron*. सूर्याबरोबर उगवणारा किंवा मावळणारा. Cos'mically *adv*. Cos'mism *n*. जगद्विचार *m*, विश्व स्वयंभू आहे असें मत *n*. Cos'mist *n*. संसारवादी *m*, दृष्टार्थवादी *m*, निसर्गवादी *m*. Cos'mocrat *n*. जगन्नियंता *m*. Cos'mocratic *a*. Cosmom'etry *n*. जग मोजण्याची कला *f*, जगन्मापन-यंत्र *n*- कला *f*. Cos'mosphere *n*. (ताऱ्यांनां अनुलक्षून) पृथ्वीची स्थिति दाखविण्याचें यंत्र *n*, पृथ्वीस्थितिदर्शक यंत्र *n*. Cos'motheism *n*. विश्वंभरवाद *m*, जगदीश्वर-मत *n*, परमेश्वर सर्वव्यापी आहे असें मत *n*, विश्वच देव आहे असें मत *n*. Cos'mothetic,-al *a*. वरील मताचा, सर्वव्यापी मताचा, विश्वदेवतावादासंबंधीं.
*N. B.* See Pantheism for Cosmism.

Cosovereign (kōsov'erin) [ L. *co*+Sovereign. ] *n*. सहनृप *m*, जोडीदार *m*, जोडराजा *m*.

Coss (kos) [ Hind. *kos.*, Sk. *krosha*, a call. ] *n*. क्रोश-(S.), कोस *m*, हा सरासरीनें २ मैलांचा असतो.

Cossacks (kos'-saks) [ Russ. *kozak*, *kazak*. ] *n. pl*. एक जातीचे रशियन लष्करी घोडेस्वार, काळ्या समुद्राचे उत्तरेस राहणारे तुर्क जातीचे लढाऊ लोक, हे हल्लीं रशियाच्या अमलाखालीं आहेत. 'कोसाकस्वार'.

Cosset (kos'-set) [ A. S. *cotsæta*, cottager. ] *n. a lamb reared without the aid of a dam* आपल्या आईशिवाय पाळलेलें कोंकरूं *n*. २ *a pet* आवडता प्राणी (जनावर). C. *v. t. to fondle* लाड करणें, आंजरणें, गोंजारणें.

Cost (kost)[O. Fr. *costeiet*, *conter*–L. *constare*, to stand together, to cost. ] *v. t.* (बद्दल-साठीं-चें) मोल-किंमत पडणें, खर्च-रुपये-पैसा पडणें, (ला किंमत) लागणें. २ (करितां) सोसावयास-करावयास लागणें, त्रास पडणें. Cost *pa. t. & pa. p.* C. *n*. मोल *n*, किंमत *f*, दाम *m*. २ खर्च *m*, व्यय *m*, वेंच *m*. ३ *pl. law* खर्च *m*. ४ कोणत्याही प्रकारचें नुकसान *n*- तोटा *m*, श्रम *m*, तसदी *f*, आयास *m*. Cost-free *a*. फुकट, मोफत, फुकटचा, फुकटशाई. Cost'liness *n*. महागाई *f*, महार्घता *f*, बहु-महा-मूल्यता *f*. Cost'ly *a*. मोठ्या मोलाचा, किंमतीचा, महाग, बहुमोल, बहु-महामूल्य. Cost-price *n*. खरेदीची किंमत *f*. Prime-cost *n*. अवल किंमत *f*, मूळ किंमत *f*, ऐन-अस्सल किंमत *f*. To cost dear फार महाग पडणें. To live at one's own cost पदरचें खर्चणें-खाणें, पदरमोड करणें.

Costa (kos'ta) [ L. rib. ] *n. anat. a rib of an animal or human being* प्राण्याची अथवा मनुष्याची बरगडी. २ *bot. a vein of a leaf esp. the mid-rib* मध्यरेषा, रेषा, मधली शीर *f*, (पानांतील). Costal *a*. बरगडीचा, कुशीचा, फासोळ्यांचा, पार्श्वीय. २ *bot*. मध्यरेषे-शिरेसंबंधीं. Cos'tated *a*. बरगडीसारखें, बरगड्या असलेला.

Costard (kos'-tėrd) [ O. Fr. *coste*, rib, side, Fr. *cote*, and meaning originally ribbed apple, from the ribs or angles on its sides. ] *n*. वाटोळें गरगरीत फळ. २ (*obs.*) डोकें *n*. Cos'tard- mong'er, Coster, Costermonger *ns*. भाजीफळें वगैरे विकणारा, फळें विकणारा फेरीवाला.

Costellate (kos-tel'lāt) [L. *costa*, rib] *a. finely ribbed* चांगल्या-लहान लहान फांसळ्या-बरगड्या असलेला.

Coster (kos'ter) [ Abbrev. of Coster-monger. ] *n*. फेरीवाला See Costard.

Costive (kos'-tiv) [ O. Fr. *costeve*, Fr. *constiper*, from L. *constipare*, to press closely together, to cram. ] *a. constipated* जडकोठ्याचा, अवरुद्धमल, मलावष्टब्ध, बद्धकोष्ठ. Cos'tively *adv*. Cos'tiveness *n*. कोष्ठबद्धता *f*, कबज, सांखळा, मलावरोध, मलावष्टंभ, मलस्तंभ. To become costive सांखळणें, (चा) अवरोध होणें.

Costotome (kos'tō-tōm) [ L. *costa*-,Gr. *temenein*,to cut.] *n*. प्रेताच्या बरगड्या कापण्याचें प्रेतशस्त्रक्रियेंतील हत्यार *n*, पार्श्वास्थिकर्तनी *f*.

Costume (kos'-tūm or kos-tūm') [ Fr. *costume*. It. *costume*, custom, dress,- *consuetud'inem*, custom.] *n*. पेहेराव *m*, वेष *m*, पोशाख *m*. C. *v. t*. पोषाख करणें, Cos'tumed *a*. Costum'er, Costum'ier *n*. पोशाख विकणारा-तयार करणारा.

Co-sufferer (ko-suf'ferer) [ L. *co* & Sufferer. ] *n*. दुःखाचा वांटेकरी *m*, समदुःखी *m*.

Co-surety (ko-shūr'ti) [ L. *co* & Surety. ] *n*. जोड जामीन *m*.

Cosy See Cozy, or Cosey.

Cot (kot) [ A. S. *cot*, *cote*, a cottage. ] *n*. खोपट *n*, खोपटी *f*, कुटी *f*, उटज *n*. [ Cot or cote *n*. लहान घर *n*, झोंपडी *f*. ] २ एक लहान बेडौल होडी *f*. ३ झांकण *n*. ४ कोंडी *f*, कोंडण *n*, मेंढवाडा *m*, खुराडें *n*. Cot-folk *n*. झोंपड्यांत-राहणारे. Cot-house *n*. मजुरीच्या मोबदला म्हणून मालकाच्या जागेंत त्याच्या परवानगीनें बांधलेलें घर *n*. Cot-land *n*. झोंपडीची जागा *f*. Cot-quean *n*. बायक्या, रांडका, बायल्या, रांड्याराघोबा-(जी), चुलमानवशा, बटक्या. Cotted *a*. Cot-town *n*. भाडोत्री घरांची पेठ *f*.

Cot (kot) [ A. S. *cot*, a cottage, a bed-chamber. ] *n*. खाट *f*, खाटलें *n*, बाज *f*, पलंगडी *f*.

Cotangent (kō-tan'jent) [L. *co* + Tangent.] *n*. कोस्पर्शरेषा *f*, कोस्पर्शज्या *f*, कोटिस्पर्शरेखा *f*.

Cotemporaneous, Cotemporary (kō-tem-pōrānēus,-rary) Same as Contemporaneous, Contemporary. *a*. एकाच समयाचा-काळाचा, समानकालीन.

Co-tenant (kō-ten'-ant) [L. *co* & Tenant.] *n.* जोडीचा भाडेकरी *m.*

Coterie (kō'tėr-ē') [O. F. *coterie*, servile tenure, from *cotier*, cotter.] *n. a clique* कट *m*, कूट *n*, मंडळी *f*, मित्रमंडळी *f*. २ चाकोळें *n*, चाखोळें *n*.

Cothurn (kō-thurn) [L. *cothurnus.*] See Buskin 2nd. & 3rd.

Co-ticular (kō-tik'uler) [L. *coticula*, a small touch-stone, *dim.* of *cos*, *costis*, whetstone.] शाणीय, साहणेसंबंधीं, साहणेस योग्य.

Cotillion, Cotillon (kō-til'ion,-lon) [Fr. *cotillon*, from O. Fr. *cote*, a coat.–L. L. *cotta*, a tunic.] *n.* आठ मनुष्यांनीं नाचण्याचें एक प्रकारचें नृत्य *n.* २ नाचते वेळीं म्हणावयाचें गाणें *n.* ३ एक जातीचा किनारीचा लोकरी कपडा *m*, 'काटिलिअन' *m.*

Co-trustee (kō'-trustē) [L. *co* & Trustee.] *n.* जोडी-वाला जिम्मेदार *m.*

Cottage (kot'-tij) [From *cot*, a cottage.] *n.* झोंपडी *f*, खोपटी *f*, खोप *f*, खोपडी *f*, आवसा *m*, कुडी *f*. Cot'taged *a.* Cot'tager *n.* झोंपडींत राहणारा, झोंपड्या, खोपट्या, कुटीस्थ. Cottage allotments झोंपड्यांत राहणाऱ्या मनुष्यास बागवगीच्या करितां दिलेली जमीन *f.*

Cotter (kot'ter) *mech. eng.* चावी *f.* Cotter-hole *n.* काटरचा-चावीचा गाळा *m.*

Cotton (kot'tn) [Fr. *coton.*–Sp. *algodon*, the cotton plant and its wool, *coton*, printed cloth, from Ar. *qutun*, *al-qutun*, cotton-wool.] *n.* कापूस *m*, रू *m.* कपाशी *f*, कार्पास *m.* २ कापशी (झाड) *n.* ३ सुताचें कापड *n.* C. *a.* सुती, सुताचा. C. *v. t.* कापसानें भरणें. C. *v. i.* (to a person) आवडणें, (च्या विषयीं मनांत) प्रीति उत्पन्न होणें, (ला) अनुसरणें. Cottonade *n.* एक प्रकारचें कांपसाचें जाडेंभरडें हलकें कापड *n.* Cotton-carder *n.* कापूस पिंजणारा. Cotton-cleaner, Cotton-comber *n.* विंचरणारा *m.* Cotton-cloth *n.* सुताचें कापड *n.* Cotton-gin *n.* कापसांतून सरकी काढण्याचें यंत्र *n.* Cotton-mill *n.* कापसाची गिरणी *f.* Cotton-plant *n.* कापशीण *f.* Cotton-press *n.* कापसाचे गठ्ठे दाबून बांधावयाचें यंत्र *n.* Cotton-seed *n.* सरकी *f.* Cotton-seed-oil सरकीचें तेल *n.* Cotton-spinner *n.* सूत -धागा-दोरा-काढणारा. Cotton-thistle *n.* कापसासारख्या मऊ परांनीं आच्छादिलेलें कांटेरी झाड *n.* Cotton-weed *n.* ज्या झाडाचे बुंध्यावर किंवा पानावर कापसासारखी लव असते तें झाड *n.* Cotton-wool *n.* कच्चा कापूस *m*, पिंजलेला कापूस *m.* Cot'tony *a.* कापसाप्रमाणें मऊ. Cotton waste कापसांतील कचरा-गाळ *m*- गदळ *n.*

Cotyledon (kot'i-lē'don) [Gr. *kot-uledon*, a cup-shaped hollow, from *kotyle*, a cup.] *n. bot.* दल, डाळिंबी *f.* Cot'yled'onary, Cot'yledonous *a.* डाळींबीचा, दलाचा.

Couch (kouch) [Fr. *coucher*, to lay down, to lie down, from *col & locare*, to place.] *v. t.* बिछान्यावर बसविणें-पसरणें-निजवणें-ठेवणें-टाकणें. २ रांगेनें-थरानें रचून ठेवणें. ३ (in papermaking) धातूच्या जाळीवरून घोंगडीवर आणून टाकणें. ४ दडविणें, लपविणें, गर्भित करणें. ५ (with *in*) भाषेनें दर्शविणें, ग्रथित करणें. ६ (a spear) लागावर भाला रोंखणें. ७ (विशेष प्रकारच्या सुईनें) डोळ्यांतील मोतिबिंब दावणें. C. *v. i.* निजणें, लवंडणें. २ लपणें. ३ (*obs.*) लवणें, वांकणें, दवणें, दबून बसणें-असणें, दबा-धरणें-मारणें or धरून-मारून बसणें-असणें. C. *n.* पलंग *m*, खाट *f.* २ शयन *n*, शय्या *f*, मंचक *m.* ३ विश्रांतिस्थान *n.* ४ मोड येण्याकरितां जमिनीवर पसरलेल्या 'बार्ली' धान्याचा थर *m.* Couch'ant *a.* दबा धरून बसलेला, मान वर करून बसलेला. Couch-fellow, Couch-mate *n.* एकाच अंथरुणावर निजणारा सोबती, सहशायी. Couch'ing *n.* सुईनें डोळ्यांतील मोतिबिंब खालीं दावणें *n.* To couch a spear or lance लागावर धरणें, रोंखणें (भाला.)

Cough (kof) [of old Low German origin.] *n. med.* खोकला *m*, कास *m*, कफ *m.* C. *v. i.* खोकणें, ढासणें. C. *v. t.* खोकून बाहेर काढणें (up); as, To C. up phlegm. Cough-drop, C.-lozenge *n.* कफनाशक गोड गुटिका. Cough'er *n.* खोकणारा. Cough'ing *n.* खोकणें *n*, खोकला *m.* Cough down (एखाद्या वक्त्यास श्रोतृसमाजानें) खोकून खोकून खालीं बसविणें.

Coulter (kōl'-tėr) See Colter.

Council (koun-'sil) [Fr. *concile*,–L. *concilium*, *con* & *calare*, to call. This word is often confounded with *counsel* with which it has no connection.] *n.* मसलत करणारांची मंडळी *f*- संस्था *f*, मंत्रिमंडल(ळ) *n*, सभा *f*, मंत्रिसमाज *m.* २ मसलत *f*, खलबत *n*, मंत्रण *n.* COUNCIL-BOARD *n.* मसलतीस बसलेली मंत्रिसभा *f.* २ ज्यासभोंवतीं मंत्रिमंडळ बसतें तें मेज *n.* Council-chamber *n.* मंत्रणशाला(ळा) *f*, मंत्रणगृह *n.* Coun'-cillor (also councilor) *n.* सभासद *m*, कौन्सिलदार *m.* Coun'cil man *n.* म्युनिसिपालिटीचा सभासद *m.* Council of war संग्रामसंसद्, रणसंसद्, लष्करी किंवा आरमाराच्या अधिकाऱ्यांची सेनाधिपतीबरोबर विचार करण्याकरितां बोलावलेली सभा *f.* General Council आणीबाणीच्या वेळीं लढाई चालवावी किंवा चालवूं नये असा विचार करणारी सभा *f*, समरमंत्रीसभा *f.* In Council सभागृहांत. Privy Council गूढसभा *f*, राजमंत्र्यांची एकांत सभा *f*, खुद्दनिसबतीचें मंत्रिमंडल (ळ) *n.* Executive Council विधायक-कार्यकारी सभा *f*, विधायक-मंत्रिसभा *f.* Legislative Council विधिकारी-नियम-करणारी सभा *f*, कायदेकानू करणारी सभा *f.*

*N. B.*—Councillor कौन्सिलचा सभासद, Counsellor सल्लामसलत देणारा.

Counsel (koun'-sel) [O. Fr. *conseil*, from L. *consilium*, *consulere*, to consult.] *n. mutual advising, consultation* मसलत *f*, सल्ला *m*, सल्लामसलत *f*, मंत्र *m*

(R.), अभिप्राय *m*, मत *n*. २ *prudence* पोक्तविचार *m*. ३ *advice, instruction* उपदेश *m*, सल्ला *m*, अभिप्राय *m*, मत *n*. ४ *deliberate purpose*, or *plan* उपाय *m*, युक्ति *f*, योजना *f*, तजवीज *f*, मसलत *f*, बेत *m*, तोड *f*; as, "The C. of the Lord standeth for ever." "The C.s of the wicked are deceit." ५ *a secret opinion or purpose* कारस्थान *n*, गुप्त विचार *m*, काट (R.) *m*, कूट *n*. ६ *one who gives advice esp. in legal matters* कायद्याची सल्ला देणारा &c., वकील *m*, ॲडव्होकेट, बारिस्टर, सल्लामसलत देणारा (अनेकवचनींही counsel असाच शब्द योजतात). C. *v. t.* सल्लामसलत-अभिप्राय देणें, सुबुद्धि-सुविचार-अक्कल सांगणें. Coun'selling *pr. p.* Coun'selled *pa. p.* Counsel-keeper *n.* (*Shakes.*) बेत गुप्त ठेवणारा *m*. C. keeping *a.* (*Shakes.*) बेत-मसलत गुप्त ठेवणारा. Coun'sellable *a.* (*obs.*) दुसऱ्याची मसलत घेणारा-ऐकणारा-घेण्यासारखा. Coun'selled *a.* उपदिष्ट, मंत्रित, ज्यास सल्ला दिला आहे तो. Coun'selling *n.* मंत्र-सल्ला-मसलत देणें-सांगणें *n*. Coun'sellor *n.* सल्लामसलत देणारा, मसलतगार. २ (*of a ruler or king*) मंत्री *m*, अमात्य *m*, सचिव *m*. ३ (उपदेश करण्याची किंवा सल्ला देण्याची पात्रता असलेला) वकील *m*, 'बालिष्टर' *m*. Coun'sellorship *n.* सल्ला-मसलत देणें *n*, सल्लागारी *f*. २ सल्ला-मसलत देणाऱ्याचा हुद्दा *m*- पदवी *f*, साचिव्य *n*, मंत्रिपद *n*. Counsel of perfection *a declaration of Jesus Christ not absolutely imperative but commended as the means of greater perfection* (तारणाला) आवश्यक नव्हे परंतु केली तर अधिक श्रेयस्कर अशी गोष्ट. To keep counsel बेत गुप्त ठेवणें. To keep one's own counsel स्वतःचे बेत गुप्त ठेवणें. Queen's council (Q. C.) राणीचा सनदी वकील. ह्याला पगार नसतो. परंतु प्रत्येक कोर्टांत ह्याला अग्रमान मिळतो.

*N. B.*—The words Counsellable, Counsellor, Counsellorship, &c. are spelt with a single *l* by Webster which is perhaps the American way of spelling.

**Count** (kount) [O. Fr. *conpter* and later conter.–L. *computare*, to reckon.] *v. t. to reckon, to compute* गणणें, मो(मे)जणें, गणना *f*- गणती *f*- मोजणी *f*- मोजदाद *f*- गणन *n*. करणें. २ *to ascribe or impute* (चा) गुण किंवा धर्म समजणें, (चें) आहे असें समजणें; as, "Abraham believed God and it was C.ed unto him for righteousness." ३ *to esteem, to think, judge or consider* मानणें, लेखणें, गणणें, समजणें. C. *v. i. to possess value or carry weight, to increase the strength or influence of some party or interest* मोजण्यांत-गणण्यांत येणें, भरीस-उपयोगीं पडणें, (ची) किंमत असणें; as, "Every vote C s." "Accidents C. for nothing." २ (with *on* or *upon*) *to rely, to depend* हवाला ठेऊन राहणें, (वर) भरंवसा *m*,- मदार *f*- भिस्त *f*- ठेवणें, अवलंबून राहणें. ३ (*obs.*) दरकार राखणें, गणना-परवा-करणें. C. *n.* गणना *f*- गणती *f*- करणें *n*, गणना *f*, गणती *f*, मोजलेली संख्या *f*. २ *law.* तोहमतींतील सदर *n* ३ कोडतांत वादीची तकरार जाहीर करणें *n*, दावा *m*-फिर्यादीची प्रत्येक बाब *f*, रकम *f*, अभियोग (S.) *m*. Count'able *a.* मोजण्याजोगा, गण्य, गणनीय, &c. Count'ed *a.* गणलेला, मोजलेला, &c. Count'er *n* गणना करणारा. २ दुकानदाराचें पैसे मोजण्याचें टेबल *n*.-फळी *f*. ३ खेळाचा डाव मांडतांना वापरलेली धातूची चकती *f*. ४ इंग्लंडांतील एका बंदीखान्याचें नांव *n* Counting-house,–room *n.* व्यापाऱ्याची हिशेब करण्याची जागा *f*, हिशेबघर *n*, व्यापाऱ्याच्या कारभाऱ्याचें घर *n*, पेढी *f*. Count'less *a.* असंख्य, अगणित. Count-wheel *n* तास वाजविणारें दात्यांचें चक्र *n*, (घड्याळांतील) कालगणक चक्र *n*, कालवादक-चक्र *n*, (घड्याळांतील) तासाचें चक्र *n*, तासचक्र *n*. To count chickens ere (before) they are hatched. See Chicken. To count out (special phrase of the House of Commons) कायद्यानें कमींत कमी हवे तितके (चाळीस) सभासद नसल्यामुळें सभा बरखास्त करणें; as, "He had not proceeded far in his address when the House was counted out." २ एखाद्याला मोजण्यांत-ज़मेस न धरणें, (वर) मदार-भिस्त न ठेवणें.

**Count** (kount) [Fr. *comte*,–L. *comes, comitis*, an associate, a companion, one of the imperial court or train. *itum* Supine of *ire*, to go. *cf.* Sk. इ, to go.] *n.* युरोपखंडांत अमिराचा एक किताब *m*. हा इंग्लंडांतील अर्ल बरोबर आहे. Coun'tess *n. fem.* (of Earl) अर्लाची किंवा काउंटची बायको *f*. Count'ship *n* काउंटची पदवी *f*- मानमान्यता *f*. २ काउंटच्या अमलांतील प्रांत *m*. Coun'ty *n.* प्रान्त *m*, देशविभाग. २(*obs.*)काउंट अथवा अर्लच्या ताब्यांतील मुलूख *m*. ३ (*obs.*) अर्ल *m*, काउंट *m*. County corporate *n.* काउंटचे हक्क ज्यास आहेत असें शहर *n*. County-court *n.* काउंटीच्या हद्दींत इनसाफ करण्याचा ज्याला अधिकार आहे असें कोर्ट *n*. County-family *n.* प्रांतांतील सरदाराचें घराणें *n*. County-palatine *n.* विशेष हक्क असलेला परगणा *m*. ह्या परगण्यांतील जहागिरदारांस पूर्वी राजासारखे हक्क असत. County-people *n.* चांगल्या सरदारी घराण्यांतील-वरंदाज लोक. County-seat *n.* परगण्यांतील मुख्य शहर *n*. County-town *n.* कसबा, ज्या शहरांत परगण्यासंबंधानें सर्व व्यवहार चालतात तें शहर *n*.

**Countenance** (koun'-te-nans) [O. Fr. *contenance*, demeanour, from L. *continentia*, continence, from L. *continere*, to hold together, to repress.] *n. appearance or expression of the face, look, mien* नूर *m*, मुद्रा *f*, चेहरा *m*, चर्या *f*, सुरत *f*. आकार *m*, ढब *f*. २ *the face, the features* मुख *n*, चेहरा *m*, तोंडवळण *n*, तोंडवळा *m*, चेहरा *m*, मोहरा *m*, रूप *n*. ३ *favour, moral support, encouragement* कृपादृष्टि *f*, दृष्टि *f*, मान्यतादर्शक किंवा उत्साहदर्शक मुद्रा *f*, पाठिंबा *m*, पुष्टि (S.) *f*, आश्रय *m*, आधार *m*, हुरूप *f*, उत्साह *m*,

C. *v. t.* उत्तेजन देणें, कैवार घेणें, सहाय करणें, पाठ राखणें, पसंती-आधार-आश्रय पाठिंबा-मान्यता देणें. Coun'tenancer *n.* उत्तेजन देणारा, कैवार घेणारा, मदत करणारा. [A WEEPING COUNTENANCE रडकें-रडवें-रडतें तोंड, रडती सुरत, रोती सुरत. TO CHANGE C. तोंडावरील चर्येत बदल करणें. CHANGE OF C. मुखवैवर्ण्य *n.* FRESHNESS AND LIVELINESS OF C. टवटवी, टकटकी, नवती, तजेला, लुकलुकी, मुखश्री, टवटवीतपणा. HIS C. FELL तो रागावला-खिन्न झाला. IN C. बेधडक, शरम-भीति न धरितां, धीटपणानें. धिटाईनें (OPPOSED TO OUT OF C.) TO KEEP OR TO PUT IN C. वर मान धरतां येईसें करणें, धीटपणा देणें. TO KEEP ONE'S C. मनोवृत्तीचे फरक चेहऱ्यावर दिसू न देणें. २ हंसें न आवरणें. TO LET THE C. FALL तोंड-मुद्रा उतरणें, चेहरा पडणें. TO PUT OUT OF C. मान खालीं घालावयास लावणें. फजीती उडविणें, लाजविणें, खालीं पहावयास लावणें, गोंधळांत पाडणें. OUT OF C. भीतीनें गोंधळून टाकलेला, लज्जाविनम्र. TO LEND C. TO उत्तेजन देणें. I COULD NOT KEEP MY C. हांसल्यावांचून किंवा चेहऱ्यावर मनोवृत्ति प्रदर्शित केल्यावांचून राहवेना. IT WAS AS MUCH AS I COULD DO TO KEEP MY C. हसें आवरतां आवरतां मला पुरेसें झालें.

Counter (koun'-tėr) [Fr. *contre*, from L. *contra*, against.] *adv. contrary, in opposition* (used chiefly with *run* or *go.*) विरुद्ध दिशेनें, उलटा, प्रतिकूल. २ *contrary to the right course* कुमार्गानें, खोड्या-आड रस्त्यानें; as, "A hound that runs counter." ३ तोंडासमोर, आंगावर. C. *a. contrary, opposite* उलटा, विरुद्ध; as, "A counter agent, counter principles." C. *n.* (*of a horse*) घोड्याची मान व खांदा यांमधील शरीराचा भाग किंवा छाती *f.* २ *naut.* नाळ आणि जलमर्यादा यांमधील नावेचा बांकदार भाग *m.* ३ बुटाची खोंट *f.* ४ (*obs.*) गांठ *f*, भेट *f*, मुलाखत *f.* C. *v. i.* (दुसरा गुद्दा मारीत असतांना त्याला) उलट गुद्दा-ठोंसा-मारणें.

Counter (koun'-tėr) *n.* See Count (*v.*)

Counter (koun'-tėr) [A Latin prefix meaning *contrary, opposite* &c. as Counteract, Counterbalance.]

Counteract (kown'-tėr-akt') *v. t.* उलट प्रयत्न-व्यापार(S.) करणें-चालवणें, प्रतिकार-प्रतिक्रिया-प्रतियोग-प्रत्युपाय करणें, उलटविणें, मोडणें, खंडणें, पाडणें. Coun'teractor, Coun'terac'ting *n.* उलट प्रयत्न करणारा, कार्यहंता, प्रतियोगी (S.), प्रतिकारकर्ता, प्रतिकारकारी, प्रतिकारक. Coun'terac'tion *n.* उलट प्रयत्न करणें *n-* चालवणें *n*, उलट प्रयत्न *m-* व्यापार *m*, प्रतिकार *m*, प्रतिक्रिया *f*, कार्यहनन *n.* Coun'terac'tive *a.* उलट प्रयत्नाचा, प्रतिरोधी, रोधणारा, अटकावणारा, अडथळा करणारा. C. *n.* See Counteractor. Coun'terac'tively *adv.* Counter-agent *n.* प्रतिकारक वस्तु *f.* Counter-approach *n.* वेढा घालणारा, शत्रु जवळ येऊं नये म्हणून वेढा घातलेल्या जागेभोंवतालची केलेली तटबंदी *f.* Counter-attraction *n.* विरुद्धाकर्षण *n.* Counter-balance *v. t.* तोलणें, तोलून धरणें, बरोबर-समभार-समतोल-समान ठेवणें-राखणें. C. *n.* तुला-ळा *f*, घडा *m*, आभंड *n.* २ समभाराचा विषय *m-* गोष्ट *f.* ३ समतोल *m.* Counter-blast *n.* विरोधी गोष्ट; as, "The orange leaders replied by a C." Counter-brace *n.* तंग *m.* (इंग्रजी पद्धतीप्रमाणें तुमान व बंडी हीं एकालाच जोडून शिवललीं असतात व त्याला हे तंग असतात.) Counter-buff *n.* प्रतिरोधक आघात *m-* धक्का *m.* C. *v. t.* धक्का देऊन मागें लोटणें, मागें ढकलून देणें-ढकलणें. Counter-cast *n.* पेंचास तोड *f*, कुलंगडें *n*, उलट कट *m*, विरुद्ध शकल *f*, खेकट्यास मेकटें *n.* Counter-caster (*used in contempt*) *n* आंकडेमोड्या, हिशेब्या, जमाखर्च करणारा, खरडेघाशा. Counter-change *n.* (*Shakes.*) अदलाबदल *f.* Counterchanged *a.* अदलाबदल केलेला. Counter-charge *n.* प्रतिदोषारोप *m* Counter-charm *v. t.* उलट मंत्र करणें, प्रतिकारक मंत्र घालणें. C. *n.* उलट-प्रतिकारक मंत्र *m.* Counter-check *v. t.* अडथळा आणून थांबवणें. C. *n.* (रोधास) प्रतिरोध *m.* Counter-current *n.* विरुद्धप्रवाह *m.* Counter-drain *n.* (कालव्यांतून बाहेर झिरपणारें पाणी जाण्यासाठीं केलेला कालव्याशीं समांतर) प्रतिपाट *m*, झिरप्याचा पाट *m.* Counter-draw *v. t.* तेलकागदावर अगर इतर पारदर्शक पदार्थावर गिरवून प्रतिचित्र काढणें; as, "Schoolboys place an oiled paper on a map & then trace it. This process is called counter-drawing." Counter-evidence *n.* (पुराव्याच्या) उलट पुरावा *m*, विरुद्धसाक्ष *f.* Counter-extenstion *n* दीर्घीकरणावरोध, प्रतिविक्षेप *m.* Counter-foil *n* स्थळप्रत Counter-force *n.* विरुद्ध जोर *m.* Counter-fort *n.* (*fort.*) लहान तट *m*-कोट *m*-भिंत *f.* Counter-gauge *n.* (*carpenty*) *a method of measuring joints* सांधे मोजण्याचें माप *n.* Counter-influence *n.* उलट तोलाचें वजन *n*, किंवा वशिला *f.* Counter-irritant *n.* प्रतिदाहोत्पादक, प्रतिदाह उत्पन्न करणारें. Counter-irritation *n.* (*med.*) (शरीरांतील रोगजन्य दाह नाहींसा करण्याकरितां औषधानें) प्रतिदाह उत्पन्न करणें *n*, प्रतिदाह *m.* Counter-light *n.* अवरोधक प्रकाश *m.* Counter-march *n.* उलट-परत-फेर कूच *m*, प्रत्यागमन *n.* C. *v. i.* (*mil.*) फेर-परत कूच करणें. Counter-mark *n.* प्रतिलक्षण *n*, प्रतिचिन्ह *n.* २ घोड्याचें वय कमी दिसावें ह्मणून त्याच्या दांतांत केलेली खळगी *f.* C. *v.* t. प्रतिलक्षण-प्रतिखूण करणें. २ घोड्याच्या दातांत खळगी करणें. Counter-mine *v. t.* (शत्रूच्या सुरुंगाचा पत्ता काढण्यासाठीं) प्रतिसुरुंग करणें. २ *fig.* गुप्त कारस्थानानें एखाद्याची मसलत फसविणें. C. *n.* प्रतिसुरुंग *m.* २ *fig.* उलट शकल *f-* पेंच *m-* युक्ति *f.* Counter-motion *n.* विरुद्धगति *f.* Counter-move, Counter-movement *n.* उलट चळवळ *f*, विरुद्ध दिशेची हालचाल *f*, प्रतिचलन *n.* Counter-mure *v. t.* कोटाच्या आंत कोट करणें, पडभिंत करणें. C. *n.* (R.) पडभिंत *f*, पडकोट *m.* Counter-opening *n.* विरुद्ध बाजूचें भोंक *n-* छिद्र. Counter-pace *n.* उलट उपाय *m.* Counter-parole *n.* धोक्याच्या प्रसंगीं वापरण्याचा ठराविक वर-

दीच्या शब्दाहून भिन्न असा खुणेचा ज्यादा शब्द *m*, Counter-part *n.* उतारा *m*, पूरक भाग *m*, जोडीचा भाग *m*, जोड *m*, समानाकृतिक भाग. Counter-plea *n.* प्रत्युत्तर *n*, उलट तकरार *f.* सबब *f.* कारण *n.* Counter-plead *v. t.* विरुद्ध तकरार करणें. Counter-plot *v. t.* प्रतिकट-प्रतिकूट करणें, विरुद्ध कट-कूट करणें. C. *n.* विरुद्ध कट *m.* Counter-poise *v. t.* & *n.* See Counter-balance. २ *music.* प्रतिसाम्य *n.* Counter-poison *n.* विषमारक विष देणें *n*, एक विष उतरवणारें दुसरें विष *n.* Counter-pressure *n.* विरुद्ध दाब *m.* दडपण *n*, उलट दडपण *n*, प्रतिदाब *m.* Counter-project *n.* उलट बेत *m.* Counter-protest *n.* तकरारीवर तकरार *f*, प्रतिनिषेध *m.* उलट हरकत *f.* Counter-proof *n.* कोरलेल्या चित्रांचा छाप घेऊन त्या छापाची शाई ओली आहे तोंच त्याचा प्रतिछाप घेणें *n*, प्रतिछाप *m.* Counter-revolution *n.* राज्यक्रांति करणाराविरुद्ध बंड *n*, प्रतिबंड *n.* Counter-roll *n law.* (दुसऱ्यावर दाब ठेवण्याकरितां ठेवलेल्या) हिशेबाची नक्कल *f.* Counter-round *n.* गस्त बरोबर चालतात कीं नाहीं हें पाहणारे अधिकारी *m.* व ह्याकरितां घातलेली गस्त *f.* Counter-scarp *n.* रेवणी *f.* Counter-seal *v. t.* (*Shakes.*) दुसऱ्याबरोबर आणखी मोहोर करणें. Counter-security *n.* जामीन राहणारास हमी. Counter-sense *n.* खऱ्या अर्थाविरुद्ध अर्थ *m*, विपरीतार्थ *m.* Counter-shaft *n. mech. eng.* उपलाट *f.* Counter-sign *v. t.* मखलासी करणें, जोडसही करणें. Countersign *n.* खुणेचा शब्द *m.* २ मखलासी *f*, जोडसही *f.* Counter-signal *n.* जबाबी खूण *f.* Counter-signature *n.* मखलासी *f*, जोडसही *f.* Counter-sink *v. t.* खिळा बसविण्याकरितां छेदाचा कांठ निसुलता करणें. Counter-stand *n.* प्रतिकार *m.* C. *v. t.* प्रतिकार करणें. Counter-statement *n.* (एका जबानी विरुद्ध दुसरी) उलट जबानी *f*, प्रतिविधान *n.* Counter-stroke *n.* प्रत्याघात *m*, उलट गुद्दा *m.* Counter-tally *n.* पडरुजुवात *f.* Counter-time *n.* (घोड्याच्या चालींत) अडथळा *m*, प्रतिकार *m*, चालीची बदल *f.* Counter-turn *n.* अडचणीचा नवा प्रसंग *m.* Counter-vail *v. t.* समान शक्तीनें दुसऱ्याच्या विरुद्ध वागणें, भरपाई करणें. Counter-view *n.* समोरासमोर असणें *n*, परस्पर सम्मुख स्थिति *f.* २ उलट बाजू. Counter-vote *v. t.* विरुद्ध मत देणें. Counter-weigh *v. t.* समतोल वजन करणें. Counter-weight *n.* समतोल वजन *n.* दुसऱ्या पारड्यांतील वजन *n.* Counter-wheel *v. i. mili.* उलट दिशेनें चक्कर घालणें-घेणें. Counter-work *n.* उलट-विरुद्ध काम *n.* C. *v. t.* उलट-विरुद्ध काम-कर्म करणें. Counter-wrought *p. a.*

Counterfeit (koun′-ter-fit) [Fr. *contre* (L. *contra*), against & *faire* (L. *facere*), to make.] *v. t.* कपटानें सोंग-मिष-मीस-वेष घेणें, कपटानु-करण-कपटानुकृति करणें, अनुकरणें, (फसविण्याच्या बुद्धीनें) अनुकरण करणें. २ बनावट-कृत्रिम-खोटा करणें. C. *v. i.* कुभांड-तर्कट रचणें, ढोंग करणें, खोटा वेष घेणें. २ खोटी-नकली वस्तु करणें-बनवणें. C. *n.* नकली पदार्थ *m*, मिष *n*, मीस *n*, सोंग *n.* २ ढोंगी *m*, ठक *m.* ३ तोतया *m*, फसव्या *m.* C. *a.* *representing by imitation or likeness* नकली, बनावट, बनाऊ. २ खोटा, कृत्रिम, सोंगाचा, कपट (in Compound; as, कपटवेष, &c.) Coun′terfeit′er *n.* सोंग घेणारा, बनावट वस्तु करणारा, (*Speci.*) बनावट नोटा किंवा नाणीं करणारा. Counter-feitly *adv.* कृत्रिमतेनें, बनावटपणानें.

Countermand (kown′-ter-mänd′) [L. *contra* & *mandare*, to order.] *v. t.* उलट-परत हुकूम करणें, परतवणें, रद्द करणें; as, "To C. an order." २ (R.) मना करणें, अटकावणें, हरकत घेणें. C. *n.* उलट-परत-मनाईचा हुकूम *m*, प्रतिविधि *m.* Coun′ter-mand′able *a.* परत फिराया-जोगा (हुकूम).

Counterpane (kown′-ter-pān) [A corruption of Counterpoint from the employment of pane-shaped figures in these coverlets. M. Fr. *contre poinct*, L. *culcita*, *puncta*, stiched quilt.] *n.* (चौकोनी पट्ट्यांचा) पलंगपोस *m*, चादर *f*, सरपोस *m.*

Counterpoint (kown′-ter-point) *n.* The word is now corrupted into Counterpane which See.

Country (kun′-tri) [O. Fr. *contree.*—Late L. *contrata*, a region, from *contra*, opposite.] *n.* देश *m*, मुलुख *m*, प्रांत *m*, राष्ट्र *n*, भूमि (loosely) *f.* [AT, IN, TO &C. EVERY C. देशोदेशीं. CUSTOMS AND MANNERS OF A C. देशाचा रिवाज *m*, देशाचार *m*, देशरीति *f*, देशसंप्रदाय *m.* FOREIGN COUNTRY परदेश *m*, विदेश *m*, देशांतर *n*, परमुलुख *m*, परभूमि *f.* NATIVE C. जन्मभूमि *f*, स्वदेश *m*, स्वभूमि *f*, उत्पत्तिस्थान *n*, विलायत (*colloq.*) *f.* MOTHER C. मातृभूमि *f*, मायदेश *m.* OF A FOREIGN C. परदेशी, परदेशाचा, विदेशीय. IN LOW C. हेटप्रांत *m.* INHABITANT OF LOW C. हेटकरी. TO RETURN TO ONE'S NATIVE C. देशीं जाणें.] २ *rural regions* गांवढें *n*, खेडेंपाडें *n*, शहरा-नगराव्यतिरिक्त प्रदेश *m*, शहरावेगळा देश *m.* ३ जनसमूह *m*, प्रजावर्ग *m*, जानपद *n*, समस्त-लोक *m. pl.* ४ (*law.*) (a) पंच *m*, जूरी *f.* (b) एखाद्या परगण्यांतील जूरींत बसण्यालायक लोक *m. pl.* C. *a.* खेडवळ, खेडेगांवचा, ग्राम्य, खेड्यापाड्याचा, खेड्यापाड्यांतला, खेडेगांवांतील, बाहेरगांवचा. २ गांवरानी, गांवठी, गांवगिरी. ३ असंस्कृत, सभ्यताशून्य, न सुधारलेला. ४ स्वदेशीय, स्वदेशासंबंधीं. Coun′trify *v. t.* ग्राम्य-खेडवळ करणें. Coun′trified *a.* Country-box *n.* *a country house* गांवढ्यांतलें घर *n.* Country-dance [Fr. *contre*, dance.] (contra-dance) *n.* परस्पर सन्मुखस्त्रीपुरुषनृत्य *n.* (या नाचांत पुष्कळ जोड्या असतात व एका बाजूस पुरुषांची व दुसऱ्या बाजूस स्त्रियांची रांग असते.) Country-folks *n. pl.* खेडेगांवांतील-गांवढ्यांतील लोक *m. pl.* Country-house-seat *n.* गांवढ्यावरचें घर *n*, शहराबाहेर-खेड्यांत-एकांतांत राहण्यासाठीं बांधून ठेविलेलें घर *n.* Countryman *n.* देशबंधु *m*, देशबांधव *m*, एकदेशीय, एकदेशिक, स्वदेशीय. २ खेडेगांवचा माणूस *m*, गांवढा *m*, गांवढेकरी *m*, शेतखप्या, गांवढळ, गव्हार,

गुरेराख्या used contemptuously and as corresponding with *clown*, *clodhopper*, *boor*, आडमुठ्या, कांवळ्या, घोंगड्या, रान्या, रानकरी, रानट, जंगलट. Country-side *n.* खेडेपाड्याचा भाग *m.* Country-woman *n.* खेडेगांवांत राहणारी स्त्री *f*, खेडवळ स्त्री *f.* २ स्वदेशभगिनी *f.* Country-cousin *n.* (शहरांतील रीतीभाती माहीत नसलेला) खेड्यांतील आपला आप्त *m.* Country-gentleman *n.* खेडेगांवीं जमीनजुमला करून तेथेंच कालक्रमण करणारा गृहस्थ *m*, खेडेगांवांतील सुखवस्तु गृहस्थ *m*. Country-town *n.* भोंवतालच्या शेतीभातीवर अवलंबून असणारें शहर *n.* To go to the C. or to appeal to the C. *to dissolve parliament in order to ascertain the wish of the country by a new election of representatives* प्रतिनिधींच्या नव्या निवडणुकीनें लोकमत जाणण्याकरितां पार्लमेंट (प्रतिनिधिसभा) बरखास्त करणें.

County, See Count (I).

Coup (koo) [Fr. a blow, a stroke.] *n.* ठोंसा *m*, गुद्दा *m*, टोला *m.* २ (*billiards*) दुसऱ्या गोटीस धक्का न लावतां गोटी नेमक्या घरांत ढकलणें *n.* Coup d'e'tat *n.* राज्याची उलटापालट होईल या खोट्या भीतीनें घेण्यांत आलेले असुरी उपाय, म्हणजे अशा प्रकारचे अमक्या अमक्यांचे विचार असावेत अशा समजुतीनेंच त्यांस प्रतिबंधांत ठेवणें, इ. २ प्रजेवर आणलेली गदा *f.* घोरपड *f.* Coup de grace [Fr. a stroke of mercy.] *a finishing stroke* अतिशय जोराचा ठोंसा *m*, शेवट करणारा घाव *m*, शिरच्छेदाची ज्याला शिक्षा झाली असेल अशा अपराध्यास वेदना होऊं नये म्हणून एकच घाव असा जोराचा घालावयाचा कीं त्याचें शीर व धड हीं एकदम अलग व्हावींत. Coup de main (kōō-demang) [Fr. a stroke of hand.] *n.* आकस्मिक हल्ला *m*, छापा *m*, घाला *m.* Coup de maitre [Fr. a master stroke.] *n.* अप्रतिम ठोंसा *m*, नामी काम *n*, टोला *m*, चांगल्या रीतीनें ध्यानांत राहील असा तडाका *m.* Coup de theatre [Fr. a stroke of theatre.] लोकांच्या मनावर कांहीं विशेष व कायमचा ठसा उमटावा म्हणून नाट्यप्रयोगाचे वेळीं अभिनयांत केलेला आकस्मिक फेरफार *m.* २ एखाद्या गोष्टीचा परिणाम व्हावा म्हणून काढलेली युक्ति *f*, लोकांच्या मनावर परिणाम करण्याची युक्ति *f.* Coup d'œil (kōō-dël') [Fr. a stroke or glance of the eye.] *n.* *a single view of anything* एकाचवेळीं नजरेनें दिसणारा देखावा *m.*

Coup de soleil (kōō-de-sol-il') [Fr. a stroke of the sun.] *n.* *sunstroke* उन्हाचा चटका *m*, झळ *f*, झळई *f*, आंच *f*, आही *f*, उन्हाची झळा *f*, तिरमी *f*, तिरीप *f*, लूक *f.*

Coup (kowp) [Scot.-Ice. *kaupa*, to buy.] *v. t.* अदलावदल करणें. Couper *n.* उदमी *m*, व्यापारी *m*, देवघेव करणारा.

Coup (kowp) [Fr. *couper*, to cut.] *v. t.* उलटा-उपडा करणें -पाडणें.

Couple (kup'-l) [Fr. *couple*.-L. *copula*, a bond, from *co* & *apere*, to join.] *n.* *brace*, *two*, *pair* जोडी *f*, (जुवंळी) जुळी *f*, जुळें *n*, द्वंद्व *n*, द्वय *n.* (in comp., as, पुस्तकद्वय, हस्तद्वय, फलद्वय *n.*), युग *n*, युगुल *n*, युग्म *n*, दुक्कल *f.* २ (of animals *male and female*) जोडा *m*, जोडपें *n*, जोडें *n*, द्वंद्व *n*, मिथुन *n.* [A MARRIED C. वधूवर, स्त्रीपुरुषें, दंपती *f*, दंपत्य *n.* A NEWLY MARRIED C. ओवर OR ओहर *n*, ओवरें *n*, *pl.* OR वधूवर *n.* ENTERTAINMENT GIVEN TO THEM ओवरजेवण *n.* THEIR FIRST VISIT TO THE FAMILY GOD (GOING TO TEMPLE) ओवरजत्रा *f.*] ३ *frame of transverse rafters* कैची *f*, कातर *f*, चवा *m*, घिगी *f*, मोरवा (मोरावा) *m*, जिच्यायोगानें दोन वस्तु जुळतां येतात किंवा एकच होतात ती वस्तु *f*, बंध *m*, बंधन *n*, सांखळी *f.* ५ (*Galvanism*) जोडपट्टी *f*, विद्युद्घटमालेंतील धातूच्या दोन पट्ट्यांपैकीं प्रत्येक. ६ *statics* बलयुग्म *n*, प्रेरणायुग्म *n.* ७ *astron.* *a double star* तारकाद्वंद्व *n*, नक्षत्रमिथुन *n.* C. *v. t.* *to join, connect or fasten together* जोडणें, जोडी *f*, करणें-बांधणें-घालणें, जूळ *f.* घालणें, जोडगें. २ (*obs.*)&(*colloq.*) *to marry* जोडणें, लग्न करणें. C. *v. i.* (*obs.*) मैथुन *n*, अंगसंग *m*- रतिक्रिया *f*-संभोग *m.* करणें. Couplem'ent *n.* (*obs.*) जोडी *f*, जुळणी *f.* Coupl'er *n.* एकत्र करणारा, जुळणारा. Coup'let *n.* दोहरा *m*, बैत-द् *f.* Coup'ling *n.* मैथुन *n*, संभोग *m*, रतिक्रिया *f.* २ युग्मीकरण *n*, अनुसंधान *n*, जोडणें *n.* ३ (*mach.*) संधायक, जोडणारा. Coupling-box *n.* पेटीसारखी जोडणारी पट्टी *f.* Coupling-pin *n.* सांधण्याच्या उपयोगाचा खिळा *m.* Well-coupled *a.* चांगल्या-मरलेल्या पुठ्याचा (घोडा). Coupled wheels जोडचक्र.

*N. B.*—*Couple* differs from a *pair* which implies strictly not only things of the same kind but likeness, equality or customary association. A *pair* is a *couple* but a *couple* may or may not be a *pair*.

Coupon (kōō-pong) [Fr. from *couper*, to cut, to cut off.] *n.* चढलेल्या व्याजाची चिठ्ठी *f.* २ "कुपन" (मनिऑर्डरीचें), जोडपत्र *n*- चिठ्ठी *f*, प्रतिपत्रिका *f.*

Courage (kur'-āj) [O. Fr. *corage*, Fr. *courage*.—L. *cor*, *cordis*, the heart.] *n.* धैर्य *n*, हिंमत *f*, हिय्या *f*, छाती *f*, मर्दाई *f*, अवसान *n*, आव *m*, धिटाई *f.* [To LOSE C. धीर *m.* टाकणें-सोडणें, अवसान सोडणें, धीर *m.* दम *m*, सुटणें, हातपाय *m* गळणें(ळ)-मोडणें, मेटें *n.* बसणें *g. of s.*, कमर *f.* बसणें-मोडणें-खचणें *g. of s.* To TAKE C. To PLUCK UP C. दम *m*- अवसान *n*- धैर्य *n*, धरणें, धैर्यावलंबन *n.* करणें.] २ (*obs.*) *inclination, desire, will* कल *m*, इच्छा *f*, मर्जी *f*; as, "I had such a C. to do him good." [MORAL C. हृदयबल, मनोबल, मानसिक-नैतिक-नीतिधैर्य *n.*] C. *interj.* धैर्य धर. Coura'geous *a.* धैर्यवान्, हिम्मतदार, हिम्मती, हिम्मतीचा, हिय्येदार, छातीदार, छातीचा, धीट, साहसी, हिम्मतवान्. Coura'geously *adv.* धैर्यानें, हिमतीनें, छातीनें, छाती करून. Coura'geousness *n.* धीरता *f.* Dutch Courage दारू पिऊन

आलेल्या धुंदीचा ताव, दारूच्या धुंदींतील धैर्य *n.* The courage of one's convictions or opinions आपल्या ठाम मताप्रमाणें वागण्याचें धैर्य *n.* ( cf. सत्याअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं । बहुमता.) To have the courage of one's opinions or convictions स्वतःचीं मतें कळविण्याचें धैर्य करणें (बोलल्याप्रमाणें चालण्याचें धैर्य असणें.)

*N. B.*—Courage धैर्य *n*, Valour मर्दुमकी *f*, Fortitude धारिष्ट *n*. Bravery शौर्य *n*.

Courier ( koor'-i-ėr ) [ Fr. *courrier* from L. *currere*, to run.] *n.* दूत *m*, वार्ताहर *m*, निरोप्या *m*, जासूद *m*, कासीद *m*, हलकारा *m*. २ मुसाफरांची सरबराई करणारा.

Course (kaw.ɪs) [ O. Fr. *cours*–L. *cursus*, a course from *currens p. p.* of *currere*, to run. ] *n.* *the act of moving from one point to another, progress, passage* गति *f*, गमन *n*, प्रसर *m*, क्रम *m*, प्रक्रम *m*, चाल *f*, सरणी *f*, प्रवाह *m*, ओघ *m*, मार्ग *m* ( loosely ), पंथ *m* ( loosely ). २ *the ground or path traversed, track, way* रस्ता *m*, मार्ग *m*. [ RACE COURSE शर्यतीची-दौडीची-दवडीचा जागा *f*. ] ३ *motion considered with respect to its goal, line of progress or advance* प्रवृत्ति *f*, ओघ *m*, प्रवाह *m*, गमन *n*, गति *f*, वाट *f*, रस्ता *m*, प्रयाण *n*. ४ *progress between two stations* टप्पा *m*, खेप *f*, फेरा *m*. ५ *progress without interruption or rest* दवड *f*, दौड *f*, धांव *f*, धांवणें *n*, झपाटा *m* ( loosely), तडाखा *m* ( loosely ). ६ *orderly progress, procedure in a certain line of thought or action* परंपरा *f*, क्रम *m*, संप्रदाय *m*, सरणी *f*, मोड *f*, पद्धति *f*, आनुपूर्वी *f*. ७ *customary or established sequence of events* ओघ *m*, पर्याय *m*, आनुपूर्वी *f*, अनुक्रम *m*. ८ *method of procedure, conduct, behaviour* वृत्ति *f*, प्रवृत्ति *f*, व्यवहार *m*, चरित्र *n*, रहाटी *f*, आचरण *n*, नित्यनियम *m*, नित्य वागणूक *f*. ९ *a succession of acts or practices connectedly followed* अनुक्रम *m*, क्रम *m*, श्रेणी *f*, परंपरा *f*, माला *f*. १० *a succession of one to another in office or duty, order, turn* क्रम *m*, अनुक्रम *m*, पाळी *f*. ११ *the part of a meal served at one time with its accompaniments* वाढपाची एक फेरी *f*. १२ *the lowest sail on any mast of a square rigged vessel* जहाजाच्या डोलकाठीवरील अगदीं खालचें शीड *n*. १३ *a continuous level range of bricks or stones of the same height* थर *m*. १४ *pl. the menses* ऋतु *m*, विटाळ *m*, आर्तव *m*, रजोदर्शन *n*, दस्तान *n*, पुष्प *n*, रज *m*. [ COURSE OF AN ARROW बाणाचा मार्ग *m*, शरपथ *m*. C. OF EVENTS वृत्तपरंपरा *f*. C. OF LIFE जीवनक्रम *m*. C. THROUGH AGES WITHOUT BEGINNING अनादिपरंपरा *f*. DEVIOUS OR EVIL C. अमार्ग *m*, कुपथ *m*, असन्मार्ग *m*. IN C. नियमितक्रमाप्रमाणें, योग्य कालीं. IN THE C. OF दरम्यान, चालले असतांना. OF C. साहजिकरीत्या, अलबत, खचीत, अर्थात्, सहज. OF C. ( AS A MATTER OF C.) साहजिक, सहजगत्या, सहजगतीनें, सहजरीत्या, अर्थात्, कैमुतिकन्यायेंकरून. OF C. ( AS A MATTER OF RULE ) नियमानें, नेमानें. OF DUE C. संप्रदायशुद्ध, रीतीचा, रूढीचा. PROPER C. OF CONDUCT सदाचार *m*. TO CHALK OR MARK OUT A C. FOR मार्ग आंखून देणें, रेघ-रेषा ओढून देणें, -काढून देणें. TO ENTER ON A RIGHT C. रहाळीस लागणें, योग्य मार्गास-वाटस लागणें. TO FALL INTO OR ALONG WITH THE C. OF रुइस-रांतीस येणें. TO KEEP ON THE C. नीटसरळ जाणें. आयुष्यक्रमांतील आपलीं कर्तव्यकर्में करणें. TO TAKE ANOTHER C. दुसऱ्या मार्गास लागणें. TO TURN TO AN EVIL C. वाईट मार्गास लागणें. WOMAN IN C.S ( ALWAYS IN *pl.*) रजस्वला, ऋतुमती, विटाळशी. ] Course *v. t.* (ची) शिकार करणें, पारध करणें. २ धांवविणें, पळविणें, पाठलाग करणें. C. *v. i.* ( शिकारीचे मागें ) धांवणें, त्वरित गतीनें चालणें, धांवणें ( in a race or hunt ). Cour'ser *n.* शिकार करणारा *m*, शिकारी *m*, मृगया करणारा *m*. २ शिकारीचा-पारधीचा घोडा *m*, पवनवेगी-पाणीदार घोडा *m*. ३ *zool.* (शहामृगासारखा) पक्षी *m*. Cour'sing *n*. शिकारी कुत्रे घेऊन पारध करणें *n*. Course-joint *n. mason.* दोन थरांमधील सांधा *m*.

Court ( kaw.ɪt ) [ O. Fr. *cort*, *curt*, a court. L. *corten*, *cohorten*, form *chors*, an enclosure.] *n* *an inclosed space, a court-yard* आंगण *n*, आवार *n*, चौक *m*. २ *a blind alley* आडगल्ली *f*. ३ *the residence of a sovereign, prince, &c., a palace* राजगृह *n*, राजमंदिर *n*, राजवाडा *m*, वाडा *m* ( meaning राजवाडा ), राजमहाल *m*, सरकारवाडा *m*. ४ *the collective body of persons composing the retinue of a sovereign, &c.* राजपरिजन *m. pl.*, परिजन *m. pl.*, परिवार *m*. ( नोकरचाकर ), लवाजमा *m*. ५ *any formal assembly of the retinue of a sovereign* दरबार *m*, राजसभा *f*. ६ *attention directed to a person in power; conduct or address designed to get favour, courtliness of manners, flattery* आराधना *f*, मनधरणी *f*, अनुनय *m*, अनुवृत्ति *f*, दाक्षिण्य *n*, दरबारीरीतभात *f*, स्तुति *f*. ७ *law.* न्यायमंदिर *n*, धर्मासन *n*, न्यायासन *n*, अदालत *f*, कोर्त *n*, कोडत *n*, न्यायाधिशी *f*. ८ न्यायाधीश *m*, इनसाफदार *m*, कोर्त *n*, कोडत *n*. ९ *a tribunal established for the administration of justice* न्यायसभा *f*. १० *the session of a judicial assembly* न्यायकाल *m*, न्यायसत्र *n*, कोर्टाची बैठक *f*. ११ *any jurisdiction civil, military or ecclesiastical* मुलकी, लष्करी किंवा धार्मिक कोर्टाच्या ताब्यांतील अधिकारांतील प्रांत *m*-मर्यादा *f*. १२ *a place for playing the game of tennis* 'टेनिस'खेळ खेळण्याचें आंगण *n*. १३ *conduct or address designed to gain favour* अनुनय *m*, अनुवृत्ति *f*, मनधरणी *f*, स्तुतिपाठ *m*, खुशामत *f*. C. *v. t.* लक्ष्य देणें. २ आर्जवणें, आराधणें, हांजी हांजी करणें, (ची) खुशामत करणें. ३ (लग्नासाठीं)

स्त्रीची आराधना करणें, (विवाहार्थ) चित्ताराधन करणें. ४ संपादन करण्याचा प्रयत्न करणें. ५ आकर्षण करणें, मोह घालणें. C. *v. i.* कोर्टांच्या-दरबाराच्या रीतीभातीप्रमाणें चालणें. २ (एखाद्या स्त्रीची लग्नासाठीं) प्रीति संपादन करण्याचा प्रयत्न करणें. Court-breeding *n.* राजदरबारांत मिळणारें शिक्षण *n*, दरबारी शिक्षण *n*, दरबारी वळण *n.* Court-day *n.* कोर्ट भरण्याचा दिवस *m.* Court-dress *n.* दरबारी पोशाख *m.* Court-dresser *n.* खुशामत्या, खुशामत-हांजीहांजी करणारा. Court'eous *a.* सभ्य, शिष्ट, आदरसत्कारी, अनुनयी, सानुनय. २ माणुसकीचा, सभ्यपणाचा. Court'eously *adv.* माणुसकीनें, सौजन्यपूर्वक. Court'eousness *n.* See Court'esy. Court-fool *n.* परिहासक *m*, खुशमस्कऱ्या *m.* (हा पूर्वी करमणुकीकरितां राजसभेंत-दरबारांत ठेवीत असत.) Court-guide *n.* शहरांतील सरदार लोकांचीं राहण्याचीं ठिकाणें ज्यांत दाखल केलीं असतात असें पुस्तक *n.* Court-hand *n.* (अक्षराचें) दरबारी वळण *n.* Court-house *n.* कोर्टाची जागा *f.* Court'ier *n.* राजदरबारी मनुष्य *m*, राजपुरुष *m.* २ खुशामत्या *m.* Court'ierism *n.* राजपुरुषाची रीतभात *f.*- चालरीत *f.* Court'ierly *adv.* Court'ing *n.* -*act.* आर्जवणें *n*, आराधणें, &c.- *state.* आर्जव *m*, मनधरणी *f*, आराधना *f*, उपासना (?) *f.* Courtlet *n.* लहान कोर्ट *n.* Court-like *a.* See Courtly. Court'liness *n.* सभ्यता *f*, प्रौढी *f*, सुजनता *f*, दरबारीपणा *m.* Court'ly *a.* दरबारीडौलाचा, श्रीमंती, सभ्य, शिष्ट, प्रौढ. २ हांजी हांजी करणारा, खुशामत्या. Court'ly *adv.* सभ्यतेनें, दरबारी रीतीनें, खुशामतीनें. Court-martial *n.* लष्करी अदालत *f*, लष्करी न्यायसभा *f*, कोर्टमार्शल *n.* C. *v. t.* अशा कोर्टांत काम चालवणें. Courts-martial *n. pl.* गुन्हेगारांची चौकशी करणारीं लष्करी कोर्टें. Court-plaster *n.* रेशमाच्या कपड्यास एका आंगास गोंद लावून तयार केलेली मलमपट्टी *f.* Court-roll *n.* कोडताचें दफ्तर *n.* Court'ship *n.* कृपा *f.* संपादणें *n.* २ लग्नासाठीं वधूचें आर्जव *n*, विवाहार्थ प्रसादन *n.* Court-sword *n.* दरबारच्या वेळीं वापरण्याची हलकी तलवार *f*, दरबारी तलवार *f.* Court-yard *n.* घरापुढील जागा *f*, आवार (ड) *n*, आंगण *n.* Court-holywater पैठणी आदर, दरबारी बोलण्यांत पेरलेली साखर. यापासून कांहीं लभ्यांश नसतो. २ (*obs.*) खुशामत *f.* Civil court दिवाणी अदालत, दिवाणी कोडत. Court before the mansions of the great चौक *m*, राजांगण *n.* Court in banc or in bank कायद्याच्या मुद्द्याचा निर्णय करण्याकरितां बसलेलें सर्व न्यायाधिशांचें वरिष्ठ कोर्ट *n.* Criminal court फौजदारी अदालत *f*–न्यायाधिशी *f.* Familiar with courts and levees दरबारमहशूर. Friend at court मुरब्बी. Full court भरदरबार. Highest court सर्वांत वरिष्ठ कोर्ट. Holding court or levee दरबार भरविणें. In, at, to, before the court हुजूर. In open court भरकोर्टांत, हजीर मजालस. The courts of the Lord जरूसलेम येथील देऊळ. To pay one's court (कृपा संपादन करण्याकरितां) हांजी हांजी करणें.

Courtesan-zan (kawɪ'te-zan or kuɪ'te-zan) [It. *corte*, a court.] *n.* कळावंतीण *f*, कंचनी *f*, गणिका *f*, वारांगना *f.*

Courtesy (kawɪ-tĕ-si or kurt'e-si) [Fr. *courtoisie*, civility.] *n.* सभ्यता *f.* २ सभ्यतेचें काम *n*, गृहस्थपणा *m*, शिष्टता *f*, सुजनत्व *n*, अनुनय *m*, सभ्य वर्तणूक *f*, कृपाशील वर्तणूक *f*, स्त्रीनें केलेलें नमन *n*- वंदन *n.* (Written also *curtsy*). Court'esy *v. i.* स्त्रियांप्रमाणें नमन *n*-वंदन *n.* करणें, प्रणाम *m.* करणें. Courtesy-titles *n. pl.* औपचारिक पदव्या *f. pl.* Courtesies and civilities आदरउपचार *pl.*, आदरसत्कार, आदरमान.

Cousin (kuz-in) [Fr. *cousin*.-L. L. *cosinus*, *cusinus*, *contr.* from L. *consobrinus*, the child of a mother's sister, from *con* & *sobrinus*, a cousin, from *sosor*, a sister (Sk. स्वसृ).] *n.* चुलत-आते-मामे-मावस भावंड *n*,-भाऊ *m*,-बहीण *f*-बंधु *m.* [PATERNAL UNCLE'S CHILD (MALE AND FEMALE) चुलतभावंड *n.* PAT. UNCLE'S SON, चुलतभाऊ, चुलतबंधु. PAT. UNCLE'S DAUGHTER चुलतबहीण. PAT. AUNT'S CHILD आतेभावंड *n.* PAT. AUNT'S SON आतेभाऊ, आतेबंधु. PAT. AUNT'S DAUGHTER आतेबहीण. MATERNAL UNCLE'S CHILD मामेभावंड *n.* MATERNAL UNCLE'S SON मामेभाऊ, मामेबंधु. MATERNAL UNCLE'S DAUGHTER मामेबहीण. MATERNAL AUNT'S CHILD माऊसभावंड *n.* MAT. AUNT'S SON माऊसभाऊ *m*-बंधु *m.* MAT. AUNT'S DAUGHTER माऊसबहीण *f.*] २ उमरावास उद्देशून राजा सन्मानानें क्वचित् या शब्दाचा उपयोग करतो. Cousin-german *n.* चुलत-मावस-आते-मामे भाऊ *m*, अगदीं जवळचा नातेवाईक. Cous'inhood, Cous'inship *n.* Cous'inly *a.* चुलत-मावस-आते-मामे भावाच्या नात्याला शोभेसा. Cou'sinry *n. pl.* भाऊबळ *n.* (*loosely*). [FIRST COUSINS भावाभावांचीं-बहिणी-बहिणींचीं मुलें ALSO CALLED COUSINS-GERMAN, FULL COUSINS. FIRST COUSIN ONCE REMOVED वडील चुलत भावाचा मुलगा किंवा मुलगी. SECOND COUSINS भावांच्या किंवा बहिणींच्या मुलांचीं मुलें.]

Co-uterine (kō-uterīn) *n.* (R.) एकोदर, सोदर.

Co-variants (kō-vā'-riants) *n. pl.* व्युत्क्रमचलस्पर्धी.

Cove (kōv) [A. S. *cofa*, a room.] *n.* फांसूक *f*, लहान खाडी *f.* हींत जहाजें क्वचित् वरवा करितात. २ (*archi.*) गुहा *f*, दरी *f.* C. *v. t.* (*archi.*) (वर) कमान बांधणें. Cov'elet *n.* अति लहान खाडी *f.*

Cove (kōv') [Fr. *couver*, to sit or brood on.-L. *cubare*, to lie down.] *v. t.* (*obs.*) वर बसणें, पाखर घालणें; as, Birds C. their eggs. Cove *n.* (*slang.*) कोणत्याही वयाचा अथवा पदवीचा मनुष्य *m.* Covess *n. fem.*

Covenant (kuv'-e-nant) [O. Fr. *covenant*, from O. Fr. & Fr. *convenir*, to agree. L. *convenire*, to come together.] *n. law.* करार *m*, समय (S.) *m*, संकेत (S.) *m*, प्रतिज्ञा *f*, ठराव *m.*·२ करारनामा *m*, करारपत्र *n*, कराराचा दस्तैवज *m.* ३ (*a*) (*Eccl. Hist.*) an

*agreement made by the Scottish Parliament in 1638 to preserve the reformed Religion in* Scotland, generally called The National Covenant सुधारलेला धर्म राखण्याकरितां स्कॉटलंड येथील पार्लमेंटानें १६३८ मध्यें केलेला करारनामा *m.* झाला The National Covenant असें ह्मणतात. (*b*) *an agreement for the same made by the English Parliament in 1643 is called the Solemn League and Covenant* इ. स. १६४३ मध्यें इंग्लंडांतील प्रतिनिधिसभेनें अशाच तऱ्हेचा 'सॉलेम लीग अँन्ड कॉव्हेनन्ट' नांवाचा केलेला करारनामा *m.* ४ (*theol.*) *the promises of God as revealed in the Scriptures conditional on certain terms on the part of man as obedience, repentance, etc.* ईश्वरानें कांहीं अटीवर मनुष्यास दिलेलीं (बायबलांतील) वचनें, बायबलांत ईश्वरानें केलेल्या प्रतिज्ञा *f.* आश्वासनें. The old Covenant ईश्वरानें ज्यू लोकांस दिलेलीं वचनें; जुना करार *m.*-ठराव *m.*-प्रतिज्ञा *f.* The New Covenant ख्रिस्ताच्या अवतारापासून ख्रिस्तीमताप्रमाणें मानव जातीशीं जडलेला नवा संबंध, ख्रिस्तावतारापासून शिथिल झालेल्या जुन्या करारांचें नवीकरण *n.* [The Old Covenant, & The New Covenant are sometimes used for 'The Old Testament, & The New Testament'.] C. *v. i.* करार करणें, करारानें बांधून घेणें. C.*v.t.* करारानें-अटीनें देणें-देऊं करणें. Covenant-breaker *n.* करार मोडणारा. Cov'enan'ted, *a.* करारानें दिलेला. Covenantee' *n. law.* करारदार, ज्याशीं करार केला आहे तो मनुष्य (दुसऱ्या पक्षाचा). Cov'enanter-or *n.* कराकरणारा. २ *law.* करारवाला, करार करून देणारा. ३ (*Eccl. Hist.*) स्कॉटलंड देशांतील धर्म पाळण्यासंबंधानें स्कॉटलंड व इंग्लंड देशांतील लोकांनीं केलेल्या कराराचें समर्थन करून त्याप्रमाणें वागणारा. Covenant-keeping *a.* करार पाळणारा, सत्यवचनी. Cov'enant of grace बायबलाच्या आज्ञा मानून ख्रिस्तावर विश्वास ठेवण्याच्या शर्तीवर पाप्याचें तारण करण्याविषयीं ईश्वरानें दिलेलें वचन *n.* C. of redemption (बायबलांत) पिता व पुत्र यांमधील ख्रिस्तानें पाप्यांस तारण्यासंबंधाचा झालेला करार *m.*

**Cover** (kuv'-ėr) [O. Fr.-*covrir*-Fr. *couvrir.*—L. *cooperire*, from *co* & *operire*, to cover.] *v. t.* आच्छादणें, आवरण घालणें, व्यापणें, झांकणें, आच्छादन घालणें-करणें. २ *to envelope* वेष्टणें, गुंडाळणें, आच्छादणें, गुरगुटणें. ३ *to invest (one's self with something)* भूषित-लिप्त करणें; as, "He covered himself with glory." ४ *to conceal, to cloak* दडवणें, झांकणें, पांघरूण *n*- प्रावरण *n*- झांकण *n*- आच्छादन *n.* घालणें; as, "A cloud covered the mount." ५ *to brood, to sit on, to incubate* अंडीं उबवणें, पाखर घालणें; as, "While the hen is covering her eggs, the mate diverts her with songs." ६ *to overwhelm* व्यापून टाकणें; as, "The waters returned and covered the chariots and the horsemen." ७ *to shelter as from evil or danger, to protect, to defend* पाठीशीं घालणें-घेणें, रक्षण *n*- बचाव *m.* करणें. ८ *to remit* क्षमा *f*- माफ करणें, सूट घालणें; as, "Blessed is he whose sin is covered". ९ *to comprehend, to include, to embrace* पुरेसा-बरावर होणें, समावेश करणें; as, "A law which covers all possible cases of crime." १० *to be sufficient for* खर्चे भागायापुरता असणें; as, "Receipts that do not C. the expense." ११ *to copulate with* (*a female*) (च्यावर) चढणें, उडणें, लागणें; as, "A stallion covers a mare." (said of a male). १२ *to put the usual covering or head-dress on* डोकें झांकणें, डोक्यावर टोपी *f*- पागोटें *n.* घालणें, पदर घेणें. C. *v. i.* एखादी वस्तु झांकण्याकरितां (तीवर) पसरणें. २ (*obs.*) जेवणापूर्वी मेजावर चाकू, कांटे, सुऱ्या, हातरुमाल इत्यादि ठेवून तयारी करणें. ३ टोपी घालणें. C. *n.* आच्छादन *n*, आवरण *n*, पिधान *n*, सरपोस *m.* [UNDER THE C. OF आड, FROM UNDER THE C. OF आडून. UNDER THE C. OF NIGHT रात्रीचा पडदा पडल्यानें-पडल्यामुळें. THAT IS UNDER THE C. OF आडचा, आडील.] २ *concealing cause, shelter* आडपडदा *m*, पडदा *m.* ३ *sheltering cause, shelter* आश्रय *m*, आसरा or आस्रा *m*, दडण *f*, लपण *f*, रक्षण *n*; as, "The troops fought under the C. of batteries." ४ (of a pillow, cushion) गलेफ *m*, गवसणी *f*, अभ्रा *m*, थैला *m*, पिशवी *f*, मलवस्त्र *n.* ५ (over a carriage) बुरखा *m*, बुरखी *f*, अभ्रा *m*, गवसणी *f*, मलवस्त्र *n*, गर्दपोस *m.* ६ *lid, top* झांकण *n*, झांपण *n*, ढांकण *n*, ढांपण *n*, झांकणी *f*, झांकणें *n*, टोपण *n*, पिधान *n.* ७ (*hunting*) (शिकार चालली असतानां) जनावरें जींत लपून बसतात ती झाडी *f.* ८ चाकू, कांटा, चमचा इत्यादि वस्तूंचा एका मनुष्यापुरता संच, [A cover (couvert) in French means knife, fork, spoon and napkin.] ९ *pretext* मिष *n*, व्याज *n*, बहाणा *m*, कपट *n*, छद्म *n.* १० *envelope* लाखोटा *m*, लखोटा *m*, कवर *n.* Cov'ered *a.* आच्छादलेला, आच्छादित, आच्छन्न, आस्तीर्ण, आस्तृत, आवृत. २ झांकलेला, छन्न, अंतर्हित, तिरोहित, आच्छादित, व्याप्त. Cover'er *n.* Cover'ing *a.* आच्छादणारा, प्रच्छादक, आच्छादनकर्ता-कारी. २ झांकणारा, (*colloq.*) झांक्या, (*colloq.*) ढांक्या, (*colloq.*) ढांप्या, अंतर्धायक. Covering party *n.* एका तुकडीच्या संरक्षणार्थ पाठविलेली दुसरी लष्करी तुकडी *f*, कुमकेची-मदतगार-संरक्षक तुकडी *f.* Cover'ing *n.* (v. V. I)-*act.* आच्छादणें *n*, आवरणें *n.-state.* आच्छादन *n*, आवरण *n*, प्रच्छादन *n.* २-*act.* झांकणें *n*, ढांपणी *f.* ३ *thing covering, thing concealing* पांघरूण *n*, प्रावरण *n*, वेष्टण *n.* To cover ground or distance पल्ला झेंपणें-मारणें-गांठणें, पसार होणें, झपाट्यानें पळणें. To cover one's short contracts (*Stock Exchange*) भाव चढलेला असेल त्यावेळीं 'स्टॉक' खरेदी करणें. To cover into (च्यांत) भरणा करणें; as, "To cover into the treasury." To break

cover आश्रयस्थान सोडणें, आश्रयस्थानापासून बाहेर निघणें. Under cover कागदाच्या लखोट्यांत.

Coverlet ( kuv'ėr-let ) [ Fr. *couverlit*, a bed-cover. ] *n.* चादर *f*, पलंगपोस *m*.

Coverlid ( kuv'ėr-lid ) *n.* See Coverlet.

Coverpoint ( kuv'ėr-point ) *n. the fielder in the games of cricket and lacrosse who supports 'point'* क्रिकेटच्या खेळांत 'पाइन्ट' नांवाच्या गड्याजवळचा चेंडू पकडणारा खेळगडी *m*.

Co-versed-sine ( kō-verst sīn' ) [ *co.* (*co.* in Cosine) & *versed sine.* ] *n.* ( *geom..* ) कोटयुत्क्रमज्या *f.*

Covert ( kuv'-ėrt )[ O. Fr. *covert*-Fr. *couvert*, from *couvrir*, to cover. ] *a. private, secret* चोरटा, गुप्त, प्रच्छन्न, गूढ, झांकलेलें. २ सावटीचा, सावटी, आश्रयाचा *pop.* आस्र्याचा, साश्रय, वसऱ्याचा. ३ *disguised, sarcastic* उपरोधाचा, औपरोधिक. [C. SPEECH OR EXPRESSION व्यंग्योक्ति *f.* ] ४ *married* ( woman ) नवऱ्याचे स्वाधीन, भर्त्रधीन, भर्तृवश. [FEME. C. भर्तृवश बायको *f.*] C. *n. shelter, hiding place* लपण *f*, दडण *f*, सावट *f*, आश्रयस्थान *n*, आस्रा *m*, आडोसा *m*. २ पक्ष्यांचे शेपटीचीं पिसें. [UNDER C. आड, आडमोहरी.] Cov'ertly *adv.* Covert'ness *n.* Cov'erture *n. shelter, hiding* रक्षण *n*, आश्रय *m*, बचाव *m*. २ (*law.*) भर्त्राधीनता *f*, भर्तृवशता *f*, भर्त्रवलम्बिता *f.* Covert coat *u.* वर घालण्याचा आंखूड व हलका आंगरखा *m*. Covert-coating *n.* (अशा) वर घालावयाच्या कोटाचें कापड *n*.

Covet (kuv'-et) [A. Fr. *coveitier*, Fr. *convoiter*, from L. *cupidus* desirous of, from L. *cupere*, to desire.] *v. t.* (in a good sense) *to wish for with eagerness* लोभ *m*-इच्छा *f*-लालसा *f.* धरणें *g. of o.*, अभिलाषणें, अभिलाष करणें *g. of o.* २ लाहो घेणें *g. of o.*, अन्यायानें मिळविण्याची इच्छा राखणें. C. *v. i.* लोभणें, लोभ *m*-लाहू *m*-हांव *f.* सुटणें *in. con.*, लुब्ध-लोभिष्ट होणें. Cov'etable *a.* लोभनीय. Cov'eted *a.* लोभलेला, लुब्ध, लोभ सुटलेला. Cov'eting *n.* लोभ धरणें *n*, अभिलाषणें *n*, लाहो *m.* ( *v.* घे ), लोभ *m*, अभिलाप *m*. Cov'etise *n.* ( *obs.* ) हांव *f*, अधाशीपणा *m*, आतुरता *f*, बलवदिच्छा *f.* Cov'etiveness *n. Phrēn.* धनलोभस्थान *n.* २ धनलोभ *m*. Cov'etous *a.* लोभी, अभिलाषी, सोस असणारा, लुब्ध, लोलुप. २ धनलोभी, धनेच्छु, द्रव्यलोभी, धनलुब्ध, आतिशय इच्छा-लोभ राखणारा, हावरा, लोभिष्ट. Cov'etously *adv.* लोभानें. Cov'etousness *n.* (R.) लोभ *m*, लालुच *f*, हांव *f*, सोस *f*, लाहो *f*, लालसा *f*, तृष्णा *f.* २ अतिद्रव्यलोभ *m*, अर्थ-धनलोभ *m*, अर्थतृष्णा *f*, धनाशा *f*, अर्थकाम *m*. [ FREE FROM C. लोभहीन, निर्लोभी.] Cov'eting *pr. p.* Coveted *pa. p.*

Covey ( kuv'-i ) [ O. Fr. *covee*, a brood of partridges, from *cover*, to sit.—L. *cubare*, to lie down.] *n.* (*a*) *a brood or hatch of birds* पक्ष्यांचीं एका खेपेस झालेलीं पिलें *n. pl.*, वीण *f.* (*b*) *an old bird with her brood of young* नवीं पिलें जवळ असलेली पक्षीण *f.* २ *a small flock of or number of birds together* लहान पक्ष्यांचा जमाव *m*. ३ टोळी *f*, थवा *m*, जमाव *m*, ( said of a game); as A. C. of quills.

Covin (kuv'-in) [O. Fr. *covine, covaine*, from *covenir*, to agree.—L. *convenire*, to come together. ] *n. law. a collusive or deceitful agreement between two or more persons to prejudice a third* तिसऱ्याचें नुकसान करण्याकरितां दोघांनीं किंवा अधिकांनीं केलेला कट *m*. २ (*obs.*) कपट *n*, छळ *m*, वंचन *n*. Cov'inous, Cov'enous *a.* कपटाचा, कपटी, लबाड, अप्रामाणिक.

Cow ( kow) [ O. E. *cu, cou.* A. S. *cu* akin to L. *bos*, ox, cow & *Sk.* गो, a cow.] *n.* गाय *f*, धेनु *f*, गो *f.* (in com. गो ) गोमाता *f.* (in contempt गायरट *n*, गायरूं *n.* in endearment गाबुली *f.* ) [ C. CONCEIVING WHILST SUCKLING तानगाभी. C. THAT BEARS ANNUALLY वर्षवीण. C. TRACK गुरदांड *m*, गोपथ *m*. FRAME-WORK TO CONFINE A C. DURING MILKING आडी OR आढी. MILCH C. ( दुभती ) दुभती गाय *f*, दुभती धेनु *f*, पयस्विनी *f.* REACH OF A C.S LOWING गोक्रोश *m*. TIE OF LEG OF A C. DURINC MILKING माला OR वाहला *m* (*v.* घालणें). TWITCHING AND QUIVERING OF A C.'s SKIN गोस्फुरण *n*, भोंवरा *m*.] *pl. old*, Cows; *pl.* Kine, Kye. Cow-bane *n.* गुरांचा नाश करणारी पाण्यांतील एक विषारी वनस्पति *f.* Cow-berry *n.* एक प्रकारची वनस्पति *f.* Cow-boy *n.* गुराखी *m*, गोवारी *m*, गवळी *m*, गोवळी *m*, राखणा *m* गोप *m*. Cow-bug *n.* गोचीड *f*, गोचडी *f.* Cow-calf *n. calf of a cow* वत्स *n*. Cow-dung *n.* शेण *n*, गोमय *n* [ BASKET FOR DRY (OR JUNGLE) C. तिरडें *n*. CAKE OF C. गोवरी *f*, थापटी *f*, थापा *m*. ROLLS OF C. वळशेणी *f*, गोवरी *f*, शुमा *f.* DRY C. AS FOUND IN THE FIELDS रानशेण *f*, रानगोवरी *f*, माळशेण *f.* C. WASH TO BE USED IN SMEARING FLOORS शेणवणी *n*, शेणप *n*, शेणपाणी *n*, शेणखळा *m*, काला *m*, सारवण *n*. CRUMBLY OR CRUMBLED C. शेणगोवर *m*, शेणकूट *n*, शेणपुडी *f.* KINDLED HEAP OF BITS OF C. झगरें *n*, फुलझगरें *n*. LUMP OR DALE OF C. शेणगोळा *m*. LUMP OF C. AS VOIDED, AT ONE TIME शेणपोहो OR पोव *m*, शेणपा *m*, पो *m*, शेण्या *m*, पोहो *m*. LUMP OF MOIST C. IN WHICH FIRE IS PRESERVED UNDER ASHES पेंढा-डा *m*. PELTING WITH C. CLOTS शेणमार *m*, शेणपूजा *f.* PIECE OF C. ( CAKE-LUMP OR BIT ) शेण *n*, शेणखंड *n*, शेणकुट *n*. PILE OF CAKES OF C. ARRANGED FOR KINDLING थाळ *f*, थाळण *f.* PILE OF PIECES OF C. PLASTERED OVER कलोड OR कलवड *m*. PIT FOR THE DAILY C. शेणखळी *f*, शेणकी, शेणकई OR कोई *f*- शेणखाई *f*, गाईर. THE BUSINESS OF C. SMEARING पोतेरें घालणें *n*, सारवण *n*. TO SPRINKLE WITH C. WASH शेणसडा OR सडा *m*-घालणें-देणें. TO SMEAR WITH C. WASH सारवणें, सारवण

*n.* घालणें. ] Cow-feeder *n.* गोप *m,* गुराखी *m,* गवळी *m.* Cow-grass *n.* एक जातीचें गवत *n.* Cow-hedge-itch *n.* कवच कुइरी or ली *f,* कवसकुइरी or ली *f,* कुइली *f,* कपिच्छ *f,* आत्मगुप्ता *f.* [ THE POD OF C. कुइली *f,* कुइरें *n.* ] Cow'herd. C. keeper *n.* गुराखी *m,* गुराख्या *m,* गवळी *m,* गोवळा *m,* गायक्या *m,* गोवरी *m,* गोपाळ *m,* गोरक्षक *m,* जांगली *m,* जांगळी *m,* अहीर, अभीर, भीर. [ FEMALE C. गवळीण-ळण *f,* गोवारीण *f,* गवारीण *f,* गुराखीण *f,* अहिरण or अहिरणी, गोपिका *f,* गोपी *f.* QUARTER OR STATION OF COW-HERDS गवळवाडा *m,* गवळहाट *m,* घोष *m.* ] Cow-hide *n.* गाईचें बिनकमावलेलें कातडें *n.* २ गाईचें कमावलेलें कातडें *n.* ३ *whip* कोरडा *m.* Cow-house-pen-shed *n.* गोठा *m,* बेडें *n,* गोशाला *f,* कावण *f.* Cow'ish ( *Shakes.* ) गाईसारखा, भित्रा, गयाळ. Cow-leech *n.* गायपारखी *m,* गोवैद्य *m.* Cow-lick *n.* डोक्यावरील फिरवलेलें केसांचें झुलूप *n.* Cow-pox *n.* *med.* गोस्तन *n,* शीतला *f,* कांजिण्या. Cow-produce *n.* गोरस *m,* गव्य.

Cow ( kow ) *n.* एखाद्या यंत्राची किंवा गाडीची गति कमी करण्याची पाचर *f.* खिळा *m.* Cow-catcher *n.* रेल्वेच्या एंजीनपुढें असणारी सुपली *f.*

Cow ( kow ) *v. t.* दबावणें, दबकावणें, धमकावणें, भेडसावणें, धैर्यभंग-नाश करणें, उत्साहभंग करणें. Cowed *a.* दबावलेला, दबकावलेला. [To BE COWED दबणें.]

Coward ( kow'-ėrd ) [ O. Fr. *couard,* a hare, an animal proverbially timid perhaps so called from its short tail.–L. *cauda,* the tail. ] *n.* भितरा मनुष्य *m,* नामर्द *m,* भीरु *m.* C. ( *obs.* ) *v. t.* भय दाखवून घाबरा करणें. Cow'ard,-ly *a.* भितरा, भ्याड, नामर्द, न्यूनधैर्य, हीनधैर्य-शौर्य, रणभीरु. २ भितरेपणाचा. Cow'ardice, Cow'ardliness *m.* भितरेपणा *m,* नामर्दी *f,* रणभीरुता *f,* हीनशौर्य *n.* Cow'ardly *adv.* भितरेपणानें, नामर्दीनें. Cow'ardship *n.* ( *Shakes.* ) भीरुता *f.*

"Some phrases, proverbs, sayings and various formations conveying the sense of a *cowardly person* and answering to *Dastard, Poltroon, Nidget, Craven, Pusillanimous wrech, Faint-hearted, Lack-Pluck, White-liver, Cream-face, Pigeon-heart, Chicken, Woman,* are:—रांड *f,* रांडमाणूस *c,* लंडी *c,* फटलंडी *c,* झुंझारराव *m,* धारराव *m,* भागूबाई *f,* पादरा हगरा ( *slang* ), तरसगांड्या ( *slang.* ), हुरडफुंक्या, मारत्याचे मागें आणि पळत्याचें पुढें असणारा, कचलपट." (Candy).

Cower ( kow'-ėr ) [ cf. Icel. *kura,* to doze, to lie down quietly. ] *v. t.* (भयानें) दबकणें, दबणें, भयानें अंगाची जुडी करणें, अंग मारणें. २ *to sink through fear* मेटें *n. pl.* बसणें-मोडणें *g. of o.* Cowered *pa. p.* Cow'ering *pr. p.* Cow'eringly *adv.* दबकून.

Cowl (kō-wl) [ A. S. *cugele, cugle.*–L. *cucullus,* a cowl. ] युरोपियन मठवाशांची टोपी *f.* हिनें खांदेही झांकले जातात. २ टोपी *f.* ३ घुमटाच्या मथळ्यावरील छत्री *f.* ४ तारांची जाळी *f.* C. *v. t.* (टोपीप्रमाणें) आच्छादणें. Cowled *a.* टोपी घातलेला.

Cowl-staff ( kowl-staf ) [ O. F. *cuvel,* from L. *cupa,* a cup & Staff. ] *n.* ( *Shakes.*) दोघांनीं मोठें ओझें नेण्याचा भक्कम वांसा *m,* नवघण *f.*

Co-worker ( kō'work'-ėr ) *n.* सहकार्यकारी, जोडीनें काम करणारा.

Cowrie, Cowry ( kow'-ri) [Hind. *kauri.*] *n. a particular shell* कवडा *m, dim.* कवडी *f,* वराटक *m,* वराटिका *f,* कपर्दक *f,* काकिणी *f.* [ SOME KINDS ARE:–पोपटी कवडी, भवानी कवडी, वाघीकवडी, दहीकवडी, सगुणीकवडी.]

Cowslip ( kow'-slip ) [ A. S. *cu,* a cow & *slyppe,* a piece of dung. ] *n.* इंग्लंडांतील एक सुवासिक फुलझाड *n.* Cow'slipped *a.* ( सदरील ) फुलांनीं आच्छादलेलें.

Coxcomb (koks'-kōm) [Cock's comb, something resembling it formerly worn by licensed fools in their caps.] *n.* लाल कापडाची टोपी *f.* ही इंग्लंडांतील विदूषक (fools) आपल्या डोक्याला घालीत असत. ( b ) टोपी *f.* २ चूडा *f,* शिखा *f,* कलगी *f.* ३ अक्कडबाज *m,* तोरेखोर, ऐटबाज, फांकडा, नखरेबाज, बढाईखोर, दांभिक. ४ *bot.* एक जातीची वनस्पति *f,* मोरशिखा *f.* Coxcom'bical, Coxcom'ical *a.* अक्कडबाजीचा, भपकेदार, घमेंडखोर. Coxcombical'ity *n.* Coxcom'bically *adv.* Cox'combry *n.* अक्कडबाजी *f,* नखरेबाजी *f,* कुर्रा *m.*

Coxswain, Cocks-wain ( kok'swān' or kok'sn ) [ A. S. *cock,* a boat & Swain.] *n.* सुकाणूं धरणारा *m,* तांडेल *m.*

Coy ( koy ) [Fr. *coi.* still, quiet.–L. *quietus.* ] *a.* (उपवर मुलीप्रमाणें.) मुरकेखोर, लाजाळू, लज्जाशील, मुरके मारणारी. २ *soft, gentle* सौम्य. C. *v. t.* ( *Shakes.*) फसवणें, लालूच दाखविणें, मोह पाडणें. २ कुरवाळणें, थोपटणें, गोंजारणें; as, "Come, sit thee down upon this flowery bed, while I thy amiable cheeks do C." C. *v. i.* ( *obs.* ) मुरकणें, तोंड मुरकणें, मुरके मारणें. २ ( *obs.* ) नाखुष असणें. Coy'ish *a.* किंचित् सलज्ज, लज्जाशील. Co'yishly *adv.* Coy'ishness *n.* Coy'ly *adv.* लाजेनें, तोंडमुरकून, मुरकेमारून, संकोचानें. Coy'ness *n.* मुरका *m,* नखरा *m,* लाज *f,* सलज्जता *f.*

Cozen ( kuz'n ) [Coz. contr. It. of *cousin,* to deceive.] *v. t. to cheat, to defraud* ( usually by small arts or in a pitiful way ), *to cheat* चढवून फसविणें, फसविणें, ठकविणें. C. *v. i.* *to act deceitfully* फसविणें. Coz'enage *n.* ठगाई *f,* कपट *n,* वंचन *n.* Coz'ener *n.* ठक *m.* Coz'ening *pr. p.* Coz'ened *pa. p.*

Cozy ( kōzi ) See Cosy

Crab ( krab ) [ A. S. *crabba,* a crab, akin to Dut. *krabben,* to claw or scratch.] *n.* खेंकडा *m,* खेंकड *m,* किरवें *n,* वेलकडें *n,* कुरली-लें *n,* चिमोरी *f,* मुठ्या *m,* कर्कट *m,* कर्कटक *m.* २ *astron.* कर्कराशि, कर्क, कर्कट, कर्कटक.

३ *mech.* एक प्रकारची यारी *f*, जड वजन उचलण्याचें यंत्र *n*, गलबतें गोदींत लोटण्याचें यंत्र *n*. ४ तिरसट मनुष्य *m*. C. *v. t.* (*obs.*) *to make sour or morose* तिरसट करणें; as, "Sickness sours or crabs our nature." C. *a*. तिरसट, रागीट, तापट. Crabb'ed *a*. तिरसट. २ *characterized by harshness or roughness* कठीण, खडतर, खाष्ट, न समजण्यासारखें, किचर, किचरट, दुर्बोध; as, "C. handwriting." Crabb'edly *adv*. तिरसटपणानें. Crabb'edness *n*. खाष्टीपणा *m*, दाष्टपणा *m*, करडी मरजी *f*. २ खचरटपणा *m*, &c. Crab-faced *a*. तिरसट मुद्रा असलेला. Crab'ite *n*. अश्मीभूतखेंकडा *m*. Crab'like *a*. खेंकड्याप्रमाणें चालणारा, खेंकडचाल्या. Crab-louse *n*. मांडीच्या सांध्यांतील केसांत उपद्रव देणारी खेंकड्यासारखी ऊ *f*. Crab's-eyes or stones *n. pl*. Crab-sidle *v. i*. खेंकड्याप्रमाणें एका बाजूनें जाणें, खेंकडचालीनें चालणें. Crab jaws *n. pl*. कासेफोड. To catch a crab (वल्हवतांनां) वल्हें पाण्यांत बुडविण्यांत किंवा बाहेर काढण्यांत चूक करणें. Claw of a crab आंकडा, अंकडा.

Crack (krak) [A.S. *cracian*, to crack. cf. Sk. गर्ज्.] *v.t. to break or burst with or without entire separation of parts* फोडणें, भेगलणें, तडकणें, उकलणें, तडा पाडणें; as, To C. nuts, To C. glass. २ *to distract, to craze, to affect deeply with sorrow* (हृदय-छाती) फाडणें, विदीर्ण करणें, फोडणें (नें), (चा) मगज फाटणें *in con. & g. of o*. ३ *to snap* कडकडावणें, वाजवणें, तडतडवणें, फडकावणें, कडकडवणें; as, To C. a whip. ४ *to extol* वाखाणणी करणें. [To CRACK A BOTTLE बाटली उघडून ती पिणें. To CRACK A CRIB (*slang.*) घरफोडी करणें. To CRACK ON भर-घालणें, वाढवणें.] C. *v. i. to burst or open in chinks* भेगलणें, तडकणें, भंगणें, उकलणें, उलणें, तडा जाणें, चिरणें. *intens.* तडाडणें, फाटणें, तडकून जाणें *in con.* २ (*colloq.*) *to be ruined, to fail* भंगणें; as, "The credit of exchequers C.s when little comes in and much goes out." ३ *to utter a loud or sharp sudden sound* कडकडणें *intens.* कडाडणें, खडाडणें, खराराणें; as, "A thunder where the clouds in autumn C." ४ *to brag, to boast* (with *of*) शेखी *f.* मिरवणें, बढाई *f.* करणें-मारणें. C. *n. a chin, fissure, cleft, crevice* फट *f*, संधि *m, f. g. of o.*, सांध *f*, भेग *f*, भेर *f*, खांड *f*, चिरण *f*, तडा *m*, चिंच *f*, चीर *f*, चील *f*, चीण *f*, ऊट *f*. [CRACKS AND CRANNIES *compreh.* NOOKS, CREVICES AND CORNERS सांधीकोंदी *f. pl.*] (as of some vessel or thing) चीर *f*, फूट *f*, दोरा *m*, दोरवा *m*, तडक *f*, तडा *m*, तीर *m*, छेद *m*, फाटफूट *f.* ३ *sudden and sharp sound* तडक *f*, तडाक *m*, कडाखा *m*, तडतडाट *m*. [with a C. काडकन ताडकन.] ४ *sounding stroke* फटकारा *m*, चटकारा *m*, चटकणी *f*, चडक *f*, चडकण *f*, चडकणी *f*, तटकारा *m*. ५ (*obs.*) तिरसट मनुष्य *m*, विक्षिप्तमनुष्य *m*, भ्रांतचित्त. ६ (*obs.*) शेखी *f*, पत्राज *f.* C. *a*. (*colloq.*) हुशार, चलाख, तरतरीत, उत्तम; as, "A C. hand at cards." Crack-brained *a*. वेडगळ-सर, वायचळलेला, विक्षिप्त, माथेफिरू (?). Cracked *a*. भेगललेला, फुटका. २ (*colloq.*) विक्षिप्त, लहरी. Crack'er *n*. फोडणारा. २ (*obs.*) पत्राजखोर मनुष्य *m*, बढाई करणारा. ३ फटाका, फटाकडी, फटाकी. ४ पातळ व कुरकुरीत क्रॅकर नांवाचें विस्कूट. Crack-jaw *a*. उच्चारण्यास कठीण, जबडा फाडणारा. Cracks'man *n*. घरफोड्या, भिंतफोड्या. Crack-credit *n*. पत घालविणें.

Crackle (krak'-l) [Dim. of crack.] *v.i.* चटचटणें-करकरणें, तडतडणें. २ फडफडणें, कडकणें. ३ भरभरणें, भरारणें. C. *n*. राहून राहून तडतड होणारा आवाज *m*, कडकडाट *m*. २ पोटांत विवाड होऊन होणारा खळखळाट *m*. Crack'led *a*. Crack'ling *n*. तडतडाट *m*, फुरफुराट *m*. २ फडफडाट *m*, खडखडाट *m*. Crack'lingly *adv*. Crack'ly *a*. (ढि)-ढिसूळ. Crack'nel *n*. एका जातीचें हलकें व कुरकुरीत विस्कूट *n*.

Cradle (krā-'dl) [A. S. *cradol.*] *n*. पाळणा *m*, पालकख *n*, टारलें *n*. [C. SUSPENDED FROM A STAND घोडपाळणा OR घोडेपाळणा *m*. CORD, BAR, &c. SUPPORTING A C. वराती *f*, वरात. FROM ONE'S C. पाळण्यांपासून, पाळण्यांतल्यापासून, बाळपणापासून. ROPE TO SWING A C. झेपटा *m*, झेंपसा *m*, झिपुसा *m*.] २ *surg.* (as for a broken bone, &c.) पाळणा *m*. ३ *frame, bed* घोडी *f*, सोन्याची माती झारण्याचा-साफ करण्याचा पाळणा *m*. ४ *infancy or very early life* बाल्यावस्था *f*, बाळपण *n*. ५ धान्य कापण्याचा दांते असलेला विळा *m*. ६ तांब्याच्या पत्र्यावर चित्रें उठविण्याकरितां ठसे तयार करण्याचें यंत्र *n*. C. *v. t.* पाळण्यांत निजविणें. २ बालसंगोपन करणें. Cra'dled *a*. Cradle-scythe *n*. पेटीला बसविलेला बांकदार विळा *m*, कापलेला जिन्नस पेटींतच पडावा अशा रीतीनें हा विळा पेटीला बसविलेला असतो. Cradle-walk *n*. दुतर्फा झाडांचा रस्ता *m*. From the cradle आरंभापासून, जन्मापासून.

Craft (kraft) [A. S. *cræft*, strength, skill, art, cunning.] *n*. कावा *m*, कपट *n*, कावित्र *n*. २ हुन्नर *f*, कला *f*, हिकमत *f*, युक्ति *f.* ३ धंदा *m*, व्यवसाय *m*. ४ एकाच धंद्यांतील लोक *m. pl.* (taken collectively); as, "The C. of iron-mongers." वाहन *n*, मचवा *m*, होडी *f.* C. *v. i.* (*obs.*) कपट करणें, डावपेंच लढविणें. Craft'ily *adv*. Craft'iness *n*. कावेबाजपणा *m*, हिकमतगारी *f*, लुच्चेगिरी *f*. Craft'less *a*. Crafts'man *n*. कारागीर *m*, शिल्पी *m*. Craft'smanship, Craft'manship *n*. कारागिरीचें काम *n*, कारागिरी *f*. Crafts'master *n*. हुन्नरी *m*, कसबी *m*, कारागीर *m*. २ वस्ताद, अट्टल. Craf'ty *a*. युक्ति-लुच्चेगिरीसंबंधीं. २ धूर्त, कावेबाज, मतलबी.

Crag (krag) [Welsh. *craig*, akin to Gael. *creage.*] *n*. कडा *m*, खडपा, सुळका *m*, शृंग *n*. [A PERPENDICULAR C. उभा खडपा *m*.] २ *fore end of the back bone* मोऱ्हांटा *m*. [THE C. OR NECK-PIECE OF MUTTON थिव OR ग्रीव *f*. THE C. AND THE

RUMP शिवकुकडी *f.* ] Crag'ged, Crag'gy *a.* खडप्यांचा, सुळक्यांचा. Crag'gedness, Crag'giness *n.* Cragsman *n.* खडप्यावर-सुळक्यावर चढण्यांत प्रवीण झालेला मनुष्य *m.*

Crag, Cragge (krag) [ A form of *craw.* Ger. *kragen*, the neck. ] *n.* गळा *m*, गर्दन *f*, मान *f.*

Cram (kram) [ A. S. *crammian*, to stuff. ] *v. t.* कोंबणें, कोंदणें, चोंदणें, ठांसून भरणें, चिकार भरणें. २ खचणें, ठांसणें. C. *v. i.* दडपून- रगडून जेवणें. २ ( *colloq.* ) घोकंपट्टी करणें, डोक्यांत ज्ञान कोंबणें. Cram'ming *pr. p.* Crammed *pa. p.* Cram'ful *a.* Cram'mable *a.* Cram'mer *n.* परीक्षेकरितां घोकंपट्टी करवून मुलें तयार करणारा. २ घोकंपट्टी करून तयार झालेला किंवा तयार केलेला शिष्य *m.*

Cramp (kramp) [O. Fr. *crampe*, akin to Dut. & Swed. *kramp*; Icel. *krapper*, straight, narrow.] *n.* पेटका *m*, वळ *m*, वरवंट *m*, मेंडकी *f*, मेंढका *m*, कराली *f*, पेटकी *f.* २ आंकड्याची कांब *f*, सांधे मिळविण्याकरितां केलेलें एक लोखंडाचें काटकोनी हत्यार *n.* ३ अटकाव *m*, हरकत *f*, अवरोध *m*, प्रतिबंध *m*, अवरोधक-प्रतिबंधक गोष्ट *f.* विषय *m*; as, "A narrow fortune is a C. to a great mind." C. *a.* *knotty* गांठाळ. C. *v. t. fig.* प्रतिबंध *m*- अवरोध *m.* करणें, बाधक होणें. २ एके ठिकाणीं बांधणें, सांधणें, काटकोनी चाप बसविणें. ३ आखडणें, अंकडा-खोडा-खोडामोडा, &c. करणें *g. of o.* Crampoons *pl.* also Cramp-iron *n.* काटकोनी आकड्याची कांब *f.* हिचा आंकड्याप्रमाणें ओझें उचलण्याच्या कामीं उपयोग होतो. Cramp-ring *n.* पेटके बंद करणारी आंगठी *f.* (ही एक वेडगळ समजूत आहे.) Cramp'y *a.* पेटके येत असलेला, पेटके आणणारा. Bather's cramp *n.* स्नान करितां करितां होणारा पक्षघाताचा झटका *m*, स्नानाच्या वेळीं एकदम होणारा अर्धांगवायु *m.* Writer's cramp *n.* सदोदित लिहिणाऱ्या लोकांना होणारा एक जातीचा रोग *m.* ( हा झाला असतां मनुष्याला फक्त लिहितां येत नाहीं. )

Crane (krān) [ A. S. *cran* Ger. to cry out. ] *n.* बक *m*, बगळा *m.* २ (जड वजन उचलण्याची) यारी *f.* ३ पिपांतून प्रवाही पदार्थ बाहेर काढण्याकरितां पिपांला लाविलेली नळी *f*, वांकडी नळी *f.* C. *v. t.* यारीनें चढविणें. C. *v. i.* डोकें-मान लांब करणें. Cran'age *n.* यारीचें भाडें *n.* Cranenecked *a.* बगळ्यासारखी मान असलेला.

Cranium (krā'-ni-um) [ L. *cranium*, from Gr. *kranios*, from *kapra*, head, the skull.] *n.* कपाल *n*, मस्तक *n. pl.* Cra'nia, Cra'niums. Cra'nial *a.* डोक्याच्या कवटीसंबंधीं, कपालीय. Craniog'nomy *n.* डोक्याच्या कवटीसंबंधाचें ज्ञान *n*, मस्तकाकारशास्त्र *n.* Cra'niolog'ical *a.* मस्तकाकार शास्त्रासंबंधीं. Cra'niol'ogist *n.* मस्तकाकार शास्त्रवेत्ता. Cra'niol'ogy *n.* मस्तकविज्ञानशास्त्र *n.* या शास्त्रांत मस्तकाच्या कवटीचा आकार, मापें व इतर चिन्हें यांचा विचार केलेला असतो. Craniom'eter *n.* मस्तकमापकयंत्र *n.* Cra'niom'etry मस्तकमापन *n.* Cranio'scopist *n.* मस्तकपरीक्षक. Cranios'cope *n.* Cranioto'my *n.* ( प्रसूति सुलभ करण्यासाठीं ) गर्भमस्तकच्छेद *m*, मस्तकविंधन, गर्भाचे डोक्यास भोंक पाडून नंतर तें चिमट्यानें दावून ओढून काढण्याचा शस्त्रप्रयोग. Craniotomy forceps, cranioclast *n.* मस्तकविंधन केल्यानंतर तें दावून ओढून काढण्याचा चिमटा.

Crank (krank) [ O. E. *kranke*, akin to English *cringe*, *cringle*, *crinkle*, and to crank, the root meaning probably 'turn' twist. ] *n.* वांक *m*, वळण *n.* २ *mech.* यंत्र वाटोळें फिरविण्याकरितां केलेला पेंच *m*, दांड्याचा किंवा आंसाचा वक्रभाग *m.* याचा उपयोग वर्तुळगतीची आडवी अगर उभ्या किंवा आडव्या गतीची वर्तुळगति करण्याकडे होतो. ३ द्व्यर्थी बोलणें *n*, पेंचाचें बोलणें *n*, वक्रोक्ति *f.* ४ लहर *f*, अनिश्चितपणा *m.* ५ ( *obs.* ) आजारी मनुष्य *m*, रोगी *m.* ६ ( *colloq.* ) विक्षिप्त माणूस *m.* C. *v. i.* *to wind and turn* वक्रगतीनें फिरणें. C. *v. t.* वक्र करणें, वांक देणें. C. *a.* चंचल, चलाख. २ अजारी. ३ लहरी, अनिश्चयाचा, एककल्ली. Crank'ily *adv.* Crank'iness, Crank'ness *n.* Crank'y *a.*

Crank, Crank-sided (krank, krank'-sī'ded) [Ety. uncertain. ] *a. naut.* उलंडा, कलंडा, कलथा, (एकदम) उलथणारा ). Crank'ness *n.*

Cranny (kran'-i) [ Fr. *cran*, a notch. ] *n.* चीर *f*, फट *f*, सांध *f.* २ ( glassmaking ) बाटल्यांचे गळे तयार करण्याचें लोखंडी हत्यार *n.* C. *v. i.* चीर पडणें ( R. ). २ फटींतून शिरकाव करणें. Cran'nied *a.* पुष्कळ फटीचा, बहुछिद्र, छिद्राळ.

Crape (krāp) [Fr. *crepe*, from L. *crispus*, curled.] *n.* एक प्रकारचें कापड आहे. वाल *n*, कच्या रेशमाचें केलेलें पारदर्शक काळें कापड *n*, सुतक्याचें काळें वस्त्र *n.* C. *a.* शोकसूचक वस्त्राचें. C. *v. t.* चुण्या-कुरळ्या पाडणें. २ (केंस) कुरळे करणें. Crapy *a.* कुरळीसारखा, कुरळा.

Crapulence (krap'ū-lens) [ L. *crapula*, intoxication. ] *n.* अतिशय दारू पिण्याच्या योगानें झालेला रोग *m*, पानातिशयजन्यरोग *m*, मद्यजन्यविकार *m*, मदातिशय *m.* Crap'ulous, Crap'ulent *a.* झिंगून आजारी पडलेला, कैफ चढलेला.

Crash (krash) [ Imitative. O. E. *craschen*, the same word as *crasen*, to break. Crash seems to be allied to *crush & to rush.* ( *Webster* ).] *v. i.* फुटणें, मोडणें, कडाडणें or खडाडणें, घडाडणें. २ ( *esp.* as a tree, branch &c. breaking ) कडकडणें, कडाडणें, धसकणें. C. *v. t.* ( R. ) कडाडून तुकडे पाडणें. C. *n.* *loud mingled sound of things falling* धडाका *m*, धडधड *f*, धडधडाट *m*, कडाखा *m*, कडाड or खडाड *m*, कडकडाट or खडखडाट *m*, घडाड *m*, धडाड *m*, कडाकडी *f.* [ With a C. धाड-काडकन-कर. ] २ ( as of many musical instruments ) कडाका *m*, खडाका *m.* ३

व्यापारांत एकदम आलेला तोटा *m*, जबरी ठोकर *f*, एकदम वाजलेलें दिवाळें *n*.

Crash ( krash ) [ L. *crassus*, thick, coarse. ] *n*. तागाचें जाड-जाडेंभरडें कापड *n*.

Crasis ( krā'-sis ) [Gr. *krasis*, mixing.] *n*. *med.* ( शरीरांतील रक्ताच्या-&c.) घटकावयवांचें मिश्रण *n*. २ प्रकृति *f*, मूलस्थिति (रक्त इत्यादिकांची). ३ प्रकृति *f*, स्वभाव *m*, तव्वेत *f*. ४ *gram.* दोन स्वर एक होणें *n*, दोन स्वरांचा एक दीर्घ किंवा संयुक्त स्वर होणें *n*, द्विस्वरदर्शक वर्ण *m*.

Crass ( kras ) [ L. *crassus*, thick, fat, gross.] *a*. जाड, घट्ट, भरड. Cras'sament, Crassament'um *n*. घनांश *m*, दाटभाग *m*. २ घट्ट झालेल्या-सांखळलेल्या रक्ताचा दाट भाग *m*. Cras'situde *n*. जाडी *f*, जाडपणा *m*, घनता *f*, भरडपणा *m*. Crass'ly *adv*.

Cratch ( krach ) [ O. Fr. *creche*- O. E. *creche*, *creache*, Fr. *creche*, crib, manger. ] *n*. ( *obs.* ) गव्हाण *f*, also गवाण *f*, गाताडी *f*. Cratches *n*. *pl*. घोड्याच्या खुराखालीं आलेली सूज *f*.

Crate ( krāt ) [ L. *crates*, a hurdle. ] *n*. कांचेचें व चिनी मातीचें सामान नेण्याचा हारा *m*, टोपली *f*, करंडी *f*, फुलांचा हारा *m*, पाटी *f*, फळें वाहून नेण्याची टोपली *f*-हारा *m*- पाटी *f*.

Crater ( krā'-tėr ) [ L. *crater*, a mixing vessel, the mouth of a volcano. Gr. *krater*, a large bowel for mixing wine from *kerannumi*, to mix. ] *n*. ज्वालामुखीचें तोंड *n*. २ *astron.* चशक. हा राशी दक्षिण गोलार्धांत ध्वांक्ष राशीच्या पश्चिमेस आहे, ह्यांत ३१ तारे आहेत. Crater'iform *a*. Crat'erous *a*. ज्वालामुखीचीं पुष्कळ तोंडें असणारा ( पर्वत. )

Craunch ( krawnch ) [ A form of crunch. ] *v. i.* & *v. t.* कडकडां-कडकड-कडकडून-कडाकड-कडाडां-कराकरां-र-चावणें-खाणें.

Cravat (kra-vat') [Fr. *cravate*, from *cravate*, a Croat, an inhabitant of Croatia, one of a body of Austrian troops from whom in 1636 this article of dress was adopted in France. ] *n*. (उंची कापडाचा ) गळेबंद, कंठवस्त्र *n*, गळपट्टी *f*. C. *v. t.* गळेबंद घालणें. Cravat'ted *a*. गळेबंद घातलेला.

Crave ( krāv ) [ A. S. *crafian*, to crave. ] *v. t.* आळवून-मिनतवारीनें मागणें, प्रार्थणें, विनवणें. २ आशा करणें. ३ वखवखणें, खाखा सुटणें; as, The stomach C.s food. C. *v. i.* ( with *for* ) ( is also used in the same sense ) Cra'ver *n*. भिकारी *m*. Crav'ing *n*. वखवख *f*, हांव *f*. C. *a*. हावरा, आशाळभूत.

Craven ( krā'-ven ) [ O. Fr. *cravante*, struck down. ] *a*. भेकड, नामर्द, भित्रा. C. *n*. नामर्द मनुष्य. C. *v. t.* नामर्द करणें. Cra'venly *adv*. Cra'venness *n*. To cry craven "शरण आलों" असें ह्मणणें, शरण येणें.

Craw ( kraw ) [ Akin to Dut. *kraag*, neck. ] *n*. पाखराच्या गळ्याच्या नळींतील पिशवी *f*. २ कोठा *m*.

Crawfish, Crayfish ( kraw'-fish, krā'-fish) [See Crab.] *n*. नदींतला खेंकडा *m*, चिमोरा *m*, चिमोरें. *pl*. Crawfishes.

Crawl ( krawl ) [ Dan. *kravle*, or Icel. *krafla*, to paw, to scrabble with the hands. ] *v. i.* *to creep* सरपटणें, सरपटत चालणें-जाणें, खुरडत जाणें. २ रडतखडत-रर-करीत्-रखडत-झरतमरत-झुरूमुरू-फेंदत-लंघत अडखळत जाणें-चालणें-फिरणें, खुरडत चालणें, पोटावें घसरत जाणें; as, "A worm C.s on the earth; a boy C.s up a tree." ३ ( a child ) घोडा-( घोडूला ) करणें, रांगणें. ४ *to move secretly and slily* लपून-छपून-चोरून-चोरगस्तीनें-मुंगीच्या पायानें चालणें-जाणें-येणें. ५ हळूहळू दाखल होणें, आंत शिरकाव करणें. ६ अंगावर मुंग्या किडे फिरल्यासारखें वाटणें; as, "The flesh C.s." C. *n*. रखडत जाणें *n*, रांगणें *n*. Crawl'er *n*. रखडत जाणारा. Crawl'ing *n*. रांगणें *n*, सरपटत चालणें *n*-पोटानें सरकणें *n*, उरोगमन *n*. Crawl'ing *pr. a*. रांगणारा, सरपटणारा, उरोगामी, सरपटत चालणारा. Crawl'ingly *adv*. सरपटत, भुईसरपटत-टां. Crawl'y *a*.

Crawl ( krawl ) *n*. समुद्राचे कांठीं मासे ठेवण्याकरितां केलेला वाडा *m*.

Crayon ( krā'-un ) [ Fr. a lead pencil, from *crae*, chalk. ] *n*. खडूची कांडी *f*, रंगीत मातीची कांडी *f*. २ खडूच्या कांडीनें काढलेलें चित्र *n*. ३ चित्रकलेंत रंगा, साठीं लागणारे पदार्थ. C. *v. t.* खडूच्या कांडीनें चित्र काढणें.

Craze ( krāz ) [ O. E. *crasen*, to break.] *v. t.* *to crush, to grind to powder* तुकडे-पीठ करणें, फोडणें. २ (*obs.*) *to weaken* जर्जर करणें. ३ *to derange the intellect of* वेड भरविणें, वेडगळ &c. करणें; as, "Grief hath C.ed my wits." *Shakes.* C. *v. i.* पिसा-वेडा होणें. C. *n*. उन्माद *m*, चित्तभ्रम *m*. Crazed, Craz'y *a*. जर्जर-चिंधड्या झालेला, जीर्ण; as, "Piles of mean and C. houses." २ *crack-brained, mad* वेडगळ, वेडसर, वेडपा, वेडका-वायचळलेला or वायकळलेला, or वावकळलेला, मंत्रचळ्या, विक्षिप्त, पिसाट, खुळा, भ्रमिष्ट, वेडा, पिसा. [To TURN OR BECOME C. चळणें, वायचळणें, वायकळणें or वावकळणें, बावचळणें, आवगणें, खुळावणें, ESP. FROM DEMONIAC INFLUENCE, PASSION, &c. पिसाळणें, पिसटणें-पिसाटणें. ] ३ *weak* अशक्त, निर्जीव. ४ *shaky, unsafe*; as, "One of great riches, but of C. constitution." ५ *demented, deranged* उन्मत्त, भ्रांतचित्त. ६ *foolishly eager* अतिआतुर-उत्कंठित, भरीं भरलेला; as, "The girls were C. to be introduced to him." Craz'ily *adv*. Craz'edness, Craz'iness *n*. वेडगळपणा *m*, पिसें *n*, चळ *m*, वायचळ *m*, बावचळ *m*, खूळ *n*, वेड *n*. २ जर्जरपणा *m*, जीर्णता *f*. Crazing mill *n*. खाणींतील जस्ताची माती कुटण्याची चक्की *f*.

Creak ( krēk ) [ Fr. Imitative like *crake* & *croak.* ] *v. i.* *to make a sharp noise* करकरणें, किरकिरणें, खिरखिरणें, घिरघिरणें, करकर वाजणें. C. *v. t.* करकर वाज-

विणें. C. *n.* करकरशब्द *m.* Creak'er *n.* करकरणारा, करकर वाजणारा, करकरा or करकऱ्या. Creak'ily *adv.* Creak'ing *pr. a.* करकरणारा, करकर वाजणारा, करकऱ्या. Creak'y *a.*

Cream (krēm) [O. Fr. *cresme*, L. *from* Sk. *chrisma.*] *n.* (a) साय or साई *f,* मलई *f.* (b) निवळी, तवंग *m*; as, C. of lime. २ सारांश *m*, सार *n*, तत्त्व *n*, उत्कृष्ट भाग *m*. ३ साईचे निरनिराळ्या प्रकारचे खाण्याकरितां केलेले पदार्थ *m. pl.* ४ अंगराग *m*, उटणें *n*, लेप *m.* C. *v. t.* साय काढणें. २ सार घेणें. C. *v. i.* साय येणें-जमणें. Cream-cheese साईचे 'चीज.' Cream-coloured *a.* साईच्या रंगाचा, फिका पिंवळा. Cream'ery *n.* दूध लोणीं वगैरे जिनसा विकण्याचें दुकान *n*, दुभत्याचें दुकान *n*, कालवणाचें दुकान *n.* Cream-faced *a.* पिंकुटलेला, पांढुरका, निस्तेज, फिक्या तोंडाचा, दुबळा, नेभळट. Cream'iness *n.* Cream-laid *a.* मलईच्या रंगाचा आणि उभ्या रेघा असलेला (कागद). Cream-slice *n.* मलई काढण्याकरितां केलेली लांकडी छाटणी *f.* Cream'y *a.* साईचा, साईसारखा.

Crease (krēs) [French from Latin. but true origin unknown.] *n. mark made by doubling* मोड *f,* दूण *f,* दुमड *f,* सळ *m.* २ क्रिकेटांत चेंडू देणाऱ्याकरितां आणि खेळणाराकरितां केलेली मर्यादा *f,* हद्द *f.* C. *v. t.* मोड-सळ पाडणें. Creas'y *a.* मोड पाडलेला.

Crease (krēs) [Malay *kris*, a dagger.] *n.* मलाया देशांतील लोकांचा क्रिस नांवाचा खंजीर *m*, कट्यार *n.*

Create (krē-āt') [L. *creare*, cf. Sk. कृ, to create.] *v. t. to bring into being, to form out of anything* निर्माण-उत्पन्न-पैदा करणें, निर्मिणें, उत्पादणें, सृजणें. २ *to produce, to be the occasion of* उत्पन्न करणें, (ची) उत्पत्ति *f*- उद्भव *m.* करणें. *g. of o.* ३ *to invest with a new form, office or character* (ला) करणें; as, To C. one a knight. Crea'table *a.* उत्पन्न करण्याजोगा. Crea'ted *a.* केलेला, निर्मित, उत्पादित, पैदा झालेला, सृष्ट, जनित. Crea'tion *n.* उत्पन्न करणें *n*, उत्पादन *n*, उत्पत्ति *f,* निर्मिति *f.-state.* सृष्टि *f,* उत्पत्ति *f,* उद्भव *m.* २ सृष्टि *f,* भूतसृष्टि *f,* प्रत्यक्षसृष्टि *f,* सर्ग *m.* ३ नेमणें *n*, करणें *n.* Creat'ional *a.* Crea'tive *a.* उत्पादक, कल्पक, जनक. Crea'tively *adv.* Crea'tiveness *n.* Crea'tor *n.* जनिता, जनक, उत्पादक. Crea'trix, Crea'tress *n. fem.* Crea'torship *n.* उत्पादकपणा *m.*

Creature (krē'chėr) [cf. Create.] *n. anything not self-existent, any being created with life, an animal, a man* प्राणी, जीव, वस्तुजात, स्वयंभू नव्हे तें, सर्वविश्व. [The creatures *Compreh.* or collect. चेतनाचेतन *n*, चराचर *n.* Crawling or creeping C.s gener. किड्क *dim.* किडकलें *n*, कीडमुंगी *f.* Dumb C. मुकें जनावर *n*, मौन जात *f.* Living C. जीव *m*, प्राणी *m*, जंतु *m*, जिता जीव *m.* Living C.s compreh. जीवजंतु *m. pl.*, जीवजिवडे *m. pl.* Small living C. gener. जीवजंतू *m*, जीवजिवडा *m.*] २ *a human being* (in pity, contempt or endearment) जीव *m*, प्राणी *m*, माणूस *m.* ३ *dependent* आश्रित, अनुयायी, दुसऱ्याच्या आश्रयावर अवलंबून वाढलेला, दुसऱ्याचा बंदा-मिंधा. ४ (a general term among farmers for horses, oxen, &c.) ढोरें, जनावरें. Crea'tural, Crea'turely *a.* प्राण्यासंबंधीं, प्राणिधर्मविशिष्ट (R.). Crea'tureship *n.* The Creator परमेश्वर.

Creatin (krē'ā-tin) [Gr. *kreas*, flesh.] *n.* पांढरा स्फटिकाकार व नत्रप्रचुर (nitrogenous) असा स्नायूंतील घटक also Kreatine, Cre'atine. Creat'ic *a.* मासाचा.

Creche (krāsh) [Fr. *creche*, a crib.] *n. a house for the temporary accommodation of young children during the worktime of their mothers* मोलमजुरी करणाऱ्या आयांचीं मुलें संभाळण्याचें भाडोत्री घर *n.*

Credence (krē'-dens) [L. *credere*, *credens*, to believe.] *n.* (प्रत्यंतर पुराव्यावरून बसलेला) विश्वास *m*, भरंवसा *m.* २ विश्वाससाधन *n*, विश्वासकारण *n*, ज्याच्या योगानें विश्वास बसेल असें; as, A letter of C. ३ ख्रिस्ती देवळांतलें वेदीजवळचें मेज *n.* यावर द्राक्षासव व भाकरी परमेश्वराला अर्पण करण्यापूर्वी ठेवतात. Creden'dum *n.* श्रद्धाविषय *m*, विश्वासविषय *m*-वस्तु *f.* Cre'denda *pl.* Cre'dent *a.* (R.) भोळसर, भोळवट, एकदम भरंवसा ठेवणारा. Creden'tial *n.* विश्वासपत्र *n.* २ *pl. spec.* मुखत्यारनामा *m*, लायकीखूण *f*- पत्र *n.* C. *a.* विश्वास बसविणारें; as, "Their credential letters on both sides." Cred'ibi'lity, Cred'ibleness *n.* विश्वासनीयता *f,* सत्यता *f,* विश्वासपात्रता *f.* Cred'ible *a.* विश्वासार्ह, विश्वासनीय, विश्वास-श्रद्धाठेवण्याजोगा, भरंवशालायक. Cred'ibly *adv.* विश्वास बसण्याजोगा. Cred'it *n.* (सप्रमाण) विश्वास *m*, श्रद्धा *f.* २ सचोटी *f,* साख *f.* ३ विश्वासास आधारभूत गोष्ट *f.* ४ प्रतिष्ठा वाढविणारी गोष्ट *f,* यश *n*, भूषण *n.* ५ प्रतिष्ठा *f,* ख्यासकी *f,* मान्यता *f,* अब्रू *f,* नांव *n*, वजन *n.* ६ (commerce) पत *f,* आब *f,* साख *f.* ७ मुदत *f,* वायदा *m*; as, Three months' C. ८ (book-keeping) जमा *f,* जमेची बाजू. [Bad or low C. नापत *f.* Testimony of C. खात्री *f,* निशा *f.* That has C. साखवाला, साखीचा. To grow in C. पतीस चढणें. To loose one's C. (एखाद्याची) पत जाणें, पतीवर पाणी पडणें, पत बुडणें, नापत होणें. *g. of o.* Given or taken at C. उचापत, उधार. On C. उधार. Letter of C. भलावण.] C. *v. t.* (वर) भरंवसा ठेवणें, मानणें. २ (ची) प्रतिष्ठा वाढविणें. ३ जमा करणें, जमेकडे मांडणें. Cred'itable *a.* प्रतिश्लाघ्य, कीर्तिकर, स्तुत्य, अब्रूदार, संभावित. २ प्रतिष्ठेचा, यशस्कर. Cred'itableness *n.* Cred'itably *adv.* Cred'itor *n.* घेणेकरी, धनको, सावकार. Cred'itrix *n. fem.* Credul'ity *n.* भोळेपणा *m.* २ (in accepting scandal) कानपिसा. Cred'ulous *a.* भोळसर, भाविक,

भोळा. Cred'ulously *adv.* Cred'ulousness *n.* भोळा-भाव *m*, भोळसरपणा *m*.

Creed (krēd) *n.* धर्मसिद्धांतसंग्रह *n*, धर्मसूत्रसंग्रह *m*. २ धर्ममार्ग *m*, धर्म *m*, संप्रदाय *m*, पंथ *m*, मत *n*.

Creek (krēk) [A. S. *crecca.*] *n.* खाडी *f.* २ (*Shakes.*) वांकण *n*, वांक *m*. ३ ओढा *m*, ओहोळ *m*. Creek'y *a*.

Creel (krēl) [O. Fr. *creil*, a wicker basket cf. L. *craticulum*, double dim. of *crates*, a hurdle.] *n.* कुरकुली *f*, कुरकुलें *n*.

Creep (krēp) [A. S. *creopan.*] *v. i.* रांगणें, पोटानें सरपटत चालणें. २ हळूहळू चालणें. ३ लपत छपत जाणें. ४ खुशामत करणें; as, "A Creeping sycophant." उडून जाणें, बाजूस सरून जाणें; as, "Quick silver C.s on a mirror." ५ आंगावर मुंग्या चढल्याचा भास होणें. ६ वेलीप्रमाणें पसरत वाढणें. Creep'er *n.* रांगणारा. २ लता, वेल, ताणा, वल्ली. ३ किडूक, किडे. ४ लोखंडी शेगडीची खालची लहान सळई *f.* ५ *pl.* पाण्यांतील वस्तु काढण्याचा गळ *m*. Creep-hole *n.* (*fig.*) खिडकी *f.* २ निसटून जाण्यास मार्ग-फट, सांडवणूक *f.* Creep'ers गिरणीचीं यंत्रें फिरविणारा चाकावरचा पट्टा *m*. झाडावर चढतां येण्याकरितां बुटाला लाविलेली खडवडीत लोखंडी पट्टी *f.* To creep in नकळत आंत येणें. Creep'ingly *adv.*

Cremate (krē-māt) [L. *cremare*, *crematus*, to burn.] cf. Sk. श्रा, to cook.] *v. t.* जाळणें, प्रेत दहन करणें. Crema'tion *n.* प्रेत जाळणें *n*, प्रेतदहन *n*. Crema'tionist *n.* प्रेतदहनपद्धतीचा कैवारी *m*. Cremat'or, Crematōr'ium, Crem'atory *n.* प्रेतें दहन करण्याची भट्टी *f.* २ अशा भट्टीची जागा *f.* Crematōr'ial *a.* (सदरील) भट्टीसंबंधीं.

Cremocarp (krem'-ō-karp or krēm'ō) [Gr. *krema nnumi*, to hang & *karpos*, fruit.] *n. bot.* गाजराच्या जातीचें फळ *n*.

Creole (krē'-ōl) [Fr. *creole*, Sp. *criollo*, from Sp. *criadillo*, dim. of *criado*, a servant, from L. *creare*, *creatus*, to create.] *n.* अमेरिका, आफ्रिका आणि वेस्टइंडीज ह्यांमधील अस्सल युरोपियन रक्ताचे स्पॅनिश, फ्रेंच आणि पोर्तुगीज लोक, क्रीओल नांवाचे लोक. C. *a.* अशा लोकांसंबंधीं.

Crepance, crepane (krē'-pans-pān) [L. *crepare*, to break.] *n.* घोड्याच्या मागच्या पायाचा नाल लागून दुसऱ्या मागच्या पायास झालेली दुखापत *f.*

Crepitate (krep'i-tāt) [L. *crepitare*, *crepitatus*, to crackle.] *v. t.* पादणें, पाद सोडणें. २ तडतडणें, तडतड आवाज होणें; as, "Salt C.s in fire." Crep'itant *a.* Crepitā'tion *n.* पादणें *n*, पाद *m*. [SOFT C. फुसकली.] ३ तडतड आवाज *m*. Crep'itative *a.* Crep'itus *n.* C. bronchus *med.* धाकट्या श्वासनळींतील कुरकुर असा शब्द.

Crepuscular (krē-pus'-kū-lėr) [L. *crepusculum*, from *creper*, dusky.] *a.* (सकाळच्या किंवा संध्याकाळच्या) संधिप्रकाशाचा, झुंजुकमुंजुकचा. Crepus'culous *a.* Crepus'cule *n. glimmerings of dawn* चांचपडचांचपड *n*, चिपडचिपड *n*, उस्तें *n*, झुंजुकमुंजुक *m*, संधिप्रकाश *m*.

Crescent (kres'-ent) [L. *crescere*, *crescens*, to grow.] *a.* वाढता, वाढणारा, वर्धमान, वर्धिष्णु. २ शुद्ध द्वितीयेपासून वाढत जाणाऱ्या चंद्राच्या आकृतीचा, वृद्धिचंद्राचा. C. *n.* शुक्लपक्षांतील चंद्र *m*, शुक्लेंदु, वाढता चंद्र, वृद्धिचंद्र, चंद्रकोर. २ चतुर्थीचंद्राकृतिध्वज (चिह्न *n*.) (तुर्की सरकारचें). ३ (तुर्की सरकारची) सत्ता-अम्मल *m*. ४ *Hera.* ढालेवर काढलेला कोरेचा चंद्र *m*. Cres'centade *n.* इसलामी धर्मयुद्ध. Cres'cented *a.* चंद्रकोर असलेला. Crescent'ic *a.* वृद्धिचंद्रासारखा केलेला. Cres'cive *a.* (*Shakes.*) वाढता. Crescent-shaped *a.* वृद्धिचंद्राकार. [हाळींव. Cress'y *a.*

Cress (kres) [A. S. *cresse*, cerse.] *n.* आळीव, अहाळींव,

Cresset (kres'-et) [O. Fr. *cresset*, *crasset*, akin to Eng. *cruse.*] *n.* खुणेची आगटी *f*, खुणेचा-निशाणीचा-संकेताचा दीप *m*.

Crest (krest) [O. Fr. *creste*, L. *crista*, a crest.] *n.* शेंडी *f*, शिखा *f*, कुक्कुटचूडा *m*. २ तुरा *m*, कलगी *f*, शिखा *f.* ३ दिमाख *m*, मान *m*, नाक, अभिमान, टेंभा. ४ (लाटेचा) माथा *m*. ५ (डोंगराचा) माथा *m*, शिखर *n*. ६ *anat.* अस्थिशिखा *f*, अस्थिचूडा *f*, हाडावर वाढलेली उंच कड *f.* ७ घोड्याच्या मानेवरचा वक्रभाग *m*. C. *v. t.* (वर) तुरा लावणें, चूडावान् करणें, शिखाधर करणें. C. *v. i.* चूडा बनविणें. Crest'ed *p. a.* तुरेवाला, चूडावान्, शिखाधर. Crest'-fallen *a.* रग मोडलेला-जिरलेला, चीत झालेला. Crest'less *a.* चूडा-शिखा नसलेला. २ नीच कुळांतला. To let fall or lower one's crest मान खालीं घालणें, कान पाडणें.

Cretaceous (krē-tā'-shus) [L. *cretaceus*, from *creta*, chalk.] *a.* खडूचा, खडूसारखा. Cretā'ted *a.* खडूनें घांसलेला. Cretifac'tion *n.* Crē'tify *v. t.* चुन्याच्या क्षारांनीं परिपूर्ण करणें. [भेग *f*, चीर *f.* २ खांड.

Crevasse (kre-vas') *n.* (बर्फनदीला (Glacier) दुभागणारी)

Crevice (krev'-is) [Fr. *crevasse*, from, *crever*,—L. *crepare*, to burst, to crack.] *n.* फट *f*, भेग *f*, चीर *f.* C. *v. t.* चीर पाडणें, भेग पाडणें.

Crew (krū) [From O. Icel. *kru*, a swarm.] *n.* मंडळी *f*, तांडा *m*, समाज *m*. २ एका गलबतावरील सर्व नावाडी लोक, खलाशी, *m. pl.* नाविकगण *m, pl.*

Crew (krū) *pa. t.* of Crow.

Crewel (krū'-el) [From Dut. *krul*, a curl.] *n.* वेलबुट्टीकरितां वापरलेलें बारीक वळींव सूत *n*. २ असल्या सुताचें वेलबुट्टीदार काम *n*. Crew'elist *n.* Crew'ellery *a.*

Crib (krib) [A. S. *crib*, *cribb.*] *n.* जनावरांस खाणें घालण्याचें लांकडी पात्र *n*, कोटंबा *m*, कोठिंबा *m*. २ ठाण *n*, गोथवड *f*, गोठा, गोठाण-ठण. ३ मुलाचा पलंग, पलंगडी. ४ कोठी. ५ खोपट *n*, खोपटी *f.* ६ सुरटी चोरी, चोरलेली

वस्तु. ७ कठीण ग्रंथ सुगम करण्याकरितां त्यांचें अक्षरशः भाषांतर. ८ रद्द झालेले गंजिफाचे पत्ते. C. *v. t.* मुरटी चोरी करणें. २ कोंडवाड्यांत ठेवणें-घालणें. C. *v. i.* एके ठिकाणीं मिळणें. २ परीक्षेंत 'कॉपी' करण्याच्या उद्देशानें कांहीं लिहून नेणें. Crib'bing *pr. p.* Cribbed *pa. p.* Crib-biting *n.* घोड्याची एक खोड *f.* ह्या खोडीनें घोडा गवाणीचा खांब तोंडांत धरून गटगट आवाज करून हवा पोटांत घेतो.

Cribbage (krib'āj) [Dim. of *crib*, above.] *n.* एक तऱ्हेचा पत्त्यांचा खेळ.

Cribble (krib'l) [L. *cribellum*, dim. of *cribrum*, a sieve.] *n.* धान्य व भरड पदार्थ चाळण्याची चाळणी *f.* २ (*obs.*) जाड रवा-पीठ *n.* C. *v. t.* चाळणें. Crib'rāte, Crib'rose *a.* चाळणीप्रमाणें भोंकें पाडलेलें. Cribrā'tion *n.* चाळणें. Crib'riform *a.* चाळणीच्या आकाराचा.

Cribellum (kri-bellum) कित्येक कोळ्यांचा तंतू काढण्याचा एक विशेष अवयव. also Cribrell'um. Cribrell'a *pl.*

Crick (krik) [See Creak.] *n.* मानेच्या स्नायूचा पेटका-गोळा-अंवटाळा *m*, ताठा *m*, अवघडा *m*, कण *f*; उसण (*v.* भर). [TO HAVE A CRICK IN THE NECK मान तिरपावणें-तिरपणें.]

Cricket (krik'et) [O. Fr. *criquet*, from its sharp, creaking sound.] *n.* राळ *f*, झिल्ली *f*, रातकिडा *m*. [A MOLE C. घोंगेरा, बुरगुरा. CHIRPING OF C. चिनीचिनी, किरं *n*, झिल्लीरव.]

Cricket (krik'et) [O. Fr. *criquet*, a kind of game with a stick. cf. A. S. *cricc*, a crutch.] *n.* चेंडूफळीचा इंग्रजी खेळ *m*, क्रिकेटचा खेळ *m*. C. *v. i.* चेंडूफळीचा खेळ *m*- क्रिकेट *m*. खेळणें. Crick'eter *n.* क्रिकेट खेळणारा. Cricket-ground *n.* क्रिकेटचें मैदान *n*. Cricket-match *n.* चेंडूफळीचा सामना *m*, क्रिकेटचा सामना *m*.

Cried *pa. t. & pa. p.* See the word Cry.

Crim. Con. (krim kon) [Abbrev. of criminal conversation.] *n.* *adultery* जारकर्म *n*, व्यभिचार *m*.

Crime (krīm) [Fr. *crime*-L. *crimen*, an accusation-a crime.] *n.* अपराध *m*, मोठा गुन्हा *m*, दोष *m*, अन्याय *m*. २ पातक *n*, अधर्म *m*, कुकर्म *n*. ३ महापाप *n*. Crime'ful *a.* (*obs.*) अपराधपूर्ण, दुष्ट, बेकायदेशीर. Crime'less *a.* निरपराधी. Crim'inal *a.* गुन्हेगार, अपराधी. २ कुकर्मी, पापी, अन्यायी, अनीतीचा. ३ फौजदारी गुन्ह्याचा. C. *n.* अपराधी *m*, गुन्हेगार *m*. Crim'inalist *n.* (R.) फौजदारी कायद्यांत वाकबगार-दर्दी. Criminal'ity *n.* अन्यायीपणा *m*, अपराधीपणा *m*. २ अपराध *m*. Crim'inally *adv.* Crim'inate *v. t.* गुन्हेगार ठरविणें, दोषारोप करणें. Criminā'tion *n.* गुन्हेगार ठरविणें *n*. Crim'inātive, Crim'inātory *a.* दोषावह, दोषारोप करणारा, गुन्हा लावणारा. Criminol'ogy *n.* Crim'inous *a.* अपराधप्रचुर, दुष्ट, गुन्ह्यांनीं भरलेला. २ महदपराधासंबंधीं. Crim'iniousness *n.* Capital crime मरणदंडक अपराध *m*.

Crimp (krimp) [A. Dut. *crimpen*, to shrink.] *a.* लौकर भंगून जाण्यासारखें, ठिसूळ, शीघ्रभंगुर; as, "C. earth." C. *v. t.* नागमोडीचा आकार देणें, सुरकुत्या पाडणें. २ पकडणें, चिमट्यांत धरणें. C. *n.* लष्करी नोकरींत फसवून नेणारा. Crimp'age *n.* Crimp'er *n.* नागमोडीचा आकार देणारा. Crimping-iron *n.* झुबकेदार केंस कुरळे करण्याची फणी *f.* Crimping-machine *n.* कातणें *n*, चिरणी *f.* Crimp'le *v. t.* (R.) मुरडणें, मुरडवडी घालणें चुणी *f*- चूण *f*- निरी *f.* घालणें, तुरपणें. २ कुरळें करणें. Crimpled *a.* मुरुडलेला, मुरडींव, &c. Crimp'ler *n.* मुरडणें (एक यंत्र आहे) *n.* २ *an instrument of tailors to crimple cloth* चुणकस *f.*

Crimson (krim'zn) [O. Fr. *cramoisin*.-L. L. *cramesinus*, from Arab. *qermez*, the kermes insect which yields the dye.] *n.* किरमिजी रंग *m*. C. *a.* किरमिजी. C. *v. t.* किरमिजी रंग देणें, किरमिजी रंगानें रंगविणें. C. *v. i.* किरमिजी रंग येणें. २ लज्जित होणें, लाजणें, लाजेनें (साहेब लोकांत) लाली येणें.

*N. B.*—Crimson should be, as its derivation suggests, restricted to किरमिजी only. In some districts, अब्वाशी is another name for किरमिजी. गुलाली and गुलबासी approach very nearly किरमिजी. In the Bombay bazar, if we ask for किरमिजी or Crimson, they give us Magenta. There are seven or eight shades of Magenta and we have to choose the one we want.

Cringe (krinj) [A. S. *crincan*, *cringan*, to shrink] *v. t.* पुढच्या पुढें नाचणें, थुंकी झेलणें, हांजी हांजी करणें-म्हणणें. C. *n.* (*obs.*) लवणभंजन *n*, आर्जव *m*. Cringe'ling, Crin'ger *n.* पुढेंपुढें करणारा-नाचणारा, लवणभंजन करणारा, थुंकी झेलणारा, गोंडा घोळणारा. Crin'gingly *adv.*

Cringle (kring'gl) [Eng. *cringe.*] *n.* खीळ *f*, कडी *f.*

Crinkle (kring'-kl) [cf. Dut. *krinkelen*, to turn or wind.] *v. t.* दुमटणें, मुरडणें. C. *v. i.* दुमडून जाणें. C. *n.* सुरकती *f*, चिरमी *f*, चुणी *f.* Crink'ly *adv.* सुरकुत्यांचा. Crink'um-Crank'um *n.* वांकडीतिकडी वस्तु *f.*

Cripple (krip'-l) [A. S. *crypel*, from *creopan*, to creep & suffix *el*, of the agent.] *n.* लंगडा *m*, पांगळा *m*, लुला *m*, पंगु *m*. C. *a.* लंगडा, पांगा. C. *v. t* लंगडापांगा करणें. २ अशक्त करणें, पंगू करणें. ३ छाटणें, कमी करणें. Cripp'ledom *n* पंगुस्थिति *f.* Cripp'ling *n.* इमारतीस दिलेला टेंका *m*- धिरा *m*-टेटावा *m*. Crippled *a.* लंगडा, पांगळा, पांगा, पांगूळ, हातापायांनीं अपू, लुला, व्यंग. २ *fig.* पंगू, बळहीन केलेला. To be or become a cripple पांगुळणें.

*N. B.*—We propose the following restrictions. Lame=लंगडा. Maimed=लुला, विकलांग. Cripple=पांगळा. However for the word cripple पांगळा, लुला and लंगडा may be promiscuously used. लटका=Paralyzed.

Crisis (krī'-sis) [L. *crisis*-Gr. *krisis*, from *krinein*, to separate.] *n.* बऱ्यावाइटाचा-सोक्षमोक्षाचा-आणी-

बाणीचा वेळ m. संधि f. टिपण n, प्रसंग m, संकटवेळा f, दांसण n. २ परिणाम ठरविणारी रोगाची स्थिति f, जोखीम f, व्याधिसीमा f. Crises ( krī'sēz ) *pl.*

Crisp ( krisp ) [ A. S. *crisp*, from-L. *crispus*, curled.] *a.* कुरळ झालेला, गुच्छदार; as, "C. hair." २ लौकर फुटून जाण्यासारखें, ठिसूळ. ३ ताजा, टवटवीत; as, " It ( laurel ) has been plucked nine months, and yet looks as, hale and C. as if it would last ninety years." जोरदार, जोसाचा; as, "C. wine." ४ झगझगीत, धगधगीत. "C. fire." ५ कडक, कडग, कुरकुरित, कुडकुडीत; as, "C. Cakes." C. *v. t.* कुरलाकृति करणें, वांकडेंतिकडें करणें. २ कडंग-खरपूस भाजणें. C. *v. i.* (लहान लाटेसारखें) हालणें. Cris'pāte-d *a.* कुरलाकृतीचा. Crispā'tion *n*, Crisp'ature *n.* वांकड्यातिकड्या सुरकुत्या पडणें *n.* Crisp'er *n.* कुरलाकृति *f.* करणारा, Crisping iron-pin. Same as Crimping iron. Crisp'ly *adv.* Crisp'ness *n.* कडंगाई *f*, कुरकुरीतपणा *m*, कुरलता *f*, खरपूसपणा *m*, कडंगपणा *m*, कुडकुडी *f.* Crisp'y *a.* वळलेले, गुच्छ झालेले. २ ठिसूळ.

Criss-cross (kris'-kros) [A corruption of Christcross.] *n.* (एखाद्या मनुष्याला लिहितां येत नसलें म्हणजे त्याची) सहीच्या जागीं केलेली खूण *f* निशाणी *f* (सही करणाराची). C. *v. t.* रेघा मारणें. C. *adv.* विरुद्धपणानें, प्रतिकूल रीतीनें.

Criterion ( krī-tē'ri-on ) [ Gr. *kriterion*, from *krinein*, to judge. ] *n.* Crite'ria *pl.* कसोटी *f.* परीक्षा *f*, निर्णयप्रमाण *n*, निर्णायक लक्षण *n*, लक्षण *n*, चिह्न *n*, गुणागुणलक्षण *n.*

Critic ( krit'ik ) [ L. *criticus.*-Gr. *kritikos*, from *krites*, a judge. from *krinein*, to judge.] *a.* परीक्षक, शोधक, रसज्ञ, रसिक. २ छिद्रान्वेषी, टीकाकार. Crit'ical *a.* परीक्षक, रसिक, गुणज्ञ, शोधक. २ गुणदोषविवेचनासंबंधीं. ३ गुणदोषवेत्ता ४ छिद्रान्वेषी, दोषदर्शी. ५ भयंकर, बऱ्यावाइटाच्या समयाचा, आणीबाणीचा, हारजिताचा. Crit'ically *adv.* Crit'icalness, Critical'ity *n.* Crit'icaster, Crit'ickin *n.* हलक्या प्रतीचा टीकाकार. Criticis'able *a.* Crit'icise *v.* t. दोषादोषविवेचन करणें, टीका करणें. २ दोष ठेवणें-काढणें, टीका करणें. C. *v. i.* गुणदोषाचें विवेचन करणें. Crit'icism *n.* गुणदोषविवेचन *n*, गुणावगुणपरीक्षा *f.* २ छिद्रान्वेषण *n*, टीका *f.* Critique [ Fr. ] *n.* गुणदोषचंद्रिका *f*, दोषादोषप्रकाशिका *f.* २ गुणागुणपरीक्षा *f.* ३ विवेचक *n*, टीकाकार *m.* Critical angle *n.* See Angle. Critical philosophy, see philosophy. Critical point फक्त दाबानें घन पदार्थ द्रव करणारें उष्णतामान, अवर-अवधि-उष्णतामान.

Croak ( krōk ) [A purely onomatopoetic word.] *v. t.* डरडुरणें, डरांवडरांव करणें. २ करकरणें, करांवकरांव करणें. ३ सदोदित रड गाणें, कुरकुर करणें, अभद्र बोलणें-भाकणें. C. *v. t.* डुरडुरणें, कुरकुरणें. C. *n.* डुरडुर, डरांवडरांव *m*, टरांवटरांव *m.* Croak'er *n.* सदोदित रडणारा, रड्या, गाणें गाणारा, अभद्रभाक्या. Croak'ily *adv.* Croak'ing *n.* Croak'y *a.*

*N. B.* " Terms or phrases for *a person ever croaking* ( i.e. foreboding evil ) and answering to *Croaker*, *Screech-owl*, *Raven*, *Damper*, are नास्तिभाक्या, अवसानघातकी, काळजिभ्या, हीरमोड्या, मोड्या, अभद्रसूची." (Candy.)

Croceous (krō'shi-us ) *a.* (R.) केशराचा, केशरी रंगाचा, [केशरी, केशरमय.

Crochet ( krō'-shā ) [Fr. dim. of *croc*, a hook.] *n.* लोंकरीच्या विणकामाच्या सुया.

Crock ( krok ) [ A. S. *crocca*, an earthen vessel. ] *n.* मातीचें भांडें *n*, मृण्मयपात्र *n.* २ मस *f*, मशी *f*, खरपी *f*, जळ *f.* Crock'ery *n.* *earthen ware* गाडगी मडकी *n. pl.* कुंभारसामान *n.*

Crocodile ( krok'-ō-dīl ) [ L. *crocodilus.*-Gr *krokodeilos*, a lizard. ] *n.* सुसर, मगर (?), नक्र, ग्राह *m.* (S.). Crocodil'ian *a.* नक्रासंबंधीं. Crocodil'ity *n.* (R.) आभासात्मक कोटिक्रम *m.* Crocodile tears वरवर रडें, कोरडें रडें. To shed crocodile tears नक्राश्रु ढाळणें, मायावीपणानें रडणें, मानभावीपणानें रडणें.

*N. B.*—Alligator मगर, Crocodile सुसर.

Crocus ( krō'kus ) [ L. *crocus.*-Gr. *krokos*, saffron cf. Sk. कुंकुम. ] *n. bot.* ज्या झाडाला लवकरच फुलें येतात व ज्याचा मोहोर प्रकाशित असतो असें झाड *n.* २ *chem.* पिंवळ्या रंगाची भुकी *f.*

Crœsus ( krēsus ) [ *croesus*, a rich and powerful king of Lydia, whose name became prov. for wealth. ] *n.* क्रीसस नांवाचा राजा *m.* २ जगत्‌शेट *m*, कुबेर *m*, नवकोटिनारायण *m*, धनशेट *m*, श्रीमंत *m.*

Croft ( kroft ) [ A. S. *croft*, a field. ] *n.* वाडी *f*, वाडगें *n*, वाडकुलें *n.* Crof'ter *n.* लहान शेतवाडी करणारा. Croft'ing *n.* ( *Scot.* ) शेतवाडीची जमीन *f.* २ (*Manufacture*) ओपवणें *n.*

Cromlech ( krom'lek ) [ W. *cromlech* ; *crom*, bending or bent, concave + *llech* a flat stone akin to Ir. *cromleac.* ] ( *arch.* ) दोन किंवा अधिक उभ्या चिऱ्यांवर आडवे दगड ठेवून केलेलें स्मारक *n.* हें स्मारक इ. स. पूर्वी प्रचारांत असे.

Crone ( krōn ) [ Formerly *crony*, from Dut. *karoni*, a hussy, a slut, *lit.* a carrion. ] *n.* (*obs.*) म्हातारी मेंढी *f.* २ थेरडी *f*, म्हातारी *f*, डोकरी *f*, डोकरीण *f.*

Crony ( krō-n'i ) [ Ety. unknown, possibly classical.] *n.* सलगीचा-जीवींचा मित्र *m*, जिवलग मित्र *m.* Cronyship *n.* गडी *m*, गडीपणा *m*, दोस्ती *f*, गट्टी *f*, स्नेह *m.*

Crook ( krōōk ) [ Same as Icel. *krokr*, Swed. *krok*, a hook or crook. ] *n.* वांक *m*, वळण *n.* २ कपट *n*, युक्ति *f.* ३ वांकड्या टोंकाचें हत्यार *n*, आंकडी *f*, अंकुश *m*, मेंढक्याचा बांकदार दांडा *m.* ४ *music.* वाद्यांच्या तोंडावर बसविण्याची बांकदार जिवणी *f.* ५ चोरांचा

साथी *m*, कपटी-लबाड मनुष्य *m*. C. *v. t.* वांकविणें, वांकडें करणें. २ (R.) आडमार्गाला लावणें, भ्रष्ट करणें. C. *v. i.* वांकणें, वळणें. Crook-back *n.* कुबड *n.* Crook-backed *a.* कुबड्या, कुबडमोड्या, कुब्ज. Crooked *a.* वांकडा, वक्र, विनत. २ कुटिल, वक्र. ३ खोटा, कपटी; as, "C. dealings." Crook'edly *adv.* वांकड्या रीतीनें. Crook'edness *n.* वांकडेपणा *m*, वक्रता *f*, कौटिल्य *n.* Crook-kneed *a.* वांकडे गुडघे असलेला, फेंद्या-फेंगड्या पायांचा. Crook-shouldered *a.* वांकडे खांदे असलेला. Crook in one's lot (व्यवहारांत येणारा) कठीण प्रसंग. By hook or by crook कसेंही करून, जसातसा, चांगल्या किंवा वाईट रीतीनें, चांगल्या किंवा वाईट मार्गानें, योग्य किंवा अयोग्य उपायानें.

Croon (krōōn) [of imitative origin.] *v. t.* आपल्याशींच गाणें-गुणगुणणें. २ मधुर गायन करून शांत करणें. C. *v. i.* गुरांप्रमाणें दुःखानें रडणें.

Crop (krop) [A. S *cropp*, top, bunch, craw of a bird.] *n.* पीक *n*, पीकपाणी *n.* २ पाखराच्या गळ्यांतील अन्नाशयाची पिशवी *f*, चुनाळ *m.* ३ डोक्याचे कापलेले केंस *n.* ४ घोड्यावर बसून फेरफटका करण्याच्या वेळचा अतिशय आंखूड वादीचा चाबूक *m.* ५ उभें शेत *n*, पीक *n.* ६ बोखा *m*, शेंडा *m*, तिटाळी *f.* [CROP OF FRUITS OR FLOWERS लाग, बाज, बार, उफर, उपरा. AUTUMNAL C. खरीप. DECLINING OF RIPENING C.s आंकड्यास येणें, पडणीस येणें. FAILURE of C. नापीक. VERNAL C. रब्बी. To C. OUT वर दिसणें. To C. UP अप्राधान्यपणानें-गौण रीतीनें उपस्थित होणें. इतर वस्तूंच्या किंवा कारणाच्या प्रसंगानें पुढें येणें-उपस्थित होणें.] C. *v. t.* खुडणें, तोडणें, बोखडणें (R.), बोडकावणें. C. *v. i.* पीक येणें. Cropped *pa. p.* Crop-eared *a.* मुंढ्या कानाचा. Crop'ful *a.* (*Miltion*) भरलेल्या पोटाचा, पूर्णोदर. Crop'per *n.* पीक कापणारा. २ धरतें, लागतें झाड *n.* ३ खंडानें पीक कापणारा. Crop'ping *pr. p.* Crop'ping *n.* कापणें *n.* Crop-sick *a.* अतिशय जेवल्यानें आजारी, असमाधानी. Crop-tailed *a.* लांडा, छिन्नपुच्छ.

Croquet (krō'-kā) [Fr. *croquet*, a bent stick.] *n.* एक प्रकारचा काठीनें खेळावयाचा खेळ *m.*

Crore (krōr) [East Indian.] *n.* कोटी *m. f*, क्रोड, शंभर लक्ष.

Crosier, Crozier (krō'-zhier) [L. *crux*, a cross.] *n.* ख्रिस्ती विशपाचा धर्मदंड *m.*

Cross (kros) [Fr. *croix*, from L. *crux*, *cruces*, a cross.] *n.* क्रूस *m*, ख्रिस्ती धर्माची खूण *f.* २ येशू ख्रिस्ताचें मृत्युसूचक चिन्ह *n.* ३ ख्रिस्तमत *n.*- धर्म *m.* ४ क्रूसाच्या शिक्याचें नाणें *n*, नाणें *n*, पैसा *m.* ५ क्रूसाकार दागिना *m*, क्रूसाच्या आकाराचा एखादा दागिना *m.* ६ सहीऐवजीं केलेली क्रूसाची निशाणी *f.* ७ सत्वपरीक्षणार्थ आलेलें संकट *n.* ८ क्रूसासारखी (+) फुली *f.* ९ अक्करमास. C. *v. t.* (वर) क्रूसाची खूण करणें. Cross-bearer *n.* (एखाद्या समारंभांत) क्रूस घेऊन चालणारा, क्रूसवाहक. Cros'sing *n.* क्रूसा or क्रासासारखी खूण करणें *n.* Cross-section *n.* तिर्यक् छेद *m*, आडवा काट-छेद *m.* Cross-stitch *n.* दुहेरी टांका *m.* Cross'let *n.* लहान क्रास-क्रूस *m.* Cross and pile नाण्याच्या उलट्यापालट्या बाजूचा खेळ *m.* To cross one's mind एखाद्याच्या एकदम मनांत येणें. To cross the path of any one मोडा घालणें, अडथळा करणें, मार्गांत आडवें पडणें-होणें-आड येणें. The Southern cross (*astro.*) दक्षिणीय चतुष्पथ.

Cross (kros) *a.* आडवा, वांकडा. २ विपरीत, उलटा, प्रतिकूल. ३ दुःशील, दुरात्मा. ४ आमन्यासामन्याचा, अदलाबदलीचा. ५ खिसखिशा, खाष्ट, खंक, खंकाळ्या, खव्याल, कटकव्या, खडतर, जिकरी, तिरसट, तिसकूट, हिरवट, तुटस, तुसडा. ६ संकराचा. [CROSS BREED संकर-मिश्रजाति. भिन्नकुलोत्पत्ति.] C. *v. t.* क्रूसांची खूण-चिह्न करणें, एका रेघेवरून दुसरी रेघ ओढणें, फांटा मारणें. २ छेकणें, छका मारून रद्द करणें. ३ अडचण हरकत करणें, आडवा-वांकडा येणें, अवरोध-प्रतिरोध करणें, मोडा घालणें. ४ अटकाव करणें, रोखणें. ५ ओलांडणें, उतरणें, उल्लंघणें, पार जाणें, तरणें. C. *v. i.* ओलांडणें. Cross-action *n. law.* एकाच खटल्यांत उलट दावा *m.* Cross-armed *a.* हातास तिठा घालून. Cross-bar *n.* आडवा गज *m.* Cross-barred *n.* आडवे गज लावलेला. Cross-beam *n.* इमारतीच्या दोन्ही बाजूस बळकटी आणणारी मोठी तुळई *f*, खांडबार. Cross-birth *n.* (बाळंतपणाचे वेळीं) आडवें येणें *n.* Cross-bones दोन मांडयांचीं हाडें एकमेकांना आडवीं बांधून त्यावर घातलेली करवंटी *f.* ही एक मृत्यूची खूण असें मानतात. Cross-bow *n.* मोठ्या दांड्याला आडवें बांधलेलें धनुष्य *n*, कुंद्याचा-दस्त्याचा कमठा *m.* Cross-bowman *n.* वरच्या प्रकारचें धनुष्य वापरणारा. Cross-country *a.* शेतांतला, शेतांतून. Cross-cut जवळचा आडरस्ता *m.* Cross examine *v. t.* उलट सवाल घालणें, प्रतिप्रश्न करणें, उलट तपासणी करणें. Cross-eyed *a.* तिरवा, काणा, चकणा. Cross-grained *a.* आडव्या शिरांचा, आडव्या दोराचा. २ आडगात्या, अडिवाळ. Cros'sing *n.* (*Rail*) एका रुळावरून दुसऱ्या रुळावर जाणें, दोन आडव्या रुळांचा सांधा ओलांडणें, उतरणें. २ अवरोध *m*, प्रतिरोध *m.* ३ ओलांडणी *f*, उतरण *f.* Cross-legged *a.* अढी घालून बसलेला. Cross'ly *adv.* Cross-patch *n.* दुःशील मनुष्य *m*, आडजात *f.* Cross-plough *v. t.* बेरणें, बेरणी करणें. Cross-purpose *n.* उलट हेतु *m*, मनसुबा *m*, एकानें म्हणावें एक दुसऱ्यानें समजावें दुसरें. To be at cross purposes (न जाणतां) एकमेकांच्या विरुद्ध वागणें, (विरोध करण्याचा हेतु नसतांनाही एकमेकांशीं) विरुद्ध वागणें, एकमेकांशीं विरुद्धपणाचें वर्तन होणें. Cross-question *n.* उलट प्रश्न-सवाल. Cross-road *n.* आडवा रस्ता *m*, आडवाट *f.* Cross-way *n.* चवाठा *m*, तिवाठा *m.* Cross-wise *a.* आडवा, आड.

Crotch (kroch) *n.* बेळकें *n*, दुबेळकें *n*, बेचकें *n*, नांगें *n.* Crotched *a.*

Crotchet ( kroch'et ) [ Fr. *crochet*, dim. from *croc*, a hook. ] *n.* वेळकी *f*, दुवेळकी *f*; वेचकी *f*. २ *print.* चौकोनी कंस *m*, वेळें *n*. ३ लहर *f*, तरंग *m*. Crotch'eted, Crotch'ety *a.* लहरी, लहरीदार. Crotch'eteer *n.* लहरी मनुष्य *m*.

Croton ( krō'tun ) [ Gr. *kroton*, a tick or mite which the seed of the plant resembles.] *n.* चंद्रज्योतीचें-(?) जेपाळाचें झाड *n*. Croton-oil *n.* जेपाळाच्या बियांचें तेल *n*.

Crouch ( krowch ) [ A softened form of *crook.*] *v. i.* दबणें, दबकणें, दबा धरून बसणें-असणें. २ हातांपायांपायां पडणें, पदर पसरणें, लवणभंजन करणें.

Croup ( kroop ) [ A S. *kreopan*, to call. ] *n.* क्रूप नांवाचा खोकला ; ह्याचें पर्यवसान केव्हां केव्हां घटसर्पांत होतें. C. *v. i.* Croup'iness *n.* Croup'ous, Croup'y *a.*

Croup ( kroop) [ Fr. *croupe*, hind quarters, the rump. ] *n.* घोड्याचें ढुंगण *n*, ढिमोरा *m*, चौक *m*.

Croupier ( kroo'-pi-er ) [ Fr. one who rides on the croup. ] *n.* ( सार्वजनिक जेवणाचे वेळीं ) उपप्रमुख. २ जुगाराच्या टेबलावरचे पैसे गोळा करणारा.

Crow ( krō ) [ A. S. *crawe*, a crow ; *crawan*, to cry like a cock. ] *n.* कावळा *m*, काक *m*, वायस *m* ( S. ). २ संबल *f*, तोमर *f*, तरफ *f*. ( of iron ). ३ आरवणी *f*, आरव *f*, कोकणी *f*, कूक *f*, बांग *f*, साद *f*. [ SECOND C. दुसारणी. ] ४ प्राण्यांच्या आंतड्यांतील नरम त्वचा *f*. ( ह्या अर्थी हा शब्द खाटीक लोक वापरतात. ) C. *v. i.* आरवणें, कुकणें, साद देणें. २ आनंदानें ओरडणें, जयशब्द करणें ( with over ). Crowed or Crew *pa. t.* Crowed *pa. p.* Crow-bar *n.* वांकड्या टोंकाची-बांकदार तरफेची पहार *f*, कटवणी *f*. Crow-keeper *n.* ( *Shakes.* ) पाखरांना भेडवण्याकरितां शेतांत उभा केलेला गवताचा पुरुष *m*, गवती भूत *n*. Crow-quill *n.* कावळ्याच्या पिसांची लेखणी *f*. Crow's-bill or Crow-bill *n. surg.* जखमेंतून गोळी काढण्याचा चिमटा *m*. Crow'sfoot *n.* म्हातारपणीं डोळ्याखालीं पडणाऱ्या सुरकुत्या. Crow'snest *n. naut.* मोठ्या डोलकाठीवरचें खलाशाचें बसण्याचें ठिकाण *n*. As the crow flies (जसा कावळा सरळ जातो तसें ) सरळ. Eat crow *or* eat boiled crow मनाविरुद्ध काम करावयास भाग पडणें. Have a crow to pluck *or* pick with दुसऱ्याबरोबर भांडून कांहीं तरी गोष्ट ठरविण्याची असणें.

Crowd ( krowd ) [ A. S. *crudan*, to press. ] *n.* जमाव *m*, घोळका *m*, थवा *m*, टोळी *f*, समुदाय *m*, समूह *m*. २ तेली तांबोळी *m. pl.*, कोळीमाळी *m. pl.*, कनिष्ठ प्रतीच्या लोकांचा जमाव *m*-मेळा *m*. C. *v. t.* भरून काढणें, खेटून काढणें, रगडा-दाटी करणें. २ खेटवणें, दाटी करणें. C. *v. i.* दाटणें, खेटणें, भिडणें, आंत घुसणें; as, "A man C.s into a room." ३ अडचण करणें. ४ लगट करणें. Crowd'ed *p. t.* & *pa. p.* गर्दी झालेला, गच्च भरलेला, &c. Crowd sail *naut.* गलबताची गति वाढविण्याकरितां पुष्कळ शिडें उभारणें.

Crown ( krown ) [ O. Fr. *corone*,-Fr. *couronne*.-L. *corona*, a crown. ] *n.* मुकुट *m*, मुगूट *m*, किरीट *m*. २ शिरोभूषण *n*. ३ ( with *the* ) राज्याधिकारी *m*, राज्यकर्ता *m*, राजा *m*. ४ पारितोषिक *n*, इनाम *n*, बक्षीस *n*. ५ राज्यपद *n*, राजगादी *f*. ५ राज्याधिकार *m*, बादशाही अम्मल *m*, सत्ता *f*. ६ शोभा *f*, नाक *n*, भूषण *n*; as "Virtuous woman is a C. to her husband." ७ पराकाष्ठा *f*, अवधि *m*; as, "Mutual love, the C. of all our bliss." ८ शिखर *n*, अग्रभाग *m*. ९ शीर्षाग्र *n*, ब्रह्मांड *n*. १० ( of a hat ) शिखा *f*, माथा *m*. ११ कमानीचा शिरोबिंदु *m*. १२ भट्टीचा घुमट *m*. १३ पांच शिलिंगांचें इंग्लंडांतील एक नाणें *n*. १४ एक तऱ्हेचा छापण्याचा कागद *m*. १५ *geom.* दोन समकेंद्र परिमितींतील क्षेत्र *n*. C *v. t.* राज्याभिषेक करणें, गादीवर बसविणें. २ भूषित करणें. ३ संपूर्ण-परिपूर्ण करणें. ४ ( चा ) शिखर-कळस होणें; as, "Amidst that grove that crowns yon tufted hill." Crown-agent *n.* स्काटलंडांतील सरकारतर्फे फौजदारी खटले तयार करणारा सालिसिटर *m*. Crown-colony *n.* सरकारी वसाहत *f*, मुख्य देशाकडून जिचा राज्यकारभार चालतो अशी वसाहत *f*. Crowned *a.* मुकुट घातलेला, मुकुटधारी, किरीटी, &c. २ भूषित, &c. [ To BE CROWNED WITH SUCCESS सार्थक्य *pop.* सार्थक *n*- साफल्य *n*-&c. होणें *g. of. s.* कृतकृत्य होणें. ] Crown'er *n.* ( Shakes. ) हा करोनर शब्दाचा अपभ्रंश आहे. Crown'et *n.* लहान मुकुट *m*, मुकुटक *m*. Crown-glass *n.* खिडक्यांच्या तावदानांची एक प्रकारची कांच *f*. Crown'ing *n.* राज्याभिषेक *m*. Crown-jewels *n.* राजाचें जवाहीर *n*, सरकारी जवाहीर *n*. Crown-land *n.* सरकारी जमीन *f*. Crown-lawyer *n.* ( फौजदारी खटल्यांत ) राजाच्या वतीचा वकील *m*. Crown'less *a.* मुकुट नसलेला. Crown-post, King-post *n.* कैचींतला मधला किंवा मुख्य खांब *m*. Crown-prince *n.* राजाचे पश्चात् गादीवर येणारा राजपुत्र *m*, युवराज *m*. Crown-saw *n.* सिलेंडरला ( cylinder ) दांते पाडून केलेली वाटोळी करवत *f*. Crown-wheel *n.* उभ्या दांतांचें चाक *n* ( ह्याचे दांत चाकाच्या पातळीवर उभे असतात ), तुंबा(?) *m*. Crown-witness *n.* ( फौजदारी खटल्यांत ) सरकारी साक्षीदार *m*.

Crucial ( krū'shi-al ) [ L. *crux*, *crucis*, a cross. ] *a.* क्रूसाच्या आकाराचा, क्रूसासंबंधीं. २ जिवावरचा, जिवापरता, प्रखर, फार कडक. ३ *logic.* निर्णायक. Cru'ciāte *a. bot.* क्रूसाकृति, क्रूसाकार पानें किंवा पाकळ्या असलेला.

Crucible ( krū'si-bl ) [ L. L. *crucibulum*, Origin doubtful. ] *n.* मूस *f*, पूट *n*, आवर्तनी *f*. २ वितळलेली धातु रहाण्याकरितां भट्टीच्या तळाशीं केलेली पोकळ जागा *f*, धातुरसपात्र *n*. [DIPPING ROD OF A CRUCIBLE ईषिका *f*, तुलिका *f*.] ३ कडक परीक्षा *f*, कसोटीचा प्रसंग *m*.

Cruciferæ ( krū'si-f'ērē ) [ Fr. *crucifier*. L. *crux*, *crucis*, cross-*ferre*, to bear. ] *n. bot.* मोहरीच्या जा-

तीची वनस्पति *f*, मोहरीकुल. Cruc'ifer *n.* क्रूसवाहक *m*, एखाद्या समारंभांत क्रूस घेऊन चालणारा, एखाद्या समारंभांतील क्रूसवाला *m*. Crucif'erous *a.* क्रूसासारखी पाकळ्या किंवा पानें जिला असतात अशी (वनस्पति). २ क्रूस धारण करणारा, क्रूसधारी.

Crucify (krū'-i-fī) [L. *crux* & *figere, fixus*, to fix.] *v. t.* क्रूसावर चढवून ठार करणें, क्रूसावर चढविणें-देणें, हातापायांत खिळे ठोकून क्रूसावर खिळवणें. २ अतिशय यातना देणें. ३ जिंकणें, दमन करणें. Cru'cified *pa. p.* Cru'cifier *n.* क्रूसावर चढविणारा. २ छळ करणारा, त्रास देणारा. Cru'cifix *n.* क्रूसावर लावलेलें ख्रिस्ताचें चित्र *n.* The crucifixion *n.* क्रूसावर चढविणें-देणें &c. Cru'ciform *a.* क्रूसाच्या आकाराचा. Crucig'erous *a.* क्रूसाची खूण असलेला.

Crude (krūd) [L. *crudus*, raw.] *a.* कच्चा, आम, अपक्व, कोंवळा. २ हिरवा, कच्चा. ३ अप्रौढ. ४ आम, अजीर्ण. Crude'ly *adv.* Crude'ness, Crud'ity *n.* कच्चेपणा *m*, अपक्वता *f*, अप्रौढता *f*. २ कच्चाई *f*, अपक्वत्व *n*. ४ *med.* आम *f*. *pop.* आंव *f*, आमांश *m*, कुपित्थ (?) *n*.

Cruel (krū'-el) [Fr *cruel*.–L. *crudelis*, cruel.] *a.* क्रूर, निष्ठुर, कठोर, दयाशून्य, निर्दय, उग्र, निष्करुण, खुनी, खाटकी, घातकी, अमानुष, राक्षसी, हिंसक, हिंस्र. २ दुःखदायक, परपीडक, परदुःखसंतोषी, दुःख देण्याच्या स्वभावाचा. ३ दुःखकर, कठोर. Cruel-hearted *a.* निष्ठुर अंतःकरणाचा. Cru'elly *adv.* Cru'elty *n.* निर्दयपणा *m*, निष्ठुरपणा *m*, &c. २ *a cruel deed* क्रूरकर्म.

Cruet (krū'-et) [A. Fr. *cruet*–O. Fr. *cruie*–L. *cruga*, a pitcher.] *n.* सिर्कादाणी *f*, कांचेची लहान कुपी *f*. Cruet-stand *n.* घड *m*. (कुप्या ठेवण्याचा).

Cruise (krūz) [Dut. *kruisen*, to cross the sea, *kruis*, a cross-L. *crux*.] *v. i.* रक्षणाकरितां किंवा लुटीकरितां समुद्रांत तारवें घेऊन खेपा करणें, दर्या फिरणें, समुद्रांत फिरणें, समुद्रपर्यटन करणें. C. *n.* दर्या फिरणें *n*, समुद्रपर्यटन *n*. Cruis'er *n.* समुद्रपर्यटन करणाऱ्या माणसाचें वाहन *n*, शत्रूचीं गलबतें धरण्याकरितां व आपले देशाच्या गलबतांचें रक्षण करण्याकरितां समुद्रांत फिरणारें लढाऊ गलबत *n*, क्रूझर *n*.

Crumb, Crum (krum) [A. S. *cruma*, a crumb cf. Ger. *krume*.] *n.* चुरा *m*, कुसकुर *m*, कुटका *m*, कण *m*. २ (as opposed to *crust*) भाकरीच्या-पावाच्या आंतील मऊ खुसखुशीत भाग *m*, गर *m*, गीर *m*, गर्भ *m*, मगज *m*. ३ लेश *m*, अल्पांश *m*; as, "A crumb of comfort." C. *v. t.* चुरा करणें, भूस करणें. Crumb'y, Crum'my *a.* चुरा झालेला, भुसभुशीत, खुसखुशीत, पिठूळ.

Crumble (krum'-bl) [See Crumb.] *v. t.* कुसकरणें, चुरणें, चुरचुरा-चुराडा-भगरा करणें *g. of o.*, चुरडणें. C. *v. i.* चुरणें, चुराडा होणें, विरणें. २ चुरडून-चुरा होऊन पडणें, चुरा चुरा होऊन कोसळणें, रेलणें, झुरणें, झिरणें. (*obs.*) C. *n.* फार लहान तुकडा *m*. Crumb'y *a.* विरणा, विरका, खुसखुशीत, भुसभुशीत, पिठूल, भुसका.

Crump (krump) [From an A. S. root *crimpan*, to shrink up.] *a.* (*obs.*) वांकडा, बांकाचा. २ वाळलेला, कठीण; as, "A C. loaf." Crump'et *n.* एकजातीची नरम साहेबी भाकरी *f*, क्रम्पेट. Crump'y *a.* भरड, लौकर भंगून जाणारें, भिदुर.

Crumple (krump'l) [Formed from Crump.] *v. t.* चुरणें, चुरडणें, चुरगळणें, चोळामोळा करणें. C. *v. i.* चुरणें, चुरडणें. Crump'led *a.* चोळामोळा केलेला, चुरलेला, कुसमडलेला. Crump'ling *n.* -*act.* चुरणें *n*, &c. Crumpled horn मुंढा, मुंढरा. [A COW WITH C. horns मुंडी गाय *f*. A BEAST OF WHICH THE HORNS ARE CRUMPLED मुंडा-डी-डें.]

Crunch (krunsh) [Of imitative origin.] *v t.* दांताखालीं चिरडणें. २ कांहींतरी कठीण चाऊन कुडकुड आवाज करणें, कुडकुडावणें, दांतानें कडाडां फोडणें. C. *n.* दांतानें चिरडणें *n*. Crunk. Same as Crunkle.

Crunkle (krunk'l) *v. t.* कचकचणें, कचाचणें, किचकिचाट करणें. २ कर्कोच्या पक्ष्याप्रमाणें ओरडणें. Crunk'-ling *n.* कचकच *f*.

Crunode (krū-nōd) क्रूसपात. See the word Node.

Crupper (krup-'er) [Fr. *creupier*, from *crope*, the croup, the buttocks.] *n.* लेंडी *f*, दुमची *f*. (घोड्याच्या खोगिराची.) [BOSS ON A CRUPPER गेंद *m*.] २ *buttocks or rump of a horse* ढिमोरा *m*, चौक *m*.

Crural (krū'ral) [L *cruralis*, from *crus–cruris*, the leg.] *a. of or pertaining to the thigh or leg, or to any of the parts called crura* पायांसंबंधीं, जांघिक; as, "The crural arteries."

Crusade (krū-sād') [Fr. *croisade*, L. *crux*, a cross.] *n.* धर्मार्थयुद्ध *n*, धर्मयुद्ध *n*. २ जरुशलेम शहर मुसलमान लोकांपासून घेण्याकरितां ख्रिस्ती लोकांनीं मागें अनेक वेळां स्वाऱ्या केल्या त्यांपैकीं प्रत्येक. ३ उत्साहानें नेटानें चालविलेलें काम *n*, मोठें काम *n*. C. *v. i.* युद्धांत गुंतणें. Crusad'er *n.* धर्मयुद्धांतील वीर *m*.

Cruse (krūz) [Possibly connected with L. *crux*, cf. Swed. *krus*, Ger. *krause*.] *n.* लहान पेला *m*. २ कुपी *f*. [सूस *f*.

Cruset (krū'-set) [Fr. *creuset*.] *n.* सोनें वितळावयाची

Crush (krush) [O. Fr. *cruisir*, *croissir*, to crack or break.] *v. t.* चिरडणें, चेंगरणें, ठेंचणें, चुरडणें. २ चेंचणें, कुदणें, चेंदा करणें, भुका-गा करणें, चेंदणें. ३ जमीनदोस्तीत-पादाक्रांत करणें, धुळीस मिळविणें, मारून पीठ पाडणें, धूळ करणें. ४ नाश करणें. ५ *fig.* दुःख देणें. C. *v. i.* दबला जाणें, चुराडा होणें. C. *n.* चुराडा *m*, कडाखा *m*, रगडा *m*. Crushed *a.* ठेंचलेला, चुरलेला, See the verb. Crush'er *n.* Crush-hat *n.* दावून गोळा केली

तरी न मोडणारी टोपी *f.* Crush'ing *n.* ठेंचणें *n*, चेंचणें *n*, चेंगरणें, &c. See the verb. Crush'ingly *adv.* Crushing machine *n.* दळण्याचें-भरडण्याचें यंत्र *n.* Crushing-strain *n.* चेंगरण्याचा-चुरडण्याचा दाब *m.* Crush-room *n.* नाटकगृहांतील खोली *f.* पडदा पडला म्हणजे हींत प्रेक्षक लोक विश्रांतीकरितां जातात. To crush a cup गटगट पिणें, ढोंसणें.

Crust (krust) [O. Fr. *crouste.*—L. *crusta.*] *n.* कवच *m*, कवची *f*, पूट. [Crust of dirt *n.* किटण *n*, कीट *n.*] २ बाहेरचा-वरील पोपडा *m*, पदर *m*, थर *m*, लेप *m*, पोपाडा *m*, खरपुडी *f*, पापुद्रा *m*, चकदळ *n.* ३ भूगोलाचा बाहेरला कठीण भाग *m*, भूकवच *n.* ४ (दारूच्या बाटलींतील) तळचा सांखा *m.* ५ रक्त सांखून झालेला पोपडा *m*, कवंदी *f*, खपली ६ (as opposed to *crumb*) भाकरीचा बाहेरील कठीण भाग *m.* C. *v. t.* (वर) कवच *n*-लेप *m.* घालणें C. *v. i.* खवळ *n*- खपला *m*, &c. धरणें. Crust'ed *a.* गंज-खपल्या चढलेला, पोपडा आलेला, खपल्याचा. Crustā'tion *n.* पोपडा *m*, पापुद्रा *m*, गंज *m.* Crust'ily *adv.* खव्याळपणानें, तिरसटपणानें. Crust'iness *n.* खव्याळपणा *m*, खाष्टीपणा *m.* Crust'y *a.* कवचाचा, कवचीचा. २ मनाचा कोमल परंतु बाहेरून दिसण्याला खव्याळ, खाष्ट, द्राष्ट, तापट.

Crusta (krus'ta) [L. *crusta*, rind, shell.] कवच *n*, शिंप *f.* २ कोरलेलें रत्न. *n.* Crustæ *pl.* Crusta'lactea स्तनावर दुधाचा पापुद्रा येणें.

Crustacea (krus-tā'shi-a) [L.] *n.* खेंकड्याच्या जातीचे प्राणी, कर्कजातीयप्राणी, कवचजीविप्राणी. Crusta'cean *n.* &*a.* कर्कजातीयप्राण्यासंबंधीं, कवचजीविप्राण्यासंबंधीं. Crustaceolog'ical *a.* Crusta-ceol'ogist *n.* कर्कजातिप्राणिशास्त्रज्ञ, कवचजीविप्राणिशास्त्रज्ञ. Crustaceol'ogy *n.* खेंकड्याच्या जातीच्या प्राण्यांचें शास्त्र *n*, कर्कटजातीयप्राणिशास्त्र *n*, कवचजीविप्राणिशास्त्र *n.* Crusta'ceous *a.* कवचाचा, कवचीचा, कवचमय.

Crutch (kruch) [A. S. *crycc*, *cricc*, a staff, a crutch.] *n.* कुबडी *f*, पांगुळकाठी *f*, पांगूळघोडा *m.* २ बायकांच्या जिनाचा उंच तक्क्या *m.* C. *v. t.* कुबडीच्या आधारानें उभें रहाणें. Crutched *a.* कुबडी असलेला, कुबडीवर सांवरलेला.

Crux (kruks) [L. *crux*, a cross, torture, trouble.] *n.* *any thing that tries in the highest degree* कसोटीची वेळ *f*- प्रसंग *m*- स्थळ *n*, कसोटी *f*, परीक्षेची भूमिका *f*, निकषभूमी *f.* २ *anything that puzzles or vexes in the highest degree* गूढ *n*, कोडें *n.* ३ *astron.* क्रूस *m.* *pl.* Cruxes, Cruces.

Cry (krī) [Fr. *crier.*—L. *quiritare*, to cry.] *v. t.* *to utter a loud voice, to bawl, to speak or call loudly* मोठ्यानें बोलणें, ओरडणें, ओरडून बोलणें, पुकारा करणें. [To CRY ON *to call upon, to invoke* (च्या) नांवानें हाक मारणें, (चा) धांवा करणें. To C. OUT पुकारणें, पुकारा करणें, प्रगट-जाहीर करणें. २ शोक करणें. ३ *to complain loudly* तकरार करणें. To C. AGAINST *to protest against* (चा) निषेध करणें. To C. TO OR UPTO *to call on in prayer, to implore* (चें) आर्जव-विनंति करणें, (ची) करुणा भाकणें, सहाय-मदत मागणें. To C. OUT AGAINST *to blame, to utter censure* दोष देणें, चूक काढणें निंदणें.] २ *to utter a loud voice in weeping, to weep, to lament* रुदन करणें, शोक करणें, रडणें, रुदंती करणें, (with a loud voice) आकांतणें, आकांत-आक्रोश करणें. [To CRY WITH PLENTIFUL TEARS ढळढळां रडणें. To C. UNGOVERNABLY ओक्साबोक्सा रडणें. To C. UNCEASINGLY रडण्याचा चळ घेणें, रडण्याचा टाहो घेणें, रड घेणें. To C. SOBBINGLY मुसमुसणें, हुमसणें, स्फुंदणें.] ३ *to utter a loud sound in distress* आक्रोश करणें. ४ *to proclaim* जाहीर करणें, पुकारा करणें, प्रसिद्ध करणें. ५ *fig.* (in contempt) रर करणें, पागोळ्या सोडणें, गाई पाण्यावर आणणें. ६ (esp. applied to babes and infants) केंकटणें, कोकलणें, केंकणें, केकटणें, टेटावणें, व्यांहाव्यांहा करणें. [THE FOLLOWING WORDS GIVEN BY MR. CANDY IN SENSE NO 6 ARE OF VERY RARE USE. केंकावणें, खेकाटणें, किरकणें, पिरंगणें, कण्हेरी गाणें, टांही OR तांही भरणें.] ७ (of animals generally) ओरडणें, आरडणें, पुकारणें (?), शब्द करणें. ८ (of a bird) किलबिलणें, किलकिलाट करणें. ९ (of an elephant) चीं चीं करणें. १० (of a crane) किचकिचणें, कचकचणें. ११ (of a peacock) टाहो फोडणें. १२ (of the bandikote) रोरावणें, रोराण *n.* करणें. C. *v. t.* मोठ्यानें ओरडणें. २ रडूनरडून असुक एक गोष्ट करायला लावणें; as, "To C. one's self to sleep." ३ *to proclaim, to name loudly and publicly for giving notice* पुकारा करणें, जाहीरखबर देणें, दवंडी पिटवणें. ४ जाहीर करणें. [To CRY UP *to praise, to applaud, to extol* वाडवार-बढाई-चढाईकी-तारीफ-थोरवी-प्रतिष्ठा-फुशारकी- &c. सांगणें, वाखाणणी-स्तुति करणें, वाखाणणें, तारीफ करणें. २ किंमत वाढविणें. To CRY DOWN *to decry by words or writing, to depreciate* उणेपणा-उणावकी-उणीव-लहानवी-अप्रतिष्ठा-&c. करणें-सांगणें, (चें) वजन-किंमत कमी करणें, निंदणें.] C. *n.* *pl.* Cries. ओरड *f*, ओरडाओरड *f*, गोंगाट *m.* २ विलाप *m*, आक्रंद *n*, रुदन *n*, रोदन *n.* ३ पुकारा *m*, पुकार *m*, साद *f.* ४ आरोळी *f.* ५ हर्षनाद *m*, हर्षगर्जना *f.* ६ (ओरडून केलेली) नम्र विनंति *f*; as, "C. the most piteous cry of the poor souls." ७ दवंडी *f.* ८ लोकवाणी *f*, लोकवार्ता *f*; as, "The cry goes that you shall marry her." ९ शिकारी कुत्र्यांची टोळी *f*; as, "The cry more tunable was never holloaed to nor cheered with horn." १० (in contempt) चौकडी *f*; as, "Would not this get me a fellowship in a cry of players." Cried *pa. p.* Crier *n.* रडणारा. २ ओरडणारा, थाळीदौंडी पिटणारा. ३ कोर्टांत पुकारणारा. Crying *a.* लक्ष्य देण्याजोगा, भयंकर, &c. Crying *n.* ओरडणें *n*, ओरड *f*, ओरडा *m.* २ धांवा *m*, हांक *f*, धांवणें *n.* A far cry फार अंतर, लांब अंतर. Great cry and little wool *m.*

cf. डोंगर पोंखरून उंदीर काढणें. Hue and cry पुकारा, हांकाटी *f*, बोंब *f*, बोंबाबोंब *f*, आरोळी *f*, हांकाहाक *f*, ओरडाओरड *f*. In full cry (hunting) पूर्ण पाठलाग करीत असतां. Within cry of ऐकतां येईल इतकें लांब. Given to crying रडवा, रडका, रड्या. About to burst into crying रडकुटीस आलेला.

Crypt (kript) [L. *crypta*.—Gr. *krupte*, from *kruptein*, to hide.] *n*. (ख्रिस्ती देवळांत) वेदीखालील भुयार *n*. Cryp'tic,-al *a*. गूढ, गूढार्थक, गुह्य.

Cryptogamia (krip-tō-gā'mi-a) [Gr. *kruptos*, concealed & *gamos*, marriage.] *n*. *bot*. अदृश्यबीजवनस्पतिवर्ग *m*. अदृश्यबीजवनस्पति *f*. Cryp'togam *n*. Cryptogā'mian *a*. अदृश्यबीजवनस्पतीचा. Cryptogam'ic, cryptog'amous *a*. ज्यांत पुनरुत्पत्तींचीं इंद्रियें सूक्ष्म आहेत अशी (वनस्पति), अदृश्यबीज, अपुष्प, प्रछन्नबीज. Cryptog'amist *n*. अदृश्यबीज वनस्पतीविषयीं पूर्ण माहितगार. Cryptog'amy *n*. अपुष्पवनस्पतीविषयीं माहिती *f*- ज्ञान *n*, अबीजवनस्पतिज्ञान *n*.

Crystal (kris'tal) [L. *crystallus*, Gr. *krustallos*, from *kruos*, frost.] *n*, स्फटिक *n*, बिलोर (?), सिताश्म (?). Crys'tal, Crys'talline *a*. स्फटिकाचा, स्फटिकमय. २ पैलूदार. Crys'tallisable *a*. Crys'tallisā'tion *n*. स्फटिकीकरण *n*, स्फटिकीभवन *n*. Crys'tallise C. *v. t.* पैलूदार कांड्या-खडे करणें-बनवणें. २ स्थायी-स्थिर स्वरूप देणें. C. *v. i.* कांड्या-खडे बनणें-होणें. २ स्थायी स्वरूपाचा होणें. Crys'tallite *n*. स्फटिकासारखा खनिज पदार्थ *m*. Crys'tallog'rapher *n*. स्फटिकशास्त्रवेत्ता. Crys'tallograph'ical *a*. Crys'tallog'raphy *n*. स्फटिकशास्त्र *n*. Crys'talloid *a*. स्फटिकासारखा, अनुस्फटिक. Crys'tallomancy *n*. स्फटिकाच्या मदतीनें भविष्यकथन *n*.

Cub (kub) [Etymology unknown.] *n*. अर्भक *n*, पिलूं *n*, बच्चा *m*, पशुशावक *n*. २ लहान मूल (in comp. वत्स, बचडें). [C. OF A TIGER OR LION पेटा.] C. *v. t.* विणें, जन्म देणें. Cub'bing *pr. p.* Cubbed *pa. p.* Cub'bish *a*. पोरकट, अडाणी. Cub-drawn *a*. पिलांनीं स्तनपान केलेली. Cub-hood *n*. अर्भकता *f*-पणा *m*. Cub'less *a*. पिलें नसलेली.

Cub (kub) *n*. (*obs.*) गोठा *m*, कपाट *n*.

Cubation (kū-bā'-shun) [L. *cubare*, to lie down.] *n*. ओठांगणें *n*, लवंडणें *m*.

Cube (kūb) [L. *cubus*, Gr. *kubos*, a cube.] *n*. घनाकृति *f*, घन *m*. २ *arith*. घन *m*. Cū'bage *n*. घनफळ *n*, घनक्षेत्र *n*. Cū'bature *n*. एखाद्या पदार्थाचें घनमूळ *n*- घनक्षेत्र काढणें *n*. Cubic,-al *a*. घनाकार, घनासंबंधीं. [C. CONTENTS घनफळ *n*. C. EQUATION घनसमीकरण *n*.] Cu'bically *adv*. Cu'bicalness *n*. Cu'biform *a*. घनाकार. Cū'b'oid, Cuboid'al *a*. घन पदार्थासारखा, अनुघन, घनकल्प, घनसदृश. Cube-root *n*. घनमूळ *n*. [सुगंधमरीच.

Cubeb (kū'beb) [Arab. *kababah*.] *n*. कबाबचिनी,

Cubebin (kūbeb-in) *n*. ज्याचे घनाकार खडे होतात असें द्रव्य *n*, घनकणद्रव्य *n*.

Cubit (kū'-bit) [L. *cubitus*, the elbow, cf. *cubare*, to lie down.] *n*. *a measure of length being the distance from elbow to the extremity of the middle finger*. हात *m*. (कोंपरापासून मधल्या बोटाच्या शेंड्यापर्यंत) Cu'bital *a*. हातासंबंधीं.

Cuckold (kuk'old) [O. Fr. *cucuault*,-*coucou*, a cuckoo.] *n*. छिनाल बायकोचा भ्रतार *m*, जारिणीपति *m*, कुलटापति *m*. Cuck'old, Cuck'oldise *v. t.* दुसऱ्याला खट्टू करण्याकरितां त्याच्या बायकोशीं व्यभिचार करणें. Cuck'oldly *adv*. Cuckold-maker *n*. दुसऱ्याच्या बायकोशीं व्यभिचार करणारा. Cuck'oldom, Cuck'oldry *n*. दुसऱ्याच्या बायकोशीं व्यभिचार करणें *n*.

Cuckoo (kook-ōō) [Fr. *cou-cou* & *kindred* words in many languages.] *n*. कोकिल *m*, पिक *m*, रोडकी, कोकिळा *f*.

Cucumber (kū'-kum-bėr) [L. *cucumis*, *cucumeris*.] *n*. *bot*. कांकडी *f*, खिरा *m*, शेतवालुक *n*, दरकांकडी *f*. Cucum'iform *a*. कांकडीच्या आकाराचा.

Cucurbit (kū'kėr'-bit) [L. *cucurbita*, a gourd.] *n* डमरुयंत्र *n*. ह्याचा उपयोग ऊर्ध्वपातनांत (Distillation) करतात. Cucur'bital, Cucur'bita'ceous *a. bot.* कांकडीच्या जातीचा, कर्कटीवर्गीय. Cucur'bitive *a*. कांकडीच्या बियाच्या आकाराचा. (किडा वगैरे.)

Cud (kud) A. S. *cudu*, *cwidu*, the cud, what is chewed.] *n*. रोथ *m*, रवंथ *m*, रवंथ करणारीं जनावरें गिळलेलें अन्न तोंडांत आणितात तें. २ तमाखूचा बार *m*, गोळी *f*. ३ रवंथ करणाऱ्या जनावरांचें पहिलें पोट *n*. To chew the cud रवंथ करणें. २ *fig. to reflect, to ruminate* विचार *m*-मनन *n*. करणें.

Cuddle (kud'l) [Perhaps from A. S. *cuth pa. p.* of *cunnan*, to know.] *v. t.* पोटाशीं धरून-कुशींत घेऊन जवळ करून निजणें. C. *v. i.* लगटून निजणें, कुशींत शिरणें. C. *n*. दृढालिंगन *n*. [घर *n*.

Cuddy (kud'i) *n*. जहाजांतील लहान कोठडी *f*, स्वयंपाक-

Cuddy (kud'i) *n*. गधडा, गर्दभ, गाढव, गद्धा. २ मूर्ख.

Cudgel (kuj'l) [A. S. *cycgel*; Welsh. *cogel*, a cudgel, from *cog*, a small piece of wood.] *n*. सोंटा *m*, सोटगें *n*, सोटा *m*, दांडकें *n*, दांडका *m*, सोडगा *m*, दंड *m*, दांडूक *n*. [CONFLICT WITH C.s लट्ठालट्ठी *f*. C. COAXING दांडेपान्हवण, सोटेपान्हवण. C. PLAYING सोटेबाजी *f*, लट्ठालट्ठी *f*, चोपाचोपी *f*.] C. *v. t.* दांडावणें, दांडकणें, चोपणें, टोणपणें, बडवणें, झोडपट्टी काढणें, धोपटणें. Cud'gelling *pr. p.* Cudgelled *pa. p.* Cud'geller *n*. सोट्यानें मारणारा. Cud'gelling *n*. सोट्यानें मारणें *n*. Given to cudgelling दंडुक्या. Cudgel-proof *a*. मारलें तरी लागत नाहीं असा, वज्रदेही. To take up the cudgels कलहांत- वादविवादांत गुंतणें. To take up the cudgels for कोणत्याहि पक्ष्याच्या समर्थनार्थ धिटाईनें

उभें राहाणें. To cudgel one's brain एखादी गोष्ट सुचण्या-समजण्यासाठीं मेंदूला त्रास देणें.

Cue (kū) [L. L. *quando*, 'when' i. e. when the actor was to begin.] *n.* शेंपूट *n*, डोक्याचे मागले बाजूस लोंबत असलेला केसांचा झुबका *m*, पुच्छ *n*. २ सूचना *f*, मागमूस *m*, संदर्भाचा शब्द *m*. ३ (*colloq.*) वृत्ति *f*, मन *n*, मनोवृत्ति *f*. ४ बिलिअर्ड खेळण्याची एक काठी *f*. C. *v. t.* पुच्छासारखें करणें-बनविणें.

Cuff (kuf) [Origin obscure. cf. Swed. *kuffa*, to strike.] *n.* मुटका *m*, बुक्की *f*; बुकाडा *m*, मुष्टिप्रहार *m*, गुद्दा *m*. C. *v. t.* चपराक मारणें, धपकावणें, चपराकणें, मुष्टिप्रयोग करणें.

Cuff (kuf) [Late A. S. *cuffie*, a kind of cap, hence a covering for the hand.] *n.* *cuff of sleeve* मुहळी *f*, मनगटपट्टी *f*.

Cuffy (ku'fi) *n. slang.* शिद्दी *m*.

Cuirass (kwi-ras') [O. Fr. *cuirace*.-L. *corium*, skin leather.] *n.* उरस्त्राण *n*. C. *v. t.* उरस्त्राण घालणें. *n.* Cui'rassier *n.* उरस्त्राणधारी, उरस्त्राण घालणारा.

Cuisse (kwis) [O. Fr. *cuissaux*-L. *coxa*, the hip.] *n.* जंघात्राण *n*, मांडीचें कवच *n*, तारांचा मांडचोळणा *m*.

Culinary (kū'-li-nėr'-i) [L. *culina*, a kitchen.] *a.* स्वयंपाकाचा, पाकासंबंधीं, पाकशालेसंबंधीं.

Cull (kul) [L. *col* for *con*, together & *legere*, to gather.] *v. t.* निवडणें, वेंचणें, छानणें. Cul'ler *n.* निवड्या *m*. Cul'ling *n.* निवड, &c.

Cullender. See Colander.

Cullion (kul'yun) [O. Fr. *couillon*.—L *coleus*, the scrotum.] *n.* हलका-नीच माणूस *m*, पामर *m*. Cull'ionly *a.* नीच, अधम.

Cully (kul'i) [Prob. a contr. of cullion.] *n.* भोळा, भोळसट-र, सहज फसणारा. C. *v. t.* ठकविणें, फसविणें. Cullied *pa. p.* Cull *n.* भोळा सांव, लवकर फसणारा (मनुष्य).

Culm (kulm) [L. *culmus*, a stalk.] *n.* ताट *n*, तृणदंड *m*, (तृण) काण्ड *n*.

Culminate (kul'-min-āt) [L. *culmen*, *culminis*, a summit.] *v. i.* उच्चस्थानीं येणें, खस्वस्तिकीं-डोक्यावर येणें, मध्याह्न वृत्तांत जाणें. २ पराकाष्ठेस पोहोंचणें, कळस होणें. Cul'minant *a.* खस्वस्तिकीं असलेला, सर्वोत्कृष्ट, मुख्य. Culminā'tion *n.* खस्वस्तिक *n*. २ कळस *m*, पराकाष्ठा *f*. ३ *astron.* मध्याह्न वृत्तांतून जाणें (as sun), मध्याह्नवृत्तांत जाणें *n*.

Culpable (kul'pa-bl) [L. *culpa*, a fault.] *a.* दोषास पात्र, दूषणार्ह, दोषी. Cul'pabil'ity *n.* दोषपात्रता *f*. Cul'pableness *n.* दूषणार्हता *f*. Cul'pably *adv.* Cul'patory *a.* दोषदर्शक, निंदाव्यंजक.

Culprit (kul'-prit) [L. L. *culpatus*, a person accused.] *n.* अपराधी, अन्यायी, गुन्हेगार. २ कैदी *m*.

Cultivate (kul'-ti-vāt) [L. *cultivare*, *cultivatum*, from *colere*, *cultus*, to till.] *v. t.* *to till* मशागत करणें, कमावणें, नांगरणें, लागवडीस आणणें, जोपासना करणें, राबणें, ढुणणें, कीर्द *f*- राबणी *f*- राबणूक *f*- कृषि *f*- करणें, कीर्दीस-राबणुकीस आणणें. २ *to direct special attention to* (कडे) विशेष लक्ष देणें. ३ (the faculties, any art) (अभ्यासानें-मेहनत करून) वाढविणें, (चें) परिशीलन *n*-अभ्यास *m*. करणें. ४ गिरवणें, वळवणें, कमावणें. ५ *to raise by tillage* मशागत *f*- कमाई *f*. करणें. ५ पीक *n*- पेरा *m*. करणें, राबणुकीनें पिकवणें, उत्पन्न करणें. ६ (च्या) बरोबर सलगी *f*- स्नेह *m*-समागम *m*. इच्छिणें; as, "I loved and cultivated him accordingly." Cul'tivable, Cultivat'able *a.* मशागत करण्याजोगा, लागवडीस आणायाजोगा, &c. Cul'tivā'tion *n.* लागवड *f*, राबणें *n*, शेतकाम *n*, शेती *f*, कृषिकर्म *n*. २ शेतकी सुधारण्याकरितां केलेली मेहनत *f*-यत्न *m*. ३ शारीरिक, बौद्धिक व नैतिक बाबतींतील उत्कर्ष *m*-सुधारणा *f*, प्रबोधन *n*. ४ मशागत *f*, कमावणें *n*, सुधारणा *f*. ५ पीक करणें *n*, संवर्धन *n*, अभिवृद्धि *f*. [THAT IS UNDER C. वाहीत, वाहोळ.] Cul'tiv'ated *pa. t. & pa. p.* राबलेला, वहीत, कीर्दसार, लागवडीचा.. Cul'tiva'tor *n.* शेतकरी *m*, शेतखप्या, कृषिजीवी. २ अभिवृद्धि करणारा, संवर्धक. [ACTUAL C. OF A FARM करदा. NON-RESIDENT C. ओवंडेकरी, केवी.]

Culture (kūl'-chėr) [Fr.—L. *cultura*, from *colere*, to till.] *n.* पिकाकरितां जमीन तयार करणें *n*. ३ सुशीलता *f*, विनय (S.), विनीतता *f*, नम्रता *f*, बुद्धिविकासन *n*, (बुद्धीची) सुधारणा *f*, संवर्धन *n*, अभिवृद्धि *f*, सुसंस्कार *m*, उन्नति *f*, उत्कर्ष *m*. Cul'turable *a.* मशागत करावयास पात्र-योग्य. Cul'tural *a.* Cul'tured *p. a.* विनीत, मशागत केलेला. Cul'tureless *a.* Cul'turist *n.* संवर्धक, अभिवृद्धि करणारा, शेतकरी, शेतखप्या.

Culver (kul'-vėr) [A. S. *culfre*, a pigeon.] *n.* ख(क)बूतर *n*. Culver-tailed *a.* वज्रकळाशी केलेला. Culver-house *n.* खुराडें *n*.

Culverin (kul'-vėr-in) [from *culevrin*,-Fr. *coulevrius*-L. *coluber*, an adder.] *n.* एक प्रकारची तोफ *f*, बंदूक *f*, कलव्हरीन *f*. Cul'verineer *n.* अशा तोफेवरील गोलंदाज *m*, अशा तऱ्हेची बंदूक वागविणारा शिपाई *m*, कलव्हरीनवाला *m*.

Culvert (kul'-vėrt) [Origin doubtful.] *n.* रस्त्याखालून पाणी जाण्याकरितां केलेलें गटार *n*.

Culvertage (kul'vertāj) *n.* मुख्य खोताचा निवळ शेतखप्या बनणें *n*.

Cumbent (kum'-bent) [L. *cumbare*, to lie down.] *a.* खालीं पडलेला.

Cumber (kum'-bėr) [O. Fr. *combrer*, from L. L. *cumbrus*, a mass. Perhaps from *cumulus*, heap.] *v. t.* अडथळा *m*-अडचण *f*. करणें- आणणें. २ मोडा घालणें, ओझें घालून अडविणें, ओझें घालणें. ३ कष्ट *m*- दुःख देणें. C. *n.* (*obs.*) त्रास देणें *n*, अडचण *f*, जुलूस *m*, त्रास *m*. Cum'bered *a.* अडथळा केलेला, &c.

Cum'berless *a.* Cum'berment, Cum'brance *n.* अडथळा *m*, अडचण *f*, अतिभार *m*, अवरोध *m*. Cum'bersome *a.* Cum'brous *a.* अवघड, अवजड, त्रासदायक, कष्टकर, दुःखकर, दुर्भर, दुर्वाह्य. Cum'brous *a.* खचरट, खडतर. Cum'brously *adv.* Cum'brousness *n.* अवजडपणा *m*, अवघडपणा *m*, दुर्भरत्व *n*, क्लेशवाह्यता *f*.

Cumin, Cummin ( kum'-in ) [ L. *cuminum*,—Gr. *kuminon*.-Heb. *kammon*.-Fr. *cumin*. ] *n.* जिऱ्याचें झाड *n*. Cumin-seed *n.* जीरक *n*, जिरें *n*, कणा (S.) *m*, अजाजी (S.) *m*.

Cumulate ( kū'mū-lāt ) [ L. *cumulare*, *cumulatus*, to heap up.] *v. t.* ढीग करणें, गोळा करणें. Cu'mulated *a.* (*obs.*) गोळा केलेला. Cumulā'tion *n.* संचय *m*, ढीग *m*, ढिगारा *m*, राशि (S.) *m*, रास *f*. Cu'mula'tive *a.* जमत जमत गेलेला, संचित, हळू हळू सांचलेला. २ सांचून सांचून परिणाम-कार्य करणारा. २ वर्धिष्णु, उत्तरोत्तर वर्धमान-वाढणारा-प्रबल होत जाणारा. Cu'mula'tively *adv.*

Cuneal Cuneate ( kū'ni-al, kū'ne-āt ) [ L. *cuneus*, *a* wedge. ] *a.* पाचरा-चा, पाचरीच्या आकाराचा. Cune'iform, Cūn'iform *a.* पाचरीच्या आकाराचा, पाचरीसंबंधीं. २ *anat.* (पाचरीसारखें) पावलांतील एक लहान हाड *n*.

Cunning ( kun'ing ) [ A. S. *cunnan*, to know.] [शहाणा, चतुर, कुशल असा *cunning* ह्या शब्दाचा पूर्वी अर्थ होता परंतु त्याचा आतां लोप होऊन त्या शब्दास वाईट अर्थ आला आहे. ] *a.* (*obs.*) *sly, subtle, crafty, artful* (applied to persons) काबू, मतलबी, हुन्नरी (?), हिकमती, कावेबाज, कपटी, कसबाती (R.), गुंड, गुंडा, छक्यापंज्याचा, धूर्त, चतुर, लुचा, सोदा, कारस्थानी, फसव्या, वंचक, लबाड, वंचनशील. २ ( applied to things showing craftiness or characterised by it. ) लुच्चेगिरीचा-फसविण्याचा-द्योतक. C. *n.* ( *obs.* ) चतुराई *f*, कुशलता *f*. २ कावेबाजी *f*, हिकमत *f*, कावा *m*, कावित्र *n*. ३ ( *obs.* ) चेटक *n*. Cun'ningly *adv.* काव्यानें, डावपेंच करून, लुच्चेगिरीनें. Cun'ningness *n.* See Cunning *n.* Cunning-man *n.* ( *obs.* ) जाणता, इलमबाज, चेटकी. Cunning-woman *n.* *fem.* कुसलण or कुसळीण *f*, चेटकीण *f*.

Cup (kup) [A. S. *cuppe*.-L. *cuppa*-*cupa*, a tub.] *n.* पेला *m*, प्याला *m*, वाटी *f*, जांब *m*, कटोरी *f*. २ पेला, पेलाभर वस्तु *f*. ३ (*pl.*) *repeated potations, revelry* दारू पिण्याचा नाद *m*, छाकटेपणा *m*, पीत्वापीत्वा (?); AS, "Thence from cups to civil broils." *Milton*. ४ वांट्यास-नशीबास-कपाळास आलेली गोष्ट-भोग *m*; as, "To drink the bitterest cup of humiliation." ५ रक्तशोपक यंत्र *n*. ६ पेल्याच्या आकाराचा पदार्थ *m*. ७(of a flower) वाटी *f*, गोंडा *m*. C.*v. t.* तुंबडी लावणें, शिंगानें रक्त काढणें, (by scarification) फांसण्या मारणें. Cup'ped *pa. p.* Cup-bearer *n.* प्यालेदार, जांबबरदार. Cup-board(kub'urd) *n.* फडताळ *n*, भंडारी *f*, कपाट *n*, बोखारा (*obs.*) *m*. Cup-board-love-faith बाजारी-लटकें-वरवर प्रेम *n*-विश्वास *m*. Cup'ful *n.* पेलाभर. Cup'fuls *pl.* Cup'per *n.* तुंबडी लावणारा. Cup'ping *n.* तुंबडी लावणें *n*. [ TO CRY CUPBOARD खावयास मागणें. (*obs.*) IN ONE'S CUPS दारूच्या धुंदींत-निशेंत. MANY A SLIP BETWEEN THE CUP AND THE LIP. cf. हातातोंडांची गांठ पडेपर्यंत काय होतें कोणास ठाऊक. LET THIS CUP PASS FROM ME ( *Bible* ) हें दुःख-संकट टळूं दे. HIS CUP RUNS OVER तो अतिशय दुःखांत आहे. WE MUST DRINK THE CUP *cf.* आलीया भोगासी असावें सादर. "तुकाराम."

Cupid ( kū'pid ) [ L. *cupere*, to desire. ] *n.* मदन *m*, कामदेव *m*. २ मदनाचा पुतळा *m*, सुंदर तरुण मुलगा *m*.

Cupidity ( kū-pid'-i-ti ) *n.* अति कामना *f*. लालसा *f*. लोभ *m*, धनाची अतितृष्णा *f*.

Cupola ( kū'-po-la ) [L. *cupula*, *cupa*, a tub.] *n.* घुमट *m*, कळस *m*, डेरा *m*. C. *v. t.* घुमट-करणें-चढवणें.

Cupreous, Cupric ( kū'-pri-us, ku'pirk ) [L. *cuprum*, copper.] *a.* तांब्याचें बनविलेलें, ताम्रमय. Cuprif'erous *a.* ताम्रधारी-मिश्र.

Cur ( kuɹ ) [ cf. Swed. *kurre* : O. D. *korre*, a dog.] *n.* कुतरडें *n*. २ नीच माणूस *m*. Cur'rish *a.* कुत्यासारखा, तुसड. Cur'rishly *adv.* Cur'rishness *n.*

Curate ( kū'rāt ) [ L. *cura*, care. ] *n.* पाद्री *m*. २ 'रेक्टरच्या' किंवा 'व्हिकरच्या' हाताखालचा अधिकारी *m*, पाद्रीचा हस्तक *m*. Cu'racy, Cu'rateship *n.* क्युरेटचा अधिकार *m*, क्युरेटची जागा *f*.

Curator ( kū'-rā'-tor ) [ L. *curator*, an overseer, from *curare*, to take care of. ] *n.* ग्रंथशालाधिकारी *m*, 'क्यूरेटर' *m*, शालाग्रंथाधिकारी *m*, ग्रंथप्रकाशनाध्यक्ष *m*, देखरेख करणारा. २ रक्षक, वाली *m*. *Roman law.* अज्ञानाचा-वेड्यांचा पालक, व्यवस्थापक, (ग्रंथसंग्रहालयाचा, पदार्थसंग्रहालयाचा, युनिव्हर्सिटींतील जिनगीचा) व्यवस्थापक *m*. Cu'ratrix *n.* *fem.* अज्ञानपालन करणारी स्त्री *f*. Cura'torship *n.*

*N. B.*—Refer to a text-book on Roman Law for the distinction between Curator and Tutor.

Curb ( kəɹb ) [ Fr. *courber*, to bend.-L. *curvare*, to curve, from *curvus*, curve. ] *v. t.* ( *obs.* ) वळवणें, वाकविणें. २ दाबांत ठेवणें, दमन करणें, आवरणें, लगामीं धरणें-ठेवणें, आळ्यांत ठेवणें. ३ ( विहिरीच्या वगैरे ) भोंवती कठडा-गडगा घालणें. C. *n.* लगामाची कडी *f*, जेरकडी *f*. २ गडगा *m*, कठडा *m*. ३ ( round a well ) वरांडी *f*. ३ विहिरीच्या भोंवतालचा कठडा *m*, ( बोकलबेंड ) लांकडाशीं आधारचौकट *f*, सांगाडी *f*, ( विहिरीच्या भिंती पडूं नयेत म्हणून तळाशीं दिलेली आधारचौकट). ४ आडकाठी *f*, अडणी *f*. ५ घोड्याचे मागचे पायास आलेली सूज *f*. Cur'bable *a.* Curb'less *a.* Curb-roof *n.* दुपाखी छप्पर *n*. Curb-stone *n.* अटीचा दगड *m*, (?) पाटथरा *m*, पांथरा *m*, दांडा *m*.

Curby ( kərbi ) *n.* कहबा *m*, एक प्रकारचें गवत *n*.

Curd or Curds ( kėrd-s ) [ Welsh. *crwd*, a round lump. ] *n.* दहीं *n*, दधि *n*. [ CURDS CONGLOBATED BY CHURNING मठा, मट्ठा *m*. NODULE OF CURDS कवडी *f*, दह्याची कवडी *f*. RIVERS OF CURDS AND WHEY दधिकुल्या *f. pl*. VESSEL TO HOLD CURDS AND WHEY दहींहंडी *f*, दधिभांड *n*. Curd'iness *n*. Curd'le *v.i.* जमणें, गोठणें, विरजणें. २ घट्ट होणें. C. *v. t.* जमवणें, घट्ट करणें, गोठविणें. Cur'dy *a.* दह्यासारखा, दधिप्रचुर.

Cure ( kūr ) [ O. Fr. *cure*.—L. *cura*, care. ] *n.* क्युरेटची- उपाध्याची वृत्ति *f*. २ उपचार *m*, उपाय *m*, इलाज *m*, दवा *m*. ३ आराम *m*, बरें होणें *n*. ४ इलाज *m*, औषध *m*, दवा *f*, चिकित्सापद्धति *f*; as, "Water-cure, Milk-cure." C.*v.t.* बरा करणें, आरोग्य देणें. २ ( रोग्याला ) इलाज करणें, ( रोग ) दूर करणें, (चा) उपाय करणें. ३ वाळवून-खारवून टिकाऊ-पुष्कळ दिवस टिकेल असें करणें, मिठांत-मिठानें मळणें,खारावणें. ४ ( एखाद्या वाईट ) नादांतून सोडविणें. ५ प्रतीकारकरणें. Cu'ring *pr.p.* Cured *pa. p.* Cu'rable *a.* साध्य, उपायवश, बरा होण्याजोगा, शमनीय, प्रतिकार्य. Cu'rableness, Cu'rabil'ity *n*. बरें होण्याची-करण्याची शक्ति *f*- पात्रता *f*, सुसाध्यता *f*. Cure-all सर्व-रोगनाशक औषध *n*. Cu'rative *a.* बरा करण्याची शक्ति असणारा, रोगहर, रोगघ्न. Cu'ratory *a.* बरें करणारा. Cure'less *a.* असाध्य. Cu'rer *n.* बरा करणारा, चिकित्सक (?) *m*. Curing-house *n*. मासे इत्यादि खारवण्याचें आवार *n*.

Curfew (kėɹ'-fū) [A.Fr. *couvre-feu*, firecover, from L. *covrir*, to cover and *focus*, hearth. ] *n.* इंग्लंडांत अकराव्या शतकांत रात्रीं लोकांनीं दिवे मालवावे म्हणून वाजविण्याची घंटा *f*, 'कर्फ्यू' *f*.

Curia ( kūri-a ) [ L. ]. *n.*: *one of the thirty parts into which the Roman people were divided by Romulus.* 'क्युरिआ' *f*, रोम्युलसनें केलेल्या प्राचीन रोमन लोकांच्या तीस विभागांपैकीं प्रत्येक *f*. (२) क्युरिआ एकत्र जमण्याचें स्थान *n*. ३ *the senate house* सीनेटचें गृह *n*, मंत्रिसभा *f*. ४ न्यायमंदिर *n*. Curiæ *pl*.

Curio ( kūri-ō ) [ Abbreviation of Curiosity.] *n. an article of curiosity* अपूर्ववस्तु *f. pl.* Curios.

Curious ( kū'-ri-us ) [ O. Fr. *curios*,—Fr. *curieux*.—L. *curiosus*, from *cura*, care, attention. ] *a. inquisitive, prying* शोधक, सर्वशोधी, बहुशोधी, मार्मिक, जिज्ञासु, बुभुत्सु, अपूर्वदर्शनोत्सुक, श्रवणदर्शनोत्सुक. २ *wrought with art* कळाकुसरीचा, कलाचातुर्याचा, करामतीचा, कलाकौशल्याचा, नवलाचा. ३ *novel, strange* विलक्षण, कौतुकाचा, नवलाचा. ४ जिज्ञासा जागृत करणारा ; as, "This is a C. thing." Cu'rios'ity *n*. शोधकपणा *m*, चौकसपणा *m*, शोधकबुद्धि *f*, जिज्ञासा *f*. २ अपूर्वदर्शनोत्सुकता *f*, श्रवणदर्शनोत्सुकता *f*, अन्वेषणासक्ति *f*, कौतुक *n*, कुतूहल (S.) *n*. [IDLE C. नसती उठाठेव *f*, रिकामी चौकशी *f*.] ३ हौस *f*, उत्कंठा *f*. ४ *objects of curiosity* अपूर्ववस्तु *f*, दुर्लभवस्तु *f*, चमत्कारिक वस्तु *f*, टूम *f*, बूट *m*. Cu'riously *adv.* बारीक दृष्टीनें. २ चमत्कारिक रीतीनें, तऱ्हेवाईक रीतीनें. ३ कळाकुसरीनें, करामतीनें. Cu'riousness *n*. Curious arts *n*. (*obs.*) जादू *m*.

Curl ( kėɹl ) [ Akin to D. *krullen*. Dan. *krolle*, dial. Swed. *krulla*, to curl, probably akin to E. *crook*.] *v. t.* कुरळ करणें. २ मुरडणें, वळवणें, मुरड घालणें. ३ वेंटाळें घालणें. ४ ( झुलुपानें ) सुशोभित करणें-शृंगारणें-अलंकृत करणें; as, "Curling with metaphors a plain intention." ४ उसळणें, तरंग उठविणें; as, "Seas would be pools without the brushing air to curl the waves." C. *v. i.* वेंटाळणें, कुरळ होणें. २ तरंग उठणें, लहरी-लाटा घेत चालणें. C. *n*. केंसांचें वेंटोळें *n*, कुरळ केंसांचा झुबका *m*, झुलूप *n*, कुरूळ *n*, कुरल *n*, अलक (S.) *m*. २ तरंग *m*, लाट *f*. ३ बटाटे वगैरेंवर पडणारा एक रोग *m*. (ह्याचे योगानें झाडांचीं किंवा वेलींचीं पानें मुरडून खुरडतात.), मुरडी *f*, खुरटी *f*. Curled *a.* कुरळ, कुरल, मुधाळ ( *obs.*), मुध्याळ ( *obs.*), मुद्याळ ( *obs.* ). Curled-pate *a.* (*obs.*) कुरळ केंसांचा. Curl'er *n*. मुरड घालणारा, मुरड घालणारी वस्तु *f*. २ 'कर्लिंग' खेळ खेळणारा. Cur'liness *n*. Curl'ing *n*. See Curl *n*. Curling irons, Curling tongs *n. pl*. केंस कुरळे करण्याचें लोखंडी हत्यार *n*. (हें किंचित् तापवून त्या सभोंवतीं केंस गुंडाळले म्हणजे ते कुरळे होतात.) Curling stone *n*. 'कर्लिंग' खेळांतील मूठ असलेला जड धोंडा *m*. Curl'y *a.* Same as Curled.

Curlew ( kėɹ'lū ) [ Fr. *corlieu*, curlew.—L. *currere*, to run & *levis*, light. ] *n.* चोंच व पाय लांब असलेला व आंखूड शेंपटीचा पक्षी *m*.

Curling (kur'-ling) *n.* (धुराचें) कुरळ. २ कुरळ करणें *n*. ३ स्काटलंडांतील एक प्रकारचा पाण्यांतील-बर्फावरील खेळ खेळणें. (ह्या खेळांत चाळीस पौंड वजनाचे गडगडे दगड बर्फावरून किंवा गोठलेल्या पाण्यावरून फेंकून देतात, आणि खेळणारे आपला दगड नेमक्या ठिकाणीं जावा व इतरांचा जाऊं नये म्हणून यत्न करीत असतात.)

Curmudgeon ( kėɹ-mu-jun ) [ Said to be derived from *corn-mudgin*, being considered in old times, the most grasping, miserly of men. ] *n.* पैशाची खूब हांव असणारा-लोभी-कृपण-कद्रू-कंजूष मनुष्य *m*. Curmudg'eonly *adv.* लोभी-कद्रू-कंजूषपणानें.

Currant (kur'unt) [From *Corinth* in Greece whence they were first brought.] *n.* बेदाणा *m*, मनुका *f*. २ एक प्रकारचें लहान फळ *n*.

Current (kur'ent) [O. Fr. *curant*, *corant pr. p. curre*, *corre*, to run-L. *currere*, to run. ] *a.* धांवणारें, वाहणारें. २ साधारण, चालू, प्रसिद्ध, लोकप्रसिद्ध, व्यावहारिक. ३ चलनी, चालता. ४ चालता, मजकूर as in सालमजकूर, वर्तमान, विद्यमान; as, "C. month." ५ खरा ( रुपया इत्यादि नाणें ); as, "If thou be C. gold indeed." २ रूढ, रूढींतला ; as, "C. word." C. *n*. ओघ *m*, प्रवाह *m*; as, "A C. of water and air." २ प्रवाह *m*, ओघ *m*, धार *f*, स्रोत *m*. (of water). ३ क्रम *m*, गति

*f*; as, "The C. of time or event." ४ *rivulet* लहान ओढा *m.* Cur'rency *n.* लोकमान्य गोष्ट *f*, परिपाठ *m*, पाठ *m*, प्रचार *m*, प्रवृत्ति *f*, प्रसिद्धि *f*, रूढि *f*, रिवाज *m*, चाल *f*, चलन *n*. २ चालू किंमत *f*. ३ *law.* चलनी नाणें *n*, चलन *n*; as, "The C. of a country." Paper currency नाण्यांच्या ऐवजीं चालणाऱ्या नोटा *f. pl.* ४(एखादी गोष्ट चालू राहण्याची) मुदत *f.* Cur'rently *adv.* साधारण रीतीनें, लोकांत, चारचौघांत, व्यवहारांत; as, "The view currently taken." Cur'rentness *n.* Current coin चालू नाणें *n.* Inducing current or primary current आदि-प्रधानप्रवाह. Not current गैरचलन. Ocean currents *geog.* महासागरप्रवाह *m.* Pass current सत्य आहे असें समजलें जाणें-मानलें जाणें. Secondary current, re-current आगंतुक-गौण प्रवाह *m.*

Curricle (kur'ri-kl) [L. *curriculum*, a running, a race-course, from L. *currere*, to run.] *n.* लहान-आंखूड-रस्ता *m.* २ दोन चाकांची गाडी *f.* ३ रथ *m.* Curric'ulum *n.* (R.) शर्यतीचा मार्ग *m*, रस्ता *m*, धांवण्याची जागा *f.* २ (शाळा-विश्वविद्यालय इत्यादिकांतील) ठरींव अभ्यासक्रम *m*-शिक्षणक्रम *m*-अध्ययनक्रम *m. pl.* Curricula, Curriculums.

Curry (kur'-i) [Tamil *kari*, sauce.] *n.* written also Currie कढी *f*, आंबटी *f*, आमटी *f.* २ कोंबडें, मासळी वगैरे घालून शिजविलेली पंचरस भाजी *f.* C. powder कढीचा मसाला *m.*

*N. B.*—कढी is different from English curry which somewhat corresponds to आंबटी *f* or आमटी *f.* A kind of meat curry is वरवट.

Curry (kur'ri) [O. Fr. *correier*, to prepare, arrange furnish or curry (a leather).] *v. t.* (चामडें) साफ करून कमावणें, रांपवणें, ओजवणें. २ (said of a horse) चाकरी-खरारा करणें *g. of o.*, खाजवणें. ३ (said of persons) चंपी करणें, मर्दणें; as, "I have seen him curry a fellow's carcass handsomely." Cur'rying *n.-act.* कमावणें *n.* &c., कमावणी *f.* Cur'rying *pr. p.* Cur'ried *pa. p.* Cur'rier *n.* (चामडें कमावणारा) चांभार *m*, चाम्हार *m*, चर्मकार *m.* Curry-comb *n.* खरारा *m.* Cur'rying *n.* Curry favour खुशामतीनें मर्जी संपादणें, हांजी हांजी करणें. Rubber of a currier इंगा *m*, रांपा *m*, रांपी *f.*

Curse (kəːs) [A. S. *curse*, a curse.] *v. t.* *to execrate* शापणें, शाप-अभिशाप देणें, अभिशापणें, अनिष्टचिंतन-अकल्याण चिंतन करणें, तळतळाट देणें. २ अरिष्ट आणणें. [CURSE IT! BURN IT! BLAST IT! FOUL BEFALL IT! RUIN SEIZE IT! cf. *Mar.* जळो, वत्ती लागो, आग लागो, नांव जळो, नांवास इळद लागो.] उच्छाप (pop.), उःशाप. [CURSE TO A FAMILY कुलांगार. THE C. OF SCOTLAND पत्त्यांतील चौकडीचा नहिल्या. DELIVERED FROM A C. शापमुक्त. EFFECT OF A C. शापगुण *m.* TO DELIVER OR FREE FROM A C. शापोद्धार-शापमुक्ति करणें, उच्छाप-उःशाप-उश्राप-उद्शाप देणें.] C. *v. i.* शापणें. C. *n.* शाप *m*, श्राप *m*, अनिष्टचिंतन *n*, अभिशाप *m*, तळतळाट *m.* २ आपदा *f.* महासंकट *n*- उपाधि इत्यादिकांचें कारण *n*; as, "The common curse of mankind is folly and ignorance." (*Shakes.*) Cursed, Curst *a.* शापलेला, शापित, अभिशप्त, शापग्रस्त, शापदग्ध. २ शापार्ह, शाप्य, अतिद्वेष्य, अतिद्वेषयोग्य, अतिद्वेषार्ह, अतिनिंद्य (R.). Cur'sedly *adv.* Cur'sedness *n.* Cur'ser *n.* Cur'sing *n.-act.* शाप देणें *n*, शापन *n*, अभिशापन *n*, अनिष्टचिंतन *n.* Curst'ness *n.* तिरसटपणा *m*, शिवरेपणा *m*; "Curses like chickens come home to roast." ज्याचे शाप त्यालाच भोंवतात. cf. ज्याची गाळी त्यास जाळी ('To curse by bell, book, and candle'.), (रोमन कॅथलिक लोकांत) पूर्ण बहिष्कार घालणें. See under "Bell".

Cursive (kəː'siv) [L *currere*, *cursum*, to run.] *a.* जलद चालणारा-वाहणारा. C. hand जलद लिहिलेलें अक्षर *n*, फर्डेशाही *f.* Cur'sively *adv.*

Cursory (kəː'sori) [L. *cursor*, a runner.] *a.* घाईघाईचा, जलदीचा, वरवरचा, उपराउपरचा, उपेक्षाबुद्धीचा, विहंगमदृष्टिक. Cur'sorary *a.* (*Shakes.*) See Cursory. Cur'sorily *adv.* वरवर, जलदीनें. Cur'soriness *n.* वरवरपणा *m.* Cursoriness of view स्थूलदृष्टि, विहंगदृष्टि.

Curt (kəːt) [L. *curtus*, shortened.] *a.* संक्षिप्त आणि तुटस. २ (असभ्यता दिसून येईल इतकें) संक्षिप्त. Curt'ate *a.* कमी केलेला. २ *astron. the distance of a planet or comet from the sun or earth projected upon the plane of ecliptic* क्षेत्रांशांतर *n*, शरकोटी *n.* Curt'ly *adv.* Curt'ness *n.*

Curtail (kəː-tāl') [L. *curtus*, short.] *v. t.* शेंडा-बुडखा तोडून तोकडा करणें, छाटणें, कापणें, उणा-कमी-न्यून करणें, संक्षेप करणें. Curtail'ing *pr. p.* Curtailed' *pa. p.* Curtail'ment *n.* कापणें *n.* Curtail-step *n.* जिन्याच्या पायथ्याची वाटोळी पहिली पायरी *f.* Curtail-dog *n.* लांडा कुत्रा *m.*

Curtain (kəː'-tin) [O. Fr. *cortine*, *curtine*, from L. L. *cortina*, curtain.] *n.* पडदा *m*, जवनिका *f*, प्रतिसीरा *f*, तिरस्करिणी *f.* [BEHIND THE CURTAIN पडद्याआड, पडद्याच्या पलीकडे, गुप्त. DRAW THE CURTAIN पडदा एकीकडे सारणें-करणें, गुप्त राखणें, प्रगट करणें. MOSQUITO C. मच्छरदाणी *f.* TO DROP THE C. प्रवेश पुरा-समाप्त करणें, पडदा पाडणें. THE CURTAIN FALLS खेळ संपतो-पुरा होतो. STRING PASSING THROUGH THE RINGS, OF A CURTAIN कडसणी *f.*] २ *fort.* किल्ल्याच्या दोन बुरुजांमधील किंवा दोन दरवाज्यांमधील कोट *m.* C. *v. t.* पडद्यांनीं झांकणें. C. lecture एकांतीं भ्रताराची बायकोनें केलेली कानउघाडणी *f*, कांतोपदेश *m*, कांतेचा उपदेश *m.*

Curtsy, Curtsey (kəːt'-si) [See Courtesy.] *n.* स्त्रीचें लहान मुलांचें नमन *n.* C. *v. t.* स्त्रीसारखें-मुलासारखें नमन करणें.

Curve (kəːv) [L. *curvare*, from *curvus*, curved.] *n.* वांक *m*, वळण *n*, नति *f.* २ *geom.* वक्र *n*, वक्ररेषा *f*

वक्ररेषाकृति *f*, धनुर्मार्ग *m*. २ कमान *f*, मेहेराव *f*. [AXIS OF A C. वक्राचा अक्ष *m*. C. OF QUICKEST DESCENT लघुतमावरोहण वक्र. BRANCH OF A C. वक्रशाखा *f*. CLASS OF A C. वक्रजाति *f*. CONTINUOUS C. अखंडवक्र, अभंगवक्र. MOTION IN A C. वक्ररेषागमन *n*, वक्ररेषागति *f*. PLANE C. समपातळींतील-एकंधरातलवक्र *m*. ] C. *v. t.* वळविणें, बांक देणें. C. *v. i.* (एका दिशेकडून हळूहळू दुसऱ्या दिशेस) वांकणें-वळणें, वांकडा फुटणें; as, "The road C.s to the right." Cur'vate,-d *a*. वांकलेला, वळलेला, वळणाचा, वळणदार. Curvā'tion *n*. वक्रीभवन *n*, वक्रीकरण *n*, वांक *m*. Cur'vative *a. bot.* वळण्यासारखा, वक्रीभवनशील, वांकण्याची शक्ति असलेला, ज्याच्या पाजाच्या कडा किंचित् वांकलेल्या असतात असा, वक्रधाराशील. Cur'vature *n*. वांक *m*, वळण *n*. *math.* वक्रता *f*, वक्रीभवन *n*. [ANGLE OF C. वलमानवर्तुलकोन *m*. CORD OF C. वलमानवर्तुलज्या *f*, वलमानवृत्तज्या *f*. CIRCLE OF C. वक्रीयवृत्त *n*. RADIUS OF C. वलमानवर्तुलाची त्रिज्या *f*. ] Curve-d *a*. वांकडा, वक्र, वांकाचा, बांकदार. Curved line *n*. कुटिल रेषा *f*, वक्ररेषा *f*. [CURVED SURFACE *n*. वक्रतल *n*, बांकदार पृष्ठ *n*. ] Curve tracing *n. math.* वक्ररेखन *n*. Cur'vicaudate (ker'-vi-kaw'-dāt) *a. zool.* वक्रपुच्छ असलेला, बांकदार शेंपटीचा. Cur'vicostate *a. bot.* बांकदार फांसळी असलेला. Cur'vifoliate *a. bot.* बांकदार पानें असलेला, वक्रपलाश. Cur'viform *a*. वांकदार आकाराचा. Cur'ving *n*. वांक *m*, वळण *n*, बांकणें *n*. Cur'virostral *a*. बांकदार चोंच असलेला, वक्रचंचु. Cur'vital *a*. वक्रीभवनाचा-संबंधीं, वक्रतेचा. Cur'vity *n*. वळणें *n*, वक्रपणा *m*.

Curvet (ker'-vet) [L. *curvus*, bent.] *n*. उडी *f*, उत्प्लवन *n*. २ उड्या मारणें *n*, खिदळणें *n*. C. *v. i.* फांदणें, नाचणें, कुदणें, उडणें. C. *v. t.* उडी मारण्यास लावणें, उडविणें, नाचविणें.

Curvilinear, Curvilineal (ker'-vilin'-iar, ker-vi-lin-'ial) [L. *curvus*, bent & *linea*, a line.] *a*. वक्ररेषारूप, वक्ररेषाघटित-निर्मित, वक्रीय. [C. MOTION वक्ररेखागति *f*, वक्रगति *f*. Cur'vilinear'ity *n*. वक्ररेखारूप असण्याची स्थिति *f*, वक्ररेषारूपता *f*.

Cushion (koosh'-un) [O. Fr. *coissin*, *coussin*, probably related to L. *coxa*, the hip.] *n*. उशी *f*, उपधान *n*. (S.) २ तिवाशा *m*, तिवाशी *f*, तक्या *m*, लोड *m*. ३ बिलिअर्ड खेळांतील मेजाची लवचिक कोर *f*. धार *f*, (उशीसारखी). ४ धांगडधिंग्याचा नाच *m*. C. *v. t.* गादी बसविणें. २ (च्या वर) गादी-उशी आंथरणें-बसवणें; as, "To C. a chaise." ३ गादीच्या-उशीच्या खालीं लपविणें. ४ तक्याशीं विश्रांति घेणें. Cush'ioned *a*. Cush'ionet *n*. लहान तक्या *m*-लोड *m*. Cushion-tire *n*. उशीसारखी मऊ धांव *f*. Cush'iony *a*. उशीसारखा मऊ.

Cusp (kusp) [L. *cuspis*, a point.] *n. arch.* अणीदार कमानीची झालर *f*. २ *astrol.* लग्न *n*, तनुस्थान *n*, पहिलें भुवन *n*. ३ *astron.* अर्धचंद्राग्र *n*, अर्धचंद्रशिखा *f*, शृंग *n*. ४ *math.* (ज्या बिंदूंत दोन वांक मिळतात तो) स्कंध *m*. ५ *anat.* सुळया दातांवरचा उंचवटा *m*, दन्तस्कंध *m*. Cus'pidate,-d *a. bot.* शिरोदंती, निशिताग्र, स्कंधाग्र. २ अणकुचीचा, सूच्यग्र, अणीदार.

Custard (kus'-terd) [Prob. a corruption of O. E. *crustade*, a pie made with a raised *crust*, from L.—*crusta*, a crust.] *n*. दूध, अंडीं साखर घालून केलेली बासुंदी-पेय (?) *n*. Custard-apple *n. bot.* शिताफळ *n*, सीताफळ *n*, शिताफळी *f*, लवनी *f*.

Custody (kus'-to-di) [L. *custodia*, from *custos*, guard.] *n*. रखवाली *f*, राखण *f*, संभाळ *m*, पालन *n*. २ कैद *f*, बंधन *n*, निरोध *m*, बंदी *f*. ३ पहारा *m*, हवाला *m*, चौकी *f*. Custo'dial *a*. रखवालीचा, रखवालीविषयींचा, &c. Custo'dian *n*. रखवालदार *m*, राखणदार *m*. २ देखरेख करणारा *m*. Cu'stode, Custo'dier, Cu'stos, Custo'dian *ns*.

Custom (kus'-tum) [O. Fr *custume*, *costume*.—L. *consuetudo*, custom, from *con* & *suere*, to be accustomed.] *n*. रूढि *f*, पद्धति *f*, रहाटी *f*, रहाळी *f*, परिपाठ *m*, पाठ *m*, वहिवाट *f*, प्रचार *m*, प्रघात *m*, चाल *f*, रिवाज *m*, अभ्यास *m*, दस्तुर *m*, रीति *f*, रीत *f*. मार्ग *m*, शिरस्ता *m*, संप्रदाय *m*, धारा *m*. २ *law.* देशरिवाज *m*, देशाचार *m*, शिरस्ता *m*, संप्रदाय *m*, चाल *f*, आचार *m*. ३ गिऱ्हाइकी *f*. ४ दस्तुरी *f*. ५ जकात *f*, शुल्क *n*, राजस्व *n*. ६ *pl.* आयात व निर्गत मालावरील जकात *f*. Cus'tomable *a*. जकात देण्यासारखा. See Customar'y. Cus'tomar'ily *adv*. नेहमीं, बहुत करून, प्रायः, सामान्यतः, संप्रदायाला अनुसरून. Cus'tomar'iness *n*. रूढता *f*, प्रसिद्धता *f*. Cus'tomary *a*. चालीचा, रीतीचा, मार्गाचा, लोकाचाराचा, लोकप्रचारांतला, &c. २ नित्यपाठांतला, सरावाचा, सवईचा. C. *n*. कायद्याचें, नियमांचें किंवा आचाराचें पुस्तक *n*, आचारग्रंथ *m*, कल्पग्रंथ *m*. Customed *a*. सवईचा, सरावाचा. Cus'tomer *n*. जकात-महसूल गोळा करणारा *m*. २ गिऱ्हाईक *m*, ग्राहक *m*, खरीददार. ३ सामान्या (S.) *f*, गणिका *f*. (*obs.*) वेश्या *f*. [Customer on credit खातेदार. ] ४ *slang.* विचित्र मनुष्य *m*. Custom-house *n*. मांडवी *f*, नाकें *n*, जकातचौकी *f*, शुल्कस्थान *n*(?). Custom officer *n*. जकात्या *m*, जकातदार *m*, जकातीचा अधिकारी *m*. Custom-stand,-box,-booth *n*. जकातनाकें *n*, नाकें *n*, चौकी *f*, सायर. [ANCIENT CUSTOM वृद्धाचार *m*, वृद्धपरंपरा *f*. FAMILY CUSTOM कुलाचार *m*, कुलधर्म *m*. FIXED AND FIRM CUSTOM अबाधित परंपरा *f*, रूढ-मूलपरंपरा *f*. संप्रदाय *m*.-चाल *f*.-रीति *f*. FARMER OF CUSTOMS जकातदार (?) *m*, जकातीचा मक्तेदार *m*. GENERAL C. शिरस्ता *m*, जनसंप्रदाय *m*, लोकरीति *f*. CUSTOMS AND MANNERS रीतभात *f*. NATIONAL OR LOCAL CUSTOM देशाचार *m*, देशरीति *f*. PARTICULAR CUSTOM विशेषरूढि *f*. RIGHT OR GOOD C. सदाचार *m*, शिष्टसंप्रदाय *m*. ] Custom-shrunk ज्याची गिऱ्हाइकी कमी झाली आहे असा.

Cut (kut) [Scandi.] *v. t.* कापणें, विभागणें, खंडणें

भाग करणें. २ छेदणें, कातरणें, कापणी करणें. ३ कापणें, छाटणें,कातरणें; as, "To cut the hair." ४ कोरणें,खोदणें, तोडणें. ५ (चें) मर्म-हृदय भेदणें, (चा) मनोभंग करणें, (ला) झोंबणें, लागणें. ६ छेदणें. ७ खच्ची करणें, अंडच्छेद करणें. ८ ओळख बुजवणें,(ला) ओळख न देणें, (च्या-विषयीं) (ला)अज्ञान दाखविणें,न पाहिलेंसें करणें,न जाणणें; as, "To cut one's acquaintance (*colloq.*)," गैर हजर राहणें. १० माकडचेष्टा करणें,खोडी-चेष्टा करणें; as, "To cut a caper," आनंदानें नाचणें- बागडणें, खिदळणें-खोडी करणें. [To C. THE CARDS (गंजिफांतील-पत्त्यांतील पानें वांटण्यापूर्वीं) डाव काटणें. To CUT A DASH OR FIGURE (*colloq.*) प्रभाव दाखविणें, गाजवणें, नांव *n*-कीर्ति मिळवणें. To CUT DOWN जमीनदोस्त करणें, चीत करणें, पाडाव करणें. २ तोडून पाडणें, खंडन करणें, चीत करणें; AS, "SO GREAT IS HIS ELOQUENCE THAT HE CUTS DOWN THE FINEST ORATOR." ३ कापणें, छाटणें,कमी-न्यून करणें; AS,"TO CUT DOWN THE EXPENSES." ४ *naut.* हलक्या वर्गांत दाखल करणें; AS, "TO CUT DOWN A FRIGATE INTO A SLOOP." To CUT A JOKE थट्टा करणें. To CUT THE KNOT OR THE GORDIAN KNOT संक्षिप्त रीतीनें अडचण दूर करणें, दांडगाईनें-झटकाफटकीं संकट दूर करणें, संकटांतून पार पडणें. To CUT LOTS पत्त्याचे भाग पाडणें, विभाग-वांटा करणें. To CUT OFF कापणें, कापून काढणें. २ नाश करणें, उच्छेद करणें, अंत करणें, उत्कर्तन- अवकर्तन करणें. ३ चा संबध-व्यवहार-संसर्ग बंद करणें- बंद पाडणें. ४ थांबविणें, हरकत करणें, मोडा घालणें; AS, "TO CUT OFF AN ENEMY'S RETREAT." ५ समाप्त करणें, अंत करणें, योग्य वेळापूर्वीं संपविणें. To CUT OUT कापून काढणें, कापणें; AS, "TO CUT OUT A PIECE FROM A BOARD." २ बेतणें, बेतून कापणें- काढणें, आंखून कापणें, वेतणी करणें; AS, "TO CUT OUT GARMENTS." ३ योजणें, योजना करणें, (च्या) साठीं तयारी करणें. ४ युक्तीनें जागा हिसकावून घेणें. ५ अटकावणें, प्रतिबंध करणें, रोखणें. ६ बंदरांतून शत्रूच्या तोफांच्या माऱ्यांतून जहाज पकडून नेणें. To CUT TO PIECES कापून तुकडे तुकडे करणें, चूर करणें. २ कत्तल करणें, कापणें. To CUT A PLAY नाटकांतील कांहीं भागाची छाटाछाट करून त्याचें लहान नाटक करणें, नाटकाची रंगावृत्ति करणें. To CUT RATES दर कमी करणें. To CUT SHORT थोडक्यांत आणणें, संक्षिप्त करणें, आंखूड-लहान करणें, एकदम बंद करणें, अटकावणें. To CUT STICK(*slang.*)पळून जाऊन नाहींसें होणें, पलायन करून जाणें. To CUT TEETH दांत येणें-फुटणें, दंतोद्गम होणें. To HAVE CUT ONE'S EYETEETH (*colloq.*) हुशार-तल्लख होणें. To CUT ONE'S WISDOM-TEETH समजूं लागणें, समजण्याच्या घरांत येणें, अक्कलदाढा येणें. To CUT UNDER कमी भावानें- किंमतीनें विकणें. To CUT UP तुकडे तुकडे करणें, कापणें. २ उच्छेद करणें, उच्छेदणें, नाश करणें. ३ पीडा करणें, धैर्य खचविणें, हतधैर्य करणें, खिन्न करणें]. Cut *v. i.* कापणें; as, "This knife cuts well." २ कापलें जाणें. ३ नेवट-नेऊर-लागणें (as a horse). ४ पलायन करणें, पळ काढणें. ५ हुकुमाकरितां पत्ते काटणें. ६ चावकानें आवाज करणें, (चाबूक) कडकन वाजविणें, होईल तितक्या घाईनें निघून जाणें, नांगराचें दोरखंड कापून गलबत घेऊन पळणें, दांत फुटणें. [To CUT ACROSS नीट मधून जाणें. To CUT IN-INTO मध्येंच शिरणें. To CUT UP चांगल्या किंवा वाईट (सरसकट) भागांत वाटणी करणें. २ खोड्या करणें. To CUT UP ROUGH कजेखोर होणें.] Cut *a.* कापलेला, कापींव, छिन्न-त्रुटित-निकृत्त. २ विभागलेला, भाग पाडलेला. ३ कोरलेला, कोरींव. ४ लायक. C. *n.* घाव *m*, घाय *m*, जखम *f.* २ (*a*) प्रहार *m*, वार *m.* (*b*) फटका *m.* ३ कठोरवचन *n*, मर्मभेदी-छद्मी वचन *n.* ४ अनादर *m*, हेळसांड *f.* ५ खोवण *f*, खांच *f*, खांड *f.* ६ कापून पडलेली-झालेली-खांच *f.* ७ तुकडा *m*, खंड *m*, भाग *m.* ८ कोरींव चित्र *n.* ९ पत्ते कापणें *n*, कापणी *f*, काटणी *f.* १० बेत *m*, तोंड *n*, मोड *m*, घाट *m*, डौल *m*, तऱ्हा *f.* ११ (*obs.*) खच्ची केलेला (घोडा) *m.* १२ सुताचें कुकडें *n*, (लोंकरीची) लडी *f.* १३ जवळचा रस्ता *m*- वाट *f.* १४ *pl.* दैव *n*, नशीव *n.* Cut'ting *pr. p.* Cut *pa. p.* Cut-away coat ज्याचे कोंपरे कापले आहेत असा(कोट)*m.* Cut off जवळचा रस्ता *m.* Cut-purse-pocket *n.* खिसेकापू, कातऱ्याचोर *m*, उचल्या *m*, भामटा *m.* Cut'ter *n.* कापणारा *m*, कपडे बेतणारा *m*, शिंपी *m.* २ कापण्याचें हत्यार *n*- सुरा *m.* ३ एक प्रकारची होडी *f.* ४ एका घोड्याची लहान गाडी *f.* ५ रेव्हिन्यु कोर्टांतील एक अमलदार *m.* ६ गळा (ळे)-कापू *m*, खुनी *m.* ७ पिवडी *f.* [C. THROAT *n.* मान-गळा कापणारा *m.*] C. *a.* दुष्ट, घातकी. Cut'ting *n.* कापणें *n*, छेद *m*, छेदन *n*, काप *m*, काट *m*, कापणी *f*, &c. २ कापलेला पदार्थ *m*, काप *m*, कपळा *m*, तुकडा *m*, चकती *f.* ३ वर्तमानपत्रांतील संग्रहासाठीं कापलेला परिच्छेद *m*, (पॅरॅग्राफ *m*). ४ डोंगर पोंखरून केलेला रस्ता *m*, बोगदा *m.* C. *a.* तीक्ष्ण, तीव्र. २ मर्मी, मर्मच्छिद्, मर्मभेदक, तिखट, जिव्हाळीं लागणारा. A cut above किंचित् जास्त, वरची पायरी *f*, कांकणभर सरस. Cut-nail *n.* लोखंडाचा पत्रा यंत्रानें वळवून केलेला खिळा *m.* Cut-stone *n.* छिनीनें-टाकीनें घडलेला दगड *m.* Cut-water *n.* जहाजाच्या नाळीचा पुढील भाग *m.* (ह्याचे योगानें पाणी तोडलें जातें.) २ पुलाच्या दगडी खांबाचा दगडी त्रिकोणी भाग *m.* ३ पाणकोंबडी *f.* Cutter-block *n. mech. eng.* कापण्याचा ठोकळा *m.* Cutting power *n.* कापण्याचें बळ *n.* Milling cutter *n.* एका प्रकारची धातू साफ करण्याची कानस *f.* Short-near cut जवळचा रस्ता. Cut and come again, *take a cut from the joint and come for another if you like* मांसाचा लहान तुकडा घ्या आणि लागल्यास पुन्हा या. Cut and dry or cut and dried तयार करून ठेवलेलें, तयार (the allusion is to timber cut, dry and fit for use). Cut off with a shilling अल्पांश देऊन वारसाचा हक्क तोडणें. Cut one direct ओळखीच्या मनुष्याकडे समक्ष पाहून त्यास ओळखिलें नाहीं असें दाखविणें. To cut indirect दुसरीकडे पाहून त्याला पाहिलेंच नाहीं असें दाखविणें. To cut the ground from under one प्रतिपक्ष्याच्या सर्व मतांचें खंडन करणें. Cut one's coat according to one's cloth आंथरूण पाहून पाय पसरणें, आदा पाहून खर्च करणें.

To cut one out (च्या वर) सरशी होणें-करणें. He is cut out for a sailor तो स्वभावतःच खलाशाच्या कामाला योग्य आहे. I will cut your comb for you मी तुझें गर्वखंडन करीन.

Cute (kūt) [Abrev. of acute.] *a.* बिलंदर, पक्का, लुचा, हुशार, काफर, अट्टल.

Cutis (kū'tis) [L. *cutis*, the skin.] *n.* कातडी *f*, त्वचा *f*, चर्म *n*. २ *bot.* बाह्यसाल *f*. Cuta'neous *a.* त्वचेसंबंधीं-चा. Cu'ticle *n.* बाहेरील कातडी-त्वचा *f*. २ *bot.* बाह्यत्वक्, त्वचेवरील पातळ पडदा *m*, झाडाची बाह्यसाल *f*. ३ कोणत्याहि प्रवाही पदार्थावरील पापुदरा *m*, साइटी *n*. Cutic'ular *a.*

Cutlass (kut'-lus) [Fr. *coutelas*, from L. *cultellum*, a small knife, dim. of *culter*, a coulter.] *n.* रुंद व कमानदार तलवार *f*, तेगा *m*, खांडा *m*.

Cutler (kut'-ler) [O. Fr. *cotelier*,-L. *cuttellus*, a knife.] *n.* चाकू *m*, सुऱ्या इत्यादि लोखंडी धारेचीं हत्यारें करणारा *m*, छुरिकाकार *m*. Cut'lery *n.* चाकू, सुऱ्या इ. लोखंडी हत्यारें करण्याचा धंदा *m*. २ तरवारी, चाकू, सुऱ्या इ. धारेचीं लोखंडी हत्यारें, सुऱ्या वगैरे सामान.

Cuttle, Cuttlefish (kut'tl-fish) [A. S. *cudele.*] *n.* म्हाकूल *m* (एक जातीचा मासा *m*). Cuttle-bone *n.* समुद्रमणकी, समुद्र कफ-फेन-फेस-सिंधुकफ, सुफेन. These words are used also for the fish.

Cutty (ku'ti) *a.* आंखूड, ठेंगणा. C. *n.* तंबाखू ओढण्याची मातीची लहान चिलीम *f*. २ जारिणी *f*, व्यभिचारी स्त्री *f*.

Cyanogen (sī-an'-o-jen) [Gr. *kuanos*, a dark blue substance & *gen.*] *n.* *carbon-nitrogen* कर्बनत्रिल.

Cyathiform (sī'ath'-i-form) [L. *cyathus*, a cup.–Gr. *kuathos*, & form.] *a.* पेल्यासारखा वरच्या बाजूस किंचित् रुंद.

Cycadaceous (sī-k'a-dā'- shius) [L. *cycas*, one of the grenera-gen. *Cycados*, Gr. *kukas*, a kind of palm.] *a.* बहिर्वर्धिष्णु, ताडाच्या वर्गासंबंधीं.

Cycle (sī'-kl) [Fr-L.-Gr. *kuklos*, a circle.] *n.* आकाशांतील कल्पितवर्तुळ *n*, चक्र *n*. २ कालचक्र *n*, संवत्सर, चक्र *n*, युग *n*, दीर्घकाल *m*. ३ *bot. one entire round in a circle or sphere* फेरा *m*, एक पूर्ण गोल *m*; as, "A C. of leaves." ४ वर्ष *n*. ५ (*obs.*) पंचांग *n*. ६ दुचाकी *f*, तिचाकी *f* (गाडी *f*). Also Cyclus. C. *v. t.* सायकलवर बसणें. Cy'clic,-al *a.* चक्रासंबंधीं. [C. POETS वीरचरित्रकाव्यें लिहिणारे कवि *m. pl.* C. OF ECLIPSES ६५८६ दिवसांचें युग *n* C. of INDICTION १५ वर्षांचें युग *n*-कालचक्र *n*. C. OF THE MOON OR METONIC C. १९ वर्षांचा काल *m*. C. OF THE SUN OR SOLAR C. २८ वर्षांचा काल *m*.] Cy'clist *n.* सायकलवर बसणारा. Cy'clograph *n.* (मध्यबिंदूच्या मदतीशिवाय) वर्तुलच्छेद किंवा वृत्तकंस काढण्याचें यंत्र *n*, वृत्तकंसलेखक *m*. Cy'cloid *n.* एका सरळ रेषेवर वाटोळें फिरणाऱ्या चक्रांतील विवक्षित बिंदूनें केलेला वक्र *m*, चक्राभास *m*. Cycloi'dal *a.* चक्राभासीय. Cyclom'eter *n.* चाकाचे फेरे मोजण्याचें यंत्र *n*, चक्रपरिवर्तनमापक.

Cyclone (sī'-klōn) [Gr. *kuklos*, a circle.] *n.* चक्रवात *m*, भोंवरा *m*, घुगी *f*, वाभरूं *n*, तुफान *n*. Cyclo'nic *a.*

Cyclopædia, Cyclopedia (sī'-klō-pē'-di-a) [Gr. *kyklos*, a circle L. *paideia*, learning.] *n.* विश्वकोश *m*, विश्वज्ञानकोश *m*, ज्ञानचक्र *n*, सर्वज्ञानसंग्रह *m*. Cyclope'dic, Cyclopæ'dic *a.*

Cyclops (sī'-klops) [Gr. *kuklos*, a circle, & *ops*, an eye.] *n.* भाललोचन (राक्षस), एकडोळ्याचा राक्षस *m*, सायक्लाप्स नांवाचा राक्षस *m*. Cy'clopes *n. pl.* Cyc'lop'ean, Cy'clop'ic *a.* भाललोचनाचा-संबंधीं; राक्षसासारखा.

Cygnet (sig'-net) [Dim. of Fr. *cygne*, swan.-L. *cygnus*, Gr. *kuknos*, a swan.] *n.* हंसशावक *m*, बालहंस *m*. Cygni alpha *astron.* हंस.

Cylinder (sil'-in-der) [Fr. *cylindre*, from L. *cylindrus*, from Gr. *kulindein*, to roll.] *n. geom.* नलिकाघनक्षेत्र *n*. २ *anat.* नळ *m*. ३नळ *m*, नळकंडें *n*. ४ पंचपात्र *n*.५ वर्तुळस्तंभ *m*, वृत्तचिति *f*. Cylin'drical, Cyl'in'dric *a.* वरवंट्याच्या आकाराचा, नळकंड्यासारखा. Cyl'indri-c'ity *n.* Cylin'driform *a.* वरवंट्याच्या आकाराचा. Cyl'indroid *n.* दीर्घवर्तुळ टोंकें असलेलें सिलिंडर *n*. Cylinder of a gun बंदुकीची नळी *f*.

Cymbal (sim'-bal) [O. Fr. *cimbale*,–L. *cymbalum*–Gr. *kumbe*, the hollow of a vessel.] *n.* झांज *f*, टाळ *f*, झांजरी *f*, ताळ *f*, कांसाळ, करताळ *m*. Cym'balist *n.* टाळधरी *m*, टाळकरी *m*, झांजकरी *m*, झांज्या *m*, टाळकुट्या *m*, टाळघाइया *m*. Also cymbal-player *n.*

Cymbiform (sim'-bi-form) [L. *cymba*, boat.-Gr. *kumba*, form.] *a.* नावेच्या आकाराची, नौकाकृति.

Cyme (sīm) [L. *cyma*,-Gr. *kuma*, a sprout.] *n. bot.* लहान अंकुर *m*. २ केंद्रत्यागी मंजरी *f*. (हींत मधील फुलें अगोदर उमलतात.) Cym'oid, Cym'ose, Cymous *as.* मंजरीसंबंधीं.

Cynanthropy See Cynic.

Cynic, Cynical (sin'-ik-al) [L. *cynicus*-Gr. *kunos*, a dog.] *a.* तुसडा, मनुष्यद्वेषी, उदासीन, माणुसघाण्या. २ लुब्धकाच्या ताऱ्यासंबंधीं. ३ सिनिक पंथाचा-संबंधीं. ४ नीतीनें चालणाऱ्याची मस्करी करणारा. Cynan'thropy *n.* एक प्रकारचें वेड *n*. ह्या वेडांत मनुष्य आपण कुत्रा झालों असें समजून त्याप्रमाणें चेष्टा करूं लागतो. Cyn'ic *n.* सिनिकपंथाचा मनुष्य *m*. २ जनशत्रु, लोकद्वेषी, मनुष्यद्वेषी. ३कद्रूवृंदावन *n.* (loosely), कद्रू कवंडळ *n.* (loosely), टेंभुरणीचा कोळसा *m*. Cyn'icism *n.* द्वाष्टपणा *m*, दुष्टपणा *m*. Cyn'ically *adv.* Cyn'icalness *n.*

*N. B.*—Cynic. अँटिस्थेनीस नांवाचे तत्त्ववेत्त्यानें ग्रीस देशांत प्राचीन काळीं एक तत्त्वज्ञानाचा पंथ स्थापिला. त्याचें नांव सिनिसिझम. त्यास हें नांव पडण्याचें मुख्य कारण असें कीं ह्या मताचा मुख्य पुरस्कर्ता 'डाओजिनीस' हा कुत्र्याप्रमाणें एका पिपांत रहात

असे. त्यावरून त्यास लोक सिनिक म्हणजे श्वानवृत्ति असें म्हणूं लागले व त्यावरूनच 'सिनिसिझम्' हा शब्द निघाला. ह्या मताचे अनुयायी हे तत्कालीन इतर मतांचा फार द्वेष करीत असत व सामाजिक रीतीभातींचा त्यांस फार तिरस्कार वाटत असे. त्यांची वृत्ति बहुतकरून फार कडक व उदासीन असे. ह्यावरून सिनिक ह्मणजे गुरगुरणारा, दुरात्मा, निंदाशील, मनुष्यद्वेषी, उदासीन असे अर्थ आले आहेत. मनुष्य हा स्वभावतः स्वहितसाधू असून परोपकार हें केवळ ढोंग होय असें समजणारे मनुष्यासही सिनिक असें म्हणतात.

Cynosure ( sī'-nō-shūr or sin'o-zhur ) [L.-Gr. *kunos*, a dog & *oura*, a tail. ] *n.* ध्रुवपुच्छ *m*, ज्योतिरथ *m*. २ मोहनी *f*, आकर्षण *n*, प्रलोभन *n*. ३ मार्गदर्शक, दर्शक.

Cypher ( sī'fer ) Same as Cipher.

Cypress (sī'pres') [L. *cupressus*, the Cyprus.] *n. bot.* सुरूचें झाड *n*, सरू *m*, सुरू. [ONE READY ALIKE TO BEAR C. OR MYRTLE शुभाशुभाला सारखा CF. *fig.* आंब्याचा डहाळा, आम्रपल्लव. TALL OR STRAIGHT CYPRESS. स(सु) रूचा, स(सु)रू दार. ]

Cyprus (sī'-prus ) [From *Cyprus*, where it was first manufactured. ] *n.* सायप्रस नांवाचें काळें वस्त्र *n.* हें अशुभसूचक असतें.

Cypsela (sīp'-sē-la) [ Gr. *kupsele*, any hollow vessel.] *n. bot.* एकबीजफल *n.*

Cyst ( sist ) [L. *cystis*-Gr. *kustis*, a bag. ] *n.* ( प्राण्याच्या शरीरांतील) रोगट द्रव्यांची पिशवी *f*, अर्बुद *n*, अवाळूं *n*, गळूं *n*, सभोंवती पापुद्रा असून आंत पाणी आहे असें आवाळूं, गांठ वगैरे. Cys'tic, Cys'tiform, Cys'toid *a.* पिशवीच्या आकाराची. Cys'ticle *n.* लहान पिशवी *f.* Cys'tin *n.* बस्तिगत अश्मरीविशेष. Cys'titis *n.* मूत्राशयदाह. Cys'tocele *n.* बस्तिभ्रंश *m*, मूत्राशय आपले जागेवरून पुढें येणें *n*. Cystot'omy *n.* बस्तिच्छेद *m*. Cystic sarcocele कठिण वृषणार्बुद. Cysticercus fasciolaris सिस्टिसर्कस फॅसियोलॅरिस, मांजरांतील फिती सारख्या जंताची पूर्वस्थिति. Cysticercus Cellulose सिस्टिसर्कस सिल्यूलोज, डुकराचें मांस खाणाऱ्या मनुष्याच्या आंगांतील फितीसारख्या जंताची पूर्वस्थिति.

Cytherean ( sith'er-ēan ) [ Gr. *cerigo*, an island in the Ægean Sea. ] *a. pertaining to the goddess Venus* शुक्रासंबंधीं.

Cytoblast ( sī'-tō-blast ) *n. bot.* वनस्पतीच्या आद्यपेशींतील अंतर्बिंदु *m*. २ *med.* बिंदुगर्भ *m*, कणगर्भ *m*, बिंदुकणिका *f*, कणरेणु *m*. Cy'togen'esis *n. bot.* पेशीभवन *n*, पिंडभवन *n*, आद्यबिंदुघटना *f*.

Cytoblastema (sī'to blas-tē'-ma) *n. bot.* आद्यजीवकण *m*, आद्यबिंदुद्रव्य *n*.

Czar, Tsar(zār) [Russ.-Teut.-L. *cæsar*, an emperor.] *n.* रशिया देशाचा राजा *m*, बादशाह *m*, झार *m*, रूस देशाच्या राजाचा किताब *m*. Czari'na, Tsari'na *n. fem* रूस देशाच्या राणीचा किताब *m*. Czare-vitch, Tsarvitch *n.* रशियाच्या राजाचा मुलगा *m*. Cesar'e-vitch, Czarowitz *n.* झारच्या सर्वांत मोठ्या मुलाचा किताब *m*, युवझार *m*, रशियन युवराज *m*. Cesarev'na *n.* रशियाच्या युवराजाच्या बायकोचा किताब *m*. Czarev'na, Tsarev'na *n.* झाराची मुलगी.

# D

D. (dē) इंग्रजी वर्णमालिकेंतील चवथें अक्षर आणि तिसरें व्यंजन. ह्याचीं अनेक वचनें D's, Ds, de's अशीं लिहितात. फिनिशियन व यहुदी भाषांतील डॅलेथ (Daleth) अक्षराच्या ठिकाणीं व ग्रीक भाषेंतील डेल्टा (Delta) अक्षराच्या, व संस्कृतभाषेंतील ड् व द् ह्या व्यंजनाच्या ठिकाणीं इंग्रजींत D हें अक्षर प्रतिनिधित्वानें योजितात. ग्रीक भाषेंतील Δ डेल्टा अक्षराचा एक कोण वाटोळा मुरडून इंग्रजी D हें अक्षर तयार केलेलें आहे. २ used in reference to the shape of the letter 'D'. D ह्या अक्षराच्या आकाराच्या पदार्थांचें नुसतें 'D' ह्या अक्षरानें निदर्शन करतात; जसें, "D block, D trap, D valve, &c." ३ Damn ह्या ग्राम्य शब्दाबद्दल प्रतिष्ठित लोक नुसत्या D ह्या अक्षराची योजना करतात. ४ गणिताच्या किंवा इतर शास्त्रीय विवेचनांत चवथा पदार्थ किंवा पुरुष दर्शविण्यासाठीं D हें अक्षर योजितात; As, 'A, B, C & D can do a piece of work in five days.' ५ ( *music.* ) The name of the second note of the natural Major Scale. संगीत शास्त्रांत स्वरसप्तकाच्या दुसऱ्या स्वराची ह्मणजे ऋषभ स्वराची संज्ञा; रि, रे. ६ ( *math.* ) शून्यलब्धींत किंवा 'चलनकलन' गणितांत तात्कालिक गतीसाठीं किंवा शून्यलब्धी ( Differentiation ) साठीं D हें अक्षर घालितात. तसेंच उच्चगणितांत वक्राची न्यूनता ( deficiency of a curve ) दाखविण्यासाठीं D हें अक्षर इंग्रजी गणिती योजितात. ७ Daniel, David, Duke, Degree, Domini इत्यादि शब्दांचा संक्षेप म्हणून इंग्रजींत D हें अक्षर केव्हां केव्हां योजण्यांत येतें, पदव्यांमध्यें D ह्या संक्षेपाचा बहुधा Doctor असा अर्थ असतो; as, D. Sc.= Doctor of Science. ८ रोमन लिपीमध्यें ५०० ह्या संख्येबद्दल D ह्या अक्षराचा उपयोग करतात. [ In this use it is not the initial of any word or even strictly a letter but one half of the sign ↀ or (I) the original Tuscan numeral for 1000.] ९ D or d is also used to indicate a penny or pence, being then the initial letter of Latin *Denarius*, a silver coin equal to 8½ pence. पेनी *f*, पेन्स. १० D̄ stands for 5000. D वर आडवी रेघ दिली म्हणजे तें चिन्ह पांच हजार ही संख्या दाखवितें.

Dab (dab) [M. E. *dabben*, a blow.] *v. t. to strike gently with the hand* थापटणें, थाप *f.* थापटी *f.* मारणें, थोपटणें, बदका *m.*-रपका *m.* मारणें. २ *to cast* (some thing soft) *against* थापणें. ३ (with *up, on, over*) लावणें. ४ *to peck, to stick* (चोंचीनें-काठीनें) बोंचणें. D. *n. a soft blow* थाप *f,* थापट *f,* कोमल आघात *m.* २ *a sudden blow* बदका *m,* रपका *m.* ३ *a soft lump, a mass dabbed* लपका *m,* लवका *m,* लादा *m,* लगदा *m.* ४ *a peck* टोंच *f,* चोंच *f,* चंच्वाघात *m.* Dab'ber *n.* लावणें *n.* (cf. कातणें=कातण्याचें यंत्र *n.*) (छापखान्यांतील खिळ्यांवर किंवा नकसकामावर शाई लावण्याचें.) Dabbed *pa. p.* Dabb'ing *pr. p.*

Dab (dab) [Perhaps corrupted from adept.] *n.* (*colloq.*) *an expert* कुशल-निष्णात-पटाईत-फरडा-निपुण मनुष्य *m,* वस्ताद *m.*

Dabble (dab'-l) [Frequentative of Dab.] *v. t. to moisten by little dips or strokes* भिजविणें, ओलें-ओलसर करणें. २ *to sprinkle* सिंचन *n.* करणें. D. *v. i. to play in water* (as with the hands) पाण्यांत-चिखलांत खेळणें. २ *to work in a slight or superficial manner* वरवर काम करणें, लुडबुडणें. ३ *to tamper, to meddle* मध्यें पडणें-घुसणें,-हात शिरकविणें, पाय घुसडविणें, चंचुप्रवेश करणें. ४ (*fig.*) *to dip into lightly* लुडबुडणें, डुबकणें, बुचकळणें. Dab'bler *n.* पाण्यांत-चिखलांत खेळणारा. २ थोडेसें-वरवर काम करणारा. ३ लुडबुडणारा, चंचुप्रवेश करणारा, एकही धड न करणारा, लुडबुड्या, डुबणारा, कडेचा-तडीचा पोहणारा. Dab'blingly *adv.* Dabbled *pa. p.* Dab'bling *pr. p.*

Dabchick (dab'-chick) [Perhaps so named from its quickness in diving beneath the water.] *n.* पाण्यांत पटदिनीं बुडी मारणारा 'डॅबचिक' पक्षी *m.*

Dabster (dab'-stėr) [cf. Dab, an expert.] *n. colloq. one who is a skilled master of his business* फरडा *m,* वस्ताद *m,* मुरब्बी *m,* निपुण-पटाईत मनुष्य *m.*

Da Capo (dākä'-pō) [It. From the head or beginning.] *n. mus.* ध्रुवपद *n,* आंकड(ण)कडवें *n.* (indicated by the letters D & C.)

Dace (dās) [O. Fr. *dars,* (*dart*) a dart.] *n.* एक प्रकारचा मासा *m,* मत्स्यविशेष *m.*

Dacoit (dä-koit') [Hind. डाका.] *n.* डाका घालणारा, दरवडेखोर, दरोडेखोर, डाकाईत also Dakoit. Dacoit'y, Dacoit'age *n.* डाका *m,* दरोडा *m,* धाडदोरी *f,* धाड *f,* लूट *f.*

Dactyl, Dactyle (dak'-til) [L. *dactylus*, the metrical foot marked–⏑ ⏑,—Gr. *daktulos*, a finger, a dactyl.] *n. a poetical foot consisting of three syllables the first long and the other two short like the joints of a finger* भगण *m,* तीन अक्षरी गण *m.* (प्रथमपद गुरु व पुढचीं दोन लघु). २ हाताचें किंवा पायाचें बोट *n,* किड्याचा पंजा *m.* Dac'tylar, Dactyl'ic *a.* भगण ज्यांत आहे असा, भगणासंबंधीं, तीन अक्षरी गणासंबंधीं. Dactyl'iomancy *n.* हातांतील आंगठीच्या योगानें शकुन पाहणें-जाणणें *n.* Dac'tylist *n.* नुसते 'भगणच' ज्यांत आहेत अशी कविता लिहिणारा. Dac'tylog'raphy *n.* रत्नावरचें नक्षीचें काम *n.* Dactylol'ogy *n.* करपल्लवी भाषा *f,* बहिरे मुके यांची भाषा *f.* या भाषेंत प्रत्येक अक्षराबद्दल बोटांनीं करावयाची एक खूण ठरविलेली असते.

*N. B.*—The word Dactylomancy, Dactylography & Dactylology are spelt by Webster as Dactyliomancy, Dactiliography and Dactyliology. In giving the meaning of Dactyl in English Prosody, we translate *syllable* by अक्षर, meaning by अक्षर as much portion of a word as can be uttered at once.

Dad, Daddy (dad, dad'-i) [Probably of Celtic origin. cf. Sk. तात, a father.] *n.* दादा *m,* बाबा *m,* बा *m,* तात *m.* २ रंगभूमीवरचा व्यवस्थापक *m,* सूत्रधार *m.* Daddy-long-legs *n.* लांब तंगड्यांचा कीटक *m,* शेतांतील लांब पायाचा कोळी *m.* Called also "Harvestman," "Carter," "grand-father long-legs."

Dad (dad) [Derivation unknown.] *v. t. to dash* आपटणें.

Daddle (dad'-l) [Probably frequentative of Dade.] *v. i.* लहान मुलाप्रमाणें किंवा म्हाताऱ्याप्रमाणें लटपटत चालणें. Daddled *pa. p.* Dadd'ling *pr. p.*

Dade (dād) [Derivation unknown.] *v. t. & v. i.* (*obs.*) अगदीं लहान मुलास दोरीनें किंवा हात धरून चालण्यास शिकविणें, 'चाल चाल माते' करणें.

Dædal, Dædalian (dēdal, de-dā-li-an) [L. *dædalus*, cunningly wrought, from Gr. *daidalos*.] *a.* चतुराईनें तयार केलेला, कसबाचा, हुन्नरीचा, हिकमतीचा, कसबी; as, "Dædal hand of Nature."

Dado (dā'-dō) [It. *dado*, a die, cube, pedestal.–Folk-L. *datum*, from *dare*, to give.] *the cubical base of a column* खुर्ची *f,* खुर्चीचा दर्शनी भाग *m,* खांबाखालील नक्षीची चौरस खुर्ची *f,* डेडो *m.* २ *in any wall that part of the basement included between the base and the base-course* प्रत्येक मजल्यावरील भिंतीच्या आरंभीं जो जाडा थर घेतात तो भाग, तळसरीसारखा भिंतीखालील भाग, तळसरी *f,* डेडो *m,* तळखंड *n.* ३ *the lower part of the wall of an apartment when adorned with mouldings* वेलबुट्टीनें रंगविलेल्या भिंतीचा तळ व वेलबुट्टीची पहिली रेघ ह्यांमधील भाग *m,* डेडो *m,* तळसरी *f,* वेलबुट्टीखालचें भिंतीचें तळखंड *n.*

Daffodil (daf'-ō-dil) [The initial *d* is a later addition perhaps from M. Fr. *fleur, d'affrodille*–L. *asphodelus*,–Gk. *asphodelos*, a kind of lily.] *n.* डॅफोडिल नांवाचें एक प्रकारचें (अदृश्यकांड) फुलझाड *n.* २ (ह्या झाडाचें) डॅफोडिल नांवाचें फूल *n.* हें डॅफोडिल फुलझाड आपल्याकडील नागदवण्यासारखें असतें; also Daffodilly (daf'ō-dil-i), Daffodowndilly (daf'ō-down-dil'i).

Daft (däft) [O. E. *daft, deft*, stupid.] *a. stupid, foolish* वेडगळ, वेडसर, भ्रमिष्ट. २ *gay, playful* गमत्या, खेळकर. Daft'ly *adv.* Daft'ness *n.* वेडगळपणा *m*, खेळकरपणा *m*, गमतीपणा *m*, &c.

Dagger (dag'-ėr) [M. E. *dagger*–Fr. *dague*, a dagger.] *n.* खंजीर *m*, कट्यार *f*, जंबिया *m.* [SOME OF THE COMMON KINDS ARE:–कटार *f*, जंवा *m.* OR जंविया *m*, खंजिर *m*, पाल्कोयती *f*, पेशकवज *m*, वाक *m*, बिचवा *m*, माडू *m*, सुरा *m.* TO BE AT DAGGERS DRAWN एकमेकांचा जीव घ्यावयास तयार होणें, हाडवैरी असणें. TO LOOK DAGGERS, TO SPEAK DAGGERS, *to speak or look so as to wound the sensibilities* रागानें दुसऱ्याचें मन दुखेल अशा रीतीनें बोलणें किंवा पाहणें. TO PLUNGE A DAGGER *fig.* कट्यार भोंसकणें.] २ *print.* खंजिरी (†). *f.* D. *v. t.* (*obs.*) *to stab* खंजीर मारणें-खुपसणें.

Daggle (dag'l) [Frequentative verb from *Swed. dagg*, dew.] *v. t. to wet by dragging on the wet ground* भिजवून चिंब-ओलें करणें. २ *to trail in the dirt* चिखलांत-पाण्यांत लोळवणें-लडबडवणें. D. *v. i.* पाण्यांतून किंवा चिखलांतून जाणें. Daggle-tail *n. a slovenly woman* आपला झगा चिखलांत लोळूं देणारी बाई *f*, अजागळ-अस्ताव्यस्त स्त्री *f.*

Dagoba (dag'o-ba) [Singhalese *dagoba.*] *n.* गौतम बुद्धाच्या किंवा बुद्धभिक्षूच्या शवावर बांधलेली घुमटाकार समाधि *f*, 'डागोबा.'

Dainty (dān'-ti) [M. E. *deintee.*–O. Fr. *daintie*, delicacy, dignity, honour, from L. *dignitas, dignus*, worthy.] *a. delicious to the palate* गोड, रुचिर, सुरस, रुचकर, स्वादु, मिष्ट. २ *nice, delicate, elegant in form, manner or breeding* नाजूक, कोमल, सुंदर, नीटनेटका, अतिसभ्य. ३ *requiring dainties, affectedly particular as to food* गोडघांश्या, गोडखाऊ, गोडखाद्या, गोडजिभ्या, चवनट, जिभेचा शिंदळ, चोखनळ, चोखारी, चोकांदळ, चोखाळा, खुराक्या. [TO BE DAINTY ओलेंकोरडें पाहणें, चव *f.* काढणें, चाखत माखत *adv.* खाणें-जेवणें, नाका-ओंठावर जेवणें. TO BECOME D. तोंड *n.* माजणें *g. of o.*] ४ *overnice, hard to please, fastidious, scrupulous, ceremonious* मिजाजखोर, मिजासी, खोडकर, चिकित्सखोर, अत्यादराची अपेक्षा करणारा, अत्यादराकांक्षी, थोडक्यांत खुष न होणारा, दुराराध्य. D. *n.* सुग्रास *m*, मिष्टान्न *n*, स्वाद्वन्न *n*, पक्वान्न *n*, भोजनविशेष *m*, गोडघांस *m.* २ (*poetic*) लाडका *m*, आवडता, प्रियकर. Dain'tily *adv.* नाजूकपणानें, सुंदर रीतीनें, काळजीपूर्वक, दिमाखानें, &c. [TO FARE D. रोज पक्वान्न खाणें, AND WITH *in. con.* खायाला मिळणें.] २ चोखंदळपणानें, चाखतमाखत, ओलें कोरडें पाहून, नाका ओंठावर. Dain'tiness *n.* गोडी *f*, रुचकरपणा *m*, रुचि *f*, मिष्टता *f*, मजेदारी *f.* २ चोखंदळपणा *m*, चोखाळेपणा *m*, सोंगळपणा *m.* ३ मिजाज *f*, नाजूकपणा *m*, नाजकाई *f.*

Dairy (dā'-ri) [M. E. *deyerye*, a room for a *deye*, a milk-woman, a farm-servant,—O. Norw. *deigja*, Swed. *deja*, a maid, dairy-maid, who was also the bread-maker.] *n. every thing connected with milk and its products* दु(प)भतें *n.* २ *the house or room where milk is kept and converted into cheese and butter* दुभत्याची खोली *f*-घर *n*-जागा *f.* (this word is used adjectively or in combination; as, Dairy-farm, Dairy-countries, Dairy-house, Dairy-room, &c.) Dairy-farm *n.* दूधदु(प)भत्याचा कारखाना *m*, गोरसशाला *f.* Dairy'ing *n.* दु(प)भत्याचा व्यापार *m.* Dairy-maid *n.* दुभतेकरीण *f*, गवळण *f*, गोपकन्या *f.* Dairy-man *n.* गवळी *m*, दुभतें करणारा *m.*

Dais (dā'-is) [M. E. *deis, deys*–A. Fr. *deis*, a high table–L. *discum*, acc. of *discus*, a quoit, a platter, Gr. *diskos*, a quoit, disc.] *n.* उंचपीठ *n*, उच्चपीठ, *n* उच्चासन *n*, उंच मांडणी *f.* २ (*obs.*) सत्ताधारी पुरुषाच्या सिंहासनावरील छत्र *n.*

Daisy (dā'-zi) [A. S. *dœges, eage*, eye of day i. e. the sun, which it resembles.] *n.* (हिंदुस्थानांतील वांदररोटी, रानतीळ, व माका यांच्या वर्गांतील) इंग्लंडांतील डेझी नांवाची वनस्पति *f*- फुलझाड *n.* २ डेझी नांवाचें फूल *n.* Daisied *a.* डेझी फुलांनीं युक्त-सुशोभित.

Dak, Dawk (däk, dawk) [Hindi dak, डांक.] *n.* डांक *f*, पोस्ट *n*, टपाल *n.* Dak-bunglow *n.* डाकेच्या-टपालाच्या टप्प्यावर असणारा वाटसरूस राहण्याचा बंगला *m*, डांकबंगला *m.*

Dakoit, See Dacoit.

Dale (dāl) [A. S. dœl a valley.] *n. a low place between hills* दरी *f*, खिंड *f*, खोरें *n.* [HILLS AND DALES. *compreh.* दरीखोरें *n*, दराखोरा *m.*] २ *a trough or spout to carry off water as from a pump* पाणी वाहण्याचें घंगाळ *n*-नळ *m.*

Dally (dal'-i) [M. E. *dalien*, to play, trifle.–O. Fr. *dalier*, to converse, chat.–cf Ger.(?) *dahlen*, to trifle.] *v. i.* ऐषआरामांत वेळ घालविणें, बायकी खेळांत-चैनींत-विलासांत-कालक्रमण करणें, रमणें. २ विलंब करणें. ३ रेंगाळणें, गोंजारणें. ४ कामचेष्टा(S.) *f*- विषयक्रीडा *f.* करणें. D. *v. t.* खोटी करणें, वेळ गमावणें. Dall'ied *pa. p.* Dall'iance, Dall'ying *n.* (v. V. I.) *act.* विलंब *m*, खोटी *f.* २ रमणें *n*, कामचेष्टा *f*, इष्कबाजी *f*, विषयक्रीडा *f*, विषयविलास *m*, विलास *m*, कामकेलि *f*, रमणूक *f*, हाव *m. pl.*, हेला *f*, विहार *m.* ३ उशीर *m*, खोळंबा *m*, टंगळमंगळ *f*, अळमटळम *m*, चेंगटाई *f*, हयगय *f.* ४ परस्पर गोंजारणें *n.* Dall'ier *n*, Dall'ying *pr. p.*, रमणारा, कामचेष्टा करणारा. २ गमणारा, घालघसऱ्या, कोणतीही गोष्ट दक्षतेनें व दूरवर विचार करून न करणारा.

Dalmatic (dal-mat'-ik) [Fr. *dalmatique*–L. *dalmatica* fem. of *dalmaticus*, belonging to Dalmatia.] *n.* रुंद बाह्यांचा व पोकळ असा 'मास' च्या वेळीं घालण्याचा डीकनांचा व बिशपांचा आंगरखा *m.* २ इंग्लंडांत राज्याभिषेकाचे वेळीं राजे घालतात तो आंगरखा *m.*

Dam ( dam ) [ Pol. *tama*, a dam, a dike. ] *n. embankment* बांध *m*, धरण *n*, बंधारा *m*, बंधारण *n*, जलवंधन *n*, धरण *n*, जलावरण *n*, तुंग *m*, तुंबा *m*. [DAMS, EMBANKMENTS, *compreh.* बांधबंधारा *m*, बांधबांधोळी *f*, मूळबांध *m*, ताल *f*, समुद्राचें पाणी शेतांत येऊं नये म्हणून हद्दीवर घातलेला बांध *m*. D. TO TURN OFF वळण *n*. FIELD (FOR RICE) FORMED BY A D. बांधण *n*. ] २ ( as in a field, across a road ) शेतबांधण *n*, मूळबांध *m*, ताल *f*. ३ भट्टीच्या तोंडावरचें विटांचें बांधण *n*. D. *v. t.* ( used with *in* or *out* ) बांधबंधारा *m*. बंधारा *m*. घालणें, बांधणें, बांध घालून तुंबवणें-थोपवणें. २ बंद करणें, अटकावणें. To D. out अडवणें, बंद करणें.

Dam ( dam ) [ See the word Dame.] *n*. जनावराची आई *f*, मादी *f*. २ ( in contempt ) ( मनुष्याची ) आई *f*, माता *f*.

Damage ( dam'āj ) [ M. E. *damage*,–A. Fr. *damage*, L. *damnatus pa. p.* of *damnare*, (*damnum*,) to condemn.] *n*. (शरीराचें-मालाचें-कीर्तीचें-अब्रूचें) नुकसान *n*, नुकसानी *f*, नाश *m*, अपाय *m*, हानि *f*, चट्टा *m*, *pl*. (*law*.) नुकसान *n*, नुकसानी *f*, नुकसानीचा पैसा *m*. ऐवज *m*. दंड *m*. D. *v. t.* नाश करणें, दुखविणें, खराबी करणें, बिघडवणें. D. *v. i.* नुकसान *n*-हानि *f*. होणें, नासणें. Dam'ageable *a*. नासायाजोगा, बिघडायाजोगा, नाशवंत, विनाशी. Dam'aged *pa. p.* जाया झालेला, नासलेला, खराब केलेला, जायबंदी. [THE D. AND SPOILED (GOODS) *compreh.* or नासका-कुचका-वाईटसाईट (जिन्नस, माल).]

*N. B.*—In Sanskrit works on Hindu Law, दंड is used for Damage. In English Law, Damages are ordinary, nominal & vindictive or exemplary. In old Hindu Law there was no such distinction so specifically drawn, though the distinction was for all practical purposes observed, as will be seen from the difference in the amount of damages severally mentioned. See for example, the Commentaries of विज्ञानेश्वर and अपरार्क on याज्ञवल्क्य's व्यवहाराध्याय first verse introducing the chapter of 'Assaults'. Ordinary damage योग्य-बेताचा-सर्वमान्य दंड *m*. Nominal D. हक्क प्रस्थापित करणारा दंड *m*. Exemplary D. धाक किंवा दहशत घालणारा दंड *m*, उत्तमप्रमाण दंड *m*. *i. e.* दंड which will serve a good example to others, *cf*. उत्तमसाहस दंड *m*.

Damar, See Dammar.

Damascene ( da'mas-ēn ) [ From Damascus in Syria. ] *n*. मनुका ( a kind of plum ).

Damask ( dam'ask ) [ M. E. *damaske*, cloth of Damascus-It. *damasco*–Heb. *dmeseq*, damask. *Dammeseq*, Damascus.] *n*. एक प्रकारचें रेशमी वेलबुट्टीचें-भरजरी-जरतारीचें कापड *n*, धुमास *n*. २ पाणीदार पोलाद *n*. ३ तांबडा लाल-गुलाबी रंग *m*. D. *v. t.* रेशमी वेलबुट्टीचे भरजरी कपडे करणें (as cloth), सुशोभित करणें, कापडावर वेलबुट्टी करणें. D. *a*. दमास्कसी गुलाबाच्या रंगाचा. २ दमास्कसमध्यें उत्पन्न होणाऱ्या वस्तूसंबंधीं.

Damaskeen' *v. t.* पोलादावर खोदकाम-नक्षीकाम करणें. २ सुशोभित करणें, वस्त्रावर वेलबुट्टी काढणें. Dam'askeen'ing, Damasceen'ing *n*. खोदकाम *n*, नक्षीकाम *n*, वेलबुट्टी काम *n*. Damaskin' *n*. दमास्कसच्या पोलादाची तलवार *f*- पातें *n*. Damask-colour *n*. दमास्कसमधील गुलाबाचा पक्का रंग *m*. Damask-plum *n*. मनुका *f*. Damask-rose *n*. एक प्रकारचें मोठें सुवासिक गुलाबाचें फूल *n*. Damask-steel *n*. दमास्कसचें पाणीदार-तीक्ष्ण व चिंवट पोलाद *n*. Dam'assin *n*. किनखाप *m*, जर *m*. Damascus blade *n*. दमास्कस येथें तयार होणारी पाणीदार तलवार *f*.

Dame ( Dām ) [ M. E. *dame*,–O. Fr. *dame*, a lady,–L. *domina* fem. of *dominus*, a lord.] *n*. बाई *f*, बाईसाहेब *f*, माईसाहेब *f*, मुख्य बाई *f*. २ बाई *f*, ( in general ) कोणतीही बाई *f*. ३ घरखटला चालविणारी बाई *f*, घरधनीण *f*, पोक्त बायको *f*. ४ सरदाराची बायको *f*. Dame-school *n*. मास्तरणीची शाळा *f*. Dame's violet *n*. एका प्रकारचें निशिगंधाचें झाड *n*.

Dammar ( dam'mar ) *n*. डामर *n*, डांबर *n*. Dammar black *a*. डामरासारखा काळा. Dammar-rock *n*. डामराचा खडक *m*.

Damn ( dam ) [ M. E. *damnen*, *dampnen*–Fr. *damner*–L. *damnare*, to condemn.] *v. t. to doom to hell* नरकांत टाकणें-घालणें-बुडवणें, नरकाचा दंड ठरविणें. २ *to cause the eternal punishment of* नरकास-अधोगतीस नेणें-पाठवणें. ३ दोष लावणें-ठेवणें, दोषी ठरविणें, स्पष्ट धिक्कार दर्शविणें ; as, "Do not D. them without hearing." ( Damn is sometimes used interjectionally, imperatively and intensively. ) D. *v. i.* ( नरकास जावो-अधोगतीस जावो असा ) शाप देणें, वाईट चिंतणें. D. *n*. (अधोगतीचा) शाप *m*. Dam'nable *a*. नरकांत टाकायाजोगा, नरकार्ह, दोषार्ह, निंद्य. २ धिक्कारयोग्य, अतिदुष्ट. Dam'nableness *n*. Dam'nably *adv*. Damnā'tion *n*. नरक *m*, अधोगति *f*, दुर्गति *f*, नरकवास *m*, अधःपात *m*. २ धिक्कार *m*. Dam'natory *a*. दोष लावणारा, नरकांत लोटणारा. Damned *p. a*. Damnif'ic *a*. उपद्रव देणारा, नुकसान करणारा, हानिकारक, अपायकारक. Damnificā'tion *n*. Dam'nify *v.t.* (R.) तोटा-नुकसानी करणें. Dam'ning *a*. दोष लावणारें, नरकाच्या दंडास पात्र करणारें, अधोगतीस नेणारें.

Damp ( damp ) [ cf. M. E. *dampen*, to suffocate. ] *a*. ( of things ) दमट, दामट, दमकट, ओलसर, अंबटओला, अर्धसुका, आंबसुका. [ To GET D. सरदणें, दमटणें, दमसरणें, थंडावणें, सादळणें.] २ ( of the air, places ) सरद, दमसर, दमट. ३ ( R. ) उदास, दिलगीर, खिन्न, नाउमेद, निराश, भग्नोत्साह. D. *n*. सरदी *f*, सरद हवा *m*. २ निराशता *f*, उदासीनता *f*, उत्साहभंग *m*, निराशा *f*, खिन्नता *f*. ३ *pl. mining* खाणींतील प्राणघातक वायु *m*. [CHOKE D. कार्बानिक आसिड ग्यास असलेली दूषित हवा *f*, प्राणहरवायु *m*. D. Sheet हवा खेळती रहाण्याकरितां व दूषित ग्यास काढून टाकण्याकरितां केलेला खाणींतला पडदा *m*.]

D. *v. t.* दमट-ओलसर करणें. २ ( विस्तव ) विझविणें. ३ उदास करणें, मरगळीस आणणें, निरुत्साही करणें, नरम-ढिला करणें-सुस्त करणें, हिरमोड *m*- उत्साहभंग *m*- आशाभंग *m.* करणें, उमेद खचविणें, विरजण *n*- पाणी *n.* घालणें, खिन्न करणें, निराश करणें. Damped *a.* दमट-ओलसर केलेला. २ हिरमोड केलेला, भग्नोत्साह. [To be D. हिरमुष्टी होणें. ] D. *v. i.* ओलसर होणें, मरगळीस येणें. Damp'y *a.* किंचित् ओलसर. २ किंचित् खिन्न. Damp'en *v. t.* & *v. i.* ओलसर करणें-होणें. २ उदास-खिन्न करणें-होणें. Damp'er *n.* दमट करणारा, खिन्न-हिरमोड करणारा, मोडणारा, मोड्या, उत्साहभंग करणारा, धीर खचविणारा. २ प्रतिबंधक पट. ३ गव्हांचें पीठ आणि पाणी यांचा राखेंत भाजलेला रोटगा *m.* Damp'ish *a.* आंबट ओला, असमळसा ओलसर, दमट, दमसर. Damp'ishness *n.* Damp'ly *adv.* Damp'ness *n.* किंचित् ओलसरपणा *m*, दमटपणा *m*, आंबसुकेपणा *m*, किंचित् आर्द्रता *f.* २ सरदी *f*, दमटसरपणा *m.* [To BE AFFECTED BY D. दमटणें, अतिशय भिजल्यामुळें व पाणी टाकल्यामुळें कुजणें-नासणें.] Damping off ( *bot.* ) अतिशय पाण्यामुळें झाडांचें मरण.

Damsel (dam'-zel) [M. E. *damosel*–O. Fr. *dameisele*, a girl–Late L. *domicellus*, a page. ] *n. young unmarried woman* बाला *f*, कुमारी *f*, मुग्धा *f*, अविवाहित तरुणी *f.* [A. D.'s CHILD, CELESTIAL D. परी, अप्सरा, सुरयुवती. ]

Damson (dam'zn) *n.* मनुका. Called also Damask-[plum.

Dance ( dans ) [ M. E. *dauncen*–O. Fr. *danser*–O. H. Ger. *danson*, to drag along ( as in a round dance. )] *v. i.* (तालावर) नाचणें, नाच *m*- नृत्य *n*- नर्तन करणें. [To D. AND SKIP ABOUT नाचूं उडूं लागणें. To D. ATTENDANCE ON (एखाद्याची मर्जी संपादन करण्याच्या हेतूनें त्याची) हांजीहांजी करणें, पुढेंपुढें करणें, हात जोडून सेवेस तयार राहणें *g. of o.* To D. FOR JOY अत्यानंदानें-हर्षें होऊन नाचणें, नागवा नाचणें, धोतर सोडून-टाकून-फेडून नाचणें, थैयथैय नाचणें. ] D. *v. t.* नाचविणें, नृत्य करविणें. Dance, Danc'ing *n.* नाच *m*, नृत्य *n*, नर्तन *n.* [D. IN A RING मंडलनृत्य *n*, रासनृत्य *n* D. WITH GESTICULATION तांडव. LIVELY AND MERRY D. थैथै-थैथैय्या नाचणें *n.* ] २ *mus.* चाल, गत *f* (नाचाची). Danc'ing *pr. a.* Danc'er *n.* नाचणारा, नर्तन-नृत्यकर्ता, नाच्या, नटवा. २ नाचरा. Dancing-girl *n.* कलावंतीण or कळवंतीण *f*, कंचनी *f*, नटी *f*, नर्तकी *f*, नायकीण *f.* [ATTENDANT ON D. भडवा. BELLS ON THE ANKLES OF A D. घुंगुर, घागऱ्या. MUSICIAN ATTENDANT ON A D. साजिंदा, (*in bad sense*) भडवा. ROBE WORN BY A D. पेशवाज *m*, पिस्वाद *m.* PRESENT MADE TO A D. WHILE DANCING मुजरा *m.* ] Dancing-master *n.* नृत्यशिक्षक *m.* Dance of death मृत्यूचें साम्राज्य *n.* Dancing-room *n.* नाचण्याचा अड्डा *m*, नृत्यशाला *f*, नृत्यमंदिर *n.* To dance on a rope or to dance on nothing फांशीं दिला जाणें, फांशीं जाणें. To lead one a pretty dance दुसऱ्यास त्रास देणें, नाडे नाचविणें. Saint Vitus's dance एक प्रकारचा रोग, कम्पवात.

*N. B.*—To dance attendance: in this phrase the allusion is to the ancient custom of weddings, where the bride on the wedding night had to dance with every guest & play the amiable though greatly annoyed. (Brewer.) St. Vitus's dance so called from the supposed power of St. Vitus over nervous and hysterical affections. ( Brewer. )

Dandelion ( dan-de-lī'un ) [ Fr. *dent*, tooth ; *de*, of & *lion*, lion.] *n.* एक प्रकारचें 'ड्यांडेलियन' नांवाचें विलायती फुलझाड *n.* हें आमच्याकडील रानतीळ, माका या वर्गांत मोडतें. २ 'ड्यांडेलियन' नांवाचें विलायती फूल *n.*

Dander ( dan'-dėr ) [ of Scotch origin. ] *n.* डोक्यांतला कोंडा *m*-भुसा *m*, दारुणा *m.* २ क्रोध *m.* ३ *Scot.* भट्टींतील निखारे. D. *v. i.* भटकणें. २ असंबद्ध भाषण करणें, तुटक तुटक बोलणें. To raise a person's dander एखाद्याला राग आणणें.

Dandle ( dan'dl ) [ Probably of imitative origin. *cf.* *dandola*, *dondola*, a toy. ] *v. t.* झेलणें, मांडीवर ( मुलाला घेऊन ) नाचविणें, लालन *n.* करणें. २ गोंजारणें, लाड करणें, (शीं) खेळत बसणें. ३ (*obs.*) *to put off by trifles* यःकश्चित् गोष्टींत वेळ मोडणें. Dan'dler *n.* लाड करणारा.

Dandruff, Dandriff ( dand'ruf, dand-rif ) [ of unknown origin. cf. Prov. E. *dan*, scurf & *drib* (?), driblet.] *n.* डोक्यांतला कोंडा *m*-भुसा *m.*

Dandy ( dan'-di ) [ origin unknown. Prov. E. *dandy*, gay, fine.] *n. a beau* पोषाखाची फाजील अक्कड करणारा, अक्कडबाज, नखरेबाज, छानछोक, ऐटीबाज. २ लहान शीड *n.* Dan'dify *v. t.* डामडौली दिसेल असा करणें. Dan'dily *adv.* अक्कडबाजीनें. Dandy-brush *n.* देवमाशाच्या हाडांचा खरारा *m.* Dandy-cock *n.* जावा बेटांतील एकजातीचा पक्षी *m.* Dandy-fever *n.* हाडमोड्या ताप *m.* Dandy-horse *n.* अतिवेगाची पायगाडी *f.* हिला दोन, तीन किंवा चार चाकें असतात. Dan'dyish *a.* अक्कडबाजासारखा. Dan'dyism *n.* अक्कडबाजी *f*, नटवेपणा *m*, नखरेबाजी *f.*

Dane ( dān ) *n.* डेन्मार्क देशांतील रहिवासी *m*, डेन मनुष्य *m.* Dane'gelt, Dane'geld *n.* हल्ले करणाऱ्या डेन लोकांना पैसे भरण्यासाठीं इंग्लंडदेशावर बसविलेला प्राचीन कर *m.* Dan'ish *a.* डेन लोकांचा. D. *n.* डेन लोकांची *f.*

Danger ( dān'-jėr ) [ M. E. *daungere*, power to harm –O. Fr. *dangier*, absolute power.–Late L. *dominus*, a lord. ] धोका *m*, संकट *n*, भय *n*, जोखीम *f*, भीति *f.* २ (of life) *jeopardy, exposure to peril* जीवितसंशय *m*, प्राणसंकट *n*, प्राणसंदेह *m.* [THE HOUR OF D. संकटसमय *m*, आपत्समय *m.* ATTENDED WITH D. जोखमी, संदिग्ध, धोक्याचें.] २ (*obs.*) दुसऱ्यास अपाय-उप-

द्रव करण्याची शक्ति f. ३ (obs.) अनर्थ m, अपाय m, संकट n, विपत्ति f. D. v. t. (Shakes.) जीव धोक्यांत घालणें. Dan'gerous a. संकटाचा, धोक्याचा, जोखमाचा, जोखमी, दुस्तर. २ भीतिप्रद, भयंकर. ३ जीवावरचें, विषम. ४ अपायकारक. Dan'gerously adv. धोक्यानें, भयानें. Dan'gerousness n. जोखमीपणा m, प्राणघातकपणा m. Danger-signal n. धोक्याचा-भयसूचक बावटा m,-निशाणी f. In one's danger एखाद्याच्या शक्तींतलें.

Dangle (dan'gl) [of Scandinavian origin. Danish *dingle*, to swing about.] v. i. to hang loosely ओळंबणें, ओळकंबणें, लोंबकळणें, लटकणें, ओळकंबा m-झोंका m-ओंबकळा m- झोंळकंबा m. घेणें-खाणें. [To D. ON A GIBBET फांसावर लोंबणें, फांशीं जाणें.] २ fig. to dangle (about or after) to hang upon importunately नादीं कच्छपीं-पाठीं लागणें g. of o., कासोटा m. धरणें g. of o. D. v. t. लोंबकावणें, झोंका देणें, हालवणें. Dan'gler n. Dan'gling pr. a. ओळंबणारा, ओळंबता, अवलंबी. २ दुसऱ्याच्या तंत्रानें वागणारा, कासोटा धरणारा, (स्त्रियांचे) नादीं लागणारा, (स्त्रियांसंबंधीं) नादिष्ट, नादी, नाद्या, नादखोर Dan'gling n.-act. झोंका देणें. n, ओळकंबणें n, ओळकंबा m, झोळकंबा m. २-act. कासोटा धरणें n, नादीं लागणें n. Dangled pa. t. Dan'gling pr. p.

Daniel (dan'yel) n. 'ड्यानीयल' नांवाचा हीब्रू लोकांचा भविष्यवादी m. २ शहाणा प्रामाणिक न्यायाधीश m. cf. रामशास्त्री m.

Dank (dank) [M. E. *dank*:—Swed. *dank*, marshy ground.] damp ओलसर, सर्द, सरद, दमट. D. n. moisture, humidity, water (obs.) ओलावा m, दमटपणा m, पाणी n. २ सरदी-सर्दी f. Dank'ish a. किंचित् ओलसर-दमट.

Dank (dank) [of Persian origin.] n. इराणांत चालू असलेलें डँक नांवाचें रुप्याचें लहान नाणें n.

Danseuse (dän-suz') [Fr. *danser*, to dance.] n. a professional female dancer नाचण्याचा धंदा करणारी कलावंतीण f, नायकीण f.

Dap (dap) [cf. dip.] v. i. पाण्यांत हळूंच गरी-गळ टाकणें.

Dapper (dap'-ér) [Dutch *dapper*, brave, hence fine, spruce.] a. चलाख आणि ठेंगणा, ठुसका, ठेंगणारेंगणा, सुबक, सुटसुटीत, खुटखुटीत, लहानसर, अटोपसर, नीटनेटका, पोषाखांत व दिसण्यांत टापटिपीचा, व्यवस्थेशीर. Dapp'erling n. चिटलिंग m, चिमखडा m.

Dapple (dap'-l) [The original sense is 'a little pool' from Norwegian *dape*, a poll, a wet splotch.] a. marked with spots of different shades of colour, spotted अबलख, चित्रवर्णी, दुरंगी, पंचरंगी; as, "A dappled horse." D. v. t. to variegate with spots अबलख करणें, चित्रविचित्र करणें. Dapp'erly adv. चित्रविचित्र स्थितींत. Dapple bay a. सारंगी (रंग).

Dare (däer) [M. E. *dar*, I dare. p. t. *dorste*, *durste*, cf. Gr. *thrasein*, to be bold. Sk. धृष्, to dare.] v. i. to have adequate or sufficient courage आवश्यक धीर m -धैर्य n -हिय्या m-हिम्मत f. असणें. in. con., with g. of o., अंगीं साहस असणें, छाती असणें. २ to venture, not to be afraid धजणें. D. v. t. to venture to do or to undertake, to attempt courageously छातीनें-धैर्यानें (एखादें काम) हातीं घेणें. २ to challenge, to provoke, to defy ईर्षेनें-पैजेनें-छातीवर हात ठेऊन सांगणें, आव्हान करणें, पुढें ये असें म्हणणें, तुच्छ करणें-मानणें. D. n. (R.) venturesomeness, boldness, dash, challenge, defiance हिम्मत f, बहादुरी f, अवगणना f, आव्हान n. Dare-devil n. a reckless fellow धाडसी-अविचारी मनुष्य. Dare'ful a. (R.) Dar'ing pr. a. bold, fearless, adventurous धीट, साहसी, साहसबुद्धीचा, आगींत उडी घालणारा, संकटें वगैरे तुच्छ मानणारा. (R.) Dar'ing n. boldness, adventurousness धार्ष्ट्य n, धिटाई f, धारिष्ट n, साहस n. २ a daring act साहसकर्म n. Dar'ingly adv. धिटाईनें, धीटपणानें, धजून, छातीनें. Dar'ingness n.

*N. B.*—The present tense *dare* is really an old past tense so that the third person is *he dare* (cf. *he shall*, *he can*); but the form *he dares* is now often used and will probably displace the obsolescent *he dare*, though grammatically as incorrect as *he shalls* or *cans*. Formerly *durst* was also used as the present. Sometimes the old form *dare* is found for *durst* or *dared*.

Darg (däɹg) [A Scotch word meaning day-work.] n. a day's work रोजकाम n. २ Scot. नेमून दिलेलें काम n.

Dark (däɹk) [M. E. *derk*.] a. destitute of light अंधाराचा, काळा, अंधकारमय, अंधकारयुक्त, तमोमय, काळाकुट्ट, काळाकभिन्न, गहिरा, (कोणत्याही) गर्द रंगाचा. [A D. NIGHT काळोखी रात्र f, काळी रात्र f, अमावास्येची काजळी रात्र f. PITCH D. गुरू-डू-प-ब-अंधार m.] २ obscure अस्पष्ट, दुर्बोध, गहन, दुर्ज्ञेय, गुप्त; as, "A. D. meaning". ३ destitute of knowledge and culture, in moral or intellectual darkness अज्ञानांत मग्न झालेला, अज्ञानाचा, अडाणी, अज्ञानांधकाराचा. ४ atrocious, wicked निर्दय, क्रूर, जंगली, दुष्ट; as, "A. D. deed." ५ foreboding evil, gloomy उदास, उदासी, भयानक, भयंकर, अरिष्टसूचक, संशयोत्पादक. [IN THE D. HOURS OF ADVERSITY आपत्तीच्या वेळीं, आपत्तींतील अत्यंत भयंकर वेळीं.] ६ (obs.) आंधळा. [D. IN SOUL तमोवृत्ति, पापात्मा. D. THOUGHTS पापसंकल्प.] D. n. absence of light, darkness अंधार m, तम n, अंधकार m, तिमिर m, काळोख n. २ dark half of a month कृष्णपक्ष m. ३ condition of ignorance अज्ञान n, अंधार fig. m. ४ secrecy गुप्तता f, गूढपणा m. ५ (fine arts) a dark shade in painting, &c. छाया f, काळसरपणा m. D. v. t. (obs.) to make dark or black अंधार-काळोख करणें,

अंधकारमय-युक्त करणें, काळा-काळसर करणें. Dark'en *v. t. to make dark* अंधार-काळोख करणें, काळें-काळसर करणें. २ *to make dim* अंधळा करणें, अंधक करणें. ३ *to make gloomy* उदास-खिन्न करणें. ४ *to render ignorant* अज्ञानावृत करणें. ५ *to render less clear* समजेनासा-गहन-दुर्बोध-कठीण करणें. ६ *to tarnish* मळविणें, कलंक लावणें. D. *v. i. to grow dark* अंधकार होणें-पडणें. Dark'ish *a.* काळा, काळवट, काळसर, सांवळा, श्यामल. Dark'le *v. t. to grow dark* अंधकार होणें-पडणें. The dark horse (*colloq.*) ज्याच्या चपळतेची कोणालाच माहिती नाहीं असा शर्यतीस आलेला घोडा *m*, अज्ञातगुण-काळा घोडा *m*. २ ज्याच्या हुशारीची कांहींच माहिती नाहीं असा (पार्लमेंट सभेचा) नवीन उमेदवार *m*. Dark-room *n.* अंधारकोठडी *f*, वेड्यांना कोंडून ठेवण्याची अंधाराची खोली *f*. Dark-lantern *n.* ज्योत हवी तेव्हां झांकतां येण्याजोगा-काळा कंदील *m*. The dark Ages इ. स. ५०० पासून १५०० पर्यंतचा युरोपांतील (विद्या) प्रगतिशून्यत्वाचा काल *m*, कृष्णयुग *n*. The dark day इ. स. १७८० च्या मे महिन्याची १९ वी तारीख. या दिवशीं अमेरिकेंतील सगळ्या न्यूइंग्लंडभर काळोख पडला होता. Dark'ling *adv.* (*poet.*) काळोखांत; as, "So out went the candle, and we were left D." Dark'lings *adv.* काळोखांत. Dark'ling *a. becoming dark, gloomy* काळा होणारा, खिन्न होणारा. २ काळा, खिन्न. Dark'ly *adv.* अंधुकपणानें, अंधारांत, अनिश्चितपणें. ३ *with a dark, gloomy or cruel look* रागानें, क्रूरपणानें, दटावून. Dark'ness *n.* अंधकार *m*, काळोख *m*, काळोखी *f*, तम *n*, तिमिर *n*. [PITCH D. THICK D. काळोखमेट, अंधार गुडुप, अंधतम, घनांधकार *m*, भिन्न काळोख *m*.] २ *a state of ignorance* अज्ञानांधकार *m*. ३ *secrecy* गुप्तपणा *m*, गूढता *f*, गहनता *f*. ४ *a state of distress or trouble* आपत्ति *f*. [PRINCE OF D. नरकाचा अधिपति *m*, सैतान *n*.] ५ काळसरपणा *m*, काळेपणा *m*, काळसांवळेपणा *m*. ६ *want of clearness or perspicuity* अस्पष्टता *f*. Dark'some *a.* अंधक (अंधुक), शून्यप्रकाश, अल्पप्रकाश, न्यूनप्रभ. Dark'y, Dark'ey *n. slang* शिद्दी *m*. Dark-slide *photo.* अंधक सरकणी *f*. To keep dark मौन धरणें. To keep in the dark गुप्त ठेवणें, बाहेर न फोडणें. The darkest hour is that before the dawn पहांटेपूर्वी गाढ काळोख असतो. *cf.* नशीबाचें चक्र अगदीं खालीं गेलें म्हणजे तें पुन्हां वर येतेंच. जेव्हां वस्तुस्थिति अगदीं निकृष्ट होते तेव्हां सुधारणेस प्रारंभ झालाच पाहिजे, चक्रनेमिक्रमन्याय. To leap in the dark ज्याच्या परिणामाविषयीं खात्री नाहीं अशा कामांत उडी घालणें, *lit.* काळोखांत उडी घालणें. To view with darkened eyes डोळे उघडून न पहाणें. २ दूषित मनानें विचार करणें. (*fig.*) दूषित दृष्टीनें पहाणें *fig.*

Darling (där'-ling) [M. E. (?) *derling*, A. S. *deorling*; *deor*, dear and *ling.*] *a. dear, beloved, favourite* आवडीचा, आवडता, लाडका, ममतेचा, प्रीतीचा, लडिवाळ, प्रिय, प्यारा, जिवलग. D. *n. one dearly beloved, a favourite* जिवलग *m*, जिवप्राण *m*, प्राण *m*, जिवींचा जिव्हाळा *m*, गळ्याचा-गळ्यांतला ताईत *m*, कंठमणी *m*, लाडका-आवडता मनुष्य *m*, बहिश्चर प्राण *m*.

Darn (däɹn) [M. E. *dernen*, to conceal—A. S. *derne, dyrne*, secret, hidden.] *v. t. to mend with interlacing stitches of yarn or thread* रफू करणें, (दोरे भरून) भोंकें बुजविणें. D. *n.* रफू केलेला कापडाचा भाग *m*. Darned *a.* रफू केलेला. Darn'er *n.* रफू करणारा *m*, रफूकरी *m*, रफूगार *m*. Darn'ing *n.* रफू *m*, तुणणें *n*. [PRICE OR COST OF D. तुणणावळ *f*.]

Dart (däɹt) [M. E. *dart*.—O. Fr. *dart*—O. H. Ger. *tart*, a dart.] *n. a pointed missile, weapon* फेंकून मारण्याचें हत्यार *n*, प्रास *m*. २ *a short lance, javelin* बरची *f*, भाला *m*. ३ तीर *m*, शर *m*, बाण *m*. ४ *any thing that pierces or wounds like a dart* हृदयभेदणारा पदार्थ *m*. ५ एक प्रकारची मासळी *f*. D. *v. t.* फेंकणें, टाकणें, मारणें. २ सोडणें. D. *v. i.* (बाणाप्रमाणें) निसटणें, सण्कन् निघून जाणें. Dart'er *n.* बाण *m*-भाला *m*-बरची *f*- इ. फेंकणारा. २ अमेरिकेंतील "स्नेकबर्ड' नांवाचा पक्षी *m*. ३ 'डार्टर' नांवाचा मासा *m*. Dart'ingly *adv.* (बाणाप्रमाणें) वेगानें, सण्कन्.

Dash (dash) [M. E. *daschen*. *cf.* Low. Ger. *daschen*, to thrash.] *v. t. to throw with violence or haste*, आदळणें, आपटणें. २ *to shatter, to ruin* फोडणें, तुकडे तुकडे करणें-उडवणें. *g. of o.*, नाश करणें. ३ *to put to shame* लज्जित-शरमिंदा-खिन्न करणें, (चा) उत्साहभंग करणें; as, "Dash the proud gamester in his gilded car." ४ *to adulterate* भेळ *f*- मिसळ *f*, घालणें-घालून बिघडविणें; as, "To D. wine with water." ५ *to cancel* फांटा *m*. मारणें-देणें, खोडणें, रेघ *f*. मारणें. ६ *to throw water in splashes* शिंतोडे उडविणें. D. *v. i. to strike against* आदळणें, आपटणें, धडकणें. २ *to splash up* (as liquid) उसळणें, डचडच उडणें. ३ (at, amongst, through, away) उसळणें, उसळी *f*. मारणें-खाणें, धडाक्यासरसा-धडकून-झपाट्यानें जाणें-शिरणें. ४ (*with down*) कोसळणें, ढांसळणें. Dash, Dash'ing *n.* आदळणें *n*, आपटणें *n*, टक्कर *f*. [D. AND BANGING ABOUT आदळआपट.] २ *a sudden check* धक्का *m*, धपका *m*. ३ *adulteration* भेळ *f*, मिसळ *f*. ४ *a sudden rush* उसळी *f*, मुसांडी *f*, सुरकांडी *f*. ५ *a vain show* अवडंबर *n*, ऐट *f*, भपका *m*, टामटूम *f*. ६ लिहिण्यांतील किंवा छापण्यांतील खूण *f*. (—), जोडरेघ *f*. ७ धसरा *m*, झटका *m*. ८ *energy in style or action, animation* पाणी *n*, तरतरी *f*, धीटपणा व तरतरी *f*, तडफ *f*, चलाखी *f*. Dash'ing *p.a.* धसकनंदन, धसक्या, रंगेलमर्द, रगेला. २ भपकेबाज, दिखाऊ, ऐटबाज. Dash-board *n.* अटकफळी *f*, घोड्याच्या खुरानें उडालेलें पाणी, चिखल वगैरे थांबविण्याकरितां गाडीच्या पुढच्या आंगाला लाविलेली फळी *f*. Dash'er *n.* आपटणारा, आदळणारा. २ डामडौली माणूस *m*. Dash'ingly *adv.*

(*colloq.*) थाटानें, थाटमाटानें, ऐटीनें. Dash-pot *n.* हिसका सोसणारें भांडें (कार्लिस एन्जिनमध्यें), एखाद्या यंत्रांत एकदम फाजील गति उत्पन्न होऊं नये म्हणून केलेली योजना *f*- रचना *f.* Dash-wheel *n.* कापसाचीं वस्त्रें धुण्याची चक्राकृति पेटी *f.* To dash off खरडणें, झोडणें; as, "To D. off a sermon or an article." A dash of the pen लेखणीचा फराटा *m*-फांटा *m*- झटका *m.*

Dastard (das'te.d) [M. E. *dastard*, cf. Ice. *dæstr*, exhausted, breathless.] *n. one who meanly shrinks from danger, an arrant coward* भितरा मनुष्य *m.* D. *a.* भितरा, भ्याड, नामर्द, लंडी, भागूबाई. Das'tardness, Das'tardliness, Das'tardy *n.* भितरेपणा *m*, भागूबाईपणा *m.* Das'tardly *adv.* भितरेपणानें, नामर्दपणानें, भागूबाईपणानें.

Dasymeter (da-sim'ē-tėr) [Gr. *dasys*, rough + meter.] *n. an instrument for testing the density of gases, consisting of a thin glass globe which is weighed in the gas or gases, and then in an atmosphere of known density* वायूचें घनत्व किंवा दार्ढ्य मापण्याचें यंत्र *n*, घनत्वमापक *m.* ह्यालाच कित्येक भौतिकशास्त्री भारदर्शक (baroscope) असें म्हणतात.

Data (dā'tä) [L.] *n. pl.* Datum *sing.* पूर्वपक्ष *m*, प्रतिज्ञा *f*, निर्दिष्ट *n*, गृहीत *n*, स्वीकृतपक्ष *m*, उपन्यास *m*, (वादांत किंवा सिद्धांतांत मूलभूत) धरलेली गोष्ट *f*- विषय *m*, दिलेलें *n*, दत्त *n.*

Date (dāt) [M. E. *date*–Fr. *date*–Late L. *data*, a date. L. *data*, given.–L. *dare*, to give. cf. Sk. दा, to give. Date is that addition to a writing, inscription, coin &c. which specifies the time (as day, month & year) when the writing or inscription was given or executed or made.] *n.* तारीख *f*, मिति *f*, तिथि *f.* [ACTUAL OR TRUE D. नक्की मिति *f*, वाजवी मिति *f.*] २ काळ *m*, समय *m*, वर्ष *n*, दिवस *m.* [TO FIX OR APPOINT FOR A CERTAIN D. ठरविणें, ठेपविणें. TO BE FIXED *for* &c. ठेपणें, ठरणें.] ३ (*obs.*) *assigned end* अंत *m*, शेवट *m.* ४ (*obs.*) *given length of life, duration* मुदत *f*, आयुष्य *n*, कालमर्यादा *f.* D. *v. t.* तारीख *f*- मिति *f.* मांडणें-लिहिणें-धरणें-मोजणें. २ *to note or fix the time of* नक्की काळ ठरविणें. D. *v. i.* (with *from*) पासून काळास आरंभ होणें, (ची) काळगणना *f.* होणें. Date'less *a.* बिनमितीचा, बिनतारखेचा. To go out of date माजी पडणें, शिळा-जुना होणें. Up to date आजतागाईत-पर्यंत.

Date (dāt) [M. E. *date*–O. Fr. *date*.–L. *dactylum* acc. of *dactylus*.–Gr. *dactulos*, a finger, perhaps through Arabic *dagal*, a palm-tree.] *n.* खजूर *m*, खारीक *f*, खजूरी *f.* २ the fruit खजूर *m*, the stone or seed आंठी *f*, बीं *f.* [WILD D. TREE शिंद *f*, शिंदी *f.* D. PLUCKED AND DRIED WHILST IMMATURE खारीक *f.* LUMPED D.s पेंडखजूर *m.* NOT LUMPED D. जायदी खजूर *m.* SPIRITUOUS EXUDATION FROM THE WILD DATE-TREE शिंदी *f.*] Date-palm *n.* खजूरीचें-खारकेचें झाड *n.* Date-tree *n.* खजूराचें झाड *n.* Date-sugar *n.* खजूरीपासून केलेली साखर *f.*

Dative (dāt'ive) [See Date.] *a. gram.* संप्रदानासंबंधीं, चतुर्थी विभक्तीचा. २ *law.* (*a*) *appointed by public authority* सरकाराकडून नेमलेला, राजनियुक्त; as, "An executor-dative." (*b*) *in one's gift, capable of being disposed of at will or pleasure* (च्या) पूर्ण मालकींतला-अधिकारांतला; as, "A D. office." (*c*) *given by magistrate as distinguished from being cast upon a party by the law* माजिस्त्रेटानें दिलेला. D. *n.* संप्रदान *n*, चतुर्थी विभक्ति *f.*

Datum (dā'tum) See Data.

Datura (da-tū'-rä) *n.* धोतरा *m*, धत्तूर *m.*

Daub (dawb) [M. E. *dauben*–O. Fr. *dauber*, to plaster–L. *dealbare*–L. *de*, down & *albare*, to whiten.] *v. t. to smear with soft adhesive matter, to besmear* लेपणें, लेपडणें, भरवणें, सारवणें, माखणें, चितडणें. २ *to paint in a coarse or unskilful manner* रंग लेपडणें. ३ *to put on without taste, to deck gaudily* व्यर्थ भपक्याचा पोशाख करणें. ४ (R.) *to flatter excessively or grossly* खुशामत करणें. ५ *to cover with specious or deceitful exterior* कपटवेष देणें, भलतेंच सोंग देणें. D. *v. i. to smear* लेपटणें, चोपडणें. २ *to play the flatterer* स्तुतिपाठक होणें-वनणें. D. *n.* लेप *m*, विलेपन *n*, लपटा *m*, चिकटा *m.* २ *a picture coarsely executed* भरकटीत रंगविलेलें चित्र *n.* Daub'er *n.* लिंपणारा, ओबडधोबड चित्र रंगवणारा. २ छापण्याची शाई लावण्याकरितां चिंध्यांचा केलेला बोळा *m*, लावणें *n.* ३ हांजीहांजी करणारा *m.* Daub'y *a.* चिकण, चिकट, चिकचिकीत.

Daughter (daw'-tėr) [M. E. *doghter*, *dohter* cf. Sk. दुहितृ.] *n.* मुलगी *f*, कन्या *f*, तनया *f*, सुता *f*, लेंक *f*, पुत्रिका *f*, चिरंजीवी *f*, तनुजा *f*, आत्मजा *f*, नंदिनी *f*, (R.) in endearment कन्यारत्न *n*, छोकरी *f.* २ *a son's wife* सून *f.* Daugh'ter-in-law *n.* सून *f*, स्नुषा *f*, पुत्रजाया *f.* Daugh'terliness *n.* कन्याधर्म *m.* Daugh'terling *n.* लहान मुलगी *f.* Daugh'terly *adv.* कन्याधर्मतत्पर, कन्येला शोभेल असें.

Dauphin (daw'-fin) [Fr. *dauphin*–L. *delphinum* acc. of *delphinus*, a dolphin–Gr. *delfi* stem of *delfis* a dolphin.] *n.* फ्रान्स देशच्या राजाच्या वडील मुलाची पदवी; हा मुलगा गादीचा लगत वारस असतो. इ. स. १८३० च्या राज्यक्रांतीनंतर ही पदवी बंद पडली.

Davit (dā'vit or dāv'it) [Perhaps of Hebrew origin.] *n. naut.* जहाजावरील काटकोनी तरफ *f.* (ही जहाजावरील होडी वर ओढतांना किंवा खालीं सोडतांना ती जहाजाच्या बाजूस घासूं नये म्हणून हातरहाटाप्रमाणें पुढें केलेल्या दोन खांबांच्या पाण्याचे बाजूस कलती केलेली असते.)

Davy, Davy-lamp (dā'-vi, dā'-vi-lamp) *n.* रक्षकदीप *m-* दिवा *m.* हा सर हंफ्रे डेव्ही यानें शोधून काढला.

Dawdle (daw'-dl) [cf. *Dadle.*] *v. i. to trifle* गमणें, वेळ काढणें, विरंगुळणें, रमणें. D. *v. t.* वेळ व्यर्थ दवडणें. Daw'dler *n.* गमणारा, मुद्दाम चेंगटपणा करणारा. Daw'dling *n.* गमणें *n,* वेळ काढणें, &c. Daw'dlingly *adv.* वेळ काढीत.

Dawk (dawk) [Prov. E. *dauk*, to cut or pierce with a jerk.] *v. t. to cut or mark with an incision* पक्की खूण *f-* कायमची खूण करणें. D. *n.* लांकडांतील ढोल *f-* फट *f-* चीर *f.*

Dawk (dawk) [Hindi *dak*, post.] *n.* डाक *f,* टपाल *f.*

Dawn (dawn) [See *Day.*] *v. i.* उजाडणें, उजेडणें, फटफटणें, फटफटीत होणें, तांबडें फुटणें, अरुणोदय होणें, पहाट *f.* होणें. [D. BRIGHTLY, D. GLOWINGLY दिशा *f.* फांकणें, दिशा उजळणें, भणभणणें.] २ *fig.* उदय पावणें, दिसूं लागणें, पसरणें. D. *n.* Dawn'ing *n.* पहांट *f,* अरुणोदय *m,* उषःकाल *m,* दिनमुख *n,* प्रभात *f.* [AT THE PEEP OF D. उजाडतांक्षणीं, उजाडतां. EARLY D. सुप्रभात *f.* FIRST GLIMMERINGS OF D. झुंजूमुंजू *n,* झुंझुर-कें-कट *n.* TIME OF D. उजाडताकाळ *m,* प्रभातकाळ *m,* प्रातःकाळ *m,* उषःकाळ *m.*] २ *fig.* उदय *m,* प्रारंभ *m.*

Day (dā) [M. E. *day, dai, dæi.* cf. A. S. *dæg.* cf. Sk. दह्, to burn. *Day* is the hot bright time as opposed to night.] *n.* उजेडाचा काळ *m,* दिवस *m,* दिन *m.* [SOLAR DAY वार *m,* LUNAR DAY तिथि *f.*] २ *those hours allotted by usage or law for work* काम करणाराचे ठराविक तास; इतके तास काम केलें म्हणजे एक दिवस समजला जातो, रोज *m.* ३ काळ *m;* as, "The great men of this day." ४ (*the day*) (लढाई वगैरेचा) विशेषदिवस *m;* as, "His conduct won the day." [ADVANCING D. चढती वेळ *f.* ALL THE D. LONG दिवसभर. BLIND BY D. दिवांध. BY D. AND NIGHT रात्रंदिवस, निशिदिनीं, अहोरात्र, अहर्निश. CLOSE OF THE D. दिनांत. DAY AND NIGHT रात्रंदिवस, अहोरात्र, अष्टौप्रहर. DECLINING D. उतरती वेळ *f,* उतार-दिवस *m.* HALF OF THE D. दिवसाचें पूर्वार्ध *n,* उत्तरार्ध *n,* एक वेळ *m.* DURING OR THROUGH ONE HALF OF THE D. वेळभर. FINE D. सुदिन *m,* निरभ्र दिवस *m.* FINE DAYS निखरणीचे दिवस. FOUL DAY दुर्दिन *m.* IN OPEN D. दिवसा ढवळ्या. OF A FULL OR WHOLE DAY दिवसा-मन्याचा, सबंध दिवसाचा. PAY OF A D. रोजचा पगार *m,* रोजमुरा *m.* WHILST IT IS D. सूर्य उजेडीं, दिवसा उजेडीं, दिवस घेऊन. TO GO DOWN (THE D.) दिवस धारेवर जाणें.] ५ रोज *m,* वासर *m,* एकाह *m,* एक-रात्र *f,* अहोरात्र *f.* [SOME OF THE TERMS FOR THE PERIODS INTO WHICH THE DAY IS DIVIDED ARE:— अरुण, उषःकाल, गर्गाचार्याचा मुहूर्त, गोधूल OR गोरज, ब्राह्मण-मुहूर्त, अभिजिन्मुहूर्त OR अभिजित्, रामपहरा, कुतप, शिवमुहूर्त, राक्षसवेळ, AND अमृतवेळ, उद्वेगवेळ, रोगवेळ, लाभवेळ, शुभवेळ. AUSPICIOUS D. शुभदिवस *m,* मंगलकारक दिवस *m.* AUSPICIOUSNESS OF THE D. दिनशुद्धि *f,* सुमुहूर्त *m.* D. AFTER D. दिवसानुदिवस, दिवसेंदिवस, दिवसोदिवस, रोज, नेहमीं, दररोज. EATING D. जेवणवार *m.* EVERY D. रोजचेरोज, दररोज, आलादिवस. EVERY OTHER D. एक दिवस आड, एकांत्राड. EVIL DAYS, DARK AND BLIND DAYS आपत्काल *m.* FROM THIS DAY आजपासून. HAPPY D. (*faustus dies.*) सोन्याचा दिवस *m,* सुदिन *m,* सुदिवस *m.* HIRE OR WAGES FOR A D. रोजी, रोजची मजुरी *f.* INAUSPICIOUS D. अशुभ दिवस *m,* कुदिन *m,* वर्ज्यदिवस *m.* NOW-A-DAYS आजकाल, अलीकडे. ODD DAY आडदिवस *m,* आडवार *m.* ON THE D. AFTER दुसऱ्या दिवशीं. ON THE D. BEFORE आदल्या दिवशीं, काल. ON THE THIRD D. (PAST OR FUTURE) तेरवां. ON THE FOURTH D. परवां. PERSON EMPLOYED BY THE D. रोजकरी, रोजदार. ROSTER OR ROTATION D. पाळीचा दिवस *m-* वार *m.* THROUGH THE D. ALL THE D. एकरात्र, आठौं प्रहर, अष्टौ प्रहर, अहोरात्र, दिवसभर. TRIDUUM त्रिदिन *m,* त्रिरात्र *f,* त्रिरात्री *f.* TO DAY आज, आजचा दिवस *m,* अद्य. TO-MORROW उद्यां, उदयीक. THE NEXT DAY, ALSO THE DAY BEFORE YESTERDAY परवां. THE THIRD DAY (PAST OR FUTURE) तेरवां. THE FOURTH DAY परवां. UNLUCKY D. दुर्दिन, वाईट-खऱ्याळ दिवस. UP TO DAY आजपर्यंत, आजपावेतों, आजतागायत. TO WIN THE D. शेर होणें, जय-यश पावणें.] ६ ऐतिहासिक काळ *m.* ७ *pl.* आयुष्य *n.* ८ लढाईचा दिवस *m.* ९ नेमलेला दिवस *m-* काळ *m.* १० उत्सवकाल *m.* Day-bed *n.* (*Shakes.*) पर्यंक *m,* मंच *m,* आसन (S.), पलंग *m.* Day-blindness *n.* दिवांधत्व *n,* दृष्टिदोष *m.* याच्या योगानें अंधक प्रकाशांत वस्तु स्पष्ट दिसतात. Day-book *n.* रोजखरडा *m,* रोजकीर्द *f.* Day-break *n.* प्रातःकाल *m,* प्रातःसमय *m,* अरुणोदय *m,* उषःकाल *m.* Day-coal *n.* कोळशाच्या खाणींतील वरचा थर *m.* Day-dreams *n.* मनोराज्य *n.* Day-dreamer *n.* मनोराज्य करणारा. Day-fly *n.* एकच दिवस जगणारी गोड्या पाण्यांतील माशी *f.* Day-labour *n.* दिवसमजुरी *f,* रोजमजुरी *f.* Day-labourer *n.* रोजदार, रोजमजुऱ्या, मजूर *m.* Day-light *n.* दिवसाचा उजेड *m,* सूर्यप्रकाश *m.* [AT D. उजेडतां.] Day-lily *n.* दिवसा फुलणारें किंवा एकच दिवस ज्याचें आयुष्य आहे असें फूल *n.* Day-long *n.* सर्व दिवसभर. Day-peep *n.* उषःकाल *m,* सूर्योदय *m.* Day-owl *n.* दिवसा उडणारा घुबड *m.* Day-school *n.* दिवसाची शाळा *f.* Day-sight *n.* सूर्यप्रकाशानेंच केवळ चालणारी दृष्टि *f,* रातांधळें *n.* Day'sman *n.* पंच *m,* तिऱ्हाईत *m,* मध्यस्थ *m,* लवाद *m.* Day-star *n.* प्रभातनक्षत्र *n,* शुक्राचा तारा *m.* Day-time दिवस (as opposed to night). Day-wearied *a.* दिवसभर काम करून थकलेला. Day-work *n.* दिवसाचें काम *n.* Day of doom झडतीचा-निवाड्याचा दिवस *m.* Dai'ly *a.* रोज, नित्य. D. *adv.* दरदिवशीं. D. *n.* दैनिक-आह्निक वर्तमानपत्र *n,* दैनिक *n.* A day after the fair वरातीमागून घोडें, फार उशीरां. "I have had my day" माझे तारुण्याचे

सुखाचे दिवस गेले, मीं सुखाचे दिवस पाहिले आहेत. To-day a man and to-morrow a mouse आज राव, उद्या रंक. Days of grace हुंडीची मुदत भरल्यावर फेड करण्याकरितां जी (तीन दिवसांची) जास्त मुदत देतात ती, 'तीन दिवस गलासचे.' Astronomical day मध्याह्नकाळापासून मध्याह्नकाळापर्यंतचा दिवस *m*, ज्योतिषदिन *m*. Mean solar day मध्यम सौरदिन *m*. Sidereal day नक्षत्रमानाचा दिवस *m*, नाक्षत्रसावन दिवस *m*. Civil day मध्यरात्रीपासून मध्यरात्रीपर्यंतचा दिवस *m*, इंग्रजी व्यावहारिक दिवस *m*. Jewish day दोन सूर्यास्तांमधील काळ *m*.

Daze (dāz) [M. E. *dasen*, to stupefy. Swed. *dasa*, to lie idle.] *v. t. to stupefy with excess of light, with a blow, cold or with fear* दिपवणें, चकवणें, चकित करणें, थक्क करणें.

Dazzle (daz'l) [Frequentative of *daze*.] *v. t. to bewilder with display or brilliancy of any kind* दिपवणें, दिपवून सोडणें. २ *to overpower with light* (शोभेनें-तेजानें) चकित करणें. D. *v. i. to be intensely bright* दिपणें, चकाकणें. ३ *to be confused by excess of brightness* तेजानें चकित-थक्क होणें, गोंधळून जाणें. D. *n. a light of dazzling brilliancy* दिपविणारें तेज *n*, चकचकाट *m*, झकझकाट *m*. Dazz'ler *n*. Dazz'ling *a*. दिपवणारा, तेजःपुंज. Dazz'lingly *adv*.

De (dē) [A Latin prefix.] De हा उपसर्ग ल्याटीन भाषेंतून घेतला आहे व ह्याचे अर्थ 'पासून', 'खालीं', 'दूर' असे आहेत; as, in Debark, Decline & Decamp. फ्रेंच भाषेंतून आलेल्या शब्दांत De याचा अर्थ Dis किंवा 'भिन्न,' 'वेगळाला' असा आहे. Derange, Deform इत्यादि शब्दांत De ह्या उपसर्गाचा अर्थ 'नकार' किंवा 'विरोध' ह्या उभयार्थी आहे. Deprave, Despoil, Declare, Desolate इत्यादि शब्दांत De याचा अर्थ 'आधिक्यसूचक' असा आहे.

Deacon (dē'-kn) [M. E. *deken*; A. S. *diacon*—L. *diaconus*–Gr. *diakonos*, a servant, a deacon.] *n*. बिशप व प्रीस्त यांचा दीक्षा दिलेला सहकारी, डीकन *m*. २ ख्रिस्ती एक्क्लेसियेंतील (चर्च) आचार्यांचा तिसरा वर्ग *m*. ३ प्रेसबिटेरियननामक ख्रिस्ती धर्मपंथांत 'मिनिस्टर' आणि 'एल्डर्स' यांच्या खालच्या दरजाचा सहकारी. याच्याकडे देवालयाच्या वतीनें गरीबांना साहाय्य करण्याचें काम असतें. Dea'coness *n*. (चर्चचें कांहीं काम करण्याकरितां नेमलेली) डीकनीण *f*. Dea'con-hood *n*. डीकनचा हुद्दा *m*. Dea'conry, Dea'conship *n*.

Dead (ded) [M. E. *deed*. A. S. *dead*, dead.] *a. deprived of life* मेलेला, मृत, गत, मयत, प्राणविरहित-विहीन. [SOME COVERT OR SOFTENING TERMS USED IN MENTIONING *a dead person* ARE:—वैकुंठवासी (IF HE HAD BEEN A WORSHIPPER OF VISHNU), कैलासवासी (IF A WORSHIPPER OF SHIVA), स्वर्गवासी, दिवंगत, स्वर्यात, लोकांतरगत, लोकांतरप्राप्त, परलोकगत.] २ *destitute of life, inanimate* निर्जीव, जड, अचेतन, निचेष्ट; as "A D. matter." ३ बधिर. ४ *death-like, without show of life* मृतप्राय, मेल्यासारखा, घोर, गाढ; as, "A D. sleep." ५ *motionless, inactive, useless* निश्चल, स्थिर, अचेतन, निरुपयोगी. ६ *unproductive, unprofitable* अनुत्पादक; as, "A D. capital or stock." ७ *so constructed as not to transmit sound* ध्वनिवाहक नाहीं असा, अध्वनिवह, अध्वनिवाहक; as, "A D. floor." ८ *lacking spirit, dull, cheerless, lustreless* निस्तेज, मलूल, मरगळलेला, निःसत्व. ९ *sure as death, unerring* बिनचुक, अचूक, नेमका; as, "A D. shot.' १० *wanting in religious spirit* मेलेला, धर्मबुद्धिरहित, श्रद्धाहीन; as, "D. faith, D. works." ११ *law. cut off from the rights of citizen* नागरिकाधिकारहीन, नागरिकदृष्ट्या-समाजदृष्ट्या-मृत. १२ *mech. not imparting motion* मृत, अप्रेरक, गति न देणारा; as, "D. steam." १३ *no longer spoken, not in use* अप्रचलित-मृत-व्यवहारांत नाहीं अशी (भाषा); as, "A D. language." १४ (*paint.*) *flat, without gloss* (not brilliant or rich, thus brown is a dead colour as opposed to crimson) मेलेला, कमी उठावाचा. Dead *n. the period of profoundest repose, inertness, gloom* भर [IN COMP. ऐन AS, A PREFIX; ऐन रात्रीं = IN THE DEAD OF NIGHT; ऐन हिंवाळ्यांत=IN THE D. OF WINTER; भर AS A PREFIX; AS, भररात्रीं=IN THE D. OF NIGHT.] Dead *adv. to a degree resembling death, to the last degree, completely, wholly* मृतप्राय. Dead *v. t.* (*obs.*) मृतप्राय-हलका मंद-न्यून करणें, बलहानि करणें, तेजोऱ्हास करणें. २ पाणचट-पचपचीत करणें. D. *v. i.* (*obs.*) मरणें; as, "Heaven's stern decree has benumbed and deaded me." Dead-alive *a. uneventful* सामसुमीचा. Dead-beat *a.* See Galvanometer. २ *quite overcome* जेरीस-रंजीस आलेला. Dead-born *a.* उपजत मेलेला, मृतजात. Dead-clothes *n.* मृता-शवा-वर घातलेलीं वस्त्रें. Dead-colouring *n.* प्रथम दिलेला फिकट रंग *m*. Dead-drunk *a.* शुद्धि जाण्याइतकी दारू प्यालेला, दारू पिऊन तर्र. Dead-eye *n.* मध्यभागीं तीन भोकें पाडलेला असा चपटा व वाटोळा लांकडी ठोकळा *m*, तिडोळी ठोकळा *m*. याच्या भोंवतीं दोरी गुंडाळलेली असते व मधल्या तीन भोकांतून कांहींतरी अडकविण्याकरितां दोऱ्या सोडलेल्या असतात. Dead-freight *n.* सबंध जहाज ठरविल्यानंतर त्याची पुरी भरताड न झाल्यामुळें जी रिकामी जागा रहाते तिजबद्दल भरलेला पैसा *m*. Dead-heat *n.* ज्यांत कोणाचीही सरशी होत नाहीं अशी दौड *f* शर्यत *f*. Dead-house *n.* दवाखान्यांत किंवा इतर ठिकाणीं मेलेलीं माणसें कांहीं वेळ ठेवण्याकरितां केलेली जागा *f*, मयतखाना *m*. Dead-language *n.* प्रचारांत नसलेली भाषा *f*, अप्रचलित-मृत भाषा *f*. Dead-letter *n.* ज्याला पत्र पाठविलें आहे तो न सांपडल्यामुळें डांकघरांत (post-office) पडून राहिलेलें पत्र *n*, बिनवारशी पत्र *n*. २ प्रचारांत नसलेली जुनीपुराणी गोष्ट *f*, काळ अगर चाल बदलल्यामुळें ज्याची

सत्ता व वजन नष्ट झालें आहे असा कायदा वगैरे; लुप्तार्थ कायदा *m.* Dead-level *n.* पूर्ण सपाट प्रदेश *m.* Dead-lift *n.* तरफ वगैरेच्या साहाय्यावांचून उचलणें *n.* २ *an effort under discouraging circumstances, extreme emergency* प्रतिकूल स्थितींत केलेला यत्न *m,* महत्संकट *n.* Dead-lock *n.* (प्रगतीची) कुंठितावस्था *f,* प्रगतिस्तब्धता *f,* काम बंद पाडणारी लहान अडचण *f.* Dead-march *n.* लष्करी शिपाई वगैरेंच्या प्रेतयात्रेचे वेळीं वाजवावयाचें गीत *n,* लष्करी प्रेतयात्रागीत *n.* Dead-meat *n.* विकण्यास तयार असलेलें मांस *n.* Dead-men *n.* अतिमद्यपानसमारंभाचे वेळीं रिकाम्या झालेल्या बाटल्या *f. pl.* Dead'ness *n. the state of being destitute of life* मेलेलेपणा *m,* प्राणराहित्य *n,* गतप्राणता *f.* २ *the state of being destitute of vigour* अचेतनत्व *n,* मंदत्व*n,* अनुत्साह *m,* म्लानता *f.* ३ *insensibility* मेलेलेपणा *m,* बहिरेपणा *m,* बधिरत्व *n.* ४ *dullness* फिकेपणा *m,* हिमळपणा *m.* ५ *coldness, indifference* उदासीनता *f.* Dead-pay *n.* हजिरीपटावर नांवें असलेल्या मृत शिपायांबद्दल लबाडीनें घेतलेला पगार *m.* Dead-reckoning *n.* नक्षत्रें न पाहतां जहाजें कोणत्या ठिकाणीं आहेत तें ठरविण्याची रीत *f.* Dead-sea *n.* मृतसमुद्र *m.* Dead-set *n.* निकरानें व फार वेळ केलेला प्रयत्न *m.* Dead-shot *n.* अचुक नेम *m.* २ अचुक नेम मारणारा *m.* Dead-stock *n.* (ज्याच्या) पासून मिळकत नाहीं असें सामान *n,* शिलकी सामान *n.* Dead-stroke *a.* उलट धक्का-प्रत्याघात खाल्ल्याशिवाय. Dead-wall *n.* खिडक्या किंवा जाळ्या नसलेली भिंत *f.* Dead-water *n.* गलबत चालत असतांना (मागील बाजू) खालीं भोंवऱ्यासारखें येणारें पाणी *n.* Dead-weight *n.* निरुपयोगी-फाजील वजन *n*- ओझें *n.* Dead-wind *n.* जहाजाच्या तोंडाचा (समोरून येणारा) वारा *m.* Dead-wood *n.* बळकटी येण्याकरितां जहाजाच्या मागच्या प्रत्येक भागास मारलेल्या लांकडी फळ्या वगैरे. Dead-work *n.* प्रारंभीं करावें लागणारें गैरफायदेशीर काम *n,* जुनें-निरुपयोगी काम *n.* The wind is dead against us आमच्या दिशेच्या अगदीं उलट दिशेनें वारा वाहत आहे. Let the dead bury the dead मागच्या सर्व गोष्टी विसरा. To flog a dead-horse उलगडा केलेला प्रश्न पुन्हां उकरून काढणें, "खाजवून खरूज काढणें." Working for a dead-horse अगाऊ घेतलेल्या पगाराबद्दल काम करणें. I am at a dead lift मी मोठ्या संकटांत आहें. Waiting for dead men's shoes मेलेल्या मनुष्याची मालमत्ता मिळण्याची वाट पहाणें-मिळण्याकरितां टपून बसणें. To make a dead set at a thing एखाद्या गोष्टीचा बरा किंवा वाईट निकाल करणें. To make a dead set upon a person एखाद्याच्या अंगावर तुटून पडणें.

Deaf (def) [M. E. *deef,* A. S. *deaf.*] *a.* बहिरा, बहिरट (तिरस्कारार्थी), फुटक्या कानाचा, बधिर, मंदकर्ण, कानफुटका, भैरळ, भैरट (loosely). [A. D. PERSON बहिरा मनुष्य, भैरी, भैरोबा OR ज्याला भैरोबाची OR भैरवाची सेवा आहे, ज्याचें कानपूर ओस झालें. TO BECOME D. बहिरावणें.] २ *unwilling to hear or listen* न ऐकणारा, बहिरा. ३ *determinately inattentive* जाणून बुजून लक्ष्य न देणारा, बहिरा. Deaf'en *v. t. to make deaf* बहिरा-बधिर करणें, कान *m. pl.* बंद करणें-फोडणें. २ *to stun* बंद करणें *g. of o.,* कानठाळी *n. pl.* or कानटाळी *n. pl.* बसविणें *g. of o.,* कानठाळ्या बसविणें. D. *v. i.* बहिरावणें, कानठळी-ळें *n. pl.* -ळ्या *f. pl.* कानटाळीं-ळें *n. pl.* बसणें, कान *m. pl.* जाणें-फुटणें *g. of s.* Deaf'ening *n.* बधिर करणें. Deaf'ly *adv.* Deaf-mute *n.* बहिरा आणि मुका *m.* Deaf'ness *n.* बहिरेपणा *m,* बधिरत्व *n,* श्रवणाभाव *m.*

Deal (dēl) [M. E. *deel,* A.S. *dæl,* a share.] *n. part, portion, share* (वराचसा) भाग *m,* विभाग *m,* अंश *m.* २ *the process of dealing cards to the players, the portion distributed* (पत्त्यांची) वांटणी *f.* ३ [Prob. Dut. *deel,* a plank, threshing floor.] देवदारूची ७ इंचांपेक्षां रुंद व सहा फुटांपेक्षां लांब फळी *f.* ४ देवदारूचें लांकूड *n.*

Deal (dēl) [M. E. *delen,* to divide.] *v. t. to make distribution* विभागणें, वांटणें. २ पत्ते वांटणें, विभागणें, वांटणी करणें; as, "To D. the cards." ३ (with *out*) एकसारखें देणें. D. *v. i. to do a distributing or retaling business* किरकोळ व्यापार *m*-उदीम *m.* करणें. २ *to make distribution* वांटणी *f.* करणें. ३ (with *with* or *between*) *to act as an intermediary in business or any affair* मध्यस्थी करणें. ४ *to trade, to do business* देवघेव करणें. ५ *to conduct one's self* वागणें, व्यवहार करणें. ६ *to contend with, to treat with by way of opposition, check or correction* झगडणें, गांठ असणें. [TO HAVE TO DEAL WITH गांठ *f*- प्रसंग *m.* असणें IN. CON.] Deal'er *n.* देवघेव करणारा *m,* व्यापारी *m,* सवदागर *m.* (for more meanings see Verb.) २ पत्ते वांटणारा *m.* Deal'ing *n.* व्यापार *m,* धंदा *m,* उद्यम *m,* सवदा *m.* ३ व्यवहार *m,* देवघेव *f.* ४ वागणें *m,* व्यवहार *n.* ५ संसर्ग *m,* गांठ *f.* [DOUBLE DEALING दुटप्पी वर्तन *n,* बोलणें एक व करणें भलतेंच असें वर्तन *n,* उच्चाराविरुद्ध आचार करणें *n.* FAIR DEALING चोख वर्तन *n,* सचोटीची वागणूक *f.*]

Dean (dēn) [O. Fr. *deien,* (*Fr. doyen*)-Low L. *decanus,* a chief of ten-L. *decem,* Sk. दश, ten.] *n. an ecclesiastical dignitary* क्याथेड्रलचा मुख्य धर्माधिकारी *m,* (युनिव्हर्सिटी किंवा कॉलेजमधील एखाद्या शिक्षणशाखेचा) मुख्य अधिकारी *m,* शिक्षणशाखाध्यक्ष *m,* शाखाध्यक्ष *m.* ३ युनिव्हर्सिटीच्या चालकमंडळीचा चिटणीस *m,* युनिव्हर्सिटींतील विशेष शिक्षणशाखेचा अध्यक्ष *m,* चिटणीस *m.* Dean'ery *n.* वरील धर्माधिकाऱ्याचें रहाण्याचें ठिकाण *n.* २ त्याचा अधिकार *m*-मर्यादा *f*- क्षेत्र *n.* ३ (त्याचें) उत्पन्न *n.* Dean'ship *n.* धर्माधिकाऱ्याचा धंदा *m.* Rural dean खेड्यापाड्यांतील धर्मोपदेशकांवर देखरेख करणारा अधिकारी *m.*

Dear (dēr) [A. S. *deore, dyre, cf.* Ger. *theuer.*] *a.* लाडका, प्रिय, प्यारा. २ महाग, मोलाचा, उंची, मौल्यवान्, भारी, बहुमोली. [EXORBITANTLY OR ENORMOUSLY DEAR भारीमोलाचा, मोलाआगळा, भारी-जवर-जरवमाहाग, मोलमहागाचा. TO BE OR BECOME D. माहागणें, माहागाई *f.* माजणें *g. of s.*, चडचडणें, चणचणणें, चणाणणें, बहकणें, भीक *f.* लागणें *g. of s.*, काटविकरा *m.* येणें WITH ला OR स. DEAR ME! OH DEAR (IN THE FEMALE VOCAB.) अगई.] ३ हृदय-मन आकर्षणारा-वेधणारा. ४ इष्ट, बहुमान्य, दुर्मिळ, दुर्लभ, अनर्घ. D. *n. lover, sweetheart* जीवप्राण *m*, प्रिया *f*, प्राणनाथ *m*. D. *adv.* बहुमोलानें, लाडकेपणानें. D. *v. t.* (*obs.*) *to make dear* महाग करणें. २ *to endear* प्रिय करणें. Dear-bought *a.* महाग घेतलेला. Dear'ling *n.* (*obs.*) लाडकें *n.* Dear-loved *a.* अत्यंत प्रीतींतला. Dear'ly *adv.* Dear'ness *n. fondness, tenderness, love* लाडकेपणा *m*, प्रेम *n*, प्रेमळपणा *m*. २ *costliness* मोठी किंमत *f*, बहुमूल्यता *f.* ३ महागाई *f.* Dear'y *n.* लाडका *m*, लाडकी *f.*

Dearth (dĕrth) [See Dear.] *n.* महागाई *f.* २ *famine* दुष्काळ *m*. ३ *scarcity, want, lack* तूट *f*, अभाव *m*. Dearth'ful *a.*

Death (dĕth) [A. S. *death. cf.* Ger. *tod.* See Dead & Die.] *n.* मरण *n*, मृत्यु *m*, काळ *m*, अंत *m*, कायमचा अचैतन्यपणा *m*. "Anniversary of D." वार्षिकश्राद्ध *n*, श्राद्धतिथि *f*, मृततिथि *f.* [OF THE FOLLOWING SIGNIFICANT TERMS, A GOOD MANY ARE EXTENSIVELY CURRENT:—अंत *m*, अवसान *n*, देवाज्ञा *f*, निधन *n*, काल *m*, निर्वाण *n*, (*fig.*) प्राणोत्क्रमण *n*, प्राणावसान *n*, कालनिद्रा *f*, परलोकगमन *n*, पंचत्व *n*. DEATH AS PERSONIFIED काळ *m*, मृत्यु *m*, कृतांत *m*, यम *m*. ACCIDENTAL D. अपघात *m*, अपमृत्यु *m*. A LINGERING D. खितपणीचें मरण *n*, झिजून-झाल होऊन मरणें *n*. BANDS OF D., SNARE OF D. कालपाश *m*, यमपाश *m*, मृत्युपाश *m*. CONTINUING TILL D. आमरणांत चालू असणारा, आमरणांतिक. DEATH ABROAD विदेशीमरण *n*, प्रोषितमरण *n*. D. AT WILL इच्छामरण *n*. D.-THROE (STRUGGLE) मरणाच्या वेळची धडपड *f*, अंतकाळच्या यातना *f. pl.* D. UPON BEDSTEAD शय्या-मंचक-मरण *n*, खट्वामरण *n*. EXEMPT FROM D. AND DECAY अजरामर. FEAR OF D. जीवितसंशय *m*. FEIGNED D. मरणसोंग *n*, सोंगाचें मरण *n*. HOUR OF D. अंतकाल *m*. IMPURITY CONTRACTED THROUGH A D. मृताशौच, सुतक. LABOURED BREATHING AT TIME OF D. ऊर्ध्ववायु *m*, घरघर *f*, दीर्घश्वास *m*. SHADOW OF D. मरणकळा *f*, प्रेतकळा *f.* NARROW ESCAPE FROM D. मरतांमरतां वांचणें, मोठ्या शर्तीनें मृत्यूच्या दाढेंतून सुटका *f*, काळ आला होता परंतु मरण आलें नव्हतें OR वेळ आली नव्हती. NATURAL D. आपमरण *n*, कालमृत्यु *m*. ONE LEAN AS D. मरतमढें *n*. ONE ON THE POINT OF D. अत्यावस्थ, अत्यवस्थ, नाकाशीं सूत धरलेला, कंठगत प्राण, मरणोन्मुख, घटका घातलेला-भरलेला. SLEEP OF D. काळनिद्रा *f*- झोंप *f*, महानिद्रा *f*, दीर्घनिद्रा *f.* TIDINGS OF THE D. (OF A RELATION) FROM ABROAD परदेशांत मेलेल्या आप्ताची वातमी *f*, हुंडी (*colloq.*) *f.* UNTIL D. आमरणांत. VIOLENT OR UNNATURAL D. अपमृत्यु *m*, अकालमृत्यु *m*, दुर्मरण *n*, अपघात *m*. VOLUNTARY D. आपण होऊन मरणें *n*, देहत्याग *m*, काम्यमरण *n*. WORSE THAN D. मृत्युपरीस दारुण. TO WAIT FOR OR WISH THE D. OF तिलांजली घेऊन उभा राहणें, (च्या) नांवानें पाणी सोडणें (*obs.*), (च्या) मरणाची वाट पाहणें. TO CHEAT OR CHIDE D. काळवंचना करणें. TO DIE A NATURAL D. स्वाभाविक रीतीनें मरणें. TO DRAW UP IN D. हातपाय गुंडाळणें. TO WORRY TO D. जीव नकोसा करणें, प्राण-जीव खाणें. TO BE ON THE POINT OF D. मरायास टेंकणें, (सु) बुडणें(?), मरणाचे पंथास लागणें, कंठीं प्राण उरणें, घटकापळावर येणें. SOME OTHER EXPRESSIONS FOR 'TO BE ON THE POINT OF DEATH' ARE:—यमलोकाची वाट *f.* धरणें, पंथास OR मरणाचे पंथास लागणें, डफ(व)घाईस येणें, (ची) नाडी आटपणें, काठी शिखरास लागणें, तंतीं प्राण उतरणें, पाणी देखील घोटूं नये असें म्हणणें, हातपाय गुंडाळणें, कंठाशीं प्राण येणें, जीव खळवटणें, उत्तरपंथास लावणें, घुटमळणें, घुटमुळणें, घुटवळणें, नाकाशीं सूत धरणें. TO BE QUIVERING OR FLICKERING IN D. एकजीव येणें, एक जीव जाणें. *g. of o.*, टिकटिक करून असणें. TO DRAW TOWARDS D. मृत्युपंथास लागणें. TO HAVE ONE'S EYES FIXED IN D. डोळे थिजणें *g. of o.*] २ पूर्ण नाश *m*- लोप *m*. ३ *manner of dying* मरण *n*, मरणाचा प्रकार *m*; as, "Let me die the D. of the righteous." ४ *the cause of the loss of life* मृत्युकारण *n*, मृत्युकारणगोष्ट *f*; as, "He caught his D. at the last county sessions." ५ *personified destroyer of life* मृत्युदेव *m*, यमधर्म *m*, धर्मराज *m*, कृतांत *m*; as, "D. a great proprietor of all." ६ *danger of death* प्राणसंकट *n*, जीव जाण्याचें भय *n*; as, "In Deaths oft." ७ *murder* खून *m*, घात *m*, वध *m*; as, "Not to suffer a man of D. to live." ८ *theol. loss of spiritual life* आत्मविस्मृति *f*, मोह *m*, धर्मभ्रंश *m*. ९ *anything so dreadful as to be like death* मृत्यूप्रमाणें दारुण-भयंकर गोष्ट *f*; as, "It was D. to them to think of entertaining such doctrines." Death-adder *n.* दक्षिण आफ्रिकेंतील भयंकर कांडर *n*- सर्प *m*. Death-agony *n.* प्राणांत यातना *f.* Death-bed *n.* मरणशय्या *f.* Death-bell *n.* मरणघंटा *f*, ख्रिस्ती लोकांत एखाद्याच्या मरणसमयीं वाजविलेली घंटा *f.* Death-blow *n.* घातक मार *m*, प्राणघातक आघात *m*- ठोसा *m*- गुद्दा *m*. Death-damp *n.* मरणसमयीं येणारा घाम *m*. Death-duties *n.* मृताच्या वारसानें मिळकत ताब्यांत घेतांना सरकारास दिलेला कर *m*, वारसपट्टी *f*, वारसकर *m*. Death-fire *n.* दलदलीच्या जमिनींत दिसणारा एक प्रकारचा ग्यासचा दिवा *m*. हा दिसला म्हणजे मृत्यु सन्निध आहे असें भोळसर लोक मानतात, भुताटकी खेळ *m*, वेताळाची स्वारी-मशाल *f.* Death'ful, Death'ly *a.* नाशकारक, भयंकर, हानियुक्त. Death'less *a.* अमर, नाशरहित. Death'-like *a.* मरणासारखा. २ भयंकर. Death'liness *n.* घातकपणा *m*, भयंकरपणा *m*. Death-marked *a.* मरावयास-मरूं

घातलेला. Death-mask *n.* मृताच्या चेहऱ्यावरून घेतलेला शाडूचा (प्लॅस्टरचा) मुखवटा *m.* Death-practised *a.* चेटूक करून मरणाची भीति घातलेला. Death-rate *n.* मृत्युसंख्येचें मान *n.* Death-rattle *n.* मरणसमयींची घरघर *f.* Death's door *n* यमद्वार *n.* [TO BE AT D's DOOR मरणाचे द्वारीं वसणें.] Death's head *n.* मनुष्याच्या कपाळाची कवटी *f.* ही मृत्यूची खूण समजत असत. Death-man *n.* फांशीं देणारा मांग *m.* Death-stroke *n.* (See death-blow above). Death-token *n.* मृत्युसान्निध्याची खूण *f.* Death-trap *n.* जीव कोंडून मारणारी जागा *f.* घर-तारूं *n.* Death-warrant *n.* वध्याचा जीव घेण्याचा हुकूम *m*, फांशीचें वारंट *n.* Death-wound *n.* प्राण घेणारी जखम *f.* Be death on (वर) जीव ठेवणें, (ला)जीवप्राण करणें. Black-death *n.* एकप्रकारचा रोग, ह्यांत मनुष्य काळाठिक्कर पडतो. Do or put to death ठार करणें. Gates or jaws of death यमद्वार, काळाची दाढ. To death *adv.* मरेमरेतों, अत्यंत, अतिशय.

Debar (de-bär') [L. *de*, from and *bar.*] *v. t. to cut off from entrance, to preclude, to hinder from approach* (with *from* & sometimes with *of.*) आडवणें, प्रतिबंध करणें, अटकाव *m.* करणें, (with स, or ला) आड-आडवा येणें, मना करणें. Debar'ment *n. hindrance from approach, exclusion* अटकाव *m*, प्रतिबंध *m.* Debarr'ing *pr. p.* Debarred *pa. p.*

Debark (de-bärk') [L. *de*, from & *barque*, a boat or vessel.] *v. t.* & *v. i. to disembark, to put or go ashore* जहाजांतून जमिनीवर उतरणें. Debarkā'tion, Debarcā'tion *n.* जहाजांतून जमिनीवर उतरणें *n.*

Debase (de-bās') [L. *de*, down & *base*, low, which See.] *v. t. to degrade* खालच्या पायरीवर-नीच पदवींत-कनिष्ठ प्रतींत आणणें, हलका-हीन-नीच करणें, कमी दराचा करणें, शोभा-किंमत-योग्यता कमी करणें. २ *to adulterate* (coin or metals) हीण *n.* मिळवणें-घालणें, हिणकस-नीरस करणें. ३ (R.) *to reverse* वरची बाजू खालीं करणें. Debased' *a.* हलका केलेला, अपकृष्ट. २ वरची बाजू खालीं केलेली आहे असा, उलटा फिरविलेला. Debase'ment *n. degradation* अपकर्ष *m*, मानहानि *f*, तेजोहानि *f.* २ हिणकस करणें *n.* Debase'ment of coinage हिणकस करणें. Deba'ser *n.* खालच्या पायरीवर आणणारा, हलका-नीच-कनिष्ठ करणारा. Deba'sing *n.* & *a.* Deba'singly *adv.*

Debate (de-bāt') [O. Fr. *debatre*,–L. *de*, down & *battere*, to beat.] *n. strife in argument, contention in words and argument, controversy* वादविवाद *m*, वाग्युद्ध *n*, वादानुवाद *m*, तकरार *f.* २ *discussion* वाटाघाट *f*, चाटावाट *f*, भवतिनभवति *f*, चर्चा *f*, घाटाघाट *f.* ३ (R.), वादविषय विवादविषयक वस्तु *f.* D. *v. t. to contend in words, to dispute, to contest, to discuss* (साठीं) झगडणें, यत्न करणें, वाटणें-घोळणें, भवतिनभवति *f*- वाटावाट *f*- वाटाघाट *f*- काटाकूट *f.* करणें, वादविवाद *m*- कोटिक्रम *m*- वाग्युद्ध *n*- चर्चा *f*- भांडण *n.* करणें. २ *to strive for* भांडणें. D. *v. i.* (often used with *on* or *upon*) *to contend in words, to dispute, to discuss* वाक्कलह *m*- वाग्युद्ध *n.* करणें, तकरार *f*- वादविवाद *m.* करणें. २ *to deliberate, to consider* मनाशीं निर्णय *m.* करणें, विचार *m.* करणें. Debat'able *a.* चर्चा-वादविवाद करण्याजोगा, वाक्कलहाई. २ वादग्रस्त. [D. LAND *n.* इंग्लंड व स्कॉटलंड यांच्या सीमेवरील जमिनीच्या एका पट्याला ही संज्ञा आहे.] Debate'ful *a.* (*obs.*) वादग्रस्त. २ भांडखोर. Debate'ment *n.* (R.) विचार *m*, चर्चा *f*, वादविवाद *m.* Debat'er *n.* वादविवाद करणारा. Deba'tingly *adv.*

Debauch (de-bawch') [O. Fr. *desbaucher*–Fr. *debaucher* to corrupt–Fr. *des* (L. *dis*) & *baucher* to hew.] *v. t. to seduce* दुर्व्यसनांत-बदफैलींत-बदकर्मांत घालणें, बिघडवणें. २ (a female) फुसलावणें, फितवणें, भ्रष्ट करणें, सन्मार्गापासून वळवणें, कुमार्गास-आडमार्गास लावणें. ३ *to seduce from allegiance* फितविणें, फितवणी *f.* करणें, बिथरविणें; as, "To D. an army." D. *n.* खाण्यापिण्यांत अतिरेक *m.* २ मद्यपान *n.* ३ बाहेरख्याली *f*, बदकर्म *n.* Debauched' *a.* दुराचारी, दुराचरणी, भ्रष्टाचारी, व्यभिचारी, बदकर्मी, बदफैली. Debauch'edly *adv.* Debauch'edness *n.* बदफैलीपणा *m.* Debauchee *n.* बदफैली, बाहेरख्याली, चंगीभंगी, सोदा, व्यभिचारी. Debauch'er *n.* भ्रष्ट करणारा, कुमार्गास लावणारा, फूस लावणारा. Debauch'ery *n.* बदफैली *f*, बदकर्म *n*, बाहेरख्याली *f.* २ *excessive intemperance* विषयासक्ति *f.* Debauch'ment *n.* बाहेरख्यालपणा *m*, बाहेरख्यालीपणा *m.*

Debenture (de-bent'-ūr) [L. *debentur*, they are due, third person pl. passive of *debere*, to owe,– L. *debenture*, is the first word of the receipt passed.] *n.* कर्जरोखा *m.* (सार्वजनिक कर्जाच्या रोख्यांना Debenture असें म्हणतात), कबुलायतीची चिठ्ठी *f*, प्रतिज्ञापत्र *n.* २ *draw-back* देशांत माल आणतेवेळीं त्या मालावर दिलेली जकात तो माल बाहेरदेशीं पाठविला असतां मालकाला परत मिळण्याबद्दलचें हुकूमपत्र *n*, परतजकातपत्र *n.* ३ *law.* दस्तऐवज *m.* Debenture bond *n.* कर्जाचा-व्याजू लेख *m.* Debent'ured *a.* जकात परत मिळण्याचा हुकूम असलेला.

Debilitate (de-bil'-i-tāt) [from *p. p.* of L. *debilitare*, to weaken–L. *debilis*, weak–*de*, away & *bilis* (Sk. बल), strength.] *v. t. to impair the strength of, to weaken, to enfeeble* दुर्बल-दुबळा करणें, कमजोर-निशक्त करणें, शक्ति *f*-बळ *n*-जोर *m.* कमी करणें. *g. of o.* Debilitā'tion *n.* दुबळा-कमकुवत करणें *n.* Debil'ity *n.* क्षीणता *f*, शक्तिक्षीणता *f*, कमजोरी *f*, कमकुवत *f*, निर्वीर्यता *f.* [D. OF THE HEART हृदयाची अशक्तता *f.*]

*N. B.*—Distinguish between Debility, Infirmity, Imbecility. See Infirmity.

Debit (deb'-it) [L. *debitum*, what is due, debt, from *debere*, to owe.] *n. a debt* कर्जाऊ दिलेली रक्कम *f.* २

*an entry on the debtor side of an account* नांवें पडलेली रक्कम *f.* ३ खर्चाची बाजू *f.* D. *v. t. to charge with debt* कर्ज लादणें, नांवें मांडणें. २ *to enter on the debtor side of an account* खर्ची-नांवें मांडणें-लिहिणें. Deb'itor *n.* (*obs.*) ऋणको, ऋणकोनाम. To debit an account खात्यांत नांवें लिहिणें.

Debonair (deb-o-naer') [M. E. *debonere, debonaire*- O. Fr. *debonaire*, for *debonaire* lit. of a good stock.] *a. of good manners, complaisant* सुशील, सभ्य, नीटनेटका, सुंदर, सुबक. Debonair'ly *adv.* Debonair'ness *n.*

Debosh ( de-bosh' ) (*obs.*) Same as Debauch.

Debris (deb'-rē) [Fr. *debris*, fragments-O. Fr. *de*, & *brisier*, to break.] *n. geol. broken & detached fragments taken collectively, fragments detached from a rock or mountain & piled up at the base* (पहाडांतून किंवा खडकापासून पडून पायथ्याशीं जमा झालेला) दगडांचा व मातीचा ढीग *m.* २ *rubbish, remains, ruins* (पडझडीनें व मोडतोडीनें झालेल्या) चुन्याचा ढीग *m.*

Debt ( det ) [M. E. *dette*-O. Fr. *dette*-L. *debita*, a sum due.] *n.* कर्ज *n*, ऋण *n. pop.* रीण *n*, देणें *n.* [DEBTS OR DEBT *compreh. indef.* कर्जवाम *n*, कर्जपाणी *n*, ऋणपाणी *n.* BAD D. बुडीतकर्ज *n*, जळीतबाकी *f.* ACCOUNT OR REGISTER OF BAD DEBTS बुडीतखातें *n.* BOUND BY D. ऋणबद्ध. CLOSING PAYMENT IN DISCHARGE OF A D. झाडबाकी *f.* D. UPON EASY TERMS सुखऋण *n.* DISCHARGE OR LIQUIDATION OF A D. रद्दकर्ज *n*, ऋणशोधन *n*, ऋणदान *n*, ऋणापनयन *n*, ऋणमोक्ष *m*, ऋणमुक्ति *f*, कर्जमुक्ति *f*, ऋणापकरण *n*, रीणफेड *f.* DISPUTED OR DISPUTABLE D. लडथडीचें-लढ्याचें कर्ज *n*- ऋण *n*, वांध्याचें कर्ज *n.* FREE FROM D. अनृण, अनृणी. LOAD OF D. कर्जाचें ओझें *n.* ONE OVER HEAD AND EARS IN D. कर्जबाजारी, कर्जांत बुडालेला. TO BE OVER HEAD AND EARS IN D. डोईवरून पाणी जाई इतकें कर्ज *n.* असणें. PRINCIPAL OF A D. मुद्दल *n*, ऐन कर्ज *n.* RECOVERY OF A D. ऋणादान *n*, कर्जाची वसुली *f.* RELEASED FROM D. ऋणमुक्त, ऋणमोचित. TO BE IN D. (च्यावर) कर्ज असणें. THE D. OF NATURE मरण *n.* WRITTEN ACKNOWLEDGEMENT OF A D. कर्जखत *n*, कर्जरोखा *m.* WRITTEN RELEASE FROM D. ऋणमुक्तिलेख *m*, कर्जांतून मुक्तता करणारा लेख *m.* TO SETTLE A D. कर्जाची फेड करणें. TO ADJUST A D. कर्जाची तोड करणें.] २ *obligation, liability* ऋण *n*, उपकार *m.* ३ *a duty neglected, fault, sin, trespass* पाप *n*, अपराध *m*, दोष *m*, अतिक्रमण; as, "Forgive us our D." ४ दावा *m.* Debt'ed *a.* Debt'ee *n.* (*law.*) धनको *m.* Debt'or *n.* देणेकरी, कर्जदार, ऋणी *m*, अधमर्ण. [D. IN BONDS AND NOTES रिणको OR रिणकोनाम FROM ऋण DEBT AND AS OPPOSED TO CREDITOR धनको OR धनकोनाम FROM धन MONEY, OR देणेकरी. ALLOWANCE MADE TO A D. IN DURESS भत्ता OR भातें. BAD DEBTOR (BANKRUPT) बुडीतकूळ *n*, कच्चें-थकलें कूळ *n.* GOOD D. तरतें कूळ *n*, पक्कें-ताजें कूळ *n.* HARD D. खटकूळ *n.* SHUTTING UP (BY A CREDITOR) OF A D. IN HIS OWN HOUSE दारकोंड *f.*] Debt'orship *n.* ऋणीपणा *m.* Debt of honour जें धनकोस कायद्यानें वसूल करितां येत नाहीं परंतु ऋणकोनें कबूल केलेलें कर्ज, इमानास जागून फेडलेलें-फेडावयाचें कर्ज *n.* Passive debt द्यावयाचें कर्ज *n*, देणें *n.* Floating D. *miscellaneous public debt, like exchequer and treasury bills, as opposed to "Funded Debt," that which has been converted into perpetual annuities like Consols in Britain* अल्पकालिक-अल्प मुदतीचें कर्ज *n.*

Debut (de-bu') [Fr. *debut*, a first stroke.] *n. a beginning or first attempt, (hence) the first appearance before the public* प्रारंभ *m*, प्रथम प्रयत्न *m.* २ प्रथम दर्शन *n*, प्रथम भाषण *n*, वक्त्याचें किंवा नटाचें पहिलेंच सार्वजनिक भाषण *n*- काम *n.* Debutant' *n.* वक्ता या नात्यानें प्रथमच लोकांपुढें येणारा. २ प्रारंभ करणारा. *Fem.* Deb'utante.

Decade, Decad (dek'-ād) [Fr. *decade*-L. *decadem*. -Gr. *decada*, acc. of *decas*, a company of ten.] *n. a group of ten* दशक *pop.* दसक *m*, दसकडी *f.* [D. OF SOLDIERS दाहिजा (R.) *m.*]. २ *a series of ten years* दहा वर्षें *n. pl.*, दशवर्ष *n*, वर्षदशक *n.* Dec'adal *a.*

Decadence, Decadency (de-kā'-dens) [L. *de*, down & *cadere*, to fall.] *n. a state of decay* नीच स्थिति *f*, उतरती कळा *f.* Deca'dent *a.*

Decagon (dek'a-gon) [Gr. *deca*, ten & *gonia* (Sk. कोन), an angle.] *n.* दशकोन *m*, दशकोनाकृति *f.* Decag'onal *a.*

Decalogue (dek'a-log) [Fr. *decalogue*-L. *decalogum* -Gr-*decalogos*, the ten commandments.] *n.* दशाज्ञावली *f*, आज्ञादशक *m.* २ मोझेसला देवानें सिनई पर्वतावर ज्या दहा आज्ञा दिल्या त्या. Dec'alogist *n.* ख्रिस्ती शास्त्रांतील दशाज्ञा विवरण करून सांगणारा.

Decamp (de-kamp') [O. Fr. *descamper*, to remove a camp-L. *dis*, away & *campus*, a field, a camp.] *v. t. to remove a camp* तळ *m.* उठवणें-उचलून जाणें-सोडणें, कूच करणें. २ *to depart, to run away* पळणें, तोंड काळें करणें, गाशा *m.* गुंडाळणें, झुकांडी *f*, झुगार *m.* देणें, गच्छंती *f.* करणें. Decamp'ment *n.* उठावणी *f*, कूच *m.*

Decanal (dek'-an-al) [Cf. Fr. *decanal* See Dean.] *a. pertaining to a dean or clergy* डिनासंबंधीं. See the word Dean.

Decandria (de-kan'dri-a) [Gr. *deca*, ten and *aner, andros*, a man.] *n. a class of plants in the Linnæan system having ten stamens* दशपुंकेसर वर्ग *m.* Decan'drian, Decand'rous *a.*

Decangular (dek-ang'ū-lar) [Gr. *deca*, Sk. दश, ten and *angulus*, an angle.] *a.* दशकोनी.

Decant (de-kant') [Fr. *decanter*.–M. L. *decan-thare*, to pour out–L. *de*, from & *canthus*, lip of a cup. –Gr. *canthos*, corner of the eye. ] *v. t. to pour from one vessel into another* एका भांड्यांतून दुसऱ्या भांड्यांत ओतणें. २ *to pour out gently as a liquor so as not to disturb the sediment* खालीं गाळ राहील अशा रीतीनें जपून ओतणें. Decantā'tion *n.* Decant'er *n.* दारूचें सुरईच्या आकाराचें कांचेचें भांडें *n.* यांतून पिण्याकरितां दारू प्याल्यांत ओततात. २ प्रवाही पदार्थ ओतणारा.

Decapitate (de-kap'-i-tāt) [ L. *de*, off & *capit*, stem of *caput*, the head. ] *v. t. to behead* शिरच्छेद करणें, डोकें उडविणें, फांशीं देणें. Decapitā'tion *n.* शिरच्छेद *m*, शिरच्छेदन *n.*

Decapod (dek'a-pod) [ Gr. *deca*, ten & *pous*,–(Sk. पद्), foot. ] *n.* दशपदी प्राणी *m.* Decap'odal *a.* दहा पाय असलेला, दशपदी.

Decarbonate (de-kär'bon-āt) [*De*, from & *carbon.*] *v. t. to deprive of carbonic acid* कार्बनिकाम्ल (कर्बिकाम्ल) काढून टाकणें. Decar'bonise, or Decar'-burise *v. t.* (तून) कार्बन-काढून काढणें. Decarbonisā'-tion, Decarburisā'tion *n.* कार्बन-कर्ब काढून टाकणें *n*, कार्बन काढून टाकण्याची रीत *f*, विकर्बीकरण *n.*

Decastyle (dek'a-stīl) [ Gr. *deca*, ten & *stulos*, a column. ] *n.* दहा खांब असलेला इमारतीचा पुढला भाग *m*, दशस्तंभ *m.*

Decay (de-kā') [ Fr. *decair*–L. *de*, down & *cadere*, to fall. ] *v. i. to waste away, to decline* क्षय *m*, ऱ्हास *m.* पावणें-होणें, उतरणें, मोडणें (*fig.*),झरणें, गळणें, उतरता पाया लागणें. २ *to fail* विघडणें, क्षय होणें, अशक्त-भ्रष्ट होणें. ३ *to rot, to perish* नासणें, सडणें, कुजणें. D. *v. t.* (R.) *to cause to decay* उतरता पाया लावणें, क्षीण करणें. २ (*obs.*) *to destroy* नाश *m.* करणें. D. *n. decline, deterioration, corruption* उतरता पाया *m*, उतरती *f*, क्षय *m*, ऱ्हास *m*, झरणें *n* (*fig.*), मोडणें *n* (*fig.*). २ *cause of decay* क्षीणावस्थेचें कारण *n.* ३ *rottenness* कूज *f.* ४ (*obs.*) *destruction, death* मरण *n*, नाश *m.* Decayed' *a.* झुरलेला, गळलेला, विगलित, जीर्ण, खोंकड. Decayed'ness *n.* Decay'er *n.* Decay'ing *pr. a.* झुरणारा, क्षयी, क्षयिष्णु, उतरणारा.

Decease (de-sēs') [ M. E. *deces*–O. Fr. *deces*, death–L. *decessus p. p.* of *decedere*, to depart. ] *n. death* मरण *n*, देहावसान *m*, परलोकगमन *n.* D. *v. i. to die, to pass away* मरणें, प्राण *m.* सोडणें. Deceased' *a.* मयत, परलोकगत, स्वर्गवासी, मेलेला, मृत. (See Dead.)

Deceit (de-sēt') [ O. Fr. *p. p. of deceveir, decept*–L. *deceptus*, deception. ] *n. a contrivance to entrap, fraud, trick* लबाडी *f*, कपट *n*, माव *f*, कापट्य *n*, छल (S.) *m*, मिष *n*, दगल *f*, दगलबाजी *f*, प्रतारणा *f*, ठकबाजी *f*, ठकविद्या *f*, कपटविद्या *f*, वंचन *n.* २ *an attempt to deceive* ठकवाजी *f*, फस(फट)वणूक *f*, ठकविद्या *f.* ३ (*law.*) *a contrivance to entrap, any trick, collusion or contrivance, false representation or underhand practice used to defraud another* कपट *n*, कृत्रिम *n*, हुलकीवणा *f*, हूल *f*, प्रतारणा *f.* (S.), वंचन *n* (S). [ To EXPRESS *deceit* AS UNDERSTOOD IN THE WORDS AND PHRASES, *a cheat, illusion, trickery, false show, a make-believe, an empty flourish*, SOME WORDS AND PHRASES ARE:—माया *f*, माव *f*, मावेचा मृग *m*, धंदराधंदरीचा व्यापार-व्यवहार *m*, विपय-वस्तु *f*, भूत-सृष्टी *f*, ऐंद्रजाल *n*, ठकवण *f*, फसवण *f*, हुलकावणी *f*, फसव-णूक *f*, माकडशेंडा *m.* D. AND KNAVERY *compreh.* दगा-फटका *m*, दगलफसल *f*, कपटप्रबंध *m.* A MASTER-PIECE OF TREACHERY OR D. दगेमात *f.* ] Deceit'ful *a.* कपटी. २ दगलबाज. Deceit'fully *adv.* Deceit'fulness *n.* दगलबाजी *f*, कापट्य *n.*

Deceive (de-sēv') [ Fr. *decevoir*–L. *decipere*, to take away, to deceive. ] *v. t. to cheat, to impose upon* ठकविणें, फसविणें, फटविणें, वंचणें, प्रतारणें, डोक्यावरून हात फिरविणें *idio.*, तोंडास पानें पुसणें *idio.* २ *to beguile, to amuse* हुलकावणें, भुरळ-मोह घालणें, चकवणें. ३ *to deprive by fraud or stealth* फसवून लुबाडणें, लुचा-डणें, नागवणें, मुंडणें. Deceiv'able *a.* ठकवायाजोगा-सारखा, प्रतारणीय, वंचनीय. Deceiv'ableness *n.* फसवण्याची शक्यता *f.* संभव *m*, वंचनीयता *f.* Deceiv-ed *n.* ठकवलेला, फसवलेला.

December (de-sem'bėr) [O. Fr. *decembre*–L. *december*, as it was the tenth month of the Roman year which began in March. ] *n.* इंग्रजी वर्षाचा शेवटचा व बाराचा महिना *m*, दिसेंबर *m.* Decem'berly *adv.* दिसेंबर महिन्यासारखा. २ थंड, उदास.

Decemvir (de-sem'vėr) [ L. *decemuir*, one of the ten *decemuiri*, or ten men joined in a commission.] *n. one of a body of ten magistrates in ancient Rome.* प्राचीन रोमन दहा स्वतंत्र न्यायाधिशांपैकीं एक. *pl.* Decem'virs or [L.] Decem'viri. Decem'viral *a.* Decem'virāte *n.* डेसेमवरचा हुद्दा *m.* २ डेसेमवर-च्या नेमणुकीचा काल *m.*

Decency (dē'sen-si) [ L. *decentia*, from *decens-decentem* acc. of *pr. p.* of *decere*, to become, to be fit. ] *n. the quality or state of being suitable or becoming in words or behaviour, seemliness* शिष्टा-चार *m.* २ *propriety* योग्यता *f*, औचित्य *n.* ३ *modesty* विनय *m*, मर्यादा *f.* [To KEEP D. पडदा राखणें, मर्यादा राखणें-पाळणें.] ४ *freedom from obscenity & impurity* संभावितपणा *m*, सभ्यता *f*, निर्दोषता *f*, दोषशून्यता *f.* ५ *mediocrity* मध्यम स्थिति *f.*

Decennary (de-sen'ėr-i) [ L. *decennium*, a period of ten years, *decem*, ten & *annus*, a year. ] *n. a period of ten years* दहा वर्षें *n. pl.* दहा वर्षांचा काल *m.* मुदत *f. pl.* Decennaries also Decen'nium. Decen'nial *a.* दहा वर्षांचा, दशवार्षिक, दशवर्षावधि.

Decennoval ( de-sen'-ō-val ) [L. *decani*, ten & *novem*, nine. ] *a.* १९ वर्षांचा.

Decent ( dē'sent ) [ See Decency. ] *a. fit, proper, becoming* योग्य, उचित. २ *decorous, seemly* साजेलसा, शोभणारा. ३ *free from obscenity or immodesty* शिष्ट, सभ्य, सविनय, शिष्टाचारानुरूप, समर्याद, संभावितपणाचा, निर्दोष, दोषशून्य. ४ (*archaic*) *well-formed* चांगल्या बांध्याचा, बांधेसूद. ५ *moderate but competent, sufficient, fairly good* पुरेसा, पुरता, मध्यम चांगला. ६ *respectable* संभावित. ७ *reasonably comfortable or satisfactory* सुखकर, सोइस्कर, सुखाचा, सुखवस्तु, (खाऊन पिऊन) सुखी. De'cently *adv.* De'centness *n.*

Decentralize ( dē-sen'tral-īz ) [ L. *de* & Centralise.] *v. t. to cause to withdraw from the centre* एकाच केंद्रांत जमूं न देणें. २ *to divide, to distribute* (said of authority) (अधिकार किंवा सत्ता) एका केंद्रांतून काढून निराळ्या ठिकाणीं वांटणें. Decentralizā'tion *n.*

Deception (de-sep'-shun) [ Fr. *deception*–L. *deceptio-deceptum.* ] *n. the act of deceiving or misleading* ठकवणें *n*, फसवणें *n*, फसवणूक *f.* २ *the state of being deceived* फसवण *f*, फसगत *f*, फसणूक *f.* ३ *false representation, cheat, fraud* फसवणूक *f*, कपट *n*, थाप *f*, भुलथाप *f*, सोदेगिरी *f*, सोदेशाई *f*, कावित्र *n*. Decep'tibil'ity *n.* Decep'tible *a.* Decep'tive *a.* भ्रामक, भ्रांतिजनक, मोहोत्पादक, कपटी. २ फसविणारा. Decep'tively *adv.* Decep'tiveness *n.* Decep'tivity *n.* Decep'tor *n.* Decep'tory *a.*

Decession ( de-sesh'-un ) [ See decease. ] *n.* गमन *n*.

Decharm ( de-charm' ) [ cf. Fr. *decharmer*. See charm. ] *v. t.* मंत्र *m*- मोहनी *f*- चेटूक *n*. उतरवणें.

Dechristianize ( de-krist'yan-īz ) *v. t.* ख्रिस्ती धर्मापासून परावृत्त-पराङ्मुख होणें.

Decide (de-sīd') [Fr.L. *de* & *cædere*, to cut off.] *v. t. to settle* ठराव *m*- निर्णय *m*- निश्चय *m.* करणें, शेवट लावणें-करणें. २ *to bring to a termination* निकाल *m.* करणें. D. *v. i.* ठराव करणें, निश्चित करणें. २ निकाल लावणें, फैसला करणें. Decid'able *a.* निश्चय-निर्णय करावयाजोगा, निकाल करावयाजोगा. Decid'ed *a.* ठरावलेला, फैसला केलेला-झालेला, निर्णीत, निश्चित. २ निःसंशयाचा. ३ स्पष्ट. ४ दृढनिश्चयाचा, दृढ, निर्धाराचा. Decid'edly *adv.* खचित, निःसंशय, निश्चित रीतीनें. Decid'er *n.* ठराव करणारा, निर्णेता, निर्णायक.

Decidua ( dē-sid'ū-ā ) [ See Deciduous. ] *n. anat. the inner layer of the wall of the uterus, which envelops the embryo, forms a part of the placenta and is discharged with it* अस्थायी गर्भकोश *m*, अपरा.

Deciduous ( de-sid'-ū-us ) [ L. *deciduaus*–L. *decidere*, to fall off. ] *a. bot.* गळून जाणारा, गलनशील, (फूल उकललल्यानंतर) गळणारा.

Decigram, Decigramme ( des'i-gram ) [ L. *decimus*, tenth & Fr. *gramme.* ] 'ग्राम' नांवाच्या वजनाचा दहावा हिस्सा *m*. हें वजन अवाईपाईस १.५४३२ ग्रेनाइतकें आहे.

Deciliter, Decilitre ( desi-lē'-tėr ) [L, *decimus*, tenth & Litre. ] *n.* 'लिटर'चा दहावा हिस्सा *m.* ह्यांत ६.१०२२ घन इंच भरतात.

Decimal ( des'-i-mal ) [Fr. *decimal.*–L. *decimus*, tenth –*decem*, ten. ] *a.* दशांश, दशांशाचा. [ D. ARITHMETIC दशांशगणित *n.* D. FIGURE OR POINT दशांशचिह्न *n.* D. FRACTION दशांश अपूर्णांक *m.* ] २ दशगुणित, दशगुणोत्तर. D. *n.* दशांश *m*, दशांश अपूर्णांक *m*.

Decimate ( des'-i-māt ) [ L. *decimatus p. p.* of *decimare*, to decimate. ] *v. t. to take the tenth part of* दहावा भाग घेणें. २ *to select by lot & punish with death every tenth man* बंडवाले वगैरेंपैकीं प्रत्येक दहावा मनुष्य घेऊन त्यास देहांत शिक्षा करणें. ३ *to destroy a considerable part of* नाश करणें, क्षय करणें, नासधूस-उजाड करणें. Dec'imā'tion *n.* Dec'imā'tor *n.* नासधूस करणारा.

Decimeter, Decimetre ( des'-i-mē-tėr ) [Fr. *decimetre*–L. *decimus*, tenth & *metre.* ] *n. one tenth part of a metre* (*equal to* 3·937 inches) एकदशांश मीटर *n*.

Decipher ( de-sī'-fėr ) [ Fr. *de* & Cipher. ] *v. t. to translate from secret characters or ciphers into intelligent terms* सांकेतिक लिपीचा-गूढ लिपीचा अर्थ काढणें-लावणें. २ *to unfold, to reveal* उलगडा *m.* करणें, स्पष्टीकरण *n.* करणें. ३ *to stamp* (वर) चिह्न-निशाण-शिक्का करणें. Deci'pherment *n.*

Decision ( de-sizh'-un ) [ See Decide. ] *n. the act of deciding, settling or terminating* निवाडा *m.*- निकाल करणें. २ *settlement, conclusion, final opinion* निर्णय *m*, निश्चय *m*, निकाल *m.* ३ *an account (especially) of a legal adjudication* ठराव *m*, फैसला *m*, निवाडा *m.* ४ *the quality of being decided, prompt & fixed determination, unwavering firmness* झटकन् निश्चय करण्याचा स्वभाव *m*, करारीपणा *m*, निश्चयीपणा *m*; as, "D. of character." Deci'sive *a. tending to decide* निर्णय करणारा-कारी, निर्णायक, निश्चयात्मक, निश्चयाचा. २ *final or conclusive* अखेरचा, शेवटचा, निकालाचा. ३ *marked by promptness & decision* झटकन् निश्चय करण्याचा स्वभाव असलेला. Deci'sively *adv.* Deci'siveness *n.* Deci'sory (R.) *a.*

Deck ( dek ) [ Dut. *dekken*, to cover ; *dek*, a cover, a ship's deck. ] *v. t. to cover, to overspread* झांकणें, (वर) आच्छादन घालणें, आच्छादणें. २ *to dress* ( as the person ), *to adorn, to embellish* (वस्त्रें-भूषणें इत्यादिकांनीं) सजवणें, साजरा-सुशोभित करणें, नटवणें, शृंगारणें, मंडित करणें. ३ *to furnish with a deck* ( as a vessel ) गलबताला मजला-पृष्ठ करणें-लावणें. D. *n.* (R.) *a floor-like covering* तक्तपोशी

*f.* २ *the planked flooring of a ship* गलबताचा मजला *m*, पृष्ठ *n*, नौकापृष्ठ *n*, नौकाफलक *n*. [ To CLEAR THE Ds. *to remove every unnecessary incumbrance in preparation for battle, to prepare for action* सर्व क्षुल्लक अडचणी दूर करून लढाईला तयार होणें, तळझाडा करणें, लढाईला मैदान मोकळें करणें ( FIG. ), कोणत्याही कामाची पूर्वसामग्री तयार करणें. BERTH DECK खलाशांचे झुलते बिछाने टांगण्याचा मजला *m*, ( खलाशांचे उपयोगाकरितां ) बिछानेमजला *m*. हा तोफमजल्या-खालीं असतो. BOILER D. आगबोटींतील वाफभांडें ठेवण्या-करितां केलेला लहानसा मजला *m*. FLUSH D. सुकाणूंपासून नाळेपर्यंतचा मजला *m*. GUN D. तोफमजला, आगबोटींत तोफा ठेवण्याचा मजला *m*. ORLOP D. लंगरदोर गुंडाळून ठेवण्याचा मजला *m*. POOP D. नाळेवरचा मजला *m*, मुख्य डोलकाठी आणि नाळ यांमधील मजला *m*. UPPER D. अगदीं वरचा मजला *m*. HALF D. अर्धा मजला, हा मुख्य डोलकाठी आणि केबीन ह्यांमध्यें असतो. QUARTER D. मुख्य डोलकाठी आणि सुकाणूं ह्यांमधील वरमजल्याचा भाग *m*. FOR HURRICANE DECK, SPAR D. SEE HURRICANE, &c. ] ३ सपाट छप्पर *n*. ४ आगगाडींतील माणसांच्या डब्यावरचें सपाट छप्पर *n*. ५ पत्त्यांचा जोड *m*. [ To SWEEP THE D. लावलेल्या सर्व पैजा जिंकून टेबल 'खलास' करून टाकणें. ] DECK'ER *n*. नटवणारा, &c. २ *a vessel having a specified number of decks* मजला-मजले असलेलें तारूं *n*.; as, Two-decker, Three-decker. ३ *a gun belonging to a particular deck of a ship of war* लढाऊ गलबतांतील असुक एक मजल्या-वरची बंदूक *f*. ४ *a workman employed on the deck of a ship* गलबताच्या मजल्यावर काम करणारा मजूर *m*.

Declaim ( de-klām' ) [L. *de*, down or fully & *clamare*, to cry. ] *v. i. to speak rhetorically, to make a formal speech, to recite a speech, a poem as a rhetorical exercise* अलंकारमय भाषेनें बोलणें, वक्तृत्वाची तालीम करणें, (वक्तृत्वकला साध्य होण्याकरितां ) गद्यपद्यादि प्रबंध पाठ म्हणणें, वक्तृत्व करणें, वक्तृत्वाचा पाठ म्हणणें. २ *to speak for rhetorical display, to speak loudly or earnestly with a view to convince or to move the passions* ( वक्तृत्वाचें प्रदर्शन करण्याक-रितां-खात्री करून देण्याकरितां-सुरळ पाडण्याकरितां ) वाक्पांडित्य *n*. करणें. ३ *to make an empty speech, to repeat trite arguments* शब्दावडंबर करणें, उष्टीं विधानें करणें. D. *v. t. to utter in public, to deliver in a rhetorical or set manner* (समेंत ठराविक पद्धतीनें) अलंकारप्रचुर भाषण करणें. Declaim'ant *n*. (R.) Same as Declaimer. Declaim'er *n*. अलंकारमय भाषण करणारा, मोहक वक्ता *m*, सुरळ घालणारा- मोह पाडणारा वक्ता *m*, &c. Declaim'ing *pr. p*. Declamā'tion *n.-act*. अलंकारयुक्त भाषण *n*, वक्तृत्वपाठ *m*, सुरळ पाडणारें-मोहक वक्तृत्व *n*. २ *a set speech in public* पूर्वींच तयार केलेलें सार्वजनिक भाषण *n*. ३ *a display in speaking* वक्तृत्वप्रदर्शन *n*, मोहकवाक्पांडित्य *n*. Declam'atory *a*. अलंकारमय भाषणाचा, केवळ शब्दावडंबरी, वागलंकारमय.

Declare ( de-klār' ) [ O. Fr. *declarer*—L. *declarare*—L. *de*, fully & *clarus, clear*. ] *v. t.* ( *obs.* ) *to make clear* स्पष्ट-विशद करणें. २ *to make known by language* शब्दांनीं ज्ञात करणें, कोणत्याही रीतीनें कळविणें, निवेदन करणें, दर्शविणें. ३ *to proclaim, to announce* प्रसिद्ध-जाहीर करणें. ४ *to make declaration of, to assert, to affirm* प्रतिज्ञेवर-निःसंशय-खात्रीपूर्वक सांगणें. ५ *com*. (जकात वगैरे आकारण्यासाठीं मालाची) यादी व वर्णन देणें. ६ ( used reflexively ) आपण कोणत्या पक्षाचे आहों हें जाहीर करणें, आपलें मत उघड रीतीनें बोलून दाखविणें. D. *v. i. to make a declaration or an open & explicit avowal* ( often with *for* or *against* ) अमुक पक्षाचा आहें असें उघडपणें सांगणें. २ *law. to state the plaintiff's cause of action at law in a legal form* वादीची तक्रार कायद्याबरहुकूम मांडणें. ३ *to show cards in order to score* (गुण मिळविण्याकरितां ठरींव पानें) उतरणें-दाखविणें. Declā'ra'ble *a*. स्पष्ट सांगतां येण्याजोगा, जाहीर करतां येण्याजोगा, &c. Declar'ant *n*. प्रसिद्ध करणारा. २ प्रतिज्ञा *f*. करणारा. ३ फिर्याद *f*. मांडणारा. Declarā'tion *n.-act*. प्रकाशन *n*, प्रसिद्धि *f*, जाहिरात *f*, प्रकटीकरण *n*, घोषणा *f*. २ प्रतिज्ञा *f*. ३ जाहिरनामा *m*; as, D. of Independence. ४ *law*. वादीची तक्रार *f*. ५ (of Court) कोर्टाचा ठराव *m*. Declar'ative, Declar'atory *a*. प्रसिद्ध-जाहिर करणारा. Declar'atively *adv*. Declar'atorily *adv*. Decla'rer *n*. स्पष्टपणें सांगणारा, निवेदन करणारा, प्रसिद्धिकर्ता, जाहिर करणारा. Declared *pa. p*. Decla'redly *adv*.

Declension ( dē-klen'-shun ) [ O. Fr. *declinaison*—L. *declinationem* acc. of *declinatio*, declination or declension—L. *declinare*, to bend down.] *n. the act or state of declining, descent, slope* वांकणें *n*, वांक *m*, ढाळ *m*, उतार *m*, उतरण *f*. २ *a downward tendency, deterioration, decay* उतरती कळा *f*, सोंडता पाया *m*, अवनति *f*, ऱ्हास *m*, क्षय *m*, नाश *m*. ३ *the act of courteously refusing* सभ्यपणानें नाकारणें *n*, अस्वीकार *m*. ४ *gram*. ( अ ) विभक्तिरूपें चालविणें *n*, विभक्तिप्रत्यय लावणें *n*. ( ब ) विभक्त्यंतरूप *n*. Declen'sional *a*.

*N. B.*—The nominative was held to be the primary & original form and was likened to a perpendicular line; the variations or oblique cases were regarded as fallings ( hence called *casus*, cases or fallings.) from the nominative or perpendicular and an enumerating of the various forms being a sort of progressive descent from the noun's upright form was called a declension.

Decline ( de-klīn' ) [ O. Fr. *decliner*—L. *declinare*—L. *de*, from & *clinare*, to lean. ] *v. i. to bend or lean downward* वांकणें, नमणें. २ *to deteriorate, to decrease, to decay* उतरणें, खालावणें, उणावणें, क्षीण होणें, अवनति होणें, क्षय-ऱ्हास पावणें, पडणीस-पडघाईस येणें, नासणें. ३ ( in years ) उतारवय होणें, जरा येणें. ४ ( in the world ) लौकिकांत उतरणें, खालावणें. ५ ( the day ) कलणें, उतरणें, परतणें, फिरणें. ६ *to turn aside, &c.* कलणें, झुकणें, बाजूस वळणें-सरणें, सरणें. ७ *to turn away, to shun, to refuse* ( the opposite of Accept or Consent ) मागें वळणें, पराङ्मुख होणें, नाकारणें; as, "He D. d upon principle." D. *v. t. to bend down, to turn away from* वांकविणें, नमविणें. २ *to refuse, to avoid* नाकारणें, नकार देणें, नको म्हणणें, अनंगीकार-अस्वीकार करणें, टाळणें. ३ *gram.* विभक्तिरूपें चालविणें, सुबन्तप्रक्रिया करणें, सविभक्तिक शब्द चालविणें. D. *n.* अवनति *f*, ऱ्हास *m*, नाश *m*. २ ऱ्हासकाल *m*, पडता काळ *m*. ३ *med.* रोगांत पडणारा उतार *m*. Declin'able *a.* वांकवितां येण्याजोगा, &c. २ रूपें चालवितां येण्याजोगा, सविभक्तिक, सुबन्त. Declinā'tion *n.* वांकण *n*, बांक *m*, नति *f*, उतार *m*, कलन *n*, च्युति *f.* २ ऱ्हास *m*, क्षय *m*, नाश *m*. ३ *astron.* क्रांति *f.* [ Declination, Parallel of द्युज्यासमान्तर (वृत्त), अहोरात्रसमानान्तर (वृत्त). D. circle of द्युज्यावृत्त, अहोरात्रवृत्त. D. parallax क्रान्तिलंबन. ] ४ *physics.* च्युति *f*, बांक *m*. Dec'linātor *n.* क्रांतियंत्र *n*, क्रांति मोजण्याचें यंत्र *n*. Declin'atory *a.* नकारार्थी, नकारसूचक, नकारव्यंजक. Declin'ature *n. the act of declining or refusing* नकार *m*. Declī'ner *n.* See verb. Declinometer or Declination Compass चुंबकाचा बांक काढण्याचें यंत्र. *n*, बांककम्पास *m*, दिग्दर्शनी *f*, होकायंत्र *n*.

Declivity (de-kliv'-i-ti) [Fr. *declivite*.—L. *declivitatem* acc. of *declivitas*.—L. *declivus*, sloping downward—L. *de*, down & *clivus*, a slope. ] *n. slope* उतार *m*, उतरण *f*, उतरड *f*, उतरडी *f*, उतरवण *f*, वरंगळ *f.* २ उतरती जागा *f.* Decliv'itous *a.* Declī'vous *a.* उतरता, उतरणीचा, उतरट, वरंगळीचा.

Decoct ( de-kokt' ) [ L. *decoctus p. p.* of *decoquere*, to boil down ; *de*, down & *coquere*, to cook. ] *v. t. to prepare by boiling* उकळणें, कषाय-काढा करणें, शिजविणें. २ (R.) *to digest* पचविणें, जिरविणें. Decoc'tible, Decoc'tive *a.* उकळण्याजोगा, पचविण्याजोगा, &c. Decoc'tion *n. an extract of anything got by boiling* काढा *m*, कषाय *m*. २ काट *m*, कट *m*. [D. ( of acids ) for scouring metals उकाडा *m*. Second D. निकाढा *m*. Aqueous D. जलक्काथ *m*. ] Decoc'ture *n.* (R.) काढा *m*.

Decollate ( de-kol'-āt ) [ O. Fr. *decollation*—Late L. *decollationem*, from *p. p.* of *decollare*, to behead from L. *de*, off & *collum*, the neck.] *v. t. to behead* धर्मवीराला फांशीं देणें, शिरच्छेद करणें. Decoll'ated *a.* Decollā'tion *n.* फांशीं देणें. २ फांशीं दिलेल्या साधूचें किंवा धर्मवीराचें चित्र *n*. हा शब्द विशेषेंकरून सेंट जॉन बाप्टिस्ट याच्या शिरच्छेदास लावतात.

Decolour (de-kul'-ėr) [ L. *de* & Colour. ] *v. t. to deprive of colour, to bleach* रंग काढणें, रंगहीन करणें, अपवर्ण करणें. Also Decolourise & Decolorate. Decol'orant *n.* रंगहीनक द्रव्य *n*, निक्षालक *n*. Decolorā'tion *n.* Decolorizā'tion *n.* रंग काढण्याची क्रिया *f.* Decolourized', Decolorate *a.* रंगहीन झालेला, रंग काढून घेणारें ( द्रव्य ).

Decompose ( dē'-kom-pōz' ) [ L. *de* & Compose.] *v. t. to resolve into original elements, to separate the constituent parts of* विघटन करणें, मूलतत्वें भिन्न करणें *g. of o.*, तत्वें पृथक् करणें, पदार्थांचीं मूलतत्वें निरनिराळीं करणें. २ *to rot, to decay* कुजवणें, सडवणें. D. *v. i. to become resolved* (मूलतत्वें) भिन्नभिन्न होणें, विघटणें. २ *to decay, to rot* सडणें, कुजणें. De'composed *a. zool.* विस्कळित (said of divergent feathers of a bird's crest ). २ See the verb. Decom'positi'on *n.* विघटन *n*, पृथक्करण *n*. २ *decay, dissolution, disintegration* विलय *m*, नाश *m*, कुजणें *n*, कूज *f.* ३ *state of being reduced into original elements* विघटित स्थिति *f*, विघटन *n*. [D. of forces, See Resolution of forces. D. of light प्रकाशाच्या रंगाचें पृथक्करण *n*- विघटन *n*.]

Decompound (dē'-kom-pownd') [ L. *de* & Compound.] *v. t. to form by a second composition* मिश्र पदार्थांचें पुन्हां मिश्रण करणें, पुनर्मिश्रण करणें. २ *See to Decompose.* D. *a.* द्विर्मिश्रित. D. *n.* पुनर्मिश्रण *n*. [D. leaf विभागलेलें संयुक्त पान *n*.] De'compoun'dable *a.* पुन्हां मिश्रण करितां येण्याजोगा.

Deconcentrate ( dē'-kon-sen'trāt ) [ L. *de* & Concentrate. ] *v. t.* (R.) विकेंद्रणें, मध्यबिंदूपासून दूर सारणें- च्युत करणें, केंद्रच्युत करणें. २ एकाग्रता मोडणें. Deconcentrā'tion *n.* (R.) मुख्य ठिकाणापासून फाटाफूट *f*, विकेंद्रीभवन *n*, विकेंद्रीकरण *n*. २ एकाग्रताभंग.

Deconsecrate ( dē-kon'-sē-krāt ) [ L. *de* & Consecrate.] *v. t. to deprive of sacredness, to secularise* अपवित्र करणें, पावित्र्यहीन-रहित करणें, (केवळ पवित्र म्हणून राखून ठेविलेली वस्तु) व्यवहारांत उपयोगास-घेणें. Deconsecrā'tion *n.* अपवित्रता *f*, अपवित्रीकरण *n*, अपवित्रितता *f.*

Decorate ( dek'ō-rāt ) [ From *p. p.* of *decorare*, to adorn—L. *decor* ( for *decos* ), stem of *decus*, honor, ornament. ] *v. t. to adorn, to beautify, to embellish* शृंगारणें, सुशोभित करणें, सजवणें, अलंकारणें, भूषविणें, मंडित-भूषित करणें. Dec'ora'ted *a.* शृंगारलेला, मंडित, विभूषित. Dec'ora'ting *pr. p. a.* शृंगारणारा, मंडनकर्ता-कारी. Decorā'tion *n. the act of decorating* शृंगारणें *n*, प्रसाधन *n*, *&c.* २ *that which adorns or beautifies, ornament* शोभा *f*, अलंकार *m*, भूषण *n*, मंडन *n*. ३

*any mark of honor* (लढाईत केलेल्या पराक्रमाबद्दल अगर विद्याप्रावीण्याबद्दल अगर कलापटुत्वाबद्दल मिळालेल्या) सन्मानाची खूण *f.* (चांद, बिल्ला, पदक वगैरे) विद्वत्ताशौर्य इत्यादिकांचें निदर्शक *n.* [SCULPTURAL D. खोदकामाची नक्षी *f.*] Dec'ora'tive *v.* अलंकारोपयोगी. Decorative work *n.* अलंकृति *f.* Dec'ora'tiveness *n.* Decorā'tor *n.* शृंगारणारा, प्रसाधक *m,* प्रसाधिका *f,* अलंकर्ता, मंडनकार. Decoration day मे महिन्याची ३० वी तारीख. ह्या दिवशीं अमेरिकेंत 'सिव्हिल' लढाईंत कामास आलेल्या शिपायांच्या व खलाशांच्या थडग्यांवर फुलें घालून त्यांचा सन्मान करीत असतात.

Decorous (de-kō'-rus) [L. *decorus,* seemly–L. *decor,* stem of *decus,* seemliness.] *a. suitable to a character or to the time, place and occasion; marked with decorum* शोभेसा, अनुरूप, युक्त, दक्षिण (S.). २ *fit, proper, becoming* योग्य, साजेसा, शोभेसा, उचित. Deco'rously *adv.* Deco'rousness *n.* योग्यता *f,* औचित्य *n,* युक्तता *f,* दाक्षिण्य *n.* Deco'rum *n.* शिष्टरीति *f,* शिष्टाचार *m,* सुरीति *f,* सभ्यता *f,* शिष्टाचार *m,* स्थल व काळ ह्यांना अनुरूप-साजेसें बाह्य वर्तन *n,* उचित वर्तन *n,* औचित्य *n,* योग्य-यथायोग्य वर्तणूक *f,* मर्यादा *f,* विनय (S.) *m.*

*N. B.*—Decorum (बाह्य) शिष्टाचार *m,* Dignity थोरपणा *m,* थोरवी *f.* Decorum, in accordance with its etymology, is that which is becoming in outward act or appearance; as, "the D. of a public assembly." Dignity springs from an inward elevation of soul producing a corresponding effect on the manners; as, "D. of personal appearance." (Web.)

Decorticate (de-kor'-ti-kāt) [L. *de* & *cortex,* bark.] *v. t. to divest of the exterior coating, to peel* साल *f.* कवच *n.* काढणें, साल *f.* सोलणें. Decorticā'tion *n.* साल काढणें *n.* Decorticā'tor *n.* साल काढण्याचें यंत्र *n,* सोलणें *n.* (on the analogy of कातणें *n.* = कातण्याचें यंत्र *n.*)

Decoy (de-koy') [Pref. *de* + *coy*; Decoy originally meant to quiet, to soothe, caress, entice.] *n. anything intended to lead into a snare; a lure that deceives and misleads into danger, or into the power of an enemy; a bait* आमिष *n,* लालूच *f,* प्रलोभन *n.* २ *a fowl or the likeness of one used by sportsmen to entice other fowl into a net or within shot* (दुसरे पक्षी फसवून आणण्याकरितां) शिकविलेला पक्षी *m.* ३ *a place into which wild fowl esp. ducks, are enticed in order to take or shoot them* पक्षी भुलवून आणण्याची जागा *f.* ४ *a person employed by officers of justice, or parties exposed to injury, to induce a suspected person to commit an offence under circumstances that will lead to his detection* संशयित मनुष्य पकडला जावा म्हणून त्याला गुन्हा करावयास लावणारा *m,* प्रलोभक. D. *v. t. to entrap, to insnare* आशा दाखवून (फसवून) पाशांत-जाळ्यांत -सांपळ्यांत पकडणें, फसविणें, पाशबद्ध करणें, (मोह घालून) पाशांत पाडणें. Decoyed' *pa. t.* Decoy'ing *pr. p.*

Decrease (de-krēs') [O. E. *decrecen*–O. Fr. *decreistre,* Fr. *decroitre*–L. *decrescere,* to grow less.] *v. i. to be diminished gradually* कमी-उणा-न्यून होणें, हलका-मंद पडणें-होणें, मंदावणें, मंदाई *f.* मंदी *f.* होणें. २ क्षय *m.* ऱ्हास *m.* होणें. D. *v. t. to cause to grow less* कमी-उणा-न्यून करणें. D. *n,* Decreas'ing *n.* उतार *m,* मंदाई *f,* मंदी *f.* २ क्षय *m,* ऱ्हास *m.* [DECREASING SERIES ऱ्हासश्रेणी *f.*] Decreas'ingly *adv.* Decre'ment *n.* न्यूनता *f,* तूट *f.* २ क्षय *m,* ऱ्हास *m.* ३ कमी झालेला अंश *m.* ४ अपचय *m,* ऋणवृद्धि *f.*

*N. B.*—Decrease एकदम लक्ष्यांत न येणाऱ्या कारणांनीं कमी होत जाणें, Diminish दृश्य कारणांनीं कमी होणें.

Decree (de-krē) [M. E. *decree,* O. Fr. *decret*–L. *decretum* neut. of *decretus, p. p.* of *decernere,* to decide. *de* + *cernere,* to decide.] *v. t. to determine judicially by authority or decree* हुकूमनामा *m.* देणें, फैसला *m.* निवाडा *m.* करणें. २ *to ordain by fate* नशिबानें-दैवानें ठरविणें. D. *v. i. to make decrees* हुकूम *m.* आज्ञा *f.* करणें; as, "Father eternal! thine is to D." "Mine, both in heaven and earth, is to do thy will." D. *n. an order from one having authority* आज्ञा *f,* हुकूम *m,* ठराव *m.* २ *edict, law, authority, rule* ठराव *m,* नियम *m,* कायदा *m.* ३ हुकूमनामा *m,* निर्णयपत्र *n,* डिक्री *f,* निवाडा *m,* निकाल *m.* ४ लवादीचा हुकूमनामा *m,* निवाडा *m.* Decree'able *a.* हुकूमनामा देण्यायोग्य. २ ठराव करण्याजोगा. ३ हुकूमनाम्यासंबंधीं. Decree'r *n.* Decre'tal *a.* ठरावासंबंधीं, ठरावाचा. D. *n.* आज्ञापत्र *n,* 'पोपचें' आज्ञापत्र *n,* व्यवस्थापत्र *n,* निर्णयपत्र *n.* २ *the collection of ecclesiastical decrees and decisions made by order of Gregory IX, in 1234 by St. Raymond of Pennafort* नवव्या ग्रेगरीच्या आज्ञेनें सेन्ट रेमन्ड यानें केलेला धर्मनिर्णयपत्रांचा-व्यवस्थापत्रांचा संग्रह *m,* धर्मनिर्णयसंग्रह *m.* Decre'tist *n.* अशा धर्मनिर्णयांत निष्णात. Decre'tive *a.* हुकूमनाम्यासारखा अधिकार ज्याला आहे असा. Dec'retory *a.* हुकूमनाम्यानें ठरवलेला, निश्चायक, ठराविक.

Decrepit (de-krep'-it) [L. *decrepitus,* noiseless, creeping about like an old man, aged–L. *de,* away & *crepitus,* noise, allied to *crepitus p. p.* of *crepare,* to crackle, to make noise.] *a. broken down with age, worn out* जराग्रस्त, जर्जर, जख्ख, अतिवृद्ध. Decrep'itness *n.* Decrep'itude *n.* जरा *f,* वार्धक्य *n,* जरावस्था *f.* Sometimes incorrectly spelt as Decrepid.

Decrepitate (de krep'-i-tāt) [See Decrepit.] *v. i. to crackle* तडतडणें, तुडतुडणें, (विस्तवांत मीठ किंवा

मोहऱ्या तडतडतात त्याप्रमाणें). D. *v. t.* तडतडणें.
Decrepitā'tion *n.* तडतड *f,* तुडतुड *f.*

Decry (de-krī') [O. Fr. *descrier*, to cry down, disparage–O. Fr. *des* (L. *dis*), implying the reversal of an act & here opposed to cry up; *crier*, to cry.] *v. t. to cry down, to clamour against* नांवानें हाका मारणें-बोंब *f.* मारणें, शंख करणें. २ *to blame clamourously, to discredit* दोष लावणें. ३ *to disparage* किंमत कमी करणें, नालस्ती करणें, निंदा करणें. Decri'al *n.* आक्षेप *m,* अपवाद *m.* Decried *a.* Decri'er *n. one who decries* दोष लावणारा, &c., नांवानें हाका मारणारा.

Decumbent (de-kum'-bent) [L. *decumbens,–entis, pr. p.* of *decumbere; de & cumbere*, to lie down.] *a. lying down, prostrate* निजलेला, पडलेला. *bot.* भुईसरपट, शयान, विलीन. Decumbā'tion, Decum'bence, Decum'bency *n.* आडवा पडलेली स्थिति *f,* शयानस्थिति *f,* शय्यागमन *n-* पतन *n.* Decum'bently *adv.* आडवा पडलेल्या स्थितींत. Decū'bital *a.* Decū'bitus *n. an attitude assumed in lying down* आजारीपणांत रोगी ज्या तऱ्हेनें निजून राहिला असेल ती तऱ्हा *f-* स्थिति *f.* [DORSAL DUCUBITUS पाठीवर उपडें निजून राहणें.] Decum'biture *n.* आजारानें विछान्यांत पडून राहणें *n,* शय्यावर्तन *n.* २ आजारानें विछान्यावर पडून राहण्याचा काळ *m,* शय्यावर्तनकाल *m.* ३ *astrol. aspect of the heavens at the time of taking to one's sick-bed, by which the prognostics of recovery or death were made* मनुष्याच्या आजारी पडण्याच्या वेळची ग्रहस्थिति *f-* कुंडली *f.*

Decurrent (de-kur'-ent) [L. *decurrens,–entis pr. p.* of *decurrere*, to run down; *de*, down & *currere*, to run–Fr. *decurrent.*] *a.* खालपर्यंत पसरणारें, अधोगामी, अधःपाती. Decur'rency *n.* Decur'rently *adv.* Decur'sion *n.* अधःपतन *n,* अधोधावन *n,* अधोद्रावण *n,* खालीं पसरणें *n.* Decur'sive *a.* Decur'sively *adv.*

Decussate (de-kus'-āt) [L. *decussatus pr. p.* of *decussare*, to cross like an X, from *decussis* (orig. equiva. to *decem asses*) the number ten, which the Romans represented by X.] *v. i. to cross at an acute angle, to intersect or lie across so as to form the figure* 'X' एक्सचा आकार होईल असें एकमेकांस छेदणें. Decus'sate,-d *a. crossed or intersected* अन्योन्य छेदक. २ *bot.* समोरासमोरच्या कोनांत कापणारीं (पानें).

Dedicate (ded'-i-kāt) [L. *dedicatus pa. p.* of *dedicare*, to affirm, to dedicate; *de + dicare*, to declare, to dedicate, akin to *dicere*, to declare.] *v. t. to set apart and consecrate, to devote formally and solemnly* (निराळें काढून ठेवून) पवित्र कामाकडे उपयोग करणें. २ *to devote one's self to a duty or service* वाहून घेणें. ३ *to address as to a patron* अर्पण करणें, वाहणें, समर्पिणें, उत्सर्ग *m.* करणें *g. of o.,* लावणें-देणें with कडे *of o.* [To D. ONE'S SOUL, BODY AND SUBSTANCE तनमनधन समर्पण करणें.] ४ नांवानें अर्पण करणें; as, "To D. a book." D. *a.* अर्पण केलेलें, &c. Ded'icant *n.* अर्पण करणारा. Dedicatee' *n.* ज्याला अर्पण केलें आहे तो. Dedicā'tion *n.* समर्पण *n,* अर्पण *n,* प्रतिष्ठा *f,* विनियोग *m* (S.) २ विशेष कामाकरितां निराळें काढून ठेवणें *n.* ३ ग्रंथार्पण *n.* ४ अर्पणपत्रिका *f,* ग्रंथार्पणलेख *m.* Ded'icā'tor *n.* अर्पण करणारा. Dedicatō'rial, Ded'icā'tory *a.* अर्पणविषयक.

Deduce (de-dūs') [L. *deducere*, from *de*, down & *ducere*, to bring.] *v. t. to derive by logical process, to infer* (with *from* or *out of*) निगमनानें-तर्कानें काढणें-घेणें, अनुमान *n-* तर्क *m.* काढणें-करणें. २ (R.) *to reduce, to diminish* कमी करणें. ३ *to take away, to subtract* वजा करणें. ४ *to lead forth* पुढें नेणें (a Latinism). Deduce'ment *n.* (R.) Deducibil'ity *n.* Dedu'cible *a.* निगमन-अनुमानसाध्य, अनुमेय. Deduct' *v. t.* कमी करणें. २ वजा करणें. Deduc'tive *a.* अनुमानाचा, आनुमानिक. २ *log.* निगमनात्मक. [D. INFERENCE OR REASONING निगामी–व्यापकसाधित अनुमान *n.* D. LOGIC निगमन (न्यायशास्त्र) *n.*] Deduc'tion *n. act or process of deducing or inferring* अनुमान काढणें *n,* तर्क काढणें *n,* अनुमानपद्धति *f.* २ *subtraction* वजा-बाद करणें *n,* वजाबाकी *f.* ३ *inference, conclusion* अनुमान *n,* साध्य (S.) ४ *that which is deducted, abatement* वजात *f.* ५ *log.* निगमन *n,* सर्वसाधारण सिद्धांतावरून विशेष सिद्धांताचें अनुमान काढणें *n,* विशेषीकरण *n.* ६ *math.* निगामी सिद्धान्त *m,* निगमन *n.* Deduc'tively *adv.* अनुमानानें, अनुमान करून, निगमनानें.

Deduct. See Deduce.

Deed (dēd) [M. E. *deed;* A. S. *dǣd.*] *n. that which is done* कृत्य *n,* काम *n,* कार्य *n,* क्रिया *f.* [A VIRTUOUS OR GOOD D. सुकर्म *n,* सत्कृत्य *n.*] २ *an illustrious act or achievement, exploit* सत्कर्म *n,* कर्म *n,* महत्कृत्य *n,* महत्कार्य *n,* अद्भुतकृत्य *n,* पुरुषार्थ *m,* दिग्विजय *m,* शतकृत्य *n.* ३ *fact, reality* खरें, सत्य, यथार्थता, तत्व, अर्थ, वस्तु. Deeds चरित्र *n,* चरित *n.* [To PERFORM A MIGHTY D. अचाट कृत्य *n.* करणें, महत्कृत्य *n.* करणें. To PERFORM DEEDS OF VALOUR धार *f.* मारणें, पराक्रम गाजविणें.] ४ *law.* खत *n,* पत्र *n,* लेख *m,* दस्तऐवज *m.* [D. OF ACQUITTANCE राजीनामा *m.* D. OF AGREEMENT करारनामा *m,* संमतिपत्र *n.* D. OF GIFT दानपत्र *n.* D. OF CONVEYANCE फरोक्तखत *n.* D. OF LEASE OR TENURE पट्टा *m.* D. OF PURCHASE खरीदखत *n,* खरीदपत्र *n.* D. OF RELINQUISHMENT सांडखत *n,* सोडचिठ्ठी *f.* D. OF SALE फरोक्तखत *n.* IN D., IN EVERY D. खरोखर, वास्तविक. D. OF SETTLEMENT ठरावपत्र *n.*] Deed'ful *a.* (R.) पराक्रमयुक्त, महत्कार्ययुक्त.

Deem (dēm) [M. E. *demen;* A. S. *deman*, to judge, to give a doom.–A. S. *dom*, a doom.] *v. t. to account, to esteem, to judge, to regard* मानणें,

समजणें, जाणणें, गणणें, लेखणें, धरणें. D. *v. i. to estimate, to be of opinion, to suppose* अंदाज करणें, मत असणें, वाटणें. D. *n.* मत *n.* Deem'ster, Demp'ster *n.* आईल ऑफ् मॅन बेटांतील दोन न्यायाधिशांचीं नांवें.

Deep (dēp) [M. E. *deep*; A. S. *deop.*] *a. extending far below the surface, far to the bottom* खोल, निम्न, ऑंड (R.); as, "A D. sea." २ *extending far back from the front or outer part* लांब, लांबचलांब; as, "A gallery ten seats deep." ३ *low in situation, lying far below the general surface* खोलगट, सखल; as, "A D. valley." ४ *hard to comprehend, profound, intricate, mysterious, obscure* कठीण, गहन, अगम्य, दुर्बोध, निगूढ, खोल, गूढ; as, "A D. subject." ५ *of penetrating intellect, sagacious, cunning* कुशाग्रबुद्धीचा, तीक्ष्णबुद्धीचा, कारस्थानी, कावेबाज, धूर्त, पक्का, पोहोंचेल, दूरदृष्टि, शहाणा, पोक्त, आंतल्या गांठीचा, लुच्चा, विशाल बुद्धीचा, अभिज्ञ, निष्णात, पुरा, थोर, जाडा; as, "D. clerks she dumbs." (Shakes.) ६ *thorough, complete, intense, heavy, heartfelt* भरपूर, भारी, फारच, अत्यंत, पराकाष्ठेचा, अगदीं, अतिशयित, पूर्ण, परिपूर्ण, मनापासूनचा, अंतःकरणपूर्वक, गाढ, गडद; as, "D. darkness, D. respect, D. sleep, &c." ७ *strongly coloured, dark, intense* गर्द रंगाचा, पक्का, दाट, गर्द, भोर (in काळाभोर), similarly लालबुंद, हिरवागार, पिंवळा धमक, &c. ८ *of low tone, full-toned, grave* खोल, गंभीर, खरजांतला(?), मंद्र(?). ९ *muddy, boggy, sandy* (said of roads) रेताड, चिखल असलेला, चिकचिकीत. D. *n.* ऑंड-खोल पाणी *n*, समुद्र *m*, दर्या *m.* २ *dead* ऐन, भर (used as a prefix in com.); as, "D. of winter" ऐन-भर हिंवाळा. D. *adv.* पूर्ण, फार खोल, अत्यंत. Deep-browed *a. of high intellectual powers* विशालबुद्धीचा. Deep-drawing *a.* ज्याला तरंगण्यास खोल पाणी लागतें असें (तारूं). Deep'en *v. t.* खोलावणें, खोल करणें, जास्त खोल करणें, खोली वाढविणें, ऑंड करणें. २ *to make darker or more intense, to darken* गर्द-दाट करणें, तीव्र करणें, उठून दिसेल असा करणें, गहिरा करणें. ३ *to make more poignant or affecting, to increase in degree* अधिक तीव्र करणें, (च्यांत) भर घालणें-पाडणें. ४ गंभीर-खोल करणें. D. *v. i.* खोल-गहन-गंभीर, &c. होणें. Deep-laid *a.* फार खोल विचारानें केलेला. Deep'ly *adv.* खोल. २ पूर्णपणें. [D. VERSED पारंगत.] ३ अति. ४ गंभीरपणानें. ५ खोल विचारानें. Deep'most *a.* अतिशय खोल. Deep-mouthed *a.* खणखणीत व मोठ्या आवाजाचा. Deep'ness *n.* Depth *n.* खोली *f*, सखलपणा *m*, गांभीर्य *n.* [TO GET OUT OF ONE'S D. *lit. & fig.* खोल पाण्यांत शिरणें.] २ खोलपणा *m*, गूढता *f*, गूढभाव *m.* Deep-read *a.* बहुश्रुत, ज्याचें पुष्कळ वाचन झालें आहे असा. Deep-sea *a.* समुद्राच्या खोल भागासंबंधीं. Deep-seated *a.* ठामपक्का बसलेला. Deep-toned *a.* खोल आवाजाचा, गंभीर.

Deer (dēr) [M. E. *deer*, an animal. A. S. *deor*, a wild animal.] *n.* हरिण *n*, मृग *m*, हरण *n*, कुरंग *m.* [SOME SPECIES ARE:—चितळ, डांगळ, सूकर, भेकर OR रें, माळशिकारी हरण, रोही, सारंग, ताम्रमृग, कृष्णमृग OR कृष्णसार, सांबर. BOUNDING OF A D. चौकडी *f.*] २ (*obs.*) वन्यप्राणी *m*, मृग *m.* Deer-catcher *n.* फांसेपारधी *m*, पाशी *m.* Deer-eyed *a.* मृगनयन, मृगलोचन, मृगनेत्री. Deer-herd *n.* हरिणाचा कळप *m.* Deer-hound *n.* हरिणाची शिकार करणारा कुत्रा *m.* Deer-lick *n.* खारटाण *f.* ही जमीन गुरें, हरणें इत्यादि चाटतात. Deer-mouse *n.* अमेरिकेंतील एक जातीचा पांढऱ्या पायाचा चपळ उंदीर *m.* Deer-neck *n.* हरिणासारखी बारीक व बेडौल मान *f.* (हरिणमान *f.*). Deer-skin *n.* हरणाची कातडी *f*, मृगाजिन *n.* Deer-stalker *n.* लपून छपून हरणाची शिकार करणारा पारधी *m.* Deer-stalking *n.* लपून छपून केलेली पारध *f.* Deer *pl.* Small deer क्षुद्र प्राणी *m.* (शिकारीचा). २ (*metaph. & lit.*) भिकारडी शिकार *f.*

Deface (de-fās') [O. E. *defacen*, to disfigure, to efface – O. Fr. *desfacier*, to deface, to disfigure–L. *dis*, apart & *facies*, face.] *v. t. to disfigure, to mar, to spoil* रूपभंग करणें, रंगरूप बदलणें, मूळरूपाचा नाश करणें, (ओळख बुजे इतकें) विरूप करणें, ओळखीचें साधन बुजविणें, खराब करणें *n*, बिघडवणें *n*, भंगवणें. २ (*obs.*) *to destroy, to injure by effacing* खोडणें, खरडून टाकणें. Defaced' *a.* विरूप, कुरूप केलेला. Deface'ment *n.* विरूप करणें, बिघडवणें, खंडन *n*, विच्छेद *m.* २ रूपनाश *m*, खंडितता *f.* ३ विरूपता *f.* Defa'cer *n.* विरूप करणारा, विरूपक. २ विरूपता आणणारी-रूपघ्न-वस्तु *f.* Defa'cingly *adv.*

*N. B.*—Deface रूपभंग करणें, Efface पुसून टाकणें. For accurate meanings of Deface, Deform, Disfigure, See Disfigure.

Defalcate (de-fal'-kāt) [From *p. p.* of Late L. *defalcare*, to abate, deduct; *de*, away & Late L. *falcare*, to cut with a sickle, from L. *falx*, stem of *falc*, a sickle.] *v. i. to cut off, to deduct* (used chiefly of money, accounts, rents, income, &c.) कमी-न्यून करणें, (खर्च) तोडणें-छाटणें. *v. t. to commit defalcation, to embezzle money held in trust* (जिमा म्हणून ठेवलेले) पैसे खाऊन जाणें, (पैशाची) अफरातफर करणें, (ठेवी) खाणें-गडप करणें, (पैशाची) गफलत करणें. Defalca'tion *n.* तोटा *m*, कमताई *f*, कोताई *f.* २ तोड *f*, तोडलेली वस्तु *f.* ३ (पैशाची) अफरातफर *f.* Defalca'tor *n.* (पैशाची) अफरातफर करणारा, अफरातफऱ्या.

Defame (de-fām') [L. *de* & Fame.] *v. t. to disgrace, to harm the good fame of* अब्रूस कलंक *m.* लावणें, अब्रूनुकसानी *f.* करणें, नाचक्की *f.* करणें, नालस्ती *f.* करणें. २ *to render infamous* (ची) बदनामी *f.* बेअब्रू करणें, अभिशंसन *n*-अपभाषण *n*-विकत्थन *n.* करणें *g. of o.* ३ (R.) *to* (ची) आब *f.* अब्रू *f.* इज्जत *f.* हुर्मत *f.* घेणें.

*accuse* तोहमत-आरोप ठेवणें. D. *n.* (*obs.*) अपमान *m*, अप्रतिष्ठा *f.* Defamā'tion *n.* *calumny, aspersion* अब्रू घेणें *n.* २ *law.* अब्रूनुकसानी *f*, बेअब्रू *f*, नाचक्की *f*, नालस्ती *f*, अपभाषण *n.* Defama'torily *adv.* Defama'tory *a.* निंदात्मक, अब्रूनुकसानीचा, नालस्तीचा. Defa'mer *n.* अब्रू घेणारा. Defa'ming *a.*

*N. B.*—In modern usage written defamation bears the title of *libel* and oral defamation that of *slander.* (Web.)

Default (de-fawlt') [M. E. *defaute*–O. Fr. *defaute, defalte*–Fr. *defaut*–Low L. *defalta*, from a verb meaning to be deficient; from L. *de* & *fallere*, to deceive.] *n.* *failure, omission, fault* चूक *f*, कसूर *f*, अपराध *m*, दोष *m*, अंतर *n*, तफावत *f*, दुराचार *m.* २ *fault, offence* गुन्हा *m*, अपकृत्य *n.* ३ *law.* कसूर *m*, गफलत *f*, नेमलेल्या दिवशीं कोर्टांत गैरहजर राहणें *n.* [JUDGMENT BY DEFAULT कोर्टांत हजर न झाल्यामुळें किंवा आपलें म्हणणें न कळविल्याउळें एखाद्या विरुद्ध झालेल्या खटल्याचा निकाल *m*, एकतर्फी निकाल *m.* IN DEFAULT OF (च्या) अभावीं, (च्यांत) अंतर पडलें तर. IN DEFAULT OF PAYMENT पैसे न भरल्यामुळें. TO SUFFER A DEFAULT एकतर्फी निवाडा होऊं देणें.] D. *v. i.* *to fail in duty, to offend* (वादीनें-साक्षीनें-पंचानें) कर्तव्यास चुकणें, अपराध *m*- गुन्हा *m*- चूक *f.* करणें. २ *to fail in fulfilling a contract, agreement, or duty* करार पुरा करण्यास चुकणें, वचन न पाळणें, (कामांत–चाकरींत–बोलींत) कसर करणें. ३ *to fail to appear in court* कोर्टांत हजर राहण्यास चुकणें. ४ *to let a case go by default* (आपल्यावर) एकतर्फी निवाडा होऊं देणें. D. *v. t.* *to fail to perform or pay* चूक *f*- कसूर *f.* करणें, न देणें, न भरणें. २ (*law.*) *to enter a default against* वादी हजर नाहीं असें लिहून ठेवणें. ३ (*obs.*) *to omit, to leave out of account* सोडून देणें. Default'er *n.* (कामांत-चाकरींत-बोलींत) कसर करणारा-तफावत करणारा, लाजीमदार. [D. IN ACCOUNTS हिशेबचोर *m*, तजकन्या *m.*] २ (हुकुमाप्रमाणें कोर्टांत हजर न झालेला) गैरहजीर मनुष्य *m.* ३ हिशोबचोर *m*, उचापत करणारा *m.* ४ (वर्गणी वगैरे) न देणारा, न भरणारा.

Defeasance (de-fē'-zans) [O. Fr. *defesant, defeisant pr. p.* of *defaire, desfaire*, to render void–Fr. *des* (*dis*), apart & *faire* (L. *facere*), to make.] *n.* (*obs.*) *a defeat, an overthrow* हार *f*, पराजय *m*, पराभव *m.* २ *a rendering null or void* रद्द-बातल करणें *n*, नियमभंग *m*, व्यर्थ-रद्द करणें *n.* ३ (*law.*) (मुख्य दस्तऐवज) रद्द करणारी अट *f.* Defea'sanced *a.* Defea'sible *a.* रद्द करण्यास योग्य, लोपनीय. Defea'sibleness *n.* Deed of defeasance (E. *law.*) खत किंवा दस्तऐवजाबद्दल जी एखादी अट पाळल्यास तो दस्तऐवज कायद्यानें रद्द ठरविला जातो त्या अटीचा कागद.

Defeat (de-fēt') [M. E. *defaiten*, to defeat; O. Fr. *Desfait-desfaire.* Lit. it means *to undo, to disfigure, to destroy* नाश करणें, बिघडविणें, पायमल्ली करणें; but this meaning is obsolete.] *v. t.* *to overcome, to vanquish* (चा)पराजय *m*-पराभव *m.* करणें. २ (*a*) *to render null, or void* रद्द-व्यर्थ-बातल करणें, बुडवणें; as, "To D. a title." (*b*) *to frustrate* (चा) मोड *m*-भंग *m.* करणें, (च्या वर) पाणी फिरविणें. (*c*) *to deprive of* (जिंदगी *f.*) काढून घेणें; as, "The escheaters defeated the right heir of his succession." ३ *to resist with success* चालूं न देणें, होऊं न देणें. D. *n.* Defeat'ing *n.* जिंकणें *n*, पाडाव *m*, पराजय *m*, पराभव *m*, अपजय *m.* [TO ACKNOWLEDGE D. हार जाणें.] २ भंग *m*, नाश *m*, घात *m*, विघात *m.* Defeat'ed *a.* जिंकलेला, पराजित, पराभूत. २ नासलेला, मोडलेला. Defeat'ure *n.* (*obs.*) पराजय *m.* २ कुरूपता *f.* To defeat one's hopes (चा) आशाभंग करणें.

Defecate (def'-e-kāt) [L. *defaecatus p. p.* of *defaecare*, to defecate–L. *de*, out & *fæx, fæcis*, dregs.] *v. t.* *to clear from impurities, to purify* मळ *m.* काढणें, निर्मळ करणें, स्वच्छ करणें, शोधन करणें. २ *to clear* शुद्ध करणें. D. *v. i.* मळ निवणें, निर्मळ होणें. २ *to void excrement* घाण निघून जाणें. D. *a.* शुद्ध केलेला, स्वच्छ केलेला. Defecā'tion *n.* शोधन *n*, मलापकर्षण *n*, निर्मळ करणें *n.* Defecā'tor *n.* शोधणारा, शोधक.

Defect (de-fekt') [L. *defectus*, a want—L. *defectus p. p.* of *deficere*, to fail, originally to undo—L. *de*, away & *facere*, to make.] *n.* *a want, a deficiency, an imperfection* व्यंग *m*, कसर *f*, उणेपणा *m*, कमीपणा *m*, कोतेपणा *m*, अपूर्णता *f*, वैकल्य *n.* २ *a failing, a fault* दोष *m*, भूल *f*, चूक *f*, अंतर *n.* ३ *an imperfection* दोष *m*, व्यंग *n*, खोड *f.* ४ *a blemish* छिद्र *n*, उणें *n*, गोम *f*, बिंग or गें *n.* D. *v. i.* (*obs.*) *to fail, to become deficient* उणें पडणें, कमी पडणें. D. *v. t.* (R.) *to injure, to damage* नुकसान *n.* करणें. Defectibil'ity *n.* (R.) अपूर्णता *f.* Defec'tible *a.* (R.) अपूर्ण. Defec'tion *n.* *a desertion, a revolt, an apostacy, a failure in duty* फितुर, त्याग, बंड, कर्तव्यांत चूक *f*, परित्याग *m.* Defec'tionist *n.* फितुरीस उत्तेजन देणारा. Defec'tive *a.* *imperfect*, उणा, अपुरा. २ *faulty* सदोष, कसरीचा. ३ *gram.* रूपें बरोबर न चालवितां येण्याजोगा, गौण; as, "D. noun or verb." Defec'tively *adv.* Defec'tiveness *n.* Defects of one's qualities सद्गुणातिशयापासून सहजरीत्या उत्पन्न होणारे प्रमाद, सद्गुणांचे दोष.

Defence (de-fens') [M. E. *defence*–O. Fr. *defense*–L. *defensus*, a defending–L. *de*, down & *fendere*, to strike.] *n.* *the act of defending* रक्षण *n*- बचाव *m.* करणें *n.* २ *the state of being defended* रक्षण *n*, बचाव *m.* ३ *that which defends or protects, a guard* रक्षण करणारा, रक्षक, पालक, बचावाचें साधन *n*, बचाव *m*, आसरा *m*, छत्र *n*, आश्रय *m*, ढाल *f.* (*fig.*) ४ *protecting plea, vindication, justification* (बचावाची)

सबब *f*, म्हणणें *n.* ५ *(law) the defendant's answer or plea* प्रतिवाद्रीचा जवाब *m*. म्हणणें *n.* ६ *art or skill in making defence, defensive plan or policy* रक्षण-कौशल्य *n*, बचावाचें चातुर्य *n*, रक्षण-बचावयुक्ति *f.* ७ *(obs.) prohibition, a prohibitary ordinance* मना *f*, मनाई *f*, बंदी *f*, मना करणारा-प्रतिबंधक कायदा *m*, धार्मिक मनाई *f*, शास्त्राचा निषेध *m*. D. *v. t.* *(obs.) to furnish with defences, to fortify* तटबंदी करणें. Defence'less *a.* Defence'lessness *n.* Defenc'es *n. pl.*

Defend (de-fend') [M. E. *defenden*—O. Fr. *defendre* —L. *defendere*, to defend, to strike down or away—L. *de*, down & *fendere*, to strike. cf. Sk. हन्, to strike. ] *v. t. (obs.) to ward off, to drive back or away, to repel* काढून लावणें, पिटाळून लावणें, दूर करणें. २ *(obs.) to prohibit, to forbid* अटकाव-मनाई करणें, (चाल-रिवाज) बंद करणें-पाडणें. ३ *to repel danger or harm from, to protect, to uphold, to guard* भय-दुःख दूर करणें, संभाळणें, (चा) बचाव करणें, (चें) समर्थन करणें, (च्या) तर्फे-वतीनें बोलणें, (चा) पक्ष घेणें. ४ *(law) to contest (as a suit), to oppose or resist (as a claim)* प्रतिवादी होऊन दाव्याचा उत्तरपक्ष चालवणें, जाब देणें, (च्या) विरुद्ध (कोर्टांत) हजर रहाणें; as, "To D. an action." Defen'dable *a.* (R.) रक्षण करितां येण्याजोगा, रक्ष्य. Defen'dant *n.* रक्षण करणारा. २ प्रतिवादी *m*, प्रतिपक्षी *m*. D. *a.* बचाव करण्यालायक, रक्षण करणारा, राखता. Defendee' *n.* (R.) ज्याचें रक्षण केलें आहे तो, रक्षाविषय, रक्षित. Defen'der *n.* रक्षक *m*, त्राता *m*, संरक्षक *m*, कैवारी *m*, कैपक्षी *m*. Defen'sative *n.* रक्षण करणारा पदार्थ *m*. Defense *n.* & *v. t.* See Defence. Defensibil'ity *n.* रक्षण करितां येण्याची शक्यता *f*. Defen'sible *a.* रक्षणीय, गोपनीय, स्वसंरक्षणशील, स्वसंरक्षणक्षम, स्वतःचा बचाव करून घेणारा. Defen'sive, Defen'sory *a.* रक्षणाचा, रक्षणोपयोगी. २ बचावाचा, आत्मरक्षक. ३ शत्रूस मागें हटवून आत्म-संरक्षण करावयाचा (opposed to offensive). [To BE ON THE DEFENSIVE OR TO STAND ON THE DEFENSIVE आत्मसंरक्षणाच्या तयारीनें रहाणें. ] ४ *bot.* बचाव करणारें, संरक्षक. Defen'sively *adv.* आत्मसंरक्षण मात्र करून. Defender of the faith धर्मसंरक्षक, इंग्लंडच्या राजाची एक पदवी *f*, सद्धर्मप्रतिपालक.

Defer (de-fer') [M. E. *differren*—O. Fr. *differer*, to delay—L. *differre*—L. *dif* (*dis*), apart and *ferre*, to bear.] *v. t. to put off, to postpone, to delay* पुढें लांबणीवर टाकणें, उशीर *m*. विलंब *m*. वेळ *f*. लावणें, दिरंगाईवर नेणें, कालांतरावर-दिवसगतीवर लोटणें, लांबणीवर टाकणें. D. *v. i. to put off* दिवसगत लावणें, विलंब लावणें. Defer'ment *n.* (R.) दिवसगत लावणें *n*, लांबणीवर टाकणें *n*, दिवसगत *f*, लांबण *f*, दिरंगाई *f*. Defer'rer *n.* लांबणीवर टाकणारा.

Defer (de-fer') [O. Fr. *deferer*, to admit or give way to an appeal—L. *deferre*—L. *de*, down & *ferre*, to bear or carry. ] *v. t. (obs.) to render, to offer* देणें, अर्पण करणें; as, "Worship deferred to the Virgin." २ (with *to*) *to submit in a respectful manner* आदरानें-नम्रतापूर्वक पुढें मांडणें, सादर करणें. D. *v. i.* (with *to*) *to submit to the opinion of another* (च्या) सांगण्याला-मताला मान देणें, (चें) ऐकणें; as, "To D. to a friend's judgment." Def'erence *n. regard, respect* मान *m*, आदर *m*. Def'erent *n.* वाहक, नेणारा; as, "Though air be the most favourable D. of sounds." [DEFERENT DUCT (*anat.*) वाहक नलिका *f*.] Deferen'tial *a.* भिडस्त, मर्यादशील. २ भिडेचा, मुरवतीचा. Def'erentially *adv.* Deferred annuity नियमित वेळीं एखाद्या कंपनींत (मंडळीच्या) पेढीवर ठेविलेल्या पैशाव-रील मिळणारें व्याज *n*. (हें भांडवल मात्र कधींच परत मिळत नाहीं, फक्त व्याज मिळावयाचें असतें.) Deferred-pay लष्करी शिपायांना नोकरी सोडावयाच्या वेळीं मिळा-वयाचें विशेष प्रकारचें वेतन (शिपाई वारल्यावर हें वेतन त्याच्या कायदेशीर हक्कदारास मिळतें).

Defervescence (de-fer-ves'-ens) [L. *defervescere*, to cease boiling—L. *de*, down & *fervescere*, from *fervere*, to boil.] *n. abatement of heat* ज्वरनिर्गम *m*, उष्णता कमी होणें *n*. २ ताप-ज्वर कमी होण्याचें लक्षण *n*. (अंगांतील ताप कमी होऊन) आंगची स्वाभाविक उष्णता येण्याची स्थिति *f*.

Deficient (de-fish'-ent) [From stem of *pr. p.* of L. *deficere*, to fail. ] *a. not sufficient, incomplete, imperfect* उणा, कमती, अपुरा, न्यून. [D. IN INTELLECT अडाणी, अपुऱ्या बुद्धीचा, बुद्धिहीन. D. IN ANY ORGAN व्यंग, हीनांग, विकलेंद्रिय.] Defi'ciency (Sometimes) Defi'cience *n. want, failure* वाण *f*, कमताई *f*, कोताई *f*, उणीव *f*, तोटा *m*. २ *defect, imperfection* अपूर्णता *f*, अभाव *m*, दोष *m*, छिद्र *n*. [SLIGHT D. OR EXCESS कमजास्त *n*, कमजास्ती *f*, कंपेश *m*. DEFICIENCY OF CURVE वक्राभाव.] Defi'ciently *adv.* Defi'cientness *n.*

Deficit (de-fis'it) [L. *deficit*, it fails.] *n. lack, a falling short* उणीव *f*, तोटा *m*, खूट *f*, तूट *f*.

Defile (de-fil') [Fr. *defiler*, to defile,—L. *dis*, apart and *filum*, thread. ] *v. t. to march in a file* रांगेनें जाणें, कूच करणें, दंडव्यूह करणें. D. *v. t.* (किल्ल्याचे वगैरे सभों-वतीं) तट-भिंत घालणें. D. *n. a narrow passage, a long narrow pass between hills* एकपावली अरुंद वाट *f*, पाऊलवाट *f*, खिंड *f*. Defil'ade *v. t. mil.* शत्रूच्या दारूगोळ्यापासून बंदोबस्त होईल अशी तटबंदीची व्यव-स्था करणें. Defile'ment *n.* (किल्ल्याच्या आंतील बाजूचें रक्षण करण्याकरितां त्या बाजूकडे) भिंत-तट घालणें *n*, तट *m*, तटबंदी *f*.

Defile (de-fil') [M. E. *defoulen*, to trample under foot; L. *de*, down & A. S. *fylan*, to defile, to make foul, from A. S. *ful*, foul.] *v. t. to make foul or impure* अपवित्र-दूषित करणें, मळवणें, मळ-कट-मळीण करणें. २ *to soil or sully, to tarnish, to*

*taint* कलंक लावणें. ३ *to injure in purity of character, to corrupt* भ्रष्ट करणें. ४ *to make ceremonially unclean* विटाळविणें. ५ *to violate the chastity of* (चा) पातिव्रत्य भंग करणें, बाटविणें. Defiled' *a.* मळवलेला, मळकट केलेला. २ अपवित्र केलेला, विघडवलेला, भ्रष्ट. ३ विटाळलेला, बाटवलेला. Defile'ment *n. the act of defiling* मळवणें *n.* २ *dirtiness, taint* मळीणपणा *m,* मलिनता *f,* कलंक *m.* ३ *pollution* अपवित्रता *f.* ४ *uncleanness* विटाळ *m,* बाट *m.* Defil'er *n.* Defil'ing *pr. a.* मळवणारा, दूषक. २ विघडविणारा, अपवित्र-भ्रष्टकर्त्ता-कारी-कारक. ३ विटाळविणारा, बाटवणारा.

Defiliation ( de-fil-i-ā'-shun ) [ L, *de & filius*, a son. ] *n. abstraction of a child from its parents* आई-बापांपासून मुलास काढून नेणें *n,* अपत्यापहरण *n.*

Define ( de-fīn' ) [ O. Fr. *definer*.—L. *definire*.–L. *de*, down & *finire*, to end, from *finis*, end. ] *v. t. to determine the boundaries of, to mark the limits of* (ची) मर्यादा ठरविणें, मर्यादा करणें, हद्दीच्या खुणा करणें; as, "To. D. the extent of a country." २ *to bring to termination, to end* शेवट करणें, पूर्ण करणें, समाप्ति करणें. ३ *to determine with precision, to ascertain clearly* नक्की-बरोबर ठरविणें, निश्चित करणें. ४ *to determine the precise significance of, to fix the meaning of, to describe accurately* व्याख्या ठरविणें, लक्षण करणें-बांधणें; as, "To D. a word." Defin'able *a.* व्याख्येय, निर्णेय, लक्षण करायाजोगा. Defined *a.* लक्षण बांधलेला, व्याख्यात, कृतलक्षण. Define'ment *n.* (*obs.*) लक्षण करणें *n,* लक्षण *n.* Defin'er *n.* अर्थ-व्याख्या-सांगणारा. Def'inite *a. limited, fixed* मर्यादित, परिच्छिन्न, व्यवस्थित, निर्णयाचा, नियमित, सावधिक. २ *having certain limits in signification, precise, exact, clear* ज्याचे अर्थास मर्यादा आहे असा, निश्चितार्थक, स्पष्टार्थक. ३ (*obs.*) *determined, resolved* निश्चित, ठराविक, ठरींव, नियमित. ४ *gram. serving to define, limiting* विशेषार्थवाचक, नियामक. Def'initely *adv.* Def'initeness *n.* Def'inition *n. the act of defining* मर्यादा ठरविणें *n.* २ *an explanation of the meaning of a word or term* व्याख्या *f,* लक्षण *n,* निर्वचन *n.* ३ (*optics*) *distinctness* स्पष्टता *f.* ४ (R.) *description, sort* जात *f,* प्रकार *m.* [Justness of D. लक्षणसमन्वय *m.* Law of definite proportions नियमितप्रमाणनियम *m,* प्रत्येक ठरींव मिश्रणांत तीं तीं द्रव्यें वजन केलीं असतां एकमेकांशीं सारख्याच प्रमाणांत असतात असा रसायनशास्त्रांतील नियम *m,* रसायनशास्त्रांत मिश्रित द्रव्यें ठरींव प्रमाणांत असण्याचा शास्त्रीय नियम *m.* ] Def'initive *a. determinate* नियमाचा, ठरावाचा. २ *positive, final, conclusive, unconditional, express* निश्चित, खचित, असंदिग्ध, स्पष्ट, नक्की.

Deflagrate (def'-la-grāt) [ L. *de*, down & O. Fr. *flagrare*, to burn. Allied to Sk. भ्राज्, to shine.] *v. i. & v. t.* (*chem.*) *to burn with a sudden & sparkling combustion* ठिणग्यांसहित भडका होणें, जाळ होऊन एकदम जळणें. २ *to snap & crackle with slight explosions when heated* (मिठाप्रमाणें) तुड-तुडून फुटणें. Def'lagrabil'ity *n.* ठिणग्यांसह पेटण्याची योग्यता *f,* साग्निकणज्वलनक्षमता *f.* Def'lagrable *a.* पेटायाजोगा, (मिठाप्रमाणें) फुटण्याजोगा. Def'lagrā'tion *n.* जळणें *n,* आगीचा डोंब *m.* Deflagrā'tor *n.* धातुमय पदार्थांची ज्वलनक्रिया त्वरित व्हावी म्हणून ज्याचा उपयोग करितात असा एक विजेच्या ब्याटरीचा नमुना *m.*

Deflect ( de-flekt' ) [ L. *deflectere*,—L. *de*, down & *flectere*, to bend. ] *v. i. to turn aside, to deviate from a right and proper course* (सरळ मार्ग सोडून) आडमार्गानें जाणें. २ *to swerve* च्यवणें, दुर्मार्गानें जाणें, बहकणें. D. *v. t. to bend* वक्र करणें, (सरळ मार्ग सोडून) आडमार्गास लावणें. Deflec'ted *a. bot.* सरळ मार्गापासून निवृत्त केलेलें, खालीं वांकलेलें. Deflec'tion, Deflex'ion *n.* सन्मार्गच्युति *f.* २ *bot.* व्यावृत्ति *f,* बहिर्णति. ३ *math.* विक्षेप *m.* ४ *eng.* भारानें बहालांस आलेली वक्रता *f.* Deflec'tive *a.* भलतीकडे नेणारा. Deflec'tor *n. mech.* दिव्याची ज्योत किंवा भट्टींतील विस्तवाचा झोत फांकविणारी रचना *f,* फांकणें *n,* फांकवणी *f.* ( cf. फणी, कातणें. ) Deflex *v. t.* वांकविणें; as, "Rays of light are often Deflexed." Defle'xure *n.* विमार्गगमन *n,* बाजूस-खालीं वांकणें *n,* च्यवन *n.*

Deflower, Deflour ( de-flowr' ) [ M. E. *deflouren*–O. Fr. *defleurer*–Late L. *deflorare*—L. *de*, down & *flor* ( *flos* ), a flower. ] *v. t. to deprive of flowers* (चीं) फुलें काढून नेणें. २ *to take away the prime beauty of* मुख्य सौंदर्य-शोभा नाहींशी करणें. ३ *to deprive of virginity* ज्वानीचा-नवतीचा भर लुटणें, कौमार्याचा भंग करणें, जबरीनें संभोग करणें, ( वेश्यांच्या बाबतींत ) हातलावणी करणें. ४ *to seduce* फुसलावणें. Deflow'erer, Deflou'rer *n.* See the verb. Deflo'rate *a.* Deflorā'tion *n.* कौमार्यभंग *m.* २ उत्तमांश *m,* श्रेष्ठ-निवडक भाग *m,* नगदमाल *m,* नाक *n.* (*fig.*)

Defluent ( def'lōō-ent ) [ L. *de & fluent*, See Fluent. ] *a.* खालीं वाहणारा. Deflux'ion *n. med.* पडसें येणें *n,* नाक वाहणें *n,* अधःप्रवाह *m,* अभिष्यंद *m.*

Defoliate (de-fō'li-āt ) [ L. *de* and Foliate. ] *v. t. to deprive of leaves* (झाड)पत्र-पर्णहीन करणें. Defoliate-d *a.* पत्र-पर्णहीन. Defoliā'tion *n.* पानें गळणें *n,* पत्र-पर्णमोक्ष *m.* २ पानें गळण्याची वेळ *f.* Defoliā'tor *n.* पत्र-पर्ण-हीन करणारा.

Deform ( de-fōrm' ) [ M. E. *deformen*–O. Fr. *difformer*–L. *deformis*–L. *de*, away & *forma*, shape. ] *v. t. to spoil the form of, to disfigure* व्यंग-विकल करणें, बेढब-बेडौल करणें, आकारप्रमाण बिघडवणें, कुरूप-विरूप करणें ( =Disfigure ). २ *to render displeasing, to deprive of comeliness or grace* सौंदर्यहीन-शोभाहीन करणें, खराब करणें. Deformā'tion [ L. *deformatis*. ] *n.* विकल करणें *n,* विकलीकरण *n,* व्यंगीकरण *n,* विरूपता *f.* २ *alteration of form for*

*the worse* (especially opposed to Reformation सुधारणा *f.*) दुर्धारणा *f.* कुधारणा *f.* Deformed' *pa. a.* व्यंग-विकल केलेला, बेढब, बेढौल, शोभाविहीन केलेला. [DEFORMED IN ALL HIS LIMBS सर्वांगविकल, अष्टवक्र *fig.*] Deformed'ly *adv.* Deformed'ness *n.* विकलता *f.* कुरूपता *f.* दोष *m.* व्यंग *n.* Deform'er *n.* व्यंग-विकल-विरूप करणारा. २ दुर्धारक (See the 2nd meaning of Deformation given above). Deform'ity *n.* रूप-सौंदर्य-बांधा-इत्यादिकांना विशोभित-विकल करणारी गोष्ट *f.* वैकल्यकारण *n.* २ *ugliness, distortion* विकलता *f.* कुरूपता *f.* विरूपता *f.* ३ *defect* खोड *f.* व्यंग *n.* दोष *m.*

Defraud (de-frawd') [O. Fr. *defrauder*–L. *defraudare*–L. *de*, away & *fraud*, stem of *fraus*, fraud.] *v. t. to cheat, to deprive of right &c. by a deceitful device, to withhold wrongfully* ठकविणें, फसवणें, लबाडीनें (दुसऱ्याचें) घेणें, अटकावून ठेवणें (with *of* before the thing). Defraudā'tion *n.* (R.) लुच्चेगिरीनें घेणें *n.* फसवणूक *f.* Defraud'ment *n.* (ठकबाजीनें केलेला) अपहार *m.* Defrau'der *n.* फसविणारा, ठकविणारा, ठक, अपहारक.

Defray (de-frā') [O. Fr. *desfrayer*.–L.–O. H. Ger. *fridu*, peace, also a fine for breach of the peace.] *v. t. to pay, to discharge* फेडणें, वारणें *g. of o.* (with cost, charge, expenses as the object). २ (*obs.*) *to avert or appease* (as by paying off), *to satisfy* शांत करणें, निवारण करणें; as, "To D. anger." Defray'ing *pr. p.* Defrayed' *pa. p.* Defray'ment, Defray'al *n.* खर्च देणें *n.* Defray'er *n.* खर्च देणारा, कर्ज वारणारा-फेडणारा. २ शांत करणारा.

Deft (deft) [M. E. *deft, daft*–A. S. *dæfte*, (*gedæfte*), mild, gentle.] *a.* (*archaic.*) *clever, dexterous* कुशल, चतुर, दक्ष (S.), हुशार. २ *fit, apt* योग्य, उचित. ३ *handy, neat, spruce* नीटनीटकें, सुबक, सुरेख, ठीक. Deft'ly *adv.* Deft'ness *n.* दक्षता *f.* ठाकठीकपणा *m.*

Defunct (de-funkt') [L. *defunctus*, having fully performed the course of life, *p. p.* of L. *defungi*—L. *de*, fully and *fungi*, to perform. See Function.] *a. dead, deceased* मृत, मेलेला, मयत. D. *n.* मृतमनुष्य *m.* Defunc'tion *n.* (*obs.*) मृत्यु *m.* Defunc'tive *a.* (*obs.*) प्रेतयात्रेसंबंधीं.

Defy (de-fī') [M. E. *defyen*–O. Fr. *defier, desfier*, to renounce one's faith—Late L. *diffidare*–L. *dif* (*dis*), a part & *fidare*, to trust.] *v. t. to call out to combat, to dare, to brave* आव्हान *n.* करणें, युद्धास बोलावणें *n.* अहोपुरुषिका दाखवणें-करणें. २ *to set at defiance, to treat with contempt* तुच्छ मानणें, तृणवत् मोजणें, न जुमानणें, कःपदार्थ समजणें, अवज्ञा करणें, अवमान-अनादर करणें. Defi'ance *n.* युद्धार्थ आमंत्रण *n.* युद्धाव्हान *n.* युद्धेच्छा *f.* अडथळ्यास न जुमानणें *n.* २ अवगणना *f.* अवज्ञा *f.* [IN D. OF न जुमानतां, अनादर करून. TO BID DEFIANCE TO OR TO SET ONE AT DEFIANCE तुच्छ-कसपटाप्रमाणें मानणें, युद्धाव्हान करणें.] Defiant *a.* उद्धट, उर्मट. Defiant'ly *adv.* तुच्छ रीतीनें, बेपर्वाईनें, उद्धटपणानें. Defiant'ness *n.* उद्धटपणा *m.* Defi'er *n.* युद्धास आमंत्रण करणारा. २ तुच्छ मानणारा.

Degenerate (de-jen'ėr-āt) [From *p. p.* of L. *degenerare*, to become base–L. *de*, down & *gener*, stem of *genus*, race.] *v. i. to decline in good qualities, to deteriorate, to become inferior* श्रेष्ठ जातींतून कनिष्ठ जातींत जाणें *biolo.* बदजात-कमजात होणें, मूलगुण सुटणें, हलक्या दर्जाचा होणें, बिघडणें, विचलणें. D. *a. deteriorated, degraded, unworthy, base, low* हीनगुण, गुणक्षीण, मूलगुणभ्रष्ट, गुणापकृष्ट, कमजात, विगुण, पतित, अधम. Degen'eracy, Degen'erate'ness *n.* गुणऱ्हास *m.* २ वैगुण्य *n.* कमजातपणा *m.* Degen'erately *adv.* Degen'erating *a.* Degenerā'tion *n. decline, degradation, debasement* हीनजातिभवन *n.* अवनति *f.* नीचावस्था *f.* अधोगति *f.* ऱ्हास *m.* २ कळाहीन-सामर्थ्यहीन होणें *n.* ३ *med.* वैकल्य *n.* बारीक होणें *n.* लहान होणें *n.* वाळणें *n.* ४ (R.) ऱ्हास पावलेली वस्तु *f.* निकृष्टगुणता *f.* [D. OF PROGENY संततीची अवनति *f.* संततीचें हीनजातित्व *n.*- हीनत्व *n.*] Degenerā'tionist *n.* पदार्थ उत्तरोत्तर कमदर्जाचा होतो असें मानणारा *m.* पदार्थावनतिवादी *m.* Degenera'tive *a.* हीनावस्था आणणारा, ऱ्हासकारक-अवनतिकारक, क्षयकारी.

Deglutition (deg'-lōō-tish'-un) [Fr. *deglutition*–L. *de*, down & *glutitus p. p.* of *glutire*, to swallow.] *n.* गिळणें *n.* गिलन *n.* निगरण *n.* (प्राण्यांची) गिळण्याची रीत *f.*- शक्ति *f.* गिलनशक्ति *f.* Deg'lutive, Deg'lutitory *a.* गिळण्यास मदत करणारा. Deg'lutitious *a.* गिळण्यासंबंधीं.

Degrade (de-grād') [O. Fr. *degrader*, to deprive of rank or office–Late L. *degradare*,–L. *de*, down & *gradus*, rank.] *v. t. to reduce in estimation, character or reputation, to lessen the value of* पदवी *f.* योग्यता *f.* किंमत *f.* मान *m.* हलका-कमी करणें. २ *to lower in rank, to deprive of office, to strip of honours* खालच्या पायरीवर आणणें, पदभ्रष्ट करणें, कमी दर्जांत आणणें. ३ *geol. to reduce in altitude or magnitude* उंची किंवा आकार कमी करणें. D. *v. i.* हीनत्व येणें, मानभंग होणें. २ *biol. to degenerate* (पुढच्या पिढ्यांत) खुजे-खुरट होणें. Degradā'tion *n. the act of reducing in rank, &c.* दरजा *m.*- पदवी *f.* कमी-हलकी करणें-होणें *n.* &c. २ *the state of being reduced in rank, character or reputation, disgrace, abasement, debasement* अधिकार-पद-न्यूनता *f.* अपकर्ष *m.* पातित्य *n.* मानऱ्हास *m.* अवसान *m.* अपमान *m.* कमीपणा *m.* अप्रतिष्ठा *f.* अधोगति *f.* ३ *diminution or reduction of strength, efficacy or value; degeneration; deterioration* शक्तीची क्षीणता *f.*

दुबळेपणा *m*, मूल्यन्यूनता *f*, अवनति *f*, ऱ्हास *m*. ४ *geol.* (पाण्याच्या प्रवाहानें किंवा इतर कारणांनीं टेंकड्या किंवा खडक यांची) झरण्याची-झिजण्याची क्रिया *f*, क्षरण-क्रिया *f*. ५ *biol.* अपकृष्ट-ऱ्हासाची स्थिति *f*, गुणहीनत्व *n*. ६ *physiol.* वाढ खुंटणें *n*, क्षीण होणें *n*. Degra'ded *a.* खालच्या पदवीस आणलेला, पदच्युत, पदभ्रष्ट, पतित, मानच्युत. Degra'ding *a.* हलकेपणा आणणारा, इजत-खाऊ, अपयशाचा, बेअब्रूचा. Degra'dingly *adv.*

N. B. Every man has a certain moral or social position and he is said to degrade himself when he falls below it.

**Degree** (de-grē') [O. Fr. *degre, degret*, a step or rank–L. *de*, down & *gradus*, step.] *n. rank or station in life, position* पदवी *f*, पायरी *f*, पद *n*, दर्जा *m*. २ पर्याय *m*, पायरी *f*. [BY DEGREES पर्यायानें, क्रमशः, अंशतः] ३ विस्तार *m*, मर्यादा *f*, अंश *m*, पोहोंच *m*. [D. OF LATITUDE अक्षांश. D. OF LONGITUDE रेखांश *m*.] ४ *a certain distance or remove in the line of descent* पिढी *f*; as, "A relation in the third or fourth D." ५ विश्वविद्यालयांतील पदवी *f*. ६ (परिघाचा ३६० वा) अंश *m*. ७ *alg.* घात. ८ (यंत्रावरील) अंशदर्शक रेषा-मात्रा *f*, अंश *m*, प्रमाणांक *m*. ९ *mus.* दोन रांगांमधील तफावत *f*. फेर *m*. Forbidden degrees शरीरसंबंधास वर्ज्य पिढ्या. To a great degree अतिशय, फारच. In the smallest degree अणुमात्र, लवमात्र, काडीमात्र, अंशमात्र. To advance by degrees पायरीपायरीनें चढणें. To this degree इतपत, ह्या अंशापर्यंत, ह्या मर्यादेपर्यंत.

**Dehisce** (de-his') [L. *dehiscere*–L. *de*, down & *hiscere* (*hiare*), to gape.] *v. i. to gape* (बीं बाहेर पडण्याकरितां बोंडें शेंगा वगैरे) शिरेवर फुटणें, स्फोटन होणें. Dehis'cence *n. bot.* (बीं बाहेर पडण्याकरितां बोंडें शेंगा वगैरे) फुटणें *n*, स्फोट *m*. Dehis'cent *a. bot.* उकलणारें (शेंग, बोंड इ.), स्फुटनशील, फुटीर.

**Dehort** (de-hort') [L. *dehortari*—L. *de* & *hortari*, to urge, exhort.] *v. t.* (*obs.*) *to urge to abstain or refrain, to dissuade* निवारणार्थ-निवृत्त्यर्थ बुद्धिवाद *m*. सांगणें-उपदेश *m*. करणें, परावर्तनबुद्धि *f*. सांगणें, निवारणोपदेश *m*. करणें, अमुक गोष्ट करूं नको म्हणून उपदेश करणें. Dehortā'tion *n.* (R.) निवारणार्थ उपदेश-आग्रह करणें *n*, निवारणार्थ उपदेश *m*. Dehortā'tive, Dehortā'tory *a.* (R.) निवारणोपदेशाचा, निवारणोपदेशात्मक, परावृत्त करणारा. Dehort'er *n.*

**Dehumanise** (de-hū'-ma-nīz) [L. *de* & Humanise.] *v. t. to divest of human qualities* (such as pity, tenderness, &c.) माणुसकीपासून च्युत करणें, मनांतील कींव-कळवळा इ. नाहींशीं करणें, माणुसकी नाहींशी करणें.

**Dehydrate** (de-hī'-drāt) [L. *de* & *Hydrate*–Gr. *hudros*, water.] *v. t. chem. to deprive of water, to render free from water* (रासायनिक कृतीनें) जलांश काढून घेणें, पाणी नाहींसें करणें, निर्जल करणें. D. *v. i.* पाणी नाहींसें होणें. Dehydrā'tion *n.* मिश्र पदार्थांतील पाण्याचा भाग नाहींसा करण्याची क्रिया *f*, निर्जलीकरण *n*. २ जलरहित-स्थिति *f*.

**Deify** (dē'-i-fī) [M. E. *deifyen*–O. Fr. *deifier*–Late L. *deificare*–L. *dei*, for *deus*–(Sk. देव, a god) & *fic* for *facere*, to make.] *v. t. to make a god of, to enroll among the deities, to apotheosise* देवपद देणें, देवांत गणणें, देव करणें. २ *to praise or revere as a deity* देवासारखा पूज्य मानणें, दैवत मानणें, अतिशय मान देणें; as, "To D. money." ३ *to render god-like* ईश्वरकल्प मानणें. Deif'ic-al *a.* ईश्वरतुल्य करणारा. २ पूज्य मानणारा. Deificā'tion *n.* देवत्व देणें *n*, देवपदास चढविणें *n*. २ अकटोविकट स्तुति *f*. De'ified *a.* Deifi'er, Deify'er *n.* पूज्य मानणारा. Deify'ing *a.* De'iform *a.* देवरूपी, देवाकार, देवशील. Deiform'ity *n.* देवाकारत्व *n*, देवरूपता *f*, देवशीलता *f*.

**Deign** (dān) [M. E. *deignen*–A. Fr. *deign*–L. *dignari*, to deem worthy, from L. *dignus*, worthy.] *v. i. to think worthy, to vouchsafe, to condescend* (followed by an infinitive) मेहेरबानी *f*. कृपा *f*. अनुग्रह *m*. प्रसाद *m*. करणें, प्रसन्न होणें. D. *v. t.* (*obs.*) *to esteem worthy* योग्य मानणें-लेखणें. २ *to condescend to give or bestow, to stoop to furnish, to allow, to grant* मेहेरबान-कृपाळू होऊन देणें, (ची) मेहेरबानी करणें; as, "He deigned to look at me."

**Deist** (dē'-ist) [Fr. *deiste*—L. *deus*–Sk. देव, a god.] *n.* केवलेश्वरवादी *m*, केवलेश्वरमतानुसारी *m*. Deists ईश्वराचें अस्तित्व मानणारे परंतु धर्म ईश्वरप्रणीत आहे हें मत नाकबूल करणारे अशांना हा शब्द लावतात. बायबल हें ईश्वरप्रणीत पुस्तक आहे असें न मानणाऱ्या आस्तिकांसही हा शब्द लावितात व त्या वेळीं त्या शब्दाचा अर्थ निंदाव्यंजक होतो. Dē'ism *n.* केवलेश्वरमत *n*. केवलेश्वरी मत *n*, आस्तिक्य *n*. Deis'tic-al *a.* केवलेश्वरमतासंबंधीं. Deis'tically *adv.*

**Deity** (dē'-i-ti) [M. E. *deite*,–O. Fr. *deite*—L. *deitatem*—L. *dei*, for *deus*–Sk. देव, a god.] *n.* ईश्वरी गुणांचें निधान *n*, भगवान् *m*, परमेश्वर *m*. २ *divinity, godhead* देवत्व *n*, देवपणा *m*. ३ *a god or goddess* देव *m*, देवता *f*, परमेश्वर *m*.

**Deject** (de-jekt') [From L. *dejectus p. p.* of *dejicere*, to throw down, L. *de* & *jacere*, to throw.] *v. t.* (*obs.*) *to cast down* खालीं फेंकणें. २ *to cast down the spirits of, to dispirit, to discourage, to dishearten* उमेद खचविणें, उत्साहभंग *m*-मनोभंग *m*. करणें *g. of o.*, खिन्न-उदास-उदासी करणें. D. *a.* (*obs.*) खिन्न, उदासी, दिलगीर. Dejec'ted *a.* खिन्न केलेला-झालेला, खिन्न, उदास, विषण्ण, भग्नोत्साह, म्लान, विमनस्क. Dejec'tedly *adv.* उदासपणानें, औदासिन्यपूर्वक, विषादपूर्वक. Dejec'tedness *n.* खिन्नता *f*, उदासीनता *f*. Dejec'tion *n. the act of humbling one's self* कमीपणा

खेद n. २ *lowness of spirits, mental depression, melancholy* खिन्नता f, विषाद m. ३ *physiol.* मलत्याग m, विष्ठोत्सर्ग m. Dejec'tory a. खिन्नता आणणारें. २ सारक-रेचक.

Dejeuner (dā-zhōō-nā') [Of French origin.] n. *a breakfast* न्याहारी f, सकाळचा फराळ m. २ *a lunch* फराळ m.

Delate (de'-lāt') [L. *de* & Late.] v. t. (*obs.*) *to carry, to convey* वाहून नेणें. २ *to make public* जगत्प्रसिद्ध करणें. ३ *to accuse* दोषारोप करणें. ४ *to carry on, to conduct* चालविणें. Delā'tion n. (*obs.*) *conveyance* वाहणें n. २ *accusation by an informer* दोषारोप m. Delā'tor n. (R.) *an accuser, an informer* दोषारोप करणारा.

Delay (de-lā') [O. Fr. *delayer, dilaier*–L. *dilatare*,–L. *de* (*dis*), apart & *latus*, borne.] v. t. *to put off, to defer, to procrastinate, to prolong the time of or before* विलंब m-उशीर m. करणें-लावणें, वेळ लावणें, कालहरण करणें, दिवसगतीवर लोटणें-ढकलणें. २ *to retard, to stop, to detain* (चा) खोळंबा m. करणें, (ची) खोटी करणें, गतिभंग m- गतिरोध m. करणें *g. of o.*; as, "The mail is delayed by a heavy fall of snow." D. v. i. *to move slowly, to linger, to tarry* गमणें, वेळ लावणें, रेंगाळणें. D. n. *pl.* Delays. *a putting off, detention, hindrance* विलंब m, खोळंबा m, उशीर m, खोटी f, खंड m, खळ m. Delayed' a. विलंबित, उपेक्षित. २ खोळंबवलेला, खोळंबलेला. Delay'er n. विलंब-उशीर लावणारा. Delay'ing n. विलंब m, खोळंबा m, उशीर m. Delay'ingly *adv.* (R.)

Dele (dē'lē) [Imperative sing. of L. *delere*, to destroy.] v. t. (*print.*) *to erase, to cancel, to delete* पुसून-काढून टाकणें, खोडून टाकणें. D. n. मुद्रितें (proofs) तपासतांना कांहीं भाग काढून टाकण्याची खूण f. ही 'डी' (d) या इंग्रेजी अक्षराच्या आकाराची असते. Dele'ble, Deli'ble a. पुसून टाकण्याजोगा, पुसून टाकतां येण्याजोगा.

Delectable (de-lek'ta-bl) [Late M. E. *delectable*–Fr. *delectable*–L. *delectabilis*, delightful.–L. *delectare*, to delight.] a. *highly pleasing, delightful* रमणीय, आनंदकारक, आल्हादजनक, मनोहर, मनोरम. Delec'tableness n. Delec'tably *adv.* Delectā'tion n. प्रमोद m, अत्यानंद m, हर्ष m, आल्हाद m.

Delegate (del'-e-gāt) [L. *delegatus* p. p. of *delegare*, to depute–L. *de* & *legare*, to depute.] v. t. *to entrust to the care or management of another, to transfer, to assign, to commit* (वर) सोंपविणें, (कडे) निरविणें, हवालीं करणें, स्वाधीन करणें. २ *to send as one's representative, to depute, to authorise* मुखत्यार m- प्रतिनिधि m- वकील m. करून पाठविणें, नियुक्त-अधिकृत करणें, (एखादें काम करण्यासाठीं) अखत्यार देऊन धाडणें. D. n. प्रतिनिधि m. २ *a chosen deputy, a representative* मुनीम m, वकील m. D. a. अधिकार देऊन पाठविलेला (प्रतिनिधि). Delegā'tion n. वकील नेमणें n, नियोजन n, वकील m, प्रतिनिधि m. २ *a deputation* वकिलात f, प्रतिनिधिमंडळ n. ३ Del'egacy n. (*obs.*) वकील नेमणें n. २ प्रतिनिधींची सभा f.

Delete (de-lēt') [L. *deletus*, p. p. of *delere*, to destroy.] v. t. *to erase, to blot out, to omit* खोडून-खरडून टाकणें, काढून टाकणें, गाळणें. D. n. जें कांहीं खोडावयाचें असेल तें. Delen'da *pl.* खोडावयाच्या गोष्टी f. *pl.* Delē'tive, Del-ē'tory a. नाहींसें करणारें.

Deleterious (del'-etē'-ri-us) [Gr. *dēlētērios*, noxious.] a. *hurtful, noxious, destructive, pernicious* घातक, प्राणांतक, प्राणनाशक, अपकारक, नाशक. २ विषारी. Delete'riously *adv.* Dele'teriousness n.

Delf, Delft (delf, delft) [Dut. *delf*, earthenware first made at *Delft*, formerly *Delf*, a town in South Holland.] n. (a contraction for Delftware) *earthenware* हॉलंडांत डेल्फ्ट येथें प्रथम तयार केलेलें एक प्रकारचें मातीचें भांडें n, मृद्भांड n.

Deliberate (de-lib'-ėr-āt) [L. *deliberatus* p. p. of *deliberare*, to consult. L.–*de* & *liberare*, to weigh.] v. t. *to weigh in the mind, to consider the reasons for and against, to ponder, to reflect upon* पोक्त-कार्याकार्यविचार करणें, पोक्तपणें विचार करणें, (कोणताही कार्यक्रम ठरविण्याचे पूर्वी त्याची) युक्तायुक्तता पहाणें, परिणामाचा दूरवर विचार करणें, सारासारविचार करणें. D. v. i. *to take counsel with one's self, to reflect, to consider* (sometimes with *upon, about, concerning*) मनाशीं विचार करणें, मनांत तोलणें, मनन करणें. D. a. (said of persons) *carefully considering the probable consequences of a step* विचारी, दूरदर्शी, विचारवंत, परिणामदर्शी. २ *carefully considered, well-advised* विचाराचा, विचारसिद्ध, सावधगिरीचा. ३ *not hasty or sudden, slow* सावकाशीचा, धिमा. Delib'erately *adv. with careful consideration, circumspectly, warily, slowly* पक्का-काळजीपूर्वक विचार करून, विचारपूर्वक, जाणूनबुजून, समजूनउमजून, सावकाश. Delib'erateness n. *the quality of being deliberate* विचारशीलता f, विमृश्यकारिता f, समीक्ष्यकारित्व n, विचारपूर्वकता f. २ *calm consideration* विचार m, मनन n. Delibera'tion n. *the act of deliberating, careful consideration* पूर्वापरविचार m, मागलापुढला विचार m, आगचा-मागचा विचार m, कार्याकार्यविचार m. २ *careful discussion and examination of the reasons for and against a measure* अनुकूल व प्रतिकूल गोष्टींचा विचार m, चर्चा f, मसलत f, मनसुबा m, साग्र-सांगोपांग विचार m. Delib'erative a. *pertaining to deliberation* विचार करण्याचे अधिकाराचा, विचाराचा, पोक्त विचार करणारा. D. n. *a discourse in which a question is discussed or weighed & examined*

(प्रश्नाचा वादविवाद ज्यांत चालला आहे असें) पोक्त संभाषण *n.* २ *a kind of rhetoric employed in proving a thing convincing others of its truth to persuade them to adopt it* अलंकारयुक्त व प्रोत्साहक भाषण *n.* हें लोकांस एखाद्या गोष्टीचें सत्य पटून ती ग्राह्य व्हावी म्हणून केलेलें असतें.

Delicate (del'-i-kāt) [L. *delicatus*, luxurious.] *a. pleasing to the senses, refinedly agreeable, nice, fine, elegant* नाजूक, इंद्रियांस सुखावह, स्वादु, सुंदर, मधुर, मिष्ट, रुचकर, लजतदार. २ *slight and shapely, lovely, graceful* आकारानें सुंदर, रमणीय. ३ *fine, slender, minute, not coarse* (said of threads, &c.) बारीक, नाजूक. ४ *slight, smooth, light, yielding* (said of textures) गुळगुळीत, नरम, तुळतुळीत, हलका, तलम, तलमसुती. ५ *soft and fair* मऊ, मृदु आणि सुंदर; as, "D. cheeks." ६ *light, softly tinted* (said of colours) फिका, किंचित् छटा-झांक-लुकेर असलेला. ७. *refined, gentle* (said of manners) सभ्य, विनयशील, नम्र, दक्षिण (S), हुसन्यास न दुखविणारा. ८ (said of constitution) कोमल, सुकुमार, नाजूक, स्त्रीसदृश, बायकी. ९ *of exacting tastes & habits, dainty, fastidious* मिजाजखोर, चोखंदळ, खंतखोर. १० *nicely discriminating, refinedly critical, exquisite* सूक्ष्मग्राही. [D. SHADES नाजूक छटा *f.* D. THERMOMETER सूक्ष्म उष्णमापक. D. REACTION सूक्ष्मप्रतिकार्य *n.*] D. *n.* (R.) *a choice dainty, a delicacy* श्रेष्ठान्न *n,* मिष्टान्न *n.* २ *a delicate, luxurious person, an effeminate person* ऐपआरामी-शोकी-पोशा मनुष्य *m,* बायक्या *m.* Del'icacy *n. agreeableness to the senses, delightfulness* माधुर्य *n,* मनोहरता *f,* रमणीयता *f.* २ *softness, tenderness, smoothness, elegance* कोमलता *f.* ३ *frailty, weakness* दुर्बलता *f.* ४ *nice propriety of manners and conduct, refinement* आदर *m,* विनय *m,* शिष्टाचार *m,* विधिवद्धता (?) *f,* सभ्यता *f,* मर्यादा *f.* ५ *effeminacy* नाजकाई *f,* सुकुमारता *f,* मृदुता *f.* ६ *addiction to pleasure, luxury* सुखोपभोग *m,* विषयभोग *m,* आसक्ति *f.* ७ *nice and refined perception and discrimination, critical niceness* कुशाग्रमतित्व *f,* अतिसूक्ष्मदृष्टि *f,* बारीक नजर *f.* ८ *something pleasant to the taste, a dainty* मिष्टान्न *n,* स्वादिष्ट अन्न *n,* मिष्ट पदार्थ *m,* खाण्याचा उत्तम पदार्थ *m.* ९ (*obs.*) *pleasure, gratification, delight* आनंद *m,* संतोष *m,* सुख *n.* १० *the state of being affected by slight causes, sensitiveness* अतिसूक्ष्म फरक दाखविणारा गुण *m,* सूक्ष्मत्व *n;* as, "A D. of a balance." Del'icately *adv.* Del'icateness *n.*

Delicious (de-lish'-us) [M. E. *delicious*–O. Fr. *delicious*–Late L. *deliciosus*, pleasant.–L. *delicia*, pleasure,–L. *delicere*, to amuse–L. *de*, away & *lacere*, to entice.] *a. most sweet and graceful to the taste* रुचकर, गोड, मिष्ट, रुच्य, रसभरित. २ *delightful, charming* आनंदकारक, रमणीय, मनोहर; as, "D. landscape." ३ (*obs.*) *addicted to pleasure, luxurious, effeminate* चैनी, ऐपआरामी, स्त्रीसक्त. Delici'ously *adv.* Delici'ousness *n. the quality of being delicious* गोडी *f,* चव *f,* रुचि *f,* लजत *f.* २ *luxury* ऐपआराम *m.*

Deligate (del'i-gāt) [L. *deligatus p. p. of deligare*, to bind up; L. *de*, fully and *ligare*, to bind.] *v. t.* (*surg.*) *to bind up* जखमेस पट्टी बांधणें. Deligā'tion *n.* जखमपट्टी *f.*

Delight (de-līt') [Misspelt for *delite*–M. E. *deliten* –O. Fr. *deliter, deleiter*–L. *delectare*, to delight.] *v. t. to give delight to, to please highly* संतुष्ट-आनंदित करणें, हर्षविणें, संतोषविणें, खुप करणें, मोदविणें. D. *v. i. to take great pleasure, to be greatly rejoiced* आनंदित होणें, आनंद पावणें (followed by an infinitive or by *in*). D. *n. extreme satisfaction, joy* आनंद *m,* हर्ष *m,* परम संतोष *m.* २ *that which gives pleasure or delight* आनंदहेतु *m-* विषय *m,* हर्षदायक वस्तु *f.* Delight'ed *a.* हर्षविलेला, उत्साहित. Delight'edly *adv.* Delight'ful *a.* Delight'some *a. highly pleasing* आनंदविणारा, अनुरंजक, आल्हादक, रम्य, मनोहर. Delight'fully *adv.* सुखानें, also Delight'somely *adv.* Delight'fulness, Delight'someness *n.* रमणीयता *f,* रंजकत्व *n,* आनंददायकत्व *n,* सुख *n.* Delight'less *a.* आनंदरहित, हर्षरहित-शून्य.

Delimit (de-lim'-it) [L. *de*, fully and Limit.] *v. t. to fix the limits of, to demarcate, to bound* मर्यादा *f.* आंखणें-ठरविणें, हद्द *f.* नक्की करणें. Delimitā'tion *n.* मर्यादा आंखण्याची क्रिया *f.* Delimiting curve परिणामकवक्र.

Delineate (de-lin'ē-āt) [p. p. of L. *delineare*–L. *de*, down and *lineare*, to mark out.] *v. t. to sketch in outline, to represent with accuracy and minuteness* रेखणें, रेखाटणें, रेखा-चित्र काढणें, अंकन *n-* करणें, नकाशा *m-* आलेख्य *n.* काढणें, सूक्ष्मभेद-खाणाखुणा दाखविणें *g. of o.* २ *to describe* निरूपिणें, निरूपण करणें, बारकाईनें वर्णन करून सांगणें. Delin'eable *a.* (चित्रानें) काढून दाखवितां येण्याजोगा, निरूपण-वर्णन करतां येण्याजोगा. Delineā'tion *n.* (sometimes Delineament) रेखणें *n,* आलेखन *n,* चित्र *n,* आलेख्य *n,* नकाशा *m.* २ सूक्ष्म वर्णन *n,* निरूपण *n,* बारकाईनें केलेलें वर्णन *n.* Delin'eator *n.* चित्रें काढणारा, रेखाटणारा, &c. &c.

Delinquent (de-ling'-kwent) [L. *delinquent*, stem of *pr. p.* of *delinquere*, to fail, to omit one's duty,–L. *de*, away & *linquere*, to leave.] *a. failing in duty, offending by neglect of duty* कर्तव्यांत चुकणारा, दोषी, अपराधी, गुन्हेगार. D. *n.* कर्तव्यांत चूक-कसूर करणारा. २ *a culprit* अपराधी. Delin'quency *n. a failure or omission of duty* कर्तव्यांत अंतर *n-*कसूर *f.* २ *fault, a misdeed, an offence* गुन्हा *m,* दुष्कर्म *n,* दुष्कृति *f.* Delin'quently *adv.*

Deliquate (de-li-kwāt) [L. *deliquatus* p. p. of *deliquare*, to clear off, to clarify–L. *de* & *liquare*, to make liquid.] *v. i.* (*obs.*) *to melt or be dissolved* वितळणें, हवेनें पातळ होणें (as salt). D. *v. t.* (*obs.*) *to cause to melt away* विरघळवणें, वितळवणें. Deliquā'tion *n.* (*obs.*) वितळण्याची क्रिया *f.* वितळणें *n.*

Deliquesce (del'-i-kwes') [L. *deliqeuscere*, to melt, to dissolve–L. *de* & *liquescere*, to melt.] *v. i.* (*chem.*) हवेच्या योगानें पाणी होणें, विद्रुत होणें. Deliques'cence *n.* पाणी होणें *n*, विद्रावण *n*, विलयन *n.* Deliques'cent *a.* वितळणारा, पाणी होणारा, विद्रविष्णु.

Deliquium (de-lik'-wi-um) [See Deliquate.] *n.* (R.) हवेनें विरघळण्याची क्रिया *f.* विद्रावण *n*, (स्थिति).

Deliquium (de-lik'-wi-um) [L. *deliquium*, failure, want.] *n. swoon* मूर्च्छा *f.* मूर्च्छना *f.* मूर्च्छितावस्था *f.*

Delirious (de-lir'-i-us) [L. *delirium*, madness + Eng. suffix *ous*—L. *delirus*, mad *lit.* going out of the furrow. L. *de*, from & *lira*, a furrow.] *a. wandering in mind, light-headed, insane, raving, wild* ज्वरादिविकारांनीं ज्याच्या क्रिया, विचार व बोलणें अव्यवस्थित व असंबद्ध झाल्या आहेत असा, चित्तभ्रम-भ्रम झालेला, वायु झालेला, बरळणारा, प्रलापी, बेशुद्ध, बेसावध, बेहोष, शुद्धि नसलेला, भ्रांतचित्त. Delirā'tion *n.* बेशुद्धि होणें *n.* Delirifā'cient *a.* भ्रम उत्पन्न करणारा. Delir'iously *adv.* Delir'iousness *n.* Delir'ium *n. mental aberration, a roving or wandering of the mind* चित्ताचा भ्रम *m*, उन्मत्तवायु *m.* २ *strong excitement, madness, wild enthusiasm* क्षुब्धता *f.* वेड *n*, अनावर उत्साह *m.* [D. TREMENS सतत व पुष्कळ दारू पिऊन होणारा उन्माद, मद्योन्माद *m.* D. IN FEVER ज्वरांत वायु होणें.]

Delitescent (del'-i-tes'-ent) [L. *delitescens, delitescentis* pr. p. of *delitescere*, to lie hid.] *a. lying hid, concealed* गुप्त राहणारा, गूढ. Delites'cence *n.* गूढपणा *m.*

Deliver (de-liv'-er) [O. Fr. *delivrer*, to set free—Late L. *deliberare*—L. *de*, from & *liberare*, to free.] *v. t. to set free from restraint, to set at liberty, to release, to free, to save* (often with *from* or *out of*) (अटकेंतून) सोडणें, बंधमुक्त करणें, स्वतंत्र करणें, (ला) संकटांतून तारणें-वचावणें; as, "He who taketh warning shall D. his soul." २ *to give, to transfer, to make over, to commit* (often with *up* or *over*, *to* or *into*) (ला) अर्पण करणें, (च्या) स्वाधीन करणें-पदरीं घालणें, (खरेदीदारास) मालाचें माप देणें. ३ *to make over to the knowledge of another, to communicate* निवेदन करणें, सांगणें. ४ *to free from or to disburden of the young, to bring forth* (ची) सुटका *f*-सोडवणूक *f.* करणें, बाळंत करणें. ५ *to give forth in action or exercise, to discharge* लढाईत किंवा खेळांत देणें; as "To D. a blow." Deliv'erance *n. the act of delivering or freeing from restraint, rescue* सोडवण *n*, परित्राण *n*, उद्धार *m*, मोचन *n*, सोडवणूक *f.* २ *the state of being delivered* सुटका *f.* मुक्तता *f.* मुक्ति *f.* मोक्ष *m.* Deliv'ered *a.* मोकळा केलेला, सोडवलेला, बंधनमुक्त, मुक्त. २ तारलेला, तारित. ३ अर्पित, समर्पित. ४ निवेदित, विदित. ५ बाळंत झालेली, प्रसूत. [TO BE D. बाळंत होणें, हातींपायीं सुटणें (LOOSELY), दोन जिवांचा निवाडा होणें (LOOSELY).] Deliv'erer *n.* सोडवणारा *m.* २ तारणारा *m*, तारणकर्ता *m.* ३ अर्पक, समर्पक. ४ निवेदक. Deliv'ery *n. the act of delivering from restraint, rescue, release, liberation* सुटका करणें *n*, सोडवणें *n*, तारणें *n*, उद्धारणें *n*, बचावणें *n*, काढणें *n*, सुटका *f.* मोकळीक *f.* सोडवणूक *f.* उद्धार *m*, उद्धारगत *f.* २ *the act of delivering up or over, surrender and transfer of the substance of a thing* अर्पण-स्वाधीन करणें *n*, सोंपवणूक *f.* सोंपणी *f.* ताबा देणें *n.* ३ माप देणें-घालणें *n*, (खरेदीदारास दिलेलें) मालाचें माप *n.* ४ वांटणी *f.*; as, "D. of letters." ५ *the act or style of utterance, manner of speaking* बोलण्याची शैली *f*-खुबी *f*-ढब *f.* भाषणसरणी *f*-शैली *f.* ६ *the act of giving forth, parturition* बाळंत होणें *n*, प्रसव *m*, प्रसूति *f.* गर्भमोचन *n.* [EASY D. सुखप्रसव *m.* MONTH OF D. प्रसूतिमास *m.* TO BE NEAR D. OR TO BE ON THE POINT OF D. बाळंत व्हावयास टेंकणें, आसन्नप्रसव असणें.] ७ *the act of exerting one's strength or limbs* स्वतःच्या शक्तीचा-बळाचा उपयोग करणें *n*, बळ कामीं लावणें *n.* ८ *the act or manner of delivering a ball* चेंडू देण्याची-फेंकण्याची क्रिया-शैली *f.* फेंक *f.* House to house delivery पोष्टांतून पत्रें बंग्या वगैरे मालकाच्या घरीं नेऊन देणें. Gaol or jail delivery बंदखलास (R.) *m. law.* कैद्याची मुक्तता *f.* बंधविमोचन *n.*

Dell (del) [M. E. *delle*; A. S. *dell.*] See Dale.

Delphian (del'-fi-an) *a.* ग्रीस देशांतील डेल्फी शहरांतील प्रश्नदेवतेसंबंधानें, प्रसादवाणीतुल्य, ईश्वरप्रेरित. २ *ambiguous, mysterious* संदिग्ध, मोघम, द्व्यर्थी, संशययुक्त, also Delphi.

Delphinus (del-fī'-nus) *n.* धनिष्ठा *f.* ही राशि विषुववृत्ताच्या उत्तरेस आहे.

Delta (del'-tä) [Gr. letter *delta* Δ.] *n.* एक ग्रीक अक्षर *n.* Δ याचा उच्चार इंग्रजी D. अक्षराप्रमाणें आहे. २ या अक्षराच्या आकाराचा नदीच्या मुखाजवळील जमिनीचा तुकडा *m*, चिमट्यांतला प्रदेश *m*, चिमटा *m*, बेचकें *n*, सुंदरबन *n*, दोआब *n.* Deltaficā'tion *n.* (R.) नदीच्या मुखापाशीं त्रिकोणाकृति जमीन बनणें *n.* Del'toid (डेल्टानामक ग्रीक अक्षराप्रमाणें) त्रिकोणाकृति *f.* २ *bot.* त्रिकोणीपत्राकार-पर्णाकार, त्रिकोणाच्या आकाराचा. Delta metal तांबें, जस्त, लोखंड या तिहींची मिश्रधातु. ही Δ त्रिकोणी चिन्हानें दर्शवितात. Deltoid muscle खांद्याचा त्रिकोणाकृति स्नायु *m* (याच्या योगानें हात सरळ वर करितां येतो.), तिकोनी स्नायु *m.*

Delude (de-lūd') [L. *deludere*, to mock at, to

cajole—L. *de*, down and *ludere*, to play.] *v. t. to lead from truth or into error, to mislead the mind or judgment of* (ला) भ्रमांत-चुकींत पाडणें, मोह घालणें, (च्या) मनास भलतीकडे नेणें. २ *to beguile, to impose upon, to dupe, to make a fool of* (ला) फसविणें, (च्या) डोळ्यांत धूळ घालणें, (ला) चकवणें, ठकवणें, वंचन-प्रतारण करणें, गाढव-मूर्ख बनविणें. ३ *to frustrate* निष्फळ-व्यर्थ करणें. ४ *to disappoint* निराशा-नाउमेद करणें. Delu'dable *a.* फसवितां येण्याजोगा, ठकविण्याजोगा. Delu'der *n. a deceiver, an imposter* फसव्या, ठक, प्रतारक, वंचक, लुचा. Delu'ded *a.* फसवलेला, वंचित.

Deluge (del'-ūj) [O. Fr. *deluge*—L. *diluvium*, a washing away—L. *diluere*—L. *de* (*dis*), apart and *luere*, to wash.] *n. an inundation, a flood* पूर *m*, लोंढा *m*. २ जलप्रलय *m*, जगबूड *f*; जगबुडती *f*. ३ (*fig.*) उत्पात *m*, विनिपात *m*, आपत्ति *f*, कोणतीही हानि-नाशकारक गोष्ट *f*. [THE D. बायबलांत वर्णिलेला नोहाच्या वेळचा जलप्रलय *m*.] D. *v. t. to overflow with water, to inundate* बुडविणें, जलमय करणें. २ *to overwhelm with a deluge, to cover, to overspread* (पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें) बुडवून टाकणें, झांकणें, पसरणें. Delu'ger *n.* Delu'ging *pr. a.* बुडविणारा, पाणजंजाळ करणारा.

Delusion (de-lū'-zhun) [See Delude.] *n. the act of deluding, deception* ठकविणें *n*, फसविणें *n*, ठकवणूक *f*, फसवणूक *f*, वंचन *n*. २ *the state of being deluded or misled* फसगत *f*, फसवणूक *f*, मोह *m*, भ्रम *m*, भ्रांति *f*. ३ *that which is falsely believed or propagated* कपट *n*, प्रलोभन *n*, माया *f*. [OPTICAL D. दृष्टिभ्रम, दृग्भ्रम *m*.] Delu'sionist *n.* सदोदित फसविण्याची खोड असलेला (मनुष्य), प्रतारणपटु. Delu'sive, Delu'sory *a.* फसवणारा, कपटी, फसवणुकीचा, मायेचा, मोहाचा, भ्रामक. Delu'sional *a.* भ्रमासंबंधीं. Delu'sively *adv.* Delu'siveness *n.*
*N. B.*—Delusion भ्रम, Illusion माया.

Delve (delv) [M. E. *deluen* : A. S. *delfan*.] *v. t. and v. i. to dig* कुदळीनें खणणें, खणणें. २ *to penetrate, to trace out, to fathom* (च्या) आंत शिरून पत्ता काढणें. D. *n. a pit, a ditch, a den, a cave* खाडा *m*, गुहा *f*, खांच *f*, दरी *f*. Delv'er *n.* खणणारा.

Demagnetise (de-mag'-ne-tīz') [L. *de*, away and Magnetise.] *v. t.* लोहचुंबकत्व-लोहचुंबकाचे धर्म नाहींसे करणें-काढून टाकणें. २ *to free from mesmeric influence* इच्छाशक्तीच्या मोहनापासून मुक्त करणें, इच्छाशक्तिमोह उतरवणें. Demag'netisa'tion *n.* इच्छाशक्तिमोहभंग *m*. Demag'netiser *n.*

Demagogue (dem'-a-gog) [Fr. *demagogue*—Gr. *demagogos*, a popular leader, *demos*, people and *agogos*, leading.] *n. leader of the rabble* प्राकृत-हलक्या लोकांचा पुढारी-नायक *m*, गावगुंड *m*, ग्रामणी *m* (S.), प्राकृतजननायक *m*. २ *one who attempts to control the multitude by specious arts* लोकांस तोंडदेखलें बोलून-थापा मारून वळविणारा वक्ता *m*. ३ *an unprincipled and factious mob orator* सामान्य लोकांत वाक्पांडित्य गाजविणारा वक्ता *m*, विवेकशून्य आरडाओरड करणारा पुढारी *m*, केवललोकप्रियवक्ता *m*. Dem'agogic,-al *a.* Dem'agog'ism, Dem'agoguism, Dem'agoguery, Demagog'y *n.* असल्या पुढाऱ्याचे-वक्त्याचे डावपेंच-कसब *n*.

Demain (dē-mān') [O. E. *demeine*, *demain*, rule, demesne—O. Fr. *demeine*, *demaine*, from L. *dominium*, property, right of ownership, from L. *dominus*, master, proprietor, owner.] *n. law. a lord's chief manor place, with that part of the lands belonging thereto which has not been granted out in tenancy* (उमरावाचा राहण्याचा बंगला व कुळाकडे न लावतां स्वतःच्या उपयोगासाठीं ठेविलेली) खुद्द भोगवट्याची जमीन *f*.

Demand (dē-mand') [Fr. *demander*, to demand, require—L. *demandare*, to entrust; in Late L. to demand—L. *de*, away & *mandare*, to commission, to order.] *v. t. to ask or call for by authority, to claim or seek from as by authority or right* सत्तेनें-हक्कानें मागणें, दावा करणें, अधिकारपूर्वक मागणें-मागणी करणें. २ *to inquire authoritatively, to question* विचारणें, चौकशी करणें, प्रश्न करणें. ३ *to require as necessary or useful, to be in urgent need of* (ची) गरज-जरूर लागणें-पडणें. ४ *law. to call into court, to summon* 'समान' लावून बोलणें, सत्तेनें बोलावणें. D. *v. i. to make a demand, to inquire* विचारणें, विचारपूस करणें, मागणी करणें. Demand' *n.* Demand'ing *n. peremptory urging of a claim, a requisition* सत्तेची मागणी *f*, मागणी *f*, उघराणी *f*. २ *earnest inquiry, question, query* प्रश्न *m*, सवाल *f*. ३ *a diligent search, manifested want, desire to possess* खप *m*, व्यय *m*, जरूर *f*, तंगी *f*, मागणी *f*, खोटा *f*. ४ *that which one has a right to demand, a claim* दावा *m*, मागणी *f*; हक्क *m*. ५ (*law*) (*a*) दावा *m*, मागणी *f*. (*b*) मागणी करण्याचा हक्क *m*. (*c*) मागणी केलेली रक्कम-वस्तु *f*, दाव्याची रक्कम-वस्तु *f*, सांगितलेलें वस्तूचें मोल *n*. [TO BE IN D. (ची) मागणी असणें, (ला) भाव येणें, (चा) अतिशय खप असणें. ON D. मागेल त्या वेळीं, हक्क दाखवितांच, दर्शनीं. EXORBITANT OR GREAT D. हाकाक *f*, चणचण *f*, तेजी *f*; AS, "THE SWADESHI CLOTH IS IN GREAT D."] Deman'dable *a.* सत्तेनें मागतां येण्याजोगा. Deman'dant *n.* मागणारा. २ वादी *m*. Deman'der *n.* हक्कानें मागणारा. Demand'ress *n. fem.*

Demarcation, Demarkation (dē'-mārk-ā'-shun) [Span. *demarcacion*—L. *de*, down and Span. *marcar*, to mark—Ger. origin.] *n. limit* हद्द *f*, शींव *f*, सीमा *f*,

(*pop.*) शीव *f.* २ *separation* भाग *m*, परिच्छेद *m.* ३ *distinction* भेद *m*, अंतर. ४ *the act of setting a limit* मर्यादा नक्की करण्याची क्रिया *f.* Demarcate *v. t.* सीमा *f.* मर्यादा *f.* ठरविणें, विभागणें. २ *to discriminate* भेद काढणें,-दर्शविणें.

Dematerialise (dē-ma-te'rī-al-īz) [L. *de*, and Materialise.] *v. t.* एखाद्या वस्तूंतून पंचमहाभूतात्मक गुण काढून घेणें, भौतिकांश-पार्थिवांश-जडांश-जडत्व-स्थूलदेहत्व काढून घेणें. D. *v. i.* भौतिकांश- &c. विहीन होणें.

Demean (de-mēn') [M. E. *demenen*–O. Fr. *demener*–L. *de*, down, fully and *mener*, to conduct, from Late L. *minare*, to drive cattle, to conduct–L. *minari*, to threaten.] *v. t. to conduct, to behave, to comport* (followed by the reflexive pronoun) आचरणें, वागणें. २ *to debase, to lower, to degrade* (followed by the reflexive pronoun) कमीपणा-हलकेपणा घेणें. ३ *to manage, to conduct, to treat* वागविणें, आवरणें. Demean *n.* Demean'our *n.* (*obs.*) *behaviour, conduct, bearing* वागणूक *f,* वर्तणूक *f,* चाल *f,* रीत *f.* २ *management, treatment* व्यवस्था *f,* आवर *m*, उरक *m.*

Dement (de-ment') [L. *dementare*, to drive out of one's mind–L. *de*, and *ment*, stem of *mens*, mind.] *v. t.* (R.) *to deprive of reason, to make mad* विचारशक्ति नष्ट करणें, वेडा करणें. D. *a.* (R.) मूढ, ज्ञानहीन. D. *n.* मूढ मनुष्य *m.* Demen'tate *v. t.* वेडा करणें. Demen'ted *a.* मूढ, वेडा, विचारहीन. Demen'tia, Demen'cy *n.* विचारशक्तीचा नाश *m.*

Demerit (de-mer'-it) [O. Fr. *demerite*–Late L. *demeritum*, a fault–L. *demerere*–L. *de*, fully and *merere*, to deserve.] *n. fault* अपराध *m.* २ *crime* गुन्हा *m.* ३ *ill desert* दुर्गुण *m*, अवगुण *m.*

Demesmerise (de-mes'-mer-īz) [L. *de* and Mesmerise.] *v. t. to bring out of the mesmeric state.* See Demagnetise. २ Demesmerisā'tion *n.*

Demesne (de-mēn') See Demain.

Demi, Demy (dem'-i) [O. Fr. *demi*, half–L. acc. *dimidium*–L. *de* (*dis*), apart & *medius*, middle.] *n.* अर्धा भाग दाखविणारा प्रत्यय *m.*. २ ऑक्सफोर्डमधील मॅगेलन कॉलेजांतील अर्धी फी देणारा विद्यार्थी *m.* ३ See Demy.

Demi-castion (demi-cast'-yun) अर्धा बुरूज *m*, हुडा *m.*

Demi-cadence (dem'-i-kā'dens) *n. mus.* अर्धस्वरावरोह *m.*

Demi-cannon (dem'i-kan'-un) *n.* ३० पासून ३६ पौंडांचा गोळा सोडणारी तोफ *f.*

Demi-culverin (dem'i-cul've-rin) *n.* ९ पासून १२ पौंडांची गोळा फेंकणारी तोफ *f.*

Demi-deify (dem'i-de'-fī) *v. t. to deify in part* थोडासा देवासारखा मान देणें, उपदेवाप्रमाणें वागविणें.

Demi-devil (dem'i-dev'-il) *n* अर्धपिशाच *n.*

Demi-god (dem'-i-god) *n.* गंधर्व *m*, उपदेव *m*, यक्ष *m.* Dem'igodd'ess *n. fem.*

Demi-gorge (dem'-i-gawrj) *n.* (*Fort*) अर्धरंध्र *n.*

Demirep (dem'-i-rep) [Contra. Fr. *demi-reputation.*] *n.* जिच्या पातिव्रत्याची शंका आहे अशी स्त्री *f,* रखेली *f,* नादावलेली स्त्री *f.*

Demise (dē-mīz') [O. Fr. *demise*, *desmise* fem. of *p. p.* of *desmettre*, to displace–L. *dimittere*, to dismiss.] *v. t. to transfer or transmit by succession or inheritance, to bestow by will, to bequeath* वारसास देणें, मृत्युपत्रानें देणें, वारसास मिळकतीचा अधिकार देणें. २ *to convey as an estate by lease, to lease* पट्ट्यानें-कौलानें-कबुलायतीनें देणें. D. *n.* (वड्या मनुष्याचें) निधन *n*, मृत्यु *m*, राजमृत्यु *m.* २ वारसा *m.* ३ *law.* पट्ट्यानें-कौलानें मिळकतीचा तावा देणें *n.* Demi'sable *a.* कौलानें देतां येण्याजोगा.

*N. B.*—The *demise* of the crown is a transfer of the crown, royal authority or kingdom to a successor. Thus when Edward *IV.* was driven from his throne for a few months by the house of Lancaster, this temporary transfer of this dignity was called a *demise*. Thus the natural death of a king or a queen came to be denominated a *demise* as by that event the crown is transferred to a successor (Web.).

Demit (de-mit') [See Demise.] *v. t. to lay down as an office, to resign* अधिकारत्याग करणें, राजीनामा देणें, सोडणें, बदलणें. २ (R.) *to yield, to submit, to humble* कबूल होणें, कमीपणा घेणें. ३ (R.) *to let fall, to depress* खालीं पाडणें, पडूं देणें. Demissi'on *n. resignation of an office* अधिकारत्याग *m*, राजीनामा *m.* Demissly *adv.* (*obs.*)

Demiurge (dem'-i-urj) [of Gr. origin.] *n. God as the maker of the world* कर्ता *m*, विधाता *m*, जगत्कर्ता *m.* २ *according to the Gnostics an agent or one employed by the Supreme Being to create the material universe and man* परमेश्वराच्या आज्ञेनें विश्वाची उत्पत्ति करणारा देव *m.* Demiur'gical *a.* उत्पन्न करणारा, घटनयोग्य.

Demivolt (dem'-i-volt) [Cf. Fr. *demi-volte.*] *n.* घोड्याची एक प्रकारची चाल *f,*- गति *f,*- चलन *n.*

Demobilise (de-mob'il-īz) [Cf. Fr. *demobiliser.*] *v. t. to disorganise, to disband & send home* (as troops) शिपायांचीं हत्यारें काढून घेऊन त्यांना स्वदेशीं पाठविणें, लष्करी चाकरींतून रजा देणें, लष्कर-सैन्य मोडून टाकणें. Demobilisā'tion *n.* सैन्य मोडून टाकणें *n*, लढाई संपवून शांततेवर येणें *n.*

Democracy (de-mok'-ra-si) [Fr. *democratie* from Gr. *democratia*, from *demos*, people & *kratein*, to rule.] *n. government by the people* प्रजासत्ताकराज्य *n*, प्रजासत्तात्मकराज्य *n*, लोकप्रभुत्व *n*, बहुनायकी *f.*

२ *government by popular representation.* लोकांनीं निवडलेल्या प्रतिनिधींनीं चालविलेलें राज्य *n*, प्रतिनिधिसत्तात्मक राज्य *n*. ३ *the people* (regarded as the source of government) जनसमूह *m*, समस्त लोक. ४ *the principles and policy of the democratic party* प्रजासत्ताकराज्याचे नियम *m*- नीति *f.* also Dem'ocraty (*Milt.*). Dem'ocrat, Dem'ocratist *n. an adherent or advocate of democracy* प्रजासत्ताकराज्यपक्षी *m*, प्रजापक्षावलंबी *m*, प्रजातंत्रवादी *m*. २ *a member of the democratic party* प्रजासत्तावर्धक पक्षाचा मनुष्य *m*. Democrat'ic-al *a.* लोकप्रभुत्वासंबंधीं, लोकसत्ताक, लोकसत्ताकराज्यासंबंधीं, जनसमूहास उपयोगी. Democrat'ically *adv.* Dem'ocra'tifiable *a.* Democ'ratise *v. t. to render democratic* प्रजासत्ताक करणें.

Demography (de-mog'ra-fi) [Gr. *demos*, the people & *graphein*, to write.] *n. that branch of anthropology which deals with the life-conditions of communities of peoples as shown by statistics of births, deaths &c.* (मानुष्यकशास्त्रांतील) आयुःपरिस्थितिप्रकरण *n*, राष्ट्रें व जाती ह्यांच्या जननमृत्युविवाहादि गोष्टींचें साधारण वर्णन *n*. Demog'rapher *n.* असें वर्णन लिहिणारा *m*. Demograph'ic *a.*

Demoiselle (dem-wä-zel') [Of French origin. See Damsel.] *n.* (*Shakes.*) *a young lady, a damsel* तरुण स्त्री *f*, अप्सरा *f*, (*b*) *a lady's maid* दासी *f*. २ एक प्रकारचा सुंदर आकृतीचा बगळयासारखा पक्षी *m*.

Demolish (de-mol'-ish) [O. Fr. *demoliss-demolir*, to demolish–L. *demoliri, demolire*, to pull down–L. *de*, from & *moles*, heap, mass.] *v. t. to throw or pull down, to raze, to pull to pieces, to ruin* मोडणें, मोडून-पाडून टाकणें, मोडून-तोडून टाकणें, सपाट-जमीनदोस्त करणें, (चा) नाश-विध्वंस-उच्छेद करणें. Demolished *a.* जमीनदोस्त. Demol'isher *n.* नाश करणारा *m*, विध्वंस करणारा. Demoli'tion *n. destruction by violence, utter overthrow* नाश *m*, विध्वंस *m*.

Demon, Deamon (dē'-mon) [Formerly *dæmon*–L. *dæmon*–Gr. *daimon*, a god or genius, spirit.] *n. an evil spirit, a devil* दानव *n*, दैत्य *m*, असुर *m*. २ *a spirit, an immaterial being* भूत *n*, पिशाच *n*, यक्ष *m*, अतिशय दुष्ट मनुष्य *m*. ३ *one's genius* मृताचा आत्मा-लिंगदेह *m*. ४ *a tutelary spirit* कैवारी देवता *f.* [WATER D. गिऱ्हा *m*, आसरा *f.*] *fem.* Demo'ness. Demo'niac, Demo'niacal *a.* असुरी, असुरसंबंधीं, असुराचा. २ पिशाचाचा, भुताचा, अतिदुष्ट. Demo'niac *n.* भूतग्रस्त मनुष्य *m*, पिशाचग्रस्त मनुष्य *m*. Demoni'acally *adv.* De'moniacism *n.* पिशाचग्रस्त होण्याची स्थिति *f*, पिशाचग्रस्ताच्या चेष्टा *f.* De'monian *a.* (*Milt.*) भुतासंबंधीं. De'monianism, De'moniasm *n.* भूतसंचार(स्थिति *f*), भूतबाधा *f.* De'mono'cracy *n.* भूताचें-दैत्याचें-पिशाचाचें राज्य *n*. Demonol'atry *n.* भूतार्चन *n*, पिशाचपूजा *f.* De'monol'ater *n.* भूतार्चन-पिशाचपूजा करणारा *m*. De'monol'ogy *n.* भूतपिशाचादिविषयक विद्या *f.* Demonol'ogist *n.* भूतपिशाचविद्येचा ग्रंथलेखक *m*. De'monoma'nia *n.* एक प्रकारचें वेड *n*. यांत वेड लागलेल्या मनुष्यास भूतबाधा झाली आहे असें वाटतें. Demon'omy *n.* पिशाचराज्य *n*, पिशाचसत्ताप्रदेश *m*. De'monry *n.* भूतशक्ति *f*, भुताची झडपण *n*.

Demonetise (dē-mon'e-tīz) [L. *de* & Eng. Monetise verb from money.] *v. t. to deprive of current value, to withdraw from use* नाणें प्रचारांतून बंद-रद्द करणें; as, "The gold mohurs have been completely demonetised by the East India Company." Demonetizā'tion *n.* चलनी नाणें बंद करणें *n*.

Demonstrate (de-mon'-strāt) [From *p. p.* of L. *demonstrare*, to show fully–L. *de*, fully & *monstrare*, to show, from *monstrum*, a portent.] *v. t. to show or make evident by reasoning or proof, to prove by deduction* (अर्थोपपत्त्या किंवा प्रमाणानें) स्पष्ट दाखविणें, दर्शविणें, प्रमाण देऊन सिद्ध करणें, प्रतिपादणें, प्रतिपादन *n*- उपपादन *n*. करणें *g. of o.*, खचित करून दाखविणें. २ (*anat.*) *to exhibit & explain* (*a dissection or other anatomical preparation*) चा भाग-अवयव दाखवून समजावून देणें. Demon'strable *a.* सिद्ध करतां येण्याजोगा. Demon'strableness *n.* Demon'strabil'ity *n.* सिद्धता करतां येण्याचा धर्म *m*-गुण *m*. Demon'strably *adv.* स्पष्टपणें. De'monstrat'ed *a.* सिद्ध केलेला, प्रतिपादित. Demonstrā'tion *n. the act of demonstrating, exhibition, proof* साधणें *n*, सिद्ध करणें *n*, साधन *n*, प्रतिपादन *n*, उपपादन *n*, सिद्धि *f*, उपपत्ति *f*. २ *an indubitable evidence* सिद्धांत *m* निश्चितार्थ *m*. ३ *mil. a decisive exhibition of force* आव *m*, आवारा *m*, खटाटोप *m*, आडंबर *m*, डौल *m*, मांडणी *f*, घटाव *m*. [EMPTY D. पोकळ-रिता डौल *m*, मेघाडंबर *m*. DIRECT OR POSITIVE D. प्रतिपाद्य सिद्धांत *m*. INDIRECT OR NEGATIVE D. निषेधार्थक प्रतिपादन-सिद्धांत *m*. ४ *anat.* भाग-अवयव दाखवून समजूत देण्याची क्रिया *f*. ५ *an expression of feelings by outward signs, a manifestation, a show* देखावा *m*, थाटमाटाचा समारंभ *m*-प्रदर्शन *n*. Demonstrā'tor *n.* Demon'strā'tive *a.* सिद्ध करणारा, प्रतिपादक, निर्णय करणारा, स्पष्ट दाखविणारा, प्रदर्शक. २ *displaying feeling or sentiment* निष्कपटी, मनाचा मोकळा. ३ *consisting of eulogy or invective* स्तुतिपर, निंदात्मक. [D. PRONOUN दर्शक सर्वनाम *n*.] Demon'stratively *adv.* जोरानें, स्पष्टपणें. Demon'strative'ness *n.* स्पष्टता *f*. Dem'onstra'tory *a.* सिद्ध करणारा.

Demoralise (de-mor'-al-īz) [Modern Fr. *demoraliser*–Fr. *de* (L. *dis*), apart & *moral*, moral, with verbal suffix *ise.*] *v. t. to corrupt in morals* नीतिभ्रष्ट-धर्मभ्रष्ट करणें, आचारहीन करणें, दुराचारी करणें. २ *to weaken in spirit or efficiency* जोम *m*–जोस *m*-

तरतरी *f*–किंमत *f.* कमी करणें. Demoralisā'tion *n.* नीतिभ्रष्टता *f.*

Demos ( dē'-mos ) [ Gr. ] *n.* हलक्या वर्गाचे–खालच्या दर्जाचे–कनिष्ठ प्रतीचे लोक *m. pl.* Demo'tic *a.* लोकांसंबंधीं. २ *popular, common* साधारण, लोकप्रिय.

Demulcent ( de-mul'-sent ] L. *demulcens pr. p.* of *demulcere*—L. *demulcere*, to stroke, to soothe.] *a. softening, mollifying, soothing* (जळजळ) शमविणारें, बरें करणारें, मऊ–नरम करणारें, शमक. D. *n.* सूज कमी करणारें औषध *n.* Demul'sion *n.* शांतवन *n.* २ ज्याच्या योगानें (रोगाचें) शमन होतें तो पदार्थ *m*, शामक *n*, शमक *n.*

Demur ( de-mėr' ) [ O. Fr. *demourer, demeurer*, to tarry, to hesitate—L. *demorari*—L. *de*, fully & *morari*, to delay, from *mora*, delay. ] *v. i.* ( *obs.* ) *to linger, to stay, to tarry* कांकूं करणें, नानू *f.* करणें, कुचकुळणें, मागेंपुढें करणें. २ *law.* तकरार *f.* सांगून थांबणें, तकरार *f*- हरकत *f.* घेणें. ३ *to take exception* आक्षेप घेणें. D., Demur'ring *n. stop, pause, scruple* कांकूं *f*, आक्षेप *m*, आशंका *f*, संदेह *m*, वितर्क *m*, विकल्प *m.* २ *law.* पक्षकारानें कायद्याच्या मुद्यानें घेतलेली हरकत *f.* Demur'rable *a.* हरकत घेण्याजोगा. Demur'rage *n.* गलबताची खोटी झाल्याबद्दल मालकास दिलेला पैसा *m*, खुटवा *m*, नियमित वेळेपेक्षां जास्त वेळ स्टेशनांत माल पडून राहिला तर मालकानें कंपनीस दिलेला पैसा *m.* Demur'rer *n.* अटकाव करणारा, तकरार करणारा. २ *law.* कायद्याचा वांधा *m.* [ D. *to evidence* पक्षकारानें पुराव्याविरुद्ध घेतलेली हरकत *f.* ]

Demure ( de-mūr' ) [ L. prefix *de* + M. E. *mure*, mature, calm—O. Fr. *meur*,—L. *maturus*, mature. ] *a. of sober and serious mien, grave* अतिनम्र, गंभीर. २ *affectedly modest, making a show of gravity* गोमुख्या, बोकेसन्याशी, भगलभावार्थी, बकध्यानी, ओढून–ताणून–विनय दर्शविणारा, ढोंगी, दांभिक, वरवर विनय दाखविणारा. Demure'ly *adv.* गंभीरपणानें, ढोंगीपणानें. Demure'ness *n.* बकध्यान *n*, बोकेसंन्यास *m.*

Demy ( de-mī' ) [ An Eng. spelling of L. *demi.* ] *n.* कागदाचा एक विशिष्ट आकार *m.* छापण्याचा "डेमाय्" कागद २२½ तसू लांब व १७½ तसू रुंद, लिहिण्याचा २१ तसू लांब व १६ तसू रुंद व चित्रें काढण्याचा २० तसू लांब व १५ तसू रुंद असतो. Demy'ship *n.*

Den ( den ) [ M. E. *den*; A. S. *denn*, a cave.] *n. a small cavern or hollow place in the side of hill or among rocks* गुहा *f*, बीळ *n.* २ *a squalid place of resort, a wretched dwelling-place* राहण्याचें घाणेरडें ठिकाण *n*, भिकारडी–दुराचाराची जागा *f.* ३ (*colloq.*) *any snug or close retreat where one goes to be alone* एकांतवास *m*, एकांतआश्रम *m.* D. *v. i.* गुहेंत राहणें.

Denary ( dēn-ar-i ) [ L. *denarius*, containing ten–L. *deni pl.* ten by ten–L. *decem*, ten. ] *a.* दसपट, दहादहांनीं वाढणारा. D. *n.* दहा *m.* २ एक प्रकारचें नाणें *n.*

Denationalise-ze ( de-nash'-un-al-īz' ) [ *Cf.* Fr. *denationaliser.* ] *v. t. to divest or deprive of national character or rights* राष्ट्रीय हक्क–स्वरूप–स्वत्व–स्वातंत्र्य काढून घेणें. Denationalizā'tion *n.* राष्ट्रीय स्वरूप नाहींसें करणें *n*, लोकांतला राष्ट्रीयत्वाचा जोम नाहींसा करणें *n.*

Denaturalize ( de-nach-ėr-al-īz ) [*Cf.* Fr. *de-naturaliser.*] *v. t. to render unnatural, to alienate from nature* विदेशीय करणें, स्वभाव किंवा निसर्ग बदलणें–फिरविणें. २ (R.) *to deprive of citizenship* नागरिकपणाचे स्वाभाविक हक्क हिरावून घेणें–काढून घेणें.

Dendriform ( den'-dri-form ) [ Gr. *dendros*, a tree & Form. ] *a.* (आकारानें) झाडासारखा–झुडपासारखा.

Dendrology ( den'-drol'-ō-ji ) [ Gr. *dendros*, a tree & *logia*, discourse. ] *n. the natural history of trees* वृक्षवर्णनविद्या *f.* Dendrol'ogist *n.* वृक्षेतिहासनिपुण. Dendrolo'gical *a.* वृक्षेतिहासासंबंधीं. Dendrit'ic *a.* झाड किंवा झुडपासारखा आकार असलेला, वृक्षाकार.

Dene ( dēn ) *n.* गुहा *f*, दरी *f.* गांवाच्या नांवाचे शेवटीं या शब्दाचा उपयोग करितात. Dene-hole *n.* केन्ट, एसेक्स येथील खड्डू तयार करण्याकरितां केलेली गुहा *f.*

Dene-bola ( dēn-bōlä ) *n.* उत्तराफाल्गुनिनक्षत्राची दुसरी तारा *f.*

Dengue (den-g'ā)*n. med.* एक प्रकारचा हाडमोड्या ताप *m.*

Denier ( den'-i-ā' ) *n.* एक जुनें अल्प किंमतीचें फ्रेंच नाणें *n.* हें नाणें तांब्याचें केलेलें असतें.

Denigrate (den'-i-grāt) [L. *denigrare*–L. *de* & *nigrare*, to blacken from *niger*, black. ] *v. t.* (*R.*) (*fig.*) *to blacken or sully, to defame* एखाद्यास बट्टा आणणें, काळोखी लावणें. २ *to blacken thoroughly* पूर्ण काळें करणें. Denigrā'tion *n.* (*fig.*) कालिमा *m*, बट्टा *m.*

Denizen ( den'-i-zen ) [ Formerly *deynsein*– O. Fr. *deinzein* ( also *denzein* )–L. *deintus*, from within, L. *de*, from & *intus*, within. ] *n. naturalised citizen* (ज्यास राजाच्या कृपेनें नागरिकाचे हक्क मिळालेले आहेत असा) विदेशीय नागरिक *m*, नगरवासी *m*, ज्यास परदेशांत येऊन राहण्याचा हक्क मिळाला आहे असा विदेशीय मनुष्य *m.* D. *v. t. to constitute* ( one ) *a denizen* नागरिक–रहिवाशी करणें. २ *to populate with naturalised occupants* वसति करविणें. D. *v. i.* वसति होणें, रहिवाशी होणें. Denizenā'tion *n.* नागरिक करणें *n.* Den'izen'ship *n.* नागरिकावस्था *f.*

Dennet (den'-net) *n.* दोन चाकांची एका घोड्याची उघडी [ गाडी *f.*

Denominate ( dē-nom'-i-nāt ) [From *p. p.* of L. *denominare*, to name–L. *de*, down & *nominare*, to name, from *nomen*, a name.] *v. t. to give a name to, to entitle, to designate* नांव ठेवणें, संज्ञा *f*- नाम *n*- अभिधान *n.* ठेवणें. Denom'inable *a.* संज्ञा देण्यास योग्य–पात्र. Denominā'tion *n. a name, a designation,*

*a title, a category* नांव *n*, संज्ञा *f*, गुणनाम *n*, वर्ग *m*, विल्हा *m*. २ *a class or society of individuals, a sect* पंथ *m*, संप्रदाय *m*, पक्ष *m*. Denom'ina'tional *a.* वर्गसूचक, गुणवाचक, गौण. २ संप्रदायाचा, सांप्रदायिक. Denominā'tionalism *n.* विशिष्ट पंथांचें अनुसरण *n*-समर्थन *n*. २ विशेषसांप्रदायिकत्व *n.* Denom'ina'tionally *adv.* Denom'ina'tive *a.* गुणवाचक, उपाधिवाचक, जातिनिर्देशक. २ सांप्रदायाचा. D. *n. gram.* (नामापासून बनलेला) नामधातु *m*. Denom'ina'tively *adv.* Denominā'tor *n.* नांव देणारा-ठेवणारा *m*. २ छेद, छेदक, हर. [REDUCE TO A COMMON D. समच्छेद-समहर करणें. D. OF FRACTION *alg.* अपूर्णांकाचा छेद *m*.]

Denote (de-nōt') [Fr. *denoter*–L. *denotare*, to mark out;–L. *de*, down & *notare*, to mark, from *nota*, a mark.] *v. t. to mark out plainly, to signify by a visible sign, to indicate, to point out* निशाणी करणें, स्पष्ट चिन्हानें-खुणेनें दाखविणें, जाणवणें. २ *to be the sign of, to betoken, to signify* (चें) लक्षण *n*,- चिन्ह *n*,- खूण *f*- निदर्शन *n*. असणें. Deno'table *a.* दर्शनीय, लक्षणीय, सूचनीय. Denotā'tion *n.* चिन्ह *n*, निशाणी *f*, निर्देश *m*, सूचन *n*, अभिधान *n*, उपलक्षण *n*, व्यक्तिविशिष्टता *f*, *Eng. log.* व्यक्तिनिर्देश *m*. Deno'tative *a.* दाखवितां येण्याची शक्ति असलेला, निर्देशक्षम, नामकरणसमर्थ, (नाम-व्यक्ति) निर्देशक. Deno'tatively *adv.* Denote'ment (R.) *n.* खूण *f*, सूचन *n*. Deno'tive *a.*

Denouement (de-nōō'-mong) [Fr. *denouement*–L. *dis*, apart & *nodare*, to knot, from *nodus*, a knot.] *n. the undoing of a knot, the unraveling or discovery of a plot, the catastrophe* (of a drama or romance) नाटकांतील किंवा कल्पित कथेंतील भानगडीचा उलगडा *m*, निर्वहण *n*. २ *the solution of a mystery* गुसगोष्टीचा खुलासा *m*. ३ *issue, outcome* उलगडा *m*, उकल *m*.

Denounce (de-nowns') [O. Fr. *denoncer*–L. *denuntiare*, to declare–L. *de*, down & *nuntiare*, to tell, from *nuntius*, a messenger.] *v. t. (obs.) to make known in an official manner, to proclaim* (an evil) सरकारी रीतीनें (वाईट गोष्ट) जाहीर करणें. २ *mili. to proclaim in a threatening manner, to threaten by some outward sign or expression* धमकी देऊन जाहीर करणें, धमकी दाखविणें, दहशत घालणें. ३ *to point out as deserving of reprehension, to accuse in a threatening manner, to invoke censure upon* दंडास-शिक्षेस पात्र ह्मणून जाहीर करणें, छीथू करणें, आरोप करणें, बदनामी करणें. ४ (अमेरिकेंत खाणीचें काम अर्धवट केल्यामुळें किंवा अजिबाद सोडल्यामुळें तेथें) काम करण्याबद्दल हक्क पुढें आणणें. Denounce'ment *n.* (*archaic.*) See Denunciation. Denoun'cer *n.* धमकी देणारा, दहशत घालणारा.

Dense (dens) [L. *densus*, thick.] *a. close, thick, compact* घण, सांद्र, घन, दाट (said of liquids), घट्ट, दृढ (said of solids), निबिड, गर्द, सांद्र (said of forests, &c.) २ *stupid, gross, cross* मठ्ठ, ओंडा, सूर्ख. D. *n.* (R.) *a thicket* दाटगर्द झाडी *f*. Dense'ly *adv.* Den'sity, Dense'ness *n.* घट्टाई *f*. २ घट्टपणा *m*, घनता *f*, दृढपणा *m*, दृढता *f*, दार्ढ्य *n*. ३ निबिडपणा *m*, गर्दबाजी *f*. ४ *photo. depth of shade* गहिरी छाया *f*. ५ (*physics*) दार्ढ्य *n*.

Dent (dent) [A variation of Dint.] *n.* (*obs.*) *a stroke, a blow* प्रहार *m*, ठोंसा *m*, आघात *m*. २ *a slight depression made by a blow, an indentation* प्रहारचिन्ह *n*, पोंचा *m*, खोमा *m*. D. *v. t. to make a dent upon, to indent* खळगी-पोंचा पाडणें.

Dent (dent) [L. *dens, dentis*, cf. Sk. दन्त, a tooth.] *n. a tooth* (of a wheel) *a notch* चाकाचा दांता *m*. D. *v. t. to notch* दांते पाडणें. Dent'ed दांता पाडलेला. Den'tal *a.* दांत्यासंबंधीं. २ दंत्यवर्णाचा. [D. ENGINE दांताला भोंकें पाडण्याचीं हत्यारें वाटोळें फिरविणारें यंत्र *n*. D. SURGEON दंतवैद्य *m*.] Den'tary *a.* दंतवृद्धीसंबंधीं. Den'tate *a.* (*biol.*) सरळ दांते असलेला, दन्तुर. Den'tately *adv.* सरळ दांते असलेल्या रीतीनें. Den'ticle *n.* [L. *denticulus*, double diminutive of *dens*, a tooth.] *n.* लहान दांत *m*, पुढें आलेलें टोंक *n*. Dentic'ulate *a.* दांते असलेला. Dentic'ulated *a. bot.* दंताकृतीचा, लहान लहान दांते असलेला (पान, बीं इ.) Dentic'ulā'tion *n.* लहान दांते-दांतरे असलेली स्थिति *f*, दंतरा *m*. Den'tiform *a.* दांताच्या आकाराचा, दंताकार. Den'tifrice [Fr. *dentifrice*–L. *dentifricium*–L. *denti* decl. stem. of *dens*, a tooth, & *fricare*, to rub.] *n. tooth-powder* दांतवण *n*, दंतचूर्ण *n*, दंतमंजन *n*. Dentig'erous *a.* दांत असणारा. Den'tise *v. i.* नवे दांत येणें-फुटणें-बाहेर पडणें. Den'tist [Fr. *dentiste.*] *n.* दंतवैद्य *m*. Den'tistic *a.* दंतवैद्याचा. Den'tistry *n.* दंतविद्या *f*. Denti'tion [L. *dentitionem*–L. *dentitus p. p.* of *dentire*, to cut teeth–L. *dens*, a tooth.] *n.* दांत फुटणें *n*, दांत येणें *n*, दंतोद्भव *m*. [D. DIFFICULTY दांत येतांना त्रास येणें *n*.] २ *the arrangement of the teeth, with regard to kind, number, and order* प्राण्यांच्या दातांची रचना *f*. Den'toid *a.* दंतासारखा, दंताच्या आकाराचा. Dentil'oquist *n.* दांत उघडल्याशिवाय बोलणारा, दांत आंवळून बोलणारा, चावत बोलणारा.

Denude (de-nūd') [L. *denudare*–L. *de*, fully & *nudare*, to lay bare, from *nudus*, bare.] *v. t. to divest of all covering, to make bare or naked, to strip* नागवा-उघडा करणें, काढून घेणें. Denudā'tion *n.* नागवा करणें *n*, नग्नस्थिति *f*.

Denunciate (de-nun'-shi-āt) [L. *denuntiatus*, *denunciatus p. p.* of *denuntiare*-*ciare*; See Denounce.] *v. t.* (R.) *to denounce, to condemn publicly or solemnly* सार्वजनिक रीतीनें छीथू करणें; as, "To

D. this new work." Denunciā'tion *n.* (*obs.*) *proclamation, announcement* जाहिरात *f.* २ *the act of denouncing, public menace or accusation* सार्वजनिक धाक-दहशत-आरोप *m*, नामोशी *f*, छीथू *f*, बदनामी *f.* ३ *that by which anything is denounced, threat of evil, arraignment* दहशत *f*, आरोप *m*, Denun'ciative, Denun'ciator'y *a.* (छिथू करण्याच्या हेतूनें) जाहीर करणारा, धमकी दाखविणारा, दोषारोप-तोहोमत आणणारा, भय घालणारा. Denun'ciā'tor *n.* छिथूकरण्याच्या हेतूनें जाहीर करणारा, &c.

Deny (de-nī') [M. E. *denien*–M. Fr. *denier*–L *denegare*, to deny fully–L. *de*, fully & *negare*, to deny.] *v. t. to contradict* खरें नव्हे असें ह्मणणें, विरुद्ध बोलणें, (एखाद्या गोष्टीची सत्यता) नाकबूल करणें. २ (*obs.*) *to refuse to do something* (एखादी गोष्ट करण्याचें) नाकारणें, (करावयाचें) नाकबूल-अमान्य करणें; as, "If you deny to dance." ३ *to refuse to grant* (मागणी) नामंजूर करणें, (केलेली विनंति, याचना इ०) अमान्य करणें, नन्नाचा पाढा वाचणें; as, To deny a request; (ईश्वरानें) न देणें; as, "The pleasure of seeing was denied to him." ४ *to disclaim connection with* अंगाबाहेर टाकणें, कान झाडणें, कानावर हात ठेवणें. [To DENY ONE'S WORD OR ENGAGEMENT बदलामीवर येणें. To DENY FLATLY साफ नाहीं ह्मणणें, वाटाण्याची अक्षत लावणें (*fig.*), निझाडा देणें (R.). To DENY ONE'S SELF जीव मारणें-जाळणें, इंद्रियांचें दमन करणें, इंद्रियसुखाचें नियमन करणें.] D. *v. i. to answer in the negative* नकारार्थी उत्तर देणें. Deni'al, Deny'ing *n.* नकार *m*, नाकबुली *f*, निषेध *m.* Deny'ingly *adv.* Deni'able *a.* Denied *pa. p.* & *a.* Deni'er *n.* नाकबूल करणारा, नाकारणारा.

Deobstruct (dē'-ob-strukt') [L *de*, & Obstruct.] *v. t.* अडचण दूर करणें, निर्विघ्न करणें. २ (प्रवाही पदार्थाचा) मार्ग साफ-खुला करणें.

Déobstruent (de-ob'stru-ent) *a. med.* अडचण दूर करणारा. D. *n.* रेचक *n*, रेच *m*, जुलाब *m.*

Deodand (dē'ō-dand) [*deo* dat. of *deus*, God; *dandum*, neut. of *dandus*, to be given from *dare*, to give.] *n.* देवाला वाहिलेली-दिलेली वस्तु *f*, देवोपहार *m.* [झाड *n.*

Deodar (de-o-där') [cf. Sk. देवदारू.] *n.* देवदारूचें

Deodorise (dē-ō-'dėr-īz') [L. *de*, & *odor*, smell.] *v. t. to deprive of odour resulting from impurities* दुर्गंधी काढून टाकणें, वाईट वास-घाण नाहींशी करणें. Deo'dorisā'tion *n.* Deo'dori'ser *n.* दुर्गंधिनाशक (द्रव्य.)

Deontology (dē'-on-tol'-ō-ji) [Gr. *deon*, the necessary and *logos*, discourse.] *n. the science of duty or moral obligation* कर्तव्यशास्त्र *n*, धर्मशास्त्र *n.* (या शास्त्रांत मनुष्याचीं कर्तव्यें सांगितलेलीं असतात.) Deon'-tolo'gical *a.* De'ontolo'gist *n.* कर्तव्यशास्त्रवेत्ता *m.*

Deoppilate (dē-op'i-lāt) *v. t.* (*obs.*) *to free from obstruction* अडथळे दूर करणें. Deopp'ilā'tion *n.* Deop. pilā'tive *a. med.* रेचक, मलशोधन करणारें.

Deorganization (dē-orga-ni-zā'-shun) *n.* विसकटाविसकट *m*, अव्यवस्था *f*, घडी विसकटणें *n* समुदायभंग *m.* समुदाय is organisation according to रामदास.

Deoxidate, Deoxidize (dē-oks'i-dāt, oksi-dīz') *v. t. chem. to deprive of oxygen* कोणत्याहि पदार्थांतून प्राणवायु (oxygen) निराळा करणें, प्राणवायु काढून टाकणें, विप्राण करणें. Deoxidā'tion, Deo'xidize'ment *n.* Deox'idi'zer *n.* प्राणवायु काढून टाकणारा पदार्थ *m.*

Depart (de-pärt') [Fr.–L. *de*, from & *partire*, to part, to divide.] *v. i.* (*obs.*) *to separate* विभक्त होणें. २ *to go forth or away* जाणें, निघणें, निघून जाणें, रवाना-चालता-मार्गस्थ होणें, प्रयाण-प्रस्थान करणें. ३ *to forsake, to abandon* (नियम-तत्त्व) सोडून जाणें, उल्लंघन करणें. ४ *to perish* नाश होणें, नाहींसें-नष्ट होणें. ५ *to die, to quit this world* जग सोडून-परलोकीं जाणें, मरणें, गुजरणें. D. *v. t.* (*obs.*) *to separate* ताटातूट करणें; as, "Till Death departed them." (Chaucer) २ *to divide in order to share* विभाग-वांटा-वांटणी करणें. ३ *to leave, to depart from* सोडणें, सोडून देणें; as, "Ere I D. his house." (Shakes.). D. *n.* पदार्थांच्या घटकावयवांचें पृथक्करण *n.* २ *departure, death* गमन *n*, मरण *n.* Depart'able *a.* Depar'ted *pa. t.* & *pa. p.* D. *a.* गेलेला, मरण पावलेला. [THE DEPARTED मृत *pl.*] Depart'er *n.* Depar'ting *pr. p.* or verbal noun, same as Departure. Depart'ment *n. a part, portion, subdivision* शाखा *f*, विभाग *m*, अंग *n*, खातें *n*, प्रकरण *n*, विल्हा *m.* २ *province* (अभ्यासाचा) विषय *m.* ३ (जीवनक्रमाचें) क्षेत्र *n*, मर्यादित प्रांत *m.* ४ *a sub-division of business* खातें *n.* ४ *a territorial division* (esp. in France) प्रांत *m*, परगणा *m*, जिल्हा *m.* De'partmen'tal *a.* De'partmen'tally *adv.* खात्याकडून-तून; as, He was punished D. Depar'ture *n. separation* भाग-ताटातूट-खंड करणें *n.* २ *removal from a place* प्रस्थान *n*, गमन *n.* ३ *death* निर्याण *n*, परलोकगमन *n*, मरण *n*, मृत्यु *m.* ४ *deviation from a rule* नियमोल्लंघन *n*, अतिक्रमण *n.* ५ (*law.*) पक्षकारानें पहिली तक्रार सोडून देऊन दुसरी नवीन काढणें *n*, दुसरी कोटी *f*, निमित्तान्तर *n.* [A NEW DEPARTURE नवी रीतभात *f*- वहिवाट *f*, नवी टूम *f*, तृतीयपंथ *m.*] D. *v. t. to rescue from poverty* निर्धनस्थितींतून उच्च स्थितीस नेणें, निर्धनता दूर करणें.

Depasture (de-pas'-tūr) *v. i.* & *v. t.* (R.) *to feed* चरण्यास सोडणें, चारणें, चारविणें.

Depatriate (dē-patri-āt) [L. *de* & *patria*, one's country.] *v. t. to banish* देशांतून घालविणें, हद्दपार-देशपार करणें.

Depauperate (dē-paw'pėr'āt) [L. *de* & *pauper*, poor.] *v. t.* (*obs.*) *to impoverish* कंगाल करणें.

Depend ( de-pend' ) [ Fr.-L. *de* & *pendere*, to hang.] *v. i. to hang down* लोंबणें, लोंबकाळणें, लटकणें. २ *law. to hang in suspense, to be waiting for settlement* निकालाकरितां खोळंबून राहणें. ३ *to rely for support* अवलंबणें, आश्रय करणें *g. of o, esp.* (कार्यकारणभावानें) अवलंबून असणें. ( followed by *on* or *upon* & formerly by *of* ). ४ *to trust, to rely* विश्वास ठेवून राहणें-असणें, भरंवशावर राहणें (with *on* or *upon*). ५ (*obs.*) *to serve, to attend* चाकर होणें. *g. of o.* (*Shakes.*). Depend'able *a.* विश्वासपात्र, खात्रीलायक, भरंवशालायक. Depend'ence *n.* लोंबणें *n*, अवलंबन *n.* २ *subjection as of an effect to its cause* अवलंबित्व *n*, कार्यकारणभावानें अवलंबन *n.* ३ *mutual connection or support* परस्पर आश्रय *m-* संबंध *m.* ४ *inability to help one's self* स्वावलंबनाभाव *m*, पराधीनता *f.* ५ *reliance* विश्वास *m*, भरंवसा *m.* ६ *that on which one depends* आधार *m*; as, "He was her sole D." Depend'ency *n. territory under dominion* परतंत्र देश *m*, ताब्यांतील देश *m.* २ *a thing hanging down* अवलंबी गोष्ट *f.* ३ *that which is attached to something else as its consequence, subordinate* अवलंबी-सहगामी-आनुषंगिक वस्तु *f.* ४ *subordination* परतंत्रता *f*, पराधीनता *f.* Depen'dent *a.* लोंबणारा. २ दुसऱ्यावर भरंवसा-मदार ठेवून बसणारा, परतंत्र, पराधीन, अनुजीवी. [ DEPENDENT COVENANT OR CONTRACT एखाद्या अटी वर अवलंबून असणारा करार *m.* DEPENDENT VARIABLE *math.* परतंत्र चलपद *n.* Depend'ent *n.* परोपजीवी, नोकर, चाकर. २ अवलंबी, आश्रित. ३ आनुषंगिक गोष्ट *f.* Depend'ently *adv.* Depend'er *n.* Depend'ingly *adv.* विश्वास ठेवून, अवलंबून राहून.

*Note.* The forms Dependance, Dependancy, Dependant are from the French; the forms Dependence etc. are from the Latin. Some authorities give preference to the form Dependant when the word is a noun thus distinguishing it from the adjective, usually written Dependent. Dependence is more used in the abstract, and Dependency in the concrete ( Web. )

Deperdition ( dē'per-dish-un ) [ Cf. Fr. *deperdition.*] *n.* (*archai.*) *loss, destruction* नुकसान *n*, नाश *m.*

Dephlegmate (dē-fleg'-māt) [L. *de*+*phelgma*, a flame, *cf.* Sk. श्लेष्म, mucous matter. ] *v. t.* (*obs.*) *to deprive of super-abundant water by evaporation or distillation* ( आटवून किंवा ऊर्ध्वपातनानें ) अर्क किंवा अम्लें यांतून पाणी काढून टाकणें, विश्लेष्म करणें. Dephlegmā'tion *n.*

Dephlogisticate ( dē'-flō-jis'-ti-kāt ) [L. *de* & Phlogisticate. cf. Fr. *desphlogistiquer.*] *v. t. to deprive of phlogiston or the supposed principle of inflammability* ( एखाद्या पदार्थांतून ) ज्वालाग्राही द्रव्य काढून टाकणें. हें द्रव्य प्राचीन रसायनशास्त्रवेत्त्यांनीं कल्पनेनेंच ठरविलें होतें. De'phlogis'tica'ted air=*oxygen gas* प्राणवायु *m.*

Depict ( de-pikt' ) [ L. *depictus pa. p. of depingere*, to depict. ] *v. t. to form a coloured likeness of, to paint, to portray* रंगीत तसबीर *f-* चित्र *n.* काढणें. २ *to represent in words* शब्दांनीं रंगविणें ( *fig.* ), वर्णन करणें, वर्णणें. ३ Depic'ted *pa. t.* Depic'ting *pr. p.* & *v. n.* Depic'ture *v. t. to make a picture of* (चें) चित्र काढून दाखविणें. २ *to describe in words* वर्णन करणें.

Depilate (dep'-i-lāt) [L. *depilatus, pa. p. of depilare*; *de*, down *pilare*, to pluck away hairs.] *v. t. to strip of hair* (उपटून) केश काढणें, निष्केश करणें. २ सोडणकाथ्या काढून बेणणें. Depilā'tion *n.* केशनिष्कासन *n*, केश उपटून काढणें *n.* Depil'atory *a.* केश काढण्याचा धर्म ज्यांत आहे असा, केशनाशक. D. *n.* केश काढण्याचा लेप *m*, केशनाशक लेप *m.* Dep'ilous *a.* केशहीन, विकेश, निर्लोम.

Deplete (de-plēt') [L. *de* & *plere*, Sk. पृ, to fill.] *v. t. med. to empty, to unload* ( as, the vessels of the human system by blood-letting or by medicine) ( औषधानें किंवा रक्तमोक्षानें शरीरांतील वाहिन्या ) रिकामा-रिक्त करणें. २ *to reduce by destroying or consuming the vital powers of, to exhaust as a country of its strength or resources* ( जीविताचीं साधनें नाहींशीं करून ) हतवीर्य-दुबळा करणें, ( एखाद्या देशांतील संपत्ति धुवून देश) कंगाल करणें, (खजिना) रिकामा करणें. Deple'tion, Deple'tive *n.* रिता करणारा पदार्थ *m*, रक्ताधिक्य कमी करणारें औषध *n.* Deple'tory *a.* रिता करण्यास उपयोगी.

Deplore (de-plōr') [ O. Fr. *deplorer*-L. *deplorare*, to weep. ] *v. t. to feel or express deep and poignant grief for, to mourn, bewail* विलाप करणें, शोक करणें, ( अतिशय दुःखानें ) रडणें, दुःख करणें. २ ( *Shakes.* ) *to complain of* (च्या) संबंधीं कुरकुर करणें. D. *v. i.* शोक करणें. Deplor'able रडूं यायाजोगा, शोचनीय, शोकार्ह, शोकोचित. Deplor'ably *adv.* खेद वाटायाजोग्या रीतीनें. Deplor'ableness *n.* शोचनीय स्थिति *f.* Deplor'abil'ity *n.* शोचनीय अवस्था *f.* Deplor'er *n.* Deplorā'tion *n.* (R.) शोक *m.* Deplor'ingly *adv.*

Deploy ( de-ploi' ) [Fr. *deployer*, O. Fr. *desploier*-L. *dis*, apart & *plicare*, to fold.] *v. t. to spread out a body of troops in such a way that they will display a wider front & less depth* (मागचे शिपाई पुढें आणून) अघाडी वाढविणें-विस्तृत करणें. D. *v. i.* अघाडी विस्तृत होणें. Deploy', Deploy'ment *n.* Deployed' *pa. t.* Deploy'ing *pr. p.* & *v. n.*

Deplume ( de-ploom' ) [ L. *de*, away & *plumare*, to cover with feathers.] *v. t. to deprive of plumage* पिसारा *m-* पिसें उपटणें, बोडकें करणें. Dep'lumā'tion *n.*

पिसारा काढणें *n.* २ *med.* डोळ्याच्या पापण्यांस होणारा रोग *m.* ह्याचे योगानें पापण्यांचे केश झडतात.

Depolarize ( dē-pō'-lar-īz ) [ L. *de* & *polarize*, *cf.* Fr. *depolariser.* ] *v. t.* *to deprive of polarity.* See Polarise.

Depone ( de-pōn' ) [L. *de*, down & *ponere*, to place.] *v. t.* & *v. i.* *to assert under oath, to depose* शपथेवर साक्ष *f.* जबानी *f.* देणें. Depo'nent ( de-pō'-nent ) [ L. *pr. p.* of *deponere.* ] *a. gram.* कर्मणि रूप असून कर्तरी अर्थाचा. D. *n.* शपथेवर जबानी देणारा. [D. VERB कर्मणि रूप असून कर्तरि अर्थ आहे असें क्रियापद *n.* ]

Depopulate ( de-pop'-ū-lāt ) [L. *depopulatus pa. p.* of *depopulare*, to ravage; *de* & *populari*, to populate, from *populus*, people. ] *v. t.* *to. deprive of population* निर्जन करणें, बेचिराख करणें, ओसाड करणें, निर्मनुष्य करणें, वस्ती नाहींशी करणें, उध्वस्त करणें, उजाड करणें. D. *v. i.* निर्जन होणें, ओसाड होणें, &c. Depopu'la'ted *a.* निर्जन केलेला, &c. Depop'ulā'tion *n.* ओसाडपणा *m*, ओसाडी *f*, उजाडी *f*, निर्जन करणें *n.* Depop'ulā'tor *n.* उध्वस्त करणारा.

Deport ( de-pōrt' ) [ M. Fr. *deporter*–L. *de*, away & *portare*, to carry.] *v. t.* *to transport, to banish* हद्दपार करणें, देशांतरास नेणें, काळ्यापाण्यावर पाठविणें. २ *to conduct* ( used reflexively ) वागणें, वर्तणें. D. *n.* वर्तणूक *f*, आचरण *n*, चालचर्या *f.* De'portā'tion *n. law.* देशबहिष्कार *m*, काळेपाणी *n*, काळ्यापाण्याची शिक्षा *f.* Deport'ment *n.* आचरण *n*, वर्तन *n*, चालचर्या *f.*

Depose ( de-pōz' ) [O. Fr. *deposer*, to displace–O.Fr. *de* ( L. *de*), from & Fr. *poser*, to place, of Greek origin. ] *v. t.* *to remove from throne or high position* गादीवरून काढणें, पदच्युत-राज्यभ्रष्ट करणें, स्थानभ्रष्ट करणें, कामावरून काढणें. २ (*law.*) *to testify under oath* प्रतिज्ञेवर-शपथेवर साक्ष *f.* जबानी *f.* देणें. D. *v. i.* *to bear witness* प्रतिज्ञेवर-शपथेवर साक्ष *f.* साक्षी *f.* देणें, जबानी लिहून देणें. Deposed' *a.* गादीवरून काढलेला, राज्यभ्रष्ट, राज्यपदभ्रष्ट, स्थानच्युत, सिंहासनभ्रष्ट, पदच्युत. २ स्थान-पद-अधिकारभ्रष्ट, भ्रष्टाधिकार. Depos'able *a.* पदच्युत-अधिकारभ्रष्ट करायाजोगा. Depos'al *n.* पदच्युति *f.*

Deposit (de-poz'-it) [O. Fr. *depositer*–L. *de* & *ponere*, to put down.] *v. t.* *to lay down* खालीं ठेवणें-टाकणें, घालणें; as, "Crocodile deposits her eggs in the sand." २ *to lay up as store* सांठवून ठेवणें, सांठा करणें, सांठविणें. ३ *to lay up for safe custody* (सुरक्षितपणासाठीं) जिम्मेस-दिमतीस-ताब्यांत ठेवणें-देणें, हवालीं-स्वाधीन करणें. ४ *to pledge* अनामत *f.* हडप *f.* ठेवणें. ५ ठेव *f.* ठेवणें. D. *n.* अनामत *f*, अमानत *f*, निक्षेप *m*, ठेव *f*, ठेवी *f*, ठेवणूक *f.* २ (R.) अनामत ठेवण्याची जागा *f.* ३ गाळ *m.* ४ (R.) पेटी *f.* ५ (*law*) (*a*) *bail money* ( जामिनदाराकरितां मेहेरबानीदाखल राखलेला ) जामीन माल किंवा पैसा *m*, ( जामिनावर सोडलेल्या अपराध्याकरितां ठेवलेला ) अनामत पैसा *m.* (*b*) *earnest money* इसारा *m*, सचकार *m*, बयाणा *m.* [IN OR ON D. अनामत. D. OF MUD ( AS, FROM A RIVER ) गाळ *m*, गाळा *m*, साई *f*, पोयटा *m.* ] Depos'itary–ory *n.* अनामतदार, जिम्मेदार(?), दिम्मतदार(?). २ ठेव ठेवण्याची जागा *f*, ठेवघर *n.* ३ सांठविण्याची जागा *f*, वखार *f*, भांडार *n*, कोठार *n*, संग्रहस्थान *n.* Depos'ited *a.* निक्षिप्त, न्यस्त, ठेवलेला. Depos'itive *a.* Depos'itor *n.* निक्षेपठेव ठेवणारा, निक्षेपक, निक्षेप्ता *m.*

Depostion ( dē'p-ō-zish'-un ) [ O. Fr. *deposition*–L. *depositionem* –L. *depositus pa. p. of deponere*, to lay down. ] *n.* गादीवरून काढणें *n*, पदच्युति *f.* २ स्थानभ्रंश *m*, अधिकारभ्रंश *m.* ३ साक्ष *f*, साक्षी *f*, साक्ष्य *f* (S.), जबानी *f.* ४ ठेव *f.* ५ मळ *m*, गाळ *m.* To take down a deposition जबानी लिहून-उतरून घेणें.

Depot ( de-pō' ) [ Fr. *depot*–O. Fr. *depost*–L. *depositum*, deposit. ] *n.* *a warehouse*, वखार *f*, कोठार *n*, भांडागार *n*, भांडार *n.* २ *mili.* (*a*) *a place where military stores are deposited* लष्करी सामानसुमान ठेवण्याची जागा *f.* वखार *f.* (*b*) *the head-quarters of a regiment* पलटणीचें राहण्याचें मुख्य ठाणें *n.* ठिकाण *n.* (*c*) *a station where recruits are assembled and drilled* लष्करांत नवीन घेतलेल्या लोकांना कवाइत देण्याचें-शिकविण्याचें ठिकाण *n.* (*d*) *a portion of a regiment which remains at home when the rest are on foreign service* (लष्कराचा कांहीं भाग परदेशीं पाठविल्यावर) स्वदेशीं राहिलेलें बाकीचें खडें लष्कर (*c*) *a place of confinement for prisoners of war* लढाईतील कैदी ठेवण्याची जागा *f.* ३ ( U. S. ) *a railway station* रेलवेस्टेशन *n*, आगगाडीचा टप्पा *m.*

Deprave ( de-prāv' ) [ M. E. *depraven*–O. Fr. *depraver*–L. *depravare*, *depravatum*; *de* + *pravus*, crooked, distorted, perverse, wicked. ] *v. t.* ( *obs.* ) *to depreciate* नालस्ती *f.* निंदा *f.* करणें, दूषण *n.* देणें. २ *to vitiate, to corrupt* बिघडविणें, भ्रष्ट करणें, खराब करणें. Depraved' *a.* बिघडलेला, खराब, दुष्ट, पापी, भ्रष्ट, आचारभ्रष्ट, पतित, कुकर्मी, पापिष्ट, अधर्मी, कर्मचांडाळ. Depraved'ly *adv.* Deprav'edness, Deprave'ment *n.* भ्रष्टता *f*, खराबी *f.* Deprav'er *n.* भ्रष्ट करणारा. Depraving'ly *adv.* Deprav'ity *n.* भ्रष्टता *f*, बिघाड *m*, खराबी *f*, दुष्टपणा *m*, दुराचरण *n.*

Deprecate ( dep'-re-kāt ) [L. *deprecatus*–L. *de*, away & *precari*, to pray. ] *v. t.* *to pray against an evil* गाऱ्हाणें गाऊन दाद मागणें, प्रतिकारप्रार्थना *f.* परिहार-प्रार्थना *f.* करणें *g. of o.* २ *to express regret, to disapprove strongly* खेद प्रदर्शित करणें, (बद्दल) अत्यंत नापसंती दर्शविणें. Dep'recable *a.* Deprecā'tion *n.* निवारणार्थ केलेली प्रार्थना *f*, दाद लागण्यासाठीं केलेली विनवणी *f.* अर्ज *m.* ३ नापसंती *f*, खेद *m.* ४ (*obs.*)

शाप *m.* Dep'recatingly *adv.* नापसंतीनें, &c. Dep'reca'tive, Dep'reca'tory *a.* अनिष्टनिवारक. २ नापसंतीदर्शक. Dep'reca'tor *n.* नापसंती दर्शविणारा, &c.

Depreciate (de-prē'-shi-āt) [L. *de*, down & *pretium*, price.] *v. t. to lessen in price* किंमत *f*- मोल *n*-दर *m*-भाव *m.* उतरवणें-कमी करणें. *g. of o.* २ *fig.* हलका करणें, हलकेपणा आणणें, उणेपणा-अप्रतिष्ठा करणें. D. *v. i. to fall in value, to become less worth* किंमत-दर-भाव उतरणें-कमी होणें, एखाद्याची किंमत कमी होणें *fig.* Dep'recia'ted *a.* किंमत-भाव उतरलेला, दर कमी केलेला; as, D. rupee किंमत उतरलेला-कमकुवत रुपया *m.* २ हलका पाडलेला-केलेला. Depreciā'tion *n.* किंमत उतरणें *n*, भाव कमी होणें *n.* २ नाण्याची किंमत कमी होणें *n.* ३ अप्रतिष्ठा *f.* Dep'recia'tive, Depre'cia'tory *a.* किंमत-प्रतिष्ठा कमी करणारा. Dep'recia'tor *n.* किंमत कमी करणारा.

Depredate (dep'-re-dāt) [L. *de* & *prædare*, to plunder.] *v. t. to subject to plunder, to lay waste, to prey upon* लुटविणें, ओस पाडणें, उध्वस्त करणें, धाड घालणें. D. *v. i. to take plunder, to commit waste* लुटणें, नासाडी करणें. Depredā'tion *n.* लुटणें *n*, लुट *f*, नाश *m*, खराबी *f*, नासधूस *f*; as, "The sea often makes D. on the land." Dep'reda'tor *n. one who plunders a robber* नाश करणारा *m*, लुटारू *m*, पेंढारी *m*, चोर *m.* Dep'reda'tory *a.* लुटीचा, लुटणारा.

Deprehend (dep're-hend') [L. *de* & *prehendere*, to take.] *v. t. to take by surprise, (to seize as a person while committing an unlawful act)* अचानक पकडणें, मुद्देमालासकट धरणें. २ *to detect, to discover, to find out* शोधून काढणें, पत्ता-तपास-तलास लावणें, धरणें or पकडणें (गुन्हा or गुन्हेगार).

Depress (de-pres') [O. Fr. *depresser*–L. *de*, down & *premere* (*pressus*), to press.] *v. t.* दाबणें, दडपणें. २ *to bring down or to humble* नमविणें, गर्व खंडणें, नक्षा *m.* उतरणें. ३ *to sadden, to deject* खिन्न-उदास-उदासी-विषण्ण करणें, उत्साहभंग करणें, हर्षभंग-मनोभंग करणें. ४ *to lessen the activity of* (व्यापार इ०) मंद करणें, मंदी आणणें, तेजी कमी करणें. ५ *to cheapen, to lessen in price* (ची) किंमत कमी करणें, स्वस्त करणें. ६ *math. to reduce an equation to a lower degree (of a line)* समीकरणाचा घात कमी करणें. Depress'ant *n.* तरतरी कमी करणारें *n*, बलघ्न *n.* Depressed' *a.* खिन्न, उदासीन, म्लान. २ *bot.* ऱ्हस्वविस्तृत, जमीनीस लागलेला, अवनत. Depres'sing *a.* खिन्न-विषण्ण करणारा-होणारा. Depress'ingly *adv.* Depres'sion *n. the act of depressing* दाबणें *n*, दडपणें *n.* २ *the state of being depressed* अवनमन *n*, पतन *n*, पात *m*, नमणें *n.* ३ *a hollow, cavity* खळगा *m*, खांच *f*, खळगी *f.* ४ *humiliation* नरम पडणें *n*, गर्व उतरणें *n.* ५ *dejection, despondence* विषाद *m*, उदासीनता *f*, उदासपणा *m*, औदासिन्य *n*, उत्साहभंग *m*, म्लानता *f.* ६ *dullness* (of trade, &c.) मंदी *f*, मंद करणें *n.* ७ (*med.*) दबलेली स्थिति *f*, निम्नता *f.* ८ (*surg.*) डोळ्यांतील मोतिबिंदू दाबून काढण्याची क्रिया *f.* ९ (*astron.*) क्षितिजाखालीं राहिलेल्या खस्थ पदार्थाचा उन्नतांश *m.* [D. OF THE POLE ध्रुवापासून विषुववृत्ताकडे जात असतां क्षितिजाकडे ध्रुव खालीं जात आहे असें दिसणें.] Depress'ive *a.* दबविणारा, अवनामक, उदासीनता आणणारा, नमविणारा, नम्र. Depres'sor *n.* खालीं दाबणारा *m*, जुलमी *m.* ३ *med.* खालीं ओढणारा, अवनामक स्नायु *m.*

Deprive (de-prīv') [O. Fr. L. L. *depriver*, *deprivare*, *deprivatum*, to divest of office; L. *de*+*privare*, to bereave, to deprive of.] *v. t.* (*obs.*) *to take away, to destroy* नेणें, काढून नेणें, अंत-नाश करणें. २ *to dispossess* हिरावून-काढून घेणें, बुचाडणें, नागवणें. ३ *to divest of office* (*eccl.*) धर्माधिकाऱ्याचा अधिकार काढून घेणें, अधिकारहीन-रहित करणें. Dep'rivā'tion *n.* काढून टाकणें *n*, नागवणें *n*, नागवणूक *f*, नागवण *f.* २ नाश *m*, तोटा *m*, नुकसान *n.* ३ हानि *f.* ४ पुरोहिताची वृत्ति काढून घेणें *n.* ५ प्रतिष्ठा-मान हिरावून घेणें *n.* [D. A BENEFICIO वेतनहरण *n.* D. AB OFFICIO अधिकारहरण *n.*] Dep-riv'ative *a.* Deprived' *a.* नागवलेला, नष्ट (in comp., as, नष्टबुद्धि, नष्टधैर्य.) [D. OF WEALTH गतद्रव्य. D. OF AUTHORITY अधिकारभ्रष्ट, पदभ्रष्ट.] Deprive'ment *n.* (R.) नागवणूक *f.* २ नुकसान *n.* ३ पदभ्रष्टता *f.*

Depth (depth) [See Deep.] *n.* खोली *f*, खोल जागा *f.* [D. UP TO THE BREAST छातीभर *f*, छाती ठाव *m.* D. UP TO THE WAIST कमरठाव *m*, कमरभर. D. ABOVE THE NECK बुडत ठाव *m*, गळांभर.] २ *profoundness, intensity, abundance* संपूर्णता *f*, गहनता *f*, गांभीर्य *n*, दार्ढ्य *n*, घनता *f*, सांद्रता *f*, आधिक्य *n*, वैपुल्य *n*, विपुलता *f.* ३ *lowness* गंभीरता *f*; as, D. of sound. ४ मध्यभाग *m*, मध्य *m*, also expressed by भर, ऐन; as, IN D. OF WINTER भर-ऐन हिंवाळ्यांत. ५ *logic.* मिश्रकल्पनेची व्याप्ति *f.* ६ समुद्र *m.* [D. OF FOCUS नाभीची खोली *f.* D. OF IMPRESSION संस्काराचें घनत्व *n*, -उठाव *m.* D. OF SOUND नीच स्वर *m*, स्वरगांभीर्य *n.* D. OF CUT जखमेची खोली *f.*] Depth'en *v. t.* (*obs.*) खोल करणें. Depth'less *a.* उथळ. २ अगाध, असाप. Out of one's depth पाण्यांत जेथें एखाद्यास मुळींच तळ लागत नाहीं किंवा जेथें एखाद्याचा मुळीं बचाव होत नाहीं अशी (जागा), मनाच्या मगदूरीच्या बाहेरचा-पलीकडचा.

Depulse (de-pul's) [L. *depulsus.*] *v. t.* (*obs.*) *to drive away* हाकून देणें. Depul'sion *n.* हाकलून देणें *n.* (R.)

Depurate (dep'-ū-rāt) [L. *de* & *purare*, to purify.] *v. t. to free from impurities, to purify* स्वच्छ करणें, साफ करणें, स्वच्छ-निर्मळ-शुद्ध-मळरहित करणें. D. *a. cleansed* साफ, स्वच्छ, निर्मळ. Dep'urā'tion *n.* शुद्धिकरण *n*, शोधन *n*, (जखम) धुण्याची क्रिया *f.* Depur-a'tor *n.* शुद्धि करणारा (पदार्थ-द्रव्य *n.*) Depurā'tory *a.* (रक्त) शुद्धि करणारा, स्वच्छ करणारा.

**Depute** ( de-pūt' ) [ Fr. *deputer*–L. *deputare*, to esteem, to consider–L. *de* & *putare*, to prune, to clean, to set in order.] *v. t. to appoint or send as a substitute, to delegate* नेमून-नियुक्त करून-वकील करून-अखत्यारी देऊन पाठविणें, वारचा-वांटचा पाठविणें, (आपल्या तर्फे) बदली कार्यकारी-प्रतिनिधि नेमणें. २ (R.) *to appoint, to choose* नेमणें, (ची) नेमणूक करणें, निवडणें. D. *a.* (*Scot.*) प्रेषित, प्रतिनिधि. Deputā'tion *n. the act of deputing* नियुक्तप्रेषण *n*, प्रतिनिधिप्रेषण *n*, नेमून पाठविणें *n.* २ *the person deputed* प्रतिनिधि *m*, नियुक्त-प्रेषित मनुष्य *m*, मुखत्यार *m*, वकील *m.* ३ *delegation* प्रतिनिधिपणा *m*, मुखत्यारी. *f.* Dep'utise *v. t. to appoint as deputy* वकील-प्रतिनिधि नेमणें. D. *v. i. to act as a deputy* प्रतिनिधि-वकिलाप्रमाणें वागणेंचें-काम करणें. Dep'uty *n.* वकील *m*, प्रतिनिधि *m*, मुनीम *m*, मुतालीक *m*, दुय्यम *m.* २ कारभारी *m.* Dep'utyship *n.* वकिली *f*, वकिलायत *f*, मुनिमी *f*, प्रतिनिधित्व *n.* Chamber of deputies फ्रान्सांतील कायदे कौन्सिलाच्या दोन शाखांपैकीं एक. हींतील सभासद लोकनियुक्त असतात.

Deputy is used in combination with various executive officers to denote an assistant empowered to act in their name; as, D. collector, D. marshal, D. sheriff. ( Web. )

**Derail** ( de-rāl' ) *v. t.* (आगगाडी) रुळांवरून घसरविणें. खालीं आणणें. Derail'ment *n.*

**Derange** (de-rānj') [L. *dis*, asunder & O. Fr. *rangier*, to rank.] *v. t. to disturb the proper arrangement of, to disorder* अ-गैर-व्यवस्था करणें, गोंधळणें, गफलतणें, धांदल *f.* घालमेल *f.* गोंधळ *m.* करणें, क्रमभंग *m.* करणें. २ *to disturb in the normal action of the intellect, to render insane* बुद्धिभ्रंश-बुद्धिविक्षेप-चित्तविक्षेप-चित्तविभ्रंश-चित्तभ्रम करणें, भ्रमिष्ट करणें. ३ *to disturb in the action or function of a machine or organism* बिघडविणें, नादुरुस्त करणें. Deranged' *a.* गोंधळलेला, अव्यवस्थित. २ भ्रमिष्ट, विक्षिप्तबुद्धि, पिसा, वेडा. Derange'ment *n.* गोंधळणें *n*, घालमेल *f*, अव्यवस्था *f*, गोंधळ *m*, घोंटाळा *m*, गफलत *f*, भानगड *f*, गडबड *f*, उलटापालट *f.* २ बुद्धिभ्रंश *m*, चित्तभ्रम *m*, चित्तविभ्रंश *m*, चित्तविक्षेप *m.*

**Derby** (där'-bi) *n.* लंडनाजवळील एप्सम मैदानावर तीन वर्षांच्या उमरीच्या घोड्यांची प्रतिवर्षीं होणारी शर्यत *f.* ही शर्यत १२ वा अर्ल ऑफ् डार्बी यानें इ. सन १७८० त सुरू केली म्हणून तिला डार्बी किंवा डर्बी असें म्हणतात. ही दरसाल व्हिटसन टाईडच्या आदल्या आठवड्यांतील बुधवारीं होते. २ डार्बी नांवाची घुमटाकार टोपी *f.* [ DERBY DAY डर्बी येथील वार्षिक शर्यतीचा दिवस *m.* ] Derbyshire-neck *n. goitre or bronchocele* गळ्याचे मधोमध एक गांठ सुजून ती मोठी होणें *n.*

**Derelict** ( der'-e-likt ) [ L. *derelictus*, pa. p. of *derelinquere*, to forsake–L. *de* & *linquere*, to leave. ] *a. left, abandoned, given up adrift* सोडून दिलेला, त्याग केलेला. २ त्यक्त, समुद्रांत सोडून दिलेला, वाऱ्यावर सोडलेला. २ *careless, neglectful* निष्काळजी, (कर्तव्य) पराङ्मुख. ३ *unfaithful* निमकहराम. D. *n.* (*law.*) मालकानें टाकलेली वस्तु *f.* २ समुद्रांतून निघालेली जमीन *f.* Der'elic'tion *n. complete abandonment* त्याग *m*, परित्याग *m*, त्यागकर्म *n.* २ (*law*) *a neglect or omission as if by voluntary abandonment* कर्तव्यपराङ्मुखता *f*, कर्तव्याची हयगय *f.* ४ समुद्र मागें सरल्याकारणानें मिळालेली जमीन *f.*

**Deride** ( de-rīd' ) [L. *de* & *ridere*, to laugh.] *v. t. to laugh at with contempt, to mock, to scoff at* उपहास *m.* थट्टा *f.* मस्करी *f*, करणें, टर-टेर *f.* उडविणें, विटंबना *f.* करणें. Deri'der *n.* उपहास करणारा. Deri'dingly *adv.*

**Derision** ( de-rizh'-un ) *n. the act of deriding* उपहास &c. करणें. २ *the state of being derided* उपहास *m*, विटंबना *f*, टर *f*, टेर *f*, थट्टा *f*, मस्करी *f*, तिरस्कार *m*, धिक्कार *m.* ३ *an object of scorn, a laughing-stock* उपहासाविषय *m*, उपहासास्पद ( वस्तु *f.* ), विनोदास्पद ( वस्तु *f.* ), खेळवणा *m.* खेळणें *n.* ( *used in contempt* ) Deri'sive, Deri'sory *a.* विटंबनेचा, उपहासाचा, उपहाससूचक, उपहासात्मक. Deri'sively *adv.* Deri'siveness *n.* उपहासास्पदता *f.*

**Derive** ( de-rīv' ) [ O. Fr. *deriver*, to derive, also to drain—L. *derivare*, to drain of water—L. *de*, from and *rivus*, a river. ] *v. t.* (*obs.*) (*a*) *to turn the course of* ( as water ) ओघ वळविणें ( followed by *to*, *into*, *on*, or *upon.* ) (*b*) *to divert & distribute* विभागून देणें, सर्वांस देणें-कळविणें. (*c*) *to transmit* ( एकापासून ) दुसऱ्यास-दुसऱ्या पिढीस देणें. (*d*) *to communicate* कळविणें, सांगणें. २ *to obtain by descent or transmission* ( followed by *from* ) कुलपरंपरेनें मिळविणें, आनुवंशिक रीतीनें संपादणें, मूलतः प्राप्त करून घेणें. ३ *to draw, to deduce* (पासून) काढणें, तर्क *m.* अनुमान *n.* काढणें, तर्कणें. ४ *to trace the origin, descent, or derivation of* (चें) मूळ-व्युत्पत्ति शोधून काढणें. ५ (*chem.*) *to obtain one substance from another by actual or theoretical substitution* (पासून) काढणें-पैदा करणें. D. *v. i.* (*Shakes.*) *to flow, to have origin, to be deduced, to descend, to proceed* (च्या पासून) निघणें, उत्पन्न होणें, &c. Deri'vable *a.* ( पासून ) काढतां येण्याजोगा, (पासून) मिळवितां येण्याजोगा, कुलपरंपरेनें येण्याजोगा. २ तर्कानें-अनुमानानें काढतां येण्याजोगा, तर्कज्ञेय, तर्क्य. Deri'vably *adv.* Deri'vate *v. t.* ( *obs.*) See Derive. D. *a.* [ R. ] Derivā'tion *n.* (*obs.*) ओघाचें वळण *n.* २ कुलपरंपरेनें प्राप्ति *f*, कारणापासून कार्याची प्राप्ति *f.* ३ (*gram.*) व्युत्पत्तिशोधन *n*, व्युत्पत्तिनिर्णय *m.* ४ *the state or method of being derived; the relation of origin when established* उत्पत्ति *n*, मूळ *n.* ५ तर्क *m*, अनुमान *n*, व्युत्पत्ति *f*, उपसिद्धांत *m.* ६

(*math.*) उत्पत्ति *f.* एका फलापासून दुसऱ्या फलाचा तर्क करण्याची कृति *f.* ७ (*med.*) अभ्यावाहन *n*, एकीकडून दुसरीकडे वाहणें *n*, क्षुब्ध झालेल्या भागांतून रोगजनक-पू-रक्त-लस-वगैरे पदार्थ बाहेर काढण्याची क्रिया. *f.* उ. पलिस्तर, डाग, इ. Deriv'ational *a.* Deriv'ationist *n.* शब्दांची व्युत्पत्ति ठरविण्यांत गुंतलेला मनुष्य *m.* २ *biol.* सर्व प्राण्यांचे मूळ आकार किंवा रूपें ही उत्क्रांतीनें उत्पन्न झालीं आहेत असें प्रतिपादन करणारा. Deriv'ative *a.* व्युत्पन्न, अमुकेक मुळापासून उत्पन्न झालेला. D. *n.* दुसऱ्यापासून निघालेला-मिळालेला, उत्पन्न झालेला, अन्यप्रास, अन्यलब्ध, व्युत्पन्न (शब्द) *m.* २ (*gram.*) व्युत्पन्नशब्द *m.* ३ *med.* क्षुब्ध झालेल्या भागांतून रोगजनक पदार्थ काढणारें औषध किंवा साधन *n.* Deriv'atively *adv.* Deriv'ativeness *n.* Derived' *a.* व्युत्पन्न. [To BE D. निघणें *f.* (ची) व्युत्पत्ति असणें. ] Deriv'er *n.*

Derm, Derma (derm, der'ma), Dermis (der-mis) [Gr. *derma*, skin.] *n.* त्वचा *f.* कातडी *f.* चामडी *f.* Dermal, Der'mic, Der'matic *a.* त्वक्संबंधी, त्वचामय. Der'matography, Der'mography *n.* (शारिरिकशास्त्रांतील) त्वचाप्रकरण *n.* Der'matoin *a.* त्वचेसारखी. Der'matol'ogical *a.* Der'matol'ogist *n.* त्वक्संबंधीं माहिती असलेला मनुष्य *m.* Der'matol'ogy *n.* त्वक्शास्त्र *n*, ह्या शास्त्रांत त्वचेच्या रोगांचा व रचनेचा विचार केलेला असतो. Der'matophyte *n.* शरिरांवर बांडगुळासारखें वाढलेलें मांस *n.* Der'mato-skeleton, Der'mo-skeleton *n.* *anat.* बाहेरची कठीण त्वचा *f.* (e. g. केश, नखें, शिंग, &c. )

Derogate ( der'-ō-gāt ) [ L. *derogatus pa. p.* of *derogare*, to derogate—L. *de*, down, from & *rogare*, to propose a law. ] *v. t.* *to repeal partly* ( said of law ) कायद्याचा कांहीं भाग रद्द करणें. २ (R.) *to depreciate, to disparage* हलकेपणा आणणें, ( ची ) मानहानि करणें. D. *v. i.* *to detract, to withdraw* ( usually with *from* ) कमी होणें. २ (R.) *to act beneath one's rank, place, birth or character* (आपल्या दर्जाला ) न शोभेल असें वागणें. D. *a.* कमी किंमतीचें, अपमानित, दर्जाला उतरलेला. Der'ogately *adv.* Derogā'tion *n.* (followed by *of*, *from*, or *to*) कायद्याचा कांहीं भाग रद्द करणें *n.* २ (*stockexchange*) करारांत कमी करणें *n*, फेरफार करणें *n.* ३ अपकर्ष *m*, अपमान *m*, अप्रतिष्ठा *f*, कमीपणा *m*, हलकेपणा *m.* Derog'ator'ily *adv.* Derog'ator'iness *n.* Derog'atory, Derog'ative *a.* अब्रू घेण्यासारखा, इज्जतखाऊ, मानहारक, महत्वहारक, तेजोहारक, लघुत्वजनक, कमीपणा आणणारा. [DEROGATORY CLAUSE IN A TESTAMENT मृत्युपत्रांतील गुप्तवाक्य *n.* हें फक्त मृत्युपत्र करणारालाच माहित असतें. व तें ज्यांत नसेल तें मृत्युपत्र खोटें ठरतें. कोणी जबरदस्तीनें मृत्युपत्र लिहून घेईल तर तें चालूं नये ह्मणून ही तजवीज केलेली असते.] [दरवेशी *m.*

Dervise Dervis, Dervish (der'-vis) *n.* इराणी फकीर *m*,

Descant ( des'-kant ) [O. North Fr. *descant* ( O. Fr. *deschant* ), a kind of song—Late L. *descantus*—L. *dis*, apart & *cantus*, a song; *cantare*, to sing.] *n.* *a double song, melody or counterpoint sung above the plain song of the tenor, a variation of an air, a variation by ornament of the main subject or plain song* जोडगीत *n*, तारस्थानांतील-विदारी, रूपककरण; भिन्नमूर्छना *f*, अंतरा *m*, तोडा *m*, अलंकारयुक्त आभोग *m.* (*b*) *the upper voice in part music* अंतऱ्यांतील तारस्वर *m*, तारस्वरांची तान *f.* ( *c* ) *the canto, cantus, or soprano voice, the treble* तारस्वर *m*, उच्चस्वर *m*, टीपेचा स्वर *m*, तृतीयस्थानांतील स्वर *m*-श्रुति *f.* २ *a comment* टीका *f*, भाष्य *n*, आदर्श *m*, विवेचन *n.* D. *v. i.* जोडगीत *n.* गाणें, तारसुराची तान *f.* मारणें, तारस्वरांत गाणें, सुर-रागतान मारून गाणें, खांचखोंचीनें गाणें. २ *to discourse at large* वाक्पांडित्य करणें, टीका करणें, भाष्य-विवरण करणें. Descan'ter *n.* जोडगीत गाणारा, तारसुराची तान मारणारा, तारस्वरांत गाणारा. २ वाक्पांडित्य दाखविणारा.

Descend ( de-send' ) [M. Fr. *descendre*—L. *descendere*—L. *de*, down & *scandere*, to climb *cf.* स्कंद्, to climb. ] ( opp. of Ascend. ) *v. i.* *to move downwards, to come or go down* (कडे) खालीं वळणें-पडणें-उतरणें, खालीं जाणें-येणें, अवतरणें, अवरोहण *n*- अधोगमन *n*- अवतरण *n.* करणें. २ ( *poetic* ) *to enter mentally, to retire* (अंतरात्म्यांत) लीन-मग्न-होणें. ३ ( with *on* or *upon*) *to make an attack, to come upon suddenly, and with violence* हल्ला करणें, चालून येणें, स्वारी करणें. ४ *to come down to a lower, less fortunate, humbler, less virtuous state, to lower or abase one's self* हलक्या-नीच स्थितींत येणें, अवनति करून घेणें, खालावणें. ५ *to pass from the more general or important to the particular or less important matter* सामान्य किंवा महत्वाच्या गोष्टीवरून विशेष किंवा बिनमहत्वाच्या गोष्टीवर येणें, सूक्ष्म-बारीक भेदांत शिरणें, ( प्रधान विषयापासून ) गौण विषयाकडे वळणें. ६ (*a*) *to come down as from a source, to be derived, to proceed by generation* (पासून) निघणें-उत्पन्न-पैदा होणें, वंशांत-कुलांत उत्पन्न होणें, (चा) वंशज होणें. (*b*) *to proceed by transmission* हातांत जाणें-येणें-पावणें, मिळणें. ( *c* ) *to fall or pass by inheritance* वारसा-हक्कानें जाणें. ७ *astron.* दक्षिण दिशेकडे वळणें-सरणें. ८ *mus.* उंच स्वरावरून नीच स्वरांत येणें. D. *v. t.* उतरणें, उगमाकडून मुखाकडे जाणें; as, "They descended the river in boats." (*b*)(च्या) माथ्याकडून पायथ्याकडे येणें. Descen'dable *a.* Descen'dant *n.* वंशज *m*, वंशी *m*, वंश *m*, अपत्य *n*, संतति *f*, संतान *n.* Descen'ded *a.* उतरलेला, अवतीर्ण, अवरूढ. Descen'dent *a.* पडता, उतरता. २ वंशज. Descen'der *n.* खालीं उतरणारा. Descen'dible *a. admitting descent* उतरण्याजोगा. २ *that may descend from an ancestor to an heir* पूर्वजापासून वंश-

जांनां मिळण्याजोगा; as, "A D. estate." Descen'dibil'ity *n.* वंशजांनां मिळण्याची शक्यता. *f.* Descen'ding *a.* उतरता, उतरवट. [D. CONSTELLATIONS OR SIGNS (*astron.*) ज्यांतून ग्रह दक्षिणेकडे सरतात-जातात ते तारकापुंज. D. NODE (*astron.*) दक्षिणेकडे जातांना ग्रहाची कक्षा ज्या ठिकाणीं क्रांतिवृत्तास छेदिते तो बिंदु *m.* D. REDUCTION उतरती मांजणी *f.* D. SERIES *math.* उतरती संख्या, श्रेढी, &c.] Descen'sion *n.* उतरणें *n.* *descent* उतार *m.* ३ *degradation* नम्रता *f,* हीनावस्था *f.* Descen'sional *a.* Descen'sive *a.* खालीं पडणारा. Descent' *n.* *the act of descending* उतरणें *n,* उतार *m,* अवरोह *m,* अवरोहण *n,* अधोगति *f,* अवतरण *n,* अवतार *m,* अवपतन *n,* अवपात *m,* अधःपात *m.* [D. FROM TIME IMMEMORIAL अनादिपरंपरा.] २ *incursion, sudden attack* हल्ला *m,* चढ *f.* ३ *progress downward* उतरती कळा *f,* निकृष्ट आचरण *n,* अधोगति *f,* पतन *n,* नीचता *f,* आचारच्युति *f.* ४ *lineage, birth, extraction* वंश *m,* कुळी *f,* गोत्रोत्पत्ति *f,* उत्पत्ति *f,* वंशपरंपरा *f.* ५ (*a*) *transmission of an estate by inheritance* वारसहक्कानें जिंदगी मिळणें. (*b*) *title to inherit an estate by reason of consanguinity* सगोत्रतेनें येणारा वारसहक्क *m.* ६ *declivity, slope* उतरण *f,* उतरड *f,* उतरडी *f,* उतार *m,* वरंगळ *f,* घसरण *f.* ७ *descendants, issue* वंशज *m,* वंश *m,* संतति *f,* संतान *n.* ८ (R.) *the lowest place, the bottom* सर्वांच्या खालची जागा *f,* तळ *m.* ९ *a generation* पुढची पिढी *f.* १० *mus.* उंचस्वरापासून नीच स्वरांत जाणें *n.*

Describe (de-skrīb') [L. *de,* down & *scribere, scriptum,* to write.] *v. t. to represent by drawing, to trace or mark out* काढणें, रेखाटणें, नकाशा *m.* काढणें; as, "So D. a circle." २ *to represent by word* (written or spoken), *to give an account of* (लेखांनीं किंवा भाषणांनीं) वर्णन करणें, निरूपिणें, निर्वचणें, वर्णन *n.* निरूपण *n.* करणें *g. of o.* ३ *to make known to others by words or signs* खुणेनें दर्शविणें, लिहून-तोंडीं दर्शविणें, शब्दांनीं कळविणें. ४ (*obs.*) *to distribute into parts, to class* वर्गीकरण करणें. D. *v. i. to use the faculty of describing, to give a description of* वर्णनशक्तीचा उपयोग करणें, (चें) वर्णन करणें. Descri'bable *a.* अंकाया जोगा (R.), रेखाटायाजोगा. २ वर्णन करायाजोगता-सारखा, निरूपणीय, निरूप्य, निर्वचनीय, निरूपणयोग्य, निरूपणशक्य. Described' *a.* काढलेला, रेखटलेला. २ वर्णन केलेला-झालेला, वर्णित, जातवर्णन. Descri'ber *n.* वर्णन करणारा. Descrip'tion (de-skrip'-shun) *n. the act of describing* वर्णन करणें *n,* रेखाटणें *n,* वर्णणें *n,* निरूपणें *n.* २ *an account* वर्णन *n,* निरूपण *n,* निर्देश *m,* निर्वचन *n,* लक्षण *n,* व्याख्या *f.* ३ *a delineation by marks* नकाशा *m.* ४ *kind, sort* जाति *f,* जात *f,* प्रकार *m,* तऱ्हा *f;* as, "A person of this D." [*Of what D.* कसा.] Descrip'tive *a.* वर्णनात्मक, वर्णनरूप, वर्णनाचा, वर्णनकारक, वर्णनपर. [DESCRIPTIVE ANATOMY वर्णनात्मक शारीरशास्त्र *n.*] Descrip'tively *adv.* Descrip'tiveness *n.* वर्णनपरता *f,* वर्णनात्मकता *f.*

Descry (de-skrī') [O. Fr. *descrier* now *decrier,* to cry down.] *v. t. to spy out, to espy, to discern* टेहेळणें, हेरणें, निरीक्षण करणें, दूर-लांबवर पाहणें, ओळखणें. २ (R.) *to discover, to disclose, to reveal* थांग-पत्ता-सुगावा लावणें, उघडकीस आणणें. D. *n.* *discovery, view* दिसत असलेली वस्तू *f.* (सैन्य वगैरे). Descri'er *n.*

Desecrate (des'-e-krāt) [*Desecratus pa. p.* of *desecrare*—L. *de,* fully & *sacrare,* to account as sacred. Change of sense due to O. Fr. *dessarrer,* from L. *dis.*] *v. t.* (opp. to Consecrate) *to divest of a sacred character or office, to violate the sanctity of, to profane* विटाळवणें, बाटवणें, भ्रष्ट करणें, अपवित्र करणें. Des'ecra'ter-or *n.* Des'ecrā'tion *n.* विटाळणें *n,* अपवित्रीकरण *n.*

Desert (de-zert') [O. Fr. *desert, a thing deserved, pa. p.* of *deservir,* to deserve.] *n. that which is deserved, the reward or punishment justly due* योग्य फळ *n,* योग्य शासन *n,* योग्य बक्षीस *n.* २ *claim to recompense* (in a good sense), *claim to reward, merit or worth due* बदल्याचा-बक्षिसाचा हक्क *m,* लायकी *f,* योग्यता *f,* पात्रता *f.* Desert'less *a.* पात्रताहीन, अपात्र.

Desert (dez'-ert) [O. Fr. *desert,* a wilderness—L. *desertum,* waste, *pa. p.* of *deserere,* to desert—L. *de,* away & *serere,* to join.] *n. a deserted or forsaken region* निर्जन-विजन-ओसाड प्रदेश *m.* २ *a barren tract incapable of supporting population* रुक्षप्रदेश *m,* मरुस्थल *n,* ओसाड मैदान *n.* ३ सुपीक परंतु ज्यांत वसाहत झाली नाहीं असा प्रदेश *m,* ओसाड प्रदेश *m,* पडीत जमीन *f.*

Desert (dez'-ert) *a. forsaken* निर्जन, शून्य, उजाड, ओस. २ *unproductive, waste, barren* रखरखीत, रुखा, रुक्ष. ३ *solitary* सुना, सुनका, शून्याकार. ४ *pertaining to a desert* जंगली, जंगलाचा, अरण्याचा, वन्य.

Desert (de-zert') [See Desert = barren land.] *v. t. to forsake, to abandon* सोडणें, त्यागणें, टाकणें, टाकून जाणें, अव्हेर करणें, अंतर देणें, ताटी कापणें, (आयत्या वेळीं-ऐन संकटाचे वेळीं) निसरणें-पसार होणें. २ *mili. to abscond from, to abandon (service) without leave* रजेशिवाय नोकरी सोडणें, फरारी होणें. D. *v. i.* रजेशिवाय (चाकरी) सोडून जाणें, फरारी होणें. Desert'er *n.* दुसऱ्यासंबंधीं आपलें कर्तव्य करावयाचें चुकविणारा-टाळणारा-परवानगीशिवाय चाकरी सोडणारा, पळून जाणारा, फरारी. २ फरारी होणारा अपराधी, गुन्हेगार. २ Deser'tion *n.* सोडणें *n,* टाकणें *n,* त्याग *m,* परित्याग

*m*, अंतर *n*, अव्हेर *m*, फरारीपणा *m*. २ *theol.* (*obs.*) ईश्वराची अवकृपा *f.* [ SPIRITUAL D. भगवत्कृपेची निराशा *f.* ]

Deserve ( de-zėrv' ) [ O. Fr. *deservir*–L. *deservere*, to serve fully—L. *de*, fully & *servere*, to serve.] *v. t. to be worthy of, to merit, to be entitled to* योग्य-लायक असणें-होणें. २ ( *obs.* ) *to serve, to treat, to benefit* चाकरी करणें, बरदास्त ठेवणें, (चा) फायदा करणें. D. *v. i. to be worthy of recompense* ( usually with *ill* or with *well* ) योग्य होणें, लायक असणें; as, "To D. well of a person." Deserv'ing *a. meritorious, worthy* लायक, योग्य, क्षम, पात्र, उचित. D. *n. merit, desert* योग्यता *f*, गुण *m*. Deserv'ingly *adv.* Deserved'ly *adv.*

Deshabille ( desh'-a-bīl ) [ Fr. *deshabille*, undress–Fr. *deshabiller*, to undress. ] *n. a careless toilet, an undress* हीन वेष *m*, कसे बसे कपडे घातलेली स्थिति, अर्धवस्त्रपरिधानस्थिति *f.*

Desiccate (des'-i-kāt) [ L. *desiccatus pa. p.* of *desiccare*, to drain dry–L. *de*, away & *siccare*, to dry.] *v. t. to dry up* सुकविणें, ओलसरपणा नाहींसा करणें. २ *to preserve by drying* सुकवून सांठविणें-टिकविणें; as, "To D. fish or fruit." D. *v. i. to become dry* सुकणें. Des'iccant, Desic'cative *a.* व्रणशोषक, सुकविण्याची शक्ति असणारा. D. *n.* जखमेचें वाहणें बंद करण्याचें औषध *n*, वाळवणारें औषध *n*, कोरडें करणारें औषध *n*, व्रणशोषक. Desicca'ted *a.* वाळविलेला, सुकविलेला. Des'iccā'tion *n.* व्रणशोषण *n*, वाळविण्याची क्रिया *f.* Desicca'tor *n. chem.* द्रवता-ओलावा शोषून घेण्याकरितां तेजावाचा अर्क किंवा ( calcium chloride ) ज्यांत ठेवतात असें एक घट्ट ( air-tight ) तोंडाचें कांचेचें भांडें *n*. या भांड्यावर, ओलावा काढण्याकरितां किंवा जाऊं न देण्याकरितां, पदार्थ लटकावून ठेवतात, शोषणपात्र *n*.

Desiderate ( de-sid'ėr-āt ) [ L. *desideratus pa. p.* of *desiderare.* ] *v. t. to desire, to feel the want of, to lack, to miss, to want* (ची) गरज *f*- उणीव *f.* भासणें, इच्छिणें, उणें असणें, चुकणें. Desiderā'tion *n.* (R.) इच्छित वस्तु *f.* Desid'era'tive *a.* इच्छादर्शक. D. *n.* इष्ट-पदार्थ *m*. २ *gram.* मूळधातूला निराळा प्रत्यय जोडून बनविलेलें इच्छादर्शक क्रियापद *n*; as, गम्-गच्छति=तो जातो, जिगम्-जिगमिषति=तो जाण्याची इच्छा करितो.

Design (de-zīn') [O. Fr. *designer*, to design–L. *designare*, to denote–L. *de*, down & *signare*, to mark, from *signum*, a sign. cf. Pr. *designar*, *desegnar*, Ital. *disegnare* which means, to design, contrive plot, purpose, intend, and also draw, paint, portray.] *v. t. to draw the main features or outline of, to delineate* (नमुन्याकरितां) नकाशा काढणें, कल्पनाचित्र काढणें, काल्पनिक नकाशा काढणें. २ *to designate, to show, to appoint* अंगुलिनिर्देश करणें, ( निर्देश करून ) ठरविणें, नेमणें. ३ *to form an idea of, to project* मनांत बेत योजणें-रचणें, मनांत घाट घालणें, मनांत रचना करणें, कल्पिणें. ४ *to intend, to purpose* ( usually with *for* before the remote object but sometimes with *to* ) उद्देशणें, संकल्प करणें, बेत-विचार ठरविणें. D. *v. i. to form a design* नकाशा काढणें. २ *to plan* बेत ठरविणें. D. *n. a preliminary sketch or plan* नकाशा *m*, नमुना *m*, कल्पना-चित्र *n*, रेखाटणी *f.* २ *scheme, plan, project* कल्पना *f*, रचना *f*, बेत *m*, योजना *f*, युक्ती *f.* ३ (in bad sense) *evil intention, or purpose, scheme, plot* दुष्ट मसलत *f*- बेत *m*, कृष्णकारस्थान *n*. ४ *intention or purpose as revealed or inferred from the adaptation of means to end* उद्देश *m*, हेतु *m* (*spec.*) ईश्वरी योजना-हेतु *m*. ५ *the realisation of an inventive or decorative plan* कल्पनेवरून केलेलें नकसकाम-खोदकाम *n*-चित्र *n*, हुन्नर *f.* Designa'ble *a. distinguishable* ( नकाशानें ) दाखवितां येण्याजोगा, ओळखितां येण्याजोगा. Des'ignate *v. t. to mark out, to make known, to indicate, to name* निर्देशणें, निर्देश करणें, अमुक ह्मणून सांगणें, नांव देणें, नामनिर्देश करणें. २ *to call by a distinctive title or to name* पदवी-नांव-हुद्दा-किताब देणें. ३ *to indicate, or set apart for a purpose or duty* ( with *to* or *for* ) पदवी देऊन नेमणें- योजणें, नेमणूक *f*- योजना *f.* करणें. *g. of o.*; नियुक्त करणें, आंखून देणें. Des'igna'ted *a.* निर्देशलेला, नामनिर्दिष्ट, उपलक्षित, विशेषित. Des'ignā'tion *n. the act of designating, indication* निर्देश *m*. २ *appointment for a purpose* नेमणूक *f*, योजना *f*, आंखून देणें *n*. ३ *distinguishing mark or title* चिन्ह *n*, पदवी *f*, किताब *m*, नामाभिधान *n*, नांव *n*. ४ *use, application, import* अर्थ *m*, उपयोग *m*, प्रयोग *m*. [D. OF A WORD शब्दाचा अर्थ, भावार्थ *m*.] ५ *law.* नांव, धंदा, रहाण्याचें ठिकाण इत्यादिकांचा उल्लेख *m*. ६ वर्गनिर्देश *m*. Designa'tor *n.* नामनिर्देश करणारा *m*. २ ( Roman Antiq.) (सार्वजनिक समारंभामध्यें प्रत्येकाला आपल्या) पदवीप्रमाणें जागा दाखविणारा कामगार *m*. Designed' *pa. t.* & *pa. p. a.* Designed'ly *adv.* जाणून, जाणून पुसून, समजून उमजून, मुद्दाम, बुद्ध्या, बुद्धिपुरस्सर, उदमेखून ( *colloq.* ) Design'er *n. a contriver* योजणारा. २ *a plotter, a schemer* योजक, कल्पक. ३ उपद्व्यापी, पाताळयंत्री. ३ स्वतःच्या बुद्धि-सामर्थ्यानें-कल्पकबुद्धीनें चित्रें, कोरींव काम, नक्षी, रंग देणें इ. करणारा. Design'ful *a.* युक्तीपूर्ण, हुन्नरी. Design'ing *a.* योजक. २ *cunning* लुच्चा, उपद्व्यापी, वंचनशील, प्रतारक.

*N. B.*—मनसुबा *f*, उद्देश *m*, मतलब *m*, इंगित *n*, मानस *m.* & *n*, आशय *m*, निमित्त *n*, अभिप्राय *m*, अभिप्रेत *n*, हृदय *n*, हार्द (*pop.*) (हरद्र or हरिद्र or हार्द्र) *n*, संकल्प *m*, विवक्षा *f*, चिकीर्षा *f*, विषय *m*, मनीषा *f.*

Candy has given the above words as conveying the sense of Design, but we think they are suitable renderings of the word Intention. Design has reference to something definitely aimed at. Intention points to the feelings or desires with which the thing is sought. Design is कल्पना, Intention is उद्देश.

Desire ( de-zīr' ) [O. Fr. *desirer, desirrer*–L. *desiderare*, to long for; See desiderate.] *v. t. to long for, to wish for earnestly, to covet* इच्छिणें, वांच्छिणें, आशावणें, इच्छा *f-* आशा-आस *f-* उमेद *f-* वांच्छा *f.* धरणें-करणें; (in high degree) *to crave, to thirst, to pant, to hanker after, to long for, to be dying for* वख-वखणें, घोपणें, मरणें, अभिलाषणें, लुसुलुसु करणें, जीव *m.* टांगला असणें *g. of s.*, जीव वर धरणें or वरता जीव धरणें, छंद *m.* धरणें-घेणें, तान्हेनें-भुकेनें तरतरणें, धांदावणें, लोभणें, कंठीं प्राण *m.* धरणें. २ *to express a wish for, to entreat, to request* इच्छा प्रदर्शित करणें, अर्ज करणें, प्रार्थना-विनंति करणें, विनवणें, प्रार्थणें. ३ (*obs.*) *to demand* सांगणें, आज्ञा करणें. ४ (*obs.*) *to require, to claim* (ची) गरज असणें, लागणें, जरूर-आवश्यकता असणें. ५ (*obs.*) *to miss, to regret* ची खोट पडणें, मागून आठवण निघणें. D. *n. an eager wish to obtain or enjoy* इच्छा *f,* वांच्छा *f,* वासना *f,* संपादनेच्छा *f,* हौस *f,* अपेक्षा *f,* हव्यास *m,* तलब *f,* काम *m* (S), कामना *f,* स्पृहा *f,* ईषणा *f,* भोगेच्छा *f,* आकांक्षा *f,* कांक्षा *f,* मनःकामना *f,* स्पृहा *f,* हेतु *pop.* हेत *m, pop.* मानस *m. n,* मनीषा *f,* मनोरथ *m,* ईहा *f-* (S) मनोदय *m*; (in high degree) *thirst after, panting or hankering after, longing for* हांव *f,* भूक *f,* वेड *n,* वळवळ *f,* उत्कंठा *f,* उत्कटेच्छा *f,* तृष्णा *f,* तृषा *f,* अभिलाष *m,* सोस *m,* उत्सुकता *f,* औत्सुक्य *n,* लालसा *f,* लिप्सा *f,* आर्त *f.* [CARNAL D. कामेच्छा *f.* OBJECT OF D. इष्ट, इष्टवस्तु *f.* SNARE OR FETTERS OF D. आशापाश *m,* आशाजाल *n,* आशाबंधन *n.* –ENTANGLED IN IT आशाबद्ध. VOID OF D., EXEMPT OR FREE FROM D. अनिच्छ, निरिच्छ, अनपेक्ष, निरपेक्ष, निराकांक्ष, निस्पृह, निर्वासन, निष्काम. TO GRATIFY INTENSE D. (FOR SEEING) पारणें फेडणें (*v. i.* फिटणें). TO MOCK OR BAULK D. वासना *f.* फजीत करणें. TO MORTIFY D. वासना *f.* मोडणें-मारणें, जीव *m.* जाळणें-मारणें-इच्छाविनाश *m-* इच्छाक्षय *m-* इच्छानिवृत्ति *f.* करणें; (sensual) इंद्रियनिग्रह *m,* इंद्रियसंयमन *n.* करणें. ACCORDING TO ONE'S D. (OR PURPOSE) इच्छेप्रमाणें, यथाकाम, यथाभिमत. EVIL D. दुर्वासना *f,* कुवासना *f,* पापवासना *f.* VIRTUOUS OR GOOD D. पुण्यवासना *f,* धर्मवासना *f,* सद्वासना *f.* TO GRANT OR FULFIL A D. इच्छादान *n-* आकांक्षा पूर्ण करणें, हेतु- मनोरथ पुरविणें. TO OBTAIN A D. इच्छालाभ *m-* इष्टवस्तुलाभ *m.* होणें.] २ *an expressed wish, a request, a petition* मनोदय *m,* प्रार्थना *f,* विनवणी *f,* मानस *m,* अर्ज *m.* ३ *anything which is desired, an object of longing* इच्छाविषय *m,* इष्टवस्तु *f,* इष्टपदार्थ *m,* लोभविषय *m.* ४ *excessive longing, lust* अतिलोभ *m,* तृष्णा *f,* लालसा *f,* उत्कंठा *f,* आकांक्षा *f.* Desi'rable *a.* इच्छिण्याजोगा-सारखा, काम्य, कामनीय, स्पृहणीय, स्पृह्य, अपेक्षणीय, अपेक्ष्य, अपेक्षितव्य, आकांक्षनीय, वांच्छनीय, इच्छार्ह, कामार्ह, लोभ्य, लोभनीय. Desi'rableness *n,* Desi'rabil'ity *n.* इष्टता *f,* स्पृहणीयता *f,* इच्छार्हता *f,* लोभनीयता *f.* Desi'rably *adv.* Desired' *a.* इच्छिलेला, इच्छित, अपेक्षित, आकांक्षित, कांक्षित, वांछित, इष्ट, अभीष्ट, अभिलाषित. Desire'less *a.* निरिच्छ. Desi'rer *n.* Desi'ring *pr. a.* Desi'rous *a.* इच्छिणारा, इच्छावान्, साकांक्ष, इच्छु (esp. in comp., as, धनेच्छु, विद्येच्छु, जगद्धितेच्छु, मोक्षेच्छु), आकांक्षी (in comp.), हव्यासी, लुब्ध. (in high degree), *craving* हवला, उत्कंठित, सोत्कंठ, अभिलाषी, भुकेला, लोभग्रस्त, लोभाविष्ट, लोलुप, लोभाक्रांत, लोभातुर, लोभाकुल, लोभांध, अतीच्छ, आशाळभूत. Desi'rously *adv.* आतुरपणानें, उत्कंठितपणानें. Desi'rousness *n.* मिळविण्याची उत्सुकता *f.*

N. *B.* Note the uses: Desiring *to* do a thing, Desirous *of* doing a thing.

Desist ( de-sist' ) [ O. Fr. *desister*, to cease –L. *desistere*, to desist –L. *de*, away & *sistere*, to stand still, from *stare*, to stand.] *v. i. to cease to act, to stop, to forbear* (often with *from*) बंद पडणें, (पासून) थांबणें, राहणें, हात आटोपणें-काढणें, सोडून देणें. Desist'ance-ence *n,* Desist'ing *n.* राहणें *n,* हात आटोपणें *n.* Desist'ive *a.* ( R. ) *final, conclusive* शेवटचा, अखेरचा.

Desk ( desk ) [ M. E. *deske, desk* —Med. L. *desca*, a desk –L. *discum*, acc. of *discus*, a disk.] *n. a sloping table for the use of writing* (लिहिण्याच्या सोईचें) उतरतें मेज *n,* लिहिण्याचें टेबल *n.* २ *a shut-up writing-box* लिहिण्याकरितां उतरतें मेज करितां येणारी कागद वगैरे ठेवण्याची पेटी *f.* ३ (in a church or chapel) गायकमंडल बसण्याचें किंवा प्रार्थनापुस्तक ठेवण्याचें मेज *n.* ४ *fig.* ख्रिस्ती उपाध्यायाचा धंदा *m-* हुद्दा *m-* काम *n..* ५ *fig.* ख्रिस्ती देवळांतील गायकमंडळ *n.* Desk-work *n.* कारकुनीकाम *n,* लेखनकाम *n.* D. *v. t.* मेजांत बंद करून ठेवणें. २ *to treasure* सांठवून ठेवणें.

*N. B.*—Desk हें निरनिराळ्या आकारांचें व रचनांचें असतें. त्याचे litany-desk, music-desk, prayer-desk, reading-desk, school-desk आणि writing-desk असे निरनिराळे प्रकार आहेत.

Desman ( des'man ) *n.* एका जातीची चिचुंदरी *f.*

Desmoid ( des'-moid ) [ Gr. *desmos*, ligament † *oid*.] *a. resembling or having the characteristics of a ligament* संधिबंधनासारखा, संधिबंधासारखा, संधिबंधसदृश.

Desmography ( dez-mog'-raf-i ) [ Gr. *desmos*, a ligament, & *graphein*, to write. ] *n.* (अस्थिसंयोग करणाऱ्या) संधिबंधनाचें वर्णन *n*, संधिबंधनवर्णन *n.* Desmol'ogy *n.* ( R. ) अस्थि जोडणाऱ्या संधिबंधनासंबंधीं विचार *m*, संधिबंधनविचार *m.*

Desolate ( des'-ō-lāt ) [ L. *desolatus*, forsaken *pa. p.* of *desolare*, to forsake–L. *de*, fully & *solare*, to make lonely, from *solus*, alone.] *v. t. to deprive of population, to depopulate* निर्जन करणें, वस्ती नाहींशी करणें, प्राणिरहित-जीवरहित करणें, ओस पाडणें. २ *to lay waste, to ruin, to ravage* नाश *m*- धुळधाण *f*- फन्ना *m.* उडविणें-करणें, उजाड-ओसाड-ओस-बेचिराख-विध्वंस करणें, नांगर *m*- खराटा *m.* फिरवणें with वर of *o.* Des'ola'te,-d *a. destitute or deprived of inhabitants, deserted, gloomy* उजाड केलेला, उजाड झालेला, ओस, ओसाड, बेचिराख, सुना, सुनका, उध्वस्त, उद्वस्त, निर्जन, शून्य, भयाण. २ *laid waste, neglected, in a ruinous condition* उध्वस्त, नष्ट, नाश पावत असलेला, उर्जा नसलेला. ३ *left alone, forsaken, comfortless* आधार-आश्रय तुटलेला, एकटा, एकान्तवासु, अनाथ झालेला. ४ (*obs.*) *lost to shame, dissolute* निर्लज्ज, निलाजरा, बेशरम, निसत. ५ *destitute of or lacking in* उणा, अपुरा, न्यून. Des'olate'ly *adv.* Des'olate'ness *n.* निर्जनता *f.* २ अनाथता *f*, &c. Des'ola'tor-er *n.* नाश-उध्वस्त करणारा, &c. Des'olā'tion *n. the act of desolating, depopulation* उध्वस्त-उजाड-ओसाड करणें *n*, निर्जन करणें *n.* २ *state of being desolated, ruin* उजाडी *f*, ओसाडी *f*, उध्वस्तता *f*, बेचिराखी *f*, खराबी *f*, विध्वंस *m*, नाश *m.* ३ *solitariness, gloominess* उदासीनता *f*, एकलकोंडेपणा *m*, भयाणपणा *m.* ५ *a place or country laid waste or forsaken* उध्वस्त-निर्जन प्रदेश *m.* [ SOME SIGNIFICANT WORDS AND STRIKING PHRASES AND FIGURES EXPRESSING THIS SENSE ARE:– राखरांगोळी *f*, गोपचंदन *n*, भणभणाट or भणाण *m*, राक्षसिणी पीठ कांडितात, तेथें खरांटा फिरला आहे, त्या देशावर गवत रुजलें आहे ( घरावर *loc.*), घरास कांद्या लागल्या आहेत, तेथें चिटपाखरूं देखील भेटत नाहीं, दिवा लागत नाहीं. (त्या देशांत-गांवांत), पायवरवंटा झाला (देशाचा-गांवांचा), तेथें शुक्र आहे (*Candy*).] Des'ola'tory *a* (2.) निर्जन, उजाड केलेला, उध्वस्त केलेला.

Despair ( de-spār' ) [ M. E. *despeiren*, *desperen*–O. Fr. *despeir*, tonic stem of *desperer*, to despair–L. *deperatus*; See Desperate.] *v. i. to be hopeless, to have no hope, to give up all hope or expectation* ( often with *of* ) आशा *f.* सुटणें *g. of s.*, निराश असणें-होणें, हताश होणें. D. *v. t. to give up as beyond hope or expectation* आशा टाकणें-सोडणें, आशात्याग *m.*-आशामोचन *n.* करणें, निराश होणें. २ *to cause to despair* निराश करणें, कंबर खचवणें. D. *n. loss of hope, utter hopelessness, complete despondency* निराशा *f*, नैराश्य *n*, आशानाश *m*, आशाविच्छेद *m*, आसमोड *f*, आशानष्टता *f*, हिरमोड *m.* २ *that which is despaired of* जिच्याविषयीं निराशा झाली आहे अशी वस्तु *f*, निराशाविषय *m.* Despair'er *n.* आशा सोडणारा. Despaired' *a.* निराश, नष्टाश, गताश, भग्नाश, हताश. Despair'ing *a. feeling or expressing despair, hopeless* निराश, हताश. Despair'ingly *adv.* निराशेनें.

Despatch ( de-spach' ) Dispatch (dis-pach') [ Span. *despachar*, to despatch, to expedite–L. *dis*, away & L. type *pactare*, to fasten.] *v. t. to dispose of speedily* (as business), *to execute quickly, to finish, to perform* उडवणें, झपाझप निकालांत आणणें, (कामाचा) बार *m.* उडविणें, उरकणें, आटपणें, संपवणें, फडशा पाडणें, ( काम ) करून टाकणें, उलगडा करून टाकणें. २ (*obs.*) *to rid, to free* सुटें-मोकळें-मुक्त करणें,(ला) स्वतंत्रता देणें. ३ *to get rid of by sending off, to send away hastily* पाठवून मोकळें होणें, रवानगी करून टाकणें, ब्याद घालविणें, उचलबांगडी करून टाकणें. ४ *to send off or away* ( as messengers, messages, letters, &c. ) दवडणें, दामटणें, दपटणें, पिटणें, पिटाळणें, पिटाळून-पळत लावणें, धावडणें, रवानगी करणें, हकारणें, पाठविणें, धाडणें. ५ *to send out of the world, to put to death* ठार मारणें-करणें, (ची)गति-गत-लावणें-देणें, इहलोकांतून पार करणें, फडशा पाडणें, निकाल करणें. D. *v. i. to make haste* घाई-गर्दी करणें. २ *to conclude an affair, to finish a matter of business* काम पुरें करणें-आटोपणें-संपवणें-पार करणें, कामाचा निकाल करणें. D. *n. the act of sending a message or messenger* निरोप धाडणें, जासूद दवडणें *n.* २ *any sending away, dismissal, riddance* बोळवण *f*, उचलबांगडी *f*, सोडवणूक *f*, सुटका *f*, मुक्ति *f.* ३ *the finishing up of a business, speedy performance, prompt execution, diligence, haste* (कामाचा) निकाल *m*, उरक *m*, आटप *m*, झपाटा *m*, झटपट *f*, चलाखी *f*, जलदी *f*, घाई *f*, त्वरा *f*, उतावळ *f.* ४ ( *a.* ) *a message despatched or sent with speed* त्वरेनें पाठविलेला निरोप *m*- संदेश *m.* ( *b.* ) *pl. important official letters sent from one public officer to another* खलिते, सरकारी टपाल-कागद-लखोटे. ५ ( *modern* ) *a message transmitted by telegraph* तारेनें पाठविलेली बातमी *f*- निरोप *m*- तार *f.* Despatched' *a.* Despatch-boat *n.* जरूरीचे खलिते नेण्याकरितां ठेवलेली जलद चालणारी बोट *f.* Despatch-box *n.* सरकारी कामाचे कागदपत्र नेण्याची थैली *f.* २ प्रवासीपेटी, हींत लेखनाचें वगैरे सामान असतें. Despatch'er *n.* पाठविणारा. Despatch'ful *adv.* ( *Milton* ) घाईचा, जलदीचा. Pneumatic despatch *n.* हवेच्या दाबानें पत्रें, तारा किंवा लहान बंग्या खालून वर किंवा वरून खालीं पाठविण्याची व्यवस्था *f.*

Desperado ( des'-per-ā'-dō ) [ M. Span. *desperado*–L. *desperatus*, pa. p. of *desperare.* ] *n. a reckless, furious man; a wild ruffian* क्रूरकर्मा *m*, रामोशी *m*,

दांडगेश्वर *m*, आडदांड *m*, गळेकापू *m*, दुष्ट कर्मे करण्यास उद्युक्त *m*, अविचारी व धाडशी मनुष्य *m*, भयंकर-उग्र स्वभावाचा माणूस *m. pl.* Desperados.

Desperate (des'-pėr-ät) [L. *desperatus*, pa. p. of *desperare*, to lose all hope—L. *de*, from & *sperare*, to hope, from *spes*, hope.] *a.* (*obs.*) *without hope, given to despair, hopeless* निराश, आशाहीन, हताश, नष्टाश, त्यक्ताश. २ (*a*) *beyond hope, causing despair, extremely perilous or dangerous* जिवावरचा, हिंमत खचविणारा, धैर्य गळविणारा, नाइलाज, उपायहीन, कठीण, असाध्य; as, "D. disease." (*b*) *irretrievable* ज्याची हानि भरून येत नाहीं असा (विषय). ३ *reckless, furious* साहसिक, जिवावर उदार, असुरी, दारुण, तुमुल, तुंबल (fighting), झपाट्याचा (wind). ४ (in a bad sense) निकराचा, (in a bad sense) बेसुमार, पक्का, अट्टल, अमर्याद, बेताल, कमालीचा, पराकाष्ठेचा. Des'perately *adv.* साहसानें, साहसपूर्वक, जिवावर उदार होऊन, जिवाची आशा न बाळगतां. Des'perateness *n.* निराशा *f*, नैराश्य *n*, &c. २ *virulence* जलालीपणा *m*, जलाली *f*, कडकपणा *m*. Des'perā'tion *n.* *a giving up of hope* आशा सोडणें *n.* २ *utter hopelessness* पूर्ण निराशा *f.* ३ *extreme recklessness, reckless fury* अतिसाहस, भयंकर धाडस, क्रोधोन्मत्तता *f*, क्रोधांधता *f.*

Despicable (des'pi-kȧ-bl) [See Despise.] *a. fit or deserving to be dispised, contemptible, vile, mean, worthless* तुच्छ करण्याजोगा, तुच्छ मानण्याजोगा, तिरस्कार करण्याजोगा, तिरस्करणीय, तिरस्कारार्ह, धिक्कार करायाजोगा, अवमाननीय, हलकट, तुच्छ, कवडी किंमतीचा, दमडीचा, निकृष्ट, अधम, पाजी, नीच, क्षुद्र, निंद्य, कुत्सित (S). Des'picableness *n. worthlessness, vileness* तिरस्करणीयता *f*, अवमाननीयता *f*, अवमानार्हता *f*, तुच्छत्व *n*, क्षुद्रता *f.* Des'picabil'ity *n.* अधमपणा *m*, क्षुद्रता *f*, हलकटपणा *m*. Des'picably *adv.* तुच्छपणानें.

Despise (de-spīz') [M. E. *despisen*—O. Fr. *despis* stem of the pr. p. of *despire*—L. *de*, down & *spicere*, to look.] *v. t. to look down upon with contempt, to contemn, to scorn, to disdain* तिरस्कार *m.* करणें, तुच्छ मानणें, धिक्कार-हेलना करणें, कःपदार्थ मानणें, उपेक्षिणें, तिरस्कारणें, अवगणणें, अवमानणें, हलकें लेखणें. Despi'sable *a.* (R.) तिरस्कार करण्याजोगा-जोगता. Despi'sal *n.* (R.) तिरस्कार *m.* Despised'ness *n.* तिरस्कृत-ता-त्व-पणा *f. n. m.* Despi'ser *n.* तिरस्कार करणारा *m.* Despi'sing *n.* तिरस्कारणें *n*, तिरस्कार *m*, धिक्कार *m*, अवमान *m*, अनादर *m*, अवगणना *f*, हेळणा *f*, अवहेलना *f*, अवहेलन *n.*

Despite (de-spīt') [M. E. *despit*—O. Fr. *despit*, —L. *despectum*, a looking down upon.] *n. the feeling or mental attitude of looking down upon or despising anything* तिरस्कार *m*, द्वेष *m.* २ *an action that shows contemptuous disregard* तिरस्कारदर्शक कृत्य *n.* ३ द्वेषबुद्धीनें-तिरस्कारानें-चुरशीनें केलेलें कृत्य *n.* ४ *indignation, anger, evil feeling* क्रोध *m*, दंश *m.* ५ *the entertaining of a grudge or ill-will* चुरस *f*, अदावत *f*, डाव *m.* D. *v. t.* (*obs.*) *to vex, to annoy, to offend contemptuously* (चा) तिरस्कार करणें, त्रास देणें, सतावणें, अपमान करून राग आणणें. Despite'ful *a. malicious* द्वेषी, चुरशी, खुनशी, द्रोही. Despite'fully *adv.* Despite'fulness *n.* In Despite of दुसऱ्याची पर्वा न करितां, खिसगणती न करितां, न जुमानतां.

Despoil (de-spoil') [O. Fr. *despoiller*, to despoil -L. *de* & *spoliare*, to plunder.] *v. t.* (*obs.*) *to strip* (as of clothing), *to unclothe* नागविणें. २ *to plunder, to rob* (usually followed by *of*) लुटणें, लुबाडणें. Despoil'er *n.* लुटारू *m*, लुबाडणारा. Despoliā'tion *n. a stripping or plundering* लूट *f*, नागवणूक *f.* Despoil'ment *n.* (R.) लूट *f.*

Despond (de-spond') [L. *despondere*, to promise fully. (2) to give up, to yield (hence to despair) —L. *de*, fully, away; *spondere*, to promise.] *v. i. to be thoroughly disheartened, to lose all courage, to become dispirited* (ला) विषाद वाटणें, (ची) अजीवातनिखालस-सर्वस्वी) आशा *f.* गळणें-सुटणें, धीर *m*-धैर्य *n.* सुटणें *g. of s.*, हिंमत *f.* धीर *m.* खचणें, निराशा *f.* होणें *g. of s.*, हातपाय *m. pl.* गळणें *g. of s.*, पाय *m. pl.* मोडणें *g. of s.*, (ची) निराशा *f.* होणें. Despon'dence *n.* नैराश्य *n.* Despon'dency *n.* विषाद *m*, पूर्णनिराशा *f*, विषण्णता *f.* Despon'dent *a.* निराश, निरुत्साह, नाउमेद, गतोत्साह, विषण्ण, नष्टधैर्य, गतधैर्य. Despon'dently *adv.* Despon'ding *a.* Despon'dingly *adv.* आशा सोडून, निराश होऊन. Despon'der *n.* विषाद वाटणारा, नष्टाश, गताश.

*N. B.*—Despondency = विषाद *m*, Despair = निराशा *f.*

Despot (des'-pot) [O. Fr. *despot* — M. L. *despotus* — Gr. *despotes*, a master of the house Cf. Sk. धामपति. Despot शब्दाचा मूळ अर्थ कुटुंबाचा किंवा गुलामांचा धनी असा होता, पुढें अस्वतंत्र लोकांचा अनियंत्रित राजा असा या शब्दाचा अर्थ झाला व पुढें अनियंत्रित राजा, जुलमी राजा, स्वेच्छाचारी राजा, ह्या अर्थी हा शब्द वापरूं लागले.] *n. an absolute or irresponsible ruler or sovereign* अनियंत्रित सत्ताधारी-स्वतंत्र-स्वाधीन राजा *m.* २ *one who rules regardless of laws or constitution, a tyrant* अशास्त्रवर्ती-निरंकुश-प्रजापीडक-जुलमी राजा *m*, कायद्याची पायमल्ली करणारा-स्वेच्छाचारी राजा *m.* Des'potāte *n. the station or government of a despot* जुलमी राजाचा अधिकार किंवा राज्य *n*, बेबंदशाही *f.* २ *the domain of a despot* प्रजापीडक राजाचें राष्ट्र *n.* Despot'ic, Despot'ical *a. absolute in power* स्वतंत्र, अनियंत्रित, निरंकुश. २ *tyrannical, arbitrary* जुलमी, बेबंद. Despot'ically

*adv.* जुलमानें. Despot'icalness *n.* जुलमीपणा *m,* बेबंदी *f.* Des'potism *n. the power and principles of a despot, absolute control, tyrannical sway* मोंगलाई *f,* अप्रतिबंधक राज्यसत्ता *f-* अधिकार *m,* बेबंदशाही *f,* जुलूम *m,* अनियंत्रित राजसत्ता *f.* २ *a despotic monarchy, absolutism, autocracy* अप्रतिबंधकसत्ताक राज्य *n,* स्वेच्छाचारी राज्य *n,* बेबंदशाही *f.* Des'poto'cracy *n.* See Despotism.

Despumate ( des'-pū-māt ) [ L. *despumatum*–L. *de*, off & *spumare*, to froth.] *v. t. & v. i. to throw off impurities in spume, to foam* फेंसाच्या रूपानें मळी वर येणें-बाहेर पडणें-पाडणें, फेंस येणें-आणणें. Des'pumā'tion *n.* फेंस येणें *n,* द्रवपदार्थांतून घाण पदार्थ काढून टाकणें *n.*

Desquamate ( des'-kwa-māt ) [L. *de*, off & *squama*, a scale. ] *v. i. med. to peal off in the form of scales, to scale off* (as skin in certain diseases) साल निघणें, कातडें काढणें, सोलणें, खरपुडी *f-* पापुद्रा *m.* काढणें. Des'quamā'tion *n. med.* खरपुडी *f-* खवला *m-*पापुद्रा *m.* काढणें *n-* निघून जाणें, त्वगूविमोचन *n.* Des'quamā'tive, Des'quama'tory *a.*

Dessert ( de-zērt' ) [ O. Fr. *dessert*,–O. Fr. *desservir*, to clear the table–O. Fr. *des* (L. *dis*) *servir* (*servire*), to serve.] *n. a service of pastry, fruits or sweetmeats at the close of a dinner* जेवल्या नंतरचा मुखशुद्धीकरितां किंवा सुरुचिकरितां फळें, मिठाई इत्यादिकांचा उपाहार *m,* भोजनोत्तर उपाहार *m.* Dessert-service *n.* मुखशुद्धीकरितां उपाहार ठेवण्याचीं ताटें *n. pl,* उपाहारपात्रें.

Destine ( des'-tin ) [ O. Fr. *destiner*, to ordain.–L. *destinare*, to destine, ordain;—L. *de*, down & *stanare*, to cause to stand, deriv. of *stare*, to stand; Cf. Sk. स्था, to stand. ] *v. t. to determine, to fix the future condition or application of* (often with the remoter object preceded by *to* or *for* ) पूर्वीं-आगाऊ योजून ठेवणें, पूर्वयोजना *f-* पूर्वनियोग *m-* पूर्वनियोजन *n.* करणें *g. of o.* २ *to fix* ( as by destiny or by an authoritative decree ), *to doom, to pre-ordain, to ordain, to appoint* दैवानें-ईश्वरी सूत्रानें ठरविणें-नेमणें, ( च्या ) नशीबीं-भाग्यांत लिहिलेलें असणें, नेमणें, ठरविणें, लिहिणें. Destinā'tion *n. the act of destining* पूर्वींची नेमणूक *f,* पूर्वयोजना *f.* २ *purpose for which anything is destined, ultimate design, predetermined end, object or use* पूर्वनियुक्त हेतु *m-*अर्थ *m-* प्रयोजन *n-*अंतिमहेतु *m,* अगोदर-पूर्वीं ठरवून ठेवलेला परिणाम *m,-* हेतु *m,-* उपयोग *m.* ३ *the place at the end of a journey, place or point aimed at* प्रवासाचें-जाण्याचें ठिकाण *n,* प्रवासावधिस्थल *n,* पूर्वनियुक्त-इष्टस्थल *n.* Des'tined *a.* पूर्वीं योजून ठेवलेला, पूर्वनियोजित, पूर्वनियुक्त, दैवकृत, दैवीं लिहिलेला. Des'tiny *n. that to which any person or thing is destined, predetermined state, fate, lot, doom* नेमणूक *f,* योजना *f,* दैव *n,* अदृष्ट *n,* पूर्वकर्म *n,* प्रारब्ध *n,* प्राक्तन *n,* प्राक्तनकर्म *n,* नशीब *n.* [ PERSECUTIONS OF D., TROUBLE OR EVIL APPOINTED BY D. कर्मकचाट *n,* कर्मकपाट *n,* कर्मकटकट *f.* SUBJECT TO D. दैवायत्त, दैववश, दैवाधीन. ] २ *the fixed order of things, invincible necessity, resistless power or agency conceived of as determining the future whether in general or of an individual* ईश्वरी सूत्र *n,* दैवरेषा *f-*खा, ब्रह्मरेषा *f-*खा *f,* ब्रह्मलेख *m,* ब्रह्मलिखित *n,* कपाळरेषा *f-*खा *f,* कपाळलेख *m,* दैवयोग *m,* प्रारब्धयोग *m,* विधि *m.* (S), भवितव्य *n,* होतव्य *n,* होयीक *n.* (*colloq.*). [ FULFILMENT OF D. दैवफल. TO BE IN ONE'S D. ( च्या ) नशीबीं लिहिलेलें असणें. MAN MUST FULFIL HIS D. सटवीनें लिहिलेलें टळणार नाहीं, नशीबीं लिहिलेलें चुकत नाहीं. MAN MUST LABOUR AND FULFIL HIS D. प्रारब्ध भोगूनच सारलें पाहिजे. TO FIGHT AGAINST D. नशीबाविरुद्ध जाणें, दैवाशीं झगडणें. THE DESTINIES (ANCIENT MYTHOLO.) THE THREE PARCÆ OR FATES; THE SUPPOSED POWERS WHICH PRESIDE OVER HUMAN LIFE & DETERMINE ITS CIRCUMSTANCES AND DURATION मनुष्याची भवितव्यता ठरविणाऱ्या तीन सटव्या; ही यूरोपियन लोकांची कल्पना आहे. ]

Destitute ( des'-ti-tūt ) [ L. *destitutum*.–L. *de*, away & *stituere*, to place alone. ] *a.* (*a*) *forsaken*, ( often followed by *of* ) निराश्रित, अनाश्रय, अनाश्रित, अनाथ, निराधार, (*b*) *deficient, lacking, devoid* शून्य, हीन, रहित, वेगळा, निराळा. २ *not possessing the necessaries of life, needy* अन्नवस्त्राला महाग-मोताद, कंगाल, भणंग, उघडाबोडका, उघडा. Des'titu'tion *n. the state of being deprived of anything, deficiency, lack, extreme poverty, utter want* निराश्रितपणा *m,* निराधारता *f,* अठराविसवे दारिद्र्य *n,* कमतरता *f,* अनाथावस्था *f,* आश्रयराहित्य *n-* हीनता *f,* निराधार-निराश्रित स्थिति *f,* कंगालपणा *m.*

Destroy (de-stroy') [M. E. *destroien, destruien*–O. Fr. *destruire* ;–L. *de*, down & *struere*, to build.] *v. t. to unbuild, to pull or tear down, to raze, to demolish* मोडणें, मोडून-तोडून टाकणें, मोडून-फोडून-भंगून टाकणें, पाडणें, धुळीस मिळविणें, जमीनदोस्त करणें, (वर) पांटावरवंटा *m.* फिरवणें. २ (freely) *to ruin, to bring to naught, to put an end to, to annihilate, to consume* नाश *m-* विनाश *m-* सत्यानाश *m-* नासाड *f-* नासाडी *f.* करणें, चंदन *n-* गोपचंदन *n-* नासधूस *f-* नासधूळ *f-* धूळ *f-* धूळधाणी *f.* करणें, विध्वंस *m-* संहार *m-* विघात *m-* उच्छेदन *n.* करणें *g. of o.,* नाहींसा करणें. ३ *to put an end to the existence, prosperity or beauty of, to kill* नामशेष करणें, नाहींसा करणें, निःपात *m-* निर्मूलन *n-* निर्दलन *n.* संहार *m-* क्षय *m-* लय *m-* फन्ना *m.* करणें. Destroyed' *a.* मोडलेला, मोडून-

तोडून टाकलेला, ध्वस्त, विध्वस्त, छिन्नभिन्न, निर्दलित. २ नष्ट, खाक झालेला (expressed sometimes by नष्ट, भग्न & क्षीण as the first member of a compound; as in नष्टबुद्धि, भग्नवीर्य, क्षीणशक्ति.) ३ नाहींसा केलेला, उच्छेदलेला, उच्छिन्न, निर्दलित, संहृत (S.). Destroy'er *n.* मोडणारा, नाश करणारा, संहार करणारा, विघाती, नाशक, विध्वंसक, संहारक, संहारकर्ता. २ नाशक, विनाशक, विनाशी (S.), भंजक, घातक. ३ नाहींसा करणारा, घातक, नाश-उच्छेद-कर्ता-कारी, घ्न. (in comp., as, रोगघ्न, ज्वरघ्न, पित्तघ्न.) Destruc'tible *a.* नाशवंत, मोडायाजोगा-जोगता, ध्वंसनीय, विध्वंसनीय, निर्दलनीय, उच्छेदनीय. २ नासाया जोगा-जोगता, नाशवंत, क्षयिष्णु. Destruc'tibil'ity, Destruc'tibleness *n.* नाशवंतपणा *m*, ध्वंसनीयता *f.* Destruc'tion *n.-act.* मोडणें *n*, ध्वंसन *n*, विध्वंसन *n*, उच्छेदन *n*, भंजन *n.-state.* विध्वंस *m*, विघात *m*, उच्छेद *m*, संहार *m*, प्रलय *m*. [To SWEEP WITH THE BESOM OF D. खराटा *m*. फिरवणें]. २-*act.* नासणें *n*, नासून टाकणें *n*, हानि *f*, लय *m*, विलय *m*, अत्यय *m*. ३ *a destroying agency, cause of ruin, a destroyer* विनाशकारण *n*, हानिकारक *n*. [HOUR OF D. विनाशकाल *m*. THE UNIVERSAL D. महाप्रलय *m*, प्रलय *m*. Destruc'tionist *n.* किंमतवान् वस्तु नाश करण्यामध्यें ज्याला आनंद होतो तो. विध्वंसप्रिय मनुष्य *m*. २ समाजांतील संस्था मोडून टाकण्याकडे ज्याची प्रवृत्ति असते तो, प्रचलित राज्यव्यवस्था मोडून टाकणाऱ्या पक्षाचा अभिमानी *m*, विध्वंसप्रिय मनुष्य *m*. ३ *theol.* दुष्टसंहारमतवादी, जगाचे शेवटीं खलांचा पूर्ण संहार होईल असें मानणारा. ४ विध्वंसक *n*, नाशक *n*, घातक *n*. Destruc'tive *a.* विध्वंसक, नाशक, घातक. [D. CRITICISM विध्वंसी-विघटनात्मक-विध्वंसात्मकटीका. D. SORITES *logic.* व्यतिरेकी अनुमानशृंखला *f.*] D. *n.* उच्छेदक *n*, विध्वंसक *n*. Destruc'tively *adv.* विघातकरीतीनें. Destruc'tiveness *n.* नाशकारकता *f.* २ *phreno.* नाश करण्याचा स्वभाव *m*, नाशस्थान *n*. Destruc'tivist *n.* Destruc'tor *n.* नाश करणारा. २ कचरा जाळण्याची भट्टी *f.*

Desudation (des-ū-dā'-shun) [L. *de* & *sudare*, to sweat.] *n. med. a sweating* घाम सुटणें-येणें *n*. (या घामानंतर बारीकबारीक पुटकुळ्या उठतात.)

Desuetude (des'wē-tūd) [L. *desuetudo*, disuse; L. *de* & *suescere*, to become used.] *n. the cessation of use, the state of disuse, discontinuance of practice, custom or fashion* रद्दी पडणें *n*, माजी पडणें *n*, अनभ्यास *m*, गैरवलण *n*, प्रवृत्तिविच्छेद *m*.

Desultory (des'-ul-tėr'i) [L. *desultorius.* –L. *de*, from & *salire*, to jump. Desultory शब्दाचा मूळ अर्थ इकडून तिकडे उड्या मारणारा-उड्डाण करणारा असा होता.] *a. disconnected, immethodical, aimless* विस्कळित, अव्यवस्थित, अस्थिर, चंचल, अक्रमिक, मंडूकप्लुतीचा. Des'ultoriness *n.* विस्कळितपणा *m*, क्रमराहित्य *n*.

Desynonymise (dē'-si-non'-i-mīz) [L. *de* & Synonymise.] *v. t. to deprive of synonymous character, to discriminate in use* एकार्थीशब्दाचे सूक्ष्म अर्थ लक्षांत आणून यथार्थ उपयोग करणें.

Detach (de-tach') [Fr. *detacher*, to unfasten, Fr. *de*, (L. *dis.*) & Fr. *tache*, a nail, tack.] *v. t. to part, to separate, to disunite* वेगळा-भिन्न-वियुक्त करणें, दूर करणें, (पक्षांतून-पुष्ठ्यांतून) बाजूस-वेगळें-निराळें-एकीकडे काढणें, निराळा करणें, सोडवणें. २ *to separate for a special object or use* (used especially in military language) विशेष कामगिरीसाठीं निराळें-वेगळें काढून ठेवणें; as, "To D. a party from an army or a ship from a fleet." D. *v. i. to push asunder, to disengage* सुटणें, वेगळा होणें, मोकळें होणें. Detach'able *a.* वेगळा करितां येण्याजोगा. Detached' *a.* अलग, तुटक, वियुक्त. Detached'ly *adv.* Detached'ness *n.* तुटकपणा *m*, अलगपणा *m*. Detach'ment *n.* सैन्याची तुकडी *f*, टोळी *f*, सेनाखंड *m*. २ (*a*) *the act of detaching* निरनिराळा करणें *n*. (*b*) *state of being detached* वियुक्तस्थिति *f.* ३ *abstraction from worldly objects, renunciation* (ऐहिक विषयांपासून) परावृत्ति *f*, निवृत्ति *f*, वैराग्य *n*. To detach a person from a cause एका पक्षांतून फोडणें-काढणें-अलग करणें.

Detail (de-tāl') [O. Fr. *detail*, a piece-mealing, also retail, or a selling by parcels.–O. Fr. *detailler*, to cut into pieces.–O. Fr. *de* (L. *de*), down or fully & *tailler*, to cut.] *v. t. to relate in particulars, to report minutely and distinctly* सविस्तर-तपशीलानें-तपशीलवार-सांगणें-लिहिणें, तपशील सांगणें-लावणें-लिहिणें, बारीक वर्णन करणें. २ *mili. to tell off or appoint for a particular service* (as an officer, a troop or a squadron) लष्करी-सरदारी कामगिरीवर नेमणें-पाठविणें. D. *v. i.* तपशील देणें. D. *n. a particular, an item* तपशील *m*, बाबत *f*, सविस्तर माहिती *f*, विशेष वर्णन *n*. २ *an account which dwells on particulars* (used chiefly in *pl.*) तपशीलवार वर्णन *n*. ३ *mil.* कामावर विशेष नेमणूक *f. pl.* De'tails तपशील. Detailed' *a.* सविस्तर. In detail सविस्तर, तपशीलवार, बाबतवार, रकमवार. Wearisome detail परवड *f*, पाल्हाळ *n*.

Detain (de-tān') [From O. Fr. *detenir*–L. *de*, & *tenere*, to hold.] *v. t. to keep back or from, to withhold* अटकावणें, अटकावून ठेवणें; as, To D. the wages of labourers. २ *to restrain from proceeding, to stay, to stop, to delay* अटकाव करणें, खोळंबा करणें, खोटी करणें, रोखणें, अडवणें, खोळंबवणें. ३ *to hold or keep in custody* कैदेंत-बंदींत-अटकेंत ठेवणें. Detain'er *n.* अटकाव करणारा. २ *law.* दुसऱ्याच्या मालकीची वस्तु आपल्या ताब्यांत घेणें. ३ तुरुंगांतील कैद्यास जास्त दिवस कैदेंत ठेवण्याचा परवाना *m*. Detain'ment *n.* (R.).

Detect (de-tekt') [L. *detectus, pa. p. of detegere*, to uncover, to expose–L. *de*, away & *tegere*, to cover, *tectum*, covered; Detection is the result of search or inquiry.] *v. t. to discover, to bring to light* शोधून काढणें, (शोध किंवा तपासणी करून) उघडकीस आणणें, (ला) समजणें-कळणें, (च्या) ध्यानांत येणें. Detect'able, Detec'tible *a.* शोधून काढण्याजोगा, &c. Detec'ted *a.* शोधून काढलेलें. Detec'ter-or *n.* शोधून काढणारा. २ उघडकीस आणणारा. Detec'tion *n.* शोध *m*, तपास *m*, ठाव *m*, ठिकाण *n.* Detec'tive *a.* शोधून काढण्यास योग्य, शोधून काढण्यांत चतुर, शोधून काढणारा. D. *n.* गुप्त पोलीस *m*, गुप्त जासूद *m.*

Detent (de-tent') [L. *detentum*, to keep back, to detain from *de* & *tenere, tentum*, to hold.] *n. mech.* कुत्रें *n.*

Detention (de-ten'-shun) [See Detain.] *n.* ठेवणें *n*, राखणें *n.* २–*act.* रोखणें *n*, अडवणें *n*, अडवणूक *f.* -*state.* खोटी *f*, खोळंबा *m*, अटकाव *m.* ३ *confinement, restraint, custody* अटकेंत ठेवणें *n*, बंधन *n.*

Deter (de-ter') [L. *deterrere*–L. *de*, from & *terrere*, to frighten.] *v. t. to prevent from action by fear of consequences, or of the difficulties, imprudence, or risk of the attempt* (भय घालून-भिववून-भेवडावून) मागें ओढणें-अडवणें-अटकावणें-विमुख करणें, पराङ्मुख करणें, मोडा घालणें. Deter'ring *pr. p.* Deterred' *pa. p.* Deter'ment *n.* मोडा *m*, अडवण *f*, अटकाव *m.* Deter'rer *n.* अडवणारा, अटकाव करणारा.

Deterge (de-terj') [L. *detergere*–L. *de*, off & *tergere*, to wipe.] *v. t. to cleanse* (जखम) धुणें, जखमेंतला मल, पू, वगैरे काढून टाकणें. Deter'gence, Deter'gency *n.* मलशोधकशक्ति *f.* Deter'gent *a.* मल साफ करणारा. D. *n.* मल साफ करणारें औषध *n*, जुलाबाचें औषध *n*, त्वचा साफ करणारा पदार्थ *m.* (पाणी, साबण वगैरे), शोधक *n.*

Deteriorate (de-tē'-ri-ō-rāt') [L. *deterioratus pa. p.* of *deteriorare*, to make worse–L. *deterior*, worse.] *v. t. to make worse, to impair* ऱ्हास करणें, खराब-वाईट करणें, बिघडवणें, निकृष्ट करणें. D. *v. i. to grow worse, to degenerate* बिघडवणें, बिघडत जाणें, गुणास उणावणें-खालावणें, वाईट होणें, गुणऱ्हास होणें, निकृष्ट होणें. Dete'riora'ted *a.* Dete'riorā'tion *n.–act.* See verb. २–*state.* उतरता पाया *m*, उतरती कमान *f*, खचतापाया *m*, अपकर्ष *m*, अपचय *m*, विपर्यास *m*, अधोगति *f*, गुणऱ्हास *m*, ऱ्हास *m*, क्षय *m*, विकार *m*, भ्रष्टता *f*, तेजोऱ्हास *m.* Deter'iorā'tive *a.* Deter'iority *n.* (*obs.*) विकृति *f*, भ्रष्टता *f*, ऱ्हास *m.*

N. B.—Deteriorate, Degenerate.

Determine (de-ter'-min) [O. Fr. *determiner*—L. *determinare*, to bound, end—L. *de*, down, fully & *terminare*, to bound, from *terminus*, a boundary.] *v. t. to fix the boundaries of* (ची) मर्यादा *f*- हद्द *f*- चतुःसीमा *f.* ठरविणें, (ला) मर्यादा *f.* नेमणें, परिच्छेद *m.* करणें. २ *to set bounds to, to limit* सीमा *f*- शेवट *m.* ठरविणें, तड लावणें. ३ *to fix the form or character of, to regulate, to settle* (गुणरूप) ठरविणें-निश्चित करणें. ४ *to fix the course of* (ची) दिशा *f*- मार्ग *m*- क्रम *m.* ठरविणें. ५ *to ascertain definitely* (ची) जाति *f.* किंवा नाम *n.* ठरविणें; as, "To D. an unknown or newly discovered plant or its name." ६ *to bring to a conclusion, to decide* निकाल *m*- निवाडा *m.* करणें. ७ *to resolve on* संकल्प *m*- निश्चय *m*- निर्धार *m.* करणें. ८ *to impel, to direct, to lead* कल *m.* देणें, रोख *m.* लावणें, मार्ग *m*- दिशा *f.* ठरविणें. ९ (*logic.*) उपाधिविशिष्ट करणें. १० (*Physical science*) (घटक द्रव्यांचा) निर्णय *m.* करणें. D. *v. i.* (*obs.*) *to come to an end* अंत होणें, पुरें होणें, शेवट लागणें. २ *to come to a decision, to resolve* निश्चय होणें-ठरणें. Deter'minable *a.* मर्यादा-हद्द ठरवितां येण्याजोगा, ठरवावयाजोगता, निर्धारणीय, निर्धार्य, अवधारणीय, अवधार्य, निर्णेय, &c. Deter'minableness, Deter'minabili'ty *n.* निर्णेयता *f.* Deter'minant *a.* निर्णायक. D. *n.* निर्णायक. *math.* (निर्णायक) कनिष्ठफल *n.* २ (*log.*) निर्णायक गुण *m.* Deter'minate *a.* (*math.*) निश्चित केलेला, ठरीव, निर्णीत. २ *conclusive* निर्णय करणारा, निर्णायक. ३ (of esp. of time) बांधा, बंदा, सावधि, सावधिक, कृतावधि, ठरावाचा, मुदतीचा, कृतकाल, कालपरिच्छिन्न. ४ (*obs.*) निश्चयी, कृतनिश्चय, दृढसंकल्प. D. *v. t.* (*Shakes.*) शेवट *m*- अंत *m.* करणें. Deter'minate'ly *adv.* Deter'minate'ness *n.* निखालसपणा *m*, निश्चितता *f*, खचितपणा *m.* Deter'minā'tion *n.–act.* मर्यादा ठरविणें, &c–*state.* परिच्छेदता *f*, &c. २ *termination, limit* अंत *m*, शेवट *m*, अवधि *f*, समाप्ति *f.* ३ *direction, tendency, impulsion* (मनाची) प्रवृत्ति *f*, कल *m*, इच्छा *f*, हेतु *m*, वळण *n.* ४ *decision of character, resoluteness* (मनाचा) निग्रह *m*, निर्धार *m*, निश्चितपणा *m*, अट *f*, हुरूम *m*, संकल्प *m*, करारीपणा *m*, निश्चय *m.* ५ *a judicial decision* ठराव *m*, फैसला *m*, निवाडा *m*, निकाल *m*, फडशा *m*, निर्णय *m.* ६ *purpose, conclusion formed* विचार *m*, निश्चय *m*, निकाल *m.* ७ *med.* शरीरांतील कोणत्याही पातळ पदार्थांचा एके ठिकाणीं संचय होणें, रक्ताभिगमन *n.* ८ (*chem.*) पदार्थांचा घटकांशनिर्णय *m.* ९ (*physics*) लांबी, घनता, वजन इत्यादि मोजणें, परिमाणनिश्चय *m.* १० (*logic.*) उपाधिविशिष्ट करणें *n.* Deter'minā'tive *a.* Deter'mined *a.* निश्चयाचा, कराराचा, करारी, निर्धारी, वज्रसंकल्पी. *v. V.* Deter'minedly *adv.* दाढून, बळेंच. Deter'miner *n.* ठरवणारा, &c. Deter'minism *n.* (*metaph.*) इच्छा ही हेतुमूलक असते, व स्वतंत्र नसते असें मत *n*, (इच्छेची) हेतुपरिच्छेद्यता *f*, हेतुमूलकता. Deter'minist *n.* हेतुमूलकतावादी *m.* Deter'minis'tic *a.*

Deterration ( dē'-ter-ā'-shun ) *n.* जमिनींतून उकरून काढणें *n.*

Deterrent ( de-ter'-ent ) [ See Deter. ] *a.* निवर्तक, निवारण करणारा. २ ( *physic.* ) प्रतिरोधक, निवारक.

Detersion ( de-ter'-shun ) [ See Deterge. ] *n.* मळ काढून टाकणें *n*, क्षतशुद्धि *f*, क्षतशोधन *n*.

Detersive ( de-ter'-siv ) [ See Deterge. ] *n. & a.* क्षतशोधक, क्षतविशोधक, क्षतशुद्धिकारक. Deter'sively *adv.* क्षतशोधकरीतीनें, मळ काढून टाकतां येईल अशा रीतीनें. Deter'siveness *n.* क्षतशोधकता *f.*

Detest ( de-test' ) [ M. Fr. *detester*, to loathe–L. *detestari*, to execrate–L. *de*, down & *testari*, to call to witness. ] *v. t. to abhor, to abominate* धिक्कारणें, तिरस्कार करणें, ओंगळ मानणें, अति द्वेष करणें. Detest'able *a.* धिक्कारण्याजोगा, निंद्य, घाणेरडा, गर्हणीय, अतिद्वेष्य, अत्यप्रिय. Detest'ableness *n.* गर्हणीयता *f.* Detest'ably *adv.* Detestā'tion *n.* अतिद्वेष *m*, किळस *m*, धिक्कार *m*. Detest'er *n.*

Dethrone ( de-thrōn' ) [ M. Fr. *desthroner*, to unthrone—O. Fr. *des* (L. *dis*), apart & L. *thronus*-Fr.–Gr. *thronos*, a throne.] *v. t. to remove from the throne* गादीवरून काढणें-खालीं करणें, पदच्युत करणें, सिंहासनच्युत-सिंहासनभ्रष्ट-राजपदभ्रष्ट करणें. Dethrone'ment *n.* पदच्युति *f*, राज्यभ्रष्टता *f.*

Detinue ( det'-i-nū ) [ Fr. *detenir*, to detain.] *n. a person or thing detained* अटकावलेला मनुष्य *m*,-वस्तु *f*,- माल *m*. २ *law.* बेकायदेशीर रीतीनें माल अटकविल्याबद्दल फिर्याद *f.* Writ of D. अटकावलेला माल परत मिळण्याचा अगर त्याची किंमत व नुकसानी भरून मिळण्याचा हुकूमनामा *m*.

Detonate ( det'-ō-nāt ) [ L. *detonatus pa. p.* of *detonare*–L. *de*, down & *tonare*, to thunder.] *v. t. to explode with a sudden report* धाडकन् फुटून भडकणें-उडणें-भडका होणें, धडाका उडणें, बार होणें. D. *v. t. chem. to cause to explode with a sudden report* धाडकन् फोडून बाहेर उडविणें, भडका उडविणें, बार करून उडविणें. Det'ona'ting *a.* धाडकन् भडकणारा, बार होऊन उडणारा. [ DETONATING POWDERS OR FULMINATING POWDERS धाडकन् बार होऊन उडणारें रासायनिक चूर्णांचें मिश्रण *n*, बाराची पूड *f.* DETONATING GAS बाराचा मिश्रवायु *m*, उज्जवायूचे ( हायड्रोजनचे ) दोन भाग व प्राणवायूचा ( ऑक्सीजन ) एक भाग यांचें मिश्रण *n.* हें पेटविलें असतां मोठा बार होतो.] Detonā'tion *n.* ज्वालाग्राही पदार्थाचा एकदम होणारा बार *m*. Det'ona'tor *n.* Det'onize *v. t.* जाळून धडाका *m*- बार *m*. करणें, बार करणें, धाडकन् आवाज-बार होईल अशा रीतीनें जाळणें.

Detort ( de-tort' ) [ L. *de*, away & *torquere*, to twist. Cf. Fr. *detorquer*, *detordre*. ] *v. t. to pervert, to turn from the original or plain meaning* फिरविणें, अर्थविपर्यास करणें, विपरीत अर्थ करणें, अर्थ फिरविणें.

Detor'sion, Detor'tion *n.* विपरीत अर्थ करणें *n*, अर्थविपर्यास *m*, अर्थ फिरविणें *n*.

Detour ( de-tōōr' ) [ Fr. *detour*, a circuit; verbal noun from *detourner*–Fr. *de* ( L. *dis* ), aside, apart & *tourner*, to turn. ] *n. a turning, a circuitous way* चक्कर *f*, फेरी *f*, वांक *m*, आडमार्ग *m*, वळण *n*.

Detract ( de-trakt' ) [ L. *detractus pa. p.* of *detrahere*–L. *de*, away &c *trahere*, to draw. ] *v. t. lit. to withdraw, to take away* काढून घेणें, हरण-अपहार करणें, कमी करणें. २ *to take away from reputation or merit, to lesssen or depreciate worth or merit* हलकेपणा आणणें, किंमत कमी करणें, अपकर्ष करणें, अब्रूस कमीपणा आणणें, मानन्यूनता *f*- मानहानि *f* गुणापवाद करणें. D. *v. i. to defame* (often with *from*) मान-अब्रू घेणें, किंमत कमी करणें, हलकेपणा आणणें. Detrac'ter-or *n.* Detrac'tress *n. fem.* Detrac'tingly *adv.* Detrac'tion *n.* [ O. Fr. *detraction*–L. *detractionem*. ] ( असूयेमुळें दुसऱ्याच्या ) गुणाची किंमत कमी करणें *n*, मानहानि *f*, गुणापवाद *m*, निंदा *f.* Detrac'tive *a.* (R.) Detrac'tious *a.* Detrac'tory *a.* निंदक, गुणदूषक.

Detrain ( de-trān' ) *v. t.* आगगाडींतून बाहेर काढणें, गाडींतून बाहेर उतरविणें. D. *v. i. to alight from a train* आगगाडींतून बाहेर उतरणें.

Detriment ( det'-ri-ment ) [ O. Fr. *detriment*–L. *detrimentum*–L. *detritus*–L. *deterere*–L. *de*, off & *terere*, *tritum*, to rub. ] *n. mischief, loss* नुकसान *n*, नुकसानी *f*, तोटा *m*, हानि *f*, खराबी *f*, धक्का *m*, क्षति *f*, अपकार *m*. D. *v. t.* ( *archaic* ) *to do injury to, to hurt* इजा *f*- नुकसान *n*- हानि *f.* करणें. Det'riment'al *a. injurious, hurtful* अपकाराचा, अवगुणकारी, अपकार करणारा, अपकारक, अपकारी, क्षतिकारक, हानिकारक.

Detritus ( de-trī'-tus ) [ L. *de*, off & *terere*, *tritum*, *to rub.* ] *n. a mass of substances worn off from solid bodies by attrition and reduced to small portions* घनपदार्थ घांसून पडलेला चुरा *m*. ( For large portions, the word Debris is used. ) Detri'tal *a.* घांसून पडलेल्या चुराशासंबंधीं. Detriti'on *n.* घस *f*, तूट *f.*

Detrude ( de-trōōd' ) [ L. *detrudere*–L. *de*, down & *trudere*, to thrust.] *v. t. to push down with force* (जोरानें खालीं किंवा बाहेर) लोटणें-ढकलणें-रेटणें. Detru'sion *n.* अधःक्षेप *m*. २ *med.* एका ठिकाणाहून भलत्याच ठिकाणीं जाणें, विमार्गगमन *n*.

Detruncate ( de-trun'-kāt ) [ L. *de*, off & *truncare*, to cut off.] *v. t. to cut off, to lop off* शेंडा *m*-डोकें कापणें-छाटणें-कापून टाकणें. Detruncā'tion *n.* कापणें *n*, शेंडा-डोकें छाटणें *n*.

Deuce ( dūs ) [ O. Fr. *deus* (Fr. *deux* ), also *dous*, two–L. *duos*, acc. of *duo*, *two*.] *n.* खेळाच्या पत्त्यांतील

दुव्वा *m*, दुरी *f.* [Deuce-ace *n.* दुफाशी डावांत तिरफळ *n*, तिनकाणे *n.*] २ टेनिसांत एकाच खेळांत दोन्हीं भिडूंनीं तीन टोले मारिले असतां जे मार्क मोजतात ते किंवा "40 all."

Deuce (dūs) [Low Ger. *de duus*; the deuce Ger. *der daus*! Orig. an exclamation on throwing the *deuce*, or two at dice, as it was a losing throw.–O. Fr. *dous*, two (above).] *n.* (*vulg.*) *a devil, a demon* भूत *n*, पिशाच *n*, राक्षस *m.* (used only in exclamatory or interjectional phrases.) Deuced *a.* राक्षसी. २ अतिशय. Deucedly *adv.* अत्यंत.

Deuterogamy (dū'-tėr-og'-a-mi) [Gr. *deuteros*, second & *gamos*, marriage.] *n.* पहिल्या बायकोच्या किंवा नवऱ्याच्या मरणानंतर केलेला विवाह *m*, विधवा-विधुर-विवाह *m*, बिजवराचें लग्न *n*, पुनर्विवाह *m*, दुसरें लग्न *n*, द्वितीय संबंध *m*, द्वितीय विवाह *m.* Deuterog'amist *n.* बिजवर *m.* २ दुसरें लग्न करणारी स्त्री *f*, पुनर्भू *f.*

Deuteronomy (dū'-tėr-on'-o-mi) [Late L. *deuteronomium*–Gr. *deuteronomion*, a second or the repeated law–Gr. *deuteros*, second & *nomos*, law.] *n.* परमेश्वरानें मोझेजला दिलेल्या दहा आज्ञांचा अनुवाद असलेलें पेन्टेटूचचें पांचवें पुस्तक *n.* Deuteronom'ic,-al *a.* Deuteron'omist *n.* ड्युटरॉनमीचें किंवा अनुवादाचें पुस्तक लिहिणारा ग्रंथकार किंवा अशा ग्रंथकारांपैकीं एक.

Devaporation (de-vap-ō-rā'-shun) *n.* *the change of vapour into water* वाफेचें पाणी होणें *n*, विवाष्पीभवन *n.*

*N. B.*—In विवाष्पीभवन, वि signifies the reverse process.

Devastate (dev'-as-tāt) [L. *devastatus pa. p.* of *devastare*–L. *de* & *vastare*, to lay waste.] *v. t.* *to lay waste, to ravage* उध्वस्त-ओसाड-उजाड करणें, बेचिराख करणें, नासधूस *f*- धूळदशा *f*- धूळधाणी *f*- धूळधाण *f.* करणें. Devastā'tion *n.–act.* नासधूस *f*- नासाडी *f.* करणें *n.–state.* विध्वंस *m*, नासधूस *f*, नासधूळ *f*, वेराणी *f*, नासाडी *f.* २ *law.* मयताच्या जिंदगीची वहिवाटदारानें नासाडी करणें *n.* Dev'asta'ted *a.* नासधूस केलेला, उजाड. Dev'asta'ting *pr. p.*

Develop (de-vel'-op) [Fr. *developper*, to unfold; L. *de* & O. Fr. *voloper*, to envelop. Develop शब्दाचा मूळ अर्थ आच्छादन काढून टाकणें असा आहे. व ह्या मूळ अर्थापासून स्पष्ट करणें, प्रगट करणें, पूर्णतेस आणणें, व्यक्त करणें, उत्क्रांति करणें, वाढविणें, विस्तार करणें असे अर्थ आलेले आहेत.] *v. t.* *to unfold, to unravel* उघड-स्पष्ट करणें, उघडा-व्यक्त-प्रकट करणें. २ *to produce or give forth* (स्पष्ट रूपानें-दृश्य रूपानें) उत्पन्न करणें, पूर्णतेस आणणें, (ला) पूर्णत्व देणें. ३ *to form or expand by process of growth* (ची) वृद्धि *f*- वर्धन *n*- वाढ *f.* करणें, प्रगल्भ करणें, विकास करणें, फुलविणें, पूर्ण वाढ करणें, (ची) उत्क्रान्ति करणें, उद्भिन्न करणें. ४ *to advance, to further, to perfect, to make to increase, to promote the growth of* (ची) अभिवृद्धि *f.* करणें, (ला) पूर्णतेस आणणें, वाढविणें. ५ *to unfold gradually* (as a flower from a bud) फुलविणें, विकासवणें, (चा) विकास करणें. ६ *math.* *to change the form of* (as of an algebraic expression without changing the value) (चें) विस्तृतरूप करणें, (चा) विस्तार करणें; as, y=f(×)= A+B+Cx२+Dx३ +&c. ७ *photo.* *to cause to become visible* (as an invisible or latent image upon a plate) व्यक्त करणें, स्पष्ट करणें, व्यक्तीकरण-विकासन करणें, विकासित करणें. ८ खुलविणें; as, To D. a colour. D. *v. i.* *to grow into, to evolve* स्वाभाविकपणें पूर्णतेस येणें, वाढणें, वृद्धि होत जाणें, विकसणें, विकास पावणें, उत्क्रांतावस्थेत जाणें, उत्क्रांत होणें, क्रमशः वृद्धि पावून पूर्णतेस येणें, (ची) उत्क्रान्ति होणें, उत्क्रमणें, उद्भिन्न होणें. २ *to become apparent gradually* व्यक्त-स्पष्ट-विकसित होणें-होत जाणें. Devel'opable *a.* विकास करण्या-पावण्याजोगा, &c. Devel'oped *a.* संवर्धित, विकसित, उत्क्रांत, विस्तारित, व्यक्तीकृत,&c. Devel'oper *n.* (See the verb.) २ *photo.* व्यक्तीकरण *n* (=व्यक्तीकरण करणारें द्रव्य *n*), विकासक द्रव्य *n.* Devel'opment *n.* *the act of disclosing that which is unknown* व्यक्त-करणें *n*, व्यक्तीकरण *n.* २ *gradual growth of what is in the germ through a series of progressive changes* उत्क्रमण *n*, उत्क्रान्ति *f*, संवर्धन *n*, वाढ *f*, उत्तरोत्तर-वृद्धि *f*, उत्क्रान्तिपूर्वक वृद्धि *f.* [DOCTRINE OF DEVELOPMENT OR DEVELOPMENT THEORY; THE SAME AS THE DOCTRINE OF EVOLUTION OR ACCORDING TO DARWIN EVOLUTION THEORY. THE DEVELOPMENT THEORY OR HYPOTHESIS IS SIMPLY THE DOCTRINE OF EVOLUTION AS APPLIED ESPECIALLY TO THAT FORM OF THE DOCTRINE TAUGHT BY LAMARCK. SEE EVOLUTION.]. ३ *photo.* व्यक्तीकरण *n*, विकसन *n.* ४ *math.* विस्तार *m.* ५ (of a plot in a drama) वस्तु-विकास *m*, संवर्धन(?) *n*, विकास *m*, उद्भेद *m*, प्रकटीकरण *n*, प्रकट-स्पष्ट व्यक्त-उघड करणें *n.* ६ खुलविणें *n.* Devel'opmen'tal *a.* Devel'opmen'tally *adv.* To develop the colour रंग खुलविणें.

N. B.— *Develop* also spelt as *Develope.*

Devest (dē-vest') [From M. Fr. *desvestir*, to devest–L. *dis*, off & *vestire*, to clothe.] *v. t.* See Divest. २ *law.* *to take away* (as an authority, title, &c.), *to deprive, to alienate* (as an estate) सत्ता-अधिकार काढून घेणें, मालकीहक्क उडविणें-काढून घेणें.

Deviate (dē'-vi-āt) [L. *deviatus*–L. *de*, from & *via*, a way.] *v. i.* *lit & fig.* *to go out of the way, to go astray, or err* मार्ग सोडणें, आडमार्गास जाणें, गैर-आडमार्गास लागणें, आडवाटेंत-आडमार्गांत-आडरानांत जाणें-शिरणें, पाऊल *n.* or पावटा *m.* वांकडा टाकणें or with *g. of.s.* पडणें, चळणें, च्यवणें, चुकणें, सुलणें. D. *v. t.* (R.) *to cause to deviate* आडमार्गास लावणें, भुलवणें. De'viā'tion *n.* बहकणें *n*, च्युति *f*, मार्गच्युति *f*, च्यवन

*n.* २ *transgression, act of sin* अपथगमन *n*, कुपथगमन *n*, पापकृत्य *n*, व्यभिचार *m* (S). ३ *error, offence* अपराध *m*, भूल *f*, चूक *f*, गुन्हा *m*. ४ *com.* (नियमित आणि सामान्य) मार्गाबाहेर अवश्यकतेशिवाय जहाज जाणें *n*. अशा रीतीनें जहाज ठराविक मार्गाच्या बाहेर गेलें ह्मणजे विमेवाल्यावरची जबाबदारी उडते. [DEVIATION OF THE COMPASS जहाजावरच्या लोखंडाच्या आकर्षणानें ख बिंदूमधून जाणाऱ्या वर्तुळाशीं होकायंत्राच्या सुईनें केलेला कोन *m*, च्युतिकोन *m*. Devia'tor *n*. आडमार्गानें जाणारा. De'viatory *a.* (R.) च्युतिकारक.

Device (de-vīs') [O. E. *devys, devise*, will, intention, opinion, invention–Fr. *devis*, architect's plan & estimates–Late L. *divisum, divisa*, a division; also a judgment, device.] *n. that which is formed by design, scheme, project, stratagem* युक्ति *f*, उपाय *m*, शक्कल *f*, योजना *f*. २ *power of devising, invention, contrivance* कल्पकता *f*, करामत *f*, कल्पना *f* (S). ३ (*a*) *a picture of some kind, with a motto illustrative of a man's life or character borne by an individual rather than by a family* सरदारकीचें निदर्शक चिन्ह, बिरुद. पूर्वीं हें चिन्ह निशाण, ढाल, नोकरांचा पोषाक इत्यादिकांवर दाखवित असत व त्यावरून त्या सरदाराच्या पदवीचा, पराक्रमाचा किंवा महत्वाकांक्षेचा स्पष्ट बोध होत असे. (*b*) (improperly) *heraldic bearing* कुलचिन्ह *n*, घराण्याचें बिरुद *n*. ४ (*obs.*) *anything fancifully conceived* केवळ मनानें कांहींतरी केलेली कल्पना *f*. Devices डावपेंच *m*. [CROOKED D.s वांकडेतिकडे उपाय, कुटिल उपाय.] Device'ful *a.*

Devil (dev'-l) [A. S. *deoful, deofol*–L. *diabolus*–Gk. *diabolos*, the slanderer, the devil–Gk. *dia*, through, across & *ballein*, to throw. In Jewish & Christian Theology the Devil is the proper appellation of the supreme spirit of Evil, the tempter & the spiritual enemy of mankind, the foe of God & Holiness. He is represented as a person subordinate to the Creator but possessing superhuman powers of access to and influence over men. He is the leader or prince of wicked apostate angels & for him & for them everlasting fire is prepared. His other names are:–Beelzebub, Lucifer, Apollyon, the Prince of darkness, the Evil One, the Enemy of God & Man, the Arch-enemy, Arch-fiend, the Old Serpent, the Dragon; and in popular or rustic speech by many familiar terms as Old Nick, Old Simmie, Old Clootie, Old Teaser, the Old One, the Old lad, etc. (Murray.)] *n. the Satan* सैतान *m*, मानवजातीचा शत्रू *m*, मनुष्यास अधोगतीस नेणारा. २ *the false god or idol of the heathens* ख्रिस्तीमताप्रमाणें ख्रिस्तीतरांचा देव *m*. ३ *a malignant being of angelic or superhuman nature & powers, one of the host of Satan supposed to have its abode in hell, also one of the malignant or evil deities worshipped & feared by the heathen people, an evil spirit, a demon* पिशाच्च *n*, खविस *m*, भूत *n*, राक्षस *m*, समंध *m*, सैतानाचा अनुयायी. ४ *a human being of diabolical character or qualities, a malignantly wicked or cruel man, a fiend in human form* खवीस *m*, राक्षस *m*, अतिदुष्ट मनुष्य *m*, सैतान *m*. ५ *an expletive of surprise, vexation or emphasis or ironically of negation, & this is rendered into Marathi by the expletives used in a vulgar language*; as, शिंचा, शिंदळीचा, भांचोद. ६ (*cookery*) हाडांसुद्धां भाजलेलें व अतिशय मसाला लावलेलें मांसखंड *n*. ७ (*manuf.*) चिंध्या-कापूस वगैरे फाडण्याचें-पिंजण्याचें यंत्र *n*. D. *v. t. to make like a devil* भूत बनविणें, पिशाच्च करणें. २ (*cookery*) पदार्थ तिखट-जहाल-जलाल करणें. Devil in the bush बागेंत होणारें पुष्पविशेष. Devil-bird, Devil-diver *n*. पाणपक्षी *m*. Devil'dom *n*. Devil'ess *a. fem.* जखीण *f*, हडळ *f*, लांव, लांवसट, विवशी, डंखीण, अळवंत. Devilet, Dev'iling, Devil'kin *n*. लहान भूत *n*, भुतारें (R.) Devil-fish *n*. करालमत्स्य, हा दिसण्यांत फार भ्यासूर असतो. Dev'ilish *a.* राक्षसी, पिशाच्चसंबंधी. Dev'ilism *n*. Devil-may care अविचारी, साहसी, धाडसी. Dev'ilment *n*. Devil on the neck यातनायंत्र *n*, या लोखंडी यंत्रांत मनुष्याचे पाय व मान एकत्र आंवळलीं जात असत. Dev'ilry, Dev'ilship *n*. सैतानाच्या मदतीनें केलेलें चेटूक *n*, मंत्रप्रयोग *m*, जारणमारणकला *f*. २ सैतानाचें काम *n*. ३ सैतानी कृत्य *n*, सैतानी क्रूरपणा *m*. ४ (humourously) अत्यंत धाडशी स्वभाव, एखाद्या कामांत अत्यंत धाडसानें उडी टाकणें. ५ पिशाच्चसमुदाय *m*, पिशाच्च-कोटि *f*. Devil-worship *n*. पिशाच्चपूजा *f*. Devil a bit अगदीं न, मुळींच न. Devil's Advocate रोमन काथोलिक पंथांत एखादा महंत मेला असतां त्यास साधुमालिकेंत गोंवण्यापूर्वीं त्याच्या वर्तनांतील गुणदोषांची चर्चा पोपापुढें होत असते, व त्या चर्चेंत मृत महंताचे दोष दाखविणारा एक अधिकारी नेमलेला असतो त्यास हें नांव आहे. Devil's bit त्वग्रोग, लावसट, खाद. Devil's books पत्ते, गंजिफा. Devil's coach-horse *n*. मोठी व काळ्या रंगाची पाकोळी *f*. Devil's dozen तेरा. Devil's-dung *n*. हिंग *m*. Devil's dust *n*. 'डेविल' नांवाच्या यंत्रानें पिंजलेल्या चिंध्यांचे किंवा कापसाचे तंतु. Devil's own इ. स. १८०९–१४ मध्यें चाललेल्या पेनिनसुलर लढाईंत जनरल पिक्टन यानें ८८ व्या पायदळ पलटणीची मर्दुमकी पाहून त्या पलटणीला दिलेलें नांव *n*. २ *Inns of court* च्या स्वयंसेवकांनाही हें नांव देतात. Devil's snuff-box *n*. एक जातीची पावसाळ्यांत उगवणारी छत्री *f*, आळंबें *n*. Devil's-tattoo हातानें किंवा पायानें जमीन इत्यादिकावर तबल्या प्रमाणें वाजविणें. Devil-to-pay पुढें येणारें मोठें संकट *n*, आगामी अरिष्ट *n*. ह्या ह्मणींत Devil या शब्दाचा अर्थ नांवेच्या तळाच्या फळ्यांमधील कळाशी असा आहे व pay या शब्दाचा अर्थ राळेचें लुकण करून सांधे बुजविणें

असा आहे. Blue-devil See under Blue. Cartesian Devil पदार्थांचें विशिष्टगुरुत्व दाखविणारी कांचेची बाहुली *f.* Tasmanian Devil एक तऱ्हेचा मांसभक्षक व आपलें पोर सतत आपल्या आंगावर बाळगणारा प्राणी *m.* To play the devil with रसातळास पोहोंचविणें, सत्यानास करणें. Printer's Devil छापखान्यांतील कामशिकाऊ पोऱ्या *m.* हा शाईचे रूळ धुणें, झाडलोट करणें, वगैरे हलकीं कामें करतो. ह्याच्या आंगांत फाटके तुटके कपडे असतात व त्यांना शाई व इतर घाण लागून ते मळकट झालेले असतात. म्हणून त्याला Devil असें म्हणतात. Between the devil and the deep sea एकीकडे आड व एकीकडे विहीर अशा स्थितींत, पेंचांत. As the Devil loves holy water (भुताला जसें तीर्थ आवडतें तसें म्हणजे) अगदीं न, मुळींच नाहीं. Devil rides on a fiddle stick क्षुल्लक गोष्टीस अतिशय महत्व देणें. Cheating the devil भुतास ठकविणें, प्रतिज्ञेंतून युक्तीनें निसटून जाणें, आपलें वचन पाळून दुसऱ्यास फसविणें. Give the devil his due अतिशय दुष्ट मनुष्याच्या देखील गुणांचें चीज केलेंच पाहिजे. Gone to the devil रसातळास-भयाभंगास पोंचला आहे, (ची) वाताहात झाली आहे. Devil's bones फांसे (खेळण्याचे). हे हाडाचे केलेले असतात व त्यांपासून (जुगारानें) खेळणाराचा नाश होतो ह्मणून त्यास हें नांव पडलें आहे. Devil's current बास्फरस समुद्राच्या एका प्रवाहाला त्याच्या अत्यंत वेगामुळें हें नांव पडलें आहे. Devil's daughter's portion डील, डोव्हर व हारिच या बंदरांत नवख्या खलाश्यांना व प्रवाश्यांना नागवीत यामुळें त्यांतील बंदरास सैतानाच्या मुलीचें आंदण गांव असें ह्मणण्याची रूढि पडली होती. Devil's luck *n.* विलक्षण सद्दी. अशा सद्दीच्या लोकांना भूत सहाय्य आहे असें जुन्या काळचे लोक मानित. Devil's mass वारंवार शपथा घेणें. To say the devil's pater-noster देवास दोष देणें-बोल लावणें. Talk of the Devil & he is sure to come नांव काढल्याबरोबर दत्त ह्मणून उभा, एकदम दत्त ह्मणून उभा. To hold a candle to the devil भयामुळें दुष्टास देखील साहाय करणें. To kindle a fire to the devil पुण्याच्या भ्रमानें पापाचरण करणें. When the devil is blind कधींही न.

**Devise** (de-vīz') [Fr. *deviser*, to distribute, to regulate–L. *dividere* (*divisum*), to divide. Devise formerly included the notion of to construe, to frame, to fashion, now it expresses only the mental process of inventing or contriving.] *v. t. to formulate by thought, to contrive, to invent, to plan, to scheme* कल्पिणें, योजना *f.* रचना *f.* करणें, नवीन शोध *m.* लावणें; as, To D. an engine. २ *to plan or scheme for, to purpose to obtain* (संपादनार्थ) युक्ति *f.* बेत *m.* योजणें, प्रयत्न *m.*-खटपट *f.* करणें. ३ *law. to give by will* (स्थावर जिंदगी) मृत्युपत्रानें देणें, पूर्वीं हा शब्द जंगम मिळकतीलाही लावीत असत. D. *v. i. to form a scheme, to lay a plan, to contrive, to consider* युक्ति काढणें, बेत ठरविणें, विचार करणें. D. *n.* मृत्युपत्रानें स्थावर मिळकत देणें *n.* २ स्थावर मिळकतीचें मृत्युपत्र *n*, किंवा अशा मृत्युपत्रांतील असें कलम कीं ज्याच्या योगानें स्थावर मिळकत दिलेली असते. मिळकत देणारें कलम *n.* ३ मृत्युपत्रद्वारा दिलेली मिळकत *f.* Devi'sable *a.* कल्पना करण्याजोगा, कल्पनीय, कल्प्य. २ मृत्युपत्रानें देण्यासारखी. Devis'al *n.* Dev'isee *n. law.* मृत्युपत्रांत ज्याचे नांवानें मालमत्ता दिलेली असते तो. Devi'ser *n.* कल्पक, शोधक, उपायज्ञ. Devi'sing *pr. p.* Devi'sor *n. law.* मृत्युपत्रानें देणारा, मृत्युपत्र करणारा.

**Devoid** (de-void') [M. E. *devoid* (through *devoiden*, *devoiden*, to empty)—O. Fr. *desvuidier*, *desvoidier* from *des* (L. *dis*) & *voidier*, to empty.] *a.* (*obs.*) *void, empty, vacant* रिकामा, फुकट, पोकळ, रिता, रिक्त. २ *destitute, not in possession* (with *of*) रहित, शून्य, हीन. D. *v. t. to empty out, to remove* रिता-रिकामा-रिक्त करणें, खाली करणें (*colloq.*)

**Devoir** (dev-wawr') [M. E. *devoir*,–M. Fr. *devoir*–O. Fr. *deveir*, to owe; used as a noun–L. *debere*, to owe.] *n. duty* कर्तव्यकर्म *n.* २ *due act of civility or respect* (now usually in the *pl.*) मान *m*, सन्मान *m*, आदरकर्म *n*, सत्कार *m*, मुजरा *m*, सलाम *m*; as, "They paid their devoirs to the ladies."

**Devolution** (dev'-ōl-ū'-shun) [Cf. Fr. *devolution*.] *n. the act of rolling down* घरंगळत जाणें *n*, कलंडत जाणें *n*, प्रक्रांति *f.* २ *a passing from one person to another* एकाच्या ताब्यांतून दुसऱ्याच्या ताब्यांत जाणें *n.* अनुयायास-खालील अधिकाऱ्यास-वारसास मिळणें *n*, अनुक्रमागतप्राप्ति.

**Devolve** (de-volv') [L. *de*, down & *volvere*, to roll.] *v. t. to transfer from one person to another, to deliver over, to hand down* (generally with *upon*, sometimes with *to* or *into*) सोंपविणें, निरविणें, (च्या) हवालीं-स्वाधीन करणें, (कडे) देणें; as, "They devolved their whole authority into the hands of the council of sixty." २ *to roll onward or forward, to pass on* ढकलणें, लोटणें, कलंडवणें, घरंगळवणें. D. *v. i. to pass by transmission or succession, to be handed over or down* (generally with *on*, *upon*, sometimes with *to* or *into*) आंगावर-माझ्यावर-कडे पडणें-येणें. Devolve'ment *n.* आंगावर पडणें *n.*

**Devonport** (dev'-on-pōrt) *n.* लिहिण्याचें नक्षिदार मेज *n.* याला खण असतात.

**Devote** (de-vōt') [L. *devotus*. *p. p.* of *devovere*, to devote or vow fully–L. *de*, away & *vovere*, to vow.] *v. t. to set apart or to dedicate by a solemn act, to consecrate, to consign over* वाहणें, समर्पणें, अर्पिणें, अर्पण-समर्पण करणें, स्वाधीन करणें, नेमणें, लावणें. २

*to doom* तोडणें, देणें, (पवित्र म्हणून) राखून ठेवणें. ३ *to doom to evil* (नाश व्हावा म्हणून) हवालीं करणें-सोडून देणें; as, "The city was devoted to the flames." ४ *to give up wholly, to direct the attention of wholly or chiefly, to attach, to addict* (often with a reflexive pronoun.) वाहून घेणें, व्यसन लावून घेणें. Devo'ted *a.* वाहिलेला, नवसलेला, अर्पित, समर्पित. २ *strongly attached, zealous* भजनीं लागलेला, अनुरक्त, आसक्त, निरत, तत्पर (S), परायण; as, ईश्वरपरायण. Devo'tedly *adv.* Devo'tedness *n.* समर्पण *n*, अनुरक्तता *f.* २ भक्ति *f*, आसक्ति *f*, परायणता *f*, उपासकता *f.* Dev'otee *n.* वाहून घेतलेला मनुष्य *m*, भक्त *m*, भगत *m*, कट्टा उपासक *m*. Devote'ment *n.* (R.) परायणता *f*, आसक्तता *f*, समर्पितत्व *n*. Devo'tion *n. consecration* नवसणें *n*, वाहणें *n*, समर्पण *n*, उत्सर्ग (S) *m*. २ *the state of being devoted* अर्पितत्व *n*, समर्पितत्व *n*. ३ *ardent love, devoutness* बळकट प्रेम *n*, अनुराग *m*, भक्ति *f*, आसक्ति *f*, परायणता *f.* ४ *act of worship, prayer* भजन *n* (S.), पूजा *f*, अर्चा *f*, प्रार्थना *f*, आराधना *f*, उपासना *f.* [MORNING D.s संध्या *f.*] ५ (*obs.*) *power of disposal* सत्ता *f*, व्यवस्था *f.* ६ (R.) *an object of devotion* ज्याची पूजा करावयाची तो, आराध्य, उपास्य, विभूति. [HOLLOW AND INTERESTED D. सकामभक्ति *f*, मतलबी भक्ति *f.*] Devo'tional *a.* भक्ति-भजनविषयींचा, भजनाकडचा, भजना संबंधीं-विषयक, भजनाचे उपयोगाचा, भक्तिपूर्वक; as, A D. frame of mind. Devo'tionalist, Devo'tionist *n.* देवनादी, देवपिसा मनुष्य, भजन्या, टाळकुट्या, (*colloq.*) दिवसभर नाक धरून बसणारा. Devo'tionally *adv.*

Devour (de-vowr') [O. Fr. *devorer*—L. *devorare*, to consume—L. *de*, fully & *vorare*, to gulp down.] *v. t. to eat up with greediness, to feast upon like a wild beast or glutton, to prey upon* आधाशीपणानें खाणें, आगधाडीनें खाणें, बकाबक खाणें, खाऊन टाकणें, खाऊन चट करणें,-वर ताव-हात मारणें. (*colloq.*) [TO BE READY TO D. (वक्रदिनी खाण्याकरितां) आ वासून-टाळा पसरून बसणें.] २ *to seize upon and destroy or appropriate greedily, to consume, annihilate* धाड घालणें, हावरेपणानें घेणें, फडशा-फन्ना-सप्पा उडविणें, फन्ना-फस्त-पार करणें, गट्ट करणें, गिळंकृत करणें, निसतान करणें. ३ *to enjoy with avidity* मनसोक्त-आधाशीपणानें-सोसानें-हावरेपणानें विषयांचा (S) उपभोग घेणें. ४ *to gaze intently on* सहेतुक दृष्टीनें पाहणें-डोळे भरून पाहणें. Devour'able *a.* खाण्याजोगा, &c. Devour'er *n.* खाऊन टाकणारा, &c., खादक. Devour'ing *a.* Devour'ingly *adv.* Devour'ment *n.* खाणें *n.*

Devout (de-vowt') [M. E. *devot*, (*devoute*)—O. Fr. *devot*—L. *devotus*, devoted.] *a. devoted to religion, and religious exercises and thoughts, pious, reverent* धर्मशील, धर्मपरायण, भाविक, कर्मशील, पारमार्थिक, भक्तिमान्, भक्तिपरायण, भक्तिप्रवण, भक्तिनम्र. २ *expressing devotion or piety* भक्तिपूर्ण, भक्तिदर्शक, श्रद्धान्वित. ३ *warmly devoted, hearty, sincere, earnest* शुद्ध अंतःकरणाचा, शुद्ध भक्तीचा, भक्तिपूर्ण, कळकळीचा, भाविक, खऱ्या अंतःकरणाचा, कळवळयाचा, खरा, मनापासूनचा, बेंबीच्या देठापासूनचा. Devout'ly *adv.* भक्तिभावानें, भक्तीनें, भक्तिपूर्वक. Devout'ness *n.* भाविकता *f*, पारमार्थिकता *f*, भक्ति *f.*

Dew (dū) [M. E. *deu*, *dew*, dew cf. Sk. धाव्, to flow.] *n.* दंव *n*, दहिंवर *n*. २ (*fig.*) *anything which falls lightly and in a refreshing manner* ताजातवाना-टवटवीत करणारा पदार्थ *m*, ताजातवाना करणारें कारण *n*, गारवा *m* (*fig*); as, "The golden D. of sleep." ३ *an emblem of morning* उदय *m*, अरुणोदय *m*, टवटवी *f*, पालवी *f*; as, "The D. of his youth." ४ *an emblem of fresh vigour* तरतरीचें चिन्ह *n*, उत्साहचिन्ह *n*. D. *v. t. to wet with dew or as with dew, to be bedewed, to moisten* दंवानें ओलें करणें, ओलवणें. Dew-berry *n. the fruit of certain species of bramble found in England or America* ड्युबेरी नांवाचें झाड *n*. २ अशा झाडाचें फळ *n*. Dew-claw *n. a rudimentary inner toe of a dog's hind-foot* कुत्र्याच्या मागील पायाचा पहिला अंगठा *m*. Dew-drop *n.* दवाचा थेंब *m*, तुषारबिंदु *m*, दंवकण *m*. Dew-fall *n.* दंव पडणें *n*, दंवाचें पतन *n*. २ दंवपतनाची वेळ *f.* Dewi'ness *n* दंवानें ओली झालेली स्थिति *f*, तुषारमयता *f.* Dew-lap *n. the pendulous skin under the neck of an ox which laps or licks the dew in grazing* बैलाचें पोळें *n*. २ *the flesh upon the human throat especially when placid with age* (म्हातारे मनुष्याचे) गळ्यापासून लोंबणारी कातडी किंवा मांस *n*. गलकम्बल *n*. Dew'less *a.* दंवरहित. Dew-point *n.* दंव बनण्यास लागणारे उष्णमानांश *n*, दंहिवराचें उष्णमान *n*, दंवबिंदु *m*, दंवावधि *m*. Dew-retting *n.* दंव आणि उन्ह यांच्या योगानें ताग किंवा वाख याची साल कुजवून आंतील धागे निराळे करण्याची रीत *f.* Dew-worm *n. a kind of earth worm* गांडूळ *n* Dew'y *a.* दंवाचा-दहिंवराचा, तुषारमय, तुषारवत्, दंवानें ओला, तुषाराक्त. २ दंवासारखा हळूहळू पडणारा. ३ उत्साहदायक. ४ तुषारसदृश, तुषारासारखा. Mountain dew (*slang.*) व्हिस्की दारू *f.*

Dewan (dē-wan') [Hind.] *n.* दिवाण *m*, (संस्थानांतील किंवा घरांतील मुख्य कारभाऱ्याला हा शब्द लावतात.) Dewani, Dewanny *n.* दिवाणी *f*, दिवाणाची-दिवाण कचेरी *f.* २ दिवाणाचा हुद्दा *m*.

Dewlap (dū'-lap) [Dew + A. S. *læppa*, a loose hanging piece.] *n.* See the word Dew.

Dexter (dek'-stėr) [L. *dexter*, on the right hand or right side, *cf.* Gr. *dexiteros*, Sk. दक्षिण, right.] *a. belonging to or situated on the right hand or side, right* उजव्या हाताकडचा, उजव्या बाजूकडचा, उजवा, दक्षिण (S.). २ (*fig.*) सरळ, उजू, दुष्टताशून्य

as, "Motives sinister are opposed to motives dexter." ३ (*Hera.*) *on the right hand side of a shield, i. e. towards the right hand of its bearer* ढालेच्या उजव्या बाजूस. [DEXTER CHIEF OR DEXTER POINT दक्षिणोर्ध्वकोन *m*, ढालेच्या उजव्या बाजूचा-वरच्या बाजूचा कोपरा *m*. DEXTER BASE ढालेच्या उजव्या बाजूचा खालचा कोंपरा *m*, दक्षिणाधःकोन *m*.] ४ (R.) *right, straight forward, fair* सरळ, विनलवाडीचा, निष्कपट. D. *n.* उजवीबाजू *f.* D. *adv. on the right side, to the right* उजव्या बाजूकडे. Dexter'ity *n. manual skill, adroitness, neat-handedness; hence address in the use of the limbs and in bodily movements generally* हस्तकौशल्य *n*, हस्तनैपुण्य *n*, चलाखी *f*, शिताफी *f*, सफाई *f.* २ *mental adroitness or skill, readiness of expedient, quickness of contrivance, skill of management, cleverness, address, ready tact* चतुराई *f*, चातुर्य *n*, शहाणपणा *m*. ३ *sharpness, cleverness in taking an advantage, (used in a bad sense,)* हातचलाखी *f.* ३ (*lit.*) *right-handedness, the using of the right hand in preference to the left* उजखुरेपणा(?) *m*. Dex'terous *a. deft or nimble of hand, ready and expert in the use of the body and limbs, handy, ready* चपळ, चलाख, तरतरीत, हाताचा कुशल, उजवा हात (as, त्या कामांत त्याचा उजवा हात आहे. ) करदक्ष, हातवळलेला, हातखंडा ( तो त्या कामांत हातखंडा आहे.) २ *skillful or expert in contrivance or management, quick at inventing expedients, expert* युक्तिवान्-बाज, हिकमत्या, चतुर, कसबी. ३ (of things) *done with dexterity, skillful, artful* चतुराईनें-सफाईनें-शिताफीनें-कुशलतेनें केलेला. ४ *right-handed* उजखुरा. Dex'terously *adv.* सुगराईनें, कौशल्यानें. Dex'terous'ness *n.* Dex'tral *a. right* (as opposed to left) उजवा, दक्षिण, सव्य. [D. CONCH उजवा शंख *m*.] Dex'tral'ity *n. right-handedness* डाव्या हातापेक्षां उजवा हात जास्त वापरण्याची संवय *f*, उजखुरेपणा *m*. Dex'trally *adv.* उजवीकडे. Dex'trogyrate *a.* ध्रुवीकरणाची पातळी उजव्या हाताकडे फिरविणारे. Dex'trose, Dex'trorsal *a. bot* अपसव्य, दक्षिणालिंगनी, उजवेकडचा, दक्षिणगामी, दक्षिणमार्गी, उजवीकडचा.

Dextrine ( dek'-strin ) [ L. *dexter*, right. ] *n. a soluble gummy substance obtained from starch, so named from its turning the plane of polarization to the right hand* ज्यापासून साखर उत्पन्न होते असा रासायनिक पदार्थ *m*, एकाप्रकारचा चिकट डिंकासारखा पदार्थ *m*, मधुरसा ( coined ), सिंद्रक *m*.

*N. B.*:—If starch be exposed to heat for a prolonged period, it is converted into a solid gummy substance called Dextrine or British gum.

*N. B.* सिंद्रक हा गंधकाम्लाच्या पाण्यामध्यें घालून कांहीं वेळ पर्यंत उष्ण केला ह्मणजे त्याची साखर बनते. ३ भाग गव्हांचें सत्व, १२ भाग पाणी, आणि एक भाग गंधकाम्ल, हीं एकत्र करून कढवावीं ह्मणजे त्या सत्वाचा हळूहळू सिंद्रक बनतो, तो कांहीं तास पर्यंत कढल्यानें त्याची द्राक्षशर्करा बनते. ह्या द्रवांतील आम्ल न्यूट्लाईज ( अव्यापारक, निष्क्रिय ) करण्यासाठीं त्यांत खडूचें चूर्ण घालावें ह्मणजे सल्फेट आफ् लाईमचा सांका बनतो. त्यापासून तो द्रव गाळून वेगळा काढावा. मग त्यांत प्राणिज कोळसा शुद्धीकरणार्थ घालून कढवून आटवावा; आणि पुनः गाळून स्फटिकीकरणास ठेवावा. त्यांत जे स्फटिक बनतात ते द्राक्षशर्करेचे होत.

Dextrose ( deks'-trō-j ) [ L. *dexter*, right. ] *n. grape sugar* द्राक्षशर्करा *f.*

Dextroversion ( dex'-trō-vėr-shun ) *n.* उजवे बाजूकडे वळविलेलें असणें *n*. [ D. OF THE UTERUS गर्भाशयाचें बूड उजवेबाजूस वळलेलें असणें-वळणें,दक्षिणनमन *n*, गर्भाशय-सव्येतरनमन *n*. ]

Dhobie ( dhō-bi ) [ Hind. ] *n.* परीट *m*, धोबी *m*.

Diabetes ( dī'-a-bē'-tēz ) [ Gk. *diabutus*,–L. *diabetes*, a pair of compasses, a siphon, diabetes–Gr. *diabainein*, to stand with the legs apart–Gr. *dia*, apart & *bainein*, to go. ] *n. a disease which is attended with a persistent, excessive discharge of urine* मधुमेह *m*, इक्षुमेह *m*. या रोगांत शरीरांतील सर्व साखर लघ्वींतून जाते, त्यामुळें लघ्वीचें प्रमाण वाढतें व ती गोड होते. Same as Diabetes Mellitus. Diabetes Insipidus बहुमूत्र, बहुमूत्रमेह *m*, उदकमेह *m*, मूत्रातिसार *m*. मूतसागर *m*. ह्या रोगांत फक्त लघ्वीचें प्रमाण वाढतें, परंतु तींतून साखर जात नाहीं. यास सोमरोग असेंही म्हणतात. Di'abet'ic,-al. *a.* मधुमेहासंबंधीं. २ मधुमेह असलेला, मधुमेहाचा (रोगी).

Diablerie, Diablery ( dī-ab'-lėr-i ) [ F. *diablerie*–Fr. *diable*, devil—L. *diabolus*, devil. ] *n. business connected with the devil, or in which the devil is employed or has a hand, wild recklessness, devilry* सैतानी कृत्य *n*, अत्यंत दुष्ट कृत्य *n*, ( सैतानास शोभणारें ) भयंकर कृत्य *n*. २ *sorcery or conjuring in which the devil is supposed to assist* चेटुक *n*, जादुटोणा *m*. ३ *that part of mythology which has to do with the devil or devils; devil-lore* पिशाच्चविद्या *f*, पुराणांतील पिशाच्चवर्णनाचा भाग *m*. ४ *the realm, world or assemblage of devils* पिशाच्चांचें राज्य *n*.

Diabolic,-al ( dī'-a-bol'-ik,-al ) [ Gr. *diabolos*, the devil. ] *a. pertaining to the devil* सैतानाचा. २ *resembling or appropriate to the devil* सैतानास शोभणारा. ३ *pertaining to witchcraft or magic as attributed to satanic influence* जादुविद्येसंबंधीं, चेटकविद्येसंबंधीं, जारणमारणउच्चाटनासंबंधीं. ४ *atrocious, outrageously wicked, inhumanly wicked* दुष्ट, वाईट, घोरपापाचा, अतिदुष्ट, अपवित्र, सैतानी, राक्षसी, अघोरी, अंगावर शहारे आणण्याजोगा, दारुण. Di'abol'ically *adv.* Di'abolize *v. t.* ( R. ) दुष्ट करणें, सैतानी-अघोर स्वरूप देणें. Diab'olism *n.* अतिदुष्ट

वर्तणूक *f*, सैतानी कृत्य *n*, सैतानी स्वभाव *m*- पणा *m*. २ *possession by the devil* भूत-पिशाच्चबाधा *f*. ३ *sorcery* जादू *f*, चेटक *n*. ४ *doctrine or system of opinions as to devils* पिशाच्चविद्या *f*. Diabolist *n*. जारण -मारणविषयींत प्रवीण. Diabol'ogy *n*. पिशाच्चविद्या *f*.

Diacaustic (dī-a-kaws'-tik.) [L. *dia* & Caustic.] *a*. (opposed to Catacaustic) *pertaining to or possessing the properties of a species of caustic curves formed by refraction* वक्रीभूत किरणांच्या संगमानें झालेला, दाहकवक्रधर्मी. Diacaus'tic *n*. वक्रीभूत किरणांच्या संगमानें झालेला वक्र *m*, दाहकवक्र *m*.

Diacid (dī-acid) [Pref. *di twice* + acid.] *a*. *divalent*:- said of a base or radical as capable of saturating two acid monad radicals or a dibasic acid द्व्यम्ल.

Diaconal (dī-ak'-aw-nal) [L. *diaconalis.*] *a*. *pertaining to a deacon* डीकनासंबंधीं.

Diaconate (dī-akaw-nāt) [L. *diaconatus.*] *n*. डिकनी *f*, डिकनचा हुद्दा *m*- अधिकार *m*- पदवी *f*. २ डिकनची कारकीर्द *f*. ३ *a body of deacons* डीकनांचें मंडळ *n*.

Diacoustics (dī'-a-kaws'-tiks) [See Diacaustic.] *n*. ध्वनिविद्या *f*.

Diacritic,-al (dī'-a-krit'-ik-al) [Gr. *dia*, through & *kritein*, to separate.] *a*. *used to distinguish letters of similar form or different sounds of the same letter* (एकाच अक्षराचे) निरनिराळे उच्चार दाखविणारी (खूण *f*.), ध्वनिभेददर्शक, उच्चारभेददर्शक; as, ā, ă, ä, ō, &c. Diacrit'ic *n*. ध्वनिभेदकचिन्ह *n*.

Diadelphous, Diadelphian (dī-a-del'-fus) (dī'-a-del'-fi-an) [Gr. *dia*, two & *adelphos*, a brother.] *a*. *bot*. (of stamens) *united by the filaments so as to form two bundles*) द्विगुच्छ (पुंकेसर). (ex. आगस्ता, वाटाणा, पांगारा वगैरे) Diadel'phia *n*. *pl*.

Diadem (dī'-a-dem) [Fr. *diademe*-L. *diadema*-Gk. *diaduma*, a fillet-apart. & *dew*, I bind. Cf. Sk. दा, to bind. Now the use of this word is chiefly poetic and rhetorical.] *n*. *a badge of royalty, a crown* चक्रवर्ति मुकुट *m*- किरीट *m*, सार्वभौमराजाचा-चक्रवर्ति राजाचा मुकुट *m*. २ *fig*. *regal power, sovereignty* चक्रवर्तित्व *n*, सार्वभौमराजसत्ता *f*, बादशाही *f*. ३ (*heraldry*) (मुकुटाच्या कोरेवरून निघणाऱ्या समोरासमोरच्या दोन उभ्या) नक्षीदार रेषांची कमान *f*. D. *v*. *t*. मुकुट घालणें, मुकुटमंडित-भूषित करणें. Di'ademed *a*. मुकुट घातलेला, मुकुटमंडित. Diadem-spider *n*. बागेंतील कोळी *m*. Gem or jewel of a diadem मुकुटमणि *m*.

Diæresis (dī-ē'-re-sis) [L. *diæresis*-Gr. *diairesis*, a dividing.] *n*. *gram*. *separation as of one syllable into two* पदविभेद *m*. २ *the mark* (¨) *placed over the latter of two vowels to show they are to be pronounced separately* लगत असणाऱ्या दोन स्वरांचा उच्चार वेगवेगळा करावयाचा असें दाखविण्याकरितां दुसऱ्या स्वरावर केलेली खूण *f*, पृथगुच्चारदर्शक बिंदु *m*, पृथगुच्चारबिंदु *m*, असंधि-स्वरविच्छेददर्शक (चिन्ह *n*;) as, Coöperāte, aërial. ३ जखमेची कातडी व तिच्या खालील भाग फाटणें, कापले जाणें.

Diagnosis (dī-ag-nō'-sis) [Gr. *dia*, between & *gnosis*, *gnonai*, to know.] *n*. *med*. निदान *n*, रोगपरीक्षा *f*. २ *scientific determination* निदान *n*, शास्त्रानुसार निश्चय *m*, शास्त्रीय निर्णय *m*. ३ *critical perception or scrutiny* सूक्ष्मपरीक्षा *f*, सूक्ष्मपरीक्षेनें केलेला निकाल *m*, बारीक तपास *m*. ४ *concise description of a species* विशेषलक्षणवर्णन *n*, मुख्यमुख्यलक्षणांचें वर्णन *n*. [DIFFERENTIAL D. *med*. भेदकारीचिकित्सा *f*.] Diagnoses *n*. *pl*. Di'agnose *v*. *t*. लक्षणांवरून रोगाची परीक्षा करणें, रोगनिदान करणें. Di'agnos'tic *a*. रोगलक्षणदर्शक-सूचक. D. *n*. रोगाचें विशेष लक्षण *n*- चिन्ह *n*. Di'agnos'tics *n*. *pl*. रोगलक्षणज्ञान-विद्या *f*, निदान प्रकरण *n*. Diagnos'ticate *v*. *t*. रोगनिदान *n*. करणें, रोगाचें लक्षण बांधणें.

Diagometer (dī-a-gom'-ē-tėr) [Gr. *diagein*, to conduct & *metron*, a measure.] *n*. *a sort of electroscope invented by Rousseau in which the dry pile is employed to measure the amount of electricity transmitted by different bodies or to determine their conducting power* रुस्सोनें शोधून काढलेला विद्युद्दर्शक, रुस्सोचा विद्युद्दर्शक.

Diagonal (dī-ag'-o-nal) [Gr. *dia*, through & *gonia*, Sk. कोन, a corner.] *n*. कर्णरेषा *f*, *math*. कर्ण. [D. POINTS = कर्णबिंदु *m*. D. TRIANGLES = कर्णत्रिभुज्या *f*.] २ *a diagonal cloth, a kind of cloth having diagonal stripes, ridges, or welts made in the weaving* चौकोनी उतरत्यासळईचें कापड *n*. D. *a*. समोरासमोरचे कोन साधणारा, कर्णरेषेसारखा, कर्णाकृति. Diag'onally *adv*. कर्णरेषेनें, कर्णरेषेच्यादिशेनें, कोणाकोणि.

Diagram (dī'-a-gram) [Gr. *dia*, round & *graphein*, to write.] *n*. *a figure or drawing made to illustrate a statement or facilitate a demonstration, a plan* (समजूत देण्यासाठीं किंवा स्पष्टीकरणासाठीं काढलेली) आकृति *f*. २ *math*. परिलेख *m*. भङ्गि *f*. D. *v*. *t*. *to put into the form of a diagram* आकृति काढणें. Di'agrammat'ic *a*. आकृतीसंबंधी, &c. Di'agrammat'ically *adv*.

Dial (dī'-al) [M. E. *dial*-Med. L. *dialis*, relating to a day; hence a plate for showing the time of the day-L. *dies*, a day. The English word *dial* is presumed to be a derivation from, L. *dialis*, daily; *diale* = *diurnale*, meaning as much land as could be ploughed in a day.] *n*. *an instrument formerly much used for showing the time of day from the shadow of a style or gnomon on a graduated arc, a sun-dial* (वेळ दाखविण्याकरितां) छायायंत्र

n, छायायंत्र n. (R.), सूर्यघटी f. (obs.). २ *the graduated face of a time-piece or a clock* घड्याळाची तबकडी f. ३ (आंकडे घातलेली) तबकडी f. ४ *a miner's compass for underground surveying* खाणींत काम करणाऱ्याचें मोजणीचें यंत्र n. [THE MARINER'S SUNDIAL IS ESSENTIALLY THE SAME AS THE CIRCUMFERENTOR USED BY THE LANDSURVEYOR.]. D. *v. t.* छायायंत्रानें मोजणें. Di'alist *n. a maker of dials* छायायंत्र करणारा, &c. २ छायायंत्रवेत्ता, &c. Di'alling n. छायायंत्रज्ञान n, छायाविद्या f. Dial-plate n. छायावृत्त n. २ घड्याळाची तबकडी f. Style of a dial छायासूची f.

Dialect (dī'-a-lekt) [Fr. *dialecte*–L. *dialectus*–Gr. *dialektos*, discourse, language, dialect.] *n. the form of speech of a limited region or people, a variety or sub-division of a language* प्रांतिक भाषा f, पोटभाषा f, देशभाषा f, (विशेष प्रांताची) बोली f, विशेषवर्गाची भाषा f, भाषाप्रकार m. २ *language, tongue, form of speech* बोली f, भाषा f. Di'alectal *a.* पोटभाषेसंबंधीं, बोलीसंबंधीं. Dialec'tism n. पोटभाषेचा शब्दसंप्रदाय m, पोटभाषेपणा m. Dialectol'ogist n. पोटभाषेंत प्रवीण असलेला मनुष्य m, पोटभाषाभिज्ञ m. Dialectol'ogy n. पोटभाषांचा शास्त्रीय विचार m, पोटभाषाशास्त्र n. Di'lectici'an n.

Dialectic (dī'a-lek'-tik) [O. Fr. *dialectique*–L. *dialectica*–Gr. *dialektike*, the dialectic art, the art of discussion or debate. ल्याटिन भाषेंत *Dialectica* हें नपुंसकलिंगी अनेक वचन असल्यामुळें इंग्रजींत Dialectics असा बरेच वेळां अनेकवचनीही प्रयोग आढळतो.] n. (according to Socratis) प्रश्नोत्तरानें वादविवाद करून पदार्थांच्या जातींचें(ideas) यथार्थज्ञान मिळविण्याची पद्धति f. २ (according to Plato) (*a*) निरनिराळ्या जातींच्या पदार्थांचा यथार्थ बोध करून देणारी प्रश्नोत्तररूपी वादविवादपद्धति f. (*b*) पराविद्या f, ब्रम्हविद्या f, ब्रह्मज्ञान n, तत्वज्ञानाचा कळस (?) m, परमेष्ठीज्ञान n. ३ (according to Aristotle) प्रश्नोत्तररूपानें निश्चितकल्प किंवा सिद्धकल्प किंवा संभवात्मक किंवा probable ज्ञान मिळविण्याची पद्धति f. ४ (with the Stoics and down to the Middle Ages) न्यायशास्त्र n, तर्कशास्त्र n. ५ वादविवादकला f. ह्या तर्कशास्त्रांत किंवा न्यायशास्त्रांत तर्कांच्या किंवा अनुमानांच्या पद्धति व तीं बिनचुक काढण्याचे नियम सांगितलेले असतात. ६ (modern English) *the art of critical examination into the truth of an opinion, the investigation of truth by discussion* अतिसूक्ष्म विचारानें एखाद्या सिद्धांताची सत्यासत्यता स्थापित करण्याची कला f. ७ (in modern philosophy) (according to Kant) "*Specifically applied to the criticism which shows the mutually contradictory character of the principles of science, when they are employed to determine objects beyond the limits of experience i. e. the soul, the world, God* अज्ञेयमीमांसा f, अज्ञेयवाद m, आत्मा, ईश्वर आणि जग ह्या अतींद्रिय पदार्थांचें बुद्धीनें आकलन करीत असतानां उत्पन्न होणाऱ्या विरोधांचा विचार m. ८ (according to Hegel) who denies that such contradictions are ultimately irreconcilable the term is applied (a) *to the process of thought by which contradictions are seen to merge themselves in a higher truth that comprehends them* & (*b*) *to the world-process, which being in his view but the thought-process on its objective side developes similarly by a continuous unification of opposites.* (ह्यांट प्रमाणें) परस्परविरोधी कल्पनांची एकवाक्यता किंवा संबद्धता दाखविण्याची पद्धति f, विरोधाभासनिरसन n.

*N. B.—Dialectic* शब्दाचा मूळ अर्थ प्रश्नोत्तररूपानें वादविवाद करून सत्यासत्याचा निर्णय किंवा अनुमान किंवा तर्क करण्याची कला असा आहे. ही कला झेनो नांवाच्या ग्रीक तत्वज्ञानें प्रथम प्रचारांत आणिली व इचा साक्रेतिसानें अध्ययन व अध्यापन या दोन गोष्टींकरितां जन्मभर उपयोग केला. प्लेटोनें या कलेला शास्त्रीय स्वरूप दिलें. प्लेटोचे सर्व ग्रंथ या प्रश्नोत्तररूपी वादविवादपद्धतीनें लिहिलेले आहेत. प्लेटोनें Dialectic हा शब्द दोन अर्थी वापरिला आहे. निरनिराळ्या पदार्थांच्या जातींचा (ideas) यथार्थ बोध करून देणारी प्रश्नोत्तररूपी विचारपद्धति असा प्लेटोप्रमाणें D. चा एक अर्थ आहे व त्यानें आपल्या Republic नामक पुस्तकांत जें ज्ञानाचें वर्गीकरण केलें आहे, त्यांत Dialectic हा शब्द (१) पराविद्या, (२) ब्रह्मविद्या, (३) परमेष्ठिज्ञान, (४) तत्वज्ञानाचा कळस ? (५) ज्या विंचच्यायोगानें आपणांस इंद्रियगम्य विषयांपासून तों अतींद्रिय विषयांपर्यंत ज्ञान होतें, इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष ब्रह्म किंवा सच्चिदानंदाचें दर्शन होतें अशी विद्या (६) "येन विदितेन सकलं विदितं भवति" या वचनांत सांगितल्याप्रमाणें जी विद्या आली असतां सर्व विश्वाचें ज्ञान होतें ती विद्या, अशा अर्थी योजिला आहे. प्लेटोच्या नंतर आरिस्टॉटल यानें निश्चित किंवा सिद्ध अनुमानपद्धति ह्मणजे Demonstrative method of science व संभवात्मक किंवा सिद्धकल्प अनुमानपद्धति म्हणजे Probable method of reasoning असे दोन ज्ञानसिद्धीचे मार्ग कल्पिले आहेत व त्यांपैकीं दुसऱ्या मार्गाला किंवा पद्धतीला *Dialectic* हा शब्द त्यानें योजिला आहे. आरिस्टॉटलच्या मताप्रमाणें प्रश्नोत्तररूपी वादविवादानें मिळणारें ज्ञान पक्कें किंवा सिद्ध किंवा निश्चित असें नसतें म्हणून त्यास त्यानें *Dialectic* किंवा Probable reasoning किंवा सिद्धकल्प किंवा संभवात्मक अनुमानपद्धति असें म्हटलें आहे. स्टोइक पंथाच्या लोकांनीं अलंकारयुक्त वक्तृत्वशास्त्र व तर्कशास्त्र असे ग्रीक न्यायशास्त्राचे दोन भाग केलेले होते. परंतु स्टोइककालानंतर बरींच शतकें मध्ययुगीन कालापर्यंत *Dialectic* हा शब्द न्यायशास्त्राकरितांच वापरीत असल्यामुळें इंग्रजी भाषेंत चारपांचशें वर्षांपूर्वी D. हा शब्द Logic किंवा न्यायशास्त्र या अर्थीच वापरीत असत. क्यान्ट या जर्मन तत्वज्ञानें D. हा शब्द अज्ञेय मीमांसा या अर्थी योजिला आहे. त्यानें आपल्या ज्ञानमीमांसा (Critique of Pure Reason) या नांवाच्या ग्रंथांत तिसऱ्या भागाला *Dialectic* हें नांव दिलें आहे. या तिसऱ्या भागांत मानवी बुद्धीला बुद्धिसापेक्षच ज्ञान होतें. केवल

किंवा बुद्धिनिरपेक्ष ज्ञान होऊं शकत नाहीं असें आपलें मत प्रतिपादन केलें आहे. आत्मा, ईश्वर व विश्व हे पदार्थ बुद्धिद्वारा अज्ञेय आहेत व यासंबंधीं बुद्धिमार्गानें ज्ञान मिळविण्याची खटपट करीत असतांनां परस्परविरोधी कल्पना बऱ्याच येतात हें क्यान्टनें आपल्या *Dialectic* नामक भागांत दाखविलें आहे. क्यान्टचा पुढील तत्ववेत्ता हेगेल यानें *Dialectic* हा शब्द क्यान्टच्या मतें विरुद्ध दिसणाऱ्या कल्पनांची परस्परसंबद्धता किंवा एकवाक्यता करण्याची पद्धति या अर्थी योजिला आहे. क्यान्टनें व हेगेलनें D. हा शब्द कोणत्या अर्थी योजिला आहे हें त्यांच्या ग्रंथांचें प्रत्यक्ष अवलोकन केलें असतां ज्यास्त स्पष्ट समजेल.

Dialogue ( dī'a-log ) [Fr. *dialogue*–L. *dialogum* acc. of. *dialogus*, Gr. *dialogos*, a conversation. *n. a conversation between two or more persons, a formal conversation in theatrical performances or in scholastic exercises* **विशेषतः दोन मनुष्यांचा संवाद** *m*, **नाटकी संवाद** *m*, **गुरुशिष्यसंवाद** *m*, **संलाप** *m*. २ *a written composition in which two or more persons are represented as conversing or reasoning on some topic* ( **दोन किंवा अधिक मनुष्यांचा एकाच विषयावरील काल्पनिक** ) **संवादरूप लेख** *m*; as, The D.'s of Plato. D. *v. i.* (*Shakes.*) *to take part in a dialogue, to discourse in a dialogue* **संलापांत-संवादांत मिसळणें**. D. *v. t.* (R.) *to express as in dialogue* **संवादरूपानें कथन करणें**. Dial'ogic, Dialo'gis'tic, Dial'ogis'tical *a.* **संवादात्मक, संलाप-संवादरूपक**. Dial'ogically *adv.* Dialogist'ically *adv.* Dial'ogise *v. t. to discourse in dialogue* **संलाप-संवादरूप भाषण करणें**. Dial'ogism *n.* **काल्पनिक संवाद** *m*. Dial'ogist *n. a speaker in a dialogue, a writer of dialogues* **संवादकर्ता, संवादलेखक**.

Dialysepalous ( dīa-li-se-pa-lus ) [ Gr. *dialy*, separated & Sepal. ] *a. bot. having the sepals distinct.* **विभक्तबाह्यपुष्पकोश. (ex. मोहरी, मुळा.)**

Dialypetalous ( dī'-al-i-pet'-al-us ) *a. having the petals distinct* **निरनिराळ्या पाकळ्या असलेला, वियुक्तपत्र** (ex. **हिरवा चाफा, रामफळ.**)

Dialyphyllous ( dī'-a-li-fi-lės) [ Gr. *dialy*, separated & *phyllos*, *leaf.*] *a. having the leaves distinct* **द्विपत्र, विभक्तपत्र. ( उ. बिगोनिया. )**

*N. B.*—Diaphyllous हा शब्द एकदल वनस्पतीस लावतात. कारण एकदलवनस्पतीमध्यें बाह्यकोश आणि अंतर्कोश बहुधा एकाच रंगाचे असतात.

Dialysis ( dī-al'-i-sis ) [ Gr. *dia*, asunder & *lyein*, to loose. ] *n. chem. a chemical process of separating the soluble crystalloid substances in a mixture from the colloid by filtration through a parchment membrane floating in water* **हंसक्रिया** *f*, **चर्मद्वारा पृथक्करण** *n*, **अभिसरणमूलकभिन्नीकरण** *n*, **चर्माच्छादित भांड्यांतून फटकी, खडीसाखर, सोरा, इत्यादि अनुस्फटिक** (crystalloid) **पदार्थ अंड्यांतील बलक, शिरस, चरबी इत्यादि प्रतिस्फटिक** ( colloid ) **पदार्थांपासून चाळणी-सारखे निराळे करण्याची क्रिया** *f*. **ह्या क्रियेला हंसक्रिया हा लहान शब्द आम्हीं सुचवितों, कारण दुधापासून पाणी वेगळें करण्याचा हंसाचा विशेष गुण आहे.** Di'alyse *v. t.* **हंसक्रिया** *f*, **चर्मपृथक्करण करणें.** Dialys'able *a.* **हंसक्रियायोग्य, चर्मपृथक्करणयोग्य.** Dial'ysate *n.* **ज्याचें चर्मपृथक्करण करावयाचें आहे तें द्रव्य** *n*, **चर्मपृथक्करण-द्रव्य** *n*. Di'alys'er *n.* **चर्मपृथक्करण करण्याचें भांडें** *n*, **चर्मपृथक्करणपात्र** *n*, **हंसक्रियापात्र** *n*. Di'alyt'ic *a.* **हंसक्रियेसंबंधीं, चर्मपृथक्करणासंबंधीं.**

*N. B.*—Prof. Modak uses the word अभिसरण for Dialysis in some of his books. Dialysis is a method of separating by Diffusion through a septum of gelatinous matter. Therefore अभिसरणमूलकपृथक्करण or भिन्नीकरण will be in our opinion the most correct renderings of Dialysis. When we have once used अभिसरण for diffusion, we must have a different word for Dialysis.

Diameter ( dī-am'ė-ter ) [ M. Fr. *diametre*, a diameter–L. *diametros*–Gr. *diametros* ; Gr. *dia*, through & *metrein*, to measure. cf. Sk. **मा**, to measure. ] *n. any right line passing through the center of a figure or body* **व्यास** *m*, **मध्यरेषा** *f*, **मध्यसूत्र** *n*, **गर्भसूत्र** *n*, **बिंब** *n*. २ *a diametral plane* **व्यासक्षेत्र** *n*. ३ *the measure of a body through from side to side, width, thickness,* **जाडी** *f*; as, The D. of a tree. Di'ametral, Di'amet'rical, *a.* **व्यासरूपी, व्यासासंबंधीं.** Di'ametal *a.* **व्यासरूपी, व्यासासंबंधीं.** २ *as remote as possible, as if at the opposite end of a diameter, directly adverse* **निखालस, नीट-थेट खास.** ( *b.* ) **धडधडीत, लांबचा-दूरचा.** (*c*) **विपरीत, उलट.** [ SOME PHRASES AND SAYINGS IN MARATHI EXPRESSIVE OF DIAMETRICAL OPPOSITION ARE त्याची पूर्व तर आमची पश्चिम, त्याची उत्तर तर आमची दक्षिण, त्याचा हां तर आमचा ना, त्याचें पांढरें तर आमचें काळें, त्याचें आडवें तर आमचें उभें. ] Di'ametrally *adv.* **व्यासरूपानें.** Di'amet'rically *adv.* **धडधडीत, निखालस, समोर.**

Diamond ( dī'-a-mond ) [ M. E. *diamant*–O. Fr. *diamant*, altered form of *adamant*–L. *adamanta* acc. of *adamans* –Gk. *adamas*, a very hard metal or stone, *lit.* unconquerable—*a*, not & *damein*, to conquer. ] *n.* **हिरा** *m*, **हीरक** *m*, **हीर** *m* (S), **वज्र** *m*, *n*. (S), **हिरकूट** *n*, ( *in contempt* ). [THE VARIETIES ARE तोरमल्ली, राजावर्त, बिल्याण, नथुशाई, हिरा. DIAMOND CUT WITH FACETS **तरतरा** *m*, **बिल्याण** *m*, **पैलुदार हिरा** *m*. D. BIT **हिरकणी** *f*. D. MINE **हिऱ्याची खाण** *f*, **वज्राकर** *m*. D. CUT D. **उखळामुसळाचें मांडण** *n*. ] २ (*fig.*) *something very precious, a thing or person of great worth, a person of very brilliant attainments* **हिरा** *m*. ( used in Marathi in the same figurative senses in which the English word Dia-

mond is used.) ३ *something that shines like a diamond* हिरा *m*, हिऱ्यासारखा चमकणारा पदार्थ *m*. ४ *a tool consisting of a small diamond set in a handle used for cutting glass* (कांच कापण्याची) हिरकणी *f*; as, "Glazier's diamond." ५ *a diamond-shaped figure* बहुकोनी-पैलूदार आकृति *f*, चौकोनी आकृति *f*. ६ चौकट *m*, पत्त्यांतील चौकडीचीं पानें *n. pl.* चौकडी *f*. डायमंड नांवाचा टाईप *m*. हा Brilliant टाईप खेरीजकरून सर्वांत लहान असतो. D. *a*. हिऱ्या-चा-सारखा, हिरेजडित. Diamond-beetle *n*. एक प्रकारचा चकाकणारा सपक्ष कीटक *m*. Diamond-cutting *n*. हिरकणीनें कापणें *n*. (आरसे, भिंग इ०) Diamond-drill *n. eng.* (खडकाला भोकें पाडण्याचा) अग्रभागीं काळे हिरे बसविलेला गज *m*. Diamond dust or powder *n*. हिऱ्याचा चूर *m*- चूर्ण *n*. Diamonded *a*. अष्टपैलू असलेला. Diamondife'rous *a*. Diamond wheel *n*. हिरे घुरण्याचें धातूचें चाक *n*. Black diamond कोळसा *m*. Rough diamond ओबडधोबड हिरा *m*. २ (*fig.*) समाजाच्या चालीरीति माहित नाहींत असा बुद्धिमान् मनुष्य *m*. A diamond of the first water सर्वोत्कृष्ट किंवा अतिशय पाणीदार हिरा *m*, (*fig.*) सर्वगुणसंपन्न मनुष्य *m*. Diamond morter *n*. *chem.* दगडाचा खल *m*, हिरे कुटण्याचा खल *m*.

Diana (dī-an'-a) [L. *diana.*] *n*. *an ancient Italian female divinity, the moon-goddess, patroness of virginity & of hunting.* (regarded as identical with the Greek Artemis.). प्राचीन इटालीयन लोकांची कौमार्य आणि मृगया यांची अधिष्ठात्री देवता *f*, डायनादेवी *f*.

Diapason (dī'-a-pā'-zon) [L. *diapason*, an octave, concord of a note with its octave–Gr. *diapason*, concord of first & last notes of an octave, *lit.* through all the notes.] *n*. *the octave or interval which includes all the tones of the diatonic scale* स्वरसप्तक *n*, स्वरग्राम *m*. २ *concord, as of notes; an octave apart; harmony* दुपटीच्या स्वरांचा संवाद *m*, स्वरमेलन *n*. ३ *the entire compass of tones* श्रुतिविस्तार *m*, श्रुतिसमूह *m*. ४ *a standard of pitch*; *a tuning fork* स्वरांच्या उच्चतेचें मान *n*- प्रमाण *n*; निश्चित स्वरांचा चंग *m*, त्रिशूल किंवा पसरट सवाणा *m*. ५ *one of certain stops in the organ, so called because they extend through the scale of the instrument* श्रुतिवीणा-तंत्री-स्वर *m*, मुरली-पावा-सनईचें सुषिर *n*- छिद्र *n*.

Diaper (dī'-ă-pėr) [O. E. *diaspre, diapre, diaspe*, sort of figured cloth.] *n*. *figured linen cloth* एक प्रकारचें चित्रांचें उंची कापड *n*.

Diaphanoscope (dī'-a-fan'-a-skōp) [Gr. *diaphanes*, transparent & *scopc.*] *n. photo. a dark box constructed for viewing transparent pictures, with or without a lens* पारदर्शक चित्रें पाहण्याची काळीपेटी *f*, पारदर्शकचित्रदर्शिका *f*. २ *surg. a surgical instrument for the examination of internal organs* अंतर्दर्शिका *f*. Diaphan'oscopy *n. photo.* पारदर्शकचित्रदर्शन *n*. २ *surg.* अंतर्दर्शन *n*.

Diaphoresis (dī'-a-fō-rē'-sis) [L. *diaphoreticus*–Gr. *diaphoretikos*–Gr. *dia* & *pherein*, to carry.] *n*. (औषधानें आणलेला) कृत्रिम घाम *m*. Di'aphoret'ic *n*. घाम आणणारें औषध. D. *a*. स्वेदोत्पादक, घाम आणणारें.

Diaphragm (dī'-a-fram) [Fr. *diaphragme*–L. *diaphragme*–Gr. *diaphragma*, partition.] *n*. छाती व पोट यांमधील पडदा *m*, मधला पडदा *m*, मध्यपटल *n*, पोटाच्या वरचा पडदा *m*. २ (यंत्राच्या आंतील) आवरण *n*, पडदा *m*. ३ *photo.* आवरण *n*, आवरक *m*. Di'aphragmat'ic *a*. Di'aphrag'mal *a*. मध्यपटलासंबंधीं. Di'aphrag'mati'tis *n*. मध्यपटलाची सूज *f*. Iris Diaphragm *n*. तारका पडदा *m*.

Diarchy (dī'ar-ki) [Gr. *di*, two & *archein*, to rule.] *n*. *a form of government in which the supreme power is vested in two persons* द्विसत्ताकराज्य *n*. Less correctly Dinarchy.

Diarrhœa, Diarrhea (dī'-a-rē'-a) [L. *diarrhœa*–Gr. *diarroia*–Gr. *dia*, through & *rhein*, to flow.] *n*. अतिसार *m*, जुलाब *m*, पातळ मळ होणें *n*, हगवण *f*, हगरड *f*, धंडाळी or धांडाळी-धेंडाळी-धेंडोळी-ढेंढळ-ढेंढाळी *f*, फोकांडी *f*, ढगळ *f*, डरंगळ *f*, भसरें *n*, अतिसाराचा-जुलाबाचा उपद्रव *m*, परसाकडेचा उपद्रव *m*. [AFFECTED WITH D. हगवणकरी *m*. BILIOUS D. पित्तापासून होणारा अतिसार *m*.- जुलाब *m*, पित्तातिसार *m*. BLOODY D. रक्तातिसार *m*. CHOLERAIC D. अतिशय जोराचा अतिसार *m*, विषूचिका रोगांतील जुलाबाप्रमाणें ज्या अतिसारांत पांढऱ्या रंगाचे जुलाब होतात तो अतिसार *m*, पांढरे फोक, तीव्रातिसार *m*. विषूचिकातिसार *m*. CHRONIC D. जीर्णातिसार *m*. COLLIQUATIVE D. क्षीणातिसार *m*. DYSENTERIC D. प्रवाहिकातिसार *m*. FATTY D. ज्या अतिसारांत स्निग्ध पदार्थांचें पचन न झाल्यामुळें ते तसेच मळांतून पडतात तो अतिसार *m*, स्नेहातिसार *m*, स्नेहापचन *n*, वसातिसार *m*. HILL D. शैलातिसार *m*. INFANTILE D. बालातिसार *m*. LIENTERIC D. ज्या अतिसारांत खाल्लेलें अन्न न पचतां तसेंच्या तसेंच पडतें तो अतिसार *m*, अपक्वातिसार *m*, आमातिसार *m*. MUCOUS OR CHYLOUS D. कफातिसार *m*. NERVOUS OR MENTAL D. मानसातिसार *m*. (शोकातिसार, भयातिसार वगैरे) PURULENT D. पूयातिसार *m*. STERCORACEOUS D. बहुमलातिसार *m*. SIMPLE OR FECULENT D. मलातिसार *m*, मलातिसार *m*. TUBULAR D. ज्या अतिसारांत आंतड्याचे आंतील भागाचा पापुद्रा नळीसारखा बाहेर पडतो तो अतिसार *m*, नाडिरूपातिसार *m*. VIOLENT D. ढगळपट्टी *f*, ढेंढळपट्टी *f*, मुसळवादा *m*, भयंकर अतिसार. TO HAVE A D. पोट *n*. जाणें-सुटणें *g. of s.*, भेंडळणें OR धेंडाळणें OR ढेंढळणें, डरंगळणें, ढगळणें, ढाळणें, फोकलणें, पोटाचें पाणी *n*. होणें, ढाळ *m. pl.* होणें.] Diarrhœal, Diarrhœtic *a*. रेचक, सारक.

Diarthrosis (dī'-är-thrō'-sis) [Gr. *dia* & *arthrosis*, joint.] *n. anat.* चलसंधि *m*, चक्रसंधि *m*.

Diary (dī'-a-ri) [L. *diarium*.] *n. a register of daily events and transactions, a daily record, a journal* रोजनिशी *f*, तिथिपत्र *n*, रोजची हकीकत लिहून ठेवण्याचें पुस्तक *n*, दिनवृत्त *n*, दिनचर्या *f*. D. *a.* एक दिवस टिकणारा; as, A. D. fever. Diā'rial, Diā'rian *a.* Dī'arise *v. t. &v. i.* तिथिपत्र लिहून ठेवणें. Dī'arist *n.* दिनवृत्त लिहून ठेवणारा.

Diasmose (dī'as-moz) *n.* व्यभिसरण *n*.

Diastole (dī-as'-to-lē) [Gr. *dia*, asunder & *stellein*, to place.] *n. physiol.* (रक्ताशयधमनी इत्यादिकांचें) प्रसरण *n*, दीर्घीभवन *n*. २ *gram.* ऱ्हस्व अवयवांचें दीर्घत्व होणें *n*, दीर्घीभवन *n*. Diastol'ic *a*.

Diatessaron (dī-a-tes'a-rōn) [Gr. for *dia*. *tessaron*, through or composed of four.] *n. med.* चार औषधांचें मिश्रण *n*- चूर्ण *n*. २ *mus.* स्वरचतुष्टय.

Diathermal (dīa-ther'-mal) [Gr. *dia* & *therme*, heat.] *a.* उष्णताभेदक, उष्णता वाहक-नेणारा. also Diather'manous, Diather'mous, Diather'mic. Diather'mance, Diather'mancy *n.* उष्णतावाहकशक्ति *f*, उष्णताभेद्यगुण *m*.

Diathesis (dī-ath'-e-sis) [From Gr. *diathesis-dia*, through & *tithein*, to place.] *n. bodily condition or constitution, esp. a morbid habit which predisposes to a particular disease, or class of diseases* प्रकृतिमान *n*, प्रकृति *f*. (उ. वातप्रकृति, कफप्रकृति)

Diatomic (dī'-ä-tom'-ik) [Pref. *di* & atomic.] *a. chem.* (*a*) *containing two atoms* (*b*) *having two replaceable atoms or radicals* द्विपरमाणुक.

Diatribe (dī'-a-trīb) [Fr. *diatribe*–L. *diatriba*–Gr. *diatribe*,–*dia*, through & *tribein*, to rub, wear away.] *n.* (*arch.*) *prolonged or exhaustive discussion* लांबलचक कंटाळवाणें भाषण *n*, चऱ्हाट *n*. २ *an acrimonious or invective harangue* भेदिक व आवेशाचें भाषण *n*–टीका *f*, कुत्सित–निंदात्मक–झोंबणारें–टोमण्याचें भाषण *n*–टीका *f*. Dia'tribist *n.* भेदिक भाषण करणारा किंवा लेख लिहिणारा.

Dibasic (dī-bā'-sik) [Pref. *di* + *basic*.] *a. chem. having two acid hydrogen atoms capable of replacement by basic atoms or radicals, in forming salts* द्विभस्मिक. See the word Base (भस्म).

Dibble (dib-'l) *n. a pointed implement used to make holes in the ground in which to set out plants or plant seeds* टोंव पाडण्याचें आऊत *n*, खुंटाळी *f*, ढवस *n*, पेंडस *n*. also Dibb'er. Dibb'le *v. t.* खुंटलणें, टोंचिणें, रोवणें. D. *v. i.* टोंवणें, गरी-प्रमाणें पाण्यांत वारंवार बुडवणें. Dibb'ler *n.* टोंवणारा मनुष्य *m*. २ टोंवण्याचें आऊत *n*.

Dicast, Dikast (dī'-kast) [Gk. *dikastes*, from *dikazein*, to judge.] *n. a functionary in ancient Athens answering nearly to the modern juryman* प्राचीन काळच्या ग्रीक लोकांमधील पंचायतीचा सभासद *m*, पंच *m*. 'ज्यूरर' *m*. Dicas'tery *n.* (R.) *a court of justice* 'डिकास्ट' बसण्याची न्यायकचेरी *f*, न्यायमंदिर *n*.

Dice (dīs) [*pl.* of Die.] *n.* खेळण्याचे फांसे *m, pl.* अक्ष. २ फांशांचा खेळ *m*. D. *v. i.* फांशांनीं खेळणें. Diced *a.* Dice-box *n.* फांसे घालून खेळण्याची पेटी *f*. Dice-coal *n.* (इंग्रजी फांशाच्या आकाराचे) घनाकार तुकडे होणारा कोळसा *m*. Dic'er *n.* फांसे खेळणारा *m*.

*N. B.*—इंग्रजी फांसे घनाकार असतात व देशी फांसे लांब व चौरस असतात.

Dicephalous (dī-sef'-a-lus) [Gr. *di*, double & *kephale*, a head.] *a. having two heads on one body, double headed* एकाच धडावर दोन मस्तकें ज्यास आहेत असा, दोन मस्तकांचा, दुडोकी.

Dichlamydeous (dik'-la-mid'-ī-us) [Gr. *dis*, & *chlamus*, a garment.] *a. bot. having both the floral envelopes* (*calyx and corolla*) द्विकोषयुक्त, दुकोशी.

Dichotomize (dī-kot'-o-mīz) [L. *dichotomus*–Gr. *dichotomos*–Gr. *dicha*, in two & *temnein*, to cut.] *v. t. & v. i.* (R.) *to cut into two parts, to part into two divisions* (आरपार) दुभाग करणें, दुभागणें, कापून दोन भाग करणें, दोनवर्गी करणें. २ *astron.* (अर्धचंद्रासारखे) अर्धबिंब दाखविणें. Dichot'omous *a. bot.* दुभागलेला (देंठ), (मूळापासून शेंड्यापर्यंत दोन दोन डहाळ्यांनीं) दुभागलेला. Dichot'omously *adv.* Dichot'omy *n. a cutting into two, a division* दुभागणें *n*. २ *division or distribution of general into two species* दोन पोटविभाग *m*, उपजातिरूपभेद *m*, उपजाति *f*. ३ *astron. the phase of the moon in which it appears bisected or shows only half its disk* अर्धचंद्र *m*, अष्टमीचा चंद्र *m*. ४ (*biol.*) *successive division and subdivision* दोन दोन आरपार फांटे फुटत जाणें *n*, दुबेळकी बनत जाणें *n*. ५ *the place where a stem or vein is forked* दुबेळकें *n*. ६ (*logic.*) *the division of a class into two sub-classes opposed to each other by contradiction* अन्यव्यावृत्तविभेदीकरण *n*, अन्यव्यावृत्तविभेद *m*.

Dichroism (dik'-rō-izm) [Gr. *dis*, twice & *chroa*, colour.] *n. the property observed in some crystals and solutions of exhibiting two or more colours when viewed in different directions* द्विरंगत्व *n*, द्विवर्णत्व *n*, दुरंगीपणा *m*. Dichrō'ic, Dichrois'tic *a.* दुरंगीपणाचा धर्म असलेला, द्विरंगत्वधर्मी, दुरंगी. Dichroscope *n. an instrument for observing or testing the dichroism of crystals or solutions* द्विरंगत्वदर्शक.

Dickens (dik'-enz) [Perhaps a contraction of the diminutive *devilkins*, or *deilkin*.] *n. the devil* पिशाच *n*, समंध *m*, भूत *n*. [The Dickens (also a

dickens ) आश्चर्य, उतावीळपणा, मनःक्षोभ, आकस्मिक उद्गार इत्यादि मनोविकार दाखविण्याकरितां *what, where, how, why* इत्यादि प्रश्नार्थक शब्दांबरोवर Dickens शब्दाचा उपयोग करतात; जसें "I cannot tell what the Dickens his name is"; "why the Dickens don't you let us serve them all out at once." "Then what a Dickens can I do or say." अशा उदाहरणांत इंग्रजी Dickens शब्दाचा अर्थ भान -चोद, लेंकाचा, मेला, जळ्ला, असा करावा. The Dickens take you तुला समंध लागो. To go to the Dickens नाश पावणें, वाटोळें होणें; as, "Business went to the Dickens." To play the Dickens with सत्यानाश करणें, अत्यन्त नुकसान करणें; as, "The lion would roar & tear & play the Dickens."

Dicker ( dik'-ėr ) [ Gr. *deka*, ten. ] *n. the number of ten* दहा, दसकडी *f.* चामड्यांची दसकडी *f.* Dicker हा शब्द बहुधा चामड्यांच्या दसकडीला लावितात.

Dicker ( dik'-ėr ) [ From the last word Dicker.] *v. t.* अदलाबदलीचा व्यापार करणें; as, "The required needle was Dickered for the egg." D. *n.* अदलाबदलीचा व्यापार *m.*

Dicky, Dickey (dik'-i) *n. naut. an officer acting in commission* गलबतावरील सनदी कामदार *m.* २ *a donkey, a he-ass* गाढव *m.* ३ गाडी हाकणाऱ्याची बसावयाची पेटी *f.* ४ *a detached shirt-front* शर्टाची सुटी छातीपट्टी *f.*

Dicotyledon ( dī'-kot'-i-lē'-dun ) [ Pref. *di* + *cotyledon.*] *n. bot. a plant whose seeds divide into two seed lobes or cotyledons in germinating* द्विदल वनस्पति *f.* ज्यांच्या बियांत दोन डाळिंब्या असतात अशा वनस्पति. (उ० हरभरा, वाटाणा, तूर, पावटा.)

Dictate ( dik'-tāt ) [ L. *dictātus pa. p.* of *dictare*, to say, often freq. of *dicere*, to say.] *v. t. to tell, to put into words which are to be written down, to utter, pronounce or read aloud to a person* ( something which he is to write ) मजकूर लिहून घेण्याकरितां सांगणें, शुद्धलेखन सांगणें. ( b ) हक्कानें-अधिकारानें-सत्तेनें-प्रेरणेनें-स्वाभाविक म्हणून-आज्ञेच्या रूपानें सांगणें. २ *to lay down authoritatively, to order or command in express terms* हुकुमानें-अधिकारानें-आज्ञेच्या रूपानें-सांगणें, हुकूम-आज्ञा करणें. D. *v. i.* आज्ञा करणें, हुकूम फरमावणें; as, "He is the oracle of the family & D.s. to his sisters on every occasion." २ *to compose literary works* ग्रंथ रचणें; as, "Sylla could not skill of letters & therefore knew not how to D." D. *n. command, order* आज्ञा *f.* आदेश *m.* २ *the authoritative words* of a written law, of scripture or revelation & also those attributed to or derived from inspiration, from conscience, reason, nature, experience, self-interest and other ruling or actuating principles आज्ञा *f.* आदेश *m.* प्रेरणा *f.* चोदना *f.* (S.), सांगी *f.* सांगणें *n.* Dictā'tion *n.* मजकूर लिहून घेण्याकरितां सांगणें *n.* शुद्धलेखनाकरितां मजकूर सांगणें *n.* २ सांगून लिहविलेला मजकूर *m.* ३ शुद्धलेखन *n.* ४ *authoritative utterance* सत्तेनें-तोऱ्यानें-आढ्यतेनें सांगणें-फरमावणें. Dictā'tor *n. a ruler or governor whose word is law; an absolute ruler of a state* (राज्यांतील) अप्रतिबंध सत्तायुक्त मनुष्य *m.* अप्रतिबंध सत्तेचा मनुष्य *m.* २ *a chief magistrate invested with absolute authority elected in seasons of emergency by the Romans and by other Italian States.* जुन्या रोमन लोकांनीं व इटालींतील इतर संस्थानांनीं आणीबाणीच्या वेळीं शांतता करण्याकरितां निवडलेला अप्रतिबंधसत्तायुक्त मनुष्य *m.* ३ *a person exercising absolute authority of any kind or in any sphere; one who authoritatively prescribes a course of action or dictates what is to be done* ( कोणत्याही बाबतींत ) अनियमितसत्ताधारी मनुष्य *m,* लोकांच्या वर्तनासंबंधीं सत्तेनें नियम घालून देणारा, कोणतेंही काम अप्रतिबंधसत्तेनें करणारा. ४ *one who dictates to a writer* शुद्धलेखन सांगणारा. Dictā'tress, Dictā'trix *n. fem.* Dictatō'rial *a. absolute, unlimited* अप्रतिबंधसत्तायुक्त, स्वतंत्र, स्वेच्छ, अमर्याद. २ *imperious, overbearing* अहंपणाचा, आढ्यतेचा. Dictā'torship, Dic'tature *n.* अनियंत्रित-अनिर्बंधसत्ता *f.* Dicta'tory *a.*

Diction ( dik'-shun ) [ L. from, *dicere, dictum*, to say.] *n. choice of words for the expression of ideas, language* शब्दयोजना *f.* भाषापद्धति *f.* वाणी *f.* भाषा *f.* [ Good D. मार्मिक शब्दयोजना *f.* ]

*N. B.*—Phraseology विशेषशब्दयोजना; Diction शब्दयोजना; Style=भाषारीति; भाषापद्धति as; वैदर्भी, गौडी, &c. of Sanskrit writers.

Dictionary ( dik'-shun-ėri ) [ From med. L. *dictionarium* or *dictionarius, lit*, a repertory of dictions, phrases or word. Fr. *dictionnaire*; Ital. *dizionario*, Span. *diccinario.* Dictionary शब्दाचा मूळ अर्थ शब्दकोश असा आहे, परंतु सध्या अक्षरांच्या अनुक्रमणिकेप्रमाणें रचलेल्या कोणत्याही पूर्ण माहिती देणाऱ्या पुस्तकाला हा शब्द लावितात; जसें, Dictionary of architecture, of biography, of geography. इ. स. १२२५ सालीं जोन-द-गार्लेंदिया नामक एका इंग्रजी गृहस्थानें आपल्या विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां वाक्यरूपानें विषयवार लिहिलेल्या ल्याटीन शब्दसंग्रहाला Dictionarius हें नांव प्रथम दिलें.] *n.* शब्दकोश *m.* [एका भाषेंतून दुसऱ्या भाषेंत शब्दांचा अर्थ सांगणाऱ्या कोशाला Bilingual Dictionary ( द्विभाषिक कोश ) असें म्हणतात. तीन भाषेंच्या शब्दकोशाला Trilingual D. ( त्रिभाषिक कोश ) असें म्हणतात. तींहीपेक्षां जास्ती भाषांच्या शब्दकोशाला Polyglot (विविधभाषिक कोश) असें म्हणतात.] २ ( *fig.* ) *a person or thing regarded as a repository of knowledge, convenient for consul-*

*tation* ( एखाद्या विषयासंबंधानें ) पूर्ण माहितीचें आगर -घर, पूर्णमाहितीचा कोश *m*; जसें, आमच्या म्युनिसीपालिटीच्या संबंधानें (क्ष) हा पूर्ण माहितीचा चालता बोलता कोशच आहे, X is a living D. of our Municipal affairs). Dictiona'rian ( R. ) कोशकार *m*.

Dictum (dik'-tum) [ L. ] *n. authoritative statement, dogmatic saying, apothegm* वचन *n*; as in मनूचें वचन-वाक्य *n*, म्हणणें *n*, उक्तवाक्य *n*, नियम *m*, अधिकारी मनुष्याचें मत *n*, निकाल *m*. २ *law.* दाव्याशीं संबंध नसलेल्या मुद्यावर न्यायाधिशांनीं दिलेलें मत *n*. *pl.* Dic'ta.

Dictyogen ( dik'ti-o-jen ) *n. bot.* जाळ्यासारख्या शिरा ज्याच्या पानांत असतात असें झुडुप *n*, जालपर्णी झुडुप *n*. ( Ex. म्हारचांफा).

Did, Didst ( did, didst ) *pa. t.* of Do.

Didactic,-al (di-dak'-tik) [ Gr. *didactikos*, apt at teaching.] *a. fitted or intended to teach, preceptive, instructive, teaching some moral lesson* उपदेशपर, उपदेशात्मक, उपदेशाचा, बोधपर, ज्ञानदायक, नीतिपर. Didac'tically *adv.* उपदेशपररीतीनें. Didac'ticism *n.* उपदेशपरता *f*. नीतिपरता *f*. Didactics *n. pl. the act or science of teaching* नीतिशिक्षण *n*, शिक्षा *f*.

Diddle ( did'-l ) [ A recent word of obscure origin. ] *v. t. to waste time in the merest trifling* क्षुल्लक गोष्टींत वेळ घालविणें. २ *to cheat or swindle* फसविणें, ठकविणें. To D. out of फसवून-हिरावून घेणें; as, "You were diddled out of fiftythousand pounds." Didd'ler *n.* फसव्या *m*, ठक *m*.

Diddle ( did'l ) *v. i.* गुलासारखें तोल सांवरीत चालणें.

Dido ( dī'-dō ) *n.* फसविण्याची युक्ति *f*, खोडी *f*. [To CUT A. D. खोडी करणें, फसविण्याची युक्ति काढणें.]

Diduction ( di-duk'-shun) *n.* उपांगवियोग *m*, भाग निराळे करणें *n*.

Didynamia (did'-i-nā'-mi-a) [Gr. *di*, double & *dunamis*, strength.] *n. bot.* तुळस सबजा सारख्या पुष्पांतील दोन आंखूड आणि दोन लांब असे पुंकेसर असलेल्या झाडांचा वर्ग *m*, तुलसीवर्ग *m*.

Die ( dī ) [M. E. *dyen, deyen*; Late A. S. *degan*, to die. ] *v. i. to pass from an animate to a lifeless state, to cease to live* ( said of animals and vegetables often with *of, by, with, from*, and rarely *for*, before the cause or occasion of death ) मरणें, गुजरणें, मृत होणें, प्राण-जीव जाणें, पंचत्व पावणें, जाणें (*fig.*), निवर्तणें, वारणें, गत *f*. होणें, निजणें (euphemistically ), नाश पावणें-होणें. [ THE FOLLOWING WORDS & PHRASES ARE CANT, COVERT, ALLUSIVE, &C., BUT THEY ARE TOO COMMON TO BE OMITTED देवाज्ञा होणें, निवर्तणें, परलोकवासी होणें, देवाकडे जाणें, गुंडाळणें, आटपणें, संपणें, खटारणें, खटावणें, घडघडणें, चंचरणें (R.), गवाळें *n*. आटोपणें, गाशा *m*. गुंडाळणें, डोळे झांकणें, बिऱ्हाड *n*. अटोपणें, पंथास पोहोंचणें, चसनापुरास जाणें, लष्कर कामास येणें (SAID OF MILITARY MEN), राम म्हणणें, राम होणें, रुप्याचे-रुपेरी-पांढरे डोळे करणें, प्रस्थान गुंडाळणें-अटोपणें-बांधणें, प्रस्थान चालणें *g. of s.*, न येण्याचे वाटेनें जाणें, निजधामास जाणें, वर जाणें, स्वर्गवासी-कैलासवासी-वैकुंठवासी होणें, परलोकगत-लोकांतरगत-दिवंगत, &c. होणें, ( आपला ) अवतार संपविणें, (चा) अवतार संपणें-खपणें, उलथणें, चचणें, ( SAID OF ENEMIES ), ( चा ) काळ होणें.] २ *to suffer death, to lose life* मरण स्वीकारणें, प्राण देणें, प्राण समर्पण करणें, प्राणाची आहुति देणें; as, "In due time Christ died for the ungodly." ३ *to become lost or extinct, to be extinguished* नाहींसा-नष्ट होणें, बंद पडणें, लयास जाणें; as, "Great deeds cannot die." ४ *to sink, to faint, to pine, to languish with weakness* खचणें, झुरणें, मरणें, मरत जाणें, थकत जाणें, मरगळीस येणें; as, "The young men acknowledged, in love letters, that they died for Rebecca." ५ *to become indifferent, to cease to be subject* (with *to*) उदासीन असणें, (ला) वश नसणें, (चा) पगडा बसूं न देणें, (च्या) काबूबाहेर राहणें; as "To die to pleasure or to sin." ६ *to recede and grow fainter, to become imperceptible, to vanish* ( often with *out* or *away* ) मागें पडत जाणें, कमी कमी होत जाणें, अस्पष्ट होत जाणें, अगोचर-नाहींसा होणें; as, "The sound died away." ७ (*arch.*) *to disappear gradually in another surface* (दुसऱ्या पृष्ठतलांत) मिळून जाणें. ८ *to become vapid, flat or spiritless* ( as liquor ) फिकें-निस्तेज-निःसत्व होणें, फिकें पडणें, (चा) जोस जाणें. TO BE ABOUT TO D. मरावयास टेकणें-गुंडाळणें. To D. BY INCHES तिळतिळ प्राण सोडणें. To D. SUDDENLY तडकातडकी-तडकाफडकी *adv.* मरणें, ताडातुडी *adv.*-बोलतां बोलतां मरणें. To D. SUDDENLY ( IN THE HEIGHT OF VIGOUR, PLENITUDE OF ENJOYMENT, &C. ) तरणाताठा मरणें, भरल्या घोसानें-भरल्या-वंदांत-मरणें. To D. IN GREAT NUMBERS मरामर *f*. चालणें-लागणें-होणें *g. of s.* DYING OF EXTREMELY SICK STATE (OF MEN, ANIMALS, &C.) मरतवड *f*, मरवड *f*, मरतवडा *m*. To D. game अखेरपर्यंत टिकाव धरणें-काढणें, नेट धरणें. To D. hard मृत्यूशीं झगडत झगडत मरणें. Die hard *a.* मरणाला चिवट. To D. off मरामर लागणें. To D. out नाहींसा होणें. To D. in the last ditch मरेपर्यंत लढणें Let the secret D. within your breast ही गुप्त गोष्ट तुझ्या अंतःकरणांतच राहूं दे. To D. in harness नित्याचें काम करीत असतां मरणें. To D. from the memory or To D. in one's shoes. To D. a violent death अपघातानें मरणें.

Die ( dī ) [ O. Fr. *dez* ( pl. of *det.* ) *de*, dice–Late L. *datum*, lit. a thing given or decreed, hence applied to a die for casting lots. ] *n. a small cube with spots from one to six on the faces used in gaming by being shaken in a box and then thrown from it* फांसा *m*, अक्ष *m*. [ FALSE DIE कपटफासा *m*, दुरक्ष *m*, कूटाक्ष *m*. MARK OR SPOT ON A D. रेजा *m*, पगडा *m*. ] २ *any small cubical or*

३ *to deal with, in eating or in drinking* (दुसऱ्यास बरोबर घेऊन एखादी वस्तु) खाऊन- पिऊन टाकणें; as, "We D.ed a bottle." ५ *law. to examine or search thoroughly* निरनिराळ्या साधकबाधक प्रमाणांचा विचार करणें, शिकस्त-फोड-छाननी करून पाहणें. Discuss'able *a.* विचार करायाजोगा. Discus'sion *n.* वादग्रस्तचर्चा *f,* वादविवाद *m,* वाटाघाट *f,* मंथन *n,* खल *m,* मुद्देसूद निरूपण *n.* २ *surg.* गळूं निचरणें *n.* Discuss'er *n.* Discuss'ive, Discu'tient *a.* (*med.*) दुष्टधातुनाशक, नासलेलें रक्त काढून टाकणारें. Discu'tient *n.* गळूं बसण्याचें किंवा निचरण्याचें औषध *n.*

Disdain (dis-dān') [M. E. *disdeyn*–O. Fr. *desdain*-O. Fr. *desdegnier*–L. *dedignari*, to disdain. Disdain शब्दाचा धात्वर्थ अयोग्य-अप्रशस्त मानणें असा आहे.] *v. t. to reject as unworthy of one's self, to scorn* (एखादी गोष्ट आपल्यास अनुचित म्हणून) धिक्कारणें, (अतिक्षुद्र म्हणून) दुर्लक्ष करणें, तुच्छ-हलका मानणें-समजणें, कसपटाप्रमाणें मानणें, अव्हेर करणें, ताठ्यानें-ऐटीनें धिक्कारणें, (बेपर्वाईनें क्षुद्र म्हणून) तिटकारा करणें. D. *v. i. to be filled with scorn, to be haughty, to feel contemptuous anger* (चा) तिरस्कार वाटणें, ताठा असणें, उर्मट-उद्दाम असणें, (चा) तिरस्कारयुक्त क्रोध येणें. D. *n. a feeling of contempt & aversion* तिरस्कार *m,* अवज्ञा *f,* अवगणना *f,* अनादर *m,* तिटकारा *m.* Disdain'ful *a.* तिरस्कारपूर्ण, अनादरदर्शक, उद्धट, मगरूर. Disdain'fully *adv.* Disdain'fulness *n.* मगरूरी *f,* दिमाख *m,* ताठा *m.*

Disease (diz-ēz') [O. Fr. *desaise*, want of ease–O. Fr. *des*. (L. *dis*) & *aise*, ease.] *n.* (*obs.*) सुखाभाव *m,* असुख *n,* अस्वास्थ्य *n,* दुःख *n.* २ *malady, illness, sickness* दुखणें *n,* विकार *m,* रोग *m,* व्याधि *f,* पीडा *f,* विकृति *f,* आजार *m.* [ADDISON'S D. मूत्रपिंडाला लागून त्याचे वरचे बाजूस एक उपमूत्रपिंड (SUPRARENAL BODY) म्हणून इंद्रिय असतें त्याचा रोग *m.* AN INHERITED OR A CONNATE D. पिढीजाद रोग *m,* आईबापांपासून झालेला रोग *m,* जन्माचा रोग *m,* आनुवंशिक -सहज रोग *m.* BRIGHT'S D. मूत्रांतून (अलबूमेन) श्वेतकल्क निघून जाणें, मूत्रपिंडदाह *m,* मूत्रपिंडाला सूज येणें. CURE OR ALLEVIATION OF D. रोगशांति *f,* रोगोपशम *m,* रोग बरा होणें *n.* D. OF THE NOSE नासारोग *m,* नाकाचा रोग *m.* D. OF SYNOVIAL BURSEA सयानो व्हिअल वर्सि नामक पिशव्यांचा विकार *m.* D. GERMS IN THE AIR हवेंतील व्याधिबीजजंतु-रोगजंतु.] D. *v. t.* (*obs.*) दुःख -त्रास देणें, संकट आणणें. २ आजारी पाडणें. Diseased *a.* रोगी, रोगट, रोगग्रस्त, दुखणेकरी, आजारी, रुग्ण. [D. MIND अस्वस्थमन *n.*]

Disedge (dis-ej') *v. t.* (*Shakes.*) मंद-बोंथट करणें, तीव्रता-धार काढून टाकणें.

Disedify (dis-ed'-i-fī) *v. t.* (R.) (एखाद्या वस्तूवरून) परमार्थबुद्धि उडवून टाकणें, सन्मार्गनिष्ठा *f.* धर्मनिष्ठा कमी करणें.

Disembark (dis-em-bärk') [Cf. Fr. *desembarquer.*] *v. t. to put on shore, to land, to remove from on board a vessel* किनाऱ्यावर-जमिनीवर ठेवणें-लावणें-सोडणें-उतरणें, जहाजावरून किनाऱ्यावर आणणें. D. *v. i.* किनाऱ्यावर-जमिनीवर उतरणें. Disem'barkā'tion *n.* जहाजांतून जमिनीवर उतरणें *n.* Disembark'ment *n.* (R.)

Disembarrass (dis-em-bär'-ras) [Cf. Fr. *desembarrasser.*] *v. t. to free from embarrassment, impediment or perplexity, to clear, to extricate* घोंटाळ्यांतून मुक्त करणें, गोंधळ दूर करणें, सोडवणें, मोकळा करणें. Disembar'rassment *n.*

Disembellish (dis-embel'-ish) [Cf. Fr. *desembellir.*] *v. t.* अलंकारविरहित करणें, (ची) शोभा कमी करणें, विशोभित करणें.

Disembitter (dis-em-bit'-tėr) *v. t. to free from bitterness* कडवटपणा-कडूपणा काढणें-नाहींसा करणें.

Disembody (dis-em-bod'-i) *v. t. to divest of the body or corporeal existence* देहानिराळा-विदेही करणें. २ (*mil.*) *to disarm & disband* (as a body of soldiers) (निःशस्त्र करून) लष्करी नोकरींतून काढणें. Disembod'ied *a.* गलितदेह. Disembod'iment *n.* देहानिराळा करणें *n.* &c. २ देहरहितस्थिति *f,* &c.

Disembogue (dis-em-bōg') [Span. *desembocar*–Span. *des* (L. *dis*) & *embocar*, to put into the mouth–*en* (L. *in*) & *boca*, mouth, from L. *bucca*, cheek.] *v. t. to pour out or discharge at the mouth* (as a stream) मुखद्वारा समुद्रांस-सरोवरांस मिळणें. २ (*R.*) *to eject, to cast forth* बाहेर-पुढें टाकणें. D. *v. i. to become discharged, to flow out* वाहणें, बाहेर टाकला जाणें, पडणें. Dis'embogue'ment *n.*

Disembowel (dis'-em-bow'-el) [L. *dis*, intensive & Embowel.] *v. t. to take or let out the bowels or interior parts of* (चीं) आंतडीं-अन्तरभाग बाहेर काढणें. *fig. & lit.* Dis'embow'elment *n.*

Disembroil (dis'-em-broyl') [L. *dis*, not & Embroil.] *v. t. to free from perplexity* घोंटाळा काढून टाकणें-दूर करणें, घोंटाळ्यांतून काढणें.

Disempower (dis'em-pow'-ėr) *v. t. to deprive of power* (ची) शक्ति काढून टाकणें-नाहींशी करणें.

Disenamour (dis'-en-am'-ėr) *v. t. to free from the captivity of love* प्रीतिपाशांतून मुक्त करणें.

Disenchant (dis'-en-chant') [Cf. Fr. *desenchanter.*] *v. t. to deliver from the power of charms or spells, to free from fascination or delusion* मंत्र उतरणें, मोहनी घालविणें-दूर करणें, भ्रम नाहींसा करणें घालवणें. Disenchant'er *n.* मंत्र उतरणारा. Disenchant'ress *n. fem.* Disenchant'ment *n.* भ्रमनिवारण *n,* मोहनी काढणें *n.*

Disencumber (dis'-en-kum'-bėr) [Cf. Fr. *desencombrer.*] *v. t. to free from encumbrance* (चें) विघ्न-

अडथळा दूर करणें, निर्विघ्न करणें, भारमुक्त करणें. Disencumb'rance *n.*

Disendow (dis'-en-dow') *v. t.* (देवस्थानाच्या) देणग्या काढून घेणें. Disendow'ment *n.*

Disenfranchise (dis'-en-fran'-chīz) *v. t. to deprive of the rights of a citizen* नागरिकत्वाचा हक्क-नागरिकत्व काढून घेणें. Dis'enfran'chisement *n.*

Disengage (dis'-en-gāj') [ Cf. Fr. *desengager.* ] *v. t. to extricate, to detach, to set free, to clear* सोडणें, सोडवणें, काढणें, मुक्त करणें, वेगळा-निराळा करणें, सुटका करणें. D. *v. i. to release one's self* सुटणें, मोकळें होणें, अलग-वेगळा राहणें. Disengaged' *a.* सोडलेला, मुक्त. २ रिकामा, चिंतारहित, उद्योगरहित. Disenga'gedness *n.* Disengage'ment *n.* सोडवणें *n*, सोडवण *f*, सोडवणूक *f.* २ *freedom from engrossing occupation, leisure* रिकामपण *n*, मोकळेपण *n*, फुरसत *f.* Disenga'ging *a.*

Disennoble (dis-en-nō'-bl) *v. t. to lower, to degrade* श्रेष्ठत्व *n*. नाहींसें करणें, मोठेपणा *m*- श्रेष्ठता *f* आणणारी गोष्ट नाहींशी करणें, कमीपणा आणणें.

Disenroll (dis-en-rōl') *v. t.* यादींतून नांव काढून टाकणें. Also Disenrol.

Disenshrouded (dis'-en-shrowd'-ed) *a.* आच्छादन काढ-लेला, उघडा.

Disenslave (dis-en-slāv') *v. t.* बंधनमुक्त करणें.

Disentail (dis'-en-tāl') [ L. *dis*, asunder & Entail.] *v. t. law.* (एकदां ठरवून टाकलेली) वारसांची परंपरा मोडून टाकणें-बाजूला ठेवणें.

Disentangle (dis-en-tang'-gl) [ L. *dis*, the opposite of, & Entangle.] *v. t. to free from entanglement, to reduce to orderly arrangement* (आंतील) घोंटाळा काढून टाकणें, सुव्यवस्थित करणें, व्यवस्थितपणें ठेवणें. २ *to extricate from complications & perplexity, to set free* गोंधळापासून मुक्त करणें, सोडवणें, मोकळा करणें. Disentan'gled *a.* Disentan'glement *n.*

Disenthral (dis'-en-thrawl') [ L. *dis*, the opposite & Enthral. ] *v. t. to release from slavery* (गुलामगिरींतून) मोकळें करणें, (ला) स्वतंत्रता देणें. Also Disenthrall, Disinthral. Disenthral'ment, Disenthrall'ment *n.*

Disenthrone (dis'-en-thrōn') [ L. *dis*, asunder & Enthrone. ] *v. t.* (*Milt.*) गादीवरून काढणें, अधिकार काढून घेणें.

Disentitle (dis'-en-tī'-tl) [L. *dis*, & Entitle.] *v. t. to deprive of title or claim* हक्क *m*- अधिकार *m.* काढून घेणें.

Disentomb (dis-en-tōōm') [L. *dis* & Entomb.] *v. t.* थडग्यांतून उकरून बाहेर काढणें.

Disentrance (dis'-en-trans') *v. t.* मूर्च्छा नाहींशी करून सावध करणें, मूर्च्छा उडवणें.

Disentwine (dis'-en-twīn') *v. t.* (ची) वीण उसकटणें, उकलणें.

Disepalous (dī-sep'-al-us) *a. bot.* द्विपर्ण (बाह्यपुष्पकोश).

Disestablish (dis-es-tab'-lish) [ L. *dis*, asunder & Establish.] *v. t. to unsettle, to break up (anything established)* अस्थिर करणें, संस्था मोडणें-उठविणें. (*b*) *to deprive a church of its connection with the state* देवस्थानाचा संस्थानाशीं असलेला संबंध तोडून टाकणें. Disestab'lishment *n.* अस्थिर करणें *n*, &c. २ संस्थानांतून देवस्थानाच्या खर्चाकरितां पैसा न देणें *n.*

Disesteem (dis-es-tēm') [ L. *dis* & Esteem. ] *n. want of esteem, disfavour, disrepute* अपमान *m*, अवमान *m*, अव्हेर *m*, नाचक्की *f*, बेअब्रू *f*, इतराजी *f*, अवकृपा *f.* D. *v. t. to feel an absence of esteem for, to slight* (ची) चहा नसणें, (वर) इतराजी-नाराजी *f.* न करणें-असणें, अपमान करणें, तिरस्कार करणें. Disestimā'tion *n.*

Disfavour (dis-fā'-vėr) [ L. *dis* & Favour. ] *n. the state of not being in favour* अवकृपा *f*, कटाक्ष *m*, रोष *m*, दुर्दृष्टि *f*, इतराजी *f*, खप्पा मर्जी *f*, गैरमर्जी *f*, अप्रसन्नता *f*, अप्रसाद *m.* २ *disesteem, disregard* नापसंती *f*, नावड *f*, नावडतेपणा *m*, अरुचि *f.* ३ *an unkindness* अपकारक गोष्ट *f*, अदयता *f*, अवकृपा *f.* (*fig.*). D. *v. t. to regard or treat with the reverse of favour or good will, to discountenance, to treat with disapprobation* इतराजी-गैरमर्जी-अवकृपा करणें, रोषानें वागविणें, प्रोत्साहन न देणें, नापसंती दर्शविणें. Disfa'vourer *n.*

Disfigure (dis-fig'-ūr) [ L. *dis* & Figure. ] *v. t. to mar the figure of, to deface, to deform* विरूप-विद्रूप-कुरूप-व्यंग-बदसुरत-बेडौल-खराब करणें, रूपनाश-रूपभंग करणें, छिन्नभिन्न करणें. Disfigurā'tion *n.* रूपनाश *m*, रूपभंग *m.* Disfigure'ment *n.* विरूपता *f.* २ *a defacement, a blot* डाग *m*, कलंक *m.*

Disforest (dis-for'-est) [ L. *dis*, asunder & Forest.] *v. t.* See Disafforest. २ झाडी-जंगल तोडणें.

Disfranchise (dis-fran'-chīz) [L. *dis*, asunder & Franchise.] *v. t. to deprive of a franchise or chartered right, to dispossess of the rights of a citizen* (-चे) हक्क-सनद काढून घेणें, नागरिकत्वाचा-मत देण्याचा अधिकार काढून घेणें. Disfran'chisement *n.*

Disfurnish (dis-fėr'-nish) *v. t.* (चें) सामानसुमान काढून घेणें-टाकणें. २ वांचून-रहित करणें.

Disgarnish (dis-gär'-nish) *v. t.* पोषाख काढून घेणें.

Disgorge (dis-gawj') [ Fr. *degorger*, earlier *desgorger*–Fr. *de, des* (L. *dis*) & Gorge. ] *v. t. to eject or discharge by the throat or mouth, to vomit* ओकणें, उगळणें, ओकून-उगळून टाकणें, उद्गीर्ण करणें. २ *to give up unwillingly as what one has wrongfully seized and appropriated* (लबाडीनें हरण केलेलें) नाइलाजानें-नाखुषीनें परत देणें-स्वाधीन करणें; as, "He was compelled to D. his ill-gotten gains." D. *v. i. to vomit forth what anything*

*contains, to discharge* ओकून टाकणें, परत करणें. Disgorge'ment *n.*

Disgrace ( dis-grās' ) [ M. Fr. *disgrace*—It. *disgrazia*—L. *dis*, apart & *gratia*, grace. ] *n. the condition of being out of favour, loss of favour, regard or respect* अप्रतिष्ठा *f*, मानहानि *f*, मानखंडणा *f*, अपमान *m*, अपयश *n*, इतराजी *f*, गैरमर्जी *f.* २ *the state of being dishonoured, dishonour, shame, ignominy* बद्लौकिक *m*, बदनाम *n*, बदनामी *f*, बेअब्रू *f*, पची *f* (*colloq.*), फजीती *f*, फजीतवाडा *m.* ३ *that which brings dishonour, cause of shame, great discredit* लज्जास्पद-निंद्य गोष्ट *f*, बेअब्रू करणारी गोष्ट *f*, कलंक *m*; as, "A. D. to a family." D. *v. t. to put out of favour, to dismiss with dishonour* कृपेंतून-मर्जीतून काढणें-घालवणें, फजीत करून काढून टाकणें-लावणें-देणें. २ *to bring reproach or shame upon, to lower in estimation* लाजवणें, लाज *f.* आणणें, अब्रू *f.* इज्जत *f.* घेणें, बेअब्रू *f.* करणें, मानभंग *m.* मानहानि *f.* अपमान *m.* अप्रतिष्ठा *f.* करणें, तोंडास काळिमा लावणें, पागोटें-नाक खालीं करणें (*fig.*). ३ *to upbraid, to revile* निंदा करणें. Disgraced *a.* मर्जीतून-कृपेंतून उतरलेला-गाळलेला-गळालेला. २ अपमान केलेला, लाजवलेला, अपमानित. Disgrace'ful *a. causing shame, bringing disgrace* लाज-शरम आणणारा, लाजिरवाणा, निंद्य, लज्जास्पद, बेअब्रू करणारा, कलंक लावणारा, अपमानकारक, अपयशाचा. Disgrace'fully *adv.* Disgrace'fulness *n.* Disgra'cer *n.* Disgra'cious *a.* शोभारहित, असुखकारक.

Disguise ( dis-gīz' ) [ O. Fr. *desguiser*, to disguise—O. Fr. *des* ( L. *dis* ), apart & *guise*, guise. See Guise. ] *v. t. to change the guise or appearance of, esp. to conceal by an unusual dress* सोंग देणें-घेणें, (विशेष पोषाखानें) खरें स्वरूप लपविणें, (च्या सोंगानें-वेपानें) रूप लपविणें, वेष-सोंग घेणें-देणें. २ *to hide by a counterfeit appearance, to cloak by a false show* कपटवेष देणें-घेणें, ( कपटवेषानें ) खरें रूप झांकणें. ३ (*Shakes.*) *to affect or change by liquor, to intoxicate* (कैफ देऊन) गुंगविणें, (दारू पाजून) बेहोष करणें. Disguise, Disguise'ment, Disgui'sing *n. a dress or exterior put on for purposes of concealment or of deception* सोंग *n*, वेष *m.* २ *artificial language or appearance assumed for deception, false appearance* आकारगोपन *n*, आकारगुप्ति *f*, सोंग *n*, कपटवेष *m*, छद्मवेष *m*, कपटरूप *n*, बतावणी *f*, छद्म (S.), छल (S.), व्याज (S.), व्यपदेश (S.). ३ (*Shakes.*) *intoxication* धुंदी *f*, निशा *f.* Disguised *a.* सोंग-वेष दिलेला, &c. Disguisedly *adv.* Disguis'edness *n.* Disguis'er *n.*

Disgust ( dis-gust' ) [ M. Fr. *desgouster*, *to* distaste, to loath—O. Fr. *des-* (L. *dis-*), apart *&* *gouster*, to taste, from L. *gustare*, to taste.] *n. repugnance to what is offensive* वीट *m*, कंटाळा *m*, किळस *m*, *for* चिळस *f*, खंत *f*, खंती *f*, तिरस्कार *m*, त्रास *m*, तिटकारा *m.* D. *v. t. to provoke disgust or strong distaste for, to excite aversion to* ( often with *at*, *with* or *by*) कंटाळवणें, वीट *m-* कंटाळा *m.* आणणें, किळस *m-* चिळस *m.* आणणें. Disgust'ed *a.* Disgust'edly *adv.* Disgust'ing, Disgust'ful *a.* कंटाळवाणा, किळसवाणा, &c., Disgust'ingly *adv.* Disgust'ingness *n.* Disgust'fulness *n.*

Dish ( dish ) [ M. E. *disch*; A. S. *disc*, a dish—L. *discus*, a quoit, a platter. ] *n. a vessel, a platter, a plate &c., used for serving food at the table* बशी *f*, ताटली *f*, ताट *n*, थाळा *m*, थाळी *f.* २ (*fig.*) *food served in a dish, any particular kind of food* ताटांत वाढलेलें अन्न *n*, पक्वान्न *n*, ताट *n.* ३ *the state of being concave* ( ताटासारखी ) अंतर्गोलता *f.* ४ *a hollow place, as in a field* शेतांतील खोलगट जागा *f.* ५ (*a*) अशुद्ध धातु मोजण्याचें २८×४×६ इंचांचें घनमाप *n.* (*b*) खाणीच्या उत्पन्नापैकीं जमिनीच्या मालकास दिलेला भाग *m.* D. *v. t. to put in a dish ready for table* ताटें-पानें वाढणें. २ अंतर्गोल करणें. ३ (*law*) *to frustrate, to beat* चीत करणें. [ To DISH OUT वाढलेलीं ताटें ज्याच्या त्याच्या पुढें मांडणें. To D. UP (स्वयंपाकाच्या भांड्यांतून) अन्न काढून ताटांत वाढणें. ] Dish-clout,-cloth *n.* ताटें पुसण्याचा कपडा *m.* Dish-cover *n.* ताटावर झांकण ठेवण्याचा कपडा *m.* Dishes & platters, *compreh.* थाळीठावकें. Earthen D. मृण्मयपात्र *n*, परळ *n.* Flat, earthen dish खापर *n.* Wooden D. with a handle दांडपाळें *n.*

Dishabille ( dis-a-bēl' ) [ Fr. *deshabille*—Fr. *deshabiller*, to undress—Fr. *des* ( L. *dis* ), apart, away, un, & *habiller*, to dress.] *n. a loose negligent dress* (घरांत वापरण्याचा) पायघोळ झगा *m*—आंगरखा *m*, कफनी *f.*

Dishearten ( dis-hāʀt'n ) [L. *dis*, asunder & Heart.] *v. t. to dispirit, to discourage* निराश करणें, ( काम चालत असतांना मध्येंच) (ची) कंबर खचविणें (*fig.*), (ची) नाहिंमत-मनोभंग *m.* करणें, धैर्य *n.* खचविणें, (चा) हिरमोड *m.* करणें, (ची) नाउमेद *f.* करणें. Disheart'ened *a.* धैर्य खचलेला. Disheart'ening *a.* धैर्य खचविणारा.

Disherit ( dis-her'-it ) [ Fr. *desheriter*—Fr. *des* & *heriter* to inherit. ] *v. t.* ( *obs.* ) वारसा काढून घेणें. Disher'ison *n.* वारसपणानें प्राप्त झालेल्या मिळकतीचा उपभोग घेऊं न देणें *n.* Disher'itor *n.* वारसपणाचा हक्क काढून घेणारा.

Dishevel ( dis-shev'-el ) [ M. Fr. *discheveler*, to disorder the hair—O. Fr. *des-*( L. *dis-*), apart & *chevel* ( Fr. *cheveu* ), a hair, from L. *capillum*, acc. of *capillus*, the hair of the head. ] *v. t. to suffer the hair to hang loosely & disorderly*

(used chiefly in the passive participle) (केंस) विखरणें-पिंजरणें-फिंदरणें. २ *to spread loosely or disorderly* अस्ताव्यस्त रीतीनें पसरणें. Dishev'elled *a.* विखरलेला, पिंजरलेला. Dishev'elment *n.*

Dishonest (dis-on'-est) [L. *dis* & Honest. या शब्दाचा मूळ अर्थ बेअब्रूचा, हलकट असा होता.] *a.* (persons) *wanting in honesty, void of integrity, faithless* अप्रामाणिक, विश्वासास-भरंवशास अपात्र, नेकी नसलेला, दगेखोर, बेइमान, फसव्या, लफंगा, लबाड, हराम, खोडसाळ. २ (of actions) *discreditable as being at variance with straightforward or honourable dealing, characterised by fraud, knavish, unjust* कपटाचा, लुच्चेगिरीचा, लबाड, हरामाचा, हरामखोरीचा, लबाडीचा, अप्रामाणिकपणाचा, अन्यायाचा, अधर्माचा. Dishon'estly *adv.* Dishon'esty *n. want of honesty, probity or integrity in principle, faithlessness* अप्रामाणिकपणा *m*, अविश्वास *m*, अनार्जव *m*, बेइमानी *f*, बेइमानीपणा *m*, दगलबाजी *f*. २ *violation of trust or of justice, a dishonest act* लबाडी *f*, न्यायातिक्रमण *n*, अन्याय *m*, लुच्चेगिरी *f*, *spec.* विश्वासघात *m*, अनीति *f*, कापट्य *n*, कुटिलता *f*. ३ *lewdness, unchastity* (*Shakes.*) शिंदळकी *f*, व्यभिचार *m*.

Dishonour (dis-on'-ėr) [L. *dis* & Honour.] *n. lack of honour, disgrace, ignominy* अपमान *m*, अवमान *m*, *m*, मानभंग *m*, कलंक *m*, अप्रतिष्ठा *f*, अपयश *n*, अपेश *n*, अपकीर्ति *f*, बेअब्रू *f*, मानहानी *f*. २ (*a*) (*law.*) *non-payment of commercial paper by the party on whom it is drawn* हुंडीचा नाकार *m*- अस्वीकार *m*. (*b*) नापत *f*. D. *v. t. to deprive of honour, to disgrace, to stain the character of* अपमान करणें, मानभंग-मानखंडना-अप्रतिष्ठा-फजिती-बेअब्रू करणें, अब्रूस कलंक लावणें, नांवास काळिमा लावणें, लाज आणणें, चारचौघांत अपमान करणें, अप्रतिष्ठेनें वागविणें. २ *to violate the chastity of, to debauch* (चें) पातिव्रत्य-भंग करणें, (ची) अब्रू-इज्जत घेणें-मळविणें, (शीं) व्यभिचार करणें. ३ *to refuse or decline to accept or pay* हुंडी नाकारणें, हुंडीचा स्वीकार न करणें. Dishon'ourable *a. entailing dishonour, ignominious, shameful, disgraceful, base* मानहीन, लज्जास्पद, नीच, अश्लाघ्य, अपमान-कारक-कारी, इजतखाऊ, इजतघेऊ, कलंक लावणारा; as, "More disgraceful & more D. conduct has never characterised the British service." २ (of persons) *devoid or negligent of honour, meriting shame & reproach, base, despicable* हलके वर्तणुकीचा, अधमवृत्तीचा, हलकट, नीच, पाजी. Dishon'ourableness *n.* Dishon'ourably *adv.* Dishon'oured *a.* अपमान केलेला, अवमानिलेला, अवमानित. २ अस्वीकृत, (हुंडी वगैरे) लागू न झालेली. Dishon'ourer *n.* Dishon'ouring *n.* मानखंडना *f*, मानभंग *m*.

Dishorse (dis-hors') *v. t.* घोड्यावरून खालीं उतरणें, (द्वंद्वयुद्धांत) घोड्यावरून खालीं पाडणें.

Disillude (dis-il-lūd') *v. t.* (ची) माया-भ्रम-निरास करणें-घालवणें, भ्रम उडविणें. Disillu'sion *n.* माया-भ्रम-निरास *m*. D. *v. t.*-(ची) माया-भ्रम नाहींसा करणें. Disillu'sionise *v. t.* माया-भ्रम घालविणें. Disillu'sionment *n.* भ्रमनिरास *m*. Disillu'sive *a.*

Disimprove (dis'-im-prōōv') *v. t. to make worse,* बिघडविणें, नीच स्थितीस आणणें. D. *v. i. to grow worse* बिघडणें, अवनति होणें, वाईट स्थिति होणें.

Disinclination (dis'-in-kli-nā'-shun) *n. the state of being disinclined, slight aversion or dislike, indisposition* कल-ओढा नसणें *n*, अनादर *m*, मन उडणें *n*, विरुद्धकल *f*. Dis'incline *v. t. to incline away the affection of, to excite a slight aversion to* (च्या विषयीं) नावड *f*-निरुत्साह उत्पन्न करणें, (च्यावरून) प्रीति *f*-मन *n*. उडवणें. Dis'inclined *a.* [To BE D. (कडे) मन न घेणें, मनोदेवता न वाहणें.]

Disincorporate (dis'-in-kor'-pō-rāt) [L. *dis*, asunder & Incorporate.] *v. t. to deprive of corporate powers or privileges* व्यक्तित्वाधिकार काढून घेणें, अनधिकारी करणें, सनदीमंडळीचे हक्क काढून घेणें, सनदीमंडळीची संस्था बंद करणें. २ *to detach from a corporation* मंडळींतून काढणें-फितविणें. Dis'incorporā'tion *n.* अधिकारहरण *n*.

Disinfect (dis'-in-fekt') [L. *dis*, asunder & Infect.] *v. t. to free from infectious or contagious matter, to destroy putrifaction, to purify* (हवा, घरें, वस्त्रें इ०) शुद्ध करणें, संसर्गनिवृत्ति करणें, संसर्गनिवर्तन करणें, रोगबीजरहित करणें, रोगाच्या गुप्तसंचारी बीजापासून मुक्त करणें. Dis'infec'tant *a.* रोगबीजरहित-शुद्ध करणारा, *chem.* सूक्ष्मकृमिघ्न. D. *n.* रोगबीजरहित करणारें औषध *n*, संसर्गनिवर्तक-संसर्गनाशक-जंतुनाशक औषध *n*, जंतु मारणारें-जंतूंचें विष मारणारें औषध *n*, जंतुघ्न *n*, कृमिघ्न *n*, सूक्ष्मकृमिघ्न *n*. Dis'infec'tion *n.* रोगबीजरहित करणें *n*, शुद्ध करणें *n*. Dis'infec'tor *n.* रोगबीजरहित करणारा. २ रोगबीजरहित करणारीं औषधें लावण्याचें उपकरण *n*, कृमिघ्नद्रव्ययंत्र *n*, कृमिघ्नयंत्र *n*.

Disingenuous (dis'-in-jen'-ū-us) [L. *dis*, not & Ingenuous.] *a. not noble, mean, unworthy* (of persons) कुढा, कपटी, मनाचा कुढा, हीन, अनुदार, आंतल्या गांठीचा, नीच, वांकडा, खोटा, अयोग्य. २ *not ingenuous, uncandid, meanly artful* कपटाचा, हलकट, कुढेपणाचा, खुनशी. Dis'ingen'uously *adv.* Dis'ingen'uousness *n.* कुढेपणा *m*, कुढाभाव *m*, कापट्य *n*, कपटभाव *m*.

Disinherit (dis'-in-her'-it) [L. *dis*, asunder & Inherit.] *v. t. to cut from an inheritance* (चा) हक्क-वारसा काढून घेणें. २ *to deprive of heritage, to dispossess* मिळालेली जिंदगी काढून घेणें. Dis'inher'itance *n.*

Disintegrate (dis-in'-te-grāt) [L. *dis*, asunder & *integer*, whole, entire.] *v. t. to separate into integrant parts, to reduce to fragments or to powder*

(चे) (भाग-घटकावयव) निरनिराळे करणें, तुकडे तुकडे करणें, चूर्ण करणें, चुरा करणें. D. *v. i.* पृथक्करण होणें, चुरा होणें. Disin'tegrable *a.* Disin'tegrā'tion *n.* फुटणें *n*, विश्लेष *m*, *chem.* तुकडे-चूर्ण होण्याची क्रिया *f*, चूर्णक्रिया *f.* २ *geol.* (बर्फ-धुकें-हवा इत्यादिकांच्या स्वाभाविक व्यापारानें) खडक वगैरे फुटून जाण्याची क्रिया *f.* ३ *med.* भाग निरनिराळे होणें *n.* Dis'integra'tive *a.* Dis'integra'tor *n. mech.* (आघातानें-प्रहारानें) चूर्ण करण्याचें-दळण्याचें यंत्र *n*, उभा खलबत्ता *m.*

Disinter (dis'-in-tĕr') [L. *dis*, the opposite of & Inter.] *v. t. to take out of the grave or tomb, to unbury, to dig up* (थडग्यांतून) उकरून काढणें, खणून काढणें. २ *to bring from obscurity into view* उजेडास -उघडकीस आणणें. Dis'inter'ment *n.*

Disinterested (dis-in'-tĕr-est-ed) [L. *dis*, asunder & Interested.] *a. free from selfish motive* (स्वार्थ)निरपेक्ष, निस्पृह, निस्स्वार्थी. २ *not biased or prejudiced* तटस्थ, निःपक्षपाती, समबुद्धि, निःस्पृह, उदासीन. Disin'terest'edly *adv.* निरपेक्षबुद्धीनें. २ निःस्पृहबुद्धीनें. Disin'terest'edness *n.* (स्वार्थ) निरपेक्षता *f.* २ निःस्पृहता *f*, निःपक्षपात *m.*

Disinthral or Disinthrall (dis'-in-thrawl') *v. t.* See Disenthrall.

Disjoin (dis-join') [L. *dis* & Join.] *v. t. to part, to separate, to sunder* वियोग-भेद-विश्लेष करणें, (चा) संबंध तोडणें, वेगळा-वियुक्त करणें. D. *v. i.* वेगळा-वियुक्त होणें.

Disjoint (dis-joint') *v. t. to separate the joints of, to put out of joint, to dislocate* सांधा *m*-संधि *m*-सांध *f.* उखळणें-उसकटणें-उपटणें, संधिभेद करणें, स्थानभ्रष्ट करणें. २ *to separate at joints, to break in pieces* (चे) सांधे वेगळे वेगळे करणें, सांधे-उकटणें,-मोडणें-सोडवणें. ३ *to break the natural order & relations of, to make incoherent* (चा) स्वाभाविक क्रम-संबंध मोडणें-बदलणें. D. *v. i.* तुकडे होऊन पडणें. Disjoint'ed *a.* सांधा उखळलेला, संधिविश्लिष्ट, &c. २ स्थानभ्रष्ट, पूर्वापरसंबंधरहित, असंबद्ध. Disjoint'edness *n.*

Disjunct (dis-junkt') *a.* (R.) अलग, निराळा, वियुक्त, विभिन्न. Disjunc'tion *n.* वियोग *m.* २ *logic.* पक्षान्तरवाक्य *n.* Disjunc'tive *a.* वियोगकारी. २ (*gram.*) पक्षान्तरबोधक, विभाजक. [D. CONJUNCTION पक्षान्तरबोधक उभयान्वयी अव्यय *m.* D. PROPOSITION पक्षान्तरवाक्य *n.* D. syllogism पक्षान्तरानुमान *n.*] D. *n.* पक्षान्तरबोधक उभयान्वयी अव्यय *n.* २ (*logic.*) पक्षान्तरवाक्य *n.* Disjunc'tively *adv.* Disjunc'tor *n.* Disjunc'ture *n.*

Disk (disk) [L. *discus*, a quoit. See Dish, Disc.] *n.* (a) *discus* चपटी बांगडी *f.* (b) *quoit* चक्र *n.* अशीं चक्रें ग्रीस लोक अद्यापिही डोक्यांत बाळगतात. २ *a flat, circular plate* चक्राकृति-चाटोळी तबकडी *f*; as, "A. D. of metal or paper." ३ *astron. the circular figure of a celestial body, as, seen projected on the heavens* बिंब *n*, मंडल *n.* ४ *biol.* वर्तुल *n*, चक्र *n.* ५ *bot.* कर्णिका *f.*

Dislike (dis-lïk') [L. *dis*, not & Like.] *n. a feeling of positive & usually permanent aversion to something unpleasant, uncongenial or offensive; disapprobation, repugnance, displeasure, disfavour* नावड *f*, अप्रियता *f*, अरुचि *f*, नापसंती *f*, तिटकारा *m*, द्वेष *m.* D. *v. t. to regard with aversion, to disapprove, to disrelish* नापसंत वाटणें, (ची) नावड-अप्रीति असणें, (चा) तिटकारा-द्वेष करणें. Dislike'able, Dislik'able *a.* Disliked' *a.* नापसंत. Dislike'ness *n.* (R.)

Dislocate (dis'-lō-kāt) [From *pa. p.* of Late L. *dislocare*, to put out of place–L. *dis*, apart & *locare*, to place, from *locus*, place.] *v. t. to displace* स्थानभ्रष्ट करणें, अव्यवस्थित करणें, मूळ स्थिति बिघडविणें, (*esp.*) हाडांचा सांधा निखळणें-उखळणें, (एका हाडाची दुसऱ्या हाडाशीं असणारी) स्वाभाविक रचना मोडणें. D. *a.* स्थानभ्रष्ट केलेला, &c. Dislocā'tion *n.* स्थानभ्रंश *m.* २ भूगर्भांतील खडक, थर इत्यादिकांचा स्थानभ्रंश *m.* ३ (*med.*)-*act.* सांधा उखळणें *n.* (*b*)-*state* अस्थिभ्रंश, च्युति *f*, अव्यवस्था *f*, बिघाड *m.*

Dislodge (dis-loj') [L. *dis* & Lodge.] *v. t. to drive from a lodge or place of rest* (विश्रांति) स्थानापासून काढून टाकणें-हालवणें, (ची) तळी उचलणें, (ला) उखडणें. २ *to drive out from a place of hiding* हुसकणें, हुसकविणें, उच्चाटन करणें, (चा) उठाव करणें- *or of defence* (शत्रूंना) दडणीच्या किंवा इतर आसऱ्याच्या ठिकाणावरून-जाग्यावरून हांकून लावणें, आसनभ्रष्ट करणें. D. *v. i.* (ठिकाण-विश्रांतिस्थान) सोडून जाणें. Dislodg'ment *n.* स्थानभ्रष्टता *f*, उच्चाटन *n*, उठाव *m.*

Disloyal (dis-loi'-al) [L. *dis*, not & Loyal.] *a. not loyal, not true to a sovereign or lawful superior, false where allegiance is due, faithless* अराजनिष्ठ, सरकाराशीं-राजाशीं बेईमान-हराम, राजद्रोही, राजशासनावमानी. Disloy'ally *adv.* Disloy'alty *n.* अराजनिष्ठा *f*, बेइमानी *f.*

Dismal (diz'-mal) [Orig. A. Fr. *dismal*, unlucky days,–L. *dies mali*, evil days. Perhaps from O. Fr. *disme*, Fr. *dime*, tithe, the phrase *dismal day* properly meaning the day when tithes must be paid.] *a. gloomy to the eye & ear, sorrowful & depressing to the feelings, cheerless, dull* दिसण्यास किंवा ऐकण्यास भयंकर-स्मशान-भयानक, उद्वेगजनक, अशुभसूचक, उदास, कोंदट, ओंधट, मळिण (said of weather). [A. D. DAY दुर्दिन, कुदिन (CANDY).] Dis'mally *adv.* Dis'malness *n.* The Dismals *n. pl. the dumps, low spirits* उदासीनता *f.*

Dismantle (dis-man'-tl) [M. Fr. *dismanteller*–O. Fr. *des-* (L. *dis-*), apart & *manteler*, to cloak.] *v. t. to strip or deprive of dress, to divest* पोषाख काढून घेणें, वस्त्रहरण करणें. २ *to strip of furniture*

& *equipments, guns, &c.* (युद्धाचें सामान) जमीनदोस्त करणें, गांवकुसूं-किह्याची तटबंदी मोडणें. ३ *to disable, to render useless* नालायक-अशक्त करणें, शक्ति कमी करणें. [ To D. A HOUSE घर मोडणें-पाडणें. ]

Dismask ( dis-mäsk′ ) *v. t.* बुरखा काढणें. २ उघडकीस आणणें.

Dismast ( dis-mäst′ ) [ L. *dis* & Mast. ] *v. t.* डोलकाठी काढून घेणें, डोलकाठ्या मोडणें. Dismast′ment *n.* (R.)

Dismay ( dis-mā′ ) [A hybrid word. O. Fr. *desmayer* –Fr. *des* ( L. *dis* ) & O. H. Ger. *magan* ( Ger. *mogen* ) = A. S. *magan*, to have right or power. ] *v. t. to disable with alarm & apprehension, to depress the spirits & courage of, to appal, to terrify* भयानें गाळण करणें-उडविणें-गर्भगलित करणें, गांगरवून टाकणें, खूब भेवडावणें-भिवविणें, पांचांवर धारण बसविणें, हिंमत-धैर्य खचविणें, धैर्यभंग करणें, धाक-दहशत घालणें. D. *v. i.* ( ची ) हिंमत तुटणें, ( ला ) धाक-दहशत बसणें. D. *n.* दहशत *f*, भय *n*, गाळण *f*, धाक *m*. Dismay′edness *n.* Dismay′ful *a.*

Disme ( dēm ) [ Of French origin. Cf. Sk. ( दशम ).] *n.* दहावा भाग *m*.

Dismember ( dis-mem′-bėr ) [ L. *dis* & Member. ] *v. t. to tear limb from limb, to tear or cut in pieces, to break up* अवयव छेदणें-खंडणें-तोडणें-वेगळे करणें, अंगच्छेद-गात्रच्छेद करणें, विस्कलित करणें, तुकडे तुकडे करणें, छिन्नविच्छिन्न करणें, मोडणें. Dismem′berment *n.* निरनिराळे भाग करणें *n*, अवयवच्छेद *m*, विशकलन *n*.

Dismiss ( dis-mis′ ) [ A coined word; suggested by Fr. *desmettre*, p. p. *desmis*, to displace, to dismiss; L. *dimittere*,—L. *di* ( L. *dis* ), apart, away & *mittere*, to send. ] *v. t. to send away, to give leave of departure* पाठवून देणें, रजा देणें, रवानगी करणें, निरोप देणें, बोळवणी-पाठवणी करणें, बोळविणें. २ *to remove or discharage from office, service or employment* चाकरीवरून काढणें-दूर करणें, बडतरफ करणें. ३ *to lay aside or reject as unworthy of attention or regard* (जमेस धरण्याजोगी नाहीं म्हणून एखादी गोष्ट ) बाजूस गुंडाळून ठेवणें, लक्षांत न घेणें, (कडे) दुर्लक्ष करणें, काढून टाकणें. [To D. AN ASSEMBLY सभा विसर्जन करणें, बरखास्त करणें. To D. FROM THE MIND मनांतून काढून टाकणें. ] Dismis′sal *n.* रजा *f*, निरोप *m*, बोळवण *n*, पाठवणी *f*. २ बडतरफी *f*. ३ दुर्लक्ष *n*. Dismis′sion *n.* Dismissed *a.* निरोप दिलेला, बोळविलेला, घालवून दिलेला, विसर्जित. २ पदच्युत, पद-अधिकारभ्रष्ट. Dismis′sive *a.*

Dismortgage ( dis-mor′-gāj ) [ L. *dis*, asunder & Mortgage.] *v. t. to redeem from mortgage* गहाण सोडवणें-मुक्त करणें.

Dismount ( dis-mownt′ ) [ L. *dis* & Mount. ] *v. t. to throw or bring down from an elevation, place of honour or authority* खालीं फेंकणें-लोटणें-आणणें. (*b*) अधिकारावरून खालीं आणणें, ( चा ) दर्जा कमी करणें, (उच्च पदावरून) उतरविणें, खालीं आणणें. २ *to unhorse* घोड्यावरून खालीं आणणें-पाडणें. ३ ( *mech.* ) ( यंत्र ) खालीं उतरणें-घेणें. (*b*) ( यंत्र ) सोडणें ( as, opposed to जोडणें ). ४ ( *artillery* ) (तोफखान्याच्या गाड्या मोडून व सामान वगैरे काढून घेऊन) तोफा निकामी-निरुपयोगी करणें. D. *v. i.* उतरणें, खालीं येणें, अवरोहण करणें. २ घोड्यावरून उतरणें.

Disobedient ( dis-ō-bē′-di-ent ) [ L. *dis* & Obedient.] *a. neglecting or refusing to obey, refractory* अवज्ञा करणारा, हुकूम मोडणारा, बेहुकमी, आज्ञा-हुकूम न मानणारा, आज्ञातिक्रमी. २ अनम्र, न जुमानणारा, ( चा ) अम्मल चालूं न देणारा. Dis′obe′dience *n.* अवज्ञा *f*, हुकूम मोडणें *n*, आज्ञोल्लंघन *n*, आज्ञाभंग *m*. Dis′obe′diently *adv.*

Disobey ( dis-ō-bā′ ) [ L. *dis*, not & Obey.] *v. t. to refuse or neglect to obey, to violate command* अवज्ञा करणें, आज्ञा *f*-हुकूम *m*, मोडणें-तोडणें, आज्ञाभंग *m*-आज्ञोल्लंघन *n*. करणें. D. *v. i.* आज्ञा मानण्याचें नाकारणें.

Disoblige ( dis-ō-blīj′ ) [ L. *dis*, the opposite of & Oblige.] *v. t. to do an act which contravenes the will or desires of, to displease* उपकार न करणें, उपकारीं-उपयोगीं न पडणें, विरुद्ध वागणें, अनादरानें मन दुखविणें, नाखुष करणें, अनुपकारानें-अकृपेनें असंतुष्ट करणें. Disobligā′tion *n.* उपकार न करणें *n*. २ (R.) उपकारांतून-ऋणांतून मुक्त करणें *n*, उतराई होणें *n*. Dis′obliga′tory *a.* Dis′oblige′ment *n.* Dis′obli′ging *a.* नाखुष करणारा, &c., कापल्या करांगुळीवर न मुतणारा, अनुपकारी. २ अनुपकारी, उपकार न करणारा. Dis′obli′gingly *adv.* Dis′obli′gingness *n.*

Disorder ( dis-or′-dėr ) [ L. *dis* & Order. ] *n. want of order, lack of arrangement, confusion, disarray* अव्यवस्था *f*, गोंधळ *m*, गैरबंदोबस्त *m*, गडबड-सडबड *f*, उलथापालथ *f*, गाबाळ *f*, विस्कळ *f*, अस्ताव्यस्तता *f*, घोंटाळा *m*, भग्नप्रक्रम *m*, *mili.* व्यूहभंग. २ *neglect of order or system, irregularity* व्यवस्थेची हयगय *f*, गैरशिस्त *f*, शिस्त मोडणें *n*, पद्धत्यतिक्रम *m*, नियमोल्लंघन *n*. ३ *breach of public order, disturbance of the peace of society, tumult* शांतताभंग *m*, अस्वस्थता *f*, गलबल *f*, धांदल *f*. ४ *disturbance of the functions of the animal ecomony, sickness, derangement* शारीरिक व्यापारांत बदल *m*- अव्यवस्था *f*- बिघाड *m*, आजार *m*, विकृति *f*, विकार *m*. D. *v. t. to disturb the order of, to derange* विसकळणें, अव्यवस्था-उलथापालथ-घालमेल-धांदल करणें. २ *to disturb or interrupt the regular & natural functions of either* (body or mind), *to discompose* विकार-विकृति उत्पन्न करणें, व्यथित होणें-करणें-देणें. Disor′dered *a.* विसकलित, अस्ताव्यस्त, &c. २ विकृत, आजारी. Disor′derliness *n.* अव्यवस्थितपणा *m*, अव्यवस्था

क्रमराहित्य *n*, क्रमशून्यता *f.* Disor'derly *a.* अव्यवस्थित, अस्ताव्यस्त, क्रमशून्य, गबाळ्या. २ *unruly, lawless, turbulent* कायद्यास न जुमानणारा, आडदांड, बेकायदा, अनावर. ३ (*law*) *offensive* गैरशिस्त. ४ विकृत. D. *adv.* अव्यवस्थितपणानें, गैरशिस्त रीतीनें. [DISORDER OF THE STOMACH कोठ्याचा विघाड-विकृति-विकार *f*, उदरव्याधी *m.* DISORDER OF THE INTELLECT मनाची अस्वस्थता *f*, बुद्धिभ्रम *m.* DANGEROUS DISORDER जिवावरचें भयंकर दुखणें *n*, जिवासांड रोग *m.* EXACERBATED DISORDER हातपाय टेंकावयास लावणारें-भयंकर-कंटाळवाणें दुखणें *n.* NATURAL DISORDER अंगभूत रोग, अंगरोग *m*, स्वाभाविक-नैसर्गिक रोग *m*, ( AS OPPOSED TO बाहेरवसा, भूतवाधा. ) ]

Disorganise ( dis-or'gan-īz' ) [ L. *dis*, & Organise. ] *v. t. to break up* ( what is organised ), *to throw into utter disorder* घडी-रचना-जुळणी-घटना मोडणें-तोडणें, अस्ताव्यस्त करणें. Disor'ganisā'tion *n.* रचना मोडणें *n*, अव्यवस्था *f*, उलथापालथ *f.* Disor'gani'ser *n.* घोंटाळा-धांदल करणारा. Disor'ganic *a.* घटनारहित, विन्यस्त. (S.)

Disown (dis-ōn') [L. *dis*, not & Own.] *v. t. to refuse to acknowledge as belonging to one's self* आपलें नाहीं असें म्हणणें. २ *to refuse to acknowledge or allow, to deny* नाकारणें, अस्वीकार-अंगीकार न करणें. Disowned *a.* नाकारलेला, &c. Disown'ing *n.* नाकारणें *n.*

Disparage ( dis-par-āj ) [ M. E. *desparagen*–O. Fr. *desparager*–O. Fr. *des*, apart & *parage*, rank–L. *dis*, apart, away & *paraticum*, society, equality of rank. ] *v. t. to dishonour by a comparison with what is inferior, to speak slightly of, to depreciate, to undervalue* (दुसऱ्यांचा ग्रह वाईट करण्याकरितां एखाद्या वस्तूची हलक्या वस्तूशीं तुलना करून ) कमीपणा आणणें, ( ला ) तुच्छ करणें, ( ची ) किंमत-योग्यता कमी करणें-हलकी करून दाखविणें. Dispar'agement *n.* (*obs.* ) हीन कुळाशीं विवाहसंबंध *m.* २ *injurious comparison with an inferior, diminution of value, dishonour, reproach, disgrace* ( commonly with *to*) नीच-हलक्या वस्तूशीं तुलना *f*, कमीपणा आणणारी गोष्ट *f*, कमीपणा आणणें *n*, अप्रतिष्ठा *f.* Dispar'ager *n.* अप्रतिष्ठा करणारा. Dispar'agingly *adv.* अपमानकारक रीतीनें.

Disparate ( dis'-pa-rāt ) [ L. *disparatus, pa. p.* of *disparare*–*dis* & *parare*, to make ready, prepare.] *a. unequal, dissimilar, separate* विजोड, विजातीय, विषम, भिन्न. Disparate'ness *n.* विषमता *f.* Dis'parates *n. pl.* अत्यंत भिन्न वस्तु *f.*

Disparity ( dis-par'i-ti ) [ Fr. *disparite*–L. *dis*, apart & Fr. *parite*, equality. ] *n. unequality, difference* ( in age, rank, condition or excellence & the like) *dissimilitude* ( वय-पदवी-स्थिति-गुण इ॰ मध्यें ) फेर *m*, फरक *m*, तफावत *f*, अन्तर *n*, भेद *m*, विजोडपणा *m*, विषमता *f*, असमानता *f.*

Dispart ( dis-pärt' ) [ O. Fr. *despartir*–L. *dis* & Part.] *v. t.* (*archaic*) भाग करणें, निराळा-वेगळा करणें, कापणें. २ ( *gun* ) *to make allowance for the dispart in a* (gun) कांहीं सूट सोडणें. (*b*) *to furnish with a dispart sight* ( बंदुकीला नेम धरण्यासाठीं ) माशी बसविणें. D. *v. i. to separate, to open, to cleave* निराळा होणें, उकलणें, भेगलणें. D. *n.* तोफेचा काना व तोंड या जवळच्या धातूच्या जाडीमधील अंतर *n.*

Dispassion ( dis-pash'-un ) *n. freedom from passion, an undisturbed state, apathy* विकारशून्यता *f*, निर्विकारस्थिति *f*, मनाची शांत स्थिति *f*, शांतता *f*, शांति *f.* Dispas'sionate *a. free from passion, not prejudiced, composed* विकाररहित, शून्य, शांत. (*b*) *judicial* समतोल बुद्धीचा, निःपक्षपाती. Dispas'sionately *adv.* निर्विकारबुद्धीनें, शांतपणानें, थंडपणानें, निःपक्षपातानें. Dispas'sioned *a.* (R.) विकाररहित.

Dispatch ( dis-pach' ) See Despatch.

Dispauper (dis-paw'-pėr) *v. t. to deprive of the claim of a pauper to public support* (सार्वजनिक आश्रयावरचा) भिकाऱ्यांचा हक्क काढून घेणें. (*b*) *to deprive of the privilege of suing in forma pauperis* नादारींत फिर्याद चालविण्याची मनाई करणें.

Dispauperise ;( dis-paw'-pėr-īz ) *v. t. to free from a state of pauperism* दारिद्र्यांतून मुक्त करणें. (*b*) *to free from paupers* एखाद्या प्रदेशांतून भिकार ( लोक ) काढून देणें-लावणें.

Dispel ( dis-pel' ) [ L. *dispellere*, to drive asunder –L. *dis*, apart & *pellere*, to drive. ] *v. t. to drive away by scattering, or so as to cause to vanish; to clear away, to banish* ( नाहींसे करण्याकरितां ) घालवणें, नाहींसा करणें, दवडणें, पळवणें, फांकविणें, दूर करणें, लयास नेणें, बारा वाटांस लावणें. Dispelled' *a.* घालवलेला, दवडलेला, &c.

Dispensary ( dis-pen'-sari ) [ Cf. Fr. *dispensaire.* ] *n. a place where medicines are prepared & dispensed esp. gratuitously to the poor* दवाखाना *m*, औषधालय *n*, औषधशाळा *f.*

Dispensation ( dis-pen-sā'-shun ) *n. distribution* वांटणें *n*, विभागणें *n*, वांटणी *f*, विभागणी *f*, देणें *n*, भागकल्पन *n*, ( often used of the distribution of good & evil by God to man. ) ईश्वराच्या घरचा नेमानेम *m*, ईश्वरी व्यवस्था *f*-सूत्र *n*- विधि *m.* नियोग *m*- संकेत. २ *that which is enjoined* विहितधर्म *m.* ३ *relaxation of a law in a particular case* (धार्मिक बाबतींत एखादा) नियम मोडण्याची परवानगी *f*, सवलत *f*, (विहित गोष्ट न करण्याबद्दल) माफी *f*, (निषिद्ध गोष्ट करण्याबद्दल) परवाना *m.* ४ *theol. a system of principles, promises, and rules ordained and admini-*

*stered* संहिता *f.* ह्यामधें विधि, नियम व फलें हीं सांगितलीं असतात. The word used for 'New dispensation' by ब्रह्मसमाज is नूतन संहिता. Dispen'sative *a.* Dispen'satory *a.* धार्मिक बाबतींत नियम मोडण्याची परवानगी देणारा-देण्याचा अधिकार असलेला. D. *n.* औषधें तयार करण्याच्या माहितीचें पुस्तक *n*, औषधप्रक्रियाग्रंथ *m.* Dispen'satorily *adv.*

Dispense ( dis-pens' ) [ O. Fr. *dispenser*, to dispense with–L. *dispensare*, to weigh out, frequentative form of *dispendere*–L. *dis*, apart & *pendere*, to weigh.] *v. t. to deal out in portions, to distribute, to give* खैरात करणें, देणें, वाटून देणें. २ *to apply* ( as laws to particular cases ), *to administer, to execute* ( कायदे ) लागू करणें-चालविणें-बजावणें-अमलांत आणणें-लावणें. ३ *to exempt, to excuse, to absolve* ( with *from*) नियमाच्या-कायद्याच्या बंधनांतून सुटका-मोकळीक मुक्तता करणें, सवलत देणें, ( ची ) माफी करणें. D. *v. i.* (धार्मिक बाबतींत) नियमोल्लंघनाची माफी देणें. [ To D. WITH (A) *to permit the neglect or omission of* ( AS FORM, CEREMONY &c. ) नियमाची हयगय होऊं देणें. ( B ) *to suspend the operation of* ( AS A LAW ) कायद्याची अम्मलबजावणी बंद ठेवणें. ( C ) *to give up, to release* त्याग करणें, सोडून देणें. ( D ) *to do without, to forego, to part with* वांचून-शिवाय भागविणें-चालणें. (E) *to allow by dispensation* धार्मिक बाबतींत नियमोल्लंघनाची आज्ञा देणें, मोकळीक देणें, माफी करणें. ( *b* ) *to break up or go back from, as one's word* वचनास फिरणें, वचनभंग करणें, वचन मोडणें. IT CANNOT BE DISPENSED WITH त्याशिवाय-वांचून चालणार नाहीं. ] Dispensed' *a.* Dispen'sing *a.* माफी करणारा, (कायद्याविरुद्ध गोष्ट करण्यास) परवाना देणारा. २ वांटणारा. Dispen'sable *a.* खैरात करण्याजोगा. Dispen'sabil'ity, Dispen'sableness *n.*

Dispeople ( dis-pē'-pl ) [ L. *dis*, asunder & People.] *v. t. to deprive of inhabitants, to depopulate* उजाड-निर्जन-ओसाड करणें. Dispeo'pler *n.* निर्जन करणारा.

Dispermous ( dis-pėr'-mus ) [Gk. *dia*, two & *sperma*, a seed. ] *a. bot. containing only two seeds* दोन बिया असणारें, द्विबीज.

Disperse ( dis-pėrs' ) [ M. Fr. *disperser*, From L. *pa. p. dispersus pa. p.* of *dispergere*–L. *di*-( for *dis*-) & *spargere*, to scatter. ] *v. t. to scatter abroad, to distribute, to spread* (निरनिराळे करून दाही-दिशांस) फांकविणें, चोहोंकडे विखरणें, उडविणें, उधळणें, दाही दिशांस पसरणें. *mili.* व्यूह मोडणें. २ *to scatter so as to cause to vanish, to dissipate* (अदृश्य होण्याकरितां चोहोंकडे) फांकविणें, नाहींसा करणें. D. *v. i. to separate, to go into different parts, to vanish* चोहोंकडे-दाही दिशा-रानोमाळ होणें-फांकणें, अदृश्य होणें, पांगापांग होणें, पांगणें, वेगळा-निराळा-पृथक् होणें, दूर-वर-जिकडेतिकडे जाणें होणें, विकीर्ण होणें. ४ *to distribute wealth, to share one's abundance with others* संपत्तीचें दान करणें, आपल्या संपत्तीचा दुसऱ्यासह उपभोग घेणें, आपल्या ऐश्वर्यांत दुसऱ्यास भागीदार करणें; as, "He hath dispersed, he hath given to the poor." Disper'sal *n.* पसरण्याची क्रिया *f.* Dispersed' *a.* उडवलेला, पसरलेला, परागंदा, रानोमाळ झालेला. Dispersedly *adv.* इतस्ततः, तजावजा. Dispersed'ness *n.* Dispers'er *n.* Dispers'ive *a.* प्रसरणशील, विकिरणशील.

Dispersion ( dis-pėr'-shun ) [ See Disperse. ] *n.–act.* उडविणें *n*, फांकवणें *n*, फांकणें *n*, पांगणें *n.*- *state.* उडवाउडव *f*, फांकाफांक *f*, वाताहत *f*, पांगणी *f.* [GENERAL D. पांगापांग OR गी *f.* ] २ *med.* सूज उतरणें-कमी करणें *n*, गोंठलेलें रक्त फांकणें *n.* ३ *optics. separation of light into its different coloured rays* (प्रकाशाचें पृथक्) विकिरण करणें *n.* [ DISPERSION OF LIGHT प्रकाशविस्पर्शन *n*, प्रकाशविकिरण *n.* ]

Dispirit ( dis-pir'-it ) [ L. *dis* & Spirit. ] *v. t. to deprive of cheerful spirits, to dishearten, to discourage* धीर-कंबर खचविणें, हिरमोड करणें, धैर्यभंग करणें, उदास-खिन्न-खट्टू-निरुत्साह करणें, नाहिंमत करणें, हर्षभंग करणें. Dispir'ited *a.* उमेद-छाती खचलेला, उदास, निरुत्साह, गतोत्स. Dispir'itedly *adv.* Dispir'itedness *n.* औदासिन्य *n*, विषण्णता *f*, निर्विण्णता, नाउमेद *f.* Dispir'iting *a.* हिंमत खचविणारा, हिरमोड करणारा, निरुत्साह करणारा.

Dispiteous ( dis-pit'-ē-us ) [ See Despite. ] *a. cruel, pitiless* क्रूर, निष्ठुर, निर्दय, पाषाणहृदय.

Displace ( dis-plās' ) [ L. *dis* & Place. ] *v. t. to change the place of, to move from the usual or proper place, to put out of place* स्थानच्युत-स्थलभ्रष्ट करणें. २ *to crowd out, to take the place of* ( च्या जागीं घुसल्यामुळें ) एकीकडे सरावयास लावणें, (च्या) जागीं जाऊन बसणें, ( ची ) जागा घेणें,-पटकावणें-मारणें; as, "Holland displaced Portugal as the mistress of the seas." ३ *to remove* (from a state, office, dignity or employment ), *to discharge, to depose* पदभ्रष्ट-स्थानभ्रष्ट-अधिकारभ्रष्ट करणें, ( कामावरून ) दूर करणें-काढून टाकणें, काढून लावणें. ४ (*obs.*) *to dislodge, to drive out, to banish* आश्रयाच्या जागेंतून हुसकून लावणें -देणें हद्दपार करणें, नाहींशी करणें. Displaced' *a.* स्थानच्युत, भ्रष्ट. Displace'ment *n.–act.* स्थानच्युत करणें *n.* -*state. chem. & math.* स्थलच्युति *f*, स्थानान्तर *n.* २ *med.* मोतीबिंबाचें स्थलांतर *n*- स्थलांतर. (*b*) ओषधी-वनस्पतींतून सत्व काढण्याची क्रिया *f.* ३ *the quantity or weight of a fluid displaced by a floating body* तरंगत्या ( गलबतानें ) पदार्थानें बाजूस सारलेलें पाणी *n.* [BY DISPLACEMENT METHOD आगंतुक रीतीनें.] Displa'cer *n.* ( ची ) स्थानच्युति करणारा. २ *chem.* स्थानच्युतिकर्ता.

Displant ( dis-plant' ) [ L. *dis* & Plant. ] *v. t. to remove* ( what is planted or fixed ), *to displace*,

*to root out* उपटून काढणें, ठिकाणावरून हांकलून लावणें, समूळ काढून टाकणें, उन्मूलन करणें. Displantā'tion *n.*

Display ( dis-plā' ) [ A. Fr. *desplayer*, O. Fr. *despleier*, to unfold–L. *dis*, apart & *plicare*, to fold. ] *v. t. to unfold, to spread wide, to expand* उघडणें, पसरणें, ताणणें. २ (*mili.*) *to extend the front of a column, bringing it into line* ( सैन्य एका ओळींत-रांगेंत आणून) अघाडी वाढविणें. ३ *to spread before the view, to show, to exhibit to the sight or to the mind* नजरेसमोर आणणें, दृष्टीस-नजरेस पाडणें, व्यक्त करणें, दाखविणें. ४ *to make an exhibition of, to set in view conspicuously, to parade* प्रदर्शन करणें, (डौल मिरविण्यासाठीं-लोकांच्या दृष्टीस पडावें म्हणून-लोकांत प्रसिद्धि व्हावी म्हणून) दाखविणें. ५ *print. to make conspicuous by large or prominent type* (ठळक-जाडा टाईप घालून विशेष रीतीनें) सुव्यक्त करणें. D. *v. t. to make a display of* ( चें ) प्रदर्शन करणें, आडंबर करणें. D. *n. an unfolding, a manifestation, an exhibition* उघड करून दाखविणें *n*, प्रकाशन *n*, थाट *m*, प्रदर्शन *n*. २ *an ostentatious show, an exhibition for effect* प्रदर्शन *n*, आडंबर *n*, भपका *m*, आव *m*, झाक *f.* Displayed' *a.* पसरलेला, प्रदर्शन केलेला, &c. २ ( *herald.* ) *with wings expanded* पंख पसरलेला, विस्तृतपक्ष. ३ ( *print.* ) ठळक टाईपांनीं विशेष रीतीनें नजरेस आणलेला. Display'er *n.* प्रदर्शन करणारा, &c.

Displease ( dis-plēz' ) [ O. Fr. *desplaisir*–Fr. *deplaisir*–Fr. *des* ( L. *dis* ) & *plaisir*, to please. ] *v. t. to make not pleased, to be disagreeable to, to offend* (often followed by *with* or *at*) नाखुष-असंतुष्ट करणें-ठेवणें,(मध्यें) अप्रीति-नावड उत्पन्न करणें,(ला) अप्रिय वाटणें, (चें) मन दुखविणें, (ला) खट्टू-नाराज करणें. Displeas'ed *a.* नाखुष केलेला, नाराज केलेला, असंतुष्ट. Displeas'edly *adv.* Displeas'er *n.* नाखुष करणारा, &c. Displeas'ing *a. offensive, disagreeable* नाखुष करणारा, असंतोषकारक, नाखुष, नापसंत, मन दुखविणारा.

*N. B.*—Displease usually expresses less than Anger, Vex, Irritate or Provoke.

Displeasure ( dis-plezh'-ėr ) [ See Displease. ] *n. irritation or uneasiness of the mind, dislike, dissatisfaction* नाखुषी *f*, गैरमर्जी *f*, खप्पामर्जी *f*, इतराजी *f*, असंतोष *m*, अवकृपा *f*, अप्रसन्नता *f.* २ *cause of irritation or annoyance, offence* असंतोषहेतु *m*, नाखुषीचें कारण *n*.

*N. B.*—असंतोष has now a tendency to be restricted to Discontent in English.

Displode ( dis-plōd' ) [ L. *displodere*,–L. *dis*, asunder & *plodere*, *plaudere*, to clap, to strike. ] *v. t. to discharge, to explode* (बार) उडविणें. D. *v. i. to burst with a loud report* ( मोठा आवाज होईल अशा रीतीनें ) धडाक्यानें फुटणें-उडणें. Displo'sion *n.* दारूचा धडका *m.* Displo'sive *a.*

Displume ( dis-plōōm' ) [ O. Fr. *desplumer*–Fr. *deplumer*–L. *dis* & Plume.] *v. t. to deprive of decoration, to dishonour, to degrade* ( ची ) शोभा हरण करणें, (ची) शोभा करणें (*fig.*), अपमान *m.* करणें, योग्यता *f.* किंमत *f.* कमी करणें.

Disport ( dis-pawrt' ) [ M. E. *disporten*, to amuse –O. Fr. *se desporter*, to amuse one's self–L. *dis*, away & *portare*, to carry ( hence to remove one's self from labour. ] *v. t. to divert, to amuse, to make merry* खेळवणें, रमवणें, (चें) मनरंजन करणें, (ची) करमणूक करणें. २ *to remove from a port, to carry away* ( बंदरांतून ) काढून नेणें-बाहेर काढणें, घेऊन जाणें. D. *v. i. to play* खेळणें, रमणें. D. *n.* खेळ *m*, विहार *m*, क्रीडा *f*, गंमत *f*, मजा *f*, करमणूक *f.*

Dispose ( dis-pōz' ) [ O. Fr. *disposer*, to arrange– O. Fr. *dis* ( L. *dis* ), apart & Fr. *poser*, to place. See Pose. ] *v. t. to set in order, to arrange* मांडणें, व्यवस्था करणें, रचणें, थाटणें, लावणें, रचना *f.* मांडणी *f.* करणें, नीटनेटकें करणें. २ *to regulate, to adjust, to settle* व्यवस्था लावणें, निकाल लावणें, नक्की करणें. ३ *to deal out, to assign to use, to bestow for an object, to apply* (च्या) कामास-कामीं लावणें, (च्या) कारणीं लावणें, वासलात-व्यवस्था लावणें, (च्या) उपयोगार्थ देणें, विशिष्ट हेतूकरितां देणें. ४ *to give a tendency or inclination to, to incline* (चें) मन वळविणें, (ला) वळविणें, (च्या) मनाला वळण लावणें-देणें, (ला) प्रवृत्त करणें. Dispo'sable *a.* विल्हेवाट लावतां येण्याजोगा. Dispo'sal *n. an arrangement* रचना *f*, व्यवस्था *f*, मांडणी *f.* २ *adjustment, management* विशेष रचना *f*, व्यवस्था *f*, रचाई *f.* ३ *the transference of anything into new hands, alienation* नवीन माणसाचे ताब्यांत जाणें *n*, विल्हेवाट *f*, निरवानिरव *f*, सोंपवासोपव *f.* ४ *the power to dispose of* (esp. in the phrase *at* or *in* the *disposal* of ) ( कोणत्याही गोष्टीचा ) निकाल लावण्याचा-उपभोग घेण्याचा अधिकार *m.* Disposed' *a.* कल-हेतु असलेला, &c. Disposed'ly *adv.* Dispos'er *n.* व्यवस्था-विल्हेवाट-निकाल लावणारा. २ नियामक, नियंता. ३ दाता. Dispos'ing *pr. p.* Dispos'ingly *adv.* [To DISPOSE OF *to determine the fate of* (चा) सोक्षमोक्ष ठरविणें, पखाद्या वस्तूचें अखेर काय करावयाचें हें ठरविणें, (चा) निकाल करणें-ठरविणें, (ची) निर्गत लावणें. २ (ची) व्यवस्था-वासलात-विल्हेवाट लावून मोकळें होणें. ]

Disposition ( dis-pō-zish'-un ) [Fr. *disposition*–L.acc. *dispositionem*, a setting in order–L. *dispositus pa. p.* of *disponere*, to set in various places, to arrange–L. *dis*, apart & *ponere*, to place. ] *n.–act.* व्यवस्था करणें *n*-ठरविणें *n*, देऊन टाकणें *n*, विल्हेवाट करणें *n*, &c. २ *arrangement, order* व्यवस्था *f*, रचना *f*, मांडणी *f*, मांडणूक *f.* ३ *tendency to any*

धरण्याचें जहाज *n.* २ *a sort of stone* खाणींत सांपडणारा एक विशिष्ट प्रकारचा दगड *m.* Dog'gish *a.* *churlish, growling, brutal* कुत्र्याच्या स्वभावाचा, गुरगुरणारा, फोंफावणारा, पशुतुल्य, रानवट, रानटी. Dog'gishly *adv.* Dog'gishness *n.* Dog'bane *n.* *bot.* पांढरा रस असलेलीं विषारी झुडपें *n. pl.* Dog'bee *n.* मधमाशींतला नर *m.* Dog-biscuit *n.* कुत्र्याला घालण्याचें बिस्कुट *n.* Dog'-bolt *n.* (*colloq.*) कुत्रें *n.* Dog-box *n.* (a) आगगाडीच्या ज्या भागांत कुत्रे ठेवितात ती जागा *f.* (b) कुत्र्याला बसण्याकरितां केलेली जागा *f.* Dog-cart *n.* एक घोड्याची दोनचाकी गाडी *f.* Dog *or* Dog's cabbage *n.* *bot.* एक विशिष्ट वनस्पति *f.* Dog-cheap *a.* (a) पैशानें पायली, अति-कमालीचा, स्वस्त. (b) हलकट. Dog-collar *n.* (a) कुत्र्याच्या गळ्यांतील पट्टा *m.* (b) गळ्याबरोबर बसणारी-घट्ट गळेपट्टी *f*-कालर *f.* Dog-days *n. pl.* ज्या दिवसांत लुब्धक (व्याध) ताऱ्याचा उदयास्त सूर्याबरोबर होतो असे दिवस *m*, जुलैच्या आरंभापासून सप्टंबरच्या आरंभापर्यंतचे दिवस *m.pl.* अक्षांशाच्या मानानें उदयास्ताच्या ह्या मुदतींत फरक पडतो. Dog's-eared, Dog-eared *a.* पानांचे कोंपरे मोडलेलें (पुस्तक *n.* इ.). Dog's-ear *n.* (पुस्तकाच्या पानाचा निष्काळजीपणानें) मोडलेला-मुरडलेला कोंपरा *m.* Dog-faced *a.* कुत्र्याच्या तोंडासारखा चेहरा ज्याचा आहे असा. Dog'-fancier *n.* (a) कुत्र्यांचा शोकीन. (b) कुत्र्यांचा व्यापार करणारा. Dog-fall *n.* कुस्ती खेळणाऱ्या दोघांचें जमिनीवर एकदम पडणें *n.* Dog-fish *n.* शार्क जातीचा लहान मासा *m.* Dog-fight *n.* कुत्र्यांची लढाई *f.* Dog-fox *n.* नर खोंकड *m.* Doggrass *or* Dog's-grass *n.* गव्हांच्या रोपड्यांसारखें एक प्रकारचें गवत *n.* Dog-headed *a.* कुत्र्याच्या डोक्यासारखें डोकें असलेला. Dog-hearted *a.* पाषाणहृदयी, निर्दय. Dog-hole *n.* (a) कुत्र्याचें घर *n.* (b) मनुष्यांस राहण्यास निरुपयोगी जागा *f.* Dog-house *n.* *kennel* कुत्र्यांचें घरकुटलें *n.* Dog-Latin *n.* अशुद्ध-घेडगुजरी ल्याटिन *n.* Dog-leech *n.* (*obs.*) कुत्र्यांचा वैद्य *m.* (b) *a quack* नाकाडोळ्यांचा वैद्य *m.* (*colloq.*) Dog's- letter *n.* R ह्या इंग्रजी अक्षरास हें नांव दिलेलें आहे. Dog-louse *n.* *zool.* कुत्र्यांच्या आंगावरची ऊ *f.* Dog's- meat *n.* कुत्र्यांचें अन्न *n*, उच्छिष्ट-अवशिष्ट अन्न *n.* Dog-plate *n.* कुत्र्यांच्या शर्यतींत बक्षिस लाविलेली तबकडी *f.* Dog-power *n.* *mech.* कुत्र्याचा रहाट *m.* Dog-ship *n.* कुत्र्यासारखा स्वभाव *m.* Dog-sick *a.* अतिशय आजारी. Dog-skin *n.* श्वानचर्म *n*, (a) कुत्र्याची कातडी *f.* (b) कुत्र्याच्या कातडीचें केलेलें कमावलेलें चामडें *n.* Dog-sleep *n.* कुत्र्याची झोंप *f*, सावध झोंप *f*, श्वाननिद्रा *f*, जागृतनिद्रा *f*, हलकी झोंप *f.* २ (*obs.*) झोंपेचें सोंग *n.* ३ *naut.* (बाकीच्या लोकांवर कामाचा ताण पडत असतांना घेतलेली) डुकली *f.* Dog-star (dog'-stär) *n.* लुब्धक *m*, लुब्धक तारा *m.* Dog-tooth (dog'-tōōth') *n.* सुळा *m*, सुळादांत *m.* Dog-vane *n.* *naut.* वारा कोणत्या दिशेस वाहतो हें पाहण्याकरितां डोलकाठीच्या शेंड्यावर लाविलेला पिसांचा झुबका *m.* Dog-watch *n.* संध्याकाळीं चार ते सहा व सहा ते रात्रीं आठ वाजेपर्यंत पहारा *m.* D. on it शपथ वाहण्याची-घेण्याची एक पद्धत-तऱ्हा *f.* To give *or* throw to the dogs निरुपयोगी म्हणून टाकून देणें. To go to the dogs चुलींत-मसणांत जाणें, (-चा) सत्यानास-सत्यनाश *m.* होणें. They lead a cat & dog life ते नेहमीं भांडतात. To lead the life of a dog नीचवृत्तीनें आयुष्य क्रमणें. A surly dog *n.* चिडखोर मनुष्य *m.* Dogs of war लढाईतील संकटें *n.* (अन्नपाण्याची टंचाई, मनुष्यहानि वगैरे.) Dogs don't eat dog सरकारी पत्रांना टपालहांशील पडत नाहीं. २ देवळास दिलेल्या जमिनीवर दशांश बसला जात नाहीं. A black dog has walked over him तो अगदीं उदास-खिन्न आहे A dog in the manger *n.* एखाद्या वस्तूचा आपण उपयोग न करितां दुसऱ्यासही घेऊं-उपयोग करूं-न देणारा मनुष्य *m.* Every D. has his day दोन दिवस सासूचे, दोन दिवस सुनेचे; आज तुझे चांगले दिवस आहेत, उद्यां माझे येतील. Gone to the dogs भिकेस लागलेला, धुळीस मिळालेला. He has not a dog to lick his feet त्याला कुत्रा देखील विचारीत नाहीं. Hungry dogs will eat dirty puddings भुकेला कोंडा *m*, "क्षुधातुराणां न रुचिर्नवेला," भूक लागलेली असली म्हणजे दगड सुद्धां चालतात. Old dogs will not learn new tricks जुन्या चालीचे लोक नव्या चाली स्वीकारणार नाहींत. Throw, send, or give it to the dogs उकिरड्यावर फेंकून दे. To give a dog a bad name & hang him कोणाची नुकसानी करावयाची असेल तर आधीं त्याची नालस्ती करावी.

Dogged (dog'-ged) *a.* (*obs.*) & (R.) *sullen, morose* दुर्मुखलेला, खिन्न, सदाउदास. २ *sullenly obstinate, obstinately persistent* पिच्छा न सोडणारा-पुरविणारा, निश्चयी, आग्रही, निश्चयाचा, हट्टी. Dog'gedly *adv.* निश्चयानें, नेटानें. Dog'gedness *n.* (R.) उदासीनता *f*, खिन्नता *f*, दुर्मुखता *f.* २ आग्रह *m*, हट्ट *m*, नेटाचा निश्चय *m.*

Doggerel, Doggrel (dog'-gėr-el) *n.* *a sort of loose or irregular verse, mean or undignified poetry* भिकार-कमी दर्जाचें काव्य *n*, हलकी कविता *f.* D. *a.* *low in style & irregular in measure* विषम व अधम.

Doggy (dog'-i) *a.* कुत्र्यांचा शोकी.

Dogma (dog'-ma) [Gr. & L. *dogma*, a received opinion.] *n.* *a doctrine, a tenet* मत *n*, तत्व *n.* २ *a formally stated & authoritatively settled doctrine* अनुशासन *n*, आदेश *m*, प्रमाणवचन *n.* ३ *an arbitrary dictum* निरंकुश-अनिर्बंध-अनियंत्रित-दुराग्रहाचें मत *n*, (सत्य अथवा पुरावा यांजकडे लक्ष न देतां) प्रस्थापिलेलें-प्रतिपादित मत *n*, स्वतःच्याच जोरावर ठोकून दिलेलें मत *n.* Dogmat'ic,-al *a.* स्थापित-सिद्ध मताविषयींचा. २ दुराग्रहाचा. ३ मताभिमानी, हटवादी, (दुराग्रहामुळें) निश्चयात्मक, हेकेखोर. Dogmat'ically *adv.* हटवादीपणानें. Dogmat'ics *n.* *theol.* *the science which*

treats of Christian doctrines, doctrinal theology ख्रिस्तमतशास्त्र n- दर्शन n, ख्रिस्तीधर्मतत्वांसंबंधीं शास्त्र n. Dog'matise v. i. to assert positively, to advance with arrogance खात्रीनें-निश्चयानें-आग्रहानें-हट्टानें प्रतिपादन करणें-प्रपादणें-सांगणें-प्रस्थापणें, प्रौढीनें-आढ्यतेनें-तोऱ्यानें स्वमत सांगणें-ठोकून देणें. v. t. (R.) to deliver as a dogma स्वमत म्हणून सांगणें. Dog'matiser n. स्वमतदुराग्रही. Dog'matism n. arrogance or positiveness in stating opinion स्वमताभिमान m, स्वमताग्रह m, हेका m, हटवाद m, दुराग्रह m. Dog'matist n. स्वमताभिमानी, हटवादी.

Doily (doy'-li) n. हातपुसणें n, टुवाल m, हातरुमाल m.

Doit (doyt) n. a small Dutch coin worth about half a farthing अर्ध्या फार्दिंगच्या किंमतीचें एक लहान डच नाणें n. २ any small piece of money कवडी f, दमडी f, दिडकीदुगाणी f. ३ any thing of small value, a trifle क्षुल्लक बाब f.

Dolabra (dō-lā'-brā) [L. dolabra, a cleaver–dolare, to hew.] n. a rude ancient axe or hatchet प्राचीन काळची ओबडधोबड कुऱ्हाड f. Dolab'riform a. bot. कुऱ्हाडीच्या डोक्याच्या आकाराचा.

Doldrums (dōl'-drums) n. pl. a part of the ocean near the equator abounding in calms & variable winds जेथें नेहमीं शांत व अनियमित वारे वाहतात असा भूमध्यरेषेच्या-विषुववृत्ताजवळचा समुद्राचा भाग m- प्रदेश m. २ a condition of dullness बसून राहण्याची-निकामी बसण्याची स्थिति f, उदासीनता f. [To BE IN THE D. naut. स्वस्थ पडून राहणें.]

Dole (dōl) [M. E. dol, dale, A. S. dale, dāl, a division.] v. t. to deal out scantily or grudgingly or in small portions तुटपुंजीपणानें-चिकट हातानें देणें-वांटणें, लहानलहान भाग देणें, अल्प प्रमाणानें देणें. D. n. distribution वांटणी f. २ a part, share, portion वांटा m, हिस्सा m, भाग m. ३ alms, charitable gratuity दान n, धर्म m, देणगी f. ४ a boundary, a landmark हद्द f, खुणा f. ५ a void space left in tillage ओसाड टाकलेली जमीन f, लागवड न केलेली-पडीक जमीन f.

Dole (dōl) [O. E. dol–Fr. doloir, to suffer–L. dolere, perh. akin to dolare, to hew.] n. grief, sorrow, lamentation दुःख n, शोक m, दिलगिरी f. Dole'ful a. full of grief शोकाकुल, शोकमग्न, उद्विग्न. २ exciting sorrow खेदकारक, शोकावह, शोकप्रद. ३ sad, dismal रडका, रडवा, रडकुंडा, म्लान, विषण्ण, उतरलेल्या तोंडाचा, खिन्न. [DOLEFUL COUNTENANCE रडकें तोंड n, रडकी मुद्रा f, रोती सुरत f.] Dole'fully adv. Dole'fulness n. रडवेपणा m, रडकेपणा m, रडवें-रडकें-उतरलेलें तोंड n. Dolent a. (obs.) दुःखी. Dole'nte a. adv. (mus.) करुण किंवा करुण स्वरानें. Dole'some a. शोकमग्न, शोकाकुल. २ खेदकारक, शोकावह, शोकप्रद.

Do-little (dōō'-lit-tl) n. (colloq.) one who performs little though professing much कृतीपेक्षां मचमच फार करणारा, ज्याचें करणें थोडें पण बोलणें फार आहे असा मनुष्य m.

Doll (dol) [A contraction of Dorothy.] n. a girl's toy baby (लहान मुलींची खेळण्याची) बाहुली f- पुतळी f, खुंटवावली f, पुत्रिका f. २ a pretty but silly woman शहाणपणापेक्षां सौंदर्यानें जास्त शोभणारी स्त्री f- पुतळी f. Doll'dom n. Doll'hood, Doll'ship n.

Dollar (dol'-lėr) [Low Ger. daler, Dut. daalder, a dollar. Adapted and borrowed from Ger. thaler, a dollar.] n. स्पेन देशांतील व अमेरिका खंडांतील एक नाणें आहे; त्याची किंमत सुमारें सव्वादोन रुपये आहे डालर m. Doll'ared a. श्रीमंत, धनवान्. Doll'arless a. द्रव्यहीन, गरीब. Dollar-fish n. युनायटेड स्टेट्समधील एक प्रकारचा मासा m.

Dolour, Dolor (dō'-lėr) [See 2nd. Dole- Fr.–L. dolere, to feel pain.] n. (poetic) pain, grief, distress, anguish दुःख n, शोक m, खेद m, संकट n, चिंता f, काळजी f, हृद्रोग m. Dolorif'erous a. दुःखजनक. Dolorif'ic a. दुःखाचा, शोक m-खेद m. कारक-जनक-दायक, दुःखद-प्रद-दायक, शोकावह. Doloroso a. & adv. mus. करुणस्वरयुक्त, करुण रसाचें आविष्करण करणारा. Dol'orous a. शोककारक, खेदकारक. Dol'orously adv. Dol'orousness n. शोकजनकत्व n, दुःखदायित्व n.

Dolphin (dol'-fin) [O. Fr. daulphin (now dauphin)–Folk L. dalphinum, for L. delphinum acc. of delphinus, a dolphin. Gr. delfis.] n. zool. a kind of fish एक प्रकारचा मासा m. (हा मासा मरत असतांना याचे रंग वरचेवर पालटतात.) २ a mass of iron or lead hung from the yardarm in readiness to be dropped on the deck of the enemy's vessel शत्रूचे गलबतावर टाकून त्यास अटकाव करण्याकरितां गलबतावर ठेवलेला लोखंडाचा वगैरे गोळा m. ३ astron. a small northern constellation (पूर्वेकडील एक लहान) डॉलफिन नांवाचा तारा m. ४ any contrivance resembling or fancifully likened to a dolphin डालफिनच्या आकाराची कोणतीही वस्तु f- यंत्ररचना f. Dolphin-fly n. zool. घेवड्याच्या शेंगांचा नाश करणारी आळी f.

Dolt (dōlt) [M. E. dult = dulled –M. E. –dul, dull.] n. a heavy, stupid fellow; a blockhead, a dullard दगड m, धोंडा m, टोणपा m, मूर्ख m, नंदी m, नंदीबैल m, शहाण्याची खरवड f. D. v. i. (obs.) मूर्खपणाचें आचरण ठेवणें. Dolt'ish a. जड-मंदमतीचा, जडबुद्धि, मूर्ख. Dolt'ishly adv. Dolt'ishness n.

Domain (dō-mān') [Fr. domaine–O. Fr. demaine, adj. –L. dominicus, adj. dominus, a lord.] n. dominion, authority सत्ता f, अधिकार m, ताबा m, मालकी f. २ territory over which dominion or authority is exercised, possessions of a sovereign or the like, empire राज्य n, राष्ट्र n, ताब्यांतील-अधिकाराखालचा-हाताखालचा मुलूख m- प्रदेश m, स्वसत्ताक्रांत भाग m- प्रदेश m. ३ demesne, landed

*property* वतनी जमीन *f.* ४ *law. ownership of land, patrimony which one has in his own right, absolute proprietorship* जमिनीची मालकी *f,* स्वतःचे ताब्यांत असलेली वडिलार्जित मालमत्ता *f,* अनियंत्रित मालकी *f.* [ PUBLIC D. ( U. S. ) सार्वजनिक उपयोगाची जागा *f.* EMINENT D. राज्यांतील सर्व जमिनीवर राजाची पूर्णसत्ता *f-* मालकी *f.* ] Doma'inal, Doma'nial *a.* ताब्यांतील प्रांतासंबंधी. २ सत्तेसंबंधी.

Dome ( dōm ) [ Fr. *dome*–It. L. *domus*, a house.] *n. a house, an edifice,* ( chiefly in Poetry ) इमारत *f,* घर *n.* २ *arch. a cupola formed on a large scale* घुमट *m,* डेरा *m,* कळस *m.* ३ *any erection resembling the dome or cupola of a building* घुमटाकार रचना *f,* घुमटाकृति वस्तु *f,* घुमट *m.* Domed *a.* घुमट असलेला. Dom'ical *a.* घुमटाकार, घुमटाकृति.

Domesday ( dōōmz'dā' ) [ See Doomsday.] Doomsday book–इंग्लंड देशचा राजा, पहिला वुइल्यम ह्यानें केलेलें इंग्लंड देशांतील एकंदर कुळंबाऱ्यांचें नोंदणी-मोजणीबुक; ह्या बुकाचे दोन भाग असून त्यांत प्रत्येक ठिकाणाची 'कन्फेसर'च्या कारकीर्दीतील किंमत, वुइल्यमनें इंग्लंड देश काबीज केला त्या वेळची ( इ. स. १०६६ ) किंमत व नोंदणीच्या वेळची ( इ. स. १०८६) किंमत हीं नमूद केलेलीं होतीं, व एखादा जमिनीच्या मालकीचा तंटा उपस्थित झाल्यास त्याचा निर्णय या नोंदणीबुकावरून करीत. हें पुस्तक विंचेस्टर येथील देवळाच्या (Domus-dei) नांवाच्या भागांत ठेविलेलें असे म्हणून त्यास ( Domesday-book ) असें नांव पडलें, असें Stow चें मत आहे. इतर कित्येक विद्वानांच्या मतें ह्या शब्दाची उत्पत्ति (Dom bocs ) ह्या शब्दापासून झाली आहे. (Dom-bocs) म्हणजे पूर्वीच्या सॅक्सन राजांनीं केलेल्या मोजण्या.

Domestic ( dō-mes'-tik ) [ Fr. *domestique*–L. *domus*, a house.] *a. pertaining to one's house or household, relating to home life* प्रापंचिक, घरगुती, घरांतील, गृह्य, घरच्यासंबंधीं. २ *pertaining to one's own country, intestine, not foreign* स्वराष्ट्रांतील, देशी, देशीय, स्वदेशान्तर्गत ; as, "Foreign wars & D. dissensions." ३ *remaining much at home, devoted to home duties* गृहप्रिय-लंपट-निमग्न, गृहासक्त, घर सोडून फारसा बाहेर न जाणारा, घरच्या व्यवहारांत सुख मानणारा, बायक्या (*colloq.*), घरकोंबडा, चुलकोंबडा. ४ *living near the habitations of men, domesticated, tame* माणसाळलेला, घरसंवईचा, पाळींव, पाळलेला, घरगुती, घराऊ (?). ५ *made in one's own house, nation or country* स्वदेशी, स्वदेशोत्पन्न, आपल्या देशांत तयार केलेला, देशी; as, "D. manufactures &c." D. *n. a hired household assistant, a house servant* घरीं ठेवलेला-घरचा-घरांतला चाकर *m-*नोकर *m,* कामकरी *m,* घरचाकर *m,* गडी *m,* कामकरीण *f,* गृह-भृत्य *m-*किंकर *m.* ( S. ) D. *n. pl.* ( *commerce* ) *articles of home manufacture or produce, esp.* ( *in U. S.* ) *cotton goods bleached or unbleached for common use* देशांत तयार होणारा माल *m-*जिन्नस *m.* D. *n.* ( *obs.* ) कुटुम्ब *n.* Domes'tically *adv.* घरगुती-खासगी रीतीनें. २ गृहकृत्यासंबंधानें. Dōmes'ticate *v. t. to make domestic, to habituate to home life* (-ला) घरची संवय लावणें. २ *to cause to be, as it were, of one's family or country* आपल्याच घरचा किंवा देशांतील म्हणून ग्रहण-स्वीकार करणें, आपल्या घरांत किंवा देशांत चालू-सुरू करणें, स्वदेशी-स्वकुटुम्बीय करणें, आपला-आपलासा-आपलीशी-करणें; as, "To D. a foreign custom or word." ३ *to tame or reclaim from a wild state* माणसाळवणें, जंगली स्थितींतून बाहेर आणणें. Domes'tica'ted *a.* माणसाळवलेला, पाळींव, घरसंवयीचा, माणसाळलेला. Domes'ticā'tion *n.* माणसळवणें *n,* जंगली प्राण्यांना माणसाळवण्याची क्रिया *f.* Domes'tica'tor *n.* माणसाळवणारा *m.* Domestic'ity *n.* घरगुतीपणा *m.*

*N. B.*—DOMESTIC ARCHITECTURE: गृहादिइमारतशास्त्र *n,* वास्तुशास्त्र *n.* DOMESTIC ECONOMY प्रापंचिक मितव्ययाचीं तत्वें *n. pl.* DOMESTIC DUTIES घरकाम *n,* गृहकर्म *n* (S.), गृहकृत्य *n-*कार्य *n.* (S.) DOMESTIC SQUABBLING गृहकलह *m-*भेद *m,* यादवी *f.*

Domicile, Domicil ( dom'-i-sīl or sil ) [ O. Fr. *domicile*–L. *domus*, a house. ] *n. a place of permanent residence* वसति-निवास-स्थान *n,* कायमची राहण्याची जागा *f-* ठिकाण *n.* २ *law. a residence at a particular place accompanied with an intention to remain there for an unlimited time* कोणत्याही एका विवक्षित ठिकाणीं तेथेंच कायमचें राहण्याचे बुद्धीनें केलेला वास *m-* घर *n,* (कायमचें) घर करून राहणें *n.* ३ *com. the place at which a bill of exchange is made payable* ज्या ठिकाणीं हुंडी लागू करावयाची ती जागा *f.* D. *v. t.* एखाद्या ठिकाणीं कायमची वस्ती करावयास लावणें.

Dominant ( dom'-i-nant ) [L. *dominans*, *antis*, *pr. p.* of *dominari*, to rule over—*dominus*, a lord. ] *a. ruling, governing, prevailing, predominant, controlling* सत्ता चालविणारा, प्रबल, प्रधान, श्रेष्ठ, जबरदस्त, जोराचा, प्राबल्यवान्, सत्ताधीश, श्रेष्ठ, अद्याधिकारी. २ ( *mus.* ) गाण्यांतील पांचव्या स्वरासंबंधी. D. *n. mus.* गाण्यांतील पांचवा ( उंच ) स्वर *m.* Dom'inance, Dom'inancy *n.* सत्ता *f,* अधिकार *m,* प्राबल्य *n,* प्राधान्य *n,* श्रेष्ठत्व *n.* Dom'inantly *adv.*

Dominate ( dom'-i-nāt ) [ L. *dominatus*, *p. p.* of *dominari*, to dominate. *dominus*, a lord. ] *v. t. to predominate over, to rule, to govern* अधिकार-सत्ता-अम्मल चालविणें; as, "A city Dominated by the axe." D. *v. i. to be dominant* प्रमुख होणें, सत्ताधीश असणें. D. *v. t. to rule over, to control,* (-वर) अधिकार *m-*सत्ता *f.* चालविणें-गाजविणें, (-वर) राज्य करणें. D. *v. i. to be dominant, to lord it over* प्रबल-जबरदस्त होणें. Dominā'tion *n. dominion, supre-*

*macy, authority* (often arbitrary or insolent way) सत्ता *f*, अधिकार *m*, प्रभुत्व *n*, आधिपत्य *n*, जुलूम *m*, जबरदस्ती *f*, अरेरावी *f*. २ (R.) *a ruling party, party in power* सत्ताधीश-राज्य करणारी मंडळी *f*-मंडळ *n*. ३ *pl. a high order* (the fourth of the nine orders) *of angels in the celestial hierarchy* देवदूतांच्या नऊ वर्गांपैकीं चवथा वर्ग *m*. Dom'inative *a*. अधिकार *m*-सत्ता *f* चालविणारा-गाजविणारा, जुलमी, उद्धट, धृष्ट (S.). Dom'inator *n*. सत्ता *f* अधिकार *m*- राज्य *n*. चालविणारा.

Domineer (dom-i-nēr') [See Dominate above.] *v. i. to rule with insolence, to be overbearing, to tyrannize* (often with *over*) (वर) कडक-करडा-जलाल अम्मल करणें-चालविणें, करडी कमान चालविणें, -वर जुलूम करणें, गर्वानें फुगणें-फुगून जाणें, जलाली करणें. D. *v. t.* कडक रीतीनें-करडा अम्मल चालविणें, हुकमत करणें-चालविणें. Domineer'ing *a*. शेखी *f*- झेंडा *m*. मिरविणारा, प्रभुत्व गाजविणारा, उद्धट.

Dominical (dō-min'-i-kul) [O. Fr. *dominical* Late. L. *dominicalis*, belonging to the Lord's day or to the Lord.—L. *dominus*.] *a. indicating, or pertaining to the Lord's day or Sunday* (ख्रिस्ती लोकांमध्यें) प्रभूचा (विश्रांतीचा) दिवस जो आदितवार त्या दिवसासंबंधीं-तो दाखविणारा. २ *relating to, or given by, the Lord* ख्रिस्तासंबंधीं, येशूनें दिलेलें. [D. or Sunday letter सबंध वर्षांतील रविवार दाखविण्याकरितां खुणेसाठीं पंचांगांत A. B. C. D. इ. सात अक्षरें असतात त्यांपैकीं एक अक्षर *n*.]

Dominican (dō-min'-i-kun) [New. L. *dominicanus*,—*dominicus*, *dominic*, the founder.] *a. Eccl.* डॉमिनिकन् धर्मोपदेशकांसंबंधीं. D. *n. a friar of the order founded by St. Dominic* (about 1215) डॉमिनिक यानें स्थापन केलेल्या पंथापैकीं धर्मोपदेशक *m*- साधु *m*.

Dominicide (dō-min'-i-sīd) [L. *dominus*, a master & *caedere*, to kill, to cut down.] *n. the act of killing a master* स्वामिहत्या *f*. २ *one who kills his master* स्वामिघातक *m*, आपल्या धन्यास ठार मारणारा, निमकहराम (*colloq.*).

Dominion (dō-min'-yun) [O. Fr. *dominion*—Late L. *dominio*, equiv. to L. *dominium*, Lordship.] *n. sovereign or supreme authority, power of governing & controlling, supremacy* पूर्णसत्ता *f*- अधिकार *m*, अम्मल *m*, आधिपत्य *n*, प्रभुत्व *n*, श्रेष्ठत्व *n*, राज्य-नियंत्रणसत्ता *f*, हुकूम *m*. २ *superior prominence, predominance, ascendency* वर्चस्व *n*, प्राबल्य *n*, वरचढपणा *m*, प्राधान्य *n*, जोर *m*, शिरजोरपणा *m*.. ३ *that which is governed, territory under authority* राज्य *n*, ताब्यांतील-हाताखालचा मुलूख *m*, अधिकारांतील देश *m*, स्वसत्ताक्रांत प्रदेश *m*. [D. day ता० १ जुलई स० १८६७ रोजीं अमेरिकेंतील कानडा प्रांताची "धि डोमिनियन् ऑफ् कानडा" या नांवानें स्थापना करण्यांत आली; तो दिवस प्रतिवर्षी उत्सव म्हणून तेथें पाळण्यांत येतो त्यास हें नांव लावतात.]

Domino (dom'-i-nō) [Fr. *domino*, *orig.* a master's hood, late a masquerade-dress—L. *dominus*, a master.] *n. a kind of mask* (chiefly, a half mask worn at masquerades to conceal the upper part of the face) (कपटवेष *m*-सोंग *n*. घेतांना घालण्याचा तोंड झांकण्याकरितां केलेला) सैल झगा *m*. २ *a person wearing a domino* कपटवेष-सोंग घेणारा मनुष्य *m*. ३ *a kind of hood worn by canons* क्यानन (जोगी) लोकांनीं डोकीवर घालण्याचा पोषाख *m*. ४ *costume worn as a disguise* मुखवटा *m*. ५ *a mourning veil formerly used by women* पूर्वीं सुतकामध्यें स्त्रिया जो एक प्रकारचा बुरखा वापरीत असत तो. A kind of game played with 28 flat oblong pieces of ivory or bone एक प्रकारचा सोंगट्यांसारखा खेळ.

Dominus (dom'-i-nus) [L. *dominus*, master.] *n. pl.* Domini. *a master* धनी *m*. २ *sir* (a title of respect) महाराज, सरकार (हा बहुमानवाचक शब्द पूर्वीं योद्ध्यांस किंवा धर्मोपदेशकांस लावीत असत).

Don (don) [Span.—L. *dominus*, a lord.] *n. Sir, Mr. signior* (a title in Spain, formerly given to noblemen & gentlemen only, but now common to all classes). स्पेन देशांतील एक पदवी *f*. (ही पदवी पूर्वीं फक्त सरदार व बडे लोक यांना मिळत असे.) साहेब, मिस्तर. २ *a man of distinction, position, or importance* मोठा मनुष्य *m*, शिष्टजन *m*, महाजन *m*, बडा-थोर गृहस्थ *m*, आर्य *m*. ३ *a head fellow or tutor of a college* (Eng. universities) पाठशाळेचा-कॉलेजचा मुख्य *m*- फेलो *m. fem.* Dona, Donna. ही पदवी अनुक्रमें स्पेन व इटलीमध्यें स्त्रियांस लावतात. [Prima Donna: the principal female singer in an opera संगीत नाटकांतील नायिका-मुख्य गाणारी स्त्री *f*.] Don'nish *a*. विद्वत्तेची घमेंड बाळगणारा, घमेंड्या. Don'nism *n*. (Cantab, Eng. uni.) अहंमन्यता *f*, ताठपणा *m*, प्रौढी *f*, शेखी *f*. Don'ship *n. the personality or rank of a don or gentleman* सरदार-गृहस्थ-वीर यांची पदवी *f*, किंवा योग्यता *f*.

Don (don) [Do + on; -oppo. to *doff*.] *v. t. to put on, to dress in* घालणें, आंगावर घेणें, आंगांत घालणें, पेहेरणें.

Donate (dō'-nāt) [L. *donatus*, *p. p.* of *donare*, to donate-*donum*, gift-*dare*, to give.] *v. t. to give, to bestow, to present* देणें, बक्षीस देणें, नजर-बक्षीस करणें. Donā'tion *n. the act of giving or bestowing, a grant* देणें *n*, दान करणें *n*. २ *that which is given as a present, a gift* दान *n*, देणगी *f*, इनाम *n*, बक्षीस *n*, नजराणा *m*. ३ *law. the act or contract by which a person voluntarily transfers the title to a thing of which he is the owner, from himself to*

*another, without any consideration* बक्षिस-इनाम देण्याची क्रिया *f*, किंवा करार *m*, खुषीनें दिलेली देणगी *f*. Do'nary *n*. (R.) *a thing given to a sacred use* (ईश्वरार्पित देवास) वाहिलेली वस्तु *f*. Don'ative *n*. *gift, present* देणगी *f*, बक्षीस *n*. २ *Eccl. a benefice conferred upon a person by the founder* उपाध्याय-वृत्ति *f*. Dona'tor *n*. *law*. बक्षिस-देणगी देणारा. Don'atory *n*. (Scots-Law.) सरकारांत जमा केलेली बेवारशी मालमत्ता कांहीं अटींवर ज्यास दिलेली असते तो मनुष्य *m*. Donee' *n*. ज्याला बक्षिस *n*- दान *n*. दिलें आहे तो मनुष्य *m*. Dō'nor *n*. बक्षिस-देणगी देणारा. Donatis comet *astron*. डोनेटिस यानें शोधून काढलेला धूमकेतु. हा इ. स. १८५७ मध्यें प्रथमतः फ्लॅारेन्स शहरीं डोनेटिस यांस २ जूनला दिसला. पुढें तो सप्टेंबरपर्यंत इतका तेजस्वी झाला कीं दुर्बिणीच्या साहाय्यावांचून तो सर्वांच्या दृष्टीस पडत असे.

Done (dun) *pa. p.* of Do. केलेला, कृत. २ कबूल (केलेलें).

Doni (dō'-ni) [Tamil *tōni*. Sk. द्रोणी.] *n. naut*. एका डोलकाठीची नाव *f*- मचवा *m*. (कारोमांडल व सीलोनचे किनाऱ्यावर व्यापार करण्यांत यांचा उपयोग करितात.)

Donjon (dun'-jun) [See Dungeon.] *n. the chief tower* किल्ल्याचा मुख्य बुरूज *m*, किल्ल्यांतील सैन्याच्या रक्षणाकरितां केलेला मजबूत भाग *m*.

Donkey (don'-ki) [Probably *dun*, from the colour of the animal, and *key*, a diminutive termi.] *n. an ass* गाढव, गर्दभ *n & m*, or (less frequently) *a mule* खेंचर *n*. २ *a stupid fellow* मूर्ख-जडबुद्धीचा मनुष्य *m*, गद्धा *m*, गधडा *m* (*colloq.*). D. ENGINE (दोनपासून चार घोड्यांची शक्ति आहे असें) वाष्पपात्रामध्यें पाणी सोडण्याचें किंवा जड ओझीं वगैरे उचलण्याचें एक लहान यंत्र *n*. D.–PUMP *n*. पाणी काढण्याचा-आग विझविण्याचा वगैरे वाफेनें काम करणारा बंब *m*. THE D. MEANS ONE THING & THE DRIVER ANOTHER निरनिराळ्या लोकांचीं निरनिराळीं मतें असतात व तीं तशीं असण्याचें कारण स्वहित हें होय. TO RIDE THE BLACK D. गाढवासारखा आपलाच हेका धरणें, अडेल तट्टू होणें.

Do-nothing (dōō-nuth-ing) *a. doing nothing, lazy* आळशी, सुस्त, मंद. also *n*.

Don't (dont) [Contra. of Do+not.] नको, नका.

Donzel (don'-zel) [O. Fr. *danzel, doncel, dancel*, young man.] *n*. (*obs.*) *a young gentleman not yet knighted, a squire, a page* कुलीन-मोठ्या-सरदार घराण्यांत-कुळांत जन्मलेला पण अद्याप किताब न मिळालेला तरुण मनुष्य *m*, 'नाईट'चा नोकर *m*- चाकर *m*.

Dooab. See Doab.

Doodle (dōō'-dl) *n. a simple fellow* साधा-भोळा-भोळसट मनुष्य *m*, भोळानाथ *m*.

Dooly (dōō'-li) [Sk. Dola, दोल.] *n. a kind of litter* डोली *f*, डोली *f*, दोली *f*, पालखी *f*, मेणा *m*. Dooly-bearer *n*. डोली वाहणारा, डोलकर *m*, भोई *m*.

Doom (dōōm) [M. E. *dom*, A. S. *dom*, a thing decided on –*don*, to set, do.] *n*. (*obs.*) *a statute, law, enactment*; (*gen.*) *decree* कायदा *m*, सरकारी हुकूम *m*- नियम *m*- ठराव *m*. २ *judgment, decision* (*esp.* one formally pronounced), (mostly) *condemnation, sentence of punishment* न्याय *m*, निकाल *m*, निर्णय *m*, शिक्षा *f*, दंड *m*, शिक्षेचा हुकूम *m*- ठराव *m*. ३ *that to which one is doomed or sentenced* (a) नशीब *n*. (b) शासन *n*, दण्ड *m*. ४ *ruin, death* नाश *m*, अंत *m*, मरण *n*, क्षय *m*, लय *m*, मोक्ष *m*. (*colloq.*) ५ (*obs.*) *discrimination, discernment* सूक्ष्म विचार *m*, सारासारबुद्धि *f*. D. *v. t.* (*obs.*) *to judge* (-चा) न्याय करणें-निकाल लावणें, इनसाफ करणें. २ *to pronounce sentence or judgment on, to condemn, to sentence* (-ला) शिक्षा *f*- सजा *f*. देणें-करणें, दंड करणें. ३ *to ordain as penalty* (-ची) शिक्षा सांगणें-करणें. ४ (New England) *to assess a tax upon* (by estimate or at discretion, अंदाजानें (-च्यावर) कर बसविणें. ५ *to destine, to appoint as by decree or by fate* (-च्या) नशीबीं-कपाळीं-दैवीं लिहिणें-लिहिलेलें असणें, (-च्या) बद्दल ईश्वरी योजना असणें. Doom'ing *pr. p.* Doomed *pa. p.* ज्याचे दिवस पुरे भरले आहेत, ज्याचीं वर्षें भरलीं आहेत असा, आसन्ननाश. Doom'ful *a.* (R.) नाश करण्याचे शक्तीनें भरलेला. Dooms *adv. very, exceedingly* अतिशय, पुष्कळ. Dooms'-day *n*. शिक्षेचा-मरणाचा दिवस *m*. २ (प्रलयकालानंतर) ईश्वरापुढें जगाचा इनसाफ-न्याय होण्याचा दिवस *m*. [D. -BOOK see Domes-day Book. इंग्लंडांतील पहिल्या वुइल्यम् राजाच्या हुकुमावरून तयार केलेला जमिनीच्या सर्व तपशिलाच्या माहितीचा (मोजणी, मालकी वगैरेचा) खर्डा *m*- पत्रक *n*- पुस्तक *n*.] Dooms-man *n*. न्यायाधीश *m*, मध्यस्थ *m*.

Door (dōr) [Cf Sk. द्वार, M. E. *dore, dure*. A. S. *dor, duru*, a gate.] *n. an entrance way* दार *n*, द्वार *n*, दरवाजा *m*, जाण्यायेण्याचा मार्ग *m*. Door-bell *n*. दरवाज्यांतील घंटा *f*. Door-case-frame *n*. दाराची चौकट *f*. Door-check *n*. दारकस *f*. Door-keeper *n*. द्वारपाल *m*, देवडीवरचा शिपाई *m*. Door-mat *n*. (दरवाज्यांत ठेवलेलें) पाय पुसण्याचें तरट *n*. Door-plate *n*. (घरांत रहाणाऱ्याचे नांवाची वगैरे लोकांचे माहितीसाठीं) बाहेर टांगलेली पाटी *f*. Door-post *n*. बाही, द्वारस्तंभ *m*. Door-stepstone *n*. उंबरठा *m*. Door-tree *n*. आडसर *m*. Door-way *n*. दरवाजा *m*, घरांत जाण्याचा रस्ता *m*. Door-yard *n*. घराभोंवतालचें आंगण *n*. Folding-door *n*. घडीचा दरवाजा *m*. Back-door *n*. मागील दार *n*. [IN DOORS OR WITHIN DOORS घरांत. NEXT D. TO शेजारीं, शेजारचा, जवळ. OUT OF DOORS OR WITHOUT DOORS घराबाहेर, उघड्या हवेंत, (-च्या) घराबाहेरचा, हरवलेला. TO LAY AT ONE'S D. (-च्या) माथीं (दोष) मारणें-लादणें, (-च्या) बोडक्यावर बसविणें. TO LIE AT ONE'S D. -कडे (दोष) असणें. Death's door

मरणाचें द्वार *n*, काळाचा जवडा *m*, काळाची तावडी *f*. From D. to D. दारोदार, घरोघर. Front door *n*. पुढील दार *n*, दर्शनी दरवाजा *m*. Secret-private door *n*. चोरदरवाजा *m*. Shutting up of doors दार *n*-कवाड *n*. लावणें. To dance attendance from door to door लोकांचे उंबरठे पुजणें, द्वारपूजा करणें, लोकांचे उंबरठे झिजविणें, दारटोळ्या मळणें. To show the door चालता हो म्हणून सांगणें. To lie at one's door. (*fig.*) पदरीं असणें (दोष, अपराध, इ.).

Doquet (dok'-et) *n*. A form of a Docket.

Dor (dor) *n*. मस्करी *f*, थट्टा *f*. To give one the dor *to subject one to ridicule* टर *f*. करणें.

Dorado (dō-rā'-dō) [Span. *dorado*, gilt–L. *deauratus*, *pa. p.* of *deaurare*, to gild–*de*+*aurum*, gold.] *n*. एक प्रकारचा सुंदर रंगाचा मासा *m*. २ (also called Hiphias or the sword fish) दक्षिण गोलार्धांतील सहा नक्षत्रांचा पुंज *m*, डोरेडो तारा *m*, खड्गमत्स्य तारा *m*. Doradic *a*.

Dorian, (dō'-ri-an) [Pertaining to Doris or Doria in Greece.] *a*. (प्राचीन ग्रीसमधील) डॉरिस प्रांताचा, डोरियन लोकांचा. D. *n*. डॉरिस प्रांतांतील रहिवाशी *m*, डोरीयन मनुष्य *m*.

Doric (dor'-ik) *a*. डॉरियन लोकांसंबंधीं. २ डॉरिक भाषेचा. ३ डॉरिक नांवाच्या ग्रीक लोकांतील इमारत बांधण्याच्या पद्धतीचा. D. *n*. ग्रीक लोकांची इमारत बांधण्याची सर्वांत जुनी व साधी पद्धत *f*. आयोनिक, कारिंथियन व डारिक अशा त्यांच्या तीन मुख्य पद्धति होत्या.

Dormant (dor'-munt) [Fr. *dormant pr. p.* of *dormir*–L. *dormire*, Sk. द्रै, to sleep.] *a*. *sleeping* निजलेला, झोंपीं गेलेला, निद्रित; as, "A D. animal." २ (*fig.*) *intellectually asleep, with the faculties not awake, inactive as in sleep* सुस्त, सुषुप्तीच्या अवस्थेंत, सुस्त स्थितींतला, अजागरूक. ३ *with animation suspended* (हालचाल न करितां) पडून राहिलेला, मलूल, सुस्त, निद्रावस्थ. ४ (of plants) *with development suspended* अवर्धमान. ५ अव्यवसायी, न वापरलेला, न उपयोग केलेल्या स्थितींतला. Dormant partner *n*. (कामामध्यें भाग न घेतां) फक्त नफ्यातोट्यामध्यें ज्याचा भाग असतो असा भागीदार *m*. Dor'mancy *n*. निद्रावस्था *f*, निद्रितस्थिति *f*. २ अव्यापारता *f*, अव्यवहार *m*, न वापरलेली किंवा न उपयोग केलेली स्थिति *f*, अजागरूकावस्था *f*. Dormant or Dormer window *n*. उतरत्या छपरांतील खिडकी *f*. Dormi'tion *n*. दीर्घनिद्रा *f*, महानिद्रा *f*, झोंप *f*, काळझोंप *f*. Dor'mitive *a*. झोंप आणणारें. D. *n*. झोंप आणणारें औषध *n*.; as, "Opium is a D." Dor'mitory *n*. शयनगृह *n*, निजण्याची खोली *f*. घर *n*, शयनशाला *f*. २ (*obs.*) कबरस्थान *n*, स्मशान *n*. Dor'mouse *n*. रानउंदीर *m*. हे हिंवाळ्यामध्यें अतिशय सुस्त होतात. *pl*. Dormice.

Dormitory See Dormant.

Dorsal (dor'-sal) [L. *dorsum*; It. *dorso*, the back.] *a*. *pertaining to the back* पाठीचा, पृष्ठ्य, पृष्ठासंबंधीं, (*bot.*) पृष्ठभागाचा, पृष्ठासंबंधीं. D. *n*. (सिंहासनाच्या किंवा ख्रिस्ती लोकांत यज्ञकुंडाच्या मागें) लोंबत ठेवलेला उंची कपडा *m*-पडदा *m*. Dor'sally *adv*. Dorsibranch'iate *a*. पाठीवर कल्ले असलेला. D. *n*. पाठीवर कल्ले असलेले प्राणी *m. pl*. Dorsif'erous *a*. ज्या वनस्पतींच्या पानांच्या पाठींतून बीं येतें अशा (वनस्पति), पृष्ठप्रसव, आईच्या पाठीकडून ज्यांची उत्पत्ति होते असे (प्राणि), पृष्ठप्रसव. (पृष्ठात् प्रसवो येषां ते.) *biol*. पृष्ठवाही. Dorsig'erous *a*. पाठीवर वाहणारा, पृष्ठवाही. Dors'um *n*. डोंगराचा कडा *m*. २ जनावराची मागची बाजू *f*, पृष्ठभाग *m*, वरचा भाग *m*. Dorsal region *anat*. पृष्ठप्रदेश *m*. Dorsal spine पाठीचा कणा *m*. Dorsalis psoriasis *med*. हस्ताच्या पृष्ठावर होणारा एक त्वगरोग *m*, हस्त-पृष्ठावदरण *n*. Send to dorse पाठीवर फेंकणें.

Dory (daw'-ri) *n*. लहान होडी *f*.

Dose (dōs) [O. Fr. *dose*, a quantity of medicine given at once–L. *dosis*–Gr. *dosis*, a giving.] *n*. औषधाचें प्रमाण *n*. प्रत्येक वेळीं औषध किती घेणें तें, एक वेळेपुरताच दिलेला दवा *m*-औषध *n*, मात्रा *f*, औषध-परिमाण *m*, घुटका *m*, घोंट *m*, औषधप्रमाण *n*, डोस *m*. २ एखाद्यावर त्याच्या मर्जीविरुद्ध लादिलेला भाग *m*, अप्रिय भाग *m*, कंटाळा उत्पन्न होईल अशा रीतीनें दिलेला भाग *m*. D. *v. t*. भाग करून देणें. २ औषध देणें, प्रमाणानें औषध देणें. ३ (किळस येईल असा) अप्रिय पदार्थ देणें. Dos'age *n*. भाग करून देणें. Dosim'eter *n*. *an apparatus for measuring doses or the like* (औषधाचें) भाग मोजण्याचें यंत्र *n*. Dosol'ogy, Dosil'ogy *n*. कोणत्या प्रमाणानें कोणतें औषध देणें याविषयीं शास्त्र *n*. औषधप्रमाणशास्त्र *n*.

Doss (dos') *n*. गवताचा बिछाना *m*. Doss-house *n*. अतिस्वस्त भाड्याचें शयनगृह *n*. Doss'er *n*. वरच्या प्रकारच्या घरांत राहणारा.

Dossal (dos'-sal) *n*. ख्रिस्ती देवळांत 'च्यान्सेल' वर टांगलेलें चित्रविचित्र रंगाचें सुशोभित कापड *n*.

Dosser (dos'-er) *n*. पेटारा *m*, टोपली *f*. २ भिंतीचा पडदा *m*.

Dost (dust) 2nd *pers. sing. pres. indic*. of Do.

Dot (dot) [A. S. *dott*, head of a boil; Dut. *dot*, a little bundle of spoilt wool.] *n*. टिंब *n*, पूज्य *n*, बिंदु *m*, शून्य *n*, लहान ठिपका *m*, चिन्ह *n*. D. *v. t*. शून्य-पूज्य देणें-मांडणें. २ (ला) खुणा करणें, (पृथक् पृथक् वस्तूंनीं) खुणा करणें. D. *v. i*. टिंब *n*. देणें, ठिपके देणें. Dotted *a*. मध्यें मध्यें बिंदूप्रमाणें पदार्थ मांडलेला. २ *bot*. अंकित. Dotted *pa. p*. Dotting *pr. p*. Dot and go one घुकतेंच चालूं लागलेलें मूल *n*. २ ज्याचा एक पाय दुसऱ्यापेक्षां अधिक लांब आहे असा मनुष्य *m*.

Dotation (dō-tā'-shun) [Late L. *dotatio*–L. *dotare*, to endow–*dos*, *dotis*, dower.] *n*, *the act of*

*endowing, endowment* देणगी *f,* नेमणूक *f, espe.* वर्षासन *n,* वर्षासन करून देणें *n,* नेमणूक करणें *n,* देणगी देणें *n.* २ *the act of bestowing a marriage portion on a woman* स्त्रीधन *n.* ३ *establishment of funds for support (as of an hospital)* (दवाखाना इत्यादि धर्मार्थ संस्थेकरितां केलेली) निधिस्थापना *f,* ( धर्मार्थसंस्थेच्या मदतीकरितां ) द्रव्यनिधि *m.* Do'tal *a. pertaining to dotation* देणगीसंबंधीं, &c. २ स्त्रीधनासंबंधीं. ३ निधिस्थापनेसंबंधीं.

Dote ( dōt ) [ M. E. *dotien, doten,* to be foolish; cf. M. Dut. *doten,* to be silly.] *v. i. to be silly, deranged or out of one's wits, to act or talk foolishly or stupidly* भ्रमिष्ट होणें, खुळावणें, मूर्खासारखें वागणें-बोलणें. २ *to be weak-minded from old age* म्हातारचळ लागणें *in. con.,* म्हातारचाळे-म्हातारचेष्टा करणें. २ *to be foolishly in love, to bestow excessive love or fondness upon* एखाद्यावर फिदा होणें, भुलणें, भुलून जाणें, भाळणें, वेडा होणें, तन्मय-तल्लीन-मोहित-अत्यासक्त होणें. Do'tage *n. feebleness of mind in old age* म्हातारचळ *m,* चळ *m,* साठी *f,* साठीबुद्धी *f,* पिसें *n,* बाळें *n,* ( *obs.* ) तारें *n* ( *provin.*), भ्रमिष्टासारखें किंवा मूर्खासारखें आचरण *n,* वेडेचार *m,* अतिमूर्खपणा *m.* ३ ( वेडावून गेलेल्याचें किंवा भुलून गेलेल्याचें ) अतिप्रेम *n.* ४ *an object of dotage* अतिशय प्रेमाचा विषय *m.* Do'tard *n.* म्हातारचळ्या, साठ्या, साठ्याबुद्धीचा, म्हातारबुद्धीचा, नष्टबुद्धि. Doted *a.* ( *obs.* ) मूर्ख. Dot'er *n.* म्हातारचाळे करणारा, &c. Dot'ing *a.* खुळावलेला, नष्टबुद्धि. २ भुलून गेलेला, निरत, अत्यासक्त, मूर्खपणानें तन्मय झालेला. Dot'ingly *adv.* भुलून, वेडा होऊन, अत्यासक्तीनें. Dot'ish *a.* मुलाप्रमाणें अत्यासक्त, मूर्ख. Dottle *a.* मूर्ख. D. *n.* क्षीणबुद्धि *m,* अतिवृद्ध *m.* Dotty *a.* मनाचा हलका.

Doth ( duth ) *3rd. pers. sing. pres.* of Do.

Dotterel ( dot'-ėr-el ) *n.* अतिशय मूर्ख असा पक्षी *m.* २ साधा भोळा व मूर्ख मनुष्य *m.* To dor the dotterel भोळ्या मनुष्याला फसविणें.

Doub grass ( dōōb-grȧs' )*n. bot.* हरळी *f,* दूर्वा *f.*

Double ( dub'-l ) [ O. Fr. *doble,* later *double* –L. *duplus,* lit. twice-full. L.-*duo,* two; *plus,* full; L. *duplus* akin to Gr. *diploos,* double. ] *a. twofold, multiplied by two, twice as much* दुप्पट, दुणा, दुरा, द्विगुण, दुबार. [ D. WORK दुणें-दुहेरें काम *n.* ] २ *being in pairs, presenting two of a kind, coupled* जुळा, जोड (in comp. जोडनळी), जोडगिरी or जोडगीर ( *loosely* ). ३ *acting two parts, one openly and the other secretly, deceitful, insincere* दुटप्पी वर्तनाचा, दोन मनांचा, आंत एक बाहेर एक असा, लपंडावाचा, द्व्यर्थी, कपटी. ४ *bot. having the petals in a flower considerably increased beyond the natural number* एकाहून अधिक पांकळ्यांचीं वर्तुळें असलेलें फूल; उ० वटमोगरा. ५ द्वित्त ( e. g. क्क, ग्ग, च्च ). ६ *folded* दुहेरी, दुहेरा, दुहिरी, दुडता, दुडती. D. *v. t. to increase by adding an equal sum or quantity* दुप्पट करणें, द्विगुण-द्विगुणित करणें. २ *to fold one part upon another part of* ( often followed by *up* ) दुणणें, दुमटणें, दुमडणें, दुहेरी करणें, एक घडी घालणें ( *colloq.*), वार्धक्यानें शरीराची घडी होणें. ३ *to exceed by two fold* (-च्या) दुप्पट असणें. ४ *to pass around or by, to march or sail round* भोंवताली फिरणें, प्रदक्षिणा-वळसा घालणें; as, "To D. the Cape of Good Hope." ५ *mil. to unite as ranks or files so as to form one from each* रांगा किंवा तुकड्या जोडणें. ६ *to clinch* ( as a fist ) मूठ आंवळणें. D. *v. i. to be increased to twice the sum* दुप्पट-द्विगुणित होणें, दुणावणें, दुणारणें. २ *to return upon one's track* गेल्या रस्त्यानें मागें फिरणें. ३ *to play tricks, to use sleights* कपट करणें, दगा करणें, डावपेंच करणें-लढविणें. ४ *print. to set up a word or words a second time by mistake* (एकदां जुळलेला शब्द-मजकूर, चुकीनें पुन्हां जुळणें. D. *n. twice as much* दुप्पट *f,* दुणी *f,* दुपटी *f.* २ ( among compositors ) *a doublet* चुकीनें दुबार जुळलेला मजकूर *m.* ( among pressmen) *a sheet that is twice pulled & blurred* दोनदां ओढून चिताड केलेला कागद *m.* ३ *a plait, a fold* घडी *f,* पदर *m.* ४ *a turn or circuit in running to escape pursuers* झुकांडी *f,* गोता *m,* वांकण *n,* वळण *n.* ५ *a trick, a shift, an artifice* पेंच *m,* डाव *m,* शक्कल *f,* युक्ति *f,* तोड *f.* ६ *a counterpart* प्रत *f,* नक्कल *f,* हुबेहुब मनुष्याची आकृति *f-* प्रतिमा *f,* मेल्यावर भुताच्या रूपानें दिसणारी आकृति *f,* छायापुरुष *m.* ७ *a substitute* प्रतिनिधी *m,* बदली *m,* नट किंवा गवई हजर नसला तर त्याऐवजीं जो काम करतो तो *m.* ८ *double beer, strong beer* बीअर नांवाची डबल दारू *f.* (दुप्पट कैफी.) ८ (*lawntennis*) *a game between two pairs of doubles* खेळणाऱ्या दोन जोड्यांचा खेळ *m;* as, "A first prize for D." D. up *v. t.* घडी करणें. Double acting *a.* दोन बाजूंनीं काम करणारा, द्विगुणितफलावह, दुप्पट काम करणारा. Double-banked *a.* (बोटींत बसून) दोघां दोघांच्या जोडीनें वल्हविलेला. Double-barrelled *a.* दोन नळ्या असलेला, दुनळी, दोनबारी, दुबारी. Double-bearing *a. bot.* द्विप्रसव, द्विगुणफल, दोनदां प्रसवणारा. Double-breasted *a.* डबल छाती असलेला ( कोट ). Double-charge *v. t.* दुप्पट दारू भरणें-ठासणें, *lit.* दुप्पट भार-वजन घालणें. Double-dagger *n.* (*print.*) लक्ष पोंचविणारें चिन्ह *n* ‡‡ Double-dealer *n.* दुतोंड्या, दुटप्पी, मनांत एक व जनांत एक, द्विजिव्ह, दुबोल्या. Double-dealing *n.* दुटप्पी व्यवहार *m-* वर्तन *n.* Double-decked *a. naut.* दुमजल्याचें (जहाज). Double-decker *n.* (तोफा उडविण्याचें) दोन मजले असलेलें लढाऊ जहाज *n,* लढाऊ दुमजली जहाज. २ (*colloq.*) टप्प्यावर बसण्याकरितां जागा असलेली भाडोत्री गाडी *f.* Double-dyed *a.* दोनदां रंग दिलेला, खूब रंग दिलेला, २ पूर्ण, पुरा,

अडूल; as, "A D. dyed villain." Double-eagle *n.* वीस डॉलरचें नाणें *n.* Double-edged *a.* दोहोंकडून धार असलेला, दोन कांठांचा. २ (*fig.*) दोन अर्थ होणारें (प्रमाण *n.*). Double-gild *v. t.* दुहेरी मुलामा देणें. Double-handed *a.* दोन हात असलेला. २ कपटी, फसव्या. Double-headed *a.* दोन डोक्यांचा. Double-hearted *a.* दगलबाज, विश्वासघातकी. Double-letter *n.* दुप्पट हांशील लागेल असें टपालचें पत्र *n.* Double-lock *v. t.* दोन कांट्यांचें कुलूप लावणें, दोन आडण्यांनीं-आडसरांनीं लावणें, दुप्पट मजबुतीनें लावणें-बंद करणें. Double-meaning *a.* द्व्यर्थी, कपटी. Double-minded *a.* अनिश्चित, दोन मनांचा, फुटक्या मनांचा, द्विमनस्क. Double-natured *a.* द्विस्वभाव. २ द्विधातुक, उभयविध. Doub'leness *n.* दुटप्पी वर्तन *n*, दुहेरीपणा *m*, कपट *n.* Double play *n.* ज्यां खेळांत दोन गडी एकदम मरतात-बाद होतात असा खेळ *m.* Double pica *n.* दुप्पट पायका टाईप *m.* Double-point *n. math.* द्विगुणबिंदु *m.* Double-quick *a.* & *adv. mili.* त्वरितगतीचा, अति त्वरित. Double-quick *n.* अति जलद गति *f.* Double-quick *v. t.* & *v. i.* अति जलद चालविणें-चालणें. Double refraction *n.* द्विधा वक्रीभवन *n.* Double-salt *n.* द्विभस्मिक लवण *n.* (भस्म base). Double-shade *v. t. mili.* अंधार-काळोख दुप्पट करणें. Double-standard *n.* द्विचलनपद्धति *f.* Double-star *n.* जवळ जवळचे दोन तारे *m. pl.* तारायुग्म *n*, डोळ्यांनींच पाहिलें तर एक आहे असें दिसणारें तारायुग्म *n*, दुहेरी तारा *m.* Double-time *n. mili.* Same as Double-quick. Double-tongued *a.* द्विजिव्ह, अनेकजिव्ह, दुतोंड्या, एकाच गोष्टीविषयीं निरनिराळ्या वेळीं निरनिराळें बोलणारा. २ दगेखोर, कपटी, घातकी. Doubled *a.* दुप्पट केलेला, द्विगुणित, दुघडी, दुणता, दुडता, दुमडता, दुहेरी. Doub'ler *n.* दुप्पट करणारा. २ लपंडाव करणारा. ३ कापसाचे किंवा रेशमाचे दोन अथवा अधिक ताणे-धागे एके ठिकाणीं करून वसविणारा कामकरी *m*-यंत्र *n.* ४ *elec.* विद्युज्जागृति द्विगुणित करणारें यंत्र *n*, द्विगुणकर *m.* Doub'ling *n.* दुप्पट करणें *n.* २ दुमड-मोड *f*-घडी *f.* ३ पेंच *m*, डाव *m.* ४ वक्रगति *f*, पळतांना एकदम मारलेला हिसका *m*-घेतलेलें वळण *n.* Double rule of three बहुराशिक-पंचराशिक प्रमाण *n.*

Doublet (dub'-let) [M. E. *dobbelet*, O. Fr. *doublet*, an inner (double) garment.—Fr. *double*, double. (with suffix *et*).] *n. two of the same kind, a pair, a couple* जोडी *f*, दुकल *f*, युग्म *n*, युगल *n.* २ *one of two things precisely alike or in some way identical, one of a pair or couple, a duplicate* सारख्या दोन वस्तूंपैकीं एक *f*, प्रतिरूप *n.* ३ *a word unintentionally doubled or set up* (त्याच शब्दाची) द्विरुक्ति *f.* ४ बंडी (आंतली) *f*, cf. बाराबंदी *f*, बंडी *f.* ५ *pl. the same number turning up on both the dice at a throw* ज्यांत दोन्हीं फांशांवरील अंक सारखेच असतात असें दान *n*; बारा *pl*, दुड्डी *s*, बेती *s.* वगैरेसारखें दान *n.* ६ बॅकगॅमनचा खेळ *m.* ७ *one of two or more words* (in the same language.) *derived by different courses from the same original form* (thus *cloak* & *clock*, *fashion* & *faction*, *crypt* & *grot*, *guard* & *ward* are all doublets). एकाच मूलरूपापासून निरनिराळ्या परंपरेनें-रीतीनें निघालेल्या भाषेंतल्या दोन किंवा अधिक शब्दांपैकीं एक *m.* ८ *pl. a combination of two simple lenses* दोन लेन्सेसची (काचयवांची) रचना *f.*

Doubloon (dub-lōōn') [Fr. *doublon* –Span. *doblon*, a coin the *double* of a pistole.-Span. *doblo*, double. –L. *du*, two & *plus*, allied to *plenus*, full.] *n.* स्पेन देशांतील एक नाणें *n.* याची किंमत अदमासें १५ डालर व ६० सेन्ट्स आहे.

Doubt (dowt) [M. E. *douten*–O. Fr. *douter*–L. *dubitare*, to be of two minds—*dubius*, doubtful–L. *du*, two.] *v. i. to be in doubt or uncertainty, to be wavering or undecided in opinion or belief* (विषयीं) साशंक-शंकित होणें-असणें, संदेह *m*-संशय *m*-वानवा *m* असणें-वाटणें, शंका घेणें. २ (*obs.*) *to suspect, to fear, to be apprehensive* भिणें, शंका-धास्ती धरणें-घेणें. D. *v. t. to call in question, to feel doubt about, to distrust* -च्याबद्दल प्रश्न असणें, (-चा) संशय येणें-बाळगणें, (-बद्दल) अविश्वास धरणें- करणें, (-विषयीं) शंका घेणें, शंका *f*- संदेह *m*-अंदेशा *m* धरणें-घेणें-बाळगणें-मानणें, अविश्वास *m*-अप्रत्यय *m*-करणें-ठेवणें. २ (*obs.*) *to suspect, to fear, to be apprehensive of* (-ला) भिणें, (-ची) भीति वाटणें. ३ (*obs.*) *to fill with fear, to make afraid, to affright* घाबरवणें, भीति दाखविणें, भयभीत करणें. Doubt'ed *a.* शंकित, आशंकित, संदिग्ध. Doubt *n. the* (subjective) *state of uncertainty with regard to the truth or reality of anything, uncertainty of judgment or mind* संशय *m*, बुचकळा *m*, संदेह *m*, शंका *f*, आशंका *f*, दुग्धा *m*, भ्रांति *f*, वानवा *m*, कांक्षा *f*, विकल्प *m*, अंदेशा *m.* २ *the condition of being* (objectively) *uncertain, uncertainty of condition* अनिर्णय *m*, अनिश्चय *m*, घोंटाळा *m.* ३ (*obs.*) *apprehension, fear, dread, suspicion* कांक्षा *f*, किंतु *m*, संशय *m*, वहीम *m*, भीति *f*, भय *n*, धास्ती *f.* ४ *matter or point involved in uncertainty, a doubtful question, a difficulty* दुर्बोध स्थळ *n*, शंकास्थान *n*, प्रश्न *m*, विषमपद *n*, उलगडा न झालेला-संशयग्रस्त मुद्दा *m*- प्रश्न *m.* [No D. निःसंशय, निश्शंक, खात्रीनें-लायक-पूर्वक. Without D. खात्रीनें. Solution of D. *n.* संशयनिवृत्ति *f.* To leave in D. संशयांत-बुचकळ्यांत ठेवणें-पाडणें. Of solved or removed D. *a.* छिन्नसंशय. Doubt'able *a.* शंका घेण्याजोगा, शंकनीय. Doubt'er *n.* शंका घेणारा, शंकेखोर, अनिश्चयाचा मनुष्य *m.* Doubt'ful *a. undetermined, wavering* अनिश्चित, साशंक, शंकित, आशंकित, संशययुक्त, संशय-शंकाग्रस्त, शंकापन्न, भ्रांत-

हृदयी. २ *not obvious or clear, not decided* संदिग्ध, संशयात्मक, शंकनीय, भ्रांतिकारक, निकाल-निर्णय न झालेला-लागलेला, उलगडा न पडलेला. ३ *characterised by ambiguity, dubious* संदिग्धार्थ (S.), अव्यक्त (S.), अस्पष्ट, गूढ; as, "A D. phrase." ४ *of uncertain issue or event* ज्याचा शेवट काय होईल हें खात्रीनें सांगतां येत नाहीं असा, अदृष्टफल, अनिश्चितान्त. ५ (*obs.*) *fearful, apprehensive, suspicious* शंकित, भीत, भ्यालेला. Doubt'fully *adv.* संशयानें, शंकित होऊन, संशयपूर्वक, शंकेनें, शंकित-साशंक वृत्तीनें. Doubt'fulness *n.* शंकित वृत्ति *f*, बुचकळा *m.* २ शेवट काय होईल हें न समजणें *n.* Doubt'ing *a.* शंकित, साशंक. Doubt'less *adv.* निःसंशय, खात्रीपूर्वक-लायक. *a.* निःशंक, शंका-भीतिरहित. Doubt'lessly *adv.* खचित, नक्की, निश्चयपूर्वक.

Douceur (dōō-sėr') [Fr. *douceur*, lit. sweetness (hence, pleasant gift).–L. *dulcorem*, acc. of *dulcor*, sweetness.–L. *dulcis*, sweet.] *n. sweetness of manner* सभ्य वागणूक *f*, गोड वर्तन *n.* २ *a gift for service done or to be done* (काम करून घेण्याकरितां किंवा केल्याबद्दल दिलेली) देणगी *f.* अगर बक्षीस *n*, पारितोषिक *n.* ३ (*sometimes*) *a bribe* लांच *m.*

Douche (dōōsh) [Fr. *douche*, a shower-bath–It. *doccia*, a water-pipe–It. *docciare*, to pour; equivalent to Late L. *ductiare*–L. *ductus* –L. *ducere*, to lead.] *n. a current of water or vapour directed upon some part of the body to benefit it medicinally* (वैद्यकदृष्ट्या फायदा होण्यासाठीं शरीराचे कोणत्याही भागावर सोडलेली) पाण्याची धार *f*, किंवा (वाफेचा) वाफारा *m*, अभिषिंचन *n.* २ *a douche bath* बाष्पस्नान *n*, वाफारा *m*, पाण्यानें किंवा वाफेच्या उवाऱ्यानें शरीर साफ करणें *n*, योनिमार्ग धुवून-खळवळावून काढणें. ३ *med. a syringe* पिचकारी *f.*

Dough (dō) [M. E. *dah*, *dogh*. A. S. *dāh*, Dut. *deeg*, Dan. *deig*, Swed. *deg*, Icel. *deig*, Goth. *daigs*, a kneaded lump. Cf. Sk. दिह्, to smear.] *n. soft mass of moistened flour or meal, kneaded or unkneaded, but not yet baked* भिजविलेलें भाकरी वगैरेंचें पीठ *n*, मळलेली-तिंबवलेली कणीक *f.* पीठ *n.* २ *anything of the consistency of such paste* भिजविलेल्या कणकेसारखा मऊ पदार्थ *m.* [To HAVE ONE'S CAKE D. हातीं घेतलेल्या कामांत यश न येणें-निराशा होणें, काम फसणें.] Dough-baked *a.* अर्धवट भाजलेली, पक्क न झालेली, कच्ची, हिरवी. २ अर्धें राहिलेलें, पुरें न झालेलें. ३ (*colloq.*) जडबुद्धि, मंदबुद्धीचा. Dough-faced *a.* लवचीक, लवणारा. Dough'iness *n.* तिंबलेल्या कणकेसारखी स्थिति *f.* Dough-kneaded *a.* मऊ, नरम. Dough'y *a.* भिजलेल्या पिठासारखा मऊ, नरम, थलथलीत व फिकट.

Doughty (dow'-ti) [M. E. *dohti*, *duhti*, valiant. A. S. *dohtig*, valiant—A. S. *dugan*, to be worth, be strong.] *a. able, strong, valiant, redoubtable* (now seldom used except in irony or burlesque) समर्थ, सशक्त, शूर, बहादर, प्रतापी, प्रतापशील, खंबीर. (या शब्दाचा उपयोग सांप्रत केवळ थट्टेनें करितात.) Dough'tily *adv.* शौर्यानें. Dough'tiness *n.* शौर्य *n.*

Douse, Dowse (dous) [(E.?) Allied to M. Dut. *doesen*, 'to smite with violence'.] *v. t. to plunge suddenly into water, to immerse* डुबकून्-कर-दिशीं बुडविणें-घालणें, बुडविणें, बुचकळविणें. २ *naut. to strike or lower in haste, to slacken suddenly* (शीड *n.*) एकदम पाडणें-आंवरणें-गुंडाळणें-ढिलें करणें, एकदम मंदगति करणें. ३ (*slang*) *to put out, to extinguish* मालविणें, विझविणें, घालविणें.

Dove (duv) [A. S. *dufe* (only in *comp.*), lit. a diver–A. S. *dufan*, to plunge into.+O. S. *duva*, a dove.] *n. zool. a pigeon of the genus Columba* खबूतर *n*, कबूतर *n.* २ *a word of endearment for one regarded as pure and gentle* प्यारा *m*, लाडका *m.* Dove-colour *n.* पिंगट-जांभळा रंग *m.* Dovecot,-cote *n.* खुराडें *n*, कबूतरखाना *m.* Dove-eyed *a.* खबूतरासारख्या डोळ्यांचा-नेत्रांचा. २ *meek-eyed* नम्र-प्रीतिदर्शक नेत्रांचा. Dove-house *n.* खबूतरखाना *m*, खुराडें *n.* Dovelet *n.* लहान कबूतर *n.* Dove-like *a.* गरीब, निरुपद्रवी, निरपराधी. २ शुद्ध, निर्मल, शांत, प्रेम करण्यालायक. Dove-ship *n.* (*obs.*) कबूतरासारखा गुण *m*-स्वभाव *m*, निरुपद्रवीपणा *m*, शुद्धता *f.* To flutter the dovecots निरुपद्रव्यांना भिवविणें. Soiled dove *n.* (*slang*) वेश्या *f*, कळवंतीण *f.* Dov'ish *a.* निरुपद्रवी, शुद्ध, नम्र.

Dove-tail (duv'-tāl) *n. carp.* कळाशी *f*, चाळा *m*, दांता *m.* D. *v. t. to cut to a dovetail* कळाशीकरितां कापणें. २ *to join by means of dovetails* कळाशी करणें-जोडणें-बसविणें. ३ (*fig.*) *to fit in or connect skillfully or nicely* कुशलतेनें-खुबीनें-बरोबर-नीट रीतीनें जोडणें-बसविणें-सांधणें.

Dow (dow) *n.* एकाच डोलकाठीचें लहान जहाज *n.* (Same as Dhow.)

Dowager (dow'-a-jėr) [O. Fr. *douagere* –*douage*, an endowment, which is coined (with suffix -*age*) from Fr. *dou-er*, endow.–L. *dotare*, to endow–L. *dot*, stem of *dos*, a gift, dowry. Sk. दा, *dā*, to give.] *n.* (*Eng. law.*) *a widow endowed or having a jointure* स्वतःचे निर्वाहाकरितां मिळकत जवळ असलेली विधवा *f.* २ *a title given in England to a widow, to distinguish her from the wife of her husband's heir bearing the same name* (chiefly applied to widows of personages of rank) मरण पावलेल्या मोठ्या मनुष्याच्या विधवेच्या नांवापुढें लावण्याचा किताब *m.* Queen dowager मृतराजाची विधवा *f.* गतभर्तृका राणी *f.*

*N. B.—Drawing* या शब्दाचा उपयोग सामासिक शब्दांत पूर्वपदाचे ठिकाणीं विशेषणासारखा करितात; व त्या वेळीं त्याचा अर्थ चित्रकर्मासंबंधीं असा असतो; जसें, D.-master *n.* चित्रकर्म शिकविणारा. D.-board *n.* चित्रालेख्य *n*, चित्रफलक *m.* D.-pen *n.* (चित्र काढण्याचें) कलम *n.* इ०.

*N. B.—Draw & drag* distinguished: Draw तजविजीनें जोर लावून पुढें ओढणें. Drag फरारां ओढणें. ज्या वेळेस ओढण्याकरितां कांहीं साधन-सामुग्री घेतलेली असते त्या वेळेस तशा ओढण्यास Draw असें म्हणतात; व साधनावांचून मोठ्या कष्टानें फरपटीत नेणें यास Drag असें म्हणतात.

Drawl (drawl) [Frequentative of *draw*; parallel to *draggle* from *drag*. Introduced from Dut. *dralen*, to be slow, to linger; from *dragen*, to draw.] *v. t. to utter in a slow, lengthened tone* हेल काढून उच्चार करणें-बोलणें. D. *v. i.* (*obs.*) (आळसानें-मल्लूलपणानें-अकडीनें) ओढत बोलणें, ओढून बोलणें, हेल काढून बोलणें. D. *n. a lengthened, slow, monotonous utterance* एकसुरी पाल्हाळिक भाषण *n.* Drawl'er *n.* ओढून बोलणारा. Drawl'ing *n.* Drawl'ingly *adv.*

Drawloom (draw'-lōōm) *n. a kind of loom used in weaving figured patterns* नकशीचा पिंजरा *m*, कापडांत कांहीं नकशी अगर वेलबुट्टी काढावयाची असली म्हणजे मागाचे डोक्यावर एक प्रकारची पिंजऱ्यासारखी यंत्ररचना असते ती *f.* २ ज्या मागास असा पिंजरा असतो तो माग *m*, नकशीच्या पिंजऱ्याचा माग *m*, डॉबीचा माग *m*, अगर सांचा *m.* ३ अशा मागावर तयार केलेलें एक प्रकारचें दमास्क नांवाचें कापड *n.*

Drawn (drawn) *pa. p.* of Draw ओढलेला, ताणलेला, आकर्षित, आकृष्ट. २ म्यानांतून बाहेर काढलेलें (शस्त्र *n.*). ३ (ओढून) वाढविलेला. ४ चित्रांत काढलेला. [D. BUTTER *n.* वितुळविलेलें लोणी *n.* D. FOWL *n.* आंतडीं बाहेर काढलेले कोंबडीं इ. पक्षी *m. pl.* D. GAME *or* BATTLE *n.* बरोबरीचा-निकाल न लागलेले-ज्यांत कोणाचाच जय नाहीं असा खेळ *m*-युद्ध *n*, समयुद्ध *n.* D. fox *n.* आश्रयस्थानापासून हुसकविलेलें खोंकड *n.* D. WORK *n.* कापडांतून पाहिजेत तसे निरनिराळे धागे ओढून काढून एकादा नकशीचा तयार केलेला नमुना *m.* AT DAGGERS D. *lit.* हत्यार उपसून तयार, नेहमीं कलह करणारे.]

Dray (drā) *n. a squirrel's nest* खारीचें-खारकुंडीचें घरटें *n*-घर *n.*

Dray (drā) [A. S. *dræge*, that which is drawn. See Draw.] *n. a strong low cart used for heavy burdens* ओझ्याची गाडी *f*, खटारा *m*, गाडा *m*, छकडा *m.* २ *a kind of sledge or sled* चाकाशिवाय-बिनचाकी गाडी *f*, बर्फावरून सरपटत जाणारी गाडी *f.* Dray'age (drā'-āj) *n. use of a dray* खटार गाडीचा-खटाऱ्याचा उपयोग *m.* २ *the charge of a dray* खटाऱ्याचें भाडें *n.* Dray'man *n.* खटारेवाला *m.*

Dread (dred) [A. S. *drædan*, in comp.; akin to O. S. *dradan*, O. H. G. *tratan*, to dread, to fear.] *v. t. to fear in a great degree, to regard with terrific apprehension* (-ची) धास्ती *f.* धाक *m.* वाळगणें-घेणें, धरणें, दहशत *f.* बाळगणें-घेणें, (-ला) अतिशय भिणें. D. *v. i. to be in great fear* मोठी धास्ती *f.* भय *n.* वाटणें, (-चा) धाक *m.* बसणें-वाटणें. D. *n. great fear in view of impending danger, fearful apprehension of danger, anticipatory terror* (भावी संकटाबद्दल वाटणारी) महाभीति *f*, भय *n*, धास्ती *f*, भीति *f*, दहशत *f*, थरकांप *m.* २ *reverential or respectful fear, awe* धाक *m*, भयपूर्वक आदर *m*, सन्मानपूर्वक भीति *f.* ३ *an object of terrified apprehension* भीतिस्थान *n*, भयाचें कारण *n*, धास्ती उत्पन्न करणारें कारण *n.* D. *a. exciting great fear, causing terror* भयोत्पादक, भीतिजनक-दायक, भयप्रद, भयंकर, भयानक, घोर, उग्र. २ *inspiring with reverential fear, awful, venerable* पूज्यभावयुक्त-आदरयुक्त भीति उत्पन्न करणारें, दरारा बसविणारें. Dread'able *a.* भीति वाटण्याजोगा. Dread'er *n.* धास्ती बाळगणारा *m*, &c. Dread'ful *a.* (*obs.*) *full of dread* भयभीत, भीतीनें गर्भगळित झालेलें. २ *inspiring dread* घोर, दारुण, भीम, भयंकर, उग्र, &c. ३ *inspiring awe* पूज्यभाव व भीति उत्पन्न करणारें. Dread'fully *adv.* Dread'fulness *n.* भेसूरपणा *m*, भयानकत्व *n*, दारुणत्व *n*, उग्रता *f.* Dread'less *a. fearless, intrepid, dauntless* भय-भीतिरहित, निर्भय, निर्धास्त. २ *secure* सुरक्षित, निराबाध, निर्भय. Dread'lessly *adv.* Dread'lessness *n.* निर्भयपणा *m*, &c. Dread'ly *a.* (*obs.*) भीतिदायक. D. *adv.* भीतिपूर्वक. Dread-naught *n. a fearless person* धीट-न भिणारा मनुष्य *m*, निधड्या छातीचा मनुष्य *m.* २ *a garment of thick cloth that can defend against storm & cold* वारा व शीत यांपासून रक्षण करणारा कपडा *m*- कोट *m.* ३ अशा कोटाचें कापड *n.* Dread'ed *pa. t. & pa. p.* Dread'ing *pr. p.*

Dream (drēm) [M. E. *dreem.* A. S. *dream*, a dream, not found. (Quite distinct from A. S. *dream*, a sweet sound, harmony, also joy, glee, happiness.) O. S. *drom*, dream. Dut. *droom*, Icel. *draumr*, Dan. & Swed. *drom.*] *n. the thoughts, or series of thoughts, or imaginary transactions, which occupy the mind during sleep; a sleeping vision* स्वप्न *n*, स्वप्नदर्शन *n.* २ *a visionary scheme, an idle fancy, a revery* मनोराज्य *n*, स्वप्नसृष्टि *f*, असंभाव्य कल्पना *f*, पोकळ कल्पना *f*; as, "A D. of bliss." D. *v. i. to experience sleeping visions* (often with *of*) स्वप्न पाहणें-पडणें-होणें, स्वप्नांत पाहणें. २ *to let the mind run on in idle revery or vagary, to have a visionary notion or idea, to imagine* वृथा मनोरथ *m*-मनोराज्य *n*-कल्पना *f.* चालविणें-करणें, स्वप्नीं-विचारीं-स्वप्नांत असणें, कल्पना *f.* चालविणें. D. *v. t. to have a dream of, to have a vision of in sleep* (often followed by an

objective clause) स्वप्नांत पाहणें. [To D. AWAY, OUT, THROUGH, &c. बसून-रिकामपणांत (वेळ) घालविणें, निरर्थक विचारांत-मनोरथ करून-आळसांत घालविणें-काढणें.] Dream'er *n.* स्वप्नें पडणारा *m*, स्वप्न पाहणारा *m*. २ *a visionary* वृथा वासना *f*-मनोराज्य *n*. करणारा *m*. Dream'ery *n*. स्वप्नस्थिति *f*, मनोराज्यविजृंभण *n*. Dream'ful *a*. Dream'fully *adv*. Dream'ily *adv*. स्वप्नांतल्याप्रमाणें, न समजतां. Dream'iness *n*. स्वप्नस्थिति *f*, स्वप्नवत्स्थिति *f*. Dream'ingly *adv*. स्वप्नस्थितीप्रमाणें. Dream'-land *n*. *an unreal, delightful country such as is sometimes pictured in dreams, region of fancies, fairyland* कल्पनासृष्टींतील-स्वप्नांत दिसणारी-काल्पनिक सुखभूमि *f*, सुखमय प्रदेश *m*, कल्पित सुखप्रदेश *m*, स्वप्नस्थान *n*, मनोराज्य *n*, यक्षपुरी *f*, अलका नगरी *f*. Dream'less *a*. स्वप्नरहित. Dream'lessly *adv*. Dream'y *a*. स्वप्नानुभवी, स्वप्नवत्,स्वप्नमय, स्वप्नोपम, स्वप्नासंबंधीं. Dream-while *n*. स्वप्नस्थितीचा काल *m*. Dream-world *n*. स्वप्नभूमि *f*-सृष्टि *f*. [A BAD D. दुष्टस्वप्न *n*, दुःस्वप्न *n*. CREATION OF D. स्वप्नसृष्टि *f*, स्वप्नप्रपंच *m*. INTERPRETATION OF D.s स्वप्नांचा विचार *m*- उलगडा *m*- चिकित्सा *f*. INTERPRETER OF D.s स्वप्नचिकित्सक *m*. LIKE A D. स्वप्नवत्.] Dreamed or Dreamt *pa. t.* & *pa. p.* Dream'ing. *pr. p.*

Drear ( drēr ) [ *drear* is short for *dreary*. M. E. *drery*. A. S. *dreórig*, sad; orig. 'gory'; formed with suffix-*ig* from A. S. *dreor*, gore.] *a*. *dismal, gloomy with solitude* भयाण व निर्मनुष्य, भणभणीत, उदास, रूक्ष, रखरखित, शून्याकार, निर्जन, शून्य. D. *n*. (*obs.*) उदासपणा *m*. Drearihood,-head *n*. (*obs.*) *affliction* पीडा *f*, बाधा *f*, क्लेश *m*, व्यथा *f*, कष्ट *m*, दुःख *n*. Drear'ily *adv*. Drear'iness *n*. *dismalness, gloomy solitude* उदासपणा *m*, भणभणीतपणा *m*, भयाणपणा *m*, रखरखाट *m*, रूक्षता *f*. Drear'ing *n*. (*obs.*) Drear'isome *a*. *very dreary* फारच भयाण-उदास.

Dredge ( drej ) [ North E. *dreg*. Answering to A. S. *drecg*, *drecge* ( not found ) for *drag-jo*.—A. S. *dragan*. See Draw.] *n*. *any instrument used to gather or take by dragging* गोळा करण्याचें किंवा बाहेर काढण्याचें साधन *n*; as: (*a*) *a dragnet for taking up oysters &c. from their beds* (पाण्याच्या बुडांतून-तळांतून) मोत्यांचे शिंपले वगैरे काढण्याचें जाळें *n*. (*b*) *a dredging machine* गाळ काढण्याचें यंत्र *n*. (*c*) *an iron frame, with a fine net attached, used in collecting animals living at the bottom of the sea* (समुद्राच्या तळांतील) मासे वगैरे पकडण्याचें यंत्र *n*. २ ( *mining* ) *very fine mineral matter held in suspension in water* पाण्यांत मिश्र झालेले खनिज पदार्थांचे सूक्ष्म कण *m. pl.*, खनिजगाळ *m*. D. *v. t.* *to gather with a dredge* ड्रेज्यंत्रानें (गाळ) उपसणें-काढणें. २ *to deepen with a dredging machine* (ड्रेज्यंत्रानें उसपून) नदीचा तळ खोल करणें-खोली वाढविणें. [ DREDGING MACHINE *n*. नदींतील-गोदींतील तळाचा गाळ काढण्याचें आकर्षणयंत्र *n*. ]

Dredge ( drej ) [ O. Fr. *dragee*, mixed corn; also a sweetmeat,–Late L. *dragata*, *drageia*, a sugar-plum; altered form of *tragemata*, *pl.* of *tragema*. -Gr. *tragēma*, something nice to eat. ] *v. t.* *to sprinkle flour &c. on roasting meat* (भाजत घातलेल्या मांसावर) कणीक-पीठ पेरणें-घालणें-पसरणें-लावणें. [ Dredging box *n*. गाळ काढण्याचें यंत्र *n*.] Dredg'er *n*. ड्रेज्नें मासे धरणारा *m*. २ गाळ काढण्याचें यंत्र *n*. D. *n*. ( *cookery* ) *a box with holes in its lid* भोंकांच्या झांकणाची पेटी *f*. हिचा उपयोग भाजणाऱ्या मांसावर पीठ टाकण्यांत करतात.

Dreg ( dreg ) [Prob. from Icel. *dregg*, akin to Swed. *dragg*, to draw. ] *n*. *refuse, lees, grounds, sediment* (प्रवाही पदार्थाचा तळाशीं राहणारा) रेंदा *m*, गाळ *m*, मळी *f*, खळबळ *f*, गाळसाळ *m*, गदळ *m*, मळ *m*, कचरा *m*. २ *the vilest & most worthless part of anything* (एखाद्या वस्तूचा) निरुपयोगी शेष *m*-अवशिष्टभाग *m*, पातेरा *m*, (*fig.*) (समाजांतील) नीच-पाजी-हलकट लोक, कचरा *m*; as, "The dregs of society." समाजाची खरवड *f*, अत्यंत खरवड *f*. [ पूर्वी या शब्दाचा उपयोग स्पेन्सर, शेक्सपियर वगैरेंनीं क्वचित् ठिकाणीं एकवचनीं केलेला आढळतो ; परंतु हल्लीं बहुधा याचा उपयोग अनेकवचनींच होतो. ] Dreg'giness *n*. मलपरिपूर्णत्व *n*, मलिनत्व *n*, अशुद्धत्व *n*. Dreg'gish *a*. Dreg'gishness *n*. Dreg'gy *a*. गढूळ, गदळ.

Drench ( drench ) [ M. E. *drenchen*. A. S. *drencan*, causal of *drincan*; hence, to make drink. See Drink. ] *v. t.* *to cause to drink*, ( *esp.* ) *to dose by force, to put a potion down the throat of* ( as of a horse) पाजणें, प्यावयास लावणें, घशांत कोंबणें, (जनावरांस) घोंव्यानें पाजणें. २ *to purge violently by physic* (औषध देऊन) कोठा साफ करणें-झाडणें. ३ *to steep in moisture, to wet thoroughly, to soak, to saturate with water* (भिजवून) चिंब-चिबचिबीत-चुबचुबीत-चप-चपीत-थबथबीत करणें. [As "TO FELL" IS "TO MAKE TO FALL", AND "TO LAY" IS "TO MAKE TO LIE," SO "TO DRENCH" IS "TO MAKE TO DRINK." ] D. *n*. *a drink, a draught* पाजण्याचा पदार्थ *m*, घोंट *m*. २ *a potion of medicine forced down the throat* घशांत कोंबलेलें औषध *n*. ३ *a potion that causes purging* कोठा साफ करणारें औषध *n*, रेचक *n*. Drench'er *n*. भिजविणारा पदार्थ *m*-मनुष्य *m*. २ *one who administers a drench* औषध देणारा *m*-पाजणारा *m*. [ DRENCH-HORN घोंटें *n*, धोटें *n*, नाड (R.) *n*, नाडा (R.) *m*. ]

Dress ( dres ) [ O. Fr. *dresser*, *drescer*, to erect, set up, dress; answering to a Late L. form *directiare*-L. *directus*, p.p. of *dirigere*, to direct. See Direct. या शब्दाचा मूळ अर्थ नियमन करणें असा होता.] *v. t.* ( *mili.* ) *to arrange in exact continuity of line, to*

*adjust to a straight line & at proper distance* एका रांगेनें सारख्या अंतरावर उभें करणें, व्यवस्थित लावणें; as, "To D. the ranks." २ (*med.*) *to treat methodically with remedies bandages, &c. as a sore or wound* जखम बांधणें,(जखमधुऊन साफ करून) मलमपट्टी बांधणें. ३ To D. या शब्दाचे संदर्भानें 'उपयोगीं पडेल असें करणें', 'तयार करणें', 'सजविणें', 'स्वच्छ करणें' इ० अनेक अर्थ होतात; जसें, [ (a) To D. FOOD अन्न शिजवून तयार करणें. To D. LEATHER चामडें उपयोगाकरितां तयार करणें-कमावणें. To D. A LAMP दिवा पुसून-वात कापून स्वच्छ करणें. To D. A GARDEN बाग तयार करणें. To D. A HORSE घोड्याची चाकरी-मालीस करणें. To D. GRAIN धान्य-दाणा पाखडणें-निवडून साफ करणें. To D. ORES (*mining*) (अशुद्ध धातू) वर्गावर्गी करून शुद्ध करणें. To D. UP or OUT भपकेदार पोषाख करणें, चट्टीपट्टी करणें. To D. A SHIP (स्वराष्ट्रचिह्नांकित बावटे वगैरे उभारून) जहाज शृंगारणें. ] ४ *to cut to proper dimensions, to give proper shape to* ( कापून-ठोकून ) बेतशीर आकार *m*-रूप *n.* देणें. ५ *to put in proper condition by appareling* ( as the body ), *to clothe, to apparel, to deck* वस्त्र-वस्त्रें नेसवणें-पेहेरणें, जामानिमा करणें, पोषाख घालणें-चढविणें-करणें, वेषान्वित-वस्त्रभूषित करणें. ६ *to break & train for use* ( as a horse &c. ) शिकविणें, उजू करणें, शिकवून तरवेज करणें. D. *v. i. mili. to arrange one's self in due position in a line of soldiers* (शिपायानें आपली रांग धरून) नीट ठिकाणावर उभें राहणें. ( रांगेनें उभें करण्याचे वेळीं हा खुणेचा शब्द उच्चारितात.) [ To D. TO THE RIGHT, To D. TO THE LEFT, To D. ON THE CENTRE (*mili.*) (-च्या) उजवीकडे-डावीकडे-मध्यें रांग धरून उभें राहणें.] २ *to clothe or apparel one's self, to put on one's garments* पोषाख-कपडे करणें-घालणें-चढविणें-पेहेरणें, वस्त्र परिधान करणें. D. *n. clothes, garments, habit, apparel* पोषाख *m*, कपडे *m. pl.*, वस्त्रें *n. pl.*, पेहेराव *m*, वेष *m.* २ *a lady's gown* सभ्य-गरती स्त्रीचा झगा *m.* ३ *attention to apparel or skill in adjusting it* पोषाखाच्या टापटिपीकडे विशेष लक्ष *n*, प्रसाधनविधिनैपुण्य *n*, पोषाखाचा शोक *m.* D.- circle *n.* नाटकगृहांतील-थेटरांतील ज्यास्त भाड्याची-दराची प्रमुख गल्लेरी *f*- ग्यालरी *f*- माडी *f.* Dress-parade (*mili.*) (सैन्याच्या पाहणीच्या वेळीं) सारखा पोषाख घालून केलेली कवाईत *f.* Dress-coat *n.* (फक्त पाठीमागेंच) घोळ-झोल-झोळ असलेला आंगरखा *m*- कोट *m.* Dress'ed *p. a.* वस्त्रभूषित,आच्छादित, वस्त्रयुक्त, सवस्त्र. २ शिजविलेला &c. Dres'ser *n. one who makes ready for use by putting in order* दुरुस्ती करणारा *m*, नीट करणारा *m.* २ *one who puts on clothes* पोषाख घालणारा, कपडे चढविणारा, वेष देणारा. ३ *an assistant in a hospital, whose office it is to dress wounds &c.* जखमा बांधणारा मदतनीस *m*, मलमपट्या तयार करून बांधणारा, उपवैद्य. ४ (*mining*) *a kind of pick for shaping large coal* मोठा कोळसा तासण्याचें पिकांव *n.* ५ *a table on which meat &c. is dressed* मांसादि पदार्थ तयार करण्याचें मेज *n*-टेबल *n.* ६ *a cupboard to receive dishes & cooking utensils* स्वैपाकाचीं भांडीं ठेवण्याचें फडताळ *n*- कपाट *n.* Dress-goods *n. pl.* (स्त्रियांच्या अथवा लहान मुलींच्या) झग्यांस लागणारें रेशमी अगर तागाचें कापड *n.* Dressing *n. dress, raiment, ornamental attire* वस्त्रें *n. pl.*, कपडा *m*, मौल्यवान्-उंची पोषाख *m.* २ *an application to a wound* मलमपट्टी बांधणें *n.* ३ *manure spread over land* जमिनीवर पसरलेलें खत *n.* (जोंपर्यंत हें पृष्ठभागावरच असतें तोंपर्यंत त्यास 'top-dressing' असें म्हणतात.) ४ *a condiment* मसाला *m.* ५ *the stuffing of fowls &c.* कोंबडीं बदकें इत्यादि (मसाला भरून) खाण्यासाठीं तयार करणें. ६ *gum, starch &c. used in stiffening silk, linen &c.* (कापड ताठ-खडखडीत होण्याकरितां लावलेली) खळ *f.* ७ *an ornamental finish, as a molding around doors &c.* (दारें-खिडक्या यांच्या भोंवतालचें) नकशीचें काम *n.* ८ (*colloq.*) *castigation, scolding* (often with *down*) कोरडे मारणें-आटणें (*fig.*). Dressing-case *n.* (स्त्रियांची) वेणीफणीचें सामान ठेवण्याची पेटी *f*, फणीघराची पेटी *f.* (पुरुषांची) पोषाख करण्याचें साहित्य ठेवण्याची पेटी *f.* Dressing-gown *n.* सैल झगा *m*, पायघोळ झगा *m.* Dressing-room *n.* प्रसाधनागार *n*, परिधानस्थान *n*, कपडे करण्याची खोली *f*- जागा *f.* Dressing-table *n.* पोषाख ठेवण्याचें मेज *n.* Top-dressing *n.* See Dressing. ३. Dress'-maker *n.* कपडे शिवणारा *m.* Dress'-making *n.* कपडे शिवणें *n* Dres'sy *a.* भपकेदार पोषाख करणारा, छानछोकीचा पोषाख करणारा, पोषाखाचा हौशी, डामडौली, पोषाखी. Evening dress *n.* सांज-पोषाख *m*, संध्याकाळच्या वेळीं घालण्याचा पोषाख *m* -कपडे *m.* Full dress *n.* पुरा-पूर्ण पोषाख *m.* To dress finely नटणें.

Drew ( drū ) *pa. t.* of Draw.

Dribble ( drib'-l ) [Frequentative of obs. E. *drib*, to drip slightly, which is a weakened form of *drip.*] *v. i. to fall in a quick succession of small drops* टिपकणें, थिबथिब गळणें, ठिबकणें, थिबकणें, पागळणें, गळती लागणें, ठिबठिब गळणें. २ *to slaver, to drivel* ( as a child or an idiot ) तोंडांतून लाळ गळणें-पागळणें-सांडणें. D. *v. t. to let fall in drops* थेंबथेंब पाडणें-गाळणें-सोडणें-सांडणें. D. *n. a drizzling shower* पावसाची झिमझिम *f.* Drib'bler *n.* थेंबथेंब पाडणारा. Drib'blet, Drib'let *n. a small part, a small sum* लहान-अल्प रकम *f*-अंश *m*; as, "To pay money in D.s." कणशः-बिंदुक्रमेण-दमडीअधेल्यानें भरपाई करणें, थोडथोडी रक्कम देऊन भरती-भरपाई करणें.

Dried ( drīd ) *pa. t. & pa. p. a.* of Dry.

Drier ( drī'-ėr ) *n.* आर्द्रताकर्षक *m.*

Drift ( drift ) [ From *drive*; akin to Dut. *drift*, a driving; Dan. *drift*, drift, impulse, drove, herd. Ger. *trift*, pasturage.] *n. a driving, a violent*

*movement* (पुढें नेण्याचा) जोर *m*, झपाटा *m*, ओढ *f.* २ *the force which impels or drives, an overpowering influence* ओढ *f*, पूर्ण कहा *m*, ताबा *m*, अम्मल *m*, पगडा *m*. ३ *course or direction along which anything is driven* रस्ता *m*, मार्ग *m*, दिशा *f*, प्रवाह *m*, ओघ *m*, गति *f.* ४ *object aimed at or intended, intention, aim* रोंख *m*, कटाक्ष *m*, धोरण *n*, हेतु *m*, उद्देश *m*, अभिप्राय *m*. ५ *import or meaning of a sentence* भावार्थ *m*, तात्पर्य *n*, आशय *m*, मतलब *m*, अभिप्राय *m*. ६ *that which is driven, forced, or urged along* ढकललेली-लोटलेली वस्तु *f*, ढीग (*loosely*) *m*; as, "A D. of snow." ७ *mech. a slightly tapered tool of steel for enlarging or shaping a hole in metal by being driven into it* (धातूस पाडलेलें भोंक मोठें करण्याचा पोलादी) टोंकदार-निमुळता सामता *m*, दिशीमध्यें चावी (चक्रांतील) ठोकण्याचें हत्यार *n*. ८ (*mining*) *a passage driven or cut between shaft & shaft, a small subterranean gallery, a tunnel* दोन विहिरींमध्यें-खाड्यांमध्यें खोदलेला-पाडलेला रस्ता *m*, जमिनीखालची ग्यालरी *f*, अन्तर्भौम मार्ग *m*, (भूम्यंतर्गत) बोगदा *m*, सुरंग *m*, खनक *m*. ९ *the difference between the size of a bolt & the hole into which it is driven* खिळा व तो मारण्याचें भोंक यांच्या आकारांमधील अंतर *n*. D. *v. i. to float or be driven along by* (a current of water) वाहणें, (ओघा-प्रवाहाबरोबर) वाहत जाणें. २ *to accumulate in heaps by the force of wind* (वाऱ्याच्या जोरानें वाहत जाऊन)-चा ढीग जमणें-रास होणें-डोंगर बनणें. ३ (*mining*) *to examine a vein for the purpose of ascertaining the presence of metals or ores* (धातूंकरितां खाणीची) शीर शोधणें. D. *v. t. to drive or carry away* वाहून नेणें, ओघाबरोबर नेणें. २ *to drive into heaps* (वाहत नेऊन) ढीग रचणें -रास पाडणें. ३ *mech. to enlarge or shape, as a hole, with a drift* (सामत्यानें भोंक) मोठें करणें-बेतबार करणें-आकारांत आणणें. D. *a. movable by wind, that is drifted* वाऱ्यानें उडत-वाहत जाणारा, प्रवाहानें लोटीत नेलेला. Drift'age *n.* (ठरलेल्या मार्गांतून वाऱ्याच्या योगानें झालेलें जहाजाचें) विचलन *n*. Drift-anchor *n.* जहाज प्रवाहाबरोबर वाहत जाऊं नये म्हणून त्याला बांधलेला नांगर *m*. Drift-bolt *n.* खिळे उपटण्याचा स्क्रू *m*. Drift-ice *n.* (प्रवाहाबरोबर) वाहत जाणारें बर्फ *n*. Drift'less *a.* हेतुरहित, उद्देश-अभिप्रायरहित-वांचून, योजनारहित. Drift-sail *n.* नियमित मार्गांतून जहाजाचें विचलन होऊं नये म्हणून लावलेलें शीड *n*, स्थिरावतें शीड *n*.

Drill (dril) [Dut. *drillen*, to bore or drill (soldiers).] *v. t.* (सामत्यानें) भोंक पाडणें, विंधणें, वेधणें. २ *to train in the military art* कवाईत शिकविणें, सैन्यविन्यास शिकवणें, लष्करी तालीम *f*-कवाईत *f.* देणें. ३ *to instruct thoroughly in any art or branch of knowledge* (कोणत्याही कलेची किंवा विद्येची) पुरी तालीम *f*-कवाईत *f*-शिक्षण *n*. देणें. D. *v. i.* तालीम-कवाईत-करणें. D. *n. an auger* सामता *m*, विंधणें *n*, वेधन *n*. २ *military exercise* कवाईत *f*, तालीम *f.* ३ (कोणत्याही विषयाची) कडक तालीम *f*, सक्तशिक्षण *n*; as, "A D. in Latin grammar." Drill-master *n.* कवाईत शिकवणारा. Drill-sergeant *n.* (लष्करी शिपायांना) कवाईत शिकवणारा 'सार्जन्ट' *m*.

Drill (dril) [Of English origin.] *v. t.* (R.) झरझरून वाहत लावणें. २ *to sow, as seeds, by dribbling them along a furrow or in a row* पांभरींतून पेरणें. ३ (*obs.*) (-ला) लालूच दाखवणें. D. *v. i.* पांभरीनें पेरणें. D. *n.* कुळव *m*, गुठळ्या मोडण्याचा नांगर *m*. Drill-plough *n.* पांभर *f.* [D. OF TWO TUBES मोघड *m*. *f. n.*, मोघण *n. f.* D. OF THREE TUBES टिफण *f*, OR टिफणी *f*, OR टिफणें *n*. TUBE OR CHANNEL OF A D. फण *m*. SEED-BOX OF A D. चाडें *or* चाढें *n*.] Drill-harrow *n.* दांताळें *n*.

Drink (drink) [A. S. *drincan*, to drink.] *v. i.* पिणें. २ दारू पिणें, दारू पिण्याची संवय असणें, दारूबाज-निशाबाज असणें, ठांसून पिणें. D. *v. t.* पिणें, प्राशन-पान करणें. २ *to suck up, to absorb, to imbibe* (आंत) सोखून-शोषून घेणें. ३ (ज्ञानेंद्रियद्वारा) आंत घेणें. To drink down दाबून टाकणें, गिळून टाकणें, पोटांत घालणें; as, "To D. down unkindness." To drink in पिणें, आंत घेणें. To D. off *or* up एका खेपेनें पिऊन टाकणें. To D. the health of, To D. to the health of एखाद्याचें कल्याण किंवा आरोग्य चिंतीत (त्याच्या नांवानें) दारू पिणें, 'आरोग्यपान' करणें. D. *n.* पिण्याचा पदार्थ *m*, पेय *n*, पानद्रव्य *n*. [COOLING DRINK शीतपेय *n*.] २ मदिरापान *n*, माद आणणारें पेय *n*; as, "When D. is in, wit is out." Drink-money *n.* दारू पिण्याकरितां दिलेलें पोस्त *n*. [IN DRINK छाकटा, प्यालेला. STRONG DRINK जहाल-तीव्र-कडक दारू *f.*] Drink'able *a.* पिण्या-प्याया-चा-जोगता- &c. पेय, पानयोग्य. D. *n.* (esp in *pl.*) पिण्याचा पदार्थ *m*. Drink'er *n.* पिणारा, प्राशनकर्ता, पानी (as, मद्यपानी), पी (*in comp. as,* मद्यपी), प (*in comp.*, as, मधुप). Drink'ing *n.* पिणें *n*, प्राशन *n*, पान *n*. (esp. *in comp.*, as, अमृतपान, मधुपान.) २ *practice of drinking to excess* अतिशय दारू पिण्याची खोड *f.*

Drip (drip) [Of Scandinavian origin.] *v. i. to fall in drops* टपकणें, टिपकणें, गळणें, पाघळणें, स्रवणें, पाझरणें. २ *to let fall drops of moisture or liquid* टपकणें, ठिपकणें. D. *v. t. to let fall in drops* टिपकत टपकत खालीं सोडणें. D. *n.* टिपकणें *n*, ठपकणें *n*, ठपकणी *f*, टिपक *f*, टिपकणी *f*, गळ *f*, गळती *f*, स्राव *m*, स्रवण *n*, पाघळ *m*. २ *that which falls in drops* गळ *f*, गळती *f.* ३ *the edge of a roof* छपराची कोर *f.* Drip'ping *n.* गळणें *n*, गळती *f*. D. *a.* टपकणारा, स्रावी

(comp. जलस्रावी-स्रावक). Dripping-wet *a.* ओला चिंब, थबथबीत, चबचबीत, चिबचिबीत, चीब. [ To BE DRIPPING-WET चबचबणें, चिबचिबणें. ] Drip-stone *n.* पाणी बाजूनें टिपकवून लावण्यासाठीं दरवाज्यावर केलेलें झुकाऊ कारनिस *n*, पाणझुकाव *m*, पाणकारनिस *n*. Drip'pingly *adv.* थबथब, थबाथब, टपटप, टपाटप, चिबचिब. Right of drip (*law*) (एकाच्या छपरावरून) दुसऱ्याच्या जागेंत पाणी पडूं देण्याचा हक्क *m*.

Drive (drīv) [A. S. *drifan*, to drive; Ger. *treiben*, to push.] *v. t. to push forward, to compel to move on* पुढें लोटणें-ढकलणें. [ In this first sense in some particular contexts the words used are :—दवडणें, दपटणें, दामटणें, लाटणें, रगडणें, रपाटणें, लाटालाटीनें दपटणें. ] २ (as a nail) मारणें, ठोकून रोंवणें, टापरणें, ठोकणें. ३ (as cattle, birds, &c.) हाकणें, हाकलणें, हाकून-हाकलून देणें, पिटून लावणें, धुडकावणें, दवडणें, घालवून देणें, घालवणें, पिटाळणें-पिटाळणी करणें. [ PARTICULAR WORDS OR INTERJECTIONS ARE USED IN *driving away or off*. THOSE USED TO A BEAST, GENER. ARE हुत्त, हुडुत्त.-TO A CAT, छुक्, छुत्, OR शुक्क & शुत्, शिर (*obs.*)-TO BIRDS, हो, हा, हुश्श OR हुस्स.-TO CROWS, &C. हड्या.-TO A DOG, हड, हडहड, हडि.] ४ (a flock, a beast, &c.) हाकणें or हांकणें, हाकून नेणें, हाकवणें, हाकलणें. [PARTICULAR WORDS OR INTERJECTIONS ARE USED IN *driving on*: THOSE USED TO A HORSE OR BULLOCK ARE, ड्यां, ड्यांड्यां.-TO AN ELEPHANT, धकधक, धगधग, धगेधगे OR दगेदगे, धा.-TO CATTLE, थैक, हैक, हड.-TO FOWLS, ख़ुड.-TO SHEEP OR GOATS, तिर OR थिर.-TO PIGS, हू.] ५ *to convey in a vehicle drawn by a beast* गाडींतून नेणें; as, "To D. a person to his own door." ६ (*a vehicle*) हांकणें-हाकणें, चालवणें. ७ *to urge or impel vehemently* पिटाळणें, पिटणें, हाकलणें, पिटाळणी करणें, दवडणें, दडपणें, दामटणें, ढकलणें. ८ (a trade or bargain) सुरू-चालू ठेवणें. ९ *to clear by forcing away what is contained* (अंतर्गत वस्तु) हाकवून काढणें. १० *to dig horizontally* (क्षितिजाशीं) समान्तर रेषेंत खणणें. D. *v. i. to move furiously* जोरानें जाणें-येणें. २ गाडींत बसून जाणें. ३ *to tend to* कल *m*- ओढा *m*- ओढ *f*- धोरण *n*. असणें with *g. of o.* ४ *to be driven towards* (-कडे) ओढला जाणें, (-कडे) वाहत जाणें. Driv'ing *pr. p.* Drove *pa. t.* Driv'en *pa. p.* Drive *n.* गाडींत बसून फिरणें *n*- जाणें *n*. २ गाडींत बसून जाण्याचा रस्ता *m*, गाडीमार्ग *m*. ३ कामाची तडफ *f*- उतावळ *f*- त्वरा *f*. ४ एकत्र हाकलेले किंवा वाहून गेलेले पदार्थ *m. pl.* Driv'er *n.* हाकणारा *m*, गाडीवान *m*, धुरेकरी *m*. (for more meanings see the verb.) Driving-band *n.* चालविणारा पट्टा *m*, एका यंत्राच्या गतीनें दुसऱ्या यंत्राला गति देणारा पट्टा *m*. Driving-shaft *n.* यंत्रांना गति देणारी लाट *f*, चालविणारी लाट *f*. Driving-wheel *n.* (दुसऱ्या चक्राला) गति देणारें चक्र *n*. To drive to one's wits' end गोंधळवून टाकणें, वेडा करून सोडणें.

Drivel (driv'-l) [O. E. *dravelen, drabelen, drevelen, drivelen*, to slaver.] *v. i. to slaver* (तोंडांतून) लाळ गळूं देणें, लाळणें, लाळ गळणें *g. of s.*, लाळ टाकणें-गाळणें. २ *to be foolish, to speak like an idiot* वेडेचार-चाळे करणें, पचाल-पागल बनणें, अचावचा बोलणें, *spec.* म्हातारचळ लागणें, साठी बुद्धि होणें. D. *n.* लाळ *f*, लाला (S.) *f*, निरर्थक भाषण *n*, अचावचा भाषण *n*, (लहान मुलांसारखें) बे बे किंवा (म्हाताऱ्यासारखें) फे फे भाषण *n*, अस्पष्ट भाषण *n*. Driv'eller *n.* Driv'elling *pr. p.* D. *n.* म्हातारचळ *m*.

Drizzle (driz'-l) [Freq. of M. E. *dresen*–A. S. *dreosan*, to fall.] *v. i. to rain in very small drops* पावसाचा कोंडा पडणें, कोंडापाऊस पडणें, तुषार पडणें, पाऊस थुइथुइ पडणें-केंडणें, (continuously) झुरझुर-रिपरिप लागणें with *g. of s.* D. *v. t. to shed slowly in minute drops or particles* बारीक तुषार-कोंडा पाडणें; as, "The air doth D. dew." D. *n.* झुरझुर *f*, रिपरिप *f*, बुरगें *n*, तुषार *m. pl.*, कोंडा *m*, कोंडा पाऊस *m*. Drizzling *n.* झुळझुळ *f*, रिपरिप *f*. &c. Drizz'ling *adv.* शिरिशिरी, झिरीमिरी, थुइथुइ, थिवथिव. Drizz'ly *a.* बुरबुरीचा, तुषाराचा.

Droll (Drōl) [Fr. probably from Dut. *drollig*, odd -*trold*, a hobgoblin.] *a. odd, amusing* (of persons) विदूषकी, विक्षिप्तपणाचा, विलक्षण गमतीचा, शकारी. (of things) विलक्षण गमतीची. Droll *n.* विदूषक *m*, गमत्या-शकार (*fig.*) *m*. २ विलक्षण वस्तु *f*. D. *v. i. to practise drollery* विदूषकी करणें, गंमत-विक्षिप्तपणा करणें. Droll'ery *n.* मस्करी *f*, विक्षिप्तपणा *m*. Droll'ish *a.*

Dromedary (drum'-e-deri) [Fr. *dromedary*–L. L. *dromedarius*–Gr. *dromas-dromados*, running. *cf.* Sk. द्रम्, to run.] *a. thorough-bred one-humped Arabian camel* एकमदारी उंट *m*. Drom'edarist *n.* Dromedārian *n.* सांडणी स्वार *m*.

Drone (drōn) [A. S. *dran*, the bee.] *n.* मधुमक्षिका *m*, भ्रमर *m*, मधुप *m*, मधमाशीचा नर *m*. २ *one who lives on the labours of others, a lazy idle fellow* आयतखाऊ, ऐदी, फुकटखाऊ, पंक्तिबारगीर, पंक्तिपठाण, ऋणकरी, ऋणाइतस्वरूपी. ३ *a humming or deep murmuring sound* गुणगुण *f*.

Drone (drōn) [M. E. *dronen*, to hum *cf.* ध्रण्, to sound.] *v. i. to hum* गुणगुण करणें. २ *to live in idleness* आळसांत दिवस घालविणें-आयुष्य काढणें.

Droop (drōōp) [M. E. *droupen* Icel. *drupa*, to drop.] *v. i. to languish from grief or other cause* गळणें, खचणें, मोडणें, बसणें, बळमोड होणें *g. of. s.* म्लान-ग्लान-गलित होणें, म्लानि-ग्लानि येणें *in. con.* २ *to hang down, to lean forward* मान *n* टाकणें, मान मोडणें

पडणें *g. of. s.* D. *v. t.* खचवणें, म्लान करणें. २ (-ची) मान खालीं पाडणें. Droop'ing *n.* गळणें *n*, खचणें *n*. Droop'ingly *adv.* Drooped *pa. p.*

Drop (drop) [ A. S. *dropa*, a drop; *dreopan*, to drop. Dut. *drop*, Ger. *tropfen.* ] *n. a small portion or particle of liquid* थेंब *m*, टिपका *m*, टपका ( *obs.* ) *m*, बिंदु *m*, बुंद *m*, थेंबका *m*, थेंबटा ( R. ) *m*. [ By DROPS बिंदुशः, थेंबथेंब. ] २ *a very small quantity of liquid* शितोडा *m*, शीट *n*, शिटा *m*. ३ ( of an ornament) *a pendant* लोलक *m*, *spec.* भोंकर *n*. ४ *a trap in the gallows the fall of which allows the criminal to drop* पडती फळी *f*, पाडतां येईल अशी केलेली फळी *f*, फांसावर चढवितांना गुन्हेगारांना उभें करण्याची फळी *f*. ५ *a device for lowering goods into a ship's hold* जहाजांत ओझीं उतरून घेण्याचें यंत्र *n*. ६ *a trap-door* चोरदरवाजा *m*. ७ *a curtain which falls or drops in front of the stage of a theatre* दर्शनी पडदा *m*, पहिला पडदा *m*, मुखपट *m*. ८ *a drop-hammer* एक जातीचा हातवडा *m*. ९ *pl.* थेंबानें घेण्याचें औषध *n*. किंवा सुगंधी द्रव्य *n*. १० *naut. the depth of a square sail* वरपासून खालपर्यंत शिडाची उंची *f*. D. *v. i.* टपकणें, टिपकणें, टपटप-थबथब-थेंबथेंब पडणें. २ *to fall suddenly* (एकदम) पडणें, गळणें, गलन *n*- स्खलन *n*. होणें *g. of s.* ३ *to come to nothing* रहाणें, पडणें, तहकूब होणें. ४ (with in) *to come unexpectedly* अवचित-अकस्मात् येणें. [TO DROP IN REGULARLY AND CONSTANTLY ठेवलेला-नेमका-टाकला येणें, दत्त म्हणून येणें.] ५ मरून पडणें. ६ *to lower* खालीं होणें, गळणें. D. *v. t.* थेंब *m. pl.*-टिपके *m. pl.* पाडणें-गाळणें-टाकणें, टपटप-थबथब-थेंबथेंब-पाडणें-टाकणें-गाळणें. २ *to let fall* सांडणें, पाडणें, पडूं देणें, सोडणें, टाकणें. ३ *to dismiss, to set aside, to have done with* सोडणें, सोडून देणें, गाळणें, टाकणें, नांव *n*-वार्ता *f*- वास्तपूस्त *f*- वासपूस *f*- वाजपूस *f*. सोडणें *g. of o.* ४ *to bestow or communicate by a suggestion* (सूचना इ०) हळूच सावधगिरीनें देणें ; as, "To D. a hint." ५ ( as curtain) खालीं पाडणें-सोडणें. ६ (पत्र) टाकणें-पाठवणें; as, "To D. a line." ७ *to give birth to* प्रसवणें, जन्म देणें, विणें, घालणें; as, "To D. a lamb." ८ *to cover with drops* ( ठिपक्या ठिपक्यांनीं ) भूषित करणें ; as, "To D. with gold." ९ *to omit, to leave out* सोडणें, गाळणें. Drop'per *n.* गाळणारा, सोडणारा, सांडणारा, &c. Drop'ping *n.* गाळणें *n*, सोडणें *n*, पडणें, &c. Drop'pingly *adv.* थेंबथेंब.

Dropsy (drop'-si ) [ Formerly *dropsie* or *ydropsie*, the form *dropsie* being due to loss of y. M. Fr. *hydropisie*–L. *hydropisis*, *hydropisia*–from Gr. *hudor*, water-the word having been formerly written *hydropsy.* ] *n. an unnatural collection of water in any part of the body* हातपाय सुजणें *n*, सर्वांग सुजणें *n*, रोगामध्यें रुधिराभिसरणाला अडथळा आल्यामुळें त्वचेखालीं श्वेतरक्त (lymph) सांचल्यामुळें त्वचेला आलेला फुगीरपणा अगर फुगवटा *m*, शोथ *m*, शोफ *m*, जलसंचय *m*, रक्तांतील जलांश (अब्धातु ) रक्तवाहिन्यांतून निघून शरीराच्या कोणत्यातरी भागांत-उदरांत संचित होणें *n*. [ D. OF AMNION ( HYDRAMNIOS ) गर्भोदकोदर. D. OF BRAIN (HYDROCEPHALUS) जलशीर्ष, शीर्षशोथ. D. OF CHEST ( HYDROTHORAX ) जलपिंजर, जलोरोग्रह *m*, उरस्तोयरोग *m*. D. OF CONJUNCTIVA (HYDRO-PHTHALMUS) जलनेत्र. D. OF FALLOPIAN TUBE (HYDROSALPINX) अंडवाहक नलिकेंत रक्तोदक सांचणें, रजोवहांवुदर, रजोवहनाडीशोफ. D. GALL-BLADDER जलपित्ताशय. D. JOINT ( HYDROS ARTICULORUM ) जलसंधि, संधिशोथ. D. TUNICA VAGINALIS. SEE HYDROCELE मुष्कोदर. CARDIAC D. बुक्कोदर, हृदयाचे रोगापासून झालेला उदररोग. GENERAL D. ( ANASARCA ) सर्वांगशोफ, शोथोदर, सर्वांगास सूज येणें. HEPATIC D. पित्तोदर, काळजाचे रोगापासून झालेला उदररोग *m*. OVARIAN D. अंतःफलोदर, जलांतःफल. PERICARDIAL D. ( HYDROPERICARDIUM ) हृद्गृहोदर, जलहृद्गृहरोग, हृत्तोयरोग, हृद्गृह नांवाच्या हृदयाच्या पडद्यांत ( हृत्कोशांत ) पाणी सांठणें. PERITONEAL D. (ASCITES) जलोदर, अंत्रावरणांत जलसंचय होणें.]

Dross ( dros ) [ A. S. *dros*, from *dreosan*, to fall. ] *n. recrement or scum of metals* कीट *m. or n*, किटण *n*, जळ *m*, कलंक *m*. २ *rust* गंज *m*, कलंक *m*, तांब *f*. ३ *waste matter, dregs* गाळ *m*, रेंदाट *n*. Dros'sy *a.* मळ असलेला, गाळ असलेला. Dros'siness *n*.

Drought ( drowt ) [ A. S. *drugathe*, dryness. ] *n. want of rain or of water* सुकवें *n*, सुकवा *m*, अनावृष्टि *f*, अवृष्टि *f*, अवर्षण *n*. [ CROP DESTROYED BY D. सुकवें *n*. TIME OF SCARCITY FROM D. सुख्खा दुकाळ *m*, खरपड *f*. ] २ *thirst* तहान *f*, तृषा *f*, कोरड *f*, शोष *m*. ३ *scarcity* महागाई *f*, दुर्मिळता *f*. Drough'ty *a.* निपावशा, सुकव्याचा, अवर्षणाचा.

Drove ( drōv ) [ A. S. *drifan*, to drive. ] *n. a number of cattle driven* हेड *f*, तांडा *m*, ( हाकून न्यावयाच्या मोकळ्या गुरांचा ) कळप *m*. २ *any collection of irrational animals* ( मनुष्येतर ) सधर्मी प्राण्यांचा समुदाय *m*- समाज *m*. ( *S.* ) ३ *a crowd of people in motion* माणसांचा घोळका *m*, झुंड *f*, तांडा *m*. Dro'ver *n. one who drives cattle to market* हेड्या *m*, हेडवाला *m*.

Drown ( drown ) [ M. E. *drounen*. A. S. *druncnian*, to drown-*druncen pa. p.* of *drincan*, to drink. ] *v. t. to sink in water* बुडविणें. २ *to deprive of life by immersion in water or other liquid* बुडवून मारणें-प्राण घेणें. ३ ( the voice ) *to extinguish, to overcome* बुडविणें, दबविणें, लोपविणें, ऐकूं न जाईसें करणें. ४ ( one's self ) *as an act of Hindu religion* जलसमाधि घेणें. D. *v. i. to be suffocated in water, to perish in water* बुडणें. २ बुडून मरणें. To struggle in drowning गचकळणें, गचकळ्या-गटकळ्या खाणें.

**Drowse** ( drowz ) [ A. S. *drusian*, to be sluggish. ] *v. i. to sleep imperfectly, to slumber, to be heavy with sleepiness* झोंपेनें गुंगणें, झोंपेनें गुंग-जड होणें-असणें, गुंगी *f.* येणें, झोंपेच्या गुंगींत-तालांत असणें. D. *v. t. to make heavy with sleepiness, to make dull or stupid* (झोंपेनें) गुंगवणें, गुंगी *f* -तार *f* आणणें. Drow'sily *adv.* गुंगत, सुस्तीनें. Drow'siness *n.* झोंपेची गुंगी *f* -तार *f* रवरवी *f* -सुरसुरी *f* -सुस्ती *f* -तंद्रा *f.* Drow'sy *a.* झोंपेची गुंगी आलेला, गुंगलेला, गुंग. २ *habitually inclined to sleep* झोंपाळू, झोंप्या, गुंग्या.

**Drub** ( drub ) [ Ar. *daraba*, to beat. ] *v. t.* दांडकणें, ठोकणें, चोपणें, बडवणें, कुचलणें, कुटणें, खुबलणें, कुमकणें. D. *n.* तडाका *m*, बडगा *m.* Drub'bing *pr. p.* Drubbed *pa. t. pa. p.* Drub'bing *v. n.* दांडकणें *n*, चोपणें *n*, बडवणें *n*, कुट्टण *n*, कुंदी *f*, काण्डात *n*, &c.

**Drudge** ( druj ) [ Ety. unknown. ] *v. i. to work hard* काबाड कष्ट *m. pl.* करणें, हाडें *n. pl.* झिजवणें, हाडाचीं काडें *n. pl.* करणें, रक्ताचें पाणी करणें (*fig.*), कुत्तेघशी करणें. Drudge, Drudg'er *n.* काबाडकष्ट करणारा, कष्टाळू, काबाडकाम्या, खप्या. Drudg'ery *n. hard or humble labour, uninteresting toil* काबाडकाम *n*, काबाडकष्ट *m*, कुत्तेघशी *f*, खप *m*, कसाला *m.*

**Drug** (drug) [O. Fr. *drogue*, a drug, Dut. *droog*, dry from their hot dry nature as once used. cf. Gr. *tragema*, sweetmeats, articles of that nature having formerly constituted the principal stock of the druggist.] *n.* शुष्कौषधिद्रव्य *n*, औषध *n*, भेषज *n.* २ *any article of slow sale or not in demand* पडीत माल *m*, सांदोरीस पडलेला माल *m.* D. *v. t. to dose to excess as with medicine* अतिशय कोंबणें, ठांसून भरणें, बेसुमार औषधें देणें-कोंबणें. २ *to tincture with something offensive or injurious* बाधक-अपकारक-विकारकारक द्रव्य घालणें-मिसळणें. ३ *to affect or season with drugs* (औषधि द्रव्यें घालून) मसालेदार करणें. २ (शुलीचें-गुंगीचें औषध देऊन) बेशुद्ध करणें. Drug'ging *pr. p.* Drugged *pa. t.* Drug'gist *n. one who deals in drugs* गांधी *m*, औषधविक्या *m*, पसारी-ऱ्या *m*, भेपजी *m.*

**Druid** ( drōō-id ) [ Celt. *derw*, an oak. The Druids worshipped under oak trees. ] *n. a celtic priest* केल्ट लोकांचा पाद्री *m*, 'ड्रुइड' *m.* Druid'ic,-al *a.* Dru'idism *n.* ड्रुइडी धर्म *m.* २ ड्रुइड लोकांतील रूढ संस्कार *m.* ह्या लोकांकडे धर्माचा व न्यायाचा अधिकार असे व ते देवरुपीपणा, मंत्रतंत्र, जादूगारी वगैरे धंदे करीत व नरमेध करीत असत.

**Drum** ( drum ) [ Dut. *trom*, Ger. *trommel*, a drum. perhaps of imitative origin. ] *n.* पडघम *m*, तंबूर (*obs.*) *m*, आनक (S.) *m*, ढोल *m.* २ *the tympanum or middle portion of the ear* मध्यकर्ण *m*, कर्णविवर *n.* ३ *the upright part of a cupola* घुमटाच्या मथळयाचा भाग *m*, घुमटाचा डेरा *m.* ४ पडघमासारखें वाटोळें फिरणारें 'सिलिन्डर.' D. *v. t.* काठीनें पडघम वाजवणें; as, "To D. a tune." २ ( with *out* ) हाकलून देणें; as, "To D. out a rogue from a camp." ३ (with *up*) ( पडघम वाजवून ) एके ठिकाणीं बोलावणें-गोळा करणें; as, "To D. up recruits." D. *v. i.* पडघम वाजविणें. २ *to throb* (छाती) उडणें, धडधडणें. ३ *to beat with the fingers* हातांनीं वाजवणें. ४ *to go about as a drummer does* ढोल पिटीत फिरणें; as, "To D. for recruits." Drum-stick *n.* ढोलकाठी *f*, टिपरूं *n*, टिपरें *n*, टिपरी *f*, चोप *m.* Drum'mer *n.* पडघम वाजविणारा. [ THE FOLLOWING INFORMATION WILL BE FOUND USEFUL:- THE VARIOUS KINDS & SORTS OF DRUMS AMONG THE INDIANS ARE:-काल्लू *m*, खरडी *f*, टिमकी *f*, डंका *m*, डमरू OR डहूर OR डौर *m*, ढोल *m*, *dim.* ढोलकें *n.* OR ढोलकी *f*, तबल *m. dim.* तबलक *f*, तबला *m*, ताशा *m*, दमदमा *m*, दमामा *m*, दायरा *m*, पखवाज *m*, मरफा *m*, मांदळ *m*, मृदंग *m*, संबळ *m*, डफ *m.* BRACE OF A D. माडू OR माहडू *m*, ओढण *f*, कांकर *m.* CHILD'S D. *gener.* टिमकी *f*, ढमदमें *n*, ढमकें OR डुमडुमें *n*, डुमकें *n.* END OR HEAD OF A D. पुडा *m*, पूड *n*, तोंडी, *f*, नडघें *n*, फेडा *m.* END WHICH IS BEATEN वाजता पुडा *m.* BASS END धुमाचा पुडा. FRAME OF A D. टोपण *n.* HOUR-GLASS D. डमरू ( डहूर OR डौर ), हुडूक *m.* PASTE APPLIED TO THE END OF A D. वोहण OR वोवण *n*, कणीक *f.* SWOLLEN AS TIGHT AS A D.-(THE BELLY) दब्ब-दबदबीत-दुमदुमीत टमटमीत-&c. भरलें-झालें. WITH D.s BEATING & COLOURS FLYING (*fig.*) धौशा लावून, वाजत गाजत व निशाणें फडकवीत.]

**Drunk** ( drunk ) *pa. p.* of Drink. प्यालेला, छाकटा, झिंगलेला, दारूचा कैफ चढलेला, मत्त, मद्यवश. [DEAD D. पुरा झिंगलेला, मरेमरें-स्तों-स्तव झिंगलेला, धुंद, गुंग, पिऊन लास झालेला. To BE D. झिंगणें, पिऊन गुंग-लास -तर्र इ॰ होणें, कैफ *m*-अमल *m.* चढणें-येणें *in. con.*, छाकटणें, ( *colloq.* ) घोड्यावर बसणें.] २ *drenched or saturated with liquid or moisture* प्रवाही द्रव्यानें-पातळ पदार्थानें भिजवलेला-चिंब झालेला. Drunk is never used attributively but always predicatively; as, "the man is Drunk" ( not a drunk man ). Drunk'ard *n.* दारूबाज *m*, छाकटा, दारू पिणारा-खाणारा, मद्यपी. Drunk'en *pa. p.* झिंगलेला, प्यालेला. २ ओला केलेला. ३ कैफांतला, अमलांतला, मदमूलक; as, "D. quarrels." Drunk'eness *n.* दारू प्याल्यामुळें झालेली स्थिति *f*, दारूची नशा *f* -निशा *f*, दारूचा कैफ *m*, अम्मल *m*, तार *f*, मद *m.*

**Drupe** ( drōōp ) [L. *drupa*–Gr. *druppa*, an over-ripe olive–*drupepēs*, ripened on the tree, from *drus*, a tree, *peptein*, to cook; cf. *drupetēs*,–*drys*, & *piptein*, to fall. ] *n. bot.* अष्टिवर्गाचें फळ *n*, कोय किंवा आठील असलेलें फळ *n*, आंत आठील किंवा कोय असून बाहेरून गीर असलेलें फळ *n.* ( उ. आंबा. ) Drupa'ceous *a.* अष्टिवर्गफलासंबंधीं. २ अष्टिवर्गफल प्रसवणारा, अष्टिवर्गफलप्रसव.

**Dry** (drī) [A. S. *dryge*, dry.] *a. free from moisture* कोरडा, सुका, शुष्क, अनार्द्र. [STIFFLY D.-A WASHED CLOTH: कडक, खडखडीत, चुरचुरीत, सणसणीत, खड्डंग. TO BE OR BECOME CRISPLY OR STIFFLY D.-CLOTH, PAPER, CROPS, GRASS &c. कडपणें-खडंग वाळणें. D. WEATHER रूक्ष-कोरडी हवा *f.* D. VEGETABLE सुकी भाजी *f,* वाळविलेली-वाळवून ठेवलेली भाजी (हरभरा, गोवारी, &c.), उसरी *f.*] २ *free from juice or sap, not green* वाळलेला, सुका, सुकट, शुष्क, नीरस, रसहीन- शून्य. [OLD AND D. VEGETABLE तरडा. *intens;* as, जून जून तरडा.] ३ *not giving milk* भाकड, आटलेली, उडालेली, विसका. [TO BECOME DRY उडणें, आटणें, विसकणें.] ४ *thirsty, needing drink* तहान लागलेला, शोप पडलेला, तृपार्त. ५ *not shedding tears* आसवें नाहींत असा, निरश्रू. ६ *of certain morbid conditions, in which there is an entire or comparative absence of moisture* सुका (खा), सुकून गेलेला, शुष्क. ७ *destitute of that which interests or amuses, barren, plain* कोरडा, आळणी, रुखा, रूक्ष, बेकस, बाकस, विरस, नीरस, शुष्क. ८ *characterised by a quality somewhat severe, grave or hard,* hence, *sharp, shrewd* पक्का, चलाख, हुशार, पोहोंचेल. ९ (hair) करडा, रांठ, भरभरीत, रुक्ष. १० (bread) कोरडा, सुका, निकळा, नुसता or निसता. ११ *free from rain* कोरडा, विनपावसाचा, पर्जन्याभावाचा, अवर्षणाचा. १२ *sarcastic* झोंबणारा, टोंचणारा, मर्मभेदक. १३ *hard, poor, blunt or not savoury* रखरखीत, रुखा, रूक्ष. १४ *ununctius and crumbly* फुसफुशीत, फसफशीत, भुसभुशीत, भसभशीत, फळफळीत, भरभरीत. D. *v. t.* वाळवणें, सुखवणें, सुकवणें, कोरडा-सुका करणें. [To D. UP शोपणें, सोखणें, आटवणें.] D. *v. i.* वाळणें, कोरडा होणें, सुखणें. [GRAIN &c. SPREAD OUT TO D. वाळवण *n,* सुकवण *n.* To D. UP सुखटणें, शोपणें, कोरडा पडणें.] २ आळणें, आटणें. ३ सुकटणें, सुखा होणें, रस जाणें *g. of s.* Dry-eyed *a.* कोरड्या-सुख्या डोळ्यांचा. Dry-land *n.* खुष्की *f,* कोरडी-सुखी जमीन *f.* Dry-nurse *n.* अंगावर न पाजणारी-केवळ संभाळणारी दाई *f.* Dry'age *n.* वाळवण *n,* सुकणावळ *f.* २ सुकवळ *n,* घट *f.* Dry'ing *n.* वाळवणें *n,* सुखवणें *n,* शुष्कीकरण *n.* २ शोषणें *n,* शोपण *n,* शोप *m.* Dry'ness *n.* कोरडेपणा *m,* सुकेपणा *m.* २ शुष्कता *f,* रसराहित्य *n,* रसाभाव *m.* ३ कोरडेपणा *m,* सुखेपणा *m,* रूक्षता *f,* नीरसता *f.* Dry-shod *adv. without wetting shoes or the feet* कोरड्या पायांनीं, सुख्या पायांनीं, पाय किंवा जोडे भिजल्याशिवाय.

**Dual** (dū'al) [L. *dualis-duo,* two.] *a. expressing or consisting of the number two* दोन ही संख्या दर्शविणारा, द्विसंख्याक. D. *n.* द्विवचन. [D. CONTROL दोहोंचा-दोघांचा अंमल *m-* सत्ता *f.*] Dua'lism *n.* द्विगुणत्व *n,* द्विधाभाग *m,* विभागद्वैध *n.* २ (*philos.*) *a view of man as constituted of two original & independent elements as matter & spirit* जड आणि चैतन्य यांच्या संयोगानें मानवप्राणी बनला आहे असें मत *n.* ३ (*theol.*) *a system which accepts two gods or two original principles one good and the other evil* द्वीश्वरमत *n,* द्वितत्वमत *n.* See Dietheism. ३ *the doctrine that all mankind are divided by the arbitrary decree of God into two classes the elect & the reprobate* मानवजातीचे पापी व पुण्यवान् असे दोन भाग ईश्वरी इच्छेनें पडले आहेत असें मत *n-*वाद *m.* ४ (*physiol.*) *the theory that each cerebral hemisphere acts independently of the other* वरिष्ठ मेंदूच्या किंवा महामस्तिष्काच्या दोहों शकलांचे व्यापार स्वतंत्र चालतात असें मत *n,* शकलद्वैध *n.* Du'alist *n.* द्वीश्वरवादी *m.* २ *one who administers two offices* दोन अधिकार चालविणारा (अधिकारी). Du'alistic *a.* Dual'ity *n.* द्वित्व *n.* Dual-school मुलांमुलींची (एकच) शाळा *f.* Du'archy *n.* द्विसत्ताकराज्य *n.*

**Dub** (dub) [Connected with old Fr. *a-douber,* to equip with arms or A. S. *dubban,* to strike or beat.] *to confer knighthood upon* (-ला) सरदारी देणें. (ह्या शब्दाचा धात्वर्थ मारणें, प्रहार करणें, थापटणें असा आहे. पूर्वी इंग्लंडांत सरदारी देण्याच्या वेळीं राजा आपल्या तलवारीचे पानानें भावी सरदाराच्या खांद्यावर हळूच थापट मारीत असे, ह्यावरून Dub शब्दाला सरदारी देणें असा अर्थ आला आहे.) २ *to invest with any dignity or new character* पदवी देणें. ३ (*obs.*) *to ornament or adorn* भूपित करणें. ४ *to rub or dress smooth* (घांसून-पुसून) तुळतुळीत करणें. Dub out (खांच खळगे भरून काढून) जमीन सारखी-सपाट करणें. D. *v. t. to make a quick noise* (नगाऱ्यासारखा) धब धब आवाज करणें. D. *n.* (R.) धबका *m,* धुम्मा *m.*

**Dubber** (dubur) [From Hindi. डबा.] डबा *m,* बुधला *m,-* लें *n* दबडें *n,* डबडें *n.*

**Dubious** (dū'-bi-us) [L. *dubiosus,* doubtful—L. *dubium,* doubt; *neu.* of L. *dubius,* doubtful, moving in two directions.-L. *duo,* two.] *a. doubtful or not settled in opinion, wavering, undetermined* शंकित, साशंक, संशयग्रस्त, डळमळीतमताचा, द्विधामताचा. २ *occasioning doubt, not clear, questionable* संशयोत्पादक, संशयजनक, संशयित, अस्पष्ट, संदिग्ध. ३ *of uncertain event or issue* अनिश्चितपरिणामक, अतर्क्यफलक, ज्याचा परिणाम काय होईल हें कळत नाहीं असा. Du'biously *adv.* संशययुक्त रीतीनें, चलबिचलीनें, &c. Du'biousness *n. state of being dubious* साशंकता *f,* शंकितता *f,* साशंकवृत्ति *f,* भ्रान्ति *f.* Dubi'ety *n. uncertainty, doubt* अनिश्चय *m,* संशयितता *f,* संशय *m.* Dubios'ity *n. state of being doubtful* संदिग्धता *f,* संशयप्रचुरता *f.* २ *a doubtful statement or thing* संदिग्धविधान *n,* संशययुक्त भाषण *n.* Du'bitable *a.* (R.) शंकनीय, संशयास्पद. Du'bitably *adv.* (R.) Du'bitancy *n.*

(R.) शंका *f.* Du'bitate *v. i.* (R.) संशय घेणें. Dubitā'tion *n.* शंका घेणें *n.* Du'bitative *a.* Du'bitatively *adv.*

Ducal (dū'-kal) [ Fr. *ducal*, adj. from *duc*, a duke. See Duke. ] *a. of or pertaining to a duke* ड्यूकाचा-संबंधीं. Du'cally *adv.* See the word Duke.

Ducat (duk'-at) [ O. Fr. *ducat*–It. *ducato*, a ducat, also a duchy; named from L. *ducatus* (duchy of Apulia) from *dux*, leader or commander. See Duke.] *n. a coin, either of gold or silver, of several countries in Europe* (orig. one struck in the dominions of a duke.) सोन्याचें किंवा चांदीचें नाणें *n.* (यूरोप खंडांतील पुष्कळ देशांत प्राचीन काळीं हें नाणें वापरीत असत. सोन्याच्या नाण्याची किंमत साधारणपणें ९ शि० ४ पे० आहे; व चांदीच्या नाण्याची किंमत जवळ जवळ याच्या अर्ध्यानें आहे.)

Duchess (duch'-es) *n.* ड्यूकची बायको *f.* किंवा विधवा *f.*

Duchy (duch'-i) [ Fr. *duche.*–Late L. *ducatum*, acc. of *ducatus*, a dukedom.–L. *duc*, stem of *dux*, a duke. See Duke.] *n. the territory or dominions of a duke, a dukedom* 'ड्यूक'च्या ताब्यांतील मुलूख *m*- प्रांत *m.* २ ड्यूकाची जहागीर *f.*

Duck (duk) [ Apparently the same as 4th. Duck.] *n. a pet, a darling* प्रियवस्तु *f*, लाडका *m*, आवडता *m*, नाकांतील बाल *m*, (*fig.*) प्रियतम *m.*

Duck (duk) [ Dut. *doek*, linen cloth, canvas. cf. Dan. *dug*, Swed. *duk.*] *n. a linen (sometimes cotton) fabric, finer & lighter than canvas used for the lighter sails of vessels, men's clothing &c.* डक नांवाचें कापड *n.*

Duck (duk) [ O. E. *duken, douken*, to dive. ] *v. t. to plunge under water and suddenly withdraw* पाण्यांत बुडवून एकदम बाहेर काढणें. २ *to plunge the head of into water* (पाण्यांत किंवा इतर प्रवाही पदार्थांत) डोकें बुडविणें *g. of o.* ३ *to bow, to bob down* एकदम खालीं वांकवणें. D. *v. i. to go under the surface of water and immediately reappear* पाण्यांत बुडून लागलेंच बाहेर येणें. २ *to drop the head or person suddenly* डोकें किंवा अंग खालीं टाकणें-फेंकणें. Duck'er *n.* बुडणारा, पोहणारा. २ *a servile person* डोकें खालीं घालणारा, हांजी हांजी करणारा, (*fig.*) थुंकी झेलणारा.

Duck (duk) [ O. E. *duke, doke.* See Duck. ] *n. a bird of a certain kind* बदक *n*, कलहंस *m.* २ *a sudden inclination of the head or dropping of the person, resembling the motion of a duck in water* बदकासारखा मानेचा कल *m.* Lame duck *n.* दुर्बलहीनशक्ति मनुष्य *m*-वस्तु *f. spec.* (Stock exchange) (*slang*) दिवाळखोर, (म्हटल्या बोलीला ज्याच्यानें पैसे देववत नाहीं असा) बातल मनुष्य *m.* Duck-legged *a.* आंखूड पायाचा. Bombay Duck एक प्रकारचा मासा *m*, बोंबील *m.* Duck'ling *n.* बदकाचें पिल्लूं *n.* To make ducks and drakes of one's money पैशाची चैनबाजींत धूळधाण करणें, उधळपट्टी करणें. To make ducks and drakes: see Drake. To get a duck: *not to score a single run in cricket* क्रिकेटच्या खेळांत एकही धांव न होणें. He got a ducking in the examination तो परीक्षेंत नापास झाला.

Duct (dukt) [ L. *ductus*, a leading (hence, a duct.)–L. *ductus*, *p. p.* of *ducere*, to lead.] *n. any tube by which a fluid is conveyed* (शरीरांतील किंवा इतर) नळ *m*, नलिका *f.*

Ductile (duk'-tīl) [ Fr. *ductile*, malleable.–L. *ductilis*, easily led–L. *duct-us*, *p. p.* of *ducere*, to lead.] *a. easily led, yielding to persuasion or instruction* वळवितां येण्याजोगा, विनेय, नरम; as, "A D. people." २ *capable of being elongated or drawn out as into wires* तन्य, तार काढतां येण्याजोगा, उद्वर्त्तनीय, तंतुभवनयोग्य. Ductilim'eter (duk'-tilim'-ē-tēr) [ Ductile + meter. ] *n.* तन्यतामापक. Ductil'ity *n.* तन्यता *f*, उद्वर्त्तनीयता *f*, उद्वर्त्तनक्षमता *f*, तंतुभवनयोग्यता *f*, तान्तवता *f.*

Dudgeon (duj'-un) [ Unknown origin. ] *n. the haft of a dagger* खंजीराची मूठ *f*-थरूं *n.*

Dudgeon (duj'-un) [ Unknown origin.] *n. resentment, anger, displeasure* खप्पामर्जी *f*, रुसवा *m.*

Duds (duds) [ Of Scandinavian origin.] *n. old or inferior clothes, tattered garments* जुने-फाटके-तुटके कपडे *m. pl.*, जीर्ण वस्त्रें *n. pl.*, *spec.* जुनेरें *n. pl.* २ (*slang*) *effects in general* मालमत्ता *f*, पुंजी *f.*

Due (dū) [ O. Fr. *deu*–Fr. *du*, *p. p.* of *devoir*, to owe.–L. *debere.* See Debt.] *a. payable, owing and demandable* यायाचा, द्यायाचा, पावायाचा, देय, हक्कहलाल, हक्कहलालाचा, लागू. २ *appropriate, fit* योग्य, यथायोग्य, यथान्याय, लायक, वाजवी. ३ *proper, lawful, regular, exact* नियमसर, बरोबर, नेमका, योग्य. ४ *appointed or required to arrive at a given time* संकेताप्रमाणें-ठरल्याप्रमाणें यावयाचा असलेला. ५ *owing, ascribable* (as to a cause) -मुळें झालेला. D. *n. that which is owed, debt, that which one contracts to do, or pay for or to another* घेणें *n*, घेव *f*, देणें *n*, येणें *n*, पावणें *n.* २ *a fee, a toll* जकात *f*, कर *m.* ३ *right, just title or claim* वाजवी हक्क *m.* Due'ful *a.* वाजवी, योग्य. Du'ly *adv.* वाजवी रीतीनें. Due'ness *n. what is due or becoming* योग्यता *f.* २ *debt* कर्ज *n.*

Duel (dū'-el) [It. *duello*, a duel.–L. *duellum*, a fight between two men (archaic form of L. *bellum*, war.) –L. *duo*, two.] *n. a combat between two persons fought with deadly weapons by agreement* द्वंद्वयुद्ध *n*, दोन मनुष्यांमधील युद्ध *n*, द्वंद्व *n.* २ *a sustained fight between two animals* टक्कर *n*, झुंज *n*, झुंज *f*,

*ness* (said of manners, style, &c.) स्वाभाविकपणा *m*, नैसर्गिकपणा *m*, स्वाभाविकत्व *n*, नैसर्गिकत्व *n*, सहजत्व *n*, सुकरत्व *n*, सौकर्य *n*, सुगमपणा *m*. [AT E. स्वस्थ, सुखी, वीतचिंत, सुखांत. ILL AT E. अस्वस्थ, चिंताक्रांत-ग्रस्त, दुःखी, कष्टी, सचिंत. TO STAND AT E. (*mili.*) रांगेंत आपआपल्या जागेवर सुखकारक स्थितींत उभें राहणें. WITH E. साहजिकरीत्या, सहज, सहजगत्या, अनायासें, कांहीं श्रम पडल्याशिवाय.] E. *v. t.* & *v. i.* (often with *of*) *to free from pain, to relieve from toil or care, to give rest or repose* दुःखमुक्त करणें, सुख देणें, विश्राम *m* -विसावा *m*- विश्रांति *f* -आराम *m* -स्वस्थता *f.* देणें, वीतचिंत करणें. २ *to render less painful, to mitigate, to alleviate* हलका-कमी करणें, शमविणें, शान्तविणें, सान्त्वन *n.* करणें *g. of o.*, उपशम करणें. ३ *to release from pressure or restraint, to move gently, to shift a little* (-च्यावरील) भार हलका-कमी करणें, (-चें) भारमोचन-(-ला) भारमुक्त करणें, हळूच सरकवणें, किंचित्-जरा हलवणें-सारणें, स्थलांतर करणें. [TO E. OFF OR AWAY (*naut.*) *To slacken a rope gradually* (दोरी) हळूहळू सैल करणें-सोडणें.] Ease'ful *a. quiet, comfortable, restful* सुखावह, स्थिर, शांत, स्वस्थ, निश्चिन्त. Ease'fully *adv.* Ease'fulness *n.* Ease'less *a.* अस्वस्थ, दुःखी, कष्टी. Eas'ily *adv. with ease, without effort* अनायासानें, सहज, सहज रीतीनें-गतीनें-रीत्या-गत्या, फार श्रम-कष्ट केल्यावांचून. २ *without pain, anxiety, or disturbances* सुखानें, सुखांत, काळजीवांचून. ३ *readily, willingly, without reluctance* खुषीनें, तत्परतेनें. ४ *smoothly, quietly, without tumult* हळू, शांतपणें, गडबड केल्याशिवाय, बिनगोंगाट. ५ *without shaking or jolting, commodiously* सुखावह रीतीनें, गचके खाल्ल्याशिवाय, शांत, सुरळीत, सरळ, नीट. Eas'iness *n. freedom from distress, rest* स्वास्थ्य *n*, सुख *n*, स्वस्थता *f*, स्वस्थपणा *m*, सौख्य *n*, कुशलता *f*, शांति *f.* २ *freedom from difficulty, ease* सौकर्य *n*, सुगमपणा *m*, सुखसाध्यता *f*, सुलभपणा *m*, सोपेपणा *m*; as, "The E. of a task." ३ *compliance, disposition to yield without opposition* कबुली *f*, विनतकारी स्वभाव *m*, आनुकूल्य *n.* ४ *freedom from effort, constraint, or formality* (said of style, manner &c.) स्वाभाविकपणा *m*, सहजत्व *n*, &c. See Ease *n.* ५ *freedom from jolting* गाडी इत्यादिकांचे धक्के-गचके न बसणें *n.* Ease'ment *n. that which gives ease, relief &c.*; *convenience, accommodation* सोय *f*, मदत *f*, सुखदायकत्व *n.* २ (*law*) *a liberty, privilege, or advantage, which one proprietor has in the estate of another propritor, distinct from the ownership of the soil, as a way, watercourse &c.* दुसऱ्याच्या जागेवर (मालकी हक्कावांचून) असणारा हक्क *m.* किंवा मोकळीक *f*; जसें, पायवाट, गाडीवाट, किंवा पाणवाट वगैरे. परभूमावधिकार *m.*

Easel (ē'zl) [Dut. *ezel*, ass, donkey, hence also a support, a painter's easel. Ger. *esel*–L. *asellus*, *dimin.* of L. *asinus*, ass.] *n. a frame* (commonly) *of wood serving to hold a canvas upright or nearly upright, for the painter's convenience or for exhibition* (चित्रकाराचे सोईकरितां किंवा प्रदर्शनाकरितां चित्रपट उभा करून ठेवण्यासाठीं केलेली) लांकडाची घोडी *f.*

East (ēst) [M. E. *est*, A. S. *east*, *adv.* in the east; *eastan*, from the east. Icel. *austr*, Swed. *ost*, L. *aurora* (for *ausosa*), Sk. *ushas*, dawn.] *n. the point in the heavens where the sun is seen to rise at the equinox, or the corresponding point on the earth* पूर्व *f*, पूर्व दिशा *f*, प्राची *f*, उगवत *f*, पूर्वांशा *f.* २ *the eastern parts of the earth, the regions or countries which lie east of Europe, the orient* युरोपाच्या पूर्वेकडील देश *m*, पौरस्त्य देश *m*, पूर्व *f.* [आशिया मायनर, सीरिआ, इराण, हिंदुस्थान चीन वगैरे देशांस हें नांव लावतात.] East *a.* पूर्वेकडील, पूर्वेचा, पूर्वदिशेचा, &c. East *adv.* पूर्वेकडे, पूर्वदिशेकडे, उगवत, पूर्वबाजूस. E. *v. t. to move toward the east* पूर्वेकडे-पूर्वदिशेस जाणें-सरणें. East'er *v. i.* (*naut.*) *to veer to the east* (said of wind) (बदलून) पूर्वेकडे वाहूं लागणें, पूर्ववाही होणें. East'erling *n. a native of a country eastward of another* (आपल्या) पूर्व बाजूकडील देशांतील मनुष्य *m*, पौरस्त्य *m*, पूर्वेकडचा मनुष्य *m.* २ *a piece of money coined in the east by Richard* II. *of England* इंग्लंडच्या दुसऱ्या रिचर्ड राजानें पूर्वेकडील प्रदेशांत पाडलेलें नाणें *n.* East'erling *a.* East'erly *a. coming from the east* पूर्वेकडून येणारा-वाहणारा. २ *situated, directed, or moving toward the east* प्राच्य, पूर्वेकडील, पूर्वाभिमुख, पूर्वगामी. East'erly *adv.* पूर्वेकडे. East'ern *a. situated in the east, oriental* अगदीं पूर्वेकडील, पौरस्त्य, प्राग्देशीय. २ *going toward the east* पूर्वगामी, पूर्वाभिमुख. East'ernmost *a.* पूर्वेकडील टोंकाचा. East Indian *a.* ईस्ट इंडिज् बेटांतील. East' Indian *n.* ईस्ट इंडिज् बेटांतील रहिवाशी *m.* East'ward,-wards *adv.* पूर्वेकडे.

Easter (ēs'-tėr) [M. E. *ester*; A. S. *easter*, *eastran*, paschal feast, Easter.—A. S. *Eastre*, a goddess of light or spring whose festivities were held at the vernal equinox or in April. See EAST.] *n. an annual church festival commemorating Christ's resurrection, & occurring on Sunday, the second day after Good Friday.* 'गुड फ्रायडे' नंतर पहिल्याच रविवारीं होणारा ख्रिस्तपुनरुत्थापनानिमित्त वार्षिकोत्सव *m*, ख्रिस्तपुनरुत्थापनोत्सव *m.* २ *the day on which the festival is observed, Easter day* ईस्टर सणाचा दिवस *m*, ईस्टर *m.* [*Easter* या शब्दाचा उपयोग विशेषणार्थीं किंवा सामासिक

शब्दांत पूर्वपदाचे स्थानीं करितात; जसें, *Easter day* OR *Easter-day, Easter week, Easter Sunday &c.*

Easy (ēz'i) *a. free from pain, distress, toil, trouble &c; at ease;* (a) *quiet* सुखी, सुखरूप, खुशाल, सुचित्त, स्वस्थ, निर्दुःख, सुस्थ. (b) *free from care, not anxious, tranquil* निश्चिंत, स्वस्थ, बिनघोर, बिनधास्त, निर्धास्त, शांत, निष्काळजी. (c) *free from formality, unconstrained, smooth* (manner or style) सरल, सरळ, ऋजु, सुगम, अक्लिष्ट, सोपी. २ *affording ease or rest* सुखदायक-कारक, सुखकर, सुखप्रद, सुखावह. ३ *not difficult, requiring little effort or labour* सोपा, सोपारा, सुलभ, सुकर, अल्पसाध्य, अनायाससाध्य, सुखसाध्य. ४ *furnishing comfort, commodious* आराम देणारा, सोयीचा, सुखाचा. ५ *tractable, yielding, complying, ready* अनुकूल, भिडस्त, दुसरा सांगेल तसें ऐकणारा. ६ (*com.*) *not straitened as to money matters* (oppo. to *tight*) सैल, ढिला, चणचण नसलेला, बेददाद. Eas'y-going *a.* दगदगीचा तिरस्कार असणारा, शांत. २ शांतताप्रिय. Eas'y chair *n.* आरामखुर्ची *f.*

Eat (ēt) [M. E. *eten.* A. S. *etan,* Dut. *eten,* Icel. *eta,* Swed. *ata,* Sk. अद्, to eat.] *v. t. to chew and swallow as food* (said especially of food not liquid) खाणें, भक्षणें, भक्षण *n-* अशन *n.* करणें. [SOME SIGNIFICANT JOCOSE & FREE EXPRESSIONS FOR THE SAME ARE: भक्ष्यस्थानीं घालणें, धडांत टाकणें-घालणें-उतरणें, प्राणपूजा *f* -पोटपूजा *f.* करणें. SOME ENGLISH EXPRESSIONS AS *to eat up, to clear the desks, to lick or clean the platters, to clear work, to dispose of* ARE RENDERED BY THE FOLLOWING: खाऊन टाकणें, खाऊन पार करणें, गट्टगोळा *m-* करून टाकणें, चाटून पुसून खाणें, निपटून शिपटून खाणें, झडती लावणें-देणें (R.), चट्टामट्टा *m* -तळझाडा *m-* (R.) तळपट *n-* (R.) निःपात *m-* निसंतान *n* सफेजंगी *f-* सप्पा *m* - निरानिपटा *m*-करणें, चाटून पुसून नाहींसा करणें, कचाचूर *m* (R.) करणें- करून टाकणें, चपेट OR चपाट *adv.* खाणें, रपाटणें, झपाटणें, चपाटणें, ताव *m* देणें WITH वर *of o.,* पूज्य करणें (R.), सप्पा *m.* उडविणें-वळवणें *g. of o.,* रगडणें, रपाटणें, गट्ट करणें, खाऊन फस्त करणें.] २ *to corrode as metal by rust, to consume the flesh as a cancer, to weary or waste away* (-ला) तांब *f.* लागणें, गंज *m.* चढणें, झिजविणें, खाऊन टाकणें, हळूहळू नाहींसा करणें. [To E. HUMBLE PIE मुकाट्यानें अपमान सोसणें-सहन करणें, मूग गिळून रहाणें. पूर्वी शिकारीच्या मेजवानीचे वेळीं चांगले पदार्थ थोरामोठ्यांच्या वांट्यास जाऊन नोकर चाकरांस हरणाच्या (HUMBLE) आंतड्याची (PIE) कढीच मिळत असे, व असा अपमान त्यांना मुकाट्यानें सोसावा लागत असे. ह्यावरून TO EAT HUMBLE PIE म्हणजे मुकाट्यानें अपमान सोसणें असा अर्थ झाला आहे. To E. ONE'S TURNS बॅरिस्टरच्या परिक्षेचा अभ्यास करणें. इंग्लंडांत बॅरिस्टरचा अभ्यास करितांना कोर्टाच्या इनमध्यें विद्यार्थ्यांना अमुक एक वेळां जेवावें लागत असतें. To E. WELL (*trans.*) चांगली भूक असणें. To E. ONE'S WORDS आपलें बोलणें *n-* बोल *m-* शब्द *m* मागें-परत-माघारीं घेणें. To E. OUT खलास करणें, (-चा) फडशा पाडणें-करणें. To E. THE WIND OUT OF A VESSEL हळूहळू वाऱ्याच्या उलट दिशेनें मार्ग क्रमण करणें. To E. ONE OUT OF HOUSE & HOME घरदार खाऊन वांसे तोंडीं लावणें, खाऊन खाऊन घरादाराचा सत्यानाश करणें.] Eat *v. i. to take food* (especially solid) जेवणें, भोजन *n* -जेवण *n.* करणें. २ *to taste or relish* लागणें, (-ची) चव *f* असणें; as, "It eats like a mango." ३ *to make one's way slowly* हळूहळू आंत शिरकत जाणें, चरणें. [To E., To E. IN OR INTO गंजणें, कुरतुडणें.] Eat'able *a.* खाद्य, खाद्या- भक्षायाचा- जोगा-जोगता &c., भक्ष्य, भोज्य, भक्षणार्ह. E. *n.* भक्ष्य *n,* खाद्य *n,* खाणें *n.* Eat'age *n. eatable growth of grass for horses & cattle* (esp. that of aftermath.) एकदां गवत कापून नेल्यानंतर पुन्हां गवतास येणारी फूट *f,* दुसरा फुटवा *m.*

Eaves (ēvz) [M. E. *euese, pl. eueses* (eaveses.) A. S. *efes,* a (clipped) edge of thatch, whence *efesian,* to shear. The *s* of *eaves* is in English regarded as a plural ending, though not so in Saxon.] *n. pl. arch. the edges or lower borders of the roof of a building, which overhang the walls, & cast off the water that falls on the roof* पागोळ्या *f. pl.* पावळ्या *f pl.,* हीड *f* (R.), वळचणी *f,* पावसा *m.* २ (*obs.*) *brow, ridge* कडा *f,* कांठ *m,* कडपा *m.* ३ *eyelids, eyelashes* पापण्या *f. pl.,* पापण्यांचे केंस *m. pl.* [E. BOARD (*arch.*) पाणपट्टी *f.* ALSO CALLED E. CATCH OR LATH. E. CHANNEL, E. GUTTER छपरावरील पावसाच्या पाण्याचा पन्हळ *m.* EAVES MOLDING (*arch.*) पाणपट्टीची गोलची *f-* गोळा *m.*] Eaves-drop *v. i. to listen & learn from under the eaves what is said within doors* वळचणींतून-आडून &c. कानवसा *m* - कानोसा *m*- कानवा *m* - कानव्हळा *m.* घेणें, आडून ऐकणें. Eaves-drop, Eave-drop *n.* पागोळ्या *f. pl-* पावळ्या पडणें *n,* वळचणीची धार *f.* Eaves-dropper *n.* आडून-चोरून ऐकणारा- कानवसा घेणारा *m.* Eaves-dropping *n. law.* चोरून ऐकण्याची संवय *f,* गुप्त भाषण आडून ऐकून बाहेर फोडण्याची संवय *f.*

Ebb (eb) [M. E. *ebbe.* A. S. *ebba,* ebb of the tide, akin to Dut. *eb, ebbe.*] *n. the return of the tidal wave toward the sea* (oppo. to *flood*) ओहटी *f,* ओहट *m,* ओहटें *n,* सुकती *f.* २ (*fig.*) *a falling back from a better to a worse state, decline, decay* उतार *m,* उतरती *f,* उतरती कळा *f,* उतरता पाय *m*- पाया *m,* क्षय *m,* नाश *m.* [EBB & FLOW भरतीओहटी *f,* चालता काळ व पडता काळ *m.* (OFTEN USED FIGURATIVELY.)] E. *v. i. to flow back; to return, as the water of a tide toward the sea* (oppo. to *flow*) ओहटणें, ओहट *m* सुकती *f-* ओहटी *f-* लागणें- परतणें, वळणें. २ *to fall back from a better to a*

*worse state, to decline, to decay* हटणें, उतरती कळा लागणें, नाश पावणें. Ebb *a. receding, shallow, low* उथळ. Ebbed *pa. t. & pa. p.* Eb'bing *pr. p. & v. n.* Ebb-tide *n. the retiring tide* (oppo. to *flood-tide*) ओहट *m*, सुकती *f.*

Eblis (eb'-lis) [Ar. *iblis.*] (*Mahomedan myth.*) *the prince of evil spirits, Satan* इबलीस *m*, भुताखेतांचा राजा *m*, सैतान *m. n.*

Ebony (eb'un-i) [M. Fr. *ebene*,-L. *hebenus, ebenus*,-Gr. *ebenos*,- ebony wood.] *n. a hard, heavy & durable wood, which admits of a fine polish or gloss* अबनूस *m*, टेंबुरणी *f* -तेंदू-तिंदुक यांचा आंतील काळा नार *m.* Ebon, Eb'ony *a.* टेंबुरणीचा केलेला. २(रंगानें) टेंबुरणीसारखा. Eb'onist *n. one who works in ebony* टेंबुरणीच्या लांकडाचें काम करणारा. Ebo'nize *v. t. to make black, or stain black, in imitation of ebony* (टेंबुरणीच्या लांकडाप्रमाणें) काळें करणें-पाडणें, (रंग देऊन) काळें करणें. Eb'onized *pa. t. & pa. p.* Eb'onizing *pr. p. & v. n.*

Ebracteate (ē-brak'-ti-āt) [L. *e*, from & *bractea*, a thin layer of wood.] *a.* (*bot.*) *without bracts or floral leaves* उपपर्णविहीन, देठाशीं पान नसलेलें (फूल) (उ० मोहरी, मुळा, वगैरे). Ebra'cteolate *a.* (*bot.*) *without bracteoles, or little bracts* उपपर्णकविहीन. See Bract and Bracteole.

Ebriety (e-brē'-i-ti) [Fr. *ebriete*,-L. acc. *ebrietatem*, -L. *ebrius*, drunken.] *n. drunkenness, intoxication by spirituous liquors, inebriety* निशा *f*, झिंगी *f*, दारूचा कैफ *m* -अंमल *m* -तार *f.* Ebrios'ity *n. addiction to drink, habitual drunkenness* दारूबाजी *f*, दारू पिण्याचें व्यसन *n*, निशाखोरी *f*, निशाबाजी *f.* Ebrious *a.* (R.) *inclined to drink to excess* अट्टल-पक्का दारूबाज, निशाबाज, झिंगा, झिंगट, झिंगीखोर, निशाखोर, अमली. २ छाकटा, तर्र.

Ebrillade (e-bril'-lād) [Fr.] *n. a bridle check, a jerk of one rein given to a horse when he refuses to turn* लगामाचा हिसका *m*, घोडा वळत नसल्यास त्याला एका बाजूच्या अनीनीनें द्यावयाचा हिसका *m.*

Ebulliate (e-bŭl'li-āt) [L. *ebullire*, to bubble up.] *v. i.* (*obs.*) *to boil or bubble up* (आधणाचे) बुडबुडे येणें, उकळी *f*- कढ *m*- आधण *n.* येणें. Ebul'lience, Ebul'liency *n. a boiling over, effervescence* ऊत *m*, उकळी *f.* २ (*fig.*) उमाळा *m*, उमासा *m.* Ebull'ient *a.* कढणारा. २ *manifesting excitement of feeling* तापणारा, अंतःक्षुब्ध, उसळी मारणारा, रागावणारा. Ebul'lioscope *n.* (*phys. & chem.*) *an instrument for observing the boiling point of liquids* (मद्यमिश्रित द्रव पदार्थांचा) उत्कलनबिंदु पाहण्याचें यंत्र *n*, उत्कलनबिंदुदर्शक *m*, क्वथनदर्शक *m*, मद्य किती उष्णमानानें कढतें तें पाहून त्यामध्यें मद्यविष किती आहे, त्याचा निर्णय करण्याचें यंत्र *n.*

Ebullition (ebul-lish'-un) [O. Fr. *ebullition*.—L. acc. *ebullitionem*, a rare word, from *ebullitus*, *p. p.* of *ebullire*-L. *e*, out & *bullire*, to bubble.] *n. a boiling or bubbling up of a liquid* कढण्याची क्रिया *f*, क्वथन *n*, उत्सेचन *n.* २ कढ *m*, आधण *n*, उकळी *f.* ३ *effervescence occasioned by fermentation* फेंस *m*, ऊत *m*, जोस *m*, फणफण *m.* ३ *a sudden burst or violent display, an outburst* (राग इत्यादि) मनोविकारांची उकळी *f*- उद्रेक *m*, उमाळा *m*, उमाळा *m*, उमासा *m*, उमाळी *f*, उभड *f.*

Eburin (eb'-ū-rin) [L. *ebur*, ivory.] *n. a composition of dust of ivory or bone with a cement* हस्तिदंत किंवा हाडें यांची भुकी लुकणांत घालून मिळवून केलेलें मिश्रण *n*, हस्तिदंतमिश्रित लुकण *n.* Eburnā'tion *n.* (*med.*) *a condition of bone or cartilage occurring in certain diseases in which they come to resemble ivory* (शरीरांतील हाड) कांहीं रोगांत हस्तिदंतासारखें कठीण होणें. Ebur'nēan, Eburnien *a. made of or relating to ivory* हस्तिदंती, हस्तिदंतविषयक. Eburnificā'tion *n.* Eburnine हस्तिदंती *a.*

Ecaudate (ē-kaw'-dāt) [Pref. E + *caudate*.] *a.* (*bot. & Zool.*) *tailless* बिनशेंपटीचा, पुच्छरहित, विपुच्छ.

Ecbolic (ek-bŏl'-ic) [Gr. *ekballein*, to throw out] *n.* (*med.*) *a drug, as ergot, which by exciting uterine contractions promotes the expulsion of the contents of the uterus* (गर्भाशयाचें आकुंचन करून) गर्भपात करणारें औषध *n.*

Eccaleobion (ek-kă-lē-ō'bi-on) [Gr. *ekkalein*, to call out (*ek*, out of & *kalein*, to call) + *bios*, life.] *n. a contrivance for hatching eggs by artificial heat* कृत्रिम उष्णतेनें अंडीं उबविण्याकरितां केलेलें यंत्र *n.*

Eccentric (ek-sen'-trik) [Fr. *excentrique*-L. L. *eccentricus*–*eccentros*, out of the center-Gr. *ek*, out of & *kentron*, Sk. केन्द्र, centre.] *a. deviating from the centre or from true circular motion* उत्केन्द्र, केन्द्रच्युत. २ (*geom.*) *not having the same centre* (oppo. to *concentric*) असम-विषम-केन्द्र. ३ (*mach.*) *pertaining to an eccentric* मध्यबाह्य दागिन्यासंबंधीं. ४ *not coincident as to motive or end* (-च्या) विरुद्ध, उलट, प्रतिकूल, न मिळणारा, विसंगत. ५ *departing from the usual course, irregular, anomalous, odd* विलक्षण, विचित्र, तऱ्हेवाईक, लोकाचाराविरुद्ध, गैरशिस्त, बेशिस्त, अन्यथाचारी-वर्त्ती. E. *n. geom. a circle not having the same centre as another contained in some measure within the first* असमकेन्द्र-विषमकेन्द्रवर्तुल *n.* २ *an anomalous or irregular person or thing* विचित्र माणूस *m*-व्यक्ति *f*, विलक्षण वस्तु *f.* ३ (*astron.*) *the supposed circular orbit of a planet about the earth, but with the earth not in its centre* ग्रहाची उत्केन्द्रकक्षा *f.* ४ *a circle described about the*

*centre of an elliptical orbit, with half the major axis for radius* विक्षेपवर्तुल *n*, उपकारक-उपकुर्वाण-वर्तुल *n*. ५ *mach.* उत्केन्द्र ठेविलेला दागिना *m*-वस्तु *f.* Eccen'trical *a.* See Eccentric. Eccen'trically *adv.* Eccentric'ity *n. oddity* विलक्षणपणा *m*, वैलक्षण्य *n*, लोकबाह्यता *f*, लोकमर्यादातिक्रम *m*, विक्षिप्तपणा *m*. २ *math.* केन्द्रच्युति *f*, उत्केन्द्रता *f*. ३ असमकेन्द्रता *f*, विषमकेन्द्रता *f*.

*N. B.* यंत्रशास्त्राच्या पुस्तकांत ECCENTRIC हा शब्द .वरेच वेळां येतो. त्याजबद्दल आजपर्यंत मध्यबाह्य हा शब्द मराठींत वापरीत असत. परंतु आमच्या मतें उत्केन्द्र किंवा अपकेन्द्र किंवा अपमध्य हे शब्द ज्यास्त योग्य आहेत.

Ecchymose ( ek'ki-mōz ) [ Gr. *ek*, out & *chumos*, juice, — *chein*, to pour. ] *v. t. med.* ( chiefly used in the *passive* form ) *to discolour by the production of an effusion of blood beneath the skin* ( रक्त सांखळल्यामुळें कांतडी ) बाहेरून तांबडी, निळी, व काळी होणें. Ecchymo'sis [ *ec* + *chumo* + *osis* suffix showing condition. ] *n.* (*med.*) (रक्त सांखळल्यामुळें कांतडीवर आलेला) तांबडा, निळा रंग *m*. Ecchymo'ses *pl.* Ecchymot'ic *a.*

Ecclesiastic, Ecclesiastical ( ek-klē-zias'-tik,–al ) [ L. *ecclesiasticus*,-Gr. *ekklesia*, an assembly, the Church, -*ekkalein*, to call forth or convoke.] *a. pertaining or relating to the Church, not civil or secular* धर्मखात्यासंबंधीं ( मुलकी किंवा लष्करी खात्याहून भिन्न ), धर्मप्रकरणाचा, धर्मप्रकरणविषयक, एक्लेसिएसंबंधीं. Ecclesias'tic *n. one who holds any clerical or spiritual office in the Christian Church* (opposed to lay officials) धर्मकर्मनियुक्त-धर्मपदनियुक्त मनुष्य *m*, धर्मसंस्थेंतील-धर्मखात्यांतील वरच्या दर्ज्याचा नोकर *m*. Ecclesiastical courts (called also *Christian Courts*) एक्लेसिएचीं कोर्टें *n. pl.*, प्रतिष्ठित धर्मांवर देखरेख ठेवणारीं कोर्टें *n. pl.*, ख्रिस्ती आचार्यांच्या खटल्यांची चौकशी करणारीं कोडतें-कोर्टें *n. pl.* E. law एक्लेसिएचा कायदा *m*, ख्रिस्ती धार्मिक कोर्टांत चालू असणारा मुलकी व संस्कारविषयक कायदा *m*, धार्मिक कोर्टांचा कायदा *m*, ख्रिस्ती आचार्यांना लागू पडणारा क्यानन-कायदा *m* -कानु *m*, संस्कारप्रकरणासंबंधीं व मुलकी कायदा *m*. E. States पूर्वीं राज्यकारभारासाठीं रोम येथील पोपच्या ताब्यांत असलेला मुलूख *m*. Ecclesias'tically *adv.* Ecclesias'ticism *n. strong attachment to ecclesiastical forms, usages, &c.* एक्लेसिएनें ठरविलेल्या विधींवर विशेष भक्ति *f*- दृढ श्रद्धा *f*. Eccle'siast *n. an ecclesiastic* धर्माधिकारी *m*, धर्मपदस्थ *m*. Ecclesias'tes *n. one of the canonical books of the Old Testament* 'उपदेशक.' Ecclesias'ticus *n. a book of the Apocrypha* रोमन क्याथोलिक लोकांनीं धर्मपुस्तकांत घातलेल्या प्रक्षिप्त भागांचें स्वतंत्र-पुस्तक *n*. Eccle'sia *n.* Ecclesiæ *pl.* ( *Gr. Antiq.* ) *the public legislative assembly of the Athenians* आथिनियन लोकांची कायदे करणारी मंडळी *f*- संस्था *f*. २ ( *Eccl.* ) *a church, either as a body or as a building* ख्रिस्ती धर्माधिकारीमंडळ *n*, एक्लेसिआ *f*. २ ख्रिस्ती देऊळ *n*. Ecclesiolo'gy *n. the science or theory of church building and decoration* धर्मालयें बांधणें व सुशोभित करणें ह्या विषयींचे नियम *m. pl.* -शास्त्र *n*. Ecclesiol'ogist *n.* धर्मालयें बांधण्याच्या शास्त्रांत पारंगत-निष्णात-निपुण मनुष्य *m*- वाकबगार. Ecclesiolog'ical *a.*

Eccritic ( ek-krit'-ik ) [ Gr. *ekkritein*, to choose out. ] *n. med. a remedy which promotes discharges* ( as an emetic or a cathartic ) (जुलाब वगैरे) उत्सर्गप्रवर्तक ( उपाय ) *m*, ( उदर म्हणजे कोठा वगैरे ) साफ-स्वच्छ करणारें औषध *n*, शोधन *n*.

Ecderon ( ek'-dėr-on ) [ Gr. *ek*, out & *deros*, skin. ] *n. anat. the outer layer of the skin, integument* अवभासिनी त्वचा *f*. Ecderon'ic *a.*

Ecdysis ( ek'-di-sis ) [ Gr. *ek*, out of & *duein*, to enter. ] *n. biol. the act of shedding or casting off an outer coat or integument as in the case of serpents &c.* कांत टाकणें *n*, ( सापाची ) मेंग टाकणें *n*.

Echinate, Echinated ( ek'-i-nāt,-ed ) [ L. *echinus*, –Gr. *echinos*, a hedgehog, a sea-urchin.] *a. prickly like a hedgehog, having sharp points* (शाळिंदरासारखे) कांटेरी केंस असलेला, कांटेरी.

Echinoderm ( e-ki'-nō-dėrm ) [ Gr. *ekinos*, hedge -hog & *derma*, skin. ] *n.* कंटकित तनुवर्गांतील प्राणी *m*, पाठीवर कांट्यासारखे केंस असलेला प्राणी *m*, कांटेदार कांतडीचा प्राणी *m*, कंटकत्वक् प्राणी *m*.

Echinodermata ( e-ki-nō-dėr'-matā ) *n. pl.* ज्याच्या कांतडीवर कांट्यासारखे केंस असतात असे प्राणी *m*. कंटकत्वक् ( कंटकयुक्तत्वक् ) *m*. Echinoder'matous *a.* कंटकत्वक्प्राण्यासंबंधीं.

Echo ( ek'-ō ) [ L. *echo*,–Gr. *echo*, an echo, a sound. ] *n. pl.* Echoes. *repercussion of sound, a sound reflected from an opposing surface & repeated to the ear of a listener* प्रतिध्वनि *m*, प्रतिनाद *m*, प्रतिशब्द *m*, पडशब्द *m*, पडसाद *m* & *f*, अनुध्वनि *m*. २ (*fig.*) *sympathetic recognition, response* अनुकूलतेचा-अनुकूलतापूर्वक प्रतिध्वनि-शब्द *m*. ३ (*fig.*) *a mere repeater of the opinions of another* तुणतुण्या, बोललेलें बोलणारा, श्रुतभाषी. ४ (*Myth.*) *a wood or mountain nymph regarded as repeating sounds* प्रतिध्वनि-देवता *f*, प्रतिध्वनि करणारी वनदेवता *f*. E. *v. t. to send back* ( a sound ), *to reverberate* प्रतिध्वनि *m*–प्रतिनाद *m*-प्रतिशब्द *m*. करणें. २ *to repeat with assent, to respond, to adopt* (-ला) होस हो म्हणणें, (स्वीकारदर्शक) प्रतिध्वनि करणें (*fig.*), (प्रतिध्वनीनें) रुकार देणें. E. *v. i. to resound* प्रतिध्वनि *m*- प्रतिनाद *m*-प्रतिशब्द *m*. होणें, घुमणें, दणदणणें, दणाणणें, दुमदुमणें. Ech'oed *pa. t.* & *pa. p.* प्रतिध्वनित, प्रतिनादित. Ech'oing *pr. p.* & *v. n.* Ech'oer *n.* प्रतिध्वनि

करणारा. Ech'oless *a.* प्रतिध्वनि-उत्तर मिळाल्याशिवाय. Echom'eter *n. mus. a graduated scale for measuring the duration of sounds &c.* ध्वनिमापक *n*, ध्वनिमापक-ध्वनिकालमापक-ध्वनिस्थैर्यमापक-ध्वनि-तारतम्यमापक-अंशदर्शक पट्टी *f.* किंवा यंत्र *n.* Echo-m'etry *n.* ध्वनिकालमापन *n* (कला). Ech'oscope *n.* प्रतिध्वनिदर्शक यंत्र *n.* Echo organ (*mus.*) 'आरगन' वाद्यांत स्वर उत्पन्न करण्याकरितां केलेली किल्ली *f.* अथवा खुंटी *f*, कळ *f*, ध्वनिकीलक *m.* Echo-stop (*mus.*) प्रतिध्वनिव्यवस्थापक पडदा *m-* खुंटी *f-* कळ *f.* To applaud to the echo (शाबासकी देण्याकरितां-स्तुति करण्याकरितां) प्रतिध्वनि निघेइतका जयघोष करणें.

Eclaircise (ē-klær'-sīz) [Fr. *eclaircir*, Pref. *es* (L. *ex*), out & *clair*–L. *clarus*, clear.] *v. t. to clear up what is obscure or not understood, to explain* (जें अस्पष्ट किंवा गहन असेल तें) स्पष्ट करणें, विशद करणें. Eclair'cised *pa. t. & pa. p.* Eclair'cising *pr. p. & v. n.* Eclair'cissement *n.*

Eclampsia, Eclampsy (ek-lamp'-siä,-i) [Gr. *ek*, forth & *lampein*, to shine.] *n. med. convulsions occurring in pregnant women before, or at the time of, delivery* गरोदरपणांत किंवा प्रसूतीचे वेळीं येणारे आंचके *m. pl.* (मुलांना येणारी आंकडी नव्हे.) २ *med. a fancied perception of flashes of light, a symptom of epilepsy* डोळ्यांपुढें उजेडाची चमक मारते असें भासणें *n*, काजवे दिसणें *n.* (हें आंचक्यांचें लक्षण आहे.)

Eclat (e-klä') [Fr. *eclat*, a spliter, noise, brightness–Fr. *eclater*, to split, to shiver, to glitter.] *n. brilliancy of success or effort, striking effect, glory, renown* जयोत्कर्ष *m*, थाटमाट *m.* २ *a demonstration of admiration and approbation, applause* स्तुतिघोष *m*, प्रशंसाघोष *m*, जयशब्द *m*, जयघोष *m*, वाहवा *f*, जयजयकार *m.*

Eclectic (ek-lek'-tik) [Gr. *eklektikos*; *ek*, out & *legein*, to choose.] *a. selecting, choosing* (what is true or excellent in opinions, doctrines, &c.) *from various sources or systems* निवडून-वेंचून काढणारा, (निरनिराळ्या पंथांतून) उत्तम-सत्य-वेंचक तत्वें-मतें काढून घेणारा, उत्तमांशग्राहक; as, "An E. philosopher." २ *consisting or made up of what is chosen or selected* सारसंग्रहाचा, सारसंग्रहात्मक, निवडून-वेंचून काढलेल्याचा समावेश ज्यांत केलेला आहे असें; as, "An E. method; An E. system of philosophy; An E. magazine." [E. PHYSICIAN सर्व प्रकारच्या वैद्यक पद्धतींतील उत्तमांश तेवढा घेऊन आपली पद्धति बनविणारा वैद्य *m*, उत्तमांशसंग्राहक-सारसंचयी वैद्य *m.*] E. *n. one who follows an eclectic method in philosophy, science, religion, & the like* साराग्राही, सारसंग्राहक. Eclec'tically *adv.* Eclec'ticism *n.* Eclectic Philosophy निरनिराळ्या तत्वज्ञानाच्या पद्धतींतून जेवढा ग्राह्यांश असेल तेवढा घेऊन बनविलेली नवीन तत्वज्ञान-पद्धति *f*, सारात्मक तत्वज्ञानपद्धति *f.*

Eclipse (ē-klips') [L. *eclepsis*,–Gr. *ekleipsis*, a failure, esp. of light of the sun–Gr. *ekleipein*, to fail–Gr. *ek*, out & *leipein*, to leave.] *n. astron.* ग्रहण *n*, ग्रह *m* (S.), उपराग *m.* २ (*fig.*) *a darkening or obscuring of splendour, brightness, glory, honour, &c.; gloom, obscuration* वैभव *n-* तेज *n* इ० झांकून टाकणें *n*, आच्छादणें *n*, ग्रास *m*, लोप *m*, निस्तेजता *f*, मजीतपणा *m*, मालिन्य *n*; as, "A perpetual E. of spiritual life." [ANNULAR E. कंकणाकृति ग्रहण *n.* CYCLE OF Es. (SEE CYCLE) ग्रहणचक्र *n.* LUNAR E. चंद्रग्रहण *n.* SOLAR E. सूर्यग्रहण *n.* PARTIAL E. खंडग्रहण *n*, अपूर्णग्रासग्रहण *n.* TOTAL E. खग्रास ग्रहण *n*, पूर्णग्रासग्रहण *m.* DAY OF AN E. ग्रहणाचा दिवस *m.* DURATION OF AN E. ग्रहण पूर्णग्रास झाल्यानंतर (ग्रहण) मोक्षास प्रारंभ होईपर्यंतचा काल *m*, खग्रासग्रहणकाल *m*, पूर्णग्रासकाल *m.* IMMERSION सम्मीलन *n*, INGRESS AT AN E. स्पर्श *m.* ABLUTION AT THE BEGINNING OF AN E. स्पर्शस्नान *n.* PERIOD OF AN E. ग्रहणस्पर्शापासून मोक्षापर्यंतचा काल *m*, ग्रहणपर्वकाल *m.* RISING DURING AN E. ग्रस्तोदय *m.* SETTING DURING AN E. ग्रस्तास्त *m.* UNCOVERING OF AN E. उन्मीलन *n.*] E. *v. t. to cause the obscuration of* (said of a heavenly body) झांकून-आच्छादून टाकणें, लोपविणें; as, "The Moon eclipses the Sun." २ (*fig.*) *to obscure or darken the beauty, glory, honour, &c. of* फिका-माजी-मागें पाडणें, निस्तेज-मजीत &c. करणें, उणें आणणें *with* ला *or* स, (तेज) लोपविणें; as, "My joy of liberty is eclipsed." E. *v. i. to suffer an eclipse* ग्रस्त होणें, ग्रहण लागणें *with* ला *of s.* Eclipsed' *pa. t. & pa. p.* झांकलेला, आच्छादित, लुप्त, ग्रासलेला, केतुग्रस्त, राहुग्रस्त. २ फिका पडलेला, मागें पडलेला. Eclip'sing *pr. p. & v. n.*

Ecliptic (ē-klip'-tik) [L. *linea ecliptica*, the ecliptic line, or line in which eclipses take place.] *n. astron. the great circle of the celestial sphere, making an angle with the equinoctial of about 23°28'* (It is the apparent path of the sun, or the real path of the earth as seen from the sun.) क्रांतिवृत्त *n*, रविकक्षा *f.* २ *geog. a great circle drawn on a terrestrial globe making an angle of 23°28' with the equator* (used for illustrating and solving astronomical problems) क्रांतिवृत्त *n*, अयनवृत्त *n*, भवलय *n*, भवृत्त *n.* [DECLINATION OF A POINT OF THE E. क्रांतिभाग *m.* INCLINATION (OF A PLANET'S ORBIT) TO THE E. कोणत्याही ग्रहांचें कक्षावृत्त व क्रान्तिवृत्त ह्यांमधील कोन *m*, कक्षावृत्त व क्रान्तिवृत्त यांमधील अंतर *n*, परमापम *m.* MOTION OF THE NODES OF THE E. क्रांतिपातगति *f.* NODES OF THE E. क्रांतिपात *m.* OBLIQUITY OF THE E. *the inclination of the ecliptic to the equator.*

परमक्रांति *f*, परक्रांति *f*, परमापम *m*, परापम *m*. ] E. *a. pertaining to an ecliptic* क्रांतिवृत्ताचा. २ *pertaining to an eclipse or eclipses* ग्रहणासंबंधी.

Eclogue ( ek-'log ) [ L. *ecloga* ( Fr. *églogue* ) Gr. *eklogē* from *eklegein*, to select.] *n. a poetical composition in which shepherds are introduced conversing with each other, a bucolic, a pastoral poem* मेषपालविषयक काव्य *n*.

Economy ( e-kon'-ō-mi ) [ L.–Fr.–Gr. *oikonomia*- *oikos*, house & *nomos*, law, rule. ] *n. the management of the household especially as to expense* (खर्चासंबंधानें) गृहव्यवस्था *f*; वेत *m*, बेतबात *m*, बंदोबस्त *m*, संजोग (R.) *m*, गृहकार्यनिर्वाह *m*. २ *the management of the pecuniary concerns of an household, frugality, thrift* ( दूरदृष्टीनें-पुढचा विचार करून केलेली ) काटकसर *f*, मितव्यय *m*, नियमित खर्च *m*. ३ *orderly arrangement and management of the internal affairs of a state or of any establishment, kept up by production and consumption, esp. such management as directly concerns wealth* कारभार *m*; as, "Political E." अर्थशास्त्र *n*. ४ *the operation of nature in the generation, nutrition, and preservation of animals and plants* (काटकसरीची) सृष्टिव्यवस्था *f*; as, "The animal or vegetable E." ५ *the regulation and disposition of the internal affairs of a state or nation, or of any department of government* अंतर्व्यवस्था *f*, आंतली व्यवस्था *f*. Econom'ic, Econom'ical *a. domestic* घरगुती, गृहस्थितिसंबंधी, प्रापंचिक; as, "Economical misfortune." २ *relating to domestic economy or to the management of household affairs* प्रापंचिक, गृहव्यवस्थेसंबंधी; as, "Economic art." ३ *managing with frugality, frugal* ( said of character or habits) काटकसऱ्या, कतरबेती, कतरबेत्या, अल्पव्ययी, मितव्ययी, काटकसरीनें-टापटिपीनें खर्च करणारा, टापटिपीचा, वेतास वेत करणारा. ४ *managed with frugality, frugal* (said of acts, saving) काटकसरीचा, कतरबेताचा, घरजोगावणीचा, घरगुजुतीचा, अल्पव्ययाचा, मितव्ययाचा, बेताचा, बेतशीर; as, "An economical use of money." ५ *relating to the resources & wealth of a country, relating to political economy* सांपत्तिक, अर्थशास्त्रासंबंधी. ६ *regulative, relating to the adaptation of means to end* नियामक, आटपशीर, मित, व्यवस्थित. Econom'ically *adv.* काटकसरीनें. Econom'ics *n. the science of household affairs, or of domestic management* (गृह) प्रपंचशास्त्र *n*, गृहव्यवस्थेचे नियम *m. pl.* २ *Political Economy* अर्थशास्त्र *n*; as, "In politics and economics." Econ'omist *n. one who manages domestic or other concerns with frugality* काटकसरीनें खर्च करणारा, टापटीप ठेवणारा; as, "*Economists* even to parsimony." २ *a student of economics* अर्थशास्त्राचा अभ्यास करणारा विद्यार्थी *m*, अर्थशास्त्री *m*. Econ'omizā'tion *n*. (R.) Econ'omise,-ze *v. t. to use with prudence, to expend with frugality* वेतावातानें-टापटिपीनें-काटकसरीनें खर्च करणें, काटकसर करणें. E. *v. i. to be prudently sparing in expenditure* बेतावातानें टापटिपीनें-काटकसरीनें &c. -खर्च करणें, मितव्ययी असणें, कमी खर्च करणें. Economi'ser *n. one who, or that which, economises* काटकसर करणारा. २ ( *Steam Boilers*) *an arrangement of pipes for heating feed water by waste heat in the gases passing to the chimney* बायलरांत घालण्याचें पाणी तापवून घेण्याकरितां उभ्या करून ठेवलेल्या पुष्कळ नळ्यांची रचना *f*, 'खानामेजर' (economiser शब्दाचा अपभ्रंश).

*N. B.* Economy सद्व्यय *m* (दूरदृष्टीनें–पुढचा विचार करून केलेला). Frugality मितव्यय *m*. Parsimony चिकटपणा *m*.

*N. B. Economical* is the usual form when meaning *frugal, saving*; *economic* is the form commonly used when meaning *pertaining to the management of a household, or of public affairs.*

Ecorche ( ā-kor'-shā ) [ Fr. ] *n.* ( *painting and sculp.* ) *an image representing an animal, especially man, with the skin removed so that the muscles are exposed for purposes of study* (अभ्यासासाठीं स्नायु दिसावे म्हणून प्राण्याच्या-विशेषतः मनुष्याच्या शरीराची काढलेली किंवा घडलेली) त्वचारहित मूर्ति *f*, त्वग्रहित मूर्ति *f*.

Ecostate ( ē-kos'-tāt ) [ L. *e* ( *ex* ), without and *costa*, a rib. ] *a. bot. having no ribs or nerves* ( as applied to leaves ) शिरा नसलेलें, बिनशिरांचें.

Ecraseur (ā-krä-zėr') [Fr. *ecraser*, to crush to pieces.] *n. a surgical instrument for operation, the parts operated on being severed by the crushing effect produced by the gradual tightening of a steel chain* शरीरांतील कोणतेहि ठिकाणीं रोगामुळें भाग वाढलेला असल्यास तो कापून काढण्याचें यंत्र *n*. यांत एक तारे सारख्या पदार्थाचा फांस असतो. त्या फासांत वाढलेला भाग अडकवून फांस आंवळीत गेलें म्हणजे तारेच्या योगानें तो भाग कापला जातो. तारेचा उपयोग केला तर त्या यंत्राला wire ecraseur म्हणतात. कधीं कधीं तारे-ऐवजीं सांखळीचा उपयोग करितात. तेव्हां त्याला chain ecraseur म्हणतात.

Ecstasy ( ek'-sta-si ) [ O. Fr. *extasie*–L. *ecstasis*, a trance–Gr. *ekstasis*, a standing out, *ek*, out and *stasis*, standing. ] *n. the state of being beside one's self or rapt out of one's self, an extraordinary elevation of the spirit as when the soul unconscious of sensible objects is supposed to contemplate heavenly mysteries* देहभानावर नसणें *n*, भानावर नसणें *n*, तन्मयावस्था (?) *f*, उन्मनी (अवस्था) *f*, देहभानाभाव *m*, ब्रह्मानंदमग्नता *f*, ब्रह्मानंदीं मग्न होणें *n*,

(cf. ब्रह्मानंदीं लागली टाळी कोण देहातें सांभाळी) समाधि (?) *f.* २ *excessive joy, rapture, enthusiastic delight* अत्यानंद *m*, परमानंद *m*, हर्षावेश *m*, हर्षनिमग्नता *f*, हर्षसंभ्रम *m*, हर्षभर *m*, आनंदाचा भर *m*. ३ (*obs.*) (*Shakes.*) *violent distraction of mind, madness or insanity* वेड *n*, आवेग *m*, पिसें *n*, उन्माद *m*. ४ *med. a morbid state of the nervous system in which the attention is occupied exclusively by one idea and the cerebral control is in part withdrawn from the lower centres and those for certain reflex functions.* These latter centres may be in a condition of inertia or of insubordinate activity presenting various disordered phenomena for the most part motor. शरीरांतील सर्व ज्ञानतंतूंचा प्रदेश विकृत झाल्यामुळें निरनिराळ्या गोष्टींचें ज्ञान नाहींसें होऊन तें एकाच गोष्टीकडे लागलें असतांना किंवा शरीरांतील खालच्या प्रतीच्या निरनिराळ्या केंद्रांवरील मेंदूचा ताबा अगदीं किंवा अंशतः नाहींसा झाल्यामुळें जी मनाची व शरीराची स्थिति होते ती, समाधीसारखा रोग *m*, (समाधीमध्यें) जी देहाची निचेष्ट स्थिति होते तशीच ह्या Ecstasy नामक विकारांत होत असल्यामुळें Ecstasy ला समाधिरोग हें नांव आम्हीं योजिलें आहे. निचेष्टावस्था *f*, गात्रस्तंभ *m*, ताठा *m*. E. *v. t.* (*obs.*) *to fill with rapture or enthusiasm* हर्षनिर्भर करणें, अत्यानंदित-परमानंदित करणें. Ecstat'ic,-al *a. pertaining to or proceeding from ecstasy* हर्षावेशाचा, परमानंदाचा. २ *delightful beyond measure, rapturous* परमहर्षदायक, अत्यानंददायक. Ecstati'cally *adv.* आनंदाच्या भरांत.

Ect, Ecto (ekt, ek'-tō) [Gr. *ektos*, outside.] *n. a combining form signifying 'without', 'outside,' 'external'* (-च्या) 'बाहेरचा'-'बाह्य' अशा अर्थी दुसऱ्या शब्दाशीं जोडण्याचा शब्द *m*.

Ectad (ek'-tad) [Ect + L. *ad*, towards.] *adv. anat. toward the outside* (oppo. to *entad.*) बाह्यभागीं-प्रदेशीं.

Ectasis (ek'-ta-sis) [Gr. *ek* & *teinein* Sk. तन्, to stretch.] *n.* (*Pros.*) *the lengthening of a syllable from short to long* (छंदःसुखासाठीं) लघु अक्षर गुरु करणें *n*.

Ecumenic, Ecumenical (ek-ū-men'-ik,-al) [L. *œcumenicus*,–Gr. *oikoumene*, the inhabited world,—*oikos*, Sk. ओकस्, a house.] *a. general, universal* सामान्य, सर्वसाधारण, साधारण.

Eczema (ek'-zē-mä) [Gr. *ekzein*, to boil out, from *ek*, out & *zein*, to boil.] *n. med.* (त्वचेला दूषित रक्तानें, घर्षणानें, किंवा इतर कारणानें सूज येऊन आलेला) खरजीसारखा पुरळ *m*. Eczem'atous *a*.

Edacious (e-dā'-shus) [L. *edax*, *edacis*,—*edere*, to eat.] *a. given to eating, greedy, voracious* खादाड, औदरिक, आधाशी, लोभी, बहुभक्षक. Edā'ciously *adv.* Edac'ity *n. voracity, rapacity, greediness* खादाड-आधाशी-हावरेपणा *m*, लोभ *m*.

Eddish (ed'-dish) [A. S. *edisc*, aftermath.] *n. aftermath* फेरकापणी *f*. २ *stubble* & *stubble field* गवताचे (शेतांत) राहिलेले खुंट *m. pl.*

Eddy (ed'-i) [From Icel. *ida*, an eddy, from pref. *id*, A. S. *ed*, again, back.] *n. pl.* Eddies. *a current contrary to the main current* उलट-विरुद्ध प्रवाह *m*, उलटा प्रवाह *m*. २ *a whirlpool* गरगर फिरणारा भोंवरा *m*, आवर्त्त *m*, चक्र *n*; as, "And smiling *eddies* dimpled on the main." E. *a.* गरगर फिरणारा; as, "Eddy winds." E. *v. i. to move in a circle* घोंटाळणें, कोंडाळणें, गोंधळणें, गिरक्या घालणें-मारणें, वाटोळें फिरणें, भोंवणें; as, "Eddying round and round they sink." E. *v. t.* (R.) *to collect as into an eddy* भोंवऱ्यासारखें गोळा करणें. Eddied *pa. t.* & *pa. p.* Ed'dying *pr. p.* & *v. n.*

Edema (ē-dē-'mä) [L.] *n. med.* (विनलालीची) सूज *f*. अशी सूज स्थानिक कारणामुळें सहसा येत नाहीं. तर ती रक्ताशय, फुफ्फुसें, यकृत् आणि मूत्रपिंड विघडले म्हणजे येते. Same as œdema. Edem'atous, Edem'atōse *a*.

Eden (ē'-den) [Heb. *ēden*, delight, pleasure, an abode of delight.] *n. the garden in which Adam and Eve, the first human pair were placed by God* ख्रिस्ती धर्मशास्त्रांतील ईडन नामक बाग *f*- बगीचा *m*. आडाम आणि ईव्ह हें (स्त्रीपुरुषांचें) पहिलें जोडपें देवानें ज्या बागेंत ठेविलें होतें. २ *a delightful region or residence, a paradise* प्रतिईडन *n*, (ईडनसारखें) सुखस्थान *n*, रम्यस्थळ *n*, राहण्याचें रमणीय स्थान *n*-ठिकाण *n*, ईडन *m*. Eden'ic *a. paradisaic* ईडनसारखा, ईडनासंबंधीं. २ (*fig.*) सुखस्थानासंबंधीं, प्रतिईडनासंबंधीं. E'denized *a.* (R.) *admitted to a state of paradisaic felicity* ईडनांतील सुखास पात्र केलेला.

Edentate (ē'-den'-tāt) [L. *e*, (*ex*), out of, without & *dens*, *dentis*, Sk. दन्त, a tooth.] *a. destitute or deprived of teeth* अदंत, दंतविहीन, निर्दशन, नीरद. २ *zool. belonging to the Edentata* दंतविहीन प्राण्यांसंबंधी. *m. pl.* Edentā'tä *n. pl.* (*zool.*) अदंत प्राणिवर्ग *m*, दंतविहीन प्राणी. Eden'tulous *a. toothless.*

Edge (ej) [A. S. *ecg*, L. *acies*, edge, whence *ecgian*, *eggian*, to sharpen.] *n.* धार *f*, धारा *f*; as, "The edge of an axe, knife, sword, scythe etc." [A DULL E. बोंथट-पडती-बसकी धार *f*. A SHARP E. वाहती धार *f*.] २ (*fig.*) *that which cuts as an edge does, or wounds deeply* &c. धार *f*; as, "The edge of slander." ३ *a margin, a brink, extreme verge* कड *f*, कांठ *m*, किनारा *m*, कोर *f*, धार *f*, बाणी *f*, दर *f*, कडा *m*, प्रांत *m*, प्रांतभाग *m*, कडण *f*, पाळ *f*, बाजू *f*, किनार *f*; as, "The edge of a table, a precipice, etc.; Pursue even to the very edge of destruction." [Or BROKEN E.—PITCHER &c. कांठफुटका. To BE SET ON E. (THE TEETH) आंबणें, दंतहर्ष होणें.] ४ *sharpness*

*keenness* तेज *n*, तीक्ष्णता *f*, तिखटपणा *m*, प्रखर-तीव्र-ता *f*; as, "The full E. of our indignation." ५ *intenseness of desire* उत्कंठा *f*. ६ *the beginning or early part* प्रारंभ *m*, सुरवात *f*, मुख *m* (*fig.*), तोंड *n*; as, "In the edge of evening." [To be on edge, *to be eager, impatient or anxious* उत्सुक असणें, अधीर होणें, उत्कंठा लागणें. To set the teeth on edge दांत आंबविणें.] E. *v. t. to furnish with edge* धार *f.* काढणें. २ *to sharpen* (weapons,) धार *f.* देणें, पाजवणें, पाजळणें; as, "To E. her champion's sword." ३ *to shape or dress the edge of* (धार) लाविणें. ४ *to furnish with an edge, fringe or border* (-ला) कांठ *m.* लावणें, आंचळ्या काढणें; as, "To edge a dress. To edge a garden with box." ५ (*obs.*) (*fig.*) *to make sharp, to incite, to goad, to urge on* टोंचणी *f.* लावणें, प्रोत्साहन *n.* देणें, प्रेरणा *f.* करणें, उत्तेजन देणें, प्रवृत्ति करणें. [PERSON EDGED ON खंडेराव *m*, हणगोबा *m.*] ६ *to move by little and little or cautiously as by pressing forward edgewise* बाजूस-कडेस सरकवणें, हळूहळू शिरकाव करणें, शिरकवणें; as, "Edging their chairs forwards." E. *v. i. to move sideways or gradually* बाजूवर-कडेवर जाणें, होणें, सरणें, सरकणें; as, "To E. along the way." Edge'less *a. not sharp, blunt* बिनधारेचा, बोंथट, (*loosely*) निधारी, निधार. Edge'shot *a. carp.* (said of a board) *having an edge planed* (रंध्यानें) गुळगुळीत केलेल्या कांठांचा. Edge'wise, Edge'ways *adv. in the direction of the edge* धारेकडून, कडेकडून, बाजूवर, धारेवर. Edg'ing *n. that which forms an edge or border* (as the fringe, trimming, &c.) किनारी *f*, कांठ *m*, किनार *f*, कोर *f*, लकेरी (R.) *f*, मगजी *f*, गोट *m*, गोटा *m*, घडी *f.* [THAT HAS E. मगजीदार.] २ *the operation of shaping or dressing the edge of anything* (as a piece of metal) धार सारखी करणें-घडवणें. Edg'ingly *adv.* (R.) *gradually, gingerly* हळूहळू, सावकाश, सावधपणें-गिरीनें, भीतभीत. Ed'gy *a. easily irritated* लवकर रागावणारा, सहजताबडतोब चिडणारा, चिडखोर; as, "An E. temper."

Edible (ed'i-bl) [L. *edere*, to eat.] *a. eatable* खायाचा, खाद्य, भक्ष्य, भक्षणीय, खाण्याजोगा; as, "E. fishes, fruits, &c." E. *n. anything edible* खाद्य *n*, खाण्याचा पदार्थ *m*. Ed'ibleness, Edibil'ity *n.* भक्षणीयता *f.*

Edict (ē'-dikt) [L. *edictum*, — *edicere*, to proclaim,—*e*, out and *dicere*, to speak.] *n. a public command or ordinance by the sovereign power, a decree, a proclamation of command or proclamation of law made by absolute authority* राजाज्ञा *f*, राजशासन *n*, शासन *n*, आज्ञापत्र *n*, निर्बंध *m*. Edict of Nantes (*French Hist.*) प्राटेस्टन्ट लोकांना सवलती देण्याकरितां चौथ्या हेनरी राजानें इ. स. १५९८ त काढलेलें आज्ञापत्र *n.* पुढें इ. स. १६८५ मध्यें चौदाव्या लुई राजानें हें आज्ञापत्र रद्द केल्यानंतर पुष्कळ प्राटेस्टन्ट लोकांचा भयंकर छळ झाला. [GENERAL EDICT सामान्य शासन *n*- आज्ञापत्र *n.*] Edict'al *a.* आज्ञापत्रांतर्गत-पत्ररूप; as, "The Roman E. law."

*N. B.*—Decree ठराव *m*, निर्णयपत्र *n*, कोर्टाचा हुकूमनामा *m*- निकाल *m*. Edict राजशासन. Proclamation घोषणपत्र, जाहीरनामा. Law कायदा. Regulation कानू.

Edify (ed'-i-fī) [O. Fr. *edifier*–L. *ædificare*–L. *ædes*, a building orig. a hearth & *facere*, to make. या शब्दाचा मूळ अर्थ (घर, इमारत) बांधणें असा होता; as, "There was a holy chapel edified."] *v. t. to instruct & improve esp. in moral & religious knowledge, to teach* परमार्थबुद्धि वाढवणें, सन्मार्गावरची-धर्मावरची निष्ठा वाढवणें, बोध करणें, शिक्षण देणें, (-ची) ज्ञानवृद्धि करणें, मनाची उन्नति करणें; as, "It does not appear probable that our dispute (about miracles) would either E. or enlighten the public." E. *v. i.* (R.) *to improve* सुधारणें. Edifica'tion *n. a building up* (esp. in a moral or spiritual sense), *instruction* ज्ञानवृद्धि *f*, परमार्थबुद्धीची वृद्धि *f*, सन्मार्गनिष्ठेची वृद्धि *f*, सन्मार्गस्थैर्य *n*, नीतिप्रकर्ष *m*, बोध *m*; as, "The assured E. of his church." २ (*obs.*) *a building or edifice* इमारत *f.* Ed'ificatory *a.* See Edifying. Ed'ifice *n. a building, a structure, a fabric* (chiefly applied to elegant houses & other large structures) सुंदर व भव्य इमारत *f*, मंदिर *n*, (भव्य) इमला *m*, वसतिगृह *n*. Edific'ial *a.* Ed'ifying *a. instructing, improving* परमार्थबुद्धि वाढविणारा, सन्मार्गनिष्ठा वाढविणारा, ज्ञानवर्धक, मानसिक-नैतिक उन्नति करणारा, उन्नतिकर; as, "An E. conversation." Ed'ifyingly *adv.* Ed'ifyingness *n.*

*N. B.* "Edification is an improvement in a *moral* or *religious* sense; he who is edified is conscious of an accession to his practical stock of knowledge, and an increase of his moral strength." *Smith.*

Edit (ed'-it) [Fr. *editer* or L. *editus p. p.* of L. *edere*, to give out, to publish—L. *e*, out and *dare*, to give.] *v. t. to superintend the publication of; to select, correct, arrange &c., the matter of, for publication* (-चा) संपादक होणें, निवड-शुद्धि-व्यवस्था करून छापण्यास तयार करणें, (दुसऱ्यांनीं लिहिलेलें) तपासून किंवा सुधारून छापणें; as "To E. a newspaper, a dictionary, &c." Edi'tion *n. literary work edited and published* (as by a certain editor or in a certain manner) (एखाद्या मनुष्यानें प्रकाशित केलेला) विवक्षित ग्रंथ *m*; as, "Deighton's E. of Shakespeare." २ *the whole number of copies of a book printed and published at one time*, एका आवृत्तीस काढलेल्या प्रती *f. pl.*, आवृत्ति *f.* Ed'itor *n.* संपादक *m*, (दुसऱ्यांनीं लिहिलेल्याची निवड करून

प्रसिद्ध करणारा) अग्रलेखक *m*. २ *conductor of a newspaper* चालक, कर्ता *m*. Edito'rial *a. of* or *pertaining to an editor, published by an editor* संपादकीय, चालकानें-केलेला-लिहिलेला. E. *n. a leading article in a newspaper or magazine* मुख्य लेख *m*, अग्रलेख *m*, संपादकाचा-एडिटराचा लेख *m*- मजकूर *m*, संपादकीय लेख *m*. Edito'rially *adv*. संपादकाच्या नात्यानें. Ed'itorship *n*. संपादकत्व *n*, संपादकाचें काम *n*-धंदा *m*. Ed'itress *n. fem*. संपादिका *f*.

*N. B.*—Editor = संपादक; कर्ता. Publisher = प्रकाशक.

Educate ( ed'ū-kāt ) [ L. *educatus* p. p. of *educare*, to bring up a child physically and mentally.- *educare*, to lead forth or bring up ( a child )-*e*, out & *ducere*, to lead. ह्या शब्दाचा धात्वर्थ पुढें नेणें, जोपासना करणें, वाढविणें असा आहे, व त्यावरून पुढें मुलाच्या शारीरिक, मानसिक, व नैतिक शक्तीची अभिवृद्धि करणें असा ह्या शब्दास अर्थ आला आहे. व सध्यां तर बहुधा 'मानसिक वाढ-अभिवृद्धि करणें' ह्या अर्थीच ह्याचा प्रयोग होतो.] *v. t.* ( a ) मनःसंवर्धन करणें. ( b ) वागणुकीचीं, वर्तनाचीं तत्वें शिकविणें. ( c ) पद्धतशीर शिक्षण देऊन एखादा कामधंदा करण्यासाठीं तरबेज करणें, शिक्षा ( S. ) देणें, शिकविणें. २ *to instruct, to cultivate, to train* (-ला) शिक्षण देणें, शिकविणें, लिहिणें-पुसणें *n*. सांगणें, शिक्षित-सुसंस्कृत करणें, तयार करणें, कमावणें; as, "To E. a child; To E. the eye, the ear, the taste &c." Ed'ucable *a. capable of being educated* सुशिक्ष्य, शिक्षणक्षम. Educabi'lity *n*. Edu'cated *a*. शिकविलेला, शिक्षित. २ विद्वान्, सुशिक्षित, विद्यासंपन्न, संस्कृत, संस्कृत मनाचा, विद्यासंस्कृत, साक्षर. Educā'tion *n. the act or process of educating* शिकविणें *n*, शिकवण *f*, शिक्षा ( S. ) *f*, शिक्षण *n*. २ *the result of educating* शिक्षण *n*, विद्या *f*, अध्ययनसंपन्नता *f*, अध्ययनसंपत्ति *f*, साक्षरता *f*, शिक्षणसंस्कार *m*. Educa'tional *a*. विद्याविषयक, शिक्षेचा, शिक्षाविषयक, शिक्षणासंबंधीं. [E. DEPARTMENT विद्याखातें *n*, शाळाखातें *n*. ] Educa'tionist *n. one who is versed in the theories of, or who advocates and promotes, education* अध्यापनशास्त्रपटु, शिक्षणशास्त्रपटु, शिक्षणाचा कैवारी *m*- पुरस्कर्ता *m*. Ed'ucative *a. tending to educate* शिक्षणदायक, शिक्षण देणारा; as, "E. experience." Ed'ucator *n. a teacher* शिक्षक *m*, शिकविणारा *m*, अध्यापक *m*.

*N. B.* Education मनोवृद्धि, (मन व वर्तन ह्यांना) संस्कृत करणारें शिक्षण, संस्कार. Instruction शिक्षण. Teaching शिकवणी-णें. Training सराव, अभ्यास. Breeding गृहशिक्षण, शिक्षा; as, त्याच्या घरची शिक्षा चांगली नाहीं.

Educe ( e-dūs' ) [ L. *educere*, to bring out–L. *e*, out and *ducere*, to lead. ] *v. t. to bring or draw out, to extract, to evolve* ओढून बाहेर काढणें, काढून घेणें- बाहेर आणणें, विकासन करणें, उन्नत-तयार करणें, (-ची) उत्क्रान्ति *f*- विकास *m*. करणें; as, "They want to E. and cultivate what is best and noblest in themselves." Edu'cible *a*. ओढून काढतां येण्यासारखा, विकासक्षम, विकास करतां येण्याजोगा. E'duct *n. that which is educed, as by analysis* सार *n*, तात्पर्य *n*, निष्कर्ष *m*. Educ'tion *n*. बाहेर काढणें *n*, दृष्टीसन्जरेस आणणें-पाडणें *n*. Educ'tive *a*. ओढणारा, आकर्षक, विकासक, उत्क्रामक. Educ'tor *n. one who, or that which, brings forth, elicits, or extracts* ओढून काढणारा, विकासक, उत्क्रामक; as, "Stimulus must be called an E. of vital ether."

Edulcorate ( e-dul'-ko-rāt ) [ L. *e*, out and *dulcorare* ( *p. p. dulcoratus* ), to sweeten–L. *dulcis*, sweet.] *v. t. to sweeten, to free from acidity* मधुर-गोड करणें, (-ला) गोडी *f*- माधुर्य *n*. आणणें, (-चा) आंबटपणा *m* नाहींसा करणें-दवडणें-घालवणें, मिष्ट करणें. २ *chem.* (R.) *to free from acids, salts, or other soluble substances, by washing; to purify* खारटपणा काढून टाकणें, (अम्ललवणादि विरघळणारीं द्रव्यें) धुवून टाकून पदार्थ शुद्ध करणें. Edul'corated *pa. t.* and *pa. p.* Edul'corating *pr. p.* and *v. n.* Edulcorā'tion *n. the act of sweetening* गोड करणें *n*, माधुर्य आणणें *n*, मधुरीकरण *n*. २ *chem.* ( R. ) अम्ललवणादि विसर्जन *n*. Edul'corative *a*. माधुर्यकारक. Edul'corator *n. a dropping bottle* थेंब थेंब पाडतां येण्यासारखें कांचपात्र *n*.

Ee ( ē ) [ Formed on the French *p. p.* ending *é*, masc. ] *A suffix used, chiefly in law terms, in a passive sense to indicate the direct or indirect object of an action, or the one to whom an act is done or on whom a right is conferred; It is correlative to–'or,' the agent or doer.* 'Ee' हा प्रत्यय 'or' ह्या प्रत्ययाचा प्रतियोगी आहे. ह्या प्रत्ययावरून ज्या माणसावर क्रिया व्हावयाची असते त्याचा बोध होतो; जसें, Assignee ज्यास बेचन करून द्यावयाचें आहे तो. Assignor बेचन करणारा. Donee ज्याला द्यावयाचें आहे तो. Donor देणारा, दाता.

Eel ( ēl ) [ A. S. *ael.* ] *n. zool.* वाम *f*, वांव *f*. Eel-buck, Eel-basket *n*. वाम पकडण्याची टोपली *f*. Eel-pout *n. zool.* डाकू *m*. Eel-spear *n*. वाम पकडण्याचें एक प्रकारचें हत्यार *n*–गळ *m*. (?)

E'en ( ēn ) *adv.* A contraction for *Even.*

E'er ( ær ) *adv.* A contraction for *Ever.*

Eerie, Eery ( ē'-ri ) [ A. S. *earh*, timid. ] *a. calculated to inspire fear, wild* भीतिदायक, घाबरवून टाकणारा, भेसूर. २ *affrighted* भ्यालेला, घाबरलेला. Ee'rily *adv.* भय वाटण्याजोगें. Ee'riness *n*. Ee'riesome *a*.

Effable ( ef'-fa-bl ) [ L. *ex*, out & *fari*, to speak.] *a. utterable* कथनीय, उच्चारणीय, सांगण्यासारखा.

Efface ( ef-fās ) [ Fr.–L. *ef* ( *ex* ), out & *facies*, face. ] *v. t. to blot out, to erase* पुसणें, पुसून टाकणें, पुसटणें, खोडणें, खोडून टाकणें, बोळा *m*. फिरवणें

काढून टाकणें, खरडून-छिनून काढणें, दिसेनासा करणें. as, "To E. the letters on a monument &c." २ *to destroy as a mental impression, to wear away* (मनांतून) दवडणें-घालवणें-नाहींसा करणें-दूर करणें. Effa'ced *pa. t. & pa. p.* पुसून-खोडून टाकलेला, दिसेनासा केलेला. Effa'cing *pr. p. & v. n.* Effa'ceable *a.* पुसून टाकतां-खोडतां येण्याजोगा. Efface'ment, Effa'cing *n.* पुसून टाकणें *n.*

*N. B.*—Deface विद्रूप करणें. Efface पुसून टाकणें. Deface या शब्दांत वस्तूच्या रूपांत विद्रूपता आणण्याची कल्पना आहे. Efface या शब्दांत रूपाचा वगैरे संबंध नसून वस्तु फक्त अदृश्य करण्याची किंवा पुसून टाकण्याची कल्पना आहे.

Effect (ef-fekt') [L. *efficere* (p. p. *effectus*), to work out—L. *ef* (for *ex*), out and *facere*, to make.] *n. result, consequence, outcome* कार्य *n*, निष्पत्ति *f*, परिणाम *m*, गुण *m*, फल *n. pop.* फळ *n*, उत्तरफल *n*, अर्थ *m*, फलोदय *m*; as, "The E. is the unfailing index of the amount of the cause." २ *execution, performance, operation* अम्मल *m*, बजावणी *f*, अम्मलबजावणी *f*, सिद्धि *f*, आचरण *n*; as, "The law goes into E. in May." ३ *impression left on the mind, sensation produced* ठसा *m*, मनावरील संस्कार *m*- परिणाम *m*. ४ *power to produce results, efficiency, force* कार्यक्षमता *f*, परिणामकरता *f*; as, "To speak with E." ५ *purpose, general intent* (with *to*) अभिप्राय *m*, अर्थ *m*, मतलब *m*, उद्देश *m*, रोंख *m*; as, "They spoke to her to that E." ६ *the purport* तात्पर्य *n*, मतलब *m*, सार *n*, आशय *m*, हेतु *m*; as, "The E. of his intent." ७ *reality, fact* (as distinguished from mere *appearance*) यथार्थता *f*, खरेपणा *m*, सत्यता *f*, वास्तविकता-पणा *m*; as, "No other in E. than what it seems." ८ *pl. goods, movables, personal estate* पुंजी *f*, मालमत्ता *f*, (जवळ असलेली) चीजवस्तु *f*, जंगम इस्टेट *f*; as, "He left the town with all his E.s." [For E. *for an exaggerated impression or excitement* विशेष ठसा *m* -परिणाम *m* -संस्कार *m*. उत्पन्न करण्याकरितां, चळवळ उडवून देण्याकरितां. In E. *in fact* वस्तुतः, वस्तुगत्या, खरोखर. Of no E., of none E., To no E., without E. *destitute of results, force, validity and the like* निष्फळ, व्यर्थ, वृथा, वायां, निरर्थक, फुकट. To give E. to *to carry out in practice* अमलांत आणणें, (-ची) बजावणी करणें, सुरू करणें, प्रचारांत आणणें, आचरणें. To take E. upon लागणें, (वर) लागू होणें-पडणें. To take evil E. बाधणें, (-चा) दुष्परिणाम घडणें-होणें. Cause and E. कार्यकारण *n*. Relation of cause and E. कार्यकारणभाव *m* -संबंध *m*. Evil E. अवगुण *m*, दुष्परिणाम *m*. To take E. *to become operative* अमलांत-प्रचारांत येणें, गुणास येणें, बीं रुजणें, फळणें, यशस्वी होणें.] Effect' *v. t. to produce as a cause or agent, to cause to be* साधणें, संपादणें, मिळविणें. २ *to bring to pass, to accomplish, to enforce* घडवून-बनवून आणणें, घडवणें, करवणें, साधणें, जोडणें, करणें; as, "To E. that which the divine counsels had decreed." Effec'ted *pa. t.* and *pa. p.* साधलेला, साधित, निष्पादित, घडवून आणलेला, घडवलेला. Effec'ting *pr. p.* and *v. n.* Effec'ter,-or *n.* Effect'ible *a. practicable, feasible* साधण्याजोगा, करतां येण्याजोगा-सारखा, साध्य. Effec'tion *n.* (R.) *creation, production* निष्पत्ति *f.* Effec'tive *a. efficacious, operative, efficient, active* गुणकारक-कारी-कर्त्ता, गुणावह, साधक, कार्यसाधक, कार्यसंपादक, कार्योपयोगी, उपयोगाचा, कामाचा, कार्यक्षम, कार्यसमर्थ. E. *n. a cause* कारण *n*, निमित्त *n*, हेतु *m*, निदान *n*. २ *one who is capable of active service* कार्योपयोगी-कार्यक्षम माणूस *m*. ३ [Fr. *effectif*, real, effective, real amount.] (*commerce*) *specie or coin as distinguished from paper money* (a term used in many parts of Europe) नाणें *n*, रोख पैसा *m*, रोकड *f.* Effec'tively *adv. powerfully, with effect* जोरदारपणानें, काम होण्यासारख्या रीतीनें, परिणामकारित्वानें. २ *thoroughly, completely* पूर्णपणें. Effec'tiveness *n.* गुणकारकत्व *n*, कार्यसाधकत्व *n*, गुणकारिता *f*, गुण *m*. २ उपयोगीपणा *m*, उपयोगिता *f*, कार्यक्षमता *f*, उपयुक्तता *f.* Effect'less *a. useless, bootless* निरुपयोगी. Effect'ual *a. adequate, efficient, operative* फलोत्पादक, गुणावह, लागू पडणारा, कार्यसाधकसंपादक, अमोघ, सिद्धिकारक, रामबाण (*fig.*), वर्मी; as, "E. steps for the suppression of rebellion." २ *that has produced effect* सफल, अमोघ, सार्थक, सार्थ, कृतार्थ, कृतकृत्य, कृतगुण, प्राप्तफल, फलित. Effec'tually *adv.* फल *n*-गुण *m*. येईल असें. २ *thoroughly* पुरतेपणें, अगदीं. Effec'tualness *n.* सफलत्व *n*, साफल्य *n*, अमोघत्व *n*. Effec'tuate *v. t. to bring to pass, to achieve, to accomplish, to fulfill* घडवून-बनवून आणणें, घडवणें, करवणें, साधणें, जोडणें, पूर्ण करणें, संपादणें; as, "A fit instrument to E. his desire." Effec'tuā'tion *n.* संपादन *n*.

Effeminate (ef-fem'-i-nāt) [L. *effeminare* (p. p. *effeminatus*), to grow or make womanish,—L. ef (for *ex*), thoroughly and *femina*, a woman.] *a. soft and delicate to an unmanly degree, weak, womanish* बायक्या, बायल्या, रांड्या (*vulg.*), स्त्रीसारखा अशक्त, क्लीब, दुर्बल, नामर्द, स्त्रीसारखा भितरा, नेभळट, कन्यारास, चुळभावनवशा, बाईलकाम्या. २ (in a good sense) *womanlike, tender* नाजूक, नरम, स्त्रीधर्मी, स्त्रीगुणविशिष्ट, स्त्रीस शोभणारा, जनानी; as, "Gentle, kind, E. remorse." E. *v. t. to make soft and delicate, to weaken* (-ला) क्लैब्य-नेभळेपणा *m.* आणणें, दुर्बल करणें; as, "It will not corrupt or E. children's minds." *Locke.* E. *v. i. to grow womanish or weak* (-ला) दुर्बलता *f*- नेभळेपणा *m*. येणें, दुर्बल-ळ -नेभळट होणें. Effem'inated *pa. t.* and *pa. p.* Effem'-

inating *pr. p.* and *v. n.* Effem'inately *adv.* स्त्रीबुद्धीनें, स्त्रीप्रमाणें, बायल्याप्रमाणें. Effem'inateness, Effem'inacy *n.* (used reproachfully of men) नामर्दपणा *m*, क्लीबता *f*, दौर्बल्य *n*, स्त्रीत्व *n*, रांड्येपणा *m*, बायक्येपणा *m*, बाइलेपणा *m*, नामर्दी *f*.

*N. B.—Effeminate* and *Womanish* are used in a reproachful sense; *Feminine* and *Womanly*, applied to women, are epithets denoting propriety or commendation.

Efferent (ef'-fer-ent) [L. *ef* (for *ex*), out of, & *ferre*, to carry.] *a. physiol.* (a) *conveying outward or discharging* (applied to certain blood vessels, lymphatics, nerves etc.) केन्द्रस्थानापासून-मूलस्थानापासून बाहेर जाणारा, उद्गामी. (b) *conveyed outward* (as opposed to *afferent*) उद्गत. E. *n. an efferent duct or stream* बाहेर वाहून नेणारी-उद्गामी नलिका *f*.

Effervesce (ef-fer-ves') [L. *effervescere*,-L. *ef* (*ex*), out of & *fervescere*, to begin to boil,-*fervere*, to be hot.] *v. i. to bubble and hiss, or froth and sparkle, as fermenting liquors* (पाण्यांत दाबानें कोंडून राहिलेला कर्बिकाम्ल (Carbonic acid) इ. वायु दाव काढल्यामुळें बाहेर पडूं लागल्यानें द्रवपदार्थाला) (फसफस) फेंस येणें, फसफसणें *in. con.*, ऊत *m.* येणें, उतणें, खदखदणें, बुदबुदणें, ओतास जाणें, उतून जाणें. २ *to exhibit feelings that cannot be repressed* (-ची उकळी फुटणें *acc.* of *s.* (त्याला आनंदाची उकळी फुटली), (-चें) भरतें येणें *acc.* of *s.*, (-चा) ऊत येणें; as, "To E. with joy or merriment." Efferves'cence, Efferves'cency *n.* फसफस *m*, फसफसणें *n*, उतणें *n*. (b) ऊत *m*, खतखत *f*, खदखद *f*, बुदबुद *f*, उत्सेक *m*; as, "The E. of wine, cider, beer." २ *flow of animal spirits* उकळी *f*, भरतें *n*, ऊत *m*, उत्सेक *m*. Efferves'cent *a. gently boiling or bubbling* फसफसणारा, फणफणणारा, सळसळणारा. Efferves'cible *a. capable of effervescing* ऊत आणण्यास लायक. Efferves'cive *a. tending to produce effervescence* फेंस आणणारा, फसफसणारा.

*N. B.*—When used metaphorically, *Ebullition* is employed of sudden bursts of anger or ill-temper. *Effervescence* is used less commonly, but employed of the natural exhibition of liveliness and good spirits. *Fermentation* and *Ferment*, of a state of ill-suppressed discontent or impatience, and especially among a number of persons. But *Ferment* is commonly appropriated to the emotional, and *Fermentation* to the material. A hive of working bees is in a state of fermentation. It is dangerous to approach if some cause has thrown them into a ferment.

Effete (ef-fēt') [L. *effetus*, exhausted by having brought forth young—L. *ef* (*ex*), out and *fetus*, that has brought forth.] *a. no longer capable of producing young* (as an animal), *or fruit* (as the earth); *no longer productive, barren, sterile* (म्हातारपणामुळें) फलोत्पादनास असमर्थ, अफलोत्पादक, क्षीण. २ *worn out with age, exhausted of energy, incapable of efficient action* निःसत्व, निःशक्त, क्षीणशक्ति, शक्तिहीन, जीर्ण, क्षीण, दुर्बल.

Efficacious (ef'fi-kā'-shus) [L. *efficere*, to effect—L. *ef* (*ex*), thoroughly and *facere*, to make.] *a. effectual, having power adequate to the purpose* इ. गुणकारक-कारी, गुणावह, गुणदायी, गुणाचा, गुणदायक, गुणप्रद, अमोघ, प्रबळ, समर्थ, साधनी, कार्यसाधक, कार्यसंपादक, जयावह. Effica'ciously *adv.* Effica'ciousness *n.* Ef'ficacy *n. power to produce effects* सामर्थ्य *n*, सत्ता *f*, कार्यसाधकता *f*, बळ *n*, प्रभाव *m*, सफलता *f*, गुण *m*, तेज *n*, कार्यसिद्धि *f*, गुणकारिता *f*, गुणशक्ति *f*, &c. Effi'cience, Effi'ciency *n. effective or efficient power or agency* कर्तृत्व *n*, कर्तेपणा *m*, कार्यसाधकत्व *n*, कार्यक्षमता *f*- नैपुण्य *n*. २ *mech. the ratio of useful work to energy expended* प्रत्यक्ष होणारें काम व त्याकरितां खर्च झालेली शक्ति यांमधील प्रमाण *n*, सामर्थ्य *n*. Effi'cient *a. competent, able, operative* कार्यसाधक, कारक, साधक, कार्यक्षम. Effic'iently *adv.*

Effigy (ef'-fi-ji) [Fr. *effigie*–L. *effingere*, to fashion—L. *ef* (*ex*), out and *fingere*, to form or devise.] *n. pl.* Effigies. *the image, likeness, or representation of a person or thing, whether a full figure or a part* (commonly applied to sculptured likenesses as those on monuments, or to those of the heads of kings or queens on coins and medals, but sometimes applied to portraits) पुतळा *m*, प्रतिमा *f*, बाहुला *m*, or बाहुली *f*, or बाहुलें *n*, प्रतिरूप *n*, प्रतिमूर्ति *f*, प्रतिकृति *f*. [To BURN OR TO HANG IN E. पुतळा करून जाळणें-फांशीं देणें (एखाद्या व्यक्तीविषयीं द्वेष व्यक्त करण्याचा हा एक मार्ग आहे). FUNERAL RITES PERFORMED ON AN E. (OF LEAVES) WHEN THE CORPSE IS MISSING पालाशविधि *m*.] Effig'ial *a.* Effig'iate *v. t. to form a like figure* पुतळा करणें. २ *to adapt* योग्य करणें. Effigā'tion *n. act* प्रतिमा करणें *n*. २ *an image or effigy* प्रतिमा *f*.

Efflate (ef-flāt) [L. *efflare* (*p. p. efflatus*), to blow or breathe out, L. *ef* (*ex*), out and *flare*, to blow.] *v. t. to fill with breath, to puff up* फुगवणें, (-च्यांत) वारा *m.* भरणें. Effla'ted *pa. t.* and *pa. p.* Effla'ting *pr. p.* and *v. n.* Efflā'tion *n. the act of filling with wind; a puff, as of wind* फुगवणें *n*.

Effloresce ( ef-flo-res' ) [ L. *ef* ( *ex* ), out & *florere*, to blossom,-*flos, floris*, a flower. ] *v. i. to burst into blossom as a flower, to blossom forth* मोहोर फुटणें-येणें, मोहोरणें, (-ला) फुलें-फुलारा येणें (*colloq.*). २ *chem. to become covered with crystals as the moisture frozen on a pane of glass* (स्फटिकासारख्या ठिपक्यांनीं) मोहोरणें-फुलणें, (वर) फुल्लन येणें, होरणें, आच्छादित होणें. ३ *chem. to change from a compact or crystalline state to a powder by losing water of crystallisation* (उष्णता, हवा वगैरेंनीं आर्द्रता जाऊन क्षाराचा) भुगा होणें; as, "Glauber's salts, & many others, E." ४ *to form mealy powder on the surface as of a liquid* (कणीदार-कणीसारखा) रवा जमणें. ५ *to become covered with a whitish crust from a slow chemical change by the action of acid from an external source* (हवेंतील आम्लांच्या निकट संसर्गानें पदार्थांचा पृष्ठभाग रसायनक्रियेमुळें बदलून) रवाळ होणें. Effloresc'ed *pa. t. & pa. p.* Efflores'cing *pr. p. & v. n.* Efflores'cence *n. bot. flowering or state of flowering, the blossoming of flowers* फुलारा *m*, मोहोर *m*, पुष्पोद्गम *m*, पुष्पप्रसव *m*. २ *med. eruption as in measles, or smallpox* पुरळ or पुरूळ *m*, (आंग) फुलणें *n*, उतणें *n*, (हुरूप्याची) उगवण *f*. पुरूळ *m*. ३ *chem. formation of crust on the surface of efflorescing bodies as salts* फूल *n*, रवा *m*, कणी *f*. Efflores'cent *a.* मोहोरणारा. २ फूल येणारा, फुलणारा. Efflores'cency *n.*

Effluence, -ency (ef'-flū-ens,-si) [L. *effluens,-entis, pr. p.* of *effluere*–L. *ef* ( *ex* ), out & *fluere*, to flow. ] *n. emanation or a flowing out* प्रवाह *m*, ओघ *m*, निःसरण *n*, बाहेर वहाणें *n*. २ *issue, efflux, that which flows or issues from a body or substance* प्रस्रव *m*, स्राव *m*, निःस्रवण *n*, निर्गम *m*. Ef'fluent *a.*

Effluvium (ef-flū-'vi-um) [See Effluence.] *n. invisible emanation, exhalation perceived by the sense of smell esp. noisome or noxious* गंध *m* (S.), घाण *f*, पूतिगंधि *m*, दुर्गंध *m*. Efflu'viable *a.* Efflū'vial *a. pertaining to or containing effluvia* दुर्गंधी-घाणी-संबंधीं, दुर्गंधयुक्त. Efflū'viate *v. i.* (R). *to throw off effluvium* (पासून) दुर्गंधी-घाण येणें. Efflū'viated *pa. t. & pa. p.* Efflu'viating *pr. p. & v. n.*

Efflux ( ef'-fluks ) [ L. *effluere, effluxum*, to flow out. ] *n. effusion, outflow* बाहेर येणें *n*, बाहेर निघणें *n*, स्रवण *n*, निर्गम *m*, प्रवाह *m*, ओघ *m*, निस्सरण *n*; as, "The E. of matter from an ulcer; the E. of men's piety." २ *emanation, effluence* प्रस्राव *m*, स्राव *m*, निर्गत वस्तु *f*, उद्रेक *m*; as, "Prime cheerer, light! Efflux divine." Efflux'ion *n.* See Efflux.

Effodient ( ef-fō'-di-ent ) [ L. *ef* ( *ex* ), out & *fodere*, to dig. ] *a. zool. accustomed to dig, digging up* नेहमीं खणणारा, उकरणारा.

Effoliation ( ef-fō'-lia'-shun ) [ L. *ef* ( *ex* ), out & *folium*, a leaf. ] *n. bot.* पार सडणें *n*, झाडाचीं पानें पडणें *n*- गळणें *n*, विपर्णीभवन *n*.

Effort ( ef'-fert ) [ Fr. *effort*.–L. *ef* (*ex*), out & *fortis*, strong. ] *n. an exertion of strength or power, whether physical or mental, more or less strenuous endeavour* आयास *m*, सायास *m*, प्रयास *m*, विशिष्ट प्रयत्न *m*, दीर्घप्रयत्न *m*, आटाआट *f*, उद्यम *m*, महोद्यम *m*. [ With E. आयासानें, प्रयत्नतः, प्रयत्नानें. Without E. अनायासें, सहज, अयत्नतः. To make a last and desperate E. निर्वाणींचा प्रयत्न करणें, शेवटच्या व निकराचा प्रयत्न करणें, मरतां मरतां हातपाय झाडणें. With one brisk E. एका झपाट्यानें-सपाट्यानें-तडाक्यानें-ओढीनें-दमानें-आवेशानें. To make great E. मोठा प्रयत्न-दीर्घप्रयत्न करणें, जंजाळें तोडणें (R.), जंजीर *f*. तोडणें.]

*N. B.*—Effort जोराचा विशिष्ट प्रयत्न, आयास. Attempt यत्न. Endeavour सतत-दीर्घ प्रयत्न-प्रयास.

Effranchise ( ef-fran'chiz or chīz ) [L. *ef* ( *ex* ), out & Franchise. ] *v. t. to enfranchise, to invest with franchises or privileges.* See Enfranchise.

Effrontery ( ef-frun'-teri ) [ Fr. *effronterie*–L. *effrons, effrontis*, putting forth the forehead *i. e.* barefaced–*ef* ( *ex* ), out & *frons, frontis*, the forehead. ] *n. audacious impudence or boldness, barefaced assurance* उद्धटपणा *m*, उर्मटपणा *m*, वैयात्य *n*, औद्धत्य *n*, धाष्ट्यं *n*. २ *shamelessness* निर्लज्जपणा *m*, निलाजरेपणा *m*.

Effulge ( ef-fulj' ) [ L. *ef* ( *ex* ), out & *fulgere*, to flash.] *v. i. to shine forth, to beam* प्रकाशणें, चकचकणें, (चें) तेज पडणें. E. *v. t.* (R.) *to cause to shine* प्रकाशित करणें, प्रकाशविणें, (तेज-कांति) पाडणें-सांडणें; as, "His eyes effulging a peculiar fire." Efful'gence *n. a flood of light, great lustre or brightness, splendour* प्रकाशपूर *m*, प्रकाशाचा झोत *m*, अतिशय प्रकाश *m*, बृहत्तेज *n*, दीप्ति *f*, कांति *f*, प्रभा *f*, भणका *m*, तेजस्विता *f*; as, "The bright & balmy E. of morn." Efful'gent *a. luminous, bright* अतिप्रकाशयुक्त, तेजस्वी, दीप्तिमान्. Efful'gently *adv.*

Effuse ( ef-fūs' ) [ L. *ef* (*ex*), out & *fundere, fusum*, to pour. ] *v. t.* (R.) *to pour out like a stream or freely, to spill, to shed* सांडणें, भळभळ-घळघळ वाहणें; as, "With gushing blood effused." E *v. i. to issue, to emanate* बाहेर निघणें-पडणें, लोट येणें, लोट वाहणें. Effus'ed *pa. t. & pa. p.* Effus'ing *pr. p & v. n.* Effuse *a. bot. spreading loosely esp. on one side* एकाच बाजूस पसरणारा; as, "An E. inflorescence or branch." २ *zool. having the lips or edges of the aperture abruptly spreading* (said of certain shells) एकदम एका बाजूस पसरणारा (शिंपला). Effu'sion *n. the act of pouring out* लोट सोडणें *n*, लोटच्यालोट सोडणें *n*, लोट ओतणें *n*, स्राव *m*, ओतणी *f*, लोट *m*.

२ *that which is poured out either literally or figuratively* लोट *m*, निःसार *m*, बहिस्स्राव *m* (*fig.*); as, "Wash me with that precious E. and I shall be whiter than snow." ३ बोलण्याचा-भाषणाचा पाट-प्रवाह *m*. ४ भकणें *n*, बहकणें *n*. (in bad sense); as, "The light E. of a heedless boy." ४ *med.* (a) केश-वाहिन्यांतून रस वाहणें *n*, बहिस्स्राव *m*. (b) केशवाहि-न्यांच्या छिद्रांतून वाहून जाणारा रस *m*. ५ शरीरांतील पातळ पदार्थ एके ठिकाणीं सांचणें *n*, रक्तांतील द्रवपदार्थ रक्तांतून निराळा होऊन दुसरीकडे सांचणें *n*. Effu'sive *a. pouring forth freely* बाहेर टाकणारा-ओतणारा-वाहणारा. Effu'sively *adv.* Effu'siveness *n.*

Eft (eft) [A. S. *efete*, lizard.] *n. zool. a newt* पालीच्या जातीचा प्राणी *m*.

Egad (ē-gad') [Euphemistic corruption of the oath 'By God.'] *interj. an exclamation expressing exultation or surprise &c.* (आनंद किंवा आश्चर्य-दर्शक) उद्गारवाची अव्यय *n*, उद्गारवाचक अव्यय *n*.

Egality (ē-gal'i-ti) [O. E. *egalite*,–Fr. *egalite*; cf L. *æquus*, equal.] *n. equality* बरोबरी *f*, समानता *f*.

Egean (ē-jē'-an) *a.* ग्रीसच्या पूर्वेकडील भूमध्यसमुद्राच्या आखातासंबंधीं, इजिअन.

Eger (ē-'ger) *n.* Same as Eagre.

Egest (ē-jest') [L. *e* & *gerere*, *gestus*, to carry.] *v. t. physiol. to void as excrement, to excrete as the indigestible matter of the food* (अन्नाचा पचन न होणारा भाग *m*.) बाहेर टाकणें, विसर्जन करणें, (मलरूपानें) टाकणें. २ (in an extended sense) *to excrete by the lungs, skin, or the kidneys* (फुफ्फुस, त्वचा, मूत्रपिंड इत्यादिकांच्या द्वारें शरीरांतील घाण) बाहेर टाकणें. Eges'ta *n. pl.* (opposed to *Ingesta*) *excrements* शरीरांतून बाहेर टाकलेली घाण *f*. २ घाम *m*, मल *m*. Eges'tion *n.* (शरीरांतून बाहेर टाकलेला) मळ *m*.

Egg (eg) [O. E. *æg*, A. S. *æg*, influenced by Icel. *egg*.] *n.* अंडें *n*, कवट *n*, कवठ *n*, अंड *n* (S.). २ *biol. ovum, germ-cell* पेशी *f*, कोश *m*. ३ *anything resembling an egg in form* अंड्याच्या आकाराची-अंडा-कृति वस्तु *f*. [CONTENTS OF AN E. बील *m*, वलक *m*. GOLDEN E. PRODUCED FROM E. अंडज. TO DROP ONE'S EGGS– (a BIRD) अंडीं-घालणें-गाळणें.] Eg'gler *n. a collector of, or dealer in eggs* अंड्यांचा व्यापारी *m*, अंडींविक्या *m*. Eg'gery *n.* (R.) *a nest of eggs* अंडीं ठेव-ण्याचें पक्ष्याचें घरटें *n*. Egg-apple अंड्याच्या आकाराचें फळ *n*. Egg-cup *n.* जेवणाचे वेळीं अंडीं ठेवण्याचा (पानाजवळचा) पेला *m*. Egg-plant *n. bot.* वायंग्याचें झाड *n*. [THE FRUIT OF THE EGG PLANT वांगें *n*, वायंगें *n*, वृन्ताक *n* (S.).] Egg-shell *n.* अंड्याचें टरफल *n*, कवची *f*, कवंठी *f*, कवंटें *n*, कवटी *f*. Egg-spoon *n.* अंडीं खाण्याचा लहान चमचा *m*.

Egg (eg) [M. E. *eggen*–Icel. *eggia*, to goad on–Icel. *egg*, an edge (point).] *v. t.* (with *on*) *to urge on* (-च्या) मागें टुमणें लावणें. २ *to instigate* चिथावणें, भर देणें. Eg'ger. *n.* टुमणें लावणारा.

Eglandulose, Eglandulous (ē-glan'-dū-lōs,-lus) [L. *e*, out & *glandulose*, glandulous.] *a. destitute of glands* ग्रंथिहीन.

Eglantine (eg'-lan-tīn) [Fr. *eglantine*.–L. *aculeus*, a spine, a prickle, dim. of L. *acus*, needle.] *n. bot.* एक प्रकारचा गुलाब *m*.

Ego (e'-go) [L. *ego*, I.] *n.* (*metaphysics*) *the conscious & permanent subject of all psychical experiences, whether held to be directly known or the product of reflective thought* (as opposed to *non-ego*, the not-self, the object) देहाभिमानी आत्मा *m*. E'goism *n.* (*metaphysics*) *the doctrine which finds all the elements of knowledge in the Ego & the relations which it implies or provides for* ज्ञानाचीं सर्व अंगें बीजरूपानें आत्म्यामध्यें असतात असें मत *n*, डेकार्टिसच्या कांहीं कट्ट्या शिष्यांचें मत *n*. २ *a passionate love of self, egotism* अहंपणा *m*, मीपणा *m*, अहंकार *m*, अहंता *f*, अहंभाव *m*, अहंमती *f*, अहंमान *m*, अहंममता *f*, अहंपदार्थ *m*. ३ *selfishness* स्वार्थदृष्टि *f*, आपलपोटेपणा *m*. E'goist *n.* (*metaphysics*) *a believer in egoism* आत्म्यांत ज्ञान बीजरूपानें असतें असें मानणारा *m*, डेसकार्टिसचा शिष्य *m*. २ *one given overmuch to thoughts of self* अहंमानी, अहंवादी, अहंकारी. ३ *a selfish person* स्वार्थी, आपलपोट्या माणूस *m*. Egois'tic, Egois'tical *a.* अहंमन्यतेचा. Egoi'stically *adv.* Eg'oity *n.* (R.) *personality* देह *m*. E'gomism *n.* (R.) *egoism*, which See. E'gotheism *n.* (R.) *self-worship, deification of self* आत्मपूजा *f*, आपली बढाई *f*. E'gotism *n.* (the word is also used in the sense of *Egoism*) *the practice of too frequently using the word* I, मीपणा मिरवण्याची संवय *f*, मीमी करण्याची संवय *f*. २ *a speaking or writing overmuch of one's self* मीपणा *m*, मीपण *n*, आपलीक *f*, आत्मस्तुति *f*, आत्मश्लाघा *f*, आत्माभिमान *m*, ममता *f*. E'gotist *n.* आपली बढाई सांगणारा. Egotis'tic, Egotis'tical *a.* गर्विष्ठ, आत्मश्लाघेसंबंधीं. Egotis'tically *adv.* Ego'tize, Eg'oise *v. i. to talk or write much of one's self, to exhibit egotism* आपला बडीवार *m*. आपली बढाई *f*. सांगणें-मिरवणें, आत्मश्लाघा *f*. आत्मस्तुति *f* करणें.

*N. B.*—Egoism मीपणा, अहंपणा, अहंता. Self-conceit लब्धप्रतिष्ठितपणा, अहंमन्यता. Vanity गर्व, पोकळ गर्व. Egotism आत्मश्लाघा.

Egregious (ē-grē'-ji-us) [L. *egregius*, lit. chosen out of the common flock or herd, from *e* or *ex*, out & *grex*, *gregis*, a flock.] *a.* (R.) *extraordinary, distinguished, remarkable, enormous* प्रख्यात, प्रसिद्ध. २ (now mostly used in an ill or ironical

sense ) विलक्षण, लोकोत्तर, अलौकिक, मोठा, जबर. २ *arrant* बिलंद, विलंदर, बिलंदी, अट्टल, गाळींव. Egre′giously *adv.* कमालीचा, पराकाष्ठेचा, अत्यंत, फारच, बेहद्द. Egre′giousness *n.*

Egress ( ē′-gres ) [ L. e ( *ex* ), out & *gradi*, *gressus*, to step. ] *n. the act of going out or leaving, departure* बाहेर जाणें *n*, निघणें *n*, निर्गमन *n*, निस्सरण *n*, निष्क्रमण *n*, निर्याण *n*; as, "The gates barred over us, prohibit all E." २ *the power to leave* निष्क्रमणशक्ति *f.* ३ *astron. the passing off from the sun's disk of an inferior planet in a transit* निष्क्रमण *n.* Egress *v. i. to go out, to depart, to leave* बाहेर जाणें, निघणें. Egressed′ *pa. t.* & *pa. p.* Egress′ing *pr. p.* & *v. n.* Egres′sion *n.* ( R. ) See Egress *n.* Egres′sor *n.* ( R. )

Egret ( ē′-gret ) [ M. Fr. *egrette*, *aigrette*, a dim. from an old form *aigre*, from O. H. Ger. *heiger*, a heron.] *n. zool.* एका जातीचा बगळा *m.* २ *a plume or tuft of feathers worn as a part of a head-dress or anything imitating such an ornament, an aigrette* तुरा *m*, कलगी *f*, झेंडा *m.* ३ *bot. the flying feathery or hairy crown of seeds* (as the down of the thistle ) कुसुवांचा तुरा *m.* ४ *zool. a kind of ape* एका जातीचें माकड *n.*

Egrette ( ē-gret′ ) Same as Egret *n.*

Egyptian ( ē-jip′-shun ) [From *Egypt*, Gr. *Aiguptos.*] *a. pertaining to Egypt* मिसरदेशीय, इजिप्तसंबंधीं, इजिप्शन, मिसर देशाचा. E. *n. a native of Egypt* इजिप्तमध्यें राहणारा, इजिप्शन, इजिप्तदेशीय-मनुष्य *m.* २ *the Egyptian language* इजिप्शन-मिसरी भाषा *f.* E′gyptize *v. t. to give an Egyptian character or appearance to* इजिप्शनाचा गुण *m*-रूप *n*-आकार *m.* देणें. E′gyptized *pa. t.* & *pa. p.* E′gyptizing *pr. p.* & *v. n.* Egyptol′oger, Egyptol′ogist *n. one skilled in the antiquities of Egypt* इजिप्शन-पुराणवस्तुशास्त्रवेत्ता *m.* *spec.* मिसरलिपिवेत्ता *m.* Egyptol′ogy *n. the science or study of the antiquities of Egypt esp. the hieroglyphics* इजिप्तमधील प्राचीन वस्तूंचा अभ्यास *m*, (मुख्यतः ) चित्राक्षरांचा अभ्यास *m.*

Eh ( ā, or ĕ ) *interj. an expression of inquiry or slight surprise* आं !, उः!, अरे !, रे !.

Eider ( ī′-der ), Eider-duck ( ī′-der-duk ) [ Ger. *eider* ; Swed. *eider*; Icel. *aedcr*; Dan. *eder.* ] *n. the duck itself* आपल्याच पिसांच्या लवेनें आपलें घरटें मऊ करणारें बदक *n.* Eider-down *n. the down of the duck, which is much valued for its warmth, lightness and elasticity* बदकावरची लव *f.*

Eidograph ( ī′-dō-graf ) [ Gr. *eidos*, likeness & *graphein*, to write. ] *n. an instrument for copying drawings on the same or a different scale* एखाद्या चित्राच्या ( Drawing ) लहान किंवा मोठ्या प्रमाणाच्या प्रतिमा काढण्याचें यंत्र *n*, प्रतिमालेखक (यंत्र).

Eidolon ( ī-dōl′-on ) [ Gr. image. ] *n. an image or representation, a phantom, an apparition* प्रतिमा *f*, मूर्ति *f.*

Eight ( āt ) [ A. S. *eahta*; Ger. *acht*, L. *octo*, Gr. *okto*, Sk. अष्टन्.] *n.* आठ *pl.*, आठांचा आंकडा *m.* २ आठ ही संख्या दाखविणारी खूण *f.* E. *a.* आठ, अष्ट. Eight-day *a.* आठ दिवसांचा, आठ दिवस चालणारा. Eighteen′ *n.* & *a.* अठरा. Eight′eenmo *n.* & *a.* अष्टादशपत्री. Eight′eenth *n.* & *a.* अठरावा. Eight′fold *a.* आठघडी, आठपट. Eighth *a.* आठवा. Eighth′ly *adv.* Eight′ieth *n.* & *a.* ऐशींचा. Eight score *n.* & *a. eight times twenty, a hundred and sixty* एकशें-साठ, आठ कोडी *f. pl*, आठविसा-इसा. Eight′y *n.* & *a.* ऐशीं.

Eikon ( ī-kon [ Gr. ] *n. a likeness, an image, a statue* ( used rather in an abstract sense, and rarely for a work of art. Same as Icon.) मूर्ति *f*, प्रतिमा *f.*

Either ( ī′-ther ) [ M. E. *either*—A. S. *ægther*, contracted from *æghwaether*, compounded of *a* –aye, the pref. *ge* & *hwaether* = whether]. *a.* & *pron. one of two, the one or the other* ( properly used of two things, but sometimes of a larger number, for *any one* ) दोहोंपैकीं एक, दोहोंपैकीं पहिला किंवा दुसरा, अन्यतर (S.), एकतर (S.). *either* ह्या शब्दाची योजना दोहोंपैकीं एक अशा अर्थींच बहुधा करितात, पण क्वचित् दोहोंपेक्षां ज्यास्त संख्या उद्दिष्ट असतांही *either* या शब्दाचा प्रयोग आढळतो. व त्या वेळेस त्याचा अर्थ '(पैकीं) कोणीही एक' असा होतो; जसें, "Scarce a palm of ground could be gotten by *either* of the three." २ *each of the two or both* (formerly, also, each of any number) दोहोंपैकीं प्रत्येक, दोन्ही, दोनही, दोघे; as, "His flowing hair in curls on *either* cheek played." E. *conj.* *Either* precedes two, or more, co-ordinate words or phrases, and is introductory to an alternative. It is correlative to *or.* पक्षांतराची विवक्षा असतां पहिल्या पक्षाच्या आरंभीं *either* व दुसऱ्या पक्षाच्या आरंभीं *or* हे शब्द योजितात, व अशा रीतीनें *either* व *or* हीं अव्ययें परस्परसंबंधी असतात; as, "*Either* he is talking, *or* he is pursuing, *or* he is in a journey, *or* peradventure he sleepeth."

*N. B.*—Few writers hesitate to use *either* in what is called a triple alternative; such as, "We must *either* stay where we are, proceed *or* recede." *Either* was formerly sometimes used without any correlation, and where we should now use *or.*

Ejaculate ( ē-jak′-ū-lāt ) [ L. *ejaculor*, *ejaculatus*, L. *e* (*ex*), out and *jaculum*, a dart, L. *jacere*,

to throw.] *v. t.* (*archaic or technical*) *to throw suddenly, and swiftly, as if a dart* (अस्त्राप्रमाणें) एकदम भरकन् फेंकणें, टाकणें, क्षेपण *n.* करणें. २ *to throw out as an exclamation* टाकणें, बाहेर मध्येंच एकदम ओरडणें-बोलणें, (चा) उद्गार *m.* काढणें. ३ (पिचकारीसारखें) उत्सेचन *n.* करणें. E. *v. i.* (R.) उद्गार *m.* निघणें-काढणें, उद्गारणें; as, "Ejaculating to himself." Ejaculā'tion *n. the act of throwing or darting out with a sudden force and rapid flight* फेंकणें *n.*, असन (S.) *n*; as, "An ejaculation or irradiation of the eye." Bacon. २ *the uttering of a short, sudden exclamation or prayer, or the exclamation or prayer uttered* उद्गार *m*, प्रार्थनेचा उद्गार *m*, उद्गारित प्रार्थना *f.* ३ *physiol.* उत्सेचन *n*, शुक्रोत्सेचन *n*. Ejac'ulator *n. anat. a muscle which helps ejaculation* उत्सेचक, शुक्रोत्सेचक, मूत्रोत्सेचक. Ejac'ulatory *a.* उत्क्षेपक, बाहेर टाकणारें, उत्सेचक. २ उद्गारलेलें, एकदम-आकस्मिक बाहेर आलेलें, उद्गारित.

Eject (ē-jekt') [L. *e* (*ex*), out of & *jacio, jectum*, to throw.] *v. t. to cast or throw out, to expel, to dismiss* बाहेर घालवणें, काढणें, काढून देणें, टाकणें, हाकलून देणें, हकालणें, निष्कासन *n*- निस्सारण *n.* करणें *g. of o.*, बडतरफ करणें, हद्दपार करणें. २ *law. to cast out, to evict, to dispossess* काढून टाकणें, घालवून लावणें; as, "To E. tenants from an estate." Ejec'tion *n. the act of casting out, expulsion, evacuation* घालवणें *n*, निस्सारण *n*, निरासन *n*, निरास *m*, उत्क्षेप *m*, बाहेर पाडणें *n*; as, "Vast E. of ashes;" "The E. of a word." २ *physiol. the act or process of discharging anything from the body, particularly the excretions* मलविसर्जन *n*, शरीरांतील मल बाहेर टाकणें *n*. ३ *dispossession, banishment*, काढून टाकणें *n*, हद्दपार करणें *n*, बाहेर घालविणें *n*. Eject'ment *n. a casting out, a dispossession, an expulsion* बाहेर घालवणें *n*, बाहेर काढणें *n*, निष्कासन *n*. २ *law.* काढून टाकणें *n*, हुसकवून देणें-लावणें *n*; as, "The E. of tenants from their homes." Ejec'tor *n. one who, or that which, ejects or dispossesses* बाहेर काढणारा-घालविणारा *m*, निष्कासक *m*. २ *mech. a jet pump for lifting water or withdrawing air from a space* उत्क्षेपक *m*, उत्सर्जक.

Eke (ēk) [A. S. *ecan*, to increase, to eke; Icel. *auka*; Goth. *aukan*; L. *augere*; Sk. ओजस्, *strength*.] *v. t. to add to, to enlarge by addition* (generally with *out.*) (भर घालून) वाढविणें; as, "He eked out his income by odd jobs." Eked *pa. t.* & *pa. p.* E'king *pr. p.* & *v. n.* E. *adv.* (*obs.*) *in addition, likewise* तसाच, आणखी; as, "A train-band captain *eke* was he of famous London town." E. *n.* (R.) *an addition* वृद्धि *f*, वाढवणें *n*, भर *f*.

Elaborate (ē-lab'-ō-rāt) [L. *e*, out and *laborare*, to labour,—*labor*, labour.] *v. t. to produce with labour, to work out or complete with great care, to work out fully or perfectly* मोठ्या श्रमानें-मेहनतीनें तयार करणें, (अगदीं बारीक सारीक गोष्टीकडे सुद्धां पूर्ण लक्ष्य पुरवून) बनविणें-तयार करणें, (पुनः पुनः महत्प्रयासानें-काळजीपूर्वक) दुरुस्ती करून सुधारणें; "To E. a painting or literary work." E. *a. wrought with labour, finished with great care, highly finished* मोठ्या श्रमानें-कष्टानें केलेला, संस्कृत, बहुश्रमसिद्ध, श्रमसाधित, महाप्रयत्नविरचित, मेहनतीचा, मशागतीचा; as, "An E. discourse, performance, research, &c." Elab'orately *adv.* मोठ्या श्रमानें-कष्टानें-मेहनतीनें, संस्कार-परिष्कार-पूर्वक. Elab'orateness *n.* Elaborā'tion *n. improvement by successive operations, refinement* सुधारणा *f*, संस्कृति *f*, संस्कार *m*, शोधन *n*. २ *physiol. the process performed by living organs in animals and plants by which something of a higher order is produced* समुत्पादन *n*; as, "The E. of chyle, sap, or tissues." Elab'orative *a.* श्रमसाधक, श्रमानें-काळजीपूर्वक साधणारा. Elaborative faculty (*metaphysics.*) *the discursive faculty, thought* विचारशक्ति *f*, वस्तूंचे संबंध जाणण्याची शक्ति *f*. Elab'orator *n.* श्रमानें बनविणारा-सुधारणारा, मोठ्या श्रमानें तयार करणारा. Elab'oratory *a. tending to elaborate* मोठ्या श्रमानें तयार करण्याकडे कल असलेला. E. *n.* (*obs.*) *a laboratory* रसायनशास्त्राची शाळा *f* (as सुतारशाळा, लोहारशाळा &c.), रासायनिक विद्यागृह *n*, प्रयोगशाळा *f*.

Elæoptene (ēl-ē-op'tēn) [Gr. *elaion*, olive-oil and *ptenos*, winged.] *chem. n. the more liquid or volatile portion of certain oily substances*, (*as distinguished from stearoptene, the more solid parts*) तेलकट पदार्थांतील फार पातळ किंवा उडून जाणारा भाग *m*.

Elaine (ē-lā'-in) [Gr. *elainos*, pertaining to the olive, *elaia*, the olive.] *n. the liquid principle of oils and fats, olein* तेलांतील व चरबींतील द्रवतत्त्व *n*. Elāic *a.*

Elan (ā-län') [Fr.—from *elancer*, to dart.] *n. ardour inspired by passion or enthusiasm* विकारवशतेनें किंवा विशेष उत्साहानें आलेलें औत्सुक्य *n*, तरतरी *f*, वारें *n*, भर *f*.

Elapse (ē-laps') [L. *elabi, elapsus*, to glide away.] *v. i.* (usually in reference to *time*) *to slip or glide away, to pass away silently* जाणें, होऊन जाणें, लोटणें, उडणें, गुजरणें, गुदरणें; as, "Eight days elapsed; at length a pilgrim came." Elap'sion *n.* (R.) गुदरणूक *f*, गुजारणा *f*.

Elastic (ē-las'tik), Elastical (ē-las'tik-al) [L. *elasticus*.—Gr. *elastos*, beaten out, extensible, —Gr. *elaunein*, to beat out, to drive.] *a. springing*

back; *having the power of returning to the form from which a thing is bent, drawn, pressed or twisted* स्थितिस्थापक, वेतसवृत्ति, लवचीक; as, "A bow is elastic; The air is elastic, India-rubber is elastic." २ *possessing the power or quality of recovering from shocks and trials* लवचीक, कंदुकवृत्ति (*fig.*), वेतसवृत्ति (*fig.*); as, "An elastic constitution; Elastic spirits." E. *n.* (*collog.*) *an elastic woven fabric.* (as a belt, braces or suspenders, etc. made in part of India-rubber.) (रबर घालून विणलेल्या दोरीचा) लवचीक-लास्टिक तुकडा *m.* Elas'tically *adv.* लवचीकपणानें, वेतसवृत्तीनें. Elasti'city *n. the quality of being elastic, springiness, tendency to rebound* स्थितिस्थापकता *f,* स्थितिस्थापक गुण *m,* लवचीकपणा *m.* २ (*fig.*) *power of resistance to, or recovery from depression or overwork* प्रकृतिप्रापकता *f,* वेतसवृत्ति *f.* Elas'ticness *n.* लवचीकपणा *m,* स्थितिस्थापकता *f,* स्थितिस्थापकत्व *n.*

Elate (ē-lat') [L. *elatus*, elevated, (*fig.*) elated, proud, from *e*, out & *latus*, (used as p. p. of *ferre*, to bear and allied to *Tollere*, to lift up to elevate.] *a.* (R.) *lifted, raised, elevated* वर उचललेला, उंच केलेला. २ *flushed or exalted with confidence or hope* हर्षानें चढलेला-फुगलेला, हर्षपुष्ट, हर्षप्रफुल्लित, हर्षोन्नत, शेफारलेला. E. *v. t.* (R.) *to raise, to exalt* चढवणें; as, "By the potent sun elated high." २ *to fill with confidence or exultation* चढून-फुगून जाणें, हर्षानें चढवणें-फुगवणें, हर्षपुष्ट-हर्षप्रफुल्लित करणें; as, "Foolishly elated by spiritual pride." Elated *pa. t.* & *pa. p.* हर्षानें चढलेला, फुगलेला, हर्षपुष्ट, हर्षफुल्लित. Ela'ting *pr. p.* & *v. n.* Ela'tedly *adv.* हर्षप्रफुल्लतेनें. Elat'edness *n.* हर्षप्रफुल्लता *f.* Ela'ter चढविणारा *m,* हर्षानें-गर्वानें फुगविणारा *m.* Elā'tion *n.*

Elater (el'a-ter) [Gr. *elater*, driver.] *n. bot.* (अपुष्पवनस्पतींच्या) बिया उडविणारा पिळदार तंतु *m.*

Elaterium (ē-la-tē'-ri-um) [L. Gr.-*elaterion. neut. of elaterios*, driving, purgative–Gr. *elater*, a driver, from *elaunein*, to drive.] *n. a cathartic substance obtained, in the form of yellowish or greenish cakes, as the dried residue of the juice of the wild or squirting cucumber* एक प्रकारचें विरेचक द्रव्य *n.* हें हिरवट अथवा पिंवळसर रंगाच्या वड्यांच्या रूपानें सांपडतें. ह्याच्या ऐवजीं आपलेकडील कांटेरी इंद्रायण चालतें.

Elbow (el'-bō) [A. S. *elboga*, *elnboga*,—(akin to Icel. *olnbogi*, prop, arm-bending) *eln*, fore-arm and *boga*, a bending. See ell & bow.] *n.* कोंपर *m.* *n,* कूर्पर *m.* २ *any turn or bending like that of the elbow* (as, in a wall, building, etc.) कोंपरा *m,* वांकण *n.* ३ *a sudden turn in a line of coast or course of a river* वळण *n,* वळसा *m.* [At the elbow *very near, at hand* जवळच, हाताशीं. Elbow-grease *n. energetic application of force in manual labour* हातकामामध्यें जोर-शक्ति लावणें, जोर करणें, जोरानें शक्तीचा उपयोग करणें. २ *perspiration excited by hard manual labour* अंगमेहनतीनें-शारीरिक श्रमानें येणारा-घाम *m,* (*fig.*) निढळचा घाम *m.* Elbow in the hawse (*naut.*) *the twisting together of two cables by which a vessel rides at anchor, caused by swinging completely round once* तिडा-तिढा-वळसा पडणें. Elbow scissors कोंपरकातरी *f,* वांकड्या पानाची-पात्याची कातरी *f.* हिचा शस्त्रक्रियेमध्यें उपयोग होतो. कूर्परकातरी *f,* कूर्परिका *f.* [Out at elbows *shabby, in needy circumstances* ज्याचे कोंपरे फाटले आहेत असा आंगरखा घातलेला, कोपरांत-कोपरे फाटलेला आंगरखा घातलेला, गरीब, नातवानीचा, अडचणींत सांपडलेला.] E. *v. t. to push aside with the elbow* (as when one walks in an overcrowded street) कोंपरखळी *f-* कोंपरढोंसणी *f-* मारणें, कोंपरानें रेटणें-मारणें-ढोंसणें; as, "They (the Dutch) would E. our own aldermen off the Royal Exchange." To elbow one's way वाट काढणें, गर्दीतून कोंपरे मारून-कोंपरानें ढकलून वाट काढणें-घुसणें, कोंपरानें रेंटीत-बाजूला सारीत-पुढें घुसणें. E. *v. i. to jut into an angle* कोन येणें, बांकणें, पुढें येणें, वांक-वांकण-बांक-बांकण येणें. २ *to push rudely along* कोंपरानें रेटीत पुढें जाणें, घुसणें; as, "Purse-proud, elbowing insolence." El'bowed *pa. t.* and *pa. p.* El'bowing *pr. p.* and *v. n.* Elbow-board *n.* हात ठेवण्याचा अडणा *m,* खिडकीच्या चौकटीची खालची बाजू *f.* El'bow-chair *n. a chair with arms to support the elbows, an arm-chair* हाताची-हात असलेली खुर्ची *f,* हातखुर्ची *f.* Elbow-room *n. ample room for motion or action, free scope* कोंपर लांब करण्याला जागा *f-* अवकाश *m,* प्रशस्त जागा *f;* as, "My soul hath elbow-room."

Eld (eld) [A. S. *old*, an age, *eldo*, old age.] *n.* (*poetic*) *old age, decrepitude, old time, former age* म्हातारपण *n,* पुरातनकाल *m,* जुना काळ *m;* as, "Astrologers and men of E."

Elder (el'-der) [A. S. *yldra*, (*caldra*,) the *comp.* of, *eald*, old., *vide* old.] *a. older, more aged or existing longer* वयानें मोठा; as, "The E. members of the family." २ *born before another, senior, earlier, older* (now gener. applied to a son, daughter, child, brother, &c.) थोरला, वडील, ज्येष्ठ; as, "The E. shall serve the younger." Elder hand (पत्त्याच्या खेळांत) पहिला उतरणारा *m.*

Elder (el'der) [A. S. *ealdor*, an elder, a prince, -*eald*, old.] *n. a superior in age, a senior* वयानें थोर, वडील *pl.,* गुरुजन *m. pl,* पूज्य-वृद्ध माणूस *m.* २ (R.) *an aged person, a predecessor* पूर्वज, बापदादा, वाडवडील, मागले, मागील पुरुष; as, "Carry your

head as your E.s have done." ३ *a person occupying any office appropriate to such as have the experience and dignity which age confers* वृद्ध, वयोवृद्ध, वयाच्या मोठेपणामुळेंच ज्याच्याकडे न्यायाधिशीचा अगर दुसरा कोणताही अधिकार आला आहे असा-अनुभववृद्ध; वय व अनुभव यामुळें मिळणारा कोणताही अधिकार धारण करणारा पुरुष *m*, वडील *m*; as, "The *elders* of Israel; The *elders* of the synagogue; The *elders* of the apostolic Church." ४ (in the Methodist Episcopal Church) *a clergyman authorised to administer all the sacraments* प्रेसबुतर *n*, वडील *m*, प्रभुभोजनादिविधी चालविण्याचा सर्व अधिकार ज्याच्याकडे आहे असा पाद्री *m*, वृद्धपाद्री *m*. El'derly *a. advanced beyond middle age, bordering on old age* पन्नाशी उलटलेला, उतार वयाचा, उत्तरवयस्क, वयस्क, वयोगत, पोक्त. El'dership *n. seniority* वृद्धता *f*, वडीलपणा *m*, वडीलकी *f.* २ *the office of an elder* ज्येष्ठत्व *n*, वडीलकीचा अधिकार *m*, ३ (collectively) *a body of elders* वडीलधारीं माणसें *n. pl*, वडीलमंडळी *f*, वृद्धमंडळी *f.* ४ *the order of elders* वडिलांचा-प्रेसबुतरांचा वर्ग *m*. El'dest *a. most advanced in age, that was born before others* सर्वांहून वडील-ज्येष्ठ, &c., पहिला, वडील, दादा, अग्रज. Presiding elder *meth. church.* ज्याला बिशपकडून जिल्ह्यांतील सर्व चर्चें-(ख्रिस्ती देवळें) व त्यांवरील पाद्री ह्यांवर देखरेख ठेवण्याचा अधिकार मिळाला आहे असा.

Elder (el'-der) [O. E. *ellern, eller.*—A. S. *ellen*; the *d* has been inserted in later times.] *n. bot.* एक जातीचें झाड *n*.

El Dorado (el'-dō-rädō *or* rādō) [Span. *el*, the, and *dorado*, gilt. *pa. p.* of *dorare*, to gild.] *n. a name given by the Spaniards in the 16th century to an imaginary country in the interior of South America reputed to abound in gold and precious stones* सोळाव्या शतकामध्यें स्पॅनिअर्ड लोकांनीं सोनें, रत्नें वगैरे मूल्यवान् पदार्थांनीं भरलेल्या दक्षिण अमेरिकेंतील एका काल्पनिक देशाला दिलेलें नांव *n*. 'एलडोराडो' नांवाची कल्पित सुवर्णभूमी *f.* २ *any region of fabulous wealth, exceeding richness* सुवर्णभूमि *f*, पैशानें-संपत्तीनें भरलेली-खोव्या-काल्पनिक संपत्तीनें भरलेली जमीन *f* जागा *f.* ३ विपुलतेचें-समृद्धीचें स्थान *n*; as, "The whole comedy is a sort of El Dorado of wit."

Eleatic (ē lē-a'tik) [L. *eleaticus*, from *Elea*, an ancient Greek town in Southern Italy.] *a. of or pertaining to a sect of Greek philosophers who taught that the only certain science is that which owes nothing to the senses and all to the reason* ग्रीक तत्वज्ञानाच्या एलिआटिक पंथासंबंधीं. २ *an adherent of the Eleatic School of philosophy* एलिआटिकपंथी. Eleaticism *n.* इंद्रियजन्य ज्ञानावांचून केवळ तर्कानेंच सिद्ध होणारें जें ज्ञान तेंच खरें ज्ञान होय असें ग्रीक मत *n*.

Elect (ē-lekt') [L. *eligere, electus*, to elect,—L. *e*, out & *legere*, to choose.] *a. chosen* निवडलेला, वरलेला, निवडून नेमलेला, पसंत केलेला. २ *theol. set apart to eternal life* निवडलेला, परम भागवत (?), ईश्वराची कृपा झालेला; as, "The elect angels." ३ *chosen or elected but not yet actually inaugurated, consecrated or invested with office* (कोणत्याही अधिकाराच्या जागेकरितां निवडलेले पण अद्याप) प्रत्यक्ष अधिकार ज्यांच्या हातांत आला नाहीं असे (भावी अधिकारी); as, "Bishop, Viceroy, Governor, &c. elect." E. *n. one chosen or set apart* पसंत केलेला मनुष्य *m*, निवडून काढलेला मनुष्य; as, "Behold my servant, whom I uphold; mine *elect* in whom my soul delighteth." २ *pl. theol. those who are predestined for salvation* मोक्षा-मुक्तीकरितां निवडलेले; as, "Shall not God avenge his own *elect*?" E. *v. t. to pick out, to select* निवडणें, वरणें (R.), निवडून-वेंचून घेणें-काढणें-नेमणें-योजणें; as, "The deputy *elected* by the Lord." २ *to select by vote* (मतें घेऊन) निवडणें-निवडून काढणें, बहुमतानें निवडणें, (मताधिक्यानें) पसंत करणें; as, "To E. a delegate, governor, president, &c." ३ *theol. to designate, choose or select* (as an object of mercy) पसंत करणें, (कृपापात्र) ठरविणें. Elec'tant *n.* (R.) *an elector* निवडण्याचा-निवडून देण्याचा अधिकार ज्याला आहे असा, निवडणारा-निवडून देणारा, मतदार, मताधिकारी. Elec'tion *n. the act of choosing, selection, choice* पसंती *f.* २ *the act of choosing a person to fill an office or employment by a manifestation of preference as by vote, ballot, uplifted hands, or viva voce* निवडणूक *f*, निवड *f*, निवडणें *n*, नियोजन *n*, वेंचणें *n*; as, "The E. of a municipal commissioner, a president, &c." ३ *free will, voluntary preference* पसंत करण्याची सत्ता *f*, अधिकार *m*, निवडण्याचा अधिकार *m*, निवड *f*, पसंती *f*; as, "By his own E. led to evil." ४ (*obs.*) *discernment, discrimination* विवेकशक्ति *f*, विवेक *m*, विचार *m*, पसंती *f*; as, "To use men with much difference and E. is good." *Bacon.* ५ *theol. divine choice, predestination of individuals as objects of mercy and salvation* (one of the five points of Calvinism) निवडणें *n*, व्यक्तिमात्राचें भवितव्य ठरविणें *n* (जसें, मोक्षाधिकारी-कृपापात्र, इ.); as, "There is a remnant according to the E. of grace" Rom. XI. 5. ६ *law.* निवडणूक *f*, निवड *f.* ७ *those who are elected* पसंत केलेलीं माणसें *n. pl.*, निवडून आलेलीं माणसें *m. pl.*, as, "The E. hath obtained it." Rom. XI. 7. [To contest an election निवडून यावें म्हणून चढाओढ करणें, झालेली निवड गैरवाजवी आहे

अशी तक्रार करणें.] To make one's election पसंत करणें,-ठरविणें. Elec'tioneer *v. t. to work or exert one's self in any way to secure the election of a candidate* (एखाद्या उमेदवाराच्या निवडणुकीकरितां) स्वतः हरप्रयत्न करणें, निवडून आणण्यासाठीं प्रयत्न करणें; as, "A master of the whole art of electioneering." Elec'tioneered *pa. t.* and *pa. p.* Elec'tioneering *pr. p.* and *v. n.* Elec'tioneer'er *n.* Elec'tive *a. selecting, exerting the power of choice* निवडीनें-निवडून केलेला; as, An E. act. २ *electoral* मताधिकारासंबंधीं, मताधिकाराचें, निवडून देण्यासंबंधीं, निवडून देण्याच्या हक्कासंबंधीं, पसंतीचें; as, "The independent use of their E. franchise." ३ *dependent on choice* पसंतीवर अवलंबून असलेलें, पसंतीनें होणारें, पसंतीचें, निवडणुकीनें होणारें-ठरणारें; as, "An E. Study; an E. office." [ELECTIVE AFFINITY OR ATTRACTION (*chem.*) योगशीलता *f.*] Elec'tive *n.* (*colloq.*) (*U. S.*) *an optional course of study* (अभ्यासाचा-विद्येचा) ऐच्छिक-वैकल्पिक भाग *m*-शाखा *f.* Elec'tively *adv.* पसंतीनें, निवडून देण्याच्या पद्धतीनें. Elector *n. one who is entitled to give his vote in favour of a candidate for office, a person legally qualified to vote* मतदार, निवडून देणारा, निवडून नेमणारा, निवडणारा, निवड करणारा, मत देण्याचा अधिकार असलेला मनुष्य *m*, मताधिकारी *m.* २ (*in the old German empire*) *one of the princes entitled to choose the emperor* (पूर्वीच्या जुन्या जर्मन राज्यांत) बादशाहाची निवड करण्याचा अधिकार ज्याला होता असा राजपुत्र *m.* ३ *one of the persons chosen by vote of the people in the United States, to elect the President & Vice President* युनायटेडस्टेट्समधील अध्यक्ष व उपाध्यक्ष यांची निवड *f*-नेमणूक करण्याकरितां किंवा हे निवडण्याचा अधिकार ज्यांना लोकमतानें मिळाला आहे अशांपैकीं एक मनुष्य *m.*

Electary *n. med.* See Electuary.

Electic *a.* See Eclectic.

Electicism *n.* See Eclecticism.

Electric (ē-lek'-trik), Electrical (ē-lek'-tri-kal) [Fr. *electrique.*-L. *electrum*-Gr. *electron*, amber, from the fact that the earliest electric phenomenon observed was the attraction of *amber* for light substances when rubbed.] *a. consisting of, containing, derived from, or produced by, electricity* विजेचा, विद्युतीचा, बिजलीचा, विद्युत्संबंधीं, विद्युद्विषयक, विद्युज्जात; as, "E. power; an E. jar; E. sparks; &c." २ *capable of occasioning the phenomenon of electricity* विद्युद्धर्मी, विद्युज्जननक्षम, विद्युज्जनक; as, "An E. machine or substance." ३ *electrifying, thrilling, magnetic* विद्युज्जागृत, विजेचा गुणधर्म असणारा, विद्युद्धर्मी, विजेसारखा संचार किंवा जागृति-शहारा उत्पन्न करणारा; as, "E. atmosphere or aura." [E. BATTERY *n.* विद्युद्घटमाला *f.* OR BETTER विद्युन्माला *f.* ELECTRICAL BRUSH *n.* विजेचा ब्रश *m.* E. CABLE *n.* विजेची तार *f*, विद्युद्रज्जु *f.* E. CANDLE *n.* विजेची मेणबत्ती किंवा विजेची बत्ती *f.* E. CANNON *n.* विजेनें उडणारी तोफ *f.* E. CLOCK *n.* विजेचें घड्याळ *n*, विद्युच्छक्तीनें चालणारें घड्याळ *n.* E. current विद्युत् प्रवाह *m*, विजेचा प्रवाह *m.* E. FLUID *n.* विद्युद्द्रव *m.* ELECTRICAL IMAGE *n.* विद्युत्प्रतिमा *f*, विजेनें उठलेली प्रतिमा *f.* E. LIGHT *n.* विजेचा दिवा *m*, विद्युद्दीप *m*, विजेची बत्ती *f*, विद्युत्प्रकाश *m.* E. OR ELECTRICAL MACHINE *n.* विजेचें यंत्र *n.* E. MOTOR *n.*, SEE ELECTROMOTOR विद्युच्चालक, विद्युत्प्रवाहजनकोपकरण. E. OSMOSE *n.* (*physics.*) SEE OSMOSE E. PEN. विद्युल्लेखनी *f*, विजेचें कलम *n.* E. RAILWAY *n.* विद्युच्छक्तीच्या योगानें चालणारी आगगाडी *f.* E. RAY विद्युत्किरण *n.* E. TELEGRAPH *n.* विजेचें तारायंत्र *n*, विद्युत्तिरोलेखन *n.*] E. *n.* (*physics.*) *a nonconductor of electricity, an amber, glass, resin, &c. employed to excite or accumulate electricity* विजेचा अवाहक पदार्थ; as, अंबर, कांच, राळ, गंधक वगैरे; यांचा उपयोग विद्युत् उत्पन्न करण्यास किंवा जागृत करण्यास किंवा संचित करण्यास करितात. Elec'trically *adv.* Elec'tricalness *n.* Elec'trician *n. one versed in the science of electricity* विद्युद्वेत्ता *m*, विद्युत्शास्त्रवेत्ता *m.* Electric'ity *n. pl.* Electricities. *a name for the cause or agent underlying certain phenomena called electric and usually spoken of as a fluid* वीज *f*, विद्युत् *f.* [ATMOSPHERIC E. वातावरणजन्यविद्युत् *f*, वातावरणांतील विद्युत् *f*, आकाशस्थ विद्युत् *f.* DYNAMICAL E. चलविद्युत् *f*, गतिविशिष्ट विद्युत् *f.* FRICTIONAL E. घर्षणजन्य विद्युत् *f*, घर्षणविद्युत् *f.* MAGNETIC E. चुंबकीय विद्युत् *f*, चुंबनजन्य किंवा चुंबनीय विद्युत् *f*, आयसकांतिज विद्युत् *f.* NEGATIVE E. ऋणविद्युत् *f.* POSITIVE E. धनविद्युत् *f.* RESINOUS E. लाक्षविद्युत् *f.* STATICAL E. स्थिरविद्युत् *f.* VOLTAIC E. व्होल्टकविद्युत् *f.* Dynamical E. गतिविशिष्टविद्युत् *f*, चलविद्युत् *f.* VITREOUS E. काचविद्युत् *f.*] २ *the science which treats of the phenomena & laws of electricity* विद्युच्छास्त्र *n.* ३ (*fig.*) *the electrifying energy or characteristic* विद्युद्धर्म *m*, वीज *f*, विजेसारखा गुण *m*, विद्युत्पादकशक्ति *f.* Electrifiable *a.* विद्युज्जागृत होण्याजोगा. Electrificā'tion *n.* विद्युज्जागृत करणें *n*, विद्युत् भरणें. Elec'trify *v. t. to communicate electricity to, to charge with electricity* वीज *f.* भरणें-घालणें, विद्युज्जागृत करणें; as, "To E. a jar." घटांत वीज भरणें, घटांत जागृति भरणें. २ *to cause electricity to pass through* -आंतून वीज नेणें; किंवा विद्युज्जागृत करणें; as, "To E. a limb or the body." ३ *to surprise with some sudden & brilliant effect, to thrill* (विजेसारखें) चकित-थक्क करणें, चकित करून सोडणें, शरीरांत विजेसारखा संचार करणें; as, "This patriotic sentiment E.d the audience." Elec'trify *v. i. to become electric* विद्युद्युक्त होणें, विजेनें जागृत होणें. Elec'trine *a. belonging to or made of amber* अंबराचा केलेला. Electrizā'tion *n.*

Electrize *v. t.* See Electrify. Electrizer *n.* Electro *a pref.* *signifying, pertaining to, produced by, producing or employing electricity &c.* विजेचा, विजेपासून झालेला, विद्युज्जनित, विजेसंबंधीं, वीज उत्पन्न करणारा, विद्युज्जनक; as, Electro-dynamics, Electro-magnet विद्युद्गतिशास्त्र, विद्युच्चुंबक. Electro *n.* *an electro-type* विद्युत्प्रतिमा *f.*; विजेनें उत्पन्न केलेली प्रतिमा *f.* Electro-ballistic *a.* Electro-ballistics *n.* *the art or science of measuring the force or velocity of projectiles by means of electricity* प्रक्षिप्तवस्तूंचा वेग किंवा जोर विजेनें मापण्याचें शास्त्र किंवा त्याची कला *f.* Electro-biologist *n.* विद्युज्जीवनशास्त्रवेत्ता *m.* Electro-biology *n.* *biol.* विद्युज्जीवनशास्त्र *n.* २ *that phase of mesmerism or animal magnetism, the phenomena of which are supposed to be produced by a form of electricity* विजेनें उत्पन्न केलेलें चित्ताकर्षण *n*- मोहनी *f.* Electro-bioscopy *n.* *biol. a method of determining the presence or absence of life in an animal organism with a current of electricity, by noting the presence or absence of muscular contraction* विजेच्या प्रवाहानें प्राण्याच्या शरीरांत जीव किंवा चेतना आहे कीं नाहीं हें त्यांतील स्नायूंच्या आंखडण्यानें पहाण्याचें शास्त्र *n.* Electro-capillarity *n.* विद्युत्कौशिकता *f.*; विद्युत्केशाकर्षकता *f.* Electro-chemical *a.* विद्युद्रासायनिक. Electro-chemistry *n.* विद्युद्रसायनशास्त्र *n.* Electro-chronograph *n.* *astron.* & *physics.* विद्युत्सूक्ष्मकालदर्शक. Electro-chronographic *a.* विद्युत्सूक्ष्मकालदर्शकासंबंधीं. Electrode *n.* विद्युन्मार्ग *m.* Electro-dynamic, Electro-dynamical *a.* विद्युद्गतिविषयक. Electro-dynamics *n.* *the phenomena of electricity in motion* विद्युद्गतिचमत्कार *m.* २ *the branch of science which treats of the properties of electric currents* विद्युद्गतिशास्त्र *n*, ज्यांत विद्युत्प्रवाहांच्या गुणधर्मांचें विवेचन केलें आहे असें शास्त्र *n.* Electro-dynamometer *n.* विद्युत्प्रवाहाचा जोर मापण्याचें यंत्र *n.* Electro-engraving *n.* विद्युत्प्रवाहानें खोदणें *n.* Electro-etching *n.* विजेनें आसिडाच्या साहाय्यानें धातूच्या पत्र्यावर किंवा कांचेवर खोदणें *n.* Electro gilding *n.* विद्युद्धात्वारोहण *n*, विजेनें मुलामा देणें. Electro-gilt *a.* विजेनें मुलामा दिलेलें, सोनें चढविलेलें. Electrograph *n.* विद्युल्लेख *n.* Electro kinetic *a.* Electro-kinetics *n.* (गतिविशिष्ट) विद्युल्लतेचें शास्त्र *n*, विद्युद्गतिस्थितिशास्त्र *n.* Electro-lier *n.* विजेचे दिवे बसविण्याचें झुंबर *n.* Electrol'ogy *n.* विद्युच्छास्त्र *n* विजेचें विवेचन करणारी सृष्टिशास्त्राची शाखा *f.* Electrol'ysis *n.* विद्युद्विच्छेदन *n.* विद्युद्विश्लेषण *n*, विद्युत्पृथक्करण *n.* Electroly'te *n.* *physics & chem.* विद्युद्विच्छेद्य, विद्युद्विकार. Electrolyt'ic, Electrolyt'ical *a.* विद्युद्विच्छेदनासंबंधीं. Electrolyt'ically *adv.* Electrolyzable *a.* विद्युद्विच्छेद्य. Electrolyzation *n.* विद्युद्विच्छेदनक्रिया *f.* Electrolyze *v. t.* *to decompose by the direct action of electricity* विद्युल्लतेनें पदार्थांचें रासायनिक पृथक्करण करणें. Electrolyzed *pa. t. & pa. p.* विद्युत्पृथग्भूत, विद्युद्विच्छेदित. Electro-magnet *n.* विद्युच्चुंबक. Electro-magnetic *a.* विद्युच्चुंबनीय. Electro-magnetism *n.* विद्युच्चुंबनशास्त्र *n.* Electro-metallurgy *n.* विद्युद्धात्वारोहण *n.* Electro'meter *n.* विद्युन्मापक. Electromet'ric,-al *a.* विद्युन्मापनसंबंधीं, विद्युन्मापकानें दाखविलेला. Electro'metry *n.* *physics.* विद्युन्मिति *f.* Electro-motion *n.* विद्युच्चलन *n*, विद्युत्प्रवहण *n.* Electro-motive *a.* विद्युच्चालक. [ ELECTRO-MOTIVE FORCE विद्युच्चालक शक्ति *f.*] Electro-motor *n.* विद्युच्चालक. Elec'tron *n.* *an atom of electricity* विद्युत्परमाणु *m.* २ (*obs.*) *amber, also the alloy of gold & silver called electrum* अंबर, किंवा सोनें वरुपें यांची वीज उत्पन्न करण्याची मिश्र धातु *f.* Electro-negative *n.* ऋणात्मक-विद्युत् *f.*, ऋणविद्युत् *f.* Ele'ctrophone *n.* विद्युत्स्वरयंत्र *n*, विद्युत्भणन *n.* Electro-ph'orus *a.* विद्युत्स्फुरक. Elec'tro-physiol'ogy *n.* विद्युदिंद्रिय-विज्ञानशास्त्र *n.* Elec'tro-plate *v. t.* विजेनें सोनें चांदी इत्यादि धातूंचा मुलामा चढविणें. Elec'tro-po'lar *a.* विद्युद्ध्रुव, विद्युद्ध्रुवीय. Elec'tro-pos'itive *n.* धनात्मकविद्युत् *f.*, धनविद्युत् *f.* Elec'tro-scope *n.* विद्युद्दर्शक. Elec'tro-statics *n.* विद्युत्स्थितिशास्त्र *n*, स्थिरविद्युच्छास्त्र *n.* Elec'tro-tint *n.* विजेनें धातूवर उठावाची नकशी काढण्याची पद्धत *f.* Elec'tro-type *v. t.* विजेनें टाईप किंवा प्रतिमा किंवा मुद्रणाक्षरें पाडणें. Elec'tro-typist *n.* विजेनें मुद्रणाक्षरें पाडणारा *m.*

Electuary ( ē-lek'-tū-ėr-i ) [ M. Fr. *electuaire*-L. *electuarium electarium*, a medicine that is licked away, Gr. *ek*, out & *leikein*, to lick. ] *n.* *med.* *a medicine composed of powders, or other ingredients, incorporated with some conserve, honey or syrup* लेह *m*, अवलेह *m*, चाटण *n.* *pl.* Electuaries.

Eleemosynary ( el'-ē-moz'-i-nėr-i ) [ L.L. *eleemosynarius*,–*eleemosyna*, alms,–Gr. *eleemosyne*, alms-*elein*, to pity,–*eleos*, compassion. See alms. ] *a.* ( a ) *relating to charity, alms, or alms giving* भिक्षे-दाना-धर्मादायासंबंधीं, भिके-खैरातीसंबंधीं. ( b ) *intended for the distribution of charity* भिक्षा वांटून देणारी; as, "An E. corporation, society, &c." २ *given in charity, or alms, having the nature of alms* दान *n*- भीक *f*- धर्म *m* म्हणून दिलेला, धर्मार्थ दिलेला, भिकेचा, भिक्षेचा, खैरातीचा, धर्मांचा, भैक्ष्य, दानरूप; as, "E. assistance;" "E. cures." ३ *supported by charity* भिकेवर-धर्मादायावर वाढलेला-जगलेला-राहिलेला-पोसलेला; as, "E. poor." E. *n.* *one who lives by receiving alms or charity* भिक्षेवर राहणारा-पोट भरणारा, भैक्ष्योपजीवी, भिक्षावृत्ति, भिकारी. *pl.* Eleemosynaries. El'eemosynarily *adv.* भिक्षावृत्तीनें.

Elegance,–cy ( el'-e-gans,–si ) [ Fr. *elegans*,–L. *elegantia*–*elegans* for *elegens*–*e* ( *ex* ), out & *legere*,

to pick, to choose. ] *n. grace given by art or practice, refinement, fine polish* (said of manners, language, style, architecture, &c.) सुशोभितपणा *m*, सुरेखपणा *m*, शोभा *f*, कांति *f*, श्री *f*, चारुता *f*, लावण्य *n*, सौन्दर्य *n*, थाट *m*. २ *that which is tasteful & highly attractive* सफाई *f*, लालित्य *n*, प्रौढी *f* (R.); as, "The beautiful wildness of nature without the nicer E.s of art." [ ELEGANCE OF SPEECH वाग्विलास *m*. ELEGANCE OF STYLE पदलालित्य *n*. ] El'egant *a. having beauty or pleasing effect resulting from grace, refinement, or polish; graceful, tasteful & highly attractive* सुंदर, थाटदार, शोभिवंत, सुशोभित, शोभेचा, सुरेख, भव्य (S.), चारु, उमदा, नामी; as, "E. manners; E. style of writing; an E. speaker; An E. structure." २ *exercising a nice choice, discriminating beauty or sensitive to beauty* मार्मिक, गुणग्राहक, रसिक, सौंदर्य *n*- खुमास *f*. जाणणारा-ओळखणारा; as, "E. taste." El'egantly *adv.* शोभेलसें, शोभापूर्वक, शोभेनें, कौशल्यानें, सुरेखाईनें, नामी. २ प्रशस्तपणानें, प्रौढीनें, सफाईनें.

*N. B.*—Elegance कृत्रिम सौंदर्य, थाट, लालित्य. Grace (=*attractiveness, winsomeness*) स्वाभाविक सौंदर्य, लावण्य, मोहकत्व, आकर्षकता.

Elegy (el'-e-ji) [ M. Fr. *elegie*–L. *elegia*,–Gr. *elegeia*, –Gr. *elegos*, a lament. ] *n. a mournful or plaintive poem, a funeral song, a dirge* शोकगीत *n*, शोकगान *n*, विलापगीत *n. pl.* Elegies. [E. SUNG BY MUHAMMADANS DURING THEIR MUHARRAM मरशा *m*.] २ (in Classic poetry) *any poem written in elegiac verse* पांच किंवा सहा 'भ'गणात्मक वृत्तानें रचलेलें काव्य *n*- कविता *f*. Ele'giac *a. plaintive, expressing sorrow or lamentation* शोकगीताचा, शोकगानाचा; as, "E. lay, strains, &c." २ *used in elegies* पांच किंवा सहा 'भ'गणात्मक वृत्ताचा-छंदाचा; as, "An E. verse, distich, couplet &c." E. *n. an elegiac verse* पांच किंवा सहा 'भ'गणात्मक वृत्तांची कविता *f*. Ele'giacal *a. elegiac* शोकगीताचा, शोकगीतासंबंधीं. Ele'giast, Ele'gist *n. a composer of elegies* शोकगीत रचणारा-बनवणारा. Ele'gize *v. t. to celebrate in elegiac verse, to lament in an elegy, to bewail* शोकगीतांत-शोकगीतें म्हणून शोक करणें, शोक *m*- दुःख *n*. करणें, (-च्या निधनासंबंधानें) शोकगीतें रचणें.

Element (el'-e-ment) [Fr.–L. *elementum*, an element, a first principle; same root as in *Aliment.* ] *n. one of the simplest constituents, principles, or parts of anything* तत्व *n*, मूलतत्व *n*, मूलवस्तु *f*, मूलद्रव्य *n*, मूलकारण *n*. [ THE SEVEN ELEMENTS OF THE BODY सप्तधातु *f. pl.* ] २ *one of the ultimate, undecomposable constituents of any kind of matter; specifically chem. a substance which cannot be decomposed into different kinds of matter by any means at present employed* मूलतत्व *n*, तत्व *n*. ३ (a) *one of the ultimate parts which are variously combined in anything* (मूल)घटक *m*, अवयव *m*, घटकावयव *m*, भाग *m*, अंश *m*, अवश्यक अंश *m*; as, "Letters are the E.s of written language." (b) hence, also, *a simple portion of that which is complex* अवयव *m*, भाग *m*. (as a shaft, lever, wheel, &c. in a machine.) (c) *a constituent part* घटक *m*, घटकावयव *m*; as, "Quartz, feldspar and mica are the E.s of granite." ४ *one of the several parts combined in a system of aggregation when each is of the nature of the whole* (as a cell in the honeycomb, a blood corpuscle, a muscular tissue, etc.) (वस्तुसंघातांतील) व्यक्तिशः पूर्ण असी वस्तु *f*, पूर्णघटक *m*. ज्याप्रमाणें मधाच्या पोळ्यांत प्रत्येक घर ही स्वतंत्र पूर्ण वस्तु आहे. ५ *biol. the cells of which animal and vegetable organisms or their tissues and organs are composed* मूलपिंड *m*, मूलपेशी *f*, घटक *m*, पिंड *m*. ६ *math.* (a) घटक *m*, अवयव *m*. (एखाद्या वक्राचा किंवा पृष्ठतलाचा किंवा घनाकृतीचा) मूल बिंदु *m*, मूल वक्र *m*, मूल-घटकपृष्ठतल *m*. (b) *a differential* (एखाद्या फलाची) तात्कालिक गति *f*. (c) *one of the terms in an algebraic expression* घटकपद *n*, पद *n*. ७ *one of the necessary data upon which a system of calculations depends or general conclusions are based* बीज *n*, मूळ *n*, बीजभूतज्ञान *n*; as, "The E.s of a planet's orbit." ८ *pl. the rudiments of any system in philosophy, science, or art* मूलतत्वें *n. pl*; as, "The E.s. of chemistry, geometry, music &c." ९ *pl. any outline or sketch considered as containing the fundamental ideas or features of the thing in question* (अमुक एक विषयाची) रूपरेषा *f*, (प्रधानांगनिदर्शक) बाह्य रेषा *f*, मूल कल्पना *f*, मूल लक्षणें *n. pl.*; as, "The E.s of a plan." १० *one of the four constituents of the material world* (as air, earth, water and fire.) महाभूत *n*, जुन्या इंग्रजी कल्पनेप्रमाणें पृथ्वी, आप, तेज, व वायु ह्या चार महाभूतांपैकीं एक *n*. ११ *the state of sphere natural to anything or best suited for its existence* स्वाभाविकस्थान *n*, (जीवनार्थ) सुखावहस्थान *n*, स्थान *n*, स्वस्थान *n*, जीवनक्षेत्र *n*, स्वक्षेत्र *n*; as, "They show that they are out of their E." १२ *the conditions and movements of the air* चार महाभूतांची स्थिति *f*, महाभूतें *n. pl*; as, "The E.s be kind to thee." (b) सामुग्री *f*, आवश्यक पदार्थ *m. pl*; as, "The E.s of the alchemists were salt, sulphur and mercury." १३ *the whole material of which the world is composed* वस्तुमात्र *n*, वस्तुजात *n*, तत्वें *n. pl*; as, "The E.s shall melt with fervent heat." १४ *pl. Eccle. the bread and wine used in the Lord's Supper* (ख्रिस्ती

प्रभुभोजनाचे वेळीं घेण्याचा ) द्राक्षासव आणि रोटी *f.* E. *v. t.* (*obs.*) *to compound of first principles* मूलतत्त्वांपासून-मूलतत्त्वें घेऊन बनविणें-घडविणें-जोडणें; as, "( Love ) being *elemented* too." २ *to constitute* बनविणें, घडविणें; as, "His very soul was *elemented* of nothing but sadness." Elemen'tal *a. pertaining to the first principles and primary ingredients, or to the four supposed elements of the material world* तत्त्वा-मूलतत्त्वासंबंधीं, भौतिक, पंचभूतात्मक, आधिभौतिक, भूतविषयक; as, "E. air; E. strife." २ *elementary, rudimentary, fundamental* प्राथमिक, आरंभींचा. ( b ) तात्त्विक, तत्त्वासंबंधी; as, "E. rules of erudition." Elemen'talism *n. the doctrine that the heathen divinities originated in the personification of elemental powers* ( पंच ) महाभूतांच्या विशाल शक्तींवर मनुष्यधर्मांचा आरोप होऊनच मूर्तिपूजकांच्या देवतांची उत्पत्ति झाली आहे असें मत *n.* El'emental'ity *n. the condition of being composed of elements* तत्त्वांच्या योगानें घडलें जाणें *n*-घडणें *n.* ( b ) *the thing so composed* तत्त्वघटित वस्तु *f.* Elemen'tally *adv. literally, according to elements* मूलतत्त्वाप्रमाणें, अक्षरशः, शब्दशः; as, "E. understood Words." Elemen'tariness, Elementa'rity *n.* मूलावस्था *f*, तत्त्वावस्था *f*, तत्त्वभूतता *f*, मूलभूतता *f*, मूलस्थिति *f*, अमिश्रस्थिति *f.* Elemen'tary *a. consisting of a single element, simple* एकतत्त्वात्मक, एकतत्त्वमय-रूप, तत्त्वरूप, मूल, अमिश्रित, तत्त्वात्मक; as, "An E. substance." २ *pertaining to or treating of the first principles of anything* तत्त्वसंबंधीं, तत्त्वविषयक, तत्त्वविचारात्मक; तत्त्वविचारी, प्राथमिक, आरंभींचा, केवळ मूलतत्त्वात्मक; as, "An E. treatise." ३ *pertaining to one of the four supposed elements, air, water, earth and fire* चार ( पृथ्वी, आप्, तेज व वायु ) तत्त्वांपैकीं कोणत्याही एकासंबंधीं-विषयक, तत्त्वात्मक, एकतत्त्वरूप, भौतिक; as, "Some luminous and fiery impressions in the E. region." Elementā'tion *n.* ( R. ) *instruction in the elements or first principles* ( केवळ ) मूलतत्त्वांसंबंधीं शिक्षण *n*-माहिती *f*- ज्ञान *n.* El'ementoid *a. resembling an element* मूलतत्त्वसदृश, मूलतत्त्वासारखें. To be in one's element स्वाभाविक स्थितींत-स्वक्षेत्रांत असणें. To be out of one's element ( स्वभाव ) विरुद्धस्थितींत असणें, एखाद्यास परक्या परक्यासारखें वाटणें.

Elench, Elenchus ( ē-lenk', -us ) [L. *elenchus*, -Gr. *elenchos*, -*elenchien*, to confute, to prove.] *n. pl.* Elenchs, Elenchi. *log. a refutation* निराकरण *n.* २ *a sophism, a specious but fallacious argument* हेत्वाभास *m*, (दिसण्यांत निर्दोष परंतु खरोखर-वस्तुतः) सदोष विधान *n.* Elen'chical *a.* Elen'chically *adv.*

Elephant ( el'-ē-fant ) [ Fr. *elephant*-L. *elephas*, *elephantis*—Gr. *elephas*, an elephant—Heb. *eleph* an ox. See Alpha. Sk. इभ.] *n.* हत्ती *m*, हस्ती *m*, गज *m*, कुंजर *m*, मातंग *m*, वारण *m*, करी *m.* [ BELL OF AN E. गजघांट *f.* BODY-CLOTH OF AN E. झूल *f.* CARRIER OF SPEAR BEFORE AN E. गडेकरी *m.* CHAIN OR ROPE OF FOOT OF AN E. अंदू *m.* DRIVER OR KEEPER OF AN E. माहात *m.* E. IN RUT मदोत्कट कुंजर-गज. E. WITHOUT TUSKS मत्तहत्ती, मुकणा हत्ती. E.S CONSIDERED AS AN ARM OF AN ARMY गजभार *m*, कुंजरभार *m.* EXUDATION FROM THE TEMPLES OF AN E. हस्तिमद *m*, मद *m*, सिंधु *m.* FEMALE E. हत्तीण *f*, कुंजरी *f*, करेणु *f.* FOOT-HOLD FOR THE RIDER OF AN E. कलावा OR किलावा *m.* FRONTAL GLOBE ON FOREHEAD OF AN E. कुंभ *m.* GOAD OF AN E. अंकुश *m.* HEAD-CLOTH OF AN E. श्री *f.* NAIL OF THE FOOT OF AN E. ( IT IS USED MEDICINALLY ) गजनख *n.* PLACE WHERE E.S ARE TIED UP गजशाला *f.* SCREAM OR CRY OF THE E. किंकाळी *f*, किराळी *f*, किंळ *f.* SEAT BEHIND THE TOWER OF AN E. FOR THE PAGE खवासखाना *m*, खवासा *m.* TEMPLE OF THE E. गंड *m*, गंडस्थळ *n*, कट *m.* TIP OF THE TRUNK OF AN E. पुष्कर *n.* TOWER OF AN E. ( CANOPIED ) अंबारी *f*, चंवरडोल *m.* TOWER OF AN E. ( WITHOUT CANOPY ) हौदा *m.* TROOP OR BODY OF E.S गजभार *m*, कुंजरभार *m*, गजयूथ *m.* ] २ (*obs.*) *ivory, the tusk of an elephant* हस्तिदन्त *m*, हत्तीचे सुळे *m. pl.* -दांत *m. pl* Elephant paper २८ इंच लांब व २३ इंच रुंद कागद *m.* Double elephant paper ४० इंच लांब व २६¾ इंच रुंद कागद *m.* Elephant Seal समुद्रांतील हत्ती *m.* Elephan'tiac *a. med. affected with elephantiasis* श्लीपदार्त. Elephanti'asis *n. med. a disease of the skin, in which it becomes enormously thickened, and is rough, hard and fissured, like an elephant's hide* वारूळ *n*, वल्मीक *m*, हत्तिरोग *m.* Elephan'tine *a. pertaining to an elephant or resembling an elephant (commonly in size)* हत्तीचा, गजाकार, हस्तिविषयक-संबंधीं, हत्तीसारखा; as, E. proportions. २ hence, *huge, enormous, heavy* मोठा, हत्तीच्या आकाराचा, बोजड, अवजड, अगडबंब, जड. Elephantoid', Ele'phantoid'al *a. resembling an elephant in form or appearance* ( आकारानें अगर स्वरूपानें ) हत्तीसारखें, हत्तीशीं साम्य असलेलें, हस्तिसदृश.

Elephantiasis. See elephant.

Eleutheromania (e-lū'-therō-mā'-nia) [Gr. *eleutheros*, free + *mania*, madness. ] *n.* ( R. ) *excessive zeal for freedom* स्वतंत्रतेची उत्कट इच्छा *f*, स्वतंत्रतेबद्दल फाजील हांव *f*, स्वतंत्रतेचें वेड *n.* Eleu'theroman'iac *n. a fanatic on the subject of freedom* स्वतंत्रतेबद्दल उत्कट इच्छा किंवा वेड असलेला.

Elevate (el-e-vāt) [ L. *e* (*ex*), out and *levare*, *levatum*, to raise, from *levis*, light in weight.] *v. t. to lift up*,

*to raise* (सखलांतून) उंचावर नेणें, वर उचलणें-उठवणें, चढवणें; as, "To elevate a weight, a flagstaff, etc." २ *to promote* (वरच्या पदास-दर्जास-अधिकारास) चढविणें, (पदवी-अधिकार-मान) वाढविणें, (मोठ्या पदवीस-अधिकारास) चढविणें, (-ची) बढती देणें; as, "To E. to an office, or to a high social position." ३ *to animate, to cheer* उत्साह आणणें, उत्तेजित करणें, उल्लसित करणें; as, "To E. the spirits." ४ *to dignify, to ennoble* प्रतिष्ठित-थोर करणें, उदात्त करणें; as, "To E. the mind or character". ५ *to raise to a higher pitch* (said of sounds) उंच करणें, वाढविणें, (सूर-आवाज) चढविणें; as, "To E. the voice." ६ (*colloq. & sportive*) *to make tipsy* (दारू पाजवून) चढविणें, (दारूच्या) रंगांत आणणें, थोडीशी गुंगी आणणें, घोड्यावर बसविणें:(*colloq.*); as, "The elevated cavaliers sent for two tubs of merry stingo." ७ (*obs.*) *to detract from, to disparage* (Latin meaning) कमी करणें, खालीं उतरणें, (R.) खिन्न-उदास करणें. To ELEVATE A PIECE, *to raise the muzzle* तोफेचें तोंड वर करणें-उचलणें. El'evated *a. uplifted, lofty* उंच केलेला, उंचावलेला, &c., मोठ्या पदवीस चढविलेला. २ *animated, noble* मोठा-थोर-उदात्त केलेला, उत्तेजित, उच्च; as, "Elevated thoughts." El'evatedness *n.* प्रतिष्ठितपणा *m*, थोरपणा *m*, उच्चता *f.* Elevā'tion *n.* (said of material things, persons, the mind, the voice, &c.) *the act of raising from a lower place, condition, or quality to a higher* उठावणी *f*, चढवणी *f*, बढती *f*, वाढ *f*, थोरवी *f*, उंची *f*, उंच करणें *n*, थोर करणें *n*, चढविणें *n*; as, "The E. of grain; E. to the throne; E. of the mind, thoughts or character." २ *height, exaltation* प्रौढी *f*, भारदस्तपणा *m*, उदात्तता *f*, प्रौढपणा *m*; as, "The style wanted a little E." ३ *an elevated place or station, a hill* उंच-उंचीची जागा *f*, टेंकडी *f*, उच्चस्थान *n.* ४ *astron. altitude* उन्नति *f*, उन्नतांश *m*; as, "The E. of the pole or of a star." ६ (*gunnery*) *the movement of the axis of a piece in a vertical plane* (तोफेचें तोंड) खालीं वर करणें; (also) *the angle between the axis of the piece and the line of sight* रोखाची रेषा व तोफेचा आंस ह्यांमधील कोन *m*, उन्नतिकोन *m.* ७ (*drawing*) उभा देखावा *m*, उभारणी *f.* El'evator *n. one who, or that which, raises or lifts up anything* चढविणारा, उंच करणारा; as, (a) *a mechanical contrivance* (धान्य वगैरे जिन्नस) वर चढविण्याचें यंत्र *n.* (b) *a cage or platform and the hoisting machinery in a hotel, warehouse, mine, etc., for conveying persons, goods, etc., to or from different floors or levels* (माल इ० वर चढविण्याची) खुर्ची *f*-पाळणा *m.* (c) *a building for elevating, storing, and discharging grain* धान्याचें उंच जागीं असलेलें कोठार *n.* (d) *anat. a muscle which serves to raise a part of the body* उन्नामक (स्नायु) *m.* (e) *surg. an instrument for raising a depressed portion of a bone* उन्नामक (शस्त्र) *n.* El'evatory *a. tending or having power to elevate* उंच करण्याची-वर उचलण्याची शक्ति असलेला, उच्चकारी, उद्धारक, उन्नामक. E. *n.* See Elevator *n.*

Eleve (ā läv') [Fr. *elever*, to raise, to bring up.] *n. a pupil, a scholar* छात्र *m*, शिष्य *m*, विद्यार्थी *m.*

Eleven (ē-lev'n) [O. E. *enleven*, A. S. *endleofan*, *endlufon*; Icel. *ellifu*; Dan. *elleve*, Ger. *elf*, compounded of two elements meaning *one and ten.*] *n. eleven units or objects* अकरा, अकरांचा समुदाय, अकरें *n*, अकरी *f.* २ *a symbol representing eleven units as* '11' *or* XI अकरा ही संख्या दाखविणारें चिह्न *n*-आंकडा *m.* ३ (*cricket* and *American football*) क्रिकेट अगर फूटबालच्या खेळाचा सामना खेळण्याकरितां एखाद्या विवक्षित मंडळींतून, प्रांतांतून अगर देशांतून वगैरे निवडून ११।११ पटाईत खेळाडू घेतात ते *m. pl.*, अकरा, अकरी *f*; as, "The Parsee eleven." Elev'enth *a. next after the tenth* अकरावा, एकादश; as, "The E. chapter." २ *constituting one of eleven parts into which a thing is divided* एक अकरांश, अकरावा हिस्सा, एकादशांश; as, "The E. part of a thing." E. *n. one of eleven equal parts* अकरा समभागांपैकीं एक, अकरावा हिस्सा.

Elf (elf) [A. S. *ælf*, elf.] *n.* Elves. *pl. a fairy, a goblin* वनदेवता *f*; as, "Every elf, and fairy sprite." २ *a dwarf* खुजा *m*, वामनमूर्ति *m*, बुटका *m*, गिड्डा माणूस *m.* ३ *a mischievous person* खोडकर-वात्रट-फाजील मनुष्य *m.* ४ *a pet name for a child* मुलाचें लाडकें नांव *n.* Elf arrow (*called also Elf bolt, Elf dart, & Elf shot*) गारगोटीचा बाण, गारगोटीचें शरमुख. Elf child वनदेवतांनीं (चोरून नेलेल्या मुलाबद्दल) मुलाच्या जागीं ठेवलेलें (दुसरें) मूल. El'fin, El'fish *a. of or relating to elves* वनदेवतांसंबंधीं, वनदेवतांविषयीं-विषयक. Elf'like *a. mischievous* वनदेवतेसारखा, वात्रट, खोडकर, फाजील. Elf-fire *the ignis fatuus* दलदलीच्या रानांतून रात्रीच्या वेळीं जी ज्वाला उठते ती *f.* (ही ज्वाला वनस्पतीच्या अगर प्राण्याच्या परमाणूंच्या पृथक्करणापासून उत्पन्न होते व हें पृथग्भवन पृथ्वीवर नेहमीं चाललेलें असतें). Elf-land *n. fairyland* यक्षिणींची-वनदेवतांची भूमी *f.* Elf-owl *n.* एका जातीचें लहान घुबड *n.* Elf *v. t.* (*Shakes.*) *to entangle mischievously* (as an elf might do) घोंटाळ्यांत घालणें, अडचणींत-पेंचांत आणणें, वात्रटपणानें खोड्यांत घालणें. Elfin *n. a little elf or urchin* लहानगी (बाल) वनदेवता *f.* El'fish *a. elf-like, imp-like, weird, mischievous* वात्रट खोडकर. Elf-lock *n. matted hair* केसांचा गुंता *m*-शिंकें *n*, गुंतवळा *m*, जटा *f.* Elf'kin *n. a little elf* बाल वनदेवता *f.*

Elgin marbles (el'jin-mär'blz) *n. pl. Greek sculptures in the British Museum* [They were obtained

by Lord Elgin at Athens about 1811 ] ग्रेट-ब्रिटनच्या पदार्थसंग्रहालयामध्यें असलेले ग्रीस देशचे कोरींव-खोदींव कामाचे नमुने *m. pl.* हे नमुने लार्ड एलजिन ह्यानें सन १८११ च्या सुमारास पैदा केले.

Elicit ( e-lis'-it ) [ L. *elicere, elicitus*, to elicit,—L. *e* ( *ex* ), out and *lacere*, to entice. ] *v. t. to draw out* ( by coaxing ), *to bring to light, to bring out against the will* (लाडी गोडी लावून) बाहेर काढणें, बाहेर पाडणें, वदविणें, उघडकीस-उजेडांत आणणें, (-च्या) तोंडांतून बाहेर काढणें. E. *a.* ( *obs.* ) *open, evident* उघड, उघडउघड, स्पष्ट, प्रत्यक्ष, उघडकीस आणलेली-आलेली, उजेडांतली; as, "An elicit act of equity."

Elide ( ē-līd' ) [ L. *elidere*, to strike off or out, —L. *e* ( *ex* ), out and *lædere*, to hurt by striking. ] *v. t.* ( *obs.* ) *to dash to pieces, to demolish* खंडण करणें, चिंधड्या-ठिकऱ्या उडविणें, हाणून पाडणें, धुव्वा उडविणें, खंडणें, खोडणें; as, "To E. the force of an argument." २ *gram. to cut off* ( as, a vowel or syllable, usually the final one ) अंत्य स्वराचा -पदाचा लोप करणें.

Eligible ( el'-i-ji-bl ) [ L. *e* ( *ex* ), out and *legere*, to choose. ] *a. fit to be chosen for some purpose or duty, legally qualified to be elected and to hold office* निवडून येण्यास योग्य, निवडून येऊन अधिकार चालविण्यास पात्र, वरणीय, ग्राह्य, ग्रहणीय, नियोजनीय, अंगीकार्य, लायक. २ *suitable, desirable, preferable* योग्य, अनुरूप, पसंत, सोईवार (?), स्वीकारणीय. El'igibleness, Eligibil'ity *n.* पात्रता *f*, योग्यता *f*, अनुरूपता *f*, पसंत होण्याची योग्यता *f*, निवडून येण्याची पात्रता *f*, वरणीयता *f*, ग्राह्यता *f.* El'igibly *adv.*

Eliminate ( e-lim'-i-nāt ) [ L. *eliminare, eliminatum*,—L.-*e* ( *ex* ), out and *limen*, threshold. ] *v. t. to put out of doors, to expel, to release, to set at liberty* काढणें, काढून टाकणें, मोकळा करणें, हांकणें, हांकून काढणें, दाराबाहेर काढणें, हांकून लावणें, मुक्त करणें, सोडणें, स्वतंत्र करणें; as, "E. my spirit, give it range, through provinces of thought yet unexplored." २ *alg. to cause to disappear from an equation* काढून टाकणें, काट मारणें, छेकणें, उडविणें. ३ *to leave out of consideration* सोडून देणें, (-चा) विचार न करणें, खिसगणती न धरणें, (ला) न मोजणें, जमेंत न धरणें; as, "E. errors that have been gathering and accumulating." ४ *physiol. to expel from the system, to excrete* बाहेर टाकणें, विसर्जन-उत्सर्ग करणें; as, "The kidneys E. urea, the lungs carbonic acid." Eli'minā'tion *n.* Eli'mina'tive *a.*

Elinguation ( ē'-lin-gwā'-shun ) [L. *e* ( *ex* ), out and *lingua*, tongue. ] *n.* ( *old English law.* ) *punishment by cutting out the tongue* जीभ कापण्याची शिक्षा *f.*

Eliquament ( ē-lik'-wa-ment ) *n.* चरबींतून किंवा मांसांतून दाबून काढलेलें तेल *n.*

Eliquation ( el'i-kwā'-shun ) [ L. *e*, & *liquare, to melt.* ] *n. the process of separating a fusible substance from one less fusible, by means of a degree of heat sufficient to melt the one & not the other ; as an alloy of copper & lead* (कमी आंचानें वितळणारे पदार्थ ) बेताची आंच देऊन वेगळे करण्याची कृति *f.*

Elision ( e-lish'un ) See under Elide.

Elite ( e-lēt' ) [ Fr. *elite* elected or select. ] *n. pl. a choice or select body, the flower* वेंचक-निवडक-शेलका भाग *m*, उत्तमांश *m*, नाक ( *fig.* ) *n*, चांगला चांगला भाग *m*, निवड *f*; as, "The E. of society."

Elixir ( ē-liks'ir ) [ Fr. *elixir*, Sp. *elixir*, Ar. *el-iksir*, the philosopher's stone.—Gr. *xeros*, dry.] *n.* (*alchemy*) *an imaginary liquor capable of transmuting base metals into gold* हीन धातूंचें सोनें बनविणारा काल्पनिक रस *m.* २ *one for prolonging life indefinitely* अमृत *n*; as, "E. vitæ, or the E. of life." ३ *the refined spirit, the quintessence* सत्व *n*, सार *n*, अर्क *m*, कस *m*; as, "The E. of wordly delights." ४ *med. a compound tincture or medicine, composed of various substances held in solution by alcohol in some form* मिश्रौषध *n* प्रवाही औषधाचें मिश्रण *n.* ५ *any invigorating substance or cordial* शक्ति आणणारें-शक्तिवर्धक औषध *n*, पुष्टिकारक-उत्साहवर्धक औषध *n*, *pop.* अमृत *n.*

Elizabethan ( ē-liz'a-beth'-an ) [ After Queen *Elizabeth.* ] *a. pertaining to Queen Elizabeth or her times, esp. to the architecture or literature of her reign* इलिझबेथ राणीच्या वेळचें-काळचें (शिल्प *n*, वाङ्मय *n* ) इलिझबेथकालीन; as, "The E. writers, drama, literature, etc." E. *n. one who lived in England in the time of Queen Elizabeth* इलिझबेथ-राणीच्या कारकीर्दींतला-काळचा-मनुष्य *m*, इलिझबेथ-कालीन मनुष्य *m.*

Elk ( elk ) [ Icel. *elgr*; O. H. Ger. *elaho*; Swed. elg. ] *n. zool.* सांबरासारखी एक हरणाची जात *f.*

Ell ( el ) [ A. S. *eln.* ] *n.* ( R. ) *a measure for cloth of different lengths in different countries* (the English *ell* being 45 inches, the Scotch 37.2, & the French 54.) पाश्चात्य देशांतील कापडाची लांबी मोजण्याचें एक माप *n.* इंग्रजी 'एल्' ४५ इंचांचें आहे. [ GIVE HIM AN INCH & HE WILL TAKE AN ELL. *cf.* भटाला दिली ओसरी भट हातपाय पसरी.]

Ellagic (el-laj'-ik) [ Fr. *galle*, gall (with the letter reversed). ] *a. pertaining to or derived from gall-nuts* मायफळाचा.

Ellipse (el-lips') [L. *ellipsis*—Gr. *elleipsis*, a defect.—So called because its plane forms with the base

of the cone a *less* angle than that of the parabola. Gr. *el* for *en*, in & *leipein*, to leave. ] *n. geom. an oval or oblong figure produced when cone is cut by a plane which passes through it, not parallel to nor cutting the base* दीर्घवर्तुल *n*, दीर्घवृत्त *n*, लंबवृत्त *n*, लंबवर्तुल *n*, अंडाकार *m*-अंडाकृति वर्तुळ *n*, अंडवृत्त *n*. २ *gram. omission*, See Ellipsis. ३ *astron. the elliptical orbit of a planet* दीर्घवर्तुल *n*, ग्रहाची दीर्घवर्तुल कक्षा *f*- गमनमार्ग *m*, दीर्घवृत्तकक्षा *f*. Ellip'sograph, Ellip'tōgraph *n. an instrument for describing ellipses, a trammel* दीर्घवर्तुललेखक *m*, दीर्घवर्तुल काढण्याचें साधन *n*- हत्यार *n*- यंत्र *n*. Ellip'soid *n. geom. a solid, all plane sections of which are ellipses or circles* दीर्घवृत्ताभास *m*, दीर्घवर्तुलाभास *m*. ह्याचा प्रत्येक छेद दीर्घवर्तुल असतो. Ellipsoid, Ellipsoidal *a. having the form of an ellipsoid* दीर्घवृत्ताभासात्मक, दीर्घवृत्ताभासासारखा. Ellip'tic, Ellip'tical *a. pertaining to, or having the form of, an ellipse* दीर्घवर्तुलाकार, दीर्घवर्तुल (*a.*) &c. २ *bot.* लंबवर्तुलाकार. Ellip'tically दीर्घवर्तुलाकारानें. Ellip'ti'city *n. deviation of an ellipse or a spheroid from the form of a circle or a sphere* दीर्घवृत्तीयता *f*.

Ellipsis ( el-lip'-sis ) [ Gr. *elleipsis*, an omission, a defect. ] *n. gram. the omission of one or more words which the hearer or reader may supply* पदन्यूनता *f*, पदापेक्षा *f*, पदाकांक्षा *f*, शेप *m* (?), अध्याहार *m*; as, "The man I admire" for "The man *whom* I admire." [SUPPLYING OF AN E. अध्याहारपूरण *n*, आकांक्षापूरण *n*. WORD, CLAUSE, &C. REQUIRED TO SUPPLY AN E. पूरक (पद, वाक्य, &c.). ] २ *print. the marks thus—or * * * or........... denoting the omission or suppression of letters or words* त्रुटि *f*, त्रुटिचिह्न *n*, सोडलेल्या शब्दांची जागा *f*. Ellip'tic, Ellip'tical *a. having a word or words left out* शब्द सोडलेला. Ellip'tically *adv. with a word or words left out* कांहीं शब्द सोडून, पदन्यूनतापूर्वक, अध्याहारानें.

Elm ( elm ) [A. S. *elm*; Dut. *olm*; Dan. *alm*, Swed. *alm*. ] *n. a valuable European timber tree* यूरोपांत होणारें एक मौल्यवान् एल्मनांवाचें झाड *n*. Elm'en *a.* (*obs.*) *belonging to elms* एल्मझाडाचें, एल्मच्या लांकडाचें केलेलें. El'my *a. abounding in elms* एल्मप्रचुर, एल्ममय, एल्मनें भरलेलें.

Elmo's fire ( el'-mōs-fīr' ) [ After *saint Elmo* whom sailors in the Mediterranean invoke during a storm. ] *n. a popular name for a meteoric appearance seen playing about the masts of a ship* वादळाच्या पूर्वीं किंवा नंतर डोलकाठ्यांवरून दिसणारी उल्का *f*, सेन्ट एल्मोची चूड *f*.

Elocular ( ū-lok'-ū-ler ) [ L. *e*, without and *loculus*, a cell. ] *a. bot. having but one cell or cavity not divided by a partition* अविभक्तपेशीयुक्त.

Elocution ( el-ō-kū'-shun ) [ L. *e*, out and *loquor*, *locutus*, to speak. ] *n.* (R.) *utterance by speech* भाषणशक्ति *f*, वाचाशक्ति *f*, वाचा *f*; as, "( Fruit ) whose taste gave E. to the mute." २ *oratorical, or expressive delivery including gestures, graces of intonation, &c.* हावभावासह भाषण *n*, ठसेदार-ठसा उमटविणारें बोलणें *n*, मनोवेधक-चित्ताकर्षक भाषण *n*, भाषणशैली *f*, भाषणाची ढब *f*- पद्धति *f*, अभ्यास-साध्य व्याख्यानकला *f*, वक्तृत्व *n*. ३ *style or manner of speaking or reading in public* वक्तृत्व *n*; as, "The E. of a reader." ३ ( *obs.* ) *eloquent diction* वक्तृत्वपूर्ण भाषाशैली *f*, जबेफराशी *f*, वाक्चातुर्य *n*- भाषणचातुर्य *n*, वाक्पाटव *n*; as, "To express these thoughts with. E." Elocu'tionary *a. pertaining to elocution* अभ्याससाध्यवक्तृत्वसंबंधी-विषयक, भाषणकलेसंबंधीं Elocu'tionist *n. one versed in elocution, a teacher of elocution* वक्तृत्वशिक्षक *m*.

*N. B.* See Eloquence.

Eloge ( e-l-ozh' ) [Fr.–L. *eloguim*, a maxim. ] *n. a funeral oration, a panegyric on the dead, a discourse delivered in public in honour of an illustrious person* (थोर मनुष्य मृत झाला असतां त्याच्या सन्मानार्थ) अंत्यविधीचे वेळीं केलेलें स्तुतिपर भाषण *n*, मृतस्तव *m*. El'ogist *n. a deliverer of an eloge* मृताचे गुणानुवाद करणारा, मृतस्तोता *m*, मृतस्तुतिपाठक *m*. El'ogy, Elo'gium *n. a panegyric, an eloge* मृत-स्तुतिपाठ *m*, गुणानुवाद *m*.

Elohim ( ēl-ō'-him ) [ Heb. ] *n. one of the Hebrew names for God of frequent occurrence in the Bible used both of the true God and of false God* ( while *Jehovah* is used only of the true God. ) हिब्रू भाषेंतील ईश्वराचें एक नांव. हें नांव बायबलमध्यें वरचेवर येतें. पण हें खऱ्या व खोट्या अशा दोन्ही देवांला लावतात. "जोहोवा" हा शब्द फक्त खऱ्या देवालाच लावतात. अल्ला *m*, देव *m*. Elo'hist *n.* ( in contradistinction to *Jehovist* ) *the supposed writer of the Elohistic passages in the Pentateuch* ज्यांमध्यें ईश्वराला Elohim ह्या नांवानें उल्लेखिलें आहे असे जुन्या कराराच्या पहिल्या पांच पुस्तकांतील भाग लिहिणारा. 'इलोहिम' शब्द वापरणारा लेखक *m*. Elohis'tic *a.*

Elongate ( ē-long'-gāt ) [L. *e* & *longus*, long.] *v. t. to stretch out, to extend* ताणणें, लांबविणें, वाढविणें; as, "To E. a line." E. *v. t.* (R.) *to recede apparently from the sun* ( said of a planet in its orbit ) अंतर पडणें, दूर होणें-जाणें, सूर्यापासून मागें हटणें, (-चा) इनापगम होणें. २ प्रतान पावणें. Elongated *pa. t.* & *pa. p.* Elonga'ting *pr. p.* & *v. n.* Elongā'tion *n. protraction, extension* लांबविणें *n*, वाढविणें *n*, वाढ

*f.* (?), लांबी *f* (?). २ *that which lengthens out, continuation* लांबलेला भाग *m*, विस्तार *m*, वृद्धि *f.* ३ *a withdrawal, a being at a distance,* परतणें *n*, दूर-लांब-अंतरावर होणें *n*, अंतरावर असणें *n*. ४ *astron. the angular distance of a planet from the sun* (कोणत्याही) ग्रहाचें सूर्यापासून अंतर *n*, सूर्य व ग्रह यांमधील अंतर *n*, इनापगम *m*; as "The E. of Venus or Mercury."

Elope (ē-lop') [ Dut. *ontloopen*, to run away.] *v. i. to run away privately with a paramour or lover (man or woman) in defiance of duty or social restraints* (आपुकमापुकांनीं मिळून) पळून जाणें, (of a female) हात *m*. धरून जाणें, लागून जाणें *with* शीं *of o.*, (परपुरुषाबरोबर) बाहेर निघणें, उठून जाणें. Elope'ment *n*. पळणें *n*, पळून जाणें *n*, सवल्लभ पलायन *n*. Elop'er *n*.

Eloquence (el'o-kwens) [L. *e*, out & *loqui*, to speak. ] *n. oratory* (नैसर्गिक-उपजतचें-आंगचें-जातीचें) वक्तृत्व *n*, वक्तृत्वशक्ति *f*, जबेफराशी *f*, वाक्शब्दचातुर्य *n*, शब्दपांडित्य *n*, वाक्पाटव *n*, वाक्पटुता *f.* [ Goddess of E. (or speech) सरस्वती *f*, वाग्देवी *f*, वाग्देवता *f.* ] २ (*fig.*) *whatever produces the effect of moving and persuasive speech* वक्तृत्व *n*, (हृदयद्रावक-चित्ताकर्षक) भाषण *n*; as, "Silence that spoke & E. of eyes." ३ *that which is expressed with eloquence* (हृदयद्रावकतेनें-चित्ताकर्षकतेनें सांगितलेलें-लिहिलेलें) वक्तृत्व *n*; as, "Let my books be then the E. of my speaking breast." El'oquent *a*. बोलका, वक्ता, तोंडाचा चतुर, वाग्मी, वाक्पटु. २ *adapted to express strong emotion, or to state facts and arguments with power and fluency* वक्तृत्वपूर्ण; as, "An E. address, appeal, etc." El'oquently *adv.*

*N. B.*—Elocution प्रसंगोचित अभिनय व स्वर (आवाज) यांनीं युक्त असें भाषण *n*. Elocution हें अभ्याससाध्य आहे. Eloquence आंगचें-स्वाभाविक-नैसर्गिक आहे. Eloquence हें निसर्गजात आहे.

Else (els) [ A. S. *ellés adv.* else, otherwise. ] *a. & pron. other, one or something beside* दुसरा, दुजा, अन्य, शिवाय, खेरीज, आणखी; as, "Who E. has done it?" "Do you desire to tell me anything E.?" (*Else* always follows its noun. Sometimes the possessive form is given to *Else* rather than to the noun; as, "No one *else's*, somebody *else's*. A suit of clothes like everybody *else's*.") E. *adv. & conj. besides, in addition* शिवाय, आणखी; as, "Nowhere else; no one else." २ *otherwise, in the other or contrary case* नाहींतर, अन्यथा, इतरथा, एरवीं, नाहींपेक्षां; as, "For thou desirest not sacrifice *else* would I give it." (sometimes *else* is used expletively after *or*, simply signifying an alternative; as, "Will you do it or *else* shall I?" Else'where *adv. in any other place* इतर-दुसऱ्या-अन्य-ठिकाणीं, अन्यस्थळीं, अन्यत्र, इतरत्र. २. *in some other place* दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं, कोठें दुसरीकडे; as, "It is reported in town and E."

Elucidate (e-lū'-si-dāt) [ L. *e*, out and *lucidus*, clear, bright–L. *lucere*, to shine. ] *v. t. to make lucid or clear, manifest, to illustrate* विशद करणें, उघड-स्पष्ट-व्यक्त-प्रकाशित &c. करणें, (उदाहरणें देऊन) स्पष्ट करणें, (विषयावर) प्रकाश पाडणें; as, "To E. a subject with examples or illustrations." Elucida'ted *pa. t. & pa. p.* Elucid'ating *pr. p. & v. n.* Elucidā'tion *n. exposition, illustration, explanation* स्पष्टीकरण *n*, विशदीकरण *n*, उघड-व्यक्त करणें *n*, (उदाहरणें देऊन) स्पष्ट करणें *n*, व्याख्यान *n*, विवरण *n*, प्रकाशन *n*. Elu'cida'tive, Elu'cida'tory *a*. (R.) *illustrative, explanatory* विशद करणारें. २ *making clear* स्पष्ट करणारें. Elucida'tor *n. an expositor* विशद-उघड-स्पष्ट करणारा.

Elude (e-lūd') [ L. *e*, out and *ludere*, to play. ] *v. t. to avoid by stratagem, artifice, wiles, deceit or dexterity; to evade* (शिताफीनें) चुकवणें, टाळणें, टाळाटाळ *f.* चुकवाचुकव *f.* करणें *g. of o.*, झोका *m*-झोला *m*-झुगारा *m*-झुकांडी *f.* देणें; as, "To E. an office, To E. detection, inquiry, search, &c." २ *to baffle, to frustrate, to foil* व्यर्थ करणें, निष्फळ करणें, फसविणें, चकविणें, झुकविणें; as, "To E. the force of an argument or blow." Elu'dible *a. evadible* टाळण्याजोगा, टाळतां येणारा. Elu'sion *n. adroit escape as by a stratagem, a trickery, a mockery* युक्तीनें निसटणें *n*, शक्कल *f*-हिकमत *f.* लढविणें *n*. Elu'sive *a. using arts or deception to escape, eluding the grasp, fallacious* युक्तीनें निसटणारा, पळणारा, टाळणारा, चुकविणारा, शक्कल लढविणारा, चुकार, चुकाऊ, चुकवणुकीचा, झुकांडीचा. Elu'sively *adv.* Elu'siveness *n*. चुकारूपणा *m*. Elu'sory *a. evasive, fraudulent, deceptive, fallacious* फसविणारा, चकविणारा, टाळणारा, टाळाटाळी करणारा, झुकविणारा, झोका देणारा. Elu'soriness *n*.

Elutriate (e-lū'-tri-āt) [ L. *e*, out and *luere, lutum*, to wash. ] *v. t. to purify* (ores) *by washing and straining off or decanting the liquid from the substance washed, the lighter matters being then separated from the heavier; to strain off or decant, as a powder which is separated from heavier particles by being drawn off with water* पाण्यानें शोधणें, पाण्यानें धुवून धुवून सूक्ष्मपदार्थ वेगळे करणें, पाण्यांतून गाळून साफ करणें. Elu'triated *pa. t. & pa. p.* Elu'triating *pr. p. & v. n.* Elutriā'tion *n.* पाण्यानें शोधणें *n*, जलशोधन *n* (जलेन शोध्यते).

Elves (elvz) *pl.* see Elf. Elvish *a.* Elvishly *adv.*

Elysium (e-liz'-i-um) [ L.– Gr. *elysion* (*pedion*), the Elysian fields. ] *n. pl.* Elysia. *myth.* an

abode of the happy souls after death (according to the Greek poets) स्वर्ग *m.* २ *a place of exquisite felicity* इंद्रभुवन (*fig.*) *n*, नंदनवन (*fig.*) *n*, आनंदस्थान *n.* Ely'sian *a. pertaining to Elysium or the abode of the blessed after death* स्वर्गाचा, स्वर्गीय. २ *exquisitely delightful, beatific* (*fig.*) स्वर्गीय, दिव्य, परमानंदप्रद-कर, अत्यानंददायी.

Elytron, Elytrum (el'i-tron,-trum) [Gr. a cover, a sheath,–*eluein*, to roll round.] *n. pl.* Elytra. (*zool.*) *one of the anterior pair of wings in the Coleoptera and some other insects, when they are thick, and serve only as a protection for the posterior pair* (पक्षकवचप्राण्याचा मागचा) कवच -पंख *m.* See Coleoptera.

Em (em) *n.* (*printing*) *the unit of measurement of printed matter on a page being a type whose breadth is equal to its depth* एम्, छापील मजकुराची ओळ मोजण्याचें मूलप्रमाण *n.* छापण्यांत ओळी जोडते-वेळीं इंग्रजी एम् ह्या अक्षरास जी समचौरस जागा लागते ती *f.* ह्या जागेचें माप कल्पून जोडारी ओळीचें मेज घेतात.

Emaciate (e-mā'-shi-āt) [L. *e*, (intens.) very and *macies*, leanness.] *v. i. to waste away in flesh* रोडणें, रोडकावणें, रोडावणें, सुकणें, आंग *n.* टाकणें-सोडणें (*of children*), क्षीण-रोड-कृश होणें-होत जाणें चालणें, वाळणें, हडकणें, हाडें निघणें -बाहेर येणें, सुकत जाणें. E. *v. t.* रोडविणें, सुकविणें, कृश करणें, वाळविणें, आंग *n.* घालविणें, (*fig.*) हडकविणें, हाडें बाहेर काढणें; as, "His sickness has E. d him." Emacia'ted *pa. t.* and *pa. p.* Emacia'ting *pr. p.* and *v. n.* Ema'ciate *a.* रोड, रोडका, कृश, वाळलेला, रोडलेला, खराब, हडकलेला, सुकड, क्षीण; as, "E. steeds." Emaciā'tion *n. the act of making very lean* रोड करणें *n*, कृश करणें *n*, क्षीण करणें *n.* २ *the state of being emaciated or reduced to excessive leanness, an excessively lean condition* कृशता *f*, कार्श्य *n*, रोडकेपणा *m*, क्षीणता *f.*

Emanate (em'-a-nāt) [L. *e*, out and *manare* (*p. p. manatum*), to flow.] *v. i. to flow forth or issue from a source* (said of what is intangible as *light, heat, odour, power etc.*) निघणें, वाहणें, सुटणें, निस्सरण *n.* होणें, निस्सृत &c. होणें. २ *to take origin, to spring, to originate* निघणें, उद्भवणें, उत्पन्न होणें, निपजणें, उद्भूत होणें, निर्माण होणें; as, "That subsisting form of Government from which all special laws emanate." Em'anant *a. passing forth into an act, or making itself apparent by an effect* (said of mental acts) कृतींत or कृतीनें दृश्य होणारा, निघणारा, सुटणारा, वाहणारा; as, "An emanant volition." Emanā'tion *n. the act*-निघणें *n*, निस्सरण *n*, निपज *f*, निर्गमन *n*, उत्पत्ति *f*, उद्गम *m*, उद्भव *m*, प्रभव *m*, निर्गम *m*, प्रवृत्ति *f.* २ *that which emanates, efflux, effluvium* निस्सृत द्रव्य *n*- पदार्थ *m*, निर्यास *m.* Emana'tive *a.* उत्पन्न होणारा, उद्भवणारा. Em'ana'tively *adv.*

Emancipate (e-man'-si-pāt) [L. *e*, out *manus*, the hand, and *capere*, to take.] *v. t. to set free from the power of another, to manumit* हातून सोडविणें, मोकळीक *f*- सुटका *f*- बंधमोचन *n*- करणें, (गुलाम-गिरींतून-जाचांतून) सोडवणें, दास्यांतून काढणें; as, "To emancipate a slave, a country etc." २ *theol. to deliver from migratory existence* मुक्त करणें, मोक्ष *m*- मुक्ति *f*- अढळपद *n*- अक्षयपद *n.* देणें, (संसार-माया-पाशातून) अंढळ पदावर बसविणें, उद्धरणें, उद्धार *m.* करणें. Eman'cipated *pa. t.* and *pa. p.* Eman'cipating *pr. p.* and *v. n.* Eman'cipate *a. set at liberty* बंधमुक्त, मोकळा. २ मुक्त केलेला. Emancipā'tion *n. the act. deliverance, liberation, release, freedom, manumission, enfranchisement* सोडणें *n*, सोडवण *n*, बंधमोचन *n*, मोचन *n.* (b) *the state* सोडवण *f*, सोडवणूक *f*, सुटका *f*, मोकळीक *f*, मुक्तता *f.* २ *the act* मुक्त करणें *n*, मुक्तीस पोंचविणें *n.* (b)–*the state beatitude* मुक्ति *f*, मोक्ष *m*, उद्धारगत *f*, उद्धार *m*, अपुनर्भव *m.* [Desirous of E. मोक्षार्थी, मुमुक्षु. Way or course to E. मुक्तिमार्ग *m.* Working out of E. मुक्तिसाधन *n.*] Eman-cipa'tionist *n. an advocate of emancipation esp. of slaves* दास्यविमोचनाभिमानी, दास्यविमोचन-पुरस्कर्ता. Eman'cipator *n.* दास्यमुक्त करणारा. २ मुक्ति देणारा. Eman'cipatory *a.* बंधमोचनविषयक; as, "E. laws." Eman'cipist *n.* (*Australia*) *a freed convict* बंधमुक्त कैदी *m.*

Emarginate (e-mär'-ji-nāt) [L. *e*, out & *margo, marginis*, border, margin.] *v. t. to take away the margin of* (-ची) कडा *f.* काढून टाकणें, अग्ररहित करणें, खांच पाडणें. Emar'ginated *pa. t.* & *pa. p.* Emar'-ginating *pr. p.* & *v. n.* Emar'ginate, Emar'ginated *a. having a blunt or obtuse notch in the margin* कांठ कापलेला, भुंडा. २ *bot. notched at the summit* (said of a leaf, petal, etc.) (आपट्याच्या पाना-सारखा-अंबुतीच्या पानासारखा, अग्रखांची, कांचनपर्णा-प्रवत्, भग्नाग्र, खंडिताग्र. ३ *Cryst. having the edges truncated* अग्रखांची. Emar'ginately *adv.* Emar'-ginā'tion *n.–the act.* (आपट्याच्या पानासारखी) टोंकाला खांच पाडणें-असणें *n.* (b) -*the state* कापलेले कांठ *m.* २ *a notch or shallow sinus in the margin* छिन्नाग्रखांचित्व *n*, (आपट्याच्या पानासारखी) टोंकाची खांच *f.*

Emasculate (e-mas'-kū-lāt) [L. *e*, *away from* & *masculus*, dim. of *mas*, a male. See masculine.] *v. t. to geld, to castrate* खच्ची करणें, पुरुषत्वभंग *m* -पुरुषत्व-नाश *m* -पुंस्त्वभंग *m* -पुंस्त्वनाश *m*- प्रजननशक्तिभंग *m*- &c. करणें *g. of o.*, नपुंसक-निरुत्पादक-पंढ &c. करणें, वृषणच्छेद *m.* करणें, पुरुषत्व हरण करणें, पंढत्व आणणें, (आंडिल बैल) बडवणें, आंड बडविणें-ठेंचणें. २ *to render*

*effeminate, to weaken* दुर्बलता *f*-नामर्दपणा *m.* आणणें, नष्टवीर्य करणें; as, "Luxury has not E.d their minds." ३ *to expurgate by removing coarse or obscene passages from (a book)* (पुस्तकांतून-ग्रंथांतून ग्राम्य-अश्लील-बीभत्स मजकूर काढून टाकून) पुस्तक शुद्ध करणें. Emas'culated *pa. t.* & *pa. p.* खच्ची केलेला, नष्टवीर्य, गतवीर्य, नष्टपौरुष. Emas'culating *pr. p.* & *v. n.* Emas'culate *a. deprived of virility, unmanned, weakened* नष्टपौरुष; as "E. slave." Emasculā'tion *n. the act-* पुंस्त्वहरण *n*, (अंड) बडवणें *n.* (b) *the state-castration* हीनपौरुषत्व *n*, षंढत्व *n*, नपुंसकत्व *n.* २ *-the act* जोम मोडणें *n*, उत्साहभंग *m.* (b) *the state-unmanly weakness* क्लैब्य *n*, नेभळेपणा *m.* Emas'culator *n.* · *one who, or that which, emasculates* खच्ची करणारा, नामर्द करणारा. Emas'culatory *a. tending to emasculate* पुंस्त्वनाशक.

Embalm (em-bäm') [Fr. *embaumer.*–pref. *em* (L. *ĕn*)+*baume, balsam,* balm. see Balm.] *v. t. to preserve* (a dead body) *from decay by removing the intestines and filling their place with aromatic and desiccative drugs, and oils, to mummify* (प्रेत चिरकाल टिकण्यासाठीं त्यांत) मसाला *m.* घालणें-भरणें; as, "Joseph commanded his servants, the physicians, to *embalm* his father; and the physicians *embalmed* him." २ *to imbue with sweet odour, to perfume* सुवासित करणें, सुवास-मधुर वास लावणें, गंधमाधुर्य आणणें; as, "With fresh dews E.d the earth." ३ *to perpetuate in remembrance, to cherish tenderly the memory of* प्रेमानें (-चें) स्मरण कायम ठेवणें, चिरकाल आठवण राखणें; as, "Those tears that *embalm* the dead." Embalmed *pa. t.* and *pa. p.* Embalm'ing *pr. p.* and *v. n.* Embalm'er *n.* Embalmment *n.* (R.)

Embank (em-bank') [Pref. *em* (L. *in*) and Bank.] *v. t. to inclose with a bank; to defend by banks, mounds, dikes, etc.* (च्या भोंवती) बंधारा *m*-बंधारण *n* -बांध *m.*–&c. करणें-घालणें. Embanked' *pa. t.* and *pa. p.* Embank'ing *pr. p.* and *v. n.* Embank'ment *n.–the act* बंधारा *m-* बांध *m.* घालणें *n.* २ *the structure* (as a mound, bank, dike, etc.) बंधारा *m*, बांध *m*, बंधारण *n.*

Embar (em-bär') [Pref. *em* (L. *in*) and Bar.] *v. t. to shut in securely as with bars* (-आंत) अडकवून ठेवणें-टाकणें, अटकेंत ठेवून सुटतां न येईल असें करणें, प्रतिबंधांत ठेवणें; as, "Where fast E.d in mighty brazen wall." २ *to block up, to hinder by prohibition* प्रतिरोध-निरोध करणें, (-ची) गति खुंटविणें-थांबविणें, (ला) अटकाव करणें, मनाई करणें; as, "He embarred all further trade." *Bacon.* Embarred' *pa. t.* and *pa. p.* Embar'ring *pr. p.* and *v. n.*

Embarcation (em'-bär-kā'shun) See Embarkation.

Embargo (em-bär'gō) [Sp. *embargo,* an arrest, a stoppage of ships, *lit.* what serves as a bar-pref. *em* (L. *in*) and Span. *barra,* a bar.] *n. pl.* Embargoes. *an edict or order of the government prohibiting the departure of merchant vessels or other ships from some or all of the ports within its dominions* (आपल्या मुलुखांतील कोणत्याही एखाद्या किंवा सर्व बंदरांतून निघून जाण्याची व्यापारी) गलबतांस सरकारानें केलेली मनाई *f*, आपल्या ताब्यांतील बंदर न सोडण्याविषयीं व्यापारी जहाजांस झालेली राजाज्ञा *f.* २ (*sometimes*) *an entire interdiction of commercial intercourse* वाणिज्यकर्मनिषेध *m.* ३ *a prohibition to sail* समुद्रयान-गमननिषेध *m*, गलबतें चालविण्यास अटकाव *m.* ४ *a restraint or hindrance imposed on anything* (कोणत्याही गोष्टीसंबंधानें) मनाई *f*- बंदी *f.* ५ बंदराची बंदी *f*, गलबतास अटकाव *m.* E. *v. t. to prohibit from leaving port* (said of ships also of commerce and goods) बंदर सोडण्याची-बंदरांतून गलबत हाकारण्याची मनाई *f*- अटकाव *m.* करणें, बंदर सोडून जाण्यास (मालास वगैरे) प्रतिबंध करणें. Embargoed' *pa. t.* and *pa. p.* Embar'going *pr. p.* and *v. n.*

*N. B.*—सदरहू प्रकारची सरकारानें केलेली मनाई जर शत्रुकडील गलबतांस झालेली असेल तर तीस *hostile embargo* असें म्हणतात. परंतु तीच जर सरकारानें आपल्याच प्रजेच्या गलबतांस केलेली असेल तर तीस *civil embargo* असें म्हणतात.

Embark (em-bärk') [Fr. *embarquer* pref. *em* (L. *in*) and *barque,* a bark, a little ship. See Barque.] *v. t. to put on shipboard* गलबतावर चढविणें. २ *to engage, enlist or invest* (*as persons, money, etc.*) *in any affair* अडकवणें, घालणें, टाकणें, (-ला-कडे) लावणें-खर्च करणें-उपयोग करणें; as, "He E.d all his fortune in trade." "It was the reputation of the sect upon which St. Paul E.d his salvation." E. *v. i. to go on board a ship, vessel, boat* (प्रवासासाठीं) गलबतावर चढणें-जाणें-बसणें; as, "The troops embarked for Lisbon." २ *to engage, or take a share, in any affair* (कोणत्याही कामास) हात घालणें, प्रारंभ करणें, प्रवृत्त-उद्युक्त होणें, प्रवर्त्तणें; as, "Slow to embark in any undertaking." Embarked' *pa. t.* & *pa. p.* Embark'ing *pr. p.* & *v. n.* Em'barkā'tion *n.–the act.* गलबतावर चढविणें *n*- चढणें *n*, नौकारोहण *n*; as, "The E. of troops." २ *that which is embarked* गलबतावर चढवलेला-गलबतावर भरलेला माल *m*, भरताड. Embark'ment *n.* (R.)

Embarrass (em-bar'-ras) [Fr. *embarrasser,* to embarrass.– Span. *em* (L. *im* for *in*) and *barra,* a bar.] *v. t.* (in thought, speech, action &c.) *to perplex, to discompose, to disconcert, to abash* पेंचांत-घोटाळ्यांत पाडणें-आणणें, गांगरवणें; as, "Laughter may E. an orator." २ (in movement) *to im-*

*pede, to obstruct* (*as business, affairs, etc.*) पेंचांत -पेंचाटींत-घोळांत-फेऱ्यांत पाडणें-घालणें-आणणें, गुरफटवणें, गुंतागुंत करणें, (-ला) विरोध करणें, अडथळा करणें. ३ *com. to involve in pecuniary difficulties, to encumber with debt* (*said of a person or his affairs*) (पैशाच्या) अडचणींत आणणें, (पैशाच्या बाजूनें) पेंचांत आणणें, ओढाताण-चणचण-कर्जबाजारी करणें, कर्जांत बुडविणें-घालणें, (वर) कर्ज लादणें. Embar'rassed *pa. t. & pa. p.* Embar'rassing *pr. p. & v. n.* Embar'rassment *n. perplexity, confusion of mind, disconcertedness* गोंधळ *m*, फेंफें *f.* २ *hindrance, obstruction, impediment* घोंटाळा *m*, अडथळा *m*, अडचण *f*, नड *f*, बाधा *f*, भानगड *f*, व्यत्यय *m*; as, "The embarrassments to commerce growing out of the late regulations." ३ *perplexity or difficulty arising from inability to pay one's debts* (पैशाची) अडचण *f* -नड *f* -तूट *f* -उणीव *f* -वाण *f.*

Embase (em-bās') [Pref. *em* (L. *in*) and Base *a.* or *v. t.*] *v. t.* (*obs.*) *to lower* (as in value, position, etc.), *to degrade, to deteriorate* (-ची) किंमत कमी करणें, (-ला) हलकेपणा आणणें, हीणकस करणें ; as, "Alloy in coin of gold may make the metal work the better. but it *embaseth* it." Embased' *pa. t. & pa. p.* Embas'ing *pr. p. & v. n.* Embase'ment *n.*

Embassade (em'ba-sād) *n.* (*obs.*) (*Shakes.*) Same as Embassy.

Embassador (em-bas'sa-dėr) *n.* (*Chaucer, Dryden*) Same as Ambassador. Embassad'orial *a.* Same as Ambassadorial. Embas'sadress *n.* Same as Ambassadress. Em'bassage *n. an embassy* वकिलात *f*, वकिली *f.* २ (*Shakes.*) *errand, message* निरोप *m*, संदेश *m.* Em'bassy *n.* Embassies *pl. the mission of an ambassador, a public message to a foreign court concerning state affairs* वकिलात *f*, (राजकारस्थान करण्याकरितां) परराष्ट्रांस पाठविलेला निरोप *m*, थैली *f.* २ (hence) *any solemn message* कोणत्याही महत्वाच्या कामासंबंधी निरोप *m.* ३ *the ambassador and his suite, envoys* परराष्ट्राकडे पाठविलेला राजवकील व त्याचा परिवार *m* -लवाजमा *m.* (b) वकीलमंडळ *n.* ४ *the residence or office of an ambassador* परराष्ट्राकडे पाठविलेल्या वकीलाची राहण्याची जागा *f* कचेरी *f.*

*N. B.*—The word Embassy is sometimes, but rarely, spelled as *Ambassy.*

Embattle (em-bat'l) [Pref. *em* & O. Fr. *bastiller* (from the same root as Battlement, Bastille, Baste), to fortify.] *v. t. to furnish with battlements* (भिंती घालून) मजबूत करणें, तटबंदी करणें, कूस घालणें. Embat'tling *pr. p.* Embat'tled *pa. t. & pa. p.* (*heraldry*) *having the edge broken like battlements* धार मोडलेलें, दांते पडलेलें. Embat'tlement *n. an indented parapet, a battlement* (which see) दांत्यांप्रमाणें पुढें मागें झालेली-जंग्यांच्या रक्षणाकरितां त्यांच्या तोंडावर चोंहों बाजूंनीं पुढें दगड आणून बांधलेली-भिंत *f.* २ *the fortifying of a building or a wall by means of battlements* भिंत-इमारत इ॰ पुस्ती किंवा नेटावा देऊन मजबूत करणें *n.*



Embattle (em-bat'l) [Pref. *em* & Battle.] *v. t. to arrange in order of battle, to array for battle* (लढाईकरितां) सैन्याची रचना लावणें-करणें, सैन्य व्यवस्थेनें उभें करणें, फौज रांगेनें लावणें-उभी करणें, सेनायोजना *f* -रणयोजना *f* -रणरचना *f.* करणें, व्यूह रचणें. २ *to arm or equip for battle* (लढाईकरितां) हत्यारबंद-सशस्त्र-सज्ज-सिद्ध करणें. E. *v. i.* (*obs.*) लढाईस सिद्ध होणें, व्यूह करून उभें राहणें. Embat'tled *pa. t. & pa. p. having been the scene of battle* लढाईची जागा असलेलें, जेथें पूर्वी लढाई झाली आहे अशी (जागा), रणभूमि *f* -रणमैदान *n.* झालेलें, ज्याच्यावर-ज्या ठिकाणीं लढाई होऊन गेली आहे असें, लढाईचें; as, "An E. plain."

Embay (em-bā') [Pref. *em* + 1st Bay.] *v. t. to enclose in a bay, to landlock* उपसागरांत-आखातांत कोंडणें-घालणें; as, "If that the Turkish fleet be not ensheltered and *embayed*, they are drowned." Embayed' *pa. t. & pa. p.* Embay'ing *pr. p. & v. n.* Embay'ment *n.* (R.)

Embeam (em-bēm') *v. t.* (R.) *to make brilliant with beams* (किरणांनीं) प्रकाशित करणें, (-वर) उजेड पाडणें, (-वर) किरण पाडून चकाकित-झकझकीत करणें.

Embed (em-bed') *v. t. to lay as in a bed, to lay in surrounding matter* पुरून ठेवणें-टाकणें, पुरणें, (आंत) खोल घालणें. Embed'ded *pa. t. & pa. p.* Embed'ding *pr. p. & v. n.* Embed'ment *n.* पुरणें *n.*

Embellish (em-bel'lish) [O. Fr. *embellir*—pref. *em* (L. *in*) & (*belle,-bellus*) *bel, beau*, beautiful, pretty.] *v. t. to make beautiful with ornaments, to deck, to adorn, to decorate* (-ला) शोभा *f* -रमणीयता *f.* आणणें, सुशोभित-मंडित करणें, मंडन करणें *g. of o.*, भूषविणें, अलंकृत करणें, (-ला) रमणीय स्वरूप देणें, मनोवेधक-चित्ताकर्षक करणें, शोभविणें, सजविणें, नटविणें. २ (*fig.*) *to dress up, to colour* (a story with striking anecdotes &c.) बनावणें, बनावून सांगणें, तिखटमीठ लावून सांगणें, फुगवून सांगणें, फुगविणें, रंगवून सांगणें. Embel'lisher *n.* शोभा देणारा *m.* Embel'lishment *n.—the act* सुशोभित करणें *n*, मंडन *n*, अलंकरण *n*, अलंक्रिया *f*, थाट *m.* २ *ornament, decoration* अलंकार *m*, भूषण *n*, शोभा *f*, मंडन *n*; as, "Pictorial E.s."

Ember (em'-bėr) [A. S. *æmyrie*, cinders.] *n. a lighted coal smouldering amid ashes*, (generally used in the *pl.* to signify) *live cinders, smouldering remains of a fire* निखारे *m, pl.*, रसाणें *n.* (*colloq.*)

Ember ( em'-ber ) [ A. S. *ymbren*, *ymbryne*, a running round, a circuit,—*ymb*, around & *ryne*, running–*rinnan*, to run. ] *a. recurring in each quarter of the year* त्रैमासिक, तीन तीन महिन्यांनीं येणारा-होणारा; as, "E. fasts." Ember-days, Embering-days *n. pl.* (in *Rom. Cath. & Eng. Church*) *days set apart for fasting and prayer in each of the four seasons of the year* ( the Wednesday, Friday, and Saturday after the first Sunday in Lent, Whitsuntide, the 14th of September, and the 13th of December) वर्षांतील चार ऋतूंपैकीं प्रत्येक ऋतूमध्यें उपोषण व उपासना (प्रार्थना) करण्याकरितां नेमलेले दिवस *m. pl.* हे दिवस ज्या आठवड्यांत येतात त्या आठवड्यांस *Ember weeks* असें म्हणतात. Embertide *n. the season at which ember-days occur* वरील दिवस येण्याचा हंगाम *m.* Ember-week *n. the week in which ember-days occur*. See Ember-days.

*N. B.* Ember-days. The supposition that persons sat in embers ( or ashes ) on these days is without foundation.

Embezzle ( em-bez'-l ) [ A. Fr. *enbesiler*, to filch–O. Fr. *en* (L. *in*) & *besillier*, to maltreat. O. Fr. *besil*, ill-treatment. ] *v. t. to appropriate fraudulently to one's own use* ( as money or property entrusted to one's care ), *to peculate, to apply to one's private use by a breach of trust* (as a clerk or servant entrusted with his employer's money or valuables ) ( ठेव-मालकाचा पैसा इ० चा ) अपहार करणें-खाणें-गडप करणें, (-चा) अपहार करणें, खाणें, गिळंकृत करणें, गिळून बसणें, चावणें. [ PHRASES INVOLVING THIS SENSE ARE NUMEROUS : AS, चापाचापी करणें, घशाहाताखालीं घालणें, दडपणें, डल्ला मारणें *with* वर *of o.*, तळीराम गार करणें, स्वाहा करणें. ]. Embez'zling *pr. p.* Embez'zled *pa. p.* Embez'zlement *n.–the act* अपहार *m*, अपव्यय *m*, हरामखोरी *f.* Embez'zler *n.* खाणारा, खावू, खादू, गडप करणारा.

Embitter ( em-bit'ter ) [ Pref. *em* & Bitter. ] *v. t. to make bitter or sad* दुःखमय-कष्टमय करणें, दुःखाचा-क्लेशाचा-कठीण करणें, दुःख *n.* क्लेश *m. pl.* &c. देणें, कटु करणें, दुखवणें. Embit'terer *n.* Embit'terment *n.* ( a )–*the act* दुःखाचा-क्लेशाचा करणें *n.* ( b ) *that which embitters* दुखवणारी-दुःखाचा-क्लेशाचा करणारी गोष्ट *f.* कारण *n.*

Emblaze ( em-blāz' ) [ Pref. *em* & Blaze. ] *v. t. to kindle, to set in a blaze* पेटविणें, आग लावणें. २ *to adorn with glittering embellishments* झकझकीत-चकचकीत भूषणांनीं शृंगारणें. ३ ( *heraldry* ) *to emblazon, to paint with the armorial colours* ( चिलखताप्रमाणें ) चित्रभूपित करणें.

Emblazon ( em-blā'-z'n ) [ Pref. *em* & Blazon.] *v. t.* ( said of heraldic bearings ) *to blazon or adorn with figures, to depict, to represent* आपल्या कुळाच्या चिन्हांनीं सुशोभित करणें, कुलसूचक-कुलदर्शक चित्रें *n. pl.*- चिन्हें *n. pl.* काढणें, ठळक-भपकेदार-भडक रंगांनीं रंगविणें. २ *to deck in blazing colours, to set off conspicuously* ( -चा ) थाटमाट करणें, नटविणें, रंगदार-भपकेदार करणें, लोकांच्या डोळ्यांत भरेल अशा रीतीनें शृंगारणें. ३ *to celebrate in laudable terms, to sing the praises of* (-ची) स्तुति गाणें-सांगणें-करणें, घोशानें वर्णन करणें, घोशा-गाजावाजा करणें, (-चे) पोवाडे गाणें, वाखाणणी करणें, (वाहवा करून-स्तुति करून) प्रसिद्धीस आणणें. Emblā'zoner *n.* Emblā'zonment *n.–the act* अलंकरण *n*, सुशोभित करणें *n.* २ भपकेदार वर्णन *n.* ३ *that which is emblazoned* कुलसूचक-दर्शक चिन्हांनीं अलंकृत वस्तु *f*, थाटानें-भपक्यानें वर्णिलेली गोष्ट *f.* Emblā'zonry *n.* Emblazonries *pl. the act or art* ( ढालीवर-तरवारीवर-&c. ) शृंगारिक नकस काम काढणें *n*, शोभिवंत-सुंदर नकशी काढणें *n.* २ *the heraldic or ornamental decoration* ( as pictures or figures on shields, standards, etc. ) ( ढाल, तरवार, पताका वगैरेंवर काढलेलीं ) कुलदर्शक चिन्हें-चित्रें *n. pl*, नकासकाम *n*; as, "Thy ancient standard's rich E."

Emblem ( em'blem ) [ Fr. *embleme*.–L. *emblema*, Gr. *emblema*–*emballein*–*em*, in & *ballein*, to cast. *Lit. something inserted in a surface as ornament* शोभेकरितां तोंडावरच बसविलेली वस्तु *f*, शोभेकरितां कांचेचे-संगमरवरी दगडाचे वगैरे तुकडे चुन्यांत वगैरे बसवून केलेलें काम असा E. या शब्दाचा मूळ अर्थ होता.] *n. a symbol, a type* ( सूचक-ज्ञापक-व्यंजक बोधक) खूण *f*, चिन्ह *n*, निशाणी *f*, चित्र *n*, द्योतक खूण *f*, चिन्ह *n*; as, "A balance is an E. of justice. The sceptre is the E. of sovereignty." २ *a picture accompanied with a motto, a set of verses or the like* ( intended as a moral lesson or meditation ) एखादी बोधपर म्हण अगर कविता वगैरे ज्यावर लिहिलेली आहे असें चित्र *n.* याचा मुख्य उद्देश नीतिशिक्षण हा असतो. अशा तऱ्हेच्या चित्रांचा प्रसार करण्याकरितां सतराव्या शतकांतील लेखक व कारागीर त्या विषयाचा विशेष लक्ष लावून अभ्यास करीत असत. E. *v. t.* (R.) Em'blemat'ic, Em'blemat'ical *a. pertaining to or containing emblems* खुणेचा, सांकेतिक, लाक्षणिक, व्यंजक, उद्बोधक, ज्ञापक, सूचक, संकेताचा, सांज्ञिक. Em'blemat'ically *adv.* सांकेतिक रीतीनें. Emblem'atist *n. an inventor of emblems* द्योतक चित्रें-चिन्हें शोधून काढणारा. Emblema'tize, Em'blemize *v. t. to represent by an emblem, to symbolize* ( कोणत्याही ) खुणेनें-चिन्हानें-चित्रानें सुचविणें-दर्शविणें-काढून दाखविणें.

Emblement ( em'-blē'-ment ) [O. Fr. *embleer*, to sow with corn–pref. *em* & *ble*, *bled*, from L. *bladum* the produce of corn.] *n.* (used esp. in the *pl.*) (*law*) *the produce or*

*fruit of land sown or planted, growing crops annually produced* उभें or उगवतें पीक *n.*

Embody ( em-bod-'i ) [ Pref. *em* and Body. ] *v. t.* ( written also *Imbody* ) *to render obvious to the senses or mental perception* देही-शरीरी-सदेह करणें, देह *m* - शरीर *n.* देणें, दृश्यस्वरूप देणें. २ *to form into a body, to incorporate, to collect into a body* एकदेही-समाविष्ट-सामील करणें. E. *v. i.* ( also *Imbody* ) *to unite in a body, a mass or a collection, to coalesce* गोळा होणें, एकत्र होणें, जमणें, एकदेही- एकशरीरी होणें, एकजूट करणें; as, "Firmly to E. against this court party." *Burke.* Embod'ied *pa. t. & pa. p.* देही, देहधारी, देहवान्, शरीरी, जातरूप. २ संग्रहीत, संग्रह केलेला. Embod'ying *pr. p. & v. n.* Embod'ier *n.* दृश्य स्वरूप देणारा. २ एकत्र करणारा. Embodi'ment *n.–the act* देह देणें *n.* २ एकदेहीकरण *n*, एकीकरण *n.–the state* शरीरिता *f*, देहवत्त्व *n*, मूर्तिमत्ता *f*, सदेह स्वरूप *n*, दृश्यस्वरूप *n.* २ मूर्ति *f.* ३ संग्रह *m*, समाहार *m.*

Embogue ( embōg' ) [ Pref. *em* & O. Fr. *bogue*, a mouth.–L. *bucca*, the cheek. ] *v. i.* (R.) *to discharge itself as a river into another river or the sea* ( आंत ) वाहत जाणें.

Embolden ( em-bōld'en ) [ Pref. *em* & Bold. ] *v. t. to make bold or courageous* अधिक धीट करणें, धीर *m.* हिम्मत *f.* देणें, (-ला) धिटाई *f*- धीटपणा *m.* आणणें, निर्भय करणें. Embold'ened *pa. t. & pa. p.* धीट. Embold'ening *pr. p. & v. n.* Embold'ener *n.*

Embolism ( em'bō-liz'-m ) [ Gr. *emballein*, to throw in, to insert. ] *n. intercalation; the insertion of days, months or years, in an account of time, to produce regularity* अधिक मास *m* -दिवस *m* - वर्ष *n.* २ *med. the obstruction of a blood vessel by a clot of fibrin*, ( a frequent cause of paralysis & of gangrene of the part beyond the obstacle ) गोठलेल्या रक्ताचा तुकडा शरीरांतील एका भागांतून दुसऱ्या भागांत जाऊन सूक्ष्म धमनींत अडकून राहणें. Embolis'mal *a. intercalary* अधिक; as, " E. months." Embolis'mic, Em'bolismical *a. intercalated* अधिक महिन्याचें, ज्यांत अधिक महिना पडतो तें; as, "E. year."

Embonpoint ( om'-bon-pwan ) [Fr. *em* in, *bon*, good & *point*, condition. ] *n. plumpness, fleshiness* ( said esp. of persons somewhat corpulent ) स्थूलपणा *m*, दोंदीलपणा *m.*

Emborder ( em-bor'-dėr ) [Pref. *em* & Border. ] *v. t. to furnish or adorn with a border* (-ला) कांठ लावणें.

Embosom (em-bōōz'-um) [ Pref. *em* & Bosom. ] *v. t. to take into the bosom, to foster, to admit to affection* प्रेमानें हृदयांत बाळगणें, (-ला) प्रेम दाखविणें, प्रेमभाजन करणें. २ *to inclose, to surround, to shelter closely* (-नें) संरक्षण करणें, भोंवतालीं आश्रय देणें.

Emboss ( em-bos' ) [Pref. *em* ( L. *in*) & Boss.] *v. t. to raise the surface of into bosses or protuberances*, ( particularly ) *to ornament with raised work* उठावाची नकशी काढणें, गेंददार-गोंडेदार करणें, (-वर) गेंद गोंडे-वेंडें उठवणें, उठावनकशीनें शोभा आणणें. २ *to raise in relief from a surface* ( as an ornament, a head on a coin, or the like) पृष्ठभाग उठाव करणें, उठावाचें चित्र *n*- नकशी *f.* काढणें, उठाव काम करणें, उठाव नकशी काढणें. Embossed' *pa. t. & pa. p.* Embos'sing *pr. p. & v. n.* Emboss'er *n.* उठाव नकशीचें-उठाव काम करणारा. Emboss'ment *n.–the act* ( कोणत्याही वस्तूवर) उठाव चित्रें काढणें *n.* २ *a bosslike prominence, a figure in relief, a protuberance* उठावचित्र *n*, उठाव नकशी *f*, उंचवटा *m*, उठाव नकसकाम *n.*

Emboss ( em-bos' ) [ O. Fr. *embusquer*, to shroud in a wood. -O. Fr. *em* ( L. *in* ), in & *bos*, a wood. ] *v. t.* ( *Milton* ) *to conceal in a thicket* झाडींत लपविणें, (आश्रय धरून) रानांत राहविणें. २ *to ensheath, to beset* वेष्टणें, ( नें ) युक्त करणें, आच्छादित-आवृत करणें; As, "In mighty arms embossed."

Embouchure ( äm-bōō-shur' ) [Fr. pref. *em* & *bouche*, the mouth. ] *n. the mouth of a river* नदीमुख *n*, नदीचें तोंड *n*- मुख *n.* २ *the mouth of a cannon* तोफेचें तोंड *n.* ३ *mus.* (a) *the mouthpiece of a wind instrument* वायुवाद्याचे नळीच्या तोंडाला लावण्याचा भाग *m*, जीभ *f.* २ ( वायुवाद्याचे नळींत बसविलेला ) जीव *m*, जीभ *f*, जिव्हाळी *f.* (b) *the shaping of the lips to the mouth piece* ( वायुवाद्याचे ) जिभेप्रमाणें ओंठांची जुळणी *f*, ठेवण *f*, जिवणी *f*; as, "A flute-player has a good E. "

Embowel ( em-bow'-el ) [ Pref. *em* & Bowel.] *v. t. to eviscerate, to disembowel* (to disembowel is the preferable word in this sense ) आंतडीं बाहेर काढणें-उपसणें-उपसून काढणें *g. of. o.*; as, "The barbarous practice of embowelling." २ *to hide in the inward parts, to bury* लपविणें, झांकणें, पुरून टाकणें, गडप्प करणें; as, " Or deep emboweled in the earth entire." Embow'eler *n.* Embow'elment *n.* Emboweled or Embowelled *pa. p.* Emboweling, Embowelling *pr. p.*

Embower ( em-bow'-er ) [ Pref. *em* & Bower. ] (written also *Imbower.*) *v. t. to cover with a bower, to shelter with trees* लताकुंज करणें, वेलींचें आच्छादन करणें, झाडांचा आसरा बनविणें, कुंज करणें *acc. of o.* E. *v. i. to lodge or rest in a bower* (लता) कुंजांत बसणें-विश्रांति घेणें.

Embox ( em-boks' ) [ Pref. *em*, & Box. ] *v. t. to enclose* ( as in a box ) पेटींत बंद करणें-घालणें.

Embrace (em-brās') [O. Fr. *embracer*, Fr. *embrasser*; pref. *em* ( L. *in* ), & *bras*, arm.] *v. t. to clasp in the arms with affection, to hug* आलिंगन *n*- खेंव *f.*

देणें, आलिंगणें, कवळणें, कंवटाळणें, वेंगाळणें, वेंगटणें, आलिंगून-कवळून-वेंगाटून धरणें, वेंगेंत-कवेंत-धरणें, उराशीं-पोटाशीं धरणें, वेंग *f*- मिठी *f.* घालणें-मारणें, विळखा *m.* घालणें, आंवळणें. [To E. EAGERLY कडकडां-कडकडून भेटणें, कंवटाळून धरणें. ] २ (*Shakes.*) *to cherish, to love* (प्रीतीनें ) मनांत बाळगणें-वागविणें, (वर) प्रेम करणें. ३ *to welcome, to accept with heartiness* खुशीनें पतकरणें, अंगीकारणें, स्वीकारणें, ग्रहण *n*- अंगीकार *m*- स्वीकार *m.* करणें *g. of o.*, कबूल करणें, आनंदानें-मनापासून-अन्तःकरणपूर्वक ग्रहण करणें; as, "What is there that he may not E. for truth ?" ४ *to encompass, to inclose* घेरणें, कंवटाळणें, कोंडणें, कोंडून धरणें, (चोंहों बाजूंनीं) वेढणें-वेष्टण घालणें. ५ *to include, to comprehend* समावेश करणें *g. of o.*, समाविष्ट-अन्तर्भूत करणें, (-च्या) पोटांत येणें; as, "Natural philosophy embraces many sciences." ६ *to accept, to submit to* (-ला) सादर असणें, (-ला) कबूल असणें *in. cons.* पतकरणें, (-ला) डोई देणें; as, "I E. this fortune patiently." ७ *law. to attempt to influence corruptly* ( as a jury ) (-चें) ( मन कलुषित करण्याचा प्रयत्न करणें, (-चें) मन विघडवूं पाहणें, (अयोग्य उपायांनीं-निषिद्ध मार्गांनीं-बेकायदेशीरपणानें ) फितवणें, मन वळविण्याचा प्रयत्न करणें. E. *v. i. to join in an embrace* (-ला) मिठी मारणें. Embrac'ed *pa. t. & pa. p.* Embrac'ing *pr. p. & v. n.* Embrace *n. pressure to the bosom, clasp, hug (the act)* आलिंगन *n*, आश्लेष *m*, कवळणी *f*, कंवटाळणी *f*, वेंगाटणी *f.*–*the state* मिठी *f*, विळखा *m.* [CLOSE & FAST E. घट्ट मिठी *f*, माकडमिठी *f*, दृढ-गाढालिंगन *n.*] २ अंगीकरण *n*, अंगीकार *m*, स्वीकरण *n*, स्वीकार *m*, ग्रहण *n.* (S.) ३ पतकर *m*, पतकरणें *n*, घेणें *n.* Embrace'ment *n. a clasp in the arms, an embrace* आलिंगन *n*, प्रेमालिंगन *n*, मिठी *f*, &c. २ ( *Bacon* ) *the state of being contained* अन्तर्भाव *m*, समावेश *m.* Embra'ceor *n. law. one guilty of embracery* (न्यायाधिशाचें वगैरे) मन कलुषित करूं पाहणारा, मन विघडविण्याचा प्रयत्न करणारा, मन वळविणारा, अयोग्य तऱ्हेनें-बेकायदेशीर रीतीनें न्यायाधिशाचें मन वळविण्याचा अपराध ज्याच्या हातून झाला आहे असा. Embra'cer *n.* कंवटाळणारा, आलिंगन देणारा. Embra'cery *n. law. an attempt to influence a jury corruptly to one side by promises, entreaties, threats etc.* ( पैशाची लालूच दाखवून, धमकी देऊन, विनवणी करून, थापा मारून, अशा) अनेक बेकायदेशीर इलाजांनीं पंचांचें किंवा जूरीचें मन आपले बाजूकडे ओढून घेण्याचा-वळविण्याचा प्रयत्न *m*, फितविण्याचा प्रयत्न *m.*

Embrasure ( em-brā'-zhūr ) [Fr. pref. *em*, & *braser*, to slope the edge of a stone. ] *n. fort. an aperture with slant sides in a wall or parapet through which cannon are pointed & discharged, a crenelle* (बंदुका-तोफा रोंखून उडविण्याकरितां किल्ल्याच्या तटबंदींत केलेलें-राखलेलें) तिरकस-कलतें-तिरपें भोंक *n*, मारणी *f*, आकाशजननी (S.), जंगी *f*, जंजीरी *f*, तोफेची खिडकी *f.* २ *arch. a splay of a door or window* (खिडकीची किंवा दरवाज्याची) निमुळती बाजू *f.*

Embrocate (em'-brō-kāt) [L. *embrocare, embrocatum*, -Gr. *embroche*, a fermentation, *em*, & *brechein*, to wet. ] *v. t. med. to moisten and rub* ( as a diseased part ) *with a liquid substance* ( as with spirit, oil, etc. ) *by means of a sponge or a piece of cloth* (प्रवाही औषधी द्रव्यानें केलेल्या) ओल्या फडक्यानें किंवा स्पंजानें घांसणें-मर्दन करणें, प्रवाही औषधानें चोळणें, औषध चोळणें. Em'broca'ted *pa. t. & pa. p.* Em'brocating *pr. p. & v. n.* Embrocā'tion *n.*–*the act* मर्दन *n*, लेपन *n*, चोळणें *n*, घांसणें *n.* २ *the liquid or lotion with which an affected part is rubbed* चोळण्याचें-लावण्याचें औषध *n*, मर्दनौषध *n.*

Embroglio ( embrōl'-yō ), See Imbroglio. घोंटाळा *m*, घोंटाळा होण्याची-आणीबाणीची-निकराची वेळ *f.*

Embroider ( em-broy'-dėr ) [ Pref. *em &* Broider.] *v. t. to adorn with figures of needlework, often raised above the surface* कशिदा *m.* काढणें *with* वर *of o.*, बुटी *f*- वेल *f.* काढणें, वेलबुटी *f.* काढणें *with* वर *of o.* Embroi'dered *pa. t. & pa. p.* Embroi'dering *pr. p. & v. n.* Embroi'derer *n.* कशिदा काढणारा *m.* Embroi'dery *n. variegated needle-work* कशिदा *m*, बुटी *f*, वेलबुटी *f.* २ *the art* कशिदाचें-वेलबुटीचें काम *n.* ३ ( *fig.* ) *variegated or diversified ornamentation* नकशी *f*; as, "A mere rhetorical E. of phrases."

Embroil (em-broil') [Fr. *embrouiller* pref. *em* (L. *in*) & *brouiller*; see Broil.] *v. t. to mix up or entangle in a quarrel or disturbance* तंट्यांत-भांडणांत गुंतवणें, (-च्यांत) फूट *f*- तूट *f*- विघाड *m.* पाडणें, कळ *f*- आग *f.* लावणें, खजाळी *f.* करणें, (-मध्यें) बखेडे *m. pl.* पाडणें-माजविणें, भांडण *n*- कलह *m.* झुंपविणें; as, "The royal house embroiled in civil war." २ *to make confused, to distract* घोंटाळ्यांत पाडणें-घालणें, गोंधळवणें, (-ची) गडबड *f*- धांदल *f.* करणें-उडविणें. ३ *to complicate, to jumble* गुंतवणें, (-ची) गुंतागुंत करणें, गुरफटवणें, संकर करणें; as, "The Christian antiquities at Rome are so embroiled with fable and legend." ४ *to involve in difficulties by dissension or strife* (भांडणें लावून) अडचणींत घालणें-पाडणें-आणणें, E. *n.* See Embroilment. Embroil'er *n.* कज्जेदलाल-कळलाव्या, आगलाव्या, दुलाव्या, कळचेप्या-कलह लावणारा, कळीचा नारद *m.* Embroil'ment *n.*–*the act* तंटा *m*- भांडण *n*- कळ *f*- आग *f.* (*fig.*) लावणें *n*, लावालाव *f.* करणें *n.* (b) *the condition–entanglement in a broil* भांडण *n*, कज्जा *m*, कलागत *f*, कलह *m*, भांडणांत-कलागतींत सांपडणें-अडकणें-गुंतणें-गुंतून पडणें *n.*

Embrown ( em-brown' ) [ Pref. *em* & Brown. ] *v. t. to give a brown colour to* तपकिरी रंग चढविणें *with*

वर *of o.*, तपकिरी रंग देणें *with* ला *of o.*, तपकिरी करणें.

Embrue (em-brōō) *v. t.* (*obs.*) See Imbrue, Embrue.

Embryo (em'-bri-ō) [Gr. *embryon*, *em*, in & *bryein*, to be full of anything.] *n.* ( *biol.* ) *the first rudiments of an organism, whether animal or plant*; as: (a) *the young of an animal in the womb esp.* before the several members are distinctly formed after which it is called a *foetus* (नुक्ताच राहिलेला) अस्पष्टावयवगर्भ *m*, भ्रूण *m*, जरायुस्थ गर्भ *m*, पिंड *m*, गाभ *m* ( said of beasts ). [ MURDER OF E. भ्रूणहत्या *f.* ] (b) *bot. the germ of the plant which is enclosed in the seed and which is developed by germination* गर्भ *m*, मोग *m*, मोख *m*, मोड *m*, मूलांकुर *m*, अंकुरबीज *n.* [ E. BUD गर्भकलिका *f.* E. SAC ( also sometimes called *amniotic sac*, *embryonic sac* & *embryonal sac* ) उल्व *m*, गर्भवेष्टन *n.* IN E. गर्भावस्थ, गर्भावस्थेंत असणारा. अपरिणत-अपरिपक्व दशेंत-स्थितींत.] E. *a. rudimentary*, *undeveloped* अपरिणत, अपरिपक्व, गर्भस्थितींतील; as, "An E. bud." Em'bryogen'ic *a. biol. pertaining to the development of an embryo* (See Embryogeny) गर्भवृद्धीसंबंधीं. Embryog'eny *n. biol. the production and development of an embryo* गर्भधारणा व वृद्धि *f*, गर्भसंभव व परिपोषण *n.* Embryog'ony *n. biol. the formation of an embryo* गर्भ वनणें *n*-तयार होणें *n.* Embryog'raphy *n. the general description of embryos* पिंडभेदवर्णन *n*, पिंडवर्णन *n*, गर्भविषयक स्थूलविवेचन *n.* Em'bryol'ogy *n. biol. the study of the gradual development of the ovum until it reaches the adult stage* पिंडाच्या संभवापासून तों त्यास पूर्णावस्था येईपर्यंतचा गर्भाच्या वृद्धीचा अभ्यास *m*, पिंडवृद्धिशास्त्र *n*, पिंडशास्त्र *n.* Embryolog'ic, Embryolog'ical *a.* Embryol'ogist *n.* पिंडशास्त्रवेत्ता *m.*

*N. B.* इंग्रजींत चार महिन्यांपर्यंतच्या गर्भाला Embryo असें म्हणतात. चार महिन्यांनंतर गर्भाला जेव्हां स्पष्ट अवयव येतात तेव्हां त्यास fœtus असें म्हणतात. आर्यवैद्यकांत पहिल्या महिन्याच्या गर्भाला कलल व दुसऱ्या महिन्याच्या गर्भाला अर्बुद असें म्हणतात. चार महिन्यांनंतरच गर्भाला स्पष्टावयव येतात असें आर्यवैद्यकाचेंही मत आहे.

Embryon ( em'-bri-on ) [ See Embryo. ] *n.* & *a.* See Embryo. Em'bryonal, Em'bryonary, Em'bryonāte, Em'bryona'ted, Em'bryon'ic *a. biol. of or pertaining to an embryo* पिंडाचा, गर्भसंबंधीं. २ *rudimentary* प्राथमिक, बाल्यावस्थेंतील (*fig.*), अपरिणत. Embryonif'erous *a. having an embryo* सगर्भ, गर्भ असलेला. Embryon'iform *a. biol. like an embryo in form* पिंडाकार, गर्भाकृति, आकारानें गर्भासारखा. Embryoplas'tic *a. biol. relating to or aiding in the formation of an embryo* गर्भाला आकार प्राप्त होतांना उपयोगीं पडणारा. Embryot'ic *a.* Same as Embryonic. Embryot'omy *n. med. the cutting of a fœtus into pieces within the womb so as to effect its removal* ( as in dangerous delivery) गर्भ *m*,-मूल ( *colloq.* ) कापून काढणें *n*, ( बाळंतीण अडली असतां ) ( अडलेल्या बाळंतिणीची सुटका करितांना), गर्भछेदन *n.* Em'bryōtroph *n. biol. the material from which the embryo is formed & nourished* ज्याच्यापासून गर्भोत्पत्ति व गर्भपोषण होतें असें द्रव्य *n*, गर्भद्रव्य *n.*

Emend ( ē-mend' ) [ L. *emendare–e*, out of & *menda*, *mendum*, a fault, a blemish. *Amend* & *Mend* are virtually the same as *Emend.* ] *v. t. to remove faults or blemishes from, to purge of faults, to make better* (-चे) दोष काढून टाकणें-नाहींसे करणें-घालविणें-दूर करणें, सुधारणें, (-ची) सुधारणा करणें, निर्दोष-शुद्ध करणें. २ *to make corrections* ( in a literary work ), *to improve the reading of* ( as an *emended* text of Shakespeare ) शुद्ध करणें, (-ची) शुद्धि करणें, तपासून सुधारणें -शुद्ध करणें, शोध घालणें, पाठशुद्धि करणें. Emendā'tion *n.–the act* शुद्ध करणें *n*, शोध *m*, शोधन *n.* २ *alteration by editorial criticism, as of a text so as to give a better reading* शोध *m*, पाठसूचना *f*, शुद्धि *f*, दुरुस्ती *f.* ३ *removal of errors or corruptions from a document* शुद्धि *f*, शोध *m*, दुरुस्ती *f.* Em'endator *n.* शोधक. २ टिप्पणीकार *m.* Emen'datory *a.* शुद्ध-निर्दोष करणारा, दोष काढून टाकणारा. Emend'er *n.* दोष काढून टाकणारा, शोधक.

*N. B.* Amend सुधारणें. Emend निर्दोष करणें.

Emerald ( em'-ĕr-ald ) [ Fr. *emeraude*, Span. *esmeralda.* L. *smaragdus.*–Gr. *smaragdos*, *an emerald.* cf. Sk. मरकत.] *n. min. a precious stone of a rich green colour* पाच *f*, गरुडपाच *f*, मरकत *m*, राजनील *m*, पन्नग *pop.* पन्ना *m*, हरिन्मणि *m*, अश्मगर्भ *m.* २ *print.* टाइपाचा एक प्रकार *m.* E. *a.* मारकत, मरकतसदृश, जंबुर्दी; as, "E. meadows." Emerald green हिरवट टिकाऊ रंग *m*, मरकती रंग *m*, पाचेसारखा हिरवा रंग *m.* Emerald Isle आयर्लंड बेटास दिलेलें एक नांव *n.* त्या बेटांतील गर्द व हिरव्या चार झाडीच्या रंगावरून त्यास हें नांव पडलें आहे.

Emerge ( ē-mėrj' ) [ L. *e*, & *mergere*, *mersum*, to dip, to plunge. See Merge. ] *v. i. to rise out of a fluid, to issue and appear* ( प्रवाही पदार्थांतून-पाण्यांतून ) वर येणें-निघणें, उदय पावणें, दृष्टीस पडणें, दृष्टिगोचर होणें, उदय *m*-उन्मज्जन *n* उद्गमन *n* -पावणें *with g. of s.*; as, "To E. from the water or the ocean; The sun E.s from behind the moon in an eclipse." २ *to emerge from poverty or obscurity* डोकें वर काढणें, करणें, उदय होणें *g. of s.*, उदयास येणें, पुढें येणें, (*fig.*) *g. of s.*, नांवारूपास येणें, अभ्युदय पावणें ; as, "Those who have emerged from very low, some from the lowest, classes of society." Emer'gence *n. pl.* Emer'gences *the act of sudden uprisal or appearance* (अकल्पित) वर येणें *n*, उदय *m*, उन्मजन

*n*, उद्गमन *n.* २ *rise* उदय *m*, अभ्युदय *m.* Emer'-gency *n. pl.* Emergencies *sudden or unexpected appearances* अवचित येणें *n*, दृष्टिगोचर होणें *n*, (अकल्पित) आविष्करण *n.* २ *an unforeseen occurrence or combination of circumstances which calls for immediate action or remedy, exigency* आकस्मिक प्रसंग *m*-प्रयोजन *n*, अडीअडचणीची वेळ *f*, प्रसंग *m*, अडचण *f*, नड *f*, अडली गरज *f*, निकड *f*, संकट *n*, विपत्समय *m*; as, "A safe counsellor in most difficult emergencies." Emer'gent *a. issuing, coming to light* प्रकाशमान होणारा. २ *calling for prompt action, urgent* ज्याची तावडतोब व्यवस्था लाविलीच पाहिजे असा निकडीचा, जरूरीचा, आकस्मिक प्रसंगाचा, आकस्मिक; as, "Protection granted in E. danger." Emergent year *n. the epoch or date from which any people compute their time or dates* जीपासून कोणत्याहि लोकांच्या कालगणनेला सुरवात होते ती वेळ *f.* ज्या वर्षापासून तारीखवार वेळ मोजण्यास सुरवात करितात तें वर्ष *n*, शकारंभ *m*, वर्ष-सन सुरू झाला तें वर्ष *n*; as, "The E. *year* of Christendom is the year of the birth of Christ, The *E. year* of the United States is the year of the declaration of their independence." Emer'gently *adv.* आकस्मिक. Emer'gentness *n.* (R.) Emer'sion *n. the act of emerging or rising out of a fluid or other substance, the act of coming forth to view* उन्मज्जन *n*, उद्गमन *n*, उत्थान *n.* २ *astron. the reappearance of a heavenly body after an eclipse or occultation* आविर्भाव *m*, (*lit.*), उदय *m*, (ग्रहणाच्या मोक्षकालानंतर) दर्शन *n*, ग्रहणमोक्ष *m*, उन्मीलन *n.* (?).

Emeritus (ē-mer'i-tus) [L. *emeritus*, having served out his time, L. *e*, out & *merere, meritus*, to merit, to earn, to serve. ] *a. discharged from the service of public duty with honour on account of old age, infirmity or long service* (वृद्धावस्था, अशक्तपणा, किंवा बहुत काळपर्यंत इमानें इतबारें नोकरी केल्यामुळें) बहुमानपुरस्सर नोकरीवरून जाण्यास मोकळीक दिलेला, सत्कारपूर्वक नोकरीच्या जबाबदारींतून मोकळा केलेला; as, "A professor or pastor E." E. *n. pl.* Emeriti. *a veteran who has honourably completed his service* ज्यानें आपली नोकरी उत्तम प्रकारें बजाविली आहे असा मनुष्य *m*, ज्यानें आपली नोकरी अब्रूनें पुरी केली आहे-संपवली आहे असा मनुष्य *m.*

Emerods, Emeroids (em'ĕr-odz) [ Corrupted from Hemorrhoids. ] *n. pl.* hemorrhoids मूळव्याध *f.*

Emersion (ē-mėr-shun) See under Emerge.

Emery (em'-er-i) [ Fr. *emeri*, O. Fr. *esmeril*, from It. *smeriglio*, Gr. *smiris, smiris, smeris*, from *smaein*, to rub.] *n. min.* कुरुंदाचा चूर *m.*

Emesis (em'-ĕ' sis) [ Gr. *emein*, to vomit. ] *n. med. a vomiting* ओकारी *f*, उलटी *f*, वमन *n*, वांति *f.*

Emeto-cathartic (emetō-ka-thär'tik) [ Gr. *emetos*, & E. Cathartic, vomiting, which see. ] *a. med. producing vomiting and purging at the same time* वांति व ढाळ एकाच वेळीं उत्पन्न करणारें, वामक व रेचक.

Emetic, Emetical (e-met'-ik,-al) *a. inducing to vomit* उलटी करणारें, वांतिकारक. Eme'tic *n. a medicine which causes vomiting* उलटी *f*-वमन *n.* करणारें औषध *n*, उलटीचें-वांतीचें-वामक औषध *n.* Eme'tically *adv.*

Emeute (ā-mėt' *or* ā-müt') [ Fr. ] *n. a seditious tumult or outburst* राजद्रोही दंगा *m*, बंड *n*, बंडाळी *f.*

Emication (em-i-kā'-shun) [ L. *e*, out & *micare, micatus*, to move quickly to and fro, to sparkle.] *n. a sparkling, scintillation, a flying off in small particles* (as heated iron or fermenting liquors) (उष्णतायुक्त पदार्थांचे) बारीक कण उडणें *n*, ठिणगी किंवा किटाळ उडणें *n*, तुषार उडणें *n.* Em'icant *a.* (R.) *flashing* ठिणग्या उडणारा.

Emiction (e-mik-'shun) [ L. *e*, out & *mingere, mictum*, to make water. ] *n. the voiding of urine* लघ्वी करणें *n*, मुतणें *n.* २ *urine* लघ्वी *f*, मूत *n.* Emic'tory *a.* & *n. med. diuretic* बहुमूत्रक, मूत्रल.

Emigrate (em'-i-grāt) [ L. *e*, out and *migrare*, to remove. ] *v. i. to migrate from house, to remove from one country or State to another for residence* (दुसरीकडे जाऊन राहण्याकरितां) स्वदेशत्याग *m*-स्वदेशांतर *n.* करणें, आपला देश सोडणें-सोडून जाणें, (स्वदेशत्याग) करून परदेशवास करणें-पतकरणें; as, "Forced to E. in a body to America." E. *a.* (*obs.*) Em'igra'ted *pa. t.* & *pa. p.* Em'igra'ting *pr. p.* & *v. n.* Em'igrant *a. removing from one country to another* (*for the purpose of residence*) (परदेशवासार्थ) स्वदेशत्याग केलेला-आपला देश सोडून गेलेला, स्वदेशत्यागी, (स्वदेशत्याग करून) परदेशवास पतकरलेला; as, "An E. nation." २ *pertaining to an emigrant, used for emigrants* देशत्यागी लोकांचा, स्वदेशत्याग (परदेशगमन) करणाऱ्या लोकांकरितां उपयोग केलेलें; as, "An E. ship or hospital." E. *n. one who emigrates* देशत्याग करणारा मनुष्य *m*, देशत्यागी. Emigrā'tion *n.* -*the act* देशत्याग *m*, आपला देश सोडून देणें *n*-जाणें *n*, (स्वदेशत्याग करून केलेलें) परदेशगमन *n*-परदेशवास *m.* २ *the emigrants collectively* देशत्याग करणारी मंडळी *f*-जनसमूह *m*-संघ *m*, देशत्यागी लोकांचा जमाव *m*; as, "The German E." Em'igrational *a.* देशत्यागासंबंधीं. Emigra'tionist *n. an advocate or promoter of emigration* देशत्यागवादी *m*, देशत्यागोत्तेजक *m*, स्वदेशत्यागमतवादी *m.* Emi'grator *n.* (R.)

*N. B.* Emigrant, Immigrant. *Emigrant* and *emigration* have reference to the country *from* which the migration is made; the correlative words *immigrant* and *immigration* have reference to the country

into which the migration is made, the former marking the *going out from* a country, the latter the *coming into* it. *Webster*.

Eminence ( em'-i-nens ) [ L. *eminens*, eminent. ] *n. a high ground or place, a height* उंचवटा *m*, उंचवळा *m*, उमाठा *m*, उंचाड *n*, टेंकाड *n*, टेंक *n*, टेंपर *n*, जमिनीचा वर आलेला भाग *m*, उच्चभूभाग *m*; as, "Without either eminences, or cavities." २ *high rank, distinction, social or moral loftiness, preferment* श्रेष्ठता *f*, पदवी *f*, श्रेष्ठता *f*, श्रेष्ठत्व *n*, उन्नति *f*. ३ *celebrity* मोठेपणा *m*, मातबरी *f*, प्रसिद्धि *f*, लौकिक *m*, नांवलौकिक *m*, ख्याति *f*, प्रतिष्ठा *f*, गौरव *m*. ४ *a title of honour* ( *esp. applied to cardinals in the Rom. Cath. Church*) कार्डीनलची ( मानाची ) पदवी *f*. Emi'nency *n*. Eminencies *pl*. उच्चत्व *n*, श्रेष्ठत्व *n*. Emi'nent *a. lofty, high, prominent* अत्युच्च, फार उंच, मोठी, उच्च, उन्नत; as, "A very eminent promontory." २ (*fig.*) *superior to others* ( *whether, by birth, high station, merit, talent, learning or virtue* ) श्रेष्ठ, वरिष्ठ, उत्कृष्ट, उत्तम, थोर, महान्, मोठा; as, "An eminent scholar." ३ *distinguished, conspicuous* प्रसिद्ध, महशूर, प्रख्यात, लब्धप्रतिष्ठ, ठळक, प्रसिद्धीचा, नांवालौकिकाचा, विश्रुत, विख्यात. Em'inently *adv. in a high degree, conspicuously* विशेषेंकरून, प्रकर्षेंकरून, अतिशय, अति, महा, बडा, जाडा; as, "An eminently learned doctor."

Emir, Emeer ( ē-'mēr or ē-mēr' ) [ Ar. *emir*, *amir*, a commander. ] *n*. अमीर *m*. E'mirship, Emeership *n. the rank or office of an emir* अमीराची पदवी *f*, दर्जा *m*, अमीरी *f*.

Emissary ( em'-is-sėr-i ) [ L. *emissarius*, *emittere*, *emissum*, to send out. ] *n*. Emissaries. *pl. one sent out by any Power that is at war with another to create dissatisfaction among the people of the latter* गुप्त दूत *m*, हेर *m*, चार *m*, वार्ताहर *m*, चर *m*. शत्रूकडील लोकांचीं मनें कलुषित-असंतुष्ट करण्याकरितां शत्रूच्या राज्यांत पाठविलेला मनुष्य *m*, शत्रूच्या राज्यांत बेदिली उत्पन्न करण्याकरितां पाठविलेला मनुष्य *m*. Emi'ssary *a. exploring, spying* गुप्त बातमी काढणारा, टेहेळणी करणारा. २ *anat. applied to the veins which pass out of the cranium through apertures in the walls* डोक्याच्या कवटीच्या आंतील व बाहेरील शिरांचा संबंध जोडणारी, डोक्याच्या कवटींतील छिद्रांतून जाणारी, शिरासंधायक ( अशुद्ध रक्तवाहिनी ) *f*. Emi'ssaryship' *n. the office*- हेराचें काम *n*. शत्रूच्या राज्यांत बेदिली उत्पन्न करण्याचें काम *n*.

*N. B.*—Emissary, Spy. A *spy* enters an enemy's camp to learn the condition of the enemy; an *emissary* may be a secret agent appointed not only to detect the schemes of an opposing party, but to influence their councils. A *spy* must be concealed, or he suffers death; an *emissary* may in some cases be known as the agent of an adversary without incurring similar hazard.

Emit ( ē-mit' ) [ L. *e*, out & *mittere*, to send. ] *v. t. to throw or give out* ( as, light, heat, steam, &c. ) सोडणें, बाहेर टाकणें, पाडणें, देणें. २ *to discharge* टाकणें, सोडणें, फेंकणें, मारणें ( *colloq.* ); as, "Lest, wrathful, the far-shooting God E. his fatal arrows." ३ *to issue forth* (as an order or decree) (हुकूम) सोडणें. ४ *to print and circulate* ( as notes or bills of credit ) पतचिठी *f*- नोट *f* बाहेर काढणें, नोटा छापून व्यवहारास देणें; as, "No state shall E. bills of credit." Emis'sion *n. the act of sending or throwing out* सोडणें *n*, पाडणें *n*, टाकणें *n*, देणें *n*, फेंकणें *n*. २ *the act of sending forth or putting into circulation* काढणें *n*, सोडणें *n*; as, "The E. of bank notes." ३ *that which is issued or circulated* बाहेर पडलेला-काढलेला पदार्थ *m*, स्राव *m*, स्रुति *f*, निषेक *m*, उत्सर्ग *m*; as, "The E. was mostly blood." Emis'sive *a. sending out, emitting* विमोचक, उत्सर्जनशील. २ फर्मावण्याची; as, "E. powers." Emissiv'ity *n*. उत्सर्जनशीलता *f*, उत्सर्जनशक्ति *f*, विमोचनशक्ति *f*. Emit'tent *a. sending forth, emissive* विमोचक, बाहेर पाडणारा. Emis'sion theory ( *physics* ) तेजोनिर्गमवाद *m*, तेजःपरमाणुवाद *m*, प्रकाशोत्सारणवाद *m*, प्रकाशोत्सर्गवाद *m*.

Emmanuel ( em-man'-ū-el ) See Immanuel.

Emmenagogue ( em-men'-a-gog) [ Gr. *emmena*, the menses ( Gr. *en*, in & *men*, *menos*, a month ) & *agein*, to lead. ] *n. med. a medicine that promotes the menstrual discharges* आर्तवजनक औषध *n*. Emme'nago'gic *a*. आर्तवजनक.

Emmet ( em'-met ) [ A. S. *aemette*, *aemete*; O. E. *emet*, *amete*, ant. ] *n. an ant* मुंगी *f*, पिपीलिका *f*.

Emmetropia ( em-me-trō'-pi-ä ) [ Gr. *emmetros*, proportional ( Gr. *en*, in & *metron*, measure ) & *opos*, eye. ] *n. med.* ( as opp. to *hypermetropia*, *myopia* & *astigmatism* ) चांगली दृष्टि *f*, ज्या दृष्टीनें जवळचें व लांबचेंही चांगलें दिसतें अशी दृष्टि *f*, अविकारित-साफ-तीक्ष्ण दृष्टि *f*. Emmetro'pic *a*. Emmet'ropy *n*. Same as Emmetropia.

Emollescence (em-ol-les'-sens) [L. *e*, out & *mollescere*, to grow soft—*mollis*, soft. ] *n*. ( *metallur* ) *that degree of softness in a body beginning to melt which alters its shape, the first or lowest degree of fusibility* वितळण्याला आरंभ होण्याची स्थिति *f*-पायरी *f*, वितळूं घातलेल्या पदार्थाचें रूपांतर होतांना प्रारंभीं त्याच्या आंगीं जो नरमपणा येतो तो *m*. Emol'liate *v. t. to soften* मऊ-नरम-मृदु करणें, (-चा) ताठपणा *m*- तीव्रता *f* मोडणें-कमी करणें. २ *to render effeminate* मऊ करणें, जनानीपणा आणणें, नेभळा-नेभळट-करणें, (-च्या) आंगांतील पाणी नाहींसें करणें, भागूबाई बनविणें, नामर्द

करणें-बनविणें; as, "Emolliated by four centuries of Roman domination, the Belgic colonies had forgotten their pristine valour." Emol'lient *a. making soft, making supple, relaxing the solids* मऊ करणारा, नरमपणा आणणारा, सान्द्रता कमी करणारा, स्निग्ध, स्नेहन, अभ्यंजन. E. *n. med. an external softening or soothing application to allay irritation, soreness, &c.* मवाळीचें-मवारीचें-मवागीचें *n-* उपशामक औषध *n*, अभ्यंजन *n*, विलेपन *n*, स्नेहन *n*, मवाळी *f.* Emolli'tion *n.* ( *Bacon.* ) *relaxation* मऊ करणें *n*, सैल करणें *n*-सोडणें *n*.

Emolument ( e-mol'-ū-ment ) [ O. Fr. *emolument*–L. *e*, out & *moliri*, to move, to work,–*moles*, a heap, also effort. ] *n. compensation for service, remuneration, perquisites, fees or salary, gain in general* प्राप्ति *f*, मेहनताना *m*, लाभ *m*, श्रमाचा मोबदला *m*, मेहनतीचें फळ *n*, फळश्रुती *f* (*fig.*), मिळकत *f*, आय *m*, आदाय *m.* Emolumen'tal *a.* (R.) *profitable, advantageous* लाभदायक, फायदेशीर.

Emotion ( ē-mō'-shun ) [ Coined from L. *emotus*, *p. p.* of *emovere*–L. *e*, out & *movere*, *motum*, to move. ] *n. a moving of the mind or soul, a state of excited feelings of any kind* (as, pleasure, pain, joy, grief, &c.) मनोविकार *m*, अंतःकरणाची विक्रिया *f-* विकार *m-* विकृति *f-* भाव *m.* [To BE CHOKING UNDER SOME GREAT E. मनोविकाराच्या उत्कटपणानें-आवेगानें -आवेशानें कंठ दाटणें-सद्गदित होणें WITH *g. of s.*, भरून येणें, गदगदून येणें, गहिंवरणें.] २ *disturbance or agitation of mind caused by a specific exciting cause & manifested by some sensible effect on the body* क्षोभ *m*, व्याक्षोभ *m*, उद्वेग *m*, मनस्ताप *m*, संक्षोभ *m*, आवेग *m*, अन्तर्वेग *m*, रस (?) *m*, मनोविकार *m*, भाव *m*, भर (?) *m.* [ UNDER E. मनोविकाराच्या आवेशांत-भरांत. ] ३ *one of the three fundamental properties of the human mind* ( the other two being *intellect* and *volition* ) चित्ताचा गुण *m*-धर्म *m.* Emō'tional *a. pertaining to emotion* मनोविकाराचा, मनोविकारविषयक-संबंधीं, मनोवृत्तीचा. २ *easily moved* कोंवळ्या मनाचा, मनोविकाराधीन, नाजुक मनोवृत्तींचा. Emo'tionalism *n. the tendency to emotional excitement, tendency to regard things in an emotional manner* विकारवशता *f*, विकाराधीनता *f.* Emo'tionalise *v. t. to give an emotional character to* मनोविकाराचा विषय समजणें-मानणें-करणें, मनोविकारात्मक समजणें; as, "Brought up in a pious family where religion was not talked about or *emotionalised*, but was accepted as a rule of thought and conduct."

Empale ( em-pāl' ) [ Fr. *empaler*,–L. L. *impalare*–*em* and *palus*, a pale, a stake. ] *v. t. to fence in or fortify with pales or stakes or otherwise* (written also *Impale*) मेढेकोट-लकडकोट बांधणें, कुडण *n-* कुंपण *n-* वही *f-* वय *f* घालणें; as, "All that dwell near enemies E. villages, to save themselves from surprise." २ *to inclose or surround* ( See *Impale* ) कुडणें, कुडून टाकणें, घेरणें, मध्यें घरणें. ३ *to put to death by thrusting a sharpened stake through the body* सुळीं-सुळावर देणें-चढवणें-घालणें. ४ ( *heraldry* ) Same as Impale. Empale'ment *n.* लकडकोट *m*, मेढेकोट *m.* २ सुळीं देणें *n*, शूलारोपण *n.*

Empannel ( em-pan'-el ) Same as Impanel.

Emperil ( em-per'-il ) *v. t.* धोक्यांत घालणें. See Imperil.

Emperor ( em'-pėr-ėr ) [ Fr. *empereur*.–L. *imperator*, a ruler—*imperare*, *imperatum*, to command–*im* ( *in* ), upon and *parare*, to order. ] *n. sovereign or supreme monarch of an empire* ( a title of dignity superior to that of *king* ) सार्वभौम राजा *m*, सम्राट् *m*, बादशाहा *m*, चक्रवर्ती *m*, मंडलाधीश *m*, महामंडलेश्वर *m*, राजेन्द्र *m*, राजाधिराज *m*, महाराज *m.* Em'perorship *n.* बादशाही *f*, सार्वभौमत्व *n.* Em'press *n. fem.* बादशाहीण *f*, चक्रवर्तिनी *f*, महाराणी *f.* Em'pery *n.* (*poetic*) (*a*) *empire*, साम्राज्य *n*, बादशाही *f*, आधिराज्य *n.* (*b*) *power* सार्वभौम सत्ता *f*, बादशाही सत्ता *f-* अम्मल *m-* अधिकार *m.*

Emphasis ( em'-fa-sis ) [ L.–Gr. *emphasis*, a setting forth, orig. appearance,–Gr. *em*, in & *phainein*, to show, to make clear ( whence Phenomenon. ) ] *n. rhet. a particular stress of utterance, or force of voice, given to the words or parts of a discourse to make the meaning clear* वाक्यांतील एखाद्या शब्दाचा किंवा वाक्यांशाचा अर्थ श्रोत्यांच्या मनांत विशेष रीतीनें भरावा म्हणून शब्द उच्चारतांना त्यावर जो आघात देतात तो *m*, शब्दावरचा नेट *m*-शब्दावरचा जोर *m*, शब्दाघात *m*, वाक्यांशाघात *m.* २ *a peculiar impressiveness of expression or weight of thought, vivid representation enforcing assent* नेट *m*, जोर *m*, निश्चय *m*, खात्री *f*, स्पष्टपणा *m*, ठामपणा *m*, कायमपणा *m*; as, "To dwell on a subject with great E." Em'phasize *v. t. to pronounce or utter with a particular stress of voice* (उच्चारतांना) नेट *m-* जोर *m-*देणें, ठांसून बोलणें-उच्चारणें; as, "To E. a word or phrase." २ *to make emphatic* (वर) विशेष जोर देणें, जोरानें-नेटानें प्रतिपादन करणें. Em'phasized *pa. t.* & *pa. p.* Em'phasizing *pr. p.* & *v. n.* Empha'tic,-al *a. uttered with emphasis* जोरानें-नेटानें-ठांसून उच्चारलेला, नेटाचा, जोराचा, जोरदार; as, "An E. manner, tone, &c." २ *striking the sense, impressive, forcible* विशेषार्थबोधक, जोराचा, नेटाचा, परिणामकारी; as, "E. colours; E. evils." Emphat'ically *adv.* नेट-जोर देऊन, जोरानें, नेटानें, स्पष्टपणें. Emphat'icalness *n.* जोर *m*, नेट *m*, अर्थबोधकता *f.*

**Emphysema** ( em-fi-sē'-mä ) [ Gr. *emphysaein*, to inflate. ] *n. med. a swelling or protuberance produced by gas or air diffused in the cellular tissue* त्वचेमध्यें हवा किंवा वायुरूपी पदार्थ सांचल्यामुळें ती सुजणें किंवा फुगणें *n*. Emphysema of the lungs (पुष्कळ वर्षे खोकल्याचा विकार राहिल्यानें) फुप्फुसांतील वायु कोश फुगणें *n*. Emphysem'atous, Emphysema'tose *a. bloated, swelled* सुजलेला, सूज आलेला, फुगलेला.

**Emphyteusis** ( em-fi-tū'-sis ) [ Gr. *em* and *phuteuein*, to plant. ] *n.* ( *Rom. law* ) *a real right, susceptible of assignment and of descent, charged on productive real estate, the right being coupled with the enjoyment of the property on condition of taking care of the estate and paying taxes, and sometimes a small rent* खंडानें नियमित मुदती पावेतों किंवा कायमचा मिळविलेला दुसऱ्याच्या स्थावर मिळकतीवरील हक्क *m*. हा हक्क खरेदी, विक्री किंवा बक्षीस म्हणून देतां येत असे.

**Empire** ( em'-pīr ) [ Fr. *empire*–L. *imperium*, a command, rule, dominion, empire–L. *im*, upon and *parare*, to order. ] *n. supreme power, sway, dominion* साम्राज्य *n*, सार्वभौम सत्ता *f*, आधिपत्य *n*, प्रभुत्व *n*, ईशत्व *n*, ऐश्वर्य *n* ( *lit.* ), अधिराज्य *n*, आधिराज्य *n*, चक्रवर्तित्व *n*; as, "The E. of the sea." २ *the dominion of an emperor* सार्वभौमाचें राज्य *n*, साम्राज्य *n*, सार्वभौमराज्य *n*, चक्रवर्तिराज्य *n*; as, "The Indian E." ३ *any dominion, supreme control, rule, sway* सत्ता *f*, साम्राज्य *n*, अम्मल *m*, ताबा *m*, आधिपत्य *n*; as, "The E. of mind or reason; Under the E. of facts." [ CELESTIAL E. SEE UNDER CELESTIAL. ] Empire city *n*. न्यूयार्क शहरास हें नांव लावितात. Empire state *n*. न्यूयार्कच्या संस्थानास दिलेलें नांव *n*.

**Empiric** ( em-pir'-ik ) [ M. Fr. *empirique*–L. *empiricus*,–Gr. *empeirikos*, experienced,–Gr. *em*, in and *peira*, a trial. ] *n. one who relies only upon observation and experience* फक्त अनुभवसिद्ध किंवा प्रयोगसिद्ध गोष्टींवरच हवाला ठेवणारा, अनुभवसिद्ध गोष्टी तेवढ्याच खऱ्या असा भरंवसा बाळगणारा, अनुभवैकशास्त्रवादी *m*. २ *one who confines himself to applying the results of mere experience* ( esp. in medicine ) (शास्त्रीय ज्ञानाची पर्वा न करितां) केवळ आपल्या अनुभवाप्रमाणेंच औषध देणारा, आडमुठा वैद्य *m*, अनुभवावरच भिस्त ठेवणारा वैद्य *m*, तोडगा करणारा-जाणणारा, बाडीवैद्य *m*, टाणाटोणा वैद्य *m*. ३ *any ignorant and unlicensed pretender, a quack, a charlatan* बाडीवैद्य *m*. (*colloq.*), नाकाडोळ्याचा वैद्य *m*. ( *colloq.* ), कुवैद्य *m*, दुश्चिकित्सक *m*, वैदू *m*; as, "Swallow down opinions as silly people do *empiric's* pills." Empi'ric,–al *a. pertaining to experiments or experience, depending upon the observation of phenomena* आनुभविक, ( *pop.* ) अनुभविक, अनुभवसिद्ध-प्रयोगसिद्ध, अनुभवाचा; as "The village carpenter lays out his work by E. rules learnt in his apprenticeship." २ *depending upon observation or experience alone without due regard to science and theory* (said esp. of medical practice, remedies, &c. ) प्रयोगैकविषयक, शास्त्र गुंडाळून ठेवणारा, अनुभवज्ञानी, शास्त्रप्रक्रियेस न मानणारा, अनुभवसिद्ध गोष्टी-प्रक्रियाच खऱ्या मानणारा. [EMPIRICAL FORMULA *chem*. प्रयोगसिद्ध सारणी *f*, सरलसारणी-सूत्र *n*; AS, THE E. FORMULA OF ACETIC ACID IS $C_2 H_4 O_2$.] Empi'rically *adv.* केवळ प्रयोगज्ञानानें, शास्त्राकडे दुर्लक्ष करून. Empir'icism *n. the method or practice of an empiric, pursuit of knowledge by observation and experiment* केवळ अनुभवानेंच ज्ञान मिळविणें *n*, फक्त अनुभवानेंच ज्ञान संपादन करण्याची पद्धति *f*, अनुभवज्ञानसंपादनपद्धति *f*. आपल्या अनुभवास येईल तेवढेंच खरें असें मानून ज्ञान मिळविण्याचा मार्ग *m*–तऱ्हा *f*. २ *quackery, charlatanry* दुश्चिकित्सा *f*, बाडी वैद्यकी *f*, तोडगा *m*. ३ *metaph. the system of philosophy which attributes the origin of all our knowledge to experience* अनुभववाद *m*, आपल्यास असलेलें सर्व ज्ञान अनुभवजन्य आहे असें ( प्रतिपादन करणारें ) मत *n*. Empi'ricist *n. an empiric*. Empiris'tic *a.* ( *physics* ) *relating to or resulting from experiment or experience following from empirical methods or data* (as opposed to *Nativistic*) अनुभवैकशास्त्रसिद्ध, प्रयोगसिद्ध, अनुभव-जात-सिद्ध.

**Emplastic** ( em-plas'-tik ) [ Fr. *emplastique*, O. Fr. *emplastre*,–L. *emplastrum*.–Gr. *en*, in & *plassein*, to form, or apply as a plaster.] *a. fit to be applied as a plaster, glutinous, adhesive* चिकट, चिकटणारा, चिकण, चिकटाऊ, डकणारा; as, "E. applications." E. *n. med. a medicine causing constipation* मलावष्टंभक-अवरोधक औषध *n*, मलोत्सर्गप्रतिबंधक (औषध) *n*. Emplastrā'tion *n. med. the application of a plaster or salve* पलिस्तर लावणें *n*, पलिस्तर मारणें *n*.

**Emplead** ( em-plēd' ) See Implead.

**Emplection** ( em-plek-'shun ) See Emplecton.

**Emplecton** ( em-plek'-ton ) [ Gr. *em* & *plekein*, to weave, to twist.] *n.* ( R. ) *a kind of masonry in which the outer faces of the wall are ashlar, the space between being filled with broken stone and mortar* बाहेरून साफ घडलेलें दगडांचें थरबंद बांधकाम *n*, दोहोंबाजूंनीं दर्शनी साफ घडवलेले दगड ठेवून मध्यें गैरी दगड व चुना ह्यांची भराई असलेलें बांधकाम *n*.

**Employ** ( em-ploy' ) [ Fr. *employer*.– L. *implicare*, to infold, to involve, to engage. ] *v. t.* ( often followed by *in*, *about*, *on* or *upon* & sometimes by *to* ) *to occupy the time, attention or labour of; to use, to have in service* कामीं लावणें *with g. of o.*,

उपयोगांत आणणें, वापरणें; as, ( a ) *to make use of* ( as an instrument, a means, a material, etc., for a specific purpose ), *to apply* वापरणें, वहिवाटणें, लावणें, कामीं-कामास-उपयोगास लावणें, (-चा) विनियोग *m*- योजना *f*. करणें; as, "To *employ* one's pen in writing, bricks in building, words and phrases in speaking; To *employ* the mind; To *employ* one's energies." ( b ) *to occupy* (-कडे ) लावणें, खर्च करणें, घालविणें, गुंतविणें; as, "To *employ* time in study." ( c ) *to have or keep at work, to exercise* खपविणें, राबवणें, वापरणें, (कडून) काम करून घेणें. ( d ) *to give employment or occupation to, to entrust with some duty or behest* ठेवणें, चाकरीस ठेवणें, (-ला) काम *n*- धंदा *m* -चाकरी *f*- नोकरी *f*- रोजगार *m* - उद्योग सांगणें-देणें; as, "Jonathan & Jahaziath were employed about this matter." E. *n. fixed or regular service or business, employment* उद्योग *m*, व्यापार *m*, धंदा *m*, काम *n*, विनियोग *m*, as, "The whole E. of body and of mind." Employ'able *a*. वापराया-चा-जोगा. २ ठेवण्याजोगा. Employe', Employ'ee *n*. ( the former is the French & the latter the English form. ) *one employed by another, a clerk or workman in the service of an employer* नोकर *m*, चाकर *m*, दुसऱ्याचे नोकरीस चाकरीस-पदरीं-सेवेंत राहिलेला मजूर *m*- कारकून *m*-मनुष्य *m*. Employ'ed *pa. t.* Employ'er *n*. चाकरीस ठेवणारा, धनी *m*, स्वामी *m*, नियोजक *m*. Employ'ment *n*.–*the act.* वापरणें *n*, खपवणें *n*. २ ठेवणें *n*, काम सांगणें *n*. ३ विनियोग *m*, योजना *f*, वापर *m*. ( b ) –*the state.* रोजगार *m*, चाकरी *f*, धंदा *m*, वृत्ति *f*, उद्योग *m*, उपयोग *m*. [ IN ONE'S E. अमुकाच्या चाकरीस. TO BE OUT OF E. उद्योगधंदा नाहीं ह्मणून घरीं बसणें, चाकरीवांचून असणें, नोकरीचाकरीवांचून–कामधंद्यावांचून असणें. THAT IS OUT OF E. बेरोजगार OR री, बेकार, रिकामा, रिकामका. THAT HAS E. OR SERVICE चाकरमानी, रोजगारी, रोजगारशीर, धंदेवाईक. HOME OR STATIONARY E. बैठारोजगार *m*. FAT, RICH, OR LUCRATIVE E. मिळकतीची जागा *f*, लाभकारक रोजगार *m*. E. *compreh.* धंदारोजगार *m*. ] २ *that which takes up time, energy or attention; occupation, office or post of business, service* व्यापार *m*, काम *n*, व्यवसाय *m*, व्यवहार *m*.

Empoison (em-poi'zn ) [Pref. *em* & Poison.] *v. t.* विष घालणें, विष घालून मारणें. २ *to poison, to put poison into* (-ला) विष लावणें, (-आंत) विष घालणें, विषारी करणें. ३ *to taint with poison, or venom, to embitter, to destroy all pleasure in* विषमय करणें, (-च्यांत) माती कालविणें, (-च्यांत) विष कालविणें, (-च्या) सुखाची नासाडी-खराबी करणें. Empoi'soner *n*. *one who or that which empoisons* विष घालणारा. २ घाण *f* -नासाडी *f* -खराबी *f*- करणारा.

Emporium ( em-paw'-ri-um ) [ L. *emporium*, an emporium or mart,–Gr. *emporion*–Gr. *emporos*, a merchant,–Gr. *em* & *poros*, a way. ] *n. pl.* L. Emporia, Emporiums. *a place of trade, a mart, esp. a city or town which is the commercial centre of a country, a market place* मोठी पेठ *f*, उतारपेठ *f*, पेंठेचा गांव *m*, वाणिज्यस्थान *n*, व्यापाराचें मोठें ठिकाण *n*, व्यापारी उलाढालीचें मुख्य ठाणें *n*; as, "Bombay is the *emporium* of India."

Empoverish ( em-po-'vĕr-ish ) Same as Impoverish. भिकेस लावणें. २ नापीक करणें.

Empower ( em-pow'ĕr ) [ Pref. *em* & Power. ] *v. t.* *to give legal power or authority to, to warrant, to license* मुखत्यारी *f* -परवाना *m* -मुभा *f*. देणें, मुखत्यार करणें, अधिकार देणें; as, "The High court is *empowered* to try and decide cases, civil or criminal." २ *to give moral or physical power, faculties to* शक्ति देणें, समर्थ करणें, ताकद आणणें. Empow'ered *pa. t.* & *pa. p.* Empow'ering *pr. p.* & *v. n.*

Empress ( em'pres ) See under Emperor. [ EMPRESS CLOTH निवळ लोंकरीचें किंवा लोंकर व कापूस मिसळून केलेलें स्त्रियांच्या कपड्यांचें कापड *n*. ]

Empressement ( em-pres'-mong ) [Fr.] *n. eagerness, cordiality* सौहार्द *n*.

Emprise, Emprize ( em-prīz' ) [ O. Fr. *emprise*.–*en* & *prise*, a taking,–L. *prehendere*, to seize. ] *n*. ( *poetic* ) *an undertaking, an enterprise, an adventure* साहस *n*, धाडस *n*, जोखीम *n*, साहसाचें-धाडसाचें-जोखमाचें काम *n*. २ *the qualities which prompt one to undertake difficult & dangerous exploits* धाडशी-साहसी-स्वभाव *m*, धाडस *n*.

Empty (em'-ti) [A. S. *aemetig, aemtig, emtig*, vacant, free, idle.] *a. containing nothing, void of contents, not filled* (said of a box, room, house, stomach, &c.) रिकामा, रिता, रिकामका, रिक्त, खालीं, खुला, मोकळा. २ *free, clear, devoid* अलिप्त, मुक्त, मोकळा, हीन, (as, गुणहीन). ३ *having nothing to carry, unburdened* रिकामा, रिक्त, ओझ्याशिवाय; as, "When ye go, ye shall not go empty." ४ *destitute of effect, sincerity or sense* (said of language) व्यर्थ, भाकड, भुकड, सुक्का, शुष्क, कोरडा, निरर्थक, उगीच, वरवरचा, मनापासून नव्हे असा; as, "Empty words or threats; Words are but *empty* thanks." ५ *unsatisfactory, hollow, vain* ( said of pleasure, the world, etc. ) अशाश्वत, नश्वर, खोटा, पोकळ, वरवरचा; as, "Pleased in the silent shade with *empty* praise." ६ *producing nothing, unfruitful* ( as a plant or tree ) वायफळ, निष्फळ, वांवडा, वांझ, वांज, वांजा; as, "An *empty* vine." ७ *devoid of sense, knowledge, or courtesy* मठ्ठ, जड, बेअकली, अडाणी; as, "*Empty* brains;" "An *empty* coxcomb." ८ *unreal, unsubstantial* असार, निःसार, स्वप्नवत्, फोल, कोरडा, निरर्थक, वायफळ; as, "*Empty* dreams." *Empty* is used as the first element in a

compound; as, Empty-handed, Empty-headed, Empty-hearted, etc. E. *n.* Empties. *pl.* ( used in commerce, *esp.* in transportation of freight ) *an empty box, bottle, crate, cask, etc.* खाली-रिकामें बारदान *n*; as, "Special rates for *empties.*" E. *v. t. to remove the contents from, to exhaust, to pour out, to discharge* रिकामा-रिता-मोकळा-खाली करणें, ओतणें, ओतून टाकणें, उसपणें, उसपून खालीं-रिता करणें. E. *v. i. to discharge itself* रिकामा होणें; as, "A river *empties* into the sea." २ *to become empty* रिकामा-खाली होणें; as, "The chapel *empties.*" Emp'tied *pa. t. & pa. p.* रिक्त-रिकामा केलेला. Emp'tying *pr. p. & v. n.* Emp'tier *n.* रिकामा-खालीं करणारा. Emp'tiness *n. the state of absence of contents, vacuum* पोकळपणा *m*, रिकामेपणा *m*, रितेपणा *m*, रिक्तता *f*, रिक्तभाव *m*, शून्यता *f*. २ *want of substance, hollowness, unsatisfactoriness* पोकळपणा *m*, वायफळपणा *m*, निरर्थकत्व *n*, शुष्कत्व *n*, (*fig.*) शुष्कपणा *m*, कोरडेपणा *m* (*fig.*), मायारूप *n*, भाकडपणा *m*, मिथ्यात्व *n*, खोटेपणा *m*; as, "The E. of earthly glory." ३ *want of sense or knowledge, vacuity of mind* अक्कलशून्यता *f*, ज्ञानाभाव *m*, बुद्धिहीनता *f*, बेअकलीपणा *m*, अज्ञान *n*, मूर्खपणा *m*; as, "The sins of E., gossip, and spite."

Empyema ( em-pi-ē'-mä ) [ Gr. *empyema.*–Gr. *em* & *puon*, pus. ] *n. med. a collection of pus, blood or other fluid matter, in some cavity of the body esp. in that of the pleura* ( now restricted to a collection of pus in the cavity of the pleura ) फुफ्फुसवेष्टणाच्या पिशवींत पू होणें.

Empyreal ( em-pir'-ē-al ) [L.–Gr. *empyros*, fiery, scorched. Gr. *em* & *pur*, fire.] *a. formed of pure fire or light, refined beyond aerial substance, pertaining to the highest & purest region of heaven* तेजोमय, अग्निमय, तेजोलोकाचा, अग्निप्रकाशजन्य, शुद्ध-केवळ-नुसत्या अग्नीचा किंवा प्रकाशाचा बनविलेला, अंतरिक्षवासी वस्तूंहून जास्त शुद्ध, दिव्य; as, "Go, soar with Plato to the E. sphere." [E. air *oxygen gas* प्राणवायु *m.*] Empyre'an *n. the highest heaven where the pure element of fire was supposed by the ancients to exist* तेजोलोक *m*, तेजोमय लोक *m*, शुद्धाग्नि लोक *m*. *N. B.*—टोलेमी नामक ग्रीक ज्योतिष्यानें पांच लोक ( स्वर्ग ) वर्णिले आहेत; ते असे:–(१) The planetary heaven: ग्रहलोक. (२) The sphere of the fixed stars: तारालोक. (३) The crystalline which vibrates: तरल स्फटिकलोक. (४) The *primum mobile*, which communicates motion to the lower spheres चैतन्य लोक; त्यापासून खालच्या तीन लोकांना चैतन्य ( गति ) मिळतें. The empyrean, or the seat of deity & angels: शुद्धाग्निलोक, देवलोक; ह्या लोकांत शुद्धाग्नीचें वास्तव्य असतें अशी समजूत आहे.

Empyreuma ( em-pi-rōō'-ma ) [ Gr. *empureuein*, to kindle–*empuros.* ] *n. chem. the odour of some oily animal or vegetable substances when burnt in close vessels or when subjected to destructive distillation* बंद केलेल्या भांड्यांत वनस्पतिज किंवा प्राणिज पदार्थ जाळले असतांनां त्यांपासून निघणारी दुर्गंधी *f. pl.* Empyreu'mata. Empyreumat'ic,-tical *a.*

Emu, Emeu, Emew ( ē'-mū ) [Port. *ema*, an ostrich.] *n. zool.* शहामृगाच्या वर्गांतील ऑस्ट्रेलियामधील एक पक्षी *m.*

Emulate ( em'-ū-lāt ) [ L. *aemulari, aemulatus* to make one's self a rival,–L. *æmulus*, a rival. ] *v. t. to strive, to equal, or to excel in qualities, or actions, to vie with, to rival* (बरोबरी किंवा वरकडी किंवा सरशी करण्याकरितां) झटणें-स्पर्धा *f.* करणें, बरोबरी करणें, तोलास तोल देण्याचा प्रयत्न करणें, सरसरी लावणें, टक्कर मारणें-देणें *with* शीं *of o.* Emulā'tion *n. the endeavour to equal or to excel in qualities or actions, rivalry* चढाओढ *f*, स्पर्धा *f*, विजिगीषा *f*, प्रतिस्पर्धा *f*, चढाचढी *f*, अहमहमिका *f*. २ *sinful rivalry, envy, envious contention* हेवा *m*, ईर्ष्या *f*, मात्सर्ययुक्त भांडण *n*. चुरशीची तकरार *f*. तंटा *m*. कज्जा *m*, चुरस *f*. Em'ulative *a. aspiring to competition, rivalling* चढाओढीचा, ईर्ष्येचा, प्रतिस्पर्धी, स्पर्धी; as, "E. zeal." २ चुरशीचा, ईर्ष्येचा, ईर्ष्यालु, ईर्ष्यायुक्त. Em'ulatively *adv.* चढाओढीनें. Em'ulator *n.* बरोबरी किंवा वरचढ करूं पाहणारा, प्रतिस्पर्धी. Em'ulatress *n. fem.* (R.) Em'ulous *a. desirous or eager to imitate, equal or excel another* ( with *of* ) बरोबरी करूं पाहणारा, विजिगीषु, जयेच्छु, प्रतिस्पर्धी. २ (*Shakes.*) *factious, contentious* मात्सर्ययुक्त, भांडखोर, तकरारी, लढाईखोर, मत्सरी, चुरसखोर; as, "E. Carthage." Em'ulously *adv.* Em'ulousness *n.*

*N. B.—Competition* is not a matter of feeling but of action. It is the attempt to gain something desirable with or against others who are aiming at the same thing, especially in matters of interest & honour. *Competition* चढाओढ *f*, वरचढ होण्याचे प्रयत्न *m. pl. Emulation* अहमहमिका *f*, विजिगीषा *f*. *Ambition* महत्वाकांक्षा *f*. *Rivalry* स्पर्धा *f*, ( हेवा *m*, मत्सर *m.* )

Emulsion ( ē-mul'-shun ) [ L. *e*, out & *mulgere*, *mulsum*, to milk. ] *n. a soft liquid remedy of a colour and consistency resembling milk* दुधासारखा रंग व दाटपणा असलेलें औषध *n*, दुधासारखें औषध *n*. Emul'sify *v. t.* दुधासारखें करणें-बनवणें. Emul'sive *a. milklike, softening* दुधा-प्रमाणें-सारखा, नरम, नरमपणा-मऊपणा आणणारा, स्निग्ध, मवाळ. २ *yielding oil by expression* तेल निघणारा, पिळून-चुरडून तेल काढतां येण्यासारखा, सतैल; as, "E. seeds." ३ *yielding a milklike substance* ज्याच्यापासून दुधासारखा पदार्थ निघतो असें; as "E. acids." Emul'sin *n.* गोड्या आणि कडव्या बदामांत सांपडणारा आंबविणारा पदार्थ *m.*

*N. B.*—प्रथम एखादें तेल घ्यावें व त्यांत नियमित प्रमाणानें एखादा 'अल्कली' तीव्रक्षार जातीचा पदार्थ घालून तें घोटावें म्हणजे त्या मिश्रणाचा दुधासारखा पदार्थ होतो त्याला Emulsion असें म्हणतात.

Emunctory (ē-munk'-tėr-i) [L. *emungere, emunctum,* to blow the nose, hence, to wipe.] *n. pl.* Emunctories. *anat. an excretory duct* (as the skin, kidneys, &c.) उत्सर्जक *m.* (नलिका *f.* इंद्रिय *n.*) शरीरांतील निरुपयोगी पदार्थ बाहेर टाकण्याचा मार्ग *m.* देहमलविसर्जन-निर्गम मार्ग *m,* (देह) मलप्रवाहक *m.*

En (en) [Fr. *en,*–L. *in.* ]. A prefix signifying *in* or *into* used in many English words, chiefly those borrowed from the French. Some English words are written indifferently with *en* or *in.* For ease of pronunciation, it is generally changed to *em* before *p, b,* & *m,* as in *Em*ploy, *Em*body, *Em*mew. It is sometimes used to give a causal force, as in *en*able, *en*feeble &c. बऱ्याच इंग्रजी शब्दांचे (पूर्वी) मागें व विशेषतः फ्रेंच भाषेंतून आंग्ल भाषेंत आलेल्या शब्दां (पूर्वी) मागें, 'आंत,' 'मध्यें' किंवा 'बाहेरून आंत' अशा अर्थी लावण्याचा उपसर्ग. कांहीं शब्दांचे मागें सामान्यतः *en-* किंवा *in-* यांपैकीं कांहींही जोडतात. उच्चाराचे सोयीसाठीं *en-* याचें उत्तरशब्दांतील *p, b,* व *m* या अक्षरांपूर्वी *em-* असें रूप होतें; जसें, *employ, embody, emmew.* कधीं कधीं याच्या योगानें प्रयोजक धातूचा अर्थ होतो; जसें, *Enable, Enfeeble,* व कधीं कधीं त्याच्या योगानें फक्त अर्थाची पराकाष्ठा दर्शविली जाते; जसें, *En*chasten. २ A prefix from Gr. *en,* in, (as, encephalon, &c.) ग्रीक भाषेंतील "आंत" या अर्थाच्या *en* या उपसर्गापासून झालेला उपसर्ग *m.* ३ A suffix from A. S. *an,* formerly used to form the plural of many nouns; as, in *ashen, eyen, oxen, etc.* आंग्लो साक्सन्- *an* या प्रत्ययापासून आलेला प्रत्यय. पुष्कळ नामांचें अनेकवचन करितांना याचा उपयोग होतो; जसें, *ashen, eyen, oxen,* यांपैकीं फक्त शेवटचा शब्द मात्र हल्लीं प्रचारांत आहे. कधीं कधीं जुन्या अनेकवचनी रूपांपुढेंही हा प्रत्यय जोडतात; जसें, *Children, brethren* इ०. ४ A suffix signifying *to cause, to make,* used to form verbs from nouns and adjectives नामांपासून किंवा विशेषणांपासून (चीं) क्रियापदें करितांना 'करणें, (कारण होऊन उत्पन्न) करविणें अशा अर्थी लावण्याचा-जोडण्याचा प्रत्यय; जसें, *strengthen, frighten, lengthen, tighten.* ५ An adjectival suffix, meaning *'made of;'* as, in *golden, wooden,* etc. '-चा केलेला-बनवलेला, चा' अशा अर्थी विशेषणासारखा लावण्याचा प्रत्यय; जसें, *golden* (सोन्याचा, सोनेरी), *wooden* (लांकडाचा, लांकडी.) इ०. ६ *the termintion of the past participle of many strong verbs;* as, in broken, trodden, etc. ज्या क्रियापदांचा भूतकाल व भूतकालवाचक धातुसाधित होतांना *ed* हा प्रत्यय लावला जात नाहीं अशा (strong) क्रियापदांचें भूतकालवाचक धातुसाधित करितांना लावण्याचा प्रत्यय; जसें, broken, trodden इ०

Enable (en-ā'-bl) [Pref. *en* & Able. या शब्दाचा मूळ अर्थ शक्ति-सामर्थ्य-बळ देणें, सशक्त करणें असा आहे.] *v. t. to supply with power (physical, moral or legal), to furnish with sufficient power, ability or authority, to render competent for* शक्ति-सामर्थ्य-ताकद देणें-आणणें, शक्त-समर्थ करणें, कार्यक्षम-अधिकारी-अधिकारसंपन्न-बलसंपन्न करणें, कुवत *f.* आणणें. Enable'ment *n.* –*the act.* शक्ति *f.* सामर्थ्य *n.* देणें *n,* समर्थ करणें *n.* २–*the state. ability* शक्ति *f.* बळ *n,* सामर्थ्य *n,* ताकद *f,* कार्यक्षमता *f,* कार्यक्षमत्व *n,* योग्यता *f,* कुवत *f.* Ena'bling *pr. p.* Enabled *pa. p.*

Enact (en-akt') [Pref. *en* & Act.] *v. t. to decree, to make into a law, to give sanction to* (a bill or legislative proposal) ठराव *m-* नियम *m-* कायदा *m-* निर्बंध *m.* करणें, कायद्यानें ठरविणें, (-चा) कायदा बनविणें, (-ला) कायद्याचें रूप देणें, (-च्याबद्दल) कायदा करणें, स्थापणें, प्रस्थापित करणें. २ *to act the part of, to represent, to play* (-ची) भूमिका *f.* सोंग *n-* 'पार्ट' *m.* घेणें, (नाटकांत-चें) काम करणें-पात्र होणें; as, "I did E. Julius Cœsar." E. *n.* (*Shakes.*) Enac'ted *pa. t.* & *pa. p.* Enac'ting *pr. p.* & *v. n.* [Enacting clause कायदेमंडळांत आलेल्या मसुद्याला कायद्याचें स्वरूप देण्याची मंजुरी देण्यासाठीं जोडलेलें कलम *n;* ज्या कलमानें (कायद्याच्या) सर्व मसुद्याला कायद्याचें स्वरूप प्राप्त होतें तें कलम *n;* कोणताही नियम कायदा या नात्यानें पाळला जाण्याकरितां त्यास कायदेमंडळाची मंजुरी मिळाली आहे असें दर्शविणारें कलम *n,* मंजुरी कलम *n,* निर्बंधक वाक्य *n.*] Enac'tive *a. having power to enact or establish as a law* विधिक्षम, शासनक्षम (on the analogy of कार्यक्षम), कायदा करण्याची सत्ता *f-* अधिकार *m.* असलेला, शासनाधीश. Enact'ment *n. the act, the passing of a bill into a law* स्थापणें *n,* स्थापन *n,* स्थापना *f,* व्यवस्थापन *n.* (b) –*the state.* सिद्धि *f,* मसुद्यास कायद्याचें स्वरूप देणें *n,* (-ला) कायदा बनविणें *n.* २ *a law enacted, an act, a decree, a prescribed requirement* कायदा *m,* ठराव *m,* शासन *n,* विधि *m,* निर्बंध *m,* नियम *m.* धारा *m.* Enac'tor *n.* कायदे करणारा.

Enamel (en-am'-el) [Pref. *en* & A. Fr. *amaile* for O. Fr. *esmail,* enamel. See Smelt *v. t.* ] *n. a coloured substance of the nature of glass differing from it by a greater degree of fusibility or opacity used as an ornamental coating for various articles* कांचमिना *m,* (भांड्यांवर चढविण्याचा) कांचेचा मुलामा *m,* कांचेसारखा मुलामा *m,* कांचवण *n.* २ *that which is enamelled, any smooth glossy surface resembling enamel esp. if variegated* कांचेच्या मिन्याप्रमाणें चकाकणारी भिन्न भिन्न रंगाची सपाटी *f.* पृष्ठभाग *m.* ४ *anat.* (of the teeth) दांतांवरचें लुकण *n.*

Enamel painting *n. painting with enamel colours upon a ground of metal, porcelain, or the like, the colours being afterwards fixed by fire* (भांड्यांवर चढविण्याचा) कांचेसारखा मुलामा *m.* हा अगोदर धातूच्या भांड्यांवर चढवितात व मग तीं भांडीं भट्टींत घालून भाजतात. तीं चांगलीं भाजून निघालीं ह्मणजे त्यांवरचा मुलामा पक्का होतो. [ENAMEL PAPER धातूचा कांचेसारखा मुलामा चढविलेला कागद *m.*] E. *v. t. to lay enamel upon, to decorate with enamel whether inlaid or painted* कांचेचा मिना चोळणें-लावणें-चढविणें, कांचेचा मुलामा चढविणें, कांचवणें. २ *to variegate with colours as if with enamel* कांचमिन्याच्या रंगांनीं चित्रविचित्र करणें. ३ *to form a glossy surface like enamel upon* कांचमिन्यासारखा तकाकीत (पृष्ठ भाग-सपाटी) करणें, as, "To enamel card paper, To enamel leather or cloth." ४ *to disguise with cosmetics* (as a woman's complexion) (कांतिवर्धक अंगराग लावून) झांकणें, तकाकी आणणें. E. *v. i. to practise the art of enamelling* कांचमिना चढविण्याचें काम *n*- धंदा *m.* करणें. E. *a.* कांचमिन्याचा; as, "E. painting." Enam'elled *pa. t. & pa. p. covered with enamel* कांचमिन्याचा, कांचमिनेदार. Enam'elling *pr. p. & v. n.* कांचमिन्याचें काम *n.* Enam'eler, Enam'elist *n.* (written also Enameller, Enamellist) कांचमिनागार *m*, कांचमिनेगार *m*, कांचमिनेवाला *m*, कांचमिना लावणारा.

Enamour (en-am'-ėr) [O. Fr. *enamourer,– en & amour–* L. *amor*, love.] *v. t. to inflame with love, to charm, to captivate* (followed by *of* or *with* before the name of the person or thing that captivates) मोह *m*- भुरळ *f* पाडणें, आसक्त-आपक करणें *with* वर *of o.*, भुलवणें, वेडा करणें, वेड लावणें, मोहपाशांत पाडणें, मोहित करणें, प्रेमपाशांत अडकविणें, भाळचणें, भाळवून टाकणें (*colloq.*), मोहिनी घालणें. Enam'oured *pa. t. & pa. p.* सानुराग, आसक्त, अनुरक्त, कामासक्त, रत (in comp.), लुब्ध, भुललेला, वेडा, मोहित, फिदा. [TO BE ENAMOURED OF भुलणें, भाळणें, वेडा-लुब्ध होणें, मोहपाशांत अडकणें, (वर) आसक्त-आपक होणें.] Enam'ouring *pr. p. & v. n.* Enam'ourment *n.* (R.) *the state of being enamoured* आसक्तता *f.*

Enantiosis (e-nan-ti-ō'sis) [Gr.=contradiction, Gr. *enantios*, opposite.] *n. rhet. a figure of speech by which what is meant to be conveyed in the affirmative is stated in the negative and vice versa, affirmation by contraries* विपरीतवाक्यद्वारा निश्चित कथन *n.* Chambers gives the following:– *the expression of an idea by negation of its contrary* (as, "He is no fool"="He is wise.") बोलणारास आपणांस जी गोष्ट सांगावयाची असेल त्या गोष्टीच्या विरुद्ध गोष्टीचें निषेधात्मक विधान करणें; द्विनञ् प्रकृतार्थ; जसें, "तो मूर्ख नाहीं"="तो शहाणा आहे."

Enarthrosis (en-är-thrō'-sis) [Gr. *en*, in & *arthron*, a joint.] *n. anat. a ball-and-socket joint* उलूखलसंधि *m*, जोडखीळ *f.* २ *the kind of articulation represented by such a joint* खवाटा *m*, खांद्याचा खुबा *m.*

Encage (en-kāj') [Pref. *en* & Cage.] *v. t.* (*Shakes.*) *to confine in a cage, to coop up* पिंजऱ्यांत घालणें-कोंडणें, कोंडून ठेवणें, बंदींत ठेवणें-घालणें. Encag'ed *pa. t. & pa. p.* Encag'ing *pr. p. & v. n.*

Encalender (en-kal'-en-der) *v. t. to register in a calender, to calender* (-ची) नोंद करणें, यादींत नमूद करणें, तिथिपत्रांत-पंचांगांत दाखल करणें.

Encamp (en-kamp') [Pref. *en* & Camp.] *v. i. to take up a position in a camp, to make a camp, to form & occupy a camp* छावणी पडणें *in. con;* डेरे *m. pl.*– डेरादांडी *f*- तळ *m.* देणें-पडणें *in. con.*, मुक्काम करणें, गोट पडणें. E. *v. t. to form into a camp, to place in a temporary habitation or quarters* तळ देण्यास लावणें, (स्वारीवर जातांनां सैन्य मध्येंच) थांबविणें, मुक्काम करण्यास लावणें, तंबू मारण्यास-ताणण्यास लावणें, छावणी करविणें; as, "Bid him *encamp* his soldiers." Encamp'ing *pr. p.* Encamped *pa. t. & pa. p.* Encamp'ment *n.*–*the act* तळ देणें *n*, मुक्काम *m*, (सैन्य) निवेशन *n* (S.) २ *the place where an army or a company is encamped, a camp* तळ *m*, गोट *m*, मुक्काम *m*, शिबिर *n*, निवेश (S.), पडाव *m* (R.), पडण *n.* (R.). [SEARCHING OF AN E. UPON LEAVING IT तळझाडा *m*- शुद्धि *f*- शोधणी *f.*]

Encase (en-kās') *v. t.* पेटींत घालणें.

Encash (en-kash') [Pref. *en* & Cash.] *v. t. to turn into cash, to cash* वटावणें, मोडणें, टक्के करणें, पैसा करणें, रोख पैसा करणें, रोकड करणें. Encash'ment *n. the payment in cash of a note, cheque, draft, etc.* रोकड *f* -नाणें *n* -नगद *f* -देणें *n.*

Encaustic (en-kaws'-tik) [Gr. *en* & *kaustikos*, caustic–Gr. *kaiein*, to burn.] *n. the method of painting in heated wax, or in any other way where heat is used to fix the colours* उनउन्हीत मेणानें अगर दुसऱ्या एखाद्या उष्ण पदार्थानें रंग बसविण्याची किंवा पक्का करण्याची तऱ्हा *f.*

Encave (en-kāv') [Pref. *en* & Cave.] *v. t. to hide in, or as in, a cave or recess* (गुहेंत &c.) लपविणें, दडविणें.

Enceinte (an-sant' *or* an-sānt') [Fr.– L. *in*, in & *cinctus*, *cingere*, to gird.] *a. pregnant, with child* गरोदर, गर्भवती, गर्भार, पोटाशीं (*colloq.*), गाभण (*only of beasts*). E. [Fr.–L. *incingere*, to gird in.] *n. fort. the line of works forming the main inclosure of a place* तट *m*, तटबंदी *f*, कोट *m.* २ किल्ला *m*, कोट *m.* ३ *the area or town inclosed by a*

*line of fortification* तटबंदी केलेला प्रदेश *m-* गांव *m-* शहर *n*; as "The suburbs are not unfrequently, larger than their *enceinte.*"

Encenia (en-sē'-ni ä) [L. *encaenia*-Gr. *enkainea*, a feast of dedication, *en* & *kainos*, new.] *n. pl. a festival commemorative of the founding of a city or the consecration of a church; also the ceremonies (as at Oxford & Cambridge) commemorative of founders or benefactors* (कोणत्याही शहराच्या संस्थापनेची किंवा देवळाच्या ईश्वरार्पणाची आठवण राहण्यासाठीं केलेला) स्मरणोत्सव *m*, (संस्थापक किंवा कल्याणकर्त्ते यांचे केलेले) स्मरणोत्सव *m. pl.*

Encephalon, Encephalos (en-sef'a-lon,-los) [Gr. *en*, in & *kephale*, cf. SK. कपाल, the head.] *n. anat. the contents of the cranium, the brain* मस्तिष्क *m*, मेंदू *m*, मगज *m*. Encephali'tis *n. med. the inflammation of the brain* मस्तिष्ककृच्छ्र *m*. Encephalit'ic *a.* Enceph'alocele *n. med. the hernia of the brain* मस्तिष्काचा अंतर्गळ *m*. Encephalol'ogy *n. the science which treats of the brain, its structure and functions* मस्तिष्कशास्त्र *n.* ह्यांत मस्तिष्काची रचना व व्यापार यांचा विचार केलेला असतो. Encephalop'athy *n. med. any disease or symptoms of disease referable to disorders of the brain* मस्तिष्कविकृतिजन्य व्याधि *f-* रोग *m-* पीडा *f.* Encephalot'omy *n. surg. the art or act of dissecting the brain* मस्तिष्कव्यवच्छेद *m.*

Enchain (en-chān') [Pref. *en* & Chain.] *v. t. to bind with a chain, to hold in chains* सांखळीनें बांधणें, सांखळींत धरणें-अडकविणें, शृंखलाबद्ध करणें. २ *to hold fast, to confine, to rivet* मजबूत-घट्ट बळकट-जोरानें धरणें, अडकून पाडणें-धरणें, गुंतवून ठेवणें, गुंतविणें; as "To enchain attention." ३ *to link together, to connect* एकत्र जोडणें, जोडणें, सांधणें, जुळविणें, सांखळी लावणें. Enchain'ed *pa. t. & pa. p.* Enchain'ing *pr. p. & v. n.* Enchain'ment *n.–the act.* धरणें *n*, गुंतविणें *n*, जोडणें *n*, जुळविणें *n.* (b) *–the state.* गुंतणूक *f*, जोड *f*, जुळवाजुळव *f.*

Enchair (en-chār') [Pref. *en* & Chair.] *v. t. to seat in a chair.* खुर्ची देणें, खुर्चीवर बसविणें.

Enchannel (en-chan'-nel) [Pref. *en* & Channel.] *v. t. to make run in a channel* (पाणी) पन्हळींतून-नें काढून लावणें, पाटानें सोडणें, पाटांतून जाऊं देणें; as, "Its waters were *enchannelled.*"

Enchant (en-chänt') [Fr. *enchanter.* – L. *in*, in and *cantare*, to sing.] *v. t. to practise witchcraft or sorcery* जादू-टोणा करणें. २ *to delight in a high degree, to charm, to enrapture* अत्यानंद देणें, अति सुखविणें, रमविणें, रंजविणें, मोहून टाकणें, मोहविणें, आनंदांत गुंग करणें; as, "Music enchants his ears." Enchan'ted *pa. t. & pa. p.* Enchant'ing *pr. p. & v. n.* Enchan'ted *a. under the power of enchantment, possessed or exercised by enchanters* भारलेला, जादूनें भारलेला; as, "An enchanted castle." Enchant'er *n. a sorcerer or magician* जादूवाला, जादूगीर, टोणा-टाणाटोणा करणारा, मंतर तंतर करणारा (*colloq.*). २ *one who delights as by an enchantment* मोह पाडणारा, भुलविणारा, आनंदविणारा, रंजविणारा, मनोरंजन करणारा, गुंगवणारा. Enchant'ing *a. charming, fascinating* भुलविणारा, मोहविणारा, जादू-टोणा करणारा, मोहक, चित्ताकर्षक. Enchant'ingly *adv.* भुलवून, जादू करून, जादूनें. Enchant'ment *n. -the act.* जादू *f*, टोणा *m*, टाणाटोणा *m*. २ *the production of certain wonderful effects by the aid of demons or the agency of supposed spirits; the use of magic arts, spells or charms; incantation.* (भूतांच्या साहाय्यानें) चमत्कार करणें *n-* करून दाखविणें *n*, जादूचा-साबरीविद्येचा-मंत्राचा उपयोग करणें *n*, मंत्रतंत्र *m*; as "After the last E. you did here." २ *the effect produced by an enchantment* चमत्कार *m*, (*colloq.*) मोह *m*, भुरळ *f*; as, "To break an enchantment." ३ *that which captivates the heart and senses, an influence or power which highly delights* मोहिनी *f*, मोह *m*, भुरळ *f*, जादू *f*, साबरी विद्या *f*, साबरी विद्येचें सामर्थ्य *n*, मंत्रशक्ति *f*; as, "Such an E. as there is in words." Enchan'tress *n. fem. a sorceress* जादूगार स्त्री *f*, जादू करणारी स्त्री *f*, चेटकीण *f*, डंखीण *f*. २ *a woman who fascinates* मोह पाडणारी स्त्री *f*, भुरळ घालणारी बायको *f*, मोहक स्वरूपाची बायको *f.*

Encharge (en-chärj') [Pref. *en* & Charge.] *v. t. to impose* (a charge) *upon* (-वर जबाबदारी) सोंपविणें, (-कडे) लावून देणें.

Enchase (en-chās') [Fr. *enchâsser*,-*en* & *chasse, caisse*, a frame,–L. *capsa*, a chest, a case–L. *capere*, to take.] *v. t. to inclose in a border or rim, to surround with an ornamental casing* (as a gem with gold), *to adorn* कोंदण करणें, कोंदणांत बसविणें. २ *to ornament by embossing or engraving* नकशी *f* वेलबुट्टी *f* काढणें, नकासकाम *n.* करणें, कलाकुसरीनें शोभा आणणें, शोभिवन्त करणें; as, "To E a watch case;" "with golden letters well enchased." Enchas'er *n.* Encha'sing *pr. p. & v. n.* Enchased *pa. t. & pa. p.*

Enchorial, Enchoric (en-kaw'rial,-kawr'ik) [Gr. *en chora*, a country.] *a. belonging to or used in a country, native, indigenous* (said esp. of the common written characters employed by the common people of ancient Egypt, in distinction from the hieroglyphics.) देशी, देशाचे, देशाच्या प्रचारांतील असलेले. प्राचीनकाळीं ईजिप्त देशांतील सर्व साधारण लोक जी लिपी वापरीत असत तीसच हा शब्द मुख्यत्वें करून लावतात.

Encircle ( en-sėr'kl ) [ Pref. *en* & Circle. ] *v. t. to form a circle about, to surround* कोंडणें, वेढणें, वेढा घालणें, भोंवताली जमणें, वेष्टणें.

Enclasp ( en'-kläsp ) [ Pref. *en* & Clasp. ] *v. t. to clasp, to embrace* कंवटाळणें, कवळणें, कवळून धरणें, भेटणें, आलिंगन देणें.

Enclave ( en-kläv', an-kläv' ) [ Fr. *en* & L. *clavus*, a key, a nail.] *n.* ( *Recent* ) *a place or country entirely surrounded by the territories of another power of which it is independent* परकी-दुसऱ्या राजाच्या ताब्यांतील मुलुखानें चारी बाजूंनीं वेढलेला प्रदेश *m*- जमीन *f* &c, परराष्ट्रवलयांकित प्रांत *m.* E. *v. t.* ( *Recent* ) *to inclose within an alien territory* परकी राजसत्तेखालच्या मुलखानें चोंहोंकडून घेरणें, पाराष्ट्रवलयांकित करणें. Enclave'ment *n.*

Enclitic, Enclitical ( en-klit'-ik,-klit'ik-al ) [ Gr. *egklitikos*, inclined–*egklinein*, to incline, *en*, in & *klinein*, to bend, to lean. ] *a. gram. affixed, subjoined* ( said of a *word* or *particle* which leans back upon the preceding word so as to become a part of it, & to lose its own independent accent, generally varying also the accent of the preceding word) अनुबद्ध, प्रत्ययित. Enclit'ic *n.* दुसऱ्या शब्दाच्या-पुढें जोडलेला शब्द *m*, दुसऱ्या शब्दा (शीं) पुढें जोडल्या-मुळें त्याच्याशीं एकजीव झालेला शब्द *m*; जसें, *Prithee* यांतील *thee* हें सर्वनाम. Enclit'ically *adv.*

Enclose, Enclosure. See Inclose.

Encomium ( en-kō'-mi-um ) [Gr. *en*, in & *komos*, a jovial festivity, a revel. See Comedy.] *n. pl.* Encomiums. *panegyric, eulogy, strong commendation* प्रशंसा *f*, अतिस्तुति *f*, अतिशय तारीफ *f*, वाखाणणी *f*.

*N. B.*—Encomium अतिस्तुति. Eulogy मनुष्याचें गुणस्तवन, पोवाडा ( *fig.* ) Panegyric प्रसिद्धपणें केलेली स्तुति.

Encompass ( en-kum-'pas ) [ Pref. *en* & Compass. ] *v. t. to encircle, to environ, to inclose* घेरा *m*- गराडा *m*. घालणें, घेरणें, वेढणें, वेष्टणें; as, "The army E. s a city; a ring E. s the finger." Encom'passment *n. -the act.* घेरा *m*- वेढा *m*. घालणें *n*, &c. (b) *-the state.* घेरा *m*, वेढा *m*, वेष्टन *n*. Encom'passing *pr. p.* & *v. n.* Encom'passed *pa. t.* & *pa. p.*

Encore ( äng-kawr' ) [ Fr. the last part of the word is from L. *hora*, hour. ] *adv.* or *interj. once more, again* ( used by the auditors and spectators of plays, concerts, and other entertainments, to call for a repetition of a particular part) पुन्हां, आणखी एकदां, 'वन्समोर'. E. *n. a call or demand* ( as, by continued applause ) *for a repetition* पुन्हां म्हणण्याची सूचना *f*; ( टाळ्यांचा गजर इत्यादिकांनीं ) as, "The encores were numerous." E. *v. t. to call for a repetition of* पुन्हां म्हणण्यास सांगणें; as, "To E. a song." Encor'ed *pa. t.* & *pa. p.* Encor'ing *pr. p.* & *v. n.*

Encounter ( en-kown'-tėr ) [ O. Fr. *encontrer.-en* (L. *in* & *contre* ( *L. contra* ), against. ] *v. t. to come against face to face, to meet in conflict with, to oppose, to struggle with* समक्ष भेट होणें *with g. of s.* & *o.*, ( शीं ) गांठ पडणें, ( शीं ) सामना-लढाई होणें, (मध्यें) अनुभवास येणें (अडचणी, संकटें इ०); as, "To encounter a friend in travelling." E. *v. i. to meet face to face, to meet* (esp. as enemies), *to engage in combat* सामोरा येणें, भेट होणें. ( b ) सामना होणें, गांठ पडणें, सलामी झडणें; as, "Three armies encountered at Waterloo." "I will encounter with Andronicus." Encoun'tered *pa. t.* & *pa. p.* Encoun'tering *pr. p.* & *v. n.* Encoun'ter *n. a meeting face to face, a sudden or incidental meeting, a running against, an interview* ( अकस्मात् पडलेली ) गांठ *f*, समक्ष-समोरासमोर व अवचित पडलेली गांठ *f.* २ *a combat, a battle* सामना *m*, प्रसंग *m* ( *fig.* ), ( समक्ष ) दोन हात ( *fig.* ) *m*; as, "To join their dark encounter in the mid-air." Encoun'terer *n. an opponent, an antagonist* प्रतिपक्षी *m*, सामनेवाला *m*, लढाईंत समोर उभा राहणारा *m*.

Encourage ( en-kur'-āj ) [ Fr. *encourager.*–Pref. *en* ( L. *in* ) & Courage. ] *v. t. to inspire with courage, spirit, or hope; to animate, to help forward* उत्तेजन देणें, धीर-धैर्य देणें, हुरूप आणणें, प्रोत्साहन देणें, अवसान देणें, मदत देऊन प्रगति करणें; as, "David encouraged himself in the Lord." "We should E. female education." Encour'aged *pa. t.* & *pa. p.* Encour'aging *pr. p.* & *v. n.* Encour'agement *n. -the act.* प्रोत्साहन *n*, उत्तेजन *n*, धीर *m*, जोर *m*, हुरूप *f.* २ *incentive, increase of confidence* प्रोत्साहन *n*, हुरूप देणारी गोष्ट *f*, उत्तेजक, उद्दीपक, उद्दीपन *n*. Encour'ager *n*. Encou'raging *a*. Encou'ragingly *adv.*

Encradle ( en-krā'dl ) [ Pref. *en* & Cradle. ] *v. t. to lay in a cradle* पाळण्यांत घालणें.

Encratite ( en'-krä-tīt ) [L. *encratitae, pl.*–Gr. *en*, in & *kratos*, strength. ] *n.* ( *Eccl. Hist.* ) इ. स. च्या दुसऱ्या शतकांतला मद्य, मांस व (मैथुन) लग्न ह्यांपासून निवृत्त राहणारा एक पंथ *m*.

Encrimson ( en-krim'-zn ) [ Pref. *en* & Crimson. ] *v. t. to give a crimson or red colour to* किरमिजी *m*-तांबडा रंग *m*. देणें-चढविणें.

Encroach ( en-krōch' ) [O. Fr. *enchrochier*, to perch, to prop, to fasten to a hook.] *v. i. to trespass, to intrude, to trench upon* ( हळू हळू किंवा चोरून दुसऱ्याच्या गोष्टींत-बाबींत) बेकायदेशीर शिरकाव-प्रवेश करणें, (आपला हक्क अधिकार नसतांना दुसऱ्याच्या अधिकारांत) हात घालणें-घुसडणें, दुसऱ्याच्या सीमेंत-शिवेंत

पाऊल टाकणें-पाय पसरणें, अतिक्रमण करणें; as, "Superstition.........a creeping and *encroaching* evil." Encroached' *pa. t.* & *pa. p.* Encroach'ing *pr. p.* & *v. n.* Encroach'er *n.* Encroach'ingly *adv.* घुसडकावून. Encroach'ment *n.* *unlawful intrusion* बेकायदेशीर शिरकाव *m*, अतिक्रमण *n.* २ *that which is taken by encroaching on another* अतिक्रमणानें संपादन केलेली-अन्यायानें मिळवलेली वस्तु *f.*

Encrust ( en-krust' ) See Incrust. Encrustment *n.* Same as Incrustment.

Encumber (en-kum'-bėr) [ Fr. *encombrer* Pref. *en* & O. Fr. *combrer*, to hinder.] written also Incumber. *v. t.* *to impede the motion or action of* (as with a burden), *to weigh down*, *to obstruct or embarrass* (जास्ती ओझें घालून गतींत-कामांत) अडथळा आणणें, (फाजील गोष्टीनें) गतिनिरोध करणें, ओझ्याखालीं वांकवणें, मध्यें अडथळा-व्यत्यय-व्याक्षोभ-अडचण आणणें, वर ओझें लादणें, अवघडवणें, लोढणें अडकविणें; as, "His movements were *encumbered* by his mantle." "His mind is *encumbered* with useless learning." २ *to load with debts or other legal claims* (वर) (कर्ज किंवा दुसरा कसला तरी) बोजा लादणें; as, "To *encumber* an estate with mortgages." Encum'berment (R.) Encum'brance *n.* *a clog, an impediment* लोढणें *n*, गुंता *m*, अडचण *f*, अडथळा *m*, पायखोडा *m*, पायगुंता *m*, खोडा *m.* २ *law.* Same as Incumbrance. Encum'brancer *n.* *law.* Same as Incumbrancer.

Encurtain ( en-kur'-tin ) *v. t.* *to inclose with curtains* पडदपोशी करणें, पडदे लावणें, पडदे लावून झांकणें.

Encyclic, Encyclical ( en-sī'-klik,-al ) [ Gr. *en*, in and *kyclos*, circle. ] *a.* *general*, *circular* सामान्य-साधारण-वट-हुकमासंबंधीं; as, "An E. letter of a bishop, of a council, etc." E. *n.* *an encyclical letter esp. one from the pope* पोपचें अनुशासन *n*-वटहुकूम *m.*

Encyclopedia, Encyclopædia (en-sī'-klō-pē'-dia) [See Cyclopedia. ] ( formerly written *Encyclopedy* or *encyclopædy* ) *n.* *a comprehensive summary of knowledge or of a branch of knowledge, a cyclopedia* विश्वकोश *m*, विश्वज्ञानसंग्रह *m.* Encyclopedi'acal, Encyclope'dic, Encycloped'ical *a.* विश्वकोशीय, विश्वकोशासारखा, अतिविस्तृत. Encyclope'dism *n.* *the art of writing or compiling encyclopedias* विश्वकोशलेखन-कला *f.* २ *an encyclopedic learning* विश्वज्ञान *n*, व्यापकज्ञान *n.* Encyclope'dist *n.* *one whose knowledge embraces the whole range of sciences* विश्वकोशकार *m*, विश्वज्ञानी. The Encyclopedists इ० स० १७५१—१७७२ च्या दरम्यान फ्रान्स देशांत जो विस्तृत विश्वकोश तयार झाला त्याचे लेखक *m. pl.* डायडेराट व डालेम्बर्ट हे त्याचे प्रकाशक होते. आणि व्हाल्टेअर व रूसो हे त्याचे साहाय्यकर्ते होते.

Encyst ( en-sist' ) *v. t.* *to enclose in a cyst* पेशीवेष्टित करणें, पापुद्र्यांत कोंडणें. Encyst'ed *a.* Encysta'tion *n.*

End ( end ) [ O. E. & A. S. *ende.* ] *n.* *extremity* ( in general ), *termination*, *close*, *limit* अंत *m*, शेवट *m*, टोंक *n*, अग्र *n*, शेवटचा भाग *m*, मर्यादा *f*, सीमा *f*, शिखा *f*, कळस *m.* २ *issue*, *result*, *conclusive event*, *consequence* पर्यवसान *n*, शेवट *m*, परिणाम *m*, समाप्ति *f*, क्षेत्रफल *n*, ( *colloq.* ) फल *n*; as, "My guilt be on my head, and there an end." ३ *death*, *destruction*, *extermination*, ( also ) *the cause of death or destruction* अंत *m*, मृत्यु *m*, नाश *m*, मरण *n*, शेवट *m*, नाशहेतु *m*, मरणकारण *n*; "I shall see an end of him." ४ *intention*, *purpose*, *aim* हेतु *m*, मतलब *m*, उद्देश *m*, इरादा *m*, अर्थ *m* ( S. ), अभिप्राय *m*, आशय *m*; as, "To labour for private or public ends." ५ *a remnant*, *a fragment*, *a scrap* अवशेष *m*, शेष *m*, तुकडा *m*; as, "Odds and ends." E. *v. t.* *to bring to an end*, *to finish*, *to terminate*, *to close* संपवणें, शेवटास नेणें-पोंचवणें, समाप्त करणें, ( -ची ) कड लावणें, तडीस लावणें-नेणें; as, "To end a speech." २ *to form* or *be at the end of* -च्या शेवटीं असणें, -चें अंत्य असणें-होणें; as, "The letter *k ends* the word *back.*" ३ *to put to death*, *to destroy* ( -चा ) अंत *m*- नाश *m.* करणें, ठार मारणें, (-चा) जीव घेणें; as, "This sword hath ended him." E. *v. i.* *to cease*, *to terminate* संपणें, सरणें. To end up कलथें-कलंडें करून ठेवणें. Ended *pa. t.* & *pa. p.* End'ing *pr. p.* & *v. n.* End'able *a.* सांत (S.)

End'less *a.* *perpetual*, *interminable* अनंत, अपार, अपरिमित; as, "E. praise." २ (*Shakes.*) *infinite*, *excessive*, *unlimited* अमर्याद, अतिशय, असीम, अगणित, अलोट. ३ ( R.) *fruitless*, *unsatisfying* निष्फल, मोघ, व्यर्थ, फलहीन, फुकट, वायफळ. ४ *void of design*, *objectless* हेतुहीन, साध्यहीन, इष्टरहित; as, "An E. pursuit." End'lessly *adv.* End'lessness *n.* आनंत्य *n*, अनंतता *f*, अपारता *f*, &c. End'most *a.* *farthest*, *remotest* अंतिम. End for end *in reversed order* ह्या शेवटाबद्दल त्या शेवटाकडून, उलट रीतीनें-बाजूनें, उलटीकडून, टोंकांस टोंक. End'man *n.* रांगेंतला शेवटचा-अगदीं पाठीमागचा-मनुष्य *m.* End on *naut.* *having the end pointing directly to an object* ( -कडे ) नाळ लावून, नाळ पुढें करून. In the end शेवटीं, अखेरीस. On end उभा, खडा, वर उचललेला. To the end क्रमानें ( शेवटपर्यंत ), कडेपर्यंत. To make both ends meet *to live within one's income* आयाव्ययास गांठ घालणें, खर्चाची तोंडमिळवणी करणें, जमेच्या बाहेर खर्च जाऊं न देणें, जमेला आणि खर्चाला मेळ घालणें, आंथरूण पाहून पाय पसरणें To put an end to (-चा) अंत-नाश करणें. End-all (*as in Be-all & end-all*) Extreme or very E. सरशेवट *m*, सरता शेवट *m.* At the extreme E. सरशेवटीं, सरत्याशे

वटीं, सरतेशेवट. At the E. of -च्या शेवटीं-अंतीं. From E. to E. आरपार, या टोंकापासून त्या टोंकापर्यंत, अहदतहद. Standing on E. उत्तंभित. At one's wits' E. किंकर्तव्यतामूढ, सुचेनासें झालेला, गोंधळलेला. To begin at the wrong E. उलट दिशेनें आरंभ करणें. To be the E. of -च्या नाशास कारण होणें. To come at the end of one's tether *to go as far as one's powers permit* शक्य तेवढी खटपट करणें. To be at one's fingers' E. करतलामलकवत् भासणें, (-च्या) हातचा मळ असणें. Latter E. *the end of life* आयुष्याचा शेवट. There is no E. मर्यादा नाहीं.

Endamage (en-dam'-āj) Same as Damage.

Endanger (en-dān'-jĕr) [Pref. *en* & Danger.] *v. t. to put to hazard, to expose to loss or injury* धोक्यांत-भयांत-संकटांत घालणें-पाडणें, काळाचे तोंडीं-जबड्यांत देणें-घालणें, मरणाच्या द्वारीं बसविणें, (-ला) धोका आणणें; as, "To E. life or peace." Endan'gered *pa. t.* & *pa. p.* Endan'gering *pr. p.* & *v. n.* Endan'gerer *n.* Endan'germent *n.* धोका *m*, संकट *n*, &c.

Endear (en-dēr') [Pref. *en* & Dear.] *v. t. to make dear or beloved* लाडका करणें, प्रीतिपात्र करणें, आवडता-प्रिय-प्यार-जिवलग-गोड करणें. २(R.) *to raise the price or cost of* (-ची) किंमत वाढविणें-चढविणें, महाग करणें. Endear'ed *pa. t.* & *pa. p.* Endear'ing *pr. p.* & *v. n.* Endear'edly *adv.* ममतेनें. Endear'edness *n.* जिवलगपणा *m.* Endear'ing *a.* Endear'ingly *adv.* Endear'ment *n.* -*the act.* लाडका-आवडता करणें *n.* (b) -*the state.* प्रीतिपात्र असणें *n*- होणें *n*, लाड *m-pl.*, लाडिकपणा *m*, लाडीगोडी *f.* २ *that which manifests, excites or increases affection* प्रीतिदर्शक-बोधक-वर्धक गोष्ट *f.*

Endeavour (en-dev'-ĕr) [O. E. *endevor*, Pref. *en* & *dever, devoir*, duty.] *v. t. to exert physical or mental strength for the attainment of, to try, to attempt* सतत यत्न-प्रयत्न करणें, (साठीं) खटपट करणें, (-च्या प्राप्तीकरितां मानसिक अथवा शारीरिक) श्रम करणें, (शरीरानें व मनानें) झटणें, (-चा) उद्योग करणें (*colloq.*). E. *v. i. to exert one's-self, to work for a certain end* (generally with an infinitive) धडपडणें, धडपड करणें, झटणें. Endea'voured *pa. t.* & *pa. p.* Endea'vouring *pr. p.* & *v. n.* E. *n. an effort, a trial, an essay* यत्न *m*, प्रयत्न *m*, झटणूक *f*; (-च्या प्राप्तीकरितां) मानसिक अथवा शारीरिक श्रम *m. pl.* Endeav'ourer *n.* Endeav'ourment *n.*

Endecagon (en-dek'a-gon) [See Hendecagon.] *n. geom. a plane figure of eleven sides and angles* एकादशकोनाकृति *f*, अकरा कोनी-अकरा कोन असलेली आकृति *f.*

Endecagynous (en-dekaj-i'-nus) [Gr. *endeka*, eleven & *gune*, female.] *a. bot.* एकादशस्त्रीकेसरयुक्त (as a flower).

Endecaphyllous (en-'dē-kafi'-lus) [Gr. *endeka*, eleven & *phyllon*, leaf.] *a. bot.* (said of a leaf) एकादशपत्री.

Endeictic (en-dīk'-tik) [Gr. *en*, in and *deiktein*, to show.] *a. serving to show or exhibit* निदर्शक, व्यंजक, दिग्दर्शक, दिग्दर्शन करणारा, दाखवून देणारा; as, "An E. dialogue."

Endeixis (en-dīk'sis) [Gr. *endeixis*, an indication.] *n. med. an indication* चिन्ह *n*, लक्षण *n*, निदर्शन *n*.

Endemic (en-dem'-ik) [Gr. *en*, in & *demos*, people.] *n. med. a disease peculiar to a particular district or locality* स्थानिक रोग *m*, विशिष्ट जागीं होणारा रोग *m*; as, "Fear, which is an E. latent in every human heart, sometimes rises into an epidemic." Ende'mial (R.) Endem'ic, Endem'ical *a.* स्थानिक, विशिष्ट जागीं होणारा; as, "An E. disease." Endem'ically *adv.* Endemiol'ogy *n. the science which treats of endemic diseases* स्थानिकरोगचिकित्सा *f.*

*N. B.*—Endemic, See Epidemic.

Endenizen (en-den'-i-zn) [Pref. *en* & Denizen.] *v. t.* (*obs.*) *to naturalize, to admit to the privileges of a denizen* (विदेशीय मनुष्यास) नागरिकाचे हक्क देणें, (-चें) नागरिकत्व कबूल-मान्य करणें, (-ला) नागरीक करणें.

Enderon (en'-dē-ron) [Gr. *en*, in & *deros*, skin.] *n.* (*obs.*) *anat. the deep sensitive & vascular layer of the skin & mucous membranes* ज्यामध्यें स्पर्शज्ञान तंतु व रक्तवाहिन्या जास्त प्रमाणानें असतात असा बाह्यत्वचा किंवा श्लेष्मलत्वचा यांच्या खालचा पदर *m*, उपबाह्यत्वचा *f*, उपश्लेष्मलत्वचा *f.*

Endiaper (en-dī'ā-pĕr) [See Diaper.] *v. t. to decorate with a diaper pattern* (फुलें, ठिपके वगैरे नकशी सारख्या अंतरावर काढून) चित्रित करणें-चित्रवणें, नकशीदार करणें.

Endict (en-dīt') See Indict.

Endite (en-dīt') Obsolete form of Indite.

Endive (en'-div) [Fr.–L. *intibus*, endive; Cf. Pr. Sp., Pg., & It. *endivia.*] *n. bot. a composite herb* (*Cichorium Endivia*) कास्नी *f*, सूर्यफूल किंवा शेवती सारख्या जातीची एक प्रकारची वनस्पति *f.*

Endo, End (en'-dō, end) [Gr. *endon*, within,—*en*, in.] a combining form signifying *within* 'आंतील' या अर्थीं लावण्याचा ग्रीक भाषेंतील उपसर्ग *m*; as, "Endocarp, Endogen, etc."

Endo-blast (en'-dō-blāst) [*Endo* & Blast.] *n. biol. the inner germinal layer, hypoblast, entoderm* अंतःकललपटल *n*, अंतःकलल *n*. कलल is the first germinal cell after conception, which is divided into three layers: (1) Epiblast, (2) Mesoblast, and (3) Endoblast or Hypoblast or Ento-derm. The three corresponding words are: (1) बाह्य कललपटल, (2) मध्यकललपटल, (3) अंतःकललपटल.

**Endocardium** ( en'-dō-kär'-di-um ) [ Gr. *endon*, & *cardia*, the heart. ] *n. anat. the membrane lining the cavities of the heart* हृत्पुटान्तर्वेष्टण *n*, हृदन्तस्त्वचा *f*, हृदयाची अन्तस्त्वचा *f*, हृदयाच्या चार पुटांच्या आंतली त्वचा *f*, हृदयान्तस्त्वचा *f*. Endocar'diac, Endocar'dial *a. pertaining to the endocardium* अंतर्हृत्त्वचेसंबंधीं, हृत्पुटाच्या आंतील पडद्यासंबंधीं-त्वचेसंबंधीं. २ *med. seated or generated within the heart* हृदयांतर्गत, हृज्जात; as, "E. murmurs." Endocardi'tis *n. med. inflammation of the endocardium* हृदन्तस्त्वग्दाह *m*, हृत्पुटांच्या अन्तस्त्वचेला आलेली सूज *f*, हृदयाचे अन्तस्त्वचेचा दाह व सूज *f*.

**Endocarp** ( en'-dō-kärp ) [ Gr. *endon* & *karpos*, fruit. ] *n. bot. the inner layer of a ripened ovary* अंतःफलकवच *n*, फलांतःकवच *n*, ( उ. आंब्याच्या कोयीच्या वरच्या पडद्याच्या खालील पडदा *m* ).

**Endochondral** (endō-kon'-dral) [ Gr. *endon* & *kondros*, cartilage. ] *a. physiol. growing within cartilage* ( applied esp. to developing bone ) अस्थिकूर्चान्तर्वर्धिष्णु.

**Endochrome** ( en'dō-krōm ) [ Gr. *endon* & *kroma*, colour. ] *n. bot. the colouring matter within the cells of plants* पिंडरंजक द्रव्य *n*, पिंडरंजक *n*.

**Endoderm** ( en'dō-derm ) [ Gr. *endon*, & *derma*, skin. ] *n. biol. the inner layer of the skin* ( opposed to *epiderm*) ( बाहेरील कातडीच्या खालील ) अन्तस्त्वचा *f*. Endōder'mic *n*. Endōder'mal *a*. अन्तस्त्वचेसंबंधीं.

**Endo'dermis** ( endō-der-mis ) *bot.* अन्तस्त्वचा *f*.

**Endogamous** ( en-dog'a-mus ) [ Gr. *endon* & *gamos*, marriage. ] *a. marrying within the same tribe* ( as opposed to *exogamous* ) आपल्याच ज्ञातीशीं -ज्ञातींत शरीरसंबंध-विवाह करणारा-लावणारा. Endog'amy *n*. ( opposed to *exogamy* ) आपल्याच ज्ञातींशीं-ज्ञातींत शरीरसंबंध करण्याविषयीं चाल *f*, ज्ञातिविवाह *m*, स्वजातिशरीरसंबंध *m*.

**Endogen** ( en'-dō-jen ) [ Gr. *endon*, & *gen*, *genis*, born. ] *n. bot.* ( as opposed to *exogen* ) अन्तर्वर्धिष्णु रोपा *m*. Endoge'nesis *n. biol. growth from within, multiplication of cells by endogenous division as in the development of one or more cells in the interior of a parent cell* पिंडाचें आंत विभागून वाढणें *n*, आंतले आंत विभागून वाढण्याची क्रिया *f*, अन्तर्वृद्धि *f*. Endogenet'ic *a*. Endog'enous *a. bot.* & *biol.* अन्तर्वर्धिष्णु. (उ. माड, नारळ). Endoge'nously *adv.* Endog'eny *n*. Same as Endogenesis.

**Endolymph** ( en'dō-limf ) [ Gr. *endo* & Lymph. ] *n. anat. the watery fluid contained in the membranous labyrinth of the internal ear* कर्णांतर्जल *n*, कर्णद्रव *m*, कानाचे आंतील एका विवरांतील पातळ पदार्थ *m*, कर्णांतर्रक्तरस *m*. Endolympha'tic *a*.

**Endolymphangial** ( endō-limfan'-ji-al ) [ Gr. *endon* & Lymphangial. ] *a. anat. within a lymphatic vessel* शोषकवाहिनींतील.

*N. B.*—Lymph=रक्तरस, श्वेतरक्त. Serum रक्तजल. Lymphatic vessel=शोषकवाहिनी.

**Endometrium** ( endō-mē'-tri-um ) [Gr. *endon*, within & *metra*, the womb.] *n. anat. the membrane lining the inner surface of the uterus or womb* गर्भाशयाची अन्तस्त्वचा *f*, गर्भाशयान्तस्त्वक् *f*. En'dometri'tis *n. med. inflammation of the endometrium* गर्भाशयाचे अन्तस्त्वचेला आलेली सूज *f* व दाह *m*.

**Endoneurium** ( en dō-nū'ri-um) [Gr. *endo* & *neuron*, a sinew, nerve. ] *n. anat. the delicate bands of connective tissue among nerve fibres* ज्ञानतंतुंमधील संधायक तंतूंचें जाळं *n* -संधानककला *f*.

**Endoparasite** ( endō-par'a-sīt) [Gr. *endo* & Parasite.] *n. zool.* ( as opposed to Ectoparasite ) *any parasite that lives in the internal organs of an animal as the threadworm, tapeworm, etc.* (दुसऱ्या) प्राण्याच्या पोटांत-कोठ्यांत राहणारे ( जंतादि ) कृमि *m. pl.* अंत्रस्थकृमि. En'dopar'asit'ic *a*.

**Endophlœum** ( en'dō-flē'-um ) [ Gr. *endo* & *phloios*, bark. ] *n. bot. the inner layer of the bark of trees* अन्तर्साल *f*, वल्कलत्वचा *f*.

**Endophyllous** ( endō-fi'-lus ) [ Gr. *endo*, & *phyllon*, leaf. ] *a. bot. wrapped up in a leaf or sheath* पत्रांतर्घटित, पत्रांतस्थ ( उ० एकदल वनस्पतींचीं पानें), पानामध्यें गुंडाळलेलें, पत्रवेष्टित.

**Endoplasm, Endoplasma** (en'dō-plaz'm,-ä) [ Gr. *endo* & *plasma*, anything formed or moulded. ] *n. the protoplasm in the interior of a cell* (सूक्ष्म पिंडांतील) मुख्यजीवनपदार्थ *m*. मुख्यजीवनक *n*. En'doplas'tule *n*. See Nucleolus. अंतर्जीवनक *n*.

**Endorse** ( en-dors' ) [ Formerly *endosse*.—Fr. *endosser*, to put on the back, to endorse.—L. *en*, in & *dorsum*, the back.] *v. t.* Same as Indorse which see. Endorsee *n*. Same as Indorsee. Endorse'ment *n*. Same as Indorsement. Endor'ser *n*. Same as Indorser.

**Endosarc** ( en'dō-särk ) [ Gr. *endo* & *sarkos*, flesh.] *n. biol. entoplasm, endoplasm* अंतर्जीवनक *n*. जीवनक=*protoplasm*.

**Endoscope** ( en'dō-skōp ) [ Gr. *endo* & Scope. ] *n. med. an instrument for examining the interior of the rectum, the urethra, and the bladder* मलमार्ग, मूत्राशय व मूत्रमार्ग तपासून पाहण्याचें यंत्र *n*, मलमूत्रमार्गदर्शक *n*. Endos'copy *n. med. the art or process of examining by means of the endoscope* मलमूत्रमार्ग दर्शन *n*.

**Endoskeleton** ( en'dō-skel'ē-tun ) [ Gr. *endo* & Ske-

**Execute** ( eks'e-kūt ) [ O. Fr. *exsecuter*–L. *executus*, p. p. of *exsequor*, to follow out, pursue, perform –L. *ex*, out & *sequor*, to follow.] *v. t. to complete, to perform* बजावणें, सिद्ध करणें, पूर्ण करणें, (-ची) समाप्ति करणें, तडीस-शेवटास नेणें-पोंचविणें, (-ची) तड *f.* शेवट *m.* लावणें, संपविणें, करणें. २ *to complete as a legal instrument, to perform what is required to give validity to as by signing and perhaps sealing* सही-शिक्का घालून (दस्तऐवज इ.) पुरा करणें, सही-शिक्का घालणें-देणें-करणें; as, "To E. a deed." ३ *to give effect to, to perform the requirements or stipulations of* अमलांत आणणें, बजावणें, (-ची) अम्मलबजावणी करणें. ४ *to inflict a capital punishment on, to put to death in conformity to a legal sentence* देहांत शिक्षा *f.* देणें, वधशिक्षा *f.* करणें, (-चा) जीव *m.* घेणें-शिरच्छेद *m.* करणें, प्राण *m.* घेणें, ठार मारणें. ५ *mus. to perform, as a piece of music, either on an instrument or with the voice* छेडणें, गाऊन-वाजवून दाखविणें. Ex'ecutable *a.* ( R. ) *that can be executed* करतां येण्यासारखा, (सु) साध्य, सोपारा. Exec'utant *n. one who executes or performs* बजावणी करणारा, बजावणारा. २ (esp.) *a performer on a musical instrument* वाजविणारा. Execu'ter *n.* See Executor. Execu'tion *n. the act of executing, performance, achievement* संपादन *n* (क्रिया), साधणूक *f.* अनुष्ठान *n*, साधन *n.* २ *a putting to death as a legal penalty* शिरच्छेद *m*, वध *m*, देहांतशासन *n.*–शिक्षा *f.* ३ *the act or the mode of performing a work of art, of performing on an instrument, &c.* साधनक्रिया *f*, (चित्र इत्यादि कलाकुशलतेचें) काम करण्याची हातोटी *f*, (वाद्य इत्यादिकांवर) वाजविण्याची तऱ्हा *f*-चाल *f*, वाद्य वाजविण्याचें काम *n.* ४ *law.* ( a ) *the carrying into effect the judgment given in a court of law* बजावणी *f.* (b) *a judicial writ by which an officer is empowered to carry a judgment into effect, final process* बजावणीपत्रक *n.* (c) *the act of signing, sealing, and delivering a legal instrument* दस्तऐवज सही-शिक्यानिशीं पुरा करून स्वाधीन करणें. ५ *that which is executed, effective work* (usually with *do* ) कृत्य *n*, काम *n*, कर्म *n*, परिणाम *m*, शेवट *m*, अखेरनिकाल *m*; as, "To do some fatal E." Execu'tioner *n. one who executes*, esp. *one who inflicts capital punishment* शिरच्छेद करणारा *m*, मांग *m* (*colloq.*), मातंग *m*, प्राण घेणारा *m*, ठार मारणारा *m.* Exe'cutive *a. designed or fitted for execution, active, pertaining to the execution of the laws or the conduct of affairs* राजविधिप्रवर्तक, नियमप्रवर्तक, विधायक, कार्यात्मक, कार्यकारी, शासनासंबंधीं. E. *n. the power or authority in government that carries the laws into effect, the persons who administer the government* अम्मल-बजावणी करणारे अधिकारी *m. pl.*, सत्ताधिकारी *m. pl.* Exe'cutively *adv.* Exec'utor *n. one who executes or performs, a doer* (कार्य) करणारा, कर्ता. २ *law. the person appointed by a testator to execute his will or to see its provisions carried into effect, after his decease* मृत्युपत्र बजावणारा, मृत्युपत्राबरहुकूम व्यवस्था करणारा, मृत्युपत्रव्यवस्थापक. Exec'utress, Exec'utrix *n. fem.* Executo'rial *a.* Exe'cutorship *n.* मृत्युपत्र-व्यवस्थापकाचा अधिकार *m*, (मृत्युपत्र) बजावणाऱ्याचा अधिकार *m.* Exec'utory *a. pertaining to administration or to putting the laws in force, executive* अंमलबजावणीसंबंधीं. २ *law. designed to be executed or carried into effect in time to come, or to take effect on a future contingency* भविष्यकाळीं अमलांत आणण्याकरितां योजलेला.

*N. B.*—Execute = बजावणें, अमलांत आणणें. Perform = यथाविधि करणें, करणें. Achieve = उत्तम रीतीनें पार पाडणें.

*N. B.*—Executor हा मृत्युपत्रानें नेमलेला असतो व एखादा मनुष्य मृत्युपत्र केल्याशिवाय मेला असला तर त्याच्या जिनगीची व्यवस्था करण्याकरितां कोर्टाकडून नेमला जाणाऱ्या व्यवस्थापकाला Administrator असें म्हणतात.

**Exegesis** ( ekse-jē'-sis ) [Gr. *exegesis*–*exegeomai*, to explain–*ex*, out & *hegeomai*, to guide,–L. *agere*, to lead. ] *n. exposition, explanation, esp. of the scriptures* स्पष्टीकरण *n*, विवरण *n*, व्याख्यान *n*, अर्थबोध *m*, टीका *f.* Ex'egete, Exege'tist *n. one who interprets the scriptures* धर्मग्रंथाचें विवरण करणारा *m*, टीकाकार *m.* Exeget'ic, Exeget'ical *a. pertaining to exegesis, explanatory* विवरण करणारा, स्पष्ट-उघड करणारा, टीकात्मक, स्पष्टार्थबोधक. Exege'tically *adv.* Exege'tics *n. pl. the science of exegesis* विवरणशास्त्र *n.*

**Exemplify** (eg'zem-pli-fī) [ L. *exemplum*, example & *facere*, to make; cf. L. L. *exemplificare*, to copy, serve as an example. ] *v. t. to show or illustrate by example* उदाहरणानें दाखविणें, दाखला-दृष्टांत देऊन सिद्ध करणें. २ *to copy* नक्कल करणें. ३ *to show by an attested copy* सहीच्या नकलेनें साक्ष देणें. Exem'plified *pa. t. & pa. p.* दाखल्यानें स्पष्ट केलेलें. Exemplifica'tion *n.* दाखला देणें *n*, दृष्टांतानें समर्थन करणें *n.* २ द्योतक-दर्शक गोष्ट *f.* Ex'emplary *a. serving as a pattern, worthy of imitation* कित्त्याचा, अनुकरणीय, कित्ता घेण्याजोगा, दृष्टांतास योग्य, अनुकरण करण्यास योग्य, अनुकार्य, अनुसरणार्ह, अनुकरणार्ह, उत्तम, भला, कित्ता घेण्यास योग्य, दाखला घेण्याजोगा. २ *serving as a warning, monitory* दहशत-धाक-जरब बसावया-जोगा, धडा घालून देणारा, उदाहरण घालून प्रतिबंध करणारा, जरबेचा. ३ *illustrating as the proof of a thing* उदाहरणीय, दृष्टांतादाखल.

**Exempt** ( eg-zemt' ) [ O. Fr. *exempt*, whence *exempter*, to exempt, free–L. *exemptius*, p. p. of *eximero*, to take out, deliver, free–L. *ex*, out & *emere*, to take. या शब्दाचा मूळ अर्थ वेगळा करणें,

निराळा करणें, निराळा ठेवणें असा आहे.] *a. not liable to, free, clear, privileged, released, unaffected* (with, *from*) सुटा, सोडलेला, माफ, माफीचा, मोकळा, अप्रतिबद्ध, मुक्त. E. *n. one not subject* मोकळा-स्वतंत्र मनुष्य *m.* E. *v. t. to grant immunity to* (-पासून) मुक्त करणें, सवलत *f.* देणें. Exemp'tible *a.* Exem'ption *n. act of exempting* सवलत देणें *n.* माफ करणें *n.* २ *the state of being exempt, freedom from any service, immunity* सवलत *f.* माफी *f.* मोकळीक *f.* सुटका *f.* मुक्ति *f.* मुक्तता *f.* रहितत्व *n.* वर्जन *n.*

*N. B.*—Exemption=सवलत. Freedom=माफी, सुटका.

Exenterate ( eks-en'tėr-āt ) [ L. *exenterare*–Gr. *ex*, out *enteron*, intestine. ] *v. t. to disembowel* आंतडीं *n. pl.* &c. बाहेर काढणें.

Exequies ( eks'ē-kwēs ) [ O. Fr. *exeques*, *exequies*, funerals, L. *exsequor*, to follow out–L. *ex*, out & *sequor*, to follow.] *n. pl. a funeral rite, the ceremony of burial, funeral procession* उत्तरक्रिया *f.* और्ध्वदेहिक *n.* दहनविधि *m.* प्रेतयात्रा *f.* स्मशानयात्रा *f.* अंत्यसंस्कार *m.* Exe'quial *a.* उत्तरक्रियेसंबंधीं, और्ध्वदेहिक.

Exercise ( ek'-sėr-sīz ) [ O. Fr. *exercice*–L. *exercitum*–L. *exercise*, L. *exercitus* p. p. of *exercere*, to drive out of an enclosure, drive on, set at work,–L. *ex*, out, & *arcere*, to enclose.] *n. the act of exercising, a setting in action or practice, application, occupation* व्यवसाय *m.* व्यापार *m.* धंदा *m.* व्यवहार *m.* काम *n.* २ *exertion for the sake of training or improvement (whether physical, intellectual, or moral)* अभ्यास *m.* अभ्यसन *n.* ३ *bodily exertion (for the sake of keeping the organs and functions in a healthy state)* तालीम *f.* कसरत *f.* कवाईत *f.* व्यायाम *m.* शारीरिक मेहनत *f.* ४ *the performance of an office, a ceremony, or a religious duty* अनुष्ठान *n.* आचरण *n.* ५ *a disquisition, a lesson, a task* घडा *m.* पाठ *m.* ६ *a trial, a test* परीक्षा *f.* कसोटी *f.*; as, "Patience is more often the E. of saints, the trial of their fortitude." E. *v. t. to set in action, to give employment to, to school or train, to busy* कामीं लावणें, गुंतवणें, (-ला) उद्योग लावून देणें, वापरणें, व्यवहारणें. २ *to exert for the sake of training, to practise in order to improve, to improve by practice* (-चा) अभ्यास *m.* करणें, अभ्यासणें, संवयीनें सुधारणें. ३ *to occupy the attention and effort of, to tax, to vex, to afflict* छळणें, गांजणें, त्रास देणें, छळणूक करणें. ४ *to put in practice, to carry out in action, to use, to employ* चालवणें, गाजवणें, करणें, उपयोगांत आणणें, (-ची) अम्मलबजावणी करणें, बजावणें. ५ चालवणें; as, "To E. anything." Exercisable *a.* To exercise one's discretion तारतम्याचा उपयोग करणें.

Ex'ercise *v. i.* व्यायाम करणें, शारिरीक मेहनत करणें. Ex'erciser *n.*

Exert ( eg-zėrt' ) [ L. *exertus*, better spelt *exsertus*, thrust forth, p. p. of *exserere*, to thrust out–L. *ex*, out & *serere*, to join, to put. या शब्दाचा मूळ अर्थ पुढें लोटणें-ढकलणें असा आहे. ] *v. t. to put in vigorous action, to bring into active operation* कामीं लावणें, उपयोगांत आणणें. [To EXERT AUTHORITY अम्मल गाजवणें. To EXERT ONE'S SELF देह झिजविणें, सक्त मेहनत घेणें.] २ *to bring to bear, to do, to perform* घडवून आणणें, करणें. Exer'tion *n. the active exercise of any power or faculty, an effort,* (esp.) *a laborious effort* परिश्रम *m.* प्रयत्न *m.* प्रयास *m.* Exer'tive *a. having power or a tendency to exert, using exertion* मेहनती.

Exfoliate ( eks-fō'li-āt ) [ L. *exfolio*, *exfoliatus*–*ex*, off & *folium*, a leaf. ] *v. t.* & *v. i. to send off or to come off in scales* (साल *f*-त्वचा *f*-यांचे) कळपे गळून पडणें, (झाडांचे-सालीचे इ.) कळपे उडून जाणें. Exfoliā'tion *n.* Exfo'liative *a.*

Exhale (eks-hāl' *or* egz-āl') [Fr. *exhaler*,—L. *exhalare*, to breathe out–L. *ex*, out & *halare*, to breathe.] *v. t. to breathe out* श्वास बाहेर टाकणें-सोडणें, उच्छ्वास करणें. २ *to emit (as vapour), to send out, to evaporate* वाफेच्या रूपानें बाहेर टाकणें-सोडणें, (वाफ-सुगंध इ०) सोडणें. ३ *to draw out, to cause to be emitted in vapour* ओढून घेणें, (-ची) वाफ करणें. E. *v. i. to rise off as vapour* (-ची) वाफ होणें, उडून जाणें, नाहींसें होणें. Exha'lable *a.* वायु-वाफेच्या रूपानें उडून जाण्यासारखा. Exha'lant *a. having the quality of exhaling* वाफेच्या रूपानें उडून जाणारा. Exhalā'tion *n. the act of exhaling, evaporation* वाफ होऊन जाणें *n.* २ *that which is exhaled or steam, vapour, &c.; emanation* उच्छ्वास *m.* निर्गम *m.* प्रवाह *m.* उद्गमन *n.* उत्क्षेप *m.* ३ बाष्प *m.* धूम *m.* ४ वाष्पोद्गमन *n.* धूमोद्गार *m.*

Exhaust ( eg-zawst' ) [ L. *exhaustus* p. p. of *exhaurire*, to draw out, drink up–L. *ex*, out & *haurire*, to draw (esp. water).] *v. t. to draw or let out wholly, to drain off completely* (उपयोगासाठीं) सर्व काढून घेणें, खलास करणें, पूर्णपणें नाहींसा करणें, उपसून काढणें, (वायु इ.) निष्कासन करणें, (spec.) वायुशून्य करणें, निर्वात करणें. २ *to empty by drawing or letting out the contents* रिक्त-रिकामा-रिता करणें, खालीं करणें, शून्य करणें. ३ *to drain (metaphorically), to use or expend wholly, to deprive wholly of strength, to use up, to tire out, to wear out* श्रमवणें, दमविणें, जिकीरीस-जेरीस आणणें, कंटाळा *m*-थकवा *m*-शीण *m.* आणणें, शिणवणें, खर्च करणें, फडशा-फन्ना उडवणें, खर्चून टाकणें, (आंतील) दम-जोर नाहींसा करणें.

*bring out or develop completely, to discuss thoroughly* (-ची) पूर्ण चर्चा करणें, (-ची) पुरी वाटाघाट करणें. ५ *chem. to subject to the action of various solvents* खेंचून-ओढून-आकर्षून घेणें. Exhaust' *a. drained, exhausted* काढून घेतलेला, निष्कासित. २ *pertaining to steam, air, gas, &c. that is released from the cylinder of an engine after having performed its work* (इंजिनच्या सिलिंडरमधून) बाहेर टाकलेली, निष्कासित. E. *n.* (*steam Eng.*) *the steam let out of a cylinder after it has done its work there* श्रान्त, बाष्प. २ *the foul air let out of a room through a register or pipe provided for the purpose* (खोलींतून नळाच्या द्वारें) बाहेर टाकलेली विपारी हवा *f.* Exhaust'ed *pa. t. & pa. p. drained out, emptied, consumed,* रिक्त, रिकामा, खर्च केलेला, उपसलेला. २ *tired out* दमलेला, थकलेला, शिणलेला, भागलेला, श्रान्त. Exhaust'er *n. one who, or that which, exhausts* खर्च करणारा *m*, नाहींसें करणारा *m*, श्रमविणारा *m*, रिक्त-रिकामा करणारा *m*. Exhaustibil'ity *n.* Exhaus'tible *a. capable of being exhausted* थकवून टाकतां येण्यासारखा. Exhaus'tion *n. the act of exhausting or consuming* संपवून टाकणें *n*, रिकामा करणें *n*. २ *the state of being exhausted, extreme fatigue* क्षीण *m*, थकवा *m*, भागवटा *m*, ग्लानि *f*, अतिश्रम *m*, फन्ना *m*, अत्यंत फडशा *m*, समाप्ति *f*, निसांठा (R.), लय *m*, इ०. ३ शोपण *n*. ४ व्यय *m*, अपचय *m*, क्षय *m*. Exhaus'tive *a. tending to exhaust, exhibiting all the facts or arguments* सर्वग्राही, निःशेष, सर्वांगपूर्ण. Exhaus'tively *adv.* Exhaust'less *a. that cannot be exhausted* न संपणारा, विपुल, भरपूर. Exhaus'ture *n. exhaustion.* See above.

*N. B.*—Exhaust = (उपयोग करून) संपवून टाकणें. Drain = (उपसून) रिकामा करणें.

Exhibit (eg-zhib'-it) [L. *exhibitus* p. p. of *exhibere*, to hold forth,–L. *ex*, out & *habere*, to have, or hold. ] *v. t. to hold forth or present to view; to show*, esp. *in order to attract notice to what is interesting; to display* प्रदर्शन *n*. करणें, दाखविणें, नजरे-वर-पुढें ठेवणें-मांडणें. २ *law.* (a) *to submit, as a document, to a court or officer, in course of proceedings* (निशाणी *f*-दाखला *m*-) दाखल-सादर करणें. (b) *to present or offer in a legal form, to bring as a charge* (-वर) आरोप *m*. ठेवणें-आणणें-लादणें. ३ *med. to administer as a remedy* उपचार-इलाज करणें. E. *n. any article, or collection of articles, displayed to view, as in an industrial exhibition; a display* प्रदर्शनांतील वस्तु *f*-वस्तुसंग्रह *m*, प्रदर्शनांत मांडलेली वस्तु *f*. २ *law. a document produced and identified in court for future use as evidence* निशाणी *f*, दाखला *m*, लेख *m*, रोखा *m*, पुराव्यासाठीं न्यायकचेरींत दाखल केलेला कागद *m* -लेख *m*. Exhib'iter,-or *n.* प्रदर्शक *m*, प्रदर्शनास वस्तु पाठविणारा. Exhibi'tion *n. display* दाखविणें *n*, नजरेवर ठेवणें *n*, इ. २ *a public show, a public show of works of art, manufactures, &c.* प्रदर्शन *n*, देखावा *m*. ३ *maintenance, allowance esp. for meat and drink,* (*Eng. Univ.*) *private benefaction for the maintenance of scholars* विद्यार्थ्यांची पोटगी *f*, भत्ता *m*, नेमणूक *f*-वेतन *n*. ४ *med. the act of administering a remedy* उपचारक्रिया *f*. Exhibiti'oner *n.* (*Eng. Univ.*) *one who has an allowance granted for support* नेमणुकीचा विद्यार्थी *m*, नेमणूक करून दिलेला आंग्ल विद्यापीठांतील विद्यार्थी *m*. Exhibit'ionist *n.* Exhib'itive, Exhib'itory *a. serving for exhibition, representative* निदर्शक. Exhib'itively *adv.* To make an exhibition of one's self *to behave foolishly, exciting ridicule* स्वतःच्या अकलेचें प्रदर्शन करणें.

*N. B.*—Exhibit = जाहीर रीतीनें दाखविणें, प्रदर्शन करणें. Show = दाखविणें. Display = आत्मप्रतिष्ठेकरितां दाखविणें. Demonstrate = प्रत्यक्ष-स्पष्ट प्रमाणानें दाखविणें. Indicate = बोटानें दाखविणें. Evince = (विशेष खात्रीलायक प्रमाणें देऊन) सिद्ध-शाबीत करणें, (also) दर्शविणें. Manifest = बाहेर दर्शविणें, प्रगट करणें.

Exhilarate (eks-hil'-ĕr-āt) [L. *ex*, very & *hilaris, hilarus*, glad, cheerful, from Gr. *ilaros*, cheerful. ] *v. t. to make merry or jolly, to enliven, to animate, to cheer* (-ला) खूप-आनंदित करणें, (-ला) उल्हास *m* - उत्साह *m*. आणणें, (-चें) मनोरंजन *n*. करणें. Exhil'arant *a. exciting joy, mirth, or pleasure* उल्हासजनक, हर्प-आनंदोत्पादक. E. *n. that which exhilarates* आनंदोत्पादक-उल्हासजनक वस्तु *f*. Exhil'arating *pr. p. & v. n. cheering, gladdening* उल्हासजनक, आनंदोत्पादक. Exhil'aratingly *adv.* Exhilarā'tion *n. the act of enlivening the spirits, a gladdening* आनंद देणें *n*. २ *the state of being enlivened or cheerful* आनंद *m*, संतोष *m*, उल्हास *m*, आनंदवृत्ति *f*, उल्हासवृत्ति *f*. Exhilarative, Exhilar'atory *a.*

Exhort (eg-zort') [O. Fr. *ex(h)orter*–L. *exhortari*, to encourage greatly–L. *ex*, out, very & *hortari*, to encourage. ] *v. t. to incite by words or advice, to urge strongly* आग्रहानें उपदेश करणें. २ *to advise, to warn, to caution* सावध करणें, बजावणें, सांगणें, उपदेश *m*. करणें, बुद्धिवाद *m*. सांगणें, बोध *m*. करणें, सूचना-इशारा देणें. ३ *to persuade* वळविणें. E.v. i. (चांगल्या कामाकडे प्रवृत्ति होण्यासारखा) उपदेश करणें. Exhortā'tion *n. the act of exhorting, a counsel, religious discourse* उपदेश *m*, बुद्धिवाद *m*, बोध *m*, कानउघाडणी *f*, प्रबोधन *n*, प्रोत्साहन *n*. Exhor'tative, Exhor'tatory *a.* Ex'hortator, Exhor'ter *n.*

*N. B.*—Exhort = (आग्रहानें) उपदेश-बोध करणें. Persuade = मन वळविणें.

Exhume (eks-hūm') [L. *ex*, out of & *humus*, the ground, soil. ] *v. t. to take out of the ground or*

place of burial, to disinter ( पुरलेलें ) उकरून बाहेर काढणें, उकरणें, उकरून बाहेर काढणें. Exhumā'tion *n.* *the act of exhumating, disinterment* उकरणें *n*, उत्खनन *n*. Exhum'er *n.* *one who exhumes* उकरणारा *m*.

Exigent ( eks'-i-jent ) [ L. *exigens-entis*, pr. p. of *exigere* to drive out, to require, to exact–*ex*, out & *agere*, to drive. ] *a. pressing, demanding immediate aid or action, urgent, critical* निकडीचा, ओढीचा, गरजेचा, अडचणीचा, आणीबाणीचा, जरूरीचा. Ex'igence,-cy *n. pressing necessity, emergency, distress* निकड *f*, नड *f*, अडचण *f*, संकट *n*, आणीबाणीची वेळ *f*, आणीबाणीचा प्रसंग *m*, अवचित अडचण *f*, अपरिहार्य अडचण *f*, आपत्ति *f*, विपत्ति *f*.

*N. B.*—Emergency=अवचित आलेली मोठी अडचण. Exigency=अवचित आलेली लहान अडचण.

Exile ( egz'-īl ) [ Fr. *exil*–L. *exilium*, *exsilium*, banishment; cf. *exsul*, an exile–*ex*, out of & *solum*, soil, land. ] *n. expulsion from one's home, banishment*, ( sometimes ) *voluntary separation from one's native country* देशाच्या बाहेर हांकलणें *n*, हद्दपार करणें *n*, देशबहिष्कृतत्व *n*. २ *the person expelled from his country by authority* हद्दपार केलेला मनुष्य *m*, देशाबाहेर हांकलेला मनुष्य *m*. ३ *one who separates himself from his home* देशांतरीं गेलेला मनुष्य *m*. E. *v. t. to banish or expel from one's native country, to drive away* हद्दपार करणें, देशाबाहेर हांकलणें-हांकलून देणें-लावणें. Exile'ment *n.* (R.) *banishment* हद्दपार करणें *n*. Exilic *a. pertaining to exile*, esp. *to that of the Jews in Babylon* बाबिलोनमधील यहुदी लोकांच्या हद्दपारीसंबंधीं, हद्दपारीसंबंधीं.

*N. B.*—Exile = हद्दपार करणें-जाणें-होणें. Expel = विटंबना, अपमान ( शेणमार (*colloq.*)) करून हांकून देणें. Transport = काळ्यापाण्यावर पाठविणें, समुद्रापलीकडे नेणें. Banish = ( जाहिरनामा-आज्ञापत्र काढून) काढून लावणें. Expatriate = स्वदेशाबाहेर हाकलणें.

Exist ( eg-zist' ) [ L. *existere*, better *exsistere*, to stand forth, arise–L. *ex*, out & *sistere*, to set–*stare*, Sk. स्था, to stand. ] *v. i. to be as a fact, to have an actual or real being whether material or spiritual* अस्तित्वांत असणें, विद्यमान असणें. २ *to be manifest in any manner, to continue to be* दृग्गोचर होणें, दृष्टीस पडणें, चालू रहाणें. ३ *to live, to have life or functions of vitality* जिवंत-हयात रहाणें. Exis'ting *pr. p. a.* Exis'ted *pa. t.* & *pa. p.* Exist'ence *n. the state of existing or being* अस्तित्व *n*. २ *continuance in being* जीवत्व *n*, स्थिति *f*, भाव *m* (S.), सत्ता *f* (S.) ३ *continued or repeated manifestation, occurrence, as of events of any kind* वारंवार घडणें *n*, पुन्हांपुन्हां घडून येणें *n*, सतत दर्शन *n*, चालू स्थिति *f*. ४ *that which exists, a being, an entity* प्राणी *m*, विद्यमान वस्तु *f*. [ ATTAINMENT OF THE END OF E. जीवित-जन्म-जीव साफल्य *n*, जन्मसार्थक *n*, जन्माची सार्थकता *f*. ] Exis'tent *a. having being or existence, existing, occurring now* जिवंत असणारा, सत् (S.), घडणारा, घडून येणारा, वर्तमान, विद्यमान.

*N. B.*—Exist = खरोखर-तत्वतः असणें. Be = असणें. Subsist = वर असणें ( *colloq.* ),-वर राहणें,-च्या मुळें असणें. Live = जीवंत असणें.

Exit ( ek'sit ) [ L. 3rd. pers. sing. pres. of *exire*, to go out–*ex*, out & *ire*, to go. ] *n. the departure of a player from the stage, when he has performed his part* निर्याण *n*, निर्गमन *n*, निष्क्रमण *n*, निष्क्रमण करणें *n*, जाणें *n*, निघून जाणें *n*, पडद्यांत जाणें *n*. २ *any departure, death* प्रयाण *n*. (*colloq.*), मरण *n*, उत्क्रमण *n*. ३ *a way of departure, egress, way out* बाहेर जाण्याचा मार्ग *m*-रस्ता *m*-वाट *f*. Exeunt *n.* L. pl.

Exocarp ( ek'sō-karp ) [L. *exo* & Gr. *carpos*, fruit. ] *n. bot. the outer portion of a fruit as the flesh of a peach or the rind of an orange* बाह्यफलकवच *n*, बाह्यकवच *n*.

Exodermis ( ek'sō-dėr-mis ) [L. *exo* & *dermis*, skin. ] *n.* बाह्यत्वचा.

Exodus ( eks'o-dus ) [ L.,–Gr. *exodos*, a going out –*ex*, out & *hodos*, a way; cf. Sk. सद् with आ, to approach.] *n. a going out esp. that of the Israelites from Egypt* निर्गमन *n*, बाहेर जाणें *n*, निर्गम *m*. २ *any large migration from a place* (जनसंघाचें) निर्गमन *n*, निर्गम *m*. ३ *the second book of the Old Testament* जुन्या कराराचें दुसरें पुस्तक *n*, निर्गम *m*. Exodist *n. one who goes out, an emigrant* बाहेर जाणारा.

Exogamy ( eks-o'gam-i ) [ Gr. *exo*, out & *gamos*, marriage. ] *n.* ( opposed to *Endogamy* ) गोत्रांतर विवाह *m*. Exog'amous *a.*

Exogen ( eks'o-jen ) [ Fr. *exogène*–Gr. *exo*, outside & *gen*, root of *gignomai*, to be produced. ] *n. bot. a plant belonging to one of the great classes that increases by layers, growing on the outside of the wood* बाह्यवर्धक झाड *n*, बहिर्वर्धिष्णु झाड *n* ( उ. अंबा, फणस इ० ). Exogene'tic *a. biol.* बहिर्वर्धिष्णु. Exog'enous *a. bot.* बाह्यवर्धक.

Exonerate ( eg-zon'-er-āt ) [ From p. p. of L. *exonerare*, to free from a burden–L. *ex*, away & *onerare*, to burden–*oner* ( for *ones* ) stem of *onus*, a burden. या शब्दाचा मूळ अर्थ ओझें किंवा दडपण काढून टाकणें असा होता. ] *v. t. to free from the burden of blame, to acquit* ( दोषाचें ) ओझें काढून टाकणें, ( दोषापासून ) मुक्त करणें, ( दोष ) मुक्त करणें, ठपका *m* - दोष *m*. उडवणें. २ *to discharge from duty or obligation as a bail* ( जबाबदारींतून ) मुक्त करणें. Exonerā'ting *pr. p.* & *v. n.* Exonera'ted *pa. t.* & *pa. p.* Exonerā'tion *n. the act of freeing mentally from a charge or imputation* दोषमुक्त करणें *n*, दो…

*m* -ठपका *m.* उडवणें *n*, दोषविमोचन *n*, आळांतून मुक्त करणें *n.* २ *-the state.*दोषमुक्तता *f.* -मुक्ति *f.* Exonera'tive *a. freeing from a burden or obligation* दोषमुक्त करणारा, दोष *m* -ठपका *m.* उडविणारा, दोषभारहारक. Exonera'tor *n.*

Exorable ( eg'-zora-bl ) [ L. *exorabilis,-exorare*, to gain by entreaty-*ex*, out & *orare*, to pray. ] *a. capable of being moved by entreaty, pitiful, tender* विनवणी केल्यास द्रवणारा, दयाळु, कोमल, सांत्वनीय.

Exorbitant ( eg-zor'-bi-tant ) [ Fr. *exorbitant*-L. *exorbitant* stem of pr. p. of *exorbitare*, to fly out of a track-L. *ex*, out and *orbita*, a track of a wheel-*orbis*, a wheel. या शब्दाचा मूळ अर्थ ठरींव मार्गाबाहेरचा असा आहे.] *a. going beyond the usual limits, excessive, inordinate* जबर, बेसुमार, भारी, मर्यादातीत, अतिशय, कमालीचा. २ *anomalous* अनियमित, अनियमबद्ध. Exor'bitance,-cy *n. extravagance, enormity* बेसुमारपणा *m*, अतिशयता *f*, निर्मर्यादता *f*, मर्यादातिक्रम *m.* Exor'bitantly *adv.*

*N. B.*—Exorbitant=अमर्याद, बेसुमार, जुलमी. Extravagant=बेताल. Excessive=अतिशय.

Exorcise ( ek'sor-sīz' ) [ Late L. *exorcizare*,-Gr. *exorkizo-ex*, out & *horkizo*, to bind by an oath-*horkos*, an oath. ] *v. t. to cast out as a devil, evil spirits, by conjuration or summoning by a holy name* भूत-समंध इत्यादि काढणें-झाडणें-घालवणें, काढणें, भूतनिःसारण *n.* करणें. २ *to deliver from the influence of an evil spirit* भुताच्या-पिशाचाच्या तडाक्यांतून-झपाट्यांतून-बाधेंतून मुक्त करणें, भूतबाधा-पिशाचबाधा नाहींशी करणें. Ex'orcising *pr. p. & v. n.* Ex'orcised *pa. t. & pa. p.* Ex'orcism *n. the act of exorcising* भूत-पिशाच काढणें *n*- झाडणें *n*- घालवणें *n*, भूतापसर *n.* २ *the formula for exorcising* भूत काढण्याचा मंत्र *m.* Ex'orcist, Ex'orciser *n. one who expels evil spirits by conjuration* पंचाक्षरी *m*, देवऋषि *m*, मांत्रिक *m*, भूतकाढ्या *m*, जाणता *m.*

Exordium ( eg-zor'di-um ) [ L. *exordium*, a beginning-L. *exordiri*, to begin, to weave-L. *ex* & *ordiri*, to begin, to weave. ] *n. a beginning, an introduction* आरंभ *m*, सुरवात *f*, मुख *n*, प्रारंभ *m.* २ *esp. the introductory part of a discourse or written composition* उपोद्घात *m*, प्रस्ताव *m*, प्रस्तावना *f.* Exor'dial *a. introductory, pertaining to the exordium* प्रास्ताविक, आरंभींचा, उपोद्घाताचा.

Exorhizal, Exorhizous ( ekso-rī'-zal,-zus ) [ Gr. *exo*, outside & *rhiza*, a root. ] *a. bot.* बहिर्वर्धक (मूळ).

Exoskeleton ( eksō-skel'-ō-tun ) [ Gr. *exo*, outside & *skeleton*, a dry body or skeleton. ] *n. anat.* बाह्यास्थिपञ्जर *m.*

Exosmose ( eks'os-mōs ) [ Gr. *exo*, outside & *osmos*, a thrusting, an impulsion.] *n.* (*physics*) *the passage outward of fluids, gases, &c. through porous media esp. living animal membranes* ( also Exosmosis *n.* opposed to *Endosmose* ) बाह्याभिसरण *n.* Exosmot'ic *a.*

Exostome ( ek's-ō-stōm ) [Gr. *exo*, & *stoma*, mouth.] *n. bot.* बाह्यबीजरंध्र *n*, बीजबाह्यरंध्र *n.*

Exostosis ( eks-os-tō'-sis ) [ Gr., a bony excrescence, from *ex*, out of *osteon*, a bone. Fr. *exostose.* ] *n. anat. a morbid protuberance on the surface of a bone, an osseous tumour growing from bone, cartilage* हाडावरील विकारित वाढ *f*, हाडावरील टेंगूळ *n*, हाडावर वाढलेलें हाडाचें अवाळूं *n.*

Exoteric,-al ( eks-ō-ter'ik,-al ) [Gr. *exoterikos*, comp. formed from *exo*, without. ] *a. external, public, fit to be communicated to the public* सर्वांस सांगावयाजोगा, बाह्य, सार्वजनिक, उत्तान. २ *capable of being fully and readily comprehended* सुलभ, ग्राह्य, ग्रहणशील, सर्वांस कळविण्याजोगा, समजण्याजोगा. Exoter'icism *n.* सर्वग्राह्यता *f.* २ उत्तानता *f.* Exoter'ics *n. pl. philo. the public lectures or published writings of Aristotle* ॲरिस्टॉटलचीं जाहीर व्याख्यानें *n. pl.*

Exothecium ( eksō-thē'-shi-um ) [ Gr. *exo*, without & *theke*, a case or sheath. ] *n. bot. the outercoat of the anther* परागकोशबाह्यावरण *n.*

Exotic ( egz-ot'-ik ) [ L. *exoticus*-Gr. *exotikos*, outward, foreign-*exo*, outward. ] *a. introduced from a foreign country, not native, foreign* परदेशी, परदेशाचा, बाह्यदेशचा, परक्या ठिकाणाचा, परका, परकीय, परदेशांतून आणून लावलेला, विलायती (*colloq.*). E. *n. anything of foreign origin, something not of native growth* ( as a plant, a custom, &c. ) परदेशची वस्तु *f*- झाड *n.* अथवा चालरीत *f*, विलायती वस्तु *f* ( *colloq.* ). Exo'tical *a.* (R.). Exot'icalness *n.* Exot'icism *n.* परदेशित्व *n.* २ *an exotic* which see.

Expand ( eks-pand' ) [ L. *expandere*, to spread out-L. *ex*, out & *pandere*, to spread out, causal from *patere*, to lie open. ] *v. t. to spread out, to lay open, to diffuse* पसरणें, विस्तारणें, विस्तार *m.* करणें, विस्तृत करून ठेवणें. २ *to dilate, to enlarge, to distend* ( opposed to *contract* ) प्रसरण *n* -वृद्धि *f.* करणें, वाढवणें, लांबवणें, विस्तार करणें. ३ *math. to state in large form, to develop* विस्तार *m.* करणें; as, "To E. an equation." E. *v. i. to become opened* फुलणें, विकास *m.* पावणें-होणें, उघडणें, (*fig.*) उमलणें, उकलणें. Expand'er *n.* Expand'ed *pa. t. & pa. p.* Expand'ing *pr. p. & v. n.* Expanse' *n. that which is expanded or spread out, a wide extent of space, esp. the firmament* सपाटी *f*, तळवट *n*, विस्तार *m*, अवाढव्य जागा *f*, मैदान *n*, ( *esp.* ) आकाश *n.* Expansibil'ity *n.* प्रसरणशीलता *f*, प्रसरणक्षमता *f.* Expan'sible *a.*

*capable of being expanded or spread out widely* प्रसारणीय, विस्तारणीय. Expan'sibleness *n.* Expan'sibly *adv.* Expan'sion *n. the act of expanding, dilatation* पसरणें *n*, विस्तारणें *n*, फैलाव *m*, प्रसार *m*, प्रसारणी *f*, विकास *m*, प्रसरण *n*, वृद्धि *f.* [CUBICAL E. घनप्रसरण *n.* LINEAR E. लंबप्रसरण *n.* SUPERFICIAL E. क्षेत्रप्रसरण *n.* ABSOLUTE E. केवलप्रसरण *n.* APPARENT E. दृश्यप्रसरण *n.*] २ *expanse, extended surface* विस्तार *m*, विस्तीर्ण प्रदेश *m.* ३ *space* अवकाश *m*, जागा *f.* ४ *com. extension of business transactions, esp. increase of the circulation of bank notes* फैलावा *m*, वृद्धि *f.* ५ *math. the developed result of an indicated operation* विस्तार *m*, (संक्षेपानें मांडून दाखविलेल्या रकमेचें पूर्ण) विस्तृत स्वरूप *n*; as, "The E. of $(a+b)^2$ is $a^2+2ab+b^2$." Expan'sive *a. diffusive, widely extended* पसरावयाचा, प्रसारणीय, प्रसार होण्याजोगा, प्रसरणशील, प्रसृत, अतिविस्तीर्ण. Expan'sively *adv.* Expan'siveness *n.*

*N. B.*—*Expansion* is also used adjectively.

*N. B.*—Expand = ( सर्व बाजूंनीं ) प्रसरण होणें, विस्तार वाढणें. Extend = एका बाजूनें वाढणें-लांब होणें. Enlarge = (भर घालून-पुस्ती देऊन) मोठा करणें. Dilate = फुगून मोठें होणें. Distend = ( फुटून जाण्याइतकें ) तट्ट फुगणें.

Ex parte ( eks-pär'-tē ) [L. *ex* & *pars, partis part.*] *a. one-sided, partial* एकपक्षी, एकदेशी, एकदेशीय, एकतर्फी. Exparte statement एकतर्फी-एकदेशी विधान *n.*

Expatiate ( ek-spā'-shi-āt ) [ From p. p. of *exspatiari—ex*, out of & *spatiari*, to roam,—*spatium*, space.] *v. i. to range at large or without restraint* (स्वच्छंदीपणानें) भराऱ्या मारणें, हिंडणें, मोकळें फिरणें. २ *to enlarge in discourse, argument, or writing; to descant* (विषय) वाढविणें, विस्तार *m* -फैलाव *m.* करणें, विस्तृतपणें लिहिणें-बोलणें, ( विषयाचें ) विस्तृत विवेचन करणें. E. *v. i.* पसरणें. Expa'tiating *pr. p. & v. n.* Expa'tiated *pa. t. & pa. p.* Expatiā'tion *n. act of expatiating* विस्तारणें *n*, विस्तार *m.* Expa'tiative, Expa'tiatory *a.* (R.) *expansive, diffusive* विस्तरणशील. Expa'tiator *n.* विस्तृत विवेचन करणारा.

Expatriate ( ek-spā'-tri-āt ) [ From p. p. of *expatriare–ex*, out of & *patria*, father-land–*pater, patris*, Sk. पितृ, a father.] *v. t. to banish or exile* जन्मभूमींतून हांकून देणें-लावणें, हद्दपार करणें. २ reflexively (as, to E. one's self) *to withdraw from one's native country* स्वदेश सोडणें-सोडून जाणें. Expa'triating *pr. p. & v. n.* Expa'triated *pa. t. & pa. p.* Expatriā'tion *n. the act of banishing* ( जन्मभूमींतून ) हद्दपार करणें *n*, स्वदेशाबाहेर हांकलणें *n.* २ *the state of banishment, esp. the forsaking of one's own country* स्वदेशत्याग *m.*

*N. B.*—See Exile.

Expect ( ek-spekt' ) [L. *expectare*, better *exspectare*, to look for anxiously,–L. *ex*, thoroughly & *spectare*, to look, frequentative of *specere*, to see.] *v. t. to look for mentally* अपेक्षणें, संभाव्य वाटणें, अट-कळ *f.* बांधणें-करणें. २ *to look forward to* वाट पहाणें, वाट *f* -मार्ग *m.* लक्षणें, मार्गप्रतीक्षा *f.* करणें, तिष्ठत बसणें, आशा करणें. Expect'able *a.* Expec'tance, -cy *n.–the act.* अपेक्षण *n*, अपेक्षा करणें *n*, वाट *f.* पहाणें *n.* २ *the state of expecting, expectation* मार्गप्रतीक्षा *f*, अपेक्षा *f*, प्रतीक्षण *n.* ३ *the object of expectation or hope* आशाहेतु *m*, अपेक्षित ( वस्तु *f* -गोष्ट *f.* ). Expec'ting *pr. p. & v. n.* Expec'ted *pa. t. & pa. p.* Expec'tant *a. looking for, waiting for* अपेक्षा करणारा, मार्गप्रतीक्षा करणारा. २ *med. waiting for the efforts of nature, with little active treatment* अगदीं थोड्याच वेळां औषध देऊन रोग आपोआप बरा होऊं देणारी (चिकित्सा). E. *n. one who waits in expectation, one who is looking or waiting for some benefit or office* वाट पहाणारा, मार्गप्रतीक्षा करणारा, आशा करणारा, टपून वाट पहात बसणारा, आशेनें बसणारा. Expec'tantly *adv.* Expectā'tion *n.–the act.* संभव वाटणें *n*, मार्गप्रतीक्षा करणें *n.* २ *the state of expecting or looking forward to an event as about to hap*[pen] संभव *m*, अंदाज *m.* ३ *that which is expected or looked for* अपेक्षित गोष्ट *f*, इष्ट वस्तु *f*, धारलेली-अंदाज केलेली वस्तु *f*; as, "Why our great E. should be called the seed of woman." ४ *the prospect of the future, grounds upon which something is expected to happen* आशा *f*, संभव *m.* [ E. OF LIFE जगण्याचा संभव *m* -आशा *f.* TO HOLD IN ANXIOUS E. ( डोळे इ० ) ताणणें. TO WAIT *or* STOP IN E. तिष्ठणें.] ५ *the value of a chance which depends upon some contingent event* संभव *m.* ६ *med. the leaving of a disease principally to the efforts of nature to effect a cure* आजाऱ्याच्या रोगाच्या बरेपणासाठीं सृष्टिक्रमावर ठेवलेला हवाला *m.* Expect'ative *a. constituting an object of expectation, contingent* इष्ट असून संभाव्य, मार्गप्रतीक्षा करण्यास-आशा करण्यास योग्य. E. *n. an expectancy* इष्ट असून अपेक्षित असलेली गोष्ट *f.* Expec'ter *n. one who expects* मार्गप्रतीक्षा करणारा, वाट पाहणारा, संभव मानणारा. Expec'tingly *adv.* वाट पाहात.

*N. B.*—Expect = अपेक्षणें, संभाव्य वाटणें. Hope = आ[शा] करणें. Await = ( उत्कंठेनें ) वाट पाहणें, मार्गप्रतीक्षा करणें.

Expectorate ( ek-spek'to-rāt ) [ From p. p. of L. *expectorare*, to expel from the breast–L. *ex*, out of & *pector* ( for *pectos* ), stem of *pectus*, the breast.] *v. t. to eject from the lungs, to discharge as phlegm or other matter by coughing, hawking and spitting; to spit forth* ( खोकून, खांकरून, आणि थुंकून ) वे(ब)डके बाहेर टाकणें, उत्सर्ग-उद्गिरण-करणें,

(कफ) बाहेर टाकणें. Expec'torant *a. med. tending to promote expectoration* कफोद्गारक. E. *n. med. a medicine which promotes expectoration* कफोद्गारक औषध *n* -दवा *m. f.* Expectorā'tion *n. act of expectorating* कफहरण *n.* २ *that which is expectorated* कफ *m*, खांकरा *m*, बेडका *m*, &c. Expec'torative *a.* Same as Expectorant.

Expedient (ek-spē'-di-ent) [See Expedite.] *a. hastening* घाई करणारा. २ (hence) *suitable, advisable* (sometimes contradistinguished from *right*) कार्योपयोगी, उपयुक्त, प्रसंगोचित, अनुकूल, हेतुविशेषपोषक, फायदेशीर. ३ (*Shakes.*) *quick, expeditious* जलद. E. *n. that which serves to promote or advance* अनुकूल–पोषक-वर्धक उपाय *m.* २ *means devised in an exigency, shift* प्रसंगीं योजलेली युक्ति *f* -साधन *n* -उपाय *m* - तोड *f*, &c. [FERTILE IN EXPEDIENTS उपायज्ञ, युक्त्या, उपायकुशल.] Expe'dience-cy *n.* (sometimes contradistinguished from *moral rectitude*) उपयुक्तता *f*, हेतुविशेषपोषकता *f*, सुसाधकता *f.* २ (*Shakes.*) *expedition, haste, dispatch* चलाखी *f*, चपळाई *f*, त्वरा *f*, घाई *f*, धांदल *f*, गर्दी *f* (*colloq.*), &c. ३ (*Shakes.*) *an expedition, enterprise, adventure* स्वारी *f*, जबाबदारीचें काम *n.* Expedien'tial *a.* Expe'diently *adv.*

*N. B.*—Expediency, Fitness. "Fitness regards every kind of appropriateness, as moral fitness; expediency regards only adaptation to self-interest, or tendency to promote a proposed object." Smith.

Expedite (ek'spe-dīt) [From p. p. of L. *expedire*, to extricate the foot, release, get ready–L. *ex*, out & *ped*, stem of *pes, pedis*, Sk. पद्, a foot.] *v. t. to relieve of impediments, to facilitate, to quicken* (पायबंद-अडचण काढून टाकून एखाद्याची) गति शीघ्र करणें, त्वरेवर-जलदीवर -शीघ्रगतीवर घेणें-आणणें, शीघ्रगति करणें. २ *to dispatch, to issue officially* (सरकारांतून) काढणें-सोडणें पाठविणें (हुकूम इ०); as, "Such charters be *expedited* of course." E. *a. unimpeded, free from impediments* अप्रतिहत, अनिरुद्ध, अडथळा नसलेला, मोकळा, खुला. २ *quick, speedy, prompt* जलद, चलाख, चंचल, शीघ्रगति, चपळ. Ex'peditely *adv.* घाईनें. Ex'peditеness *n.* घाई *f*, चपळाई *f*, त्वरा *f.* Expedi'tion *n. speed, promptness, dispatch, haste* घाई *f*, त्वरा *f*, जलदी *f*, &c.; as, "With winged E. swift as the lightning glance." २ *a setting forth for the execution of some object of consequence, progress* (महत्वाच्या कामगिरीसाठीं) बाहेर प्रयाण *n* -प्रवास *m.* ३ *an important enterprise, implying a change of place; esp. a warlike enterprise* स्वारी *f*, मोहीम *f.* (*b*) मोहिमेचे लोक *m. pl.* Expedi'tionary *a. of or pertaining to an expedition* स्वारीचा, स्वारीसंबंधीं. Expedi'tious *a. having celerity, speedy* जलद, त्वरित, घाईचा. २ *quickly executed or done* (of matters) ताबडतोबीचा, जलदीचा, त्वरेचा. Expedi'tiously *adv.* Expedi'tiousness *n. quickness* त्वरा *f*, घाई *f.*

Expel (eks-pel') [L. *expellere*, to drive out, L. *ex*, out & *pellere*, to drive.] *v. t. to eject* बाहेर टाकणें-फेंकणें-घालविणें-हांकलणें, हुसकून लावणें. २ *to banish* (एखाद्या देशांतून) बाहेर घालविणें, हद्दपार करणें. ३ *to cut off from further connection with an institution* (एखाद्या संस्थेंतून) घालविणें; as, "To E. a student from a college." ४ (*Shakes.*) *to keep out, off, or away; to exclude* वगळणें, टाकणें, सोडून देणें. Expel'ling *pr. p. & v. n.* Expelled *pa. t. & pa. p.* घालविलेला, काढून टाकलेला, बहिष्कृत. Expel'lable *a.*

See *N. B.*—to Exile.

Expend (ek-spend') [L. *expendere*, to weigh out, lay out–L. *ex*, out & *pendere*, to weigh.] *v. t. to lay out, to apply or employ in any way, to consume by use, to spend* खर्च करणें, खर्चून टाकणें, संपविणें, व्यय करणें, खलास करणें, उडवून टाकणें. E. *v. i.* सोंपणें. २ *to pay out or disburse money* पैसा वांटणें. Expen'diture *n. a laying out* (as of money) खर्च *m*, व्यय *m.* २ *expense* खर्च *m.* Expense' *n.* खर्च *m*, व्यय *m.* २ *cost, outlay, charge* (Sometimes with the notion of *loss* or *damage* to those on whom the expense falls) किंमत *f*, मोल *n*, खर्च *m.* [RIGHT E. सद्व्यय *m.* UNCALLED FOR E. नस्ता-रिकामा खर्च *m.* UNPRODUCTIVE E. बुडित खर्च *m*, अनुत्पादक व्यय *m.* WRONG E. असद्व्यय *m.* CONTINGENT E. सादिलवार खर्च *m*, नैमित्तिक व्यय *m.* EXTRA *or* ODD E. शिवायखर्च *m*, जादाखर्च *m.* MINOR *or* MISCELLANEOUS E. वरखर्च *m*, आडखर्च *m*, किरकोळखर्च *m*, हातखर्च *m*, उपरखर्च *m.*] Expen'sive *a. costly, dear*, महाग, फार किंमतीचा. २ *liberal* (esp. in *bad sense*), *extravagant* खर्चिक, उधळकीचा. Expen'sively *adv.* Expen'siveness *n.* खर्चिकपणा *m.* २ बहुमूल्यता *f.* Expen'seless *a.* बिनखर्चाचा.

Experience (ek-spē'ri-ens) [O. Fr. *experience*,-L. *experientia*, proof.] *n. the effect upon the judgment or feelings, (produced by any event whether witnessed or participated in, personal acquaintence, actual enjoyment or suffering)* प्रत्यक्ष अनुभव *m*, अनुभव *m*, स्वानुभव *m*, प्रयोगपरीक्षा *f.* [BY OR THROUGH E. निदर्शनीं, अनुभवानें. PERSONAL E. स्वानुभव *m*, स्वानुभूति *f.* UNIVERSAL OR GENERAL E. सर्वानुभूति *f*, सर्वानुभव *m.* WITHIN ONE'S PERSONAL E. डोळ्यांदेखत OR तां, जाणोपरी, स्वदृष्टीच्या अमलांत, स्वतःच्या अनुभवांत. TO AGREE WITH THE E. OF दाखल्यास उतरणें, अनुभवाशीं जुळणें. TO BRING UNDER E. निदर्शनास-अनुभवास आणणें. TO COME UNDER E. अनुभवांत येणें,

दृष्टोत्पत्तीस-निदर्शनास येणें, निदर्शनीं करणें. ] २ *experimental or inductive knowledge* प्रयोगज्ञान *n*, अनुभवज्ञान *n*. ३ (hence implying) *skill, facility, or practical wisdom gained by personal knowledge, feeling or action* प्रतीति *f*, प्रचीति *f*, प्रत्यंतर *n*, दाखला *m*, साक्षात्कार *m*, दृष्टांत *m*, अनुभव *m*, परीक्षा *f*. E. *v. t. to try personally, to have the lot or fortune of* अनुभवणें, उपभोगणें, परीक्षा *f*. घेणें, (-च्या) निदर्शनास येणें. २ *to exercise, to train by practice* तयार करणें, कमावणें *in. cons.* Expe'rienced *pa. t. & pa. p. taught by experience, skilful, wise* अनुभव घेतलेला, अनुभवलेला, अनुभवशीर, अनुभविक, जाणता, वाकबगार, अनुभववृद्ध. Expe'rienceless *a. having no experience* अनुभवहीन, अननुभवी, अजाण, बच्चा. Experien'tial *a. derived from, or pertaining to experience* अनुभवजात, अनुभवाचा, अनुभवजन्य. Experien'tially *adv.* Experien'tialism *n. philo.* (oppo. *to intuitionalism*) अनुभवैकवाद *m*, अनुभवमूलकविज्ञानवाद *m*. Experien'tialist *n.* अनुभवैकवादी *m*. Exper'iment *n.* प्रयोग *m*. २ (*Milton*) परीक्षा *f*, अनुभव *m*. E. *v. i.* प्रयोग करणें-करून पाहाणें. Experiment'al *a.* प्रयोगसंबंधीं, प्रयोगात्मक, प्रयोगज्ञात, परीक्षात्मक. Experimen'ter *n.* प्रयोगकर्ता *m*. Experitmentator *n.* Exper'imentist *n.* Experimentum *crucis* निर्णायक परीक्षा *f*.

Experiment See Experience.

Expert ( ek-spert' ) [ O. Fr. *expert*,-L. *expertus*, p. p. of *experiri*, to make full trial of,-L. *ex*, thoroughly & *periri*, an obso. verb of which the p. p. *peritus* is common. ] *a. taught by use, practice, or experience; experienced; clever; skilful* कुशल, अनुभवानें-अभ्यासानें तयार झालेला, निष्णात, पटाईत, पटु, दक्ष, कसबी, निपुण, ज्ञाता, प्रवीण, वाकबगार, विशारद. Ex'pert *n. one instructed by experience* कसबी-पटु-निष्णात मनुष्य *m*. २ *law. a specialist in a particular profession or department of science* कोणत्याहि एका शाखेंतील निष्णात, वाकबगार. ३ *a sworn appraiser* खरा परीक्षक *m*, पटाईत भाववाला *m*, चतुर पारखी *m*. Expert'ly *adv.* शिताफीनें, सफाईनें. Expert'ness *n.* शिताफी *f*, सफाई *f*, &c.

Expiate ( ek'spi-āt ) [From p. p. of *expiare*, to atone for fully,-L. *ex*, fully & *piare*, to propitiate, from *pius*, devout. ] *v. t. to make complete satisfaction for, to atone for, to make amends for* (बद्दल) प्रायश्चित्त *n*. घेणें-करणें, निस्तरणें, प्रक्षालन *n*-परिमार्जन *n* -निरसन *n*. करणें, (डाग वगैरे) धुवून काढणें, प्रायश्चित्तानें शुद्ध करणें. Ex'piable *a. capable of being atoned for* प्रक्षालनीय, परिमार्जनीय, निस्तरतां येण्यासारखें. Expia'tion *n. the act of atoning for* प्रायश्चित्त घेणें *n* -करणें *n*, प्रक्षालन *n*, निरसन *n*, निस्तरणें *n*, परिमार्जन *n*. २ *the means by which atonement is made, an atonement* प्रायश्चित्त *n*, प्रक्षालन *n*, निरसन *n*, परिमार्जन *n*.

Ex'piator *n. one who makes atonement* प्रायश्चित्त करणारा-घेणारा, प्रक्षालन-परिमार्जन-निरसन करणारा. Ex'piatory *a. atoning* परिमार्जक; as, "E. rites."

Expire ( ek-spīr' ) [ O. Fr. *expirer*,-L. *expirare*, *exspirare*, to breathe out, die,-L. *ex*, out & *spirare*, to breathe. ] *v. t. to breathe out* ( opposed *to inspire*) (श्वास *m*.) बाहेर सोडणें-टाकणें. २ *to emit in minute particles, to exhale* (अति सूक्ष्म कणांच्या रूपानें) बाहेर सोडणें, उच्छ्वासणें. ३ ( *obs.* ) (*Shakes.*) *to bring to a close* संपविणें. E. *v. i. to emit the breath* श्वास सोडणें. २ *to breathe out the life, to die* प्राण *m*. सोडणें, सरणें. ३ *to come to an end, to terminate* संपणें, खपणें, सरणें, (-चा) शेवट-अंत होणें. Expir'able *a. that may expire, capable of being brought to an end* नश्वर, नाशवंत. Expi'rant *n. one who expires or is expiring* प्राण सोडणारा, मरणारा, मरणोन्मुख, मरणासन्न. Expirā'tion *n. the act of expiring* बाहेर सोडणें *n*. २ *death* मृत्यु *m*, अंत *m*. ३ *extinction, termination, end* शेवट *m*, अंत *m*, नाश *m*. ४ *matter breathed forth* उच्छ्वासित *n* (S), उच्छ्वसन *n*. (S.), निःश्वास *m*. Expi'ratory *a. pertaining to expiration or the emission of the breath* बहिःश्वासाचा, उच्छ्वासासंबंधीं. Expir'ing *pr. p. & v. n. dying, ending, terminating* मरणारा, खपणारा, संपणारा. २ *pertaining to or uttered at the time of dying* मरतेवेळचा, शेवटचा, अंत-कालिक-काळचा. Ex'piry *n. expiration* अंत *m*, शेवट *m*, समाप्ति *f*.

Expiscate ( ek-spis'kāt ) [ L. *expiscare*, *expiscatus*—*ex*, out & *piscari*, to fish,—*piscis*, fish.] *v. t.* (R.) *to find out by skilful means or by strict examination* (मोठ्या शिताफीनें-खुबीनें) शोधून काढणें, (बारीक नजरेनें, दृष्टीनें ) हुडकून काढणें.

Explain ( ek-splān' ) [O. Fr. *explaner*,-L. *explanare*, —*ex*, out & *planare*, *planus*, plain. या शब्दाचा मूळ अर्थ 'खुलासा करणें, सोपें करणें' असा होता. ] *v. t. to make plain, manifest, or intelligible; to unfold and illustrate the meaning of; to account for* स्पष्ट करणें, उघड करणें, उकलणें, विवरण *n*. करणें, उकलून-फोडून-समजावून सांगणें, उलगडा करणें, जाब देणें, प्रकाशन *n*. -द्योतन *n*. करणें. E. *v. i.* स्पष्ट करणें. Explain'able *a. that may be explained, capable of being interpreted* स्पष्ट करतां येण्याजोगा-करण्याजोगा, व्याख्येय, उलगडा-खुलासा करण्याजोगा. Explain'er *n.* स्पष्ट करणारा, विवरण करणारा, व्याख्या करणारा, व्याख्याता, समजावून-फोडून-उलगडून सांगणारा. Explanā'tion *n. the act of explaining* विवरण करणें *n*, समजावून-फोडून उलगडा करून सांगणें *n*. २ *that which explains or makes clear* खुलासा करणारी गोष्ट *f*, खुलासा *m*. ३ *definition, interpretation, sense* व्याख्या *f*, अर्थ *m*, हेतु *m*. ४ *reconciliation, agreement* समजी *f*, समजूत *f*; as, "To come to an

E." Explan'ative *a.* Explan'atoriness *n.* Explan'atorily *adv.* Explana'tory *a. serving to explain, containing explanation* स्पष्ट करणारा, व्याख्यात्मक, विवरणात्मक, विवरणरूप, अर्थसूचक-बोधक-प्रकाशकारक, उलगड्याचा.

*N. B.*—Explain = खुलासा करणें, सोपें करणें. Elucidate = स्पष्ट करणें, विशद करणें. Illustrate = दृष्टांत-चित्रें वगैरे देऊन समजूत पडेल असें करणें. Exemplify = सोदाहरण सांगणें.

Expletive ( ek'sple-tiv ) [ L. *expletivus*,–filling up, –L. *expletus*, p. p. of *explere*, to fill up–L. *ex*, fully & *plere*, to fill. ] *a. filling up* पूरक. २ *superfluous* फाजील. E. *n. a word, letter, or syllable not necessary to the sense, but inserted to fill a vacancy* पादपूरण *n*, पादपूरणशब्द *m*-वाक्य *n.* Ex'pletively *adv.* Ex'pletory *a.* Same as Expletive.

Explicate ( ek'spli-kāt ) [ L. *explicare*, to unfold, explain,–L. *ex*, out & *plicare*, to fold. ] *v. t. to unfold the meaning or sense of, to explain* विवरण करणें, समजावून-उलगडून सांगणें, समजावणें, उलगडा करणें. Ex'plicable *a. capable of being explicated, admitting explanation* व्याख्येय, समजण्याजोगा, सारखा. Explicā'tion *n.—the act.* उलगडा करणें *n*, उलगाणें *n*, &c. २ *explanation* उलगडा *m*, व्याख्या *f*, स्पष्टीकरण *n.* Ex'plicative, Ex'plicatory *a.* विवरणात्मक. Ex'plicatively *adv.*

Explicit ( ek-splis'-it ) [ L. *explicitus*, old p. p. of *explicare*, to unfold, make plain. cf. Fr. *explicite*.] *a. distinctly stated, plain in language, clear, express* उघड, स्पष्ट, स्वच्छ, साफ, चरचरीत, बिनभानगडीचा. २ *having no disguised meaning, unreserved, out-spoken* ( applied to persons ) निर्भीड, स्पष्टवक्ता, खसखशीत, मनांत असेल तें उघड उघड सांगणारा. Explic'itly *adv.* Explic'itness *n.*

Explode ( ek-splōd' ) [ M. E. *exploder*, to explode publicly, to disgrace or drive out, L. *explodere*, to drive off the stage by noise–L. *ex*, away & *plodere, plaudere*, to clap hands. या शब्दाचा मूळ अर्थ टाळ्या वाजवून किंवा हुर्यो करून रंगभूमीवरून घालवून देणें असा आहे. ] *v. t. to bring into disrepute and reject* (नादान ठरवून) त्याग करणें, (नादान म्हणून) धुडकवून देणें; as, " To E. a doctrine". २ *to cause to burst noisily* धाडकन् फोडून उडविणें, भडकविणें, भडका करणें, बार करणें, सोडणें, धडकविणें, आवाजाबरोबर फोडणें -उडविणें, उत्स्फोट करणें, भक्दिनीं किंवा धाडकन् उडवणें. E. *v. i. to burst violently into flame* भडकणें, भडका होणें. २ *to burst with force and a loud report* ( मोठा आवाज होऊन ) जोरानें फुटणें, उडणें. ३ *to burst forth with sudden violence and noise* एकदम-धाडकन् आविर्भूत होणें, उत्स्फोट होणें. ४ *to burst into laughter* हंसूं कोसळणें. Explod'ed *pa. t. & pa. p. rejected, discarded* रद्द झालेला-पडलेला, रद्द, उडवून दिलेला, टाकलेला. Explod'ent *n. an instrument causing explosion* भडका उडविण्याचें साधन *n.* २ *explosive* which see. Explod'er *n.* Explo'sion *n. the act of exploding* भडका उडविणें *n*, उत्स्फोट *m.* २ *a bursting with violence and noise* भडका *m*, धडाका *m.* ३ *a violent outbrst of feeling* उत्स्फोट *m*, लोट *m*, उमाळा *m*, पूर *m.* Explo'sive *a. liable to or causing explosion, bursting out with violence and noise* भडकन् उडणारा, उत्स्फोटनशील. E. *n. something that will explode* उत्स्फोटक द्रव्य *n*, उत्स्फोटक *n*, भडकणारें द्रव्य *n* -वस्तु *f.* Explo'sively *adv.* Explo'siveness *n.*

Exploit ( ek-sploit' ) [ O. Fr. *esploit*, revenue, profit–Fr. *exploit*–L. *explicitum*, a thing settled, ended or achieved. ] *n. a heroic act, a deed of renown, an adventurous or noble achievement* पराक्रम *m*, वीर-शूर-कृत्य *n*, महत्कृत्य *n*, धाडसाचें कृत्य *n* -काम *n.* २ (*obs.*) ( *Shakes.* ) *combat, war* लढाई *f*, झटापट *f.* E. *v. t.* [ Fr. *exploiter*. ] (*recent*) *to utilize, to make available, to get the value or usefulness out of* उपयोगीं लावणें, उपयोगांत आणणें, (-पासून) शक्य तो फायदा करून घेणें. २ ( hence ) *to draw an illegitimate profit from, to speculate on* अयोग्य रीतीनें नफा मारणें-मिळविणें, सट्टे करणें. Exploi'table *a.* उपयोगी, फायदेशीर. Exploi'tage, Exploitā'tion *n. the act of exploiting or utilizing* आपल्या उपयोगीं-कामीं लावणें *n.*

Explore ( ek-splōr' ) [ Fr. *explore*,—L. *explorare*, to search out, lit. to make to flow out, –L. *ex*, out & *plorare*, to make to flow. ] *v. t. to search for the purpose of discovery, to examine thoroughly* शोधून काढणें, (-चा) तपास *m.* लावणें-काढणें-करणें, परीक्षा *f.* करणें. Explo'rable *a.* शोधून काढतां येण्यासारखा. Explorā'tion *n. the act of exploring* ( esp. of geographical discovery ), *examination* शोधून काढणें *n*, परीक्षा *f* -पारख *f.* करणें *n*, हुडकून काढण्याचा प्रयत्न करणें *n*, शोध लावूं पहाणें *n.* २ शोध *m.* Explorā'tive, Explo'ratory *a. serving to explore, searching out* उपयोगी. Ex'plorator *n.* शोधक, शोधणारा. Explor'er *n. one who explores* शोधून काढणारा, शोधक. २ *an apparatus with which one explores* ( as a diving bell ) शोध लावण्याचें यंत्र *n*, शोध लावण्याचे कामीं उपयोगीं पडणारें साहित्य *n*, शोधसाहित्य *n* (उ. बुडी मारण्याची घंटा). Explor'ing *a. employed in or intended for exploration* शोध लावण्याचे कामाचा.

Exponent (ek-spō'-nent) [L. *exponens*,–*ex*, out & *ponere*, to place. ] *n. one, who or that which stands as an index or representative* निदर्शक चिन्ह *n*, निशाणी *f*, निदर्शन *n.* २ *alg. a figure written on the right hand of and above another quantity showing how often a quantity is to be multiplied by itself,*

*covered with, or as with, feathers* पिच्छा-पंखा-संबंधीं, पक्षाच्छादित. To feather an oar, *to turn the blade of the oar horizontally as it comes out of the water* वल्हें पाण्याशीं समान्तर करणें, वल्हें पाडणें. To feather one's nest *to accumulate wealth for one's self while serving others in a position of trust* आपलें साधून घेणें, आपलें घर भरणें, आपला तळीराम गार करून बसणें. To be in high feather (*colloq.*) *to be greatly elated or in high spirits* गर्वोन्मत्त-(जयामुळें) खुषींत -आनंदांत असणें. To make the feathers fly, *to attain some real success in attack* हबेलंडी करून सोडणें, धूळधाणी उडविणें, रानोमाळ पळविणें. To show the white feather, *to show signs of cowardice* (a white feather in a gamecock's tail being considered as a sign of degeneracy) भितरेपणाचें चिन्ह दाखविणें, नामर्दपणा-भागूबाईपणा दाखविणें, (*fig.*) शेंपूट घालणें. To be in full feather (*colloq.*) *to be in full dress or in one's best clothes* थाटमाटाचा पोषाख करणें, उंची पोषाख करणें, कपडे घालणें. To cut a feather *naut.* पाणी हालवून फेंस आणणें. २ (*colloq.*) मोठेपणा-मान मिळविणें, (आपलें) नांव करणें, पुढें येणें. To tar & feather a person आंगाला डांबर फांसून वर पिसें चिकटविणें. शिक्षा करण्याचा हा एक प्रकार आहे. A feather in the cap (*colloq.*) *an honour or mark of distinction* मान *m*, मोठेपणाचें लक्षण *n* -खूण *f* -चिन्ह *n*, मोठेपणा *m*.

Feature ( fē'-chur ) [ O. Fr. *faiture*, fashion –L. *factura*, work, formation –L. *factus* p. p. of *facere*, to make. ] *n. the make, form, or outward appearance of a person*, (*esp.*) *good appearance* आकृति *f*, बाह्यांग *n*, ठेवण *f*, बांधा *m*, स्वाकृति *f* (S.). २ *the make, cast, or appearance of the human face, and esp. of any single part of the face* रूपलक्षण *n*, रूपचिन्ह *n*, मुखलक्षण *n*, मुखचिन्ह *n*, मुद्रा *f*, मुखचर्या *f*, मुखरूप *n*. [ FEATURES तोंडवळण *n*, तोंडवळा *m*, तोंडघडण *f*, तोंडवाण *f*, मुखवटा *m*, चेहरा *m*, रूपरेषा *f*, रूपरेखा *f*, रूप *n*.] ३ *the cast of anything, any marked peculiarity or characteristic* विशेष लक्षण *n*, मुख्य लक्षण *n* -खुबी *f* -खूण *f*. ४ ( R. ). (*Milton.*) *a form, a shape* आकृति *f*, आकार *m*. Fea'tured *a. shaped, fashioned* ( rendered by ) आकृति ( at the end of a compound e.g. मधुराकृति ); as, "How noble, young, how rarely *featured.*" [ BOLD F. उदारलक्षण *n*, उदाराकृति *f*. ILL F. कुरूप, कुलक्षण, डराकृति *f*. Well F. सुरूप, रूपवान्, सुलक्षण, चेहरेदार, चेहरेबाज, सुभगाकृति *f*. ] २ *having features, formed into features* घडीव, घडलेला, आकारांत आणलेला, आकार दिलेला, लक्षणयुक्त, रूपवान्, बांधेसूद. Fea'tureless *a. having no distinct or distinctive features* ओबडधोबड, उखरपाखर, सरासरी, कांहींतरी.

Febrile ( fē'bril ) [ Fr. *febrile* –L. *febrilis* –L. *febris* fever. ] *a. pertaining to fever* तापाचा, ज्वराचा, ज्वरासंबंधीं. २ *derived from fever* ज्वरोत्पन्न. ३ *indicating fever* ज्वरसूचक, ज्वरदर्शक. [ F. SYMPTOMS ज्वराचीं चिन्हें *n. pl.*-लक्षणें *n. pl.* F. FEVERISHNESS कणकणी *f*. ] Febril'ity *n*.

February ( feb'rōō-ar-i ) [ L. *februarius*, the month of expiation, –L. *februa*, *neut.pl.* the Roman festival of expiation on Feb. 15; *februum*, purification, *februare*, to expiate. ] *n. the second month of the year* इंग्रजी वर्षाचा दुसरा महिना *m*, फेब्रुआरी *m*. फेब्रुआरी महिना अठ्ठावीस दिवसांचा आहे; परंतु 'लीप' वर्षांत ह्याचे एकुणतीस दिवस धरतात.

*N. B.*—February generally corresponds with our माघ or फाल्गुन.

Fecal, same as Fæcal.

Feces same as Fæces.

Fecula ( fek'-ū-lä ) [ L. *fæcula*, burnt tartar or salt of tartar, *dimi.* of *fæx*, *fæcis*, sediment, dregs.] *n. the nutritious part of wheat, starch* गव्हांचें सत्व *n*, गव्हांतील पौष्टिक भाग *m*. २ *the green matter of plants, chlorophyll* वनस्पतींतील हिरव्या रंगाचें द्रव्य *n*, हरितरंजकद्रव्य *n*.

Feculent ( fek'-ū-lent ) [ Fr. *fekulent* –L. *fæculentus*, full of dregs –L. *fæces*, dregs. ] *a. containing fæces, muddy, foul, turbid* गाळाचा, रेंदाचा, मलीन, मळीण, समल, कलुषित, किट्टाचा, गदळ, गढूळ, रेंदाड, रेंदाळ. Fec'ulence, Fec'ulency *n. muddiness, foulness* मलीनता *f*, मळीणपणा *m*, गढूळपणा *m*, रेंदाळपणा *m*. २ *sediment, lees, dregs* मल *m* (S.), मळ *m*, गाळ *m*, गदळ *m*, रेंदा *m*, किट्ट *n*.

Fecund ( fē'-kund ) [ L. *fecundus*, fruitful, –L. *feo*, to bring forth. Allied to *fetus*, offspring. ] *a. fruitful in children* अवंध्य, अमोघ, बहुप्रज (S). २ *prolific* बहुफलप्रद, पुष्कळ फळ देणारा. Fe'cundāte *v. t. to make fruitful or prolific* फलद करणें, अमोघ-बहुप्रज -फलित करणें. २ *to render fruitful, to impregnate* रेतसिंचन करणें, गर्भाधान करणें, ( स्त्रीरेत व पुरुषरेत एके ठिकाणीं आणून) गर्भधारणा करणें, प्रजनन करणें. Fe'cundation *n. impregnation, fertilisation, the act by which material prepared by the generative organs of the female organism is brought in contact with matter from the organs of the male, so that a new organism results* रेतस्सेचन *n*, गर्भाधान *n*, स्त्रीरेत व पुरुषरेत नवीन संतत्युत्पादनाकरितां एकत्र करणें *n*. Fe'cundify *v. t.* Same as Fecundate. Fe'cundity *n. fruitfulness* बहुफलदायकत्व *n*, सुपीकपणा *m*. २ *biol. the quality in female organisms of reproducing quickly and in great numbers* बहुप्रजोत्पादनशक्ति *f*

प्रजननशीलत्व *n*, अवंध्यत्व *n*, अमोघत्व *n*, फलवत्व *n*. ३ *the power of germinating* (as in seeds) रुजण्याचें सामर्थ्य *n* -शक्ति *f*, प्ररोहणशक्ति *f*, उद्भेदशक्ति *f*. ४ *richness of invention* बहुफलदता *f*; as, "The F. of God's creative power."

Federal (fed'-ėr-al) [Fr. *federal* –L. *fœdus, fœderis*, a treaty; akin to *fides*, faith.] *a. pertaining to or consisting of a treaty or covenant, founded upon mutual agreement* नानाराष्ट्रनिर्मित कराराचा, निरनिराळ्या राष्ट्रांनीं आपसांत केलेल्या करारानें बांधलेला, नानाराष्ट्रीय करारामुळें झालेला, करारानें स्थापिलेला-संयुक्त-संश्लिष्ट-बद्ध-ठरविलेला. २ (specifically) *composed of states which are independent in home affairs but which combine for national or general purposes* संयुक्त, संधिसंश्लिष्ट, (or rather) संश्लिष्ट संधिबद्ध. [A. FEDERAL GOVERNMENT संश्लिष्ट संस्थान *n*, संधिबद्ध राज्य *n*.] ३ *constituting or pertaining to such a federal government* संधि-संश्लिष्टराज्याचा, संयुक्त राज्याचा. ४ *friendly or devoted to a federal government* संयुक्तराज्यस्नेही, संयुक्तसंस्थानानुरक्त, संधिसंश्लिष्टराज्याला अनुकूल, संश्लिष्टराज्याला अनुकूल, संयुक्तराज्यानुरक्त. Fed'eracy *n.* (*obs.*) संयुक्तता *f*, अनेक संस्थानांची संश्लिष्टता *f*. Fed'eral *n*. Same as Federalist. Fed'eralise *v. t. to make federal, to unite in federal union* संयुक्त-संश्लिष्ट करणें, जूट करणें, संधि-संश्लिष्ट करणें, पुष्कळ संस्थानें संधिसंश्लिष्ट करणें, सत्ता केंद्रांतून कमी करून प्रत्येक संस्थानाला ती देणें. Fed'eralism *n*. संश्लिष्टता *f*, संधिबद्धता *f*, संधियुक्तता *f*. २ संयुक्ततेचे नियम *m. pl.* -तत्त्वें. Fed'eralist *n. an advocate of confederation* संयुक्ततावादी *m*, संश्लिष्टतावादी *m*, संश्लिष्ट राज्यपद्धति असावी असें म्हणणारा. Fed'erate *a. united by compact* संधिबद्ध, संयुक्तसंश्लिष्ट. Fed'eration *n*. जूट *f* -संप *m* -एकी *f* करणें *n*. करारांत -जुटींत सामील करणें. २ *a league, a confederacy* जूट *f*, संप *m*, एकी *f*, संघ *m*, संयुक्तता *f*, संश्लेष *m*. Fed'erative *a* संयुक्त.

Fee (fē) [O. Fr. fee–O. Fr. *fu* (Fr. *fief*), a fee, fief–probably O. H. Ger. *fehu*, property; Also *cf.* L. *pecus*, sk. पशु, cattle. Also A. S. *feoh* (now obs.) M. E. *fee*, cattle.] *n. property, possession, tenure*, ताबा *m*, कबजा *m*. २ *reward or compensation for services rendered or to be rendered especially payment for professional services* मेहनताना *m*, वतन *n*, प्रतिफल *n*, दस्तुरी *f*, फी *f*, हक्क *m*, मोल *n*, मोबदला *m*, पारितोषिक *n*. [RETAINING FEE OF A VAKIL सचकार *m*.] ३ *a right to the use of a superior's land as a stipend for services to be performed* (पगाराबद्दल) मालकाची जमीन वापरण्याचा हक्क *m*, वेतनादाखल जमीन धारण करण्याची मालकी *f*. (*b*) *the land so held, a fief* मोकासा *m*, सरंजाम *m*, जहागीर *f*, वेतनादाखल जमीन *f*. प्राचीन काळीं इंग्लंडामध्यें मुख्य जहागीरदार पोटजहागीरदारांना लष्करी नोकरीसाठीं असे सरंजाम किंवा जमिनी देत असत. Fee-simple *an absolute fee, a fee without conditions or limits* वंशपरंपरा चाललें जाणाऱ्या वेतनाबद्दल विनअटीनें दिलेली जमीन *f*. F. *v. t. to reward for services performed* मेहनताना *m* -फी *f*. देणें *n*. २ (hence) *to bribe or keep in hire* लांच देणें. Feed *pa. t.* & *pa. p*. Fee'ing *pr. p.* & *v. n*.

Feeble (fē'bl) [M. Fr. *foible*–O. Fr. *faible*, feeble–L. *flebilis*, doleful; hence, weak–L. *flere*, to weep.] *a. weak, infirm, debilitated* अशक्त, निःशक्त, निर्बल, कमजोर, दुबळा, नेभळा, दुर्बल, शक्तिक्षीण. २ *wanting force, vigour, or efficiency in action or expression; not full, loud, bright, or rapid* &c. अस्पष्ट, पुसट, अंधुक, नेभळा, पोंचट, दुबळा, कमजोर. Fee'ble-minded *a. weak in intellectual power, irresolute* बुद्धीचा दुर्बल, चंचल, अनिश्चयी. Fee'ble-mindedness *n*. बुद्धीची दुर्बलता *f*, स्वभावाचा अनिश्चयीपणा *m*. Fee'bleness *n*. निर्बलता *f*, दुर्बलता *f*, दौर्बल्य *n*, असामर्थ्य *n*, अशक्ति *f*, निःसत्वता *f*. Fee'bly *adv*. दुर्बलतेनें, दौर्बल्यानें, कमजोरीनें, हलकेपणानें.

Feed (fēd) [A. S. *fedan*, to feed, to nourish–*foda*, food.] *v. t. to give food to, to supply with nourishment* पोसणें, पोषणें, खायाला घालणें, देणें, अन्न देणें, खाऊंजेऊं घालणें, पालनपोषण *n*. करणें *g. of o.*, पाळणें, भरविणें. [TO FEED A CHILD BY THE HAND *or* WITH A SPOON हातानें किंवा चमच्यानें भरविणें.] २ *to satisfy, to gratify* (पोसून) तृप्त करणें, शांत -थंड करणें, पोसणें. ३ *to fill the wants of, to supply with that which is used or wasted* (जरूर असलेल्या वस्तूंचा पुरवठा) करणें, पुरविणें, (नड *f* -गरज) पुरविणें -भागविणें, अवश्यक पदार्थ देणें, पोसणें. ४ *to foster, to strengthen, to develope and guard* संवर्धन *n*. -जोपासना *f* -प्रतिपाळ *m* -सांभाळ *m*. करणें. ५ *to graze, to cause to be cropped by feeding* (as herbage by cattle) चारणें, (गवत, चारा, इ. गुरांकडून) खावविणें. ६ *to give for food* (especially to animals) चारणें, चारा म्हणून देणें, (गुरांस दाणावैरण) घालणें-देणें. ७ *mech.* (a) *to supply* (the material to be operated upon) *to a machine* (एकसारखा यंत्रांत किंवा यंत्राजवळ धरून) पुरवठा करणें; as, "To *feed* paper to a printing press." (b) *to produce progressive operation upon or with* (यंत्रांला एकसारखें काम पुरविलें जावें म्हणून किंवा यंत्रानें दागिन्यावर काम करीत रहावें म्हणून) पुरवठा करणें. F. *v. i. to take food, to eat* खाणें, जेवणें. २ *to subsist by eating, to satisfy the appetite, to prey* (with *on* or *upon*) (-वर) राहणें, उपजीविका करणें, खाऊन राहणें, (-च्या) आहारावर असणें. ३ *to be nourished* (as if by food) संवर्धन *n* -पोषण *n*. होणें, पोसलें जाणें, पोसणें. ४ *to place cattle to feed, to pasture, to graze* चारणें, चरावयास सोडणें-लावून देणें. ५ (*Prov. Eng.*) *to grow fat* पुष्ट-लठ्ठ-तुंद होणें, माजणें. F. *n. that which is eaten,* (esp.) *food for*

*beasts, fodder, pasture, hay, grain* वैरण *f.* चारा *m.* चराव गवत *n.* कडबा *m.* पेंढा *m.* २ *a grazing or pasture ground* कुरण *n.* गायरान *n.* गुरें चरण्याची जागा *f.* ३ *an allowance of provender given to a horse, cow, &c.* रतीब *m.* चंदी *f* (?), खुराक *m.* (?), सुख्या वैरणीचा खुराक *m.* ४ (R.) (*Milton*) *a meal or the act of eating* जेवण *n.* भोजन *n.* खाणें *n.* भक्षण *n.* ५ *the water supplied to steam boilers* वाफ करण्याकरितां दिलेलें पाणी *n.* ६ *mach.* (a) *the motion, or act of carrying forward the stuff to be operated upon, as cloth to the needle in a sewing machine; or of producing progressive operation upon any material or object in a machine, as in a turning lathe, by moving the cutting tool along or in the work* भरविणें *n.* पुरविणें *n.* (b) *the supply of material to a machine, as water to a steam boiler, coal to a furnace, or grain to a run of stones* पुरवठा *m.* वैरण *n.* पुरवण *f.* (c) *the mechanism by which the action of feeding is produced, a feed motion* पुरविणारें यंत्र *n.* Feed-bag *n.* तोबरा *m.* Feed-door *n.* भट्टीचें तोंड *n.* Feed-pipe *n.* (वाफेच्या बंबांत पाणी पुरविणारी) पोषक नळी *f.* Feed'er *n. one who or that which gives food or supplies nourishment* पोसणारा, खायास घालणारा, पाळणवाला, पालनवाला, पोषक, अन्नदाता, अन्न देणारा -पुरविणारा. २ (from *v. i.*) खाणारा, आहारी (as, अन्नाहारी, फलाहारी, &c.), जीवी (as, अन्नजीवी, मांसजीवी, &c.) उपजीवी, (as, अन्नोपजीवी). ३ *one who furnishes incentives, an encourager* भर देणारा, चिथविणारा, उत्तेजक, प्रोत्साहक. ४ *one who eats or feeds,* (specifically) *an animal to be fed or fattened* खुराकी लावलेला प्राणी *m.* पोसणा *m.* ५ *one who fattens cattle for slaughter* कापण्यासाठीं ढोरें पोसवून मोठीं करणारा *m.* ढोरें पोसणारा *m.* ६ *a stream that flows into another body of water,* (specifically) *a water course which supplies a canal or reservoir by gravitation or natural flow* ओढा *m.* झरा *m.* (दुसऱ्या प्रवाहाला मिळणारा) पोषक प्रवाह *m.* ७ *a branch railroad, a branch school, or the like* (आगगाडीची, शाळेची) पोषकशाला *f.* पोषकशाखा *f.* ८ *an auxiliary part of a machine which supplies or leads along the material operated upon* पुरवठा करणारें उपयंत्र *n.* (यंत्राची) पोषकशाखा *f.* (or briefly) पोषक *n.* ९ (*steam engine*) *a device for supplying steam boilers with water as needed* (वाफेच्या बंबांत जसें लागेल तसें सदोदित) पाणी पुरविण्याचें साधन *n.* बाष्पपात्रपोषक *n.* (or briefly) पोषक *n.* Feed'ing *n. the act of eating or of supplying with food* खाणें *n.* जेवणें *n.* भरविणें *n.* जेवूं घालणें *n.* २ *that which is eaten* खाणें *n.* अन्न *n.* खादित *n.* खाद *f.* ३ *pasture-land* गुरचरण *n.* कुरण *n.* जनावरांची चरण्याची जागा *f.* Feed'ing-bottle *n. nursing-bottle* (लहान मुलांना) दूध पाजण्याची शिशी *f.* दूधकुपी *f.* Feed'ing-gear *n.* गतीचा पुरवठा करणारें उपयंत्र *n.* गतिपोषक *n.*

*N. B.*—The word *feeder* is used in various senses in English; we may translate it by the word पोषक giving to this word (पोषक) all the senses of the English word *feeder*.

Feel (fēl) [A. S. *felan*, to feel; Ger. *fuhlen*, akin to Icel. *falma*, to grope, & prob. to A. S. *folm*, L. *palma*, palm of the hand.] *v. t. to perceive by the touch, to take cognizance of by means of the nerves of sensation* वाटणें, स्पर्शानें जाणणें, स्पर्शेंद्रियानें-स्पर्शेंद्रियद्वारा जाणणें -समजणें, ओळखणें, स्पर्शज्ञान होणें *in. con., g. of o.* [To F. THE PULSE नाडी पहाणें.] २ *to touch, to handle, to try by the touch, to press & squeeze* चाचपणें, चापसणें, चासपणें, चापसून-चाचपून पहाणें. [To BE FEELING ONE'S WAY चाचपणें, चाचपडणें, चाचपडत जाणें -चोलणें.] ३ *to perceive by the mind, to be sensible or conscious of* वाटणें *in. con.*, अनुभवणें, मनाला अनुभव येणें, भोगणें, समजणें. ४ *to take internal cognizance of, to have an inward persuasion of* (अंतर्यामीं) वाटणें -समजणें, (-ची) शुद्धि येणें. F. *v. i. to have perception by the touch* स्पर्शज्ञान होणें *in. con.*, स्पर्श कळणें-समजणें *in. con.* २ *to have sensibilities moved or affected* कळवळणें, द्रव *m.*-पान्हा *m.* -कळकळ *f.*-कळवळ *f.*-कळकळा *m.* येणें, द्रवणें, पाझरणें. ३ *to appear to the touch* (followed by an adjective describing the kind of touch) स्पर्शास वाटणें -लागणें *in. con.*, वाटणें, लागणें; as, "To F. hot or hard." ४ *to know with feeling, to know certainly or without misgiving* मनाला खात्रीलायक वाटणें -पटणें -भासणें, अंतर्यामीं वाटणें -समजणें, पूर्णपणें -ओळखणें -जाणणें -समजणें, पूर्णपणें ज्ञात- अवगत असणें, खात्री असणें; as, "I F. God." ५ *to be conscious of an inward impression* (followed by an adjective describing the condition) वाटणें; as, "I F. full sick." [To F. WELL बरें वाटणें, समाधान वाटणें.] F. *n. sensation communicated by touching* स्पर्शेंद्रियानें होणारें ज्ञान *n.* स्पर्शज्ञान *n.* Feel'er *n. one who, or that which, feels* स्पर्शानें जाणणारा-समजणारा-ओळखणारा, चापसणारा, चाचपणारा, वाटणारा. २ *zool. one of the sense organs of certain animals* (as insects) *which are used in testing objects by touch & in searching for food* (प्राण्याचें) स्पर्शेंद्रिय *n.*; उदाहरणार्थ मुंग्यांच्या मिशा *f. pl.* ३ *a remark or observation or proposal made to sound the views of others* (दुसऱ्यांचा) अंदाज काढण्याकरितां केलेली सूचना *f.* Feel'ing *n. the sense of touch, nervous sensibility to external objects* स्पर्श *n.* स्पर्शज्ञान *n.* अंतःकरण *n.* हृदय *n.* कळकळ *f.* २ *an act of apprehending any object whatever, consciousness* जाणीवशक्ति *f.* संवेदना *f.* ३ *the capacity of the soul*

*for emotional states* कनवाळूपणा *m*, करुणा *f*, दया *f*, करुणार्द्रता *n*, द्रव *m*, पाझर *m*, कळवळा *m*. [ To FORCE F. खाजवून पान्हा *m*. आणणें. ] ४ *any state or condition of emotion, any mental state whatever* मनोविकार *m*, मनोवृत्ति *f*, मनाची वृत्ति *f* -विकार *m*. ५ *that quality of a work of art which embodies the mental emotion of the artist & is calculated to affect similarly the spectators* मनोवृत्तीचा आविर्भाव *m*, विकाराविर्भाव *m*. F. *a. easily affected or moved* कोमल, कोंवळें, लवकर द्रवणारें, सहृदय, करुणामय, हृदयाळु, करुणार्द्र, कनवाळु, कोंवळ्या मनाचा, मनाचा कोंवळा, कोमल अंतःकरणाचा. २ *expressive of great sensibility, attended by or evincing sensibility* कळवळा आणण्याजोगा, कळवळ्याचा, कारुणिक, करुणात्मक, करुणारसाचा. Fee'lingly *adv.*

Feet ( fēt ) *pl.* of Foot.

Feign ( fān ) [ O. Fr. *feign* as in *feign-ant*, pres. pt. of *feindre* –L. *fingere*, to form, feign. ] *v. t. to imagine, to invent, to form and relate as if true* (जणूं काय खऱ्या आहेत अशा) कल्पिणें व सांगणें. २ ( hence ) *to pretend, to counterfeit* सोंग घेणें, गतक *n* -ढोंग *n* -मिष *n* -कोंग *n* -बहाणा *m*. &c. करणें-घेणें *g. of o.*; as, To F. sickness. Feign'ed *a. pretended, false, counterfeit* रचलेला, कल्पित, मनःकल्पित. २ सोंगाचा, मिषाचा, हुलीचा, हुलकावणीचा, ढोंगी, खोटा, कपटी. [ FEIGNED DRESS कपटवेश *m*. F. SLEEP खोटी -लुड्पुटीची झोंप *f*. F. ascetic ढोंगी संन्यासी *m*.] Feign'er *n*. प्रतारक, फसविणारा, ढोंगी. Feigned'ly *adv.* कपटानें. Feign'edness *n*. Feign'ing *n*. Feign'ingly *adv.*

Feint (fānt) [ Fr. *feint*, pa. p. of *feindre*. See Feign.] *n. an assumed or false appearance, a pretence, a stratagem* ढोंग *n*, सोंग *n*, मिष *n*, कोंग *n*, हिल्ला *m*, गतक *n*, हूल *f*, हुलकावणी *f*, छल *m*, व्यपदेश *m*, शक्कल *f*. २ *a mock blow or attack on one part when another part is intended to be struck* ( said of certain movements in fencing, boxing, war, &c. ) हूल *f*, हुलकावणी *f*. Feints डावपेंच *m. pl.* F. *v. i. to make a feint* हूल दाखविणें.

Feld-spar, Feld-spath ( feld'-spär,–spath ) [ Ger. *feld*, field and *spath*, spar. ] *n*. ( *mineralogy* ) फेलस्फार *m*, सोमकांत *m*, चंद्रकांत *m*. फेलस्पार ( सोमकांत ) हा अल्युमिनमचा सिलिकेट असतो. परंतु यांत पोट्यासिअम (पालाश), सोडिअम ( सिंध ) आणि क्याल्सिअम (खट) यांचे अंश असतात. यांचें चूर्ण होऊन चिनीमाती बनते. हा दगड दुसऱ्या कित्येक पाषाणांशीं मिश्र झालेला असाही आढळतो. Feld-spath'ic, Feld-spathose *a.*

Felicity ( felis'i-ti ) [ O. Fr. *felicite*,–L. acc. *felicitat-em*, from *felix*, *icis*, happy. ] *n. blessedness, blissfulness, happiness* परमसुख *n*, परमानंद *m*, आनंद *m*, सुख *n*, कल्याण *n*, सौभाग्य *n*. २ *a happy event, that which promotes happiness, prosperity, blessing* कल्याणकारक किंवा सौख्यकारक गोष्ट *f*, कल्याण *n*, सुख *n*. ३ *a pleasing faculty or accomplishment* मन रिझविणारा गुण *m*, मोहक शैली *f*, मोहक घाटणी *f*, मजेदारपणा *m*. Feli'citate *v. t. to make very happy, to delight* फार सुखी करणें, आनंद -सुख देणें, आनंदित -सुखी करणें. २ *to express joy or pleasure to, to congratulate* आनंद प्रदर्शित करणें, आनंदित करणें, सुख मानणें. F. (*archaic*) फार सुखी. Felicitā'tion *n*. आनंदप्रदर्शन *n*. Feli'citous *a. happy, delightful, prosperous* प्रसन्न, सुखी, आनंदी. २ *skilful* चतुर. ३ *appropriate* ( as words ) योग्य. Feli'citously *adv.* Feli'citousness *n.*

Feline ( fē'-līn ) [L. *felinus*, belonging to cats –L. *feles*, a cat; perhaps allied to Gr. *felus* female. ] *a. zool. cat-like* मांजराचा, बैडालिक, बिडालजातीय, मांजरासारखा, प्रमार्ग. २ *sly, treacherous* कपटी, दगलबाज, लबाड, लुच्चा, चोरीचा. Felin'ity *n*. Fe'lis *n. a genus of carnivorous mammals, including the domestic cat, the lion, tiger, panther, and similiar animals* बिडालवर्ग *m*, व्याघ्रवर्ग *m.*

Fell ( fel ) *pa. t.* of Fall.

Fell ( fel ) [A. S. *fel*, Eng. *fell*; cf. L. *pellis*, Gr. *pella*, skin. ] *n. skin or hide of a beast with the wool or hair on, a pelt* (used chiefly in composition, as woolfell) केशाच्छादित -सकेश चामडें *n*, केंसासह पशूंचें कातडें *n.*

Fell ( fel ) [ A. S. *fellan*, causal form of *feallan*, to fall. ] *v. t. to cause to fall, to cut down* पाडणें, खालीं पाडणें, तोडणें, तोडून टाकणें, निजवणें, जमीनदोस्त करणें, धुळीस मिळवणें.

Fell ( fel ) [O. Fr. *fel*, cruel –Late L. *fello*, *felo*, a felon. cf. A. S. *fel* ( only in comp.).] *a. cruel, barbarous, inhuman, fierce, savage* क्रूर, जंगली, निर्दय, उग्र, दारुण, खुनी, घातकी. २ (*obs.*) *eager* उत्सुक.

Fell ( fel ) [ Icel. *fjall*, *fell*, a hill. Akin to Swed. *fjall*. ] *n. barren or rocky hill* नापीक -खरखरीत -खडकाळ टेंकडी *f*. २ *a wild field, a moor* जंगल *n*, रान *n*, ओसाड जागा *f*.

Fell ( fel ) [-cf. Gael. *fill*, to fold, Swed. *fall*, a hem. ] *v. t. to sew or hem* ( said of seams ) शिवणें. F. *n*. ( *sewing* ) *a form of seam* एक प्रकारची शिवण *f*. २ ( *weaving* ) *the end of a web formed by the last thread of the weft* ताग्याचें-ठाणाचें टोंक *n.*

Fellow ( fel'lō ) [ M. E. *felawe*-Icel. *felagi*, a partner in goods, from *fe* ( Ger. *vieh* ), cattle property, and *lag*, a laying together, pl. *log*, a law. ] *n*. ( commonly used of men but sometimes

of women ) *a companion, an associate, a partner, a comrade* सोबती, संगति ( *pop.* ) संगती or संगाती, साथी, साथीदार, जोडीदार, भाऊ, बंधु, गडी, सगा, सवंगडा, सवंगडी, सहाय, मित्र, सहचर, सखा. २ *an ignoble or mean person, a worthless person* पाजी, हलकट-नीच-कुचकामाचा मनुष्य *m.* ३ *an equal in power, rank, or character &c.* तसाच दुसरा मनुष्य *m*, ( -च्या ) तोलाचा-दर्जाचा-शीलाचा-स्थितीचा मनुष्य *m*, तुल्य मनुष्य *m.* ४ *one of a pair, a mate, the male* जोडीपैकीं एक *m.* (*spec.*) नर *m*, मादी *f.* ५ *a person, individual* गृहस्थ *m*, इसम *m*, माणूस *m*, भाई *m*, जण *m*, पुरुष *m.* [ BOLD AND HEROIC F. मर्द, मर्दमाणूस, मर्दगाजी. FELLOWS *compreh. chaps, hands* गडी माणूस *m. pl.* SOME F. OR OTHER गवल्या गोमाजी, सोम्या गोम्या, गोमा गणेश. SOME FELLOWS, SOME HALF DOZEN FELLOWS OR OTHERS कांहीं अलवते गलबते *m pl.*, गवते गोमाजी *m. pl.*, गोमाजी सोमाजी *m. pl.*, साळकोजी माळकोजी *m. pl.*, साळके गोळके *m. pl.*, अलते भलते *m. pl.* YOU FELLOWS अरे ए.] ६ (in universities and colleges ) *a scholar who is appointed to a foundation called a fellowship* फेलो *m.* वृत्तिधारी पदवीधर विद्यार्थी *m.* ७ *a member of a literary or scientific society* सन्मान्य सभासद *m.* Fel'low com'-moner *n. a student at Cambridge University who commons or dines at the fellows' table* केंब्रिज युनि-व्हर्सिटींत फेलोंच्या टेबलावर जेवणारा विद्यार्थी *m.* Fel'-low creature *n. one of the same race or kind, one made by the same creator* जातभाई *m*, जातबंधु *m*, स-मानजातीय, सजातीय मनुष्य *m* -प्राणी *m.* Fel'low-fe'el-ing *n. sympathy* सहानुभूति *f*, समवृत्ति *f*, दया *f*, अनु-कंपा *f.* Fellow'ship *n. the state or relation of being a fellow or associate* साहायता *f*, सहाय्य *f*, साहचर्य *n.* २ *companionship, frequent and familiar intercourse* सोबत *f*, संगत *f*, साथ *f*, संग *m*, सहवास *m*, सख्य *n*, समागम *m.* [ F. OF TABLE पंक्ति or पंगत, एकपंक्ति (*pop.*) एकपंगत, पंक्तिव्यवहार, भोजनव्यवहार, अन्नव्यवहार.] ३ *partnership, association* ( hence ) *joint interest* भागीदारी *f*, पातीदारी *f*, पाती *f*, भागी *f.* ४ *those associated with one* ( as in a family or a society ) समाज *m*, टोळी *f*, मंडळी *f*, कंपू *m.* ५ *an endowment in a university for the support of graduates called fellows* फेलोंची शिष्यवृत्ति *f*, फेलोची -जागा -सनदी नेमणूक *f.* ६ *arith. the rule for dividing profit and loss among partners called also partnership, company, and distributive proportion* सरकत *f*, सरकतवाटणी *f.* [SINGLE F. एकेरी सरकत. DOUBLE F. दो(दु)हेरी सरकत. ]

*N. B.* Fellow is often used in compound words, or adjectively, signifying *associate, companion,* or sometimes *equal.* In this sense it is rendered by स, सह or सम. Fellow-citizen *n.* सहनागरिक, एकनगरस्थ. Fellow-countrymen स्वदेशज, देशबंधु, एकदेशीयमनुष्य. Fellow-student सहाध्यायी, सतीर्थ, गुरुबंधु. Fellow-labourer, Fellow-worker *n.* सहकारी, सहश्रमकारी. Fellow-soldier सहयोद्धा. Fellow-sufferer समदुःखी, सहदुःखी, सहभोगी. Fellow-traveller सहप्रवासक, सहयायी.

Felt (felt) [ M. E. *felt.* A. S. *felt.* Ger. *filz*, woollen cloth allied to Gr. *pilos*, wool wrought into felt, L. *fileus*, a felt-hat. ] *n. cloth made of wool united without weaving* एक जातीचा बुरणूस *m*, 'फेल्ट' *m*, विणल्याशिवाय दावून व डकवून केलेलें लोंकरीचें कापड *n*, जेन *n* ( R.), जीन *n* ( R. ), नमदा *m* (R.), बुरणूस *m* ( *loosely* ). २ *a hat made of felt* फेल्टची टोपी *f.* F. *v. t. to make into felt or feltlike substance* फेल्ट किंवा फेल्टसारखा कपडा तयार करणें, फेल्टसारखा एके ठिकाणीं चिकटवणें-डकवणें. २ *to cover with or as with felt* बुरणुसानें आच्छादणें, (-वर) बुरणूस चढवणें. Felt'er *v. t. to mat together like felt* फेल्टप्रमाणें -फेल्टसारखें-करणें. Felt'ing *n. the material of which felt is made* फेल्ट करण्याचा पदार्थ *m.* २ *the process of making felt* फेल्ट करण्याची पद्धति *f.* A peace of felt छाप *f.* Made of, belonging to, &c. felt फेल्टचा, बुरणुशी. To form ( roll out ) felt फेल्ट -जेन *n* -बुरणूस *m.* लाटणें-करणें.

Female (fē'-māl) [O. Fr. *femelle*—L. *femella*, a young woman; dim. of *femina*, a woman. ] *a. belonging to the sex which conceives and gives birth to young* स्त्रीजातीसंबंधीं, स्त्रीजातीय, स्त्रीजातीचा. २ *characteristic of woman, feminine* जनानी, कोमल, स्त्रीधर्मी, मृदु, सुकुमार, नरम, नाजूक, नेभळा. [ THE F. SEX स्त्रीजात *f*, वायकांची जात *f.* ] ३ *bot. having pistils and no stamens* गर्भतंतुकेसरयुक्त, केवळ स्त्रीकेसरयुक्त, गर्भतंतुकेसरपुष्पी. F. *n. an individual of the sex which conceives and brings forth young* स्त्री *f*, नारी *f*, बायको *f*, मादी *f*, स्त्रीजातीचा प्राणी *m.* २ *a pistillate plant* मादी *f*, गर्भतंतुयुक्त पुष्पें असणारें झाड *n.* Fem'inine *a. characteristic of a woman, womanish, womanly* स्त्रीचा, स्त्रीजातीसंबंधीं, जनानी, स्त्रैण. २ *having the qualities of a woman*; as, (in a good sense) *modest, graceful* मर्यादशील, विनयशील, कोमल, मृदु, नरम, सुकुमार, नाजूक or (in a bad sense) बायल्या, बायक्या, भ्याड, भितरा, नामर्द. ३ *gram. having a form belonging more esp. to words which are appellations of the females* स्त्रीलिंगी; as, "A F. termination" स्त्रीलिंगीप्रत्यय *m.* F. *n. gram. any one of those words which are the appellations of females* स्त्रीजातीवाचक शब्द *m.* Fem'ininely *adv.* Fem'inineness *n.* Fem'inity *n. womanliness* स्त्री-स्वभाव *m.* २ बायकोपणा *m.* Fem'ale-screw *n. spiral-threaded cavity into which another or male screw turns* मादी *f.* Fem'inism *n.* स्त्रीप्रकृतित्व *n*, स्त्रीलक्षणत्व *n.*

*N. B.*—Female and feminine; we apply *female* to the sex as opposed to male, and also to the distinctive belongings of women; as, *female* dress; while we apply *feminine* to things appropriate to, or affected by, women; as, *feminine* accomplishments. "*Female* applies to sex rather than to gender, and is a physiological rather than a grammatical term. *Feminine* applies to gender rather than to sex, and is grammatical rather than physiological." *Latham.*

Felly, Felloe (fel'i, fel'ō) [A. S. *felgu*; Ger. *felge.*] *n. one of the curved pieces in the circumference of a wheel* अढेकड *n*, वांक or वाक *n*, पाटा *m.* [CORD CONNECTING A GAP BETWEEN TWO FELLIES वांकाळा *m.*]

Felon (Fel'-on) [M. E. *felun*—O. Fr. *felon*, a traitor,-Late L. *felonem*, acc. of *felo*, a traitor, rebel. Felon शब्दाचे मूळ अर्थ राजद्रोही, स्वामिद्रोही, बंडखोर मनुष्य, ज्या वर्तनानें किंवा गुन्ह्यानें जहागीर खालसा होत असे, असें वर्तन करणारा लष्करी पोटजहागिरदार (Vassal), देहान्तशिक्षेयोग्य मोठा गुन्हा करणारा मनुष्य असे आहेत. Felony हा गुन्हा (Treason) राजद्रोहापेक्षां कमी व (Misdemeanour) सामान्य गुन्ह्यापेक्षां जास्त असा आहे. जास्त माहितीकरितां या शब्दाच्या शेवटीं दिलेली टीप पहा.] *n.* (*law.*) *a person who has committed a felony* (*a*) ज्या गुन्ह्यामुळें किंवा वर्तनामुळें लष्करी पोटजहागिरदाराची जहागिरी खालसा होत असे असा गुन्हा किंवा असें वर्तन करणारा मनुष्य *m*, स्वामिद्रोही. २ *a person guilty or capable of heinous crime, one who commits a capital crime* मोठा गुन्हा करणारा, देहान्तशिक्षेजोगा अपराध करणारा मनुष्य *m*, महानीच, महाअपराधी, महापापी, महापातकी, घोरकर्मी. Fel'onious *a. traitorous, disloyal, malignant, cruel* राजद्रोही, स्वामिद्रोही, विश्वासघातकी, घातकी, क्रूर, अतिद्वेषी. २ *villainous, wicked, perfidious,* महापापी, दुराचारी, दुष्ट, पापिष्ठ, पापबुद्धीचा, पापवासनेचा, पापसंकल्पाचा. ३ *law. done with intent to commit a crime* गुन्हा करण्याच्या बुद्धीनें केलेला. Felo'niously *adv.* Fel'oniousness *n.* अतिघोरता *f*, राजद्रोहीपणा *m*, विश्वासघातकीपणा *m.* Fel'oury *n. the whole body or class of felons* (*originally applied to the convict population of Australia*) भयंकर कृत्य करणारे लोक *m. pl.*, घोर गुन्हे करणारे लोक *m. pl.*, अघोरकर्मी लोक *m. pl.*, गुन्हे किंवा खून करणारे लोक *m. pl.* Fel'ony *n.* (*Feudal law*) *an act on the part of a vassal which involved the forfeiture of his fief* ज्या कृत्यानें किंवा वर्तनानें किंवा गुन्ह्यानें लष्करी पोटजहागिरदारा (vassal) ची जहागिरी खालसा होते, असें कृत्य *n* -वर्तन *n* किंवा-गुन्हा *m.* २ *a capital crime, a heinous crime, a crime greater than misdemeanour* देहान्तशिक्षेजोगा गुन्हा *m*, अतिघोर अपराध *m*, महा अपराध *m*, (ठरलेल्या सामान्य अपराधा- (Misdemeanour) पेक्षां) जास्त दुष्ट गुन्हा *m.*

*N. B.*—In Feudal law felony was an act on the part of a vassal which involved the forfeiture of his fief. Crimes have, from a very early period, been distributed by the law of England into three classes or divisions: viz. Treasons, felonies and misdemeanours. Treason meant the violation of the allegiance due from a subject to the sovereign. Felony is an act or crime which involves the forfeiture of one's estate or property. All crimes which were not treasons or felonies were misdemeanours. Felony was an important term in feudal law. It meant any act or crime which involved the forfeiture of property or estate, even acts which had nothing of a criminal character about them were called felonies; such as, a breach of duty on the part of the vassal, neglect of service, delay in seeking investiture, injuries by the lord against his vassal. In course of time felonies came to mean capital crimes.

Feminine. See Female.

Femoral. See Femur.

Femur (fē'-mur) [L. *femur*, thigh.] *n. anat. the thigh bone* मांडीचें हाड *n*, जंघास्थि *m.* Fem'oral *a.* जंघास्थीचा, जंघास्थिगत.

Fen (fen) [M. E. *fen*, A. S. *fenn*, Dut. *veen*, Icel. *fen.*] *n. a bog, moor, marsh* पाणथळ *n*, दलदल *f*, चिखलवट जमीन *f*, झिलाण *n.* Fenn'y *a.* पाणथळाचा, दलदलीचा, पाणवळाचा.

Fence (fens) [Short for defence. Fr. *defendre*, to forbid,–Fr. *defense*, prohibition–L. *fendere*, to strike.] *n. that which fends off attack or danger, defence, protection, security* (संकट वारणारें, मारा चुकविणारें) रक्षणाचें साधन *n*, निवारणोपाय *m*, निवारणसाधन *n*, ढाल *f*, बचाव *m.* २ *an inclosure about a field or other place* कुंपण *n*, वई *f* (वही *f*), आडा *m*, आवरण *n*, आवार *m*, आडकूट or आडकूड *m*, वेष्टन *n*, परिघ *m*, वाड *n.* ३ (*Locks*) *a projection on the bolt, which passes through the tumbler gates* (*in locking and unlocking*) बोल्टावरील चाप *m.* ४ (a) *the art & practice of fencing and sword-play* (दांड्याचा किंवा तरवारीचा) दांडपट्टा *m*, छडीपट्टा *m.* (b) पट्टा खेळण्याचें कसब *n.* ५ *skill in debate and repartee* वादांत कोटी उलट लावण्याचें कसब *n*, कोटी आंगावर न येऊं देण्याचें कसब *n*, कोटीवर प्रतिकोटी लढविण्याचें कसब *n.* ६ (*slang*) *a receiver of stolen goods or a place where they are received* चोरीचा माल घेणारा *m*, चोरीचा माल घेण्याचें ठिकाण *n*, चोरबाजार *m.* (?). F. *v. t. to fend off danger from, to protect, to guard* (-चा) बचाव *m* -रक्षण *n* -संरक्षण *n.* करणें, (-ला)

सलामत ठेवणें. २ *to secure by an inclosure* कुंपण *n* -कुडण *n* -वई *f.* घालणें -घालून राखणें, कुडणें, कुडून घेणें. F. *v. i. to make a defence, to give protection or security as by a fence* संरक्षण *n.* करणें, रक्षण *n* -बचाव *m.* करणें. २ *to practise the art of attack and defence with the sword or with the foil, esp. with the small sword, using the point only* दांडपट्टा *m* -छडीपट्टा *m.* खेळणें. ३ (hence) *to fight or dispute in the manner of fencers* (i. e. by thrusting, guarding, parrying, &c.) प्रतिकोटीनें कोटी उडवून देणें, प्रतिकोटी लढविणें. Fen'ced *a.* Fence'less *a. without a fence, uninclosed* उघडें, आवारावांचून, कुंपणावांचून. Fen'cer *n. one who teaches or practises the art of fencing with sword or foil* दांडपट्टा खेळणारा *m* -शिकविणारा *m,* दांडपट्टेवाला *m.* [PRACTISING STICK OF A F. दांड *m,* गदगी *f.*] Fen'cible *n. mili. a soldier enlisted for home service only* (usually in the *pl.*) देशांतल्या देशांत नोकरी करणारा लष्करी शिपाई *m* -सोजीर *m.* F. *a. capable of being defended* बचाव करण्यालायक. Fen'cing *pr. p.* & *v. n.* F. *n. the art or practice of attack and defence with the sword or foil* दांडपट्ट्याचा खेळ *m* -सराव *m,* दांडपट्ट्याच्या खेळाचा अभ्यास *m.* २ *disputing or debating in a manner resembling the art of fencers* प्रतिकोटी करणें. ३ (U. S.) *materials used for building fences* कुंपणकाठी *f,* शिरीं *n. pl.* ४ *act of building a fence* कुडणें *n,* कुडण *n,* कुंपण घालणें *n*; as, "Rail-fencing, Stone-fencing, Wire-fencing." [PRICE OR COST OF F. कुडणावळ *f.*] To sit on the fence *to be still hesitating as between two opinions* अनिश्चित -संदिग्ध असणें, (-चें मत) डळमळीत असणें.

Fend (fend) [Abbrev. from Defend.] *v. t. to keep off, to ward off, to shut out* (often with *off*) दूर किंवा लांब राखणें, (-ला) अटकाव करणें, आपल्यापर्यंत येऊं न देणें. F. *v. i. to act on the defensive* आपला बचाव करणें, हांकून देणें, दूर होणें. Fend'er *n.* रक्षक; as, (a) (आगींतून विस्तव न उडावा म्हणून ठेवलेला) चुलीचा आडोसा *m,* चुलीची पाळ *f.* (b) (धक्क्याला अगर दुसऱ्या जहाजाला आपटूं नये म्हणून जहाजाच्या बाजूंस सोडलेलें) जाड दोरखंडाचें वेंटाळें *n,* डफरा *m.* सध्यां मुंबईच्या बंदरांत डफरा हा शब्द इंग्रजी (fender) या अर्थी वापरतात.

Fenian (fe'ne-an) [O. Irish. *Fene,* one of the names of the ancient population of Ireland, confused in modern times with *finna,* the militia of Finn and other ancient Irish kings.] *n. a member of an association of Irishmen founded in New York in 1857 for the over-throw of the English government in Ireland* आयर्लंडमधील इंग्रजी राज्य उलथून टाकण्याकरितां १८५७ मध्यें न्युयार्क येथें स्थापन केलेल्या संस्थेचा सभासद *m,* फेनिअन *m.* F. *a.* फेनिअन लोकांसंबंधी. Fe'nianism *n.* फेनिअन पंथ *m,* फेनिअन लोकांचीं मतें *n. pl.*

Fennel (fen'nel) [A. S. *finol.*-L. *fœniculum,* fennel -*fœnum,* hay.] *n. bot.* बडिशोपीची एक जात *f.* [SWEET F. बडीशोप *f.* F.-SEED कृष्णजीरक *m.* HAVING THE SMELL OF SWEET F.— (MANGOES, &c.) मिरमिटा, शोपा.]

Fenny *a.* See Fen.

Fenugreek (f-en'ŭgrēk) [L. *fœnum Græcum,* lit. Greek hay.] *n. bot.* मेथी *f.* [SWEETMEAT OF SEED OF F. मेथोडा *m.*]

Feoff (fef) [A. Fr. *feoffer,* to endow with a fief.- O. Fr. *fief.* See Fief.] *v. t.* (*law.*) *to give or grant a corporeal hereditament to, to enfeoff* जमिनीचा ताबा किंवा मालकी देणें, जमीन बक्षिस करून देणें. F. *n.* (*law.*) *a fief* ताबा *m,* मालकी *f.*

Feral (fē'-ral) [L. *ferus,* wild.] *a.* (*bot. and zool.*) *wild, untamed, not domesticated* (said of birds, beasts, plants, &c.) रानटी, जंगली, न माणसाळलेला.

Feral (fē'-ral) [L. *feralis,* belonging to the dead.] *a.* (R.) *deadly, fatal, dangerous* घातक, प्राणनाशक, भयंकर, मृत्युजनक, अंतकर; as, "F. diseases."

Fer-de-lance (fær-de-läns') [Fr., the iron of a lance, lance-head.] *n. zool. a large venomous serpent of Brazil and the West Indies* मोठ्या विषारी सर्पाची जात *f.*

Feria, Ferial (fē'ri-ä,-al) [L.] *n.* Feriæ *pl. Eccl. a week day,* (esp. *a day which is neither a festival nor a fast*) आठवड्यांतील साधारण दिवस *m.* Fe'rial *a.*

Ferine (fē'-rīn) [L. *ferinus*- L. *ferus,* wild. See Fierce.] *a. wild, untamed* रानटी, क्रूर, हिंस्र, न माणसाळलेलें. F. *n.* हिंस्रपशु *m.* Fe'rinely *adv.*

Ferment (fėr'ment) [L. *fermentum,* for *fervimentum*-*fervere,* to boil.] *n. that which causes fermentation* (as yeast, barm, or fermenting beer) विपाकप्रवर्तक (पदार्थ) *m,* मंड *m,* फेण *m,* किण्व *m,* सुरामंड *m,* कारोत्तर *m,* विपाक *m* (here विपाक= विपाकप्रवर्तक पदार्थ),आंबविणारा-फणफणवणारा -विपाककर पदार्थ *m,* फेनोत्पादक पदार्थ *m,* फेनद *n.* २ *heat, tumult, agitation* क्षोभ *m,* क्षुब्धता *f,* गडबड *f,* गलका *m.* ३ (R.) *a gentle internal motion of the constituent parts of a fluid, fermentation* विपाक *m,* खदखद *f,* फणफण *f,* आंबवण *n.* F. *v. t. to cause fermentation in* विपाक *m.* उत्पन्न करणें, आंबवणें, फिचविणें, खदखदविणें, आंबवून किंवा विपाक पावून चांगला पदार्थ बनविणें (जसें, द्राक्षरस किंवा इक्षुरस विपाक पावून त्यापासून (alcohol) मद्यसार बनतो). २ *to set in motion, to heat* तापवणें, खळबळ उत्पन्न करणें. F. *v. i. to undergo fermentation, to effervesce* घुमणें, उमळणें (*impers.*), विपाक पावणें, विपाक

होणें, खदखदणें, फणफणणें, फदफदणें, उफणणें, आंबणें, आंबून-विपाक पावून मद्यसार किंवा मद्यार्क बनणें. २ *to be agitated or excited by violent emotions* ( प्रबल मनोविकारांनीं ) प्रक्षुब्ध होणें. Fermentabil'ity *n.* Ferment'able *a. capable of fermentation* उकळी येण्यासारखा. Fermentā'tion *n. the process of undergoing an effervescent change* आंबवणें *n*, फणफण *f*, विपाकक्रिया *f*, विपाक *m*. [ Acetic F. अम्लविपाक *m.* Alcoholic or vinous F. सौदिकविपाक *m*, मद्यविपाक *m.* Lactic F. दुग्धाम्लविपाक *m.* Butyric F. घृताम्लविपाक *m.* Viscous or mucous F. पिच्छविपाक *m.*] २ *a state of agitation or excitement* ( as of the intellect or feelings ) चळवळ *f*, धांदल *f*, क्षोभ *m*, अंतःक्षोभ *m*. Ferment'ative *a. causing fermentation, produced by fermentation* क्षोभकर, क्षोभक्षम, क्षोभजनक, क्षोभजन्य, विपाककारी. Ferment'atively *adv.* Ferment'ativeness *n.*

*N. B.*—Prof. Modak uses the word विपाक for fermentation in his Marathi chemistry.

Fern ( fėrn ) [ A. S. *fearn*; Dut. *varen* ; Ger. *farn* (*kraut*) plant; Sk. पर्ण, a wing, feather, leaf. ] *n. bot. an order of cryptogamous plants, the 'Filices,' which have their fructification on the back of the fronds or leaves* नेचा *m*, नेचरी *f*, घेडेपाउलें *n*, सितेचे केस *m. pl.* Fern'ery *n. a place for rearing ferns* नेचाचे रोपे तयार करण्याची जागा *f.* Fern'ticle *n.* (*prov. Eng.*) *a freckle on the skin resembling the seed of fern* नेचाच्या बीप्रमाणें त्वचेवरील ठिपका *m* -डाग *m.* Fern'y *a. abounding in ferns* नेचांनीं भरलेला.

Ferocious ( fe-rō'-shus ) [ L. *ferox*, *ferocis*, wild -*ferus*, wild.] *a. fierce, savage, ravenous, rapacious* क्रूर, उग्र, दारुण, खादाड, हिंसक, हिंस्र, आसुर, राक्षसी as, A F. lion. Fero'ciously *adv.* Fero'ciousness *n.* Feroc'ity *n. savage wildness or fierceness, cruelty* क्रूरपणा *m*, क्रूरता *f*, क्रौर्य *n*, उग्रपणा *m*, उग्रता *f*, हिंसकता *f*, दारुणता *f*.

Ferous ( fer'-us ) [ L. *fer*,-*ferre*, to bear. See Bear, to support. ] a suffix signifying *bearing, producing, yielding* वाहक, जनक, दायक अशा अर्थी लावण्याचा प्रत्यय; जसें, auri-*ferous* ( yielding gold ).

Ferreous ( fer'-ri-us ) [ L. *ferreus* -*ferrum*, iron.] *a.* (*obs.*) *partaking of, made of, or pertaining to, iron* लोखंडाचा, लोखंडी, लोहमय, लौह.

Ferret (fer'-et) [ O. Fr. *furet*, a ferret, prob.-L. *fur*, a thief.] *n. zool. a tame animal of the weasel kind employed in unearthing rabbits* फेरेट नांवाचें जनावर *n.* हें ससे बिळांतून हुसकविण्याकरितां बाळगतात. F. *v. t. to drive or hunt out of a lurking place as a ferret does the cony; to search out by patient and sagacious efforts* ( often used with *out* ) (फेरेटप्रमाणें) हुडकून शोधून उकरून खणून &c. -काढणें, शहाणपणानें -आस्तेआस्ते शोध लावणें. Fer'reting *pr. p.* & *v. n.* Fer'reted *pa. t.* & *pa. p.* Fer'reter *n. one who ferrets* पत्ता लावणारा, हुडकून काढणारा.

Ferret (fer'-ret) [ It. *fioretto*, dim. of *fiore*, a flower -L. *florem* acc. of *flos*, a flower. ] *n. a kind of narrow tape usually made of wool, sometimes of cotton or silk* ( called also *ferreting* ) एक प्रकारची लोकरीची नवार -नाडी *f*, -फीत *f*. ही बहुधा लोंकरीची बनविलेली असते. परंतु कधीं कधीं ती सुताची अथवा रेशमाचीही करितात.

Ferruginous ( fer-rōō'-jin-us ) [ L. *ferruginus*-*ferrugo*, iron-rust. ] *a. containing particles of iron* लोहांश असलेला. २ *resembling iron rust in appearance or colour* लोखंडाच्या गंजाप्रमाणें दिसणारा, हिरवट. Ferru'go *n. a disease of plant caused by fungi, commonly called the 'rust,' from its resemblance to iron rust in colour* तांबड *f* (?), तांब *f* (?) ( verb पड ).

Ferrule ( fer'ōōl ) [ Corrupted spelling ( due to the confusion with *ferrum*, iron, of the older form *virrol*. Fr. *virole*,-L *viriola*, a bracelet-*viria*, an armlet. ] *n. a ring or cap of metal*, ( *put round a cane, or handle*, ) मायणी *f*, वसूं *f*, *dim.* वसवी *f*, मांडळ *f*, विडी *f*, लोहवलय *n*, लौहरक्षणी *f*.

Ferry (fer'i) [ A. S. *ferian*, to convey, causal of A. S. *faran*, to go.] *v. t. to carry or transport over a water, in a boat* तरीपार नेणें or तरीपार करणें उतरवणें, (तरींतून) पलीकडच्या तीरास नेणें-पोंचविणें, तर ओलांडून नेणें. F. *v. i.* तर ओलांडून जाणें. Ferr'ying *pr. p.* & *v. n.* Fer'ried *pa. t.* & *pa. p.* Ferr'y *n. a place where persons are carried across a river in a ferry boat* तरीचें नाकें *n*, उतरण *f*, उतार *m*. २ *a ferry-boat* तर *f*, नांव *f*. ३ *a franchise or right to maintain a vessel for carrying passengers and freight* तरीचा हक्क *m* -मक्ता *m*. तरींतून उतारू आणि त्यांचा माल नेण्याआणण्याचा हक्क *m*. Fer'riage *n. the fare to be paid for passage at a ferry* तरींत बसून नदीपलीकडे जाण्याचें हांशील *n*, नोर *m*, उतार *m*, आतर (S.). Ferry-boat *n.* तर *f.* Ferry-boat ferrying gratuitiously धर्मनाव *f*, धर्मनौका *f*. Ferry-man *n.* तर्या *m*, नावाडी *m*, अंड्या *m*, अंबिया *m*.

Fertile ( fėr'-til or tīl ) [Fr.-L. *fertilis*-*ferre*, Sk. भृ, to bear. ] *a.* (a) *fruitful, able to produce abundantly* सुपीक, बहुपीक, पिकाऊ, फार पिकाचा -उत्पन्नाचा, बहुपिकी, सुपिकी, बहुप्रसव; as, "F. land or soil." (b) *productive, rich, inventive* बहुप्रसव, कल्पनाप्रचुर, प्ररोही (S.), उत्पादक; as, "F. imagination." २ *bot.* (a) *fruit-bearing* फलोत्पादक, फलावह. (b) *containing pollen* (said of anthers) परागी, सपराग. ३ *plenteous*

*ample* बहुत, पुष्कळ, भरपूर. Fer'tilely *adv.* Fertilisā'tion, Fertilizā'tion *n.* *the act or process of rendering fertile* उर्वरीकरण *n*, फलदायक करणें -होणें *n.* २ *biol. fecundation, impregnation* फलवान् -गर्भयुक्त करणें *n*, गर्भाधान *n*, रेतःसंमिश्रण *n*. Fer'tilise *v. t.* *to make fertile, to make fruitful or productive* (खत वगैरे घालून) सुपीक &c. करणें, पिकाऊपणा *m.* आणणें. २ *to fecundate* (गर्भ) आहित करणें, गाभवणें, भरवणें; as, "To F. a flower." Fer'tiliser *n.* *one who fertilises* गर्भयुक्त -फलवान् करणारा *m.* २ *that which renders fertile* सुपीक करणारा *m*, खत *n.* Fertil'ity *n.* *the state or quality of being fertile, productiveness, richness, fecundity* सुपीकपणा *m*, पिकाऊपणा *m*, कस *m*, मगदूर *m*, फलवत्ता *f.*

*N. B.*—Fertile, Fruitful. *Fertile* implies the inherent power of production; *Fruitful*, the act. The same distinction prevails when these words are used figuratively. A man of *fertile* genius has by nature great readiness of invention; one whose mind is *fruitful* has resources of thought, & a readiness of application which enable him to think & act effectively.

Ferule (fer'ōōl) [L. *ferula*, a rod.] *n.* *a flat piece of wood used for striking children, esp. on the hand, in punishment* मुलांस शिक्षा करण्याची लांकडी थापटी *f*, पट्टी *f*. F. *v. t.* पट्टीनें शिक्षा करणें.

Fervent (fer'vent) [O. Fr. *fervent*, *fervere*, to boil. Sk. घर्म, heat.] *a.* *hot, glowing, burning* उष्ण, तलख, तलखल्या, तीव्र, तीक्ष्ण, चंड, रखरखीत, कडक, भाजणारा, अतिगरम; as, "F. summer." २ *warm in feeling, earnest, zealous* कळकळीचा, सोत्साह, उत्सुक, उत्साही, हौसदार, हौशी, उमेदी, उद्मेखी (R.), पोटागीचा, तिडकीचा, उद्युक्त; as, 'F. in spirit." Fer'vency *n.* औत्सुक्य *n*, उत्कटता *f*, आसक्ति *f*, तीव्रता *f*, उत्साह *m.* Fer'vently *adv.* Fer'ves'cent *a.* *growing hot* तापणारा. Fer'vid *a.* *very hot, burning, boiling* उष्ण, तलख, तीक्ष्ण, प्रचंड, रखरखीत; as, "The mounted sun shot down direct his *fervid* rays." २ *ardent, vehement, zealous, heartful* उत्कट, उत्सुक, उत्साही, हौसदार, सोत्साह, कळकळीचा; as, "The *fervid* wishes." Fervid'ity *n.* Fer'vidly *adv.* औत्सुक्यानें, उत्कटतेनें. Fer'vidness *n.* Fer'vousness *n.* *heat, excessive warmth* प्रखरता *f*, उष्णता *f*, गरमी *f*, ताप *m*, उन्हाळा *m*, कडकी *f.* २ *intensity of feeling or expression, glowing ardour, earnestness* सप्रेम औत्सुक्य *n*, उत्कटता *f*, आतुरता *f*, तीक्ष्णता *f*, (प्रेमपूर्वक) उत्सुकता *f*, तीव्रता *f.*

Festal (fes'tal) *a.* *pertaining to a feast or holiday, joyous, gay* सणावाराचा, आनंदाचा, मौजेचा.

Fester (fes'tér) [O. Fr. *fere*, also spelt *fistle*, an ulcer, whence *festrir*, to fester (Godfroy) -L. *fistula*, a running sore.] *v. i.* *to generate pus* पुवळणें, पुवळणास येणें, पू उत्पन्न होणें, (गळूं इ०) पिकणें -तयार होणें; as, "A sore or a wound *festers*." २ *to grow virulent or malignant, to rankle* चिडणें, चिरडीस जाणें, उतणें. F. *v. t.* (गळूं इ०) पिकवणें. Fe'ster *n.* *a pustule* वहाणारें गळूं *n* -फोड *m.* २ *a festering or rankling* शल्य *n*, सल *n.*

Festive (fes'tiv) [L. *festivus* -L. *festum*, holiday; See Feast.] *a.* *pertaining to or becoming, a feast; joyous, gay, sportive* आनंदाचा, उत्साहाचा, उत्साहासंबंधीं, चैनीचा, गमतीचा, करमणुकीचा, मेजवानीचा, मजेचा, मौजेचा. Fes'tively *adv.* मौजेनें, आनंदानें. Fes'tival *n.* *time of feasting or celebration; an anniversary day of joy, civil or religious* उत्सव *m*, सण *m*, सणवार *m*, सणाचा दिवस *m*, जयंती *f*, प्रयोजन (*colloq.*) *n*, कारण *n*, पर्व *m*, पर्वणी *f*, पर्वणीचा दिवस *m*, पर्वदिवस *m*, उत्साह *m*, उत्सवाचा दिवस *m*, ईद *f* (of Mohammadans). [F. WITH ILLUMINATIONS दीपोत्सव *m.* GREAT F. महोत्सव *m.* Money, &c. given to dependents AT A F. पोस्त *n.* SOLAR F. सूर्यपर्व *m.*] F. *a.* *festive* which See. Festiv'ity *n.* सण *m.* २ आनंद *m*, मजा *f*, &c.

Festoon (fes-tōōn') [Fr. *feston*, a garland, festoon -It. *festone*, a garland. Usually derived from L. *festum*, a feast.] *n.* *a garland hanging in a depending curve, used in decoration for festivals*, &c. तोरण *n*, माळ *f*, हार *m.* २ *anything arranged in this way* तोरणासारखी रचना *f*, तोरण *n.* (*fig.*) २ (*arch. & sculp.*) *a curved ornament consisting of flowers, fruits, and leaves hanging in a natural curve* तोरण *n*, वेलबुटीचें तोरण *n.* F. *v. t.* *to adorn with festoons* माळा -तोरणें वगैरे टांगून शोभा आणणें.

Fetch (fech) [M. E. *fecchen*, *pt. t. fehte, fæhte*, A. S. *feccan*, to fetch.] *v. t.* *to go and bring, to get* (जाऊन) आणणें, घेऊन येणें, आणणें. २ *to obtain as price or equivalent, to sell for* किंमत *f.* -मोबदला *m.* आणणें, असुक किंमत येणें *in con.* with *g. of s.* (असुक किंमतीला) विकलें जाणें. ३ *to recall from a swoon* (sometimes *to*) (मूर्च्छेतून) शुद्धीवर आणणें, सावध करणें; as, "To F. a man to." ४ *to reduce, to throw* खालीं आणणें, पाडणें, चीत करणें, जमीनदोस्त करणें; as, "The sudden trip in wrestling that F.s a man to the ground." ५ *to bring to accomplishment, to achieve, to make* घडवून आणणें, साधणें, करणें; as, "To F. a compass." ६ *to reach, to arrive at, to attain* (-ला) जाऊन पोहोंचणें; as, "And straight we F.ed the Sirens'isle." ७ *to cause to come, to bring to a particular state* यावयास लावणें, (असुक एक स्थितींत) आणणें, काढणें, (*colloq.*) आणणें; as, "They could not F. the butter in

the churn." F. *v. i. to bring to one's self, to make headway* दिशा बदलणें, तोंड फिरविणें; as, "To F. to windward." F. *n. a trick, an artifice* डाव *m*, पेंच *m*. To fetch and carry *to serve obsequiously like a trained spaniel* फार मिनतवारीनें सेवा *f* -नोकरी *f* -प्रवृत्ति *f*. करणें.

Fetch (fech) [Prob. from Norwegian *Vættelys* the Vætt's or goblin's candle = ignis-fatuus. ] *n. the apparition of a living person* जिवंत माणसाचें भूत *n*, जिवंत समंध *m*. Fetch-candle *n. a light seen at night, believed to portend a person's death* रात्रीं दिसणारी मरणचूड *f*. ही दिसेल त्यास मरण येतें अशी युरोपांतील लोकांची समजूत आहे.

Fete (fāt) [Fr. *fete*.–L. *festum*, a feast. See Feast.] *n. a feast, a festival, a holiday, an entertainment* (in an open place) सण *m*, सणाचा दिवस *m*, उत्सव *m*, उत्सवदिन *m*, सुट्टीचा व मजा मारण्याचा दिवस *m*, महोत्सव *m*, जत्रा *f*, जत्रेचा दिवस *m*. [ Fancy fe'te मिनाबाजार *m*, प्रत्येकाला आपआपल्या आवडी (fancy) प्रमाणें मिळणाऱ्या मौजेच्या वस्तूंचा बाजार *m*, -जत्रा *f*, मौजेचा बाजार *m*. असल्या बाजारांत किंवा जत्रेंत पुष्कळ गमतीचे खेळ, करमणुकीचे नाना प्रकार व विक्रीच्या मजेदार जिन्नसा, उपहारांचीं दुकानें, नाच, तमाशे इ० असतात; व हा बाजार एखादे मोठ्या मनुष्याचे आश्रयाखालीं सार्वजनिक अगर धर्मार्थ कामाकरितां भरविलेला असतो. यांत मोठमोठ्या दर्जाचे पुरुष व रूपवान् स्त्रिया दुकानदार होऊन माल विकण्यास बसतात; व बहुतेक वेळां विकण्याचा माल फुकट मिळविलेला असतो. दुकानदार स्त्रिया गिऱ्हाइकांस गळ घालून एका रुपयाचे किंमतीचे मालाबद्दल गिऱ्हाइकांकडून केव्हां केव्हां पुष्कळ रुपये काढितात. येथें कोणचीही वस्तु स्वस्त मिळत नाहीं, इतकेंच नव्हे तर केव्हां केव्हां तिच्याबद्दल अवाच्या सवा किंमत पडते. या बाजारांत प्रत्येक मनुष्यास आपआपल्या आवडी (fancy) प्रमाणें माल किंवा करमणुकीचीं साधनें मिळावीं अशी व्यवस्था केलेली असते. ] F. *v. t. to feast, to honour with a festival* मेजवानी देऊन मान *m* -गौरव *m*. करणें. Fete-champetre *n. a rural festival* रानजेवण *n*, वनभोजन *n*.

Fetich, Fetish (fē'tish) [ Fr. *fetiche*—Port. *feiticio* (lit. artificial) 1 magic; २ name given by the Port. to the gods of W. Africa. —L. *factitius* artificial —*facere*, to make. ] *n. an artificial object used as an amulet or a means of enchantment* फेटिशिओ *m*, मंतरलेली किंवा भारलेली वस्तु *f* (जसें, ताईत *m* or *f*, यंत्र *n*, भालदोरी *f*, दोरा *m*, मंतरलेला अंगारा *m*, मंतरलेले तांदुळ *m. pl.* ). २ *an inanimate natural object worshipped by some people on account of its supposed inherent magical powers or as being animated by a spirit* फेटिशिओ *m*, अमानुषशक्तियुक्त एखादी अचेतन वस्तु *f*, जिचा उपयोग भुतें भारण्यास किंवा देवता सिद्ध करण्यास करितात अशी वस्तु *f*, जारणमारणाचे कामीं लागणारीं साधनें *n. pl.* (जसें, मणि *m*, औषधि *f*, पाषाण *m*, वनस्पति *f*, अस्थी *f*, नरकपाल *n*, करोटी *f*. ) ३ *any object to which one is excessively devoted* आवडीची -प्रेमाची-भक्तीची वस्तु *f*, स्तोम माजविलेला मनुष्य *m*-वस्तु *f*. Fe'tichism, Fe'tishism *n. the doctrine or practice of belief in fetiches* फेटिशिओपूजा *f*, मंतरलेल्या किंवा भारलेल्या किंवा दैवी म्हणून मानलेल्या वस्तूंची पूजा *f*, मण्योषध्यादिपूजा *f* (दैविक अद्भुत शक्तींचें अधिष्ठान किंवा साधन म्हणून मानलेल्या) मणि, मंत्र, यंत्र, औषधि, पाषाण, वृक्ष, ताईत, दोरे, अस्थि, दंत, कपाल, योद्धयांचीं किंवा वीर पुरुषांचीं चिलखतें इत्यादि नैसर्गिक किंवा कृत्रिम जड वस्तूंचा संग्रह किंवा आराधना करण्याचा संप्रदाय; वर दिलेल्या जड वस्तूंस अद्भुत शक्तींचें अधिष्ठान किंवा साधन समजून त्यांची पूजा करण्याचा प्रघात. हा प्रघात आफ्रिकेंतील गिनीदेशाच्या लोकांत पोर्तुगीज लोकांस प्रथम आढळला तेव्हां त्यांनीं त्यांच्या त्या पूजनीय जडवस्तूंस फेटिशिओ हें नांव दिलें. २ *excessive devotion to one object or to one idea, blind adoration* अमर्याद -अतिशय भक्ति *f*, अंधश्रद्धा *f*, नाद *m*, छंद *m*. ३ *abject superstition* मूढ विश्वास *m*, अंधभक्ति *f*. Fe'tichist, Fe'tishist *n. a believer in fetiches* मणि, औषधि इत्यादि भारलेल्या वस्तूंवर श्रद्धा असणारा *m*. Fetichis'tic, Fetishis'tic *a. pertaining to or involving fetichism* भारलेल्या किंवा दैवी मानलेल्या वस्तूंच्या पूजेसंबंधी. फेटिशिओ हा शब्द पोर्तुगीज भाषेंतून घेतला आहे.

Feticide (fē'ti-sīd *or* fet'i-sīd) [ *Fetus*, & L. *cædere*, to kill. ] *n.* (*med. & law.*) *the act of killing the fetus in the womb, the offence of procuring an abortion* (written also *Fœticide*) भ्रूणहत्या *f*, गर्भपात *m*, गर्भपात करण्याचें पातक *n* -गुन्हा *m*.

Fetid (fet'id or fē'-tid) [ O. Fr. *fetide*–L. *fetidus*, *fœtidus*, stinking–L. *fetere*, to stink. ] *a. having an offensive smell* कुजट, वासट, घाणेरा, घाणेरडा, वाशेळा, घुरट, दुर्गंधियुक्त, उग्रगंधि, उग्रट. Fetid'ity, Fetid'ness *n.* घाण *f*, घुरटाण *f*, ओरडाण *f*, दुर्गंध *m*.

Fetlock (fet'-lok) [ From root of *Foot* & *Lock*, as in Lock of hair. O. E. *fetlak*, *flock*. cf. Icel. *fet*, pace. See Foot. ] *n. the cushionlike projection, bearing a tuft of long hair on the back side of the leg above the hoof of the horse and similar animals* झुलूप असलेला नेवराबाहेरचा पुढें आलेला भाग *m*, (*loosely*) नेवर *m*. २ *the joint of the limb at this point* (between the great pastern bone and the metacarpus) (*a*) *the tuft of hair* नेवर (सांधा) *m*. (*b*) नेवरावरील केश *m pl.* -झुलुप *n*.

Fetter (fet'ėr) [ A. S. *fetor*, shackle for the feet. cf. L. *pedica*, a fetter. ] (Gen. *pl.*) *n. chain by which*

*an animal is confined by the foot, shackle* बिडी *f*, अर्गला *f* or अगळा *m*, निगड *m n*, पादबंधन *n* (बांधण्याची) सांखळी *f*, सांखळदंड *m*, शृंखला *f*. (S.) २ *a restraint* बिडी *f* (*fig.*), बंधन *n*, अटक *f*, अटकाव *n*, लोढणें *n*, पायगुंता *m*, निगडन (S.). F. *v. t. to shackle or confine the feet of with a chain* पायांत बिडी *f*. घालणें, निगडणें, पाय बांधून टाकणें. २ *to restrain from motion, to confine* बंदी-अटकाव-मना करणें, जखडणें, (पायांत बिडी असल्याप्रमाणें) गत्यवरोध करणें; as, "Fettered by obligations." Fet'tered *a.* (a) *bound by fetters* निगडबद्ध, निगडित. (*b*) *zool. seeming as if fettered, as the feet of certain animals which bend backward, and appear unfit for walking* फेंगड्या -तरशा पायांचा. Fet'terless *a. free from fetters* मोकळा, मुक्तायस, निरंकुश.

Fetus (fē'tus) [ L. *fetus*, a bringing forth, offspring.–L. *fuere* (obsolete verb) to generate, to produce; allied to *fui*, I was. ] *n. the young or embryo of an animal in the womb or in the egg* भ्रूण *m*, चार महिन्यांच्या नंतरचा गर्भ *m*. Also Fœtus.

Feu (fū) [ Low L. *feudum*, a variant of fee. ] *n. a. tenure where the vassal, in place of military services, makes a return in grain or in money* लष्करी नोकरीऐवजीं मूळ धन्यास धान्य किंवा रोख पैसे देण्याची पद्धत *f*. २ *a sale of land for stipulated annual payment especially for building on* घरें बांधण्यासाठीं वर्षाचें ठराविक भाडें घेऊन जमीन देणें *n*.

Feud (fūd) [ Low L. *feudum* –O. Fr. *fiu* also spelt *fief*. See Fee, Fief. ] *n. fief, land held of a superior in fee or on condition of military service* (लष्करी नोकरी करण्याच्या अटीवर मुख्य जहागिरदारा-(Lord) कडून पोटजहागिदाराला मिळालेला) लष्करी मोकासा *m* -सरंजाम *m* -जहागीर *f* -कुणबावा *m*. Feud'al *a.* लष्करी मोकाश्याचा, लष्करी नोकरीच्या जहागिरीचा. [F. system लष्करी जहागीर देण्याचा शिरस्ता *m*, लष्करी जहागिरीची पद्धत *f*. ]. Feud'alize *v. t. to reduce to a feudal tenure* लष्करी नोकरीबद्दलच्या जहागीरदारीसारखें करणें. Feud'alism *n. feudal system, feudal principles and usages* लष्करी नोकरीबद्दल जहागीर देण्याचा शिरस्ता *m*, लष्करी नोकरीबद्दलच्या जहागिरीचीं तत्वें व मामूल वहिवाट *f*. Feud'alist *n. an adherent or supporter of the feudal system* लष्करी जहागीर देण्याच्या शिरस्त्याचा कैवारी *m*. Feud'ally *adv.* Feud'atory *n.* मोकासी *m*, मोकासदार *m*, कुणबावेदार *m*, लष्करी नोकरीबद्दल जहागीर धारण करणारा *m*, सामन्त *m*. Feud'atory *a.* मोकासदाराचा, लष्करी जहागीरदाराचा. Feud'ist *n. a person versed in feudal law* लष्करी जहागीरदारीचे कायदे जाणणारा.

Feud (fūd) [ A. S. *fæhdh* –*fah*, hostile. Ger. *fehde*.] *n. a deadly quarrel between tribes or families* हाडवैर *n*, कलह *m*, भांडण *n*. २ *a combination of kindred to avenge injuries or affronts done or offered to any of their blood, on the offender and all his race* (आपल्या जातींतील मनुष्यास कोणीं दुखापत केली किंवा त्याची इज्जत घेतली तर त्याबद्दल त्याजवर किंवा त्याच्या जातीवर) सूड उगवण्याकरितां केलेला एकोपा *m* -जूट *f*.

Fever (fē'-vėr) [ Fr. *fievre* –L. *febris* –*fervere*, to be hot. ] *n. a disease marked by great bodily heat & quickening of pulse* ताप *m*, ज्वर *m*, जाळ *m*, जर *m*. (*vulg.*) [ Ardent F. *either remittent or intermittent malarial fever* तीव्रज्वर *m*. कोणत्याही जातीचा संतत किंवा आंतरिक मलेरिआजन्य ताप *m*, हिवज्वर *m*, हिमज्वर *m*. ASTHENIC F. *any variety of fever associated with great general and nervous depression* ज्या तापांत (ज्ञानतंतूंचा) शक्तिपात होतो तो ताप *m*, शक्तिहारक ज्वर *m*. ATAXIC F. *irregular fever applied to that form of typhus wherein the brain & nervous system are chiefly affected* सम्मोहसन्निपात *m*, ज्या तापांत वायू होतो तो ताप *m*. ATYPIC F. *a term applied to an intermittent fever which presents irregularity in its paroxysms* अनियत ज्वर *m*. जो ताप अनियमित वेळीं पाळीनें व कमीजास्त जोरानें येतो तो ताप *m*. AUTUMNAL F. *typhoid fever* वरसातीताप *m*, वर्षाऋतूंतील सन्निपात *m*. BENGAL F. *pernicious remittent fever* बंगाल्यांतील ताप *m*, बंगल्वर *m*. BILIOUS F. *remittent fever with gastro-intestinal disturbances* पित्तज्वर *m*. ज्या तापांत आंतड्यांत व आमाशयांत विकार होतो तो ताप *m*. BRAIN F. *meningitis popularly applied to any kind of febrile state in which symptoms of cerebral excitement are prominent, as well as to inflammatory disease of the brain or its membranes* ज्या तापांत मेंदू व त्याचीं वेष्टणें यांचा दाह होतो तो ताप *m*. ज्या तापांत मेंदूच्या दाहामुळें वायु (वडवड) होतो तो ताप *m*, वेडा मधुरा *m*, प्रलापक सन्निपात *m*. BREAK-BONE F. *dengue* ज्या तापांत हाडें फार दुखतात तो ताप *m*, संधिकसन्निपात (ज्वर) *m*. CATARRHAL F. *one with a tendency to inflammation of the mucous membranes, as frequently seen in influenza* ज्यांत सर्दी होते असा ताप *m*, अभिष्यंदज्वर *m*. CATHETER F. *that which sometimes follows the passage of instruments into the urethra* (OFTEN, AND NOT ALWAYS, DUE TO A WANT OF ASEPSIS) मूत्रोत्सर्गनलिकाज्वर *m*. लघ्वी काढण्याची नळी मूत्रमार्गांत घातल्यामुळें जो ताप येतो तो. हा ताप बहुतकरून अस्वच्छपणामुळें येतो. नलिकाज्वर *m*. CEREBRO-SPINAL F. *a malignant specific infectious disease the most marked characteristic of which is inflammation of the meninges of the brain and cord, causing muscular rigidity and nerve pain, not infrequently associated with a macular skin eruption*

ज्या तापांत मेंदूच्या व ज्ञानरज्जूच्या आवरणांना सूज येते, स्नायू ताठ होतात, वेदना होतात व आंगावर फोड येतात असा भयंकर व स्पर्शसंचारी ताप *m*, मस्तिष्कदाहजन्य ज्वर *m.* CONGESTIVE F. *malarial fever* कर्दमजन्य ज्वर *m*, दूषितविषम ज्वर *m.* CONTINUED F. *any fever in which the rise in temperature occurs with only slight intermission, and which is not of brief duration* जो ताप एकसारखा असून फार दिवस रहातो तो, निरंतरज्वर *m.* DENGUE F. *an epidemic febrile disease, the most marked features of which are the sudden onset and severe pain throughout the body* कमरमोडीचा ताप *m.* ज्या तापांत सर्वांग फार दुखतें तो ताप *m*, संधिकसन्निपात *m.* ENTERIC F. *typhoid fever, an acute specific infectious febrile disease running a course of from three to four weeks, characterized by diarrhœa, bronchitis, great depression and an eruption of rosecoloured spots* (TYPHOID FEVER) आंत्रज्वर *m*, आंत्रगतज्वर *m*; जो ताप स्पर्शसंचारी, व तीव्र असून तीन ते चार आठवडेपर्यंत रहातो, व ज्यांत अतिसार, खोकला, अतिशय अशक्तता, आणि आंगावर गुलाबी रंगाचें उगवण येतात असा ताप *m*, तंद्रिक सन्निपात *m*, मधुरा *m.* EPHEMERAL F. *one of brief duration, probably due to indigestion, fatigue or other temporary cause* अपचन, त्रास, किंवा तशाच एखाद्या तात्पुरत्या कारणामुळें आलेला ताप *m*, लघुज्वर *m*, ज्वरांश *m.* ERUPTIVE F. *one accompanied by lesions of the skin, consisting of macules, papules or pustules* ज्या तापांत आंगावर कांहीं उगवण -फोड येतात असा ताप *m*, पिटिकोत्पादक ज्वर *m.* ESSENTIAL F. *idiopathic fever* कारण न समजलेला ताप *m*, निजज्वर Sk. *m.* AS DISTINGUISHED FROM आगंतुकज्वर. HAY F. *an incorrect term for acute catarrh of the naso-pharynx and adjacent mucous membranes occurring in neurotic persons in the late summer and not necessarily with fever* दम्यासारखा विकार *m.* नाकपुड्या, घसा व त्याजवळील श्लेष्मल त्वचेला ज्या तापांत सूज येते व जो नाजूक प्रकृतीच्या लोकांना उन्हाळ्यांत होतो तो ताप *m*, त्यांत ताप असतोच असें नाहीं. तृणगंधजन्यज्वर *m.* HEAT F. *elevated temperature caused by prolonged exposure to great heat* पुष्कळ वेळपर्यंत उष्णता लागल्यामुळें जो ताप येतो तो; उष्माभिघातजन्यज्वर *m.* HECTIC F. *that due to prolonged suppuration as in phthisis* क्षयज्वर *m*, प्रलेपकज्वर *m*, अस्थिगतज्वर *m.* कफक्षयांत किंवा शरीरांत कोठें पू होत असला म्हणजे जो ताप येतो तो. INFLAMMATORY F. *that which is caused by local inflammation, symptomatic fever* दाहजन्यज्वर *m.* कोणत्याहि ठिकाणीं दाह झाला असतां जो ताप येतो तो. INTERMITTENT F. *that which is due to malarial poisoning & in which there are periods of absolute normal temperature* सविरामज्वर *m*, अंतरितज्वर *m*, अंझ्याताप *m*, हिंवताप *m*, पाळीचा ताप *m.* मलेरियाच्या ज्या तापांत कांहीं वेळ ताप साफ निघतो तो. JUNGLE F. *pernicious remittent fever in certain parts of India* हिंदुस्थानांतील कांहीं भागांत येणारा जंगली ताप *m*, दूषितज्वर *m*, कर्दमज्वर *m.* MALARIAL F. विषमज्वर *m*, कर्दमज्वर *m*, दुर्जलजन्यज्वर *m.* MOUNTAIN F. *in some cases enteric fever, in others remittent fever, as seen in the mountains of Western North America* डोंगरी ताप *m*, पर्वतज्वर *m*, ज्वरविशेष *m.* अमेरिकेच्या पश्चिम व उत्तर भागांत येणारा विषमज्वरासारखा ताप *m.* PANAMA F. *pernicious remittent fever of the Isthmus of Pamama* पनामांतील विषमज्वर *m.* PERNICIOUS F. *suddenly developing and intense remittent fever* महासंततज्वर *m*, भयंकरज्वर *m.* PUERPERAL F. सूतिकाज्वर *m.* RELAPSING F. *characterized by two or more suddenly developed febrile paroxysms and due to a spiral micro-organism, the spirillum Obermeirei, which is found in the blood during the paroxysms* उलटणारा ताप *m*, परिवर्ती ज्वर *m*, जो ताप उलटून पुन्हा येतो व ज्यांत तापाचे वेळीं रक्तांत एक प्रकारचा किडा सांपडतो असा ताप *m*, आवर्तकसन्निपात *m.* REMITTENT F. *a malarial fever in which there are periodical falls in the temperature, but not to normal* स्वल्पविरामज्वर *m*, विषमज्वराचा एक प्रकार *m*, संततज्वर *m.* ज्या मलेरियाच्या तापांत सायंकाळीं जास्त व सकाळीं कमी असतो परंतु जो साफ निघत नाहीं असा ताप *m.* SCARLET F. *a specific contagious fever most frequent in childhood, attended by a bright scarlet skin eruption, by catarrh of the respiratory tract, followed by desquamation of the skin, and often by albuminuria* लोहितांगसन्निपात *m*, जो ताप स्पर्शजन्य असून बहुतकरून मुलांना येतो, व ज्यांत गोंवराप्रमाणें आंगावर लाल रंगाचें उगवण उठतें, खोकला येतो व आंगावरून भूस जातें व लघ्वींत आल्ब्यूमेन जातो असा ताप *m.* SEPTIC F. *that due to the introduction into the body of the products of decomposition* कोथोद्भव OR कोथजन्यज्वर *m*, विषज्वर *m.* कुजलेले पदार्थ रक्तांत गेल्यामुळें येणारा ताप *m.* TYPHOID F. *enteric fever* प्रलापकसन्निपात ज्वर *m.* TYPHOMALARIAL F. *remittent fever with symptoms resembling those of enteric fever* आंत्रगतज्वर *m*, दूषितसंततज्वर *m.* TYPHUS F. *a very fatal, specific, infectious disease slightly resembling enteric fever* वेडामधुरा *m*, तंद्रिकसन्निपात *m.* Sk. मधुरा, जो ताप स्पर्शसंचारी असून फार भयंकर असतो, व जो थोडासा आंत्रज्वरासारखा दिसतो असा ताप *m.* YELLOW F. *an acute infectious febrile disease, running a rapid course and marked by a jaundiced tint of the skin and by vomiting of a dark-brown grumous substance* हारिद्रकसन्निपात *m*, पीतज्वर *m.* जो ताप तीव्र असून स्पर्शसंचारी असतो व ज्यांत कातडी पिंवळसर दिसते, व ज्यांत काळसर तांबूस रंगाचे पदार्थांची ओकारी होते व जो लवकर संपतो असा ताप *m.* COLD PAROXYSM OF A F. हिंव OR हींव, हिंवाची हुडहुडी किंवा थडथड *f.* COMMON F. सामान्यज्वर *m.* F. ASCRI-

BED TO VITIATION OF THE BILE पित्तज्वर; OF THE HUMOUR PHLEGM कफज्वर *m*; OF THE HUMOUR WIND वातज्वर *m*; OF THE THREE HUMOURS त्रिदोषात्मकज्वर *m*, सन्निपातज्वर *m*; OF THE BILE AND AIR पित्तवातज्वर *m*; OF THE BILE AND PHLEGM पित्तकफज्वर *m*. F. QUARTAN तिजारें *n*, चातुर्थिकज्वर *m*, आल्या दिवसापासून क्रमानें चौथ्या दिवशीं येणारा ताप *m*, चातुर्थिक विपर्यय *m*. F. QUOTIDIAN ऐकाहिकज्वर *m*, (?) अन्येद्युष्क, अहोरात्रींतून एक वेळा याप्रमाणें दर दिवशीं येणारा ताप *m*. F. TERTIAN दुजारें, तृतीयकज्वर *m*, आल्या दिवसापासून क्रमानें तिसरे दिवशीं येणारा ताप *m*. F. (DOUBLE QUOTIDIAN) द्वैकालीनज्वर *m*, सततज्वर *m*, अहोरात्रींतून दोन वेळां येणारा ताप *m*. F. SEATED IN THE BONES हाडज्वर *m* (?), हाडकुरकुटी *f* (?). Fever PATIENT तापकरी, जरकरी, ज्वरी, ज्वरित, जातज्वर. HOT PAROXYSM OF F. तापाचा लाहडा *m*, ज्वराग्नि *m*. PROSTRATION OF STRENGTH IN F. गुरगुदी *f*, शक्तिपात *m*. SLOW CREEPING F. चोरताप *m*. SLOW OR LINGERING F. जीर्णज्वर *m*. TO STOP A F. BY INCANTATIONS ज्वर OR जर बांधणें.] F. *v.t. to become fevered* ज्वरानें आजारी पडणें. २ *to become excited* संतप्त किंवा क्षुब्ध होणें. Fever-heat *n. the heat of fever* ज्वराची उष्णता *f*. २ *an excessive degree of excitement* संतप्तता *f*, अतिक्षोभ *m*. Fe'verish *a.* थोडासा ताप आलेला, कणकणी आलेला, आंग मोडून आलेला, कसर आलेला, &c., मंदज्वरार्त, ज्वरोन्मुख. [F. EXCITEMENT ज्वरासारखी तडफड *f*. TO FEEL F. कणकणणें, कडमडणें, (हिंवानें, तापानें, &c.) कडमडीत असणें-पडणें-निजणें &c., कडांगी *f* -कडमोड *m*. येणें-भरणें-लागणें *in. con.*, आंग *n*. मोडून येणें, आंग *n*. रवरवणें.] २ *disposed to fever* ज्वराचे प्रकृतीचा, ज्वरस्वभाव, ज्वरशील. ३ *indicating fever* ज्वरदर्शक. ४ *fickle* चंचल, अस्वस्थ. ५ ज्वरितासारखा, क्षुब्ध-अस्वस्थ. Fe'verishly *adv.* ताप आल्यासारखें. Feverishness *n.* ज्वरग्रस्तता *f*, संक्षुब्धता *f*, संतप्तता *f*, कणकणी *f*, कणकण *f*, रवरव *f*, रवरवी *f*, कडंग *f*, कडांगी *f*, कसर *f*, ज्वरांश *m*. Fe'verous *a.* ज्वरकरी, तापकरी, सज्वर, ज्वरार्त.

*N. B.*—In the above, we have taken English definitions of several fevers from the Dictionary of Medical Terms by Keating, and in determining the Marathi equivalents for the same, we have mainly relied on the results of the learned labours of Dr. G. K. Garde as embodied in his editions of वारभट and माधवनिदान. For the accurate meanings of such terms, used above, as, सततज्वर, संततज्वर, विषमज्वर, सन्निपातज्वर, &c. we strongly recommend to our readers Dr. Garde's Marathi edition of माधवनिदान.

Few (fū) [A. S. *fea*; *pl. feawe*; Fr. *peu*; L. *paucus*, small.] *a. small in number, not many* थोडा, थोडका, अल्प, कांहीं, थोडाबहुत, कितीएक, कित्येक, (*colloq.*) दोनचार, चार पांच. A Few ('A few' means more than simple 'few') कांहीं (पण पुष्कळ नव्हत असे). Few'ness *n.* थोडेपणा *m*, &c. A good few *a considerable number* बरेच. In few *in a few words, briefly* संक्षेपानें, थोडक्यांत. Some few *an inconsiderable number* थोडेसे, कांहीं. The few *the minority* थोडी संख्या *m*, दुर्बल पक्ष *m*, अल्पसंख्याकपक्ष *m*.

Fiasco (fi-as'kō) [It. *fiasco*, bottle, perhaps from L. *vasculum*, a little vessel, *vas*, a vessel.] *n. a failure* or *breakdown in a dramatic or musical performance*, (also in a general sense) *an ignominious failure* फज्जा *m*, फट्फजिती *f*, पची *f*, बोऱ्या *m*, बाजा *m*, बंबोरा *m* (उडविणें).

Fiat (fīat) [L. *fiat*, "let it be done" 3rd pers. sing. pres subj. of *fieri*, passive of *facere*, to do.] *n. an authoritative sanction, a command* आज्ञा *f*, हुकूम *m*, फरमान *f*, आदेश *m*; as, "To determine by the F. of the king alone, the course of national policy."

Fib (fib) [Possibly corrupted from *fible*, fable.] *n. something said falsely* खोटें *n*, गप्प *f*, असत्य *n*. Fib *v. t. to speak falsely* खोटें *n* ·असत्य बोलणें. Fib'ber *n one who tells fibs* गप्पाड्या *m*. बातेरा.

*N. B.*—Fib is a mild euphemism for lie.

Fibre (fī'bėr) [Fr. *fibre*. -L. *fibra*, a thread.] *n. a small thread or filament* (found in animal or vegetable tissue) तंतु *m*. (*pop.*) तांत *or* ताथ *f*, तांतू *m*, सूत्र *n*, सूत *n*, दोरा *m*, पागोरा *m*. [F. (OF A MUSCLE OR A LEAF OR WOOD) शीर *f*, शिरा *f*, रेषा *f*, हिरका *m*, हीर *m*. F.S (AS OF MANGOES रेषा *f*, केसर *n*, लोंचर *n*, छुचर *n*, चुचर *n*, चोचर *n*, चोचरट *n*, लोंकर *f*. CLOTTED F.S (OF HEMP, *ambadi*) वांख *m*, वाक *m*.] २ *a substance consisting of fibres* (whether animal or vegetable), *a general name for the raw material such as cotton, flax, &c., used in textile manufactures* तंतुमय कच्चा माल *m*. (कापूस, वाक, ताग, रेशीम, लोंकर इ०). ३ *a subdivision of a root, a rootlet* कुडें *n*, कुडी *f*, पाळ *n*, पागोरा *m*. ४ *sinew, strength, toughness* चिवटपणा *m*, बळ *n*, दम *m*, पाणी *n*, (*fig.*) स्नायु *m*. ५ (*fig.*) तंतुसारखा बारीक भाग किंवा पदार्थ *m*, तंतु *m*, नस *m*, (*fig.*); as, "They are bound up in every F. of my being." Fi'bred *a. having fibres, made up of fibres* तंतुयुक्त, तंतुमय. Fi'breless *a. having no fibres* तंतुरहित, तंतुहीन. Fi'briform *a. having the form of a fibre* तंतुसारखा, तंत्वाकार, तंतूच्या आकाराचा. Fi'bril *n. a small fibre* बारीक तांतु *m*, तंतुकडी *f*. Fi'brous *a. containing or consisting of fibres* तंतुमय. Fi'brousness *n*. Fibrilla'tion *n. the state of being reduced to fibres* तंत्वीभवन

*n.* Fibrill'ous *a. pertaining to or composed of fibres* तान्तव, तन्तुमय, तन्तूसंबंधीं. Fibro-cartilage *n.* तन्तुमत्तरुणास्थि *m*, तन्तुकूर्चा *f.* सफेत तन्तुमयकले (fibrous connective tissue)चे नागमोड तन्तु आणि कूर्चेच्या सूक्ष्मपेशा यांच्या भिन्नप्रमाणांच्या मिश्रणानें ही तन्तुकूर्चा बनते. Fibro'ma *n.* तन्तुमद्ग्रंथि *m*, तन्तुमयग्रंथि *m*, तन्तुमय त्वचेनें बनलेलें वाळूक *n.* हें वृषण, स्तन, गर्भाशय, चर्माखालील जालिनी कला (Cellular tissue) व वातवाहिनी (nerve) ह्या ठिकाणीं होतें.

Fibrin (fī'brin) [L. *fibra*, a thread.] *n. an organic compound, composed of thready fibres, found in animals and plants* तान्तव *n* (तन्तोरिदं तान्तवम्), रक्ततन्तुबीज *n*, रक्ततंतुजाल *n*, रक्तांमधील एक पांढरें तंतुमय द्रव्य *n.* ह्या द्रव्यामुळेंच रक्त गोठतें. Fibrin-factors रक्ततंतुजालघटक *m. pl*, तान्तवघटक *m. pl.* Fibrino-gen *n.* तान्तवजनक *m*, तान्तवकार *m.* Fibrinoplastin *n.* (or paraglobulin) तान्तवपरिणामक *m.* Fibrin-ferment *n.* तान्तवकिण्व *m*, तान्तवमण्ड *m*, तान्तवोत्पादकमण्ड *m*, स्रवलेल्या रक्तांतील दोन तान्तवघटकांचा संयोग करून तान्तव (fibrin) उत्पन्न करणारा किण्व *m.* Fibrinā'tion *n. the state of acquiring or having an excess of fibrin* तान्तवातिरेक *m*, तान्तवाधिक्य *n.*

*N. B.*—Fibrin करितां तान्तव हा शब्द पसंत नसेल तर रक्ततन्तुबीज घ्यावा व रक्ततन्तुबीजजनक, रक्ततन्तुबीजपरिणामक, रक्ततन्तुबीजमण्ड हे शब्द करावे.

Fibroma. See Fibre.

Fibula (fib'-ū-la) [L. & It. *fibula*, a buckle.] *n. a brooch, clasp, or buckle* बखल *n*, अडकवण *n.* २ *anat. the outer and usually the smaller of the two bones of the leg, or hind limb below the knee* बहिर्जंघास्थि *m*, गुल्फास्थि *m*, पायाच्या दोहों हाडांपैकीं एक हाड *n.* हें लांब, पातळ व त्रिकोणाकार असतें. ३ *a needle for sewing up wounds* व्रणसूचिका *f*, जखम शिवण्याची सुई *f.* Fib'ular *a.*

Fickle (fik'-l) [A. S. *ficol*; Ger. *ficken*, to move quickly to and fro; cf. Fidget.] *a. liable to change, unstable, inconstant, capricious* चंचल, (*pop.*) चंचळ, उडाणटप्पू, उचलचावडा, चंचलवृत्ति, चंचलचित्त, क्षणिकचित्त, क्षणिकबुद्धि, अस्थिर. Fick'leness *n.* चांचल्य *n*, चंचलबुद्धि *f*, चंचलचित्त *n.*

Fiction (fik'shun) [Fr. *fiction* –L. *fictionem* acc. of *fictio*, a feigning –L. *fictus* p. p. of *fingere*, to feign.] *n. the act of feigning or inventing (imaginary incidents, existences, states or things)* कल्पनेनें निर्माण करणें *n*, कल्पिपणें *n.* २ *something that is imaginatively invented, feigned existence or event* कल्पना *f*, रचना *f*, कल्पनासृष्टि *f*, मानससृष्टि *f*, काल्पनिक गोष्ट *f*, कल्पिलेली किंवा रचलेली गोष्ट *f*, हकीकत *f*, मिथ्याकथा *f*, कल्पितकथा *f.* ३ *fictitious literature* कादंबऱ्या वगैरे वाङ्मय *n*, कादंबऱ्या वगैरे ग्रंथसमूह *m.* ४ (*law*) *an assumption of a possible thing as a fact irrespective of the question of its truth; any like assumption made for convenience as for passing more rapidly over what is not disputed and arriving at points really at issue* (योग्य न्याय देण्याकरितां कायद्यांतील अपूर्णता अथवा उणीव भरून काढणारी) कायद्याची व्यंगपूरक कल्पना *f.* Fic'tional *a.* कल्पनेचा, काल्पनिक, कादंबरीसंबंधीं, &c. Fic'tionist कादंबरीकार *m*, कादंबरीसारखे ग्रंथ लिहिणारा *m.* Ficti'tious *a.* (a) *feigned, imaginary* कल्पित, कल्पिलेला, रचलेला, कल्पनेचा, काल्पनिक, मनःकल्पित, अवास्तविक. (b) *not real, counterfeit* खोटा, केलेला, कृत्रिम, मिथ्या, बनावट, कपटाचा. Ficti'tiously *adv.* कल्पून, रचून, कृत्रिमरीतीनें. Ficti'tiousness *n.* कृत्रिमता *f*, काल्पनिकत्व *n*, खोटाई *f*, खोटेपणा *m.* Fic'tive *a.* Same as Fictitious.

Fictitious. See Fiction.

Fiddle (fid'l) [A. S. *fithele*, Ger. *fiedel.*] *n. a stringed instrument of music* (called also a *Violin*) फिडल *f*, एक प्रकारचें तंतुवाद्य *n.* हें सारंगीसारखें असतें. २ *bot. a kind of dock (Rumex pulcher) with fiddle-shaped leaves* फिडलसारख्या पानांची वनस्पति *f.* आपल्या देशांत रुईचीं कांहीं पानें फिडलच्या आकाराचीं असतात. ३ *naut. a rack or frame of bars connected by strings, to keep table furniture in place on the cabin-table in bad weather* फिडलसारखी मांडणी *f.* F. *v. t.* or *v. i. to play on a fiddle* फिडल वाजविणें. २ *to move the hands and fingers restlessly or in busy idleness, to trifle* (फिडलवर जसें वाजवतात त्याप्रमाणें) जणूं काय वाजवण्याकरितां हाताचीं बोटें हालवणें. ३ उगीच कांहीं तरी करणें. Fidd'ling *pr. p. & v. n.* Fidd'led *pa. t. & pa. p.* Fidd'ler *n.* Fiddle-stick *n.* गज *m*, कमान *f.* Fiddle-string *n.* फिडलची तार *f.*

Fiddle-faddle (fid'dl-fad'dl) *n. a trifle, trifling talk, nonsense, unmeaning action* क्षुल्लक गोष्ट *f*, नस्ता कारभार *m*, रिकामा कारभार *m*, नस्ती उठाठेव *f.* F. *v. t.* नस्ता कारभार *m* -नस्ती उठाठेव *f.* करणें, उगाच माशा मारणें (*colloq.*).

Fidelity (fī-del'i-ti) [M. Fr. *fidelite* –L. *fidelitatem* (acc. of *fidelitas*), faithfulness –L. *fidelis* –L. *fides*, faith.] *n. veracity, honesty* प्रामाणिकपणा *m*, खरेपणा *m.* २ *adherence to a person or party, loyalty* इमानीपणा *m*, भक्ति *f*, अनुराग *m*, आसक्तता *f*, विश्वासूपणा *m*, निष्ठा *f.* ३ दांपत्याचार *m*, दंपतीधर्म *m.* २ *adherence to the marriage contract* नवराबायकोचें एकमेकांशीं इमान *n*, इमानीपणा *m.* [F. TO A HUSBAND पातिव्रत्य *n*, सतीत्व *n.*]

Fidget (fij'-et) [Icel. *fika*, to climb up nimbly, Ger. *ficken*, to move to & fro, conn. with Fickle.] *v. i. to move uneasily one way or the*

*other* वळवळणें, चळवळणें, चुळबुळणें, चुळमुळणें, चुळमुळणें, चुळचुळ *adv.* -मुंगळा *m.* लागणें *in. con.*, वळवळ *f.* -चळचळ *f* -चुळचुळ *f*, &c. लागणें-सुटणें *in con.* F. *n. uneasiness, restlessness* चळवळणें *n.* Fidg'eting *pr. p.* Fidg'eted *pa. t.* Fidg'etiness *n.* चळवळ *f*, वळवळ *f.* Fidg'ety *a. restless, uneasy* वळवळणारा, अस्वस्थ.

Fiducial (fi-dū'shi-al) [L. *fiducia*, confidence, from *fidere*, to trust.] *a. having faith or trust, confident, undoubting* भरंवशाचा, विश्वासाचा, भावपूर्ण, अढळ, अचल, निश्शंक; as, "Fiducial reliance on the promises of God." २ *having the nature of a trust, fiduciary.* See the word Fiduciary. Fidu'cially *adv.*

Fiduciary (fi-dū'shi-ar-i) [L. *fiduciarius–fiducia*, trust.] *a. confident, unswerving* विश्वासाचा, भरंवशाचा, खात्रीचा, अचल, अढळ, निश्शंक. २ *held in trust* (दुसऱ्याचे फायद्याकरितां विश्वासाचे नात्यानें आंगावर घेतलेली जबाबदारी) जिम्मा म्हणून ठेवलेला -ठेऊन घेतलेला, विश्वासात्मक. F. *n. one who holds a thing in trust for another* जिम्मेदार (?). २ *theol. one who depends for salvation on faith without works* सत्कर्मांवांचून केवळ श्रद्धेनें मुक्ति मिळविण्याची अपेक्षा करणारा.

Fie (fī) [Fr. *fi* the sound instinctively made in presence of a bad smell.] *interj.* (with *on* or *upon*) *an exclamation denoting contempt or dislike* धिक्, हें:, शिः, हॅट्, छे, छत्, छिः, छिछी, Fie! Fie! धिक्-धिक्! धिक्कार! धिक्कार! To cry F. धिक् म्हणणें, थुथुथु-छिथु &c. करणें, धिक्कार असो असें म्हणणें.

Fief (fēf) [Fr. *fief.* Low L. *feudum.*] Same as Feud.

Field (fēld) [A. S. *feld* earth, land.] *n. land suitable for tillage or pasture, the open country* माळ *m*, मैदान *n*, (शेतीस-कुरणास उपयोगी) खुली जागा *f*, क्षेत्र *n*, जमीन *f.* २ *a piece of land inclosed for tillage or pasture* शेत *n*, (कुंपण, बांध इ० घालून) शेतीस तयार केलेली जमीन *f*, वावर *n*, वाडी *f*, *dim.* वाडगें *n*, वाडकुलें *n*, ठिकें *n* (*prov.*), ठिकाण *n.* [SMALL F. पट्टी *f*, कडतरी *f* (*prov.*). STAND IN A F. FOR THE WATCHER माळा *m*, माच *n*, माचा *m*, माळोंचा *m*, माचळी *f.* TO CARRY TO A F. खळवटणें (?) UNSOWN F. नापेर -पडीत शेत *n*, पडशेत *n.* WATER-PIPE FIXED IN THE BANK OF A F. मोंगळी *f* (R.).] ३ *a battle-ground* लढाईचें ठिकाण *n*, समरांगण *n*, रणभूमि *f*, रणक्षेत्र *n*, समरभूमि *f.* ४ *an open space, an expanse* आवार *n*, पटांगण *n.* (a) *the space covered by an optical instrument at one view* (दर्शनयंत्रांतून एकाच वेळीं दिसणारें) क्षेत्र *n*, दृश्यक्षेत्र *n.* ५ *an unrestricted or favourable opportunity for action, province* अवसर *m*, वाव *m*, संधि *f*, अवकाश *m*, स्थान *n.* ६ *an extent or tract of ground covered with or containing some special natural formation or production* (खनिज द्रव्यांची) खाण *f*, खनिज द्रव्यें सांपडणारी जमीन; as, "Gold-field; oil-field." (b) *cultivated track* लागवडीस आणलेली जमीन *f*, वावर *n.* [BLANK SPOT IN A F. OF CORN ओशिक *n*, ओसा *m.* CONTINUOUS COURSE *or* RANGE OF FIELDS सजा *or* सजा *or* सज्जा *m.* DIVISION OF *or* IN A F. कोठी *f*, कुणगा *m*, दळें *n*, मळी *f*, चोंढा *m*, मांगा *m.* F. BUSINESS शेतकाम *n*, शेतकी *f*, शेती *f.* FIELDS, PLANTATIONS, ARABLE GROUNDS, *compreh. or gener.* शेतमळा *m*, शेतपोत *n*, शेतभात *n.* LIVING IN THE FIELDS (as during harvest) शेतवस्ती *f.* PERSON EMPLOYED TO WORK IN THE FIELDS शेतकरी, शेतकाम्या, शेतखण्या, कामकरी. SETTING OF A F. *or* PLANTATION लावणी *f*, लागवड *f.*] ७ *a collective term for all the competitors in any outdoor contest or trial, or for all except the favourites in the betting* प्रतिस्पर्धि *m. pl*, खेळणारे गडी *m. pl*, आखाडा *m* (भरलाच आहे).

Field *v. i. to act as fielder in cricket* चेंडू झेलणाराचें व परतवणाराचें काम करणें, (चेंडू) वळविणें, डाव देणें. [चेंडू झेलणें, अडविणें व तो बरोबर फेंकणें हीं (Fielding) डाव देण्यामधील मुख्य कामें आहेत.] F. *v. t. to stop and return ball* चेंडू पकडून परत लावणें. Field artillery *n. light ordnance mounted on wheels, for the use of a marching army* गाड्यावरच्या तोफा *f. pl.*, स्वारींतल्या हलक्या तोफा *f. pl.*, चालता तोफखाना *m.* Field-colours *n. mili. small flags for making out the positions for squadrons and battalions* लहान लहान निशाणें *n. pl.* हीं खुणेसाठीं रोंवितात. Field-day *n.* (a) *a day in the fields* शेतकामाचा दिवस *m.* (b) *mili. a day when troops are taken into the field for instruction in evolutions* कवायतीचा किंवा गोळीबाराचा दिवस *m.* (c) *a gala-day* सणाचा -मौजेचा दिवस *m.* Field'ed *a.* (*obs.*) *encamped* तळ दिलेली. Field'er *n.* (क्रिकेटच्या खेळांत) चेंडू वळवणारा, झेलून परतवणारा, डाव देणारा. Field-glass *n.* (a) *a binocular telescope of compact form* दोहीं डोळ्यांनीं पहाण्याची लहान दुर्बीण *f.* (b) *a small achromatic telescope* यथावर्णदर्शक दुर्बीण *f.* Field'ing *n. the act of playing as a fielder* चेंडू वळवणें *n* -झेलणें व परतवणें. Field-marshal *n. mili. the highest military rank conferred in the British and other European armies* रणाधिपति *m*, मुख्य सेनाधिपति *m.* [(cf.) सेनाकर्ते. The highest military title among the Marathas conferred upon Balaji Vishvanath the first Peshwa (-superior to that of a general).] Field-officer *n. mili. an officer above the rank of captain & below that of general* कॅप्टनच्या वरच्या व जनरलच्या खालच्या दर्जाचा लष्करी कामगार *m*, रणाधिकारी *m.* Field-piece *n. a cannon mounted on wheels for the use of a marching army* (गाड्यावर

घातलेली) स्वारीची तोफ *f*, चालती तोफ *f*. Field'-work *n. any temporary fortifications thrown up by an army in the field* (सैन्यरक्षणासाठीं केलेली) तूर्ता-तूर्तीची तटबंदी *f*. To keep the F. *mili. to continue a campaign* लढाई चालू ठेवणें.

Fiend (fēnd) [M. E. *fend*, A. S. *fiond*, *feond* lit. 'a hating one,' an enemy, the enemy; Sk. पीय्, to hate (Fick.). Fiend शब्दाचा मूळ अर्थ शत्रु असा आहे, परंतु तो अर्थ आतां लुप्त झाला आहे.] *n. the arch-enemy of mankind, the devil* मनुष्यजातीचा बिलंदर शत्रु *m*, सैतान *n*. २ *an evil spirit generally, a demon, a devil, a diabolical being* सैतान *n*, पिशाच *n*, भूत *n*, वेताळ *m*, असुर *m*, राक्षस *m*. ३ *a person of superhuman wickedness* अतिशय दुष्ट मनुष्य *m*, सैतानी स्वभावाचा मनुष्य *m*. ४ *an implacable or malicious foe* सैतानासारखा -पिशाचासारखा शत्रु *m*, आतिदारुण -अतिक्रूर शत्रु *m*. ५ *a person or agency causing mischief or annoyance* नुकसान करणारा किंवा त्रास देणारा मनुष्य *m*, किंवा इतर साधन *n*. Fiend'ish *a. infernal, malignant, wicked* सैतानासारखा, अतिदारुण, अतिक्रूर &c. Fiend'ishness *n*. सैतानी स्वभाव *m*, सैतानपणा *m*, अतिदारुणता *f*, &c. Fiend'like *a*. सैतानासारखा, पिशाचासारखा.

Fierce (fērs) [O. Fr. *fers*, *fiers*, –L. *ferus*, wild, savage.] *a. furious, violent* भयंकर, चंड; as, "F. wind." २ *vehement in anger or cruelty, ferocious, savage* उग्र, चंड, जहाल, जालीम, जलाल, कट्टा, कडक, खंदा, दारुण, जाज्वल्य, प्रखर, राक्षसी, आसुरी. [SOME TERMS AND PHRASES FOR A FIERCE, FEROCIOUS MAN ARE यम, यमरूप, यमरूपी, यमस्वरूप, यमदूत, कालमूर्ति, कालपुरुष, कालस्वरूप, कालरूप, कालरूपी, कल्पान्तकाल, कृतान्त, काळ, कर्दनकाळ, कृतान्त, प्रलयकाळ, राक्षस, वडे राक्षस, आग्यावेताळ, रुद्रावतार, अकरावा रुद्र, जहरीमोहरा, आवसावरचा वाघ, तुफान, पंचानन, जिता संवध, दैत्यांशी.] ३ *excessively earnest, eager or ardent* अत्यंत उत्सुक, अत्यंत उत्कंठित, अतिकडक. Fierce'ly *adv*. Fierce'ness *n*. भयंकरपणा *m*, जालीमपणा *m*, उग्रता *f*, चंडता *f*. २ अत्युत्सुकता *f*.

Fiery (fīr'-i or fī'ėr-i) *a. consisting of, containing, or resembling fire* विस्तवासारखा, विस्तवाचा, अग्निमय, आगीचा, अग्नीचा, अग्निवत्, अग्नियुक्त. २ *vehement, ardent, impetuous* रागीट, उद्युक्त, तरतरीत. ३ *passionate, irritable* तापट *or* तापड, जहाल, जलाल, तलख, आग्या, उष्ण, खपती, तलखल्या, चंड, खंदा, आसुरी, जाज्वल्य. ४ *unrestrained, mettlesome, spirited* कह्यांत न राहणारा, पाणीदार, तापट. ५ *burning hot, parched, feverish* जळजळीत, जळणारा, करपलेला, ज्वरित. Fier'ily *adv*. Fier'iness *n*. अग्निता *f*, अग्निस्वभाव *m*, अग्निधर्म *m*. २ उष्णता *f*, जहाली *f*, तलखी *f*, तलखली *f*, तापट स्वभाव *m*, नाकावर राग *m*. ३ उष्णता *f*, जळजळीतपणा *m*.

Fife (fīf) [L. *pipare*, to chirp.] *n. mus. a small shrill pipe used chiefly to accompany the drum in military music* लष्करी बांसरी *f*, लष्करी पोंवा or पांवा *m* रणतुर *f*, रणवाजंत्र *n*. F. *v. i. to play on a fife* रणवाजंत्र वाजविणें. Fif'er *n. one who plays on a fife* रणवाजंत्री *m*, लष्करी बांसरी वाजविणारा.

Fifteen (fif'tēn) [A. S. *fiftyne* –*fif*, five, *tyn*, ten.] *a.* & *n*. पंधरा, पंचदश. Fif'teenth *a*. पंधरावा. F. *n. mus.* कोणत्याही स्वरापासून दोन सप्तकांच्या अंतरावरील अगर पंधरावा स्वर *m*. (*b*) कोणत्याही स्वरापासून पंधरावा स्वर दाखविणारा वाद्याचा पडदा *m*. (*c*) दोन सप्तकांचें अंतर *n*.

Fifth (fifth) [A. S. *fifta*.] *a*. पांचवा. F. *n*. पांचवा हिस्सा *m*, पंचमांश *m*. २ *mus*. साडेतीन स्वरांचें किंवा तेरा श्रुतींचें अंतर,— तेरा श्रुतींच्या अंतरावरील स्वर, कोणत्याही स्वराचा मुख्य संवादी स्वर किंवा पंचम. Fifth'ly *adv*.

Fiftieth (fif'ti-eth) [A. S. *fiftigotha*.] *a*. पन्नासावी.

Fifty (fif'ti) [A. S. *fiftig*—*fif*, five, *tig*, ten.] *a*. पन्नास. [F. ONE एकावन OR न्न. F. TWO बावन. F. THREE त्रेपन. F. FOUR चौपन. F. FIVE पंचावन. F. SIX छप्पन. F. SEVEN सत्तावन. F. EIGHT अठ्ठावन. F. NINE एकुणसाठ. AGGREGATE OF FIFTY पन्नासी. AGE OF FIFTY पन्नासी *f*, पन्नाशी *f*.]

Fig (fig) [Fr. *figue*, which, like A. S. *fic*, Ger. *feige*, is from L. *ficus*, a fig.] *n. bot. a fig tree* अंजिराचें झाड *n*. [INDIAN F. *ficus Indica* वड *m*, वट *n*. F. *glomerata* उंबर *m*, उंदुवर *m*, औदुंबर *m*- अश्वत्थ *m*. (THE FRUIT. उंबर). HOLY F. OR *F. religiosa* पिंपळ. *Ficus scabriuscula* बोरवाडा *m*, काळा उंबर *m*. FICUS BENJAMINA नांदरूख *f*. *Mass raised around the* F. *religiosa* पिंपळाचा पार *m*. DESCENDING SHOOT OF F. INDICA वडाची पारंबी *f*.] २ *the fruit of a fig tree* अंजीर *m*. ३ *the value of a fig, practically nothing; a fico* (used in scorn or contempt) कवडी *f* (*colloq.*), कसपट *n*, उंबर *m*. [A F. FOR YOU AND YOUR FATHER TOO तुला फें तुझ्या बापालाही फें.] F. *n.* (*colloq.*) *figure, dress, array* पोषाख *m*, थाटमाट *m*, भपका *m*. Fig-coloured *a*. अंजिरी, अंजिराच्या रंगाचा.

Fight (fīt) [A. S. *feohtan*; Ger. *fechten*; prob. connected with L. *pugnus*, the fist, Gr. *pux*, the clenched fist.] *v. i.* (followed by *with* or *against*) *to strive or contend for victory, with armies or in single combat; to contend in arms* लढणें, लढाई *f* -युद्ध *n*. करणें, (-ला) हाणून पाडण्याचा प्रयत्न करणें. २ *to act in opposition to anything, to struggle against, to make resistance* झगडणें, (-च्या) विरुद्ध धडपड करणें, सामना करणें, (-शीं) झुंजणें. [To F. SHY (of) *to keep out of reach* (-च्या) पासून दूर -लांब -अलग-रहाणें.] F. *v. t. to carry on, or wage, as a*

*conflict or battle; to sustain by fighting* (-शीं) झगडा चालविणें -करणें, (करितां -साठीं) झगडणें; as, "He had to F. his way through the world." २ *to contend with in battle, to war against* (शीं) लढणें; as, "They *fought* the enemy in two pitched battles." ३ *to cause to fight, to manage or manœuvre in a fight* झुंझविणें, (-ची) झोंबी *f* -टक्कर *f*. लावणें, लढविणें, डावपेंचानें लढविणें; as, "To F. cocks." [To FIGHT IT OUT *to bring to a decisive and conclusive result* शेवट *m* -अखेर *f* -सोक्षमोक्ष *m*. करणें, निकाल लावून घेणें -करून घेणें. ] F. *n. a battle, a contest in arms, a combat* लढाई *f*, लढणें *n*, युद्ध *n*, रण *n*, संग्राम *m*, संगर *n*, समर *m*, विग्रह *m*, शस्त्रव्यवहार *m*, झुंझ *f*. & *n*. [ ARDOUR FOR THE F. युद्धकंडू *m*. CLOSE F. हातघाईचें युद्ध *n*, घनचक्र *n*. Fair F. धर्मयुद्ध *n*. TUMULTUOUS AND FURIOUS F. तुमुल (*pop.*) तुंबळ *n*. ] २ *a struggle or contest of any kind* झुंज *n*. & *f*, झुंजणें *n*, मारामार *or* मारामारी *f*, हाणमार *or* हाणामारी *f*, कुटाकुटी *f*, झगडा *m*, कलह *m*, युद्ध *n*, भांडण *n*, धडपड *f*. [ F. FOR SPORT क्रीडायुद्ध *n*. F. (setting to fight) OF ANIMALS FOR A WAGER प्राणिद्यूत *n*. HEIGHT *or* HEAT OF THE F. ऐनलढाई *f*, ऐन मारामारी *f*, लढाईचा भर *m*. SHARP *or* BRISK FIGHT कट्टी लढाई *f*, कचाकची *f*. ] ३ (*colloq.*) *strength or disposition for fighting, pugnacity* दांडगाई *f*, लढवय्येपणा *m*. Fight'er *n*. योद्धा *m*, लढवय्या *m*. Fight'ing *a*. *fit for battle* युद्ध करण्यास योग्य -लढण्यास लायक, लढण्याच्या कामाचा, लढाऊ, सांग्रामिक (S.). २ *occupied in war, being the scene of a battle* लढण्याच्या कामीं लावलेला, (-वर) लढाई चालू असलेला, लढाईचा; as, "A fighting field." Fought *pa. t.* & *pa. p.*

Figment (fig'ment) [ L. *figmentum*, an invention –L. *fig*, base of *fingere*, to feign ( p. p. *fic-tus*, for *fig-tus* ) See Feign. ] *n. an invention, a fiction, a fabrication* खोटी गोष्ट *f*, निवळ कल्पना *f*, कल्पिलेली-रचलेली गोष्ट *f*, मानससृष्टि *f*, मिथ्या कथा *f*.

Figure (fig'ur) [ Fr. *figure* –L. *figura*, a thing made –L. *fingere* (base *fig*), to make, fashion, feign. ] *n. the form of anything, shape, outline, appearance* आकार *m*, आकृति *f*, रूप *n*, डौल *m*, घाट *m*, मुद्रा *f*. २ *the representation of any form, as by drawing, painting, carving &c.,* (*esp.*) *a representation of the human body* पुतळा *m*, प्रतिकृति *f*, मूर्ति *f*, प्रतिमा *f*, आकार *f*, छबी *f*, तसबीर *f*, चित्र *n*, बाहुला *m* -ली *f*-लें *n*; as, "A F. in bronze." ३ *a design wrought out in a fabric* कापडांत विणलेली नकशी *f*, बुटी *or* बुट्टी *f*, वेलबुट्टी *f*, वेलबूट *or* वेलबुट्टा *m*, बुटे *or* बूट *m. pl.*, फुल्या *f. pl.*, नकशी *f*, नकासकाम *n*, बिरवण *f*. ORNAMENTED WITH FIGURED WORK नकशीदार. TO MAKE FIGURED WORK नकासणें, नकासकाम करणें. TO ADORN WITH FIGURED WORK बिरविणें. TO COVER WITH FIGURES & IMAGES (A WALL, FLOOR, &c. चितारणें.)] ४ (*geom.*) *a diagram* (*made to represent a magnitude or the relation of two or more magnitudes, a surface or space inclosed on all sides superficial* or *solid*) आकृति *f*, घनाकृति *f*. ५ *the appearance or impression, made by the conduct or career of a person* (वर्तनानें पडणारी) छाप *f*, रंग *m*, ठसा *m*; as, "A sorry *figure*." [ TO CUT A FIGURE *or* TO CUT A GOOD FIGURE नांव करणें, छाप बस-विणें. TO CUT A BAD FIGURE फजीती पावणें -करून घेणें.] ६ *magnificence, splendour, show* भपका *m*, शोभा *f*, नकशा *m*, ख्याति *f*, दबदबा *m*, वैभव *n*, थाटमाट *m*. ७ *a character or symbol representing a number, a digit* अंक *m*, आंकडा *m*, (*pop.*) आंख *m*. संख्यादर्शक चिन्ह *n*. [ FIGURES *cyphering* हिशेब *or* हिशोब *m*. PLACE OF FIGURES अंकस्थल *n*.] ८ (*colloq.*) *value, as expressed in numbers; price* किंमत *f*, मूल्य *n*, आंकडा *m*. ९ *a person, thing or action, conceived of as analogous to another person, thing or action, of which it thus becomes a type or representative* प्रतिरूप *n*, प्रतिरूपक *n*, प्रतिबिंब *n*, दर्शकचिन्ह *n*. १० (*Rhet.*) *a mode of expressing abstract or immaterial ideas by words which suggest pictures or images from the physical world, pictorial language, trope;* (hence) *any deviation from the plainest form of statement* अलंकार *m*, आलंकारिक भाषा *f*, उपचार *m*, रूपक *n*. [ FIGURES & TROPES GENERALLY अर्थालंकार *m* (as distinguished from शब्दालंकार verbal ornaments). ११ (*logic*) *the form of a syllogism with respect to the relative position of the middle term* आकार *m*, अनुमानवाक्यप्रकार *m*. १२ (*dancing*) *any one of the several regular steps or movements made by a dancer* पादन्यास *m*, पदन्यास *m*, नाचाचीं पावलें *n. pl.* १३ *astrol. a horoscope* जन्मकुंडली *f*. F. *v. t. to represent by a figure, to shape* रूप -आकार -स्वरूप देणें, चित्र तयार करणें -काढणें, प्रतिमा तयार करणें. २ *to adorn with figures* निरनिराळ्या आकृतींनीं -चित्रांनीं भूषित करणें, शृंगारणें. ३ *to indicate by numerals* आंकडे काढून दाखविणें, अंकांनीं दर्शविणें. ४ *to compute* मोजणें, गणती *f* -गणना *f* करणें. ५ *to represent by a metaphor, to signify* रूपकानें -आलंकारिक भाषेनें दर्शविणें, सुचविणें. ६ *to prefigure, to foreshadow* भविष्य सुचविणें -करणें, आगाऊ जाणविणें. (*b*) *to embellish* शृंगारणें. F. *v. i. to make a figure, to be distinguished* नांवाजलें जाणें, प्रसिद्धीस -प्रख्यातीस -नांवास येणें. २ (*colloq.*) *to calculate, to contrive, to scheme* (-ची) तयारी -बेत करणें. Fig'urate *a. of a definite form or figure* विशिष्ट आकाराचा. Figurā'tion *n. the act of giving*

*figure or determinate form* विशिष्ट आकार देणें *n.* Fig'urative *a. represented by figure* आकृतीनें दाखविलेला. २ *used in a sense that is tropical, as a metaphor; not literal* (applied to words and expressions) औपचारिक, आलंकारिक, अन्योक्तीचा. ३ *abounding in figures of speech, flowery* अलंकारपूर्ण, अलंकारप्रचुर, पुष्पित. [F. LANGUAGE *or* SPEECH अलंकारिक भाषा *f.*] ४ *relating to the representation of form or figure by drawing, carving, etc.* प्रतिकृतिसंबंधीं, चित्राचा. Fig'uratively *adv.* Fig'urativeness *n.* Figure-caster *n.* ज्योतिषी *m.* [ Figure casting *n. the practice of astrology* ज्योतिष *n.* Fig'ured *a. adorned with figures* चित्रित. (*b*) *indicated or noted by figures* चिन्हांकित. Fig'urehead *n. the figure, statue or bust, on the prow of a ship* जहाजाच्या नाळीवरील बाहुलें *n.* २ *a person who allows his name to be used to give standing to enterprizes in which he has no responsible interest or duties; a nominal, but not real, head* नांवाचा धनी *m.* (एखाद्या कामास महत्व यावें म्हणून उगीच आपलें नांव त्या कामाशीं जोडून देणारा) नामधारी पुरस्कर्ता किंवा मालक -धनी *m.* Fig'urine *n. a very small figure, whether human or of an animal in terracotta or the like* टेराकोटा मातीचें लहानसें चित्र *n.* Fig'urist *n. one who uses or interprets figurative expressions* अलंकारशास्त्री, साहित्यशास्त्री *m.* Fig'urate numbers *n. any series of numbers beginning with unity, and so formed that if each be subtracted from the following, and the series so formed be treated in the same way, by a continuation of the process, equal differences will be obtained* संकलित संख्या *f* -श्रेणी *f.*

Filaceous (fil-ā'shus) [L. *filum*, a thread.] तंतुमय, सूत्रमय.

Filament (fil'-a-ment) [Fr. –L. *filum*, a thread.] *n. bot. a fibre esp. the thread-like part of the stamen supporting the anther* केसर *n*, तंतु *m*, केशर *m* or *n*, सूत्र *n*, सृणाल *m.* Filament'ary *a.* केसराचा, केसरासारखा. Filamen'tous *a.* केसराचा.

Filbert (fil'-bėrt) [Prob. from St. *Philibert*, whose day fell in the nutting season, Aug. २२ (*U. S.*).] *n. bot.* हॅझल जातीच्या वर्गांतील एका झाडाचें फळ *n.*

Filch (filch) [M. E. *felen*, to conceal.] *v. t. to steal or take privily, to pilfer commonly that which is of small value* चुरटी चोरी करणें, उपटणें, उचलणें (*colloq.*), चोरणें. Filch'er *n.* Filc'hingly *adv.*

File (fīl) [Fr. *file*, from L. *filum*, a thread.] *n. a line, row* रांग *f*, ओळ *f*, पंक्ति *f*, शेज *f*, पंगत *f*; as, "A F. of soldiers." २ *the line or wire or other contrivances by which papers are kept in order* (कागदपत्र एके ठिकाणीं लावून ठेवण्याची) तार *f*, अडकवणें *n*, फाईल *f*, फैल *f.* ३ *an orderly collection of papers* फाईल *f*, मिसल *f*, फेरिस्त *f.* ४ *a roll or list* यादी *f*; as, "A F. of all the gentry." F. *v. t. to set in order, to place on file, to insert in its proper place in an arranged body of papers* फैलावर or फैलीवर घालणें -लावणें -ठेवणें, जागच्या जागीं गोठवणें, फेरिस्ताला &c. लावणें. २ *to bring before a court or legislative body by presenting proper papers in a regular way* न्यायाधीशापुढें -पंचांपुढें कागदपत्र दाखल करणें. ३ *law. to note* (*on a* paper) *the fact and date of its reception in court* कोर्टांत दाखल केल्याची तारीख नमूद करणें, निशाणी नंबर घालून खटल्यांत दाखल करणें. F. *v. i. to march in a file or line* आडव्या रांगेनें चालणें.

File (fīl) [A. S. *feol.* Ger. *feile* allied to L. *polio*, to polish.] *n. a steel instrument, having cutting ridges or teeth, for smoothing metals, &c.* कानस *f.* २ *anything employed to smooth, polish or rasp, literally or figuratively* कानस (transferred use) *f*, कानसण्याचें हत्यार *n.* ३ (*slang*) *a shrewd or artful person* धूर्त किंवा लुच्चा माणूस *m.* F. *v. t. to rub smooth, or cut away with a file* कानसणें, कानसीनें घांसणें, (-ला) कानस मारणें. २ *to smooth or polish as with a file* कानसून गुळगुळीत करणें. File-cutter *n. a maker of files* कानसी करणारा *m.* File-fish *n. zool.* कानसमासा *m.* ज्याची पाठ कानसीसारखी असते व तिनें लांकूड घांसतां येतें. Fil'er *n. one who works with a file* कानसीनें साफ करणारा *m*, कानस मारणारा *m.* Fil'ing *n.* (*gen. pl.*) *a particle rubbed off by the act of filing* चुरा *m*, भुगा *m*, भुसा *m*, कीस *m*, कण *m.*

Filial (fil'-yal) [L. *filialis*,-*filius*, a son, *or filia*, a daughter.] *a.* (*a*) *pertaining to or becoming a son* पुत्राचा, पुत्रानुरूप, पुत्रयोग्य, पुत्राला शोभणारा, पुत्रीय, पुत्रधर्माचा. (*b*) *pertaining to or becoming a daughter* कन्येचा, लेकीचा, पुत्रिकाधर्माचा, पुत्रिकाधर्मक, कन्येला शोभणारा. (*c*) (*without reference to sex*) अपत्याचा, अपत्ययोग्य, अपत्यधर्माचा. [F. AFFECTION पितृभक्ति *f* (REFERRING TO FATHER); F. AFFECTION मातृस्नेह *m* (REFERRING TO MOTHER). F. DUTY पुत्रधर्म *m*, पुत्रिकाधर्म *m*, अपत्यधर्म *m.*] २ *bearing the relation of a child* पुत्राचें नातें असलेला, अपत्यसंबंधाचा. Fil'ially *adv.* पुत्रधर्मानुरूप, अपत्यधर्मानुरूप, अपत्यधर्मानें, अपत्यसंबंधानें. Filiā'tion *n.* पुत्रत्व *n*, पुत्राचें नातें *n.* २ *law. assignment of a bastard child to some one as its parent* अपत्यीकरण *n*, पुत्रीकरण *n.*

Filibuster, Fillibuster (fil'i-bus-tėr) [Span. *filibuster* a corruption of Dut. *vrijbuiter*, a freebooter.] *n. a free-booter* लुटारू *m*, पेंढारी *m.* २ चांचा *m.* F. *v. t. to act as a military free-booter* लुटारूपणा *m* -चांचेपणा *m.* करणें, पेंढारीपणा करणें. Fil'i-

busterism *n. the characteristics or practices of a filibuster* पेंढाऱ्यांची रीत *f* -रिवाज *m* -धंदा *m*.

**Fill** (fil) [A. S. *fyllan*, *fullian*-*ful*, full; Ger. *fullen*.] *v. t. to make full, to put into until all the space is occupied* भरणें, भरून देणें, भरणी *f* -भरण *n*. करणें *g. of o.* [To F. FULL पूर्ण भरणें, तोंडोतोंड भरणें, तुडुंब-तुंद-भरपूर-ओतप्रोत-कांठोकांठ-गळोगळ भरणें.] २ *to furnish an abundant supply to, to supply abundantly* भरपूर पुरवठा करणें, पूर्ण जागा व्यापणें, पूर्ण भरून राहणें. ३ *to fill or supply fully with food, to feed* (-ला) अन्न देणें, तृप्त (अन्नानें) करणें, (-ची) भूक भागविणें. ४ *to perform the duties of, to occupy, to hold* (-चें) काम करणें, (-ची) जागा घेणें -भरणें; as, "The president F.s the office of a magistrate." ५ *to supply with an incumbent* (-ची जागा) भरणें; as, "To F. a vacancy." ६ *naut. to press and dilate* (as a sail) शिडांत वारा भरणें, फुगविणें. ७. (*civil eng.*) *to make an embankment in or raise* (the level of a low place with earth or gravel) भरणी करणें, भरणी घालणें, भरणें, बुजवणें, भरणी घालून वर आणणें. F. *v. i. to become full* भरणें, भरून जाणें. २ *to have an abundant supply of* महापूर -भरगच्च भरणें, ओतप्रोत भरणें. ३ *to be satiated* (-चें) पूर्ण भरल्यामुळें मन विटणें, (-चा) वीट येणें. ४ *to fill a cup or glass for drinking* (पेला इ०) भरणें. F. *n. a full supply, as much as gives complete satisfaction* भरपूर पदार्थ *m*, समाधान किंवा तृप्ति होईल इतका पदार्थ *m*, पुरेसें -पोटभर अन्न *n*; as "You shall eat your F." २ *fullness, satisfaction* भरती *f*, तृप्ति *f*, पर्याप्ति *f*, समाधान *n*. [To THE F. समाधान होईपर्यंत, आतृप्ति, यथेच्छ. To EAT ONE'S F. पोटभर-पोट भरून जेवणें. To GET ONE'S F. OF तुंबडी भरणें *g. of s.* To TAKE ONE'S F. OF भरपूर भाग-भर घेणें *g. of o.*] Fill'ed *pa. p.* भरलेला, भरित, पूरित, पूर्ण. [FILLED FULL भरपूर. FILLED WITH भरलेला, आकुल (IN COMP.) AS, शोकाकुल (FILLED WITH SORROW); क्रोधाकुल (FILLED WITH ANGER).] Fill'er *n.* भरणारा *m*. Fill'ing *n.* भरणें *n*, भरणी *f*, भरण *f*, भरती *f*, पूरण *n*, परिपूरण *n*. [FILLING AND EMPTYING भरणें उपसणें *n*, भरउपस *f*.] २ *the woof in woven fabrics* बाणा *m*, वाणा *m*, पूरण *n*. To fill in *to insert* (मध्यें) भरणें. To fill out *to enlarge to the desired limit, to make complete* पुरें तयार करणें, ठरल्याप्रमाणें वाढवणें. To fill up *to make quite full* तुडुंब -ओतप्रोत भरणें. २ (-नें) भरून जाणें-होरणें-बुजून जाणें. To back & fill (*fig. & colloq.*) *to take opposite positions alternately, to assert & deny* पुढें जा मागें ये असें करणें, एकदां हो एकदां नाहीं असें म्हणणें.

**Fillet** (fil'et) [O. Fr. *filet*, thread -L. *filum*, a thread.] *n.* पट्टी *f*. [FRONT F. कपाळपट्टी *f*.] F. *v. t.* पट्टी बांधणें.

**Fillip** (fil'ip) [अनुकरणवाचक शब्द. Formed from the sound.] *v. t. to snap with the finger* टिचकी *f*. मारणें, टिचकणें, टिचणें, टिच *f*. मारणें, टिचकारणें. २ *to snap, to project quickly* भरभर सोडणें, उडवणें. F. *n. a jerk of the finger forced suddenly from the thumb* टिचकी *f*, टचका *m*. [WITH A. F. टिचकन्.] Fil'liped *pa. t. & pa. p.* Fil'liping *pr. p. & v. n.* F. *n. something serving to rouse or excite* चुटकी *f*, उद्बोधित -जागृत करणारी गोष्ट *f*.

**Filly** (fil'i) [Dim. of *foal*, formed by adding suffix *y* & modifying vowel.] *n. a young mare* शिंगी *f*, लहान घोडी *f*, तट्टाणी *f*. २ (*colloq.*) *a lively, spirited young girl* फुटाणी *f*, छबकडी *f*, चटकचांदणी *f*, मासी *f*, (*fig.*) तरुण व उत्साही मुलगी *f*.

**Film** (film) [A. S. *film*, skin, akin to *fylmen*, membrane.] *n. a thin skin, a pellicle* तवंग *m*, सारा *m*, सायरा *m*, कोशेटा *m*, *dim.* कोशेटी *f*. २ *a membranous covering causing opacity* सूक्ष्मत्वचा *f*, पातळ मऊ पडदा *m*, पटल *n*, पातळ पापुद्रा *m*, कोशेटा *m*, कोशेरा *m*. २ (hence) *any thin slight covering* पातळ पडदा *m*. [F. OVER THE EYE पटल *n*. (*pop.*) पडळ *n*, सारा *m*, कवडा *m*, पदर *m*.] ४ *a slender thread as that of a cobweb* (कोळयाच्या जाळयाचा इ०) अतिसूक्ष्मतंतु *m*, धागा *m*, दोरा *m*. F. *v. t. to cover with a thin skin or pellicle* तवंगानें -साऱ्यानें -सूक्ष्म पडद्यानें झांकणें. Film'iness *n.* पटलावृतता *f*, तवंगमयता *f*, सारा आलेली स्थिति *f*. २ तंतुमयता *f*. Film'y *a. composed of film or films* पटलावृत, सपटल, साऱ्याचा, तवंगाचा. २ तंतुमय.

**Filter** (fil'-tėr) [Fr. *filtre*, the same word as *feutre*, felt-Late L. *filtrum*, felt; felt being used for straining liquors.] *n. any porous substance, as cloth, paper, sand or charcoal, through which water or other liquid may be passed to cleanse it from impure matter* गाळक *m*. (कापड, कागद, रेती किंवा कोळसे वगैरे) पाणी स्वच्छ करणारा सच्छिद्र पदार्थ *m*. २ *a device containing such substance* पाणी गाळण्याचें यंत्र *n*, गाळणी *f*, टपका *m*, जलशोधक *m*, गलंतिका *f*, गळती *f*, फिल्टर *m*. ३ *a similar device for purifying air* हवा स्वच्छ करण्याचें यंत्र *n*. F. *v. t. to purify any liquid by a filter* (जलशोधकानें) स्वच्छ -निर्मळ -निर्दोष -शुद्ध करणें, गाळून शुद्ध करणें. F. *v. i. to fall through a filter, to percolate* गाळणींतून खालीं पडणें, झिरपणें, झिरपत जाणें. Filter-paper *n. a porous unsized paper for filtering* गाळणकागद *m*. Fil'trate (fil'trat) *v. t. to filter or percolate* गाळणींतून गाळणें. Filtrā'tion *n.* गाळण्याची क्रिया *f* -पद्धति *f*.

**Filth** (filth) [A. S. *fyldh* -*ful*, foul. See Foul.] *n. foul matter, anything that defiles* घाण *f*, मल *m*, *esp.* मळ *m*, खळमळ *m*, चिखल *m*, कल्मष *n*, किल्बिष *n*, (*pop.*) खस्त *f*. २ *corruption, pollution* घाण *f* (*fig.*)

चिखल *m* (*fig.*), पंक *m* (*fig.*), कर्दम *m* (*fig.*), भ्रष्टता *f*, अपवित्रता *f*, भ्रष्टाकार *m*, मलिनता *f*. Filth'ily *adv.* मळकेपणानें, घाणेरडेपणानें, भ्रष्टतेनें. Filth'iness *n.* घाणेरडेपणा *m*, ओंगळपणा *m*, भ्रष्टता *f*. Filth'y *a. nasty, dirty, foul, impure* घाणेरडा, मळका, मळकट, मलीन, गलिच्छ, घामट. २ भ्रष्ट, अपवित्र, अशुद्ध. ३ कुत्सित, निंद्य, गर्ह्य, दूषणीय.

Filtrate See Filter.

Fin (fin) [ A. S. *fin*; L. *pinna*, a fin. ] *n. the organ by which a fish balances itself and swims* माशाचा पर *m*, माशाचा पंख *m*, मत्स्यपक्ष *m*. २ *a finlike organ* माशाच्या पंखासारखा अवयव *m*. (a) (*slang*) *the hand* हात *m*. (b) *a blade of white bone* व्हेल माशाच्या हाडाचें पातें *n*. (c) *the thin sheet of a metal* धातूचा पातळ पत्रा *m*, वरख *m*. (d) *a feather* पीस *n*. ३ *a finlike appendage* (as to submarine boats) आगबोटीचा पंखा *m*. ४ *a mark or ridge left on a casting at the junction of the parts of a mold* ओतकामाच्या दोन भागांमधील खूण *f*. F. *to carve or cut up* कापणें. Finned *pa. t. & pa. p.*

Final (fī'nal) [ O. Fr. *final* –L. *finalis* –L. *finis*, end. ] *a. last, terminating, ultimate* शेवटचा, अखेरचा, अंत्य, शेवटील, अंतिम, चरम. २ *conclusive* अखेरचा, शेवटचा, निर्णायक, निश्चायक; as, "F. judgment." ३ *respecting an end or object to be gained* अंतिमहेतुसंबंधीं, अंतिमहेतुदर्शक, उद्देशदर्शक. Final'ity *n. the state of being final* शेवटली अवस्था *f*, चरमत्व *n*, शेवटची -अखेरची पायरी *f*. २ *a final or conclusive arrangement, a settlement* शेवटची व्यवस्था *f*, अखेर निकाल *m*. ३ *the relation of end or purpose to its means* उद्देशसंबंध *m*, हेतुसंबंध *m. pl.* Finalities. Fi'nally *adv.* शेवटीं, अंतीं, अखेर. २ *wholly, completely* पूर्णपणें, अगदीं.

Finale (fenä'lā) [ It. *finale* final—L. *finis*, end.] *n. end* अन्त *m*, उद्यापन *n*. २ *the last passage in a piece of music* चिजेचा शेवटचा भाग *m*, गीतान्त्यांश *m*, प्रबन्धान्त *m*. ३ *the concluding piece in a concert* ( मजलसींत किंवा जलशांत ) अखेरची चीज *f*, अन्तिमगीत *n*.

Finance (finans') [ O. Fr. *finance*— Late L. *finis*, end *i. e.* final arrangement. पंधराव्या शतकापासून तों सतराव्या शतकापर्यंत finance शब्दाचे पुढील अर्थ होते:— (१) शेवट. (२) कर्ज फेडणें किंवा सावकाराचे नक्की हिशेब करणें. (३) बंदिवासांतून सुक्त होण्याकरितां दिलेली खंडणी. (४) निरनिराळ्या जिनसांचा पुरवठा, पैशांची पुंजी. (५) व्याजानें कर्ज काढणें. (६) कर, राजाचा किंवा संस्थानाचा महसूल किंवा वसूल. हे साही अर्थ सध्यां लुप्त झाले आहेत. ] *gen. pl. the pecuniary resources* ( of a sovereign or state or a company or an individual ) ( एखाद्या संस्थानाचा किंवा राजाचा किंवा कंपनीचा &c. खर्च भागविण्याचीं ) उत्पन्नाचीं साधनें *n. pl.*, आयसाधनें *n. pl.*, उत्पन्न *n*, जमाबंदीची किंवा वसुलाचीं साधनें *n. pl.*, जमामहसूल *m*, जमावसूल *m*, जमाबंदी *f*. २ *funds* उत्पन्न *n*, द्रव्यसामग्री *f*, निधि *m*, धनदौलत *f*. ३ *available money, resources* उत्पन्नाचीं सर्व शक्य साधनें *n. pl.* ४ *the management of money esp. public money, the science which concerns itself with levy and application of revenue in a state* आयशास्त्र, ( एखाद्या संस्थानांतील ) वसुलाच्या बाबींची योजना व व्यवस्था *f*, संस्थानच्या द्रव्यसाधनांची व्यवस्था लावण्याचें शास्त्र *n*, राजकरव्यवस्थाशास्त्र *n*, करव्यवस्थाशास्त्र *n*, करशास्त्र *n*, जमावसूलशास्त्र *n*. Finan'cial *a.* वसुलाचा. [ F. YEAR जमामहसुलाचें वर्ष *n*. ] वसूलप्रकरणाचा, द्रव्यसाधनाविषयीं. २ सांपत्तिक, ऐपतीसंबंधीं. ३ राज्यकरव्यवस्थेसंबंधीं, राजकरशास्त्रासंबंधीं. Finan'cialist *n.* Same as Financier. Finan'cially *adv.* जमावसुलाच्या बाबतींत, जमावसुलाच्या दृष्टीनें, सांपत्तिक दृष्टीनें, उत्पन्नाच्या-द्रव्याच्या दृष्टीनें. Financier' *n. one who is concerned with finance, one who is skilled in levying and managing public money* जमामहसुलाचा मुख्य अधिकारी *m*, जमावसूलखात्याचा-जमाबंदीवरील मुख्य अधिकारी *m*. जमावसुलाचे कामाची उत्तम व्यवस्था करणारा *m*. २ *capitalist concerned in financial operations* पैसे पुरवणारा, भांडवल पुरवणारा, भांडवलवाला *m*.

*N. B.*—In the 13th and 14th centuries the words *finare*, *finacio* and *financia* were employed, principally by writers in France, to denote those bargains by which the indefinite liabilities of ancient tenures were commuted for fixed sums payable to the immediate lord of the tenant. At a later time in England *finance* became more synonymous with the product of taxation and the finances of a country denoted the ways and means by which the expenditures of government were met.

Find (fīnd) [ A. S. *findan*; Ger. *finden.* ] *v. t. to meet with or light upon accidentally* (अवचित) भेटणें, मिळणें, सांपडणें, भेटणें, आढळणें ( all with inverse construction). २ *to learn by experience or trial, to perceive, to experience* अनुभव येणें, प्रत्यय येणें, दाखला येणें, अनुभवानें समजणें, जाणणें. ३ (*a*) *to come upon by seeking* शोधून पत्ता लावणें; as, "To F. bottom." (*b*) मापानें-अभ्यासानें-प्रयोगानें शोधून काढणें. ४ *to provide for, to furnish* देणें, पुरवठा करणें; as, "To F. food for workman." ५ *to arrive at as a conclusion* सिद्धांत -ठराव करणें-ठरविणें, स्थापित करणें, निर्णय *m* -निवाडा *m*. करणें; as, "To F. verdict." [To F. OUT ( A THIEF ) हुडकून काढणें. २ ( A SECRET )

शोधून काढणें, उजेडास आणणें. ३ ( AN ENIGMA ) सोडविणें, उकलणें. ४ ( GOD ) समजून घेणें, जाणणें, कळवून घेणें. TO BE FOUND OUT *to be brought to light* उमगणें, शोध *m* -ठिकाणा *m.* लागणें *g. of s.*] F. *v. i.* (*law.*) *to determine an issue or fact and declare such a determination to the court* (मुद्दयांचा) निकाल ठरविणें; (पुराव्यावरून वादग्रस्त गोष्टीचा) निवाडा करणें. F. *n. anything found, a discovery of anything valuable,* as *a deposit of objects of pre-historic interest* अपूर्व -अमूल्य शोध *m.* Find'able *a.* शोधतां येण्याजोगा. Find'er *n.* शोधणारा *m.* २ *astron.* उपदुर्बीण *f,* उपदूरदर्शक *m,* सहकारी दुर्बीण *f,* शोधनिका *f.* Find'ing *n.* सांपडलेली -मिळालेली -दिलेली वस्तु *f.* २ *pl. that which a journeyman or an artisan finds or provides for himself* हत्यारांचा संच *m,* हत्यारेंपात्यारें *n. pl.* ३ *support, maintenance, provision* आधार *m,* आश्रय *m.* ४ *the result of a judicial examination or inquiry, verdict* ठराव *m,* (पुराव्यावरून वादग्रस्त गोष्टींचा) निर्णय *m,* निवाडा *m;* as, "The F. of a jury." A REVISED F. *or* DECISION परतफैसल्ला *m,* पुनर्निर्णय *m.*

Fine ( fīn ) [ Fr. *fin* –L. L. *finus,* fine –L. *finire,* to finish. The earliest sense of 'fine' is accomplished, perfect, brought to perfection, refined, (hence) free from impurity पूर्ण केलेला, पुरा केलेला, पूर्णतेला नेलेला, शुद्ध केलेला, निर्दोष. ] *a. finished, refined* सभ्य (?), शिष्ट (?). २ *excellent, beautiful, elegant, worthy of admiration, accomplished* उत्कृष्ट, उत्तम, सुंदर, शोभन, सुभग, सरस, विमल, निर्मल, चांगला, बेष ( *provin.* ), खासा, बेपखासा, भला, खुबीदार, मजेदार, नगीना ( R. ), नामी, फरमाशी, उमदा, उदार ( S. ), चोख (*provin.*), चोखट (*provin.*), चोखा, चखोट ( *provin.* ), शेलका, झुंद, झुंदडा, गुलजार, चांग ( *obs.* ). ३ *aiming at show or effect, loaded with ornament, over-dressed or over-decorated, showy* छानीचा, छानदार, अकडीचा, बभूक, डौलदार, शानदार, ढबदार, ठळक, घवघवीत, घसघशीत. ४ ( as applied to man ) *splendid, dashing, gorgeous, gaudy* छानीचा, छानदार, देखणा, दिखाऊ, घवघवीत, घळघळीत, ढुमदार, ढुमीचा, ऐटबाज, छेलछबीला, रंगेल, नटवा, सुभावणा, शोभवणा, मवूक, थाटाचा, थाटमाटाचा, मिरवणारा. [ FINE & SHOWY BUT WORTHLESS पोशाकी, पोशाखी. ] ५ *nice, delicate, exquisite* नाजुक, कोमल, मृदु, बारीक, सूक्ष्म, बारीक -तलम सुताचा, बारीकसुती, तलमसुती, बारकस. ६ *not coarse, subtle, tenuous* बारीक, नाजुक, सूक्ष्म, तनु, बारकस, तलम. ७ *slender, filmy* बारीक, तलम, बारकस; as, "F. thread." ८ *dexterous* खुबीदार. ९ *thin, keen* तीक्ष्ण, बारीक, तिखट; as, "F. edge." १० *having such a proportion of pure metal in its composition* (असुक नंबरी) ठाम, खरोखर, शुद्ध; as, "G. hundred touches *fine*" शंभर नंबरी ठाम. ११ (used ironically) छान, चांगलें ( in the sense of वाईट ). F. *v. t. to make fine, to refine* शुद्ध करणें; as, "To F. gold." २ *to make finer* (as in bulk, texture, &c.) जास्त तलम किंवा नाजुक करणें. To F. the soil (मशागत करून) जमीन सुधारणें. To Fine-draw बेमालुम रफू करणें. Fine-eyed *a.* सुंदर डोळ्यांचा. Fine-looking *a.* देखणा, दर्शनीय. Fine'ly *adv.* नटून, थटून, खूब छानीनें -डौलानें, ढुमीनें. Fine'ness *n.* बारकाई *f,* बारिकपणा *m,* तलमाई *f.* २ बारकाई *f,* बारिकपणा *m,* बारकावा *m,* नाजकाई *f,* नाजुकपणा *m,* सूक्ष्मता *f.* ३ छान *f,* शान *f,* छानदारी *f,* ढब *f,* ढबदारी *f,* घवघवीतपणा *m.* ४ छान *f,* छानदारी *f,* ढूम *f,* ढुमदारी *f,* झळक *f.* ५ सुंदरपणा *m,* सौंदर्य *n,* सरसपणा *m,* उमदेपणा *m.* ६ बारीकपणा *m,* बारकाई *f,* सूक्ष्मता *f.* Finery *n. show, splendour* भपका *m,* आडम्बर *n,* बाह्य शोभा *f,* छानदारी *f,* ढुमदारी *f.* २ *fine clothes* भपक्याचा पोशाख *m,* दरबारी पोशाख ( *colloq.* ) *m.* Fi'ning *v. n. the process of fining or refining* शुद्ध करण्याची रीत *f* -पद्धति *f,* शोधनपद्धति *f.* २ *that which is used to refine* शोधक द्रव्य *n,* शुद्ध करणारा पदार्थ *m.* Fining pot *n. a vessel in which metals are refined* धातु शुद्ध करण्याचें भांडें *n-* (generally) मडकें *n.*

Fine ( fīn ) [ Fr. *fine* –L *finitus,* finished, –*finis,* an end. A fine was originally a sum of money paid at the *end,* so as to make an *end* of a transaction, suit, or prosecution; mulct, penalty. ] *n.* (*obs.*) ( *Shakes.* ) *end* शेवट *m.* २ *a sum of money imposed as a punishment* दंड *m,* गुन्हेगारी *f,* धनदंड *m,* फुरई *f,* दंडफुरई *f.* [ F. AND FORFEITS ( *compreh.* ) खंडदंड *m,* खंडगुन्हेगारी *f.* F. TO BE PAID TO A KING राजदंड *m.* F. TO BE PAID TO A BRAHMIN ब्रह्मदंड *m.* VEXATIOUS *or* UNJUST F. भुरदंड *m.* ] F. *v. t. to punish by fine, to mulct* दंड करणें, दंडणें. Fine'less *a.* ( *obs.* ) ( *Shakes.* ) *endless* अनंत. In fine सारांश, शेवटीं. Fin'ing *v. n.* दंड करणें *n.*

Finesse ( fi–n'es ) [ Fr. ] *n. artifice, subtlety of contrivance to gain a point* डावपेंच *m,* पेंचपाच *m,* पाचपेंच *m,* हिल्लाहरकत *f.*

Finger ( fin'gėr ) [A. S. *finger,* perhaps akin to root of Fang.] *n. one of the five extreme parts of the hand* बोट *n,* अंगुली *f,* (*pop.*) अंगुळी *f,* करपल्लव *m.* Five [F. in, *part* or *concern in* आंग *n,* संबंध *m.* Five fingers (collect.) अंगुलीपंचक *n,* पांच बोटें *n. pl.* Fore–F. आंगठ्याजवळचें बोट *n,* तर्जनी *f,* प्रदेशिनी *f.* Middle–F. मधलें बोट *n,* मध्यमा *f,* कार्णिका *f.* Ring–F. or third finger आंगठीचें-करांगळीजवळचें बोट *n,* पवित्रक घालण्याचें बोट *n.* Little F. आंगठी *f,* करंगळी *f.* करांगुली *f.* Space between the fingers गेचक *n,* बेचक *n.* Finger-language करपल्लवी भाषा *f,* करपल्लवी *f,* बोटांच्या खुणांची भाषा *f.* That is at one's fingers' ends (*lit.*) बोटांच्या

टोंकावर असलेला; *cf.* तोंडपाठ, मुखपाठ, हातखडा. To get a F. in बोट *n.* शिरकणें, चंचुप्रवेश करणें. To point out with the finger बोटानें दाखविणें, अंगुलि -निर्देश करणें. Finger-board *n.* तंतुवाद्य वाजवितांना दांडीच्या किंवा तबल्याच्या ज्या भागावर बोटें ठेवितात तो भाग *m*, अंगुलिफलक *m.* Finger-post *n.* बोटाच्या खुणेचा खांब *m.*] २ *anything that does the work of a finger* बोट *n.* (*fig.*) (बोटासारखा घड्याळाचा) कांटा *m* (वगैरे). ३ *the breadth of a finger* बोट *n*, अंगुळ *n*, बोटाची रुंदी *f*, बोटाची लांबी *f.* [To THE EXTENT OF A FINGER बोटभर.] ४ *skill in the use of the fingers* (as) in playing upon a musical instrument) वाद्य वाजवितांना करावयाची बोटाची चलाखी *f*, अंगुलिकौशल्य *n*; as, "She has a good F." F. *v. t. to touch with the fingers, to handle* बोट *n.* लावणें, बोटळणें, बोटाळणें. २ *to toy with* (बोटानें) -शीं खेळणें. ३ *to perform on an instrument of music* बोटांनीं वाद्य वाजविणें, अंगुलिप्रयोग करणें. ४ *to mark the notes of* (in place of music) *so as to guide the fingers* (कोणत्या बोटांनीं कोणते स्वर वाजवावे याविषयीं) गायनलिपींत चिन्हें करणें. ५ *to take thievishly, to pilfer* चापसणें, दपटणें. ६ *to execute any delicate work* (बोटानें) नाजुक नकसकाम करणें. F. *v. i. to use the fingers in playing on an instrument* (वाद्य वाजवितांना) बोटांचा प्रयोग करणें, अंगुलिकर्म करणें. Fin'gered *a.* बोटें असलेला, बोटांचा, सांगुलिक, बोट्या (in comp. as, एकबोट्या, दुबोट्या &c.). [SIX FINGERED सांगळ्या, अधिकांगुल.] २ *having leaflets like fingers* बोटासारखीं पानें असलेला, अंगुल्याकारपर्णी. ३ *marked with figures designating which fingers should be used* गायनलिपीच्या चिन्हांनीं निर्देश केलेला, गायनलिपिनिर्दिष्ट. Fin'gerer *n.* बोटाळणारा *m.* २ चापसणारा, दपटणारा. Fin'gering *v. n.* बोटाळणें *n.* २ वाद्य वाजविणें *n*, अंगुलिप्रयोग *m.* ३ गायनलिपींत चिन्हें मांडणें *n*, चिन्हांकन *n.* ४ (बोटांचें) नाजुक नकसकाम *n*, Fin'gerless *a.* निबोट्या, अंगुलिहीन.

Finical (fin'-ikal) [From Fine *a.*] *a. affectedly fine, precise in trifles, over-nice, foppish* चोखंदळ, टापटिप्या, ठाकठिक्या, चापचोप्या, चाकचोप्या. २ (thing) विशेष चोखंदळपणाचा, विशेष ठाकठिकीचा. Finical'ity, Fin'icalness *n.* चोखंदळपणा *m*, ठाकठिकेपणा *m.* Fin'ically *adv.*

Finis (fīnis) [L.] *n. the end, conclusion* (*often placed at the end of a book*) शेवट *m*, समाप्ति *f*, इतिश्री *f.*

Finish (fin'ish) [M. E. *finischen*, –O. Fr. *finiss*, base of pres. pa. of *finir*, to finish –L. *finire* –L. *finis*, end.] *v. t. to perfect, to accomplish* पुरता -पूर्ण करणें, तडीस नेणें, शेवटास -सिद्धीस नेणें. २ *to arrive at the end of, to end, to bring to an end* संपवणें, सरवणें, फडशा *m.* करणें *g. of o.* ३ *to terminate, to conclude* संपवणें, उलगडणें, आटोपणें. ४ *to give the last touch to, to polish, to perfect* पूर्ण तयार करणें, ओजवणें, सुधारणें, ओज *f.* करणें *g. of o.*, सफाई *f* -झिलाई *f* -ओप *f.* आणणें, पारिष्कार *m* -संस्कार *m.* करणें *g. of o.* ५ घांसणें, घांसपूस *f.* करणें, नेपाळणें. F. *v. i. to come to an end* संपणें, शेवट होणें, समाप्त होणें. २ (R.) *to end, to die* मरणें. F. *n. that which finishes or puts an end to* शेवटचा हात *m*, काम संपवणारा हात *m.* २ *the labour required to give final completion* शेवटचा हात *m.* ३ *the last polish given* सफाई *f*, ओज *f*, ओप *f*, झिलाई *f.* ४ *the result of completed labour, completion* (oppo. to *start* or *beginning*) शेवट *m*, तड *f*, निकाल *m*, अखेर *f*, समाप्ति *f.* Finish'ing *n.* See the several meanings of the verb Finish. २ *that which completes or gives a finishing appearance to any kind of work* (कोणतेंहि काम किंवा कोणतीहि वस्तु बाजारांत नेण्याकरितां दिलेला) शेवटचा संस्कार *m* -हात *m.* ३ (*in building & carpentry*) शेवटचें नकसकाम *n.*. ४ (*in book-binding*) पुस्तकाच्या पुठ्यावर नकशी काढणें व अक्षरें खोदणें *n.* Finishing house *n.* (एखादें यंत्र किंवा वस्तु बाजारांत पाठविण्यापूर्वीं तिला) शेवटचा संस्कार किंवा हात देण्याचें घर *n.* Fin'ished *pa. p.* संपविलेला. २ ओज दिलेला, &c. ३ पूर्ण, पुरा. Fin'isher *n.* संपविणारा, पूर्ण -पुरा करणारा. २ (पुस्तकें बांधल्यावर त्यांना) वेलबुटी व मुलामा चढविणारा, शेवटचा हात देणारा, शेवटचा संस्कार देणारा (मनुष्य किंवा यंत्र).

Finite (fī'nīt) [L. *finitus*, pa.p. of *finire*, to end.] *a. having an end or limit, subject to limitations or conditions* (as opp. to *infinite*) समर्याद, परिमित, सावधिक, ससीम, अंतवान्, (*pop.*) अंतवंत, सांत, आद्यंतवान्, अविच्छिन्न, मर्यादित. Fi'nitely *adv.* Fi'niteness *n.* समर्यादता *f*, सावधित्व *n*, ससीमता *f*, परिमितता *f.* Fin'itude *n.* Same as Finiteness.

Fir (fėr) [A. S. *furh*; cf. Ger. *fohre.*] *n. the name of several species of cone-bearing resinous trees, valuable for their timber* देवदाराच्या जातीचें लांकूड *n.* Indian F. देवदारु *m.* (*pop.*) देवदार *m.*

Fire (fīr) [A. S. *fyr*; Ger. *feuer*; Gr. *pyr*; allied to Sk. पावक, pure, (also) fire.] *n. the heat and light caused by burning* आग *f*, अग्नि *m*, विस्तव *m*, विस्तू *m*, अनल *m.* [F. OF LUST कामानल *m.* F. OF HUNGER क्षुधानल *m.* F. OF ANGER क्रोधानल *m.* SLOW F. मंदाग्नि *m.* FALL OF METEOROUS F. अग्निपात *m*, दिव्य उत्पात *m.* F. FABLED TO BE IN THE OCEAN वडवाग्नि *m*, वडवानल *m.* FLINT, STEEL, &C. FOR STRIKING F. चकमक *f.* ROARING F. *or* GLAZING F. आगीचा कल्लोल-(ळ) *m*, भडका *m*, भडाका *m*, लोळ *m*, धोकाळ *m*, धोदराट *m*, धगाटा *m.* SACRED *or* SACRIFICIAL F. हुतवह *m*, होमाग्नि *m*, गृह्याग्नि *m.* HOLE, ENCLOSED SPACE, *or* VESSEL FOR PRE-

SERVING IT अग्निकुंड *n*, कुंड *n*, होमशाला *f*, होमकुंड *n*. MAINTAINER OF HOLY F. अग्निहोत्री. SHEET OF F. आगीचा धोत *m*, -लोळ *m* -गलूल *m*? WIDOWER'S SACRED F. विधुराग्नि *m*. TO BE ON FIRE (-ला) आग *f*. लागणें, जळणें. TO EXPOSE TO THE ACTION OF F. (MEDICAL COMPOUNDS) अग्निपुट *n* -आंच *f*. देणें. TO PLACE OVER A SLOW F. मवागीं टाकणें. TO SET ON F. आग *f*. लावणें, पेटवणें, शिलकावणें OR शिलगावणें. TO TAKE F. TO CATCH F. पेट *m*- चेत *f*. घेणें, प्रदीप्त होणें, शिलकणें, शिलगणें.] २ *fuel in a state of combustion* आगटी *f*, आकटी *f*, आगटें *n*, आकटें *n*, शेकोटी *f*, शेकाटी *f*, धगटी *f*, धकटी *f*, धकटें *n*, धगटें *n*, धगें *n*, परसा *m*. ३ *the burning of a house or town* आग *f*. ४ *anything which destroys or affects like fire* आग *f*, जाळणारा पदार्थ *m*. ५ *ardour of passion, excessive warmth, consuming violence of temper* अनल *m*, अग्नि *m* (as, कामानल, क्रोधाग्नि). ६ *liveliness of imagination or fancy, intellectual and moral enthusiasm* प्रतिभानल *m*, बुद्धीचें आणि नीतीचें तेज *n* -आग *f*. ७ *splendour, brilliancy, hence a star* (*a*) चकाकी *f*. (*b*) तारा *m*. ८ *torture by burning* आगीची यातना *f*, जळजळ *f*, आग *f*. ९ *severe trial or affliction* अतिकडक कसोटी *f*, अतितीव्र यातना *f*. १० *the discharge of fire-arms, firing* गोळीमार *m*, मारा *m*, मार *m*. [BLUE F., RED F., GREEN F. निळ्या -तांबड्या -हिरव्या ज्योती देणारीं मिश्रणें *n. pl.*, दारूकामांत निरनिराळे रंग दिसावे म्हणून केलेलीं मिश्रणें *n. pl.*, जांवळी -तांबडी -हिरवी दारू *f*; आपल्याकडे अशा मिश्रणांच्या चंद्रज्योती किंवा फुलवाज्या करितात.] Fire-alarm *n*. (*a*) आग लागल्याची खबर *f* -इशारा *m*. (*b*) आगीचा इशारा देण्याचें यंत्र *n*. Fire-annihilator *n*. (कार्बोनिक आसिड) कर्बिकाम्ल वायू वगैरे अदाह्य वायूंच्या योगानें आग विझविण्याचें यंत्र *n* -साधन *n*, अग्निशत्रु *m*. Fire-balloon *n*. अग्निविमान *n*. Fire-bar *n*. चुलींतील जाळी *f* -सळई *f*. Fire-basket *n*. (हातांतून घेऊन जातां येणारी) शेगडी *f*. Fire-blast *n*. झाडांवरचा एक प्रकारचा रोग *m*, झाडांवर पडणारी आग *f*. ह्याच्या योगानें झाडें जळल्यासारखीं दिसतात. Fire-box *n*. यंत्रांतील विस्तव पेटविण्याचें कुंड *n*, अग्निकुंड *n*, आगीची भट्टी *f*. Fire-brigade *n*. आगबंबवाल्यांची टोळी *f*, आग विझवणारे लोक *m. pl.* Fire-bug *n*. आगलाव्या (*lit.*), दुष्टाव्यानें किंवा वेडासुळें आगी लावणारा -घालणारा. Fire-company *n*. See Fire brigade. Fire-drill *n*. (*a*) आग विझविण्याची कवाईत *f* -सराव *m* -अभ्यास *m*. (*b*) अरणिमंथा *m*. Fire-eater (*a*) अग्निभक्षक जादूगार *m*. (*b*) (*colloq.*) सुद्दाम तंटे उपस्थित करणारा, आगलाव्या (*fig.*), कुरापत्या, उपद्व्यापी. Fire-engine *n*. आग विझविण्याचें इंजन *n*, आगीचा बंब *m*. Fire-escape *n*. इमारतीस आग लागली असतां तींतून बाहेर पडतां यावें म्हणून केलेली योजना *f*. Fire-gilding *n*. (सोनें व पारा ह्यांच्या मिश्रणाच्या) मुलाम्याचा एक प्रकार *m*. ह्यांत अगोदर दागिन्यावर सोनें व पारा ह्यांचें मिश्रण चढवितात व मग उष्णतेनें पारा तेवढा उडवून टाकतात. सोनेरी मुलामा *m* (?), आंचीनें मुलामा करणें *n*. Fire insurance *n*. आगीचा विमा *m*. Fire-irons *n*. भट्टीचीं हत्यारें *n. pl.* (चिमटा, इ०). Fire-main *n*. आगीचा नळ *m*. Fire-office *n*. आगीचा विमा उतरण्याची कचेरी *f* -हपीस *n*. Fire-opal *n*. अग्निपुलक *m*, विमल... *m*. Fire-ordeal *n*. अग्निदिव्य *n*. Fire-policy *n*. आगीच्या विम्याचा कागद *m*. Fire-ship *n*. शत्रूकडील गलबतांस आग लावून देण्याचें (ज्वालाग्राही पदार्थांनी भरलेलें) गलबत *n*. Fire-shovel *n*. विस्तव उसपण्याचा झारा *m*. Fire-water *n*. जलालदारू *f*, आगपाणी *n*. Fire-worship *n*. अग्निपूजा *f*. Fire-worshipper *n*. अग्निपूजक *m*, (*speci.*) पारशी *m*. [ON FIRE जळणारा, पे... णारा. २ (HENCE) अत्युत्सुक. RUNNING FIRE दारूगोळ्याच... सारखा मारा *m*. ST. ANTHONY'S FIRE धांवरें *n*, अग्निवि... *m*. TO SET ON FIRE आग लावणें, जाळणें. TO TAKE FIRE जळणें, आग -पेट घेणें. २ रागावणें. ३ भडकणें.] F. *v. t. to se... on fire* पेटवणें, आग लावणें, जाळणें. २ *to bake* भाजणें, भाजून काढणें. ३ *to irritate, to inflame* (as th... passions) भडका उडवून देणें, चिडविणें, चीड आणणें. ४ *to animate* जोर -जोम आणणें-उत्पन्न करणें. ५ *to fe... the fire of* सर्पण-जळण घालणें. ६ (*Shakes.*) *to illuminate* प्रकाशित करणें, (-वर) प्रकाश पाडणें. ७ *to ca... to explode* उडवणें. ८ (*obs.*) (*Shakes.*) *to drive by fire*. ९ (*farr.*) *to cauterize* डागणें, डावणें, चुरका-चोरा देणें. F. *v. i. to take fire* आग -पेट घेणें, जळणें, पेटणें. २ *to be irritated* तापणें, रागावणें, चिडणें. ३ *to discharge artillery* दारूगोळा सोडणें, दारूगोळ्याचा मारा करणें, बार सोडणें. Fire'-arm *n*. अग्न्यस्त्र *n*. Fire'ball *n*. अग्निगोलक *m*. २ उल्का *f*. Fire'beetle *n*. ... काजवा (?) *m*. Fire'board *n*. भट्टीवरील झांकण... Fire'brand *n*. *a piece of burning wood* कोलती... कोलीत *n*, अंगार *m*, विस्तव *m*, अग्निकाष्ठ *n*, ज... लांकूड *n*. [F. IN THE HAND OF A MADMAN पिशाच्या... हातीं कोलीत.] २ *one who inflames factions, or ca... contention & mischief; an incendiary* आग *f* (... विस्तव *m* (*fig.*), आगलाव्या, चूडलाव्या, आगघा... कज्जेदलाल *m*, कळीचा नारद *m*. Fire'cracker *n*. फ... *m*, फटाकडा *m*, (दिवाळीचें) दारूसामान *n*. Fire'... *n*. *a support for wood in a fireplace* आ... भट्टींत लांकडें ठेवण्याची मंडपी *f*. Fire'drake *n*. *a... dragon* (?) विक्राळ राक्षस *m*. २ *a fiery meteor* ... पुंज उल्का *f*. ३ *a rocket* (दारूचा) बाण *m*. ४ *a ... er at a furnace or fire* भट्टीशीं काम करणारा. Fi... fanged *a*. *injured as by fire, burnt* (said ... manure which has lost its goodness & acqui... an ashy hue in consequence of heat generated... decomposition) करपटलेलें, करपलेलें (खत, इ०). Fire'... fly *n*. *zool.* काजवा *m*, खद्योत *m* (S.). Fire'lock *n*. चुलीची पाळ *f*. Fire'-kiln *n*. भट्टी *f*. ... (बंदुकीचा) चाप *m* -चकमक *f*. २ चापी-चापाची बंदू...

चकमकवाली बंदूक *f*. [F. WITH A FLINT ( as distinct from match-lock) गारमांडें(ड) *n*. Fire'man *n*. *a member of a fire company* आग विझविणारांच्या टोळींतील मनुष्य *m*. २ *a man who tends the fires* ( as of a steam engine ) आगवाला *m*, (भट्टी, इंजन वगैरेंमध्यें) आग पेटवणारा. Fire'-new *a*. *fresh from the forge, quite new, bright* घणाखालचा, घणकोरा, नवघड, घुकताच भट्टींतून काढलेला, ताजा, नवा, कोरा, करकरीत, चकचकीत. Fire'-pan *n*. शेगडी *f*, आगटी *f*, आगटें *n*. Fire'place *n*. *a hearth* ( usually an open recess in a wall in which a fire may be built) भिंतींतील चूल *f*, चुलाणें *n*, चुला *m*, चुलण *n*, चुलाण *n*. [ F. OF A SHIP OR BOAT चुलदान *n*. HOB OF A F. वैल *m*, अवेल *n*, वाईल *m*. LARGE AND RUDE F. चुलवा *m*. RAISED BACK OF A F. भाणोसा *or* भानोसा *m*. RANGE OF FIRE-PLACES चुलांगण *n*, चुलवान *or* (ण) *n*. ] Fire'-proof *a*. *incombustible* पेट न घेणारा, न पेटणारा-जळणारा, अदाह्य. Fire'set *n*. भट्टीचें साहित्य *n*, भट्टीशीं लागणारें सामान *n*. Fire'side *n*. चुलीचा शेजार *m*. २ *home, domestic life, retirement* गृहसुख *n*, गृहवास *m*, घरीं स्वस्थ बसून सुखानें काढलेलें आयुष्य *n. pl*. Fire'stone *n*. *iron pyrites* ( formerly used for striking fire ) चकमक *f*; विस्तव पाडण्यासाठीं प्राचीन काळीं हिचा उपयोग करीत असत. २ ( *also* ) *a flint* गार *f*, गारगोटी *f*, गारेचा दगड *m*. ३ *a stone which will bear the heat of a furnace without injury* अग्निप्रस्तर *m*. Fire'tower *n*. *a light-house* दिवादांडी *f*, दीपगृह *n*. Fire'warden *n*. *an officer who has authority to direct in the extinguishing of fires, or to order what precautions shall be taken against fires* ( called also *fireward* ) आगकामगार *m*, आगी विझविणाऱ्यांच्या टोळीवरील अंमलदार *m*, निर्वापणाधिकारी *m*. Fire'wood *n*. *wood for fuel* जळण *n*, जळवण *n*, सर्पण *n*, जळाऊ -जळणाचीं लांकडें *n. pl*., इन्धन *n* (S.), लांकूडफाटें *n* (*colloq*.). [ F. MERCHANT लांकूडवाला *m*. ] Fire'work *n*. दारूकाम *n*, दारू *f*, दारूखाना *m*. [ CERTAIN FIREWORKS ARE घडेबाजी, सुरनळा, नळा, चंद्रजोत, तारा, चापा, चिचुंदरी, जांतीण, पेटी, फुलझडी, फुलझाड, फुलबाजी, महताब, शिंगट, सुरसुरी, हातनळा, लंका, दारूचा डल्ला, बाण, चक्र. VARIOUS FIREWORKS PUT TOGETHER & FIRED भुताळें *n*, सुइनळा *m*, किल्ला *m*.] २ *pl. a pyrotechnic exhibition* आतसबाजी *f*, अग्निक्रीडा *f*, लंका *f*. Fir'ing *n*. *the act of discharging firearms* गोळीमार *m* or *f*, (गोळयांचा) मारा *m*, मार *m*, मारगिरी *f*. [ BRISK OR FURIOUS F. OF ORDNANCE, MUSKETRY, STONES, AND *fig*. OF ABUSE, &c. भडिमार *m*, धडाका *m*. देवडमार *m*, भडमार *or* धडाधडी *f*, DOUBLE F. दुमारा *m*, दुमारें *n*, दोहोंकडून मारा *m*. LINE OF F. मारा *m*. MUTUAL F. गोळागोळी *f*.] २ *the mode of introducing fuel into the furnace and working it* भट्टी पेटवून चालविणें *n*. ३ *the application of fire or of a cautery* गूल *m*-गोदा *m* -चोरा *m*. डेंगें *n*. ४ *the process of partly vitrifying pottery by exposing it to intense heat in a kiln* (भट्टींत मातीचीं भांडीं) भाजून काढणें *n*, भाजणें *n*. [ F. IRON डागणी *f*, डाहणी *f*.] ५ ( *obs*. ) *fuel* सर्पण *n*, &c. See Firewood.

Firm ( fėrm ) [ Fr. *ferme* –L. *firmus*, firm; allied to Sk. धृ, to bear or support.] *a*. *fixed* ठाम, दृढ, कायम केलेला, पक्का. २ *closely compressed, compact, solid* ( applied to the matter of bodies ) मजबूत, कठीण, सक्त, दृढ, घन ( *pop*. ) घण, घट्ट, घटमूट, दाट, कणखर, निबर, सकस, खंबीर, खंमाल, कुव्वल, सद्दढ, सुदृढ, घनीकृत, जंजीरबंद. [ F. ( FROM RAMMING OR BEATING ) *hard* ठाम, ठांस. TO GROW F. AND COMPACT घटणें, भरणें.] ३ *constant, steady, strong, stable* स्थिर, अचल, निश्चयाचा, नेटाचा, धिराचा, कराराचा, करारी, निर्धाराचा, निर्धारी, अटीचा, निश्शंक, निग्रही, सुधीर, धक्क, सत्वधीर, स्थिरबुद्धीचा, स्थिरमनस्क, दृढनिश्चयाचा, धैर्यशाली, मजबूत. ३ *tight, close, fast* ताठ, ठाम, गाढ, गच्च, अडच. ४ *solid* ( as opposed to *fluid* ) घट्ट, घन. ५ *fixed or stable* अढळ, स्थिर, अचल, ध्रुव, स्थाणु. ६ *indicating firmness* निश्चयदर्शक, दमदार; as, "F. countenance." ७ *substantial and strong* ( especially of edifices ) मजबूत, बळकट, खंबीर, खबरदार, जोराचा, संगीन, बंदिस्त, भक्कम. Firm'ly *adv*. धैर्यानें, चिकटपणानें, धैर्यपूर्वक, दृढनिश्चयपूर्वक. २ घट्ट, गच्च, बळकट, कडकडून, कडकावून. Firm'ness *n*. ( See the various meanings of the adjective Firm. ) मजबूतपणा *m*, कठीणपणा *m*. २ धैर्य *n*, निग्रह *m*, नेट *m*, अट *f*. (३) जोर *m*, खंबिरी *f*, बळकटी *f*, मजबुती *f*, &c.

Firm ( fėrm ) [ Span. *firma*, a signature. The older sense was signature of the house or ( as we call it ) the firm. –Span. *firmar*, to confirm –L. *firmare*, to make firm –L. *firmus*, firm.] *n*. *the title under which a company transacts business* कंपनीचें -मंडळीचें -पेढीचें &c. नांव *n*. २ *a business-house* कंपनी *f*, पेढी *f*, अड्डा *m*, मंडळी *f*. ३ *partnership* भागीचा -पातीचा व्यवहार *m*.

Firmament ( fėr'ma-ment ) [ O. Fr. *firmament* –L. *firmamentum*, a support, also expanse of the sky. –L. *firmare* –L. *firmus*, firm or solid.] *n*. ( *obs*. ) *fixed foundation* मजबूत पाया *m*. २ *the solid sphere in which the stars were supposed to have been fixed, sky* आकाश *n*, आकाशमंडल *n*, नभोमंडल *n*, नक्षत्रमंडल *n*, मेघमंडल *n*, तारांगण *n*, नभ *n*. Firmament'al *a*. *celestial* आकाशमंडलाचा, नभोमंडलाचा, आंतरिक्ष.

Firman ( fėr'man ) [ Pers. *ferman*, European philologists connect Pers. फरमान with Sk. प्रमाण. ] *n*. ( written also *Firmaun* ) फरमान *n*, आज्ञापत्र *n*.

First ( fėrst ) [ A. S. *fyrst*, the superl. of E. *fore* by

adding *-st*. Cf. Sk. प्र. ] *a. preceeding all others of a series or kind, earliest* पहिला, प्रथम, आद्य, आदि, आदिम, पूर्व, प्राथमिक; as, "The F. day of a month." २ *foremost* सर्वांत पुढचा. ३ *most excellent, chief* सर्वोत्तम, पहिल्या नंबरचा, सर्वोत्कृष्ट, उत्तमोत्तम. ४ *foremost* अव्वल, अपूर्व, अघाडीचा. ५ *most excellent, highest* श्रेष्ठ, प्रमुख, प्रधान, अग्रणी, अग्रेसर. F. *adv. before any other person or thing in time, space, rank, etc.* पहिल्यानें, पहिलें, अगोदर, आधीं, आदौ, प्रथम, प्रथमतः, पुरः ( in comp. as, पुरस्सर, पुरोगामी ), पहिल्या प्रथम. [ AT F. पहिला, पहिल्यान्, पूर्वी, अवल, पहिल्यान्दां. AS AT F. पूर्ववत्. F. AND FOREMOST अगदीं पहिल्यान्चा, अगदीं पहिला. F. OF ALL सर्वांच्या आधीं. FROM F. TO LAST अवलअखेर, आद्यंत. FROM THE F. पहिल्यापासून, पूर्वीपासून, अवलपासून.] First-born *a. first brought forth, eldest* (hence most excellent) ज्येष्ठ (अपत्य) *n*, वडील (मूल) *n*, पहिलें (मूल) *n*, उत्कृष्ट. First'-class *of the highest rank, of the best quality, first-rate* पहिल्या प्रतीचा, उंची. First-day *n. Sunday* रविवार *m*, आदित्यवार *m*. First'-floor *m*. ( *a.* ) *the ground-floor* ( U. S. ) तळमजला *m*. ( *b.* ) *the floor next above the ground floor* (*Eng.*) दुसरा मजला *m*. First-fruits *the fruits of the season earliest gathered* पहिला वहार *m* -लाग *m* -पाड *m*. ( esp. with reference to the custom of making offerings of these to God or the Gods) नवाळी *f*, नवीन वाळ or नवी नव्हाळ *f*, नवान्न *n*, नवधान्य *n*. २ *the earliest products, results, issues of anything* पहिलें फळ *n*, पहिलीं फळें *n. pl.* ३ *a payment usually representing the amount of the first year's income (formerly paid by bishops or feudal tenants to some superior)* पहिल्या वर्षाचें उत्पन्न *n*. First'-hand *a. obtained directly from the first or original source* मूळांतून मिळविलेली. २ प्रत्यक्ष. First'ling *n. the first produce or offspring* ( said of animals ) पहिलें वेत *n*, पहिली वीण *f*. २ *the thing first thought or done* पहिली आहिली गोष्ट *f*, पहिला विचार *m*, पहिलें काम *n*. First'ly *adv. in the first place, before anything else* पहिल्यानें, अगोदर, आधीं, प्रथम. First'-rate *a. of the highest excellence* पहिल्या प्रतीचा -नंबरचा, सोळा आणे, सर्वोत्कृष्ट. First-'water *n. the hightest quality or purest lustre* उंची पाणी, अत्युत्कृष्ट पाणी ( said of gems ).

Firth See Frith.

Fisc (fisk) [ Fr. *fisc*–L. *fiscus*, a basket or purse, the treasury. ] *n. the state-treasury, the public revenue* राजाचा वसूल *m*, संस्थानचा वसूल *m*, राजस्वकोष *m*. Fisc'al *a.* राजाच्या वसुलाचा-वसुलाविषयींचा, राजाच्या किंवा संस्थानच्या वसुलाचा. [F. POLICY ( आयातमालावरील ) जकातीचें धोरण *n*.]

Fish (fish) [ A.S. *fisc*; Ger. *fisch*; Icel. *fiskr*; L. *piscis*.] *n*. मासा *m*, मत्स्य *m*, मच्छ *m*, मासळी *f*, पाण्‌शेंग *f*, मीन *m*. [ F. in cant or free phraseol. पाण्‌शेंग *f*, बंदरी जिन्नस *m*. F. as exposed for sale or lying in quantities मासळी *f*, माहुरें *n*. Some kinds of *fish* are बोंबील, हळवा, शिंगाडा, कंड, खिरा, गादा, घोगरा, चिंवणें, डांकू, निवटा, बोटी, सुकट, मरल. Basket-work let down to catch F. बोकसी *f*. Odd F. *a queer fellow* जलचर, तमाशाचा माणूस. Shoal of F. मत्स्यसंघात *m*.] २ *the flesh of fish* माशाचें मांस *n*. ३ *a piece of wood fixed alongside another for strengthening* लांकडाचा जोडतुकडा *m*, ह्याचा आकार केव्हां केव्हां माशासारखा असतो. सरं *n*, पिढें *n*. Fish or fishes *pl*. Fish *v. t. to search for fish* माशाकरितां शोधणें; as, To F. a stream. २ *to search by sweeping* ( झारेकऱ्यासारखें मातींत -चिखलांत ) झाडून शोधणें. ३ *to draw out or up* वर ओढणें -घेणें, उचलणें. ४ *naut. to strengthen as a weak spar* जोडपट्टी लावून मजबूत करणें. ५ *to hoist the flukes of* (नांगराचा) फाळ वर उचलणें. ६ *to seek or obtain by artifice* युक्तीनें मिळविण्याचा प्रयत्न करणें. F. *v. i. to attempt to catch fish* मासे धरणें, मासे मारणें. २ *to be employed in taking fish* मासे पकडण्याचें काम करणें. ३ *to seek to obtain by artifice* युक्तीनें मिळविण्याचा प्रयत्न करणें; as, "To F. for compliments." Fish-beam *n*. माशाच्या आकाराचें लोखंडी वहाल *n*. Fish–bone *n*. कांटा *m*, कंटक *m*, मत्स्यकंटक *m*. Fish–carver *n*. मासे कापण्याची सुरी *f*. Fish–day *n*. (मांस न खातां) मासे खाण्याचा दिवस *m*. Fish'er *n*. मासे धरणारा. Fish'erman *n*. कोळी *m*, मासे धरणारा, मासे मारणारा, मत्स्यधारक, मत्स्यग्राहक. [The words following denote castes of fishermen धीवर, कोळी, गावती, गाबीद, दालदी, भोई, कैवर्तक.] Fish'ery *n*. मासे धरण्याचा धंदा *m*, दालद *n*. २ मासे धरण्याचा कारखाना *m*. Fish–hook *n*. गळ *m*, बडिश *n*, गरी *f*, मत्स्यवेधन *n*. Fish'ing *a*. मासे धरण्याच्या कामांत वापरलेला -वापरण्याचा, दालदी. F. *n*. मासे धरण्याचा धंदा *m*. Fishing rod *n*. मासे धरण्याची काठी *f*. Fish–monger *n*. मासेविक्या, मच्छविक्रा. Fish'net *n*. माशाचें जाळें *n*. मत्स्यजाल *n*. Fish-plate *n*. पीसपलेट *f*, मत्स्यपट्टी *f*. (दोन रुळांच्या सांधावर मारण्याची) सांधपट्टी *f*. Fish–pond *n*. माशाचा हौद *m*, मत्स्यकुंड *n*. Fish-woman *n*. Fish-wife *n*. कोळीण, मासे विकणारी, मासेविकी. Fish'y *a*. माशाचा, माशासारखा.

Fissure ( fish'ūr ) [ O. Fr. *fissure* –L. *fissura* –*findo*, *fissus*, to break. ] *n. a narrow opening or chasm, crack* भेग *f*, चीर *f*, खांड *f*, तडा *m*, तीर *m*. F. *v. t. to cleave* चिरणें, भेग पाडणें, &c.

Fist ( fist ) [ M. E. *fist*, A. S. *fyst*. ] *n. the closed or clenched hand* मूठ *f*, मुष्टि *f*, मुष्टिका *f*, (*jocosely*) मुष्टिमोदक *m*. [ BLOW WITH THE F. गुद्का *m* (मारणें, देणें), ढुसा *m*, बकांदी *f*, गुद्दा *m*, मुष्टिप्रहार *m*.

BLOW WITH THE SIDE OF THE F. बुकी *f*, बुकांदा or बकांदा *m*, बुकांदी or बकांदी *f*, बुकाडा *m*, बुतका or बुदका *m*. CLENCHING THE F. मुष्टिबंध *m*. F. AS RAISED TO STRIKE मुटका *m*. ( *v.* उगारणें. ) F. TO F. बुक्काबुक्की. FREE OF THE F. *given to striking* हाताचा फटकळ. HUGE F., MUTTON F. बुकाडा *m*. IRON ( OR HARD ) F. वज्रमुष्टि. STRIKING WITH THE F. मुष्टिप्रयोग *m*. TO BEAT WITH THE SIDE OF THE F. बुदकणें. ] २ *print. the index-mark* ( ☞ ) हाताची खूण *f*, हात *m*. Fist'ful *n*. मूठभर ( used with a noun ). मुष्टि *f*. Fist'icuff *n*. *a blow with the fist* ठोसा *m*, गुद्दा *m*. २ (*pl.*) *boxing, blow* बुक्काबुक्की *f*, हातपिटी *f*, धप्पाधप्पी *f*, धब्बाधब्बी *f*, कुटाकुटी *f*, गुद्दागुद्दी *f*. To come to fisticuffs हातघाईवर -हातपिटीवर येणें, मुष्टिमोदक देणें.

Fistula (fis-tū-lä) [L. *fistula*, a pipe.] *n. anat. a deep narrow abscess, a deep narrow pipe-like sinuous ulcer* भगंदर *m*. ( *pop.* ) भगेन्द्र *n*. आपण ज्याला भगंदर म्हणतो त्याला इंग्रजींत Fistula in Ano असें नांव आहे. नाडीव्रण आणि भगंदर यांमध्यें पुढें लिहिल्याप्रमाणें फरक आहे. नाडीव्रण म्हणजे पू वाहणारी नलिकाकार पोकळ जागा. ह्यालाच इंग्रजींत Sinus असें म्हणतात. नाडीव्रणाला (Sinus) एकच तोंड असतें. Fistula ला दोन किंवा अनेक तोंडें असतात. नाडीव्रण जर (उदरगव्हरादि) स्वाभाविक गव्हराला किंवा (मूत्रनलिका, गलनलिका, इ.) स्वाभाविक नलिकेला किंवा वृक्कयकृतादि यंत्राला पोंचला असेल तर त्याला इंग्रजींत Fistula असें म्हणतात ; जसें, Abdominal fistula उदरगत नाडीव्रण, Urethral fistula मूत्रनलिकांतर्गत नाडीव्रण. मलमार्गाला पोंचलेल्या नाडीव्रणालाच भगंदर असें म्हणतात. Fistula ला मराठींत द्विमुखी नाडीव्रण किंवा बहुमुखी नाडीव्रण असा शब्द योजिला तर बरें होईल. गुदद्वाराशिवाय इतर ठिकाणच्या Fistula नां मराठींत नासूर किंवा लासूर म्हणतात. डोळ्याच्या Fistula ला इंग्रजींत Lachrymal fistula व ह्यालाच मराठींत कोणी कोणी लासूर म्हणतात. Rectal fistula मलद्वाराचे बरेच आंतील बाजूस दुसरें छिद्र असणारें भगेंद्र, गुदगतभगेंद्र. Recto-vaginal fistula योनिमार्ग व मलमार्ग यांमधील पडदा फाटून होणारें भगेंद्र. हा विकार बहुतकरून प्रसूतींत होतो. योनिगुदगत भगेंद्र. Recto-vesical fistula मलमार्ग व मूत्राशय यांमधील भिंत फाटून छिद्र पडलेलें भगेंद्र. हा विकार बहुतकरून बाळंतपणाचे वेळीं होण्याचा संभव असतो. गुदबस्तिगत भगेंद्र. Vesico-vaginal fistula मूत्राशय व योनिमार्ग यांचे मधील पडदा फाटून छिद्र पडणें. बस्तियोनिमार्गगत नाडीव्रण.

Fit ( fit ) [ M. E. *fit*, A. S. *fit*, a song, Icel. *fet*, a foot; Sk पाद, a step, a verse of a poem. The first sense was a foot or step, then a part of a poem, a bout of fighting and lastly a sudden attack of pain ( *Chambers.* ).] *n. a sudden and violent attack* (रोगाचा) झटका *m*, झपाटा *m*. [ FIT OF EPILEPSY फेपरें *n*, फेंफऱ्याचा झटका *m*. ] २ *convulsion, paroxysm* आवेग *m*, आवेश *m*, तिडिक *f*, सर *f*, वेग *m*. ३ *a passing humour, a caprice, a sudden and unusual effort followed by inaction, an impulsive and irregular action* लहर *f*, तव्येत *f*. F. *v. t.* ( *Shakes.* ) *to wrench as by fit* (झटक्यानें) पिळणें, पिळवटून टाकणें. Fit'ful *a. marked by sudden impulses, spasmodic* लहरी. Fit'fully *adv.* Fit'fulness *n*. लहरीपणा *m*. Fits and starts *spasmodic and irregular bursts of activity* लहर *f*, चैन *f*, तव्येत *f*. By fits, By fits and starts *irregularly* लहर लागेल तेव्हां, लहरीनें, लहरीप्रमाणें, सोडून धरून.

Fit ( fit ) [ M. E. *fitten*, to arrange. ] *a. adapted to any particular end or standard, competent, worthy* योग्य, लायक, उचित, उपयुक्त, उपयोगी, क्षम, लाजीम, अर्ह. २ *convenient, becoming, meet, proper* लायक, लाजीम, उचित, बरोबर, युक्त, योग्य, जोगता OR जोगा (as, राजाजोगता -जोगा), समर्पक. [F. AND UNFIT योग्यायोग्य, युक्तायुक्त, सदसत्, कार्याकार्य. ] ३ *adapted, serviceable or suitable for* जोगता or जोगा ( पायाजोगता जोडा, अंगाजोगता आंगरखा ), बरोबर, लायक, अर्ह (पूजनार्ह, भक्षणार्ह), अनुरूप. ४ *properly trained and ready* (शिकवून) तयार, जोगा, योग्य; as, "A horse F. for a race." F. *v. t. to make fit or suitable* योग्य -उपयुक्त -लायक करणें, योग्यता आणणें-देणें. २ *to give the required form* योग्य आकार देणें. ३ *to supply with something that is fit* योग्य वस्तूनें युक्त करणें-देणें. ४ *to be suitable, to suit, to become* (-ला) योग्य असणें, बसणें, शोभणें, घटणें, सजणें, साजणें. ५ *to bring into a required form, to adjust* जोगा- -योग्य आकाराचा देणें. ६ *to accommodate to, to adapt, to suit with* मेळ *m* -जवा *m* -जम *m*. बसवणें -पाडणें, जुळणी *f*. करणें -मिळवणें. To F. out *to supply with necessaries or means* ( आवश्यक वस्तूंनीं ) युक्त करणें, ( आवश्यक वस्तू देऊन ) सज्ज -तयार करणें; as, "To F. out privateer." [To F. UP *to furnish with things suitable* पुरी तयारी करणें -सज्ज करणें.] F. *v. i. to be proper or becoming* शोभणें, साजणें, योग्य -ठीक होणें -दिसणें. २ *to suit, to be adapted* (a garment) (अंगाबरोबर होणें, (अंगांत) बसणें. Fit'ting *pr. p.* Fit'ted *pa. p.* Fit'ly *adv.* योग्य, यथायोग्य, ठीक, दुरुस्त, अनुरूप. Fit'ness *n*. योग्यता *f*, लायकी *f*, अर्हता *f*, क्षमता *f*. २ योग्यता *f*, लायकी *f*, शिस्तपणा *m*, शिस्तवारी *f*, औचित्य *n*. [ F. OF THINGS स्वाभाविक-नैसर्गिक सरळपणा *m* -न्याय्यता *f* -उचितता *f* -वाजवीपणा *m*, स्वाभाविक -नैसर्गिक योजना *f*, सृष्टीची शाश्वत व्यवस्था *f*. ] ३ उपयोग *m*, लायकी *f*. Fit'ter *n*. सज्ज -सज्जित करणारा. २ जोडणी करणारा, जोडारी. Fit'ting *a. fit, appropriate* योग्य, उचित, &c. Fit'ting *n*. जोडकाम *n*. २ (generally *pl.*)

*anything used in fitting up* जोडतांना वापरलेल्या वस्तू *f. pl.*, जोडकामाचें साहित्य *n.* Fit'tingly *adv.* योग्य रीतीनें. Fit'ting-out *n. a supply of things fit and necessary* आवश्यक व योग्य वस्तूंचा पुरवठा *m.* Fitting-shop *n. a shop in which pieces of machinary are fitted together* यंत्राचे निरनिराळे भाग जोडण्याचें दुकान *n*, जोडकामाचें दुकान *n*.

*N. B.*—The (*eternal*) *fitness of things*, a phrase extensively used in the 18th century with reference to the ethical theory of Clarke, in which the quality of moral rightness is defined as consisting in a 'fitness' to the relations inherent in the nature of things. Hence popularly used (at first with playful allusion) for 'what is fitting or appropriate.'

Clarke's own usual phrase is 'the eternal *reason* of things,' but the words *fit* & *fitness* are constantly used by him as synonyms of 'reasonable' and 'reason.' (Dr. Murray.)

Five (fīv) [A. S. *fif*; Ger. *funf*; L. *quinque*; Gr. *pente*, *pempe*; Sk. पंचन्, five.] *a.* पांच, पंच. [AGGREGATE OF F. पंचकडी *f*, पंचक *n*, फाड *f*, पांडव *m.* (THERE WERE FIVE PANDAWAS). F. ARMED (WARRIOR, &c. ALSO WILD BEASTS) पंचहत्यारी, पांचहत्यारी. F. FACED, F.-SIDED पंचानन, पंचमुखी. F.-FOLD पांचपट. SURPLUSAGE OF F. (PER CENT, IN BUYING *kadba*, MANGOES, &c.) वर्तवळ्याची -वरची पंचकडी *f*, पंचोत्तरी *f*, पंचोत्तरा *m*, (शेंकड्याच्या) वरचे पांच.] F. *n. five units* पांच (वस्तूंचा समुदाय) पंचकडी *f*, फाड *f*. २ पांचाचा आंकडा *m*, पांच *m. pl*; as, ५ or 5 or V.

Fives (fīvz) [See Vives.] *n.* (*Shakes.*) *a disease of the glands under the ear in horses* एकप्रकारचा घोड्यांचा रोग *m.* ह्यांत घोड्यांच्या कानाखालीं लहान गांठी उठतात.

Fives (fīvz) *n. pl.* एक प्रकारचा चेंडूचा खेळ *m.* F. Court सदरहू खेळ खेळण्याचें पटांगण *n* -चौक *m.*

Fix (fiks) [O. Fr. *fix*, fixed –L. *fixus*, fixed. cf. Sk. पाश्, to bind.] *v. t. to make firm, stable, or fast, to set or place permanently, to establish, to implant; to secure* ठाम -गच्च -घट्ट -बळकट बसवणें, दृढ करणें, पक्का करणें, स्थिर -अढळ -अचल करणें, न हालेसा -न निघेसा -न ढळेसा करणें, पक्का करणें, जाम करणें. २ *to hold steadily, to fasten, as the eye upon an object* स्थिर करणें, स्थिरपणानें लावणें, नेमणें, खिळविणें, स्थापना *f* -आधान *n.* करणें *g. of o.* ३ *to settle, to appoint, to determine, to establish* स्थापणें, नेमणें, ठरवणें, बांधणें, नियम *m* -नेम *m* -ठराव *m* -निश्चय *m.* करणें *g. of o.*, स्थापन करणें, इयत्ता करणें *g. of o.*, ठाम -मुकरर -नियमित-नेमित-निश्चित-खचीत करणें. ४ *to confine, to restrain, to stay* स्थिरावणें, थांबवणें, राहवणें, बसवणें, स्तंभन *n* -स्तंभ *m.* करणें. ५ *photo. to render permanent* पक्का-कायम-टिकाऊ-स्थिर-स्थायी करणें. ६ (*iron manuf.*) *to line the hearth of* (a puddling furnace) दरजा *f. pl.* भरणें. ७ *to put in order, to arrange, to adjust* नीटनेटकें -व्यवस्थित लावणें -करणें. F. *v. i. to become fixed* स्थिर होणें, बसणें, स्थावरणें, स्थिरावणें. [To F. (AS THE EYE IN DEATH) थिजणें.] २ *to become firm, to congeal* घट्ट होणें, थिजणें, गोठणें, स्थिर होणें, उडून न जाणें, वाहून न जाणें. To F. on, *to determine on* निश्चय *m* -नेम *m* -ठराव *m.* करणें. F. *n. a difficulty, a dilemma* कचाटा *m*, पंचाईत *f*, अडचण *f*, नड *f*, संकट *n.* Fix'able *a.* ठाम करण्याजोगा. Fixā'tion *n.* स्थिर करणें *n.* २ स्थिरता *f*, स्थैर्य *n*, न उडून जाण्याची स्थिति *f.* ३ स्थिरीकरण *n.* Fixa'tive *a.* रंग स्थिर करणारा. Fix'ature *n. a gumming preparation for fixing the hair* केंस बसविणारा चिकट पदार्थ *m*, चिकटवण *n*, स्थिरीकरणद्रव्य *n.* Fix'ed *pa. a.* खिळलेला, न हालेसा केलेला, खिळींव, ठाम, ठास, थावर, कायम, अढळ. २ लावलेला, नेमलेला, स्थापलेला, &c., स्थापित, आहित, अवस्थापित, प्रस्थापित. ३ ठरवलेला, नेमलेला, &c., निश्चित, नियमित, बांधा, बंदा, मोयीन, मसम, मुस्तकीम, ठाम, ठास, नियत. [To BE F. ठरणें.] ४ स्थिरावलेला, स्थिर, स्तंभित, स्तब्ध. ५ *stationary* अढळ, स्थावर, अचर, अचल, निश्चंचल, ध्रुव, स्थाणु. ६ *law.* (as opposed *to moveable*) स्थावर. Fix'edly *adv.* Fix'edness *n.* ठामपणा *m*, ठांसपणा *m*, खिळलेपणा *m*, गच्चपणा *m*, अढळपणा *m*, स्थैर्य *n*, स्थिरता *f*, काइमी *f.* २ ठामपणा *m*, ठासपणा *m*, खचितपणा *m*, निखालसता *f*, नियमितत्व *n*, निश्चितत्व *n.* ३ स्थिरावलेलेपणा *m.* Fix'er *n.* गच्च बसविणारा. २ नेमणारा, मुकरर करणारा. ३ स्थिरावणारा. Fixid'ity, Fix'ity *n.* ठामपणा *m*, स्थिरता *f*, &c. Fix'ing *n.* Fixing solution *photo.* स्थिर करणारा द्रव *m*, स्थिरीकरणद्रव *m*, पक्का करण्याकरितां वापरलेल्या वस्तू *f. pl.* Fix'ture *n. a moveable that has become fastened to anything, a fixed article of furniture* स्थावर केलेला माल *m* -द्रव्य *n*, ठाम केलेला किंवा ठाम झालेला पदार्थ *m* -वस्तु *f.* २ *a fixed or appointed time or event* कायमचा उत्सव *m* -गोष्ट *f*, ठाम किंवा कायम केलेला काळ *m*, कायम केलेली कुस्ती *f* -शर्यत *f.* ३ (*Shakes.*) Fix'edness *n.* कायमपणा *m*, मजबुती *f.* Fix'ure *n.* (*Shakes.*) स्थिरता *f*, ठामपणा *m.* Fixed air *n.* स्थिर वायु *m.* कार्बानिक आसिडला हें नांव आहे. Fixed body *n. chem.* (न उडून जाणारे) स्थिर पदार्थ *m. pl.* Fixed oils *n.* न उडून जाणारीं -स्थिर तेलें *n. pl.* Fix'ed stars *n.* (स्थिर) ध्रुव तारे *m. pl.*

*N. B.*—The word *fixture* is frequently substituted for *fixure* (formerly the word in common use) in new editions of old works.

Fizz (fiz) [Formed from the sound.] *v. i. to make a hissing or sputtering sound* फसफसणें,

Foible ( foi'bl ) [ O. Fr. *foible*, weak. ] *n. a moral weakness, a weak point, a failing, a weakness of character* (दुर्गुणामुळें आलेला) दोष *m*, कमीपणा *m*, व्यंग *n*, विंग *n*, उणेपणा *m*, उणें *n*, वर्म *n*, छिद्र *n*, मर्म *n*.

Foil ( foil ) [ O. Fr. *fuler*, to trample on, ( also ) to oppress, foil, over-charge extremely –Late L. *fullare*; *folare*, to full cloth. See Full.] *v. t. to trample or tread down* लाथाडणें, ( पायानें ) तुडविणें. २ *to baffle, to frustrate, to render nugatory* मोडणें, हारवणें, थकवणें, वाहवणें, लटपटवणें, कुंठित करणें, चालेनासा करणें, फुकट दवडणें, चकविणें. ३ *to overthrow, to defeat* चीत करणें, पाडाव करणें. ४ *to blunt* तीव्रता मोडणें ; as, "To F. scent in a chase." ५ *to outdo, to surpass* ( -पेक्षां, -वर ) सरशी *f* -ताण *f* करणें. F. *n. frustration, defeat* चकभूल *f*, फसगत *f*, मोडा *m*, पाडाव *m*. २ *a blunt weapon used in fencing, resembling a small sword in the main but usually lighter and having a button at the point* निधारी-वुळी-वोथी-वोथट &c. तरवार *f*- पट्टा *m* -दांड *m*. ३ *the track or trail of an animal* माग *m*, पत्ता *m*, वास *m*. Foil'ing *pr. p. & v. n.* Foil'ed *pa. t. & pa. p.* To put to foil *to blemish* दोष देणें. To run a foil *to lead astray, to puzzle* चुकविणें, भलत्याच बाजूस नेणें, मार्ग चुकविणें.

Foil ( foil ) [ M. E. *feuille*, a leaf ( also ) the foyle of precious stones –L. *folia pl.* of *folium*, a leaf.] *n. a very thin sheet or leaf of metal* (without *pl.*) (धातूचें) पातळ पान *n*, कागद *m*, पत्ता *m*; as, "Brass F., tin F., gold F." २ ( *jewelry* ) *a thin leaf of sheet copper silvered and burnished and afterwards coated with transparent colours mixed with isinglass* (आंगठींतील ) खड्याखालीं बसविण्याचा पातळ पत्रा *m*. ३ *anything that serves by contrast of colour or quality to set off another thing to advantage* कोंदण *n*, प्रभावळ *f*, प्रभावर्धक वस्तु *f*. ४ *a thin coat of tin, with quicksilver, laid on the back of a looking-glass to cause reflection* ( आरशाच्या मागें लाविलेला ) पाऱ्याचा जस्ती पत्रा *m*. ५ *arch.* पत्तीची नकशी *f*.

Foist ( foist ) [ Dut. *vuisten*, to take in the hand, *vuist*, fist. ] *v. t. to interpolate* ( usually followed by *in* or *upon* ) घुसडणें, खुपसणें, खुपसून घालणें, घालघुसड *f*. करणें, घुसडून देणें, प्रक्षेप करणें. Foist'er *n.* घुसडून देणारा, प्रक्षेपक, घुसड्या, खुपशा.

Fold ( fōld ) [ A. S. *fald* also *falod*, a fold. ] *n. a pen or enclosure for domestic animals* गोठा *m*, (for calves or kids ) गोठी *f*, माची *f*, (esp. for sheep) मेंढवाडा *m*. २ ( *fig.* ) ( esp. in a spiritual sense ) *the Church* कळप *m*, समुदाय *m*, पंथ *m*. ३ *the sheep contained in a fold* मेंढवाड्यांतील -कळपांतील मेंढरें *n. pl.*, कळप *m*. ४ *an enclosure of any kind* (कोणत्याही प्रकारची गोठ्यासारखी ) कुडलेली जागा *f*, शेतावरील वेडें *n*, कोंडवाडा *m*, वाडा *m*. F. *v. t.* कावण *n*. घालणें.

Fold ( fōld ) [ A. S. *fealdan*, to fold. ] *n. a bend or ply, one of the parts or both of them together which are brought together in folding* घडी *f*, पदर *m*, चुणी *f*, निरी *f*, पट्टी *f*, पडदा *m*. [ Bagging or bellying F. ओंचा *m*. Upper *or* outer F. घडीपदर *m*, वरचा -वाहेरचा पदर *m*. ] २ *a similar configuration in animal and vegetable structures* (प्राण्यांतील किंवा वनस्पतींतील) घडीवजा रचना *f*, घडी *f*, पडदा *m*. ३ *a winding* घडी *f*, घडीसारखी रचना *f*. ४ *a coat* (as of an onion) (कांद्याचा इ.) पापुद्रा *m*. ५ (in a serpent's body ) *a coil* वेटाळें *n*. ६ *a length of string between two bends* ( दोरीचा ) दोन वांकणांतील भाग *m* -पदर *m*. ७ *a leaf of a book, a sheet of paper, one of the leaves of a folding door* ( पुस्तकाचें ) पान *n*, ( कागदाचा ) ताव *m*, (घडीच्या दरवाजाचें) झडप *n*. ८ *the line or mark made by a folding* दुमड *f*, चूण *f*, दूण *f*. ९ *times or repetitions* (used with numerals to denote increase, the doubling, trebling, &c., of anything; as, four-fold = four times, multiplied by four चौपट, चौगुण.) generally expressed by पट, गुण at the end of a numeral. १० *embrace* मिठी *f*, आलिंगन *n*, परिरंभ *m* (S.). ११ ( of cakes, crusts ) *layer, coat* पडदा *m*, पापुद्रा *m*, पातोडा *m*. १२ *a plication* घडी *f*, &c. २ *agri. the keeping of sheep in enclosures on arable land, &c.* शेळ्या ( शेतांत ) बसविणें *n*, मेंढरें बसविणें *n*. Fold'ed *pa. p.* Fold *v. t. to lap or lay in plaits or folds, to double or bend over upon itself* घडी करणें -घालणें, दुमडणें. [ To F. up (पुष्कळ पदरांची) घट्ट घडी घालणें.] २ *to lay together as the hands* जोडणें ; as, "He *folds* his arms in despair." ३ *to coil, to wind* ( with *about, round*, &c.) वेटाळें करणें. ४ *to embrace* वेंगटणें, वेंगाटणें, कवटाळणें, आलिंगिणें. ५ *to conceal* लपविणें, छपविणें, दडविणें, लपवून -छपवून -दडवून ठेवणें; as, "To F. one's faults." F. *v. i.* घडी पडणें, दूण पडणें. २ *geol. to double up* घडी पडणें, दुमडणें. ३ *to take a winding course* (said of a river &c.) (वळण -वांकण घेऊन ) वांकडें तिकडें जाणें. Fol'der *n. one who folds* घड्या घालणारा -रचणारा. २ *that which folds, a flat knife-like instrument used for folding paper* (कागदाच्या घड्या पाडण्याची) मुक्या सुरीसारखी पट्टी *f*, मुकी सुरी *f*. Fold'ing *a. that can be folded* घडी पडणारा. Folding-chair *n.* घडीची खुर्ची *f*. Folding door *n. one of two or more doors filling a single opening and hung upon hinges* घडीचा -दुमडीचा दरवाजा *m*.

Foliage ( fō'-li-āj ) [ Fr. *fueillage* -*fueille* –L. *folium*, a leaf. ] *n. leafage* पालवी *f*, पल्लव *m. pl.*, पर्णसमूह

*m*, पाला *m*, पानें *n. pl.*, विस्तार *m*, पळवा *m*. [ TUFT OF F. पालव *m*. NEW F. पालवी *f.* OF RICH AND LUXURIANT F. सातारा *or* सातेरा. TO BE COVERED WITH F.–(TREE *or* PLANT) सातरणें, डवडवणें, डवरणें. ] २ *a cluster of leaves, flowers and branches* झुबका *m*, घोंस *m*, गेंद *m*, ढाळा *m*, ढापा *m*, गोंडा *m*. ३ *arch. the representation of leaves, flowers and branches in architecture* पत्ती *f*, (इमारतीवरील) नकशीची पत्ती *f*, पत्तीची नकशी *f.* F. *v. t.* पत्तीनें शृंगारणें. Fo'liaged *a. furnished with foliage* पर्णयुक्त, पानांनीं भरलेला, पल्लवित. २ पत्ती काढलेला. Fo'liar *a. bot. consisting of leaves* पर्णमय, पल्लवमय. २ *pertaining to leaves* पल्लवासंबंधीं. Fo'liate *v. t. to beat into a thin plate* पत्रा करणें, ठोकून वर्ख -वर्खांचीं पानें बनविणें. २ *to decorate with foils* वर्ख -बेगड लावून चित्रविणें, वर्ख-बेगड लावणें. ३ *to mark the folios or leaves of* (a volume, &c.) *with consecutive numbers* (पोथी, पुस्तक इ.च्या पृष्ठांस) अनुक्रमांक देणें. ४ *to spread over with a thin coat of tin and quick-silver* जस्त *n* -पारा *m* चढविणें -देणें -लावणें; as, "To F. a looking-glass." F. *v. i. to put forth leaves* पालवणें, (-ला) पालवी *f* फुटणें. Fo'liated *a. having leaf-like projections* पालवीसारखा, विस्तारलेला, पानासारखा पुढें आलेला; as, "A. F. shell." Folia'tion *n. the process of forming into leaves* पल्लवीभवन *n*, पालवणें *n*. २ *the manner in which the young leaves are disposed within the bud* नवदलरचना *f.* ३ *the act of beating a metal into a thin plate* (धातू ठोकून तिचा) वर्ख करणें *n* -ठोकणें *n*. ४ *geol. the process or property of splitting up into leaf-like layers* पल्लवीभवन *n*, (पानासारखे) बारीक थर पडण्याची क्रिया *f.* ५ *arch. ornamentation with foils* पत्ती खोदणें *n* -कोरणें *n*. ६ *the act of coating with an amalgam of tin foil and quicksilver* (as in making looking-glasses) पारा चढविणें *n*, पारदलेपन *n*. ७ *the consecutive numbering of the foils* (or leaves) *of a book or MS.* (दुंड्यांवर) अनुक्रमनंबर देणें *n*, क्रमांकन *n*.

Foliate. See under Foliage.

Folio (fō-'li-ō) [ L. *folium*, the leaf of a tree, a leaf or sheet of a paper. ] *n. a leaf of a book or manuscript* पृष्ठ *n*, पत्र *n*, पान *n*. २ *a sheet of paper once folded* दुबंदी पान *n* -कागद *m*, दुंडा *m*, दुड्डा *m*. ३ *a book made of sheets of paper each folded once*, (hence) *a book or volume of the largest size* दुबंदी वही *f* -पुस्तक *n*, फार मोठ्या-विस्तृत आकाराचें पुस्तक *n*. ४ *print. the page number of a printed book* (छापील पुस्तकांतील) पानाचा अनुक्रमांक *m* -आंकडा *m*. ५ *(law) a certain number of words taken as a unit in reckoning the length of a document* (एका पानांत असणारी) ठराविक शब्दसंख्या *f.* F. *a. formed of sheets each folded once* दुड्यांचा. F. *v. t. to page* (पानांवर) अनुक्रम -आंकडा -क्रमांक घालणें.

Folk (fōk) [ A. S. *folc.* ] *n.* (*colloq.*) *people in general* (generally used in the *pl.* form, and often with a qualifying adjective) लोक *m. pl.*, जन *m. pl.*, जनता *f* (S.) [ OLD F. वृद्धजन *m. pl.*, बुड्ढे अदमी. ] २ *colloq.* (*New Eng.*) *the persons of one's family* कुटुंबांतील मंडळी *f* -माणसें *n. pl.*, घरची मंडळी *f.* Folk'-lore *or* Folk lore *n. tales, legends or superstitions long current among the people* (कोणत्याही लोकांमधील अति प्राचीन काळापासून म्हणजे त्या लोकांच्या राष्ट्र या नात्यानें बालपणापासून चालत आलेल्या व वर्तमान काळीं) आराजरंक आणि आबालवृद्धांच्या तोंडीं असणाऱ्या दंतकथा *f. pl.*, कहाण्या *f. pl.*, (पंचतंत्रांतल्या गोष्टीसारख्या) नीतिबोधक गोष्टी *f. pl.*, जातककथा *f. pl.*, बालसारस्वत *n*, लौकिकसारस्वत *n*, लोकांत प्रचलित असलेल्या दंतकथा *f. pl.* -कथा *f. pl.*

Follicle (fol'-i-kl) [L. *folliculus*, *dim.* of *follis* bag.] *n. bot. a simple pod opening down the inner suture* आंतल्या दुमडीवर फुटणारी शेंग *f*, गोणिकाफल *n*. [ (गोणिका = BAG). सावरीचें बोंड आणि रुईचें फळ हीं FOLLICLE चीं उदाहरणें आहेत ]. Follicular *a.* गोणिकाफलासारखा, गोणिकाफलांचा, सावरीच्या बोंडासारखा, रुईच्या फळासारखा.

Follow (fol'-ō) [ M. E. *folwen*; A. S. *folgian*, also *fylgan* (weak verb), to follow. ] *v. t. to go or come after*, (hence) *to accompany* अनुसरणें, (-च्या) मागून -मागें -पाठीमागें -पाठीमागून जाणें -येणें -चालणें, (-च्या) बरोबर जाणें, &c. २ *to pursue* पिच्छा पुरविणें, पाठीस लागणें *g. of o.*, पाठ घेणें *g. of o.*, पाठलाग करणें *g. of o.* ३ (*fig.*) *to pursue like an enemy* पाठीस लागून नकोसें करणें, पुरेपुरे करणें. ४ *to obey, to act in accordance with* अनुसरणें, प्रमाण मानणें, (-च्या प्रमाणें) चालणें. ५ *to copy*; *to take* (a person) *as a guide, leader, &c., to take as model* (-चें) अनुकरण करणें, (-चा) कित्ता *m* -वळण *n* घेणें -गिरवणें. ६ *to succeed in order of time, rank, or office* पश्चात् -होणें -असणें -घडणें, गादीवर येणें, &c. ७ *to result from as an effect from a cause* (-पासून) निघणें -होणें, (-चा) परिणाम असणें, उद्भवणें. ८ *to keep the mind upon while in progress* (as speech, musical performance, &c.) (-कडे) सारखें लक्ष लावणें -लावून ऐकणें, अवधान देऊन ऐकणें. ९ *to keep with and understand* ग्रहण *n*. करणें, आकलन *n*. करणें, समजणें, (अवधान राखून) लक्षांत घेणें. १० *to attend upon closely* (as a profession), *to practise* (कोणतीही गोष्ट) धंदा म्हणून चालविणें -करणें -पतकरणें, (धंदा) चालू ठेवणें, अनुसरणें. ११ *to strive after, to aim at* (-च्या) मागें लागणें (*fig.*) (-ची) पिच्छा पुरविणें, (-च्या साठीं) यत्न करणें, मिळविण्याची खटपट करणें, चिकाटी धरणें, चिकटून राहणें.

F. *v. i.* (used in various senses of the transitive verb.) Follow-board *n. a board on which the pattern and the flask lie while the sand is rammed into the flask* (ओतारी लोकांची) पेट्या दाबण्याची किंवा भरण्याची खालची फळी *f.* Followed *pa. a.* Foll'ower *n.* (*lit.*) मागून जाणारा -येणारा, &c. २ *an attendant* अनुयायी, अनुचर, अनुचारी, पार्श्वक, परिचारक, सेवक. [FOLLOWERS *pl.* चाकरमाणसें *n. pl.*, गडीमाणसें *n. pl.*, लवाजमा *m*, सेवक-परिचारक-अनुयायी वर्ग *m* -लोक *m. pl.* (*colloq.*), परिच्छद *m.*] ३ *a disciple* अनुयायी, अनुगामी, शिष्य. ४ *a pursuer* पाठलाग करणारा, मागें लागणारा. ५ (*colloq.*) *a sweetheart* प्रियकर, सहचर. ६ (*colloq.*) *a man who courts a maid-servant,* (esp.) *one who calls at the house to see her* दासीच्या नादीं लागणारा. ७ (*steam-engine*) *the removeable cover of a piston* दट्ट्याचें आच्छादन *n*, काढघाल करतां येण्या-जोगें दट्ट्याच्या बरोबरचें आच्छादन *n*, दट्ट्याचा अनुयायी. ८ *mach. the part of a machine that receives motion from another part* अनुयायी दट्ट्या, एकाच यंत्रांतील दुसऱ्या भागाच्या गतीनें चालणारा भाग *m.* ९ *the plate or block by which the pressure is applied* दाबक (?). Foll'owing *n.* (*the action*) मागून जाणें *n* -येणें *n*, अनुगमन *n.* २ *followers collectively* अनुयायिमंडळ *n*, शिष्यमंडळ *n*, (-च्या) बाजूची मंडळी *f.* ३ *vocation, business* व्यवसाय *m*, काम *n*, धंदा *m.* To follow suit (*a*) (*card playing*) *to play a card of the same suit as the leading card* पहिल्यानें उतरलेल्या रंगाचेंच पान उतरणें. (*b*) *to follow an example set* (-चा) धडा *m* -वळण *n.* गिरविणें. Foll'owing *a. succeeding, subsequent* नंतरचा, पाठी-मागचा. २ *ensuing* (*as a result or consequence*), *resulting* परिणाम पावणारा, परिणामरूपी, तदुद्भूत.

Folly (fol'-i) [Fr. *folie,-fol,* foolish.] *n. the state of being foolish* मूर्खपण *n* (णा *m.*), अज्ञान *n*, मौर्ख्य *n*, मूढता *f*, मोह *m.* २ *a foolish act, foolery* चूक *f*, मौर्ख्य *n*, मौर्ख्यस्खलित *n.* ३ *a ridiculous thing, an absurdity* वेडाचार *m*, वेडा चाळा *m.* ४ *wickedness, evil, mischief, harm* दुष्टता *f*, दौर्जन्य *n*, दुष्कृत्य *n*, अपकार *m.* ५ *wrong, sin, scandalous crime* निंद्य अपराध *m*, नीचकर्म *n*, गर्ह्य कृत्य *n.* ६ *wantonness, lewdness* (as applied to a woman) अत्या(ना)चार *m*, उनाडपणा *m*, छिनालपणा *m.* ७ *the result of a foolish action* मौर्ख्याचा परिणाम *m.* ८ *madness, insanity, mania* वेड *n*, पिसें *n*, चळ *m.*

Foment (fo-ment') [M. Fr. *fomenter*–L. *fomentare-fomentum,* –L. *fovere,* to warm.] *v. t. to apply warm lotion to* शेकणें, शेक *m.* देणें -घेणें, शेकणी *f.* -करणें, शेक *m* -शेगडी *f.* करणें, ऊब देणें. २ *to promote development, effect, or spread of* (something material or physical) संवर्धन *n* -प्रतिपाळ *m* -सांभाळ *m* -जोपासना *f.* -करणें, वाढविणें, विस्तार *m.* करणें, फैलावणें. ३ *to rouse, to stir up* उत्साह आणणें -देणें, प्रोत्साहन -धीर देणें. ४ *to instigate, to foster* (esp. in a bad sense) चिथविणें, फुंकणें *or* फुंकून देणें, चेतविणें, पेटविणें, तेल *n.* ओतणें -घालणें, गोंवरी *f* -पेंढी *f* -आग *f* -विस्तव *m* -काडी *f.* लावणें, चेतवाचेतव करणें, कलागत *f.* लावणें. Fomenta'tion *n.* शेक *m*, भाज *f*, शेकणें *n.* २ *the remedial means* नि-वारक उपाय *m.* (*sing. or pl.*) ३ (*fig.*) *encouragement, a stimulus* उत्तेजन *n*, धीर *m*, जोर *m*, बळ *n*, शक्ति *f.* ४ *instigation* चिथवणी *f.* Foment'er *n.*

Fond (fond) [M. E. *fond,* more commonly *fonn-ed,* *p. p.* of *fonnen,* to be weak, to act as a fool.] *a.* (*archaic*) (*Shakes.*) *silly, foolish, simple* साधा, भोळा, मूर्ख, सांव (*fig.*). २ *foolishly credulous or sanguine* (a sense in *literary* use since the 16th century). दुधखुळा. ३ *over-affectionate, foolishly tender, doting* अत्यंत प्रीति करणारा, (-वर) वेडा झालेला, अत्यासक्त, इष्क लागलेला. ४ *affectionate, loving, tender* (in later use without reproachful sense) ममताळू, मायाळू, माया करणारी; as, "A F. mother." ५ *longing or yearning* (followed by *of* and rendered in comp.s by) इच्छु. ६ *cherished and entertained with strong or unreasoning affection* (said of opinions, sentiment, &c.) आव-डीचा, आवडता. F. *v. i.* (*obs.*) (*Shakes.*) *to dote* (-ची) इष्क लागलेला, (-ची) इच्छा करणारा. Fon'dle *v. t. to caress* कुरवाळणें, लाड *m* -लडिवाळपणा *m* -लाडीक *f* -लालन *n* -कोडकौतुक *n* -&c. करणें *g. of o.*, लालित करणें, लाडकणें, पोटाळणें, जोंबाळणें, गोंजारणें, अंजारणें. F. *v. i. to behave, play, or speak fondly; to toy* लडिवाळपणें वागणें -बोलणें -खेळणें. Fon'dler *n.* Fon'dling *n. a caress* लाड *m*, लाडिक-पणा *m*, &c. २ *a person or thing fondled* लाडांचा विषय *m*, लाडका, प्यारा, प्रीतिपात्र *n.* Fon'dly *adv.* Fond'ness *n.* (*obs.*) *foolishness, folly* मूर्खपणा *m.* २ *foolish affection, unreasoning tenderness* छंद *m*, नाद *m*, वेड *n*, इष्क *f.* ३ *affectionateness, tenderness* (without reproachful sense) माया *f*, ममता *f.* ४ *instinctive or unreasoning liking or partiality* उपजत ओढा *m*, आंधळी ममता *f* -माया *f.*

Font (font) [L. *fons,* a fountain.] *n. a fountain, a source, a spring* झरा *m*, उगम *m*, मूळ *n*, उत्पत्ति-स्थान *n.* २ *a receptacle, usually of stone, for the water used in the sacrament of baptism* बासिस्मा-पात्र *n*, बासिस्म्याचें पाणी ठेवण्याचा दगडी पेला *m.* २ *a receptacle for holy water* तीर्थपात्र *n.* ३ *the reservoir for oil in a lamp* दिव्यांतील तेल रहा-णारा भाग *m*, दिव्याचें टवळें *n* (समईचें चवडें *n.*), तेलाची तळी *f.*

Font (font) [Fr. *fonte fondre*-L. *fundere,* to cast.]

*n.* (in England usually Fount) *print. a complete assortment of printing type of one size, including a due proportion of all the letters in the alphabet, large and small, points, accents, and whatever else is necessary for printing with that variety of type* (एक आकाराचा) ठश्यांचा -मुद्रांचा -खिळ्यांचा संच *m*- जोड *m.*

Fontanel (fon′-ta-nel) [Fr. *fontanelle* –*fontaine*, fountain.] *n.* (also Fontanelle) *anat. one of the membranous intervals between the incompleted angles of the parietal and neighbouring bones of a fœtal or young skull* लहान मुलांची टाळू *f.*

Food (fōōd) [A. S. *foda*, from a root *pa*, to nourish. Sk. पा, to protect.] *n. nutriment, esp. what is eaten by animals for nourishment* अन्न *n*, खाणें *n*, भक्ष्य *n*, आहार *m*, भोजन *n*, खाद्य *n*, अशन *n*, भक्ष्य *n*, भोज्य *n*, खाद्य *n.* [COARSE, UNSAVOURY F. अरबट चरबट अन्न *n*, कदन्न *n.* CONSISTING *or* COMPOSED OF F. अन्नमय. DAILY F. (*colloq.*) रोजची भाकर *f.* DISTRIBUTION OF F. अन्नदान *n*, अन्नशांति *f*, अन्नसंतर्पण *n.* DRESSED F. शिजलेलें अन्न *n*, स्वयंपाक *m*, सिद्धान्न *n.* DRESSED F. GIVEN IN ALMS TO BRAHMANS झोळी भिक्षा *f.* DRESSING OF F. स्वयंपाक *pop.* सैंपाक *m.* EXTRA *or* ODD ARTICLES OF F. आडखाणें *n*, आडखाद *f.* F. AND CLOTHING अन्नवस्त्र *n*, अन्नाच्छादन *n.* F.–COMPREH. *or* INDEF. भाकर तुकडा *m*, अन्नपाणी *n*, अन्नोदक *n*, खाणेंपिणें *n.* HEAVY F. जडान्न *n.* INCOMPATIBLE F. न सोसणारें अन्न *n*, विरुद्धभोजन *n*, विरुद्धान्न *n.* LOATHING OF F. अन्नद्वेष *m.* NON-OBSERVANT OF THE DISTINCTION OF F. सर्वभक्षी, सर्वभक्षक, सर्वान्नभक्षक, सर्वान्नभोजी. NUTRITIOUS F. खुराक *m*, पौष्टिक अन्न *n.* RICH AND SAVOURY F. मिष्टान्न *n.* UNDRESSED F. शिधा *m.* WHOLESOME F. सत्वान्न *n.*] २ *what is edible* (as oppo. to *drink*) खाद्य *n*, अशनीय *n* (oppo. to पेय). ३ *anything that instructs the intellect, excites the feelings, or moulds habits of character* अन्न *n* (*fig.*), पोषण *n*, (अन्नवत्) वर्धक -पोषक -वस्तु *f*; as, "This may prove F. to my displeasure" (*Shakes.*). ४ *matter to discuss or dwell upon* विचार्यविषय *m.* Food′ful *a. full of food* अन्नमय, अन्नप्रचुर. (*b*) *fertile* सुपीक. Food′less *a.*

Fool (fōōl) [O. Fr. *fol* (Fr. *fou*), a fool—L. *follem*, acc. of *follis*, wind-bag.] *n. one who is destitute of reason, an idiot* मूर्ख, अक्कलशून्य मनुष्य, बेवकूब. [SOME OF THE FAMILIAR COLLOQUIAL WORDS IN MARATHI FOR THE ENGLISH WORD *fool* ARE:—बैल, गाढव, गधडा, नंदी, नंद्या, नांद्या, नरपशु, दगड, खुळेश्वर, टोणपा, टोणपनाथ, टोणपेश्वर, ठोंबा *or* ठोंब्या, पत्थर, वांठीचा पिता, देवापुढचा देव, हुम्या, देवानां प्रियः (S.), शंख, शुंठ, शामाळ्या, शतमूर्ख, शुद्धस्फटिक, ढ, शाहाण्याची खरवड, गाढवाचा खरारा, बुद्धीचा नवसागर, बुद्धीचा खंदक, अकलेचा कांदा, अकलेचा अवतार, अकलेचा खंदक, माणसाचा लेक, झळझळीत मूर्ख, निपटमूर्ख, ठणठणपाळ, मूर्खशिरोमणि, गावदी, वेडीहट्ट, शेंड्यावर बसून झाड तोडणारा, महादेवाचें वाहन. A LEARNED F. पढतमूर्ख. AN ARRANT F. शतमूर्ख. F.'S PHIZ बावळी मुद्रा *f*, गावाळी मुद्रा *f.* F.'S ERRAND *an unreasonable, silly, profitless adventure or undertaking* रिकामी उठाठेव *f*, नसता उपद्व्याप *m.* हिसका *m.* TO MAKE A F. OF झकवणें, भोंदणें, बेवकूब -गाढव -मूर्ख बनवणें, हास्यास्पद करणें. TO MAKE A F. OF ONE'S SELF नकशा *m.* गमावणें, झक *f.* मारणें, आपल्या स्वतःला मूर्ख बनवणें, आपल्याला हास्यास्पद करणें, आपलें हंसें करून घेणें, अकलेचें प्रदर्शन करणें. BETTER BE A WISE MAN'S SERVANT THAN A FOOL'S MASTER शाहण्याचा व्हावें चाकर पण वेड्याचा होऊं नये धनी.] २ *a simpleton, a dolt, one who acts absurdly* भोळा, भोळसर मनुष्य *m*, (*loosely*) वेडा. ३ (*scrip.*) *one who acts contrary to moral and religious wisdom, a wicked person* मूर्ख, पापाचरणी मनुष्य *m.* ४ *a professional jester or buffoon* विदूषक, मस्कऱ्या, खुपमस्कऱ्या. ५ *a retainer formerly kept to make sport with motley dress* चित्रविचित्र पोषाक घातलेला मस्कऱ्या. [APRIL-FOOL, SEE THE WORD APRIL. FOOL'S CAP *a cap to which bells were usually attached*–FORMERLY WORN BY PROFESSIONAL JESTERS (इंग्रजी नाटकांतील किंवा जुन्या इंग्रजी दरबारांतील) विदूपकाची टोपी *f.* २ *a writing paper made in sheets ordinarily* 16 × 13 *inches and folded so as to make page* 13 × 8 *inches* फुलस्केप कागद *m.* FOOL'S PARADISE *the reign of vanity and nonsense* मूर्खांचा -खुळ्यांचा -वेड्यांचा बाजार *m.* २ (hence) *any foolish pleasure or condition of vain self-satisfaction* मूर्खपणाचा शोक *m*, वेडा नाद *m*, खूळ *n.* TO PLAY THE FOOL *to act a foolish part* मूर्खपणाचें आचरण करणें, मूर्खपणानें वागणें.] Fool *v. i. to play the fool, to trifle, to toy, to spend time in idle sport or mirth* मूर्खासारखें वागणें, गमणें, खेळणें, माशा मारणें, रिकामा वेळ दवडणें, (खेळून-उडवून) वेळ व्यर्थ घालवणें. F. *v. t. to infatuate, to make foolish* मूर्ख करणें, बनवणें, वेडा करून सोडणें. २ *to impose, to deceive, to cheat by inspiring foolish confidence in* छकवणें, झकवणें, भोंदणें, ठकवणें, चकवणें, बसवणें, तोंडाला पानें पुसणें, (-ला) गद्धा बनवणें. Fool′ery *n. absurdity* वेडेचार *m. pl.*, मूर्खाई *f*, वेड *n*, खूळ *n.* २ *a foolish ridiculous action, something nonsensical* वेडेपणा *m*, वेडगळपणा *m*, वेड *n.* Fool′-hardiness *n.* अविचार *m*, साहस *n.* Fool′-hardy *a. daring without judgment, foolishly adventurous and bold* अविचारी, साहसी, धाडशी, धसकट, धुसमुसळ्या. Fool′ish *a. silly, unwise* मूर्ख, खुळा, (*remiss*) खुळसर, खुळसट, खुळकट, (*remiss*)

वेडसर, वेडगळ, वेडका, पिसा, बेकूब or बेवकूब, भकू, बावळा, मूढ, मूर्ख, निर्बुद्ध, बुद्धिहीन, नष्टबुद्धि. [TO MAKE TO LOOK F. फजीत करणें -पाडणें. TO TURN F. मूर्ख बनणें, चवणें, चळणें.] २ *proceeding from silliness* मूर्खपणाचा, वेडेपणाचा, बेवकुबीचा, अज्ञानाचा, अविचाराचा; as, "A F. act." ३ *ridiculous* उपहासास्पद, उपहास्य, थट्टा करण्यासारखा. Fool'ishly *adv.* Fool'ishness *n.* To fool away (one's time or money) मूर्खपणानें खर्च करणें -दवडणें.

*N. B.*—मूर्ख is one who is destitute of reason. वेडा is one who is deranged in mind or intellect. Therefore the most accurate rendering of *fool* will be मूर्ख and not वेडा.

Foot (fŏŏt) [M. E. *fot*, foot, *pl. fet*, feet, A. S. *fot*, *pl. fet*—L. *pes, pedis*, Sk. पद, foot.] *n. the lowest part of the leg beyond the ankle-joint* पाय *m*, पद *n*, पाद *m*, पाऊल *n*, चरण *n*. [AN EVIL F. पांढरा पाय *m*, पायचळ *m, f*, पायचाळा *m*, पायरवा *m*. ARTISTIC POSITION *or* CAST *of* THE FOOT IN FENCING, DANCING, &c. पावटा *m*, पवित्रा *m*, पायंडा *m*. COVERING FOR THE FEET पादत्राण *n*, पादरक्षा *f*, जोडा *m*. बूट *m* इ०] HAVING FOUL (mud-clogged, dusty, &c.) FEET भरल्या पायांचा. HEAVY OF F. पायाचा जड. HOLLOW OF THE F. तलहृदय *n*. LIGHT OF F. पायसूट, हलक्या पायाचा. ON F. पायीं, पायउतारा, पादचालीनें, पादचाली. GOING ON F. चालणें *n*, पादचाल *f*, चरणचाल *f*. ON THE F. OF पायीं. TOUCHING THE F. *or* FEET (IN REVERENCE) पादग्रहण *n*, पायीं लागणें *n*. TREADING UNDER F. पायमल्ली *f*, पादाक्रमण *n*. TRODDEN UNDER F. पादाक्रांत. WATER PRESENTED TO WASH THE HANDS AND FEET पाद्यार्घ्य *n*. WITH FEET YET FOUL FROM THE ROAD भरल्या पायांनीं. TO BURN THE FEET (BY WALKING ON HOT GROUND, &c.) पायांच्या पोळ्या *f. pl.* करणें, पाय पोळणें. TO GET ON ONE'S FEET (AFTER SICKNESS, &c.) जमिनीस पाय *m. pl.* लागणें *g. of s.*, जमीन *f.* सोडणें. TO GET ON F. (INTO VOGUE) लागणें, पडणें, आचारांत येणें. TO SET ON F. आरंभणें, सुरू करणें, मांडणें, उठवणें, उभा करणें, चालू -प्रवृत्त &c. करणें. TO STRIKE THE F. (AGAINST A STONE, &c.) ठेंच *f* -ठोसर *f.* खाणें (*in. con.*) -लागणें. TO WASH THE FEET पादप्रक्षालन *n* -पाच *n.* करणें.] २ (*fig.*) पाया *m*, आधार *m*, मूळ *n*, तळ *m*, मजबुती *f*; as, "The F. of sound reason to stand upon." ३ *mili. foot-soldiers, infantry* पायदळ *n*, पदाति *m. pl.*; as, "Both horse and F." ४ *the end of a bed or grave towards which the feet are placed* (बिछान्याचें-थडग्याचें) पायगत *n*, पायतें *n*, पायाकडची बाजू *f.* ५ *the part of the stocking which covers the foot* (पायमोज्याचा) पाय *m*, तळवा *m*. ६ *proso. a combination of syllables constituting (a metrical element of) a verse* पाद *m*, चरण *m*, (कवितेची) ओळ *f.* ७ *a unit of measurement* फूट *m* (बारा इंच). ८ *the lower part of an object which serves to support it, the base* पाया *m*, बुडखा *m*, बुडूख *n*, तळ *m*, बुंधा *m*. ९ *corresponding organ of some invertebrate animals* पाय *m*. १० *bot. the part of a petal by which it is attached, the part of a hair below the epidermis* बुंधा *m*, बुडखा *m*. ११ *foot of a letter* टाइपाचा पाय *m*. १२ (*of a plough*) *the piece of hooked or bent wood at the end of the plough under the suck* नांगराचा फाळ *m*. १३ (*of an organ-pipe*) *a tube introduced at the bottom of the pipe, serving as a support and also as a conductor of the wind* तळची नळी *f*, तलनलिका *f* (?). १४ (*in a sewing machine*) *the small plate which is pressed on the cloth to hold it steady* कापड सारखें दाबून धरण्याचा (शिवण्याच्या यंत्रांतील) लोखंडी पाय *m*. १५ *the lowest part or bottom as of a wall, or ladder* तळ *m*, तळचा भाग *m*, बुडाकडचा भाग *m*, पायथा *m*, बुडूख *m*, तल (*pop.*) तळ *m*, बुंधा *m*, पाया *m*. १६ *the beginning or end of the slope of a bridge* (उतरत्या) पुलाचा पायथा *m* किंवा पाय *m*. १७ *the lower end or bottom (of a page, a document, a class or list)* शेवट *m*, तळचा भाग *m*. १८ *what is written at the foot* (पानाच्या) पायाजवळचा -पायथ्याजवळचा -तळचा मजकूर *m*. १९ (*pl. foots*) *that which sinks to and lies upon the bottom, the dregs, the refuse, the refuse in refining oil or coarse sugar* तळचा गाळ *m*, मळी *f*, सांखा *m*, रेंदा *m*. २० *footing, standing, basis* पाया *m*, आधार *m*. २१ (*of a table*) खूर *m*, पाय *m*. २२ *the last of a row or series* रांगेंतील शेवटली वस्तु *f.* २३ (*of a class*) वर्गाचा शेवट *m*. २४ *naut. the lower edge of a sail* शिडाची खालची बाजू *f*, पायथा *m*. Feet. *pl.* Foot. *v. i. to dance*, नाचणें, नृत्य करणें. २ *to walk* (opposed to *ride* or *fly*) चालणें, चालत जाणें, पायीं जाणें. F. *v. t.* (*Shakes.*) *to spurn* लाथा झाडणें, लाथा *f. pl.* मारणें. २ (*obs.*) *to establish, to set on foot* उपस्थित-सुरू -करणें, पाया घालणें. ३ *to tread* तुडवणें, तुडवीत जाणें; as, "To F. the green." [TO FOOT IT *to walk* चालत जाणें. २ *to dance* नाचणें.] ४ *to sum up* (as the numbers in a column, sometimes with *up*) (-ची) बेरीज करणें -घेणें, मिळवणें, (-चा) हिशोब करणें. [TO FOOT A BILL (*colloq.*) *to pay a bill* हिशोब चुकविणें-चुकता करणें.] ५ (*Poet.*) (*Shakes.*) *to strike with the talon* नखी मारणें. ६ (*Shakes.*) *to renew the foot of* (as of a stocking) (पायमोज्याचे) तळवे नीट -दुरुस्त करणें. Foot'ball *n.* पायचेंडू *m*, लातचेंडू *m*, पादकंदुक *m*. २ (*the game*) पादकंदुक क्रीडा *f.* चरणकंदुकक्रीडा *f.* Foot-bath *n. a bath for the feet* पादस्नान *n*. (*b*) *a vessel used in bathing the feet* (स्नानाचे वेळीं) पाय बुडवून ठेवावयाचें भांडें *n*. Foot'-board *n. a board upon which one may stand or brace*

*his feet* पाय ठेवण्याची फळी *f*, पादपीठ *n*; as, (*a*) *the platform for the engineer & fireman of a locomotive* पायटा *m*, आगगाडीच्या इंजनाची बाजूची फळी *f* -कठडा *m*. (*b*) *the foot-rest of a coachman's box* पायफळी *f*, गाडी हांकणारानें पाय ठेवण्याची फळी *f*. २ *a board forming the foot of a bedstead* माच्याच्या -बाजेच्या पायाची फळी *f*. ३ *a treadle* (पाययंत्र सुरू करतांना) पाय ठेवण्याची जागा *f* -पाव्या *m*, पायटा *m*. Foot'-boy *n. a page* पोऱ्या *m*, नोकर *m*, खिजमतगार *or* खिजमतदार *m*, हुजऱ्या *m*. Foot'-breadth *n. the breadth of a foot* (used as a measure) एका फुटीची रुंदी *f*. Foot'-bridge *n. a narrow bridge for foot passengers only* पायपूल *m*, पायदादर *m*. Foot'-cloth *n.* (*formerly*) *a caparison for a horse* (घोड्याची) पाखर *f*, झूल *f*. Foot'ed *pa. t. & pa. p. having feet* सपाद, पादयुक्त, पाद (in comp.; as, द्विपाद, त्रिपाद, चतुष्पाद, &c.). २ *established* स्थापित, प्रस्थापित, दृढ झालेला, पक्का अम्मल बसलेला. Foot'-fall *n. a footstep* पाऊल *n*. २ *the sound of a footstep* पायरव *f*, सांचल *or* सांचोल *f*, सांचोला *m*, चाहूल *f*, खडका *m*. [TO LISTEN FOR A FOOT-FALL चाहूल *f* -पायरवा *m*. घेणें.] Foot'-guard *n. pl.* [*Eng.*] *infantry soldiers belonging to select regiments called the guards* पायदळांतील शेलके लोक *m. pl.* Foot'-hill *n. a low hill at the foot of mountains* (पर्वताच्या) पायथ्याची -पायथ्याशीं असलेली टेंकडी *f* -टेंकाड *n*. Foot'-hold *n. firm standing* पाय ठेवायाला आधार *m*, मजबूत आधार *m*, पायटेंकणें *n*, आश्रय *m*, *pop.* आसरा *m*, थार *or* थारा *m*, टेंका *m*, टेंकू *m*. Foot'ing *pr. p.* F. *v. n. ground for the foot* आधार *m*, मजबूत पाया *m*, आश्रय *m*, थारा *m*, पाय ठेवायला जागा *f*. २ *standing, position* जागा *f*, दर्जा *f*, हुद्दा *m*. ३ *relative condition, state* स्थिति *f*, अवस्था *f*, दशा *f*, वृत्ति *f*, भाव *m*. ४ *tread, step,* (*esp.*) *measured step* पाय *m*, पा (वं) यंडा *m* (?). ५ *the act of adding up a column of figures* (एका रकान्यांतील आंकड्यांची) बेरीज घेणें *n* -करणें *n*, मिळविणें *n*. ६ (*a*) *the act of putting a foot to anything* (-ला) पाय लावणें *n* -बसविणें *n*. (*b*) *that which is added as a foot* पाय *m*. ७ *a narrow cotton lace, without figures* सुताची साधी पट्टी *f*, फीत *f*. ८ *arch. & engin. the sloping portion of a wall* (भिंतीचा तळचा) निमुळता भाग *m*. Foot'less *a. having no feet* पादहीन, निष्पाद. Foot'-licker *n. a sycophant* हांजी हांजी करणारा, पाय चाटणारा. Foot'light *n. one of a row of lights in the front of the stage in a theatre &c. and on a level therewith* तलप्रकाश *m*, तळचे दिवे *m. pl.* [BEFORE THE FOOT-LIGHTS *upon the stage* रंगभूमीवर. २ (hence) *in the capacity of an actor* नट या नात्यानें.] Foot'-man *n. a foot-soldier* प्यादा *m*, पदाति *m*. २ *a man in waiting* हुजऱ्या *m*. ३ *a runner* गाडीपुढें धांवणारा नोकर *m*. ४ *a metallic stand with four feet for keeping anything warm before a fire* आळशी *f*. Foot'mat *n.* पायपुसणें *n*, पायपुसें *n*, पायदाज *n*, पायचटई *f*. Foot'men *pl.* Foot'-mark *n.* पदचिन्ह *n*, पद *n*, पाऊल *n*, पायाची खूण *f*. Foot'-print *n. the impression of the foot* पदचिन्ह *n*, पदांक *m*, पद *n*, पाऊल *n*, पावटी *f*. Foot'-note *n. a note at the foot of a page* मजकुराच्या किंवा पृष्ठाचे खालीं लिहिलेली-दिलेली टीप *f*. Foot'-pace *n.* पायचाल *f*, पायगति *f*. Foot'-pad *n. a highwayman* वाटमाऱ्या *m*, वाटेचा लुटारू *m*- चोर *m*. Foot'-passenger *n.* पायीं चालणारा. Foot'-path *n. a footway* पायवाट *f*, पाऊलरस्ता *m*, पाऊलवाट *f*, पायरस्ता *m*. Foot'-pound *n. mech. a unit of energy or work, being equal to the work done in raising one pound avoirdupois against the force of gravity to the height of one foot* एक पौंडाचें ओझें जमिनीपासून एक फूट वर उचलण्यास लागणारा जोर *m* -शक्ति *f*. गुरुत्वाकर्षणाच्या विरुद्ध दिशेनें उचललेल्या वजनाच्या पौंडांच्या व अंतराच्या फुटांच्या गुणाकाराच्या प्रत्येक एकमास (unit) हल्लींच्या प्रचारांत असलेल्या यंत्रशास्त्राच्या भाषेंत foot-pound असें म्हणतात. Foot'-press *n. a cutting, embossing or printing press moved by a treadle* पायछाप *m*, पायानें चालवितां येणारें कापण्याचें, छापण्याचें किंवा उठाव नकशी करण्याचें यंत्र *n*. Foot'-race *n.* चालण्याची शर्यत *f*. Foot'-rope *n. naut.* (a) *the rope rigged below a yard, upon which men stand when furling* (formerly called a *horse*) पायदोरी *f*, शीड गुंडाळतांना उभें रहाण्याची दोरी *f*. (b) *that part of the bolt-rope to which the lower edge of a sail is sewed* शिडाचें खालचें टोंक बांधण्याची दोरी *f*. Foot'-rot *n.* शेळयांच्या पायांना होणारा एक रोग *m*. Foot'-rule *n.* तीन फुटीचें माप *n*. Foot'-soldiers *n. pl.* पायदळी शिपाई *m. pl.* Foot'-sore *a. having sore feet, as by reason of much walking* दुखऱ्या पायांचा, पायांस फोड आलेला. Foot'-stalk *n. bot. the stalk of a leaf or of a flower* देंठ *m*. २ *mach. the lower part of a millstone spindle* जात्याची खालची तळी *f*. Foot'-stall *n. the stirrup of a woman's saddle* घोड्यावरील स्त्रियांच्या जिनाची रिकीब *f*. २ *arch. the plinth or base of a pillar* खांबाची-खांबाची बैठक *f*, उथाळें *n*, उथळें *n*. Foot'-step *n.* (a) *a track, mark* पाऊल *n*, पावटी *f*. (b) (hence) *token, mark* चिन्ह *n*, खूण *f*; as, "The F. of divine wisdom." Foot'-stock *n* (जात्याच्या यंत्रांत जाडबारीक पीठ येण्याकरितां वरची तळी वर उचलण्यासाठीं मधल्या खुंट्याच्या) खालची मायणी व मळसूत्र *n*. Foot'-stool *n. a low stool to support the feet of one when sitting* पीठ *n*, पादपीठ *n*, पदासन *n*. Foot'-way *n. a passage for pedestrians only* पाऊलवाट *f*, पायरस्ता

*m*, चालत जाणाऱ्या लोकांच्या उपयोगाकरितां मुद्दाम केलेला एकाबाजूचा रस्ता *m*. Foot′-worn *a. worn by the feet* चालून चालून झिजलेला -मळलेला. २ *wearied in the feet* थकलेल्या -दमलेल्या -श्रमलेल्या पायांचा.

Fop (fop) [M. E. *fop*, a fool; cf. Dut. *foppen*, to cheat, to fob off, to delude (Johnson).] *n. a dandy; a coxcomb; one who is foolishly attentive to and vain of his appearance, dress, or manners* छानछोक्या, डामडौली, डौली, पोकळडौली, नखरेबाज, अक्कडबाज, नखरेदार, नटवा, नटमोगरा. Fop′ling *n. a petty fop* किंचित् डौली -थोडासा नखरेबाज मनुष्य *m*. Fop′pery *n. coxcombry, dandyism, silly affectation of elegance* नखरेबाजपणा *m*, अक्कडबाजी *f*, फाकडेपणा *m*. २ *foolery, folly* वेडेपण *n*, डौलाची वेडी आवड *f* -हांव *f*, डामडौल *m*, वेड *n*, वेडेचार *m. pl.* Fop′pish *a.* डौली, अक्कडबाज, नखरेबाज, अक्कडबाजीचा, नखरेबाजीचा. Fop′pishly *adv.* Fop′pishness *n.* पोकळ डौल *m*, अक्कडबाजी *f*, नखरेदारी *f*, नखरेबाजी *f*, छानछुकी *f*, छानछोकी *f*, शानछुकी *f*, शानशोकी *f*.

For (fawr) [A. S. *for, fore*, before, for; L. *pro*, Ger. *pro*, Sk. प्र.] *prep. indicating the reason of any thing, indicating the remoter and indirect object of an act* करितां, साठीं, स्तव, कारणें, कारणानें, हेतूसाठीनें, योगें, मुळें, नें; as, "With fiery eyes sparkling *for* very wrath." २ *on behalf of, in favour of, on the side of* (oppo. to *against*) तर्फे, बाजूनें, वतीनें, पक्षाला, पक्षाचा, पक्षाकडील *all with g. of o.*, (-ला) अनुकूल; as, "Majority of votes *for* him." ३ *instead of, in place of* (-च्या) बद्दल -बदला -बदलीं- ऐवजीं -जागीं -जागेवर -मोबदला. ४ *to be, as being* (असुक) असें म्हणून -समजून -धरून; as, "I took him *for* an honest man" = तो प्रामाणिक मनुष्य आहे असें म्हणून -समजून-धरून मी चाललों. ५ *notwithstanding, in spite of* (-ला) न जुमानतां -मानतां, (-कडे) लक्ष न देतां-दुर्लक्ष करून, (-ची) परवा न करितां -ठेवतां, (-ला) न गणून -न गणतांन मोजून -न मोजतां; as, "The writer will do what he pleases *for* all me." ६ *during, in or through the space or time of* पर्यंत, पावेतों, (-च्या) दरम्यानअवकाशांत-अवधींत- मुदतींत; as, "*For* many miles about, there is not a bush." For all that *notwithstanding, in spite of* असें असूनही, असें असून सुद्धां, असें आहे तरी, असें असतांही, तरी सुद्धां, तरीही पण. F. all the world *wholly, exactly* सर्व जगा (च्या राज्या) करितां देखील, कांहीं झालें तरी. F. as much as *or* For as much as, *seeing that, since* ज्या अर्थी -पेक्षां, असें आहे तर. F. by *near, hard by* जवळ, शेजारीं, नजीक, हाताशीं. F. ever *eternally, at all times* सदा, नेहमीं, सदासर्वकाळ, कायमचा, शेवटचा. F. me *or* F. all me, *as far as regards me* माझ्या स्वतःबद्दल म्हणाल-बोलाल -विचाराल -पुसाल तर, माझ्या एकट्या पुरतें -पुरेसें. For my life *or* F. the life of me, *if my life depended on it* (*colloq.*) माझ्या प्राणावर बेतली -ठेपली तरी, प्राणान्तींही, जीव गेला तरी ही. Were it not F. *or* If it were not F. *leaving out of account* असें नसतें तर. F. *conj. because, since, by reason that, for that* कारण, कारण कीं, कांतर, कांकीं, कां म्हणाल -पुसाल-विचाराल तर. F. *n. one who takes the affirmative side* (antithesis of *against*, & commonly used in connection with it) (-ची) बाजू *f*. -पक्ष *m*. उचलून धरणारा, (-च्या) बाजूचा-पक्षाचा मनुष्य *m*, मंडन करणारा. २ *that which is said on the affirmative side, or in favour, of some one or something* (एकाद्या गोष्टीच्या -पक्षाच्या) तर्फेचें -बाजूचें -पक्षाचें बोलणें *n* -म्हणणें *n*, (कोणत्याही गोष्टीच्या किंवा पक्षाच्या) मंडनार्थं दिलेलीं कारणें *n. pl.* -पुरावा *m*, मंडनार्थ प्रतिपादन *n*. The F.s and againsts *those in favour and those against* (-च्या पक्षा) कडील -बाजूचे आणि त्याच्या विरुद्ध असलेले लोक *m. pl.*, उलट सुलट बाजूचे लोक *m. pl.*, अनुकूल व प्रतिकूल पक्ष *m. pl.* २ *pros and cons, the advantages and disadvantages* उलट सुलट-दोन्हीं बाजूंचें म्हणणें *n* -बोलणें *n*, अनुकूल व प्रतिकूल कारणें *n. pl.*, शंका उपशंका *f. pl.*, (एखाद्या विषयाच्या) दोन्ही बाजू *f. pl.*, फायदा तोटा *m*, नफा नुकसान *n*, बरें वाईट *n*.

Forage (for′āj) [M. E. *forage, fourage*, -L. L. *fodrum*, fodder.] *n. the act of providing food, search for provisions* (घोडा किंवा जनावरें ह्यांना) घांसदाणा वैरण इ. लुटून आणणें *n*, (especially by pillage) कहीनें केलेली लूट *f*, लुटून आणलेलें तृण *n* -वैरण *f*. २ *food of any kind for animals esp. for horses and cattle* (घोडे व इतर जनावरें यांच्याकरितां) घांसदाणा *m*, गवतकाडी *f*, चारा *m*, वैरण *f*, चंदी *f*, घांस *m*. ३ (now chiefly) *provender for horses in an army* घांसदाणा *m*. F. *v. i.* (*a*) *to wander in search of food or forage* भक्ष्य -चारा मिळविण्यासाठीं शोधीत फिरणें. (*b*) *to ravage for forage; to plunder, to pillage, to overrun a country for the purpose of obtaining or destroying supplies* कही *f*. करणें, घांसदाणा लुटून आणणें -नेणें. F. *v. t. to supply with forage* दाणा घालणें, दाणापाणी देणें, खायाला घालणें. २ *to collect forage from* दाणापाणी गोळा करणें -मिळवणें. Forage-party *n.* कही *f*.

Foramen (fo-rā′-men) [L. *foramen*, a small hole, from *forare*, to bore, to pierce. L. *pl. foramina*, E. *pl. foramens.*] *n. a small aperture, opening, perforation or orifice* लहानसर भोंक *n*, अल्प छिद्र *n*.

Foray (for′-ā) [Scot. a form of Forage.] *n. an incursion or raid with a view to pillage* लुटीकरितां हल्ला *m*. स्वारी *f*. F. *v. t. & v. i.* लूट *f* करणें, लुटणें.

Forbear (for-bae′r) [A. S. *forberan.*] *v. i. to pause, to*

*refrain from proceeding* थांबणें, धीर *m* -दम *m* धरणें, धीरानें घेणें, कांहीं वेळ जाऊं देणें, खळणें, राहणें. २ *to refuse, to decline, to give no heed* नाकारणें, न ऐकणें, (-कडे) लक्ष न देणें, दुर्लक्ष करणें, कानाडोळा करणें. ३ *to control one's self when provoked* गय *f* -गम *f*. खाणें, मन *n* आंवरून धरणें-आंवरणें, धीर धरणें, धीर खाणें. F. *v. t.* (*a*) *to abstain from, to keep away from* (-पासून) दूर -लांब राहणें. (b) *to give up* सोडून देणें, सोडणें. २ *to treat with indulgence or consideration* गय *f*. खाणें, गम खाणें, (-कडे) कानाडोळा करणें, (-चें) हवें तसें चालूं देणें. Forbear'ance *n.* थांबणें *n*, राहणें *n*, धीर धरणें *n*. २ *exercise of patience* धीर *m*, दम *m*. ३ *command of temper* संयम *m*, संयमन *n*. ४ *clemency* गय *f*, गम *f*, क्षमा *f*, शांति *f*, मुलाजा *m*. Forbear'ing *pr. p. a. & v. n.* Forbear'er *n.* ( from *v. i.* ) धीर धरणारा, दम धरणारा, थांबणारा, धिम्मा ( in a good sense). २ ( from *v. t.* ) गम खाणारा, गय करणारा, क्षमी, क्षमावान्. Forbear'ingly *adv.* गम खाऊन.

Forbear (forbaer') [ *Fore-be-er*, one who is before.] *n.* *Scot. an ancestor, a forefather* (usually in the *pl.*) पूर्वज *m. pl.*, वाडवडील *m. pl.*

Forbid (for-bid') [ *For*–prefix. away, and Bid.] *v. t.* *to prohibit, to interdict* मना *f*. करणें, नको म्हणणें, वारणें, निवारणें, निषेध *m*- प्रतिषेध *m* -करणें, वर्ज करणें. २ *to exclude from by express command, to command not to enter* (मुद्दाम सांगून) बंद करणें, बंदी किंवा मनाई करणें. ३ *to hinder, to obstruct* अडथळा *m*- अवरोध *m* -हरकत *f* -प्रतिबंध *m* आणणें -करणें. ४ (*obs.*) *to accurse* शिव्या देणें. Forbid'dance *n.* (*obs.*) (*Milton.*) हरकत *f*, मनाई *f*, प्रतिबंध *m*, प्रतिषेध *m*, निषेध *m*. Forbid'den *a.* प्रतिषिद्ध, वर्जित, निवारलेला, मना -वर्ज केलेला, वारित, निवारित, परिवर्जित, प्रत्याख्यात. २ (as used of food) निषिद्ध, अविहित, हराम. Forbid'denly *adv.* ( *Shakes.* ) Forbid'der *n.* मना करणारा, निषेध करणारा, निवारक, निवारणकर्ता, निवारणकारक, वर्जक, परिवर्जक. Forbid'ding *a.* मना करणारा, निषेध करणारा, निवारक. २ *repulsive* तिटकारा आणणारा, त्रासजनक, किळस आणणारा, अमंगल, अप्रसन्न. F. *n.* निवारणें *n*, मनाई *f*, वारण *n*, निवारण *n*, निषेध *m*, प्रतिषेध *m*, परिवर्जन *n*, प्रत्याख्यान *n*. Forbid'dingly *adv.* Forbid'dingness *n.* Forbidden fruit ( a) निषिद्धफळ *n*. (b) *any coveted unlawful pleasure* ( so called with reference to the *forbidden fruit* of the Garden of Eden) निषिद्धसुखाची हांव *f*, निंद्य सुखाचा लोभ *m*. [एडन बागेंतील ज्ञानवृक्षाचें फळ खाऊं नका असा देवानें आदम व ईव्ह यांना निषेध केला होता, तरी त्यांनीं तें निषिद्ध फळ खाल्लें व त्यामुळें मानवजातीस दुःख झालें अशी गोष्ट बायबलांत आहे. यावरून निषिद्ध फळ म्हणजे निषिद्ध सुखाचा लोभ हा अर्थ झाला आहे.]

Force (fawrs) [O. Fr. *force*–L. L. *fortia* –L. *fortis*, strong. ] *n. strength, power, energy, might,* (*often*) *an unusual degree of strength or energy, capacity of exercising an influence or producing an effect* जोर *m*, जोम *m*, बल *n*. (*pop.*) बळ *n*, प्रभाव *m*, पराक्रम *m*, प्रताप *m*, शक्ति *f*, अलौकिक सामर्थ्य *n*, ताकद *f*, कुवत *f*, हिय्या *m*. [ Brute F. (as opposed to *art* or *skill* ) मनगटाचा जोर *m*, आंगबळ *n*, आंगजोर *m*, शारीरिक बल *n*, दांडगटपणा *m*, आंगमर्दाई *f*, आंगमर्दी *f*, बाहुबल *n*, भुजबल *n*, आडदांडपणा *m*. ] २ *pertinency, validity, special signification* जोर *m*, युक्तता *f*, विशेष अर्थ *m*, प्राबल्य *n*; as, "The F. of an appeal, an argument, a contract or a term." ३ *power exerted against will or consent, compulsory power, violence, coercion* जोर *m*, जोरावा *m*, जोरावरी *f*, जोरा *m*, जोरजबरी *f*, बळजोरी *f*, बलात्कार *m*, जुलूम *m*, जबरदस्ती *f*, जबरी *f*, बळजबरी *f*. [ By F. *compulsively* बरें. मनगटाच्या जोरावर.] ४ (often in the *pl.*) *military or naval strength, an armament, troops, warlike array* सैन्य *n*, बल *n*, सैन्यभार *m*, सेनाभार *m*, दळभार *m*, सेना *f*, हत्यारबंद शिपाई *m. pl.* [Light-armed force सडी फौज *f*.] (b) *a body of men prepared for action in other ways* कोणतेंही काम करण्याकरितां तयार असलेले लोक *m. pl.*, सैन्य (*fig.*); as, "The labouring F. of a plantation." ५ (*law*) *violence or physical coercion* बळजोरी *f*, जुलूम *m*, बेकायदेशीर सत्ता *f*, बेकायदेशीर अधिकार *m*, जबरी *f*, धाकदपटशा *m*. ६ *validity, efficacy* जीव *m*, सामर्थ्य *n*, शक्ति *f*, बल *n*, बळकटी *f*, तेज *n*, अम्मल *m*, बंधन *n*. [ That is in F. चालता, चालू, जिता, जागता, जिवंत, उपस्थित, अमलांत असलेला, प्रवर्त्तमान, वर्त्तमान. Through the F. of परत्वें or परत्वेंकरून (in *comp.* as, जातिपरत्वें, संप्रदायपरत्वें, लोकाचारपरत्वें, कालपरत्वें, देशपरत्वें, दैवपरत्वें). To be in F. चालणें, चालू-&c. असणें. ] ७ (as of a disease, of winds, heat, &c.) *violence, vehemence* जोर *m*, उग्रम *m*, जोम *m*, अम्मल *m*, बल (*pop.*) बळ *n*, तडाका *m*, कंड *m* (*v.* मोड, जिरव ), रग *f*, झपाटा *m*, वेग *m*. ८ ( *Physics* ) *any action between two bodies which changes, or tends to change, any physical relation between them, whether mechanical, thermal, chemical, &c.* शक्ति *f*, प्रेरणा *f*, बल *n*. [ Concurrent F. s एकदिग्गामी प्रेरणा *f*, सहगामी प्रेरणा *f*. Retarding F. क्षीयमाण प्रेरणा *f*. Non-concurrent F. s भिन्नदिग्गामी प्रेरणा *f*. Accelerating F. वर्धमान प्रेरणा *f*. Resolution of F.s प्रेरणापृथक्करण *n*. Equilibrium of F.s प्रेरणासमतोलन *n*. Parallelogram of F. s प्रेरणासमांतरभुजचौकोन *m*. Composition of F.s प्रेरणैकीकरण *n*.] ९ *a body of police* ( पोलिसाची ) तुकडी *f* -पार्टी *f*. [The force *policemen* पोलिस *n*, पोलिसमधील शिपाई *m. pl.*] F. *v. t. to coerce, to constrain by force, to compel* जुलूम *m* -बळजबरी *f* -बळ *n* -बळजोरी *f* -जोर *m* -जबरी *f* -&c. करणें with वर *of o.*, गळ *m*

घालणें with ला *of o.* [To F. ONE'S HAND *to compel one to act prematurely or to adopt a policy he dislikes* मर्जीविरुद्ध वागण्यास भाग पाडणें, (-चे) हात बांधून टाकणें.] २ *to compel, as by strength of evidence* पदरांत -पदरीं माप घालणें, कबूल करविणें, (खात्री) पटविणें, (खुणा) पटविणें; as, "To F. conviction on the mind." ३ (*a*) *to ravish, to commit rape upon* (a woman), *to use violence to, to violate* जुलूम *m* -बळजोरी *f* -बलात्कार *m* -जोरा *m.* &c. करणें *with* वर *of o.* (*b*) *to put a strained sense upon* (words) (शब्दांचा) क्लिष्टार्थ करणें, (शब्दांची) ओढाताण करणें, शब्दच्छल करणें; as, "Without *forcing* the words of Moses into such a sense." ४ *to capture by assault, to win by violence* हल्ला *m* -चाल *f.* करून घेणें, बळकावणें, हिरावून घेणें, मनगटाच्या जोरावर घेणें. ५ *to impel, drive, wrest, &c. by violence* (with a following adverb, as *along, away, from, into, through, out, &c.*) बळकावणें, हांकलणें, जबरदस्तीनें -दांडगाईनें ढकलणें, हिसकावणें, &c. ६ (*a*) *to exert to the utmost* शिकस्त *f* -कमाल *f.* करून पाहणें. (*b*) *to produce by unnatural effort, to strain* ओढून ताणून -क्लिष्ट रीतीनें रचणें; as, "To F. a metaphor." ७ (*whist*) *to compel* (an adversary or partner) *to trump a trick by leading a suit of which he has none* (आपल्या भिडूजवळ किंवा विरुद्ध बाजूकडे ज्या बाजूचें पान नसेल ती बाजू खेळून त्यास हुकुमानें मारून) हात घ्यावयास लावणें. ८ (a business, &c. upon) पाठीवर गोणी *f.* घालणें, डोकीवर धोंडा *m* -देणें -चढवणें -वळवणें, गळीं *adv.* बांधणें. ९ (a passage) (मार्ग *m* -वाट *f*) काढणें, दपटून -जबरीनें &c. शिरवणें, रिघवणें, घुसडणें, शिरकवणें, जबरीनें -जोरानें रिघाव *or* वा *m* -रीघ *m, f.* करणें. १० (fruit, &c.) *to cause to ripen soon* बळें-मारून सुटकून पिकविणें. ११ *to overpower by force, to make a forcible entry into, to take by force, to storm* (a stronghold), *to board a ship, to effect a passage through by force* घुसणें, हल्ला करून स्वाधीन करून घेणें. १२ *to bring about, to effect, or produce by force or effort; to bring about of necessity or as a necessary result* मुद्दाम घडवून आणणें, व्हावयास लावणें, घडवणें. For'ced *a. produced with great labour* परिश्रम घेऊन कष्टानें केलेला, जुलुमाचा, वेठीचा. २ *hurried* भरभर ओरखडलेला. ३ *produced by unnatural effort, strained* क्लिष्ट, ओढाताण केलेला. Forced'ly *adv.* ओढून ताणून. For'cedness *n.* Force'ful *a. forcible* बळकट, बळाचा, जोराचा, जोरदार, सबल, प्रबल, ताकदवान. २ *cogent, impressive, efficacious* सबळ, सयुक्तिक. Force'fully *adv.* Force'less *a. feeble* कमजोर, दुर्बल, निर्बल. Force'-pump *n. mach.* (*a*) *a pump having a solid piston, for drawing and forcing a liquid, as water, through the valves* दाबाचा बंब *m,* जोरानें पाणी खेंचणारा बंब *m.* (*b*) *a pump adapted for delivering water at a considerable height under a considerable pressure* उंचीवर जोरानें पाणी खेंचणारा बंब *m.* For'cer *n. one who, or that which, forces or drives* दावणारा, दाब *m,* दट्टया *m.* २ *mech.* (*a*) *the instrument by which water is forced in a pump* (बंबामध्यें घेतलेलें पाणी) वर खेंचणारा भरींव दट्टया *m.* (*b*) *a small hand-pump for sinking pits, draining cellars, &c.* खाडे पाडणारा किंवा आगबोटीच्या तळचें घमत काढणारा हातबंब *m.* For'cible *a. powerful* जोरदार, बळकट, प्रबल, सबळ, वजन पडण्यासारखा, वजनदार. २ *impressive, efficacious* परिणामकारी. ३ *impetuous* तलख, जलाल, जोराचा. ४ *effected by force* जुलमाचा, जबरदस्तीचा. Forcible-feeble *a. seemingly vigorous, but really weak* पुढें तिखट मागें पोंचट. For'cibleness *n.* बल *n, pop.* बळ *n,* बळकटी *f,* सबलता *f,* प्रबलता *f.* For'cibly *adv.* बलात्कारानें, जबरीनें, बळानें. For'cing *n. the accomplishment of anything violently or precipitately* (एखादी गोष्ट) बलात्कारानें -जोरानें घडवून आणणें *n,* बळजबरीनें करवणें *n.* २ (*Gardening*) *the art of raising plants, flowers, and fruits at an earlier season than the natural one, as in a hotbed* योग्य ऋतूच्या अगोदर झाडें, फुलें, फळें तयार करण्याची कला *f.* Forc'ing-house *n. a greenhouse for the forcing of plants, flowers, &c.* ऋतूच्या अगोदर झाडें, फुलें, फळें तयार करण्याचें गृह *n.* For'cing-machine *n.* जोरानें ढकलून बसविणारें किंवा ढकलून काढणारें यंत्र *n.* For'cing-pit *n. a hotbed* ऋतूच्या अगोदर फळें, फुलें तयार करण्याचा खाडा *m.*

Forceps (fawr'-seps) [L. *forcep, for-cipis,* from the root of *formus,* hot, and *capere,* to take.] *n. a pair of pinchers or tongs* शस्त्रक्रिया करीत असतां वापरण्याचा चिमटा *m,* संदंश *m* (यंत्र), सांडस *m.* [AURAL F. कानांतील पदार्थ काढण्याचा चिमटा *m,* द्वितालसंदंश *m.* BULLDOG F. शरीराच्या एखाद्या भागाचा छेद करतेवेळीं मोठा मांसल भाग ओढून धरण्याचा चिमटा *m.* BULLET F. गोळी काढण्याचा चिमटा *m.* CRANIOTOMY F. गर्भाच्या मस्तकास भोंक पाडल्यानंतर तें पकडून खालीं ओढण्याचा चिमटा *m.* DRESSING F. व्रण धुण्याच्या वेळीं व तशाच इतर सर्व साधारण प्रसंगीं वापरण्याचा चिमटा *m.* HÆMOSTATIC *or* ARTERY F. रक्तवाहिनी दाबून रक्त बंद करण्याचा चिमटा *m.* LARYNGEAL F. गळ्यामध्यें खालीं एखादा बाह्य पदार्थ अडकल्यास तो काढण्याच्या कामीं उपयोगी चिमटा *m.* LION F. सिंहमुखसंदंश *m,* सिंहासारखें तोंड असणारा चिमटा *m,* अस्थि किंवा अस्थीला चिकटलेली (बाण वगैरे) वस्तु ओढून काढण्याचा चिमटा *m.* LITHOTOMY F. (मूत्राशयांतील)मुतखडा काढण्याचा चिमटा *m.* MID-WIFERY F. द्विफणीप्रसवसंदंश *m,* गर्भाकर्षक संदंश *m.* NECROSIS F. मृतास्थि किंवा मृतास्थीचे तुकडे काढण्याचा चिमटा *n.* PILES *or* HÆMORRHOID

F. मूळव्याधीचा मोड कापण्याच्या वेळीं ते पकडण्याचा चिमटा *m.* RING-SHAPED F. तरक्षुमुखसंदंश *m.* SEQUESTRUM F. रक्षमुखसंदंश *m*, हाडाचा तुकडा ओढून काढण्याचा चिमटा *m.* SINUS F. नाडीव्रणांत चाकू घालण्यासाठीं मार्गदर्शकाच्या कामीं उपयोगी चिमटा *m.* TONGUE F. जीभ बाहेर राहावी म्हणून ती पकडून ठेवण्याचा चिमटा *m.* TORSION F. शिरेचें तोंड पिळवटून रक्तबंदी करण्याचा चिमटा *m*, मुचुंडीसंदंश *m.* URETHRAL F. ( मूत्रनळींतून ) मुतखडा काढण्याचा चिमटा *m* -संदंश *m.* ]

**Ford** (fōrd) [M. E. *ford*, also *forth.* A. S. *ford*, a ford, passage.] *n. a place in a river, or other water, where it may be passed by man or beast on foot, by wading* उतार *m*, पायउतार *m*, पार *m.* २ *a stream, a current* (पाण्याचा) ओढा *m*, ओहोळ *m.* F. *v. t. to wade through* पायउतारानें उतरणें, पायानें (नदी) उतरून पलीकडे जाणें, पायीं उतरणें. Ford'able *a.* पायानें-पायीं उतरायाचा, उतरायाजोगा, पायउतार, थोडें पाणी असलेला (उतार) -असलेली (नदी). Ford'ableness *n.* Ford'less *a.* उतार नसलेली.

**Fore** (fōr) [A. S. *fore*, radically the same as *for*, prep. To be distinguished from the prefix. *for* (Ger. *ver*, in *vergessen.* L. *per.* )] *a. situated or appearing in front, in front of something else* (opp. to *back* or *hind* ) पुढचा, समोरचा, पुढें-समोर असलेला, समोरील, पुरोवर्ती, अग्रवर्ती, पुढील, अग्रिम, मोहोरचा, मोहोरला, मोहरील, अग्र, पूर्व ( in comp.; as, अग्रभाग, पूर्वसूचक ). २ *anterior, precedent, earlier* पूर्वींचा, अगोदरचा. The F. and the hinder पुढलामागला. F. *adv. in the part that precedes or goes first, in advance* (opp. to *aft, after, back, behind, &c.* ) पूर्वींच्या-अगोदरच्या भागांत, आधीं, पूर्वीं. ३ *naut. in or towards the bows of a ship* ( गलबताच्या ) नाळीकडे. F. & aft *adv. naut. from stem to stern* (in distinction from *athwart* ) सर्व गलबतभर, ( गलबताच्या ) या टोंकापासून त्या टोंकापर्यंत, नाळीपासून वरामापर्यंत. २ (of motion or direction) *backwards & forwards* पुढेंमागें, मागेंपुढें. F. & aft *a. placed or directed in the line of the vessel's length* नाळीपासून वरामापर्यंतचा. F. *prep.* The use of *Fore* as a preposition is now obsolete. (Sometimes written *'fore* as if a contraction of *afore* or *before* ). F. *n. the front, the fore part of anything* अघाडी *f*, पुढचा भाग *m* -बाजू *f.* २ (hence) *that which is in front, the future* भविष्य काळ *m*, पुढें होणारी गोष्ट *f.* ३ *naut. the bow of a ship* नाळीची बाजू *f*, नाळ *f.* To the F. *present on the spot, within call* ( जागेवर ) हजर, जवळ, ऐकूं येण्याजोग्या अंतरावर. २ *still surviving or living* अद्यापि हयात -जीवंत; as, "The steward, though stricken in years, is still to the F." ३ *ready at hand, available* (said of money ) जवळ, हाताशीं, तयार, मिळण्याजोगा; as, "How many captains in the regiment have £. 2000 to the F." [ TO COME TO THE F. *to come to the front* पुढें-समोर-नजरेस येणें.] Fore-appoint' *v. t. to order or appoint beforehand* पूर्वींच -आगाऊ नेमणें -नेमणूक करणें -हुकूम सोडणें. Fore- appoint'ment *n.* पूर्वींची -आगाऊ नेमणूक *f.* २ *preordination* (ईश्वरी) नेमानेम *m.* Fore'arm *v. t.* (हल्ला किंवा प्रतिकार करण्याची) आगाऊ-आधींच तजवीज *f* -तरतूद *f* -व्यवस्था *f.* करून ठेवणें. F. *n. anat. that part of the arm between the elbow and the wrist* कोंपर आणि मनगट ह्यांच्या मधला हात *m*, कोंपर आणि मनगट यांमधील हाताचा भाग *m*, (कोंपराच्या खालीं मनगटापर्यंत) हात *m.* Fore-bode' *v. t. to foretell* आधीं-भविष्यरूपानें सुचविणें -सांगणें, (-चें) भविष्य करणें. २ *to augur despondingly* (some ill or misfortune ) वाईट *n* -अशुभ *n.* सुचविणें. F. *v. i.* भविष्य *n* -भाकित *n.* करणें -सांगणें. Forebode'ment *n. the act.* (*a*) भविष्यकथन *n.* (*b*) अशुभकथन *n.* २ *the thing foreboded* भविष्य *n*, भाकित *n.* (*b*) भाकितानें वर्तविलेलें (भावी) संकट *n* -अशुभ *n.* Forebod'er *n.* भविष्य *n* -भाकित *n* सांगणारा -वर्तविणारा -करणारा, &c. Forebod'ing *n. presage of coming evil* अपशकुन *m*, वाईट शकुन *m*, अशुभाशंका *f.* Forebod'ingly *adv.* Forecast' *v. t. to plan beforehand, to scheme, to project* (कोणत्याहि गोष्टीचा) आगाऊ नकाशा आंखणें -आंखून ठेवणें, बेत *m* -योजना *f.* करणें-करून ठेवणें. २ *to foresee* दिसणें or दिसून येणें *in. con. with* ला *of s.*, ( तरतूद करण्यासाठीं ) अंदाज करणें, पुढें नजर पोंचविणें, दूरवर पाहणें. F. *v. i. to contrive beforehand* अगोदर तजवीज *f.* करणें -करून ठेवणें, पूर्वींच बेतबात *m* -बंदोबस्त *m* -योजना *f.* करून ठेवणें, आधीं योजना *f* करून-अटकळ *f.* बांधून -अजमास *m.* करून ठेवणें. F. *n. previous contrivance, predetermination* अगोदरची तजवीज *f*, पूर्वयोजना *f*, आगाऊ झालेला निश्चय *m.* २ *foresight of consequences and provision against them, provision, premeditation* पुढची नजर *f*, भविष्यदृष्टि *f*, धोरण *n*, दूरदृष्टि *f*, दूरवर पोंचविलेली नजर *f.* Forecast'er *n.* Fore'castle *n. naut.* (sailors say *fōk's'l* ) गलबताचा पुढील भाग *m.* Forecho'sen *a.* आगाऊ पसंत केलेला- निवडलेला. Fore'chuck *n.* लांकडी कातकामाच्या सांगाड्याची तीन अण्यांची किंवा तीन टोंकांची आर *f.* Fore'cited *a.* उपरिनिर्दिष्ट, पूर्वकथित. Foreclose ( fawr-clōz' ) [Better spelt *forclose*– Fr. *forclos*, p. p. of *forclore* ( *Forclorre* ) to exclude, to shut out–O. Fr. *fors* ( L. *foris*, ) outside, & Fr. *clore*, to close.] *v. t. to shut out, to exclude* बंद-मना करणें, हरकत *f* -प्रतिबंध *m.* आणणें. Foreclo'sure *n.* ( *law* ) *a proceeding which bars or extinguishes a mortgager's right of redeeming a mortgaged estate*

गहाण देणाराचा गहाण सोडवून घेण्याचा हक्क नष्ट करणें *n.* Foredate' *v. t. to date before the true time* पुढची तारीख आगाऊच घालून ठेवणें -घालणें. Fore'deck *n. naut. the fore part of a deck or of a ship* जहाजाचा पुढचा भाग *m.* Foredoom' *v. t. to predestinate* (-चें) भविष्य *n.* वर्तवणें, आधींच नशीबीं लिहून ठेवणें. Fore'-doom *n.* आगाऊ दिलेली शिक्षा *f.* Fore'father *n. an ancestor* पूर्वज, वडील. Fore'-fathers *n. pl.* वाडवडील *m. pl.*, बापदादे *m. pl.*, आजेपणजे *m. pl.*, पितर *m. pl.* Fore'finger *n. the finger next to the thumb* आंगव्या जवळचें-पुढलें बोट *n*, तर्जनी *f*, प्रदेशिनी *f.* Fore'-foot *n. one of the anterior feet of a quadruped* (usually written *forefoot*) पुढला पाय *m.* Fore'front *n. foremost part* अगदीं पुढचा -दर्शनी भाग *m*, अग्रभाग *m*, अघाडी *f.* Forego (fawr-gō') [O. E. *forgan, forgon, forgoon*, A. S. *forgan*, prop. to go past, (hence) to abstain from.] *v. t. to quit, to relinquish, to leave* सोडणें, त्यागणें, सोडून देणें, जाऊं देणें. २ *to resign, to renounce* (said of a thing already enjoyed, or of one within reach, or anticipated) (-वरील) सत्ता *f* -मालकी *f* -हुकूम *m.* सोडणें, सोडून देणें, दवडणें. Forego'er *n. one who forbears to enjoy* उपभोगाची सत्ता किंवा अधिकार सोडून देणारा. *N. B.* :- *forgo* is the better spelling etymologically. Forego (fawr-gō') [Fore + *gan*, to go.] *v. t. to precede* (used esp. in the *present* and *past participles*) (-च्या) आधींच होऊन-ठरून जाणें. Forego'er *n. a predecessor, an ancestor* पूर्वज, आधीं होऊन गेलेला मनुष्य *m.* Forgo'ing *pr. a.* आधींचा, पूर्वींचा, पूर्वोक्त. Fore'gone *pa. p. a.* पूर्वीं ठरलेला, पूर्वसंकल्पित. A F. conclusion *one predetermined, one which has preceded argument or examination* (वादविवाद होण्यापूर्वींच -दोन्ही पक्षांचें बोलणें ऐकून घेण्यापूर्वींच) ठरून गेलेलें मत *n.* Fore'ground *n.* पूर्वभाग *m*, अग्रभाग *m.* Fore'head *n.* कपाळ *n*, कपाल *n*, ललाट *n*, माथा *m* भाल *n* or *m*, निढळ or निढाळ *m.* [SECTARIAL MARK ON THE F. टिळा *m*, टिकला *m*, टिकली *f*, टिका *m*, टिळक *m*, तिलक *m.* VERTICAL MARK ON THE F. नाम *m.*] Forejudge' *v. t.* (घडलेली हकीकत व पुरावा ऐकण्या) पूर्वींच -आगाऊ न्याय करणें -निवाडा देणें. Foreknow' *v. t. to know beforehand* अगोदरच -पूर्वींच -पहिल्यानेंच माहित होणें -समजणें *in. con. with* ला *of s.* -जाणणें -जाणून ठेवणें, भविष्यज्ञान असणें *in. con. g. of o.*, पूर्वज्ञान असणें *with* विषयीं *of o.* Fore'-knower *n.* अगोदर जाणणारा -जाणून ठेवणारा, &c., भविष्यज्ञ, भविष्यदर्शी *m*, दैवज्ञ. Foreknow'ledge *n.* (*Milton*) पूर्वज्ञान *n*, आगाऊ ज्ञान *n*, (कोणतीही गोष्ट घडण्या) पूर्वीं होणारें -आगाऊ ज्ञान *n.* Fore'land *n.* भूशिर *n.* Fore'lock *n. the lock of hair that grows from the forepart of the head* कपाळावर येणारें झुलुप *n*, टाळूवरची बट *f*, भ्रामरक *m*, भ्रमरालक *m*, काकपक्ष *m* (S.)-(of a horse) झेंडी *f.* २ *mech. a linchpin* (परत न निघणारी अशा वेताची) निसुलती चपटी खीळ *f*, (लांकडाच्या सांध्याला मारण्याची) टाळ *f.* To take time *or* occasion by the F. *not to let slip an opportunity* संधि दवडूं -वायां जाऊं न देणें, वाहत्या गंगेंत हात धुवून घेणें, संधि साधणें. Fore'man *n.* (*a*) *the chief man of a jury, who acts as their speaker* सरपंच *m*, मोहोरक्या *m.* (*b*) *an overseer* मुकादम *m*, देखरेख करणारा. Fore'mast *n. naut.* पुढची डोलकाठी *f.* Fore'mentioned *a. mentioned before* पूर्वकथित, पूर्वोक्त, उपरिनिर्दिष्ट, वर -पूर्वीं- मागें सांगितलेला, पूर्वोदित, वर म्हटलेला-दिलेला. Fore'milk *n.* (*physiol.*) *the milk secreted just before or directly after the birth of a child or of the young one of an animal* चिका *m*, चीक *m.* Fore'most *a. first in time, place, rank, dignity, &c.* सर्वांपुढला, सर्वांपुढचा, सर्वांपुढील, अग्रिम, प्रथम -पहिल्या प्रतीचा, अग्रवर्ती, अग्रेसर, मोहरचा, मोहरला. Fore'name *n. the first or christian name* स्वतःचें नांव *n.* F. *v. t.* प्रथम -पहिल्यानें नामनिर्देश करणें. Fore'named *a.* पूर्वोक्त, वर म्हटलेला, पूर्वोदित, &c. Fore'noon *n. the early part of the day, from morning till noon* पूर्वान्ह *m*, मध्यान्हाच्या पूर्वींची वेळ *f*, सकाळपासून दोन प्रहरच्या मधली वेळ *f.* Fore'ordain *v. t. to appoint beforehand, to predetermine, to predestinate* अगोदर नेमून-योजून ठेवणें. २ *to predetermine* अगोदर ठरवून ठेवणें. Foreordina'tion *n.* पूर्वयोजना *f.* Fore'part *n. the part most advanced* प्रथमचा -पहिला भाग *m* -काळ *m*, पुढला भाग *m*, अग्र *m*, अग्रभाग *m*, मुख *n*, तोंड *n*, मोहर *f.* [F. AND BACK PART आगापिच्छा *m.*] २ *beginning* सुरवात *f*, आरंभ *m*, प्रारंभ *m*, उपक्रम *m.* Forepro'mised *a. promised beforehand* पूर्वप्रतिज्ञात, ज्याबद्दल आगाऊ वचन दिलें आहे असा. Fore'quoted *a. cited before* पूर्वोक्त, पूर्वकथित, पूर्वनिर्दिष्ट. Fore'-rank *n. front* आघाडी *f.* Fore'reach *v. t. naut.* (दुसऱ्या गलबताच्या) पुढें जाणें. Fore'run *v. t. to precede* पूर्वीं-अगोदर-आधीं जाणें-धांव ठोकणें. २ (a) *to introduce as a harbinger* आगाऊ सुचविणें. (b) *to announce* आगाऊ विदित करणें. Fore'runner *n.* (a) *a harbinger* पुढें धांवणारा, अग्रगामी, प्रागगामी, अग्रदूत *m* (cf. भालदार, चोपदार *m*). (b) *a prognostic* अग्रलक्षण *n*, पूर्वचिन्ह *n.* २ (*obs.*) *an ancestor* पूर्वज *m*, पूर्वपुरुष *m.* Foresee' *v. t. to have prescience of* भविष्य *n* -भविष्यार्थ *m* पाहणें -पाहून ठेवणें-करणें-करून ठेवणें -समजणें, अगोदर-पूर्वीं-पहिल्यानेंच &c. पाहणें-पाहून ठेवणें. Fore-sha'dow *v. i. to prefigure* आगाऊ नकाशा आंखून ठेवणें *g. of o.* Fore-short'en *v. t.* (*fine arts*) *to shorten by drawing in perspective* यथार्थदर्शनचित्र घेऊन लहान

करणें. Fore-show' *v. t.* अगोदर-पूर्वीं -&c. दाखवणें-दाखवून देणें, भविष्यसूचन *n-* अग्रसूचन *n-* पूर्वसूचन *n-* &c. करणें *g. of o.* २ See Foretell. भविष्य करणें -सांगणें. Fore-show'er *n.* पूर्वीं दाखविणारा -दाखवून देणारा, भविष्यसूचक, भविष्यसूची. Fore'-sight *n.* (R.) *foreknowledge* पूर्वज्ञान *n.* २ *prudence* दूरदृष्टि *f,* पोक्तदृष्टि *f,* धोरण *n,* दूरदर्शित्व *n,* दूरदर्शिपणा *m,* पुढची नजर *f* -विचार *m.* Fore'-skin *n. anat. the fold skin which covers the glans of the penis* शिश्नशीर्षाच्छादिनी त्वचा *f;* ( पुरुषाच्या जननेंद्रियाची ) पुढची चामडी *f* -टोपी *f,* शफाग्रचर्म *n.* Fore'-skirt *n. the front skirt of a garment, in distinction from the train* पुढची किनार *f.* Fore'-sleeve *n. the sleeve below the elbow* कोंपराखालची अस्तनी *f.* Fore-stall' *v. t. to anticipate* आगाऊच धारणें -अंदाज करणें, आघाडी *f.* साधणें-मारणें *g. of o.,* आगापाई *f.* साधणें-करणें *g. of o.* २ *to preoccupy, to get ahead of* अघाडी मारणें. ३ ( also ) (*a*) *to exclude by prior occupation or by measures taken in advance* आधींच आक्रमण करून -ताब्यांत घेऊन दुसऱ्यास मज्जाव करणें. (*b*) (*Eng. law*) *to intercept on the road, as goods on the way to market* ( आगाऊ खरेदी करून ) अटकाव *m.* करणें. To F. the market *to buy or contract for merchandise or provision on its way to market, with the intention of selling it again at a higher price* माल बाजारांत चालला असतां पुढें जास्त किंमतीला विकण्याकरितां वाटेंतच त्याची खरेदी करणें. Fore-stall'er *n.* Fore'-taste *v. t.* (*a*) *to taste before full possession* सत्ता नसतांना आगाऊच उपभोग घेणें, मासला चाखणें, उपभोग *m* -आदिभोग *m* -पूर्वानुभव *m.* घेणें. (*b*) *to anticipate* आगाऊ कल्पना करणें -बांधणें *with* विषयीं *of o.* २ ( *Milton* ) *to taste before another* दुसऱ्याच्या अगोदर चाखून पहाणें. F. *n.* Foretell' *v. t. to predict* भविष्य करणें-सांगणें, भाकीत *n* -भविष्यार्थ *m* -भवितव्य *n.* करणें -करून ठेवणें. F. *v. i.* भविष्य वर्तवणें-सांगणें-कथणें, कथून ठेवणें, अगोदरच कथून ठेवणें, भविष्य-भाविकथन *n.* &c. करणें. Foretell'er *n.* भविष्यवादी *m,* भविष्य सांगणारा, भाकणारा, भविष्यकथक, भविष्यद्वक्ता *m,* दैवज्ञ *m.* Foretell'ing *n.* भाकणें *n,* भाकणूक *f,* भविष्यकथन *n,* भाविकथन *n.* Forethink' *v. t.* ( *obs.* ) *to prognosticate* भविष्य करणें. Fore'-thought *n. prescience, forecast* भविष्यज्ञान *n,* पूर्वविचार *m,* दूरदर्शन *n* -दृष्टि *f,* दीर्घदर्शन *n* -दृष्टि *f,* पूर्वज्ञान *n.* F. *a.* आगाऊ -अगोदर समजलेला. २ ( hence ) *deliberate* जाणून बुजून केलेला. Fore'-tooth *n. anat. one of the teeth in the forepart of the mouth* पुढचा दांत *m,* सुळादांत *m,* छेदक *m,* चौकटीचा दांत *m,* राजदंत *m.* Fore'-top *n.* ( *a* ) *the hair on the forepart of the head* टाळूवरचे केंस *m. pl.* (*b*) esp. *a tuft or lock of hair which hangs over the forehead, as of a horse* (घोड्याच्या) कपाळावर लोळणारा केशपुंज *m* -केशांचा झुपका *m.* २ *the top of a periwig* टोपाचा शिरोभाग *m.* ३ *naut. the platform at the head of the foremast* पुढच्या डोलकाठीच्या डोक्या-टोंकाजवळ उभें राहण्यासाठीं केलेली मांडणी *f.* Fore-warn' *v. t. to caution in advance* (पूर्वींच) इशारा *m.* देणें, (आगाऊ) सूचना *f.* देणें -देऊन ठेवणें -सुचविणें, अगोदर -पूर्वीं -पाहिल्यानें &c. जतावणें-सुचविणें, ताकीद *f.* देणें-करणें, तटकारणें. Fore'woman *n. fem. a head woman* मुकादमीण *f.* Fore'word *n. a preface* प्रस्तावना *f,* उपोद्घात *m,* सुरवातीचे-प्रारंभींचे -प्रस्तावने दाखल -आधींचे चार शब्द *m. pl.*

Foreign (for'in) [O. Fr. *forain,* alien, strange. Low L. *foraneus, adj.* from L. *foras,* out of doors, *adv.* with *acc. pl.* form allied to L. *fores,* doors.] *a. alien* अन्य, पर, भिन्न, परका. २ *not native* परदेशचा, बाहेरच्या देशाचा, बाहेरचा, परदेशी, परमुलुखचा, परमुलखी, परदेशीय, विदेशी, विदेशीय, वैदेशिक, अन्यदेशी, भिन्नदेशीय, पर, दूरस्थ. ३ *distant, not appropriate* ( -च्या ) बाहेरचा *or* ला, अप्रकृत, अप्रस्तुत, अप्रासंगिक, अप्राकरणिक, असंबद्ध; as, "F. to the purpose." ४ (*obs.*) *exiled* हद्दपार केलेला. Foreign office *n. that department of the government of Great Britain which has charge of British interests in foreign countries* परराष्ट्रीय कचेरी *f.* हीमध्यें इतर राष्ट्रांत ब्रिटिश हिताहिताचा जो संबंध येतो त्यावर पैरवी ठेवण्याचें काम केलें जातें. Foreign Secretary *n. an officer of state who manages the affairs of foreign department or office* परराष्ट्रीय चिटणीस *m.* For'eigner *n.* परदेशचा माणूस *m,* अन्यदेशीय-परदेशी-विदेशी-परमुलखी-परदेशस्थ-परद्वीपस्थ मनुष्य *m.* For'eignness *n.* परकीयता *f,* भिन्नभाव *m,* भिन्नता *f.* २ परदेशीयत्व *n,* परमुलखीपणा *m.* ३ अप्रासंगिकत्व *n,* अप्रकृतता *f,* असंबद्धता *f.*

Forensic ( fo-ren'sik ) [ L. *forensis* –*forum,* market-place. ] *a. belonging to courts of law held by the Romans in the forum* 'फोरम्' मध्यें रोमन लोकांनीं भरविलेल्या न्यायांगणासंबंधीं, रोमन लोकांच्या न्यायमंदिरासंबंधीं. २ *used in law pleading* कायद्याच्या कोर्टांत वापरलेला, न्यायसभेंत -न्यायमंदिरांत वापरण्याचा, वकिली करितांना वापरण्याचा.

Forest (for'est) [O. Fr. *forest.* –Late L. *forestis,* free space of hunting-ground; *foresta,* a wood.–L. *foris,* out of doors, *adv.* allied to L. *fores,* doors.] *n. an extensive wood* अरण्य *n,* वन *n,* रान *n,* कांतार *m, n,* कानन *n,* अटवी *f,* जंगल *n,* झाडी *f.* [CONFLAGRATION OF A F. वणवा *m,* दावानल *m,* दावाग्नि *m,* दाव *m.*] २ (*Eng. Law*) *a large extent of country, generally waste and woody, belonging to the*

*sovereign, set apart for the keeping of game for his use* (राजाकरितां) शिकारीसाठीं राखून ठेवलेलें जंगल *n.* F. *a. pertaining to a forest* रानट, अरण्याचा, वनाचा, रानाचा, आरण्यक. Fores'tage *n.* (*a*) *a duty payable to the king's foresters* जंगलपट्टी *f.* २ (collec.) *tree-growth* जंगलाची -झाडांची नवी वाढ *f,* जंगलवाढ *f.* Forest'al *a.* जंगलासंबंधीं. Forest'er *n. an officer appointed to watch a forest and preserve the game* राखलेल्या जंगलांतील श्वापदांचें रक्षण करून ठेवणारा अधिकारी *m,* जंगलअधिकारी *m.* २ *one who has charge of the growing timber on an estate* वाढत्या इमारतीझाडांवर देखरेख करणारा अधिकारी *m,* जंगल अधिकारी *m* ३ *an inhabitant of a forest* वनचर, वनेचर, रानटी, रानकरी, रान्या, जंगली. Forest-fly *n. one of numerous species of bloodsucking flies which attack both men and beasts* रानमाशी *f,* वनमाशी *f.* Forest'ry *n. the art of cultivating forests* वनरक्षणविद्या *f,* जंगलें कशीं राखावीं ह्या संबंधाची विद्या *f.* Forest-tree *n. a timber tree* वनवृक्ष *m,* इमारती झाड *n.* (fruit tree फळझाड, फलवृक्ष).

Forfeit (for'fit) [Fr. *forfaire, forfait,* –L. L. *forisfacere, forisfactum,* to do beyond what is permitted, to offend,–*foris,* out of doors, beyond, & *facere,* to do. ] *v. t. to alienate the right to possess, by some neglect, or crime* दंडादाखल देणें, (आगळीक -कसूर इत्यादिकांमुळें) दंडादाखल हक्क गमावणें, वस्तु हरवणें; as, "To F. an estate by treason." [ TO BE FORFEITED दंडास जाणें.] F. *v. i.* (*obs.*) *to fail to keep an obligation* करार पुरा करण्यास चुकणें. For'feit *n. a thing forfeited* दंडादाखल हरलेली वस्तु *f.* F. *a. liable to penal seizure* राजहार्य. For'feitable *a. subject to forfeiture* दंडास जाण्याजोगा, दंडहार्य. For'feiting *pr. p & v. n.* For'feited *pa. t. & pa. p.* For'feiter *n. one who incurs a penalty of forfeiture* दंड म्हणून (कांहीं वस्तु) हरणारा. For'feiture *n. the act of forfeiting* दंडादाखल देणें *n,* दंडादाखल जाणें *n.* २ *that which is forfeited* दंडादाखल हरलेली वस्तु *f.*

Forge (fōrj) [O. Fr. *forge,* a workshop, –L. *fabrica,* a workshop.] *n. a place where iron or other metals are wrought by heating and hammering* लोहाराची भट्टी *f* -साळ *f,* लोहाराचा कारखाना *m.* F. *v. t. to form by heating and hammering* घणानें ठोकून घडणें -घडणी *f* -घडणूक *f* -करणें *g. of o.* २ *to frame, to invent* तयार करणें, बनवणें, रचणें. ३ *to counterfeit, as a signature, or a signed document* बनावटीचा -बनावट -खोटा -खोटसाळ-कृत्रिम &c. करणें, बनवणें, खोटा (लेख इ०) करणें. F. *v. i. to commit forgery* खोटा कागदपत्र किंवा सही करणें, बनावट लेख किंवा सही करणें. For'ged *a.* Forge'man *n.* For'ger *n.* घडणारा, घडकामी or -म्या. २ बनावट -खोटा करणारा. For'gery *n.* (*obs.*) *the act of forging metal into shape* घडणें *n,* घडणी *f,* घडणूक *f,* घडण *f,* घटना *f,* घटन *n.* २ *the crime of fraudulently making or altering a writing or signature purporting to be made by another* दुसऱ्याच्या लेखांत किंवा सहींत कपटानें फिरवाफिरव करणें *n,* खोटा-बनावट लेख -सही करणें *n.* ३ *that which is forged* बनावट-खोटा लेख *m* -सही *f.* For'ging *n. the act of shaping metal by hammering* घणानें किंवा दाबानें लोखंड घडणें *n,* घडणें *n,* घडणी *f,* घडणूक *f,* &c. २ *the act of counterfeiting* बनावट करणें *n.* ३ *mach. a piece of forged work in metal* घडकाम *n,* घडीव धातूचें काम *n.*

Forget (for-get') [A. S. *forgietan*-prefix *for-,* away & *gitan,* to get.] *v. t.* (*a*) *to lose the remembrance of* विसरणें, विसर *m* -विस्मृति *f* -विस्मरण *n.* होणें-पडणें *in. con. & g. of o.,* आठवण *f.* न राहणें, भुलणें, भूल *f* -मोह *m.* पडणें *in. con.,* विसरून जाणें. [ To F. ONE'S SELF (*a*) *to become unmindful of one's own personality, to be lost in thought* (विचारांत गढून गेल्यामुळें) स्वतःचें भान न राहणें, तन्द्री लागणें, भुलणें, भांबावणें. (*b*) *to be entirely unselfish* स्वार्थबुद्धि -स्वार्थ -स्वतःच्या फायद्याची दृष्टि -आपलेपणा सोडणें, स्वार्थत्यागी बनणें. (*c*) *to be guilty of what is unworthy of one; to lose one's dignity, self-control or temper, &c.* स्वतःला -स्वतःची ओळख विसरणें, आपल्या दर्जाची ओळख न राहणें.] (*b*) *to lose the power of, to cease from doing* करितां न येणें, न होणें, करण्याची संवय नसणें -मोडणें; as, "Hath thy knee *forgot* to bow?" २ *to slight, to neglect* उपेक्षा *f* -हयगय *f* -हेळसांड *f.* करणें *g. of o.,* (-ला) विसरणें, (-ची) ओळख विसरणें. Forget'ful *a. apt to forget* विसराळू, विसराळ, विसऱ्या, स्मरणाचा -आठवणीचा-&c. फुटका, आठवणीचा धड (*ironically*), विस्मरणशील, घळ्या, भांब्या, भांबळ or -ळ्या, गफलती, गफलत्या. २ *neglectful, inattentive* निष्काळजी, हयगय -टंगळमंगळ -कानाडोळा करणारा. ३ (*archaic* or *poetic*) *oblivious, inducing oblivion* स्मृतिनाशक, स्मृतिहानिकारक; as, "The F. wine." Forget'fully *adv.* Forget'fulness *n. proneness to let slip from the mind* विसराळूपणा *m,* विसराळू स्वभाव *m.* २ *oblivion* विस्मृति *f,* विस्मरण *n,* विसर *m.* ३ *careless omission, inattention* दुर्लक्ष *n,* निष्काळजीपणामुळें झालेली चुकी *f,* गफलत *f.* Forget'-me-not *n. bot. a small herb, bearing a beautiful blue flower and extensively considered the emblem of fidelity* नीलपुष्पी *f.* हें फुलझाड विश्वासाचें द्योतक आहे असें मानतात. Forget'ter *n.* Forget'tingly *adv.*

Forgive (for-giv') [A. S. *forgiefan*–prefix *for-,* away & *gifan,* to give; cf. Dut. *vergeven.*] *v. t. to par-*

*don* (said in reference to the *act* forgiven) क्षमा *f.* -माफ करणें, माफी *f.* करणें *g. of o.*, (दंड *m* -अपराध *m* -अन्याय *m*, &c. यांची) क्षमा करणें *g. of o.*, माफ करणें, (अपराध) पोटांत घालणें, (अपराध) विसरून जाणें. २ *to absolve* (said of the *person* offending) मुक्त करणें, सोडवणें, (-ची) मुक्तता करणें, सोडून देणें. Forgiv'able *a.* क्षम्य. Forgiv'en *p. a.* सोडलेला, क्षमा -माफ केलेला, माफ. Forgive'ness *n.* *–the act.* क्षमा करणें *n*, माफी देणें *n*, क्षमापन *n.* २ *–the state.* क्षमा *f.* दया *f.* माफी *f.* सूट *f.* ३ *disposition to pardon, willingness to forgive* क्षमा *f.* क्षांति *f.* क्षमाशीलता *f.* [FORGIVENESS OF SIN पापमार्जन *n*, पापक्षमापन *n*, पापक्षमा *f.*] Forgiv'en *pa. p.* Forgiv'er *n.* Forgiv'ing *a. disposed to forgive, mild* क्षमी, क्षमावान्, क्षमाशील, क्षमापर, क्षांत. Forgiv'ingly *adv.* Forgiv'ingness *n.* क्षमाशीलता *f.* क्षमापरता *f.*

Fork (fork) [A. S. *forca*, –L. *furca*, a fork.] *n. an instrument consisting of a handle with a shank, terminating in two or more prongs* (used for piercing, holding, &c.) कांटा *m.* २ *furcation* दुखांदा *m*, नांगें *n*, दुबेळकें *n*, गेचक *n*, गेचकळ *n*, बेळकें *n*, बेचक *n*, बेचकूल *n*, बेचकें *n*, बेचांगळें *n*, दुफांटा *m*, फांदा *m.* ३ *anything furcate* डेळकें *n*, डेळकी *f.* डेळी *f.*; as, "A tuning F."=चंग *m.* ३ *a prong, a branch* (of a stream, road &c.) फांटा *m*, शाखा *f.* ४ *the place where a division or a union occurs*, बेचक *n*, दुबेळकें *n*, गेळकें *n.* F. *v. i. to shoot into blades* (as corn) पात्या *f. pl.* फुटणें. २ *to divide into two or more branches* खांद्या *f. pl.* फुटणें. F. *v. t. to raise with a fork* (as hay) कांट्यानें उचलणें. Fork'ed *a. furcated* द्विशाख, द्विकंटक, डेळक्याचा, दुबेळक्याचा, दुफांट्याचा. २ *ambiguous, equivocal* संदिग्ध, संशयित, दुटप्पी. Fork'y *a.* Forke'dly *adv.* Fork'-head *n. the barbed head of an arrow* बाणाचें फळ *n*, टोंक *n*, अग्र *n.*

Forlorn (for-lawrn') [M. E. *forlorn*, A. S. *forloren p. p.* of *forleosan*, to lose utterly; from *for-*, away and *leosan*, to lose.] *a. deserted* टाकलेला, त्यक्त, सोडलेलें -निराश्रय (मूल *n*). २ *helpless, destitute, miserable* अनाश्रय, निराश्रित, निराधार, लाचार, अनाथ, अगतिक, गतिहीन, अडलेला. ३ *almost helpless, desperate* निराश, दीन, जिवावर उदार. A F. hope [D. *verloren hoop.*] *mili.* आणीबाणीच्या प्रसंगाकरितां मुद्दाम राखून ठेवलेलें निवडक सैन्य *n.* Forlorn' *n. a lost, forsaken, or solitary person* एकटा -एकाकी -टाकून दिलेला मनुष्य *m.* २ *a desperate case or enterprise* शेवटचा उपाय *m*, जिवावर उदार होऊन केलेला उपाय *m* -कृत्य *n.* Forlorn'ly *adv.* Forlorn'ness *n.*

Form (form) [O. Fr. *forme*–L. *forma*, shape. O. Fr. *forme*, also means 'a bench'.] *n. configuration, figure, external appearance* आकार *m*, आकृति *f.* घडण *f.* घडणी *f.* बांधा *m*, घाट *m*, घडीत *n*, डौल *m*, उभारणी *f.* रूप *n*, छब *f.* मांडणी *f.* थाट *m*, ठेवण *f.* वळण *n.* [*Form*, IN COMP. IS NEATLY RENDERED BY आकार; AS, MOON-FORM चंद्राकार, EGG-FORM अंडाकार, CIRCLE-FORM चक्राकार, मंडलाकार, वृत्ताकार, वलयाकार. SPHERE-FORM गोलाकार. LEAF-FORM, PITCHER-FORM, &c. पर्णाकार, कलशाकार, गृहाकार, वृक्षाकार, पुस्तकाकार, करंडाकार, पीठाकार, &c.] २ *system, constitution* पद्धति *f.* व्यवस्था *f.* घटना *f.* तंत्र *n*, धोरण *n*, रचना *f.* प्रकार *m*; as, "A republican F. of government." ३ *formula* ठरींव नियम *m*, पद्धति *f* (*pop.*) पद्धत *f.* वेत *m*, क्रम *m*, विधि *m*, परिपाटी *f.* परिपाठ *m*; as, "A F. of prayer." [IN DUE F. यथापद्धति, पद्धतवार.] ४ *conventionality, formality* ठराविक उपचार *m*, उपचार *m*, आदरोपचार *m*, नमुना *m* (*colloq*). ५ (*a*) *elegance, beauty* रूप *n*, लावण्य *n*, सौंदर्य *n.* (*b*) *shapeliness* सुघटना *f.* इष्टाकार *m*, आकृति *f.* रूप *n.* ६ *an image* प्रतिमा *f.* बिंब *n*, प्रतिबिंब *n.* ७ *pattern, model* नमुना *m*, सांचा *m*, संचा *m.* ८ (*a*) *bench* बांक *m* or *n.* (*b*) (of students) *class* वर्ग *m.* (*c*) (also) *a class or rank in society* दर्जा *m*, पदवी *f.* ९ *the seat or bed of a hare* ससाचें बसण्याचें अथवा निजण्याचें ठिकाण *n* -जागा *f.* १० (*print.*) *the type or other matter from which an impression is to be taken, arranged and secured in a chase* फर्मा *m*, (छापण्यासाठीं तयार केलेला) जुळींव ठशांचा संच *m.* ११ (*Fine Arts*) *the boundary line of a material object* बाह्यरेषा *f.* (In painting, more generally) *the human body* मनुष्याकृति *f.* माणसाचें चित्र *n.* १२ *gram. the particular shape of a word or part of speech* रूप *n*; as, "Verbal *forms*"=क्रियापदाचीं रूपें *n. pl.* १३ *metaph.* (*a*) *that assemblage or disposition of qualities which makes a conception, or that internal constitution which makes an existing thing to be what it is* (called *essential* or *substantial form*, and contradistinguished from *matter*) मूलस्वरूप *n.* (*b*) (hence) *law of being or activity*, (subjectively viewed) *an idea*, मूलकल्पना *f.* मूलक्रियानियम *m*; (objectively) *a law* स्थितिनियम *m.* १४ (*a*) *mode of acting or manifestation to the senses, or the intellect* रूप *n*; as, "Water assumes the F. of ice." १५ *biol.* (*a*) *the peculiar characteristics of an organism as a type of others* मूलजाति *f.* शरीररचनाविशेष *m*, देहरचनाविशिष्टत्व *n*, मूर्ति *f.* वपु *n.* (*b*) (also) *the structure of the parts of an animal or plant* रचना *f.* बांधणी *f.* बांधा *m*; as, "Good F. or bad F." F. *v. t. to frame, to fashion, to make* घडणें, करणें, बनविणें, तयार करणें, वळवणें, उतरणें. २ (*a*) *to shape, mold or fashion into a certain state or condition* (-चा) आकार *m* -रूप *n.* देणें-आणणें

(*b*) *to train* शिकवून तरबेज -तयार करणें. (*c*) *to arrange* रचणें, बांधणें, रचना *f* -रचणूक *f* -बंदोबस्त *m*- &c. करणें *g. of o.* ३ *to go to make up, to be the essential or constituent elements* (said of that out of which anything is formed, in whole or in part) अंगभूत -अवयवभूत &c. असणें *in con.*, बनवणें; as, "Who *formed* by far the majority." (These constructions in English can best be translated into Marathi by *in. con.*) ४ *to provide with a form* (*as a hare*) (See F. *n.* ९) सशाला राहण्यास जागा देणें. ५ *gram. to derive by grammatical rules, as by adding the proper suffixes and affixes* (व्याकरणाचे नियम लावून रूपें) तयार करणें. F. *v. i. to take a form* विशेप आकारानें -रूपानें राहणें; as, "The infantry should *form* in columns." २ *to run for a form, as a hare* (सशानें) आश्रयस्थान पकडण्याकरितां धांवणें -पळणें. For'mal *a. belonging to the form* आकाराचा, रूपाचा, आकृतीचा. २ *constituent, essential* अंगभूत, सहज, स्वाभाविक, स्वरूपात्मक. ३ *done in due form, or with solemnity; ceremonial; express* यथाविधी, बेताचा, बेतींव, कायदेशीर, यथापद्धति, यथामार्ग, आचारशुद्ध, संप्रदायशुद्ध, सर्व सोहळे करून (केलेला), व्यवहारानुरूप, आचारानुरूप, विध्यनुरूप. ४ *regular, stiff, exact, methodical, ceremonious* आदरोपचारी, आदरोपचाराचा, आदरोपचारनिष्ठ, आदरसत्कारी, औपचारिक, बेतबेताचा, ठरींव पद्धतीच्या बाहेर काडीभर न जाणारा. ५ *having the form or appearance without the substance or essence* बाहेरचा, बाहेरच्या डौलाचा, वरवरचा, बाह्यात्काराचा, दिखाऊ, वरवर केलेला, तात्पुरता, चालचलाऊ, कामापुरता, वरकांतीं केलेला, नमुना म्हणून केलेला. ६ *conventional* विध्यनुरूप, रूढ झालेला, ठरींव, पूर्वापार चालत आलेला, (परंपरागत) परंपरेनें स्थापित केलेला. ७ (*obs.*) (*Shakes.*) *sound, normal* ताळ्यावर असलेला, सुस्थितींतील. ८ *log. concerned with the form* (as distinguished from the matter) *of reasoning* (तर्क करण्याच्या) प्रकाराचें किंवा रूढीचें प्रतिपादन करणारें (तर्कशास्त्र), रूढिप्रतिपादक, प्रकारप्रतिपादक, रूढ्यात्मक, प्रकारात्मक, वाक्यात्मक. [वाक्य = *syllogism. F. logic* वाक्यात्मक तर्कशास्त्र *n*, रूढ्यात्मक-प्रकारात्मक-रूढिप्रतिपादक-प्रकारप्रतिपादक तर्कशास्त्र *n*. ] Form'alise *v. t. to give formal or definite shape to* विशेष रूप *n* -यथाविधि रूप देणें. २ *to render formal* कायदेशीर-पद्धतशीर-यथाविधि करणें. F. *v. i. to act with formality* शिष्टाचाराच्या कवाइतीनें वागणें. Forma'lism *n. the practice or the doctrine of strict adherence to, or dependence on, external forms, esp. in matters of religion* कर्मठपणा *m*, मंत्रापेक्षां तंत्राची जास्त आवड *f*, तंत्रप्रियता *f*, नियममात्रसेविता *f*. Forma'list *n. one too much confined to forms* आचाराकडे अत्यंत लक्ष देणारा, बाह्याचारभक्त *m*. २ *esp. one who rests in external religious forms, or observes strictly the outward forms of worship, without possessing the life and spirit of religion* धर्मासारख्या बाबतींत केवल बाह्यविधीला चिकटून राहणारा, बाह्योपचारी, बाह्यधर्मनिष्ठ, बाह्यधर्मवृत्ति, धर्माच्या बाह्यांगाला अत्यंत महत्त्व देणारा. Formali'ty *n. the condition or quality of being strictly ceremonious* आदरोपचारनिष्ठा *f*, आदरोपचारभक्ति *f*, आदरोपचारसेवा *f*, औपचारिकत्व *n*, बाह्योपचारभक्ति *f*, भक्ति *f*, सेवा *f*. २ *form without substance* बाह्योपचार *m*, आदरोपचार *m*, पोकळ शिष्टाचार *m*. ३ *conventionality, ceremony* धर्मक्रिया *f*, विधि *m*, उपचार *m*, संस्कार *m*. ४ *usual method, habitual mode, rite* उपचार *m*, रीति *f*, संस्कार *m*. ५ *that which is formal* बाह्योपचार *m*, बाह्यभाग *m*. For'mally *adv.* आदरोपचारानें, आदरानें, आदरपूर्वक. २ पद्धतवार, यथापद्धति, यथाविधि. Forma'tion *n. a forming, a shaping* घडणें *n*, बनवणें *n*, &c. २ *structure, construction* रचणें *n*, रचणूक *f*, रचना *f*, बांधणी *f*, घडणी *f*, घडणूक *f*, घटना *f*, घटन *n*, घडण *n*. घाट *m*, बांधा *m*. ३ *substance formed and deposited* (भांड्याच्या इ०) तळाशीं बसणारा सांख *m*. ४ *geol.* (*a*) *mineral deposits and rock masses designated with reference to their origin* रचना *f*, घटना *f*, विन्यास *m*; (*b*) *a group of beds of the same age or period* समकालीन थर *m. pl.*- स्तर *m*. ५ *mili. the arrangement of a body of troops, as in square column,* &c. बलविन्यास *m*, सैन्याची मांडणी *f*, व्यूह *m*. Forma'tive *a.* आकार किंवा रूप देण्याची शक्ति असलेला. २ *gram. derivative* तद्धित; as, "A termination merely F." ३ *biol.* संवर्धनशील, वृद्धिकारी. F. *n. gram.* (*a*) *that which serves merely to give form, and is no part of the radical, as the prefix or the termination of a word* उपसर्ग *m*, किंवा प्रत्यय *m*. ह्यांसारखा मूळ शब्दांत फरक केल्याशिवाय त्याचें रूप बदलणारा शब्द *m*. (*b*) *a word formed in accordance with some rule or usage, as from a root* साधितशब्द *m*. Form'ed *a.* Form'er *n.* बनविणारा. २ सांचा *m*, पाटन *n*. Form'less *a.* निराकार.

Former (fawm'ėr) [ A. S. *forma*, first, superl. of *fore* & comp. suffix -*er*. ] *a. prior* मागचा-ला, मागील, अधीचा, अधील, पेशजींचा (?), पूर्व, पूर्वींचा, अगोदरचा, अगोदरील, अधला. २ (hence) *ancient* प्राचीन, पूर्वकालीन, प्राक्तन, पूर्वतन, पुरातन, माजी. ३ *first mentioned* पूर्वोक्त, पहिला, अदला, गेला. Form'erly *adv.* मागें, पूर्वीं, मागल्या काळीं, गेल्या काळीं, जुन्या काळीं, पहिल्या काळीं, पूर्वकाळीं, गतकाळीं. [ As F. यथापूर्व, पूर्ववत्. ]

Formic (faw'mik) [ L. *formicare* -*atum*, to creep like an ant -*formica*, an ant. ] *a. chem. pertaining*

*to, or derived from, ants* मुंग्यांचा, पिपीलिकेसंबंधीं. २ (in an extended sense) *pertaining to, or derived from, formic acid* पिपीलिकाम्लासंबंधीं, फार्मिक आसिडाचा-संबंधीं. For'micary *n. zool. an ant-hill* वारूळ *n.* For'micate *a. zool. resembling, or pertaining to, ants* मुंगळी-पिपीलिकासदृश-संबंधीं. Formicā'tion *n. a sensation resembling that made by the creeping of ants on the skin* मुंग्या *f. pl.* (*v.* येणें, चढणें; उ. हातापायाला मुंग्या आल्या), विरविरी or विरविर *f,* रवरवी or रिवरीव *f.*

Formidable (faw'mi-da-bl) [Fr. *formidable* –L. *formidabilis,* terrible, –L. *formidare,* to dread, *formido,* fear.] *a. alarming* भयंकर, भयजनक, भयोत्पादक, कराल, घोर, भयानक, विकराळ, उग्र. Formidabi'lity *n.* For'midableness *n.* भयंकरत्व *n,* भयानकपणा *m,* भयजनकता *f.* Form'idably *adv.*

Formula (fawrm'ū-la) [L. *formula,* dim. of *forma,* a form.] *n. an established rule* (ठरींव) पद्धति *f.* (*pop.*) पद्धत *f,* रीति *f* (*pop.*) रीत *f,* विधि *m,* सरणि *f,* (सूत्रवत्) नियम *m.* २ *eccl.* (*a*) *a written confession of faith* धर्मस्वीकाराची लेखी कबुली *f,* धर्मांगीकाराचा लेख *m,* लेखी धर्मप्रतिज्ञा *f.* (*b*) *a formal statement of doctrines* धर्मसिद्धांतनिवेदन *n,* धार्मिकसिद्धांतांचें यथाविधि निवेदन *n* -ख्यापन *n* -प्रकाशन *n.* ३ *math. a general principle in algebraic language* (बीजगणितांत) सिद्धांत *m* -सूत्र *n.* ४ *med. a prescription* (काढा इ॰ च्या) औषधांची यादी *f.* ५ *chem. a symbolic expression* (by means of letters, figures, &c.) *of the constituents of a compound* संकेत *m,* घटकसंकेत *m,* सूत्र *n,* सारणी *f.* [EMPIRICAL F. प्रयोगसिद्धसारणी *f* -संकेत *m.* GRAPHIC F. *or* RATIONAL F., (called also) STRUCTURAL F. *or* CONSTITUTIONAL F. घटनादर्शकसारणी *f.* MOLECULAR F. अणुदर्शकसारणी *f-* संकेत *m.*] Form'ulary *n. a book containing formulas* विधिक्रमलेख *m,* वचनमाला *f,* सिद्धांतसंग्रह *m.* २ *formula, prescribed form or model* विधान *n,* विधि *m,* पद्धति *f,* &c. F. *a. prescribed* विहित, उक्त, नियमित. Form'ulate *v. t. to put in a clear & definite form of statement* सिद्धांतरूपानें-सूत्ररूपानें मांडणें-रचणें-रचना करणें, संकेताच्या- सारणीच्या रूपानें मांडणें. Formulā'tion *n.* सूत्ररूप *n.* -सिद्धांतरूप *n* -सारणीरूप *n.* देणें *n,* सिद्धांतीकरण *n,* सूत्रीकरण *n.*

Fornicate (faw'ni-kāt) [L. *fornicor, fornicatus -fornix,* an arch, a vault, a brothel.] *v. i. to have unlawful sexual intercourse* व्यभिचार *m-* शिंदळकी *f* -छिनाली *f,* &c. करणें. २ *to commit fornication* अविवाहित स्त्रीशीं गमन *n* -अनूढागमन *n* -कन्यागमन *n* -वेश्यागमन *n.* करणें. Fornicā'tion *n.* अविवाहित स्त्रीशीं गमन *n,* अविवाहितागमन *n,* अनूढागमन *n,* कन्यागमन *n,* वेश्यागमन *n.* २ *incontinence of an unmarried woman* अनूढाव्यभिचार *m.* ३ *unlawful intercourse of the sexes* (gener.) शिंदळकी *f,* छिनाली *f,* जारकर्म *n,* व्यभिचार *m,* रांडबाजी *f,* बदअलम *m,* बदकर्म *n;* (in cant or covert phraseology) बहिर्द्वार *n,* बहिर्व्यसन *n,* बाहेरख्याल *m.* For'nicator *n.* शिंदळकी करणारा, बाहेरख्याली, शिंदळकीखोर, बहिर्व्यसनी, शिंदळ, छिनाल. For'nicatress *n. fem.* अनूढाव्यभिचारी *f.* -चारिणी *f.*

Forsake (faw-sāk') [M. E. *forsaken.* A. S. *forsacan,* to neglect, –*for,* away, & *sacan,* to strive.] *v. t. to desert, to abandon* सोडणें, सोडून जाणें, टाकणें, टाकून जाणें, त्याग *m* -परित्याग *m-* &c. करणें *g. of o.,* अंतर *n.* देणें, -पासून दूर पळणें. २ (*Shakes.*) *to reject, to refuse* नाकारणें, स्वीकार *m.* न करणें, (-ला) नकार देणें; as, "If you F. the offer of their love." Forsak'ing *pr. p.* & *v. n.* Forsook' *pa. t.* Fors'aken *pa. p.*

Forsooth (faw-sōōth') [M. E. *for sothe,* for truth. A. S. *for sooe* where *for*=for & *sooe* is dat. of *soo,* truth.] *adv. in truth, certainly* (formerly used as an expression of respect, esp. to women; now used ironically or contemptuously) ह्या शब्दाचा अर्थ पूर्वीं 'देवाची शपथ' 'गळ्याच्यान्' असा होता; पण हल्लीं त्याचा उपरोधिक किंवा तिरस्कारदर्शक अर्थ झाला आहे. २ खराच! बरोबर!

Forswear (faw-swār') [Pref. *for,* away & Swear.] *v. t.* (a) *to renounce upon oath* (-च्या) त्यागाविषयीं शपथ वाहणें -करणें with *g. of o.,* विषयीं आण *f.* वाहणें with *g. of o.,* शपथ -आण वाहून सोडणें, शपथपूर्वक सोडणें, सशपथ त्याग *m.* करणें *g. of o.* (b) (hence) *to renounce with protestations* निषेधपूर्वक त्याग करणें. २ *to deny upon oath* शपथ करून -शपथपूर्वक सशपथ &c. नाकारणें, अपन्हव *m* -अपलाप *m.* करणें, शपथेवर नाकबूल जाणें -करणें, खोटी शपथ खाणें -वाहणें. [To F. ONE'S SELF खोटी शपथ *f.* करणें -वाहणें, क्रियाभ्रष्ट होणें.] Forswore' *pa. t.* Forsworn' *pa. p.*

Fort (fawt) [Fr. *fort* –L. *fortis,* strong.] *n. a fortification* कोट *m,* किल्ला *m,* दुर्ग *m,* कूट *m,* कोटि *f* (S.). [COUNTRY ON OUTSIDE OF A F. बाहेरकोट *m.* CREST *or* HIGHEST WORKS OF A F. बालेकिल्ला *m.* EARTH HEAPED UP AGAINST THE WALL OF A F. खेण *f,* खेणी *f.* F. ON THE PLAIN –AS DISTINGUISHED FROM A HILL-FORT भुईकोट *m.* F. SURROUNDED BY THE SEA जंजिरा *m,* सिंधुदुर्ग *m.* GOVERNOR *or* KEEPER OF A F. दुर्गाधिकारी *m,* दुर्गाध्यक्ष *m,* किल्लेदार *m.* HILL-FORT डोंगरकिल्ला *m,* डोंगरी किल्ला *m,* गड *m.* ACCOUNTANT OF HILL FORT गडनीस *m.* (HIS OFFICE *or* BUSINESS गडनिविसी *or* निसी *f.*). SOLDIER *or* PEON SERVING IN A HILL FORT गडकरी *m,* गडावरील माणूस *m.* IMPREGNABLE *or* STRONG F. बांका किल्ला *m,* बांका

बुलंद *m*, अभेद्य दुर्ग *m*. INVESTING *or* BESIEGING A F. दुर्गावरोध *m*, किल्ल्याला वेढा-गराडा देणें *n* -घालणें *n*. OUTER FORT बाहेरकोट *m*. SMALL FORT गढी *f*, चौबुरजी *f*. THE UPPER FORT बालेकिल्ला *m*. TO KINDLE THE JUNGLE ROUND A FORT किल्ला *m*. नेसवणें. TOWN BELONGING TO A FORT पेठ *f*. WALL OF A FORT प्राकार *m*. कोट *m*, तट *m*, फांद *m*. SECOND *or* OUTER WALL OF A FORT पडकोट *or* परकोट *m*.] Fort'ed *a*. (R.) (*Shakes.*) *guarded by forts* तटबंदी केलेला.

Forte (fawt) [See Fort.] *n*. See Fort *n*. above. २. *the stronger part of the blade of a sword, the part near the hilt* ( as oppo. to *foible* ) तरवारीच्या मुठीजवळचा जाड मजबूत भाग *m*, मुठीजवळची मजबूत धार *f*. २ *that in which one excels* बिरुद *n*, बिरीद *f*, बाणा *m*, कुलदैवत *n*, विशिष्ट -श्रेष्ठ गुण *m*, बाण्याचा विषय *m*. F. ( for'-tā ) *adv. mus. strongly, loudly* मोठ्या स्वरानें, मोठ्यानें (?).

Forth ( fawth ) [ A. S. *forth*. ] *adv*. ( *a* ) *onward in time, place, or order* पुढें. ( *b* ) *on to the end* अखेरपर्यंत, -पासून पुढें,-पासून नंतर; as, "From that day F." [AND SO F. इत्यादि, वगैरे.] २ *out into notice or view* (दृश्य होण्यासारखा) पुढें, दिसण्यासारखा, दिसेल असा, नजरेंत भरण्यासारखा; as, "The plants put *forth* leaves." ३ ( *Shakes.* ) *abroad, away, out* बाहेर, अन्य ठिकाणीं, दुसरीकडे; as, "I have no mind of feasting F. to-night." Forth'-coming *a*. *making appearance* पुढें येणारा, हजीर, हाजीर, हजर, तयार, सिद्ध, लवकरच घडून येणारा. २ *about to appear* यावयास तयार झालेला, समीप असलेला, आगामी, दिसण्याच्या बेतांत आलेला. Forth'going *n*. ( *a* ) *a going forth* पुढें जाणें *n*. ( *b* ) *an utterance* उच्चार *m*, उच्चारित *n*. F. *a*. *going forth* पुढें जाणारा. Forth'putting *a*. *forward, obtrusive* फाजील, चोंबडा, लुबरा, पुढें पुढें करणारा. Forth'-with *adv*. *immediately* लगेंच, लागलाच, तत्क्षणीं, तेव्हांच, तावड-तोब, तसाच, तत्काल, एकदम, लगोलग, हां म्हणतांच-म्हणतां क्षणीं, आतांच, एव्हांच, असाच.

Fortieth ( faw'ti-eth ) [ A. S. *feorwertigotha*. ] *a*. *following the thirty-ninth* चाळिसावा. २ *constituting one of forty equal parts into which any thing is divided* चाळिसांश.

Fortification See fortify.

Fortify ( faw'ti-fī ) [ O. Fr. *fortifier*, to make strong -L. *forti*, decl. stem of *fortis*, strong, *ficare*, for *facere*, to make. ] *v. t. to strengthen* बळकट करणें, (-ला) बळकटी आणणें, अचल -स्थिर -मजबूत करणें. २ *to strengthen and secure by forts* तटबंदी *f* -कोटबंदी *f*. &c. करणें, तटबंदीनें मजबूत करणें, दुर्गप्राकार दृढ करणें. For'tified *pa. t.* & *pa. p.* For'tifiable *a*. Fortifica'tion *n*. *the act of fortifying* तटबंदी *f* -कोटबंदी *f*, &c. करणें *n*. २ *the art or science of fortifying places in order to defend them against an enemy* दुर्गप्राकारादिरचनाविद्या *f* -शास्त्र *n* -कला *f*. [ FORTIFICATIONS तटबंदी *f*. ] ३ *a fortress* कोट *m*, किल्ला *m*. For'tifier *n*.



Fortitude ( faw'ti-tūd ) [Fr. *fortitude* -L. *fortitudo*, strength -L. *fortis*, strong; with suffix *-tudo*. ] *n*. (*obs.*) *strength* शक्ति *f*, ताकद *f*, बळ *n*, जोर *m*, &c. २ *passive courage, resolute endurance* धीर *m*, धैर्य *n*, छाती *f*, धारिष्ट *n*, हिय्या *f*, वीर्य *n*, धारणा *f*, धृति *f*, सहनशक्ति *f*.

Fortnight (fawt'-nīt) [ M. E. *fourtenight*; ( Sk. नक्त night ). A. S. *feowertyne night*, fourteen nights. ] *n*. *two weeks* पंधरवडा *m*, पक्ष *m*, द्विसप्ताह *n*, अर्धमास *m*, मासार्ध *m*. [ LUNAR F. शुक्लपक्ष *m*. DARK F. कृष्णपक्ष *m*.] Fort'nightly *a*. or *adv*. पंधरवड्याचा.

Fortress ( fawr'tres ) [ O. Fr. *forteresse*, *fortelesce* -L., *fortis*, strong. ] *n*. *a stronghold, a fort* कोट *m*. गढी *f*, चौबुरजी *f*. F. *v. t. to fortify* which see.

Fortuitous ( for-tū'i-tus ) [L. *fortuit-us*, casual; -L. *forte*, by chance with suffix *-ous*. ] *a*. *happening by chance, accidental* आकस्मिक, अवचित -ध्यानीं मनीं नसतां झालेला, आगंतुक, दैवघटित, दैवजात, यदृच्छाजात. Fortu'itously *adv*. आकस्मिकपणें, आगंतुकपणें, अवचितपणें, यदृच्छेनें. Fortu'itousness *n*. आकस्मिकता *f*, Fortu'ity *n*. आकस्मिकत्व *n*, दैवयोग *m*, यदृच्छा *f*, दैवघटितत्व *n*, आगंतुकत्व *n*, &c.

Fortune ( fawr'tūn ) [ O. Fr. *fortune* -L. *fortuna*, chance. ] *n*. *destiny, luck* दैव *n*, भाग्य *n*, प्रारब्ध *n*, नशीब *n*, कर्म *n*, कपाळ *n*, दैविक *n*, दैवाचे-प्रारब्धाचे-नशीबाचे ताळे *m. pl.*, सादलाध or दृ *f*. [ SMILING OF F. IS EXPRESSED IN IDIOMATIC MARATHI BY दैव *n*. -भाग्य *n*. -नशीब *n*. &c. उघडणें -खुलणें -उपटणें -उमें राहणें -उदित होणें -उजेडणें &c., कपाळाची रेघ *f* -रेषा *f* उघडणें -उपटणें, दैव *n*. -भाग्य *n* -&c. उदय पावणें, उदयास येणें, भाग्याचा -दैवाचा &c. उदय *m*. होणें *g. of s.*, लक्ष्मी अवतरणें *with* वर *of o*. THE TURNING, FROWNING, *or* BECOMING ADVERSE OF F. IS EXPRESSED BY दैव *n* -भाग्य *n* -नशीब *n*. &c. फुटणें- माघारणें -अस्त होणें. THE INCREASING PROPITIOUSNESS OF F. IS EXPRESSED BY दैवानें &c. उपट खाणें. THE TAKING OF A RUN BY F. ( of good or evil ) IS दैवानें &c. धांव घेणें. THE CONSTRAINING BY F. (to some evil) IS दैवानें &c. ओढ *f*. घेणें *or* दैव *n*. &c. ओढवणें. SHOWERING DOWN OF FAVOURS BY F. IS दैव *n*. &c. फळफळणें *n*. DAWN OF GOOD F. भाग्योदय *m*. FAVOURITE OF F. भाग्यपुरुष *m*, दैवशाली -दैवाचा प्राणी *m*, दैवाचा पुतळा *m*. GUSTS OF F.'S FAVOURS घोवें *n*, गोवें *n*, घवाड *n*. WHEEL OF F. दैवचक्र *n*, कालचक्र *n*, संसारचक्र *n*, रहाटगाडगें (*colloq.*) *n*. WORSHIP OF F. लक्ष्मीपूजन *n*. F. FAVOURS THE BRAVE धारिष्टास दैव धारजिणें. YOU MAY OUTRUN ALL, BUT F. WILL OUTRUN YOU सर्वांपुढें धांवेल पण दैवापुढें धांववत नाहीं. ] ( *b* ) ( also ) *the per-*

*sonified power regarded as determining human success, apportioning happiness & unhappiness and distributing arbitrarily the lot of life* दैवदेवता *f.* २ *fate, destiny* दैवरेषा *f,* दैवदशा *f,* कपाळरेषा *f,* दैवाचे ताले *m. pl.,* दैव *n,* कपाळ *n,* भाग्य *n,* प्रारब्ध *n,* भोग *m,* भोक्तृत्व *n,* भवितव्य *n,* होतव्य *n,* होयीक *n,* होष्य *n,* होष्यमाण *n.* ३ *good or ill success* लाभालाभ *m,* जयापजय *m,* यशापयश *n,* सुखदुःख *n,* बरेंवाईट *n.* [ GOOD F. सुदैव *n.* ILL F. दुर्दैव *n.* ] ४ *wealth* धन *n,* संपत्ति *f,* दौलत *f,* लक्ष्मी *f,* ऐश्वर्य *n,* पुंजी *f,* पैसा *m,* वित्त *n,* वित्तविषय *m,* मत्ता *f*; as, "A man of F." [ OF BLASTED FORTUNES हतश्री, हतैश्वर्य. TO MAKE *or* BE MAKING ONE'S F. दैव *n.* काढणें.] For'tunate *a. auspicious, happening by good fortune* (said of events) सुदैवाचा, मंगल, मांगलिक, शुभकर, शुभावह. २ *lucky* (said of persons) भाग्याचा, दैवाचा, सुदैवाचा, मोठ्या दैवाचा, भाग्यवान् (*pop.*) भाग्यवंत, दैववान्, (*pop.*) दैववंत, नशीबवान्, (*pop.*) नशीबवंत, धन्य, भाग्यशाली, दैवशाली, श्रीमान्, श्रीमंत. For'tunately *adv.* नशीबानें, सुदैवानें, सुभाग्यानें, दैवयोगानें-बळानें, भाग्योदयानें. For'tunateness *n.* सौभाग्य *n* (S.), भाग्यशालित्व *n,* दैवशालित्व *n.* Fortune-book *n.* शकुनवंती *f.* Fortune-hunter *n. one who seeks to acquire wealth by marriage* लग्नानें श्रीमंत होण्याचा प्रयत्न करणारा. For'tuneless *a. luckless* भाग्यहीन, फुटक्या-कम-नशीबाचा, भाग्यरहित, अभागी, कपाळकरंटा. Fortune-tell *v. t.* दैव *n* -भाकित *n.* सांगणें. Fortune-teller *n. one who professes to tell future events in the life of another* दैव सांगणारा, होतव्य &c. सांगणारा, जोशी *or* ठोकजोशी, मेढेजोशी, डाकोचा *or* डाकोता जोशी, कुडबुडा *or* कुडमुडा जोशी, सर्वदा *or* सरोदा जोशी, पिंगळा जोशी, डौऱ्या जोशी, मनकवडा, फालबेला *or* ल्या, नक्षत्रसूची, दैवज्ञ, दैवलेखक. Fortune-telling *n. the practice or art of professing to reveal future events in the life of another* दैव *n.* सांगणें *n* -भाकणें *n.* &c., उपश्रुति *f.* [THERE ARE VARIOUS SYSTEMS OF FORTUNE-TELLING, INTERPRETING OMENS, &C. OF WHICH SOME ARE मेढेमत *or* मेढगामत *n,* भाडळीमत *n,* सहदेवमत *n,* गोरखमत *n.* ]

Forty (faw'ti) [ A. S. *feowertig -feower,* four, + suff. *-tig,* ten. ] *a. four times ten* चाळीस. [F. ONE एकेचाळ, एकचाळीस, एकताळ, एकताळीस, एकेताळीस. F. TWO बेचाळीस, बेचाळ, बेताळीस. F. THREE त्रेचाळीस, त्रेताळीस. F. FOUR चव्वेचाळ, चव्वेचाळीस, चव्वेताळ, चव्वेताळीस. F. FIVE पंचेचाळ, पंचेचाळीस, पंचेताळ, पंचेताळीस. F. SIX शेचाळ, शेचाळीस, शेताळ, शेताळीस. F. seven सत्तेचाळ, सत्तेचाळीस, सत्तेताळ, सत्तेताळीस. F. EIGHT अठ्ठेचाळ, अठ्ठेचाळीस, अठ्ठेताळ, अठ्ठेताळीस. F. NINE एकुणपन्नास. ]

Forum (faw'rum) [ L. *forum,* a market-place.] *n. the market-place in Rome, where public business was transacted and justice dispensed* (सार्वजनिक काम करण्याची व सार्वजनिक न्याय देण्याची) सार्वजनिक जागा *f.* २ *the courts of law* (as opposed to the *parliament*) न्यायस्थान *n,* न्यायांगण *n,* न्यायमंदिर *n.*

Forward (faw'ward) [ M. E. *forwardes,* A. S. *foreweard-* A. S. *fore,* before, *weard,* sig. direction.] *a. near, at the fore part* पुढील, पुढचा, आघाडीचा, तोंडाजवळील, तोंडाजवळचा, तोंडचा; as, "The F. ship in a fleet." २ (*a*) *ready, prompt* तयार, तत्पर, उद्यत. (*b*) (in an ill sense) *too hasty* नाचरा, पुढें पुढें करणारा, धांवरा. ३ (*a*) *ardent, eager, earnest* उत्सुक, उत्कंठित, उत्साहवान्, उत्साही, सोत्साह, धजदार, आतुर. (*b*) (in an ill sense) *less reserved or modest than is proper, bold, impudent* धीट, निर्भीड, धृष्ट, अगाळिकीचा, उद्दाम, उद्धत, उद्दट. [TO BE OFFICIOUSLY F. पुढच्या पुढें करणें -नाचणें.] ४ *advanced beyond the usual degree* आगसलेला, पुढारलेला, पुढें गेलेला, वेळेपेक्षां लौकर तयार झालेला, अकालपरिणत-परिपक्क. ५ *advanced towards completion* पूर्णप्राय, तयार होण्याच्या बेतांत आलेला, तोंडाशीं आलेला. F. *v. t.* (*a*) *to help onward, to promote* टेंका देणें, (-ला) हात देणें, (-च्या वाढीस) मदत करणें. हातभार लावणें, वृद्धिंगत करणें; as, "To F. the growth of plants." (*b*) *to quicken* घाईनें पुढें ढकलणें. २ *to transmit* पुढें धाडून देणें, पुढें धाडणें, (पत्र इ०) पाठविणें, पुढें पाठविणें. F. *adv.* [ RIGHT F. सरधोपट. TO COME F. पुढें सरकणें, सरसावणें. TO PUT ONE'S SELF F. आपलें घोडें पुढें ढकलणें, पुढें पुढें करणें.] For'wards *adv.* (*a*) *onward* पुढें, मोहरें, समोर, तोंडापुढच्या बाजूस. (*b*) *progressively* (oppo. to *backward*) उत्तरोत्तर, अधिकाधिक, पुढें पुढें, अघाडीस. For'warder *n. a promoter* पुरस्कर्ता, सहाय्यकर्ता, प्रवर्तक. २ *one who sends forward anything* धाडणारा, पुढें पाठविणारा; (*com.*) *a forwarding merchant* (माल पाठविणारा व्यापारी) अडत्या, वच्छादि. ३ (*book-binding*) *one employed in forwarding* (पुस्तकाची) शेवटची बांधणी करणाराकडे पाठविणारा. For'warding *n. the act of one who forwards* पुढें पाठविणें *n.* २ (*book-binding*) *the process of putting a book into its cover, & making it ready for the finisher* पुस्तकावर पुठ्ठा किंवा वेष्टन चढविण्याची पद्धत *f.* For'wardly *dav.* पुढें पुढें करून, आतुरतेनें, उत्कंठतेनें. For'wardness *n. promptness* तत्परता *f,* तयारी *f.* २ *advancement, an advanced stage of progress* पुढें गेलेली स्थिति *f,* आघाडी *f,* अभिवृद्धि *f,* उत्कर्ष *m.* ३ *ardour, eagerness* पुढें पुढें करण्याची हांव *f,* उत्कंठा *f,* आतुरता *f,* उत्साह *m.* ४ *confidence, assurance* प्रत्यय *m,* दृढविश्वास *m,* असंशय *m.* ५ *want of due reserve or modesty* धीटपणा *m,* धिटाई *f,* निर्भीडपणा *m,* धृष्टता *f,* अमर्यादपणा *m,* अविनय *m,* लचाळकी *f.* ६ *prematureness* आघाडीची पक्कता *f,* अकालपक्कता *f.*

**Fosse** (fos) [Fr. *fosse*, –L. *fossa*, a ditch–L. *fossa*, fem. of *fossus*, p. p. of *fodere*, to dig.] *n.* *a ditch or moat in front of a fortified place* खंदक *m*, खळगा *m*, खांच *f*. Foss'ed *a.* Fosse'way *n.* *one of the great military roads constructed by the Romans in England and other parts of Europe* (so called from the *fosse* or ditch on each side for keeping it dry) (सैन्य जाण्यायेण्याच्या सोईसाठीं प्राचीन रोमन लोकांनीं इंग्लंडमध्यें बांधिलेला) दोन्हीं बाजूंला खंदक असलेला रस्ता *m*.

**Fossil** (fos'il) [M. Fr. *fossile*, that may be digged; L. *fossilis*, dug up –L. *fossus* p. p. of *fodere*, to dig. Fossil शब्दाचा मूळ अर्थ खणतीचें द्रव्य किंवा खनिज द्रव्य असा होता. परंतु तो हल्लीं लुप्त झाला आहे.] *n.* (*paleon.*) *the remains of an animal or plant found in stratified rocks* खडकांच्या थरांमध्यें राहिलेला प्राचीन प्राण्यांचा किंवा वनस्पतींचा शेष भाग *m*, अश्मीभूत -प्रस्तरीभूत वनस्पति *f*, चैतन्यावशिष्ट *n*, वनस्पतिपाषाण *m*, प्राणिपाषाण *m*. २ (*colloq.*) *a person whose views and opinions are extremely antiquated* एकदां ठरलेलीं पुष्कळ दिवसांचीं जुनीं मतें किंवा विचार कधींही न बदलणारा मनुष्य *m*, जुन्या विचारांचा पाषाण *m*. (*fig.*). F. *a.* *dug out of the earth* खनिज, खननोद्भूत, पृथ्वींतून खणून काढिलेला, उत्खात, आकरोद्भूत; as, "F. coal." २ (*paleon.*) *like, or pertaining to, fossils* चैतन्यावशिष्टासंबंधीं, अश्मीभूतवनस्पतिसंबंधीं, अश्मीभूतप्राण्यासंबंधीं, अश्मीभूतवनस्पतीसारखा. Fossilif'erous *a.* अश्मीभूतवनस्पतिवह. [*N. B.* According to Mr. Pavgi, Fossil = चैतन्यावशिष्ट and according to another writer, Fossil = पद्. We are doubtful about the second equivalent.] Fossilifiction *n.* *the process of becoming fossil* (वनस्पतीचें किंवा प्राण्याचें) अश्मीभवन-प्रस्तरीभवन *n*. Fos'silise *v. t.* *to petrify* (वनस्पति &c.) पाषाणासारखा करणें. २ *to deaden* प्रेतवत् करणें, मृतप्राय करणें. F. *v. i.* *to become fossil* (खडकांच्या थरांमध्यें) अश्मीभूतरूपानें राहणें, प्रस्तरीभूत -अश्मीभूत होणें. २ *to become antiquated, rigid &c., beyond the influence of change* जुन्या मतांना-विचारांना चिकटून राहणें, पुराणप्रियतेला बळी पडणें, प्रगतीला विरोध करणें, अप्रगतिक्षम बनणें. Fossilisa'tion *n.* Fos'silism *n.* *the science or state of fossils* अश्मीभूतवनस्पतिशास्त्र *n*, अश्मीभूतवनस्पतित्व *n*. २ *the state of being extremely antiquated in views and opinions* केवळ जुन्या मतांनांच अनुसरणें *n* -पाळणें *n*. Fossilist *n.* *a paleontologist* अश्मीभूतवनस्पतिशास्त्रवेत्ता *m*, अश्मीभूतप्राणिशास्त्रवेत्ता *m*. *N. B.*—In our opinion अश्मिल or प्रस्तरिल will be the best equivalent for Fossil.

**Foster** (fos-ter) [A. S. *fostrian*, to nourish, *fostre*, a nurse, –*foster* (= *fodstor*), food.] *v. t.* *to feed, to bring up, to nourish* (दुधानें -अन्नानें) पालन करणें, पोषण करणें, जोपासना करणें, वाढवणें, लहानाचा मोठा करणें. २ *to cherish* वाहणें, वागवणें, बाळगणें, राखणें. ३ *to promote the growth of, to sustain and promote* वाढीस लावणें, वृद्धिंगत करणें, वाढवणें, जोपासना करणें. Foster-brother *n.* दूधभाऊ *m*, दाईभाऊ *m*, (*b*) *pl.* एकाच आईबापांचीं नव्हत परंतु एकाच दाईच्या दुधावर वाढलेलीं मनुष्यें *n. pl.* Foster-child *n.* पाळींव-पोसका -पोसगा -पोसणा or पोष्णा मुलगा *m* -मुलगी *f*, (आईच्या अंगावरचें दूध न मिळतां) दाईच्या दुधावर वाढलेलें मूल *n*. Fos'terdam *n.* *a nurse* दाई *f*. Foster-daughter *n.* पोष्णी -पाळींव लेंक *f*, पोष्णी-पाळींव बेटी *f*. Foster-father *n.* पाळकबाप *m*. Fos'terling *n.* Same as Foster-child. Foster-mother *n.* दाई *f*, पालक माता *f*, धात्री *f*, मातृका *f*, उपमाता *f*. Foster-nurse *n.* दाई *f*. Foster-sister *n.* दूधबहीण *f*, दाईबहीण *f*. Foster-son *n.* पाळींव लेक *m*, पाळींव बेटा *m*, पाळींव पुत्र *m*. Fos'terage *n.* *the charge of nursing* दाईचें वेतन *n* -पगार *m*. Fos'tered *a.* पोसलेला, परिपालित. Fos'terer *n.* पोसणारा, पोशिंदा.

**Fought** *pa. t.* & *pa. p.* of Fight.

**Foul** (fowl) [M. E. *foul*; A. S. *ful.*] *a.* *filthy, dirty, defiled* मळका, मळकट, मलिन *pop.* मळीण, मळसर, मलदूषित, कलुष, दूषित, घाणेरडा, अस्वच्छ. २ *abusive* निंदाव्यंजक, बीभत्स, कुत्सित, अप and कु (in comp.; as, अपकृत्य, अपशब्द, कुशब्द, &c.). ३ *detestable* निंद्य, गर्ह्य, त्याज्य, धिक्कारणीय, तुच्छ. ४ *loathsome* घाणेरा, घाणेरडा, ओंगळ, ओखटा, मुरदाड or मुडदार, अमंगल. ५ *unfavourable* (of wind) उलटा, तोंडचा, पुढचा, समोरचा, प्रतिकूल; (—of weather) जौळी, वादळी. ६ *unfair, dishonest* खोटा (खेळ इ०), अप्रामाणिक, असरल, अनृजु, कुटिल, आडमार्गाचा, गैरवाजवी, अन्यायाचा. ७ *entangled* (opp. to *clear*) अडकलेला, अडलेला, गुंतागुंत झालेला. [To FALL F. OF (-च्या) अंगावर येणें.] F. *v. t.* *to defile, to soil* (-ची) घाण करणें, मळवणें, नाश करणें, खराब करणें. २ *mili.* *to incrust* (the bore of a gun) *with burnt powder in the process of firing* (आवाज काढकाढून तोफेचें तोंड जळक्या) दारूचा गंज राहिल्यामुळें विघडविणें -खराब करणें. ३ *to cover* (a ship's bottom) *with anything that impedes its sailing* (गलबताच्या इ० तळाशीं) अडगळ बांधून गत्यवरोध करणें. ४ *to entangle* गुंतवणें. ५ *to come into collision with* (-शीं) टक्कर होणें *g. of s.* F. *v. i.* *to become clogged with burnt powder in the process of firing, as a gun* (दारू राहिल्यामुळें तोफेचें तोंड) गंजानें भरणें. २ *to become entangled, as ropes* गुंतागुंत होणें. Foul'ing *pr. p.* & *v. n.* Foul'ed *pa. t.* & *pa. p.* Foul *n.* *an entanglement* गुंतागुंत *f*, किचाड *n*. २ *collision* (as in a boat-race) टक्कर *f*, ठोकर *f*. Foul *n.* *a*

*disease of the clefts of the hoofs of cattle* खुरखूत or खुरकूत *n*, खुरगुटी *f.* [ To BE AFFECTED WITH F. खुरखुतणें or खुरकुतणें.] F. *adv.* Foul'mouthed, Foul'-spoken, Foul'-tongued *a.* तोंडाळ, तोंडाचा फटकळ, तोंडाचा वाईट, आडव्या जिभेचा, दुर्मुख. २ वाग्दुष्ट. ३ कुबट. Foul-play *n.* दगा *m*, घात *m*, आडमार्गाचें -सरळ नसणारें वर्तन *n*, काळेंबेरें. Foul'ness *n.* मळके-पणा *m*, मळीणपणा *m*, &c.

Found *pa. t.* & *pa. p.* of Find.

Found ( fownd ) [ O. Fr. *fonder* -L. *fundare*, to found -L. *fundus*, a bottom, foundation.] *v. t. to lay the basis of, to ground* पाया *m.* घालणें, स्थापणें, संस्थापणें, स्थापना *f* -स्थापन *n.* करणें *g. of. o.*, स्थापित करणें. २ *to begin to raise, to originate* उभारणें, चालू-सुरू करणें, स्थापणें, उघडणें, निर्माण करणें. Foundā'-tion *n. the act of founding* स्थापणें *n*, स्थापना *f*, स्थापन *n*, संस्थापन *n*, संस्थापना *f*, प्राणप्रतिष्ठा *f*, प्रारंभ *m*, सुरवात *f.* २ *ground-work, basis* पाया *m*, तळ *m*, मूलाधार *m*, आश्रय *m*, आधार *m*, बुडखा *m*, बुडूख *m.* [To LAY A FIRM F. मजबूत (चिरेबंदी) पाया *m.* घालणें.] ३ *endowment* धर्मादाय *m*, धर्मादायदेणगी *f*; (धर्मादायकृत्याला) पैशाचा पुरवठा *m*, पैशाची बेगमी *f.* ४ *an endowed institution or charity* (इनाम जमीन वगैरे रूपानें) वर्षासन तोडून दिलेली संस्था *f*; (भरपूर उत्पन्नाची) धर्मादायसंस्था *f.* Founda'tioner *n.* (Eng.) *one who derives support from the funds of a college* पाठशाळेच्या वर्षासनांतून पोसला जाणारा (विद्यार्थी इ०). Foun'ded *pa. t.* & *pa. p.* स्थापित, &c. Found'er *n.* पाया घालणारा, स्थापन करणारा, संस्था-पक, स्थापक, मूलपुरुष *m.* Found'ing *pr. p.* & *v. n.*

Found (fownd) [O. Fr. *fondre* -L. *fundere*, to pour; to cast metals.] *v. t. to cast* (धातू वगैरे) ओतणें. Found'er *n. a caster* ओतारी, ( धातु ) ओतणारा. Found'ing *n. the art of casting* (धातूचें) ओत-काम *n*, ओतण्याची कला *f.* Found'ery *n.* Same as Foundry. Found'ry *n. the act, process, or art of casting metals* ओतकाम *n*, ओतकामाची पद्धति *f*, (धातु) ओतण्याची कला *f.* २ *the buildings & works for casting metals* धातू ओतण्याचा -ओतकामाचा कार-खाना *m*, कुप्यशाला *f* ( S. ).

Founder ( fown'-dėr ) [ O. Fr. *fondrer*, Fr. *fondre-fond* -L. *fundus*, the bottom.] *v. i. naut. to be-come filled with water and sink* ( as a ship ) (पाण्यानें भरल्यामुळें) बुडणें -तळाशीं जाणें -तळाशी जाऊन बसणें, बुडणें, बसणें. २ *to fall, to stumble & go lame* ( as a horse ) पडणें, अडखळणें, ठेंचाळणें, ठेंच लागून लंगडणें, पायाला ठोकर लागणें -बसणें *g. of s.* ३ *to fail, to miscarry* फसणें, फुकट -निरर्थक -व्यर्थ -निष्फळ होणें, फुकट -व्यर्थ जाणें, कामास -उपयोगीं न पडणें -येणें, वायफळ होणें. F. *v. t. to cause internal inflamma-tion & soreness in the feet of* ( a horse ), *so as to disable or lame him* (घोड्याला) पायांनीं -पायांचा अधू &c. करणें, लंगडा करणें. F. *n.* (*far.*) (*a*) (घोड्याच्या) पायांना सूज आल्यामुळें आलेला अधूपणा *m* -लंगडेपणा *m.* (*b*) सूज येऊन येणारा ताप *m.* (*c*) *acute rheumatism* जोराचा संधिवात *m* -वायु *m.*

Foundling ( fownd'ling ) *n. a little child found deserted, a child without a parent or owner* रस्त्या-वर टाकलेलें मूल *n*, रस्त्यावर सांपडलेलें मूल *n*, गवशा, निबाप्या, अज्ञातपितृक, अपविद्ध, बिनवारशी मूल *n.*

Fount ( fownt ) [ Fr. *font.*—L. *fontem*, acc. of *fons*, a fountain. ] *n.* Same as Font, which see.

Fountain (fownt'-an) [ Fr. *fontaine* -L. *fons*, *fontis*, a spring, *-fundere*, to pour. ] *n. spring* झरा *m or* झिरा *m*, झरी *f*, निर्झर *m* ( S. ), प्रवाह *m.* [A COR-RUPT F. CANNOT SEND FORTH FRESH STREAMS आडांत पाणी खारें तर पोहऱ्यांत कोठून गोड येईल?]. २ *a playing fountain* कारंजें *n*, फवारा *m.* ३ *a source, origin* मूळ *pop.* मूळ *n*, उगम *m*, उत्पत्तिस्थान *n*, आदि *m*, प्रभव *m.* ४ *a reservoir or chamber to contain a liquid which can be drawn off as needed for use* (पाणी, तेल, इ० चा) सांठा *m*, जलागार *n.*

Four ( fawr ) [ A. S. *feower*, Ger. *vier*, L. *quatuor*, Gr. *tettares*, *pisures*, Sk. चत्वार, four. ] *a. twice two* चार, दोहोंच्या दुप्पट, चौ ( in comp.; as, चौपट, चौकोनी ), चहुं ( in comp. as ; चहुंकडे ), चतुर् ( S. ), (cf. चतुर्भुज, चतुष्कोन). [ AGGREGATE OF F. चौकडी *f*, चतुष्क *n*, चतुष्टय *n.* AGGREGATE OF F. ( COWRIES OF PICE ) गंडा *m.* OF F. KINDS, SORTS, WAYS चतुर्विध. ] F. *n. four units or objects* चार एक, वस्तुचतुष्क *n*, चतुष्क *n*, चार वस्तु *f. pl.* २ *a symbol representing four units* चारांचा आंकडा *m*- अंक *m.* (४). ३ *four things of the same kind, esp. four horses &c.* (एकजातिवस्तूंचें) चतुष्क *n*, चौकडी *f*, ( विशेषतः ) रथा-दिकांचे चार घोडे *m. pl.*; as, "A chariot & *four*;" "A chaise & *four*" = चार घोड्यांची गाडी *f*, &c. Four'fold *a. four times* चौपट, चतुर्गुण. F. *v. t.* चौपट करणें. Four'-footed *a. having four feet* चतुष्पाद, चौपायी, चार पायांचा. Four'-handed *a. having four hands* चार हातांचा, चतुर्भुज. २ *re-quiring four 'hands' or players* चार गडी-भिडू लागणारा (खेळ *m*), चौघांचा, चौघांनीं खेळण्याचा; as, "A. F. game." Four'-in-hand *a. drawn by four horses driven by one person* (एक सारथी असून) चार घोडे जोडलेला रथ *m* -गाडी *f*; as, "A F. coach." F. *n.* ( *a* ) *a team of four horses driven by one person* (एकच हांकणारा असलेलें) अश्वचतुष्क *n*, (एका सारथ्याच्या हाताखालील) घोड्यांची चौकडी *f.* २ (also) *a vehicle drawn by such a team* (एक सारथी असणारी) चार घोड्यांची गाडी *f.* Four'-poster *n.* ( *colloq.* ) *a large bed-stead with tall posts at the corners to support curtains* (मच्छरदाणी वगैरेसाठीं)

चार कोनखांब असलेला पलंग *m*, चौखांबी पलंग *m*. Four'-score *a.* & *n. four times twenty* चार विसा *f. pl.*, ऐशीं. Four'teen *a.* & *n. four & ten more* चौदा, चवदा, चतुर्दश. Four'teenth *a. the ordinal of fourteen* चौदावा, चवदावा. Fourth *a. the ordinal of four* चवथा, चतुर्थ. [ To MAKE THE SUBJECT OF A F. OPERATION ( to plough, read, &c. the fourth time ) चौसारणें *or* चौसरणें, चौसारणी करणें. ] F. *n. one of four equal parts into which one whole may be divided* चौथाई *f*, पाव *m*, पावकें *n*, चौथा वांटा *m*, चतुर्थांश *m*, चोतकर or चौतकर *m*.–of a cake चतकोर *m*, चतकुर *m*. or *f*. [ EXCESS BY A F. सवाई *f*. THAT EXCEEDS BY A F. सव्वा. ] Fourth'ly *adv*. Four-wheeler *n. a vehicle having four wheels* चारचाकी *f*, चौचाकी गाडी *f*.

Fowl ( fowl ) [ A. S. *fugel*, Ger. *vogel*. ] *n*. ( *a* ) *any bird esp. any large edible bird* खाद्य पक्षी *m*, (कोंबडा, बदक, इ०) भक्ष्य पक्षी *m*. ( *b* ) *any domesticated bird used as food* ( as a hen, duck &c.) कापून खातां येईल असा कोणताही (कोंबड्या बदकासारखा) पाळींव पक्षी *m*. ( *c* ) ( in a more restricted sense ) *the common domestic cock or hen* कोंबडा *m*. २. *the flesh of fowl* भक्ष्यपक्ष्याचें मांस *n*. *pl*. Fowls or Fowl. [ F. HOUSE ( पक्ष्यांचें ) खुराडें *n*, खुडी *f*, खुडें *n*. ] F. *v. i. to catch or kill wild fowl for game or food, as by shooting* ( पांखरांची -पक्ष्यांची ) शिकार *f* -पारध *f* करणें. Fowl'er *n*. पारधी *m*. Fowl'ing *n*. पारध करणें *n*. Fowling-piece *n*. पारधीची -शिकारीची -पारधी-शिकारी बंदूक *f*.

Fox (foks) [A. S. *fox*; Ger. *fuchs*.] *n. zool. a carnivorous animal of the genus* Vulpes, *family* Canidæ, *of many species* खोंकड *m*. or *n*, खोकड *m*. or *n*. [FLYING F. वडवाघूळ *n*. ] २ *zool. the fox shark or thrasher shark* (called also *seafox*) पाणखोंकड *n*, समुद्रखोंकड *n*. ३ *colloq. a sly, cunning fellow* कपटी -कावेबाज मनुष्य *m*, लुचा, धूर्त (S.). ४ (*obs.*) (*Shakes.*) *a sword* ( so called from the stamp of a *fox* on the blade ) खोंकडी तलवार *f*. Fox-brush *n. zool. the tail of a fox* खोंकडाचें शेंपूट *n*, खोंकडाचा गोंडा *m*. Fox-case *n. the skin of a fox* खोंकडाची कातडी *f*. Fox-earth *n. a hole in the earth to which a fox resorts to hide himself* खोंकडाचें बीळ *n*. Fox-evil *n. alopecy, a disease in which the hair falls off* केंस गळून पडण्याचा रोग *m*. Fox-glove *n*. एक प्रकारची वनस्पति *f*. Fox-hound *n. zool. one of a special breed of hounds used for chasing foxes* खोंकडाची शिकार करण्यांत पटाईत अशी कुत्र्याची अवलाद *f*. Fox-hunt *n*. खोंकडाची शिकार *f* -पारध *f*. Fox-hunter *n*. खोंकडाची पारध करणारा, खोंकडाची पारध करणारा कुत्रा *m* Fox-hunting *n*. खोंकडाची शिकार *f*. Fox-ship *n*. (R.) ( *Shakes.* ) *craftiness* कपटीपणा *m*, कापट्य *n*, लुचेगिरी *f*. Fox-tail *n the tail of a fox* खोंकडाचें शेंपूट *n*. २ ( *metal.* ) *the last cinders obtained in the fining process* फुलें *n. pl*. Fox-terrier *n. zool. one of a peculiar breed of terriers used in hunting to drive foxes from their holes and for other purposes* फाक्सटेरिअर (एक जातीचा कुत्रा) *m*. Fox-trot *n. a pace like that which is adopted for a few steps, by a horse, when passing from a walk into a trot or from a trot into a walk* खोंकडचाल *f*. Fox and geese खोंकड आणि राजहंस. Fox *v. t. to intoxicate* मद *m* -अम्मल *m* -निशा *f* आणणें, निशेनें गुंग करणें, झिंगवणें. २ *to make sour, as beer, by causing it to ferment* (आंबवून) आंबट करणें. ३ *to repair the feet of* ( boots, &c. ) *with new front upper leather* (जोडे, बूट इ० चे) तळवे नीट करणें. Foxed *a. discoloured or stained* ( said of timber, and also of the paper of books or engraving ) डागळलेला, विटलेला, निरंग झालेला. २ *repaired by foxing* तळ घालून नीट-दुरुस्त केलेला (जोडा, बूट, इ०). Fox'iness *n. craftiness* खोंकडगिरी *f*, धूर्तता *f*, कापट्य *n*, लुचेगिरी *f*, हिकमत *f*, मतलब *m*. २ *deterioration* नास *m*, नासाडी *f*, घाण *f*, धुळधाण *f*, नासणें *n*, हीनता *f*, क्षीणता *f*. ३ *a coarse and sour taste in grapes* (द्राक्षादिकांची) आंबट चव *f*, आंबटपणा *m*. Fox'y *a. wily* लुचा, लुचेगिरीचा, कपटी, धूर्त, कावेबाज, हिकमत्या, मतलबी. २ *having the colour of a fox* खोंकडी रंगाचा.

Fract (frakt) [ L. *fractus*, p. p. of *frangere*, to break. ] *v. t.* (*obs.*) *to break* मोडणें, तोडणें, फोडणें, तुकडे तुकडे करणें. २ *to violate* दूषित -अपवित्र करणें.

Fraction (frak'-shun) [ Fr. *fraction*, –L. acc. *fractionem*, a breaking –L. *frangere*, to break. Fraction या शब्दाचा मूळ अर्थ (जोरानें) मोडणें असा आहे. ] *n. a portion, a fragment* भाग *m*, विभाग *m*, अंश *m*, हिस्सा *m*, तुकडा *m*. २ (*arith.* & *alge.*) *one or more aliquot parts of a unit or whole number* अपूर्णांक *m*, भिन्नसंख्या *f* or ( briefly ) भिन्न *n*. [ COMMON *or* VULGAR F. व्यवहारी अपूर्णांक *m*. ADDITION OF F.S अपूर्णांकांची बेरीज *f*, भिन्नसंकलन *n*. COMMON MEASURE OF F.S साधारण भाजक *m*, अपवर्त्तक *m* (?). HIGHEST COMMON MEASURE OF F.S अपूर्णांकांचा दृढभाजक *m* -दृढअपवर्त्तक *m*. COMPLEX F.S मिश्र अपूर्णांक *m. pl.*; जसें, $\frac{\frac{४}{२}}{३}$, $\frac{२\frac{२}{३}}{५}$. COMPOUND F.S प्रभागजाति अपूर्णांक *m*. *pl.*; जसें, $\frac{३}{४} \times \frac{५}{६}$. CUBE OF A F. अपूर्णांकाचा घन *m*, भिन्नघन *m*, DECIMAL F. दशांश ( अपूर्णांक ) *m*, दशमलव *m*. DENOMINATOR OF A F. अपूर्णांकाचा छेद *m*, छेदक *m*, भाजक *m*. DIVISION OF F.S अपूर्णांकांचा भागाकार *m*, भिन्नभाजन *n*. IMPROPER F. स्थूलभिन्नसंख्या *f*, विषम अपूर्णांक *m*; जसें, $\frac{७}{५}$, $\frac{१०}{३}$. MULTIPLICATION OF F.S अपूर्णांकांचा गुणाकार *m*, भिन्न-

गुणन *n.* NUMERATOR OF A F. अपूर्णांकाचा अंश *m* -भाज्य *m.* PROPER F. सम अपूर्णांक *m*, सूक्ष्मभिन्नसंख्या *f*; जसें, २/५. REDUCTION OF F.S TO A COMMON DENOMINATOR अपूर्णांकांचा समच्छेद करणें *n.* REDUCTION TO A LOWER DENOMINATOR अपवर्त्तन *n.* (?). SIMPLE F. भागजाति अपूर्णांक *m*; जसें, २/५, १४/११. SQUARE OF A F. अपूर्णांकाचा वर्ग *m*, भिन्नवर्ग *m.* ] Frac'tional *a.* अपूर्णांकाचा, अपूर्णांकासंबंधीं. २ *constituting a fraction* अपूर्णांकरूप, अपूर्णांकघटित. ३ *insignificant, relatively small* हिशोबांत -जमेंत न घेण्यासारखा, बारिकसारिक, अगदींच लहान -थोडा. Frac'tionally *adv.* अपूर्णांकरूपानें, भागरूपानें, भागशः. Frac'tionate *v. t. to separate into different portions or fractions as in the distillation of liquids* निरनिराळे भाग -अंश पाडणें.

Fractious (frak'-shus) [ See Fraction. ] *a. apt to break into a passion, unruly, apt to scold* रागीट, लवकर राग येणारा, तुडस, तुसडा, तुटक, तुटसाळ, बेफाम, कज्जेखोर, कज्जेदलाल, भांडखोर. Frac'tiously *adv.* भांडखोरपणानें. Frac'tiousness *n.* तुडस स्वभाव, तुसडा स्वभाव *m*, तुडसपणा-तुसडपणा *m.*

Fracture (frak'-tur) [ See Fraction. ] *n. rupture, breach* फूट *f*, भंग *m*, भंजन *n*, फट *f*, फाट *f*, चीर *f*, चुराडा *m.* २ (*surg.*) *the breaking of a bone* अस्थिछेद *m*, अस्थिभंग *m.* [ COMMINUTED F. (A FRACTURE IN WHICH THE BONE IS BROKEN INTO SEVERAL PARTS ) (ज्या भंगांत हाड मोडून त्याचे दोहोंहून अधिक तुकडे होतात असा ) अनेक खंडांचा अस्थिभंग *m.* COMPLICATED F. (A FRACTURE OF THE BONE COMBINED WITH THE LESION OF SOME ARTERY OR JOINT ) ( ज्या भंगांत हाड मोडून त्याच्या मोडक्या टोंकांनीं स्नायू, धमन्या, ज्ञानतंतू, मेंदू, यकृत्, प्लीहा, वगैरे शरीराचे महत्वाचे भाग जखमी होतात असा ) गुंतागुंतीचा अस्थिभंग *m.* COMPOUND F. ( A FRACTURE IN WHICH THERE IS AN OPEN WOUND FROM THE SURFACE DOWN TO THE FRACTURE ) ( ज्या भंगांत हाड मोडतें व आणखी हाडाच्या मोडलेल्या टोंकांशीं हवेस जाऊं देण्यासारखी कातडी व मांस यांस जखम झालेली असते किंवा त्या जखमेंतून मोडलेल्या हाडाचें टोंक बाहेर आलेलें असतें असा ) मिश्र अस्थिभंग *m.* SIMPLE F. (A FRACTURE IN WHICH THE BONE ONLY IS RUPTURED) ( ज्या भंगांत फक्त हाड मोडतें व दुसरी फारशी इजा झालेली नसते असा ) साधा अस्थिभंग *m.* ] ३ (*min.*) *the texture of a freshly broken surface* तडक *f*, चीर *f*, भेगाळपणा *m.* F. *v.t. to break asunder* छेद *m* -भंग *m.* करणें, मोडणें, तोडणें, चुरा *m* -चुराडा *m.* करणें, तुकडे तुकडे छिन्नविच्छिन्न करणें, तडकणें, चीर *f.* -पाडणें.

Fragile (fraj'-il) [ Fr. *fragile*, L. *fragilis*, easily broken –L. *frag*, base of *frangere*, to break. ] *a. easily broken, brittle, delicate* ठिसुळ, लवकर फुटणारा, नाजुक, भंगशील, भंजनशील, फुटरा, फुटीर, कांचेच्या भांड्यासारखा, अशक्त. २ *frail* क्षणभंगुर, नाशवंत, नश्वर, अचिरायु, अशाश्वत. Fra'gilely *adv.* Fragil'ity *n. brittleness* ठिसुळपणा *m*, नाजुकपणा *m*, भंगशीलता *f.* २ (क्षण) भंगुरता *f*, नाशवंतपणा *m.* ३ *feebleness* अशक्तता *f*, कमजोरपणा *m*, दुर्बल (ळ) ता *f*, दुर्बळपणा *m*, दौर्बल्य *n.*

Fragment (frag'-ment) [ Fr. *fragment* –L. *fragmentum*, a broken piece, –L. *frag*, base of *frangere*, to break, with suffix *-mentum.* ] *n. a small detached portion, a portion broken off* तुकडा *m. dim.* तुकडी *f*, कपळा *m*, खंड *m* or *n*, कटका *m*, कुटका *m*, निराळा झालेला भाग *m.* [FRAGMENTS चुरा *m*, चूर *m*, चाराचुरा *m*, चकाचूर *or* चकनाचूर *m*, चूरचार *m*, चुराडा *m*, कुटा *m*, खुर्दा *m* (*colloq.*). F.s (OF RICE, PULSE, &C. ) कणी *f*, आडकणी *f*, कणवर *m.* IN FRAGMENTS भागशः, खंडशः. ] Fragmen'tal *a.* Frag'mentarily *adv. piece-meal* भागशः, खंडशः, थोडें थोडें, हळू हळू. Frag'mentariness *n.* अपूर्णत्व *n*, खंडितत्व *n.* Frag'mentary *a. disconnected, not entire* तुकड्यांचा, खंडमय, अपूर्ण, अंशरूप. Frag'mented *a. broken into fragments* भग्न, खंडित, छिन्नविच्छिन्न.

Fragrant (frā'-grant) [ Fr. *fragrant*, –L. *fragrantum*, acc. of *fragrans*, *pr. p.* of *fragrare*, to emit an odour. ] *a. sweet-scented, odorous* सुवासिक, वासाचा, मधुर -गोड वासाचा, सुगंधि, सुवासाचा, सुगंधाचा, सुगंधिक, इष्टगंध, सुरभि (S.), परिमलयुक्त-विशिष्ट, मधुर, गोड, खुशबोईचा. Frag'rance, -cy *n. perfume, a sweet smell* सुवास *m*, सुगंध *m*, सुगंधि *m*, गोडी *f*, माधुर्य *n*, सुरभि *m*, सौरभ्य *n*, परिमल (*pop.*) परिमळ *m*, स्वाद *m*, आस्वाद *m*, खुशबोई *f*, मधुर-गोड स्वाद *m* -वास *m.* [ A WIDELY DIFFUSED F. दमदमाट *m*, घमघमाट *m.* TO HAVE DIFFUSIVE F. घमघमणें, घवघवणें. STRONG, SWEET, DIFFUSIVE, &C. F. घमघमीत, घवघवीत. ] A fragrance *fragrant substance* गंध *m*, सुरभि *m*, सुगंधिद्रव्य *n*, परिमलद्रव्य *n.* Frag'rantly *adv.*

Frail (frāl) [ O. Fr. *fraile*, brittle –L. *fragilem*, acc. of *fragilis*. See Fragile. ] *a. fragile* भंगुर, क्षणभंगुर, भंजनशील, भंगशील, क्षणविध्वंसी, नश्वर, नाजूक, अशक्त, दुर्बल, निर्बल, फुटरा, फुटीर, निर्जीव. २ *weak in resolution* अधीर, अस्थिर, अस्थिरबुद्धि, चलबुद्धि, स्खलनशील, भ्रमशील, अनिश्चयी, डळमळीत मताचा. ३ (also) *unchaste* (often applied to fallen women) व्यभिचारी, पतित, भ्रष्ट, नादान, दूषित. Frail'ly *adv.* Frail'ness, Frail'ty *n.* भंगुरता *f*, नश्वरता *f*, नैश्वर्य *n*, अशाश्वती *f.* २ अशक्ति *f*, अशक्तता *f*, दौर्बल्य *n*, दुर्बलता *f*, &c. ३ अस्थिर बुद्धि *f*, अस्थिरता *f*, डळमळीतपणा *m*, अनिश्चय *m*, भ्रमशीलता *f.* ४ *fault* चूक *f*, चुकून घडलेली गोष्ट *f*, प्रमाद *m*, दोष *m.*

Frail (frāl) [ O. Fr. *frayel*, of dubious origin. ] *n. basket of rush* लव्हाळ्याची टोपली *f.*

Frame (frām) [A. S. *framian*, to be helpful, *fram*, forward.] *v. t.* (*arch. & engin.*) (*a*) *to construct by fitting & uniting together the several parts of the skeleton of any structure* जोडणें, उभें करणें. (*b*) (specifically in wood-work) *to put together by cutting parts of one member to fit parts of another* जोडून-कापून सांधणें-सांधा देणें, जोडणें. २ (*a*) *to devise* योजून काढणें, शोधून काढणें, डोक्यांतून काढणें. (*b*) (in a bad sense) *to fabricate as something false* रचणें (कपट इ०), बनविणें. ३ *to adjust, to regulate* जम *m* -बसविणें, जुळून देणें, जुळवणें, (-शीं) जुळता-मिळता करणें, बसता -बसेसा करणें, मिळवून बरोबर करून घेणें. ४ *to provide with a frame* (as picture) (-ला) चौकट घालणें-बसविणें, चौकटींत घालणें-बसविणें. F. *v. i.* (*obs.*) (*Shakes.*) *to proceed, to go* जाणें; as, "The beauty of this sinful dame, made many princes thither F." F. *n. a structure* रचना *f*, मांडणी *f*, उभारणी *f*, रचणी *f*. २ *physical constitution* शरीराची काठी *f*, अंगरचना *f*, बांधा *m*, शरीराची ठेवण *f*, आकृति *f*, आकार *m*, रूप *n*. ३ *a kind of open case or structure made for admitting, supporting, or enclosing things*; as, (a) ओतकामाची पेटी *f*. (b) कशिदा काढण्याची चौकट *f*. (c) सूत काढण्याचा सांचा *m*. (d) फीत तयार करावयाची चौकट *f*. ५ *form, scheme, structure* बंधारण *n*, धोरण *n*, तंत्र *n*, पद्धति *f*, रीति *f*, योजना *f*; as, "A. F. of government." ६ *humour, temper, mood* वृत्ति *f*, मनोवृत्ति *f*, स्वभाव *m*, प्रकृति *f*, वळण *n*, इच्छा *f*, भाव *m* (१). Fram'er *n.* चौकट घालणारा -बसविणारा. Frame'-work *n. the frame of anything* चौकट *f*. २ मांडणी *f*, &c. Fram'ing *n. that which frames* चौकट *f*. २ *a frame-work* बाहेरचें काम *n*, चौकटीचें काम *n*. Framing-chisel *n.* विंधकामाच्या-इंधकामाच्या यंत्राचें हत्यार *n*, सब्बा *m*, जाडी फरशी *f*.

Franc (frangk) [Fr. *-frank*, a Frank. See Frank *a.*] *n. a silver coin originally used in France, now also in Belgium, &c., equal to 10d. Sterling* १० पेन्स किंमतीचें रुप्याचें नाणें *n*. प्रथमतः हें नाणें फ्रान्स-मध्यें निघून हल्लीं बेल्जिअम् वगैरे देशांतही सुरू आहे.

Franchise (fran'-chiz *or* -chīz) [Fr. from *franc*, fem. *franche*, free. या शब्दाचा मूळ अर्थ "मोकळीक, स्वातंत्र्य, माफी, सूट" असा आहे.] *n.* (*law*) *a particular privilege conferred by grant from a sovereign or a government, and vested in individual* (सरकारानें व्यक्तीस सनदपूर्वक दिलेला) विशिष्ट अधिकार *m*, सनदी अधिकार *m*, खास हक्क *m*. २ *a constitutional right or privilege, esp. the right to vote* (नियंत्रित राजसत्तेंतील) व्यक्तीचा मताधिकार *m*, मत देण्याचा अधिकार *m*-हक्क *m*, मत *n*. [ELECTIVE F. (कोणत्याही सार्वजनिक निवडणुकीमध्यें) निवडून देण्याचा अधिकार *m* -हक्क *m*.] ३ *the district or jurisdiction to which a particular privilege extends* विशेष हक्क भोगणारा प्रांत *m*. ४ (hence) *an asylum, a sanctuary* (ज्या ठिकाणीं बाहेरील कोणत्याही अन्य सत्तेचा जोर पोंचत नाहीं असा) आश्रम *m*, पवित्रस्थान *n*, शरण स्थान *n*, निर्भय आश्रयस्थान *n*, कोट *m*. F. *v. t. to give liberty to* (-ला) स्वातंत्र्य देणें, स्वतंत्र करणें, (-ची) सुटका करणें, मोचन करणें, मुक्त -मोकळा करणें. २ *to give one the franchise* (-ला) मताधिकार *m* -मत देण्याचा हक्क *m*. देणें. Fran'chisement *n. release, freedom* स्वतंत्रता *f*, स्वातंत्र्य *n*, मोकळीक *f*, मोचन *n*, सुटका *f*, बचाव *m*. २ अधिकार *m*, हक्क *m*. Fran'-chiser *n. one who has the franchise* सूट *f* -मोकळीक *f* -विशेष अधिकार *m* -हक्क *m* भोगणारा.

Frangible (fran'ji-bl) [Late L. *frangibilis*, breakable, a coined word –L. *frangere*, to break. See Fraction.] *a.* Same as Fragile, which see. Frangibil'ity *n.*

Frank (frank) [O. Fr. *franc*- L. L. *francus*, free.] *a. open, candid* (of persons) मनाचा मोकळा, मनाचा साफ, निर्मळ-शुद्ध-स्वच्छ मनाचा, निष्कपट, अकपट, अकृत्रिम, प्रशस्त, सालस, सरल, निष्प्रांजल, प्रांजल. (*b*) (of speech) प्रशस्तपणाचें, सालसपणाचें, सरळ-शुद्ध भावाचें, निष्कपट, सरळ, उघड. २ *loose, licentious* (used in a bad sense) दुराचारी, व्यसनी, व्यभिचारी, स्वैर-स्वच्छंदानें वागणारा, निरंगल वागणारा. F. *v. t. to send by public conveyance free of expense* फुकट-मोफत रवाना करणें, हांशिला-शिवाय पाठविणें. २ *to exempt from charge for postage* (as a letter, package &c.) (पत्र, पुडकें, इ० कांस) डांकखर्चाची माफी करणें -सूट देणें, टपालां-तून फुकट -मोफत जाऊं देणें, टपालखर्च माफ करणें-सोडणें. F. *n. the privilege of sending letters or other mail matter free of charge* (पत्रें किंवा इतर डांकेनें जाणाऱ्या वस्तू) हांशीलावांचून पाठविण्याचा -रवाना करण्याचा हक्क *m*, टपाल खर्चाची माफी *f* -सूट *f*. २ (also) *the sign, mark, or signature denoting that a letter or other mail matter is to go free of postage* (वरीलप्रमाणें डांक-टपालहांशीलाच्या) माफी-हक्काची दर्शक सही *f* -खूण *f*. Frank'ing *pr. p.* Fran'-ked *pa. t. & pa. p.* Fran'kly *adv.* मोकळ्या -उघड मनानें, खुल्या दिलानें, निष्कपटपणानें. Frank'ness *n. openness, candour* मनाचा मोकळेपणा *m*, सरळपणा *m*, सालसपणा *m*, &c.

Frankincense (frank'-in-sens) [O. Fr. *franc encens*, pure incense.] *n. a fragrant, aromatic resin, or gum resin, burned as an incense in religious rites or for medicinal fumigation* ऊद *m*, लोहबाणी ऊद *m*, चंद्रसेनी ऊद *m*, धूप *m*. [ASHES OF F. उदी *f*. COAL TO KINDLE F. धूपांगार *m*. OIL OF F. उदेल *n*. PERFUMED WITH THE SMOKE OF F.

उदेला. SOOT *or* CONDENSED SMOKE OF F. फूल *n.* STICK &c. SET WITH LIGHTS OF F. झाड *n.* WICK *or* STICK COVERED WITH F. ऊदकाडी *f,* ऊदवत्ती *f,* धूपकाडी *f,* अगरवत्ती *f.* TO FUMIGATE WITH F. उदवणें, धुपवणें, धुपारा देणें. ]

Frantic (fran'-tik) [O. Fr. *frenetique* –L. *phreneticus*, -Gr. *phrenetikos*, mad; *phrenitis*, inflammation of the brain -*phren*, the mind.] *a. mad, furious* वेडापिसा, दिवाणा, कावराबावरा, मारका, वेडा, उन्मत्त. Fran'tically, Fran'ticly *adv.* कावराबावरा होऊन, वेड्यासारखा. Fran'ticness *n.* कावरेबावरेपणा *m,* &c.

Fraternal (fra-tėr'-nal) [Fr. *fraternel*, L. L. *fraternalis*-*frater*, a brother, akin to E. *brother*, Gr. *phrater*, a clansman; Sk. भ्रातृ, brother.] *a. brotherly* भाऊपणाचा, भ्रात्रीय (S.), बंधुभावाचा, भावासारखा. Frater'nally *adv.* Fra'ternise *v. i. to have brotherly feelings* भाऊपणा *m.* करणें, भ्रातृभावना *f.* प्रेम *n.* करणें, सख्ख्या भावांप्रमाणें राहणें-सख्य करणें. Frat'erniser *n.* Frater'nity *n. brotherhood* भ्रातृभाव *m,* भाऊपणा *m,* भाईचार *m.* २ *a society* (एकमेकांशीं भावांप्रमाणें वर्तन ठेवणारें) मंडळ *n,* समाज *m,* मंडळी *f,* समूह *m.* ३ *men of the same profession* व्यवसायबांधव *m. pl.* व्यवसायबंधू *m. pl.*, समव्यवसायी मंडळी *f,* व्यवसायबंधुता *f.* ४ (in the Roman Catholic Church) *an association for special religious purposes, for relieving the sick and destitute &c.* (रोमनक्याथोलिक धर्मपंथांतील) रुग्णशुश्रूषासंप्रदाय *m,* भ्रातृसंप्रदाय *m.*

Fratricide (frat'ri-sīd) [Fr., –L. *frater*, *fratris*, a brother, and *cædere*, to kill.] *n. the act of one who murders his own brother* भावाची हत्या *f,* भ्रातृहत्या *f,* भ्रातृवध *m,* भ्रातृघात *m.* २ *one who murders or kills his brother* भावाची हत्या करणारा, भ्रातृहत्या करणारा, भ्रातृघाती, भ्रातृहंता *f.* Fra'tricidal *a.*

Fraud (frawd) [Fr. *fraude*, –L. *fraus*, *fraudis*, fraud.] *n. deceit, trick* लबाडी *f,* लुचेगिरी *f,* भामटेगिरी *f,* भामटेपणा *m,* कपट *n,* कापट्य *n,* ठकबाजी *f,* ठकवणूक *f,* दगा *m,* धूर्तपणा *m,* छल *m,* छद्म *n,* कैतव *n,* व्याज *n.* २ (*law*) *an intentional perversion of truth for the purpose of obtaining some valuable thing or promise from another* (दुसऱ्यापासून एखादी किंमती वस्तु अथवा उपयोगी वचन उपटण्यासाठीं जाणूनबुजून केलेली) दगलबाजी *f,* सत्यापलाप *m,* असत्याचरण *n,* खोटें *n.* ३ (*obs.*) (*Milton*) *a snare* कपटजाल *n,* जाळें *n,* फसवणूक *f.* Fraud'ful *a.* See Fraudulent. Fraud'fully *adv.* कपटानें, ठकबाजीनें, कपटपूर्वक, कपट करून. Fraud'less *a.* निष्कपट. Fraud'lessly *adv.* Fraud'lessness *n.* Fraud'ulence, -cy *n.* कपटपणा *m,* कापट्य *n,* ठकबाजी *f,* शठत्व *n,* खोटेपणा *m.* Fraud'ulent *a. deceitful* कपटी, फसव्या, लबाड, लुच्चा, धूर्त (S.), शठ, छद्म, कपटवृत्ति, सकपट. [F. DEALING *or* DOING ठकबाजी *f,* ठकबाजीचा धंदा *m* -व्यापार *m,* असत्य-कपटाचरण *n.*] २ *characterized by or proceeding from fraud* लुचेगिरीचा, ठकबाजीचा, कपटाचा, दगलबाजीचा. ३ *obtained or performed by artifice* लुचेगिरीनें -कपटानें मिळविलेला -केलेला. Fraud'ulently *adv.* लुचेगिरीनें.

Fraught (frawt) [Ger. *frachten*, to load.] *n.* (*obs.*) (*Shakes.*) *a freight* माल *m,* भरताड *n,* भरवण *n,* पुरेसें ओझें *n.* F. *v. t.* (*obs.*) *to freight* भरणें, लादणें, &c. F. *a. laden, filled* भरलेला, (-नें) पूर्ण, परिपूर्ण, आकुल *or* आवह (in comp. as, F. with danger = भयावह).

Fray (frā) [Fr. *frayer* –L. *fricare*, to rub.] *v. t. to rub* घांसणें, (घांसून घांसून) फाडणें (as cloth). F. *v. i. rub* घांसणें, घसमटणें. २ *to unravel* (घांसून घांसून उभे धागे तुटून आडवे धागे) गुंतणें.

Fray (frā) [Abbreviated from *Affray.*] *n. a broil* भांडण *n,* तंटा *m,* कज्जा *m,* बोलाचाली *f,* बखेडा *m,* लढा *m.* F. *v. t. to terrify, to frighten* भिवविणें, घाबरविणें.

Freak (frēk) [A. S. *frec*, bold, rash; Ger. *frech*, Icel. *frekr.*] *n. a whim or fancy* लहर *f,* तरंग *m,* तव्येत *f,* चैन *f,* हुक्की *f,* वेड *n.* २ *a frolic, a trick* छंद *m,* नाद *m,* चाळा *m.* Freaks *pl. pranks* खेळ *m,* चोज *m. pl.*, चाळा *m.* [TO INDULGE IN F. तऱ्हा-तऱ्हा करणें, नाना चाळे करणें.] Freak'ful *a.* Freak'iness *n.* Freak'ish *a.* लहरी, तबियती, छंदिष्ट, छांदिष्ट, ख्याली. Freak'ishly *adv.* Freak'ishness *n.* लहरी स्वभाव *m.*

Freck (frek) [From a root found in Icel. *freknur*, Dan. *fregne*, which in pl. = Freckles.] *v. t.* (*R. & Poet.*) *to checker, to diversify* ठिपके -वण -ठिक्या-डाग पाडणें, चित्रविचित्र करणें, (-वर) पट्टे ओढणें.

Freckle (frek'l) [Icel. *freknur* (*pl.*), Dan. *fregne.*] *v. t. to spot* डाग पाडणें, पट्टे ओढणें, चित्रविचित्र करणें, ठिपके-ठिक्या -वण पाडणें. F. *n. a small yellowish or brownish spot in the skin particularly on the face, neck, or hands* (आंगाच्या कातडीवर -तोंडा-हाता-मानेवर असणारे) पिंवळसर डाग *m. pl.*, वण *m,* ठिक्या *f. pl.*, टिपके *m. pl.*, मावा *f. pl.* २ *any small spot or discoloration* लहान-बारिक डाग *m* -वण *m,* (कांतिहीनतादर्शक) डाग *m,* वण *m,* टिपका *m.* Freck'ly *a.* ठिपक्याठिपक्यांचा. Freck'led *a.*

Free (frē) [A. S. *freo*, free.] *a. not dependent, at liberty* मोकळा, स्वतंत्र, स्वतंत्रेच्छ, स्वेच्छ, स्वेच्छाचारी, स्वाधीन (S), स्ववश, स्वायत्त (S). २ *enjoying political liberty* स्वतंत्र, राजकीय स्वातंत्र्य भोगणारा. ३ *liberated, by arriving at a certain age, from the control of parents, master, or guardian* स्वतंत्र, वयांत -कायद्यांत आलेला,

बाप्या, ( ज्याचा तो ) मुखत्यार, ज्याला कोणी दावता नाहीं असा, स्वाधीनचा. ४ *released from arrest* बंधमुक्त, अटकेंतून मोकळा -सुटलेला, सोडून दिलेला. [ To SET F. मोकळा -बंदखलास करणें, मुक्त -बंधमुक्त करणें, सोडून देणें, बंध सोडणें -सोडविणें. ] ५ *endowed with moral liberty* ( said of will ) स्वतंत्र, स्वतंत्र कार्यक्षमता असणारी ( व्यक्तीची इच्छा ). ६ *guiltless, innocent* निरपराधी, अनपराधी, निष्कलंक, अकल्मष, पापरहित, दोषरहित. ७ *frank, unreserved* उघडा, मोकळ्या मनाचा, खुल्या मनाचा, खुल्या दिलाचा, सरल, निष्कपटी. ८ *licentious* ( used in a bad sense ) स्वैर, स्वैरवृत्ति, अनर्गल, निरर्गल, अमर्याद वागणारा, बेसुमार, बेलगाम, बेफाम, कामचार (S). ९ *lavish, open-handed, liberal* उदार, सढळ हाताचा, दानशूर; as, "F. with his money." १० *exempt, clear* ( followed by *from* ) मोकळा, मुक्त, सुटा, वेगळा, निराळा, अलग, रहित ( in com.; as, दोषरहित ). ११ *charming* (said of style) अकुंठित, मोकळी, प्रशस्त, सरळ, मनोवेधक. (*b*) सहज, साहजिक, लीलेनें केलेला. १२ *ready, spirited* ( एका पायावर ) तयार, उत्सुक, उल्हासी, उत्साही, उत्साहपूर्ण, पाणीदार, बाणेदार; as " A. F. horse." १३ *admitted to special rights* ( followed by *of* ) विशेष हक्क *m* -सवलत *f* -अधिकार *m* -असलेला -दिलेला -भोगणारा. १४ *open, unrestricted, thrown open or made accessible to all* ( said of a thing to be possessed or enjoyed ) फुकटचा, मुक्तद्वार, सर्वांस सारखा खुला -मोकळा असणारा, मोफत -विनखर्चानें -फुकट मिळणारा, बिनखर्चाचा; as, " A. F. school". १५ *gratuitous, not granted by importunity or purchase* फुकट मिळणारा; as, " F. admission." १६ *not arbitrary or despotic* ( said of a government or institution &c. ) स्वतंत्र, व्यक्तिस्वातंत्र्याच्या आड न येणारा, एक व्यक्ति किंवा एक वर्ग यांचाच अधिकार चालूं न देणारा, सर्वसत्ताक, लोकसत्ताक. १७ *separated, unattached* निराळा, विभक्त, मोकळा, स्वतंत्र, असंसक्त, न कोंडलेला. F. *v. t.* (*a*) *to set at liberty* ( followed by *from* ) सोडणें, मोकळा -मुक्त -बंधमुक्त -बंदखलास करणें, (-ची) मोकळीक *f* -सुटका *f*. करणें. ( *b* ) *to disentangle, to clear* ( followed by *from* ) गुंतागुंतींतून निराळा काढणें, वेगळा -सुटा करणें, सोडवणूक *f* करणें *g. of o.*, बंधन *n* तोडणें, मोचन *n*. करणें. २ *to relieve from the constraint of* ( -च्या ) दाबांतून मोकळा करणें. Free'ing *pr. p.* Freed *pa. t.* & *pa. a.* Free agency *the capacity or power of choosing or acting freely* स्वतंत्रता *f*, स्वातंत्र्य *n*, कर्मस्वातंत्र्य *n*, इच्छास्वातंत्र्य *n*, वर्तनस्वातंत्र्य *n*. Free'-booter *n*. *a pillager* लुटारू, लुटारी, पेंढारी, पुंड, पुंडपाळ. Free'-booting *a.* & *n.* Free'-booty *n.* लूट *f.* Free'-born *a.* *born free* आजन्म स्वतंत्र, जन्मतः स्वतंत्र, स्वतंत्रतेंत जन्मलेला. Free'-man *n.* *one not a slave or vassal* स्वतंत्र मनुष्य *m*, दास किंवा गुलाम नव्हे असा. २ *a member of a borough, town, or a state, who has the right to vote at elections* कसबा, नगर किंवा संस्थान ह्यांतर्फे निवडणुकींत मत देण्याला अधिकारी मनुष्य *m*. Free'dom *n.* *liberty, independence* स्वातंत्र्य *n*, स्वतंत्रता *f*, मोकळेपणा *m*, स्वाधीनता *f*, स्वेच्छाचारिता *f*. २ ( *shakes.* ) *franchises* स्वतंत्रमताधिकार *m*, विशेष अधिकार *m. pl.*, विशेष सवलती *f. pl.* ३ *exemption from necessity, in choice and action* इच्छास्वातंत्र्य *n*, वर्तनस्वातंत्र्य *n*. ४ *ease, facility* साहजिकता *f*, सहजपणा *m*, अनायास *m*. ५ *frankness* मोकळेपणा *m*, निष्कपटपणा *m*, उघडपणा *m*. ६ *improper familiarity* ( अयोग्य ) लगट *f*, (शिष्टाचार गुंडाळून ठेऊन -शिष्टाचारास सोडून) फाजील लगट *f*. Freed'-man *n.* *a man who has been a slave, and has been set free* गुलामगिरींतून -दास्यत्वांतून मुक्त केलेला मनुष्य *m*. Free'-hand *a.* *done by the hand without support or the guidance of instruments* (हत्यारांच्या साहाय्यावांचून) केवळ हातानें केलेलें -काढलेलें; as, " F. drawing." Free'-handed *a.* *liberal* सढळ, उदार. Free'-hearted *a.* (*a*) *frank* मोकळा, निष्कपटी, दिलदार. (*b*) *generous* उदार (दाता). Free'heartedly *adv.* Free'heartedness *n.* Free'-hold *n.* *law. an estate in real property, of inheritance* ( in fee simple or fee tail ) *or for life* पूर्ण मालकीची -पूर्ण स्वामित्वाची जमीन *f*. अशा जमिनीवर राजास करभार देण्याखेरीज दुसरा नोकरीचा वगैरे कोणत्याही प्रकारचा बोजा नसतो. मराठींतील 'वतन' शब्दांत व इंग्रजी 'फ्रीहोल्ड' शब्दांत कायद्याचे दृष्टीनें बरेंच अंतर आहे. 'Freehold' शब्दाचें भाषांतर कायद्याच्या परिभाषेंत 'वतन' शब्दानें बरोबर होत नाहीं. [ Freehold is opposed to Leasehold and Copyhold. ] ( *b* ) *the tenure by which such estate is held* इंग्लंडांतील पूर्ण स्वामित्वाच्या जमीनधाऱ्याची पद्धत *f*. Free'-holder *n.* *the possessor of a freehold* पूर्ण मालकी असलेला जमीनदार. Free'-labour *n.* *the labour of freemen, as distinguished from that of slaves* स्वतंत्र माणसाचे श्रम *m. pl.* Free'-liver *n.* *one given to indulgence in eating and drinking* खानपानांत मनसोक्त वागणारा. Free'-love *n.* *the doctrine or practice of consorting with the opposite sex, at pleasure, without marriage* लग्नावांचून स्त्रीपुरुषांनीं एकमेकांशीं यथेच्छ व्यवहार करणें *n.* Free'ly *adv.* मोकळेपणानें, &c. Free'mason *n.* *one of an ancient and secret association or fraternity, said to have been at first composed of masons or builders in stone, but now consisting of persons who are united for social enjoyment and mutual assistance* फ्रीमेसन, (फ्रीमेसननामक) विशेष प्रकारच्या गूढ सांप्रदायाचे लोक *m. pl.*; इहसुखेच्छा आणि त्यांत परस्परसाहाय्य हे ह्यांचे मुख्य हेतु होत. Free'-masonic *a.* Free'-masonry *n.* ( फ्रीमेसन-

नामक) फ्रिमेसन गूढसांप्रदाय *m.* Free'-minded *a. having a mind free from care* निष्काळजी मनाचा, बेफिकिर, निष्काळजी. Free'-ness *n.* Free'-port *n. com.* (*a*) *a port where goods may be received and shipped free of custom duty* जकात भरल्या-दिल्याशिवाय जेथें मालाची नेआण करतां येते असें बंदर *n*, खुलें बंदर *n.* (*b*) *a port where goods of all kinds are received from ships of all nations at equal rates of duty* (कोणत्याही राष्ट्राच्या गलबतांतून येणाऱ्या सर्व प्रकारच्या मालावर जेथें) सारखीच जकात *f* -कर *m* घेण्यांत येतो असें बंदर *n.* Free'-school *n* (*a*) *a school to which pupils are admitted without discrimination and on an equal footing* जेथें मुलांमुलांमध्यें-विद्यार्थ्यांविद्यार्थ्यांमध्यें भेदाभेद ठेवण्यांत येत नाहीं अशी शाळा *f* -विद्यालय *n.* (*b*) *a school supported by general taxation, by endowments, &c., where pupils pay nothing for tuition; a public school* धर्मार्थ शाळा *f.* Free'-spoken *a. accustomed to speak without reserve* स्पष्ट बोलणारा-उघड बोलणारा कांहींएक चोरून न ठेवणारा, बोलण्यांत भीड न धरणारा -ठेवणारा. Free'-spokenness *n.* स्पष्टवादिता *f.* Free'-stone *n. a stone composed of sand or grit* (so called because it is *easily cut* or *wrought*) सुसभुशीत-मऊ-नरम दगड *m.* F. *a. having the flesh readily separating from the stone, as in certain kinds of peaches* बांठी -कोयीपासून ज्याचा रस लवकर सुटतो असा. Free'-swimming *a. zool. swimming in the open sea* (said of certain marine animals) खोल समुद्रांत राहणारे -पोंहणारे. Free'-thinker *n. one who speculates or forms opinions independently of the authority of others* स्वतंत्रपणें विचार करणारा मनुष्य *m.* २ (esp. in the sphere of religion) *one who forms opinions independently of the authority of revelation or of the church, an unbeliever* (a term assumed by deists and sceptics in the eighteenth century) अप्रमाणवादी, प्रत्यक्ष-प्रमाणवादी, श्रुतीचें किंवा इतर धर्मग्रंथांचें प्रमाण न मानणारा, अनर्गलतर्कवादी, चार्वाक, शास्त्रद्वेषी. Free'-thinking *n.* & *a.* Free thought *n.* श्रुति किंवा दुसरें आप्तवाक्य प्रमाण न मानणाऱ्या मनुष्याचा विचार *m*, अप्रमाणवाद *m.* Free'-tongued *a. speaknig without reserve* उघड बोलणारा. Free'-trade *n. commerce unrestricted by duties or tariff regulations* खुला व्यापार *m*, अप्रतिबद्ध व्यापार *m*, मुक्त व्यापार *m*, अनियंत्रित व्यापार *m.* Free'-trader *n.* स्वतंत्रव्यापारवादी, अप्रतिबद्धव्यापारवादी, मुक्तव्यापारवादी. Free'-will *n. a will free from improper coercion* अनियंत्रितेच्छा *f.* २ *the power asserted of moral beings of willing or choosing without restraints of physical or absolute necessity* इच्छास्वातंत्र्य *n*, मानवी इच्छेचें स्वायत्तत्व *n*, मानवी प्रयत्नांचें स्वाधीनत्व *n.* ३ *power of directing one's own action* अखत्यारी *f*, मुखत्यारी *f*, स्वेच्छाकर्तृत्व *n.* [DOCTRINE OF F. पौरुषवाद *m*, प्रयत्नवाद *m*, इच्छास्वातंत्र्यवाद *m.* MAINTAINER OF IT पौरुषवादी.] ४ *spontaneity* स्वसंतोष *m*, आपखुशी *f.* F. *a. voluntary, spontaneous* स्फूर्त, ऐच्छिक, आयत्या वेळेचा. Free'-church *n.* (*a*) *a church whose sittings are for all and without any charge* भाडें दिल्याशिवाय बसण्यास जेथें कोणालाही जागा मिळते असें ख्रिस्ती देऊळ *n.* (*b*) *an ecclesiastical body that left the Church of Scotland, in 1843, to be free from control by the Government in spiritual matters* आध्यात्मिक गोष्टींत आपणांवर सरकारची सत्ता नसावी म्हणून स्काटलंडांतील एक्क्लेसियेपासून १८४३ मध्यें फुटून स्वतंत्र झालेली एक्क्लेसिया *f*, स्वतंत्र एक्क्लेसिया *f.*

**Freeze** (frēz) [A. S. *freosan*, to freeze.] *v. i. to become congealed by cold* थंडीनें गोठणें-जमणें-थिजणें, गारठणें, घट्ट होणें. २ *to become chilled with cold, or as with cold* थंडीनें गारठणें-गार पडणें-होणें. F. *v. t. congeal* गारठवणें or गारठविणें, थिजवणें, गोठवणें, घट्ट करणें. २ *to chill* गारठवणें, गार पाडणें -करणें. Freez'-ing *pr. p.* & *v. n.* Froze *pa. t.* Fro'zen *pa. p.* Freez'-able *a.* Freez'ing-mixture *n. a mixture* (of salt and snow or of chemical salts) *for producing intense cold* तीव्रशीतजनक मिश्रण *n.* Freez'ing-point *n. that degree of a thermometer at which a fluid begins to freeze* थिजण्याचा बिंदु *m.*

**Freight** (frāt) [A late form of *fraught*, from Fr. *fret*, the hire that is paid for the ship.] *n. the lading or cargo* (*esp. of a ship or of a car on a railroad*) माल *m*, ओझें *n*, भरगत *m*, भरीत *n*, भरत *n*, भरताड *n*, भरवण *n*, भरतें *n*, भरती *f.* २ *the charge for the carriage of goods* भाडें *n*, (गलबताचा) नोर *m.* ३ *freight transportation* मालाची नेआण *f.* F. *a. employed in the transportation of freight* मालाची नेआण करणारा; as, "A F. car." F. *v. t. to furnish with freight* ओझें -माल पुरविणें, भरणें, लादणें, (-मध्यें) माल भरणें-चढवणें; as, "To F. a ship." २ भरणें, लादणें. Freight'-age *n. expense of carriage* मजुरी *f*, हेल *m*, नोर *m*, नेणावळ *f*, भाडें *n.* २ *the transportation of freight* परस्थलीं -परदेशीं माल पाठविणें *n.* ३ *freight, cargo* माल *m*, भार *m*, बोजा *m*, ओझें *n.* Freight'ed *a.* लादलेला. Freight'er *n. one who loads a ship* (गलबतांत) माल भरणारा -चढविणारा *m.* २ *one employed in receiving and forwarding freight* (दुसऱ्याकरितां जहाजांत भरून) माल परदेशीं पाठविणारा, गुमास्ता *m* (?), अडत्या *m* (?), वच्छाद *m* (?). ३ *one for whom freight is transported* ज्याच्याकरितां माल पाठवावयाचा तो मनुष्य *m.* ४ *a vessel used mainly to carry freight* मालबोट *f*, मालाची बोट *f*, माल परदेशीं नेणारें गलबत *n.*

French ( french ) [ A. S. *frencise* –L. *francus*; cf. O. Fr. *francois*, Fr. *francois.* ] *a. belonging to France or its people* फ्रेंच, फ्रान्स देशाचा, फ्रान्स देशांतील लोकांचा. F. *n.* ( *a* ) *the people of France* फ्रान्स देशांतील लोक *m. pl.*, फ्रेंच लोक *m. pl.*, फ्रेंच *m. pl.* ( *b* ) *the language of France* फ्रान्स देशाची भाषा *f*, फ्रेंच भाषा *f*, फ्रेंच *f*. French-bean *n. the common kidney bean* (घेवड्याच्या शेंगेसारखी) फरसबी *f*. French chalk *n.* कडक खडू *m* (?). French-leave *n.* ( *a* ) *an informal, hasty or secret departure* रजा घेतल्याशिवाय चोरट्या रीतीनें निघून जाणें *n* -पळून जाणें *n*. ( *b* ) *esp. the leaving a place without paying one's debts* आपलें कर्ज दिल्याशिवाय चोरट्या रीतीनें निघून जाणें *n*, फरारी किंवा पसार होणें *n*. French-polish *n. a preparation for the surface of wood work, consisting of gums dissolved in alcohol, either shellac alone or shellac with other gums added* लांकडाला लावण्याचें एक प्रकारचें पालिस *n*, फ्रेंच पालिस *n*. २ *the glossy surface produced by the application of the above* (फ्रेंच पालिस लावून आलेला) तकतकीतपणा *m* किंवा सफाई *f*, फ्रेंच पालिस *n*. F. *v. t.* फ्रेंच पालिस करणें. French'ify *v. t. to gallicise, to make French or Frenchlike* (-ला) फ्रेंच वळण देणें -लावणें. French'man *n. native or one of the people of France* फ्रान्स देशचा रहिवाशी *m*, फ्रान्समधील मनुष्य *m*, फ्रेंच मनुष्य *m*.

Frenzy ( fren'-zi ) [ L.,–Gr. *phrenesis*=Gr. *phrenitis*, inflammation of the brain,–*phren*, the mind.] *n. madness, rage* उन्माद *m*, उन्मादवायु *m*, चित्तभ्रम *m*, आवेश *m*. F. *a.* (R.) *mad, frantic* भ्रांत, कावराबावरा. Fren'zied *a.* उन्मत्त, भ्रांतचित्त. Fren'ziedly *adv.*

Frequent ( frē'kwent ) [ L. *frequens, frequentis*, cog. with *farcire*, to stuff. ] *a. often repeated or occurring* वारंवार घडणारा-होणारा, वारंवार घडलेला -झालेला, वारंवारचा, अभीक्ष्ण ( S. ), वरचेवर -लौकर लौकर होणारा; as, " F. visits." २ *habitual, persistent, given to any course of conduct* नेहमींचा, राबत्याचा, संवयीचा. F. *v. t. to visit often* वारंवार &c. जाणें येणें, खेटे *m. pl.* -खेपा *f. pl.* घालणें, पैरव *m* -पैरवी *f.* राखणें -करणें, जाण्यायेण्याचा राबता *m.* असणें *g. of s. with in con.* -व्याप असणें *in. con.*, (-कडे) जाणें-येणें *n.* ठेवणें-असणें, ( -कडे ) जाण्यायेण्याचा सराव *m* ठेवणें. २ ( *obs.* ) ( *Milton* ) *to make full, to fill* भरून टाकणें, भरणें. Fre'quency *n. common occurrence* पुनःपुनरावृत्ति *f*, पौनःपुन्य *n*, असकृत्व *n*, वरचेवर-वारंवार घडणें *n*- घडून येणें *n* -होणारी आवृत्ति *f*, आभीक्ष्ण्य *n*, वारंवार झालेलेपणा *m* (?). Frequenta'tion *n. resort* येणें जाणें *n*, येजा *f*, येरझार *f*, पैरव *m*, पैरवी *f*. Frequen'tative *a. gram. serving to express the frequent repetition of an action* पौनःपुन्यदर्शक-पौनःपुन्यवाचक (विशेषणें, क्रियापदें इ०). F. *n. a frequentative verb* पौनःपुन्यवाचक क्रियापद *n*. Frequent'er *n.* खेपा घालणारा, नेहमींचा येणारा. Fre'quently *adv.* वारंवार, वरचेवर, पुनःपुनः, घडीघडी, अनेकवार, फारदां, नेहमीं (*loosely*). Fre'quentness *n.* पौनःपुन्य *n*.

Fresco ( fres'kō ) [ It. *fresco*, cool, fresh. ] *n. a painting on fresh plaster* ताज्या -ओल्या गिलाव्यावर काढलेलें चित्र *n*. २ *the art of painting on freshly spread plaster, before it dries* ताज्या पसरलेल्या -ओल्या गिलाव्यावर चित्रें काढण्याची कला *f*. ३ ( in modern parlance, incorrectly applied to) *painting on plaster in any manner* कोणतेही ओल्या गिलाव्यावरचें चित्र *n*. F. *v. t. to paint in fresco, as walls* भिंतीच्या गिलाव्यावर चित्रें काढणें. Fresco'ing *pr. p.* & *v. n.* Fresco'ed *pa. t.* and *pa. p.* Fresco'er *n.* Fresco'ist *n.* भिंतीच्या गिलाव्यावर चित्रें काढणारा.

Fresh (fresh) [A. S. *fersc*, fresh.] *a. new and strong, unimpaired, sound* रसभरित, टवटवीत, ताजा, नूतन, नवीन, ताजातवाना, ताज्या दमाचा. २ *new* नूतन, नवीन, नवा, ताजा, दुसरा, कोरा. ३ *not stale* गोड, ताजा, साजूक, लोणकढें (तूप *n*), अनसूट. ४ *youthful* तारुण्याचा, भरज्वानीचा, लालीचा. ५ *unpractised* नवा, नवखा, नवशिखा, बिनवहिवाटीचा, राबलेला नाहीं असा, घसवटलेला नाहीं असा, शिकाऊ, अननुभवी, अनभ्यस्त. ६ ( *a* ) *renewed in vigour, alacrity, or readiness for action* ताज्या -नव्या दमाचा, पुनर्नवीन. [ To LOOK F. टवटवणें, टवटवीत-सतेज- तेजस्वी दिसणें.] (*b*) (hence) *tending to renew in vigour* नवीन दम किंवा जोर दाखविणारा. ७ *not salt* खारट-तुरट नव्हे असा, गोड, गोडा, गुळचट; as, " F. water" = गोडें पाणी *n*. F. *n. a spring of fresh water* गोड्या पाण्याचा झरा *m*. २ *the mingling of fresh water with salt in rivers or bays, as by means of a flood of fresh water flowing toward or into the sea* (गोड्या पाण्याचा ओघ समुद्रांत जाऊन) गोडें व खारें पाणी एक होणें *n*. Fresh'en *v.t. to separate, as water, from saline ingredients* (समुद्राच्या किंवा खाऱ्या पाण्यांतील) क्षार काढून टाकणें, खाऱ्या पाण्याचें गोडें पाणी करणें, गोडावणें, गोडा-गोडें करणें. F. *v. i. to grow fresh* ताजातवाना होणें. २ *to grow brisk or strong* मजबुती *f* -तकवा *m* येणें, ताजा-हुशार होणें. Fresh'et *n.* (*obs.*) *a stream of fresh water* (गोड्या) पाण्याचा झरा *m*. २ *a sudden inundation* पूर *m*, अकस्मात् आलेला पाण्याचा लोंढा *m*. Fresh'ly *adv.* Fresh'man *n. a novice* नवा -अनभ्यस्त -नवशिका -अपरिचित, अननुभवी मनुष्य. २ *a student during his first year in a college or university* कॉलेजांतील किंवा युनिव्हर्सिटींतील पहिल्या वर्षाचा विद्यार्थी *m*. Fresh'manship *n.* Fresh-new *a.* ( *obs.* ) ( *Shakes.* ) *unpractised* नवशिका. Fresh'ness ताजेपणा *m*, नूतनता *f*, नवीनपणा *m*. २ नवेपणा *m*, नवखेपणा *m*, नवशिखेपणा *m*,

कोरेपणा *m.* ३ गोडी *f*, गोडपणा *m*, ( applied to ghee ) साजूकपणा *m* -लोणकडेपणा *m.* ४ तारुण्य *n*, भरज्वानी *f*, लाली *f.* ५ (*a*) टवटवी *f*, टवटवीतपणा *m*, टकटकीतपणा *m*, लुसलुशीतपणा *m.* (*b*) नवा जोम *m*, दम *m*, जोर *m.*

Fret ( fret ) [O. Fr. *freter*, to strengthen ( as with iron ) or to adorn. ] *v. t. to ornament with raised work* उठावाच्या नकशीनें शृंगारणें. Fret *n. ornamental work in relief as carving or embossing* वर आलेलें -उठाव नकशीचें काम *n.* Fret'ted *pa. t.* & *pa. p.* Fret'ting *pr. p.*& *v. n.*

Fret ( fret ) [ O. Fr. *frete*, trellis-work. ] *n. a piece of interlaced ornamental work* काटकोनाकृति जाळीची नकशी *f*, जाळी *f.* २ एकमेकांशीं आडव्या उभ्या बांधलेल्या पट्यांची नकशी *f.* [ Fret work *work adorned with frets* जाळीकाम *n*, जाळीच्या नकशीचें काम *n.* ] ३ *the reticulated head-dress or net, made of gold or silver wire, in which ladies in the Middle Ages confined their hair* सोन्याच्या किंवा रुप्याच्या तारांचा केलेला एक डोक्यावर घालण्याचा दागिना *m*, एक प्रकारची सोन्याच्या किंवा रुप्याच्या तारांनीं केलेली बायकांनीं डोक्यावर घालण्याची जाळी *f*, जरतारी जाळी *f.*

Fret ( fret ) [A. S. *fretan*, to gnaw *-for*, inten. prefix, and *etan*, to eat.] *v. t. to rub* घसवटणें, घासटणें, घासणें. २ (hence) *to gnaw* कुरतुडून टाकणें, खाऊन टाकणें. ३ *to impair, to wear away* (चोळवटून-घांसून) कमी करणें, क्षीण करणें; as, "By starts, his *fretted* fortunes give him hope and fear." ४ *to cause to ripple* क्षोभविणें, क्षुब्ध करणें, लाटा उठविणें. ६ *to irritate* चिडवणें, खिजवणें, चिथावणें. F. *v. i. to chafe* चोळटणें, चिंवचिंवणें, तळतळणें, मनांत कुढणें, धुसपुसणें, चुळबुळणें, धुसणें. २ *to eat in* आंत खात जाणें. ३ *to be in violent commotion* क्षुब्ध होणें. ४ *to be chafed or irritated* चिडणें. F. *n. a rippling on the surface of water* पाण्याच्या पृष्ठभागावर लहान लाटांचा उद्भव *m.* २ *irritation, agitation of the mind* चीड *f*, उद्वेग *m*, मनःक्षोभ *m.* ४ *pl.* ( *mining* ) *the worn sides of river banks where ores or stones containing them accumulate by being washed down from the hills, and thus indicate to the miners the locality of the veins* नदीच्या कांठाचा ढांसळून गेलेला किंवा भंगून गेलेला भाग *m.* Fret'ful *a. peevish* चिडखोर, चिरचिऱ्या, पिरपिरा, पिरपिऱ्या, किरकिरा, किरकिऱ्या. Fret'fully *adv.* Fret'fulness *n.* चिडखोरपणा *m*, &c.

Fret ( fret ) [ Prob. same as the above. ] *n. a short wire on the finger-board of a guitar or other instrument* सारिका *f*, पडदा *m*, सुनरी *f.* F. *v. t. to furnish with frets, as an instrument of music* सारिका *f* -पडदा *m.* लावणें-बसविणें.

Friable (frīa'-bl) [ Fr.,-L. *friabilis-friare*, *friatum*, to crumble. ] *a. easily crumbled, pulverised or reduced to powder* पिठ्या, खुसखुशीत, भुसभुशीत, आशुचूर्णनीय ( S. ), चूर्णधर्मी -धर्मक. Friabil'ity, Fri'ableness *n.* पीठ होण्याचा धर्म *m.*

Friar ( frī'ėr ) [ O. Fr. *frere* -L. *frater*, a brother]. *n.* ( Roman Cath. Church ) *a monk of one of the four mendicant orders* ( Gray, White, Black and Augustine Friars ) रोमन क्याथलिक महन्त *m*, जोगी *m*, गोसावी *m*, यति *m.* २ ( *print.* ) *a white patch on a page, caused by a deficiency of ink* ( शाई न लागल्यामुळें ) छापील पानावर राहिलेला पांढरा -कोरा भाग *m.* Fri'ary *n.* मठ *m.*

Friction ( frik'-shun ) [Fr. *friction* L. *frictus*, contr. p. p. of *fricare*, to rub; allied to *friare*, to rub. ] *n. attrition* घर्षण *n*, चोळणें *n*, चोळणी *f*, घासणें *n*, घासणी *f.* २ *mech. the resistance which a body meets with from the surface on which it moves* घर्षण *n*, संघर्षण *n*, संघर्ष *m.* ३ *a clashing between two persons or parties in opinion or work* (दोन मनुष्य अथवा पक्ष यांमध्यें उडालेली) चकमक *f.* Friction-wheel *n. mach. one of the wheels in frictional gearing* घर्षण कमी करणारें चक्र *n.* Friction-machine *n.* घर्षणानें वीज उत्पन्न करणारें यंत्र *n.* Friction-meter *n.* घर्षणमापक *m.* Friction-powder *n.* घर्षणानें पेटणारी दारू *f.* Fric'ative *a. phon. produced by the friction or rustling of the breath intonated or un-intonated, through a narrow opening between two of the mouth organs* घर्षणजन्य (व्यंजनें). Fri'ctional *a. produced by friction* घर्षणजन्य. Fric'tionless *a.* घर्षणशून्य, घर्षणरहित.

Friday ( frī'dā ) [A. S. *frigedæg*, day of (the goddess ) *Frig*, Latinised *frigga*, wife of Odin. ] *n. the sixth day of the week, following Thursday* शुक्रवार *m*, भृगुवार *m.*

Friend ( frend ) [A. S. *freond* pr. p. of *freon*, to love. ] *n. an intimate associate* मित्र, स्नेही, इष्ट, सखा, दोस्त, सहाय, हितचिंतक, सुहृद्, सुखदुःखाचा सोबती, समदुःखसुखी, सख (in comp.). [ Acquired F. जोडलेला स्नेही *m.* Contest of F.s मित्रयुद्ध *n*, मित्रकलह *m.* False F. खोटा स्नेही, दुर्मित्र, कपटमित्र, असन्मित्र, किंसखा. Female F. सखी *f*, मैत्रीण or सखी *f*, सहेली *f*, आली *f.* F. in need गरजेच्या वेळीं उपयोगीं पडणारा स्नेही, संकटमित्र, प्रसंगीं उपयोगीं पडणारा. Friends, relatives and connections-compreh. or gener. सखेसोयरे or सगेसोयरे *m. pl.*, सुहृत्संबंधी *m. pl.*, आप्तेष्ट. Friends and acquaintances इष्टमित्र *m. pl.* Interested F. स्वार्थसाधुमित्र *m*, कामापुरता मित्र *m* -स्नेही *m.* Of one's own F.s and acquaintances ओळखीपाळखीचा, ओळखीपाळखी, ओळखीदेखीचा, ओळखीदेखी. A. F. in need is a F. indeed दुःखाचा सांगाती तोच खरा मित्र, संकटांतही स्नेह कायम

ठेऊन साहाय्य करणारा तोच खरा मित्र. Cf. स सुहृद्व्यसने यः स्यात् (S.). WITH PROVISIONS IN STORE WERE FRIENDS BY THE SCORE जों जवळ ओयरा तों जग सोयरा, असतील शितें तर मिळतील भुतें. ] २ (also sometimes) *an attendant* सोबती *m*, अनुचर *m*, सहचर *m*. ३ *one not inimical or hostile; one of the same nation, part, or kin, whose friendly feeling may be assumed* आपल्याच गोटांतील -कंपूंतील -पक्षांतील मनुष्य *m* -दोस्त *m*, सपक्ष *m*, एकदेशी, देशबंधु *m*, राष्ट्रबंधु *m*. (ज्यांची मैत्री सहज मानतां येईल असे). ४ *a promoter* आधार किंवा उत्तेजन देणारा, आश्रयदाता, साहाय्यकर्ता. ५ *obs. Shakes. a paramour of either sex* यार *m*, जार *m*, दोस्त *m*, जारिणी *f*. Friend'like *a*. Friend'less *a. destitute of friends* उघडा, अनाश्रय, अनाश्रित, निराश्रय, अनाथ, विचारा, निजोर, निराधार, अगतिक, गतिहीन, असहाय, अनावृत, मित्रहीन. [FRIEND OF FRIENDLESS अनाथनाथ, अगतिकगति.] Friend'lessness *n*. Friend'lily *adv*. Friend'liness *n*. दोस्ती *f*, गोडीगुलाबी *f*, मित्रत्व *n*, मित्रता *f*, रहस्य *n*, स्नेह *m*, स्नेहभाव *m*. Friend'ly *a. kind, favourable* स्नेहाचा, स्नेहभावाचा, अनुकूल, मैत्रीचा. २ *amicable* स्नेहानुकूल. ३ *not hostile* वांकडा न जाणारा, शत्रुत्व न करणारा. ४ *propitious* शुभ, मंगल. F. *adv*. (*obs.*) *Shakes*. Friend'ship *n*. मैत्री *f*, मित्रभाव *m*, मैत्रकी or मैत्रिकी *f*, स्नेह *m*, स्नेहभाव *m*, दोस्ती *f*, इखलास *f*, इष्टत्व *n*, सख्य *n*, सखित्व *n*, सौहार्द *n*, सौहृद *n*, घटित *n*. [BREACH OF F. मित्रभेद *m*. CLOSE F. सांगड *f*, गट्टी *f*, अद्वैत *n*, अद्वैतभाव *m*, जीवश्चकंठश्च *n*, गळश्च कंठश्च *n*.] To make friends with *to become reconciled to or on friendly terms with* स्नेहसंबंध करणें, भाईबंदी-मैत्री करणें, (भांडण मिटवून) स्नेह संपादणें, तह करणें (*fig.*). A friend at court *or* in court *one disposed to act as a friend in a place of special opportunity or influence* दांभिक मित्र, लौकिकांत मैत्री दाखविणारा, सभामित्र.

Frieze (frēz) [Fr. *frise.*] *n. a kind of coarse woollen cloth or stuff, with a shaggy or tufted nap on one side* लोंकरी कापडाची एक जात *f*. ह्याला मुंबईच्या बाजारांत आस्त्राखान असें म्हणतात.

Frigate (frig'-āt) [Fr. *fregate*–It. *frigata*, of dub. origin.] *n. a ship of war carrying twenty eight to sixty guns on the main deck and raised greater deck and forecastles* विशिष्ट तऱ्हेचें लढाऊ गलबत *n*, फ्रिगेट *n*.

Fright (frīt) [A. S. *fyrhto*, fear.] *n. a state of terror excited by the sudden appearance of danger* धडकी *f*, धबका *m*, दचका *m*, दचक *f*, वचक *or* वचका *m*, धास्ती *f*, अपधाक *m*, ढासरा *m*, भेदरा *m*, आंच *f*, त्रास *m*.–in high degree, as expressed by *alarm, amazement, horror, consternation, dismay*, &c. गात्रभंग *m*, अंडत्रास *m*, त्रेधा *f*, तिरपीट *f*, तिऱ्हड *f*, घोरभय *n*, धैर्यभंग *m*, विक्षेप *m*, वैचित्य *n*. [TO TAKE *or* CONCEIVE F. धास्ती *f* घेणें, वचक *m* -वचका *m*- खाणें AND *in con*. वसणें, धास्ती *f* -ढासरा *m*. धरणें. त्रास *m*. पावणें, आंच *f*. वसणें *in. con*., दचक *f* -दचका *m* -धडकी *f* -धवका *m*. वसणें -भरणें *in. con*., डचकणें *or* दचकणें, वचकणें, वाचटणें, वाचकणें, अपधाकणें, धास्तावणें, भेदरणें, भिणें, गोळा *m*. येणें *in. con*., घावरणें, गांगरणें (*or* गेंगारणें, गेंगरणें, गोंगरणें), गांगावणें, –in high degree as expressed by such phrases as TO BE FRIGHTENED OUT OF ONE'S WITS -OUT OF ONE'S SEVEN SENSES, TO BE TERROR-STRUCK, TO BE STRUCK AGHAST &c., गर्भगळीत होणें, धाबें *n*. दणाणणें *in. con. g. of s*., मुलीचें झाड *n*. भेटणें *in. con*., देव्हान्यांत देव नाहींसा होणें *g. of s*., मलमूत्र *n*. होणें *in.con*., मृतप्राण-गतप्राण होणें, लेंडी *f*. गाळणें, पांचांवर धारण *f*. वसणें *g. of. s*., हगमूत *f*. लागणें-सुटणें *in. con*., छाती *f* -ऊर *m*. फाटणें *g. of s*., जीव *or* प्राण *m*. कालवणें *g. of. s*., चकरी *f*. गुंग होणें *g. of s*., चकरी *f*. भुलणें *g. of s*., पाय मोडणें, हातपाय गोळा होणें *g. of s*., बावरणें, धादरणें, हुगुटणें, कान्हणें. ] F. *n. a frightful woman* हडळ *f*, जखीण *f*, कडकलक्ष्मी *f*. २ *anything strange, ugly or shocking, producing a feeling of alarm or aversion* (धास्ती किंवा तिटकारा उत्पन्न करणारी कोणतीही) विपरीत -हेंद्रवेंद्र विकाळ स्वरूपाची वस्तु *f*. Fright, Fright'en *v. t. to terrify* भिवविणें, भेवडावणें, भेडसावणें, भेदरावणें, दचकवणें, वचकवणें, भय *n*. -भेदरा *m*. घालणें, धडकी *f* भरविणें -बसवणें, भयभीत करणें, बुजविणें *or* बुजाविणें, -in high degree, *terrify, frighten out of one's wits*, &c. पांचांवर धारण *f*. बसविणें *g. of o*., त्रेधा *f* -तिरपीट *f* करणें *g. of o*., देव्हान्यांत देव नाहींतसे करणें *g. of o*., धाबें *n* दणाणविणें, घराचीं कौलें *n. pl*. हालविणें -पळविणें *g. of o*., खालचें पाणी वर करणें *g. of o*., माटमूट करायास लावणें, मृतप्राय -भयाकुल -भयाक्रांत &c. करणें. [ To F. INTO खूब भय घालून (कांहीं काम) करविणें.] Fright'ened *a*. भेवडावलेला, भयभीत, भययुक्त, भयान्वित, सभय, -in high degree; *filled with, swallowed up by, overcome by, fear*, भयाक्रांत, भयग्रस्त, भयाकुल, भयपीडित, भयचकित, भयाधीन, कावराबावरा. Fright'ful *a. shocking* भयंकर, भयानक, भयजनक, अकटोविकट, अकराळ, अकराळविकराळ, घोर, कराल *pop*. कराळ, भेसुर. Fright'fully *adv*. Fright'fulness *n*.

Frigid (frij'id) [L. *frigidus, frigere*, to be cold –L. *frigus*, cold.] *a. cold* (स्वभावतः व इतरांच्या सापेक्षतेनें) थंड, शीतळ, शीत; as, "F. zone." २ *dull and unanimated* मठ्ठ, मंद, मंदोत्साहाचा, निरुत्साहाचा, विरस, प्रीतिशून्य, स्नेहशून्य, आदरशून्य. ३ *impotent* नेभळा, नपुंसक, बायला, बुळा, नामर्द. Frigid'ity *n. coldness* थंडपणा *m*, हिमता *f*, शैत्य *n*. २ *stiffness and formality* (आदरशून्य) औपचारिक थंड वर्तन *n*. ३ *coldness of affection* स्नेहशून्यता *f*, प्रीतिशून्यता *f*. ४ *want of heat or vigour* निस्तेजस्विता *f*, कमजोर-

पणा *m*, निर्बळता *f*, नेभळेपणा *m*, रग नसण्याची स्थिति *f*, बुळेपणा *m*, शिळपटपणा *m*, नपुंसकत्व *n*. Frig'idly *adv*. Frig'idness *n*.

*N. B.*—Frigid, cold, and cool. *Frigid* denotes that which is by nature relatively cold; as, "The F. zone." A *frigid* style of speaking or writing is one which neither conveys nor excites warmth of feeling or brightness of thought. *Cold* expresses the absence of heat physically or metaphorically; as, "C. weather; C. reception." *Cool* is employed not so much of temperament (like *cold* and *frigid*) as of the state of mind under certain circumstances, and is associated with the praiseworthy as *cold* with the contrary; as, "Cool determination or courage; Cool indifference."

**Frigorific** (frig-or-if'-ik) [See Frigid.] *a. causing cold, producing cold* हिमकर, हिमजनक, हिमोत्पादक, शीतजनक, शीतोत्पादक, शीतावह.

**Fringe** (frinj) [O. Fr. *frenge*—L. *fimbria*, threads, fibres, akin to *fibra*, fibre.] *n. loose threads forming a border (of a piece of stuff)* आंचळी *f*, दशी *f*, झालर *f*, लकेरी *f*, दाल *f*, झल्लर *f*, किनारी *f*, कांठ *m*, मगजी *f*. २ *a margin* माया *f*, मर्यादा *f*, हद्द *f*, सीमा *f*, अवधि *f*. ३ *bot. the peristome or fringe-like appendage of the capsules of most mosses* झालर *f*, शेंवाळाच्या बोंडाभोंवतीं असणारी झालर *f*. F. *v. t.* झालर लावणें, मगजी लावणें, दाल -कांठ लावणें. Fring'ed *a*. झालरदार, झालर लावलेला. Fringe'less *a*.

**Frippery** (frip'ĕr-i) [Fr. *friperie*, *frepe*, a rag.] *n. cast-off clothes, old clothes* जुनेरीं or रें *n*, जुनींपानीं -जुनीं पुराणीं पांघरुणें *n. pl.* २ *affected elegance* खोटा भपका *m*. ३ *a place where old clothes are sold* जुनीं पांघरुणें विकण्याची जागा *f*, चोरबाजार *m* (*colloq.*), जुन्यांचा बाजार *m*. ४ *the trade in old clothes* जुने कपडे विकण्याचा व्यापार *m* -धंदा *m*. F. *a. contemptible* तिरस्काराहं, धिक्कारण्यालायक, निकामी, ज्याच्यांत जीव किंवा दम नाहीं असा. Frip'per *n*. (*obs.*) *one who deals in frippery* जुने पुराणे कपडे विकणारा.

**Frisk** (frisk) [O. Fr. *frisque* -L. L. *friscus*.] *v. i. to leap, skip, dance, or gambol, in frolic and gaiety* बागडणें, आनंदानें नाचणें, नाचणें, खिदडणें or खिदाडणें, खिदळणें or खिदाळणें, खिदडा *m*. घालणें, टुणटुण *adv*. उड्या *f. pl.* मारणें, नाच *m*. मांडणें, हुदंडणें, बोकळणें, उल्लाळणें or उल्हाळणें. [To F. WILDLY, BOISTEROUSLY, &c. धिंगडणें, धिंगाणा घालणें, हलकल्होळ करून सोडणें, धुडगूस घालणें.] २ (-a deer or horse, &c.) ठिकणें, नाचणें. ३ (-dogs, kittens, kids, &c.) बागडणें, नाचणें. F. *n. frolic* नाचणें *n*, बागडणें *n*, खिदडणें *n*, ठिकणें *n*, उड्या मारणें *n*, खिदडा *m*, धुडगूस *m*, धांगडधिंगा *m*. [WILD, BOISTEROUS, &c. F. धिंगाणा *m*, धिंगाडा *m*, धिंवडी *f*, तातकथय्या *m*, ताथय्या *m*, थैथय्या *m*.] Frisk'er *n*. नाचणारा, बागडणारा. Frisk'ful *a. frolicsome* खिदळणारा, नाचणारा, उड्या मारणारा, नाचरा (*lit.*), मौजा मारणारा. Friski'ly *adv*. Frisk'iness *n*. धिंगामस्ती *f*, खिलाडीपणा *m*, नाचरेपणा *m*. Frisk'ing *a*. Frisk'ingly *adv*. Frisky *a*. मौज्या.

**Frisket** (frisk'et) [Fr. *frisquette* -O. F. *frique*.] *n.* (*print.*) *the light frame which holds a sheet of paper before it is laid on the form for impression* (so called from the *quickness* of its *motion*) पिचकिट *n* (इंग्रजी frisket या शब्दाचा अपभ्रंश), टिपणीला (tympan) जोडून असलेली (कागद धरण्याची) चौकट *f*.

**Frit** (frit) [Fr. *fritte*-L. *friggere*, to fry.] *n. a calcined mixture of sand and fluxes ready to be melted in a crucible to form glass* कांचेच्या घटक द्रव्यांचें मिश्रण *n*; शुद्ध धुतलेली व भाजलेली वाळू पक्के ५० शेर, मोदारशृंग (शिशाचा आक्साईड किंवा लिथार्ज) ३५ शेर, आणि शुद्ध केलेला पोट्याश (पर्लआश किंवा पोट्याशिअम् कार्बोनेट) १५ शेर याप्रमाणें हीं द्रव्यें कांच करण्यांत वापरतात. मऊ चिनी मातीचीं भांडीं ज्या घटकमिश्रणापासून तयार होतात त्यालाही इंग्रजींत Frit असें म्हणतात.

**Frith** (frith) [M. E. *firth*, an estuary.] *n. a narrow inlet of the sea esp. at a river-mouth* खाडी *f*.

**Fritter** (frit'ĕr) [O. Fr. *friture* -L. *frigere*, *frictum*, to fry.] *n. a small quantity of batter fried in boiling lard or in a frying pan* डुकराच्या चरबींत तळलेला मांसाचा तुकडा *m*. २ *a fragment* तुकडा *m*, अंश *m*, भाग *m*, कटका or कुटका *m*. F. *v. t. to cut, as meat, into small pieces, for frying* तळण्याकरितां मांसाचे तुकडे तुकडे करणें. २ *to break into small pieces* तुकडे तुकडे करणें. [To F. AWAY *to diminish* तुकडे तुकडे करून नाहींसा करणें. २ (also) *to waste piecemeal* तुकडे तुकडे करून उधळून टाकणें -नाहींसा करणें, वायां दवडणें.] Frit'terer *n*. तुकडे तुकडे करणारा.

**Frivolous** (friv'o -lus) [Fr. *frivole*, -L. *frivolus*.] *a. slight, of little worth or importance* क्षुल्लक, क्षुद्र, कवडीमोल, कवडीमोलाचा, फुसका, पोकळ, हलका, हलकट. २ *silly* बेवकूब, कमअक्कल, हलकट. Frivol'ity *n*. (*a*) *the condition or quality of being frivolous* क्षुद्रपणा *m*, पोकळपणा *m*. (*b*) मौर्ख्य *n*, हलकेपणा *m*, छिछोरी *f*, छिछोरबुद्धि *f*. २ (also) *acts or habits of trifling* हलकटपणाचें कृत्य *n*, क्षुद्राचार *m*, क्षुद्रता *f*. ३ *unbecoming levity of disposition* स्वभावाची क्षुद्रता *f*, स्वभावांतील क्षुद्रपणा *m*, हलकटपणा *m*, पोकळपणा *m*, छिछोरपणा *m*, असभ्यता *f*. Friv'olously *adv*. Friv'olousness *n*. हलकटपणा *m*, हलकेपणा *m*, छिछोरपणा *m*.

Friz ( friz ) [ Fr. *friser*, to curl. ] *v. t.* ( Written also *Frizz* ) *to curl* कुरळ्या *f. pl.*-गुठळ्या *f. pl.* करणें. २ *to form into little burrs, prominences, knobs, or tufts, as the nap of cloth* गुठळ्या *f. pl.* -गाठळ्या *f. pl.* करणें -पाडणें. ३ ( *Leather Manufacture* ) *to soften and make of even thickness by rubbing, as with pumice stone or a blunt instrument* ( चामडें ) घोटणें -कमावणें, घांसून -घोटून गुळगुळीत आणि सारखें करणें, चामडें घांसून एकसारख्या जाडीचें व नरम करणें. F. *n. a frizzle* कुरळी *f*, कुरळ *f.* २ गुठळी *f.* Friz'zed *p. a.* कुरळ्या पडलेला. २ घोटलेला, घांसलेला, गुळगुळीत -सपाट -सारखा -साफ केलेला.

Frizzle ( friz'l ) [ Dim. of Friz. ] *v. t.* same as Friz, which see. F. *n.* Frizette' *n. a curl of hair or silk* केंसाचें किंवा रेशमाचें कुरळ *n.* Friz'zler *n.* Friz'zly, Friz'zy *a.* कुरुळे, कुरळ्याकुरळ्यांचा.

Fro ( frō ) [ A shortened form of *from.* ] *adv. from, away.* It is now used only in opposition to the word *to*, in the phrase *to and fro, i. e., to and from* इकडे तिकडे, एथून तेथवर, तेथून एथवर, इकडून तिकडे आणि तिकडून इकडे.

Frock ( frok ) [ Fr. *froc*, a monk's coat, -L. *floccus*, a flock of wool. ] *n.* ( *a* ) *a loose outer garment* बाहेरचा सैल डगला *m* -झगा *m*, सैल व पायघोळ झगा *m*, आंगडें *n*, झबलें *n*, फ्रॉक *m.* हा लहान मुलेंच वापरतात. F. *v. t.* ( -ला ) फ्रॉक घालणें. २ ( -ला ) ब्रह्मचारी करणें. Frock'ed *a. clothed in a frock* फ्रॉक धारण केलेला -घातलेला. Frock'less *a. destitute of a frock* झग्यावांचून, झगा नाहीं असा.

Frog ( frog ) [ M. E. *frogge.* A. S. *frogga, frocga.* A. S. *frox*, a frog. ] *n. zool. an amphibious animal of the genus* Rana *and related genera, of many species* बेडूक *m*, भेक *m*, मंडूक *m*, दर्दुर *m.* [ FEMALE F. मंडुकी *f*, बेडकी *f.* F. IN A WELL आडांतला बेडूक *m*, कूपांतला मंडूक *m*, ( RATHER) कूपमंडूक *m.* ( also *fig.*) ] २ *anat. the fourchette of a horse's hoof* बेडकी *f*, पुतळी *f.* ३ ( *railroads* ) *a supporting plate having raised ribs that form continuations of the rails to guide the wheels where one track branches from another or crosses it* (आगगाडीच्या लोखंडी रस्त्यास जेथें सांधा असतो तेथील रुळाखालचा) बेडकाच्या आकृतीचा सांधा *f*, बेडकी सांधा *m.* ४ *the loop of the scabbard of a bayonet or sword* बेडूकपट्टा *m*; हा पट्टा कमरपट्टयाला डाव्या बाजूला जोडलेला असतो, व ह्यांत तरवार अडकवितात. Frog *v. t.* See F. *n.* फ्रागबटन लावणें, फ्रागबटन अडकवणें. Frog'ged *a.* Frog'gy *a.* Frog-hopper *n.* टोळ *m* (?). Frog'ling *n. a little frog* लहान बेडूक *m.*

Frolic ( frol'ik ) [ Cf. Ger. *frohlich*, joyful, gay. ] *a. full of pranks, frolicsome* उल्हासानें नाचणारा, बागडणारा, मौजाळा, मौज्या, खुशमौज्या, कौतुकी, ख्यालीखुशालीचा, ख्याली, खिलाडी or डू, उड्या, उडीमाऱ्या, लहरी, रंगेल, रंगेली, रंगेला, हौशी. F. *n. a wild prank* वेडगळ चाळा *m*, उडणें *n* बागडणें *n.* २ *a merry-making* खेळ *m*, मजा *f*, मौज *f*, ख्यालीखुशाली *f*, रंग *m*, कौतुक *n* (?). Frol'ics *n. pl.* ख्याल *m. pl.*, चार *m. pl.*, चोज *m. pl.* F. *v. i. to play wild pranks* उडणें, बागडणें, उड्या *f. pl.* -मौजा *f. pl.* -लहरा *f. pl.* मारणें, कौतुक *n.* करणें. Frol'icked *pa. t.* & *pa. p.* Frol'icking *pr. p.* & *v. n.* खिलाडू, उडीमाऱ्या, लहरी, रंगेल, रंगेलाली, चाळक. Frol'icsome *a.* ख्यालीखुशालीचा, ख्याली, खिलाडी, मौजाळा, मौज्या, खुशमौज्या, कौतुकी -क्या. Frol'icsomely *adv.* Frol'icsomeness *n.* खिलाडीपणा *m*, ख्यालीखुशाली *f.*

From ( from ) [ A. S. *fram*, from. ] *prep.* -पासून, -जवळून, -कडून, -हून ( in comp. ), -ऊन ( in comp. ).

Frons ( fronz ) [ L. *frons*, front. ] *n. anat. the forehead* कपाल *pop.* कपाळ *n*, भाल *n.*

Front ( frunt ) [ O. Fr. *front*, forehead, brow, -L. *frontem* acc. of *frons, frontis*, forehead, brow. ] *n. the forehead or brow* ललाट *n*, कपाळ *n*, शीर्ष *n.* २ ( sometimes, also ) *the whole face* तोंड *n*, मुख *n*, चेहरा *m*, मोहरा *m*, मुखडा *m.* ३ *the forehead, countenance, or personal presence, as expressive of character or temper, and esp. of boldness of disposition, sometimes of impudence* मुद्रा *f*, चर्या *f*, दर्शन *n* ( S. ), मुखडा *m.* [ BRAZEN F. तिखें *n* (?). UNBLUSHING F. उजळ - उघडा माथा *m.* ] ४ *the foremost rank, the van* ( oppo. to *back* or *rear* ) अग्रभाग *m*, पुरोभाग *m*, दर्शनीभाग *m*, अघाडी *f*, पुढा *m*, पुढोसा *m*, पुढवसा *m*, समोरचा-पुढचा-पुढील बाजूचा भाग *m* -आंग *n*, दिसतें आंग *n*, अग्र *n.* [TO COME TO THE F. *to become conspicuous* पुढें येणें, वाढणें, लौकिकास चढणें. EXACTLY IN F. OF (-च्या) अगदीं नाकासमोर, (-च्या) अगदीं पुढें. F. AND REAR आगापिछा *m*, अघाडीपिछाडी *f.* F. TO F. समोरासमोर ( तोंड करून ). FROM IN F. OF ( -च्या ) पुढून -समोरून -मोहरून. FROM THE F. पुढून. In F. पुढें, समोर. In F. AND IN REAR अघाडीपिछाडीं, पुढें आणि मागें. TO SET OUT IN F. पुढें निघणें -होणें, मोहर *f.* धरणें.] ५ *a position directly before the face of a person, or before the foremost part of anything* अग्रभाग *m*, दृष्टीपुढील -समोरचा प्रदेश *m* -भाग *m*, नजरेसमोरचा भाग *m.* ६ *the most conspicuous part* मुख्य -महत्वाची -ठळक गोष्ट *f* -भाग *m* -मुद्दा *m*, &c. ७ *a front piece of false hair worn by women* खोट्या केंसांचा पुढचा टोप *m.* ८ ( *Shakes.* ) *the beginning* आरंभ *m*, प्रारंभ *m*, सुरवात *f*, उपक्रम *m*, तोंड *n* ( *fig.* ); as, "Summer's F." F. *a. foremost* अगदीं पुढचा, सर्वांच्या पुढचा, समोरचा, तोंडावरचा, तोंडचा.

F. *v. t. to oppose face to face* (समोरासमोर) सामना देणें -करणें, समोर उभें राहणें, (समोर उभें राहून) प्रतिबंध करणें, तोंड देणें. २ *to appear before, to meet* (-च्या) पुढें येणें, दिसणें *in. con. with* ला *of o.*, समोर येणें, भेटणें *in. con. with* ला *of o.*, आढळणें *in. con. with* ला *of o.* ३ *to confront* सम्मुख होणें, -कडे तोंड करून -समोर असणें; as, "The house F.s the street." ४ *to adorn in front* समोरची बाजू शृंगारणें, दर्शनी भाग साजरा करणें -नटवणें, डोक्यावर किंवा कपाळावर अलंकार घालणें, शिर भूषविणें. F. *v. i. to turn the face or front in any direction* -कडे तोंड करणें -फिरविणें -वळविणें. Front'age *n. extent of front* समोरच्या भागाचा -दर्शनी भागाचा विस्तार *m.* २ *the front part of an edifice or lot* इमारतीचा दर्शनी भाग *m.* Fron'tal *a. belonging to the front part* समोरच्या भागाचा, दर्शनी. २ *anat. of or pertaining to the forehead or the anterior part of the roof of the brain case* (मगजपेटीच्या) छपराचा -कपाळाचा, कपालास्थिसंबंधीं, (मस्तिष्कावरणाच्या किंवा कपाळाच्या) कवटीच्या वरच्या भागासंबंधीं. F. *n. a frontlet*; as, (*a*) *an ornamental band for the hair* केस बांधण्याचा नकशीदार पट्टा *m.* (*b*) *mil. the metal face-guard of a soldier* (लष्करी शिपायाची) तोंडावर घालण्याची धातूची टोपी *f,* शिरस्त्राण *n*, मुखत्राण *n* तोंडावरील जिरेटोप *m.* २ *arch. a little pediment over a door or window* (दरवाजा किंवा खिडकी यांच्यावरील) पुढच्या बाजूची नकशी *f* -नकसकाम *n.* ३ *eccl. a moveable decorative member in metal, carved wood, or, commonly, in rich stuff or in embroidery, covering the front of an altar* (Frontals are usually changed according to the different seasons) (रोमन कॅथोलिक देवळांत स्थंडिला-समोंवतीं घालण्याची) नकशीची दर्शनी पट्टी *f.* ४ *anat. the frontal bone, or one of the two frontal bones of the cranium* कपालास्थि *n.* Fron'ted *a. formed with a front, drawn up in a line* रांगा धरून उभा राहिलेला; as, "F. brigades." Front'let *n. a frontal* कपाळपट्टी *f.* २ (*Rare and poetic*) *a frown* (likened to a frontlet) कपाळास घातलेली आंठी *f.*

Frontier (fron'-tēr) [O. Fr. *frontiere*, –Fr. *frontiere* –L. *frons.*] *n. the border, or extreme part of a country, bordering on another country; the marches* सरहद्द *f,* सीमा *f,* शींव *f,* प्रांतभाग *m,* कड *f,* कडा *f.* [F. district कड or कडेमहाल *m,* कडप्रांत *m.*] F. *a. conterminous* शींवेवरील, दोन देशांच्या एकमेकांस लागणाऱ्या टोंकाकडील. २ *of, or relating to, a frontier* सीमेचा -संबंधीं, सिंवेचा, शिंवेचा. Fron'tiers-man *n. man living on the frontier* सिंवेवरचा-शिंवेवर राहणारा मनुष्य *m,* शिंवकरी.

Frontis-piece (front'is-pēs) [Low L. *frontispicium*, –L. *frons*, and *speciere*, to see; not connected with 'piece.'] *n. a figure or engraving in front of a book* पुस्तकाच्या प्रारंभींचें चित्र *n,* ग्रंथाग्रवर्ति चित्र *n,* मुखचित्र *n.* २ *the principal front or face of a building* इमारतीचा दर्शनी-पुढचा-समोरचा भाग *m* -बाजू *f,* गृहाग्रभाग *m,* गृहमुख *n.*

Frost (frost) [A. S. *forst, freosan*; Cf. Ger. *frost.*] *n. the act of freezing* (applied chiefly to *the congealation of water*) गोठवण *f,* गोठण्याची क्रिया *f,* हिमीभवन *n,* नीहार *m,* गोठणें *n.* २ *severe cold, freezing weather* कडक थंडी *f,* पाणी थिजविणारी थंडी *f,* थंडीचा कडाका *m,* मी मी म्हणणारी थंडी *f.* ३ *frozen dew* (called also *hoar frost* or *white frost*) हिमीभूत -हिम झालेलें -गोठलेलें दंव *n.* Frost'-nail *n. a nail with a sharp head driven into a horse's shoe to keep him from slipping* (दंवावरून घसरूं नये म्हणून) घोड्याच्या नालास मारण्याचा विशेष प्रकारचा खिळा *m,* दंवनाल *m.* Frost'-smoke *n. an appearance resembling smoke* धुकें *n.* (धुरासारखें दिसणारें) घनीभूत बाष्प *n.* F. *v. t. to injure by frost* हिमबाधा करणें, धुक्यानें इजा करणें. २ *to produce a surface resembling frost upon* (as upon cake, metals, or glass) (धातु किंवा कांच यांवर) हिमासारखा -धुक्यासारखा भास उत्पन्न करणें, धुक्यासारखें आच्छादणें, (धातु, कांच यांच्या पृष्ठभागास) धुक्याचें रूप देणें; as, "While with a hoary light she *frosts* the ground." ३ *to roughen or sharpen, as the nail-heads or the calks of horse-shoes, so as to fit them for frosty weather* (बर्फावरून चालतांना घसरूं नये म्हणून घोड्यांचे नाल इ०) खडबडीत -खरखरीत करणें. Frost'-bite *v. t. to blight or nip with frost* थंडीच्या कडाक्यानें -थंडीनें करपविणें -नाहींसें करणें. Frost'-bite *n. the freezing, or effect of a freezing, of some part of the body, as the ears or nose* गारठणें *n,* धुक्याची बाधा *f,* हिमबाधा *f,* धुक्यापासून इजा *f,* थंडीनें (अंग) फुटणें *n* -आंखडणें *n,* हिमोपहति *f.* Frost'-bitten *a. nipped by frost* हिंवानें करपलेला-जळलेला, हिमग्रस्त, हिमदग्ध. Frost'ed *a.* Frost'i-ness *n.* (*a*) *a lustreless finish of metal or glass* (धातूवर किंवा कांचेवर दिलेली) मजित रंगाची झिलई *f* -झिलई *f.* (*b*) *the process producing such a finish* मजित रंगाची झिलई देण्याची पद्धति *f* -रीत *f.* Frost'less *a. free from frost* हिमरहित. Frost'work *n. the figurework, often fantastic and delicate, which moisture sometimes forms in freezing, as upon a window pane or a flagstone* (खिडकीच्या तावदानावर) धुक्यानें उठलेली चित्रविचित्र वेलबुट्टी *f.* Frost'y *a. freezing* थिजविणारी, पाणी थिजविण्यासारखी थंडी असलेली; as, "The night

is F." २ *covered with frost* हिमाच्छादित, हिमवान् *pop.* हिमवंत, हिमयुक्त. ३ *chill in affection* प्रेमहीन, प्रेमरहित. ४ *gray-haired* करड्या केंसांचा.

**Froth** ( froth ) [ Icel. *frauth*, froth. ] *n. spume, foam* फेंस *m*, फेन *pop.* फेण *m*, (लाळेचा) फेंस *m*. २ *an empty, senseless show of wit or eloquence* अर्थरहितवक्तृत्व *n*, फेंसासारखें वक्तृत्व *n*, वक्तृत्वफेन *m*. ३ *light, unsubstantial matter* क्षुल्लक -बारिक -विनमहत्वाची -लहानशी गोष्ट *f*, फेंस. *m* (*fig.*) *m*. Froth *v. t. to cause to foam* फेंसणें, फेंसवणें, फेणवणें, फेंस *m*. &c. आणणें. २ *to spit, vent, or eject, as froth* फेंस बाहेर टाकणें -थुंकणें. ३ *to cover with froth* फेंसानें आच्छादणें -झांकणें. F. *v. i. to foam* फेंसणें, फेंसाळणें, फेंसटणें, ( -ला -वर &c. ) फेंस *m* -फेण *m* -&c. येणें. Froth'ily *adv.* Froth'iness *n.* Froth'ing *n.* Froth'less *a. free from froth* फेनरहित, बिनफेंसाचा, फेनशून्य. Frot'hy *a. foamy* फेंसट, फेंसाळ, फेंसाचा, फेनिल, सफेन, फेनयुक्त, फेनविशिष्ट. २ *not firm or solid* फेंसासारखा, फुसका, पोकळ, लेचापेचा. ३ *light, empty* पोकळ, फोल, फुसकुला. ४ *consisting of empty display* फुशारीचा, फुशारकीचा, बुटाकीचा.

**Frouzy** ( frou'-zi ) [ Prov. E. *frouzy*, froward, peevish, offensive to the eye or nose. ] *a. fetid, musty, rank* उबट, कुबट, उबटलेला, कुबटलेला. [ To GET F. उबटणें, कुबटणें. ] २ *slovenly, dingy* मळका, घाणेरडा, अव्यवस्थित; as, "Petticoats in F. heaps." Frou'ziness *n.* उबटपणा *m*, कुबटपणा *m*, उबटाण *f*, उभसाण *f*.

**Froward** ( frō'-ward ) [ A. S. *fro*, away, with affix *-ward*. ] *a. disposed to go counter to what is demanded or what is reasonable; perverse, disobedient* जें करूं नये तें मुद्दाम करणारा, हेकेखोर, आडफांट्या, फांदा आणणारा, दुष्ट, हट्टी, करनकऱ्या. Fro'wardly *adv.* Fro'wardness *n.* करनकरेपणा *m*, हेकेखोरपणा *m*, हट्ट *m*, हेका *m*.

**Frown** ( frown ) [ From O. Fr. *froignier* ( mod. *refrogner* ), to knit the brow; origin unknown. ] *v. i. to scowl* ( कपाळास ) आंठ्या घालणें, भिंवया *f. pl.* चढवणें -वर नेणें, भिंवयांस -कपाळास तिडीक *f.* येणें -उठणें *in. con.* २ *to look with disfavour* अप्रसन्नता *f* -नाखुषी *f.* दाखविणें. F. *v. t. to rebuke with a look* मुद्रेनें तिरस्कार *m* -क्रोध *m* दाखविणें. F. *n. a scowl* आंठी *f*, भ्रुकुटीभंग *m*, भ्रूभंग *m*, भ्रूक्षेप *m*, भ्रूविक्षेप *m*. २ क्रोधमुद्रा *f*, अप्रसन्न मुद्रा *f*. Frown'ing *pr. p.* & *v. n.* see Frown *n.* Frown'ingly *adv.*

**Frozen** ( frōz'n ) *pa. p.* of Freeze थंडीनें गारठलेला, हिमस्तब्ध, हिमस्तंभित, हिमग्रस्त.

**Fructify** ( fruk'ti-fī ) [ L. *fructus*, *fruit*, and *ficare*, akin to L. *facere*, to make.] *v. t. to make fruitful* फलवान् -सुपीक -सफल &c. करणें, (-ला) सफलत्व *n.* आणणें, फळास आणणें. F. *v. i. to bear fruit* फळ धरणें -येणें *in. con.* with ला *of s.*, सुपीक -सफल -फलवान् होणें, फल देणें. Fructif'erous *a. bearing or producing fruit* फलधारी, फलोत्पादक, फलदायी. Fructifica'tion *n. fecundation* सफलीकरण *n.* २ *bot.* (*a*) *the collective organs by which a plant produces its fruit, or seeds, or reproductive spores* जननेंद्रिय *n*, पुनरुत्पादनेंद्रिय *n.* ( *b* ) *the process of producing fruit, or seeds, or spores* फलजननक्रिया *f.* Fruc'tuary *n. one who enjoys the profits, income, or increase of any thing* लाभ खाणारा, फलोपभोगी, फायदा घेणारा, उत्पन्नभक्षी.

**Frugal** ( frōō'-gul ) [ Fr. *frugal*–L. *frugalis* -*frugi*, lit. for food -*frux*, *frugis*, fruit. ] *a. sparing, economical* काटकसऱ्या, अल्पव्ययी, मितव्ययी, कातरवेती, कातरबेताचा, काटकसरीचा. २ *obtained by, or appropriate to, economy* मितव्ययानें मिळालेला-संपादिलेला, मितव्ययाचा, काटकसरीच्या बेताचा. Frugal'ist *n.* मितव्ययी. Frugal'ity *n. prudent economy* काटकसर *f*, अल्पव्यय *m*, परिमितव्यय *m*, घरजोगावणी *f*, घरजुगूत *f*, कातरबेत *m*. २ *sparingness* हात राखणें *n*, काटकसर *f*, बेताबाताचा खर्च *m*. Fru'gally *adv.* काटकसरीनें, हात राखून, बेताबातानें. Fru'galness *n.* See Frugality.

**Frugiferous** ( frōō-jif'ĕr-us ) *a. producing fruit* फलोत्पादक, फलजनक; as, "F. herb on the surface of the Earth."

**Frugivorous** ( frōō-jiv'o-rus ) [ L. *frux*, *frugis*, fruit, and *vorare*, to eat.] *a. feeding on fruits, as birds and other animals* फलोपजीवी, फलाशी, फलाहारी, फलभोजी, फलभक्षी, फळांवर जगणारा -राहणारा.

**Fruit** ( frōōt ) [ O. Fr. *fruit*, Fr. *fruit* –L. *fructus*, from *fruor*, *fructus*, to enjoy. ] *n. whatever is produced for the nourishment or enjoyment of man or animals by the processes of vegetable growth as corn, grass, cotton, &c.* (commonly used in the *pl.* ) ( मनुष्य अथवा पशु, पक्षी इ० तिर्यग्प्राणिमात्राच्या ) आहारोपयोगी वनस्पति *f* -धान्य *n*, पुष्प *n*, फळ *n*, इ०. २ (*hort.*) *the pulpy, edible seed-vessels of certain plants, as apples, oranges, &c.* फल *pop.* फळ *n*, मेवा *m* ( Guj. ). [ Hook with netting to gather F. झेला *m*, आंकडी *f*, आंखी *f*, घळ *m*, झेलणी *f.* Knocking down or gathering of F. फळें उतरणें *n*, पाडा *m*, फलपातन *n.* Layers of straw, &c. for ripening F. आढी *f.* To ripen in such layers,–F. अढींत -आढींत घालून पिकविणें. Topmost F. शेंडेफळ *n.* Unripe ( hard, green, &c. ) F. बोरा *m*, काकडा *m*, दोडा *m*. To be plump and blooming,–F. उजळणें, उतळणें (?). To yield F. ( *lit.* & *fig.* ) फळास येणें, फळणें. Fruit-bud *n. bot. a bud that produces fruit* ( फल ) कलिका *f*, कळी *f.* Fruit'-

jar *n.* *a jar for holding preserved fruit usually made of glass or earthenware* (लोणचें किंवा मुरांबा ठेवण्याची) बरणी *f*, (कांचेची-मातीची) बरणी *f*. Fruit'-sugar *n.* *chem. levulose* फलशर्करा *f*, फळांतून असणारी साखर *f*, साखरेचा एक रासायनिक प्रकार *m*. Fruit'-tree *n.* (*hort.*) *a tree cultivated for its edible fruit* फळझाड *n*. Small-fruits *n. pl.* (*hort.*) *currants, raspberries, &c.* तुतें *n. pl.*, बोरें *n. pl.* इ० लहान फळें *n. pl.* ३ *bot. the ripened ovary of a flowering plant, with its contents and whatever parts are consolidated with it* फळ *n*. ४ *offspring* मूल *n*, संतान *n*, संतति *f*, फळ *n*, प्रजा *f*. ५ *the effect or consequence of an action* परिणाम *m*, फल *or* फळ *n*, फळश्रुति *f*, अर्थ *m*, परिपाक *m*. F. *v. i.* *to bear fruit* फळ *n*. येणें *with* ला *of s.*, सफल होणें, फळ लागणें *with* ला *of s.* २ यश येणें. Fruit'age *n.* *fruit (collectively)* फळफळावळ *or* फळावळ *f*, फळें *n. pl.* २ *effect* (good or ill) (चांगला किंवा वाईट) परिणाम *m*. Fruit'er *n.* *a ship for carrying fruit* फळें नेणारें जहाज *n* –गलबत *n*. Fruit'erer *n.* *a seller of fruits* फळविक्या, फलविक्रयी, काची *m*. Fruit'eress *n. f.* फळें विकणारीण *f*. Fruit'ery *n.* *fruitage* फळफळावळ *f*, &c. २ *a repository for fruit* फळाची कोठी *f*, फळांची वखार *f*, फलागार *n*. Fruit'ful *a.* *producing fruit abundantly* फलवान्, सफल, सुफल, अमोघ, फलित, फलद, फलप्रद, बहुफल, फलद्रूप. २ *prolific, not barren* सुपीक, प्रसवशील, बहुप्रसव, अवंध्या, गर्भधारणशील. ३ *liberal, bountiful* उदार, दानशील. Fruit'fully *adv.* Fruit'fulness *n.* फलद्रूपपणा *m*, बहुफलता *f*, प्रसवशीलता *f*, बहुप्रसवत्व *n*, बहुप्रजत्व *n*, अवंध्यत्व *n*. २ सुफलता *f*, सफळता *f*, साफल्य *n*, यशस्वीपणा *m*. Fruit'ing *n.* *the bearing of fruit* फलधारण *n*, फळ धरणें *n*. Fruit'less *a.* *barren* नापीक, वंध्या, वांझ. २ *vain, unprofitable* निष्फल, फलहीन -रहित -शून्य, रिकामा, रिकामका, रिता, व्यर्थ, निरर्थक, कोरडा, पोकळ. Fruit'lessly *adv.* व्यर्थ, वृथा, फुकट, निरर्थक, शुष्काशुष्क, उगाच. Fruit'lessness *n.* पोकळपणा *m*, निष्फळता *f*, नैष्फल्य *n*, फलराहित्य *n*, वैफल्य *n*, विफलता *f*. Fruit'y *a.* *having the odour, taste or appearance of fruit* फळाचा गंध, रुचि किंवा आकार असलेला; फलसदृश. २ *fruitful* फलदायक, सफल, &c. (see Fruitful).

Fruition (frōōish'un) [O. Fr. *fruition*, from L. *fruor*, to enjoy.] *n.* *use or enjoyment of anything, esp. such as is accompanied with pleasure or satisfaction* उपभोग *m*, भोग *m*, भोगवटा *m*, विपाक *m*.

Frumentaceous (frōōmen-tā'-shus) [L. *frumentaceus* -*frumentum*, for *frugimentum*, corn -*frux*, *frugis*, fruit.] *a.* *made of, or resembling, wheat or other grain* गव्हांचा किंवा इतर धान्याचा केलेला, गव्हांप्रमाणें दिसणारा, गोधूमसदृश (वनस्पति).

Frumenty (frōō'-men-ti) [L. *frumentum*, corn or grain, from the root of *frux*, fruit.] *n.* (written also *furmenty* and *furmity*) इंग्रजी पद्धतीची गव्हांची खीर *f*- क्षिप्रा *f*.

Frush (frush) [Ger. *frosch.*] *n.* (*far.*) *the frog of a horse's foot* (घोड्यांच्या पायाची) बेडकी *f*, पुतळी *f*. २ *a discharge of a fetid or ichorous matter from the frog of a horse's foot* कुजलेली पुतळी *f*, (घोड्याच्या कुजलेल्या पुतळींतून वाहणारा) पुवाचा लोट *m*.

Frustrate (frus'trāt) [L. *frustro*, *frustra* without effect, in vain.] *v. t.* *to defeat, to baffle* निष्फल-व्यर्थ-निरर्थक -निष्फळ करणें, मोडणें, भंग *m*. करणें *g. of o.*, विफल -वृथा करणें, फसविणें. २ *to nullify* रद्द करणें, निष्फल -व्यर्थ-निरर्थक &c. करणें, वायां दवडणें, फुकट घालविणें. F. *a.* *useless, unprofitable* निकामी, निरुपयोगी, निष्फल, निरर्थक. २ *null, nugatory* रद्द. Frus'trable *a.* *capable of being defeated* निष्फल निरर्थक करतां येण्याजोगा, वायां दवडतां येणारा. Frustra'ted *pa. a.* विफलीकृत. Frustra'tion *n.* *disappointment, defeat* निराशा *f*, आशाभंग *m*, नाउमेद *f*, हिरमोड *m*, मोड *m*, भंग *m*, मोडणें *n*, विघात *m*, विफलीकरण *n*.

Frustum (frus'tum) [L. *frustum*, a piece, a bit.] *n.* *geom. the part of a solid next the base, formed by cutting off the top* (वरचा भाग काढून टाकल्यावर बाकी राहणारा कोणत्याही) घनाकृतीचा आधारारेषेजवळचा भाग *m*, सूचीखण्ड *m* (सूची=a cone or pyramid). २ *the part of any solid, as of a cone, pyramid, &c. between two planes, which may be either parallel or inclined to each other* (एकमेकांशीं कोन करणाऱ्या किंवा समांतर असणाऱ्या दोन पातळींमधील) शंकूचा किंवा कोणत्याही बहुकोनाकृति घनक्षेत्राचा भाग *m*, सूचीखण्ड *m*.

Frutescent (frōō-tes'-ent) [L. *frutex*, *fruticis*, a shrub.] *a.* *bot. somewhat shrubby in character* कांहींसें झुडुपासारखें; as, "Evergreen shrubs, both F. and succulent; The F. produce of mountains." Fru'tex *n.* *bot. a shrub* झुडूप *n*. Fruti'cose *a.* *shrubby* झुडपाळ, झुडुपांनीं भरलेलें. Fruti'culose *a.* *bot. like, or pertaining to, a small shrub* लहान झुडपाचें, लहान झुडपासारखें.

Fry (frī) [O. Fr. *frire* –L. *frigere*; cf. Gr. *phrugein* Sk. भृज्ज्, to fry.] *v. t.* *to cook in boiling lard or fat* (चरबींत) तळणें, तळण *n* -तळप *n*. करणें *g. of o.* [To F. (CORN, PULSE, &C.) WITH OIL, GHEE, &C. (तेलांत -तुपांत) तळणें. THE SMELL OF AN ARTICLE FRYING तळपाचा वास *m* -घाण *f*.] F. *v. i.* *to undergo the process of frying* तळणें, तळून निघणें -येणें. २ *to undergo or cause a disturbing action accompanied with a sensation of heat* तळणें, तळतळणें, पोळणें, तळपणें. Fry *n.* *a dish of*

*anything fried* तेलपक-तळलेला पदार्थ *m* -जिन्नस *m* -वस्तु *f*, तेलपकानें भरलेलें ताट *n*. २ ( *colloq.* ) *a state of excitement* तळतळ *f*, क्षोभ *m*, खळबळाट *m*, क्षुब्धता *f*. Fry'ing *pr. p.* & *v. n.* तळणें *n*, तळण *n*, तळप *n*. Fried *pa. t.* & *pa. p.* तळलेला. Fry'-ing-pan *n*. कढई *f*, कढणी *f*, तळणी *f*, तळण *f*, तवा *m*, काहील *m*. [To FALL OUT OF THE F. INTO THE FIRE ( cf. ) आगींतून निघून फुपाट्यांत पडणें-जाणें. ]

Fry ( frī ) [ A. Fr. *fry*, M. E. *fri*, Goth. *fraiw* seed, offspring.] *n. zool. the young of any fish* माशाचीं पोरें *n. pl.* २ *a swarm esp. of little fishes* चिंगळ्यांचा थवा *m* -जमाव *m*. ३ *young or small things in general* किरकोळ -वारिक सारीक गोष्टी *f. pl.*, चिलींपिलीं *n. pl.*

Fuddle ( fud'-dl ) [ Cf. Dut. *vod*, soft; Ger. Prov. *fuddeln*, to swindle. ] *v. t. to stupefy with drink, to make drunk* झिंगविणें, दारू पाजून बेशुद्ध-शुद्धिहीन करणें -बनविणें, उल्लू -मस्त करणें. F. *v. i. to drink to excess or habitually* झिंगणें, ठासणें, ठासून पिणें, उल्लू होणें -बनणें, दारूबाजी -छाकटबाजी करणें, दारूच्या व्यसनांत निमग्न असणें. Fud'dle *n. intoxicating drink* कैफ आणणारें -कैफी -अमली -मस्त करणारें पेय *n*, मदिरा *f*, सुरा *f*, मद्य *n*, दारू *f*. Fud'-dle-cap *n. a hard drinker* खूप ठांसून दारू पिणारा, दारूबाज, अट्टल छाकट *m*. Fud'dled *pa. t.* & *p. a.* Fud'dler *n. a drunkard* झिंग्या, झिंगट, छाकटा, दारूबाज. Fud'dling *pr. p.* & *v. n.*

Fudge ( fuj ) [ Low. Ger. *futsch* begone. ] *n. stuff, nonsense*, (often an exclamation of contempt) मूर्खपणा *m*, गाढवपणा *m*, गप्प *f*, बात *f*, खोटी गोष्ट *f*, गप्पाष्टक *n*. २ *an impostor, an humbug* फसव्या *m*, ठग *m*. F. *v. t. to fabricate, to contrive, to bungle anything* कांहीं तरी बूट पसरणें, कांहीं तरी तर्कट रचणें -गप्प उठवणें, नीळ पिकवणें (?). २ *to foist, to interpolate* कांहीं तरी घुसडून देणें, प्रक्षेप घालणें.

Fuel ( fū'-el ) [ L. *focus*, a fire-place. ] *n. that which feeds fire* सर्पण *n*, लांकडें *n. pl.*, पेटवण *n*, जळवण *n*, जळण *n*, इंधन *n* ( S. ), ( समिध् *f* =F. for sacrific ), लांकूडफांटें *n*, फांटीं *n. pl.* [ DRY CRACKLING F. तडतड जळणारें सुखें लांकूड *n*, भडस *f*, मुरकाड्या *f. pl.*, मुरकाड *n*, भडभरकाड *or* भरकांड *n*. FIT FOR F. जळाऊ, जाळाऊ, जळणाऊ, जाळींव. WOOD SPLIT INTO LOGS FOR F. गंडेरी *f* ( लांकूड ). TO ADD F. TO THE FIRE आगींत तेल *n*. ओतणें, जळत्यांत पेंडी *f*. टाकणें. ] २ *anything that serves to feed or increase passion or excitement* इंधन *n* (*fig.*), क्षोभक-उद्दीपक कारण *n*.

Fugacious ( fū-gā'-shus ) [ L. *fugax, fugacis* -*fugere*, to flee. ] *a. disposed to fly* पळपुटा, पळणारा, पळ काढणारा. २ *lasting but a short time, volatile* उडणारा, उडून जाणारा, अस्थायिक, क्षणभंगुर, न टिकणारें; as, "F. colours, smells, tastes." ३ *biol. fleeting, lasting but a short time* (applied particularly to organs or parts which are short-lived as compared with the life of the individual ) (लवकर ) गळून पडणारा, आशुगलनशील, अल्पजीवी, अचिर; as, "F. fruits, F. petals, F. curtain, F. ring." Fuga'city *n*. उडून जाण्याचा धर्म *m*. २ लवकर गळून पडण्याचा धर्म *m*, गलनशीलता. ३ *instability, uncertainty* अस्थायिकपणा *m*, अस्थायिकत्व *n*, अस्थिरता *f*.

Fugitive ( fūj'i-tiv ) [ Fr. *fugitif* –L. *fugitivus*, -*fugere* to flee. ] *a. fleeing from pursuit, danger, restraint, &c.* पळणारा, यःपलाय करणारा, ( पाठलाग होत असतां किंवा संकटापासून ) दूर पळणारा -पळत जाणारा, पळका, पळता, धांवता. २ *escaping from service* ( नोकरींतून ) पळून जाणारा, सटकून जाणारा, पळपुटा. ३ *wandering, vagrant* भटक्या, भटक्या *f. pl.* मारणारा, भटकणारा, परागंदा, वाऱ्यावर हिंडणारा. ४ *not durable* ( applied to material and immaterial things ) अस्थायि, अचिर, थोडा वेळ टिकणारा, क्षणिक, क्षणभंगुर. [F. compositions *n. pl. compositions such as are short and occasional, and so published that they quickly escape notice* थोडा वेळ टिकणारी ग्रंथरचना *f*, तात्पुरत्या महत्वाची ग्रंथरचना ] *f*. F. *n. a deserter* पळून जाणारा, पोबारा करणारा, पळपुट्या. २ *something hard to be caught or detained* निसटून जाणारें. F. from justice ( *law* ) *one who, having committed a crime in one jurisdiction, flees or escapes into another to avoid punishment* ( शिक्षा चुकविण्याच्या हेतूनें ) पळून जाणारा, फरारी होणारा, फरारी -परागंदा होणारा, परागंदा ( चोर इ० ). Fugi'tively *adv.* Fu'gitiveness *n*.

Fulcrum ( ful'-krum ) [ L. *fulcrum*, a support–L. *fulcire*, to prop. ] *n. a prop or support* टेंकू *m*, टेंका *m*, टेंकावा *m*, आधार *m*, धर *m*, उपस्तंभ *m*. २ *that by which a lever is sustained, or about which it turns in lifting or moving a body* तरफ *f*, तरफेची अट *f*, टेंकू *m*, आलंब *m*. ३ *zool.* (*a*) *the horny inferior surface of the lingua of certain insects* (कित्येक कीटकांच्या जिव्हेच्या खालचा) शृंगासारखा कठिण भाग *m*, टेंकू *m*, शृंगालम्ब *m*. ४ *anat. the connective tissue supporting the framework of the retina of the eye* डोळ्याच्या आंतील ( आलोचक ) पडद्याच्या सांगाड्यास आधारभूत असलेली शीर *f*, शिरोपस्तम्भ *m*, टेंकूची शीर *f*, आलम्बिनी *f*. Ful'crate *a. furnished with fulcrums* सालंब, उपस्तंभ असलेला, टेंकू लावलेला.

Fulfil ( fool-fil' ) [ M. E. *fulfillen*.–A. S. *fulfyllan*, to fill full, to fulfil. –A. S. *ful*, full, and *fyllan*, to fill.] *v. t. to complete by performance*; as (*a*) (-a wish, promise, intention, &c. ) ( इच्छा, वचन, हेतु, संकल्प इ० ) पुरा -पूर्ण -सत्य -खरा -सिद्ध &c. करणें, शेवटास -सिद्धीस -तडीस नेणें, पार पाडणें, पुरवणें. (*b*) ( a prophecy &c. ) ( भविष्य, अंदाज इ० ) पुरा -पूर्ण-

खरा-सत्य &c. करणें. (*c*) (-a term, period, &c.) (काळ, वेळ, इ०) भरणें, पुरा -पुरता -पूर्ण करणें. Fulfill'ed *pa. t. & pa. p.* पूर्ण -परिपूर्ण -पुरा केलेला -झालेला, भरलेला. [To BE F. पुरणें.] Fulfill'er *n.* पुरा करणारा, पूर्णकर्त्ता, सिद्ध करणारा, तडीस नेणारा, शेवटास नेणारा. Fulfil'ling *pr. p. & v. n.* Fulfil'ment *n. accomplishment* सिद्धि *f*, पार पाडणें *n*, तडीस लावणें *n*, परिपूरण *n*. २ *performance* कृति *f*, पूर्त्ति *f*, परिपूर्त्ति *f*.

**Fulgent** (ful'-junt) [From stem of pres. pt. of L. *fulgere*, to shine.] *a. shining* तेजस्वी, देदीप्यमान, चकाकणारा, लकलकित, प्रकाशमान, भास्वान्. Ful'gency *n.* तेज *n*, तेजस्विता *f*, प्रकाश *m*, दीप्ति *f*, प्रभा *f*, लकलकाट *m*. Ful'gently *adv.* Ful'gid *a.* (*R.*) same as Fulgent. Ful'gor, Ful'gour *n.* (*R.*) प्रखर तेज *n*. Ful'gorous *a.* चकाकणारा, दिपवणारा.

**Fuliginous** (fūlij'-i-nus) [L. *fuliginosus*, sooty –L. *fuligin*, stem of *fuligo*, soot. Cf. Sk. धूलि, dust.] *a. sooty, dusky* धूसर (S.), धुळकट, मळकट, धुळीसारखा. २ *pertaining to, or resembling, smoke* धुरकट, धुराचा, धुरासारखा, धूमाळा, धूममय, धुरासंबंधीं. Fuli'ginously *adv.*

**Full** (fool) [A. S. *ful*, Dut. *vol*, Icel. *fullr*, Dan. *fuld* (for *full*) Swed. *full*, perhaps Sk. पॄ.] *a. filled up* (said primarily of hollow vessels, and hence of anything else) पूर्ण, भरला, भरलेला, भरपूर, भर (in comp.; as, पेलाभर), अनवकाश, पूरित, भरित (in comp.; as, रसभरित). २ *copious, plenteous, ample* मय (in comp.; as, धान्यमय, जलमय, तेजोमय, अग्निमय, पर्वतमय), प्रचुर (in comp.; as, पुष्पप्रचुर, वृक्षप्रचुर), गडगंज, विपुल, पुष्कळ, भरपूर, रेलचेल. ३ *complete, entire, perfect* पुरा, पुरता, पूर्ण, संपूर्ण, परिपूर्ण, सांग, पक्का, भर (in comp.). [AT F. *when full or complete* पूर्ण असतांना.] ४ *sated* धालेला, तृप्त, परितृप्त, तृप्ति पावलेला. ५ *stored with information* बहुश्रुत; as, "Reading maketh a *full* man." ६ *having the attention, thoughts, &c., absorbed in any matter, and the feelings more or less excited by it* व्यग्र, मग्न. ७ *filled with emotions* क्षुब्ध, उचंबळलेला, कोणत्याही मनोविकारानें व्यापलेला, भरून आलेला (as हृदय भरून आलें आहे). Full *n. complete measure, utmost extent* पराकाष्ठा *f*, सीमा *f*, मर्यादा *f*, शिकस्त *f*, कमाल *f*, हद्द *f*, भर *m*, भरती *f*, भरतें *n*. [TO REACH ITS F. पराकाष्ठा *f* -सीमा *f* -शिकस्त *f* -हद्द *f* &c. होणें *g. of s.* F. OF THE MOON *the time of full moon* पूर्णचंद्राची वेळ *f*.] F. *adv. completely* पुरतेपणीं, पुरेपणीं, पुरतें, पुरें, पूर्ण. २ *quite, to the same degree, without diminution* तंतोतंत, बरोबरीचें, तसेंच, टांकोटांक, समसमान. ३ *to equality with, to the quantity or amount of* भर (in comp.; as, गाडीभर a cartfull, मूठभर a handful, शेरभर a seerfull, &c.). ४ *exactly* बरोबर, तंतोतंत, थेट -with power of good, quite, regular, tight, bouncing, &c. implying *completeness, ampleness, liberal, flowing measure*, भर (in comp.), तब्बल, ताठ, जोर, घळघळीत, घसघसीत, चरचरीत, चरब, तुडुंब, पुरापूर. Full'-blooded *a. having a full supply of blood* पुऱ्या रक्ताचा, भरपूर रक्त असलेला, रक्तानें पूर्ण, टवटवीत, टुकटुकीत. २ *thoroughbred* शुद्ध रक्ताचा, अस्सल अवलादीचा, अवलादीचा. Full'-bloomed *a. like a perfect blossom* बहारींत असलेला, पूर्ण भरांतला, ऐन भरांत आल्यासारखा. Full'-blown *a. fully expanded* (as a blossom) पूर्ण विकासलेला, पूर्ण विकास पावलेला, पूर्णविकसित. २ *fully distended with wind* (as a sail) (वाऱ्यानें) पुरें ताणलेलें -पसरलेलें -भरलेलें (शीड *n*.). Full'-bottomed *a. naut. of great capacity below the water-line* पघळ बुडाचा. Full'-eyed *a.* विशालनेत्री, मृगनयना (*f*). Full'-formed *a. full in form or shape* पूर्ण -पुऱ्या आकाराचा. Full'-grown *a. mature* पूर्ण वाढ झालेला. Full'-hearted *a. full of courage or confidence* धैर्यवान्, धीराचा, निधड्या छातीचा, हिंमतबहाद्दर, हिंमती. Full'-hot *a. very fiery* अतितलख, आगीसारखा, विस्तवासारखा. Full'-manned *a. completely furnished with men, as a ship* मनुष्यांचा (कामगारांचा) पूर्ण पुरवठा असलेला. Full'ness *n. abundance* प्राचुर्य *n*, प्रचुरता *f*, वैपुल्य *n*, विपुलता *f*, पूर्णता *f*, भर *m*, रेलचेल *f*, चंगाळी *f*. २ *completeness* पूर्णता *f*, पूर्तता *f*, पूर्त्ति *f*, परिपूर्त्ति *f*, पूर्णत्व *n*, पूर्णपणा *m*. ३ *satiety* समाधान *n*, तृप्ति *f*, पर्याप्ति *f*, पूर्त्ति *f*, धालेपणा *m*. Full'-orbed *a. having the disc complete or fully illuminated* पूर्णमंडल, पूर्ण मंडलाचा, पूर्णप्रकाशित. २ *like the full moon* पूर्णचंद्रसदृश, पौर्णिमेच्या चंद्रासारखा. Full'-sailed *a. having all its sails set* (as a ship) सर्व शिडें उभारलेलें. २ (hence) *without restriction or reservation* अप्रतिबंध, अप्रतिहत, निरर्गल, निर्बंध, अव्याहत, अकुंठित, मोकळा. Full'-toned *a. deep, sonorous* घौस, डोर, झार. Full'-winged *a. having large and strong or complete wings* पुरे मोठे आणि सबळ पंख असलेला. २ *ready for flight* उडण्यास सिद्ध, उडतां येईल अशा स्थितींत, उडण्यास तयार झालेला -उत्सुक. Full'y *adv.* Full age *n.* (*law*) *majority* (in England and the United States, the age of 21 years) कायद्यांत येण्याचें वय *n*, सज्ञानपणाचें वय *n*. F. band *n. mus. a band in which all the instruments are employed* सबंद बाजा *m*, (ज्यांत सर्व वाद्यें वाजविलीं जातात तो) पुराबाजा *m*. F. bottom *n. a kind of wig full and large at the bottom* तळाशीं अघळपघळ आणि पुरा असलेला (केंसांचा) टोप *m*. F. brother *or* sister *n. a brother or sister having the same parents as another* सखा भाऊ *m*, सखी बहीण *f*, सख्खें भावंड *n*. Full-dress *n. the dress*

*prescribed by authority or by etiquette to be worn on occasions of ceremony* पूर्ण पोषाख *m*, भर पोषाख *m*. [IN F. भरपोषाखानें.] Full'-moon *n.* (*a*) *the moon with its whole disc illuminated, as when opposite to the sun* पूर्णचंद्र *m.* (*b*) *the day on which the moon is full* पौर्णिमा *f*, पुनव *f* (*slang*), पूर्णिमा *f.* Full sea *n. high water* भरतीचा समुद्र *m.* Full swing *n. free course* पूर्ण वेग *m*, ऐन रंग *m*, ऐन भर *m*, पुरा जोस *m*, पुरा जोम *m.* In Full *adv.* (*a*) *at length* सविस्तर, विस्तारेंकरून, विस्तारानें. (*b*) *written out in words and not indicated by figures* अक्षरीं, लेखीं.

Full (fool) [O. Fr. *fuler*, Fr. *fouler*, to full, or thicken cloth in a mill -Late L. *fullare*, (1) to cleanse clothes, (2) to full –L. *fullo*, a fuller.] *v. t. to scour, cleanse, and thicken in a mill* (खळ घालून) यंत्रानें स्वच्छ आणि घट्ट करणें, कपडा भरविणें, छाट करून कपडा भरणें. Full'age *n. the money paid for fulling* कपडाभरणावळ *f*, भरणावळ *f*, कपडेछाटणावळ *f.* Full'er *n. one whose occupation is to full cloth* कपडा साफ व घट्ट करण्याचा धंदा करणारा, कपडेछाट करणारा. Full'ery *n. the place where the fulling of cloth is carried on* कपडा साफ व घट्ट करण्याचा कारखाना *m* -जागा *f*, कपडेछाट करण्याची जागा *f.* Full'er's earth *n.* कपडेछाट करण्याची खारी माती *f.*

Fulminate (ful'mi-nāt) [From p. p. of L. *fulminare*, to thunder –L. *fulmin* for *fulmen*, a thunder-bolt = (*fulg -men*) –L. *fulgere*, to shine.] *v. i. to thunder* गर्जना करणें, कडाडणें, एकदम मोठ्या आवाजानें फुटणें. २ (hence) *to make a loud sudden noise* मोठा आवाज *m* -भडाका *m* -धडाका *m* होणें. ३ *to send forth decrees or censures with the assumption of supreme authority* (वरिष्ठ सत्तेच्या किंवा अधिकाराच्या दिमाखानें) हुकूम सोडणें -फर्मावणें -काढणें, ठपका *m.* देणें, दूषण *n.* लावणें. F. *v. t. to cause to explode* उडविणें, मोठा आवाज *m* -धडाका *m.* करविणें. २ *to utter or send out with denunciations or censures* (said esp. of menaces and censures uttered by ecclesiastical authority) (धर्माधिकाऱ्यानें) शापोक्ति करणें, शाप देणें, (धर्माधिकाराच्या जोरावर) धमकीचा हुकूम *m*-आज्ञा *f.* सोडणें; as, "They F.ed the most hostile of all decrees." Ful'minating *pr. p.* *a. thundering* मोठा धडाका करणारा -उडविणारा. २ *hurling denunciations, menaces, or censures* सार्वजनिक रीतीनें -उघड धाक -दहशत देणारा -घालणारा, आरोप -नामोशी करणारा. Fulmina'tion *n. detonation* फटाका उडविणें *n*, गर्जना करणें *n.* २ *the act of thundering forth threats or censures as with authority* दहशत *f*, आरोप *m*, तोहमत *f*- धमकी *f* इ० देणें. ३ *vehement menace or utterance* फार कडक दहशत *f*, जोराची दहशत *f.* Ful'minatory *a.* Fulmin'ic *a. pertaining to fulmination* दहशतीचा. २ (specifically, *chem.*) *pertaining to, derived from, or denoting, an acid so called* फल्मिनिक अम्लासंबंधी.

Fulsome (fōōl'-sum) [M. E. *fulsum*, –M. E. *ful*, full, with suffix *-sum.*] *a. gross, nauseous* ओंगळ, किळसवाणा, चिळसवाणा, किळस-चिळस आणणारा-उत्पन्न करणारा, अमंगळ, घाणेरडा, ओखट, बीभत्स, अश्लील, गर्हित, कुत्सित, विरस. २ (esp.) *offensive from excessive praise* (फाजील स्तुतीमुळें) कंटाळा आणणारा, कंटाळवाणा; as, "F. flattery." Ful'somely *adv.* ओंगळपणें, निंद्यपणानें. Ful'someness *n.* ओंगळपणा *m*, ओखटेपणा *m*, गर्ह्यता *f.*

Fulvous, Fulvid (ful'vus, ful'-vid) [From L. *fulvus*, tawny. Late L. *fulvidus*, somewhat tawny.] *a. tawny* पिंगट (?), पिंगटसर, कांहींसा पिंवळा.

Fumble (fum'-bl) [Akin to Dut. *fommelen*, to fumble and Swed. *fumla* (also *famla*).] *v. i. to feel or grope about, to make awkward attempts to do or find something* चांचपडणें, चांचपणें, ढांडुळणें; as, "Adams now began to F. in his pockets." २ *to seek awkwardly, to grope about in perplexity* अडाण्याप्रमाणें शोधणें, (हेंगाड्याप्रमाणें) कांचकळणें, धांदरटासारखें हुडकणें; as, "To F. for an excuse." ३ *to handle much, to play childishly, to turn over and over* हाताळणें, (-शीं) हातचाळा करीत बसणें, पोरासारखें खेळत बसणें, विनाकारण हातानें फिरविणें; as, "I saw him F. with the sheets, and play with flowers." F. *v. t. to manage awkwardly* अडाण्यासारखें चिवडणें -हाताळणें-हातांत घेणें. Fum'-bler *n.* Fum'blingly *adv.*

Fume (fūm) [O. Fr. *fum* –L. *fumum* acc. of *fumus* smoke, Sk. धूम, smoke.] *n. smoke, vapour, reek* धूम *m*, धूर *m*, वाफ *f* (?). २ *rage or excitement which deprives the mind of self-control* राग *m*, क्रोध *m*, रोष *m*, कोप *m*, आवेश *m*, घुस्सा *m*, (मनोविकाराचा) धूर किंवा धूम *m*; as, "The *fumes* of passion." [IN A FUME *in ill temper, esp. from impatience* चिडलेला.] ३ *vain imagination, idle conceit* व्यर्थ कल्पना *f*, मिथ्या कल्पना *f*; as, "A show of *fumes* and fancies." ४ *inordinate flattery* फाजील-बेहद्द खुशामत *f*, अमर्याद स्तुति *f*, स्तुतिरूप धूम *m*; as, "To smother him with *fumes* and eulogies." F. *v. i. to smoke, to steam* धुमसणें, धुमणें, धुपणें (?). २ *to be dulled and stupefied* घाबरून -गांगरून बावरून जाणें, मूढ -भ्रांत होणें, कर्तव्यशून्य -मट्ठ होणें, (भ्रम झाल्यानें) कांहीं न सुचणें *with* ला *of s.*; as, "keep his brain *fuming*." ३ *to pass off in fumes or vapours* धूर -वाफ होऊन जाणें -उडून जाणें;

as "Their parts are kept from *fuming* away by their fixity." ४ *to be hot with anger, to chafe, to fret, &c.* रागानें तापणें -लाल होणें -जळणें, क्रोधानें आरक्त होणें, क्रोधायमान होणें, जळफळणें, कडकडणें, फणफणणें, धुमसणें, धुसमुसणें, कुरकुरणें, कावणें, जळणें, जळफणें, चवताळणें, चाचावणें, जळफळ *f* -चडफड *f*, करणें; as, "He frets, he *fumes*, he stares, he stamps the ground." [ To F. AWAY *to give way to excitement and displeasure* लवकर संतापणें -चिडणें. ] F. *v. t. to fill with fumes, vapours, odours, &c.* ( as a room ) धुरानें भरणें, (आंत) धूर करणें -कोंडणें -करून सोडणें, धुपावणें. २ *to praise inordinately* अत्यंत कमालीची स्तुति *f* -वाखाणणी *f* करणें, (-ची) खुशामत चालविणें, स्तुतीचे लोट वाहविणें; as, "They deify and *fume* him so." ३ *to throw off in vapour, or as in the form of vapour* वाफेच्या रूपानें काढून टाकणें; as, "The heat will *fume* away most of the scent." Fume'less *a.* बिनधुराचा. Fum'er *n.* ( वाफेच्या रूपानें ) उडून जाणारा, वाफ होणारा, धुमसणारा. Fu'mid *a. smoky* धूम्रमय, धुरकट, धुरट. Fumid'ity *n.* Fu'midness *n.* धुरकटपणा *m.* Fumif'erous *a. producing smoke* धूमोत्पादक, धूर उत्पन्न करणारा. Fum'ing *n.* धुमसणें *n.* Fum'ous *a. smoky* धुरकट. २ *full of fumes* धुराचा, धूम्रमय, धुरानें भरलेला. ३ उग्र वासानें भरलेला, उग्रट, as, "Garlic, onions, mustard, and such like F. things." Fu'my *a.* धुरासारखा, धुराचा; as, "Drowned in F. wine."

Fumigate (fūm'i-gāt) [ From p. p. of L. *fumigare* to fumigate –L. *fumus*, smoke, vapour, and *igare* for *agere*, to drive about. ] *v. t. to expose to smoke* धूर *m.* -धुरी *f* -धुकटी *f* -वाफ *f* -वाफारा *m. &c.* देणें. २ *to perfume* ( सुगंधी ) वाफारा देणें, धूप देणें, धुपवणें. Fumiga'tion *n. the act of fumigating* धूर देणें *n, &c.* २ *vapour raised in the process of fumigating* वाफ *f*, धूर *m*, धुरी *f*, धुकटी *f.* Fu'migator *n. one who, or that which, fumigates* वाफारा *m* -धुरी देणारा. २ *an apparatus for fumigating* वाफारा देण्याचें यंत्र *n*, धुरी देण्याचें यंत्र *n.* Fu'migatory *a.* धुरी देण्याचें (द्रव्य).

Fun (fun) [ M. E. *fon*, *fonne*, a foolish person. ] *n. merriment* मजा *f*, मौज *f*, गमत *f*, खेळ *m*, क्रीडा *f*, लीला *f*, कुतूहल *n*, विनोद *m*, खुशाली *f*, ख्यालीखुशाली *f*, खेळीमेळी *f*, खेळी *f*, तमाशा *m*, रंग *m*, रमूज *f*, हास्यविनोद *m.* [ To MAKE F. OF, *to hold up to ridicule* उपहास *m* -थट्टा *f.* करणें, (-ची) मजा करणें. ] Fun'ny *a.* मौजेचें, गमतीचें, हास्यजनक. २ *comical, laughable, amusing* हास्यरसपूर्ण, हास्याचा, हास्यात्मक, हास्यविनोदपूर्ण, हांसविणारा, परिहासक, मौजेचा, कौतुकाचा, विनोदी, थट्टेखोर, चमत्कारिक, चमत्काराचा, तमाशाचा.

Function (funk'-shun) [ M. Fr. *function* ( Fr. *fonction* ) –L. acc. *functionem*, performance.] *n. performance* कृत्य *n*, कार्य *n*, कर्तव्य *n*, आचरण *n.* २ *the appropriate action ( of any special organ or part of an animal or vegetable organism)* कर्म *n*, क्रिया *f*, व्यापार *m*, कार्य *n*, काम *n*, धर्म *m*, कृत्य *n*, अधिकार *m*, फरज *f*, व्यापार *m.* ३ *the natural or assigned action of any power or faculty, as of the soul, or of the intellect* स्वाभाविक कार्य *n* -व्यापार *m* -गुण *m*, स्वभाव *m*, कार्यशक्ति *f.* ४ *the course of action which particularly pertains to any public officer in Church or State* अधिकार *m*, विधि *m.* ५ *math. a quantity so connected with another quantity, that if any alteration be made in the latter there will be a consequent alteration in the former* ( Each quantity is said to be a *function* of the other. Thus, the circumference of a circle is a *function* of the diameter. ) फल *n.* [ALGEBRAIC F. बैजफल *n.* ANTI-HYPERBOLIC F. अतिपरवलीय प्रतिकूल फल *n.* ARBITRARY F. अनियमित फल *n.* CIRCULAR F. चापीय -चक्राकार फल *n.* COMPLEMENTARY F. पूरक फल *n.* COMPLEX F. मिश्रित फल *n.* COMPLEX-HYPERBOLIC F. मिश्रितातिपरवलीय फल *n.* CONTINUITY OF F. फलाविराम. ELLIPTIC F. दैर्घ्यफल. EXPLICIT F. स्पष्ट फल. EXPONENTIAL F. घातीयफल *m.* HYPERBOLIC F. अतिपरवलीयफल. HYPER-ELLIPTIC F. अतिदैर्घ्यफल.] Func'tional *a. official* हुद्यासंबंधीं, कर्तव्यासंबंधीं, कामाविषयींचा. २ *pertaining to the function of an organ or part, or to the functions in general* क्रियाव्यापारविषयक, कार्यासंबंधीं. [FUNCTIONAL DISEASE *n. med. the derangement of an organ arising from a cause, often unknown, external to itself* कोणत्याहि इंद्रियाच्या 'व्यापारांत' विघाड झाल्यामुळें होणारा रोग *m.* इंद्रियाच्या 'रचनेंत' विघाड झाल्यामुळें होणारा नव्हे.] Func'tionally *adv.* Func'tionary *n. one charged with the performance of a function or office* कामगार, कामदार, अमलदार, अधिकारी.

*N. B.*:—To understand some of the technical words given above, it is necessary to note the following; Hyperbola = अतिपरवलय; Ellipse = दीर्घवृत्त; Elliptic = दैर्घ्य; Exponent = घात; Hyperelliptic = अतिदैर्घ्य.

Fund ( fund ) [M. Fr. *fond*, a bottom, a merchants' stock,—L. *fundus*, bottom. ] *n. a deposit of resources, capital* निधि *m*, संचय *m*, गंगाजळी *f*, ठेवा *m*, सांठा *m*, फंड *m*, भांडवल *n*, पुंजी *f*, भांडार *n*, गठ्ठा *m*, गठडी *f.* (*b*) *pl. the stock of a national debt* (called also *public funds*) कायमची -बैठी दैव *f*, सरकारास कायमचा कर्जीं दिलेला पैसा *m.* २ *a supply* पुरवठा *m*, भांडार *n*, भांडवल *n.* Sinking fund *the aggregate of sums of money set apart and invested, usually at fixed intervals for the ex-*

-tinguishment *of the debt of a government, or of a corporation, by the accumulation of interest* व्याजांतून कर्ज फेडतां यावें अशासाठीं सरकारानें किंवा सार्वजनिक संस्थांनीं व्याजीं लावलेली रक्कम *f*, ऋणविमोचकनिधि *m*. F. *v. t. to provide a permanent revenue* (कायमचा) निधि तयार करणें, फंड उभारणें, फंड काढणें, फंड जमविणें. २ *to place in a fund, as money* निधिरूपानें ठेवणें, फंडांत भरणें -घालणें -जमा करणें. ३ *to put into the form of bonds or stocks bearing regular interest* बैठी ठेव करणें, नियमित व्याजाच्या फंडांत किंवा कायमच्या ठेवींत टाकणें; as, "To F. the floating debt." Fund'able *a. convertible into bonds* बैठ्या ठेवींत ठेवतां येण्याजोगा. Fund'ed *a.* बैठ्या ठेवीच्या रूपानें ठेवलेला, बैठ्या ठेवींत ठेवलेला, फंडांत ठेवलेला. Fund'-holder *n.* बैठीठेववाला, कायमच्या सार्वजनिक ठेवींत पैसे असलेला मनुष्य *m*. Fund'ing *pr. p.* Fund'less *a.* बैठी ठेव -कायमचा फंड नसलेला.

*N. B.*:—इंग्लंडांत सरकारी बैठ्या किंवा कायमच्या ठेवींत घातलेला पैसा परत मिळत नाहीं; फक्त त्याचें व्याज मात्र मिळतें.

Fundament (fun'-da-ment) [ M. E. *fundement* -O. Fr. *fondement*, foundation. ] *n. the part of the body on which one sits*, (specif., *anat.*) *the anus* गांड *f*, गुदप्रदेश *m*, अधोदेश *m*, अधःप्रदेश *m*, अधोभाग *m*, मलद्वार *n*. Fundament'al *a. pertaining to the foundation* मूलविषयक -संबंधीं. २ (hence) *essential, as an element, principle, or law* आधारभूत, मूलभूत, अवश्यक, जरूरीचें, महत्त्वाचें, मुख्य, प्रमुख, प्रधान; as, "A F. truth." F. *n. a leading or primary principle, rule, law or article, which serves as the groundwork of a system* मूलभूतविषय *m*, मूलभूत गोष्ट *f*, प्रधान -मूल तत्व *n*. Fundament'ally *adv.* मूलापासून, मूळांत.

Funeral (fū'nėr-al) [ O. Fr., -L. L. *funeralis* -L. *funus, funeris*, a funeral procession.] *n. obsequies, burial* (formerly used in the *pl.*) प्रेतसंस्कार *m*, शवसंस्कार *m*, उत्तरविधि *m*, प्रेतक्रिया *f*, अंत्यविधि *m*, और्ध्वदेहिक *n*, &c. २ *the procession attending the burial of the dead* प्रेतयात्रा *f*, स्मशानयात्रा *f*, शवयात्रा *f*, मसणबोळावा *m*. F. *a. pertaining to funeral* क्रियाकर्मान्तराचा, उत्तरकर्मांचा, प्रेतकर्मसंबंधीं, उत्तरक्रियेसंबंधीं, उत्तरक्रियाविषयक, और्ध्वदेहिक. [ A F. PILE चिता *f*. ASCENDING THE F. PILE चितारोहण *n*. BURSTING OF THE SKULL OF CORPSE ON THE F. PILE कपालमोक्ष *m*. F. ASHES चिताभस्म *n*. F. FIRE चिताग्नि *m*. F. FIRE ACCOMPANIED BY THE PROPER RITES मंत्राग्नि *m*. F. RITE, F. RITES AND CEREMONIES क्रिया *f*, क्रियाकर्मांतर *n*, प्रेतकर्म *n*, प्रेतकार्य *n*, उत्तरक्रिया *f*. THE OFFICIATING BRAHMAN AT F. RITES दर्ग्या *n*, कारटा *m* (?), स्मशानांतला भट *m*. UNHALLOWED F. FIRE भडाग *f*, भडाग्र *f*, गडाग्नि *m*.] Fu'neral *or* Funereal (Fūnē'-real) *a. suiting a funeral* प्रेतसंस्कारास उचित -योग्य -शोभणारा. २ (hence) *dismal, mournful* भयानक, गंभीर (?).

Fungus (fung'-gus) [L. *fungus*, a mushroom.] *n. bot. any plant belonging to the large class called collectively* "Fungi," "*usually terrestrial polymorphous plants, sometimes subterranean, often parasitic, destitute of chlorophyll or starch, of most varied form, color, and consistence, sometimes reduced to a few filaments or cells, the vegetative organs consisting of a tissue of slender threads, the spores most minute, sometimes superficial, sometimes borne on projecting points, or variously inclosed in cells or sacs*" कुत्र्याचें मूत *n*, (चिखलांत रुजणाऱ्या) छत्रीसारखें -कुत्र्याच्या मुतासारखें झाड *n*, अळंबें *n*, बुर्शीसारखी वाढ *f*, शिळ्या भाकरीवर किंवा दुसऱ्या एखाद्या पदार्थावर वाढणारी बुरशी *f* (तवंग ?). २ *med. a spongy, morbid growth or granulation in animal bodies, as the proud flesh of wounds* (जखमेवरची) विकृतावस्थेंतील वाढ *f*. Fun'gi *or* Fun'guses *n. pl.* Fun'giform *a. shaped like a fungus* अळंब्यासारखा. Fungiv'orous *a. zool. eating fungi* (said of certain insects) अळंबीं खाऊन राहणारा (किडा). Fun'goid *a. fungous* अळंब्यासारखा. Fungol'ogist *n. a mycologist* अळंब्यांच्या निरनिराळ्या जातींचें ज्ञान असणारा. Fungol'ogy *n. mycology* अळंब्यासारख्या वनस्पतींचा विचार *m*. Fun'gous *a. of the nature of fungi* अळंब्यांच्या जातीचा. २ (also) *having the appearance of a fungus* अळंब्यासारखा.

*N. B*— Prof. Apte gives in his English-Sanskrit Dictionary the following:—Fungus =विड्ज, गोमयज, शिलींध्र, श (सा) लेय, शीतशीव, छत्रा, मधुरिका, मिसिशी, मिश्रेया.

Funicle (fū'ni-kl) [ L. *funiculus*, dim. of *funis*, a cord or rope.] *n. a small cord or rope* दोरी *f*, क्षुद्ररज्जु *m*. २ *anat. the primitive cord of nerve fibres* सूक्ष्मज्ञानतंतूंचा रज्जु *m*, ज्ञानतंतुरज्जु *m*, ज्ञानरज्जुबंधन *n*. Funic'ular *a.* बारीक दोरीसंबंधीं. २ बारीक दोरीच्या ताणासंबंधीं, दोरीच्या ताणानें झालेला. [ F. polygon निरनिराळ्या ठिकाणीं वजनें टांगलेल्या अशा दोरीच्या ताणामुळें झालेला बहुभुज *m*, बलद्योतक रज्जुबहुभुज *m*, रज्ज्वीय बहुभुज *m*.

Funk (fungk) [O. E. *funke*, a little fire.] *v. i. colloq. to be frightened and shrink back* कचरणें, माघार *f*. घेणें. F. *v. t. to fight shy of* टाळणें, टाळाटाळ करणें. F. *n.* Funk'er *n.* घाबरट मनुष्य *m*, हुंगरा (slang).

Funnel (fun'-nel) [ Prob. through O. Fr. from L. *in-fundibulum*, funnel -*in*, and *fundere*, to pour.] *n. a tunnel* (used for conveying liquids into a close vessel) नसराळें *n*, नरसाळें *n*, नाळचें *n*, गळणी *f*, चिमणी *f* (?). २ (*specif.*) *a smoke flue or pipe* धुराडें *n*, धारें *n*.

Funny (fun'-ni) *a.* See under Fun.

Fur (fėr) [O. Fr. *forre, fuerre*, sheath.] *n. the short, fine, soft hair, of certain animals, growing thick on the skin, and distinguished from the hair which is longer & coarser* (सामान्य केंसांपेक्षां) मऊ, आंखूड आणि तुळतुळीत लव *f*; आंखूड व मऊ लोंकर *f.* २ *peltry* (जनावरांची) लोंकरयुक्त-लोंकरीची कातडी *f*; as, "A cargo of *furs*." ३ *strips of dressed skins with fur, used on garments for warmth or for ornament* (ऊब येण्यासाठीं किंवा शोभेकरितां वस्त्रप्रावरणांवर लाविलेला) लोंकरीच्या गोंड्यांचा माळेवजा गळपट्टा *m.* ४ (*pl.*) *articles of clothing made of fur* लोंकरीचीं वस्त्रें *n. pl.* -पांघरुणें *n. pl.* -कपडे *m. pl.*, ऊर्णवस्त्रें *n. pl.*, गरम कपडे *m. pl.*; as, "A set of *furs* for a lady." ५ *any coating considered as resembling fur*; as (a) *a coat of morbid matter collected on the tongue in persons affected with fever* (तापामध्यें) जिभेवर येणारा बुरसा *m* -बुरशी *f* -बुरा *m*, खरस *m*, चिकटा *m* (!). [TO BE COVERED WITH F. (-TEETH, TONGUE, &c.) बुरसणें, बुरशेणें, बुरसावणें, बुरशुरणें.] (b) *the soft downy covering on the skin of a peach* (पीच नांवाच्या फळाच्या सालीवरील) लोम *f.* (c) *the deposit formed on the interior of boilers and other vessels by hard water* तापकाच्या गाभ्यांतील (लोंकरीसारखा दिसणारा) चिकटा *m* -बुरा *m*, बुरशी *f.* F. *a. pertaining to fur* लोंकरीसंबंधीं. २ *bearing, or made of, fur* लोंकरीची, लोंकरीची केलेली; as, "A F. cap." F. *v. t. to line, face, or cover with fur* लोंकरीचें अस्तर घालणें, फरचें आच्छादन घालणें. २ *to cover with morbid matter* (as the tongue) (जिभेवर वगैरे) बुरशी चढविणें -आणणें, (जीभ) बुरशीनें झांकणें. Fur'red *pa. t. & pa. p.* बुरसावलेला, बुरशेला, बुरा चढलेला -वाढलेला. Fur'ry *a. dressed in fur, covered with fur* फरनें आच्छादिलेला, फरचे कपडे घालणारा; as, "F. nations." २ *consisting of fur* फरचा, फरमय; as, "F. spoils." ३ *resembling fur* फरसारखा. Fur'rier *n.* See below.

*N. B.*—For distinction between Fur and Wool, see under Wool. (Wool = लांब व खरखरीत लोंकर.)

Furbish (fėr'-bish) [Incep. Stem of O. Fr. *forbiss, forbir*,—O. H. Ger. *furbjan*, to purify.] *v. t. to clean, to polish, to burnish* उजळणें, उजळा *m.* देणें, ओप *f.* -ओपसारा *m.* देणें, ओपवणी *f* करणें *g. of o.*, झील *f.* -झिलई *f.* देणें, सिकल *f.* करणें. Fur'bishable *a.* उजळ होण्यासारखा, उजळ होणारा. Fur'bisher *n.* उजळा देणारा, उजळणारा, शस्त्रमार्ज.

Furcate (fėr'-kāt) [From L. *furca*, a fork.] *a. forked* (जेवतांना वापरण्याच्या) कांट्यासारखा, बेचकासारखा, डेलकीं असलेला; as, "F. twigs." Fur'cated *a.* Furca'tion *n. a branching like a fork* डेलकी *f*, डेलकें or ढेलकें *n*, डेळी *f*, केल *n*, गेळ *n*, गेळकें *n.*

Furious (fū'ri-us) [O. Fr. *furieus* –L. *furiosus* -*furia*, rage.) *a. raging, transported with fury* भयंकर, घोर, संतप्त, क्रुद्ध, उग्र, दारुण, पिसाळलेला, चवताळलेला. २ *rushing with impetuosity, moving with violence* जोराचा, जोरानें जाणारा, जोरानें वाहणारा, झपाट्याचा, तडाक्याचा, प्रचंड, जबर, अनर्थाचा; as, "A F. stream." ३ (said of battle) दारुण, तुमुल, तुंबल (*pop.*) तुंबळ, घोर, घनघोर. Fu'riously *adv.* आवेशानें, काबरेबावरेपणानें, अनर्थानें, जोरानें, तडाक्यानें. Fu'riousness *n.* तप्रचण्डपणा *m*, सतम *f* or *n*, साहस *n*, साहसबुद्धि *f*; सुसाटेपणा *m*, तडाखा *m*, धडाका *m*, चंडत्व *n*, प्रचंडत्व *n*, अनर्थ *m*, कहर *m.*

Furl (fėrl) [Formerly spelt *furdle, farthel*, to roll up in a bundle, from *fardel*, a bundle.] *v. t. to roll as a sail, or as a flag* गुंडाळणें, वात वळणें *g. of o.*, गुंडाळून बांधणें, सुरळी *f.* करणें *g. of o.*

Furlong (fėr'long) [A. S. *furlang* –*furh*, furrow & *lang*, long.] *a. a measure of length* (220 yards) मैलाचा आठवा हिस्सा *m*, फर्लांग *m*, २२० यार्ड *m. pl.*

Furlough (fėr'lō) [Dut. *verlop*; Cf. Ger. *verlaub*, permission.] *n. mili.* (*a*) *leave of absence* कांहीं वर्षें नोकरी केल्यानंतर मिळणारी विशेष हक्काची रजा *f*, गैरहजर राहण्याची परवानगी *f* -मोकळीक *f*, फर्लो *f.* (*b*) (esp.) *leave given to an officer or soldier to be absent from service for a certain time* कांहीं मुदतीपर्यंत नोकरीवरून गैरहजर राहण्याची (लष्करी अम्मलदार किंवा सोजीर यांस दिलेली) परवानगी *f* -मोकळीक *f.* (*c*) (also) *the document granting leave of absence* फर्लो रजेच्या मंजुरीचा कागद *m* -लेख *m.* F. *v. t. mili.* (*a*) *to furnish with furlough* (कांहीं मुदतीनंतर) विशेष हक्काची रजा (फर्लो) देणें, गैरहजर राहण्याची परवानगी देणें. (*b*) *to grant leave of absence to, as to an officer or soldier* (लष्करी अम्मलदार किंवा सोजीर यांस) कांहीं मुदतीपर्यंत नोकरीवरून दूर राहण्याची मोकळीक देणें.

Furnace (fėr'-nās) [M. E. *forneis* –O. Fr. *fornais* –L. *fornacem*, acc. of *fornax*, an oven –L. *fornus*, an oven.] *n. an inclosed space in which heat is produced by the combustion of fuel, as for reducing ores or melting metals* भट्टी *f*, चुला *m*, चुलावण *n*, चुलाण *n.* [TO COME OUT OF THE F. (of affliction &c.) दिव्यांतून or दिव्यास उतरणें. F. OF GOLDSMITHS आगटी *f.* or -टें *n*, बागेसरी *f.*] २ (*a*) *a place or time of punishment, affliction, or severe trial; severe experience or discipline* अतिसंकटकाल *m* -समय *m*, कठिण प्रसंग *m*, परीक्षेची वेळ *f* or *m*, कडक कवाइतीची किंवा अनुभवाची भट्टी *f*, भट्टी *f* (*fig.*). F. *v. t.* (*obs.* or *R.*) *to throw out or exhale, as from a furnace* (भट्टींतून निघाल्यासारखें) बाहेर टाकणें -फेंकणें -ओकणें (*fig.*); as, "He *furnaces* the thick sighs from him." २ (also) *to put into a furnace* भट्टींत टाकणें-घालणें.

Furnish (fėr'nish) [O. Fr. *fourniss, fournir*, to

do.] *v. t. to supply with anything necessary, useful or appropriate* पुरवणें, संजोगणें, सजवणें, सज -सजित-संपन्न-विशिष्ट &c. करणें, पुरवठा *m.* करणें. [ To F. A HOUSE घर *n.* सजवणें -मांडणें -थाटणें. ] २ *to provide or give* ( something ), *to afford* देणें, वांटणें, पुरवणें, पुरावा *m* -पुरवणी *f* -भरणा *m* -भरती *f* -पुरवठा *m.* करणें *g. of o.*; as, "To F. food to the hungry; to F. arms for defence." Fur'nished *a. stocked with furniture* सजवलेला, थाटलेला, सज्ज, सजित, शृंगारलेला. २ दिलेला, पुरवलेला. Fur'nisher *n.* थाटणारा. २ पुरवठा करणारा. Fur'nishing *n.* पुरवणें *n*, पुरावा *m* ( *lit.* ), सजना *f*, शृंगारणें *n*, सजवणें *n.* २ देणें *n*, वांटणें *n*, पुरवणें *n*, पुरावा *m*, पुरवणी *f.*

Furniture ( fėr'-ni-chėr ) [ Fr. *fourniture.* See Furnish.] *n. outfit, equipment* सामान *n*, साहित्य *n*, सरंजाम *m*, उपकरणें *n. pl.*, सामग्री *f*, संभार ( S. ) *m.* २ *articles used for convenience or decoration* सरंजाम *m*, जिनसा *f. pl.*, चीजवस्त *f.* ३ (*print.*) *pieces of wood or metal of a lesser height than the type placed around the pages or other matter in a form, and with the quoins, serving to secure the form in its place in the chase* निमुळत्या कांड्या *f. pl.*, ( फर्म्यांत ठोकावयाचे ) निमुळते चौरस लांकडाचे बारीक तुकडे *m. pl.*

Furrier ( fur'ri-ėr ) [Cf. Fr. *fourreur.*] *n. a dealer in furs* मऊ लोंकरीचा व्यापारी *m*, मऊ लोंकरीचे कपडे विकणारा -करणारा. Fur'riery *n. furs in general* मऊ लोंकरीचें कापड *n.* २ *trade in furs* मऊ लोंकरीचा व्यापार *m.*

Furrow ( fur'ō ) [ A. S. *furh*, L. *porca*, a ridge.] *n. a trench in the earth made by a plough* सरी *f*, खांचणी *f*, खांच *f*, फणी *f*, तास *n.* २ ( *a* ) *a groove as in wood or metal* खांच *f*, कोरणी *f*, खोबण *or* खोबणी *f.* ( *b* ) *a wrinkle on the face* ( तोंडावरील ) सुरकुती *f* -वळी *f*; as, "The *furrows* of age." F. *v. t. to plough* नांगरणें, ( नांगराच्या तासासारखें ) तास करणें; as, "To F. the ground or sea." २ *to mark with channels or with wrinkles* खोबणी पाडणें, खांचा करणें, फण्या पाडणें, खोबणी -खांचा -फण्यांचीं चिन्हें करणें, ( तोंडावर ) वळ्या *f. pl.* -सुरकुत्या *f. pl.* पाडणें; as, "Thou canst help time to F. me with age." Fur'rowed *pa. t. & p. p.* Fur'rowing *pr. p. & v. n.*

Further ( fėr'-*th*ėr ) [ A. S. *furdor*, a comparative of *fore*, with comp. suffix. ] *adv. to a greater distance* अधिक अंतरावर -दूर -लांबवर, आणखी पुढें. [ F. & F. पुढें पुढें, उत्तरोत्तर. F. OFF *not so near* अगदीं जवळ नव्हे. ] २ *in addition, moreover* आणखी, शिवाय. F. *a. more remote, farther* लांबचें, लांबवरचें, अधिक अंतरावरचें -दूरचें, पलीकडच्या बाजूचें; as, "The F. end of the field." २ *beyond, additional* आणखी, अधिक, जास्त, दुसरें; as, "*Further* reason." Fur'thermore *adv.* or *conj. moreover* आणखी, आणखी विशेषतः, शिवाय. Fur'thermost *a. most remote* सर्वांच्या पलीकडचा, सर्वांच्या बाहेरचा, कडेचा, शेवटचा, अंतिम, टोंकाचा. [ AT THE F. असें करतां, यथाकथंचित् (S.), फार फार तर.] Fur'thest *a. superl.* Same as Furthermost.

Further ( fėr'*th*ėr ) [ A. S. *fyrdran.* See Further, *adv.*] *v. t. to promote, to advance, to forward* (-ला) जोर *m* -नेट *m* -पुष्टि *f* -पाठबळ *n* -दुजोरा *m.* &c. देणें, पुढें नेणें -ढकलणें, लोटणें, उत्कर्ष *m.* करणें, सिद्धीच्या मार्गास लावणें (?). Fur'therance *n. promotion, advancement, progress* बढती *f*, अभिवृद्धि *f*, उन्नति *f*, उत्कर्ष *m*, प्रगति *f.* Fur'therer *n.* पुष्टि *f* -बळ *n* -जोर *m* देणारा, पुरस्कर्ता *m.*

Furtive ( fėr'-tiv ) [ L. *furtivus*, -*furtum*, theft-*fur*, thief; akin to *ferre*, to bear. ] *a. stolen, stealthy, sly, secret* चोरलेला, चोरीचा, चोरून घेतलेला, गुप्त, नकळत केलेला; as, "A. F. look." Fur'tively *adv.* चोरीनें, चोरून, चोरी करून, चोरासारखें.

Furuncle ( fū'runk'l ) [ L. *furunculus*, a petty thief, boil, dim. of *fur*, thief. ] *n. med. a boil* लहान गळूं *n* -फोड *m*, स्फोट *m.* Furun'cular *a.* गळवाचा, फोडाचा, फोडासंबंधीं. २ गळवें *n. pl.* -फोड *m. pl.* झालेला.

Fury (fū'ri ) [ Fr. *furie*, -L. *furia*-*furere*, to rage.] *n. violent or extreme excitement* उत्क्षोभ *m*, प्रक्षोभ *m*, अतिक्षोभ *m*, प्रमत्त-उन्मत्तपणा *m*, आवेश *m.* २ *violent anger, rage* प्रकोप *m*, त्वेष *m*, तेरव *m*, अतिक्रोध *m*, मोठा राग *m.* ३ *impetuosity, violence* (of the wind or storm &c. ) जोर *m*, तडाखा *or* तडाका *m*, धडाका *or* -खा *m*, धडक *f*, रट्टा *m*, सपाटा *m.* ४ *pl.* ( *Gr. Myth.*) *the avenging deities* ( *They are Tisiphone, Alecto & Megæra.*) सूड घेणाऱ्या देवता *f. pl.* ५ ( *R.* ) ( *Milton* ) *one of the fates esp. Atropos* ( अॅत्रोपोस नांवाची ) सटवी *f.* ६ *a virago* चंडिका *or* चंडी *f*, हडळ *or* हडळी *f*, घोडसटवी लागलेली *f*, आगजाळी *f*, शूर्पणखा *f*, तुफान *n*, जीवंत पिशाच *n.*

Furze ( fėrz ) [ A. S. *fyrs*, a brier. ] *n. bot. a thorny evergreen shrub* ( *Ulex Europæus* ), *with beautiful yellow flowers, very common upon the plains & hills, of Great Britain* ( & called also gorse & whin ) सदोदित हिरवें राहणारें एक प्रकारचें कांटेरी झुडूप *n.* ( Cf. पिंवळा कांटेरी धोतरा *m.* )

Fuse ( fūz ) [L. *fusus*, p. p. of *fundere*, to pour, to melt. ] *v. t. to melt, to dissolve, to liquefy by heat* वितुळविणें, द्रव *m* -रस *m.* करणें *g. of o.*, गाळणें, आटविणें(?). २ *to unite or blend, as if melted together* मिलाफ करणें, एकजीव करणें. F. *v. i. to melt* वितळणें, रस होणें *g. of s.*, आटणें(?). २ *to be blended, as if melted together* (एकत्र आटल्याप्रमाणें) एकजीव होणें *g. of s.*, मिळून जाणें. Fusibil'ity *n.* द्रवक्षमता *f*, रसभ-

वनीयता *f.* Fu'sible *a. capable of being melted* वितळण्यांजोगा, द्राव्य, गालनीय, द्रवीकरणीय. २ एकीभवनयोग्य. Fus'ing *pr. p. & v. n.* Fusing point *n. the point of fusion* (कोणत्याही धातूचा) रस होण्यास लागणारें उष्णतामान *n.* Fu'sion *n. the act of melting together* गाळणें *n*, गालन *n*, द्रावण *n*, द्रवीकरण *n*, आटविणें *n.* २ *the state of being melted by heat* द्रव *m*, द्रवत्व *n*, रसस्थिति *f.* ३ *the blending together of things, as if melted together* (दोन धातू इत्यादिकांचा एकत्र आटल्याप्रमाणें) एकजीव होणें *n*, एकत्रीभवन *n.* ४ *biol. the union, or binding together, of adjacent parts or tissues* जवळजवळच्या शिरांचें एकीभवन *n*, जवळजवळच्या शिरांचा मिलाफ *m.*

Fusee, *or* Fuzee ( fū-zē' ) [ O. Fr. *fusee*, a spindleful –L. L. *fusata* –L. *fusus*, a spindle.] *n. the cone or conical wheel of a watch or clock, designed to equalise the power of the main spring* ( घड्याळांतील) पायऱ्या पायऱ्यांचें शंकाकार चक्र *n.*

Fusil ( fū'zil ) [ O. Fr. *fussil*, a flint-musket, –L. L. *focile*, steel ( to strike fire with), dim. of L. *focus*, a fireplace.] *n. a light kind of flintlock musket formerly in use* गारेच्या चापाची हलकी बंदूक *f.* Fusileer' *or* Fusilier' *n. mili.* ( *a* ) ( formerly) फ्युझिल बंदूक धरणारा शिपाई *m.* (*b*) *pl. a title now borne by some regiments* फ्युझिलीअर नांवाची सैन्याची तुकडी *f*; as, "the Royal F.s." Fu'sillade *n. mili. a simultaneous discharge of firearms* तोफ -बंदूक इत्यादिकांचा धडाका *m* -तडाखा *m*, एकदम केलेला गोळीबार *m.* F. *v. t.* एकदम गोळीबार सुरू करणें.

Fusileer *or* Fusilier, See under Fusil.

Fusion, See under Fuse.

Fuss ( fus ) [ Imitative. ] *n. ado, tumult, bustle* गडबड *f*, नसता बाऊ *m*, चळवळ *f*, धामधूम *f*, हालचाल *f*, दंगल *f*, गर्दी *f*, पोकळ अवडंबर *n*, उगाच गडबड *f*, निरर्थक पसारा *m.* F. *v. t.* उगाच धांदल -गडबड करणें -उडवणें. Fuss'ily *adv.* धांदलीनें, गडबडीनें, गर्दीनें. Fuss'iness *n.* धांदल्या -धांदरट -गडबड्या स्वभाव *m.* Fuss'y *a.* गडबड्या, धांदल्या, &c.

Fust ( fust ) [ O. Fr. *fust* ( Fr. *fut* ) –L. *fustis*, a stick, staff. ] *n. arch. the shaft of a column or trunk of a pilaster* खांबाची मधली लाट *f.*

Fust ( fust ) [ O. Fr. *fust* ( Fr. *fut* ), a cask, taste or smell of the cask. See Fust above. ] *n. a strong musty smell* उबटाण *f*, उबसाण *f*, उम्रगंध *m*, दुर्गंध *m.* Fus'ty *a. smelling of the wood of the cask* ( as wine ), *musty* उबट, केनसट, वाशेळा, वासकट, वासका, दुर्गंध. [ To GET F. उबटणें. ] Fust'iness *n. mustiness* उबटपणा *m*, केनसटपणा *m*, उबटाण *f*, उबसाण *f.*

Fustian ( fust'yun ) [O. Fr. *fustaigne* (Fr. *futaine*) –It. *fustagno*, fustian. Arab. *fosṭat*, a suburb of Cairo.] *n. a kind of coarse twilled cotton or cotton and linen stuff, including corduroy, velveteen, &c.* फस्टीअन नांवाचें ट्वील कापड *n.* २ (*of style* ) See Bombastic. F. *a. made of fust* फस्टचा केलेला. २ *bombastic* आडंबरयुक्त, अवडम्बराचा. Fus'tianist *n. a writer of fustian* शब्दावडंबरी लेखक *m.*

Fusty, See under Fust No 2.

Futile ( fū'tīl ) [ Fr. –L. *futilis*, that easily pours out –*fundere*, to pour. Futile शब्दाचा मूळ अर्थ "बोलघेवडा, बडबड्या, वाचाळ" असा होता.] *a. vain, worthless* असार, वायफळ, पोकळ, वावगा. २ *useless, ineffectual* निष्फल, निरर्थक, व्यर्थ, फुकट, निकामी, कुचकामी, टाकाऊ. Fu'tilely *adv.* Futil'ity *n.* असारता *f*, पोकळपणा *m*, &c. ३ *uselessness* वैयर्थ्य *n*, मोघता *f*, निष्फलता *f*, नैष्फल्य *n*, &c.

Future ( fūt'-ūr ) [ L. *futurus*, used as *fut. p.* of *esse*, cf. Sk. भू, to be.] *a. that is to be or come hereafter* पुढचा or ला, पुढील, भविष्यकालचा, भविष्यकालीं होणारा -येणारा, भावी, आगामी, पुढें व्हावयाचा, मोहरचा or -ला ( *low* ). [ F. AND FIXED अवश्यंभावी. F. STATE उदर्कावस्था *f*, भविष्यस्थिति *f.*] २ *that has time intervening* सावधि, सावधिक. F. tense *n. gram.* भविष्यकाल (ळ) *m.* F. *n. time to come* पुढला काल *m*, भविष्यकाल *m*, उत्तरकाल *m*, उदर्ककाल *m*, उदर्क *m*, भवितव्य *n*, आयति *f.* [In F. पुढें.] २ ( collectively) *events that are to happen in time to come* भवितव्य *n*, भविष्य *n*, होईक *n*, होतव्य *n*, होष्य *n*, होष्यमाण *n*, होणारें *n.* ३ *the possibilities of the future* (used esp. of *prospective success* or *advancement* ) सिद्धिसंभव *m*, भविष्यकाल *m* ( *colloq.* ); as, "He had a great F. before him." ४ *gram. a future tense* भविष्यकाल *m.* Fu'tureless *a. without prospect of betterment in the future* पुढें मागें चांगलें होण्याची आशा नसलेला, नैराश्ययुक्त. Fu'turist *n. an expectant* आशावादी, भविष्यकालावर भार -आशा ठेऊन राहणारा मनुष्य *m.* २ *theol. one who believes or maintains that the fulfilment of the prophecies of the Bible is to be in the future* बायबलांतील वचनें -भविष्यें खरीं व्हावयाचीं आहेत असें मानणारा -प्रतिपादणारा. Futu'rity *n. future state* भविष्यस्थिति *f.* २ *the future* भविष्य -भावी -उत्तर -आगामी काल *m.* ३ *a future event* भविष्यकालीन गोष्ट *f*, भविष्यकालीन वृत्त *n*, होष्यमाण *n.*

Fuzz ( fuz ) [ Imitative of Buzz, Fizz. ] *v. i. to fly off in minute particles with a fizzing sound like water from hot iron* फसफस आवाजानें व बारीक बारीक कण होऊन उडून जाणें. F. *n. fine, light particles* ( as dust ) ( धुळीसारखे ) बारीक व हलके कण *m. pl.*

Fy ( fī ) *interjec.* Same as Fie.

G (jē) इंग्रजी वर्णमालेंतील सातवें अक्षर आणि पांचवें व्यंजन. G ह्या व्यंजनाचे दोन उच्चार आहेत; (१) ग्, जसें :—gave, go, gun. (२) ज्, जसें :—gem, gin. लॅटिन भाषेंतच G ह्या अक्षराचें स्वरूप तींतील मूळच्या C ह्या अक्षराच्या स्वरूपांत थोडासा फरक करून कल्पिलें आहे; आणि तें मग तसेंच्या तसेंच इंग्रजींत घेतलें आहे. २ *mus.* (*a*) the name of the fifth note of the diatonic scale of C major संगीतशास्त्रांत सप्तस्वरांतील पांचवा स्वर *m*, (अर्थात्) पंचम *m*. (*b*) G *clef*: the treble clef placed on the line in the stave appropriated to the note G. पंचमचिन्ह *n*, गीतलिपींतील पंचमस्वरस्थानद्योतकचिन्ह *n*. ३ *math.* सातव्या स्थानाचें दर्शक चिन्ह *n*. (A, B, C, D, E, F, G.) ४ George, Gertrude इत्यादि विशेषनामांसाठीं संक्षेपानें G. हें अक्षर वापरतात. ५ इंग्रजी भौतिकशास्त्रांत गुरुत्वाकर्षण (gravity) बद्दल *g* हें अक्षर वापरतात. ६ *math.* G. C. F. *or* G. C. M. (= Greatest Common Factor *or* Greatest Common Measure) अशा संक्षेपलिपींत G. 'महत्तम' (greatest) ह्या अर्थीं वापरतात. ६ फ्रीमेसन्सच्या भाषेंत G. M. ह्याचा अर्थ Grand Master असा आहे.

Gab (gab) [Of A. S. origin.] *v. i. to talk idly, to chatter, to prate* बडबडणें, बकबकणें, बकवा *f. pl.* -जल्पना *f. pl.* करणें, फाल्या *f. pl.* करणें -मारणें. G. *n.* (*colloq.*) *idle prate, unmeaning talk* बडबड *f*, बकबक *f*, बकवा *f* or *m*, जल्पना *f*, जल्प *m*. [GIFT OF THE G. *a talent for talking, facility of expression* वाक्प्रसाद *m*, जिव्हानुकूल्य *n*, अस्खलित वाणीचा प्रसाद *m*, जिभेची देणगी *f*.] २ (*Scot.*) *the mouth* तोंड *n*, मुख *n*. Gab'ber *n.* बडबड्या, बडबडणारा, बडबड -जल्पना करणारा &c.

Gabardine, Gaberdine (gab-ėr-dēn') [Span. *gabardina*, -Span. *gaban*, a kind of great coat.] *n.* (*Shakes.*) *a coarse frock or loose upper garment* (formerly worn by Jews), *a mean dress* जाडाभरडा पोकळ चोगा *m*, ग्याबरडीन *m*.

Gabble (gab'-b'l) [Perhaps frequentative of Gab *v. i.* which see.] *v. i. to talk fast or without meaning, to jabber, to prate* व्यर्थ बडबडणें, बडबड करणें, बकबक *f.* करणें, अर्थरहित भाषण करणें, भकणें. २ *to utter inarticulate sounds with rapidity, to cackle like geese* जलद जलद व अस्पष्ट शब्द उच्चारणें, वचावचा बोलणें. G. *n.* व्यर्थ बडबड *f*, निरर्थक -अर्थरहित बोलणें *n*, बकबक *f*, बरळ *f*. २ गलगल *f*, वचावचा बोलणें *n*, बडबडाध्याय *m*, (*colloq.*) गुडगुड *f*. Gab'bler *n.* बडबड्या, वाचाळ, जल्पक &c.

Gaberdine, See under Gabardine.

Gabion (gā'-bi-un) [It. *gabbione*, a large cage, -L. *cavea*, a hollow -L. *cavus*, hollow. See Gage.] *n.* (*fort.*) *a hollow cylinder of wicker-work, like a basket without a bottom* (gabions are made of various sizes, and filled with earth in building field-works, to shelter men from an enemy's fire) (शत्रूकडील तोफेच्या माऱ्यापासून सैन्याचें रक्षण करण्याकरितां) मातीनें भरून ठेवलेली बिनबुडाची टोपली *f*. Gā'bionade *n. fort.* (मातीनें भरलेल्या) बिनबुडांच्या टोपल्यांची भिंत *f*.

Gable (gā'-b'l) [O. Fr. *gable*, A. S. *geafel*, a fork.] *n. arch.* (a) *the vertical triangular portion of the end of a building from the level of the cornice or eaves to the ridge of the roof* चांदई *f*. (b) (hence) *the end-wall of a building* (*as distinguished from the front or rear side*) (इमारतीचा) चांदईकडचा भाग *m*. (c) *a decorative member having the shape of a triangular gable* चांदईसारखी नकशी *f*, चांदई *f*. Ga'blet *n. arch. a small gable, or gable-shaped canopy, formed over a niche, &c.* लहान चांदई *f*.

Gablock (gab'-lok) [See Gavelock.] *n. a false spur or gaff, fitted on the heel of a game-cock* लढाऊ कोंबड्याच्या पायांस मारलेली नखी *f*.

Gaby (gā'-bi) [From a Scand. root found in Icel. *gapi*, *gapa*, a rash, reckless man. Cf. Gape.] *n.* (*colloq.*) *a simpleton, a dunce, a lout* खुळा, मेषपात्र *n*, मूर्ख मनुष्य *m*, मठ्ठ, अविचारी.

Gad (gad) [O. E. *gad*, goad, sting.] *n. the point of a spear or an arrow-head* (बाण *m*, भाला *m*, इ० चें) टोंक *n*, अग्र *n*, अणी *f*, फळ *n*. २ *a pointed or wedge-shaped instrument of metal* (as a steel wedge used in mining) कुऱ्हाडीच्या पात्यासारखें हत्यार *n*, छिणी *f*, कोतरणी *f*. ३ *a sharp-pointed rod, a goad* अणीदार दांडा *m*, पराणी *f*, अंकुश *m*. ४ *a spike on a gauntlet* दस्तान्याच्या आंगठीवर बसविलेली पराणी *f* -विंडी *f*. ५ *a rod or stick* (as a fishing rod, a measuring rod, &c.) अणीदार दांडा *m* -सोंटा *m*, गळ *m*, लकडी *f*. Upon the G. *upon the spur of the moment* आयत्या वेळीं, तत्काल, तत्क्षणीं, त्याच वेळेस. २ *hastily* धांदलीनें, घाईघाईनें, लगबगीनें, उतावीळपणानें. G. [Prob. from Gad *n.* and orig. meaning *to drive about.*] *v. i. to walk about, to run or go about without purpose* (*like cattle stung by a gad-fly*) हिंडणें, भटकणें, उनाडणें, हिंडणवारे *m. pl.* -हिंडफेरा *m* -उनाडकी *f* करणें, भटक्या *f. pl.* मारणें -मारीत फिरणें. २ (hence) *to run wild, to be uncontrolled* सैरावैरा धावणें -पळणें, ताब्यांत न राहणें, ताब्यांतून सुटणें -निसटणें -पळणें. Gad'a-bout *n. colloq. a*

*gadder.* Gad'der *n. a rambling gossip* भटक्या गप्पीदास. [ THESE WORDS, AS RESTRICTED TO FEMALES, ARE RENDERED BY नगरभवानी, भटकभवानी, गांवभवानी, हिंडफिरी, गांवगाई, बारा घरची विह्री *f*, जिच्या पायांस भिंगरी OR भोंवरा पडलेला आहे अशी; AND, AS USED OF MALES, BY हिंडफिन्या, भटकभैरव -भैरोबा, पायावर -पायीं भोंवरा पडलेला, ज्याचा तळ थांवत नाहीं असा, बारा पिंपळांवरचा मुंजा.] Gad'ding *pr. p. & v. n.* Gad'dingly *adv.* भटक्या मारीत. Gad'dish *a. disposed to gad* भटक्या मारण्याची संवय पडलेला. Gad'dishness *n.* भटक्या स्वभाव *m.* Gads'man *n. one who uses a goad in driving* (गाडीचीं वगैरे जनावरें ) पराणीनें हांकणारा.

Gadfly ( gad'-flī ) [ From Gad *n.* and Fly. ] *n. a fly which pierces the skin of cattle in order to deposit its eggs* गोमाशी *f*, बंघाळी *f*.

Gael ( gāl ) [ Gael. *Gael*, a Scotch Highlander. ] *n.* (*ethnol.*) ( a ) *Celt or the Celts of the Scotch Highlands or of Ireland* आयर्लंडचा किंवा स्कॉच् हायलंड्सचा केल्ट मनुष्य *m*, गेल *m*. Gael'ic *a.* (*ethnol.*) *of, or pertaining to, the Gael* गेल मनुष्याचा, गेल मनुष्यासंबंधीं. Gael'ic *n.* गेलिक भाषा *f*.

Gaff (gaf) [Fr. *gaffe*, hook. Perhaps akin to German *gabel*, Sk. गभ, a fork. ] *n. a barbed spear or a hook with a handle* मच्छी मारण्याचा लहान भाला *m*, आंकडी *f*. २ *the spar upon which the upper edge of a fore-and-aft sail is extended* शिडाच्या टोंकापर्यंत जाणारी काठी *f* (?). G. *v. t.* मच्छी मारण्याच्या आंकडीनें मारणें -पकडणें.

Gaffer ( gaf'fėr ) [ Possibly Contr. of Godfather; but prob. from *gramfer*, the West of England form of *Grand-father*, as *Gammer* of Grandmother. ] *n. an elderly man, an aged rustic* म्हातारबावा *m*, बावा *m*, वृद्ध मनुष्य *m*, वृद्ध आजोबा *m*. [ A LITTLE G. वडलोबा *m*. ] २ ( Prov. Eng. ) *a foreman or overseer of a gang of labourers* मुकादम *m*, म्होरक्या *m*, नाईक *m*.

Gaffle ( gaf'-f'l ) [ Cf. A. S. *geafl*, fork. See Gaff.] *n. an artificial spur or gaff for game cocks* (लढाऊ कोंबड्याच्या पायांस घालण्याची ) कृत्रिम नखी *f*.

Gag ( gag ) [ Ety. doubtful. Probably imitative of sound made in choking. ] *v. t. to stop the mouth of by thrusting something in* (तोंडांत) बोळा *m* -चोबा *m* -कोंबणें -घालणें, (तोंडांत) बोळा *m* देणें, (तोंड) कोंडणें -बांधणें, बंद करणें. [ To G. WITH A CLOUT चोंदी *f*. देणें.] २ *to pry or hold open by means of a gag* बोळा घालून उकलणें -आ करावयास लावणें. ३ *to deprive of power or freedom of speech, to stop the mouth of* ( -चें तोंड ) बंद करणें, ( भाषणाचें किंवा लेखनाचें ) स्वातंत्र्य हिरावून घेणें. G. *v. i. to heave with nausea, to retch* ( -ला ) ओकारी येणें, मळमळणें. २ (*slang*) *to introduce gags or interpolations* घुसडा-घुसड करणें. G. *n. something put into the mouth or throat to hinder speech* ( तोंडांत कोंबण्याचा ) बोळा *m*. २ *a mouthful that makes one retch, a choking bit* ओकारी आणणारा घांस *m*, घशाशीं अडकलेला तुकडा *m* -घांस *m*. ३ ( *slang* ) *a made-up story, a speech or phrase interpolated off-hand by an actor on the stage in his part as written* रचलेली -बनावट -पदरची गोष्ट *f*, नटानें रंगभूमीवर आपल्या पदरचें केलेलें (सयुक्तिक) भाषण *n*. Gag'ger *n.* Gag'ging *pr. p.* [ G. ACT मुसकुटदावीचा कायदा *m*. ]

Gage ( gāj ) [Fr. *gage*, *gager*, to wager.] *n. a pledge, a security* ( एखादें कृत्य केलें नाहीं तर हरण्याची ) पैजेची वस्तु *f*, पैज *f*, तारण *n*, गहाण *n*. २ *a glove, cap or the like, cast on the ground as a challenge to combat; a challenge; a defiance* पैजेचा विडा *m*, पैजेची खूण *f*, प्रतिज्ञाचिन्ह *n*, आव्हानचिन्ह *n*. G. *v. t. obs.* (*Shakes.*) *to offer as a guarantee, to stake, to wage or wager* गहाण *n* -तारण *n*. ठेवणें -देणें, जामीनगतीस लावणें -देणें. २ *to bind by pledge, to engage* ( तारण ठेऊन ) बांधून घेणें -टाकणें.

Gage ( gāj ) [ So called because an English family named *Gage* imported the *greengage* from France in the 18th century.] *n. a variety of plum* बिया किंवा आठी असलेल्या फळांची एक जात *f*, गेज नांवाचें फळ *n*.

Gage ( gāj ) [ See Gauge.] *n. a measure or standard.* See Gauge. G. *v. t.* See Gauge.

Gaggle ( gag'-g'l ) [ Of imitative origin. ] *v. i. to make a noise like a goose, to cackle* हंसनाद *m*. करणें, गुडगुडणें, गुडगुड आवाज करणें. G. *n.* ( *Prov. Eng.*) *a flock of wild geese* रानांतील हंसपक्ष्यांचा कळप *m*.

Gaiety ( gā'i-ti ) *n.* See Gayety under Gay.

Gain ( gān ) [ O. E. *gain*, Icel. *gagn*, gain. ] *v. t. to obtain or acquire by effort or labour* ( श्रम करून ) मिळविणें, पैदा करणें, संपादणें, संपादन करणें, मिळणें *in. con. with* ला *of s.*, प्राप्त होणें *in. con. with* ला *of s.* ( b ) *to obtain as a profit or advantage* कमावणें, (फायद्यादाखल) मिळविणें, संपादणें, अर्जन करणें, मिळकत *f* -किफाई *f* -कमाई *f* करणें *g. of o.*, उपार्जना *f* -उपार्जन *n. &c.* करणें *g. of o.* २ *to come off winner or victor in, to be successful in* जय *m* -यश *n* -फत्ते *f*. मिळविणें, जिंकणें, जितणें, मिळविणें ( *colloq.* ), फत्ते होणें *in. con. g. of s.* ३ *to draw into any interest or party, to win to one's side, to conciliate* आपल्या गोटांत ओढणें, आपल्या बाजूस -पक्षास ओढणें -ओढून *or* वळवून घेणें, आपलेंसें करणें, वश करणें -करून घेणें. ४ *to reach* (-ला) पोंचणें, पावणें. [To G. GROUND जोर धरणें -मिळणें *with* ला *of s.*] G. *v. i. to receive advantage or profit* लाभ होणें *in. con. with* ला *of s.*, लाभणें, लाधणें. २ *to make advance in interest, health, or happiness; to make*

progress सुधारत जाणें; पुढें पुढें मजल मारणें. G. *n. oppo. to loss*) फायदा *m*, किफायत *f*, नफा *m*, लाभ *m*, मिळकत *f*, प्राप्ति *f*, कमाई *f*, पैदास्त *f*, मिळताव *m*, उत्पन्न *n*, आय *m*, आदाय *m*, अदा *m*, जोड *f*, मीळ *f*, उपज *m*, निपज *m*, लभ्यांश *m*, लभ्य *n*. [ BY WAY OF G. नफेवारीं, नफ्यादाखल, फायद्यादाखल, सरिफेवारीं. DISHONEST G. लुचपत *f* ( v. खा ). G. AND LOSS नफातोटा *m*, नफानुकसान *n*, लाभालाभ *m*, लाभहानि *f*. PROSPECT OF G. लाभदृष्टि *f*, मिळकतीची आशा *f*. UNEXPECTED *or* RARE G. आकस्मिक-अलभ्य लाभ *m*, घोवें *n*, घवूक *n*, घवाड *n*. ] २ *acquisition, accumulation* मिळकत *f*, अर्जन *n*. Gain'able *a*. प्राप्य, मिळण्याजोगा. Gain'ed *pa. p. a.* मिळवलेला, प्राप्त, लब्ध. Gain'er *n*. मिळवणारा, संपादन करणारा, &c. Gain'ful *a*. लाभदायक, फलद्रूप, फायदेशीर, फायद्याचा, नफ्याचा, &c. Gain'fully *adv*. फायदेशीरपणानें. Gain'fulness *n*. Gain'ing *pr. p.* & *v. n.* मिळविणें *n*. &c. Gain'less *a*. बिनफायद्याचा. Gain'lessness *n*. Gain'pain *n*. *bread-gainer* ( a term applied in the Middle Ages to the sword of a hired soldier) भाकरी मिळविणारा. Gain'some *a*. See Gainful.

Gainsay ( gān'-sā ) [A. S. *gegn*, against, and say.] *v. t. to say something against, to contradict, to controvert* उलट बोलणें -सांगणें, (-शीं ) वाद घालणें -घेणें *g. of o.*, खंडणें, उलट -उलटा घेणें -धरणें *with* वर *of o.*, प्रत्याख्यान *n*. -विपरीत कथन *n*- विरुद्ध-कथन *n*. करणें. २ *to forbid* मना *f* -मनाई *f*. करणें, हरकत *f*. घेणें. Gainsay'er विरुद्ध -उलट बोलणारा &c., वाद घेणारा. २ हरकत करणारा, अडविणारा.

Gairish ( gaer'ish ) *a*. See Garish. भडक, झळक, भडकीचा.

Gait ( gāt ) [Ice. *gata*, a way.] *n*. (*Shakes.*) *a going, a walk, a way* चाल *f*, रस्ता *m*, मार्ग *m*, वाट *f*. २ *manner of walking or stepping* चालण्याची ढब *f*- ऐट *f* -नोक *m*, चाल *f*, गति *f*, पाउल *n*. [ SOLEMN *or* STATELY G. गजगति *f*. ] Gait'ed *a*. *having* (such) *a gait* ( used in *comp.* ) ( अमुक प्रकारचें ) पाऊल -गति असलेला; as, " Slow -gaited" = मंदगति.

*N. B.—Gait* is the manner of the walk as to the movements of the *legs and feet alone*. Smith.

Gaiter ( gā'-tėr ) [ Fr. *guetre*; akin to Eng. *wear v.* ] *n*. *covering of cloth or leather fitting down upon shoe* (थंडीचें निवारण करण्याकरितां) बुटांवर बसविण्याचें पायांचें आच्छादन *n*, गेटर *m*.

Gala ( gā'-la ) [Fr. *gala*, show, pomp –It. *gala*, finery; of German origin.] *n*. *pomp, show* भपका *m*. २ *gala dress* सणाचा -भपक्याचा पोषाख *m*. ३ *a festive occasion, a festival characterised by the display of finery and show* आनंदाचा -सणाचा -छानछोकीचा दिवस *m*, सण *m*, उत्सव *m*. Gala-day *n*. *a holiday* सण *m*, सणाचा दिवस *m*. Gala-dress *n*. सणाचा पोषाख.

Galactic ( ga-lak'-tik ) [Gr. *gala, galaktos*, milk; cf. Galaxy. ] *a*. *of or pertaining to milk, got from milk* दुधाचा, दुधासंबंधीं, दुग्धप्राप्त. २ *astron. of or pertaining to galaxy or the Milky Way* आकाशगंगेसंबंधीं. Galac'tagogue *n*. *med. an agent exciting secretion of milk* दुग्धोत्पत्तिप्रवर्तक (औषधि *f*). Galac'tia *n*. *a morbid flow or deficiency of milk* (कांहीं विकारानें अंगावरील) दुधाचा फाजील पान्हा सुटणें किंवा दूध खुंटत जाणें *n*. Galacto-desim'eter, Galactom'eter *n*. *an instrument for ascertaining the quality of milk* ( *i. e.*, its richness in cream ) *by determining its specific gravity, a lactometer* दुग्धपरीक्षक *m*, दूध तपासण्याचें यंत्र *n*, दुग्धपरीक्षायंत्र *n*. Galactoph'agist *n*. *one who eats or subsists on milk* दुग्धोपजीवी, दुग्धभोजी, दुग्धप्राशी, दूधच पिऊन राहणारा. Galactoph'agus *a*. दुग्धभोजी. Galactoph'orous *a*. *anat. milk-carrying* ( applied to the ducts of mammary gland ) दुग्धवाहक, दुग्धप्रवाहक (नलिका *f*). Galactopo'ietic *a*. *med.* दुग्धजनक G. *n*. दुग्धजनक औषध *n*.

Galangal ( ga-lan'-gal ) [O. Fr. *galingal*–Ar. *khalanjan*. ] *n*. कोळंजन *n*, कोलंजन *n*.

Galatian ( ga-lā'-shan ) [ From *Galatia*, in Asia Minor.] *a*. (एशिआ or या मायनरमधील ) गॅलेशिआसंबंधीं, गॅलेशिआ प्रांतासंबंधीं. २ गॅलेशिआमधील लोकांचा -संबंधीं. G. *n*. गॅलेशिआचा रहिवासी.

Galaxy ( gal'ak-si ) [ Through Fr. and L., from Gr. *galaxias, gala, galactos*, milk.] *n*. *The Milky Way* आकाशगंगा *f*, आकाशनदी *f*, स्वर्गंगा *f*, सुरनदी *f*. २ *any splendid assemblage* ( *of persons or things* ) (महापुरुष) मंडल *n*, (सुवस्तु) मंडल *n*.

Galbanum ( gal'-ba-num ) [L.,–Gr. *chalbane*, prob. from Hebr. *khelbenah -cheleb*, fat. ] *n*. (also *Galban* ) *a gum resin* गंधाबिरुजा *or* गंधाबेरोजा *m*.

Gale ( gāl ) [ Perh. from Scand., as in Dan. *gal*, mad, Norw. *galen*, raging.] *n*. *a strong but steady wind* (between a stiff breeze and a hurricane. The most violent gales are called *tempests*. ) सोंसाट्याचा (पण बराच काल सारखा वाहणारा) वारा *m*, जोराचा वारा *m*, जवळ or जौळ *n*, वावटळ *f* or *n*, ढोसण *f*, प्रभंजन *m*, महावात *m*, वात्या *m*. २ *Shakes. a moderate current of air, a breeze* मंद वारा *m*, मंद पवन *m*, वाऱ्याची झुळूक *f* -लहर *f*, झुळझुळ वाहणारा वारा *m*. ३ *a state of excitement, passion, or hilarity* जोर *m*, जोस *m*, भर *m*, आवेश *m*, आवेग *m*.

Gale ( gāl ) [ Prob. A. S. *gagel*; cf. Ger. *gagel*, a myrtle-bush. ] *n*. *bot. a plant growing in marshy*

off." Air G. ज्वालाग्राही वायूशीं मिश्र झालेली हवा f. Gas-burner n. धुराच्या दिव्याची खोळ f. G. coal धूर तयार करण्याच्या कामीं उपयोगी पडणारा कोळसा m. G. fitter धुराच्या दिव्यांकरितां नळ्या वगैरे बसविणारा. G. meter धूर किती वापरला गेला हें मोजण्याचें घड्याळ n. G. stove धुरानें सैंपाक करण्याची चूल f, धुराची चूल f. G. trap घाणेरी हवा बाहेर लावून देण्याचा पिंजरा m. G. washer टारपासून ग्यास निराळा करण्याचें यंत्र n. G. water ( धुर शुद्ध केलेलें ) धुरकट पाणी n. G. works धुराचा कारखाना m. Laughing G. हंसें उत्पन्न करणारा एक प्रकारचा वायु m. Marsh G. दमट जागेंत उत्पन्न होणारा विषारी वायु m. Gasalier' n. (also, Gasolier) धुराच्या दिव्यांचें झुंबर n. Gas'eous a. *in the form, or of the nature, of gas* वायुरूप, वायुसदृश. २ *lacking substance or solidity, tenuous* पोकळ, पोंचट, दम नसलेला, निर्जीव, क्षुल्लक. Gasifica'tion n. वायुरूप देणें n, वाय्वीकरण. Gas'iform a. See Gaseous. Gas'ify v. t. (-चा) वायु बनवणें, (-ला) वायुरूप देणें. G. v. i. वायुरूप होणें -बनणें. Gas'light n. धुराचा दिवा m, धुराची बत्ती f. Gas'ogen n. वायु उत्पन्न करण्याचें यंत्र n. Gas'olene or Gas'oline n. ग्यासोलिन, कच्च्या पेट्रोलमचें भागिक ऊर्ध्वपातन करितांना त्यांतून ६०°-७०° श उष्णमानावर निघणारा पदार्थ m. Gasom'eter n. वायुमापक m. Gasomet'ric, -al a. वायुमापकानें मोजलेला, वायुमापकानें दाखविलेला. Gasom'etry n. मिश्रणांत निरनिराळ्या वायूंचें परिमाण मोजण्याची विद्या f, वायुमिति ( Cf. Geometry=भूमिति ). Gas'oscope n. खाणीमध्यें प्राणघातक विषारी वायु आहे किंवा काय हें समजण्याचें यंत्र n, प्राणघातक वायुदर्शक.

Gascon (gas'-kon) [ Fr. ] a. *of, or pertaining to Gascony, in France, or to the Gascons* फ्रान्स-देशच्या गास्कनी परगण्यांतील -परगण्याचा -परगण्या-संबंधीं. २ गास्कन लोकांचा -संबंधीं, &c. G. n. *a native of Gascony* गास्कनी येथील रहिवासी, गास्कनीकर m. २ *a boaster, a bully* शेखी f -ऐट f -डौल m -घमेंड f -प्रौढी f, मारणारा, गर्विष्ठ. गास्कनीकरांची गर्विष्ठपणा-बद्दल ख्याति होती त्यावरून हा अर्थ निघाला आहे. Gas'conade n. *a vaunt, a bravado, a bragging* शेखी f. &c. मिरवणारा, प्रौढी मारणारा, वल्गना f. करणारा. G. v. i. *to boast, to brag, to bluster* शेखी f -प्रौढी f -डौल m. &c. मारणें -मिरवणें, &c. Gasconad'er n. Gasconade, see under Gascon.

Gash ( gash ) [ O. Fr. *garser*, to pierce with a lancet. Perh. from an assumed L. *carpere*, to separate into parts. ] v. t. *to make a long deep incision in* ( especially applied to incisions *in flesh* ) घाव m -वार m करणें, मांसापर्यंत जखम करणें, (मांसामध्यें) भोंसकणें. G. n. *a long and deep cut (esp. in flesh)* वार m, घाव m, (मांसामध्यें झालेली) मोठी जखम f, भोकसा or भोसका m, भगदाड n, दीर्घ-छेद m, दीर्घक्षत n.

Gasp ( gäsp ) [ Icel. *geispa*, to yawn, (by metathesis) from *geipsa*; Cf. *geip*, idle talk. ] v. i. *to labour for breath, to respire convulsively, to pant violently* धापा f. pl. टाकणें -देणें -दाटणें, धापणें, धापलणें, धामणें, लाहक्या f. pl. -अहाळण्या f. pl. देणें, कांसळणें. २ *to show vehement desire* (-च्यासाठीं) धापा टाकणें (*fig.*). G. v. t. *to emit or utter with gasps* (with *forth, out, away*, &c.) धापेबरोवर बाहेर सोडणें -टाकणें. G. n. *a laboured respiration* धाप f, लाहकी f, आहळणी f, दम m, कासश्वास m, ऊर्ध्व m, उदान m. [ THE LAST G. घुट्ट n. TO BEAT THE LAST G. कंठीं -दंतीं -तंतीं प्राण उतरणें -उरणें -लागणें g. of s., घरघर f -घोर m लागणें. ] Gas'ping pr. p. & v. n.

Gastric ( gas'-trik ) [ Gr. *gaster*, Sk. जठर, the belly. ] a. *of, pertaining to, or situated near the stomach* जठराचा, जाठर, जठरासंबंधीं, जठरासन्न. G. juice n. जठराग्नि(?) m, जठरानल (?)m, कोठाग्नि (?) m, ( these words literally mean *fire of the belly*), जाठररस m. Gastrilo'quist n. बेंबीच्या देंठापासून -पोटांतून बोलणारा -आवाज काढणारा. Gastron'omer n. खाण्यापिण्याच्या कामांत शोकी माणूस m, भोजनकुशल, भोजनशौंड, चविष्ट, जेवणारा, मिष्टान्नभुक्, मिष्टान्नभोजी. Gastron'omy n. भोजनकला f.

*N. B.*:—Some suggest that क्लेदकश्लेष्मा mentioned in Sanskrit medical works corresponds to 'Gastric juice' of English medical writers. Sanskrit medical writers such as सुश्रुत & चरक mention five kinds of श्लेष्मा ( १ ) क्लेदकश्लेष्मा ( gastric juice ), ( २ ) बोधकश्लेष्मा (Saliva), (३) श्लेषकश्लेष्मा ( joint oil), ( ४ ) अवलंबकश्लेष्मा ) ( श्लेष्मा residing in heart & lungs ), and ( ५ ) तर्पकश्लेष्मा ( श्लेष्मा residing in brain). We are not able just now to settle one English word for श्लेष्मा. Sometimes it is translated as 'mucus,' and sometimes as 'phlegm.' We shall, however, discuss the word श्लेष्मा hereafter under the English word 'Mucus.'

Gate ( gāt ) [ A. S. *geat*, a way, a gate. ] n. *a large door or passage* महाद्वार n, मोठें दार n, मोठा दरवाजा m, ( आंतबाहेर जाण्यायेण्याचा ) मोठा मार्ग m. [ BUILDING OVER THE G. गोपुर m. or n. FRONT or GRAND G. सिंहद्वार n, महाद्वार n, (-OF A VILLAGE or WARD &C. ) वेस f, ग्रामद्वार n, गांवदरवाजा m -कुसूं n, ( -of an enclosure, in a fence, &c.) फाटक n, झडपा m, झांपा m, कवाड n. ] २ (also, *fig.*) *a means or way of entrance or exit* प्रवेशद्वार n, मुक्तिमार्ग m (*lit.*), सुटण्याचा मार्ग m. Gate'-keeper n. द्वारपाल m, वेसकर m. Gate-money n. दस्तुरी f, नाक्यावरील कर m, नाक्यावरील जकात f. To stand in the gate or gates *to occupy places of advantage* सोयीची जागा पटकावणें -पटकाऊन बसणें. Gate'way n. दिंडी f, दरवाज्यांतून राखलेला रस्ता m -मार्ग m. Gate of justice न्यायद्वार n,

न्यायमंदिराचा मार्ग *m.* Gates of death मृत्यूचा दरवाजा *m*, ( *i. e.* जवळ येऊन ठेपलेलें ) मरण *n*.

Gather ( gath'ėr ) [ A. S. *gaderian* –A. S. *gade*, company. ] *v. t. to bring together, to assemble, to muster* ( people &c.) गोळा करणें, जमविणें, जमा करणें, एकवटणें, एकत्र -एकवट करणें, संग्रह *m* -संचय *m*. करणें, मिळवणें, कवळणें, गुंडाळणें, एके ठिकाणीं करणें. २ *to cull, to harvest, to pick off, to pluck* तोडणें, काढणें, तोडून -काढून घेणें, उतरणें, तोडणी *f* -तोडा *m*. &c. करणें *g. of o.*, खुडणें, खुडून घेणें, वेंचणें. ३ *to amass, to gain, to heap up* ( things ) जमविणें, सांठविणें, संचय *m* -संग्रह *m* करणें, (-ची) पुंजी करणें, गोळा -जमा करणें. ४ ( *a* ) *to contract, to compress* संकुचित करणें, आंखडणें, अखुडणें, आटोपणें. ( *b* ) ( also ) *to pucker, to plait* मुरुडणें, मुरडणें, सुरकुतवणें, सुरकत्या घालणें, मुरड -मुरूड घालणें, चूण पाडणें. ५ *to collect, derive, or deduce as inference; to conclude* अनुमान *n*. -तर्क *m*. करणें -काढणें -बांधणें, हाशील *n* -तात्पर्य *n*. घेणें, तर्कानें -तर्क करून -अनुमानानें काढणें, सार ठरविणें. ६ *arch. to bring together, or nearer together, in masonry* आंवळीत आंवळीत आणणें, अरुंद करीत आणणें. ७ *naut. to haul in, to take up* खेंचून -ताणून घेणें -धरणें. G. *v. i. to come together* एकत्र होणें, मिळणें, गोळा -जमा -एके ठिकाणीं होणें -येणें. २ *to unite* जुळणें, एक होणें, मिळणें, जूट करणें. ३ *to grow larger by accretion, to increase* वाढणें, मोठा होणें, वधारणें (*Guj.*). ४ *to concentrate, to come to a head and generate pus* पुवळणें, पुवळणास येणें, पुवारणें, (-आंत) पू होणें, पुलेणें, पुलेजणें. ५ *to collect or bring things together* जमा करणें. ६ *to pucker* सुरकुतणें, सुरकुत्या पडणें with ला *of s.*, अखुडणें, मुर ( *or* -रू ) डणें, चुणणें. G. *n. a plait, a pucker* सुरकुती *f*, चिरमी *f*, झुरली *f*, चूण *f*, मुर ( or -रू ) ड *f*, चीण *f*. Gath'erer *n*. Gath'ering *n*. *-the act.* गोळा करणें *n*, संग्रह करणें *n*, समाहार *m*. २ *that which is gathered;* as, ( a ) *a crowd, an assembly* सम्मेलन *n*, जमाव *m*, गर्दी *f*, समाज *m*, मंडळी *f*, सभा *f*, समूह *m*, संघ *m*, &c. ( b ) *a collection or charitable contribution* धर्मादायाची वर्गणी *f*- वसूल *m*. Gath'ered *a.* गोळा केलेला, एकवटलेला, संग्रहीत, संचित, मीलित, &c. २ तोडलेला, उतरींव. ३ सांचरलेला, आटपलेला. ४ मुरडलेला, मुरड घातलेला. To be gathered to one's people *or* fathers मरणें. To gather one's self together आपल्या आंगांतील सर्व शक्ति एकवट करणें. To gather to a head पूर्ण तयार होणें, परिपक्व दशेस येणें.

Gaudy (gawd'i) [M.E. *gaude*, an ornament, –L. *gaudium*, joy *-gaudere.*] *a.* ( Now chiefly in disparaging sense ) *excessively or glaringly showy, tastelessly gay or fine* भपकेबाज, भपकेदार, डौलाचा, देखणाऊ, दिखाऊ, ढुमदार, भडक, बभूक, भवूक, भडकीचा, शानदार, छानीचा, उज्ज्वल, शोभिवंत, चित्रविचित्र. २ *gay, merry* उल्हासी, रंगेल, आनंदी, खूष, राजी, तबियतींत असलेला. G. (*Oxford univ.*) *a feast or festival* स्मारकभोजन *n*, स्मरणभोजन *n*, ( called also *gaud-day* or *gaudy day* ) सण *m*, शुभोत्सव *m*, शुभदिवस *m*. Gaud'ily *adv.* भपक्यानें, डौलानें. Gaud'iness *n*. भपकेदारपणा *m*, देखणेपणा *m*, डौल *m*, दिखाऊपणा *m*.

Gauge ( gāj ) [ O. Fr. *gauger -gauge*, a liquid measure; old form of *jauge*, a measuring rod.] *v. t. to measure or determine with a gauge* ( गजानें इत्यादि ) मोजणें, मापणें, (-चें) परिमाण *n* -मेज *n* -माप *n* घेणें -काढणें. २ *to ascertain the contents or capacity of* (-चें) क्षेत्रमान *n*-(-ची) ग्रहणशक्ति *f* अजमासून पाहणें.३ *mech. to measure the dimensions of* (-ची) लांबी रुंदी मोजणें -परिमिति घेणें. G. *n. a measure, a standard* माप *n*, इयत्ता *f*. २ *dimensions, estimate* माप *n*, परिमिति *f*, अजमास *m*, अंदाज *m*, अंदाजी *f*, गणना *f*, मापन *n*, तोल *m* or *n*, क्षेत्र *n*.३ *templet* (विस्तार किंवा आकार ताडून पाहण्याचें ) गेज *n*.४ *the distance between the two rails of a railway line* ( लोहमार्गाच्या दोन रुळांमधील ठराविक ) अंतर *n* -गाळा *m*. ५ *phys. an instrument or apparatus for measuring the state of a phenomenon, or for ascertaining its numerical elements at any moment* मापनयंत्र *n*, मापक *m*; as, " A Rain G. " ( =पर्जन्यकुंड *n*), पावसाचें पाणी मोजण्याचें यंत्र *n*. ६ ( *building* ) *that part of a shingle, slate, or tile, which is exposed to the weather, when laid* ( एकावर एक लावलेल्या कौलांच्या थरांतील प्रत्येक ) कौलाचा उघडा राहणारा भाग *m* -गाळा *m*. (*b*) ( *also* ) *one course of such shingles, slates, or tiles* उघड्या गाळ्याच्या कौलांचा थर *m*. Gau'ger *n*. मोजणारा Gau'ging *pr. p.* & *v. n.* Gauging-rod *n*. मोजनळी *f*, गजनळी *f*, मापनलिका *f* (S.), पिंपांत भरलेल्या मद्यादि द्रव पदार्थांचें परिमाण काढण्याची नळी *f*. हिच्या योगानें पिंपांत द्रव पदार्थ किती भरला आहे हें पदार्थ बाहेर काढून मोजल्याशिवाय समजतें.

Gaunt ( gawnt ) [ Cf. Norw. *gand*, a thick pointed stick, a tall and a thin man. ] *a. lean, meagre, pinched and grim* रोड, रोडका, सडपातळ, काठ्या, रोडांग्या, पातळांग्या, हाडकुला, काटकुळा, एक पाशीचा. Tall and G. ढांगळ, लंबूस.

Gauntlet ( gawnt'-let ) [O. Fr. *gantelet*, dim. of *gant*, glove. ] *n*. हस्तत्राण *n*, दस्ताना *m*, वज्रमुष्टि *f* (*pop.*) वज्रमूठ *f*, ( हस्तरक्षक ) मोजा *m*. To throw the G. युद्धादिकास आव्हान करणें, पण लावणें, पण मांडणें. To take up the G. आव्हानाचा स्वीकार करणें, पण *m*. -विडा *m*. उचलणें *n*.

Gauze ( gawz ) [ Fr. *gaze*, so called because it was

first introduced from *Gaza* in Palestine. ] *n.* जाळी *f.* २ गाझ *f.* ( रेशमी किंवा सुती ) जाळीदार कापड *n.* G. *a. thin, light* पातळ, हलका, बारीक, गाझसारखा.

Gave ( gāv ) *pa. t.* of Give, which See.

Gawky ( gawk'-i ) [ O. E. *gok, gowk*, cuckoo, fool. ] *a. foolish and awkward* अडाणी, अनाडी.

Gay ( gā ) [ Fr. *gai*; prob. from root of Ger. *jäh*, quick, lively. ] *a. lively, merry, blithe* उल्लासी, आनंदी, चपळ, प्रफुल्ल, चुणचुणीत. २ *fond of amusements and sports* खेळाडू, रंगेल *or* -ली *or* -लें, रंगी, रंगीला, ख्याली, चैनी, गुलहौशी *or* -शा, खुशालचंद, शोकाजी. ३ *splendid, fine* सुंदर, भपकेदार, डौलदार. ४ *dissipated, lewd* सुखासक्त, चैनी, खुशालचेंडू -चंदू, सुखोपभोगास सवकलेला, चैनीस सवकलेला. G. *n. an ornament, anything that looks gay or showy, (espe.) one that is used to amuse a child* भपकेदार चीज *f.* शोभिवंत चीज *f* -दागिना *m*, मुलांचा मजेचा खेळ *m*, खेळणें *n.* Gay'ly *adv.* उल्हासानें, उल्लासानें, चपलतेनें, आनंदानें, खुषीनें, चुणचुणीतपणें. २ डौलानें. Gayer. *Compa.* Gayest. *Super.*

Gaze ( gāz ) [ M. E. *gasen*, to stare at. ] *v. i. to stare at, to look intently* टकमक -एकसारखें पाहणें, न्याहाळणें, टकटक -टकटकां -टक लावून -न्याहाळून -एकाग्रदृष्टीनें -स्तंभदृष्टीनें पाहत राहणें. G. *n. a fixed look* टक लावून पाहणें *n*, एकाग्रदृष्टि *f*, स्तंभदृष्टि *f*, निरीक्षण *n*, प्रेक्षण *n*, एकनजर *f*, अनिमेष दृष्टि *f.* [ At G. न्याहाळीत.] Gaze'ful *a.* टकमक पाहणारा. Gazing-stock *n.* एकाग्रदृष्टिपात्र *n*, उपहासदर्शनास्पद *n*, टक लावून पाहण्याचा विषय *m.*

Gazette ( ga-zet' ) [ O. Fr. *gazette*, an abstract of news issued at Venice. ] *n. a. newspaper* वर्तमानपत्र *n*, वृत्तपत्र *n*, अखबार *f*, समाचार *m*, ग्याझिट *n.* G. *v. t.* वर्तमानपत्रांत -वृत्तपत्रांत छापणें -प्रसिद्ध करणें, आज्ञापत्रिकेंत प्रसिद्ध करणें, जाहीर बातमी देणें. Government G. सरकारी आज्ञापत्रिका *f.* Gazetteer' *n. a writer of news* वृत्तलेखक *m*, वर्तमानपत्र -वृत्तपत्रलिहिणारा. २ ( *obs.* ) *Burke. newspaper* वर्तमानपत्र *n.* ३ *a geographical dictionary* भूगोलविषयक कोश *m*, स्थलकोश *m*, स्थलवर्णनकोश *m.* Gazetted *pa. t.* Gazetting *pr. p.*

Gear ( gēr ) [ A. S. *gearwe*, preparation -*gearu*, ready. ] *n. clothing, garments, ornaments* धोतरपातर *n*, कपडालत्ता *m.* २ *goods, property* सामान *n*, सामानसुमान *n*, तेगार *m*, सरंजाम *m*, साज *m.* ३ *whatever is prepared for use or wear* वापरण्याचे जिन्नस *m. pl.* ४ *the harness of horses or cattle* ( खोगीर इत्यादि ) सरंजाम *m.* ५ *warlike accoutrements* लढाईचा सरंजाम *m* -सामुग्री *f.* ६ *manner, custom, behaviour* रीत *f*, रूढि *f*, रिवाज *m*, चाल *f*, पद्धत *f.* ७ *affairs, concern* काम *n*, कामकाज *n*, रोजगार *m*, धंदा *m*, उद्योगधंदा *m*, व्यवहार *m.* ८ *mech. a toothed wheel* दांते असलेलें चक्र *n*, दांताळें चाक *n.* ९ *the mechanical arrangements connecting a motor with its work* (यंत्राच्या निरनिराळ्या भागांची मुख्य चालकाशीं ) जोडणीचा सरंजाम *m*, कळाशी *f.* १० *rubbish* घाण *f*, कचरा *m.* ११ दंतचक्रें *n. pl.* Out of G. विस्कळित, विसकटलेला, असंबद्ध, विलग्न. In G. सुरळीत, सुसंलग्न, चालू, बरोबर बसलेला. Running G. धांवेची कळाशी.

Gelatin same as Gelatine.

Gelatine ( jel'-a-tin ) [ Fr., –L. *gelo -gelatum*, to freeze, -*gelu*, frost. ] *n.* ( ऊन पाण्यांत विरघळणारें ) सरसासारखें प्राणिजद्रव्य *n.* प्राण्यांच्या हाडांतील शुद्ध सरस *m*, जिलेटिन *n.* G. *a. viscous* चिकीचा, सरसासारखा, चिकचिकीत, चिकट, बुळबुळीत. Gelat'inous *a.* चिकट, संलग्नशील. Gelat'inate *v. t.* or *i.* ( जिलेटिनसारखा ) चिकचिकीत करणें -होणें. Gelatina'tion *n.* शुद्ध सरसा ( जिलेटिन ) सारखा करणें.

Geld ( geld ) [ Icel. *gelda*, Dan. *gilde*, barren. ] *v. t.* ( *a* ) *to castrate, to emasculate* खची करणें, अंड *m* -वृषण *m.* कापणें, अंडच्छेदन -मुष्कच्छेदन करणें *g. of o.* (*b*) ( -by pounding the testicles ) बडविणें, चेंचणें, ठेंचणें, ( बैल इ. ) ठेंचून टाकणें. २ *to deprive of anything essential* मुख्य भाग *m* -प्राणभूत भाग *m* -सारभूत गोष्ट *f.* काढून घेणें -टाकणें, नागविणें, नागवणूक *f.* करणें, (-ला ) लुबाडणें, कफल्लक करणें -करून सोडणें. Geld'able *a.* Geld'ed *pa. t.* & *pa. p.* Geld'er *n.* बडविणारा, खची करणारा, &c. Geld'ing *pr. p.* & *v. n.* Gelt *n. a castrated animal* (usually applied to a horse, but formerly used also of a human male ) बडविलेलें ( घोडा इ. ) जनावर *n.*

Gelid ( je'-lid ) [ L. *gelidus -gelu*, frost, cold. ] *a. very cold, frozen* अति थंड, थंडगार, गोठलेला, गारठलेला, हिम ( S. ). Gelid'ity, Gel'idness *n.* अतिशैत्य *n*, गारठा *m.* Gel'idly *adv.*

Gelly, see jelly.

Gem ( jem ) [ Fr. *gemme* –L. *gemma*, a bud; allied to Gr. *gemo*, to be full. ] *n. bot. a bud* कळा *m*, कळी *f*, कलिका *f* ( S. ), उत्कलिका *f* ( S. ). २ *a precious stone of any kind* ( as the ruby, emerald, topaz, &c. ) *especially when cut and polished for ornament, a jewel* ( हिरा, पाच, नीळ, इ० ) रत्न *n*, जवाहीर *n*, मणि *m.* [ Artificial gem खोटा खडा *m.* Gem -mine रत्नाकर *m*, रत्नांची खाण *f.* Hidden G. ( *fig.* ) झांकलें माणीक *n.* Jewels *or* gems ( comprehensively ) खडेकंकर *m. pl.* Judge or connoisseur of gems रत्नपारखी. Middle gem of a string मध्यमणि *m*, मेरुमणि *m.* Small diamond हिरकणी *f.* The nine gems नवरत्नें *n. pl.* These are:—हिरक किंवा हिरा, पाच, मौक्तिक, पुष्पराग, माणीक,गोमेद, वैदूर्य, नीलमणि, पोंवळें. Belonging to a gem जवाहिरी. Set or studded with gems रत्नजडित, रत्नखचित. Socket of a gem कोंदण *n.* String of gems मणिमाला *f*, रत्नहार *m.* To

MOUNT GEMS रत्नांना कोंदण *n.* करणें.] ३ *anything of small size or expressed within brief limits which is regarded as a gem on account of its beauty or value* (as, a small picture, a verse of poetry, ) रत्न *n*, मौक्तिक *n.* in comp. as, वाङ्मौक्तिक *n*, वाग्रत्न *n*, काव्यरत्न *n*, चित्ररत्न *n*, इ. G. *v. t. to adorn with gems* रत्न -मणिभूषित करणें, रत्नांकित -रत्नखचित -रत्नजडित करणें. २ *to embellish or adorn, as with gems* शोभायमान करणें. Gem'meous *a. of or pertaining to gem* रत्नसंबंधीं, जवाहिरी, रत्नासारखा, रत्नमय. Gem'mated *a. adorned with gems or jewels* रत्नजडित. Gem'my *a.* रत्नपूर्ण. २ चकचकित, झळकणारा. ३ (*colloq. Eng.*) *smart* पाणीदार, तल्लख, चपळ. Gem'miness *n.* पाणीदारपणा *m*, चपळाई *f*, तल्लखपणा *m.*

Geminate. See Gemini.

Gemini (jem'i-ni) [L., *pl.* of *geminus*, twin -born, for *geminus -gen*, root of *gigno*, to beget.] *n. pl. a constellation of the Zodiac containing the two bright stars 'Castor' and 'Pollux'* अश्विनीकुमार तारकापुंज *m.* २ *the third sign of the Zodiac which the Sun enters about May 20th* मिथुन *n*, युग्म *n*, द्वंद्व *n*, मिथुनराशि *f.* Gem'inate *a. bot. in pairs* युग्म, द्विगुण, यमज. Gem'inous *a.* जुळा, जोड. Geminifl'orous *a. bot.* दुहेरी फुलांचा.

Gemmary, Same as Gemmeous. See under Gem.

Gemmule, same as Plumule, which see.

Gender (jen'dėr) (Fr. *genre, gendre* –L. *genus, generis*, a kind, kin. या शब्दाचा मूळ अर्थ 'जात, प्रकार' असा होता.] *n.* (*obs.* or *colloq.*) *sex, male or female* (पुरुष किंवा स्त्री) वर्ग *m* -जात *f.* २ *gram. a classification of nouns* लिंग *n.* [COMMON G. सामान्य लिंग *n.* MASCULINE G. पुल्लिंग *n.* FEMININE G. स्त्रीलिंग *n.* NEUTER G. नपुंसकलिंग *n.* VARIATION (of word) THROUGH G. लिंगविकार *m.*] G. *v. t. to beget, to engender* उत्पन्न -पैदा करणें, जन्म देणें. G. *v. i.* (R.) *Shakes. to copulate* जुगणें, संग करणें. Gen'derless *a.* लिंगहीन (?), अव्यय, अलिंग.

Genealogy (jē-nē-al'o-ji) [Gr. *genealogia*, genealogy, *genea*, birth, race, and *logos*, discourse.] *n. an account or history of the descent of a person or family from an ancestor, a pedigree* वंशक्रमवर्णन *n*, वंशवर्णन *n*, वंशावलिवर्णन *n*, वंशचरित्र *n*, वंशानुचरित्र *n*, कुलक्रमचरित्र *n*, वंशवृक्ष *m.* २ *regular descent of a person or family from a progenitor, lineage* वंश *m*, वंशावळ *f*, वंशक्रम *m* -अनुक्रम *m* -परंपरा *f*, कुलक्रम *m.* ३ उत्क्रांतिक्रम *m.* Genealog'ic, -al *a.* वंशावळीचा, वंशानुक्रमसंबंधीं. Genealog'ically *adv.* वंशानुक्रमें. Geneal'ogist *n. one who traces the descent of persons or families* वंशावळी लिहिणारा, वंशावलिरचक, वंशावलिज्ञ. Genealo'gize *v. i. to investigate, or relate the history of, descents* वंशावळ शोधून काढणें -लिहिणें -ठरविणें. Gen'earch *n. the chief of a family or tribe* कुटुंबाचा किंवा जातीचा मुख्य नायक.

Genearch. See under Genealogy.

General (jen'-ėr-al) [Fr., –L. *generalis*, leader -*genus*, race, kin.] *a. pertaining to a whole class or order* सामान्य, सगळ्या जातीचा, जातिमात्राचा, जातिविषयक -संबंधीं. २ *not special or particular, including all particulars* साधारण, सर्वसामान्य, सर्वसाधारण, व्यापक; as, "A. G. inference." [G. term (*math.*) साधारण पद *n.* G. good सर्वहित *n*, सामान्य हित *n.*] ३ *not specific, vague, indefinite* मोघम, अस्पष्ट, अनिश्चित, संदिग्ध, अपरिछिन्न; as, "A G. expression." ४ *widely spread, prevalent, extensive though not universal* सार्वजनिक, सामान्य, पुष्कळ प्रचारांतील, रूढींतला, रूढीचा, प्रायिक, व्यावहारिक, रूढ, चालू; as, "A G. custom or opinion." ५ *having a relation to all* सर्वांचा, सार्वत्रिक, मनुष्यमात्राचा. ६ *as a whole* एकंदरींची, एकंदरींतली; as, "G. behaviour." ७ *usual* नेहमींची, हंमेशची; as, "G. habit." G. *n. the whole, the total* (opposed to *particular*) ठोकळ गोष्ट *f* -प्रमाण *n*, सामान्यता *f*, सामान्य नियम *m*; as, "In particulars our knowledge begins, & so spreads itself by degrees to *generals.*" २ *mili. the commander of an army or of a body of men not less than a brigade* सेनापति *m* -नायक *m* -अधीश *m* -अधिपति *m*, सेनानी *m*, जनरल *m.* ३ *mili. the roll of the drum which calls the troops together* (सैन्य एकत्र जमविण्यासाठीं इशारती करितां केलेला) नौबतीचा डंका *m*; as, "To beat the *general.*" ४ *eccl. the chief of an order of monks, or of all the houses or congregations under the same rule* महंतांचा अधिपति *m*, मुख्य यति *m*, मुख्य महंत *m.* Genera'lia *n. pl., generalities, general terms* सामान्य सिद्धांत *m. pl.*, सामान्य गोष्टी *f. pl.* Generalis'simo [It. superl. of *generale*, general.] *n. the chief commander of an army* (a title used in most foreign countries) मुख्य सेनापति *m.* General'ity *n. the quality of including species* सर्वसाधारणता *f*, सामान्यता *f*, सामान्यपणा *m*, जातित्व *n*, व्यापकता *f.* २ *a general or vague statement or phrase* मोघम -अस्पष्ट -अविशेष विधान *n* -वाक्य *n*, अविशेषता *f*; as, "Let us descend from *generalities* to particulars." ३ *the main body, the bulk, the greatest part* मुख्यांश *m*, व्यापक भाग *m*, सर्व साधारण भाग *m.* Gen'eralize *v. t. to bring under a genus* व्यापक -सामान्य वर्गांत -वर्गाखालीं आणणें -घालणें -मोडणें. २ *to use with a more extensive application, to make universal in application* (-ला) सामान्य -व्यापक रूप -स्वरूप देणें, पुष्कळ गोष्टींस लागू करणें,

(-ची) व्याप्ति वाढविणें, व्यापक -विस्तृत करणें. ३ *to derive or deduce* (a general conception, or a general principle) *from particulars* विशेष गोष्टींवरून सामान्य -व्यापक नियम -सिद्धांत बांधणें -काढणें -बसविणें, सामान्यीकरण करणें; as, "A mere conclusion *generalized* from a great multitude of facts." G. *v. i. to take comprehensive views* सामान्य नियम ठोकून देणें, साधारण्य आणणें, साधारण्य आणून वहिवाटणें -वहिवाट करणें, साधारण्यांत आणणें. Gen'eralizable *a.* Generaliza'tion *n.* सामान्य विधान *n.* (विशेष उदाहरणांवरून काढलेलें), व्यापकधर्मकथन *n*, व्याप्तिग्रहण *n*, व्यापकसिद्धांत *m*, सामान्यीकरण *n.* Gen'eralized *a.* सामान्यीकृत. Gen'eralizer *n.* सामान्यीकार. Gen'erally *adv. commonly* प्रायः, बहुधा, बहुतकरून, वारंवार, बहुशः, पुष्कळ वेळां, पुष्कळदां, व्यापकतः. २ *in the main, upon the whole, comprehensively* मुख्यत्वेंकरून, सामान्यपणें -रीतीनें, बहुतेक अंशीं, व्यापकपणें, एकंदरीनें. Gen'eralness *n.* सामान्यपणा *m.* Gen'eralship *n.* सेनापतित्व *n*, नायकत्व *n*, सेनापतीचें काम *n.* २ *military skill in a commander* युद्धदाक्षिण्य *n* -कौशल्य *n*, रणपटुत्व *n*, सेनापतीचें रणकौशल्य *n* -युद्धनैपुण्य *n* -लष्करी हुषारी *f.* ३ (*fig.*) *leadership, management* पुढारीपणा *m*, चालकत्व *n*, नायकत्व *n*, आधिपत्य *n*, म्होरकेपणा *m*, व्यवस्थापकत्व *n.* Generalty *n.* (R.) see General'ity *n.*

Generalize, Generlization, see under General.

Generate (jen'-ėr-āt) [L. *generatus*, p. p. of *generare*, to generate -*genus*, kind.] *v. t. to beget, to procreate, to produce* (a being similar to the parent) जनन -प्रजनन करणें, उत्पन्न -निर्माण करणें, (-ला) जन्म देणें, प्रसवणें, निपजविणें. २ *to bring into life* अस्तित्वांत आणणें, जन्मास घालणें. Gen'erant *a. generative* उत्पादक, दायक, जनक (in comp). G. *n.* जनक, उत्पादक. Genera'tion *n. procreation* जनन *n*, प्रजनन *n.* उत्पादन *n*, प्रसव *m*, जन्म *m.* [MALE *or* FEMALE ORGANS OF G. उपस्थ *m or n*, गुह्य *n.* MALE ORGAN OF G. शिश्न *n.*] २ *origination by some process, production, formation* उत्पत्ति *f*, प्रसूति *f*, संभव *m*, उद्भव *m*, पैदास *f.* ३ *progeny, offspring* प्रजा *f*, संतान *n*, संतति *f*, वंश *m*, विस्तार *m*, अपत्य *n*, कुल *n.* ४ *single step or stage in the succession of natural descent, a rank or remove in genealogy* पिढी *f*, पुस्त *m*, पुरुष *m*, डोई *f.* ५ (hence) *the mass of beings living at one period* पिढी *f*, समकालीन मंडळी *f.* [A G. *single succession* पिढी *f*, पुस्त *m.* FROM G. TO G. पिढीदरपिढी, पुस्तदरपुस्त, पिढीपेस्तर, पिढ्यानपिढ्या.] ६ (also) *the average lifetime of man, an age* आयुष्याची सरासरी *f*, पिढीचा काल *m*, आयुष्यमर्यादा *f*, आयुर्मर्यादा *f*, पिढीच्या कालाची मर्यादा *f*, एका पिढींत लोटणारा काळ *m.* ७ *race, kind, family, breed* जाति *f*, जात *f*, वर्ग *m*, कुल *n*, कुटुंब *n.* ८ *biol. the aggregate of the functions and phenomena which attend reproduction* प्रजननक्रिया *f*, जननव्यापार *m.* Gen'erating *a.* उत्पादक, &c. [G. LINE उत्पादकरेखा *f.* G. CURVE उत्पादकवक्र *n.*] Gen'erative *a.* Gen'erator *n.* जनक, जनिता *m*, उत्पादक. २ *an apparatus in which vapour or gas is formed from a liquid or solid by means of heat or chemical process* द्रव किंवा घन पदार्थापासून रासायनिक क्रियेनें वाफ अगर वायु उत्पन्न करण्याचें साधन *n*, बाष्पोत्पादकपात्र *n*, (or briefly) उत्पादकपात्र *n.* ३ *mus. the fundamental note, or root of the common chord* (called also *generating tone*) मुख्य जनकस्वर *m.*

Generation, see under Generate.

Generic,-al (ge-ner'-ik,-al) [Fr. *generique* -L. *genus*. See Gender.] *a. relating to a genus* (as distinct from a *species* or from *another genus*) जातिगत, जातीचा, जातीय, साधारण, सामान्य; as, "A G. description *or* name." [G. PROPERTY जातिधर्म *m*, सामान्यधर्म *m*, व्यापकजातिधर्म *m.*] २ *very comprehensive* (oppo. to *specific*) व्यापक, फार -अति विस्तृत. Gener'ically *adv.* Gener'icalness *n.* जातिगतत्व *n*, सामान्यत्व *n*, जातीयत्व *n.*

Generosity, See under Generous.

Generous (jen'ėr-us) [O. Fr. *generosus* -*genus*, birth. Generous ह्याचा मूळचा अर्थ "कुलीन, उच्च कुळांतील -घराण्यांतील, अभिजात (S.), थोर" असा होता. परंतु तो सध्यां लुप्त झाला आहे.] *a. noble, magnanimous, honourable* उदार, वदान्य (S.), थोर, महात्मा, महाशय, उदारचरित, मोठ्या मनाचा, मनाचा मोठा; as, "A G. critic or foe." ३ *free to give, munificent* उदार, दानी, दाता, दानशूर, दानशील, वदान्य (S.), धौताल, त्यागशील, सढळ -मुख्या हाताचा, उदारवृत्ति, औदार्यशाली; as, "A G. friend." [GENEROUS WITH THE PROPERTY OF ANOTHER (OF.) आईजीच्या जिवावर बाईजी उदार, हलवायाच्या घरावर ब्रह्मार्पण करणारा -तुळशीपत्र टाकणारा.] ४ *characterised by generosity, overflowing* भरपूर, पोटभर, सढळ, अघळपघळ; as, "A G. table." ५ *full of spirit or strength, stimulating* उद्दीपक, कडक, जोमदार, जोमाचा, ताकदवान्, गरम (*fig.*); as, "G. wine." Genero'sity *n.* मनाची थोरवी *f*, उमदा स्वभाव *m*, मोठें मन *n*, महात्मता *f*, माहात्म्य *n.* (*lit.*) २ *munificence* औदार्य *n*, दानशीलता *f*, दानशूरता *f*, दानशूरपणा *m*, दातृत्व *n*, सढळपणा *m.* Gen'erously *adv.* उदार-मोकळ्या मनानें, मोठ्या मनानें. २ सढळपणानें, औदार्यानें, औदार्यपूर्वक. Gen'erousness *n.*

Genesis (jen'e-sis) [L. & Gr., -Gr. *gignomai* -obs. *generare*, to beget.] *n. production, formation, origination* उत्पत्ति *f*, उद्भव *m*, प्रभव *m*, पैदास *f*, जन्म *n*, जनन *n.* २ *the first book of the Old Testa-*

*ment* ( so called by the Greek translators from its containing the history of the creation of the world and of the human race ) उत्पत्ति *f*, जुन्या करारांतील पहिलें पुस्तक *n*, सृष्ट्युत्पत्तिवर्णनात्मक पहिलें पुस्तक *n*. Gene'sial *a*. Genesiol'ogy *n*. *the doctrine or science of generation* जननशास्त्र *n*.

Genesiology See under Genesis.

Genial ( jē'-ni-al ) [ Fr. –L. *genialis* -*genius*, the spirit of social enjoyment. ] *a*. *generative* उत्पादक, जनक. २ *cheerful, sympathetic* आनंदी, उत्साहवर्धक, रम्य, सुखकर, मौजी, सुखप्रद, सुखावह, रमणीय, मनोहर, रुचिर. ३ (*R.*) *marked with genius* विशालबुद्धि असलेला. Genial gods ( *Pagan Mythol.* ) *the powers supposed to preside over marriage and generation* विवाहप्रधानदेवता *f*. *pl*., गर्भाधानप्रधानदेवता *f*. *pl*. विवाहप्रधानदेवताs, according to Hindus, are अग्नि, पवमान, अर्यमा *and* प्रजापति. गर्भाधानप्रधानदेवताs, according to Hindus, are विष्णु, प्रजापति, अग्नि & सूर्य. Geniality, Gen'ialness आनंदी स्वभाव *m*, सुप्रसन्नता *f*, उल्हास *m*. Gen'ially *adv*. *cheerfully* आनंदानें, उल्हासानें.

Geniculate ( jen-ik'ū-lāt ) [ L. *geniculatus* -*geniculum*, a little knee -*genu*, the knee. Cf. Sk. जानु. ] *a*. *bent abruptly at an angle like the knee when bent* गुढघ्यासारखा वांकलेला, जान्वाकृति. G. *v. t.* (R.) *to form joints or knots on* (-वर) जानुसमसंधि येणें. Geni'culated *a*. Genicula'tion *n*. ( R. ) गुढघे टेंकणें *n*. २ वांक *n* -बांक *n*. येणें *n*. ३ जानुसमसंधि *m*.

Genital ( jeni'-tal ) [ O. Fr. *genital* –L. *genitalis*, generative –L. *genit'um*, superl. of *gignere*, to beget. ] *a*. *pertaining to generation, or to the generative organs* जननविषयक, जननसंबंधी, प्रजननसंबंधी, प्रजोत्पादनसंबंधी, जननेंद्रियविषयक, जननेंद्रियसंबंधी. Ge'nitals *n*. *pl*. *the organs of generation* उपस्थ *m* or *n*, जननांग *n*, जननेंद्रिय *n*.

Genitive ( jen'i-tiv ) [ L. *genitivus* ( *gignere*, *genitum*, to beget) as if indicating origin, a mistranslation of Gr. *genikos*, -*genos*, a class. ] *a*. *gram. of, or pertaining to, that case* ( as the second case of Latin and Greek nouns ) *which expresses source or possession* ( It corresponds to the *possessive* case in English ) षष्ठिविषयक, संबंधकारक. G. *n*. *the genitive case* षष्ठी *f*, षष्ठी विभक्ती *f*, संबंधकारक *n*, षष्ठीकारक *n*. Geniti'val *a*. *possessing genitive form* षष्ठिविभक्तिरूप. २ *pertaining to, or derived from, the genitive case* षष्ठिविभक्तिव्युत्पन्न, षष्ठिव्युत्पन्न, षष्ठिविभक्तीचा. Genitival-ly *adv*.

Genitor (jen'i-tor) [L.] *n*. *a generator, an originator* जनक, जनिता *m*, उत्पादक, स्थापनकर्ता *m*. Gen'iture *n*. *generation, birth* जनन *n*, जन्म *m* or *n*, उत्पत्ति *f*, उद्भव *m*. [ LORD OF THE G. *astrol.* जन्मनक्षत्र *n*. ]

Geniture, See under Genitor.

Genius ( jen'yus *or* jē'-ni-us ) [ L. *genius*, *gignere*, *genitum*, to beget. ] *n*. *pl*. Genii. *a supernatural being, a tutelary deity, a spirit good or bad* देवता *f* (as, ग्रामदेवता *f*, वनदेवता *f*, इष्टदेवता *f*, कुलदेवता *f*), दैवत *n*, रखवालदार दूत *m* -भूत *n* -पिशाच *n*- वेताळ *m* -देवता *f*. [ G. OF A PLACE स्थल देवता *f*, क्षेत्रपाल *m*. G. OF DWELLING PLACES वास्तुदेवता *f*, वास्तुपुरुष *m*. ] २ (*pl*. Geniuses. ) *that disposition or aptitude of mind which is peculiar to each man, and which qualifies him for certain kinds of action or special success in any pursuit* प्रकृति *f*, स्वभाव *m*, शील *n*, मनाची ओढ *f*, कल *m*, साहजिक प्रवृत्ति *f*, बुद्धि *f*, बुद्धीची धांव *f*. ३ *special taste* लक्ष *n*, आवड *f*, विशेष आवड *f*, गोडी *f*, भक्ति *f*, ओढा *m*. ४ *animating spirit as of a nation, religion, or a language* प्राकृतिक धर्म *m*, नैसर्गिकस्वभाव *m*, मूलस्वभाव *m*, मूलप्रकृति *f*, (भाषेची) मोड *f*, मोडणी *f*. ५ *uncommon intellectual power*, अचाट बुद्धि *f*, अचाट बुद्धिसामर्थ्य *n*, बुद्धिवैभव *n*, विशेष -अलौकिक बुद्धिमत्ता *f*. ६ *a man of superior faculties* अलौकिक बुद्धीचा मनुष्य *m*, विलक्षण -लोकोत्तर डोक्याचा माणूस *m*, अलोट बुद्धीचा मनुष्य *m*, अलोट कल्पनाशक्तीचा -अलोट निर्माणशक्तीचा मनुष्य *m*. as, "Kalidas was a rare genius." Genius loci *the genius or presiding divinity of a place* स्थलदेवता *f*. २ ( hence ) *the pervading spirit of a place or institution, as of a college &c.* दैवत *n*.

Gennet, Same as Jennet.

Gent, A familiar abbreviation of Gentleman.

Genteel ( jen-tēl' ) [ Lit. belonging to a noble race or family –Fr. *gentil*, noble –L. *gentilis*, belonging to the same clan, a gentile ( afterwards applied to mean well-bred, &c. –L. *genti*, decl. stem of *gens*, a clan, tribe. ] *a*. *polite, well-bred* (of persons ) (*a*) खानदानीचा, सुशील, आर्य, घरंदाज, शिष्ट, सभ्य चालीचा, शिष्टसंप्रदायी, सभ्यसंप्रदायी, शिष्टाचारसंपन्न, (*b*) सभ्याचारविषयक. २ *graceful, elegant* ( of manners ) सुभग ( S. ), गृहस्थी, शिष्ट, सभ्य, शिष्टाचाराचा, सालस. ३ *elegant in appearance, dress or manner* देखणा, भव्य, भारदस्त. ४ *suited to the position of a lady or a gentleman* सद्गृहस्थास -सभ्य स्त्रीस अनुरूप -योग्य, सद्गृहस्थयोग्य, गृहस्थयोग्य. Genteeli'sh *a*. *somewhat genteel* कांहींसा सभ्य. Genteel'ly *adv*. Genteel'ness *n*. *the quality of being genteel* मनुष्यपणा *m*, माणुसकी *f*, गृहस्थपणा *m*, गृहस्थगिरी *f*, शिष्टाई *f*, शिष्टाईकी *f*, सभ्यता *f*, शिष्टता *f*, सौजन्य *n*. Gentil'ity *n*. *good birth or extraction* कुलीनता *f*, वर्णश्रेष्ठता *f*, सद्वंशता *f*, वंशविशुद्धि *f*. २ *good-breeding, politeness of manners* सभ्यता *f*, सौजन्य *n*, गृहस्थाई *f*, सुविनीतता *f*.

Gentian ( jen'-shan ) [ Said to have been brought into use by *Gentius*, King of Illyria, conquered by the Romans in 167 B. C. ] *n.* किराईत *n.* Stick *or* dried G. काडेकिराईत *n.*

Gentile ( jen'tīl ) [ L. *gentilis -gens*, a nation. ] *a.* यहुदी नाहीं असा, यहुदीतर.

Gentility, See under Genteel.

Gentle ( jen'tl ) [ L. *gentilis*, well-born. ] *a. well-born, of good birth* कुलीन, सुकुल, पिढीजाद, पिढीजादा, कुलवंत, जातिवंत, जातीचा, सुकुलांतला, घरंदाज, वंशज, वंशविशुद्ध, सद्वंश, अभिजात, खानदानीचा, खाणीचा, सुजात, आर्य. २ *meek, peaceable, mild* गरीब, धिम्मा, संत or (थ), स्वभावाचा सौम्य -शांत, सौम्य, सौम्यवृत्ति, शांत, नरम. ३ *moderate* सौम्य, नरम, मृदु, कोमल. [G. MEASURE सामोपचार *m.*] ४ ( -a breeze ) हलका, मंद, संथ. Gentle-folks *n. pl.* गृहस्थ लोक *m. pl.*, सभ्य लोक *m pl.*, कुलीन लोक *m. pl.* (*Spec.*) पांढरपेशे *m. pl.*, पांढरपेशे लोक *m. pl.*, Gentle-hearted कोमल अंतःकरणाचा. Gen'tlehood *n*, सौम्यता *f*, सभ्यता *f.* Gentleness *n.* कुलीनता *f*, अभिजात्य *n.* २ गरिबी *f*, धिमाई *f*, नरमाई *f*, भलाई *f*, माधुर्य *n*, संथपणा *m*, शांति *f*, शांतस्वभाव *m*, शांतवृत्ति *f*, सौम्यवृत्ति *f*, सौम्यप्रकृति *f*, स्वभावमार्दव *n.* ३ नरमाई *f*, मंदी *f*, मृदुता *f*, कोमलता *f*, सौम्यता *f*, मांद्य *n.* ४ हलकेपणा *m*, &c. Gent'ly *adv.* धिम्मेपणानें, संथपणानें, नरमाईनें, सौम्यरीतीनें, शांतवृत्तीनें. २ हलक्यानें, धीरेधीरे, हळूच, आस्तेआस्ते. Gent'rice *n.* सुकुलजन्म *m* or *n.* The gentle craft जोडे करण्याचा धंदा *m.* The gentle sex स्त्रीजाति *f.* Gen'tleman *n. a man well-born, one of good family, one above the condition of a yeoman* गृहस्थ *m*, सज्जन *m*, सुजन *m*, सुमनुष्य *m*, सभ्यगृहस्थ *m*, सभ्यजन *m*, सभ्यपुरुष *m.* २ *one of gentle or refined manner, a well-bred man* चालीरीतीचा -सुशिक्षित मनुष्य. ३ ( *her.* ) *one who bears arms but has no title* उमरावांची पदवी नसतांना जवळ हत्यारें वागवणारा मनुष्य *m.* ४ *the servant of a man of rank* अमीरउमरावाचा चाकर *m.* ५ *a man irrespective of condition* ( used esp. in *pl.* in addressing men in popular assemblies ) सभ्य गृहस्थ *m*, सद्गृहस्थ *m.* Gentlemen-at-arms राजदरबाराच्या वेळीं येणाऱ्या सभ्यगृहस्थांची टोळी *f* -समाज *m.* Gen'tlemanhood, Gen'tlemanship *n.* गृहस्थपणा *m*, सभ्यपणा *m.* Gen'tlemanlike *a.* सद्गृहस्थास शोभण्यासारखा. Gen'tlemanliness *n.* सभ्यपणा *m.* Gen'tlemanly *a.* सभ्य, चालीचा, रीतीचा, सुजनवृत्ति, सौजन्यवृत्तीचा, सभ्याचारसंपन्न, शिष्टाचारसंपन्न. २ *becoming a gentleman* गृहस्थगिरीचा, शिष्ट, सभ्य, गृहस्थी, सौजन्याचा, सभ्याचाराचा, शिष्टाचाराचा, गृहस्थास योग्य, गृहस्थोचित, गृहस्थाई, सभ्योचित. Gen'tle-woman *n. fem.* कुलवधू *f*, सभ्य स्त्री *f*, कुलीन स्त्री *f.* Gen'tle womanliness *n.* Gen'tlewomanly *a.* सुशील स्त्रीस शोभणारा.

Gentry ( jen'-tri ) [ O. Fr. *genterise*, another form of *gentilis*, rank. ] *n. people of education and good breeding* आर्य-शिष्ट लोक *m. pl.* कुलीन -जन *m. pl.*, गृहस्थलोक *m. pl.* २ ( In England, in a restricted sense ) *those between the nobility and yeomanry* उमराव आणि शेतकरी यांच्या मधील वर्गांचे लोक *m. pl.*, मध्यम वर्गांचे लोक *m. pl.*, मध्यमवर्ग *m.* ३ (*obs.*) ( *shakes.* ) *courtesy, civility* नम्रता *f*, विनय *m*, सुजनता *f*, सौजन्य *n*, सभ्यता *f.*

Genu ( je'-nu ) [L., Sk. जानु, the knee.] *n.* Genua *pl. anat. the knee* गुढघा *m*, ढोंपर *n*, जानु *n* (S.). २ *the knee-like bend in the anterior part of the callosum of the brain* जानुवक्र *m.* Genuflect' [ L. *genu*, & *flecto* (*flexum*) to bend.] *v. i. to bend the knee, as in worship* ( प्रार्थनेच्या वेळीं ) ईश्वरापुढें गुढघे टेंकणें -वांकवणें. Genufle'ction गुढगे टेंकणें *n.*

Genuflection, See under Genu.

Genuine ( jen'-ūin ) [L. *gignere*, Sk. जन्, to beget, to be born.] *a. belonging to, or proceeding from, the original stock; native* अस्सल -खऱ्या बीजाचा-हाडाचा. २ (hence) *not spurious, not counterfeit, real, pure* खरा, अस्सल, सत्य, अकृत्रिम, चोख, निष्कपट, यथार्थ, स्वाभाविक, शुद्ध, अमिश्रित, निर्व्याज (S.). Genui'nely *adv.* Gen'uineness *n.* अस्सलपणा *m.* २ निष्कपटपणा *m*, खरेपणा *m.*

Genus ( jē'-nus ) [ L. *genus*, ( *gen*, *generis*, for *genesis* ) kin or race, Sk. जन्, to beget. ] *n.* Genera *pl.* ( *logic* ) *a class of objects divided into several subordinate species, a class more extensive than a species* जाति *f*, जात *f*, वर्ग *m*, परजाति *f*, परसामान्य *n.*

*N. B.*—Genus = जाति, परजाति, परसामान्य. Species = उपजाति, अपरजाति, अपरसामान्य.

Geocentric, -al ( jēō-sen'-trik,-al ) [ Gr. *geo*, Sk. ज्यां, the earth, and Gr. *kentron*, Sk. केंद्र, centre. ] *a. astron. having the earth for its centre* भूकेंद्रीय, भूगत. २ *in relation to, or seen from, the earth* ( usually opposed to *heliocentric* = as seen from the sun ); *measured from the earth* पृथ्वीपासून घेतलेला -पाहिलेला, पृथ्वी मध्य कल्पून मोजलेला.

Geography ( jē-og'ra-fi ) [ Fr. –L. –Gr. *geographia* - *geo*, the earth, and *graphe*, a description. ] *n. the science which describes the earth and its inhabitants* भूगोलविद्या *f* -शास्त्र *n*, भूगोलवर्णन *n.* २ *a treatise on this science* भूगोल *m*, भूगोलाचें पुस्तक *n.* Geog'rapher *n.* भूगोलवेत्ता-ज्ञ. Geograph'ic, -al *a.* भूगोलीय, भूगोलशास्त्रविषयक-संबंधी. Geograph'ically *adv.* भूगोलाच्या दृष्टीनें.

Geology ( jē-ol' - o-ji ) [ Gr. *geo*, the earth, and *logos*, a discourse. ] *n. the science that treats of the structure and history of the earth, of the*

*changes it has undergone, and their causes and of the plants and animals imbedded in its crust* भूगर्भशास्त्र *n*, मृदावरणशास्त्र *n*, भूस्तरशास्त्र *n*. Geologer, Geolo'gian, Geol'ogist *n*. मृदावरणज्ञ, भूस्तरशास्त्री, भूगर्भशास्त्रविद्-वेत्ता-ज्ञ. Geolog'ic, -al भूगर्भीय, भूस्तरीय. Geolog'ically *adv*. Geologize *v. i. to study geology* भूस्तरशास्त्राचा अभ्यास -व्यासंग करणें, भूस्तरशास्त्रीय शोध लावणें -वादविवाद करणें.

Geomancy ( jē'o-man-si ) [ Fr. *geomancie* –Gr. *geo*, the earth, and *manteia*, divination. ] *n. divination by figures or lines drawn on the earth* जमिनीवर रेघा किंवा आकृति काढून शकुन पाहण्याची विद्या *f*, एक प्रकारचीरमलविद्या *f*. भूरमलविद्या *f*. Ge'omancer *n*. भूरमलविद्या जाणणारा.

Geometry ( jē-om'e-tri ) [ Gr. *geo*, the earth, and *metron*, a measure. ] *n. the science which treats of the properties and relations of magnitudes, the science of the relations of space* भूमिति *f*, रेखागणित *n*. -गणना *f*. २ *a treatise on this science* भूमिति *f*, भूमितीचें पुस्तक *n*. Geom'eter, Geometri'cian *n*. भूमितिज्ञ, रेखागणिती -गणित्या -गणक. Geomet'ric, -al *a*. भूमितीय, रेखागणिताचा. Geometrically *adv*. भूमितिशास्त्रप्रमाणें.

Georgic, Georgical ( jor'-jik, -al ) [ L. *georgicus*, Gr. *georgikos*, *georgia*, agriculture -Gr. *geo*, the earth, and *ergon*, work.] *a. relating to agriculture and rural affairs* शेतवाडीसंबंधीं, जानपदीय, ग्राम्य ( *lit.* ). Geor'gic *n. a rural poem* कृषिकर्मविषयक काव्य *n*.

Geranium ( jē -rā-ni'-um ) [ L., –Gr. *geranion* -*geranos*, a crane. ] *bot. n*.एक फूलझाड *n*.

Germ (jerm) [ Fr. *germe* -*germen*, a bud.] *n. boil. the earliest form under which an organism appears, that which is to develop a new individual* अंकुर *m*, कोम *m*, मोड *m*, कोरक *m*. मूलपिंड *m*. २ ( *fig.* ) *origin, first principle* मूलप्रकृति *f*, बीज *n*, मूळ *n*. Ger'micide *a. destructive to germs* जंतुनाशक. G. *n*. जंतुकुठार *m*. Ger'minal *a*. मूलांकुरगत, मूलांकुरात्मक, मूलांकुराचा, बीजाचा. २ मूलांकुरसदृश, मूलांकुरासारखा. ३ मूलांकुररूपी, बीजरूपी. ४ अप्रगल्भ. Germinate *v. i.* (-ला ) अंकुर फुटणें, (-ला ) मोड येणें. G. *v. t.* अंकुररूपानें वाढवणें. Ger'minating *pr. p.* & *v. n.* अंकुर फुटणें *n*. २ मोड *m*, अंकुर *m*, &c. Ger'minated *pa. t.* & *pa. p.* मोड आलेला, अंकुर फुटलेला. Germina'tion *n*. अंकुरोद्भव *m* -उद्भवन *n*. Ger'minative *a*.

*N. B.*:—Germ = कोणत्याही सेंद्रिय प्राण्याचा मूल अंकुर *m*. Sperm = पुरुषजातीच्या प्राण्याच्या शरीरांतील अपत्योत्पादक धातु किंवा प्रवाही पदार्थ, रेत, धातु; स्त्रीजातीच्या अपत्योत्पादक धातूला रज (रजस्) म्हणतात. पुरुषवीर्यांतील जंतूला 'रेत' व स्त्रीवीर्यांतील जंतूला रजस् असें म्हणतात. ह्या दोहोंच्या संयोगानें जो मूलबीजरूपी सूक्ष्म प्राणी उत्पन्न होतो त्यास germ असें म्हणतात.

German ( jer'-man ) [ Fr. *germain*, –L. *germanus*, full, own, prob. for *germinanus* -*germen*, bud, origin. ] *a. nearly related, closely akin* जवळचा नातेवाईक, जवळच्या नात्याचा, सगावाला, जवळ जवळ सारखा, सनाभि, संपृक्त. Germane' *a.* ( *lit.* ) *near akin* जवळच्या नात्याचा. २ ( *hence* ) *appropriate, relevant* युक्त, योग्य, उक्त, उचित, सुसंगत, जुळता, मिळता, मेळ घालतां येण्यासारखा, संबद्ध. Brother german, see under Brother. Cousins german, see under Cousin.

German ( jer' -man ) [ L. *girmani*, variously given as meaning 'The shouters,' from Celt, *gairm*, a loud cry.] *a*. जर्मनीमधील, जर्मनीचा, जर्मन. G. *n*. जर्मन *m*, जर्मनी देशांतील रहिवाशी. २ जर्मनभाषा *f*. ३ एक प्रकारचा नाच *m*. German-silver *n*. जर्मन-सिल्व्हर नांवाची धातु *f*. Ger'manize *v. t.* जर्मनरूप देणें, जर्मन तऱ्हेवर -पद्धतीवर नेणें, जर्मन करणें. Germaniza'tion *n*. जर्मनीकरण *n*. German'ic *a*. जर्मन देशाचा,जर्मनीचा. German'ism *n. an idiom of the German language* जर्मनसंप्रदाय *m*, जर्मन भाषेंतील वाक्संप्रदाय *m* -भाषासंप्रदाय *m*. २ जर्मनपणा *m*. ३ *a characteristic of the Germans* जर्मन लोकांचा विशेष गुण *m*, जर्मनत्व *n*.

Gerund ( jer' -und ) [ L. *gerundium*, *gerere*, to carry -*gerundus*, that which is to be *done or carried on.* ] *n*. (*Lat. gram.*) धातुसाधित कृदंत *n*.

Gestation ( jes-tā'-shun ) [ Fr., –L. *gestatio* -*gesto*, *gestatum* -*gerere*, to carry. याचा मूळचा अर्थ "वस्त्र -अलंकार -परिधान -धारण करणें -आंगावर घेणें -घालणें" असा होता. परंतु सध्यां तो लुप्त झाला आहे.] *n. the act of carrying the young one in the womb* गर्भधारण करणें *n*. २ *pregnancy* गर्भधारण *n*, गर्भ -वहन *n*, गर्भारपणा *m*, गाभणपणा *m* (*of beasts only*). ३ *passive exercise* वाहनांत -वाहनावर बसून केलेला -घेतलेला व्यायाम *m* ; as, "*Gestation* in a carriage or in a boat has the same good effects but in a less degree." Ges'tant *a.* ( *R.* ) *bearing within, laden, burdened* पूर्ण, पूरित *or* भरित ( in comp.; as, अर्थपूर्ण -पूरित, रसभरित). ( Ges'tatory *a*. गर्भारपणांतील, गर्भारपणासंबंधीं. Period of gestation गर्भवृद्धिकाल *m*, गर्भावस्थाकाल *m*.

Gesticulate (jes-tik'ū-lāt) [L. *gesticulor*, *gesticulatus*, *gesticulus*, dim. of *gestus*, a gesture -*gerere*, *gestum*, to bear, to carry, to perform.] *v. i. to use postures, to make gestures while speaking* हावभाव *m. pl.* -अंगविक्षेप *m pl.* -अभिनय *m. pl.* &c. करणें, (बोलतांनी) चाळा -चेष्टा करणें, हातवारे करणें. Gesticula'tion *n*. *-the act.* हावभाव &c. करणें *n*. २ *a gesture* हावभाव *m*, अंगविक्षेप *m*, अभिनय *m*, अंगचेष्टा *f*. &c. ३ *antic tricks or motions* नखरा *m*, टिवल्याबावल्या *f. pl.* Gestic'ulator *n*. Gesticul'atory *a*. Ges'ture ...

(*obs.*) *manner of carrying the body* चाल *f.* २ *manual gestures* हातवारे *m. pl.*, हावभाव *m*, चेष्टा *f*, व्यापार *m*, भाव *m*, इंगित *n*. G. *v. t. to gesticulate*, which see. Gesture-language *n*. हावभावाची भाषा *f*, चेष्टानुगत भाषा *f*, सांकेतिक भाषा *f*. Ges'tureless *a*. अंगविक्षेपरहित, चेष्टारहित.

Gesture, see under Gesticulate.

Get (get) [A. S. *gitan*, to get.] *v. t. to procure, to obtain, to come by* मिळवणें *or* मेळवणें, संपादणें, जोडणें, हस्तगत -प्राप्त करून घेणें, पावणें, मिळणें, लाभणें, लाधणें, गावणें (these last five *with in. con.*). २ *Shakes. to beget* प्रसवणें, (-ला) जन्म देणें, आपल्या पोटीं संतान मागणें; as, "I had rather to adopt a child than *get* it." ३ *to learn, to commit to memory* (as a lesson; also with *up*) शिकणें, पाठ -तोंडपाठ करणें. ४ *Shakes. to prevail upon, to induce* वळवणें, (-चें) मन वळवणें, वश करून घेणें -करणें, कह्यांत आणणें. ५ *to procure to be, or to cause to be, in any state or condition* (with a following *participle*) घडवून आणणें, करावयास -व्हावयास लावणें; as, "*Get* it done." ६ *to betake, to remove* (in a *reflexive* sense) निघणें, चालणें, हालवणें; as, "*Get* thee out." To G. by heart *to commit to memory* पाठ करणें. To G. the better (*or* best) of *to obtain an advantage over* (-वर) सरशी करणें -मिळवणें, (-वर) ताण करणें, वरकडी करणें. To G. up *to cause to be established, to arrange* रचणें, तयार करणें, उपस्थित -सुरू करणें, (-ची) स्थापना करणें, मिळवून -घडवून-जुळवून आणणें. G. *v. i. to make acquisition, to receive accessions, to gain* (-ला) अधिकाधिक मिळणें, वाढणें, मिळवणें, (-ला) लाभ होणें; as, "We lose, they daily G." २ *to come to be, to become* (with a following *adv.* or *pa. p.* belonging to the subject of the verb) होणें, बनणें, (-शीं *or* -ला) येऊन पोंहचणें -पावणें; as, "To G. sober, awake, beaten, &c." To G. ahead *to advance* पुढें जाणें, आघाडी मारणें. २ *to prosper* भरभराटणें, तेजीस येणें, सरशी मारणें. To G. along *to proceed* चालणें. To G. a mile (or other distance) (-भर) चालून जाणें, आक्रमणें. To G. among *to come into the company of* (-मध्यें) येऊन पडणें -सांपडणें -बसणें. To G. asleep झोंपीं जाणें, झोंप येणें -लागणें *in. con. with* ला *of s.* To G. astray *to wander out of the right way* भडकणें, भलत्याच मार्गास लागणें -जाणें. To G. at *to reach* (-ला) पोंहचणें. To G. away with *to carry off, to capture* मिळवणें, जिंकणें. २ (hence) *to defeat* (-चा) पाडाव *m* -पराजय *m* -करणें. To G. back परत जाणें -येणें -फिरणें. To G. before पुढें जाणें -येऊन बसणें. २ मागें रेंगाळणें. (-च्या) मागें पडणें. To G. beyond (-च्या) पलीकडे जाणें, ओलांडून जाणें; as, "Three score and ten is the age of man, a few *get* beyond it." To G. clear *to be released* मुक्त होणें, मुक्ति करून घेणें, मुक्ति पावणें, मोकळा होणें, (संकट, भय, अटक, इ. कांतून) बाहेर पडणें, सुटणें, सुखरूप निघणें. To G. forward पुढें मजल मारणें. To G. home घरीं पोंचणें. २ *to arrive at one's goal or aim* उद्दिष्ट स्थलीं येऊन पोंचणें, नेम साधणें. To G. into (a) *to enter* (-आंत) जाणें -प्रवेश करणें. (b) *to pass into, to reach* येऊन पोंचणें, (-शीं) येऊन प्राप्त होणें. To G. lose *or* free *to disengage one's self* (आपली) मुक्तता करून घेणें, सोडवून घेणें, मोकळा होणें, &c. To G. near (-शीं) येणें, (-च्या) जवळ येणें -जाणें. To G. on पुढें जाणें. २ (-चें) चालणें; as, "How do you *get on*." To G. over (a) *to surmount, to overcome* ओलांडणें, ओलांडून जाणें, (-तून) पार पडून जाणें. (b) *to recover from* (an injury or calamity) (-तून) वरा होणें, निभणें, निभावणें, बचणें, बचावणें, पार पडणें, वटावणें. To G. through (a) *to pass through* (something) (-च्या मधून) निघून जाणें. (b) *to finish* (what one was doing) संपवणें, पूर्ण -पुरें करणें, तडीस नेणें -लावणें. To G. up (a) *to rise* (as from bed) (झोंपेंतून) उठणें, जागें होणें. (b) *to ascend, to climb* (वर) चढणें. Get *n. progeny* प्रजा *f*, संतान *n*, उत्पत्ति *f*. G.-penny *n*. (*colloq.*) *a successful affair* फायदेशीर धंदा *m*, फत्ते काम *n*. Get'ter *n*. Get'ter-up *n*. (*colloq.*) तयार कराणारा, बनवणारा, उपस्थित -चालू -सुरू इ० करणारा. Get'ting *pr. p.* and *v. n. the act.* मिळवणें *n*, &c. २ *acquisition* फायदा *m*, मिळकत *f*, &c. Get up *n*. (*colloq.*) *make-up, style* बनावट *f*, पद्धत *f*, तऱ्हा *f*, रचणी *f*, रचना *f*, &c. Got *pa. t.* Got'ten *pa. p.*

Geyser (gī'-sėr) [Icel. *geysa*, to gush.] *n. a boiling spring* कढत पाण्याचा झरा *m*, उन्हाळें *n*.

Ghastly (gĭst'-li) [M. E. *gastly*. Formed from M. E. *gasten*, A. S. *gaesten*, to terrify.] *a. like a ghost in appearance, pale, dismal* प्रेतकळा आलेला, मुड(र)द्यासारखा, प्रेतकळेचा, मढेकळेचा, प्रेतच्छायेचा, मुडासारखा, प्रेत-मृतवत्, भेसुर, फिक्का, विवर्ण (S.). २ *horrible, shocking, dreadful* भयंकर, विक्राळ, क्रूर, भयानक, बिकट. Ghast'fully *adv.* Ghast'ly *adv.* Ghast'liness *n*. मढेकळा *f*, प्रेतकळा *f*.

Ghat, Ghaut (ghawt) [Hind. *ghat*, (घाट) a passage or gateway.] *n. a pass through a mountain* डोंगरांतील -पर्वतांतील वाट *f* -मार्ग *m*, घाट *m*. २ *a range of mountains* पर्वतांची रांग *f* -ओळ *f*, घाट *m*. ३ *stairs descending to a river* (नदीला, तलावाला, इ० बांधलेला) घाट *m*, (नदींत, इ०) उतरण्याकरितां केलेल्या पायऱ्या *f. pl.*, घाट *m*.

Ghee (ghē) [The Indian name.] *n*. तूप *n*, घी *n*.(*Guj.*)

Ghost (gōst) [A. S. *gast*; Ger. *geist*. Of uncertain origin; perhaps allied to Icel. *geisa*, to rage (like

*for its Christian training and instruction* ख्रिस्ती धर्मपिता *m.* ख्रिस्ती लोकांत लहान मुलांस बाप्तिस्मा देतांना त्यांच्या पुढील धर्मशिक्षणासंबंधानें आपल्यावर जो जबाबदारी घेतो तो *m.* God'-fearing *a. having reverential and loving feeling towards God, religious* देवास भिणारा, ईश्वरास भिऊन वागणारा. God'-head *n. divine nature or excellence* देवपण *n*, देवपणा *m*, देवत्व *n*, देवांश *m*, ईश्वरी अंश *m*, दैविक गुण *m.* २ *the Supreme Being* ईश्वर *m*, परमेश्वर *m*, परमेश *m*, परमात्मा *m*, देवाधिदेव *m.* See God *n.* २. God'-hood *n.* देवपणा *m.* God'-less *a. impious, wicked* (देवाचें भय न बाळगतां) अनीतीनें वागणारा, पापचारी, अधर्मी, पापी (नास्तिक किंवा ईश्वराचें अस्तित्व न मानणारा is Atheist). God'lessly *adv.* God'lessness *n.* पापचारित्व *n.* God'like *a. resembling god, divine* ईश्वरासारखा, दैविक, ईश्वरी, अमानुष. २ (hence) *pre-eminently good* अलौकिक, असाधारण, अत्युत्तम, सर्वोत्तम, सर्वोत्कृष्ट, श्रेष्ठ, सरस, दैविक. ३ *of divine form* देवरूपी, देवस्वरूपी. ४ *appropriate to God* ईश्वरयोग्य, ईश्वराला अनुरूप. God'likeness *n.* God'lily *adv. righteously* नेकीनें, सन्मार्गानें. God'liness *n. piety* ईश्वरभक्ति *f*, ईश्वरनिष्ठा *f*, ईश्वरपरायणता *f*, भक्ति *f*, परमार्थबुद्धि *f*, धर्मबुद्धि *f.* God'ling *n. a. diminutive god* दैवत *n.* God'ly *a. pious, righteous, devoted* (said of persons) ईश्वरनिष्ठ -भक्त -परायण, धर्मनिष्ठ -भक्त -परायण, धार्मिक, पवित्र, शुद्ध, निर्मळ, सरळ, सदाचरणी, पारमार्थिक. २ (said of things) नेकीचा, ईश्वरनिष्ठेचा &c. God'ly *adv.* भक्तीनें, भक्तिपुरःसर. God'-mother *n. a woman who becomes sponsor for a child in baptism* ख्रिस्ती लोकांत लहान मुलांस बाप्तिस्मा देतांना त्यांच्या पुढील धर्मशिक्षणाची जबाबदारी जी आपल्या आंगावर घेते ती *f*, ख्रिस्ती धर्ममाता *f.* God'send *n. an unexpected acquisition or piece of good fortune* (जणूं काय) ईश्वरानें (पाठवून) दिलेला लाभ *m*, अचिंत्य लाभ *m.* God'ship *n. the rank or character of a god* देवपण *n*, देवपणा *m.* २ *a god or goddess* देव *m*, देवता *f*, &c. God'son *n.* ख्रिस्ती धर्मपुत्र *m.* God'speed [A contraction of the phrase "*God speed you*"; written also as two separate words.] *n. success* जय *m*, यशप्राप्ति *f.* २ *prosperous journeying* निर्विघ्न -सुखकर प्रवास *m*, प्रवास सुखकर होणें *n.* God'-ward *adv. toward God* ईश्वराकडे.

Go-down (gō-doun') [Corruption of Malay *gadong*, warehouse.] *n. a warehouse* वखार *f*, जिन्नसखाना *m*, गोदाम or गुदाम *m* or *n*, गुदांव *n.*

Goggle (gog'-gl) [Prob. related to Ir. and Gael. *gog*, a nod.] *v. t. to roll the eyes, to stare* डोळे फिरविणें -वटारणें, वटारून -टवकारून पाहणें. G. *a full and rolling* (said of the eyes) बटबटीत, गटगटीत, वटवटीत, गरगरीत, भोकरासारखे (डोळे *m. pl.*). G. *n.* (a) *a strained or affected rolling of the eye* (मुद्दाम) डोळे वटारणें *n* -फिरविणें *n* -गरगरवणें *n.* २ *pl.* (a) *a kind of spectacles for protecting the eyes from cold, dust, &c.* झांकणें असलेला बटबटीत कांचेचा चष्मा *m*, झांपणी चष्मा *m.* (b) *coloured glasses for relief from intense heat* (उन्हाचा त्रास होऊं नये म्हणून डोळ्यांस लावण्याचा) रंगीतभिंगांचा उन्हाळी चष्मा *m* -आरशी *f.* (c) *a disk with a small aperture, to direct the sight forward, and cure squinting* (दृष्टि तिरवी न जातां समोर दिसावें म्हणून लहान भोंक) छिद्र असलेलें कांचबिंब *n* -वाटोळी कांच *f.* (d) *any screen or cover for the eyes, with or without a slit for seeing through* (डोळ्यांवर घालण्याचा भोंकाचा अथवा बिनभोंकाचा) बटबटीत चष्मा *m*, डोळे झांकण *n* -झांपण *n*, अक्षिपटल *n.* Gog'gled *a. prominent, staring* (as the eye) बटबटीत, वटवटीत, गटगटीत, वटारलेला, टवकारलेला (डोळा *m.*). Gog'gle-eyed *a.* बटबटीत -गटगटीत डोळ्यांचा, वटारलेल्या डोळ्यांचा, डोळे वटारलेला.

Goglet (gog'-let) [Port. *gorgoleta.*] *n. a water cooler, an earthen jar for cooling water by evaporation* सुजा *m*, (पाणी गार करण्याचा मातीचा) चंबु *m* -गिंडी *f*, (मृण्मय) अपकरा *m.*

Goiter, Goitre (goi'-tėr) [Fr. *goitre* –L. *guttur*, throat.] *n. med. an enlargement of the thyroid gland, on the anterior part of the neck;* गळ्यांतील ढालेसारख्या गांठीची वाढ *f.* Goi'tered, Goi'tred *a. affected with goiter* ढालेसारख्या गांठीची वाढ झालेला. Goi'trous *a.* (a) *pertaining to goiter* ढालेसारख्या गांठीच्या वाढीसंबंधीं, (b) *of the nature of goiter* ढालेसारख्या गांठीच्या वाढीसारखा.

*N. B.*—मन्यास्तंभ is not Goitre but it is Wryneck or Stiffneck.

Gold (gōld) [A. S. & Ger. *gold* & Dut. *goud* (for *gold*), Icel. *gull*, Swed. & Dan. *guld.*] *n. one of the precious metals much used for coin* सोनें *n*, सुवर्ण *n*, कनक *n*, कांचन *n*, हिरण्य *n*, हेम *n*, स्वर्ण *n*, जांबूनद *n.* [ALLOYED G. भेसळ सोनें *n.* BETTER EVEN THAN G. सोन्याहून पिंवळा. COLOUR OF G. (AS APPEARING) ON HEATING IT ताव *m.* G. AND SUCH LIKE VALUABLES —COMPREH. or CARELESSLY सोनेंवानें *n*, सोनेंनाणें *n.* PURE (VERY PURE) G. बावनकशी -शंभर नंबरी -चोख सोनें *n.*] २ *money, riches, wealth* कनक *n* (as in कनक आणि कांता), पैसा *m*, धन *n*, द्रव्य *n*, दौलत *f*, पुंजी *f.* ३ *a yellow colour like that of gold* (सोन्यासारखा) पिंवळा रंग *m*, सोनेरी रंग *m*; as, "Flowers tipped with G." ४ (*fig.*) *something precious or pure* बावनकशी सोनें *n*

(*fig.*), चोख -शुद्ध -स्वच्छ -अमूल्य वस्तु *f*; as, " Hearts of G. " G. -amalgam *n. a mineral, found in Columbia and California, composed of gold and mercury* कोलंबिया व कॅलिफोर्निआ प्रांतांमध्यें सांपडणारी सोनें व पारा यांची मिश्रित धातु *f*, खनिज मिश्रधातु *f*. G. -beater *n. one whose occupation is to beat gold into gold leaf* सोन्याचे पत्रे ठोकून वर्ख करणारा, सोन्याचे पत्रे ठोकणारा. G.-beating *n. the art or process of reducing gold to extremely thin leaves, as by beating with a hammer* हातोड्यानें ठोकून सोन्याचा वर्ख करण्याची क्रिया *f* -प्रयोग *m* -कला *f*. G. blocking *n. printing with gold leaf, as upon a book cover, by means of an engraved block* (ग्रंथाच्या पुठ्ठ्यावर) कोरींव ठोकळ्यानें सोनेरी अक्षरें उठविणें *n* -छापणें *n*. G. -diggings *n. pl. the places, or region, where gold is found by digging in sand & gravel from which it is separated by washing* ज्या ठिकाणीं खणलें असतां वालुकामिश्रित सोनें सांपडतें ती सोनेरी रेतीची जागा *f*, सुवर्णपुलिन *n*. G. -dust *n*. सोन्याचे बारीक कण *m. pl.*, कनकपराग *m. pl.*, सोन्याची माती *f*. G. -end *n. a fragment of broken gold or jewelry* तोडलेल्या सोन्याचा तुकडा *m*. G.-end man *n*. (a) *a buyer of old gold or jewelry* आडगिऱ्हाइकी किंवा जुनें सोनें अथवा जडजवाहीर विकत घेणारा -खरेदी करणारा. (b) *a goldsmith's apprentice* शिकणाऊ -शिकाऊ -नवा -नवशिका सोनार *m*. (c) *an itinerant jeweller* (गांवोगांव) दारावर हिंडणारा -फिरणारा जवाहिऱ्या *m*, फेरीवाला जवाहिऱ्या *m* -मोतीवाला *m*. G. -fever *n. a popular mania for gold hunting* स्वर्णज्वर *m*, सोन्याच्या खाणी शोधून काढण्याचें वेड *n*. G. -field *n. a region in which are deposits of gold* सुवर्ण (खनि) प्रचुर प्रदेश *m* सोन्याचा प्रदेश *m*, सोन्याची खाण *f*. G.-finder *n*. (a) *one who finds gold* सोनें गाळणारा, झारेकरी *m*, झाऱ्या *m*. (b) (*obs.* and *low*) *one who empties privies* संडास साफ करणारा, झाडू, भंगी. G. -fish *n*. सोनेरी -पिंवळ्या रंगाचा एक मासा *m*, सोनेरी मासा *m*, सोनमासा *m*. G. -foil *n. thin sheets of gold, as used by dentists and others* सोन्याचा पातळ पत्रा *m*, बेगड *f*. दंतवैद्यांस यांचा उपयोग होतो. G.-lace *n. a kind of lace, made of gold thread* कशिद्याच्या कामाकरितां सोनेरी मुलामा चढविलेली तार *f*, सोन्याचा -सोनेरी छडा *m* -गोफ *m*, जर *f* (?). G. -latten *n. a thin plate of gold or gilded metal* सोन्याची किंवा सोन्याचा मुलामा असलेल्या धातूची तबकडी *f*. G. -leaf *n. gold beaten into a film of extreme thinness, and used for gilding &c.* (it is much thinner than *gold foil*) सोन्याचा वर्ख *m*, सोनेरी वर्ख *m*. G. -lode *n.* (*mining*) *a gold vein* (खाणींतील) सोन्याची शीर *f*. G. -mine *n*. सोन्याची खाण *f*, सुवर्णखनि *f* (S.). G.-mohur *n*.—the flowering tree गुलतुरा *m*, सोनतरवड *m*. २ सोन्याची मोहोर *f*. G.-nugget *n. a lump of gold as found in gold mining or digging* (खाणींत खणतांना सांपडलेला अशुद्ध धातुमिश्रित) सोन्याचा गट *m*. G. -plate *n. a general name for vessels, dishes, cups, &c. of gold* सोन्याचीं भांडीं *n. pl.*, स्वर्णपात्रें *n. pl.* G. shell *n.* (a) *a composition of powdered gold or gold leaf, ground up with gum water and spread on shells, for artist's use* (चितान्याच्या कामाची) सोनेरी शाई *f*. G. -size *n. a composition used in applying gold leaf* सोनेरी वर्ख चिकटविण्याची कांजी *f* -लुकण *n*. Gold'smith *n*. सोनार *m*, सुवर्णकार. —in contempt: सोनारडा, कथीलकुट्या, ठोकडा, ठोक्या. —in allusive and reproachful phraseology: देखतचोर, पश्यतोहर (S.), सुवर्णस्तेयी. [ Anvil of a G. for forming beads &c. ऐरण *f*, मणखुरा *m*. Burnisher of a G. नितळणा *m*. Business *or* art of a G. सोनारकाम *n*, सोनारकी *f*, सोनाराचा धंदा *m*. Furnace *or* chafing dish of a G. आगटी *f*, (*dim.*) आगटें *n*, बागेसरी *f*. Hammer of a G. घांट्या *m*. Nippers *or* tongs of a G. सवाणा *m*, सांडस *m*, (*dim.*) सांडसी *f*. Some other implements of a G. are:—करडा, कंडारणें, कांकणा, तुला, दवकें, पानसळई *f*. ] G. solder *n. a kind of solder, often containing twelve parts of gold, two of silver, and four of copper* (बहुधा: १२ भाग सोनें, २ भाग रुपें, व ४ भाग तांबें यांचा) सोनें सांधण्याचा डांख *m*. G. -stick *n. the colonel of a regiment of English life -guards who attends his sovereign on state occasions* दरबारी स्वारीच्या वेळीं नेहमीं राजाच्या तैनातींत हजर राहणारा इंग्रजी प्राणरक्षक फलटणीचा कर्नल *m*. G. thread *n*. (a) पिंवळ्या रेशमी दोऱ्यावर सोन्याची तार गुंडाळलेली जर *f* or *m*., जरतार *f* (b) *bot.* एक जातीचा पिवळ्या रंगाचा रोपा *m*. ह्याचीं मुळें पिवळीं -सोनेरी रंगाचीं -असल्यामुळें त्यास हें नांव पडलें आहे. G. -tissue *n. a tissue interwoven with gold thread* जरीचें वस्त्र *n* जरीचा -कपडा *m*, जरतारीनें विणलेला कपडा *m*. G. -tooling *n. the fixing of gold leaf by a hot tool upon book covers, or the ornamental impression* हत्यारानें सोनेरी नकशी काढणें *n*. (b) हत्यारानें ग्रंथांच्या मलपृष्ठावर काढलेली सोनेरी नकशी *f*. G. -washings *n. pl. places where gold found in small gravel is separated from lighter material by washing* सोनें गाळण्याची जागा *f* -भट्टी *f*. Jeweller's G. (३ भाग सोनें व १ भाग तांबें मिळून कोंदणाकरितां, जवाहिऱ्याचें सोनें *n*. Gold'en *a. made of gold, consisting of gold* सोन्याचा, सोनेरी, सुवर्णाचा, सुवर्णमय, सुवर्णात्मक -संबंधीं, सौवर्ण, कनकमय, हैम. २ *having the colour of gold* सोनेरी रंगाचा, सोनेरी, पिंवळा, सुवर्णरंगी. ३ *very precious, highly valuable* सोन्याचा (*colloq.*)

सुवर्णतुल्य, लाख रुपयांचा, लाख रुपये किंमतीचा, सोन्यासारखा. ४ *eminently auspicious, excellent* शुभ, शुभकर, शुभावह, अतिमंगल, सोन्याचा; as, "A G. day." Golden age (*a*) *the fabulous age of primeval simplicity and purity of manners in rural employments* (followed by the *silver*, *bronze* and *iron ages*) सत्ययुग *n*, रामराज्य *n* (*fig.*). (*b*) (*Roman literature*) *the best part* (B. C. 81-A. D. 14) *of the classical period of Latinity* रोमन वाङ्मयाच्या उत्कर्षाचा -भरभराटीचा काळ *m.* (इ० स० पूर्वी ८१ पासून इ० स० १४ पर्यंतचा), (*c*) (hence) *that period in the history of a literature &c., when it flourishes in its greatest purity or attains glory* उत्कर्षाचा -भरभराटीचा -वैभवाचा काळ *m*; as, "The Elizabethan age has been considered the *Golden age* of English Literature." Golden gang *n.* सोनेरी टोळी *f.* Golden grease *n.* (*slang*) *a bribe*, लांच *m.* Golden mean *n. moderation, sufficiency without excess* विवेक *m*, हद्दींत राहून -मर्यादा राखून काम करण्याचा गुण *m*, नेमस्तपणा *m.* Golden rule of conduct (*a*) नीतीचा -व्यवहाराचा उत्तम नियम *m.* (*b*) *the rule of doing as we would have others do to us* दुसऱ्यांनीं आपणाशीं जसें वागावें असें वाटतें तसें दुसऱ्यांशीं वागून राहण्याचा नियम *m.* (*c*) *the rule of proportion, the rule of three* त्रिराशी *f*, त्रैराशिक *n.* Golden wasp *n.* सोनमाशी *f.*

Golf (golf) [Ger. *kolben*; Swed. *kolf*, a club, a butt end.] *n.* (*Scot.*) *a game played with a small ball and a bat or club crooked at the lower end. He who drives the ball into each of a series of small holes in the ground and brings it into the last hole with the fewest strokes is the winner* एका खेळाचें नांव आहे. गॉल्फ नांवाचा खेळ *m.* वांकड्या दांडूचा चेंडूखेळ *m.* Golf'er *n.* गॉल्फ खेळ खेळणारा.

Golosh same as Galoche which see.

Gomphosis (gom-fō'-sis) [Gr. *gomphos*, a nail —*gomphios*, a tooth.] *n. anat. a form of union or immovable articulation where a hard part is received into the cavity of a bone, as the teeth into the jaw* (शरीरांतील अवयवांचा) दृढ -अचल संधि *m*, (specif.) दन्तधर संधि *m.*

Gondola (gon'dō-la) [It., a dim. of *gonda* —Gr. *kondu* -a drinking-vessel, said to be a Pers. word.] *n. a long, narrow boat with a high prow & stern, used in the Canals of Venice* वेनीसमधील एक तऱ्हेची लांब होडी *f.* Gondolier' *n. a man who rows a gondola* गांडोला होडीचा वल्हेकरी.

Gone *pa. p.* of Go.

Gong (gong) [Malayan *gong*. the gong] *n. an instrument, first used in the East, made of an alloy of copper and tin, shaped like a disc with upturned rim and producing, when struck, a harsh resounding noise* (थाळीसारखा) तास *m*, [PERSON APPOINTED TO STRIKE A G. घड्याळजी. तासजी. STICK, &c. TO STRIKE A G. टिपरूं *n.*] २ *mach. a flat saucerlike bell, rung by striking it with a small hammer which is connected with it by various mechanical devices* आपोआप वाजणारें तासासारखें घंटायंत्र *n*, Gong-metal *n. an alloy* (78 parts of *copper* and 22 of *tin*) *from which oriental gongs are made* तास करण्याची मिश्रधातु *f.* हिच्यामध्यें ७८ भाग तांबें व २२ भाग कथिल असतें.

Gonitis (go-n'ī-tis) [Gr. *gonu*, knee & *itis*, inflammation.] *n. med. inflammation of the knee joint*, गुडघ्यांतील त्वचांचा अभिष्यंद व दाह *m*, क्रोष्टुशीर्ष *n.*

Gonorrhea *or* Gonorrhœa (gon-or-rē'-ä) [Gr. *gonos*, semen, and *rhein*, to flow.] *n. med. a contagious inflammatory disease of the genito-urinary tract affecting especially the urethra and vagina, and characterised by a muco-purulent discharge, pain in urination and chordee* परमा *m*, पूपरमा *m*, परमें *n*, पूयप्रमेह *m* Gonorrhe'al, Gonorrhœ'al *a. med.* पूपरम्याचा -संबंधीं, पूयप्रमेहविषयक.

*N. B.*:—Gonorrhœa is पूयप्रमेह or पूपरमा or simply परमा but not simply प्रमेह which is excessive urination.

Good (gōōd) [A. S. *god*, closely akin to Dut. *goed*, Ger. *gut*; Icel. *god.*] *a. possessing desirable qualities, useful, serviceable, not bad* चांगला, बरा, उत्तम, (loosely) चोख, चोखट *or* चखोट, चोखवेश, खासा, बरवा, ठीक, चालण्यासारखा, उपयोगीं पडण्यासारखा, टाकाउ नव्हे असा, हित. [EXTREMELY *or* SUPERLATIVELY GOOD लाखरुपयांचा (*colloq.*), लाख्या, बावनकशी, उत्तमोत्तम. THE G. AND THE BAD बरें वाईट *n*, चांगलें वाईट *n*, सारासार *n*, सदसत् *n.* CONSIDERATION OF THE GOOD AND THE BAD बऱ्यावाईटाचा -चांगल्या वाईटाचा विचार *m*, सारासारविचार *m*, सदसद्विचार *m.* DISCRIMINATION BETWEEN THE G. AND THE BAD सारासारविवेक *m*, सदसद्विवेक *m.* SEPARATING THE G. FROM THE BAD सारासारनिर्णय *m*, चांगल्या वाईटाची निवड *f*, क्षीरनीरविभाग *m.* PRETTY G. मध्यम, बऱ्यापैकी, बरा, बरासा. VERY G. नामी, वेश, खासा, पसंत, उत्तम. TO GIVE ONE AS G. AS HE BRINGS तोलास तोल *m.* देणें. TO SEEM G. UNTO (-च्या) उचितास -विचारास -पसंतीस -धर्मास येणें, (-ला) पसंत पडणें, पसंतीस उतरणें.] २ *virtuous, pious, religious* (said of persons or actions) चांगला, भला, नेकीचा, सत्वशील, सत्वसंपन्न, सात्विक, सत्वस्थ, सत्ववृत्ति, सद्वृत्ति, धार्मिक, धर्मिष्ठ, साधुवृत्ति, सत् (in comp.; as, सत्कर्म, सत्संग, सद्गुण, सद्धर्म, सन्मार्ग, सज्जन.) [G. (godly, virtuous, &c.) MAN सत्पुरुष, पुण्यपुरुष, पुण्यप्राणी, पुण्यात्मा, सुजन, सुमनुष्य,

सद्गृहस्थ. G. ( simple, mild, &c. ) MAN देवभोळा, भोळा -भावडा -सरळ मनुष्य, देवमाणूस, ईश्वरी पुरुष.] ३ *humane, well-disposed, benevolent, merciful, polite* ( often followed by *to.* or *toward;* also formerly by *unto* ) परोपकारी, उपकारी, मायाळू, दयाळू, मेहेरनजर ठेवणारा, ( गरिबाचा ) दाता, कनवाळू. ४ *suited, adapted, of use* ( followed esp. by *for* ) उपयोगी, कामास -उपयोगास पडणारा -येणारा, बेताचा, बेतवार, ठीक, योग्य, योग्यतेचा, पाहिजे तसा. ५ *skilful, dexterous* ( followed esp. by *at* ) चतुर, कुशल, पटाईत, वाकब, हुशार. ६ *competent, sound, valid* योग्य, ग्राह्य, साधार, उत्तम, विचारानें केलेला -दिलेला. ७ ( in a commercial sense ) *of unimpaired credit* लायक, अब्रूदार, पतीचा, पतवाला, भला, खबरदार (कूळ *n*), जिवट, वजनदार, पैसेवाला. ८ *real, actual, serious* ( as in the phrase *in good sooth* ) खरोखरीचा, खरा, वास्तविक, वाजवी, न्याय्य. ९ *not small or insignificant, considerable* ( as in the phrase '*a good deal*' ) बराच, बराचसा, जमेस धरण्यासारखा, क्षुल्लक नव्हे असा. १० *sound, strong, firm, substantial, having strength, or pith or spirit or virtue* कसदार, सकस, जीवदार, जिवट, दळदार, खबरदार, ससार, सतेज, सात्विक, ऐवजदार, धड, धडका. ११ *auspicious* शुभ, इष्ट, मंगल. [ -OF SIGNS, ASPECTS, SEASONS, &c. शुभ, शुद्ध, इष्ट, मंगल, सु ( IN COMP. AS सुकाल, &c. ). G. AND BAD शुभाशुभ, इष्टासुष्ट, खाडद्वाड. ] १२ ( pieces of money ) सणसणीत कोरा, सणसणीत, खणखणीत, निर्मळ. १३ *full, complete* पुरा, पूर्ण, सबंद, सगळा, भरून, भरपूर; as, "G. measure." १४ *fair, honourable, unsullied* ( as in the phrase *a good name* ) निष्कलंक, यशस्वी, कीर्तिवंत, मोठें -चांगलें ( नांव *n* ), थोर. For G. *or* for G. and all *completely and finally, fully, truly* निर्वाणीचा, शेवटचा, निकालाचा, संपूर्ण, पूर्णपणें, खरोखर. G. breeding *polite manners formed by education* ( सुसंवर्धनामुळें आलेलें ) सौजन्य *n*, सुशीलता *f*, सभ्यता *f*, सभ्यपणा *m*, विनय *m*. (S). G. cheap *reasonably cheap* ( *lit.* good bargain ) स्वस्त, किफायतीनें मिळणारा, फायदेशीर, बेताच्या किंमतीचा, फार महाग नव्हे असा, स्वल्पांतला, अल्पांत -थोड्यांत मिळालेला. Good folk *or* people *n. pl.* २ ( *colloq. Eng. and Scot.* ) *fairies, brownies, pixies, &c.* अप्सरा *f. pl.*, वनदेवता *f. pl.*, यक्षिणी *f. pl.* Good for nothing *a.* (a) *of no value, worthless* क्षुल्लक, बिन-महत्वाचा, बिनकिंमतीचा, निरुपयोगी, कुचकामी. (b) *an idle person* कुचकामी -निकामी -निरुद्योगी -निरुपयोगी -वशा -खाण्याला काळ (मनुष्य), अजागलस्तन *m* (*pop.*) अजागळ. Good Friday *n. the Friday of Holy Week, kept in some churches as a fast, in memory of Christ's passion or suffering* गुड्फ्रायडे *m*, खिस्ताच्या दुःखभोगाचा स्मरणदिवस *m*. Good humour *n. a cheerful state of mind* प्रसन्नता *f*, खुशमर्जी *f*, आनंदी वृत्ति *f*, आनंदी स्वभाव *m*, संतोषवृत्ति *f*. Good'-humoured *a.* आनंदी. Good'-looking *a.* देखणा, सुंदर, सुस्वरूप, सुरूप. Good'-nature *n. amiability* सुस्वभाव *m*, शांत -थंड -सौम्य -नम्र वृत्ति *f* -स्वभाव *m*, सुशीलता *f*, सालसता *f*, सालसाई *f*, सालसपणा *m*, भलाई *f*, भलेपणा *m*, सद्वृत्ति *f*, सुवृत्ति *f*. Good'-natured, Good'-tempered *a.* सुस्वभावाचा, सालस, सुवृत्ति. Good speed *n.* Same as *godspeed.* Good turn *n. a favour* प्रसाद *m*, कृपा *f*, मेहेरबानी *f*, उपकार *m*, अनुराग *m* (?), अनुग्रह *m*. Good'-will *n.* (a) *benevolence* सौमनस्य *n*, सदिच्छा *f*, कृपा *f*, अनुग्रह *m*. [ TO ACQUIRE THE G.-WILL OF (-ची) मर्जी *f* -अनुग्रह *m* -कृपा *f* संपादणें, (-च्या) पोटांत शिरणें (*fig.*). TO LOSE THE G. -WILL OF (-च्या) मर्जीतून -मनांतून उतरणें, कृपा गमावणें. TO PRESERVE THE G.-WILL OF (-ची) मर्जी *f* -मन *n*. राखणें -खूष ठेवणें. ] ( b ) ( law ) *the tendency of persons, old customers & others, to resort to an established place of business; the custom of any trade or business* एकदां धरलेलें व स्थायिक झालेलें दुकान न सोडतां त्याच ठिकाणीं आपलें खातें चालू ठेवण्याविषयींचा गिऱ्हाइकांचा कल *m* -इच्छा *f* -ओढा *m*. ( c ) *the advantage accruing from such tendency* कायम झालेल्या गिऱ्हाइकीपासून होणारा फायदा *m* -मिळणारा नफा *m*. In good time *adv.* (a) *opportunely, punctually* अगदीं वेळेवर -वेळेला, नेमक्या -ठरल्या वेळीं, योग्य वेळीं, सुवेळीं, बेतावर. (b) *mus. correctly, in proper time* तालशुद्ध, तालावर, ताल न चुकवितां, तालास धरून. To hold good *to remain true or valid* ( सारखेंच ) लागू पडणें, (-चा) अम्मल *m* -जोर *m* कायम राहणें. To make good ( a ) *to maintain* (वचन -शब्द इ०) राखणें, पाळणें, कायम ठेवणें, न बदलणें. २ *to indemnify, to supply* ( a defect or deficiency ) ( खोट *f* -तूट *f* -तोटा *m* -नुकसान *n* -हानि *f* &c. ) भरून देणें -काढणें, (-ची) भरपाई करण्याबद्दल कबुली देणें -भरपाई करणें, पुरें करून देणें. ३ *to prove or verify* ( as an accusation ) सिद्ध -शाबीत करणें -करून देणें -दाखविणें. ४ *to prove to be blameless, to clear, to vindicate* (-च्या वरील) दोष *m* -आरोप *m*-तोहमत *f* &c. नाहींशी करणें -उडवून टाकणें, निर्दोषी आहे असें सिद्ध करणें. To think good *to approve, to be pleased or satisfied with* पसंत करणें, मान्य करणें, (-ला) संमति देणें, बरा वाटणें, आवडणें *in.* *con.*, मर्जीस -पसंतीस -उचितास येणें -पडणें -असणें *in-con.*, *g of s.* N. B. :— '*Good*' in the sense of *wishing well*, is much used in greeting and leave-taking; as, "G. day, G. night, G. morning, G. evening." &c. Good या शब्दाचा उपयोग शुभचिंतनार्थी फार होतो. Good *n. that which possesses desirable qualities, promotes success, welfare, or happi-*

*ness, is serviceable, fit, excellent* ( oppo. to *evil* ) बरें *n*, हित *n*, चांगलें *n*, भलें *n*, श्रेय *n*, कल्याण *n*, श्रेयाची -कल्याणाची गोष्ट *f*, सुखाची -आनंदाची फायद्याची गोष्ट *f* -बाब *f*. [ FUGITIVE G. पळतें पीक *n*. THE SUPREME G. परमार्थ *m*. ] २ *advancement of interests, advantage, benefit* ( oppo. to *harm* ) फायदा *m*, लाभ *m*, हित *n*, श्रेय *n*, फल *n*, अबादी *f*, अबादानी *f*, चांगलें *n*, गुण *m*. ३ *weal, welfare, well-being* श्रेय *n*, कल्याण *n*, शुभ *n*, अभीष्ट *n*, हित *n*, बरें *n*. [ TO WISH *or* SEEK THE G. OF कल्याण -अभीष्टचिंतन *n*. &c. करणें *g. of o.*, बरें मागणें *with* ला *or* चा *of o.*, बऱ्यावर असणें *g. of o.* ] ४ *moral qualities, virtue* नेकी *f*, नीतिधन *n*, इमानीपणा *m*, सचोटी *f*, सद्गुण *m*, नीतिमत्ता *f*. ५ *pl.* ( a ) *wares* ( formerly used in the *sing.* in a collective sense ) माल *m*, मालमत्ता *f*, सामान *n*, सामानसुमान *n*, जिन्नसपान्नस *m*, जिन्नस *m*. [ GOODS TAKEN FROM A SHOP TO BE RETAINED *or* RETURNED AS MAY SUIT जांगड ( माल ). PERISHABLE GOODS लवकर नासणारा -नासाऊ माल *m*, नासकें केणें *n*, न टिकाऊ -टिकणारा माल *m*. ] ( b ) ( *in law* ) *a comprehensive name for almost all personal property as distinguished from land or real property* जंगम मिळकत *f*, चर द्रव्य *n*, चीजवस्त *f*. ( c ) *goods and chattel* मालमत्ता *f*, जिंदगी *f*, इळाखिळा *m*, चीजवस्त *f*. Goods-engine *n*. ( *Eng* ). *a freight locomotive* मालगाडीचें इंजन *n*. Goods-train *n*. ( *Eng.* ) *a freight train* मालगाडी *f*, माल नेणारी आगगाडी *f*. Goods-wagon *n*. *a freight car* मालगाडीचा डबा *m*, वाघण *f* ( *colloq.* ). G. *adv.* *well* ( esp. in the phrase *as good*, with a following *as* expressed or implied ), *equally well* तितकेंच चांगलें -उत्तम -ठीक. As G. as *virtually, the same as* सारखेंच, वस्तुतः एकच, खरें पाहिलें असतां. G.-by *or* G.-bye *n*. or *interj*. ( a contraction of *good be with you* ) *fare well* ( a form of *address* used *at parting* ) सुखी ऐस !, स्वस्ति !, कुशल असो !, निरोप *m*. Good'ish *a*. *tolerable, rather good than the contrary* बऱ्यापैकीं, बरासा, चालण्याजोगा, चांगलासा, टाकाऊ किंवा वाईट नव्हे असा, मध्यम. Good'liness *n*. *grace, elegance, comeliness* साजरेपणा *m* &c., खुबसुरतपणा *m*, सौंदर्य *n*, लावण्य *n*, स्वरूपता *f*, खुमास *f*. Good'ly *a*. *pleasant* सुखकर, सुखाचा, आनंदाचा, सौख्याचा, आनंद -सुखदायक, खुष करण्याजोगा -करणारा, खुषकारक, समाधानकारक, मजेचा, रम्य. २ *comely, graceful* सुस्वरूप, सुंदर, गोरा, गोमटा, साजरा, गोजरा, गोजिरवाणा, देखणा, सुदर्शन, सुभावणा. ३ *large, considerable, portly* मोठा, भव्य, बराचसा, बहुतेक, पुष्कळसा; as, "A G. number." Good-man *n*. *obs. Shakes.* a familiar appellation of civility, equivalent to "My friend", "Good sir," ( sometimes used *ironically* ) भाई हो !, दोस्त हो !, भल्या माणसा !, शहाण्याच्या कांद्या ! ( *ironically* ). २ *the master of a house or family* घरकरी *m*, घरधनी *m*, घरचा मालक *m*, कारभारी, *m*, गृहस्थ *m*. Good'ness *n*. *excellence* चांगुलपणा *or* चांगलेपणा *m*, चोखटपणा *m*, गुण *m*, तेज *n*, सत्व *n*, सत्ता *f*, सौष्ठव *or* सौष्ठव *n*. २ *soundness, heartiness, pluck* कस *m*, सत्व *n*, जीव *m*, ऐवज *m*, वीर्य *n* (*pop.*) वीर *and* विरी *f*, तेज *n*, स्वारस्य *n*, जीवनपाणी *n*, दम *m*. ३ *purity, auspiciousness* शुद्धि *f*, शुभ *n*, शुभता *f*, शुद्धता *f*. ४ *virtue, benevolence* सद्गुण *m*, गुण *m*, उदारपणा *m*, औदार्य *n*, भलाई *f*, भलेपणा *m*, भलेपण *n*, नेकी *f*, साधुत्व *n*, साधुपणा *m*, साधुवृत्ति *f*, सत्व *n*. ५ *kindness* कृपा *f*, उपकार *m*, परोपकार *m*, अनुग्रह *m*, प्रसाद *m*, चांगुलपणा *m*, भलेपणा *m*, मेहेरबानी *f*, दया *f*, माया *f*. Good-wife *n*. *fem. the mistress of a house* गृहिणी *f*, घरधनीण *f*, घरकरीण *f*, घरचारिणी *f*, घरची कारभारीण *f*. Good-wife ( a low term of *civility* or *sport*) अवा *or* आवाजी *f*, आऊ *f*, बाई *f*. Goodygoody *a*. *colloq. exhibiting goodness with silliness* अतिशय मोळसर, सदोदित धर्माची किंवा नीतीची सबब पुढें आणणारा.

Goose ( gōōs ) [ A. S. *gos.*, pl. *ges* ( lengthened *o* caused loss of *n*, and *gos* = *gons, gans* ) -L. *anser* ( = *hans-er* ), Sk. हंस्. ] *n*. ( *pl.* Geese ) *any large web-footed bird like a duck but larger and stronger* हंस *m*, हंसी *f*, वरटी *f*. [ CRY OF THE G. *cackle* हंसनाद *m*. FLIGHT *or* FLOCK OF GEESE हंसमाला *f*. ] २ *any large bird resembling the common goose* हंसासारखा मोठा पक्षी *m*. ३ *a tailor's smoothing iron* ( so called from its handle which resembles the neck of a goose ) हंसी *f*, हंसाच्या मानेच्या आकाराची मूठ असलेली ) कपडा साफ -गुळगुळीत करण्याची शिंप्याची इस्तरी *f*. ४ *a silly creature* बेवकूब -मूर्ख माणूस, वेडगळ, अजागळ. ५ *a game played with counters on a board divided into compartments, in some of which a goose was depicted* एक हंसपटाचा खेळ *m*. हा खेळ खेळण्याच्या लांकडी पटावर जीं घरें पाडलेलीं असतात त्यांपैकीं कांहीं घरांत हंसाचें चित्र काढलेलें असतें. A wild goose chase *an attempt to accomplish something impossible of attainment* वेडगळ -निरर्थक प्रयत्न *m*, अशक्य गोष्ट सिद्धीस नेण्याकरितां तिला हात घालणें *n*, शशशृंगशोधन *n*. Goose-quill *n*. *a large quill of a goose, used as a pen* लिहावयाचें हंसाचें पीस *n*, हंसपक्ष्याच्या पिसाची लेखणी *f*. Goos'ery *n*. *a place for keeping geese* हंसपक्ष्यांचें खुराडें *n*, हंसशाला *f*. २ *silliness* मूर्खपणा *m*, आचरटपणा *m*, वेडगळपणा *m*. Gos'let *n*. dim. of *goose*. Gos'ling *n*. *a young or unfledged goose* हंसाचा बच्चा *m* -पिलूं *n*.

Gooseberry ( gooz' -berri ) [ Prof. Skeat says *goose-* is for *grose-* or *groise-*, which appears in O. Fr.

*groisele, grosele*, gooseberry. ] *n. bot. a thorny shrub of the genus Ribes* एक प्रकारचें कांटेरी झाड *n*, गूजबेरीचें झाड *n.* २ *the edible berries of such shrub* ( द्राक्षें, तोरणें यांसारखें ) गूजबेरीचें फळ *n*, गूजबेरी *n.* ३ *a silly person* मूर्ख, बैल, ( *fig.* & *contemptuous* ), नंदी, टोणपा, अजागळ.

Go-out ( gō'-out ) [ Go + out. ] *n. a sluice in embankments against the sea* ( ओहटीच्या वेळीं मोऱ्या व गटारें यांतील पाणी समुद्रांत सोडून देण्याची ) समुद्रकिनाऱ्याच्या धक्क्यांतील गोमुखी *f* -मोरी *f.*

Gopher ( gō'fėr ) [ Heb. ] *n. zool. one of several North American burrowing rodents of the general* Geomys, *and* Thomomys, *of the family* Geomyidæ ( called also *pocket gopher* and *pouched rat* ) जमिनींत बिळें करून राहणारा एक जातीचा उंदीर *m*, गोफर *m.* अमेरिकेंत एका विशेष जातीच्या कांसवाला किंवा सापालाही गोफर असें म्हणतात.

Gordian ( gord'yan ) [ The *Gordian knot* was a knot so tied by *Gordius*, king of *Phrygia*, that no one could untie it. ] *a. pertaining to Gordius, king of Phrygia, or to a knot tied by him* फ्रिजिआचा राजा जो गॉर्डिअस त्याच्यासंबंधीं, गॉर्डिअसनें बांधलेल्या -मारलेल्या गांठीचा -संबंधीं, गॉर्डिअसच्या गांठीसंबंधीं. २ ( hence ) *intricate* भानगडीचा, गुंतागुंतीचा, सोडविण्यास कठीण, त्रासाचा, त्रासदायक, डोकेफोडीचा, मुष्किलीचा, माराकुटीचा. Gordian knot *an intricate knot tied by Gordius in the thong which connected the pole of the chariot with the yoke* ( रथाचा दांडा व जोखड यांच्या सांध्याशीं ) गॉर्डिअसनें मारलेली गांठ *f.* ही गांठ सोडणारास एशिया खंडाचें स्वामित्व मिळेल असें भविष्य एकानें वर्तविल्यावरून आलेक्झांडर धी ग्रेट यानें ती सोडण्याचा प्रयत्न केला. परंतु तो सफळ होईना. यासाठीं ( एशिया खंड हातचें जाऊं नये म्हणून ) त्यानें ती आपल्या तरवारीनें तोडून टाकिली. २ ( hence ) *an inextricable difficulty* ब्रह्मगांठ *f*, पेंच *m*, मेख *f*, मखलाशी *f.* To cut the G. knot *to remove a difficulty by bold and energetic measure* मोठ्या धैर्यानें कठीण अडचणींतून -प्रसंगांतून पार पडणें, मखलाशी सोडविणें.

Gore ( gōr ) [ A. S. *gor*, blood, dung, dirt. ] *n. blood* रक्त *n*, रुधिर *n.* २ ( *esp.* ) *clotted blood* ( रक्तप्रवाह बंद झाल्यावर राहिलेलें ) गोठलेलें -घट्ट रक्त *n*, रक्ताचीं चकळें *n. pl.* G. *v. t. to pierce or wound* ( as with a horn ) ( रक्त येण्यासारखी जखम पडण्याइतकें शिंगानें ) भोंसकणें ( or भोसकणें ), भसकावणें, शिंग ( or गा ) टणें, शिंग मारणें, ( अणीदार हत्यार शरीरांत ) खुपसणें. Gor'ed *pa. t.* and *pa. p.* Gor'ing *pr. p.* and *v. n.* [ Scratch *or* mark of a G. खाकर *m.* ] Gor'y *a. covered with clotted blood* रक्तबंबाळ, रक्तानें भरलेला, रक्ताक्त. २ *bloody, murderous* रक्ताचा घोंट घेण्यास उत्सुक, खुनी, खुनशी, खून घेणारा, खून पाडणारा, घातकी, प्राणाशीं गांठ घालणारा; as, " G. emulation."

Gore (gōr) [A.S. *gara*, a projecting piece of land, from *gar*, a spear-point] *n. a triangular piece of cloth sewed into a garment, sail, &c.* कळी *f*, बच्चा *m* ( ? ), बगलपट्टी *f* ( of a shirt ), ( त्रिकोणाकृति ) कापडाचा तुकडा *m.* २ *a small triangular piece of land* जमिनीचा तिकोनी तुकडा *m* -पट्टी *f*, भूमित्रिकोण *m*, त्रिकोणभूमि *f.* G. *to cut in a triangular form* कळी *f* -तिकोनी तुकडा कापणें -काढणें. २ *to provide with a gore* ( -ला ) कळी *f.* लावणें, (सदऱ्याला) बगलपट्टी *f.* मारणें-लावणें; as, " To G. a shirt ".

Gorge ( gawrj ) [ O. Fr., -L. *gurges*, a whirl-pool, from its gaping appearance or voracity, applied to the gullet; akin to Sk. गर्गर, whirlpool -गॄ, to devour. ] *n. the throat, the gullet* गळा *m*, कंठ *m*, गल *m* ( S. ). २ *a narrow passage* अरुंद -चिंचोळा रस्ता *m* -मार्ग *m.* -वाट *f.* ३ *a defile between mountains* खिंड *f*, खिंडकुली *f* or -लें *n*, खेंड *f*, खिंडार *n.* ४ *that which is swallowed* ( esp. by a hawk or other fowl ) ( कोंबडीं, बदकें इ॰ पाळींव पक्ष्यांचें ) खाणें *n*, खाद्य *n.* ५ *a choking of a passage or channel by an obstruction* ( चोंदल्यामुळें ) रस्ता बुजून जाणें *n* -बंद होणें *n*, रस्ता चोंदणें *n.* ६ *full meal, glut* अभरवण *n* or *f*, भरपूर जेवण *n.* ७ (*naut.*) *the groove of a pulley* कप्याची खांच *f* -पन्हळी *f.* G. *v. t. to swallow with greediness* हांवरटपणानें -अधाशीपणानें -बकाबक खाणें -गट्ट करणें, अन्न पोटांत भरणें -खचणें -दडपणें, दपटून जेवणें, नळीचें वऱ्हाड करणें, आकंठ भोजन करणें -जेवणें, गळ्याशीं येई तों खाणें. G. *v. i. to eat greedily and to satiety* हांवरटपणानें ( पोट फुगे तों ) खाणें, आधाशीपणानें ( गळ्याशीं येईपर्यंत ) खाणें. Gor'ged *a. having a throat* सकंठ, कंठयुक्त. २ *glutted* अन्नाचा वीट आलेला, ठांसलेला, आकंठ भरलेला.

Gorgeous ( gawr'jus ) [ O. Fr. *gorgias*, beautiful, gaudy –*gorgias*, a ruff, Fr. *gorge*, the throat. ] *a. showy, fine, magnificent* झळकफळक, भपक्याचा, भडक, भव्य, जरक बरक, भळभळीत, घवघवीत, झळझळीत, भपकेदार, शोभायमान. Gor'geously *adv.* Gor'geousness *n.* भडक *f*, शान *f*, झळझळ *f*, झळझळाट *m.*

Gorget ( gawr'-jet ) [ See Gorge. ] *n. a piece of armour, whether of chain mail or of plate, defending the throat and upper part of the breast and forming a part of the double breast-plate of the 14th century* कंठत्राण *n*, पदक *n*, जुगणी *f.* २ *a small ornamental plate, usually crescent-shaped and of gilded copper* ( formerly hung round the neck of officers in full uniform ) ( अलंकारादाखल घालण्याचा ) गळ्यांतील अर्धगोलाकृति पट्टा *m*, मानपट्टा *m.* ( on the analogy of गळपट्टा, कमरपट्टा, &c. ). ३ *surg. a grooved instrument used in per-*

*forming various operations* ( called also *blunt gorget* ) ( शस्त्रक्रिया करण्याचें ) पन्हळीदार शस्त्र *n.* ४ *zool. a crescent-shaped, coloured patch on the neck of a bird or mammal* पक्ष्यांच्या मानेवरील रंगीत अर्धचंद्राकृति पट्टा *m*, ( पोपट इ० पक्ष्यादिकांच्या ) मानेवरील रंगीत कोर *f*.

Gorgon ( gor'gun ) [ L. *gorgon, gorgo* –Gr. *-gorgos*, grim. ] *n.* ( *Gr. myth.* ) *one of the three fabled sisters* ( Stheno, Euryale, and Medusa ) *with snaky hair and of terrific aspect, the sight of whom turned the beholder to stone. The name is particularly given to Medusa* ग्रीक लोकांच्या पुराणप्रसिद्ध स्थेनो, युरीयली, व मेड्यूसा अशा ज्या तीन बहिणी त्यांपैकीं एक *f*. यांच्या अंगावर सर्पासारखे केंस असून, चेहरा इतका भयंकर होता कीं त्यांच्याकडे पाहणारा निवळ पाषाण बनत असे. सदरहू तीन बहिणीपैकीं जी मेड्यूसा इजला हें नांव विशेषेंकरून लावलेलें आढळतें. २ ( *Milton* ) *any thing very ugly or horrid* कोणतीहि विकराळ -कद्रूपी वस्तु *f*, विकराळ स्वरूप *n*, विद्रूप मूर्ति *f*. Gor'gon, Gorg'onean, Gorgonesque', Gorg'onian *a. like a Gorgon, terrific* भयानक, विकराल, भयंकर. २ ( hence ) *very ugly* अगदीं विद्रूप, वेडाविद्रा, ओंगळ, घाणेरडा, बेढब.

Gorilla ( gō-rill'ä ) [ An African word. ] *n. zool. a large, arboreal, anthropoid ape of West Africa* पश्चिम आफ्रिकाखंडांतील मोठ्या जातीचा मनुष्यासारखा वानर *m*, माकड *m* or *n*, गोरिला *m*,

Gormand ( gawr'mand ) [ Fr. *gourmand* a glutton.] *n. a greedy eater* अधाशी, पुष्कळ -अतिशय खाणारा, खा खा खाणारा, खादाड मामा *m.* G. *a. gluttonous* खादाड, खाखा सुटलेला, खाण्यावर उठलेला. Gor'mandise *v. i. to eat greedily* दपटून -रपाटून -रगडून खाणें, उपट जेवणें. Gor'mandiser *n. a glutton* खादाड, अधाशी, हांवरा. Gor'mandism *n. gluttony* अधाशीपणा *m*, खादाडपणा *m*, खाखा *f*, हांवरटपणा *m*.

Gorse ( gawrs ) [ A. S. *gorst*, Furze. ] *n.* ( *bot.* ) *Furze*, which See. Gors'y *a.*

Gory. See under Gore.

Gospel ( gos'pel ) [ A. S. *godspell;* commonly derived from A. S. *god*, "Good" and *spell*, story, and so a translation of Gr. *evanggelion*, good news; but more probably from *god*, "God" and *spell*, a narrative =God-narrative. So also the Icel. is *guth-spjall*, God-story, and not *goth-spjall*, " good story. " ] *n. glad tidings* सुवार्ता *f*, शुभवार्ता *f*, शुभवर्तमान *n.* (b) (*esp.*) *the good news concerning the life of Christ* ख्रिस्ताचा शुभवृत्तांत *m*, ख्रिस्तासंबंधीं शुभवर्तमान *n.* २ *one of the four narratives of the life and death of Jesus Christ* ( मॅथ्यु, मार्क, ल्यूक आणि जॉन यांनीं लिहिलेल्यापैकीं कोणतेंही ) ख्रिस्ताचें शुभवर्तमान *n.* ३ *a selection from one of the gospels, for use in a religious service* (उपासनेकरितां ख्रिस्ताच्या ) शुभवर्तमानांतील निरूपणाचा -उपदेशाचा विषय *m;* as, "The G. for the day." ४ *a system of religious doctrines* विशेष शुभधर्मपंथ *m.* शुभवर्तमान *n.* ५ ( *sometimes* ) *any system of political doctrines or of social philosophy* राजकीय सामाजिक शुभधर्म *m;* as, " This political G. " ६ *anything propounded or accepted as infallibly true* खरीच आहे अशी मानलेली कोणतीही गोष्ट *f*, शुभवर्तमानासारखी सत्य गोष्ट *f*, ब्रह्मवाक्य *n.* (*fig.*), वेदवाक्य *n* (*fig.* ), ब्रह्मसूत्र *n* ( *fig.* ). G. *a. evangelical* ख्रिस्ती शुभवर्तमानाचा -संबंधीं. २ शुभवर्तमानासारखा, शंकातीत, निर्विवाद; as, "A G. truth." Gos'peller *n. one of the four evangelists* (मॅथ्यु, मार्क, ल्यूक आणि जॉन यांपैकीं एक ) ख्रिस्ती शुभवर्तमानकार *m.* २ *a priest who reads the gospel during the communion service* शुभवर्तमानवाचक *m*, (ईश्वरोपासनेच्या वेळीं वेदीजवळ ख्रिस्ती) शुभवर्तमानांतील अध्याय वाचणारा प्रीस्ट *m.* Gos'pelize *or* Gosp'ellize *v. t. to form according to the gospel* ख्रिस्ती शुभवर्तमानाला धरून करणें -रचणें; as, " A command G.ed to us." २ *to instruct in the gospel* ख्रिस्ती शुभवर्तमानाचें शिक्षण देणें, ख्रिस्ति शुभधर्माची ओळख करून देणें; as, "To G. the savages."

Goss, ( *obs.* ) *Shakes.* See Gorse.

Gossamer (gos'a-mėr) [M. E. *gossomer* -M. E. *samere* -Romance *samarra*, the skirt of a mantua, from the legend that it is the shreds of the Virgin Mary's shroud which she cast away when she was taken up to heaven. Prof. Skeat thinks it is formed from *goose & summer* of which *summer* may (as in Ger. *mädchen-sommer*) mean 'summer-film.'] *n. a fine, filmy substance, like cob-webs, floating in the air, in clear weather* म्हातारी *f*, वाततूल *n.* २ (a) *any very thin gauze-like fabric* पातळ जाळीदार -कापड *n.* -कपडा *m* ( b ) ( also ) *a thin waterproof stuff* पाणी आंत येऊं न देणारा -घेणारा ( पावसाळी ) -कपडा *m.*-कापड *n.* ( c ) *an outer garment made of waterproof gossamer* ( सदरहू कापडाचा ) वरून घालण्याचा ( पावसाळी ) कपडा *m*, पावसाळी आंगरखा *m.* Gos'samery *a. flimsy* पातळ, नाजूक.

Gossip ( gos'-ip ) [ Orig. a sponsor in baptism, or one *related* in the service of *God;* M. E. *gossib* ( earlier from, *godsib* ) -God, and *sib*, relationship. ] *n. a sponsor* ख्रिस्ती धर्मपिता *m*, ख्रिस्ती धर्ममाता *f.* २ *Shakes. a familiar & customary acquaintance, a companion* सोबती, दोस्त *m*, गडी, जोडीदार, साथीदार, भाईबंद. ३ ( a ) *an idle tattler* ( as applied to males ) गप्पी, गप्प्या, गोष्टीप्रिय, गोष्टीलंपट. (b) ( as applied to females ) नगरभवानी *f*, भटकभवानी *f*, गांवगाई *f*, &c. See Gadder. ४ *groundless*

*rumour* गप्प *f*, गपसप *f*, थाप *f*, गुलथाप *f*, वात *f* ( वाता *pl.* ). G. *v. t.* ( *obs.* ) *Shakes. to stand sponsor to* ( -चा or -ची ) धर्मपिता or धर्ममाता होणें. G. *v. i.* (*obs.*) *Shakes. to make merry* मजा मारणें -करणें -उडवणें. २ *Shakes. to prate* वटवट *f* -बडबड *f* करणें -चालविणें, तोंड ( सारखें ) सुरू -चालू ठेवणें. ३ *to run about and tattle* गप्पा छाटणें, वाता कुटणें -खवाळणें, फाल्या *f. pl.* -वाता *f. pl.* मारणें. Gos'siper *n.* गप्पीदास, वाताड्या. Gos'sipry *n. special intimacy* विशेष -निकट परिचय *m*, दाट -घट्ट ओळख *f*, संघट्टण *f*, सेतकूट *n* ( *fig.* ). २ *gossip* गप्पा *f. pl.*, &c. Gos'sipy *a. full of, or given to, gossip* वाताड, गप्पीदास. Gossip-stand *n.* This term is rendered into Marathi by such words as रिकामटेंकड्यांचा आखाडा *m* -फड *m* -अड्डा *m*, रिकामचावडी *f*, &c.

Got, See under Get. मिळविलेला, संपादित, &c. Ill G. अन्यायोपार्जित, उपटाउपटीचा, हरामाचा. Well G. न्यायोपार्जित, स्वकष्टार्जित, सरळ मार्गानें मिळविलेला, निढळच्या घामाचा, हलालीचा.

Goth (goth) [O. E. *Gotan*; L. *Gothi* (pl.), the Goths.] *n. ethnol. one of an ancient Teutonic race, who dwelt between the Elbe and the Vistula in the early part of the Christian Era* प्राचीन ( अस्सल ) ट्युटॉनिक लोकांच्या गॉथ जातीपैकीं मनुष्य *m*, गॉथ *m*. २ *a barbarian* जंगली -अडाणी -रानटी -वेडगळ -आडदांड -आडमुठ्या मनुष्य, आडमुठ्या. Goth'ic *a. pertaining to the Goths, or their language* गॉथ लोकांच्या संबंधीं, गॉथ लोकांच्या भाषेसंबंधीं. २ *rude, barbarous* जंगली, अडाणी, रानटी, वेडगळ, दांडगट, आडदांड, आडमुठ्या. ३ ( *arch.* ) ( पश्चिम युरोपखंडांत इ० स० १२०० पासून १४७५ पर्यंतच्या सुमारास प्रचलित असलेल्या ) गॉथिक बांधकामाच्या धर्तीचा. G. *n. the language of the Goths* गॉथभाषा *f*. २ *a kind of square-cut type, with no hair lines* ( विशिष्ट आकाराचा ) गॉथिक ठसा *m*. -टाईप *m*. ३ ( *arch.* ) *the Gothic style of architecture* गॉथिक बांधकाम *n*, गॉथिक बांधकामाची धर्ती *f*. Goth'icise *v. t. to make Gothic* गॉथिक स्वरूप देणें. २ *to bring back to barbarism* पुन्हां रानटीपणांत लोटणें -ढकलणें. Goth'icism *n. a Gothic idiom* गॉथभाषासंप्रदाय *m*, गॉथिकपणा *m*, गॉथिक भाषेंतील संप्रदायविशेष *m*. २ *conformity to the Gothic style of architecture* गॉथिक बांधकामाचें अनुकरण *n*, ( बांधकामाचा ) गॉथिकपणा *m*. ३ *barbarousness* रानटीपणा *m*, अडाणीपणा *m*, दांडगटपणा *m*.

Gothamist ( goth'a-or gōtha-mist ) [ Orig. 'man of Gotham,' a village of Nottinghamshire, noted for some pleasant blunders or simpleton stories. ] *n.* इंग्लंडमधील नॉटिंगहॅम परगण्यांतील गॉथम नांवाच्या खेड्यांतील रहिवाशी *m*, गाथमगांवकर *m*, गाथमकर *m*. या खेड्यासंबंधानें पूर्वीं बऱ्याच भोळसरपणाच्या गोष्टी प्रचलित होत्या. २ ( hence ) *a wiseacre, a person deficient in wisdom* दीडशहाणा *m*, उंटावरचा शहाणा *m*, अकलेचा खंदक *m* ( *ironical* ).

Gothamite *n. a gothamist* which see.

Gotten, see under Get.

Gouge ( gōōj or gowj ) [Fr.,—Low L. *guvia*, a kind of chisel. ] *n. a chisel for cutting holes, or channels* विंधण्याचें अऊत *n*, नाख्या *m*, सन्या *m*. २ *a bookbinder's tool for blind tooling or gilding, having a face which forms a curve* पुस्तकें बांधणाराचा नाख्या *m*. ३ ( a ) *-the act.* खोबण मारणें *n*. पाडणें *n*. ( b ) *a groove* खोवण *f*, ( लांकडांत वगैरे ) खोदून -उकरून काढलेली पोकळी *f* - पन्हळी *f*. ४ ( *slang* ) *imposition, fraud* दगा *m*, ठकवणूक *f*, फसवणूक *f*, ठकबाजी *f*, लुच्चेगिरी *f*, &c. ५ ( also ) *an impostor, a cheat* भामट्या, सोदा, ठक, लुचा -लबाड मनुष्य. G. *v. t. to scoop out with a gouge* ( नाख्यानें ) पन्हळी पाडणें. २ *to scoop out* ( as the eye) *with the thumb nail* आंगठ्याच्या नखानें (डोळा) उपसून काढणें. ३ *to cheat in a bargain* ( सौद्यांत ) फसविणें, ठकविणें, बुडविणें.

Gourd ( gōrd or gōōrd ) [ O. Fr. *gourde*, contraction of Fr. *cougourde* –L. *cucurbita*, a gourd. ] *n. bot.* भोंपळा *m*. [ BITTER G. कडू भोंपळा *m*, कडूतुंबी *f*, कडुकालाबु *m*. BOTTLE-SHAPED G. तुंबा *m*, तुंबी *f*, अलाबु *m*. YOUNG G. घटा *m*. SOME OTHER KINDS ARE:— घणसा, डांगर, नारिंगी, तवशी, धेंडशी, परवर, पेटा OR पेठा. ] २ *a dipper or other vessel made from the shell of a gourd* वाळलेल्या भोंपळ्याचें भांडें *n*, तुंबा *m*, कमंडलू *m*. ३ ( hence ) *a drinking vessel, a bottle* पिण्याचें पात्र *n*, भांडें *n*, शिशी *f*, बाटली *f*, &c. G.-tree *n.* भोंपळीचें झाड *n* -वेल *m*. Gourd'iness *n.* Gourd'y *a.*

Gourmand ( gōōr 'mänd ) [ Fr., a glutton. ) *n. a glutton* खाबू, पोटबाबू, खाबूनंदन, खादूनंदन, औदरिक. See under Gormand.

Gout ( gowt ) [ Fr. *goutte* –L. *gutta*, a drop, because the disease was supposed to be caused by a humour settling on the joints in drops. ] *n. a drop, a clot or coagulation* टिपका *m*, बिंदु *m*, गांठ *f*, सांखा *m*. २ *a painful constitutional disease in which there is an accumulation in the blood of uric acid salts in consequence of deficient excretion or increased formation of the products of proteid metamorphosis, inflammation of the joints, particularly of the great toe* ( In its last stages it attacks the stomach. ) वातरक्त; वेदनाप्रचुर संधिविकार *m*, रक्तांत सूत्राम्लां ( uric acid ) तील क्षार संचित झाल्यामुळें हा रोग होतो. हा रोग झाला असतां विशेषें करून पायाचा आंगठा एकाएकीं सुजतो. ३ *a disease of cornstalks* धान्याच्या पातीवर पडणारा रोग *m*. Gout'ily *adv.* Gout'iness *n.* वातरक्तग्रस्तता *f*, वात-

रक्त झालेली स्थिति *f.* Gout'y *a. diseased with or subject to the gout* वातरक्तग्रस्त, वातरक्तानें पीडलेला. २ *pertaining to the gout* वातरक्तासंबंधीं, वातरक्तविषयक. ३ *swollen as if with gout* (वातरक्तासारखा) सुजलेला, फुगलेला, फुगीर.

*N. B.* :—Gout is वातरक्त and one kind of संधिवात. Rheumatism is आमवात. वातरक्त viz. Gout and आमवात viz. Rheumatism should not be confounded. Gout is sometimes called पादाग्ररोग which corresponds to the Greek name *podagra*. वातरक्त and रक्तपिती are two distinct diseases and therefore should not be confounded. For more information on this point see Dr. Garde's *Madhavanidán* in Marathi. In popular language Gout is wrougly called in Marathi वातरोग, संधिवायु, वायु, शूल &c.

Govern (guv'ern) [ O.Fr. *governer* ( It. *governare* ) —L. *gubernare*, to steer a ship, to rule, borrowed from Gr. *kybernan*, akin to Gr. *kybe*, head. ] *v. t. to regulate by authority* सत्तेनें -अधिकारानें नियंत्रण *n* -नियमन *n.* करणें, (-वर) अधिकार *m* -हुकूम *m* -हुकुमत *f* -सत्ता *f* -राज्य *n* -अम्मल *m* &c. गाजविणें -चालविणें -करणें. २ *to direct, to restrain, to manage* हुकमांत -ताब्यांत -कबज्यांत ठेवणें -राखणें, (आपल्या) मर्जीप्रमाणें चालविणें, आवरणें, अटोपणें, आटोपणें, बंदोबस्त *m* -बंदोबस्ती *f.* ठेवणें -राखणें *g. of o.*, आवर -आटोप -शासन -नियमन करणें *g. of o.*, दाबांत -कह्यांत ठेवणें -वाळगणें; as, "To G. a horse." ३ *gram. to require, or require to be in, a particular case* (व्याकरणांत एखाद्या शब्दाच्या संबंधानें) विशेष विभक्ती आणणें -यावयास लावणें -अवश्य करणें; as, "A transitive verb *governs* the objective case." G. *v. i.* (*a*) *to exercise authority* अम्मल *m* -राज्य *n.* करणें -चालविणें, अखत्यार *m* -हुकूम *m* -अम्मल *m* -सत्ता *f.* बजाविणें. Governabil'ity *n. governableness* which see. Gov'ernable *a. controllable, manageable* आवराया -चा -जोगता -जोगा, &c., अटोपायाजोगा &c., नियम्य, नियमनीय, शास्य, शासनीय, वश्य, दाबांत ठेवतां येण्याजोगा -सारखा, कह्यांत राहणारा -वागणारा. Gov'ernableness *n.* शासनीयता *f*, नियमनीयता *f*, आवरतां येण्याजोगेपणा *m*, शास्यता *f.* Gov'ernance *n. control, government, authority* शास्यता *f*, ताबा *m*, अम्मल *m*, अधिकार *m*, अखत्यार *m*, हुकूम *m*, हुकमत *f*, सत्ता *f*, वर्चस्व *n.* २ *arrangement* व्यवस्था *f*, घडी *f*, जम *m*, नीटनेटकेपणा *m*, ठाकठीकपणा *m*, बेतवात *m.* Gov'ernante, Gov'erness *n. fem. a female governor* स्वामिनी *f*, अधिकारिणी *pop.* अधिकारीण *f*, शासनकारिणी *f.* २ (esp.) *one entrusted with the care and instruction of children* ( usually in their *homes* ) (मुलांकरितां घरांत ठेविलेली ) शिस्त लावणारी व शिक्षण देणारी बाई *f*, मुलांस शिक्षा लावणारी बाई *f.* Gov'erning *pr. p. a. prevalent, controlling* चालू, नियामक, (-चा) अम्मल असलेला, प्रबल, सत्तावान्, जोरावर असलेला. [ GOVERNING BODY नियामकमंडळ *n.*] २ *requiring a particular case* विशेष विभक्तीची अपेक्षा करणारें (क्रियापद, इ०), विभक्तिकारक. Gov'ernment *n. control, direction, regulation* नियमन *n*, नियंत्रण *n*, व्यवस्था *f*, आवर *m*, आटोप *m*, नियम *m*, देखरेख *f*, बंदोबस्त *m*, बंदोबस्ती *f*, आळावांधा *m*, आळेबंद *m*, अम्मल *m*; as, "Civil, Church, or family G." २ *the system of polity in a state* राज्यपद्धति *f*, राज्यकारभाराचें धोरण *n* -तंत्र *n*, राज्यतंत्र *n*, राज्य चालविण्याची रीत *f* -तऱ्हा *f* -नियम *m. pl.* ३ *authority* अधिकार *m*, सत्ता *f*, सामर्थ्य *n*, ताबा *m*, अखत्यार *m*, हुकूम *m*, हुकमत *f*, मामलत *f*, मामला *m*; as, "I here resign my G. to thee." ४ *the ruling power, the administration, the person or persons authorized to administer the laws* शासनसत्ता *f*, शासनाधिकार *m*, शास्ता *m*, सरकार *n*, (राज्यकारभाराचीं सूत्रें हातीं असलेला) अधिकारी पुरुष *m*, (राज्यांतील) अधिकारी वर्ग *m* -पुरुष *m. pl.*, (राज्यांचे) कर्णधार *m. pl.*, शास्ते *m. pl.* ५ *a state* राज्य *n*, संस्थान *n*; as, "The G.s of Europe." ६ *Shakes. management of the limbs or body* इंद्रियनियमन *n.* ७ *the influence of a word in regard to construction, requiring that another word should be in a particular case* कारक *n.* Governmen'tal *a. pertaining to, or made by, government* सरकारचा, सरकारसंबंधाचा, सरकारानें केलेला, सरकारी, राज्यसूत्रचालकांचा; as, "G. duties." Gov'ernor *n.* (a) *a chief ruler* सुभेदार, मुख्य -वरिष्ठ अधिकारी, सरसुभा, मुख्य नियंता -शास्ता -अनुशास्ता. (b) (now esp. in India) *a chief ruler of a presidency* इलाखाधिपति *m*, गव्हर्नर *m*, धाकटे लाटसाहेब *m.* २ *a tutor, a guardian* नियामक, शिक्षक, नियंता, देखरेख ठेवणारा, खासगी -घरगुती अध्यापक. ३ *naut.* (*R.*) *a pilot* गलबतांची बंदरांत नेआण करणारा (त्याच बंदरांतील अधिकारी), बंदरांतील माहितगार नावाडी *m* -सुकाण्या *m.* ४ *mach. a contrivance applied to steam-engines, water-wheels, and other machinery, to maintain nearly uniform speed when the resistances and motive force are variable* वराळ यंत्राची गति होतां होईल तितकी सारखी राखणारा सांचा *m* -नियामक *m.* Gov'ernor-General *n.* ( *pl.* Gov'ernors-Gen'eral ) गव्हर्नरच्या वरचा अधिकारी, गव्हर्नर जनरल *m*, व्हाईसरॉय *m*, बडे -थोरले लाटसाहेब *m.* Gov'ernorship *n. the office of a governor* गव्हर्नरचा हुद्दा *m* -जागा *f* -अधिकार *m.*

Gowk, Gouk (gowk) [ See Gawk. ] *n. zool. the European cuckoo* (called also *jawky*) युरोपीय कोकिला *f.* २ *a simpleton*, See Gawky.

Gown (gown) [ M. E. *goune*, a loose robe. ] *n. a loose flowing upper garment* (सर्वांगावर घालण्याचा

लांब) सैल झगा *m*, गाऊन *m*. २ (esp.) *the ordinary outer dress* (स्त्रिया, पदवीधर, शिष्यवृत्तिधर, न्यायाधीश, वकील वगैरे धंदेवाईक लोक इ०कांचा) व्यवसायदर्शक झगा *m*, शांततासूचक झगा *m*. ३ *Shakes. any sort of dress* पोशाख *m*, वेष *m*, पेशा *m*, पेहेराव *m*; as, "He comes in the G. of humility." Gow'ned *a*. झगा घातलेला, कपडे केलेला. Gown's man *or* Gown'man *n*. *one whose professional habit is a gown* (as a divine &c.) (ज्यास स्वतःच्या व्यवसायाची खूण म्हणून झगा घालावा लागतो असा) झगेवाला पाद्री *m*. २ (hence) *a civilian* (in distinction from a soldier) झगेवाला मुलकी अधिकारी-मुलकी अम्मलदार.

Gowpen (gow'pen) [Scand.] *n*. *the hollow of the hand or of the two hands held together* अंजलि *m* pop. अंजळी *f*, ओंझळ or ओंजळ *f*, अंजलिपुट *m* or *n*. २ *a handful* ओंजळ *f*, ओंजळभर *f* (दिलेली वस्तु *f*).

Grab (grab) [Cf. Swed. *grabba*, Sk. ग्रह् (?) to grasp; *greifen*, to seize. From the same root as Grapple, Grasp, Grip.] *v. t. to snatch, to seize suddenly* झोंबाडणें, झोंबाडा घालणें, पकडणें, (छापा घातल्यासारखें) हिसकावणें, हिसकणें. G. *n. a sudden grasp or seizure* पकड *f*, मिठी *f*, छापा *m* (*fig.*), (एकदम हात मारून) पकडणें *n*. २ *an instrument for clutching objects for the purpose of raising them* (specially applied to devices for withdrawing drills &c. from artesian and other wells that are drilled, bored, or driven) (-आंत धरून ओझें वगैरे उचलण्याची कप्पी लावून चालविण्याची) पकड *f*, गुराब *f*. G. -bag *n. colloq.* (at fairs) *a bag or box holding small things which are to be drawn, without being seen, on payment of a small sum* थोडेसे पैसे देऊन आंत न पाहतां काढून घेण्याच्या लहान लहान चिजा भरलेली पिशवी *f* -पेटी *f*, (जत्रेंतील) सोडतीची पेटी *f* -पिशवी *f*. G. game *n. colloq. a theft committed by snatching a purse or other piece of property* (पैशाची पिशवी इ०) हिसकावून घेऊन केलेली चोरी *f*, हिसकाहिसक करून केलेली चोरी *f*, देखतचोरी *f*. Grab'ber *n. one who grabs* देखतचोर *m*.

Grabble, same as Grope.

Grace (grās) [Fr. *grace*—L. *gratia*, favour -*gratus* beloved, dear, agreeable, pleasing.] *n. the exercise of love, kindness, mercy, favour* कृपादृष्टि *f*, दया *f*, परोपकारी -दयाळू स्वभाव *m*, मेहेरनजर *f*, सस्नेहता *f*. २ *favour bestowed or privilege conferred* अनुग्रह *m*, कृपा *f*, प्रसाद *m*, अनुग्रहाचें -कृपेचें फळ *n*. [OBJECT OF G. कृपापात्र *n*, अनुग्राह्य. TO GET INTO ONE'S GOOD GRACES (-च्या) पोटांत शिरणें, (-ची) मर्जी *f* -मन *n*. संपादन करून घेणें. TO GET OUT OF ONE'S GOOD GRACES (-च्या) कृपेंतून -मर्जीतून -मनांतून उतरणें, (-ची) अवकृपा होणें *with* वर *of s.*] ३ *theol. the divine favour toward man; the mercy of God, as distinguished from His justice* ईश्वरी अनुग्रह *m* (b) (also) *any benefits His mercy imparts, enjoyment of the divine favour* (ईश्वरी) अनुग्रहाचें फल *n*. ४ (law) *the prerogative of mercy exercised by the executive* (as pardon) (दया करण्याच्या अधिकाराचा उपयोग करून गुन्हेगारास दिलेली) माफी *f*, दया करण्याच्या हक्काचा उपयोग *m*. ५ *any characteristic fitted to win favour or confer pleasure or benefit, inherent excellence, virtue* चांगुलपणा *m*, सद्गुण *m*, गुण *m*, सुलक्षण *n*, भूषण *n*, अलंकार *m*, उत्तमता *f*, श्रेष्ठता *f*. ६ *loveliness, beauty* (physical, intellectul or moral), (commonly) *easy elegance of manners, gracefulness* सौंदर्य *n*, लावण्य *n*, सुरूपता *f*, रूप *n*, रुपाळुपणा *m*, खुबसुरतपणा *m*, शोभा *f*. ७ *pl. myth. graceful and beautiful females, sister goddesses* (represented by ancient writers as the attendants sometimes of Apollo, but oftener of Venus. They were three in number, (प्राचीन पाश्चात्य पुराणांतरीं वर्णिलेल्या ॲग्लाया, यूफ्रॉजणी, व थॅलाया नांवाच्या) तीन खुपसुरत अप्सरा *f. pl.* ८ *the title of a duke, a duchess, or an archbishop* (and formerly of the king of England) ड्यूक व त्याची बायको किंवा आर्चबिशप यांच्या नांवांचा उल्लेख करितांना त्यांस लावण्याची पदवी *f*; as, "His G. the Duke of......" ९ (a) *a petition for grace* माफीअर्ज *m*, माफी मिळण्याकरितां केलेला अर्ज *m*- (लेखी) विनंति *f*. (b) *a blessing asked, or thanks rendered, before or after a meal* भोजनापूर्वी किंवा नंतर करावयाची ईश्वराची प्रार्थना *f* -ईशस्तुति *f* -ईशचिंतन *n*, भोजनापूर्वी मागण्याचा ईश्वराचा आशीर्वाद *m*. Day of G. *n. theol. the time of probation, when the offer of divine forgiveness is made and may be accepted* (आपल्या पापांबद्दल पश्चात्ताप पावून ईश्वरी अनुग्रह करून घेण्याचा) विचार करण्याकरितां पापी लोकांस दिलेली मुदत *f* -वेळ *m*. Days of G. *n. pl.* See under Day. Good graces *n. pl. favour, friendship* कृपा *f*, कृपादृष्टि *f*, स्नेहदृष्टि *f*, अनुग्रह *m*, मेहेरबानी *f*, दोस्ती *f*. G. cup *n*. (a) *a cup in which the health is drunk after grace* भोजनाच्या वेळच्या ईशस्तुतीनंतर आरोग्यचिंतनार्थ (पाश्चात्य लोक) ज्या प्याल्यांतून मद्यप्राशन करितात तो पेला *m*, आरोग्यपानपात्र *n*. (b) *a health so drunk* (ईशस्तुतीनंतर केलेलें) आरोग्यमद्यप्राशन, आरोग्यपान *n*. Grace drink *n. a grace cup* which see above. G. stoke *n. a finishing stroke or touch, a coup de grace* शेवटचा -सफाईचा हात *m*. Means of G. *n. pl. means of securing knowledge of God, or favour with God, as the preaching of the gospel &c.* ईश्वरी ज्ञानाचीं -ईश्वरी अनुग्रहाचीं साधनें *n. pl.* To do G. *to reflect credit upon* (-ला) भूषणावह होणें *in. con.* To say G. *to render thanks before or after a meal*

भोजनापूर्वी किंवा नंतर (ईश) प्रार्थना करणें. With a good G. खुबीनें, खुमासीनें, डौलानें, छानीनें. २ *gracefully* सफाईनें. ३ *graciously* कृपादृष्टीनें, कृपाळूपणानें. With a bad G. *ungraciously* अयोग्य रीतीनें. २ न शोभेल -न साजेल अशा रीतीनें, बिनखुबीनें. [ Grace, Mercy; these words, though often interchanged, have each a distinctive and peculiar meaning. *Grace*, in the strict sense of the term, is spontaneous favour to the guilty or undeserving; *mercy* is kindness or compassion to the suffering or condemned. It was the *grace* of God that opened a way for the exercising of *mercy* toward men. ] G. *v. t. to embellish and dignify* सुशोभित करणें, शोभा *f.* आणणें -देणें, शोभन *n* -मंडन *n.* करणें *g. of o.*, शृंगारणें, शोभविणें, शोभिवणें, शोभिवंत करणें. २ *to honour* मोठेपणा *m* देणें -करणें *g. of o.*, गौरव *m* -मान *m*, करणें *g. of o.* ३ *to supply with heavenly grace* ( -वर ) ईश्वरी कृपा *f* -अनुग्रह *m.* होणें *in. con.* ४ *mus. to add grace notes, cadenzas, &c. to* अलंकारस्वर जोडणें. Grace'd *a. beautiful* शोभिवंत, शोभमान, सुंदर, रमणीय, &c. Grace'ful *a. elegant* लावण्यवान्, शोभायमान, शोभजारा, खुबसुरत, गोजरा, गोजिरवाणा, साजरा, छबदार, छबडा, छबीला, छबेला, ललित, डौलदार, कांतीव. Grace'fully *adv.* डौलानें, डौलदारीनें, लालित्यानें, छानीनें, छबीनें, खुबीनें. Grace'fulness *n.* खुबी *f*, खुमास *f*, छब *f*, छबी *f*, छबदारी *f*, छान *f*, साजरेपणा *m*, गोजरेपणा *m*, गोजिरवाणेपणा *m*, लावण्य *n*, कांति *f*, लालित्य *n.* Grace'less *a. corrupt* देवधर्मानें टाकलेला, धर्मत्यक्त, त्यक्तधर्म, कोरडा, देवधर्मानें ओळखलेला, निसवलेला. Grace'lessly *adv.* Grace'lessness *n.* Gra'cious *a. merciful, beneficent, condescending* दयालु pop. दयाळु, दयावंत, सकरुण, कृपायुक्त, करुणायुक्त, कृपा -करुणादृष्टि ठेवणारा, अनुग्राही, बहाल, उपकारी, मेहेरबान. २ *graceful, excellent* सुभग, सुभगाकृति, मधुर, मधुराकृति, रुचिर, मनोहर, लावण्ययुक्त -संपन्न, खुबसुरत, उत्कृष्ट, नामी. ३ *produced by divine grace* ईश्वरदत्त, ईश्वरी कृपेनें -अनुग्रहामुळें झालेला -मिळालेला. Gra'ciously *adv.* कृपेनें, कृपापूर्वक -पुरस्सर, कृपादृष्टीनें. Gra'ciousness *n.* कृपा *f*, कृपाळूपणा *m*, कृपालुता *f*, कृपादृष्टि *f*, कृपाकटाक्ष *m*, बहाली *f*, अनुग्रह *m*, प्रसाद *m.* २ मोहकता *f*, लावण्य *n.*

Gracious. See under Grace.

Gradation. See under Grade.

Grade (grād) [Fr. *grade*, a degree—L. *gradum*, acc. of *gradus*, a degree, step.] *n. a degree or step in rank or dignity, relative position or standing* पायरी *f*, पर्याय *m*, पदवी *f*, विशेप परिस्थिति *f*, दर्जा *m*, स्थान *n.* २ काटकोनाचा शंभरावा भाग *m.* ३ ( *a* ) *the rate of ascent or descent* ( *usually stated as so many feet per mile*) चढ *m*, उतार *m*, चढण *f*, उतरण *f.* ( *b* ) *a gradient* चढ किंवा उतार मोजण्याचें माप *n* -प्रमाण *n.* [ AT GRADE *on the same level* ( said of the crossing of a railroad with another railroad or a highway, when they are on the same level at the point of crossing ) एकाच पातळीमध्यें असलेले (एकमेकांस छेदणारे आगगाडीचे रूळ), एकाच चढाचे किंवा उताराचे. DOWN GRADE *a descent* ( आगगाडीच्या मार्गावरील ) उतार *m* -उतरण *f.* UP GRADE ( लोहमार्गाचा ) चढ *m.* चढण *f.* GRADE CROSSING *a crossing at grade* सारख्या -एकाच पातळीमध्यें असलेल्या रेषांचें परस्परछेदन *n.* ] ४ ( *stock breeding* ) *the result of crossing a native stock with some better breed* ( दुसऱ्या देशांतील) श्रेष्ठ जातीचीं जनावरें व आपल्या देशांतील जनावरें यांपासून उत्पन्न झालेली चांगली अवलाद *f.* G. *v. t. to arrange in order according to size, quality, rank, &c.* अनुक्रम -पायरीप्रमाणें लावणें. २ *to reduce to a level, as the line of canal or road* एकाच चढांत किंवा उतारांत आणणें. ३ *to cross with some better breed* ( चांगली अवलाद उत्पन्न करण्याकरितां ) अस्सल जात लावणें, श्रेष्ठतर जातीच्या रक्ताची भेसळ करणें. Gradu'ate *v. t. to arrange so that they shall harmonize* (एकरूपता दिसेल अशा बेतानें) पायरी पायरीनें जुळविणें -मांडणें -लावणें -रेखाटणें. २ *chem. to bring to a certain strength or grade of concentration* अमुक एक घट्टपणाचा करणें. Grada'tion *n.* (a) *the act of progressing by regular degrees or steps* (गति सारख्या प्रमाणांत राखून ) उत्तरोत्तर -क्रमाक्रमानें -हळू हळू पुढें जाणें *n* -प्रगति करणें *n*, क्रमिक गति *f.* (b) *the state of being arranged in ranks* पायरी पायरीप्रमाणें केलेली मांडणी *f* -रचना *f*, क्रमवार व्यवस्था *f.* २ *any relative position in a series* क्रम *m*, अनुक्रम *m*, आनुपूर्व्य *n*, ( परंपरेंतील ) पद *n* -पायरी *f*, श्रेणिभाव *m.* [ IN REGULAR G. क्रमाक्रमानें, क्रमशः, यथाक्रम.] ३ *the act or process of bringing to a certain grade* अमुक एक पदवीला -पायरीला आणणें *n.* ४ ( *fine arts* ) *a gradual passing from one tint to another* ( as in painting or drawing) रंग हळू हळू पालटणें *n.* बदलणें *n*, ( चित्र, नकाशा, इत्यादिकांतील ) क्रमिक वर्णांतर *n.* Grada'tional *a.* क्रमिक. Grada'tory *a. gradual*, which see. २ *zool. suitable for walking* ( said of the limbs of an animal when adapted for walking on land ) ( जमिनीवरून ) चालतां येण्यासारखे ( प्राण्यांचे पादादि अवयव ). G. *n. arch. a series of steps from a cloister into a church* ( देवळांतील ) सोपानपरंपरा *f.* Gra'dient *a. walking* ( पायांनीं पावलें टाकीत ) चालणारे. २ *rising or descending by regular degrees of inclination* सारख्या प्रमाणानें चढत किंवा उतरत जाणारा. ३ *adapted for walking, as the feet of certain birds* ( जमिनीवरून ) चालण्यास योग्य -लायक -चालतां येण्यासारखे ( पक्ष्यादिकांचे पाय ). G. *n. grade* चढाचें किंवा उताराचें प्रमाण *n* -मान *n.* २ *a portion of a way not*

*level* रस्त्याचा चढता किंवा उतरता भाग *m*, ( पातळीमध्यें असलेल्या रस्त्यावर लागणारा ) मधलाच चढ *m.* किंवा उतार *m.* ३ *the rate of increase or decrease of a variable magnitude, or the curve which represents it* (चलप्रमाणाच्या) चढाचें किंवा उताराचें मान *n*, उतार किंवा चढ दाखविणारें वक्र *n.* किंवा रेषा *f.* G.-post *n. a post indicating by its height or by marks on it the grade of rail road, highway, &c., at that spot* रस्त्याच्या चढाचें किंवा उताराचें प्रमाण दाखविणारी पाटी मारलेला ( रस्त्याच्या बाजूचा ) खांब *m*, चढउतारखांब *m.* Gra'din,-e *n.* ( *arch.* ) *a seat raised over another* एकापेक्षां एक अधिक उंच अशा जागांची ( बसण्यासाठीं ) केलेली बैठक *f*, पायऱ्या पायऱ्यांची मांडणी *f*; as, "The *gradines* of the amphitheatre". Grad'ino *n. step or raised shelf* ( as above an altar ) उंच फळी *f.* Grad'ual *a. proceeding by steps or degrees* क्रमाक्रमाचा, क्रमानुक्रमाचा, क्रमिक, थोडें थोडें -आस्ते आस्ते वाढत किंवा कमी होत जाणारा. Grad'ually *adv.* क्रमाक्रमानें, क्रमानुक्रमानें or क्रमानुक्रमें. Grad'ualness *n.* क्रम *m*, आस्तेपणा *m*, &c. Grad'uate *v. t. to mark with degrees* अंश *m. pl.* -छेद *m. pl.* -भाग *m. pl.* मांडणें -पाडणें, अंशांकन *n* -अंशरेखन *n.* करणें, अवधिमान *n.* करणें. २ ( *a* ) *to admit or elevate to a certain grade or degree* कांहींएक पायरीपावेतों चढविणें, ठराविक दर्जाला चढविणें -पोंचविणें. ( *b* ) ( esp. in a college or University ) *to admit, at the close of the course, to an honourable standing defined by a diploma* ( विश्वविद्यालयांत शिक्षणक्रम पुरा झाल्याची ) पदवी देणें. २ *to arrange by degrees or to a certain degree* पायरीपायरीनें बसविणें -बनविणें, क्रमानें -पायरी पायरीनें मांडणें. ३ *to determine the degrees of* ( -चे ) अंश *m. pl.* मान ठरविणें -मुक्रर करणें; as, "To G. the heat of an oven". ४ *chem. to bring to a certain degree of consistency, by evaporation, as a fluid* ( -मध्यें ) ठराविक प्रमाणाचा घट्टपणा आणणें. G. *v. i. to change gradually* क्रमाक्रमानें बदलणें, बदलत जाणें. २ *zool. to taper, as the tail of certain birds* ( शेंपूट इ० ) बारीक बारीक -टोंकदार होत जाणें, अणीदार होत जाणें. ३ *to receive a diploma* विद्यालयांतील ( शिक्षणक्रम पुरा करून ) पदवी मिळविणें, ( कोणत्याही शाखेचा विश्वविद्यालयीन शिक्षणक्रम पुरा झाल्याचा ) दाखला मिळविणें. G. *n. one who has received an academical or professional degree* विद्यालयांतील ( शिक्षणक्रम पुरा होऊन ) ज्यास पदवी मिळाली आहे असा मनुष्य *m*, पदवीधर *m.* २ *a measuring glass used by apothecaries and chemists* ( अंश मांडलेला ) मापाचा पेला *m* -गलास *m* or *n*, अंशांकित काचपात्र *n.* G. *a. graduated* अनुक्रमाचा -अनुक्रमानें लावलेला. २ अंश घातलेला-मांडलेला. Grad'uated *a. marked with, or divided into, degrees* अंश भाग पाडलेला, अंशांकित, मापांकित. २ *zool. tapered* (said of bird's tail) अणीदार -टोंकदार ( शेंपूट *n* -शेंपटी *f* ). ३ क्रमाक्रमानें वाढणारा -कमी होणारा. Grad'uateship *n.* पदवीधरपणा *m.* Gradua'tion *n.* –*the act.* ( a ) निरनिराळ्या मापाचे भाग -अंश पाडणें *n*; as, "The G. of a scale". ( b ) पदवी मिळविणें *n*; as, "G. at a college". ( c ) क्रमानें बदलत -पालटत जाणें *n*; as, "G. in colour." ( d ) क्रमाक्रमानें अणीदार -टोंकदार होत जाणें *n*; as, "G. of a bird's tail." २ *the state of being graduated* ( a ) अंशछेद *m*, मापांकन *n.* ( b ) पदवीधरपणा *m.* ( c ) क्रमानें होत गेलेला रंगाचा पालट *m* -बदल *m.* ( d ) टोंकदारपणा *m.* ३ *a scale* माप *n*, प्रमाण *n.* ४ *the exposure of a liquid in large surface to the air, so as to hasten its evaporation* बाष्पीभवन त्वरित होण्याकरितां ( द्रवपदार्थ ) उघड्या हवेंत टाकणें *n* -ठेवणें *n*, उघडी हवा लागूं देणें *n* -लावणें *n.* Grad'uator *n. one who determines or indicates graduation* क्रम किंवा पर्याय दाखविणारा, क्रमदर्शक *m*, अंशदर्शक *m.* २ *an instrument for dividing any line, right or curved, into small, regular intervals* क्रमलेखक *m*, सारखें अंतर पाडण्याचें हत्यार *n*, सारख्या अंतराचे भाग पाडण्याचें हत्यार *n.* ३ *an apparatus for diffusing a solution as brine or vinegar, over a large surface, for exposure to the air* बाष्पीभवन हवें तितकें होण्याकरितां द्रवपदार्थ उघड्या हवेंत ठेवण्याचें उपकरण *n.*

Gradual }<br>Graduate } See under Grade above.

Graff ( gräf ) See Graft below, of which this was the old form of writing. Graf'fed *a.* See Grafted under Graft.

Graft ( gräft ) [ Orig. *graff* –O. Fr. *graffe* ( Fr. *greffe* ) –L. *graphium*, a style or pencil ( which the inserted slip resembled ) –Gr. *graphein*, to write. ] *v. t. to insert* ( graft ) *in a branch or stem of another tree* कलम बांधणें -करणें, पैवंद करणें. २ *surg. to implant a portion of* ( living flesh or skin ) *in a lesion so as to form an organic union* ताजें मांस किंवा कातडी घालून ( जखम ) सांधणें, गात्रसंधान करणें. ३ *to join* ( one thing ) *to another as if by grafting* सांधणें, सांध्यास सांधा मिळवून -जोडणें -जोडून टाकणें -एकजीव करणें, ( दुसऱ्याशीं ) मिळवून टाकणें. G. *v. i. to practise grafting* कलम बांधणें -लावणें, कलम बांधण्याचें काम *n* -धंदा *m.* करणें. G. *n.* ( a ) *a small scion of a tree inserted in another tree* कलम *n*, शिडाईत *n*, कलमाची डहाळी *f* -खुंटी *f.* ( b ) *a branch or portion of a tree growing from such a shoot or scion* ( दुसऱ्या झाडावर रुजणारें ) कलम *n.* ( c ) *surg. a portion of living tissue used in the operation of autoplasty* जखम भरून काढण्याकरितां उपयोगांत

आणलेलें ताजें मांस n. -कातडी f इ०. Graf'ted a. *bearing grafts* कलमी, शिडाइती, पैवंदी or -धी. [G. TREE or STOCK इसाड n, ईस n. ] Graf'ter n. कलम बांधणारा -लावणारा. २ *an instrument by which grafting is facilitated* कलम बांधण्याचें हत्यार n. ३ *the original tree from which a scion has been taken for grafting upon another tree* कलम बांधण्याकरितां ज्या झाडाची फांदी तोडली आहे असें (पूर्वीचें) झाड n. Graf'ting n. *-the act, art or process* कलम बांधणें n, कलम बांधण्याची क्रिया f -कला f -कृति f -तऱ्हा m. २ *surg. the transplanting of a portion of flesh or skin to a denuded surface* जखमेच्या जागीं दुसरीकडचें मांस घालणें n -नेणें n, गात्रसंधान n. ३ *Carp. a scarfing or endwise attachment of one timber to another* एका लांकडांचें टोंक दुसऱ्या लांकडाच्या टोंकास मिळवून केलेली जोडणी f -सांधकाम n.

Grain (grān) [ Fr., -L. *granum*, seed, which is akin to Eng. Corn. ] n. *a single small hard seed* दाणा m, कण m. [ EMPTY THROUGH EXCESSIVE RAIN (-EARS OF CORN or A GRAIN) पाणपिसा. HOLLOW or LIGHT G. फोल n, फोलकट n, फुंकणी f. or -ण n. or -णूं n, चिंबचळें n, चिंबफोल n, कुणी f, पोंकण n, फुलकें n. -THROUGH MUCH RAIN पाणफोल n, पाणपिशी f. HOLLLOW or LIGHT G.s फोल n, मुकण n, खोकस n, पुंजट n, पुंजरण n. THAT REMAINS HARD AFTER SOAKING or STEEPING -GRAIN मुकाणा, मुका. ] २ *corn* (in general) धान्य n, दाणा m, दाणागोटा m, गल्ला m, अन्न n, कण m, सस्य or शस्य n. [THE HINDUS DIVIDE THEIR GRAINS INTO TWO CLASSES. -1ST. THE *principal* or *superior Grains* अठरा धान्यें (THESE ARE गहूं, तूर, जव, जोंधळा, वाटाणा, लांक,साळ,हरभरा, मसूर, जवस, मूग, राळा, तीळ, हरीक, कुळीथ, सांवा, उडीद, चवळी ). AND 2ND. THE *inferior Grains* उपधान्यें or कुधान्यें or कदन्न n. (THESE ARE सजगुरा, मादली, वरी, नाचणी, वरग, कांग, खपले गहूं, मका, कर्डी, राजगिरा, मटकी, पावटा, मुगी, वाल, कारळ, देवभात, सातू, अंबाडी). Note:- SOME PERSONS GIVE LISTS WHICH DIFFER FROM THE ABOVE IN A FEW GRAINS. A HUSKED G. बेटका m. ALMS OF UNDRESSED G. कोरान्न n. *pop.* कोरण n. -PERSON THAT BEGS IT कोरान्नकरी. AWNED or BEARDED G. शूकधान्य n. BROKEN G. आडकणी f, आडदाळ f, कणवर or कणोर m, फूट f or फुटळ f or n. DIRTY (EARTH-MINGLED) G. मातकण m, मातेरा m, मातेरें n, ससकर m. EARLY GRAINS -COLLECT. अग्रधान्य n, अगात n. FULL & GOOD (GRAINS or EARS OF CORN) कणदार. G. AS JUST TRODDEN OUT ताजें मळून काढलेलें धान्य n, मदन n. *pl.* G. AS A PREMIUM UPON MONEY LENT काढा m. G. FOR CONSUMPTION OF AN ARMY रसद f. G. ( PULSE or CORN ) COARSE AND GROUND भरडण n, भरडा m. G. ( or CORN ) WHICH BURSTS or BREAKS READILY फुटाळू दाणा m, फुटीर or फुटरा दाणा m. LATE GRAINS -COLLECT. पश्चिम धान्य n, मागस धान्य n. LENDING GRAIN AT INTEREST धान्यवर्धन n. MIXED G. ससकर m. PARCHED G. चविना m, लाह्या f. pl. RECEPTACLE FOR G. ( GENERAL ) कोथळा m, *dim.* कोथळी f. RECEPTACLE FOR G. IN A WALL अंबार n, वळद n. SACK or CASE FOR G. मोत m. SOAKED or STEEPED G. भिजाणे m. *pl.*, भिजण f, उंबलें or उमलें n. STORE OF G. धान्यसंग्रह m. संचय m. UNDRESSED G. ( ESP. AS GIVEN TO BRAHMANS, &c. ) आमान्न n, उलफा m, शिधा m. UNHUSKED G. BOILED घुगऱ्या f. pl. TO BE G.-SURFEITED, ( HORSE, &c. ) दाणावणें. ] ३ (a) *any small, hard particle* ( as of sand, sugar, &c. ) रवा m, कण m, रज m, कणी f. ४ (of wood) हिरका m, हीर m (*fig.*), मोड m, मोडणी f. [ AGAINST THE G. विलोम, प्रतिलोम. AGREEMENT WITH THE G. आनुलोम्य n. CONTRARIETY TO THE G. वैलोम्य n, प्रातिलोम्य n. THAT IS WITH AND AGAINST THE G. अनुलोमविलोम. WITH THE G. अनुलोम m. ] ५ *the unit of the English system of weights* ग्रेन नांवाचें इंग्रजी वजन n. याचें वजन साधारणपणें गव्हांच्या कणसांतील मधल्या दाण्या-(grain) च्या वजनाइतकें असतें व याचवरून यास ग्रेन हें नांव पडलें आहे. ६ (a) *a reddish dye made from the coccus insect or kermes* किरमिजी (रंग) m. (b) (hence) *a red colour of any tint* (कोणतांही) तांबूस रंग m. ७ *texture* घटना f, बंधारण n, पोत m, खुमास f, विणकर f, वीण f, विणप f. ८ *the fibre which forms the substance of any fibrous material* दोरा m, तंतु m, रेपा f, रेखा f, शीर f (शिरा *pl.*), &c. ९ *the hair side of a piece of leather, or the marking on that side* चामड्याची केंस असलेली वरची बाजू f. किंवा त्या बाजूवरील खूण f. १० *pl. the remains of grain after brewing* (अर्क काढलेल्या धान्याचा) चोथा m, कचरा m, मल m, कीट n. ११ (hence) *any residuum* गाळ m, रेंदा m. G. v. t. *to paint in imitation of the grain of wood, marble &c.* (लांकूड, दगड इ०कांच्या दोऱ्यांसारखे) दोरे काढून रंगविणें. २ *to form* ( powder, sugar, ) *into grains* (पीठ, साखर इ०कांचे) बारीक बारीक कण करणें, रवाळ करणें. ३ *to take the hair off the skin* (कातड्यावरील) केंस काढून टाकणें -काढणें, केंस काढून (चामडें) साफ करणें. G. v. i. *to granulate* बारीक बारीक कण होणें *in. con. g. of s.*, रवाळ -रवेदार होणें. Grain'ed a. बारीक बारीक (कण) झालेला, मोडलेला (दाणा). २ रवेदार, रवाळ. ३ (hence) *rough* खडबडीत, खरखरीत. ४ *ingrained* आंगांत भिनलेला -मुरलेला -खिळलेला -बाणलेला. ५ *painted in imitation of the grain of wood* लांकडांतील दोऱ्यांसारखा रंगवलेला. Grain'er n. (चुना मारून टाकून कातडें नरम राहावें म्हणून तें कमावतांना घातलेलें) खबूतराचें शीट n. २ *a knife for taking the hair off skins* (चामड्यावरील) केंस काढण्याची आरी f. ३ (a) लांकडासारखा रंग देणारा. (b) असा रंग देण्याचा कुंचला m. Grain'ing

*n. indentation or roughening* ( as on the edges of coins ) ( नाण्याच्या परिघाभोंवतीं ) उभे दोरे पाडणें *n.* २ ( कातडें कमावतांना तें नरम करून ) मोहरेदार करण्याची कृति *f.* ३ लांकडासारखा रंग देणें *n.* Grain'y *a. granular* रवाळ, कणीदार. Against the grain *against the fibre of the wood* लांकडाच्या दोऱ्याच्या उलट. २ ( hence ) *against the natural temper or nature, reluctantly* स्वाभाविक प्रकृतीच्या उलट, मूळ स्वभावाच्या विरुद्ध, उलट, विरुद्ध, नाखुषीनें, जुलुमानें, जुलुमास्तव, मनाच्या विरुद्ध -उलट. With a grain of salt *with reservation* ( as of a story that cannot be admitted ) ( एखादी गोष्ट अगदींच -धडधडीत खोटी दिसूं -भासूं नये म्हणून ) कांहीं तरी -थोडीशी मर्यादा राखून -ठेवून, अटीवर. Grain'-worm *n.* धान्यावर पडणारा किडा *m* -कीड *f.* In grain *deeply seated, fixed, innate* भिनलेला, बाणलेला, मुरलेला; as, "Anguish *in grain*". To dye in grain *to dye of a fast colour* पक्का रंग देणें. Grain'-cellar *n.* पेंव *n,* ( धान्य ठेवण्याचें ) भुयार *n* -तळघर *n.* Grain'-dealer *n.* भुसारी *m,* मोदी *m,* धान्याचा व्यापारी *m,* तांदुळवाला *m* ( loosely ). Grain'-parcher *n.* भडबुंज्या *m,* भुजावी *m,* भुजारा *m,* भाजपी *m,* ( चणे इ० ) धान्य भाजणारा.

Gram ( gram ) [ Anglo-Ind., perh. from Port. *grao* —L. *granum*, grain. ] *n. bot.* चणा *m,* हरभरा *m.* [Acid obtained from G. plants ( हरभऱ्याची ) आंब *f.* Flour of G. बेसन *n.* Flour of G. boiled and spiced अळण *n.* G. soaked and parched फुटाणा *m,* फुटाणे *m.pl.,* चणा *m,* चणे *m. pl.* Green pods of G. parched पोपटा *m* (?), हवळा *or* हुळा *m or* उळा *m.* Green G. plants given to fatten horses फसल *f.* pod of G. घांटा *m.* ]

Gram, Gramme ( gram ) [ Fr. –L. –Gr. *gramma*, a letter, a small weight. ] *n. the unit of weight in the metric system. It was intended to be exactly, & is very nearly, equivalent to the weight in a vacuum of one cubic centimetre of pure water at its maximum density. It is equal to 15.432 grains* एक ( प्रकारचें ) वजनी माप *n,* ग्राम *m.*

Gramineal, Gramineous ( gra-min'ē-al, -ous ) [ L. *gramineus* –*gramen, graminis*, grass. ] *a.* गवताच्या जातीचा, तृणजातीय, तृणसदृश, गवतासारखा.

Graminifolious ( grami-ni-fō'li-us ) [ L. *gramen*, grass, & *folium*, a leaf. ] *a. bot. bearing leaves resembling those of grass* गवताच्या पानांसारखीं पानें असलेला.

Graminivorous ( grami-niv'-ō-rus ) [ L. *gramen, graminis*, grass, & *vorare*, to eat greedily.] *a. feeding on grass* तृणभक्षी, तृणाहारी, तृणाद, तृणजीवी.

Grammar ( gram'-ėr ) [ Fr. *grammaire*, from L. L. *gramma*, a letter, with the termination –*arius* -Gr. *gramma*, a letter -Gr. *graphein*, to write.] *n.* ( a ) *the science which treats of the principles of language* व्याकरणशास्त्र *n,* ( or briefly ) व्याकरण *n.* ( b ) *language* ( spoken or written ) *in accordance with grammar* व्याकरणशुद्ध भाषा *f* ( बोलणें *n* or लिहिणें *n.* ), शुद्धभाषापद्धति *f.* २ *a treatise on the principles of language* व्याकरण *n,* व्याकरणग्रंथ *m,* व्याकरणाचें पुस्तक *n.* ३ *a treatise on the elements of any science* ( कोणत्याही शास्त्राच्या ) मूलतत्वांचें पुस्तक *n,* मूलतत्वविचार *m;* as, "A G. of geography." Comparative G. *the science which determines the relations of kindred languages by examining and comparing their grammatical forms* तुलनात्मक व्याकरणशास्त्र *n,* व्याकरणदृष्ट्या केलेली ( निरनिराळ्या भाषांची ) तुलना *f.* G. school (a) *a school, usually endowed, in which Latin and Greek grammar are taught, as also other studies preparatory to colleges* (उच्चशिक्षणक्रम सुरू होण्यापूर्वीं अवश्य असणाऱ्या ) इतर विषयांशिवाय जेथें लॅटिन व ग्रीक व्याकरण शिकवितात ती शाळा *f,* ( इंग्लंडांतील ) प्राथमिक शिक्षणाची शाळा *f.* (b) (in the American system of graded common schools ) *an intermediate grade between the primary school and the high school, in which the principles of English grammar are taught* प्राथमिक शिक्षण आटोपल्यानंतर इंग्रजी व्याकरणाचें ज्ञान -नियम शिकविण्याची ( अमेरिकेंतील ) शाळा *f.* Gramma'rian *n.* व्याकरणविद्, व्याकरण जाणणारा. २ *one who writes on, or teaches, grammar* व्याकरणी, वैय्याकरणी, वैय्याकरण, व्याकरणकार. [Mere G. केवलवैय्याकरणी, शुद्धवैय्याकरण.] Grammat'ic, -al *a. of, or pertaining to, grammar* व्याकरणाचा, व्याकरणासंबंधीं -विषयक, व्याकरणिक. २ *according to the rules of grammar, grammatically correct* व्याकरणाच्या नियमाप्रमाणें, व्याकरणशुद्ध, व्याकरणसिद्ध, व्याकरणानुसार. [G. accuracy (व्याकरणदृष्ट्या ) शब्दशुद्धि *f,* व्याकरणाची निर्दोषता *f,* व्याकरणशुद्धत्व *n.* G. error व्याकरणदृष्ट्या चूक *f,* व्याकरणाची चूक *f.*] Grammat'ically *adv.* व्याकरणदृष्ट्या, व्याकरणाच्या नियमानें, व्याकरणानुरूप, व्याकरण संभाळून. [If looked at G. व्याकरणदृष्ट्या, व्याकरणदृष्टीनें पाहिलें असतां. ] Grammat'icalness *n.* Grammat'icaster *n. a petty grammarian* अप्रसिद्ध वैय्याकरणी, थोडेंसें व्याकरण जाणणारा. Grammat'icise *v. t. to render grammatical* व्याकरणशुद्ध करणें, व्याकरणदृष्ट्या दोष काढून टाकणें. Grammat'icism *n. a point or principle of grammar* व्याकरणाचा मुद्दा *m* -तत्व *n.*

Gramophone ( gra'm-ō-fōn ) [ Gr. *gramma*, writing, and *phone*, sound ; Cf. Sk. भण् to speak. This word is formed by inversion of Phonogram. ] *n. an instrument devised for permanently recording and reproducing sounds* गाणें किंवा

भाषण कायमचें लिहून ठेवण्याकरितां व तें पुन्हां हवें तेव्हां गाऊन किंवा बोलून दाखविण्याकरितां तयार केलेलें यंत्र *n*, ( popularly called ) बोलण्याचें यंत्र *n*.

Grampus ( gram'pus ) [ A sailor's corruption, through It., Port., or Span. of the L. *grandis piscis*, great fish.] *n. zool.* एक जातीचा मोठा मासा *m*.

Granary ( gran'ar-i ) [L. *granaria -granum*, grain.] *n. a corn-house, a storehouse for grain* कोठार *n*, (dim.) कोठी *f*, धान्यागार *n*, धान्यशाला *f*, धान्यकोष्ठ *m*, अन्नकोष्ठ *m*, (धान्याचें) दास्तान *n* -भांडार *n*. [SUBTERRANEOUS G. पेंव *n*. LINING OF IT ( COMPOSED OF BUNDLES OF HOLCUS ) मेंळा *m*. ] २ *fig. a region fertile in grain* सुपीक प्रांत, *m* धान्यसमृद्ध प्रदेश *m*.

Granate, See Garnate.

Grand ( grand ) [Fr. *grand* —L. *grandis*, great.] *a. great, extensive* मोठा, मोठा थोरला, भव्य, विशाल; as, "A G. mountain or army." २ (hence) *chief, principal* मुख्य, प्रमुख, प्रधान, अग्रगण्य; as, "Our G. foe, Satan." ३ *illustrious, dignified* ( said of persons ) विराजमान, आलिजाहा, भव्य, थोर, वैभवशाली, थाटाचा. ४ *magnificent, splendid* ( said of things ) भव्य, महान्, तेजस्वी, प्रगल्भ; as, " A G. view or conception." ५ *standing in the second or some more remote degree of parentage or descent* ( वंशज किंवा पूर्वज या नात्यानें दुसऱ्या किंवा त्यापेक्षां ) खालच्या अगर वरच्या पिढींतील; as, " A G.-son, G.-father ". G. cordon *n*. रुंद रेशमी फीत *f*. २ ( ज्या सन्मान्य अधिकाऱ्याच्या पोषाखावर अशा तऱ्हेची फीत असते तो ) ग्रॅन्ड कार्डन नांवाचा अधिकारी *m*. G. cross *n*. ( a ) *the highest rank of knighthood in the order of the Bath* इंग्लंडांतील ग्रॅन्ड क्रॉस पदवीची सरदारी *f*. ( b ) *a knight grand cross* ग्रॅन्ड क्रॉस पदवीचा सरदार *m*. G. Duchess ( a ) *the wife or widow of a grand duke* ड्यूकीण *f*, (राजाच्या खालच्या प्रतीच्या ) ड्यूकची बायको *f* -विधवा *f*. ( b ) *a lady having the sovereignty of a duchy in her own right* ड्यूकच्या अमलाखालच्या प्रांताची मालकी जिच्याकडे आली आहे अशी उमरावीण *f*. ( c ) ( in Russia ) *a daughter of the Czar* ( रशियाच्या ) झार(बादशहा)ची मुलगी *f*. G. duke *n*. ( *a* ) *a sovereign duke inferior in rank to a king* राजाच्या खालच्या प्रतीचा सत्ताधीश सरदार *m*, वरिष्ठ ड्यूक *m*. ( b ) ( in Russia ) *a son of the Czar* ( रशियाच्या ) झार (बादशहा) चा मुलगा *m*. G. guard *n*. डावा खांदा आणि छाती या दोहोंचें रक्षण करणारें चिलखत *n*. G. juror *n*. *a member of a grand jury* मोठ्या पंचसभेंतील -सभेचा सभासद *m*. G. jury *n*. ( *law* ) *a jury of not less than twelve men, and not more than twenty three, whose duty it is, in private session, to examine into accusations against persons charged with crime, and if they see just cause, then to find bills of indictment against them, to be presented to the court* ( called also *grand inquest* ) (गुन्ह्याची चौकशी करण्यांत न्यायाधीशास मदत करणारी बारांपेक्षां कमी व तेवीसांपेक्षां जास्त सभासद नसलेली) मोठी पंचसभा *f*, ग्रॅन्ड ज्यूरी *f*. G. juryman *n*. (अशा) मोठ्या पंचसभेंतील सभासद *m* -एक पंच *m*. G. lodge *n*. *the chief lodge, or governing body, among free masons and other secret orders* (फ्रीमेसन्ससारख्या गूढसांप्रदायी संस्थेचें) नियामक -व्यवस्थापक -मुख्य मंडळ *n*. Gran'deur *n*. *greatness, splendour, dignity, magnificence* भव्यता *f*, भव्यपणा *m*, महानता *f*, थाटमाट *m*, डौल *m*, माहात्म्य *n*, प्रताप *m*, प्रभाव *m*, वैभव *n*, मोठेपणा *m*, थोरवी *f*, ऐश्वर्य *n*, बडेजाव *m*, भूति *f*, विभूति *f*. Grand'father *n*. *a father's or mother's father* ( paternal ) आजा *m*, प्रपिता *m*, पितामह *m*, पितृपिता *m*, ( paternal or maternal ) आजा *m*, ( maternal ) माय आजा *m*, मातामह *m*, मातृपिता *m*. [ BROTHER OF G.-FATHER चुलत आजा *m*. –HIS WIFE चुलत आजी *f*. G.-FATHER OF G.-FATHER निपणजा *m*, वृद्धप्रपितामह *m*. ] Grandil'oquence [ L. *grandis*, & *loquor*, to speak. ] *n*. *bombast* ( usually in a *bad sense* ) मोठ्या मोठ्या बाता *f. pl.*, सव्वा हात भाषण *n*, शब्दावडंबर *n*, शब्दजाल *n*. Grandilo'quent, Grandilo'quous *a*. *bombastic* मोठे मोठे शब्द वापरणारा, बोलण्यांत रेलचेल -अघळपघळ, शब्दावडंबरी. Gran'diose *a*. *imposing, splendid* ( in a *good sense* ) मनोवेधक, खुबीदार, मनांत ठसण्या -भरण्याजोगी, मनांत ठसणारा -भरणारा, चित्तहारी, &c. २ *bombastic* ( in a *bad sense* ) शब्दजालप्रचुर, निवळ मोठमोठ्या शब्दांचा भरणा असलेली; as, "A G. style." Grandios'ity *n*. Grand'ly *adv*. Grand'ma *or* Grand'-mamma *or* Grand'mother *n*. *the mother of one's father or mother* ( paternal ) आजी *f*, पितामही *f*, ( paternal *or* maternal ) आजी *f*, ( maternal ) मायआजी *f*, मातामही *f*. [GREAT G. (–PATERNAL) पणजी *f*, प्रपितामही *f*. G. OF G. निपणजी *f*. ] Grand'-motherly *a*. Grand'-nephew *n*. *grandson of one's brother or sister* भावाचा किंवा बहिणीचा नातु *m*. Grand'pa *or* Grand'-papa *n*. *a grandfather* आजा *m*. G. sire *n*. (specif.) *a grandfather* आजा *m*, आजोबा *m* (*lit*.). २ ( more generally ) *any ancestor* ( कोणताही ) पूर्वज *m* ( पुरुष ). G.–son *n*. ( in male or female line ) नातु *m*. [–SON'S SON=पौत्र *m*. -DAUGHTER'S SON दौहित्र *m*.] G. uncle *n*. ( आपल्या ) बापाचा किंवा आईचा चुलता *m*, चुलत आजोबा *m* -आजा *m*.

Grange ( grānj ) [ Fr. *grange*, barn, –L. *granum*, corn. Grange ह्या शब्दाचा प्राचीन अर्थ " धान्याचें कोठार " असा होता. ] *n*. *a farm house with buildings for farming purposes* (शेतकऱ्याचा) शेतावरील वाडा *m*, शेतावरील खोपट *n*. २ *a farm* शेत *n*, क्षेत्र *n*. ३ *an association of farmers designed to further*

*their interests* शेतकऱ्यांचा संघ *m*, शेतकरीसभा *f*, शेतकरीमंडळ *n*. Gran'ger *n*. *a member of a grange* शेतकरीमंडळाचा सभासद *m*.

Granite ( gran'it ) [ It. *granito*, granite, grained –L. *granum*, grain. ] *n*. *geol*. *a granular, crystalline rock consisting essentially of quartz, orthoclase-feldspar, and mica, much used in building* वज्रतुंड or simply वज्र *m*, ( स्फटिक, चंद्रकांत आणि अभ्रक या पदार्थांच्या कणांच्या अनियमित मिश्रणानें झालेला ) ग्रानाइट नांवाचा ( एक जातीचा ) दगड *m*. यांतील घटकपदार्थांचे कण ( grains ) वेगळे वेगळे दिसतात. याचवरून यास ग्रानाइट ( Granite ) हें नांव पडलें आहे. गया येथील विष्णुपदाचें प्रसिद्ध देवालय व बुद्धगयेंतील बौद्ध लोकांचीं प्रसिद्ध देवळें याच दगडांचीं बांधलेलीं आहेत. Granit'ic *a*. *of, pertaining to, or of the nature of, granite* वज्रतुंडदगडाचा, वज्राचा, वज्रतुंड दगडाच्या जातीचा. २ ( *fig.* ) *hard, rigid, unimpressionable* कठिण, न झिजणारा. Granit'iform *a*. *geol*. *resembling granite in structure or shape* ग्रानाइटसारखा.

Grant (grant) [O. Fr. *graanter*, (*craanter*, *creanter*,) to promise, as if from L. L. *credento* –L. *credere*, to believe. ] *v. t. to give over* ( usually in answer to *petition* ) ( मागितल्यावरून ) देणें. २ ( *law* ) *to convey, to transfer* ( property ) *by deed* नांवावर चढवून देणें, ( दुसऱ्याच्या ) नांवानें करून देणें. ३ *to bestow with or without compensation* ( particularly in answer to request or prayer ) ( मोबदला घेऊन किंवा बक्षीस म्हणून ) देणें, दान करणें, बक्षीस देणें. ४ *to allow, to concede* कबूल -मान्य करणें, कबूल -मान्य असणें *with* स or ला *of s*. G. *n*. *concession, allowance, permission* परवानगी *f*, मोकळीक *f*, सूट *f*, सवलत *f*. २ *the admission of something in dispute* कबुली *f*, कबुलजबाब *m*, स्वीकार *m*, रुकार *m*. ३ *a gift, a boon* दान *n*, बक्षीस दिलेली -केलेली वस्तु *f*. ४ ( a ) ( *law* ) *transfer of property by deed or writing* ( लेख करून जमिनीची -मिळकतीची मालकी दुसऱ्यास देऊन टाकण्याचें) दान *n*, इनाम *n*, इनामत *n*, बक्षीस *n*. [ Deed of G. बक्षीसपत्र *n*. G. of land जहागीर *f*, इनामत *f*. Holder of a G. इनामदार, जहागीरदार. Resumption of a G. दत्तापहार *m*. Tax upon a G. इनामपट्टी *f*.] (b) (also) *the deed by which the transfer is made* इनामपत्र *n*, शासनपत्र *n*, सनद *f*. [ Forced G. कूटशासन *n*. Grants -compreh. इनामइक्राम *n*. ] Grant'-in-aid *n*. मदतीदाखल देणगी *f*. Grant'able *a*. Grantee' *n*. ( *law* ) *the person to whom a grant is made* इनाम घेणारा -पावणारा, प्रतिग्रहीता. Grant'er *n*. *one who grants* दाता *m*. Grant'or *n*. ( *law* ) *the person by whom a grant is made* इनाम -बक्षीस देणारा.

Granulate ( gran'ū-lāt ) [ Formed from Granule. ] *v. t. to form into small grains or granules* दाणेदार -कण्याकण्यांचा -रवेदार -रवाळ करणें. २ *to roughen* कणकण असलेला -खरबरीत करणें. ३ *to unite as by granulation* खरबरीत करून जोडणें -सांधणें. G. *v. i.* ( of a wound, ulcer &c. ) *to develop a number of small prominences like granules* ( जखम, गळूं, फोड इ० ) माठळणें,माठणें, मठारणें, शेजेस येणें, किरळ *m*. फुटणें *in. con. with* ला *of s*. Granula'tion *n*. दाणेदार करणें *n*. २ (of a wound ) अंगूर *m*, किरळ *m*. ३ डोळ्यांतील खुपऱ्या *f. pl.* Medicaments to effect G. माठवण *n*. Granul'ated *a*. दाणेदार, रवेदार.

Granule ( gran'ūl ) [ L. *granulum*, dim. of *granum*. See Grain. ] *n*. dim. of Grain which see.

Grape ( grāp ) [ O. Fr. *grape*, M. Fr. *grappe*, bunch or cluster of grapes. ] *n*. *bot*. *a well-known edible berry growing in pendent clusters* (*the berries are smooth-skinned, have a juicy pulp, and are cultivated in great quantities for table use and for making wine and raisins*) द्राक्ष *n*, अंगूर *n*. [Black G. काळें द्राक्ष *n*. Juice of the G. द्राक्षारस *m*, द्राक्षांचा रस *m*. ] Sour grapes *things which persons affect to despise because they cannot possess them* ( –in allusion to Æsop's fable of the fox and the grapes ) ( इसापनीतींतील कोल्ह्याच्या गोष्टींतील ) आंबट द्राक्षें *n. pl.*, ( मनांतून पाहिजे असून मिळण्याचा संभव नसल्यामुळें ) नको म्हटलेली वस्तु *f*. २ *bot. the grapevine* द्राक्षा *pop.* द्राक्ष *f*, द्राक्षी *f*, द्राक्षांचें झाड *n* -वेल *f* -लता *f*. ३ ( *man.* ) *a mangy tumour on the leg of a horse* घोड्याच्या पायावरील खरपुडी बांधलेलें गळूं *n*. ४ ( *mili.* ) *grapeshot* कुलपी गोळा *m*. Grape'less *a*. *wanting grapes or the flavour of grapes* द्राक्षांची गोडी *f* -रुचि *f* नसलेला, बेचव. Grap'ery *n*. *an inclosure used for the cultivation of grapes* द्राक्षांची बाग *f*. Grape'shot *n*. ( *mili.* ) *a cluster, usually nine in number, of small iron balls, put together by means of cast-iron circular plates at top and bottom, with two rings, and a central connecting rod, in order to be used as a charge for cannon* एक जातीचा कुलपी गोळा *m*. Grape'stone *n*. *a seed of the grape* द्राक्षांतील बी *f*. Grap'y *a*.

Graph ( grāf ) [ Orig. an abbreviation of *graphic formula*. See Graphic. ] *n*. *a kind of symbolic diagram in which a system of connections is expressed by spots or circles* (विशेषसंकेतपूर्वक ) सांकेतिक आकृति *f*, सांकेतिक चित्र (वक्र, रेषा ).

Graphic,-al ( graf'-ik,-al ) [ L. *graphicus*, belonging to painting or drawing –Gr. *graphikos* –*graphein*, to write. ] *a*. *of, or pertainiag to, the arts of painting and drawing* रंगित काम किंवा चित्रकला यांसंबंधीं. २ *of, or pertaining to, the art of writing* लेखनकलेचा -संबंधीं. ३ *written or engraved* लिहि-

केला, लिखित, लेखी, खोदींव, खोदलेला, खोदून काढलेला. ४ *well delineated, clearly and vividly described* हुबेहुब, प्रत्यक्ष, चित्रासारखा, स्वरूपदर्शक, मूलनिदर्शक -बोधक, उत्तम वर्णन केलेला, सुवर्णनात्मक, रसभरित. ५ *vivid* हुबेहुब. ६ *pertaining to the use of diagrams, linear figures or symbolic curves* सांकेतिक आकृतीनें किंवा रेषेनें किंवा वक्रानें दाखविलेला, आकृतिनिर्दिष्ट, साकृति, सचित्र, चित्रित.

Graphology (gra-fol'o-ji) [Gr. *graphein*, to write, & *logos*, discourse. ] *n. the study of hand-writing as a means to character* हस्ताक्षरावरून मनुष्याचा स्वभाव जाणण्याची विद्या *f.* हस्ताक्षरसामुद्रिक *n.*

Grapnel ( grap'nel ) [ Fr. *grappin*; from root of Grapple. ] *n. naut. a small anchor, with four or five flukes or claws, used to hold boats or small vessels* ( चार किंवा पांच हूक अथवा आंकडे असलेला होड्या वगैरे ओढून धरण्याचा गलबतावरील ) गळ *m*, नांगर *m.* २ ( hence ) *a grappling iron* ( written also *grapline* or *grapnel* ) गळ *m.*

Grapple ( grap'-pl ) [ Fr. *grappiller*, the grapple of a ship –*graper*, to pluck, prop. to seize. ] *v. t. to seize* ( झोंबल्यासारखें ) धरणें -घेणें, झोंबणें, झोंबाडणें. [To G. AT (झोंबून) धरूं पाहणें.] २ *to join indissolubly, to fix* जाम -घट्ट -मजबूत -न हालेसा बसविणें, खिळवून टाकणें, खिळवणें, जखडून टाकणें -बांधणें. G. *v. i. to contend in close fight* ( -शीं ) झोंबणें -झोंबी करणें -खेळणें -घेणें. To G. with *to enter into contest with, resolutely and courageously* ( -शीं ) नेटानें टक्कर मारणें -देणें, झोंबी खेळणें. G. *n. close hug in contest* झोंबी *f.* २ ( *a* ) *a grab* गुबारा *m.* ( *b* ) *naut. a grappling iron* गळ *m.*

Grasp ( grasp ) [ M. E. *graspen*, to grope. ] *v. t. to catch* मुठींत -पंज्यांत -कवज्यांत -हातांत -हातानें धरणें पकडणें, धरणें, पकडणें. [ To G. AT मुठींत धरूं -पकडूं पाहणें.] २ *to comprehend* समजणें, ग्रहण -आकलन करणें, मनांत उतरणें, ध्यानांत येणें, लक्षांत येणें (the last three with ) *in. con. g. of s.* G. *v. i. to struggle, to strive* पकडण्याचा प्रयत्न करणें, धडपड करणें, धडपडणें. G. *n.* (*a*) *a grip of the hand* मूठ *f*, मुष्टि *f*, मिठी *f*, पकड *f.* (b) *reach of the arms* डाव *m*, हस्तग्राह *m*, तावडी *f*, कवजा *m*, आवांका *m.* २ *wide-reaching power of intellect* ( *to comprehend subjects and hold them under survey*) आकलनशक्ति *f*, ग्रहणशक्ति *f*, धारणा *f*, पोंच *m*, पोंहोंच *m*, आवांका *m.* ५ *the handle of a sword or of an oar* मूठ *f.* Grasp'able *a.* Grasp'er *n.* Grasp'ing *a. catching* धरणारा. २ *greedy of grain, miserly* अधाशी, चिकट, कंजुष, कवडीचुंबक; as, "He is a G. man." Grasp'ingly *adv.* Grasp'ingness *n.* अधाशीपणा *m.* Grasp'less *a. relaxed* सैल, ढिला.

Grass ( gras ) [ A. S. *gœrs*, *grœs*, grass.] *n. herbage, pasture* गवत *n*, घास *m*, तृण *n*, वैरण *f*, कडबा *m* ( *loosely* ). G. *v. t. to cover with grass* गवतानें झांकणें. २ ओप देण्याकरितां गवतावर पसरणें. ३ *to feed* ( cattle ) *on grass* गवत चारणें. G. *v. i. to produce grass* ( -वर ) गवत उगवणें *in. con.* Grass'ed *pa. p. a.* see Grassy. Grass'-hopp'er *n.* एक जातीचा टोळ *m.* २ *fig.* ( as a term of derision or reproach ) (टोळासारखा ) अल्पकाळ टिकणारा प्राणी. Grass'iness *n.* Gras'sing *v. n.* Grass'less *a.* Grassy *a. covered with grass* गवतानें आच्छादलेला, ( -वर ) गवत उगवलेला. २ *of, or pertaining to, grass* गवताचा -संबंधीं. ३ *resembling grass* गवतासारखा.

Grate ( grāt ) [ M. E. *grate*, a grating –L. *crates*, a hurdle. ] *n. a structure or frame containing parallel or crossed bars with interstices* गजांची जाळी *f.* २ *a frame or bed of iron bars for holding fuel while burning* ( शेगडीला -चुलीला बसविण्याची लोखंडी) गजांची जाळी *f* -आगटी *f.* Grat'ed *a.* जाळीचा, जाळी बसविलेला. Graticulā'tion [ Fr. *graticuler*, to divide into small squares in painting –L. *craticula*, a small hurdle. ] *n. the division of a design or draught into squares in order the more easily to reproduce it in larger or smaller dimensions* ( नमुना, संकेतपट, चित्रपट इ०कांमध्यें ) चौकटी -चौकोन पाडणें, चतुष्कोनांकित करणें. (S.). Grat'icule *n. a design or draught which has been divided into squares, in order to reproduce it in the dimensions* चतुष्कोनांकित केलेला संकेतपट *m* -चित्रपट *m*, नमुना *m*, इ०. Grat'ing *n.* जाळीचा कठडा *m.*

Grate (grāt) [ O. Fr. *grater* (F. *gratter*), to scrape.] *v. t. to rub roughly or harshly causing a harsh sound* खरखर घांसणें, ( of teeth ) दांत खाणें, करकरवणें, करकर आवाज काढणें. २ *to reduce to small particles by rubbing* ( किसणीवर ) किसणें, घांसून कीस काढणें -करणें. ३ *to fret, to irritate* चिडवणें, चीड आणणें, संतापवणें, दांत ओंठ खावयास लावणें. G. *v. i. to make a harsh sound by friction* करकरणें, खडखडणें, खरखरणें, खरारणें, घांसण्यानें कर्कश आवाज होणें. २ *to cause wearing and tearing* घांसून जाणें, घसणें, झिजणें. ३ *to offend by oppression or importunity* (-ला) संताप -चीड आणणें, राग येणें, संताप होणें, (-ला) घुस्सा येणें. Grat'er *n. that which grates;* ( esp. ) *an instrument or utensil with a rough indented surface for rubbing off small particles of any substance* किसणी *f.* Grat'ing *a. harsh* कर्कश, करकरणारा. G. *n. a harsh sound caused by attrition* ( संघर्षणानें उत्पन्न झालेला) कर्कश आवाज *m*, करकर आवाज *m.* Grat'ingly *adv.* करकरां.

Grateful ( grāt'-ful ) [Hybrid; O. Fr. *grat*, pleasing, from L. *gratus*; with E. suffix *-ful.* ] *a. having a due sense of benefits received* कृतज्ञ, उपकारज्ञ, उपकार स्मरणारा -आठवणारा, निमकहलाल, ओभारी.

२ *affording pleasure, gratifying, delicious* गोड, रुचकर, स्वादिष्ठ, सुख *n* -आनंद *m* -समाधान *n* देणारा, सुखद -प्रद, सुखावह, सुखकर, हृदयंगम, रम्य, रमणीय, खूप करणारा; as, "A G. present; A G. sleep." Grat'efully *adv.* कृतज्ञतापूर्वक, &c. Grat'efulness *n.* कृतज्ञता *f,* निमकहलाली *f.* २ गोडी *f,* सुखदायकत्व *n,* हृदयंगमपणा *m,* रमणीयत्व *n,* &c. Grat'ify *v. t. to please, to give pleasure to, to satisfy, to soothe, to indulge* संतोषविणें, सुखविणें, संतोष *m* -सुख *n* -देणें, खुपी -खुप -आनंदित -संतुष्ट -संतोषित करणें, पुरवणें, फेडणें, पूर्ण -तृप्त करणें, संतर्पणें, संतर्पण करणें *g. of o.;* as, "To G. the taste, the appetite, the senses, the desires, the mind, &c." २ *obs. Shakes. to requite, to recompense* (-चे) उपकार जाणणें -स्मरणें, मोबदला करणें-देणें. Gratifica'tion *n. -the act.* संतोषविणें *n,* संतोषण *n,* संतोषीकरण *n,* पुरवणें *n,* आराधन *n,* शांति *f,* शमन *n,* संतर्पण *n,* पुरे लाड *m. pl.,* तृप्तता *f,* &c. २ *that which affords pleasure* संतोषहेतु *m,* संतोष-कारण *n.* ३ *enjoyment, fruition, delight* तुष्टि *f,* तृप्ति *f,* समाधान *n,* संतोष *m,* आनंद *m,* प्रमोद *m,* सुख *n,* हर्ष *m.* ४ *a reward, a recompense* मोबदला *m,* पारितोषिक *n,* इनाम *n,* बहाल केलेली वस्तु *f.* Grat'ified *a.* संतोषित, संतुष्ट, तृप्त, समाधानी, पुरवलेला, फेडलेला, संतर्पित, &c. Grat'ifier *n.* सुख देणारा, &c.

Graticulation. See under Grate 1.

Graticule. See under Grate 1.

Gratify, See under Grateful.

Gratis ( grā'tis ) [L. *gratiis,* out of favour or kindness—L. *gratia,* favour.] *adv. for nothing, without fee or reompense, freely, gratuitously* फुकट, फुकट-वारी, फुकटाफुकटी, फुकटफाकट, मोफत, मोलावांचून.

Gratitude ( grat'i-tūd ) [ Fr.,—L. *gratus,* pleasing. ] *n. warm and friendly feeling toward a benefactor, thankfulness* कृतज्ञता *f,* उपकार स्मरणें *n* -आठवणें *n* -जाणणें *n,* उपकारस्मरण *n* -स्मृति *f,* उपकारज्ञता *f.*

Gratuitous ( gra-tū'i-tus ) [ L., *-gratus,* pleasing. See Gratis.] *a. done or given for nothing* मेहेरबानी दाखल -खातर केलेला -दिलेला, बहाल केलेला, बक्षिसा-दाखल. See Gratis. २ *not called for by circumstances, voluntary* कोणीही विचारलें नसतां केलेला, अनाहुत, आगंतुक, आगंतुकीचा, बिनजरूरीचा. Gratu'itously *adv.* फुकट, मोफत, &c. २ ( देणाऱ्यानें ) खुष होऊन. Gratu'itousness *n.* मोफत दिलेली स्थिति *f.* Gratu'ity *n. a present* बक्षिसादाखल दिलेलें वेतन *n,* बक्षीसरूपाचें वेतन *n.* -पगार *m.*

Gratulate ( grat'ū-lāt ) [ L. *gratulatus,* p. p. of *gratulari,* to congratulate *-gratus,* pleasing, agreeable.] *v. t.* (R.) *Shakes. to salute with declarations of joy, to congratulate* अभिनंदन करणें. G. *a. obs. Shakes. worthy of gratulation* अभिनंदनीय, अभिनंदन करण्यासारखा. Gratula'tion *n. congratulation* अभिनंदन *n.* Grat'ulatory *a.* अभिनंदनपर.

Gravamen ( grav-ā'men ) [ L., -L. *gravis,* Sk. गुरु, heavy. ] *n.* ( *law* ) *the grievance complained of; the substantial cause of the action* ( फिर्यादीची ) तकरार *f,* ( फिर्याद करण्याचें ) कारण *n,* फिर्याद *f.* २ ( also in general ) *the ground or essence of a complaint* तकरारींतील तात्पर्य *n* -सारांश *m.* Grava'mina *pl.* L. Gravamens *pl.* E.

Grave ( grāv ) [ M. E. *graven.* A. S. *grafan,* pa. t. *grof,* Gr. *graphein,* L. *scribere,* to write, Icel. *grafa,* a tomb. या शब्दाचा मूलार्थ 'खणणें' असा आहे.] *v. t. to engrave* खोदणें, कोरणें, कोरींव काम करणें, २ *to impress deeply* ( on the mind ), *to fix indelibly* ( मनावर ) पक्कें करणें -ठसविणें -बिंबविणें. ३ ( *obs.* ) *Shakes. to entomb, to bury* थडग्यांत पुरणें -गाडणें -घालणें. G. *v. i. to practise engraving* खोदकाम करणें -शिकणें. G. *n. an excavation in the earth as a place of burial* पुरून टाकण्याकरितां जमिनींत काढले-ला खळगा *m* -खळगी *f* -खाडा *m.* २ *a tomb* थडगें *n,* समाधि *f* (of Saints ), कबर *f* (of Mahamadans ). ३ ( hence ) *death, destruction* मृत्यु *m,* मरण *n,* नाश *m,* अंत *m,* काल *m* ( S. ). Grav'ed *or* Grav'en *pa. p.* Grave clothes *n. pl.* कफनें *n. pl.,* प्रेतवस्त्रें *n. pl.,* शववस्त्रें *n. pl.* Grave'less *a. without a grave, unburied* न पुरलेला, पुरून न टाकलेला. Grav'en *a. carved* खोदलेला, कोरलेला, खोदींव, कोरींव. [ GRAVEN IMAGE *an object of worship carved from wood, stone, &c.* खोदून तयार केलेली (लांकूड,दगड,इ॰कांची) देवाची मूर्ति *f.* ] Grav'er *n.* खोदकाम *n* -कोरींव काम करणारा. २ *an engraving tool* खोदणें *n,* कोरणें *n.* Grav'ery *n. engraving* खोदकाम *n.* Grave'stone *n.* a *tombstone* थडग्यावरील दगड *m.* Grave'yard *n. a cemetery* स्मशान *n,* कबरस्थान *n* ( of Mahomedans ). Grav'ing *n. carving figures in hard substances esp. by incision* ( खोदून ) मूर्ति घडणें *n* -कोरणें *n.* २ *impression* ( as upon the mind ) ठसा *m,* परिणाम *m.*

Grave ( grāv ) [ Fr. *grave,* -L. *gravem,* acc. of *gravis,* heavy. याचा मूळ अर्थ 'वजनदार, जड' असा आहे. ] *a. of importance, weighty, influential* महत्वाचा, महत्, वजनदार, भारी, सक्कम. २ *sedate, serious* ( said of character, relations, &c. ) गंभीर, प्रगल्भ, खोल,धीर, शांत. ३ *low, deep* (said of sound.) प्लुत, खोल, गंभीर. Grave'ly *adv. in a grave manner* गंभीरपणें-पणानें. Grave'ness *n.* गंभीरपणा *m,* गांभीर्य *n.* Grav'ity *n. heaviness* जडपणा *m,* गुरुत्व *n.* २ *sobriety of character or demeanour* गांभीर्य *n,* गंभीरपणा *m.* ३ *importance, significance, dignity, &c.* महत्त्व *n,* मोठेपणा *m,* महिमा *m,* गौरव *m.* ४ ( hence ) *seriousness, enormity* भयंकरपणा *m,* मोठेपणा *m,* महत्त्व *n;* as, "The G. of an offence." ५ ( *physics* ) *the*

*tendency of a mass of matter toward a centre of attraction* गुरुत्वमध्याकर्षण *n*, ( पदार्थांचें ) आकर्षण-मध्यगामित्व *n*. ६ ( *esp.* ) *the tendency of a body toward the centre of the earth* गुरुत्वाकर्षण *n*. ७ *mus. lowness of tone* ( oppo. to *acuteness* ) निचपणा *m*. Gravim'eter *n*. ( *physics* ) *an instrument for ascertaining the specific gravity of bodies* गुरुत्वमापक *m*, विशिष्टगुरुत्वमापक *m*. Gravimet'ric *a*. *chem. measured by weight* गुरुत्वमापकाचा, गुरुत्वमापकानें केलेला. Gravimet'rically *adv*. Centre of gravity गुरुत्वमध्य *m*. Gravimet'ry *n*. विशिष्टगुरुत्वमापन (on the analogy of महत्त्वमापन = Mensuration). Specific gravity ( पदार्थांचें ) विशिष्टगुरुत्व *n*.

Gravel ( grave'l ) [O. Fr. *gravele*, dim. of O. Fr. *grave*, gravel. Of Celtic origin.] *n*. *small fragments of stone* कंकर *m*, रेंव *f*, रेंवडा *m*. [ HEAP OF G. रेंवठा *m*.] २ *med. a deposit of small calculous concretions in the kidneys and the urinary or gall-bladder* सिकता *f*. ३ (also) *the disease of which they are a symptom* अश्मरी *f*, मुतखड्याचा रोग *m*, मुतखडा *m*. G. *v. t. to cover with gravel* ( -वर ) रेंव पसरणें. २ *to run ( a ship ) aground* ( जहाज ) वाळूंत रुतून बसविणें. ३ ( *colloq.* ) *to check or stop, to embarrass, to perplex* बंद पाडणें -करणें, तोंड मिटविणें, गप्प -चूप बसविणें, घाबरवणें; as, "*Graveled* for want of matter." ४ *to hurt or lame* ( a horse ) *by gravel lodged between the shoe and foot* (नाल व पाय यांच्यामध्यें) खडा -दगड रुपल्यामुळें लंगडा करून टाकणें. Grav'eling *or* Grav'elling *n*. *act of covering with gravel* (-वर ) रेती पसरणें *n*. २ *a layer or coating of gravel* रेतीचा थर *m*. Grav'elly *a*. रेंवट, रेंवाळ, रेंवसाळ. Grav'elstone *n*. *a pebble* बारीक खडा *m*.

Graveolent ( gravē'-ō-lent ) [ L. *gravis*, Sk. गुरु, heavy, & *olere*, to smell. ] *a*. ( R. ) *having a rank smell* दुर्गंधियुक्त, कुजकट, नासका, घाण येत असलेला. Grave'olence *n*. ( R. ) *a strong and offensive smell* उग्रट घाण *f*; कुजकट वास *m*, नासकी घाण *f*.

Graves ( grāvz ) Same as Greaves which see.

Gravid ( grav'-id ) [ L. *gravidus*, *gravis*, Sk. गुरु, heavy. ] *a*. *heavy with young, being with child, pregnant* गर्भार, गर्भवती, गर्भयुक्त. २ *fruitful* फलदायक, सुपीक, सुफल. Gravid'ity *n*. ( R. ) गर्भावस्था *f*; गर्भारपण *n*, गर्भयुक्तता *f*.

Gravitate ( grav'i-tāt ) [ From L. *gravis*, Sk. गुरु, heavy. See Grave *a*. ] *v. i. to be acted on by gravity* गुरुत्वाकृष्ट होणें, गुरुत्वाकर्षण पावणें, मध्य-केंद्र -अभिसरण -अभिगमन होणें *g. of s.* -करणें; as, "All bodies G. toward each other". २ *to tend* ( toward a direction or object ) ( -कडे ) कल *m* -ओढा *m* -गति *f*. असणें *g. of s.*, ( -कडे ) सरकणें, ( -च्या ) बाजूला झुकणें -सरणें -हालणें; as, "Politicians naturally G. toward the stronger party." Gravita'tion *n*. गुरुत्वाकर्षण *n*, गुरुत्वमध्याकडे जाणें *n*. २ ( *phys.* ) *the tendency of all bodies to attract each other* ( विश्वांतील सर्व वस्तूंचें ) परस्पराकर्षण *n*. Gravita'tional *a*. *phys.* गुरुत्वाकर्षणासंबंधीं. Grav'itative *a*. *tending to a centre* मध्याभिसरणशील.

Gravy ( grāv'i ) [ O. E. *greavie*. Prob. orig. an *a*. formed from *Greaves* ( which see ), the dregs of tallow. ] *n*. *the juice* ( dripping ) *from the meat while cooking* रसा *m*, पक्वमांसरस *m*, ( शिजतांना ) मांसांतून गळणारा रस *m*. २ *liquid dressing for flesh, meat, vegetables, &c.* ( कालवलेल्या मसाल्यासारखा ) इंग्रजी तऱ्हेचा पातळ मसाला *m*. Grav'y *a*. *tallowy, fatty* चरबीनें भरलेला, स्निग्ध, मांसल, लठ्ठ, लुटलुटीत.

Gray, Grey ( grā ) [ A. S. *græg*; allied to Ger. *grau* and L. *ravus*, tawny. ] *a*. *ash-coloured, of a white colour mixed with black* कबरा, कर्बूर, कसरा, करड्या रंगाचा, धूसर, राखाड्या रंगाचा, सुरकट. [ IRON G. करडा. ] २ *gray-haired, hoary, aged* पांढऱ्या -पिकलेल्या -शुभ्र -रुपेरी केंसांचा, पलित, करडा, पक्वकेश, पिकलेका, वृद्ध. ३ *old, mature* फार -पुष्कळ दिवसांचा, जुनाट, जुना, परिपक्व, परिणत, पक्का; as, "G. experience." G. *n*. *a gray colour* कबरा -कसरा -करडा &c. रंग *m*. २ *an animal or thing of a gray colour* (esp. a horse) कबऱ्या रंगाचा घोडा *m* -वस्तु *f*. Gray'ness *n*. कबरटपणा *m*, करडेपणा *m*. Gray antimony *n*. *min. stibnite* सुरमा *m*. G. back *n*. *the body louse* आंगावरील ऊ *f*. G. beard *n*. *Shakes.* ( *fig.* ) *an old man* वृद्ध मनुष्य, आजोबा *m* ( *colloq.* ), पिकलेलें पान *n* ( *fig. & colloq.* ), म्हातारा. २ *a coarse earthenware vessel for holding liquors* ( मद्य ठेवण्याचें ) मातीचें खडबडीत पात्र *n*. G. hound *n*. *zool.* See Grey-hound. Gray'ish *a*. कबरट, कसरट. Gray'stone *n*. 'बॅसाल्ट'सारखा कबरा दगड *m*.

Graze ( grāz ) [ M. E. *grasen*, A. S. *græs*, grass. See Grass. ] *v. t. to feed with grass* ( गुरांस ) चारा -घांस -गवत घालणें -देणें, चारणें, चरवणें, चरावयास -चारणीस -चारणीवर घालणें -सोडणें -लावणें. २ *to eat, or feed on, grass* ( गवत -चारा -घांस ) खाऊन राहणें -खाणें. ३ *to tend* ( *cattle* ) *while grazing* चरतीं गुरें राखणें -संभाळणें, ( चरत असणाऱ्या गुरांच्या ) पाठीवर राहणें. G. *v. i. to eat grass* गवत -चारा -घांस खाणें, चरणें. २ *to yield grass for grazing* ( गुरांस ) चरण्यासारखें गवत रुजवणें -उगवणें *with* वर *of s.*; as, "Those lands that G. freely." G. *n*. *the act.* चरणें *n*, &c. Graz'er *n*. गुरें चारणारा -राखणारा -सांभाळणारा, गुराखी. २ *a creature feeding on growing grass* ( कुरणांत ) चरणारें जनावर *n*. Grazi'er *n*. *one who pastures cattle and rears them for market* विकण्याकरितां गुरें राखून त्यांची जतन करणारा

-निगा राखणारा. Graz'ing *n.* –*the act.* (गुरें) चारणें *n* -राखणें *n*, राखण *n*. २ *a pasture* कुरण *n*, गुरें चरण्याचें मैदान *n*, गुरचरण *f*.

Graze (grāz) [ Ety. dub. Perhaps only a peculiar use of Graze above. Perhaps confused with *rase* (Fr. *raser*), to scrape. See Rose. ] *v. t. to pass lightly along the surface* (-ला) चाटून -घांसून जाणें, (-ला) घांसटणें -घांसटून जाणें -निसटता लागून जाणें. G. *n. a light touch* निसटता लागणें *n*, घांसटणें *n*.

Grease (grēs) [ Fr. *graisse* –*gras*, fat –L. *crassus*, gross, thick. ] *n. soft thick animal fat* चरबी *f*, मेद *m*, माखण *n*, स्नेह (S.) *m*, ओशट *m*, (–of lamps) मेणकट *n*, चिकटा *m*, (–of axles &c.) ओंगण *n*, वंगण *n*. २ (*far.*) *an inflammation of a horse's heels* घोड्याच्या टांचेंतील सूज *f*, मेंडी *f*. G. *v. t.* (sometimes pronounced grēz) *to lubricate* (चाक इ०कांत) ओंगण *n* -वंगण *n*. घालणें -करणें. २ *to bribe* लांच देणें, पैसे चारणें, (-ची) मूठ भरणें -दाबणें, हात चेपणें. ३ (*far.*) *to affect* (a horse) *with grease* (the disease) (घोड्याच्या टांचेला) मेंडी उत्पन्न करणें. Greas'er *n.* (esp.) *a person employed to lubricate the working parts of a machinery* (यंत्राच्या चक्रादि चालत्या भागांत तेल घालून) वंगण करणारा. Greas'ily *adv.* Greas'iness *n.* बुळबुळीतपणा *m*. २ स्निग्धता *f*, ओशट *m*, चिकणाई *f*, बुळबुळ *f*, बुळबुळीतपणा *m*. Greas'y *a. oily, unctuous* बुळबुळीत, तेलट, मेणकट, चिकट, चिकणवट, स्निग्ध. २ *defiled with grease* तेलकट, घाणेरडा, मळका. ३ *smooth* गुळगुळीत, सफाईदार. ४ (*far.*) मेंडी झालेला (घोड्याचा पाय).

Great (grāt) [M. E. *gret*, *greet*. A. S. *great*. Perh. allied to Graced, Gross, Grow. ] *a. large* (in space or number), *big, immense* मोठा, महान्, महा (in comp.), मोठा, थोरला, जंगी, टोलेजंग, बेसुमार. [AS G. जेवढा, जितका. HOW G. केवढा. SO G. तेवढा, तितका. २ एवढा, इतका.] २ *long continued, prolonged in time* फार, पुष्कळ, बहुत, कितीतरी, मोठा; as, "A G. while; A G. interval." ३ *superior, admirable, commanding* (applied to thoughts, actions, feelings) उत्तम, श्रेष्ठ, मोठा, लायक, प्रशंसनीय, विशिष्ट, प्रसिद्ध, वाखाणण्याजोगा. ४ *uncommonly gifted, mighty, powerful, noble* तेजस्वी, प्रकाशमान, जबरा, समर्थ, प्रतापी, प्रतापशाली-वान्, महा, ठळक, असाधारण, अलौकिक, विलक्षण बुद्धीचा; as, "A G. hero, scholar, genius," &c. ५ *foremost, eminent, principal, distinguished* ठळक ठळक, मुख्य, मोठा, प्रधान, पुढें -प्रसिद्धीस आलेला, श्रीमान्, श्रीमंत, बडा, जाडा; as, "G. men; the G. seal; the G. marshal; &c." [ A G. MAN महाजन *m*, बडा लोक *m*, वीर *m*, प्रस्थ *n*, धेंड *n*. THE G. बडे -थोर लोक *m. pl.* THE G. & SMALL *rich & poor, high & low* लहानथोर, लहानमोठे. TO BECOME A G. MAN शिष्टावणें. TO PLAY THE G. MAN बडाई -बढाई -बडिवार मारणें, फुशारकी मिरविणें -मांडणें -करणें -सांगणें. ] ६ *pregnant, big* (with young) गर्भवती, गर्भार, (of beasts) गाभण. ७ *hard, grievous* जड, कठीण. ८ (genealogy) *older, younger, or more remote, by a single generation* (often used before *grand* to indicate one degree more remote in the direct line of descent) (आणखी) एक पिढीनें वरच्या किंवा खालच्या पायरीचा as; "*Great* grand-father." G. seal (सरकारी) शिक्कामोर्तब *n*. G. *n. the whole, the gross* सर्व भाग *m*. G.-bellied *a.* मोठ्या पोटाचा. २ गर्भार, &c. Great-coat *n. an overcoat* वरून घालण्याचा आंगरखा *m*. Great'-grand'-child *n.* पणतवंड *n*. Great'-grand'-father *n.* पणजा *m*. Great'-hearted *a.* (*obs.*) *fearless* निर्भय. २ *magnanimous, generous, noble* उदार (अंतः-करणाचा), मोठ्या मनाचा. Great-heart'edness *n.* औदार्य *n*, उदार अंतःकरण *n*. Great'ly *adv. in a great degree* फारच, फार, बहुत, अति. २ *nobly* मोठ्या मनानें, मन मोठें करून. Great'ness *n.* मोठेपणा *m*, विशालत्व *n*, विस्तृतपणा *m*. २ थोरवी *f*, माहात्म्य *n*, मोठेपण *n*, मातबरी *f*. ३ वैभव *n*, श्रीमंती *f*, ऐश्वर्य *n*.

Greaves (grēvz) [ O. Fr. *greves* from *greve*, the shin bone. ] *n. pl. an armour for the leg below the knee* गुडघ्यापासून खालच्या पायाचें कवच *n*, जंघात्राण *n* (?).

Greaves (grēves) [ Swed. *grevar*, leavings of tallow. ] *n. pl. the sediment of melted tallow* (गाळलेल्या) चरबीचा गाळ *m* -रेंदा *m*.

Grebe (grēb) [ Fr. *grebe*; of unknown origin. ] *n. zool. one of the several swimming birds or divers of the genus Colymbus* ग्रीब *m*, पाणबुड्या पक्ष्यांची एक जात *f*.

Grecian (grē'shan) [ A. S. & Fr. *Grec* –L. *Græcus* –Gr. *Graikos*.] *a. pertaining to Greece* ग्रीस देशासंबंधीं, ग्रीशन. G. *n. a Greek* ग्रीस देशांतील मनुष्य *m*, ग्रीशन. २ *a jew who spoke Greek* ग्रीक भाषा बोलणारा यहुदी *m*. ३ *one versed in the Greek language, literature or history* ग्रीक भाषा, वाङ्मय किंवा इतिहास यांत प्रवीण -हुषार मनुष्य *m*. Gre'cism *n. an idiom of the Greek language* ग्रीक भाषेच्या धर्तीवर बनविलेला इंग्रजी भाषेंतील एक शब्दालंकार *m*, इंग्रजी शब्दांचा ग्रीकत्वालंकार *m*. Gre'cize *v. t. to cause* (a word) *to take a Greek form* ग्रीक स्वरूप देणें.

Greedy (grēd'-i) [A. S. *grædig*, hungry; cf. Sk. गृध्र, (*gridhra*, from *v. gridh*, to be greedy). *Greedy* denotes the low animal desire of possession and eagerness of enjoyment whether in matters of food or any other object of appetite or desire. ] *a. voracious* अधाशी, खादाड, हावरा, हावरट, वखवख्या, अति खाणारा, बहुभक्षक. २ *vehemently desirous, avaricious* (followed by *of*) आशाळभूत,

लोभी, लोभिष्ठ, हावरा, हावरट, अतितृष्णाकुल. Greed, Greed'iness *n.* खादाडपणा *m*, अधाशीपणा *m*, खाखा *f*, खाखाई *f*, वखवख *f*, हांवरटपणा *m*. २ लोभ *m*, अतिलोभ *m*. Greedi'ly *adv.* अधाशीपणानें, हावरटपणानें, &c. २ लोभानें, लोभीपणानें, &c. Greed'y-eye *a.* *covetous* आशाळभूत. Greed'y-gut *n.* (*low*) *a glutton* अधाशी, भोजनमासा, &c.

Greek (grēk) [A. S. *Grec*, L. *Graecus*, Gr. *Graikos*.] *a. Grecian* which see. G. *n.* a *Grecian* ग्रीक *m*, ग्रीक देशांतील मनुष्य *m*. २ (also) *the language of Greece* ग्रीक लोकांची भाषा *f*, ग्रीक भाषा *f*. ३ (*slang*) *a knave, a cheat* ठक *m*, लुच्चा, पाजी, &c. ४ (*colloq.*) *something unintelligible* न समजणारी गोष्ट *f*.

Green (grēn) [A. S. *grene*; Ger. *grun*, Icel. *grœnn*; allied to Grow.] *a. of the colour of growing plants, verdant* हिरवा, हिरव्या रंगाचा, हरित (S.). [DARK G. हिरवागार, हिरवाचार. OF A PEA-GREEN *or* DARKISH G. निंबुरडा.] २ *having a sickly colour, wan colour* (as of the face from sickness or fear) फिक्का, निस्तेज. ३ *fresh and vigourous* टवटवीत, ताजा, नवा. ४ *not ripe, not fully ripened* हिरवा, हिरवंडा, हिरवसा, हिरवट, कच्चा, अपक्क, अपरिपक्क, तयार न झालेला; as, "G. fruit or vegetables." ५ (R.) *half raw* अर्धकच्चा. ६ *immature in age or experience, young, raw, not trained, simple, credulous* कच्चा, अननुभवी, तरुण, भोळा. ७ *not dry, containing its natural juices* हिरवा, ओला, दमट, आंगओला, दमटसर, चिंबट, आर्द्र. (-of plants) *succulent, sappy* ओला, कोवळा, सरस (S.), रसाळ. [G. FOOD (grass, leaves, &c.) FOR CATTLE ओलें *n*, ओलेंपालें *n*, झाडपाला *m*, हिरवें *n*, चार *f*, चारा *m*, हिरवीचार *f*.] G. hand *n. a novice* नवशिका. G. sickness *n. med. chlorosis* हरितरोग *m*. G. vitriol *n. chem. sulphate of iron* हिराकस *m*. G. ware *n.* बिनभाजलेलीं मातीचीं भांडीं *n. pl.* G. *n. the green colour* हिरवा रंग *m*, हिरवा *m*, हरितवर्ण *m*. २ *a grassy plain or plot* ओळवण *n*, गवताड *n* or *f*, नीळवट *f*, हिरवें *n*. ३ *fresh leaves or branches of trees* (usually in the pl.) नवपल्लव *m. pl.*, पाला *m*. ४ *leaves and stems of young plants which in their green state are boiled for food* पालेभाजी *f*, भाजीपाला *m*, भाजी *f* [GREENS AND ROOTS *rude fare* झाडपाला *m*, आलेंपालें *n*. G. KEPT CROPPED खुंटभाजी *f*.] ५ *any substance or pigment of a green colour* हिरव्या रंगाचा पदार्थ *m* -पूड *f*. G. *v. t. to make green* हिरवा रंग देणें. G. *v. i. to become or grow green* हिरवा होणें. Green'ery *n.* (R.) *verdure* हिरवळ *f*, हिरवट *f*. Green'-eyed *a. having green eyes* हरितचक्षु. २ *seeing everything through a medium which discolours or distorts* कलुषित दृष्टीनें पाहणारा. Green' grocer *n. a retailer of vegetables or fruits in their fresh or green state* काची, माळवेविक्या, कुंजरा, ताजी फळभाजी विकणारा. Green'-head, -hood *n. verdancy* हिरवट रंग *m*. Green'horn *n. a raw inexperienced person* कच्चा, अजाण -अपेट -नवा -अव्यवहार मनुष्य. Green'ish *a.* हिरवट. Green'ishness *n.* Green'ly *adv. newly, freshly* नवीनच. Green'-market *n.* मंडई *f*, माळसात *f*, माळहट *m*. Green'ness *n.* हिरवेपणा *m*, सवजी *f*. २ *freshness, newness* ताजेपणा *m*, नवीनपणा *m*, अपक्कता *f*, अपक्कदशा *f*. ३ *unripeness* हिरवेपणा *m*, कच्चेपणा *m*, कोवळीक *f*, कोवळेपणा *m*. ४ ओलेपणा *m*, ओलावा *m*, दमसरपणा *m*, दमटपणा *m*. Green'room *n. the retiring room in a theatre which originally had the walls coloured green* नेपथ्य *n*, नेपथ्यशाला *f*. Green'-stall *n.* मंडईंतील फळेंभाजी विकण्याची जागा *f*. Green'wood *n.* (*poet.*) *a forest as it appears in spring and summer* हिरवें दाट रान *n*.

Greet (grēt) [A. S. *gretan*, to go to meet. *Greet* is to salute with some demonstration of personal feeling. 'आदर -पूज्यभाव स्पष्ट दर्शवून नमस्कार करणें' असा Greet शब्दाचा अर्थ आहे. "Greeting is demonstrative recognition by words or other signs and expressions. We *accost* and *salute* only persons directly. We may *greet* their acts or words." Smith.] *v. t. to salute, to hail, to welcome, to accost with friendship* अभिवादन *n*-कुशलप्रश्न *m*. -क्षेमप्रश्न *m*. &c. करणें, नमस्कार *m* -रामराम *m* (among Hindoos other than Brahmins) -सलाम *m* (among Mahomedans) करणें. २ *to come upon, or meet, as with something that makes the heart glad* समाधानपूर्वक -संतोषपूर्वक येऊन भेटणें. G. *v. i. to meet and give salutations* परस्पर भेटून नमस्कार करणें. Greet'er *n.* अभिवादक. Greet'ing *n. salutation at meeting* अभिवंदन *m*, अभिवादन *n*, नमस्कार *m*, रामराम *m*, सलाम *m*, &c. २ *a compliment from one absent* अभिनंदनपर निरोप *m*.

Gregarious (gre-gā'ri-us) [L. *gregarius*, belonging to a flock -*grex*, *gregis*, a flock.] *a. habitually living or moving in flocks or herds* कळप करून राहणारा -फिरणारा -हिंडणारा, यूथचारी, संघचारी. Grega'riously *adv.* कळप करून. Grega'riousness *n.*

Gregorian (gre-gō'ri-un) [L. *Gregorianus* -*Gregorius*, Gregory.] *a. pertaining to, or originated by, some person named Gregory, esp. one of the Popes of that name* (used especially of certain 'chants' of a peculiar musical mode used in the services of the Christian Churches) (पोप) ग्रेगरी यानें केलेला -स्थापिलेला-चालू केलेला, ग्रेगरीचा, ग्रेगरीकृत.

Grenade (gre-nād') [Fr., —Sp. *granada* -*granada*, -L. *granatum*, a pomegranate -*granum*, a

grain. ] *n. mil. a hollow ball or shell of iron filled with powder or other explosive* (so called from its *resembling a pomegranate* ) *ignited by means of a fuse, and thrown from the hand among enemies* हिंगणबेट *n*, (फुटून भडकणारा युद्धोपयोगी) प्राणनाशक गोळा *m*. Grena'dier *n. mil.* (originally) *a soldier who carried and threw grenades* (शत्रुगोटांत) हिंगणबेटें फेंकणारा फौजेंतील शिपाई *m*. २ (afterwards) *one of a company attached to each regiment or battalion, taking post on the right of the line, and wearing a peculiar uniform* विशिष्ट पोषाख घातलेला (फौजेच्या तुकडींतील) उजव्या बाजूचा शिपाई *m*, ग्रेनेडीअर *m*.

Grew *pa. t.* of Grow.

Grey ( grā ) Same as *Gray* which see.

Greyhound ( grā'-hownd ) [ Icel. *greyhundr*–Icel. *grey*, a dog, and *hundr* ( E. *hound* ), a hound. ] *n.* ( written also *grayhound* ) शिकारी कुत्र्यांच्या जातीपैकीं एक (कुत्रा *m* ).

Griddle ( grid'l ) [ W. *greidell -greidio*, to scorch or singe; Gael. *greidil*, Scot. *girdle.* ] *n. an iron plate or pan used for cooking cakes* तवा *m*. २ *a seive with a wire bottom used by miners* रेती चाळण्याची तारेची मोठी चाळण *f*.

Gridiron ( grid'ī-urn ) [M. E. *gredire*, a griddle, and from the same Celtic root as *griddle*; but the termi. *-ire* became identified with M. E. *ire*, iron. See Griddle.] *n. a grated iron utensil for boiling flesh and fish over coals* (कोळशांवर मांसमच्छर भाजण्याकरितां तळाशीं लोखंडी) जाळी असलेलें भांडें *n*. २ *naut. an openwork frame on which vessels are placed for examination, cleaning, and repairs* (तपासून दुरुस्ती करण्याकारितां जहाजें पाण्याबाहेर ओढून ठेवण्याची) उघडी जाळी *f*, जाळीची चौकट *f*.

Grief ( grēf ) [ Fr. *grief –grever*, to burden –L. *gravo*, to grieve –L. *gravis* ( Sk. गुरु ), heavy. *Grief* expresses an acute state of mental trouble. *Sorrow* is reflexive and is commonly tinged with regret. *Grievance* is a mental hardship. *Hardship* is physical and is externally suffered. Heavy taxation is a *hardship* when viewed in its pauperising effects, a *grievance* as furnishing ground of complaint against a government or an administration. *To grieve* is purely mental. It is to feel the pain of an inward trouble. *To mourn* is to give outward expression to grief in visible signs. *To lament* is to do the same in audible signs. Mark the phrases *bitter grief, deep mourning*, and *loud lamentation.* ] *n. sorrow, sadness* मनस्ताप *m*, दुःख *n*, खेद *m*, शोक *m*, क्लेश *m*, हुरहुर *f*, परिताप *m*, पस्तावा *m*, व्यथा *f*, पीडा *f*. २ *cause of sorrow or pain, grievance* दुःख *n*. दुःखाचें कारण *n*. See below. ३ (R.) *malady* रोग *m*, व्यथा *f*, व्याधि *f*, विकार *m*. Grief'ful *a.* दुःख-पूर्ण. Grief'less *a.* विनदुःखी. Griev'ance *n. a cause of uneasiness and complaint, injury* दुःख *n*, दुःखाची -दुःख देणारी गोष्ट *f*, संकट *n*, अनिष्ट *n*, अडचण *f*, नड *f*, तक्रार *f*, हरकत *f*, बाधा *f*, पीडा *f*. २ *grief, affliction* क्लेश *m*, पीडा *f*, &c. Grieve *v. t. to occasion grief to, to hurt* (मनाला -अंतःकरणाला) दुःख *n* -क्लेश *m* पीडा *f* -कष्ट *m*. देणें, दुखवणें, दुखावणें. २ · (R.) *to sorrow over* (-च्या बद्दल) दुःख करणें, दुःख करीत बसणें. G. *v. i. Shakes. to feel grief, to sorrow, to mourn* ( often followed by *at, for*, or *over* ) रडणें, दुःख *n*- शोक *m*- खेद *m*. करणें, चिंता करणें, दिलगीर होणें. Griev'ed *pa. t. & p. p.* Griev'er *n.* Griev'ing *pr. p. & v. n.* Griev'ing *a.* दुःखी, कष्टी, पीडित &c. २ दुःख -क्लेशकारक. G. *n.* दुःखितावस्था *f*, हुरहूर *f*, चुटपुट *f*, रुखरुख *f*, &c. Griev'ingly *adv.* Griev'ous *a. painful, afflictive, hard to bear, offensive* दुःखद -प्रद -कारक, दुःसह, क्लेशकारक, भारी, जड, जबर, अवघड, कठीण, असह्य. २ *heinous, aggravated, flagitious* महाभयंकर, भीम, उग्र, क्रूरपणाचा, अमानुष, घोर. ३ *full of, or expressing, grief* शोकदर्शक, दिलगिरीचा, केविलवाणा. Griev'ousness *n.* To come to grief (*colloq.*) दुःखांत पडणें, रडावें लागणें, पस्तावणें, पस्तावा पावणें. To be grieved दुःखी होणें, दुःख पावणें.

Griffin ( grif'fin ) [ Of uncertain origin. ] *n. an Anglo-Indian name for a person just arrived from Europe* नवा -नवा आलेला -नुकताच विलायतच्या बोटीवरून उतरलेला युरोपीयन *m*.

Griffin ( gri'fin ) [ Fr. *griffon* –L. *gryphus* –Gr. *gryps –grypos*, hook-nosed. ] *n. myth. a fabulous monster half lion and half eagle* ( written also *griffon* ) गरुडसिंहराक्षस *m*. ( on the analogy of नृसिंह ). याचें शरीर व पाय सिंहासारखे असून, पंख व चोंच गरुडासारखी असते. २ *her. a representation of this creature as an heraldic charge* (ढालीवर काढलेलें ) गरुडसिंहराक्षसाचें चित्र *n*. ३ *zool. a species of large vultures* मोठ्या गृध्रपक्ष्यांची एक जात *f*.

Grill ( grill ) [ Fr. *griller -gril* a gridiron –L. *craticula*, dim. of *crates*, a grate. ] *n. a gridiron* q. v. २ *that which is boiled on a gridiron* भाजण *n*, भाजलेला पदार्थ *m*, भाजप *n*. G. *v. t. to boil on a gridiron* भाजणें, शेकणें. २ *to torment, as if by boiling* छळून काढणें, प्राण काढणें -घेणें ( *colloq.* ).

Grim ( grim ) [ A. S. *grim*; Ger. *grimmig –grimm* fury *-gram*, hostile.] *a. of forbidding aspect, fierce, stern* भयंकर, उग्र, उग्रमुद्रेचा, उग्रमुख -वदन, कालस्वरूप, क्रूरमुख, विकटमूर्ति, विकराल *pop.* विक्राळ, भयानक. Grim'ly *a.* (R.) *grim*, which see. Grim'ly

*adv. fiercely* उग्रपणानें, उग्र मुद्रेनें, उग्रमुख करून. Grim'ness *n. sternness* तोंडाचा उग्रपणा *m*, मुखक्रौर्य *n* -उग्रता *f*, उग्र -भयंकर -विक्राळ स्वरूप *n*, रौद्रता *f*, घोरता *f*, कठोरपणा *m*, नैष्ठुर्य *n*, निष्ठुरपणा *m*, &c.

Grimace (gri-mās') [ Fr., of uncertain origin. Perh. from root of Icel. and A. S. *grima*, a mask or phantom. ] *n. a distortion of the face in jest &c., a smirk; a made-up face* माकडचेष्टा *f*, वांकुली *f*, विचकुली *f*, वांकडें तोंड *n* (usually in *pl.*), तोंडाचा चाळा *m*, मुखभंग *m*. [ TO MAKE GRIMACES विचकुल्या *or* वेचकुल्या *f. pl.* -वानरविचकुल्या *f. pl.* &c. दाखवणें, तोंडें वेडींवांकडीं करणें. ] G. *v. i. to make grimaces* तोंड वेडेंवांकडें करणें. Grimace'd *a. distorted, crabbed* वक्र, वांकडा, वांकडा झालेला, वेडावांकडा.

Grimalkin (gri-mal'kin) [ Gray, and *malkin* (a cat's name), a dirty drab, a hare, Malkin = Maldkin a dim. of Maud, Matilda. ] *n. an old cat*, (esp.) *a she-cat* म्हातारें मांजर *n*, मांजरी *f*, (म्हातारी) भाटी *f*.

Grime (grīm) [ Of Scandinavian origin. ] *n. foul matter, sullying blackness deeply ingrained* काट *m* or *n*, मळ *m*, कचरा *m*, खट *f* (?), कट *m*, काट *m*, किटण *n*, कलच *m*, कुट्ट काळेपणा *m*, घाण *f*, गंज *m*. G. *v. t. to soil deeply, to dirt* मळकट -मलिन -घाणेरडा -खराब करणें -करून टाकणें, नासणें, विघडवणें, किटवणें, काटवणें, कटवणें. [ TO BE GRIMED किटणें, काटणें, कटणें. ] Grim'ily *adv.* घाणेरडेपणानें. Grim'iness *n.* घाणेरडेपणा *m*. Grim'y *a. full of grime, dirty, foul* किटलेला, कटलेला.

Grin (grin) [ A. S. *grennian*. ] *v. i. to show the teeth* (as a dog), *to snarl* (अंगावर) दांत विचकणें, गुरगुरणें, गुरकावणें. २ *to set the teeth together and open the lips, as in laughter, scorn, &c.* दांत विचकणें -काढणें -दाखविणें, दांत विचकून -काढून -दाखवून हंसणें, बत्तीशी दाखविणें, दांतांच्या कवळ्या *f. pl.* -कवड्या *f. pl.* बाहेर काढणें -दाखविणें, खिसखिस-खदाखदां &c. हंसणें. G. *v. t. to express by grinning* दांत विचकून प्रदर्शित करणें -दर्शविणें. G. *n.* दांत विचकणें *n*. २ *a hard, forced, or sneering smile* दांत विचकून हंसणें *n*, खिसाणा *m*. Grin'ner *n.* दांत विचकणारा. Grin'ningly *adv.* दांत विचकून, खिसखिस.

Grind (grīnd) [ A. S. *grindan*. Allied to L. *frendere*, to gnash. Cf. *grist*. ] *v. t. to reduce to powder by friction* दळणें, दळून पीठ करणें -पाडणें. (b) -coarsely भरडणें, घरटणें, घरडणें, घसाडणें, चरडणें. (c) -upon a stone वांटणें. २ *to sharpen, to whet* (सहाणेवर) धार लावणें, धार काढणें, पाजवणें, पाजळणें, पाजणें, घांसणें. ३ *to rub against one another* (as teeth) एकमेकांवर घांसणें, (दांत) खाणें -करकरवणें -चावणें. ४ *to harrass or oppress* गांजणें, छळणें, जाचणें, पीडणें, घाण्यांत -चरकांत धरणें -पकडणें, छळणूक करणें, नकोनको -पुरेपुरे करणें, (-च्या) डोक्यावर वरवंटा फिरविणें, पिळणें, पिळून काढणें, त्राही त्राही करून सोडणें, &c. ५ (*college slang*) *to study hard for examination* ताड्या *m.* मारणें -लावणें, चक्कू *m*- घोक्या *m* लावणें, दळणें (*fig.*), (पुस्तकांचा) कीस काढणें -भूस पाडणें, दळण काढणें. G. *v. i. to turn the millstones* दळणें, दळण *n.* करणें. २ *to become pulverized by friction* दळलें जाणें, दळणें. ३ *to become polished or sharpened by friction* घांसून सफाईदार होणें -धार येणें -चढणें *with* ला *of s.* ४ *to grate* करकरणें, घरघरणें, करकर -घरघर आवाज होणें. ५ *to drudge, to study hard* (as for examination) काथ्याकूट करणें, डोकेफोड करणें, सक्त मेहनत घेणें, उरस्फोड करणें. G. *n.* दळण *n*. २ दळणें *n*. ३ दळप *n*. ४ (*colloq.*) *hard and uninteresting study* घोकंपट्टी *f*, चक्कू *m*, ताड्या *m*, घोक्या *m*. ५ (*college slang*) *a hard student* दळ्या, घोकंपट्टी करणारा -उरस्फोड करून अभ्यास करणारा विद्यार्थी *m*, पुस्तकांतील मर्म न जाणतां अभ्यास करणारा विद्यार्थी *m*, घोक्या *m*. Grind'er *n.* दळणारा, दळ्या, दळणकरी. २ धार लावणारा, पाजवणारा, &c. ३ *one of the double teeth used to grind or masticate the food* दाढ *f*. Grind'ing *n.* दळणें *n*, २ दळण *n*, दळप *n*. [ G. AND POUNDING -COMPREH. दळणकांडण *n*, दळाकांडा *m*. MILL FOR G. जातें *n*. PRICE *or* COST OF G. दळणावळ *f*, दळाई *f*, पिसणावळ *f*, पिसाई *f*. G. MILL पिठाची गिरण *f* -गिरणी *f*.] Grind'ingly *adv.* Grind'stone *n.* सहाण *f*, ज्ञाण *m*. To hold, put, *or* bring one's nose to the grind-stone *to oppress one* छळणें, पिडणें, गांजणें, &c.

Grip (grip) [ See Gripe *v. t.* below. ] *n. an energetic or tenacious grasp* घट्ट मिठी *f* -मूठ *f*, मगर मिठी *f*. २ *a peculiar mode of clasping the hands by which members of a secret association recognize or greet one another* (कोणत्याही गुप्तमंडळांतील व्यक्तींची परस्परांस ओळख पटण्यासाठीं ठरविलेलें) सांकेतिक हस्तपीडन *n*; as, "A masonic G." ३ *a handle or gripe* मूठ *f*, दांडा *m*, &c. G. *v. t. to gripe* which see. Grip'per *n.* मुठींत धरणारा. २ *pl.* (in printing presses) *the fingers or nippers* बोटें *n. pl.*, चिमटे *m. pl.*

Gripe (grīp) [ A. S. *gripan*, Ger. *greifen*, Sk. ग्रह्, to seize. To gripe is to grasp with a squeeze or pinch, and it is a voluntary action. ] *v. t. to clasp closely with the fingers, to clutch* (पिळवटल्यासारखें -चिमट्यांत धरल्यासारखें) मुठींत -कवज्यांत -चिकाटीनें &c. धरणें, धरणें, पकडणें. २ *to seize and hold fast* घट्ट -मजबूत धरून ठेवणें, गच्च -बळकट पकडणें. ३ *to pinch, to distress* चिमटा काढणें -घेणें, त्रास देणें, संकटांत पाडणें. ४ (specifically) *to cause pinching pain to the bowels of* पोटांत मुरडा *m* -तिडीक *f*, शूळ *m* &c. करणें. G. *v. i. to clutch, hold, or pinch a thing esp. money, with a gripe* (कोणतीही वस्तु) मुठींत घट्ट

धरून ठेवणें -धरणें. २ *to suffer griping pains* (-च्या) पोटांत मुरडा *m* -तिडीक *f* -आंकडी *f.* होणें, वळणें. G. *n. grasp, seizure, fast hold, clutch* पकड *f*, मूठ *f*, पंजा *m*, मिठी or हाताची मिठी *f*, चिकाटी *f*, कवज *f* (*v.* घाल, मार), मगरमिठी *f*, सपाटा *m*, तावडी *f*, &c. २ *that on which the grasp is put, a handle, a grip* मुठींत धरण्याचा भाग *m*, मूठ *f*; as, "the G. of a sword." ३ *mech. a brake to stop a wheel* गतिरोधक *m* -स्तंभक *m*, ढकली *f.* ४ *oppression, cruel exaction, affliction* चिमटा *m* (*fig.*), दुःख *n*, हाल *m*, अपेष्टा *f.* ५ *pinching and spasmodic pain in the intestines* (chiefly used in the *pl.*) मुरडा *m*, तिडीक *f*, आंकडी *f.* Gripe'ful *a. extortionate* छळणारा, गांजरा, पिळून काढणारा, चरकांत धरणारा, जुलमी. Grip'er *n. an oppressor* जुलूम करणारा. Grip'ing *n.* See Gripe *n.* Grip'ingly *adv.* Gripe penny *n. a miser* चिकू, चिकट्या, चिकट मनुष्य, कंजुष.

Grisly (griz'li) [A. S. *gryslic, agrisan*, to dread.] *a. frightful, horrible, dreadful* अक्राळ, विक्राळ, भयानक, भयंकर, भीम (S.), दारुण. Gris'liness *n.*

Grist (grist) [A. S. *grist*, a supply of corn to be ground.] *n. corn to be ground* दळण *n*, दळप *n.* २ *that which is ground at one time* वैरण *n*, घास *m.* ३ *supply, provision* पुरवठा *m*, बेगमी *f*, भर *f.* ४ (in rope making) *a given size of rope* (ज्या नमुन्याची नवीन दोरी करावयाची असेल त्या) दोरीची जाडी *f.* [COMMON G. *a rope three inches in circumference, with twenty yarns in each of the three strands* प्रत्येकीं वीस वीस धाग्यांच्या तीन पदरांची तीन इंच घेराची दोरी *f.*] All is G. that comes to his mill (*colloq.*) तो ज्याला धरतो त्याचें सोनेंच बनतें. To bring G. to the mill (*colloq.*) *to bring profitable business into one's hands* (-ला) फायद्याचें कलम आणून देणें. G.-mill *n.* धान्य दळून देण्याची गिरणी *f* -गिरण *f.*

Gristle (gris'l) [A. S. *gristel*. Perhaps a dim. of *grist*.] *n. anat. cartilage* अस्थिकूर्चा *m*, कूर्चा *m* or *f*, तरुणास्थि *n*, कोमलास्थि *n.* Grist'ly *a. anat. cartilaginous* कूर्चामय, तरुणास्थिमय, तरुणास्थिरूप.

Grit (grit) [A. S. *greot*, grit.] *n. coarse sand or gravel* रेंव *f*, रेंवा *m*, रेंवाळें *n*, कंकर *m.* २ *the coarse part of meal* अन्नांतील चरबरीत भाग *m.* [HUSKS AND GRITS IN MEAL चरड *n*, चरंडा *m*, कचकच *f*, खडा *m*, कच *f.*] ३ *pl. grains* (esp. oats or wheat) *husked and coarsely ground* भरड *n*, भरडा *m*, सांजा *m*, कणी *f.* ४ *geol. a hard, coarse-grained siliceous sandstone* कठीण खरबरीत दोन्यांचा सिलिकापूर्ण रेंवाळ दगड *m.* ५ *structure as adapted to grind or sharpen* (दळण्याच्या किंवा धार लावण्याच्या उपयोगी) खरबरीत तोंड *n*, किंवा तळ *m*; as, "A stone of good G." ६ *invincible spirit, unyielding courage, fortitude* मनाची पुरी दृढता *f*, (हार न जाणारी) छाती *f*, हिंमत *f*, धैर्य *n*, (मनाचा &c.) खंबीरपणा *m.* G. *v. i. to grate, to grind* करकरणें, खरखर आवाज होणें. G. *v. t.* (*colloq.*) *to rub harshly together* करकरवणें, चावणें (as the teeth). Grit'tiness *n.* रेंवटपणा *m*, रेंचाळ *m*, कचकचीतपणा *m.* Grit'ty *a.* कचकचीत, रेंवट, रेंवाळ. २ (*colloq. U. S.*) *resolute* निश्चयाचा, दृढ.

Grizzle (griz'l) [Fr. *gris*, gray -O. Ger. *gris*, gray.] *n. a gray colour* भुरकट रंग *m*, भुरा रंग *m*, करडा -कबरा रंग *m.* Griz'zled *a. gray* करडा, काळापांढरा, कबरा, धूसर, मोरा. Griz'zly *a. somewhat gray* कबरट. G. *n. zool. a grizzly bear* भोरकट आस्वल *n.*

Groan (grōn) [A. S. *granian*, to groan, to weep.] *v. i. to moan* कण्हणें, कुंथणें, विवळणें or विव्हळणें, हुंबणें, परवणें, हायहाय करणें. २ *to strive after earnestly, as with groans* कण्हून -कुंथून प्रयत्न करणें. G. *v. t. to affect by groans* कुंथून -कण्हून नापसंती दाखविणें. G. *n.* (*a*) *a low, moaning sound* कण्हणें *n*, कुंथणें *n*, विवळणें *n*, विवळणी *f.* (*b*) (usually) *a deep, mournful sound uttered in pain or great distress* हायहाय *f*, हायाहूया *m*, उष्णश्वास *m.* (*c*) (*sometimes*) *an expression of strong disapprobation* पूर्ण नापसंती *f*, नापसंतीचे उद्गार *m. pl.* Groan'er *n.*

Groat (grōt) [A. S. *groat.*] *n. a particle, an atom* कण *m.*

Groat (grōt) [O. Low Ger. *grote*, a coin of Bremen.] *n. an old English silver coin, equal to four pence* ग्रोट *m*, चार पेन्स किंमतीचें एक जुनें इंग्रजी नाणें *n.* २ *obs. any small sum of money* लहान -बारिक रक्कम *f*, पै पैसा *m* (*colloq.*), चवली पावली *f* (*colloq.*).

Grocer (grō'sėr) [Fr. *grossier* -Fr. *gros*, great; from root of Gross. The word, formerly *grosser*, originally meant 'one who sold by wholesale.' या शब्दाचा मूळ अर्थ 'घाऊक विकणारा, घाऊकीचा व्यापारी' असा होता.] *n. a trader or dealer in tea, sugar, &c.* किराणेवाला (वाणी) *m*, पसारी, किराण्या, वाणी *m*, दुकानदार. [GREEN G. माळवेंविक्या, बागवान, कुंजडा or कुंजरा.] G.'s itch *n. med. a disease of the skin caused by handling sugar and treacle* (साखर, कांकवी इ० पदार्थांत हात घातल्यामुळें -फार राबल्यामुळें होणारा) त्वग्रोग *m*, लोहिविकार *m*, (मधुस्पर्शजन्य) कंडुरोग *m.* Gro'cery *n. commodities sold by grocers* किराणा *m*, किराणा जिन्नस *m*, खाजें *n*, वाणजिन्नस *m*, वाणसौदा *m.*

Grog (grog) [Short for *grogram*; it had its name from Admiral Vernon, nicknamed *Old Grog*, from his *grogram* breeches (about 1745 A. D.). He ordered the sailors to dilute their rum with water.] *n. a mixture of spirit and water, not sweetened* केवळ जलमिश्रितमद्य *n*, दारूपाणी *n.* [GROG

BLOSSOM *a redness on the nose or face of persons who drink ardent spirits to excess* अतिशय दारू पिणाऱ्या लोकांच्या नाकावर -चेहेऱ्यावर दिसणारी लाली *f.* Grog'giness *n. state of being groggy* धुंदी *f,* (दारूची) निशा *f* -अम्मल *m* -कैफ *m.* २ (*man.*) *tenderness or stiffness in the foot of a horse that causes him to move in a hobbling manner* (ज्यामुळें घोडा अडखळत चालतो असा) घोड्याच्या पायांचा नाजुकपणा *m,* ताठरपणा *m.* Grog'gy *a.* (*colloq.*) *tipsy* प्यालेला, दारूच्या धुंदींत असलेला, कैफ चढलेला. २ *unsteady on the legs* पायांवर तोल न सांवरणारा, डळमळीत. ४ (*Man.*) *moving in a hobbling manner, owing to tender feet*(said of a horse)अडखळत चालणारा(घोडा). Grog shop *n. a dramshop* अमली दारूचें दुकान *n.*

Groin (groin) [Icel. *grein*, division, branch -*greina* to divide.] *n. anat. the line between the lower part of the abdomen and the thigh, the region of this line* जांघ *f,* मांडीचा सांधा *m,* ऊरुसंधि *m,* आडसंधि *m* -सांधा *m,* जांघाड *n.* २ *arch. the projecting solid angle formed by the meeting of two vaults growing more obtuse as it approaches the summit* (घुमटाचे दोन डेरे एकत्र जुळल्यानें होणारा) जंघाकोन *m.* ३ *engin. a frame of wood-work across a beach to accumulate and retain shingle* (रेती वाहून न जातां एकत्र सांठवून ठेवण्याची समुद्राच्या किंवा तळ्याच्या कांठीं) वाळवंटांत लावून ठेवण्याची जाळी *f.*

Groom (grōōm) [Icel. *gromr*, boy.] *n. a waiter, a servant* हुजऱ्या *m,* चाकर *m,* नोकर *m,* हाताखालचा -तैनातींतला मनुष्य. २ (esp.) *one who has the charge of horses* मोतद्दार, घोडेवाला, घोडक्या, खासदार, अश्वपाल, अश्वरक्षक. ३ *a title of several officers of the royal household* (इंग्लंडच्या राजघराण्यांतील खासगीकडील) ग्रूम नांवाचा कारभारी. ४ *a bridegroom* वर *m,* नवरदेव *m,* नवरा *m,* नूतन वर *m.* G. *v. t. to tend, care for or clean, as a horse* (घोड्याची) चाकरी *f.* करणें, मालिश *f* -खरारा *m* करणें *g. of o.,* (घोड्याची पाठ) पुसणें -चोळणें. [LIP-ROPE USED IN GROOMING ओटाळी *f,* पुजमाल *m.*] Groom'er *n. one who grooms horses* घोड्याची चाकरी करणारा, मोतद्दार, घोडेवाला. २ (esp). *a brush for cleaning horses* (घोड्याचें आंग साफ करण्याचा) खरारा *m.* Groom'sman *n. a male attendant of a bridegroom at his wedding* (नवऱ्याकडील) करवला *m,* टोंकणा *m,* टोंकण्या *m.*

Groove (grōōv) [A. S. *grof, græf -grafan*, to dig. Ger. *grube-graben*, to dig.] *n. a furrow, or long hole, such as is cut with a tool* पन्हळी *f,* खांच *f,* खांचणी *f,* खेंचणी *f,* खोवण *f,* चर *m,* वाडी *f,* पाट *m,* ओहोळ *m,* खाचर *m.* २ (hence) *a fixed routine* कामाचें रहाटगाडगें *n,* चक्र *n,* गाडा *m,* कामाची ठराविक परंपरा *f.* ३ (*mining*) *a shaft or excavation* (खाणींतील) बोगदा *m,* खाडा *m.* G. *v. t. to furrow* चर *m* -पन्हळी *f* -खणणें -काढणें, कालवा *m* -पाट *m* -पात्र *n.* काढणें. Groove'-slip *n.* ओंदण *n.* Groov'er *n. one who, or that which, grooves* पात्र खणणारा. Groov'ing *n. -the act.* पन्हळ काढणें *n.* २ *a groove, or collection of grooves* पाट *m. pl.,* पन्हळ *m. pl.*

Grope (grōp) [A. S. *grapian*, to seize, to handle. Allied to 'Grab, Gripe.'] *v. i. to feel one's way* (as with the hands, when one cannot see) चांचपणें, चांचपडणें, चांचपत -चांचपडत जाणें, रांपणें. G. *v. t. to search out by feeling in the dark* चांचपून पाहणें, रांपून पाहणें. Grop'er *n.* चांचपत जाणारा. Grop'ingly *adv.* चांचपत, चांचपडत.

Gross (grōs) [Fr.,—L. L. *grossus*-L. *crassus*, thick, dense.] *a. great, large, fat, bulky* मोठा, स्थूल, ढमाल, फाल्या, ढमाल्या, अगडबंब; as, "A G. fat man." २ *coarse* जाडाभरडा, भरडा, खरखरीत, खडबडीत, ओबडधोबड. ३ *dull* स्थूलबुद्धि, मंदबुद्धि, ढोम्या, अजगर (*fig.*). ४ (a) *expressing, or originating in, animal or sensual appetites* पशुतुल्य, कामवासनाजन्य. (b) (*hence*) *vulgar, low, obscene* हलकट, नीच, अचकटविचकट, बाष्कळ, बीभत्स, कुत्सित, अर्वाच्य. ५ *thick, dense* दाट, घट्ट, जाड, अपारदर्शक*f;* as, "G. medium." ६ *serious, flagrant, palpable* मोठा, भयंकर, उघड, धडधडीत दिसणारा, दाट, निबिड, गाढ, घोर; as, "G. mistake, ignorance, negligence, injustice," &c. ७ *whole, entire, total* (oppo. to *net*) कच्चा, ठोक, एकूण, एकंदर, सर्व मिळून, एकत्राचें; as, "G. sum, weight, &c." G. *n. the main body, chief bulk or mass* मुख्य -प्रधान भाग *m,* भरारा *f,* ठोकरास *f,* ठोकमाल *m,* ठोकजमा *f.* By the gross *at wholesale* घाऊक, उक्ता, सट्ट्यानें, सट्ट्यांत. In the gross, In gross *all parts taken together* एकदम सगळा, ठोक, एकठोक, सकट, सर्व. २ (*sing.* and *pl.*) *the number of twelve dozen* बारा डझनें *n. pl.,* चोवीस छकड्या *f. pl.,* एकशें चवेचाळीस. A great gross *twelve gross* बारा ग्रोस *m. pl.,* १४४ डझनें *n. pl.* Gros'sly *adv.* Gros'sness *n. corpulence* स्थूलत्व *n,* स्थौल्य *n.* २ *coarseness* भसाडेपणा *m,* भरडेपणा *m,* ओबडधोबडपणा *m.* ३ *shamefulness* लज्जास्पदत्व *n,* हलकटपणा *m.* ४ भारीपणा *m,* मोठेपणा *m,* &c. ५ स्थूलता *f,* स्थूलबुद्धि *f,* बुद्धिमांद्य *n,* मतिमांद्य *n.* ६ विचकटपणा *m,* बाष्कळपणा *m.*

Grot, see Grotto.

Grotesque (grō-tesk') [Fr., -It. *grotesca*, curious painted work, such as was employed on the walls of grottoes, -It. *grotta*, a vault.] *a. wildly and strangely formed, extravagant* विलक्षण, विचित्र, तऱ्हेवार, तऱ्हेवाईक, विरूप, वेडाविद्रा, वक्राकृति. G. *n. a whimsical figure or scene* (such as is found

in old crypts and grottoes) विलक्षण आकृति *f* -देखावा *m.* २ *artificial grottowork* कृत्रिम गुहा *f* -गुंफा *f* (S.). Grotesque'ly *adv.* विचित्रपणानें. Grotesque'ness *n.* वेडेविद्रेपणा *m*, विरूपता *f.*

Grotto (grot'-ō) [Formerly *grotta*, –It. *grotta*, Late L. *grupta*, –Gr. *krypte* –L. *crypta*, a concealed subterranean passage, a vault.] *n.* (also Grot) *a cave* गुहा *f*, गव्हर *n*, गुंफा *f* (S.). २ *an artificial recess or cave* कृत्रिम गुहा *f*, लेणें *n.* Grot'towork *n.* लेणीं *n. pl.*, कोरींव लेणीं *n. pl.*

Ground (ground) [A. S. *grund*, earth ground small.] *n. the surface of the earth* भुई *f*, भूमि *f*, जमीन *f*, धरणी *f*, धरित्री *f*, मही *f* (S.). २ (hence) *a floor or pavement supposed to rest on the ground* फरशी *f*, तळ *m*, जमीन *f*, &c. [ALONG THE G. भुईसरपट. OFF or FREE FROM THE G. (-a weight under raising) भुइसांड, जमीनसांड, तळसांड. To RUN AGROUND तळास -भुईस लागणें.] ३ *any definite portion of the earth's surface, territory, country* जमीन *f*, जागा *f*, देश *m*, प्रदेश *m*, मुलूख *m*, &c. [AN ABANDONED or WASTE PIECE OF G. खरावा *m.* G. OBTAINED FROM THE SEA खार *f*, खारटाण *n* or *f.* G. SATURATED WITH MOISTURE उपळवट *f*, उपळवटा *m*, उपळवटीची जमीन *f.* HOLY G. देवभूमि *f*, पुण्यभूमि *f*, पुण्यक्षेत्र *n*, पवित्र भूमि *f.* LEVEL G. सपाटी *f*, समथळ *n*, तवा *m*, समभूमि *f.* LOW G. दवका *m*, खोलवट *n*, दव *m.* RISING G. उंचवटा *m*, उंचवळा *m*, उंचाड *n*, चढ *m*, चढण *f*, चांटी *f.* To SHIFT or LEAVE ONE'S GROUND (*fig.*) रान बदलणें -सोडणें, पारखें होणें *g. of s.*] ४ (hence) *a territory appropriated to, or resorted to for, a particular purpose; place of action* (कोणत्याहि विवक्षित कामाकरितां मुद्दाम राखून ठेवलेली) जागा *f*, मैदान *n*, पटांगण *n*, (rendered by) शाला *f.* or गृह *n* (as in व्यायामशाला *f*, विश्रांतिगृह *n.*). ५ *land, estate, possession, field* जमीन *f*, शेत *n*, जहागीर *f*, वतन *n*, इस्टेट *f.* ६ (esp. *pl.*) *the gardens, lawns, fields &c. belonging to homestead* जमीनजुमला *m*, शेतभात *n*, शेतवाडी *f*, शेतपोत *n*, वाडीकवाडी *f.* ७ (esp. with reference to agriculture) *land* काळी *f*, शेतजमीन, भातजमीन *f.* [BLACK G. काळी -काळवट जमीन *f.*] ८ (-of an encampment) तळ *m.* [To BREAK G. प्रस्थान or अंगप्रस्थान *n.* करणें.] ९ *foundation* पाया *m.* १० *the foundation of knowledge, belief, or conviction; a premise* आधार *m*, प्रमाण *n*, मुद्दा *m*, आश्रय *m*, ठिकाण *n*, ठिकाणा *m*, बीज *n*, हेतु *m*, कारण *n*, मूळ *n*, प्रयोजन *n.* ११ (*painting & decorative art*) भूमिका *f.* १२ *pl. dregs, lees* गाळ *m*, सांका *m*, रेंदा *m*; as, "Coffee *grounds*." G. floor तळमजला *m.* G. rent भुईभाडें *n.* G. nut *n.* भुईमूग *m.* G. room तळमजल्यावरील खोली *f.* To bite the ground जमिनीवर लोळत पडणें, मातींत लोळणें, धूळ खाणें. To break G. (a) *to open the earth as for planting* खणणें, जमिनींत खळगा काढणें. (b) (*fig.*) *to begin to execute any plan* कामास हात घालणें, काम हातांत घेणें, प्रारंभ करणें, सुरू करणें. (c) *naut. to release the anchor from the bottom* नांगर उठविणें, लोइली उठविणें, नांगर पाण्यांतून वर काढणें. To come or fall to the G. *to fail* निष्फळ -व्यर्थ होणें -जाणें. To gain G. *to advance, to proceed forward in conflict* एकएक पाऊल पुढें सरणें -सरकणें -टाकणें -जाणें. २ *to obtain an advantage, to have some success* (-वर) जय मिळविणें, विजयी होणें. ३ *to become more prosperous or influential* भरभराटणें, भरभराटीस -वैभवास चढणें, महत्वास चढणें, (-ला) वैभव प्राप्त होणें, (-ला) महत्व येणें *in. con.* To get or gather G. (R.) *to gain ground* which see. To give G. *to recede, to yield advantage* मागें हटणें -सरणें -सरकणें, माघार घेणें, चाल करूं देणें. To lose G. *to retire, to retreat* पळ काढणें, माघार घेणें, हटणें, मागें हटणें -फिरणें. २ *to lose credit or reputation* पत नाहींशी होणें -जाणें *g. of o.*, (-चें) वजन *n* -महत्व *n.* कमी होणें, खालीं येणें. To stand one's G. *to stand firm* आपली जागा (प्राण गेल्यास) न सोडणें, टक्कर मारणें. To take the G. *to touch bottom or become stranded* (said of ship) तळाला -तळाशीं लागणें -जाऊन बसणें -चिकटणें -चिकटून बसणें. G. *v. t. to lay, set or run on the ground* भुईवर -जमिनीवर ठेवणें -टेंकणें. २ *to furnish a ground for, to found, to fix firmly* आधार *m* -आश्रय *m.* धरणें -घेणें -सांगणें, आधारानें -आश्रयानें -आधारावरून करणें -सांगणें. ३ *to instruct in elements or first principles* ओनामा -मूलतत्वें शिकविणें, मूलतत्वांत पक्का करणें. ४ *elec. to connect with the ground so as to make the earth a part of an electrical circuit* (जमिनींत) विद्युत्प्रवाह नेणें. ५ (*Fine Arts*) *to cover with a ground, as a copper-plate for etching* भूमिका करणें. G. *v. i. to run aground, to strike the bottom and remain fixed* तळास -भुईस -तळावर -कोरड्यावर &c. लागणें -लागून बसणें. Ground'age *n.* जहाजाचा (लागणाऱ्या बंदरांतील जागेबद्दल) स्थानिक कर *m.* Ground'edly *adv.* कायम, पक्केपणीं. Ground'ing *n.* पाया खणणें *n* -घालणें *n.* २ *elementary instruction* ओनामा *m*, मूलतत्वज्ञान *n.* ३ *a basis* पाया *m*, मूळ *n*, आधार *m.* Ground'less *a.* निराधार. Ground'lessly *adv.* Ground'lessness *n.*

Group (grōōp) [Fr. *groupe* –It. *groppo*, a bunch, knot.] *n. a cluster, crowd, an assemblage* गट *m*, गठ्ठा *m*, जमाव *m*, टोळी *f*, समुदाय *m*, संघ *m*, ग्राम *m.* २ *a variously limited assemblage of animals or plants including certain species of a genus or a whole genus or certain genera or even several orders* वर्ग *m*, गण *m*, (समलक्षण किंवा सजातीय

प्राण्यांचा ) वर्ग *m*, उपवर्ग *m*, गण *m*, उपगण *m*, जात *f*, पोटजात *f*. ३ (*mus.*) (*a*) *a number of eighth, sixteenth etc. notes, joined at the stems* स्वरग्राम *m*. (*b*) अलंकारदर्शकग्राम *m*. G. *v. t. to form a group of* वर्ग पाडणें -बांधणें, ग्राम बांधणें, गण *m*. बांधणें, जमाव *m* -समुच्चय *m*. करणें *g. of o.* २ *to arrange or combine in a group or groups* (often with reference to mutual relation and the best effect) (सर्व वस्तु उठावानें आणि योग्य दिसतील अशा रीतीनें) समुच्चयानें मांडणें -योजणें -रचणें. Group'ed *a*. वर्ग केलेला, वर्गावर्गानें रचलेला. Group'ing *n*. (*Fine Arts*) *the disposal or relative arrangement of figures or objects as in drawing, painting, sculpture or in ornamental designing* समुच्चयन *n*, वर्गवार रचना *f*, योग्य -यथायोग्य जुळणी *f*, गणीकरण *n*, समुच्चयीकरण *n*. Photograph of a group समुच्चयाचा -गणाचा प्रकाशलेख *m*.

Grouse (grows) [Prob. formed from the older *grice* (on the analogy of *mouse, pl. mice*) -O. Fr. *griesche*, gray, of unknown origin.] *n*. (*sing. & pl.*) *the heathcock or moorfowl* (bird with short curved bill, short legs, and feathered feet, frequenting moors and hills) एक जातीचा पक्षी *m*. [ROCK G. पक्रोरडी *f*.] G. *v. i. to seek or shoot grouse* ग्राउस पक्ष्याची शिकार करणें.

Grout (growt) [A. S. *grut*, coarse meal.] *n*. *coarse meal, ground malt* भरभरीत आटा *m*, रवा *m*. २ (formerly) *a kind of beer or ale* ग्राउट नांवाची (बियर) दारू *f*. ३ (*pl.*) *lees, dregs, grounds* कचरा *m*, कीट *m*, मळ *m*, गाळ *m*, रेंदा *m*, रेंदट *n*. ४ (a) *a thin, coarse mortar, used for pouring into the joints of masonry and brickwork* (दरजा भरण्याचा) कमावलेला -मळलेला भरभरीत चुना *m*. G. *v. t. to fill up or finish with grout* (as the joints between stones) (कमावलेल्या) चुन्यानें दरजा भरणें, दरजांमधील सांधे *m. pl.* -फटी *f. pl.* भरून काढणें. Grout'ing *v. n. the process of filling in or finishing with grout* चुन्यानें दरजा भरून काढण्याची क्रिया *f*. २ (also) *the grout thus filled in* दरजांत भरलेला चुना *m*. Grout'y *a*. (*colloq.*) *cross, sulky, sullen* उद्विग्न, विषण्ण, उदास.

Grove (grōv) [A. S. *graf*, a grove-*grafan*, to dig. See Grave, Groove.] *n*. *a wood of small size, generally of a pleasant or ornamental character* राजी *f*, राई *f*, वनराजी *f*, बन *n*, वन *n*.

Grovel (grov'el) [Explained by Skeat as due to M. E. *groveling*, flat on the ground, properly an adv.; also spelt *grofling*.] *v. i. to crawl on the earth* (esp. in abject fear &c.) (शिळपटपणानें किंवा काल्पनिक -निरर्थक भीति इ०कांमुळें) भुई *f*. -जमीन *f*. &c. धरणें -धरून असणें -धरून चालणें, भुईला -जमिनीला लागणें, जमिनीवर पडून सरपटत जाणें, रांगणें. २ *to be low, mean or abject* हलकट -नीच -पाजी -पागल बनणें -होणें, भ्रष्ट -कामासक्त होणें, विषयपंकांत लोळणें. Grovel'ler, Grovel'er *n*. सरपटत जाणारा. २ *an abject wretch* अधम, अधमाधम, नीच, पाजी, पागल, हरामखोर, हरामखाऊ. Grovel'ling, Grovel'ing *pr. p. a. lying low* जमिनीला लागलेला, खालीं पडलेला -वांकलेला. २ *debased, low* हलकट, हलका, अधम, नीच, पाजी, निकृष्ट, तिरस्कार्य.

Grow (grō) [A. S. *growan*, Icel. *groa*; connected with *Green*.] *v. i. to become enlarged by a natural process* (इंद्रियांची वृद्धि होऊन) वाढणें, वाढत जाणें, वृद्धिंगत होणें, (-ची) वाढ होणें, मोठा होणें-होत जाणें. २ *to increase in any way* (in size) (भर पडल्यामुळें) वाढणें, विस्तार पावणें, विस्तृत होणें, फुगणें, वाढत जाणें, वाढीस लागणें. ३ *to advance to maturity* (नैसर्गिक वाढीनें) पूर्ण उमेदींत येणें, ज्वानींत येणें, तयार होणें, पुरी वाढ होणें *in. con. g. of s.* ४ (a) *to be produced by vegetation* रुजणें, उगवणें, वाढणें. (b) (-rapidly and vigourously) *to thrive* फोफावणें, फोफावत वाढणें, उफाटणें, उफाट्यानें -झपाट्यानें -घुमान्यानें वाढणें. ६ *Shakes. to adhere* (-ला) मिळणें, लागणें, चिकटणें, (-ला) मिळून -लागून-चिकटून बसणें -जाणें; as, "Our knees shall bend till the ground on which they *grow*." G. *v. t. to cultivate, to produce* पिकवणें, (लाऊन -पेरून इ०) वाढविणें, तयार करणें, पैदा करणें, उत्पन्न करणें, करणें. Grow'er *n*. वाढवणारा, वाढीस लावणारा. २ पिकवणारा, तयार करणारा. Grow'ing *pr. p. & v. n.* वाढवणें *n*, वाढणें *n*. Grow'th *n*. -*the process* (of growing) वाढ *f*, वृद्धि *f*, अभिवृद्धि *f*, वर्धन *n*, वाढणें *n*, विस्तार *m*. २ पूर्णावस्था *f*, ऐन उमेद *f*, ज्वानी *f*, भर *m*. ३ *product* निष्पत्ति *f*, उगवण *f*, उत्पत्ति *f*, फळ *n*, उत्पन्न *n*. Grow'thful *a*. वाढणारा, वर्धनशील. Grown *pa. p.* रुजलेला, उपजलेला. २ वाढलेला, वृद्ध. ३ (with *up*) वयांत आलेला, पूर्ण वाढलेला, प्रौढ, थोर, मोठा. To grow on *to gain in the estimation of* (-ला) पटत जाणें, पसंत पडणें, (-च्या) मनांत भरलें जाणें. To grow out of *to issue from* (-पासून) निघणें -होणें, उद्भवणें, उत्पन्न होणें. To grow up or together *to become united by growth* एकत्र उगवणें -वाढणें, (एकमेकांस भिडून -चिकटून वाढल्यामुळें) एकजीव होणें *in. con. g. of s.* Grown over (with) *covered with growth* आवृत, आच्छादित, &c. in comp.

Growl (growl) [Dut. and Ger. *grollen*, to be angry, to roar.] *v. i. to utter a deep, murmuring sound, like a dog* गुरगुरणें, गुरकणें, गुरगुर *f*. करणें, घुरकणें. २ *to murmur, to grumble* कुरकुरणें, कुरबुरणें, कुरकुर *f* -कुरबूर *f*. करणें -लावणें. G. *v. t. to express by growling* गुरकावून दर्शवणें -सुचवणें. Growl *n*. *growling, the threatening sound made by a surly*

dog, a grumbling sound गुरकणें n, गुरकणी f, गुरकावणी f, गुरगुरवणी f, गुरगूर f, गुरगुराट m, घुरघुराट m. २ कुरकूर f, कुरबूर f, पुटपूट f, कुरकुरणें n. Growl'ed pa. t. Growl'er n. one who growls गुरगुरणारा, गुरकणारा, गुरक्या. २ कुरकुरणारा, कुरकूर करणारा, कुरकुऱ्या, कुरबुऱ्या. Growl'ing pr.p. Growl'ingly adv.

Grub (grub) [O. E. grobben to engrave. E. Grab, Gripe.] v. i. (a) to dig in or under the ground (दुष्प्राप्य वस्तूसाठीं) जमीन खणणें -खोदणें, जमिनीखालीं खणणें. (b) to be occupied in digging खणण्यांत गुंतणें -गुंतून राहणें. २ to drudge, to do menial work रखडणें, राबणें, खपणें, (जिवापाड) श्रम करणें, श्रमाचें -कष्टाचें काम करणें, काबाडकष्ट -हलकें काम करणें, मरमर मरणें. G. v. t. to root out by digging (followed by up) खणून काढणें, उपटून काढणें, खुरप्यानें मुळासकट उपटणें, तळसून काढणें. २ (slang) to supply with food खावयास घालणें -देणें, खुराक लावणें, (-ला) पोसणें -बाळगणें; as, "They are not bound to G. you." G. n. (slang) food, victuals खुराक m, रतीब m, चंदी f. G.-ax or -axe, G.-hoe n. खुरपें n. (dim.) हातखुरपें n, पुतळी f (?), दावली f. G.-breaker, Grub-hook n. खुरप्या (नांगर) m. G.-grass n. खरडा m. G.-saw n. हातकरवत f. G.-street n. अठराव्या शतकांत लंडनमध्यें कमी दर्जाचे ग्रंथकार व वर्तमानपत्रकर्ते जेथें रहात असत ती ग्रब नांवाची गल्ली किंवा आळी f. २ (hence) cheap and bad literature स्वस्त व गबाळ ग्रंथ m. pl. ३ असे ग्रंथ लिहिणारे (ग्रंथकार). Grub'ber n. one who, or that which, grubs खुरपणारा, खुरप्या. २ (esp.) a tool of the nature of a grub-axe, &c. खुरपण्याचें हत्यार n, खुरपणें n.

Grudge (gruj) [M. E. grucchen -O. Fr. groucer, groucier, to grumble.] v. t. to be unwilling to give, to begrudge, to covet (followed by the direct object only, or by both the direct and indirect objects) न खपणें in. con. with ला of s., (-वर) डोळा m -नजर f राखणें -ठेवणें, (-बद्दल दुसऱ्याचा) हेवा करणें, देण्यास नाखूष असणें. २ (obs.) Shakes. to cherish enmity (-बद्दल) मनांत दुष्टावा m. धरणें. G. v. i. to be covetous or envious, to murmur दुष्टावा &c. धरणें -करणें, कुरकुरणें, नाक मुरडणें, तक्रार करणें, नाखूष असणें; as, "The Cardinal on his death-bed murmured and grudged." G. n. cherished malice or ill-will, an old cause of hatred चुरस f, आकस m or f, अदावत f, दावा m, डाव m, गांठ f, अढी f, पीळ m, शल्य n (pop.) सल n, गुबा (or -भा) रा m, गोवरीची आग f (fig.), कुपित्थ n (S.), मानसहिंसा f, अन्तर्दाह m, द्वेष m, मत्सर m, ईर्ष्या f, दुष्टावा m, दावा m, वैर n, वैरभाव m, अढी f. [To GRATIFY A G. दावा m -वैर n -डाव m साधणें -उगवणें, वैरोद्धार m. करणें. To MAINTAIN G. मनांत गांठ f -अढी f धरणें -बाळगणें -ठेवणें.] G.-bearing a. spiteful अकसखोर, अकसी, कुन्हेवाईक, अढी धरणारा. Grudge'ful a. दावेकरी, दावेदार, दीर्घद्वेषी. Grudg'er n. मेंग्या साप m (fig.), आडगांठ्या. Grudg'ing pr. p. a. Grudg'ingly adv. नाखुषीनें, असंतोषानें, मोठ्या संकटानें -कष्टानें -दुःखानें -जुलमानें.

Gruel (grōōel) [O. Fr. gruel, —Low L. grutum, meal.] n. a light, liquid food, made by boiling meal in water or milk पेज f, (of rice) कणेरी f (of bits of rice), मंड m (of parched rice). [SOUR G. कांजी f. THIS WORD IS IMPROPERLY USED BY LADIES AND AYAS FOR GRUEL.].

Gruesome (grōō'-sum) [Scand.; cog. with Ger. grausam.] a. horrible, fearful घोर, भयंकर, भयानक.

Gruff (gruf) [Dut. grof; Ger. grob, coarse.] a. coarse-grained रेंवट, जाडे भरडे कण असलेला; as, "The G. sulphur." २ (a) rude, unpolished कठोर, निष्ठुर, बेअदबी करणारा, रूक्ष, परुष (S.), उद्धट, उद्दामपणाचा, तुटकपणाचा; as, "To speak in terms more G., his head was like a sugar-loaf." (b) (also said of a guess) ढोबळ -ठोकळ (अनुमान). ३ rough, sour, surly; (a) (of aspect or manner) करडा, खड्याळ, दाष्ट. (b) (of the voice and speech –implying the utterance of hoarse or guttural sound) रूक्ष, घोगरा (?), कर्कश, कठोर. Gruf'fly adv. उद्दामपणानें, उद्धटपणानें, परुष वाणीनें, &c. Gruff'ness n. रेंवटपणा m. २ कठोरपणा m, नैष्ठुर्य n. ३ कर्कशपणा m, घोगरेपणा m.

Grum (grum) [A. S. gram, grim. Cf. Dan. grum.] a. morose, surly, grim, severe of countenance उग्र चेहऱ्याचा, तापट, कडक (प्रकृतीचा), तिखट; as, "Nick looked sour and G." २ low, deep in the throat, guttural गळ्यांतल्या गळ्यांत होणारा, निच, खोल; as, "A G. voice."

Grumble (grum'-b'l) [Fr. grommeler, to mutter.] v. i. to murmur with discontent कुरकुरणें, कुरबुरणें, मुरमुरणें, बुरबुरणें, बडबडणें, कुरकूर f -कुरबूर f -मुरमूर f -बडबड f. &c. लावणें -करणें. २ (as the bowels) (पोटांत) गुरगुरणें, गुडगुडणें, खळबळणें, गरगरणें. G. v. t. to express or utter with grumbling कुरकुरत -गुरकावून सांगणें -बोलणें. G. n. the noise of one that grumbles कुरकूर f, कुरबूर f, गुरगूर f, गुरकावणी f, गुणगुण f, बडबड f, असंतोषाचा उद्गार m. २ discontented disposition असंतोषी स्वभाव m, किरकिऱ्या स्वभाव m, बेदिली f. Grum'bled pa. t. & p. p. Grum'bler n. कुरकुरणारा, कुरबुऱ्या, &c. Grum'bling pr. p. & v. n. कुरकूर f, कुरबूर f, कुडकूड f, बुरबूर f, पुटपूट f.

Grume (grōōm) [O. Fr. grume, –L. grumus, a little heap.] n. a thick, viscid fluid; a clot (as of blood) गठळी f, गुठळी or गोठुळी f, चाखळ f. Gru'mous, Grumose' a. गुठळ्यांचा, चाकळांचा.

Grunt (grunt) [M.E. grunten -A.S. grunian, to grunt.]

*v. i. to make a deep sound like a hog* डुरडुरणें, डुरडूर *f.* करणें, डुरकणें, (-of the buffalo and other animals) डिरकणें, डुरकणें, डिरकण्या *f. pl.* फोडणें, रेकणें, डुरकणें, डुरंगळणें or डुरंगाळणें. G. *n. a deep guttural sound* (of a hog) डुरडूर *f.* सूकरशब्द *m.* (of a buffalo) डिरकणी *f.* रेंकणें *n.* Grunt'er *n.* डुरकणारा, (specif.) डुकर *m* or *n.* २ (brass-founding) *a hook used in lifting a crucible* आंकडा *m.* वांकवलेली कडी *f.* Grunt'ing *pr. p.* & *v. n.* डुरकणें *n.* Grunt'ingly *adv.*

Guarantee, Guaranty (gar-an-tē' *or* gar'an-ti) [O. Fr. *garantie, guarantie,* pa. p. of *garantir,* to warrant -*garant,* warrant. Guarantee is prob. influenced by words like Assignee, Lessee &c.] *n. a contract to see performed what another has undertaken, a warranty, a security* हमी *f.* जामिनकी *f.* जामिनी *f.* जिम्मा *m.* जिम्मेदारी *f.* हवाला *m.* प्रतिभू *m* (S.), गॅरंटी *f.* २ *the person who makes such a contract, a guarantor* हमीवाला *m.* जामीन *m.* जामीनदार *m.* जामीनगार *m.* जिम्मेदार *m.* जिम्मेवाला *m.* (-चा) हवाला घेणारा *m.* प्रतिभू होणारा *m.* G. *v. t. to undertake that another shall perform certain engagements, to warrant* हमी *f* -हवाला *m* -जिम्मा *m* -जामीनगत *f* &c. देणें -घेणें, जामीन राहणें. Guaranteed' *pa. t.* & *pa. p.* हवाला दिलेला. Guarantee'ing *pr. p.* & *v. n.* Guar'antor *n. a warrantor, a security* जामीन &c. राहणारा, जामीन. (b) विम्याच्या धर्तीवर खजिनदार वगैरे जबाबदार कामगारांच्या सचोटीबद्दल हवाला घेणाऱ्या मंडळ्या *f. pl.*

Guard (gärd) [O. Fr. *garder, guarder,* to guard.] *v. t. to protect from danger, to ward, to take care of* (-चें) रक्षण करणें, (-ची) काळजी घेणें, (-ला) जपणें, राखणें, राखण *f* -रखवाली *f* करणें, प्रतिपाळ *m* -सांभाळ *m.* करणें. २ *to keep watch over* (to prevent escape &c.) (-वर) पहारा करणें -नजर ठेवणें. ३ *to protect the edge of,* (esp.) *with an ornamental border* (कांठ लावून -फीत लावून) सुरक्षित करणें, मजबूत करणें. G. *v. i. to watch* (by way of caution), *to be wary* सावध -हुषार राहणें, सावध -हुषार असणें, सावधगिरीनें -हुषारीनें राहणें -असणें, सावधगिरी *f* -हुषारी *f.* ठेवणें, जपणें, संभाळणें. G. *n.* रक्षण करणारा. २ *a man or body of men stationed to protect, a watch* पहारा *m.* पहारेकरी, रखवालदार, रखवाला, रक्षक, चौकी *f.* ३ *one who has charge of a mail coach or a railway train* डांकेचा -आगगाडीचा गार्ड *m* -रक्षक. ४ *protection, that which guards* बचाव *m.* संरक्षण *n.* निवारण *n.* वारण *n.* संरक्षक साधन *n.* त्राण *n* (in comp.; as, जंघात्राण). ५ *part of the hilt of a sword* तरवारीच्या मुठीच्या मागचा भाग *m.* ६ *ornamental border at the edge of a garment* कांठ *m.* किनार *f.* ७ (*a watch-guard*) (घड्याळाचा सांखळीवजा) पट्टा *m.* ८ (यंत्राला किंवा यंत्राजवळच्या मनुष्यांस कोणत्याही प्रकारचा अपघात न व्हावा म्हणून लावलेला) पिंजरा *m.* ९ (a) *a fence or rail to prevent falling from the deck of a vessel* आगबोटीवरील कठडा *m.* (b) *the frame-work of strong timbers, which curves out on each side beyond the paddle wheel and protects it and the shaft against collision* पिंजरा *m.* (c) *a plate of metal, beneath the stock, or the lock frame, of a gun or pistol, having a loop called a bow, to protect the trigger* (बंदुकीच्या खजिन्याखालीं बसविलेली धातूची) राखणपट्टी *f.* १० *a posture of defence* (in fencing &c.) स्वसंरक्षक पवित्रा *m.* ११ *an expression or admission intended to secure against objections or censure* (आक्षेप, शंका इ. कांच्या निवारणार्थ केलेलें) स्वपक्षाकडील समर्थन *n.* ११ *watch, heed, care* सावधगिरी *f.* हुषारी *f.* दक्षता *f.* खबरदारी *f.* [To BE ON ONE'S G. सावधगिरीनें -खबरदारीनें असणें, जपणें, संभाळणें.] Guard'able *a.* संरक्षणीय. Guard'ed *pa. t.* & *pa. p. wary, cautious* सावध, दक्ष, हुषार, दूरदृष्टि; as, "He was *guarded* in his expressions." २ *framed or uttered with caution* जपून -संभाळून -सावधगिरीनें -दक्षतेनें -बेताबातानें केलेला -उच्चारलेला, &c.; as, "*Guarded* expressions." Guard'edly *adv.* सावधगिरीनें, &c. Guard'edness *n.* सावधगिरी *f.* हुषारी *f.* &c. Guard-house, G.-room *n.* पहारेकऱ्यांची खोली *f.* हिच्यामध्यें शिपायांस त्यांच्या दुर्वर्तनाबद्दल कोंडून ठेवतात. २ (hence) *a lock-up* चौकी *f.* चावडी *f.* देवडी *f.* Guard'ian *n. one who guards or takes care of* वाली, (-ची) काळजी घेणारा -बाळगणारा, राखणदार, रखवालदार, राखण, &c. २ (*law*) *one who has the care of an orphan minor* (अज्ञान-) पालक. G. *a. protecting* रक्षक, पालक, &c.; as, "G. deities." [G. ANGEL *an angel supposed to watch over a particular person* अधिदेवता *f.* राखणदेवता *f.* दैवत *n.* २ *a person specially devoted to the interests of another* वाली, पाठीराखा *m.*] Guard'ianship *n. the office, duty, or care of a guardian* पालकत्व *n.* पालकाचें काम *n* -अधिकार *m* -कर्तव्य *n* -जबाबदारी *f.* सांभाळ *m.* प्रतिपाल *m.* वालीपणा *m.* Guard'less *a.* Guard'ship *n.* गार्डची जागा *f.* To mount guard *mili. to go on guard-duty* पहाऱ्यावर जाणें, पहारा सुरू करणें. On or off one's guard *on the watch or the opposite* हुषार, सावध, सावधान, दक्ष; *or* बेसावध, गैरहुषार -सावध, गाफील, गैबत्या, अस्ताव्यस्त.

Guava (gwä'-vä) [Span. *guayaba,* the guava fruit, -*guayabo,* the guava tree. Probably of West Indian origin.] *n. a tropical tree or its fruit, of the genus* Psidium (-the tree) पेरू *m.* जांब *m.* (-the fruit) पेरू *m.* जांब *m.* जमरूद *m.* जांबफळ *n.*

Gudgeon (guj'-un) [Fr. *goujon* -L. *gobio* (-*nem*) -Gr. *kobios.* See Goby.] *n. zool. a small European*

*fresh water fish* युरोपांतील एक प्रकारचा गोडा मासा *m*, गजन *m.* २ *what may be got without skill or merit* , दुपारी -लायकी नसतांना मिळण्यासारखी वस्तु *f.* ३ *a person easily duped or cheated* सहज फसणारा -चकणारा माणूस, भोलानाथ. G. *v. t.* (*R.*) फसविणें, ठकविणें.

Guerdon, Same as Reward, which see.

Guerilla, Guerrilla ( ger-ril'la ) [ Span. *guerrilla*, dim. of *guerra* ( Fr. *guerre* ) –O. Ger. *werra*, war. ] *n. a mode of harassing an army by small bands* ( adopted by the Spaniards against the French in the Peninsular war ) गनिमी काव्याची लढाई *f.* २ *a member of such band* गनीम *m.* G. *a.* गनिमी.

Guess ( ges ) [ M. E. *gessen*, from Dan. *gisse*, to guess. ] *v. t. to conjecture or judge:* ( a ) (-at random ) ( कांहींतरी ) तर्क *m* -अटकळ *f* -अनुमान *n* -अदमास *m* -अंदाज *m.* &c. करणें -बांधणें, कल्पना *f.* करणें -बांधणें. ( b ) (-what is likely or probable, but is not certain or decisive) अजमावणें, अजमासणें, अजमावून -अजमासून पाहणें, ( संभाव्य परंतु खात्रीलायक होणारी नव्हे अशा गोष्टीबद्दल) तर्क *m* -अटकळ *f.* &c. करणें -बांधणें. ( c ) -rightly ( by accident ) खरी अटकळ बांधणें, उकलणें, सोडणें, उलगडा करणें. २ *to think, to suppose, to imagine, to believe* समजणें, कल्पना करणें, समज *m* -कल्पना *f* -तर्क *m.* होणें *in. con. g. of s.* G. *v. i. to judge on uncertain knowledge* ( with *at* or *about* ) ( -संबंधानें ) अटकळ *f* -धोरण *n* -तर्क *m.* करणें -बांधणें. G. *n. judgment or opinion on insufficient evidence or grounds* अटकळ *f,* धोरण *n*, अनुमान *n*, तर्क *m*, अजमास *m*, अंदाज *m*, समज *m*, कल्पना *f.* Guess'able *a.* तर्क्य. Guess'er *n.* अजमासणारा, अटकळ *f* -तर्क *m.* करणारा -बांधणारा, धोरण बांधणारा. [ THAT IS A GOOD G.–*a man shrewd at guessing* घोरणी, अटकळबाज, अनुमानी, ताडबाज, तर्कबाज.] Guess'ing *n.* अटकळ *f,* तर्क *m*, धोरण *n.* Guess'ingly *adv.* तर्कानें, अनुमानानें, धोरणानें. Guess'-work *n. work performed or results obtained by guess* अंदाजी काम *n*, अंदाज *m*, धोरण *n*, तर्क *m*, धोरणानें -अदमासानें केलेलें काम *n*, अनुमानधपका *m.*

Guest ( gest ) [ A. S. *gest, gœst*; allied to Dut. & Ger. *gast*, L. *hostis*, stranger. ] *n. a visitor, a person received and entertained in one's house or at one's table, a visitor entertained without pay* पाहुणा *m*, पाव्हणा *m*, पाहुणारावणा *m*, अतिथि *m*, अभ्यागत, आला गेला *m* ( आलें गेलें *n* ), मेहमान *n.* [ ATTENTION TO A G. परामर्श *m* (*v.* घे, कर. ), समाचार *m*, (पाहुण्याची) विचारपूस *f,* पाहुणचार *m.* G.s–compreh. or loosely पहीपाहुणा *m.* HONOURS &c. PAID TO A G. आदरोपचार *m. pl.*, आदरातिथ्य *n*, संभावना *f,* पाहुणचार *m. pl.* ] २ *a lodger or boarder at a hotel* खाणावळींतला पाहुणा *m*, खाणावळींत राहणारा प्रवाशी *m* -मुशाफर *m.* ३ *a person invited to an entertainment* मेजवानीस -जेवणावळीस -आदरातिथ्यास बोलावलेला मनुष्य. [ G–SUMMONER आमंत्रण -बोलावणें करणारा, बोलावणेंकरी, बोलावण्या, आमंत्रणकरी, आमंत्रण्या. ] G.-chamber *n.* पाहुण्यांची खोली *f.* G. rites *n. pl.* पाहुणचार *m. pl.*

Guggle ( gug'-g'l ) [ Formed from Gurgle. ] *v. i.* See Gurgle.

Guide ( gīd ) [ Fr. *guider*; Prob. from a Teut. root, as in A. S. *witan*, to know, to observe. ] *v. t. to lead or direct, to pilot* (-ला) वाट *f* -मार्ग *m* -रस्ता *m.* &c. दाखविणें, वाट *f* -रस्ता *m.* &c. दाखवून नेणें; as, "To G. a traveller." २ *to regulate and manage* वळण *n* -दिशा *f.* लावणें, चालविणें, (योग्य दिशेनें -मार्गानें) कारभार चालविणें -करणें, शिस्तीला -मार्गाला लावणें. ३ *to instruct and influence* (intellectually or morally), *to train* मार्गाला लावणें, (-च्या) शिक्षणाला -नीतीला वळण -दिशा -मार्ग लावणें. G. *n. one who leads or directs another person in his way, one who exhibits points of interest to strangers, a conductor* वाटाड्या, मार्गदर्शक *m*, माहितगार, नीट वाटेनें नेणारा, वाट दाखवून देणारा. २ ( also ) *that which guides, a guide-book* मार्गप्रदीप *m* (*fig.*), मार्गोपदेशिका *f,* ( कोणत्याही विषयाच्या ) माहितीचें पुस्तक *n*, मार्गदर्शिका *f.* ३ *one who, or that which, directs another in his conduct or course of life* ; *a director; a regulator* मार्गदर्शक, मार्गोपदेशक, निर्देशक, उपदेशक, उपदेष्टा. [ SPIRITUAL G. धर्मगुरु *m.* ] ४ *any contrivance, especially one having a directing edge, surface, or channel, for giving a direction to the motion of anything as water, an instrument, or part of a machine, or for directing the hand or eye as of an operator* वाटाड्या, खुणेचा सांचा *m*; as, ( a ) ( *water-wheels* ) *a blade or channel for directing the flow of water to the wheel buckets* (पाण्याच्या चक्रींतील) चक्राला जोडलेल्या भांड्यांत पाणी नेऊन सोडणारी नलिका *f* -नळी *f,* ( b ) ( *surgery* ) *a grooved director for a probe or knife* ( जखम तपासण्याच्या कामाचें ) पन्हळीदार शस्त्र *n.* ( c ) (*print.*) *a stripe or device to direct the compositor's eye to the line of copy he is setting* ठसे जुळणाराची दृष्टि ( तो जुळीत असलेल्या ) मजकुराकडे नेणारी पट्टी *f* -कांटा *m*, वाटाड्या. Guid'able *a.* विनेय, वश्य, ऐकणारा (*fig.*), ऐकून घेणारा ( *fig. & colloq.* ). Gui'dance *n. the act or result of guiding* वाट दाखविणें *n*, मार्गदर्शकत्व *n.* २ *the superintendence or assistance of a guide, direction, government* कारभार *m*, वहिवाट *f,* देखरेख *f,* निर्वाह *m*, पुढारीपणा *m*, चालकत्व *n*, नायकत्व *n*, मार्गदर्शकत्व *n.* Guide'-book *n. a book of directions and informa-*

*tion for travellers, tourists, &c.* मार्गदर्शक *m*, वाटाडें पुस्तक *n*, वाटेच्या माहितीचें पुस्तक *n*, वाटेच्या सविस्तर माहितीचें पुस्तक *n*. Guide'post *n*. वाट *f* -मार्ग *m* -रस्ता *m* दाखविणारा खांब *m*, रस्त्याच्या खुणेचा खांब *m*, (मार्ग) दर्शकस्तंभ *m*. Guid'er *n*. वाटेनें नेणारा, वाट दाखविणारा, मार्गदर्शक, उपदेष्टा.

Guidon ( gī'-dun ) [ Fr. *guidon*, It. *guidone*. See Guide *v. t.* ] *n. a small flag*; as, ( a ) *that carried by cavalry or that used to direct the movements of a body of infantry* (घोडेस्वारांच्या फौजेबरोबर असलेला अथवा पायदळाची हालचाल करतांना ) खुणा दाखविण्याचा बावटा *m*. ( *b* ) *-of a guild or fraternity* कोणत्याही समाजाचा -मंडळाचा (विशिष्टचिन्हांकित) बावटा *m* -पताका *f* -झेंडा *m*.

Guild, Gild ( gild ) [ A. S. *gild*, money, *gildan*, to pay; it is the same word as Gold and Gild. ] *n. an association of men belonging to the same class or engaged in kindred pursuits, formed for mutual aid and protection; a business fraternity or corporation* एकाच वर्गांतील किंवा धंद्यांतील लोकांचें परस्परसहकारी मंडळ *n* -समाज *m* -संघ *m*, व्यापारी संघ *m*, (परस्परांचें परस्परांस साहाय्य मिळून सर्वांस सुख व्हावें अशा हेतूनें) एकत्र झालेल्या लोकांची संस्था *f*; as, "The Stationers' G., The Iron-mongers' G." *N. B.*—They were originally licensed by the government, and endowed with special privileges and authority. (सनदी मंडळी *f*). २ *a religious association or society, organised for charitable purposes or for assistance in parish work* धर्ममंडळ *n*, धर्मखातें *n* -संस्था *f*, धर्मादावखातें *n*. Guild'brother *n*. संघबंधु *m*. G.-hall *n. the hall where a guild or corporation usually assembles, a town-hall* महाजनवाडी *f*, संघगृह *n*. Guild'ry *n*. *a guild, the members of such association* धंदेमंडळ *n*, महाजनमंडळ *n*, अशा मंडळाचे सभासद *m. pl.*

Guilder ( gil'-der ) [ Dut. *gulden* –Ger. *gulden*, gold.] *n. an old Dutch and German coin* हॉलंड व जर्मनींतील सोन्याचें प्राचीन नाणें *n*. (b) (*now*) *a silver coin worth 1s. 8d.* ( हल्लीं ) एक शिलिंग आठ पेन्स किंमतीचें एक चांदीचें नाणें *n*. ( c ) *Shakes. money* (*generally*) पैसा *m*, धन *n*, द्रव्य *n*, संपत्ति *f*, &c.

Guile ( gīl ) [ O. Fr. *guille*, deceit, as in A. S. *wil*, a trick. See Wile.] *n. cunning, artifice, duplicity, deceit, wile* कपट *n*, कावा *m*, दगा *m*, कावादावा *m*, कपटविद्या *f*, पेंच *m* ( *fig.* ), छल *m*, माया *f*, माव *f*, कृत्रिम *n*, चेटक *n*. Guile'ful *a*. कपटी, सकपट, कपटाचा, कावेबाज, कावेदार, दगेखोर, दग्याचा, मायावी, छद्मी, शठ, धूर्त. Guile'fully *adv*. कपटानें, दग्यानें, &c. Guile'fulness *n*. कापट्य *n*, दगेखोरपणा *m*, &c. Guile'less *a*. निष्कपट, निष्कृत्रिम, अकृत्रिम, निष्प्रपंच, अमायिक, अवक्र, सरल *pop.* सरळ, सिधा, भोळा, वांकडें तिकडें माहित नसलेला. Guile'lessly *adv*. निष्कपटपणानें, सरळपणानें &c. Guile'lessness *n*. निष्कपटपणा *m*, निष्कापट्य *n*, अकापट्य *n*, कपटाभाव *m*, कपटराहित्य *n*, सरळ -भोळेपणा *m*, सिधा रस्ता *m* ( *fig.* ), धोपट मार्ग *m* ( *fig.* ). Guil'er *n. obs. a deceiver* फसव्या, ठक, &c.

Guillotine ( gil'ō-tēn ) [ Fr. It was named after Joseph Ignace *Guillotin* ( 1738-1814 ), a physician, who first proposed its adoption. The instrument was invented by Dr. Antonis Louis, and was called at first *Louison* or *Lousielle*. ] *n. an instrument for beheading* शिरच्छेद करण्याचा -मान उडविण्याचा सांचा *m*, गिलोटिन *n*. २ *any instrument for cutting* कापण्याचें यंत्र *n* -शस्त्र *n* -हत्यार *n*. G. *v. t. to behead with the guillotine* गिलोटिननें मान उडविणें -गर्दन छाटणें &c.

Guilt ( gilt ) [ Orig. a *payment* or *fine* for an offence; A. S. *gylt*, guilt –*gildan*, to pay, to atone. ] *n. the criminality and consequent exposure to punishment, wilful disobedience of law, the state of one who has broken a moral or political law, crime, offence against right* अपराध *m*, गुन्हा *m*, तकसीर *f*, दोष *m*, पाप *n*, पातक *n*, पापकर्म *n*, पापीपणा *m*, दोषीपणा *m*, वांक *n*. २ *exposure to any legal penalty or forfeiture* दण्डार्हता *f*, शिक्षापात्रता *f*; as, "A ship incurs *guilt* by the violation of a blockade." Guilt'ily *adv*. Guilt'iness *n*. दोषीपणा *m*, सदोषता *f*, अपराधिता *f*, सापराधता *f*. Guilt'less *a. innocent* निर्दोष, निरपराध, दोषरहित -शून्य, अपाप, निर्मल, विमल, निष्कलंक, धुतल्या मोत्यासारखा, धवल ( S. ). २ *unacquainted* ( *with* ), *without experience or trial* अनभिज्ञ, नेणता, अननुभवी, कच्चा. Guilt'lessly *adv*. Guilt'lessness *n*. निर्दोषता *f*, निरपराधता *f*, दोषराहित्य *n*, &c. Guilt'y *a. criminal, morally delinquent, chargeable with, responsible for, justly exposed to penalty* ( used with *of*, and usually followed by the crime, sometimes by the punishment ) दोषी, अपराधी, कृतपाप -अपराध, गुन्हेगार, पापी, सपाप &c. २ *evincing or indicating guilt, involving guilt* गुन्हा शाबीत करणारा, अपराध सिद्ध करून देणारा, दोषदर्शक, दोषयुक्त, दोषी, दुष्ट, पापी; as, "A G. look, action, or feeling."

Guinea ( gin'i ) [ Proper name. ] *n. a district on the West Coast of Africa* ( formerly noted for its export of gold and silver ) आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील गिनी नांवाचा एक प्रांत *m*. २ *a gold coin of England current for twenty-one shillings sterling* ( because first made of gold brought from Guinea). २१ शिलिंग किंमतीचें सोन्याचें एक नाणें *n*, गिनी *f*. Guinea'-worm *n. a very slender, thread-*

like nematoid worm common in tropical Africa नारू m, वाळा m, ( in covert or cant phraseol. ) नारायण m, नारोपंत m.

Guise ( gīz ) [ Fr. guise, a way, guise. ] n. customary way of speaking or acting, custom, fashion, चाल f, पद्धत f, वहिवाट f, चालचलणूक f, तऱ्हा f, वागणूक f, वर्तणूक f. २ external appearance in manner or dress, appropriate indication or expression, garb, shape वेष m, पेप m, पेहेराव m, पोषाख m, कपडे m. pl., रूप n, तऱ्हा f, आकार m, डौल m, देखावा m, रूपरंग m. ३ cover, cloak मिष n, बहाणा m, ढोंग n, सोंग n, खोटा देखावा m; as, "Under the G. of patriotism, &c." G. v. t. to dress पोषाख घालणें -चढवणें ( lit. & fig. ).

Guitar ( gi-tär' ) [ Fr. guitare,–Gr. kithara, lyre or lute.] n. a stringed instrument of music resembling the violin, but larger, and having six strings with seventeen frets, played upon with the fingers गिटार f, सारंगीसारखें एक प्रकारचें तंतुवाद्य n.

Gulf ( gulf ) [ Fr. golfe. ] n. a large bay आखात n, मोठी खाडी f. २ (poet.) a deep place in the earth, an abyss आखात n, अति खोल व भयंकर खळगा m.

Gull ( gul ) [ Prob. from gull, the bird, it being thought stupid. ] v. t. to beguile, to deceive, to cheat, to trick फसवणें, भोळसावणें, छकवणें, ठकवणें, मुंडवण f. घालणें g. of o., गफलतींत पाडणें -घालणें, गळा कापणें g. of o. To be gulled छकणें, मुंडवण f. पडणें g. of s. G. n. ( Shakes. ) a cheating, trick, fraud ठकबाजी f, ठकवणूक f, कपट n, लबाडी f. २ ( Shakes. ) one easily cheated, a dupe भोळा, भोलानाथ, भजनी, फशा. Gull'-catcher or Gull'er n. छकवणारा, फसवणारा, फसव्या, वंचक. Gull'ery n. फसवणूक f. Gull'ible a. सहज फसणारा -फसला जाणारा. Gullibil'ity n.

Gull ( gul ) [ Of Celtic origin. Cf. Corn. gullan, Wel. gwylan, Bret. gwelan,: gwela, to weep, to cry.] n. a web-footed sea-fowl ( named from its 'wailing cry'. ) दर्यांतील एक जातीचा पक्षी m.

Gullet ( gul'et ) [ O. Fr. goulet, the gullet, dim. of O. Fr. goule ( Fr. gueule ) –L. gula, Sk. गल, throat. ] n. (anat.) the tube by which food and drink are carried from the pharynx to the stomach अन्ननलिका f, अन्नाची नळी f, अन्नमार्ग m. २ something shaped like the food passage or performing like functions गळयाच्या नळीच्या आकृतीची कोणतीही वस्तु f, अन्ननलिकासमवस्तु f. ( a ) a channel for water पाणी जाण्याचा मार्ग m, पाण्याचा पाट m. ( b ) ( engin. ) a preparatory cut or channel in excavations of sufficient width for the passage of earth wagons ( खड्डा खणण्यास सुरवात केली असतां ) माती भरून नेण्याकरितां केलेला गाडीचा रस्ता m. (c) a concave cut made in the teeth of some saw blades (करवतीच्या पात्याच्या दांत्यांतील) पन्हळीसारखी खांच f.

Gulosity ( gū-los'i-ti ) [ L. gulositas, -gulosus, gluttonous. See Gullet. ] n. ( R. ) excessive appetite, voracity राक्षसी भूक f, पोटांत उठलेला राक्षस m, खाखा f, खादाडपणा m, पोटांत पडलेली आग f, &c.

Gully ( guli ) [ Probably gullet, which see. ] n. a channel worn in the earth by a current of water घळ f, घळण f, ओहळ or ओहोळ m, खांचर m or f, पन्हळ m, पन्हळी f. २ ( Eng. ) a grooved iron rail or train plate ( आगगाडी अथवा ट्राम्वे यांचा ) पन्हळीदार लोखंडी रूळ m. G. v. t. to wear into a gully or into gullies खांच -ओहोळ -पन्हळ &c. पाडणें. G. v. i. ( obs. ) to flow noisily घळघळ -खळखळ वाहणें.

Gulp ( gulp ) [ Dut. gulpen, to swallow eagerly. ] v. t. to swallow eagerly or in large draughts, to take down at one swallow गटगट -घोटघोट -घुटघुट adv. &c. पिणें, ढोसणें, घोटणें, घटघट -घटाघट पिणें, गटकावणें, गट्ट करणें. [ To G. UP to throw up from the stomach, to disgorge ओकून टाकणें, ओकणें, वांती करून बाहेर टाकणें. ] G. n. the act of taking a large mouthful, a swallow or as much as is swallowed at once घोटभर, घोट m, गटका m, घुटका m. [ By GULPS घटघट or -टां, घटाघट or -टां, घुटघुट, घटाटां, गटगट, गटागट, ढसढस or -सां. EXPIRING or LAST G. घुट्ट n, गट्ट n. WITH A G. गटकन -कर &c., घुटकन -कर, घुट्ट.] २ a disgorging ओकारी f, उलटी f, वांति f, ओकून येणें n. -पडणें n. -पाडणें n. -टाकणें n.

Gum ( gum ) [ A. S. goma, jaws; Icel. gomr, Ger. gaumen, palate. ] n. the dense tissues which invest the teeth, and cover the adjacent parts of the jaws हिरडी f, दंतमांस n. [ RUBBER FOR THE G. ( OF A CHILD ) चोफण or -णी f. or -णें n, चुंफणी f. ] २ (-of the eyes) डोळयाचा गू m, चिपडा m, चिपडें n, उकीर m. [ To BE COVERED WITH G. -THE EYES ( डोळे ) चिपडणें, चिकटणें, डकणें. ] G. v. t. to deepen and make large the spaces between the teeth of ( worn ) saws ( झिजलेल्या ) करवतीचे दांते घांसून लावणें -खोल करणें. Gum'mer n. दांते घांसून करवत लावण्याची कानस f.

Gum ( gum ) [ O. Fr. gomme –L. gummi –Gr. kommi; Prob. from an Egyptian form kami. ] n. a substance which exudes from certain trees, and hardens on the surface डिंक or डीक m, ( झाडाचा ) चीक m, गोंद m. [ G. ARABIC मस्वाई गोंद m, आरबी गोंद m. ( G. ARABIC IS NOT बाभळीचा गोंद.) G. WATER डिंकवणी n, ( चिकटविण्यासाठीं पातळ केलेला गोंद m. ] २ ( bot. ) gum-tree ( the name given to several trees in America and Australia ) गोंदाचें झाड n. ३ (a) a hive made of a section of a

*hollow gum-tree* ( डिकाच्या ) झाडाचे पोकळींत मधमाशांकरितां केलेलें घर *n.* ( b ) ( *also* ) *a vessel made of a hollow log* पोकळ लांकडाचें भांडें *n.* G. *v. t. to smear or unite with gum, to close with gum* डकवणें, डिकवणें, डीक *m.* -गोंद *m* लावणें, गोंदानें चिकटविणें, गोंदावर बसविणें. G. *v. i. to exude or form gum, to become gummy* चिकट होणें, (-ला) चिकटपणा *m.* येणें, चीक टाकणें. Gum'my *a. consisting of, or like, gum* डिंकाचा, गोंदाचा -सारखा. २ *producing or covered with gum* डिकाचा, डिक्या, डिकरा, चिकाळ or -ळा or -ळ्या. ३ *viscous, adhesive* चिकट, चिकण, चिकचिकित. ४ (-the eyes) चिपडा, शेण्या. Gum-stand or Gum-bottle *n.* गोंददाणी *f.* डिंकदाणी *f.* Chewing gum खाण्याचा गोंद *m.* Gum-dragon *n.* मोठ्या कांटेरी झुडपापासून मिळणारा डीक *m.* याची उत्पत्ति आशिया खंडाच्या पश्चिम भागांत होते. Gummif'erous *a. producing gum* ज्याच्यापासून गोंद निघतो असा, डिकाचा, गोंद प्रसवणारा; as, "G. plants." Gum'miness *n.* चिकटपणा *m,* चिकणांश *m.* Gum'ming *v. n.* डकवणें *n,* चिकटविणें *n.*

Gumboil ( gum'boil ) [From Gum 1 and Boil.] *n. med, a small suppurating inflamed spot on the gum* हिरडीचा फोड *m,* द्विजव्रण *m,* द्विजस्फोट *m.*

Gun ( gun ) [ M. E *goane,* a bow or a gun. Possibly ( like cannon ) from L. *canna,* reed or tube. ] *n. a weapon consisting essentially of a metal tube* ( massive enough to require to be mounted on a carriage or a fixed substructure ) *from which heavy missiles are thrown by the force of gun-powder or by explosive force of any kind, a piece of ordnance, cannon, great gun* तोफ *f,* उल्हाटयंत्र *n.* २ पक्षी इत्यादि मारण्याची किंवा पारध करण्याची एक किंवा दोन नळयांची काडतुसी छऱ्यांची बंदूक *f.* [ NAMES OF SOME OF THE SMALLER GUNS CALLED SMALL ARMS ARE: बंदूक, पिस्तुल, &c. SIGHT OF A G. मखी *f,* माशी *f,* मासकी *f.* REPORT OF A G. बार *m,* आवाज *m,* पेट *m.* A G. THAT HAS A LONG REACH *or* RANGE पल्लेदार बंदूक *f.* G. CARRIED ON A CAMEL सुतरनाल *f* ( *obs.* ), उंटावर वाहून नेण्याची तोफ *f.* सध्यांच्या भाषेत GREAT GUNS म्हणजे तोफा आणि SMALL GUNS म्हणजे बंदुका असा अर्थ आहे. ] ३ *fig.* वक्तृत्वाची तोफ *f,* टीकेची तोफ *f;* as, "Oratorical *gun* ; the *guns* of satire." ४ *the times at which guns are fired* तोफेचा वेळ *m,* तोफ *f;* as "You must not sleep till the morning G." ५ *one of a shooting party* पारध्यांच्या टोळीपैकीं एक ( बंदूकवाला पारधी ). ६ *an artillery-man, a gunner* गोलंदाज *m.* ७ *naut. pl. violent blasts of wind* सोसाट्याचा वारा *m,* वाऱ्याचा सोसाटा *m.* [ TO BLOW GREAT GUNS *naut. to blow a great gale* झपाट्याचा -तुफानी -वादळी वारा सुटणें. ] Great G. *n. a piece of heavy ordnance* भारी मोठी तोफ *f.* २ ( hence ) *a person superior in any way* कोणत्याही तऱ्हेनें श्रेष्ठ माणूस *m,* बडा -थोर माणूस *m,* तोफ *f* ( *fig.* ), तोफखाना *m* ( *fig.* ), बडेखान. G. barrel *n.* बंदुकीची नळी *f.* G. -boat *n. a boat or small vessel of light draught fitted to carry one or more guns* ( एक किंवा अधिक तोफा नेण्यासारखी ) तोफी नाव *f,* तोफ नेण्याची हलकी होडी *f.* G. -carriage *n. a carriage on which a gun or cannon is supported* तोफी गाडी *f,* तोफ नेण्याची गाडी *f,* रणगाडा *m,* तोफेचा गाडा *m.* G.-cotton *n. chem. an explosive prepared by saturating cotton with nitric acid* विदारणतूल *m,* विस्फोटकतूल *m.* नत्रिकाम्लामध्यें कापूस भिजवून हा तयार करितात. G.-fire *n. the hour at which the morning or evening gun is fired* ( सकाळची अथवा संध्याकाळची ) तोफ सुटण्याची वेळ *f,* तोफेची वेळ *f.* G.-metal *n. an alloy of copper and tin in the proportion of 9 to 1 used in making guns* ( ९ भाग तांबें व १ भाग कथिल यांच्या मिश्रणानें बनविलेलें ) तोफा ओतण्याचें कांसें *n,* तोफा ओतण्याची -करण्याची मिश्रधातु *f.* Gun'nage *n. the number of guns carried by a ship of war* ( एका ) लढाऊ गलबतावरील एकंदर तोफा *f. pl.* Gun'ner *n. one who works a gun or cannon* तोफ सोडणारा -उडवणारा -पेटविणारा, तोफवाला, गोलंदाज. २ *naut. a petty officer who has charge of the ordnance on board a ship* गोलंदाज खलाशी *m,* जहाजावरील तोफखान्याचा छोटा अम्मलदार *m.* Gun'nery *n. the science of artillery* गोलंदाजी *f,* उल्हाटयंत्रविद्या *f,* तोफा करण्याची व उडविण्याची कला *f.* Gun'ning *v. n. shooting game with a gun* बंदुकीनें शिकार मारणें *n* -करणें *n.* Gun'-port *n. a porthole* ( लढाऊ ) गलबताच्या बाजूला असलेलें तोफ लावण्याचें भोंक *n.* G.-powder *n. an explosive powder for guns and fire-arms* दारू *f,* अग्निचूर्ण *n.* [ BALL OF G. ( to be kindled and thrown ) दारूचा डल्ला *m.* GRANULATED G. विराण्याची दारू *f.* ] Gun'shot *n.* -*the act.* गोळीबार करणें *n,* तोफ उडविणें *n.* २ *reach or range of a gun* गोळीचा टप्पा *m,* गोळीची मारणी *f* ( or गोळयाचा टप्पा *m* -टापू *m* &c. ). G. *a. caused by the shot of a gun* गोळी लागून झालेला; as, "A G. wound." Gun'-shy *a. frightened by guns* ( said of sporting dogs ) भितरा ( शिकारी कुत्रा ). G.-smith *n.* बंदुका करणारा -ओतणारा किंवा नीट करणारा लोहार *m.* G.-stick *n.* (*R.*) *a ram rod* ( बंदूक किंवा तोफ ठांसण्याचा ) गज *m.* G.-stock *n. the stock or piece of wood on which the barrel of a gun is fixed* ( ज्याच्यावर बंदुकीची नळी बसविलेली असते तो ) लांकडांचा दस्ता *m,* कुंदा *m.* G. tackle *n. naut. the tackle used on board ship, by which the guns are run to and fro from the port-holes* ( गलबतावरील तोफेच्या ) भोंकांवरी तोफा नेण्या-

आणण्याचा सरंजाम *m.* Gatling Gun *n. a revolving battery gun* (invented by R. J. Gatling about 1861) *usually having ten parallel barrels capable of firing* 1200 *shots a minute* दशमुखी तोफ *f.* Machine G. *n. a breech-loading gun or a group of such guns, mounted on a carriage or other holder and having a reservoir containing cartridges which are loaded into the gun or guns and fired in rapid succession, sometimes in volleys* कळसूत्री तोफ *f*, यंत्रानें चालणारी तोफ *f.* As sure as a gun *certainly* खात्रीनें, खात्रीपूर्वक, निश्चयात्मक, निःसंशय, हटकून. Gun'wale, Gun'nel *n. the upper edge* (of a ship or boat) बहाण or बहाणी *f*, बाण *f*, बाणी *f.*

Gunny (gun'i) [Hindi. गोण, a sack.] *n. a strong, coarse kind of sacking* गोणपाट *n*, गोणपट *n*, गोणताड *n.* G. bag *n.* गोण *m*, पोतें *n.*

Gurgle (gur'gl) [L. *gurges*, whirlpool. Cf. *gurgulio*, gullet.] *v. i. to flow or run in a broken, irregular, noisy current, as water from a bottle, or a small stream among pebbles or stones* घुळघूळ -झुळझूळ -झुळझुळ, बुडबूड *adv.* -निघणें -वाहणें, घुळघुळणें, खळखळणें, बुडबुडणें. G. *n. the act of gurgling* भडभड वाहणें *n.* २ *a broken, bubbling noise* घुळघुळणें *n*, खळखळ *f*, खळखळाट *m.* Gur'gler *n.* Gur'gling *pr. p. a.* घुळघूळ वाहणारा, खळखळीत. Gur'gling *v. n.* घुळघुळणें *n*, खळखळ *f*, *intens.* खळखळाट *m.* Gur'glingly *adv.* खळखळ or -ळां, झुळझूळ or -ळां, घुळघूळ or -ळां, बुडबुड or -डां, अुडभूड or -डां.

Gush (gush) [From a Teut. root found in Icel. *gusa*, to gush, A. S. *geotan*, to pour. In 'Gush' the main idea is 'भडभड' वाहणें -बाहेर पडणें.] *v. i. to issue with violence and rapidly, to rush forth, to flow copiously* भडभड बाहेर पडणें, भडभड -भळभळ -घळघळ &c. वाहणें -निघणें -सुटणें -बाहेर पडणें, उमडा *m* &c. सुटणें -निघणें -होणें *g. of o.*, उफाळणें, उफाळ *m* निघणें -येणें *g. of s.*, -intens. भडाडणें (*colloq.*). २ *to act with a sudden and rapid impulse* (एकदम -अचानक -एकाएकीं) हर्षाचा -उत्साहाचा उमाळा येणें *in con.* *with* ला *of s.* ३ *to display enthusiasm in a silly demonstrative manner* (उत्साह वगैरे) भडभड व्यक्त करणें. G. *n. a sudden and violent issue of a fluid* (दाबांत -कोंडून ठेवलेला प्रवाही पदार्थ) भडभड बाहेर येणें *n*- वाहणें *n*, उफाळा *m*, उमड *m*, उमडा *m*, उमाडा *m*, भडका *m*, उबाळा *m.* २ *the fluid thus emitted* भडभड बाहेर पडलेला पदार्थ *m.* ३ (*colloq.*) *effusive display of sentiment* हर्षोद्गार *m*, उमाळा *m*, भरतें *n*, पूर *m* (*colloq.* & *fig.*). ४ *a rapid out-pouring of anything* उमाळा *m*, पूर *m*, लोट *m*, &c.; as, "A G. of song from birds." Gush'er *n.* Gush'ing *pr. p. a.* भडभड-भळभळ &c. वाहणारा.

Gusset (gus'-et) [Fr. *gousset*, arm-pit, gusset.] *n. a small piece of cloth inserted in a garment, for the purpose of strengthening some part or giving it a tapering enlargement* कळी *f*, बगल *f*, चिडी *f.* *N. B.*—निरनिराळ्या शास्त्रांत येणाऱ्या *Gusset* शब्दाचें भाषान्तर 'कळी' किंवा 'बगल' ह्याच शब्दांनीं करावें.

Gust (gust) [Icel. *gustr*, a blast.] *n. a sudden squall or blast of wind* वाऱ्याचा सपाटा *m* -झपाटा *m*, सपाट्याचा -झपाट्याचा वारा *m*, सोसाटा *m*, झटका *m*, झटकारा *m.* [IN G.s सोंसों. THAT COMES IN SUDDEN G.s (-WIND) सोशा *n*, घोशा *m.*] २ *a sudden violent burst of passion* जोराचा उमाळा *m*, भरतें *n.* Gust'ful *a.* Gust'iness *n.* सोसाटा *m*, झपाटा *m*, &c. Gust'y *a.* सोसाट्याचा, वादळी, तुफानी.

Gust (gust) [L. *gustus*, taste.] *n. sense of pleasure of tasting, relish* रुचि *f*, चव *f*, स्वाद *m*, गोडी *f*, माधुर्य *n*, &c. Gusta'tory *a.* चवदार, रुचकर.

Gut (gut) [A. S. *geotan*, to pour.] *n. a narrow passage of water* प्रणाली *f.* २ (pl.) *bowels, entrails* आंतडें *n*, आंतडीं *n* (pl.), उदर *n*, जठर *n.* ३ *one of the prepared entrails of an animal* (esp. of a sheep) *used for various purposes* (प्राण्याच्या -विशेषतः बकरीच्या -आंतड्याची बनविलेली) तांत *f.* ४ *the sac of silk taken from a silkworm* (when ready to spin its cocoon), *for the purpose of drawing it out into a thread* (दोरा तयार करण्याकरितां काढून घेतलेली रेशमाचे किड्याचे आंगावरील) रेशमाच्या रसाची (?) कोथळी *f* -पिशवी *f.* G. *v. t. to take out the bowels of, to eviscerate* (-चीं) आंतडीं काढणें -उपसणें. २ *to plunder of contents, to remove the contents of* लुटणें, रिकामा करणें, खलास करणें, धुणें, लुटून -धुवून नेणें, साफ करणें (*fig.*). Gut'ted *pa. t.* & *p. p.* Gut'ting *pr. p.* & *v. n.*

Gutta -percha (gut'a-perch'a) [Malayan *gatah*, *guttah*, gum, and *percha*, the tree producing it.] *n.* मलाया द्वीपकल्पांतील पर्चा (Percha) नांवाच्या झाडापासून होणारा रबर *m*, गटापर्चारबर *m.*

Gutta-serena (gut'ä-sērē-nä) [*Lit.* serene or clear drop.] *n. med. amaurosis* कांचबिंदु *m*, कांचबिंब *m* or *n*, काच *m*, तिमिर *m.*

Gutter (gut'ter) [O. E. *gotere*, -O. Fr. *goutiere*, -L. *gutta*, a drop.] *n. a channel at the eaves of a roof for conveying away the rain* पन्हळ *m*, गटर *n.* २ *a small channel at the road-side or elsewhere* गटार *n*, मोरी *f*, नाला *m*, प्रणाली *f* (S.), प्रणालिका *f* (S.), पन्हळ *m*, dim. पन्हळी *f.* ३ *any narrow channel or groove* (*as that formed by erosion*) *in the vent of a gun from repeated firing* कोरण *f*, खोबण *f*, (वारंवार बार काढल्यामुळें पडणारी) बंदुकीच्या चापाच्या भोंकाची पन्हळी *f.* G. *v. t. to cut or form into small longitudinal hollows, to channel* गटार *n* -मोरी *f.* बनवणें -काढणें -पाडणें. G. *v. i. to become*

channeled ( as a candle when the flame flares in the wind ) (वाऱ्यानें मेणबत्तीची वात हलल्यामुळें तिला ) खांच *f* -पन्हळी *f.* पडणें. G.–blood *n. a low-born person* हलकट -नीच -पाजी मनुष्य, गटार माणूस. G.-snipe *n. a neglected child, a street Arab* भटक्या मारणारें -उनाड पोर *n.*

Guttural ( gut'-ur-al ) [ L. *gutter*, throat; Cf. Fr. *guttural.* ] *a. pertaining to the throat*; *relating to, or characteristic of, a sound formed in the throat* कंठ्य, कंठस्थ, कंठज, कंठगत, कंठस्थानीय, कवर्गीय. [ G. *or* DEEP SOUND कंठस्वर *m.* ] G. *n. a sound formed in the throat*, कंठापासून काढलेला -कंठांतून निघालेला आवाज *m*, कंठस्वर *m.* २ ( also ) *a letter representing such a sound* कंठ्यवर्गीय -कवर्गीय अक्षर *n.* Gut'teralise, Gut'turise *v. t.* ( *R.* ) *to form a sound in the throat* कंठांतून आवाज काढणें -करणें. Gut'turally *adv.* कंठस्थानापासून. Gut'turalness *n.* कंठजनकता *f.* २ कंठ्यवर्णत्व *n.*

Guzzle ( guz'l ) [ O. Fr. ( *des-* ) *gouziller*, to swallow down –*gosier*, the throat. ] *v. i. to eat and drink with haste and greediness* बकाबक पोटांत ढकलणें -खाणें -पिणें, गटागट -ढसढस *adv.* पिणें -खाणें, घोटा लावणें, ठांसणें. G. *v. t. to swallow with exceeding relish* ठांसणें. Guz'zler *n.*

Gymnasium ( jim-nā'-zi-um ) [ L., –Gr. *gymnasion* -*gymnazein*, to exercise -*gymnos*, naked.] *n. a place or building where athletic exercises are performed, a school for gymnastics* तालीम *f*, तालीमखाना *m*, आखाडा *m*, मल्लभूमि *f*, मल्लांगण *n*, कसरतशाला *f*, व्यायामशाला *f.* [ WRESTLING PIT IN A G. हवदा *or* हौदा *m.* ] २ *a school for the higher branches of literature and science, a preparatory school for the University* ( used esp. of German schools of this kind ) (विशेषतः जर्मनीमधील ) दुय्यम प्रतीचें शिक्षण देणाऱ्या शाळा *f. pl.*, ( विश्वविद्यालयांत प्रवेश होण्यापूर्वीचें शिक्षण देणारी ) दुय्यम प्रतीची शाळा *f.* Gym'nast *n.* ( a ) कसरतमास्तर, तालीम शिकविणारा, वस्ताद. (b) मल्ल, तालीमबाज. २ ( *fig.* ) तालीम ( *fig.* ) देणारा. Gymnas'tic,-al *a. pertaining to athletic exercises* तालीमबाजीचा, मल्लयुद्धाचा. Gymnas'tically *adv.* Gymnas'tics *n. pl. athletic exercises, the art of performing gymnastic exercises* मल्लविद्या *f*, तालीमबाजी *f*, तालीमबाजपणा *m*, कसरत *f*, कसरतविद्या *f*, मल्लयुद्ध *n* -क्रीडा *f*, व्यायामविद्या *f.* २ ( also ) *disciplinary exercises for the intellect or character* ( बौद्धिक ) तालीम *f.*

Gymnosophist ( jim-nos'of-ist ) [ Gr. *gymnos*, naked, and *sophos*, wise. ] *n. one of a sect of philosophors, said to have been found in India by Alexander the Great, who were almost naked, denied themselves the use of flesh, renounced bodily pleasures, and employed themselves in the contemplation of nature* दिगंबरजैनी, दिगंबरी. Gymnos'ophy *n. the doctrines of the Gymnosophists* दिगंबरजैनमत *n* -पंथ *m.*

Gynœceum, Gynæcium ( jinē-sē'um, jinē-sī'um ) [ Gr. *gyne*, a woman, and *oikos*, Sk. ओकस्, house. ] *n. that part of a large house, among the ancients, exclusively appropriated to women* अन्तःपुर *n*, अन्तर्गृह *n*, जनानखाना *m*, महाल *m.* Gyne'cian, Gynæ'cian *a.* अन्तःपुरांतील, स्त्रियांचा. Gynæ'cic *a. pertaining to women's disease* स्त्रीरोगासंबंधीं.

Gynarchy ( jin'ār-ki ) [ Gr. *gyne*, a woman and *arche*, rule. ] *n. government by a female* स्त्रीराज्य *n.*

Gynecocracy, Gyneocracy ( jin-e-kok'-ra-si, -ok'-ra-si ) [ Gr. *gyne*, a woman, and *kratein*, to rule. ] *n.* Same as Gynarchy. Gyno'cracy *n.*

Gynecology, Gynæcology ( jin-ē-kol'-o-ji ) [ Gr. *gyne*, a woman, and *legein*, to speak. ] *n. med. the science which treats of the structure and diseases of women* स्त्रीरोगचिकित्सा *f.* Gynecolog'ical *a.* Gyneola'try *n. adoration or worship of women* स्त्रीपूजा *f*, स्त्रियांचा गौरव *m* -मान *m*, &c. Gynepho'bia *hatred of women* स्त्रीद्वेष *m* (on the analogy of अन्नद्वेष), स्त्रियांविषयीं तिटकारा *m.*

Gypsum ( jip'-sum ) [ L. -Gr. *gypsos*, chalk. ] *n. min.* (called also *plaster of Paris*) जिप्सम *m.* ह्याला बाजारांत कुलनार किंवा कर्पूर शिलाजित असें म्हणतात. ह्यालाच कांहीं ठिकाणीं चिरोळी किंवा शिरगोळा असेंही म्हणतात. ह्याचें रासायनिक नांव क्यालसिअम सल्फेट असें आहे.

Gypsy ( jip'-si ) See Gipsy.

Gyrate ( jī'-rāt ) [ L. *gyro*, and *gyratus*, *p. p.* of *gyrare*, to gyrate. ] *v. t. to revolve round a central point* मध्यबिंदूभोंवतीं -केन्द्रासभोंवतीं फिरणें. G. *a. curved in a circle* वर्तुलाकार. २ *taking a circular course* वर्तुल मार्गानें जाणारा. Gyra'tion *n. a circular or spiral motion, motion about an axis, rotation* परिवर्त्तन *n*, आवर्त *m*, फेरा *m*, फेरी *f*, गिरकी *f*, गिरकांडी *f*, गिरकांडा *m.* २ *math.* भ्राम्यभ्रमण *n.* Gy'ratory *a. revolving* ( सभोंवतीं -वाटोळा ) फिरणारा. Gyre [ Gr. *gyros*, a round. ] *n. a turn, a revolution, a circuit* चक्कर *n*, गिरका *m*, वर्तुलगति *f.* Gy'roscope *n. an instrument showing to the eye the effects of rotation* भ्रमणदर्शक *m.*

Gyve ( jīv ) [ Of Celtic origin; Cf Wels. *gefyn.* ] *n. a shackle*, ( *specif.* ) *a fetter* बंधन *n*, खोडा *m*, अटकाव *m*, प्रतिबंध *m*, ( विशेषतः ) बेडी *f*, बिडी *f.* G. *v. t.* अडकविणें, (-ला) अटकाव करणें -बिडी घालणें.

H (āch) इंग्रजी वर्णमालेंतील आठवें अक्षर. याची गणना व्यंजनांत करितात. H ह्या अक्षराचें नांव फ्रेंच भाषेंतून घेतलें आहे, व ह्याच्या आकृतीचें मूळ इजिप्शिअन् लिपींत आहे. इजिप्शिअन् भाषेमधील या अक्षराची मूळ आकृति इजिप्शिअन् भाषेंतून फिनिशिअन्‌मध्यें, व फिनिशिअन्‌मधून ग्रीकमध्यें, ग्रीकमधून लॅटिन्‌मध्यें व त्या भाषेंतून इंग्लिश् भाषेमध्यें बदलत बदलत जाऊन, इंग्रजीमध्यें तिला हल्लींचें स्वरूप प्राप्त झालें आहे. व्युत्पत्तिदृष्ट्या लॅटिन्, ग्रीक किंवा संस्कृत या भाषांतील c (=क्, श्, स्) ह्या अक्षराला सध्यांच्या इंग्रजीमध्यें h हें अक्षर बहुधा अनुरूप असतें; जसें, L. cornu = E. *h*orn, Gr. *k*utos = E. *h*ide, Sk. शत = E. *h*undred. श्, थ्, ध् इत्यादि दोन साध्या व्यंजनांनीं व्यक्त होणारे ध्वनि इंग्रजींत h हें अक्षर दुसऱ्या व्यंजनाला जोडून व्यक्त करितात; जसें, श्=*sh*, थ्=*th*. कांहीं शब्दांत c या अक्षराचा ध्वनि थोडासा बदलण्याकरितां त्याच्यापुढें h हें अक्षर योजितात; जसें, *c*harm, cat*ch*. Chemistry, Chiromancy, Chyle इत्यादि शब्दांत अनुक्रमें e, i आणि y ह्या स्वरांपूर्वीं व c या अक्षरानंतर h हें अक्षर आलें. यावरून c या अक्षराचा उच्चार कर्कश आहे असा निर्देश होतो. २ *a symbol denoting the eighth place in a series* एखाद्या मालिकेंतील आठव्या स्थानाचें द्योतक चिन्ह *n.* ३ (in the differential calculus) the letter is used to denote a small increment शून्यलब्धि-वृद्धिचिन्ह *n*, तात्कालिकगतिदर्शक चिन्ह *n* (according to Sudhâkar Dwivedi). ४ हेन्‍री, हेलन् इत्यादि हकारानें प्रारंभ होणाऱ्या (शब्दांचा) इंग्रजी विशेषनामांचा संक्षेप म्हणून या अक्षराची योजना करितात. तसेंच संज्ञाक्षर या नात्यानें याचा उपयोग करितात; जसें, H (in chem.) = Hydrogen. H *or* h (in phys.) = horizontal force. H *or* h = hour. H (on lead-pencils) = hard, the various degrees of hardness being denoted by its repetition, e. g. HH, HHH, &c. and HB = hard black (denoting a medium of hardness). H. B. M. = His (*or* Her) Britannic Majesty. H. C. = Heralds' College *or* House of Commons. H. C. F. (*math.*) = Highest Common Factor. H. E. I. C. = Honorable East India Company. H. H. = His (*or* Her) Highness, *or* His Holiness. H. I. M. = His (*or* Her) Imperial Majesty. H. M. = His (*or* Her) Majesty. H. M. C. = His (*or* Her) Majesty's Customs. H. M. S. = His (*or* Her) Majesty's Ship *or* Service. H. P. = Horse Power *or* Half Pay. H. R. H. = His (*or* Her) Royal Highness, &c.

*N. B.*:—प्राचीन साक्सन भाषेंत H चा उच्चार क् असा होता. तेव्हां H चा क् हा उच्चार प्रचारांतून जाऊं लागला; तेव्हां तो राखून ठेवण्याच्या हेतूनें त्याच्या मागें c किंवा g ची पुस्ती देण्याचा प्रघात पडला. कालवशात् क्षयास लागलेला H चा क् हा उच्चार लयास जाऊन ch चा उच्चार च् होऊं लागला, व gh निरुच्चार होऊन मागील स्वरास दीर्घत्व प्राप्त झालें.

**Ha** (hä) [ From the sound. ] *interj.* an interjection denoting surprise, joy, or grief आश्चर्यदर्शक-आनंद-दर्शक -शोकदर्शक उद्गारवाचक अव्यय, हा! हाहा!! २ (when repeated) denoting laughter हास्यदर्शक उद्गारवाचक अव्यय, हाहाहा! हहह!

**Habeas corpus** (hā'-be-as kor'-pus) [ Lit. *'have the body'* from L. *habeo*, to have, and *corpus*, the body. Brewer says: "The exact meaning of the words *Habeas corpus* is this: 'you are to produce the body,' *i. e.* "you, the accuser, are to bring before the judge the body of the accused, that he may be tried and receive the award of the court, &c." ] *n.* (*law*) *a writ having for its object to bring a party before a court or judge, esp. one to inquire into the cause of a person's imprisonment or detention by another, with the view to protect the right to personal liberty* अटकेंत ठेवलेल्या मनुष्यास (कोर्टापुढें) न्यायासनापुढें हजर करावयास लावण्याचा हुकूमनामा *m*, 'शरीर हजर कर' असा कायदा *m* -हुकूमनामा *m*.

**Haberdasher** (hab'ėr-dash-ėr) [Ety. is dubious.] *n. a dealer in drapery or goods of various descriptions, as laces, silks, trimmings, &c.* फीत, दोरा, सुया, सुताच्या गुंड्या वगैरे जिन्नस विकणारा *m*, (loosely) बोहरी, फेरीवाला बोहरी. Hab'erdashery *n.* फीत, दोरा, सुया, सुताच्या गुंड्या वगैरे सामान *n.* २ (also) *fig. trifles* बारीकसारीक-किरकोळ सामान *n*.

**Habergeon** (ha-bėr'je-un) [Fr. *haubergeon*, dim. of O. Fr. *hauberc*. See Hauberk. ] *n. a piece of armour to defend the neck and breast* गळा व छाती यांचें रक्षण करणारें बखतर or बक्तर *n*.

**Habiliment** (ha-bil'-iment) [Fr. *habillement -habiller*, to dress–L. *habilis*, fit, ready –L. *habeo*, to have.] *n. garment* पोषाख *m*, पेहराव *m*, लिबास *f.* हा शब्द बहुधा अनेकवचनीं वापरतात व ह्याचा अर्थ बहुधा 'हुद्याचा पोषाख' किंवा 'दरबारी पोषाख' असा असतो.

**Habit** (hab'-it) [ L. *habitus*, state, dress, -L. *habere*, to have. ] *n. the usual condition or state of a person or thing, either natural or acquired* वृत्ति *f*, भाव *m*, तबियत *f*, तब्बेत *f*, प्रकृति *f*; as "A religious H." २ (*esp.*) *physical temperament or constitution* (भौतिक) प्रकृति *f*, रचना *f*. ३ *fixed or established custom, ordinary course of conduct, practice, usage* (ठरींव) पद्धत *f*- रीत *f*- चाल *f*, वहिवाट *f*, प्रघात *m*. (b) (hence, prominently) *the involuntary tendency or*

*aptitude to perform certain actions, which is acquired by their frequent repetition* सवय *f,* संवय *or* संवई *f,* सराव *m,* अभ्यास *m,* परिपाठ *m,* रीति *or* रीत *f,* आदत *f,* वहिवाट *f;* as, "H. is second nature." [TO GET INTO A H. OF संवय लागणें, पाठ *m.* पडणें *in. con.*]. (c) (in an ill sense) खोड *f,* चट *f,* चटक *f,* चवणा *or* चौणा *m,* लकब *f,* व्यसन *n,* दुर्व्यसन *n,* छंद *m.* [LIGHT HABITS *or* WAYS चार *m. pl.,* चारचार *m. pl.* -ADDICTED TO SUCH- चारकट *or* चारगट. LOW DISREPUTABLE H. भिकार खोड *f* -चाळा *m.* OF ILL HABITS खोडकर, छंदी, दुर्व्यसनी, व्यसनी. TO BREAK OFF AN ILL HABIT खोड *f.* सोडणें. To CONTRACT AN ILL H. खोडावणें, खोडणें, चटावणें.] ४ (a) *outward appearance, attire, dress* बाह्यस्वरूप *n,* वेष *m,* पेहराव *m,* पोषाख *m.* (b) (hence) *a garment* वस्त्र *n,* कपडा *m,* (esp.) *a closely fitting garment or dress worn by ladies* स्त्रियांचा आंगाबरोबर बसणारा पोषाख *m;* as "A riding H." H. *v. t.* (-ला) वस्त्र नेसवणें, पोषाख घालणें. Hab'itable *a. that may be inhabited or dwelt in* रहायाजोगा -जोगता, वासाई, वसति करण्यास योग्य; as, "The H. world." Hab'itableness, Habitabil'ity *n.* वासाईता *f.* Hab'itably *adv.* Hab'itant *n. an inhabitant* रहिवाशी, राहणारा, वास करणारा. Habita'tion *n.* (a) *the act of inhabiting* राहणें *n.* (b) *state of inhabiting or dwelling or of being inhabited* वसति *f,* वास *m,* निवास *m.* २ *place of abode, residence* निवासस्थान *n,* वसतिस्थान *n,* राहण्याचें ठिकाण *n* -जागा *f,* वसति *f,* घर *n,* गृह *n,* मुक्काम *m,* मकाण *n.* Habit'ual *a.* संवयींतला, रावत्यांतला, नेहमींचा. २ *customary* सदोदितचा, संवयीचा, राबत्याचा, चालीचा. Habit'ually *adv.* नेहमीं, नेमानें, नित्य, नित्यनेमानें, हमेष. Habit'ualness *n.* नित्यनियम *m,* नित्यक्रम *m.* Habit'uate *v. t. to make accustomed, to accustom, to familiarise* संवय or संवई *f* -अभ्यास *m.* लावणें -पाडणें, संवयींत-रावत्यांत आणणें. [To BE HABITUATED संवय &c. लागणें, सराव पडणें, खांद *m* -खांदा *m*- पडणें.] H. *a.* (*R.*) *firmly established by custom, formed by habit* संवयीनें झालेला. Habit'uated *pa. p.* संवय लागलेला, (in a bad sense) चटावलेला. Habitua'tion *n. the act of habituating or accustoming, the state of being habituated* अभ्यास -संवय करणें *n* -पाडणें *n* -लावणें *n,* संवय *f,* अभ्यास *m,* &c. Ha'bitude *n. habitual attitude* संवय *f,* सराव *m.* २ *habitual association or familiarity* नेहमींचा संबंध *m,* सहवास *m,* परिचय *m,* परिचितपणा *m,* अभ्यास *m.* ३ *habit of body or of action* ठेवण *f,* रीत *f,* संवय *f,* सराव *m,* आदत *f,* &c. see Habit *n.*

Habitat (hab'it-at) [3rd pers. sing. pres. ind. of L. *habito.*] *n. the natural abode or locality of an animal or plant* मूलस्थान *n,* उत्पत्तिस्थान *n,* जन्मस्थान *n,* मूलवसतिस्थान *n.*

Hack (hak) [See Hatch, a half-door.] *n. a frame or grating of various kinds* जाळीची चौकट *f;* as, (a) *a frame for drying bricks, fish or cheese* (वीट इ०) सुकत घालण्याची जाळी *f.* (b) *a rack for feeding cattle &c.* (गुरांना खाणें घालण्याची) जाळ्याची झोळी *f.* २ *unburned brick or tile stacked up for drying* भाजण्याच्या पूर्वी वाळत ठेवलेली वीट *f.* कौल *n.* इ०.

Hack (hak) [A. S. *haccian, haccan,* Dut. *hakken,* and Ger. *hacken.* See Hash.] *v. t. to notch, to mangle by repeated strokes of a cutting instrument* चोंचावून -झाजावून तोडणें, खाचडणें, चांचरणें, खापलणें, सडकणें, तोडणें; as, "To H. a post." [To H. AND HEW धसधस *adv.* तोडणें, धसकावणें, झाजावणें, सपासपी *f.* करणें. To H. TO PIECES कुचा *or* खुरचा *f. pl.* पाडणें, खांडोळी *f* -खांडोळीं *n.pl.* करणें *g. of o.*] २ (*fig.*) *to mangle in speaking* तुटततुटत -अडखळत -लागत -चांचडत -चोंचरें बोलणें, बोलतांना अडखळणें -लागणें. H. *v. i. to cough faintly and frequently or in a short broken manner* ओढत ओढत -हळू हळू -दबतदबत खोकणें. H. *n. Shakes. a notch, a cut* खापा *m,* खाप *f,* खांच *f,* घाव *m,* प्रहार *m.* २ *an implement for cutting a notch* खाप पाडण्याचें हत्यार *n.* ३ *a large pick used in breaking stones* (दगड फोडण्याचें) मोठें पिकाव *n.* ४ *a hacking, a catch in speaking, a short broken cough* बोलतांना जीभ अडखळणें *n-* खोकला येणें *n.* ५ (*foot-ball*) *a kick on the shins* पायाच्या नळीवर गैरशिस्तपणानें मारलेली लाथ *f.* Hack'ed *pa. t. & p. p.* Hack'er *n.* (a) खापा पाडणारा. (b) खापा पाडण्याचें हत्यार *n,* (esp.) टर्पेन्टाईन जमविण्याकरितां पाइन झाडाला खापा पाडण्याचें हत्यार *n.* Hack'ing *pr. p. & v. n.* Hack'-saw *n.* लोखंडाच्या चौकटींत बसविलेली धातू कापण्याची अरुंद पात्याची करवत *f.*

Hack (hak) [Shortened from *hackney,* which See]. *n. a horse, hackneyed or let out for common hire,* (also) *a horse used in all kinds of work, or a saddle horse* (as oppo. to a *hunting* or *carriage horse*) (ओझीं वाहण्याच्या) कामाचा घोडा *m,* ओझ्याचा -भाडोत्री -भाड्याचा घोडा *m.* खाजगी बसण्याच्या किंवा गाडीच्या शिवाय इतर घोड्यांस हा शब्द लावतात. (-in contempt) घोडकट *n,* घोडकें *n,* भटाचा तट्टू *m,* हरदाशी -कंठाळी घोडा *m.* २ *a coach or carriage let for hire,* (particularly) *a coach with two seats inside facing each other; hackney coach* भाडोत्री -भाड्याची गाडी *f.* ३ *a writer or author who hires himself out for any sort of literary work* भाडोत्री ग्रंथकार *m* -लेखक *m.* ४ *an overworked man, a drudge* हलकें काम करणारा, मोल घेऊन काम करणारा, भाड्याचा चाकर, मजूर. ५ *a procuress* कुंटण *f.* Hack *a. hackneyed, hired, mercenary* भाड्याचा, भाडोत्री,

भाड्यानें घेतलेला, उसना (*colloq.*). [H. WRITER भाडोत्री लेखक.] H. *v.t. to let out for hire* भाड्यानें देणें -लावणें. २ *to use frequently and indiscriminately* वापरून वापरून किंमत घालविणें -दवडणें; as, "The word remarkable has been so often *hacked* of late." Hack *v. i. to be exposed or offered to common use for hire, to turn prostitute* भाड्यानें लागणें, शिंदळ -छिनाल बनणें, दुकान घालणें -घालून बसणें (*fig.* and *colloq.*). २ *to live the life of a drudge or hack* काबाडकष्ट करून मजुरी -पोटास मिळविणें. Hack'ery (Hind. *chhakra*) *n.* छकडा *m.* Hack'man *n.* भाडोत्री गाडी हांकणारा.

Hackle (hak'l) [ Dut. *hekel*, dim. of *heak*, a hook; akin to E. Hook.] *n. a comb for dressing flax, raw silk, &c.; hatchel* ताग, कच्चें रेशीम वगैरे विंचरण्याची फणी *f*, पिंजणी *f*. २ *any flimsy substance unspun* (as raw silk) बिनकांतलेलें रेशीम *n*, किंवा रेशमासारखा हलका पदार्थ *m*. ३ *feather in a cock's neck* कोंबड्यादि पक्ष्यांची शेंडी *f* -मानेवरील पिसें *n. pl.* ४ *an artificial fly for angling, made of feathers* (मासे मारण्याच्या गळाला अडकविण्याची) पिसांची केलेली कृत्रिम माशी *f*, पिसांची माशी लावलेला (मासे मारण्याच्या) गळाचा आंकडा *m* -हूक *m*. H. *v. t. to separate* (the coarse part of flax or hemp from the finer) *by drawing* (it) *through the teeth of a hackle* विंचरून साफ करणें. २ *to tear asunder, to break into pieces* तोडून टाकणें, तुकडे तुकडे करणें, छिन्नविच्छिन्न करणें, विदारून टाकणें. Hack'led *pa. t. & p. p.* Hack'ling *pr. p. & v. n.* Hack'ly *a. rough or broken as if hacked* (खापललेल्यासारखा) खडबडीत.

Hackney (hak'ni) [ Fr. *haquenee*, a pacing horse. ] *n. pl.* Hackneys. *a horse for riding or driving, a nag, a pony* स्वारीचा -बसण्याचा किंवा गाडीचा घोडा *m* -तट्टू *m* -बट *m*. २ *a horse or pony kept for hire* भाड्याचा -भाडोत्री घोडा *m*. ३ *a carriage kept for hire* भाड्याची गाडी *f*, भाडोत्री गाडी *f*. ४ *a hired drudge, hireling* मोल घेऊन काम करणारा, भाडोत्री नोकर. ५ *a prostitute* वेश्या *f*. H. *a. let out for hire, devoted to common use* भाड्याचा, भाड्यानें लावलेला. २ (hence) *much used, trite, mean* शिळा, (फार वापरण्यांत आल्यामुळें) वेचव, उच्छिष्ट. H. *v. t. to devote to common or frequent use, to wear out in common service, to make trite or commonplace* वरचेवर वापरणें, -वापरून किंमत घालविणें, सर्वां तोंडीं करणें, उष्टा करणें. २ *to carry in a hackney coach* भाड्याच्या गाडींतून नेणें. Hack'neyed *a.* रावलेला, रापलेला, निरडलेला, &c. २ सर्वां तोंडीं केलेला -झालेला, उष्टा, प्राकृत, जनोच्छिष्ट, चावट (*colloq.*). Hack'neyman *n. pl.* Hackneymen. *a man who lets horses and carriages for hire* गाड्याघोडे भाड्यानें देणारा.

Had *pa. t. & pa. p.* of Have.

Hades (hā'-dēz) [ Gr. *haïdes, hades*, the unseen, dubiously derived from *a*, neg., & *idein*, to see.] *n. the nether world* (according to classical mythology, the abode of the shades, ruled over by Hades or Pluto) मृतलोक *m*, मरणानंतर मनुष्य ज्या ठिकाणीं जातो ती जागा *f*.

*N. B.*—*Hades* differs from the place of punishment or Hell, and was understood by Greeks and Romans to be the abode of the souls of the dead and is translated by मृतलोक.

Hæmacytometer (hema- *or* hēma-sītom'ē-tėr) [Gr. *haima*, blood, *kutos*, a hollow vessel, and *metron*, measure.] *n.* रक्ताच्या असुक एक परिमाणांत रक्तगोलक किती आहेत हें निश्चित करण्याचें (मोजण्याचें) यंत्र *n*, रक्तगोलकमापक *m*. (रक्तगोलक = Corpuscle).

Hæmagogue (hem'-ag-og) [Gr. *haima*, blood, and *agogos*, expeller. ] *n. med. blood-expeller* शरिरांतून रक्त बाहेर घालविणारें औषध *n*, (मूळव्याधीच्या) मोडांतून होणारा रक्तस्राव किंवा आर्तवस्राव वाढविणारें औषध *n*.

Hæmatemesis (hemä-tem'ē-sis *or* hēmā-) [ Gr. *haima*, blood, and *emesis*, vomiting. ] *n. med. a vomiting of blood* रक्ताची ओकारी *f*.

Hæmatinic (hēm-m'atin-ik) [ Gr. *haima*, blood. ] *n. med. a medicine designed to improve the condition of the blood* रक्त वाढविणारें -रक्तवर्धक औषध *n*.

Hæmatocele (hem'-at-ō-sēl) *n. med. a tumour consisting of extravasated blood* (बहिःसंचय झाल्यामुळें होणारा) रक्तग्रंथि *m*, वृषणांत होणारा रक्तग्रंथि *m*.

Hæmatoma (hem-at-ō'm-a) [ Gr. *haima*, blood, and suffix *-oma*, 'tumour.' ] *n. med. a sanguineous cyst* रक्तग्रंथि *m*, टेंगूळ *n* (*loosely*). याचा उद्भव विशेषेंकरून मस्तकावर किंवा मेंदूमध्यें होतो.

Hæmaturia (hema-tū'-ria) [ Gr. *haima*, blood, and *ouron*, urine. ] *n. med. presence of blood in the urine* लघ्वींतून-लघ्वीमध्यें रक्त पडणें *n*.

Hæmianæsthesia (hemi-anes-thē'si-ä) [ Gr. *hemi*, half, *an*, not., *aisthesis*, perception.] *n. med. loss of sensation on one side of the body only* शरिराच्या अर्ध्या भागाचा -अर्धांगाचा स्पर्शज्ञानलोप *m*, अर्धांगाचा स्पर्शज्ञानभंग *m*.

Hæmoglobin (hemo-glō'bin) [ Gr. *haima*, blood, & L. *globus* a ball. ] *n. med. the colouring matter of the red blood-corpuscles* (रक्तामध्यें असणारें) रक्तरंजक द्रव्य *n*. याच्या योगानें रक्तास तांबडेपणा येतो.

Hæmophilia (hemo-fil'-iä) [ Gr. *haima*, blood, and *philia*, friendship.] *n. preternatural tendency to hæmorrhage* जिच्यामध्यें थोडकेंसें कारण झालें असतां रक्तस्राव होऊं लागतो अशी विलक्षण (नाजुक) हलकी प्रकृति *f*.

Hæmoptysis ( hem-op'-ti-sis ) [ Gr. *haima*, blood, and *ptusis*, a spitting. ] *n. med. expectoration of blood which has escaped from vessels in the lung or bronchi* ( usually a symptom of pthisis due to tubercular ulceration of blood-vessels, but also caused by excessive blood-pressure in the pulmonary vessels ) छातींतून रक्त येणें *n*, कफक्षयामध्यें रक्त फुप्फुसांतून तोंडावाटे बाहेर पडणें *n*.

Hæmorrhage ( hem'-or-rāj ) [ Gr. *haima*, blood, and *rhegnumi*, to burst forth. ] *n. med. the escape of blood* रक्तस्राव *m*.

Hæmorrhoid ( hem-'or-royd ) [ Gr. *haima*, blood, and *rheo*, to flow. ] *n. med. a pile* अर्श *m*, मूळव्याध *f*. [ External H.s (मूळव्याधीचा) मोड *m*. Internal H.s गुदकील *m*. ]

Hæmostatic ( hemo-stat'-ik ) [ Gr. *haima*, blood, and *statikos*, causing to stand.] *a. styptic* रक्तस्राव थांबविणारें -बंद करणारें ( औषध *n*. ), रक्तस्तंभक.

Haft (haft) [A. S. *hæft*, akin to Ger. *heft*, & E. *heave* or *have*. ] *n. a handle* ( said chiefly of a knife, sword, or dagger ), *the hilt* (चाकू, तरवार, इ० कांची) मूठ *f*, दांडा *m*, मुठ्या *m*, (कोयतीचें ) थरूं *n*, कबजा *m*, परज *m*. Haft *v. t. to set in, or furnish with, a haft* (-ला) मूठ *f* -थरूं *n* बसविणें -घालणें, मुठींत &c. बसविणें; as, "To haft a dagger."

Hag ( hag ) [ Shortened from A. S. *hæg-tesse*, a witch or fury -A. S. *haga*, a hedge, because witches were thought to frequent bushes. या शब्दाचा मूळ अर्थ 'जखीण, डाखिण, हडळी' असा होता, परंतु तो आतां लुप्त झाला आहे. त्या झाडाझुडपांत वस्ती करीत अशी पूर्वी समजूत असे. ] *n. an ugly old woman* खप्पड -वृद्ध -जख्खड -कुरूप स्त्री *f*, हेडंबा *f*, शाकिणी *f*. २ *a fury, a she-monster* राक्षसस्त्री *f*, राक्षसीण *f*. ३ *an appearance of light and fire on a horse's mane or a man's hair* घोड्याच्या अयाळावर किंवा मनुष्याच्या केंसावर दिसणारें तेज *n*- चकाकी *f* -तकाकी *f*. Hag *v. t. to harass, to weary by vexation* त्रास देणें, छळणें, पिडणें, चिडवून कंटाळा आणणें -नाउमेद करणें, हैराण करणें. Hag'ged *pa. t.* and *p. p.* Hag'ged *a.* ( *R.* ) *like a hag, lean, ugly* रोडका, कुरूप, इ०. Hag'ging *pr. p.* and *v. n.* Hag'gish *a. ugly, wrinkled* कुरूप, सुरकुत्या -वळ्या पडलेला. Hag'gishly *adv.* Hag'-ridden *a. ridden by a hag* डाखिणीनें तुडवलेला, भुतानें पिडलेला. २ ( hence ) *afflicted by a nightmare* झोंपेंत भिणारा -दचकणारा.

Hag ( hag ) [ Scot. *hag*, to cut; cf. E. *hack*. ] *n. a small wood or part of a wood, which is marked off or inclosed for felling, or which has been felled* तोडून पाडण्याकरितां आंखून ठेवलेलें जंगल *n* -रान *n*, किंवा तोडून ठेवलेलें कूप *m*. २ *a quagmire* दलदल *f*, पाणथळ *f*.

Haggard ( hag'-ard ) [ Fr. *haggard*; orig. and prop. meaning, of the hedge or woods, wild, untamed.] *a.* ( *obs.* ) ( *Shakes.* ) *wild, intractable, untamed* जंगली, रानटी, न माणसाळलेला; as, "A H. or refractory hawk." H. *n.* ( falconry ) *a young or untrained hawk or falcon* ससाण्याचा बच्चा *m*, न शिकविलेला (लहान) जंगली ससाणा *m*. २ *a fierce intractable creature* अडेल -दंडेल -उग्र -जंगली प्राणी. [ See haggard below. ]

Haggard ( hag'ard ) [ Lit. hag -like ; See hag. ] *a. lean, anxious in appearance, having the expression of one wasted by want or suffering* खप्पड, मरगळलेला, खब्बड, थेरडा, मऱ्या. Hag'gardly *adv.*

Haggle ( hag'-l ) [ A variant of *hackle*, itself a freq. of *hack*, to cut. See Hack. ] *v. t.* & *v. i. to be difficult in bargaining, to stick at small matters, to chaffer, to higgle* ओढून -ताणून धरणें, ओढणें, घासणें, घासाघास or घासाघीस *f* -घसघस or घिसघिस *f* &c. लावणें -करणें, आवगापावणा करणें -करून घेणें or देणें -विकणें, खेंचाखेंच करणें, भावांत वांधा घालणें; as, "Royalty and Science never *haggled* about the value of blood." H. *n. the act or process of haggling.* Hag'gler *n. one who haggles or is difficult in bargaining* ओढून धरणारा, घासणारा, घासाघीस -घिसघिस करणारा, ओढताण्या, जिकीर करणारा, जिकिऱ्या, कटकट्या, सौदा करण्याला कठीण. २ *one who forestalls a market, a middleman between producer and dealer in London vegetable markets* पुढें होणाऱ्या भावांचा बरोबर अदमास करणारा, पिकवणाऱ्या व विकणाऱ्याच्या (लोकांच्या) मधला अडत्या. Hag'gling *n.* घासाघीस *f*, घसघस or घिसघीस *f*, ओढाताण *f*, जिकीर *f*.

Hagiarchy ( hā'-ji-ärki ) [ Gr. *hagios*, holy, and *-archy*.] *n. a sacred government, government by holy orders of men* बैरागी किंवा संन्यासी यांचें राज्य *n*, संन्यासिसत्ताक शासनपद्धति *f*.

Hagiocracy ( hāji-ok'rasi ) [ Gr. *hagios*, holy, and *kratein*, to rule. ] *n. government by a priest-hood, hierarchy* उपाध्यायमंडळाची सत्ता *f*, भट्टसत्ताकराज्य *n*.

Hagiographa ( hāji-og'raf-a ) [ Gr. *hagios*, holy, and *graphein*, to write. ] *n. pl. the last of the three Jewish divisions of the Old Testament* ( it comprises Psalms, Proverbs, Job, Canticles, Ruth, Lamentations, Ecclesiastes, Esther, Daniel, Ezra-Nehemiah, and Chronicles) यहुदी लोकांनीं पाडलेल्या जुन्या कराराच्या तीन भागांपैकीं शेवटचा भाग *m*. या भागांत उपदेशक ( Ecclesiastes ), कालवृत्तांत (Chronicles), प्रार्थना ( Psalms ), बोधवचनें ( Proverbs), लहान गीतें (Canticles) इत्यादि प्रकरणें येतात.

Hagiology ( hāji-ol'-oj-i ) [ Gr. *hagios*, sacred, and *logos*, discourse. ] *n. history of saints* संतचरित्रमाला *f*. Hagiol'ogist *n.* संतचरित्रलेखक.

Hab (hä) Same as Ha.

Hail (hāl) [A. S. *hagal*, a round pebble.] *n. frozen rain or particles of ice falling from the clouds* (the separate particles are called *hail-stones*) गार *f*, गारा *f. pl.*, करका *f*. H. *v. i. to rain hail* गारा *f. pl.* पडणें. H. *v. t.* (*Shakes.*) (गारांप्रमाणें, गारांचा) वर्षाव करणें. Hail'ed *pa. t.* and *p. p.* Hail'ing *pr. p.* and *v. n.* Hail'-shot *n. small shot which scatters like hail-stones* गारांप्रमाणें इकडे तिकडे पडणाऱ्या गोळ्या *f. pl.* Hail'stone *n.* गारगोटा *m*, गार *f*, करका *f*. Hail'-storm *n. a shower of hail* गारांचें वादळ *n*. Hail'y *a.* गारांचा; as "H. showers."

Hail (hāl) [For etymology see Hale, Healthy, Heal and Whole.) *a. healthy* (preferably spelt *hale*) निरोगी, उत्तम प्रकृतीचा, धट्टाकट्टा, धडाकडा, धडसा, धडका, धडधाकट or -ड, खणखणीत, धडधोप.

Hail (hāl) [Icel. *heill*, hale, sound, used in greeting.] *v. t. to call loudly to* नमस्कार करून हांक *f.* मारणें, -बोलावणें. २ *to greet, to address* कुशलप्रश्न विचारणें -करणें. Hail *v. i. to declare, by hailing, the port from which a vessel sails or where she is registered* (ज्या बंदरांतून गलवत निघालें असेल त्या) बंदराचें नांव सांगणें -पुकारणें. २ (hence) *to sail, to come* (used with *from*) (ज्या बंदरांतून गलबत निघावयाचें असेल त्या) बंदराहून येणें, हांकारणें, सुटणें, निघणें. ३ (*colloq.*) *to come* (with *from*) (-हून) येणें. Hail *interj.* an exclamation of respectful or reverent salutation, or, occcasionally, of familiar greeting कुशल असो, जयजय, नमस्कार, नमस्ते, नमोनमः, स्वस्ति! H. *n. a wish of health* स्वास्थ्य-चिंतन *n.* २ *a salutation* नमस्कार *m*, वंदन *n.* ३ *a loud call* मोठी हांक *f*. Hail-fellow *n. an intimate companion* सवंगडी *m*, दाट स्नेही *m*.

Hair (hār) [A. S. *hær*, Ger., Dut., and Dan. *haar* &c., a common Teutonic word.] *n. a filament imbedded in the skin* केश *pop.* केंस *m*. २ *the collection or mass of filaments growing from the skin of an animal and forming a covering for a part of the head or for any part or the whole of the body* केश *pop.* केंस *m. pl.*, बाल *m. pl.*, मीस *f* (of beasts). ३ *hair* (human or animal) *used for various purposes* केश *m*, बाल *m*, लोंकर *f*, (loosely) रोम *m* or *n*, कच *m* (Sk.), लव or लंव *f*. ४ *bot. an outgrowth of the epidermis, consisting of one or several cells* केंस *m*, लव *f*, लोम *m* or *n*. ५ *a spring device used in a hair-trigger firearm* बाल *m*. ६ *any very small distance or degree, a hair-breadth* केंसाचें -केंसाएवढें -केंसाइतकें अंतर *n*, केंसभर (with a noun). N. B.:—*Hair* is often used adjectively or in combination as *hair* brush or *hair* brush. [Against the hair *in a rough or disagreeable monner* स्वभावा-कला-विरुद्ध, प्रतिलोम रीतीनें. Hair'brush *n.* केंशमार्जनी *f*. Hair compass, Hair divider *n. a compass or divider capable of delicate adjustment by means of a screw* सूक्ष्मांतरदर्शक *m*, (दिशा किंवा भाग दाखविणारा) केंस कंपास *m*.-होका *m*. Hair'dresser *n. one who dresses or cuts hair, a barber* केंस विंचरणारा, हजाम *m*, न्हावी *m*. Hair glove *n. a glove of horse hair for rubbing the skin* हात्या *m*, आंग चोळण्याची हाताळी *f*, घांसटी *f*. Hair'lace *n. a netted fillet for tying up the hair of the head* केंस बांधण्याची पट्टी *f*. Hair line *n. a line made of hair, a very slender line* बारीक रेघ *f*. Hair moth *n. zool.* ऊर्णवस्त्र-लोंकर-रेशीम इ०कांचे कपडेलत्ते -माल खाणारा किडा *m*. -कीटक *m*. Hair oil *n.* केंसांना लावण्याचें तेल *n*, केंसतेल *n*. Hair pencil *n.* (रंगकाम करण्याची बारीक) कुंचली *f*. Hair pin *n.* केंसकांटा *m*, (केंसांत घालण्याचा -अडकविण्याचा) डोक्यां-तील आंकडा *m* -कांटा *m*. Hair plate *n. an iron plate forming the back of the hearth of a bloomery fire* (खनिजलोहशुद्धीकरण करण्याच्या) आगटीच्या पाठीशीं बसावलेला लोखंडी पत्रा *m*. Hair powder *n. a white perfumed powder as of flour or starch* (formerly much used for *sprinkling on the hair of the head*, or *on wigs*) केंसांना लावण्याची केंसांची पूड *f*. Hair seating *n. hair cloth for seats* (of chairs &c.) (खुर्चीच्या आसनावर वगैरे घालण्याचें) केंसांचें कापड *n*. Hair shirt *n.* तपोव्रतयोग्य वस्त्र *n*. पाश्चात्य लोकांत हें घोड्याच्या केंसांचें केलेलें असतें. त्यावरून त्यास केंसांचा शर्ट असें म्हणतात. Hair sieve *n.* केंसांच्या बुडाची चाळण *f*, केंसांची गाळणी *f*. Hair splitter *n.* काथ्याकूट करणारा. Hair'splitting *n.* (रिकामा) काथ्या-कूट *m*. Hair'spring *n.* बाल *m*, केंसासारखी बारीक कमान *f*. Hair trigger *n.* बंदुकींतील बाल *m*, (यत्किंचित् धक्का लागला असतांही उडणारा) बंदुक पेटविणारा चाप *m*. Hair worm *n.* केंसासारखा किडा *m*. Not worth a hair *of no value* कसपटासमान, तुच्छ. To split hairs *to make distinctions of useless nicety* कुडाला तुंबड्या लावीत बसणें, रिकामा काथ्याकूट करणें. Hair breadth or hair's breadth *n. the diameter or breadth of a hair, a very small distance*, (*sometimes definitely*) *the forty-eighth part of an inch* केंसाएवढें अंतर *n*; (केव्हां केव्हां) इंचाचा ४८ वा भाग *m*. Hair'ed *a. having hair* सकेश, केंस असलेला. २ (in composition) *having* (*such*) *hair* अमुक तऱ्हेचे केंस असलेला; as, "Red -H." Hair'iness *n.* केंसाळपणा *m*, केशबाहुल्य *n*, बहुकेशता *f*. Hair'less *a.* केशहीन, अकेश. Hair'y *a. covered with hair* केंसाळ or -ळू, बहुकेश, केशमय, लोममय. २ *made of hair* केंसांचा, केंसांचा केलेला, केशमय, केशनिर्मित. ३ *rough with hair* (केंस असल्यामुळें) खरबरीत.

Halberd (hal'bẽrd) [Fr. *hallebarde* -O. Ger. *halm*,

handle, or helm, helmet, and O. Ger. *barte*, an axe.] *n.* *an ancient military weapon being a combination of a spear and an axe, a poleaxe.* भाल्याला कुऱ्हाडीचा फाळ जोडून झालेलें हत्यार *n*, (loosely) भालेकुऱ्हाड *f.* Halberdier' *n.* भालेकुऱ्हाडकरी. Hal'berd-shaped *a.* भालेकुऱ्हाडीच्या आकाराचा, भालेकुऱ्हाडीसारखा.

Halcyon (hal'si-un) [Gr. *halkyon.*] *n.* *the kingfisher* डिचा *m*, हॅल्सिअन *m*, एक जातीचा जलगामी पक्षी *m.* H. *a.* *pertaining to or resembling the halcyon, which was anciently said to lay her eggs in nests on or near the sea during the calm weather about the winter solstice* हॅल्सिअन पक्ष्यासंबंधीं, डिचा पक्ष्यासारखा.२ (hence) *calm, quiet, peaceful* शांततेचा, अक्षुब्ध. H. days शांततेचा काळ *m.*

Hale (hāl) [A variant of Haul, which see.] *v. t.* *to pull, draw up* ओढणें, वर खेंचणें.

Half (häf) [A. S. *healf, half.* The word is found in all the Teutonic languages. Original meaning was '*part*' or '*side.*'] *a.* *consisting of a moiety* अर्धा, अर्ध, निम्मा; as, "H. hour." २ *partial, imperfect, incomplete* अर्धवट, अर्धामुर्धा, अपूर्ण, निम्मांशिम्मा, थोडा बहुत; as, "A H. dream; H. knowledge." H. *binding* अर्धी बांधणी *f*, जिच्यामध्यें पुस्तकाच्या पाठीला व कोपऱ्यांना चामडें घालून बाजूंस कापड किंवा कागद लावतात अशी (पुस्तकाची) बांधणी *f.* At H. cock अर्धवट चाप ओढून ठेवलेली (बंदूक). H. hose आंखूड (अर्ध्या पायास पुरणारे) मोजे *m. pl.* H. pay अर्धा पगार *m.* २ कमी पगार *m.* H. price अर्धी -निम्मे किंमत *f.* २ कमी किंमत *f.* H. tide अर्धी भरती *f*, पूर्ण भरती व पूर्ण ओहोट यांचा मध्यकाल *m.* H. truth अर्धवट खरी गोष्ट *f.* H. year अर्धें वर्ष *n*, षण्मास *m*, सहा महिने *m. pl.*, सहामाही *f.* H. *adv.* *in some part, approximating a half, in part, imperfectly* अर्धवट, निम्माशिम्मा, &c. H. *n.* [याचा मूळ अर्थ 'बाजू', 'भाग' असा होता. तो आतां लुप्त झाला आहे.] *one of two equal parts* (sometimes followed by *of*) अर्धभाग *m*, अर्ध *n*, अर्धांश *m*, निम्मे *f*, निमाई *f*, निमखाई *f*, (अर्धेल or) अर्धेल *f.* [ABOUT H. निम्मेशिम्मे, अर्धामुर्धा, अर्धासा. BY or IN HALVES निमेनिम, अर्धार्ध. BETTER H. अर्धांगी *f*, पत्नी *f*, अर्धांग *n.* COMPOSED OF ONE AND A H. दिडका, दिडता, दीड. H. OF A RUPEE अधेली *f*, अर्धा रुपया *m*, आठ आणे *m. pl.* H. OF A PICE अधेला *m*, तीन दमडी *f*, अर्धा पैसा *m.* H. in conjunction with numerals as follows:—ONE AND A H. दीड. TWO AND A H. अडीच; and for THREE AND UPWARDS साडे; as, THREE AND A HALF साडेतीन or औट. FOUR AND A H. साडेचार, &c. TO GO HALVES दोघांनीं निमेनिम -अर्धार्ध -सारखा वांटून घेणें. TO CRY HALVES दुसऱ्याच्या बरोबरीनें वांटा -समभाग मागणें.] Half *v.t.* सारखे दोन भाग करणें. H.-baptise *v. t.* (कोणाला न कळवितां) घाईघाईनें बाप्तिस्मा देऊन टाकणें. H.-blood *n.* *the relation between two persons born of the same father or of the same mother, but not of both* एकाच आईच्या किंवा एकाच बापाच्या (परंतु दोघांच्या नव्हे) मुलांचा संबंध *m* -नातें *n*, सापत्न संबंध *m*, भिन्नपितृक संबंध *m.* २ *a person so related to another* सापत्न संबंधाचा मनुष्य. ३ *a half-breed* वर्णसंकरजन्य मनुष्य. H. -blooded *a.* वर्णसंकर-जन्य-जनित. २ *degenerate, mean* भ्रष्ट, पतित, अधम, नीच, कमजात, &c. H.-boot *n.* (पायाच्या) गोफ्यापर्यंत -घोट्यापर्यंत पुरणारा बूट *m*, अर्धा बूट *m.* H.-bound *a.* अर्ध्या बांधणीचें, पाठीला व कोंपऱ्याला चामडें घालून बाजूंस कागद किंवा कपडा लावून बांधलेलें (पुस्तक). H.-bred *a.* *imperfectly acquainted with the rules of good breeding* अर्धवट सुधारलेला (मनुष्य), सदाचार किंवा सद्वर्तन व रीतभात यांची अर्धवट ओळख असलेला (मनुष्य), उत्तम शिक्षण पूर्णपणें न मिळालेला (इसम). H.-breed *a.* Same as *half-blooded* q. v. H. *n.* Same as Half -blood *n.* ३. H.-brother *n.* सापत्न-सावत्र बंधु *m* -भाऊ *m.* H.-cast *n.* युरोपियन व हिंदु किंवा मुसलमान अशा (निरनिराळ्या जातींच्या) आईबापांचें संतान *n* -मूल *n.* H. -cock *v. i.* (बंदूक इ० बार उडविण्याच्या हत्याराचा) चाप अर्धवट ओढून ठेवल्यामुळें (त्या हत्याराचा) एकदम चांगला बार न होणें -निवणें, अर्धवट चापामुळें बार न सुटणें. H. -cracked *a. colloq.* विचारशक्ति अर्धवट नष्ट झालेला -मूढ (मनुष्य). H.-faced *a.* *Shakes.* *showing only part of the face* अर्धवट तोंड दाखविणारा. २ *wretched-looking, meagre* (दिसण्यांत) भिकार. H.-hearted *a.* *ungenerous, unkind* अनुदार, कठोर. २ *lacking zeal, lukewarm* अर्धवट उत्साही, पूर्ण उत्साह नसणारा. H.-heartedly *adv.* H.-heartedness *n.* H.-holiday *n.* अर्ध्या दिवसाची रजा *f* -सुटी *f*, अर्धी सुटी *f.* H. -length *n.* *a portrait or photograph showing the upper part of the body* कमरेच्या वरचा शरीराचा भाग दाखविणारें चित्र *n.* अर्धफोटो *m* (प्रकाशलेख), अर्ध्या शरीराचा चेहरा *m.* H.-ling *n.* *a halfgrown person* बालपण व तरुणपण यांमधील स्थितींतला मनुष्य *m*, कोंवळा बाप्या *m.* H.-mast *n.* *some point below the top of the mast or staff* (दुःखप्रदर्शनप्रसंगीं) (मुख्य) डोलकाठीच्या थोड्या खालच्या भागाचा बिंदु *m.* H. -measure *n.* *a weak line of action* अर्धवट -अपुरा उपाय *m.* H. -moon *n.* (शुद्ध किंवा वद्य अष्टमीचा) अर्धचंद्र *m* (*lit.*), चंद्रार्ध *m.* २ *a crescent* अर्धचंद्राकार *m*, अर्धचंद्राकृति *f.* H. -read *a.* *superficial, shallow* तात्पुरतें -तुटपुंजें ज्ञान असलेला, अर्धवट झालेला. H. -royal *n.* (एकावर एक पुष्कळ पानें चिकटवून केलेला) अर्धवट जाड कागद *m.* H.-sighted *a.* *short-sighted* ज्याची दृष्टि दूर अंतरावर पोंचत नाहीं असा, जवळचेंच दिसणारा.

२ *having weak discernment* अदूरदृष्टि, सारासार-विचाररहित. H.-sister *n.* सापत्न -सावत्र बहीण *f.* H.-sovereign *n.* दहा शिलिंग किंमतीचें (सोन्याचें) इंग्रजी नाणें *n.* H.-sword *n.* *Shakes. a close fight* (तरवारीस तरवार लागेल अशा बेतानें) जवळ उभें राहून केलेलें युद्ध *n*, निकट युद्ध *n.* H.-time *n.* (नित्य-ठरलेल्या वेळाचें) निम्में काम *n.* H.-way *adv.* मधो-मध. २ *imperfectly* अर्धवटपणानें, कसेंबसें. H.-witted *a.* कमअक्कल, नादान, बेवकूब, मूर्ख.

Haliography (hāliog'ra-fi) [Gr. *hals*, the sea, and *graphein*, to write.] *n.* *description of the sea* समुद्र -उदधिवर्णन *n.* २ *the science that treats of the sea* सिंधुशास्त्र *n.* Haliogr'apher *n.* समुद्रवर्णनकार.

Halite (hā'-līt *or* hal'-īt) [Gr. *hals*, salt.] *n. min. native salt, sodium-chloride* मीठ *n*, लवण *n*, निमक *n.*

Halituous (halit'ū-us) [L. *halitus*, breath, vapour, *-halare*, to breathe.] *a. vapourous* वाफेसारखा.

Hall (hawl) [M. E. *halle*. A. S. *heall*, *heal*, a hall, orig. a shelter.] *n. a building or room of considerable size and stateliness for public business* (सार्वजनिक कामासाठीं वापरण्याचा) मोठा वाडा *m*, मोठी खोली *f*, सार्वजनिक सभागृह *n*, सार्वजनिक खोली *f*, कचेरी *f*, सदर *f*, सरकारवाडा *m*; as, "Westminister *Hall* in London." २ *a large room or passage at the entrance of a house* दिवाणखाना *m*, वाड्यांत जातांना पहिल्यानें जी खोली लागते ती, दारा-जवळची खोली *f*, गृहसुखशाला *f.* ३ *a large chamber for the sale of particular goods* (विशिष्ट माल विकण्याचें) दालन *n* -अड्डा *m* -अखाडा *m.* ४ *an edifice in which courts of justice are held* न्यायमंदिर *n*, धर्मसभा *f*, न्यायसभा *f*, न्यायसभागृह *n.* ५ *the main building of a college* पाठशाळेचा मुख्य दिवाणखाना *m.* ६ *the specific name of a college in a university* विश्वविद्यालयांतील विशेष पाठशाळा *f.* ७ (a) *the apartment in which English University students dine in common* इंग्लंडमधील पाठशाळेंतील हजेरीची मुदत (term) भरतांना एकत्र जेवणाचा दिवाणखाणा *m.* (b) (hence) *the dinner itself* मुदतीकरितां सहभोजन *n.* ८ *a place for special professional education* विशेष धंद्यांचें शिक्षण देण्याचें गृह *n.* ९ *a place for conferring professional degrees or licenses* धंद्याच्या पदव्या किंवा धंदे करण्याकरितां योग्य परवानगी देण्याचा दिवाण-खाना *m.* Hall'age *n.* दालनांत माल ठेवण्याबद्दलचें भाडें *n.* Hall'-door *n.* दिवाणखान्याचा दरवाजा *m.* Bachelor's H. *n.* स्वैर वागण्याची जागा *f*, फटिंगाची खोली *f*, जेथें स्त्रियांचें वारेंही नाहीं अशी जागा *f.* Liberty -H. *n.* हवें त्याला येण्याची जागा *f*, मुक्तद्वार *n.* Hall'-mark *n. the official stamp of the Goldsmiths' company and other assay offices in the United Kingdom on gold and silver articles* (धातूंचा कस पाहण्याच्या कचेरींत मारलेला सोनें, रुपें इ० कांवरील) कसाचा -प्रतीचा शिक्का *m.* २ (also *fig.*) शिक्का *m* (*fig.*), शिक्कामोर्तब *n* (*fig.*), छाप *m* (*fig.*), पसंती *f*; as, "A word or phrase lacks the H. of the best writers."

Halleluiah, Hallelujah (hal-e-lōō'-yä) [Heb. *halelu*, praise ye, and *Jah*, *Jehovah.*] *n.* and *interj. praise ye Jehovah, praise ye the Lord* ईश्वराची स्तुति करा अशा अर्थाचें गायन *n*, 'हालेलुया.'

Halliard (hal'yard) [See yard and Hale *v.*] *n. a rope by which yards, sails &c. are hauled or hoisted* शिडें वर उचलण्याची किंवा खालीं सोडण्याची दोरी *f*, कांड *n.*

Halloo (hal-lōō') [Imitative; A. S. *eala.*] *n. a cry to draw attention* ललकारी *f*, पुकारा *m*, हांक *f*, हांकाटी *f*, हांकाहांक *f*, हांकारा *m*, आरोळी *f*, पुकारणी *f.* H. *v. i. to cry out* ललकारी *f* -आरोळी मारणें, साद घालणें, पुकारणें, पुकारा *m.* करणें. H. *v. t. to encourage or chase with shouts* ललकारी मारून उत्तेजन देणें -आणणें, (-च्या) पाठीस लागणें, पिटाळणें. २ *to call to* (पुकारून) हांक मारणें. H. *interj.* हं, ए, अरे, अहो, हें पहा, &c. H.-bellow *n.* हाकारा *m*, हाकाहाक *f*, हाकारी *f*, हाकाटी *f*, &c. Hallooed' *pa. t.* and *pa. p.* Halloo'ing *pr. p.* and *v. n.* पुकारा *m*, साद *m*, ललकारी *f.* To halloo before one is out of the wood *to count on safety before one is out of danger* संकट नाहींसें होण्यापूर्वीच सुरक्षितपणावर हवाला ठेवून राहणें.

Halloa (hal'ō) Same as Halloo.

Hallow (hal'ō) [A. S. *halgion* -*halig*, holy.] *v. t. to make holy* पवित्र करणें -ठेवणें-ठरविणें. २ *to treat or keep as sacred, to reverence* पवित्र मानणें, पूज्य मानणें -गणणें. ३ *to consecrate* वाहणें, अर्पण करणें. Hal'lowed *pa. t.* and *p. p.* Hal'lowing *pr. p.* and *v. n.*

Hallucination (hal-lū-sin-ā'shun) [L. *hallucinatio* -*hallucinor*, *alucinor*, (*atum*) to wander in mind.] *n. error, mistake, a blunder* चित्त ठिकाणावर नसल्या-मुळें -चित्तभ्रम झाल्यामुळें होणारी चूक *f*, भूल *f*, भ्रम *m*, भ्रांति *f*, मोह *m*, व्यामोह *m.* २ *med. perception of things that do not exist, delusion* वस्तुतः जेथें कांहींही नाहीं तेथें कांहीं तरी वस्तु आहे असा भ्रम होणें *n*, इंद्रजाल *n*, मायिक वस्तूचा भास *m*, दृग्भ्रम *m.* मानसिक भ्रांति *f.* Hallu'cinate *v. i.* (*R.*) भलती-कडेच जाणें, वाहवणें, चुकणें, भूल होणें. Hallu'cinator *n.* (चित्त-) भ्रम झाल्यामुळें चुका करणारा. Hallu'cinatory, Hallu'cinative *a.* भ्रांतिकारक, भ्रमाचा.

Hallux (hal'-luks) [L. *hallex*, *allex.*] *n. anat. the great toe* पायाचा आंगठा *m.*

Halo (hā'-lō) [L. *halos*, acc. *halo*, Gr. *halos*, a round thrashing-floor, also (from its *round* shape) the disk of the sun or moon, and (later) a haloround it.] *n. pl.* Halos. *a luminous circle*

*round the sun or moon, caused by the refraction of light through mist* (प्रकाशवक्रीभवनामुळें दिसणारी सूर्य किंवा चंद्र यांची) अंशुमाला *f*, वळें *n.* तेजोवलय *n*, परिवेष *m*, परिधि *m*, खळें *n.* [ LARGE H. तळें *n.* LUNAR H. पानकोंबडा *m* -कोंबडें *n.* ] २ (*paint.*) *the bright ring round the head of holy persons* प्रभामंडल *n*, तेजोमंडल *n*, प्रकाशाचें वळें *n.* ३ *an areola* (स्तनाग्रावरील) चूचुकाचा काळा रंग *m.* H. *v. t. & i. to surround with a halo* (-च्या) भोंवतीं मंडल करणें, तेजोवेष्टन घालणें. Ha'loed *pa. t. & p. p.* Ha'loing *pr. p. & v. n.* Ha'loscope *n.* तेजोवलयदर्शक् *m.*

Halt (hawlt) [A. S. *healt*, Icel. *haltr*, Dan. and Swed. *halt.*] *n. a stop arrest of progress*; (a) (in marching) मुक्काम *m*, तळ *m*, डेरा *m*, विराम *m*, विश्राम *m*, गत्यवरोध *m*, (b) (in any action) मुक्काम *m*, विचार *m*, थांबणें *n.* H. *v. i. to stop from going on* (मध्येंच) थांबणें, (अध्यां मकाणावर) मुक्काम करणें -उभें राहणें. २ (*mili.*) उभा राहणें, तळ *m* -डेरा *m.* देणें. ३ *to be in doubt, to hesitate* संशयांत -विचारांत -घोटाळ्यांत पडणें, नानू-कांकूं करणें. ४ *to limp* लंगडणें. H. *v. t.* (*mili.*) *to stop in a march* तळ-डेरा-छावणी पाडणें, (कूच करीत असतां मध्येंच) मुक्काम करावयास लावणें. Halt'ed *pa. t. & p. p.* Halt'ing *pr. p. & v. n.*

Halt (hawlt) [A. S. *healtian*, limp.] *a. lame* लंगडा, लंगडत चालणारा. H. *n. lameness* लंगडेपणा *m*, लंगडणें *n.* H. *v. i. to limp* लंगडणें, लंगडत चालणें, (चालतांना) पाय काढणें. २ *to have an irregular rhythm, to be defective* तालशुद्ध नसणें, तालांत नसणें; as, "The blank verse shall H. for it." Hal'tingly *adv.* लंगडतलंगडत.

Halter (hawl'-tėr) [A. S. *healfter*. Akin to Ger. *halfter*, and E. *Helve*, which see.] *n. a strong rope or cord for holding and leading a horse* (घोड्याची) काढणी *f*, वागदोर *m.* २ *a noose* फांशीं देण्याची दोरी *f*, दोरीचा फांस *m*, गळफांस *m.* [ TO TWIST A H. FOR ONE'S OWN NECK उपटून सूळ खांद्यावर घेणें, आपल्या गळ्याला फांस लावून घेणें.] H. *v. t. to tie by the neck with a halter* काढणी गळ्यांत घालणें, काढणीनें बांधणें. २ *to subject to a hangman's halter* फांसावर चढविणें, फांशीं देणें. Hal'tered *pa. t. & p. p.* Hal'tering *pr. p. & v. n.*

Halve (häv) [ From *Half*, which see. ] *v. t. to divide into two equal parts* दोन समभाग करणें, अर्धार्ध -निमेनिम करणें, बरोबर अर्धा करणें. २ *to form half of* (-चा) अर्धा भाग असणें, (-च्या) अर्ध्यानें असणें, (-च्या) अर्धा भरणें. ३ (*arch.*) *to join* (two pieces of timber) *by cutting away each for half its thickness at the joining place, and fitting together* (जोडण्याचे टोंकांशीं प्रत्येकाच्या जाडीचा अर्धा भाग कापून) दोन लांकडें जोडणें, निम्मेवर जोड देणें, अर्धार्ध लांकडांचा जुवा बसविणें. Hal'ved *pa. t.* and *p. p.* -निमेनिम केलेला, अर्धकृत, सामीकृत. Hal'v[es] *n. pl.* [ BY H. कणशः, अंशतः, अर्धवट.] Hal'vin[g] *pr. p.* and *v. n.*

Halyard (hal'-yėrd) [Skeat explains it as *hal[e]* *v. t.* and *yard*; more prob. merely *halier.*] [*n.*] *naut.* (written also *halliard, haulyard*) *a rop[e] or tackle for hoisting or lowering yards, sail[s], flags, &c.* (गलबतावरील) शिडें, डोलकाठ्या, वाव[टें] निशाणें वगैरे उभारण्याची किंवा उतरण्याची दोरी *f.*

Ham (ham) [A. S. *hamm*; cf. dial. Ger. *hamm[e]*, perhaps named from the bend at the ham.] [*n.*] *anat. the region behind the knee joint* पायाच्या ढोंप[रा]राची लवण *f*, लवण *f*, ढोंपराचा मागचा भाग *m.* २ (*esp.*) *the thigh of a hog cured by salting and smokin[g]* खारवून वाळविलेली डुकराच्या ढोंपराची लवण *f.*

Hamate (hā'māt) [L. *hamatus*, *-hamus*, hook.] *a. hooked, bent at the end into a hook* हुकासारख[ा] वांकडा, (टोंकाशीं) आंकडीप्रमाणें वांकलेला. Ha'mated *a.* Ha'miform *a.* *hook-shaped* हुकाप्रमाणें वांकडा, वांकलेला.

Hamburg (ham'-bėrg) *n.* जर्मनींतील एल्ब नदीच्या मुखाजवळचें व्यापाराचें शहर *n*, हॅम्बर्ग *n.*

Hame (hām) [Cf. Dut. *haam*, Low Ger. *ham.*] *n. one of the two curved pieces of wood or metal in the harness of a draught horse, to which the traces are fastened* (गाडीच्या घोड्याच्या गळेबंदात असलेली) कडी *f.* हिच्यांत गाडीला जोडणारा पट्टा अ[स]कवितात, पट्टेकडी *f.*

Hamlet (ham'let) [O. Fr. *hamel* (Fr. *hameau*) and dim. affix *-el*; Old Fris. *ham*, a home, Ger. *heim*, A. S. *ham*, a dwelling.] *n. a small village, a little cluster of houses in the country* वाडी *f*, लहान खेडें *n*, पाडा *m*, पाडें *n*, मजरा *m*, लहानसें गांव *n.* Ham'leted *p. a.* *confined to a hamlet* खेड्यां[]तल्या खेड्यांत असणारा.

Hammal (ham'al) *n.* *a Turkish porter* मजूर *m*, हमाल, हेलकरी.

Hammer (ham'ėr) [A S. *hamor*, akin to Ger. *hammer*, Icel. *hamarr.*] *n. an instrument* (for driving nails, beating metals, &c.) *consisting of a head fixed crosswise to a handle* हातोडा *m*, dim. हातोडी *f.* [ SLEDGE H. घण *m.* WIELDER OF [H.] घणकरी *m.*] *N. B.*:—हातोड्याचे आकाराच्या किंवा त्याचें कार्य करणाऱ्या निरनिराळ्या यंत्रादिकांस hammer हा शब्द लावतात; जसें, (घड्याळांतील) मोगरी *f.* २ (बंदुकीचा) घोडा *m*, केपावर आपटणारें चापाचें तोंड *n.* ३ ठोकून काढणारा, हाणणारा, हाणून पाडणारा; as "St. Augustine was the *hammer* of heresies." Atmospheric H. *a dead -stroke hammer in which the spring is formed by confined air* कोंडलेल्या हवेच्या दाबमुळें -दाबानें कार्य करणारा हातोडा *m.*

To bring to the H. *to put up at auction* लिलांवांत विकण्यास काढणें, लिलांवानें विकणें, (-चें) लिलांव करणें. H. *v. t. to beat with a hammer* हातोड्यानें ठोकणें. २ *to shape by* (such) *beating* हातोड्यानें ठोकून घडणें -आकृति देणें किंवा आणणें. ३ *to contrive by intellectual labour* (usually with *out*) मनन करून योजणें, मनांत ठरविणें -बेत करणें, घाट घालणें; as, "He was *hammering out* a penny dialogue." H. *v. i. to be busy forming anything* कामांत असणें, गुंतून राहणें; as, "Whereon this month I have been *hammering*." २ *to strike repeated blows (lit. or fig.)* ठोकणें, ठोके मारीत राहणें, तीच तीच गोष्ट पुढें आणणें. H.-cloth *n. cloth covering a coach-box* गाडीच्या पेटीवरील कापड *n* -कपडा *m.* H.-dressed *a.* (said of building stones) टांकीनें -हातोड्यानें घडलेला (इमारती दगड *m.*). Ham'mered *pa. t.* & *p. p.* Ham'merer *n.* घणकरी, हातोड्यानें काम करणारा. Ham'mer-harden *v. t. to harden* (a metal) *by hammering it in a cold state* (धातु थंड असतांना तिला) ठोकून कणखर करणें. H.-hardening *pr. p.* and *v. n. –the process* धातु थंड असतांना ती ठोकून कणखर -कठीण करण्याची कृति *f.* Ham'mering *pr. p.* & *v. n.* Ham'merless *a.* (*firearms*) *without a visible hammer* (said of a gun having a cock or striker concealed from sight, and out of the way of an accidental touch) (चुकून हात लागून धक्का बसूं नये किंवा उडूं नये म्हणून) झांकलेल्या घोड्याची (बंदूक *f.*) Ham'merman *n.* Upto the hammer *first-rate* पहिल्या प्रतीचा -नंबरचा, उंची, अस्सल.

Hammock (ham'mok *or* ham'-uk) [*Hamaca*, an American Indian word meaning, a net.] *n. a piece of strong cloth or netting suspended by the corners, and used by sailors as a bed* (जाळीचा किंवा कितानासारख्या मजबूत कपड्याचा) खलाशांचा झोळीचा -झुलता पाळणा *m*, झुला *m*, झुलावा *m.*

Hamper (ham'-pėr) [Contraction from *hanaper*. O. Fr. *hanapier* -*hanap*, a drinking cup. A. S. *hnæp*, a bowl.] *n. a large 'basket' for conveying goods* (सामान नेण्याची) टोपली *f* -पेटारा *m*, dim. पेटारी *f*, हारा *m.* H. *v. t.* पेटाऱ्यांत -हाऱ्यांत घालणें -भरणें. Ham'pered *pa. t.* and *p. p.* Ham'pering *pr. p.* and *v. n.*

Hamper (ham'-pėr) [First about 1350, in Northern writers, prob. related to Icel. *hemja* (*pa. t. hamdi*), to restrain; Ger. *hemmen* prob. of the same origin as E. *hamble.*] *v. t. to impede or perplex, to shackle* अडथळा करणें, अडचणींत -घोटाळ्यांत- गळफट्यांत घालणें -पाडणें, गोवणें, गोवून टाकणें, जाळ्यांत धरणें -पाडणें, अटकावणें, (-चा) घोटाळा करणें, (-ला) प्रतिबंध -विरोध करणें. [To BE H.ED अवघडणें, अडचणणें.] H. *n. a shackle, a fetter* शृंखला *f*, बिडी *f*, नड *f*, अडचण *f*, प्रतिबंध *m*, अडथळा *m*, आडकाठी *f.* २ *naut. articles ordinarily indispensable but in the way at times* (गलबतावर जरूर बाळगाव्या लागणाऱ्या परंतु नेहमींच उपयोग -जरूर न लागल्यामुळें) कधीं कधीं अडचण करणाऱ्या -नडणाऱ्या वस्तु *f. pl.*

Hamstring (ham'string) [See *Ham* and *string.*] *n. anat. the string or tendon of the thigh* कुच्या *f. pl.*, (गुडघ्याच्या मागची) घोंडशीर *f.* H. *v. t. to lame by cutting the hamstrings* घोंडशीर तोडून लंगडा करणें. २ *to cripple, to incapacitate* लंगडा पाडणें, अधू करणें, जायां करणें, पंगू करणें -पाडणें, निरुपयोगी -कुचकामी करणें. Ham'stringing *pr. p.* and *v. n.* Ham'strung *pa. t.* and *p. p.*

Hanaper (han'a-pėr) [O. Fr.] *n.* See *hamper* No. I.

Hand (hand) [A. S. *hand*, hand.] *n. the extremity of the arm below the wrist* हात *m*, हस्त *m*, कर *m*, पाणि *m* (Sk.). [ACTION WITH THE H. *manual gesticulations* हातवारे *m. pl.* BACK OF THE H. करपृष्ठ *n* (as oppo. to करतल *m.*). FREE OF THE H. हाताचा सढळ-मोकळा. HANDS करद्वय *n.* H. AS SPREAD *or* OPENED OUT पंजा *m.* HANDS HOLLOWED AND JOINED अंजलि *pop.* ओंजळ *f*, अंजलिपुट *m*, संपुट *m*, करपुट *m.* QUANTITY BROUGHT UP BY THE H. बुचकुली *f.* ONE WHOSE HANDS REACH TO THE KNEE *longimanus* आजानुबाहु.] २ (*Tobacco manuf.*) *a bundle of tobacco leaves tied together* (तंबाकूच्या पानांची हातांत धरण्यासारखी) जुडी *f*, पेंडी *f*, घडी *f.* ३ *that which resembles or does the duty of a hand:* as, (a) *a limb of certain animals* (माकड इ० प्राण्यांचा) हात *m*, पंजा *m.* (b) *an index or pointer of a dial* (घड्याळाचा) हात *m*, कांटा *m*, सूचि *f* (Sk.). ३ *a measure of four inches* (chiefly in measuring the height of horses) चौंगा *m.* ४ *side, part* (either right or left) हात *m*, बाजू *f*, अंग *n*, दिशा *f.* ५ *skill, dexterity* हात *m*, हातोटी *f*, हाताची -काम करण्याची सफाई *f* -खुबी *f*, हस्तकुशलता *f*, हस्तकौशल्य *n*, हाताची चलाखी *f.* ६ *act, deed* काम *n*, कृत्य *n*, कर्म *n*, करणी *f.* ७ (hence) *manner of performance* (कामाचा -खेळाचा -डावाचा) प्रकार *m*, हात *m*, क्रम *m*; as, "To change the H. in carrying on the war." ८ *a workman, a labourer* कामकरी *m*, गडी *m.* ९ *style of handwriting* हात *m*, हस्ताक्षर *n*, अक्षर *n*, दस्कत *f*, (लिहिण्याची) मोड *f* -धाटणी *f* -पद्धति *f* -वळण *n*, लिपी *f.* १० *personal possession* हात *m* (*fig.*), अधिकार *m*, सत्ता *f*, कबजा *m*, ताबा *m.* ११ (hence) *power, control* हात *m* (*fig.*), हुकूम *m*, शक्ति *f*, सत्ता *f.* १२ *agency in transmission from one person to another* हात *m*, देवघेव करणारांपैकीं (एक) इसम *m.* १३ *what is, or may be, held in a hand at once:* as,

(a) (*card playing*) *the quota of cards received from the dealer* हात *m*, दस्त *m*, दस्ता *m*, डाव *m*. १४ (fire-arms) *the small part of a gunstock near the lock, which is grasped by the hand in taking aim* (नेम धरतांना) हातांत धरण्याचा बंदुकीच्या दस्त्याचा भाग *m*. H. *v. t. to give with the hand* हातानें उचलून देणें, (आपल्या हातून दुसऱ्याचे) हातीं देणें. [TO H. DOWN परंपरेनें देणें, पिढ्यानुपिढ्या चालू ठेवणें, (बापापासून मुलाला त्यानंतर नातवाला याप्रमाणें) पुढच्या पिढ्यांना देणें. TO H. OVER (-च्या) स्वाधीन -हवालीं करणें, (-कडे) देणें.] २ *to lead or conduct* हात धरून नेणें, वाटेनें नेणें, पोंचविणें, (-ला मदतीसाठीं) हांत देणें-लावणें. ३ (*obs. Shakes.*) *to seize, to lay hands on* धरणें, पकडणें, (-वर) हात टाकणें. ४ *naut. to furl* (a sail) गुंडाळणें, आटोपणें, आवरणें, बांधणें. *N. B.* :—HAND IS USED FIGURATIVELY FOR A LARGE VARIETY OF ACTS OR THINGS, IN THE DOING, MAKING, OR USE OF WHICH THE HAND IS IN SOME WAY EMPLOYED OR CONCERNED. IT IS ALSO USED AS A SYMBOL TO DENOTE VARIOUS QUALITIES OR CONDITIONS. HAND IS OFTEN USED ADJECTIVELY OR IN COMPOUNDS (WITH OR WITHOUT THE HYPHEN) SIGNIFYING 'PERFORMED, OR FOR USE, BY THE HAND.' H. bag *n*. हातपाकीट *n*. H. barrow *n*. हातगाडी *f*. H. bellows *n*. हातभाता *m*. H- bill *n*. हस्तपत्रक *n*, हस्तपत्रिका *f*, जाहीरपत्रक *n*. २ (usually written separately) *a pruning hook* छाटण्याचा हातचिमटा *m*. H. book *n*. (वाटेल तेव्हां पाहतां येण्यासाठीं नेहमीं जवळ बाळगतां येण्यासारखें कोणत्याही विषयावरील) छोटेखानी पुस्तक *n*, हातचोपडी *f*, हातबुक *n*, सारसंग्रह *m*. H. -breadth *n*. चौंगा *m*, चार अंगळें *n. pl.*, पांच बोटें *n. pl.* H.-car *or* -cart *n*. हातगाडा *m*. H.-cloth *n*. See Handkerchief. H.-craft *n*. See Handicraft. H.-cuff [*hand*, and *cosp*, *cops*, fetter.] *n*. (usually in the *pl.*) *a 'cuff' or fetter for the hand* हातबेडी *f*, हातबिडी *f*. H. *v. t.* हातबेडी घालणें. H.-footed *a. having feet like hands* हातासारखे पाय असलेला. H.-ful *n*. मूठभर वस्तु *f*, मूठ *f* (*fig.*), पसा *m*, मुष्टिमात्र *n*. [DOUBLE H. ओंजळ *f*, धोत *f*. IN, AT, *or* WITH ONE H. एकमुठीं.] २ *a small quantity or number* अगदीं थोडा -थोडका, चिमूट *f*. [MERE H. *a few* इनमीन सव्वातीन *or* साडेतीन.] Hand gallop *n*. साधी चौकचाल *f*. H.-glass *n*. लहान लहान रोपे झांकून ठेवण्याचें कांचेचें झांकण *n*. २ हातआरसा *m*- (dim.) आरशी *f*. H. hole *n*. (steam-boilers) (वाफेचा बंब साफ करण्यासाठीं) हात जाण्यासारखें भोंक *n*. H.-kerchief *n*. हातरुमाल *m*, दस्तरुमाल *m*. H. language *n*. करपल्लवी भाषा *f*, (briefly) करपल्लवी *f*. H. line *n*. मासे मारण्याचा बिनदांड्याचा गळ *m*. H. list *n*. (सहज संबंध दाखवितां येण्यासारखी) हातयादी *f*. H. loom *n*. हातमाग *m*. H. made *a*. हस्तकृत, हातानें केलेला. H.-maid, -maiden *n. fem. a female attendant* परिचारिका *f*, दासी *f*. H. money *n*. (करार ठरल्याबद्दल दिलेला) विसार *m*, इसार *m*, बयाणा *m*. H.-mill *n*. जातें *n*, जांतीण *or* जांतण *f*, *dim.* जांतली *or* जांतुली *f*, घरट *m*, *dim.* घरटी *f*, चक्की *f*. [BUSHEL (iron lining of the mouth) OF A H. MILL मानी *f*. CHISELLER *or* RECHISELLER OF A H. जातें उफट्या, टांकी लावणारा, टकारी, टांकेकरी. EDGE AROUND THE MOUTH OF A H. पाळ *f*, पाळें *n*. FIRST GRINDINGS UPON A H. उफटी *f*. FLOUR ADHERING TO THE H. चिकटा *or* चिकोटा *m*. INCISION MADE UPON A H. WITH A CHISEL टांकी *f*. LEAF *or* SLATE OF A H. तळी *f*, पेड *n*. PIN OF A H. खुंटा *m*. SLIP OF IRON ON THE UPPER LEAF OF A H. पाटी *f*. TO CHISEL *or* RECHISEL A H. उकटणें, टांकी लावणें, टांकणें. TO TURN *or* PLY A H. जातें ओढणें. TO HUSK *or* GRIND COARSELY IN THE H. (*gharat*) घरटणें, घरडणें.] H.-organ *n*. हस्तवाद्य *n*. H.-post *n*. हातखांब *m*, रस्त्यांच्या पाट्या मारलेला (चवाठ्यावरील) खांब *m*. H.-running *adv. continuous* एकसारखा, लागोपाठ. H.-saw *n*. हातकरवत *f*. H. screen *n*. हातपडदा *m*. उन्हाचा किंवा उष्णतेचा त्रास होऊं नये म्हणून हा तोंडावर घालतात. H. screw *n*. (जड ओझीं उचलण्याचें लहानसर) मळसूत्राचें यंत्र *n*. H.-SPIKE *n*. पहार *f*, पहारई *f*. H.-TIGHT *a*. हातांनीं जितकें बांधतां येईल तितकें घट्ट. H.-wheel *n*. हातचाक *n*. H.-work *n*. हातकाम *n*. H.-writing *n*. हस्ताक्षर *n*, दस्तूर *m*. [ONE'S OWN H. स्वदस्तूर *m*, दस्तुरखुद्द.] २ *manner of writing* हातवळण *n*, अक्षराचें वळण *n*, अक्षर *n*, अक्षरांची मोड *f*, लिपी *f*. H.-wrought *a*. हस्तकृत -निर्मित. All H.s *everybody, all parties* प्रत्येकजण, सर्वजण. At *or* on all H.s चहूंकडून, सर्व बाजूंनीं, सर्व पक्षीं. [ADMITTED ON ALL H.s सर्वसंमत, सर्वांस कबूल.] At any H. *on any account* कसेंही करून, कांहीं झालें तरी. At no H. *on no account* कोणत्याही कारणामुळें (नाहीं). At first H. नवीन, कोरा करकरीत. At second H. जुना, वापरलेला, आडगिऱ्हाइकी. At H. जवळ, नजीक, हाताशीं, समीप. At the H.s of -पासून, (-च्या) हातून -कडून. By H. हातानें, हातीं, यांत्रिक साहाय्यावांचून. Cool H. धिमा मनुष्य. Clean H.s निर्दोषता *f*, निर्दोषपणा *m*, दोष -पापराहित्य *n*. [TO HAVE CLEAN H.s निर्दोष -पापरहित असणें.] From H. to H. एकापासून दुसऱ्यास, परंपरेनें, हातोहातीं. H. in H. मिळून, जुटीनें, एकत्र, एकमतानें, एकतंत्रानें. २ न्याय्य, वाजवी, रास्त. H. over H. *or* H. over fist हातोपातीं, आळीपाळीनें, दोन्ही हात टाकीत; as, "To climb H. over H." २ (also) *rapidly* झपाट्यानें, भराभर; as, "To come up with a chase H. over H." H.s off थांब, पुरे, उगीच रहा, बस्स कर. H. to H. हातघाईवर येऊन केलेलें (युद्ध), निकट, जवळ भिडून केलेलें. Heavy H. *severity, oppression* जाच *m*, काच *m*, कठोरता *f*, कठोरपणा *m*, नैष्ठुर्य *n*, जुलूम *m*, कडकपणा *m*, &c. In H. हातांतला,

हातीं घेतलेला, चालू -सुरू असलेला-केलेला. २ रोकड, पाशीं -जवळ असलेला, रोख; as, "Cash *in hand*". In one's H. *or* H.s (स्वतःच्या) ताब्यांतील -हातांतील. ३ *at one's risk or peril* स्वतःच्या हिंमतीवर, हातावर; as, "I took life *in my hand*." मीं आपले प्राण हातावर घेतले. Laying on of H.s *a form used in consecrating to office, or in blessing persons* दीक्षा देतांना (मस्तकावर) हात ठेवणें, आशीर्वाद देणें. Light H. ढिला हात *m*, ढिली दोरी *f*, ढिलेपणा *m*, सढळपणा *m*, नरमपणा *m*. Note of H. *a promissory note* (पैसे उसने घेतल्यावर ते परत देण्याचा) वचनलेख *m*. Off H. *or* out of H. *forthwith* तावडतोब, बिन-तक्रार, हातासरसा, सहज, हातावर. Off one's H.s हातावेगळा; as, "I have got that job *off my hands*." Old H. अनुभवी -जुना मनुष्य. Poor H. साधारण -चालचलाऊ मनुष्य. On H. हातांत, जवळ, शिल्लक; as, "A supply of goods *on H.*" On one's H.s (आपल्या) ताब्यांत, हातांत, देखरेखीखालीं. Right H. *place of honour, power, and strength* उजवा हात *m* (*fig.* and *colloq.*), मानाची -अधिकाराची जागा *f*. Slack H. *carelessness, sloth* हयगय *f*, आळस *m*. Strict H. *vigorous discipline* करडा अंमल *m*, कडक कायदा *m*, कायदेशीरपणा *m*, जरब *f*. Under one's H. स्वदस्तुरचा. Under the H. of (-च्या) हातचा, (-च्या) सहीनिशीं -सहीचा. To bear a hand *naut.* ताबडतोब मदत करणें, मदतीला धांवणें. To be H. and glove, *or* in glove, with, See under Glove. To be on the mending H. जगल्या पंथास लागणें, (रोग्याला) उतार लागणें, दिवसेंदिवस प्रकृति सुधारत जाणें. To bring up by H. (आंगावरील दूध न पाजतां मुलास सुसते) खावयास घालून पोसणें -वाढविणें. To change H.s पक्ष-धनी बदलणें, एकाच्या हातांतून दुसऱ्याच्या हातीं जाणें, एका पक्षाकडून दुसरे पक्षास मिळणें. To clap the H.s आनंददर्शक टाळ्या वाजविणें, टाळ्या वाजवून आनंद दर्शविणें. To come to H. पोंचणें, पावणें, मिळणें, हातीं लागणें, स्वाधीन होणें. To get one's H. in (कोणत्याही कार्याला -कामाला) हात घालणें, सुरवात करणें. २ (एकाद्या कामाची) संवय -माहिती होणें. To have a H. in (एखाद्या गोष्टीशीं आपला) संबंध असणें, (-आंत) हात -हितसंबंध असणें, (-मध्यें) अंग असणें. To have in H. (आपल्या) ताब्यांत -हातांत -अधिकारांत असणें, हुकुमांत असणें. २ (-मध्यें) व्यापृत असणें, गुंतून राहणें -असणें. To have one's H.s full हाताला वार नसणें, न फावणें, पुष्कळ काम असणें, कामाचा रगाडा असणें. २ अडचणींत -प्रसंगांत असणें -पडणें. To have, *or* get, the (higher) upper hand of (-वर) सरशी करणें, (-चा) पाडाव -पराजय करणें, चीत करणें. To his hand, To my H., &c. पूर्ण, तयार, तयारींत; as, "The work is made *to his H.*" To hold in H. ताब्यांत ठेवणें, नियमन करणें, आवरणें. To lay hands on पकडणें, धरणें, हल्ला -स्वारी करणें, धाड घालणें, (-वर) झडप घालणें. To lend a H. मदत करणें, साहाय्य करणें, मदत देणें, हात देणें. To lift, *or* put forth, the H. (*-against*) (-वर) हात उगारणें -उचलणें -टाकणें. To live from H. to mouth हातावर संसार चालविणें -करणें, कशीबशी तोंडमिळवणी करणें. To make one's H. फायदा -नफा मिळविणें. To pour water on the H.s of (-ची) सेवा -खिजमत करणें. INAM GRANTED IN REMUNERATION FOR WASHING THE H.S (OF THE RAJAH, &C.) हातधुणी *f*. To put the H. unto (वस्तूला) हात घालणें, हात मारणें, चोरणें. To put the last, *or* finishing, H. to पुरा करणें, निपटणें, शेवटचा -अखेरचा हात देणें, तयार करणें. To set the H. to हातीं घेणें -धरणें, पतकरणें, (-ला) प्रारंभ -सुरवात करणें. To stand one in H. (-चा एखाद्या व्यक्ती-) शीं संबंध असणें -येणें -पोंचणें. To strike H.s टाळी देणें -मारणें, हातावर हात मारणें -देणें, (टाळी मारून) करार करणें. २ दुसऱ्याच्या कर्जाबद्दल जबाबदार होणें किंवा चांगल्या वर्तनाबद्दल जामीन राहणें -होणें. To take in H. *to undertake* हातीं धरणें -घेणें, (-ला) हात घालणें. To take off one's H.s सोडविणें, मुक्त करणें. To wash one's H.s of हात झाडून मोकळा होणें, (-च्या) दगदगींतून मोकळा होणें.

Handicap (hand'i-kap) [From *hand in cap*; perh. in reference to an old mode of settling a bargain by taking pieces of money from a cap.] *n*. *a race in which the horses carry different weights, or are placed at different distances, or start at different times so that all shall have, as nearly as possible, an equal chance of winning* शर्यत जिंकण्याची सर्व घोड्यांस सारखी संधि मिळावी म्हणून ज्या शर्यतींत निरनिराळ्या घोड्यांवर निरनिराळीं वजनें ठेवितात, किंवा त्यांस निरनिराळ्या (कमीजास्त) अंतरावरून अथवा निरनिराळ्या वेळीं (पुढेंमागें) सोडतात ती शर्यत *f*. २ सारखी संधि (सवलत) देण्यासाठीं केलेला अडथळा *m*. ३ अडथळा *m*, प्रतिबंध *m*. H. *v. t.* कोणत्याही शर्यतींत किंवा सामन्यांत सारखी संधि देण्याकरितां अडथळा घालणें. २ (hence, in general) *to place at disadvantage* अडचणींत -प्रसंगांत आणणें. *N. B.*:—Originally the word was applied to a method of settling a bargain or exchange by arbitration, in which each of the parties exchanging put his *hand* containing money into a *cap*, while the terms of the award were being stated, the award being settled only if money was found in the hands of both when the arbiter called 'Draw.'

Handicraft (hand'i-kraft) [For *handcraft*, influenced by *handiwork*.] *n*. *manual occupation, a trade requiring skill of hand* हस्तकौशल्य *n*, कला *pop.* कळा *f*, हुन्नर *m.* or *f*, शिल्प *n*, शिल्पविद्या

*f.* शिल्पकर्म *n.* हातकाम *n.* २ (*R.*) *handicraftsman* हुन्नरवाला, शिल्पी. Han'dicraftsman *n.* हुन्नरवाला *m.*

Handiwork, Handywork (hand'i-wurk) [A. S. *handgeweorc–hand*, hand, & *geweorc*, another form of *worc*, work.] *n.* *work done by the hands, work of skill or wisdom* हस्तकौशल्याचें काम *n.* हस्तकौशल्य *n.* कारागिरी *f.*

Handle (hand'l) [A. S. *handlian –hand*, hand.] *v. t.* *to touch, hold, or use with the hand* हातानें स्पर्श करणें, हात -बोट लावणें, हातांत घेणें -धरणें, हातानें वापरणें. २ *to manage* (often, *skilfully*) (चतुराईनें) वापरणें, वहिवाटणें, उपयोग करणें. ३ *to accustom to the hand* (वारंवार हात लावून) वहिवाटींत -राबत्याखालीं आणणें, सराव करणें -पाडणें. ४ *to receive and transfer*, (hence) *to buy and sell* देवघेव करणें, खरेदी विक्री करणें. ५ *to practise, to make a business of* अभ्यासणें, आचरणें, धंदा करणें, व्यासंग करणें. ६ *to treat* (well or ill) वागविणें, (-शीं) वर्तन ठेवणें. ७ *to discourse on, to discuss* (एखाद्या) विषयावर लिहिणें -बोलणें, प्रतिपादन करणें, ऊहापोह करणें, वाटाघाट करणें, घोळणें, घाटणें. H. *v. i.* हातांचा उपयोग करणें. २ चांचपणें (Psalm cxv, 7). H. *n.* *that part of anything which is held in the hand* दांडा *m.* मूठ *f.* मुष्टि *f.* कान *m.* २ (*fig.*) *that of which use is made, a tool* साधन *n.* करण *n.* उपकरण *n.* हत्यार *n.* साहित्य *n.* [To GIVE A H. प्रसंग -संधि -साधन देणें.] Hand'led *pa. t. & p. p.* Hand'ler *n.* Hand'ling *pr. p. & v. n.*

Handsel, Hansel (hand'sel, han'-) [A. S. *handselen –hand*, hand, and *sal*, bargain; akin to *sellan*, to give.] *n.* *money for something sold (given) into the hands of another, the first sale or using of anything* भवानी *f.* बोहणी *f.* प्रथमविक्रय *m.* पहिली विक्री *f.* २ *the first present sent to a young woman on her wedding day* (लग्नाचे दिवशीं) नवरे मुलीस पाठविलेली प्रथमभेट *f.* H. Monday (पाश्चात्य लोकांतील) नूतन वर्षाचा पहिला सोमवार *m.* चाकर-नोकर व मुलें इ॰कांस बक्षिसें वांटण्याचा दिवस *m.* H. *v. t.* *to give a handsel* बक्षीस देणें, भेट पाठविणें. २ *to try experimentally* बोहणी करणें, मुहूर्त करणें, (कोणत्याही गोष्टीचा) प्रारंभ करणें. Hand'seled *or* Hand'selled *pa. t.* and *p. p.* Hand'seling *or* Hand'selling *pr. p.* and *v. n.*

Handsome (hand'sum, *or* han'-) [*Hand*, and affix *-some*. It, at first, meant 'dexterous.' Cf. Dut. *handzaam*, easily handled, and Eng. *handy*. या शब्दाचा मूळ अर्थ 'कुशल, चतुर, वाकबगार, ठीकसर, सोयीचा, बेतवार,' असा होता. परंतु सध्यां तो लुप्त झाला आहे.] *a.* *good-looking, having a pleasing expression or appearance* (expressing more than *pretty*, and less than *beautiful*) देखणा, सुंदर, रूपवान्, रूपस, गोजिरा, गोजिरवाणा, गोंडस, राजस, शोभिवंत, सुशोभित. २ *graceful, becoming, appropriate* योग्य, युक्त, उक्त, लायक, जोगा, जोगता, प्रसंगानुसारी, प्रासंगिक. ३ *liberal, generous* उदार, उमदा, थोर, महाशय, महानुभाव, सढळ; as, "H. is that H. does." [To DO THE H. THING *to act liberally* थोरपणानें -उदारपणानें वागणें.] ४ *ample, moderately large* पुष्कळ, विपुल, बराचसा, पाहिजे तितका, पुरेसा. Hand'somely *adv.* सुरेखपणानें, सुंदरपणें. २ *naut.* काळजीनें, काळजीपूर्वक. Hand'someness *n.* सौंदर्य *n.* सुरेखपणा *m.* सौष्ठव *n.* खुमास *f.*

Handy (hand'i) [see Hand.] *a.* *dexterous, adroit* हाताचा कुशल, कुशळ हाताचा, हस्तपटु, क्रियाकुशल, सुघट, हरकामी. २ *ready to the hand, near* हाताशीं -हाताजवळ (तयार), हुकमी, तावडतोब मिळण्या-सारखा. ३ *convenient* आटोपसर, बेताचा, बेतसर, सोईचा, सोईवार, लहानसर; as, "A H. volume." ४ *naut. obedient to the helm* (said of a ship) सुकाणूनें सहज फिरवितां येण्यासारखें (जहाज). Handy-dandy *n.* *a child's-play* (मिटलेल्या मुठींत काय आहे तें ओळ-खण्याचा पैज लावून खेळण्याचा) मुलांचा खेळ *m.* 'जिंकजिंक पोरा कोणत्या हातीं खडा' हा खेळ *m.* २ (hence) *forfeit* हार *f.* Handy-fight *n.* *boxing* हातपिटी *f.* मुष्टियुद्ध *n.* हातांचें युद्ध *n.* Handy-gripe *n.* *seizure by, or grasp of, the hand* हस्तग्रह *m.* २ (also) *close quarters in fighting* (युद्ध चालू असतां पडलेले) सैन्याचे जवळ जवळ तळ *m. pl.* Hand'y-stroke *n.* ठोंसा *m.* गुद्दा *m.* बुक्की *f.* Hand'ily *adv.* कुशलतेनें. २ सोईनें. Hand'iness *n.* सुगराई *f.* हातोटी *f.* हस्तकौशल्य *n.*

Hang (hang) [A. S. *hangian*, causal form of *hon*, *pa. p.* *hangen*, to hang.] *v. t.* *to suspend* (often with *up* or *out*) टांगणें, खालीं सोडणें, खुंटीला लावणें, (in a way to admit of free motion) लोंबत ठेवणें, लोंबवणें, लटकावणें. २ *to put to death by suspending by the neck* (a form of capital punishment) फांशीं देणें, फांशी -फांसावर चढविणें, गळफांस लावणें, फांस घालून मारणें. ३ *to decorate* (as a wall) *by hanging pictures &c.* चित्रें इ॰ टांगून (भिंत) सुशोभित करणें -मढवणें, (भिंतीवर) चित्रें टांगणें -लावणें. To H. down (as the head) खालीं घालणें. To H. fire *mili.* (बंदुकींतील दारू) लवकर पेट न घेणें. २ रखडत पडणें. H. *v. i.* *to be suspended or hanging* लटकणें, लोंबणें, टांगलें जाणें, खालीं सुटणें, (loosely) लोंबत -लटकत राहणें, ओळकंबणें, हिलगणें. २ (*R.*) *to die or be put to death by suspension from the neck* फांशीं जाणें, फांशीच्या शिक्षेनें मरणें, फांस लागून मरणें. ३ *to hold or rest for support, to depend* (usually with *on* or *upon*) अवलंबून असणें -राहणें; -a person (-च्या) कच्छपीं -कांसेस लागणें, आश्रय धरून असणें;—a matter अडकून

राहणें, गुंतणें. ४ *to hover or impend* ( usually with *over* ) (-वर, -भोंवतीं) घिरट्या घालणें. ५ *to be in suspense, to linger* लोंबत पडणें -राहणें, भिजत पडणें, लांबणीवर पडणें -जाणें, तहकूब राहणें. ६ *to drag* रडतखडत चालणें -जाणें. To H. around रिकामपणीं भटकणें -हिंडणें, रेंगाळणें, घोंटाळणें, गमणें, रमणें. To H. back कच खाणें, कांकूं करणें, कचरणें, घोटाळणें, मागें पाय ठेवणें. To H. by a thread (-ची) कठीण अवस्था असणें *in. con.* To H. by the eyelids केंसावर -केंसासारख्या आधारावर लटकून राहणें, (-ला) निमित्तमात्र आधार असणें *in. con.* २ अर्धवट -अपुरा राहणें. To H. on (with the emphasis on the preposition) *to hold fast, to be persistent* (as a disease) मिठी न सोडणें, धरून बसणें. To H. on the lips, words, &c. शब्दाला फसणें, वक्तृत्वाला मोहिला जाणें, वक्तृत्वानें मोहित होणें, वक्तृत्वाला भुलणें. To H. out *to project* पुढें येणें, डोकावणें. २ न ऐकणें, हेका न सोडणें, कबूल न करणें; as, "The juryman *hangs out* against an agreement." To H. over, See Hang *v. i.* To H. to (-ला, -शीं) चिकटणें. To H. together जुटीनें -एकमतानें असणें -राहणें; as, "We are all of a piece; we *hang together*." २ *to be self-consistent* (-ला) ताळा -मेळ -जम बसणें, आत्मसंबद्ध असणें; as, "The story does not *hang together*." To H. up one's hat आपलें घर असें मानून वागणें, परकी भाव न ठेवणें, घरोब्यानें राहणें. To H. upon सानुराग दृष्टीनें पाहणें, प्रेमदृष्टि ठेवणें. २ *mili.* टेहाळणी करणें, (-च्या) भोंवतीं भोंवतीं असणें. H. *n.* लटकणी *f*, लोंबकळ *f*. २ ( *colloq.* ) *connection, arrangement* संबंध *m*, जम *m*, रचना *f*, अन्वय *m*, मांडणी *f*, जुळणी *f*, जोड *m*. [To GET THE H. OF (-ची) रचना -जुळणी समजणें, (-ची) संवयी लागणें, (-चा) रावता पडणें.] ३ ( *colloq.*) *steep declivity* झुकाव *m*, कठीण चढ *m* -उतरण *f*. H.-by *n.* (in contempt) *a dependent* आश्रित, परावलम्बी -परोपजीवी मनुष्य. H.-dog *n.* नीच -हलकट -पाजी मनुष्य. H.-dog *a.* पाजी. Hang'ed *or* Hung *pa. t.* and *p. p.* (the former is preferable to the latter, when reference is had to death or execution by suspension, and it is also more common). Hang'er *n. a hangman*, which see. २ ज्याला वस्तु अडकवितात किंवा टांगतात तें (उ. खुंटी, कमरेचा पट्टा.). Hang'er-on *n.* ( *pl.* Hangers-on ) *a dependent* आश्रित. [IDLE H. पंक्तिवारगीर, भोजनभाऊ.] Hang'ing *pr. p.* and *v. n.* फांशीच्या शिक्षेचा सूचक; as, "A H. face." २ वस्तु अडकवून -टांगून ठेवण्यासारखा. H. *n.* झालर *f*. H. garden झुलती बाग *f*, कृत्रिम उंचवट्यावरची बाग *f*. H. lamp टांगदिवा *m*. H. wall खाणींत काम करणाऱ्याच्या डोक्यावर येणारा बोगद्याचा भाग *m*. H. *n.* लोंबत ठेवणें *n*, लोंबणें *n*, लटकणें *n*. २ फांशीची शिक्षा *f*, फांसावर चढवून आलेला मृत्यु *m*. ३ ( chiefly in *pl.*) झालर *f*. Hang'-man *n. pl.* Hangmen ( sometimes used as a term of reproach, without reference to office ) फांशीं देणारा मनुष्य *m*, मांग *m*, डोंब *m*, चांडाळ *m*, दंडपाशिक. Hang'manship *n.* Hang'nail *n.* (नखाचा) नर *m*. Hang'nest *n.* पिशवीप्रमाणें झाडांस लटकणारें पक्ष्याचें घरटें *n*. २ *a hang-bird* झाडांस लटकणारीं घरटीं बांधणारा पक्षी *m*.

Hank ( hank ) [ Probably from *Hang*, which see. Icel. *hanki*, cord; Ger. *henkel*, a handle, *henken*, to hang. ] *n. two or more skeins of thread tied together* कमींत कमी दोनशें चाळीस चार लांब सुताची लडी *f* -आटी *f* -मुठा *m* -मुठी *f* -कुकडें *n* -पाष्ट *n* -गुंडा *m*. हिंदुस्थानांत बहुतकरून एका हँक (hank) मध्यें आठशें चाळीस वार लांब सूत असतें. एका स्कीन-(skein) मध्यें एकशेंवीस वार लांब सूत असतें. २ *hold, influence* वजन *n*, दाब *m*, दरारा *m*, जरब *f*, धास्ती *f*, भीति *f*. ३ *naut.* शिडाच्या टोंकाच्या दोरीचें नाक *n*. H. *v. t.* (सुताचीं ठराविक लांबीचीं) कुकडीं करणें.

Hanker (hangk'-er,) [ A frequentative of *Hang*, in the sense of 'to hang on.' Cf. Dut. *hunkeren.* ] *v. i. to long for with eagerness and uneasiness* ( usually with *for* or *after* ) छंद घेणें, सोस लागणें -घेणें, (-च्या साठीं) जीव टांगला जाणें, (-ची) तहान लागणें. २ *to linger in expectation* लाळ घोटीत राहणें, आशाळभूतपणानें राहणें -असणें. Han'kered *pa. t.* and *pa. p.* Han'kering *pr. p.* and *v. n.* छंद *m*, सोस *m*. Han'keringly *adv.* आशाळभूतपणानें.

Hap ( hap ) [ Icel. *happ*, unexpected good luck. ] *n. chance, accident, casual event, luck* अकस्मात् -अवचित -एकाएकीं -ध्यानीं मनीं नसतांना घडून आलेली गोष्ट *f*, दैवयोग *m*, दैव *n*, नशीब *n*, प्रारब्ध *n*, यदृच्छा *f*. Hap'hazard *n.* दैवाधीन गोष्ट *f*. Hap'less *a. unfortunate, unlucky* हतभागी, भाग्यहीन, हतदैव, दैवहीन, दुर्भागी, दुर्दैवी, कमनशिबाचा -नशिबी, फुटक्या नशीबाचा. Hap'lessly *adv.* Hap'ly *adv. perhaps, by chance* कदाचित्, प्रसंगवशात्. Hap *v. i. to happen*, which see below. Hap'pily *adv. fortunately, luckily* सुदैवानें, नशीबानें, दैवबलानें. २ *in happy circumstances* सुखांत, यथासुख, आनंदांत, आनंदानें, मजेनें. ३ *gracefully, felicitously, with success* खुबीनें, चातुर्यानें, मोठ्या मौजेनें, कौशल्यानें, हातोटीनें. Hap'piness *n. good fortune, prosperity* सुदैव *n*, सुभग *n*, सौभाग्य *n* (*lit.*), चांगलें नशीब *n*, थोर नशीब *n*, भरभराट *f*, उत्कर्ष *m*, संपन्नावस्था *f*, श्रेय *n*. २ *an agreeable feeling or condition of the soul arising from good fortune or propitious happening of any kind, contentment, felicity* सौख्य *n*, सुख *n*, आनंद *m*, सुखावस्था *f*, समाधान *n*, निर्वृति *f*, परमसंतोष *m*, खूप मन *n*. ३ *unstudied grace* (used especially of language) स्वाभाविक लावण्य *n* -मजा *f* -गोडी

*f*, नैसर्गिक -स्वाभाविक खुबी *f.* (भाषा-) सौंदर्य *n.* Hap'py *a. lucky, fortunate* भाग्यवान्, दैववान्, सुखप्रद, सुखदायक, सुखकर, सुखावह, यशस्वी, आनंदमय, शुभकारी, शुभावह, कल्याणकारी. २ *enjoying good of any kind as peace, tranquillity, comfort; contented* सुखी, समाधानी, सुखरूप, कुशल, खुशाल, क्षेमवान्, सानंद, आनंदी, संतोषी, उल्लासवृत्ति, आनंदवृत्ति, प्रसन्न, खूष. ३ *blessed* सुखी, धन्य, प्राप्तार्थ; as, "H. soul." ४ *able* समर्थ, क्षम. ५ *dexterous, felicitous, apt* सुगर, कुशल, दक्ष, हुषार, चतुर, खुबीदार, मौजेचा. ६ *propitious* शुभ, मंगल, भद्र (omen). H. family *a collection of animals of different propensities living peaceably together in one cage* (निसर्गतः -जन्मतः एकमेकांशीं हाडवैर असलेले परंतु एकाच पिंजऱ्यांत कोंडून ठेविल्यावर स्नेहभावानें) एकत्र नांदणारे प्राणी *m. pl.* २ (used ironically of) *conventional alliances of persons who are in fact mutually repugnant* (पूर्वापार चालत आलेली) नांवाची दोस्ती *f.* Happy-go-lucky *a. improvident, easy-going* दूरवर विचार न करतां -होईल तें होईल असें म्हणूत वागणारा, ढकलपंचीचा.

Happen (hap'n) [O. E. *happenen.* See Hap.] *v. i. to come by chance, to fall out* (दैवानें) घडणें, अकस्मात् -एकाएकीं -अचानक प्राप्त होणें -घडणें उद्भवणें, भोंवणें. २ *to occur* घडणें, घडून येणें. To H. on *to meet with, to fall or light upon* आढळणें *in. con. with* ला *of s.*, नजरेस येणें *in. con. g. of. s.* To H. in (*colloq.*) *to make a casual call* एखादे वेळेस भेटणें, कधीं कधीं -वेळप्रसंगीं भेट घेणें. Hap'pened *pa. t.* and *p. p.* Hap'pening *pr. p.* and *v. n.*

Hap'piness *n.* } See under Hap.
Hap'py *a.* }

Harangue (ha-rang') [Fr. *harangue,* from O. Ger. *hring* (Ger. *ring,* A. S. *hring*), a ring, a ring of people assembled.] *n. a. loud speech addressed to a multitude* (मोठ्या जनसमूहापुढें केलेलें) आवेशयुक्त भाषण *n*, मोठ्या सभेपुढें शिरा ताणून केलेलें -अलंकारात्मक भाषण *n.* २ (in a bad sense) *ranting, a popular pompous address* बडबड *f*, टकळी *f*, व्यर्थ भाषण *n*, शिरा ताणून बोलणें *n*, शिरा ताणणें *n.* H. *v. i. to deliver a harangue* लोकसमुदायापुढें (आवेशयुक्त) भाषण करणें. H. *v. t. to address by a harangue* (-पुढें) भाषण -बडबड करणें, आवेशाचें व्याख्यान झोडणें. Harang'ued *pa. t.* and *p. p.* Harang'ueful *a.* Harang'uer *n.* (आवेशयुक्त) भाषण करणारा, सणसणीत व्याख्यानें झोडणारा. Harang'uing *pr. p.* and *v. n.*

Harass (har'as) [Fr. *harasser;* prob. from O. Fr. *harer,* to incite a dog, from the cry *har,* made in inciting a dog to attack.] *v. t. to fatigue to excess* दमवणें, भागवणें, कष्टी करणें, श्रमविणें, श्रमी करणें, कष्ट -श्रम देणें. २ (esp.) *to weary by importunity* बेजार करणें, जिकिरीस आणणें, सतावणें, भंडावणें, सतावून -भंडावून सोडणें, नको नको -पुरेसें करणें, पिच्छा पुरविणें, छळणें. ३ *to annoy or torment* (an enemy) (शत्रूवर वारंवार व अकस्मात् घाले घालून) जेरीस आणणें, गांजणें. Har'assed *pa. t.* and *p. p.* Har'asser *n.* कष्ट देणारा. २ छळणारा. ३ जेरीस आणणारा. Har'assing *pr. p.* and *v. n.* Har'assment *n. —the act.* कष्ट *m. pl.* देणें *n.* २ छळणें *n.* ३—*the state* छळणूक *f*, छळ *m*, गांजणूक *f.*

Harbinger (här'bin-jėr) [M. E. *herbergeour* -Fr. *auberge.* See Harbour. या शब्दाचा मूळ अर्थ "पुढें जाऊन जागा पाहून तयारी करणारा" असा होता.] *n. a forerunner* अग्रदूत *m*, जासूद *m.* २ *a precursor* (as of spring, &c.) आगमसूचक. H. *v. t. to precede as a harbinger, to usher in* (-ची) आगमसूचना देणें; as, "Thus did the star of religious freedom H. the day." Har'bingered *pa. t.* and *p. p.* Har'bingering *pr. p.* and *v. n.*

Harbour (här'-bėr) [M. E. *herberwe;* prob. through O. Fr. *herberge* -O. Ger. *hereberga,* a military encampment -*heri,* and *bergan,* to shelter.] *n. any refuge or shelter* आश्रय (*pop.*) आसरा *m*, आश्रयस्थान *n*, थारा *m*, उभें राहण्याला जागा *f* (*colloq.*). २ *a port for ships, a haven* (गलबतें नांगरण्याचें) बंदर *n*, नांगरवाडा *m.* [FLOATING (i. e. *deep-water*) H. तरतें बंदर *n.* OPEN H. वाहतें बंदर *n.* THE SPACE OPPOSITE TO THE MOUTH OF A H. वारा *m.* H. DUES बंदरजकात *f*, बंदरफी *f.* H. WATCH (गलबत नांगरून पडलें असतां ठेवलेला) बंदरपहारा *m.*] ३ (*glass-work*) *a mixing box for materials* (कांचेच्या कारखान्यांतील) मिश्रणपात्र *n.* H. *v. t. to lodge, to shelter, to protect* (-ला) आश्रय *m* -थारा *m* देणें. २ (तुफानापासून गलबताचा) बचाव करणें, नांगरणें. ३ *to cherish, to entertain* (as thoughts, in the mind) (मनांत) बाळगणें -ठेवणें, धरणें, राहूं देणें, थारा देणें. H. *v. i. to take shelter* (as in a harbour) आश्रय करणें. २ (बंदरांत) कांहीं वेळ राहणें -थोडा मुक्काम करणें, बंदर करणें, नांगर टाकणें. Har'boured *pa. t.* and *p. p.* Har'bourer *n.* आश्रयदाता *m.* २ मनांत बाळगणारा -ठेवणारा. Har'bouring *pr. p.* and *v. n.* Har'bourless *a.* निराश्रित, निराधार. Harbour-master *n.* बंदरमास्तर *m*, बंदराचा मुख्य अधिकारी *m.*

Hard (härd) [A. S. *heard,* Dut. *hard.* Allied to Gr. *kratys,* strong.] *a. firm, solid, compact* (applied to material bodies, and opposed to *soft*) कठीण, टणक, ताठ, राठ, दृढ, निबर, चिकट, चिंवट, कणखर, (as wood, stone, apple, &c.). २ *difficult:* (a) (-to the mind) कठीण, अवघड, बिकट, गहन, दुर्बोध, दुर्ज्ञेय; as "A H. problem." (b) (-to accomplish)

कठीण, अवघड, मुष्किलीचा, दगदगीचा, दुष्कर, दुःसाध्य; as, "A H. task." (c) (-to bear) कठीण, दुःसह, असह्य, कडक, कडकडीत, जबर; as, "H. winter; H. terms, H. times." (d) (-to control) कठीण, अनिवार्य, दुर्धर, जबरदस्त, प्रबळ; as, "The stag was too H. for the horse." (e) (to please or influence) *obdurate, unfeeling, cruel* कठीण, कठोर, निर्दय, निष्ठुर, परुष, पाषाणहृदय, (दुसऱ्याचें) शहाणपण चालूं न देणारा; as, "A H. master or character." २ *unjust, oppressive* कठीण, गैरवाजवी, जुलमी, जुलमाचा. ३ *rough* (as food), *sour* (as liquors) जाडा, भरडा, जाडा भरडा, रुक्ष, रुखा, कडक, आंबट, तल्लख (मद्य). ४ (*Pron.*) (said of certain consonants, as *c* in *come*) कठोर (व्यंजन). ५ *harsh* कठोर, कर्णकटु; as, "A H. tone." H. coal कठीण कोळसा *m.* H. and fast *naut.* न हालेसें, जमिनीशीं (पाण्याच्या तळाशीं) लागून बसलेलें. H. lines कठीण प्रसंग *m* -दिवस *m. pl.* H. money *coin or specie* रोकड *f*, नाणें *n*, रोख पैसा *m.* H. pan (*fig.*) *the fundamental part of anything* आधारभूत गोष्ट *f*, पाया *m.* H. water *chem. water which contains lime or some mineral substance rendering it unfit for washing* जड किंवा कठीण पाणी *n*, कठिनजल *n.* In H. condition *in excellent condition for racing* (said of race horses) शर्यतीला योग्य -लायक, कडक, तल्लख. H. *adv. with urgency, diligently* मेहनत करून, कष्टानें, आयासानें, मोठ्या प्रयासानें, श्रमानें, मेहनतीनें, शिकस्तीनें, काळजीपूर्वक, जीव लावून -तोडून. २ *with difficulty* मोठ्या मुष्किलीनें, कसाबसा, कष्टानें, कसातरी, प्रयासानें, ढकलत ढकलत; as, "The vehicle moves H." ३ *so as to raise difficulties* अडचण उपस्थित करणारा -करण्यासारखा; as, "The question is H. set." ४ *violently, vehemently,* (hence) *rapidly* झपाटून, झपाट्यानें, सपाटून, सपाट्यानें, जोरानें, रगडून, सोसाट्यानें, बेदम, बेसुमार, जलदीनें; as, "To rain or run H." [To KEEP H. AT ताणणें, चरकीं -चरकावर धरणें.] ५ *close, near* जवळ, नजीक, संनिध, पाशीं, लगत. H. BY अगदीं जवळ, जवळच, हाताशीं, कानाशीं.] H. pushed or run (for money) (पैशासंबंधीं) तारांबळ झालेला, धांदल उडालेला, गाळण झालेला -उडालेला. H. up निकडींत, पंचाइतींत, अडचणींत, प्रसंगांत. To die H. *to die only after a desperate struggle for life* निरुपाय होऊन -धडपडून धडपडून मरणें. H. *n. a ford or passage across a river or swamp* (नदींतून किंवा दलदलीच्या भागांतून पलीकडे) उतरून जाण्याची वाट *f*, उतार *m.* Hard'en *v. t. to make hard or harder* कठीण -बळकट -मजबूत -घट्ट -दृढ -सुदृढ करणें, घट्टपणा आणणें, गोठवणें. २ *to strengthen, to inure* बळकट -घट्ट -सुदृढ करणें, घटवणें, बनवणें, तयार करणें, (-ची) संवय लावणें. ३ *to confirm in wickedness* निरढवणें or निरडवणें, पुरढवणें, निर्लज्ज-कोडगा बनवणें; as, "H. not your heart." H. *v. i.* दृढ -कठीण -घट्ट होणें, गोठणें, दृढावणें. २ (bodily) दृढ -मजबूत -कठीण होणें, बनणें, कसणें, घटणें, जमणें, (in a bad sense) निरढणें or निरडणें, पुरढणें, निपटणें, पुरा बनणें, तयार होणें. ३ (a fruit, boil &c.) दाठरणें, जारटणें. Hard'ened (*pa. t.* and *p. p.*) *a.* कठीण केलेला, घट्ट झालेला. २ घटलेला, घटींव, घोटींव. ३ *confirmed in error or vice* (दुष्कर्मांत) निरढवलेला, निरडलेला, पुरढलेला, निपटलेला. ४ जारटलेला, जारट. Hard'ener *n.* कठीणपणा -ताठपणा आणणारा. २ (*specif.*) *one who tempers tools* हत्यारांना पाणी देणारा. Hard'ening *pr. p.* and *v. n. making hard or harder* कठीण -जास्त कठीण करणें *n.* २ *that which hardens* (as a material used for converting the surface of iron into steel) (हत्यारांना) पाणी देण्याचें द्रव्य *n.* Hard'er *compar. a.* Hard-favoured, H.-visaged *a.* रांकट, राठ, राठ शरीराचा -तोंडावळ्याचा, उग्र. Hard'-favouredness *n.* (शरीराचा -तोंडावळ्याचा) राठपणा *m*, रांकटपणा *m.* Hard'-featured *a.* Same as above. Hard'-fisted *a. having hard or strong hands* (as a labourer) ताठ, रांकट, राठ, कणखर, बळकट, ताकदवान, सशक्त, मजबूत, भक्कम (गडी). २ *covetous* लोभी, चिकट, कंजुष, कृपण, कवडी न सोडणारा, कवडीचुंबक. Hard'-fought *a.* निकरानें लढलेली (लढाई *f*), निकराचा, घनघोर (संग्राम *m*), तुमुल pop. तुंबळ (रण *n* -युद्ध *n*). Hard'-handed *a.* See Hard-fisted *a.* Hard'-headed *a. sagacious, shrewd* चलाख डोक्याचा, तीव्रबुद्धि, कुशाग्रबुद्धि, चाणाक्ष, दक्ष, अति तल्लख. Hard'-headedness *n.* Hard'-hearted *a.* निष्ठुर, पाषाणहृदयी, कठीण -कठोर मनाचा, निर्दय, कठिनहृदय. Hard'-heartedness *n.* कठोरपणा *m*, निष्ठुरपणा *m*, निष्ठुरता *f*, नैष्ठुर्य *n*, &c. Hard'ihood *n. bravery, intrepidity* धिटाई *f*, धारिष्ट *n*, धीटपणा *m*, छाती *f*, हिंमत *f*. २ बळकटपणा *m*, कणखरपणा *m*, बळकटी *f*, ताकद *f*, सहनशक्ति *f*. ३ *audaciousness, impudence* धृष्टता *f*, धार्ष्ट्य *n*, बेमर्यादपणा *m*, अमर्यादपणा *m*, साहस *n.* Har'dily *adv. boldly* धिटाईनें, धीटपणानें. Har'diness *n.* कणखरपणा *m.* २ *capability of endurance* सोशिकपणा *m*, सहनशक्ति *f.* Hard'ish *a.* Hard'-laboured *a.* प्रयासानें साधलेला -केलेला. Hard'ly *adv. with difficulty* कष्टानें, मुष्किलीनें, प्रयासानें, सायासानें, श्रमानें, मोठ्या जुलमानें. २ *unwillingly* नाखुषीनें, कसाबसा, जुलमावर, जिवावर येऊन. ३ *scarcely* क्वचित्, विरळा, नाहींच म्हटलें तरी चालेल अशा बेतानें. *N. B.*:—The sense is often idiomatically expressed by the reduplication of a verb; as, मी घरास पोंहचलों न पोंचलों इतक्यांत पाऊस आला = I had *hardly* got home when the rain came. ४ *harshly, roughly* कठोरपणानें, निष्ठुरतेनें. Hard'-mouthed *a. not sensible to the bit* (said of a horse) लगामीस न जुमानणारा

घोडा), न आंवरणारा, तुफान, बेफाम. Hard'ness *n.* (*lit.* or *fig.*) कठिणपणा *m*, काठिन्य *n*, कठोरपणा *m*, कणखरपणा *m*, टणकपणा *m*, टणकाई *f*, चिंवटपणा *m*, दृढपणा *m*, दृढता *f*, दार्ढ्य *n*, &c. २ दुर्ज्ञेयता *f*, दुर्बोधता *f*. ३ दुस्साध्यता *f*. ४ *chem. the peculiar quality exhibited by water which has mineral salts dissolved in it* जडता *f*, काठिन्य *n*. ५ (पैशाची) चणचण *f*, चडचड *f*. Hard'-ship *n. that which is hard to bear* (as privation, toil, &c.) संकट *n*, कठीण -अवघड -जड गोष्ट *f*, ओझें *n*. २ जाच *m*, कष्ट *m. pl.*, श्रम *m. pl.*, हाल *m. pl.* [To SUFFER HARDSHIPS कष्ट सोसणें, हाल -जाच काढणें.] Hard'ware *n. ironmongery* लोखंडी (जड) सामान *n*. Har'dy *a. stout, strong* टणक, मजबूत, कणखर, बळकट, लोखंडी (constitution), रांकट, राठ, चिकट, काटक, धडधाकड, भक्कम. [HARDY AND IRON FRAME वज्रदेह *m*, वज्रशरीर *n*.] २ *bold* धीट, धाडशी, धारिष्टवान्, हिंमती; as, "Hap favours the H. man." ३ (in a bad sense) *shameless* निर्लज्ज, कोडगा, बनलेला, निरढवलेला.

Hards (härdz) [A. S. *heordan*, hards.] *n. pl. the refuse or coarse part of flax* तागांतील कचरा *m*.

Hare (hār) [A. S. *hara*, Dut. *haas*, Ger. *hase*, Sk. शश.] *n.* ससा *m*, खरगोस *m*, शश *m*, शशक *m*. २ *astron. Lepus* ससा *m*, शशकतारकापुंज *m*. H. and hounds दौडपकडीचा खेळ *m*, सशाकुत्र्यांचा खेळ *m*. या खेळांत दोन गडी सशांप्रमाणें पुढें धांवावयास लागून बाकीचे शिकारी कुत्र्यांप्रमाणें त्यांचा पाठलाग करितात. Hare'-brained *a. having or showing no more brains or sense than a hare, reckless, heedless* उरफाट्या काळजाचा, निधड्या छातीचा, अविमृश्यकारी. Hare'-hearted *a. timorous, timid* भितरा, भागुबाई, लंडी, बायको (*fig.* and *colloq.*). Hare'-hound *n.* ससेपारधी कुत्रा *m*. Hare'lip *n. a fissure in one or both lips, generally the upper lip, like that of a hare* रावखंडा ओंठ *m*, तुटका -फाटका ओंठ *m*. Hare'-lipped *a.* रावखंडा, रांवा, ओंठतुटका. To hold with the hare and run with the hounds *to be with both sides at once* दुटप्पी वर्तन ठेवणें, धरसोड करणें.

Harem (hā'rem) [Ar. *haram*, anything forbidden —*harama*, to forbid.] *n.* (written also *haram* and *hareem*) *the portion of a (Muhammedan) house allotted to females* जनानखाना *m*, अन्तःपुर *n*, स्त्रीगृह *n*, अवरोध *m* (Sk.). २ *the family of wives and concubines belonging to one man* जनाना *m*, अन्तःपुरांतील स्त्रिया *f. pl.*, कबिला *m*, परिग्रह *m*.

Hark (härk) [O.E. *herken*. See Hearken. Now rare except in the imperative form used as an interjection, *Hark!* listen.] *v. i. hearken*, which see. ऐका! ऐक! To H. back *to go back for a fresh start* (पुन्हां सुरवात करितांना) मूलपदावर येणें, पहिल्या ठिकाणावर येणें. Hark'en *v. t.* & *i.* ऐकणें.

*N. B.*—*Hark* is now rarely used as a verb except in the imperative form used as an interjection.

Harlequin (här'le-kwin or -kin) [Fr. *arlequin*, formerly written also *harlequin*, prob. the same as O. Fr. *Hellequin*, a devil in medieval legend. याचा मूळ अर्थ '(इटालिअन) प्रहसनांतील थट्टेखोर पात्र' असा होता.] *n. a buffoon, a merry-andrew* विदूषक *m*, मस्कऱ्या *m*, वैहासिक *m*. H. *v. i. to make sport by playing ludicrous tricks* (वेडगळ चेष्टा करून) मस्करी करणें -गंमत दाखविणें. H. *v. t. to conjure away* नजरबंद करून लांब नेणें -दूर करणें. Har'lequinade *n.* ज्यांत विदूषकाचें काम पुष्कळ असतें असा खेळ *m*, विदूषकप्रधान प्रहसन *n*.

Harlot (här'lot) [O. Fr. *arlot*, *herlot*, a base fellow. Of uncertain origin; perhaps from O. H. Ger. *kerl*. या शब्दाचा मूळ अर्थ "हलक्या -नीच कुळांतील" किंवा "हलकट वर्तनाचा, लफंगा, भामट्या" असा होता. परंतु हल्लीं त्या अर्थीं याचा उपयोग करीत नाहींत.] *n. a prostitute* कसबीण *f*, वेश्या *f*, रांड *f*, रंडी *f*, गणिका *f*, वारांगना *f* (Sk.), पण्यांगना *f* (Sk.), वारवधू *f*, बाजारबसवी बायको *f*, कलावंतीण *f*, कंचनी *f*, बाजारीण *f*, बाजारची खाट *f*, वेसवा *f*, रूपाजीवा *f*, मालजादी *f*, उष्टी पत्रावळ *f*. २ *strumpet* छिनाल स्त्री *f*, व्यभिचारिणी *f*, कुलटा *f*, असती *f*, असाध्वी *f*, शिनळ -शिंदळ बायको *f*. H. *a. wanton, lewd* उनाड, छिनाल. H. *v. i.* कसबिणीचा धंदा करणें. २ शिंदळकी करणें. Har'lotry *n. prostitution* वेश्यावृत्ति *f*, कसबिणीचा धंदा *m*. २ *lewdness* छिनाली *f*, शिनळकी *f*, शिंदळकी *f*. ३ *anything meretricious* बाह्यरुचिर -दिखाऊ वस्तु *f*, दिखाऊपणा *m*, बाह्यशोभा *f*, बाह्यरुचिरता *f*.

Harm (härm) [A. S. *hearm*, akin to Ger. *harm*, grief; cf. Sk. श्रम, toil, fatigue.] *n. injury* इजा *f*, दुखापत *f*, अपकार *m*, उपद्रव *m*, अपाय *m*, पीडा *f*, दुःख *n*. २ *damage, detriment* नुकसान *n*, नुकसानी *f*, नाश *m*, हानि *f*, क्षति *f*, खराबी *f*. [WHAT H. DOES IT DO TO YOU? त्यांत तुझें काय जातें?] ३ *moral wrong* दोष *m*, अपराध *m*, पाप *n*, गुन्हा *m*. H. *v. t. to injure* दुखापत -अपकार करणें, दुःख देणें, उपद्रव करणें -देणें. २ *to damage* (-चें) नुकसान -हानि करणें. ३ *to wrong* गुन्हा -अपराध करणें *g. of s.* Harm'ed *p. t.* and *p. p.* Harm'ful *a.* अपायकारक, अपकारक. २ घातुक, नुकसान करणारा. Harm'fully *adv.* Harm'fulness *n.* Harm'ing *pr. p.* and *v. n.* Harm'less *a. innocent* गरीब, निरुपद्रवी, बापडा, बापुडवाणा, सालस. २ *unhurt* शाबूत, इजा न पोंचलेला, सुरक्षित, सुखरूप. ३ निर्दोष, निरपराध, निष्पाप. Harm'lessly *adv.* Harm'lessness *n.* निरुपद्रवीपणा *m*. २ सुरक्षितपणा *m*, सुखरूपता *f*. ३ दोषराहित्य *n*, निरपराधता *f*.

Harmonic *a.* See under Harmony.

Harmony (här'mo-ni) [Fr. *harmonie* —L. *harmonia*— Gr. *harmonia*—*harmos*, a fitting-arein,

to fit.] *n.* Harmonies. *pl. just adaptation of parts to each other* मेळ *m*, मिलाफ *m*, एकपणा *m*, अनुरूपता *f*, आनुरूप्य *n*, परस्पराविरोध *m*. २ (in facts, opinions &c.) ताळा *m*, मेळ *m*, जम *m*, एकवाक्यता *f*, एकोपा *m*, एकी *f*, ऐकमत्य *n*, अविरोध *m*, अविरोधिता *f*, (मत-) संवाद *m*, मिळतेपणा *m*. ३ *peace and friendship* स्नेह *m*, स्नेहभाव *m*, एकोपा *m*, एकी *f*. ४ (एकाच गोष्टीसंबंधानें प्रतिपादन केलेल्या निरनिराळ्या पत्रांची) सुसंगत जुळणी लावणारा ग्रंथ *m*, संगतिदर्शक -अविरोधदर्शक -ऐक्यदर्शक ग्रंथ *m*. ५ *mus.* (a) स्वरैक्य *n*, स्वरसंवाद *m*, स्वरमेलन *n*, एकतान *m*, स्वरांचा मेळ *m* -जोड *f* -जुळणी *f*. (b) स्वरशास्त्र *n*, स्वरमेलनशास्त्र *n*. Harmon'ic,-al *a. concordant* जुळणीचा, सुसंगत, अविरोधी, संदर्भयुक्त, मेळाचा, जमाचा. २ *harmonious* (a) स्वरमेळाचा, स्वरैक्याचा, स्वैरक्यासंबंधीं, एकतान, समस्वर, मिलाफाचा; (b) मधुर, कर्णमधुर, गोड. ३ *math. having relations or properties bearing some resemblance to those of musical consonances* हरात्मक, समस्वर, गायनात्मक, एकतान, गायनाची (श्रेढी). Harmon'ica *n.* जलतरंग *m*. २ लहान हातवडीनें वाजविण्याची बाजाची पेटी *f*. Harmon'ically *adv. harmoniously* मिलाफानें, एकताननतेनें, एकपणानें. २ *in respect to harmony* स्वरैक्यदृष्ट्या, तालशुद्धीनें. ३ एकतानतेनें. Harmon'ics *n. pl. the doctrine or science of musical sounds* स्वरशास्त्र *n*. Harmo'nious *a. symmetrical* जुळणारा, जुळता, सुसंगत, एका मेळांत वसणारा, एकतान, मिळता. २ *living in peace and friendship, marked by agreement of feeling or sentiment* एकसारखा विचार किंवा एकसारखी भावना असणारा, सलोख्याचा, एकदिलाचा, एकमताचा, सलोख्यानें राहणारा, मित्रत्वाचा. ३ *vocally or musically concordant* एकस्वर, एकतान, एकताल, एकराग. Harmo'niously *adv.* Harmo'niousness *n.* सुसंगतता *f*, ताळा *m*, मेळ *m*, संगति *f*. २ सलोखा *m*. ३ स्वरैक्य *n*, तालसमता *f*. Har'monist *n.* स्वरज्ञानी, स्वरज्ञ. २ *a musical composer* शास्त्रशुद्ध संगीतकार *m*. Harmo'nium *n. a musical instrument in which the tones are produced by forcing air by means of a bellows* (वाजविण्याची) बाजाची पेटी *f*, हारमोनियम *m*. Harmoniza'tion *n.* एका सुरांत आणणें *n*, एकस्वरीकरण *n*, एकतानीकरण *n*, मेळ बसवणें *n*. Har'monize *v. t. to cause to agree* जुळवणें, जुळविणें, जमविणें, जुगवणें, मेळ बसविणें, मिळणी करणें, एकतान -संवादी करणें. २ *mus.* सूर जमविणें, एकसुरांत बसविणें. H. *v. i. to agree* (in action, sense, purport, effect on the mind, &c.) (-शीं) जुळणें, जमणें, जम बसणें *g. of s.* २ *to be in peace and friendship* सलोख्यानें -मिलाफानें -एकमतानें राहणें -असणें, मित्रत्वानें राहणें -नांदणें. ३ *to form a concord* सूर जमणें, एकसूर -एकस्वर होणें. Har'monizer *n.*

*N. B.*:—Note the meanings of the English words: Harmony, Melody, and Rhythm. Harmony =स्वरसंवाद, स्वरैक्य, अनेक विजातीय परंतु रक्तिजनक स्वरांचा एकाच काळीं उच्चार करून तान किंवा चीज गाण्याची किंवा वाजविण्याची पद्धत. ही आर्यसंगीतांत प्रचलित नाहीं. Melody= आलाप. एकाच वेळीं एकाच स्वराचा उच्चार करून तान किंवा चीज गाण्याची किंवा वाजविण्याची पद्धत *f*. Rhythm =लय. तालाची आवृत्ति करून अव्याहत चालणारी मात्रांची गति.

*N. B.*:—Harmonic progression हरात्मकश्रेढी, समस्वरश्रेढी, एकतानश्रेढी, गायनश्रेढी. In Sanskrit श्रेणी is used for श्रेढी. In this connection it should be remembered that Arithmetical progression is गणितश्रेणी or व्यक्तश्रेणी, and that Geometrical progression is भूमितिश्रेणी or गुणोत्तरश्रेणी. In this latter equivalent गुणोत्तर is the Sanskrit equivalent for 'common ratio.' In translating the mathematical terms Harmonic analysis, H. function, H. motion, H. pencil, H. points, H. polar, H. ratio, H. resistance, H. section, and H. system, put either of हरात्मक, एकतान, समस्वर, and गायनात्मक for Harmonic, and पृथक्करण=analysis; फल=function; गति=motion; सूचि=pencil; बिंदु= point; ध्रुव=polar; निष्पत्ति=ratio; प्रतिरोध=resistance; खण्ड=section; संप्रदाय=system. Thus, Harmonic analysis=हरात्मक -एकतान -समस्वर -गायनात्मक पृथक्करण, and so on for other terms.

Harness (här'nes) [O. Fr. *harneis*, Fr. *harnais*, *harnois*, armour. Cf. *Iron.* या शब्दाचा मूळ अर्थ "योद्ध्याचा किंवा घोड्याचा लष्करी सरंजाम -पोषाख" किंवा "उरस्त्राण, कवच" असा होता.] *n. the equipment of a draught or carriage horse* (गाडीच्या घोड्याचा) सरंजाम *m*, ओढ *f*, ओढण *f*, अश्वसामग्री *f*. २ *the part of a loom comprising the heddles, with their means of support and motion, by which the threads of the warp are alternately raised and depressed for the passage of the shuttle* वया (heddles) व त्या खालींवर करण्याचा सरंजाम *m*. To die in H. *to die with armour on* लढतां लढतां मरणें. २ (*hence, colloq.*) *to die while actively engaged in work or duty* शेवटपर्यंत काम करीत असतां मरणें. H. *v. t. to equip or furnish for self-defence* सरंजाम -सामुग्री देणें, स्वसंरक्षणाची तयारी करून देणें. २ *to make ready for draught* सरंजाम घालणें, (गाडीला) जुंपावयास तयार करणें, खोगीर चढविणें. Har'nesser *n.* Har'ness-cask *n. naut.* (called also *harness tub*) (गलबतावरील) खलाशांचे खाण्याचे खारे पदार्थ ठेवण्याचें पिंप *n*.

Harp (härp) [A. S. *hearpe*, Ger. *harfe.*] *n.* सारंगीसारखें तंतुवाद्य *n*, हार्प *f*. [JEW'S or JEWISH H. मोरचंग *m*, चंग *m*.] २ *astron. a constellation of this name* सारंगी *f*, स्वरमंडळ *n*. H. *v. i.* हार्प वाजविणें. २ *to dwell on, or recur to, a subject tediously and monotonously* (usually with *on* or *upon*) तीच

तीच गोष्ट घोकणें, (कंटाळा येईंपर्यंत त्याच त्याच गोष्टीची) घोकणी करणें, आंकणकडवें लावणें, छंद-जपमाळ घेणें, जपणें. [To H. ON ONE STRING एकाच गोष्टीचा जप करीत बसणें, एकच गोष्ट घोकणें.] H. *v. t.* (हार्प) वाजविणें. २ *to give voice to* स्पष्ट बोलून सांगणें, उघड बोलून दाखविणें. ३ *to hit upon* शोधून काढणें. Harp'er, Harp'ist *n.* हार्पवाला *m*, हार्प वाजविणारा *m*. Harp'ing *a.*

Harpoon (här-pōōn') [Fr. *harpon* -O. Fr. *harpe*, a dog's claw, clamp, *harpin*, boat-hook, L. *harpa*, Gr. *harpe*, sickle.] *n. a dart for striking and killing whales or large fish* मोठे मासे मारण्याची बरची *f.* H. *v. t.* बरचीनें (मोठे मासे) मारणें. Harpooneer', Harpoon'er *n.*

Harpsichord (härp'si-kord) [See *Harp* and *Chord.*] *n.* एक प्रकारचें तंतुवाद्य *n.*

Harpy (här'pi) [L. *harpyia*–Gr., *pl. harpyiai*, 'snatchers', symbols of the storm-wind *harpazein*, to seize.] *n.* (*Gr. myth.*) ग्रीक लोकांनीं पुराणांतरीं वर्णिलेला स्त्रीचें तोंड व गिधाडाचें धड असलेला हिंस्र राक्षस *m*, स्त्रीगृध्र *m*. २ *a rapacious person, an extortioner* (दुसऱ्यावर) धाड घालणारा मनुष्य *m*, (*fig.*) गिधाड *n.*

Harridan (har'i-dan) [Fr. *haridelle*, a jade.] *n. a worn-out strumpet* वृद्ध वेश्या *f*, उष्टी पत्रावळ *f.*

Harrier (har'i-ėr) [Formed from *hare*, like *graz-i-er.*] *n.* (written also *harier*) *a small kind of dog with a keen smell, for hunting hares* ससाची शिकार करणारा (कुलुंग्या जातीचा) -ससेपारधी कुत्रा *m.*

Harrow (har'ō) [A. S. *harwe*; cf. Icel. *herfi*, Dan. *harv.*] *n. an implement of agriculture usually made of wood or iron toothed with spikes for smoothing and pulverising ploughed land, and for covering seeds sown* दांताळें *n*, दांताळ *n*, दांता *m*, फांसाटी *f*, फेंसाटी *f*, मैंद *m*, अळें *n*, फण *m*, झंगा *m*, कुळव *m*, झोंपा *m*, गुठा *m*, गुठें *n*. These are some of the kinds of H. H. *v. t. to draw a harrow over* गुठावणें, पाळी घालणें, कुळवणें, फेंसाटणें, वखरणें. २ *to lacerate, to harass, to vex* कांट्यावर ओढणें -घालणें, (-ची) कुतरओढ करणें, बेजार करणें, जेरीस आणणें. Har'rowed *pa. t.* and *p. p.* Har'rower *n.* Har'rowing *pr. p.* and *v. n.*

Harry (har'i) [A. S. *hergian*, to lay waste, as is done by an army.] *v. t. to plunder, to ravage, to lay waste* लुटणें, लुटून फस्त -उजाड -उध्वस्त करणें. २ *to worry, to harass* छळणें, पिडणें, गांजणें, बेजार करणें.

Harsh (härsh) [M. E. *harsk*, from a root found in Dan. *harsk*, rancid, Ger. *harsch*, hard. See *Hard a.*] *a. rough, disagreeable:* (a) -to the touch खडबडीत, खरखरीत, खरबरीत. (b) -to the taste आंबट, आंबटढाण, रुक्ष, अस्निग्ध. (c) -to the ear कर्णकटु, कर्णकठोर, कर्कश, कठोर, दुःश्राव्य. (d) -to the feelings कठोर, निष्ठुर, परुष, करडा, स्नेहभावरहित. २ (*painting, drawing, &c.*) *having violent contrasts of colour, or of light and shade* विजातीय (रंग), परस्परविरुद्ध. Harsh'ly *adv.* Harsh'ness *n.* खडबडीतपणा *m*. २ आंबटपणा *m*, आंबटाई *f.* ३ कर्णकटुता *f*, कर्कशपणा *m*. ४ निष्ठुरता *f*, कठोरपणा *m*, पारुष्य *n.*

Harslet, See Haslet.

Hart (härt) [A. S. *heort.*] *n. a stag, the male of the red deer* हरिण (*pop.*) हरण *m.* or *n.* Hart'shorn *n.* हरणाचें शिंग *n.* २ *chem. a solution of ammonia, orig. a decoction of the shavings of a hart's horn* अमोनियाचें द्रवमिश्रण *n.* हें हरिणाच्या शिंगांच्या भुकटीपासून मूळ करण्यांत आल्यामुळें त्यास हें नांव पडलें आहे.

Harum-Scarum (hā'rum-skā'rum) [Prob. compounded of an obs. *v. hare*, to affright, and *scare.*] *a. flighty, wild, rash* धांदल्या, धांदला, धांदरट, घोटाळ्या, हूड, गडबड्या, उत्पाती. A harum-scarum fellow शेखचिल्ली.

Harvest (här'vest) [A. S. *haerfest*, autumn.] *n. the time of gathering in the crops or fruits* हंगाम *m*, फसलहंगाम *m*, फसल *f*, कापणीची वेळ *f*, कापणीचे दिवस *m. pl.*, सुगी *f.* २ *the crops gathered in, fruits* पीक *n*, फसल *f.* [ABUNDANT H. सुपीक *n*, सुगी *f.* AUTUMNAL H. खरीप *n.* VERNAL H. रब्बी or रवी *f*, रवी धान्य *n.*] ३ *the product of any labour, reward* श्रमाचें चीज *n* -फळ *n*, मोबदला *m*, बक्षिस *n*, नफा *m*, फायदा *m*, फळ *n.* H. *v. t. to reap and gather in* (as a crop) पीक काढून घेणें -गोळा करणें -जमविणें. Har'vester *n.* Har'vest-home *n. the time of harvest* मळणी काढण्याचे दिवस *m. pl.*, फसलहंगाम *m*, नवें *n*, नवीनवाळ *f*, पिकाचा हंगाम *m.* २ *the feast held at the bringing home of the harvest, and also the song sung at the time* फसलहंगामाचें जेवण व गाणें *n*, मळणीचें जेवण *n.* ३ *a service of thanksgiving at harvest-time* खलयज्ञ *m.* Har'vesting *pr. p.* and *v. n.* Har'vestless *a. lacking in crops* बिनपिकाचा, नापीक. Har'vestman *n.* Harvestmen *pl.* मळणकरी. Har'vest-moon *n.* मीनराशीचा पूर्ण चंद्र *m*, समोदयकालिक चंद्र *m.* Har'vestry *n.* -*the act.* पीक गोळा करणें *n.* २ पीक *n.*

Hash (hash) [Fr. *hacher* -*hache*, hatchet.] *n. that which is hashed, a mixed dish of meat and vegetables in small pieces* खिमा *m.* २ *something hashed up again, a mixture and preparation of old matter* जुना नवा माल एकत्र करून तयार केलेलें मिश्रण *n*, नव्याजुन्याची भेसळ *f* -खिचडी *f.* H. *v. t. to mince and mix, to chop small* खिमा करणें, फोडी *f. pl.* -खुरचा *f. pl.* पाडणें *g. of o.*, चोचावून तुकडे करणें *g. of o.*

Haslet (has'-let) [Fr. *hetelettes*, broil -*haste*, spit.]

*n. the edible viscera* (as the heart, liver, &c.) *of a beast, esp: of a hog* पशूचे (विशेषेंकरून डुकराचे) पोटांतील खाण्यासारखे अवयव *m. pl.*

Hasp (hasp) [A. S. *hæpse*, a clasp.] *n. the clasp of a padlock* कडी *f.* २ *a spindle to wind yarn or thread on* (सूत गुंडाळण्याची) चाती *f.* H. *v. t.* कडी घालणें -लावणें.

Hassock (has'uk) [W. *hesgog*, sedgy -*hesg*, sedge.] *n. a thick mat for kneeling on in church* देवळांत प्रार्थनेचे वेळीं गुडघे टेंकण्याची गवताची जाड चटई *f.*

Hastate, Hastated (hast'āt,-ed) [L. *hastatus*-*hasta*, spear.] *a. shaped like a spear* भाल्यासारखें, भाल्याच्या आकृतीचें, भालाकार.

Haste (hāst) [O. Fr. *haste* (Fr. *hate*), of Ger. origin, Dut. *haast*. All perhaps from the root of Eng. *hate* in an earlier sense of, to pursue.] *n. celerity of motion, swiftness* (applied only to voluntary beings, as men and other animals) शीघ्रगति *f*, त्वरा *f*, जलदी *f.* २ *hurry, urgency* धांदल *f*, घाई *f*, जलदी *f*, निकड *f*, तांतड *f*, चपळाई *f*, लगबग. *f.* ३ *rashness, vehemence* उतावळ or उतावळी *f*, आवेग *m*, गडबड *f.* To make H. जलदी *f* -त्वरा *f.* करणें. H., Hasten *v. t. to hurry on, to drive forward* घाई करणें, जलदी -त्वरा करणें, जलदीवर -त्वरेवर घेणें -आणणें, लवकर घडवून आणणें. H. *v. i. to move with speed* जलदी -त्वरा करणें, लगबगीनें चालणें -जाणें -येणें. २ *to be in hurry* धांदलींत -गडबडींत -गर्दींत असणें. Has'tener *n.* Has'tily *adv. in haste* घाईनें, जलदीनें, त्वरेनें, लवकर, चपळाई करून. २ *without due reflection, rashly* उतावळीनें, उतावळेपणानें, धांदरटपणानें, मागें पुढें पाहिल्यावांचून, (मागचा पुढचा) विचार न करितां, हूडपणानें, अल्लडपणानें. ३ *Shakes. passionately, impatiently* रागाचे भरांत -आवेशांत, तापटपणानें, लगबगीनें. Has'tiness *n.* जलदी *f*, त्वरा *f*, घाई *f*, चपळाई *f.* २ उतावळ or उतावळी *f*, धांदल *f*, अविचार *m*, अविवेक *m.* ३ संताप *m*, राग *m*, लगबग *f.* Has'tings *n. pl. early vegetables* हळवा भाजीपाला *m.* Has'ty *a.* (-of persons) *precipitate, rash* धांदरट, अविचारी, हूड, अल्लड, अविमृश्यकारी. २ (-of things) घाईघाईनें -उतावळीनें केलेला. ३ धांदलीचा, उतावळीचा. ४ तापट, रागाचा, रागीट.

Hat (hat) [A. S. *hæt*, connected with Sk. छद्, to cover.] *n. a covering for the head* (साहेबी) उभी टोपी *f.* [H. BLOCK टोप्या करण्याचा ठोकळा *m.* THE EIGHTEEN HATS *the European or hat-wearing nations* अठरा टोपीवाले, अठरा टोपकर, अठरा टोपस. TO PASS AROUND THE H. वर्गणी गोळा करण्यासाठीं टोपी फिरविणें.] H.-band *n.* टोपीवर गुंडाळण्याची पट्टी *f.* H.-box *n.* टोपी ठेवण्याची पेटी *f.* Hat'ted *a.* टोपी घातलेला. Hat'ter *a.* टोप्या करणारा -विकणारा, टोपीकार, टोपीवाला.

Hatch (hach) [Fr. *hacher*, to chop, to hack.] *v. t. to shade by minute lines crossing each other in drawing and engraving* (रेखाचित्र किंवा खोदकाम करितांना) परस्परांस छेदणाऱ्या सूक्ष्म रेषांची छटा देणें. Hatch'ing *n.* crosshatching, same as above.

Hatch (hach) [A. S. *haca*, the bar of a door; Dut. *hek*, a gate.] *n. a door with an opening over it, a wicket* (वरून मोकळा असलेला) जाळीचा दरवाजा *m.* २ *a frame in a river, for catching fish* (मासे धरण्याकरितां नदींत लावलेली) जाळी *f.* ३ *a flood-gate* उघडी *f*, सांड *f.* ४ (a) *a hatch-way* गलबताच्या किंवा वखारीच्या मजल्यांतून माल खालींवर नेण्याकरितां ठेवलेली चौकोनी जागा *f*, मजल्यांतील चौकोनी मार्ग *m.* (b) *a cover used in closing it* असला चौकोनी मार्ग झांकण्याची ताडपत्री *f.* To batten down the H.s गलबताच्या मजल्यावरील दारें (ताडपत्री टाकून) बंद करणें. To be under H.s कैदेंत असणें. Hatch *v. t.* (झांकण टाकून) दार बंद करणें.

Hatch (hatch) [Lit., to produce young by sitting in a hatch or coop, a hatch being anything made of cross bars of wood (Skeat.); hence; the same word as Hatch, a door.] *v. t. to produce* (especially from eggs, as young) *by incubation* ऊब देऊन अंडें फोडणें, (पिल्लें बाहेर काढण्यासाठीं) अंड्यास ऊब देणें. २ *to originate, to plot, to concoct* कट-व्यूह रचणें, बेत करणें. H. *v. i. to produce young* (said of eggs) (अंड्यांतून) पिल्लें बाहेर पडणें. २ *to be advancing toward maturity* वाढत्या मार्गास असणें. H. *n.* –*the act.* पिल्लें काढणें *n.* २ *development, disclosure, discovery* वाढ *f*, वृद्धि *f*, आविर्भाव *m* (*lit.*). ३ *a brood* वीण *f*, वेत *n.* Hatch'er *n. an incubator* (कृत्रिम) ऊब देण्याचें यंत्र *n.* २ *a plotter* कूट-व्यूह रचणारा.

Hatchel (hach'el) *n.* Same as Hackle. ताग विंचरून साफ करण्याची पिंजणी *f* -मोठी फणी *f.* H. *v. t.* फणीनें (ताग) विंचरून साफ करणें. २ (*colloq.*) *to tease, to worry* त्रास देणें -आणणें, छळणें, पुरेसें करणें. Hatch'eler *n.*

Hatchet (hach'et) [Fr. *hachette* –*hacher*, to chop.] *n. a small axe* कुऱ्हाड *f*, फरशी *f*, परशु *pop.* परश *m*, तबल *m.* २ *specif. a tomahawk* उत्तर अमेरिकेंतील लोकांचें युद्धोपयोगी शस्त्र *n* -परशु *m.* To bury the H. समेट -तह करणें, मित्रत्व -स्नेह संपादणें. To take up the H. युद्ध-लढाई सुरू करणें. H.-faced *a. sharp-visaged* उग्र मुद्रेचा.

Hatchment (hach'ment) [Corrupted from *achievement.*] *n. the escutcheon of a dead person placed in front of the house* मृत सरदाराची त्याच्या घरासमोर लावलेली कुलचिन्हांकित ढाल *f.*

Hatchway (hach'wā) See under 2nd Hatch ४.

Hate (hāt) [A. S. *hatian*, to hate. *Hate* is from the same root as *Haste*, and orig. meant, to

देवासारखा, देवाप्रमाणें, देवाइतका; as, "She was H. true." २ *by the influence or agency of heaven* देवाच्या प्रभावानें -कर्तृत्वानें; as, "Our *heavenly* guided steps shall climb." Heav'enly-mind'ed *a. pure, devout, godly, pious* परमार्थबुद्धि, परमार्थी, परमार्थासक्त, परमार्थनिष्ठ, परनिष्ठ, पारमार्थिक. Heav'enly-mind'edness *n.* परमार्थबुद्धि *f.* -निष्ठा *f.* -दृष्टि *f.* परमार्थिपणा *m.* परमार्थासक्ति *f.* परनिष्ठा *f.* Heav'enward *a.* and *adv. toward, or in the direction, of heaven* आकाशाकडे, आकाशमार्गी, गगनपंथी.

Heavy (hev'i) [A. S. *hefig* -*hebban*, to lift. Heavy means *hard to heave.*] *a. heaved or lifted with labour, weighty* उचलण्यास कठीण, वजनदार, जड, भारी, गुरु (Sk.). (b) (hence, sometimes) *large in extent, quantity, or effects* पुष्कळ, बहुत, खूप, कमालीचा, बेसुमार, विस्तृत, व्यापक, &c.; as, "A H. fall of rain; H. business, transactions, &c." (c) (often implying strength) मजबूत, दृढ, खंबीर. २ *not easy to bear, burdensome, oppressive, grievous* दुःसह, असह्य, जाचक, तीव्र, जबर, कठीण, दुःखद, दुःखप्रद, त्रासदायक, पीडक. ३ *encumbered, burdened, bowed down* (either with actual burden, or with care, grief, &c.) ओझ्याखालीं दडपलेला -सांपडलेला, भाराक्रांत, दडपून गेलेला. ४ *slow, sluggish, dull, inanimate* जड, मंद, सुस्त, स्तिमित, निस्तेज, मलूल, मठ्ठ, रड्या, रडका, व्यर्थ (*lit.*). ५ *strong, violent, forcible* जोराचा, मोठा, धडाक्याचा, दांडगा, जबर, वेगाचा; as, "A H. storm, sea, &c." ६ *loud, deep* (said of sound) खोल, गंभीर, मोठा. ७ *dark with clouds, gloomy* (said of the sky) अभ्राच्छादित, ढगांनीं भरलेलें, घनदाट, काळें. ८ *not easily digested* (said of food) जड, पचण्यास कठीण, अपथ्य. ९ *having much strength* (said of liquors) जहाल, कडक, जालीम. H. fire तोफांच्या विस्तवाचा जंगी भडीमार *m.* H. metal मोठे गोळे उडविण्याच्या तोफा *f. pl.* Heav'y *adv.* फार वजनानें. Heav'ily *adv.* फार जड होईपर्यंत, मोठ्या वजनानें. २ *with difficulty* कष्टानें, मोठ्या प्रयासानें, कसाबसा. ३ *slowly and laboriously* दुःखानें, जड पावलानें, जिवावर. ४ *sorrowfully* कष्टित मनानें -अंतःकरणानें. Heav'iness *n. weight* (in its various senses); as; वजन *n.* जडपणा *m.* ओझें *n.* २ *sluggishness* सुस्ती *f.* सुस्तपणा *m.* जडत्व *n.* मंदी *f.* मंदपणा *m.* ३ *oppression* जाच *m.* त्रास *m.* दुःख *n.* पीडा *f.* छळणूक *f.* जाचणी *f.* ४ *thickness* घट्टपणा *m.* दाटपणा *m.* ५ *sadness* उदासीनपणा *m.* ग्लानि *f.* अनुत्साह *m.* Heav'y-armed *a. mili.* जड शस्त्रास्त्रें असलेला. Heav'y-handed *a. clumsy* ओबडधोबड, धवडी. Heav'y-headed *a.* मंद, मंदमति, जड, जडबुद्धि, मठ्ठ डोक्याचा, निर्बुद्धि. Heav'y-hearted *a. despondent, sad* दुःखी, कष्टी, उद्विग्न, दुर्मनस्क, उदासीन. Heav'y-laden *a.* भाराक्रांत, ओझ्यानें लादलेला. Heav'y-limbed *a.* आंगजड, बोजड आंगाचा. Heav'y-witted *a.* स्थूलबुद्धि, जडबुद्धीचा.

Hebdomadal, Hebdomadary (heb-dom'a-dal, -dar-i) [L. *hebdomadalis*-Gr. *hebdomas*, a week -*hepta*, Sk. सप्त, seven.] *a. consisting of seven days* सात दिवसांचा, सप्तदिन. २ *weekly* साप्ताहिक, आठवड्याचा.

Hebetate (heb'ē-tāt) [L. *hebitatus*-*hebitare*, to dull.] *v. t. to dull, to blunt, to stupefy* बोंथट करणें, तीव्रता मोडणें, तीक्ष्णता कमी करणें, मंदत्व आणणें, अतीक्ष्ण करणें. H. *a. dull* बोंथट, अतीक्ष्ण, मंद, जड. Hebita'tion *n.* Heb'etude *n.* बोंथटपणा *m.*

Hebrew (hē'broo) [Fr. *Hebreu* (?)-L. *Hebræus*-Gr. *Hebraios* -Heb. *ibhri*, a stranger from *the other side* (esp. of the Euphrates)-*ebher*, the region on the other side -*abar*, to pass over.] *n. an appellative of any one of Abraham's descendants* (esp. in the line of Jacob) आब्राहामचा (जेकबच्या घराण्यांतील) वंशज *m.* हिब्रू *m* (commonly Jew). [Jews domiciled in India are termed Bene-Israels. The whole Jewish or Hebrew race is first divided into two groups: (1) European Jews, and (2) Asiatic Jews. Asiatic Jews are divided into Bene-Israel, Indian Jews (converts to Jewish Religion), Bagdad Jews, Japan Jews and so on.] २ हिब्रू भाषा *f.* H. *a.* हिब्रू (जात किंवा भाषा). Hebra'ic *a.* हिब्रू मनुष्यासंबंधी. २ हिब्रू भाषेसंबंधी. ३. हिब्रूरीतीभातीसंबंधीं. Hebra'ically *adv.* हिब्रू मनुष्याप्रमाणें, हिब्रू भाषेप्रमाणें. He'braism *n.* हिब्रू भाषेंतील विशेष शब्दप्रयोग *m.* २ हिब्रू लोकांची चालरीत *f.* ३ *the type of character of of the* Hebrews हिब्रू लोकांचा स्वभावविशेष *m.* हिब्रूस्वभावविशेष *m.* Hebraist *n. one versed in the Hebrew language and learning* हिब्रूभाषापण्डित *m.* हिब्रूवाङ्मयवेत्ता *m.* Hebrais'tic *a.* अनुहिब्रू (भाषाप्रयोग). He'braize *v. t.* and *i.* अनुहिब्रू करणें, हिब्रूरूप देणें, हिब्रूपणा आणणें. He'brewess *n. fem.* हिब्रू बायको *f* -स्त्री *f.*

Hecatomb (hek'a-tōōm *or* -tom) [Gr. *hekatombe*-*hekaton*, hundred, and *bous*, Sk. गो, an ox.] *n. a sacrifice of a hundred oxen or cattle at the same time* शंभर बैलांचा किंवा गुरांचा यज्ञ *m.* शतगोमेध *m.* शतबलिदान *n.* २ (hence) *the sacrifice or slaughter of a large number of victims* सरसहा कत्तल *f.* सरसकट केलेली काटाकाटी *f.* लाखों जीवांचा प्राणनाश *m.* हजारों जीवांची प्राणाहुति *f.* [HECATOMBS OF SLAIN पूर्णाहुति *f.*]

Heck (hek) [See *Hatch*, a half-door.] *n. a latticework contrivance for catching fish* मासे धरण्याची ताटी *f.*

Heckle (hek'l) Same as Hackle, which see.

Hectic (hek'tik) [Fr. *hectique*-Gr. *hektikos*, habitual

*-hexis*, habit. Akin to Sk. सह्, to overpower, to endure.] *a. habitual, constitutional* संवयीचा, सततचा. २ *affected with hectic fever* कफक्षयी, क्षयज्वराचा, हळूहळू शरीर झिजविणाऱ्या रोगाचा -रोगांतील. H. *n. a habitual or remittent fever* (कफक्षय झाला असतां) प्रतिदिवशीं येणारा ताप *m*, (कफक्षयांतील) दैनिक ज्वर *m*, कफक्षयज्वर *m* (?), जीर्णज्वर *m* (?). २ *a hectic flush* पूस्राव *m*. Hec'tical *a*. Same as Hectic. Hec'tically *adv.*

Hectogram, Hectogramme (hek'tō-gram) [Gr. *hekaton*, a hundred, and Fr. *gramme*, a gram.] *n. a measure of weight, containing a hundred grams* शतग्राम *n*, (रसायनशास्त्रांतील) शंभर ग्रामचें एक वजनी माप *n*. See the word Gramme.

Hectograph (hek'tō-grăf) [Gr. *hekaton*, a hundred, + *graph*.] *n. a contrivance for multiple copying, by means of a surface of gelatin, softened with glycerin* चरबीचा मध (glycerin) लावून सरसाच्या पाटावर पुष्कळ प्रति छापण्याचें यंत्र *n*.

Hectolitre, Hectoliter (hek'-tōlēter *or* hek'-tol'i-tĕr) [Fr. *hectolitre* -Gr. *hekaton*, a hundred, and Fr. *litre*, a liter.] *n. a measure of capacity for liquids, containing a hundred liters* शतलिटर *n*, शंभर लिटरचें घनमाप *n*. See the word Liter.

Hectometre (hek'tō-mēter) [Fr. *hectometre* -Gr. *hekaton*, a hundred, and Fr. *metre*, a meter.] *n. a measure of length, equal to a hundred meters* शतमात्रा (meter=मात्रा). Meterची लांबी ३९.३७ इंच आहे. शंभर मीटरचें किंवा मात्रांचें लांबीचें माप *n*.

Hector (hek'-tor) [Gr. *Hector*, the name of a Trojan warrior.] *n. a bully; a blustering, turbulent, insolent fellow* तिसमारखान, धारराव, अरेराव, शूरंमन्य; *loosely* शूरमानी, टेंकोजी, रगडमल्ल. H. *v. t. to treat with insolence, to threaten, to bully* गुरकावणें, (-शीं) अरेरावी करणें, धमकावणें, दरडावणें, धमकी भरणें. २ (hence) *to torment by words* धमकीनें -अरेरावी पणानें भांडखोरपणानें चिडविणें. H. *v. i. to bluster* अरेरावी *f* -अरेरावकी *f* -रगडमल्ली करणें, चढाईच्या गोष्टी सांगणें. Hec'torly *a*. अरेरावी, चढाईचा, फुशारकीचा, तिसमारखानासारखा.

Heddle (hed'dl) [Of A. S. origin.] *n.* (*weaving*) *one of the sets of parallel doubled threads which, with their mounting, compose the harness employed to guide the warp threads to the lathe or batten in a loom* वई *f* (वया *pl.*), ओंवी *f* (ओंव्या *pl.*). H. *v. t. to draw* (the warp thread) *through the heddle-eyes in weaving* पावठा भरणें. H. -bar *n*. पावठणी *f*. H.-eye *n*. पावठ्याचें भोंक *n*- नाक *n*. Hed'dling *v. n.*

Hedge (hej) [A. S. *hege*, hedge.] *n. a thicket of bushes* वय *f*, वई *f*, कुंपण *n*, कुडण *n*, वेष्टन *n*, कुंप *n*, आडा *m*, आवार *n*. [THORN H. कांटेवई *f*.] *N. B.*:— *Hedge*, when used adjectively or in composition, often means *rustic, outlandish, illiterate, poor* or *mean*; as, Hedge priest, Hedge-born, &c. H. *v. t. to inclose or separate with a hedge* वय -कुंपण घालणें, कुडणें, कुडण -आवार करणें. २ *to obstruct* (as a road), *to hinder* (from progress &c.) (sometimes with *up* and *out*) बंद करणें, बुझवणें, (-मध्यें) अडथळा करणें -घालणें -आणणें. ३ *to surround for defence, to protect* (भोंवतालीं) संरक्षण -बचाव करणें, पहारा ठेवणें -करणें. ४ *to surround so as to prevent escape, to hem* (in) घेरणें, वेढणें, कोंडणें, (-भोंवतीं) वेढा -घेरा देणें -घालणें. H. *v. i. to shelter one's self* (from danger, duty, responsibility, &c.), *to skulk* (लपून छपून) आपला बचाव करणें, अंग चोरणें. २ (betting) *to reduce the risk of a wager by making a bet against the side or chance one has bet on* (एखाद्यानें जुगार खेळतांना ज्या बाजूनें पैसे लाविले असतील त्याच्या विरुद्ध बाजूला पैसे लावून) त्याच्यावरील संकट कमी करणें. ३ *to use reservations and qualifications in one's speech* (एखादी गोष्ट आपल्या अंगावर येऊं नये म्हणून) मर्यादा राखून बोलणें, (सुटण्यास) सवड -कड ठेऊन बोलणें. H. -born *a. of low birth* नीच कुळांतील, हीनवर्ण, अधम. H.-hog *n*. एका जातीचें जनावर *n*. Hedge'less *a*. Hedg'er *n*. वई -कुंपण घालणारा किंवा नीट करणारा. Hedg'erow *n*. झाडांचें किंवा झुडपांचें हद्दीवरील कुंपण *f*. Hedg'eschool *n*. आयर्लंडमधील उघड्यावर भरवलेली गरीब मुलांची शाळा *f*.

Hedonic (hē-don'ik) [Gr. *hedone*, pleasure.] *a. of, or pertaining to, pleasure* सौख्यविषयक, सुखासंबंधीं. [H. SECT इंद्रियोपभोगवाद्यांचा पंथ *m*.] Hedon'ics *n.* (*philos.*) *that branch of moral philosophy which treats of the relation of duty to pleasure* सुखविज्ञानशास्त्र *n*, सुख म्हणजे काय याचा विचार करणारें शास्त्र *n*, कोणकोणतीं कर्मे केलीं असतां सुखप्राप्ति होईल याचा विचार करणारा तत्वज्ञानाचा भाग *m*, प्रत्येक मनुष्य सुखाकरितांच सर्व कर्मे करीत असतो असें मानणारा पंथ *m*, सुखापेक्षक कर्मवाद *m*, सुखदुःखविद्या *f*. Hed'onism *n*. सुखापेक्ष कर्मवाद *m*, सुखप्रयोजनतावाद *m*. २ सुखोत्पादनबुद्धीनें केलेला स्वकर्तव्याचा निर्णय *m*. Hed'onist *n*. सुखापेक्षक कर्मवादी *m*. Hedonis'tic *a*.

Heed (hēd) [A. S. *hedan*, to care or heed.] *v. t. to observe, to take notice of* लक्ष देणें -लावणें, ऐकणें, ध्यानांत आणणें -धरणें -ठेवणें, मनावर घेणें, (-कडे) मन लावणें. २ *to attend to, to look after* मानणें, पुसणें, जपणें, (-वर) लक्ष ठेवणें. H. *v. i. to mind, to consider* (कोणत्याही गोष्टीचा) विचार करणें, विचारांत घेणें. H. *n. notice, caution, careful consideration* (often with *give* or *take*) लक्षपूर्वक विचार *m*, सावधान

चित्त *n*, अवधान *n*, ध्यान *n*, भान *n*, लक्ष *n*, मनोयोग *m.* २ *attention* जपणें *n*, पुसणें *n.* Heed'ful *a. attentive, cautious* सावध, सावधान, सावधचित्त. Heed'fully *adv.* Heed'fulness *n.* Heed'less *a. inattentive, careless* निष्काळजी, गाफल, निष्काळजीपणाचा, गाफली or गाफील, गफलती, असावध, बेसावध, गैरसावध, असावधान, गैरहुषार, &c. Heed'lessly *adv.* गफलतीनें, निष्काळजीपणानें. Heed'lessness *n.* निष्काळजीपणा *m*, गफलत *f*, गाफलपणा *m*, गैरहुषारी *f.*

Heel (hēl) [A. S. *heldan, hyldan,* akin to Icel. *halla,* to tilt, to pour, and perhaps to Eng. *hill.*] *v. i. naut. to lean or tip to one side* (as a ship) (गलबत) एका बाजूस झुकणें -कलंडणें -कलणें, डुलणें, ढळणें, कल जाणें, करोटणें.

Heel (hēl) [A. S. *hela*–perhaps from A. S. *hoh;* akin to L. *calx,* Gr. *lax,* the heel.] *n. the part of the foot projecting behind* टांच *f*, खोंट *f*, पादमूल *n*, पार्ष्णि *m.* [A TUMOUR ON THE H. टांचरूं *n.* NECK AND HEELS *colloq. the whole body* सर्वांग *n.* THE GREAT TENDON ABOVE THE H. घोडशीर *f*, घोंडशीर *f*, दवणशीर *f.* TO BE (CLOSE) AT THE HEELS OF (-च्या) पाठोपाठ -मागोमाग असणें, दुमाल्यावर असणें. TO BE DOWN AT THE H. *to be slovenly or in a poor plight* निकृष्टावस्थेंत येणें, (-ची) दशा होणें. TO BE OUT AT THE HEELS, Same as above. TO COOL ONE'S HEELS (as in waiting) अंवणें (and *causally* अंवविणें), अंवत वसणें, तिष्ठत वसणें, (तिष्ठून तिष्ठून) पाय दुखवून घेणें. TO GO HEELS OVER HEAD उलटा पडणें, खालीं डोकें वर पाय होणें. २ (hence) *to move in an inconsiderate or rash manner* धुमधडाक्यानें जाणें, तंडक जाणें. TO HAVE THE HEELS OF *to outrun* (धांवत -च्या) पुढें जाणें. TO LAY BY THE HEELS *to fetter, to imprison* (-ला) विड्या ठोकणें -घालणें, कैद करणें, तुरुंगांत अडकविणें, अटकेंत ठेवणें. TO SHOW THE HEELS, TO TAKE TO THE HEELS *to flee* पळणें, पाय काढणें. TO THROW UP ANOTHER'S HEELS *to trip him* (-ला) उलथून पाडणें. TO TREAD UPON ONE'S HEELS (-च्या) लगोलग असणें. TO TURN ON *or* UPON ONE'S HEELS झटकन् मागें परत -वळणें -फिरणें. TO URGE *or* STRIKE WITH THE HEELS टांचळणें, टुमणी देणें, टांच मारणें.] २ *the whole foot* (esp. of beasts) (जनावराचा) खूर *m*, पाय *m.* ३ *the covering of the heel, spur* टांचेचा कांटा *m* -आर *f.* ४ *management by the* (*spurred*) *heel* टांच *f* (मारणें -देणें); as, "The horse understands the H. well." ५ *the hinder part of anything* पार्श्वभाग *m.* ६ *the closing or concluding part* शेवटचा -शेवटला भाग *m*, शेष *m*, शेंपूट *n*; as, "The H. of a hunt, the H. of the white loaf." ७ *the lower part* अधोभाग *m*, बैठक *f.* H. *v. t. to add a heel to* (जोड्याला) खोंट घालणें. Heel'-ball *n. a composition of wax and lamp-black* (used by shoemakers for polishing, and by antiquaries for copying inscriptions) काजळी मेण *n*, मेण व दिव्यांचें काजळ यांच्या मिश्रणाचा गोळा *m.* चांभार लोक याचा उपयोग जोड्यांस पालिस करण्याकडे व प्राचीनवस्तुवेत्ते जुन्या नाण्यांचे ठसे घेण्याकडे करितात. Heel'ed *pa. t.* and *p. p.* Heel'er *n.* Heel'less *a.* बिनटांचेचा. Heel'-piece *n.* टांचेवर घालण्याचें (लोखंडी) बखतर *n* -झांकण *n.* २ जोड्याच्या खोंटेवर लावलेला चामड्याचा तुकडा *m.* ३ *the end* टोंक *n*, शेवट *m.* Heel'-post *n.* (*carp.*) बिजागरावर ज्याला दरवाजा बसवितात तो चौकटीचा खांब *m.* Heel'-rope *n.* पायवंद *m*, पिच्छाडी *f.*

Heer (hēr) [Etymol. uncertain.] *n. a yarn measure of 600 yds.* (सूत मोजण्याचें) ६०० यार्डींचें माप *n.*

Heft (heft) [From *Heave.* A. S. *hefe,* weight.] *n.* (*colloq.*) *weight, ponderousness* वजन *n*, भार *m.* H. *v. t. to heave up, to raise aloft* वर-उंच उचलणें.

Hegemony (he-jem'o-ni) [Gr. *hagemonia–hagemon,* leader–*hegeisthai,* to go before] *n. leadership* धुरीणत्व *n*, पुढारीपणा *m*, पुढारपण *n.* Hegemon'ic,-al *a.*

Hegira, Hejira (he-jī'rä) [Arab. *hijrah,* flight.] *n. the flight of Mohammed from Mecca September 13, (July 16?) 622 A. D., from which is dated the Mohammedan era* (इ० स० ६२२ वर्षी) महंमद मक्केहून पळून गेला तें वर्ष *n*, महंमदाचें मक्केहून प्रयाण *n.* या वर्षापासून मुसलमानी शकास प्रारंभ झाला. हिजरी *f*, हिजरा *m.* २ (hence) *any flight or exodus* (जनसंघाचें) निर्गमन *n*, जनसंघप्रयाण *n.*

Heifer (hef'er) [A. S. *heahfore,* –A. S. *heah,* high, and *fear,* bull, ox.] *n. a young cow* गोजी *f*, कालवड *f*, पाडी *f.*

Heigh-ho (hī'-hō) [Imitative.] *interj. an exclamation expressive of weariness* (श्रमोद्गारक) उद्गारवाचक अव्यय, हा !, अहा !

Height (hīt) [Corr. of *highth* –A. S. *heahthu–heah,* high.] *n.* (written also *hight*) *the condition of being high* उंचपणा *m*, मोठेपणा *m*, उच्चत्व *n*, उच्चपणा *m*, उच्चता *f*, श्रेष्ठत्व *n.* २ *distance upwards, altitude* उंची *f.* ३ (usually *pl.* in this sense) *that which is elevated, an eminence* उंचवटा *m*, उंचाड *n*, टेंकाड *n*, टेंकडी *f*, डोंगर *m*, शिखर *n*, शृंग *n*; as, "The Alpine H.s." ४ *elevation in rank or excellence* थोरी *f*, थोरवी *f*, महती *f*, उच्चत्व *n.* ५ *progress towards eminence, grade, degree* (वरची) पायरी *f.* ६ *utmost degree* कळस *m*, भर *m*, भरती *f*, भरतें *n*, बहार *m*, पराकाष्ठा *f*, सीमा *f*, परमावधि *f*, शेवटची पायरी *f*, मर्यादा *f*; as, "The H. of fever, folly, winter, passion, &c." [IN THE H. ऐन (in comp.), भरघोसानें. TO REACH THE H. सीमा संपादणें -साधणें.] Height'en *v. t. to make or raise higher* (अधिक) उंच करणें -चढविणें, (वर) चढविणें -वाढविणें. २ *to*

*augment, to aggravate, to intensify* (used of things good or bad) वाढवणें, उत्कर्ष करणें *g. of o.*, उत्कृष्ट करणें, जोरावणें, बळावणें, विकोपास नेणें, भारी माजविणें. ३ *to set off to advantage, by means of contrast* साजरा करणें, शोभविणें, (विरोध दाखवून) विशेष तेजस्वी करणें. Height'ened *pa. t.* and *p. p.* Height'ening *pr. p.* and *v. n.* Height'ener *n.*

Heinous (hā'-nus) [O. Fr. *hainos* (Fr. *haineux*), hateful –*haine*, hate,–*hair*, to hate.] *a. hatefully bad, atrocious, odious* अघोर, घोर, अतिदुष्ट, घाणेरडा, किळसवाणा, ओंगळ, किळस उत्पन्न करणारा. Hei'nously *adv.* Hei'nousness *n.* अघोरपणा *m*, अतिदुष्टता *f*, किळसवाणेपणा *m*, ओंगळपणा, *m*.

Heir (ār) [O. Fr. *heir* –L. *heres*, an heir.] *n. one who inherits anything after the death of the owner, one entitled to anything after the present possessor* वारस, वारीस, वारीसदार, *or* वारसेदार, दायाद, दाईज, उत्तराधिकारी. [Co-resident H. after partition संसृष्टि. Co-residence of heirs after partition संसृष्टत्व *n.* H.–apparent to a throne युवराज *or* युवराजा. His office &c. यौवराज्य *n.*] २ *child, offspring* मूल *n*, संतान *n.* Heir'dom *n.* वारसा *m*, वारिसदारी *f.* Heir'ess *n. fem.* Heir'less *a.* बिनवारशी, निवारशी, दायादहीन. २ निपुत्रिक. Heir'-loom [*Heir* and *loom*,–A. S. *loma, geloma*, furniture.] *n. any piece of furniture or personal property which descends to the heir* (वंशपरंपरागत मिळकतीबरोबर) वारसपणानें मिळणाऱ्या वस्तु *f. pl.* Heir'ship *n.* वारसा *m*, वारसपणा *m*, वारससंबंध *m.* उत्तराधिकार *m.*

Held *pa. t.* and *p. p.* of Hold. ताब्यांत असलेला. २ धरलेला, पकडलेला.

Heliac, -al (hē'li-ak, hē-lī'a-kal) [Gr. *heliakos* –*helios*, the sun.] *a. relating to the sun, solar* सूर्याचा, सूर्यासंबंधीं, सौर, सौर्य. २ *astron. emerging from the light of the sun or falling into it* सूर्यप्रकाशांतून उद्भव पावणारा, किंवा त्यांत लय पावणारा. ३ *rising or setting at the same* (or nearly the same) *time as the sun* सूर्याबरोबर उदय किंवा अस्त पावणारा, सूर्याबरोबर उगवणारा किंवा मावळणारा. Hel'iacally *adv.*

Helical (hel'i-kal) *a.* See under Helix.

Helio (hē'liō) a combining form from Gr. *helios*, the sun सौर (in comp.).

Heliocentric, -al (hē-li-ō-sen'trik, -al) [Helio, and *centric.*] *a. appearing to be seen from the sun's centre* (as oppo. to *geocentric*) सूर्यापासून मोजलेला -पाहिलेला. २ *having the sun as a center* सूर्यकेन्द्रीय, सूर्यकेन्द्रक. [Heliocentric longitude of a planet ग्रहाचा सूर्यकेन्द्रीय रेखांश *m.* किंवा ध्रुवांश *m.*] Helio-cen'trically *adv.* He'liochrome *n.* रंगारंगाचा प्रकाश-लेख *m*, रंगीत छायाचित्र *n.* He'liochromy *n.* रंगीत फोटोविद्या *f.* He'liograph *n.* सूर्यलेखक *m*, सूर्याचा प्रकाशलेख घेण्याचें यंत्र *n*, सूर्यच्छायाचित्रणयंत्र *n*, सूर्यचित्रक *m.* ३ *an apparatus for telegraphing by means of the sun's rays* सूर्यकिरणांच्या साहाय्यानें तार करण्याचें यंत्र *n.* Heliography *n.* प्रकाशलेखन *n.* Heliograp'ical *a.* Helio'grapher *n.* प्रकाशलेखक. Heliola'ter *n. a worshipper of the sun* सूर्यपूजक, सूर्यभक्त. Heliol'atry *n.* सूर्यपूजा *f.* Heliom'eter *n. astron. an instrument for measuring the apparent diameter of the sun or other heavenly body* सूर्यबिंबमापक *m*, (or briefly) सूर्यमापक यंत्र *n.* २ ग्रहाची किंवा ताऱ्याची मध्यरेषा मोजण्याचें यंत्र *n*, (ग्रहाचें किंवा ताऱ्याचें) अंतरमापनयंत्र *n*, तारान्तरमापक *m.* Hē'lioscope [*helios.* and *skopeo*, to look.] *n.* सूर्य पाहण्याची दुर्बीण *f*, सूर्यदर्शक यंत्र *n*, (or briefly) सूर्यदर्शक *m.* He'liostat *n.* सूर्यदर्पण *m.* या दर्पणानें (आरशानें) सूर्याचा प्रकाश नियमित दिशेनें परावृत्त करतां येतो. Heliotrōpe [*helios*, and *tropos*, a turn.] *n. bot. a plant whose flowers are said always to turn round to the sun* सूर्यकमल *n.* २ *min. a bloodstone* रक्त थांबविणारा एक प्रकारचा दगडी ताईत *m.* ३ *astron.* सायनयंत्र *n.* Heliotropism *n.* सूर्योन्मुखता *f.*

Helix (hē'-liks) [L. –Gr. *helix* -*helissein*, to turn round] *n. a spiral, a circumvolution* पेच *m*, पेंच *m.* २ *zool. the snail or its shell* गोगलगाईच्या जातीचा किडा *m*, किंवा त्याच्या पाठीवरची कवची *f.* ३ *anat. the external part of the ear* कानाची पाळ *f.* Hel'ical *a. spiral* वर वर चढत जाणारा, पाळीसारखा, सर्पिल.

Hell (hel) [A. S. *hel* –*helan*, to cover, to conceal, lit a place of concealment. Cog. with L. *cel-are*, to hide.] *n. the place or state of punishment of the wicked after death* नरक *m*, आयुष्यांत केलेल्या दुष्कर्मांबद्दल मरणोत्तर मिळणारी शिक्षा *f*, किंवा ती मिळण्याची जागा *f.* *N. B.*:—The Hindus suppose *Naraka* to contain many different places of torture. Some of them are: अंधतामिस्र, अवीची, असिपत्रवन, कुंभीपाक, तपन, तप्तवालुका, तामिस्र, रौरव, महारौरव, लोहसूर्मि, संघात. २ (hence) *any mental torment, anguish* मानसिक पीडा *f* -व्यथा *f*, यमयातना *f*, तीव्र -भयंकर आधि *f.* ३ *a place where outcast persons or things are gathered*: as, (a) *a dungeon or prison* अंधारकोठडी *f*, तुरुंग *m.* (b) *a gambling house* जुगाराचें घर *n*, जुवा खेळण्याची जागा *f*, जुगाराचा अड्डा *m.* (c) मोडतोड ठेवण्याची जागा *f.* ४ *the lower regions* पाताळ *m*, अधःप्रदेश *m*, अधो-भुवन *n*, नागलोक *m.* *N. B.*:— There are 7 Pātalas (सप्तपाताळ) enumerated, viz. अतल, वितल, सुतल, तलातल, रसातल, महातल and पाताळ. Abode in H. नरकवास *m.* Descending to H.

अधोगति *f*, अधःपात *m*, अधःपतन *n*. Judge of H. (cf. Minos of Greek Myth.) यम *m*; -familiarly यमाजीभास्कर, यमाजीपंत. Pains of H. यमयातना *f*, यमशिक्षा *f*, यमदंड *m*, कालदण्ड *m*. Pit of H. नरककुंड *n*. River of Hell (cf. Styx of Gk. Myth.) वैतरणी *f*. Road to H. नरकमार्ग *m*, अधःपथ *m*. Watch dogs of H. cf. श्याम and शबल. Hell'-born *a*. नरकांतील. Hell'-fire *n*. तपन *n*. Hell'hound *n*. cf. श्याम and शबल. Hell'ish *a*. नरकाचा, नरकांतील, नारकीय. २ *fit for hell* नरकार्ह, नरकयोग्य. ३ *wicked* अतिदुष्ट, अतिनिंद्य. Hell'ishly *adv*. Hell'ishness *n*. अतिनिंद्यता *f*.

*N. B.*—यमलोक is not Hell. To speak with scientific correctness and accuracy नरक is Purgatory and not Hell.

Hellebore (hel'e-bōr) [Fr. *hellebore*–L. *helleborus* –Gr. *helleboros*.] *n*. *bot*. *a plant used in medicine, anciently used as a cure for insanity* काळी कुटकी *f*, कटुरोहिणी *f*. याचा उपयोग पूर्वी वेडावर करीत असत.

Hellene (hel'lēn) [Gr. *Hellenes*, name ultimately given to all the Greeks, from *Hellen*, the son of Deucalion, the Greek Noah.] *n*. *a native of either ancient or modern Greece* ग्रीक मनुष्य, ग्रीस देशांतील रहिवाशी, हेलीन. Helle'nian, Hellen'ic *a*. *Greek*, *Grecian* हेलीनिअन्, हेलिनिक, ग्रीकलोकांसंबंधीं, ग्रीशन, हेलीनासंबंधीं. Hellen'ic *n*. हेलिनिक भाषा *f*. थोडाबहुत फेरफार होऊन आटिक भाषेपासून निघालेली व आलेक्झांडरनंतरच्या ग्रीक लेखकांत प्रचलित असलेली पोटभाषा *f*. Hel'lenism *n*. हेलिनिक भाषेचा विशेष शब्दप्रयोग *m*. २ विद्याव्यासंग, सौष्टव, रमणीयता इत्यादि प्राचीन ग्रीक लोकांच्या आंगच्या गुणांकडे असलेला ओढा *m*, हेलिनगुणलुब्धता *f*. Hel'lenist *n*. *one who affiliates with Greeks, or imitates Greek manners* अनुहेलीन, हेलीन लोकांशीं सख्यत्व करणारा, ग्रीक रीतिभातींचें अनुकरण करणारा. (b) (esp.) *a Jew who used the Greek language as his mother tongue* (मातृभाषा -जन्मभाषा म्हणून) ग्रीकभाषा बोलणारा ज्यू *m*, ग्रीक ज्यू *m*. २ *one skilled in the Greek language and literature* ग्रीकभाषापंडित *m*. Hellenis'tic, -al *a*. Hellenis'tically *adv*. Hel'lenize *v. t.* ग्रीकभाषेचें स्वरूप देणें, ग्रीकभाषेच्या पद्धतीवर नेणें. H. *v. i.* *to use the Greek language* ग्रीकभाषा वापरणें -बोलणें -लिहिणें.

Hellespont (hel'les-pont) [L. *hellespontus* –Gr. *Helle'*, daughter of Athamas, and *pontos*, sea.] *n*. *a narrow strait between Europe and Asia* (now called the *Dardanelles*) आशिया व यूरोप या खंडांमधील (हल्लींची) दार्दानेल्सची सामुद्रधुनी *f*, हेलेस्पान्ट. Hellespon'tine *a*.

Helm (helm) [A. S. *helma*, rudder; Ger. *helm*, a handle; allied to *helve*.] *n*. *the instrument by which a ship is steered* सुकाणूं *n*, सुकाण *n*, कर्ण *m* (Sk.). [To FEEL THE H. (जहाज) सुकाणाप्रमाणें वळणें.] २ *the place, station or office of direction and administration* नियंतृत्व *n*, सूत्रचालकत्व *n*, नियंत्याची जागा *f*. ३ (a) *a steersman* सुकाण्या. (b) (hence) *a guide, a director* नियंता, सूत्रचालक, मार्गदर्शक, वाटाड्या, कर्णधार, उपदेष्टा. Helm'less *a*. बिनसुकाणूचा. २ ताळतंत्ररहित. Helm'sman *n*. सुकाण्या, सुकाणदार, कर्णधार. २ (*fig.*) नियंता, चालक, कर्णधार.

Helm, Helmet (helm, hel'met) [A. S. *helm* -*helan*, to cover. Ger. *helm*.] *n*. *a covering of armour for the head* (लढाईचे वेळीं संरक्षणासाठीं) डोक्यास घालण्याची लोखंडी टोपी *f*, जिरेटोप *m*, जरीटोप *m*, जंजीरटोप *m*, शिरस्त्राण *n*, झिल्लीम *n*. २ *that which resembles a helmet in form, position, etc.* शिरस्त्राणासारखी टोपी *f*. ३ *chem*. *the upper part of a retort* नलिकामुकुट *m*. Helm'ed, Hel'meted *a*. *covered with a helmet* शिरस्त्राण घातलेला. Hel'metless *a*. शिरस्त्राण नसलेला, शिरस्त्राणरहित. Hel'met-shaped *a*.

Helminthic (hel-min'thik) [Gr. *helmins*, *helminthos*, a worm -*helisso*, to wriggle.] *a*. *pertaining to worms* कृमिसंबंधीं. २ *expelling worms* कृमि घालविणारा, कृमिसारक. Helminthi'asis *n*. *med*. *a disease in which worms are present in some part of the body* कृमिरोग *m*. Helmin'thoid *a*. *worm-like* कृमीच्या आकृतीचा, अनुकृमि. Helminthol'ogist *n*. कृमिशास्त्रवेत्ता. Helminthol'ogy *n*. *the natural history, or study, of worms* कृमिविज्ञान *n*, कृमिशास्त्र *n*.

Helot (hel'ot *or* hē'lot) [Gr.; said to be derived from *Helos*, a town in Greece, reduced to slavery by the Spartans.] *n*. *a Spartan slave* हेलट, स्पार्टामधील गुलाम *m*. २ (hence) *a serf* दास *m*, बंदा *m*, नोकर *m*. He'lotism *n*. गुलामगिरी *f*, दास्य *n*, दासत्व *n*. He'lotry *n*. *pl*. *slaves* गुलाम *m. pl.*, दास *m. pl.*

Help (help) [A. S. *helpan*, Ger. *helfen*, to aid. Sk. कॢप्, to be fitting.] *v. t.* *to furnish with strength or means, to aid, to assist* मदत करणें, साहाय्य देणें, कुमक करणें -पाठवणें -देणें, हात देणें -लावणें, हातभार लावणें, आंग *n* -डोई *f* -खांद *m* -पाठ *f*. देणें, पाठीशीं घेणें -घालणें, (-पासून) बचाव करणें, निभावून नेणें. २ *to change for the better, to remedy* (-ला) उपाय *m* -इलाज *m* -यत्न *m*. करणें, सुधारणें, (-ची) दुरुस्ती करणें. ३ *to prevent, to hinder* निवारणें, टाळणें, बंद करणें-पाडणें, (-ला) तोड काढणें, थांबविणें. ४ *to forbear, to avoid* धीर -दम धरणें, थांबणें, (कोणतीही गोष्ट केल्या-) शिवाय राहणें; as, "I cannot *help* remarking &c." ५ *to wait upon* (as the guests at table) *by carving and passing food* (पदार्थ कापून) घालणें, वाढणें, (जेवणाची) बडदास्त ठेवणें. To H. forward पुढें ढकलणें, (पुढें नेण्यास) हातभार लावणें. To H. off नेण्यास-घालविण्यास मदत करणें. To H. on हातभार लावणें,

मदत करणें. To H. out (दुसऱ्यास संकटांतून किंवा महत्प्रयासाचे कामांतून) बाहेर पाडणें, सुखरूपपणें बाहेर काढणें. To H. over (-तून) पार पडण्यास हात लावणें. To H. (one) to (at table) (-चा) पुरवठा -पुरावा करणें, पुरविणें. To H. up (वर) उठण्यास हात लावणें, हात देऊन उठविणें. H. *v. i. to give assistance* मदत करणें -देणें, सहाय -सहकारी होणें -असणें. Help *n.* साहाय्य *n*, मदत *f*, कुमक *f*, हात *m*, हातभार *m*. २ *remedy, relief* इलाज *m*, तजवीज *f*, यत्न *m*, तोड *f*, तरणोपाय *m*, परिहार *m*, शमन *n*, परिमार्जन *n*. ३ *one who assists* सहाय, साहाय्यकारी *m*, मदतनीस. (b) (also) *the whole force of hired helpers in any business* भाडोत्री मदतनीस, मदतगार कामकरी *m. pl.* ४ *Amer. a hired man or woman* (घरगुती कामकाज करणारा) मजूर *m* -नोकर *m* -बाई *f*. Hel'per *n.* मदतनीस. Help'ful *a.* मदतगार, हातभार देणारा -लावणारा. २ *useful, salutary* उपयोगी, कामाचा, फायदेशीर, हितावह. Help'fully *adv.* Help'fulness *n.* उपयोगीपणा *m*, उपयोग *m*, हितावहता *f*, फायदेशीरपणा *m*. Help'less *a. without help or power in one's self, feeble* असमर्थ, दुबळा, दीन, अनाथ, लाचार, (कोणाचीही) मदत नसलेला, मदतहीन, निराधार, निराश्रित, पंगु, अगतिक. २ *beyond help, irremediable* निरुपाय, निरुपायाचा, बेइलाज, आटोक्याबाहेर गेलेला, बिनतोड, अप्रतिकार्य, अप्रतिहार्य. Help'lessly *adv.* दुबळेपणानें, दीनपणें, लाचारतेनें. २ बिनतोडपणें. Help'lessness *n.* नाइलाजपणा *m*, दुबळेपणा *m*, निराश्रितपणा *m*, लाचारता *f*, दीनपणा *m*, &c. २ बिनतोडपणा *m*, अपरिहार्यता *f*. Help'mate *n.* हस्तक, हस्तक्या, हातखुरपणें *n.* २ (*specif.*) *a wife* पत्नी *f*, स्त्री *f*, बायको *f*. Help'meet *n.* सहचारिणी *f*, अर्धांगी *f*.

Helter-skelter (hel'tėr-skel'tėr) [Imitative.] *adv.* (*colloq.*) *confusedly and tumultuously* सैरावैरा, धांदलीनें, गडबडीनें, अफरातफरीनें, तीनतेरा, इतस्ततः. Hel'ter-skel'ter *n.* धांदल *f*, गडबड *f*, तजावजा.

Helve (helv) [A. S. *hielfe, helfe*, a handle.] *n. the handle of an axe, hatchet* दांडा *m*, मूठ *f*. H. *v. t. to furnish with a helve* (*as an axe*) दांडा -मूठ घालणें -बसविणें.

Helvetian, Helvetic (hel-vē'shan, hel-vet'ik) [L. *Helvetia*, L. name of Switzerland; *Helvetii*, the tribe of that name.] *a.* (हल्लीं ज्या देशास स्वित्झर्लंड् असें नांव आहे त्या देशांतील प्राचीन काळच्या) हेलवेटीनामक लोकांचा, हेल्वेटिक लोकांचा, हेल्वीशन.

Hem (hem) [Onomatopoetic.] *interj.* used as an expression of hesitation हुं! H. *n. a sort of half cough to draw attention* (दुसऱ्याचें लक्ष वेधण्यासाठीं काढलेला) खांकारा *m*, खांकरण्याचा शब्द *m*, खांकरणें *n*. H. *v. i. to utter the sound 'hem'* खांकरणें, खांकरा *m* काढणें -देणें.

Hem (hem) [A. S. *hemm*, a border; Ger. *hamme*, a fence.] *n. the border of a garment doubled down and sewed* गोट *m*, लोड *f*, कांठाची तुरप *f*, मुरड *f*, दाल *f*. २ *border, margin* (*as of the sea*) (समुद्रादिकाची) कड *f*, किनारा *m*, कांठ *m*. ३ (*made on sheet-mettle ware*) (भांड्याचा) कांठ *m*. H. *v. t. to form a hem on, to edge* तुरपणें, मुरडणें, लोड भरणें, गोट मारणें. २ कांठ बसविणें -करणें. To H. about, around *or* in *to surround, to inclose and confine* घेरणें, वेढणें, कोंडणें, कोंडींत धरणें, (दुसऱ्यास सुटून जातां न येईल अशा रीतीनें) वेढा देणें -गराडा घालणें. To H. out *to shut out* आंत येऊं न देणें. Hem'med *pa. t.* and *p. p.* Hem'ming *pr. p.* and *v. n.*

Hemal (hē'mal) [Gr. *haima*, blood.] *a. relating to the blood or blood-vessels* (oppo. to *neural*) रक्तासंबंधीं, रक्तवाहिन्यंतर्गत.

Hematine (hem'a-tin) [Gr. *haima*, blood.] *n. the red colouring matter in the blood* रक्तास तांबडेपणा आणणारें द्रव्य *n*, ज्यामुळें रक्तास तांबडेपणा येतो तें द्रव्य *n*, रक्तरंजक (द्रव्य), रक्तवीर्य *n*.

Hematite (hem'a-tīt) [L. -Gr. *haimatites*, blood-like -*haima*.] *n. a valuable ore of iron, with a blood-red streak* तांबडे चरे असलेली लोखंडाची मौल्यवान् अशुद्ध धातु *f*.

Hemi- (hemi-) [Gr.] a prefix signifying *half* (rendered in Marathi by) अर्ध (in comp.).

Hemicrania (hemi-krā'ni-ä) [Gr. *hemi* (-L. *semi*), half, and *kranion*, skull.] *n. med. head-ache confined to one side of the forehead only* अर्धशिशी *f*, अर्धशीर्ष *n*, अर्धी कपाळदुखी *f*.

Hemicycle (hem'i-sīk'l) [Hemi + cycle.] *n.* अर्धवर्तुल *n*, अर्धगोलाकार *m*, अर्धगोलाकृति *f*.

Hemiplegia (hemi-plē'ji-ä) [Gr. *hemi*, half, and *plege*, stroke.] *n. med. a palsy affecting one side of the body only* (बहुधा मस्तिष्कीय रक्तस्रावामुळें डाव्या अथवा उजव्या -कोणत्या तरी एका -बाजूकडे होणारा) अर्धांगवायु *m*, (शरीराच्या अर्ध्या भागाचा) पक्षाघात *or* पक्षघात *m*, पक्षवात *m*, अर्धांगघात *m*. २ (of the face and neck) तोंडाचा पक्षघात *m*, अर्दितवायु *m*. Hem'iplegy *n.* Same as above.

Hemiptera (hem-ip'tėr-ä) [Gr. *hemi*, half, and *pteron*, a wing.] *n. an order of hexapod insects having four wings, the two anterior of which are scarcely perceptible* अर्धपक्ष कीटकवर्ग or simply अर्धपक्ष. ह्या वर्गांतील प्राण्यांचे पंख कांहींसे एकावर एक असे राहतात व त्यामुळें ते अर्धेच असावेत असा भास होतो.

Hemisphere (hem'i-sfēr) [Gr. *hemi*, and *sphaira*, a sphere.] *n. a half sphere* गोलार्ध *m*, अर्धगोल *m*, निमगोल *m*. २ *half of the terrestrial globe or a map of it* भूगोलार्ध *m*, भूगोलार्धाचा नकाशा *m*. [The Eastern H. पूर्वगोलार्ध *m*. The Western H. पश्चिमगोलार्ध *m*.] ३ *the people who inhabit a hemisphere* भूगोलार्धांत राहणारे लोक *m. pl.* Hemispher'ic, -al *a.*

गोलार्धाचा, अर्धगोलाकृति, अर्धगोल, निमगोल. Hemi-spher'oid *n.* अण्डगोलार्ध *m.* H. *a.* Hemispher'oidal *a.* अण्डगोलार्धासंबंधीं, अण्डगोलार्धासारखा.

Hemistich (hem'i-stik) [Gr. *hemi*, and *stichos*, a line.] *n. half a line, or an incomplete line, in poetry* श्लोकार्ध *m*, अर्धश्लोक *m*, कवितेंतील अपुरी ओळ *f.* Hemis'tichal *a.* श्लोकार्धाचा, अपुऱ्या चरणाचा.

Hemlock (hem'lok) [A. S. *hemlic*, the second syllable being a weakened form of *leac*, a plant, and the first being of unknown origin.] *n. med. a poisonous plant used in medicine* एक प्रकारची औषधोपयोगी विषारी वनस्पति *f*, हेमूलाक *m*. मृत्यूची शिक्षा झालेल्या मनुष्यास ग्रीक लोक ही वनस्पति प्यावयास देत असत. २ *the wood of that tree* हेमूलाक वनस्पतीचें लांकूड *n* -काष्ठ *n*.

Hemoptysis (hē-mop'ti-sis) [Gr. *haima*, blood, and *ptyein*, to spit.] *n. med. expectoration of blood which has escaped from vessels in the lung* फुफ्फुसांतील रक्ताची ओकारी *f*, फुफ्फुसरक्तवमन *n*.

Hemorrhage (hem'or-āj) See Hæmorrhage.

Hemorrhoids (hem'or-oidz) See Hæmorrhoids.

Hemp (hemp) [A. S. *hænep* -L. *cannabis*–Gr. *kannabis*, which is considered to be of Eastern origin from Sk. सण.] *n. a plant with a fibrous bark used for cordage, coarse cloth, &c.* (*a*) सण *m*, ताग *m*. (*b*) अंबाडी *f*, अंबाडा *m*. २ *the fibrous rind of the plant prepared for spinning* तागाचें साल *n*. Indian H. भांग *f*, भंगा *f* (R.), भंग (R.), भृंगा *f* (R.), भृंगी *f* (R.). In cant phraseology, the word is rendered by हिरवी तमाखू *f*, गुरुप्रसाद *m*, ज्ञानवल्ली *f*, शांभवी *f*, विजया *f*. Addicted to the use of the intoxicating potion prepared from H. भंगट, भंग्या, भांग्या, भंगड, भांगखाऊ. Dry leaves of H. ground in water with spices घोंटा *m*. Exudation of the flowers of H. prepared as a drug चरस *m*. H. tops गांजा *m*, हिरवा *m*. H. leaves पत्ती *f*. H. eater माजुमी. Preparation of H. with sugar, spices, &c. माजूम *f*, याकुती *f*, सबजी *f*. Smoker of H. tops गांजेकस, गंजड. Stalk of H. जोखी *f*. Stripped stem of the H. plant सणकाडी *f*. Thread or string of H. शणसूत्र *n*. Hemp'en *a. made of hemp* तागाचा, अंबाडीचा. २ तागासारखा, अंबाडीप्रमाणें.

Hen (hen) [A. S. *henn* -*hana*, a cock. Ger. *hahn*. Prob. akin to L. *canere*, to sing, and orig. meaning 'singer.'] *n.* कोंबडी *f*, कुक्कुटी *f*. २ (used adjectively or in combination to indicate) *the female of any kind of birds* (पक्ष्याची) मादी *f*. Hen'bane *n. bot. a plant which is a bane or poison to domestic fowls* खुरासनी ओंव्याचें झाड *n*. -the seed खुरासनी ओंवा *m*. Hen'-hearted *a. cowardly, timid* भितरा. Hen'-coop *or* Hen'-house *n.* खुराडें *n*, खुडी *f*. Hen'peck *v. t. to subject to petty or annoying attempts to rule, to harass by exercise of authority* (said of a wife who thus treats her husband) (बायकोनें नवऱ्यावर) हुकमत चालविणें, वायल्या बनविणें. Hen'pecked *a.* स्त्रीवश, बायल्या, बाईलबुद्धि, स्त्रीबुद्धि, बायकोच्या कह्यांतला.

Hence (hens) [M. E. *hennes*, *henen* -A. S. *heonan*, from the base of *He*. Ger. *hinnen*, *hin*, hence; so L. *hinc*, hence -*hic*, this.] *adv. from this place* येथून, एथून, या जागेपासून, इकडून, इकडनें. २ *from this time, in the future* एथून, आतांपासून, पुढें, या वेळापासून, या काळापासून, आजपासून. ३ *from this reason, as an inference or deduction* यावरून, म्हणून, अशासाठीं. ४ *from this source or origin* ह्यापासून. Henceforth', Hencefor'ward *adv.* इतःपर, अतःपर, यापर, इतउत्तर, इतउपर, एथून पुढें, एथपासून, आतांपासून.

Henchman, (hensh'man) [Usually derived from *haunch-man*. A. S. *hengest*, a horse, Ger. *hengst*, and *man*, meaning a groom (Skeat).] *n. a servant, a page* (now chiefly used as a political cant term) अनुचर, अनुयायी, हलगेकरी *m*.

Hendecagon (hen-dek'a-gon) [Fr. *hendecagone*–Gr. *hendeka*, eleven, -*gonia*, Sk. कोन, an angle.] *n. geom. a plane figure of eleven angles and eleven sides* एकादशकोणाकृति *f*, (briefly) एकादशकोन *m*.

Hepatic,-al (hep-at'ik,-al) [L. *hepaticus* –Gr. *hepar*, liver.] *a. med. pertaining to, or involving, liver* यकृताचा, यकृतासंबंधीं. २ *resembling the liver in colour or form* यकृताच्या रंगाचा -आकाराचा. Hepati'tis *n. med. inflammation of the liver* यकृतदाह *m*.

Hepatica (he-pat'ikä) [See Hepatic so called in allusion to the shape of the lobed leaves or fronds.] *n. bot. a genus of pretty spring flowers closely related to Anemone, Squirrel cup.* हेपाटिका फूल *n*.

Hepta- (hep'-tä-) [Gr., meaning 'seven'. Sk. सप्त.] a combining form rendered by सप्त (in comp.).

Heptagon (hep'ta-gon) [Gr. *heptagonos*, seven -cornered –Gr. *hepta*, Sk. सप्त, seven, and *gonia*, Sk. कोन, angle.] *n. geom. a plane figure with seven angles and seven sides* सप्तकोणाकृति *f*, सप्तकोन *m*, सप्तास्र *n*. Heptago'nal *a.* सप्तकोनाचा, सप्तकोन.

Heptarchy (hep'tär-ki) [Gr. *hepta*, and *arche*, sovereignty.] *n. a government by seven persons* सप्तसत्ताक राज्य *n*. Heptar'chic *a.* सप्तसत्तात्मक.

Her (hėr) [M. E. *here*, -A. S. *hire*, gen. and dat. sing. of *heo*, she.] *pron.* तिचा, तिला.

Herald (her'ald) [O. Fr. *heralt*, a herald.] *n.* (in ancient times) *an officer whose business was to make public proclamations* (लढाई प्रसिद्ध करणारा, सेनापतीचे निरोप कळविणारा, किंवा जाहीर खबर देणारा) ललकाऱ्या *m*, भाट *m*. २ *a proclaimer* ललकाऱ्या,

स्तुतिपाठक, भाट, बंदिजन, चारण, नकीब, शिंगाड्या. ३ *a forerunner* अग्रदूत *m*, पूर्वचिन्ह *n*, सूचक *m*. ४ *any messenger* निरोप्या, दूत, संदेशवाहक. H. *v. t. to proclaim* (-ची) जाहीर खबर देणें, पुकारा करणें, जाहीर करणें, पुकारणें. २ ललकारी देणें. ३ *to foretell* आगाऊ सुचविणें, पूर्वसूचना देणें, (-चें) द्योतक असणें *in. con.* Heral'dic *a.* भाटाचा. २ पूर्वद्योतक. Heral'dically *adv.* भाटासारखा. Her'aldry *n.* भाटाचा धंदा *m*, भाटविद्या *f.*

Herb (ėrb *or* hėrb) [Fr. *herbe* –L. *herba*, akin to Gr. *phorbe*, pasture -*pherbo*, Sk. भृ, to nourish.] *n. a plant the stem of which dies every year* (as distinguished from a tree or shrub which has a permanent stem) वनस्पति *f*, (ज्याचें मूळ दरवर्षास सुकून मरतें असा) रोपा *m*, बुटी *f*, ओषधि *f*, औषधि *f.* [HERBS AND SIMPLES जडीबुटी *f*, झाडपाला *m*. POT-H. शाक *f*, भाजी *f*. POT-HERBS AND VEGETABLES शाकभाजी *f.*] Herba'ceous *a. of, or of the nature of, herbs* वनस्पतीचा, वनस्पतीसारखा, वनस्पतिधर्मीय. Herb'age *n. pasture* हिरवें *n*, हिरवळ *f*, झाडपाला *m*. Her'bal *a.* वनस्पतिसंबंधीं. H. *n. a book containing the classification and description of plants* वनस्पतिवर्ग व त्याचे गुणधर्म यांच्या माहितीचें पुस्तक *n*, वनस्पतिवर्णन *n*, औषधिकल्प *m*. २ *a hortus siccus* वनस्पतिसंग्रह *m*. Herb'alist, Herb'ist *n. one skilled in the knowledge of plants* वनस्पतिवेत्ता *m*, ओषधिविशारद. २ वनस्पति विकणारा, गांधी. Herb'arium *n. a classified collection of preserved herbs or plants* शुष्कोषधिसंग्रह *m*, सुकलेल्या वनस्पतींचा वर्गवार संग्रह *m*. २ *a book or case for preserving dried plants* शुष्क वनस्पति ठेवण्याची पेटी *f*. Herb'ary *n.* वनस्पतींचा बाग *m*. Herbif'erous *a.* वनस्पति धारण करणारा. Herbiv'orous *a.* वनस्पति खाऊन राहणारा, शाकतृणादिजीवी.

Hercules (hėr'kū-lēz) [Name of a hero in Gr. mythology.] *n. a Greek hero famous for his strength* (ग्रीक लोकांच्या पुराणांतरीं वर्णिलेला) हर्क्यूलीज (नांवाचा महाशक्तिमान् योद्धा *m*), बलभीम *m*, भगीरथ *m*. २ *astron. a constellation in the Northern Hemisphere* उत्तरगोलार्धांतील 'शौरी' तारकापुंज *m*. Hercu'lean *a.* हर्क्यूलीजसारखा. २ *very great, difficult or dangerous* महत्प्रयासाचा, दुःसाध्य, कष्टसाध्य, भयंकर, घोर, विकट, अवघड. २ *having extraordinary strength or size* असामान्यशक्तिमान्, अद्भुत बळ असलेला, प्रचंड, अवाढव्य, असामान्यशक्तीचा.

Herd (hėrd) [A. S. *heord, herd*; cognate words are found in all the Teut. languages.] *n. a number of beasts assembled together* (as distinguished from a *flock* applied to smaller animals) कळप *m*, झुंड *f*, खिल्लारं *f*, कुल *n*, यूथ *m* or *n*, तांडा *m*. [NOON-RESTING-SPOT OF PASTURING HERDS गोठण *f*, आखर *m*. TO COLLECT THE HERDS AT IT गोठाविणें.] २ *a crowd of low people, a rabble* झुंड *f*, घोळका *m*, तांडा *m*. H. *v. t. to unite or associate in a herd* कळपानें -कळपाचा कळप *m*. &c. फिरणें -राहणें, कळप करून राहणें. २ *to associate* (-शीं) सहवास -समागम करणें -ठेवणें. H. *v. i.* कळप करणें. Herd'ess *n. fem.* धनगरीण *f*. Herd'man [A. S. *heorde, hirde.*] *n.* हेटकरी, धनगर. Herds'man *n.* धनगर, खिल्लारी, राखणा, गुराख्या, जांगळी, गोप, पशुपाल. [HIRE OR WAGES OF A H. राखणावळ *f*, राखण *f.*] Herds'woman *n. fem.* धनगरीण *f.*

Here (hēr) [A. S. *her*, Ger. *hier*, from the demonstrative stem *hi*–. See He, Her.] *adv. in this place* (opposed to *there*) येथें, एथें, इकडे, या ठिकाणीं, अत्र (Sk.). [H. AND BEYOND अईलपईल *or* ऐलपैल. H. AND THERE *round about* आजूबाजू *or* आजूबाजूस, अरतापरता, आरापारा, इकडेतिकडे, जिकडे तिकडे, जेथें तेथें, ठिकठिकाणीं, जागोजाग, ठायीं ठायीं. २ *with intermissions or intervals* मधून मधून, राहून राहून, मध्येंमध्यें, जागोजाग, ठायीं ठायीं. ३ *dispersedly* इतस्ततः, जागोजाग. OF H., THERE, AND EVERYWHERE इकडचा-तिकडचा, सार्वत्रिक. NEITHER H. NOR THERE लागू न पडणारा (मुद्दा) NOR H. NOR THERE इथें ना तिथें, अरत्रीं ना परत्रीं, अत्र ना परत्र, इह ना पर.] २ *in this life* या जन्मीं, इहजन्मीं, इहजन्मांत, इहलोकीं. ३ *now* (sometimes used before a verb without a subject; as, *here goes.*) आतां, या वेळीं. Here'about, Here'abouts *adv.* सुमारें ह्या ठिकाणीं, ह्या ठिकाणच्या जवळ -आसपास. Hereaf'ter *adv.* या पुढें, पुढल्या काळांत, उत्तरकाळीं. २ परलोकीं. Hereaft'er *n.* परलोक *m*, मरणोत्तरची भविष्यस्थिति *f.* Hereat' *adv.* यावरून, यामुळें, यानें. Hereby'*adv.* यावरून, यामुळें, यानें, या अन्वयें, ह्याचे आधारें. Here'in *adv.* यांत. Hereinaft'er *adv.* या (लेखांत -भाषणांत इ०) पुढें -खालीं. Hereinbefore' *adv.* पूर्वीं, वर. Hereinto' *adv.* Here- of *adv.* एथचा, एथला, येथील, अत्रत्य. २ यावरून, म्हणून. Hereon' *adv.* यावर. Hereto' *adv.* याला. Here-to-fore' *adv.* यामागें, यापूर्वीं. Hereunto' *adv.* Here-upon' *adv.* ह्यावर, ह्यावरून. Herewith' *adv.* ह्याबरोबर, ह्यासहित, etc.

Hereditary (he-red'i-tar-i) [L. *hereditarius* -*hereditas*, heirship -*heres*, heir.] *a. descending by inheritance* वंशपरंपरागत, आनुवंशिक, पिढीजाद, वारशानें मिळणारा, वंशपरंपरायात, पितृप्राप्त, वडिलोपार्जित, वडिलांपासून आलेला -मिळालेला, वतनाचा, परंपरीण, वारशानें मिळालेला. [H. DISPOSITION, QUALITY, ETC. आनुवंशिक स्वभाव *m*, पिढीजाद गुण *m*, वासलात *f*. H. OFFICER वतनदार. FELLOW H.-OFFICER वतनबंधु, वतनभाऊ.] २ *descendible to an heir* पिढीजाद -वंशोवंश चालणारा -चालायाचा, वंशोपभोग्य. ३ *transmitted, or capable of being transmitted, from a parent to a child* (as a disease, etc.) आईबापांपासून -वडिलांपासून आलेला -होणारा -जडणारा -जडलेला (रोग इ०),

आनुवंशिक, मुलांत उतरणारा (गुण इ०). Hereditabil'ity n. वंशपरंपराप्राप्यता f. Hered'itable a. वारशानें मिळणारा. Hered'itably adv. वंशपरंपरेनें. Heredit'ament n. (law) वंशपरंपराप्राप्य मिळकत f, वारशानें मिळणारी मिळकत. Hered'itarily adv. वंशपरंपरेनें. Hered'ity n. आनुवंशिकता f, वंशपरंपराप्राप्तता f, पिढीजादपणा m. Her'itable a. (of things) वंशोपभोग्य, वंशोवंश -वंशपरंपरा चालणारा. [H. RIGHTS वारसपणाचे हक्क m. pl.] २ (of persons) रिक्थहारी, वारसा सांगणारा. Her'itably adv. Her'itage n. वारसा m, वतन n. २ *Script. the Israelites or the chosen people of God* (ईश्वराचे आवडते) इस्रायल लोक m. pl. Her'itance n. वतन n.

Heresy (her'e-si) [Fr. *heresie* -L- *hæresis* –Gr. *hairesis* -*hairein*, to take.] n. *an opinion adopted in opposition to the usual belief* (usually, but not necessarily, said in reproach) (प्रचलित धर्म किंवा रूढि यांच्या) विरुद्धमत n, पाखंडमत n, पाषंडमार्ग m. २ (*theol.*) प्रचलितधर्मविरुद्ध मत n, विशिष्ट समाजास मान्य असलेल्या धर्मतत्त्वांचे विरुद्ध मत n, थोतांड n. ३ (*law*) *an offence against Christianity* ख्रिस्ती धर्मशास्त्राच्या विरुद्ध आग्रहानें व उघड उघड प्रतिपादन केलेलें मत n, ख्रिस्तधर्मविरुद्ध मत n. Heret'ic a. पाखंडी. २ प्रचलित धर्मतत्त्वांविरुद्ध वागणारा,('मुरारेः तृतीयः पन्थाः' या न्यायानें धर्मभेद उत्पन्न करणारा) पाखंडी. ३ (*Rom. Cath.*) एकदां ख्रिस्ती धर्म पतकरल्यावर पुन्हां त्यांतील कांहीं तत्त्वांविरुद्ध मुद्दाम आग्रहानें वागणारा (मनुष्य). Heret'ic a. पाखंडी, थोतांडमताचा, थोतांड्या. Heret'ical a. Heret'ically adv. Hereti'cate v. t. *to denounce as a heretic* पाखंडी म्हणून सोडून देणें.

Hermaphrodite (hėr-maf'rod-īt) (L. –Gr. *Hermaphroditos*, the son of *Hermes* and *Aphrodite*, who, when bathing, grew together with the nymph Salmacis into one person.] n. *an abnormal individual in whom are united the properties of both sexes* (-male) (जन्माचा) हिजडा m, ठवा m; (-female) हिजडी f, अर्धनार f; संशयितलिंगी स्त्री किंवा पुरुष, हिजडें n. २ *an animal or plant in which the two sexes are united* द्विलिंगी प्राणी m, द्विलिंगी वनस्पति f, स्त्रीनरकेशरयुक्त पुष्प n, युग्मलिंगी पुष्प n. H. a. संशयितलिंगी, उभयलिंगी, स्त्रीपुरुषजातीचा. Hermaphrodit'ic,-al a. हिजडा. Hermaph'rodism n. हिजडेपणा m, संशयितलिंगित्व n.

Hermeneutics (hėr-me-nū'tiks) [Gr. *hermeneutikos* -*hermeneus*, an interpreter -*Hermes*, Mercury, the god of art and eloquence.] n. *the science of interpretation and explanation* (esp. of the Scriptures) श्रुतिशब्दार्थमीमांसा f, अर्थप्रकाशन n. Hermeneu'tic,-al a. *explanatory, exegetical* विवेचनात्मक, विवरणात्मक, श्रुतिशब्दार्थमीमांसेसंबंधीं. Hermeneu'tically adv. विवेचनरूपानें, विवरणरीत्या.

Hermes (her'-mēz) [Gr. *Hermes Trismegistos*, lit. Hermes 'the thrice -greatest.'] n. *the Greek name for the Egyptian 'Thoth,' who was god of science, esp. alchemy* (प्राचीन किमया करणारांच्या मतें) रसायनशास्त्राची 'हर्मीज' नांवाची अधिदेवता f. Hermet'ic, -al a. *alchemical* किमयेचा, किमयासंबंधीं. २ किमयागारांच्या पद्धतीचा -पद्धतीस अनुरूप. ३ *air-tight* वायुप्रतिबंधक, (वाऱ्याचाही शिरकाव न होण्यासारखा) घट्ट, गच्च, सुदृढ, वायू न जाईसा. Hermet'ically adv. वायु न शिरेल अशा रीतीनें, गच्च.

Hermit (hėr'mit) [M. E. *eremite*, through Fr. and L. from Gr. *eremites* -*eremos*, solitary, desert.] n. *one who retires from society and lives in solitude or in the desert* (esp. from religious motives) वानप्रस्थ, अरण्यवासी, वनवासी, तपस्वी, योगी, एकान्तवासी. Her'mitage n. *the dwelling of a hermit, a secluded residence, a retired abode* अरण्यवास m, आश्रम m, मठ m, (*dim.*) मठी f, पर्णकुटी f, पर्णशाला f, गुंफा f, एकान्तवासाची जागा f. २ *a kind of wine, both white and red, so called from Hermitage, a district of France* 'हरमिटेज' नांवाची फ्रेंच दारू f. फ्रान्स देशांतील हरमिटेज नामक परगण्यावरून हें नांव पडलें आहे. Her'mitary n. मठ m. Her'mitess n. *fem.* तपस्विनी f. Hermit'ical a. *pertaining to, or suited for, a hermit* तपस्व्याचा, एकान्तवासास योग्य.

Hern (hėrn) n. *zoöl.* Same as Heron, which see.

Hernia (hėr'ni-ä) [L.] n. *pl.* E. Hernias, L. Herniæ. *med. a rupture, esp. of the abdomen* अन्तर्गळ m, (इन्द्रियाची) स्थानभ्रष्टता f, (कोणतेंही इन्द्रिय आपल्या वास्तविक जाग्यापासून सुटून) दुसरीकडे -बाहेर -पुढें येणें n, *prop.* शीर उतरणें n. Her'nial a. अन्तर्गळाचा, अन्तर्गळासंबंधीं. Herniot'omy n. *med. a cutting for the cure or relief of hernia, celotomy* अन्तर्गळ बरा करण्यासाठीं केलेली छेदनक्रिया f.

Hero (hē'rō) [Through Fr. and L. from Gr. *heros*; akin to L. *vir*, A. S. *wer*, a man, and Sk. वीर, a hero.] n. *mythol. a warrior, supposed to be exalted, after death, to a place among the gods; a demigod* वीर, (मरणोत्तर) वीरस्वर्ग मिळविणारा योद्धा m, उपदेव m. २ *a man of distinguished bravery* वीर, शूर, शूरवीर, शूर गडी, मर्द, मर्दमाणूस, जवानमर्द, गाजी, रणशूर, रणधीट, रणधीर, तरवारबहादूर, शूरशिरोमणी. [DRINKING OF HEROES IN BATTLE वीरपान n. HEROES OF THE FIRST ORDER अतिरथी महारथी m. pl. HERO'S BADGE (bracelet) वीरकंकण n. POST IN BATTLE WISHED FOR BY HEROES वीराशंसन n.] ३ *a prominent or central personage in any remarkable action or event,* (hence) *an illustrious person* (कोणत्याही महत्वाच्या बाबतींतील) प्रमुख m, कार्यकर्ता m, मध्यमणि m (*fig.*). ४ *the principal figure in any history or work of fiction* नायक m. Hero'ic,-al a. *becoming a*

H. *v. t. to fetter by tying the legs, to clog* पायांना खोडा घालणें, पायांत खोडा अडकविणें; as, "They H.ed their horses." २ *to perplex* गोंधळवणें, (-चा) गोंधळ उडविणें, घोंटाळयांत घालणें -पाडणें -टाकणें, (-ची) पंचाईत करणें, बुचकळयांत -पेंचांत पाडणें. H. *n. an unequal gait, a limp* लंगडी चाल *f*, विषम गति *f*. २ Same as Hopple, which see. ३ *difficulty, embarrassment* पंचाईत *f*, पेंच *m*, घोंटाळा *m*, गोंधळ *m*, झेंगट *n*, लचांड *n*, कचाट *n*, खेंकटें *n*, कच *f*, ओकटें *n*. Hob'bled *pa. t.* and *p. p.* Hob'bler *n.* Hob'bling *pr. p.* and *v. n.* Hob'blingly *adv.*

Hobby (hob'i) [Fr. *hobereau*, a hobby, a species of falcon.] *n. a small, strong-winged European falcon formerly trained for hawking* (युरोपमधील) मजबूत पंखांचा लहानसा बहिरी ससाणा *m*, हाबीससाणा.

Hobby, Hobby-horse (hob'i, -hors) [O. Fr. *hobin*, a mare.] *n. a strong active horse of a middle size* (said to have been originally from Ireland) मध्यम बांध्याचा मजबूत व चपळ] घोडा *m*. हा पहिल्यानें आयर्लंडांतून आणला असें म्हणतात. Cf. Indian भिमथडी तट्टू *m*. २ *a stick often with the head or figure of a horse on which boys make believe to ride* (usually under the form *hobby-horse*) (मुलांच्या खेळांतील) लांकडाचा घोडा *m*, काठीचा घोडा *m*, काठीघोडा *m*. ३ (a) *a subject or plan upon which one is constantly setting off, a favourite and ever-recurring theme of discourse* आवडीचा -हौशीचा विषय *m*, छंद *m*, नाद *m*, दैवत *n*, कुळदैवत *n*, खेळ *m*, खेळवणा *m*. (b) *that which occupies one's attention unduly or to the weariness of others* तुणतुणें *n* (*fig.*), घोडें *n* (*fig.*). Hobby-hors'ical *a. having a hobby or whim, eccentric, whimsical* लहरी, छंदिष्ट, छंद असलेला.

Hobgoblin (hob-gob'lin) [*Hob* (See second Hob), *Robin*, and *Goblin.*] *n. a frightful goblin* पिशाच *n*, चेडा *m*, बऊ or बौ *m*, बागुलबोवा *m*.

Hobnail (hob'nāl) [*Hob*, a projecting head + *nail.*] *n. a short, sharp-pointed, large-headed nail* (used in shoeing horses and for studding the soles of heavy shoes) (नाल मारण्याचा) मोठ्या डोक्याचा -गुलाचा खिळा *m*. २ See 2nd Hob. H. *v. t. to tread down roughly* (as with hobnailed shoes) (मोठ्या गुलाच्या नालाखालीं) क्रूरपणानें तुडविणें. Hob'nailed *a.*

Hobnob (hob'nob) [A. S. *habban*, to have, and *nabban*, not to have.] *adv. Shakes. have or have not* (a familiar invitation to drink) घेत असशील तर चल -चे. २ *on intimate terms of good fellowship* सलोख्यानें. H. *v. i. to drink familiarly* (with another) (स्नेहभावानें) दुसऱ्याबरोबर मद्यपान करणें, दारू पिणें. २ *to be on intimate terms, to associate familiarly* मिळून मिसळून असणें -राहणें -वागणें, दोस्तीनें वागणें. H. सख्यत्व *n*, स्नेह *m*, मित्रत्व *n*, दोस्ती *f*.

Hobson's choice, See under Choice.

Hock (hok) [From *Hochheim* in Germany.] *n. the wine produced at Hochheim* हॉक दारू *f*. ही जर्मनीमध्यें हाकीम येथें तयार होते. २ (now applied to) *any Rhenish wine* -ऱ्हाईन नदीच्या कांठच्या कोणत्याही देशांत तयार झालेली दारू *f*.

Hock (hok) [A. S. *hoh*, the heel.] *n.* (a) *the joint in the hind limb of quadrupeds between the leg and shank and corresponding to the ankle in man* (जनावराच्या) मागच्या पायांतील घोंटा *m*. (b) *a piece cut by butchers, esp. in pork, from either the front or hind leg, just above the foot* खाटकानें कापलेला घोंट्याचा भाग *m*. २ *the popliteal space; the ham* घोंडशीर *f*, मांडीच्या पाठीमागचा स्नायु *m*, कुच्या *f. pl.* Hock *v. t. to disable by cutting the tendons of the hock, to hamstring* घोंडशिरा तोडून लंगडा करणें.

Hockey (hok'i) [From *Hook n.*] *n. a game at ball played with a club or 'hooked' stick* (टोंकाशीं वांकविलेल्या काठीनें चेंडू उडविण्याचा) हॉकीचा खेळ *m*, हॉकी *m*. २ *the stick used by the players* (written also *hookey* or *hockey*) हॉकीच्या खेळांतील चेंडू उडविण्याची आंकडीदार काठी *f*. आंकडीदार दांडू *m*.

Hocus (hō'kus) [See Hocus-pocus.] *v. t.* See Hocus-pocus *v. t.* २ *to adulterate, to drug* (इतर मादक द्रव्य घालून) भेळ *f* -भेसळ *f* करणें. ३ *to stupefy with drugged liquor* (मादक पेय पाजून) गुंगवणें. H. *n. a cheat* फसव्या, भामट्या. २ *drugged liquor* मादक पदार्थ घालून कडक केलेली दारू *f*. Ho'cussed *pa. t.* & *p. p.* Ho'cussing *pr. p.* & *v. n.*

Hocus-pocus (hō'kus-pō'kus) [The meaningless gibberish of a juggler.] *n. a. juggler's trick, a term used by jugglers in pretended incantations* गारुड्याचा छूमंतर *m*, फांफूं *n*, छाछूं *n*, तंत्रमंत्र or झंतरमंतर *n*, थंतरमंतर *n*, धंतरमंतर *n*, थातूंमातूं *n*, थातुरमातुर *n*. २ *a juggler or trickster* गारुडी or गारोडी, जादूगार or जादूवाला. ३ *a juggler's trick, a cheat* (हात-) चलाखी *f*, बडबड *f*, फसवणूक *f*. H. *v. t.* (*colloq.*) *to cheat* फसविणें, (-च्या) डोळ्यांत धूळ फेंकणें, (-ची) नजर चकविणें, हातचलाखी करणें, हातचलाखीनें रूपांतर करणें; as, "Frederick was *hocus-pocussed* into a Bishop." Ho'cus-po'cussed *pa. t.* & *p. p.* Ho'cus-po'cussing *pr. p.* & *v. n.*

Hod (hod) [A variant of prov. *hot* -Fr. *hotte*, a basket carried on the back.] *n. a kind of a wooden tray with a handle borne on the shoulder, for carrying mortar, bricks, &c.* (लांकडी) कोलंबें *n*, घमेलें *n*, गबेलें *n*. Hod'man *n*.

Hodgepodge (hoj'poj) [See Hotch-potch.] *n. a mixed mass, medley* पंचमेळ *f*, खिचडमिचड *f*.

**Hodograph** ( hod'ŏ-grăf ) [Gr. *hodos*, path, & *graph.*] *n. math. a curve described by the moving extremity of a line the other end of which is fixed, this line being constantly parallel to the direction of motion of, and having its length constantly proportional to the velocity of, a point moving in any path* बलांतरलेखक ( वक्र किंवा रेषा ).

**Hoe** (hō) [Fr. *houe*, a hoe. See Hew.] *n. a tool chiefly for hewing or digging up weeds, and for loosening and arranging the earth about plants* कुदळ *f*, कुदळें *n*, पावडें or फावडें *n*, dim. फावडी *f*, खोरें *n*, केगरें *n*, कुद्दाल *m*, खनित्र *n*. [ RAISED BY THE H. ( -GRAIN, &c. ) कुदळ्याच्या. ] H. *v. t. to cut or clean with a hoe* कुदळणें, कुदळीनें खणणें. Ho'ed *pa. t. & p. p.* Ho'eing *pr. pa & v. n* Ho'er *n.*

**Hog** ( hog ) [Prob. Akin to E. *hack*, cut; and meaning first 'a castrated boar.' ] *n.* डुकर *m, f, n*, शूकर *m*, सूकर *m*. [ DOMESTIC *or* TAME H. घरडुकर *n.* ] २ ( *low* ) *a mean filthy, or gluttonous fellow* डुकरासारखा गलिच्छ किंवा अधाशी मनुष्य, डुक्कर (*fig.*). ३ (*Eng.*) *a young sheep that has not been shorn* बिनभादरलेलें तरुण मेंढरूं *n.* ४ *naut. a rough, flat scrubbing broom for scrubbing a ship's bottom under water* (डुकराच्या केंसासारखी) खरखरीत केरसुणी, डुकरी केरसुणी *f.* ५ ( *paper manuf.*) *a device for mixing and stirring the pulp of which paper is made* कागदाचा गीर मिसळून ढवळण्याची कांटेरी केरसुणी *f.* Hog *v. t. to cut short like bristles* (डुकराच्या केंसाप्रमाणें ) उभे केंस कापणें; as, "To H. the mane of a horse." २ *naut. to scrub with a hog, or scrubbing broom* डुकऱ्याकेरसुणीनें घासणें. H. *v. i. naut. to become bent upward in the middle, like a hog's back* ( said of a ship broken or strained so as to have this form ) डुकराच्या पाठीसारखें पोंक येणें, (तारूं) मोडून जाणें. तारूं वादळांत सांपडून मोडलें असतां त्याची पाठ डुकराच्या पाठीसारखी होते. Hog'ged *pa. t. & v. p. p.* Hog'ging *pr. p. & v. n.* Hog-plum *n. spondias manjifera* अंबाडा *m.* Hog'gish *a.* डुकरासारखा, शूकरवत्. Hog'gishness *n.* डुक्करपणा *m.* Hog'ringer *m.* डुकराच्या नाकांत कडें घालणारा मनुष्य. Hog'shead *n.* पीप *n.* २ एक कैली माप *n*, ५२ १/२ ग्यालनांचें माप *n*, ( किंवा ) जुनें ६३ ग्यालनचें माप *n*. *N. B.:*—Hogshead of claret = 46 gallons; H. of beer = 54 gallons; H. of tobacco varies from 750 to 1200 lbs.

**Hoiden** ( hoi'dn ) [M.E. *hoydon*, a clownish person.) *n. a romping, ill-bred girl* धांगड *f*, घोडी *f*, घोडगी *f*, जानी *f*, भोपळदेवता *f.*

**Hoist** ( hoist ) [ The final *t* is due to the *pa. p. hoist*, used for *hoised.* The verb is really *hoise.*] *v. t. to raise, to lift, to elevate* उभारणें, उचलणें, उंच करणें, उंचावणें. [ To H. SAIL शीड *n.* उभारणें.] H. *n. that by which anything is hoisted, the apparatus for lifting goods, a lift* (वखारींत माल एका मजल्यावरून दुसऱ्या मजल्यावर नेण्याचा) यंत्री पाळणा *m.* २ *naut. the perpendicular height of a flag* ( as opposed to the *fly* or *the horizontal length when flying from a staff*) (बावट्याची) उंची *f.* Hoist'away *n. a mechanical lift* यंत्री पाळणा *m.* या पाळण्यांतून मोठमोठ्या वखारींत माल खालींवर नेतात. Hoist'ed *pa. t. & p. p.* Hoist'ing *pr. p. & v. n.* Hoist'way *n. an opening for the hoist or elevator, in the floor of a wareroom* (वखारींतील) यंत्री पाळण्याचा रस्ता *m.*

**Hold** ( hōld ) [ A. S. *healdan*, to keep. ] *v. t. to sustain, to keep in the grasp, to retain* धरणें, धरून ठेवणें. [ To H. FIRMLY घट्ट -मजबूत -करकचून धरणें. ] २ *to keep possesion of or authority over* ( आपलेकडे ) ठेवणें, धरणें, राखणें, ( आपल्या हातीं -ताब्यांत ) राखून ठेवणें, हातांतून जाऊं न देणें. ३ *to possess or be in possession of, to occupy* (as an office) जवळ -ताब्यांत -कबज्यांत ठेवणें -असणें, (जागेवर) असणें *in. con.* ४ *to bind* ( legally or morally ), *to confine, to restrain* आवरणें, आवरून धरणें, आटोपणें, (-ला) आळा घालणें, बंधनांत -कह्यांत ठेवणें. ५ *to carry on, to continue, to persist in* (मौन इ०) धरणें, चालवणें, चालू -सुरू ठेवणें, बंद न पाडणें. ( b ) *to celebrate* भरणें, जमवणें, बोलावणें, करणें; as, "To H. a meeting, a Parliament, a court." ६ *to contain* ( as a vessel ) सांठवून धरणें, मावून -सांठवून घेणें, धारण करणें, समावेश होणें *in. con. g. of o.* ७ *to maintain* ( as an opinion ) बाळगणें, धरणें, (-चा) आश्रय करणें. ८ *to regard, to esteem, to consider* मानणें, लेखणें, समजणें, गणणें, (-ची ) गणना करणें; as, "I H. him but a fool." To H. a wager पैज मारणें -लावणें. To H. forth पुढें मांडणें -ठेवणें -करणें. To H. in आवरणें, आटोपणें, ताब्यांत -दाबांत -कह्यांत ठेवणें. To H. off दूर ठेवणें, जवळ येऊं न देणें, लांब राखणें. To H. one's own (a) वचन -प्रतिज्ञा पाळणें. ( b ) आपली जागा संभाळणें -राखणें -कायम ठेवणें, ठाव न सोडणें. To H. one's peace गप्प राहणें, चूप बसणें, मौन धरणें, उगाच -चुप राहणें. To H. out ( a ) *to offer* पुढें करणें, द्यावयास काढणें. ( b ) *to endure* सोसणें, सहन करणें, सोसत राहवणें; as, "He can not long *hold out* these pangs." To H. up ( a ) *to raise, to lift* वर करणें, उचलणें, ताठून धरणें, ताठ करणें. ( b ) *to support, to sustain* कायम राहणें, टिकाव धरणें; as, "He holds himself *up* in virtue." ( c ) *to exhibit, to display* (-चें) प्रदर्शन करणें, ( उचलून ) दाखवणें, उघड्यावर -सो कळ्यावर आणणें; as, "He was *held up* as an example." (d) *to rein in* (as horses), *to check* दाबणें, -आंखडून धरणें, थांबवणें. To H. water ( a ) ( *lit.* ) to

*retain water without leaking* न गळणें. (b) (hence, *fig. & colloq.*) *to be whole, sound, consistent, without gaps or holes* (commonly used in a *negative sense*) संगतवार व पायाशुद्ध असणें, निभाव काढणें, टिकाव धरणें, निभणें, टिकणें; as, "His statements will not *hold water.*" Hold *v. i. to remain fixed, not to move, to stop* (mostly in the *imperative*) ठाम राहणें, न हालणें, उभें राहणें; as, "*Hold*, enough!" २ *to be true or unfailing* लागू पडणें, खरें असणें, ठरणें, टिकणें, अचल राहणें; as, "While our obedience or argument *holds.*" ३ *to continue unbroken or unsubdued* टिकाव धरणें -काढणें, निभाव धरणें, टिकणें, निभणें. ४ *to remain attached, to adhere* (often with *with, to,* or *for*) चिकटून -धरून राहणें, न सोडणें, चिकाटी मारणें, इमान राखणें. ५ *to refrain* राहणें, थांबणें. ६ *to derive right or title* (generally with *of*) (-पासून) मिळवणें, संपादन करणें; as, "My crown is absolute, and *holds of* none." Hold on! H. up! *colloq. wait, stop* हां! हांहां! थांब! धीर धर! To H. forth *to speak in public, to harangue, to preach* चारचौघांत बोलणें, सभेंत बोलणें, जाहिर भाषण करणें, उघड उघड प्रतिपादन करणें. To H. in *to restrain one's-self* आंत ओढून धरणें, आंवरणें, थांबणें. To H. on *to continue* चालणें, चालू राहणें, सुरू असणें; as, "The trade *held on* for many years." To H. out *to last, to endure, not to give way* टिकणें, निभणें. To H. to *or* with *to take sides with* (as a person or opinion) (-ची) बाजू धरणें, पक्ष उचलणें, पक्ष -मत धरणें, (-ला) मिळणें. To H. together *to remain in union* (-शीं) लागून-जमून असणें, जुळणें, मिळणें. To H. up (as under misfortunes) निभाव काढणें, टिकाव धरणें. (b) *to cease raining, to stop* पाऊस उभणें -उघडणें -राहणें, झडपणें, निखारणें, हडकणें; as, "It *holds up.*" (c) *to keep up* चालू ठेवणें, बंद पडूं न देणें. H. *n. -the act.* धरणें *n.* २ *seizure, grasp, clasp* (often used with the verb *take* and *lay*) धर *m*, पकड *f*, कबज *n*, तावडी *f.* [To OBTAIN FIRM HOLD (A DISEASE &c.) धर धरणें.] ३ *power of seizing, authority or ground to take or keep, claim* धरण्याचा हक्क *m* -अधिकार *m.* ४ *means of support* आधार *m*, आसरा or आस्रा *m*, आश्रय *m*, अवलम्बन *n* (Sk.); as, "If a man be upon a high place without good H., he is ready to fall." ५ *a place of confinement, custody* कैद *f*, कैदखाना *m*, बंदी *f*, बंदीखाना *m*, अटक *f*, पहारा *m*; as, "King Richard, he is in the mighty *hold* of Bolingbroke." ५ *a place of security, a fortified place, a fort* (a *stronghold*) तटबंदीची जागा *f*, किल्ला *m*, गढी *f.* Held *pa. t. & p. p.* Hold'back *n. check, hindrance* ? *f*, अडथळा *m*, हरकत *f*, विघ्न *n.* २ (गाडीची) ढक *f* (?). Hold'en *p. p.* of Hold (obsolete in elegant writing, but still used in legal language.) Hold'er *n.* धरणारा. २ दांडा *m.* ३ *one who holds land &c. under another, a tenant* पोटधारेकरी, कूळ *n.* ४ *com.* (as of a bill of exchange, promissory note, &c.) (हुंडीचा) मालक *m.* Hold'-fast *n. that which holds fast:* (a) -as a nail, hook &c. वस्तुला घट्ट बसण्यासाठीं मारलेला खिळा *n*, हूक *f*, इ० (b) (*hence*) *support* आधार *m*, आश्रय *m*; as, "His *holdfast* was gone." Hold'ing *pr. p. & v. n. anything held:* as, (a) *a farm or other estate held of another, a tenure* भोगवट्याचें शेत, जमीन, वगैरे. (b) *hold, influence* सत्ता *f*, वजन *n*, अधिकार *m.*

Hold (hōld) [Dut. *hol*, a cavity or hole, with excrescent *d*. See Hole.] *n. the interior cavity of a ship between the floor and the lower deck, used for the cargo* (माल भरण्याची गलबताची) कोठी *f*, घमताड *n.* Hold'er *n. one who is employed in the hold of a vessel* (गलबताच्या) कोठींतील कामकरी.

Hole (hōl) [A. S. *hol*, a hole, cavern.] *n. a perforation, an opening in a solid body, a bore* भोंक *m*, छिद्र *m*, छेद *m*, बुराक *m*, भोंसका *m*, *dim.* भोसकट *m*, भोकसा *m*, रंध्र *n*, वेध *m*, विंध *m*, घरा *m*, घरका *m*, ढोबळा (a *large* hole), डोळा *m*, डोळू *m*, मुखी *f.* [FULL OF H.S पुष्कळ भोंकें असलेला, शतछिद्र. THAT IS FOND OF PICKING H.S छिद्रान्वेषी, रन्ध्रान्वेषी, दोष तेवढे पाहणारा. THAT HAS A H. IN HIS COAT अंगीं उणा, कांहीं तरी न्यून असलेला. TO PICK A H. IN ONE'S COAT छिद्र *n* -उणेंपणा *m* -कमीपणा *m* -दोष *m.* पाहणें, छिद्रान्वेषण *n* -रंध्रान्वेषण *n.* करणें. H. AS MADE IN THE FLESH BY A BOIL भोंक *n*, घरा *m*, घरका *m*, घरडा *m*, घरटा *m.* H. THROUGH A WALL FOR THE OUTLET OF WATER भिंतींतील मोरीचें तोंड *n.* IN THIS SENSE OF 'HOLE IN A WALL' THE WORDS भोंकू, क्नाना, मोरी HAVE NOW BECOME OBSOLETE.] २ *a cavity, an excavation, a pit, a rent,* खळगा *m*, *dim.* खळगी *f*, खळी *f*, खांच *f*, खांचर *f*, खाडा *m*, खोलगा *m*, खोलवा *m*, खंदक *m*, गर्त्ता *m*, होंडा *m.* [HOLES AND HOLLOWS खांच खळगे *m. pl.*, खांचखोबळे *m. pl.* LARGE IRREGULAR H. भोंकसा *m*, भगदड *n*, भगदळ *n.* H. IN THE GROUND, AS FOR A POST खाडा *m*, खड्डा *m*, खळगा *m*, नेम *n* (AS IN मेडीचा नेम काढणें), दम *m*, टोंब *m.*] ३ *a pit in the ground, for an animal to live in* बिळ *pop.* बीळ *n*, विवर *n*, घर *n.* ४ (hence) *a low, narrow or dark lodging* कोंझट घर *n* -घरटें *n.* ५ *a hollowed place* पोखर *f*, पोखारा *m*, खाडा *m*, खांचारा *m*, विवर *n.* [H. AS MADE IN A SMOOTH SURFACE खोंच *f*, खांच *f*, खोबळा *m*, छेद *m*, टोंचा *m*, टोंची *f.*] ६ *means of escape* सवड *f*, खिडकी *f*, फट *f.* H. *v. t. to cut deep or bore holes in* भोंक -खळगा पाडणें. २ *to drive into a hole* (as an animal or a billiard ball) बिळांत -घरांत दवडणें -घालवणें

-पिटाळून लावणें -नेणें. H. *v. i. to go or get into a hole* बिळांत -घरांत -भोंकांत जाणें.

Holiday ( hol'i-dā ) [ *Holy-day.* See Holy.] *n. a day set apart in honour of some event* सणाचा दिवस *m*, उत्सवाचा दिवस *m*, स्मरणतिथि *f*, सण *m* (as, Diwali Holidays = दिवाळीचा सण); पर्वणी *f* ( as, Sankrânt Holiday = संक्रांत पर्वणी ), पुण्यदिन *m*, पुण्याह *m*, उत्साहदिन *m*. २ *a day of amusement, a festival day* सुटीचा -मजेचा -आनंदाचा दिवस *m*. ३ ( *law* ) *a day for suspension of business* सुटीचा दिवस *m*, रजा *f*. [ THE H.s *any fixed or usual period for relaxation or festivity, esp. Christmas and New Year's Day with the intervening time* ठरलेले सुटीचे दिवस *m*, *pl.* -काळ *m*, मुख्यत्वेंकरून नाताळची अगर ( इंग्रजी ) वर्षप्रतिपदेची सुटी *f*. ] H. *a. of or pertaining to a festival, cheerful, joyous, gay* सुटीच्या -सणाच्या दिवसाचा, रजेंतील, सुटीचा, आनंदाचा, गमतीचा, मजेचा. २ *occurring rarely, adapted for a special occasion* क्वचित् घडणारा, विशेषकालाकरितां योजिलेला.

Holiness ( hō'li-nes) [See *Holy.*] *n. the state of being holy, perfect moral integrity or purity, freedom from sin, sanctity, innocence* पवित्रपणा *m*, पवित्रता *f*, शुद्धि *f*, विशुद्धि *f*, परिशुद्धि *f*, मनःशुद्धि *f*, अंतःशुद्धि *f*, अंतःशौच *n*, निष्पापता *f*. २ *the state of being hallowed or consecrated to God or to his worship, sacredness* पवित्रपणा *m*, पवित्रता *f*. His Holiness *a title of the Pope* (formerly given also to the Greek Bishops and Greek Emperors ) पुण्यराशि, पुण्यनिधि ( these two are old forms of address to the old Rishis ), पुण्यमूर्ति ( on the analogy of न्यायमूर्ति ). पोपला ( व पूर्वी ग्रीक लोकांच्या धर्मोपदेशकांस व बादशहांस ) दिलेली बहुमानाची पदवी *f*.

Holla ( hol'ā ) [ Ger. *holla* is from Fr. *hola* -*ho*, and *la* -L. *illac*, there. ] *interj.* ओलो !, होला ! H. *v. i. to cry loudly to one at a distance* ( लांबच्या मनुष्याला ) मोठ्यानें हांक मारणें.

Hollo ( hol'ō ) [ See Halloo. ] *v. i. to shout* आरोळी मारणें. H. *v. t. to urge or call by shouting* ओरडून हांक मारणें *with* ला *of o.*

Hollow ( hol'ō ) [ A. S. *holh*, a hollow place. ] *a. having an empty space or cavity, not solid* पोकळ. [ H. GRAINS पोकळ -पोलकट -पोलट -वांझे दाणे *m. pl.* ] २ *depressed, sunken* खोलगट or खोलकट, सखल, ओढलेला. [H. EYE कोंझा *or* कोंजा डोळा *m.* ] ३ *reverberated from a cavity or resembling such a sound, deep* खोल, गंभीर, ओढलेला ( voice ). ४ *not sincere or faithful* मनाचा खोटा -कुजका, कपटी. ५ ( *fig.* ) *unreal, unsound, unsubstantial* पोकळ, रिता, रिकामा, वायकरणी, फुसका. H. *n. a cavity natural or artificial, a hole, a cavern* खळगा *m*, *dim.* खळगी *f*, खोलगा *m*, खांच *f*. २ *a low spot* ( surrounded by elevations ), *a channel* खळगा *m*. H. *v. t. to make a hollow, to excavate* खळगा पाडणें, पोकळ करणें, पोंखरणें, टोंकरणें. H. *adv. wholly, completely, utterly* ( chiefly after the verb *beat*, and often with *all* ) पूर्णपणें, पुरापुरा, सपशेल; as, "This story beats the other *all hollow.*" Hollow -eyed *a.* कोंझा, कोंझट. Hol'low-hearted *a.* मनाचा कुजका. H.-sounding *a.* खबखबीत, पोकळ. Hol'lowly *adv.* Hol'lowness *n.* पोकळपणा *m*, पोकळी *f*, पोकळीक *f*, खोलावा *m*. २ रिकामेपणा *m*, फोलपणा *m*. ३ कुजकेपणा *m*. Hol'low-ware *n.* (पातेलीं किटल्या वगैरे) स्वैपाकाचीं पोकळ भांडीं *n. pl.* To beat hollow *to beat wholly* पुरा चीत करणें, ( -चा ) पुरा पराभव करणें.

Holm ( hōm ) [ A. S. *holm*, a mound.] *n. an islet in a river* जूं *n*, जुवा *m*. २ *low flat land near a river* नदीजवळची सखल व सपाट जागा *f*.

Holocaust (hol'ō-kawst) [ L. -Gr. *holokauston* -*holos*, whole, and *kaustos*, burnt. ] *n. a burnt sacrifice* आहुति *f*, होम *m*. [ OF or BELONGING TO A H. हौम्य. ] २ *sacrifice or loss of many lives* ( as by the burning of a theatre or a ship ) (पुष्कळ माणसें जळून मेल्यामुळें झालेली ) प्राणाहुति *f*, होम *m*.

Holograph ( hol'o-grăf ) [ Gr.-*holos*, whole, and *graphein*, to write.] *n. a deed or testament wholly written by the grantor or testator* ( लिहून देणारानें ) सर्व आपल्या हातानें लिहिलेला लेख *m*, स्वहस्तलिखित लेख *m*.

Holoptic ( hol-op'tic ) [ Gr. *holos*, whole, and *optic.* ] *n.* एकास एक लागलेले डोळे असलेली माशी *f*, निखिलनेत्रमक्षिका *f*.

Holster ( hōl'ster ) [ Low Ger. *holster* -Gr. *holfter*, a pistlol-case ( with change of *ft* to *st.* ) ] *n. a leather case for a pistol, carried by a horseman at the bow of his saddle* ( खोगिरापुढें लावलेली ) पिस्तुल ठेवण्याची कातड्याची पिशवी *f*.

Holy ( hō'li ) [ A. S. *halig*, lit. whole, perfect, healthy -*hal*, sound or whole. See Hale, Heal, Whole. ] *a. set apart to the service or worship of God* देवास वाहिलेला, देवाकरितां बाजूस ठेवलेला, पवित्र; as, "H. vessels, H. priest-hood." २ *perfect in a moral sense, pure in heart, religious* शुद्ध, विशुद्ध, परिशुद्ध, मनःशुद्ध, अन्तःशुद्ध, साधु, मनाचा शुद्ध -पवित्र -निर्मल, निष्पाप, पापरहित, अन्तःशुची. ३ *hallowed* पवित्र, पवित्रीकृत, सोंवळा. H. day *a religious festival* ( a ) सण *m*, सणवार *m*, सणाचा दिवस *m*, मोठा दिवस *m*. ( b ) उत्साह *m*, उत्सव *m*, उत्साव *m*. उत्सवदिन *m*, पुण्यदिन *m*, पुण्याह *m*. ( c ) पर्व *n*, पर्वणी *f*, पर्वदिन *m*. [ PRESENTS MADE ON A HOLYDAY सण *m*. VICTUALS GIVEN TO RETAINERS ON A H. DAY सण *m*. TO KEEP A H.DAY सण करणें -पाळणें.] २ *a day of rest* ( in this sense,

more commonly spelt *holiday*, which see) सणाचा -सुटीचा दिवस *m.* H. Ghost *or* Spirit *the third person of the Christian Trinity* पवित्र आत्मा *m.* H. of Holies हिब्रू लोकांच्या जेरुसलेम येथील देवळाचा अगदीं आंतला सोंवळा गाभारा *m.* ह्यांत 'मुख्य प्रीस्टा' शिवाय कोणालाही जाण्याची परवानगी नसे, व तोसुद्धां वर्षांतून फक्त एकदांच आंत जाई. H. one परमेश्वर *m.* H. orders *the Christian ministry* ख्रिस्ती लोकांची (पगारी) उपाध्येमंडळी *f* किंवा पुरोहितगण *m.* H. place *or* spot पवित्र स्थान *n*, पुण्यस्थान *n*, पुण्यक्षेत्र *n*, पुण्यतीर्थ *n*, देवस्थळ *n*, देवस्थान *n.* H. season *or* time पुण्यकाल *m*, पुण्यावसर *m.* H. stone *n.* (So called because sailors kneel when using it). (बोटींतील तक्तपोशी घांसण्याचा) खलाशांचा पवित्र दगड *m.* H.-stone *v. t.* अशा दगडानें तक्तपोशी घांसणें. H. water पवित्रोदक *n*, तीर्थ *n.* -of the Ganges गंगा *f*, गंगोदक *n.* Vessel for H. water तीर्थपात्री *f*, तीर्थवटी *or* तिर्थोटी *f.* -for the H. water of the Ganges गंगाजळी *f.* H. week *the week before Easter kept holy for the commemoration of Christ's passion* ईस्टरच्या आधींचा आठवडा *m.* H. writ *the holy writings, the Scriptures* (ख्रिस्ती लोकांचें) बायबल *n*, ख्रिस्ती लोकांचें पवित्र धर्मशास्त्र *n.*

Homage (hom'āj) [Fr. *hommage* -L. L. *homaticum* -L. *homo*, a man.] *n.* *a symbolical acknowledgment made by a feudal tenant to, and in the presence of, his lord, on receiving investiture of fee, or coming to it by succession, that he was his 'man', or vassal; profession of fealty to a sovereign* भक्तियुक्त मुजरा *m*, भक्तियुक्त वंदन *n*, भावपूर्वक वंदन *n*, प्रणाम *m*, प्रभुवंदन *n*, बादशाही मुजरे *m. pl.* २ *respect or reverential regard* नमन *n*, मान *m.* [H. OF THE HEART AND AFFECTIONS भावभक्ति *f.*] ३ *reverence directed to the Supreme Being, reverential worship* भावभक्ति *f*, भावपूर्वक भक्ति *f* -पूजा *f.* Hom'ager *n.* अंकित *m*, कूळ *n.*

Home (hōm) [A. S. *ham*; Dut. and Ger. *heim.*] *n.* *one's own house* (आपलें -स्वतःचें) घर *n*, निजगृह *n*, स्वगृह *n.* [AT H. AND ABROAD घरीं दारीं, जनीं वनीं. SERVICE *or* EMPLOYMENT AT H. बैठा रोजगार *m*, बैठी चाकरी *f.* TO DRIVE (by incantations) FROM HOUSE AND H. उच्चाटन *n.* करणें *g. of o.* TO DRIVE FROM HOUSE AND H. वनवास *m.* आणणें *with* स *or* ला *of o.* TO KEEP AT H. घर *n.* धरणें.] २ *one's native land, the place or country in which one dwells* स्वदेश *m*, मायदेश *m*, मातृभूमि *f*, जन्मभूमि *f*, आपला देश *m*, वतन *n*, विलायत *f* (as used by Englishmen in India). ३ *the abiding place of domestic affections* प्रेमाचें वसतिस्थान *n*, कुटुम्ब *n.* Cf. Marathi मीं आपल्या कुटुंबांत आहें. ४ *habitation, seat* ठिकाण *n*, स्थान *n*, घर *n.* ५ *a place of refuge and rest, an asylum* आश्रम *m*, आश्रयस्थान *n*, स्थान *n.* ६ *the grave* कबर *f.* At H. (a) *at one's own house or lodgings* आपल्या स्वतःच्या घरीं. (b) *in one's own town or country* आपल्या गांवीं. (c) *prepared to receive callers* भेटण्यास -भेट घेण्यास मोकळा -सुटा. To be at H. on any subject *to be conversant or familiar with it* एखादा विषय पूर्णपणें अवगत -माहीत असणें, एखाद्या विषयाचें पूर्ण ज्ञान असणें *in. con. with* ला *of s.*, एखाद्या विषयांत पूर्ण तरबेज असणें. To bring H. unto अंगीं भिडविणें -लावणें, (-च्या) पदरीं माप घालणें *g. of s.* To come H. *to affect or to touch personally* अंगीं or आंगास येणें, जिव्हारीं लागणें, हाडीं घाव *m.* होणें -येणें -लागणें. To feel at H. *to be at one's ease* घराप्रमाणें वागणें -राहाणें -वाटणें *in. con. with* ला *of s.* To make one's self at H. *to conduct one's-self with as much freedom as at home* घराप्रमाणें; पूर्ण मोकळ्या मनानें राहणें. Home *a.* *domestic, not foreign* घरचा, घरगुती, मुलकी or मुलखी, देशी. २ *close, personally pointed* अंगीं लावलेला -भिडवलेला. H. *adv.* *to one's own house or country* घरीं, घरास, घराकडे, आपल्या घरीं, स्वगृहीं, स्वदेशीं, गांवीं, गांवास, &c. २ *close, closely* जवळ, जवळच, निकटसंबंधानें. ३ *to the full length* पुरा, पूर्णपणें, जाम-as, "To drive a nail H." = खिळा पुरा -जाम मारणें -ठोकणें. Home-bird *n.* घरकोंबडा *m*, कूपमंडूक *m.* H. born *a.* *native, not foreign* घरचा, स्वदेशी. H.-bound *a.* *kept at home* घरीं ठेवलेला. H.-bred -raised, -made *a.* घरपोसा, पाळींव, घरगुती, घराऊ, घरघराऊ, घरचा, स्वदेशांतला, स्वदेशी, &c. Home'less *a.* घरदार नसलेला. Home'liness *n.* *want of elegance or beauty* साधेपणा *m*, साळसुदपणा *m.* Home'ly *a.* *domestic, intimate* घरकामाचा, कुटुम्बसंबंधीं, गांवठी. २ *plain, unpolished* साधा (कपडा इ०), जाडाभरडा (कपडा, अन्न इ०), गरीबीचा, विशेष बेतबात नसलेला. Home-made *a.* घरीं केलेला. २ स्वदेशांत केलेला. ३ साधा, दहाजणां सारखा, विशेष डामडौल नसलेला. Home'sick *a.* *sick or grieved at separation from home* कुटुम्बविरहानें दुःखित झालेला, गृहविरहार्त, गृहविरहदुःखी. Home'sickness *n.* कुटुम्बविरहामुळें झालेलें दुःख *n*, कुटुम्बविरह दुःख *n.* Home'-spun *a.* घरीं कातलेला -पिंजलेला -केलेला. Home'ward, Home'wards *adv.* *toward home* घराकडे, घराकडील दिशेला. H. *a.* *being in the direction of home* घराकडील दिशेला असलेला, गृहाभिमुख. Home department *n.* *that part (branch) of government which is concerned with the maintenance of the internal peace of the United Kingdom, its headquarters, the Home office, and its official head the Home Secretary* स्वराष्ट्रीय खातें *n* (as opp. to Foreign department = परराष्ट्रीय खातें). Home

rule *n. a. form of government claimed by Ireland with a separate Parliament for the management of internal affairs* आयर्लंड मागत असलेलें स्वराष्ट्रापुरतें स्वराज्य *n*, आपल्या देशाचा अन्तस्थ राज्यकारभार आपल्याच लोकांच्या हातीं असावा अशी आयर्लंड मागत असलेली स्वराज्यपद्धति *f.* Home-ruler *n.* आयर्लंडला आन्तरस्वराज्य मिळावें असें प्रतिपादन करणारा, आन्तरस्वराज्यवादी.

Homeopathy (hō-mē-op'a-thi) [Gr. *homoiopatheia*, likeness of condition or feeling -*homoios*, like, and *pathos*, feeling.] *n. Samuel Hahnemann's system of curing diseases by small quantities of those drugs which excite 'symptoms similar' to those of the disease* समचिकित्सा *f*, अनुचिकित्सा *f*, व्याधिविपर्यस्तार्थकारीचिकित्सा *f* (according to वाग्भट). प्रकृति नीट असतां घेतलेल्या एखाद्या औषधापासून होणारीं चिन्हें ज्या रोगांत दिसतात तो रोग तेंच औषध थोडथोड्या प्रमाणानें देऊन बरा करण्याची विद्या *f.* Ho'mœopath *n.* समचिकित्सक, अनुचिकित्सक. Homeopath'ic *a.* Homeopath'ically *adv.*

Homicide (hom'i-sīd) [Fr. -L. *homicidium*, -*homo* a man, and *cædere*, to kill.] *n. the killing of one human being by another* मनुष्यवध *m*, नरहिंसा *f*, नृहत्या *f*, नरवध *m.* [CULPABLE H. सदोष मनुष्यवध *m.*] २ *Shakes. one who kills another* मनुष्यवध करणारा, नरहिंसक. Hom'icidal *a.* मनुष्यवधासंबंधीं, मनुष्यवधासारखा, मनुष्याचा प्राण घेणारा. *N. B.*:—*Homicide* is मनुष्यवध and *murder* is खून.

Homily (hom'i-li) [Gr. *homilia*, communion.] *n. a discourse or sermon read or pronounced to an audience* (लेखी किंवा छापील) प्रवचन *n*, धर्मोपदेश *m*, Hom'ilist *n.* प्रवचनकार, उपदेष्टा, उपदेशक.

*N. B.*:—Book of Homilies: प्रवचनग्रंथ. Homily is a printed sermon to be read by ministers in Churches, and especially by the inferior clergies who are not qualified to compose discourses themselves.

Homogeneous (hō-mō-jē'nē-us) [Gr. *homos*, Sk. सम, one, same, and *genos*, Sk. जाति, kind.] *a. of the same kind or nature, consisting of similar parts or of elements of the like nature* समजातीय, सजातिय, एकजातीय, सधर्म, सधर्मी, सधर्मक, एकधर्मक, सवर्ण, सविध, अनुगुण. २ *alge. possessing the number of factors of a given kind* समघातिक, समगुणक, सवर्ण. Homoge'neousness, Homogene'ity *n.* समजातीयता *f*, सजातीयता *f*, साजात्य *n*, एकजातीयता *f*, साधर्म्य *n*, सावर्ण्य *n*, etc. २ *alge.* समघातता *f.*

Homograph (hom'ō-graf) [Gr. *homos*, the same, and *graphein*, to write.] *n. philol. one of two or more words identical in orthography, but having different derivations and meanings* (भिन्नार्थदर्शक) तुल्यवर्णात्मक शब्द *m*, समवर्णात्मक शब्द *m*; as, *fair* (a market), and *fair* (beautiful).

Homography (hō-mog'rä-fi) [See Homograph.] *n. geom.* तुल्यरचना *f.* Homograph'ic *a.* तुल्यरचनात्मक. Homologous, See under Homology below.

Homology (hō-mol'o-ji) [Gr. *homos*, the same, and *logos*, proportion.] *n. the quality of being homologous*: (a) *affinity of structure* समधर्मता *f.* (b) *affinity of series* समश्रेणिकता *f.* २ *philos. affinity or correspondence of descent* सममूलता *f*, समकारणता *f.* Homol'ogous *a. math.* तुल्यजातीय, एकास्पद. २ *philos.* सममूलक, समकारणक. Homol'ogous sides *geom.* एकास्पद बाजू, समश्रेणिक बाजू, समधर्मी बाजू, तुल्यजातीय बाजू-भुज.

Homonym (hom'ō-nim) [Fr. *homonyme* -Gr. *homonymos* -*homos*, Sk. सम, the same, and Gr. *onoma*, Sk. नाम, name.] *n. a word having the same sound as another but a different meaning* (भिन्नार्थदर्शक) समोच्चारित शब्द *m.*

Hone (hōn) [A. S. *han.*] *n. a stone of fine grit, used for sharpening cutting instruments* साण *f*, शिळ *f*, पाथरी *f*, पाजविण्याचा दगड *m*, निषणा *m.* H. *v. t. to sharpen on, or with, a hone* साणेवर घासणें -लावणें, पाजवणें, धार लावणें -काढणें; as, "To H. a razor."

Honest (on'est) [L. *honestus*–*honor.* चॉसरचे वेळीं या शब्दाचे अर्थ 'योग्य' किंवा 'उचित' (decent), 'कुलशीलवान्, अब्रूदार, इज्जतदार, मानवंत' (honourable) असे होते.] *a. fair in dealing with others, upright* प्रमाणिक *pop.* प्रामाणिक, नेकीचा, सचोटीचा, साखीचा, इमानी, भला, खऱ्या -चोख व्यवहाराचा. २ *open, frank* उघड्या -मोकळ्या मनाचा, निष्कपट. ३ *chaste, faithful, virtuous* निर्मल, पवित्र, शुद्ध, निष्पाप, निष्कलंक, सद्गुणी, विश्वासपात्र. [H. WOMAN पतिव्रता स्त्री *f*, साध्वी *f.*] H. labours हलालाचे श्रम *m. pl.* Hon'esty *n. integrity* प्रामाणिकपणा *m*, सचोटी *f*, नेकी *f*, इमानीपणा *m*, इमान *n.* २ *chastity, modesty* निर्मलपणा *m*, पवित्रपणा *m*, पावित्र्य *n*, पातिव्रत्य *n.*

Honey (hun'i) [A. S. *hunig*; Ger. *honig.*] *n. a sweet, viscid fluid, esp. that collected by bees from the flowers of plants, and deposited in the cells of the honeycomb* मधु *m* (Sk.), मध *m* or *f* (Mar.), माक्षिक *n*, क्षौद्र *n.* २ *that which is sweet or pleasant, like honey* मधासारखा गोड पदार्थ *m*, मध *m* (*fig.*). ३ *Shakes. sweet one* (a term of endearment) आवडतें *n*, प्रियलग; as, "*Honey*, you shall be well desired in Cyprus." H. *v. i. to be gentle, agreeable, or coaxing; to talk fondly;* (also) *to be or become obsequiously courteous or complimentary* गोड गोड बोलणें, मधुभाषण करणें, ममताळूपणानें वागणें, गोडीनें वागणें, मधाचें बोट लावणें; as, "*Honeying* and making love." Honey *v. t. to make agreeable; to cover or sweeten with, or as with, honey* सुखविणें, सुख देणें, माधुर्य आणणें, गोड

करणें, संतोषविणें; as, "Canst thou not H. with fluent speech?" H.-bag *n. the receptacle for honey in a honey-bee* (मधमाशांच्या शरीरांतील) मध जमविण्याची मधाची पिशवी *f.* H.-bee *n.* मधमाशी *f,* मधुकरी *f,* मधुकर *m.* H.-comb *n.* (मधमाशांचें) पोळें *n,* पोळा *m,* पोळ *n,* *dim.* पोळी *f,* मधशिसा *m,* मधुकोश *m,* चरवी *f* (?). [SOME KINDS OR FORMS OF H.-COMB ARE:—काट्याळें *n* (the cells environing a stick), कोळेंवें *n* (a rich kind), कोंगें *n* (a long kind), सातेरूं *n* (so called because it has *seven* cells), मुरकुट्यें *n* (one made by the मुरकुटी माशी), पोयें *or* पोवें *n.* DIVISION OF H. WHICH CONTAINS HONEY कांदा *m.* DIVISION OF THE H. CONTAINING THE BEES OR THEIR YOUNG पाकडी *or* पैकडी *f.*] H.-mouthed, H.-tongued *a.* मधुभाषी, मधुभाषण करणारा, मधुरभाषी, प्रियवादी, प्रियंवद, गोडबोल्या. Hon'ied *a.* मध लावलेला. २ गोड; as, "H. words." Hon'eymoon, Hon'eymonth *n. the first month after marriage* लग्न झाल्यानंतरचा पहिला महिना *m,* विवाहानंदमास *m,* आनंदमास *m.* Honey-sucker *n.* मधमाशी *f.* Honey'-sweet *a.* मधाप्रमाणें गोड, मधासारखा.

Honour (on'ėr) [L. *honor.*] *n. esteem due or paid to worth, high estimation, respect* मान *m,* सन्मान *m,* सत्कार *m,* आदर *m,* गौरव *m,* मान्यता *f.* २ *excellence of character, high moral worth* अब्रू *f,* इज्जत *f,* नांव *n.* [HONOUR OF WOMEN पातिव्रत्य *n,* साध्वीपणा *m,* सद्गुण *m.*] ३ *a nice sense of what is right, just, and true, with course of life correspondent thereto; strict conformity to the duty imposed by conscience, position, or privilege* मनाचा थोरपणा *m* -प्रशस्तपणा *m,* सचोटी *f,* नेकी *f,* सत्ववृत्ति *f,* सत्वस्थपणा *m,* कुलाचा अभिमान *m,* लाज *f* (*colloq.*). ४ *that to which esteem or consideration is paid, distinguished position, high rank* थोरपणा *m,* थोरवी *f,* मोठेपणा *m,* प्रतिष्ठा *f,* गौरव *m,* उच्चपदवी *f.* ५ *fame, reputation, credit* अब्रू *f,* इज्जत *f,* नांव *n,* नामोश *m,* हुरमत *f,* पाणी *n,* लौकिक *m.* [TO BECOME BOUND IN H. इरेस पडणें, केवळ अब्रूकरितां -नांवाकरितां करण्यास बांधला जाणें. TO KEEP ONE'S H. पागोटें *n* -पगडी *f* पागोट्याचे पेंच *m. pl.* संभाळणें, नांव *n*- राखणें. TO LOSE ONE'S H. अब्रू-इज्जत -नांव गमावणें -घालवणें, पाणी जाणें *g. of s.* TO STAIN THE H. OF (-च्या) नांवाला -अब्रूला बट्टा -काळोखी लावणें -बाट आणणें, (-चें) पागोटें- नांव खालीं करणें. TO TAKE CONCERN FOR THE H. OF अभिमान धरणें *g. of o.*] ६ *a token of esteem paid to worth, a mark of respect, a ceremonial sign of consideration* मानाची खूण *f,* सन्मानचिन्ह *n;* as, "He wore an *honour* to his breast; military *honours*, civil *honours*". ७ *a cause of respect and fame, glory* बोज *m,* नांवरूप *n,* यश *n,* झील *f,* रया *f.* ८ *a title applied to the holders of certain honourable civil offices, or to persons of rank* मुलकी खात्यांतील कांहीं बड्या अधिकाऱ्यांस किंवा बडे लोकांस दिलेली पदवी *f;* as, "His *honour*, the Mayor." सन्मानपात्र मेयर साहेब, सन्मानभूषण मेयर साहेब. ९ *pl. academic or University prizes or distinction* विश्वविद्यालयाकडून मिळालेलें बक्षीस *n,* विश्वविद्यालयीन सन्मान *m;* as, "*Honours* in classics." H. *v. t. to regard or treat with honour, esteem, or respect* (-ला) मान देणें, (-चा) मान करणें, सन्मान -आदर -गौरव &c. करणें *g. of o.,* थोर समजणें, (-ला) थोरपणा देणें, गौरवणें, मर्यादा *f*- बोज *m.* -ठेवणें -राखणें *g. of o.* २ *to dignify, to exalt, to raise to distinction or notice, to bestow honour upon* मोठेपणास चढविणें, मोठा करणें, थोर पदवीस नेणें, मानास चढविणें, सन्मानपद देणें. ३ (*commerce*) *to accept and pay when due* (a bill, &c.) स्वीकारणें, (हुंडी इ०कांचा) स्वीकार करणें, पटविणें, सचकारणें, आदर करणें *g. of o.* Hon'ourable *a. worthy of honour* मान्य, माननीय, सन्मान्य, सन्माननीय, आदरणीय, आदरार्ह, पूज्य, वंद्य. २ *illustrious* अब्रूचा, अब्रूदार, नांवलौकीकाचा, इज्जतवाला. ३ *high-minded, noble, actuated by principles of honour* मनाचा थोर, थोर मनाचा, प्रशस्त, उदार, उदारधी, सत्वशील, सत्ववृत्ति, सत्ववृत्तीचा, सत्वस्थ, सात्विक, उदारमनस्क, उदारचेता. ४ *not base, fair in dealing* प्रमाणिक *pop.* प्रामाणिक, नेकीचा, सचोटीचा, शुद्ध, पवित्र, निर्मल, नेक; as, "An H. motive" = शुद्ध हेतु *m,* शुद्ध दानत *f.* ५ *conferring honour, or procured by noble deeds* सन्मानदायक, थोर कृत्यें करून मिळविलेला; as, "H. wounds." ६ *performed or accompanied with marks of honour* सन्मानचिन्हांकित, गौरवचिन्हयुक्त; as "An H. burial." ७ *of reputable association or use, respectable* संभावित, अब्रूदार, नांवालौकिकाचा. ८ *an epithet of respect or distinction* नेकनामदार, (or briefly) नामदार; as, "the H. gentleman". Hon'ourableness *n.* मानमान्यता *f,* मान *m,* मान्यता *f,* गौरव *m.* २ इज्जत *f,* नांव *n,* नांवलौकिक *m,* अब्रू *f.* ३ मनाचा थोरपणा *m,* थोर मन *n,* मोठें मन *n,* प्रशस्तपणा *m.* ४ सत्व *n,* सत्वशीलपणा *m,* सत्ववृत्ति *f,* सत्य *n.* ५ नेकी *f,* प्रामाणिकपणा *m,* सचोटी *f,* इमान *n,* सत्य *n.* Hon'ourably *adv. with tokens of honour* सन्मानचिन्हपूर्वक, आदरचिन्हपूर्वक. २ सन्मानपूर्वक, मानानें, सन्मानानें. ३ अब्रूनें, अब्रू राखून -संभाळून, नांव राखून. Honora'rium, Hon'ourary *n. a fee allowed to professional men for their services* वेतन *n,* (महत्वाच्या कामगिरीबद्दल दिलेला) अल्प स्वल्प मोबदला *m.* २ *an honorary payment* केवळ बहुमानाकरितां दिलेलें वेतन *n,* बहुमानदर्शकवेतन *n,* सन्मानदर्शक वेतन *n,* (or briefly) सन्मानवेतन *n.* Hon'orary *a. done as a sign or evidence of honour* केवळ प्रतिष्ठेकरितां केलेला; as, "H. services." २ *conferring honour* सन्मानसूचक, प्रतिष्ठासूचक, सन्मानाचा, बहुमानाचा,

प्रतिष्ठेचा, मानमात्रदायी. ३ *holding a title or place without rendering service or receiving reward* सन्माननीय, सन्माय, पगाराशिवायचा, बिनपगारी. [H. SECRETARY सन्मान्य -सन्माननीय चिटणीस *m.* ] Hon'oured *a.* मान दिलेला. २ ( as a check, bill, &c. ) पटविलेला, स्वीकारलेला, सचकारलेला, सकारलेला. [To BE H.ED ( as a bill, &c. ) ( हुंडी ) पटणें, सचकारणें.] ३ सत्कारित, आदरलेला, आदृत, सन्मानित, मानित. Hon'ourer *n.* Hon'ouring *pr. p. & v. n.* Affair of honour *a duel* द्वंद्वयुद्ध *n,* द्वंद्व *n,* ( दोघांचा ) सामना *m.* Debt of H. अब्रूचें -इज्जतीचें कर्ज *n,* केवळ इज्जत राखण्याकरितां देण्याचें कर्ज *n.* Honours of war *the privileges granted to a capitulating force to march out with their arms, flags, &c.* (यशस्वी किंवा विजयी सैन्यानें ) हार गेलेल्या सैन्यास दिलेले ( शस्त्रांसहित कूच करणें वगैरेचे ) विशेष सन्मानाचे हक्क *m. pl.* Last H. *funeral rites* शेवटचा सन्मान *m,* प्रेतसंस्काराचा शेवटचा मान *m,* अंत्य सन्मान *m.* Laws of H. *the conventional rules of honourable conduct, esp. in the causes and conduct of duels* (कोणत्याही कार्यासंबंधीं, विशेषतः द्वंद्वयुद्धासंबंधीं) शिष्टसांप्रदायाचे नियम *m. pl.,* सभ्य शिस्तीचे नियम *m. pl.* Maid of H. *a lady in the service of a queen or princess* राणीच्या तैनातींतील दासी *f,* राणीची सन्मान्य दासी *f,* राणीची मानकरीण दासी *f.* Point of H. *any scruple caused by a sense of duty* अब्रूची किंवा इज्जतीची गोष्ट *f* -प्रश्न *m.* Upon my H. *an appeal to one's honour or reputation in support of a certain statement* अब्रूवर, इज्जतीवर, अब्रूला -इज्जतीला -कुळशीळाला स्मरून. Word of H. *a verbal promise which cannot be broken without disgrace* लाखाचा शब्द *m,* केवळ अब्रूसाठीं -कुळशीळासाठीं पाळावा लागणारा शब्द *m.*

Hood ( hŏŏd ) [ A. S. *hod.* ] *n. a covering or garment for the head, or the head and shoulders* ( as disting. from the *hat of a horse* ) टोपी *f,* घुंगट *n,* बुरखा *m.* [ H. OF A HORSE घोड्याच्या तोंडावरील बुरखा *m,* सीरद्वाल. H. OF A SERPENT फडा *f,* फणी *f.* H. OF A GOWN झग्याच्या पाठीमागें गळ्याशीं अडकविलेली पिशवी *f.* ] २ ( hence ) *a cowl* टोपीवजा बुरखा *m,* डोक्यावरचा बुरखा *m.* ३ *the top or head of a carriage* गाडीची दमन *f* टप *m* गाडीचीं छत्री *f.* ४ *a chimney top* धुराड्याची टोपी *f.* (-of a pump) बंबाची टोपी *f.* (-of a mortar) खलाची टोपी *f.* ५ *the hood-shaped upper petal of some flowers* ( as of monk's hood ) फुलाची टोपीसारखी पाकळी *f,* बुरख्यासारखी पाकळी *f.* N. B.:— The word *hood* occurring in several contexts should be translated by टोपी or बुरखा in all these contexts. H. *v. t. to cover with a hood* बुरख्यानें-टोपीनें झांकणें, बुरख्यासारखें -टोपीसारखें आच्छादन घालणें. २ *to cover, to hide* झांकून ठेवणें, लपविणें, छपविणें, आड करणें. २ *to blind* दिपविणें, आंधळा करणें. Hood'ed *a.* टोपीनें -टोपीसारख्या आच्छादनानें झांकलेला. २ बुरख्यासारखें झांकण असलेला. ३ *of a hooded or curved head* ( such as nails, ladles; &c. ) नागफणी, डवलीदार. ४ *bot. rolled up like a cornet of paper* बुरख्यासारखी -टोपीसारखी ( पाकळी ). Hood'less *a.* टोपीशिवाय असलेला, बोडका. Hood'man *n. the person blindfolded in blindman's buff* आंधळ्या कोशिंबिरीच्या खेळांतील डोळे झांकलेला मनुष्य, ( ह्या खेळांतील ) आंधळा *m.* Hood'manblind *n. an old term for blindman's buff* आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ *m.* Hood'wink *v. t. to blind by covering the eyes* डोळ्यांला पाटा -पडदा बांधणें, डोळे बंद करणें, डोळे बांधणें, डोळ्याला अंधारी -पटल घालणें. २ *to deceive by false appearance, to impose upon* फसविणें, ठकविणें, नजरबंदी करणें. Hood'winked *a.*

Hoof ( hōōf ) [ A. S. *hof;* Ger. *huf;* Sk. शफ. ] *n. the horny substance on the feet of certain animals* ( as horses, &c.) खुर *pop.* खूर *m,* शफ *m* or *n.* [ H. OF A HORSE OF ASS सुंब *m.* PAIRING OF THE H. OF A HORSE सुंबनराशी. THIN AND DELICATE H. गाजरसुंब *m.* DELICATE-HOOFED गाजरसुंब्या. DIVISION OF A CLOVEN H. गेळ *n,* गेळी *f.* TO BE BORN WITH TWO H.S (or legs) WHITE ( a calf or colt &c. ) दोहों खुरीं *or* दोहों पायांनीं उतरणें. TO BE BORN WITH THE FOUR H.S ( or legs ) WHITE चौखुरीं *or* चोहों पायांनीं उतरणें, चौखुरणें.] २ *a hoofed animal, a beast* ढोर *n,* जनावर *n,* गुरूं *n.* Hoof'ed *a.* खूर असलेला. Hoof'less *a.* ज्याला खूर किंवा शफ नाहीं तो, खूर नसलेला, बिनखुरी.

Hook ( hŏŏk ) [ A. S. *hoc;* Ger. *haken;* allied to Gr. *kyklos,* circle. ] *n. a piece of metal, or other hard material, formed or bent into a curve or at an angle, for catching, holding, &c.* आंकडा *m,* आंकडी *f,* केलु *n,* हूक *m.* २ *that part of a hinge which is fixed to the post, and on which a door or gate hangs and turns* ( गच्च बसविलेला ) बिजागराचा आंकडा *m* -कडी *f.* [H. AND STAPLE कडी कोयंडा *m.* H. AND EYE फांसा *m.* THAT HAS A H. AND EYE फांसेदार, सफांशी. ] ३ *an implement for cutting grass or grain; a sickle* ( आंकड्यासारखा ) कोयता *m, dim.* कोयती *f,* बोडसा *m,* बोडसें *n,* विळा *m.* ४ (R.) *a snare, a trap* जाळें *n,* सांपळा *m; -for fish* गळ *m,* गरी *f.* [ SWINGING H. OF DEVOTEES गळ *m.* ] By H. or by crook *by some means or other* युक्तीप्रयुक्तीनें, जेमतेम, प्रत्यक्षाप्रत्यक्षरीतीनें, जसातसा, अळेबळें, कसें तरी, कसेंतरी करून. ५ *the projecting point of the thigh bones of cattle* ( called also *hook bones*) आंकडीसारखीं ( गुरांचीं ) मांडींतील वांकडीं हाडें *n. pl.* H. *v. t. to catch or hold with a hook* आंकड्यांत धरणें -पकडणें, आंकड्यांत अडकविणें, गळांत धरणें. २ *to ensnare, to entrap* ( खुबीनें ) पेंचांत गाळांत

धरणें -आणणें, फशीं पाडणें, फसविणें, गोंवणें, गुंतवून टाकणें. ३ *to seize or pierce with the points of the horns* (आंकडीसारखीं) वांकडीं शिंगें भोंसकणें, वांकड्या शिंगानें धरणें, शिंगांत धरणें. H. *v. i. to bend, to be curved* (आंकडीसारखा) वांकडा होणें, वांकणें. Hook'ed *a. curvated* आंकडीसारखा, वांकडा; as, "The *hooked* bill of a bird." २ आंकडे लावलेला, आंकडे अडकविलेला; as, "The *hooked* chariot." Hook'edness *n.* वांकडेपणा *m*, वांक *m or n*, वांकण *n*. Hook'er *n. one who, or that which, hooks* आंकडा लावणारा, आंकड्यांत धरणारा -पकडणारा. २ *a fishing boat with one mast* (used on the coasts of Ireland) (आयर्लंडमधील) एक डोलकाठीची मच्छीमारी होडी *f*. Hook'ey *n. hockey* हॉकी (खेळ) खेळण्याची आंकड्याची काठी *f*. Hook'let *n.* लहान आंकडा *m* -हूक *m*. Hook'-nosed *a. having an aquiline nose* गरुडनाक्या, गरुडनासिक, शुकनासिक.

Hoop (hōōp) [Akin to Dut. *hoep*; cf. Icel. *hop*, a bay, from its round form.] *n. a pliant strip of wood or metal formed into a ring or band, for holding together the staves of casks, &c.* विडी *f*, गाडा *m*, आटा *m*. २ *a ring* (वाटोळा) पट्टा *m*, पट्टी *f*, कडें *n*, वर्तुलाकार बंधन *n*. ३ *a circle of thin whalebone, metal, &c. used for expanding the skirts of ladies' dresses* चक्कर *n*, चक्र *n*. H. *v. t. to fasten or bind with hoops* (as a barrel) गाडा-आटा-विडी-पट्टा बसविणें, पट्ट्यानें-कड्यानें बांधणें. २ *to encircle, to surround, to clasp* गवेंत धरणें, घेरणें, वेष्टणें, कोंडणें, मध्यें धरणें. Hoop'ed *a.* आटा बसविलेला, पट्ट्यांनीं आंवळलेला-आंवळून बांधलेला. Hoop'er *n*, (पिंपांना) पट्ट्या बसविणारा, गाडे घालणारा.

Hoop (hōōp) [Same as *whoop*, which see. Cf. E. *Weep*.] *v. i. to call out, to shout* मोठ्यानें ओरडणें, आरोळी मारणें -ठोकणें, हुपहुप करणें -ओरडणें. २ *to whoop* मोठ्यानें खोकणें. [HOOPING COUGH डांग्या खोकला *m*, सुसी *f*.] H. *v. t. to drive or follow with a shout* हुपहुप ओरडून घालविणें -दवडणें -पिटाळणें. ३ *to call by a shout or peculiar cry* हुपहुप ओरडून हांक मारणें. H. *n. a shout* हुपहुप आरोळी *f*. २ *a whoop* खसखस खोकला *m* -खोकणें *n*.

Hoopoe (hōōp'ō), Hoopoo (hōōp'ōō) [L. *upupa*, Gr. *epops* -imitative.] *n. a bird with a large crest, which it can erect or depress at pleasure* सुतार पक्षी *m*, सुतार *m*.

Hoot (hōōt) [Fr. *huer*, to call. Imitative word.] *v. i. to cry out or shout in contempt* हुर्यो हुर्यो *adv.* -हिडिस फिडिस *adv.* -हुत् हुत् *adv.* -हुडुत् करणें. २ *to make the peculiar cry of an owl* घुघुं करणें, घुमणें, बोभाणें or बोंभावणें. H. *v. t. to assail with contemptuous cries or shouts, to follow with derisive shouts* छिथुकरून -हुडुत् करून पिटाळणें, धिःकारपूर्वक शब्दांनीं हल्ला करणें. H. *n. a derisive cry or shout* हुर्रे *f*, हुडुत् *n*, हडहड *f*, हुरली *f*, हुरखेडी *f*, हुरवावडी *f*, धिम *f*. २ *the cry of an owl* घुटघुट *n*, खुटखुट *m*. H. *interj.* हत्त, हुडुत्त, हुर्रे, थू.

Hop (hop) [A. S. *hoppian*, to dance; Ger. *hupfen*.] *v. i. to leap on one leg, to move by successive leaps* (*as toads do*) एका पायानें -एका पायावर -उडत उडत चालणें -जाणें, लंगडी *f*. घालणें. २ *to walk lame, to limp, to halt* लंगडत चालणें, चालतांना अडखळणें, अडखळत -थांबत थांबत चालणें. H. *n. a leap on one leg* (as of a boy), *a leap* (as of a toad), *a jump* एकापायावर -उडत उडत चालणें *n*, लंगडणें *n*. Hop'per *n. one who hops* लंगडणारा. २ *a wooden trough through which grain passes into a mill* (so called from its *hopping* or *shaking condition*) घैरणें *n*. ३ *pl. a game* लंगडशाई *f*, लंगडशादी *f*, लंगडी *f*. ४ *naut. a vessel for carrying waste, garbage, &c. out to sea, so constructed as to dischage its load by a mechanical contrivance* (called also *dumping scow*) कचरा किंवा चिखल नेणारें लंगडें तारूं *n*, लंगडी बोट *f*.

Hope (hōp) [A. S. *hopa*.] *n. a desire of some good, or expectation of obtaining it; confidence* आशा *f*, आस *f*, विश्वास *m*, भरंवसा *m*, दृढ समजूत *f*. [FRUSTRATION OF H. आशाभंग *m*, निराशा *f*, हिरमोड *m*. RENEWAL or REVIVAL OF H. पुनराशा *f*. UNREASONABLE H. दुराशा *f*, अत्याशा *f*. TO GIVE UP THE H. आशा *f*. दम सोडणें -टाकणें, निराश होणें. WHILST THERE IS LIFE THERE IS H. *cf.* श्वास तों आस.] २ *one who, or that which, gives hope, furnishes ground of expectation, or promises desired good* आशा *f*, आशाजनक विषय *m*, आशादायक गोष्ट *f* -वस्तु *f*. ३ *that which is hoped for, an object of hope* आशा *f*, आशाविषय *m*. H. *v. i. to cherish a desire of good with expectation of obtaining it* (with *for*) (-ची) आशा करणें, आस धरणें, आशा -आस -आस्था करणें -बाळगणें -धरणें -ठेवणें -राखणें, अपेक्षा करणें, (-साठीं) आशावणें, आसावणें; as, "To H. for good success." २ *to place confidence in* (आशापूर्वक) विश्वास ठेवणें -करणें, भरंवसा ठेवणें -करणें, विश्वासणें, विश्वासून राहणें -असणें. H. *v. t. to desire with expectation or with belief in the prospect of obtaining it* (विश्वासपूर्वक) आशा करणें -धरणें *g. of s.*, (मिळेल अशा भरंवशानें) आस्थापूर्वक पाहणें; as, "Charity *hopeth* all things." Hope'ful *a. full of hope or agreeable expectation, inclined to hope, expectant* आशा असलेला, आशायुक्त, आशावान्, आशान्वित, उमेदवान्. २ *affording promise of good or of success* आशाजनक, होण्यासारखा, साधण्यासारखा, होतकरू, सफल होण्यासारखा, सिद्धीस जाण्यासारखा, उमेदवार; as, "A H. youth, prospect &c." Hope'fully *adv.*

आशापूर्वक, आशेनें, आस्थेनें. Hope'fulness *n.* आशा *f*, उमेद *f*, आस्था *f*. २ होतकरुपणा *m*, साध्यता *f*. Hope'less *a.* *destitute of hope* निराश, हताश, आशा नसलेला, आशारहित, आशाहीन. २ *giving no ground of hope* आशेचीं चिन्हें नसलेला, निराशेचा, निरुपाय, उपायहीन; as, "A H. cause, case, &c."

Hopper, See under Hop.

Hopple (hop'l) [Frequentative of *Hop.*] *v. t.* *to tie the feet close together, to prevent hopping or running* (धावतां ·पळतां येऊं नये म्हणून) पाय बांधणें, पायांत खोडा घालणें ·अडकविणें. २ (*fig.*) *to entangle, to hamper* जखडणें, नडवणें, (-ला) नड करणें, अडखळवणें. H. *n.* (chiefly *pl.*) *a fetter for horses or cattle when left to graze* (गुरें चरावयास सोडलीं असतांना त्यांचे पायांत अडकविण्याचा) खोडा *m*, बंधन *n*, पादशृंखला *f*.

Horal (hōr'al) [See *Hour.*] *a. of, or relating to, an hour or hours* होराविषयक, होऱ्यासंबंधीं. Hor'ary *a.* Same as *horal.* २ *noting the hours* कालदर्शक, होरादर्शक. ३ *hourly, occurring once an hour* तासाचा, तासा तासानें होणारा ·घडणारा, अल्पकालिक.

Horde (hōrd) [Fr. -Turk. *ordû*, camp -Pers. *ôrdû*, court, camp, horde of Tartars.] *n. a migratory or wandering tribe or clan, a tribe of nomadic people* (लुटारू) फिरस्त्यांचा थवा *m* ·जथा *m* ·पुंडा *m* ·टोळी *f*.

Hordeolum (hor-dē'ō-lum) [L. *hordeolus*, dim. of *hordeum*, barley.] *n. med. a small tumour upon the eyelid, a sty* आंजुळी *f*, रांजणवाडी *f*.

Horizon (ho-rī'zun) [Fr. -L. -Gr. *horizōn* (*kyklos*), bounding (circle), -*horizō*, to bound -*horos*, a limit.] *n. the circle bounding the view where the earth and sky appear to meet* क्षितिज *n*, धार *f*, काळीधार *f*, अंबरांत *m*, दिगन्त *m*, आकाशकक्षा *f*. [ASTRONOMICAL, CELESTIAL, *or* RATIONAL H. खगोलगर्भक्षितिज *n*, खगोलक्षितिज *n*. PHYSICAL, SENSIBLE, *or* VISIBLE H. दृश्यक्षितिज *n*, धार *f*, काळीधार *f*, बांदरी *f*, दृष्टिमर्यादा *f*, चक्रवालमंडल *n*, उदयाचल *m*, अस्ताचल *m*. DIP OF THE H. क्षितिजाची उतरण *f*.] Horizon'tal *a. pertaining to, or near, the horizon* क्षितिजाचा, क्षितिजासंबंधी, क्षितिजाजवळचा, क्षैतिज, काळ्या धारेचा. २ *parallel to the horizon* क्षितिजाशीं समांतर, क्षितिज ·समांतर, काळ्या धारेबरोबर, क्षितिजाबरावर, क्षितिजसमसूत्र, सपाट, क्षैतिज; as, "A H. line or surface." ३ *measured or contained in a plane of the horizon* क्षितिजाच्या सपाटीवरचा, क्षितिजनिर्दिष्ट, आडवा; as, "H. distance." [H. drill *a drilling machine having a horizontal drill spindle* आडव्या पात्याचा सामता *m*. H. ENGINE *an engine the piston of which works horizontally* आडव्या दट्ट्याचें एंजिन *n*, ज्याचा दट्ट्या आडवा सरतो असें इंजन *n* ·यंत्र *n*. H. PARALLAX क्षितिजलंम्बन *n* (PARALLAX=लम्बन). H. PLANE क्षितिज क्षेत्र *n*, क्षितिजधरातल *m*. H. POINT क्षितिजबिंदु *m*.] Horizon'tally *adv.* क्षितिजाशीं समांतर दिशेनें, क्षितिजाशीं समान, आडवा.

Horn (horn) [A. S. *horn*; Ger. *horn*; L. *cornu*, Gr. *keras.*] *n. the hard substance projecting from the heads of certain animals, as oxen* शिंग *n*, शृंग *n*, विषाण *n*, (in contempt) शिंगट *n*. [BOW OF H. शार्ङ्ग *n*. CHORD ATTACHED TO A H. शिंगोटी *f*. FLATTISH H. फताडें (शिंग *n*.). OF BACK-TURNED H.S हुंड OR होंडा, पाठशिंगी OR ·गा OR ·ग्या. H. FOR HOLDING POWDER *or* A POWDER -H. दारुचें शिंग *n*, शिंगडा. OF LONG OR LARGE H.S शिंगाळ OR ·ळ्या OR ·ळू, शिंगाडा OR ·ड्या. THE H.S -COLLEC. शिंगाडा *m*. TO DRAW IN ONE'S H.S cf. कान पाडणें, नाक गुंडाळणें. TO STRIKE WITH THE H.S शिंगटणें OR शिंगाटणें.] २ *something made of, or like, a horn* (as a horn of the moon) शृंग *n*, कोरीचें अग्र *n* (as, चंद्राची कोर *f*), शिंगासारखा पदार्थ *m*, शिंगाचा केलेला पदार्थ *m*. [A wind instrument of horn शिंग OR शृंग *n*. The most common of them are:—करणा OR कर्णा *m* (Blower of it करणेकरी), तुतारी *f* (Blower of it तुतारजी, तुताऱ्या), बांका *m dim.* बांकी *f* (Blower of it बांकेकरी), शिंग *n*, *dim.* शिंगी *f* (Blower of it शिंगाड्या, शिंगकरी), मोरशिंग, रणशिंग. A drenching H. for cattle घोटें *n*. A drinking H. पाणी पिण्याचें शिंग *n*, पाणी पिण्याचा पेला *m*.] ३ *Script. a symbol of strength, power, glory, exaltation, or pride* शिंग *n*; as, "The Lord is the *horn* of my salvation." ४ *feeler of an insect* किड्याची मिशी *f*. H. *v. t.* *to furnish with horns* सशृंग करणें, शिंगें लावणें. २ *to give the shape of a horn to* (-ला) शिंगाचा आकार देणें. Horn book *n. a first book for children* (*which formerly consisted of a single leaf set in a frame with a thin plate of transparent horn in front to preserve it*) मुलांचें पहिलें पुस्तक *n*. Horn'ed *a.* शिंगें असलेला, शिंगाचा, सशृंग, शृंगयुक्त. Horned beast-compreh. शिंग शिंगोटी *f*, शिंगोटी *f*. Fee on the purchase of a horned beast शिंगोटी *f*. Short-horned *a.* आंखुडशिंगी. Horn'er *n.* शिंगाचें काम करणारा. २ शिंगें विकणारा. ३ शिंगाडी, शिंगाड्या. Horn'less *a.* शिंगें नसलेला, अशृंग, शृंगहीन. Horn'y *a.* शिंगाचा, शृंगमय, शृंगनिर्मित. २ *hard* कठीण, निबर. Horns of a dilemma दोहोंकडून आलेली नड *f*, दुहेरी पंचाईत *f* ·अडचण *f*.

Hornblende (horn'blend) [Ger. *horn*, horn, and *blende* -*blenden*, to dazzle.] *n. a mineral of various colours found in granite and other ignious rocks that contain quartz* एक जातीचा खनिज पदार्थ *n*. See Mineral.

Horn-book, See under Horn.

**Hornet** (horn'et) [A. S. *hyrnet*, dim. of *horn.*] *n. a species of wasp so called from its antennæ or horns* मोठ्या जातीची गांधिल *f*, गांधीलमाशी *f*, साळखादें *n*, तुंबसर or तुंबसळ *m*. २ *a person who pesters with petty but ceaseless attacks* (गांधिलमाशी-सारखा त्रास देणारा) हाडवैरी मनुष्य *m*.

**Hornpipe** (horn'pīp) [*Horn + pipe.*] *n. an old Welsh musical instrument resembling a clarinet* तुतारी-सारखें वाद्य *n*. २ *a lively air for dancing* नाचतांना गाण्याचा उल्हासजनक राग *m*.

**Horography** (hor-og'ra-fi) [Gr. *hora*, an hour, and *graphein*, to describe.] *n. the art of constructing dials or instruments for indicating the hours* तास दाखविण्याकरितां शंकु किंवा इतर यंत्रें करण्याची विद्या *f*, शंकुनिर्माणविद्या *f*, कालमापनयंत्रविद्या *f*.

**Horologe** (hor'o-loj) [Gr. *hora*, an hour, and *legein*, to tell.] *n. any instrument for telling the hours* कालमानयंत्र *n*, कालमापकयंत्र *n*, Horo'logy *n*. कालमापकयंत्रशास्त्र *n*. २ कालमापनशास्त्र *n*.

**Horometry** (hor-om'et-tri) [Gr. *hora*, an hour, and *metron*, a measure.] *n. the art or practice of measuring time* कालमापनविद्या *f*, कालमापनपद्धति *f*.

**Horoscope** (hor'o-skōp) [Gr. *hora*, an hour, and *skopein*, to observe.] *n. an observation of the heavens at the hour of a person's birth by which the astrologer predicted the events of his life* जन्म-कुंडली *f*, जन्मलग्नकुंडली *f*, ग्रहकुंडली *f*. २ *the paper on which this observation is recorded* जन्मपत्रिका *f*, जन्मटिपण *n*. Appeasement of a boding H. जन्माच्या वेळच्या वाईट (अनिष्ट) ग्रहांची शांति *f*, शांत *f*, ग्रहशांति *f*. Determination from the H. of the fortunes of a person जातक *n*. Disagreement or enmity of the H.s of two parties गणवैर *n*. Diversity of H.s गणमध्य *m*. Identity *or* amity of H.s of two parties गणमैत्री *f*, गणैक्य *n*, ग्रहमैत्री *f*, राशिघटित *n*, घटित *n*. Horos'copy *n. the art of predicting the events of a person's life from his horoscope* जन्मकुंडली पाहण्याची विद्या *f*.

**Horrible** (hor'i-bl) [L. *horribilis -horrere*, to bristle.] *a. causing or tending to cause horror, dreadful, aweful, terrific* भयंकर, भयानक, भय-जनक, घोर, अघोर, अकटोविकट, अकराळविकराळ. Hor'ribleness *n*. भयंकरपणा *m*. Hor'ribly *adv.*

**Horrid** (hor'id) [L. *horridus -horrere*, to bristle.] *a. fitted to produce horror, shocking* भय उत्पन्न करण्यासारखा, भयंकर. Hor'ridness *n*.

**Horrify** (hor'i-fī) [L. *horror*, horror, and *facere*, to make.] *v. t. to strike with horror, to shock* महा-भयान्वित करणें, धस *m* -धसका *m* -धडकी *f* -बसविणें, रोमांच उभे करणें, (आंगावर) कांटा -कांटे आणणें, भयं-कर भीति उत्पन्न करणें, भीतीचा धसका बसविणें. To be horrified (भीतीनें) रोमांच उभे राहणें, (आंगावर) कांटा येणें. Horrif'ic *a. exciting horror* भीतीचा धसका बसविणारा, भीतीनें कांटे आणणारा.

**Horripilation** (hor-i-pi-lā'-shun) [L. *horrere*, to bristle, and *pilus*, hair.] *n. a contraction of the cutaneous muscles causing the erection of the hairs and the condition known as goose flesh; erection of the hairs of the body* कांटे *m. pl.*, रोमांच *m. pl.*, थरकांटा *m*, पुलक *m*, केंस उभे राहणें *n*. H. from joy हर्षरोमांच *m*. H. from fear थरकांटा *m*. That is under H. रोमांचित, पुलकित.

**Horror** (hor'ur) [L. *horrere*, to bristle.] *n. a shuddering, excessive fear* कांपरें *n*, महाभय *n*, मोठें भय *n*, धस्स *n*, अतिभय *n*. २ *that which excites horror* मोठें भय उत्पन्न करणारें कारण *n*. H. preceding fever शिसारी *f* (?), कांटे *m. pl.* Hor'rors *n. pl. distressing scenes* भयंकर प्रसंग *m. pl.* The horrors '*delirium tremens*' सतत व पुष्कळ दारू पिऊन लागणारें वेड *n*. Hor'ror-strik'en *a*. उरांत धस्स झालेला, भयचकित, महाभीतीनें त्रस्त.

**Horse** (hors) [A. S. *hors*; perh. akin to Sk. ह्रेष्, to neigh, but more probably connected with L. *curro, cursus*, to run. Cf. Courser.] *n*. घोडा *m*, अश्व *m*, वारू *m*, वाजी *m*, तुरंग *m*, (-in contempt.) घोडकट *n*, घोडकें *n*, पंचकल्याणी घोडें *n*, हरदासी घोडें *n*. [THE PACES OF A HORSE ARE:—चवडचाल, चौकचाल, टांकणचाल, तुरकीचाल, दवडचाल, दुडकी *or* दुडकीचाल, धांवरीचाल, भरधांवचाल, सात्रकचाल, रहिवाळचाल, कोकर-चाल, वाजीचाल, हदडूकचाल. ARAB H. ताजी *or* तेजी *m*, अरबी घोडा *m*. BEDDING OF A H. शेज *f*. TO LIE DOWN ON IT शेजेस जाणें. BODY-CLOTH OF A H. (घोड्याची) झूल *f*, झुरका *m*, झुरकी *f*. CONNOISSEUR OF H.s अश्वपरीक्षक. FURNITURE OF A H. तंगतोबरा *m*. GRAZING OF H.s घोडेखाद *f*. HEAD-ROPES OF A H. आघाडी *f*, दवासन *n*. HEEL-ROPES OF A H. पिछाडी *f*, पायबंद *m. pl.* HEEL-LEATHER OF A H. मुजामा *m*. HIRER OUT OF H.s घोडेखोत *m*. LEADING ROPE OF A H. वागदोर *m*, वाग *f*. LEAVINGS IN THE NOSE-BAG OF A H. उरदाणा *m*. LINE OF HORSES PICKETED तवेला *or* तबेला *m*. LIP-ROPE OF A H. (USED IN GROOMING &c.) होंटाळी *or* ओंठाळी *f*, पुजमाल *m*. NOSE-BAG OF A H. तोबरा *m*. PACE OF A H. चाल *f*, गति *f*, धारा *f*. RIDING H. स्वारीचा बसता घोडा *m*, पाठाळ *m*, पाठवळ *m*. SACRIFICE OF A H. अश्वमेध *m*. STROKE FROM THE FORE FOOT OF A H. (घोड्याची) टाप *f*. LOOK NOT A GIFT-H. IN THE MOUTH *cf.* धर्माची गाई दांत कोणी पाहीं. TO TAKE H. घोड्यावर बसून निघणें.] २ *mounted soldiery, cavalry* (used without the *pl.* termination) घोडेस्वार *m. pl.*, घोडेस्वारांची फलटण *f*, घोडदळ *n*, अश्वभार *m*, अश्वसेना *f*. [BODY OF H. UNDER ONE COMMANDER पागा *f*, पतक *n*.

COMMANDER OF IT पाग्या, पतक्या. WRITER ATTACHED पागनीस *m.* H. OF THE KING *or* STATE हुजूरपागा *f*, खास पागा *f.* ] ३ *a frame to support something, a stand* घोडा *m*, घडोंची *or* घडवंची *f*, घोडी *f*; as, "A clothes*horse*, a saw*horse*, &c." ४ *anything* (actual or figurative) *on which one rides as on a horse, a hobby* फारच आवडीचा विषय *m*, छंद *m*, नाद *m*. H. *v. t. to provide with a horse or horses* घोडा -घोडे पुरविणें; as, "Being better *horsed*, he outrode me." २ *to bestride* घोड्यावर बसल्यासारखें बसणें, दोहोंकडे पाय टाकून बसणें. ३ *to cover, as a mare* (said of the male) घोडीवर घोडा चढविणें. ४ *to take or carry on the back* पाठीवर घेणें -नेणें -वाहणें; as, "The keeper, *horsing* a deer." ५ *to place on a wooden horse &c. to be flogged* (फटके मारण्यासाठीं) घोडीवर चढविणें, घोडी देणें. Horse'back *n.* घोड्याची पाठ *f.* [ON H. घोड्यावर. MOUNTED ON H. अश्वारूढ, घोड्यावर बसलेला, सवार *or* स्वार झालेला. ] Horse'boy *n.* घोडक्या *or* घोडका, मोतद्दार. H.-breaker *n. one employed in subduing horses for use* घोडे शिकविणारा, अश्वशिक्षक, चाबूकस्वार. H.-breaking *n.* अश्वशिक्षा *f*, चाबूकस्वारी *f.* H. car *n.* घोडे नेण्याचा (आगगाडीचा) डबा *m.* H. cloth *n.* झूल *f.* H. courser *n. one that keeps horses for racing* शर्यतीसाठीं घोडे बाळगणारा. H. Doctor *n.* सालोत्तरी *or* शालोत्री, अश्ववैद्य, अश्वचिकित्सक. २ *a farrier* नालबंद. H.-drench *n. a dose of physic for a horse* घोड्यास पाजण्याचें औषध *n*, घोड्याचा जुलाब *m* (?). H. dung (घोड्याची) लीद *f.* H.-flesh *n. the flesh of horses* घोड्याचें मांस *n*, अश्वमांस *n.* २ (*colloq.*) *horses* (generally), *the qualities of a horse* घोडे *m. pl.*, घोड्याची जात *f*; as, "He is the best judge of *horseflesh*." Horse'fly *n*, घोडमाशी *f.* Horse-glove, H.-rubber *n.* हाताळें *n*, हातणी *f*, हात्या *m.* Horse guards *n. pl.* (a) *a body of cavalry so called* (हॉर्सगार्ड नांवाची) घोडेपलटण *f.* (b) (esp.) *a British regiment, called the Royal Horse Guards, which furnishes guards of state for the sovereign* राजाचे पहाऱ्यावरील घोडेस्वार *m. pl.* (c) (formerly) *the official residence in London of the Commander-in-Chief of the British army* ब्रिटिश सैन्याचे मुख्य सेनापतीचें राहण्याचें ठिकाण *n.* Horse'-jockey *n. a professional rider and trainer of race horses* शर्यतीचे घोडे शिकविण्याचा धंदा करणारा मनुष्य. २ *a trainer and dealer in horses* घोडे शिकवून विकणारा, घोडेविक्या. Horse'laugh *n. a harsh, boisterous laugh* मोठ्यानें हंसणें *n*, खदखदां हंसणें *n*, अट्टहास *m* (Sk.). Horse'leech *n.* (घोड्यांच्या तोंडावर व ओंठावर चढणारी) मोठी जळू *f*, घोडजळू *f.* २ *a farrier or veterinary surgeon* नालबंद, अश्ववैद्य. Horse'man *n. a rider on horseback* घोड्यावर बसणारा, स्वारी *f*, अश्वसादी, तुरंगसादी. (b) *one skilled in the management of horses* घोड्यावर बसणारा पटाईत, अश्वारोहकुशल. २ *mil. a mounted soldier* घोड्यावरचा शिपाई *m*, घोडेस्वार *m*, स्वार *m.* ३ एक जातीचें कबुतर *n.* Horse'manship *n.* सवारकी *f*, सवारी *f*, अश्वारोहविद्या *f.* (b) घोड्यावर बसण्यांत पटाईतपणा *m* -निपुणता *f* -कौशल्य *n.* Horse'musketeer *n.* करोल *or* करवल *m.* Horse'musketeering करोली *n. or* करवली *f.* Horse'nail *n. a horseshoe nail* (घोड्यांच्या) नालास मारण्याचा खिळा *m*, नालमेख *f*, मेख *f.* Horse'-play *n. rude, boisterous play* धांगडधिंगा *m*, घोडदुला *m*, धाबडधिंगा *m*, धिंगामस्ती *f*, धिंगाणा *m*, हुतुतु *m*, धुमड *f*, धुमाळी *f.* Horse'power *n. the power a horse can exert or its equivalent* घोड्याचें बळ *n* -जोर *m* -शक्ति *f.* २ *mach. a unit of power, being equal to that required to raise* 33,000 *lbs. avoirdupois one foot per minute* तेतीसहजार पाउन्ड वजन एक मिनिटांत एक फूट उंच उचलण्यास लागणारी शक्ति *f*, अश्वबल *n*, अश्वशक्ति *f.* ३ *a machine worked by a horse, for driving other machinery*; *a horse motor* घोड्यानें -घोड्यांनीं चालवावयाचें यंत्र *n.* Horse'race *n.* घोड्यांची शर्यत *f*, घोडदौड *f.* Horse'-raddish *n. bot.* (so called from a notion of its being wholesome for horses) शेवग्याचें -शेगटाचें झाड *n*, शेवगा *m*, शेगट *m*, शोभांजन *m.*–its pods शेवग्याच्या शेंगा *f. pl.* Horse'shoe *n. a shoe for horses* नाल *m.* [NAIL OF H. नाळमेख *f*, मेख *f.* SET OF H.s नालडवा *m.* ] २ *anything shaped like it* (घोड्याच्या) नालाच्या आकाराची वस्तु *f*; as, "A *horseshoe* magnet." Horse'shoer *n.* नालबंद *m.* -shoeing *n.* नालबंदी *f.* २ नालबंदीचा धंदा *m.* [ HORSE-SHOEING ON THE FOUR FEET चौबंदी *f.* H. ON TWO FEET दुबंदी *f.* PRICE OF H. नालबंदी *f.* TO PERFORM H. (घोड्याला) नाल मारणें, बांधणें. TO PERFORM HALF H. खोलबंदी करणें. ] Horse'-stall *n.* (घोड्याचें) ठाण *or* ठाणें *n*, तबेला *m.* Horse'way *n.* घोडेवाट *f.* Horse'whip *n.* (घोड्यावर बसतांना किंवा घोडे शिकवितांना वापरण्याचा) चाबूक *m.* H. *v. t. to flog or chastise with a horsewhip* घोड्याच्या चाबकाखालीं मारणें, घोड्याच्या चाबकानें फटके देणें -मारणें. Hors'iness *n. fondness for, or interest in, horses* घोड्यांची आवड *f*, घोड्यांविषयीं हौस *f.* Hors'y *a. pertaining to horses* घोड्याचा, अश्वविषयक. २ *suggestive of a horse* घोड्याची आठवण करून देणारा, घोड्याच्या वळणावर असलेला; as, "*H.* manners."

Horse-shoe Kidney (hors'shōō kid'-ni) *n. med.* कोणतेही एका टोंकास ज्यावेळीं दोन बाजूंचे मूत्रपिंड एकमेकांस जडलेले असून ते घोड्याच्या नालासारखे दिसतात त्या स्थितींत त्यांस 'अश्वनाल मूत्रपिंड' म्हणतात.

Hortative, Hortatory (hort'a-tiv,-tor-i) [L. *hortor*, *hortatus*, to incite. या शब्दाचा मूळ अर्थ "प्रोत्साहन

देणारा" असा होता. परंतु सध्यां त्याचा "प्रोत्साहनपर उपदेश करणारा" असा अर्थ चालू आहे.] *a. encouraging, giving advice* उपदेशक, उपदेश करणारा, बोध करणारा, बोधपर; as, "Hortatory speech."

Horticulture ( hor'ti-kul-tūr ) [ L. *hortus*, a garden, and *culture*. ] *n. the art of cultivating gardens* बागकाम *n*, बागाईत काम *n*, बागाईत *f*, उद्यानकर्म *n*, उद्यानविद्या *f*. Horticul'tural *a.* बागाईताचा, उद्यानविद्येसंबंधीं. Horticul'turist *n. one versed in the art of cultivating gardens* बागकाम करणारा -जाणणारा, उद्यानविद्यापटु.

Hosanna ( hō-zan'a ) [ Lit. 'save, I pray thee', Gr. *hosanna*–Heb. *hoshiahnna–yasha, hoshia*, to save, and *na*, I pray thee.] *n. an exclamation of praise to God or a prayer for blessings* ईश्वराचा आशीर्वाद मागण्याकरितां केलेली स्तुति *f*, ईश्वराची आशीर्वादार्थी स्तुति *f*, आशीर्वचनापेक्षी स्तुति *f*.

Hose ( hōz ) [ A. S. *hosa*, Ger. *hose*. ] *n. a covering for the legs or feet, stockings, socks* पायमोजे *m. pl.*, स्टाकिंग *m. pl.*, अर्धे स्टाकिंग *m. pl.* २ *a flexible pipe for conveying fluids* ( so called from its shape ) पायमोजाच्या आकृतीचा नळ *m*. Hose *pl*. Ho'sen *is the old pl.* of Hose. Ho'sier *n. one who deals in hose or stockings and socks* स्टाकिंग व सॉक विकणारा व्यापारी *m*, पायमोजे विकणारा व्यापारी *m*. Ho'siery *n.* मोजे विकण्याचा धंदा *m*. २ पायमोजे व त्यांसारखे दुसरे जिन्नस *m. pl.*

Hospice ( hos'pēs ) [L. *hospitium -hospes*, a stranger who is treated as a guest, one who treats another as his guest. ] *n. an Alpine convent where travellers are treated as guests* प्रवाशांचा आदरसत्कार होणारा आॅल्प्स् पर्वतांतील मठ *m*.

Hospitable ( hos'pit-abl ) [ L. *hospes*, a guest. ] *a. entertaining strangers and guests kindly and without reward* आतिथ्यतत्पर, पाहुण्यांची चांगली बरदास्त ठेवणारा, अतिथिपूजक, स्वागत करणारा, आतिथ्य करणारा. २ *showing kindness, generous* आदरसत्कार करणारा, दयाळूपणानें वागणारा. ३ *relating to hospitality* पाहुणचाराचा, अतिथिपूजनाचा. Hos'pitableness *n.* अतिथिप्रीति *f*, आतिथ्यतत्परता *f*. Hos'pitably *adv.* पाहुणचार करून, आगतस्वागत करून, स्वागतपूर्वक, आतिथ्यपूर्वक. Hospital'ity *n. entertainment of strangers and guests* पाहुणचार *m*, आगतस्वागत *n*, अतिथिपूजन *n*, आतिथ्य *n*, आदरातिथ्य *n*, अतिथिसेवा *f*, अतिथिसत्कार *m*, मेजवानकी *f*, मेजवानी *f*, बरदास्त *f*.

Hospital ( hos'pit-al *or* os'-) [O. Fr. *hospital* -L. *hospes*, a guest. पूर्वी Hospital ह्या शब्दाचा अर्थ 'मुसाफरखाना, धर्मशाळा' असा होता. परंतु तो आतां लुप्त झाला आहे. ] *n. a building for the reception and treatment of the old, the sick, and the hurt* इस्पितळ *n*, रुग्णालय *n*, रोगीशाला *f*, बिमारखाना *m*. Convalescent H. ( रोग बरा झाल्यावर ) शक्ति येईतोंपर्यंत राहण्याचें रुग्णालय *n* -इस्पितळ *n*. Cottage H. लहानसें इस्पितळ *n*. Lock H. *one for the treatment of venereal diseases* गुप्त रोगांचें इस्पितळ *n*. Magdalen H. *an institution for the reclamation of fallen women* नीतिभ्रष्ट स्त्रियांनां मार्गावर आणणारी संस्था *f*. Marine *or* Naval H. खलाशी लोकांचें किंवा आरमारांतील लोकांचें इस्पितळ *n*. Maternity H. *one for women in labour* बाळंतपणाचें इस्पितळ *n*.

Host ( hōst ) [ O. Fr. *hoste*–L. *hospes*. ] *n. one who entertains a stranger or guest at his house without reward, an entertainer* घरधनी *m*, यजमान *m*, आतिथ्यकारी, आतिथ्य करणारा. २ *an innkeeper* खाणावळीचा मालक, खाणावळवाला. Host'ess *n. f.*

Host ( hōst ) [Orig. an enemy; O. Fr. *host* -L. *hostis*, an enemy. ] *n. an army* सैन्य *n*, सेना *f*, फौज *f*. २ *a large multitude* झुंड *f*, समुदाय *m*. ३ (as a term of praise for an eminent person ) प्रस्थ *n*, प्रकरण *n*, प्रस्थान *n*, कोटि *f*, एकांगवीर *m*.

Hostage ( hōs'tāj ) [ O. Fr. *hostage* -Fr. *otage* -L. *obses, obsidis*, a hostage. ] *n. one deliverd to the enemy as a pledge for the fulfilment of the conditions of a treaty* ओल *f*, शरीरबंधक *m*. To give as a H. ओलीस देणें -ठेवणें.

Hostel ( hos'tel ), Hostelry ( hos'tel-ri ) [ O. Fr. *hostel, hostellerie*. ] *n. an inn* खाणावळ *f*, भोजनगृह *n*. Students' H. विद्यार्थ्यांचें भोजनवसतिगृह *n*.

Hostile ( hos'til ) [ L. *hostilis, hostis*, an enemy.] *a. belonging to an enemy* शत्रूकडचा, प्रतिपक्षीय. २ *showing enmity, adverse* शत्रुभावाचा, शत्रूपणाचा, दुष्मनगिरीचा, प्रतिकूल, विपक्षी, विरुद्ध. Hostil'ity *n. enmity* शत्रुत्व *n*, वैरभाव *m*, वैर *n*, प्रतिकूलता *f*. २ *a hostile deed* आगळीक *f*, भांडण *n*, लढाई *f*, मारामारी *f*, वैरपणाचें काम *n*. Hostil'ities *n. pl. acts of warfare* लढाई *f*, हल्ला *m*, युद्धप्रसंग *m*. Natural Hostility जातिवैर *n*. Hos'tilely *adv.* शत्रुपणानें, शत्रुभावानें.

Hostler ( os'lėr ) [ Orig., one who kept a house for strangers -O. Fr. *hostel*. ] *n. one who has the care of horses at an inn* खाणावळींतील मोतद्दार *m*.

Hot ( hot ) [ A. S. *hat*. See Heat. ] *a. having heat, very warm* ( oppo. to *cold*, and exceeding *warm* in degree ) ऊष्ण, ऊन, फार गरम -कढत, तप्त, तापलेला. [BOILING H., BURNING H., &c. उन्हून *or* उनून, कढतकढत, गरमागरम, रसरसीत. RED H. अग्निवर्ण. It is GLOWING H. ऊन लाही करतें, ऊन भाजतें. H. WATER SPRING कढत पाण्याचा झरा *m*, उन्हाळें *n*.] २ *fiery, animated, violent, ardent in temper* तापट, गरम, तल्लख, तीक्ष्ण, प्रखर, आग्या, तिखट, तलखल्या, जहाल *or* ज्याल; as, "Achilles is impatient, *hot*, and revengeful." (b) उतावळा, उतावळीचा; as, "H. haste." ३ ( *shakes.*) *lustful, lewd* विषयलुब्ध, कामी-

४ *pungent, acrid* तिखट, तडख, जळजळीत, झणझणीत, कडक, उग्र; as, "H. as mustard." In H. water (*fig. & colloq.*) *in trouble, in difficulty* संकटांत, अडचणींत, पेंचांत, प्रसंगांत, दुःखांत Hot-bed *n.* (*gardening*) (ज्याची वाढ नैसर्गिक रीतीनें होत नाहीं अशीं झाडें मुद्दाम तयार करण्यासाठीं बनविलेली) भिंगानीं वेष्टिलेली उष्णतापूर्ण जमीन *f* -जागा *f.* २ *any place favourable to rapid growth* (एखादी गोष्ट लवकर भरभराटीस आणण्यासाठीं केलेली) कृत्रिम जागा *f*, भट्टी *f*, अट्टी *f*, आडी *f*; as, "A H. of sedition." Hot'-blooded *a. excitable, irritable* लवकर गरम होणारा -तापणारा, ताज्या रक्ताचा, तापट, तामसी. H. -brained, -headed *a. violent, rash* साहसी, अविचारी, आततायी, अधीर, उतावळा. Hot'house *n.* उष्ण हवेंतील झाडें ठेविण्याकरितां केलेलें घर *n.* Hot'ly *adv. ardently, vehemently, hastily* आवेशानें, जलदीनें, घाईघाईनें. २ *lustfully* कामवशतेनें. Hot'ness *n.* तप्तता *f*, कढतपणा *m.* २ तापटपणा *m*, (स्वभावाचा) तिखटपणा *m*, आग्या स्वभाव *m.* ३ कामबुद्धि *f*, विषयलुब्धता *f.* Hot'press *v. t. to press paper, &c. between hot plates to produce a glossy surface* सफाईदार करण्यासाठीं -गुळगुळीतपणा देण्यासाठीं (कागद इ॰ पदार्थ) उष्णता लावून दाबणें -चेपणें. Hot'spur *n.* (तांतडीनें जातांना) टांच मारून भरधांव घोडा सोडणारा. २ (hence) *a rash man* अविचारी -साहसी मनुष्य *m.*

Hotchpot, (hoch'pot) Same as Hotch -Potch.

Hotchpotch (hoch'poch) [Fr. *hochepot -hocher*, to shake, and *pot*, a pot.] *n. a confused mass of ingredients shaken or mixed together in the same pot* खिचडी *f.* २ *a confused medley* घेडगुजरी *f.*

Hotel (ho-tel') [M. E. *hostel* -O. Fr. *hostel* -L. *hospitalia*, guest-chambers -*hospes*, a guest.] *n. a superior house for the accomodation of guests or strangers* भोजनवसतिगृह *n*, होटेल *n*, हॉटेल *n.*

Hotspur (hot'spur) [*Hot* and *spur.*] *n. one pressing his steed with spurs, as in hot haste* घोड्याला टांच मारणारा. २ *a violent, rash man* भयंकर धाडसी मनुष्य *m*, अविचारी -उरफाट्या काळजाचा मनुष्य *m.*

Hottentot (hot'n-tot) [Of Dutch origin, because the language of the South Africans seemed to the first Dutch settlers to sound like a repetition of the syllables *hot and tot.*] *n. a native of the Cape of Good Hope* केप ऑफ् गुड् होपचा मनुष्य *m*, हाटेन्टाट. २ *a brutish individual* रानटी- जंगली मनुष्य *m.*

Houdah (hou'dä) [An Indian word.] *n.* हौदा *m.*

Hough (hok) Hock (hok) [A. S. *hoh*, the heel.] *n. the joint on the hind leg of a quadruped between the knee and fetlock* (corresponding to the ankle-joint in man) जनावराच्या पाठीमागच्या पायाच्या गुढघ्याची लवण *f.* २ (in man) *the back part of the knee joint, the ham* गुढग्याची लवण *f.* H. *v. t. to hamstring* धोंडशीर तोडणें, धोंडशीर तोडून दुबळा करणें. Hough'ed *pa. t. & p. p.* Hough'ing *pr. p. & v. n.*

Hound (hownd) [A. S. *hund*, Gr. *kynos*, L. *canis*, Sk. श्वान, a dog.] *n. a dog used in hunting* शिकारी कुत्रा *m.* २ *a cur, a caitiff* अधम मनुष्य *m.* H. *v. t. to set on the chase* (कुत्र्यांना) शिकारीवर सोडणें. २ *to hunt or chase with hound* शिकारी कुत्र्यानें शिकार करणें.

Hour (owr) [O. Fr. *hore* -L. *hora* -Gr. *hōra*, an hour.] *n. sixty minutes or the twenty-fourth part of a day* तास *m*, कलाक *m*, होरा *m*, अवर *m*, अडीच घटका *f. pl.* (घटिका = 24 minutes.) [An H. or so सुमारें एक तास, घडी एक, तास एक. At all H.s वेळीं अवेळीं. Auspicious H. सुमुहूर्त *m*, शुभ मुहूर्त *m.* Every H. दरतासास, घडी घडी. The golden H. सोन्याची वेळ *f* -घटका *f.* H. cup घटका *f*, घटकापात्र *n.* The H. is full घटका भरली आहे.] २ *the time indicated by a clock* (घड्याळाची) वेळ *f.* ३ *an hour's journey or three miles* तासाची मजल *f*, तीन मैल *m. pl.* ४ *a time or occasion* काळ *m*, वेळ *f*, घडी *f*, प्रसंग *m.* H. angle नतकालकोन *m.* H. circle होरावृत्त *n*, होरानाडीमण्डल *n*, ध्रुवप्रोतवृत्त *n.* H. glass *n.* वाळूचें घड्याळ *n*, शिशी *f*, डमरू यंत्र *n.* H. hand *n.* अवर कांटा *m*, तासाचा कांटा *m.* H. line होरा रेखा *f.* H. plate *n. gong* घंटा *f*, तास *m.* २ (घड्याळांतील) आंकड्यांचें तकट *n* -तबकडी *f.* At the eleventh hour *at the last moment possible* अगदीं शेवटच्या वेळीं. In a good or evil H. *acting under a fortunate or unfortunate impulse* वेळीं अवेळीं, शुभ अशुभसमयीं, चांगल्या वाईट प्रसंगीं. To keep good H.s *to go to bed and rise early* लवकर निजणें व उठणें. The small H.s *the early hours of the morning* सकाळचा लवकर जाणारा वेळ *m.* Hour'ly *a.* तासाचा, घडीचा, घडीघडीचा. H. *adv.* दर तासास, हरघडी.

Houri (howri *or* hōōri) [Pers. *huri* -Arab. *huriye.*] *n. a black-eyed girl, a nymph of Mahomedan paradise* मुसलमानांच्या स्वर्गांतील अप्सरा *f*, हुरी *f.*

House (hows) [A. S. *hus*; akin to Goth. *hus*, Ger. *haus*, and prob. to E. *hide.*] *n. a dwelling-place* घर *n*, गृह *n*, भवन *n*, भुवन *n*, आलय *n*, सदन *n*, अगार *n* (in comp.), गेह *n*, मकाण *n.* [-in contempt or disparagement, answering to *hovel, hut, shed, cell &c.* तिवांशी घर *n*, तिवांशी खोपट *n*, मठी *f*, पर्णकुटी *f*, पर्णशाला *f*, उन्हाळसावली *f.* For the houses of Europeans बंगला is commonly used, but among themselves the Marhatas apply this word to a summer or pleasure house. A deserted or desolate H. पडघर *n*, ओसाड घर *n.* At, in, to, &c. every H. घरोघर. Born in one's H.-a slave खानाजाद. Cen-

TRAL PORTION OF A H. माजघर *n* or *m*, मधलें घर *n*. CEREMONY OF OCCUPYING A NEW H. घरभरणी *f*, गृहप्रवेश *m*, वास्तुप्रवेश *m*. CEREMONIES IN THE PURIFICATION OF A H. गृहशुद्धि *f*, वास्तुशांति *f*. H. HAVING FLAT ROOF OF EARTH धाब्याचें घर *n*, धाबें *n*. INNER APARTMENT OF A H. अंतर्गृह *n*, अंतःपुर *n*, गृहाभ्यंतर *n*. LARGE AND STATELY H. *mansion* वाडा *m*, हवेली *f*, मंदिर *n*, बंगला *m*. MASTER OF THE H. घरधनी *m*, घरकरी *m*. MISTRESS OF THE H. घरधनीण *f*, घरकरीण *f*. OPEN H. *hospitable mansion* धर्मपुरी *f*, देवपुरी *f*. PLEASURE H. *or* SUMMER H. बंगला *m*, हवेली *f*. RAIN-WATER FROM THE ROOF OF A H. घरवणी *f*. REGISTER OF THE HOUSES (of a village or town) घरटीप *f*, घरगणती *f*. SHUTTING UP OF A H. *or* HOUSES दारफळणी *f*. SITE OF A H. गृहभूमि *f*, घराची जागा *f*. -ESP. OF A RUINED H. घरठण *or* घरठाण *f*, घरठा *m*. THATCHING A H. घरशाकारणी *f*, घरशिवणी *f*. TO ROOF IN A H. घर नेसवणें. TO SET OUT *or* FURNISH A H. घर मांडणें -थाटणें. TO SET UP *or* KEEP H. घरसंसार *m* -प्रपंच *m* करणें -चालविणें -पाहणें. TO TAKE THE RUN OF (go over all) THE HOUSES घरटीप घेणें -काढणें. TO TURN THE H. OUT OF WINDOW घर डोईवर घेणें. YOU MAY JUDGE OF THE H. FROM THE YARD *Cf.* घराची ओज आंगण सांगतें.] २ *household affairs, domestic concerns* (particularly in the phrase *to keep house*) घरखटला *m*, संसार *m*, गृहकर्में *n. pl.* ३ *a household, a family* घर *n*, कुटुम्ब *m*, (एकाच) कुटुम्बांतील माणसें *n. pl.* ४ *a race of persons from the same stock, kindred* घर *n*, घराणें *n*, घराणा *m*; as, "The H. of Austria." ५ *one of the estates of the legislature* राज्यनियम करणारी सभा *f*; as, "The H. of Commons, Lords, &c." ६ *a trading or commercial establishment, a firm* घर *n*, पेढी *f*. ७ *a public house, an inn* खाणावळ *f*, भोजनगृह *n*, भोजनशाला *f*, उतारशाळा *f*. ८ *astrol. the twelfth part of the heavens* घर *n*. ९ *a square on a chess-board* (खेळांतील पटाचें) घर *n*. १० *an audience* समाज *m*, सभा *f*, श्रोतृमंडळ *n*, श्रोतृसमुदाय *m*, मंडळी *f*; as, "A thin or a full H." H. of God देऊळ *n*, भजनालय *n*. The mortal H. *the body* (as the habitation of the soul) देह *m*, शरीर *n*. Narrow, dark, &c. H. *the grave* थडगें *n*. The White H. संयुक्तसंस्थानांच्या प्रेसिडेन्टाचा राहण्याचा सरकारी बंगला *m*, (अमेरिकेंतील प्रेसिडेन्टाचें) श्वेतमंदिर *n*. To bring down the H. सर्व सभेकडून कडाक्याची वाहवा करून घेणें. To keep H. *to maintain an independent domestic establishment* स्वतंत्र -निराळा संसार करणें -चालविणें. To keep open H. *to entertain friends at all times* सर्वांना घर खुलें ठेवणें, वेळीं अवेळीं घरीं येणाऱ्या मंडळीचा आदरसत्कार करणें. To keep the H. *to be confined to the house* घर धरणें -धरून बसणें, घर न सोडणें, घराबाहेर न पडणें. H. *v. t. to protect by covering* (as wood, cattle &c.) घरांत -निवाऱ्यास ठेवणें. २ *to shelter* रहायास घर *n* -जागा *f* देणें, आश्रय देणें. ३ *to store* सांठवून ठेवणें, घरांत भरणें. H. *v. i. to take shelter, to abide* आसा -आश्रय करणें, राहणें. २ *astrol. to have a position in one of the houses* (विवक्षित) घरांत असणें; as, "Where Saturn houses." H.-bird *n*. घरकोंबडा *m*, घरकुबडा *m*, घरकुबा *m*, घरकुंडा *m*, घरबशा *m*. H.-breaker *n*. घरफोड्या, भिंतफोड्या, गृहभेदी -भेदक, संधिचोर. H.-breaking *n*. घर फोडणें *n*, भिंत फोडणें *n*, चोरी करणें *n*. H.-builder *n*. घरबांध्या. H.-dog *n*. घर राखण्याकरितां ठेवलेला कुत्रा *m*, रखवाल्या कुत्रा *m*. H. -hero, -hector *n*. गेहेशूर, गोष्ठेशूर, घरीं बसून फुशारकीच्या गोष्टी सांगणारा. House'hold *n*. घर *n*, कुल *n*, कुटुम्ब *n*, घरदार *n*. [H. EXPENSES *or* CONSUMPTION घरखर्च *m*. H. DEITY कुलस्वामी *m*, कुलदेवता *f*, घरचा देव *m*. ROOM APPROPRIATED FOR IT देवघर *n*, देव्हारघर *n*. OF *or* BELONGING TO A H. घरचा, घराऊ, घरोटीचा, घरगुती. QUOTA (of a collection, &c.) DUE FROM EACH H. घरटी *f*. RULES *or* CUSTOMS OF A H. घरचार *m. pl.* TO INVITE (to entertainment) A WHOLE H. चुलीस अक्षत लावणें. THE H. *the royal domestic establishment* खानगी खातें *n*.] २ *domestic management or economy* गृहव्यवस्था *f*, घरसंजोग *m*, घरसंजोगणी *f*, घरजोगवणी *f*, घरजुगूत *f*, घरसवर *f*. [H. AFFAIRS *or* WORK गृहकार्य *n*, घरचीं कामें *n. pl.*, गृहकृत्य *n*, घरधंदा *m*. TO DO THE H. JOBS *or* WORK घरकाम *n* -केरवारा *m*, &c. करणें.] H. *a. domestic* घरचा, घरगुती, घराऊ, घर and गृह (in comp.; as, घरधंदा, गृहकार्य, &c.). [H. troops *six regiments whose peculiar duty is to attend the sovereign and defend the metropolis* राजाबरोबर राहून शहराची रखवाली करणाऱ्या (सहा) फलटणी *f. pl.*] House'holder *n*. कुटुंबी, गृहस्थाश्रमी, गृहस्थ, घरवाला. House'keeper *n*. घरबारी, खटलेवाईक, खटलेवाला, खटलेकरी, घरंदाज. २ *a female servant who 'keeps,' or has the chief care of, the house* घर संभाळणारी बाई *f*, परिचारिका *f*, घरांतली कारभारीण *f*. House'keeping *n*. *the management of a house or domestic concerns* घरकारभार *m*, घरसंसार *m*, गृहसंजोग *m*, संसार *m*, घरसंजोगणी *f*, घरचार *m*, गृहस्थकर्म *n*. २ *hospitality* पाहुणचार *m*, आदरातिथ्य *n*, विचारपूस *f* (*colloq.*). H. *a*. संसारांत लागणारा, घरगुती. House'less *a. having no house or shelter* गृहहीन, निराश्रय, निराश्रित, उघडा. House'maid *n*. घरांतील कामकरीण *f*, घरखपी *f*, गृहदासी *f*, सैरंध्री (?). Housemaid's knee *n. med.* a swelling over the knee, due to an enlargement of the bursa in the front of the knee-pan (so called because frequently occurring in servant girls who work upon their knees) गुडघ्यावरील सुजेचा रोग *m*. House'mate *n*. घर-

सोबती. House'rent *n.* घरभाडें *n.* House'room *n.* घरांतील खोली *f*, घरांत रहायाला जागा *f*; as, "To give any one H." House'stock *n.* घरबेगमी *f*, घरबेजमी *f.* House'tax *n.* घरपट्टी *f*, घरटक्का *m*, घरदेणें *n*, घरसारा *m*, उंबरसारा *m*, घरवण *f.* House'top *n.* माळवद *n*, धाबें *n.* [CHUNAMED TERRACE ON A H. गची *f*, अटाली *f.* TO CRY FROM THE H. *to announce in the most public manner possible* सर्वत्र जाहीर करणें.] House'-warming *n.* *a feast or merry-making made by or for a family or business firm on occupying a new house or premises, as if to warm it* घरभरणी *f.* Cf. गृहप्रवेश *m.* House'surgeon *n.* स्थायीशस्त्रवैद्य *m*, इस्पितळांत रात्रंदिवस राहणारा शस्त्रवैद्य *m.* House'wife (hows'wīf) *n.* *the mistress of a house* घरधनीण *f*, घरकरीण *f*, गृहचारिणी *f.* [NOTABLE, THRIFTY &c. H. सुगरीण or सुगरण *f*, अन्नपूर्णा *f.*] २ (huz'if; prop. spelt *Hussif*, which see.) *a small case or bag for articles of female work* चंची *f*, जुगदान *n*, झोळणा *m.* House'wifely *a.* *domestic* घरगुती, घरचा. २ *economic, prudent* काटकसरी, (व्यवहार) दक्ष -निपुण, धोरणी, चतुर. House'wifery (hows'wīf-ri) *n.* *female management of domestic concerns* घरधनिणीचा कारभार *m*, घरकाम *n*, घरधंदा *m*, गृहकृत्य *n.* House'wright *n.* *house-builder* घरबांध्या. House'yard *n.* (घराचें) आंगण or अंगणें *n.* Hous'ing *n.* आश्रय देणें *n.* २ *houses, taken collectively* घरें *n. pl.*, घरबंद *m*, घर *n*, *colloq.* उंबरा *m*, *colloq.* घरटा *m.*

Housewife (huz'if) See under House.

Housing (hows'ing) [Fr. *housse*; prob. from O. Ger. *hulst*, a covering -*hullen*, to cover. Cf. *Holster*, *Husk.*] *n.* *an ornamental covering for a horse, a saddle-cloth* गाशा *m*, पाखर *f*, (घोड्याची) झूल *f.*

Hove (hōv) *pa. t.* and *p. p.* of Heave.

Hovel (huv'el) [Dim. of A. S. *hof*, a dwelling.] *n.* *a small or mean dwelling* खोपट *n*, *dim.* खोपटी *f*, झोंपडें *n*, झोंपडी *f.* H. *v. t.* *to put in a hovel* झोंपडीमध्यें घालणें -ठेवणें. Hov'elled *pa. t.*

Hover (hov'ėr) [Formed from A. S. *hof*, house.] *v. i.* *to remain aloft flapping the wings, to wait in suspense, to move about near* घिरट्या *f. pl.* -भोंवंड्या *f. pl.* -गिरट्या *f. pl.* मारणें -घालणें *with* वर or भोंवतालीं *of o.*, तरंगणें, तरंगत राहणें, घोंटाळणें, घुटमळणें, घुरमळणें. Hov'ered *pa. t. & p. p.* Hov'erer *n.* Hov'ering *pr. p. & v. n.* Hov'eringly *adv.* घिरट्या घालीत.

How (how) [A. S. *hu*; prob. a form of *hwi*, in what way, why, the instrumental case of *hwa*, who.] *adv.* *in what manner* कसें, कसा, कसकसा, केविं, कोणत्या प्रकारें; as, "*How* can a man be born when he is old?" २ *to what extent* केवढा, किती, किती तरी, कितपत; as, "O, *how* love I thy law! it is my meditation all the day." ३ *for what reason* कां, काय म्हणून, कोणत्या कारणानें, कशामुळें, कशासाठीं, कशास्तव, कशाकरितां; as, "*How* now, my love! why is your cheek so pale?" ४ *by what means* कसें, कोणत्या साधनांनीं, कशानें. ५ *in what condition* कोणत्या स्थितींत, कोणत्या तोंडानें, कसा, कसें; as, "*How*, and with what reproach, shall I return?" ६ *by what name* कोणत्या -कशा नांवानें, कसें; as, "*How* art thou called?" H. great, H. large केवढा. H. many, H. much किती, केवढा.

Howbeit (how-bē'it) [*How*, *be*, and *it.*] *conj.* *be it how it may, notwithstanding, yet, however* कसाही, कसेंही असलें तरी, कांहीं झालें तरी, कितीही, तरि, तत्रापि, तथापि.

Howda, See Houdah.

However (how-ev'ėr), Howsoever (how-so-ev'ėr) *adv.* and *conj.* *in whatever manner and degree* कसाही, कोणत्याही तऱ्हेनें, कशातरी प्रकारानें. २ *nevertheless, at all events* परंतु, तरी, तत्रापि, तथापि.

Howitzer (how'its-ėr) [Ger. *haubitze* -Bohemian *houfnice*, a sling.] *n.* *a short light canon used for throwing shells* गनोळीसारखी एक प्रकारची तोफ *f.*

Howl (howl) [O. Fr. *huller* -L. *ululare*, to shriek or howl.] *v. i.* *to yell or cry as a wolf or dog* केंकावणें, कोंकलणें, कोंकणें, केंकटणें, रडणें, बोंभावणें. २ *to utter a long, loud whining sound; to wail* हेल काढून -गळा काढून रडणें, आकांत करणें, धाय मोकलणें -फोडणें. H. *v. t.* *to utter with outcry* केंकटवणें, केंकावणें. H., Howl'ing *n.* केंकणें *n*, केंकाव *m.* २ गळा काढून रडणें *n*, आकांत *m*, आक्रोश *m*, घोर *m*, एकच घोर *m.* Howl'ing *a.* *filled with howlings as of the wind or of wild beasts* भयाण, भणभणीत, घोर. Howl'ed *pa. t. & p. p.* Howl'ing *pr. p. & v. n.*

Hub (hub) [A form of *Hob.*] *n.* *the nave of a wheel* चाकाचा तुंबा *m* -तुंब *n.* २ *the projection on a wheel for the insertion of a pin* चाकापुढें खीळ घालण्याचें भोंक *n.* ३ *the hilt of a weapon* (शस्त्राची) मूठ *f.*

Hubble-bubble (hub'l-bub'l) [Reduplication of *bubble.*] *n.* *an Indian tobacco pipe in which the smoke is drawn through water with a bubbling sound* गुडगुडी *f*, गुरगुडी *f.* [BUBBLING SOUND OF A HUBBLE-BUBBLE गुडगूड *f.* STANDING TUBE OF A H. मेरु *m.*]

Hubbub (hub'ub) [Prob. a repetition of *hoop*, whoop.] *n.* *a confused souud of many voices, riot, uproar* गलका *m*, गलबा *m*, गलबल *f*, गलबला *m*, गवगव *f*, गवगवा *m*, कोलाहल *m*, कल्होळ *m*, बलवा *m*, कल्ला *m.*

Huckster (huk'stėr) [Orig. a feminine form of an old Low Ger. root *heuker*, a retailer -O. Dut.

*hucken*, to stoop, or bow. Hawkers generally had their backs bent under the weight of the goods they carried.] *n. a retailer of small wares, a hawker, a peddler* बारीकसारिक -लहान सहान जिनसांचा व्यापारी *m*, घेवारी, पसारी, तुटपुंज्या वाणी *m*, मोडका वाणी *m*, डाळमिळ्या -हिंगमिऱ्या वाणी *m*. H. *v. t. to deal in small articles* लहान सहान जिनसांचा व्यापार -तुटपुंजा व्यापार करणें, हिंगमिरें विकणें.

Huddle (hud'l) [M. E. *hodren*; perh. from root *Hide*. Huddle orig. meant, to crowd together for concealment or shelter.] *v. i. to crowd together confusedly* खेटाखेट करणें -असणें, खेटणें, (-ची) भीड होणें, दाटीनें जमणें. H. *v. t. to throw or crowd (things) together in confusion* घालमेल -घोटाळा करून ठेवणें -भरणें, गडबड -घोटाळा -घालमेल करणें *g. of o.*, गोबडणें. २ *to perform in a hurry* गडबडीनें करणें, (-चा) गडबडगुंडा करणें, गडबडवणें, गडबडघोटाळ्याचा करणें. H. *n. a crowd, tumult, confusion* घोटाळा *m*, गोंधळ *m*, गदळ *f*, गलत *f*, घालमेल *f*, गप्पाघोळ *m*.

Hue (hū) [A. S. *hiw*, *heow*, appearance, complexion.] *n. appearance, colour* रंग *m*, वर्ण *m*, वाण *m*.

Hue (hū) [Fr. *huer*, to hoot, shout.] *n. a shouting* पुकारा *m*, हांकाटा *m*, हाकाटी *f*, हाकाहाक *f*. H. and cry ओरडाओरड *f*, पुकारा *m*, कल्होळ *m*.

Huff (huf) [An imitative word, the idea of puffing or blowing being present in it.] *n. a sudden anger or arrogance* रुसवा *m*, खप्पा मर्जी *f*, इतराजी *f*, घुस्सा *m*, क्रोध *m*, चीड *f*. २ *a boaster* पतराजखोर मनुष्य *m*. H. *v. i. to swell, to bluster* फुगून बसणें, फुगणें, (-ची) खप्पा मर्जी होणें. H. *v. t. to swell, to puff up* फुगवणें, पतराज वाढवणें; as, "To *huff* with air." Huf'fer *n*. Huf'fish *a*. Huf'finess, Huffishness *n*. चिरड *f*, चीड *f*. Huf'fy *a*. चिरडखोर.

Hug (hug) [Of Scandinavian origin. Icel. *huka*, to sit on one's hams.] *v. t. to embrace closely and fondly, to clasp to the bosom* उराशीं -पोटाशीं -उरापोटाशीं धरणें, आलिंगणें, उरींपोटीं धरणें, (-च्या) गळ्यास मिठी घालणें -मारणें. [To H. ONE'S-SELF खूष होणें, गालच्या गालांत हंसणें.] २ *naut. to keep close to* (-च्या) जवळ जाणें; as, "To *hug* the land or wind." H. *n. a close and fond embrace* आलिंगन *n*, मिठी *f*, खेम *f*, खेव *f*. A Cornish H. मगरमिठी *f*, माकडमिठी *f*. Friendly H. क्षेमालिंगन *n*, प्रेमालिंगन *n*. To give cornish H. कडकडां -कडकडून भेटणें. Hug'ged *pa. t.* & *p. p.* Hug'ging *pr. p.* & *v. n.*

Huge (hūj) [M. E. *huge*.] *a. enormous, monstrous, having great dimensions* (esp. *height*) फार मोठा, अवाढव्य, अवजड, औजड, जबर, जगड्व्याळ, वताडा, गंजवर. Huge'ness *n*. अवाढव्यपणा *m*. Hug'er *comp*. Hug'est *Superl*.

Hugger-mugger (hug'ér-mug'ér) [Of imitative origin.] *n. secrecy, concealment* गुपचुपी *f*, छपवाछपवी *f*, लिकाचोरी *f*, अडआड *f*; as, "Many things have been done in *hugger-mugger*." In H. लपूनछपून, लिकूनचोरून, अडपझडप.

Huguenot (hū'ge-not, *or* -nō) [A dim. of Fr. *Hugues*, Hugh, the name of some one of the French Calvinists, and afterwards applied as a nickname to them all.] *n. the name formerly given, in France, to an adherent of the Reformation* फ्रेंच प्रॉटेस्टंट, ह्युजेनॉट, ह्युजेनो.

Hulk (hulk) [Low L. *hulka* -Gr. *holkas*, a ship which is stowed.] *n. the body of a ship, esp. of an old vessel laid by as unfit for service* गलबताचा (विशेषतः जुन्या गलबताचा) सांगाडा *m*. २ *anything unwieldy* मोठी -अवजड वस्तु *f*.

Hull (hul) [A. S. *hulu*, a husk as of corn.] *n. the husk or outer covering of anything* टरफल *n*, साळपट *n*, साल *n* or *f*, फोल *n*. २ *naut. the body of a ship* (गलबताचा) सांगाडा *m*, पोट *n*, कोठारा *m*. ३ *mere frame* खटारा *m*, सांगाडा *m*. H. *v. t. to strip off the hull, to husk* सालपट काढणें, सोलणें. २ *to pierce the hull* (as with a cannon ball) (तोफेच्या गोळ्यानें) सांगाडा भोंसकणें. Hull'er *n. a hulling machine* धान्य घरटण्याचें यंत्र *n*, यंत्री घिरट *m*. Hul'ly *a*. टरफलें असलेला.

Hum (hum) [Imitative word.] *v. i. to make a buzzing sound like bees, to utter a low droning sound* गुणगुण करणें, गोंगावणें, घोंगावणें, घुं घुं आवाज करणें. २ *to supply an interval in speaking by an audible sound* नाकांतून -घुणघुण बोलणें, गेंगणें. H. *v. t. to sing in a low tone* गळ्यांत -गळ्यांतले गळ्यांत गाणें. To H. a tune आलापणें, गुणगुणत आलाप काढणें. H. *n. the noise of bees and some other insects* गुणगुण *f*, गुंजारव *m*. २ *hum or buzz of people speaking* कुजबुज *f*, गजबज *f*, गुणगुण *f*, गलका *m*. Hum'med *pa t.* & *p. p.* Hum'ming *pr. p.* & *v. n.*

Human (hū'man) [L. *humanus*; akin to *homo*, man.] *a. belonging to man or mankind* मनुष्याचा, मनुष्यजातीचा, मानुष, मानवी, पौरुष, पौरुषेय. [H. KINGDOM मनुष्यकोटी *f*, मानवकोटी *f*. H. UNDERSTANDING मानवबुद्धि *f*.] २ *having the qualities of a man* मनुष्यधर्मक, मानवधर्मी. H. art मानवी कला *f*. H. being मनुष्य, माणूस *n*. H.-kind *n. mankind* मनुष्य जाति *f*, मानवजात *f*, मनुष्य, मानव. Humane' *a. having the feelings proper to mankind, tender, merciful* दयाळु, दयावान्, दयावंत, सकरुण, कृपाळु, कृपावंत, करुणात्मक, सदय. २ *humanizing, exalting* मनुष्यपणा -माणुसकी आणणारा, माणसाळवणारा. Humane'ly *adv.* दयाळूपणानें, माणुसकीनें. Humane'ness *n*. Hu'manism *n. human nature or disposition*

मनुष्यपणा *m*, मनुष्यस्वभाव *m*, मनुष्यत्व *n*. २ *the study of the humanities, polite learning* उदात्त-वाङ्मयाचा अभ्यास *m*; भाषा, अलंकार, साहित्य, काव्य, इत्यादि विषयांचा अभ्यास *m*. Hu'manist *n*. उदात्त वाङ्मयाचा अभ्यास कारणारा मनुष्य (उदात्त वाङ्मय = *the* Humanities.). २ *one versed in the knowledge of human nature* मनुष्यस्वभावज्ञाता, मनुष्यस्वभावाचें परिज्ञान असलेला मनुष्य. Humanita'rian *n*. *one who denies the divinity of Christ, and believes him to have been merely human* मनुष्यैकवादी (?), मनुष्यत्ववादी, ख्रिस्ताचें मनुष्यत्वच कबूल करणारा. Humanita'rianism *n*. (ख्रिस्तासंबंधी) मनुष्यत्ववाद *m*, मनुष्यैकवाद *m* (?). Hu'manize *v. t. to render human or humane* माणसाळणें, मनुष्यपणा आणणें, नम्र -लीन -सदय करणें. २ *to give a human character or expression to* मानवरूप -मानवाकृति देणें, मानवधर्माचा आरोप करणें; as, "*Humanized* divinities." ३ *med. to convert into something human or belonging to man* मनुष्यधर्मी करणें; as, "To H. vaccine lymph." H. *v. i.* माणसाळणें, नम्र होणें. Hu'manly *adv.* मनुष्यबुद्धीप्रमाणें, मनुष्यज्ञानाप्रमाणें; as, "*Humanly* speaking." मनुष्याच्या भाषेत-ज्ञानानें बोलतांना.

**Humanity** (hū-man'it-i) [L. *humanus* -L. *homo*, a man, lit. 'a creature of the earth' -from *humus*, ground.] *n. the peculiar nature of man by which he is distinguished from other beings* मनुष्यपणा *m*, मनुष्यपण *n*, मानवस्वभाव *m*, मनुष्यस्वभाव *m*, मनुष्यता *f*, मानवत्व *n*. २ *the human race*, (often) *mankind in general* मनुष्यजात *f*, मनुष्यमात्र, (सर्व) माणसें *n. pl.* ३ *quality of being humane* माणुसकी *f*, करुणा *f*, (esp.) दीनवात्सल्य *n*, दया *f*, दयालुत्व *n*, परानुकम्पा *f*. ४ *liberal education, instruction in polite and classical literature* उदारतत्त्वविषयक शिक्षण *n*, उदार -उदात्त शिक्षण *n*, उदात्त वाङ्मयाचें शिक्षण *n*. ५ *pl.* (with definite article, *the humanities*) *the branches of polite and elegant learning, as languages, rhetoric, poetry, and the ancient classics; 'belles lettre'* भाषा, अलंकार, साहित्य, काव्य, इत्यादि विषयांचें ज्ञान *n*. पारमार्थिक विषयांच्या अध्ययनास (ईश्वरी विद्येस) Divinity हा शब्द लावतात. Professor of Humanity स्कॅाटलंडांतील विश्वविद्यालयांतील लॅटिन् भाषेचा अध्यापक *m*.

**Humble** (hum'bl) [Lit. 'on the ground,' from Fr. -L. *humilis*, low -L. *humus*, the ground. Humble शब्दाचा मूळ अर्थ 'जमिनीला लागलेला' किंवा 'सखल' असा होता.] *a. not high or lofty, not pretentious or magnificent* गरिबीचा, गरिबाचे योग्यतेचा, साधा, बिनभपक्याचा, विशेष डामडौल नसलेला; as, "A H. cottage." २ *unassuming, meek, modest* लीन, लीनमनस्क, लीनवृत्ति, नम्र, नम्रतेचा, नम्रबुद्धि, निगर्वी, गर्वहीन -शून्य, अहंकारहीन -रहित, निरभिमानी, अनभिमानी, निरहंकार, सविनय, विनयी, विनत, विनीत, &c. To eat H. pie मानहानि सहन करणें, सूग गिळून बसणें. H. *v. t. to bring low, to lower, to humiliate* नम्र -लीन करणें, नमवणें, खालावणें, हलकावणें, उतरणें, सत्ता-अधिकार &c. मोडणें -कमी करणें. २ *to mortify, to degrade, to humiliate* गर्व हरण करणें *g. of o.*, रग मोडणें -जिरविणें *g. of o.*, (-चा) नक्षा उतरणें, पाणउतारा -मानभंग -तेजोभंग करणें *g. of o.* [WITH THE POWER OR GENERAL SENSE OF SUCH WORDS AND PHRASES AS, *to mortify, to take the conceit out of, to bring to his bearings, to make to look sheepish, &c. &c.* लाजावणें, लाज आणणें, रग -खोड -माज मोडणें -उतरणें, (-ची) भोंवळ जिरवणें, मस्तक ठेंगणें करणें, मान -नाक मोडणें, पागोटें खालीं करणें, खालीं पहावयास लावणें, वोडंती -फजिती &c. करणें, पाण्यापेक्षां पातळ करणें, &c. To BE H.ED *Cf.* पारडें उतरणें -बसणें *g. of s.*, भोंवळ जिरणें *g. of s.*] ३ *to reduce the self-sufficiency of* (often used *reflexively*) कमीपणा घेणें, नमणें, ईश्वरेच्छेच्या आधीन होणें-करणें. Hum'bleness *n. humility, meekness* नम्रपणा *m*, नम्रता *f*, लीनपणा *m*, लीनता *f*, निरहंकार *m*, विनय *m*, नम्रबुद्धि *f*, &c. Hum'bler *n*. Hum'bly *adv.* नम्रपणानें, नम्रतेनें, नम्रबुद्धीनें, लीनपणानें, लीनतेनें, निरहंकारबुद्धीनें, विनयपूर्वक. २ गरीबीच्या रीतीनें -चालीनें, गरिबीलायक. Hum'ble-bee *n*. भुंगा *m*, भ्रमर *m*, भृंग *m*.

**Humbug** (hum'bug) [Orig., a false alarm, a bugbear -*hum* and *bug*, a frightful object.] *n. an imposition under fair pretences, hollowness, pretence* थापबाजी *f*, भुलथाप *f*, लोणकढी थाप *f*, पैठणी आदर *m* झोंकपट्टी *f*, भोंदेगिरी *f*, झुगारपट्टी *f*, फोल *n*. २ *one who so imposes* थापबाजी करणारा, भुलथाप्या, थापाड्या. H. *v. t. to deceive, to hoax* थापबाजी करणें, भुलथाप देणें, झोंकपट्टी देणें, बात मारणें. Hum'bugged *pa. t. & p. p.* Hum'bugger *n*. भुलथाप देणारा. Hum'buggery *n*. थापबाजी *f*. Hum'bugging *pr. p. & v. n.*

**Humdrum** (hum'drum) [*Hum*, and *drum*.] *a. dull, droning* मळमळीत, मठ्ठ, मठ्ठ्या, मख्या, जड. २ *monotonous, commonplace* एकच जातीचा, एकच सारखा, तोच तोच, तेंचतेंच. H. *n. a stupid fellow* मठ्ठ मनुष्य. २ *monotony or tedious talk or routine* विरस *m*, एकसारखेपणा *m*, तेंचतेंचपणा *m*, कंटाळवाणेपणा *m*.

**Humeral** (hū'mer-al) [L. *humerus*, the shoulder.] *a. belonging to the shoulder* खांद्याचा, स्कंधाचा. *n*. Hu'merus *n. the large bone from the shoulder to the elbow* दंडाचें हाड *n*, बाह्वस्थि *n*, भुजास्थि *n*, प्रकोष्ठास्थि *m*, स्कंधास्थि, खांद्याचें हाड *n*. २ स्कंध *m*, खांदा *m*. Hu'meri *n. pl.*

**Humid** (hū'mid) [L. *humidus*, moist.] *a. moist, containing sensible moisture* दमट, दमसर, ओलसर, ओलट, आर्द्र. H. soil दमदार -दमाची जागा *f* -जमीन *f*. Humid'ity, Hu'midness *n*. ओल *n*, ओलावा *m*, ओलेपणा *m*, आर्द्रता *f*.

**Humility**, See under Humiliate.

**Humiliate** (hū-mil'i-āt) [L. *humiliatus* p. p. of *humiliare* to make humble.] *v. t. to make humble* नम्र -लीन करणें, नम्रता -लीनता आणणें, ताठा उतरणें -मोडणें. २ *to lower in condition, to mortify* पाणउतारा *m* -मानभंग *m.* करणें, रग *f.* मोडणें -जिरविणें. Humil'iated *pa. t.* & *p. p.* Humil'iating *pr. p.* & *v. n.* Humilia'tion *n. abasement of pride, mortification* पाणउतारा *m*, मानभंग *m*, रगमोड *f.* Humil'ity *n. modesty, humbleness, self-abasement* निगर्वता *f*, नम्रावस्था *f*, नम्रता *f*, लीनता *f*, लीनपणा *m*, विनय *m*, लीनवृत्ति *f*, नम्रवृत्ति *f*, गर्वराहित्य *n*, निरभिमानता *f*, निरहंकारिता *f*.

**Humour** (ū'mur) [O. Fr. *humor* (Fr. *humeur*) -L. *humor* -*humeo*, to be moist. या शब्दाचा moisture = ओलावा असा फार प्राचीन अर्थ होता. परंतु तो सध्यां लुप्त झाला आहे. त्याचप्रमाणें प्राण्यांतील किंवा वनस्पतींतील सहज किंवा विकृत स्थितींतला रस असाही Humour शब्दाचा अर्थ एके काळीं होता, परंतु सध्यां तोही प्रचारांत नाहीं. ज्या ठिकाणीं सध्यां आपण lymph हा शब्द वापरतों त्याच ठिकाणीं पूर्वी Humour हा शब्द वापरीत असत; जसें, "There are no lymphs or humours in the constitution." ज्याप्रमाणें आपल्या आर्यवैद्यकांत मनुष्याच्या शरीरांत कफ, वात व पित्त हे तीन मूलधातु (?) कल्पिले आहेत व हे शरीरांत कमीजास्त झाले असतां मनुष्यास निरनिराळे रोग होतात, व यांच्या प्रमाणावर मनुष्याचा स्वभाव अवलंबून आहे अशी समजूत आहे, त्याचप्रमाणें यूरोप खंडांत प्राचीन व मध्ययुगीन कालांत तेथील वैद्यांची अशीच समजूत होती. त्यांच्या समजुतीप्रमाणें blood (रक्त), phlegm (कफ), choler (पित्त), व melancholy (कृष्णपित्त) असे चार धातु मनुष्याचे शरीरांत आहेत व या चार धातूंच्या प्रमाणावर मनुष्यस्वभाव अवलंबून आहे.] *n. the moisture or fluids of animal bodies* (मनुष्याच्या शरीरांतील) दोष *m*, धातु *m*, रस *m.* [THE THREE HUMOURS ACCORDING TO THE AYURVEDIC SYSTEM ARE: कफ, पित्त AND वात. (PHLEGM, BILE OR CHOLER, AND WIND.) THE HUMOURS ACCORDING TO THE ANCIENT GREEK SYSTEM ARE PHLEGM, CHOLER, BLACK CHOLER OR MELANCHOLY, AND BLOOD. DISORDER OR VITIATION OF ANY OF THEM दोष *m*, धातुनाश *m.* DISORDER OR VITIATION OF THEM ALL त्रिदोष *m*, त्रिदोषवायु *m*, सन्निपात *m.* DISORDER ASCRIBED TO THE VITIATION OF THE H. PHLEGM IS कफविकार OR कफरोग; -OF THE H. BILE पित्तविकार OR पित्तरोग; -OF THE H. WIND वातविकार OR वातरोग, वायु. EXCESS OF ANY OF THE THREE H.s प्रकोप *m*, दोषप्रकोप *m.*] २ *an animal fluid in an unhealthy state* रोगी शरीरांतील दोष *m*, दुष्टधातु *m.* ३ *temporary state of mind or feeling, mood, temper* (मनाची) वृत्ति *f*, भाव *m*, तब्बेत *f*, स्वभाव *m.* [TO BE IN THE H. FOR (-करितां) तब्बेत लागणें, (-करितां) वृत्ति असणें, स्वर -सूर भजणें -वाहणें *g. of s.*] ४ *whim, fancy, inclination, liking* छंद *m*, तरंग *m*, लहर *f.* ५ *a mental quality which delights in ludicrous and mirthful ideas* विनोद *m*, विनोदी स्वभाव *m*, थट्टेखोर स्वभाव *m*, थट्टेबाजी *f*, थट्टेखोरपणा *m.* H. *v. t. to go in with the humour of, to adapt one's self to* (-च्या) छंदानें चालणें, छंदानुवर्तन करणें, चित्तवृत्तीप्रमाणें वागणें, छंदानुरोधानें चालणें. २ *to gratify by compliance* लळा -लाड चालविणें; as, "You H. me when I am sick." Hu'moral *a. pertaining to the humours* कफवातपित्तात्मक, तीन मूळधातूसंबंधीं. २ *proceeding from the humours* (तीन किंवा चार) मूळधातूंपासून झालेला. Hu'moralism *n.* त्रिदोषवाद *m*; सर्व रोग कफ, वात व पित्त या तीन दोषांपासून उत्पन्न होतात असें मत *n* (according to the Hindoos); चतुर्दोषवाद *m*; किंवा सर्व रोग रक्त, पित्त, कृष्णपित्त व कफ यांपासून उत्पन्न होतात असें मत *n.* Hu'moralist *n.* त्रिदोषचिकित्सावादी *m*, चतुर्दोषचिकित्सावादी *m.* Hu'mourist *n.* विनोदी-थट्टेखोर विनोदवृत्तीचा मनुष्य. २ मनुष्यस्वभावविद्यार्थी. Hu'morous *a. governed by humour, capricious, irregular* लहरी, छंदी, छंदिष्ट, छांदिष्ट, तब्बेती, तऱ्हेबाज. २ *full of humour, exciting laughter* विनोदी, विनोदवृत्तीचा, थट्टेखोर, थट्टेबाज, (*colloq.*) खारटतुरट. Hu'morously *adv.* तब्बेतीखालीं. २ विनोदानें, थट्टेनें. Hu'morousness *n.* लहरीपणा *m*, छांदिष्टवृत्ति *f*, छांदसवृत्ति *f.* २ विनोदवृत्ति *f*, थट्टेबाजी *f*, थट्टेखोरी *f.*

**Hump** (hump) [Prob. a form of *heap.* Cf. Gr. *kyhhos*, a hump, Sk. कुब्ज, hump-backed.] *n. a lump or hunch upon the back* कुबड *n*, पोंक *n*, पोंग *n*, कोंक *n*, कोंग *n*, खोंद *n.* –on a bullock's back कोळ *n*, कोहळें or कोहाळें or कोळें *n*, कोळखंड *n*, कोळखांदा *m*, वशिंड or वशेंड or वसंड *f*, वृषांस *m*, ककुद *m* or *n.* –on a camel's back मदार *f.* Hump-back *n. a back with a hump or a hunch* कुबड असलेली पाठ *f*, or कुबड *n*, पोंक *n*, कोंग *n*, कोंक *n* २ *a person with a hump-back* कुबडा मनुष्य *m.*. Hump'-backed *a.* कुबडा, पोंक्या.

**Hunch** (hunch) [The nasalised form of *Hook.*] *n. a hump on the back* कुबड *f*, पोंक *n.* २ *a lump, thick piece* ढोकळा *m*, कोंडका *m*, कोंडकें *n.* H. *v. t.* कोंपरानें ढकलणें. २ पोंग बाहेर टाकणें. Hunch'-back *n.* कुबड्या. Hunch'-backed *a.* कुबड असलेला.

**Hundred** (hun'dred) [A. S. *hundred*; old Cog. of L. *cent-um*, Gr. *he-kat-on*, Sk. शत, a hundred.] *n. the number of ten times ten* शंभर, शत. [TO EXPRESS PLURALITY शें IS USED WITH A NUMERAL PREFIX; AS, एकशें, दोनशें, तीनशें. AGGREGATE OF A H. शेंकडा *m*, शतक *n.* BY H.s शेंकडों, शेंकडोंनीं, शेंकडोंशः, शेंकडोंशा, शतशः. IN OR BY THE H. शेंकडा OR शेंकडां.] २ *a division of a country in England, originally supposed to contain a hundred families* शतकुटुंब-

समुदाय m, शतकुटुंबग्राम m, शंभर कुटुंबांचें गांव n. Hun'dred-fold n. & a. शंभरपट. Hun'dredth a. शंभरावा. H. n. शंभरांश m, शतांश m, शंभरावा भाग m. Hun'dred-weight' ( Orig. 100 lbs. abbreviated *cwt.* c=hundred, and *wt.*=weight. ) वजनी ११२ पौंड m. pl., टनाचा विसावा भाग m. Great or long H. *six score* एकशें वीस.

Hung ( hung ) *pa. p. & pa. t.* of Hang.

Hunger ( hung'gėr ) [ A. S. *hungor*, hunger. ] n. *desire for food* भूक f, क्षुधा f, अन्नेच्छा f. [ To DIE OF H. भुकेनें मरणें, अन्नावांचून मरणें. H. NEEDS NO SAUCE भुकेला कोंडा. ] २ *strong desire for anything* प्रबलेच्छा f, भूक f (*fig.*). Hung'er-bit'ten n. क्षुधार्त, m. क्षुधेनें -भुकेनें व्याकुल झालेला- पीडलेला. Hung'rily *adv. voraciously* अधाशीपणानें. Hung'ry a. भुकेलेला, क्षुधित, बुभुक्षित.

Hunt ( hunt ) [ A. S. *huntian*, also A. S. *hentan*, to seize. In our opinion perhaps this may be allied to Sk. हन्, to kill, Sk. हन्ता, killer. ] v. t. *to chase wild animals* ( for prey or sport ) पारध -शिकार -मृगया करणें g. of o. २ *to pursue, to follow close* पाठलाग करणें, पाठीस लागणें g. of o. ३ ( with *out* ) *to search for* हुडकून काढणें, हुडकणें, शोधून काढणें, धुंडाळणें, धुंडाळून काढणें. ४ ( with *away* ) *to drive* हांकलून देणें, हांकलणें. H. v. i. *to go out in pursuit of game* (-च्या) शिकारीस -पारधीस जाणें, (-ची) पारध -शिकार करणें. २ *to search* शोध करणें. [ To H. EVERYWHERE घरघर-देशदेश -गांवगांव चाळणें. ] H. n. a *chase of wild animals* पारध f, शिकार f, मृगया f, आखेट m. २ *search* शोध m. ३ *game hunted* शिकार f. ४ *an association of huntsmen* पारध्यांची मंडळी f -संस्था f. Hunt'er n. पारधी, मृगयाकार, मृगयु m, व्याध m, लुब्धक m, शिकाऱ्या m, शिकारबाज. २ *a horse used in the chase* पारध्याचा घोडा m. ३ शिकारी कुत्रा m. Hunt'ing n. पारध f, शिकार f, मृगया f. Hunting box, H. seat n. *a temporary residence for hunting* पारध करितांना बसण्याची जागा f. Hunting cap n. पारध करितांना घालण्याची टोपी f. Hunting whip n. पारध्याचा चाबूक m. H. ground n. मृगयाभूमि f, पारध करण्याची भूमि f. Hunting horn n. शिकारीचे वेळीं कुत्र्यांस धीर -उत्तेजन देण्याकरितां वाजविण्याचें शिंग n. Hunt'ress n. *fem.* शिकार करणारी स्त्री f, मृगयाकारिणी f. Hunt'ed *pa. t. & p. p.* Hunt'ing *pr. p. & v. n.* Hunts'man n. पारधी.

Hurdle ( hur'dl ) [ A. S. *hyrdel*, a wicker-gate. Allied to L. *crates*, a hurdle. Cf. Sk. कृत्, to spin. ] n. a *frame of twigs or sticks interlaced, a moveable frame of timber or iron for gates* ताटी f, सांकाटा m, सांपडा m.

Hurl ( hurl ) [ Perhaps the word *Hurl* can be traced to E. *hurle blast*, hurricane, *hurle pool*, whirlpool, *hurle wind*, whirlwind. ] v. t. *to throw with violence* जोरानें फेंकणें, झुगारणें, झोंकणें. २ *to utter with vehemence* जोरानें उच्चारणें. H. v. i. *to make a noise by throwing* फेंकल्यामुळें आवाज करणें -होणें. २ *to move rapidly, to whirl* खूब जोरानें जाणें, गरगर फिरणें. Hurl'ed *pa. t. & p. p.* Hurl'er n. Hurl'ing *pr. p. & v. n.* Hurl'y n. *noise, confusion, uproar* गोंगाट m, गलबला m, कलकलाट m, गोंधळ m.

Hurly-burly ( hur'li-bur'li ) [ *Hurly* is from O. Fr. *hurler*, to yell, *Burly* is a rhyming addition. ] n. *a tumult, confusion* गोंधळ m, धामधूम f, धूमधाम f, धांदल f, धडाका m, घोळ m, घोळंकार m, घप्पाघोळ m.

Hurrah, Hurra (hoor-rä') [Of German origin.] *interj. an exclamation of excitement or joy* ( आनंददर्शक किंवा क्षुब्धतादर्शक ) हुर्योंहुर्यो n ; as, "Hip, Hip, *Hurrah*." H. n. *a cheer* ( वाहवा, सलामी, शाबासकी देण्याकरितां ) ओरडून केलेला हुरों असा आवाज m. H. v. t. & i. ओरडून सलामी-शाबासकी देणें, हुरों असें ओरडणें.

Hurricane (hur'ri-kān) [Sp. *huracan*, a whirl-wind.] n. *a storm with extreme violence and sudden changes of the wind* फार जोराचें वादळ n, तुफान n, चंडवात m, प्रचंडवात m. २ *fig.* तुफान n, वावटळ f.

Hurry ( hur'i ) [ An imitative word. ] v. t. *to urge forward, to hasten* घाई करणें, उतावळ करणें, त्वरा करणें. २ *to impel to precipitate or thoughtless action* उतावळ -अविचार करण्यास प्रवृत्त करणें. ३ *to cause to be done quickly* गडबडीनें -धांदलीनें करावयास लावणें, तांतड लावणें, गडबडवणें. To H. over or through गडबडवणें, (-चा) गडबडगुंडा करणें. H. v. i. उतावळ -घाई करणें, उतावळीनें चालणें -जाणें. २ गडबडणें. To H. up *colloq. to make haste* जलदी f. करणें, घाई f. करणें, ( लवकर ) आटपणें. H. n. *a driving forward, haste* गडबड f, धांदल f, गर्दी f. घाई f, लगबग f, तांतड f, तांतडी f, उतावळ f, उतावीळ f, जलदी f. [To BE IN A VIOLENT H. फार घाई असणें, (-ला) मुंगळा लागणें *in. con.*] २ *tumult* गडबड f, घोळ m, घोळंकार m. Hur'ried a. *working at speed or done in a hurry*, ( hence ) *imperfect, careless* घाईघाईनें काम करणारा, घाईनें केलेला -लिहिलेला, कच्चा, अर्धवट, ओढून काढलेला, निष्काळजीपणाचा; as, "A *hurried* writer, life or job." Hur'rying *pr. p. & v. n.* घाई करणें n, चालढकल f. Hur'ryingly *adv.* घाईघाईनें.

Hurry-skurry ( hur'i-skur'i ) [ *Hurry* with the rhyming addition *skurry.* ] n. *confusion and bustle* धुमधाम f, दौडादौडी f, धांवाधांव f, धांवपळ f, घाई f.

Hurt ( hurt ) [ Fr. *heurter*, to knock, to run against. Lit. *hurt* means, to butt or thrust like a ram, prob. from the Celtic *hwradd*, a thrust, the butt of a ram. ] v. t. *to cause bodily pain to* दुखापत करणें -देणें, दुखावणें. २ *to damage* नुकसान n -नुकसानी f खराबी f. करणें g. of o., उपद्रव करणें, नासवणें, नासणें, बिघडवणें, बिघडणें, बिनसवणें, बिनसणें. ३ *to wound* ( the feelings of ) (-चें मन) दुखवणें, (-ला ) दुःख देणें.

H. *pa. t.* & *p. p.* H. *n.* (शारीरिक) दुखापत *f,* अपाय *m,* अपकार *m,* इजा *f.* २ नुकसान *n,* नुकसानी *f,* खराबी *f,* खराबा *m,* नाश *m,* उपद्रव *m,* धक्का *m,* हानि *f.* ३ (मानसिक) दुःख *n.* Hurt'er *n.* अपाय -दुखापत करणारा. २ नुकसान करणारा. ३ (मन) दुखवणारा. Hurt'ful *a.* खराब करणारा, अपकारी, अपायकारक, अपकारक, अहितकारक, बाधक, दुष्ट, वाईट. २ (specif., article of food) *unwholesome* अपथ्य, वावडा, बाधक, अवगुणी. Hurt'fully *adv.* Hurt'fulness *n.* अपकारिता *f,* अपकारकभाव *m,* अपकारकत्व *n,* प्रत्यवाय *m.* २ अवगुण *m,* बाधकपणा *m,* बाधकत्व *n.* ३ दुःखदायकपणा *m.* Hurt'ing *pr. p.* & *v. n.* Hurt'less *a.* दुखापत -इजा -नुकसान -दुःख &c. न झालेला. Hurt'lessly *adv.* Hurt'lessness *n.* निरुपद्रव *m.* २ निरुपद्रवीपणा *m.*

Husband (huz'band) [M. E. *husbonde* -A. S. *husbonda* -*hus,* a house, and Icel. *buandi,* inhabiting, *pr. p.* of Icel. *bua,* to dwell.] *n.* *a married man, a man who has a wife* (corr. of *wife*) नवरा *m,* पति *m,* भर्त्ता *pop.* भतार *m,* दादला *m,* कांत *m.* [-IN VULGAR PHRASEOLOGY घो *m,* गोहो *m,* धगड *m.* -IN AMATORY OR POETIC PHRASEOLOGY प्राणनाथ, रमण, वल्लभ. CHOOSER OF HER H. (*lit.*) स्वयंवरा *f.* CHOOSING OF ONE'S H. (*lit.*) स्वयंवर *m.* DUTY OF H. AND WIFE दांपत्यधर्म *m,* स्त्रीपुरुषधर्म *m.* FIXING UPON A PERSON TO BE THE H. OF वरनिश्चय *m,* वरयोजना *f.* H. AND WIFE स्त्रीपुरुष *m,* नवरावायको *f,* दादलावायको *f,* दंपत्य *n,* दंपती *m.* H.'S BROTHER दीर *m,* भाऊजी *m,* भावोजी *m,* भावा *m.* -HIS WIFE जाऊ *f.* HUSBAND'S FATHER सासरा *m,* मामंजी *m,* श्वशुर *m.* -HIS HOUSE सासरें *n,* सासरघर *n.* GIRL RESIDENT IN IT सासुरवाशीण *f.* RESIDENCE IN IT सासुरवास (*lit.*) *m.* H.'s MOTHER सासू *f.* H.'S SISTER नणंद *f,* नंदा *f,* वनसें *f. pl.* (*colloq.*) WOMAN WHOSE H. IS ALIVE सुवासिनी *pop.* सवाशीण *f,* सभर्तृका *f.* TAKING A SECOND H. (among lower classes) पाट *m,* न्हावेर *m,* पुनर्लग्न *n* -पुनर्विवाह *m.* करणें, दुसरा नवरा करणें. TO RUN FROM ONE'S H. AND DWELL WITH ANOTHER MAN घर निघणें -रिघणें, (आपला) नवरा सोडून परपुरुषाशीं राहणें. WHILE THE H. STRUTS ABROAD, THE WIFE STARVES AT HOME टिलेपट्टे नायकांचे घरांत हाल बायकांचे, नवरा बाहेर ख्यालीखुशाली करतो व बायको घरांत उपाशी मरते.] २ *one who manages affairs with prudence* काटकसरीनें खर्च करणारा; as, "God knows how little time is left me, and may I be a good *husband,* to improve the short remnant left me." ३ *the agent or owner of a ship, who manages its concerns* गलबताचा मालक किंवा एजंट *m.* H. *v. t.* *to supply with a husband* (-ला) नवरा करून देणें. २ *to manage with economy* काटकसरीनें -बेतानें -टापटिपीनें खर्च करणें. ३ (*R.*) *to till* (जमीन) नांगरणें, शेतकी करणें. Hus'bandage *n.* *allowance or commission of a ship's husband* गलबताच्या मालकाला दिलेला पगार *m* -वेतन *n* -कमिशन *n.* Hus'band-hood *n.* दादलेपणा *m,* भर्तृत्व *n.* Hus'handman *n.* शेतकरी, शेतीभाती करणारा, शेती, कृषीवल. Hus'bandry *n.* *the business of a farmer* शेतकाम *n,* शेती *f,* शेतकी *f,* कृषिकर्म *n,* कृषि *f.* IMPLEMENTS OF H. शेतकीचीं आउतें *n. pl.,* आउतभरणा *m.*] २ *economical management, thrift* काटकसर *f,* मितव्यय *m,* घरजुगूत *f,* घरजोगावणी *f.*

Hush (hush) [Imitative.] *int.* or *imp. silence! be still!* चुप, उगी, उगाच -स्तब्ध रहा! H. *a. silent, quiet* शांत, थंड. H. *v. t.* *to make quiet* शांत -थंड -उगा -चुप करणें. २ *to appease, to soothe* शांतवन -शमन करणें *g. of o.,* दुःखपरिहार करणें. To H. up *to suppress* दाबादाब -चेपाचेप करणें *g. of o.,* दाबणें, छपवणें. H. *v. i.* चुप -स्तब्ध होणें. Hush-money *n.* *money given as a bribe to hush or make one keep silent* मुखपिंड *m,* तोंड दाबणें *n,* (चुप बसण्याकरितां दिलेला) लांच *m.*

Husk (husk) [*Hulsk* with the *l* dropped, from M. E. *hulen* (with suffix *-sk*) *-helan,* to cover.] *n.* *the dry, thin covering of certain fruits and seeds* टरफल *n,* फोल *n,* सालपट *n,* साल *n.* Husks *n. pl.* *chaff* भुसा *m,* भूस *n,* भुसकट *n,* भुसकटा *m,* भुशी *f,* भुसी *f,* फोल *n,* खोकस *n,* तूष *m pop.* तूस *n.* Husk of नाचणी or हरीक, परळ; -of legumes गुळीं, गुळें *n,* काड *n,* काठण *n* (R.). H. *v. t.* *to remove the husk of* सोलणें, साल -सालपट काढणें. Husk'ed *pa. t.* & *p. p.* *stripped of husks* सोललेला, सोलींव, निस्तुष, निस्त्वच. २ *covered with a husk* सालाचा, साल -सालपट असलेला, सालानें आच्छादित. Husk'ing *pr. p.* & *v. n.* सालें काढणें *n,* सोलणें *n.* Husk'y *a.* पुष्कळ सालें असलेला. २ पुष्कळ सालांचा. ३ सालासारखा.

Husky (husk'i) [A. S. *hwosta,* a cough.] *a. hoarse* घोगरा, कर्कश. Husk'ily *adv.* कर्कशपणानें. Husk'iness *n.* कर्कशपणा *m.* २ घोगरा आवाज *m.*

Hussar (hōōz-zär') [Hun. *huszar* -*husz,* twenty, because at one time in Hungary, one cavalry soldier used to be levied from every twenty families.] *n.* *a soldier of the national cavalry of Hungary* हुंगेरीच्या लष्करांतील घोडेस्वार *m,* हुझार *m.* २ *a light-armed cavalry soldier* हलक्या हत्यारांचा घोडेस्वार *m.*

Hussif (huz'if) [Icel. *husi,* a case -*hus,* a house. The *f* was added through confusion with Housewife.] *n.* *a case for needles, thread, &c. used in sewing* (सुईदोरा ठेवण्याचें -शिवणकामाचें) जुगदान *n.*

Hustle (husl) [O. Dut. *hutsen, hutselen,* to shake to and fro.] *v. t.* *to shake or push together* हालवणें, खळबळवणें. २ *to crowd with violence* दांडगाईनें आंत कोंबणें. To hustle a person out of a room गचांडी देऊन खोलीबाहेर हाकून देणें -काढणें.

Hut (hut) [Fr. *hutte* -O. Ger. *hutta.*] *n.* *a small or mean house* खोपट *n,* खोपटी *f,* खोपड *n,* खोपडी *f,* झोंपडी *f,* झोंपडें *n,* छपर *n,* छपरी *f,* पर्णशाला *f,* पर्णकुटी *f.* H. *v. t.* झोंपडींत ठेवणें -जागा देणें.

Huzza (hooz-zä') [Ger. *hussa;* same as Hurrah.]

*interj. & n. hurrah, a shout of joy* जयध्वनि *m*, हर्षनाद *m*. H. *v. t.* जयध्वनि -हर्षनाद करणें.

Hyacinth (hī'a-sinth) [Doublet of Jacinth.] *n.* (*myth.*) *a flower which sprang from the blood of Hyakinthos* हियासिंथ नांवाचें ग्रीक पुराणांत वर्णिलेलें फूल *n*.

Hyades, Hyads (hī'a-dēz, hī'adz) [Gr. *hyades* -*hyein*, to rain.] *n. a cluster of five stars in the constellation of the Bull, supposed by the ancients to bring rain when they rose with the sun* रोहिणी *f.*

Hyaline, Hyaloid (hī'a-lin, -loid) [Gr. *hyalos*, glass.] *a. glassy* कांचेसारखा (पारदर्शक इत्यादि).

Hybernate, same as Hibernate, which see.

Hybrid (hī'brid) [Lit. something *unnatural*, from L. *hibrida*, a mongrel.] *a. produced from different species, mongrel* भेसळ, निरनिराळ्या जातींपासून उत्पन्न झालेला, संकरज, संकीर्णजाति, संकीर्ण, संकरजात, मिश्रज. H. *n. an animal or plant produced from two different species, a mule* निरनिराळ्या दोन जातींपासून (प्राण्यांपासून अथवा वनस्पतींपासून) उत्पन्न झालेला मिश्र जातीचा प्राणी *m* किंवा वनस्पति *f*, संकीर्णप्राणी *m*, संकीर्णवनस्पति *f.* २ *a word formed of elements from different languages* (निरनिराळ्या भाषेंतील दोन शब्द एक होऊन झालेला) संकीर्ण जोडशब्द *m*, भिन्नजातीयशब्दसमास *m*, मणिप्रवाळसमास *m*; as, आगबोट (आग is Marathi, while बोट is English). Hy'bridous *a.* same as Hybrid. Hy'bridism, Hyb'ridity *n.* संकरजन्यता *f*, भेसळ *f*.

Hydatid (hī'da-tid *or* hid'-) [Gr. *hydatis*, 'watery vesicle'-*hydor, hydatos*, water.] *n. zool. a watery cyst or vesicle sometimes found in animal bodies* फितीसारख्या लांब जंतांच्या योगानें झालेली पाण्यानें भरलेली पोकळ पिशवी *f.* ही विशेषेंकरून यकृतांत सांपडते. सौत्रजलग्रंथि *m*, कृमिगर्भजलग्रंथि *m*.

Hydra (hīd'ra) [L.-Gr. *hydra* -*hydor*, water, akin to Sk. उदक, water.] *n. a water-serpent with many heads, which, when cut off, were succeeded by others* बहुमस्तकांचा एक कल्पित पाणसर्प *m*, बहुमस्तकी जलव्याल *m*. २ (hence) *any manifold evil* अनेक प्रकारचें दुःख *n*. ३ *a genus of fresh-water polypes remarkable for their power of being multiplied by being cut or divided* एक प्रकारचा जलजंतु *m*. ४ (*astron.*) *a southern constellation of great length lying southerly from Cancer, Leo, and Virgo* वासुकी *m*, मोठा नाग *m*.

Hydragogue (hī'-drag-og) [Gr. *hydor*, water, and *hagein*, to lead.] *n. med. any agents promoting the discharge of watery excretions* ज्यामुळें मळामध्यें जास्त पाणी पडतें असें तीव्र रेचक *n*, जलरेचक *n* (उ०, जेपाळ, रेवाचिनी).

Hydramnios (hī'dram-nios) [Gr. *hydor*, water, and *amnion*, 'amnion.'] *n. med. an abnormal accumulation of the liquor amnii* गर्भाशयांत प्रमाणाबाहेर होणारा गर्भोदकाचा संचय *m*, गर्भोदकरोग *m*, गर्भोदकोदर *n*.

Hydrant (hī'drant) [Gr. *hydor*, water.] *n. a machine for discharging water, a water-plug* पाणी शिंपण्याचें लांब नळी असलेलें व मोठ्या नळांतून पाणी घेण्याकरितां लहानसा नळ जोडतां येणारें यंत्र *n*, मोठ्या नळांतून पाणी काढून वेऊन रस्ते भिजविण्याची नळी *f.*

Hydrargyria (hī-drär'-ji-ria) [Gr. *hydor*, water and *hargyros*, silver.] *n. med. eczema from use of mercury* जास्त प्रमाणाबाहेर पारा घेतल्यामुळें होणारा खरजीसारखा पुरुळ *m*.

Hydrargyrum (hī'drär'ji-rum) [Gr. *hydor*, water and *hargiros*, silver.] *n. quick-silver, mercury* पारा *m*.

Hydrate (hī'drāte) [Gr. *hydor*, water.] *n.* (*chem.*) *a compound formed by the union of water with some other substance generally forming a neutral body as certain crystallised salts* उजेत *m*; पाण्याशीं संयोग पावून उत्पन्न झाला असतांही कोरडा, पांढरा आणि घन असा असणारा संयुक्तपदार्थ *m*. H. *v. t.* उजेत किंवा हैड्रेट बनविणें, पाण्याशीं संयोग करणें. Hydra'tion *n*.

Hydraulics (hī-drawl'iks) [L. belonging to a water-organ or water-pipe, from Gr. *hydor*, water, and *aulos*, pipe.] *n.* (*pl.* used as *sing.*) *that branch of science, or of engineering, which treats of fluids in motion, especially of water, its action in rivers and canals, the works and machinery for conducting or raising it, its use as a prime mover, and the like* व्यवहारोपयोगी जलशास्त्र *n*, व्यावहारिक जलशास्त्र *n*, चलजलशास्त्र *n*, (मनुष्याच्या उपयोगाकरितां बंबाच्या योगानें पाणी एका जागेवरून दुसरीकडे कसें न्यावें, त्यानें यंत्रें कशीं चालवावीं, नळांतून खाणींतील अशुद्ध धातु काढण्याकरितां पाणी कसें वापरावें, पाण्यानें याच्या कशा चालवाव्या, थोड्या खर्चांत चामड्याच्या नळांनीं रस्ते कसे भिजवावे, पाण्याच्या शक्तीच्या योगानें पाळणे खालींवर कसे न्यावे, पाणचक्क्या कशा चालवाव्या इ०) व्यवहारोपयोगी जलशक्तीचा विचार करणारें शास्त्र *n*. Hydraul'ic *a. relating to hydraulics* व्यावहारिक जलशास्त्रासंबंधीं. २ *acting by water, worked by water* पाण्यानें चालविलेला; as, "H. clock, H. motor." [H. CRANE पाण्यानें चालणारी यारी *f.* H. LIFT पाण्यानें चालणारा पाळणा *m*, पाणपाळणा *m*. H. PRESS पाण्यानें दाबण्याचें यंत्र *n*, जलपीडनयंत्र *n*.] ३ *applied to substances which harden under water and thus become impervious to it* पाण्यांत लवकर कडक होऊन बसणारा; as, "H. cement, H. mortar."

Hydrocele (hī'-drō-sēl) [Gr. *hydor*, water, and *khele*, tumour.] *n. med. dropsy of the testicle* वृषणांत होणारा जलसंचय *m*, रक्तोदकसंचयामुळें होणारी ग्रंथियुक्त वृषणवृद्धि *f*, जलांड *m*, जलमुष्क *m*, मूत्रजवृषणवृद्धि *f* (according to वाग्भट).

Hydrocephalus (hī-dro-sef'a-lus) [Gr. *hydor*, water, and *kephale* (Sk. कपाल), the head.] *n. med.*

*dropsy of the brain* डोक्यांत पाणी -रक्तोदक सांचणें *n*, जलशीर्ष *n*, मस्तिष्कशोथ *m*, शीर्षोदर *n*.

Hydro-dynamics ( hī-dro-dī-nam'iks ) [ Gr. *hydor*, water, and Dynamics. ] *n.* (*pl.* used as *sing.*) *the science that treats of the motions of a material system partly or wholly fluid* जलगतिशास्त्र *n.*

Hydrodynamometer ( hī-drō-dīna-mom'ē-tėr ) [ *Hydro* + dynamometer. ] *n. an instrument to measure the velocity of a liquid current by the force of its impact* जलवेगमापक *m.*

Hydro-extractor ( hī'-drō-eks-trakt-ĕr ) [ Gr. *hydor*, water, and Eng. Extractor.] *n.* कोणत्याही पदार्थांतून पाणी खेंचून काढण्याचें यंत्र *n*, जलाचें निष्कासन करणारें यंत्र *n*, जलनिष्कासक *m.*

Hydrogen ( hī'dro-gen ) [ Gr. *hydor*, water, and *gennao*, Sk जन्, to produce. ] *n. a gas which in combination with oxygen produces water, an elementary gaseous substance, the lightest of all known substances* प्राणवायूशीं संयोग पावून पाणी तयार करणारा वायु *m*, जलजनक वायु *m*, उजनक वायु *m*, उज्ज *m.*

Hydrogode ( hī'drōg-ōd ) [ Gr. *hydor*, water, and *odos*, way.] *n. elec.* ऋणध्रुव *m*, विद्युद्ध्रुव *m.*

Hydrography ( hī-drog'ra-fi ) [Gr. *hydor*, water, and *graphein*, to write. ] *n. the art of measuring and describing the size and position of waters or seas* जलविद्या *f.* ( *esp.* ) समुद्रविद्या *f.* या विद्येंत समुद्र, आखातें, नद्या यांचे नकाशे व त्यांची इतर माहिती दिलेली असते, समुद्रनद्यादिविद्या *f*, समुद्रवेलादिविवरण *n.* २ *the art of makingse a-charts* समुद्रवेलापटविद्या *f*, समुद्राचे नकाशे काढण्याची कला *f.* Hydrog'rapher *n.* समुद्राचे नकाशे काढणारा *m*, समुद्रपटकार *m*, समुद्रवेलादिविवरणकार *m.* Hydrograph'ic,-al *a.*

Hydromechanics (hī-drō-me-kan'iks) [*Hydor*, water, and *mechanics.* ] *n. the sience which treats of the equilibrium and motion of the forces of a system partly or wholly liquid* जलप्रेरणाशास्त्र *n.* जलप्रेरणाशास्त्र is divided into जलस्थितिशास्त्र ( hydrostatics ) and जलगतिशास्त्र ( hydrodynamics ).

Hydromel ( hī'drō-mel ) [ Gr. *hydor*, water, and *melis*, honey. ] *n. mixture of honey and water* मधपाणी *n.*

Hydrometer ( hī-drom'ēt-ėr ) [Gr. *hydor*, water, and *metron*, measure. ] *n. an instrument for measuring the specific gravity of liquids, also the strength of spirituous liquors* जलगुरुत्वमापक *m*, द्रवपदार्थांचें विशिष्टगुरुत्वमापक यंत्र *n*, द्रवगुरुत्वमापक *m.*

Hydropathy ( hī-drop'a-thi ) [ Gr. *hydor*, water, and *pathos*, suffering. ] *n. the treatment of disease by cold water* शीतजलोपचार *m*, शीतजलचिकित्सा *f*, थंड पाण्याच्या उपयोगानें रोग बरे करण्याची विद्या *f.* Hydraopath'ic, -al *a.* जलचिकित्सेसंबंधीं. Hydropath'ically *adv.* Hydrop'athist *n.* जलचिकित्सक, जलचिकित्सावेत्ता.

Hydrophobia ( hī-dro-fō'-bia ) [ Gr. *hydor*, and *phobos*, Sk. भीति, fear. ] *n. med. an unnatural dread of water* ( a symptom of a disease resulting from the bite of a mad animal ) जलसंत्रास *m.* २ (hence) *the disease itself* जलसंत्रास रोग *m*, पिसाळलेला (कुत्रा, मांजर इ०) प्राणी चावल्यामुळें होणारा रोग *m.*

Hydrophthalmia ( hī-drof-thal'-mia ) [ Gr. *hydor*, and *ophthalmos*, eye. ] *n. med. an effusion of serous fluid into the chambers of the eye* रक्तजल सांचल्यामुळें -रक्तजलसंचयामुळें होणारी नेत्रवृद्धि *f*, नेत्रवृद्धिरोग *m.*

Hydrosalpinx ( hī-drō-sal'-pinx ) [ Gr. *hydor*, and *salpigx*, tube. ] *n. med. dropsy of the Fallopian tube* गर्भाशयांत स्त्रीबीज नेणाऱ्या नळीमध्यें रक्तोदकसंचय झाल्यामुळें तिची होणारी वृद्धि *f*, फलस्रोतांवूदर *n*, रजोवहनाड्यंबूदर *n*, अंडवहनाड्यंबूदर *n.*

*N. B.*—Fallopian tube ला फलस्रोत हें नांव आहे. सुश्रुताचार्यांनीं रजोवहनाडी हें नांव त्याच नाडीस दिलें आहे. म्हणून आम्हीं शेवटचे तीन शब्द असे योजिले आहेत.

Hydrostatics ( hī-drō-stat'iks ) [ Gr. *hydor*, water, and *statics.* ] *n. the science that treats of the forces in equilibrium of a material system partly or wholly fluid* जलस्थितिशास्त्र *n.* [ Hydrostat'ic,-al *a.* जलस्थितिशास्त्रासंबंधीं. H. balance जलशास्त्रविषयक तराजू. H. Bellows जलभाता. H. press जलदाबाचें किंवा पाणदाबाचें यंत्र *n*, जलदाबक.] Hydrostat'ically *adv.* जलस्थितिशास्त्रदृष्ट्या, जलस्थितिशास्त्रनियमाप्रमाणें.

Hydrothorax ( hī-dro-th'o-raks ) [ Gr. *hydor*, water, and *thorax*, chest. ] *n. med. an accumulation of serous fluid into the cavity of the chest* फुप्फुसावरील आच्छादक पडद्यांची रक्तद्रवाच्छादित स्थिति *f*, उरस्तोयरोग *m*, जलोरोग्रह *m.* आर्यवैद्यकांत Pleurisy ला उरोग्रह हें नांव दिलेलें आहे. त्यावरून जलोरोग्रह हा शब्द बसविला आहे.

Hydrous ( hī'drus ) [ Gr. *hydor*, water. ] *a. containing water, watery* सजल, जलीय, जलमय.

Hyemal ( hī-ē'mal ) [ L. *hiemalis–hiems*, winter. See Hibernal.] *a. belonging to winter, done during winter* हिंवाळ्याचा, हिंवाळ्यांत केलेला, हैम, हैमन.

Hyena, Hyaena ( hī-ēn'a ) [ Gr. *hyaina*, ( lit.) sow-like –*hys*, a sow. ] *n. a bristly-maned quadruped of the dog kind so named from its likeness to the sow* तरस *m*, तरक्षु *m.*

Hygiene ( hī'ji-ēn *or* hī'gēn ) [ Fr. *hygiene* –Gr. *hygieia*, health, the goddess of health –*hygies*, healthy. ] *n. the science which treats of the maintenance of health* ( सार्वजनिक ) आरोग्यशास्त्र *n.* Hygien'ics *n. pl.* Same as above. Hyge'ian *a. relating to health and its preservation* सार्वजनिक आरोग्यशास्त्रासंबंधीं. Hy'gienist *n.* सार्वजनिकआरोग्यशास्त्रवेत्ता *m.*

Hygrograph ( hī'grō-grāf ) [ Gr. *hygros*, wet, and *graphein*, to write. ] *n. phys. an instrument for recording automatically the variations of the*

*humidity of the atmosphere* क्लेदलेखक *m*, हवेमधील ओलाव्याची आपोआप नोंद करून ठेवणारें यंत्र *n*.

Hygrometer (hī-grom'ĕt-ėr) [Gr. *hygros*, wet, and *metron*, a measure.] *n. phys. an instrument for measuring moisture in the atmosphere* आर्द्रतामापक *m*, क्लेदमापक *m*, हवेंतील ओलावा मोजण्याचें यंत्र *n*. Hygrom'etry *n*. क्लेदमापनविद्या *f*, क्लेदमिति *f*. Hygromet'ric, -al *a*. क्लेदमापनविद्येसंबंधीं, क्लेदमापनासंबंधी.

Hygroscope (hī'gros-kōp) [Gr. *hygros*, wet, and *skopein*, to view.] *n. an instrument for showing the moisture in the atmosphere* क्लेददर्शक *m*, क्लेदसूचक *m*, हवेंत ओलावा आहे हें दाखविणारें यंत्र *n*. Hygroscopic *a*. क्लेददर्शकासंबंधीं, क्लेददर्शकानें मोजलेला.

Hymen (hī'men) [Gr. *hymen*, membrane.] *n. anat. a fold of mucous membrane often found at the orifice of the vagina* योनिजवनिका *f*, योनींत असणारा 'कर्णिक' नांवाचा पडदा *m*.

Hymen (hīmen) [Gr. *hymnos*, a festive song.] *n. the god of marriage represented as a young man carrying a torch and whale* विवाहदेवता *f*, लग्नदेवता *f*. २ (*R.*) *marriage, wedlock* लग्न *n*, विवाह *m*. ३ (*R.*) *a wedding hymn* विवाहगीत *n*. Hymene'al, Hymene'an *a*. विवाहाचा, विवाहासंबंधीं, विवाहविषयक. H. *n. marriage song* विवाहगीत *n*, मंगलगीत *n*.

Hymenoptera (hī-menop'-tĕ-rä) [Gr. *hymen*, membrane, and *pteron*, wing.] *n. pl. zool. an extensive order of insects* (including the bees, ants, ichneumons, sawflies, &c.) त्वक्पक्षकीटकवर्ग *m*, कातड्यासारखे ज्यांचे पंख आहेत असे कीटक *m. pl.*

Hymn (him) [L. *hymnus* -Gr. *hymnos*, a song of praise.] *n. a song of praise* स्तोत्र *n*, सद्गीत *n*, भजन *n*, अभंग *m*. Hym'nic *a*. स्तोत्रासंबंधीं. Hymnol'ogist *n*. स्तोत्रें करणारा *m*, स्तोत्रें जाणणारा *m*. Hymnolo'gy *n*. स्तोत्रसंग्रह *m*, स्तोत्ररत्नाकर *m*, गाथा *f*. H. *v. t.* (गाऊन) स्तुति करणें, स्तोत्रें म्हणणें.

Hyoid (hī-oyd) [Gr. letter upsilon (U), and *eidos*, resemblance.] *a. resembling the greek letter upsilon* 'U' या ग्रीक अक्षराच्या आकृतीचें, घोड्याच्या नालासारखा. H. bone जिव्हास्थि *m*.

Hyperæmia (hīpėr-ē'mi-ä) [Gr. *hyper*, beyond, over, and *haima*, blood.] *n. med. a congestion of blood in an organ or part of the body* विकृतरक्ताधिक्य *n*, (अनिवार) अतिरक्तसंचय *m*.

Hyperæsthesia (hīpėr-es-thē'siä) [Gr. *hyper*, over and *aisthesis*, sensation.] *n. morbid excessive sensibility* विकारामुळें वाढलेलें अतितीक्ष्ण स्पर्शज्ञान *n*.

Hyperbola (hī-pėr'bo-la) [L. (*lit.*) 'a throwing beyond' -Gr. *hyper* beyond, and *ballein*, to throw.] *n. one of the conic sections or curves formed when the intersecting plane makes a greater angle with the base than the side of the cone makes* उनकलच्छिन्न *m*, अतिपरवलय *m*, (See under Mathematics) अपास्त *m* (according to S. B. Dixit), अपरावर्त्त *m*. Hyperbol'ical *a*. अतिपरवलयाचा. Hyperbol'oid *n*. घनातिपरवलय.

Hyperbole (hī-pėr'bo-lē) [A doublet of *hyperbola.*] *n. a rhetorical figure which produces a vivid impression by representing things as much greater or less than they really are* अतिशयोक्ति *f*, अत्युक्ति *f*, सत्यातिक्रम *m*. Hyperbol'ic,-al *a*. अतिशयोक्तीचा, अतिशयोक्तिविशिष्ट, अतिशयोक्तिरूप, सत्यातिक्रमी, सत्याचें अतिक्रमण करणारा. Hyperbol'ist *n*. अतिशयोक्तिवक्ता *m*, अतिशयोक्तिवादी *m*, पिसाचा कावळा करणारा.

Hypercritic (hī-pėr-krit'ik) [Gr. *hyper*, over, and *critic.*] *n. one who is overcritical* चिकित्सखोर मनुष्य *m*, फाजील चिकित्सक मनुष्य *m*. H. or Hypercrit'ical *a. overcritical* चिकित्सखोर, फाजील चिकित्सक, छिद्रखोर, छिद्रान्वेषी. Hypercrit'icism *n. excess of criticism, over-criticism* फाजील चिकित्सा *f*, फाजील टीका *f*, फाजील बाचाबाच *f*, विचक्षणा *f*.

Hypermetrical (hī-pėr-met'ri-kal) [Gr. *hyper*, and Metrical.] *a. beyond or exceeding the ordinary metre of a line* ठराविक मात्रांपेक्षां किंवा पदांपेक्षां जास्त मात्रा किंवा पदें असलेला, अधिकपदान्वित.

Hypermetropia, Hypermetropy (hī-pėr-me-trō'pi-ä -pi) [Gr. *hyper*, over, *metron*, measure, and *ops*, eye.] *n.* (called also *hyperopia*) लांबची वस्तु सुलभ रीतीनें पाहातां येऊन जवळची वस्तु पाहण्यास त्रास होणारी डोळ्यांची स्थिति *f*.

Hyperphysical (hī-pėr-fiz'ik-al) [Gr. *hyper*, and *physical.*] *a. beyond physical laws, supernatural* भौतिक नियमांच्या पलिकडचा, अतिभौतिक.

Hypertrophy (hī-pėr'-tro-fi) [Gr. *hyper*, over, and *trophe*, nourishment -*trephein*, to nourish.] *n. med. & biol. over-nourishment of an organ or part of the body* विकृतवृद्धि *f*, विकृतीमुळें होणारी अतिशय वृद्धि *f*, अतिवृद्धि *f*, अतिपुष्टि *f*.

Hyphen (hī'fen) [Gr. *hypo*, under, and *hen*, one.] *n. a short stroke* (-) *joining two syllables or words* संयोजक रेघ *f*, जोडरेघ *f*, हायफन *m*.

Hypnotic (hip-not'ik) [Gr. *hypnos*, sleep; akin to L. *somnos*, sleep, or perhaps allied to Sk. स्वप्न, dream.] *a. tending to produce sleep; soporific* झोंप आणणारा, निद्रावह. २ *of or pertaining to hypnotism* मूर्च्छनाशास्त्राचा, मूर्च्छनाशास्त्रासंबंधीं. ३ *in a state of hypnotism* मूर्च्छनेंत, मूर्च्छनेच्या स्थितींत. ४ *liable to hypnotism* मूर्च्छनाप्रयोगपात्र, मूर्च्छनापात्र; as, "An H. condition." Hyp'onitism (coined in 1843.) *a sleep-like condition induced by artificial means in which there is an unusual suspension of some powers and an unusual activity of others* (a) (वशीकरण करण्याकरितां प्रबल इच्छाशक्तीच्या योगानें आणलेली) मूर्च्छना *f*, (वशीकरणार्थ मूर्च्छना). (b) मूर्च्छनाशास्त्र *n*. [*N. B.* अस्मिताशास्त्र (an old word) is

suggested by some to be a good equivalent for hypnotism. But we should better reserve this word for Mesmerism and adopt मूर्च्छनाशास्त्र for hypnotism. Operator = विधायक. Operated subject विधेय ]. Hyp'notist *n.* मूर्च्छनाशास्त्रवेत्ता. Hyp'notise *v. t.* (वशीकरणासाठीं) मूर्च्छना आणणें. Hyp'notisa'tion *n.* मूर्च्छना आणणें *n.* Hyp'notiser *n.* मूर्च्छनाप्रयोग करणारा, विधायक.

*N. B.*—Some suggest मानसिकयोग for Hypnotism or Mesmerism. योग is a term of a very holy import and we must not debase it by using it for Hypnotism or Mesmerism.

Hypochondriac (hip-o-kon'dri-ak) [Gr. *hypo*, under, and *chondros*, a cartilage, because the disease was supposed to have its seat in the parts *under* the *cartilage* of the breast. ] *n. a person affected with hypochondriasis* रोगभ्रमी मनुष्य *m*, खरोखर रोग झाला नसूनही आपल्यास कांहींतरी रोग झाला आहे अशी कल्पना असलेला मनुष्य *m.* Hypochon'dria *n.* Hypochondri'asis *n.* रोग नसून तो झाला आहे अशी कल्पना *f,* रोगभ्रम *m,* खरोखर रोग झाला नाहीं असें असून तो झाला आहे असें वाटण्याची रोगी स्थिति *f.* Hypochon'drium *n.* बरगड्यांच्या खालचा भाग *m.*

Hypodermic (hipō-der'-mik) [ Gr. *hypo*, under, and *derma*, skin. ] *a.* त्वगन्तर्संबंधीं. H. injection *n.* बारीक पिचकारीनें त्वचेंत औषध घालणें *n-* भरणें *n.*

Hypocrisy (hi-pok'ri-si) [ L. *hypocrisis* –Gr. *hypokrisis*, the playing a part on the stage *-hypo*, under, and *krinein*, to decide.] *n. the act of a hypocrite, a dissimulation or concealment of one's real character, disposition, or motives* ( esp. in a religious sense ) दंभ *m,* दांभिकता *f,* दांभिकपणा *m,* ढोंग *n,* (खोटें) सोंग *n,* बतावणी *f,* कापट्यवृत्ति *f.* Hyp'ocrite *n.* दांभिक मनुष्य *m,* ढोंगी, (शुद्ध आचरणाची) बतावणी करणारा. Hypo-crit'ic,-al *a.* ढोंगाचा, दांभिक. Hypocriti'cally *adv.* दांभिकपणानें, ढोंग करून.

Hypocycloid (hī-pō-sī'kloid) [*Hypo* + *cycloid.*] *n. a curve traced by a point in the circumference of a circle which rolls on the concave side of a fixed circle* अतिचक्रालद. See the word Mathematics.

Hypogastric (hip-o-gas'trik) [Gr. *hypo*, under, and *gaster*, Sk. जठर, the belly. ] *a. belonging to the lower part of the abdomen* खालच्या पोटाचा, बास्तेय, बस्तिसंबंधीं, ओंटीपोटासंबंधीं. Hypogas'trium *n. the lower region of the belly* ओंटी *f,* खालचें पोट *n,* निरण *n,* बस्ती *f;* नाभ्यधोभाग *m,* उपस्थोर्ध्वभाग *m.*

Hypospadias (hī-pō-spā'-di-as) [ Gr. *hypo*, under, and *spao*, to open. ] *n. med. a deformity of the penis, in which the urethra opens upon its under surface* ( ज्यामध्यें लिंगाचा खालचा भाग उघडा राहतो असें ) लिंगव्यंग *n.*

Hypostasis (hī-pos'ta-sis) [ Lit. 'a standing under -Gr. *hypo*, under, and *histemi*, to make to stand. *n. (philos.) substance, subsistence, reality, essence* वास्तवत्वारोपण *n.* २ *med. sediment, deposit* गाळ *m;* as, "H. of urine.".

Hypotenuse, Hypothenuse (hī-pot'en-ūs, *or* hip-; hī-poth'en-ūs) [ Fr. -Gr. *hypoteinousa*, (*lit.*) which stretches under -Gr. *hypo*, under, and *teinein*, Sk. तन्, to stretch.] *n. the side of a right-angled triangle opposite to the right angle* कर्ण *m.*

Hypothec (hī-poth'ek) [ Fr. -L *hypotheca* -Gr. *hypotheke*, a pledge. ] *n. a security in favour of a creditor over the property of his debtor, while the property continues in the debtor's possession* तारणगहाण *n.* Hypoth'ecate *v. t.* तारण गहाण लावून देणें. Hypotheca'tion *n.*

Hypothesis (hī-poth'e-sis) [ Lit. 'that which is placed under' –Gr. *hypo*, under, and *tithemi*, to place.] *n. a supposition, a proposition assumed for the sake of argument* गृहीतपक्ष *m,* कल्पितपक्ष *m.* २ *a theory to be proved or disproved by reference to facts, a provisional explanation of anything* (प्रयोगानें किंवा अनुभवानें सिद्ध करण्याची कल्पित) प्रतिज्ञा *f,* कल्पित पक्ष *m,* अनुमानिक प्रतिज्ञा *f,* अभ्युपगमसिद्धांत *m,* उपन्यास *m.* Hypothet'ic, Hypothet'ical *a.* पूर्वपक्षात्मक, कल्पनात्मक, अनुमानिक, उपन्यस्त, प्रतिज्ञात्मक. २ *log.* सापेक्ष ; as, "An H. proposition" सापेक्षवाक्य.

Hypotrochoid (hī-pō-trō'koid) [*Hypo* + *trochoid.*] *n. a curve traced by a point in the radius, or radius produced, of a circle which rolls upon the concave side of a fixed circle* अतित्रिच्छेद. See the word Mathematics.

Hysteria (his-tē'-ri-ä) [ Gr. *hystericus -hysterīcos, hystera*, the womb. ] *n. a disease resulting from an affection of the womb* गर्भाशयोन्माद *m,* गर्भाशयांत विकृति झाल्यामुळें स्त्रियांना आंचके वगैरे येणें *n.* Hyster'ic,-al *a.* गर्भाशयोन्मादासंबंधीं.

Hysterotomy (his-ter-ot'o-mi) [ Gr. *hystera*, the uterus, and *tome*, a cutting. ] *n. the operation of cutting into the uterus to take out a fetus which cannot be excluded by the usual means* गर्भकोशछेदनक्रिया *f.*

Hysteron-proteron (his'ter-on-prot'er-on) [Gr. (*lit.*) 'the last first.'] *n. a figure of speech in which the word or phrase that should properly come last is put first* हेतुसाध्यव्यत्यास *m.* H. *adv.* आदिपश्चात्, आदिमग, मागें पुढें.

I (I) [A. S. *ic*, Ger. *ich*, L. *ego*, Gr. *egō*, Sk. अहम्.] इंग्रजी वर्णमालेंतील नववें अक्षर व तिसरा स्वर. याचीं अनेकवचनें Is, I's, *is*, *i's* अशीं लिहितात. याचे निरनिराळे असे पांच उच्चार आहेत, व ते पुढील शब्दांत दाखविले आहेतः—(१) pine, ice; (२) pin, tin; (३) thirst, first; (४) machine, regime; (५) baniyan, filial. I ह्या अक्षराची आकृति लॅटिन आणि ग्रीक (*iota* हें ग्रीक अक्षर) यांचे द्वारा फिनिशिअन (Semitic letter *yod*) वर्णमालेंतून आलेली आहे, व ह्या फिनिशिअन वर्णमालेंतील I च्या तुल्याक्षराचें मूळ बहुधा इजिप्शिअन भाषेंतून आलें असावें असा समज आहे. I ह्या अक्षरावर आपण जें टिंब देतों तें देण्याचा प्रघात चौदाव्या शतकापासून पडला व ह्यापूर्वी इंग्रजींत I आणि J यांच्याबद्दल एकच समानाक्षर असे. J हें अक्षर निराळ्या तऱ्हेनें लिहूं लागल्यावरही कांहीं काळपर्यंत इंग्रजी कोशांत I आणि J यांनीं सुरवात झालेले शब्द एकाच ठिकाणीं वर्ग करीत असत. २ प्राचीन इंग्रजी ग्रंथकारांत I हें अक्षर (*ay* किंवा *aye*=) 'होय' या अर्थी वापरीत असत. ३ रोमन अंकपद्धतींत I म्हणजे एक, II म्हणजे दोन, III म्हणजे तीन. ४ *math.* (*to denote*) *the ninth place in a serial order* कोणत्याही श्रेणींतील नववी वस्तु *f* -जागा *f*. ५ (*logic*) *the symbol of a particular affirmative proposition* इंग्रजी तर्कशास्त्रांत विधायक विशेष सिद्धांताचें चिन्ह *n*; as, "Some men are philosophers" is an I proposition. ६ (*to represent*) *the imaginary quantity* $\sqrt{-1}$ गणितांत $\sqrt{-1}$ चें चिन्ह. ७ Isaac, Isabella, Iodine, Incisor इत्यादि शब्दांचें संक्षेपचिन्ह; तसेंच i. h. p. = Indicated Horse Power; I. O. U.=I owe you. ८ प्राचीन इंग्रजी भाषेंत I ह्याला द्विवचन व अनेकवचन असे. परंतु सध्यां त्या द्विवचनाचा लोप झाला आहे. I = मी हें प्रथमपुरुषवाचक प्रथमार्थी एकवचनी सर्वनाम आहे. याचा कधीं कधीं नामाप्रमाणेंही उपयोग करितात. लेखक किंवा वक्ता आपल्या स्वतः संबंधानें बोलतांना I हें सर्वनाम वापरतो. I = प्रथमेचें एकवचन, We = प्र० अनेकवचन Me = द्वि० एकवचन, Us = द्वि० अनेकवचन; My किंवा Mine = षष्ठीचें एकवचन, Our किंवा Ours = ष० अनेकवचन. ९ *philos.* अहम्, आत्मा *m*, देहाभिमानी आत्मा *m*.

Iambic, Iambus (ī-am'bik, ī-am'bus) [L. *iambus* –Gr. *iambos* -*iapto*, to assail, this metre being first used by writers of satire.] *n. pros. a metrical foot of two syllables, the first short and the second long* (as in L. *fidēs*), *or the first unaccented and the second accented* (as in *deduce'*) लघुगुरु अक्षरांचा पाद *m*, उत्तरगुरुद्व्यक्षरपाद *m*. (b) *a verse composed of iambic feet* उत्तरगुरुद्व्यक्षरपादयुक्त कविता *f*. २ *a satire, lampoon* आक्षेपगर्भ कविता *f*. Iam'bic *a.* उत्तरगुरुद्व्यक्षरी पादाचा. ३ *pertaining to, or composed of, iambics* उत्तरगुरुद्व्यक्षरपादाचें, उत्तरगुरुद्व्यक्षरीपादयुक्त. Iam'bically *adv.*

Iambus, See Iambic.

Iberian (ī-bē'ri-an) *a. of, or pertaining to, ancient Iberia in Europe* (comprising Spain and Portugal) *or its inhabitants* स्पेन आणि पोर्तुगाल मिळून झालेल्या संयुक्त प्रदेशाचा, आयबीरियाचा; (b) आयबीरियन लोकांचा. I. *n. one of the original people of Iberia* आयबीरियन मनुष्य *m*. २ *the language of the Iberians* आयबीरियन भाषा *f*.

Ibex (ī'beks) [L.] *n. a genus of goats inhabiting the Alps and other mountainous regions* आल्प्स व इतर डोंगराळ प्रदेशांत राहणाऱ्या बकऱ्यांची एक जात *f*.

Ibidem (i-bī'dem) [L.] *adv. in the same place; in the same book, chapter or passage* (used to avoid the repetition of a reference) त्याच स्थळीं, त्याच पुस्तकांत -अध्यायांत -पुस्तकाच्या भागांत -प्रकरणांत; as, Hamlet p. p. 2-4, ... *ibid* 10-12. *Ibidem* is sometimes abbreviated into *ibid.* or *ib.*

Icarian (ī-kā'ri-an) [L. *Icarius* –Gr. *Ikarios*–*Ikaros*, who fell into the sea on his flight from Crete, his waxen wings being melted by the sun.] *a. belonging to Icarus* इकेरिअसचा. २ *soaring too high for safety like Icarus, adventurous or unfortunate in flight* अतिधाडसी पण अयशस्वी, इकेरिअससारखा.

Ice (īs) [M. E. *iis*, A. S. *is*; Ger. *eis.*] *n. water congealed by freezing* (कृत्रिम) बर्फ *n*, (थंडीनें) गोठलेलें पाणी *n*. २ *concreted sugar* घट्ट झालेली साखर *f*. ३ बर्फाप्रमाणें दिसणारा पदार्थ *m*; as; "Camphor *ice*." I. age *n. geol. the glacial epoch* हिमानीयुग *n*. I anchor *n*. बर्फाच्या समुद्रांत वापरण्याचा नांगर *m*. I. -berg [*ice*, and *berg*, a mountain.] *n. a large mass of ice, generally floating in the ocean* (समुद्रांत तरंगणारा) हिमपर्वत *m*, हिमराशि *f*, बर्फाचा डोंगर *m*. I.-blink *n. the blink or light reflected from ice near the horizon* बर्फावरून परावर्तन पावणारा कवडासा *m*. I. boat *n*. (a) *a boat used for being dragged over ice* बर्फांतून चालविण्याची होडी *f*. (b) *a boat used for forcing a passage through ice* बर्फ फोडून जाणारी होडी *f*. I.-bound *a. bound, surrounded, or fixed in with ice* बर्फानें वेष्टिलेला, हिमवेष्टित, बर्फांत घट्ट बसविलेला. I. box *n*. (जिन्नस थंड रहावा म्हणून चारी बाजूंस) बर्फ घातलेली पेटी *f*, बर्फाची पेटी *f*, थंडाव्याची पेटी *f*. I. brook *n*. (बर्फासारख्या) थंड पाण्याचा झरा *m*. I. built *a. composed of ice* बर्फाचा, बर्फाचा केलेला, हिमनिर्मित. २ *loaded with ice* (as mountains) बर्फानें आच्छादलेला, सर्वत्र बर्फमय झालेला, हिमावृत. I.-cream, Iced cream *n. cream sweetened*

*or flavoured and artificially frozen* थंडी मलई *f*, आईसक्रीम *n.* I. fall *n. a glacier* बर्फपात *m*, डोंगरावरून वहात येणारा बर्फ *m.* I. field *n.* बर्फक्षेत्र *n.* I. float, I. floe *n. a large mass of floating ice* तरंगता बर्फखंड *m.* I. house *n. a house for preserving ice* ( वितळून जाऊं नये म्हणून ) बर्फ सांठविण्याची जागा *f*, बर्फाचें घर *n.* I. machine *n.* बर्फ तयार करण्याचें यंत्र *n*, बर्फाचें यंत्र *n.* I. man *n. one who deals in ice or retails it* बर्फवाला, बर्फ विकणारा मनुष्य, बर्फविक्या, बर्फाचा दुकानदार, हिमविक्रेता *m.* I. pail *n.* (पिण्याचे पदार्थ थंड करण्यासाठीं) बर्फानें भरलेलें पात्र *n.* I. pick *n. a sharp instrument for breaking ice into small pieces* बर्फ फोडण्याचें हत्यार *n.* Ice pilot *n. a pilot who has charge of a vessel, where the course is obstructed by ice* (as in polar seas) बर्फाच्छादित समुद्रांत गलबत चालविणारा वाटाड्या नावाडी *m.* Ice plow (plough) *n. a large tool for grooving and cutting ice* ( गलबतास मार्ग करण्यासाठीं ) बर्फ कापण्याचें -फोडण्याचें मोठें हत्यार *n.* Ice-spar *n.* ( *min.* ) एक प्रकारचें खानिज द्रव्य *n.* Ice water *n. water cooled by ice* बर्फ घालून थंड केलेलें पाणी *n.* २ *water formed by the melting of ice* बर्फ वितळून झालेलें पाणी *n.* To break the ice *to make a passage for boats by breaking the frozen surface* बर्फ फोडून बोटींना रस्ता करणें. २ ( *fig.* ) *to overcome obstacles and make a beginning, to introduce a subject* ( पहिल्या अडचणी दूर करून ) उपक्रम -आरंभ -सुरवात करणें, विषय काढणें. Ice *v. t. to cover with ice* बर्फानें आच्छादणें. २ *to freeze* गोठवणें, थिजवणें. ३ *to cover with concreted sugar* घट्ट झालेल्या साखरेनें मढवणें. Ice'd *a.* बर्फाच्छादित, हिमावृत. २ ( बर्फानें ) गोठलेला, थिजलेला. ३ बर्फासारख्या पदार्थानें भरलेला ; as, "*Iced* cake." I'cicle *n. a hanging point of ice formed by the freezing of dropping water* ( गळतें पाणी थिजून त्याचा बनलेला ) हिमकण *m*, हिमतुषार *m*; as "*Icicle* at the eaves of a house." I'cily *adv. coldly* थंडपणानें, थंडाईनें. I'ciness *n. frigidity* थंडपणा *m*, थंडाई *f.* २ *want of animation* औत्सुक्याभाव *m*, शैथिल्य *n*, मंदी *f*, थंडाई *f.* ३ *coldness of affection* प्रेमाचा अभाव *m*, स्नेहशून्यता *f.* I'cing *n. covering of ice or concreted sugar* बर्फाचें -बर्फासारख्या घट्ट साखरेचें आच्छादन *n.* I'cy *a. cold, frosty* फार थंड, हिममय, हिमप्रचुर, बर्फमय. २ *without warmth of affection* प्रेमोष्मविरहित, प्रेमोष्मशून्य.

Icelander ( Is'land-ėr ) [From Iceland.] *n. a native of Iceland* आईसलंडचा रहिवाशी, आईसलँडर. Iceland'ic *a.* आईसलंड-चा -संबंधीं. २ आईसलंडचे रहिवाशाचा. ३ आईसलंडरसारखा. I. *n. the language of the Icelanders* आईसलंडर लोकांची भाषा *f*, आईसलँडिक भाषा *f.* Iceland spar *n. min. a transparent variety of calcite, the best of which is obtained in Iceland* आईसलंडस्पार *m*, आईसलंडांतील एक जातीचा दीर्घ चतुरस्र व पारदर्शक स्फटिक.

Ichneumon ( ik-nū'mun ) [ Gr. ( *lit.* ) the 'hunter' from *ichneuo*, to hunt after –*ichnos*, a track. ] *n. a small carnivorous animal* मुंगुस *m* or *n*, नकुल *m*, सर्पारि *m.* ( b ) *an insect which lays its eggs on the larvæ of other insects* एक प्रकारचा कीटक *m.*

Ichnography ( ik-nog'raf-i ) [ Gr. *ichnos*, a track, & *graphein*, to engrave.] *n. a tracing out* रेषांनीं काढलेला नकाशा *m.* २ *arch. a ground-plan of a work or building* तळचा नकाशा, तळमजल्याचा नकाशा *m.*

Ichor ( ī'kor ) [ Gr. *ichor*, akin to Sk. सिच्, to sprinkle, Ger. *seihen*, to filter.] *n.* (*Class. mythol.*) *the ethereal juice in the veins of the gods* देवांच्या वाहिन्यांतील रक्ताऐवजीं असलेला प्रवाही पदार्थ *m.* दिव्यरस *m.* २ *med. a watery humour ; colourless matter from an ulcer* लस *f*, नासका पू *m.* I'chorous *a.* देवांचे वाहिन्यांतील रसा -चा -सारखा, दिव्यरसाचा, दिव्यरससारखा. २ लसीचा, लसीसारखा.

Ichthyosis ( ikthi-ō'sis ) [ Gr. *ichthys*, fish.] *n. med.* (called also *fish-skin.*) *a disease in which the skin is thick, rough and scaly* मत्स्यचर्मकुष्ट *n*, मच्छांगविकृति *f*, ज्यामुळें त्वचा जाड व खडबडीत होऊन माशाचे आंगासारखी दिसते असा त्वग्रोग *m*, मत्स्यत्वग्रोग *m.* Ich'thyic *a. like, or pertaining to, fishes* माशासारखा, मत्स्यसदृश, माशासंबंधीं, माशाचा. Ichthyo'graphy *n. a treatise on fishes* मत्स्यवर्णन *n.* Ich'thyoid,-al *a. somewhat like a fish* कांहींसा माशासारखा, अंशतः मत्स्यधर्मी. Ichthyol'atry *n.* मत्स्यपूजा *f*, मत्स्यमूर्तिपूजा *f.* Ichthyologic,-al *a.* मत्स्यपूजेचा. Ichthyol'ogist *n.* मत्स्यविद्याविशारद. Ichthyol'ogy *n. the branch of zoology that treats of fishes* मत्स्यविचार *m*, मत्स्यविज्ञानशास्त्र *n.* Ichthyomor'phic, Ichthyomor'phous *a. fish-shaped* मत्स्याकृति, माशाच्या आकृतीचा. Ichthyoph'agist *n.* मत्स्यभोजी -मत्स्योपजीवी मनुष्य, मासे खाऊन राहणारा. Ichthyoph'agous *a.* माशांवर उपजीविका करणारा. Ichthyoph'agy *n.* मत्स्यभोजन *n*, मत्स्याहार *m.*

Icon ( ī'kon ) [ L. –Gr. *eikon*, an image. ] *n. an image or representation in the solid, a monumental figure, a statue* मूर्ति *f*, प्रतिमा *f.* Icon'ic, -al *a.* Icones *n. pl. pictorial representations of plants* वनस्पतींचीं चित्रें *n. pl.*

Iconoclast ( ī-kon'o-klast ) [ Coined from Gr. *eikon*, image, and *klastes*, a breaker –*klaein*, to break. ] *n. a breaker of images, one opposed to idol-worship* मूर्तिफोड्या, मूर्ति फोडणारा, मूर्तिध्वंसक, मूर्तिभंजक, मूर्तिपूजाशत्रु *m.* २ *one who attacks cherished beliefs, a radical* रूढ समजुती खोडून काढणारा, रूढ समजुतींचा ध्वंसक. Icon'oclasm *n.*

मूर्तिभंग *m*, मूर्तिभंजन *n*, मूर्तिनाश *m*, मूर्तिपूजाशत्रुत्व *n*. Icon'oclastic *a*. Iconol'ater *n*. मूर्तिपूजक. Iconol'atry *n*. मूर्तिपूजा *f*.

Icosahedron (ī-kos-a-hē'dron) [Gr. *eikosi*, twenty, and *hedra*, base.] *n. geom. a solid having twenty equal sides or faces* विंशतिफलक *m*, वीस समान बाजू किंवा तोंडें असलेला घन *m*.

Icterus (ik'tē-rus) [Gr. *ikteros*, jaundice.] *n. med. the jaundice* कावीळ *f*, कामीण *f*, कामला *f*. Icter'ic *n. a remedy for the jaundice* काविळीवर उपाय *m*, कावीळ बरी करण्याचें औषध *n*. Icteric,-al *a. affected with jaundice* कावीळ झालेला. Icteri'tious, Icteritous *a. yellow* पिंवळा, पीत, पीतवर्ण.

Ictus Solis (ik'tus so'lis) [L. *ictus*, blow, *icere*, to strike, and L. *sol*, the sun.] *n. med. a sunstroke* सूर्यकिरणांच्या प्रखर तापामुळें मेंदूस त्रास होऊन येणारी बेशुद्धि *f*, सूर्याघात *m*, उन्हाची झळ *f*, तिरीप *f*.

Idea (ī-dē'a) [L.-Gr. *idea* -*idein*, to see, akin to Wit and perhaps to Sk. विद्, to know. या शब्दाचा मूळ अर्थ "वस्तूचें मनांत पडलेलें प्रतिबिंब" असा आहे.] *n. an image of a thing formed by the mind only; a general or ideal form* (केवळ मनांतच असणारी) कल्पना *f*, कल्पना *f*, कल्पनेंतील आकृति *f*. (ज्ञानदृष्टीनें पाहिलेलें एकाद्या वस्तूचें) प्रतिरूप *n*, (मुळाबरहुकूम) मनःकल्पित चित्र *n*, मनोगतप्रतिमा *f*. [IDEA (in Plato's Philosophy) वस्तूंचें सूक्ष्म सृष्टींतील आदिरूप *n* -जातिरूप *n* -नमुना *m*.] २ *the conception of anything in its highest perfection, an ideal* (कोणत्याही पदार्थाचें) काल्पनिक सृष्टींतील उच्चतम रूप *n*, परा कल्पना *f*. ३ *opinion, belief, an item of knowledge* मत *n*, (कायम ठरलेला) विचार *m*, ग्रह *m*. ४ *intention, design, plan of action* हेतु *m*, आशय *m*, विचार *m*, मनोगत *n*, मनोरथ *m*, संकल्प *m*. ५ *a notion or an imperfect thought* कल्पना *f*, अस्फुट विचार *m*, तर्क *m*, अंदाज *m*. ६ *a rational conception* योग्य कल्पना *f*. ७ *a fictitious object or picture to which no reality corresponds* कल्पनानिर्मित वस्तु *f*, काल्पनिक वस्तु *f*, कल्पित वस्तु *f*, कल्पनाचित्र *n*. Ide'al *a. existing in idea, mental, conceptional* मानसिक, मानस (*adj.*), मनोमय, मनःप्रतिबिंबित, कल्पनाप्रत्यायित. २ *fit for a model, faultless* (निर्दोषत्वामुळें) अनुकरणीय, कित्ता घेण्याजोगा, दोषरहित, (often rendered in comp. by) परम (as, I. beauty=परम लावण्य). ३ *existing in imagination only, visionary* कल्पनासृष्ट, कल्पित, काल्पनिक, मनःकल्पित; as, "*Ideal* commonwealths." [I. WORLD मानससृष्टि *f*.]. ४ *teaching the doctrine of idealism* कल्पनावाद शिकविणारा; as, "The *ideal* theory or philosophy." ५ *math. imaginary* काल्पनिक. Ide'al *n. the highest conception of anything* (सर्वोत्कृष्टपणाची) श्रेष्ठ प्रतिमा *f*. २ (अनुकरण करण्यासाठीं किंवा प्राप्त करून घेण्यासाठीं मनानें ठरविलेलें) ध्येय *n*, उद्दिष्ट *n*, साध्य *n*, अंतिम *n*, प्राप्य *n*. ३ (केवळ कल्पनासृष्टींतील) श्रेष्ठ प्रकारचा नमुना *m*. Idealisa'tion *n*. कल्पनारूपीकरण *n*, काल्पनिक स्वरूप देणें *n*. Ide'alise *v. t. to form in idea* (-ची) कल्पना करणें, (-ची) कल्पना मनामध्यें आणणें. २ *to raise to the highest conception* अत्युत्कृष्टपणाचें -कल्पनासृष्टीचें रूप देणें. Ide'alism *n. tendency towards the highest conceivable perfection* श्रेष्ठ किंवा पराकोटीकडे जाण्याची प्रवृत्ति *f*. २ *love for and search after the best and highest* परमध्येयासक्ति *f*, परमध्येयलुब्धता *f*, परमध्येयाकांक्षा *f*. ३ *ideal style or character* परमकल्पना *f*, परमकल्पनास्वरूप *n*. ४ *philos. the doctrine that in external perceptions the objects immediately known are ideas, any system that considers thought or the idea as the ground either of knowledge or existence* दृश्यपदार्थांचें खरें स्वरूप काल्पनिक किंवा मानसिक किंवा चिन्मय असतें व बाह्य खरेपणा त्यांत कांहीं नाहीं असें प्रतिपादन करणारें तत्वज्ञानांतील मत *n*, कल्पनामयत्ववाद *m*, कल्पनावाद *m*. Ide'alist *n. one given to romantic expectations* कल्पनातरंगांत दंग होणारा -झुलणारा, कल्पनासृष्टींत दंग असणारा मनुष्य *m*. २ *one who holds the doctrine of idealism* कल्पनामयत्ववादी, कल्पनावादी, पदार्थांचें खरें रूप कल्पनामय किंवा मानसिक आहे, बाह्य नाहीं असें मानणारा &c. Idealis'tic *a. pertaining to idealists or to idealism* (a) कल्पनावादासंबंधीं. (b) कल्पनावाद्यासंबंधीं. Idea'lly *adv. by means of ideas, mentally* कल्पनेनें, काल्पनिक विचारानें, मनानें.

Idem (ī'dem) [L.] *pron.* or *adj. the same, the same as above* (often abbreviated *id.*) तोच, सदरहूप्रमाणें, वरचेप्रमाणें.

Identical (ī-den'tik-al) [L.-*idem*, the same. cf. Sk. इदम् this.] *a. the very same, not different* तोच, अभिन्न, अनन्य, तत्स्वरूपी, अभेद, तद्रूप, एकरूप. २ *uttering the same truth, tautological* एकरूप, एकस्वरूप, (hence) द्विरुक्तिवाचक, द्विरुक्तिविशिष्ट. ३ *math.* सरूप. [I. EQUATION सरूप समीकरण *n*.] Iden'tically *adv.* अभेदरूपानें. Iden'ticalness *n*. See *identity*. Iden'tifiable *a*. एकरूप -तत्स्वरूप होण्यासारखा- होण्याजोगा. Identifica'tion *n. -the act.* (a) एकरूप करणें *n*. (b) अनन्यस्वरूप -अभेद -तोच हा हें सिद्ध करणें *n*. २ *-the state* एकरूप *n*, ऐक्य *n*, सारूप्य *n*, सरूपता *f*, अनन्यता *f*, अभेद *m*, अभिन्नता *f*, &c. See *identity*. Doctrine of I. (*law*) (वस्तूचें अगर व्यक्तीचें) ऐक्य दाखविणाऱ्या पुराव्यासंबंधीं तत्व *n*. Iden'tify *v. t. to make or prove to be the same* तोच तो -हाच तो (हें) सिद्ध करून दाखविणें -शाबीत करणें -सिद्ध करणें, अनन्य -निदर्शन *n*- तत्स्वरूप*n* -अभेद *m*.&c. सिद्ध करणें, ऐक्य *n* -अभिन्नता *f*. दाखविणें. Iden'tity *n. sameness* ऐक्य *n*, ऐक्यभाव *m*, अभिन्नभाव *m*, अभिन्नता *f*, अभेद *m*,

अनन्यता *f*, तद्रूपता *f*, एकरूपता *f*, सारूप्य *n*, सरूपता *f*, तादात्म्य *n*, अनन्यता *f*. २ *math.* (a) सरूपता *f*. (b) *an identical equation* सरूपसमीकरण *n*.

Ideogram (ī-dē'ō-gram) [*Ideo*+*gram*.] *n. a kind of hieroglyph expressing no sound but only an idea* कल्पनादर्शकचिन्ह *n*, कल्पनाचिन्ह *n*.

Ideograph (īdē'-ō-grāf) [Gr. *idiographos*, autographic, from *idios*, one's own, and *graphein*, to write.] *n. a character or figure symbolizing the idea without expressing the name of it* (same as ideogram) कल्पनाचिन्ह *n*, कल्पनादर्शकचिन्ह *n*. Thus in English the ideograph, +, may be pronounced *plus*, *added to* or *more* according to the pleasure of the reader.

Ideology (ī-dē-ol'o-ji) [Gr. *idea*, and *logos*, dicourse.] *n. the science of ideas* कल्पनाशास्त्र *n*, कल्पना कशा उदय पावतात व त्यांचें स्वरूप काय याचा विचार करणारें शास्त्र *n*.

Ideomotor (ī-dē-ō-mō-'tėr) [*Ides*+motor.] *a. physiol.* applied to those actions, or muscular movements, which are automatic expressions of dominant ideas, rather than the result of distinct volitional efforts मनांतील प्रबल असलेल्या कल्पना किंवा विचार यांना अनुसरून व इच्छाशक्तीचा व्यापार न होतां होणाऱ्या क्रियांसंबंधीं, प्रबलभावनाजन्य. I. *n.* कल्पनाजन्य क्रिया *f*.

Ides (īdz) [Fr. –L. *idus*, origin doubtful, said to be Etruscan.] *n. sing. in ancient Rome, the 15th day of March, May, July, October, and the 13th of the other months* (प्राचीन रोमन लोकांच्या पद्धतीप्रमाणें) मार्च, मे, जुलई व अक्टोबर या महिन्यांचीं १५ वी व बाकीच्या महिन्यांची १३ वी तारीख *f*.

Idio- (id'i-ō-) [Gr. *idios*, one's own.] a combining form meaning *private, personal, peculiar, distinct* 'खासगी, स्वतःचा, व्यक्तिविशिष्ट, विशेष, विचित्र, स्पष्ट' या अर्थी शब्दापूर्वी जोडण्याचा प्रत्यय.

Idiocracy (idi'-ok'ra-si) See Idiosyncrasy.

Idiocy (id'i-o-si) [See *Idiot*; Gr. *idiotes*, orig. 'a private man,' then an ignorant, rude person –*idios*, one's own, peculiar.] *n. state of being an idiot, imbecility; folly* जन्माचा वेडेपणा *m*, जन्माचें खूळ *n*, उपजत भोळसरपणा *m*, उपजत खुळेपणा *m*. (b) (-of mind) खुळेपणा *m*, भोळसर बुद्धि *f*, वेड *n*, पिसें *n*, वेडेपणा *m*, खूळ *n*. Causing I. by magic जादुटोणा करून वेडा करणें. Feigned I. घालवेड *n*, वेडाचें पांघरूण *n*, पांघरलेलें वेड *n*.

Idiom (id'i-um) [Fr. –L. –Gr. *idioma*, peculiarity–*idioo*, make one's own –*idios*, one's own.] *n. a mode of expression peculiar to a language* (एखाद्या) भाषेंतील विशेष शब्दप्रयोग *m*, भाषासंप्रदाय *m*. २ *a dialect* स्थानिक भाषासंप्रदाय *m*. (b) (also) *a cast of a language* भाषेची शैली *f* -घाटणी *f* -मोडणी *f*. Idiomat'ic, -al *a. pertaining to the idioms of a language* विशेषशब्दप्रयोगाचा, भाषासांप्रदायाचा -संबंधीं. २ *conformed to idiom* विशेषशब्दप्रयोगानुरूप, सांप्रदायिक. Idiomat'ically *adv.* भाषासांप्रदायास अनुसरून.

Idiopathy (id-i-op'a-thi) [Gr. *idios*, peculiar, and *pathos*, suffering -*pathein*, to suffer.] *n.* (*obs.*) *a peculiar affection or state* विशिष्ट स्वभाव *m*, भिन्नव्यक्तिक स्वभाव *m*. २ *med. a primary disease, one not occasioned by another* मूळ स्वतंत्र रोग *m*. *N. B.*:—In this sense, the adjectival form is more often used than the noun. Idiopath'ic *a. med.* (oppo. to *symptomatic*, *sympathetic*, or *traumatic*) *primary; not depending on, or preceded by, another disease* मूळ -स्वतंत्र -स्वयमेव -स्वयंसिद्ध (रोग *m*.). Idiopath'ically *adv.*

Idiosyncracy (id-i-o-sin'kra-si) [Gr. *idios*, one's own, peculiar, and *syncrasis*, a mixing together –*syn*, together, and *krasis*, a mixing.] *n. peculiarity, any characteristic of a person, idiocracy*: (a) (–of mental temperament) चमत्कारिक स्वभाव *m*, विलक्षण स्वभाव *m*. (b) (–of physical constitution) *med.* (जिला औषधिशास्त्राचे सामान्य नियम लागू पडत नाहींत अशी) विलक्षण प्रकृति *f*, चमत्कारिक प्रकृति *f*. Idiosyncrat'ic,-al *a. peculiar* चमत्कारिक, विलक्षण.

Idiot (id'i-ut) [Fr. –L. *idiota*. See Idiocy. या शब्दाचा मूळ अर्थ "घरगुती -खाजगी रीतीनें काम किंवा नोकरी करणारा मनुष्य" असा होता. परंतु सध्यां तो लुप्त झाला आहे.] *n.* (commonly) *a person without understanding from birth, a natural fool* जन्मवेडा मनुष्य, उपजतमूर्ख, जन्माचा वेडा. २ (as a term of reproach) *one deficient in intellect, a foolish or unwise person* खुळा, खुळचट, खुळसट, भोळा, भळू, भोळसर -भोळसट मनुष्य. [SHAM I. घालवेडा.] Idiot'ic, –al *a. foolish, fatuous* जन्मतः वेडसर, वेडेपणाचा, खुळा, खुळसट, खुळसर, खुळचट, भोळेपणाचा &c.; as, "I. person, speech, &c." [I. LOOK वावळी मुद्रा *f*, गवाळ मुद्रा *f*. Idiot'ically *adv.* I'diotcy *n. lack of knowledge or mental capacity, foolishness* चळ *m*, खूळ *n*, वेडेपणा *m*, वेड *n*.

Idle (īd'l) [A. S. *idel*, Ger. *eitel*, conn. with Gr. *itharos*, clear, *aither*, upper air –*aithein*, to burn. The original sense was prob. 'clear'; (then) pure, sheer, mere; (then) vain, unimportant. (Skeat.)] *a. vain, trifling, unimportant, useless* पोकळ, वायफळ, फुसकट, फोल, बिनमहत्वाचा, निष्फळ, वायकरणी, वायकरणीचा, निरर्थक, रिता, रिकामा, रिकामपणाचा, निरुपयोगी, कुचकामाचा, टाकाऊ; as, "I. words, weapons, or stories." २ *not turned to appropriate use, unemployed* बेकामी, रिकामा;

as, "I. hours." ३ *not occupied with business* रिकामा, निकामी, बेकार, खालीं (*adj.*), मोकळा, घरीं बसलेला, बैठा, सुटा, निरुद्योगी; as, "I. workmen." ४ *averse to labour, lazy, slothful* आळशी, सुस्त, पोसा, बशा, मंद, उद्योगशत्रु, थंड; as, "An I. fellow." I'dle-wheel (*mach.*) *a wheel placed between two others, simply for transferring the motion from one to the other without changing the direction* (गति पोंचविणारें) आळशी चाक. I'dle *v. i. to lose or spend time in inaction* गमणें, रमणें, रेंगाळणें, माशा मारणें -मारीत बसणें, जोगवणें, आळसांत वेळ घालविणें, (आळसानें वेळ) व्यर्थ दवडणें. I. *v. t. to spend in idleness, to waste* (often followed by away) आळसांत घालविणें, आळसानें व्यर्थ दवडणें -गमविणें, फुकट घालविणें. I'dleness *n. the condition of being idle* (in its various senses); as, (a) *uselessness* पोकळपणा *m*, फोलपणा *m*, निरुपयोग *m*, वायफळपणा *m*. (b) *inactivity* रिकामपण *n* -णा *m*. (c) बेकारपणा *m*, अनुद्योग *m*, मोकळेपणा *m*, मोकळा वेळ *m*, निरुद्योग *m*. &c. (d) *laziness, sloth* आलस्य *n. pop.* आळस *m*, सुस्ती *f*, पोशेपणा *m*, बशेपणा *m*, उद्योगद्वेष *m*, कामाचा कंटाळा *m*- तिटकारा *m* -आळस*m*, &c. I'dler *n. a lazy person* आळशी -सुस्त &c. मनुष्य, गमणारा, माशा मारीत बसणारा, रिकामटवळा. २ *mach. an idle wheel or pulley* आळशी चाक किंवा कपी *m*. I'dly *adv. ineffectually* निरर्थकपणानें, वायफळपणें, वायकरणीं. २ *lazily* आळसानें, आळसांत, आळशीपणानें. ३ *carelessly* निष्काळजीपणानें.

Idol (i'dol) [L. *idolum* -Gr. *eidolon* -*eidos*, that which is seen-*idein*, to see. See Idea.] *n. a figure* मूर्ति *f*, आकृति *f*, प्रतिमा *f*. २ *an image of a false god or some object of worship* खोट्या देवाची मूर्ति *f*, पूज्य वस्तूची प्रतिमा *f*, देवमूर्ति *f*. ३ *an object of passionate devotion, a person or thing too much loved or honoured* दैवत *n*, पुतळा *m*, कंठमणि *m*, अत्युत्कट भक्तीचा विषय *m*, देव्हारें *n*. ४ (*Bacon*) *a false notion or conception, a fallacy* चूक *f*, दोष *m*, खोटी -चुकीची समजूत *f*, भ्रामक कल्पना *f*, भ्रम *m*. [IDOLS OF THE TRIBE मनुष्यमात्राच्या चुका *f. pl.* -दोष *m. pl.* IDOLS OF THE DEN व्यक्तिविशेषाच्या चुका किंवा दोष. IDOLS OF THE MARKET PLACE केवळ शब्दांमुळें होणाऱ्या चुका, भ्रामक शब्दयोजनेचे दोष. IDOLS OF THE THEATRE भ्रामक विचारसरणीमुळें होणाऱ्या चुका किंवा दोष.] Idol'ater *n. a worshipper of idols* मूर्तिपूजक, मूर्तीची पूजा करणारा. २ *a great admirer* अत्युत्कट भक्त, निस्सीम चहाता, एखाद्याला दैवत समजणारा मनुष्य. Idol'atress *n. fem.* Idol'atrise *v. t. to worship idols* मूर्तिपूजा -प्रतिमापूजन करणें. २ *to pay idolatrous worship* (-वर) अतिप्रीति करणें, (-ला) वाजवीपेक्षां जास्त मान देणें, फाजील भक्ति करणें *g. of o.* I. *v. t. to make an idol of* (-ची) मूर्ति करणें -प्रतिमा बनविणें. २ *to idolise* (-चें) देव्हारें माजविणें. Idol'atrous *a. pertaining to idolatry* मूर्तिपूजेसंबंधीं, मूर्तिपूजेसारखा, मूर्तिपूजेच्या गुणाचा; as, "I. sacrifices." २ *partaking of an excessive attachment or reverence* अतिभक्तीचा, फाजील कौतुकाचा. Idol'atrously *adv.* Idol'atry *n. the worship of idols* (a) मूर्तिपूजा *f*, प्रतिमापूजन *n*. (b) असद्देवभक्ति *f* (according to Christians), खोट्या देवाची भक्ति *f*. २ *excessive love or attachment* अतिभक्ति *f*, अतिप्रीति *f*, आंधळें प्रेम *n*, अत्युत्कट पूज्यभाव. I'dolise or I'dolize *v. t.* See Idol. (-ची) मूर्ति करणें, प्रतिमा बनविणें. २ (-वर) अतिशय भक्ति करणें, देव्हारें करणें *g. of o.*, स्तोम माजविणें *g. of o.* Idolis'er *n.* See Idolater. Idol'oclast *n. a breaker of idols* मूर्ति फोडणारा, मूर्तिफोड्या, मूर्तिभंग करणारा.

Idyl, Idyll (i'dil) [L. *idyllium*-Gr. *eidyllion*, dim. of *eidos*, form, image -*eidein*, to see.] *n. a short pastoral poem* पशुपालनादिविषयक लघुकाव्य *n*. साधें गीत. (b) (also) *a narrative poem* वर्णनात्मक लघुकाव्य *n*. Idyll'ic *a.*

If (if) [A. S. *gif*; properly O. Ger. *ibu*, *ipu*, dat. case of *iba*, a condition, and therefore orig. meaning 'on condition that.'] *conj. in case that* (introducing a condition or supposition) जर, जर का, जर कां, जरकरितां. [EVEN IF जरी, जरी कदाचित्. IF PERHAPS जर कदाचित्, यदा कदाचित्.] २ (as an expression of doubt) *whether* (in dependent question) किंवा नाहीं; as, "She doubts *if* two and two make four."

Igneous (ig'ne-us) [L. *igneus* -*ignis*, fire, cog. with Sk. अग्नि fire.] *a. pertaining to fire* आग्नेय, अग्नीचा, विस्तवासंबंधीं. (b) *consisting of fire* अग्नियुक्त, अग्निमय. (c) *like fire* अग्नितुल्य, अग्निसदृश, अग्निरूप, अग्नीसारखा; as, "I. appearance." (d) *bot.* अग्निवर्ण, आरक्तपीतवर्ण. २ *geol. produced by the action of fire* अग्नीच्या क्रियेपासून बनलेला -झालेला -निघालेला, अग्न्युत्पन्न; as, "I rocks." Ignes'cent *a. emitting sparks of fire* (when struck with steel) (पोलादाचा आघात केला असतां) अग्निकण उत्पन्न करणारा, अग्न्युत्पादक, (दगड इ०). Ignius-fatuus *n. a light which misleads travellers, often seen over marshy places, of which the cause is not well understood, also called 'Will-o'-the-wisp' or 'Jack-o'-lantern'* भुताची कोलती *f* or कोलीत *n*, भूतकोलित *n*, पिशाचदीपिका *f*. २ (*fig.*) *a misleading influence, a decoy* (फशीं पाडणारा) मोह *m*, भूल *f*; as, "Scared and guided by the *ignius fatuus* of popular superstition." Ignite' *v. t. to kindle, to set on fire* पेटविणें, अग्नि देणें, अग्नियुक्त करणें, जाळणें, (-ला) आग लावणें. २ *to render luminous with heat, to heat strongly* खूप तापविणें, तापवून लाल करणें, कडक उष्णता देणें, (उष्णता लावून) आरक्तपीतवर्ण करणें. I. *v. i. to*

*take fire, to begin to burn* पेटणें, पेट घेणें, जळूं लागणें. Igniti'ble *n.* पेटविण्यासारखा, प्रज्वलनीय. (b) पेट घेणारा, जळणारा, जळण्यासारखा, प्रज्वलनशील. Igni'tion *n. -the act* आग लावणें *n*, जाळणें *n*, भाजणें *n*, पेटविणें *n.* (b) प्रज्वलन *n*, उष्णता देऊन लाल करणें *n.* २ *-the state* प्रज्वलन *n*, दीपन *n.* (b) आरक्तपीतवर्णत्व *n.* Igni'tor *n.* पेटविणारा. Igniting point उद्दीपनाचें उष्णमान *n.*

Ignoble (ig-nō'bl) [ Fr. –L. *ignobilis –in*, not, and *gnobilis, nobilis*, noble. ] *a. of low birth, not illustrious, humble* हीन कुळांतील, हलक्या कुळांतला, दुष्कुलीन, हीन कुळीचा, कमजात, कमअस्सल, प्राकृत. २ *dishonorable, mean, worthless, base* नीच, हलका, पाजी, अधम, पामर, हलकट, तिरस्करणीय, टाकाऊ; as, "It is but an I. mind that mounts no higher than a bird can soar." Igno'bleness *n.* हीनकुळी *f*, हीनकुलीनता *f*, कमजातपणा *m*, कमजात *f*, &c. २ नीचपणा *m*, पाजीपणा *m*, Ign'obly *adv.*

Ignominy (ig'nō-min-i) [Fr. –L. *ignominia–in*, not, and *gnomen, nomen*, Sk. नामन् name.] *n. the loss of one's good name, public infamy* बदनाम *n*, बदलौकीक *m*, अब्रूहानि *f*, अब्रूनुकसानी *f*, अप्रतिष्ठा *f*, अपकीर्ति *f*, अपमान *m*, मानहानि *f*, (नांवाला लागलेला) कलंक *m* -डाग *m.* २ *an ignominious act* बेअब्रूची गोष्ट *f*, अपमानास्पद -शरमेची गोष्ट *f*, बदनाम -बदलौकिक करणारें -अपमानकारक कृत्य *n*, लाजिरवाणें काम *n.* Ignomin'ious *a. marked with ignominy* लाजिरवाणा, शरमेचा, कलंक लागलेला, फजीत झालेला, अपकीर्तीचा, बेअब्रूचा, बदनामी, बद्. २ *despicable, mean* तिरस्करणीय, तिरस्कार्य, अपमानास्पद, धिक्कारपात्र, निंद्य. ३ *humiliating, degrading* अपमान करणारा, as; "I. judgment or sentence." Ignomin'iously *adv.* अधमपणानें. २ बेशरमपणानें. Ignomin'iousness *n.*

Ignoramus (ig-nō-rā'mus) [ L., 'we are ignorant', 1st. pers. pl. pres. ind. of *ignoro.*] *n.* (*pl.* Ignoramuses) *an ignorant person*, (*esp.*) अडाणी, निरक्षर, अनक्षर, अक्षरशत्रु, शंख, शंखोबा, नंदी, टोणपा. २ *one making a pretence to knowledge* पंडितंमन्य, आपण जाडे विद्वान् आहों अशी घमेंड करणारा, अहंमन्य.

Ignorant (ig'nō-rant) [ Fr. –L. *ignorans, –antis*, pr. p. of *ignoro.* See Ignore.] *a. without knowledge, uninstructed* अडाणी, अज्ञानी, अज्ञ, अज्ञान, अजाण, नेणता, अशिक्षित, मूढ, नादान, मूर्ख. २ *unacquainted, with* (used with *of*) अपरिचित, गैरमाहीत, गैरमाहीतगार, पारखा, परका, अनभ्यस्त, अजाण; as, "I. of guilt, I fear not shame." ३ *resulting from ignorance, foolish, silly* अजाणपणानें केलेला -झालेला, मूर्खपणाचा, अज्ञानपणाचा, वेडगळ. I. *n. an unlettered person* अडाणी, अज्ञान, अशिक्षित -ज्ञानशून्य मनुष्य. Ig'norance *n. want of knowledge* अज्ञान *n*, अज्ञानत्व *m*, अज्ञानपणा *m*, अज्ञानता *f*, अविद्या *f*, ज्ञानाभाव *m*, अजाणपणा *m*, अनभिज्ञता *f*, मौर्ख्य *n*, मौढ्य *n*, &c. [ GROSS I. गाढअज्ञान *n.* TO KEEP IN IGNORANCE अज्ञानांधकारांत ठेवणें. ] २ गैरमाहिती *f*, गैरमाहीतपणा *m.* [ TO PLEAD I. अज्ञानाची सबब पुढें आणणें. ] ३ *theol. a wilful neglect or refusal to acquire knowledge which one may acquire and it is one's duty to have* अज्ञान *n*, अविद्या *f*, मोह *m.* Ig'norantly *adv.* अडाणीपणानें, अज्ञानानें.

Ignore (ig-nōr') [ Fr. –L. *ignoro*, not to know *–in*, not, and *gno-*, root of (*g*) *nosco, noscere*, to know, *gnarus*, knowledge. या शब्दाचा मूळ अर्थ "(-ला) माहिती नसणें, नेणणें" असा होता. परंतु तो सध्या प्रचारांत नाहीं.] *v. t. to throw out or reject as false or ungrounded* (for want of evidence &c.) (साक्षीपुरावा भरपूर नसल्यामुळें) मान्य न करणें, अमान्य करणें, (खोटा किंवा अप्रमाण म्हणून) विचारांत न घेणें, अव्हेरणें. २ (hence) *to shut the eyes to, wilfully to disregard* न विचारणें, जाणून बुजून दुर्लक्ष करणें, माहीत नाहीं असें दाखविणें -भासविणें. ३ *to set aside, to leave out of account* हिशोबांत न धरणें -घेणें, जमेस न धरणें.

Ignoratio elenchi *n.* (*logic*) तर्काभास *m*, अप्रकृतानुमितीचा हेत्वाभास *m.*

Iguana (i-gwä'na) [ Spanish word. ] *n. a genus of tropical lizards, having a large dewlap under the throat* घोरपड *f*, गोधा *f*.

Ileac, Iliac See under Ileum.

Ileum (il'ē-um) [ L. *ile, ileum, ilium*, pl. *ilia*, groin, flank. ] *n. anat. the last, and usually the longest, division of the small intestine* (written also *ilion, ileum*) लहान आंतडीचा खालचा भाग *m*, सूक्ष्मांत्रमूल *n*, पक्वाशयाचा तिसरा भाग *m*, अंत्यांत्र *n*, मंडलांत्र *n.* Il'eac, I'liac *a.* (R.) लहान आंतड्याच्या खालच्या भागाचा, सूक्ष्मांत्रमूलासंबंधीं. [I. PASSION उदावर्त *m.* THAT HAS THE I. PASSION उदावर्तरोगी, उफराट्या आंतडीचा. ] Il'eo-caecal *a.* I. valve लहान आणि मोठ्या आंतड्याच्या संयोगस्थानीं असणारा पडदा *m.* अंत्रसंधिपटल *n.*

Iliad (il'i-ad) [L. *Ilias Iliadis*, -Gr. *Ilias*, relating to Ilium, the ancient Troy.] *n.* (ग्रीककवि होमर यानें रचिलेलें) 'इलिअड' नामक महाकाव्य *n.*

Ilium (il'i-um) [ See *ileum.* ] *n. anat. the dorsal one of the principal bones comprising either lateral half of the pelvis* कडेचें हाड *n.* कटिकपाल *n.* Il'iac, Il'eac (R.) *a. anat.* कडेच्या हाडाच्या पुढचा.

Ilk (ilk) [ Scot. *ilk*, A. S. *ylc* from *–y-* or *i-* (base of He), and *lic*=like.] *a. the same* तोच, सदरहू. Of that ilk त्याच नांवाचा.

Ill (il) [ Icel. *illr*, a contr. of the word which appears in A. S. *yfel*, E. Evil. The regular comparative and superlative are wanting, their places

being supplied by *worse*, and *worst*, from another root. ] *a. contrary to good :* ( a ) ( in a physical sense) *bad, evil, unfortunate, unfavourable* वाईट, अनिष्ट, अनिष्टकारक, घातक, अहितकारक, अपायकारक, प्रतिकूल, बाधक, आड येणारा, नडणारा, दुष्ट; as, "There's some *ill* planet reigns." ( b ) ( in a moral sense ) *evil, naughty, improper* वाईट, दुष्ट, अयोग्य, दुराचारी, पापी, खोडकर; as, "Of his own body he was ill, and gave the clergy an *ill* example." २ *sick, diseased, disordered, unwell* आजारी, बरें वाटत नसलेला, अस्वस्थ, असमाधानी, दुखणेकरी, दुखणाईत, बीमार, रोगी; as, "Ill of fever." [ To BE I. अंथरुण धरणें, निजणें, आजारी -निजून असणें, पडणें, पडून असणें.] ३ *incorrect, rude, unpolished, inelegant* असभ्य, रानटी, जंगली, रानटी, अडनाडी, दांडगटपणाचा, गांवढळ, उद्धट; as, "That's an *ill* phrase; *ill* manners." ४ *cross* (as temper) दुष्ट, तुसडा, दाष्ट, खाष्ट, द्वाड. I. at ease अस्वस्थ, असमाधानी, चिंतातुर, काळजी लागलेला. I. blood ( a ) *resentment* राग *m.* ( b ) *enmity* द्वेष *m*, तिटकारा *m*, वैर *n*, शत्रुत्व *n*, वैरभाव *m*, दावा *m*, वैमनस्य *n*. I. fame अपकीर्ति *f*, बदलौकिक *m*, बदनाम *n*, दुष्कीर्ति *f*. I. humour *disagreeable mood, bad temper* गैरमर्जी *f*, गैरतब्बेत *f*. I. temper, *anger* राग *m*. I. turn, *an unkind act* दुष्टपणा *m*, दुष्टपणाचें कृत्य *n*, वाईट काम *n*. I. will गैरमर्जी *f*, दुष्टाई *f*, दुष्टावा *m*, तिटकारा *m*, द्वेषबुद्धि *f*, द्वेष *m*, तिरस्कार *m*. I. *n. evil of any kind* as, ( a ) *evil, misfortune, calamity* अनिष्ट *n*, अरिष्ट *n*, संकट *n*, दुर्दैव *n*, विपत्ति *f*, दुर्भाग्य *n*, अपाय *m*. ( b ) (in a moral sense) *wickedness, depravity, wrong* दुष्टपणा *m*, द्वाडपणा *m*, दुष्टता *f*, दुराचार *m*, पाप *n*, अवनति *f*, भ्रष्टता *f*. ( c ) दुःख *n*, रोग *m*, व्याधि *f*. I. *adv. not well, not rightly* वाईट, खराब, कमकुवतपणानें. २ *with difficulty* जुलमानें, जुलमावर, कसाबसा. Ill-according, I.-agreeing *a.* न जुळणारा, अजोड, विजोड, विलग. Ill-behaved *a.* वाईट चालीचा, बदचालीचा, बेताल, बेचालीचा, दुर्वृत्त, दुर्विनीत, दुराचरणी, &c. Ill-being *n.* अकल्याण *n*, अहित *n*, अश्रेय *n*, अकुशल *n*. Ill-betokening, I.-boding, I.-omened *a.* अभद्र, अमंगल, कुलक्षणी, दुर्लक्षणी. Ill-formed *a.* बेडौल, Ill-looking *a.* कुरूप, विरूप, विद्रूप, वेडाविद्रा. Ill-matched *a.* विजोड, सरसनिरस. Illness *n. disease, sickness* रोग *m*, दुखणें *n*, आजारीपणा *m*, आजार *m*, प्रकृत्यस्वास्थ्य *n*. २ *wrong moral conduct* कुनीति *f*, अनीति *f*. दुष्टाई *f*, दुष्टता *f*. Ill-spoken *a.* तोंडाचा फटकळ, फटकळ तोंडाचा, वाग्दुष्ट, दुर्भाषी *f*, अभद्रभाषी. Ill-starred *a.* फुटक्या नशीबाचा, कमनशिबाचा, भग्या कपाळाचा, भग्या. Ill-toned *a.* बदसूर, बेसूर, अपस्वर.

I'll ( il ) contraction of *I will* or *I shall.*

Illapse ( il-laps' ) [ L. *illapsus*, pa. p. of *illabor -il*, *in*, into, and *labor*, to slip, to slide. ] *v. i. to fall or glide, to pass* (usually followed by *into*) (आंत) जाणें -पडणें, शिरणें, उतरणें, घसरणें. I. *n. a gliding in* अंतर्प्रवेश *m*. २ ( also ) *a sudden descent or attack* अधोगति *f* ( *lit.* ), चाल *f*, दौड *f*, स्वारी *f*.

Illation ( il-lā'shun ) [ Fr. —L. *illatio*, a bringing in, a logical inference —*infero*, *illatum -il*, *in* into, and *ferre*, to bear. ] *n. the act of inferring* (*from premises or reasons*) तर्क बांधणें *n* -काढणें *n*. २ *inference, deduction, conclusion* तर्क *m*, अनुमान *n*, अनुमिति *f*. Il'lative *a. relating to illation* तर्काचा, अनुमानविषयक. ( b ) *denoting illation* ( as the words *then, therefore,* ( &c. ) अनुमानवाचक, तर्कबोधक. २ *that may be inferred, inferential* तार्किक, आनुमानिक,तर्कानें बांधलेला, अनुमानानें काढलेला. [ ILLATIVE CONVERSION आनुमानिक परिवर्तन *n*. I. SENSE आनुमानिक अर्थ *m*. ] I. *n. gram. an illative particle* अनुमानवाचक अव्यय *n*. Il'latively *adv.* तर्कानें, अनुमानानें, अनुमानरीत्या.

Illaudable ( il-lawd'a-bl ) [ *In*, not + Laudable.] *a. not praise-worthy, worthy of censure* अप्रशंसनीय, अस्तुत्य, अश्लाघ्य, निंद्य, दूषणीय.

Illegal ( il-lē'gal ) [ L. *in* not, & Legal.] *a. contrary to law* बेकायदेशीर, कायद्याविरुद्ध, गैरकायदा, गैरकायद्याचा, अशास्त्र, स्मृतिविरुद्ध, विधिविरुद्ध, राजनिषिद्ध, व्यवहारविरुद्ध, न्यायविरुद्ध, अधर्म्य, अन्याय्य. Ille'galise *v. t. to render illegal or unlawful* बेकायदेशीर -अशास्त्र ठरविणें. Illegal'ity *n. the condition of being illegal* बेकायदेशीरपणा *m*, गैरकायदेशीरपणा *m*, शास्त्रविरोध *m*, व्यवहारविरोध *m*, अशास्त्रता *f*. Ille'gally *adv.* बेकायदेशीरपणानें, गैरइनसाफानें, गैरकायद्यानें.

Illegible ( il-lej'i-bl ) [ L. *in* not & Legible.] *a. that cannot be read, indistinct* वाचायास अवघड -कठीण, गिचमीड, दुर्वाच्य, अपठनीय, पठनाक्षम, अस्पष्ट. Illeg'ibly *adv.* गिचमीडपणानें, न वाचतां येईल अशा रीतीनें. Illeg'ibleness, Illegibil'ity *n.* गिचमीडपणा *m*, दुर्वाच्यता *f*, न वाचतां येण्यासारखी स्थिति *f*.

Illegitimate ( il-le-jit'i-māt ) [ L. *in* not & Legitimate.] *a. not according to law* कायद्याविरुद्ध, शास्त्रविरुद्ध. २ *not born in wedlock* अनौरस, जारजन्माचा, जारज, विजात, दासीपुत्र, कौलटेय, बंधकीसुत, उपस्त्रीसुत, बंधुल, अशास्त्रजात, अकरमाशा, व्यभिचारज, अधर्मजात, अपत्नीजात, अदंपतीजात. ३ *not properly reasoned or inferred* तर्कशास्त्रविरुद्ध. ४ *not genuine* कमअस्सल, अनौरस. Illegit'imately *adv.* अनौरसपणानें, शास्त्रविरुद्ध. Illegi'timacy *n.* अनौरसता *f*, जारजता *f*, शास्त्रविरुद्धता *f*, विजन्म *m*, विजन्मता *f*.

Illiberal ( il-lib'er -al ) [ L. *in* not and Liberal.] *a. niggardly* अनुदार, कृपण, चिकु, अदानशील. २ *mean* अनुदार, नीच, हलकट, क्षुल्लक. ३ *rude* अशिक्षित. ४

*narrow* अनुदार, अप्रशस्त मनाचा, क्षुद्रमनस्क. Illib'erally *adv.* अनुदारपणानें, क्षुद्रमनानें. Illiberal'ity *n.* अनुदारपणा *m*, अप्राशस्त्य *n*.

Illicit ( il-lis'it ) [ Fr. –L. *illicitus* –*in* not and *licitus pa. p. of licere* to be allowable.] *a. not allowable, unlawful* निषिद्ध, मनाईचा, गैरशिस्त, व्यवहारविरुद्ध. I. intercourse अगम्यागमन *n*. Illic'itly *adv.* निषिद्धपणानें. Illic'itness *n.* निषिद्धता *f.*

Illimitable ( il-lim'it-a-bl ) [ L. *in* not and Limitable. ] *a. that cannot be bounded, infinite* ज्याची मर्यादा करितां येत नाहीं असा, अमर्याद, निस्सीम, अपार. Illim'itably *adv.* अमर्यादपणानें. Illim'itableness *n.* अमर्यादता *f*, अपारता *f.*

Illision ( il-lizh'un ) [ L. *illisio* –*in* in, upon and *lædere* to dash, to strike.] *n. the act of striking or dashing against* आदळणें *n*, आपटाआपट *f.*

Illiterate ( il-lit'ėr-āt ) [ L. *in* not and Literate. ] *a. not learned, uninstructed, ignorant* निरक्षर, अक्षरशून्य, अनक्षर, अविद्य, विद्याशून्य, विद्याविहीन. Illit'eracy *n.* अक्षरशून्यता *f*, निरक्षरता *f.* २ *a blunder* चूक *f*, अज्ञानाचें उदाहरण *n*. Illit'erateness *n.* अक्षरशून्यता *f.* Illite'rately *adv.* अक्षरशून्यतेनें.

Illogical ( il-loj'i-kal ) [ L. *in* not and Logical. ] *a. contrary to the rules of logic* तर्कशास्त्रविरुद्ध, प्रमाणासिद्ध, अतार्किक, अयुक्तिक, युक्तिविरुद्ध. २ *ignorant of the rules of logic* तर्कशास्त्राचे नियम न जाणणारा, तर्कशास्त्रानभिज्ञ. Illog'ically *adv.* तर्कशास्त्रविरुद्ध. Illog'icalness *n.* तर्कशास्त्रविरुद्धता *f*, अतार्किकता *f.*

Illude ( il-lūd' ) [ L. *illudo, illusum* -*in*, upon, and *ludere*, to play. ] *v. t. to play upon by artifice* युक्तीनें फसवणें -भुलवणें, ठकविणें. २ *to excite and disappoint the hopes of* ( थापा मारून) नादीं लावणें. Illu'sion *n. mockery, deceptive appearance, false show* भ्रम *m*, मोह *m*, भूल *f*, माया *f*, मोहजाल *n*, इंद्रजाल *n*. २ (hence) *enchantment* जादू *f.* ३ *physiol. erroneous perception* (खऱ्या वस्तूच्या ठिकाणीं भलतीच कांहीं तरी वस्तु असण्याचा) भ्रम *m*. ४ *philo.* विप्रलंभ *m*, माया *f*, भ्रम *m*. [ I. OF MOTION AND MOVEMENT गतिमाया *f*. I. TACTIA स्पर्शमाया *f*. VISUAL I. दृश्यमाया *f*. ] Illu'sionable *a.* मोह पडणारा, भुलणारा. Illu'sionist *n. a visionary dreamer* दृष्टिमायेमुळें स्वप्नवत् स्थितींत असणारा मनुष्य. Illu'sive *a.* मायामय, मायारूप, मायावंत, मिथ्या, फसवणुकीचा, कपटी, ऐंद्रजालिक, मोहाचा. २ ( *law.* ) फसवणुकीचा, खोटा. Illu'sively *adv.* मायावीपणानें, फसवेगिरीनें. Illu'siveness *m*. मायावीपणा *m*, कपट *n*, खोटेपणा *m*, भ्रामकता *f*. Illu'sory *a. deceiving by false show, deceitful, false* मायावी, फसविणारा, भ्रामक.

Illuminate ( il-lū'min-āte ) [ L. *in* upon and *luminare* to cast light.] *v. t. to throw light on, to supply with light* ( वर ) प्रकाश पाडणें, प्रकाशित करणें. २ *to light up, to decorate with artificial lights* रोशनाई *f.* -आरास करणें, दिपमाळा लावणें, 'लाइट' करणें. ३ *to adorn as a book or page with borders or initial letters in colours and gold* पत्ररंजन करणें. ४ *to make plain or clear* प्रकाश पाडणें, सुगम -विशद-स्पष्ट करणें; as, to I. a text. Illuminated *pa. t.* Illumina'ting *pr. p.* Illumina'tion *n.* प्रकाशित करणें *n*, प्रकाश पाडणें *n*. *a display of lights* रोषनाई *f*, दीपोत्सव *m*. ३ *adornment of manuscripts or books with coloured lettering or illustrations* पत्ररंजन *n*. ४ ( *theol.* ) *enlightening influence* ज्ञानचक्षु उघडणें *n*, आत्मप्रबोधन *n*. Illu'minative *a.* प्रकाश पाडणारा, प्रकाशक. Illu'minator *n.* प्रकाशक. २ पुस्तकें किंवा पत्रें यांवर अलंकार काढणारा. ३ प्रकाश एके ठिकाणीं करणारा आरसा किंवा कांच. Illume, Illumine, Same as Illuminate.

Illustrate (il-lus'trāt) [L. *illustratum*, to light up.] *v. t. to make clear, bright, or luminous* प्रकाशित करणें, (-वर) प्रकाश -उजेड पाडणें, प्रकाशणें; as, "Here, when the moon *illustrates* all the sky." २ *to make clear to the mind, to explain* (अलंकार, तुलना, दृष्टांत, दाखला इ०कांच्या सहाय्यानें) समजेसें करणें, स्पष्ट करणें, उघड -करणें -करून सांगणें, फोड करणें *g. of o.*, व्याख्या करणें. ३ *to adorn with pictures* चित्रांनीं सुशोभित -मंडित-भूषित करणें; as, "To I. a book or a subject". ( b ) *to elucidate with pictures* (चित्रें घालून) सचित्र करणें; as "To I. a history." Illus'trated *a.* प्रकाशित, द्योतित. २ स्पष्ट -उघड केलेला, सोडवून दाखविलेला, फोड केलेला. ३ चित्रयुक्त, चित्रें घातलेला, चित्रें जोडलेला, सचित्र; as, "An I. weekly or catalogue". Illustration *n. -the act* प्रकाशन *n*. (b) स्पष्टीकरण *n*, सचित्रीकरण, आविष्करण. *n*. २ *that which illustrates, an example* स्पष्टीकरण *n*, दाखला *m*, दृष्टांत *m*, उदाहरण *n*, इ०. ३ *a picture or diagram* चित्र *n*, आकृति *f*. Illus'trative *a.* प्रकाशक. २ स्पष्टीकरणात्मक, स्पष्ट करणारा, खुलासा -फोड करून देणारा, स्पष्टीकरणोपयुक्त, दृष्टांताचा. Illus'trator *n.* प्रकाशक. २ स्पष्टीकरणकर्त्ता *m*. Illus'trious *a. brilliant, luminous* प्रकाशमान, दीप्तिमान्, तेजोमय, तेजस्वी, दीप्त. २ *morally bright, noble, distinguished, conspicuous* प्रसिद्ध, सुप्रसिद्ध, वैभवशाली, विख्यात, कीर्तिमान्. २ *conferring honour, renowned* कीर्तिकर, यशस्कर, गौरवयुक्त, उत्कृष्ट, नामी; as, "I. deeds." Illu'striously *adv.* Illus'triousness *n. greatness, glory, fame* श्रेष्ठता *f*, श्रेष्ठपणा *m*, मोठेपणा *m*, वैभव *n*, प्रतिष्ठा *f*, कीर्ति *f*, नांव *n*. २ सुप्रसिद्धता *f.*

I'm. A contraction of *I am*.

Image ( im'āj ) [ Fr. –L. *imago*, an image, from root of *imitor*, to imitate.] *n. a likeness, a statue, an effigy* प्रतिमा *f*, प्रतिरूप *n*, बाहुली *f*, पुतळा *m*, पुतळी, (एखाद्या वस्तूचें) हुबेहुब चित्र *n*-तसबीर *f*, प्रति-

बिंब *n.* २ *the likeness of anything to which worship is paid, an idol* देवताप्रतिमा *f.* मूर्ति *f.* [ GRAVEN I. कोरींव मूर्ति *f.* MOLTEN I. ओतींव मूर्ति *f.* ] ३ *a representation* ( of anything ) *in the mind, a picture in the imagination, a conception, an idea* मनःकल्पना *f.* कल्पना *f.* भास *m.* आभास *m.* ४ ( *Rhet.* ) *a picture, example, or illustration, often taken from sensible objects, and used to illustrate a subject* ( usually an *extended metaphor* ) ( सादृश्यासाठीं घेतलेला ) दाखला *m.* उदाहरण *n.* दृष्टांत *m.* रूपक *n.* ५ *Opt. the figure of any object formed by the rays of light* प्रतिबिंब *n.* ( or briefly ) बिंब *n.* [ AFTER I. आगन्तुक प्रतिबिंब *n.* MULTIPLE I. विविध प्रतिबिंबें *n. pl.*, REAL I. वास्तविक -खरें प्रतिबिंब *n.* VIRTUAL I. अवास्तविक -अदृष्ट -भ्रामक प्रतिबिंब *n.* ] I. *v. t. to form an image of* ( -ची ) मूर्ति *f* -प्रतिमा *f* -पुतळी *f.* बनविणें, बाहुली तयार करणें, ( सादृश्यपूर्ण ) चित्र काढणें ; as, "The still lake *imaged* the shore". २ *to form a likeness of in the mind, to imagine* कल्पना करणें -बांधणें. Im'agery *n.* ( *orig.* ) *imitation work, images in general* मूर्ति *f. pl.*, प्रतिमा *f. pl.*; as "Painted *imagery*". २ ( *fig.* ) *unreal show* सोंग *n.* ढोंग *n.* बतावणी *f.* पोकळ डौल *m.* ३ *the work of the imagination, mental pictures* मानससृष्टि *f.* कल्पनासृष्टि *f.* कल्पना *f.* मनोराज्य *n.* ४ *rhetorical decoration in writing or speaking* काल्पनिक-आलंकारिक वर्णन *n.* -चित्र *n.* ( एखाद्या विषयाचें हुबेहुब चित्र डोळ्यांपुढें उभें करणारें ) जोरदार वर्णन *n.* Imag'inable *a.* कल्पना करितां येण्याजोगा, कल्पनीय, कल्प्य. Imag'inableness *n.* कल्पनीयता *f.* Imag'inarily *adv.* कल्पनेमध्यें, मनोराज्यांत. Imag'inariness *n. unreality* काल्पनिकपणा *m.* अवास्तवता *f.* Imag'inary *a. existing only in imagination, not real* काल्पनिक, कल्पित, कल्पनासिद्ध, कल्पनाकृत, मनःकल्पित, मानसिक, मनोराज्यांतील, अवास्तव, खोटा, असत्य, मिथ्या, मायामय. ३ *math. impossible* काल्पनिक. Imaginary *n. alg.* काल्पनिक संख्या *f.* Imagina'tion *n.*—*the act.* कल्पना करणें *n* -बांधणें *n.* २ *the faculty of making images in the mind* कल्पनाशक्ति *f.* कल्पना *f.* ३ *that which is imagined, a mental image, conception* कल्पना *f.* भावना *f.* विचार *m.* ( ? ), संकल्प *m.* [ EVIL I. कुकल्पना *f.* कुतर्क *m.* कुसृष्टि *f.* ] ४ *a contrivance* कल्पना *f.* युक्ति *f.* जुगूत *f.* Imag'inative *a. proceeding from the imagination* कल्पनेचा, कल्पनेनें केलेला, कल्पनेपासून निघालेला, काल्पनिक, कल्पनोद्भूत ; as, "An I. art". २ *full of imagination, creative, given to imagining* कल्पक, कल्पनाचतुर, कल्पनापटु, कल्पनाकुशल, कल्पनाबाज, कल्पनादार; as, "Milton had a highly *imaginative*, Cowley a very fanciful mind". Imag'inatively *adv.* काल्पनिकपणानें. २ कल्पकतेनें. Imaginativeness *n.* काल्पनिकपणा *m.* २ कल्पकता *f.* कल्पनाचातुर्य *n* -कौशल्य *n* -पटुत्व *n.* कल्पनाबाजपणा *m.* Imag'ine *v. t. to form an image of in the mind, to conceive* कल्पिणें, मनांत आणणें, ( -ची ) कल्पना करणें, डोळ्यांसमोर ( मनानें ) उभें करणें. २ *to think, to represent to one's self* ( आपल्याशीं ) विचार करणें, विचार करून पाहणें, मनाशीं ताडून पाहणें. ३ *to contrive or devise* ( -चा ) बेत करणें, घाट घालणें, ( युक्ति ) योजणें, योजून -शोधून काढणें, चिंतणें, चिंतन करणें ; as, "How long will you *imagine* mischief against a man?" I. *v. i.* विचार करणें. २ *to think, to suppose* वाटणें *in. con. with* ला *of s.*, मानणें, समजणें. Imag'iner *n.*

Imagine ( im-aj'in ) See under Image.

Imago ( i-mā'gō ) [ L. ] *n. an image* मूर्ति *f.* प्रतिमा *f.* २ *Zool. the last or perfect state of insect life, when the case covering it is dropped, and the inclosed being or 'image' comes forth* किड्याचें पूर्णस्थितींचें स्वरूप *n.*

Imbank, Same as Embank, which see.

Imbecile ( im'be-sēl ) [ Fr. *imbecile* —L. *imbecillus*; origin unknown. See Embezzle. ] *a. destitute of bodily strength, feeble, impotent* नेभळट, नेभळा, नबळा, दुर्बल, दुबळा, अशक्त, हीनशक्तिक, फुसका, क्लीब. २ ( esp. ) *feeble-minded, mentally weak* न्यूनबुद्धि, बुद्धिहीन, हीनबुद्धि, क्षीणबुद्धि, नेभळट, नेभळा, जन्माचा वेडसर. I. *n.* दुबळा -अशक्त, क्लीब माणूस. २ बुद्धिहीन माणूस. Imbecil'ity *n. feebleness :* ( a ) –of body. दुर्बलता *f.* दुबळपणा *m.* नबळेपणा *m.* अक्षमता *f.* क्लैब्य *n.* (b) -esp. of mind. न्यूनबुद्धित्व *n.* मानसिक दौर्बल्य *n.* जन्माचा वेडसरपणा *m.*

Imbed ( im-bed' ) [ Eng. *in*, into and Bed. ] *v. t.* आंत ठेवणें, घालणें.

Imberbis ( imberb'is ) [L.] *a. bot. beardless, devoid of hair* निर्लोम.

Imbibe ( im-bīb' ) [ Fr. —L. *imbibere* –*in*, in, into, and *bibere*, Sk. पिबू to drink.] *v. t. to drink in, to absorb* पिणें, शोषणें, पिऊन -शोषून घेणें, शोषण *n.* करणें *g. of o.* २ *to receive or absorb into the mind and retain* ग्रहण करणें *g. of o.*, ( मनांत ) धारण करणें, ऐकून ध्यानांत घेणें, मनांत ठसविणें -बिंबविणें -पक्कें बसविणें जडणें *in. con.* घेणें. Imbib'er *n.* Imbibati'on *n.* शोषण *n.* २ ग्रहण.

Imbitter ( im-bit'er ) [ E. *in* & Bitter. ] *v. t. to make bitter* कडू करणें. २ *to exasperate* खिजवणें, चेतवणें. ३ *to render unhappy* दुःखमय -दुःखद करणें. Imbitt'er-er *n.* Imbitt'erment *n.*

Imbody ( im-bod'i ) See Embody.

Imbolden ( im-bōld'n ) See Embolden.

Imborder ( im-bor'der ) See Emborder.

Imbosom ( im-booz'um ) See Embosom.

Imboss ( im-bos' ) See Emboss.

Imbowel ( im-bow'el ) See Embowel.

Imbricate, Imbricated ( im'bri-kāt,-ed ) [ L. *imbricatus*, pa. p. of *imbricare*, to cover with tiles -*imbrex* a gutter-tile -*imber*, a shower.] *a. bent like a gutter-tile* गटारावरील कौलासारखा वांकलेला. २ *bot. overlapping each other like tiles on a roof* घरावरील कौलांच्या रचनेसारखा. Im'bricate *v. t.* कांठ एकावर एक चढवून लावणें. Imbrica'tion *n. an overlapping of the edges* कांठ एकावर एक चढणें *n*, अतिव्याप्ति *f*. २ ( hence ) *intricacy of structure* भानगडीची रचना *f*, गुंतागुंत *f*.

Imbroglio (im-brōl'yō) [ Italian. See verb Broil and Cf. Embroil. ] *n. an intricate plot in a romance or drama* भानगडीचें कथानक *n*, (संविधानक सुव्यवस्थित नसल्यामुळें झालेली ) कथानकाची गुंतागुंत *f*, गुंतागुंतीचा भाग *m*. २ *a perplexing state of matters, a complicated or serious misunderstanding* घोंटाळ्याची स्थिति *f*, घोंटाळा *m*, भानगड *f*, ( घोंटाळा माजविण्यासारखी) मोठी गैरसमजूत *f*; as "Wrestling to free itself from the baleful *imbroglio*."

Imbrown ( im-brown' ) [ E. *Im*, in, and *brown*.] *v. t. to make brown, to darken, to obscure* पिंगट -फिका करणें, अंधुक -धुकट करणें, काळोखी लावणें.

Imbrue ( im-broō' ) [O. Fr. *embruer* -L. *bibere*, Sk. पिब् to drink.] *v. t.* ( causal of *Imbibe* ) *to wet or moisten, to soak, to drench* ( *esp.* in blood ) ओला करणें, भिजविणें, (रक्तांत) भरवणें, भिजवून चिंब करणें. Imbrue'ment *n.* भिजविणें *n*. २ ओलेपणा *m*, आर्द्रता *f*.

Imbue ( im-bū' ) [ L. *imbuo* -*in*, and root of *bibere* Sk. पिब् to drink. ] *v. t. to cause to drink or absorb, to tinge deeply, to moisten* शोषून घेण्यास लावणें, ( -आंत ) भिजविणें, छटा *f*. देणें, ( -नें ) व्याप्त -विशिष्ट -युक्त -पूर्ण &c. करणें. २ *to cause to imbibe* (as the mind ), *to impress* ( मनावर ) ठसा उठविणें *g. of o.*, बिंबविणें. Imbu'ed *pa. t. & p. p.* Imbue'ment *n.* पक्का ठसा उठविणें *n*, भिजविणें *n*. २ *a deep tincture* पक्का रंग *m*.

Imitate ( im'i-tāt ) [ L. *imitari*, *imitatus*, to imitate.] *v. t. to copy, to strive to be the same as, to follow* ( a model, example &c. ) अनुकरण करणें *g. of o.*, कित्ता *m* -वळण *n*. -घेणें -गिरविणें *g. of o.*, अनुसरणें, चाल धरणें *g. of o.* २ *to produce a likeness of, to copy* ( -ची ) हुबेहुब नक्कल बनविणें -करणें -उतरणें, धाटणी *f* -धाटी *f* -आणणें *g. of o.* ३ ( hence ) *to counterfeit* बनावट ( नक्कल ) करणें, खोटें करणें. Im'itabil'ity *n.* अनुकरणीयता *f*. Im'itable *a.* अनुकरण करतां येण्यासारखा, नक्कल करतां येण्यासारखा, अनुकरणीय, अनुसरणीय, उदाहरण घेण्याजोगा. Im'itableness *n.* अनुकरणीयता *f*. Im'itated *pa. a.* उतरलेला, अनुकृत, अनुसृत, अनुकरण केलेला. Imita'tion *n.* -*the act* अनुकरण करणें *n*, उदाहरण घेणें *n*, अनुकरण *n*, अनुवृत्ति *f*, अनुवर्तन *n*, अनुकृति *f*, अनुकार *m*. २ *likeness, resemblance* सादृश्य *n*, नक्कल *f*, उतारा *m*, ( हुबेहुब ) प्रतिमा *f*, प्रतिकृति *f*. N. B.:—*Imitation* is often used adjectively to characterize things which have a deceptive appearance, simulating the qualities of a superior article ( oppo. to *real* or *genuine* ); as, *imitation* lace=खोटा -नकली जर. Im'itational *a.* अनुकरणप्रिय; as, "I. propensities." Im'itative *a. inclined to imitate* अनुकरणप्रिय, अनुगामी, अनुकरण करणारा, अनुकारी, अनुकरणशील, गतानुगतिक; as "Men are I."=लोक गतानुगतिक आहेत. २ *formed after a model* नमुन्याप्रमाणें तयार केलेला -बनविलेला, अस्सलबरहुकूम. ( b ) ( also ) नकली, खोटा. ३ *having resemblance to something else* अनुकरणोद्भव; as, "I. colours, habits, &c." I. word *gram.* अनुकरणवाचक शब्द *m*. I. verb अनुकरणधातु *m*. Im'itatively *adv.* Im'itativeness *n.* Im'itator *n.* अनुकरण करणारा, अनुकर्ता *m*, नक्कल करणारा.

Immaculate ( im-mak'ū-lāt ) [ L. *immaculatus* -*im* ( =*in* ), not, and *maculatus*, p. p. of *maculare*, to spot -*macula*, a spot. ] *a. spotless, unstained, pure* निष्कलंक, निर्मळ, निर्दोष, पवित्र, शुद्ध, स्वच्छ. २ *limpid* निर्मळ, विमल. ३ मैथुनपापविरहित. [ I. CONCEPTION ( *Rom. Cath. Ch.* ) अपौरुषेय गर्भाधान *n*. ] Immac'ulately *adv.* निर्दोषपणानें. Immac'ulateness निष्कलंकत्व *n*, निर्दोषत्व *n*, निर्दोषपणा *m*, निष्पापता *f*.

Immailed ( im-māld' ) [ *Im* and *Mail*. ] *a. clad in armour* शिरस्त्राण -कवच घातलेला.

Immalleable ( im-mal'ē-a-bl ) *a. not malleable* [अवर्धनीय.

Immanent (im'a-nent) [ L. *immanens*,-*entis*, pr. p. of *immanere*-*im* ( =*in* ), in or near, and *manere*, to remain. ] *a. remaining within, inherent, indwelling, intrinsic* ( oppo. to *emanent, transitory* &c. ) अंतर्गत, अंतर्भूत, अंतर्भव, अनुस्यूत, आत्मगत, ओतप्रोत भरून राहिलेला, व्यापून राहिलेला. I. and transient activity आत्मगत आणि परगामी क्रिया *f*. Im'manence, Im'manency *n. philos. inherence* अंतर्भाव *m*, अनुस्यूतता *f*, ओतप्रोतता *f*, व्यापकता *f*; as, "Clement is mainly concerned in enforcing the I. of God."

Immanuel ( im-man'ū-el ) [ Heb. *immānūēl* -*im*, with + *ānū*, us, and *ēl*, God. ] *n. lit. God with us, an appellation of Christ* इमॅन्युएल *m*. हें खिस्ताचें एक नांव आहे.

Immarginate (im-mär'jin-āt) [ L. *im*, not, and *margo*, *marginis*, border.] *a bot. not margined or bordered* अप्रांत, अधार, धाराहीन, अकच्छ.

Immaterial ( im-a-tē'ri-al ) [ Fr. -L. *in*, not, & Material. ] *a. not consisting of matter, incorporeal, spiritual* अजड, अपार्थिव, अदेही, अमूर्त, अशरीरी, अमात्रक, अपांचभौतिक, निराकार, आत्मिक, आत्मरूप, आत्मरूपी; as, "Angels are spirits *imma-*

*terial* and intellectual". २ *of no substantial consequence, unimportant* अप्रधान, अप्रमुख, लघु, हलका, साधारण प्रतीचा, बिनमहत्वाचा, क्षुल्लक, किरकोळपणांतला; as, "I. objection". Immate'rialism *n. the doctrine that immaterial substances or spiritual beings exist or are possible* जडाभाववाद *m*, चित्सत्तावाद *m*, निराकारपदार्थास्तित्ववाद *m*, बाह्यशून्यवाद *m*, निराकारवाद *m*. ३ *philos.* ( esp. ) *a system that maintains the immateriality of soul* देहभिन्नात्मवाद *m*, देहभिन्नात्ममत *n*, आत्मास्तित्ववाद *m*. Immate'rialist *n.* देहभिन्नात्मवादी *m*, आत्मास्तित्ववादी *m*, बाह्यशून्यवादी *m*. Immaterial'ity *n.* अजडत्व *n*, निराकारत्व *n*, अमात्रवत्व *n*, अपांचभौतिकता *f*, अप्राकृतिकत्व *n*. Immate'rialise *v. t. to render immaterial or incorporeal* अमूर्तत्व देणें, निराकार बनविणें; as, "I. ed spirits." Immate'rially *adv.* अमूर्तत्वानें, निराकारपणें. २ *in an unimportant manner or degree* क्षुल्लकपणानें, अप्रमुखत्वानें, थोड्या प्रमाणानें. Im'materialness *n.* See Immateriality.

Immature ( im-a-tūr' ) [ L. *in*, not, & Mature.] *a. not mature, not ripe or perfect* कोवळा, कच्चा, हिरवा, अपक्व, बाल, अप्रौढ, अप्राप्तयौवन. ( *b* ) ( of understanding &c. ) अप्रबुद्ध, अप्रगल्भ, बालिश, अधुरा, अर्धवट, कोता. २ *come before the natural time, premature* अकालिक; as, "I. death". Immatured' *a.* Same as above. Immature'ly *adv.* अपक्वपणें, कच्चेपणानें. २ अप्रबुद्धपणें, अप्रल्भतेनें. Immature'ness, Immatu'rity *n. imperfectness, unripeness* कोवळेपणा *m*, कोवळीक *f*, कच्चेपणा *m*, अर्धवटपणा *m*, अपक्वता *f*, अपक्वपणा *m*, अपक्वदशा *f*. २ अप्रगल्भता *f*, अप्रगल्भपणा *m*, बालिशता *f*. ३ अकालिकत्व *n*.

Immeasurable ( im-mezh'ūr-a-bl ) *a.* मोजतां येत नाहीं असा, मोजतां न येणारा, अपरिमेय, अमेय.

Immediate ( im-mē'di-āt ) [ Fr. –L. *in*, not & *medius*, middle. ] *a. with nothing in the middle between two objects, close* अव्यवहित, निरन्तर ( *lit.* ), निरवकाश. ( a ) ( in respect to *place* ) *proximate* लगतचा, निकट, जवळचा, भिडून असलेला. ( b ) ( in respect to *time* ) *present, without delay* तात्कालिक, लगेचचा, अचिर, तेव्हांचा, एव्हांचा, तत्क्षणिक, तत्कालचा, अव्यवहितकालिक. २ *not acting by second causes, direct* प्रत्यक्ष, साक्षात्चा, साक्षात्संबंधीं; as, "An I. cause." [ I. INFERENCE अव्यवहित अनुमान.] *n.* ३ *bot.* निकट, अनंतर (*lit.*). Imme'diacy *n. immediateness* अव्यवधान *n*, व्यवधानराहित्य *n*, साक्षात्संबंध *m*, &c. Imme'diately *adv.* (–of place) *proximately* लागून, भिडून, निकटत्वानें. ( b ) (–of time) *instantly* लगेच, लागलाच, तत्काल or तात्काल, ताबडतोब, तत्क्षणीं. २ *directly* साक्षात्पणें. Imme'diateness *n.* अव्यवहितत्व *n*, निकटपणा *m*, निकटवर्तित्व *n*, अनन्तरत्व *n*. २ साक्षात्संबंध *m*. ३ तत्कालिकत्व *n*, तात्काळपणा *m*.

Immemorable ( im-mem'ōra-bl ) *a. not memorable, not worth remembering* विशेष रीतीनें ध्यानांत न ठेवण्यासारखा, क्षुद्र, यःकश्चित्.

Immemorial ( im-me-mō'ri-al ) [ Fr. –L. *in*, not & Memorial. ] *a. beyond the reach of memory, very ancient* स्मृतिकालातीत, अस्मार्तकालिक, आठवणीपलीकडचा, स्मरणातिक्रांत, फार जुना, अतिप्राचीन, पुराण, अनादि. [ I. SUCCESSION अनादिपरंपरा *f.* I. USAGE, CUSTOM, &c. अनादिपरंपराप्राप्त -अनादिकालापासून चालत आलेली चाल *f*, किंवा वहिवाट *f*. FROM TIMES I. अनादिकालापासून. ] Immemo'rially *adv.*

Immense ( im-mens' ) [ Fr. –L. *immensus* –*in*, not, & *mensus*, pa. p. of *metior*, to measure. ] *a. that cannot be measured, immeasurable, unlimited* अमर्याद, अमेय, मोजतां न येणारा, निस्सीम (*lit.*), अपरिमेय. २ (in commonest use) *very large, vast in extent* अपार, अफाट, अवाढव्य, बहुत, फारच, भारी, रगड, पुष्कळ, प्रचंड, अजस्र. Immense'ly *adv. infinitely* अनन्त पटीनें, पुष्कळ पटीनें, पुष्कळ, बहुत, कितीतरी. Immense'ness, Immens'ity *n. immeasurable or limited extent, infinity* अमर्यादपणा *m.* ( *lit.*), अमर्यादत्व *n*, अपरिमेयत्व *n*, आनंत्य *n*. [I. *infinite space* महाकाश *n*, FILLING OF I. त्रैलोक्यविस्तार *m*. THAT FILLETH I. त्रैलोक्य-व्यापी -व्यापक.] २ *greatness* अफाटपणा *m*, अवाढव्यपणा *m*, बहुतपणा *m*.

Immensurable ( im-mens'ūr-a-bl ) [ Fr. –L. *in*, not, and *mensurabilis* –*metior*, to measure. ] *a.* See Immeasurable. Immensurabil'ity *n.* अपरिमेयता *f.*

Immerge ( im-mėrj' ) [ L. *in*, into, and *mergere, mersus*, to plunge. ] *v. t.* See Immerse below. Immerg'ed *p. t.*

Immerse ( im-mėrs' ) [ See Immerge above. ] *v. t. to plunge something into* ( esp. into a fluid ), *to dip, to sink* बुडविणें, डुबविणें, मज्जित करणें, मज्जन -निमज्जन करणें *g. of o.* २ *to engage deeply, to overwhelm* गुंग -गरक -मग्न -निमग्न करणें, (मन किंवा लक्ष) पुरें ओढून -वेधून घेणें -गुंतवणें; as, "To be I.ed in the enjoyments of life'." ३ *math.* मग्न -निमज्जित करणें. Immersed' *p. p.* & *a.* बुडवलेला, मज्जित, निमज्जित, अवगाहित. २ गुंग, गरक, गर्क, निमग्न, मग्न, गढलेला, गढून गेलेला, तल्लीन, आप्लुत ( in comp. & in fig. uses; as, शोकाप्लुत). Immer'sion *n. a sinking within a fluid* : ( a ) –*the act* बुडविणें *n*, निमज्जन *n*. ( b ) –*the state* स्नान *n*, अवगाहन *n*, बुडी *f*, मज्जन *n*. २ *the state of being deeply engaged, absorption* निमग्नता *f*, तल्लीनता *f*, लय *m*, गुंगी *f*, तन्मयता *f*. ३ *astron. the disappearance of a celestial body* ( oppo. to *emersion* ) अस्त *m*, निमज्जन *n*, निमीलन. [EASTERN I. पूर्वास्त *m*. WESTERN I. पाश्चिमास्त *m*.]

Immethodical ( im-me-thod'ik-al ) [ L.–*in*, not, & Methodical. ] *a. without method or order, irregu-*

*lar* अपद्धतिक, ठराविक पद्धत नसलेला, बिनशिस्तीचा. Immethod'i-cally *adv.* पद्धत सोडून. Immethod'ic-alness *n.* अपद्धतिकता *f,* गोंधळ *m,* क्रमाभाव *m.*

Immigrate ( im'i-grāt ) [ L. *immigrare, in,* into and *migrare,* to remove. See Migrate.] *v. i. to migrate or remove into a country of which one is not a native, for the purpose of permanent residence* ( स्वदेश सोडून ) परदेशीं रहावयास जाणें, ( वसाहत करण्यासाठीं ) देशांतरीं जाणें, देशांतर करणें. *N.B.* :– Note the distinction between *emigrate* and *immigrate.* Imm'igrant *n. one who immigrates* ( the correlative of *emigrant* ) परदेशीं रहावयास जाणारा, देशांतर करणारा. Immigra'tion *n.* ( स्वदेश सोडून केलेला ) देशांतरप्रवेश *m,* परदेशवास *m,* वसाहतीकरितां परदेशांत जाणें *n,* परदेशगमन *n.*

Imminent ( im'i-nent ) [ L. *imminens, –entis –in,* upon, and *minere,* to project. ] *a. near, at hand, impending, threatening to occur immediately* ( said esp. of misfortune or peril ) जवळ येऊन ठेपलेला, अगदीं जवळचा, खेटलेला, नेटलेला, आसन्न. २ *full of danger, menacing, perilous* धोक्याचा, भयाचा, जोखमाचा, संकटमय; as, "Hairbreadth escapes in the *imminent* deadly breach." Im'minence *n. the condition of being imminent* आसन्नवर्तित्व *n,* निकटवर्तित्व *n.* २ *impending evil or danger* जवळ येऊन ठेपलेलें संकट *n* -अरिष्ट *n* -भय *n* -धोका *m.* Im'minently *adv.*

Immiscible (im-is'i-bl) *a. not capable of being mixed* अमिश्रणीय, अमेलनीय, अमेल, मिश्रण करितां न येणारा.

Immit ( im-mit' ) [L. *in,* into, and *mittere,* to send.] *v. t. to send into, to inject* ( correlative of *emit* ) आंत घालणें -भरणें. Immis'sion *n.* आंत घालणें *n*-भरणें *n,* अन्तःक्षेप *m.* Immit'ted *pa. t.*

Immitigable ( im-mit'i-ga-bl ) [ L. *in,* not, & *mitigare,* to mitigate. ] *a. not capable of being mitigated, softened, or appeased* कमी करतां न येण्यासारखा, शांत करतां न येण्यासारख्या. Immit'igably *adv.*

Immobility ( im-mo-bil'i-ti ) [ Fr. –L. *in,* not, and Mobility, which see. ] *n. the being immovable* अचलता *f,* अचलपणा *m,* निश्चलता *f,* स्थिरपणा *m,* स्थाणुत्व *n.* Immo'bile *a. immovable, fixed* अचल, अचळ, स्थिर, दृढ, स्थाणु. Immob'ilise *v. t.* अचल करणें, स्थैर्य आणणें, घट्ट-स्थिर बसवणें.

Immoderate ( im-mod'ér-āt ) [ L. *in,* not, and Moderate. ] *a. not moderate, exceeding proper limits* अनेमस्त, अतिमर्याद, अमर्याद, मर्यादातिक्रम करणारा, नेमस्तप्रमाणाबाहेरचा. Immod'erately *adv.* अनेमस्तपणानें, मर्यादातिक्रम करून. Immod'erateness *n.* अनेमस्तपणा *m,* मर्यादातिक्रम *m,* प्रमाणाधिक्य *n,* बेहद्दपणा *m,* बेहद्द *f,* अतिरिक्तपणा *m,* फाजीलपणा *m,* बेसुमारपणा *m.* Immodera'tion *n. want of moderation* नेमस्तपणाचा अभाव *m,* अनेमस्तपणा *m.*

Immodest ( im-mod'est ) [ Fr. –L. *in,* not, and Modest.] *a. wanting shame or delicacy, impudent, indecent, indelicate* निर्लज्ज, निलाजरा, धृष्ट, दांडगा, बेशरम, लज्जाहीन -शून्य, विलज्ज. Immod'estly *adv.* निर्लज्जपणानें, बेशरमपणानें. Immod'esty *n. indecency* निर्लज्जपणा *m,* निलाजरेपणा *m,* बेशरमपणा *m,* धृष्टता *f,* दांडगेपणा *m,* औद्धत्य *n.*

Immolate ( im'o-lāt ) [ Lit. 'to sprinkle meal on a victim'; L. *immolare –in,* upon, and *mola,* meal.] *v. t. to offer in sacrifice, to kill as a sacrificial victim* ( यज्ञांत ) हवन करणें, बलिदान करणें, बलि देणें *g. of o.* Immola'tion *n.* हवन *n,* बलिदान *n,* बलि *m,* आहुति *f.* Immola'tor *n.* हवन करणारा.

Immoral ( im-mor'al ) [ Fr. –L. *in* not, and Moral.] *a. not moral, inconsistent with good morals or with what is right, wicked, unjust, vicious:* ( a ) ( of persons ) अनीतिमान्, दुराचरणी, दुराचारी, अनाचारी, असदाचरणी, दुष्ट, कर्मदुष्ट, दुष्कर्मी, दुर्वृत्त, दुश्चरित्र. ( b ) ( of acts or deeds ) अनीतीचा, अन्यायाचा, दुराचाराचा, अनाचाराचा, असाधु. Immoral'ity *n. vice* अनीति *f,* दुराचार *m,* दुराचरण *n,* असदाचरण *n.* २ *an immoral act or practice* दुष्कर्म *n,* अनाचार *m,* अधर्म *m,* दुष्कृत्य *n.* Immor'ally *adv.* अनीतीनें, दुराचारानें, अधर्मानें. २ *wickedly* दुष्टपणानें.

Immortal ( im-mor'tal ) [ Fr. –L. *in,* not, and Mortal. ] *a. not mortal, exempt from death, imperishable* अमर, अमर्त्य, अजरामर, मरणमुक्त, मरणातीत, अविनाशी, नाश न पावणारा, मरण न येणारा-पावणारा, अक्षय. [The I.s मरुद्गण]. २ *connected with, or pertaining to, immortality* अक्षय्य, निरंतरचा, अखंड, सततचा; as, "I have I. longings in me." ३ *never to be forgotten, imperishable* अमर, अचिर, शाश्वत, अढळ, अजर, चिरस्थायी, चिरस्मरणीय, अविस्मरणीय; as, "An I. name, fame &c." I. *n.* अमर, चिरंजीव. Immortal'ity *n.* Immor'talise *v. t.* अमर अजरामर &c. करणें. २ *to exempt from oblivion, to perpetuate in fame* ( -चें ) ( नांव -कीर्ति ) अजरामर करणें, चिरस्थायी करणें, चिरस्थायीपणा आणणें. Immortal'ity *n. unending existence, exemption from death* अमरत्व *n,* अमर्त्यत्व *n,* अजरामरपणा *m,* अमरपणा *m,* अमृत्यु *m,* मरणमुक्तता *f.* [ Writ of I. अमरपत्र *n,* अमरपट *m,* अमरपट्टा *m.*] २ *exemption for oblivion, perpetuity* चिरस्थायीपणा *m,* चिरस्थायित्व *n,* अढळपणा *m,* चिरस्मरणीयता *f,* शाश्वती *f.* Immor'tally *adv.* अमरत्वानें, कायमपणानें.

Immovable ( im-mōōv'a-bl ) [ Fr. –L. *in,* not, and Movable.] *a. firmly fixed, steadfast, fast, unalterable, unchangeable:* ( a ) ( used of material things ) अचल, निश्चल, अचर, अढळ, पक्का, मजबूत बसलेला, न हालणारा. ( b ) ( used of the mind or will ) निश्चल, न चलणारा-चळणारा, न फिरणारा, ठाम, खंबीर,

निश्चयी, निश्चयाचा, धीराचा, धीर (*adj.*), न पालटणारा -बदलणारा. २ *not capable of being moved or affected in feeling, unimpressible* अविकारी, अव्यय, पाझर न फुटणारा, न द्रवणारा, द्रव न येणारा, कठिण, ताठ (मन), घट्ट (मन). ३ (*law*) स्थावर. I. *n.* स्थावर वस्तु *f.* २ *pl.* (*law*) *lands and things adherent thereto by nature* स्थावर इस्टेट *f* -चीजवस्तु *f* -माल *m* -मालमिळकत *f.* Immov'ableness *n.* स्थावरपणा *m*, अचलता *f.* २ निश्चलता *f*, निश्चळपणा *m.* ३ काठिण्य *n*, ताठपणा *m*, (मनाचा) घट्टपणा *m.* ४ (*law*) स्थावरपणा *m.* Immov'ably *adv.* अढळपणानें, कायमपणानें, दृढत्वानें.

Immunity (im-mūn'i-ti) [Fr- -L. *im* (=*in*), not, and *munis*, serving, obliging; cf. *munus*, service, duty. ] *n. freedom from any obligation or duty, a particular privilege* सूट *f*, मोकळीक *f*, माफी *f*, सोड *f*, सोडवणूक *f.* २ *freedom, exemption* मुक्ति *f*, राहित्य *n*, अभाव *m*, मुक्तता *f*, मोचन *n*; as, "I. from error, danger, exertion, &c." The sense is brought out by prefixing अ or अन् before a word; as, अभय, अपाप, अनायास. ३ *med. protection by inoculation* (एखाद्या रोगापासून) निर्भयता *f.* Immune' *a. exempt:* (a) सुटा, सुटलेला, मोकळा, माफी मिळालेला. (b) रहित. (c) (एखाद्या रोगापासून) निर्भय.

Immure (im-mūr') [Fr. -L. *in*, in, and *murus*, a wall. याचा मूळ अर्थ '(-च्या) सभोंवतीं भिंत घालणें -बांधणें' असा होता. ] *v. t. to wall in, to shut up,* (hence) *to imprison* (भिंतीच्या आंत) कोंडणें, कोंडून ठेवणें, तुरुंगांत घालणें -टाकणें, अटकेंत ठेवणें, कैद करणें. Immure'ment *n.* -*the act.* अडकवणें *n*, कोंडणें *n*, &c. २ *imprisonment* कैद *f*, तुरुंगवास *m*, अटक *f*, कैदेची शिक्षा *f.*

Immutable (im-mūt'a-bl) [Fr. -L. *in*, not, and *Mutable*, which see. ] *a. not mutable, unchangeable, unalterable* अविकार्य, ज्याचा पालट होत नाहीं असा, बदलतां -फिरवतां न येणारा, अविकार, निर्विकल्प, विकारातीत, कूटस्थ, नित्यसम, सतत कायम राहणारा. Immutabil'ity *n.* अविकारता *f*, अविक्रियत्व *n*, अविकारीपणा *m*, नित्यसमता *f*, कायमपणा *m.* Immut'ableness *n.* Immut'ably *adv.* न ढळेसा, न फिरेसा, फेरबदल न होईसा.

Imp (imp) [ Lit. and orig. *a graft, offspring*; from Low L. *impotus*, a graft -Gr. *emphytos*, ingrafted -*en*, and root *phy-*, to grow; akin to Be. ] *n. a little devil or evil spirit, a contemptible evil worker* तरुणभूत *n*, सैतान *m.* I. *v. t.* (*falconry*) *to mend a broken or defective wing by inserting a feather, to qualify for flight* तुटलेला किंवा कमकुवत असलेला पंख नवीन पीस घालून दुरुस्त करणें, (पक्ष्याच्या आंगीं) उडण्यालायक शक्ति आणणें. २ (hence) *to equip* भरपूर तयारी करून देणें, सरंजाम देणें, समर्थ करणें; as, "*Imp* out our drooping country's broken wing". Imp'ish *a.* सैतानासारखा.

Impact (im'pakt) [ L. *impactus*, pa. p. of *impingere*, to push against. See Impinge. ] *v. t. to drive close, to press firmly together* घट्ट चेपणें, (-वर) आघात करणें. I. *n. a striking against, a collision, contact or impression by touch* धका or धक्का *m*, धडका *m*, टक्कर *f*, आघात *m.* २ *the blow of a body in motion impinging on another body* संघात *m.* Impac'tion *n. med. a lodgment of something in a strait or passage of the body* धक्का बसल्यामुळें एक वस्तु दुसऱ्यांत शिरून गच्च बसणें *n*, प्रसक्ति *f.*

Impair (im-pār') [ M. E. *empeiren* -L. *im* (=*in*), intensive, and Low L. *pejorare*, to make worse -L. *pejor*, worse.] *v. t. to make worse, to injure, to weaken* (कायमचा) जास्त वाईट करणें, अधिक बिघडविणें, बिनसवणें, खराब करणें, हानि *f* -नुकसानी *f* -खराबी *f.* करणें *g. of o.* I. *v. i. to grow worse, to deteriorate* बिघडणें, अधिक वाईट होणें, बिनसणें. Impair'ed *pa. t. & p. p.* Impair'er *n.* Impair'ing *pr. p. & v. n.* Impair'ment *n. injury* हानि *f*, नुकसानी *f*, खराबी *f*, बिनस *m*, बिघाड *m.*

Impale (im-pāl') [ L. *im* (=*in*), and *palus*, a pale. ] *v. t. to pierce with a pale* सुळीं देणें. २ *to surround* घेरणें, वेष्टणें, (चोहोंकडून) कोंडणें. Impale'ment *n.* शूलारोपण *n*, सुळीं देणें *n.* २ वेष्टन *n*, आवार *n*, कूड *m*, कुंपण *n* or *f.*

Impalpable (im-pal'pa-bl) [ Fr.. -L. *in*, not, and Palpable. ] *a. that cannot be felt, not coarse, very fine* अति सूक्ष्म, हाताला न समजणारा -लागणारा, अगदीं बारिक; as, "I. powder". २(hence) *not perceivable by touch, intangible, not material* स्पर्शातीत, स्पर्शाज्ञेय, अव्यक्त, अग्राह्य, त्वगिंद्रियातीत, त्वगिंद्रियागोचर; as, "I. void, bodiless." ३ *not easily understood, not apprehensible* अग्राह्य, दुर्बोध्य, गहन, लक्षांत येण्यास कठीण -अवघड, न समजण्यासारखा; as, "I. distinctions." Impalpabili'ty *n.* अतिसूक्ष्मता *f.* (applicable in all the three different senses). Impal'pably *adv.* अतिसूक्ष्मपणानें -सूक्ष्मतेनें.

Impanel, Impannel (im-pan'l) [ L. *in*, in, and Panel. ] *v. t.* (written also *Empanel*) *to enter* (the names of a jury) *in a list or on a piece of parchment called a panel* (ज्यूरींतील) पंचांचीं नांवें पटावर मांडणें -नोंदणें -लिहिणें, पंच निवडून त्यांची यादी मुक्रर ठरविणें -करणें. Impan'elled *pa. t. & p. p.* Impan'elling *pr. p. & v. n.* Impan'elment *n.*

Imparipinnate (im-pari-pin'nāt) [ L. *impar*, unequal, and E. *pinnate.* ] *a. bot. pinnate with a single terminal leaflet* विषमसंयुक्तपर्णक.

Imparity (im-par'i-ti) [ L. *in*, not, and Parity.] *n. want of parity or equality, inequality, incongruity* असमानता *f*, साम्यताभाव *m*, साम्याभाव *m*, वैषम्य *n*, विषमता *f*, भिन्नता *f*, तफावत *m* or *f*, अंतर *n.* २ *indivisibility into equal parts* असमविभाज्यता *f.*

Impark (im-pärk') [L. *in*, in, and Park.] *v. t. to inclose for a park* मृगयाभूमि किंवा शिकारखाना कुडून करणें. २ (hence) *to inclose, to shut up* कोंडणें, कोंडून ठेवणें.

Impart (im-pärt') [O. Fr. –L. *impartire* –*in*, on, and *partire*, to divide –*pars, partis*, part, share.] *v. t. to bestow a part of, to allow another to partake in, to give* (अंशतः) देणें, (-चा) भाग देणें, (थोडेंबहुत दुसऱ्यास) देणें; as, "To I. food to the poor." २ *to make known, to tell* (दुसऱ्यास) माहीत करणें, विदित करणें, सांगणें, उघड करून दाखविणें; as, "When I did first I. my love to thee". I. *v. i.* (-ला) देणें. Impart'ance, Imparta'tion *n.* देणें *n*, दान करणें *n*, अंशदान *n.* Impart'er *n.* दाता *m* (*lit.*), देणारा. Impart'ible [from *impart.*] *a. capable of being imparted* देण्याजोगा, देण्यासारखा, दानयोग्य. Impartibil'ity *n.* देयता *f.*

Impartial (im-pär'shal) [Fr. –L. *in*, not, and Partial.] *a. not partial, not favouring one more than another, equitable, fair, just* अपक्षपाती, निष्पक्षपाती, समानदृष्टीचा, समदृष्टि, उभयपक्षीं समान, पक्षपात न करणारा, समानवृत्ति, रास्त, वाजवी, योग्य दिसेल तें करणारा, भाडभिड न धरणारा, (loosely) उदासीन. २ निष्पक्षपाताचा, समदृष्टीचा. Impartial'ity *n. freedom from bias* निष्पक्षपात *m*, समदृष्टी *f*, समानबुद्धि *f* वृत्तिसमता *f*, समन्याय *m*, अपक्षपात *m*, (loosely) औदासिन्य *n.* Impar'tially *adv.* निष्पक्षपातबुद्धीनें, समबुद्धीनें, न्यायानें. Impartialness *n.* Same as Impartiality.

Impartible (im-pärt'i-bl) [L. *in*, not, and *Partible* –*pars*, part.] *a. not partible, indivisible* अविभाज्य, भाग पाडतां न येणारा; as, "I. estate". Impartibil'ity *n.* अविभाज्यता *f.*

Impassable (im-pas'a-bl) [L. *in*, not, and Passable.] *a. not capable of being passed, not admitting a passage* अगम्य, दुर्गम, दुस्तर, अलंघनीय, दुर्लंघ्य, जाण्यास किंवा उल्लंघन करण्यास कठीण. Impassabil'ity, Impass'ableness *n.* अलंघनीयता *f*, अगम्यता *f*, दुर्लंघ्यता *f*, दुस्तरपणा *m.* Impass'ably *adv.*

Impassible (im-pas'i-bl) [Fr. –L. *impassibilis* –*in*, not, and *patior, passus*, to suffer.] *a. incapable of passion or feeling, inaccessible to harm or pain* दुःखातीत, दुःखावेगळा, दुःखानिराळा, निगरगट्ट, मनावर परिणाम होत नाहीं असा; as, "I. to the critic." Impassibil'ity, Impass'ibleness *n.* निगरगट्टपणा *m.*

Impassionate (im-pash'un-āt) [L. *in*, intensive, & Passion.) *a. moved by strong feeling or passion, animated, excited* आवेश भरलेला, आवेशयुक्त, सद्गदित.

Impassionate (im-pash'un-āt) [L. *in*, not, & *Passionate.*] *a. without passion or feeling* विरक्त, विरागी, कोणताही परिणाम न होणारा.

Impassioned (im-pash'und) [L. *in*, intensive, & Passioned.] *a. showing warmth of feeling, ardent, excited* प्रबलमनोविकारान्वित, प्रबलमनोविकारयुक्त.

Impatience (im-pā'shuns) [L. *in*, not, and Patience.] *n. want of patience, fretfulness; restlessness* (a) असहनशीलता *f*, असहनशीलपणा *m*, असहिष्णुता *f*, असोशिकपणा *m*, अधीर *m*, अधैर्य *n*, अक्षमता *f.* (b) (hence) अधीरपणा *m*, अधीराई *f*, उतावळ *f*, औत्सुक्य *n*, उत्कंठा *f*, हुटहूट *f*, खुरखूर *f*, खवखव *f*, विलंबासहन *n*, हुळहूळ *f.* Impa'tient *a. not able to endure* असोशिक, असहनशील, असहिष्णु, अधीर, अक्षम, असह, अधिऱ्या, धैर्यहीन. २ (hence) *not able to wait* उतावळा, दम न धरणारा, वाट न पाहणारा, उत्सुक, सोत्कंठ, सोत्कंठित, हवला, हुडहुड्या, हुळहुळ्या. ३ उतावळीचा, धांदलीचा; as, "An I. speech or reply". Impa'tiently *adv.* असहिष्णुतेनें, अधीरपणानें, अधैर्यपूर्वक. २ उतावळीनें, उत्सुकतेनें, उत्कंठेनें.

Impawn (im-pawn') [L. *in*, intensive, and Pawn.] *v. t. to pawn or deposit as security* तारण गहाण लावणें.

Impeach (im-pēch') [Lit. 'to hinder', Fr. *empêcher*; either from L. *impingere*, to strike against, or *inpedicare*, to fetter. See Impinge. Impeach याचा मूळ अर्थ 'अडथळा -हरकत -अडचण करणें' असा होता.] *v. t. to charge with a crime, to accuse, to cite before a tribunal for judgment of official misconduct* (said esp. of a public officer) सार्वजनिक रीतीनें दोषारोप करणें *with* वर *of o.*, (-ला) दोष लावणें, (गैरवर्तनाबद्दल) न्यायासनासमोर आणणें, तोहमत ठेवून (सरकारी कामगाराची) न्यायासनापुढें चौकशी करविणें. २ (hence) *to charge with impropriety, to call in question* (-च्या सद्वर्तनाबद्दल किंवा सद्धेतूबद्दल) संशय घेणें -येणें *in. con. with* ला *of s.*, (वर) आक्षेप -शंका काढणें, (-च्या संबंधानें) साशंक असणें, तकरार करणें, दोषार्ह समजणें; as, "To I. one's motives or conduct." ३ (*law*) *to discredit the credibility of a witness or the validity of a paper &c.* (साक्षीदाराच्या बोलण्यावर किंवा कागदपत्रांच्या खरेपणावर) विश्वास न ठेवणें, खरें न समजणें, खोटें आहे असें मानून चालणें. Impeach'able *a.* दोषार्ह, दोषारोपास पात्र. Impeach'er *n.* Impeach'ment *n.* (सरकारी कामगारावर दोषारोप करून त्यास) चौकशीसाठीं न्यायासनासमोर आणणें *n*, (एखाद्या सार्वजनिक स्वरूपाच्या मोठ्या गुन्ह्याबद्दल) तोहमत -दोष ठेवणें *n*, आरोप करणें *n.* २ शंका *f*, आशंका *f*, (दुसऱ्याच्या सद्धेतूबद्दल मनांत आलेला) संशय *m*, तकरार *f.*

Impearl (im-pērl') [L. *in*, in, and Pearl.] *v. t.* (*Poetic*) *to form into pearls* (-ला) मोत्यांसारखें रूप देणें, मोत्यांप्रमाणें करणें -बनवणें; as, "Dewdrops which the sun *impearls* on every leaf". २ *to adorn as with pearls* (मोतीं घातल्याप्रमाणें) सजविणें -शृंगारणें; as, "The morning dews I. every thorn".

Impeccable (im-pek'a-bl) [L. *in*, not, and Peccable.] *a. not liable to sin* ज्यापासून पाप होण्यासारखें नाहीं असा, पापसंभवातीत, पापसंभवशून्य -रहित, पापातीत, पापापात्र, अपाप, निष्पाप, पापासंगी. I. *n.* पापसंभवातीत मनुष्य *m.* Impeccabil'ity *n.* पापासंभव *m,* अपापता *f,* निष्पापता *f;* पापसंभवशून्यता *f.* Impecc'ancy *n. sinlessness* निष्पापता *f.* Impecc'ant *a.* निष्पाप, अपाप, पापरहित.

Impecunious (im-pe-kū'ni-us) [L. *in*, not, and *pecunia*, money. L. *pecunia* seems to be allied to Sk. पशु, cattle, which was the old form of wealth in India.] *a. having no money, poor* बिनपैसेवाला, निष्कांचन, निर्द्रव्य, धनहीन, गरीब. Impecunios'ity *n.* निष्कांचनता *f,* धनहीनता *f,* गरिबी *f.*

Impede (im-pēd') [Lit. 'to entangle the feet'–L. *impedire* –*in*, in, and *pes*, *pedis*, Sk. पद, foot.] *v. t. to hinder, to obstruct* विघ्न *n* -अडथळा *m* -हरकत *f* करणें, मोडा घालणें, अडती *f* -आडकाठी *f.* घालणें, अटकावणें. Imped'iment *n. hinderance* विघ्न *n,* अडथळा *m,* हरकत *f,* प्रतिबंध *m,* मोडा *m,* अटकाव *m,* अडती *f,* अंतराय *m.* [I.s OF LAW कायदेशीर रीतीनें चालल्यामुळें नित्यव्यवहारांत येणाऱ्या अडचणी *f. pl.* I. OF SPEECH *a defect preventing fluent speech* बोलण्यांत -बोलतांना अडखळणें *n,* वाक्स्खलन *n,* बोलण्यांतील खोड *f.*] Impedimen'tal *a.* बाधक, नडींव, नडीचा. Imped'itive *a.* नडणारा, नड -अडचण &c. करणारा, बाधक; as, "Cumbersome, and I. of motion."

Impel (im-pel') [L. *in*, on, and *pellere*, to drive.] *v. t. to drive or urge forward, to press on* पुढें लोटणें -ढकलणें -सारणें -चालवणें, दपटणें, दामटणें; as, "The surge *impelled* me on a craggy coast." २ *to incite to action* प्रेरणा करणें,उत्तेजन देणें, (कार्यास) प्रवृत्त करणें. Impel'lent *a.* पुढें लोटणारा -ढकलणारा -सारणारा. २ प्रेरणा करणारा, प्रवर्तक. I. *n. an impelling power or force* प्रवर्तक शक्ति *f,* प्रेरणा *f.* Impel'ler *n.*

Impend (im-pend') [L. *in*, on, and *pendere*, to hang.] *v. t. to hang over* डोक्यावर लोंबणें, डोईवर (येऊन) टेंकणें, पडण्याच्या संधानास येणें -बेतांत असणें. २ *to threaten, to be near or imminent* जवळ येऊन ठेपणें -खेटणें -टेंकणें -बितणें, भिडणें, टेकावणें, नेटणें; as, "Destruction sure over all your heads *impends.*" Impend'ence, -cy *n.* पतनोन्मुखता *f,* डोईवर टेंकलेलेपणा *m.* Impend'ent, Impend'ing *a.* उपस्थित, आसन्न, जवळ ठेपलेला, डोईवर टेंकलेला, पतनोन्मुख. See Imminent.

Impenetrable (im-pen'e-tra-bl) *a. incapable of being pierced* अभेद्य, दुर्भेद्य, *phys.* निर्भेद्य; as, "An I. shield." २ *not to be impressed in mind or heart* कठिण, वज्राप्रमाणें कठोर, निष्ठुर, असंस्कार्य. Impen'etrability *n.* अभेद्यता *f,* दुर्भेद्यता *f, phys.* निर्भेद्यता *f.* ३ काठिन्य *n,* कठीणपणा *m,* कठोरपणा *m.* ४ *stupidity, coldness* मूर्खपणा *m,* मौर्ख्य *n,* बेदरकारी *f.* Impen'etrableness *n.* Impen'etrably *adv.* अभेद्यपणानें, दुर्भेद्यतेनें.

Impenitent (im-pen'i-tent) [L. *in*, not, & Penitent.] *a. not repenting of sin* अपश्चात्तापी, पश्चात्तापशून्य, अनुतापशून्य, पश्चात्ताप न पावणारा. २ *of a hard heart* कठीण -घट्ट मनाचा, निगरघट्ट. Impen'itence,-cy *n.* अपश्चात्ताप *m,* अननुताप *m.* Impen'itently *adv.* अपश्चात्तापपूर्वक. २ मन कठीण करून.

Impennate (im-pen'āt) [L. *in*, not, and Pennate.] *a. wingless* पंखहीन, पंख नसलेला. २ *zool. having very short wings useless for flight* (उडण्याच्या उपयोगीं न पडण्याइतके) आंखूड पंख असलेला.

Impennous (im-pen'us) Same as Impennate.

Imperative (im-per'a-tiv) [Fr. –L. *imperativus* –*imperare*, to command –*in*, and *parare*, to prepare.] *a. expressive of command, authoritative, commanding* आज्ञापक, आज्ञा -हुकूम देणारा -सोडणारा -करणारा, हुकुमाचा, अधिकाराचा, अधिकारयुक्त; as, "I. orders." २ *obligatory, binding, compulsory* अवश्यकर्तव्य, अवश्यमाननीय, अवश्य करावयाचा, बंधक, केल्याशिवाय न चालणारा; as, "An I. duty." ३ *gram.* आज्ञार्थक (अर्थ=mood). I. *n. gram.* आज्ञार्थ *m.* २ आज्ञार्थी क्रियापद *n.* Imper'atively *adv.* आज्ञा म्हणून, हुकमतीनें. २ *gram.* आज्ञार्थी, आज्ञार्थानें.

Imperator, Same as Emperor.

Imperceptible (im-pėr-sep'ti-bl) [L. *in*, not, and Perceptible.] *a. not perceptible, not discernible, insensible* समजण्यांत न येणारा, अगोचर, अतींद्रिय, इंद्रियातीत, अव्यक्त, बेमालूम. २ *minute* अगदीं बारीक, अतिसूक्ष्म. Imperceptibil'ity *n.* अगोचरता *f,* अतींद्रियता *f,* बेमालूमपणा *m.* २ अतिसूक्ष्मता *f.* Impercep'tibleness *n.* Impercep'tibly *adv.* कळे न कळेसा, कळत न कळत, नकळत, हळूच, हलकेच.

Imperception (im-pėr-sep'-shun) *n. want of perception* ज्ञानाभाव *m.*

Imperfect (im-pėr'fekt) [Fr.–L. *in*, not, and Perfect.] *a. incomplete* अपूर्ण, अपुरा. २ *defective, wanting in some elementary organ* व्यंग, न्यूनांग, हीनांग, न्यून, हीन, अंगहीन, कच्चा, कसरीचा. ३ *morally or æsthetically defective* सदोष, दोषयुक्त, व्यंग असलेला. I. flower *bot. a flower wanting either stamens or pistils* व्यंग पुष्प *n,* नरकेसररहित -स्त्रीकेसररहित पुष्प *n.* I. number *math. a number either greater or less than the sum of its divisors* अपूर्ण संख्या *f.* Cf. Perfect number=पूर्णसंख्या *f.* I. obligations *obligations as of charity or gratitude which cannot be enforced by law* कायद्यानें ज्यांची अम्मलबजावणी करितां येत नाहीं अशीं दानधर्मादिकांसंबंधीं कर्तव्यें *n. pl.* I. tense *gram. a tense expressing past time and incomplete action* अपूर्ण भूत.

काळ *m*, चालू भूतकाळ *m*. Imperfec'tion *n*. *incompleteness* अपूर्णता *f.* २ *defectiveness* न्यूनता *f*, व्यंगता *f*, क्षति *f*, कचेपणा *m*. ३ कसर *f*, खोड *f*, दोष *m*, न्यून *n*, छिद्र *n*, वैकल्य *n*, कलंक *m*, गौण *n*, गुंजावीस *f*, विग *n*, गोम *f*. Imper'fectly *adv.* अपूर्णपणें, अपुरतेपणीं, अपुरता, अपुरा, कच्चा, कसरीनें, कसर राखून. Imper'fectness *n*. अपूर्णता *f*, &c.

Imperforable (im-per'-fo-rabl) [L. *in*, not, and Perforable.] *a. incapable of being bored through* छेद पाडतां न येण्यासारखा, नीरंध्र, अच्छिद्र, अवेध्य.

Imperforate (im-per'fo-rāt) *a. not pierced* अवेधित. I. anus गुदद्वाराभाव *m*, गुदद्वाररहित असण्याची स्थिति *f.*

Imperial (im-pē'ri-al) [Fr. –L. *imperialis* –*imperium*, sovereignty. See Empire.] *a. of or pertaining to an empire or to an emperor* (a) साम्राज्याचा, सार्वभौम राज्याचा, बादशाही. (b) सम्राटाचा, सार्वभौम अधिपतीचा, बादशहाचा; as, "An I. Government, an I. authority." २ (said in more recent times) ब्रिटिशसाम्राज्याचा, ग्रेटब्रिटनच्या साम्राज्याचा. ३ *of the nature or rank of an emperor or supreme ruler, ruling, commanding* बादशहाला शोभणारा, राजाधिराजाचा, सार्वभौम अधिपतीस शोभणारा, महेश्वराचा. ४ *having a commanding quality, demeanour, or aspect; majestic; exalted* बादशाही डौलाचा -दिमाखाचा, उमदा. ५ *domineering, imperious* बादशाही कडकपणाचा -करड्या अंमलाचा, बादशाही सत्ता चालविणारा, बादशाही गाजविणारा, सम्राट्दर्पाचा. ६ *of superior or unusual size or excellence* श्रेष्ठ प्रकारचा -जातीचा; as, "I. paper, I. tea, &c." ७ *appointed by a statute to be used all throughout the empire* साम्राज्यांतील सर्व मुलुखांत चालणारा; as, "I weights." I. rule चक्रवर्तित्व *n*, सम्राट्सत्ता *f.* Impe'rial *n. a tuft of hair under a man's lower lip* खालच्या ओंठावर ठेवलेला केसांचा झुपका *m*. २ *an outside seat on a diligence* चारचाकी बगीबाहेर बसण्याची बैठक *f.* ३ *a case for luggage on the top of a coach* घोडागाडीच्या टपावरील सामान ठेवण्याची पेटी *f.* ४ *anything of unusual size or excellence* (as, a large sheet of drawing, painting, or writing paper.) विशेष मोठ्या आकाराची किंवा उत्कृष्ट प्रकारची वस्तु *f.* ५ *a Russian gold coin of about 8 dollars* सुमारें २५ रुपये किंमतीचें रशियामधील 'इम्पीरिअल' नांवाचें सोन्याचें नाणें *n*. Impe'rialism *n. an imperial system of government* साम्राज्यपद्धति *f*, बादशाही राज्यपद्धति *f.* २ *the rule of an emperor esp. when despotic or arbitrary* जुलमी किंवा स्वच्छंदी बादशाहाचा अम्मल *m*. ३ *the principle or spirit of empire*, (in recent British politics) *the principle or policy* (1) *of seeking or at least not refusing an extension of the British Empire in directions where trading interests and investments require the protection of the flag, and* (2) *of so uniting the different parts of the Empire having separate governments as to secure that for certain purposes such as warlike defence, internal commerce, copyright, postal communication, they shall be practically a single state* साम्राज्यतत्त्व *n*, साम्राज्याचें वारें *n*. Impe'rialist *n*. साम्राज्यपक्षाचा मनुष्य *m*, सम्राटाचा अभिमानी. २ बादशाही अंमलाचा पुरस्कर्ता *m*. ३ (British and American politics) साम्राज्यवादी *m*, साम्राज्यपक्षाचा पुरस्कर्ता *m*.

Imperil (im-per'il) [L. *in*, in, and Peril.] *v. t. to put in peril, to endanger* धोक्यांत घालणें, जोखमांत पाडणें, संकटांत आणणें, (-वर) संकट आणणें. Imper'ilment *n*. –*the act.* धोका आणणें *n*. २ –*the state.* धोका *m*, जोखीम *n*, संकट *n*, &c.

Imperious (im-pē'ri-us) [L. *imperiosus.*] *a. assuming command, haughty, overbearing* कदरखोर, कदरवाला, जालीम, जहाल, कडक, करडा, कठीण कैदेचा, वचक बसविणारा, (दुसऱ्यांस उद्वेग उत्पन्न होईल अशा रीतीनें) सत्ता चालविणारा. २ *imperative, urgent* आवश्यक, जरूरीचा, अवश्यकर्तव्य, तांतडीचा, निकडीचा, ओढ लावणारा, चालढकल न करण्यासारखा; as, "An I. need." ३ *arrogant* मगरूर, गर्विष्ठ. Impe'riously *adv.* कदरेनें, करडेपणानें. २ निकडीनें, तांतडीनें, ओढ लावून. Impe'riousness *n*. कदर *f*, करडेपणा *m*. २ निकड *f.* ३ मगरुरी *f.*

*N. B.*—One who is *imperious* exercises his authority in a manner highly offensive for its spirit and tone. *Webster.*

Imperishable (im-per'ish-a-bl) [L. *in*, not, and Perishable.] *a. not subject to decay, indestructible, everlasting* अक्षय, अविनाशी, अक्षर, अनश्वर, नाश न पावणारा, न नासणारा -बिघडणारा, कुजून न जाणारा, चिरकाल टिकणारा -राहणारा. Imper'ishableness *n*. Imperishabil'ity *n*. अक्षय्यपणा *m*, अविनाशिता *f*, शाश्वती *f*, टिकाऊपणा *m*. Imper'ishably *adv.*

Impermeable (im-per'me-a-bl) [Fr. –L. *in*, not, and Permeable.) *a. not permitting passage, impenetrable* निर्भेद्य, दुर्भेद्य, अभेद्य, अप्रवेश्य, निबिड, &c. Impermeabil'ity, Imper'meableness *n*. निर्भेद्यता *f*, दुर्भेद्यता *f*, अभेद्यता *f*, &c. Imper'meably *adv.*

Impersonal (im-per'sun-al) [Fr. –L. *in*, not, and Personal.] *a. not representing a person, having no personality* अव्यक्तिवाचक, अव्यक्तिक, व्यक्तिनिर्देश -व्यक्तिबोध न करणारा, अपौरुष; as, "An almighty but I. power, called Fate." २ *gram. not varied according to the persons* अकर्तृक, (वाक्यांतील) पुरुषाप्रमाणें न बदलणारा. [I. VERB *gram.* अकर्तृक क्रियापद *n*, भाववाचक क्रियापद *n*.] I. *n*. भाववाचक क्रियापद *n*. Impersonal'ity *n*. अव्यक्तिवाचकत्व *n*, अव्यक्तिकत्व *n*. २ *gram.* भाववाचकत्व *n*. Imper'sonally *adv.* व्यक्तिबोध न करितां. २ भाववाचकपणानें.

**Impersonate** ( im-pėr'sun-āt ) [ L. *in*, in, and Personate. ] *v. t. to invest with personality, to endow with the form of a living being* मनुष्याचें रूप देणें, मनुष्याकृति देणें. २ *to ascribe the qualities of a person to, to personify* ( जड पदार्थावर ) मानवत्वारोप करणें, ( -वर ) मानवत्व लादणें, ( निर्जीव वस्तु ) मनुष्यच आहे असें मानणें -कल्पिणें -धरून चालणें. ३ *to assume or represent the person or character of* ( -ची ) भूमिका *f.* -सोंग *n* -वेष *m.* घेणें; as, "He I.ed Macbeth." Impersona'tion *n.*

**Impertinent** ( im-pėr'ti-nent ) [L. *in*, not, and Pertinent.] *a. not to the point, irrelevant* अप्रासंगिक, अप्रस्तुत, चालू विषयाबाहेरचा, मूळ मुद्याला सोडून, चालू प्रकरणाबाहेरचा. २ *saucy, impudent, rude* असभ्य, उद्धट, अविनीत, दांडगा, दांड, बेअदब, धट्ट. ३ *intrusive* लुडबुड्या, लुडबूड करणारा, आगंतुकी करणारा. ४ *trifling* निकामी, निरुपयोगी, क्षुल्लक. Imper'tinence *n.* अप्रासंगिकपणा *m*, अप्रस्तुतपणा *m*, अनन्वय *m.* २ उद्धटपणा *m*, धीटपणा *m*, धिटाई *f*, असभ्यता *f*, बेअदबी *f.* ३ आगंतुकी *f.* ४ निकामीपणा *m*, क्षुल्लकपणा *m.* ( b ) निकामी गोष्ट *f.* Imper'tinently *adv.* प्रसंग -अन्वय सोडून, दांडगेपणानें, उद्धटपणानें.

**Imperturbable** ( im-pėr-tur'ba-bl ) [ L. *in*, not, and *perturbere*, to disturb.] *a. that cannot be disturbed or agitated* अक्षोभ्य, अक्षोभणीय, क्षुब्ध न होणारा, घाबरून न जाणारा. २ *permanently quiet* नित्यशांत, थंड, धिमा, शांत. Imperturbabil'ity *n.* अक्षोभ्यता *f.* २ नित्यशांति *f.* Imperturba'tion *n.* अक्षोभ *m.*

**Imperviable**, Same as Impervious below.

**Impervious** ( im-pėr'vi-us ) [ L. *in*, not, and Pervious. ] *a. not to be penetrated* अप्रवेश्य, अभेद्य, दुर्भेद्य, निर्भेद्य, निबिड. Imper'viousness *n.* Imperviabil'ity *n.* अप्रवेश्यत्व *n*, अभेद्यत्व *n*, दुर्भेद्यता *f*, निबिडपणा *m*, झुडपी *f*, झुंगाड *n.*

**Impetigo** ( im-pe-tī'gō ) [ L. –*impetere*, to attack. ] *n. med. a cutaneous, pustular eruption, not attended with fever ; usually, a kind of eczema, with pustulation* ( ज्यामध्यें पुटकुळ्या उठून शरीरावर पुरळ येतो असा) एक त्वग्रोग *m*, विस्फोटक नांवाचें क्षुद्रकुष्ट *n.*

**Impetuous** ( im-pet'ū-us ) [L. *in*, upon, and *petere*, to seek or fall upon. ] *a. rushing upon with impetus or violence, furious, forcible, violent* पुष्कळ जोरानें वाहणारा -जाणारा, झपाट्याचा, तडाक्याचा, वेगवान्, सवेगगामी, जोराचा; as, "I. wind; an I. torrent." २ *vehement in feeling, passionate* कडक, तापट, तलख, तलख्या, साहसी, अमर्षी, जहाल, जलाल, आवेशानें धाडस करणारा. ३ *hasty* उतावळा, हूड. Impetuos'ity *n.* झपाटा *m*, तडाका -खा, कडाका -खा *m.* २ धाडसी स्वभाव *m*, धाडसीपणा *m*, तलखपणा *m*, साहस *n*, जहालपणा *m*, अमर्षता *f.* ३ उतावळेपणा *m*, हूडपणा *m.* Impet'uously *adv.* सपाट्यानें, तडाख्यानें २ तलखपणानें, धडकावून. ३ हूडपणानें, उतावळेपणानें. Impet'uousness *n.*

**Impetus** ( im'pe-tus ) [L. *in*, upon, and *petere*, to fa[ll] upon, to rush.] *n. an attack, an assault* झपाटा *m*, तडाखा *m.* २ *force or quantity of motion* जोर *m*, गतीचा वेग *m.* ३ *a violent tendency to any poin[t]* जोराची गति *f*, जोराची प्रेरणा *f*, प्रचोदना *f.* ४ *activity* ( जोराचें ) चलन *n.* ५ *incentive, vigour* उत्तेजन *n*, प्रोत्साहन *n.*

**Impinge** ( im-pinj' ) [ L. *in*, against, and *pangere*, to strike or to fasten. ] *v. t. to fall against, to strike, to hit* (-वर) थडकणें, जोरानें लागणें. Impinge'ment *n.*

**Impious** ( im'pi-us ) *a. irreverent, wanting in veneration for God, profane* देवनिंदक, धर्मनिंदक, असाधु, अधर्मी, दुष्ट, अधार्मिक, अधर्मनिष्ठ, अपुण्यशील. Im'piousness, Impie'ty *n. ungodliness* अभक्ति *f*, अधर्मकार्य *n*, देवनिंदकता *f*, देवनिंदा *f*, धर्मनिंदा *f*, अधर्म *m*, पाप *n.* २ *any act of wickedness* दुष्टकर्म *n*, दुष्टता *f.* Im'piously *adv.* देवनिंदाबुद्धीनें, देवनिंदापूर्वक.

*N. B.*—Distinguish Impious, Irreligious, Profane. *Irreligious* is negative, *impious* and *profane* are positive. An indifferent man may be *irreligious*, a *profane* man is irreverent in speech and conduct; an *impious* man is wickedly and boldly defiant in the stronger sense. Webster.

**Implacable** ( im-plāk'a-bl ) *a. not to be appeased, irreconciliable* अशमनीय, शांत करण्यास अशक्य, अशाम्य, अनाराध्य. २ *inextinguished* अशांत, कट्टा, अतिद्वेषी. Implacabil'ity, Implacableness *n. irreconciliableness* शमनाक्षमता *f.* २ दीर्घद्वेष *m.*

**Implant** ( im-plant' ) [ L. *in*, into, and Plant. ] *v. t. to plant or fix into, to plant in order to grow* ( used of abstract principles and rules of right and wrong ) (मुलांच्या कोमल मनांत वाढण्याकरितां चांगलीं तत्वें किंवा बऱ्यावाईटाचे नियम) लावणें, रोपण करणें, रोपणें, (-चा) रोप लावणें. Implantā'tion *n.* रोपण *n*, स्थापना *f*, आधान *n*, लावणें *n.*

**Implead** ( im-plēd' ) [ L. *in*, in, and Plead. ] *v. t. to put in or urge a plea, to prosecute a suit at law* ( फिर्याद करून -वर) काम चालविणें.

**Implement** ( im'ple-ment ) [ Low L. *implementum*, an accomplishing. २ means for accomplishing –L. *in*, and *plere*, to fill in.] *n. a tool or instrument of labour* आऊत *n*, अऊत *n*, हत्यार *n*, अवजार *n*, हत्यारें पात्यारें *n. pl.* २ उपकरण *n*, साधन *n*, साहित्य *n*, सामग्री *f*, सामान *n.* [ I.s OF CRICKET क्रिकेटचें सामान *n*, क्रिकेटचीं उपकरणें *n. pl.* ] I. *v. t.* पुरा -पूर्ण करणें.

**Impletion** ( im-plē'shun ) [ See Implement. ] *n. a filling* भरणें *n*, भरण *n*, पुरण *n.* २ *the state of being full* भरलेपणा *m*, पूर्णता *f*, पूर्णावस्था *f.*

**Implex** ( im'pleks ) [ L. *implexus* –*implecto* –*in*, into, and *plectere*, akin to Gr. *plekein*, to twine. ] *a. not simple, complicated* गुंतागुंतीचा, कठीण, दुष्क्लिष्ट. Implexus *a. bot. interlaced* अंतर्गुंफित.

**Impliable** ( im-plī'ā-bl ) *a.* ताठ, मागें न घेणारा, हार न खाणारा.

**Implicate** ( im'pli-kāt ) [ L. *in*, in and *plica*, a fold.] *v. t. to infold, to involve, to entangle* गुंतवणें, गोंवणें, गोंवून -गुंतवून घेणें -टाकणें, सामील आहे असें दाखविणें. Im'plicated *pa. t. & p. p.* गोंवलेला, गुंतलेला. [ Criminally I. लिप्त, लिप्ताळा.]. Implica'tion *n. the act.* गोंवणें *n.* २ गुंतागुंती *f,* सामिली *f,* सामिलगिरी *f,* आक्षेप *m.* ३ *that which is implied* ध्वनितार्थ *m,* मथितार्थ *m,* ध्वनि *m,* लक्ष्यार्थ *m,* अन्वय *m,* अनुमान *n,* अटकळ *f,* व्यंजना *f,* उपलक्षणा *f,* ध्वनन *n,* ध्वनितदर्शन *n.* Im'plicative *a. tending to implicate* सामील करणारा. Im'plicatively *adv.*

**Implicit** ( im-plis'it ) [ Lit. *infolded* –L. *in*, in, and *plica*, a fold. याचा मूळ अर्थ 'गुंतलेला, गोंवलेला' असा होता.] *a. tacitly comprised, implied* गर्भित, ध्वनित, अनुमानसिद्ध, फलित, अर्थसिद्ध, अंतर्गत, अंतर्भूत. २ *trusting fully the word or authority of another* ( as faith or obedience ) पुरा, पूर्ण, साफ, निखालस, निःसंशय, निर्विवाद, निर्विकल्प, अनन्यभावाचा. Implic'itly *adv.* अनन्यभावानें, बिनदिक्कत. २ ध्वनितार्थानें. Implic'itness *n.* ध्वनितता *f.* ३ पूर्णपणा *m,* &c.

**Implied**, See under Imply.

**Implore** ( im-plōr' ) [ Fr. *implorer* –L. *im* ( *in* ), on, and *plorare*, to wail. ] *v. t. to pray earnestly, to entreat* ( only one's equals ) पायां पडून -हातांपायां पडून -दाढीस हात लावून -पदर पसरून मागणें, काकळूत करणें, काकलुतीस आणणें. I. *v. i. to entreat, to beg* मागणें, विनंति करणें. Implor'er *n.* काकलुत करणारा, &c. Implor'ingly *adv.* काकलुतीनें, काकळूत करून.

N. B. :—We *implore* only our equals; we *supplicate* only our superiors.

**Imply** (im-plī' ) [ Lit. to infold –L. *in*, and *plica*, a fold. ] *v. t. to include in reality* (खरोखर) आंत समावेश करणें. २ *to mean, to signify* फलितार्थानें दाखविणें -दर्शवणें -सुचवणें -सिद्ध करणें, गर्भित करणें. To be implied गर्भित -ध्वनित -फलित असणें. Im'plied *a. known by implication, inferential* ध्वनित,गर्भित, अर्थसिद्ध, फलित, उपलक्षित. [ I. Covenants ध्वनित -गर्भित करार. I. Malice (कायद्याच्या दृष्टीनें) गर्भित -ध्वनित दुष्ट हेतु *m.* I. trust (कोर्टांत नजरेस आलेल्या गोष्टींवरून अथवा पक्षकारांच्या वर्तणुकीवरून कोर्टानें) मानलेली किंवा गृहीत धरलेली हमी *f* -जबाबदारी *f.* ]

**Impoison** ( im'-poi-zn ) [ L. *in*, and Poison. ] *v. t. to affect with poison* विष देणें -घालणें. २ *to imbitter, to impair* कडू करणें, बिघडविणें.

**Impolicy** ( im-pol'i-si ) [ Im + Policy. ] *n. inexpedience, imprudence, defect of wisdom* चुकीचें धोरण *n,* चुकीची नीति *f,* चुकीचा व्यवहार *m,* अदूरदर्शीपणा *m,* अशहाणपणा *m,* अविचार *m,* वेडेपणा *m,* वेडगळपणा *m,* अयुक्तीचें वर्तन *n,* अयुक्ति *f,* कुनीति *f.*

**Impolite** ( im-po-līt' ) [ L. *in*, not, and Polite. ] *a. of unpolished manners* असभ्य, अशिष्ट, बेअदब, अनार्य. Impolit'ely *adv.* असभ्य रीतीनें, अशिष्टतेनें. Impolite'ness *n.* असभ्यता *f.*

**Impolitic** ( im-pol'i-tik.) [ L. *in*, not, and Politic. ] *a. unwise, imprudent* ( a ) योग्य नीति न जाणणारा, व्यवहार न जाणणारा, अनीतिज्ञ, अविचारी, अदूरदर्शी, अदीर्घदर्शी. ( b ) कार्यबाधक, अनिष्टकर, अनर्थावह.

**Imponderable, Imponderous** ( im-pon'der-a-bl,-ous ) [ L. *in*, not, and Ponderable. ] *a. not able to be weighed, without sensible weight* वजन करतां न येणारा, हलका, निर्भार, गुरुत्वहीन. Impon'derables *n. pl. imponderable fluids* निर्भार द्रवपदार्थ *m. pl.*

**Imporous** ( im-pō'rus ) *a. destitute of pores, solid* नीरंध्र, रंध्रविहीन, सुश्लिष्ट, घन, घट्ट. Imporosi'ty *n. want of porosity* नीरंध्रता *f,* रंध्रविहीनता *f.*

**Import** ( im-pōrt' ) [ Fr. –L. *in*, in, and *portere*, to carry. ] *v. t. to carry into, to bring from abroad* ( बाहेर देशाहून ) स्वदेशीं आणणें, देशांतराहून आणणें. २ *to imply, to signify* अर्थ दाखविणें -सुचविणें. ३ *to be of importance to* ( -ला ) महत्वाचा -अगत्याचा असणें. I'mport *n. that which is brought in from abroad* आयात *m,* देशांत आणलेला माल *m.* २ *purport, meaning* अर्थ *m,* अभिप्राय *m,* भाव *m,* आशय *m,* भावार्थ *m.* ३ ( *R.*) *importance* महत्त्व *n,* प्रभाव *m,* महिमा *m,* अगत्य *n.* Import'able *a.* परदेशाहून आणण्याजोगा. Import'ance *n. consequence, moment, significance, weight* महत्त्व *n,* महत्ती *f,* जरूरी *f,* वजन *n,* उपयोग *m,* गौरव *m,* प्रभाव *m,* महिमा *m,* मातब्बरी *f,* उन्नति *f.* Import'ant *a.* महत्वाचा, भारी, वजनदार, अगत्याचा, उपयोगी, मोठा, प्रधान. Importa'tion *n.* आयात *f,* आयातन *n,* देशांतराहून आणणें *n.* २ आयात माल *m.* ३ घेऊन जाणें *n,* वाहून नेणें *n.* Import'er *n.* परदेशाहून स्वदेशीं माल आणणारा, आयाताचा व्यापारी.

**Important** ( im-port'ant ) *a.* See under Import.

**Importunate** ( im-port'ū-nāt ) [ Coined from the word *Importune*, which, in Middle English, meant 'troublesome.' ) *a. troublesomely urgent, overpressing in request, teasing* अत्याग्रही, लोंचट, चिकट, चिवट, चेंगट, चामट, वातड, अतियाचक. Some of the most familiar words for an importunate person are गळेपडू, हातींपायीं पडणारा -लागणारा, खणपटीस बसणारा, रड्ड रड्ड करून मागणारा. Impor'tunately *adv.* आग्रह धरून, मिन्नतवारीनें, मिन्नतीनें, खणपटीस बसून. Import'unateness, Importun'ity *n.* अतियाचना *f,* अतिप्रार्थना *f,* गळ *f,*

अत्याग्रह *m*, मिन्नत *f*, मिन्नतवारी *f*, मिन्नतमाना *m*, चिकटपणा *m*. [ IMPORTUNITY OF CHILDREN AND BEGGARS जिकीर *f*, चेंगटाई *f*, गळग्रह *m*. माथाकूट *f*, माथेफोड *f*, जिगजिग *f*. ] Importun'e *v. t. to urge with troublesome application, to press urgently* अत्याग्रहानें मागणें, त्रास देऊन -लोंचटपणानें मागणें, मिन्नत *f* -मिन्नतवारी *f*- मिन्नतमाना *m*. करणें -करून मागणें, आग्रह धरून मागणें, गळ घालणें, गळ घालून मागणें. -esp. of children and beggars गळीं पडणें, गळचिपीं बसणें, गळग्रह घालणें, दांत विचकून मागणें, (-करितां) दांत विचकणें.

Importune ( im-por-tūn' ) See under Importunate.

Impose ( im-pōz' ) [ Fr. *im*, on, and *poser*, to place.] *v. t. to place upon, to lay on* (-वर) घालणें -ठेवणें -मांडणें -स्थापणें -आरोपण करणें. २ *to lay on, as a burden or duty* कर -जकात बसविणें, जकात ठेवणें, स्थापणें, (बोजा) घालणें, टाकणें, लादणें, माथीं मारणें. ३ *to enjoin or command* आज्ञापिणें, हुकूम देणें. ४ *to lay on* (as the hands) (दीक्षा वगैरे देतांना) मस्तकावर हात ठेवणें. ५ *to arrange in proper order on a table or stone or metal for printing* शिळेवर टाकणें,छापावर टाकणें, 'इम्पोज' करणें. I.*v.i. to practise tricks or deception* ठकविणें, फसविणें, (दगलबाजीनें) गळीं बांधणें, टोपी घालणें. [ To I. UPON (-ला) फसविणें, ठकविणें. ] Impos'able *a.* ठेवतां किंवा बसवितां येण्याजोगा, &c. Impos'ing *pr. p. a. laying as a duty* कर म्हणून बसविला जाणारा. २ *impressive, commanding* असरकारक, भपकेदार,ढबदार, ठळक, भव्य, विस्मयावह, अद्भुत. ३ *deceiving* फसवणुकीचा, फसवणारा. I. *v. n.* शिळेवर टाईप मांडणें *n* -टाकणें *n*, मुद्रास्थापन *n*. Impos'ingly *adv.* ढबदार रीतीनें. Imposi'tion *n.* स्थापना *f*, स्थापन *n*, (-वर) घालणें *n*, लादणें *n*, बसविणें *n*, सोंपणें *n*. २ *burden, tax* शिक्षा *f*, दंड *m*, कर *m*, जकात *f*, बोजा *m*, भार *m*. ३ ( *Eng. Univ.* ) *an extra exercise enjoined on a student as a punishment* शिक्षेदाखल दिलेला अधिक धडा *m*. ४ *deception, fraud, imposture* दगा *m*, पाखंड *n*, फसवणूक *f*, फसवण *f*, ठकवण *f*, ठकबाजी *f*. ५ मस्तकावर हात ठेवणें *n*.

Impossible ( im-pos'i-bl ) [L. *in*, not, and Possible.] *a. that which cannot be done, that cannot exist, absurd* ( सृष्टिनियमांप्रमाणेंच ) अशक्य, घडायाचा नाहीं असा, व्हायाचा -व्हायाजोगा नाहीं असा, असाध्य, असंभाव्य, अघटमान, (*fig.*) खपुष्पायमाण, मृगजलवत्, शशशृंगायमान. Impossibil'ity *n.* अशक्यता *f*, असाध्यता *f*, असंभाव्यता *f*, असंभव *m*. २ *an impossible thing* अशक्य गोष्ट *f*, अशक्य विषय *m*. To assert impossibilities or absurdities अशक्य तेंच -नाहीं तेंच बोलणें -सांगणें. To attempt impossibilities अशक्य तें करूं पाहणें, नाहीं तेंच करणें, मृगजलस्नान करूं पाहणें, धोंड्याचा दोर काढण्याचा प्रयत्न करणें. *N.B.* :— Nowadays there is a growing tendency with translators to restrict Impossible to अशक्य, Improbable to असंभाव्य, and Impracticable to अव्यवहार्य *or* अकार्य. A thing is *impracticable* when it cannot be accomplished by any human means at present possessed; a thing is *impossible* when the laws of Nature forbid it.—( Webster. )

Impost ( im'pōst ) [O. Fr. *impost*, a tax -L. *impono*, to lay on. ] *n. a tax esp. on imports* आयातमालावरला कर *m* -जकात *f* -दस्त *m*.

Imposthume ( im-pos'tūm ) [A corr. of L. *apostema* -Gr. *apo*, away, and *histemi*, to make to stand.] *n. an abscess* गळूं *n*, विद्रधि *m*. Impost'humate *v. i. to form an abscess* विद्रधि होणें. I. *v. t. to affect with an abscess* विद्रधीनें ग्रासणें.

Impostor ( im-pos'tur ) [L. *imponere*, to lay on.] *n. one who practises imposition or fraud* ( on the public ) तोतया *m*, फसव्या *m*, ठकव्या *m*, ठग *m*, वेषधारी *m*, भोंदू *m*, वंचक *m*, पाखंडी *m*. General impostor घरभोंदू, देशठक, धुतारा. Impos'ture *n. imposition, fraud* फसवेगिरी *f*, ठकाई *f*, दगलबाजी *f*, ढोंग *n*, पाखंड *n*, भगल *f*, फटवण *f*.

Impotent ( im'po-tent ) [ L. *in*, not, and Potent.] *a. powerless, weak, feeble* कमजोर, कमताकत, अशक्त, निर्बल, दुर्बल, हीनबल, नाकर्ता, अकर्ता. २ *wanting the power of procreation, unable to copulate* क्लीब, षंढ, बुळा, खाडू, मेंग्या, नामर्द, निर्वीर्य, कमरेचा ढिला, प्रजननाशक्त, भागुबाई, नपुंसक, पुरुषत्वहीन, ( *colloq.* ) पाउणेआठ. ३ *barren, sterile* वांझ, वांजीक. ४ *wanting the power of self-restraint* इंद्रियें स्वाधीन ठेवूं न शकणारा. I. *n. one who is impotent* कमजोर -नबळा मनुष्य. Im'potence, Im'potency *n. want of strength or power, weakness, feebleness* कमजोरी *f*, अशक्ति *f*, दुर्बलता *f*, दौर्बल्य *n*. २ *inability to beget children, barrenness* बुळेपणा *m*, प्रजननाशक्ति *f*, नामर्दी *f*, क्लैब्य *n*, पौरुषराहित्य *n*, पौरुषाभाव *m*, ध्वजपात *m*. ३ *want of self-restraint* इंद्रियांची अस्वाधीनता *f*.

Impound ( im-pownd' ) [E. in, and Pound, an inclosure.] *v.t. to confine, as in a pound, to restrain within limits* पवनांत कोंडणें -घालणें -पाठविणें ( पवन is a corruption of English Pound ), कोंडवाड्यांत घालणें, कोंडणें, कोंडून ठेवणें, कोंडी *f* -कोंडणी करणें *g. of o.* २ *to hold in the custody of a court* ( संशयित दस्तऐवज संशयनिवृत्ति होई तोंपर्यंत ) कोर्टानें अडकावून ठेवणें. Impound'age *n.* पवनांत कोंडणें *n*.

Impoverish ( im-pov'ėr-ish ) [ Fr. prefix *ab* = L. *ad*, towards, and O. Fr. *povre* ( Fr. *pauvre* ) -L. *pauper*, poor. ] *v. t. to make poor, to reduce to poverty* गरीब -भिकारी- दरिद्री -निर्धन करणें, भिकेस लावणें-आणणें. २ *to exhaust the strength, richness, or fertility of* सत्व *n* -कस *m*. काढून घेणें, कृश -शुष्क करणें, दुबळा -दुर्बल -सत्वहीन -हीणकस -निःसत्व करणें,

(-ची) बलहानि -सत्वहानि करणें. Impov'erished *pa. t. & p. p.* Impov'erisher *n.* गरीब करणारा. २ निःसत्व करणारा. Impov'erishing, Impov'erishment *n. reduction to poverty* दरिद्रता *f,* निर्धनता *f,* निर्धनावस्था *f.* २ *exhaustion* निःसत्वता *f,* सत्वनाश *m,* सत्वहानि *f,* दुर्बलता *f,* हीणकसपणा *m.*

**Impracticable** (im-prak'tik-a-bl) [L. *in,* not, & Practicable.] *a. not practicable, impossible* अव्यवहार्य, (उपलब्ध आहेत तेवढ्याच साधनांनीं) कृतींत किंवा व्यवहारांत न आणतां येणारा, अकार्य, असाध्य, अघटनीय, अशक्य, न होण्याजोगा; as, "An I. undertaking." २ *not to be overcome, persuaded or controlled by any reasonable method* हेकट, हेकेखोर; as, "An I. heart." ३ *intractable* अनिवार, शिरजोर, बेहुकमी. ४ *incapable of being used* अगम्य, दुर्गम; as, "An I. road." Impracticabil'ity *n.* अव्यवहार्यता *f,* असाध्यता *f,* अशक्यता *f,* &c.

**Imprecate** (im'pre-kāt) [L. *in,* upon, and *precor, precatum,* to pray.] *v. t. to pray for evil upon, to curse* (प्रार्थना करून) शाप मागणें, शाप *m* -श्राप *m* बोलावणें, (-चें) अहित -अकल्याण इच्छिणें. Im'precated *pa. t. & pa. p.* Im'precating *pr. p. & v. n.* Impreca'tion *n. the act of imprecating* शाप -श्राप मागणें. २ *a prayer that a curse or calamity may fall upon any one* शापाकरितां केलेली प्रार्थना *f,* अनिष्टचिंतन *n.* ३ *a curse* श्राप *m,* शाप *m,* बद्दुवा *m,* अनिष्टेच्छा *f.* Im'precatory *a.* श्रापाचा, शापाचा, &c.

**Impregnable** (im-preg'na-bl) [Fr. *imprenable* –L. *in,* not, and *prehendere,* to take.] *a. that cannot be taken or seized, that cannot be moved or shaken, invincible* न घेतां येण्याजोगा, दुर्धर, बेलाग, बिकट (fortress), अजेय, अजिंक्य, दुःसाध्य.

**Impregnate** (im-preg'nāt) [Low L. *impraegnatus,* p. p. of *impraegnare,* to impregnate –*im* (= *in*), and *praegnans,* pregnant. See Pregnant.] *v. t. to make pregnant* गर्भार -सगर्भ-गर्भवती करणें, गर्भस्थापना -गर्भस्थापन करणें. (b) (as used of female animals) फळवणें, गाभण करणें. २ (*biol.*) *to come into contact with* (*an ovum or egg*) *so as to cause impregnation, to fecundate, to fertilize* फलभरित -फलदायी करणें, सुपीक -फलयुक्त करणें, (-च्या) आंगीं फलदायक शक्ति आणणें. ३ *to impart the particles or qualities of one thing to another* (with *with*) (एका वस्तूचे अंश किंवा गुणधर्म) दुसऱ्या वस्तूंत (वस्तूचे अंगीं) आणणें -घालणें; as, "Rock *impregnated* with ore." I. *v. i.* गर्भार राहणें -होणें. (b) गाभटणें, गाभ धरणें. I. *a. pregnant* गर्भार, गर्भवती. (b) (of female animals) गाभण, गाभटलेली. २ *made prolific* फलदायीकृत, सुफलदायक, सुपीक. ३ *impregnated* (दुसऱ्या वस्तूचे) गुणधर्म अंगीं भिनलेला, गुणयुक्त, गुणमिश्रित. Impregnated *pa. t.* Impregna'tion *n.* गर्भस्थापन *n,* गर्भाधान *n,* गर्भोत्पादन *n.* (b) –*the state.* गर्भारपणा *m.* २ *biol.* फलदायकत्व *n,* सुपीकता *f,* सुपीकपणा *m.* ३ *that with which anything is impregnated* एखाद्या वस्तूशीं मिळविलेली (दुसरी) वस्तु *f.* ४ *intimate mixture, infusion* (दोन वस्तूंचा) एकजीव करणारें मिश्रण *n.*

**Imprescriptible** (im-prē-scrip'ti-bl) [L. *in,* not, & Prescriptible.] *a. not capable of being lost or impaired by neglect, by disuse, or by the claims of another founded on prescription* जुनी वहिवाट अगर प्राचीन भोगवटा यांनीं उत्पन्न अगर नष्ट न होणारा; as, "I. right." २ *not derived from external authority* स्वतःसिद्ध, स्वयंभव, स्वयंसिद्ध.

**Impress** (im-pres') [L. *in,* in, & *premo, pressus,* to press.] *v. t. to press or stamp in or upon, to imprint* छापणें, ठसा उमटविणें, मुद्रित करणें, निशाणी *f* -छाप *m.* मारणें, अंकित -चिन्हित-मुद्रित करणें, छाप *m* -मोहोर *f* -शिक्का *m.* दाबविणें -पाडणें. २ *to fix deeply in the mind, to imprint, to inculcate* मनावर ठसा उमटविणें -उठविणें *g. of o.,* मनांत ठसविणें -बिंबविणें, मनावर वठविणें. ३ *to take by force for public service* (सरकारी कामाकरितां) सक्तीनें -जबरीनें घेणें, वेठीस धरणें, बेगार नेणें; as, "To I. sailors or money." I. *n.* (*pl.* Impresses) *the act of impressing or marking* छाप मारणें *n,* ठसा उमटविणें *n,* मुद्रण *n.* २ *a mark made by pressure, imprint* ठसा *m,* छाप *m,* मुद्रा *f,* मोहर *f,* शिक्का *m.* ३ *mark of distinction, stamp* छाप *m,* निशाणी *f,* चिन्ह *n.* ४ *device, motto* निशाणीचा लेख *m.* ५ (a) *the act of impressing or taking by force for public service* सक्तीनें कामास नेणें *n.* (b) *that which is impressed* सक्तीनें कामास नेलेलीं माणसें *m. pl.,* बेगार *n.* (c) सक्तीनें सरकारी कामाकरितां मागितलेला पैसा *m.* [I. MONEY *a sum of money paid immediately upon their entering service to men who have been impressed* वेठीस धरलेल्या माणसांस दिलेला पैसा *m.*] Impress'ed *pa. t. & p. p.* Impressibil'ity *n.* संस्करणीयता *f,* संस्कारक्षमता *f,* शीघ्रग्राहित्व *n,* मुद्रणीयता *f.* Impres'sible *a.* ठसा उमटवितां येण्याजोगा -येण्यासारखा. २ शीघ्रग्रहणक्षम, शीघ्रग्राही, संस्करणीय, संस्कारक्षम. Impres'sing *pr. p. & v. n.* Impres'sion *n. the act of impressing or stamping* ठसा उमटविणें *n,* छाप मारणें *n,* मुद्रण *n.* २ *stamp, mark* ठसा *m,* चिन्ह *n,* मुद्रा *f,* छाप *m,* निशाणी *f,* आकृति *f.* ३ *influence or effect on the senses or the intellect* संस्कार *m,* छाप *m,* असर *m,* परिणाम *m.* ४ *an indistinct notion, remembrance* अर्धवट संस्कार *m,* चुटपुटी आठवण *f,* अस्पष्ट कल्पना *f.* ५ *impressiveness, emphasis of delivery* छापदारपणा *m,* ठांसून बोलण्याची ढब *f,* परिणामकारिता *f.* ६ *the pressure of the type on paper or the result of such pressure* ठशाची उमटण *f,* उमट *m,* छाप *m,* ठसा *m.* ७ (a) *the whole edition printed at a given time* आवृत्ति *f.* (b)

इंद्रियासंयमन *n.* २ *inability to restrain evacuations* शरिरांतून होणारा उत्सर्ग थांबविण्याची शक्ति नसणें *n*, इंद्रियव्यापारावर तावा नसणें *n*, इंद्रियव्यापारनिग्रहाभाव *m.* [ INCONTINENCE OF URINE न समजतां लघ्वी होणें *n*, लघ्वी होऊं लागली असतां ती थांबवून धरतां न येणें *n.* ]

Incontrovertible (in-kon-tro-vert'i-bl) *a. too clear or certain to admit of dispute* (विरुद्ध प्रमाणें देऊन) खंडण करतां न येणारा, अखंडनीय, निर्विवाद.

Inconvenience (in-kon-vēn'-yens) *n. want of convenience* गैरसोय *f*, अडचण *f*, अनौचित्य *n*, अनुपयुक्तता *f*, असोईवारपणा *m*, असोई *f*. २ *that which gives trouble or uneasiness, disadvantage* नड *f*, अडचण *f*, क्लेश *m* (*pl.*), असुख *n.* I. *v. t. to bring to inconvenience* अडचणींत आणणें -घालणें, गैरसोय करणें *g. of o.* Inconven'ient *a. unsuitable* अयोग्य, अगम, असुतर. २ *causing trouble or uneasiness, incommodious* गैरसोयीचा, कष्टकारक, क्लेशकारक, अडचणीचा. Inconven'iently *adv.*

Inconvertible (in-kon-vērt'i-bl) *a. not capable of being changed into something else* ज्याचें रूपांतर करतां येत नाहीं असा, रूपांतराशक्य, अपरिवर्तनीय, अपरिवर्तनशील. Bank-notes are sometimes I. into species कांहीं वेळां नोटांना नाणें मिळत नाहीं.

Inco-ordination (in-kō-ordinā'-shun) [ L. *in*, not, & Coordination. ] *n. lack of harmonious adjustment or action* कोणतीही ऐच्छिक हालचाल करतांना स्नायूची क्रिया समतोलपणानें न होणें *n*, असमन्वय *m.*

Incorporate (in-kor'po-rāt) [ L. *incorporo*, *in*, into, and *corporare*, to furnish with a body. ] *v. t. to form into one body* एकशरीर -एकजीव -एकगट्ट संमिश्रण करणें; as, "To I. drugs." २ *to embody* साकार करणें, देह देणें, देही -शरीरी -सदेही करणें. ३ *to unite with a mass already existing* मिळविणें, मिसळणें, संयोग करणें. ४ *to combine into a structure or organisation* एक करणें, जोडणें, एकजीव करणें, जडणें, सामील-संयुक्त करणें. ५ *to form into a legal body* कायदेशीर मंडळी स्थापणें, एकव्यक्तीभूत कंपनी करणें. I *v. i. to be mixed or blended* सामील होणें, मिळणें, मिसळणें, एकजीव होणें, एकव्यक्तीभूत होणें. I. *a. united into one body* एकाकार झालेला, एकजीव झालेला, मिश्र, एकत्रित. Incorpora'tion *n.* सदेही -शरीरी करणें *n*, एकत्र करणें *n*, संयुक्त करणें *n.* २ *mixture, combination* संमिश्रण *n*, संमेलन *n*, मेळवणी *f*, एक औषध दुसऱ्या औषधांत मिळविणें *n.* ३ *an association, intimate union* सामिली *f*, अंतर्भाव *m*, संयोग *m*, मिलाफ *m.* ४ *the formation of a political or legal body* राजकीय -राजानयमबद्ध मंडळी *f* -संस्था *f.* (b) नियमबद्ध मंडळी किंवा सभा स्थापन करणें.

Incorporeal (in-kor-pō'rē-al) *a. not having a body, spiritual* अदेही, विदेही, अशरीरी, निरवयव, अजड, निराकार. २ *existing only in contemplation of law* स्पर्शागोचर, अदृश्य. [I. PROPERTY अदृश्य जिनगी *f.*] Incorpo'realness, Incorpore'ity *n.* अशरीरत्व *n*, अदेहत्व *n*, देहाभाव *m*, अजडत्व *n.* Incorpo'really *adv.*

Incorrect (in-kor-ekt') *a. inaccurate, faulty* अशुद्ध, नादुरुस्त, दोषी, चुकीचा. २ *not in accordance with the truth* असत्य, गैरशिस्त, गैररास्त, अयथार्थ. [ I. KNOWLEDGE अयथार्थ ज्ञान *n.* ] ३ *not in accordance with morality* अनीतीचा, गैरवाजवी, गैरवास्तविक. Incorrect'ly *adv.* चूक करून, मिथ्या, अन्यथा, अशुद्ध. Incorrect'ness *n.* अशुद्धता *f*, अयथार्थता *f.*

Incorrigible (in-kor'i-ji-bl) *a. bad beyond correction or reform* कोडगा, अगदीं कामांतून गेलेला, फुकट गेलेला, शिक्षातीत (Sk.), निगरगट्ट, निगरगटा (*colloq.*), माणसांतून गेलेला (*colloq.*). Incorr'igibleness, Incorrigibil'ity *n.* कोडगेपणा *m*, निगरगट्टपणा *m.* Incorr'igibly *adv.*

Incorrodible (in-kor-ōd'i-bl) *a. not able to be rusted* न गंजणारा.

Incorrupt (in-kor-upt') [ L. *in*, not, and Corrupt. ] *a. sound, pure* न बिघडलेला, शुद्ध, स्वच्छ, चोख. २ *not depraved, not to be tempted by bribes* शुद्धाचरणी, चोख व्यवहाराचा, पैशाला वश न होणारा, सरळ. Incorruptibil'ity *n.* अविनाशिता, कुजून किंवा बिघडून न जाण्याची स्थिति *f*, अजरामरता *f.* Incorrupt'ible *a.* अविनाश्य, अविनाशी, कुजून किंवा बिघडून न जाण्यासारखा, अजरामर, अपकर्षाक्षम. Incorrup'tion *n*, Incorrupt'ness *n.* अविकार *m*, अविकृति *f*, अविनाश *m*, अदुष्टता *f.* २ (मनाची) शुचिता *f*, शुद्धता *f.*

Incrassate (in-kras'āt) [ L. *incrasso*, *–in*, into, & *crasso*, to make thick *–crassus*, thick. See Crass. ] *v. t. to make thick* घट्ट करणें, (-ला) घट्टपणा आणणें. I. *v. i. med. to become thicker* अधिक घट्ट होणें, (-ला) जास्त घट्टपणा येणें. I. *a. made thick or fat* घट्ट केलेला.

Increase (in-krēs') [ Through Norm. Fr., from L. *incresco –in*, in, & *crescere*, to grow. ] *v. i. to grow in size, to become greater* वाढणें, मोठा होणें, वृद्धि पावणें, वृद्धिंगत होणें, चढणें, अधिक होणें, वाढ *f* -वृद्धि *f.* होणें *g. of s.* २ (inforce or intenseness) जोरावणें, जडावणें, बळावणें. *I. v. t. to make greater or more* वाढविणें, चढवणें, अधिक-जास्त करणें, वाढ *f* -वृद्धि करणें *g. of o.* In'crease *n.* वाढ *f*, वाढवा *m*, वाढावा *m*, वृद्धि *f*, अभिवृद्धि *f*, वर्धन *n*, संवर्धन *n*, उपचय *m*, बढती *f*, चढती *f*, चढ *f*, वाढणूक *f.* २ वाढवणें *n*, वाढवणूक *f* (from *v. t.*). ३ *increment* वाढवा *m*, वाढाव *m*, वाढ *f*, वाढा *m*, वृद्धि *f*, चय *m.* Increased *pa. t.* and *p. p.* वाढलेला, वर्धित, वृद्ध, प्रवृद्ध. २ वाढवलेला, वर्धित, संवर्धित. Increasing *pr. p.* वाढणारा, वाढता, चढता, चढाचा, वृद्धिंगत, वर्धमान. २ वाढवणारा, वर्धक, वृद्धिकारक, संवर्धक.

Incredible (in-kred'i-bl) *a. surpassing belief* अविश्वसनीय, विश्वास न ठेवण्यासारखा, विश्वासायोग्य, In-

credibil'ity *n.* अविश्वसनीयता *f.* अविश्वासपात्रता *f.* अविश्वासार्हता *f.* Incred'ibly *adv.* अविश्वसनीयपणानें.

Incredulous (in-kred'ū-lus) *a. hard of belief* एकदम विश्वास न ठेवणारा, अश्रद्धावान्, शंकाशील, शंकेखोर. Incredu'lity *n.* अश्रद्धा *f.* अश्रद्धाळूपणा *m.* शंकेखोरपणा *m.* Incred'ulously *adv.* अविश्वासानें, अश्रद्धेनें, शंकेखोरपणानें, &c.

Increment (in'kre-ment) [L. *incrementum -in-cresco.* See Increase.] *n. the act of increasing or becoming greater* वाढणें *n.* वृद्धि पावणें *n.* २ *growth* वाढ *f.* वृद्धि *f.* वर्धन *n.* वाढा or वाढवा or वाढावा *m.* भर *f.* *math.* वृद्धि *f.* चय *m.*

Increscent (in-kres'ent) [L. *in* and Crescent.] *a. increasing* वर्धनशील, वाढणारा, वृद्धि पावणारा.

Incriminate (in-krim'in-āt) [L. *in* in, & *criminare* to accuse one of a crime.] *v. i. to accuse, to charge with a crime or fault, to criminate* दोषारोप करणें, दोष ठेवणें, (अपराधाचा) आरोप -आक्षेप करणें. Incrimina'ted *pa. t.* and *pa. p.* Incriminating *pr. p.* दोष ठेवणारा, आक्षेपक, आक्षिप्त. [Incrimina'ting article आक्षिप्त किंवा आक्षेपार्ह लेख *m.* आरोपविषयक -आरोपाचा लेख *m.*]. Incrimina'tion *n.* दोषारोप *m.* दोषाक्षेप *m.* Incrim'inatory *a.* दोषाचा, आक्षेपाचा, आक्षेपक्षम, आक्षेपणीय.

Incrust (in-krust') [Fr. –L. *incrust-o, -atus -in,* on and *crusta.* See Crust.] *v. t. to cover with a crust or hard case* (वर) पोपडा *m.* -पापुद्रा *m.* -पुट -कवच चढविणें, किटवणें, सपुट -सकवच -पुट्युक्त करणें. I. *v. i.* (-वर) पापुद्रा -पोपडा &c. धरणें -बांधणें -जमणें. Incrusta'tion *n. -the act.* पापुद्रा बांधणें *n.* (b) थर चढविणें *n* -बांधणें *n.* २ *a crust or layer of anything on the surface of a body* थर *m.* पापुद्रा *m.* पापडा *m.* पोपडा *m.*

Incubate (in'kū-bāt) [L. *incubo, –atum –in,* upon, & *cubare,* to lie down.] *v. i. & v. t. to sit on eggs to hatch them* अंडीं *n. pl.* उबविणें, अंड्यांस ऊब देणें, अंडउबारा करणें. २ *to develop* (as a disease &c.) रोगबीजें कृत्रिम उपायानें उबणें -पिकणें. Incuba'tion *n. –the act.* अंडीं उबविणें *n.* २ *med. the period between the implanting of a disease and its development* शरीरांत स्पर्शजन्य विषाचा फैलाव होऊन रोगचिन्हें दिसावयास लागणारा वेळ *m.* रोगबीजपोषणकाल *m.* उत्पादनकाल *m.* [PERIOD OF I. शरीरांत रोगोत्पादक बीज शिरल्यापासून त्यामुळें होणाऱ्या (उद्भवणाऱ्या) रोगाचीं चिन्हें दिसूं लागेपर्यंत लोटणारा काळ *m.* अधिशयनकाळ *m.*] In'cubator *n. a. machine for hatching eggs by artificial heat* कृत्रिम उष्णतेनें अंडीं उबवून तीं फोडण्याचें यंत्र *n.* २ रोगाचीं अंडीं कृत्रिम रीतीनें तयार करण्याचें पेटीसारखें यंत्र *n.* अंडपोषणयंत्र.

Incubus (in'kū-bus) [L. *incubus,* a nightmare.] *n. a sensation during sleep as of a weight lying on the breast, nightmare* रात्रीं झोंपेंत छाती दडपल्यासारखें वाटणें *n.* कुस्वप्न *n.* दुःस्वप्न *n.* अजीर्णप्रयुक्त स्वप्न *n.* २ *any oppressive or stupefying influence* छाती फाडून टाकणारी -भेदरवून सोडणारी गोष्ट *f.* काळजीचा बोजा *m* -भार *m.* चिंता *f.* In'cubuses *pl.* Eng., In'cubi *pl.* L.

Inculcate (in-kul'kāt) [Lit. tread or press in; L. *inculcare –in,* into, and *calcare,* to tread *–calx,* the heel.] *v. t. to enforce by frequent admonitions or repetitions* (वारंवार सांगून किंवा पुनरुक्ति करून) आग्रहानें सांगणें, (आग्रहपूर्वक सांगून) मनांत ठसविणें -बिंबविणें -भरविणें, पुनः पुनः उपदेश करणें *g. of o.*, उगाळणें, वाटाघाट करणें *g. of o.* (*colloq.*) Incul'cated *pa. t. & pa. p.* वारंवार सांगितलेला. Inculca'tion *n.* वारंवार सांगणें, पुनः पुनः बिंबविणें. Incul'cator *n.* मनांत ठसविणारा.

Inculpate (in-kul'pāt) [Low L. *inculpare –in,* into, and, *culpa,* a fault.] *v. t. to bring into blame, to censure* (-ला) दोष -ठपका देणें, दोष -बोल-शब्द लावणें, दूषण देणें, निंदा करणें, निंदणें, नांवें ठेवणें. २ *to accuse of crime* गुन्हेगार ठरविणें, (त्या पदरीं) गुन्हा बांधणें. Inculpa'tion *n.* दोष लावणें, गुन्ह्यांत सामील करणें, दोषारोपण *n.* Incul'patory *a.* दोषारोपाचा, गुन्ह्यांत सामील करणारा.

Inculpable (in-kul'pa-bl) *a. not culpable, blameless, faultless* अदूषणीय, दोष न देण्यासारखा, दोषरहित, अदोष, निर्दोष, खोड नसलेला, बिनखोड.

Incumbent (in-kum' bent) [L. *incumbens, -entis,* pr. p. of *incumbere, incubare,* to lie upon.] *a. lying or resting on* (-च्या) वर असणारा -पडणारा- टेंकणारा, अवलंबित. २ *lying on as a duty* अवश्य कर्तव्य, जरूर करण्याचा, आवश्यक, जरूरीचा. [TO BE I. UPON (-ला) एखादी गोष्ट करणें, भाग पडणें -असणें -येणें.] ३ *bot.* अवलंबित, आधार -टेंका घेणारा. I *n. one who holds an ecclesiastical benefice* (in England or Ireland) वृत्ति धारण करणारा पाद्री, धर्मवृत्तिभोगी, वृत्तिभोगी, उपभोग घेणारा. Incum'bency *n.* (वर) असणें, वर पाडणें. २ एकादा हुद्दा, अधिकार किंवा पाद्र्याची धर्मवृत्ती धारण करणें. ३ धर्मवृत्ति *f.*

Incumber, Incumbrance, Same as Encumber, Encumbrance, which see.

Incunabula (in-kū-nab'ū-la) [L. lit. meaning 'swaddling-clothes,' hence 'beginnings.'] *n. pl. books printed in the early period of the art* (before the year 1500) मुद्रणकलेचा शोध लागल्यानंतरच्या प्रथमकाळांत छापलेलीं पुस्तकें *n. pl.* -ग्रंथ *m. pl.*

Incur (in-kur') [Lit. to run into, to fall upon *–in,* into, *currere,* to run.] *v. t. to become liable to, to bring on* आंगावर ओढून घेणें -आणणें, (-ला) पात्र होणें. Incurr'ing *pr. p.* Incurred' *pa. p.*

Incurable (in-kūr'a-bl) [L. *in,* not, & Curable.] *a.*

*beyond the power of skill or medicine* असाध्य, दुर्धर, असाधनीय. २ *remediless* उपायरहित, इलाजरहित, अचिकित्स्य, अप्रतिकार्य. I. *n. a person diseased beyond cure* बरा होण्याची आशा नसलेला आजारी मनुष्य, असाध्य रोगी. Incurabil'ity, Incur'ableness *n.* असाध्यता *f.* अचिकित्स्यता *f.* Incur'ably *adv.*

Incurious ( in-kū'ri-us ) *a. not curious, careless, negligent, heedless* अजिज्ञासू, गाफिल, बेदरकारी, असावध. Incuriousness, Incuriosity *n.* गाफिलपणा *m,* अजिज्ञासूपणा *m.*

Incursion ( in-kur'-shun ) [ Fr. –L. *incurrere,* to run into. ] *n. a running into* आंत जाणें *n,* अंतर्गमन *n.* २ *a hostile inroad* परदेशावर स्वारी *f,* स्वारी *f,* आक्रमण *n.* ३ *attack* हल्ला *m,* हमला *m,* दौड *f,* आक्रमण *n.* Incur'sive *a. pertaining to, or making an incursion or inroad* परदेशावरील स्वारीसंबंधीं. २ परदेशावर स्वारी करणारा.

Incurvate (in-kur'-vāt) [L. *in,* in, and *curvus* bent.] *v. t. to curve or bend inward* आंतल्या बाजूस वळवणें -वांकडा करणें, अंतर्वक्र करणें. I. *a. curved inward* आंतल्या बाजूस वळलेला, अंतर्वक्रीभूत. Incurva'tion *n.* अंतर्वक्रीभवन *n,* आंतल्या बाजूला वळणें *n.* २ *curvature* वांकडेपणा *m,* बांक *n,* वळण *n.* ३ *the act of bending the head in bowing* (नमस्कार करितांना) डोकें नमविणें *n.* Incurve *v. t. to bend, to make crooked* मुरडणें, वांकडा करणें, आंत वांकविणें. Incurved *a. bot. bending from without inwards* अंतर्नमिष्णु.

Incus ( in'kus ) [ L. *inkus,* an anvil. ] *n. one of the small bones in the tympanum of the ear* कानाच्या आंतील भागांत असणारें ऐरणीच्या आकाराचें एक हाड *n,* स्थूणास्थि *n.* (स्थूणा = anvil).

Indebted ( in-det'ed ) [ Fr. –L. *in,* in, and Debt. ] *a. being in debt* कर्जदार, ऋणबद्ध, ऋणी, ऋणग्रस्त, देणेदार, देणेकरी. २ *obliged by somethiny received* आभारी, ऋणी, उपकृत, उपकारी, बांधलेला, बांधीव, बंदा. Indebt'edness *n.* ऋणबद्धता *f,* कर्जदारी *f.* २ आभारीपणा *m.* ३ कर्ज *n,* कर्जाची रक्कम *f.*

Indecent ( in-dē'sent ) *a. not decent, offensive to common modesty* बेशरम, निर्लज्ज, बीभत्स, निंद्य, अयुक्त, विचकट. Inde'cency *n. lack of modesty or good manners* निर्लज्जता *f,* निर्लज्जपणा *m,* असभ्यता *f,* अमर्यादा *f,* बीभत्सपणा *m.* २ *an indecent word, act, or the like* बीभत्स वचन *n,* बीभत्स चित्र *n,* नीतिविरुद्ध वचन *n,* गैरशिस्त चाल *f.* Inde'cently *adv.*

Indecipherable ( inde-sī'fer-a-bl ) *a. not decipherable, incapable of being deciphered* वाचण्यास -ओळखण्यास न येईसा.

Indecision ( in-de-sizh'un ) *n. wavering of mind, irresolution* अनिर्णय *m,* विकल्प *m,* संशय *m,* अधीर *m,* संदेह *m,* शक or षक *m.* Indecisi've *a. not bringing to a final close or to an ultimate issue* अनिर्णायक, अनिश्चायक, संदिग्ध, सविकल्प, अधेवट. २ *hesitating* अस्थिर, चंचल, पळपळीत, गुळमुळीत. Indeci'sively *adv.* Indeci'siveness *n.*

Indeclinable ( in-de-klīn'a-bl ) *a. gram. not varied by terminations* जाति, वचन व विभक्ति लागत नाहीं असा, अव्यय, अविभक्तिक, अव्ययरूप, अविकार्य.

Indecorus ( in-de-kō'rus ) *a. violating good manners, not becoming* अनुचित, अयोग्य, शिष्टतेविरुद्ध, सभ्यतेविरुद्ध, असभ्य. Indeco'rously *adv.* अनुचितपणें. Indeco'rum *n. impropriety of behaviour* सभ्यताविरोध *m,* मर्यादातिक्रम *m,* सभ्यतातिक्रम *m,* अनौचित्य *n.* २ *an indecorus or unbecoming manner* अनुचित -अयोग्य आचार *m,* अशिष्टाचार *m.*

Indeed ( in-dēd' ) [ E. *in* & *deed.* ] *adv. in reality, in truth, in fact* खरोखर, सत्य, खचित, अवश्य, वस्तुतः.

Indefatigable ( in-de-fat'i-ga-bl) [ Fr. –L. *in,* not, *de,* down, & *fatigare,* to tire.] *a. that cannot be tired, unremitting in effort, persevering* अश्रांत, अक्लांत, परिश्रमी, मेहनती, जबर उद्योगी, कधींही न थकणारा, कसालती, खप्या. Indefat'igably *adv.*

Indefeasible ( in-de-fēz'i-bl ) *a. not to be defeated or made void* रद्द करतां न येणारा, खंडनाशक्य, अखंडनीय, अच्छेद्नीय, अविनाश्य, अनिवार्य. Indefeas'ibility *n.* अखंडनीयता *f,* खंडनाशक्यता *f.* Indefeas'ibly *adv.*

Indefectible ( in-de-fekt'i bl ) *a. incapable of defect, unfailing* अदोषार्ह, निर्दोष.

Indefensible ( in-de-fens'i-bl ) *a. that cannot be maintained or justified* ( a ) राखावयास अशक्य, रक्षणायोग्य, अरक्षणीय. ( b ) अप्रतिपाद्य, अनुत्तर, बचाव करतां न येणारा. Indefens'ibly *adv.*

Indefinable (in-de-fīn'a-bl) *a. that cannot be defined* ज्याचें लक्षण सांगतां -करतां येत नाहीं असा, अलक्षणीय, अलक्ष्य, लक्षणाशक्य. Indefin'ably *adv.*

Indefinite ( in-def'i-nit ) *a. not definite, not precise or certain* मोघम, अनियमित, अनिश्चित, अभोगत, अनिर्दिष्ट, मुग्ध, मुग्धा. २ *not limited, having no certain limits* बेहद्द, बेसुमार, अमर्याद, बेठाम, बेठिकाण. ३ *bot.* अनियमित, अनिश्चित. ४ *math.* अनिश्चित. I. proposition अनिश्चित -अनियत वाक्य *n.* I. term अनिश्चित संज्ञा *f.* I. payment मोघम फेड *f,* अभोगत फेड *f,* (फेड करतेवेळीं ती फेड कशाकडे लावावयाची यासंबंधीं जेव्हां खुलासा केलेला नसतो तेव्हां त्या फेडीला मोघम किंवा अभोगत फेड असें म्हणतात.) Indef'initely *adv. not precisely, without any settled limitation* मोघम, अभोगत. २ अमर्याद, बेसुमार. Indef'initeness *n.* मोघमपणा *m,* अनियतता *f.* २ बेसुमारपणा *m.*

Indehiscent ( indē-his'se-nt ) [ Pref. *in,* not, and L. *dehiscens,* gaping. ] *a. bot. remaining closed at maturity, or not opening along regular lines* (शिरेवर) न उकलणारा, अजृंभमान, अस्फोटमान. Indehis'cence *n. bot.* अस्फोटता *f,* अजृंभित *n.*

Indeliberate ( in-del'i-bër-āt ) *a. sudden, unpremeditated* पूर्वविचाररहित.

Indelible ( in-del'i-bl ) [ Fr. -L. *in*, not, and *delibilis*, destructible -*delēre*, to destroy. ] *a. not to be blotted out or effaced* पुसतां न येण्याजोगा, पुसून न जाण्यासारखा, वज्रलेप, पक्का, पक्का बसलेला, वज्रलेपाईत, अमार्ज्य ( Sk. ). Indel'ibly *adv.*

Indelicate ( in-del'i-kāt ) *a. offensive to good manners or purity of mind, coarse* बीभत्स, लज्जाकारक, ( word ) असभ्य, अमर्याद, निर्लज, बेमुर्वतीचा, निर्भीड ( behaviour ), लज्जाप्रद. Indel'icacy *n. want of a nice sense of propriety, refinement or good taste, rudeness* निर्भीडपणा *m*, असंकोच *m*, अशिष्टता *f*, अशिष्टाचार *m*, असभ्यता *f*, असभ्यपणा *m*.

Indemnify ( in-dem'ni-fī ) [Fr. -L. *indemnis*, unharmed -*in*, not, *damnum*, loss, and *facere*, to make. ] *v. t. to make good for damage done* ( नुकसान ) भरून देणें, हानिपूरण -क्षतिपूरण करणें. २ *to save harmless* तोट्यापासून वांचवणें, तोट्यावांचून राखणें, तोटा न येण्याची हमी देणें, नुकसानीपासून बचाव करणें. Indemnifica'tion *n. act of indemnifying* तोट्यापासून राखणें *n*, तोटा भरून देणें *n*, नुकसानभरणी *f*. २ *that which indemnifies* नुकसानाची भरपाई *f*, क्षतिपूरण, हानिपूरण *n*. Indem'nified *pa. t. & p. p.* Indem'nity *n. security from damage, loss or punishment* नुकसान, तोटा, किंवा शिक्षा न होऊं देण्याची हमी *f*, नुकसान भरून देण्याची हमी *f*, जामिनगिरी *f*. [ PAPER OF I. नुकसानचिठी *f*, हानिपूरणपत्र *n*, अभयपत्र, अदंडपत्र *n*.] २ *compensation for loss or injury* प्रतिफळ *n*, नुकसानभरपाई *f*, हानिपूरण *n*, क्षतिपूर्णता *f*, दंडनिस्तार *m*. ३ ( *law* ) केलेल्या गुन्ह्याबद्दल माफी *f* -क्षमा *f*, मुक्तता *f*.

Indent ( in-dent' ) [ L. *in*, & *dens*, *dentis*, Sk. दन्त a tooth. ] *v. t. to cut into points like teeth, to notch* खांडी *f. pl.* -खांडे *m. pl.* पाडणें, करवतीकांठी -कर्कचाकार करणें,(कापून) दांते पाडणें. २ *to indenture, to apprentice* करारानें बांधणें -ठेवणें, करार करून ठेवणें. ३ *to begin further in from the margin than the rest of the paragraph* ( पारिग्राफमधील इतर ओळींपेक्षां ) पहिल्या ओळीस जास्त जागा सोडणें; as, "To I. the first line of a paragraph one em." ४ *to stamp or to press in* दाबून खांड पाडणें; as, "To I. a smooth surface with a hammer." ५ *mili. to make an order upon* (माल) मागवणें. I. *v. i. to be cut or notched* (-ला) खांडी पडणें, करवती कांठ पडणें. २ *to zigzag, to wind in and out* करवतीच्या कांठासारखें आंत बाहेर येणें, दंतुर होणें. ३ *to contract* करार -ठराव करणें. I *n. a cut or notch in the margin of anything* दांता *m*, खांच *f*, खांडा *m*, खांड *f*, दोन दांत्यांमधील जागा *f*. २ *an official requisition for supplies* (सरकारी सामानाची) मागणी *f*. Indenta'tion *n.* खांच पाडणें *n*. २ खांच *f*, खांडा *m*. ३ खांचेसारखा खळगा *m*. ४ प्यारीग्राफाच्या सुरवातीस कमीजास्त जागा सोडणें *n*. Indent'ed *a.* करवतीसारखे कांठ -दांते असलेला. २ करारानें बांधलेला. Indent'ure *n.* करवतीसारखे दांते पाडणें *n*. २ ( *law* ) *a mutual agreement in writing between two or more parties* करारनामा *m*, कौलनामा *m*, मुचलका *m*, प्रतिज्ञापत्र *n*, खत *n*. [ Indentures were at first duplicates indented so as to correspond to each other; but this indentation afterwards went out of practice and yet the name indentures remained.] I. *v. t. to bind by indentures* करारपत्रानें बांधून घेणें. I. *v. i. to run in and out, to be notched* खांच -खोंड -धार -दांते पडणें.

Independent ( in-de-pen'dent ) *a. not under the control of others, free* स्वतंत्र, स्वाधीन, मुकत्यार, स्वायत्त ( Sk. ), अपरतंत्र, अनाधीन, अपराधीन, ( very loosely) स्वैरी, स्वैरगामी, स्वैर. २ *not subject to bias or influence* स्वतंत्र, स्वबुद्ध्यनुसारी, स्वमतानुयायी. ३ *not subordinate* स्वतंत्र, स्वतंत्र बाण्याचा. ४ *affording a comfortable livelihood* (निर्वाहाचीं) स्वतंत्र साधनें असलेला. ५ *belonging to the Independents* इंडिपेंडंटनामक ख्रिस्ती धर्मपंथाचा. ६ *math.* स्वतंत्र. ७ *possessing a competence* घरचा सुखी, निर्वाहाकरितां पारतंत्र्य नसणारा, स्वतंत्र निर्वाह करणारा, घरचा संपन्न, खाऊन पिऊन खुशाल. Independ'ence *n. absence of dependence* स्वातंत्र्य *n*, स्वतंत्रता *f*, अपारतंत्र्य *n*, अपरतंत्रपणा *m*, मुकत्यारी *f*, असंबंध *m*, अनपेक्षता *f*. २ *sufficient means for comfortable livelihood* निर्वाहस्वातंत्र्य *n*, घरचा सुखीपणा *m*, स्वतंत्र निर्वाहाचीं साधनें *n. pl.* ३ *direction of one's own affairs without interference* वर्तनस्वातंत्र्य *n*, मतस्वातंत्र्य *n*, अनन्यानुवर्तन *n*, स्वमतानुगमन *n*. Declaration of I. *the solemn declaration of independence by the Congress of the United States of America* (अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांच्या कॉंग्रेसनें काढलेला) स्वातंत्र्याचा जाहिरनामा *m*. Independ'ency *n. independence* स्वातंत्र्य *n*. २ *a doctrine that a local church is independent of every other church* स्थानिकचर्चस्वातंत्र्य *n*. Independ'ently *adv.* स्वतंत्रपणानें.

Indescribable ( in-de-skrīb'a-bl ) *a. incapable of being described* अवर्णनीय, वर्णनातीत, अनिरूपणीय, शब्दातीत, वर्णन करतां न येणारा.

Indestructible ( in-de-struk'ti'bl ) *a. not destructible* अविनाशी, अक्षर, नाशाशक्य, नाहींसा करतां न येणारा. Indestructibil'ity *n.* अविनाशित्व *n*.

Indeterminable ( in-de-ter'-min-a-bl ) *a. impossible to be determined* निश्चय -निर्णय करतां येत नाहीं असा, अनिश्चेय, अनिर्णेय. २ *interminable* अंतरहित.

Indeterminate ( in-de-tėr'min-āt ) *a. not definite or determinate, vague, lax, loose* अनिश्चित, मोघम, अनियमित, संजायित, संजाइती, अभोगत, धरसोडीचा,

डळमळीत, पळपळीत, गुळगुळीत, मुग्ध. Indeter'minately *adv.* मोघम, अभोगत, अनिश्चितपणें, धरून सोडून. Indetermina'tion *n. an unsettled or wavering state of mind* अनिश्चय *m*, अनिश्चित स्थिति *f*, अनिर्धार *m*, निश्चयाभाव *m*, धरसोडपणा *m*. Indet'erminism *n.* अनियतिवाद *m*, अहेतुबद्धतावाद *m*, अबद्धेच्छावाद *m*.

Indevotion (in-de-vo'-shun) *n. impiety, irreligion* अभक्ति *f*, अनिष्ठा *f*, अश्रद्धा *f*, अनासक्ति *f*, ईश्वराभक्ति *f*, ईश्वरानिष्ठा *f*. Indev'out *a.* भक्तिहीन, भक्तिशून्य.

Index (in'deks) [L. *index -indicare*, to show.] *n. pl.* Indexes (in'deks-ez) & in *math.* Indices (in'di-sez), *that which indicates or shows* दर्शक, सूचक, प्रदर्शक, ज्ञापक, निर्देशक. २ *that which guides or points out* दर्शकचिन्ह *n*, हात *m*. ३ *a table of references in a book* अनुक्रमणिका *f*, सूचिपत्र *n*, सूचि *f*, सूचिका *f*. ४ *the forefinger or pointing finger* तर्जनी *f*, प्रदेशिनी *f*, आंगठ्याजवळचें बोट *n*, (कोणत्याही वस्तूकडे) हात करून दाखविण्याचें बोट *n*. ५ *math. the figure or letter which shows the power or root of a quantity, the exponent* घात *m*, घातप्रकाशक *m*. [FRACTIONAL I. अपूर्णांकघात *m*.] ६ *phys.* गुणक *m*; as, "Refractive I." वक्रीभवनगुणक. I. *v. t. to furnish with an index* सूचिपत्र -अनुक्रमणिका देणें -जोडणें. Index'er *n.* सूचिपत्र तयार करणारा.

India (in'di-a) [From the river Indus.] हिंदुस्थान *n*, भरतखंड *n*, भारत *n*, भरतवर्ष *n*, भारतवर्ष *n*, जम्बुद्वीप *n*.

Indiaman (in'di-a-man *or* ind'ya-man) *n. a large ship employed in trade with India* हिंदुस्थानांत जाणारें येणारें मोठें व्यापारी गलबत *n*.

Indian (in'di-an) [From the river *Indus*, Sk. सिंधु, and applied by mistake to the West Indies by their first discoverers, who thought they had arrived at India.] *n.* हिंदी (मनुष्य). हा शब्द पूर्वी वेस्ट इंडीजमधील लोकांस चुकीनें लावीत असत. भारतीय *m*, भारतदेशीय *m*. I. berry बोर *n*. Indian corn मक्का *m*. I. cucumber कांकडी *f*. I. hemp भांग *f*. I. millet सावा *m*. I. red गेरु *m*, काव *f*.

Indicate (in'di-kāt) [L. *indicare*, -*in*, and *dicare*, Sk. दिश् to proclaim.] *v. t. to point out, to show* (-कडे बोट करून) दाखविणें, नेमका दाखविणें, दर्शविणें, सुचविणें, सूचना *f*. करणें, माहिती देणें. Indi'cant *a.* दाखविणारा, दर्शविणारा, दर्शक, निदर्शक. Indica'tion *n. the act of indicating* दाखविणें *n*, दर्शविणें *n*, प्रदर्शन *n*, बोधन *n*, उद्देशन *n*, सूचन *n*, निर्देश *m*. २ *mark, token* (निदर्शक) चिन्ह *n*, खूण *f*, निशाणी *f*, लक्षण *n*, छाया *f*, सूचक *n*, व्यंजन *n*, पूर्वरूप *n*. ३ *med. symptom in a disease which serves to direct suitable remedies* रोगाचें चिन्ह *n*. ४ *discovery made or information* शोध *m*, माहिती *f*, तपास *m*, तलास *m*, सुगावा *m*. [I. OF A PASSION &c. BY GESTURE OR ACTION आविर्भाव *m*, अभिनय *m*.] Indic'ative *a. pointing out, bringing to notice* दर्शक, निदर्शक, निर्देशक, सूचक, सूची (esp. in comp.), बोधक, उद्बोधक, दर्शी (in comp.). [I. EVIDENCE सूचक -बोधक पुरावा *m*.] २ *gram.* क्रियार्थदर्शक (as, I. mood स्वार्थ *m*.). In'dicator *n.* दर्शक *m*, दर्शकपत्र *n*, ज्ञापक, सूचक. २ सूचकपत्र (as, Fare indicator in a street-car). ३ *math.* द्योतक *m*, प्रकाशक. ४ *mach.* (*a*) वाफेच्या यंत्रांतील दाब दाखविणारें घड्याळ *n*. (b) पाण्याचा सांठा दाखविणारें घड्याळ *n*. [In all the various senses in which the word indicator is used in mechanics, we have to translate it either by घड्याळ or by दर्शकपत्र or दर्शककांटा or दर्शकसूची.] In'dicatrix *n.* द्योतकशंकुच्छिन्न *n*. Indic'ated *pa. t.*

Indict (in-dit') [L. *in*, & *dictare*, freq. of *dicare*, to say.] *v. t. to charge with crime formally or in writing, esp. by a grand jury* (राजाच्या वतीनें) मोठ्या ज्युरीनें उघड दोष ठेवणें, सार्वजनिक गुन्हा केल्याबद्दल दोषी ठरविणें, सार्वजनिक गुन्ह्याचा आरोप ठेवणें. Indict'able *a.* सार्वजनिक दोष ठेवण्यासारखा, गुन्हेगार म्हणून जाहीर करण्याजोगा. In'dic'tee *n.* सार्वजनिक गुन्हा ठेवलेला मनुष्य. Indict'er *n.* सार्वजनिक गुन्हा ठेवणारा. Indict'ment *n. the written accusation against one who is to be tried by jury* ज्युरीनें चौकशी होणाऱ्या मनुष्यावर ठेवलेला लेखी आरोप *m*, आरोपपत्र *n*. २ आरोप ठेवणें *n*. ३ आरोपितता *f*.

Indifferent (in-dif'er-ent) [Lit. 'without a difference'; L. *in*, not, & Different.] *a. not making a difference, of no account* बिनकिंमतीचा, बिनमहत्वाचा, कांहीं किंमत नसलेला; as, "Dangers are to me *indifferent.*" २ *of a middle quality, mediocre, passable* मध्यम प्रतीचा, साधारण प्रतीचा, मध्यम, साधारण, चालचलाऊ, कामचलाऊ, चालण्याजोगा; as, "The state rooms are in I. order." ३ *neutral, impartial* उदासीन, समचित्त, तटस्थ, समवृत्ति, अपक्षपाती. ४ *inattentive, unconcerned* बेपरवा, बेदरकार, निरपेक्ष, निःस्पृह, निरभिलाषी. Indiff'erence *n. passableness, mediocrity* मध्यमपणा *m*, मध्यमता *f*, सामान्यता *f*. २ *freedom from prejudice, prepossession or bias; impartiality* समता *f*, समदृष्टी *f*, सारखेपणा *m*, सारखी नजर *f*, अपक्षपात *m*. ३ *unconcernedness* उदासीनता *f*, उदासीनपणा *m*, तटस्थता *f*, तटस्थवृत्ति *f*, औदासीन्य *m*, उदासीन वृत्ति *f*, अनुत्साह *m*, अनास्था *f*, हयगय *f*, बेपरवाई *f*, अनमान *m*, आळस *m*, अनादरबुद्धि *f*, कानाडोळा *m*, आनाकानी *f*, अस्पृहा *f*, निःस्पृहता *f*, उपेक्षा *f*, प्रमाद *m*, समदृष्टि *f*, वैराग्य *n*, विरक्ति *f*. Indiff'erentism *n.* औदासीन्यवाद *m*. Indiff'erently *adv.* उदासीनपणानें, औदासीन्यानें.

Indigenous (in-dij'en-us) [L. *indigenus*, *indu* or *in*, in, & *gen*, root of *gignere*, to produce.] *a. native born or originating in* मुळचा, देशांत जन्मलेला, देशी, देशोत्पन्न, गांवठी, एतद्देशीय.

**Indigent** ( in'di-jent ) [ Fr. -L. *indigens, -entis, pr. p.* of *indigere -indu* or *in*, in, and, *egere*, to need. ] *a. destitute of means of subsistence, poor* अन्नास मोताद, गरीब, दरिद्री, भिकारी, भिकार, कंगाल. In'digency *n.* In'digence *n. want of means* गरजूपणा *m.* २ *extreme poverty* दारिद्र्य *n*, दरिद्रावस्था *f*, भिकारपणा *m*, कंगालपणा *m*, कंगाली *f*.

**Indigested** (in-di-jes'ted) [L. *in*, not, and Digested.] *not digested* पचन न झालेला, न जिरलेला, अजीर्ण, अपक्व. २ *unarranged, not methodised* अव्यवस्थित, विस्कलित, न जुळलेला. ३ *not ripened* न पिकलेला. ४ *not softened by heat* कच्चा, कठीण, मऊ न केलेला. Indigest'ible *a. not digestible* न पचण्याजोगा, दुष्पच, जड. २ *not digestible in the mind* अमान्य, अग्राह्य; as, "An I. simile." Indigest'ion *n. want of due digestion* अजीर्ण *n*, अजीर्णता *f*, अपचन *n*. [FLATULENT I. विदग्धाजीर्ण *n*. SLIGHT I. अजीर्णांश *m*. WEIGHT ON THE STOMACH FROM I. जाड्य *n*. ]

**Indignant** ( in-dig'nant ) [ Lit. 'considering as unworthy' or 'improper' -L. *indignans*, pr. p. of *indignor -in* not, and *dignus*, worthy.] *a. affected with anger and disdain* क्रोधाविष्ट, तप्त, संतप्त, क्रुद्ध, कोपज्वलित. Indig'nantly *adv.* Indigna'tion *n. anger mingled with contempt or disgust* क्रोध *m*, त्वेष *m*, रोष *m*, संताप *m*, चीड *f*.

*N. B.*—Indignation is caused by what is unnatural and base.

**Indignity** ( in-dig'ni-ti ) [ Lit. 'unworthiness;' Fr. -L. *indignitas.* ] *n. unmerited or contemptuous treatment, incivility with contempt or insult* अवहेलना *f*, अपमान *m*, हेलना *f*, हेला *f* (Sk.), अवज्ञा *f*, अनादर *m*, अव्हेर *m*, शोभा *f*. ( *colloq. & iron.* )

**Indigo** ( in'di-go ) [ Fr. -Sp. *indico*-L. *indicus*, Indian. ] *n.* (*the indigo plant*) नीळ *f*, निळीचें झाड *n*, निळंबी *f*. २ *the indigo colour* नीळ *f*, निळीचा रंग *m*, गुळी *f*, काळी गुळी *f*, निळी *f*. I. *a.* निळीसारखा.

**Indirect** ( in-di-rekt' ) [ L. *in*, not, & Direct. ] *a. not direct or straight* असरळ, वांकडा, वांकडातिकडा, वळणाचा, फेऱ्याचा; as, "An I. road." आडवातिडवा रस्ता *m*. २ *not tending to a result by the plainest course* अप्रत्यक्ष, परोक्ष, पर्यायाचा, पडद्याचा, आड. ३ *fig. oblique* आडवाटेचा, आडमार्गाचा, आडरस्त्याचा, वांकडा. ४ *not straightforward or honest* असरल (व्यवहार), अप्रामाणिक, कुटिल, वक्र, वांकडा, गैर, गैररीतीचा, गैरमार्गाचा. ५ ( *Log. & Math.* ) *not reaching the end aimed at by the plainest method* अप्रत्यक्ष, गौण, परोक्ष, उलटा. [ I. PROOF उलटी सिद्धता (as oppo. to DIRECT PROOF = सुलटी सिद्धता *f*).] Indirect'ly *adv. obliquely, unfairly* आडवाटेनें, आडमार्गानें, पडद्यानें, पर्यायानें, अप्रत्यक्ष मार्गानें. २ *math.* उलट्या रीतीनें ( as oppo. to सुलटी रीत = Direct method). Indirect'ness *n. dishonest practices* असरलता *f*, वांकडेपणा *m*, अनृजुता *f*, &c.

**Indiscernible** ( in-diz-ern'i-bl ) *a. not discernible* ओळखून काढतां न येणारा, ओळखूं न येणारा, अतिसूक्ष्म.

**Indiscoverable** ( in-dis-kuv'er-a-bl ) *a. not discoverable* हुडकून -शोधून काढतां न येणारा.

**Indiscreet** ( in-dis-krēt' ) [ Fr. -L. *in*, not, & Discreet. ] *a. not discreet, imprudent, injudicious* युक्तायुक्त विचार न करणारा, अविचारी, सारासारविचार नसलेला, असमंजस, अविवेकी, विवेकशक्तिहीन. Indiscreet'ly *adv.* अविचारानें, असमंजसपणानें. Indiscreet'ness, Indiscret'ion *n. want of discretion, rashness* अविवेक *m*, अविचार *m*, विवेकाभाव *m*, असमंजसपणा *m*. २ *an indiscreet act* अविचाराचें कृत्य *n*, प्रमाद *m*.

**Indiscrete** ( in-dis-krē't ) [L. *in*, not, and Discrete.] *a. not discrete or separated* अविभक्त, एकच.

**Indiscriminate** (in-dis-krim'i-nāt) *a. not distinguishing, confused, promiscuous* विचारहीन, विचारशून्य, तारतम्यहीन, गोंधळाचा, अविचाराचा, अविवेकाचा, योग्यायोग्यविचारशून्य, पात्रापात्रविचारशून्य, तारतम्यशून्य. Indiscrim'inately *adv.* तारतम्यविचार केल्यावांचून, भेदाभेद पाहिल्यावांचून. Indiscrim'inating *a.* अविवेकी, योग्यायोग्य विचार -तारतम्यविचार न करणारा. Indiscrimina'tion *n. want of discrimination* तारतम्याभाव *m*, सारासारविचारशून्यत्व *n*, अविचार *m*, अविवेक *m*, अविवेचना *f*. Indiscriminative *a.* तारतम्यशून्य, अविवेकी.

**Indispensable** ( in-dis-pens'a-bl ) *a. that cannot be dispensed with, absolutely necessary* अत्यंत जरूरीचा, अत्यावश्यक, अत्याज्य, टाकतां -सोडतां न येणारा, जरूर पाहिजे असलेला, जरूर, अगत्याचा. Indispens'ably *adv.* अवश्य, अगत्य, अगत्यपूर्वक, जरूर. Indispen'sableness *n.*

**Indispose** ( in-dis-pōz' ) *v. t. to render indisposed or unfit* निरुपयोगी -निकामी -निरर्थक -नालायक करणें. २ *to make somewhat ill* ( प्रकृतींत ) विकृति -विकार उत्पन्न करणें, शरीराचें अस्वास्थ्य उत्पन्न करणें, प्रकृति बिघडविणें, अस्वस्थ -बेआराम करणें. ३ *to disincline* मन फिरविणें *g. of o.*; परतविणें, फिरविणें, पालटवणें. ४ *to make unfavourable* ( with *towards* ) अप्रसन्न करणें, (-वर) मर्जी खप्पा करणें. Indisposed' *a. sick, ill* आजारी, अस्वस्थ, बिमार. २ *unwilling* नाखूष, नाराज, अराजी. Indisposit'ion *n. slight illness* अस्वास्थ्य *n*, अस्वस्थता *f*, आजार *m*, आजारीपणा *m*, बिमारी *f*, मांदगी *f*, विकार *m*, कसर *f*, विकृति *f*, असमाधान *n*. २ *the condition of wanting affinity* नावड *f*, अनावड *f*. ३ *aversion, unwillingness* नाखुषी *f*, नाखूषपणा *m*, अनिच्छा *f*.

**Indisputable** ( in-dis'pū-ta-bl ) *a. too evident to be called in question, certain* निर्विवाद, बिनतकरार, संशय घेण्यास जागा नसलेला, विवादातीत.

**Indissoluble** ( in-dis'ol-ū-bl ) *a. not capable of being dissolved* अविद्राव्य, अद्राव्य, द्रावणाशक्य, द्रावणानर्ह,

अद्रावणीय, अद्रव. २ *inseparable* वेगळा करतां न येणारा, अविभाज्य. ३ *that cannot be broken or violated, binding for ever* अभेद्य, मोडतां न येणारा, अनतिक्रम्य, अतिक्रमण करतां न येणारा, नेहमीं पाळावा लागणारा, वज्रप्राय, दृढ. Indissolubili'ty *n.* अविद्राव्यता *f*, &c.

Indistinct ( in-dis-tingkt' ) *a. not distinct or plainly marked* अस्पष्ट, संदिग्ध, पुसट, आंधळा (*fig.*), अव्यक्त, अभिन्न. २ *obscure, confused, faint* अप्रकाश, चुटपुटा, दिसे न दिसेसा, अंधुक, कळे न कळेसा. Indistinct'ly *adv.* अस्पष्टपणें, अंधुकपणें. Indistinct'ness *n. want of definiteness* अस्पष्टपणा *m*, अस्पष्टता *f*, अव्यक्तता *f*, घोंटाळा *m*. २ *dimness* अंधुकता *f*.

Indistinguishable ( in-dis-ting'gwish-a-bl ) *a. that cannot be distinguished* ओळखूं न येणारा, अभिन्न.

Indite ( in-dīt' ) [ O. Fr. *enditer, endicter* from root of Indict, which see. ] *v. t. to dictate what is to be uttered or written* (म्हणावयाचा किंवा लिहावयाचा मजकूर ) सांगणें, ( लिहावयास ) घालणें, स्फूर्ति देणें. २ *to compose, to write* रचणें, लिहिणें, करणें, कवन *n.* -रचना करणें. I. *v. i.* रचणें, कवन करणें, लिहिणें. Indite'ment *n.* लिहिण्यास स्फूर्ति देणें *n*, सांगणें *n*, &c. Indit'ed *pa. t.* & *p. p.* Indit'ing *pr. p.* & *v. n.*

Individual ( in-di-vid'ū-al ) [ L. *individuus*, and suffix *-al*, through *in*, not, & *dividuus*, divisible -*dividere*, Sk. विध्‌ to divide. ] *a. not divided, subsisting as one* अविभक्त, एकात्मक, एकजीव, एकव्यक्तीभूत, अभिन्न, अभिन्नात्मक, अभिन्नरूप, एकटा. २ *pertaining to one only* एकव्याचा, एका व्यक्तीचा, एकाचा, एकासंबंधीं, पृथक्, दरेकाचा, पृथगात्मक, पृथक्व्यक्तिक, वैयक्तिक, व्यक्तिविषयक. I. *n. a single animal, person, plant or thing* एकजण, जण, व्यक्ति *f*, इसम *m*, असामी (of persons), नग *m* ( of things). २ *a thing or being incapable of division* अविभाज्य वस्तु *f*. Individ'ualism *n. individuality* प्रत्येकता *f*, व्यक्तिता *f*. २ *self-interest, selfishness* स्वार्थ *m*, स्वतःचा फायदा *m*, स्वार्थैकदृष्टि *f*. ३ *pol. eco.* व्यक्तिस्वामित्वभाव *m* ( व्यक्तिः एव स्वामी व्यक्तिस्वामी तस्य भावः व्यक्तिस्वामित्वम्‌ ), व्यक्तिवाद *m*. ४ *philos.* व्यक्तिस्वातंत्र्यवाद *m*. Individ'ualise *v. t.* व्यक्तित्व देणें, (विशेष) व्यक्तीचें रूप देणें, व्यक्तिता -निराळेपणा देणें. Individual'ity *n. separate or distinct existence, oneness, unity* व्यक्तित्व *n*, व्यक्तिता *f*, पृथक्त्व *n*, पृथगात्मकता *f*, एकत्व *n*, पृथकूपणा *m*. २ *distinctive character* आपलेपणा *m*, स्वत्व *n*, विशेषपणा *m*, विशेष *m*, व्यक्तित्व *n*. Individ'ually *adv.* व्यक्तिशः, प्रत्येकानें, दरेकानें, एकेक, व्यक्तिवार, असामीवार. २ अविभागतः.

Indivisible ( in-di-viz'i-bl ) *a. not divisible* अविभाज्य, अविभजनीय, निःशेष भाग करतां -पाडतां न येणारा, निरवयव. I. *n.* (*math.*) *an indefinitely small quantity* अतिलहान संख्या *f*. Indivisibil'ity *n.* अविभाज्यता *f*. Indivis'ibly *adv.* निःशेष भाग न जातां.

Indocile ( in-dō'sīl, in-dos'il ) [ L. *in*, not, & Docile.] *a. not disposed to be instructed* अनुपदेश्य, अशिक्ष्य. २ *not tractable or docile* ताब्यांत -कह्यांत आणतां न येणारा, माणसाळतां न येणारा. Indocil'ity *n.* अविनेयता *f*, दुःशिक्षता *f*, कह्यांत न येण्याचा स्वभाव *m*.

Indoctrinate ( in-dok'trin-āt ) [ L. *in*, into, & *doctrina*, doctrine. See Doctrine.] *v. t. to instruct in any doctrine, to imbue with any opinion* एखादें मत मनांत भरवणें -ठसवणें -बिंबविणें, विशिष्ट मताची दीक्षा देणें. Indoctrina'tion *n. instruction in the rudiments and principles of any science* (कोणत्याहि शास्त्राच्या किंवा विद्येच्या ) मूळ सिद्धांतांचें शिक्षण *n*.

Indolent ( in'do -lent ) [ Lit. & orig. 'free from pain' or 'trouble', from L. *in*, not, and *dolens, dolentis*, pr. p. of *dolere*, to suffer pain. ] *a. indisposed to activity* आळशी, कामाचा कंटाळा असलेला, अनुद्योगी, सुस्त, आळसट, उद्योगशत्रु, कामआळशी, आंगचोर, अव्यवसायी, ढिला, ढील, आंगजड, जड, शिथिल. २ *med. causing little or no pain* अल्पदुःखकारक, अत्यल्प दुःख देणारा, लवकर न भरणारा; as, "I. tumour." [I. ULCER लवकर न भरणारें क्षत *n*, दीर्घसूत्री व्रण *m*.] In'dolence *n. habitual idleness, sloth, inactivity* आळस *m*, आळशीपणा *m*, सुस्ती *f*, सुस्तपणा *m*, आलस्य *n*. In'dolently *adv.* आळसानें, सुस्तीनें.

Indomitable ( in-dom'it-a-bl ) [ L. *indomitus*, untamed –*in*, not, and, *domāre*, to tame. ] *a. that cannot be tamed, not to be subdued* दमनाशक्य, अदम्य, अदमनीय, न वांकणारा -दबणारा -नमणारा.

Indoor ( in-dōr ) [ E. *In* and *Door.* ] *a. done within doors* घरांतला, घरांत केलेला, घरांत घेतलेला. २ *within a house or institution* घराच्या आंतला, संस्थेच्या आंतला; as, "I. patients."

Indorse ( in-dors' ) [ Through an old form *endosse* –Fr. *endosser* –Low L. *indorso*, –*in*, upon, and *dorsum*, the back. ] *v. t. to write upon the back of* (-च्या) पाठीवर -पाठीमागें ( शेरा वगैरे ) लिहिणें. Same as Endorse, which see.

Indubious ( in-dū'bi-us ) [ L. *in*, not, & Dubious. ] *a not dubious, certain* असंशयित, विनसंशयाचा, संशयातीत, संशय नसलेला, पक्का, ठाम, निश्चित, सुनिश्चित. Indu'biousness *n.* निश्चितपणा *m*, पक्केपणा *m*. Indu'bitable *a.* निःसंशय, निःसंशयाचा, निःसंदिग्ध, निश्चयात्मक, खचित. Indu'bitableness *n.* निःसंशयत्व *n*, असंदिग्धता *f*, खचितपणा *m*. Indu'bitably *adv.* बेशक, निश्चयात्मक.

Induce ( in-dūs' ) [ L. *inducere, inductum*, –*in*, into, and *ducere*, to lead. Induce शब्दाचा मूळ अर्थ 'आंत पुढें नेणें -आणणें, दृष्टीस पाडणें, दाखवणें, दाखल करणें' असा आहे; जसें, "The poet may be seen inducing his personages in the first Iliad."] *v. t. to influence, to prevail on, to move by persuasion or influence* (चें) मन वळविणें, (-ला) वळवणें, (-चें)

मन ओढणें, शिरवणें, (-ला) वश करून घेणें, उत्तेजन देणें, प्रवृत्त करणें. २ *to bring on, to effect, to cause* उत्पन्न करणें, घडवून -बनवून आणणें, उठवणें; as "Sleep induced by exhaustion." ३ *phys. to cause* (as an electric state) *by mere proximity of surfaces* (without contact or transmission) उपपादन करणें, प्रवर्तन करणें. ४ *to generalise or conclude as an inference from all the particulars* (विशेष गोष्टींवरून) सामान्य सिद्धांत -अनुमान काढणें -बांधणें, व्याप्ति साधणें -ठरविणें, उन्नयन करणें (as oppo. to अवनयन करणें = to deduce). Induc'ement *n. that which induces, a motive that leads to action* आमिष *n*, प्रयोजन *n*, उत्तेजन *n*, प्रयोजक, उत्तेजक, प्रवर्तक, प्रलोभन *n*, सबब *f*, लालूच *f*. २ (*law*) *a leading to, motive* सबब *f*, कारण *n*, हेतु *m*, निमित्त *n*. Induc'ible *a.* मन वळविण्याजोगा, घडवून आणण्याजोगा, &c. For more meanings see verb. २ *inferable* अनुमान काढण्याजोगा. Induct' *v. t.* (*lit.*) *to bring into, to introduce* आंत आणणें, प्रवेश करविणें, आंत घालणें -नेणें. २ *to put in possession as of a benefice or office* जागेवर -अधिकारावर इ० आणणें, संस्कारपूर्वक -विधिपूर्वक -समारंभानें आणून बसविणें -अधिकृत करणें, (यथाविधि) स्थापना करणें *g. of o.*, अधिकारावर बसविणें, वृत्तीवर बसविणें. Induc'tion *n.* (*lit.*) *commencement* सुरवात *f*, प्रारंभ *m*, उपक्रम *m*. २ *the act of reasoning from particulars to generals* (विशेष गोष्टींवरून) सामान्य सिद्धांत काढणें *n*, अनुमान *n*, व्याप्तिग्रह *m*, व्याप्तिसाधन *n*, आगम *m* (as oppo. to निगमन = deduction), उन्नयन *n* (as oppo. to अवनयन = deduction). [LOGICAL I. तर्कशास्त्रात्मक अनुमान *n*. MATHEMATICAL I. गणितशास्त्रात्मक अनुमान *n*. PHILOSOPHICAL I. तत्त्वज्ञानपद्धत्यात्मक अनुमान *n*.] ३ *the introduction of a clergyman into a benefice* धर्मवृत्तीवर यथाविधि स्थापना *f*, संस्कारपूर्वक स्थापना *f*. ४ (*phys.*) *an impress of an electrical or magnetic force or condition from one body on another* प्रवर्तन *n*, उपपादन *n*. [I. COIL प्रवर्तक -उपपादक वेंटाळें *n*. MAGNETIC I. चुम्बकीय प्रवर्तन *n*, चुम्बकीय उपपादन *n*.] Indu'ctional *a.* अनुमानासंबंधीं, अनुमानजनित, आनुमानिक. Induc'tive *a. lit.* नेणारा, ओढणारा. २ *phys.* प्रवर्तक, प्रवृत्तिकारक, उपपादक. ३ (*log.*) आगामी, आनुमानिक, व्याप्तिसाधक, उन्नयनाचा, आगमाचा. [I. LOGIC आगम *m*, आगामी तर्कशास्त्र *n*. I. SYLLOGISM व्याप्त्यनुमान *n*.] ४ अनुमानजन्य. Inductom'eter *n.* उपपादकत्वमापक *m*. Induct'or *n.* उपपादक *m*, प्रवर्तक *m*.

Induct, Inductor, Inductometer, See uuder Induce.

Inductile (in-duk'til) [L. *in*, not, & Ductile.] *a. that cannot be drawn out into wire or thread* अतन्य, ओढून तार -काढतां न येणारा, तंतुभवनायोग्य. Inductil'ity *n.* ओढून तार करतां न येण्याचा गुण *m*, तंतुभवनायोग्यता *f*.

Indue (in-dū') [L. *induo, induere*, to put on.] *v. t. to put on* (as clothes), घालणें, पेहरणें, आंगावर घालणें -घेणें -चढविणें -धारण करणें. २ *to supply or endow with* पुरविणें, (-चा) पुरवठा करणें, देणें, युक्त -विशिष्ट -समन्वित करणें. Indued' *a.* संपन्न, युक्त. Indue'ment *n.* पेहराव करणें *n*. २ देणें *n*, &c. Indu'ing *pr. p.*

Indulge (in dulj') [L. *indulgere*, which perh. is from *in*, towards, & *dulcis*, sweet.] *v. t. not to oppose or restrain* अटकाव -अडथळा न करणें, (-च्या) आड न येणें. २ (said of a habit or desire) *to give free course to* तृप्त करणें, पुरी करणें, असूं देणें, राखणें, बाळगणें, चालवणें, चालूं देणें. ३ (said of a person) *to gratify by compliance, to humour* (-चे) लाड करणें -चालवणें -पुरवणें, लाडकावणें, लाडावणें, लडिवाळ -कोड-कौतुक पुरवणें -चालवणें -पाळणें, छंदोनुवर्तन *n* -छंदोनुवृत्ति -छंदोनुरोध करणें. ४ *to grant by favour* प्रसन्न होऊन -अनुग्रह म्हणून देणें. I. *v.i.* यथेष्ट भोग घेणें -करणें, इच्छा -कामना तृप्त करून घेणें. २ *to practise a forbidden act without restraint* (निषिद्ध कर्माचें) यथेष्ट आचरण करणें. Indulg'ement, Indul'gence *n. gratification* लाड *m*, कोड *n*, कौतुक *n*, छंदोनुवर्तन *n*, छंदोनुवृत्ति *f*, छंदोनुरोध *m*, छूट *f*, लालन *n*. २ *favour granted* (मेहेरबानगीची) देणगी *f*, प्रसाद *m*, कृपा *f*, अनुग्रह *m*. ३ *forbearance of restraint or control* असंयम *m*, अनिग्रह *m*. ४ *remission of the temporal punishment due to sins, granted by the Pope or Church* पापापासून मुक्ति *f*, पापविमोचन *n*. Indul'gent *a. mild, not severe* सौम्य, सदय, दयार्द्र, क्षमावान्, क्षमापूर्वक, कोमल, नरम, मऊ, मृदु. २ *yielding to the wishes of others, ready to gratify* लाडपुरव्या, लाडचालव्या, लाड पुरवणारा -चालविणारा, छंदोनुवर्ती *pop.* छंदानुवर्ती, छंदोनुसारी *pop.* छंदानुसारी. Indul'gently *adv.* लडिवाळपणानें. २ सौम्य दृष्टीनें, क्षमापूर्वक, क्षमापुरःसर.

*N. B.*—It is remarked by Johnson, that if the matter of indulgence is a single thing, it has *with* before it: if it is a habit, it has *in*; as, he indulged himself *with* a glass of wine or *with* a new book; he indulged himself *in* idleness or intemperance. Webster.

Induplicate (in-dū'pli-kāt) [Pref. *in*, and Duplicate.] *a. bot. with the margins bent inwards, and the external face of these edges applied to each other, without twisting* अंतःपुटित.

Indurate (in'dū-rāt) [L. *indurare, induratum*, –*in*, in, and *durare*, to harden –*durus*, hard.] *v. t. to harden* (as the feelings) (चें मन इ०) कठिण -घट्ट -निर्दय करणें, मार्दव नाहींसें करणें. I. *v. i. to grow hard, to harden* कठिण -घट्ट -टणक होणें -बनणें, ताठ होणें. I. *a. hardened, not soft* कठीण केलेला, कठीण झालेला. २ *unfeeling* कठोर, निर्दय, निष्ठुर, क्रूर. Indura'tion *n.* कठिण करणें *n*. २ काठिण्य *n*,

कठिणपणा *m*, दृढीकरण *n*. ३ *med.* इंद्रियकाठिण्य *n*, इंद्रिय कठिण होणें *n*. ४ *obduracy, stiffness* कठोरता *f*, कठिणपणा *m*, निर्दयता *f*, निर्दयपणा *m*.

Indusium (in-dū'zi-um) [L., a woman's under-garment –*induere*, to put on.] *n bot.* Indusia *pl.* रेणुकोशाच्छादन *n*. (b) संग्राहककुंतलवलय *n*.

Industrious (in-dus'tri-us) [Fr. –L. *in*, within-& *struere*, to build up, to arrange.] *a. diligent, laborious, active* उद्योगी, उद्योगशील, (स्वभावतः) उद्योगप्रिय, मेहनती, परिश्रमी, खप्या, कष्टाळु, अनलस or अनाळशी, निराळशी, स्वस्थ न बसणारा. Indus'trial *a. relating to, or consisting in, industry* औद्योगिक, उद्योगधंद्या -चा -संबंधीं. २ *concerning those who are employed in manual labour and their wages* मजूर व त्यांचा पगार किंवा वेतन यांसंबंधीं. ३ *consisting in industry* उद्योगाचा, परिश्रमाचा, मेहनतीचा, उद्योगमय, औद्योगिक कला किंवा कारागिरी यांसंबंधीं. [I. EXHIBITION औद्योगिक प्रदर्शन *n*, उद्योगधंद्यांचें प्रदर्शन *n*. I. SCHOOL उद्योगशाला *f*. I. ORGANIZATION उद्यमवर्धक संस्था *f*, उद्यमवर्धक व्यवस्था *f*.] Indus'trialism *n. devotion to industrial pursuits* उद्योगप्रियता *f*, उद्यमप्रियता *f*. २ *that system or condition of society in which industrial labour is the chief and most characteristic feature* (opp. to feudalism and the military spirit) औद्योगिक बाणा *m*. (on the analogy of लष्करी बाणा), उद्योगकलाप्रियता *f*, उद्योगधंद्यांची आवड *f*, औद्योगिकत्व *n*, उद्योगकलालोलुपता *f*. Indus'triously *adv.* मेहनतीनें, मेहनत -उद्योग करून, उद्योगपूर्वक, परिश्रमपूर्वक, उद्योगानें. In'dustry *n. steady attention to business, assiduity* उद्योग *m*, उद्यम *m*, उद्योगप्रियता *f*, परिश्रम *m*, मेहनत *f*, अनालस्य *n*, अनलसता *f*, निरालस्य *n*, प्रयास *m*, व्यवसाय *m*. २ *any department or branch of art, occupation or business employing much labour or capital, and being a distinct branch of trade* उद्योगधंद्याचें -उद्योगकला -शिल्पाचें खातें *n*. ३ *labour, laboriousness* मेहनत *f*, परिश्रम *m*.

Indwelling (in'dwel-ing) *a. dwelling within* आंत -हृदयांत वास करणारा, अंतःस्थ, अंतःस्थित, अंतराधिष्ठित. I. *n. residence within, or in the heart or soul* अंतर्वास *m*, अंतःस्थिति *f*, अंतराधिष्ठान *n*, हृदयस्थिति *f*.

Inebriate (in-ē'bri-āt) [L. *inebriare* –*in*, intens., & *ebriare*, to make drunk -*ebrius*, drunk. See Ebriety.] *v. t. to make drunk, to intoxicate* निशा चढविणें, मत्त करणें, कैफ *m*. -अम्मल *m*. आणणें -चढवणें. Inebria'tion *n*. मद *m*, माद *m*, कैफ *m*. Inebri'ety *n*. कैफ *m*, छाकटेपणा *m*.

Inedited (in-ed'it-ed) *a. not edited, unpublished* असंपादित (ग्रंथ), न छापलेलें (पुस्तक).

Inedible (in-ed'i-bl) *a. not fit to be eaten* खाण्यास अयोग्य, अखाद्य, अभक्ष्य, अभक्षणीय.

Ineffable (in-ef'a-bl) [Fr. –L. *ineffabilis* –*in*, not, *effabilis* –*effor*, to speak or utter –*ef*, for *ex*, out, & *fari*, to speak.] *a. that cannot be spoken or described* बोलून सांगतां न येणारा, वर्णन करतां न येणारा, शब्दातीत, अकथनीय, अनिर्वाच्य, अनिर्वचनीय.

Ineffaceable (in-ef-fās'a-bl) *a. that cannot be effaced or rubbed out* पुसून टाकतां न येणारा, घांसून -खरडून न जाणारा, वज्रलेप, पक्का, कायम, टिकाऊ.

Ineffective (in-ef-fek'tiv) *a. inefficient, useless* कुचकामी, बेकामी, निरुपयोगी, व्यर्थ, निरर्थक. Ineffect'iveness *n*. कुचकामीपणा *m*, निरर्थकता *f*.

Ineffectual (in-ef-fek'tū-al) *a. fruitless* निष्फळ, विफल, फुकट, वायां, अगुणकारी. Ineffec'tually *adv.* Ineffec'tualness *n*. निष्फळता *f*, विफलता *f*.

Inefficacious (in-ef-fi-kā'shus) *a. not having power to produce an effect* अकार्यकारी, अगुणकारित्वधर्मी. Ineffica'ciously *adv.* Inef'ficacy *n. want of efficacy or power to produce an effect* अकार्यकारिता, कार्यकारित्वशून्यता *f*, अगुणकारित्व *n*.

Inefficient (in-ef-fish'ent) *a. effecting nothing* अपरिणामकारक, अपरिणामी, अकार्यसिद्धिकर. Ineffic'iency *n*. अपरिणामकारकता *f*.

Inelastic (in-e-las'tik) *a. not elastic* अस्थितिस्थापक.

Inelegance,-cy (in-el'e-gans, -gan-si) *n. want of elegance* अशोभा *f*, असौंदर्य *n*, विशोभा *f*. Inel'egant *a*. अशोभन, कुरूप, विशोभित. Inel'egantly *adv.*

Ineligible (in-el'i-ji-bl) *a. not capable or worthy of being chosen* न निवडण्यासारखा, निवडणूक न करण्यासारखा, निवडून न देण्याजोगा, निवडणुकीला अयोग्य. Ineligibil'ity *n*. निवडणुकीला अयोग्यता *f*.

Ineloquent (in-el'o-kwent) *a. not fluent or persuasive* मुखदुर्बळ, वक्तृत्वहीन, हीनवाक्, हीनवक्ता. Inel'oquence *n*. मुखदौर्बल्य *n*, जिभेचा जडपणा *m*.

Inept (in-ept') [Fr. –L. *ineptus* –*in*, not, and *aptus*, apt. See Apt.] *a. not apt or fit, unsuitable* अयोग्य, न जमणारा, न पटणारा, अनुचित, नालायक. २ *foolish, inexpert* अडाणी, वेडगळ, मूर्ख. Inept'ly *adv.* अयोग्यतेनें. २ अडाणीपणानें. Inept'itude *n*. अयोग्यता *f*, अयोग्यपणा *m*. २ अडाणीपणा *m*, वेडगळपणा *m*.

Inequality (in-e-kwol'i-ti) *n. want of equality, difference* असाम्यता *f*, साम्याभाव *m*, असाम्य *n*, भिन्नता *f*, भेद *m*, विषमता *f*, वैषम्य *n*. २ *inadequacy, incompetency* अयोग्यता *f*, नालायकी *f*. ३ *unevenness* विषमता *f*, बिनसारखेपणा *m*, उच्चनीचपणा *m*, उंचनीचपणा *m*, उंचसखलपणा *m*, खडबडीतपणा *m*. ४ *dissimilarity* निराळेपणा *m*, भेद *m*, भिन्नता *f*.

Inequitable (in-ek'wi-ta-bl) *a. not equitable, unfair, unjust* अयोग्य, अन्यायी, अन्यायाचा, गैरवाजवी.

Ineradicable (in-e-rad'i-ka-bl) [L. *in*, not, and root of Eradicate, which see.] *a. not able to be eradicated or rooted out* समूळ उपटून टाकतां न येणारा, उध्वस्त करतां न येणारा. Inerad'icably *adv.*

Inert ( in-ért' ) [ Lit. 'without *art* or skill,' from L. *iners, inertis* –*in* not, and *ars, artis*, art. See Art. ] *a. without the power of moving itself or of active resistance to motion* गतिहीन, चलनशून्य, चेष्टारहित, चेष्टाशून्य, अचेतन, अचेष्ट, जड; as "Matter is I." २ *slow, dull, inactive* मंद, सुस्त, थंड, जड, शिथिल, ढोमा, ढिला. Iner'tia *n.* जडत्व *n*, निष्क्रियत्व *n*, स्थितिसातत्य *n*. Inert'ness *n.* अचेतनत्व *n*, चलन -शून्यता *f.* २ मंदी *f*, सुस्ती *f*. Inert'ly *adv.*

Inertia. See under Inert.

Inesculent *a.* Same as Inedible.

Inessential ( in-es-sen'shal ) *a. not essential or necessary* बिनजरूरीचा, जरूर नसलेला, अनवश्यक, गौण.

Inestimable ( in-es'tim-a-bl ) *a. not able to be estimated or valued, priceless* अमूल्य, अमोल, बिनमोल, अमोलिक, मूल्यातीत, किंमत करतां न येण्याइतका, उंची, अत्युत्कृष्ट. Ines'timably *adv.*

Inevitable ( in-ev'it-a-bl ) [ Fr. –L. *inevitabilis* –*in*, not, and *evitabilis*, avoidable –*e*, out of, and, *vitare*, to avoid.] *a. not able to be evaded or avoided* अनिवार्य, दुर्निवार्य, अपरिहार्य, निवारणाशक्य, टाकतां न येणारा, अनिवार, बिनतोड, ज्यास तोड काढतां येत नाहीं असा. Inev'itableness *n.* In'evitibil'ity *n.* अपरिहार्यता *f*, अनिवार्यता *f*. Inev'itably *adv.*

Inexcusable ( in-eks-kūz'a-bl ) *a. unpardonable, not admitting excuse* माफ करण्यास अयोग्य, अक्षम्य, अक्षंतव्य, क्षमा करण्यास अयोग्य. २ *not to be palliated, unjustifiable* अनिवार्य (दोष), अपरिमार्जनीय. Inexcus'ableness *n. the quality of not admitting of excuse or justification* अक्षम्यता *f*. २ अनिवार्यता *f*. Inexcus'ably *adv.*

Inexecution ( in-ek-se-kū'-shun ) *n. neglect of execution, non-performance* न करणें *n*, अमलांत न आणणें.

Inexertion ( in-eg-zer'-shun ) *n. want of effort, defect of action* अपरिश्रम *m*, आळस *m*, सुस्ती *f*.

Inexhausted (in-egz-hawst'ed) *a. not spent, not emptied* न थकलेला, न संपलेला, अक्षय, व्यय-क्षय-शून्य, अपार, अनंत. Inexhaust'ible *a.* न थकणारा, न खपणारा, बेसुमार, अक्षय. Inexhaustibil'ity *n.*

Inexistence ( in-eg-zist'ens ) *n. want of being or existence* अभाव *m*, असत्ता *f*, असत्व *n*. Inexist'ent *not having being* अविद्यमान, नसणारा, अवर्तमान.

Inexorable ( in-egz'or-a-bl ) [ L. *in* not, *ex*, out & *orare*, to entreat –L. *os*, *oris*, mouth. ] *a. not to be moved by entreaty, unyielding* प्रार्थनेनें मन वळविण्यास अशक्य असा, कठोर, पाषाणहृदय.

Inexpedient ( in-eks-pē'di-ent ) *a. unfit, improper, not advisable or judicious* प्रसंगायोग्य, प्रसंगानुचित, अनुपयुक्त, अकर्तव्य. Inexpe'diently *adv.* Inexpe'dience -cy *n.* प्रसंगायोग्यता *f*.

Inexperience (in-eks-pē'ri-ens) *n. want of experience* अननुभव *m*, निरनुभव *m*, अप्रत्यय *m*, अननुभूति *f*, अजाणपणा *m*, लडुपणा *m*, कच्चेपणा *m*, गैरमाहिती *f*, कोंवळेपणा *m*, व्यवहाराज्ञान *n*, व्यवहाराज्ञता *f*. Inexpe'rienced *a.* अननुभवी, अजाण, अजाणता.

Inexpert ( in-eks-pert' ) *a. unskilled* नाकसबी, अनाडी, अकुशल, अपटु, घसक्या, घसब्या, हीनकौशल्य.

Inexpiable ( in eks'pi-a-bl ) *a. admitting of no atonement or satisfaction* प्रायश्चित्तातीत, ज्याला प्रायश्चित्त नाहीं असा, प्रायश्चित्तानें कमी न होणारा.

Inexplicable ( in-eks'-pli-ka-bl ) *a. that cannot be explained, not explainable* ज्याचा उलगडा व्हायाचा नाहीं असा, अनुद्घाटनीय. Inexplicabil'ity *n.*

Inexpressible ( in-eks-pres'i-bl ) *a. that cannot be expressed, unutterable* व्यक्त करतां न येण्याजोगा, सांगतां येत नाहीं असा, अकथनीय, अनिर्वाच्य, अनुच्चार्य, अनुच्चारणीय, अनिवेदनीय. Inexpress'ibly *adv.*

Inexpressive ( in-eks-pres'iv ) *a. not expressive or significant, dull* अळणी, मळमळीत, फिका, अबोधक.

Inextensible ( in-eks-ten'si-bl ) *a.* अततिशील, ताणतां न येणारा.

Inextinguishable (in-eks-ting'gwish-a-bl) *a. not capable of being extinguished, quenched, or destroyed* विझवतां न येणारा, न विझणारा, न विझता, अविझता, अशमनीय, प्रशमनाशक्य. Inextin'guishably *adv.*

Inextirpable ( in-eks-ter'-pa-bl ) *a. that cannot be rooted out* समूळ नाहींसा करून टाकतां न येणारा, अनुत्पाटनीय, उत्पाटनाशक्य, अनुच्चाटनीय.

Inextricable ( in-eks'tri-ka-bl ) *a. not capable of being untied or disentangled* ज्याचा गुंताडा काढतां येत नाहीं असा, अमोचनीय, सोडवितां न येणारा.

Ineye ( in-ī ) [ E. *In* & *Eye.* ] *v. t. to inoculate as a tree or plant by the insertion of a bud* कलम करणें, एका झाडाची कळी दुसऱ्या झाडावर उगवेशी करणें, पैवंद -पैबंदी करणें. Ineyed' *pa. t.* Ineying *pr. p.*

Infallible ( in-fal'i-bl ) *a. unerring* अस्खलनशील, अचूक, अप्रमादशील, अमोघ, भ्रमातीत, दोषातीत, अस्खालित, अदोषार्ह. २ *certain, sure not to disappoint* अचूक, अमोघ, अचूकसंधानी, वायां न जाणारा. Infallibil'ity *n. unerrability* अस्खलनशीलता *f*, प्रमादाक्षमता *f*, अपराधाक्षमता *f*, अप्रमादित्व *n*, अस्खलितमति *f*, स्खलनासंभव *m*. २ अमोघता *f*. Infall'ibly *adv.* नक्की, अचूक, नेमका, निःसंशय, निःसंदेह.

Infamous ( in'fa-mus ) *a. of ill fame or bad report* दुर्लौकिकाचा, दुष्कीर्तीचा, अपकीर्तीचा, बदनामाचा, निंद्य, कलंकित. २ ( *law.* ) *branded with infamy by conviction of a crime* (सरकारांत गुन्हेगार ठरून) नामोश झालेला, बदमाष, डांबीस. ३ *deserving detestation, scandalous to the last degree, causing or deserving infamy* अतिनिंद्य, अतितिरस्कारपात्र, अपयशस्कर, बदलौकिक करणारा; as, "I. vices or corruption." In'famy *n. ill fame or repute, public*

*disgrace* दुर्लौकिक *m*, बदनाम *n*, अपकीर्ति *f*, अपयश or अपेश *n*, अप्रतिष्ठा *f*, कलंक *m*. २ *a quality which exposes to disgrace* अपयशाचें मूळ *n*. ३ ( *law*. ) *the disgrace which a convict incurs and which makes him incompetent as a witness* डांबीसपणा *m*, डांबीसी *f*, बदमाषपणाबद्दल झालेला डंका *m*.

**Infancy** ( in'fan-si ) [ L. *infans*, *infantis*, that cannot speak -*in*, not, & *fari*, to speak. ] *n*. *the beginning of anything* आरंभ *m*, सुरवात *f*, बाल्यावस्था *f*. २ *the state or time of being an infant* बालपण *n*, बालदशा *f*, बाल्यावस्था *f*. ३ *the condition of one under age, nonage, minority* बालदशा *f*, अप्रौढ दशा *f*, वयांत येण्यापूर्वीचें वय *n*, अज्ञानपणा *m*. ( specif. ) अज्ञातव्यवहारदशा *f*. In'fant *n*. *a babe* तान्हें मूल *n*, अर्भक *n*, बालक *n*, आंगावरचें -कडेवरील मूल *n*. २ *a child several years of age* लेंकरूं *n*, मूल *n*, बाळ *n*. ३ ( law ) *a person under the age of 21 years* बाल *n*, अप्राप्तव्यवहार, जो कायद्यांत आला नाहीं तो, अज्ञान. I. *a*. *belonging to infants or to infancy* लहान मुलांचा, बालपणाचा, बालकाचा. २ *tender* कोमल, सुकुमार. ३ *not mature* कोंवळा, अपक्व, बाल. ४ *intended for young infants* लहान मुलांसाठीं केलेला, लहान मुलांचा, बाल; as, "I. toy or school." Infan'ta *n*. *a title given to a daughter of the kings of Spain and Portugal except the heiress-apparent* स्पेन व पोर्तुगाल या देशांच्या राजांच्या वडील मुलीखेरीज करून इतर मुलींस लावण्याचें उपपद. Infan'te *n*. स्पेन व पोर्तुगाल येथील राजांच्या वडिल पुत्राशिवाय इतर राजपुत्रांस लावण्याचें उपपद. Infant'icide *n*. [Infant, & *cædere*, to kill. ] *infant-murder, child-murder* बालहत्या *f*, बालहिंसा *f*, बालवध *m*. २ *the murderer of infants* बालहत्या करणारा, बालहत्यारा, बालहिंसक. In'fantile *a*. *pertaining to the first period of life* बाळपणाचा, बाळपणांतील, बाल्यावस्थेचा. २ बालकासंबंधीं, तान्ह्या मुलासंबंधीं. In'fantine *a*. लहान मुलांसंबंधीं.

**Infantry** ( in'fant-ri ) [ Fr. *infanterie* -It. *infante*, *fante*, a child, a servant, a foot-soldier; foot-soldiers being formerly the servants of knights. ] *n*. *foot-soldiers* पायदळ *n*, पदातिसेना *f*, पायभार *m*.

**Infarction** ( in-färk'shun ) [ L. *in*, in & *farcire*, *fartum* & *farctum*, to stuff, cram. ] *n*. *med.* रक्तवाहिनीमध्यें रक्ताची गुठळी बसल्यामुळें ज्या भागांत ती रक्तवाहिनी जाते तो भाग सुकणें *n*, अभिशोष *m*.

**Infatuate** ( in-fat'ū-āt ) [ L. *in*, & *fatuus*, foolish. ] *v. t.* *to make foolish, to affect with folly, to deprive of judgment* मूढ -मूर्ख करणें, वेडा -वेडगळ -खुळा -नष्टविवेक करणें, मोहांत घालणें -पाडणें, बुद्धिभ्रंश *m*. -ज्ञानभ्रंश *m*. करणें *g. of o.*, भुलवणें, भ्रम पाडणें, खूळ -वेड *n*. लावणें. २ *to inspire with foolish passion, to stupefy* ( with *with* ) (-चें) वेड भरविणें, (-च्या) नादीं लावणें, फंदांत पाडणें, लुब्ध करणें. To become or get infatuated वेडगळणें, गुंगणें, भुलणें, बुद्धिभ्रंश होणें *g. of o.* Infat'uate, Infat'uated *a*. वेडावलेला, वेडगळ केलेला-झालेला-बनलेला, नष्टविवेक, भ्रष्टबुद्धि, गुंग, धुंद, मूढ झालेला. Infatua'tion *n*. *the act of affecting with folly* वेडा करणें *n*, (-चा) बुद्धिभ्रंश करणें *n*, वेड लावणें *n*. २ *the state of being infatuated, folly* वेडावलेलेपणा *m*, वेड *n*, वेडगळपणा *m*, वेडेपणा *m*, खूळ *n*, गुंगी *f*, धुंदी *f*, भूल *f*, भुलवण *f*, भुरळें *n*, भुरळ *f*, मोह *m*, बुद्धिभ्रंश *m*, ज्ञानभ्रंश *m*, नष्टविवेकता *f*.

**Infeasible** ( in-fēz'i-bl ) *a*. *not feasible, impracticable* अशक्य, असाध्य, दुष्कर, न घडायाजोगा, न करायाजोगा. Infeasibil'ity *n*. अशक्यता *f*, असाध्यता *f*, दौष्कर्य *n*.

**Infect** ( in-fekt' ) [ Lit. 'to dip anything into'—Fr. *infect* -L. *in*, into, and *facere*, to make. ] *v. t.* *to taint with morbid matter or any pestilential substance by which disease is produced* रोगजनक पदार्थांच्या संसर्गानें बिघडविणें. २ *to communicate infection to* (मलमूत्रादि उत्सर्गांच्या योगानें) आपला रोग दुसऱ्यास लावणें -जडवणें, (नें) दूषित करणें, संसर्गदूषित करणें. ३ *to corrupt, to communicate bad qualities or bad emotions to* आपले दुर्गुण दुसऱ्यास देणें, बिघडविणें, खराब करणें. ४ *to contaminate with illegality* बेकायदेशीरपणाचा दोष लावणें. Infect'ed *a*. ( रोगजनक पदार्थांच्या संसर्गानें ) बिघडलेला, खराब रोग दिलेला -घेतलेला. २ संसर्गदुष्ट, रोगसंसृष्ट, संसर्गदूषित, ३ बिघडवलेला, दुर्गुणी, खराब केलेला. ४ दंडार्ह, बेकायदेशीरपणाचा दोष -डाग लावलेला. Infec'tion *n*. दुर्गंधीनें बिघडवणें *n*. २ ( मलमूत्रादि संसर्गानें ) रोग देणें *n*. -जडवणें *n*. ३ दुर्गुण दुसऱ्यास देणें *n*. -जडवणें *n*. ४ ( मलमूत्रादिकांचा ) संसर्गदोष *m*, संसर्ग *m*. ५ संसर्गानें बिघडविणारी वस्तु *f*. ६ *a prevailing disease, an epidemic* सांथ *f*, धाम *f*, एकदम पसरलेला रोग *m*. ७ संसर्गानुकूलता *f*. Infec'tious, Infec'tive *a*. संसर्गानें लागणारा -जडणारा -होणारा, सांसर्गिक, संसर्गसंचारी (as oppo. to स्पर्शसंचारी = contagious ). २ संसर्गानें बिघडविणारा, भ्रष्टकारक. ३ लवकर किंवा सहज देण्याजोगा -लावण्याजोगा -होण्याजोगा. Infec'tiousness *n*. संसर्गसंचारिता *f*, सांसर्गिकत्व *n*.

**Infecund** ( in-fek'-und ) *a*. *unfruitful, barren* वांझ. Infecun'dity *n*. *unfruitfulness, barrenness* वांझपणा *m*, वंध्यत्व *n*, अफलदायकत्व *n*.

**Infelicitous** ( in-felis'i-tus ) *a*. *unhappy, unfortunate* कमनशिबाचा, दुःखाचा. २ *not well said or expressed or done* सुखानें न उच्चारलेला -न व्यक्त केलेला -न केलेला. Infeli'city *n. pl.* Infeli'cities. *misery, misfortune* दुःख *n*, अकल्याण *n*. २ *that which is infelicitous* अकल्याणकारक भाषण *n*- वचन *n*.

**Infer** ( in-fer' ) [ Fr. -L. *infero* -*in*, into, & *ferre* to bring. या शब्दाचे 'आंत आणणें, पुढें आणणें, अनुमान करणें' याप्रमाणें अर्थ बदलत गेले. ] *v. t.* *to derive by deduction or induction, to conclude from facts or*

*premises* अनुमान -तर्क *m.* करणें, अनुमान -तर्क -अटकळ *f.* काढणें -बांधणें -बसविणें, उन्नयन किंवा अवनयन करणें, (निगमनानें किंवा आगमानें) अनुमान करणें -सिद्धांत काढणें -बसविणें, अनुमानणें, ताडणें. Infer'able *a.* अनुमेय, तर्कगम्य, अनुमानानें -तर्कानें काढण्यासारखा, अनुमान-तर्क करतां येण्याजोगा, तर्कवेद्य, अनुमान -तर्कसाध्य. In'ference *n.* अनुमान -तर्क करणें *n.* २ *that which is inferred, a conclusion, a deduction* अनुमान *n*, तर्क *m*, अटकळ *f.* [ DEDUCTIVE I. निगमनात्मक अनुमान *n.* INDUCTIVE I. आगमात्मक अनुमान *n.* ] Inferen'tial *a.* आनुमानिक, अनुमानसिद्ध, अनुमानानें काढतां येणारा. [ I. KNOWLEDGE आनुमानिक ज्ञान *n.* ] Inferen'tially *adv.* अनुमानानें, तर्कानें. Inferred' *a.* तर्कित, अनुमित, तर्कानें -अनुमानानें काढलेला -ठरविलेला -बसविलेला. Inferr'ible *a.* Same as Inferable.

Inferior ( in-fē'ri-ur ) [ Fr. –L. *inferior* compar. of *inferus*, low.] *a. lower* ( in place, rank, virtue, or excellence ), *subordinate* खालचा, खालला, खालील, खालच्या पायरीचा, अधर, अधःस्थ, खालल्या ओळीचा -पदवीचा -पायरीचा -प्रतीचा, कनिष्ठ. प्रतीचा, जेरदस्त, हलका, निचा, निंचा, निरस, हलक्या किंमतीचा, ऊणा, ऊणाक, ऊणे किंमतीचा, निकृष्ट, अपकृष्ट. २ *secondary* गौण, अप्रधान, अमुख्य. ३ *philos.* अपर (in oppo. to पर). ४ *between the earth and the sun* पृथ्वी व सूर्य यांच्या मधला, लघु. ४ *below the horizon* क्षितिजाखालचा. ५ *bot. growing below some other organ* दुसऱ्या अवयवाखालीं उगवलेला, अधःस्थ. I. *n. a person lower in station or rank* खालच्या पायरीचा -पदवीचा मनुष्य *m.* Inferior'ity *n. the state of being inferior, a lower position in any respect* खालची योग्यता *f* -पदवी *f*, कनिष्ठपणा *m*, कनिष्ठता *f*, उतरता दर्जा *m*, खालची प्रत *f* -पायरी *f*, गौणत्व *n*, हलकेपणा *m.* [ TO ALLOW ONE'S I. कमीपणा *m.* घेणें, हार जाणें, जीत जाणें *with* स *or* ला *of o.* ]. २ *secondariness* गौणता *f*, गौणभाव *m*, अप्रधानता *f*, ( *Philos.* ) अपरत्व *n* ( as oppo. to परत्व *n* ). ३ ऊणेपणा *m*, कमीपणा *m*, हलकेपणा *m*, निरसपणा *m*, अपकृष्टता *f.*

Infernal ( in-fer'nal ) [ Fr. –L. *infernus* –L *inferus*, low. ] *a. belonging to the lower regions* पाताळाचा, पाताळासंबंधीं, अधोभुवनासंबंधीं, अधोभुवनयोग्य. [I. REGIONS पाताल *m*, अधोभुवन *n.*] २ *resembling or suitable to hell, devilish* नरकासारखा, अतिदुष्ट. I. *n. an inhabitant of the lower regions* पाताळवासी, पाताळस्थ. I.machine *n. a machine for assassination or some other mischief* शिरच्छेद किंवा खून करण्याचें यंत्र *n.*

Infertile ( in-fer'til ) *a. not productive or fertile; barren* नापीक, अफल, वंध्य, अफलद्रूप, अफलवंत. Infertil'ity *n. barrenness* नापीकता *f*, नापीकपणा *n.*

Infest ( in-fest' ) [ L. *infesto*, from *infestus*, hostile -L *in*, and *fendere*, to strike. ] *v. t. to disturb, to harass* उपद्रव *m* -इजा *f* -पीडा *f* -उपसर्ग *m* -उपद्रव *m* देणें -करणें -लावणें. Infesta'tion *n. molestation* उपद्रव *m*, पीडा *f*, नड *f*, नडाव *m.*

Infidel ( in'fi-del ) [ Fr. –L. *in*, not, & *fidelis*, faithful –L. *fides*. faith. ] *a. unbelieving, sceptical* अविश्वासी, नास्तिक. २ *disbelieving God or Christianity, not holding the faith* देवावर किंवा ख्रिस्ती धर्मावर श्रद्धा न ठेवणारा, ख्रिस्तीशास्त्राविश्वासी, ख्रिस्ती शास्त्र ईश्वरदत्त नाहीं असें मानणारा, (R.) नास्तिक. I. *n. one who disbelieves in God or Christ and the divine origin and authority of Christianity* देवावर किंवा ख्रिस्तावर विश्वास न ठेवणारा, ख्रिस्ती धर्म ईश्वरदत्त नाहीं असें मानणारा. २ *a disbeliever in any established religion or the prevailing religious faith* प्रचलित धर्मावर अविश्वास (अश्रद्धा) करणारा, प्रचलितधर्माविश्वासी. (b) *freethinker* नास्तिक, अश्रद्धालु. ३ *a heathen* मूर्तिपूजक *m.* ४ *a Mohammedan* मुसलमान *m.* Infidel'ity *n. disbelief of religion* धर्मावर अविश्वास करणें *n*, धर्माश्रद्धा *f*, शास्त्रावर अविश्वास *m.* २ ख्रिस्ती धर्मावर किंवा शास्त्रावर अविश्वास *m.* ३ *a violation of the marriage covenant by adultery or lewdness* व्यभिचार *m*, नवऱ्याचा किंवा बायकोचा बेइमानपणा *m*, विवाहशपथभंग *m*, जारकर्म *n.* [ I. ON THE PART OF A HUSBAND असाधुता *f.* –ON THE PART OF THE WIFE पातिव्रत्यभंग *m.* ] ४ *breach of trust, treachery* विश्वासघात *m*, बेइमान *n.*

Infiltrate ( in-fil'trāt ) [L. *in*, into, & Filtrate.] *v. t. to enter a substance by filtration or through its pores* (हळू हळू) छिद्रांतून आंत दवडणें, छिद्रद्वारा प्रवेश करवणें, अंतःसेचन करणें, गाळणें. I. *v. i. to filter into or through something* हळू हळू झिरपणें -गळणें, भिनणें, जिरणें. Infiltra'tion *n. the act or process of infiltrating* अंतःसेक *m*, अंतर्गलन *n*, आंत गळणें *n*, झिरपणें *n*, भिनणें *n*, जिरणें *n.* २ *the substance which has entered the pores of a body* झिरपलेला पदार्थ.

Infinite ( in'fin-it ) [ L. *in*, not & Finite.] *a without end or limit, unlimited or boundless* ( in time or space ) अनंत, अमर्याद, अपार, निरवधि, निरवधिक. २ *philos.* अनंत, अनवच्छिन्न, अमित. ३ *very great* अतिशय -फार मोठा, भारी. ४ *math.* अनंत. I. *n.* अनंत शक्तिमान् परमेश्वर *m.* २ *infinity or boundlessness* आनंत्य *n.* ३ *math.* अनंतसंख्या *f.* In'finitely *adv.* अपार, अमर्याद. Infin'iteness *n.* आनंत्य *n*, अनंतता *f*, अमर्यादता *f.* (b) *philos.* अनवच्छिन्नता *f*, अमितता *f.* Infinites'imal *a. infinitely or indefinitely small* अत्यल्प, अतिपिक, अतिसूक्ष्म. २ *philos.* अनंत सूक्ष्म, अणोरणीयान्. I. *n. math.* अत्यल्पसंख्या *f.* Infin'itude *n. boundlessness, immensity* अपरंपारपणा *m*, आनंत्य *n*, अनंतता *f*, अपारपणा *m*, सीमाराहित्य *n*, निरवधिभाव *m.* २ *infinite extent* अनंतावकाश *m.* ३ *countless multitude* अनंतसंख्या *f.* Infin'ity *n. boundlessness* आनंत्य *n*, अनंतता *f*, अपारपणा *m*, अपारता *f*, अमर्यादपणा *m.* २ *unlimit-*

*ed energy or excellence* अनंतशक्ति *f*, अनंतगुण *m.* ३ *great multitude* मोठा समुदाय *m.* ४ (a) *endless number* अनंत संख्या *f.* (b) *math.* अनंतता *f.*

Infinitive (in-fin'it-iv) [L. *in*, not, & *finire*, to end.] *n. gram. a verb in the infinitive mood* साधारणरूप *n*, सामान्यरूप *n*, तुमुन्नतपद *n*, भाववचन *n.* २ अमर्यादित, अनियमित. I. mood=अनियमितार्थ *m.*

Infirm (in-fėrm') [L. *in*, not, & *firmus*, strong.] *a. not strong, feeble, sickly, weak* अशक्त, कमजोर, कमकुवत, नबळा, निर्बळ, दुर्बळ, लुकसान, लूसकान. [I. FROM AGE जख्ख, जख्खड, डुळाखुडा, लुडाखुडा, म्हातारा.] २ *weak of mind, irresolute* मनाचा अदृढ -अस्थिर -चंचल, लटपटीत, डळमळीत, नादान, अध्रुव. Infirm'ary *n. a hospital or place where the infirm or the sick are lodged and nursed or only treated as out-patients* रोगिशाळा *f*, बीमारखाना *m*, अनाथगृह *n.* Infirm'ity *n. weakness, feebleness* निर्बळपणा *m*, कमजोरपणा *m*, कमकुवतपणा *m*, अशक्तता *f*, दौर्बल्य *n*, बलहीनता *f*, नेभळटपणा *m.* २ *a disease* रोग *m*, दुखणें *n*, व्याधि *f*, *pop.* व्याध *f.* ३ *failing, foible, defect* व्यंग *n*, गोम *f*, खोड *f*, लंगडें *n*, उणें *n*, ऐब *f*, दोष *m*, चूक *f.* Infirm'ly *adv.* नेभळटपणानें.

Infix (in-fik's) [L. *in*, into & Fix.] *to fix in, to drive or fasten in by piercing or thrusting* खोवणें, खुपसणें, खोचणें, रोवणें, खुपसून-खोवून बसवणें. २ *to set in, to implant or fix* मनांत ठसाविणें -बिंबविणें.

Inflame (in-flām') [L. *in*, into, & Flame.] *v. t. to cause to flame, to cause to burn, to set on fire* पेटवणें, शिलगावणें, चेतवणें, प्रज्वलित करणें. २ *to raise to an unnatural heat, to kindle or intensify* (as passion) (-ला) चेव आणणें, उद्दीप्त -प्रदीप्त -संतप्त करणें. ३ *to provoke to anger or rage* चिडविणें, कोपवणें, रागास पेटविणें, संतापवणें, प्रज्वलित करणें, संतप्त -कुपित -क्रुद्ध करणें, संतापन करणें. ४ *med. to put in a state of inflammation; to produce morbid heat, congestion, or swelling of* आग -दाह उत्पन्न करणें, जळजळ उत्पन्न करणें. I. *v. i. to grow morbidly hot, congested, or painful* (-चा) दाह *m* -आग *f.* होणें. २ *to grow angry* गरम होणें, रागावणें. Inflam'er *n.* प्रज्वलित करणारा, दाह उत्पन्न करणारा. Inflammabil'ity *n.* प्रज्वलनशीलता *f*, प्रज्वलनीयता *f*, दहनशीलता *f.* Inflam'mable *a.* पेट घेणारा, ज्वलनशील, दहनशील, ज्वालाग्राही, दाह्य. २ *excitable, irritable* चिडून जाणारा, संतप्त होणारा. Inflamma'tion *n.* पेटवणें *n*, चेतविणें *n*, संतापन *n*, दहन *n*, पेट *m*, प्रज्वलन *n*, उद्दीपन *n*, प्रदीपन *n.* २ *state of being on fire* आग *f*, दाह *m*, दहन *m*, अंतर्दाह *m*, पेट *m.* ३ *med. redness and swelling attended with heat and pain* (लाली व सूज असलेला) दाह *m.* ४ संताप *m*, संतप्तता *f.* Inflam'matory *a. tending to excite heat or inflammation* दाहक, दाहजनक, दाहकारक, तापजनक, तापकारक. २ *accompanied with the excitement of the arterial action* सदाह, दाहविशिष्ट, दाहिक, दाह (in comp. as, दाहज्वर=I. fever). ३ *tending to excite anger* संताप किंवा क्रोध उत्पन्न करणारा, चेतविणारा. ४ *seditious* (सरकाराविरुद्ध) चेतविणारा, बंडाळीचा, फंदफितुराचा.

Inflate (in-flāt') [L. *in*, in & *flare*, to blow.] *v. t. to blow into, to puff up, to swell with air* (वायूनें -वाऱ्यानें) फुगवणें, फुगीर करणें; as, "To inflate the lungs." २ (*fig.*) *to swell, to puff up, to elate* गर्वानें फुगवणें, शेफारवणें, माजवणें, मातवणें, फुगेसा -मातेसा करणें, उन्मत्त करणें; as, "To I. with pride." ३ *to cause to become unduly expanded* मर्यादेबाहेर वाढवणें, फैलावणें, ताणणें, फुगवणें; as, "To I. the currency." I. *v. i. to expand* वाऱ्यानें -वायूनें फुगणें. Inflat'ed *bot.* आध्मात, स्फीत. २ फुगवलेला. ३ उद्धत, शेफारवलेला. ४ मर्यादेबाहेर वाढवलेला; as "I. prices." Infla'tion *n.* फुगविणें *n*, फुगवणी *f*, फुगवणूक *f*, फुगवण *f.* २ *med.* आध्मान *n*, आध्मापन *n*, वायूनें फुगणें *n*, वायूनें फुगवणें *n.* (*state*) फुगवशी *f*, फुगारा *m*, फुगो (गव)टा *m*, फुगोटी *f*, फुगवटी *f.* ३ *conceit, the state of being puffed up* माज *m*, पतराज *f*, दिमाख *m*, आढ्यता *f*, ऊब *f.* ४ मर्यादेबाहेरचा वाढावा *m.* Infla'tus *n. a blowing or breathing into* आंत वारा भरणें *n*, वातपूरण *n.* २ *inspiration* स्फूर्ति *f*, प्रेरणा *f*, वारें *n*, संचार *m*, अवसर *m.*

Inflect (in-flekt') [L. *in*, into, & *flectere*, to bend.] *v. t. to bend in, to bend or turn from a direct line* वांकवणें, लववणें, झोंकवणें, कलवणें, झोंक देणें. २ *gram. to vary a noun in its terminations* (शब्दाला) विभक्ति लावणें, शब्द -रूप चालविणें, क्रियापदाचीं रूपें चालविणें. ३ *to modulate* (as the voice) (स्वर) उच्चनीच करणें, स्वरभेद करणें, खांच-खोंच घेणें. Inflect'ed *a.* नमित, वांकवलेला, झोंकवलेला. २ विभक्त्यंत, सविभक्तिक, जातरूपांतर, प्राप्तरूपांतर. Inflec'tion *n.* वांकवणें *n*, वांकवणी *f.* २ *a bend, a fold* वळण *n*, वांकण *n*, वांक *n.* ३ *math.* बांक *n*, संधि *m*, सांधा *m.* ४ *a modulation of the voice* स्वरभेद *m.* ५ *the variation of nouns and verbs* विभक्तिकार्य *n*, विभक्ति *f*, लिंगकार्य *n*, रूपांतर *n.* Inflect'ive *a.* वांकविणारा, लववणारा. २ *subject to inflection* विभक्तिकार्य -लिंगकार्य -रूपांतर -क्षम.

Inflexible (in-fleks'i-bl) *a. that cannot be bent, unbending* ताठ, न वांकणारा, न नमणारा, ताठर, अनमनीय. २ *firm in purpose, not to be changed* निग्रही, दृढसंकल्पी, आग्रही, चिकट, चिंवट. ३ *unalterable* बदल न होणारा. ४ *math.* ताठर, कठिण. Inflexibil'ity *n. unyielding stiffness* ताठा *n*, ताठपणा *m*, ताठरपणा *m*, अनमनीयता *f.* २ *firmness of will or purpose, resoluteness* दृढसंकल्पता *f*, निग्रह *m*, आग्रह *m*, आग्रहीपणा *m.* ३ *obstinacy* हेका *m*, हेकटपणा *m*, दुराग्रह *m*, दुराग्रहीपणा *m.*

Inflex'ibly *adv. firmly, inexorably* दृढनिश्चयपूर्वक, निग्रहपूर्वक, दृढसंकल्पपूर्वक, आग्रहपूर्वक, चिकटपणानें.

**Inflict** (in-flikt') [L. *in*, against, & *fligere*, to strike.] *v. t. to lay on, to impose* (as punishment) लावणें, देणें, (ची शिक्षा) करणें, भोगवणें, भोगावयास लावणें. Inflict'ed *pa. t.* Inflic'tion *n. the act of inflicting or imposing* लावणें *n*, देणें *n*, आधान *n* (in comp; as, दंडाधान). २ *punishment* शिक्षा *f*, दुःख *n*. Inflict'ive *a.* शिक्षा -दंड करणारा.

**Inflorescence** (in-flor-es'ens) [Fr. -L. *inflorescens* -*inflorescere*, to begin to blossom.] *n. character or mode of flowering of a plant* पुष्पविन्यास *m*, पुष्पव्यूहन *n*, पुष्पसंविधा *f*, फुलांची मांडण *f* -ठेवण *f*. पुष्पसंनिवेश *m*.

**Inflow** (in'-flō) [E. In & Flow.] *v. t. to flow in* आंत वाहणें. I. *n. the act of flowing in or into* अंतर्वहन *n*, अंतःप्रवेश *m*.

**Influence** (in'floo-ens) [Fr. -L. *in*, into & *fluere*, Sk. स्रु to flow. Influence first meant the power or virtue supposed to flow from planets upon men and things.] *n. controlling power, agency, force* प्रभाव *m*, सामर्थ्य *n*, शक्ति *f*, बल *pop.* बळ *n*, कर्तृत्वशक्ति *f*, करणशक्ति *f*, गुणकारिता *f*, गुण *m*, प्रताप *m*. २ *power or authority* (arising from elevated station, character or wealth.) वजन *n*, तोल *m*, बोज *m*, वग *f*, भीड *f*, चलती *f*, ओढ *f*, ओढा *m*. [To exert one's I. with आपलें वजन खर्च करणें, भिडेस घालणें, भीड *f*. घालणें with स or ला *of o.* To have I. on (वर) वजन असणें, भार *m*. पडणें.] ३ *reputation* अब्रू *f*, प्रतिष्ठा *f*, गौरव *m*, मान्यता *f*. I. *v. t. to affect, to act on* कार्य करणें, गुण करणें -देणें, (वर) लागू होणें. २ *to induce, to direct, to lead* वळवणें, ओढणें, वळवून घेणें, ओढ *f*. -ओढा *m*. लागणें *in. con.*, चालवणें, प्रवर्तवणें. Influen'tial *a.* वगदार, वजनदार, तोलदार, वगीचा, चलतीचा, भारदस्त. Influen'tially *adv.*

**Influenza** (in-floo-en'zä) [It. *influenza*-L. a by-form of influence.] *n. a severe epidemic catarrh, accompanying with weakening power* एक प्रकारचा सांथीचा शैत्यज्वर *m*. खोकला व पडसें हीं या तापाचीं लक्षणें आहेत; प्रतिश्यायज्वर *m*.

**Influx** (in'fluks) [L. *influxus*,-L. *in*, into & *fluere* to flow.] *n. a flowing in* अंतःप्रवाह *m*. २ (*fig.*) *importation in abundance* आंत पुष्कळ प्रमाणानें येणें, थव्याचा थवा येणें, अंतःप्रवाह *m*; as, A great I. of goods into the country. [To BE A GREAT I. (of men, animals &c.) पेंव *n* -भोम *n*. फुटणें.]

**Infold** (in-fōld') [E. In, into & Fold.] *v. t. to inwrap, to cover with folds, to enclose* (आंत) गुंडाळणें, लपेटणें, वेष्टणें, वेटाळणें. २ *to clasp with the arms* (हातांनीं) कवटाळणें, आलिंगणें.

**Infoliate** (in-fō'liat) [E. *in*, in, & L. *folium*, a leaf.] *v. t. to cover with or as with leaves* पालवी *f*. -पल्लव *m*. आणणें -देणें, (पालवीनें -पल्लवानें) झांकणें.

**Inform** (in-form') [Fr. -L. *in*, into & Form.] *v. t. to give form or shape to* आकार -रूप *n*. देणें. २ *to animate, to give life to* सचेतन -सजीव करणें. ३ *to communicate knowledge to, to make known to* (घडलेल्या गोष्टी) कळविणें, (-ची) खबर -बातमी देणें, (-चें) वर्तमान *n* -वार्ता *f*. सांगणें -देणें, जाणवणें, सांगणें, सुचविणें, समजाविणें, जाण *f* -सूचना *f*. करणें -देणें, माहितगार -माहीत -जाणता -ज्ञात करणें. ४ (with *against*) *to communicate a knowledge of facts by way of accusation* अपराधाची खबर *f* -बातमी *f*. देणें. I. *v. i.* (*obs.*) *to take form* आकारास येणें. २ (with *against*) अपराधाची खबर देणें. Inform'ant *n.* कळवणारा, बातमी -खबर देणारा, बातमीदार. २ (R.) *one who offers an accusation* अपराधाची खबर देणारा. Informa'tion *n.* बातमी देणें *n* -कळविणें *n*. २ बातमी *f*, खबर *f*, सूचना *f*. ३ (*law*) अपराधाची खबर *f*, फिर्याद *f*, दोषारोप *m*. ४ *knowledge* ज्ञान *n*, बोध *m*. Inform'ed *pa. t. & p. p.* Inform'er *n.* खबर देणारा -सांगणारा. २ (मामलेदारास किंवा मॅजिस्ट्रेटास) गुन्ह्याची खबर देणारा.

**Informal** (in-form'al) *a. not in proper form, irregular* अपद्धतशीर, पद्धतिविरुद्ध, रीतिविरुद्ध, अशास्त्र, अविधि, अरीतसर, बेकायद्याचा, गैरकायद्याचा. Informal'ity *n. want of regular customary form* पद्धतिदोष *m*, पद्धतिविरोध *m*, विधिविरोध *m*, बेकायदेपणा *m*, बेपद्धतशीरपणा *m*. २ *an informal, unconventional or unofficial act* शिरस्ता सोडून केलेलें कृत्य *n*, अपद्धतशीर कृत्य. Inform'ally *adv.* ठराविक पद्धत -रीत सोडून.

**Informidable** (in-for'mi-da-bl) *a. not formidable* अभयानक, अभयंकर, अभयावह.

**Infraction** (in-frak'shun) [Fr.-L. *in*, in & *frangere*, to break.] *n. violation* (*especially of law*) उल्लंघन *n*, भंग *m*, उल्लंघ *m*.

**Infrangible** (in-fran'ji-bl) *a. that cannot be broken* अभंजशील, न फुटणारा, न तुटणारा, अभंग. २ *not to be violated* अनुल्लंघनीय. Infrangibil'ity Infran'gibleness *n.* अभंजशीलता *f*, अनुल्लंघनीयता *f*.

**Infrequent** (in-frē'kwent) *a. seldom occurring, rare, uncommon.* विरल *pop.* विरळ, मधून मधून -कधीं कधीं -कोठें कोठें घडणारा, अपौनःपुनिक. Infre'quence, Infre'quency *n. rareness* विरळपणा *m*, अपौनःपुन्य *n*. Infre'quently *adv.* क्वचित्.

**Infringe** (in-frinj') [Lit. 'to break into'. L. *in*, and *frangere*, to break.] *v. t. to violate* (*especially law*) (करार -वचन -कायदा) तोडणें -मोडणें, भंग *m*. -उल्लंघन करणें. २ *to neglect to obey* अतिक्रमण *n* -उल्लंघन *n*. करणें. I. *v. i. to injure, to offend* तोडणें, मोडणें, भग्न -विच्छिन्न -उल्लंघित करणें. २ (with *on* or

*upon*) *to encroach, to trespass* अतिक्रम -अतिक्रमण करणें. Infring'ed *pa. t.* मोडलेला, तोडलेला, भग्न, उल्लंघित. Infrin'ger *n.* मोडणारा, तोडणारा, भंजक, भंगकर्ता. Infringing *pr. p. a.* Infring'ement *n. breach, violation, non-fulfilment* उल्लंघन *n*, भंग *m*, मोडणें *n*, अतिक्रम *m*, अतिक्रमण *n*.

Infumate (in'-fūm-āt) [L. *in*, and *fumare*, to smoke.] *v. t. to expose to or dry by smoke* धुमी देणें, धुरानें सुकविणें. Infuma'tion *n.* धुरानें सुकविणें *n*.

Infundibulum (infun-dib'ū-lum) [L. a funnel -*infundere*, to pour in or into.] *n. anat. a. funnel-shaped or dilated part of an organ* (मेंदू, कान, व मूत्रपिंड यांमध्यें असणारा) नसराळ्यासारखा -गळणीसारखा भाग *m*, कर्णिका *f*. Infundib'uliform *a.* गळणीसारखा, नसराळ्याच्या आकृतीचा; as, I. corolla.

Infuriate (in-fū'ri-āt) [L. *in*, & *furiare*, to rage.] *v. t. to enrage, to madden* कोपविणें, संतापवणें, संतप्त -कोपान्वित करणें, वेड *n.* भरवणें. I. *a. enraged, mad* क्रोधांध, रागानें वेडा झालेला, तप्रवग्र, संतप्त, संतापित.

Infuse (in-fūz') [Fr. –L. *in*, into, & *fundere*, to pour.] *v. t. to pour into* (आंत) ओतणें -घालणें. २ *to inspire or animate with* घालणें, (-आंत) भरविणें, (आंत) आधान -स्थापन -निक्षेप करणें *g. of o.* ३ *to steep in liquor without boiling* भिजवणें, भिजत-भिजूं घालणें -ठेवणें, भावना *f* -रसपुट देणें. ४ *to instill* (as principles or qualities) मनांत उतरवणें -बिंबवणें. Infus'ible *a.* मनांत ठसविण्यालायक. २ काढा काढण्यालायक. Infu'sibil'ity *n.* काढा काढण्यालायक स्थिति *f*. Infu'sion *n.* ओतणें *n*, घालणें *n*, भरवणें *n*. २ (a) (कोणतेंही औषध) आधणाच्या पाण्यांत न शिजवितां काढा तयार करण्याची रीत *f*. (b) अशा रीतीनें केलेला काढा *m* -कषाय *m* -काट *f*. -फांट *f*, चूर्णद्रव *m*. ३ *immersion* भिजवणें *n*, भावना देणें *n*.

Infusoria (in-fū-sō'ri-a) [L.] *n. microscopic animalcula found in infusions of animal or vegetable matter exposed to the atmosphere* प्राणिज किंवा वनस्पतिज पदार्थांत सांपडणारे सूक्ष्म किडे *m. pl.*

Ingathering (in'-gath-ėr-ing) [In, and Gathering.] *n. the act of collecting and gathering the fruits of the earth, harvest* हंगामाचें -कापणीचें काम *n*, हंगाम *m*, कापणी *f*.

Ingelable (in-jel'ā-bl) *a. that cannot be congealed* थिजवतां येत नाहीं असा, घनीकरणाशक्य.

Ingenious (in-jē'ni-us) [Fr. –L *ingenium*, mother-wit -*in* and *gen* root of *gignere*, to beget.] *a. possessed of genius, or the faculty of invention, having an aptitude to contrive or to form new combinations* डोक्याचा, कल्पक, युक्तिवान्, योजक, शोधक, अतिउत्तम बुद्धीचा, कल्पनेचा, उपायी, चतुर, युक्त्या, युक्तिवान्, साधनी, लागलाग्या, संधानी, करामती, हिकमती or हिकमत्या, हुनरी, हरहुनरी, इल्मी, इलंबाज, उपायज्ञ, मार्मिक. २ *of curious design, of great genius or ingenuity, of curious structure* अकलेचा, करामतीचा, युक्तीचा, कलाकुसरीचा, कलाकुशलतेचा, चातुर्याचा, हुन्नरबाजीचा; as, I. model, I. machine. ३ *witty, shrewd, sagacious* खुबीचा, मार्मिक, मोठ्या बुद्धिमत्तेचा; as, an I. reply. Inge'niously *adv.* मोठ्या अकलेनें, मोठ्या खुबीनें, मोठ्या युक्तीनें. In'gen'iousness *n.* In'genu'ity *n. the quality or power of ready invention, quickness or acuteness in forming new combinations* कल्पकशक्ति *f*, कल्पनाशक्ति *f*, शोधकबुद्धि *f*, योजकता *f*, युक्ती or युगुत *f*, सूक्ष्ममति *f*, चतुराई *f*, चातुर्य *n*, कला *f*, हिकमत *f*. २ *curiousness or cleverness in design or contrivance* चतुराई *f*, करामत *f*, युक्ती *f*, कारागिरी *f*. N. B. Ingenuity, Cleverness. Ingenuity is a form of genius and cleverness of talent. The former implies invention, the latter a peculiar dexterity and readiness of execution (Webster).

Ingenuous (in-je-n'ū-us) [L. *ingenuus*. Lit 'free born' 'of good birth'. याचा मूळ अर्थ 'कुलीन' किंवा 'खानदानीचा' असा आहे; as, Ingenuous blood or extraction.] *a. noble, generous* उदार, मोठ्या मनाचा; as, "I. ardour or zeal." २ *open, frank* मनाचा मोकळा, निष्कपट, अकपट, निष्प्रांजल, दिलपाक, प्रशस्त, सरळ, साळढाळ, घळघळीत. Ingen'uously *adv. candidly* मोकळ्या मनानें, दिलपाकीनें, सरळ भावानें, निष्कपटपणानें. Ingen'uousness *n. openness of heart, frankness* मनाचा मोकळेपणा *m*, निष्कापट्य *m*. दिलपाकी *f*, सरळपणा *m*.

*N. B.*—Ingenuous, Open, Frank. One who is *open* speaks out at once what is uppermost in his mind. One who is *frank* does it from a natural boldness, or dislike of self-restraint. One who is *ingenuous* is actuated by a native simplicity and artlessness which make him willing to confess fault and make known his sentiments without reserve. (Webster.)

Ingesta (in-jes'tä) [L. *ingerere*, to put in; *in*, in + *gerere*, to bear.] *n. pl. physiol. that which is introduced into the body by the stomach* (opp. to *egesta*) कोष्ठगत अन्न *n*, खाऊन पोटांत गेलेलें अन्न *n*. Ingest' *v. t.* अन्न पोटांत घालणें. Inges'tion *n.*

Inglorious (in-glō'ri-us) *a. not glorious, not accompanied with celebrity* अकीर्तीचा, अपयशाचा, अयशस्कर, अकीर्तिकर. २ *sinful, disgraceful* लज्जाकारक, शरमेचा. Inglo'riousness *n.* Inglo'riously *adv.*

Ingot (in'got) [A. S. *in*, in, & *goten*, *pa. p.* of *geotan*, to pour. The true sense of 'ingot' is 'that which is poured in.'] *n. a mass of unwrought metal* (of gold or silver) वीट *f*, गट *m*, ईट *f*. Ingot mould ईषिका *f*, तूलिका *f*.

**Ingraft** ( in-graft' ) [ Fr. –L. *in*, into & Graft. ] *v. t. to graft or insert a shoot of one tree into another* कलम *n.* बांधणें, कलम *n.* करणें. २ *to set or fix deeply* खोवणें, रोवणें, बिंबविणें, पुरणें, शिरवणें, भरवणें. Ingraft'ment *n.* कलम करणें. २ *the thing ingrafted* कलम *n*, फांदी *f*.

**Ingrain** ( in-grān' ) [ L. *in*, into, & Grain. ] *v. t. to dye of a fast or lasting colour* पक्का रंग देणें. २ *to dye in the raw state* विणण्यापूर्वी रंगविणें, कच्चें सूत रंगविणें. २ *to infix deeply* पूर्णपणें बिंबविणें.

**Ingrate** ( in'grāt ) [ L. *ingratus*, unthankful. ] *a. unthankful* कृतघ्न, उपकार न स्मरणारा, निमकहराम. I. *n. an ungrateful person* कृतघ्न मनुष्य *m*, हरामखोर *m*. [ SOME MOST FAMILIAR PHRASES TO REPRESENT THE IDEA IN THE ENGLISH WORD *Ingrate* ARE खाऊनिंदक, खादनिंदक, गाईचा गोहरा, अस्तनींतला साप, खाल्ल्या घरचे वांसे मोजणारा, खाल्ल्या अन्नावर उठणारा, वगैरे.] I. *v. i. to lavish favours on an ingrate person* कृतघ्न माणसावर पुष्कळ उपकार करणें, *colloq.* अळवावर आचवणें.

**Ingratiate** ( in-grā'shi-āt ) [ L. *in*, into, & *gratia*, favour. See Grace. ] *v. t. to commend to the favour of* (used reflexively and followed by *with*) *to bring into grace or favour* कृपा *f* -मर्जी *f* &c., संपादणें -संपादन करणें, पोटांत शिरणें. *g. of o.*

**Ingratitude** (in-grat'i-tūd) [L. *in*, not, and Gratitude.] *n. unthankfulness* कृतघ्नता *f*, अकृतज्ञता *f*, अनुपकारीपणा *m*, निमकहरामी *f*.

**Ingredient** ( in-grē'di-ent ) [ L. *in*, into, and *gradior*, to walk, to enter. ] *n. a component part* घटकद्रव्य *n*, घटक *m*, वाना *m*, वान *n*, द्रव्य *n*, जिन्नस *m*, साधन *n*, उपकरण *n*.

**Ingress** ( in'gres ) [ L. *ingradior*, going in. ] *n. entrance* प्रवेश *m*, प्रवेशमार्ग *m*. २ *power or liberty of entrance* आंत जाण्याची परवानगी *f*, प्रवेशाधिकार *m*. ३ *astron. the entrance of the moon into the shadow of the earth* भूमाप्रवेश *m*. ( b ) *the sun's entrance into a sign* अधिक्रमणारंभ *m*, संक्रांति *f*. ( c ) *ingress of a luminary at an eclipse* आक्रमण *n*, प्रवेश *m*. Ingres'sion *n. the act of entering* प्रवेशन *n*.

**Ingrowing** ( in'grō-ing ) [In + Growing.] *a. growing or appearing to grow into some other substance* (वृद्धि पावून दुसऱ्या पदार्थांत) -आंत वाढणारा. I. nail *n.* वृद्धि पावून मासांत शिरणारें पायाच्या बोटाचें नख *n*, अंतर्नख *n*. In'growth *n.* आंत वाढ *f*, उलटी वाढ *f*.

**Inguinal** ( ing'gwin-al ) [L. *inguinalis* –*inguen*, *inguinis*, the groin.] *a. (anat.) pertaining to the groin* जांघेचा, जांघेच्या सांध्यासंबंधीं, मांडीच्या सांध्याचा, वंक्षणसंबंधीं, ऊरुसंधीचा. २ वंक्षणस्थ. I. hernia अंतर्गळ.

**Ingulf** ( in-gulf' ) [ E. In, & Gulf.] *v. t. to swallow up as in a vast, deep gulf* गर्क -गडप -गडद करणें. २ *to cast into a gulf* आखातांत पाडणें. Ingulf'ment *n.*

**Ingurgitate** ( in-gur'ji-tāt ) [ L. *in*, into, and *gurges*, a gulf, whirlpool.] *v. t. to swallow in a great quantity* घटाघटा पिणें. २ *to ingulf* गर्क करणें. I. *v. i. to drink largely* घटाघटा पुष्कळ पिणें.

**Ingustable** ( in-gus'tābl ) *a. not perceptible to the taste* रसनेंद्रियागोचर, जिभेला न कळणारा.

**Inhabit** ( in-hab'it ) [L. *in*, into & *habitare*, to have frequently, to dwell –L. *habeo*, I have.] *v. i. to live or dwell in, to occupy* राहणें, वसणें, वास -वसती -वस्ती *f* -निवास करणें, नांदणें, (आंत) घर *n.* असणें. I. *v. t. to dwell, to abide* राहणें &c. ( See *v. i.* ) (with the object in the locative case.) Inha'itable *a.* वसती करण्यास योग्य, राहाण्यास योग्य, वासार्ह. Inhab'itancy *n. the condition of an inhabitant, residence* कायदेशीर वास *m* -वसती *f*. Inhab'itant, Inhab'iter *n. one who dwells or resides permanently in a place* रहिवाशी, रहवासी, राहणारा, वास करणारा, वस्ती करणारा, नांदणारा, वसणारा, वतनी, वासी, कर or करी only used in compounds; as, मुंबईकर, काशीकर, गांवकरी; वासी as नगरवासी, वनवासी, -स्थ, (as, ग्रामस्थ, क्षेत्रस्थ, स्वर्गस्थ). Inhab'itation *n. the act of inhabiting* राहणें *n*, वास *m*, वसती *f* or वस्ती *f*, अधिष्ठान *n*. २ *abode, place of dwelling* निवासस्थान *n*, मुक्काम *m*, वास *m*. Inhab'ited *pa.* नांदता, राबता, वसता, वसातीचा.

**Inhale** ( in-hāl' ) [ L. *in*, upon, and *halare*, to breathe. ] *v. t. to draw the breath into the lungs* आंत श्वास घेणें, श्वासाबरोबर आंत घेणें -पिणें -खाणें -ओढणें ( तपकीर, हुंगण्याचें औषध इत्यादि ), अंतर्श्वसन करणें. Inhal'er *n. one who inhales* श्वास आंत घेणारा *m*, अंतर्श्वसक *m*, हुंगून ओढणारा *m*. २ *an apparatus for inhaling any vapour* (as ether or chloroform) अंतःश्वसक *m*, श्वासानें आंत ओढण्याचें यंत्र *n*. ३ *a contrivance to protect lungs from injury by inhaling damp or cold air* ( सर्द किंवा थंड हवेपासून) फुप्फुससंरक्षक सांचा. Inhal'able *a.* श्वासाबरोबर आंत घेण्यासारखा, आंत ओढण्यासारखा. Inhal'ation *n.* हुंगणें *n*, अंतःश्वसन *n*, श्वास आंत घेणें, सुंगणें *n*, आघ्राण *n*. Inha'led *a.* श्वासाबरोबर आंत घेतलेला, आघ्रात.

**Inharmonious** ( in-har-mō'ni-us ) *a. not harmonious, unmelodious, discordant* बेसूर, बदसूर, अपस्वर. २ *inconsistent* विसंगत, संदर्भविरुद्ध, संदर्पाविरुद्ध. Inharmon'iously *adv.* Inharmo'niousness *n.* बेसूरपणा *m*. २ विसंगतता *f*.

**Inhere** ( in-hēr' ) [ L. *in*, into and *hærere*, to stick.] *v. i. to be fixed or be permanently incorporated* ( एकाद्या वस्तूबरोबर द्रव्यगुणसंबंधानें सदोदित) अनुपक्त -समवेत असणें, (सदैव) आंत राहणें, (सदा) अंतर्निष्ठ -अंत-

र्वर्ती असणें. Inher'ence *n.* Inher'ency *n.* समवाय *m*, अंतर्वर्तित्व *n*, अंतःस्थिति *f*, अंतर्व्याप्ति *f*, अनुषंग *m*, द्रव्यगुणसंबंध *m.* Inher'ent *a. existing permanently in something* मुळापासून आंगचा, अंतवर्ती, अधिष्ठित, अंतर्निष्ठ; (as, in comp. घटांतर्निष्ठ, देहांतर्निष्ठ), संस्थ, समवेत, समवायासंबंधीं. २ *naturally pertaining to, innate* स्वाभाविक, नैसर्गिक, सांसिद्धिक, सहज. [I. QUALITY OR ATTRIBUTE समवेतधर्म, अनुगतधर्म.] Inher'ently *adv.*

Inherit (in-her'it) [L. *in*, –Fr. *heriter* –L. *hereditere*, to inherit. see Heir.] *v. t. to take as heir or by descent from an ancestor* वारशानें घेणें, कुलक्रमानें -परंपरेनें मिळणें, वारीस *m* -वारिसदार होऊन पावणें -भोगणें -घेणें, वारिसपणानें -वारिसदारीनें पावणें -भोगणें घेणें, वारिस -वारिसदार होणें *g. of o.*, वारसा येणें *g. of o.* with कडे *of s.* २ *to receive* or *to take by birth, to have by nature* वडिलांपासून येणें, जडणें. *in. con.*, पिढीचा -पिढीजाद -वसलातीचा -पित्रागत असणें. *in. con.* ३ *to possess, to own* कबज्यांत -मालकींत आणणें, वतन *n.* पावणें. I. *v. i. to have as an inheritance* वारसदारीनें (-ला) वतन मिळणें. Inher'itabil'ity *n.* उत्तराधिकारोपभोग्यता *f*, पितृपुत्रपरंपराभोग्यता *f*, वारशानें घेतां येण्यासारखी स्थिति *f.* Inher'itable *transmissible to an heir* वारिसपणानें भोगायाचा, उत्तराधिकारोपभोग्य, वारशानें घेतां येण्याजोगा. २ *capable of being transmitted from the parent to the child* बापापासून मुलाकडे जाण्याजोगा, पितृपुत्रपरंपराभोग्य. ३ *capable of succeeding to as an heir* वारस होण्याजोगा; as, I. relationship. Inher'itably *adv.* Inher'itance *n. the act or state of inheriting* वारशानें घेणें; as. the I. of an estate. २ *that which may be inherited, a heritage, a possession which passes by descent* वतन *n*, वतनवाडी *f*, दाय *m*, बापरोटी *f*, रिक्थप्राप्ति *f*, अंश *m*, दाय *m*, रिक्थ *n*, वडिलांपासून मिळालेली मिळकत *f*, क्रमागतधन *n.* ३ *a permanent or valuable possession or blessing esp. one received by gift or without purchase* वतन *n.* ४ *possession, ownership* कबज्या *m*, मालकी *f*, वतन *n.* ५ (*law*) *a perpetual or continuing right* वारसा *m.* ६ *an estate which a man has by descent as heir to another or which he may transmit to another as his heir* (वडिलांपासून आपणाला वारशानें मिळालेली व आपल्या पुढील वारसांना देतां येणारी) वडिलोपार्जित मिळकत *f*, जिंदगी *f.* [OBTAINED BY I. वतनी. RIGHT OF I. उत्तराधिकार. ONE ENTITLED TO SHARE IN AN I. दायजी. PORTION OF I. दाय, दायभाग, रिक्थविभाग. SHARE OF AN I. अंश.] Inhe'rited *pa. p.* वारशानें मिळालेला, परंपराप्राप्त, वाडवडिलांपासून मिळालेला, कुलक्रमागत. Inher'itor *n. one who inherits, an heir* वारस *m*, वारीस *m*, वारसदार *m*, उत्तराधिकारी. [JOINT I. वतनबंधु, वतनभाऊ.] Inher'itress, Inher'itrix *n. fem. an heiress* स्त्रीवारस, वारसीण *f*, वारसदारीण *f.*

Inhe'sion. Same as Inherence.

Inhibit (in-hib'it) [L. *in*, in, & *habere*, to have, to hold. cf. Habit.] *v. t. to check, to hinder* अटकावणें. २ *to forbid, to prohibit* मना करणें. Inhibit'ion *n. the act of inhibiting, restraint* अटकाव *m*, अवरोध *m*, प्रतिबंध *m.* २ *prohibition* मना *f*, निषेध *m.* ३ *a checking of an already present action* चालू क्रियेस प्रतिबंध *m*, इंद्रियव्यापारनिग्रह *m*, (इंद्रियांचे व्यापार) कमी करणें *n.* Inhib'itory *a. prohibitory* अटकेचा, प्रतिबंधक.

Inhospitable (in-hos'pit-a-bl) *a. not hospitable, not disposed to entertain strangers, not favourable to strangers* आगतस्वागत न करणारा, आतिथ्यविमुख, अतिथिद्वेषी, अभ्यागतद्वेषी, अनातिथेय. Inhos'pitably *adv.* Inhospital'ity *n.* Inhospitableness *n. the quality of being inhospitable* अनातिथ्य *n*, अतिथिद्वेष *m*, अतिथ्यनादर *m*, अतिथ्यसत्कार *m.*

Inhuman (in-hū'man) *a. not human, cruel, savage, unfeeling* अमानुष, क्रूर, जंगली, घातकी, निर्घृण, राक्षसी. २ *attended with cruelty* क्रूरपणाचा, निर्दयपणाचा, निष्ठुर. Inhuman'ity *n. cruelty, barbarousness* अमानुषता *f*, घातकीपणा *m*, क्रूरता *f*, नैष्ठुर्य *n*, निर्दयता *f.* Inhu'manly *adv. cruelly, barbarously* अमानुषपणानें, घातकीपणानें, निर्दयपणानें, क्रूरपणानें.

Inhume (in-hūm') [Fr. –*in*, in, & *humus*, the ground.] *v. t. to bury* पुरणें. Inhuma'tion *n. the act of inhumating or burying* पुरणें *n*, भूमिनिक्षेप *m.* २ (*chem.*) *the act of burying vessels in warm earth in order that their contents may be exposed to a steady heat* भांड्यांतील वस्तु सारख्या प्रमाणावर गरम होण्यासाठीं त्या भांड्यास उबदार रेतींत अथवा मातींत पुरून ठेवणें.

Inimical (in-imi'-kal) [L. *in*, not & *amicus*, friendly.] *a. unfriendly, hostile* वैरी, द्वेपी, प्रतिकूल, विरोधी. २ वैरभावाचा, शत्रुत्वाचा. Inimical'ity *n.* वैर *n*, शत्रुत्व *n.* Inim'ically *adv.* वैरबुद्धीनें, शत्रुबुद्धीनें, शत्रुभावानें.

Inimitable (in-im'it-a-bl) *a. not imitable, surpassingly excellent* अनुकरणाशक्य, अनुपमेय, अद्वितीय, अप्रतिम, उपमातीत. Inimitabil'ity *n.* Inim'itableness *n.* अनुकरणाशक्यता *f*, अनुपमेयता *f*, अद्वितीयता *f*, अनन्यसाध्यता *f.* Inim'itably *adv.* अनुकरणाशक्यतेनें, अनुकरण करितां येत नाहीं असें.

Iniquitous (in-ik'wi-tus) [L. *in*, not and *aequus* equal, fair.] *a. unfair, unjust, wicked, unreasonable* अन्यायाचा, अनीतीचा, अधर्माचा, हरामाचा. २ (applied to persons) दुरात्मा, दुर्जन, दुर्वृत्त, अधर्मी, अन्यायी. Iniq'uitously *adv.* अन्यायानें, अनीतीनें.

Iniqui'tousness *n.* अन्याय *m*, अनीति *f*, अधर्म *m*, दुर्नीति *f*, अनय *m*, पाप *n*, अन्यायिता *f*, अधर्मिता *f*, नीतिविरोध *m*, नीतिविरुद्धता *f*, नीतिविपर्यास *m*.

Iniq'uity *n.* *injustice* अन्याय *m*, अनीति *f*, दुर्नीति *f*, अन्यायिता *f*. २ अपराध *m*, पाप *n*. The cup of I. पापाचा घडा *m*.

Initial ( in-ish'al ) [ L. *initium*, a beginning. ] *a. placed at the beginning* पहिला, प्रथम, आद्य, पूर्व, आदिम, प्राथमिक. २ *incipient, commencing* पहिला, आरंभींचा. I. *n. the first letter of a word* (कोणत्याही शब्दाचें) पहिलें अक्षर *n*, नामाद्याक्षर *n*. I. *v. t. to mark with an initial* (नांवाचें) पहिलें अक्षर लिहून सही करणें.

Initiate ( in-ish'i-āt ) [ See Initial. ] *v. t. to make a beginning with, to begin* (पहिलें कृत्य करून) आरंभ करणें. २ *to instruct in the rudiments or principles* पहिली-प्रथम शिक्षा (S)- दीक्षा देणें, प्रथमोपदेश *m*. करणें, विद्यारंभ *m* -विद्योपक्रम *m* &c. करविणें, मूलपीठिका *f*. सांगणें -लावणें -लावून देणें. ३ *to introduce into a sect or society, to admit* (उपदेश देऊन) एखाद्या पंथांत घेणें, एखाद्या मंडळींत दाखल करणें, दीक्षा *f* -अनुग्रह *m*. देणें, संस्कार *m* -मंत्रोपदेश *m* -उपदेश *m*. करणें, दीक्षित -संस्कृत करणें, मुंडणें. Init'iated *a. introduced* आंत प्रवेश केलेला, पहिली दीक्षा दिलेला, दीक्षित, संस्कारित, संस्कृत, कृतसंस्कार -दीक्ष, उपदिष्ट, मंत्रवान्, कृतविद्योपक्रम. Initia'tion *n. the act or process of initiating* प्रथम प्रवेश *m*, प्रथमदीक्षा *f*, विद्याप्रवेश *m*, प्रथमोपदेश *m*. २ *mode of entrance into an organized body* प्रथमदीक्षाविधि *m*, प्रवेशविधि *m*. Init'iative *n. an introductory step or movement* आरंभ *m*, उपक्रम *m*, प्रथमविधि *m*, प्रथमसंस्कार *m*, पहिलें कृत्य *n*. २ *the right of introducing a new measure or law* कायदा प्रथम चालू करण्याचा हक्क *m*. I. *a. inceptive, initiatory* प्रथमचा, पहिला. २ *tending to initiate* दीक्षा करण्यासंबंधीं, दीक्षाकरणविषयक, दीक्षाकरणोपयोगी. Init'iatory *a. suitable for beginning* सुरवातीलायक. २ *introducing by instruction* दीक्षेनें, उपदेशानें प्रवेश करणारा, प्रवेशकारी. I. *n. introductory rite* दीक्षाक्रिया.

Inject ( in-jekt' ) [ L. *injicio, injectum* -*in*, into & *jacere*, to throw. ] *v. t. to throw in* आंत टाकणें -घालणें, &c., अंतःक्षेप *m* -अंतःक्षेपण *n*. &c. करणें. *g. of o.* २ (with a syringe) आंत पिचकारी मारणें, बस्ति *m*. देणें. Injec'tion *n. the act of throwing in* आंत घालणें *n*. २ बस्तिविधि, पिचकारीनें औषध आंगांत घालणें *n*. ३ *a medicine to be injected* बस्ति *m*, पिचकारीनें आंगांत घालावयाचें औषध *n*, मृतशरीराच्या रक्तवाहिन्यांत घातलेलें पातळ औषध *n*. ४ (Steam engine) (a) *the act of throwing in cold water* थंड पाणी बाहेरून आंत सोडणें. (b) *the cold water thrown in to produce vacuum* जागा निर्वात करण्याकरितां काढून टाकलेलें थंड पाणी *n*.

Injudicial ( in-joo-dish'al ) *a. not judicial, not according to law forms* कोर्टाच्या -न्यायसभेच्या नियमाविरुद्ध, व्यवहारविरुद्ध, व्यवहारशास्त्रविरुद्ध.

Injudicious ( in-joo-dish'us ) [Fr. –L. *in*, not, & Judicious.] *a. void of judgment, unwise* अविचारी, असमजीक, असमजदार, असमंजस, अविवेकी, असुज्ञ. २ *not according to sound judgment* अविवेकाचा, असमंजसपणाचा, असमजिकपणाचा. Injudi'ciously *adv.* अविवेकानें, असमजीकपणानें, अविवेकपूर्वक. Injud'iciousness *n.* असमजिकपणा *m*, असमंजसपणा *m*, अविवेक *m*.

Injunction ( in-jung'-shun ) [ L. *injunctio*, an order –L. *in*, & *jungere, junctum*, to join.] *n. the act of commanding* हुकूम करणें *n*. २ *an order, a command, a precept* आज्ञा *f*, हुकूम *m*, फरमान *f*. ३ (*Law*) *a writ granted by a court of equity, requiring to do or to refrain from doing certain acts* (a) ताकीदपत्र *n*, or ताकीद *f*. (b) ताकिदीचा हुकूम *m*.

Injure ( in'joor ) [ Fr. *injurier* –L. *in*, not & *jus, juris*, law.] *v. t. to do harm to, to hurt, to act with injustice or contrary to law* (a) अपकार *m*. -इजा *f*. -उपद्रव *m*. -दुखापत *f*. करणें, जायां -जायबंद -घायाळ करणें, पीडा *f*. -उपद्रव *m*. करणें. (b) (as estate, lands, &c.) खराबी *f* -नुकसान *n*-नुकसानी *f*. करणें *g. of o.*, खराब करणें, (-ला) धक्का पोंचवणें. (c) (as reputation) (अब्रू) नुकसानी करणें *g. of o.*, (-ची) अब्रू खराब करणें, (-च्या) अब्रूस बट्टा -कलंक लावणें -आणणें. २ *to annoy, to grieve* (-ला) त्रास देणें. In'jured *pa. t. & p. p.* Injur'er *n.* अपकार -दुखापत करणारा, उपद्रव देणारा. २ नुकसानकारक, नुकसान करणारा. ३ त्रास देणारा. Inju'rious *a. hurtful, harmful* ( in various senses ) as, (a) अपकारक, उपद्रवी, उपद्रवकारक, अपकार -उपद्रव -इजा -दुखापत करणारा. २ नुकसानकारक, अहितकारक, हानिकारक, खराबी करणारा. ३ *detractory* (अब्रूला) बट्टा लावणारा, काळोखी लावणारा, कलंकावह. ४ *wrongful, not just* गैरकायदेशीर, बेकायदेशीर, अन्यायकारक, दुःखकारक, दुःख देणारा, घातकी, परापकारी, परापकारक. Inju'riously *adv.* Inju'riousness *n.* उपद्रवीपणा *m*. २ हानिकारकता *f*, &c. In'jury *n. harm, hurt* अपकार *m*, उपद्रव *m*, दुःख *n*, इजा *f*, दुखापत *f*, अपाय *m*, क्षति *f*, धक्का or धका *m*. २ *detriment, damage* नुकसान *n*, नुकसानी *f*, खराबी *f*, हानि *f*, नाश *m*, क्षति *f*, धक्का *m*. (*fig.*) ३ अन्याय *m*, जुलूम *m*, अपकृति *f*, अपकार *m*, अपक्रिया *f*, अपाय *m*, पीडा *f*, वाईट *n*.

Injustice ( in-jus'tis ) [Fr. –L. *injustitia* -*in*, not, & Justice.] *n. iniquity, wrong, unfairness* अन्याय *m*, गैरइनसाफ *m*, बेइनसाफ *m*, अधर्म *m*, अनय *m*, अनीति *f*, न्यायविरोध *m*, धर्मविरोध *m*, नीतिविपर्यास *m*, गैरवाजवीपणा *m*, अरास्तपणा *m*. २ *an unjust act, a sin, a crime* अन्यायाचें कृत्य *n*, अन्याय *m*, दुष्कृत्य. ३ *a wrong* नुकसान *n*, उपद्रव *m*.

Ink ( ingk ) [ O. Fr. *engue* ( Fr. *encre* ) –L. *encaustum,* the purple red ink used by the later Roman Emperors –Gr. *engkauston* -*engkaio,* to burn in. ] *n. a coloured fluid* ( usually black ) *used for writing &c.* शाई *f.* [ I. MADE OF LAMPBLACK, LAC, &C. लाखी शाई *f.* INDELIBLE I. पक्की शाई *f.* PRINTER'S I. छापखान्याची शाई *f.* SELLER &C. OF I. शाईवाला, शाईविक्या. SYMPATHETIC I. *a fluid of such a kind that what is written with it remains invisible* अदृश्य शाई *f,* गुप्तशाई *f.* ] २ *a pigment* ( चिताऱ्याचा -रंगाऱ्याचा ) रंग *m.* I. *v. t. to dub with ink* शाईनें भरणें -भरवणें -माखणें, शाईनें ( शाई लावून ) काळा करणें. I. -bottle, -horn, -stand *n.* दऊत or दौत *f,* मषीपात्र *n.* [ PIECE OF RAG USUALLY KEPT IN THE I. पोस्त *n.*] Ink'iness *n.* In'ky *a. consisting of ink* शाईचा. २ *resembling ink* शाईसारखा. ३ *blackened with ink* शाईनें भरलेला, शाई फांसून काळा केलेला.

Inkle ( ingk'l ) [ origin unknown.] *n. a kind of broad linen tape* नवार *f.*

Inkling ( ingk'ling ) [ M. E. *inkle,* to mutter. ] *n. a hint, whisper, intimation* सूचना *f,* खूण *f* ( v. देणें ), चुणूक *f,* झुणूक *f,* झुळूक *f,* गंध *m.* (*fig.*) ईषद्ज्ञान *n,* किंचित् बोधन *n,* बातमी *f,* खबर *f,* इषारत or इशारत *f,* आभास *m,* वास *m.* [TO DIVINE THE WHOLE FROM AN I. सुतानें स्वर्गास जाणें. TO GIVE AN I. चुणूक *f.* दिशा *f.* -दाखविणें, दिग्दर्शन करणें: TO HAVE AN I. ( चा ) वास लागणें *in. con. with* ला *of s.,* बातमी समजणें.]

Inland ( in'land ) [ A. S. *inland,* a domain –in, & land. ] *a. remote from the sea, within the land, interior* समुद्रापासून लांबचा, समुद्रापासून आंतला, मध्यदेशीय, मध्यदेशस्थ, देशमध्यवर्ती, अंतर्देशीय. २ *carried on within a country, domestic, not foreign* देशांतील, देशीय, देशी, अविदेशी, (आपल्या) मुलखांतील. [ I. NAVIGATION देशांतल्या देशांतील नौकागमन *n.*] ३ *drawn and payable in the same country* ( as a bill &c. ) ज्या देशांतून लिहिली असेल त्याच देशांत पटविण्याची (हुंडी इ०), ज्या देशांत लिहिला गेला त्याच देशांत स्वीकारण्याचा, देशांतल्या देशांतचा. I *n. the interior part of a country* मध्यदेश *m,* देशाभ्यंतर *n,* ( समुद्रकिनाऱ्यापासून लांबचा ) देशाच्या आंतील भाग *m.* In'lander *n.* देशाभ्यंतरवासी, मध्यदेशस्थ.

Inlay ( in-lā' ) [ E. in, and Lay. ] *v. t. to lay within* ( a ) (hence) *to insert as pieces of ivory, pearls, or the like in a groundwork of some other material to form an ornamental surface* जडविणें, बसविणें, खचित करणें, जडावाचें काम करणें. ( b ) *to diversify with insertions* ( with *with* ) आंत भरणें, घुसडणें, जडावाचें काम करणें (*fig.*); as, "But these things are borrowed by the monks to *inlay* their story." I. *n.* जडावाचें काम *n,* जडाव *m.* Inlaid' *pa. t. & p. p.* Inlay'er *n.* जडाव काम करणारा, जडावकाम्या, जडणारा, जड्या. Inlay'ing *pr. p. & v. n.* जडणें *n,* जडण *n,* जडणी *f,* जडणकाम *n.*

Inlet ( in'let ) [ E. in & Let. ] *n. a passage by which one is let in, place of ingress, entrance* आंत जाण्याचा रस्ता *m,* वाट *f.* २ *a bay* खाडी *f,* वांकण *n,* ओहर *m.* ३ *an inserted material* आंत बसवलेली वस्तु *f.*

Inly ( in'li ) [ A. S. *inlic* -*in,* & *lic,* like. ] *a. inward,* आंतला, आंतील, अंतस्थ, गुप्त, अंतर्यामींचा, पोटांतला. I. *adv. secretly* गुप्तपणानें.

Inmate ( in'māt ) [In, & Mate.] *n. one who is in the same house with another, a fellow-lodger* एकाच घरांत राहणारा, सहवासी, सहस्थायी, सहनिवासी, एकस्थलस्थ. २ *one received into a hospital* इस्पितळांत (उपचाराकरितां) घेतलेला रोगी *m.*

Inmost ( in'mōst ) *a.* See Innermost under Inner.

Inn ( in ) [ A. S. *in, inn,* an inn, house –*in, inn,* within, from the prep. *in.* Icel. *inni,* house. या शब्दाचा मूळ अर्थ 'राहण्याची जागा, निवासस्थान, घर,' असा होता. ] *n. a house for the lodging and entertainment of travellers* फिरस्त्या लोकांच्या राहण्याची व जेवणाखाण्याची सोय करण्याचें घर *n,* खाणावळ *f,* उतारशाळा *f,* उतारवाडा *m,* भटारखाना *m,* पथिकाश्रम *m,* धर्मशाळा *f,* सराई *f.* २ *a college in London for students of law and barristers* लंडनांतील कायद्याचा अभ्यास करण्यासाठीं विद्यार्थ्यांनीं राहण्याचें कॉलेज *n,* कायद्याचें विद्यालय *n,* स्मृतिशास्त्रज्ञवास *m;* as, "*Inns* of court." ३ दारूचें दुकान *n,* पानस्थान *n.* I. *v. i. to lodge* राहणें, वास करणें. I. *v. t. to shelter* आश्रय *m* -थारा *m.* देणें. २ *to afford lodging and entertainment to* ( च्या ) उतरण्याची व जेवणाखाणाची सोय करणें. Inn'-keeper, I.–holder *n.* खाणावळवाला, भटाऱ्या, भटारी.

Innate ( in'āt, in-nāt' ) [ L. *innatus* –*in,* in, & *nasci,* to be born. ] *a. inborn, inherent, natural* जन्माचा, आंगचा, जातीचा, जन्मतः आंगीं असलेला, स्वाभाविक *pop.* स्वाभाविक, स्वभावसिद्ध, स्वभावज, सहज, नैसर्गिक, निसर्गजात, प्रकृतिस्थ, अंतर्जात. २ *metaph. derived from the constitution of the intellect* ( as oppo. to *acquired from experience* ) आंगच्या बुद्धीचा, स्वतःच्या अकलेचा. ३ *bot. joined by a base to the very top of the filament* अधःस्पर्शी, बुडापासून टोंकापर्यंत जोडलेला; as. I. anthers. Inn'ateness *n.* सहजत्व *m,* स्वभावसिद्धत्व *n,* नैसर्गिकत्व *n,* &c. Inna'tely *adv.*

Innavigable ( in-nav'i-ga-bl ) *a. impassable by ships or vessels* नौकागमनाशक्य, अनाव्य, ज्यामधून नौकाप्रवास करतां येत नाहीं असा (समुद्र, खाडी, नदी).

Inner ( in'ėr ) [ compar. of in.] *a. interior, internal* आंतला, आंतील, आंतर, आंतल्या बाजूचा -आंगचा -कडेचा. [ I. ORGAN अंतःकरण *n.* I. SELF अंतरात्मा *m.* ] २ *obscure, not easily discovered* अंतस्थ, अंतस्थित, गर्भस्थ, आंतर, गूढ, गहन, सहज न समजणारा -ध्या

नांत न येणारा. In'nermost, In'most *a. farthest, inward, most remote from outward part* अतिशय आंतला, अत्यभ्यंतरस्थ, अत्यभ्यंतरवर्ती, गाभ्यांतला.

Inning ( in'ing ) [ a verbal noun from the old verb to *inn* i. e. to house corn from noun Inn.] *n. the ingathering of grain* कापणी *f*, पीक गोळा करणें *n*. २ ( cricket playing ) (often in *pl.*) *the time or term for taking the bat* चेंडूफळीच्या खेळांतील एका पक्षाकडील सर्व गडी खेळण्याची बारणी *f* -बारी. ३ (hence) *the turn or time of a person or party in power* अधिकारारूढ पक्षाची कारकीर्द *f*, पाळी *f*, बारी *f*, भर *m* ; as "The Whigs went out, and the Democrats had their *innings*." ४ *pl. lands recovered from the sea* खार *f*, खाजण *n*, खारट *n*. Good innings *or* long innings *good luck or a long run of such luck* चांगलें दैव *n*, ( *idio.* ) उदरीं शनि *m*.

Innervate ( in-nėr'vāt ) [ In + Nerve. ] *v. t. anat. to supply with nerves* मज्जातंतूंनीं मजबूत करणें ; as, "The heart is *innervated* by pneumogastric and sympathetic branches." Innerva'tion *n. –the act.* मज्जातंतूंच्या क्रियेमध्यें जोम आणणें *n*. २ *physiol. nervous activity* मज्जातंतूंची जोमदार क्रिया *f* -व्यापार *m*. ३ *anat. the distribution of nerves in an animal, or to any of its parts* शरीरांतील मज्जातंतूंची वांटणी *f*. Innerv'e *v. t.* to *invigorate* ताकद *f*, आणणें, शक्ति *f*. भरणें, जोम *m*. आणणें, जोमदार करणें.

Innocent ( in'o-sent ) [ Fr. –L. *in*, not and *nocere*, to hurt.] *a. not hurtful, inoffensive* निरुपद्रवी, अबाधक, अनपकारी, अविकारकारी, *med.* अनुपद्रवकारी, ज्यापासून जिवाला धक्का पोंचत नाहीं असें ( अवाळूं ). २ *free from guilt, guiltless, pure, upright* निर्दोष, निरपराध, दोषरहित, निष्कलंक, अलिप्त, निर्मल, पाक. ३ *lawful, permitted* कायदेशीर, वाजवी; as, an I. trade. ४ *not contraband, not subject to forfeiture* बंदी -मना न केलेला. ५ (with *of* ) *simple, artless, foolish* निष्कपट, सात्विक, गरीब, बापडा, सालस, अकृत्रिम, दिलपाक. I. *n. an innocent person* निर्दोष मनुष्य *m*, निरपराधी माणूस *m*. २ *an idiot, a simpleton* बेवकूब -वेडा ( बिचारा ) मनुष्य *m*. Inn'ocently *adv. harmlessly* निर्दोषपणें, निरपराधपणें. Inn'ocence or Inn'ocency *n. harmlessness* निरुपद्रविकपणा, निरपराधीपणा, अनपकारिता, अनपकार *m*, सात्विकता *f*, सत्वगुण *m*, अनपराधता *f*. २ *purity, blamelessness, freedom from guilt* निर्दोषता *f*, निष्पापता *f*, अपराधहीनता *f*. ३ *ingenuousness, artlessness*, निष्कपटपणा *m*, सरलता *f*, गरीबी *f*, सालसाई *f*, बापुडेपणा *m*. ४ *imbecility* दुर्बलबुद्धि *f*. ५ *ignorance* अजाणतेपणा *m*, अज्ञान *n*.

Innominate ( in-nom'i-nāt ) [ L. prefix *in*, not, and *nominare*, to name. ] *a.* ( R. ) *having no name, unnamed* निनांवी. I. artery अनामिका धमनी I. bone *anat. the great bone which makes the lateral half of the pelvis in mammals* ( it is composed of three bones, ilium, ischium, and pubis कुल्याचें हाड, कडेचें हाड, आणि ओटीखालचें हाड ही तिन्हीं मिळून बनलेलें मोठें हाड *n*, श्रोणीफलक *m*.

Innocuous ( in-nok'ū-us ) [L. *innocuus*, not hurtful.] *a. not hurtful, harmless in effects* ( used of things and not of persons) अनपकारी, निरपकारी, अविकारी, इजा न करणारा. Innoc'uously *adv.* Innoc'uousness *n*. अविकारिता *f*, अनपकार *m*, अविकारीपणा *m*.

Innovate ( in'o-vāt ) [ L. –*in*, & *novus* Sk. नव new.] *v. t. to change or alter by introducing something new* नवी रीत चालू करणें, नवा मार्ग-नवा रस्ता -नवा व्यवहार *m* -नवा संप्रदाय *m* -करणें -पाडणें, जुना देशाचार बदलणें, नवें जुनें करणें, फेरफार -फिरवाफिरव करणें. I. *v. i. to introduce novelties, to make changes* नवीन फेरफार करणें. Innova'tion *n. the act of innovating* नवा मार्ग पाडणें *n*, नवी चाल सुरू करणें *n*, नूतन -मार्गप्रवर्तन *n*, नवाचारस्थापन *n*, फिरवणें, पालटणें, फिरवाफिरव *f*. २ *a change effected by innovating* नवी रीत *f*, नवी चालू *f*, नवा मार्ग, नूतन रीती *f*, नूतन पद्धति *f*. Innova'tor *n. one who innovates* नवमतस्थापक *m*, मतांतरस्थापक *m*, नवा मार्ग -नवी रीती *f*. पाडणारा *m*, नवसंप्रदायप्रवर्तक *m*.

Innoxious ( in-nok'-shus ) [ L. *in*, not & Noxious.] *a. harmless, innocent* निरुपद्रवी. २ *free from crime, pure* निर्दोष, निष्पाप. Innox'iousness *n*.

Innuendo ( in-ū-en'-dō ) [ Lit. *innuendo* means a suggestion conveyed by a nod. It is the gerund ablation of *innuo* thro. *in* & *nuere* to nod. ] *n. an oblique hint, a remote allusion or reference* (usually derogatory to a person or thing not named) व्यंगोक्ति *f*, अन्योक्ति *f*, व्यंग *n*, पर्यायोक्ति, भंग्युक्ति *f*, वक्रोक्ति *f*, नोक *f* ( *v.* मारणें -दाबणें.)

Innumerable ( in-nū'mer-a-bl ) [L. *in*, not & Numerable. ] *a. not capable of being numbered* असंख्य, अगणनीय, अगण्य, बेसुमार, कोट्यवधी. Innu'merably *adv.* बेसुमारपणानें. Innumerabil'ity *n*.

Innutrition ( in-nū-trish'un ) [ *In*, not & Nutrition.] *n. failure of nourishment* अपुष्टि *f*, अपोषण *n*. Innutritious *a. not supplying nourishment* अपौष्टिक, अपोषक, अपुष्टिकर.

Inobservable ( in-ob-zerv'ā-bl ) *a. that cannot be observed or seen* पाहतां न येणारा, लक्ष्यागोचर, सूक्ष्मतर. Inobserv'ant *a.* असावधान. Inobserv'ation *n*. दुर्लक्ष *n*, अलक्ष *n*.

Inobtrusive ( in-ob-trōō'siv ) *a. not obtrusive* बळेंच पुढें पुढें न करणारा.

Inoculate (in-ok'ū-lāt) [L. *in*, into, and *oculus*, eye.] *v. t. to insert as the bud or eye of a tree in another tree* कलम *n*, करणें, पिबंदी *f*, करणें. २ *med.* रोगप्रति-

बंधक रस (लस) आंगांत (टोंचून) घालणें, (रोगप्रतिबंधक) लसिकाधान करणें; ( with the matter of small-pox) देवी काढणें -टोंचणें, फोड्या काढणें, तोडगा करणें, शिका देणें, छापणें. ३ (*fig.*) *to introduce into the mind* ( used esp. of harmful ideas or principles ), *to imbue* (वाईट गोष्टी) मनांत भरविणें; as, "To I. one with treason or infidelity." I. *v. i.* कलम करणें -बांधणें. २ देवी काढणें -टोंचणें. N. B.:—The use was formerly limited to the intentional communication of the small-pox, but is now extended to include any similar introduction of modified virus. Inocula'tion *n.* ( *the act.* ) कलम बांधणें *n*, पिवंदी *f.* २ लसिकाधान *n*, लसिकानिवेशन *n*, रोगप्रतिबंधक रस टोंचून आंगांत घालणें *n*, इनॉक्युलेशन करणें *n.* (b) loosely देवी काढणें *n* -टोंचणें *n.* ३ (*fig.*) *communication of principles* (esp. false principles) *to the mind* (वाईट गोष्टी भरवून) मन बिघडविणें *n.* Inocul'ator *n.* रोगप्रतिबंधक लस आंगांत टोंचून भरणारा, इनॉक्युलेशन करणारा, लसिकाधानकार.

Inodorous ( in-ō'dur-us ) *a. having no smell, scentless* वासरहित, गंधरहित -हीन, गंधशून्य, निर्गंध.

Inoffensive (in-of-fen'siv) *a. giving no offence* अनुपद्रवी, अनुपद्रवकारी, अनुपद्रविक, नम्र, लीन, विलीन, अहिंसक, अघातुक, अद्वेष्टा, अद्रोही, निद्रोही. २ *harmless, doing no mischief or injury* निरुपद्रवी, अनपकारी, अबाधक, गरीब, बापडा *or* बापुडा, बापुडवाणा, सात्विक, सालस, साळसूद, and appellatived terms for an inoffensive person are: भोलानाथ, भोलाशंकर, भोळानाथशंकर, सांब, सांबमूर्ति, धर्मराज. Inoffen'sively *adv.* गरिबीनें, निरुपद्रविपणानें. २ सात्विकपणानें, सत्ववृत्तीनें. Inoffen'siveness *n.* निरुपद्रविपणा *m.* २ सात्विकपणा *m*, सत्वशीलपणा *m*, सत्ववृत्ति *f.*

Inofficial ( in-of-fish'al ) *a. not proceeding from the proper office, not required by the duties of any office* हपीसाच्या मार्फतीचा नव्हे असा, हपीसाच्या द्वारें न झालेला, सरकारी नात्याचा नाहीं असा, अनधिकारक, अनधिकारप्रयुक्त. २ *without the usual forms of authority* अनौपचारिक रीतीचा, अधिकारचिन्हांशिवायचा. Inoffic'ially *adv.*

Inoperative ( in-op'er-a-tiv ) *a. producing no effect* निरुपयोगी, अकार्यकारी, व्यर्थ, कुचकामाचा; as, Laws rendered *inoperative* by neglect.

Inopportune ( in-op-por-tūn' ) [ Fr. –L. *in*, not, & Opportune.) *a. unseasonable in time, inconvenient* अकालिक, अवेळींचा, अवेळेचा, अकाळींचा, अनवसर, अयोग्यकालिक, सोयीच्या वेळीं न झालेला -केलेला, अकालीन, अकाल, अयोग्य, अप्रासकाल. Inopportune'ly *adv.* भलत्याच काळीं, गैरसोयीच्या वेळीं, अयोग्य कालीं. Inopportune'ness *n.* अकालिकता *f*, असमय *m.*

Inordinate ( in-or'di-nāt ) *a. beyond usual bounds, immoderate, irregular* अमर्याद, बेमर्याद, बेसुमार, बेहद्द, अनेमस्त, सीमेबाहेर गेलेला, अपरिमित, अतिरेकी. Inor'dinacy *n. excess or want of moderation* मर्यादातिक्रम *m*, अमर्यादा *f*, बेहद्दपणा *m*, बेहद्द *f*, अपरिमितपणा *m*, अतिरेक *m.* Inor'dinately *adv.* मर्यादातिक्रम करून, बेसुमारपणानें. Inor'dinateness, Inordina'tion *n. deviation from rule, irregularity* अमर्यादता *f*, नियमोल्लंघन *n*, अनियमितपणा *m*, अतिरेक *m.*

Inorganic ( in-or-gan'ik ) *a. without life or organization* (as minerals ), *unorganised, lifeless, inanimate* जड, अचेतन, निर्जीव, चैतन्यरहित, चैतन्यशून्य, इंद्रियरहित, निरिंद्रिय; as, "I. matter." २ *pertaining to the department of unorganized substances* जडपदार्थविषयक, जडपदार्थविषयींचा, निरिंद्रियवस्तुविषयक; as, "I. chemistry" = निरिंद्रियरसायनशास्त्र. See under Chemistry.

Inosculate ( in-os'kū-lāt ) [ L. *in*, and *osculor* -*atum*, to kiss.] *v. i. to unite by mouths or ducts* ( as two vessels in an animal body ), *to blend* एकमुखी होणें, एकवाहिनीरूप होणें. I. *v. t. to unite by contact* ( एकमेकांशीं ) सांधणें, संयोग करणें, जोडणें, ( एकमेकांला ) संयुक्त करणें -मिळवणें, भिडवणें. २ *to unite intimately, to cause to become one* ( -चा ) संबंध जोडणें -लावणें. Inoscula'tion *n.* एकमुखीभवन *n*, एकमुखीकरण *n*, अग्रद्वयसंधि *m.*

Inquest ( in'kwest ) [ O. Fr. *enqueste*; See Inquire. ] *n. an inquiry, search, quest* चौकशी *f*, तपास *m*, तलास *m*, शोध *m*, विचारणा *f*, माग *m*, छडा *m*, सुगावा *m*, कयास *m.* २ *an official inquiry* सरकारी चौकशी *f* -तपास *m.* ३ *a jury, particularly a coroner's jury* मैयतकयास, कारोनरची जूरी *f*, ( अपघातामुळें ) मयत झालेल्या माणसाच्या प्रेताची चौकशी करणारी जूरी *f.* ४ अपमृत्यूची पंचमार्फत चौकशी *f*, अपमृत्युविचारणा *f.*

Inquietude ( in-kwī'et-ūd ) *n. disturbance or uneasiness* (of body or mind) अस्वास्थ्य *n*, अस्वस्थता *f*, अशांति *f*, स्वास्थ्याभाव *m*, (शारीरिक) बेआरामी *f*, त्रास *m*, पीडा *f*, आधि *f*, व्याधि *f*, खुतखूत *f.*

Inquire ( in-kwīr' ) [ L. *in*, & *quærere, quæsitum*, to seek. ] *v. i. to ask a question or questions, to seek for truth by putting queries* ( माहिती मिळविण्यासाठीं ) प्रश्न विचारणें, खबर -माहिती पुसणें, प्रश्न करणें -घालणें. २ *to make examination or investigation* चौकशी करणें, तपास -तलास करणें. [ To I. INTO तपासणें. ] I. *v. t. to ask about* ( -ची ) चौकशी करणें, माहिती विचारणें -पुसणें, (चें) वर्तमान -हकीगत -वृत्तांत विचारणें, खबर -समाचार घेणें. Inquir'er *n.* विचारणारा, पुसणारा, प्रश्न-पृच्छा करणारा, पृच्छक, प्रष्टा, जिज्ञासु, अन्वेषक. २ शोधक, परीक्षक, विचारक, शोध करणारा, वर्तमान विचारणारा, तपास घेणारा -लावणारा -करणारा, शोधकर्ता. [ I. AFTER TRUTH सत्यशोधक.]. Inquir'ing *pr. p. given to inquiry, curious* चौकस,

शोधक, पृच्छक; as, "An I. mind." Inquir'ingly *adv.* शोधकपणानें, चौकसपणानें. Inqui'ry *n.* (*the act*) तपास करणें *n*, शोध लावणें *n* -करणें *n*, &c. २ *research, investigation* तपास *m*, तलास *m*, चौकशी *f*, शोध *m*, विचारपूस *f*, वास्तपुस्त *f*, छडा *m*, छडाछड *f*, अन्वेषण *n*, परीक्षा *f*, विचारणा *f*, चर्चा *f*, विवेचन *n*, (निर्णयार्थ -निश्चयार्थ केलेली) चौकशी *f*, जिज्ञासा *f*, अन्वेषण *n*, मार्गण *n*, विचारणा *f*. ३ *a question, a query* सवाल *m*, प्रश्न *m*, पृच्छा *f*. [SPIRIT OF I. जिज्ञासुभाव *m*, ज्ञानार्जनेच्छा *f*, ज्ञानेच्छा *f*.] I. about one's health कुशलप्रश्न *m*, समाचार *m*, क्षेमसमाचार *m*. Public and open I. उघड चौकशी *f*. Inquisi'tion *n. inquiry, examination* तपास *m*, शोध *m*, चौकशी *f*, &c. २ (*law*) *a judicial inquiry* (न्यायसभेंत) सरकारमार्फत होणारी चौकशी *f*. ३ (*Rom. Cath.* Church.) *a court or tribunal established for the examination and punishment of heresies* पाखंडी लोकांच्या मताची चौकशी करणारी धर्मसभा *f*, इनक्किझिशन् *n*, धर्मविचारणसभा *f*, धर्मविचारिणी सभा *f*, धर्मसमीक्षणसभा *f*. Inquisit'ional *a. making inquiry* चौकशी करणारा, चौकशीसंबंधीं. २ इनक्किझिशनसभेचा, धर्मविचारिणीसभेचा. Inquis'itive *a. addicted to making inquiry* चौकसदार, फाजील चौकस, फाजील शोधक, विचक्षणाखोर, फाजील जिज्ञासु, (वाजवीपेक्षां जास्त) तलास करणारा. I. *n.* शोधकस्वभावाचा-फाजील चौकस मनुष्य *m*. Inquis'itively *adv.* फाजील चौकसपणानें, &c. Inquis'itiveness *n. disposition to obtain information by questions* फाजील चौकस स्वभाव *m*, विचक्षणाखोरपणा *m*, फाजील जिज्ञासा *f*. Inquis'itor *n. one who inquires* चौकशी -शोध करणारा. २ *one whose official duty is to inquire and examine* (सरकारी) चौकशी करणारा अधिकारी. ३ *one fond of asking questions* फाजील चौकशी करणारा मनुष्य *m*. ४ इनक्किझिशनसभेचा -धर्मविचारिणी सभेचा सभासद *m*. Inquisito'rial *a. making rigorous and unfriendly inquiry* कडक चौकशी करणारा, बारकाईनें तपास काढणारा, विरुद्ध पुरावा खणून काढणारा. २ इनक्किझिशनसभेसंबंधीं.

Inquisitive (in-kwiz'i-tiv) See under Inquiry.

Inroad (in'rōd) [E. *in*, into and Road.] *n. a riding into an enemy's country, an attack, an encroachment* धाड *f*, स्वारी *f*, हल्ला *m*, दौड *f*, आक्रमण *n*.

Insalivation (in-sal-i-vā'shun) [In, & Saliva, which see.] *n. physiol. the process of mixing the food with the saliva* अन्न चघळून त्याच्याशीं लाळ मिळविणें *n*, लालाश्नमेलन *n*.

Insalubrious (in-sa-lōō'bri-us) [L. *in*, not and Salubrious.] *a. unfavourable to health, not healthy, unwholesome* बाधक, जाचक, अक्षेमकर, रोगजनक, रोगट, रोगी, अनिष्ट, अनिष्टकारक, जाचणारा, अस्वास्थ्यकारक -जनक, &c. Insalu'brity *n. unwholesomeness* रोगजनकत्व *n*, बाधकपणा *m*, जाचकपणा *m*, &c.

Insalutary (in-salū'-tar-i) *a. not salutary to health* प्रकृतीला -आरोग्याला न मानवणारा, आरोग्यप्रतिकूल.

Insane (in-sān') *a. mad, not sane or of sound mind* वेडा झालेला, वेडा, वेड लागलेला, पिसा, भ्रांतचित्त, बुद्धिभ्रष्ट. २ *used by insane persons* वेड्या लोकांचा, वेड्यांचा, वेडे लोकांकरितां केलेला, भ्रमिष्टांच्या -वेड्यांच्या उपयोगाचा; as, "An *insane* hospital" वेड्यांचें इस्पितळ. ३ *making mad, causing madness* वेडा -भ्रमिष्ट करणारा, वेड लावणारा; as, "I. roots." ४ *chimerical, unpractical* वेड्यासारखा, भ्रमिष्टासारखा, वेडगळ, अव्यावहारिक, अव्यवहारोपयोगी; as, "I. plans." Insane'ly *adv. madly* वेड्यासारखा. २ *foolishly, without reason* वेडगळपणानें, मूर्खपणानें, अविचारानें, विचारशून्यतेनें. Insan'ity *n. madness, unsoundness of mind* (पुष्कळ वेळ टिकणारें, कायमचें) वेड *n*, वेडेपणा *m*, पिसें *n*, चित्तभ्रांति *f*, बुद्धिभ्रष्टता *f*.

Insatiable (in-sā'shi-a-bl) *a. incapable of being satisfied or appeased, very greedy* (a) (of persons) तृप्ति न पावणारा, अतृप्त, असोशी, अधाशी, हावरा, हावरट, वखवख्या, as "I. of glory." (b) (of things) तृप्त करतां न येणारा, अनिवार, बेसुमार; as, "I. appetite." Insa'tiate *a.* Same as above. Insatiabil'ity Insa'tiableness, Insa'tiety *n. greediness of appetite* अतृप्तपणा *m*, अधाशीपणा *m*, हावरटपणा *m*, वखवख *f*, खाखा *f*.

Inscribe (in-skrīb') [L. *inscribo, inscriptus*, -*in*, upon and *scribere*, to write.] *v. t. to write upon, to engrave* (-वर) लिहिणें, कोरणें, खोदणें, खोदून -कोरून लिहिणें. २ *to mark with letters or words* वर्णांकित-शब्दांकित करणें, छापणें, वठवणें; as "Let thy once loved friend I. thy stone." ३ *to address, to commend to by a short address* (नांवानें) नजर करणें, (नामांकन करून) अर्पण करणें; as, "To I. an ode to a friend." ४ *to imprint deeply, to impress* (as on mind) (मनांत) ठसविणें, बिंबविणें, उतरविणें, उमटविणें. ५ *geom. to draw within so as to meet but not cut the boundaries* (छेद न करितां) दुसऱ्या आकृतीच्या आंत काढणें; as, "To I. a circle, triangle &c." Inscrib'able *a.* Inscrip'tion *n. the act of writing upon or engraving* (-वर) लिहिणें *n*, खोदून लिहिणें *n*, खोदणें, अक्षरें खोदणें *n*. २ *anything engraved on a solid substance* (for preservation or public inspection) खोदींव लेख *m* -लिपि *f*, कोरींव -खोदींव -काम *n*, अंकित -मुद्रितलेख *m*. [I. ON A COPPER-PLATE ताम्रपटलेख *m*, ताम्रलेख *m*. I. ON STONE शिलालेख *m*, पाषाणलेख *m*.] ३ *an address or dedication on a book to a person* ग्रंथसमर्पण *n*, समर्पणपत्रिका *f*, समर्पणलेख *m*. Inscrip'tive *a. bearing an inscription* कोरींव लेख असलेला. २ *of the character of an inscription* कोरींव लेखासारखा, &c.

Inscrutable (in-skrōōt'a-bl) [Fr. -L. *inscrutabilis*

-*in*, not, and *scrutari*, to search into. ] *a. obscure, unsearchable* शोधून काढण्यास कठीण, शोधाक्षम, गूढ, निगूढ. २ *incomprehensible* अतर्क्य, अचिंत्य, दुर्ज्ञेय, अगम्य, गहन, अगाध, बोधागम्य, खोल.

Insect ( in'sekt ) [ Fr. –L. *insectum, pa. p.* of *inseco* -*in*, into, & *secare*, to cut. ] *n. a small animal as a wasp or fly with a body as if cut in the middle or divided into sections* कीटक *m*, किडा *m*, कीड *f*, कीट *n*, कृमि *m*. (loosely), जंतु *m* (loosely), विभक्तांग कीटक *m*. २ *any trivial or contemptible person* धिक्कारपात्र मनुष्य *m*, कीटक *m* (*fig.*), किडा *m* (*fig.*). I. *a.* कीटकासारखा. २ *small, mean* क्षुद्र, तुच्छ, हलका. Insecta'rium *n. a place where a collection of living insects is kept* कीटकगृह *n*, कीटकागार *n*, निरनिराळ्या जातीचे कीटक सांठवून ठेवण्याची जागा *f*. Insec'tiform *a.* कीटकाकार, किड्याच्या आकाराचा. Insec'tile *a. having the nature of insects* कीटकजातीय, कीटकधर्मीय. Insecti'vora *n. pl. an order of mammals which feed particularly upon insects* कीटभोजी स्तन्यप्राणी *m. pl.*, कीटभोजी प्राणी *m. pl.* Insectiv'orous *a. feeding on insects* कीटभक्षक, कीटजीवी, कीटभोजी, कीटकोपजीवी.

*N. B.*:—It will be better if we restrict the meanings of the following words as follows: Insect=कीटक; Worm=कृमि; Bacterium=सूक्ष्म जंतु.

The various orders of insects are:—Aptera=हीनपक्ष ; Diptera=द्विपक्ष ; Hemiptera=अर्धपक्ष ; Lepidoptera =वल्कपक्ष; Orthoptera =सरलपक्ष; Hymenoptera=त्वक्पक्ष; Thysanoptera अंचलपक्ष; Neuroptera शिरालपक्ष; and Coleoptera कोशपक्ष.

Insecure ( in-se-kūr' ) *a. exposed to danger, unsafe, not secure or safe* असुरक्षित, अनिर्भय, अनिर्धोक्त, भयान्वित, धोक्यांतला, धोका असलेला, अभरंवशाचा. Insecur'ity *n. danger, hazard* भय *n*, धोका *m*, जोखीम *n*, संकट *n*, अरिष्ट *n*, विघ्न *n*. २ *want of confidence in safety* अनिर्धास्तपणा *m*, असुरक्षितपणा.

Insensate ( in-sen'sāt ) [ L. *in*, not, and *sensatus, sensus*, feeling. ] *a. void of sense, stupid, foolish* अक्कलशून्य -हीन, बेअक्कल, कमअक्कल, बेवकूब, मूर्ख.

Insensible ( in-sen'si-bl ) *a. destitute of the power of feeling* सुना, बधिर, बेभान, अचेतन, संवेदनाशून्य. २ *void of feeling, apathetic* अजाण अग्राहक,अगुणग्राहक. ३ *imperceptible* अगोचर, इंद्रियागोचर, इंद्रियाग्राह्य, फार बारीक, अदृश्य, अलक्ष्य. ४ *gradual, slow* नकळत (वाढणारा), आस्ते आस्ते (होणारा), धिमा. Insensibil'ity *n.* सुनेपणा *m*, बधिरपणा *m*. २ संवेदनाशून्यता *f*, अचेतनत्व *n*, निर्दयता *f*. ३ अजाणपणा *m*. ४ अगोचरपणा *m*, अतिसूक्ष्मता *f*. ५ धिमेपणा *m*.

Insentient ( in-sen'shi-ent ) *a. not having perception, not sentient* अचेतन, संवेदनाशून्य.

Inseparable ( in-sep'ar-a-ble ) *a. not separable* वेगळा करितां न येणारा, अपृथग्भावी, अवियोजनीय, वियोजनाशक्य, अविश्लेष्य, अपृथक्करणीय, अलग -निराळा न होणारा, अविभाज्य, नित्यसहवर्ती, नित्यसंबंधी, समवायसंबंधी. [ I. ACCIDENT अविश्लेष्य उपाधि *f*, अविभाज्यविकार *m*. I. RELATION नित्यसंबंध *m*. समवायसंबंध *m*.] Inseparabil'ity, Insep'arableness *m.* अविश्लेष्यता *m*, नित्यसंबंध *m*, समवायित्व *n*. Insepa'rably *adv.*

Insert ( in-sert' ) [ L. *in*, & *serere, sertum*, to join.] *v. t. to put or thrust in, to set in or among* (-आंत) घालणें -शिरवणें -शिरकवणें, (मध्यें) घुसडणें, घुसडून देणें, समावेश -प्रवेश करणें *g. of o.*, अंतर्गत -दाखल -प्रविष्ट करणें. Inser'tion *n. –the act* आंत घालणें *n*, शिरकाव *m*, प्रवेश *m*, &c. २ ( a ) *the place or mode of inserting* घालण्याची जागा किंवा रीत *f*. (b) *anat. the point or part by which a muscle or tendon is attached to the part to be moved* ज्या स्नायूपासून एखादें हाड हालावयाचें असतें त्या हाडाला तो स्नायु जेथें चिकटलेला असतो ती जागा *f*, स्नायुबद्धस्थान.

Inside ( in'sīd ) [ E. In and Side. ] *n. the side or part within* आंतील or आंतली बाजू *f* -भाग *m* -अंग *n*, अंतरंग *n*, अभ्यंतर *n*, अंतर्भाग *m*, गर्भ *m*, गाभा *m*. २ *pl. the entrails or bowels* आंतडी *f. pl.*, पोटांतला भाग *n*, ( briefly ) पोट *m*. ३ *private thoughts and feelings* आंतील विचार *m. pl.*, अंतर्याम *n*, अंतरंग *n*, अंतर्भाव *m*, हृदय *n*. I. *prep.* and *adv. within the sides of* आंत, आंतल्या बाजूस -भागीं -आंगांत -आंगास, अंतरीं, अंतरंगीं. I. *a.* आंतला. २ पोटांतला, अंतर्यामींचा.

Insidious ( in-sid'i-us ) [ Fr. –L. *insidiosus -insidiæ*, an ambush -*insideo -in*, & *sedere*, to sit.] *a. watching an opportunity to ensnare, treacherous, artful, deceitful* कावेबाज, कावेखोर, कपटी, छद्मी, कपटाचा, फसव्या, दगेखोर, दगेबाज, लाघवी. २ ( of things ) कावेबाजपणाचा,काव्याचा, फसवणुकीचा, कपटाचा, दगलबाजीचा, कपटयुक्त, &c. Insid'iously *adv.* कावेबाजपणानें, काव्यानें, कपटानें, &c. Insid'iousness *n. treachery, deceitfulness* कावेबाजी *f*, कावेबाजपणा *m*, कावादावा *m*, कावा *m*, दगलबाजी *f*, कपट *n*, लाघव *n*.

Insight ( in'sīt ) [ E. In and Sight. ] *n. sight into, deep inspection or view* अंतर्दृष्टि *f*, आंतील माहिती *f*, खरी -पुरी माहिती *f*, गम्य *n*, समीक्षण *n*, परिज्ञान *n*, अभिज्ञान *n*. २ *power of acute observation, penetration, discernment* निरीक्षणशक्ति *f*, अवलोकनशक्ति *f*, कुशाग्रबुद्धि *f*, सूक्ष्मदृष्टि *f*, अवगाहनशक्ति *f*.

Insignia ( in-sig'ni-a ) [ L. *pl.* of *insigne -in*, and *signum*, a mark.] *n. pl. distinguishing signs of honour, or office* सन्मानचिन्हें, अधिकारदर्शक -मानदर्शक चिन्हें *n. pl.*, चांद *m*. [I. OF ROYALTY राजचिन्हें.] २ *signs, marks* चिन्हें *n. pl.*, लक्षणें *n. pl.*

Insignificant (in-sig-nif'i-kant) [L. *in*, not,and Significant. ] *a. not significant, destitute of meaning* अर्थशून्य-हीन-रहित, निरर्थक. २ *unimportant, petty*

बिनमहत्वाचा, गौण, किरकोळ, बारीकसारीक, लहान. ३ *mean, contemptible* क्षुद्र, क्षुल्लक, हलका, अधम, नीच. Insignif'icance-cy *n. want of meaning* अर्थशून्यता *f*, निरर्थकत्व *n.* २ *want of importance* क्षुद्रपणा *m*, क्षुद्रता *f*, नीचपणा *m*, नीचता *f*. Insignif'icantly *adv.*

Insincere ( in-sin-sēr' ) *a. not sincere, deceitful, dissembling* कपटी, ढोंगी, कृत्रिम, खोटा, लबाड. २ वरकरणी, वायकरणी, कपटाचा, वायकळ. Insincer'ity *n.* खोटेपणा *m*, लबाडी *f*, दुरंगीपणा *m*, कपटभाव *m*, असरलता *f*, दुजाभाव *m.* २ वरकरणीपणा *m*, कापट्य *n.* Insincere'ly *adv.* कपटानें, वरकरणीपणानें.

Insinuate ( in-sin'ū'-āt ) [ L. *in*, into and *sinus*, a curve or bosom. ] *v. t. to introduce gently or artfully or as by winding or narrow passages* (हळूच, युक्तीनें किंवा वक्रगतीनें ) शिरकावणें, खुपसणें, शिरकाव *m* -प्रवेश *m.* करविणें. २ *to infuse gently, to instil* ( धीरे धीरे ) मनांत भरविणें -घालणें -बसविणें; as, to I. wrong ideas. ३ *to hint* ( *especially a fault* ), *to suggest* व्यंगोक्तीनें, -पर्यायोक्तीनें -अन्योक्तीनें सांगणें -दर्शविणें -दाखवणें -कळवणें, सूचना करणें, नोक *f.* दाखविणें *g. of o.*, वक्रोक्ति करणें. ४ *to work one's self into favour, to ingratiate* ( with recipro. *pro.* ) पोटांत शिरणें, कृपा -मर्जी संपादणें, मर्जी संपादन करणें, अनुग्रह मिळविणें *m.* I. *v. i.* खुबीनें -युक्तीनें -शिरणें. २ (हांजी हांजी करून किंवा लबाडीनें) मर्जी संपादन करणें. Insin'uating *a.* मर्जी संपादणारा, लाघवी, आर्जवी, फुसलाव्या, मनधरणीचा. Insin'uatingly *adv.* Insinua'tion *n. lit.* आंत शिरणें. २ अनुग्रह *m.* संपादणें, मर्जी संपादन करणें. ३ *the act or power of stealing on the affections* लाघवीपणा *m*, लाघव *n*, वशीकरण *n.* ४ *a hint, a suggestion by distant allusion* सूचना *f*, नोक *m*, व्यंग *n*, व्यंगोक्ति *f*, व्यंग्यार्थ *m*, पर्यायोक्ति *f*, छेदोक्ति *f*, उपरोध *m*, खोंच *f.* Insin'uative *a.* मर्जी संपादन करणारा, आर्जवी. Insin'uator *n. one who insinuates* प्रीती संपादन करणारा *m*, फुसलाव्या *m*, व्यंगोक्तीनें सुचविणारा *m*, आंत शिरत जाणारा *m.* Insin'uatory *a.* फुस लावणारा *f*, मर्जी संपादन करणारा *m.*

Insipid ( in-sip'id ) [ Fr. -L. *in*, not, *sapidus*, well-tasted.] *a. tasteless* बेचव, स्वादरहित, निचव, फिका, अळणी, अरस, पाणचट, कवकवीत, कवकवीत, पचपचीत, मळमळीत, गिळगिळीत, पचकट. २ *wanting spirit or animation* असार, फिका, निःसत्व, निःसार, अळणी. Insip'idly *adv.* Insip'idness *n.* Insipid'ity *n. tastelessness* बेचवपणा *m*, पचपचीतपणा *m*, पाणचटपणा *m*, निचवपणा *m*, स्वादरहितता *f*, कवकवीतपणा *m.* २ *dullness* निरसता *f*, असारता *f.*

Insist ( in-sist' ) [Fr. -L. *in*, upon and *sistere*, (Sk.) स्था, to stand.] *v. i. to stand or rest on, to persist in pressing* आग्रह *m* -अट *f* -आड *f* -अडती *f* -हट्ट *m*, धरून बसणें -धरणें -करणें, अडून बसणें, थाय घेऊन बसणें, खपाटीस -खणपटीस लागणें -बसणें, खणपट घेणें. २ *to dwell on, to urge, to refuse to give way* घोरघेणें, घोकणी घेणें -मांडणें -लावणें. Insist'ence *n.* आग्रह *m*, हट्ट *m*, अट *f*, घोष. Insistent *a.* आग्रहाचा, खणपटीचा, घोकणीचा, घोषाचा. Insist'ing *pr. p.*

Insnare ( in-snār' ) See Ensnare.

Insobriety ( in-so-brī'e-ti ) [ L. *in*, not, & Sobriety.] *n. intemperance, drunkenness* अतिप्राशन *n.*

Insociable ( in-sō'-shā-bl ) [ L. *in* not, & Sociable. ] *a. unsociable, taciturn* सहवास करण्यास अयोग्य, संसर्गविमुख, असमाजप्रिय, माणूसघाण्या, घुम्या, अनालापी, असंलापी. Insoc'iably *adv.*

Insolate ( in'so-lāt ) [ L. *in*, in & *sol*, the sun. ] *v. t. to dry in the sun's rays, to expose to the heat of the sun* उन्हांत ठेवणें, उन्हांत घालणें, ऊन देणें -दाखविणें, सूर्यपुट -सूर्यकिरणपुट देणें. Insola'tion *n. the act of exposing to the rays of the sun* सूर्यपुट -सूर्यकिरणपुट देणें *n.* २ *a sunstroke* उन्हाचा झटका *m*, चटका *m*, तडाखा *m*, लूक *f*, तिरीप *f.*

Insolent ( in'so-lent ) [Lit. unusual. Fr. -L. *insolens* -*in*, not, & *solere* present participle of *soleo* to be accustomed. Insolent ह्याचा मूळ अर्थ रीत किंवा शिरस्ता सोडून जाणारा असा आहे. ] *a. haughty and contemptuous, insulting, rude* उद्धट, मगरूर, दांडगा, दांड, उरमट, बदमस्त, मस्त, मस्तवाल, शिरजोर, उन्मत्त, चढेल, माजोरी, शेफारलेला, माजलेला, अविनीत. २ *proceeding from insolence* मगरुरीचा, दांडगाईचा, दांडगेपणाचा. In'solently *adv.* मगरुरीनें, दांडगाईनें, नाक लावून, उंच नाकानें, तुरा लावून, दांडगेपणानें, उद्धटपणानें. In'solence *n. haughtiness, impudence* उद्धटपणा, उद्दामपणा *m*, दांडगेपणा *m*, उरमटपणा *m*, दांडगाई *f*, मगरुरी *f*, बदमस्ती *f*, औद्धत्य (Sk.) *n.*

Insolidity ( in-so-lid'i-ti ) [ L. *in*, not & Solidity.] *n. want of solidity, weakness* अघनता *f*, अघनत्व *n*, फुसफुशीतपणा *m.*

Insoluble ( in-sol'ū-bl ) [ L. *in*, not, & Soluble. ] *a. incapable of being dissolved* न विरघळणारा, अविद्राव्य, अद्रावणीय, द्रावणाशक्य, जड, कठीण. २ *not to be solved or explained, unsolvable* अव्याख्येय, उलगडायाचा नाहीं असा, अनुद्धाटनीय, उद्धाटनाशक्य, कठीण, अवघड, बिकट, गूढ, गहन.

Insolvable ( in-solv'a-bl ) [ L. *in*, not & Solvable. ] *a. not capable of solution or explication* सोडवण्यास कठीण. २ *incapable of being paid* फेडण्यास अशक्य; as, I. debts. ३ *not capable of being loosed, inextricable* मोकळें न करण्यासारखा; as I. bands. ४ *heavy, hard (as grains, pulse &c.)* चहाड, कुचर, जड. Insolubi'lity *n.* अद्राव्यता *f*, द्रावणाशक्यता *f.* २ (as grains, pulse ) चहाडपणा *m*, कुचरपणा *m.* ३ उलगडण्याची अशक्यता *f*, उद्धाटनाशक्यता *f*, अवघडपणा. Insolv'ency (law) *the condition of one who is unable to pay his debts off* नादारी *m*, नादारपणा *m*, दिवाळें *n.*

नातवानी *f*, ऋणमोचनाशक्ति *f*. २ *insufficiency to discharge all debts* निर्धनता *f*. Insolv'ent *a. unable to pay one's debts as they fall due* नादार, निर्धन, बसलेला, ऋणमोचनासमर्थ, दिवाळें निघालेला. २ *insufficient to discharge all debts* कर्ज फेडण्यास अपुरा; as I. estate. ३ *respecting persons who are unable to pay their debts* नादाराविषयीं, -संबंधीं; as I. court. I. law or Act of insolvency, *a law affording relief to insolvent persons* नादारीचा कायदा, ज्या कायद्यानें नादारलोक ऋणमुक्त होतात तो कायदा *m*. I. *n. one who is unable to pay his debts* दिवाळें काढणारा, नादार *m*. [To become I. थकणें, दिवाळें काढणें.]

Insomnia (in-som'ni-a) [L. *insomnis*, sleepless.] *sleeplessness* निद्रानाश *m*, झोंप न येणें *n*, जागररोग *m*, अस्वापरोग *m*. Insom'nious *a*. ज्याला झोंप येत नाहीं असा.

Insomuch (in-so-much) *adv. so, to such a degree, in such wise, to that degree* एथपर्यंत, एथपावेतों.

Insooth (in-sōōth) [L. *in* and Sooth.] *adv. in truth, truly, indeed* खरोखर, खऱ्या -सच्या रीतीनें.

Inspan (in-span') [E. *In* and *Span*, a yoke of oxen.] *v. t. to yoke draught oxen or horses to a vehicle* गाडीला बैल किंवा घोडे जोडणें -जुंपणें.

Inspect (in-spekt') [L. *inspecto* -*in*, into *specere* to look.] *v. t. to look into, to view for the purpose of examination* तपासणें, शोधणें, परीक्षा करणें, पाहणें, बघणें, टेहळणी *f*. करणें, पाहाणी *f*. करणें, निरीक्षण *n*. करणें, हेरणें, शोध -समीक्षण करणें. I. *n. close examination* बारीकतपास *m*, परीक्षा *f*. Inspec'tion *n. watch, official view* तपासणी *f*, शोध *m*, निरीक्षण *n*, निरीक्षा *f*, दर्शन *n*, समीक्षण *n*, समीक्षा *f*, अवेक्षण *n*, अवेक्षा *f*, पाहणें *n*, पाहणी *f*, हेरणी *f*. २ *the act of overseeing, superintendence* देखरेख *f*, चवकशी *f*, तपास *m*. Inspect'or *n. one who inspects, views or oversees* देखरेख करणारा, तपासनीस, तपासणारा *m*, अमीन *m*, पाहणारा *m*, पाहणी करणारा *m*, निरेखणारा, निरेख्या *m*, टेहेळ्या *m*, निरीक्षक *m*, निरीक्षणाधिकारी *m*, समीक्षक. I. general *mili. a staff officer of an army* लष्करांतील मोठा तपासणारा अधिकारी *m*. Inspect'orship *n*.

Inspire (in-spīr') [Fr. -L. *in*, into, and *spirare*, to breathe.] *v. t. to breathe into* फुंकणें, (आंत) वारा भरणें, श्वासभरित -पूरित करणें; as, "To *inspire* the breathing instruments." २ *to infuse by breathing* फुंकून -फुंकाऱ्यानें -फुंकेसरसा -फुंकाऱ्याबरोबर घालणें -भरणें -स्थापणें; as, "God *inspired* soul into man." ३ *to infuse into the mind* प्रेरणा *f*. करणें, (मनांत) भरविणें, बुद्धि *f* -वासना *f* -स्फूर्ति *f*. देणें. ४ *to disclose preternaturally* ईश्वरी प्रेरणा करणें, वारें *n*. भरविणें -शिरवणें, अवसर *m*-वारें शिरणें *in con*. ५ *to affect with a superior influence* (प्रेरणेनें) धैर्य *n*. -उत्साह *m* -आशा *f* -हिम्मत *f* -उत्तेजन *n*. देणें. ६ *to draw into the lungs, to inhale* श्वासाबरोबर आंत घेणें -खाणें -पिणें, श्वासमार्गानें आंत घेणें -ओढणें. I. *v. i. to* श्वास (आंत) घेणें. Inspir'able *a. able to be inspired or inhaled* श्वासाबरोबर आंत घेण्याजोगा, अंतःश्वसनीय. Inspira'tion *n. the act of inspiring* श्वासाबरोबर आंत घेणें *n* -घालणें *n*, अंतःश्वसन *n*, श्वासग्रहण *n*. &c. २ *a breath* श्वास *m*, दम *m*, प्राण *m*, निश्वास *m*. ३ *superior, elevating or exciting influence* प्रेरणा *f*, स्फूर्ति *f*, उत्साह *m*, उत्तेजन *n*, प्रोत्साहन *n*, धीर *m*, दम *m*, हिंमत *f*, आशा *f*. ४ *the divine influence by which the sacred writers were instructed* अंतःप्रेरणा *f*, ईश्वरी प्रेरणा *f*, ईश्वरी स्फूर्ति *f*, संचार *m*, अवसर *m*, वारें *n*. The last two words are commonly used of the afflatus of an inferior god or of a devil. [PLENARY I. पूर्ण प्रेरणा *f*, निर्दोष प्रेरणा *f*, अदोषपात्रप्रेरणा *f*.] Inspi'red *pa. t. & p. p.* श्वासाबरोबर -श्वासानें आंत घेतलेला, अंतःश्वसित. २ *moved or animated by divine inspiration* ईश्वरप्रेरित -प्रबोधित, स्फूर्ति झालेला, अंतःप्रेरित, देवसंचाराचा, अवसर आलेला. ३ *animated* उत्तेजित, प्रोत्साहित, आश्वासित. [To be I. स्फूर्ति होणें, वारें -अवसर येणें.] Inspir'er *n*. अंतःश्वसन करणारा *m*. २ स्फूर्ति -प्रोत्साहन &c. देणारा. Inspi'ring *a*. प्रेरक, प्रेरणा करणारा, प्रोत्साहक, स्फूर्तिदायक.

Inspirit (in-spir'it) [In & Spirit.] *v. t. to infuse spirit into, to give new life to* नवा दम *m* -धीर *m* -धैर्य *n* -उत्साह *m* -प्रोत्साहन *n* -चैतन्य *n*. &c. आणणें -देणें. Inspir'ited *pa. p.* प्रोत्साहन दिलेला. Inspir'iter *n*. प्रोत्साहक.

Inspissate (in-spis'āt) [L. *inspisso*, -*atum* -*in*, & *spissare*, to thicken -*spissus*, thick.] *v. t. to thicken by the evaporation of moisture, as the juices of plants* (उन्हांत वाळवून) घट्ट करणें, दाट करणें, घट्टपणा -दाटपणा आणणें, वाळवणें. I. *a*. घट्ट, दाट, वाळलेला. Inspiss'ated *pa. t. & p. p.* Inspissa'tion *n*. -*the act*. घट्ट करणें *n*. २ -*the state*. घट्टपणा *m*, दाटपणा *m*, घनता *f*.

Instability (in-sta-bil'i-ti) [L. *in*, not, & Stability.] *n. want of steadiness or firmness, inconstancy* अस्थिरता *f*, अस्थिरपणा *m*, चंचलता *f*, चंचलपणा *m*, अस्थैर्य *n*. २ *insecurity* डळमळीतपणा *m*, लिचेपणा *m*; as, "The I. of a building." Insta'ble *a*. अस्थिर, चंचल. Insta'bleness *n*.

Install, Instal (in-stawl') [Fr. -L. *in*, in, and *stallum*, a stall or seat. E. stall.] *v. t. to place in a stall or seat* जाग्यावर बसविणें, जागा देणें, as, "She *installed* her guest by the fireside." २ *to place in an office or order* संस्कारपूर्वक -संस्कारानें (जागेवर -अधिकारावर) बसविणें -स्थापणें -स्थापना करणें *g. of o.*, प्रतिष्ठापन *n* -प्रतिष्ठा *f* (Sk.) करणें, (*idiom.*) टिक्का लावणें, वस्त्रें देणें; -(a king &c.) अभिषेक -मूर्धाभिषेक

-पट्टाभिषेक करणें *g. of o.* Installa'tion *n.* -(*the act.*) *the act of placing in an office with ceremonies* अभिषेक -मूर्धाभिषेक -अभिषेचन -पट्टाभिषेक करणें *n*, स्थापना *f*, प्रतिष्ठापन *n*, नवाधिकारदान *n*, टिळा लावणें *n*, वस्त्रें देणें *n*, राज्याभिषेक करणें, संस्कारपूर्वक स्थापन *n.* Instal'led *pa. p.* Instal'ment *n.* ( also written *installment* ) *the act of giving possession of an office* ( विधिपूर्वक -संस्कारपूर्वक ) अधिकार देणें. ३ *one of the parts of a sum paid at various times* हप्ता *m*, हप्त्यानें दिलेली रकम *f*, खिस्त *f.* [PAYMENT BY I.s. हप्तेफेड *f*, खिस्त *f.* SETTLEMENT FOR THE PAYMENT OF A SUM BY I. S हप्तेबंदी *f*, खिस्तबंदी *f.* ] ४ *that which is produced at stated periods* नियमित काळीं होणारी गोष्ट *f*, हप्ता *m.*

Instance ( in'stans ) [Fr. –L. *instantia* a being near, urgency. See Instant.] *n. urgent request, solicitation* जरूरीची -आग्रहाची विनंति *f*, आग्रह *m*, अत्याग्रह *m*, मिन्नतवारी *f*, मिनती *f*, प्रार्थना *f*, विनंति *f*, आग्रहाची सूचना *f.* २ *occurrence, occasion* प्रसंग *m*, समय *m*, काळ *m*, वेळ *f*, pop. वेळा *f*; as, "In the first I." ३ *an example* उदाहरण *n*, दाखला *m*, दृष्टांत *m*, निदर्शन *n*, स्थल *n*, लक्ष्य *n.* [ FOR I. उदाहरणार्थ. ] I. *v. t. to mention as an example or case in point* (-चें) उदाहरण *n.* देणें, दृष्टांत *n* -दाखला *m.* सांगणें.

Instant ( in'stant ) [ L. *instans, -antis,* pr. p. of *insto -in,* upon, and *stare,* Sk. स्था to stand.] *n. a point in duration, any moment of time* क्षण *m*, पळ *n*, घडी *f*, निमिष *m*, पलक *m*, चिपडी *f*, मात्रा *f.* [EVERY I. क्षणोक्षणीं, घडोघडीं.] २ *a day of the present or current month* चालू महिन्याची तारीख *f* -दिवस *m.* I. *a. pressing, urgent* अगत्याचा, जरूरीचा, आग्रही, तत्पर, अतियाचक, अतिप्रार्थक, मिन्नतवारी करणारा. २ *immediate, quick* तावडतोबीचा, तात्कालिक, तत्क्षणिक, लगेचचा; as, "Impending death is thine, and I. doom." ३ *present, current* चालू, वर्तमान, चालता; as, "The I. time is always the fittest time." Instantan'eous *a. done in an instant* क्षणांत केलेला, निमिषमात्रांत केलेला. २ *momentary* क्षणिक, निमिषमात्र टिकणारा, अल्पकालिक, क्षणस्थायी. ३ *occurring at once* लगेच -तावडतोब होणारा -घडणारा. Instantan'eously *adv. in a moment* क्षणांत, निमिषमात्रांत, पळामध्यें, पळमात्रांत. In'stantly *adv.* तावडतोब.

Instate ( in-stāt' ) [ E. In and State. ] *v. t. to put in possession, to install* स्थानापन्न करणें, जागयावर बसविणें, अधिकारारूढ करणें.

Instead ( in-sted' ) [ M. E. *in stede*–A. S. *on stede,* in the place. See stead. ] *adv. in the stead, place, or room of* (-च्या) जागीं -बदली -ऐवजीं -बद्दल -मोबदला.

Instep ( in'step) [Prob., from In, & Stoop, as if sig. the 'in -bend' ( Skeat ).] *n. the prominent upper part of the human foot near its junction with the leg* पायाची धूर *f*, धूर *f*, धुरी *f*, पायाचा शिरदळ *m*, पदोपरि भाग *m.* २ *the hind leg of a horse from the ham to the pastern joint* घोड्याच्या मागच्या पायाची धूर *f.*

Instigate ( in'sti-gāt ) [ L. *in,* & root *stig,* Gr. *stizo,* Sk. तिज्, to prick. See Stigma and Sting.] *v. t. to urge on, to set on, to incite* (वाईट काम करण्यास) चिथविणें, भर *f* -फूस *f.* देणें, भरीं घालणें, भरविणें, चहीं देणें, बीर *m.* भरणें -देणें, उचल *f* -उठावणी *f.* करणें, उत्तेजन *n.* देणें, उचलणें, चढवणें. In'stigated *pa. t. & p. p.* Instiga'ting *pr. p. & v. n.* In'stigatingly *adv.* भर देऊन. Instiga'tion *n.* (*the act.*) भर *f* -फूस *f.* &c. देणें. *n.* २ *impulse* (esp. to evil) भर *f*, फूस *f*, उत्तेजन *n*, प्रोत्साहन *n*, उचल *f*, उठावा *m*, उठावणी *f*, उटाळणी *f*, उटाळा *m*, शिकवणी *f*, चिथवणी *or* चिथावणी *f.* In'stigator *n. an inciter to ill* ( वाईट काम करण्यास ) चिथावणारा, भर देणारा. Instinct' *a. instigated, incited* चिथवलेला, भर दिलेला.

Instil, Instill ( in-stil' ) [ Fr. –L. *instillo -in,* and *stillare,* to drop. See Distil.] *v. t. to drop into, to pour in by drops* आंत पागळवणें, थेंब थेंब घालणें -ओतणें -भरणें -टाकणें. २ *to infuse slowly into the mind* ( हळू हळू ) मनांत भरविणें -शिरवणें. Instilla'-tion, Instil'ment *n.* –*the act* ( a ) थेंब थेंब घालणें *n.* ( b ) हळूहळू मनांत शिरकवणें *n.* २ *that which is instilled or infused* ; ( a ) थेंब थेंब घातलेली वस्तू -औषध *n.* ( b ) मनांत भरविलेली गोष्ट *f.* Instilled' *pa. t. & p. p.* Instill'ing *pr. p. & v. n.*

Instinct ( in'stingkt ) [L. *instinctus–in,* & *stinguere,* to prick.] *n. impulse, an involuntary or unreasoning prompting to action* उपजतबुद्धि *f*, नैसर्गिक -आंगचें ज्ञान *n*, शहाणपण *n*, स्वाभाविक -साहजिक ज्ञान *n*, साहजिक प्रवृत्ति *f*, अंगस्वभाव *m.* Instinct'ive *a. prompted by instinct* उपजतबुद्धीनें वागणारा, उपजतबुद्धीचा. २ उपजत शहाणपणाचा, स्वाभाविक, प्रकृतिसिद्ध, आंगच्या बुद्धीचा -शहाणपणाचा. Instinct'-ively *adv.* उपजतबुद्धीनें, आंगच्या ज्ञानानें, स्वभावतः

Instinct ( in-stingkt' ) *a.* See under Instigate.

Institute ( in'sti-tūt ) [ Lit. to cause to stand up, L. *instituo, in,* & *statuo* to cause to stand–*stare,* Sk. स्था, to stand. ] *v. t. to set up, to establish* स्थापणें, संस्थापणें, नेमणें, नेमून देणें, घालणें, पाडणें, चालू -प्रवृत्त करणें, स्थापन *n* -संस्थापन *n.* &c. करणें *g. of o.*; as, "To I. laws कायदे करणें -बांधणें. २ *to originate, to found* नवीन स्थापणें -स्थापना करणें. ३ *to commence* सुरू -चालू करणें; as, "To I. an inquiry." I. *n. an established law* नियम *m*, नेम *m*, विधि *m*, विधान *n*, व्यवस्था *f*, धारा *m.* २ *a book of precepts or principles* शास्त्र *n*, संहिता *f*, संग्रह *n*,

[RELIGIOUS I. s. धर्मसंहिता *f*, शास्त्रसंहिता *f*. I. s. OF MANU मनुसंहिता *f*, मनुस्मृति *f*, मानवशास्त्र *n*. ]. ४ *an institution* संस्था *f*, समाज *m*, सभा *f*, विज्ञावर्धक -ज्ञानवर्धक -शोधक मंडळी *f*. [ MECHANICAL I. यांत्रिक शाळा *f*. TECHNICAL I. शिल्पशाळा *f*, शिल्पविद्यालय *n*. MECHANICAL AND TECHNICAL I. यंत्रशिल्पशाळा *f*. ] Institu'tion *n*. -(*the act.*) स्थापना करणें *n*. २ स्थापना. ३ *an established society or organisation* संस्था *f*, (विशेषतः) सार्वजनिक संस्था. ४ सार्वजनिक संस्थेचें गृह *n* -ठिकाण *n*.

Instruct ( in-strukt' ) [ Lit. to 'put in order,' L. *in*, & *struere*, to pile up, to set in order. ह्या शब्दाचा मूळ अर्थ 'बनविणें, तयार करणें, व्यवस्थित ठेवणें' असा होता, परंतु तो सध्यां लुप्त आहे. ] *v. t. to teach* शिकविणें, सांगणें, पढवणें, शिक्षण देणें, उपदेश -अध्यापन करणें, बोध करणें. २ *to furnish with directions* समजावून देणें, समजूत देणें, सूचना देणें; as, 'The Judge I.ed the Jury." ३ *to direct, to command* हुकूम किंवा आज्ञा करणें -सोडणें. ४ *to inform* कळवणें, सांगणें. Instruct'ed *p. p.* बोधित, शिक्षित, उपदिष्ट, शिकविलेला. Instruc'tion *n. the act of instructing* शिकविणें *n*. २ *that with which one is instructed* शिक्षण *n*, शिक्षा *f*, बोध *m*, उपदेश *m*. ३ *command* आज्ञा *f*, निर्देश *m*, हुकूम *m*. ४ *precepts, teachings* विधि *m*, सूत्र *n*. Instruct'ions *n. pl.* पाठ *m*, धडा *m*. २ *information* समजूत *f*, (कज्जाची) माहिती *f*, समजावणी *f*. [CODE OF I. s. सूत्रसंग्रह *m*, विधिसंग्रह *m*.]Instruc'tive *a. serving to instruct or inform* बोधपर, बोधकारक, बोधप्रद, उपदेशपर, बोधावह, बोधाचा, ज्ञानदायक, ज्ञानोत्पादक, ज्ञानप्रवर्तक. Instruc'tively *adv*. Instruc'tiveness *n*. बोधकता *f*, बोधदायकता *f*, उपदेशपरता *f*. Instruct'er, Instruct'or *n. a teacher who imparts knowledge* शिक्षक *m*, उपदेशक *m*, गुरु *m*, अध्यापक *m*, उपदेष्टा. Instruct'ress *n*. स्त्रीशिक्षक, शिक्षकीण *f*.

Instrument ( in'strōō-ment ) [ Fr. -L. *in*, into, & *struere*, to pile up. ] *n. a tool, a utensil, an implement* हत्यार *n*, आऊत *n*, अऊत *n*, हतेर *n*, शस्त्र *n*, साधन *n*, उपकरण *n*, यंत्र *n*. २ *a musical instrument* वाजंत्र *n*, वाद्य *n*. [ A WIND I. मुरली *f*, पावा *m*, वेणू *f*, वायुवाद्य *n*. MARTIAL I. रणवाद्य *n*. STRINGED I. तंतुवाद्य *n*. I. SUITABLE TO FESTIVE OCCASIONS मंगलवाद्य *n*. I. COVERED WITH SKIN ( such as drum, tabor ) चर्मवाद्य *n*. SENDING I. ( telegra.) प्रेषकयंत्र *n*, or SIMPLY प्रेषक. REED I. जिव्हाळी *f*. MOUTH I. मुखवाद्य *n*. ] ३ ( *law* ) *a deed, a contract or writing* लेख *m*, खत *n*, दस्तैवज *m*, पत्र *n*, पट्टा *m*, पत्रक *n*. ४ *that which or one who is made a means, a means* कारण *n*, साधन *n*, निमित्त *n*, निमित्तकारण *n*, कार्यकर्ता *m*, कार्यंकार *m*, कार्यसाधक *m*, प्रयोज्य *n*. Instrument'al *a. serving as an instrument or means, helpful* साधक, कारणीभूत, निमित्तकारणभूत, साधनीभूत, प्रयोजक, कारणी. २ *effected by instruments* शस्त्रांच्या साहाय्यानें केलेला, शस्त्रांचा, शस्त्रसाधित. ३ *made by instruments, not vocal* वाद्यांचा, वाद्यसंबंधी, वाद्योत्पन्न, वाद्यजनित. I. case *gram.* तृतीया विभक्ति *f*. Instrument'alist *n. one who plays on musical instruments* वाद्यवादक, वाद्य वाजविणारा. Instrumental'ity *n. agency* साधकत्व *n*, कारकत्व *n*, साधनत्व *n*. २ ( of persons ) गुजारत *f*, मार्फत *f*. Instrument'ally *adv*.

Insuavity ( in-swav'i-ti ) [ L. *in*, not & Suavity. ] *n. want of pleasant manners* तुसडेपणा *m*, कुरठेपणा.

Insubjection ( in-sub-jek'shun ) [ L. *in*, not & Subjection. ] *n. want of subjection* अताबेदारी *f*, अपारतंत्र्य *n*, शिरजोरी *f*.

Insubmission ( in-sub-mish'un ) [ L. *in*, not, & Submission. ] *n. disobedience* अवज्ञता *f*, नमून नसण्याची स्थिति *f*, अलीनपणा *m*, स्वभावाचा अनमतेपणा *m*.

Insubordinate ( in-sub-or'din-āt ) [ L. *in*, not, & Subordinate. ] *a. not submissive to authority*, शिरजोर, बेहुकमी, अनिवार, स्वास्यनधीन. Insubordina'tion *n. disobedience to authority* बेहुकमीपणा *m*, स्वाम्यनधीनता *f*, शिरजोरी *f*. [Insubordinate conduct शिरजोरपणाचें वर्तन *n*.]

Insufferable ( in-suf'er-a-bl ) [ L. *in*, not, & Sufferable.] *a. unendurable, intolerable* असह्य, असहनीय, दुःसह. Insuffer'ableness *n*. असह्यता *f*.

Insufficient ( in-suf-fish'ent ) [ L. *in*, not & Sufficient. ] *a. inadequate* अपुरा, अपुरता, अपूर्ण, निपुरा, निपुरता, न्यून. २ *wanting skill or strength, unfit*, अपुरा, नालायक, अयोग्य. Insuff'iciency *n*. Insuffi'cience *n. inadequateness* अपुरतेपणा *m*, निपुरतेपणा *m*, कसर *f*, अपूर *f*, निपूर *f*, वाण *f*, न्यूनता *f*, हीनता *f*. Insuffi'ciently *adv*. अपुरतेपणें, अपुरता, निपुरा.

Insufflation ( in-suflā'shun ) [ L. *insuflatio* –*in*, & Sufflation which see.] *n. the art of breathing on anything or of blowing air to induce respiration* फुंकर घालणें *n*, फुंकरणें *n*, श्वास *m*, श्वासन्यास *m*. २ बाप्तिस्म्याचे वेळीं तोंडावर किंवा तोंडांत फुंकर घालणें. ३ *med. the act of blowing* ( a gas, powder or vapour ) *into any cavity of the body* फुंकरानें औषध घालणें *n*, प्रधमन *n*, फुंकणें *n*, ध्मानविरेचनविधि.

Insular ( in'sū-lar ) [L. *insula*, an island.] *a. belonging to an isle, surrounded by water* बेटाचा, द्वीपाचा, पाण्यानें वेढलेला, जलवेष्टित. २ द्वीपवासजन्य, द्वीपांत राहिल्यामुळें आंगीं आलेला; as, "I. disposition or character." Insular'ity *n*. जलवेष्टितत्व *n*, द्वीपता *f*, द्वीपाकार *m*. २ द्वीपवासजन्य गुण *m*. In'sulate *v. t. to make an isle of* (-चें) द्वीप बनविणें. २ *to place in a detached situation, to isolate* वेगळा करणें, पृथक् विलग -अलग -तुटक -असंलग्न करणें. ३ ( *phys.* ) *to separate by a non-conductor* विन्यास करणें,

रोधन किंवा रोध करणें, विद्युत्स्थापन करणें, पृथग्न्यास करणें. In'sulated *a. standing by itself* तुटक, अलग, पृथक्, निराळा. २ *separated by a non-conductor* पृथक् केलेला, विन्यस्त, रोधित, विद्युत्स्थापित. In'sulating *pr.p.&v.n.* [INSULATING BODIES रोधक -विन्यासकं -विद्युत्स्थापक पदार्थ. ] Insula'tion *n.* पृथक् स्थापन *n*, पृथक् ठेवणें *m*. २ *the act of separating a body from others by non-conductors* विन्यास *m*, रोधन *n*, विद्युत्स्थापन *n*. In'sulator *n. that which insulates, a non-conductor of electricity* रोधक *m*, विद्युद्रोधक, विद्युत्स्थापक, विद्युद्विन्यासक.

Insult ( in'-sult ) [ Fr. –L. *insulto –insilio*, to spring at –*in*, upon, and *salire*, to leap. Insult ह्याचा धात्वर्थ 'वर उडी मारणें अथवा हल्ला करणें' असा आहे. ] *n. gross abuse, act or speech of contempt* अपमान *m*, अवमान *m*, अपमानकारक भाषण *n*, निर्भर्त्सना *f*, अवज्ञा *f*, मानभंग *m*, भर्त्सना *f*, निंदा *f*, गैरअब्रू *f*, हेटाळणी *f*, अनादर *m*, (loosely) तिरस्कार *m*. [ TO ADD INSULT TO INJURY दुःखावर डाग देणें, दुःखांत डागणी देणें.] Insult' *v. i. to commit an indignity upon* अपमान *m*. करणें, मानभंग *m*. -अवज्ञा *f* -गैरअब्रू *f*. करणें, हेटाळणें, निर्भर्त्सणें, अपमान होईलसें बोलणें किंवा करणें *g. of o.* I.*v.i. to leap or jump upon* उडी मारणें. २ *to behave with insolence* अपमान करणें, बेअदबीनें वर्तणें -वागणें. Insul'ting *a. containing or conveying gross abuse* अपमानानें भरलेला, अपमानकारक, निर्भर्त्सक. Insult'ingly *adv. with insolent contempt* अपमानकारक रीतीनें, हेटाळणी करून, अपमानपूर्वक, अवज्ञापूर्वक.

Insuperable ( in-sū'per-a-bl ) [ Fr.–L. *insuperabilio* –*in*, not, & *superabilis, superare*, to pass over –*super*, above.] *a. insurmountable* अलंघ्य, अलंघनीय, दुर्लंघ्य, दुरतिक्रम, दुस्तर, अनिवार्य. Insuperabil'ity *n.* अलंघ्यता *f*, दुर्लंघ्यता *f*, अजेयता *f*.

Insupportable ( in-sup-pōrt'a-bl ) [ L. *in*, not, & Supportable.] *a. incapable of being borne, insufferable* असह्य, असहनीय, दुःसह, अतिकठीण, सोसावयास अशक्य -अयोग्य. Insupport'ableness *n.* असह्यता *f*, असहनीयता *f*. Insupport'ably *adv.*

Insuppressible ( in-sup-pres'i-bl ) [ L. *in*, not & Suppressible. ] *a. not to be suppressed or concealed* साफ दाबून टाकण्यास -दडपून टाकण्यास -दाबायास अशक्य, प्रशमनाशक्य, दुर्निवार -निवारणाशक्य.

Insure ( in-shōōr' ) [Fr. –L. *in*, intensive and Sure.] *v. t. to make sure or secure* पक्का -सुरक्षित -खचीत -नक्की करणें. २ *to secure against possible loss* ( a ) विमा उतरविणें. ( b ) (नाशापासून) निवारण करणें. [ I HAVE INSURED MY HOUSE मीं माझ्या घराचा विमा उतरविला आहे.] I. *v. i. to make insurance* विमा उतरणें, विमा उतरविणें. Insur'able *a. capable of being insured against loss or damage, proper to be insured* विमा उतरण्यालायक, विम्यायोग्य. Insur'ance *n.* विमा उतरणें. २ विमा *m*. ३ *premium paid for insurance* विम्याचा हप्ता *m*. [ I. BROKER, A BROKER WHO EFFECTS INSURANCE विमादलाल. I. COMPANY, *a company whose business is to insure against loss* विमा उतरणारी कंपनी *f* -मंडळी. I. POLICY विम्याचा कागद *m*, विमा उतरल्याचा दस्तैवज *m*. ] ४ *the sum for which property is insured* विम्याची रक्कम *f*. Insur'er *n. one who insures* विमा करणारा *m*, विमेकरी *m*.

Insurgent ( in-sur'jent ) [ L. *in*, upon, *surgere*, to rise.] *a. rising in opposition to civil or political authority, rebellious* सरकारावर, उठलेला बंडवाला, बंडखोर, राजविरोधी, राजद्रोही ( *lit.* ). Insur'gent *n. a person who rises in revolt, a rebel* बंडखोर *m*, फितुरी माणूस *m*, बंड्या *m*. [Band of Insurgents बंड *n*.] Insur'gency *n.* बंड *m*, विद्रोह *m*.

Insurmountable ( in-sur-mownt'a-bl ) [ L. *in*, not & Surmountable. ] *a. incapble of being overcome* दुर्लंघ्य, दुस्तर, सुदुस्तर, दुरतिक्रम. Insurmount'ableness दुर्लंघ्यता *f*, दुस्तरता *f*. Insurmount'ably *adv.*

Insurrection ( in-sur-rek'shun ) [ L. *insurrectio* –L. *in*, upon, *surgere*, to rise.] *n. a rebellion, a revolt, a seditious rising* बंड *n*, दंगा *m*, बेदा *m*, खूळ *m*, ठेंगा *m*, राजाविरुद्ध उठणें *n*, राजकीय उपद्रव *m*, ( or simply ) उपद्रव *m*, उपप्लव *m*. Insurrec'tionary *a. rebellious, seditious* राजाविरुद्ध, बंडाचा, दंग्याचा. Insurrec'tionist *n.* बंडखोर *m*, बंडवाला *m*.

Insusceptible ( in-sus-sep'ti-bl ) [ L. *in*, not, and Susceptible.] *a. not capable of feeling or being affected* ग्रहणशक्तिरहित, वेदनाशक्तिशून्य, ग्रहणाक्षम, जाणण्यास -ग्रहण करण्यास असमर्थ. Insusceptibil'ity *n.* वेदनाशक्तिशून्यता *f*, ग्रहणाक्षमता *f*.

Intact ( in-takt' ) [ L. –*in*, not, and, & *tangere*, –*tactus*, to touch.] *a. untouched, undefiled* न शिवलेला, न बिघडवलेला, अनामत, अलग, जसाच्या तसा, अस्पृष्ट. २ *uninjured* अखंड, अविकल.

Intaglio ( in-tal'yō ) [ L. *talea*, a rod, a twig. ] *n. cutting or engraving* दगडावर -दगडांत कोरणें. २ *a stone or gem in which a figure is cut* ज्यावर चित्र कोरलें आहे असा उंची किंमतीचा दगड *m*.

Intangible ( in-tan'ji-bl ) [ L. *in*, not, & Tangible. ] *a. not tangible, not perceptible to the touch* सूक्ष्म, लहान, अस्पर्शनीय, स्पर्शागोचर. Intangibil'ity *n.* Intan'gibleness *n.* अस्पश्यता *f*, स्पर्शागोचरता *f*, सूक्ष्मता.

Integer ( in'tejer ) [L. *in*, not, & *tangere*, to touch.] *n. a whole number* (in contradiction to a *fraction* or *mixed number* ) पूर्णांक *m*, अभिन्नांक *m*. *briefly* अभिन्न *m*. In'tegral *a. complete, uninjured, whole* अखंड, पूर्ण, अभिन्न, अविकल, अत्रुटित, अन्यून. २ *pertaining to a whole, not fractional* पूर्णांकसंबंधी, सबंध, पूर्ण, अभिन्न, वंदा, बांधा. In'tegrate

*v. t.* ( *math.* ) संकलन -उपचय करणें, बेरीज करणें. Integra'tion *n.* उपचय *m*, एकत्रीभाव *m*, बेरीज *f.* Integ'rity *n.* *wholeness, entireness* अखंडत्व *n*, पूर्णता *f*, अखंडता *f.* २ *moral soundness, honesty, rectitude* प्रामाणिकपणा *m*, शुचिता *f*, सरलता *f*, साचवट *f*, नेकी *f*, सचोटी *f*, सत्य *n*, नेक *m*, सत्त्व *n.* ३ *unimpaired state, purity* शुद्धता *f.*

Integument ( in-teg'ū-ment ) [ L. *in*, upon, *tegere*, to cover.] *n.* *the external protective covering of a plant or animal* शरिरावरील त्वचा *f*, शरीरावरण *n*, पापुद्रा or पापोद्रा *m*, पदर *m*, आवरण *m*, पडदा *m.*

Intellect ( in'tel-lekt ) [ Fr. –L. *intellectus* –*inter*, between and *legere*, to choose.] *n.* *mind in reference to its rational powers, reason, the thinking principle* बुद्धि *f*, अक्कल *f*, (विचार करणारें) मन *n*, मति *f*, विचारशक्ति *f*, ज्ञानेंद्रिय *n*, प्रज्ञा *f.* [ THE FACULTY OF THE HUMAN SOUL BY WHICH IT KNOWS *viz.* INTELLECT IS DIFFERENT FROM THE POWER TO FEEL AND TO WILL ; ALSO IT IS DIFFERENT FROM THE POWER TO PERCEIVE AND IMAGINE. INTELLECT IS THE THINKING FACULTY OF THE HUMAN SOUL.] Intellec'tion *n.* *the act of understanding* बुद्धिक्रिया *f*, बुद्धिव्यापार *m.* २ *simple apprehension of ideas* बोध *m*, ज्ञान *n*, बुद्धिग्रह *m*, ज्ञप्ति *f.* Intellect'ive *a.* बुद्धिविषयक, बुद्धिजन्य. २ बुद्धिविशिष्ट, बुद्धिवान्. ३ बुद्धिमात्रगोचर. Intellect'ual *a.* *belonging to the intellect, mental* बुद्धीचा, बुद्धीसंबंधीं, बुद्धिविषयक, बौद्धिक, ज्ञानाचा, ज्ञानशक्तीचा, ज्ञानविषयक, चित्संबंधीं, चिद्विषयक. २ *endowed with intellect* बुद्धिवान्, ज्ञानशक्तिसंपन्न. ३ *suitable for exercising the intellect* बुद्धियोग्य, बुद्धिगम्य, केवळ बुद्धीच्याच उपयोगी, बुद्धिविषयक; as, "I. employments." ४ *relating to the understanding* बुद्धीसंबंधीं, मनासंबंधीं, बौद्धिक; as, "I. philosophy." Intellect'ually *adv.* कल्पनेनें, बुद्धीनें, अकलेनें. Intellec'tualism *n.* बुद्धिसामर्थ्य *n.* २ *the doctrine that knowledge is derived from pure reason* बुद्धिजन्य ज्ञानवाद *m*, बुद्धिप्राधान्यवाद *m.*

Intelligent ( in-tel'i-jent ) [ L. *intellegens* stem of *pres. pt.* of *intelligere*, to discern, to understand.] *a.* *having intellect* बुद्धिविशिष्ट, ज्ञानशक्तिक. २ *well-informed* सुजाण, शहाणा, ज्ञानी, सज्ञान. ३ *clever* बुद्धिवान्, बुद्धिसंपन्न, चतुर, कुशल, निपुण, समजदार, हुषार, कुशाग्रबुद्धीचा, चौरस. Intel'ligence *n.* *the act of knowing* जाणणें *n*, ज्ञान *n.* २ *intellectual skill or knowledge, understanding, sharpness* बुद्धिचातुर्य *n*, चतुराई *f*, बुद्धि *f*, मति *f*, ज्ञान *n*, समज *m*, चातुर्य *n*, हुशारी *f*, जाणीव *f.* ३ *news, information communicated* खबर *f*, बातमी *f*, वर्तमान *n*, वार्ता *f*, समाचार *m*, सूचना *f.* [ AUTHENTIC OR OFFICIAL I. खासबातमी *f*, विंतिमवातमी *f.* THE SECRET I. गुप्तबातमी, चोरबातमी *f.*] ४ *an intellectual being or spirit* चिद्व्यक्ति *f*, ज्ञानव्यक्ति *f*, चिद्रूप व्यक्ति *f*, ज्ञानरूप व्यक्ति *f.* Intell'igencer *n.* *one who sends intelligence* बातमीदार *m*, खबऱ्या *m*, वार्ताहर *m*, वार्तावह *m.* २ ( at courts ) अखबरनवीस. Intelligen'tial *a.* *pertaining to the intelligence* बुद्धीचा, बुद्धीसंबंधीं, बुद्धिविषयक, बुद्धिगम्य. २ *consisting of unbodied mind* चिदात्मक, चिन्मय, चिद्रूप. Intelligibil'ity *n.* Intell'igibleness *n.* बुद्धिगम्यता *f*, बुद्धिग्राह्यता *f*, ज्ञेयता *f.* Intell'igible *a.* *that may be understood* समजायाजोगा, मनांत -ध्यानांत यावयाजोगा, बुद्धिगम्य, ज्ञानगम्य, बोधशक्य, ज्ञेय, बुद्धिग्राह्य. [ EASILY I. बालबोध, सुबोध, स्पष्ट, सुस्पष्ट. ] Intell'igibly *adv.* समजायाजोगा, साफ, स्पष्ट.

Intemperance ( in-tem'pėr-ans ) [ L. *in*, not, and Temperance.] *n.* *want of due restraint, excess of any kind* अतिरेक *m*, अमर्यादा *f*, मर्यादातिक्रम *m*, अनेमस्तपणा *m*, बेसुमारपणा *m*, अतिशय *m*, अमितता *f*, अमितभोग *m*, अनियतभोग *m*, असंयम *m*, असंयमन *n*, अनियत वर्तन *n*, अनियताचार *m*, स्वैरभोग *m*, अतिभोजन *n*, अतिपान. २ *habitual or excessive indulgence in alcoholic liquors* अतिपान *n*, खूब दारू पिणें -ठासणें *n.* Intem'perate *a.* *immoderate* ( *in enjoyment* ) अमितभोगी, अनियतेंद्रिय, बेसुमार, असंयमी, अनियतवृत्ति. २ *gluttonous, drunkard* अतिभोजी, अत्याहारी, अतिपानी. ३ *ungovernable, exceeding the usual degree* अतिमर्याद, बेसुमार, बेहद्द, अमर्याद, असंयमी. ४ *addicted to excessive use of liquors* अतिदारूबाज, अतिपानी, दारू खूब ठांसणारा. Intem'perateness *n.* Same as Intemperance. २ *severity of weather* हवेचा कडकपणा *m.*

Intend ( in-tend' ) [ M. E. *entend* –L. *in*, towards, and *tendere*, Sk. तन्, to stretch. To intend ह्याचा 'ताणणें, तणावा देणें' असा पूर्वी अर्थ होता, परंतु तो सध्यां प्रचारांत नाहीं.] *v. t.* *to fix the mind upon, to design, to purpose* मनांत योजणें -धरणें -नेमणें, मनांत असणें *in. con.*, इरादा -बेत -मनोरथ *m.* करणें -धरणें. *g. of o.* I. *v. i.* *to have design, to purpose* इरादा -मनसुबा असणें. Intend'ant *n.* *a superintendent* ( एखाद्या खात्यावर नेमलेला) वरिष्ठ अधिकारी, अमीन *m*, अध्यक्ष *m*, सुपरिंटेंडंट. Intend'ed *a.* (मनांत) योजलेला, (मनांत) ठरविलेला, संकल्पित, विवक्षित. २ *betrothed, affianced* विवाहाकरितां योजून ठेवलेला, मनसोद्दिष्ट, विवाहोद्दिष्ट. Intent' *a.* *bent upon, fixed closely upon* एकचित्त, एकतान, एकनिष्ठ, एकरोखी, अभिनिवेशी, तत्पर, तल्लीन, तन्मनस्क, आसक्त. Intent' *n.* *intention, purpose* आशय *m*, अभिप्राय *m*, इरादा *m*, मनसुबा *m.* [ TO ALL INTENTS AND PURPOSES व्यवहारदृष्ट्या, सर्वस्वी, सर्वथैव, सर्वार्थी, सर्व बाजूंनीं.] Inten'tion *n.* (*lit.*) *a stretching of the mind towards any object* (एखाद्या विषयाकडे) मन लावणें *n.* २ *fixed direction of mind* एकतानता *f*, एकचित्तता *f*, एकचित्तपणा *m*,

एकाग्रता f, एकनिष्ठा f, आसक्ति f. ३ *the object aimed at, design, purpose* उद्दिष्ट गोष्ट f, उद्देश m, संकल्प m. ४ *aim* अर्थ m, आशय m, बेत m, इरादा m, मनसुबा m, चिकीर्षा f, आकांक्षा f. ५ ( *logic* ) *any apprehension of an object* वस्तुबोध m, वस्तुज्ञान n, कोणत्याही पदार्थाची डोक्यांत आलेली कल्पना f. Inten'tional *a. intended, designed* जाणून बुजून -बुद्धिपुरःसर केलेला, समजून उमजून -मुद्दामच केलेला, बुद्ध्या केलेला. Inten'tioned *pa. p. a.* [ ILL-INTENTIONED वाईट हेतु धरून केलेला, दुष्टतामूलक. WELL-INTENTIONED सद्धेतूचा, सद्धेतुमूलक. ]. Inten'tionally *adv.* समजूनउमजून, जाणूनबुजून, मुद्दाम, बुद्धिपुरःसर, बुद्ध्या, हेतूनें. Intent'ness *n. close application* एकाग्रता f, एकनिष्ठा f, एकनिष्ठता f, एकचित्तता f, आसक्ति f, अनन्यवृत्ति f, अभिनिवेश m.

*N. B.*—It will be better if we adopt the following restrictions. Intention=उद्देश, आशय, इरादा. Motive=हेतु, मतलब.

Intense ( in-tens' ) [ See Intend. ] *a. closely strained, stretched* ताणलेला, ताठ, तटतटलेला, तणतणलेला, तटतटीत, तणतणीत, सख्त, मजबूत केलेला. २ *extreme in degree* ( said of heat, cold &c. ) तीव्र, तीक्ष्ण, कडक, कडाक्याचा, भारी, जबर, अति, अतिशय, पुष्कळ, प्रखर, प्रबळ, कडकडीत, जालीम, कहराचा. ३ ( *fig.* ) *close, strict* लगव्याचा or लगटीचा, कडक, ताणाचा. Intense'ly *adv. to an extreme degree* अति, अतिशयपणानें, फारच, पराकाष्ठेचा, पुष्कळच, भारी, &c. २ *assiduously, attentively* एकचित्तपणानें, एकतानतेनें, व्यासंगपूर्वक. Intense'ness, Intens'ity *n.* तीव्रता f, तीक्ष्णता f, प्रखरता f, प्रखरपणा m, कडकडीतपणा m, कडाका m, जलाली f, अत्यंतता f, भारीपणा m, प्रकर्ष m. २ ताण m, नेट m, लगट f, व्यासंग m, अभिनिवेश m. ३ ताण m, ताठर m, तणावा m. Intensifica'tion *n. photo.* घनीकरण n. Intens'ify *v. t. to make more intense* अधिक तीव्र -कडक -जोरदार करणें, तीव्रता f -कडकपणा m. &c. वाढविणें *g. of o.* I. *v. i. to become intense* तीव्र -तीक्ष्ण -कडक -जोरदार होणें. [INTENSIFYING SOLUTION *n. photo.* घनीकरणद्रव n. ] Inten'sion *n. a straining or bending:* ( a ) *-the act.* ताण देणें n, ताणणें n. ( b ) ताण m, तणावा m. २ *increase of intensity* तीक्ष्णताधिक्य n, तीव्रतावृद्धि f, वृद्धि f, वर्धन n, उत्कर्ष m, प्रकर्ष m, प्रकृष्टता f, वाढवणी f, चढवणें n. ३ (*logic*) *the sum of the qualities implied by a general name, the comprehension of connotation* जातिवाचक शब्दावरून निर्दिष्ट होणारा गुणसमुच्चय m, गुणसमुच्चयज्ञान n, गुणबोधकता f, गुणव्यंजकता f. Intens'ive *a. stretched* ताणलेला, ताठ. २ *admitting of increase of degree* अधिक तीव्र -कडक &c. होणारा. ३ *gram. serving to intensify or give emphasis* आधिक्यदर्शक, उत्कर्षबोधक, प्रकर्षबोधक, अर्थविशेषकारक. Intens'ively *adv.* अर्थविशेषकारक रीतीनें. Intens'iveness *n.* अर्थविशेषकारकता f, प्रकर्षकारकता f.

*N. B.*—Certain words and particles are employed to intensify the sense of other words. They are, some prefixed, some affixed, some significant, some non-significant. They are most of them collected here. This collection we quote from Candy.

आग, affixed to तिखट hot, pungent, &c. ( Hot as fire. )

कढत aff. or pre. to ऊन ( Boiling hot ).

करकरीत aff. to कोरा, नवा, ताजा, and other words signifying "new" ( Bran New ).

काजरा aff. to कडू [ Bitter as the काजरा ( Nux Vomica )].

कुळकुळीत, कूट, किट्ट or कीट, कोळसा, aff. to काळा black ( Black as coal, black as soot, &c. ).

खडखडीत aff. to कोरडा dry ( Stiff dry ).

खारट, pref. to मीठ salt ( Very salt ).

गार, aff. to हिरवा green, to ओला wet, and to थंड cold.

गुंज aff. to लाल red.

गोड, pre. or aff. to मिठा sweet ( Sweet as sugar ).

घूस, aff. to काळा black.

घोट, aff. to खारट salt.

चटक, aff. to पिवळा yellow.

चार, aff. to हिरवा green ( Green as grass ).

चिंच, aff. to आंबट sour (Sour as a tamarind).

जर्द, aff. to पिवळा yellow, to तांबडा red.

जहर, aff. to कडू bitter.

जळजळीत, pre. to ऊन hot.

जाळ, aff. to तिखट hot, pungent ( Hot as fire ).

जोत, aff. to लाल red.

झणझणीत, pre. to तिखट hot, acrid, &c.

झळझळीत, aff. or pre. to पांढरा white ( Glittering white, &c. ).

टांक, ठणठणीत, aff. to कोरडा dry, empty.

ठिक्कर, aff. to काळा black.

डसाण, डहाण, ढाण, ढाण्या, aff. to आंबट sour.

डोंब, aff. to तिखट, &c. acrid, pungent.

डोह, aff. to काळा black ( applied to the water of rivers, &c. ).

ढुस्स or धुश्श or धुस्स, aff. to काळा black.

ढाण, aff. to काळा black, and to निबर tough, stiff.

तरडा, aff. to जून old, dry, &c.

तरतरीत, aff. and pre. to उभा upright (Bolt upright, straight as an arrow, &c.).

धमक, aff. धमधमीत, aff. or pre. धवधवीत, aff. or pre.

धोप aff. to पिवळा yellow, गोरा fair, पांढरा white.

पान, पीठ, aff. to गोरा ( Fair as a lily, white as flour ).

फटक or फटीक, फटफटीत, फेक, aff. to पांढरा white ( White as crystal ).

फूल, aff. to पांढरा and धवा white.

बिबवा, aff. to काळा black.

बुंद, aff. to लाल, and तांबडा red.

बेरड, भिल्ल, मांग, हबशी, aff. to काळा black (Black as a negro, moorman, &c.).

भडक, भवूक, aff. to लाल, and तांबडा, red.

भोर, aff. to काळा black (Black as soot).

मस, मोट्ळा, aff. to काळा black (Black as soot).

रसरसीत, aff. and pre. to ऊन Hot; aff. to पिंवळा yellow.

लाल, aff. to तांबडा.

लुसलुसीत, pre. and aff. to कोंवळा tender.

विखूख, aff. to कडू bitter (especially as reduplicated कडूकडू विखूखं).

शंख, aff. to निवळ and other epithets of pellucidness.

सफेत *or* द, aff. to पांढरा white.

Inter (in-ter') [Fr. *enterrer* –Low L. *interro* –*in*, into, and *terra*, the earth.] *v. t. to bury* जमिनींत पुरणें -गाडणें, भूमिगत करणें. Inter'ment *n.* गाडणें *n*, पुरणें *n.* Interred' *pa. t. & p. p.* Interr'ing *pr. p.*

Interact (in-ter-akt') [L. *inter*, Sk. अंतर्, within or between, and Act.] *v. i. to act upon each other* एकमेकांवर क्रिया -परस्परक्रिया करणें; as, "Two agents mutually I." I. *n. a short act or piece between others* उपांक *m.* २ *intermediate time* मधला वेळ *m* -काळ *m.* Interac'tion *n. intermediate action* मधली क्रिया *f.* २ *mutual or reciprocal action or influence* परस्परक्रिया *f*, अन्योन्यक्रिया *f.*

Interatomic (in-ter-a-tom'ik) *a. between atoms, acting between the atoms of bodies* आंतरपरमाण्विक, परस्परपरमाणूंमधील.

Intercalate (in-ter'kal-āt) [L. *inter*, between, and *calare*, to call. See calends.] *v. t. to insert between* (पंचांगांत दोहोंच्या) मध्यें घालणें -भरणें. -(a day,) अधिक दिवस घेणें -धरणें, -(a month) अधिकमास-अधिक महिना -मलमास घेणें -धरणें -घालणें. Inter'calar, Inter'calary *a. inserted between others* मध्यें घातलेला, अधिक or धोंड (in comp.); as, I. day अधिक दिवस *n.* I. month अधिक महिना *m*, अधिक मास *m*, धोंडमास *m*, धोंडमहिना *m*, पुरुषोत्तममहिना *m* -मास *m*, मलमास *m*, धोंडा *m.* Intercala'tion *n.* अधिक दिवस किंवा महिना घालणें *n.*

Intercede (in-ter-sēd') [Fr. –L. *inter*, between, and *cedere* to go. See Cede.] *v. t. to act as peacemaker between two, to interpose* (दोघांच्या मध्यें समेट करण्यासाठीं) (शब्दांनीं) मध्यस्थी *f.* करणें. २ *to plead for or in favour of one* (मध्यें पडून -मध्यस्थ होऊन) रदबदली करणें, परार्थप्रार्थना करणें, भीड घालणें, मध्यस्थीनें विनंति *f.* करणें. Interced'ent *a. going between* मध्यस्थ. २ *pleading for* रदबदली करणारा. Interced'er *n.* Interces'sion *n. the act of pleading for another* (आपल्या बरोबरीच्या किंवा खालच्या पायरीच्या मनुष्यासाठीं) मध्यें पडणें, मध्यस्थी *f* -मध्यस्तपणा *m.* &c. करणें, रदबदली करणें *n.* २ (मध्यस्थाच्या नात्यानें केलेली) रदबदली *f*, परार्थप्रार्थना *f.* Interces'sional *a.* रदबदलीचा. Intercess'or *n. one who reconciles two enemies* भांडण मिटविणारा, परस्परांचें समेट करणारा. २ *one who pleads for another* रदबदली करणारा, परार्थप्रार्थक. ३ *a bishop who acts during a vacancy in a see* (मुख्य बिशपाच्या किंवा पोपच्या जागेवर) बदली काम करणारा बिशप *m.* Intercesso-r'ial, Intercess'ory *a. containing intercession* मध्यस्थपणाचा, रदबदलीचा; as, "An I. prayer."

*N. B.*—We *intercede* with a superior on behalf of an equal or an inferior. We *interpose* between equals. *Interfere* implies the exercise of influence, personal power, or authority for the purpose or with the effect of altering or modifying some established course.

Intercept (in-ter-sept') [Fr. –L. *intercipio-ceptum*, –*inter*, between, & *capere*, to seize.] *v. t. to stop and seize on its passage* (वाटेंत -मार्गांत) थांबवून धरणें, रस्त्यांत अडवणें -अडकवणें, अर्ध्या वाटेवर पकडणें; as, "To I. a letter." २ *to obstruct the progress of* (-ची) गति खुंटविणें -थांबविणें, गतिभंग *m* -गतिरोध *m* &c. करणें *g. of o.*, as, "To I. a current." ३ *to interrupt or cut off communication with*, (-शीं असलेला) व्यवहार बंद पाडणें, (-शीं) जाणें येणें *n*- संबंध *m* -व्यवहार *m*, बंद करणें -तोडणें; as, "Storms I. the shore." ४ *math. to take in, to include* आंत घेणें, अंतर्भूत करणें. Intercept'ed *pa. t. & p. p.* Intercept'er, Intercept'or *n.* Intercept'ing *pr. p. & v. n.* Intercep'tion *n.* वाटेंत अडवणें, वाटेंत धरणें, वाटअडवणी *f.* २ गत्यवरोध *m.*

Interchain (in-ter-chān') [E. Inter & Chain.] *v. t. to link together* (ची) सांखळी *f.* करणें -बनविणें. २ (hence) *to unite firmly* दृढ जोडणें.

Interchange (in-ter-chānj') [L. *inter*, between & Change.] *v. t. to give and take mutually, to exchange* अदलाबदल करणें, विनिमय करणें, आदानप्रदान करणें, (परस्परांनीं) बदल देणें -घेणें. २ *to cause to follow alternately* आळीपाळीनें यावयास लावणें -आणणें, एकामागून एक येईसा करणें. I. *v. i.* एक आड एक येणें, आळीपाळीनें येणें -होणें. I. *n. mutual exchange* अदलाबदल *f*, अदलाबदलीचा व्यवहार *m* -व्यापार *m*, विनिमय *m*, आदानप्रदान *m.* २ *alternate succession* एक आड एक येणें *n*, आलटपालट *m* or *f*; as, "I. of light and darkness." Interchang'eable *a.* अदलाबदल करतां येण्याजोगा. २ एक आड एक येणारा, परस्परानुगामी. Interchangeabil'ity, Inter'changeableness *n.* विनिमयता *f.* Interchange'ably *adv.*

*N. B.*:—*Interchange* refers to a system and repetition of acts of exchange. *Exchange* refers to one transaction only.

Interclude ( in-tėr-klōōd' ) [ L. *inter*, between, and *claudere*, to shut. ] *v. t. to intercept* आंत कोंडणें, अंतर्गत करणें. Interclu'sion *n.*

Intercommune ( in-tėr-kom-ūn' ) [ L. *inter*, between & Commune. ] *v. t. to commune between or together* परस्परांशीं दळणवळण *n.* -व्यवहार *m.* -संघट्टण *n.* ठेवणें, परस्परांशीं संभाषण करणें. Intercommun'ion *n.* परस्परांमधील दळणवळण *n.*, परस्परांशीं समागम (मानसिक किंवा प्रत्यक्ष). Intercommun'ity *n.* परस्परांशीं व्यवहार *m.* -दळणवळण *n.*

Intercommunicate ( in-tėr-kom-ūni'kāt ) [E. Inter, and Communicate.] *v. t. to communicate mutually* परस्परसंबंध *m.* -व्यवहार *m.* ठेवणें, परास्परांशीं व्यवहार करणें. Intercommun'icable *a.* परस्परव्यवहार्य. Intercommunica'tion *n.* परस्परव्यवहार *m.*, एकमेकांचा व्यवहार *m.*

Intercostal ( in-tėr-kost'al ) [ L. *inter*, between, & Costal.] *a.* (*anat.*) *lying between the ribs* बरगड्यांमधला, पंजरमध्यस्थ.

Intercourse ( in'tėr-kōrs ) [ E. Inter & Course.] *n. connection by dealings, communication* दळवळण *n.*, व्यवहारसंबंध *m.*, व्यवहार *m.*, संबंध *m.*, जाणेंयेणें *n.*, वहिवाट *f.*, परिचय *m.*, रुळणी *f.*, संसर्ग *m.*, वागणूक *f.*, रफत् *m.* २ *commerce* व्यापार *m.*, देवघेव *f.* ३ *association* सहवास *m.*, संगत *f.*, समागम *m.*, संगति *f.*, वळण *n.*, वळचट *f.*, वळवटा *m.*, दळणवळण *n.*, दळवट *f.*, दळवटा *m.* [ SEXUAL I. संभोग *m.*, रतिक्रिया *f.*, मैथुन *n.* CLOSE *or* FAMILIAR I. रहाळ *f.* रहाळी *f.* घसण *f.* घसणी *f.* घसटणी *f.* TO ESTABLISH I. *or* A FOOTING घसण *f.* पाडणें, पायंडा *m.*, पाडणें -घालणें -करणें. TO REFUSE ALL I. WITH ( -शीं ) सर्व प्रकारचा संबंध तोडणें, ( -चा ) वारा न घेणें -न पडूं देणें, वाऱ्यास उभें न राहणें, सावली पडूं न देणें *g. of o.*]

Intercurrent (in-tėr-kur'ent) [ L. *inter*, between, and Current. ] *a. running between* मध्यें -आड येणारा. Intercurr'ence *n.* व्यवधान *n.*, मधून जाणें *n.*

Interdependence ( in-tėr-de-pend'ens ) *n.* अन्योन्याश्रय *m.*, अन्योन्याकांक्षा *f.*, परस्पराकांक्षा *f.*, परस्परापेक्षता *f.*

Interdict (in-tėr-dikt') [ L. *interdicere*, *-dictum* to pronounce a judgment between two parties –*inter*, between, and *dicere*, Sk. दिश् to say, pronounce. ] *v. t. to prohibit, to forbid* ( हुकमानें ) मनाई *f.* करणें, निषेध *m.* करणें, बंद करणें -ठेवणें -पाडणें. २ *to forbid communion* संसर्ग *m.* -पंक्तिव्यवहार *m.* बंद करणें, पंक्तिबाह्य करणें, बाहेर टाकणें. ३ ( *Eccl.* ) *to cut off from the enjoyment of communion with a church* ख्रिस्ती मंडळीच्या सहवासापासून दूर ठेवणें, समाजबहिष्कृत करणें. In'terdict, Interdic'tion *n.* -*the act.* मनाई -निषेध &c. करणें *n.* २ *a prohibitory decree* ( in the name of a king or State ) द्राही *f.* दुराही *f.* ३ *a prohibition* मनाई *f.*, निषेध *m.*, मना *f.*, निवारण *n.*, अटकाव *m.*, प्रतिबंध *m.* [ A WRITTEN I. मनाचिठ्ठी *f.* MARK *or* SIGN OF AN I. द्राही *f.*, दुराही *f.* जोंवडा *m.*, द्राहीचा जोंवडा *m.*, थापटी *f.* TO DISREGARD AN I. द्राही -दुराही मोडणें. TO LAY AN I. द्राही -दुराही घालणें. ] ४ *a curse* शाप *m.* Interdict'ive, Interdictory *a. prohibitory* निषेधात्मक, निषेधार्थक, निषेधकारक, निषेधाचा, मनाईचा, निवारक, प्रतिबंधक.

Interest ( int'ėr-est ) [ O. Fr. *interest* ( Fr. *interet* ) –L. *interest*, it is profitable, it concerns –*inter*, between, & *esse* (Sk.) अस् to be, See Essence.] *n. advantage* हित *n.*, फायदा *m.*, अर्थ *m.*, लाभ *m.*, कल्याण *n.*, बरें *n.* २ *premium paid for the use of money* व्याज *n.*, मिति *f.* वृद्धि *f.* [ AT I. व्याजी, कर्जाऊ, कर्जी. COMPOUND I. चक्रवाढव्याज *n.*, चढतें व्याज *n.*, चक्रावळ *f.* I. AT ONE PER CENT एकोत्रा *m.*, एकोत्रा-व्याज *n.* –AT HALF PERCENT अर्धोत्रा *m.* –AT ONE AND A HALF PER CENT दिढोत्रा *m.* –AT TWO PER CENT दुहोत्रा OR दुहोतरा *m.* AT THREE PER CENT तिहोत्रा OR तिहोतरा *m.* –AT FOUR PER CENT. चहोत्रा *m.*, AND SO ON. CALCULATING AND DRAWING THE I. ACCRUING UPON SUMS AT BROKEN PERIODS कटमितीनें व्याज काढणें *n.*, व्याजकटावणी *f.* CASTING UP AN I. ACCOUNT ( of Dr. and Cr. AND DRAWING UP THE BALANCE ) व्याजाचा हिशोब करून बाकी काढणें, व्याजफैलावण *f* OR -णी *f.* INCLUSIVELY OF I. सव्याज, व्याजासुद्धां. I. ON BROKEN PERIODS कटमितीनें व्याज *n.*, कटतें व्याज *n.* SIMPLE I. सरळव्याज *n.* THAT BEARS I. ( money) व्याजाऊ, व्याजाव, व्यांजी, व्याजू, व्याजाचा. THAT DOES NOT BEAR I. विनव्याजी, विनव्याजाचा, अवृद्धिक. THE 12TH PART OF THE I. DUE बारोत्रा *m.*] २ *any increase* वृद्धि *f.*, वाढ *f.*, भर *f.*, उपराळा *m.* ३ *concern, special attention, excitement of feeling* आस्था *f.*, जिव्हाळा *m.*, काळजी *f.*, कळकळ *f.*, कळवळा *m.*, दरद *n.*, होप *m.*, अगत्य *n.*, परवा *f.*, पोटाग *f.* ४ *selfish benefit* स्वार्थ *m.*, स्वहित *n.*, स्वार्थदृष्टि *f.* स्वहितदृष्टि *f.*, स्वहितसंबंध *m.*, ( स्वतःचा ) मतलब *m.*, लाभ *m.* ५ *share* हिस्सा *m.*, पाती *f.*, भाग *m.*, भागी *f.*, नफ्यातोट्याचा अंश *m.* -संबंध *m.*, सामलात *f.* ६ *the persons interested in any particular business* ( विशिष्ट धंद्याशीं हितसंबंध असलेले ) व्यापारी मंडळ *n.*, व्यापारी कट *m.*, व्यापारी मंडळी *f.*; as, " The Iron I." I. *v. t. to engage the attention of* ( -चें ) लक्ष *n.*, -चित्त *n.* ओढणें -वेधणें -ओढून घेणें, -वेधून घेणें. २ *to awaken concern in* (मनांत) आस्था *f* -कळकळ *f* -अनुराग *m* -पोटाग *f* -ओढ *f.* लावणें -उत्पन्न करणें, ( -वर ) मन जडवणें. ३ ( one's self ) (-चें) अगत्य धरणें -बाळगणें. In'terested *p. p. having concern* कळकळ-अगत्य -आस्था &c. असलेला, आस्थेवाईक, आस्थेकरी, आस्थावान्, पोटागीचा, कळकळीचा. २ *connected in a cause or in consequences* भागीदार, पातीदार, हिं तबद्ध, संबंधी. ३ सहेतुक. ४ *selfish* स्वार्थी, स्वार्थपर, सकाम, आपमतलबी. In'terestedly *adv.* In'terestedness *n.*

आस्था *f*, कळकळ *f*, अगत्य *n*. २ सहेतुकता *f*, अपेक्षाबुद्धि *f*, सकामता *f*, फलाशा *f*, लाभदृष्टि *f*, लाभलोभ *m*. In'teresting *pr. p. engaging the attention* चित्ताकर्षक, मनोरंजक, मनोहर. २ *engaging regard* कळकळ लावणारा, आस्था उत्पन्न करणारा, ओढ लावणारा. In'terestingly *adv.*

Interfere ( in-tėr-fēr' ) [ Lit. to strike between, through O. Fr. –L. *inter*, between, and *ferire*, to strike. ] *v. i. to come in collision* आडवा येणें, नडणें. २ *to intermeddle* मध्यें पडणें -येणें -शिवणें, (दुसऱ्याच्या चालू कामांत -गोष्टींत) हात घालणें, (आधीं ठरलेल्या कामांत) अडथळा आणणें -घालणें -करणें. ( b ) ( officiously ) लांडा कारभार -बुचा कारभार करणें, लुडबुडणें, नसती उठाठेव करणें. ३ *to strike one foot against its opposite so as to break the skin or injure the flesh* (पायांची) घासाघास होणें. Interfer'ed *p. p.* Interfer'er *n.* आडवा येणारा. २ लुडबुड्या. Interfer'ence *n.* (*the act.*) मध्यें पडणें *n.* (b) ढवळाढवळ *f*, लुडवूड *f*, &c. करणें *n.* ( c ) आड -आडवा येणें *n*, अडथळा करणें *n.* २ *interposition* मध्यस्थी *f*, मध्यस्थपणा *m*, मध्यस्थता *f.* ( b ) ढवळाढवळ *f*, लुडबूड *f*, लांडा -बुचा कारभार *m* -व्यवहार *m*, नसता कारभार *m*, नसती उठाठेव *f*, अव्यापारेषु व्यापार *m.* ३ *collision*, *clash* समाघात, अथडाअथडी *f*, नड *f*, घोंटाळा *m*, लाथडालाथड *f.* Interfe'ring *pr. p. & v. n.*

*N. B.*:—See note under Intercede.

Interfuse ( inter-fūz' ) [ L. *inter*, between, and *fundere*, to pour. ] *v. t. to pour or spread between* मध्यें -मधोमध पसरणें -घालणें ओतणें -टाकणें.

Interim ( in'tėr-im ) [ L. *-inter*, between. ] *n. time intervening, the meantime* मधला काळ *m*, (दोन गोष्टींच्या) मध्यें लोटणारा काळ *m*, अवकाश *m*, अंतर्गत काळ. [I. ORDER मध्यंतरीय हुकूम.] *m.* २ जर्मनीचा बादशहा पांचवा चार्लस यानें प्रॉटेस्टंट व क्याथोलिक यांच्या मधील मतभेद मोडण्यासाठीं काढलेला जाहीरनामा.

Interior ( in-tē'ri-ur ) [ L. comp. of *interus*, inward. ] *a. inner, internal* आंतला, आंतील, आंतचा, आंतल्या बाजूचा, आंतर ( Sk. ). [ I. PLANETS *planets within the orbit of the earth* पृथ्वीच्या कक्षेच्या आंतील ग्रह *m. pl.*, अंतर्वर्ती ग्रह. ] २ *inland* मध्यदेशस्थ, मध्यदेशीय, अंतर्देशीय, (समुद्रकिनारा सोडून) देशाच्या आंतला, अंतःप्रदेशांतील. I. *n. the internal part of a thing, the inside* आंतल्या बाजूचा भाग *m*, अंतर्भाग *m*, अभ्यंतर *n*, गर्भ *m*, pop. गाभा *m*, उदर *n*, पोट *n.* २ *the inland part of a country* अंतःप्रदेश *m*, मध्यदेश *m*, देशमध्य *m*, देशाचा मध्यभाग *m.* ( b ) ( of a house ) माजघर *m* or *n*, आंतवार *n*, अभ्यंतर *n.*

Interjacent ( in-tėr-jā'sent ) [ L. *inter*, between, & *jacere*, to lie. ] *a. lying between, intervening* ( दोन वस्तूंच्या ) मध्यें असणारा, मध्यें पडलेला, मध्यस्थित.

Interject ( in-tėr-jekt' ) [ L. *inter*, between, & *jacto*, freq. of *jacere*, to throw. ] *v. t. to throw between, to insert* मध्यें टाकणें -फेकणें -घालणें &c., मध्यप्रक्षेपण करणें. Interjec'tion *n.* मध्यें टाकणें *n*, -फेंकणें *n* -घालणें *n*, मध्यप्रक्षेप *m*, मध्यप्रक्षेपण *n.* २ *gram. a word in speaking or writing thrown in between words to express some emotion or passion* उद्गारवाचक अव्यय *n*, केवलप्रयोगी अव्यय *n*, उद्गारचिन्ह *n* ( ! ). ३ *exclamation, ejaculation* उद्गार *m.*

Interjunction ( in-tėr-jungk'shun ) [ L. *inter*, between, and Junction.] *n. a junction or joining between* सांधा *m*, जोड *m*, जोडसांधा *m*, जोडणें *n.*

Interlace ( in-tėr-lās' ) [ L. *inter*, between, and Lace. ] *v. t. to unite as by lacing together* विणणें, गुंफणें, गांठवणें, जडणें, जडवणें, मिळविणें, मध्यें मध्यें घालणें; as, "Severed into stripes that *interlaced* each other."

Interlapse ( in-tėr-laps' ) [ L. *inter*, between, and *lapsus*, to slip or fall. ] *n. the lapse or interval of time between two events* मधला काळ *m*, मध्यें लोटणारा काळ *m.*

Interlard ( in-tėr-lärd' ) [ L. *inter*, and Lard. ] *v. t. to insert between, to interpose* मध्यें मध्यें घालणें, मिसळ *f* -भेळ *f* -करणें. २ (भेळीनें) चित्रविचित्र करणें.

Interlay ( in-tėr-lā' ) *v. t. to lay among or between* मध्यें ठेवणें.

Interleaf ( in-tėr-lēf ) *n. a leaf inserted between two leaves, a blank leaf inserted* (पुस्तकादिकांच्या दोन पानां)मध्यें घातलेलें कोरें पान *n.* Interleave' *v. t. to insert blank leaves in a book* दोन पानांमध्यें कोरीं पानें *n. pl.* घालणें -घालून (पुस्तक) बांधणें.

Interline ( in-tėr-līn' ) [ L. *inter*, and Line. ] *v. t. to write in alternate lines* एकांतऱ्या ओळीनें लिहिणें, एक ओळ आड करून -एक आड ओळीनें -एकांतर पंक्तीनें लिहिणें. २ ओळीस ओळ लिहिणें; as "To I. Latin and English." ३ *to write between lines* शोध घालणें, (दोन) ओळींच्या मध्यें लिहिणें -घालणें. Interlin'ear *a.* एकांतऱ्या ओळीनें लिहिलेला. २ ( दोन ) ओळींच्या मध्यें लिहिलेला. Interlinea'tion *n. -the act.* ( a ) एकांतऱ्या ओळीनें लिहिणें *n.* ( b ) (दोन) ओळींमध्यें लिहिणें *n.* २ *a passage or word inserted between two lines* दोन ओळींच्या मध्यें लिहिलेला मजकूर *m* -शब्द *m*, शोध *m.*

Interlink (in-tėr-lingk') [L. *inter*, between and Link.] *v. t. to connect by uniting links, to join* कडींत कडी अडकविणें, कडींत कडी घालून जोडणें, दुवे जोडणें, परस्परांस गांठविणें -अडकविणें, जोडणें, सांधणें.

Interlocation ( in-tėr-lo-kā'shun ) [L. *inter*, between, *locare*, to place.] *n. a placing between* मध्यस्थापना *f.*

Interlocution ( in-tėr-lo-kū' shun ) [ Fr. –L. *interlocutio -interloquor –inter*, between, and *loquor*, *locutus*, to speak. ] *n. conference* संभाषण *n*, संवाद *m*, संकथा *f*, परस्परभाषण *n.* २ ( *law* ) *discussion*

*before the final decision* (शेवटचा निकाल देण्यापूर्वी केलेला) मधला वादविवाद *m*, स्वपक्षसमर्थन *n*. Interloc'utor *n*. संवादी, संवादकर्ता, संभाषणकर्त्ता *m*. २ (*Scot's law*) संवादात्मक ठराव *m*. ३ प्रश्नकर्त्ता *m*. Interloc'utory *a. consisting of a dialogue* संवादात्मक, संवादरूप, संभाषणरूपी, संभाषणाचा. २ (*law*) मधला, तात्पुरता.

Interlope (in-ter-lōp') [L. *inter*, between, and Dut. *loopen*, to run; Scot. *loup*; E. *leap.*] *v. t. to intrude, to intermeddle* (कारण किंवा संबंध नसतां) मध्यें पडणें, लुडबुड करणें, लुडबुडणें, नाहक दुसऱ्याच्या कामांत घुसणें -हात घालणें -ढवळाढवळ करणें, नसती उठाठेव करणें. २ *to traffic without proper license* परवानगीवांचून -परवान्यावांचून -बिनपरवाना व्यापार करणें. ३ दोघांच्या व्यापारांत सत्तेशिवाय शिरून त्यांचा नफा आपण मिळवणें. Interlop'er *n. one who runs into business to which he has no right* (कारण किंवा संबंध नसतांना) मध्यें पडणारा, लुडबुड्या, नसती उठाठेव *f* -व्यवहार *m*. करणारा, ढवळ्या, खुपशा. २ *one who carries on his trade without proper license* परवान्यावांचून व्यापार करणारा, बिनपरवाना व्यापारी, बिनपरवानेवाला व्यापारी.

Interlude (in'tėr-lōōd) [L. *inter*, between, and *ludus*, a play.] *a short dramatic performance or play between the play and afterpiece, or between the acts of a play* विष्कंभक *m* or विष्कंभ *m*. २ (*mus.*) *a short piece of instrumental music played between the parts of a song* गाणें थोडा वेळ बंद ठेवून केलेलें वादन *n*, गायनाच्या मध्यें वाद्य वाजविणें *n*.

Interlunar, Interlunary (in-tėr-lōō'nar, nar-i) [Lit. 'between the moons' —L. *inter*, & Lunar.] *a. belonging to the time when the moon, about to change, is invisible* अमावास्येचा, अमासंबंधीं, अमावास्याकालिक.

Intermarry (in-tėr-mar'i) [E. Inter + Marry.] *v. t. to marry between or among, to marry reciprocally or to take one and give another in marriage* (said of families, ranks, castes &c.) आपआपसांत लग्न करणें -विवाह लावणें, परस्परविवाह -प्रत्युद्वाह *m*. करणें, परस्परकन्यान्यवहार करणें, बदलाचें लग्न करणें, कन्याान्यवहार -विवाहव्यवहार असणें *in con. g. of s.*, साटेंलोटें करणें; as, "In early Rome, it was not lawful for plebeians and nobles to I." Intermarr'iage *n*. परस्परविवाह *m*, आपआपसांतील लग्न *n*, बदलाचें लग्न *n*, साटेंलोटें *n*, प्रत्युद्वाह *m*. [CONFUSED CONNECTION THROUGH I. गोरखसांखळी *f*. I. OF THREE FAMILIES तिरकूट *n*, तिसुती *f*.]

Intermaxillary (in-ter-maks'il-ar-i) [L. *inter*, between, Maxillary.] *a. situated between the jawbones* खालच्या व वरच्या दाभाडांमधला.

Intermeddle (in-tėr-med'l) [L. *inter*, among, and Meddle.] *v. i. to meddle or mix with, to interpose or interfere improperly* (कामावांचून -सत्तेशिवाय -कारण नसतां) मध्यें ढवळाढवळ करणें, दुसऱ्याचे कामांत हात घालणें, उठाठेव करणें, विकतश्राद्ध घेणें (*idiom.*). Intermedd'ler *n*. (संबंध नसतां) दुसऱ्याच्या कामांत हात घालणारा, ढवळ्या, उठाठेव्या.

Intermediate (intėr-mē'di-āt) Intermedial (in-tėr-mē'di-al) Intermediary (in-tėr-mē'di-ar-i) [L. *inter*, Mediate, Medial, Mediary.] *a. in the middle, between, intervening* मधला, मधचा, मधील, मध्य, मध्यस्थित, मध्यवर्ती, दरम्यानचा, अंतःस्थित. २ मध्यें पडलेला. Interme'diately *adv*. मधच्यामध्यें, दरम्यान. Intermedia'tion *n. intervention* मध्यें पडणें *n*, मध्यस्थी करणें *n*, मध्यस्थी *f*, मध्यस्थपणा *m*. Interme'dium *n. intermediate space* मधली जागा *f*, अवकाश *m*. २ *a medium between, an intervening agent or instrument* अडत्या.

Interment (in-tėr'ment) *n*. See under Inter.

Interminable (in-tėr'min-a-bl) [L. *in*, not, & Terminable.] *a. without termination or limit* (कधींही) न संपणारा, शेवट नसलेला, अमर्याद, असीम, सीमा -पार -अंत नसलेला. Inter'minableness *n*. निरवधिता *f*, आनंत्य *n*, सीमाराहित्य *n*. Inter'minably *adv*. निरवधिपणानें.

Interminate (intėr'min-āt) Same as Interminable.

Intermingle (in-tėr-ming'gl) [L. *inter*, among, & Mingle.] *v. t. to mingle or mix together* एकमेकांत मिसळणें, कालवणें, कालवाकालव *f*. करणें, सेळभेळ *f*. -एकीकरण *n*. करणें. I. *v. i.* (-ची) कालवाकालव होणें.

Intermission (in-tėr-mish'un) See under Intermit.

Intermit (in-tėr-mit') [L. *inter*, between, & *mittere* to send.] *v. t. to cause to cease for a time, to interrupt* (कांहीं काळपावेतों) थांबविणें -थांबवून धरणें, तहकूब ठेवणें -करणें, खोळंबवणें, खळवणें, मध्येंच खाडा *m* -खळ *m* -खंड *m*. पाडणें, विराम करणें, थोडा वेळ बंद ठेवणें. I. *v. i. to cease for a time* कांहीं वेळ बंद राहणें -थांबणें, खळणें, खाडा पडणें, विराम करणें. २ (said of fever), *to go off at interval* मध्यें मध्यें (ताप) निघणें -राहणें -जाणें, कांहीं वेळ सुटणें. Intermiss'ion *n. the act.* तहकूब ठेवणें *n*, &c. २ (*the state.*) *temporary discontinuance* तहकुबी or तकुबी *f*, खाडा *m*, खळ *f*, विराम *m*, तूट *f*, अंतर *n*. [WITHOUT I. निरंतर, अविरत, सतत, हमेषा, सदैव, नित्य.] ३ ताप काढलेली वेळ *f*, ताप निघाल्याची सुदत *f*. Intermiss'ive *a. coming by fits, not continual* राहून राहून येणारा -होणारा. Intermitt'ent *a. ceasing at intervals* मध्यें मध्यें थांबणारा, अंतरित, राहून राहून होणारा, तुटकफुटक. [I. DISEASE आंतरिक रोग *m*. I. FEVER थांबून थांबून येणारा -पाळीचा ताप *m*.] Intermit'ter *n*. Intermit'ting *pr. p*. मधून मधून खळणारा, येताजाता, काढता, लागता, तुटक, फुटक. &c. २ येताजाता, आंतरिक, निघता. Intermit'tingly *adv*. राहून राहून, मधून मधून, असून असून.

**Intermix** ( in-tėr-miks' ) [ L. *inter*, among & Mix.] *v. t. to mix together, to intermingle* एके ठिकाणीं -एकत्र मिसळणें, -मिळवणें, (-चें) संमिश्रण करणें, कालवणें, मिसळामिसळ करणें *g. of o.*, मिश्रित करणें, मिसळणें, मिळवामिळव -भिसळा भिसळ करणें. I. *v. i. to be mixed together* मिश्रित होणें, एकमेकांत मिसळणें. Intermix'ture *n. a mass of ingredients mixed* मिश्रण *n*, भेळ *f*, भेसळ *f*, भिसळ *f*, मिसळ *f*.

**Intermontane** ( in-tėr-mon'tān ) [ F. *inter*, & *montanus*, belonging to a mountain –L. *mons, montis*, a mountain. ] *a. between mountains* पर्वतांमधील, डोंगरांतील, डोंगरांमधील; as, "I. soil."

**Intermundane** ( in-tėr-mun'dān ) [ L. *inter*, between, & Mundane. ] *a. between worlds* भुवनांमधला, भुवनमध्यस्थित, जगन्मध्यवर्ती; as, "I. spaces."

**Intermural** ( in'-tėr-mū-ral ) [ L. *inter*, between, & *murus*, a wall. ) *a. lying between walls* भिंतींच्या मधला, प्राकारांतर्वर्ती, प्राकारवेष्टित.

**Intern** ( in-tėrn ) [ Fr. *interner*, –L. *internus*, See Internal.] *v. t. to disarm and quarter in a neutral country such troops as have taken refuge in its frontier* (आश्रयाकरितां सरहद्दीवर जमलेल्या सैन्याला) निःशस्त्र करून तिऱ्हाईत मुलखांत राहावयास लावणें, (विशेष) मर्यादेंत अटकवणें.

**Internal** ( in-tėr'-nal ) [ L. *internus, –inter*, within.] *a. inward, interior* आंतला, अंतस्थ, आंतील, अंतर्गत, गर्भस्थ, अभ्यंतर. [ I. SOUL अंतरात्मा *m.* ] २ *not foreign, within the country* देशांतला, देशांतील, देशी, अपरदेशी, अंतर्देशीय. ३ *intrinsic, real* मूळचा, आंगचा, स्वाभाविक, खरा, जातीचा, हाडाचा, वास्तविक. ४ *pertaining to the heart, spiritual* मनाचा, अंतःकरणाचा, आत्मिक; as, "I. purity" = अंतःशुद्धि. I. anguish अंतःशोक *m*, अंतर्दाह *m*. Inter'nally *adv. inwardly* आंत, आंतल्या बाजूनें -बाजूस -कडेस. २ *mentally, spiritually* मनांतून, पोटांतून, अंतःकरणांतून, मनांत. ३ *within the body* शरिरांत, पोटांत.

**International** (in-tėr-nash'un-al) [ L. *inter*, between, & National. ] *a. pertaining to the relation of two or more nations* आंतरराष्ट्रीय, राष्ट्रांच्या परस्परसंबंधाचा, परस्परराष्ट्रांमधला. Interna'tionally *adv.*

**Internecine** ( in-tėr-nē'sīn ) [ L. *inter*, between, & *necare*, to kill.] *a. mutually destructive or deadly* परस्परांचा घात करणारा, अन्योन्यसंहारी, परस्परसंहारक, उभयतांचा नाश करणारा, दोन्ही पक्षांस घातक.

**Internodation, Internode** (in-tėr-nōdā'-shun) ( in-tėr-nod' ) [L. *inter*, between, & *nodus*, a knot.] *n. bot. the space between two nodes or points of the stem from which the leaves arise* कांडें *n*, पेर *n*, पेरें *n*, ग्रंथिद्वयमध्य *m*, पर्वद्वयमध्य *m*. Interno'dial *a.*

**Internuncio** ( in-tėr-nun'shi-ō ) [ Sp. –L. *inter*, between, & *nuncius*, a messenger. ] *n. a messenger between two parties*, ( esp. ) *the Pope's representative at minor courts* उभयपक्षदूत *m*, पोपचा उपदूत *m*, -उपप्रतिनिधि *m*. ( nuncio = दूत or प्रतिनिधि ).

**Interpellate** ( in-tėr'-pel-āt ) [ Fr. –L. *inter*, between, & *pellere*, to drive. ] *v. t. to question imperatively an executive officer in explanation of his conduct, generally in legislative councils* कायदे-कौंसिलांत प्रश्न विचारणें. Interpella'tion *n. a question raised during the course of a debate* (वादविवादांत उपस्थित होणारा) कौंसिलांतील प्रश्न *m* -मुद्दा *m*. २ *interruption, intercession* अडथळा *m*, खोटी *f*, खाडा *m*. ३ *an earnest address* कळकळीचें भाषण *n*.

**Interpolate** ( in-tėr'-po-lāt ) [ L. *interpolare –inter*, between, and *polire*, to polish.] *v. t. to renew, to begin again* पुन्हां -फिरून सुरू करणें. २ *to insert, as a spurious word or passage in a manuscript or a book, to foist in* (मूळ ग्रंथांत खोटा किंवा पदरचा) शब्द *m* -वाक्य *n*. इ० घुसडणें -घुसडून देणें, खुपसणें, दडपणें, दडपून देणें, प्रक्षेप करणें, प्रक्षेप *m* -क्षेपण *m*. करणें *g. of o.* ३ *to alter or corrupt by the insertion of foreign matter* (विजातीय पदार्थ -बाहेरचा विषय -इतर द्रव्यें घालून) बिघडविणें -बदलणें. ४ *math. to fill up intermediate terms of a series* मधील पदें भरणें. Interpola'tion *n. –the act* घुसडणें *n*, घुसडाघुसड करणें *n*. &c. २ *a spurious word or passage, matter interpolated* (a) घुसडून दिलेला प्रक्षिप्त शब्द *m* -वाक्य *n* इ०, प्रक्षेप *m*. (b) प्रक्षिप्त द्रव्य *n*. ३ *the method of finding out intermediate terms of a series* श्रेढींतील मधलीं पदें शोधून काढणें *n*. Inter'polator *n.* घुसडणारा, प्रक्षेपक, खुपसणारा, खुपशा, &c.

**Interpose** ( in-tėr-pōz' ) [ Fr. –L *inter*, between, and Fr. *poser*, to place.] *v. t. to place between* मध्यें ठेवणें -घालणें. २ *to thrust in* घुसडून देणें, खुपसणें, घालघुसड करणें. ३ *to intrude* कामावांचून -सत्तेवांचून शिरवणें. ४ *to offer, as aid or services* (with *between*) मध्यें पडणें -हात घालणें, मध्यस्थीपणा पतकरणें, मध्यस्थी पडणें. I. *v. i.* ( a ) *to come between* मध्यस्थ होणें, मध्यें येणें -असणें -पडणें. (b) (by way of interruption) (मध्यें पडून) आड येणें -अडथळा करणें. २ *to mediate, to step in between parties* मध्यें पडणें, मध्यें हात घालणें, मध्यस्थी करणें, &c. Interpos'al, Interposit'-ion *n.* अंतरागमन *n*, मध्यें येणें *n*. २ *intervention* मध्यस्थी *f*, मध्यस्थपणा *m*, मध्यस्थगिरी *f*, (मध्यें) हात घालणें *n*. ३ *anything interposed* मध्यें पडलेली -आलेली -ठेवलेली वस्तु *f*.
See *N. B.* under Intercede.

**Interpret** ( in-tėr'pret ) [ Fr. –L. *inter*, between, the last part of the word is of uncertain origin.] *v. t. to explain the meaning of, to decipher* ( as language ) (-चा) अर्थ सांगणें -करणें, स्पष्ट करणें, उघड करणें, (-चा) उलगडा -खुलासा -स्पष्टार्थ करणें, विवरण

करणें *g. of o.*, सोडवून सांगणें, आशय -अभिप्राय &c. सांगणें. ( b ) (*-a dream* ) (-चा) अर्थ सांगणें. २ *to define* (-ची) व्याख्या करणें -सांगणें. ३ *to translate* (-चें) भाषांतर -तरजुमा करणें, दुसऱ्या भाषेंत सांगणें. ४ *to represent by means of art* कारागिरीनें चित्रांत दाखविणें; as, "An artist *interprets* a landscape." I. *v. i.* दुभाषेपणा करणें. Inter'pretable *a.* उलगडा -खुलासा -विवरण -व्याख्या -भाषांतर -तरजुमा &c. करण्याजोगा. Interpreta'tion *n. explanation* उलगडा *m*, खुलासा *m*, निरूपण *n*, विवरण *n*, अर्थ *m*, अर्थबोधन *n*, स्पष्टीकरण *n*, &c. २ व्याख्या *f*. ३ भाषांतर *n*, तरजुमा *m*, दुभाषेपणा *m*. ४ *math. the process of applying general principles to the explanation* स्वरूपनिर्णय *m*. Inter'pretative *a.* विवरणात्मक, स्पष्टीकरणार्थक. Inter'pretatively *adv.* Inter'preted *pa. t.* & *p. p.* स्पष्टार्थ केलेला, खुलासा केलेला. Inter'preter *n.* अर्थ करणारा -सांगणारा. २ व्याख्या करणारा -देणारा. ३ भाषांतर -तरजुमा करणारा, दुभाष्या.

Interregnum ( in-tėr-reg'num ) [ L. *inter*, between and *regnum*, rule. ] *n. the time during which a throne is vacant between the death or abdication of a king and the accession of his successor* (एक राजा गादीवरून दूर झाला असतां दुसरा बसेपर्यंत) मधला काळ *m*, (गादी मोकळी झाल्यापासून दुसरा राजा राज्यारूढ होईपर्यंतची) मधली कारकीर्द *f*. २ *any period during which the executive branch of a government is suspended* (राज्यकारभार चालविणाऱ्या प्रधानमंडळाच्या) बदलीचा काळ *m*. In'terrex *n. one who rules during an interregnum, a regent* (राजा गादीवर नसतांना) राज्यकारभार पहाणारा अधिकारी *m*, रीजंट *m*.

Interrogate ( in-tėr'o-gāt ) [ L. *inter*, between, & *rogare*, to ask. ] *v. t. to examine by asking questions* (तपासणीसाठीं) प्रश्न विचारणें -करणें, पुसणें, सवाल घालणें, (प्रश्न विचारून) तपासणी -चौकशी करणें, पुसतपास -पुरशीस करणें, विचारपूस -चौकशी करणें. Interroga'tion *n.* प्रश्न करणें *n*, सवाल करणें *n*, विचारणें *n*. २ प्रश्न *m*, सवाल *m*, विचारपूस *f*, पृच्छा *f*, पुसतपास *f*. ३ *a note* (?) *that marks a question* प्रश्नचिन्ह *n*. Interrog'ative *a. denoting, or expressed in the form of a question* प्रश्नाचा, प्रश्नरूप, प्रश्नार्थक, प्रश्नात्मक, प्रश्नसूचक. २ *gram. a word used in asking a question* प्रश्नार्थक सर्वनाम *n* -शब्द *m* -क्रियाविशेषण *n*. इ०. Interrog'atory *a.* प्रश्नरूप, प्रश्नार्थक. Interr'ogator *n.* (*in writing*) लेखी प्रश्न *m* -विचारपूस *f* -तपास करणारा *m*.

Interrupt ( in-tėr-rupt' ) [ L. *inter*, between, and *ruptum*, to break. ] *v. t. to stop or hinder* (by breaking in upon the progress of) मध्येंच अडथळा -अटकाव -हरकत करणें, मोडा *m* -मोडकी *f* -घालणें, व्यत्यय आणणें -करणें. २ *to break the continuity of* (-चा) भंग करणें, खंड पाडणें. ( b ) (*-the order*) क्रमभंग करणें. ३ *to separate* अलग -निराळा करणें. Interrupt'ed *a.* अडथळा केलेला, व्यत्यय आणलेला. २ भग्न, खंड पडलेला. ( b ) क्रमभग्न, भग्नक्रम. ३ खंडित, विच्छिन्न, अलग, निराळा. Interrup'tion *n.* (*the act*) अडथळा -हरकत &c. करणें *n*. २ (*the state*) हरकत *f*, मोडा *m*, व्यत्यय *m*, अवरोध *m*, प्रतिबंध *m*, विघ्न *n*, अंतराय *m* ( Sk. ), मोडती *f*, अडथळा *m*, अटकाव *m*. ३ खंड *m*, भंग *m*, विराम *m*, खोटी *f*. ( b ) क्रमभंग *m*, गतिभंग *m*. Interrup'tive *a.* अडथळा करणारा, नडणारा, प्रतिबंधक, &c. Interrup'tively *adv.* Interrupt'or *n.* अडथळा करणारा.

Intersect ( in-tėr-sekt' ) [ L. *inter*, between, and *secare*, *sectum*, to cut. ] *v. t. to cut into or between, to divide into parts* खंड -भाग -तुकडे करणें -पाडणें, विच्छेद करणें, दुभागणें, छेदणें, दुभागून -छेदून -भेदून जाणें. I. *v. i. to cut or cross mutually* परस्परांस छेदणें, परस्परच्छेदन करणें. Interse'cant *a.* भाग पाडणारा, छेदणारा, छेदक. Intersect'ed *a.* भाग पाडलेला, छेदित, छेदून गेलेला. Intersecting line छेदनरेषा. Intersec'tion *n.* छेदून जाणें *n*. २ छेद *m*, परिच्छेद *m*. ३ *geom. the point at which two lines cut one another* छेदबिंदु *m*, छेद *m*.

Interspace ( in-tėr-spās ) [E. Inter + Space.] *n. space between two things* मधली जागा *f*, मधलें अंतर *n*.

Intersperse ( in-tėr-spers' ) [ L. *inter*, among, & *spargere*, to scatter, akin to Gr. *speiro*, to sow. ] *v. t. to scatter or set here and there* इकडेतिकडे पसरणें, ठिकठिकाणीं -जागजागीं फेंकणें -पेरणें, मध्यें मध्यें फेंकणें -टाकणें, विकीर्ण करणें. Interspers'ed *p. p.* मध्यें मध्यें -जागजागीं फेंकलेला, अवकीर्ण. Intersper'sion *n.* जागजागीं पसरणें *n*- पेरणें *n*, अवकीरण *n*.

Interstellar, Interstellary ( in-tėr-stel'ar,-ar-i ) [ L. *inter*, between & *stella*, a star. ] *a. between or among the stars* ताऱ्यांच्या मधला -मधील, तारागणांतर्वर्ती, तारामंडलमध्यवर्ती. [I. SPACES तारामध्यावकाश.]

Interstice ( in'tėr-stis *or* in-tėr'stis ) [ Fr. –L. *interstitium* –*inter*, between & *sistere*, *stitum*, Sk. स्था to stand. ] *n. a small space between things closely set or between the parts which compose a body* फट *f*, चीर *f*, चिरण *f*, झरोका *m*, भेग *f*, संधि *m*, अंतर *n*. –as between the layers of stones दरज *f* or दर्ज *f*. २ *an interval of time between two acts* (दोन कामांमधील वेळेचें) अंतर *n*. Interstit'ial *a.* फटीमधील, भेगेंतील, फटीसंबंधीं. २ *anat. within the tissues* शरिराच्या पेशींमधील; as, "I. cavities."

Interstratified ( in-tėr-strat'i-fīd ) *a. stratified between other bodies* (दुसऱ्या पदार्थांमध्यें) आंत थर होऊन बसलेला, आंतरस्तरीभूत.

Intertexture ( in-tėr-teks'tūr ) [ L. *inter*, between, & Texture.] *n. -the act.* (आंत) विणणें *n*. २ *a being interwoven* अंतर्वीण *f*; as, "knit in nice I."

Intertrigo ( in-tėr-trī'gō ) [ L. *inter*, between, and *terere*, *tritum*, to rub. ] *n. med. a rubbing or chafing of the skin, esp., an abrasion or excoriation of the skin between folds, as in fat or neglected children* (बहुधा लठ्ठ माणसास होणारी) जांघेंतील दोन्ही त्वचा चोळून होणारी पैण *f.*

Intertropical ( in-tėr-trop'ik-al ) [ L. *inter*, between, and Tropical. ] *a. between the tropics* क्रांतिमंडलांतर्गत, क्रांतिवृत्तांतर्गत.

Intertwine ( in-tėr-twīn' ) [ L. *inter*, together, and Twine.] *v. t. to twine or twist together* एकत्र वळणें, गुंतवणें, एकमेकांत गुंफणें, ग्रथित करणें. I. *v. i. to be twisted together, to be mutually involved* एके ठिकाणीं गुंतणें, एकीकरण होणें, गुरफटणें.

Intertwist ( in-tėr-twist' ) [ L. *inter*, together, and Twist.] *v. t. to twist together* (वळून) गुंतवणें, (एकमेकांत) वळणें.

Interval ( in'tėr-val ) [ Lit. the *space between* the *rampart* of a camp and the soldiers' tents, Fr.-L. *inter*, between, and *vallum*, a rampart.] *n. space between* (पदार्थांतील -पदार्थांमधील) अंतर *n*, मधलें अंतर *n*. २ *time between* मधला वेळ *m*, मध्यकाळ *m*. ३ *time yet to pass between* अवधि *m*, अवकाश *m*, वार *m*, विलंब *m*, कालांतर *n*, फुरसत *f*, सवड *f*. [ At I.s मधून मधून, अधून मधून, अध्यें मध्यें ]. ३ *mus. the distance between two given sounds in music* (कोणत्याही दोन सुरांमधील) अंतर *n*, आंतरा *m*.

Intervene ( in-tėr-vēn' ) [ Fr. –L. *inter*, between, & *venire*, to come. ] *v. i. to come or be between* मध्यें पडणें -येणें -होणें -असणें. २ *to occur between points of time* (दोन वेळांच्या) मध्यें घडणें -होणें -येणें. ३ *to happen so as to interrupt* विघ्न -अडथळा -मोडा घालणें, (-ला) नडणें, बाधक -जाचक होणें. ४ *to interpose* मध्यें पडणें, मध्यस्थी करणें -पतकरणें, मध्यस्थ होणें. I. *v. t. to separate* (मध्यें पडून) विभक्त -निराळा -अलग करणें. Interven'ient *a.* Interven'ing *pr. p. a.* मध्यें पडणारा -येणारा -असणारा, मधला, व्यवहित. २ मध्यें होणारा, मध्यें घडणारा. ३ आड येणारा, विघ्न -अडथळा -मोडा करणारा, बाधक. Interven'tion *n. intervening* मध्यें येणें *n* -पडणें *n* -असणें *n*, मध्यस्थिति *f* ( *lit.* ), व्यवधान *n*. २ *mediation* मध्यस्थता *f*, मध्यें पडणें *n*, मध्यस्थी *f*, मध्यस्थपणा *m*, मध्यस्थगिरी *f*.

Interview ( in'-tėr-vū ) [ Fr. *entrevue* –L. *inter*, between, & View. ] *n. a mutual sight or view, a meeting* समोरासमोर भेट *f*, प्रत्यक्षदर्शन *n*, अन्योन्यदर्शन *n*, समागम *m*. [ DYING I. जीवंतभेट *f*, डोळेभेट *f*. ] २ *a conference to elicit information* मुलाखत *f*, भेट *f*. ३ ( also ) *the published statement so elicited* मुलाखतींत मिळविलेली माहिती *f*, मुलाखत (*fig.* ). I. *v. t. to visit a noble or notorious person with a view to publishing a report of his conversation* (एखाद्या मनुष्यापासून माहिती मिळवून ती प्रसिद्ध करण्याच्या उद्देशानें) भेट *f* -मुलाखत *f*. घेणें.

*N. B.* :—This use of the word originated in America, but has now become general. In'terviewer *m.* In'terviewing *pr. p. & v. n.*

Intervital ( in-tėr-v'ītal ) [ L. *inter*, between, and *vita*, life.] *a. between lives, between death and resurrection* (दोन) जन्मांमधील.

Intervolve ( in-tėr-volv' ) [Prefix *inter*, and *volvare*, *volutum*, to roll.] *v. t. to involve one within the other, to twist or coil together* एकांत एक गुंतवणें -गांठवणें, गांठणें, परस्परग्रथित करणें.

Interweave ( in-tėr-wēv' ) [ L. *inter*, together, and Weave. ] *v. t. to weave together, to intermingle* एकत्र करणें, मिसळणें, विणून मिळविणें, एकत्र विणणें.

Intestate ( in-tes'tāt ) [ L. *intestatus* -*in*, not, and *testatus* -*testari*, to make a will.] *a. dying without having made a valid will* ( of persons ) कायदेशीर मृत्युपत्र अथवा मृत्युलेख केल्यावांचून मरण पावणारा, मृत्युपत्रहीन, अकृतमृत्युपत्र, अकृतमृत्युलेख. २ *not disposed of by will* ( as estate ) मृत्युपत्रानें -मृत्युलेखद्वारा व्यवस्था न लावलेला, मृत्युपत्रानें न दिलेला. [I. PROPERTY निवारशी माल *m*, विनवारशी मिळकत *f*. ] I. *n.* मृत्युपत्र करून ठेवल्याशिवाय मरण पावलेला मनुष्य. Intes'table *a. not capable of making a valid will* मृत्युपत्र करण्याचा योग्य अधिकार नसलेला, मृत्युपत्रानधिकारी. Intes'tacy *n.* (कायदेशीर) मृत्युपत्र करून ठेवल्यावांचून मरणें *n*, अकृतमृत्युपत्रता *f*.

Intestine ( in-tes'tin ) [ Fr. –L. *intestinus*–*intus*, within, on the inside.] *a. internal* आंतला, आंतील, अंतर्वर्त्ती, अंतस्थ. २ *contained in the animal body* (प्राण्याच्या) कोठ्यांतील, पोटांतील, कोष्ठांतर्गत, शरीरांतील, देहांतर्गत. ३ *domestic* देशांतला. [INTESTINE WAR आपसांतली लढाई *f*, यादवी *f*. ] I. *n.* (usually in the *pl.* ) आंतडीं *n. pl.* ( आंतडें *sing.* ), अंत्र *n*. [ LARGE I. स्थूलांत्र *n*. SMALL I. सूक्ष्मांत्र *n*. ] Intes'tinal *a. pertaining to the intestines of an animal body* आंतड्यांचा, आंतड्यांसंबंधीं, अंत्रसंबंधीं, आंत्रिक. I. canal आंतडीं *n. pl.*

Inthral ( in-thrawl' ) [ E. *in*, into, and Thrall. ] *v. t. to bring into thraldom or bondage, to enslave, to shackle* (-ला) दासत्व आणणें, गुलाम करणें, गुलामगिरींत ढकलणें -टाकणें. Inthral'ment *n.* गुलामगिरी *f*, दास्य *n*, दासत्व *n*, कैद *f*. Inthral'led *pa. p.* Inthral'ling *pr. p.*

Intimate ( in'ti-māt ) [ L. *intimus*, innermost –*intus*, within. ] *a. innermost, internal* अगदीं आंतला, अंतस्थ, अंतरंगांतील, अंतरंगींचा, अंतरींचा, जिवाचा; as, "I knew from I. impulse." २ *close* दृढ, गाढ, पूर्ण, पुरा; as, "He was honoured with an I. and immediate admission." ३ *closely acquainted*

दाट ओळखीचा -परिचयाचा, निकट, दृढ -दाट परिचय असलेला, सलगीचा, घसणीचा, घसमटीचा, घरोब्याचा. ४ *familiar* जिवलग, प्रियतम, प्राणप्रिय, दिलजान. [To be I. (*idio.*) लाळ *f.* गळणें *g. of s.*, रस गळणें -पाघळणें *g. of s.*] I. *n. a familiar friend, an associate* दाट स्नेही *m*, जिवलग दोस्त *m*, जिव्हाळ्याचा मित्र *m*. In'timacy *n. close familiarity* सलगी *f*, दाट सख्य *n*, संघट्टन *n*, दाटी *f*, निकट परिचय *m* -ओळख *f*, दाट स्नेह *m* -दोस्ती *f*. &c., घसटणी *f*, जिवलगपणा *m*, घरोबा *m*, घणदाटी *f*, बापभावकी *f*, दांडापेंडा *m*, &c. In'timately *adv.* निकट परिचयानें, सलगीनें, जिवलगपणानें, घरोब्यानें.

Intimate ( in'ti-māt ) [ Lit. to make one *intimate with*, L. *intimo –intus*, within.] *v. t. to hint* (-ला) सूचना *f* -इशारत *f.* -खूण *f.* करणें *g. of o.*, जाणवणें, सुचवणें, खुणवणें, चुणूक दाखविणें, दर्शविणें. २ *to announce* खबर *f* -माहिती *f* -बातमी *f.* देणें, ( जाहीर रीतीनें ) सांगणें, कळवणें, कानावर घालणें. In'timater *n.* सांगणारा, कळवणारा, &c. Intima'tion *n. obscure notice, hint* सूचना *f*, इषारा *m*, दिग्दर्शन *n*, खूण *f*, चुणूक *f*. २ *announcement* जाहीर खबर *f*, बातमी *f*, माहिती *f*.

Intimidate ( in-tim'i-dāt ) [L. *in*, & *timidus*, fearful –*timidare*, to frighten.] *v. t. to make timid or fearful* भय दाखविणें -घालणें, भिवविणें, भेवडावणें, भेडसावणें, घाबरवणें, भीति घालणें, भयभीत -सभय -भययुक्त करणें. २ *to threaten, to scold* दटावणें, दहशत घालणें, धाक घालणें -दाखविणें, धमकावणें, धमकी देणें -घालणें, दरडावणें, गुरकावणें, खमकावणें, दबकावणें. ३ *to dispirit* गर्भगळित -निरुत्साही करणें, ( -ची ) हिंमत *f*- धैर्य *n* -उत्साह *m*- धीर *m.* खचवणें, ( -चे ) पाय मोडणें ( *colloq.* ). Intim'idated *pa. t. & p. p.* Intimida'tion *n.* भय -भीति &c. दाखविणें *n* -घालणें *n.* [ EMPTY I. मेघाडंबर *n* OR मेघडंबर *n.* ] ( b ) दहशत घालणें *n.* २ –*the state.* भीतिप्रदर्शन *n*, भेडसावणी *f*, भेवडावणी *f.* ( b ) धाक *m*, दहशत *f*, दटावणी *f*, धमकी *f*, धमकावणी *f*, दाब *m*, दबाव *m*, डरकावणी *f*, डर *f*. ३ उत्साहभंग *m*, निरुत्साह *m*, पाय मोडणें *n*.

Into ( in'too ) [ Lit. coming *to* and going *in*; In and To. ] *prep. expressing passage inwards or from one state to another* (बाहेरून) आंत, मध्यें, कडे.

Intolerable ( in-tol'ĕr-a-bl ) [ L. *in*, not, and Tolerable. ] *a. that cannot be endured* असह्य, दुःसह, न सोसवेसा, सोसवेनासा. २ ( *Shakes.* ) *enormous* अतिशय, अवाढव्य, असंख्यात; as, "This I. deal of sack." Intol'erableness *n.* असह्यता *f*, दुःसहपणा *m*, दुःसह्यता *f*. Intol'erably *adv.* सोसवेनासा, असह्यपणानें. Intol'erant *a. not able or willing to endure* असोशिक, अक्षम, असहमान, असहनशील, असहिष्णु. २ *not enduring difference of opinion* (दुसऱ्याचा) मतभेद -धर्मभेद न सोसणारा. Intol'erantly *adv.* असहनशीलपणानें. Intol'erance, Intolera'tion *n. want of capability to endure* असोशिकपणा *m*, असहनशीलता *f*, असहनशीलपणा *m*, असहिष्णुता *f*, असहन *n*. २ *med.* ( एखाद्या मनुष्याला एखादें ) औषध न सोसणें *n*.

Intomb. Same as Entomb.

Intonate ( in'ton-āt ) [ L. *in tonum*, according to tone.] *v. i. to sound forth* उच्चारणें. २ *to sound the notes of a musical scale* गाण्याचे सूर किंवा गायनस्वर काढणें. ३ *to modulate the voice* स्वर कमीजास्त करणें, आवाज उंचनीच करणें. Intona'tion *n. the act or manner of sounding musical notes* गायनाचे सूर काढणें *n*. (b) गायनस्वर काढण्याची पद्धत *f*. २ *modulation of the voice* आवाज कमीजास्त करणें *n*. [DEEP I. गंभीरस्वर *m.*] Intone' *v. i. to utter in tones* स्वर काढणें, सूर काढणें. २ *to give forth a low protracted sound* बारिक -लांब स्वर -सूर काढणें. I. *v. t. to read in a singing recitative manner* गाण्याचे चालीवर -धाटणीवर -स्वरांत म्हणणें; as, "To I. Church service."

Intorsion ( in-tor'shun ) [ L. *in*, and Torsion.] *n. a twisting, winding* पिळवटणें *n*, पीळ *m*.

Intoxicate ( in-toks'i-kāt ) [Lit. *to drug* or *poison* –Gr. *toxikon*, a poison in which arrows were dipped —*toxon*, an arrow. ] *v. t. to make drunk, to inebriate* कैफ *m* -अम्मल *m* -गुंगी *f* -निशा *f* -माद *m*. आणणें -चढविणें, माजवणें, गुंगवणें, झिंगवणें. २ *to excite to enthusiasm or madness* माज *m*. आणणें, मत्त -मस्त -उन्मत्त -धुंद -उन्मत्त -प्रमत्त करणें. Intox'icated *pa. t. & p. p.* कैफ *m* -अंमल *m* -निशा *f*- चढलेला, झिंगलेला. २ उन्मत्त, प्रमत्त. ३ *overbearing* मस्त, मदोन्मत्त, मदान्वित, मगरमस्त, जबरदस्त. Intox'icating *pr. p. & v. n.* कैफी, अंमली, निशा आणणारा -चढविणारा, मादक. [ I. ARTICLES *or* LIQUORS अंमली पदार्थ *m. pl.* -पेयें *n. pl.* –COMPREH. निशापाणी *n*. SOME OF THEM ARE कुसुंबा, घोटा, चरस, माजूम, याकुती, सबजी, तळी, मदंती. ] २ उन्मादक, प्रमत्तक, मस्ती आणणारा. Intoxica'tion *n.* कैफ -अंमल &c. चढविणें *n* -आणणें *n*. २ *the state of being drunk* कैफ *m*, अंमल *m*, निशा *f*, गुंगी *f*, झिंगी *f*, झिंगटपणा *m*, तार *f*. ३ *high excitement or elation* उन्माद *m*, माद *m*, उन्मत्तपणा *m*, प्रमत्तता *f*, माज *m*, मस्ती *f*, मद *m*, माजोरें *n* ( *sing.* ), धुंदी *f*.

Intractable ( in-trakt'a-bl ) [ L. *in*, not, & Tractable. ] *a. unmanageable, obstinate, stubborn* अडेल, हुकुमांत -कह्यांत -दाबांत न राहणारा -न आणण्यासारखा, दंडेल, अनिवार, अनिवार्य, दुराधर्ष, दुर्धर्ष, हट्टी, हटवादी. २ *indocile* दुःशास्य, शिकवण -शिक्षा न घेण्यासारखा. Intractabil'ity, Intract'ableness *n.* अडेली *f*, दंडेली *f*, अडेलपणा *m*, दंडेलपणा *m*, हट्टीपणा *m*, हटवादीपणा *m*, दुर्धर्षता *f*. २ दुःशास्यता *f*. Intract'ably *adv.* अडेलपणानें, दंडेलपणानें, हटवादानें.

**Intramercurial** ( in-trä-mėr-kū'ri-al ) [ L. *intra*, between, & Mercury.] *a.* (*astron.*) *between the planet Mercury and the Sun* रविबुधांतवर्ती.

**Intramural** ( in-tra-mū'ral ) [ L. *intra*, within, & Mural. ] *a. within the walls, as of a city* शहराच्या तटाच्या आंतील.

**Intransient** ( in-tran'shent ) [ L. *in*, not, & Transient. ] *a. not suddenly passing away* असंगुर, अक्षणिक, चिरस्थायी, सुस्थिर.

**Intransitive** ( in-tran'si-tiv ) [ L. *in*, not, and Transitive.] *a. expressing an action confined to the agent or subject* अकर्मक (क्रियापद ).

**Intransmissible** ( in-trans-mis'i-bl ) [ L. *in*, not, & Transmissible. ] *a. that cannot be transmitted* पाठवितां -धाडतां -पोंहोंचवितां -परंपरेनें देतां न येणारा, परंपरागतदानायोग्य. २ पार जाऊं देतां -प्रवेशमार्ग देतां न येणारा, प्रेषणायोग्य.

**Intransmutable** ( in-trans-mūt'a-bl ) [ L. *in*, not, and Transmutable.] *a. that cannot be changed into any other substance* ज्याचा पालट -बदल होत नाहीं असा, पालटतां -बदलतां न येणारा, अविकार्य. Intransmutabil'ity *n.* अविकार्यता *f.*

**Intrant** (in'trant) [L. *intrans*, *-antis -intro*, to enter; see Enter.] *a. entering, penetrating* आंत शिरणारा -जाणारा, घुसणारा, अंतर्गामी. I. *n. one who enters esp. on some public duty* नोकरीवर -जागेवर येणारा मनुष्य *m*, नवीन -नवा कामगार *m* -कामदार *m*.

**Intrathoracic** ( in-trä-thō-ras'ik ) [ L. *intra*, prep., within, on the inside, akin to *inter*, & *thoracic*. See Thorax. ] *a. within the thorax or chest* छातीच्या आंतील.

**Intrench** ( in-trensh' ) [ E. In, and Trench. ] *v. t. to dig a trench around* (-च्या) सभोंवतीं खंदक खणणें. २ *to fortify with a ditch and parapet* खंदक खणून मोर्चा बांधणें, मोर्चेबंदी करणें. ३ *to furrow* खांच *f* -खळगा *m* -तास *n* -पन्हळ *m* -हरळ *m*. पाडणें. I. *v. i. to invade, to encroach* ( with *upon* ) (-चें ) आक्रमण *n* -अतिक्रमण *n* -उल्लंघन *n*. करणें, (-ची ) पायमल्ली करणें. Intrench'ment *n. -the act* खंदक *m*, खळगा *m* &c. खणणें *n*. २ *a trench* खंदक *m*. ३ *a ditch and parapet for defence* ( शत्रूपासून बचाव करण्यासाठीं केलेली ) मोर्चेबंदी *f*. ४ ( hence ) *any protection or defence* बचाव *m*, आश्रय *m*, रक्षण *n*. ५ *encroachment* अतिक्रमण *n*, उल्लंघन *n*, पायमल्ली *f*.

**Intrepid** (in-trep'id) [L. *intrepidus -in*, not, and root of Trepidation.] *a. without trepidation or fear, undaunted, brave* धीट, धाडशी, धारिष्टवान्, खंबीर, हिंमतवान्, छातीचा, न डगमगणारा, न कचरणारा, कच न खाणारा, छातीवाला, छातीदार, निर्भय, निःशंक, शूर. Intrepid'ity *n. firm unshaken courage* धाडस *n*, धारिष्ट *n*, खंबीरपणा *m*, हिंमत *f*, छाती *f*, अढळ शौर्य *n*, शौर्य *n*, विक्रम *m* ( Sk. ), हिय्या *m*. Intrep'idly *adv.* अढळ शौर्यानें, छातीनें, हिय्यापूर्वक.

**Intricate** ( in'tri-kāt ) [ L. *intricatus -in*, & *tricor*, to make difficulties *-tricæ*, hinderances. ] *a. involved, entangled, perplexed* गुंतागुंतीचा, गुंताड्याचा, सुताड्याचा, भानगडीचा, घोंटाळ्याचा, गोंधळाचा, क्लिष्ट, गहन, गूढ, दुर्बोध, अस्पष्ट, लपेटीचा. In'tricacy, In'tricateness *n. perplexity* भानगड *f*, घोटाळा *m*, गुंतागुंत *f*, गुतागूत *f*, गुंताडा *m*, गोंधळ *m*, दुर्बोधता *f*, गहनपणा *m*, &c. In'tricately *adv.* भानगडीनें.

**Intrigue** ( in-trēg' ) [ Fr. *intriguer* -root of *intricate q. v.*] *n. a complex plot, a private or party scheme* कारस्थान *n*, कृष्णकारस्थान *n*, कुलंगडें *n*, कंत्राट *n*, कंत्राड *n*, कचाट *n*, चक्रव्यूह *m* ( *fig.* ), कपटप्रबंध *m*, कूटप्रबंध *m*, कपटनाटक *n*, कुप्रयोग *m*. २ *the plot of a play or romance* ( नाटक, खेळ, किंवा कादंबरी यांतील ) भानगडीचें -घडामोडीचें कथानक *n*. ३ *secret illicit love* कृष्णकारस्थान *n*, व्यभिचारकर्म *n*, जारकर्म *n*. I. *v.i. to form a plot or scheme* कारस्थान -कुलंगडें -कंत्राड करणें -रचणें, व्यूह -कचाट रचणें -उभारणें. २ *to carry on illicit love* जारकर्म करणें, व्यभिचार करणें, ( -शीं ) चोरून संबंध ठेवणें. Intrig'uer *n.* कारस्थान करणारा, व्यूह रचणारा, कंत्राट्या, कारस्थान्या. Intrigued' *pa. t. & p. p.* Intrigu'ing *pr. p. & v. n.*

**Intrinsic,–al** ( in-trin'sik, –al ) [ Fr. -L. *intrinsecus –intra*, within, and *secus*, following.] *a. essential, genuine, inherent* अंगभूत, मूळचा, स्वाभाविक, स्वभावसिद्ध, प्राकृतिक, जातीचा, यथार्थ, खरा, वास्तविक, अकृत्रिम. २ *med.* अंतर्वर्ती. ३ *bot.* अंतःस्थित. Intrinsical'ity *n.* मूळचेपणा *m*, अंगभूतता *f*, यथार्थता *f*, स्वभावसिद्धत्व *n*, खरेपणा *m*, वास्तविकता *f*. Intrin'sically *adv.* वास्तविकपणानें, खरोखर, जातितः, प्रकृतितः, स्वभावेंकरून, स्वभावानें, जातीनें.

**Introduce** ( in-tro-dūs' ) [ L. *intro*, within, and *ducere*, to lead.] *v. t. to lead or bring in* आंत नेणें -आणणें -घालणें. २ *to formally make known or acquainted* (औपचारिक रीत्या ) परिचय -ओळख करून देणें. ३ *to bring into notice or practice* नजरेस आणणें, पुढें आणणें, प्रचारांत -रूढींत -प्रघातांत -प्रवृत्तींत -वहिवाटींत आणणें, रूढ करणें, रूढि *f* -वहिवाट *f* -प्रघात *m* -प्रचार *m*. पाडणें *g. of o.* ४ *to commence* चालू -सुरू करणें, स्थापणें, उपक्रम करणें, आरंभ -प्रारंभ करणें *g. of o.* ५ *to preface* (-ची) प्रस्तावना करणें. (b) (-ला) प्रस्तावना जोडणें. Introduc'tion *n.* (*–the act*) ( a ) आंत नेणें *n*. -घालणें *n*. &c. ( b ) ओळख घालणें *n* -करून देणें *n*. (c) नजरेस आणणें *n*. (d) वहिवाट -प्रघात -रूढि &c. पाडणें *n*. २ प्रवेश *m*. (b) परस्पर ओळख *f*, परस्पर परिचय *m*. ३ *preliminary matter to the main thoughts of a book* प्रस्तावना *f*, उपन्यास *m*, उपोद्घात *m*, भूमिका *f*,

प्रवेशक *m*, उपक्रम *m*, पूर्वांग *n*. ४ *a treatise introductory to a science or course of study* प्रास्ताविक ग्रंथ *m*, मार्गोपदेशिका *f*, लघुग्रंथ *m*. Introduc'tory, Introduc'tive *a*. *serving to introduce* प्रास्ताविक, प्रस्तावनात्मक, प्रस्तावनारूप, उपोद्घाताचा. (b) प्रावेशिक, प्रवेशमार्गसाधक. २ *preliminary* पूर्वतयारीचा.

Intromit (in-tro-mit') [L. *intro*, within, and *mittere*, *missum*, to send.] *v. t. to send within* आंत पाठविणें -दवडणें -घालणें -सोडणें. २ *to admit, to permit to enter* आंत येऊं देणें -सोडणें, प्रवेश देणें. Intromis-s'ion *n*. आंत येऊं देणें *n*. Intromitt'ed *pa. t. & p. p.* Intromitt'ent *a*. आंत नेणारा. २ *allowing to pass within* आंत घेणारा, आंत येऊं देणारा. ३ *used in copulation* (said of the external reproductive organs of males, and sometimes of females) आंतबाहेर जाणारा, अंतर्बहिर्गामी. Intromitt'ing *pr. p. & v. n.*

Introspection (in-tro-spek'shun) [L. *intro*, within, & *specere*, to see.] *n. a sight of the inside or interior* अंतर्दर्शन *n*, अंतरावलोकन *n*, अंतर्दृष्टि *f*, प्रत्यग्दर्शन *n*, प्रत्यग्दृष्टि *f*, अंतर्मुखता *f*. २ *self-examination* आत्मपरीक्षण *n*, आत्मनिरीक्षण *n*, अंतर्दृष्टि *f*. Introspec'tionist *n*. आत्मनिरीक्षण करणारा. Introspec'-tive *a*. अंतर्दर्शी. २ *involving the act or results of conscious knowledge of physical phenomena* (contrasted with *associational*) अंतर्दर्शनजन्य, आत्मपरीक्षणाचा.

Introvert (in-tro-vert') [L. *intro*, within, and *vertere*, to turn.] *v. t. to turn inward* आंत -आंतल्या बाजूस वळवणें -वांकवणें -फिरवणें, अंतराभिमुख करणें; as, "Led toes." Introvert'ed *pa. t. & p. p.* Introver'-sion *n*. आंत फिरविणें *n* -वळवणें *n*. २ अंतःपरिवर्तन *n*.

Intrude (in-trōōd') [L. *in*, in, and *trudere*, to thrust.] *v. i. to thrust one'sself in, to enter uninvited or unwelcome* (कामाशिवाय, कारण नसतां, मध्यें) अनाहूत -न बोलावतां जाणें -येणें -शिरणें -घुसणें, पडणें -हात घालणें -ढवळाढवळ करणें, आगंतुकी करणें, (loosely) चोंबडेपणा करणें, लुडबुडणें, घुसणें, मधच्यामध्यें नाचणें. I. *v. t. to force in* जबरीनें -जोरानें -बळेंच आंत -शिरकवणें -ढकलणें -घालणें. Intrud'er *n*. आगंतुक, अनाहूत येणारा; (loosely) अनाहूत. Intrus'ion *n*. आगंतुकी *f*, लुडबूड *f*, ढवळाढवळ *f*, बोलावण्यावांचून जाणें *n*. २ *encroachment* अतिक्रम *m*. Intru'sive *a*. *entering without welcome or right* बोलावण्याशिवाय -हक्कावांचून -अनाहूत शिरणारा, आगांतुक, आगंतुक, अनाहूत. Intru'sively *adv*. Intru'siveness *n*. आगांतुकी *f*, आगंतुकपणा *m*, आगंतुकभाव *m*, अनाहूतागमन *n*, अनाहूतप्रवेश *m*.

Intrust (in-trust') [E. *in*, in, & Trust.] *v. t. to give in trust* विश्वासानें देणें -हवाली करणें, (-च्या) विश्वासावर सोपवणें, हवालणें, विश्वासणें.

Intubation (in-tū-bā'shun) [Pref. *in*, in, & Tube.] *n. med. the introduction of a tube into an organ to keep it open* (as into the larynx in croup) (श्वासनलिकारोगामध्यें श्वास मोकळा करण्याकरितां) आंत नळी घालणें *n*, नलिकाप्रवेशन *n*.

Intuition (in-tū-ish'un) [Lit. a *looking upon* or *into*, L. *in*, into or upon, & *tuitio*, *tueor*, *tuitus*, to look. See Tuition and Tutor.] *n. the power of the mind by which it immediately perceives the truth of things without reasoning or analysis* प्रतिभा *f*, स्फूर्ति *f*, सहजावबोधकशक्ति *f*. २ *a truth so perceived* सहजज्ञान *n*, सहजावबोध *m*, साक्षात् ज्ञान *n*, प्रमाणनिरपेक्षज्ञान *n*, मानसप्रत्यक्ष *n*, अंतर्ज्ञान *n*. In-tui'tional *a*. सहजावबोधाचा, &c. Intuitional'ism *n*. सहजज्ञानवाद *m*, नैसर्गिकज्ञानवाद *m*. Intu'itive *a*. *perceiving by intuition* अंतस्स्फूर्तीनें समजणारा, सहजज्ञ, अयत्नज्ञ, प्रमाणनिरपेक्षज्ञ, अंतर्ज्ञानी. २ *perceived by intuition* पाहातांच कळणारा, समजणारा, लक्षांत येणारा -कळून येण्याजोगा, अंतर्ज्ञानानें -सहजज्ञानानें -मिळालेला. [I. KNOWLEDGE सहजज्ञान *n*.] Intu'itively *adv*. सहजज्ञानानें, अंतर्ज्ञानानें, तेव्हांच, सहज.

Intumescence (in-tū-mes'ens) [Fr. –L. *in*, and *tumesco*, *–cens -tumere*, to swell.] *n. the action of swelling* सुजणें *n*, (-ला) सूज -शोफ येणें *n*. २ *a swelling* सूज *f*, शोफ *m*, शोथ *m*. Intumesce' *v. i.* सुजणें, (-ला) सूज -शोथ येणें.

Intussusception (intus-sus-sep'-shun) [L. *intus*, within, and *susception* –pref. *sus*, and *capere*, to take.] *n. med.* (*specif.*) *the reception or slipping of the upper part of the small intestine into the lower* (उदरांतील आंतड्याचा) एक भाग दुसऱ्या भागांत शिरणें *n* -जाणें *n*.

Intwine (in-twīne') [In and Twine.] *v. t.* Same as Entwine q. v. एकत्र गुंफणें -विणणें -गुंतवणें गांठवणें.

Intwist (in-twist') *v. t.* एकत्र वळणें, गुंतवणें.

Inumbrate (in-um'brāt) [L. *in*, and *umbro*, to shade –*umbra*, a shadow.] *v. t. to cast a shadow upon, to shade* छायेनें -छायेखालीं -छायेंत झांकणें, (-वर) छाया पाडणें, छायाच्छादित करणें.

Inunction (in-ungk'shun) [E. In and Unction.] *n. the act of anointing* माखणें *n*, विलेपन करणें *n*, अभ्यंजन *n*. २ (*the state*) विलेपन *n*, माखण *n*, अभ्यंग *m*. [ABLUTION AFTER I. अभ्यंगस्नान *n*. TO WASH CHILDREN AFTER I. मुलांस नाहूंमाखूं घालणें, मुलांचें न्हाणमाखण करणें.]

Inundate (in-un'dāt) [L., from *innudo*, *-atum –in*, and *undare*, to rise in waves –*unda*, a wave.] *v. t. to flow over or upon in waves* (said of water), *to flood, to deluge* पाण्यानें -पाण्यांत -पुरांत बुडविणें, जलमय -जलप्लुत -करणें, जलप्रलय करणें *g. of*

*o.* २ *to fill with an overflowing abundance* बुडविणें (*fig.*), समृद्धि *f* -रेलचेल *f.* करणें with the *locative of o. and g. of s.*, गर्दी उडविणें, चंगाळी करणें. Inun'dated *p. p.* बुडवलेला, जलमय केलेला, जलमय, जलप्लुत. Inunda'ting *pr. p. & v. n.* Inunda'tion *n. -the act.* बुडविणें *n*, जलमय करणें *n.* २ *a flood* पूर *m*, महापूर *m*, औंर *m*, जलप्रलय *m*, जलविप्लव *m.* ३ *overflowing* चंगाळी *f*, रेलचेल *f*, समृद्धि *f*, गर्दी *f.*

Inure (in-ūr') [From *in*, & an old word *ure* (used in the phrase 'to put in ure' *i. e.* in operation), –L. *opera*, work; the same word *ure* is found in *manure*, which see.] *v. t. to use or practise habitually, to accustom* (-ची) संवय *f*-संवई *f.* करणें -पाडणें, वहिवाटणें, अभ्यस्त -परिचित करणें, संवयींत -वहिवाटींत -घसवटींत -राबत्यांत आणणें, सवईचा -घसवटीचा करणें, राबवणें. २ *to harden* घटवणें, निरडणें, निरढणें, दळवटणें, कसून तयार करणें, मुरवणें. [To BE *or* GET I.ED मुरणें, घटणें, निरडणें, निरढवणें, रावणें.] I. *v. i.* (*law*) *to come into use or effect* उपयोग होणें *in. con. g. of s.*, अंमल चालू होणें, लागू पडणें. २ *to serve to the use or benefit of* (-च्या) फायद्यावर -पथ्यावर पडणें, (-ला) इष्ट -हितावह असणें. Inur'ed *pa. t. & p. p.* संवय पडलेला, राबलेला, घसवटींतला. २ घटलेला, बनलेला, तयार झालेला, निरडलेला, &c. Inure'ment *n. –the act.* (a) संवय पाडणें *n*, &c. (b) निरडणें *n*, घटवणें *n*, &c. २ *practice* संवय or संवई *f*, राबता *m.* Inur'ing *pr. p. & v. n.*

Inurn (in-urn') [L. *in*, in, and Urn.] *v. t. to place in an urn* भांड्यांत घालणें. २ *to bury* पुरणें, गाडणें.

Inutility (in-ū-til'i-ti) [Fr. –L. *in*, not, & Utility.] *n. want of utility* निरुपयोग *m*, निरुपयोगिता *f.*

Inutterable (in-ut'ėr-a-bl) [In, not, & Utterable.] *a. that cannot be uttered or expressed* उच्चारून दाखवितां न येणारा, अनुच्चारणीय, अनुच्चार्य.

Invade (in-vād') [Fr. –L. *in*, and *vadere*, to go. See Wade. याचा मूळ अर्थ 'आंत जाणें -शिरणें, मर्यादा ओलांडणें' असा आहे.] *v. t. to enter a country as an enemy* (-वर) स्वारी *f* -हल्ला *m.* करणें, (-वर) चाल *f.* करणें -करून जाणें, धाड *f.* घालणें, (-वर) दौड *f* -चाल -चढाई करणें, चालून -चढून जाणें -येणें *with* वर *of o.*, आक्रमणें, आक्रांत करणें. २ *to encroach upon, to violate* अतिक्रमण -उल्लंघन करणें *g. of o.* धक्का लावणें -पोंचवणें. I. *v. i.* स्वारी -हल्ला &c. करणें. Inva'der *n.* स्वारी करणारा, (-वर) चालून -चढाई करून येणारा -जाणारा. २ अतिक्रमण करणारा, धाड घालणारा. Inva'ding *pr. p. & v. n.* Inva'sion *n. –the act.* स्वारी -हल्ला &c. करणें. *n.* (b) धाड घालणें *n*, अतिक्रमण करणें *n.* २ *–the state.* (a) *an attack, an incursion* स्वारी *f*, हल्ला *m*, चाल *f*, दौड *f*, चढाई *f*, चढाव *f*, चढ *m*, धाड *f*, परचक्र *n* (*fig.*) [RAVAGES &C. OF AN I. राजक्रांति *f*, राजक्रांत *n*, राजीक *n*, गनिमाई *f*, गलिमाई *f*, धूळधाणी *f.*] (b) *an encroachment* अतिक्रमण *n*, उल्लंघन *n*, धाड *f.* Inva'sive *a.* (पहिल्यानें) हल्ला करणारा, (पहिल्यानें) कुरापत काढणारा. २ स्वारीचा, हहयाचा.

Invagination (in-vaji-nā'shun) [L. pref. *in*, in, and *vagina*, sheath.] *n. biol. the condition of an invaginated part or organ* (not same as *intussusception*) एका पोकळ नळीचा वरचा भाग त्याच्याच खालच्या भागांत शिरणें *n.* Invag'inated *pa. p.* आवृत, झांकलेला, आच्छादित.

Invalid (in'va-lid) [Fr. *invalide* –L. *invalidus* –*in*, not, and *validus*, strong. See Valid.] *a. not valid or strong, weak* अशक्त, शक्तिहीन, निःशक्त, निर्जीव, निर्बल *pop.* निर्बळ, दुर्बल *pop.* दुर्बळ, रड्या, रोड. २ *sick* आजारी, रोगी, रुग्ण, रोगट, रोग्या, रोगाड्या, दुखणेकरी. I. *n. one who is weak* अशक्त -निःशक्त मनुष्य. २ *a sickly person* आजारी मनुष्य, दुखणेकरी *m*, रोगी *m.* ३ *one disabled for active service* (esp. a soldier or sailor) (नोकरी करण्यास) नालायक झालेला लष्करी शिपाई किंवा खलाशी. I. *v. t. to affect with disease* आजारी पाडणें, दुखणें आणणें. २ *to render invalid* अशक्त -निर्बल -निर्जीव करणें. ३ *to enrol on the list of invalids* (नोकरी करण्यास) नालायकांच्या पटांत नांव नोंदणें *g. of o.*; as, "He was *invalided* on half pay." Inval'idate *v. t.* निर्बळ -निर्जीव करणें. Invalida'tion *n.* Invalid'ity *n. infirmity* अशक्तपणा *m*, निःशक्तपणा *m.* २ *want of health* आजारीपणा *m*, दुखणें *n*, &c.

Invalid (in-val'id) [Fr. –L. *in*, not, & Valid.] *a. not sound; weak; without value, weight or cogency* फोलकट, फोल, पोकळ, निष्प्रमाण, अप्रमाण, पोंचट, कमजोर. २ *having no effect, void, null* अपरिणामकारक, परिणामशून्य, व्यर्थ, निरुपयोगी, रद्द, वार्‍यां, फुकट, निकामी. Inval'idate *v. t. to weaken or destroy the force of* कमजोर करणें, जोर मोडणें *g. of o.*, रद्द करणें. Invalida'tion *n.* Invalid'ity *n. want of cogency or force* अप्रमाणता *f*, अप्रामाण्य *n*, व्यर्थता *f*, पोकळपणा *m*, पोंचटपणा *m*, फोलपणा *m.*

Invalorous (in-val'-ėr-us) [L. *in*, not, & Valorous.] *a. not valorous* अपराक्रमी, भितरा, रणभीरु, भागुबाई.

Invaluable (in-val'ū-a-bl) [L. *in*, not, & Valuable.] *a. that cannot be valued, priceless* अमोल, अमूल्य, मोठ्या किंमतीचा, अतिशय किंमतवान्, भारी मोलाचा. Inval'uably *adv.*

Invariable (in-vā'ri-a-bl) [L. *in*, not, & Variable.] *a. not variable, unalterable, constantly in the same state* कमीजास्त न होणारा, न बदलणारा, कायमचा, फेरफारानिराळा. २ *math.* सतत, नित्य, अविकार्य, अविकारी. Inva'riableness *n.* कायमपणा *m*, अविकारीपणा *m*, अविकारिता *f*, स्थैर्य *n*, सुस्थैर्य *n*, स्थिरता *f.* २

नित्यता *f.* Inva'riably *adv.* सतत, नित्य, नित्यनेमानें, नियमानें, एकसारखा. Inva'riant *n. math.* नित्य.

Inva'sion *n.* See under Invade.

Invective ( in-vek'tiv ) [ See Inveigh. ] *n. a severe or reproachful accusation, an attack with words* दोषारोप *m*, दोषारोपण *n*. २ *a violent utterance of censure* निंदा *f*, निंदोक्ति *f*, निर्भर्त्सना *f*, निर्भर्त्सना *n*, कुत्सा *f*, गर्हा *f*, परिभाषण *n*, कानउघाडणी *f.* ३ *sarcasm or satire* उपरोधिक भाषण *n.* I. *a. railing, abusive* निंदा करणारा, निंदात्मक, गर्हात्मक, निंदेचा, निर्भर्त्सना करणारा. २ *satirical* उपरोधिक.

Inveigh ( in-vā' ) [Lit. to *carry* or bring against, L. *inveho, invectum -in*, and *vehere*, to carry. See Vehicle.] *v. i. to attack with words, to rail against, to revile* (-वर) घसरणें -घुस्सा करणें, (-वर) तोंड सोडणें -टाकणें, तोंडसुख घेणें, (-च्या) नांवानें बोंबा मारणें -शंख करणें, निंदा *f* -निर्भत्सना *f* -कुत्सा *f* -गर्हा *f* -गर्हणा *f* -करणें.

Inveigle ( in-vē'gl ) [ Ety. dub.; probably a corr. of Fr. *aveugle*, blind -L. *ab*, without, *oculus*, the eye ;' therefore perhaps (lit.) 'to hoodwink.' ] *v. t. to entice, to seduce* फुसलावणें, भुलथाप देणें, फुसलावून -भुलथाप देऊन नेणें, मोह *m.* भूल *f* -भुरळ -भुलवण *f.* पाडणें -घालणें -घालून नेणें, प्रतारणा *f.* करणें *g. of o.* Inve'igled *pa. t. & p. p.* Inve'iglement *n. an enticing* फुसलावणें *n*, भुलथाप देणें *n.* २ *an enticement* फुसलावण *f*, फुसलावणी *f*, भुलवण *f*, भुलवणी *f*, भुलथाप *f*, प्रलोभन *n*, प्रतारणा *f*, वंचना *f*, मोह *m.* Invei'gler *n.* फुसलावणारा, भूलथाप देणारा.

Invent ( in-vent' ) [ Lit. *to come upon*; Fr. -L. *invenio, inventum -in*, upon, and *venire*, to come. याचा मूळ अर्थ '-शीं येणें, मिळणें, सांपडणें, हातीं लागणें' असा आहे. ] *v. t. to find out, to devise, to contrive* (कल्पनेनें) नवीन शोध काढणें -लावणें, (नवीन) शोधून काढणें, (नवा) रचणें, (-ची) रचना *f* -घटना *f* -योजना *f.* करणें, युक्ति *f* -कल्पना *f.* काढणें *g. of o.*, कल्पनेनें (यंत्रें वगैरे) नवीन बनवणें -करणें. २ *to fabricate, to forge* (कुभांड &c.) रचणें, पदरचा रचणें, (खोटा) बनविणें, खोटा करणें -रचणें, बगलेंतून -खांकेंतून -खिशांतून काढणें (*fig*). Invent'ed *pa. t. & p. p.* शोधून काढलेला, शोध लावलेला, घटित, निर्मित, रचित, कल्पित, क्लृप्त. २ रचलेला, बनावट, खोटा, बगलेंतून काढलेला. Invent'er *n.* See Inventor. Invent'ing *pr. p. & v. n.* शोधक, कल्पक, &c. Inven'tion *n. -the act.* (a) नवा शोध लावणें *n.* (b) रचणें *n.* २ *-the state* (a) *that which is invented, contrivance* नवी कल्पना *f*, नवीन -नवा शोध *m*, नवी क्लृप्ति *f*, सृष्टि *f*, रचना *f*, योजना *f*, निर्मित कला *f*, नवें यंत्र *n* इ० ३ (*Shakes.*) *thought or idea* उपायज्ञान *n*, कल्पना *f.* ४ *a fabrication, a device, a fiction, a forgery* कुभांड *n*, थोतांड *n*, बालंट or बलांट *n*, मिथ्या रचलेली गोष्ट *f*, कूटघटना *f.* ५ *power or faculty of inventing, ability displayed by any invention* कल्पकशक्ति *f*, निर्माणशक्ति *f*, योजकता *f*, कल्पकता *f*, कल्पनाशक्ति *f*, कल्पनाचातुर्य *n.* [OF ONE'S OWN I. स्वकपोलकल्पित. INVENTIONS AND DEVICES कळाकुसरी *f. pl.*] Invent'ive *a. able to invent, ready in contrivance* कल्पक, कल्पनाचतुर, कल्पज्ञ, युक्त्या, युक्तिवान्, युक्तिबाज, निर्माणकुशल, करामती, हिकमती, उपायज्ञ. Invent'ively *adv.* Invent'iveness *n.* शोधक-बुद्धि *f*, कल्पकशक्ति *f*, कल्पनाचातुरता *f.* Invent'or *n. one who finds out something new* नवीन शोध लावणारा, शोधक, कल्पक, योजक, निर्माता, स्रष्टा, नवी कल्पना काढणारा.

Inventory ( in'ven-tor-i ) [ Fr. *inventaire* -L. *inventarium*, a list of the *things found.* See Invent.] *n. a catalogue of furniture, goods, &c.* (मालाचें) टिपण *n*, टीप *f*, याद *f*, यादी *f*, फेरिस्त *n.* I. *v. t. to make a catalogue of* (-चें) टिपण *n* -टीप *f* -यादी *f.* &c. करणें -बनविणें.

Inverse ( in-vėrs' ) See under Invert.

Invert (in-vėrt') [L. *inverto, inversum -in, & vertere*, to turn. See Verse. ] *v. t. to turn upside down* उलटा सुलटा करणें -फिरविणें, उरफाटा करणें, मागचा पुढें करणें, विपर्यस्त करणें, अनुक्रम फिरविणें *g. of o.*, व्युत्क्रम *m* -व्यतिक्रम *m.* करणें *g. of o.* २ (*chem.*) *to reverse* पालटणें, उलट रूप देणें, व्युत्क्रम करणें. I. *v. i.* (*chem.*) *to undergo inversion* ( as sugar ) उलट रूप घेणें. Invert'ed *pa. t. & p. p.* विपर्यस्त, विपरीत, प्रतीप, उलटापालटा, उलटासुलटा, उलटा केलेला, उलटा, व्यतिक्रांत, व्युत्क्रांत. Invert'edly *adv. in a contrary manner* विरुद्ध, विपर्यस्त रीतीनें, व्यतिक्रमपूर्वक, व्युत्क्रमानें, मागेंपुढें. Inverse' *a. inverted, in the reverse or contrary order* विपर्यस्त, विपरीत, व्युत्क्रमाचा, उलटा, उरफाटा, उफराटा, उलटासुलटा, व्यत्यस्त, व्यस्त. २ *opposite* विरुद्ध, उलटा. ३ *bot. inverted* उलट वळलेला, व्युत्क्रांत. ४ *math. opposite in nature or effect* व्युत्क्रांत, विपरीत, उलटा. [ I. CURVE विपरीतवक्र *n.* I. FIGURES विपरीत आकृति *f. pl.* I. *or* RECIPROCAL RATIO *or* PROPORTION व्यस्त प्रमाण *n*, उलट प्रमाण *n*, व्युत्क्रम-प्रमाण *n.*] I. *n.* व्युत्क्रम *m.* Inverse'ly *adv.* व्युत्क्रमानें, उरफाट्या क्रमानें, उरफाट्यानें, विपरीत क्रमानें, विपर्यानें, मागचा पुढें. २ *math.* उलटक्रमानें, व्युत्क्रमानें. [ I. PROPORTIONAL व्युत्क्रम -उलट -व्यस्त प्रमाणांत. ] Inver'sion *n. the act of inverting* उलटापालट करणें *n.* २ *the state of being inverted* उलटेपालटेपणा *m.* [ I. OF THE UTERUS, &c. गर्भाशय वगैरे पडून पिशवीसारखा उलटा होणें *n*, उद्वर्जन *m.*] ३ *a change of order or position* व्युत्क्रम *m*, व्यतिक्रम *m*, विपर्यय *m*, विपर्यास *m*, विपरीतपणा *m*, व्यत्यय *m*, व्यत्यास *m*, व्युत्क्रमण *n*, व्युत्क्रांति *f.* ३ *a change of the usual order of words and phrases* विपरीत रचना *f.* ४ *chem. the act or*

*process by which cane sugar under the action of heat or acids or ferments is broken or split up into grape sugar and fruit sugar* विपर्यसन *n*, विपर्यास *m*, व्युत्क्रमक्रिया *f*.

Invertebral, invertebrate ( in-vĕrt'e-bral, in-vĕrt'e-brāt ) [ L. *in*, not, and Vertebrate.] *a. without a vertebral column or backbone* पाठीचा कणा नसलेला (प्राणी), बिनकण्याचा. I. *n.* बिनकण्याचा प्राणी, कणा नसलेला प्राणी *m*.

Invest ( in-vest' ) [ L. *investio, –itum –in*, on, and *vestire*, to clothe. Cf. Sk. वसन, cloth.] *v. t. to put vesture on, to dress* (-वर) पोषाख चढविणें, (-ला) कपडे घालणें, कपडे नेसवणें, वस्त्रें घालणें, वस्त्रालंकृत करणें. २ ( R. ) *to confer, to give* (-ला) देणें, अर्पण करणें. ३ *to place in office or authority* अधिकार देणें, (अधिकारावर) स्थापना करणें, अधिकारयुक्त करणें, (अधिकाराचीं) वस्त्रें देणें -बहाल करणें. ४ *to adorn* शोभा आणणें -देणें, भूषित -विभूषित -सुशोभित करणें. ५ *to surround, to block up, to lay siege to* वेढणें, घेरणें, कोंडणें, (-ला) वेढा *m* -गराडा *m* -घेरा *m.* घालणें -देणें, परिवेष्टित करणें. ६ *to place, as property in business* धंद्यांत (भांडवल) घालणें, (लाभासाठीं -फायद्यासाठीं पैसा) धंद्यांत लावणें -घालणें -गुंतवणें -गुंतवून ठेवणें. Invest'iture *n. the act or right of investing or putting in possession* अधिकारदान *n*, प्रतिष्ठापन *n*, संस्कार *m*, अभिषेक *m*, दानाधिकार *m*. Invest'ment *n.* कपडे घालणें *n* -देणें *n*, अधिकार देणें *n.* २ *the act of surrounding or besieging* वेढा देणें *n* -घालणें *n*, गराडा घालणें *n.* ३ *a blockade* वेढा *m*, गराडा *m*, घेरा *m*. ४ *laying out money in* धंद्याकडे (केलेला पैशाचा) विनियोग *m*, (फायद्यासाठीं धंद्यांत) भांडवल घालणें *n* -गुंतवणें *n.* ५ *that in which anything is invested* (भांडवल गुंतवलेला) व्यवहार *m*, धंदा *m*.

Investigate ( in-vest'i-gāt ) [ L. *in*, & *vestigare*, to track.] *v. t.* ( *lit.* ) *to trace the vestiges or tracks of, to search into* (-चा) पत्ता लावणें, शोध -तपास काढणें, शोध *m* -सूड *m* -सुगावा *m*. काढणें -घेणें, (-चा) छडा लावणें, (-ची) चौकशी *f* -तपास *m* -शोध *m* -अन्वेषण *n* -विचारणा *f* -निर्णय *m* -निश्चय *m*. करणें, शोधणें, बारकाईनें तपासणें, नीट चौकसणें. I. *v. i. to pursue a course of investigation or study* शोध -तपास करणें-लावणें. Invest'igable *a. able to be searched out* शोधून काढण्याजोगा, तपास लागण्यासारखा, विचारणीय, विचारार्ह. Invest'igated *pa. t. & p. p.* Invest'igating *pr. p. & v. n.* Investiga'tion *n. the act of examining into* शोध -तपास -चौकशी &c. करणें *n.* २ *research, study* शोध *m*, अन्वेषण *n*, अन्वेषणा *f*, तपास *m*, चौकशी *f*, तपासणी *f*, परीक्षण *n*, विचारणा *f*, निर्णय *m*, निश्चय *m*, विचार *m*, परीक्षा *f*, वाजपूस *f*, वाजपुशी *f*. Invest'igative *a.* Same as Investigatory. Invest'igator *n.* पत्ता *m* -तपास *m.* लावणारा, अन्वेषक *m*. Invest'igatory *a. promoting investigation* शोधनोत्तेजक, शोध करण्यास उत्तेजन देणारा. २ *given to investigation* शोध करणारा, चौकशीचा, शोधनशील, शोधक.

Inveterate ( in-vet'ėr-āt ) [ Lit. *grown old*, –L. *in*, and *vetus, veteris*, old. See Veteran. याचा मूळ अर्थ 'फार दिवसांचा, जुना, म्हातारा' असा आहे.] *a. firmly established by long continuance, deep-rooted, violent* (फार काळ लोटल्यामुळें) पक्का बसलेला, कायम होऊन बसलेला, कट्टा, दृढमूल, बद्धमूल, दृढ, आंगीं खिळलेला, जुना, जुनाट, बहुत दिवसांचा, बहुकालिक. २ संवय लागलेला. [ To BECOME I. जडणें, आंगीं खिळणें -बसणें, जुनावणें, जखडणें. ] Invet'eracy *n. firmness produced by long use or continuance* दृढमूलता *f*, बद्धमूलता *f*, जुनाटपणा *m*, आंगीं जडलेलेपणा *m*, कट्टेपणा *m.* २ *malignity, spitefulness* बद्धवैर *n*, वैरानुबंध *m*. Invet'erately *adv.* Invet'erateness *n.* See Inveteracy.

Invidious ( in-vid'i-us ) [ L. *invidiosus –invidia*, envy. See Envy. ] *a. likely to provoke or incur ill-will or envy* मत्सरावह, मत्सरजनक, हेवा उत्पन्न करणारा -वाढविणारा, ईर्ष्याजनक, असूयाजनक, ईर्ष्योत्पादक, द्वेषजनक -वर्धक, असूयोत्पादक, असूयावर्धक. Invid'iously *adv.* मत्सरोत्पादक बुद्धीनें, द्वेषजनक बुद्धीनें, मत्सरानें, हेव्यानें. Invid'iousness *n.* द्वेषजनकता *f*, असूयोत्पादकपणा *m*, ईर्ष्याजनकत्व *n*, असूयाजनकत्व *n.* २ मत्सर *m*, हेवा *m*, मात्सर्य *n*.

Invigorate ( in-vig'or-āt ) [ L. *in*, in, and Vigour.] *v. t. to give vigour to, to strengthen, to give life and energy to* (-ला) ताकद *f.* -बळ *n* -शक्ति *f*. आणणें -देणें, (-ची) ताकद *f*. बळ *n* -शक्ति *f*- वाढविणें, ताकदवान् -बळवान् -सशक्त करणें, पुष्टि देणें -आणणें, बळकटी आणणें, बलवर्धन *n* -तेजोवृद्धि *f* -पुष्टीकरण *n*. करणें *g. of o.* Invig'orated *p. p.* पुष्ट केलेला, पुष्ट, ताकदवान्, बळवान्, &c. Invig'orating *pr. p.* पौष्टिक, पुष्टिद, वीर्यप्रद, बलवर्धक, ताकद आणणारा, उत्साहदायी. Invigora'tion *n.* (*the act*) ताकद देणें *n*, पुष्ट करणें *n.* २ ( *the state* ) पुष्टि *f*, ताकद *f*, बल *n*, शक्ति *f*, बलवर्धन *n*, पुष्टीकरण *n*, बलवृद्धि *f*, तेजोवर्धन *n.* Invig'orater *n.* पुष्ट करणारा *m*.

Invincible (in-vin'si-bl) [Fr. –L. *in*, not, & Vincible.] *a. incapable of being conquered, unconquerable* अजिंक्य, अजेय. २ *insuperable* (as habit) दुस्तर, अनिवार्य, जबरदस्त. Invincibil'ity, Invin'cibleness *n.* अजिंक्यपणा *m*, अजेयता *f.* २ अनिवार्यता *f.* Invin'cibly *adv.* अजिंक्यपणानें.

Inviolable ( in-vī'ōl-a-bl ) [ L. *in*, not, & Violable. ] *a. not capable of being profaned* अनपवित्रीकरणीय, अनतिक्रमणीय. २ *uninjured, undefiled, uncorrupted*

अदोष्य, अबाध्य, अपकारायोग्य, अनपकार्य, अबाधनीय, अबाधित. ३ *not capable of being broken* अभंग, अलंघ्य, अखंड, अबाध, मोडण्यास अशक्य. Inviolabil'ity, Invi'olableness *n.* अनपवित्रीकरणीयता *f.* अलंघ्यता *f.* अनतिक्रमणीयता *f.* २ अबाधता *f.* अबाधनीयता *f.* अनपकार्यता *f.* ३ अभंगपणा *m.* अखंडनीयता *f.* Invi'olably *adv.* Invi'olacy *n.* अनुल्लंघनीयता *f.* Invi'olate,-ed *a. not violated, broken, or injured* अलंघित, अखंड, अभंग, अबाधित, अपकार न झालेला, सुरक्षित. २ *chaste, pure* स्वच्छ, विमल, शुद्ध, अदूषित. Invi'olately *adv.* Invi'olateness *n.* अखंडपणा *m.* &c.

Inviscate ( in-vis'kāt ) [ L. *in*, into, & *viscus*, the mistletoe. ] *v. t.* ( R. ) *to entangle with glutinous matter* चिकटवणें, डकवणें, चीक लावणें.

Invisible ( in-viz'i-bl ) [ L. *in*, not, and Visible. ] *a. not visible, incapable of being seen* अदृश्य, दर्शनातीत, अगोचर, अंतर्हित, तिरोहित, परोक्ष, असाक्षात्, नयनविषयातीत, अचाक्षुष ( as evidence ). I. *n. an invisible person or thing* अदृश्य वस्तु *f* -गोष्ट *f.* २ ( *esp.* ) *God, the Supreme Being* असाक्षात् ईश्वर *m*, परमेश्वर *m*, देव *m.* ३ ( *Eccl. Hist.* ) ख्रिस्ताची एकूळ्केलिया दृश्य नाहीं असें प्रतिपादन करणारा, दृश्यताविरोधी. Invisibil'ity, Invis'ibleness *n.* अदृश्यता *f*, अदृश्यपणा *m*, परोक्षता *f*, अप्रत्यक्षता *f.* Invis'ibly *adv.* अदृश्यपणानें, परोक्ष, अप्रत्यक्षपणानें.

Invite ( in-vīt' ) [Fr. –L. *invitare*, to ask, request.] *v. t. to ask, to summon* आमंत्रण *n* -निमंत्रण *n* -पाचारण *n.* करणें, आमंत्रण करणें -देणें, बोलावणें, निमंत्रणें, अभ्यर्थना करणें. २ ( *post.* ) *to allure, to attract, to tempt* (-चें) मन ओढणें -ओढून घेणें, (-चें) चित्त आकर्षण करणें, मोह -भूल पाडणें -घालणें. Invita'tion *n.* –*the act.* आमंत्रण -पाचारण &c. करणें *n.* २ *solicitation, the requesting of a person's company* आमंत्रण *n*, निमंत्रण *n*, पाचारण *n*, बोलावणें *n.* ३ *a written or printed message by which one is invited* आमंत्रणपत्रिका *f* -चिठ्ठी *f*, निमंत्रणचिठ्ठी *f* -पत्रिका *f.* ४ (R.) *allurement* मोह *m*, भूल *f*, भुलावण *f.* Invi'tatory *a. using or containing invitations* निमंत्रणात्मक, (देवास) पाचारण करणारा; as, "The I. psalm." I. *n. the invitatory song or a part of it used in worship* परमेश्वराला पाचारण करणारें गीत *n.* Invit'ed *a.* आमंत्रित, निमंत्रित, पाचारित, बोलावलेला. २ आकृष्टचित्त, प्रलोभित, मोहित. Invit'er *n.* आमंत्रण -निमंत्रण &c. करणारा. Invit'ing *pr. p.* बोलावणारा. २ चित्ताकर्षक, मोहक. Invit'ingly *adv.* Invit'ingness *n.*

Invocate ( in'vo-kāt ) [See Invoke.] *v. t. to invoke, to implore* (-चा) धांवा करणें, (येण्याकरितां) आवाहन करणें, (-ला काकळुतीनें) हांक मारणें, प्रार्थना करणें. Invoca'tion *n.* ( *the act.* ) धांवा करणें *n*, &c. २ *earnest and solemn entreaty* धांवा *m*, काकळुतीची प्रार्थना *f*, नामोच्चारण *n*, नामग्रहण *n*, नामस्मरण *n*, नांव घेणें *n.* In'vocatory *a.* धांवा करणारा.

Invoice ( in'vois ) [ Prob. a corr. of *envois*, English *pl.* of Fr. *envoi*, things sent. See Envoy.] *n.* ( *com.* ) *a written document of the particulars of merchandise shipped or sent to a purchaser with the value or price and charges annexed* मालाची (जात, किंमत, वजन, हेल वगैरे सविस्तर माहितीची) यादी *f* -पट्टी *f*, बीजक *n*, भरत्या *m* ( *Guj.* ). I. *v. t.* (खरेदीदारास पाठविलेल्या) मालाची पट्टी -यादी तयार करणें. २ *to show in the invoice* मालाच्या पट्टींत -यादींत दाखविणें -घालणें. In'voiced *a.* पट्टींत दाखविलेला. In'voicing *pr. p.* & *v. n.*

Invoke ( in-vōk' ) [Fr. –L. *in*, on, & *vocare*, to call, conn. with *vox*, *vocis*, voice. Cf. Sk. वचः, speech.] *v. t. to call on for aid or protection, to summon, to call in prayer* (-चा) धांवा करणें, नांव घेणें, नामस्मरण-नामोच्चार -स्मरण -आवाहन -करणें *g. of o.*, प्रार्थना करणें, प्रार्थणें. [ To I. BLESSINGS दुवा *m* -वरें *n.* मागणें. ] Invoca'tion *n.* धांवा *m*, प्रार्थना *f*, स्तवन *n*, नामस्मरण *n*, &c. Invok'ed *p. p.* धांवा केलेला; प्रार्थित, स्तवित, आहूत. Invok'er *n.* धांवा करणारा. Invok'ing *pr. p.* & *v. n.*

Involuntary ( in-vol'un-tar-i ) [ L. *in*, not, & Voluntary. ] *a. not having the power of will or choice* अस्वाधीन, अस्वेच्छ, इच्छास्वातंत्र्य नसलेलें, स्वेच्छेप्रमाणें वागण्यास असमर्थ. २ *not under the power or influence of the will* अनैच्छिक, इच्छेबाहेरचा, इच्छाबाह्य, अस्वेच्छाजात, स्वेच्छेप्रमाणें न होणारा; as, "I. movements." ३ *not done willingly* इच्छेविरुद्ध, गैरखुषीचा, नाखुषीचा, असंतोषाचा; as, "I. submission." Invol'untarily *adv. not intentionally or willingly* अनिच्छापूर्वक, अबुद्धिपूर्वक, नाखुषीनें, असंतोषानें, सुखासमाधानावांचून. Invol'untariness *n.* अस्वाधीनता *f*, इच्छास्वातंत्र्यशून्यता *f*, &c. २ अनैच्छिकता *f*, अबुद्धिपूर्वकता *f*, अज्ञानपूर्वकता *f*, इच्छाबाह्यता *f.* ३ गैरखुषी *f*, नाखुषी *f*, असंतोष *m.*

Involute, -ed ( in'vo-lūt, -ed ) [ See Involve. ] *a.* ( *bot.* ) *rolled spirally inward* अंतर्वेलित. २ *math.* अनवल्लूत, वक्रकेंद्रिक. See the word Mathematics.

Involution ( in-vo-lū'shun ) See under Involve.

Involve ( in-volv' ) [ Fr. –L. *involvere* –*in*, upon, & *volvere*, to roll. ] *v. t. to roll or fold up* गुंडाळणें, लपेटणें. २ *to envelop completely, to cover* ( as in darkness) वेढणें, वेष्टित करणें, वेष्टणें, झांकून टाकणें. ३ *to complicate or make intricate* गोवणें, गुंतवणें, गुंताडा *m* -गुंतागूत *f.* करणें, गुरफटवणें, गुंतवळ -सुताडें करणें *g. of o.* ४ *to connect with something as a natural or logical consequence or effect* (कार्यकारणसंबंधानें) जोडणें. (b) *to imply* गर्भित -ध्वनित करणें. ५

*to envelop as in debt* (कर्जांत) बुडविणें, गोंवणें, गळा गोंवणें *g. of o.* ६ *to engage thoroughly, to occupy* (as in study) मग्न -गर्क -करणें, चूर असणें *in. con. with* आंत *of o.* ७ *to unite* (झांकून) जोडणें, मिळविणें. ८ *math. to raise a quantity to any assigned power* घात करणें, घातकर्म करणें. Involved' *p. p.* गुंडाळलेला, लपेटलेला. २ वेष्टित, आवृत. ३ (as meaning) ध्वनित, फलित, गर्भित, उपलक्षित. (b) (as a sentence or style) दूरान्वयाचा, दूरान्वयी. ४ गोंवलेला, गुंताड्याचा, गुंतलेला, गुंतागुंतीचा. [To BE I. सांपडणें, (-आंत) अडकणें, गुरफटणें.] Involv'ing *pr. p. & v. n.* Involu'tion *n. –the act.* गुंडाळणें *n*, लपेटणें *n*, &c. २ (*the state*) *complication* गुंताडा *m*, गुंतागुंत *f*, गुंता *m*, गोंधळ *m.* [I. OF SPEECH लपेट *f*, लपेटी *f*.] ३ *that in which anything is involved, envelope* आवेष्टन *n*, वेष्टन *n.* ४ (*math.*) *multiplication of a quantity by itself a given number of times* घात *m*, घातकर्म *n*, घातक्रिया *f*, सवर्गीकरण *n*. ५ (*med.*) *the return of an enlarged part or organ to its normal size* प्रतिक्रांति *f*, अंतःक्रांति *f* (as oppo. to उत्क्रमण *n*, or उत्क्रांति *f*), मागें हटणें *n*, पूर्वस्थितीप्रत जाणें *n*, पूर्वस्थितिप्राप्ति *f.*

Invulnerable (in-vul'nér-a-bl) [L. *in*, not, & Vulnerable.] *a. incapable of being wounded or of receiving injury* अभेद्य, वज्रवत्, वज्रासारखा, वज्राप्रमाणें कठीण, (said of a person) वज्रदेही, वज्रांगी, वज्रशरीर. २ *unanswerable, irrefutable* निरुत्तर, खोडून टाकतां न येणारा, खोडण्यास अशक्य, बेमालूम; as, "An I. argument." Invulnerabil'ity, Invul'nerableness *n.* अभेद्यता *f*, अछेद्यता *f*, क्षतानर्हता *f.* Invul'nerably *adv.*

Inwall (in-wal') [E. In and Wall.] *v. t. to inclose or fortify as with a wall* (-च्या) सभोंवतीं भिंत घालणें, (भिंत घालून) मजबूत करणें.

Inward (in'ward) [A. S. *inneweard –in*, & *ward*, direction.] *a. inner, interior* आंतला, आंतल्या बाजूचा -कडेचा, आंतील, आंतर, आंतरिक, अंतरस्थ, अंतर्वर्ती. २ *seated in the mi[nd,] heart, soul &c.* मनांतील, अंतरंगांतील, पोटांतील, [हृ]दयांतील, मनाचा, अंतस्थ; as, "I. beauty." [TRUTH *or* PURITY IN THE I. PARTS अंतःशुद्धि *f*, अंतःशौच *n*. I. LETTERS, PAPERS &c. आवक कागदपत्र *m. pl.*] I. *n.* (esp. in the *pl.*) *the viscera or intestines* आंतडीं *n. pl.* In'wards *adv. toward the inside* आंतल्या बाजूस -कडेस -आंगास, आंत. २ पोटांत, मनांत, हृदयांत, अंतःकरणांत, आंत. In'wardly *adv.* आंतून, आंत. २ *in the heart, mind &c.* मनांतून, पोटांतून, अंतःकरणांतून, अंतरंगापासून. In'wardness *n. internal or true nature or state* अंतःस्वभाव *m*, अंतःस्थिति *f*, आंतली स्थिति *f.* २ *heartiness, earnestness* पोटाग *f*, कळकळ *f.*

Inweave (in-wēv') [E. In and Weave.] *v. t. to weave in or together, to interlwine* एकत्र विणणें, विणून भरणें -मिळवणें.

Inwrap (in-rap') [E. In and Wrap.] *v. t.* (written also *enwrap*) *to cover by wrapping* गुंडाळणें, वेष्टणें, गुंडाळून ठेवणें. २ *to perplex, to involve in difficulty* अडचणींत घालणें, गुरफटवणें, संकटांत पाडणें.

Inwreathe (in-rēth') *v. t. to encircle as with a wreath* (-ला) माळ घालणें -बांधणें, मालावेष्टित करणें.

Inwrought (in-rawt') *p. p. a. wrought or worked in or among other things, worked into any fabric so as to form a part of its texture* जडित, भरित, खचित.

Iodine (ī'o-din) [Gr. *ioeides*, violet-coloured *–ion*, a violet, & *eidos*, form.] *n. one of the elementary bodies in Chemistry so named from the violet colour of its vapour* 'अद' नांवाचें मूलतत्त्व *n.* [आंगाला दूषित रक्ताच्या ठिकाणीं Liniment Iodine लावलें असतां तें दूषित रक्त खाऊन टाकतें म्हणून 'अद' हा शब्द Iodine ला आम्हीं योजिला आहे. See the word Chemistry.]

Iodoform (ī-od'ō-fawrm) [E. *iodo*, of iodine, and *formyl*, a chemical radical $HCI_3$.] *n. a medicinal compound of hydrogen, carbon and iodine* पूतिनाशक उग्रट वासाचें आयडोफार्म नांवाचें इंग्रजी औषध *n.* जखमा बऱ्या करून भरून काढण्याकरितां याचा उपयोग करितात.

Iota (ī-ō'ta) [Gr. the smallest letter in the alphabet, corresponding to the English *i*. See Jot.] *n. a jot, a very small quantity or degree* अणु *m*, अणुमात्र *n*, लव *m*, लवमात्र *m*, कण *m*, बिंदु *m*, बिंदुमात्र *m*, लवलेश *m*, तिलमात्र *m.*

Irascible (ī-ras'i-bl) [Fr. –L. *irascor*, to be angry.] *a. susceptible of anger, easily provoked* क्रोधशील, शीघ्रकोपी, रागीट, तापट, संतापी, तामसी, पित्तप्रकृतीचा. Irascibil'ity *n.* Iras'cibleness *n.* क्रोधशीलता *f*, शीघ्रकोपिता *f*, रागीटपणा *m*, तापटपणा *m*, तामसीपणा *m*, राग *m*, चिरड *f*, चीड *f.* Iras'cibly *adv.*

Ire (īr) [Fr. –L. *ira*, anger.] *n. anger* राग *m*, क्रोध *m*, कोप *m*, अतिसंताप *m.* Irate' *a.* क्रोधिष्ठ, कोपिष्ठ, रागीट. Ire'ful *a. full of ire or wrath* क्रोधान्वित, कोपान्वित, क्रोधिष्ठ, कोपिष्ठ, क्रोधी, क्रोधाळु, संतप्त &c. Ire'fully *adv.* क्रोधानें.

Iridectomy (iri-dek'tō-mi) [Gr. *iris*, *–ek*, out, & *temnein*, to cut.] *n. the act or process of cutting out a portion of the iris in order to form an artificial pupil* (कृत्रिम बाहुली बनविण्यासाठीं) डोळ्यांतील कनीनिकेच्या पडद्याचा (एक) तुकडा कापून काढण्याची शस्त्रक्रिया *f*, कनीनिकाच्छेदन *n* (क्रिया).

Iridium (i-rid'i-um) [L. *iris*, *iridis*, the rain-bow.] *n.* (*chem.*) *a rare metallic element of the same*

*group as platinum. It is silver-white, very hard and brittle. Its specific gravity is 22·4. Symbol Ir.* ऐंद्र *f.* इंग्रजी Iridium शब्दांत Iris ( म्हणजे इंद्रधनुष्य ) हा ल्याटीन धातु आहे. तेव्हां इंद्रधनुष्य शब्दांतील पूर्वपद इंद्र सर्व शब्दाचा प्रतिनिधि करून त्याचें 'ऐंद्र' हें विशेषण Iridium ला मराठी नांव आम्हीं योजिलें आहे. Chemistry शब्द पहा.

Iris ( ī'ris ) [ L. *iris*, the rainbow.] *n. the goddess of the rainbow* इंद्रधनुष्याची देवता *f.* २ *the rainbow* इंद्रधनुष्य *n.* ३ *an appearance resembling the rainbow* इंद्रधनुष्यासारखा देखावा *m.* ४ *anat. the contractile membrane perforated by the pupil and forming the coloured portion of the eye* डोळ्यांतील बाहुलीचा काळा पडदा *m*, कनीनिका *f*, नेत्रतारकामंडळ *n.* Irides'cent, I'risated, I'rised *a. coloured like the iris or rainbow* इंद्रधनुष्याच्या रंगाचा. I'rises *n. pl.* Irit'is *n.* कनीनिकादाह *m*, डोळ्यांतील बाहुलीच्या काळ्या पडद्याची सूज व दाह *m.*

Irish ( ī'rish ) [ Of Ireland.] *a.* आयर्लंडसंबंधीं. २ आयर्लंडांत उत्पन्न झालेला. I. *n.* आयरिश भाषा *f.* २ ( *pl.* ) आयरिश लोक *m. pl.*

Irk ( ėrk ) [ From a Teut. root found in A. S. *weorcsum*, painful.] *v. t. to weary, to trouble, to distress* ( now used only *impersonally* ) कंटाळा आणणें, दुःख -पीडा -त्रास देणें, दमवणें, शिणवणें, शीण आणणें, कठीण -अवघड वाटणें *in. con.* Irk'some *a. tedious* कंटाळवाणा, त्रासदायक, त्रासाचा, त्रासदायी, शिणवणारा, &c. Irk'somely *adv.* Irk'someness *n.* कंटाळवाणेपणा *m*, त्रासदायकपणा *m.*

Iron ( ī'urn ) [ A. S. *iren*, iron. ] *n. the most common and useful of the metals* लोखंड *n*, लोह *n*, आयस *n.* [ CAST I. बीड *n*, STEEL पोलाद *n*, तिखें *n.* WROUGHT I. शुद्ध केलेलें लोखंड *n.* GREEN SULPHATE OF I. हिराकस *m*, धातुशेखर *m*, पुष्पकाश *m*, नयनौषध *n.* I. FILINGS लोखंडाचा कीस *m.* I. ORE अशुद्ध लोखंड *n*, लोखंडाची माती *f.* COMMON PYRITIC I. ORE सुवर्णमुखी *f*, सुवर्णमाक्षिक *n*, विटमाक्षिक *n.* AN AYURVEDIC MEDICAL PREPARATION FROM THE RUST OF I. मंडूर *m.* MOUNTED WITH I. ( rings, tags, &c. ) लोहांगी. RUST OF I. कीट *n*, किटण *n*, गंज *m.* SMELTER OF I. धवड *m*, धावड *m*, लोहार *m*, लोहकार *m.* TIPPED or POINTED WITH I. अयोमुख. ] २ *an instrument or utensil made of iron* लोखंडाचें हत्यार *n*, लोखंडी भांडें *n*, लोखंडी दागिना *m*, लोखंडी सामान *n.* [SMOOTHING I. इस्त्री *f.*] ३ ( *pl.* ) *fetters, chains* बिड्या *f. pl.*, हातकड्या *f. pl*, पायकड्या *f. pl.*, कडींतोडे *m. pl.* (used ironically.) ४ *strength, inflexibility* सक्ति *f*, कडोरता *f*, अनमतेपणा *m*, क्रूरपणा *m*; as, "To rule with a rod of I." Iron *a. made or consisting of iron* लोखंडाचा, लोखंडी, लोहमय, लौह, लोहात्मक. २ *resembling iron in colour* लोखंडी रंगाचा; as, "I. blackness." ३ *firm, enduring* कणखर, काटक, लोखंडासारखा; as, "I. constitution." ४ *hard, severe* कडकपणाचा, कष्टाचा, दुःखाचा; as, "I. years of war." ५ *inflexible* न वांकणारा, माघार न घेणारा; as, "I. will." ६ *not to be broken* मोडतां न येणारा, जबर, गाढ; as, "I. sleep." I. *v. t. to smooth with an iron* इस्त्री करणें. २ *to shackle with irons* बिड्या घालणें, चतुर्भुज करणें. ३ *to furnish or arm with iron* लोखंडी पत्र्यानें किंवा पट्ट्यांनीं मढवणें -मजबूत करणें. as, I'ron-age *n.* लोहयुग *n.* ह्या काळीं लोक लोखंडी हत्यारें प्रथमच वापरूं लागले. २ *a period of cruel tyranny* जुलमाचा काळ *m.* I'ron-bound *a.* लोखंडी पत्र्यानें मढविलेला. २ *surrounded with rocks, rugged* खडकांनीं जखडलेला -वेष्टिलेला, खडकाळ. ३ *rigid, unyielding* मुळींच कमी जास्त न होणारा; as, "I. bound traditions." I'ron-clay *n.* अशुद्ध लोखंडाची माती *f.* I'roner *n.* इस्त्री करणारा. I'ron-fisted *a.* कंजूष, चिकट, कद्रू. Iron-found'er *n.* लोखंडाचें ओतकाम करणारा, ओतारी *m.* I.-found'ry *n.* लोखंडी ओतकामाचा कारखाना *m.* I.-fram'ed *a.* वज्रदेही, वज्रशरीर, लोखंडासारखें मजबूत शरीर असलेला. I'ron-heart'ed *a.* लोखंडासारखें कठीण हृदय असलेला, अयोहृदय ( *idio.* ), वज्रहृदय. I'roning *n.* इस्त्री करणें *n.* I.-mas'ter *n.* लोखंडी कारखान्याचा मालक *m*, लोखंडी कारखानदार *m.* I.-mong'er *n.* लोखंडी सामान विकणारा *m.* I. -mong'ery *n.* लोखंडी चिजा *f. pl.* -जिनसा *f. pl.* I. -mould *n. the spot left on wet cloth after touching rusty iron* लोखंडाचा डाग *m.* I. -sides क्रामवेलची मजबूत अश्वसेना *f*, वज्रदेही अश्वसेना *f.* I. -ware *n.* लोखंडी संसारोपयोगी सामान *n.* I.-work *n.* (एखाद्या इमारतीचा) लोखंडी कामाचा भाग *m.* २ लोखंडी कामाचा कारखाना *m.* ३ लोखंडी काम *n*, लोखंडी दागिना *m.* I. -wood *n.* नागचाफा *m*, नागचंपक *m*, नागकेशर *n.* I'rony *n.* लोखंडाचा, लोखंडासारखा. [ IRON ENTERED INTO HIS SOUL तो दुःखानें अतिशय विन्हल झाला. ] To have too many irons in the fire (आपणांस झेपणार नाहींत इतकीं) पुष्कळ कामें एकाच वेळीं करणें -अंगावर घेणें.

Irony ( ī'run-i ) [ Fr- -L. *ironia*, Gr. *eironeia*, dissimulation -*eiron*, a dissembler -*eirein*, to talk.] *n. a mode of speech conveying the opposite of what is meant* व्याजस्तुति *f*, व्याजनिंदा *f*, व्याजोक्ति *f*, विपरीतलक्षणा *f.* २ *a satire* उपरोध *m*, उपरोधिक भाषण *n.* [ THE I. OF FATE नशिबाचा विपरीत खेळ *m.*] I'ronic,-al *a.* उपरोधिक, व्याजस्तुतीचा, व्याजोक्तीचा.

Irradiate ( ir-rā'-di-āt ) [ L. *in*, on, & Radiate. ] *v. t. to dart rays of light upon or into, to adorn with lustre* प्रकाशित -उज्वलित करणें, ( -वर प्रकाश पाडून ) चकाकित करणें. २ *to adorn with shining ornaments* ( लखलखित अलंकार घालून ) शोभा आणणें. ३ *to animate with light or heat* ( प्रकाश

किंवा उष्णता देऊन) उत्साह -जीव आणणें. ४ *to illuminate the understanding* (बुद्धीला) तेजस्विता आणणें, (बुद्धि) तेजस्वी करणें, (बुद्धि) प्रकाशित करणें. I. *v. i. to emit rays, to shine* प्रकाश देणें, लखलखणें, चकाकणें. Irra'diance, Irra'diancy *n.* (-वर) प्रकाश पाडणें *n.* २ *beams of light emitted, splendour* प्रकाशकिरण *m. pl.*, प्रकाश *m*, चकचकाट *m*, लखलखाट *m*, चकाकी *f*, लकाकी *f*, दीप्ति *f*, द्युति *f*, कांति *f*, प्रभा *f.* Irra'diant *a.* प्रकाश देणारा, प्रकाशक. Irradia'tion *n.* प्रकाश देणें *n*, प्रकाशन *n.* २ *that which is irradiated* प्रकाशित वस्तु *f.* ३ *brightness* चकाकी *f*, लकाकी *f*, चकचकाट *m*, लकलकाट *m*, &c.

Irrational (ir-rash'un-al) [L. *in*, not, & Rational.] *a. void of reason or understanding* बुद्धिहीन, ज्ञानहीन, अजाण. [I. ANIMALS बुद्धिहीन प्राणी.] २ *contrary to reason, absurd* अयुक्तिक, अयुक्तिसिद्ध, वेडेपणाचा, बुद्धिविरुद्ध. ३ *math. not capable of being exactly expressed by an integral number, or by a vulgar fraction; surd* करणीगत *f.* Irrational'ity *n.* अजाणपणा *m*, बुद्धिहीनता *f.* २ बुद्धिविरुद्धता *f*, अयुक्तिकता *f.* ३ *math.* करणीपदता *f.* Irra'tionally *adv.*

Irreclaimable (ir-re-klām'a-bl) [L. *in*, not, and Reclaimable.] *a. incorrigible* पुन्हां ताळ्यावर -मार्गावर आणण्यास कठीण, पुरा बहकलेला, व्यर्थ -फुकट गेलेला, सुधारतां न येण्यासारखा, सुधारणातीत. Irreclaim'ably *adv.*

Irreconcilable (ir-rek-on-sīl'a-bl) *a. incapable of being brought back to a state of friendship* कायमचा बेबनाव झालेला, फिरून मैत्री संपादन करतां न येण्यासारखा, दुराराध्य. २ *inconsistent* परस्परविरुद्ध, परस्परविरोधी, विसंगत, संदर्भविरुद्ध, विसंवादी, मेळ न बसणारा. Irreconcil'ableness *n.* दुराराध्यता *f.* २ परस्परविरोध *m*, विसंगतता *f.* Irreconcil'ably *adv.*

Irrecoverable (ir-re-kuv'er-a-bl) *a. irretrievable, that cannot be regained* पुनरप्राप्य, पुनरलभ्य, पुन्हां -फिरून -परत न मिळणारा, हातांतून पार गेलेला, कायमचा गमावलेला -हरवलेला. Irrecov'erableness *n.* पुनरप्राप्यता *f*, पुनरलभ्यता *f.* Irrecov'erably *adv.*

Irredeemable (ir-re-dēm'a-bl) *a. not redeemable, not subject to be paid at the nominal value* तंतोतंत भरून देतां न येणारा, भरपाई करतां न येण्याजोगा. Irredeemabil'ity *n.* Irredeem'ably *adv.*

Irreducible (ir-re-dūs'i-bl) *a. that cannot be reduced or brought from one form or state to another* फेरफार करतां न येण्यासारखा, कमी करतां न येण्यासारखा. [I. HERNIA पोटांत परत चढवितां न येणारा अंतर्गळ *m.*]

Irrefragable (ir-ref'ra-ga-bl) [Lit. *that cannot be broken or bent*, Fr. -L. *in*, not, *re*, backwards, and *frag*, root of *frangere*, to break.] *a. that cannot be refuted or overthrown, unanswerable* निरुत्तर, विनतोड, बेमालूम, अखंडनीय, खंडन करण्यास -खोडून टाकण्यास अशक्य. Irrefragabil'ity *n.* निरुत्तरता *f*, अखंडनीयता *f.* Irref'ragably *adv.*

Irrefutable (ir-re-fūt'a-bl) *a. that cannot be refuted or proved false* विनतोड, खोटा पाडतां न येणारा. Irrefut'ably *adv.* विनतोडपणानें.

Irregular (ir-reg'ū-lar) [L. *in*, not, and Regular.] *a. not according to rule* नियमाबाहेरचा, नियमबाह्य, अनियत, बेकायद्याचा, कायद्याबाहेरचा, गैररीतीचा, गैरचालीचा, गैरमार्गाचा, अशास्त्र, विधिविरुद्ध, अविधि, अयथाशास्त्र, अयथाविधि, उत्सूत्र. २ *unnatural* सृष्टिक्रमाविरुद्ध. [AN I. DIET कुपथ्य, अपथ्य.] ३ *unsystematic* व्यवहारांत अनियमित -निष्काळजी, नियमाबाहेर वागणारा, अपद्धतशीर, पद्धतिबाह्य, (b) क्रमबाह्य, अक्रमिक. ४ *vicious* अनाचारी, असन्मार्गी, आडमार्गी, गैरचालीचा, गैरमार्गाचा, विपथगामी, अपथवर्ती, आडमार्गानें जाणारा. ५ (*gram.*) *departing from the ordinary rules in its inflection* अपवादक, निपातित, सूत्रबाह्य, नियमबाह्य. ६ *unequal* विषम, असम, उंचसखल, उंचनीच. Irregular'ity *n.* नियमबाह्यता *f*, अनियतता *f*, नियमातिक्रम *m*, नियमोल्लंघन *n*, अविधिता *f*, अशास्त्रता *f*, गैरशिस्तपणा *m.* २ अक्रम *m*, क्रमाभाव *m*, अव्यवस्था *f*, व्यत्यास *m.* ३ अनाचार *m*, अनाचरण *n*, गैरचाल *f*, गैरवर्तणूक *f*, कुपथगमन *n.* ४ उचनीचपणा *m*, उंचसखलपणा *m*, विषमता *f.* ५ अपवादकता *f.* Irreg'ularly *adv.* बेकायदा, कायदा सोडून, गैरमार्गानें, गैररीतीनें. २ क्रम सोडून, क्रमावांचून.

Irrelative (ir-rel'a-tiv) *a. not relative, unconnected* असंबंधी, संबंधरहित, निराळा. Irrel'atively *adv.*

Irrelevant (ir-rel'e-vant) *a. not relevant, not bearing directly on the matter in hand* अप्रस्तुत, अप्रकृत, अप्रासंगिक, प्रसंगाबाहेरचा, चालू विषयाबाहेरचा, इकडचा तिकडचा. [I. DISCOURSE आडकथा *f*, भाकडकथा *f*, आडरान *n*, इकडं तिकडं *n.*] Irrel'evancy *n.* अप्रस्तुतता *f*, अप्रासंगिकत्व *n*, प्रस्तुत विषयाला सोडून असणें *n.* Irrel'evantly *adv.* प्रस्तुत विषयाला सोडून.

Irreligion (ir-re-lij'un) [Pref. *in*, not, & Religion.] *n. want of religion* धर्मौदासीन्य *n*, अधर्म *m*, अधर्मनिष्ठा *f*, धर्मलोप *m.* २ *impiety* देवनिंदा *f*, असाधुता *f*, अभक्ति *f.* Irrelig'ious *a.* अधार्मिक, अधर्मनिष्ठ, धर्महीन, दुष्ट, पापी. Irrelig'iously *adv.* अधर्मानें.

Irremediable (ir-re-mē'di-a-bl) *a. not remediable, that cannot be remedied or redressed* उपाय करितां येत नाहीं असा, परिहार किंवा प्रतिकार करितां येत नाहीं असा, निरुपायाचा, अनुपाय, उपायहीन, उपायातीत, उपायाबाहेरचा, अचिकित्स्य, दुःसाध्य, वेड्यलाजाचा, अपरिहार्य, परिहाराशक्य, उपायाशक्य, प्रतिकाराशक्य. Irreme'diableness *n.* निरुपायता *f*, उपायराहित्य *n*, असाध्यता *f.* Irreme'diably *adv.*

Irremissible ( ir-re-mis'i-bl ) *a. not remissible, not to be remitted or forgiven* माफ करण्यास अयोग्य, क्षमानर्ह. Irremissi'bleness *n.* क्षमानर्हता *f.*

Irremovable ( ir-re-mōōv'a-bl ) *a. not removable, steadfast* दुसरीकडे नेण्यास अशक्य, अपरिहार्य, परिहाराशक्य, अचल, स्थिर, स्थायी. Irremov'ableness, Irremovabil'ity *n.* अपरिहार्यता *f.* Irremov'ably *adv.*

Irreparable ( ir-rep'ar-a-bl ) *a. not reparable* सुधारण्यास -सुधारायास अशक्य, बेहूलाजाचा, उपायाबाहेरचा. २ *that cannot be recovered* भरून न मिळणारा, भरून न येणारा. Irrep'arableness *n.* सुधारण्याची अशक्यता *f,* भरून येण्याची अशक्यता *f.* Irrep'arably *adv.*

Irrepealable ( ir-re-pēl'a-bl ) *a. not repealable* रद्द करितां न येणारा.

Irreprehensible ( ir-rep-re-hens'i-bl ) *a. not reprehensible, that cannot be blamed* दोष देतां न येणारा, निर्दोष, अदूषणीय, अनिंद्य, अदोषपात्र. Irreprehens'ibleness *n.* अदूषणीयता *f.* Irreprehens'ibly *adv.*

Irrepressible ( ir-re-pres'i-bl ) *a. not repressible, not to be restrained* दडपतां येत नाहीं असा, आवरतां येत नाहीं असा. Irrepres'sibly *adv.*

Irreproachable (ir-re-prōch'a-bl) *a. not reproachable, free from fault* दूषण देतां येत नाहीं असा, अनिंद्य, अनिंदनीय, निर्दोष, निष्कलंक. Irreproach'ably *adv.*

Irreprovable ( ir-re-prōōv'a-bl ) *a. not reprovable, blameless* अनिंद्य, अदूष्य, अदूषणयोग्य, बिनठपक्याचा. Irreprov'ableness *n.* अदूष्यता *f.* Irreprov'ably *adv.*

Irresistance ( ir-re-zist'ans ) [ L. *in*, not, & Resistance. ] *n. want of resistance, passive submission* अप्रतिकार *m,* अनिवारण *n,* निमूटपणा *m.*

Irresistible ( ir-re-zist'i-bl ) *a. not resistible, not to be opposed with success* प्रतिकार करितां येत नाहीं असा, प्रतिकाराशक्य, अनिवार्य, अप्रतिकार्य, निवारणाशक्य, वारणाशक्य, दुर्वार, अबाधित. Irresisti'bleness, Irresistibil'ity *n.* प्रतिकाराशक्यता *f,* अनिवार्यता *f.* Irresist'ibly *adv.*

Irresolute ( ir-rez'o-lūt ) [L. *in*, not, & Resolute.] *a. not firm in purpose, not resolute, wavering* कच्च्या निश्चयाचा, अर्धवट निश्चयाचा, धरसोडीचा, धरसोड्या, अदढबुद्धि, अस्थिरबुद्धि, अस्थिरमनस्क, चंचलवृत्ति, फुटके मनाचा, डळमळीत, कच्चा. Irres'olutely *adv.* Irres'oluteness, Irresolu'tion *n. want of firm determination of purpose* चंचलबुद्धि *f,* कच्चा -अस्थिर निश्चय *m.*

Irresolvable ( ir-re-zolv'a-bl ) [ L. *in*, not, Resolvable. ] *a. that cannot be resolved* भाग किंवा अवयव निरनिराळे करतां न येणारा. ( b ) अविद्राव्य, द्रव करतां न येणारा.

Irrespective ( ir-re-spekt'iv ) [ Fr. –L. *in*, not and Respective.] *a. not having regard to* संबंध नसलेला, अनपेक्ष, निरपेक्ष, अपेक्षाहीन. Irrespect'ively *adv.* अपेक्षेवांचून, निरपेक्षतेनें, अनपेक्षतेनें.

Irresponsible ( ir-re-spons'i-bl ) [ L. *in*, not, and Responsible.] *a. not responsible or liable to answer for* बेजबाबदार, जबाबदारी नसलेला, बिनमोसब्याचा. Irresponsibil'ity *n.* बेजबाबदारपणा *m,* बेजबाबदारी *f.* Irresponsi'bly *adv.* बेजबाबदारपणानें.

Irrestrainable ( ir-re-strān'a-bl ) *a. not restrainable* आंवरतां येत नाहीं असा, अनिवार्य, दुर्निवार, अनावर.

Irretentive ( ir-re-tent'iv ) *a. not retentive* धारणाशक्तिहीन, धारणाहीन, अधारणाक्षम.

Irretrievable ( ir-re-trēv'a-bl ) *a. not retrievable, not to be recovered or repaired* पुन्हां न मिळणारा, अपुनःप्राप्य. २ *irremediable* निरुपाय, निरुपायाचा. Irretriev'ableness *n.* अपुनःप्राप्यता *f.* Irretriev'ably *adv.*

Irreverent ( ir-rev'ér-ent ) *a. not reverent, proceeding from irreverence* अनादराचा, अनादरबुद्धीचा, अनादरकारी, अनादरबुद्धि, अपमानकारी, अवज्ञाकारी, पूज्यबुद्धि नसलेला, अपूज्यबुद्धीचा. Irrev'erence *n. want of reverence or veneration* अनादर *m,* अवज्ञा *f,* अनादरबुद्धि *f.* २ *want of due regard for the character and authority of the Supreme Being* अपूज्यभाव *m,* अपूज्यबुद्धि *f.* Irrev'erently *adv.*

Irreversible ( ir-re-vérs'i-bl ) *a. not capable of being made to run or turn back* मागें -परत वळवितां न येणारा; as, "I. engine." २ *not reversible, that cannot be recalled or annulled* रद्द करितां येत नाहीं असा, फिरवितां येत नाहीं असा, अपरावर्तनीय, अपरावर्त्य, अनिवर्तनीय, लोपाशक्य, अलोप्य. Irrevers'ibleness *n.* अपरावर्तनीयता *f.* Irrevers'ibly *adv.* फिरवितां येत नाहीं असा *decl.*, उलटतां येत नाहीं असा *decl.*

Irrevocable (ir-rev'o-ka-bl) *a. that cannot be revoked or repealed* परत घेतां -रद्द करितां येत नाहीं असा, वज्रलेप, अनन्यथाकरणीय. Irrev'ocableness *n.* अनन्यथाकरणीयता *f.* Irrev'ocably *adv.*

Irrigate ( ir'i-gāt ) [ L. *in*, upon, & *rigare*, to wet; akin to E. *rain*. ] *v. t. to water, to moisten* पाणी घालणें, भिजवणें. २ (*esp.*) *to cause water to flow upon* (पाट काढून) पाणी लावणें -देणें, पाटाच्या -कालव्याच्या पाण्यानें भिजविणें, प्रणालिकासिंचन करणें. Ir'rigated *pa.t.* & *p.p.* Irriga'tion *n. the act of watering lands artificially* पाट सोडणें *n,* कालवे काढणें *n,* पाटाचें -कालव्याचें पाणी देणें *n* -लावणें *n,* प्रणालिकासिंचन *n.* By [ Irrigation department पाटबंधाऱ्याचें खातें *n.* By I. (raised, &c.) आडव्या पाण्यानें. Raised by I. आडव्या पाण्याचा. Requiring I. (grain) पाणभरा or पाणीभरा. Scuttle used in I. झेला *m.* Water ( of rivers, tanks, or wells ) employed in I. आडवें पाणी *n.*] २ *med.* विकारित भागावर पाण्याची धार धरणें *n,* अभ्युक्षण *n.* Irrig'uous *a.* ओला.

Irritate ( ir'i-tāt ) [ L. *irrito, –atum*, prob. freq. of *irrire*, to snarl, as a dog. ] *v. t. to make angry, to provoke, to annoy, to vex* चिडवणें,(-ला) चीड आणणें, राग आणणें, चिडीस -चिढीस आणणें -नेणें, चिथावणें, खिजावणें or खिजवणें, खवंडाळी करणें. *g. of o.* २ *physiol. to stimulate* क्षुब्ध करणें, चिडविणें, उत्तेजित करणें, ( आकुंचनमूलक ) क्षोभ करणें. ३ *med. to fret* ( as a wound, skin, &c. ) चिडवणें, खाजवणें, खाजवून लाल करणें, दाह -आग करणें *g. of o.*, डुळहुळवणें, संतापवणें, संतप्त करणें. Irritabil'ity *n. petulance, fretfulness* चिडखोरपणा *m*, रागिटपणा *m*, तिरसटपणा *m*, शीघ्रकोपित्व *n*, चिरड *f*, चीड *f*, चीढ *f*, क्रोधशीलता *f*, पित्तप्रकृति *f.* २ *physiol. the peculiar susceptibility to stimuli possessed by the living tissues, contractility* ( उत्तेजनपूर्वक ) क्षोभशीलता *f*, आकुंचनशीलता. ३ *med.* विकोपास -चिडीस गेलेली स्थिति *f*, प्रकोप *m*, आग *f*, संताप *m*, क्षोभ *m*. Ir'ritable *a. easily provoked* चिडखोर, चिरडखोर चिरडीखोर, चिडचिड्या, चिडरा, शीघ्रकोपी, कोपी, कोपिष्ठ. २ क्षोभक्षम. ३ *med.* हुळहुळा. Ir'ritableness *n.* Same as Irritability. Ir'ritably *adv.* चिडखोरपणानें. Irr'itant *a.* चिडविणारा, खिजवणारा, चीड आणणारा. २ *med.* क्षोभकारक, क्षोभजनक, क्षोभ -जाळ -डोंब उत्पन्न करणारा. I. *n. that which causes irritation* चीड आणणारी गोष्ट *f.* २ *med.* क्षोभजनक कारण *n* -वस्तु *f.* Irrita'tion *n. –the act.* खिजवणें *n*, खिजवणी *f*, चिडवणी *f.* २ *excitement, annoyance, provocation* चिरड *f*, चीड *f*, खिजापत *f*, संताप *m*, क्रोधावेश *m*, रागाचा भर *m*, संतप्तता *f.* २ *med. –the act.* चिडवणें *n*, क्षोभ करणें *n.* ( b ) *–the state.* (उत्तेजनपूर्वक) दाह *m*, संताप *m*. Ir'ritative, Ir'ritatory *a. tending to irritate* चीड आणण्याजोगा. २ *accompanied with or caused by irritation* दाहयुक्त, दाहजन्य,आग होणारा.

Irruption ( ir-rup'shun ) [ Fr.–L. *in*, into, & *ruptus p. p.* of *rumpere*, to break. ] *n. a breaking or bursting in* फुटून एकदम आंत येणें *n* -पडणें *n.* २ *a sudden invasion* धाड *f*, दौड *f.* Irrupt'ive *a. rushing suddenly in or upon* एकदम दौड *f* -हल्ला *m.* करणारा, एकदम बाहेर येणारा, एकदम आंत घुसणारा. Irrupt'ively *adv.*

Is ( iz ) [ A. S. *is*; L. *est* –Sk. अस्ति -अस्, to be. ] *third person sing. pres. of Be* आहे, असतो -असते -असतें.

Isagon ( ī'sa-gon ) [ Gr. *isos*, equal, & *gonia*, Sk. कोन, an angle. ] *n. geom. a figure having equal angles* समकोनाकृति *f.* Isagon'ic *a.* समकोनिक. I. lines ( *magnetism* ) समकोनिक रेखा *f. pl.*, समदिग्रेखा *f. pl.*, समबांक दर्शविणाऱ्या रेषा *f. pl.*

Ischiadic ( isk-i-ad'ik ), Ischiatic ( isk-i-at'ik ) [ Fr. –L. –Gr. from *is-chion*, the hip-joint. ] *a. relating to the region of the hip* कमरेच्या खवाट्यासंबंधीं.

Ischion, Ischium ( is'ki-on, -um ) [ L. ] *n. anat. seat bone, the huckle bone* कुल्ह्याचें हाड *n*, आसनास्थि *n.*

Ischuria, Ischury ( is'kū-ria,-ri ) [ L. *ischuria* –Gr. *ischein*, to hold, & *ouron*, urine. ] *n. a retention or suppression of urine* मूत्रावरोध *m*, मूत्रावष्टंभ *m.* Ischuret'ic *a. that relieves ischury* मूत्रावरोधनाशक. I. *n.* मूत्रावरोधनाशक औषध *n.*

Ish ( ish ) [ A suffix. ] *a suffix used to form adjectives from nouns and from adjectives.* It denotes: ( 1 ) *relation*; as, self*ish* स्वतःचा; ( 2 ) *resemblance*; as, boy*ish* मुलासारखा; ( 3 ) *similarity*; as, brut*ish* पशुतुल्य; ( 4 ) *diminution*; as, bitter*ish* कडुसर. In this last sense of *diminution*, the corresponding Marathi suffixes are सर, सा, वट or गट, ट, स, ( as bitterish कडुसर, largish मोठासा, blackish काळवट, greenish हिरवट, deepish खोलगट, yellowish पिंवळट, rawish हिरवस. The Sk. prefixes corresponding to English *ish* are आ, ईषत्. They apply to Sanskrit words; as, warm*ish* ओष्णम्, ईषदुष्ण. With *ish* as added to nouns and as conveying the sense of participation in any quality or character of the noun, correspond the affixes टा, आ, का, गळ; as thievish चोरटा, foolish वेडा, वेडका, वेडगळ.

Isinglass ( ī'zin-glas ) [ A corr. of Dut. *huizenblas –huizen*, a kind of sturgeon, *blas*, a bladder. ] *n. a glutinous substance chiefly prepared from the air-bladders of the sturgeon* ( स्टर्जनमाशाच्या पोटांतील वायूच्या पिशव्यांचा केलेला ) सरसासारखा चिकट पदार्थ *m*, स्टर्जनमासळीचा बलक *m.* हा खातात.

Islam ( iz'lām ) [ Lit. 'complete *submission to the will of God*,' from Ar. *islam –salama*, to submit to God.] *n. the Mohammedan religion* महमदी -मुसलमानी धर्म *m.* २ *the whole body of Mohammedans* मुसलमानी धर्माचे लोक *m. pl.*, महमदी धर्माचे अनुयायी *m. pl.* Is'lamism *n.* मुसलमानी धर्म *m.* Islamit'ic *a.*

Island ( ī'land ) [ M. E. *iland*, A. S. *igland –ig*, an island, and *land*, land.] *n. a tract of land surrounded with water* बेट *n*, टापू *m*, द्वीप *n.* २ *anything resembling an island, a large floating mass* बेट *n* ( *fig.* ), मोठा तरंगणारा ढीग *m*; as, "An I. of ice." ३ ( contemptuously ) बेटाड *n.* ४ ( in a river or inlet ) जूं *n*, जुयठें *n*, जुवें *n.* I. *a.* बेटाचा, द्वीप्य, द्वीपस्थ, द्विपासंबंधीं, द्वीपीय. I. *v. t. to cause to become or to resemble an island* बेटाचा आकार देणें, बेट होऊं देणें. २ *to furnish with an island or with islands* ( आंत ) बेट करणें; as, "To I. the deep." I'slander *n. the inhabitant of an island* बेटांतला

राहणारा, बेटकरी, द्वीपवासी, द्वीपस्थ. Isle *n.* (काव्यांत) बेट *n.* Isleman *n. an islander esp. an inhabitant of the Hebredies* बेटांतला राहणारा, (विशेषतः) हेब्रिडिस बेटांत राहणारा. Is'let *n. a little isle* लहान बेट *n,* उपद्वीप *n.*

Isobar (ī'sō-bär) [Gr. *Isos,* & Gr. *baros,* Sk. भार, weight. ] *n. a line connecting places where the height of the barometer reduced to sea level is the same, either at a given time, or for a certain period* (mean height), *as for a year* समभाररेखा *f,* समभाररेषा *f.* Isobar'ic *a.* समभाररेषेचा, समभाररेखीय. २ समभाररेषेनें दाखविलेला.

Isocheimal (ī-so-kī'mal) [Gr. *isos,* equal, & *cheima, ceimon,* winter. ] *a.* समशीतासंबंधीं, समहिमासंबंधीं. I'socheim *n. a line connecting places on the earth having the same mean winter temperature* समशीतरेखा *f,* समहिमरेखा *f.* Isochei'menal, *a.* Same as *isocheimal.*

Isochromatic (ī-so-krō-mat'ik) [ Gr. *isos,* equal & *chrōma,* colour. ] *a. opt. having the same colour* सावर्णिक, सवर्णिक, समवर्णिक, सवर्ण, एकाच रंगाचे, एकरंगी.

Isochronal (ī-sok'ron-al) [Gr. *isos,* equal, & *kronos,* time.] *a. performed in equal times* समकालावधिक, समकालावधि, सारख्याच वेळांत होणारे; as, "I. vibrations." Isoch'ronism *n.* समकालावधिकता *f.* Isoch'ronous *a.* Same as Isochronal.

Isoclinal, Isoclinic (ī-so-klī'nal,-klin'ik) [ Gr. *isos,* equal, & *klinein,* to incline. ] *a. having equal inclination or dip* समबांकरेखीय, समचुंबकरेखीय. Isoclinal lines (*magnetism*) समपातरेखा *f. pl.,* समबांकरेखा *f. pl.,* समचुंबकरेखा *f. pl.*

Isodiabatic (ī-so-diä-bat'ik) [ Gr. *isos,* equal, and *diabainein,* to pass through.] *a. phys. pertaining to the reception or the giving out of equal quantities of heat by a substance* (a) समतापग्राही, (b) समतापत्यागी.

Isodiametric (ī-so-dīä-met'rik) [ Gr. *isos,* equal, and *Diametric.* ] *a. developed alike in the directions of the several lateral axes* समव्यासिक.

Isodynamic (īso-dī-nam'ik) [Gr. *isos,* equal, and *dynamic,* which see.] *a. of, pertaining to, having, or denoting, equality of force* समशक्तिरेखीय. २ समबलसंबंधी.

Isogeotherm (ī-so-gē'ō-therm) [ Gr. *isos,* equal, *geo,* Sk. ज्या, earth, & *therme,* Sk. घर्म, heat. ] *n. phys. geog. a line or curved surface passing beneath the earth's surface through points having the same mean temperature* समभूतापरेखा *f.* Isogeother'mal, Isogeother'mic *a.* समभूतापरेखीय.

Isolate (ī'so-lāt, is'o-lāt) [ It. *isolare* –*isola* –L. *insula,* an island. ] *v. t. to place in a detached situation* (like an island), *to place by itself or alone* सुटा -वेगळा ठेवणें, सुटा करून ठेवणें, अलग करणें. 2 (*chem.*) पृथक् करणें. I'solated *pa. p.* सुटा ठेवलेला, सुटा, अलग, तुटक, वेगळा, निराळा. २ पृथक्कृत. Isola'tion *n.* (*the act*) अलग करणें *n.* २ *the state of being isolated* वेगळेपणा *m,* निराळेपणा *m.* I'solable *a.* पृथक्करणीय, पृथग्भावी, अलग करतां येणारा. Isola'tor *n.* पृथक् करणारा. २ पृथक्करणद्रव्य *n,* पृथक्कारक *n.*

Isologous (ī-sol'ō-gus) [ Gr. *isos,* equal, and *logos,* proportion. ] *a. chem. having similar proportions, similar relations, or similar differences of composition* समांतरश्रेणिक; as, "Ethane, ethylene, and acetylene, or their analogous compounds, form an I. series."

Isomeric (ī-so-mer'ik) [Lit. *having equal parts* –Gr. *isos,* equal, and *meros,* a part.] *a.* (*chem.*) *applied to compounds which are made up of the same elements in the same proportions, but having different properties* समावयविक. Isom'erus *a.* समावयव. Isom'erism *n.* समावयविकत्व *n.*

Isometric (ī-so-met'rik) [Gr. *isos,* equal, and *metron,* a measure. ] *a. having equality of measure* समपरिमाणाचा, समपरिमाणयुक्त, समपरिमाणित. I. projection तुल्यप्रतिभा *f,* समपरिमाणित प्रतिभा *f.* (Projection = प्रतिभा). Isomet'rical *a.*

Isomorphous (ī-so-morf'us) [ Gr. *isos,* equal and *morphe,* form. ] *a. having the same crystalline form but composed of different elements* समाकृतिक. Isomor'phic *n.* Same as above. Isomor'phism *n.* समाकृतिकत्व *n.*

Isopycnic (ī-so-pik'nik) [ Gr. *isos,* equal, and *pyknos,* dense. ] *a. phys. having equal density* समघनत्वाचा, समघनत्वासंबंधीं, समघन. I., *or* I. line *n. phys. a line or surface passing through those points in a medium, at which the density is the same* समघनत्वरेषा *f.*

Isosceles (ī-sos'e-lēz) [ Lit. 'having equal legs' –Gr. *isos,* equal, & *skelos,* a leg. ] *a. geom. having two equal sides* समद्विभुज, समद्विपार्श्व. An I. triangle समद्विभुजत्रिकोण *m.*

Isotheral (ī-soth'er-al) [ Lit. *having equal summers* –Gr. *isos,* equal, & *theros,* summer. ] *a. having the same mean summer temperature* समतापीय, समतापरेखीय. I. line समतापरेखा *f.*

Isothermal (ī-so-ther'mal) [ Fr. *isotherme* –Gr. *isos,* equal, & *therme,* Sk. घर्म, heat. ] *a. having an equal degree of heat* समोष्मिक, समोष्णदर्शक. I. line समोष्णरेखा *f,* समोष्णदर्शकरेखा *f.*

Isotonic ( ī-so-ton'ik ) [ Gr. *isos*, equal, & *tonos*, tone. ] *a. having equal tones* समस्वन, समस्वर, सारख्या आवाजांचा.

Isotropic ( ī-so-trop'ik ) [ Gr. *isos*, equal, & *tropen*, a turning –*tropein*, to turn. ] *a. phys. having the same properties in all directions* समस्थितिगत, साम्यस्थितिस्थायी, समस्थितिधर्मी. ( b ) ( *specif.* ) *equally elastic in all directions* समस्थितिस्थापक. Isot'ropy *n. phys.* साम्यस्थितिधर्मिता *f.* ( b ) समस्थितिस्थापकता *f.*

Israelite ( iz'ra-el-īt ) [ Gr. *Israelites* –*Israel*, Heb. *Yisrael*, contender, soldier of God–*sara*, to fight, and *El*, God. ] *n. a descendant of Israel or Jacob, a jew* इस्रायल, इस्राएलच्या वंशांतील मनुष्य *m*, ज्यू *m*, यहुदी *m*. Israelit'ic, Is'raelitish *a.* इस्रायल लोकांचा, यहुदी लोकांसंबंधी, इस्रायलचा, इस्राएली.

Issue ( ish'ū ) [ Fr. *issue* –L. *exire* –L. *ex*, out, & *ire*, to go. ] *n. the act of passing or flowing out, egress* निस्सरण *n*, निर्याण *n*, वहिस्सरण *n*, वहिःप्रवाह *m*; as, "The I. of water from a pipe." २ *the act of sending out or causing to go forth, delivery* हुकूम *m* -आज्ञा *f.* सोडणें *n*, (उपयोगासाठीं) बाहेर काढणें *n*; as, "The I. of an order from an officer, the I. of money from a treasury." ३ *that which passes, flows or is sent, out* ( उपयोगासाठीं -प्रसाराकरितां ) बाहेर काढणें *n*, प्रसिद्धि करणें *n*, प्रकाशन *n*, ( वर्तमानपत्राचा ) अंक *m*. ४ *progeny, offspring* संतान *n*, संतति *f*, बीज *n*, प्रजा *f*, अपत्यें *n. pl.* ६ *produce, profits* उत्पन्न *n*, फळ *n*. ६ *a discharge or flux* प्रवाह *m*. ७ *an artificial ulcer* पोत *m*. ८ *the final outcome or result* निकाल *m*, परिणाम *m*, निर्गत *f*, निर्गम *m*, गति *f*, उतारा *m*, वासलात *f*. ९ *a single material point of law or fact in dispute* कायद्याचा मुद्दा *m*, घडलेल्या गोष्टीसंबंधीं वाद *m*, वादविषय *m*. At issue वादग्रस्त. To join *or* take issues वाद करणें, वादांत उलट बाजू घेणें. Issue *v. i. to pass out, to flow out* वाहणें, निघणें, सुटणें, फुटणें. २ *to go out* बाहेर जाणें-पडणें. ३ *to proceed from* निघणें, उत्पन्न होणें, उपजणें, निपजणें, उगवणें, उद्भवणें. ४ *to close, to end* परिणाम *m* -शेवट *m* -अंत *m* -पर्यवसान होणें *g. of s.* ५ *to come to a point in law or fact on which parties join issue* ( वादाच्या ) मुद्द्याकडे येणें. I. *v. t. to send out, to put into circulation* चालू करणें, चलणीस -काढणें, व्यवहारांत -देवघेवींत -देण्यांत घेण्यांत घालणें -आणणें. २ *to send out, to deliver from authority* करणें, देणें, फरमावणें, सादर करणें, प्रसिद्ध करणें. ३ *to deliver for use, to give out from store* ( वापरण्याकरितां ) देणें-वांटणें. Is'suable *a.* बाहेर देण्यास -प्रसिद्ध करण्यास योग्य, &c. &c. Is'suance *n.* बाहेर देणें *n*, प्रसिद्ध करणें. Is'sueless *a.* असंतान, संततिविरहित, संतान नसलेला. Is'suer *n.* बाहेर देणारा. २ प्रसिद्ध करणारा. [ Issuing officer *n.* वारंट इत्यादि काढणारा. ].

Isthmus ( ist'mus ) [ L. –Gr. *isthmos*, a passage, an isthmus, allied to *ithma*, a step, from root of *eimi*, to go. ] *n. a neck of land connecting two larger portions of land* संयोगीभूमि *f.*

It ( it ) [ M. E. & A. S. *hit*, neut. of *he.* ] *pron. the thing spoken of or referred to* तें *n*, हें *n*. [Its *poss. pron.* त्याचें, त्याचा. Itself' *pron.* तें स्वतः. प्रथमेचें अनेक वचन They; षष्ठीचें अनेक वचन Their, Theirs; द्वितीयेचें अनेकवचन Them. ] २ कोणत्याही नपुंसकलिंगी नामाकरितां It हें 'प्रतिनिधि' म्हणून योजतात; जसें, "Here is a book, take *it* home." ३ केव्हां केव्हां it ह्याचा दर्शकसर्वनामार्थी उपयोग करतात; जसें, "*It* is I, be not afraid." मी आहें, भिऊं नको. अशा वेळीं कांहीं भाषांतरकार It चें मराठींत भाषांतर करीत नाहींत. ४ अकर्तृक क्रियापदाचा अनियमित कर्ता ह्या अर्थी it हें वापरतात; जसें, "*It* rains; *It* snows." ५ वस्तुस्थिति दाखविण्याकरितां it ह्याची योजना करतात; जसें, "How is *it* with you." ६ अकर्मक क्रियापदाचें किंवा नामसाधित क्रियापदाचें it हें 'कर्म' म्हणून वापरतात; जसें "To foot it."

Italics ( i-tal'iks ) [ From Italy, Italian. ] *n. pl. a kind of types which slope to the right* ( as used in these words, so called because first used by an Italian printer Aldo Manuzio, about 1500 ) इतालिक किंवा तिर्कस टाइप *m. pl.*, -वर्णमुद्रा *f. pl.*, Ital'icise *v. t. to print in Italics* इतालिक किंवा तिर्कस टाइपानें छापणें -लिहिणें.

Itch ( ich ) [ A. S. *gictha*, *gicenes*, an itching –*giccan*, to itch. ] *n. an uneasy irritating sensation in the skin* खाज *f*, कंड *f*, कंडू *m* or *f.* २ *an eruptive disease in the skin* ( caused by a parasitic animal ) खरूज *f*, खरूजेचा रोग *m*, खर्जू *f.* [ Dry I. सुखी खरूज *f.* I. *or* scab of cattle कथला *m*, कथली *f.* Goddess worshipped by persons having I. खरजाई *f.* Purulent *or* running I. ओली -वहाती खरूज *f.* To have the hands stiff with the I. हाताचे लाडू होणें. ] ३ *a constant teasing desire* खाज *f* ( *fig.* ), खवखव *f*, खुरखुर *f*, खुरखुरी *f*, खैरी *f*, खुरखुराट *m*, खुदखूद *f*, खुटखुटी *f*, वळवळ *f*, डुलडूल *f*, चेव *m*, कढ *m*, उकळी *f*, खुमखूम *f*, फुरण *n*, इष्क *m*, सळका *m*, सुंगा *m*. I. *v. i.* ( आंगाला ) खाज खाणें -सुटणें, खाजणें, कंडू उठणें, कंड खाणें. २ खाजणें, खवखव सुटणें, डुलडुलणें, लुवलुवणें or लवलवणें, वळवळणें, नक्षत्र पडणें. Itch'y *a. pertaining to itch* कंडूसंबंधीं, खाजेचा. २ खरजेचा. ३ *affected with itch* खरूज झालेला, कंड सुटणारा, कंड खाणारा, खरजुडा, खरजुला, खरज्या, कंडूरोगी. Itch'iness *n.* Itch'ing *pr. p.* & *v. n.* Sudden and violent I. खरजेचा खरका *m*. Violent and hot I. घायकूत *f* or *n*.

Item (i'tem) [L. *id*, that, akin to Sk. इत्थम्, thus.] *adv. likewise* अथच, अपरंच, आणखी, दुसरें. I. *n. a separate article or particular* कलम *n*, रकम *f*, बाब *f*, बाबत *f*, प्रकरण *n*. [AN EXTRA ITEM खेरीज कलम.] २ *a short article in a newspaper* थोडासा मजकूर *m*, चार ओळी *f. pl.*; as, "An I. concerning the weather." ३ *article* डाग *m*, डागिना *m*. I. *v. t. to make a note of* (-ची) नोंद *f* -करणें.

Iterate (it'ĕr-āt) [L. *iterare*, to repeat –L. *iterum*, again, cf. Sk. इतर, another.] *v. t. to utter a second time or many times* दुसऱ्यानें -फिरून बोलणें -सांगणें, पुनरुक्ति करणें, बजावणें, परतून बोलणें. २ *to do again* दुसऱ्यानें -फिरून करणें, पुनः पुनः करणें. Itera'tion, It'erance *n. repetition* फिरून -परतून बोलणें *n*, पुनरुक्ति *f*, पुनरावृत्ति *f*. It'erative *a.* पुनः पुनः बोलणारा, पुनः पुनः करणारा.

Itinerant (ī-tin'ĕr-ant) [L. *itinero*, to travel.–L. *iter, itineris –ire, itum*, to go.] *a. making journeys from place to place, travelling* फिरस्ता, फिरता, फेरेकरी, फेरीदार, फेरीवाला. I. *n. one who travels from place to place esp. a preacher* फिरता उपदेशक, फिरस्ता. Itin'eracy *n.* Itin'erancy *n.* (अधिकारपरत्वें -कामपरत्वें) प्रवास करणें *n*, फिरतीवर असणें *n*. Itin'erantly *adv.* Itin'erary *a. travelling, done on a journey* प्रवासाचा, फेरीचा, प्रवासांत केलेला, फिरतींत केलेला. I. *n. a book of travels* प्रवासवृत्तलेख *m*. Iti'nerate *v. i. to travel from place to place esp. for the purpose of preaching or lecturing* (उपदेश करण्याकरितां) गांवोगांव फिरणें, फेरी करणें, संचार *m*. करणें.

Its, Itself, See under It.

Ivory (ī'vo-ri) [O. Fr. *ivurie* –L. *ebur, eboris*, ivory –O. Egyptian *ebou*, Sk. इभ, an elephant.] *n.* Pl. I'vories. *the hard white substance composing the tusks of the elephant* हस्तिदंत *m*. [IVORY IS THE NAME ALSO USED FOR THE TUSKS OF THE SEA-HORSE.] २ *the tusks of the elephant* गजदंत *m*, हत्तीचे दांत *m. pl.* ३ *any carving executed in ivory* हस्तिदंती कोरींव काम *n*. ४ (*slang*) *teeth* दांत *m. pl.*; as, "To show one's *ivories*." I'vory *a.* हस्तिदंताचा, हस्तिदंतासारखा. I'voried *a.* हस्तिदंती कामासारखा. २ हस्तिदंतानें मढविलेला. I'vory black हाडें जाळून केलेली काळी पूड. ही पूर्वी हस्तिदंतापासून करीत असत.

I'vy (ī'vi) [A. S. *ifig*. Perhaps L. *apium*, parsley.] *n. a creeping evergreen plant on trees and walls* आयव्ही नांवाची लता *f*. I'vied, I'vyed, Ivy-man'tled *a.* आयव्ही लतेनें आच्छादिलेला.

*N. B.*:—There is no Indian plant corresponding to the English Ivy. Ivy belongs to the Natural Order Araliaceæ. Many species of the Genus Aralia are cultivated in our Bombay gardens for their beautiful foliage. An Indian plant named by our gardeners as तापमारी belongs to the Genus Aralia.